


# महाराष्ट्रीय ज्ञानकोश

## प्रस्तावनाखंड.

विभाग चवथा.

बुद्धोत्तर जग.

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर; एम्. ए. पीएच्. डी.

यांनीं

मंडळांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला.

१९२३

मुद्रक—हा ग्रंथ ज्ञानकोश छापखाना ८४१ सदाशिव पेठ पुणें येथें कंपोज करून चित्रशाळा, कलागृह वगैरे छापखान्यांत छापला.

प्रकाशकः—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड नागपूर, तर्फे श्रीधर व्यंकटेश केतकर, ८४१ सदाशिव पेठ, पुणें.

# ग्रंथालोक.



## नकाशे व चित्रें.




# प्रस्तावनाखंड.

## विभाग चवथा—बुद्धोत्तर जग.

### ग्रंथप्रवेश.

वेदोत्तर काल म्हणजे मुख्यतः कुरुयुद्धोत्तर काल. कुरुयुद्धानंतर थोडक्याच कालानें वैदिक वाङ्मयाचें संहितीकरण झालें. श्रौतसंस्थांच्या ऋत्विजांमध्यें पक्षभेद उत्पन्न होऊन यजुर्वेदाचे शुक्ल व कृष्ण असे भेद उत्पन्न झाले व त्यामुळें इतर वेदांचा उपयोग करणाऱ्यांमध्येंहि शाखांतरें उत्पन्न झालीं. श्रौतजीवी ऋत्विजांत जीवनकलहमूलक द्वैत चालू असतांच आरण्यकीय विचार उत्पन्न होऊन ज्ञानमार्गाकडे जनतेंतील विचारी वर्ग वळूं लागला असतां, श्रौतजीवी वर्गांतील पक्षभेदामुळें आणि ऋत्विग्मंडळाबाहेर असलेल्या सामान्य जनांमध्यें श्रौतधर्मस्वरूपमूलक निष्कर्तव्यता स्थापन झाल्यामुळें श्रद्धाविषय कधीं होत असलेला श्रौतधर्म लयास जाण्याच्या पंथास लागला होता. आरण्यकीय विचार सामान्य जनांस कर्में उत्पन्न करून देणारा नव्हता. फक्त पातंजल सिद्धांतानीं वैयक्तिक कर्मांचें महत्त्व वाढविलें; पण तीं कर्में फारशीं लोकप्रिय झालीं नाहींत; व्यावहारिक विषयावर नीतिवाक्यें आणि त्यांची पारमार्थिक व अधिक व्यापक विचाराशीं, आणि पारमार्थिक सोप्या कर्मांशीं जोड करून देणारीं कर्में यांनीं युक्त असे जे संप्रदाय उत्पन्न झाले त्यांत बौद्ध, जैन, शैव, भागवत; वीरशैव, वीरवैष्णव इत्यादि संप्रदाय उल्लेखिले पाहिजेत. तत्त्वज्ञानें परमार्थविषयक व्यापारूप विचार उत्पन्न करीत, आणि त्या विचारानीं औपनिषद वाङ्मय आणि लोकांमध्यें प्रचलित असलेल्या विविध उपासना यांची गति लावण्यात येई. औपनिषद विचार, विविध दर्शनें, ब्रह्मसूत्रें, पुराणें, गीता व ब्रह्मसूत्रावरील भाष्यें यांत उपबृंहित झाले, आणि ज्या सामान्य जनांस पितृमूलक उपासना करण्यापेक्षां जास्त पुढे जावयाचें असेल त्यास मार्गदर्शक झाले. ब्रह्मसमाज देखील औपनिषद विचारांवरच रचला गेला पण तो शंकर, रामानुज इत्यादि मतांपैकीं कोणत्याच मतास अंतिमत्व द्यावयाचें नाहीं, पारमार्थिक बाबतींत म्लेच्छ म्हणून समजलेल्या लोकांच्या विचारांत जे ग्राह्य असेल तेंहि घ्यावयाचें अशा तत्त्वांचा होता. वेदमूलक संस्कारधर्महि या समाजानें त्यागिला आणि त्यामुळें हिंदुस्थानांत त्यास पृथक्त्व उत्पन्न झालें आणि यामुळें त्याची सुधारलेली आवृत्ति जी प्रार्थनासमाज त्यानें पुढें संस्कारधर्मांचा त्याग केला नाहीं. आर्य समाजानें ब्राह्मणग्रंथपूर्व संहितोक्त धर्माकडे धांव मारली. येणेंप्रमाणें थोडक्यांत हिंदुस्थानच्या पारमार्थिक प्रयत्नाचा इतिहास देतां येईल. या इतिहासांतील उत्तरकालीन भागाशीं सामान्य वाचकवर्ग बराच परिचित असल्यामुळें त्यावर फारसें विवेचन प्रस्तावनाखंडांत करण्याची आवश्यकता वाटली नाहीं.

जगांत पारमार्थिक विचारांचा ओघ केवळ हिंदुस्थानांत उत्पन्न झाला नाहीं, पण त्याबरोबर हेंहि सांगितलें पाहिजे कीं पारमार्थिक विचारांची विविधता भारतीय संस्कृतींत जितकी दिसते तितकी अन्यत्र दिसत नाहीं. प्रत्येक संस्कृतींत विकास दिसतो. नरबली देऊन ईश्वरास संतुष्ट करण्याच्या पद्धतीपासून प्रवक्त्यांच्या आवेशयुक्त सद्वादित नीतिमय आणि ज्ञानमय भाषणांनीं जनतेस सन्मार्गास लावण्याच्या पद्धतीपर्यंत अनेक प्रकारचे प्रयत्न यहुद्यांच्या विकासामध्यें दृष्टीस पडतात; आणि प्रवक्त्यांच्या त्या प्रकारच्या प्रयत्नांचे भिन्नत्वाचे विकास ख्रिस्ती व महमद यांच्या उपदेशांत आढळून येतात. त्या प्रगतीचेंहि स्वरूप (सेमेटिक म्हणजे हिब्रू, अरबी यांशीं सदृश भाषा बोलणाऱ्यांच्या वंशांत उत्पन्न झालेल्या) वाङ्मयासह येथें प्रदर्शित केलें आहे. प्रस्तावनाखंडांत बहुतेक सर्व संप्रदायांचे आद्यग्रंथ वेदांप्रमाणेंच वर्णिले आहेत. जैनांच्या सर्व संप्रदायांस मान्य असे आद्यग्रंथ उपलब्ध नसल्यामुळें त्यांचें वर्णन येथें नाहीं. प्रत्यक्ष महावीराचीं वचनें आपणांस ठाऊक नाहींत; आणि भागवतानें उल्लेखिलेला महावीरपूर्व जैन तीर्थंकर ऋषभ याची तर आपणास निश्चित अशी मुळींच माहिती नाहीं. जैन वाङ्मय संप्रदायद्वैत स्थापन झाल्यानंतरचेंच आपणांस उपलब्ध आहे. कन्फ्यूशिअसचें अतिशय उच्च प्रकारचें सामाजिक तत्त्वज्ञान बुद्धपूर्वकालीन आहे. ब्रह्म आणि धर्म या दोन्ही कल्पना ज्या ताओ नांवाच्या शब्दांत व्यक्त होतात तें

ताओ नांवानेंच परिचित असलेलें तत्त्वज्ञान देखील बुद्धपूर्वकालीन असण्याचा संभव आहे. निदान बुद्धाच्या संप्रदायाचा प्रसार चीन देशांत होण्यापूर्वींचें तें खास आहे. म्हणून त्याचें विवरण प्रस्तुत विभागांत न करतां तिसऱ्या विभागांत केलें आहे. जपानचा शिंतो (बरोबर शेन ताओ; शेन=चांगला ताओ=धर्म, शिंतो=सद्धर्म) चिनी ताओचेंच एक स्वरूप असल्यामुळें त्यासहि येथें स्थल दिलेलें नाहीं.

जगाच्या इतिहासामधील एक मोठी क्रिया म्हटली म्हणजे अनेक लहान राष्ट्रकें अथवा राष्ट्रस्वरूपी जाती या एका मोठ्या राष्ट्राच्या अंकित होऊन मोठ्या शासनसंस्था उत्पन्न होणें. आजचीं लहान राष्ट्रें म्हणजे प्राचीन काळच्या अनेक राष्ट्रांच्या समुच्चयाएवढीं भासतील. विसदृश पण एकत्र झालेलीं राष्ट्रकें असतील किंवा सदृश जाती अगर राष्ट्रकें एकत्र झालीं असतील त्यांत आजच्या राष्ट्रांचा अंतर्भाव होतो. साम्राज्यें म्हणजे सामाजिक दृढीकरणाची क्रिया ज्यांत अपूर्ण आहे असे समाज. अनेक समाजांस व राष्ट्रांस, साम्राज्यांनीं एकसत्तेखालीं आणलें आहे. लहान राष्ट्रांच्या कालापासून आज तागाईत इतिहास यावयाचा म्हणजे बुद्धकालीन लहान लहान राष्ट्रांची जितकी व्यापक होईल तितकी यादी करून त्या राष्ट्रांनां आज थोडक्या राष्ट्रांच्या किंवा साम्राज्यांच्या सत्तेखालीं आणतांना काय प्रयत्न झाले त्यांचा इतिहास यावयाचा, म्हणजे इराण, ग्रीक व रोमन साम्राज्यें, मगध साम्राज्य व खलीफत देऊन नंतर शेवटच्या तीन साम्राज्यांच्या दौर्बल्याबरोबर यूरोपांतील राष्ट्रविकास कसा झाला हें यावयाचें. आणि राष्ट्रें साम्राज्यांचें धोरण अवलंबूं लागल्यानंतर भौगोलिक शोध कसे लागत गेले, आफ्रिका आणि अमेरिका हे भूभाग गोऱ्यांच्या तावडींत कसे गेले व आशियाहि जवळ जवळ कसा गेला हें दिलें पाहिजे व स्पेन, पोर्तुगाल, फ्रान्स, इंग्लंड, रशिया इत्यादि राष्ट्रांनीं तयार केलेलीं साम्राज्यें, साम्राज्यीकरणाच्या प्रयत्नांत उत्तरकालीं पडलेलीं जर्मनी व इटाली व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें यांचे प्रयत्न हीं सर्व चित्रिलीं पाहिजेत. स्वप्रदेशविकासाकरितां जी मारपीट होई तीविरुद्ध बॅलन्स आफ पॉवर म्हणजे शिरजोराविरुद्ध एकीकृत होऊन कोणासहि चढूं द्यावयाचें नाहीं या तऱ्हेची खटपट चालत होती तिचें वैयर्थ्य या महायुद्धानें सिद्ध होऊन जो राष्ट्रसंघ तयार झाला त्याचें विवेचन पहिल्या विभागांत दिलेंच आहे.

बुद्धोत्तर कालांत पारमार्थिक दृष्टीनें जे संप्रदाय उत्पन्न झाले त्या संप्रदायांमुळें राजकीय व सांस्कृतिक परिणाम जे झाले त्यायोगानें जगाचें स्वरूप कसें काय बदललें हा एक मोठा इतिहासाच्या अभ्यासकांचा विचारविषय असल्यामुळें मुसुलमान व बौद्ध यांच्या प्रयत्नांचे परिणाम सविस्तर दिले आहेत. ते देतांना सबंध जग हें विस्तीर्ण विचारक्षेत्र करून त्याचा ऊहापोह केला आहे. हिंदूंचा राजकीय इतिहास मुसलमानांच्या प्रवेशापूर्वी बराच विस्तृत आणि पुढील कालांत त्रोटक असा दिला आहे. या कालाविषयीं त्याच्या निकटत्वामुळें जिज्ञासा विशेष जागृत करण्यास नको म्हणून त्याविषयीं विवेचन शरीरखंडाकडे सोंपविलें आहे. राजकीय इतिहास व भौगोलिक शोध यांचा इतिहासक्षेत्रांत फार निकट संबंध असल्यामुळें त्याविषयीं विवेचन सविस्तर सांपडेल.

सध्यांचा एक विचाराचा महत्त्वाचा विषय म्हटला म्हणजे राष्ट्रीकरण होय. राष्ट्रीकरण देशांत कोणकोणत्या राजकीय व सामाजिक परिस्थितीमुळें उत्पन्न झालें त्याविषयीं समाजशास्त्रीय नियम काढण्यास जें इतिवृत्ताचें विधान पाहिजे तें या भागांत विशेष सविस्तर केलेलें आढळून येईल. लॅटिन व संस्कृत यांसारख्या सांस्कृतिक व व्यापक भाषांपासून विशिष्ट प्रांतिक किंवा राष्ट्रीय भाषांचा विकास कसा होत गेला हा विचार देखील राष्ट्रीकरणाच्या विचाराशीं संबद्ध आहे.

प्रस्तुत विभागांत तात्त्विक विवेचन फारसें सांपडणार नाहीं पण जगांतील अनेक होणाऱ्या गोष्टी, विशिष्ट क्रियेचा अंश म्हणून विवेचन करण्यांतच इतिहासशास्त्राचें तात्त्विक विवेचन मुख्य पहावें लागतें. जगाचा सर्व इतिहास कांहीं विशेष क्रियापर्यंत दाखविणें आणि विशेष कार्यपरंपरेंत दृष्ट नियमांचा विकास दाखविणें हें इतिहासशास्त्राचें काम आहे. तें कसें काय झालें आहे तें ग्रंथाच्या वाचनानेंच समजेल.

दक्षिण अमेरिकेचा स्थानिक इतिहास येथें दिला नाहीं. यूरोपीयांनीं त्या प्रदेशाचें यूरोपीभवन कसें केलें येथपर्यंत इतिहास आणिला आहे. त्या कालापासून आजचीं राष्ट्रें स्पानिश व पोर्तुगीज सत्तेशीं बंड करून कशीं स्वतंत्र झालीं याचा इतिहास, ब्रेझिल अर्जेंटाइन रिपब्लिक वगैरेसारख्या शरीरखंडांत दिलेल्या देशवर्णनांत सांपडेल. तसाच हिंदुस्थानांतील आजच्या शेंकडों संस्थानांचा इतिहास शरीरखंडांतच सांपडेल. दक्षिण अमेरिकेंतील संस्थानें व हिंदुस्थानांतील संस्थानें हीं दोन्ही जागतिक राजकारणाचा फारसा भाग नाहींत.

हा ग्रंथ तयार करतांना, रा. रा. यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए. एलएल. बी.; रा. रा. सर्वोत्तम वासुदेव देशपांडे, बी. ए.; रा. रा. लक्ष्मण केशव भावे, बी. ए.; रा. रा. चिंतामण गणेश कर्वे, बी. ए. यांची विशेष उल्लेखिण्याजोगी मदत झाली आहे.

श्रीधर व्यंकटेश केतकर.

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश-प्रस्तावनाखंड

## विभाग चौथा—बुद्धोत्तर जग

### ग्रंथसंक्षेप.

### प्रकरण १ लें.

### चोवीसशें वर्षांतील जगद्विकास.

(पृ. १-४)

या कालांतील प्रचंड माहितीचा थोडक्यांत गोषवारा. केवळ निवेदनात्मक इतिहास म्हणून नव्हे तर विकासात्मक नियमांनीं सांगितलेले अनेक इतिहास या अर्थानें येथें द्यावयाचा आहे.. इतिहासलेखनाकरितां दोन कालविभाग—(१) ख्रिस्तपूर्व ५०० ते ख्रिस्तोत्तर १५०० पर्यंत; व (२) इ. स. १५०० पासून आजपर्यंत असे पाडिले आहेत: पृ. १—राष्ट्रस्वरूपी समुच्चयांचें घटन विघटन: प्राचीन भाषा व त्यांच्या प्रामुख्याचा काल; मुसुलमान. ख्रिस्ती, बौद्ध संप्रदाय आणि ब्राह्मणसंस्कृति यांचे भूभागावर सादृश्योत्पादक परिणाम या गोष्टी इतिहासलेखनांत आणावयाच्या आहेत. यूरोपीय इतिहासांतील प्रमुख व्यापक क्रिया. यूरोप आणि इतर जग यांचा इ. स. १५०० पूर्वीचा संबंध: पृ. २—जगद्व्यापक महा चळवळी. लहान राष्ट्रांच्या इतिहासांत दोन क्रिया महत्त्वाच्या आहेत: (१) परस्परसंबंधनिर्णायक; (२) अंतर्गत रचनानिर्णायक. महत्त्वाच्या इतिहासविषयक पांच क्रिया. जगाचा सांस्कृतिक इतिहास लिहितांना लक्ष्यांत ठेवावयाच्या गोष्टी: (१) एका राष्ट्राचा इतर राष्ट्रांवर ताबा; (२) संप्रदायाची उत्पत्ति, विकास व व्याप्ति; (३) संस्कृतिसंवर्धकांच्या पांडित्यामुळें त्यांचा प्रसार. वाङ्मयावरच जगद्विकाससूचक क्रिया व्यक्त करण्याची जास्त भिस्त असते. वाङ्मयें सांप्रदायिक किंवा राष्ट्रीय स्वरूपांत प्रथम उत्पन्न होऊन पुढें सांस्कृतिक स्वरूप पावतात; पृ. ३—ब्राह्मण जातीचा इतिहास व बौद्धसंप्रदाय यांचा जगाच्या संस्कृतीशीं संबंध आहे, तसेंच पाश्चात्य संस्कृतीचा जगाच्या इतिहासांत मुख्य भाग आहे. पृ. ४.

---

### प्रकरण २ रें.

### लहान राष्ट्रांचा काल.

(पृ. ४-२२)

हिरोडोटसच्या इतिहासांत बुद्धकालीन जीं राष्ट्रें सांपडतील त्या राष्ट्रांचा परामर्ष यापुढें घेतला आहे; पृ. ५—हिरोडोटसच्या इतिहासांत उल्लेखिलेलीं राष्ट्रें (याद्या). पृ. ५-९. हिरोडोटसमध्यें उल्लेखिलेल्या लोकांचें प्रांतवार वर्गीकरण: पृ. १०—हिंदुस्थानचा व इतर आशियाचा परामर्ष पुढें घेण्यांत येईल. सध्यां यूरोपच्या घटनेकडे दृष्टि ठेविली आहे. ज्यूलिअस सीझरनें आपल्या कॉमेंटरी नांवाच्या ग्रंथांत ज्या जातिस्वरूपी राष्ट्रांचा उल्लेख केला आहे तीं राष्ट्रें (याद्या): पृ. ११-१८—या राष्ट्रजातींचें देशवार वर्गीकरण: पृ. १८—भारत भीष्मपर्व अध्याय ९ यांत आलेले देश (याद्या): पृ. १९—महाभारतांत पांडव दिग्विजयांत आलेले निरनिराळ्या दिशांचे देश (याद्या): पृ. २०—बृहत्संहितेंत सांगितलेले निरनिराळ्या दिशांचे देश: पृ. २१.

[संदर्भग्रंथ.—हिरोडोटस. सीझर-कॉमेंटरीज. भारत-भीष्मपर्व. बृहत्संहिता. शं. बा. दीक्षित-भारतवर्षीय भूवर्णन (प्राचीन). ज्ञानकोश विभाग ३ रा].

---

### प्रकरण ३ रें.

### इराणचें सत्तावर्धन.

(पृ. २२-६५)

बुद्धाच्या अगोदर १००वर्षांपासून ख्रिस्तापर्यंतचा काळ निरनिराळ्या राष्ट्रांच्या केवळ युद्धविषयक संपर्काचा काल नसून बौद्धिक देवघेवीचाहि काल होता. अनेक देवतांचें प्राचीन एकत्व या सुमाराच्या काळांत जरा बदलल्यासारखें दिसत होतें परंतु एका समुच्चयास दुसऱ्याचीं दैवतें अमान्य नव्हतीं; पृ. २२—झरथुष्ट्राचें आपल्या प्रदेशांतील कार्य हें वासुदेव, महावीर, गौतम, चार्वाक व आरण्यक धर्माचे अनेक प्रणेते यांच्या कार्याशीं सदृश आहे. इ. स. च्या ५ व्या शतकांत मझ्दक पंथाचा उदय होऊन ससन घराण्याच्या साम्राज्यांत तो बलिष्ठ होऊन राहिला; पृ. २३—आपल्या अनुयायांनीं सर्व मालमत्ता व कुटुंबें सर्वांच्या समाईक मालकीचीं आहेत असें समजावें असा एक मझ्दकानें नियम घालून दिला होता. मझ्दकी पंथाच्या चळवळीला धार्मिक स्वरूप फार होतें, झरथुष्ट्र धर्मांतील अज्ञान व अनीति यांचा विध्वंस करून सद्धर्म स्थापणें हाच उद्देश समाजसत्ताक पंथ स्थापन करण्यांत मझ्दकाच्या पुढें होता; पृ. २४—वैधधर्मापेक्षां कांहीं नवीन विचारसंप्रदायांस प्राधान्य मिळविण्याची जी क्रिया निरनिराळ्या राष्ट्रांत झाली ती क्रिया होत असतां अदृश्यशक्तिमूलक बलाचा म्हणजे दैवीसंचाराचाच आश्रय प्रवर्तकांस घ्यावा लागला. येशू ख्रिस्ताचा झगडा केवळ

धार्मिक विधींशीं नसून त्याचा हेतु राजकीयहि असावा. झरथुष्ट्रीधर्म हा पारशींचा राष्ट्रीय धर्म नसून तो राष्ट्रांतर्गत किंवा राष्ट्रधर्मांतर्गत संप्रदाय आहे; पृ. २५—हओम विधीविषयीं गाथांमध्यें उल्लेख नाहीं. त्यांमधील सुधारणेचे हेतु दोन प्रकारचे—धर्मशुद्धि व ईश्वर विषयक प्रगत कल्पनांचें निवेदन; आणि शेतीचा धंदा करण्याची सामाजिक सुधारणा—आहेत. झरथुष्ट्र ही व्यक्ति ऐतिहासिक कीं काल्पनिक याचा उलगडा अद्याप झाला नाहीं. गाथांमध्यें पुढें प्रचारांत आलेल्या एकाहि रूपकात्मक गोष्टीचा मागमूस नाहीं; त्याचे नातेवाईक व शिष्य पूर्णपणें मानवी प्राणी आहेत; पृ. २६—झरथुष्ट्र हा कोणी मोठा धार्मिक सुधारक असावा. गाथाकार कवी कोण होते हें समजत नाहीं. ते आपणांस गाथांचे द्रष्टे समजत एवढें खरें; पृ. २७—पुरोहितांच्या उच्च दर्जाची व श्रेष्ठ हक्कांची कल्पना गाथाकारांत होती. मझ्दकधर्माचें मूळ ठिकाण मुख्य इराण (पर्शिया) नव्हे. तो वायव्य किंवा उत्तर इराणांत जन्म पावून खालीं मीडियांत व पूर्व इराणांत प्रसार पावला असावा; पृ.२८—यहुद्यांमध्येंहि झरथुष्ट्र संप्रदायाचा परिणाम होऊन धर्मविषयक क्रान्ति झाली; पृ. २९.

बौद्ध व ख्रिस्ती वाङ्मयामध्यें बरींच साम्यस्थलें आहेत; पृ. २९—ख्रिस्ती पवित्र ग्रंथांनां बौद्ध ग्रंथ आधारभूत आहेत असें सेडेल, डेनबर्ग व एडमंड्स यांचें मत आहे. बुद्धजन्मकथा व ख्रिस्तजन्मकथा यांत सादृश्यापेक्षां विरोधच फार आहेत असें डॉ. विंटरनिटझचें मत आहे; पृ. ३०.

असित व सिमिऑन यांच्या कथा, तसेंच बुद्ध व ख्रिस्त यांच्या चमत्कारांविषयींच्या कथा परस्परसंबंध असल्यावांचून उत्पन्न झाल्या नाहींत. बुद्ध व ख्रिस्त यांच्या मृत्युकथांमध्यें साम्य दाखविण्याचा केलेला प्रयत्न चुकीचा आहे; पृ. ३१—दृष्टांतकथांतील परस्परसंबंध दन्तकथांपेक्षां कमी आहेत. चार शुभवर्तमानांची बौद्ध ग्रंथांशीं तुलना केल्यास त्यांत ऐक्यभावापेक्षां फरकच पुष्कळ आढळतात. बौद्ध वाङ्मयाचा ख्रिस्ती वाङ्मयावर प्रत्यक्ष नसला तरी अप्रत्यक्ष परिणाम झालेला आहे. बार्लाम व जोसाफेट ही ख्रिस्ती समाजांत लोकप्रिय झालेली कथा बुद्धकथेच्या आधारावर रचलेली आहे; पृ. ३२—यूरोपखंडातील विविध वाङ्मयांत घेऊनहि उरलेल्या बौद्ध वाङ्मयावशिष्टांत विश्ववाङ्मयांत अंतर्भूत करण्यासारखा पुष्कळ भाग शिल्लक आहे. पश्चिमेकडील विचारांवर भारतीय विचारांचा परिणाम होणें अगदीं शक्य आहे. हिरोडोटसचें हिंदुस्थानासंबंधीं ज्ञान कितपत होतें हें दाखविण्याकरितां त्याच्या ग्रंथांतून घेतलेले उतारे; पृ. ३३—इ.स. च्या चौथ्या शतकांत ख्रिस्ती व मिश्र संप्रदाय यांच्या झगड्यांत मणिसंप्रदायाचा उदय झाला; पृ. ३४—मणीचें चरित्र व त्यानें लिहिलेले ग्रंथ. या संप्रदायांतील तत्त्वांत जगांत अहर्मी दिसून येणाऱ्या विरोधांची उपपत्ति लावलेली आहे; पृ. ३५—याच्या तत्त्वांप्रमाणें प्रकाश व तिमिर या दोन वस्तूंचें जग बनलें आहे व या दोहोंत अव्याहत लढा चालू आहे—मणिसंप्रदायांतील आचारनीति; प्रकाशितत्त्वाला आचारांत विशेष महत्त्व असे; प्रापंचिकांनां बरीच सोडवणूक ठेविली होती. मणिसंप्रदायाची उभारणी अवेस्तावर केली होती व त्याचा ख्रिस्ती संप्रदायाशींहि धागा लागतो; पृ. ३६—बौद्धसंप्रदायाचें ज्ञान मणीला असून त्यांतील बरींच तत्त्वें त्यानें आपल्या संप्रदायांत उद्धृत केलीं आहेत. शिस्त, सोइस्करपणा, सुज्ञपणा व जुन्याशीं सांगड या योगानें हा संप्रदाय जलद प्रसार पावला. संप्रदायाचा इतिहासः पूर्वेकडे हिंदुस्थान चीनपर्यंत, पश्चिमेकडे रोमनराज्य व उत्तर आफ्रिका येथवर हा संप्रदाय पसरला; ख्रिस्ती धर्माशीं त्यानें निकट संबंध जोडला; १३ व्या शतकांत तो लयास गेला; पृ. ३७.

पूर्वी इराण हें राष्ट्र नसून त्या प्रदेशांत अनेक राष्ट्रजाति होत्या. इराणी पातशाहीमुळें पूर्व व पश्चिम यांचा संबंध आला. पर्शुभारतीयकालापासून सायरसच्या कालापर्यंतचा इतिहास अज्ञात आहे. प्राचीन इराणी इतिहासाचे कालविभाग— (१) पर्शुभारतीय, (२) वसाहतकाल, (३) पौराणिक, (४) अकिमिनियन, (५) ग्रीक सत्तेचा काळ, (६) पृथुप्रामुख्याचा काल, (७) सस्सन राजांचा काल; पृ. ३८—प्राचीन इराणी इतिहासावर प्रकाश पाडणारे ग्रंथ. वसाहतकालीं इराणी लोक पश्चिमेकडे बरेच लांब पसरले होते; सुदासाच्या मदतीस वेदपूर्वकालीं ते हिंदुस्थानांत आले होते; पृ. ३९—इराणी लोकांच्या जाती (यादी). इराणी व हिंदु पारमार्थिक विचारांत साम्य व भेदहि आहे. पारश्यांच्या धर्माचा संस्थापक झरथुष्ट्र नव्हे; तो एक धर्मसुधारक होता; पृ. ४०—मिडियाच्या साम्राज्याबद्दल विश्वसनीय माहिती मिळालेली नाहीं. त्यांचा कालहि निश्चित केला गेला नाहीं; पृ. ४१.

पौराणिक काळ फार प्राचीन असून त्याविषयीं पुरी माहिती नाहीं; त्यांतील कथा रम्य आहेत. कांहीं पौराणिक राजे—कैओमूर्स, शहा जमशीद, झोहॉक, फेरिदून, मिनोश्चेहर, न्यूदेर—कैकोबाद, कैकऊस, यांच्या कारकीर्दी; पृ. ४१—कैकऊसचा नातु सायरस याच्यापासून इराणच्या ऐतिहासिक कालास आरंभ होतो; पृ. ४२—पूर्वी इराणांत इराणी लोकांशिवाय परकीय असंख्य जाती वास्तव्य करून होत्या; पृ. ४३—इराणी लोकांचें मूलस्थान कोणतें याविषयीं वाद व ते दक्षिण रशियांतून आले असावेत अशी एक कल्पना. अकिमिनिअन घराण्याची राजावली. सायरसनें इराणी राज्याची स्थापना करून पुष्कळ राज्यें अंकित केलीं. दरायसनें राज्याची घटना उदार व स्वतंत्र धोरणावर रचली; पृ. ४४—पर्शियन लोक जित राष्ट्रांनां चिरडून न टाकतां त्याविषयीं सहानुभूति दाखवीत व त्यांनां मंत्रिमंडळांत घेत. पर्शियन (जेते) लोकांनां विशेष सवलती असून, राज्य त्यांच्या तंत्रानें चाले; राष्ट्रीयत्वाची खरी कल्पना इराणी राज्यांत त्या वेळीं होती; पृ.४५—इजिप्त व बाबिलोन या जित राष्ट्रांची सहानुभूति मिळविण्याकरितां दरायस झटत असे;

तथापि तेथें बंडें झालींच. वजीर व सात मंत्री राज्यकारभार पहात; राज्यांत पर्शियन भाषा व अरमइक लिपि चाले; राज्यांत २५ प्रांत [क्षत्रपी] व प्रत्येक प्रांतावर एक क्षत्रप असे; त्यांतील जित जातींना बरेंच स्वातंत्र्य असे; पृ. ४६—नगरसंस्थानांची स्वतंत्र स्वायत्त राज्यघटना होती. देशांत नाणीं वापरण्याची पद्धत होती; दरबारांत "नैसर्गिक विनिमयपद्धति" चा उपयोग होई; पृ. ४७—साम्राज्याचा विस्तार पूर्वेस पामीर पठार व पश्चिमेस सिथियनांचा प्रदेश थ्रेस व मॅसिडोनिया येथवर झाला असून राज्यांत सुधारणाहि पुष्कळ झाल्या. ग्रीक लोकांनीं इराणी लोकांचा पाडाव करून आपले प्रांत परत मिळविले तरी इराणी साम्राज्यावर हल्ला चढविण्याची त्यांच्यांत कुवत नव्हती; पृ. ४८—यापुढें साम्राज्याची वाढ खुंटली व देशांत बंडाळी सुरू झाली. एक एक प्रांत हातावेगळा होऊं लागला. इराणी लोकांनीं ख्रि. पू. ४ थ्या शतकांत ग्रीकांवर पुन्हां विजय मिळविला व सर्व बाबतींत श्रेष्ठ अशा ग्रीकांनां आशियांतील दुर्बळ राजांच्या कह्यांत रहावें लागे.; पृ.४९—ही टोंचणी लागूनच मॅसिडोनचा उत्कर्ष झाला व त्यानें इराणी साम्राज्य जिंकून तेथील लोक व ग्रीक यांनां एक करण्याचा प्रयत्न केला; पृ. ५०—अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर त्याच्या राज्यांतील एकतंत्रीपणा जाऊन सेनापती राजे बनले. सिल्यूकस व त्याचा मुलगा यांच्या कारकीर्दीत इराणांत नवीन ग्रीक शहरें वसून, तीं व्यापार व उद्योगधंद्यांचीं केंद्रस्थानें बनलीं. ग्रीक लोकांनीं इराणी लोकांच्या धर्मांत मुळींच हात घातला नाहीं; पृ. ५१—सिल्यूकसच्या मृत्यूनंतर त्याच्या राज्यास उतरती कळा लागली. बॅक्ट्रिया पार्थियासारखीं नवीन राज्यें निर्माण होऊं लागलीं. रोमन लोकांनीं सिल्यूकिडी राज्य नष्ट करण्याला सुरुवात केली. ख्रि. पू. दुसऱ्या शतकांत पार्थियन साम्राज्याचा मोठाच विस्तार झाला; पुढें त्याचा सिथियनांशीं झगडा होऊन त्याला उतरती कळा लागली. रोमन लोकांशीं त्याचा तंटा होताच; पृ. ५२—पार्थियनांनां बलाढ्य राज्य स्थापितां आलें नाहीं. त्यांची सत्ता अल्प होती. ते इराणी लोकांशीं संलग्न झाले होते. पार्थियन व रोमन लोकांच्या लढाया होऊन रोमन लोकांनीं अलेक्झांडरनें काबीज केलेले प्रदेश आपणांकडे घेतले; पृ. ५३—आगस्टस व हेड्रियन या रोमन बादशहांचें धोरण पार्थियनांशीं फार सलोख्याचें होतें; एक राजा जाऊन दुसरा राजा येणें हें त्या काळांत रोजचेंच झालें होतें. या काळांत अरमइक संस्कृतीचा फैलाव झपाट्यानें होत होता; पृ. ५४—पार्थियन राजांची यादी. इ. स. २१२ मध्यें अर्देशिरनें सस्सन साम्राज्य इराणांत स्थापिलें व पार्थियन लोकांनां तेथून हांकून लाविलें; पृ.५५—त्याचा मुलगा शापूर यानें राज्यविस्ताराची खटपट केली पण त्याचा विस्तार पार्थियन साम्राज्याहून मोठा झाला नाहीं. सस्सन राजे अकिमेनिड राजांप्रमाणें आपणांस सर्वसत्ताधीश व सर्वगुणसंपन्न म्हणवून घेत, तथापि त्यांचें वर्चस्व अॅकिमेनिड राजांइतकें नव्हतें; पृ. ५६—सस्सन राजांच्या काळीं झरथुष्ट्रसंप्रदायाचा बराच विकास झाला; त्याकरितां जुलूमहि होत असत. सस्सन राजांची यादी; पृ. ५७—सस्सन लोकांच्या रोमन लोकांशीं नेहमीं लढाया होत; तसेंच ख्रिस्ती संप्रदाय त्या काळीं बळावत चालला होता; पृ. ५८—इराणला श्वेतहूण नांवाचे नवीन शत्रु उत्पन्न झाले. पहिला व दुसरा खुशरू हे मोठे राजे होऊन गेले. दुसऱ्या खुशरूनें इ. स. ६०७–६१९ पर्यंत बरीच मुलुखगिरी केली; पृ. ५९—इ. स. ६३३ त अरब सैन्य इराणांत घुसलें व त्यानें थोड्याच वर्षांत सस्सनांनां हांकून लावून इराणांत आपली सत्ता स्थापिली; पृ. ६०.

[संदर्भ ग्रंथ.—डॉ. मोदी–जर्नल ऑफ दि अॅन्थ्रोपॉलॉजिकल सोसायटी ऑफ बॉंबे व्हॉ. ९ नं. ८. एन्सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अॅंड एथिक्स–मझ्दक. तबारी. नोल्डेके. यस्न ४३. इंडियन अॅंटिक्करी पु. ३४. वेंदिदाद. विंटरनिट्झ—इंडियन लिटरेचर. बुद्धिस्ट पीरियड. सेडेल–डाय बुद्धलीजेंडे. बायबल. वॉन व्हान एसिगचा ग्रंथ (१८८२ लिपझिग). एडमंड्स–बुद्धिस्ट अॅंड ख्रिश्चन गॉस्पेल्स केंपअॅंडे, फिलाडेल्फिया १९०८–९. महापरिनिब्बानसुत्त. जातकें. अश्वघोष–सूत्रालंकार [चिनी भाषांतर] सद्धर्मपुंडरीक. मज्झिमनिकाय. एडवर्ड लेहमन–बौद्धधर्मावर ग्रंथ, टयुबिन्जेन १९११. ललितविस्तर. एडविन आर्नोल्ड–लाइट ऑफ एशिया. ज्ञानकोश–विज्ञानेतिहास. हिरोडोटस. फर्वर्दिनयस्न. एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका–मॅणिकिझम. दि स्टोरी ऑफ दि नेशन्स–पर्शिया. झेनोफोन–अॅनॅबेसिस हेलेनिका. ब्रिटानिका–मीडिया. आर्नोल्ड–सोराब अॅंड रुस्तुम. ब्रिटानिका–पार्शिया.]

---

## प्रकरण ४ थें.

## ग्रीक संस्कृतीची व्यापकता.

[पृ. ६०–८६]

या प्रकरणांत ग्रीसच्या इतिहासांतील गोष्टींचे कार्यकारणभावात्मक विवेचन व एकंदर सांस्कृतिक वाढीमध्यें हेलेनिक भागाचें महत्त्व किती हें दाखवावयाचें आहे. ग्रीसच्या इतिहासाला आरंभ ख्रि.पू.३ऱ्या किंवा ४थ्या शतकापासून धरतात. पुराणवस्तुयुग व ऐतिहासिक युग यांमध्यें मोठें खिंडार आहे. मिनोई व मायसीनी काळांत व्यापार चांगला चालत असून त्याबरोबर वसाहतीहि वाढल्या होत्या; पृ.६१—७व्या शतकांत अनेक एकतंत्री (टायरंट) राजे उत्पन्न झाले, पण त्यांच्यापासून अनेक दृष्टींनीं फायदेच झाले. ग्रीकांची पर्शियनांबरोबर युद्धें होऊन शेवटीं पर्शियनांचा पुरा मोड झाला; पुढें सर्वत्र लोकशाही स्थापन झाली; पृ. ६२—महायुगांत (ख्रि. पू. ४८०–३३८) अथेनिअन, स्पार्टन, थीबि यांसारखीं नगरराज्यें अस्तित्वांत आलीं व त्यांच्यांतच दुही माजून

राहिलीं व मॅसिडोनियाचा उदय झाला; पृ. ६३.—अलेक्झांडर यानें विश्वसाम्राज्य व विश्वसंस्कृति स्थापन केली. त्याची हिंदुस्थानावर स्वारीः त्यानें प्रथम सरहद्दीवरील डोंगरी जातीचा बंदोबस्त करून, पोरसशीं लढाई दिली व त्याचा पराभव करून बियासनदीपावेतों मुलूख जिकला; पृ. ६४—पुढें त्याच्या सैन्यांत निरुत्साह उत्पन्न झाल्यामुळें तो माघारा फिरला व सिंधूच्या मुखापर्यंत जलमार्गानें आला. तेथून जिड्रोसिया व इराण या मार्गानें बाबिलोनला गेला वाटेंत त्याला पुष्कळांशीं लढावें लागलें; पृ. ६८—ग्रीकांच्या या स्वारीचा हिंदुस्थानांत मुळींच मागमूस राहिला नाहीं; पृ. ७३.

ग्रीकसंस्कृतिविकासाच्या इतिहासाचे शिकंदरपूर्व आणि शिकंदरोत्तर असे दोन भाग पडतात; पृ. ७३—अलेक्झांडर-पूर्वी वाङ्मय, कला, शौर्य इत्यादि गोष्टींमुळें ग्रीकांचा प्रसार सर्वत्र झाला; इराण, फिनीशिया केरिया व लिशिया, दक्षिण रशिया, इजिप्त, मॅसिडोनिया व इटाली या राष्ट्रांतून ग्रीक संस्कृति फिरली होती हें स्पष्ट दिसतें; पृ. ७४—ग्रीकसंस्कृति नगरराज्यांच्या विकसित संस्कृतीपासून निष्पन्न झाली असल्यानें अलेक्झांडरनें सर्वत्र ग्रीक शहरें वसविल्यावर तिचा प्रसार सुलभ झाला. ग्रीक प्रदेश विस्तीर्ण झाल्या-बरोबर त्या संस्कृतींतहि फरक पडला; नगरराज्यें खालावत गेलीं; कला व वाङ्मय यांत भावनोद्दीपक कृत्रिमपणा आला; पूर्वेकडील पारमार्थिक विचारांचा ग्रीक धर्मकल्पनांवर परिणाम झाला; पृ.७६—हिंदुस्थानावर ग्रीक संस्कृतीचा परिणाम ज्यास्त कलाकौशल्यांत मात्र झाला; पृ. ७८—इराणांत ग्रीक संस्कृतीचा प्रसार नक्की अजमावतां येत नाहीं, तथापि राजशासनांत तिची छाप पूर्णपणें पडली होती; बरेचसे ग्रीक पंडित येथें जन्माला आले; पृ. ७९—आशियामायनर-च्या अंतर्भागांत ग्रीक शहरें उदयास येऊन ग्रीक संस्कृतीचा तेथें प्रसार झाला; पृ. ८१—रोमन अंमलाखालीं देखील ग्रीक संस्कृति आशियामायनरमध्यें फैलावत होती. सिरियांतील ग्रीकवसाहतींमुळें तेथें रोमनकाळांतहि ही संस्कृति वाङ्मय व व्यवहार यांत शिरली;पृ. ८२—यहुद्यांवरहि या संस्कृतीचा पगडा बसून यरुशलेमपर्यंत ग्रीक आचार विचार पोंचले होते; पृ. ८३—इजिप्तमध्यें अलेक्झांड्रिया-खेरीज कोठेंहि ग्रीक संस्कृति रुजली नाहीं; पृ. ८४—दुसऱ्या टॉलेमीच्या वेळेपासून इथिओपियांत या संस्कृतीच्या प्रसारास सुरुवात झाली. ख्रि. पू. ३ ऱ्या शतकापासून इटालींत ग्रीक संस्कृति शिरूं लागली. ग्रीक संस्कृतीचा उत्तरकालीन इतिहास म्हणजे, पूर्वेकडे ती इस्लामी संस्कृतींत लुप्त झाली व पश्चिमेकडे कांहीं काळ मृत व पुन्हां उज्जीवित या क्रमानें तिचा प्रवाह चालला आहे; पृ. ८५.

[संदर्भग्रंथ.—आरिस्टॉटल—"ग्रीक संस्थानांतील राज्यपद्धति". ब्रिटानिका—ग्रीस. रिजवे—दि अर्ली एज ऑफ ग्रीस. स्मिथ—अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. डार्मेस्टेटर—झेंद अवेस्ता. डॉ. मिल्स—गाथा. बायबल. कर्टियस—हिस्टरी ऑफ ग्रीस. थुसिडिडीझ. हिरॉडोटस. झेनोफोन—हेलेनिका. आरिस्टोफेन्स—लिसिस्ट्रेटा. मेन-अर्ली इन्स्टिट्यूशन्स. डिमॉस्थिनीझ—ऑन दि क्राऊन, फिलिपिक्स. ॲरियन—ॲनॅबॅसिस. हिस्टोरियन्स हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड—ग्रीस.]

---

## प्रकरण ५ वें.

## रोमन संस्कृति.

(पृ. ८६—११६.)

रोमन संस्कृति म्हणजे मूळ रोम या एका शहराची संस्कृति होय. रोमन लोकांनीं कायदे व राज्यकारभार व ग्रीकांनीं वाङ्मय व ललितकला यांत प्रावीण्य मिळविलें होतें;पृ.८६—आद्य राजसत्ताक काळ ( ख्रि. पू. ७५३—५१० ).—या काळांत सात राजे होऊन गेले. राज्यकारभार लोकांच्या विचारानें चाले. प्रत्येकाला उत्तम नागरिक होण्याचें शिक्षण दिलें जाई. या काळचे रोमन लोक नीतिमत्तेंतहि वरच्या दर्जाचे ठरतील;पृ. ८७—लोकसत्ताक काळ, पूर्वार्ध (ख्रि. पू. ५१०—१३१ ).—रोमन लोकांनीं सर्व इटाली देश जिंकून कार्थेज व मासिडोनिया येथील राजसत्ताहि भुलीस मिळविल्या. या काळीं कॉन्सल कोणालाहि होतां येत असे. मात्र तो अनुभवी व प्रौढ असावा लागे. सेनेट हीच सर्वसत्ताधारी असे. समाजांत गुलामपद्धति रूढ होती. ललितकला रोमन लोकांनीं संपादिली नाहीं. या वेळीं रोमन वाङ्मयाला सुरुवात झाली; पृ. ८९—लोकसत्ताक काळ, उत्तरार्ध ( ख्रि. पू. १३७—३९ ).—या काळीं आपआपसांत रोमन लोकांची यादवी सुरू झाली. कॉन्सल व ट्रिब्यून यांत तंटे होऊं लागले व वक्तृत्वकलेला फार ऊत आला. सामाजिक स्थिति विस्खलित व अवनत अशी झाली;पृ.९२—बादशाही सत्तेचा काळ (ख्रि. पू. ३०—इ. स. ४७६).—हा अवनतीचा काळ समजतात पण तें बरोबर नाहीं;पृ.९५—याचे तीन विभाग—आगस्टाइन काळ, भरभराटीचा काळ व अवनतीचा काळ. आगस्टाइन काळ सुखशांतीचा असून त्यांत वाङ्मयाला बरेंच उत्तेजन मिळालें. आधुनिक ब्रिटिश साम्राज्याशीं त्याची तुलना करण्यांत येते; पृ. ९६—बादशाही अंमलाच्या पहिल्या दोन शतकांत राज्यकारभाराला लष्करी सत्तेचें स्वरूप आलें. रोमनें बरीच मुलुखगिरी केली. पण देशांत दारिद्र्य वाढलें व चैनीकडे समाजाची प्रवृत्ति वळली. लेखनव्यवसाय व ग्रंथालयें मात्र वाढलीं. पूर्वी स्त्रियांवर फार जुलूम होत असत. वैवाहिक नीतिमत्ताहि फार निकृष्ट दर्जाची होती. पालकाला पाल्यावर अनियंत्रित सत्ता असे. गुलाम पाळण्याची चाल सर्वत्र दिसून येई. या चालीचा रोमन समाजावर अनिष्ट परिणाम झाला. करमणुकीचे प्रकार विविध असून त्यांतील कांहीं

प्राणघातकहि असत. लोकांची ईश्वरश्रद्धा या काळीं डळमळूं लागली होती. स्टोइक पंथ बळावत चालला. रोमन साम्राज्यांत खिस्ती संप्रदायी लोकांचा छळ होऊं लागे; पृ. १०८—रोमन बादशाहीच्या अखेरच्या तीन शतकांत साम्राज्याचे पूर्व व पश्चिम असे दोन भाग झाले. साम्राज्य संकुचित होऊं लागलें. रानटी जर्मानिक टोळ्यांचे त्यावर हल्ले होऊन इ. स. ४७६ मध्यें रोमन साम्राज्याचा अंत झाला या काळांतील महत्त्वाची कारकीर्द कॉन्स्टंटाइन दि ग्रेटची; तो सहकुटुंब खिस्ती बनला; पृ. १०९—रोमन राष्ट्रांतील एकंदर जोम कालमानाबरोबर कमी कमी होत गेल्यामुळें या बलाढ्य साम्राज्याचा अंत झाला; पृ. ११०—हिंदुस्थान व रोम यांमध्यें प्राचीन काळापासून व्यापारी दळणवळण होतें. त्याच प्रमाणें वकिलातीच्या रूपानें प्रत्यक्ष संबंधहि घडून येत; पृ. १११.

[ सं द र्भ ग्रं थ.—हिस्टोरियन्स हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड—रोम. ल्युक्रेशियस—दि नेचर ऑफ दि युनिव्हर्स. व्हर्जिल—इनीयड. एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका—रोम. युसेबिअस—'जॉर्जिअस सिंकेलस यांची शकावली'. प्लिनि-लेटर्स.]

---

## प्रकरण ६ वें.

### भारतीय युद्धापासून बुद्धापर्यंतचा काळ.

### [पृ. ११०-१२८.]

या काळांत संस्कृतिविकास फारसा झाला नाहीं तरी औपनिषद विचारांचा प्रसार चोहोंकडे झाला असावा; पृ. १११—वेदकाळीं शैवादि संप्रदाय अस्तित्वांत होते. उपनिषदें निरनिराळ्या माणसांनीं रचलेलीं आहेत. त्यांत सर्वेश्वरी मत प्रामुख्यानें दिसून येतें; पृ. ११२—वासुदेवाचा उल्लेख अष्टाध्यायींत व खि. पू. २ ऱ्या शतकांतील शिलालेखांतून आढळतो; पृ. ११३—अवतारी पुरुष वासुदेव व वृष्णि कुलांतील वासुदेव एकच आहेत. महाभारतांतील नारायणीय आख्यानांत उपरिचर वसूची कथा दिली आहे; व भगवंतांनीं नारदाला वासुदेवधर्म समजावून दिला आहे; पृ. ११४—हरीची भक्तियुक्त उपासना करणें व आरण्यकास प्रमाण मानणें हें या धर्मांतील वैशिष्ट्य होय. सात्वत हें वृष्णि कुलाचें दुसरें नांव असून वासुदेवउपासनेचा त्यांचा स्वतंत्र मार्ग होता; पृ.११६—उपनिषत्कालीन नवविचारांच्या लाटेंत बौद्ध व जैन पंथांबरोबरच वासुदेवधर्महि उदयास आला. भक्तिधर्माचा मूळ उपदेशक वासुदेव असून कृष्ण हें त्याचें गोत्रनाम असावें; पृ. ११७—वासुदेव धर्म व गीतोपदिष्ट धर्म हे एकच आहेत; पृ. ११९—उपनिषदें व दर्शनें यांतून गीतेनें तत्त्वज्ञान घेतलें आहे. भगवद्गीतेचें प्रमुख लक्षण जी भक्ति तिचेंहि मूळ प्राचीन तत्त्वज्ञान विषयक वाङ्मयांत आढळतें; पृ. १२०—जुन्या धर्माला धरून ईश्वरविषयक कल्पना लोकांपुढें मांडण्याची गीतेचा विचार होता; पृ. १२१—नारायणाविषयीं दंतकथेचा विकास ऋग्वेदापासून पुराणग्रंथापर्यंतच्या काळांत झालेला दिसून येतो. त्याचा स्वर्ग म्हणजे श्वेतद्वीप होय. तेव्हा नारायण वासुदेवाच्या पूर्वी अस्तित्वांत होता तरी वासुदेव भक्तिप्रवारांत अखेरीस नारायण व वासुदेव एकच मानले गेले; पृ. १२२—ऋग्वेदात विष्णूचें महत्त्व फारसें नाहीं. पण पुढें त्याच्या परमपदामुळें पुराणांत त्याला परमेश्वर कल्पिलें आहे. वासुदेव व विष्णु एकच मानले जात असत. गोपाल कृष्ण व वासुदेव कृष्ण यांच्या कथांतून विसंगतता दिसून येते. तेव्हा ते एक नसावेत; पृ. १२३—श्रेष्ठ देव म्हणून कृष्णाला गोविंद हें इंद्रविशेषण दिलें असावें. कृष्णपूजा व कथा आभीर लोकांनीं हिंदुस्थानांत आणिली व पुढें गोपाल कृष्णाचें व वासुदेवाचें एकीकरण झालें असावें; पृ.१२५—पांचरात्र धर्मांत या गोपालकृष्ण-अंगाचें विवेचन नाहीं. भागवत धर्माचा मुख्य पाया पंचरात्रसंहिता होय. ही संहिता सोळाव्या शतकाच्या सुमारास लिहिली गेली असावी. तींत कृष्णलीलेचें वर्णन आहे; पृ.१२६—नारायणाचे अवतार निरनिराळ्या ग्रंथातून निरनिराळे आढळतात; पृ. (१२८).

[ सं द र्भ ग्रं थ.—मैत्रायणी संहिता. डॉ. भांडारकर—शैविझम अँड वैष्णविझम. उपनिषदें व आरण्यकें. निद्देस. पाणिनी—अष्टाध्यायी. विविधज्ञानविस्तार वर्ष ४१—देवदत्त भांडारकर यांचे लेख. पतंजलीमहाभाष्य. महाभारत. विविधज्ञानविस्तार—रा. राजारामशास्त्री भागवत यांचे लेख. विष्णुपुराण. ऋग्वेदसंहिता. १ कौ. ब्रा. ऐ. ब्रा. जातकें. मत्स्यपुराण. आश्व. श्रौ. सू. भागवत. सांख्य. योग. दर्शनें. यास्क-निरुक्त. मनुस्मृति. श. ब्रा. कथासरित्सागर. वामनपुराण. ज्ञानकोश—विभाग दुसरा. गृह्यसूत्रें, वायुपुराण. बृहत्संहिता. ब्रह्मसूत्र. आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया १९०५—६. वराहपुराण.]

---

## प्रकरण ७ वें.

### बुद्धजन्मकालीन वैचारिक चळवळ

### (पृ. १२८—१३५.)

नारायणीय धर्माच्या उच्चकालीं दुसरे विचारसंप्रदाय अस्तित्वांत होतेच; बौद्ध व जैन हे त्यापैकींच होत; पृ.१२८—बुद्धकालीं जग व ईश्वर यांच्या संबंधींच्या प्रश्नांवर अति मोकळेपणानें विचार होत असें बुद्धसंवादांवरून दिसतें. उत्तरकालीन जैनग्रंथकारांनां आजीविक हा बौद्धभिक्षूंचा पंथ म्हणून माहीत होता, व बौद्धांनाहि तो ' निर्ग्रन्थ ' या नांवानें माहीत होता. हा पंथ कोणांतेच मोडत नसून स्वतंत्र होता; पृ. १२९—आजीविक हे वैष्णव आहेत असें प्रो. कर्न

व बुह्लर यांचे मत असून रा. दे. रा. भांडारकर यांना ते मान्य नाही: पृ. १३०—बुद्धसंप्रदायापूर्वी बराच काळ आजीविक अस्तित्वांत होते; मौर्यकालांत त्यांना महत्व आलें. यांचा उल्लेख निरनिराळ्या काळच्या ग्रंथांतून सांपडतो: पृ. १३१—बौद्ध व जैन यांनी यज्ञसंस्था बुडविली नसून आरण्यकीय विचारानें प्रथम ती अनवश्यक मानिली. सद्धर्मालंकारांत महावीरापूर्वीच्या पूर्णकाश्यपबुद्ध. मखलीगोशाल. निगंठनातपुत्त, अजितकेशकंबल, संजयबेलट्ठ. व कुकुधकात्यायन अशा सहा तीर्थकरांचा हकीगत दिली आहे: पृ. १३२—नातपुत्त व महावीर एकच होत असें म्हणतात. महावीरानें पूर्वी प्रचलित असलेल्या मतांत सुधारणा केली इतकेच नवीन मताची त्यानें स्थापना केली नाही: पृ. १३३—बौद्ध संप्रदाय हा जैन संप्रदायापासून निघालेला नाही. महावीराचा काल ख्रि. पू. ५२७ हा येतो. जैन संप्रदायाचें सर्वांत जुनें नांव निग्रंथ असें असून, दिगंबरपंथापूर्वी या संप्रदायाचे निरनिराळे सात पंथ आढळतात. प्राचीन जैनवाङ्मय उपलब्ध नाही: पृ. १३४.

[संदर्भग्रंथ—ब्रह्मजाल सुत्त. इंडियन ॲंटिक्वरि पु. ८,१९,२३, ४१. स्मिथ—अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. वीरनंदि—आचारसार. नेमिचंद्र—त्रिलोकसार गाथा. माघनन्दिश्रावकाचार. साउथ इंडियन इन्स्क्रिप्शन्स पु. १. जर्नल बाँबे एशियाटिक सोसायटी पु. २०—२१. दिव्यावदान. कर्न—इंडियन बुद्धिझम. वराहमिहिर—बृहज्जातक. कालकसंहिता. बुह्लर—इंडियन स्टडीज. रॉयल एशियाटिक सोसायटी १९१८. जातक. विनयपिटक. अंगुत्तरनिकाय. ऱ्हीसडेव्हिड्स डायलॉग्ज ऑफ बुद्ध. एपिग्राफिआ इंडिका पु. २. ज्ञानकौहरण. अमरकोश. पाणिनीसूत्र. पतंजलिमहाभाष्य. दीघनिकाय. भट्टिकाव्य. सद्धर्मपुंडरीक. वेबर—फ्रॅगमेंट डर भॅगवति. आचारांग. विष्णुपुराण. आर्यविद्यासुधाकर. श्रावकाचार.] .

---

## प्रकरण ८ वें

## बुद्धाचें चरित्र

### (पृ. १३५-१६१)

बुद्धचरित्राचें सूक्ष्म ऐतिहासिक निरीक्षण आतांपावेतो झालेलें नाही; पृ. १३५—बुद्धजन्मस्थान—कपिलवस्तु इ. स. १८९५ त निश्चित झालें. ललितविस्तरांत भगवान्‌नें भिक्षूंच्या विनंतीवरून सांगितलेली बुद्धचरित्रकथा आहे. देवांनी तुषित येथील बोधिसत्वाला अवतार घेण्याविषयी विनंति केली. ती त्यानें मान्य करून शाक्यकुलांत मायावतीच्या पोटीं जन्म घेतला. त्याच्या जन्मकाळी अनेक शुभ गोष्टी घडल्या. त्याच्या लहानपणीच ईश्वरांची साक्ष पटविणारे चमत्कार घडून आले. गोपा नांवाच्या कन्येशी बुद्धांचा विवाह झाला. त्याला जरा, मृत्यु वगैरे मानवी दुःखें पाहून संसाराचा वीट आला व गृहत्याग करून तो वैशालीस गेला. पण तेथें त्याला दुःखनाशक धर्म सांपडला नाही. राजगृही बिंबिसार राजानें त्याला राहण्याचा आग्रह केला. तेथून गयेला जाऊन त्यानें घोर तप आचरिलें. त्यावेळी मारानें त्याला मोह पाडण्याचा व्यर्थ प्रयत्न केला तपानें बोधिप्राप्ति होणार नाही हें समजून आल्यावर आहार मिळवून तो बोधिमंडाकडे निघाला. बोधिद्रुमाखाली बोधिसत्व आसनस्थ असतां मार व त्याच्या मुली यांनी त्याला जिंकण्याचा प्रयत्न केला, पण तो वश झाला नाही. तेव्हां त्याला बोधिसत्वाची प्राप्त झाली. देवांनी त्याला धर्मचक्रप्रवर्तनाविषयीं विनंति केली. शेवटीं बोधिसत्वानें लोकांस उपदेश करून अवतारकार्य समाप्त केलें: पृ. १३६—ललितविस्तरांतील बुद्धचरित्राचें रा. चांदोरकरांनीं चिकित्सापूर्वक परीक्षण केलें आहे तें असें : गौतमीचे कोणतें तें पुराणकारांनीं दिलें नाही: एक कल्पना म्हणून त्यांनी बुद्धावतार कल्पिला आहे. नांवाप्रमाणें गौतमाच्या कुळासंबंधींहि नक्की पत्ता नाहीं. तो कीकट [कैकाडी] या व्यभिचारी वंशांत जन्मास आला. गौतमकाळीं शाक्यांची नीतिमत्ता अगदीं निकृष्ट दर्जाची होती. गौतमाच्या घरची स्थिति सांपत्तिक व नैतिक दृष्ट्या फार वाईट होती: त्याच्या ठायीं दशवगुण्ये होतीं व त्याची शारीरस्थिति चांगली नव्हती. घर नकोसें होऊनें त्यानें अरण्य धरलें. त्यानें आपल्या मनावर विजय मिळविला होता हें खरें नाहीं, कारण आपला सासरा व मेहुणा यांच्या नाशाची तो सारखी खटपट करीत होता. तो दीर्घद्वेषी असे. अजातशत्रूसारख्या पितृघातकी राजाची त्यानें कानउघाडणी न करतां उलट खुषमस्करी केली आहे. त्याच्या नीतिविषयक कल्पना शुद्ध नसून स्वार्थमूलक असत: पृ. १४२—गौतम निर्वाणास जाण्यापूर्वी, त्यानें आपल्या शिष्यांस बुद्धधम्मसंघासंबंधानें कांहीं शंका आहेत कां म्हणून विचारलें, व मग शांतपणें तो निर्वाणास गेला: पृ. १४९—त्यास स्त्रियांचा अत्यंत तिटकारा असे. बुद्धाच्या कालाविषयीं एकमत नाहीं, तथापि ख्रि. पू. ४७७ अथवा ४७८ हा त्यांचा निर्वाणकाल असावा असें एके ठिकाणी पुष्कळ पुरावे देऊन सिद्ध केलें आहे: पृ. १५०—त्याच्या निर्वाणाचा नक्की दिवस इसवीसन शक १४८ वैशाख शुद्ध पौर्णिमा, मंगळवार हा येतो: पृ. १५२—बुद्धेतिहासांतील महत्वाच्या गोष्टींचा कालनिर्णय झाला आहे. बुद्धाच्या ईश्वरविषयक कल्पना निश्चितपणें सांगतां येत नाहींत; त्याचप्रमाणें त्याची वेदांविषयीं भावना काय होती हेंहि निश्चित करतां येत नाहीं: पृ. १५३—त्याची ओरड जातिभेदाविरुद्ध नसून, ब्राह्मणाविरुद्ध असे. तो ज्ञानसंचयाचा द्वेष्टा होता तरी गूढशास्त्राविरुद्ध नव्हता. त्याची अपूर्वता ज्ञानमूलक किंवा आचरणमूलक नसून संघचालकत्वमूलक होती: पृ. १५४—कोसल व मगध देशांत बौद्ध संप्रदायाचा उगम झाला. बुद्धानंतर अशोकानें तो बराच प्रवृद्ध केला. कनिष्काच्या काळीं महा-

यान व हीनयान असे दोन पंथ पडून संप्रदायांतील एकी नाहींशी झाली. इ. स. च्या ८ व्या शतकापासून बौद्धसंप्रदायाचा हिंदुस्थानांत ऱ्हास होत गेला: पृ. १५५.—बौद्धसंप्रदायाच्या आश्रयानें शिल्पकला व चित्रकला यांस चांगलें उत्तेजन मिळालें; स्तूप, चैत्य व विहार हीं या गोष्टींची साक्ष देतील. सिंहलद्वीप, पांड्यदेश, कांची, महिषमंडल, वनवासी, अपरांत व महाराष्ट्र यांसारख्या ठिकाणीं बौद्धसंप्रदायाचा दक्षिणेंत प्रसार झाला. या संप्रदायाबरोबर जैन संप्रदायहि दक्षिणेंत गेला असावा. या संप्रदायांचा दक्षिणेंत जो ऱ्हास झाला त्याला कारण म्हणजे त्यांचे कोणी पुढारी राहिले नाहींत व शैववैष्णव पंथांकडून त्यांनां विरोध होत गेला: पृ. १५६—भूतानमध्यें या बौद्धसंप्रदायास द्रुक्पा पंथ म्हणतात. येथील मुख्य महोपाध्यायास धर्मराजा म्हणतात: पृ. १५७—अकराव्या शतकापासून ब्रह्मदेशांतील बौद्ध संप्रदाय पुढें येऊं लागला. तेथील भिक्षु विद्वान् व सदाचरणी असतात: पृ. १५८—आसामांत या संप्रदायाचा ऱ्हास होत आहे. सिलोनांतहि बौद्ध लोकांची संख्या कमी होत आहे; पण त्यांची धर्माविषयीं आस्था विशेष आहे. सातव्या शतकापर्यंत चीन देशांत बौद्ध संप्रदायाचा उत्कर्ष झाला, पण पुढें कन्फ्यूशिअनी पंथ व ताओपंथ यांनीं उचल केल्यामुळें त्याचें तेज कमी झालें: पृ. १५९—जपानांत बौद्ध संप्रदाय टिकून आहे व त्यांत सुधारणा होत आहेत. यवद्वीपांत शिव व बुद्ध हे दोन्ही पंथ एकत्र सलोख्यानें रहात; सुमात्रांत १४ व्या शतकांत बौद्ध संप्रदायाची पिछेहाट होत जाऊन हल्लीं तो तेथें नामरूपानें आहे; पृ. १६०—कोरियांत मिंग घराण्याच्या कारकीर्दीत बौद्ध संप्रदाय निकृष्टावस्थेस पोंचला; पण त्यावर जपानचें वर्चस्व आल्यापासून तो पुन्हां सांवरूं लागला आहे. सयामांतील या संप्रदायाचें स्वरूप शुद्ध नाहीं. तिबेटांतील लामाधर्म बौद्ध संप्रदायाचें एक विकृत स्वरूप म्हणून चांगला अस्तित्वांत आहे: पृ. १६१.

[संदर्भग्रंथ.—ललितविस्तर. वांदोरकर—इतिहास आणि ऐतिहासिक. बुद्धचरित्र. अमरकोश. सद्धर्मपुंडरीक. भागवतपुराण. विष्णुपुराण. अग्निपुराण. सेनार्ट—एसाइ सुर ला लेजेंडे दु बुद्ध. स्पेन्स हार्डी—बुद्धधर्मावर पुस्तकें. अश्वघोष—प्रबुद्धधर्म. जातकें. चुल्लकलिंग. बुद्धघोषाचे ग्रंथ. मिलिंद प्रश्न. भद्रकल्पावदान. बोधिसत्त्वावदानकल्पलता. स्मिथ—अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. मॅक्स मुल्लर—हिस्टरी ऑफ एन्शंट संस्कृत लिटरेचर. महावंसो. इं. अँ. पु. ३, ३०, ३७, ४०, ४३. कर्न—मॅन्युअल ऑफ बुद्धिझम. फ्लीट—इन्स्क्रिप्शन्स. बिगंडेट्—लाइफ ऑफ गौतम. इं. अँ. १९१४. अर्लिएस्ट लिथिक मॉन्युमेंट्स ऑफ दि तामील कंट्री १९०६—०९. सेवेल—लिस्ट ऑफ अँटिक्विटीज पु. १. इंपी. गॅझे. पु. २. मद्रास एपिग्रॅफिकल कलेक्शन १९१०. सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स—बुद्धिझम.]

## प्रकरण ९ वें.

### भारतीय युद्धान्तापासून चंद्रगुप्तापर्यंत राजकीय इतिहास

(पृ. १६१—१७४)

कलियुगांतील राजघराण्यांची हकीकत बहुतेक सर्व पुराणांतून आढळते. सर्व एकच पाठ असत नाहीं. भविष्यपुराण हाच सर्वांचा मूळ आधारग्रंथ आहे; सर्वत्र पुराणांतील वंशावळ्यांची सुरुवात व आरंभपुरुष हीं एक नसतात: पृ. १६१—पुराणांत संस्कृतमध्यें दिलेली हकीकत पूर्वी प्राकृत श्लोकांमध्यें असावी. त्यांतील इतिहासरचना ३ऱ्या व ४ थ्या शतकांतील दिसते. पाठांची भिन्नता व अशुद्धता यांवरून हा इतिहास प्रथमः खरोष्ठीमध्यें उत्तर हिंदुस्थानांत इ. स. ३३० च्या पूर्वी लिहिलेला असावा असें पार्गिटर अनुमान काढतो. मत्स्य, वायु व ब्रह्मांड यांच्या पाठांत फारशी तफावत नाहीं: शिवाय ते पाठ मुळाला धरून आहेत: पृ. १६२—पुराणांत कलियुगांतील पौरव, बार्हद्रथ, प्रद्योत, शैशुनाग, नंद, मौर्य, शुंग, काण्वायन व आंध्र या राजघराण्यांच्या वंशावळी विस्तृत दिल्या आहेत: पृ. १६४—पुराणेतर ऐतिहासिक साहित्य पाहतां, अगदीं आरंभीं बुद्ध संप्रदायाचा पगडा ज्या भागांत होता त्या ठिकाणीं चार बलाढ्य राज्यें नांदत होतीं. तीं राज्यें मगध, कोसल, वत्स किंवा वंश आणि अवंती हीं होत. हीं घराणीं शरीरसंबंधानें बद्ध झालीं होतीं. त्यांच्यामध्यें वारंवार भांडणेंहि होत. कोसलराज प्रसेनजित् व मगधराज अजातशत्रु यांच्यांत प्रथम वितुष्ट येऊन पुढें ते मित्र व सासराजांवई झाले. अवंतीचा राजा प्रद्योत व कौशांबीचा उदयन यांच्यांतहि प्रथम वैर होतें; पण पुढें उदयन प्रद्योताचा जांवई झाला; पृ. १६८—बौद्ध वाङ्मयांतील इतिहास स्पष्ट करण्यासाठीं ब्राह्मण वाङ्मयाची मदत घेतल्यास या घराण्यांचा इतिहास समग्र मिळेल. मगधाचें प्राचीन बार्हद्रथ घराणें गौतमबुद्धाच्या वेळेपर्यंत होतें. ख्रि. पू. ७ व्या शतकांत हिंदुस्थानांत निरनिराळीं प्रसिद्ध राज्यें होतीं: त्यापैकीं काशीचें एक होय; पृ. १७०—मगध साम्राज्याचा प्रारंभ बिंबिसारापासून झाला: त्याचा पुत्र अजातशत्रु यानें त्याचा विस्तार केला. पहिल्या शिशुनागापासून शेवटच्या नंदापर्यंत एकंदर बारा पिढ्या झाल्या. या बारा राजांचीं नांवें व त्यांचा अनुक्रमहि निरनिराळ्या पुराणांतून सारखाच असलेला दिसतो. ख्रि. पू. ६०० मध्यें शैशुनाग घराण्याची स्थापना झाली असावी: पृ. १७१—नंद नऊ होते. पहिला नंद महापद्म हा हीन संबंधापासून झाल्याचें वर्णिलेलें आहे: पृ. १७३.

[संदर्भग्रंथ.—पार्गिटर—पुराण टेक्स्ट ऑफ दि डिनॅस्टीज ऑफ दी कलि एज. पुराणें. स्मिथ—अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया; ऑक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया. धम्मपद. इं. अँ. ४४. ४५. ज्ञानकोश विभाग ३ रा. महाभारत. कल्पद्रुमकलिका. महा-

वंश. दिव्यावदान. बाण-हर्षचरित. फाहिआन. मुद्राराक्षस. कौटिल्यांचें अर्थशास्त्र.]

---

## प्रकरण १० वें.

### बुद्धापासून चंद्रगुप्तापर्यंतच्या काळची सामाजिक परिस्थिति.

( पृ. १७४-१८९ ).

गौतमकालीन शाक्य कुलाची माहिती चांगली उपलब्ध आहे. शाक्य लोकांची संख्या अजमासें दहा लक्ष होती. ते आपला राजा निवडीत. त्यांची निरनिराळ्या गांवीं सभागृहें बांधलेलीं असत. दूधदुभतें व तांदूळ यांवर ते उपजीविका करीत; पृ. १७४—शाक्येतर कुळांविषयीं माहिती नाहीं. बुद्धधम्माच्या उदयाच्या वेळीं हिंदुस्थानचे अंग, मगध, काशी, कोसल, वज्जि, मल्ल, चेति, वत्स, कुरु, पांचाल, मत्स्य, शूरसेन, अस्सक, अवंती, गांधार व कांबोज असे १६ राजकीय विभाग जातिनामावरून पडलेले दिसतात; पृ. १७६—दक्षिणेकडचें बौद्धग्रंथांत आढळणारें सर्वांत दूरचें गांव पैठण हें होय. समुद्रप्रवासाचेंहि वर्णन निकायांत आढळतें; पृ. १७७—ख्रि पू. सातव्या शतकांत अयोध्या, वाराणसी, चंपा, कांपिल्ल, कौशांबी, मथुरा, मिथिला, राजगृह, रोरुक, सागल, साकेत, उज्जयिनी व वैशाली हीं शहरें प्रसिद्ध होतीं; पृ. १७८—त्या काळीं समाजरचना ग्रामपंचायतींच्या पायावर केलेली असे. जमिनीवर कोणाचा मालकी हक्क नसे. समाज चातुर्वर्ण्यविशिष्ट होता, तथापि कोणालाहि आपला सामाजिक दर्जा बदलतां येत असे. अनुलोम प्रतिलोमविवाह होत असत; पृ. १७९—बौद्धकालीन शहरें लहान दुर्गाप्रमाणें असत. बहुतेक इमारती एक मजली व गवती छपराच्या असत. हल्लींच्या तुर्की स्नानगृहाप्रमाणें शहरांतून स्नानगृहें असत; पृ.१८१—त्या काळीं बरेच धंदे अस्तित्वांत असून धंदेवाल्यांचे १८ संघ होते. वहातुकीला जलमार्ग किंवा खुष्कीचे मार्ग असत. नाणीं व हुंड्या प्रचारांत असत. लोकांची सांपत्तिक स्थिति बरी असे. लेखनकला अस्तित्वांत होती; पृ. १८३—मठवासी, बैरागी व परिव्राजक हे आपली धार्मिक चळवळ चालवित. या वेळीं भिक्षूंचे अनेक पंथ होते. हे संचारी भिक्षू कोसल देशांतील सामान्य भाषेंत व्यवहार करीत; पृ. १८५—ब्राह्मणांचें वर्चस्व सर्वांवरच होतें असें नाहीं. तें पुढील काळांत जास्त होत गेलें. त्यासाठीं ब्राह्मणांनां आपलें वाङ्मय फिरवावें लागलें. त्यांनीं दिलेला इतिहास एकांगी होय; पृ. १८७.

[ संदर्भग्रंथ.—र्‍हीस डेव्हिड्स-बुद्धिस्ट इंडिया. सुत्तनिपात. ऋग्वेदसंहिता. विनयपिटक. उदान. रामायण. भांडारकर—ए पीप इंटु दि अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. बुहलर इंडियन स्टडीज. जातककथा. जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी १९०९. र्‍हीस डेव्हिड्स—डायलॉग्ज ऑफ दि बुद्ध. आपस्तंब—शुल्बसूत्र. हॉपकिन्स—रिलिजन्स इन इंडिया. मनुस्मृति. ज्ञानकोश-विभाग ५ वा. अंगुत्तरनिकाय वैखानससुत्त. पाणिनी सूत्रें. बॉंबे जर्नल रॉयल एशियाटिक सोसायटी १९०१. ]

---

## प्रकरण ११ वें.

### त्रिपिटक अथवा पाली धर्मशास्त्र

( १८९-२४३ ).

त्रिपिटकांतील कांहीं भाग बुद्धाचीं प्रत्यक्ष वचनें मानल्यास गैर होणार नाहीं. बुद्धाचीं संभाषणें, वचनें, गीतें, कथा व सांप्रदायिक नियम यांचा संग्रह त्रिपिटकांत येतो. त्रिपिटकांतील भाग निरनिराळ्या काळचे आहेत; पृ.१८९—बुद्धनिर्वाणानंतर पहिल्या शतकांत बौद्ध धर्मशास्त्राचीं आधारसूत्रें निश्चित झालीं होतीं. ख्रि. पू. २४२ च्या नंतर भरलेल्या तृतीयसंगीतींत बौद्धांचें पाली भाषेंतील धर्मशास्त्र-त्रिपिटक-रचलें गेलें, असें सिंहलद्वीपस्थ बौद्ध समजतात. पण तें त्यावेळचें धर्मशास्त्र मागधी भाषेंत असलें पाहिजे, त्यांत व पाली त्रिपिटकांत बराच फरक असावा; तथापि पाली त्रिपिटकांतील कांहीं भाग अशोककालीन दिसतो; पृ. १९०—बौद्ध संप्रदायाचे संस्कृतादि पालीशिवाय दुसऱ्या भाषांतून लिहिलेले धर्मग्रंथ पाहिल्यास त्यांतील मूलतत्त्वें या पाली धर्मशास्त्राशीं जुळतात. तेव्हां हें फारसें अपभ्रष्ट नाहीं; पृ. १९३—विनयपिटकांत सुत्तविभंग,खंधक व परिवार यांचा समावेश होतो. सुत्तविभंगांत पापांची यादी व प्रायश्चित्तें दिलीं आहेत. खंधकांत संघाच्या व्यवस्थेबद्दल नियम आहेत. यांतील कथा प्राक्कालीन भारतवर्षीयांच्या आयुष्यक्रमावर प्रकाश पाडतात. विनयपिटकांत दृष्टांतादाखल दिलेल्या गोष्टीहि सुंदर आहेत. परिवार उत्तरकालीन व कमी महत्त्वाचा आहे. सुत्तपिटकांत दीघ, मज्झिम, संयुत्त, अंगुत्तर व खुद्दक असे पांच निकाय आहेत. पहिल्या चारांत उपदेशपर भाषणें आहेत. दीघनिकायांत ३४ मोठीं सुत्तें आहेत, त्यांत महापरिनिब्बान हें अति महत्त्वाचें आहे. हा निकाय अलीकडे पूर्ण झाला; पृ. १९८—मज्झिम निकायांत १५२ सुत्तें असून त्यांत विविध विषय आले आहेत. या सुत्तांवरून प्राचीन संप्रदाय व बुद्धाची उपदेशपद्धति कळते. या सुत्तांचा काल एक नाहीं; पृ. २००—संयुत्तनिकायांत ५६ संयुत्त ( गुच्छ ) असून त्यांत निरनिराळ्या सांप्रदायिक तत्त्वांचें विवेचन आहे. यांत वाङ्मयाच्या दृष्टीनें बरेच महत्त्वाचे भाग आहेत; पृ.२००—अंगुत्तर निकायामध्यें वाङ्मयदृष्ट्या महत्त्वाचा भाग थोडा आहे. सारख्या गोष्टी एकत्रित करण्याची कल्पना यांत दिसून येते; पृ. २०५—या चार निकायांत पुष्कळ वेळां तींच तींच सुत्तें व पुनरुक्त्या आढळतात. त्यांतील संवाद बुद्धाची

विवेचनपद्धति कशी होती तें दाखवितात. यांत दृष्टांतांची रेलचेल आहे. हे दृष्टांत फार सयुक्तिक व विनोदी आहेत. ते तत्कालीन सांस्कृतिक इतिहास सांगतात; पृ. २१६—खुद्दक निकायांत १५ ग्रंथ आहेत. यांतील विषय काव्यमय आहे. खुद्दक पाठांत ९ सुत्तें असून तीं मंत्राप्रमाणें म्हणावयाचीं असतात. धम्मपदांत नीतिविषयक सुभाषितांचा संग्रह आहे. उदान ग्रंथांत बुद्धकालीन लहान लहान पोरकट गोष्टी आढळतात. इतिवुत्तकांत गद्यपद्यभाग असून पैकीं गद्य फार सुंदर व श्रेष्ठ आहे. सुत्तनिपात हा पद्यमय सूत्रांचा संग्रह असून, त्यांत बोधपर संवाद व कथा आहेत. विमानवत्थूंत देवप्रासादांच्या व पेतवत्थूंत भुतांच्या कथा आहेत. थेर व थेरी गाथा हे दोन वृद्ध भिक्षू व भिक्षुणी यांनीं रचलेल्या सुंदर काव्यांचे संग्रह आहेत. यांत आध्यात्मिक तत्त्वें व तत्कालीन परिस्थितीचीं चित्रें चांगलीं रेखाटलेलीं आहेत. प्रत्येक सूत्राचा काल वेगळा आहे. पृ. २०९—खुद्दक निकायांत समाविष्ट केलेल्या जातककथा लौकिक कथांना धार्मिक स्वरूप देऊन तयार केल्या आहेत. या कथांपैकीं कांहीं बुद्धपूर्वकालीन आहेत. गद्यभाग अर्वाचीन दिसतो. या कथांत कांहीं कल्पित, कांहीं प्राणिविषयक, कांहीं विनोदी कांहीं चातुर्यदर्शक तर कांहीं नीतिपर व सुभाषितांसारख्या आहेत. यांशिवाय कांहीं इतिहाससंवाद व प्रचलित दंतकथांवरून तयार केलेल्या गोष्टी जातकांत आढळतात. हीं जातकें लोकप्रिय असून त्यांनीं भारतीय संस्कृतीचा प्रसार सर्वत्र केला आहे. त्यांचें महत्त्व सर्व दृष्टींनीं आहे; पृ.२२०—अपदानामध्यें साधूंच्या पराक्रमांसंबंधीं गोष्टी आहेत. बुद्धवंसांत चोवीस बुद्धांच्या कथा आहेत. खुद्दक निकायांतील शेवटचा ग्रंथ चरियापिटक यांत बोधिसत्त्वाच्या ठायीं पारमिता कशा आल्या हें वर्णिलें आहे; पृ. २३४—अभिधम्मपिटकांत सात ग्रंथ आहेत. त्यांपैकीं पुग्गल पञ्ञत्ति व कथावत्थु हे प्रथम होत. कथावत्थु हा ख्रि. पू ३ शतकांतील बौद्ध धर्म स्वरूपादर्श म्हणतां येईल; पृ. २३६—सिंहावलोकन—पाली धर्मशास्त्राचे मुख्य विभाग आणि पोटविभाग; पृ.२३८—तिपिटकेतर बौद्ध वाङ्मय कांहीं पालींत, कांहीं शुद्ध संस्कृतांत व कांहीं मिश्र संस्कृतांत आहे. त्यांतील मुख्य ग्रंथांची सूची; पृ. २३९.

[संदर्भग्रंथ—ओल्डनबर्ग-गुरुपूजा कौमुदी जर्नल रॉयल एशियाटिक सोसायटी १९०८. विंटरनिट्झ-इंडियन लिटरेचर. मिलिंदपन्ह. विनयपिटक, सुत्तपिटक व अभिधम्मपिटक. हिरोडोटस. रामायण. महाभारत. इसॉफ-फेबल्स. वेतालपंचविंशी. अवदानें. महायानसूत्रें. निदानकथा. महावंस, दीपवंस. ललितविस्तर. स्मिथ-अशोक. हिब्बर्ट-लेक्चर्स १८८१. ई. मुल्लर-ग्रामर ऑफ पाली लँग्वेज. ए. इं. पु. २. ऱ्हीस डेव्हिड्स-बुद्धिस्ट इंडिया. कनिंगहॅम—स्तूप ऑफ भरहुत. स्पेन्स्हार्डी-ईस्टर्न मनिकिझम]

भा. च. भा

## प्रकरण १२ वें.

### अशोक ते अराजक-शकयवनांचा धुमाकूळ

(पृ. २४३-२६७)

मौर्य घराण्याच्या अगोदरच्या शैशुनाग व नंद घराण्यांची थोडीशी माहिती उपलब्ध आहे; पृ. २४३—मौर्य घराण्याचा संस्थापक चंद्रगुप्त याचा नातू अशोक यानें कलिंग देश जिंकल्यावर त्याला उपरति झाली. त्यानें बौद्ध संप्रदायाचा सर्वत्र प्रसार केला. शिला-स्तंभ-लेखांवरून अशोकाची कामगिरी ध्यानांत येते. त्याची व्यवहारनीति व राजनीति उत्तम प्रकारची असे. अशोककालीन कलाकौशल्य प्रेक्षणीय आहे; पृ. २४४—अशोकानंतर मौर्य घराण्याला उतरती कळा लागली. मौर्य घराण्याची राज्यव्यवस्था अर्थशास्त्रावरून दिसून येते. आधुनिक सुधारलेल्या राज्यपद्धतीपेक्षां ती मुळींच गौण वाटत नाहीं; पृ. २४७—मौर्यानंतर शुंग घराणें आलें (ख्रि. पू. १८५-७३). या राजांनीं ब्राह्मणधर्म प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला; पृ. २५०—शुंगानंतर काण्वघराणें झालें (ख्रि. पू. ७३-२८). यांत चार राजे होते; पृ. २५१—यानंतर आंध्र घराणें सत्ताधीश झालें. हें घराणें अशोकपूर्वकालीन असून त्याचें राज्य पूर्व हिंदुस्थानांत होतें. यांत ३० राजे होऊन गेले. इ. स. २२५ च्या सुमारास हें लयाला गेलें. याची सत्ता फार मोठी होती; पृ. २५१—शक ऊर्फ सिथियनांची हिरोडोटसनें माहिती दिली आहे, तीवरून त्यांच्या चालीरीती रानटी व क्रूर वाटतात. चिनी ग्रंथांत सोक या नांवाखालीं शकांची माहिती सांपडते. हे लोक फार दूरवर गेले होते व यांनीं राज्यें स्थापिलीं होतीं असें चिनी बखरकार म्हणतात; पृ. २५४—युएची किंवा कुशान चिनांतून येऊन त्यांनीं हिंदुस्थान व बॅक्ट्रिया येथें राज्यें स्थापिलीं. हिंदुस्थानांतील त्यांच्या कनिष्क नांवाच्या राजानें बौद्ध लोकांनां आश्रय दिला. कुशानांचा बौद्ध व हिंदू या दोहोंवरहि परिणाम घडलेला दिसतो; पृ. २५६—अशोकानंतरच्या कालांत पंजाबच्या सरहद्दीवर बॅक्ट्रियन व पार्थियन लोकांचें राज्य होतें. काबूलचा मिनॅन्डर राजा बौद्ध संप्रदायी असून त्याच्या नांवाचा मिलिंदपन्ह म्हणून प्रख्यात ग्रंथ आहे. शक बॅक्ट्रियन राज्य बुडवून हिंदुस्थानांत शिरले. इंडो-पार्थियनांची सत्ता तक्षशिला प्रांतावर ख्रिस्ती शकांच्या आरंभापर्यंत होती. इंडो-पार्थियन राजा गोंडोफरस याच्या कारकीर्दींत सेंट थॉमसनें येऊन हिंदुस्थानांत ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार केला अशी एक दंतकथा आहे; पृ.२५७—इंडोग्रीक काळांत ग्रीक संस्कृतीचा हिंदुस्थानावर फारसा परिणाम झाला नाहीं; पृ. २६१—इंडो-सिथियन किंवा कुशान बॅक्ट्रियांत येऊन राज्यें स्थापून राहिले. त्यांचा चीनशीं संबंध येत असे. कनिष्काच्या कारकीर्दींत कुशानांची सत्ता पश्चिम हिंदुस्थानावर होती. कनिष्क बुद्धोपासक व धर्मप्रसारक होता. त्या

काळीं कुशानांची भरभराट होती; पृ. २६२—इराणांतील ससन घराण्याचा हिंदुस्थानशीं संबंध होता. इ. स. २२० ते ३३० पर्यंत हिंदुस्थानांत अराजकता होती. त्यावेळचा इतिहास अज्ञात आहे; पृ. २६६.

[ संदर्भग्रंथ.—स्मिथ—अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. सॉंडर्स—दि स्टोरी ऑफ बुधिझम. रॉक एडिक्ट्स. कौटिल्य—अर्थशास्त्र. भांडारकर—हिस्टरी ऑफ डेक्कन. राजतरंगिणी. ब्रिटानिका—युएचि. पेरिप्लुस ऑफ दि एरिथ्रिअन सी. 'सेंट थॉमस यांचीं कृत्यें'(सिरियन ग्रंथ.) जॉन्स्टन—बुद्धिस्ट-चायना. सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अॅन्ड एथिक्स—बोधिसत्वाज.]

---

## प्रकरण १३ वें.

### सेमेटिक संस्कृतीची जगद्व्यापकता.

(पृ. २६७-३०८.)

यहुदी जातींतून ख्रिस्ती संप्रदाय निघाला व आज जगांत तो लाखों लोकांना धर्म आहे; पृ. २६७—यहुदी धर्मांत येशूला मान नाहीं. तो एक सामान्य मनुष्य होता; पृ. २६८—यहुद्यांचें एकत्व त्यांच्या राष्ट्रधर्मावरील श्रद्धेमुळें आहे. मेसायाच्या आगमनावर त्यांचा दृढ विश्वास आहे. कांहीं यहुदी येशूला मेसाया मानून भजूं लागले. पॉलनेंच मुख्यतः त्याचें प्रस्थ माजविलें पृ. २६९—बायबलमधील जुना करार एकाच्या हातचा नाहीं, किंवा त्याचा काल एक नाहीं. इस्राएल लोकांच्या दंतकथा प्राचीन काळीं "जे—ई" लेखकांनीं लिहून ठेविल्या. त्यांनां "अनुवाद" हा भाग नंतर जोडला. हे भाग व धार्मिक विधींचें "पी" लिखाण मिळून एहिलीं सहा पुस्तकें तयार झालीं; पृ. २७०—न्यायाधीश, शमुवेल व राजे हीं पुस्तकें झाल्यानंतर गवक्त्यांचें विविध स्वरूपांचें सुंदर लिखाण सुरू होतें. स्तोत्रें व नीतिसूत्रें रसभरित आहेत. ईयोबांत मानवी जीविताचें विवेचन आहे. गीतरत्न, रूथ, विलापपंचक, उपदेशक आणि एस्तेर हीं पुस्तकें लहान पण काव्यमय आहेत. दानिएल, कालवृत्तांत, एज्रा व नहेम्या ही ऐतिहासिक पुस्तकमालिका आहे; पृ. २७२—यहुदी लोकांच्या वाङ्मयांतील ( लेविय, अनुवाद, न्यायाधीश, स्तोत्रसंहिता, नीतिसूत्रें, गीतरत्न, विलापगीत, यशाया, यहज्केल या भागांतील ) उतारे; पृ. २७४—नवा करारः—ख्रिस्ती वाङ्मयाचा प्रारंभ सेंट पॉलच्या पत्रांपासून झाला. त्याच्या पत्रांनां तात्त्विक विचारांचें स्वरूप येऊन तीं ग्रंथनिविष्ट झालीं; पृ. २८२—शुभवर्तमानें व प्रेषितांचीं कृत्यें हीं ख्रिस्ती संप्रदाय टिकविण्याकरितां संगृहीत केलीं गेलीं. शुभवर्तमान (३ रें) व प्रेषितांचीं कृत्यें लूकनें संपादिलीं. पहिल्या शतकांत हीं पुस्तकें तयार झालीं; पृ. २८४—कॅथोलिक पत्रें सर्व ख्रिस्ती लोकां करितां आहेत. योहानमधील लेख चर्चेच्या इतिहासांत फार महत्त्वाचे आहेत; पृ. २८५—नव्या करारांत अंतर्भूत न झालेलें असें दुसरेंहि ख्रिस्ती वाङ्मय आहे. उच्च व कनिष्ठ दर्जाचे अशी लेखांची निवड करून चर्चेनें त्यांची जुळवाजुळव केली; पृ. २८७—नव्या करारांतील ( मत्तय, योहान, प्रेषित, करिंथकरांस पॉलचें पत्र १, फिलिप्पैकरांस पत्र, रोमकरांस पत्र, गलती यांस पत्र, या भागांतील) उतारे; पृ. २८८—प्रकटीकरणांत येशूचें ईश्वरपुत्रत्व व ग्रंथांचें ईश्वरप्रणीतत्व योहानास दिसलें. ही प्रकटीकरणाची कल्पना महंमदानें उचलली; पृ. २९७—वयाच्या चाळिसाव्या वर्षीं महंमदाला साक्षात्कार होऊं लागला. तेव्हां त्यानें तरवारीच्या जोरावर स्वधर्मस्थापना सुरू केली. तो मोठा शूर व राजकारणी असे; पृ. २९९—कुराण बायबलवरून रचलेलें दिसत नाहीं. त्याची भाषा अर्धवट अरबी आहे. त्यांत राजकीय संदेशहि आहेत. महंमदाच्या आचरणांत व उपदेशांत जी विसंगतता दिसते ती दोन भिन्न धंदे त्यास एकट्यासच करावे लागत म्हणून. पुष्कळ गोष्टी त्यानें यहुदी धर्मांतून उचललेल्या दिसतात; पृ. ३००—कायदेग्रंथ या नात्यानें कुराणाला फारशी किंमत नाहीं. त्यांत उच्च तत्त्वज्ञानहि नाहीं; पृ. ३०२—महंमदाचें खासगी वर्तन वाईट होतें असें त्याचेच अनुयायी म्हणतात; पृ. ३०३—कुराणाची ईश्वरदत्तता, स्त्रियांविषयीं वृत्ति व परधर्मीयांबद्दल भावना स्पष्ट करण्याकरितां कुराणांतून निवडलेले उतारे; पृ. ३०३—सेमेटिक लोकांनीं साम्राज्य स्थापून जगांत जें मोठें कार्य केलें तें राज्याचें ध्येय ठरविण्याचें होय. खलीफत व रोमन-साम्राज्य यांत अनेक सादृश्यें आढळतात; पृ. ३०८.

[ संदर्भग्रंथ.—बायबल—जुना व नवा करार. ब्रिटानिका—बायबल, टेस्टॅमेंटस. सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अॅन्ड एथिक्स—मोहॅमेडॅनिझम. कुराण. स्मिथ—मोहंमद अॅन्ड मोहॅमेडॅनिझम. मूर—लाइफ ऑफ मोहंमद. अमीरअली—लाईफ अॅन्ड टीचिंग्स ऑफ मोहंमद. डफ—हिस्टरी ऑफ ओल्ड टेस्टॅमेंट.]

---

## प्रकरण १४ वें.

### राजकीय घडामोडी व भौगोलिक ज्ञानविकास.

( पृ. ३०८—३२० )

भौगोलिक शोध व स्वाऱ्या यांचा नेहमीं अन्योन्याश्रय दिसतो; पृ. ३०८—भूवर्णनशास्त्रावर भारतीय प्रयत्न फार थोडा आहे. भारताची माहिती बाह्य लोकांनीं लिहून ठेविली आहे. इत्सिंग यानें उत्तरेच्या मार्गानें हिंदुस्थानांत आलेल्या चिनी प्रवाशांची हकीकत लिहून ठेविली आहे तिचा गोषवारा; पृ. ३०९—इत्सिंगच्या ग्रंथावरून हिंदुस्थान व चीन यांमधील तत्कालीन मार्गांची कल्पना येते;

पृ. ३१४—भौगोलिक शोधांच्या इतिहासांतील अतिप्राचीन कार्यकर्ते फिनीशियन होत; पृ ३१५.—ख्रि.पू.३३० त पिथियस नांवाच्या ग्रीक खलाशानें उत्तरध्रुवापर्यंत प्रवास केला होता. अलेक्झांडरच्या आशियाखंडांतील मोहिमांनें भौगोलिक शोधांत बरीच भर टाकली. टॉलेमानें भूगोलशास्त्र आश्रिय देऊन संशोधनास बरीच मदत केली; पृ.३१६—रोमन लोकांनीं सर्व यूरोपखंडाचें आणि आशिया व आफ्रिका खंडांतील बऱ्याच भागांचे संशोधन केलें; पृ.३१७—नवव्यापासून तेराव्या शतकापर्यंत. अरब प्रवाश्यांनीं दूरदूरच्या प्रदेशांत जाऊन तेथील माहिती लिहून ठेविली आहे; पृ.३१८—धाडसी नार्थमेन लोकांनीं आइसलंड व ग्रीनलंड येथें वसाहती केल्या; पृ.३१८—यूरोपीय व्यापारी व ख्रिस्तसंप्रदायप्रसारक आशियाखंडांत येऊन रहात. इब्न बतूता हा स्तिमित युगांतील शेवटचा भूगोलशास्त्रज्ञ होय; पृ.३१९.

[ संदर्भग्रंथ.—इंडियन अँटिक्करी पु. १०. ब्रिटानिका-जिऑग्रफी ३. इब्नबतूता. बन्बेरी-हिस्टरी ऑफ एन्शंट जिऑग्रफी. पेरिप्लुस ऑथ दि एरिथ्रिअएन सी. जेकब्स—दि स्टोरी ऑफ जिआग्राफिकल डिस्कव्हरीज.]

## प्रकरण १५ वें.

### अराजकापासून महंमदी स्वाऱ्यांपर्यंत हिंदुस्थान.

( पृ. ३२०-३३५ )

गुप्त घराण्याच्या उदयापूर्वी लिच्छवी घराणें बरेंच प्रसिद्ध होतें. पहिला गुप्त राजा चंद्रगुप्त याची बायको लिच्छवी जातीची होती. चंद्रगुप्ताचा या बायकोपासून झालेला मुलगा समुद्रगुप्त मोठा विद्वान व योद्धा होता. त्याचें साम्राज्य सर्व उत्तर हिंदुस्थान व बराचसा दक्षिणकडील प्रदेश यांवर पसरलें होतें. परराष्ट्रांशीं त्याचें दळणवळण होतें. पृ. ३२० दुसऱ्या चंद्रगुप्तानें माळवा व सुराष्ट्र जिंकून दर्यांव्यापार हातीं घेतला. याच्याच कारकीर्दीत पहिला चिनी प्रवाशी फाहिआन हा हिंदुस्थानांत येऊन येथील परिस्थिति त्यानें चांगली रेखाटली आहे; पृ. ३२२-गुप्तकाळांत हिंदू संस्कृतीचें पुनरुज्जीवन झालें व परकी संस्कृतीचा थोडाबहुत पगडा हिंदू शास्त्रें व कला यांवर पडला; पृ.३२३-इ. स. ४५५ नंतर हूणांच्या स्वाऱ्यामुळें गुप्तसाम्राज्याला उतरती कळा लागली; पृ. ३२४-पांचव्या शतकांत सुराष्ट्रांत वलभी येथें स्थापलें गेलेलें राजघराणें इ. स.७७० पर्यंत टिकलें; पृ. ३२५.—तोरमाण व मिहिरगुल हे दोन हूणराजे हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहेत. मिहिरगुल मोठा क्रूर होता; पृ. ३२५-सातव्या शतकांत भोपाळचें राज्य पश्चिममाळव्यावर होतें. ठाणेश्वराच्या राजघराण्यांतील राजा हर्षवर्धन यानें मोठा दिग्विजय संपादून आपल्या नांवाचा शक सुरू केला; पृ. ३२६-देशांत आनुवंशिक चार भिन्न जाती होत्या. वस्त्रें साधीं पण अलंकार फार वापरीत; हिंदूंत शिवभक्ति विशेष होती व बौद्ध मत देशभर पसरलेलें होतें. अशा तऱ्हेची हर्षकालीन समाजस्थिति ह्युएनत्संगनें वर्णिली आहे; पृ. ३२७-हर्षानंतर उत्तरहिंदुस्थानांत लहान लहान राज्यें स्थापन झालीं. काश्मिरांत कुशानानंतर कर्कोटक, उत्पल इत्यादि घराणीं झालीं. १३३९ त तेथें एक मुसलमानी घराणें स्थापन झालें. १७६८ त गुरखे नेपाल व्यापीपर्यंत तेथें अनेक घराणीं होऊन गेलीं. कनोजास महंमद घोरी येईपर्यंत हिंदू राज्य होतें. माळव्यांत परमार व बंगालमध्यें पाल आणि सेन घराणीं बरेच दिवस टिकून होतीं.याशिवाय राजपुतान्यांत,आसामांत व सिंध आणि काबूल येथें हिंदू राज्यें होतीं; पृ. ३२९-दक्षिणेंत चालुक्य, राष्ट्रकूट व यादव यांचीं राज्यें भरभराटींत होतीं. तामीळ प्रदेशांत मध्यकाळांत पांड्य, चेर, चोल व पल्लव हीं घराणीं सुप्रसिद्ध होतीं; पृ. ३३३-दक्षिणेंत हिंदू धर्माबरोबर जैन मतहि ख्रिस्तोत्तर ७ व्या शतकापर्यंत बरेंच पसरलें होतें. पुढें तें नष्ट झालें. तेथील सामाजिक स्थिति उत्तम प्रकारची होती; पृ. ३३५.

[ संदर्भग्रंथ.—स्मिथ-अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. जे. आर. ए. एस्. १९१४. रिपोर्ट आर्किऑलॉजिकल डिपार्टमेंट, निजाम राज्य १९१४-१५. ज्ञानकोश विभाग १ ला. बाण-हर्षचरित. वाटर्स-ह्युएनत्संगाचे लेख. वैद्य-मध्ययुगीन भारत. कालिदास-रघुवंश. भांडारकर-हिस्टरी ऑफ डेक्कन. कल्हण-राजतरंगिणी. भांडारकर कॉमेमोरेशन व्हाल्युम-विक्रम एरा-न्यु लाइट ऑन गुप्त एरा अँड मिहिरकुल. इं. अँ. १९१७ ]

---

## प्रकरण १६ वें.

### रोमन-ग्रीक साम्राज्याचा इतिहास व पश्चिमेकडील साम्राज्याची स्थापना.

( पृ. ३३५-३५१ )

रोमन प्रजासत्ताक अमदानींत ग्रीसला बरें भोगावेंयांत आलें. साम्राज्याखालीं ग्रीसची आर्थिक सुधारणा फारशी झाली नाहीं, कधीं स्वतंत्र तर कधीं सेनेटच्या सत्तेखाली तें असे,उत्तरकालीं ग्रीक स्वसंस्कृतीला पारखे बनले;पृ.३३६—ग्रीकांच्या कारकीर्दीत इजिप्तची जी भरभराट होती ती रोमन राज्यांत टिकली नाहीं, पृ.३३६— रोमन साम्राज्याचे पूर्व व पश्चिम असे दोन तुकडे पडले पूर्वेकडील साम्राज्य १५ व्या शतकांत तुर्कांनीं नष्ट केलें, पश्चिमेकडील इ. स. ४७६ त नष्ट झालें तरी त्याची परंपरा इतर यूरोपीय राष्ट्रांनीं उचलली; पृ.३३८—पूर्व साम्राज्यांतील राजघराण्यांची यादी; पृ. ३३९—३३७-४७६ पर्यंतचा साम्राज्याचा इतिहास पश्चिमेकडील ऱ्हासाचा व जर्मनांच्या उचलीचा म्हणतां येईल. पूर्वेकडील बल वाढतें होतें; पृ. ३४०—सहाव्या शतकांत जस्टिनिअननें साम्राज्याला वैभवशाली केलें; पण त्याच्यामागून पुन्हां

तें दुर्बल झालें व स्लाव्ह लोक पुढें सरसावले; पृ. ३४१—सातव्या शतकांत इराणी लोकांशीं युद्ध सुरू झालें. हिरॅक्लियस पुढें आला व त्यानें साम्राज्य उचलून धरलें. पण या काळीं इस्लामी धर्माचा उदय होऊन खलीफतीनें साम्राज्यास ग्रासलें. १० व्या शतकापर्यंत साम्राज्य व खलीफत यांचा निकराचा झगडा चालू होता; पृ. ३४२—मॅसिडोनियन घराण्याखालीं साम्राज्य पुन्हां विस्तारलें. बल्गेरिया पादाक्रांत झाला रशियाची हड्डी नरम केली गेला; पृ ३४३—उमरावांची लष्करी सत्ता खच्ची केली गेल्यामुळें आशियामायनर तुर्कांकडे गेला. ११ व्या शतकांत सेल्जुकशीं लढण्याकरितां पश्चिम राष्ट्राचा रोमन बादशहानें मदत मिळविली व तीमुळें ग्रीक व लॅटिनांखश्चन यांच्यांत वैर उद्भवलें. १२०४ सालीं क्रूसेड मोहिमा व व्हेनिसचा महत्त्वाकांक्षा यामुळें ग्रीक साम्राज्य जित व वियुक्त झालें; पृ. ३४५—लॅस्कॅरिस घराण्यानें पुन्हां एकदां डोकें वर काढलें; पण ऑटोमन तुर्कांची सत्ता वाढत जाऊन अखेर कान्स्टांटिनोपल त्यांच्या हातीं गेलें व पूर्व साम्राज्य कायमचें गारद झालें; पृ. ३४७—मध्ययुगांत यूरोपचें ऐक्य साम्राज्यमूलक व ख्रिस्ती संप्रदायमूलक होतें. यूरोपीय संस्कृतीचे घटक ग्रीक संस्कृति, रोमनसाम्राज्य व ख्रिस्ती संप्रदाय हे होत;पृ.३४८—पश्चिम रोमन साम्राज्य इ. स. ४७६–८०० पर्यंत लहान लहान संस्थानें चालवीत होतीं;पूर्वेकडील सम्राट नांवाचाच त्यावरचा सत्ताधीश असे; पृ.३४९.

[संदर्भ ग्रंथ.—एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका, व्हॉ.१९–रोमन एंपायर लेटर; प्रोम. बेरी–हिस्टरी ऑफ दि लेटर रोमन एंपायर (१८८९). गिबन–डिक्लाइन अँड फॉल ऑफ दि रोमन एंपायर. सिस्मॉंडी–दि फॉल ऑफ रोमन एंपायर. ब्राईस–दि होली रोमन एंपायर.

## प्रकरण १७ वें.

### खलीफत व इस्लामचा प्रसार.

### (पृ. ३५१–३७८)

पहिल्या चार खलीफांच्या अमदानींत मुसुलमानी सत्ता सिंधूपासून अटलांटिक महासागरापर्यंत पसरली होती. अंतःकलहाला सुरुवात झाली होती, पृ. ३५१—उमईद घराण्याखालीं इस्लामी बावटा पूर्वेस चीनच्या सरहद्दीवर तर पश्चिमेस स्पेनभूमीवर रोवण्यांत येऊन खलीफतीचा लौकिक दूरवर पसरला; तथापि ती दुर्बल व वियुक्त होत चालली; पृ.३५२—आब्बासी खलीफांत हरून अलरशीद प्रख्यात आहे. याच्या कारकीर्दीत इजिप्त व स्पेन येथें नवीन खलीफती निर्माण झाल्या. इस्लामी सत्ता कळसास पोंचून खालीं उतरूं लागली; पृ ३५३—फातिमाईद खलीफांच्या काळीं साम्राज्य बगदादपुरतेंच होतें; इतर मुलूख स्वतंत्र झाला. १२५८ त जेंगीझखानाच्या भावानें खलीफत बुडविली. इजिप्तची खलीफतीची गादी तुर्कस्थानकडे येऊन ती अद्याप तेथें नांवापुरती आहे; पृ. ३५४–तिसऱ्या खलीफाच्या खुनापासून अरबस्तानचें राजकीय महत्त्व गेलें; फक्त धार्मिक बाबतींत अद्याप त्याला महत्त्व आहे; पृ. ३५५—उमईद घराण्याखालीं सिरिया अरबसंस्थानांत श्रेष्ठ बनला;. तेथील ख्रिस्ती मुसुलमानांशक्षा बरोबरीनें वागत; पुढें त्यांच्यांत धर्मयुद्धें झालीं; पृ. ३५६–मेसापोटेमिया धर्मद्रोही व राजद्रोही म्हणून खलीफतींत प्रसिद्ध असे. आब्बासी घराण्याच्या काळीं त्याला महत्व आलें; पृ. ३५७—इस्लामी संप्रदायांत तुर्कस्थानचा भाग व्यावहारिक आहे; हल्लीं तुर्कस्थानाला पाश्चात्य वळण–मुसुलमानी कायद्याविरुद्ध–लागत चाललें आहे; पृ. ३५८–इराणांत मुसुलमानी धर्मपंथ पुष्कळ असून ते पूर्ण लोकसत्ताक आहेत; पृ. ३६०–मध्य आशिया अति मागासलेला आहे. तेथें महंमदाच्या आज्ञा सरकार जबरीनें पाळावयास लाविते; पृ. ३६१–हिंदुस्थानांत मुसुलमानी सत्ता १२–१९ व्या शतकापर्यंत टिकली; येथील फारच थोडे मुसुलमान अरबी वंशाचे आहेत; त्यामुळें सांवळेपणा कमी आहे; पृ. ३६२–तिबेटमध्यें इस्लामधर्म फारच थोडा असून प्रसरणशील नाहीं. तार्तरींत अजमासें दीड कोटी मुसुलमान आहेत; पृ. ३६३–चीनमध्यें इ. स. ६२८ मध्यें इस्लामी धर्म शिरला; कानसू व शेनसी प्रांतांतून बरेच मुसुलमान आहेत. चिनी मुसुलमानांची भाषा चिनी पण आचरण थोडें निराळें असतें; ते शेतकी व व्यापार करतात; मुसुलमानी अधिकारीहि चीनमध्यें आहेत. या मुसुलमानांत अनेक पथ आहेत. या लोकांनां स्वतंत्र राजकीय अस्तित्व नाहीं; पृ. ३६४–इजिप्तनें इस्लामी धर्माला श्रेष्ठपणा मिळवून दिला व सध्यांहि त्याला सुधारण्याचें काम नेटानें चालू आहे. तेथील अझर युनिव्हर्सिटीची कीर्ति जगभर पसरली आहे; पृ. ३६९–उत्तर आफ्रिकेंतील मुसुलमान बर्बर जातीचे असून त्यांचें कोड मलीकी आहे; ते धर्मसुधारक दिसतात; पृ. ३७१–मध्य आफ्रिकेंत मलिकाइट पंथाचे मुसलमान आहेत; पृ. ३७२–जगांतील मुसुलमानी लोकवस्ती दाखविणारें कोष्टक; पृ. ३७२.

[संदर्भ ग्रंथ.—ब्रिटानिका–कॅलिफेट. सरदेसाई–मुसलमानी रियासत. सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स–मोहामेडॅनिझम. लिंट–हिस्टरी ऑफ दि फिलॉसॉफि ऑफ हिस्टरी. वेर–दि शेखस ऑफ मोरोक्को. के–ओमाराज हिस्टरी ऑफ येमेन. ब्रूमहाल–इस्लाम इन चायना. अंडरसन चायनीज मोहामेडन्स. मिसेस मीर हसन अली–आब्झर्व्हेशन्स ऑन दि मुसुलमान्स ऑफ इंडिया. हंटर–इंडियन मुसलमान्स. ब्रौन–लिटररी हिस्टरी ऑफ पर्शिया. अर्नोल्ड–दि प्रीचिंग ऑफ इस्लाम. स्ट्रेंज–लँड्स ऑफ दि ईस्टर्न कॅलिफेट. फ्रेझर–मेसॉपोटेमिया अँड ॲसिरिया.ईलियट–टर्की, इन यूरोप.मॅकडोनल्ड डेव्हलेपमेंट ऑफ मुस्लिम थिऑलॉजी].

## प्रकरण १८ वें.

### यूरोप, शार्लमान राजाच्या मृत्यूपासून सोळाव्या शतकापर्यंत

### ( पृ. ३७७—३८२ )

शार्लमानच्या मृत्यूनंतर सरंजामी पद्धत सुरू झाली. तिनें यूरोपचें संरक्षण केलें पण ती प्रबळ होऊन बसली; पृ. ३७८—धर्मयुद्धामुळें पोप व राजा यांची सत्ता वाढली, सरंजामी पद्धत बुडाली, व्यापार वाढला; पृ. ३७९—मध्य युगाच्या उत्तरार्धांत राष्ट्रभावना जागृत झाली. हॅप्सबर्ग घराण्यांत साम्राज्यपद गेलें. बेकीमुळें यूरोपांत महंमदी सत्ता रुजली; पृ. ३८०—या वेळीं नवयुगास जागतिक वसाहतीमुळें व ज्ञानवृद्धीमुळें आरंभ झाला; पृ. ३८१.

[संदर्भग्रंथ.—ब्रिटानिका—यूरोप. दि केंब्रिज मॉडर्न हिस्टरी. हिस्टोरियन्स हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड. पीरियड्स ऑफ यूरोपियन हिस्टरी; पी. २ रें, ३ रें. अॅन्ड्रूज—हिस्टॉरिकल डेव्हलपमेंट ऑफ यूरोप.]

---

## प्रकरण १९ वें.

### यूरोपांतील लहान राष्ट्रांपासून मोठ्या राष्ट्रांचा व प्रांतिक भाषांचा विकास.

### ( पृ. ३८२-४०५ )

राष्ट्रघटनेच्या इतिहासांत संस्थान व भाषा यांच्या वाढीओढीचा इतिहास दिला पाहिजे; पृ. ३८२—इटलींत इंडोयूरोपीय व तदितर भाषा बोलणारे लोक होते. रोमनसाम्राज्यामुळें यांचें राष्ट्रीकरण सुलभ झालें; पृ. ३८३—इटालियन, जर्मन व मुसुलमान यांची जास्त वस्ती स्पेनमध्यें होती. पोर्तुगीझ लोक पुष्कळ जाती मिळून बनले आहेत. स्पेनमध्यें तीन रोमान्स भाषा चालतात; पृ.३८४—हल्लींच्या फ्रेंचांत अनेक रक्तांचें मिश्रण आहे. फ्रेंच भाषा ही रोमानिक पोटभाषा असून, ती मूळ पॅरिस शहरची भाषा होती. या भाषेंत मुख्यत्वें लॅटिन शब्दांचा भरणा आहे; पृ.३८६—आंग्ल लोक केल्टिक, रोमन, सॅक्सन स्कँडिनेव्हियन व नार्मन या जाती मिळून बनले आहेत. इंग्लिश भाषा टयूटॉनिक वंशांतील लोजर्मनपासून बनली आहे; ३८८— स्कँडिनेव्हियामध्यें टयूटॉनिक लोकवस्ती असून भाषा पूर्व टयूटॉनिकपासून बनलेली आहे; ३९०—मूळ नेदर्लंडमध्य गॅलोकेल्टिक व जर्मानिक लोक रहात; पुढें रोमन, फ्रँक व नॉर्थमेन लोक आले; प्रथम केल्टिक, मग फ्रेंच, पुढें फ्रिशियन व हॉलंडी व शेवटीं डच असा भाषाप्रचार या देशांत झाला. डच ग्रंथभाषा डच बोलीहून निराळी आहे; ३९१—डेन्मार्कमध्यें डॅनिश लोक इ. स. ८ व्या शतकापासून येऊं लागले. डेन्मार्कची आजची भाषा जुन्या स्कँडिनेव्हियन भाषेपासून निघाली आहे; पृ.३९३—जर्मनींत गाल, केल्टिक, गॉथ, फ्रँक, हूण, सॅक्सन इत्यादि लोक वस्ती करून होते. जर्मनभाषा वेस्ट जर्मानिक कुलींतील आहे; त्या पोटभाषा अनेक आहेत; पृ. ३९४—रशियन लोकांत स्लाव्ह रक्त अधिक प्रमाणांत आहे. जाती अनेक दृष्टीस पडतात. रूसमधील प्राचीन लोकांचा नक्की शोध लागला नाहीं; पृ. ३९७—हंगेरियन ९ व्या शतकांत आले. सध्यां हंगेरींत निरनिराळ्या जातींची वस्ती आहे; पृ. ४००—बाल्कन द्वीपकल्पांत स्लाव्ह लोकांची वस्ती अधिक आहे; भाषा निरनिराळ्या जातींत निरनिराळी आहे. प्रथम बल्गर, मग सर्व्हिअन, मग अल्बेनियन, नंतर तुर्की अशीं राज्यें या द्वीपकल्पांत होतीं; पृ. ४०१—ग्रीसमध्यें मुख्यत्वें ग्रीक, अल्बेनियन व व्लाच या तीन जाती आहेत. यूरल अलटेक भाषेचे फिनोउग्रिअन रशियांत जास्त आहेत. उग्रिअन शाखेंत तीन उपशाखा व फिनीश लोकांत अनेक उपजाती सांपडतात; पृ. ४०२.

[संदर्भग्रंथ.—सीझर—कॉमेंटरीज. मार्श—ऑरिजिन अॅंड हिस्टरी ऑफ इंग्लिश लँग्वेज. इलियट—मॉडर्न लँग्वेज. टॅसिटस—जर्मानिया. प्लिनी याचे ग्रंथ. हिरोडोटस. ब्रिटानिका—आस्ट्रियाहंगेरी, डेन्मार्क, फ्रान्स जर्मनी, ग्रीस, नेदर्लंड, इटली, इंग्लंड, रशिया, बाल्कन पेनिनशुला इत्यादि देश. व्हिटने—लँग्वेज अॅंड इट्स स्टडी. मरे-हिस्टरी ऑफ यूरोपियन लँग्वेजेस.]

---

## प्रकरण २० वें.

### राष्ट्रसंवर्धन राष्ट्रांतील चुरस व जगाची ओळख.

### ( पृ. ४०५-४१२ )

१६ व्या शतकांत प्रोटेस्टंट पंथ उदयास आला व राष्ट्रपद्धतीची वाढ झाली. कॅथोलिक व प्रोटेस्टंट पंथांत मोठा निकराचा झगडा चालू होता; पृ. ४०५—१७ व्या शतकांत संप्रदायमूलक युद्धें सुरू झालीं, जर्मनींतील संस्थानिक स्वतंत्र बनले. फ्रान्समध्यें राजसत्ता प्रबल झाली; १४ वा लुई यूरोप पादाक्रांत करण्याच्या खटपटींत होता. तुर्कलोक पूर्व यूरोपवर स्वाऱ्या करीतच होते; पृ. ४०७—स्वीडनचा मोठ्या झपाट्यानें उदय झाला व तसाच लवकर नाशहि झाला. स्पेन कळसास पोंचला होता तो खालीं घसरूं लागला; पृ. ४०९—रशियाचा अभ्युदय पीटर धी ग्रेटनें केला; त्यानें रशियाची अंतर्बाह्य सुधारणा केली; पृ. ४१०—होहेनझोलर्न घराणें ब्रँडेनबर्गवर राज्य करूं लागल्यापासून प्रशिया यूरोपमध्यें एक बलिष्ठ राष्ट्र म्हणून गणण्यांत येऊं लागला; पृ. ४११.

[संदर्भग्रंथ—ब्रिटानिका—यूरोप. अयर—हिस्टरी ऑफ मॉडर्न यूरोप. हिस्टोरियन्स हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड. पीरियड्स ऑफ यूरोपियन हिस्टरी. केंब्रिज मॉडर्न हिस्टरी. स्टेबिंग—हिस्टरी ऑफ रेफॉर्मेशन. ऑबिंगे—हिस्टरी ऑफ रेफॉर्मेशन इन यूरोप.]

---

## प्रकरण २१ वें.

### मुसुलमानांची हिंदुस्थानावर सत्ता.

(पृ. ४१२-४२१.)

सातव्या शतकांत अरबस्तानांत स्थापन झालेल्या महमदी धर्माच्या अनुयायांनीं तुर्कस्तान, इराण, अफगाणिस्तान, बलुचिस्तान वगैरे देश जिंकून तेथें धर्मप्रसार केल्यावर इ. स. ७११ मध्यें हिंदुस्थानावर चाल करून सिंध प्रांत काबीज केला. पण लवकरच ७५० मध्यें हिंदूंनीं त्यांनां हांकून लाविलें. तथापि १००१ पासून गिझनीच्या महमुदानें पुन्हां स्वाऱ्या सुरू केल्या व घोरीच्या महंमदानें दिल्लीस मुसुलमानी राज्य स्थापिलें. मुसुलमानांत मुख्य दोन जाती आहेत. एक सेमेटिक वंशांतले म्हणजे अरबस्तानापासून हिंदुस्थानापर्यंतच्या मध्यवर्ति देशांतले व दुसरे मोंगोलियन वंशांतले म्हणजे चीन, तार्तरी, सैबीरिया वगैरे भागांतले. त्यांपैकीं सेमेटिक वंशांतले अरब वगैरे लोक अधिक सुसंस्कृत, विद्वान् व गौरवर्णी होते, तर उलट मोंगोलियन वंशांतले मोंगल वगैरे पिंगटवर्णी, मागासलेले व क्रूर असत; पृ. ४१२—महंमद घोरीच्या घराण्यानंतर गुलाम, खिलजी, तघलख, सय्यद व लोदी या तुर्क जातीच्या घराण्यांनीं दिल्लीस राज्य केलें. नंतर १५२६ मध्यें मोंगल घराण्याचें राज्य सुरू होऊन तें लहानमोठ्या प्रमाणांत १८५७ पर्यंत टिकलें. तुर्क व मोंगल दोघेहि मोंगोलियनवंशांतले होत. तुर्कांपैकीं खिलजी घराण्याच्या वेळीं मुसुलमानांनीं दक्षिणेंत कर्नाटकापर्यंत अंमल बसविला पण लवकरच विजयानगरच्या हिंदु राजांनीं व नंतर मराठ्यांनीं मुसुलमानी अंमल नष्ट करून हिंदू राज्य स्थापिलें. १३९८ पासून मोंगलांनीं स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. त्यांत तैमूरलंग फक्त लूट घेऊन परत गेला तर बाबरनें तुर्कांचें दिल्ली येथील राज्य नष्ट करून आपलें मोंगल घराणें स्थापलें; पृ. ४१५— मोंगल बादशहांपैकीं अकबर व औरंगजेब हे विशेष कर्तृत्ववान् होते. अकबरानें रजपुतांशीं स्नेह व शरीरसंबंध जोडून त्यांच्या मदतीनें बहुतेक हिंदुस्थान जिंकून साम्राज्य स्थापिलें. शिवाय त्यानें राजकीय, धार्मिक, सामाजिक वगैरे अनेक सुधारणा केल्या व हिंदू, मुसुलमान वगैरे सर्वांनां समतेनें वागविलें. पण पुढें औरंगजेबानें उदार धोरण सोडून हिंदूंनां त्रास दिला व मराठ्यांचें राज्य बुडविण्याचा प्रयत्न केला. पण तो साधला नाहीं. उलट पक्षीं त्याच्या नंतरचे मोंगल बादशहा दुर्बल निघाल्या-मुळें प्रांतोप्रांतीचे मुसुलमान सुभेदार स्वतंत्र झाले व मराठ्यांनींहि आपलें साम्राज्य दिल्लीपंजाबपर्यंत वाढविलें. दिल्लीचे मोंगल बादशहा पुष्कळ वर्षें मराठ्यांच्या अंकित होते. अखेर १८५७ मध्यें ब्रिटिश सरकारनें दिल्लीचें मोंगल राज्य खालसा केलें; पृ. ४१६–प्रथम मुसुलमानांच्या स्वाऱ्यांचा उद्देश लुटालुटीचा होता. नंतर त्यांनीं राज्य स्थापिलें व विशेष भर धर्मप्रसारावर दिला. तथापि पांच सहाशें वर्षें राजसत्ता असूनहि मुसुलमानांनां फारसा धर्मप्रसार करतां आला नाहीं. मुसुलमानी राज्यकारभारपद्धति मात्र सर्वत्र रूढ झाली; इतकी कीं, मराठ्यांनीं सुद्धां बहुतेक तीच चालू ठेविली व ईस्ट इंडिया कंपनीच्या वेळीं प्रथम तीच कायम होती; पृ. ४१८.

[संदर्भग्रंथ.—क्रीन—हिस्टरी ऑफ इंडिया. सरदेसाई—मुसुलमानी रियासत. हिस्टोरियन्स हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड. सरकार—मोंगल ॲडमिनिस्ट्रेशन. इंपीरियल गॅझेटियर पु. २. अलबेरुनी—इंडिया. लेनपूल—मिडीव्हल इंडिया. स्मिथ-आक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया.]

---

## प्रकरण २२ वें.

### हिंदूंची उचल.

(पृ. ४२१—४५०)

परकी मुसुलमान हिंदुस्थानांत शिरतांच हिंदु लोकांनीं प्रतिकाराची चळवळ सुरू केली. प्रथम रजपुतांनीं निकराचे सामने दिले. तथापि रजपुतांचीं आपसांत भांडणें असल्यामुळें त्यांचा मोड होऊन त्यांनां खालीं रजपुतान्यांत मागें हटावें लागलें. तथापि त्यांनीं दिल्लीच्या सुलतानाशीं विरोध कायम ठेविला. पण मध्यंतरीं अकबरानें रजपुतांशीं मैत्री करून शरीरसंबंधहि जोडले. हा सलोखा तीन कारकीर्दी टिकून औरंगजेबाच्या वेळेपासून रजपुतांनीं पुनः विरोध चालू केला व आपलीं राजपुतान्यांतील राज्यें कायम राखलीं; पृ. ४२१— दक्षिणेंत मुसुलमानांनां विरोध करून विजयानगरला हिंदूंनीं राज्य स्थापन केलें. विजयानगरचें राज्य १३३६ ते १५६५ पर्यंत टिकलें व त्यामुळें मुसुलमानांचा राज्यप्रसार तुंगभद्रेच्या दक्षिणेकडे झाला नाहीं; पृ. ४२३—शिवाजीनें महाराष्ट्रांत मुसुलमानांचा अंमल नष्ट करून मराठ्यांचें स्वतंत्र राज्य स्थापलें. या कामगिरीचा उपक्रम शहाजीनेंच केला होता असें इतिहाससंशोधनानें सिद्ध केलें आहे; पृ.४२५— शिवाजीनें प्रथम विजापूरच्या सुलतानाच्या ताब्यांतील मुलूख जिंकला व नंतर दिल्लीच्या मोंगलांच्या ताब्यांतील मुलूख सोडवून महाराष्ट्राला स्वतंत्र केलें. कोंकणांतील शिद्याचा अंमल नष्ट करण्याकरितां शिवाजीनें स्वतःचें आरमारहि वाढविलें; पृ. ४३१—शिवाजीचे मुलगे संभाजी व राजाराम विशेष कर्तृत्ववान् नसल्यामुळें औरंगजेबानें

स्वतः दक्षिणेंत स्वारी करून महाराष्ट्र परत जिंकण्याचा प्रयत्न केला. पण मराठे सरदारांनीं १६८३ ते १७०७ पर्यंत सतत वीस पंचवीस वर्षें मुसुलमानांशीं झगडून महाराष्ट्राचें स्वातंत्र्य कायम राखलें; पृ. ४३५.—औरंगजेबानंतरचे दिल्लीचे बादशहा दुर्बल निघाले. त्याचा फायदा घेऊन मराठी राजांचे मुख्य प्रधान बाळाजी विश्वनाथ, बाजीराव व नानासाहेब पेशवे यांनीं महाराष्ट्राबाहेर उत्तरेकडे दिल्ली—अटकेपर्यंत व दक्षिणेंत तंजावरपर्यंत आणि पूर्वपश्चिम बंगाल ते गुजराथपर्यंतच्या बहुतेक प्रदेशांवर आपला अंमल बसविला आणि मुसुलमानांची सत्ता संपुष्टांत आणली. पण पुढें पानिपतच्या लढाईंत (१७६१) मुसुलमानांस जय मिळाल्यामुळें मराठ्यांचा राज्यविस्तार थांबला. लवकरच इंग्रजांची बलिष्ठ सत्ता मद्रास व बंगालमध्यें स्थापन होऊन अखेर तिनें मराठ्यांचें राज्य (१८१८) नष्ट केलें; पृ. ४३६—मराठे हे केवळ लुटालूट करणारे चोर, दंगेखोर होते हा व्हिन्सेंट स्मिथ वगैरे कांहीं इतिहासकारांचा आक्षेप चुकीचा असून परक्या मुसुलमानी किंवा ब्रिटिश सत्तेला विरोध करून हिंदुस्थानचें स्वातंत्र्य रक्षिण्याचा हक्क शीख, रजपूत यांच्याप्रमाणें मराठ्यांना होता व त्याच देशस्वातंत्र्याच्या भावनेनें मराठ्यांनीं राज्याची स्थापना व विस्तार केला हें मत बहुतेकांनां मान्य झालें आहे; पृ. ४४५—रजपूत, मराठे वगैरे हिंदूंप्रमाणें शीखांनीं पंजाबांत मुसुलमानी अमलाला विरोध करून तो प्रांत स्वतंत्र राखला. याप्रमाणें शीख, रजपूत, मराठे व विजयानगरचे हिंदू राजे यांनीं मिळून हिंदुस्थान देश मुसुलमानी अमलांतून बहुतेक सोडविला होता; पृ. ४४७—या सर्वांच्या प्रयत्नांपैकीं मराठ्यांचा प्रयत्न अधिक व्यापक व अधिक यशस्वी झाला. स्वधर्मसंरक्षणहि शीखरजपुतांपेक्षां मराठ्यांनीं अधिक केलें. विद्याविकास व संस्कृतिविकास या राष्ट्रीय कार्याला मात्र मराठे पेशव्यांपेक्षां विजयानगरच्या हिंदू राजांनीं फार अधिक मदत केली; पृ. ४८८.

[संदर्भग्रंथ.—ज्ञानकोश पहिला विभाग. सरदेसाई—मराठी रियासत. टॉड—हिस्टरी ऑफ राजस्थान. सेवेल—फरगॉटन एम्पायर. सूर्यनारायणराव—नेव्हर टु बी फरगॉटन एम्पायर. ग्रँट डफ—हिस्टरी ऑफ दि मराठाज. वासुदेवशास्त्री खरे—मालोजी व शहाजी नामक निबंध. विश्वनाथपंत राजवाडे—राधामाधवविलासचंपू. नरसिंह चिंतामण केळकर—मराठे व इंग्रज. सरदेसाई—मराठी रियासत मध्यविभाग १।२।३. व्हिन्सेंट स्मिथ—ऑक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया. एन्सायक्लोपीडिया ब्रिटॅनिका—शीखावरील लेख. भारत इ. सं. मंडळ—वार्षिक इतिवृत्तें; संमेलनवृत्तें; व त्रैमासिकें. खरेशास्त्री—ऐतिहासिक लेखसंग्रह. राजवाडे—मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें. लायल—ब्रिटिश डोमीनियन इन इंडिया. कृष्णस्वामी अय्यंगार—सोर्सेस ऑफ विजयानगर हिस्टरी.]

## प्रकरण २३ वें.

### जुन्या संस्कृती व त्यांचें यूरोपीभवन.

(पृ. ४५१—४७१.)

जगांत जिकडेतिकडे यूरोपीय वर्चस्व झालें आहे. जेथें यूरोपीयांचें आगमन देश्यसंहारक झालें असे देश आस्ट्रेलिया, न्यूझीलंड, अमेरिका इत्यादि होत. आफ्रिकेंत तें संहारक झालें नाहीं. तुर्कस्तानादि राष्ट्रांनीं आपलें स्वातंत्र्य गमावलें नाहीं. फ्रेंच, स्पानिश, रशियन हे देश्यांशीं शरीरसंबंधानीं समरूप झाले; पृ. ४५१—आफ्रिकेंतील मूळ रहिवाश्यांच्या बुशमन, हाटेनटॉट, नीग्रो, हेमाइट व सेमाइट अशा पांच मुख्य जाती आहेत. यांच्या संस्कृतींत शुद्ध व मिश्र असे दोन प्रकार आहेत. बुशमन व नीग्रो हे फक्त आफ्रिकेंतील मूळचे रहिवाशी व बाकीचे बाहेरून आलेले, असें मानववंशशास्त्रज्ञ समजतात. फिनिशियन, ग्रीक, रोमन, तुर्क, पोर्तुगीज, डच व इंग्लिश या लोकांनीं आफ्रिकेंत वसाहती करण्याचा प्रयत्न केला. १९ व्या शतकांत ग्रेटब्रिटन, फ्रान्स, जर्मनी, पोर्तुगाल व इटली यामध्यें आफ्रिकेची विभागणी झाली. नंतर प्रत्येक राष्ट्रानें आपल्या मुलुखाची मोजणी व पहाणी केली. तथापि व्यापार मात्र वाढला नाहीं; पृ. ४५२—अमेरिकन इंडियनांच्या वसतिस्थानांवरून निरनिराळ्या जाती कल्पिल्या आहेत. त्यांच्यांत २०० भाषा व एक हजार पोटभाषा आहेत. यांची शिल्पकला प्रगल्भ दिसते. ते शाकाहारी व मांसाहारी होते. यांच्यांत अनेक उपयुक्त धंदे असत. प्राणिविद्येमुळें यांचें बऱ्याच विषयांत पुढें पाऊल पडलें. प्रवासाकरितां वाहनें व होड्या असत. लिखितकला फार वाढलेली नव्हती; पृ. ४५८—मयसंस्कृति पुष्कळ बाबतींत मेक्सिकन संस्कृतीपेक्षां उच्च दर्जाची दिसते; पृ. ४६२—इंकापूर्वीचे (अखंडपाषाणस्तंभी) लोक बरेच सुधारलेले होते. इंका लोकांचा ईश्वर विरकोचि असे. त्यांच्या चाली व राज्यकारभार यांवरून ते रानटी वाटत नाहींत; पृ. ४६२—उच्च प्रतीची दिसणारी मेक्सिकन संस्कृति फार प्राचीन नसून आशियांतील राष्ट्रांच्या परिचयामुळें तयार झाली असावी. अझटेक राष्ट्र मोठें युद्धप्रिय व न्यायी असे. तेथील लोक मोठे उद्योगी व कुशल असत; पृ. ४६३—प्रथम अमेरिकेंत स्पानिश व पोर्तुगीज लोकांनीं, नंतर फ्रेंच व इंग्लिशांनीं वसाहती केल्या. इंग्लिशांच्या वसाहती मात्र सुधारल्या. अमेरिकेंत स्वतंत्र राष्ट्रें उदयास येऊं लागलीं; पृ. ४६५—आस्ट्रेलियांतील देश्य लोक फार मागासलेले असून त्यांच्याविषयीं खात्रीलायक संशोधन झालें नाहीं. अठराव्या शतकापासून या खंडाविषयीं जास्त माहिती मिळूं लागली. प्रथम गुन्हेगारांची वसाहत करण्यांत येऊन पुढें जबाबदारीची राज्यपद्धति तेथें स्थापण्यांत आली; पृ. ४६८—सैबेरियांत प्रथम येनिसीयन, मग उग्रोसामोयिडी, नंतर तुर्कोतार्तार व

ोवर्टी रशियन लोक आले. रशियनांनीं फार लवकर सैबेरेया जिंकला; पृ. ४७०.

[ संदर्भग्रंथ.—स्टो आणि थील—दि नेटिव्ह रेसेस ऑफ साऊथ आफ्रिका. स्पेन्सर—डिस्क्रिप्टिव्ह सोशिऑलाजी, पुं. ४. आफ्रिकन रेसेस. ब्राऊन—दि स्टोरी ऑफ आफ्रिका अँन्ड इट्स एक्सप्लोअर्रस. मंगो पार्क—ट्रॅव्हल्स इंटु दि इंटीरिअर डिस्ट्रिक्ट्स ऑफ आफ्रिका. लिव्हिंग्स्टन—मिशनरी ट्रॅव्हल्स..........इन साऊथ आफ्रिका. जॉन्स्टन—हिस्ट्री ऑफ दि कालोनायझेशन ऑफ आफ्रिका बाय ॲलिअर रेसेस. विन्सॉर—नॅरेटिव्ह अँड क्रिटिकल हिस्टरी ऑफ अमेरिका. ब्यूरो ऑफ अमेरिकन एथ्नालॉजीचीं प्रकाशितें. होम्स—आर्किऑलॉजिकल स्टडीज. मॉर्गन—टेबल्स ऑफ कॉन्सॅंग्विनिटी. ब्रौडिच—मेक्सिकन अँड सेंट्रल अमेरिकन अँटिक्विटीज. ब्रिंटन—दि अमेरिकन रेस. लिव्हिंग्स्टन फारांड—दि अमेरिकन नेशन ए हिस्टरी. ऐयरे—डिस्कव्हरीज इन सेंट्रल आस्ट्रेलिया. काल्डवेल—दि लॅंग्वेजेस ऑफ इंडिया. स्पेन्सर आणि गिलन—नेटिव्ह ट्राईब्स ऑफ सेंट्रल आस्ट्रेलिया. फार्वेक—दि हिस्टरी ऑफ आस्ट्रेलियन एक्स्प्लोरेशन. ब्रिटानिका—आफ्रिका, अमेरिका, मेक्सिको, आस्ट्रेलिया व सैबेरिया. एनसायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स—इंका, मयन. ]

---

## प्रकरण २ वें.

### भारतीय तत्त्वज्ञान व धर्म याचा विकास.

(पृ. ४७२—४७४)

धर्म हा शब्द निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या अर्थानें वापरला आहे. त्याचें स्वरूप कल्पसूत्रलेखकांनीं अधिक व्यापक केलें; पृ. ४७२—वेदेतर वाङ्मयांत वेदांगें, दर्शनें, पुराणें आणि आयुर्वेद, साहित्य, नाट्य इत्यादि व्यावहारिक वाङ्मय, अंतर्भूत होतें. व्याससूत्रें व भगवद्गीता हे ग्रंथ पारमार्थविषयक वाङ्मयास आधारभूत झाले; पृ. ४७२—सामान्य लोकांचीं दैवतें वेदकालापासून आजतागाईत जशींच्या तशींच आहेत. शिवविष्णूस साक्षर लोकांनीं आपल्या यागधर्मांत उचलून घेतलें व सामान्य जनांशीं समरूप होण्याचा प्रयत्न केला; पृ. ४७३—रामानंदानें वेदांततत्त्वें सामान्य जनांत पसरवून त्यांच्यांत धर्मश्रद्धा उत्पन्न केली. त्याच्या शिष्यांत विठ्ठलचैतन्य, नानक, कबीर यांना घालतां येईल. बसव, स्वामीनारायण व वल्लभाचार्य यांच्या नंतर राममोहनराय व दयानंद यांनीं भारतीय पारमार्थिक भावना जागृत केली; पृ. ४७३.

[संदर्भग्रंथ.—ज्ञानकोश—वेदविद्या, विज्ञानेतिहास. मनुस्मृति. कल्पसूत्रें. त्रिपिटक. दर्शनें. रामायण. महाभारत. हॉपकिन्स—रिलिजन्स ऑफ इंडिया. बार्थ—रिलिजन्स ऑफ इंडिया. भांडारकर—शैविझम, वैष्णविझम अँन्ड मायनर रिलिजस सिस्टीम्स.]

---

## प्रकरण २५ वें.

### बुद्धोत्तर चीन व जपान.

(पृ. ४७४-४८५)

चीन व हिंदुस्थान यांचा संबंध पूर्वापार आहे. चौ घराण्याच्या कारकीर्दींत (ख्रि. पू. ११२२—२५३) बादशाही सत्तेचा बराच उत्कर्ष झाला, उच्च दर्जाचें वाङ्मय व कन्फ्यूशियन आणि लाऊत्से पंथ निर्माण झाले; पृ ४७४—त्सिन घराण्यांतील शीव्हांगति बादशहानें राज्यकारभारांत आमूलाग्र सुधारणा केल्यानें बंड झालें व हान घराणें अधिकारारूढ झालें. हान घराण्याखालीं चीनचें साम्राज्य व व्यापार वाढला; पृ.४७६—यानंतर चीनमध्यें बंडाळी माजून राहिली. सुइ घराण्याच्या काळीं साम्राज्यांत ग्रंथसंख्या बरीच वाढली; खर्च फार झाला. तंग घराण्यांतील बादशहांनीं चीनची मोठी प्रसिद्धी केली; पृ.४७७—सुंग कारकिर्दींत मोंगल चिनांत घुसले व त्यांनीं राज्य बळकाविलें. पण ही मोंगल सत्ता १३६८ मध्यें नष्ट झाली व मिंग घराणें आलें. यावेळीं यूरोपीय लोकांचा चीनशीं संबंध आला. कोरियाबद्दल जपानबरोबर युद्ध झालें व मांचू लोक चिनांत शिरले; पृ.४७८—मांचू घराणें चांगलें शूर व प्रसिद्ध होतें. त्याच्या अमदानींत यूरोपियन राष्ट्रांनीं चीनमध्यें शिरून धुमाकूळ मांडला; यामुळें राज्यक्रांति होऊन चीन रिपब्लिक झालें; पृ. ४८०— चीन व ब्रह्मदेश यांचीं अनेक शतकांपासून भांडणें चालू होतीं. नेपाळचा चीनशीं संबंध तिबेटमुळें येतो. १८९०त सिकिम ब्रिटिश संरक्षणाखालीं आल्यापासून त्याचा चीनशीं संबंध तुटला; पृ.४८१—जपान व इंग्लंड या देशांत कांहीं साम्य आहे, जपानचा प्राग्ऐतिहासिक काल इ.स.पू. ६६०—इ-स-५०० पर्यंतचा आहे; या काळीं २४ राजे होऊन गेले. ऐतिहासिक कालांत १८३७ पर्यंत जपानांत सरंजामी पद्धत होती पण पुढें मोठी क्रांति होऊन जपान झपाट्यानें सुधारलेल्या राष्ट्रांच्या मालिकेंत येऊन बसला; पृ. ४८२.

[ संदर्भग्रंथ—ब्रिटानिका—चीन व जपान: हिस्टोरियन्स हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड.—जपान. हाल्डे—जनरल हिस्टरी ऑफ चायना. हुक—दि चायनीज एंपायर. हिर्थ—एन्शंट हिस्टरी ऑफ चायना. डिकिन्सन-जपान, इंडिया अँड चायना ( ॲन एसे ऑन दि सिव्हिलिझेशन ). कर्झन —जपान, कोरिया, चायना. ]

---

## प्रकरण २६ वें.

### यूरोपीय इतिहास व जागतिक इतिहास.

(पृ. ४८५—४९६)

साम्राज्यप्रसार, धर्मप्रसार व व्यापार यामुळें यूरोपचा अखिल जगाशीं प्रत्यक्ष संबंध येत गेला. यूट्रेचच्या 'तहापासून पुढें फ्रेंच राज्यक्रांतीपर्यंत फ्रान्स व इंग्लंड, आणि आस्ट्रिया व प्राशिया यांमध्यें चुरस लागून राहिली होती;' पृ. ४८५.— फ्रेंच राज्यक्रांतीमुळें सर्व यूरोप हादरलें व मोठी विचारक्रांति झाली. नेपोलियननें मोठें साम्राज्य स्थापून सर्व राष्ट्रें आपल्या अंकित ठेविलीं. त्याचा पाडाव झाल्यानंतर व्हिएन्नाच्या काँग्रेसनें यूरोपमध्यें शांतता स्थापण्याचा प्रयत्न केला; पृ. ४८६—राष्ट्राराष्ट्रांत शक्तिसमता राहण्यासाठीं राशिया, आस्ट्रिया व प्राशिया यांनीं जूट केली; पण तिचा उपयोग न होतां पुन्हां अराजकता माजली. १९ व्या शतकाच्या मध्यांत सर्व यूरोपभर मोठी क्रांतिकारक लाट उसळली; पृ. ४८८—तुर्कस्थानच्या दुर्बलतेमुळें पूर्वेकडील प्रश्न बिकट झाला. इकडे जर्मनसाम्राज्य बळावलें; फ्रेंचसाम्राज्य बुडून फ्रान्स प्रजासत्ताक झालें. यूरोपच्या राजकारणांत बिस्मार्कचें प्रस्थ वाढलें. बाल्कनयुद्धामुळें राष्ट्राराष्ट्रांत बेबनाव झाला; पृ. ४९०— इटालीनें स्वसंरक्षणार्थ आस्ट्रिया-जर्मनीशीं तह केला; फ्रान्सनें राशिया व इंग्लंड यांशीं केला. यूरोपियन राष्ट्रांत पुढें अर्मोनिया, क्रीट, आफ्रिका व आशिया यांच्या बाबतींत समेट करून टाकण्यांत आले; पृ. ४९२—पूर्व यूरोपांत पुन्हां यादवी उत्पन्न झाली; बल्गेरिया स्वतंत्र झाला; जर्मनी डोईजड झाला. इंग्लंड व जर्मनी यांच्यांत चुरस लागली व १९१४ सालीं किरकोळ कारणावरून महायुद्ध सुरू झालें. या महायुद्धाचे परिणाम विश्वव्यापी आहेत; पृ. ४९४.

[संदर्भग्रंथ.—लिओपोल्ड व्हॉन रँके—वेल्टगेश्चिचटे (युनिव्हर्सल हिस्टरी). रँकिन—इनर हिस्टरी ऑफ दि बाल्कन वॉर. कँब्रिज मॉडर्न हिस्टरी. हिस्टोरियन्स हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड पीरियड्स ऑफ यूरोपियन हिस्टरी. बेकमन्—दि असेन्डन्सी ऑफ फ्रान्स. हसल—दि बॅलन्स ऑफ पॉवर. मोर्स—रेव्होल्यूशनरी यूरोप. फिलिप्स—मॉडर्न यूरोप. डायर—हिस्टरी ऑफ मॉडर्न यूरोप. अँड्रूज—हिस्टॉरिकल डेव्हेलपमेंट ऑफ यूरोप. ब्रिटिश अँड फॉरिन स्टेट पेपर्स. हर्ट्सलट—दि मॅप ऑफ यूरोप बाय ट्रीटी. हीरेन—यूरोप अँड इट्स कॉलनीज. ईगर्टन ब्रिटिश फॉरिन पॉलिसी इन यूरोप. मे—डेमॉक्रसी इन यूरोप. मूर—एक्सपॅन्शन ऑफ यूरोप. ड्रेपर—हिस्टरी ऑफ दि इंटेलेक्चुअल डेव्हेलपमेंट ऑफ यूरोप. गिबन्स—न्यू मॅप ऑफ यूरोप १९११-१४. स्टेलर- पीस अँड वॉर इन यूरोप. डिकिनसन-यूरोपियन अनार्की. रोझ—डेव्हलपमेंट ऑफ यूरोपियन नेशन्स. बेलॉक—यूरोपियन वॉर (१९१४-१८). ब्रिटानिका (११ वी व १२ वी आवृत्ति)—यूरोप; वर्ल्ड वॉर, आडर्निग—हिस्टरी ऑफ दि मॉडर्न वर्ल्ड (१८१५-१९१०). बोन्सोनी—न्यू हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड. साइकी-वर्ल्डस् पीस. स्टेट्समन्स ईयर बुक.]

प्रे. सं. ह

---

## प्रकरण २७ वें.

### मानवी आयुष्यक्रमाचा आणि स्वातंत्र्याचा विकास.

[पृ. ४९६-५०३]

मध्यां संस्कृतीचीं केंद्रें राजधान्या नसून व्यापारी ठिकाणें होत. वैय्यक्तिक स्वातंत्र्याला समाजहिताकरितां कांहीं आळा घालावा लागतो; पृ. ४९६—सरंजामी पद्धतीचा नाश व प्रोटेस्टंट धर्म हे यूरोपांत व्यक्तिस्वातंत्र्यवर्धक झाले. अमेरिका व फ्रान्स यांनीं स्वातंत्र्याकरितां आपल्या राजांशीं युद्ध केलें. हिंदुस्थानांत ब्रिटिश साम्राज्यानें वैय्यक्तिक स्वातंत्र्याची जोपासना केली; पृ. ४९८—राजसत्तेंतून लोकसत्ता प्रादुर्भूत होते. सध्यां जगांत लोकसत्ता प्रबळ होत आहे. प्राचीन लोकशाहींत समता मुळींच नव्हती. अर्वाचीन लोकशाहींत सुद्धां समानबुद्धि सर्वत्र दिसून येत नाहीं; पृ. ४९९—लोकसत्ताविकास आर्थिक कारणांमुळें होतो. राज्य नीट चालण्यास लोकप्रीति संपादन केली पाहिजे. लोकसत्तेच्या इतिहासांत गुलामगिरीचा नाश ही महत्त्वाची गोष्ट होय; पृ. ५००—लोकसत्ता प्रस्थापित करण्याच्या कामीं ग्रंथकारांचाहि मोठा भाग आहे. लोकशाहींत कलेचा विकास होत नाहीं असें नाहीं. मात्र सामान्य वर्ग सुशिक्षित लागतो. लोकशाहीचा परिणाम मनुष्याच्या वागणुकीवर व नीतिमत्तेवर अधिक चांगला होतो; पृ. ५०२.

[संदर्भग्रंथ.—डीले—डेव्हेलपमेंट ऑफ दि स्टेट. ज्ञानकोश—हिंदुस्थान आणि जग, रूसो—सोशल कॉंट्रॅक्ट. लॉक—ट्रीटायसेस ऑन सिव्हिल गव्हर्नमेंट. हर्लि—दि न्यू सोशल डेमॉक्रसी. किड—सोशल एव्होल्यूशन. पॉन्सॉन्बी—डेमॉक्रसी अँन्ड डिप्लोमसी. लेके—डेमॉक्रसी ॲन्ड लिबर्टी. डयूशेने—डेमॉक्रसी ॲन्ड एंपायर. मे—ए हिस्ट्री ऑफ डेमॉक्रसी इन यूरोप. बटलर—डेमॉक्रसी ट्रू ॲन्ड फॉल्स. हिर्श—डेमॉक्रसी व्हर्सस सोशिआलिझम. लेव्ही—एकॉनॉमिक लिबरॅलिझम. मांटेग्यू—लिमिट्स ऑफ इंडिव्हिजुअल लिबर्टी. मिले—ऑन लिबर्टी. ॲक्टन-हिस्टरी ऑफ फ्रीडम. मेन—पाप्युलर गव्हर्नमेंट.]

---

## प्रकरण २८ वें.

### समाजनियमनात्मक विचार.

[पृ. ५०४-५०५]

समाज चालण्यास नियमनपद्धती अवश्य आहेत. रोमन कायदपद्धीत जगांत सर्वांत अधिक प्रचलित आहे. रतह

प्राचीन कायदेपद्धती नष्ट झाल्या आहेत. कमी प्रगत समाज अधिक प्रगत समाजाची कायदेपद्धति अनुकारितात. कायदेपद्धतीच्या इतिहासांत त्याचा उगम, वाढ, परावलंबित्व, समाज व राजसत्तामूलकत्व इत्यादि गोष्टी येतात; पृ. ५०४.

[संदर्भग्रंथ.—ग्रॅहॅम—सोशियालिझम, न्यू अँड ओल्ड. मॅकडोनल्ड—सोशियालिझम अँड गव्हर्नमेंट. जॉन्स–कॉर्ड ऑफ लॉज, दि ओल्डेस्ट इन दि वर्ल्ड. मेन—एन्शंट लॉ. ग्रॅहॅम वालेस—दि ग्रेट सोसायटी. किड—सोशल एव्होल्यूशन. सोहम—इन्स्टिट्यूट्स ऑफ रोमन लॉ.]

---

## प्रकरण २९ वें.

### सिंहावलोकन.

(पृ. ५०५–५२१)

आज मानव जातीच्या प्रगतीचा आढावा घेणें शक्य आहे. भौगोलिक स्थितीचा मानवप्रगतीवर परिणाम झालेला आहे; पृ. ५०५—प्रागैतिहासिककालीन अवशेष फार अल्प आहेत. ऐतिहासिक काळांत मात्र लेखांनिविष्ट माहिती मिळते. त्रिखंडसंयोगभूमीवर प्रथम मनुष्यवस्ती असून पुढें ग्रीस, इजिप्त व मेसापोटेमिया या ठिकाणीं संस्कृतिकेंद्रें पसरलीं. मोझेसनें ख्रि. पू. १५ व्या शतकांत नव संस्कृतीचा लोकसमाज तयार केला. पुढें आर्यन लोकांच्या विजयाची लाट उठली; पृ. ५०६—यूरोपखंडांत ग्रीकरोमन संस्कृति व आशियांत बौद्ध संस्कृति यांनीं आर्यन संस्कृतिविस्ताराचें काम चालविलें, नंतर ख्रिस्ती संप्रदाय आला. रोमनसाम्राज्य विभागलें गेलें व मुसुलमान यूरोपांत वरचढ बनले;पृ ५०७—फ्रँक लोक बरेच पुढें सरसावून राज्याधिकारी झाले. पोपची सत्ता बळावली. व्हिकिंग लोकांनीं अर्वाचीन बलिष्ठ राष्ट्रांनां जन्म दिला; पृ. ५०८—११ व्या शतकापासून आधुनिक काळास प्रारंभ होऊन विद्यापुनरुज्जीवन धर्मसुधारणा व भूगोलसंशोधन या गोष्टी घडून आल्या. कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट पंथानुयायांच्यामध्यें तिकराचा झगडा सुरू झाला. तदनुषंगानें इंग्लंड व फ्रान्स यांच्यांत लढाया चालल्या; पृ.५०९—रशियाचें बल वाढून तो मध्ययूरोपांत ढवळाढवळ करूं लागला. यूरोपांत मोठें वैचारिक स्थित्यंतर घडून आलें. नेपोलियनची वावटळ शांत झाल्यावर फ्रान्स व इंग्लंड सलोख्यानें वागूं लागले; पृ. ५१०—यानंतर जर्मनीचें प्राबल्य वाढून जगाची परिस्थिति अस्थिर झाली. इंग्लंडांत मोठी औद्योगिक क्रांति झाली. नवीन शास्त्रीय शोध लागले; पृ. ५१२–भावी काळांत रशियाला कोणाशीं तंटा करण्याचें कारण पडणार नाहीं. फ्रान्सला स्वसंरक्षणार्थ इंग्लंड व अमेरिका यांनां चिकटून राहावें लागेल. अनेक राष्ट्रांचा एका साम्राज्यसत्तेखालीं संघ बनविण्याकडे इंग्लंडचें लक्ष आहे; ब्रिटनशीं स्पर्धा करण्यास योग्य अशीं अमेरिका व जपान हीं दोन राष्ट्रें कायतीं जगांत दिसतात; अमेरिकेबरोबर तंटा पुढें मागें झाल्यास तो आर्थिक बाबींतच होईल; व जपानबरोबर वसाहतीकरितां होईल; पृ. ५१३—जर्मनी व तुर्कस्तान यांच्या विशिष्ट भौगोलिक स्थितीमुळें त्यांनां एकमेकांशीं सख्य राखणें भाग आहे. जर्मनी सर्व बाबतींत अतिशय पुढारल्याकारणानें इतर राष्ट्रांची त्याविषयीं सहानुभूति राहिली नाहीं. सद्यःयुद्धापासून त्याची अवस्था फार कठिण झाली आहे; पृ. ५१५–तुर्कस्तानचें अस्तित्व यूरोपियन राष्ट्रांतील परोत्कर्षासहिष्णुतेवर व स्वतःच्या लष्करी सामर्थ्यावर अवलंबून आहे. यापुढें साम्राज्य वाढविण्याचा अमेरिका प्रयत्न करीलसें दिसत नाहीं; व्यापाराच्या सुरक्षिततेकरितां आरमारी सत्ता वाढवील. युनायटेड स्टेट्सची पश्चिमगोलार्धसंरक्षकता व मनरोमताची व्यापकता दक्षिण अमेरिकेस जाचक होऊन त्यांच्यांत तंटा उपस्थित होईल; पृ. ५१६—साम्राज्यविस्तार व व्यापार या बाबतींत जपानचा पुढें मागें पाश्चात्य राष्ट्रांशीं मोठा खटका उडेल. चीनची भवितव्यता अजमावणें फार कठिण आहे; पृ. ५१७—हिंदुस्थानचें धोरण साम्राज्यसरकार व भारतीय जनता हीं ठरवितात. शुद्धीकरण व हिंदुत्वरक्षण हीं हिंदुसमाजाचीं धार्मिक कर्तव्यें होत. तसेंच हिंदुस्थानानें राजकीय स्वायत्तता मिळविली पाहिजे. व्यापारांत सत्ता मिळवून इतर राष्ट्रांशीं त्याला टक्कर दिली पाहिजे;पृ. ५१८—विसावें शतक आरमारी व वैमानिक सत्तेचा काळ आहे. पूर्वराष्ट्रांची पश्चिमराष्ट्रांस भीति वाटत आहे पण तींत फारसें तथ्य नाहीं. जर्मनी जर फार दडपला तर पुढें मोठा युद्धाचा वणवा पसरण्याचा संभव दिसतो; पृ. ५२१.

---

## प्रकरण ३० वें.

### जगद्विकासाचीं कारकें.

(पृ. ५२२—५२३)

कोणत्या विकासांगाला प्राधान्य द्यावें याविषयीं एकमत नाहीं. इतिहास वृत्तकथनाकरितां कीं तत्त्वज्ञानाकरितां हा वादग्रस्त प्रश्न आहे; तथापि अलीकडे ऐतिहासिक गोष्टींनां विकासतत्त्व लागू करण्यांत येतें; पृ. ५२२— ऐतिहासिक तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांतून व्यक्तींनां प्राधान्य न देतां त्या त्या काळच्या परिस्थितींनांच विशेष महत्त्व देण्यांत येतें, पण परिस्थितीबरोबर व्यक्तींचेंहि महत्त्व ओळखणें योग्य होईल; जगाची एकंदर स्थिति उत्तरोत्तर सुधारत आहे. प्रत्येक राष्ट्रास गत कालापेक्षां भविष्यकाल अधिक सुखावह होणार आहे; पृ. ५२३.

### परिशिष्ट.

जगांतील मुख्य धर्म, वंश प्रदेश, व त्यांतील लोकसंख्या पृ. ५२४.

---

## चवथ्या विभागांतील महत्त्वाचे सन.

### प्र. १ लें. चोवीसशें वर्षांतील जगद्विकास.

ख्रि. पू. ५०० पर्यंत——बुद्धपूर्वकाल.

ख्रि. पू. ५००–इ. स. १००० —ग्रीक, रोमन व मुसुलमानी साम्राज्याचा काल आणि बौद्धधर्मद्वारा भारतीय संस्कृतिप्रसाराचा काल.

इ. स. १०००–१५००—यूरोपांत लहान संस्थानांतून मोठ्या राष्ट्रस्वरूपी संस्थानांची वाढ.

इ. स. १५००–१९१८—यूरोपीय साम्राज्यविस्ताराची क्रिया.

इ. स. १९१८नंतर——सर्व जग एका संस्थेखालीं आणून पुनः स्वाभाविक समुच्चयांचें पृथक्त्व व शासनस्वातंत्र्य रक्षणाची क्रिया सुरू.

### प्र. ३ रें. इराणचें सत्तावर्धन.

ख्रि. पू. ६५०चा सुमार—झरथुष्ट्र.

ख्रि. पू. ३०००च्या पूर्वी—इराणचा पर्शुभारतीय काल.

ख्रि. पू. ३०००–२०००(?)–इराणचा वसाहत काळ.

ख्रि. पू. २०००–५५८——इराणचा पौराणिक काळ.

ख्रि. पू. ५५८—३३०——अकिमेनिड घराण्याचा किंवा इराणी साम्राज्याचा काळ.

ख्रि. पू. ५४६ व ४९४—पर्शियनांच्या ग्रीसवर स्वाऱ्या.

ख्रि. पू. ५५१–४८५——पहिला दरायस.

ख्रि. पू. ३३०–२४८——ग्रीक सत्तेचा काळ.

ख्रि. पू. २४८–इ.स.२२९—पार्थियन राजांचा काल.

इ. स. २२६–६३०——कट्टे इराणी सस्सन घराणें.

इ. स. ६३०ते चालू —इस्लामी सत्तेचा काल.

### प्र. ४ थें. ग्रीक संस्कृतीची व्यापकता.

ख्रि. पू. १२००–९००——होमरचें पौराणिक युग.

ख्रि. पू. ९००–७००——राजसत्ता व अल्पजनसत्ता.

ख्रि. पू. ८८१————लायकरगसनें स्पार्टासंस्थानला राज्यपद्धति व समाजघटना घालून दिली.

ख्रि. पू. ७००–४८०——टायरंटांचा उर्फ एकतंत्री सत्ताधीशांचा काळ.

ख्रि. पू. ४९० व ४८०—ग्रीकांकडून पर्शियनांचा पराभव.

ख्रि. पू. ४८०–३३८——लोकसत्ता व ग्रीक साम्राज्य.

ख्रि. पू. ३५६–३२३——अलेक्झांडर दि ग्रेट.

ख्रि. पू. ३३६–१४६——संघप्रातिनिधिसत्ता.

ख्रि. पू. १४६–इ.स.३२४—रोमन साम्राज्यसत्तेचा काळ.

इ. स. ३२४–१४५३——पूर्व रोमन साम्राज्याचा काळ.

इ. स. १४५३–१८२२—तुर्की अंमलाचा काळ.

इ. स. १८२२————ग्रीसचें स्वातंत्र्य.

### प्र. ५ वें. रोमन संस्कृति.

ख्रि. पू. ७५३————रोम शहराची स्थापना.

ख्रि. पू. ७५३–५१०——प्राचीन राजसत्ताक काळ.

ख्रि. पू. ५१०–१३१——रोमन लोकसत्ताक पूर्वार्ध.

ख्रि. पू. २६४–१४६——तीन प्यूनिक युद्धें.

ख्रि. पू. २१५–१६८——तीन ग्रीसशीं युद्धें.

ख्रि. पू. १३१–३९——रोमन लोकसत्ताक उत्तरार्ध.

ख्रि. पू. ५७–५१———सीझरचे गॉलमध्यें विजय.

ख्रि. पू. २७–१४———ऑगस्टस बादशहा.

ख्रि. पू. १४ते इ.स.४७६–रोमन बादशाही सत्तेचा काळ.

इ. स. ११४–११६——ट्राजनचे विजय.

इ. स. ३३७————जुन्या रोमन साम्राज्याची विभागणी.

इ. स. ३१३————रोमन बादशहा कान्स्टन्टाइन याचा ख्रिस्तीधर्मस्वीकार.

इ. स. ४७६————गॉथ लोकांकडून पश्चिम रोमन साम्राज्याचा अंत.

इ. स. १४५३————पूर्व साम्राज्याचा अंत.

### प्र. ८ वें. बुद्धांचें चरित्र.

ख्रि. पू. ५५७ (?)———बुद्धाचा जन्म.

ख्रि. पू. ५२७————महावीरनिर्वाण.

ख्रि. पू. ४७८ (?)——बुद्धनिर्वाण.

ख्रि. पू. २७३–२३२——अशोककाल, बौद्धधर्माचा प्रसार.

इ. स. ६५—————चीनमध्यें बौद्ध धर्माचा प्रवेश.

इ. स. २५०—————सिंहलद्वीपांत बौद्धधर्मप्रवेश.

इ. स. ३५०—————ब्रह्मदेशांत बौद्धधर्माचा प्रवेश.

इ. स. ५३८—————जपानांत बौद्धधर्माचा प्रवेश.

इ. स. ७ वें शतक———तिबेटांत बौद्धधर्माचा प्रवेश.

इ. स. ८ वें शतक———हिंदुस्थानांत बौद्धधर्माचा लोप.

### प्र. ९ वें. भारतीयुद्धापासून चंद्रगुप्तापर्यंत राजकीय इतिहास.

पौराणिक काळ पौरव घराणें.

,, ,, बार्हद्रथ घराणें.

,, ,, प्रद्योत घराणें.

ख्रि. पू. ६७२–४७०(?)–शैशुनाग घराणें.

ख्रि. पू. ४७०(?)–३२२—नंद घराणें.

### प्र. १२ वें. अशोक ते अराजक-शकयवनांचा धुमाकूळ.

खि. पू. ३२२-१८५—मौर्य घराणें.
" " ३२२-२९८—चंद्रगुप्त.
" " २७३-२३२—अशोक.
" " १८५-७३—शुंग घराणें.
" " ७३-२८—काण्व घराणें.
" " २३०-इ.स.२२५ आन्ध्र घराणें.
खि. पू. २५०-इ.स.६०-इंडोग्रीक व इंडोपार्थियन घराणीं.
इ. स. ४८-२२५—परकी कुशान घराण्याची सत्ता.
इ. स. १२०-१६२—कुशान राजा कनिष्क.

### प्र. १३ वें. सेमेटिक संस्कृती । जगद्व्यापकता.

खि. पू. ४४४-१००—जुन्या कराराची रचना.
खि. पू. ४—इ.स.२९—येशू खिस्त.
इ. स. ५०-२००—नव्या कराराची रचना.
इ. स. ५७०-६३२—महंमद पैगंबर व कुराणरचना.

### प्र. १४ वें. राजकीय घडामोडी व भौगोलिक ज्ञानविकास.

इ. स. ६७१-६९३—इत्सिंगचा प्रवास.
इ. स. १३३०-१३५३—इब्नबतूता याचा प्रवास.

### प्र. १५ वें. अराजकापासून महंमदी स्वाऱ्यांपर्यंत

इ. स. ३२०-५७२—गुप्त घराणें.
इ. स. ३३०-३७५—समुद्रगुप्त.
इ. स. ५०२-६०६—परकी हूण घराण्याची सत्ता.
इ. स. ६०६-६४७—हर्षवर्धन.
इ. स. ६४०—चिनी प्रवासी ह्युएनत्संग येतो.
इ. स. ६४७-११९२—मध्ययुग, लहान राज्यांचा काल.

### प्र. १७ वें. खलीफत व इस्लामचा प्रसार.

इ. स. ६३२-६५१—मदीनाचे पहिले चार खलीफ.
इ. स. ६६१-७५०—दमास्कसचे उमईद खलीफ.
इ. स. ७५०-१२५८—बगदादचे अब्बासी खलीफ
इ. स. ९०९-११७१—इजिप्तचा फातिमाईद खलीफत.

### प्र. १८ वें. यूरोप-शार्लमान राजाच्या मृत्यूपासून सोळाव्या शतकापर्यंत.

इ. स. ७६८-८१४—शार्लमान बादशहा.
इ. स. ८४३—व्हरडूनच्या तहानें शार्लमानच्या साम्राज्याची विभागणी.
इ. स. ९००-१३००—यूरोपांत सरंजामी पद्धतीचा (फ्यूडल सिस्टिमचा) काळ.
इ. स. १०९५-१३००—खिस्ती व मुसुलमान यांच्यामध्यें धर्मयुद्धें (क्रूसेड्स).
इ. स. १२६५—इंग्लिश पार्लमेंटची स्थापना.
इ. स. १३०२—केंब्रिज युनिव्हर्सिटीची स्थापना.
इ. स. १३३०—बंदुकीची दारू बॉर्टोल्ड नांवाच्या जर्मनानें केली.
इ. स. १३६८—जिनीवा युनिव्हर्सिटीची स्थापना.
इ. स. १४४०—छापण्याची युक्ति प्रथम जर्मनींत निघाली.
इ. स. १५२१—पहिली मॅगेलनची पृथ्वीप्रदक्षिणा.

### प्र. २० वें. राष्ट्रसंवर्धन, राष्ट्रांतील चुरस व जगाची ओळख.

इ. स. १५१८—लूथरकृत खिस्ती धर्मसुधारणा.
इ. स. १६१२—इंग्रजांची सुरतेस वखार.
इ. स. १६३८-१७१५—फ्रान्सचा चवदावा लुई.
इ. स. १६५१—नॅव्हिगेशन ॲक्ट.
इ. स. १६७२-१७२५—रशियाचा पीटर दी ग्रेट.
इ. स. १६८८—इंग्लंडांतील राज्यक्रांति.

### प्र. २१ वें. मुसुलमानांची हिंदुस्थानावर सत्ता.

इ. स. ७१२—मुसुलमानांची हिंदुस्थानावर पहिली स्वारी.
इ. स. ११९३—महंमद घोरी पृथ्वीराजाचा पराभव करतो.
इ. स. १२९४-१३२१—अलाउदीनचा दक्षिणविजय.
इ. स. १५२६—मोंगल घराण्याची स्थापना.
इ. स. १८५७—दिल्लीच्या मोंगल सत्तेचा नाश.

### प्र. २२ वें हिंदूंची उचल.

इ. स. १३२६-१५६५—विजयानगरचें हिंदु राज्य.
इ. स. १४६९—शीखधर्मसंस्थापक नानकाचा जन्म.
इ. स. १५७२-१५९७—उदेपूरचा राणा प्रतापसिंह.
इ. स. १६३०-१६८०-मराठी राज्यसंस्थापक शिवाजी.
इ. स. १७१७-१७६०—मराठी साम्राज्याची वाढ.
इ. स. १८१८—मराठी साम्राज्याचा शेवट.
इ. स. १८५७—हिंदूंचा स्वातंत्र्यार्थ प्रयत्न.

### प्र. २६ वें. यूरोपचा इतिहास व जागतिक इतिहास.

इ. स. १७७६—युनैटेड स्टेट्सचें स्वातंत्र्य.
इ. स. १७८९-१८९३—फ्रेंच राज्यक्रांति.
इ. स. १८६९—इटालीचें स्वातंत्र्य.
इ. स. १८८५—इंडियन नॅशनल कॉंग्रेसची स्थापना.
इ. स. १९१४-१९१८—जागतिक युद्ध.
इ. स. १९१७—रशियन राज्यक्रांति, बोल्शेव्हिक राज्य.
इ. स. १९१९—इंडियन रिफॉर्म्स ॲक्ट.
इ. स. १९२३—आयरिश फ्री स्टेटची स्थापना.

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश

## प्रस्तावनाखंड

## विभाग चवथा

### बुद्धोत्तर जग

## प्रकरण १ लें.

### चोविसशें वर्षांतील जगद्विकास

**साधनसामुग्री, व्याप्ति व लेखनहेतुः**—बुद्धानंतरचा जगाचा इतिहास लिहावयास प्रारंभ करणं म्हणजे अधिक परिचित विषयाकडे वळणें होय. या कालाचा थोडक्यांत इतिहास देणें ही क्रिया करणारास माहिती तुटपुंजी आहे ही सबब आणतां येणार नाहीं. हें काम कठिण असल्यास तें इतकी प्रचंड माहिती थोडक्या जागेंत कशी आणावी हाच प्रश्न आपल्या पुढें येणार यामुळें आहे. सर्व जगाच्या प्रचंड माहितीचें अवलोकन करून तिचा गोषवारा थोडक्यांत कसा द्यावा हाच प्रश्न आपण सोडविला पाहिजे. केवळ निवेदनात्मक इतिहासच नव्हे तर, जे इतिहास समाजशास्त्रीय किंवा विकासवादात्मक नियमांनीं सांगतां येतील असे अनेक इतिहास या क्षेत्रांत मोडतात. ग्रीस रोमसारख्या प्राचीन यूरोपीय राष्ट्रांचा इतिहास. तसाच आजच्या यूरोपांतील राष्ट्रांचा सर्व इतिहास, तसाच बौद्ध, मुसुलमानी व ख्रिस्ती संप्रदायांचा इतिहास याच कालांत मोडतो. जगांत चोहोंकडे लहान लहान राष्ट्रें पसरलीं आहेत अशा कालापासून राष्ट्रसंघानें जग एकसूत्रित झालें आहे अशा कालापर्यंत सर्व घडामोडी, पारमार्थिक संप्रदायांनीं राष्ट्रांचें स्वातंत्र्य हिरवण्याचा प्रयत्न, त्या प्रयत्नापासून झालेली राष्ट्रांची सुटका, नवीन जगाचा म्हणजे पश्चिम गोलार्धाचा शोध आणि जगांतील बऱ्याचशा भागावर यूरोपीय राष्ट्रांचें स्थापन झालेलें स्वामित्व या गोष्टी, या कालांतच येतात जगांतील कांहीं प्राचीन भाषांचा उदय, विकास व विनाश हा या इतिहासाचा भाग आहे. प्राचीन भाषांचा विनाश झाल्यानंतर अर्वाचीन भाषांचा उद्भव आणि विकास हाहि या कालांतला महत्वाचा विषय आहे. अशा सर्व निविध गोष्टी आपल्यापुढें असतां त्यांतील अधिक महत्त्वाच्या गोष्टी कोणत्या हें पाहून अनेक शतकें आणि अनेक विस्तृत भूभाग यांवर होणाऱ्या घडामोडी पाहून त्यांमधून कांहीं इतिहासविकासाचे सामान्य नियम निघत असतील तर ते शोधून त्या नियमांनुसार जगाचा इतिहास लिहिण्याचें कार्य येथें करावयाचें आहे.

**इतिहासलेखनार्थ कालविभाग.**—सर्व जगाचें स्थूल इतिहासचित्र देण्याच्या प्रयत्नांत कालविभाग पाडावयाचा प्रयत्न थोडासा गुंतागुंतीचा होतो. ज्ञानाच्या दृष्टीनें जे कालविभाग पडतील ते भाषेच्या दृष्टीनें पडावयाचे नाहींत. एखाद्या संप्रदायाच्या प्रामुख्याच्या अगर अप्रामुख्याच्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां कालविभाग अगदीं निराळेच पडतील. याप्रमाणें भिन्न तत्वें आपण घेतलीं असतां भिन्न इतिहासकाल मानले पाहिजेत. आणि प्रत्येकाचें विवेचन स्वतंत्र केलें पाहिजे तथापि तसें करण्यास आपणांस अवकाश नसल्यामुळें अनेक तत्वें अंगीकारूनहि थोड्याशा कालविषयक व्याप्ती अव्याप्तीस न भितां कोणत्या कालांत कोणत्या गोष्टी ठळकपणानें पुढें येतात तें पाहून इतिहासकाल पाडले पाहिजेत. या दृष्टीनें आम्हीं खालील कालविभाग पाडतों.

प हि ला का ल.—ख्रिस्तपूर्व ५००, पासून ख्रिस्तोत्तर १५०० पर्यंत.

दु स रा का ल.—इ. स. १५०० पासून आजपर्यंत.

पहिल्या कालाचे आणखी पोटविभाग पाडावयाचे झाल्यास त्या कालाची विभागणी १००० इसवीसनाच्या सुमारास करतां येईल. या कालाच्या सुमारास यूरोपांतील भाषांच्या रूपांत फेरबदल होऊन आजच्या अर्वाचीन भाषा झाल्या आहेत. हिंदुस्थानच्या इतिहासाचा कालविभागहि त्याच सुमारास पाडतां येईल. हिंदु संस्कृतीचा जवळ जवळ पूर्ण विकास यांच सुमारास झाला आणि मुसलमानी आघात याच सुमारास होऊन संस्कृति संकोचपंथास लागली होती. अर्वाचीन बंगाली, मराठी या भाषांनांहि स्वतंत्र स्थिति या सुमारास प्राप्त होऊं लागली होती. बुद्धोत्तर इतिहासाचा मुख्य विभागकाल १५०० हा धरण्याचा हेतु येणेंप्रमाणें: ख्रिस्ती सोळाव्या शतकाच्या प्रारंभाच्या सुमारास यूरोपच्या अर्वाचीन इतिहासास सुरुवात झाली असें बरेचसे यूरोपीय इतिहासकार समजतात. इ. स, १४९२ मध्यें कोलंबसानें अमेरिका खंड शोधून काढलें. वास्को दि गामा यानें १४९८ मध्यें हिंदुस्थानांस यूरोपांतून जलमार्गानें जाण्याचा मार्ग शोधून काढला. या क्रियांचा पुढील इतिहासावर महत्वाचा परिणाम झाला. १५०० नंतर थोडक्याच वर्षांनीं इंग्लंडमध्यें ८ वा हेन्री

गादीवर आला आणि त्यानें रोमची इंग्लंडवरील सत्ता झुगारून दिली. आणि त्यामुळें उत्तर अमेरिका रोमच्या कचाटींत फारशी आलीच नाहीं. हिंदुस्थानांत थोड्या काळांत मोंगली सत्ता बाबरनें स्थापित केली. दक्षिणेमध्यें संस्कृत ग्रंथकारांची परंपरा म्हणजे हिंदुसंस्कृतीची मशाल तालिकोटच्या लढाईत १४९८ मध्येंच विझली गेली. मुसुलमानी सत्ता हिंदुस्थानाबाहेर या कालानंतर संपुष्टांत येत चालली.

इ. स. १५०० पर्यंत यूरोपमध्यें राष्ट्रांची वाढ होत होती. म्हणजे लहान संस्थानांमधील लढाया आटपून त्यांचीं मोठीं राष्ट्रस्वरूपी संस्थानें बनलीं आणि १५०० नंतर यूरोपीय राष्ट्रें अतिराष्ट्रीय स्वरूपाच्या चळवळींत पडलीं.

लहान संस्थानांपासून प्रारंभ होऊन मध्यें साम्राज्य व पुढें साम्राज्याचे तुकडे व त्यानंतर मोठीं राष्ट्रें या क्रिया ख्रिस्तपूर्व ५०० पासून ख्रिस्तोत्तर १५०० पर्यंत चालत होत्या आणि १५०० पासून १९१८ पर्यंत साम्राज्यविस्ताराची क्रिया चालत होती. १९१८ च्या नंतर जग एका संस्थेखालीं आणून पुनः स्वाभाविक समुच्चयांचें पृथक्त्व व शासनस्वातंत्र्य रक्षणाची क्रिया सुरू झाली आहे.

**इतिहासलेखनाचें धोरण.**—जगामध्यें मनुष्यामनुष्यांत भेद असल्यामुळें व सदृशांची शासनसंस्था एक असावी या भावनेमुळें प्राचीन काळीं देखील भिन्न-निराळे राष्ट्रस्वरूपी समुच्चय दृष्टीस पडतात. या सर्व समुच्चयांचा हिशोब घेऊन नंतर त्यांचे घटनेविघटनेचे फरक पहात बसलें पाहिजे. त्या समुच्चयांपैकीं अनेक समुच्चय आज एका मोठ्या राष्ट्राखालीं, उद्यां एका साम्राज्याखालीं एकत्रित कसे झाले पुन्हा निराळे कसे झाले, पुढें नवीन समुच्चय कसे बनत गेले, लहान लहान समुच्चयांस ठोक देऊन एका सत्तेखालीं आणणाऱ्या शक्ती कोणकोणत्या होत्या यांची हकीकत हा राजकीय इतिहासाचा मुख्य भाग होय. निरनिराळ्या समुच्चयांस सामान्य वाङ्मयानें, परमार्थसाधनानें किंवा आपल्या कलाविकासानें एकस्वरूप दिलें जातें, तिचें वर्णन हा सांस्कृतिक इतिहासाचा मुख्य भाग होय. यासाठीं प्राचीन राष्ट्रें, प्राचीन भाषा, त्यांतील कोणत्या भाषांचें प्रामुख्य कोणत्या काळांत किती वाढलें याची माहिती आणि त्याबरोबर मुसुलमानी, ख्रिस्ती व बौद्ध संप्रदायांनीं व ब्राह्मण संस्कृतीनें जगाच्या बऱ्याचशा भूभागावर सादृश्योत्पादक काय परिणाम घडविले यांची माहिती जगाचा थोडक्यांत इतिहास सांगण्याचा प्रयत्न करतांना देखील महत्त्वानें वर्णन करण्याजोगी आहे.

**यूरोपीय इतिहासांतील व्यापक क्रिया.**—यूरोपच्या इतिहासांत झालेल्या घडामोडी थोडक्यांत पुढें मांडतांना बऱ्याच कालपर्यंत चाललेल्या, अधिक व्यापक अशा क्रिया प्रथम घेतल्या पाहिजेत. अशा क्रिया शोधूं लागतां खालील क्रियांस प्रामुख्य येतें.

(१) पूर्वीचीं लहान राष्ट्रें ही कांहीं कालपर्यंत लहान मोठीं साम्राज्यें व पुढें साम्राज्यें मोडून झालेलीं मोठालीं राष्ट्रें व साम्राज्यें तयार झालीं व तीं पुढें राष्ट्रसंघसदस्य झालीं या क्रियेचा इतिहास.

(२) जीं राष्ट्रें परस्परांशीं असदृश व अस्पृष्ट होतीं तीं ख्रिस्ती संप्रदायानें बांधलीं गेलीं व यामुळें संप्रदायसंस्थेनें राष्ट्रांवर अगर संस्थानांवर जें कमी अधिक दडपण पाडलें व पुढें तें कालांतरानें कमी झालें त्या क्रियेचा इतिहास.

(३) यूरोपांत मुसुलमानी सत्तेच्या उचलीचा व संकोचाचा इतिहास.

(४) यूरोपांतील संस्थानांमध्यें लहानें उपसंस्थानांचें अगर सरदार जाहगिरदार यांचें प्राबल्य कमी कसें होत गेलें, व प्रथम एकतंत्री राजांचें आणि नंतर लोकांचें प्राबल्य कसें वाढत गेलें त्या क्रियेचा इतिहास.

(५) लोकांचें प्राबल्य वाढत असतां पैसेवाल्या वर्गाचें महत्त्व वाढूं लागलें; व पुढें कालांतरानें कामकरी वर्ग सुसंघटित होऊन आपलें महत्त्व वाढवूं लागला; व सर्व समाजसत्ता स्वायत्तीकृत करण्याचा प्रयत्न करूं लागला; या क्रियांचा इतिहास.

(६) वैज्ञानिक इतिहास. शास्त्रीय लेखनाचा ग्रीसमध्यें झालेला आरंभ, त्यास पारमार्थिक संप्रदायांमुळें आलेलें वैकल्य आणि त्याचा ग्रीक संस्कृतीच्या पुनरुज्जीवनानंतर झालेला विकास.

(७) कलेचा इतिहास. सौंदर्य व माधुर्य यांच्या कल्पनांचा ग्रीक राष्ट्रामध्यें झालेला उदय, त्यावर ख्रिस्ती व मुसुलमानी संप्रदायांचा परिणाम; पुन्हां पैतृक कल्पनांचें ग्रहण व नंतरचा विकास.

वैज्ञानिक इतिहास हा विशेषेंकरून पांचव्या भागांत येत असल्यामुळें त्याखेरीज इतर मुद्द्यांवर येथें विवेचन देण्यांत येईल.

**यूरोप व इतर जग यांचा संबंध.**—यूरोपच्या इतिहासाशीं जगाचा संबंध निश्चितपणें १५०० नंतरचा आहे; तथापि यूरोप व इतर जग यांचा मधून मधून संबंध आलाच आहे. त्या संबंधाचे प्रसंग येणें प्रमाणें:

(१) ख्रि. पू. ५०० नंतर इराणी लोकांनीं ग्रीसला शह दिला व इजिप्त जिंकला. पूर्व पश्चिम संयोगाचा तो एक महत्त्वाचा काल होय.

(२) बौद्ध संप्रदायाचा प्रसार त्रान्सकाकेशियापर्यंत प्रत्यक्ष आणि मणिसंप्रदायामार्फत रोमन साम्राज्यांत झाला आहे.

(३) अलेक्झांडरच्या दिग्विजयामुळें दोन्ही खंडांचा बराच निकट संबंध आला.

(४) रोमन साम्राज्य हें आपली सत्ता पूर्वेकडे वाढवून पूर्व पश्चिम येथील संस्कृतीचें संयोजक बनलें. (५) सिथियन, हूण या लोकांनीं एशिया व यूरोप येथील संस्कृत राष्ट्रांस सारखाच उपद्रव दिला.

(६) मुसुलमानांनीं मोरोक्को व स्पेनपासून ब्रह्मदेश व फिलिपाईनपर्यंत आपला दरारा बसविला होता.

या गोष्टी लक्षांत घेतल्या असतां जगद्व्यापक चळवळी येणें प्रमाणें दिसतातः

(१) इराणचें सत्तावर्धन, (२) बौद्धसंप्रदायाचा प्रसार, (३) अलेक्झांडरची स्वारी, (४) रोमन साम्राज्य, (५) सिथियन व हूण यांचा इतिहास, (६) मुसुलमानी दिग्विजय.

या सहा चळवळींचा इतिहास तीनहि खंडांस सामान्य आहे. व या चळवळींचा इतिहास हा अधिक व्यापक इतिहास होय. तथापि त्यापूर्वी प्रत्येक भूभागाची काय अवस्था होती हेंहि आपण जाणलें पाहिजे. याकरितां आपण प्रथमतः इराणमार्फत झालेल्या पूर्वपश्चिम संबंधाकडे लक्ष द्यावें लागेल.

इराणचें सार्वराष्ट्रीय महत्त्व दोन कालांत दृष्टीस पडतें. त्यापैकीं पहिला काल म्हटला म्हणजे ख्रिस्तपूर्व होय. आणि दुसरा काल म्हटला म्हणजे मुसुलमानी दिग्विजयाचा होय. या काळांत इराणची नवसंस्कृति हिंदुस्थानांत शिरली. या दोहोंपैकीं पहिलाच काल सध्यां विचारार्थ घेतला आहे. मुसुलमानी दिग्विजयाचा इतिहास पुढें स्वतंत्रपणें दिला आहे. त्यामुळें इराणची नवसंस्कृति व तिचा प्रसार यांची माहिती प्रथम देणें अवश्य नाहीं. तथापि आपणांस तत्पूर्वी आणखी एका गोष्टीचा विचार केला पाहिजे.

**राष्ट्रकांपासून राष्ट्रें तयार होण्याची क्रिया.**— लहान राष्ट्रकें मोडून मोठीं राष्ट्रें अगर साम्राज्यें तयार होणें ही क्रिया लहान प्रमाणावर अनेक ठिकाणीं झाली आहे. या प्रत्येक क्रियेचें क्षेत्र अर्थात् आसपासचा प्रदेश एवढेंच असावयाचें,व त्यांची चळवळ अनेकखंडव्यापीहि असणार नाहीं. तथापि ही क्रिया कांहीं कमी महत्त्वाची नाहीं. घाईघाईनें जीं मोठालीं साम्राज्यें स्थापन झालीं तीं पुढें मोडून गेलीं आणि अल्पकालीन साम्राज्यामुळें अनेक लहान राष्ट्रें एक होऊन प्रजेचा एकजीव होणें ही क्रिया झाली नाहीं. तेव्हां जगद्विकासाच्या इतिहासांत साम्राज्यकरणापेक्षां राष्ट्रीकरणाची क्रिया अधिक व चिरस्थायी महत्त्वाची आहे.

लहान राष्ट्रांच्या किंवा दुसऱ्या कोणत्याहि मानवी समुच्चयांच्या इतिहासांत दोन क्रिया महत्त्वाच्या आहेत त्यांपैकीं (१) समुच्चयांच्या एकमेकांशीं संबंधाच्या निर्णायक आणि (२) समुच्चयांच्या अन्तर्गत रचनेच्या निर्णायक या एक प्रकारच्या क्रिया होत:

लहान समुच्चय नाहींसे होऊन मोठे समुच्चय बनणें ही क्रिया सर्व जगांत चालूच आहे. आणि तिचें पर्यवसान गेल्या महायुद्धानंतर स्थापन झालेल्या राष्ट्रसंघांत झालें. दुसऱ्या प्रकारच्या क्रियांपैकीं ज्या क्रिया महत्त्वाचा इतिहासविषय होत त्या येणें प्रमाणें.

[ १ ] संयुक्तसंस्थानपद्धतीचें राष्ट्र मोडून एकतंत्री संस्थान बनणें.

[ २ ] संप्रदायसंस्थेमुळें झालेलें राष्ट्रांचें एकीकरण व नंतर संप्रदायसंस्थेच्या दुर्बलतेमुळें होणारें पृथक्करण.

[ ३ ] लोकसत्तेची वाढ आणि तीमुळें लोकांमध्यें एकत्व भावनेचा विकास.

[ ४ ] लोकसत्तेमध्यें भांडवलवाले व काम करणारे यांमधील स्पर्धा.

[ ५ ] एकसमुच्चयाखालीं आलेल्या लोकांची एकसंस्कृतिपरंपरेंत वाढ.

वरील गोष्टी महत्त्वाचा इतिहासविषय होत. वैज्ञानिक इतिहास हा मात्र स्वतंत्र इतिहास आहे. एका राष्ट्रापासून दुसरें राष्ट्र, एका व्यक्तीपासून दुसरी व्यक्ति ज्ञान उचलते व वाढवते. वैज्ञानिक इतिहास राष्ट्रेतिहासाच्या मर्यादा दुर्लक्षून लिहिला पाहिजे.

कलेच्या इतिहासाविषयीं मात्र असें म्हणतां येईल कीं, तिचा इतिहास राष्ट्र, भाषा, संप्रदाय, विचारपद्धति, भोंवतालचें साहित्य यांनीं नियमित व संकीर्ण झाला आहे.

आपणांस जें इतिहाससूत्र पहावयाचें त्याची दिशा वर दिलेल्या स्पष्टीकरणावरून स्पष्ट होईल; ती ही कीं, लहान राष्ट्रांचा काल, लहान राष्ट्रांपासून मोठ्या राष्ट्रांचा व प्रांतिक भाषांचा विकास, राष्ट्रांतील लढायांमुळें जगांतील राष्ट्रमर्यादानिर्णायक अंगें, बौद्धिक व ईश्वरकल्पनामूलक सांप्रदायिक चळवळी इत्यादिकांचीं कार्यें आपणांस जाणलीं पाहिजेत.

**संस्कृतीच्या अतिराष्ट्रीयत्वास कारकें.**—जगाचा सांस्कृतिक इतिहास लिहावयाचा झाल्यास आपणांस दोन गोष्टींकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. त्या गोष्टी म्हटल्या म्हणजे एका राष्ट्राचा इतर राष्ट्रांवर ताबा. व एका विशिष्ट संप्रदायाची उत्पत्ति, विकास आणि अनेक मनुष्यसमूहग्राहक व्याप्ति.

या दृष्टीनें पहिली क्रिया ग्रीक व रोमन विजयांत दृग्गोचर होते.

दुसरी क्रिया बौद्ध, ख्रिस्ती व मुसुलमानी संप्रदायांत दृग्गोचर होते.

या दोन्ही क्रियांखेरीज तिसरी क्रिया म्हटली म्हणजे विशिष्ट संस्कृतिसंवर्धकांचा वर्ग तयार होऊन त्यानें पारमार्थिक संप्रदाय किंवा राजशक्ति या दोहोंच्या मदतीशिवाय केवळ आपल्या पांडित्याच्या जोरावर पसरत जाणें ही होय. या क्रियेनें हिंदु संस्कृति विस्तरत गेली.

**इतिहासलेखनास वाङ्मयसाहित्याची मदत.**— इतिहासामध्यें जेव्हां आपण अवशेषांवरून ग्रंथरचना करावयास लागतों तेव्हां आपणांस विशेषेंकरून ग्रंथांकडेसच लक्ष द्यावें लागतें. कलेचा इतिहास, विचारांचा इतिहास इत्यादि साधनांपेक्षां विशेषतः वाङ्मयावरच जगद्विकाससूचक क्रिया व्यक्त करण्याची भिस्त असते. यासाठीं संस्कृतीच्या दृष्टीनें वाङ्मयाकडे पाहिलें पाहिजे.

वाङ्मयें सांप्रदायिक किंवा राष्ट्रीय स्वरूपांत प्रथम उत्पन्न होऊन तीं पुढें सांस्कृतिक स्वरूप पावतात. अशा तऱ्हेचीं वाङ्मयें येणेंप्रमाणें:

१ संस्कृत वाङ्मय—सांस्कृतिक.

२ पालीवाङ्मय—प्रथम सांप्रदायिक व नंतर सांस्कृतिक.

३ अरबी वाङ्मय—प्रथम राष्ट्रीय मग सांप्रदायिक आणि मग सांस्कृतिक.

३ चिनी वाङ्मय—प्रथम राष्ट्रीय व नंतर सांस्कृतिक.

४ फारसी वाङ्मय—प्रथम राष्ट्रीय मग सांस्कृतिक.

५ लॅटिन व ग्रीक.—मुख्यतः राष्ट्रीय व राष्ट्र सर्वव्यापी बनल्यामुळें सांस्कृतिक. तसेंच सांप्रदायिकहि असल्यामुळें सांस्कृतिक.

६ इंग्रजी व स्पॅनिश.—अनेक राष्ट्रव्यापी. विशिष्ट संस्कृतीचें बोधक नाहीं. या वाङ्मयांत एकत्व उत्पन्न होण्यापूर्वीच जगाची विचारैकता होणें शक्य असल्यामुळें यास सांस्कृतिक वैशिष्ट्य येईलच असें सांगतां येत नाहीं.

याखेरीज इतर वाङ्मयांस अतिसांप्रदायिक किंवा अतिराष्ट्रीय महत्व देतां येत नाहीं.

ब्राह्मण जातीच्या इतिहासाचा जगाच्या संस्कृतीशीं संबंध येणेंप्रमाणें सांगतां येईल.

**ब्राह्मण जातीचा इतिहास.**—हा इतिहास द्यावयाचा म्हटला म्हणजे हिंदुसंस्कृतीचा सबंध इतिहास देणें होय.

दुसऱ्या भागांत यज्ञसंस्थेचें वर्णन करतांना ब्राह्मण जातीचा कांहीं इतिहास आलाच आहे. तेथें (पृ. १९३–२२७ व पृ. ३५३–३८९) खालील विषयांचें विवेचन केलें आहे.

(१) यज्ञसंस्थेमध्यें यज्ञांत होणाऱ्या क्रियांचें वैशिष्ट्यस्थापन आणि त्यामुळें ऋत्विजांचे झालेले त्रिविध भेद.

(२) त्रैविद्य ऋत्विजांची मूळच्या अथर्व्यांशीं स्पर्धा.

(३) यज्ञसंकोच आणि ब्राह्मणांचें गृह्याकडे आणि सूत-वाङ्मयाकडे व इतर व्यावहारिक धंद्यांकडे लक्ष.

ब्राह्मण जातीच्या प्रसारामुळें जेव्हां संस्कृति वर्धन पावली तेव्हां ब्राह्मणजाति आपली तत्कालीन विद्या घेऊन पसरली. तेव्हां ब्राह्मणांच्या विकासाचा इतिहास लिहावयाचा म्हणजे सर्व शास्त्रांच्या विकासाचा इतिहास दिला पाहिजे. कारण उच्च प्रकारची संस्कृति भारतीय व उपभारतीय लोकांस एकाच वर्गापासून मिळण्याजोगी होती व तिचें येथ अधिक विवेचन नकोच.

**बौद्ध संप्रदाय.**—याचा संस्कृतीच्या इतिहासाशीं संबंध मुख्य हाच कीं, या संप्रदायामुळें भारतीय संस्कृतीचें इतरत्र पसरली; पण या संप्रदायानें पसरविलेल्या संस्कृतीचें स्वरूप जरासें निराळें होतें. एक तर ही संस्कृति पसरवणारा वर्ग निराळा होता. आणि दुसरें देश्य परंतु श्रौत विचारानें अस्पृष्ट अशा कल्पना बौद्ध संघानें पसरविल्या. तीच गोष्ट जैनांचीहि झाली असें म्हणतां येईल. फरक एवढाच कीं अतिभारतीयत्वाचें श्रेय जसें बौद्धांनीं मिळविलें तसें जैनांस मिळवितां आलें नाहीं.

**पाश्चात्य संस्कृति.**—ग्रीक आणि रोमन संस्कृतीचा जगाच्या इतिहासांत मुख्य भाग हा कीं, यूरोपीय शास्त्रांचा पाया ग्रीकांनीं घातला. त्यांच्या कला, कल्पना ग्रीकांनीं विस्तृत केल्या, त्या उत्तरकालीन शिष्यांकडून जगभर पसरल्या. ग्रीक संस्कृतीचें अतिराष्ट्रीयत्व ग्रीसच्या राजकीय वर्चस्वाच्या दिवसांत होतें. तथापि ग्रीसच्या उचलीनें जगावर कायमचा परिणाम करून राष्ट्र मात्र नामशेष करून घेतलें.

रोमन साम्राज्य वाढलें, त्याचे तुकडे पडले, आणि तें नष्ट झालें. त्यानें जगास कायदेपद्धति उत्पन्न करून दिली.

ख्रिस्ती संप्रदायानें बऱ्याचशा जगास एकस्वरूप केलें; आणि आपण ख्रिस्ती असल्यामुळें दयावान् असलें पाहिजे ही भावना उत्पन्न करून दिली. या संप्रदायामुळें हिब्रू, ग्रीक व लॅटिन भाषांस महत्त्व आलें.

मुसुलमानी संप्रदायाच्या स्थापनेमुळें आरबी भाषेस तेजस्विता आली व महत्त्वहि आलें; व अत्यंत मागसलेल्या लोकांची एकजूट करण्यास हा संप्रदाय कारण झाला; आणि वीस कोटी पेक्षां अधिक लोक यानें व्यापिले.

अर्वाचीन यूरोपांत जी वाढ झाली तिनें इतर सर्व वाढींचा संकोच करून आपलें प्रस्थ वाढविलें.

जगाचा इतिहास लिहावयाचा म्हणजे अधिक व्यापक क्रिया शोधावयाच्या; आणि त्यांस अधिक प्रामुख्य द्यावयाचें आणि कमी व्यापक क्रियांस कमी प्रामुख्य द्यावयाचें. तथापि क्रियांचें महत्त्व लक्षांत आणण्यासाठीं मूळ स्थिति काय होती तें आपणांस जाणलें पाहिजे. यासाठीं अत्यंत लहान राष्ट्रें जेव्हां जगांत होतीं त्या कालाकडे आपण प्रथम वळूं.

## प्रकरण २ रें.

### लहान राष्ट्रांचा काल.

**लहान राष्ट्रकांचें अस्तित्व.**—लहान राष्ट्रांचा काळ ही स्थिति जगांत सार्वत्रिक होती. एखादें राष्ट्र उदयास यावयाचें, त्यानें आसपासच्या राष्ट्रांवर ताबा चालवावयाचा. तें पुन्हा पडावयाचें या प्रकारचा इतिहास चोहोंकडे दिसतो. पुष्कळदां संस्थानें अगर राष्ट्रकें साम्राज्यास वैकल्य आलें असतां पुन्हां स्वतंत्र व्हावयाचीं किंवा अधिकारारूढ सुभेदारांनीं सुभेदारीपणा टाकून राजपद घ्यावयाचें ही रीतीहि अनेक ठिकाणीं दिसून येते.

इजिप्त, बाबीलोनी, इराणी साम्राज्यांचा इतिहास त्याप्रमाणेंच ग्रीक, रोमन व मौर्य साम्राज्यांचा इतिहास अनेक लोकांच्या डोक्यावर साम्राज्य लादल्यानेंच झाला. तो इतिहास जाणण्यासाठीं प्रकृतिभूत राष्ट्रकें आपण गोळा केलीं पाहिजेत.

**बुद्धकालीन राष्ट्रकें.**—प्रथमतः बुद्धाच्या हयातीच्या कालांत कोणतीं राष्ट्रें, साम्राज्यें, भाषा व मनुष्यसंघ होते याचा हिशोब घ्यावा. आणि पुढें ज्या चळवळी झाल्या त्यांमुळें काय काय परिणाम होत गेले तें पहावें.

विशिष्ट संप्रदाय आणि संस्कृति यांच्या साम्राज्याखालीं कोणतीं राष्ट्रें आलीं, तसेंच एखाद्या विशिष्ट शासनसत्तेच्या साम्राज्याखालीं किती राष्ट्रें आलीं हें पहावें. विशिष्ट शासनसत्ता, भाषा व पारमार्थिक संप्रदाय यांच्या आश्रयानें राष्ट्रांस विशिष्ट प्रकारचें वळण कसें मिळत गेलें याचा परामर्श घ्यावा.

हिरोडोटस हा ग्रीक इतिहासकार बुद्धाशीं समकालीन होता.

याच्या इतिहासाचें पृथक्करण केलें असतां त्रिखंडांत अनेक राष्ट्रांचें अस्तित्व दिसून येतें. हिरोडोटसनें वर्णन केलेलीं राष्ट्रें व लोकसमुच्चय येथें देतों.

हे लोक अर्थात् बुद्धपूर्व होत. हिरोडोटसच्या ग्रंथांत बऱ्याच अगोदरच्या काळाचा इतिहास येतो. आणि ज्या राष्ट्रांचा इतिहास त्याच्या ग्रंथांत येतो तीं राष्ट्रें शंपन्नास वर्षें किंवा अनेक शतकें अगोदरचीं असलीं पाहिजेत.

हिरोडोटसच्या ग्रंथांतील राष्ट्रें पुढें दिलीं आहेत. त्यांत प्रथमतः राष्ट्रांचीं नावें अक्षरानुक्रमानें घेऊन त्यांचें प्रांतवार वर्गीकरण करूं.

## हिरोडोटसच्या इतिहासांत उल्लेखिलेलीं राष्ट्रें

| राष्ट्र | स्थान | विशेष माहिती. |
|---|---|---|
| अबंटी | आयोनिआ | हे युबिआमधून या परक्या देशांत आले. |
| ॲकँथिअन | ॲकँथस. (मॅसिडोनिया) | |
| अकिअन | पेलोपॉनीसस | ॲकिअनांचे १२ वर्ग आहेत. |
| ॲकिअन राष्ट्र | थिओटिस | हे लोक आपल्या मुली लग्नापूर्वी राजाला दाखवीत व राजा जी पसंत करी तिचा त्याच्याकडून प्रथम कौमार्यभंग होई. |
| ॲडिर्मॅकिडी | इजिप्त | लिबियनांचा एक वर्ग. |
| एगॅली, पेलॅस्गियन | पेलोपॉनीसस | आयोनिअन लोकांचें नांव. |
| एगिडी | स्पार्टा | तेथील एक प्रमुख जात. |
| एगिलीअन | सिर्सियन | सिसिओनिअन लोकांतील एक वर्ग. |
| एगिनेटी | एजिना | |
| एग्ली | आशिया | |
| एओलिअन (एओलिअन) | एओलिआ (आशिया मायनर) | यांचा आयोनिअन लोकांबरोबर नेहमी उल्लेख येतो. |
| एस्किओनिअन | सॅमास | सामियनांची एक जात. |
| इथिओपिअन | इथिओपिआ | |
| ॲगथर्सी | सिथिआ | |
| ॲग्रिॲनी | पिओनिआ | |
| ॲग्रिजेंटीन | इटाली | |
| ॲगिलिअन | फोसिआ (आयोनिआ) | फोसिअन लोकांचेंच हें दुसरें नांव आहे. |
| अलॅबँडिअन | कॅरिआ | |
| अलॅरोडिअन. | पॉंटस | |
| अमॅथूसीअन | सायप्रस | |
| ॲमेझॉन | सिथिआ | या लढवय्या, पुरुषी पोषाख करणाऱ्या बायका होत्या. |
| ॲलझोनी | सिथिआ | |
| ॲमोनिअन | लिबिआ | इजिप्शियन व व इथिओपियन लोकांची एक वसाहत. |
| ॲमिर्जिअन सिथिअन | सिथिआ | याना सॅकि (शक) असेंहि नांव आहे. |
| ॲनक्टोरिअन | एपायरस | |
| ॲड्रियन | अँड्रा (एजियन समुद्रांतील बेट). | |
| ॲपॅरिटी | आशिया | |
| अप्सिंथिअन | थ्रेस | |
| अरब | अरबस्थान | यांच्या बहुतेक चाली इजिप्शियनांप्रमाणेंच असतात; बॅकस आणि युरॅनिया हे त्यांचे मुख्य देव होत. इराणी लोकांचे हे दोस्त होते. |
| आर्केडियन | आर्केडिआ | हे पेलोपॉनीसस मधील ग्रीक होत. |
| आर्केलीन | सिसिऑन | |
| अर्गिपेइ | सिथिआ | सिथिआच्या सरहद्दीवर राहणारे रानटी लोक. |
| अर्गाइव्ह | पेलोपॉनीसस | हे गायनकलेंत फार निष्णात असत. |
| ॲरिअन | आशिया | मीड लोकांचें प्राचीन नांव. |
| ॲरिमॅस्पिअन | उत्तर यूरोप | एकाक्ष लोक. |
| ॲरिझँटी | मीडिआ | मीड लोकांची एक जात. |
| आर्मेनिअन | आर्मेनिआ | यांच्याजवळ गोधन विपुल असे. |

| राष्ट्र | स्थान | विशेष माहिती. |
| --- | --- | --- |
| ॲसिबस्टी | लिबिआ | |
| एंशिअन | सार्डिस | |
| ॲसोपिअन | बिओशिया | |
| असुरिअन (असुर) | असुरिआ | यांनां सिरियन असेंहि म्हणत. |
| ॲटरँटी | लिबिआ | यांच्यांत वैयक्तिक नांवें नसत. |
| ॲथीनेअन | अथेन्स | |
| ॲटिक लोक | ॲटिका | |
| ऑस्किसी | लिबिआ | |
| औसी | लिबिआ | |
| ऑटोमोली | इजिप्त | इजिप्शियन लोकांची एक शूर वसाहत. |
| बाबिलोनिअन | बाबिलोन | बाबिलोन देश चांगला समृद्ध होता. लग्नाच्या मुली बाजारांत नेऊन विकीत; प्रेतें सुगंधित करून ठेवीत. |
| बॅक्ट्रिअन | बॅक्ट्रिआ | |
| बार्किअन | इजिप्त | |
| बिस्टोनिअन | थ्रेस | |
| बिथिनिअन | बिथिनिआ (आशिया मायनर) | आशिया मायनर मधील थ्रेशियन लोकांनां हें नांव आहे. |
| बिओशिअन | बिओशिआ | |
| बोरिस्थेनिअन | सिथिआ | |
| ब्रिगि | थ्रेस | |
| बुदिअन | मीडिआ | मीड लोकांतील एक जात. |
| बुदिनि | सिथिआ | या रानटी लोकांचीं घरें लांकडी असतात; ते आपल्या अंगास रंग फांसतात; ग्रीक सण पाळतात. |
| बुसिअन | मीडिआ | |
| [illegible] | लिबिआ | |
| कॅबॅलियन | आशिया मायनर | |
| कॅडमीन | पेलोपॉनीसस | |
| कॅलॅशिअन इंडियन | हिंदुस्थान | हे कॅलटि(कराची येथील ?) लोक असावेत. |
| कॅलिपिडी | सिथिआ | हे ग्रीक--सिथिअन लोक होत. |
| कॅलिंडिअन | आशियामायनर | |
| कॅप्पडोशिअन | कॅप्पडोशिआ (आशिया मायनर) | यांनां ग्रीक लोक सिरिअन म्हणत. |
| कॅरिअन | कॅरिआ (आ. मायनर) | हे लोक भ्याड असत. |
| कार्थेजिअन | कार्थेज | |
| कॅरिस्टिअन | युबिआ (ग्रीस) | |
| कॅस्पिअन | मध्यआशिया | |
| कॅटिआरिअन | सिथिआ | सिथिअन लोकांची एक जात. |
| केल्ट. | यूरोप | हे लांब पश्चिम यूरोपांत इस्टर नदीच्या उगमाशीं रहात. |
| सेफेनी | इराण | इराणी लोकांनां ग्रीक लोक मूळ या नांवानें संबोधीत. |
| कॅल्सेडोनिअन | बिझॉन्शिअम | |
| कॅल्सिडिअन | युबिआ (ग्रीस) | |
| खाल्डिअन | असुरिआ, | बाबिलोनमध्यें हा एक पुजाऱ्यांचा वर्ग असे. |
| खालिबिअन | आशिया मायनर | |
| खोरिअटी | सिसिॲान | |
| खोरॅस्मिअन | आशिया | |
| सिसोनिअन | थ्रेस | |
| सिलेशिअन | आशिया मायनर | |
| किमेरिअन | किमेरिआ (सिथिआ) | किमेरियांतून सिथियनांनीं यांनां हांकून लाविल्यावर हे इराण,तुर्कस्थानाकडे पळाले. |
| सिसिअन | सिसिआ (इराण) | |
| क्निडिअन | कॅरिआ | |
| कोल्चिअन | आशिया मायनर | काळ्या समुद्राच्या तीरावर काकेशस प्रांतांत हा प्रदेश होता. |
| कॉर्सीरिअन | कॉर्सिरा (ग्रीस) | |
| कॉरिंथिअन | कॉरिंथ [ग्रीस] | [शेजारी होते. |
| कोरोनिअन | ग्रीस. | हे थिबन लोकांचे] |
| क्रीटन | क्रीट | |
| क्रोटोनिअन | इटाली | |
| सिमिअन | आशिया मायनर | |
| सिनेटी सिनेशियन | पश्चिमयूरोप | हे व केल्ट लोक यूरोपच्या अगदीं पश्चिमेस इस्टरनदीच्या उगमाशीं रहात. |
| सिनुरिअन | पेलोपॉनीसस (ग्रीस) | हे आयोनिअनांसारखे दिसत. पेलोपॉनीसस मधील सात राष्ट्रांपकीं हें एक राष्ट्र होतें. |

| राष्ट्र | स्थान | विशेष माहिती. |
|---|---|---|
| सायप्रियन | सायप्रस | |
| सिरेनिअन | लिबिआ | |
| सिथिनिअन | ग्रीस | |
| डॅडिसी | आशिया | |
| डैयन | इराण | एक इराणी जात. |
| डार्डेनिअन | आशिया | |
| डरिटी | आशिया | |
| डॉलिअन | ग्रीस | |
| डिलिअन | इजिअन समुद्र | हे डेलॉस येथील पुजारी होत. |
| डेल्फिअन | ग्रीस | डेल्फी या क्षेत्रांतील लोक. |
| डेर्सिइ | थ्रेस | थ्रेसिअन लोकांची एक जात. |
| डेरुसिईयन | इराण | एक इराणी जात. |
| डॉबेरी | (यू. तुर्कस्थान) पिओनिआ | |
| डोलोंसी | थ्रेस | एक थ्रेसिअन जात. |
| डोलोपी | ग्रीस | |
| डोरियन | ग्रीस | |
| ड्रिओपियन | ग्रीस | |
| डिमॅनॅटी | ग्रीस | सिसिऑन येथील एक जात. |
| एडोनिअन | थ्रेस | |
| एगेस्टीअन | सिसिली | |
| एलिअन | ग्रीस | |
| एंकेलीई | इलिरिया (बाल्कन-द्वीपकल्प) | |
| एनिअन | थ्रेस | |
| एओर्डिअन | मॅसिडोनिआ | |
| एफिशिअन | ग्रीस | |
| युस्पेरीडीस | लिबिआ | |
| गॅंडरियन | आशिया | |
| गॅरमॅंटी | लिबिआ | हे जमिनीत मीठ टाकून वर पेरणी करितात. |
| जर्मेनियन | इराण | पर्शियनांची एक जात. |
| गेटी | थ्रेस | हे लोक आपणांस अमर समजत. |
| गिलिगॅमी | लिबिआ | |
| गिंडनी | लिबिआ | यांच्या बायका पायांत कातडी फिती घालतात. त्यावरून किती पुरुषांशीं संभोग केला हें कळतें. जास्त फिती असलेल्या बाईला जास्त मान मिळतो. |
| ग्रीक | ग्रीस | |
| गिझॅंटी | लिबिआ | हे अंगाला रंग फासीत व माकडें खात. |
| हेलिसिशिअन | गॉल | |
| हिजेनिअन् | आशिया | |
| हिलेअन | सिसिऑन | |
| हिर्पेकोअन | अशियामायनर | सिलिशिअन लोकांचें जुनें नांव. |
| हायपरबोरियन | आशिया | हे लोक सायबेरियांत राहत असावेत. हे गव्हाच्या पेंढ्यांतून डेलॉसला पवित्र जिन्नस पाठवीत. |
| हिर्कॅनिअन | इराण | |
| इलिरियन | बाल्कन द्वीपकल्प | |
| इंडियन (हिंदू) | हिंदुस्थान | हे जनावराप्रमाणें उघड्यावर संभोग करतात; यांचें बीज काळें असतें! कुत्र्याएवढ्या मोठ्या मुंग्या सुवर्णयुक्त वाळू जमिनींतून वर फेंकतात व तीपासून हे बहुतेक सर्व सोनें जमा करितात! येथें झाडावरहि एका प्रकारची लोंकर तयार होते! तीपासून कपडे करण्यांत येतात! |
| आयोनियन | ग्रीस | |
| इसेडोनिअन | उत्तरआशिया | यांच्यांत एखाद्याचा बाप मेला असतां त्याचे मांस गुराच्या मांसांत मिसळून त्याची मेजवानी करितात. यांच्यांत बायकांनां पुरुषांसमान लेखण्यांत येतें. |
| इर्सी | मध्यआशिया | सिथियनांची एक जात. |
| लॅसेडीमोनिअन | लॅकोनिया (ग्रीक) | यांच्यांत राजा मेला असतां हजारों बायकापुरुष मोठ्यानें कपाळ बडवून घेऊन अमर्याद शोक करितात. |
| लॅसोनिअन | आशिया | |
| लिऑंटिनिअन | सिसिली | |
| ल्युकॅडिअन | आयोनिअन समुद्रांतील बेटें | |

| राष्ट्र | स्थान | विशेष माहिती |
|---|---|---|
| लिबिअन | लिबिआ | हे रानटी लोक असून गायींच्या मांसाखेरीज सर्व मांस खातात. हे चांगले सशक्त असतात. यांचा देश फार सुपीक आहे. |
| लिगुरी | गॉल | |
| लिगीहृज | आशिया | |
| लोक्रिअन | ग्रीस | |
| लिसिअन | लिसिआ (आशिया मायनर) | हे मूळ क्रीट बेटांतले; पुढें हांकलून दिल्यावर हे लिसियाला आले. यांच्यांत मातृकनामें चालतात. बापाचें नांव लावीत नाहींत. |
| लिडिअन | लिडिआ (आशिया मायनर) | |
| मॅसेडोनिअन | मॅसेडोनिआ | |
| मॅक्ली | लिबिआ | |
| मेसी | लिबिआ | |
| मॅक्रोनी | आशियामायनर | यांनीं इजिप्शियनांपासून सुंता करण्याची चाल घेतली. |
| मगी | इराण | एक मीडियन जात. |
| मॅग्नेटी | ग्रीस, | |
| मॅंटिनेअन | ग्रीस | |
| मॅरॅफिअन | इराण | इराणी लोकांची एक जात. |
| मार्डिअन | इराण | इराणी लोकांची एक जात. |
| मार्सिअन, मारी | इजिप्त | |
| मारिॲंडिनिअन | आशिया मायनर | |
| मॅस्पिअन | इराण | पर्शियनांची एक जात. |
| मॅसॅगेटी | उत्तर आशिया | यांच्यांत अति वृद्ध मनुष्याला बळी देऊन त्याचें मांस खातात; असें मरण हे फार उत्तम मानितात. |
| मॅटिएनिअन | इराण | |
| मीडस | मीडिआ | |
| मॅगेरीअन | सिसिली | |
| मेलॅन्क्लीनिअन | उत्तर आशीया | |
| मेलिअन किंवा मॅलिअन | ग्रीस | |
| मेसेनिअन | ग्रीस | |

| राष्ट्र. | स्थान | विशेष माहिती. |
|---|---|---|
| मेटॅपाँटीन | इटाली | |
| मिलेशिअन | आयोनिआ | |
| मोलॉसिअन | एपायरस ( ग्रीस ) | |
| मोशिअन | आशिआ | |
| मॉसिनीकी | आशिया | |
| मायसीनीअन | आर्गोलिस् (ग्रीस) | |
| मिरिनीअन | इजियन समुद्रांतील लेम्नास बेटें | |
| मायसिअन | आशिया मायनर | |
| नॅसमोनी | लिबिआ | हे टोळांची पूड करून दुधांत मिसळून पीत. लग्नांत नवरीनें पहिल्या रात्रीं सर्व पाहुण्यांजवळ निजावयाचें व संभोगाअंतीं पाहुण्यानें तिला कांहीं नजराणा द्यावयाचा अशी विलक्षण चाल या लोकांत होती. |
| न्यूरिअन | मध्य आशिया | सिथियनांची एक जात. यांच्या देशांत साप फार आहेत. एकदां तर सापांमुळें यांनीं देश सोडला होता. |
| ओड्रोमॅटिअन | थ्रेस | |
| ओड्रीसिअन | थ्रेस | |
| ओनीएटी | सिसिऑन | |
| ऑर्कोमीनिअन | ग्रीस | |
| ऑर्निएटी | ग्रीस | |
| ऑर्थोकोरिबॅंटिअन | मीडिआ | |
| पॅडिअन | हिंदुस्थान | यांच्या जातींत जर कोणी आजारी पडला तर त्याचे नातेवाईक त्याला ठार मारीत व त्याच्या मांसाची मेजवानी करीत. हे अति रानटी लोक होते. |
| पिअॅनिअन | अथेन्स | |
| पिओनिअन | पिओनिआ | |
| पिओली | थ्रेस | |
| पीटिअन | थ्रेस | |
| पॅफिलिअन | आशियामायनर | |
| पॅनोपिअन | ग्रीस | |
| पॅथिॲलिअन | इराण | हे शेतकरी होते. |
| पॅंटिमॅथिअन | आशिया | |

| राष्ट्र | स्थान | विशेष माहिती |
|---|---|---|
| पॅफ्लागोनिअन | आशियामायनर | |
| पॅरॅलॅटी | सिथिआ | सिथियनांचें एक कुल. |
| पॅरेटॅसेनिअन | मीडिआ | |
| पॅरिकॅनिअन | आशिया | |
| पॅरोरिॲट्री | ग्रीस | |
| पार्थिअन | आशिया ( इराण ) | |
| पासार्गेडी | इराण | |
| पॉसिकी | आशिया | |
| पेलॅस्गिअन | ग्रीस | |
| पेऱ्हीबिअन | ग्रीस | |
| पर्शिअन ( इराणी ) | इराण | |
| फोसिअन | ग्रीस | |
| फिनिशिअन | फिनीशिआ | |
| फ्रिजिअन | फ्रिजिआ | |
| प्लेटिअन | ग्रीस | |
| पॉलिक्निटी | क्रीट | |
| सिथिअन | लिबिआ | |
| सॅकी (शक) | आशिआ | |
| सॅमिअन | सॅमॉस | |
| सॅमॉथ्रेशिअन | इजियन समुद्र | |
| सॅरँगीयन | आशिया | |
| सॅस्पिरी | आशिया | |
| सॅट्री | थ्रेस | |
| सॅटॅगिडी | आशिया | |
| सौरोमॅटी | मध्यआशिया | यांनी ॲमॅझॉन बायकांशीं लग्नें लावून त्यांनां घेऊन ते स्वतंत्र राहिले होते. यांच्यांत कुमारिकेनें एखाद्या शत्रूला ठार केल्याखेरीज तिचें लग्न होत नसे. |
| स्कोपॅडी | ग्रीस | |
| सिथिअन | सिथिआ | |
| सिडोनिअन | सिडोन ( फिनीशिआ ) | |
| सिगिनी | यूरोप | थ्रेसच्या उत्तरेस ईस्टर नदीपलीकडे हे लोक आहेत. |
| सिंडिअन | बॉस्फॉरस | |
| सोग्डिअन | आशिया | |
| सॉलिमी | आशिया | मिलियस मधील लोकांचें नांव; यांनां मिलियन असेंहि म्हणत. |
| स्ट्रुकटी | मीडिआ | |
| स्ट्रिमोनिअन | मॅसिडोनिआ | |
| स्टिरिअन | ग्रीस | |
| सिरिअन | सिरिया | |
| टेगिअन. | टेगिया. ( ग्रीस ) | |
| टेलेबोन | ग्रीस | |
| टर्मिली | क्रीट | लिसियनांचें दुसरें नांव. |
| टयुक्रिअन | ट्रॉय | |
| थॅमॅनीअम | आशिया | |
| थीबन | ग्रीस | |
| थेस्पिअन | ग्रीस | |
| थेसॅलिअन | थेसली ( ग्रीस ) | |
| थ्रेसिअन | थ्रेस | अनेक बायकांपैकीं नवऱ्याचें जिच्यावर जास्त प्रेम असे तिला तो मेला असतां, मारून त्याबरोबर पुरण्यांत येई. हे आपलीं मुलें विकीत व बरेच पैसे देऊन बायका घेत. आळशीपणा मोठ्या मानाचा समजला जात असे. |
| थिनिअन | आशिया | |
| थिसॅगेटी | यूरोप | |
| टिबॅरेनिअन | आशिया | |
| ट्रॅकिनिअन | ट्रॅचिस (थ्रेस) | |
| टौरिअन | थ्रेस | |
| ट्रॉग्लोडिटी | आफ्रिका | हे इथिओपियन जातीचे असून फारच रानटी होते. गॅरॅमॅंटी लोक यांची शिकार करीत. हे सरपटणारे प्राणी खात. |
| ट्रोजन | ट्रॉय | |
| टिंडॅरिडी | इजियन समुद्र | हे अर्गोनॉट लोक होत. |
| टेरिअन | टायर | |
| टिऱ्हेनिअन | थ्रेस | |
| व्हेनीशिअन | इटली | |
| अम्ब्रिअन | इटली | |
| उटिअन | आशिया | |
| झौएसी | लिबिआ | युद्धांत यांच्या बायका सारथ्याचें काम करीत. |

हिरोडोटसमध्यें उल्लेखिलेल्या लोकांचें आतां प्रांतवार वर्गीकरण करूं.

### ग्रीस

ॲकियन
एगॅली,
(पेलॅस्गिअन)
एगिडी
ऐगिलीअन
एगिनॅटी
ॲनक्टेरिअन
अर्केडियन
आर्केलीन
अर्गाइव्ह
असोपिअन
अथीनिअन
ॲटिक
बिओशिअन
कॅडमीन
कॅरिस्टिअन
कॅल्सिडिअन
खोरॲटी
कॉर्सीरीअन
कॉरिंथिअन
सिन्यूरिअन
सिथ्निअन
डॉलिअन
डेल्फिअन
डेलॉपी
डोरिअन
ड्रिओपिअन
डिमॅनटी
ए॰ेअन
एफेशिअन
ग्रीक
हिलेअन
अबंटी
आयोनिअन.
लॅसेडीमोनिअन
ल्युकॅडिअन
लोकिअन
मॅग्नेटी
मिटिनिअन
मेलिअन किंवा
मॅलिअन
सेनिअन
मिलेशिअन
मोलोशिअन
मायसीनिअन
ओनीॲटे
ऑर्कोमीनिअन

### (ग्रीस पुढें चालू)

ऑर्निएटी
पिऑनिअन
पॅनोपिअन
पॅरोरिॲटी
पॅलॅस्गिअन
पेन्हीबिअन
फोसिअन
प्लेटिअन
स्कोपॅडी
स्टिरिअन
टेगिअन
टेलेबोन
थीवन
थेस्पिअन
थेसॅलिअन

### आशिया मायनर

एगॅली
एओलिअन
अॅलॅबॅंडिअन
ॲलॅरोडिअन
ॲपॅरिटी
आर्मीनियन
एशियन
असिरिअन
बाबिलोनिअन
बिथिनिअन
कॅबॅलिअन
कॅलिंडिअन
कॅपाडोशियन
कॅरिस्टिअन
खाल्डिअन
खालिबीअन
सिलिशिअन
निडिअन
कोल्चिअन
सिमिअन
सायप्रिअन
हिपॅकिअन
लिसिअन
लिडिअन
मॅक्रोनी
मॅग्नेटी
मारिअँडिनिअन
मार्यसिअन

### (आशिया मायनर चालू)

पॅफिलिअन
पॅफ्लागोनिअन
फिनीशिअन
फ्रिजिअन
सिडोनिअन
सिरिअन
टिरिअन

### इजियन-समुद्रांतील बेटें

एस्किओनिअन.
अँगिलीअन
ॲमॅथुसिअन
ॲंड्रियन
क्रीटन
डेलिअन
मिरिनीअन
पॉलिक्निटी
सॅमियन
सॅमॉनेशिअन
टॅमिली
टिंडॅरिटी

### (यूरोप) तुर्कस्थान

ॲकॅथिअन
ॲग्रिॲनी
ॲप्सिथिअन
बिस्टोनिअन.
ब्रिगी
कॅल्सेडोनिअन
सिसोनिअन
डोबेरी
डोलॉंसी
एडोनिअन
ऍकेलीई
एनिअन
एओर्डिअन
गेटी
इलिरिअन
मॅसिडोनिअन
ओडोमॅंटिअन
ओड्रीसीअन
पिओनीअन

### ('यूरोप तुर्कस्थान चालू)

पिओप्ली
पीटिअन
सॅट्री
सिंडिअन
स्ट्रिमोनिअन
ट्युक्रिअन
थ्रेसिअन
ट्रॅकिनिअन
ट्रौसिअन
ट्रोजन

### मध्यआशिया

ॲगथर्सी
ॲलॅझोनी
ॲमॅझॉन
ॲमर्जिअन
सिथिअन
अर्गिपेइ
बोरिस्थेनियन
बुदिनि
कॅलिपिडी
कॅस्पिअन
कॅटियारिअन
खोरॅस्मिअन
किमेरिअन
इसी
न्यूरिअन
पॅरलॅटी
सॉरोमॅटी
सिथिअन
टिल्हेनिअन

### इटाली

ॲग्रिजॅटाइन
क्रोटोनिअन
एगेस्टिअन
लिऑनटीनियन
मेगॅरिअन
मेटॅपॉंटिनी
व्हेनीशिअन
अंब्रीअन

### आफ्रिका

इथिओपिअन
टोग्लोडिटी

### पर्शिया (इराण)

ॲरिअन
ॲरिझॅटी
बॅक्ट्रिअन
बुदी
'बुसिअन
सेफनीस
सिसिअन
डैयन
डेरुसिईअन
जर्मनीअन
हिर्कानिअन
मगी
मॅरॅफिअन
मार्टिअन
मॅस्पिअन
मॅटिसनिअन
मीड
ऑर्थोकोरि-
बॅंटिअन
पॅथिॲलिअन
पॅरेटॅमेनिअन
पार्थिअन
पासार्गडी
पर्शिअन
स्ट्रुकॅटी

### इजिप्त

ॲड्रिमॅकिडी
ॲमोनिअन
ॲस्बिटी
ॲटॅरॅटी
ऑस्क्रिसी
औसी
ऑसोमोली
बॅर्सीअन
कबोली
कार्थेजिअन
सिरेनीअन
युस्पेरीडी
गॅरॅमॅंटी
गिलिगॅमी
गिंडॅनी
गिझॅंटी
लिबिअन
मेसी
मक्ली
मार्सिअन
किंवा मारी

### (इजिप्त चालू)

नॅसॅमोनी
सिलिअन
झौएसी

### अरबस्थान

अरब.

### यूरोप

ॲरिमॅस्पियन
केल्ट
सिनेटी सिनेशिअन
सिगिनी
थिसॅगॅटी

### हिंदुस्थान

कॅलॅशिअन इंडियन
इंडियन (हिंदू)
पॅक्टिक
पॅडिअन.

### आशिया

डॅडिसी
डार्डेनिअन
डरिटी
गॅडॅरियन
हिजेनियन
इसेडोनिअन
लॅसोनियन
लिगीइ
मॅसॅगेटी
मॉक्लिनिअन
मोशियन
मॉसिनीकी
मायसिअन
पॅटिमॅथियन
मॅरिकॅनियन
पॉसिकी
सॅकी शक
सॅरॅंगीयन
सॅस्पिरी
सटेगिडी
सोग्डिअन
सॉलिमी
थॅमनीअन
थिनिअन
टिबॅरीनिअन
उटिअन

### फ्रान्स

हेलिसिशिअन
लिगुरी

येथें एक गोष्ट सांगितली पाहिजे. ही यादी अनेक कारणांमुळें अपूर्ण आहे. एक तर हिरोडोटसच्या पुस्तकाचा कांहीं भाग किंवा दुसरें एखादें पुस्तक लुप्त आहे, असें उपलब्ध पुस्तकांतील हवाल्यांवरून दिसतें. शिवाय हिरोडोटसला सर्व राष्ट्रांची माहिती असणेंहि अशक्य आहे.

हिरोडोटसच्या वेळची हिंदुस्थानची स्थिति येथें वर्णीत नाहीं.हा ग्रंथकार आशियांतला:व आशियाविषयीं या ग्रंथकारानें दिलेली माहिती अधिक पूर्ण करण्यास आपणांपाशीं साहित्य आहे. खुद्द महाभारतांत दोनतीनशें राष्ट्रांचा उल्लेख आहे. पाली ग्रंथ आणखी पुरावा पुढें मांडतील. हिरोडोटसच्या कालावरून आपणांस पुढें जावयाचें आहे. प्राचीन राष्ट्रांपैकीं अनेकांच्या नांवांखेरीज आपणांस इतर माहिती कांहीं नाहीं. प्राचीन राष्ट्रें नष्ट होऊन आजची राष्ट्रमालिका कशी तयार झाली हें जाणण्याची, आपणांस स्वाभाविकपणें इच्छा असणार. हिंदुस्थानचा व इतर आशियाचा परामर्श आपण मग घेऊं: आणि सध्यां यूरोपच्या घटनेकडेच दृष्टि ठेवूं.

हिरोडोटसचा ग्रंथ हा ग्रीक पुरावा होय. यूरोपच्या प्राचीन स्थितीविषयीं जे अनेक ग्रंथकार आपणांस कामास येतात त्यांत ग्रीक व रोमन हे मुख्य होते. रोमन लोकांच्या ग्रंथांपैकीं ज्या ग्रंथांत यूरोपांतील प्राचीन राष्ट्रांची बरीच माहिती आहे असा ग्रंथ म्हटला म्हणजे ज्यूलिअस सीझरचा कामेंटरी नांवाचा ग्रंथ होय.

ज्यूलिअस सीझरनें ज्या जातिस्वरूपी राष्ट्रांचा उल्लेख केला आहे तीं राष्ट्रें येणेंप्रमाणें:

| नांव | स्थान | सीझरशीं संबंध |
|---|---|---|
| ॲडुऑटयूकी | टयूटन्स आणि सिंब्री यांचे वंशज | यांनीं गॉलच्या कारस्थानांत २९०० लोक पुरवले होते. सीझरनें त्यांनां शरण यावयास लावलें. |
| एडुइ | लोअर बर्गंडीमधील ऑटन जवळील गॉलचे रहिवाशी. | हेल्व्हेटींनीं केलेल्या नासधुसीबद्दल त्यांनीं सीझरपाशीं तक्रार केली. ते ॲरिओव्हिस्टस विरुद्ध अर्ज करण्याच्या कामांत सामील झाले. सीझर त्यांच्यामधील आपापसांतले कलह मिटवतो. ते रोमन लोकांच्या विरुद्ध उठतात. |
| आफ्रिकन | टयूनिसच्या आसपासचे लोक. | |
| आलबीसि | गॉलमधील लोक.फारशी माहिती नाहीं. कांहीं लोकांच्या मतें व्हिवॅरॉईस व हे एकच आहेत. | त्यांनां मारसेलिसच्या नोकरींत घेतलें जातें. |
| ॲलेमान्नी | नेक्कर व अपरऱ्हाईनच्या मधील टापूमध्यें राहणाऱ्या जातींच्या संघाचें नांव. | त्यांनीं रोमन सत्तेला अडथळा केला. मॅनर्टच्या मतें ॲरियोव्हिस्टसच्या पराभवानंतर पळून गेलेल्या लोकांचे हे वंशज असावेत. |
| ॲलोब्रोगेस | पूर्वी गॅलीया ट्रॅन्सॅल्पिनामधील राहणारे. नंतर डॉफीनी,सेव्हाय, पीडमांट या प्रांतांत वस्ती केली. | ते रोमन लोकांचे शत्रू होते व त्यांनीं सीझरपाशीं हेल्वेटिअन्सनीं केलेल्या नासधुसीबद्दल तक्रार केली. |
| अम्बारी | गॉलमधील रहिवाशी. | |
| ॲंबियालीटस | गॉलचे रहिवाशी. | सीझरच्या विरुद्ध व्हेनेटींच्या कटामध्यें सामील होतात. |
| ॲंबिआनि | अमीन्सचे रहिवाशी. | सीझरच्या विरुद्ध बेलजन लोकांच्या कटाला १०००० लोक पुरविले. सीझरपाशीं शेवटीं शरण येऊन क्षमेची याचना करतात. |
| ॲंबीवरी | गॉलचे रहिवाशी. नॉरमंडीमधील ॲम्ब्री, येथें रहात. | |
| ॲंबीव्हरेटी | गॉलचे रहिवाशी. | ॲलेशियाचा वेढा उठवण्यासाठीं त्यांनां आपल्या लष्कराचा पुरवठा करण्याबद्दल हुकूम केला जातो. |
| ॲंबीव्हरीटी | ऱ्हाईन व मीजमधील ब्रॅबंट येथील लोक. | |
| ॲंब्रेनीज | स्वित्सर्लंडमधील कँटन ऑफ बर्न येथील प्राचीन लोक. | |
| ॲनार्टीस | हरसनीअन जंगलाच्या सरहद्दीवर राहणारी जर्मन जात. | |

| नांव | स्थान | सीझरशीं संबंध |
|---|---|---|
| अँकाल्लाईटस | ऑक्सफर्ड शायर मधील लोक. | ते सीझरला शरण येतात व त्याकडे आपले वकील पाठवतात. |
| अॅन्सीबॅरीइ | लोअर जर्मनींतील रहिवाशी. | |
| अँडीस | गॉलमधील लोक. अँजूच्या परगण्यांत राहणारे रहिवाशी. | सीझर हा हिंवाळ्यांत त्यांच्यामध्यें आपला तळ देतो. |
| अँम्बीव्हॅरीइ | एम्स व वेसर या नद्यांमध्यें राहणारे लोअर जर्मनीचे रहिवाशी. | |
| आरमोरिकी | ब्रिटनीचा भाग जो आरमोरिका तेथील रहिवाशी. | ते रॉशिअस यावेर त्यानें हिंवाळ्यांत तळ दिला असतां हल्ला करण्यासाठीं जमतात. |
| अॅरव्हर्नी | फ्रान्समधील मूळचे लोक. | सीझरनें अकस्मात् त्यांच्यावर स्वारी करून त्यांचा प्रदेश लुटला. |
| अॅरिटगी | स्पेनमधील अँडॅलूशिआमधील लोक. | |
| अॅट्रीबेटिस | अॅरटॉईस या नांवानें हल्लीं प्रसिद्ध असलेल्या नेदर्लंडच्या एका भागांत राहणारे गॉलचे रहिवाशी. | गॉलच्या कटाला ते आपले १५००० लोक पाठवतात. |
| अॅटयूआरीइ | पूर्व जर्मनीचे लोक. मीज आणि ऱ्हाईन यांमधील टापूंत राहणारे. | |
| औलरसी-एब्यूरोव्हिसीस, ब्रनोव्हिसीस, सेनोमनी, डायाब्लिंटीझ | गॉलमधील रहिवाशी | हे पुष्कळ लोक कटाला पुरवतात. अलेशिआच्या कुमकेसाठीं स्वतःचें लष्कर पुरविण्याचा त्यांनां हुकूम होतो. |
| औसी | गॅस्कनींतील ऑक्समध्यें राहणारे गॉल लोक. | ते कॅससला शरण जातात. आणि ओलीस माणसें ठेवतात. |
| ऑसेटानि | पिरेनिअन पर्वताखालील स्पेनचे लोक. | शरण आल्याबद्दल वकील सीझरकडे पाठवतात. |
| बेल्जी | गॅलीया बेल्जीकाचे रहिवाशी. हे मूळचे बेलजी लोक जर्मन वंशापासून झालेले आहेत अशी त्या वेळची कल्पना होती. हे अतिशय शूर लोक होते. | ट्यूटन्स आणि सिंब्री यांच्या स्वारीला अडथळा करतात. सीझर त्यांचा पराभव करून त्यांनां परत आपल्या मूलस्थानाकडे हांकून लावतो. |
| बेलोकॅसी | नॉरमंडीमधील बेयोमध्यें राहणारे गॉल लोक. | आलेशिआच्या मदतीसाठीं ३००० लष्कर पाठवतात. |
| बेलोव्हासि | बेलजीमधील अतिशय प्रसिद्ध जातीचे लोक. हल्लीं फ्रान्समध्यें बोव्हे येथें राहतात. | बेलजमच्या कटाला १००००० लोक पुरवतात. सीझरच्या विरुद्ध उठतात. परंतु पराभव झाल्यामुळें शरण येतात. |
| बोसी | ग्रेसचे लोक. | पाँपींच्या सैन्यापैकीं लोक. |
| बेटोन्स | हिस्पॅनिआ टरकोनेन्सीसमधील लोक. | घात होण्याची धमकी दिल्यामुळें कॅशसच्या मदतीला धांवतात. |
| बिब्रोसि | ब्रिटनचे लोक. | ते तहासाठीं सीझरकडे वकील पाठवतात. |
| बिगेरिओन्स | गॅस्कनीमधील बिगोरी प्रांतांत राहणारे गॉल लोक. | कॅससला शरण येऊन ओलीस ठेवतात. |
| बिटुरिजीस | फ्रान्समधील गिनीमधील बेरी प्रांतांतील लोक. | |
| बॉइ | पूर्वीचे जर्मन लोक. ऱ्हाईन नदी ओलांडून गॉलमध्यें वस्ती करतात. | गॉलविरुद्ध हेलव्हेटिअनला मदत करतात. रोमन लोकांच्यावर पिछाडीच्या बाजूनें हल्ला करतात. सीझर त्यांनां एडयुन्समध्यें राहण्याची परवानगी देतो. |
| बोरानी | जर्मनीमध्यें राहणारे पूर्वीचे लोक. कांहींच्या मतें ब्यूरि व हे एकच आहेत. | |
| बॉस्फोरानी | युक्झाइन समुद्रावर राहणारे तार्तार लोक. | |
| ब्रॅनोव्ही | गॉलचे रहिवाशी | अलेशियाच्या मुक्ततेकरितां सैन्य पुरवितात. |
| ब्रॅनोव्हीसी | फ्रान्समधील मॅरिएनमधील लोक. | |

| नांव | स्थान | सीझरशीं संबंध |
|---|---|---|
| ब्रूटीइ | इटालींतील कॅलॅब्रिअन नांवाचे लोक. | हे प्रथम गुलाम असून पुढें आपल्या धन्यांवर उठून स्वतंत्र झाले. |
| बुरसाव्हो-लेन्सेस | हिस्पानिआ बीटिका-मधील लोक. | |
| कॅडेटीस | गॉलचे रहिवाशी. | |
| कॅडार्सि | कॅर्सी देशामध्यें वस्ती करणारे गॉलचे रहिवाशी. | |
| सीरीसी | नामूरच्या भोंवतालच्या टापूंत राहणारे बेलजीक गॉल. | सीझरच्या विरुद्ध बेलजमच्या कटांत सामील होतात. |
| कॅलॅगूरिटॅानी | कॅलॅव्होरा प्रांतांत रहाणारे हिस्पानिया टरकॉनेन्सिसमधील लोक. | शरण आल्याबद्दल सीझरकडे वकील पाठवतात. |
| कलेटीस | मूळचे बेलजीक गॉल. नार्मंडीमध्यें राहणारे लोक. | बेलजमच्या बंडाला दहा हजार लोक पुरवतात. |
| कॅनीनफेटीस | जर्मनीच्या खालच्या भागांतील मूळचे रहिवाशी; पण आतां दक्षिण हॉलंडमध्यें गोर्कम प्रदेशांत राहतात. | |
| कँटब्री | ग्यूप्यूस्कोआ व बिस्के या प्रांतांमध्यें राहणारे स्पेनमधील शूर लोक. | त्यांनां अॅफ्रॅनिअस लष्कर पुरवण्याला भाग पाडतो. |
| कॅरॅलीटानी | सार्डीनीआमधील कॅग्लिसा प्रांतांतील लोक. | ते पॉंपीच्या विरुद्ध उठतात व आपल्या तोफखान्यामुळें कोटाला हाकलून लावतात. |
| कार्नी | नॉरीकमच्या एका भागांत राहणारे पुरातन लोक. तो प्रांत हल्लीं कार्नीओला या नांवानें प्रसिद्ध आहे. | |
| कार्न्यूटीस | फ्रान्समधील लोक. हल्लीं ज्याला चार्ट्रीस म्हणतात त्या प्रदेशांत राहणारे. | तेथें सीझर आपलें लष्कर ठेवतो. ते उघडपणें टॅस्गेटिअसचा खून करतात सीझरकडे वकील पाठवतात व शरण जातात. |
| (कार्न्यूटीस) | | रोमन लोकांच्या विरुद्ध पुढाकार घेतात. बिटचुरिजरीअन्रावर हल्ला करतात. पण सीझर त्यांचा पराभव करतो व पळवून लावतो. |
| कार्पी | डॅन्यूब नदीजवळचे प्राचीन लोक. | |
| कॅसी | पूर्वकालीन ब्रिटनचे रहिवाशी. | ते सीझरकडे आपले वकील धाडतात व शरण येतात. |
| कॅटूरिजीस | गॉलमधील लोक. एम्ब्रुअन प्रदेशांत रहाणारे. | आल्प्स पर्वतावरच्या मार्गावर सीझरला विरोध करतात. |
| केल्ट | गॉलचे मूळचे रहिवाशी. विशेषतः ज्या भागाला गॅलिआ केल्टीका म्हणतात त्यामध्यें रहाणारे. | गॉलमध्यें अंतर्भूत असलेल्या तीन राष्ट्रांतील लोकांमध्यें हे अतिशय शूर होते. ते स्वतः आपल्यास गेल असें म्हणवून घेत असत. |
| कल्टीबेरी | स्पेनचे रहिवाशी. केल्ट लोकांचे वंशज. एब्रो नदीच्या कांठीं त्यांनीं वस्ती केली. | अफ्रेनिअस त्यांनां सैन्य देण्यास भाग पाडतो. |
| सेनिमॅग्नी | ब्रिटनचे पूर्वीचे रहिवाशी. सफोक, नारफोक, केम्ब्रिजशायर आणि हंटिंग्डनशायर परगण्यांत रहाणारे लोक. | |
| सेन्नी | कोल्टिक शाखेचे लोक. | |
| सेनोमानी | गॅलिआ केल्टिकाचे रहिवाशी. | |
| सेन्ट्रॉनी | फ्लँडर्सचे रहिवाशी. | |
| सेन्ट्रोनी | गॉलचे रहिवाशी. | |
| केरूस्कि | एल्ब आणि वेसर या नद्यांच्या टापूंतील, ब्रन्स्वीकच्या ताब्यांत असलेल्या मॅन्सफील्ड प्रदेशांत रहाणारे प्राचीन जर्मनीचे मूळचे लोक. | आर्मीनिअसच्या आधिपत्याखालीं सॉल्टस टयूटोबर्जिएन्सिसच्या मैदानांत दुर्दैवी व्हेरसला जाळ्यांत पकडून त्याला व त्याच्या सैन्याला या लोकांनीं ठार मारलें. त्यांचा नंतर जर्मनीकसनें पराभव केला. |
| सिंब्री | केर्सोनेसस सिम्ब्रिका या देशांत रहाणारे | |

| नांव | स्थान | सीझरशीं संबंध |
|---|---|---|
| (सिंब्री) | उत्तरेकडचे अतिशय प्राचीन जटलंडी लोक. | |
| कोकसाटीस | गॅलचे रहिवाशी. कांहीं-च्या मतें बॅझॅडोइस असें यांनां म्हणतात. | |
| कॉंड्रूसि | लीज आणि नामूर यामधील कॉंड्रोट्झ नांवानें प्रसिद्ध असलेल्या देशांत राहणारे बेलजमचे पूर्वीचे लोक. | |
| क्यूरिऑ-सोलीटी | ब्रिटानीमधील कॉर्नौला देशांत रहाणारे गॉलचे रहिवाशी. | |
| डायाब्लिंटीस | लॉ परशे या प्रदेशांत वास्तव्य करणारे गॉलचे मूळचे रहिवाशी. | |
| एब्यूरोनीज | नामूर परगण्यामध्यें असलेल्या प्रदेशांत रहाणारे जर्मनीचे मूळचे लोक. | विश्वासघाताबद्दल सीझर त्यांच्यावर पुरा सूड घेतो. |
| एब्यूरो-व्हीसेस | नॉर्मंडीमधील इव्ह-रोच्या प्रदेशांत रहाणारे गॉलचे रहिवाशी. | ते आपल्या कायदेमंडळाची कत्तल करतात; व व्हिरिडोव्हिक्सला मिळतात. |
| एल्यूटेटी-कॅडर्सी | अॅक्वीटेनिआमधील कॅडर्सींची एक शाखा. | अलेशिआला कुमक म्हणून लष्कर पाठवतात. |
| एल्यूसाटीस | गॅस्कनीमधील यूसेच्या प्रदेशांत रहाणारे गॉलचे मूळचे रहिवाशी. | |
| एसुइ | गॉलचे रहिवाशी. | |
| गाबली | गिवादनच्या प्रदेशांत रहाणारे गॉलचे रहिवाशी. | ते व्हर्सीगेटोरीच्या कटाला मिळतात. व प्ल्यूटोरिअसपाशीं आपले लोक ओलीस ठेवतात. |
| गॅडिटानी | स्पेनमधील गेड्स या नांवाच्या प्राचीन महत्त्वाच्या शहराचे रहिवाशी. | |
| गॅली अथवा गॉल | गॉलचे मूळचे रहिवाशी. यांचा प्रदेश जर्मनांपेक्षां फार चांगला आहे. | रोमन लोकांपेक्षां देहयष्टीनें उंच व धिप्पाड, फार करारी, शूर पण संकटांत निरुत्साही होणारे लोक. |
| गॅरीटीस | गॅव्रे प्रदेशांत रहाणारे गॉलचे रहिवाशी. | |
| गॅरोसेली | जेनीस पर्वताच्या आसपास रहाणारे गॉल लोक. | आल्प्स पर्वतावरचा सीझरचा मार्ग अडवून टाकतात. |
| गरूमनी | गॅरोनच्या आसपासच्या मुलखांतील गॉल लोक. | |
| गेटी | डान्यूबच्या दोन्ही तीरांवरील मीसिआ व डेसीआमधील टापूंत रहाणारे सीथीअन लोक. | |
| गॉडर्यूनी | बेलजमचे लोक. घेंटचे मूळचे रहिवाशी. कांहींच्या मतें कोर्ट्रेचे रहिवाशी. | सिसरोच्या छावणीवर हल्ला करण्याच्या कामांत अॅम्बीओरिक्सला मदत करतात. |
| गॉटीनी | जर्मनीचे पूर्वीचे लोक. | मॅरोबोड्स लोकांनीं त्यांनां जर्मनीबाहेर हांकून लावलें. |
| ग्रूडिई | लूवेनचे रहिवाशी. | सिसरोच्या छावणीवर हल्ला करण्याच्या कामांत अॅबीओरिक्सला मदत करतात. |
| गुगर्नी | प्राचीन जर्मन लोक. उबी आणि बॅटवीमधील ऱ्हाईन नदीच्या उजव्या तीरावर रहाणारे लोक. | |
| गटोनीज | व्हिस्तुला नदीच्या टापूंत रहाणारे जर्मन लोक. | |
| हेल्वेटीइ | स्वित्झरलंडचे प्राचीन रहिवाशी. गॉलचे अतिशय शूर लोक. | सीझर त्यांचा पराभव करून त्यांस त्यांच्या मुलखांत हांकून लावतो. |
| हेलवीइ | व्हिवॅराइसच्या ताब्यांत असलेल्या मुलखांत रहाणारे गॉलचे रहिवाशी. | सीझर त्यांच्या मुलखावर चाल करून जातो. |
| हर्मंडूरी | अपर सॅक्सनीमधील मिस्नीआच्या प्रदेशांत रहाणारे प्राचीन जर्मन लोक. कांहींच्या मतें त्यांनीं बोहेमियाचा विस्तृत प्रदेश व्यापिला होता. | |
| हेरूली | उत्तरेकडचे लोक. प्रथम स्कॅंडिनेव्हीआ मधून आले. | |

| नांव | स्थान | सीझरशीं संबंध |
|---|---|---|
| | लोअर सॅक्सनीमधील मेक्लेनबर्ग प्रदेशांत रहाणारे. | |
| इलुर गॅव्हो-नेन्सेस | इबरस जवळचे हिस्पॅनिआ टरकोनेन्सिसचे . लोक. | ते सीझरला शरण जातात व त्याला धान्य पुरवतात. |
| ॲसेटानी | पिरेनीअन पर्वतापाशीं रहाणारे स्पॅनिश लोक | ॲफ्रेनिअसविरुद्ध बंड करून सीझरला शरण जातात. |
| यॅाडर्टीनी | इलिरियमची राजधानी याडरपासून पडलेलें नांव. | |
| लॅरीनांटीस | इटालीमधील लेरीनमचे लोक. | |
| लॅटिनी | इटालीच्या प्राचीन लॅटीयम भागापासून आलेले लोक. या नांवावरूनच त्यांच्या भाषेला लॅटिन हें नांव पडलें. | |
| लॅटोब्रिगि | लॉसानी या प्रदेशांत रहाणारे गॅलीआ बेलजीकाचे रहिवाशी. | |
| लेमोव्हीसि | गॉलचे मूळचे रहिवाशी. | |
| लेमोव्हीसी-आर्मारिकि. | सेंट पॉ डी लिओनचे रहिवाशी. | |
| लेपॉंटिइ | लेव्हेंटीनीच्या दरीपाशीं रहाणारे आल्प्सचे रहिवाशी. | |
| ल्यूसी | हल्लीं ज्या ठिकाणीं लोरेन आहे, त्या ठिकाणीं रहाणारे गॅलीआ बेलजीकाचे अस्त्रनिपुण रहिवाशी. | |
| लेव्हसी | लूव्हेनपासून जवळच असणारे ब्रॅबंटचे रहिवाशी. | नव्हींचे मांडलीक. |
| लिबुर्नी | हल्लींच्या क्रोडालीआच्या भागांत रहाणारे इलिरिकमचे रहिवाशी. | |
| लिंगेनीस | शांपेनमधील लांग्रेसमध्यें व आसपास रहाणारे गॅलीआ बेलजिकाचे रहिवाशी. | |
| ल्यूकानी | बॅसीलिकेटच्या प्रदेशांत रहाणारे इटालीचे मूळचे लोक. | |
| लीगीइ | हल्लींच्या सिलेशिआच्या व पोलंडच्या सरहद्दीच्या प्रदेशांत रहाणारे अपर जर्मनीचे रहिवाशी. | |

| नांव | स्थान | सीझरशीं संबंध |
|---|---|---|
| मॅंडूबीइ | बर्गंडीमध्यें रहाणारे गॉल लोक. | |
| मॅरूकी | अब्रूझो नांवाच्या प्रदेशांत वास्तव्य करणारे इटालीचे प्राचीन लोक. | |
| मार्सी | ड्यूकॅटो डीमार्सी या नांवानें प्रसिद्ध असलेल्या प्रदेशांत रहाणारे इटालीचे रहिवाशी. | |
| मॅसीली एन्सीज | मॉर्सीलीसचे रहिवाशी. | |
| मीडियो-मॅट्रिसीस | मेंटझच्या आसपास रहाणारे लोरेनचे रहिवाशी. | |
| मेल्डीइ | कांहींच्या मतें म्योचे लोक; परंतु बेल्जीचे असण्याचा जास्त संभव. | |
| मेनॅपी | व्हाईन नदीच्या दोन्ही तीरांवर रहाणारे गॅलिआ बेलर्जीकाचे रहिवाशी. | |
| मॉरीनी | पिकार्डी व अर्टाइसच्या सरहद्दीवरील बॉलोनच्या तीरावर वास्तव्य करणारे पूर्वीचे रहिवाशी. | सीझरच्या मतें या देशांतून ब्रिटनला जाण्याला सर्वांत जवळचा मार्ग आहे. |
| नबॅथीइ | अरबस्थानचे प्राचीन लोक. | |
| ननेटीस | नॅंटीसच्या आसपासच्या प्रदेशांत वस्ती करणारे गॉलचे रहिवाशी. | |
| नान्टुआटीज | सेव्हॉयच्या उत्तरेकडील मूळचे रहिवाशी. | |
| नॅरीस्की | नुरेंबर्ग ही ज्या देशाची राजधानी आहे त्या नॉर्टगो प्रदेशाचे मूळचे लोक. | |
| नेमेटीस | व्हाईन नदीवर स्पायर शहरच्या आसपास रहाणारे जर्मनीचे मूळचे रहिवाशी. | |
| नव्हीइ | गॅलीया बेल्जीकाचे मूळचे रहिवाशी. | सीझरच्या स्वारीमध्यें त्याच्यावर हल्ला करतात व स्वतःचा पूर्ण नाश होई तोंपर्यंत शौर्यानें लढतात. |
| निटोब्रीगीज | गॅरोनच्या दोन्ही तीरांवर असणारे मूळचे गॉल. | |

| नांव | स्थान | सीझरशीं संबंध |
| --- | --- | --- |
| नोरीआ | स्टीरीआ प्रांतांतील ईलिरिकमच्या सरहद्दीवरील शहर. | |
| न्यूमिडिआ | न्यूमीडिआचे रहिवाशी. | |
| ऑस्केन्सीज | हिस्पॅनिआ टरकोनेन्सिस मधील ऑस्का शहराचे लोक. | |
| ऑसीस्मीइ | गॉलचे मूळचे रहिवाशी. त्यांचा मुलूख ब्रिटनीच्या एका भागावर पसरलेला होता. | |
| पेमानी | गॅलीया बेलजीकाचे मूळचे रहिवाशी. कांहींच्या मतें लक्सेंबर्गचे रहिवाशी. | |
| पॅरीसी | आईल ऑफ फ्रान्सच्या नांवानें हल्लीं प्रसिद्ध असलेल्या प्रदेशांत वास्तव्य करणारे गॉलचे रहिवाशी. | |
| पार्थीनी | मॅसिडोनिआचे रहिवाशी. | त्यांचें मुख्य शहर हल्ला करून घेतलें जातें. |
| प्यूसिनी | डॅन्यूबच्या एका मुखाच्या कांठीं असणारे प्यूसबेटाचे रहिवाशी. | |
| पिक्टी | प्राचीन उत्तरेकडील रानटी लोक. मिश्र विवाहामुळें स्काटशीं एकजीव होतात. पण प्रथमतः डेन्मार्क पासून आले असावेत असा तर्क आहे. | |
| पिक्टोनीज | लॉयरच्या दक्षिण तीरावर असणारे गॉलचे रहिवाशी. | |
| पिरूस्टी | पॅनोनिआच्या हद्दीवर असणारे इलिरिकमचे प्राचीन लोक. | |
| प्लूमोसि | टूरनेजवळ वस्ती करणारे नर्व्हीअन लोकांच्या ताब्यांत असणारे गॅलिआ बेलजीकाचे लोक. | |
| प्रेसिआनी | गॉलचे मूळचे रहिवाशी. | ते रोमन लोकांनां शरण गेले. |
| रौरासी | हल्लीं ज्या ठिकाणीं स्वीत्झर्लंडमध्यें बॅसले आहे, त्याच्या जवळ वस्ती करणारे प्राचीन जर्मन लोक. | ते हेल्वेटी लोकांबरोबर मिळतात व स्वतःचें मूलस्थान सोडून जातात. |
| रेमी | व्हेस्ते नदीवर शांपने प्रांतांत फ्रान्समधील एक भरभराटीस आलेलें शहर. | ते सीझरला शरण जातात. सीझरवर त्यांचें वजन असतें. बेलोव्हेसीच्या हातांत ते पडतात. |
| ऱ्हेडोनीज | ब्रिटनीमधील रेनेसच्या आसपास वस्ती करणारे गॉलचे रहिवाशी. | ते रोमन लोकांनां शरण जातात. |
| रोक्सोलानी | ॲलानीच्या सरहद्दीवरील सीथिआ यूरोपीआचे लोक. त्यांच्या देशाला हल्लीं तांबडा रशिआ म्हणतात. | |
| रूटेनी | गॉलचे मूळचे रहिवाशी. हल्लीं ली रौअर्ग या नांवानें प्रसिद्ध असलेल्या प्रदेशांत राहणारे. | |
| सॅलूव्ही | हल्लीं ज्या ठिकाणीं एक्स आहे त्याच्या आसपासचे गॅलिया नॉरबोनेन्सिसचे लोक. | |
| सांटोनीज | गिनीचे प्राचीन रहिवाशी. | |
| सेडूनी | व्हॅलेसच्या वरच्या भागावर राहाणारे जिनेव्हा सरोवराच्या दक्षिणेला असणारे गॉल्स. | |
| सेडूसी | स्वेबियाच्या सरहद्दीवर असणारे जर्मन लोक. | |
| सेगोन्टिआसी | हॅंपशायरमधील हॉलशॉटच्या आसपास असणारे ब्रिटनचे लोक. | |
| सेगुसियानी | हल्लीं ज्या ठिकाणीं लियानिस फॉरेस्ट आहे त्या ठिकाणीं वस्ती करणारे गॅलिआ केल्टीकाचे लोक. | |
| सेक्वानी | हल्लीं अपर बर्गंडी या नांवानें प्रसिद्ध अस | ते जर्मन लोकांना गॉलमध्यें आणतात. |

| नांव | स्थान | सीझरशीं संबंध |
|---|---|---|
| ( सेक्वानी ) | लेल्या भागांत राहणारे गॅलिया बेलजीकाचे लोक. | |
| सेसूव्हीइ | सीझच्या आसपास वस्ती करणारे गॉलचे प्राचीन लोक. | ते रोमन लोकांस शरण जातात. |
| सिब्यूझाटीज | अडरच्या आसपासच्या भागांत राहणारे गॉलचे प्राचीन लोक. | ते रोमन लोकांस शरण येतात. |
| सुएसिओनीज | गालचे प्राचीन रहिवाशी. | रोमन लोकांनां शरण येतात. |
| सुएव्ही | जर्मनीचे अतिशय शूर कडवे लोक. त्यांच्या ताब्यांत जर्मनीचा मोठा भाग असतो. नंतर स्पेनमध्यें व कांहीं डॅन्यूबमध्यें जातात. देवापेक्षां ते शूर आहेत अशी जर्मनांची भावना होती. | रोमन लोकांविरुद्ध ते कट करतात. यूबि लोक त्यांनां खंडणी देतात. |
| सुलसीटानी | सार्डिनीआचे प्राचीन रहिवाशी. | |
| टारबेली | लॉंबार्ड प्रदेशांत आइस व बेयोनच्या भोंवतालच्या टापूंत राहणारे पिरनीज जवळील गॉलचे रहिवाशी. | ते क्रॅससला शरण जातात. |
| टरूसाटीस | गॉलचे मूळचे लोक. | ते रोमन लोकांस शरण जातात. |
| टेंक्थेरी | ऱ्हाईन नदीवर राहाणारे जर्मन लोक. | ते व यूसीपेटीस ऱ्हाईन नदीवर येतात; व युक्तीनें ती नदी ओलांडतात. त्यांची कत्तल केली जाते. |
| ट्यूटोनीज | सिंब्रीयाच्या हद्दीवर राहणारे अतिप्राचीन जर्मन लोक. | त्यांनां बेलजांच्या प्रदेशामधून हाकलून दिलें जातें. |
| थुरी | इटलीचे प्राचीन लोक. | |
| टोक्झांड्री | ब्रेडा द जट्रूयडेनबर्गच्या सरहद्दीवरील लोक. | |
| ट्रेव्हिरी | लोअर जर्मनी. | |
| ट्रिबोसि | अलसेस प्रदेशाच्या आसपास राहणारे जर्मनीचे प्राचीन लोक. | |
| ट्रिनोबॅंटीस | मिडलसेक्स व हर्टफर्ड शायर परगण्यांत रहाणारे प्राचीन ब्रिटिश. | |
| ट्यूलिंगी | स्वित्सर्लंडमध्यें जेथें हल्लीं स्टूलिंजन आहे त्याच्या आसपासच्या भागांत राहणारे जर्मनीचे प्राचीन लोक. | |
| ट्रुंग्री | ज्या ठिकाणीं लीजमध्यें ट्रांग्रीस हल्लीं आहे, त्याच्या आसपास रहाणारे लोक. | |
| ट्यूरोनीज | टूरमच्या आसपासच्या टापूंत रहाणारे प्राचीन गॉल. | |
| टस्की | इटलीच्या एका महत्वाच्या टस्कनी या भागांत रहाणारे लोक. | |
| यूबीइ | ज्या ठिकाणीं हल्लीं कोलन आणि ज्युलिअर्स हीं शहरें आहेत त्याच्या आसपास राहणारे लोअर जर्मनीचे लोक | सुएव्हीच्या विरुद्ध रोमन लोकांपाशीं मदत मागतात व सीझरच्या बाजूनें लढतात. |
| यूनेली | गॉलचे प्राचीन लोक. | |
| यूसीपेटीस | नेहमीं नेहमीं वस्ती बदलणारे प्राचीन जर्मन लोक. | |
| व्हॅंगीओनीज | 'वर्मस शहराच्या भोवतीं' असलेले प्राचीन जर्मन. | |
| व्हेलॉनी | व्हेलाइच्या आसपास रहाणारे गॉलचे प्राचीन लोक | |
| व्हेलोकॅसीस | नारमंडीचे प्राचीन लोक. | |
| व्हेनैटी | हें नांव पूर्वी व्हेनेटिअनस व गॉलमधील ब्रेटानी येथील व्हेनीसचे रहिवाश्यांनां देत असत. दुसरा अर्थ या ठिकाणीं लागू आहे. | समुद्राच्या बाजूनें ते फार सशक्त असत. त्यांचें प्रधानमंडळ सीझर कापून काढतो. व त्यांचा पूर्ण पराजय झाल्यामुळें ते सीझरला शरण जातात. |

| नांव | स्थान | सीझरशीं संबंध |
|---|---|---|
| व्हेरॅग्री | गॅलीआ लुग्डुनेन्सिसचे लोक. | |
| व्हेरोमांडुइ. | गॅलीआ बेलजीकाचे लोक. त्यांचा देश पिकार्डीचा एक भाग आहे. | |
| व्हेरेनॅज | एस्ट्रामॅडुराचा भाग व्यापणारे स्पेनचे लोक. | |
| व्हिंडेलिसि | व्हिंडेलिकाच्या प्रदेशांत रहाणारे जर्मन. | |
| व्होकाट्राज | लापुरडेनीसच्या सरहद्दीवरील गॉल्स. | |
| व्होकांटी | डॉफीनींतील डायच्या प्रदेशांत व व्हेनिसच्या परगण्यांतील व्हायसनच्या भागांतील प्राचीन गॉल. | |
| व्होल्की. | गॉल लोकांची कडवी जात. त्यांच्या टेक्टोसेजेस व अरेकोमिसी या शाखा आहेत. | |

सीझरनें उल्लेखिलेल्या राष्ट्रजातींचें आतां देशवार वर्गीकरण करूं.

**( गॉल )**

एडुइ
आलवीर्सा
अम्बारी
ऑम्बिआलीट्स
अम्बीबारी
अम्बीव्हरेटी
अँडीस
अॅट्रेबॅटीस
ऑलरसीएव्ह्यूरोव्हीसीस.
ऑलरसी ब्रॅनोव्हीसीस
ऑलरसी डायाब्लिंटीस
औसी
बेलजी
बेलोकॅसी
बेलोव्हासी
बिगेरिओन्स
कॅडेटीस
कॅडर्सी
सीरीसी

( गॉल पुढें चालू )

कलेटस
कॅटुरिजीस
केल्ट
सेन्ट्रोनी
कोकोसाटी
क्यूरिआसोलीटा
डायाब्लिंटीस
एव्ह्यूरोव्हासीस
एल्युटेटी
एल्युमेटीस
एसुइ
गबाली
गॅली अ० गॉल
गॅरीटीस
गॅरोसेली
गॅरुम्नी
हेल्वेटी
हेल्वी
लॅटोब्रिगी
लेमोव्हीसीस
ल्यूटुगी
लेक्झोव्ही

( गॉल पुढें चालू )

लिंगोन्स
मेडुबीइ
मेनापी
ननेटीस
नर्व्ही
ऑसीमी
पेमानी
पॅरीसी
पिक्टोन्स
प्लमोसी
प्रेशिआनी
रेडोन्स
रुटेनी
सल्व्ही
सेडूनी
सेगूसियानी
सेक्वानी
सेसूव्ही
सिबुझेटीस
सूएसिओनेज
टारबेली
टरुसाटीस

( गॉल पुढें चालू )

युनेली
व्हेलानी
व्हेनेटी
व्हेरोमॅंडुयि
व्होकाटीस
व्होकॉंटी.
व्होल्की
आरमोरिकी
सेन्नी
सेनोमॅनी

**( आफ्रिका )**

आफ्रिकन.

**( जर्मन )**

अॅडुआटयूकी
अॅलेमानि
अॅनार्टीस
अॅन्सीबरीइ
अॅम्प्रीव्हॅरीइ
अॅट्यूआराइ
बोइ
बोरानी
कॅनीनफेटीस
केरुस्की
एव्ह्यूरोनीज
गॉटनी
गुगर्नी
गटोनीज
हर्मंडूरी
हेरूली
लॉगीइ
नॅरिस्की
रेरुसी
सेदुसी
सुएव्ही
टॅंचथेरी
ट्यूटोनीज
ट्रिव्हेरा
ट्रिबोसी

( जर्मनी चालू )

टयूलिंगी
यूबी
यूसिपेटीस
व्हॅगीओनीज
व्हिंडेलिसि

**( इटाली )**

अलोब्रोगेस
ब्रूटी
कॅरॅलिटानी
लॅरीनाटीस
लॅटिनी
ल्यूकानी
मरुकी
मार्सी
नॅंटयू आटीज
सुलासटानि
थूरी
टस्की

**( स्वित्झर्लंड )**

अॅब्रोन्स
लेपॉंटी

**( इजिप्त )**

अलेक्झांड्रिअन

**( ब्रिटन )**

अॅकेलाइटस
बिब्रोसी
कार्पी
कॅसी
सेनिमॅग्नी
गेटी
प्यूसीनी
पिक्टी
सेगॉन्टिआसि
ट्रिनोबॅंटीस

**( फ्रान्स )**

अर्व्हर्नि
बिटुरिजेस

( फ्रान्स चालू )

ब्रॅनोव्हीसेस
कार्न्यूटीस
मॅसीलिएन्सेस
मीसियोमॅट्रिसीस
रेमी

**( स्पेन )**

अॅस्टीगी
औसिटानी
बुर्सान्व्होलेन्सेस
कॅटाब्री
सेल्टांबेरी
गॅडिटानी
यसेटानी
व्हेटोन्स
बेटोन्स
कॅल्ग्यूरिटानी
इलुरगव्होनेन्सेस
ऑक्सिन्सेस

**( जटलंड )**

सिंब्री

**( हॉलंड )**

बॅटेव्ही

**( बेलजम )**

अॅम्बीआनी
कॉंड्रूसी
गोडयूनी

**( आशिया मायनर )**

बेसी
जार्डॅनी
लिबर्नी
पार्थीनी
पिरुस्टा

**( अरबस्थान )**

नबाथी

या राष्ट्रजातीच्या प्रगतीची द्योतक जीं शहरें होतीं त्यांचा हिशेब येणेंप्रमाणें:—

**( गॉल )**

अॅजेंडिकम
अॅमाजेटोब्रिआ
ऑक्टानिआ
अॅरिलेट
अर्व्हेरिकम्

( गॉल चालू )

कॅबिलोनम्
कॉरकॅसो
डेसेशिआ
ड्यूरोकोटॉरम्
गेनाबम्

( गॉल चालू )

गरगोव्हिआ
लिमो
मॅगेटोब्रिआ
मॅटिस्को
मेलोडनम्
नोव्हिओडनम

(गॉल पुढें चालू.)

टालोसा
युक्सेलोडनम्
व्हिएन्ना

(इटली)

ॲपोनियाना
ॲप्यूलिआ
ॲक्वीलिया
ऑरमीनम्
ॲरेटियम्
ॲस्क्युलम्
ऑक्झिमम्
आल्वा
ॲंकोना
ब्रँडूशिअम्
कॅमेरिनम्
कॅपेनिया
कॅपीकॅनीनि
कॅन्यूशिअम
कॅपुआ
कॅरलीस
कॅसीलिनम्
सिंग्यूलम्
कॉर्सा
कॉकॉर्डिआ
कॉर्फिनियम्
कॉर्सिका
कोझेनम्
क्रेमोना
फॅनम्
फेसूली
जीनीव्हा
इगूंव्हिअम्
इस्ट्रिआ
लिग्यूरिआ
मेसाना
पिझारम्
रॅव्हेना
सॅलासि
सार्डीनिआ
स्पोलेटियम्
सुल्मो
सिरॅक्यूज
हॅरोसीनि
ॲंब्रिआ
व्हेरोना

(ग्रीस)

ॲकरनेनिआ
ॲकाआ
एटोलिआ
ॲंब्रेशिआ
ॲंफिलेशिआ
अथेन्स
ब्युथ्रोटम्
कॅलीडॉन
कॉर्सीरा
कॉरिंथ
थीबी

(मॅसिडोनिआ)

ॲमॅटिआ
ॲंफीपोलिस
ॲंचिथालस
ॲपोलोनिया
ॲस्पेरेजम
बर्जिआ
बुलिस
कॅसेंड्रिआ
डिव्हाचिअम
लिमस
पेट्रा
फिलिपि
थेसॅलोनिका

(आफ्रिका)

असिला
ॲडूमेटम
एजिमेरिस
आगार
ॲक्विलेरिआ
ॲस्कूरम
मॉरिटानिआ
क्ल्यूपिआ
कॉर्नेलिआना
कॅस्ट्रा
सिरीन
सार्सिना
लोप्टिस
हिपो
पॅरॅडा

(आफ्रिका चालू)

पॅरोटोनिअम्
टॉलेमिआस
रुसिपना
सासूरा
टेगिआ
थॅबेना
थॅपसस
थुसेटा
युटीका
व्हॅका
झामा
झेटा

(आशिया-मायनर)

बिथनिया
ॲपॅमिया
कॅपॅडोशिआ
सीझेरिआ
कोमॅना पॉंटिका
सिझीकस
एफेसस गॅलेशिआ
गॅलीओ ग्रेशिआ
हेरॅक्लिआ
हसोरिया
मॅझाक
मिशिआ
पेरिंथल
ट्रोया
ट्रॅलिस

(स्पेन)

कॅबिलो
कॉर्मोना
कॅरुका
कॉर्टिआ
ॲस्टेव्हिआ
ॲस्टा
ॲटेगुआ
कॅस्ट्रपोस्थुमिआ
हिस्पॅनिआ
मिआनिया
गेड्स
इलर्डा
इलर्जिस
इटालिका

(स्पेन चालू)

व्हेन्टिस्पान्टे
मलाक्का
मंडा
न्यूमेन्टिआ
ऑवीफ्यूला
पोस्थुमियाना
सोरिकोरिआ
सॉरिशिआ
टॅरॅको
थुकूबीरा

(जर्मनी)

कॅस्ट्राव्हेटरा
सॅमरोब्रिव्हा
नाव्हिओमॅगम

(इजिप्त)

ॲलेक्झांड्रिआ
कॅनोपस
डेल्टा
पेल्यूशियम

(थेसली)

एजिनम
गॉंफी
लॅरिसा
मेट्रापोलीस

(ब्रिटन)

अंग्लागा
कॅटिअम

(फ्रान्स)

ॲंडोस
ल्युटेशिआ
मॅसिला
नॉवी

(बेल्जम)

ऑर्मिआनम्
नेमेटॉसिन्ना

(सिरिया)

अँटीओशिआ

ज्यूलिअस सीझरच्या कामेंटरीशिवाय इतर ऐतिहासिक ग्रंथ अनेक आहेत. त्यांतील राष्ट्रें शोधून काढून तीं मांडण्याच्या भानगडींत आम्हीं पडत नाहीं. प्रत्येक राष्ट्राचा इतिहास पहाणें आपणांस शक्य नाहीं. लहान राष्ट्रकांपासून मोठीं राष्ट्रकें तयार होण्याची जी विकासक्रिया आहे तिच्याकडे आपणांस विशेष लक्ष दिलें पाहिजे.

या याद्या देण्याचें प्रयोजन हें कीं, आपणांस भारतामध्यें तीन चार हजार जाती आणि जातींच्या पूर्वी असलेलीं राष्ट्रें यांचें अस्तित्व जर आपल्या ग्रंथांवरून व्यक्त होतें तर इतर जगाची स्थिति कशी काय असावी या विषयीं आपणांस जिज्ञासा उत्पन्न होते. आपणांकडे आजच्या पद्धतशीर अवलोकनानें, तीन चार हजार राष्ट्र सदृश जातींचें अस्तित्व दिसून येतें. पण ग्रंथांत ३।४ शेंच राष्ट्रांची माहिती सांपडते. महाभारत व बृहत्संहिता इत्यादि ग्रंथांत खालील राष्ट्रांचा उल्लेख केलेला आहे.

### भारत भीष्मपर्व अध्याय ९ यांत आलेले देश.

अंग
अंग
अटवीशिखर
अठिद
अंतचार
अंतर्गिरि
अधिराज्य-कुशाद्याः
अनुपावृत्त
अपरंतगण
अपरवल्लव
अपरम्लेंच्छ
अमरांत

अभीसार
अयवाह
अवंतयः
अश्मक
आत्रेय
आंध्र
आनर्ताः(नैर्ऋताः)
आभीर
ईजिक
उत्कल
उत्तम
उत्तर
उत्सवसंकेताः

उपत्यक
उगावृत्त
उल्लत
ऋषिक
औंड्र
कक्ष
कच्छ
कन्यकागुण
करक
करट
करभंजक
करातियः
करीषक

करूष
कर्णाटक
कालिंग
कलिंग
काक
कांतिकोसल
कांबोज
कालतोयक
कालद
काशय:
काश्मीर
काश्मीर
किरात
किरात
कुकर
कुकुरांगार
कुंडल
कुंतय:
कुंतय:
(अपर) कुंतय:
कुंतल
कुंतल
कुंदापरांता:
कुरुपांचाल
कुरुवर्णक
कुलत्थ
कुलिंद
कुलिंद
कुश
कुशल्य
केकय
केरला:प्राच्या:
कोसल
कोसल
कोकुटक
कोंकणा:
कोकशका:
क्रूर
खाशीर
गांधार
गोध
गोपराष्ट्र
गोपालकक्ष
गोमंत
घटसृंजय
चक्र
चक्रातय:
चर्ममंडल
चीन
चेदिमत्स्य
चोल
जठर
जांगल
जांगल
झिल्लिक
तनय
तंगण
अपर तंगण
ताम्रलिप्तक
ताल
तिलभार
तीरग्रह
त्रिगर्त
दशार्ण
दशापार्श्वरोमाण:
दार्वाचिरा
दुर्गाल
द्राविड
धुरंधर
ध्वजिन्यु
निषध
निषाद
नैकपृष्ठ
पंचाल
पंचाल
परांत
पल्हव
पारसिक
पाण्डुराष्ट्र
पार्वतीय
पांशिवाट
पुण्ड्र
पुलिन्द
पुलिन्दक:
पुलिन्दा:
प्रतिमत्स्य
प्रल्हाद
प्रावृषेय
प्रोषक
प्रौष्ठ
बर्बर
बलव
बहव:
बर्हिगिर्य
बहुवाद्या:
बाल्हिक
बाल्हिक
बोध
भरद्वाज
भर्ग
भार्गव
भूषिक
भोज
मगध
मगध
मत्स्य
मद्र
मधुमन्त:
मंद्रक
मलज
मल्ल
मल्लराष्ट्र
मसीर
मोहपक
मद्रिय
मानवर्जका:
मारिष
माल
मालवानरा:
मालवा:
माहिक
मोह्य
मूषक
मूषक
मेकल
मेरुभूत
म्लेंच्छ
यकृल्लोमाना:
यवन
यामुन
रमणाश्चीना:
रूपवाहिक
वंग
वध्र
वनवासिक
वनायु
वल्कल
वाटधान
वातजामरथोरगा:
वारवास्य
विकल्प
विजय
विदभा
विदर्भ
विदेह
विंध्यचुलिक
वैदेह
व्यूक
शक
शक
शशिक
शाल्व
शाल्वसेनम:
शूरसेन
शूरसेन
शैवल
सकृद्ग्रह
संड
सनीप
समङ्गा:
समन्तर
समवेगवशा:
सामुद्रनिष्कुट
सिद्ध
सिन्धु (पुलिंदका:)
सिन्धुसौवीर
सुकन्दक
सुदामात:
सुमल्लिका
सुदृष्ट
सुदेष्ण
सुनय
सैसिरिन्ध्रा:
सौशल्य
सौसिरिध्रा:
सौहृदानभकानना
स्तनपोषका:
स्तनबाला:
स्वक्षामलज।
स्वराष्ट्र
हूण

महाभारतांत पांडवांच्या दिग्विजयांत आलेले निरनिराळ्या दिशेचे देश:

**उत्तर**

(अर्जुन दिग्विजय)

अंतर्गिरि
अभिसारीनगरी
आनर्त
उत्सवसंकेत
उपगिरि
उलूक
ऋषिक
काम्बोज
परम काम्बोज
कालकूट
काश्मीर
किरात
कुरु ( उत्तर )
कुलिन्द
कोकनद
चीन
चोल
त्रिगर्त्त
दरद
दार्व
देवप्रस्थपुर
पंचगण
प्रतिविन्ध्यपर्वत
प्राग्ज्योतिष
बर्हिगिरि
वाल्हिक
मानस
मोदापुर
लोह
लोहित
शाकलद्वीप
श्वेतपर्वत
सागरानूप
सिंहपुर
सुदामन
सुसंकुल
गुह्म
हरिवर्ष
हाटक

**पूर्व**

(भीमदिग्विजय)

अयोध्या
इन्द्रपर्वत
कर्वट
काशि
किरात
कुमार
कोसल
उत्तरकोसल
कौशिकीकच्छ
गण्डक
गिरिव्रज
गोपालकक्ष
चेदि
ताम्रलिप्त ( नृप )
दशार्ण
निषाद
पंचाल
पुण्ड्र
पुलिन्द
प्रसुह्म
बर्बर
भर्ग
भल्लाट
भोगवान् पर्वत
मत्स्य
मल्ल
दक्षिण मल्ल
मलद
मागध
मोदागिरि
लौहित्य
वंग
वत्सभूमि
वर्मक
विदेह
वैदेह
शक
शर्मक
शुक्तिमान् पर्वत
सागरानूप
सुह्म
सुह्म

**दक्षिण**

( सहदेवदिग्विजय )

अधिराज
अंध्र
अर्बूक
आटवीपुरी
आवन्त्य
उष्ट्रकर्णिक
औड्रकेरल
कच्छ
करहाटक
कलिङ्ग
कांतारक
किष्किन्धा
कुंतिभोज
केरल
कोलगिरि
कोसल
गोशृंग
चर्मण्वती
ताम्रद्वीप
तालवन
तालीकट
तिमिंगल
दण्डक
द्रविड
नरराष्ट्र
नर्मदा
नाचीन

नाटकेय
निषाद
निषादभूमि
पटच्चर (चोरदेश)
पांड्य
पाषंड
पुलिन्द
प्राकोटक
भोजकट
मत्स्य
अपर मत्स्य
माहिष्मती
रम्यग्राम
रामकपर्वत
वाताधिप
वेणातट
शूरसेन
शूर्पारिक
संजयंतीपुरी
सुर्भीपट्टण
सुराष्ट्र
सेक
अपर सेक
हेरंब

**पश्चिम**
(नकुल दिग्विजय)

अंबष्ठ
अमरपर्वत
उत्तरज्योतिष
उत्सवसंकेत
किरात
त्रिगर्त
दशार्ण
दिव्यकटपुर
पंचकर्पट
पंचनद
पल्हव
पुष्करारण्य
बर्बर
मद्र
मध्यमकेय
मरुभूमि
महेत्थ
मालव
यवन
रामठ
रोहितकगिरि
वाटधान
शाक
शाकल
शिबि
शैरीषक
सरस्वती
सिंधुकुल
हारहूण

बृहत्संहितेंत सांगितलेले निरनिराळ्या दिशांचे देश वर्णक्रमपूर्वक पुढें दिले आहेत.

**मध्य**

अरिमेद
अश्वत्थ
उज्जिहान
उद्देहिक
उपज्योतिष
औदुंबर
कंक
कपिष्ठल
कालकोटि
कुकुर
कुरु
गजाव्हय
गौरग्रीव
धर्मारण्य
नीप
पांचाल
पांडुगुड
पारियात्रनग
भद्र
मत्स्य
मरु
मांडव्य
माथुरक
माध्यमिक
यामुन
वत्सघोष
शूरसेन
साकेत
सारस्वत
साल्वनीप

**पूर्व**

अंजन
अंबष्ठ
अश्ववदन
उड्र
उत्कल
उदयगिरि
एकपद
कर्वट
काशी
कोशलक
क्षीरोदसमुद्र
खस
गौडक
चांद्रपुर
ताम्रलिप्तिक
दन्तुरक
पद्म
पुरुषाद
पौंड्र
प्राग्ज्योतिष
भद्र
मगध
माल्यवत्
मिथिल
मेकल
लौहित्य
वर्धमान
वृषभध्वज
व्याघ्रमुख
शबरगिरि
शूर्पकर्ण
समतट
सुह्म

**आग्नेयी**

आंध्र
उपवंग
उर्ध्वकंठ
कालिंग
किष्किंध
कंटकस्थल
कोशल
चर्मद्वीप
चेदि
जठरांग
त्रिपुरी
दाशार्ण
नग्नपर्ण
नालिकेर
निषादराष्ट्र
पुरिक
महाग्रीव
वंग
वत्स
विदर्भ
विंध्यरासि
वृष
व्यालग्रीव
शबर
शौलिक
श्मश्रुधर
हेमकूट्य

**दक्षिण**

आंध्र
आकर
आभीर
आवंतक
ऋषभ
ऋषिक
ऋष्यमूक
कंकट
कच्छ
कर्णाट
कांवय
काञ्ची
कार्मणेयक
कालाजिन
कुंजरदरी
कुसुमनग
कृष्णवेल्लर
केरल
कोल्लगिरि
कोंकण
क्रौंचद्वीप
गणराज्य
गिरिनगर
गोनर्द
चित्रकूट
चैयरिक
चोल
जराधर
टंकण
तापसाश्रम
ताम्रपर्णी
तालिकट
तिमिंगिलाशन
तुंबवन
दण्डकावन
दर्दुर
दशपुर
धर्मपत्तन
नासिक्य
पिंशिक
फणिकार
बलदेवपत्तन
भरुकच्छ
मरुचीपत्तन
मलय
महाटवि
महेन्द्र
मालिन्द्य
याम्योदधि
लंका
वनवासि
वारिचर
वेण
वैडूर्यशंखमुक्ता
शिबिक
शूर्पाद्रि
सौरिकर्णि
सिंहल

**नैऋती**

अंबष्ठ
आभीर
आरव
आवर्त
कपिल
कर्णप्रावेय
काम्बोज
कालक
किरात
क्रव्याश
खंड
चंचूक
द्रविड
नारीमुख
पल्हव
पारशव
फेणगिरि
बर्बर
बादर
महार्णव
माकर
यवन
रैवतक
वडवामुख
शूद्र
सिंधु
सिन्धु
सुराष्ट्र
सौवीर
हेमगिरी

**पश्चिम**

अपरान्तक
अस्तगिरि
कमक
क्षरार्पण
ताराक्षितिशृंग
पंचनद
पारत
प्रशस्ताद्रि
मणिमान्
मेघवान्
म्लेंच्छ (निर्मर्याद)
रमठ
वनौघ
वैश्य
वोक्काण
शक
शांतिक
हैहय

**वायव्य**

अश्मक
एकविलोचन
कुलूत
क्षुद्रमीन
क्षेमधूर्त
खस्थ
गुरुहा
चर्मरंग
तालहल
तुखार
दीर्घग्रीवास्यकेश
नृसिंहवन
फल्गु
भूतपुर
भोगप्रस्थ
मद्र
मद्रक
मरुकुच्च
माणहल
मांडल्य
मांडव्य
मालव
मेरु
यशोवती
यामुन
यौधेय
राजन्य
लहड
लुका

| | | |
|---|---|---|
| वसाति | कोहल | कुलून |
| वसुमान | क्रौञ्च | कौणिन्द. |
| वाटधान् | खचर | खस |
| वेणुमती | गव्य | गंधर्व |
| शरधान | गांधार | घोष |
| शीतक | चिपिट | चीन |
| शूलिक | नक्षशिल | चीर |
| श्यामक | तुरगानन | जटासुर |
| स्त्रीराज्य | त्रिगर्त | डामर |
| हिमवान | दंडपिंगलक | तंगण |
| हूण | दासमय | त्रिवेत्र |
| हेमताल | दासेरक | दरद |
| | धातुमान | दार्व |
| **उत्तर** | नासिक | दिविष्ठ |
| | पुष्करावत | नष्टराज्य |
| अंतर्द्वीप | पौरव | निवसन |
| अंबर | | पशुपाल |
| अश्वमुख | **ईशानी** | पौरव |
| आग्नीध्र | | ब्रह्मपुर |
| आदर्श | अनुविश्व | भल्लापलोल |
| आर्जुनायन | अभिसार | मेरुक |
| कच्छ | एकचरण | मुंजाद्रि |
| कंठधान | काश्मीर | वनराज्य |
| कुरु ( उत्तर ) | किरात | वनराष्ट्र |
| केशधर | कीर | वसुवन |
| कैलावत | कुचिक | सुवर्णभू |
| कैलास | कुनठ | सैरिन्ध |

आशिया, यूरोप, आफ्रिका या तीन खंडांस एकमेकांशीं जोडणारा जो भूभाग त्याच्या आसपास बुद्धकालांत कोणकोणतीं लहान लहान राष्ट्रें होतीं त्यांची कल्पना वर दिलेल्या याद्यांवरून येईल. यांपैकीं पश्चिमेकडील बरींच राष्ट्रें बुद्धपूर्वकालीं इजिप्त, असुरिया व बाबिलोनिया या साम्राज्यसत्तांखालीं ख्रि. पू. पांच हजारपासून ख्रि. पू. सातव्या शतकापर्यंत होतीं. या प्राचीन साम्राज्यांचा इतिहास तिसरा विभाग 'बुद्धपूर्व जग' यांत आलाच आहे. त्यानंतर या राष्ट्रकांपैकीं बऱ्याच राष्ट्रकांचा एका सत्तेखालीं समावेश करणारें जें इराणचें प्राचीन साम्राज्य त्याच्या इतिहासाकडे आंतां वळूं.

## प्रकरण ३ रें.

### इराणचें सत्तावर्धन

**पूर्व व पश्चिम यांमधील बौद्धिक देवघेव.**— बुद्धाचा काल ज्या एका कारणामुळें महत्वाचा आहे तें कारण म्हटलें म्हणजे या काळापासून पुढें ऐतिहासिक माहितीची अधिक विपुलता आहे हें होय. बुद्धपूर्व कालामध्यें निरनिराळ्या देशांच्या इतिहाससंगतीसाठीं जितकें कल्पनेवर जावें लागतें तितकें बुद्धोत्तर कालामध्यें जावें लागत नाहीं. बुद्धाच्या अगोदर ,१०० वर्षांपासून ख्रिस्तापर्यंतचा काल म्हटला म्हणजे निरनिराळ्या राष्ट्रांच्या संपर्काचा काल होय. या कालाचा इतिहास लिहितांना वैदिक कालापेक्षां आपण अधिक परिचयाच्या क्षेत्रांत आहों असें वाटतें. या कालांत निरनिराळ्या राष्ट्रांचा संबंध आल्यामुळें एखाद्या राष्ट्राविषयीं देश्य माहिती जर कमी पडली तर ती दुसऱ्या राष्ट्रांतील पुराव्यानें भरून काढतां येते. हा काल निरनिराळ्या राष्ट्रांच्या केवळ युद्धविषयक संपर्काचा काल नसून बौद्धिक देवघेवीचाहि काल होता. इराणी लोकांनीं ग्रीस, इजिप्त व हिंदुस्थान हे प्रदेश एका साम्राज्याखालीं आणून त्यांच्या बौद्धिक देवघेवीस खरी सुरुवात केली. इजिप्त, बाबिलोनिया या साम्राज्यांनीं आपली हद्द हिंदुस्थानपर्यंत मुळींच आणली नाहीं. इराणी लोकांनीं जें कार्य सुरू केलें तेंच ग्रीकांच्या व रोमन लोकांच्या कारकीर्दींत अधिक वाढलें. इराणी राष्ट्रानें आपल्या संस्कृतीच्या विकासासाठीं ग्रीक व हिंदु तत्त्ववेत्ते, भारतीय संगीतज्ञ यांस आश्रय दिला. ग्रीकांच्या आशियांतील स्वारीनंतर ग्रीकांनीं आपली संस्कृति या खंडांत पसरविण्याचा प्रयत्न केला; आणि भारतीय लोकहि आपल्या पांडित्यामुळें, लढाईंत मदतीसाठीं आणि व्यापारासाठीं चोहोंकडे जात होते. या दळणवळणाचा परिणाम निरनिराळ्या लोकांत सादृश्य उत्पन्न होण्याकडे व्हावयाचाच. कांहीं अंशीं निरनिराळ्या लोकांच्या संपर्कानें, तर कांहीं अंशीं प्रत्येक देशांतील स्वतंत्र पण एकाच दिशेनें झालेल्या विकासांत ग्रीसपासून वंगापर्यंत आणि रोमपासून चोडापर्यंत निरनिराळीं राष्ट्रें एकमेकांशीं सदृश होऊं लागलीं होतीं. त्यांच्यांतील सादृश्य उपासनाविषयक, ज्ञानविषयक आणि कलाविषयक होतें. त्या काळच्या बौद्धिक परिस्थितीचें साकल्यानें अवलोकन केलें असतां आपणांस कांहीं अनेक राष्ट्रव्यापी प्रवृत्ती आढळून येतात. आणि त्यामुळें प्राचीन जगाच्या बौद्धिक इतिहासास एक तऱ्हेचें एकत्व येतें. कांहीं कांहीं राष्ट्रांतील सादृश्य पितृमूलक होतें पण कांहींचें नवीन प्रयत्नांचें फळ होतें. तो नवीन प्रयत्न पृथक्त्वानें सदृश विकास आणि देवघेव या दोन्ही क्रियांनीं अंकित झालेला होता. निरनिराळ्या राष्ट्रांतील बौद्धिक चळवळींतील सादृश्य, देवघेवीचा तसाच सामान्य विकासाचा परिणाम आहे.

**उपासना व परमार्थसाधनांतील साम्य व भेद.**— प्राचीन बौद्धिक चलवलन अवगमिण्यासाठीं आपणांस सर्व राष्ट्रांच्या प्राचीनतम ज्ञात स्थितीकडे अवलोकिलें पाहिजे. भारतीयांमध्यें व इराणी लोकांत जो अथर्व्यांचा सामान्य धर्म होता त्याच्या निरनिराळ्या छटा आपणांस केल्टिक लोकांपासून ग्रीक लोकांपर्यंत पसरलेल्या लोकसमूहांच्या पौरोहित्यांत दिसून येतात. प्रत्येक राष्ट्रांत अथर्व्यांशीं सदृश वर्ग, ज्योतिष, बलि, जादूटोणे व वैद्यक यांत गुंतलेला आढळेल. हें सामान्यत्व होतेंच. अनेक देवतांचें प्राचीन एकत्व या सुमाराच्या काळास जरा बदलल्यासारखें दिसत होतें. परंतु एका समुच्चयास दुसऱ्या समुच्चयाचीं दैवतें अमान्य होतीं असें मात्र नाहीं. ग्रीकांचा अस्क्लेपिअस

पर्शूंत अश्मदेव या नांवानें होता. परंतु त्याची सदृश शब्दाची प्रतिकृति भारतांत दिसत नाहीं. ऋग्वेदांतील अनेक देवतांपैकीं ज्या अन्यत्र सांपडल्या आहेत अशा देवता फारच थोड्या. जसें देवतांचें आहे तसेंच विधींचेंहि आहे. भारतांतील श्रौतधर्म मंत्रकालीन श्रौतधर्मापेक्षां अगदींच निराळा झालेला होता. त्याप्रमाणें निरनिराळ्या राष्ट्रांमध्यें पितृमूलक अग्न्युपासनेंत किंवा अग्निद्वारा दैवतोपासनेंत फरक पडलेला होता. पर्शूंच्या किंवा मगांच्या प्राचीन श्रौत धर्माचें आपणांस शिस्तवार ज्ञान मुळींच नाहीं. पर्शूंचा धर्म आणि भारतीयांचा धर्म यांतील सध्यांच्या किंवा कांहीं वर्षांपूर्वींच्या अग्निकर्मविधींचें ज्ञान गोळा करून डॉ. जीवनजी मोदी यांनीं नुकतेंच मुंबईच्या अन्थ्रापॉलॉजिकल सोसायटीपुढें मांडलें व तें त्या संस्थेच्या अहवालांत प्रसिद्धहि केलें आहे. त्यांनीं जी माहिती दिली आहे ती जवळ जवळ लुप्त विधींचीच दिली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि त्यावरून आपणांस अत्यन्त प्राचीन कालचा पारशांचा श्रौतस्मार्त-धर्म काढावयाचा असला तर बरेंच कल्पनेंत शिरावें लागेल. त्या कल्पनेमध्यें सध्यां शिरण्याचें प्रयोजन नाहीं. तथापि एवढें निश्चितपणें म्हणतां येईल कीं, या विधिसमुच्चयांत अत्यंत प्राचीन काळच्या धर्माचा म्हणजे रिवाजांचा अंतर्भाव झाला असावा. आणि झरथुष्ट्रेतर किंवा झरथुष्ट्रपूर्व जो मग-धर्म त्याचा हा रूपांतरित स्मारक असावा. झरथुष्ट्राला केवळ अवदानांची फिकीर नव्हती. त्यानें दैवतांस विशिष्ट गुणाचें स्वरूप देऊन ईश्वरमाहात्म्यक बनविलें आहे; आणि एक प्रकारचा नैतिक विचारसमुच्चय पुढें मांडून जुनाट धर्मावर कडी करण्याचा प्रयत्न केला आहे. म्हणजे विचार आणि नैतिक बुद्धि यांचें ज्ञानकांड तयार करून त्याखालीं कर्मकांड चिरडण्याचा आरण्यकीय प्रयत्न झरथुष्ट्रानें केला. तात्पर्य, झरथुष्ट्राचें आपल्या प्रदेशांतील कार्य हें वासुदेव, महावीर, गौतम, चार्वाक व आरण्यक धर्माचे अनेक प्रणेते यांच्या कार्याशीं सदृश आहे.

**परमार्थ संप्रदायाचा सामाजिक नीतीवर परिणाम.**—धार्मिक बाबतींमध्यें तात्त्विक वादापेक्षां सामाजिक रिवाजांस महत्त्व द्यावयाचें आणि सामाजिक सुधारणेला महत्त्व दिल्यामुळें संप्रदायग्रंथाचा अर्थ आपल्या मतानुसार लावावयाचा; किंवा आपण जी सुधारणा करूं पाहतों तीसारखा लावावयाचा या प्रकारच्या खटपटींना देखील इराणच्या इतिहासांत स्थान मिळालें होतें असें दिसतें. प्लेटो सांघिक विवाह प्रतिपादूं लागला. हिंदुस्थानांत सांघिक विवाहाचें प्रतिपादन नाहीं तरी समर्थन करण्यांत आलें. परंतु इराणमध्यें सांघिक विवाह प्रचलित करण्यास धर्मगुरूंनीं खटपट केली. ती खटपट करणाऱ्या संप्रदायास मझ्दक असें नांव आहे. त्याचें स्वरूप थोडक्यांत येथें दिलें आहे.

**मझ्दकाचें चरित्र**—मझ्दक हा बामदाघ नांवाच्या सुशिएना येथें राहणाऱ्या इराणी गृहस्थाचा मुलगा होता. त्यानें इ. स. च्या ५ व्या शतकाच्या शेवटीं समाजसत्ताक पद्धतीचा पंथ स्थापिला. हा पंथ पुढें सस्सन घराण्याच्या साम्राज्यांत बराच बलिष्ठ बनला. कित्येक म्हणतात, या पंथाचा मूल संस्थापक खुरगाचा मुलगा झरथुष्ट्र हा असून त्याच्याच अनुरोधानें मझ्दक यानें या पंथाचा प्रसार लोकांमध्यें केला. खरा मूळ संपादक कोणीहि असो, मझ्दक याच्या नेतृत्वाखालीं हा पंथ फार महत्त्वास चढला यांत शंका नाहीं. मझ्दकला यश येण्यांत इराणांतील त्या वेळची अराजकता बऱ्याच अंशीं कारण झाली. इ. स. ४८८ मध्यें गादीवर बसलेला कवध सम्राट याला त्याच्या सरदारांनीं आणि झरथुष्ट्र सांप्रदायिक धर्माधिकाऱ्यांनीं फार विरोध केल्यामुळें त्यानें मझ्दक पंथाचा स्वीकार केला. कवधला त्याच्या राज्यांतील सत्ताधारी वर्गानें पदच्युत करून त्याचा भाऊ जामास्प याला गादीवर बसविलें, परंतु थोडक्याच वर्षांनीं मझ्दक पंथी लोकांच्या मदतीनें कवधनें आपलें राज्य परत मिळविलें. पुढें कवधचें मझ्दक पंथाला फारसें साहाय्य झालें नाहीं. मझ्दकच्या मरणाच्या सुमारास इराणच्या गादीच्या वारसाबद्दल तंटा उपस्थित झाला. कवधचा जो मुलगा मझ्दक पंथाला अनुकूल होता, त्याला गादीवर बसविण्याकरितां मझ्दक पंथ व खुशरू राजपुत्राला सम्राटाच्या संमतीनें गादीवर बसवूं पहाणारे झरथुष्ट्र पंथी धर्माधिकारी यांच्यामध्यें मोठा सामना झाला. ख्रिस्ती बनलेल्या टिमोथेऊस नांवाच्या एका इराणी अधिकाऱ्यानें या तंट्यासंबंधानें असें लिहून ठेवलें आहे कीं, कवधनें मझ्दक पंथीयांशीं समेट करण्याचें ढोंग करून स्वतःची गादी मझ्दकपंथी राजपुत्रास देण्याचा एक दिवस मुकर केला व त्या दिवशीं तो समारंभ पहाण्याकरितां मझ्दकी पंथाच्या लोकांना बायकांमुलांसह टेसिफॉन येथें एकत्र बोलाविलें; आणि नंतर विश्वासघात करून आपल्या सैनिकांकडून त्यांची कत्तल करविली. नंतर त्या पंथाच्या उरल्यासुरल्या लोकांनाहि पकडून जाळण्याचा आणि त्यांची मालमत्ता जप्त करण्याचा हुकूम सोडला. ही कत्तल खुशरू राज्यावर आल्यावर झाली असें बहुतेक मुसुलमान लेखक म्हणतात; पण वास्तविक खुशरू राज्यावर येण्यापूर्वींच (इ. स. ५३१) दोनतीन वर्षें व त्याच्याच चिथावणीवरून ती झाली असली पाहिजे असें दिसतें. या कत्तलीच्या वेळीं खुशरूनें जो क्रूरपणा दाखविला त्यावरून त्याला अनुशकुवान (अनुशर्वान, नुसिर्वान) असें उपनामहि मिळालें असें म्हणतात. खुशरूनें अनेक उपायांनीं या पंथाचा पूर्ण नायनाट केला, व मझ्दक पंथाचें इतिहासांत यापुढें मुळींच नांव आढळत नाहीं. तथापि हा पंथ सर्वस्वीं नष्ट झाला असें दिसत नाहीं. पुढें मुसुलमानी रियासतींत ॲंटिनोमि नांवाचे जे अनेक पंथ निघाले ते मझ्दक पंथांतूनच उद्भवले असावेत असें जें कित्येकांचें म्हणणें आहे, तें संभवनीय दिसतें.

**मझ्दक पंथाचीं तत्त्वें.**—मझ्दक पंथाची हकीकत स्वतंत्र उपलब्ध नसून ती त्यांच्या प्रतिपक्ष्यांच्या लेखांतूनच

कायतो मिळते. झरथुष्ट्र आणि ख्रिस्त पंथी लेखकांनीं जें या पंथासंबंधानें लिहून ठेवलें आहे त्याचा पडताळा पहाण्यास मझ्दक पंथाचें असें एकहि साधन उपलब्ध नाहीं. तबारीमध्यें या पंथाच्या तत्त्वाचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतें.

'मझ्दकनें घालून दिलेल्या नियमांपैकीं एक नियम असा होता कीं, त्याच्या अनुयायांनीं सर्व मालमत्ता व कुटुंबें सर्वांच्या समाईक मालकीचीं आहेत असें समजावें. हीच अत्यंत पवित्र वागणूक होय व ती ईश्वराला सम्मत आहे; आणि असें वागल्यानेंच मनुष्याला परलोकीं सद्गति मिळते असा उपदेश त्यानें अनुयायांनां केला.

मझ्दक पंथाच्या लोकांचें असें म्हणणें होतें कीं, परमेश्वरानें मनुष्यजातीच्या निर्वाहाकरतां जगामध्यें जीं जीं साधनें उत्पन्न केलीं आहेत तीं सर्वांनीं समान मालकीचीं समजून त्यांचा उपभोग घ्यावा. परंतु ईश्वराची इच्छा न जुमानतां मनुष्य जातीनीं एकमेकांशीं अन्यायाचें वर्तन केलें आहे, सबब श्रीमंतापासून मालमत्ता हिसकावून घेऊन तिचा उपभोग घेण्याचा सर्वांना सारखाच अधिकार दिला पाहिजे. द्रव्य, स्त्रिया व इतर मालमत्ता यांवर एकाचा हक्क जास्त, एकाचा कमी असा पक्षपात कोठेंहि असतां कामा नये. मझ्दकच्या या शिकवणीचा फायदा गरिबगुरीब जनसमाजानें घेण्याचें ठरविलें, आणि त्यामुळें मझ्दक पंथाला पुष्कळ अनुयायी मिळून तो इतका प्रबल बनला कीं, त्याच्या अनुयायांनीं लोकांच्या घरांत शिरून जुलमानें त्यांची मालमत्ता व बायकामुलें लुबाडण्यास सुरवात केली. त्यामुळें समाजांत इतका गोंधळ माजला कीं, प्रत्यक्ष बाप मुलाला व मुलगा बापाला ओळखीनासा झाला.' मझ्दक यानें कवध बादशहा त्याचा अनुयायी असल्यामुळें आपल्या तत्त्वाप्रमाणें त्याच्याहि एका बायकोकरितां–खुशरूच्या आईकरितां--त्याजवळ मागणी केली होती असाहि उल्लेख आढळतो.

**मझ्दकाचा समाजसत्तावाद.**—राष्ट्रांतील संपत्तीवर सर्वांचा सारखा हक्क आहे हें तत्त्व मान्य केलें म्हणजे त्यापासून समाईक मालकी, गरीब, श्रीमंत इत्यादि समाजांतील वर्गवारीचें निर्मूलन आणि स्त्रीपुरुषसंबंधांत विवाहबंधनाचा अभाव हे सिद्धांत न्यायतःच निघतात. यांपैकीं खुद्द मझ्दकला कोणते सिद्धांत किती प्रमाणांत मान्य होते हें पाहिलें पाहिजे. तिसऱ्या म्हणजे विवाहसंस्थेसंबंधानें पाहतां खुशरूच्या राज्यारोहणप्रसंगीं केलेल्या भाषणावरून (तबारी १. ८९६. १५ २ नोल्डेके पान १६०) असें दिसतें कीं, त्या वेळीं धर्मबंधनें बरींच नष्ट झालीं होतीं व अनेकांचें नुकसान झालें होतें. त्या लोकांनां नुकसान भरपाई देण्याकरितां आणि बिनवारसी मुलांची व्यवस्था करण्याकरितां खुश्रूला बरेच नवे नियम करावे लागले. यावरून मझ्दकनें समाजव्यवस्थेंत बरीच क्रांति उडवून दिली होती व वरिष्ठ वर्गांनां त्याच्या पंथाच्या लोकांकडून मोठा त्रास भोगावा लागला होता असें दिसतें. या परिस्थितीवर प्रतिपक्षी लेखकांनीं बराच जोर दिलेला आहे व त्यांच्या वर्णनांत तथ्यांशहि बराच दिसतो. कारण मझ्दक हा केवळ प्लेटोप्रमाणें तत्त्ववेत्ता नसून तो आपले सामाजिक सुधारणेचे विचार तरवारीच्या जोरावर अमलांत आणणारा क्रांतिकर्ता होता. आधुनिक समाजसत्तावादी आणि मझ्दक पंथी यांच्यामध्यें नोल्डेकेनें असा एक महत्त्वाचा फरक दाखविला आहे कीं, 'मझ्दकी पंथाच्या चळवळीला इतर हरएक पौरस्त्य चळवळीप्रमाणेंच धार्मिक स्वरूप फार होतें. झरथुष्ट्र पंथांतहि मझ्दक पंथाचा हा विशेष आढळतो. मझ्दकनें गुरेंढोरें मारून मांस खाण्याचें बंद केलें होतें. फर्दुसीच्या महाकाव्यांतील वर्णनावरून असें स्पष्ट दिसतें कीं, मझ्दकनें आपल्या पंथाची समता आणि बंधुत्व हीं तत्त्वें झरथुष्ट्राच्या मूळ स्वरूपांतल्या धर्मांतून घेतलीं होतीं. मझ्दकच्या प्रतिपक्षीयांनीं केलेलें वर्णनच खरें आहे असें मानलें तरी त्यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, झरथुष्ट्राच्या धर्मांतील अज्ञान व अनीतीचा विध्वंस करून सद्धर्म स्थापन करणें हाच उद्देश समाजसत्ताक पंथ स्थापन करण्यांत मझ्दकच्या पुढें होता. मझ्दकच्या चळवळीला विलक्षण यश येण्याचें कारण इराणी धर्मांतलीं ध्येयेंच त्यानें लोकांपुढें मांडलीं हें होय. एकंदरींत मणिसंप्रदायांतल्या तत्त्वज्ञानापेक्षां झरथुष्ट्रसंप्रदायांतील तत्त्वांचाच तो पुरस्कार करीत होता असें म्हणावें लागतें.

**धर्मसुधारकांचें अदृश्य शक्तिमूलक बल.**—नवीन उत्पादन आणि जुन्याचा अभ्यास यांचा एकमेकांशीं पुष्कळदां विरोध असतो. जो जें कांहीं नवीन उत्पादितो त्यानें उत्पादन केलेल्या मालाचा संचय बनला म्हणजे त्याचा अभ्यास करून बनलेला पंडितवर्ग तयार होतो. धार्मिक सुधारणा करणारे लोक पुष्कळ प्रसंगीं जुन्या परंपरेच्या अभ्यासकांपासून फुटून बाहेर पडतात. आणि जुनी विचारपरंपरा जर आपण सोडली तर ती सोडण्यास आपणांस आधार त्या शक्तीच्या बरोबरीचा किंवा त्याहून उच्च प्रकारचा आहे असें त्यांस भासवावें लागतें. माझे शब्द पूर्वपरंपरागत पंडितांपेक्षां किंवा पूर्वींच्या वचनांपेक्षां अधिक किंमतीचे कां आहेत तर ते मला परमेश्वरानें प्रत्यक्ष सांगितले म्हणून, माझें दळण वळण खुद्द देवाशीं किंवा निदान देवदूतांशीं आहे असें त्यास भासवावें लागतें. आणि या पद्धतीमुळें पांडित्यांत कमी परंतु धूर्ततेंत किंवा खऱ्या शहाणपणांत अधिक अशा लोकांस पुढें येण्यास वाव मिळतो. जेव्हां अदृष्ट शक्ति, दिव्य दृष्टि किंवा प्रत्यक्ष देवतेशीं संबंध मनुष्य स्थापूं लागतो, तेव्हां त्याच्यापुढें पांडित्य काय उपयोगी पडणार! ऋषी, किंवा यहुदी लोकांतील प्रवक्ते (प्रॉफेट्स) यांचें महत्त्व असल्याच पद्धतीनें उत्पन्न झालें आणि त्याच कारणामुळें रासपुतीन योग्यतेस चढला. प्रवक्त्यास जसा परमेश्वराकडून संदेश येई तसा रासपुतीनला सेंट अँथनीकडून संदेश आला होता. प्राचीन काळचीं परमेश्वरी संदेश मनुष्यास आणण्याची कृति म्हणजे ज्यास आपण अंगांत

येतें म्हणतों ती होय. अंगांत आल्यानंतर मनुष्य कांहीं उच्च तऱ्हेचीं वाक्यें बोलूं लागतो; व त्या भरांत साहजिकपणें असाध्य अशा कृती करूं लागतो. आणि त्यावरून सामान्य लोकांची अशी समजूत होते कीं, याच्या अंगांत कोणी तरी उच्च प्रकारच्या व्यक्तीनें संचार केला असावा. आजचे मानसशास्त्रवेत्ते कदाचित् याचें स्पष्टीकरण निराळ्या प्रकारें देतील. संचरण्याचें महत्व आपल्या लोकांत अजूनहि आहे. घागरी फुंकल्यानंतर जी बाई फुंकतां फुंकतां अर्धवेडी होते तिच्या अंगांत देवी संचारली आहे असें लोक समजतात; व तिला अनेक भविष्यात्मक प्रश्न विचारूं लागतात. अंगांत येऊन मनुष्य जीं वाक्यें वदतो त्या प्रकारच्याच क्रियेनें कुराण उत्पन्न झालें आहे असें मुसुलमान लोक समजतात; आणि त्यास ते प्रकटीकरण मानतात. सामान्य लोकांवर असल्या प्रकारच्या व्यक्तींचा व त्यांनीं उद्गारलेल्या शब्दांचा परिणाम बराच महत्त्वाचा होतो. वैधधर्मापेक्षां कांहीं नवीन विचारसंप्रदायांस प्राधान्य मिळावयाची जी क्रिया निरनिराळ्या राष्ट्रांत झाली ती क्रिया होत असतां असल्या प्रकारच्या संचाराचाच आश्रय प्रवक्त्यांस घ्यावा लागला. झरथुष्ट्र याचा परमेश्वराशीं निकट संबंध होता, असें इराणी ग्रंथांत वारंवार दाखविलें आहे. येशू ख्रिस्ताहि तसेंच प्रतिपादी आणि महंमदहि तसेंच प्रतिपादित असे. बुद्ध किंवा महावीर यांसंबंधानें तसें म्हणतां येणार नाहीं. परंतु ते ध्यानादि क्रिया हें उच्च ज्ञानसाधन आहे आणि तें त्यांचें ज्ञानसाधन आहे असें प्रतिपादित. या प्रत्येकांचा परंपरागत वैधधर्माशीं झगडा होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांमध्यें येशू ख्रिस्ताविषयीं थोडेंसें निराळें मत दिलें पाहिजे. येशू ख्रिस्ताचा झगडा केवळ धार्मिक विधींशीं नसून त्याचा हेतु राजकीय असावा असें वाटतें. यहुद्यांतील मेसायाची कल्पना राजकीय आहे व होती. रोमच्या सत्तेखालीं यहुदी राष्ट्र असतां यहुद्यांचें लक्ष स्वत्वस्थापनेकडे होतें; आणि त्या वेळेस यहुदी लोकांमधील स्वत्वस्थापक वर्ग जुन्या वैधपरंपरेस चिकटून होता. मकाबीनीं बंड उभारलें त्या वेळेस ते फारासी ( वैधधर्माचा पक्ष ) वर्गाला चिकटून होते. परंतु येशू ख्रिस्तानें राजकीय व धार्मिक सुधारणा एकदमच करण्याचें मनांत आणलें; आणि त्यांतल्या त्यांत तो ब्राह्मणेतराचा मुलगा म्हणून त्यास दोन्ही सुधारणा करतांना एकहि सुधारणा करतां आली नाहीं. नंतर जेव्हां हा धर्म बिघडवितो असा जुन्यांनीं आरोप केला आणि त्याच्याविरुद्ध फिर्याद केली तेव्हां ख्रिस्ताला रोमन अधिकाऱ्यांनीं केवळ 'तुमच्याच' लोकांच्या आग्रहाकरितां म्हणून क्रूसीं दिलें, असें ख्रिस्ताचें भोंवतालच्या काव्याची छाटाछाट केली असतां चरित्र सांपडेल. मला येथलें राज्य नको असून मला राज्य पाहिजे तें निराळेंच आहे अशा तऱ्हेची भाषा येशू बोले हें खरें. ही भाषा परक्या न्यायाधिशापुढें जावें लागणाऱ्या आम्हां जिंकलेल्या राष्ट्रांतील लोकांस सहज समजण्यासारखी आहे. येशूचा प्रयत्न पोरकट बुद्धीनें आणि पोरकट साहित्यावर राज्यस्थापना करण्याचा होता आणि त्याचा धर्महि त्याच जातीचा तयार झाला होता, आणि तो प्रथम यहुदी लोकांकरितांच होता. येशू मेल्यानंतर जेव्हां पॉलच्या हातीं संप्रदायपौरोहित्य आलें तेव्हां या कसलेल्या भिक्षुकानें येशूच्या मिशनचा जिंकणाऱ्यांच्या राजधानींत कसा प्रसार होईल या दृष्टीनें येशूच्या मताचें रूपांतर केलें; आणि त्या संप्रदायाचें स्वरूप अधिक आध्यात्मिक प्रकारचें बनविलें. असो.

ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार प्रथमतः ग्रीकांमार्फत आणि नंतर रोमन लोकांमार्फत झाला.

बौद्ध संप्रदायाचें व जैनांचें येथें वर्णन करण्याचें कारण नाहीं. पुढें भारतांतील बौद्धिक परिस्थितीचा इतिहास अधिक व्यापक रीतीनें मांडलाच आहे. वैदिक धर्म, बौद्ध संप्रदाय, पर्शूंचा पैतृक धर्म झरथुष्ट्र संप्रदाय, सेमिटिक लोकांचा पैतृक धर्म आणि त्यांतून निघालेली यहुदी प्रवक्त्यांची परंपरा व ख्रिस्ती व इस्लामी संप्रदाय यांचा एकमेकांशीं संबंध, युद्धें किंवा त्यांचें संमीलन करण्याकरितां झालेले प्रयत्न, हा बुद्धापासून एक हजार वर्षांचा बौद्धिक इतिहास होय. संमीलनार्थ प्रयत्न एकच झालेला दिसतो. आणि तो प्रयत्न म्हटला म्हणजे मणिसंप्रदाय हा होय. या संप्रदायाचीं तत्त्वें वगैरे देण्यापूर्वी त्याचा ज्या प्रदेशांत उगम होऊन प्रसार झाला त्या प्रदेशांतील लोकांची पारमार्थिक वृत्ति कश प्रकारची होती हें समजून घेतलें पाहिजे. यासाठीं इराणांतील संप्रदायपद पावलेला असा जो झरथुष्ट्री पंथ त्याचें प्रथम थोडक्यांत पर्यालोचन करूं.

**झरथुष्ट्री संप्रदाय व प्राचीन धर्मांत सुधारणा.**— गाथा व तत्संबंधींचे ग्रंथ यांमध्यें जें धर्माचें स्वरूप आपणांस दिसतें तशा स्वरूपांतच तो धर्म निर्माण होऊन विकास पावलेला नाहीं. तर तो वास्तविक मूळच्या धर्माच्या स्वरूपांत मुद्दाम सुधारणा घडवून आणून बनलेला आहे. तथापि या धर्माचीं मुळें पुरातन काळचीं नाहींत असें नाहीं. तर या धर्मांत कांहीं विचार अगदीं पुरातन काळापासून प्रचलित असलेल्या धार्मिक कल्पनांपासून घेतलेले दिसतात. ज्या कल्पनेवर त्या धर्मांतील मुख्य द्विशक्तिमत बसविलें आहे ती प्रधान कल्पना देखील साधूंची शक्ति व दुष्टांची शक्ति यांच्यामधील चिरंतन विरोध, सुपीकपणा व रुक्षपणा, प्रकाश व अंधकार आणि जीव व मृत्यु यांच्यामधील लढाया जांविषयीं पर्शुभारतीयकालीन जुन्या कथांवर रचलेली आहे. झरथुष्ट्री धर्म हा पारशी मंडळींचा राष्ट्रीय धर्म नसून हा राष्ट्रांतर्गत किंवा राष्ट्रधर्मांतर्गत संप्रदाय आहे. यासंबंधीं गाथांच्या प्रत्येक अकलुषित मनाच्या वाचकास पुरावे शोधून काढण्यास फार दूर जावयास नको. गाथांमधील मझ्द अहुर पुरातन आर्यन् लोकांच्या प्रकाशदेवतेहून जितका भिन्न आहे त्याहून मोशेचा याहवे अरण्यांत गडग-

डणाऱ्या आकाशस्थ देवतेहून जास्त भिन्न नाहीं. सर्व आर्यन् रूपकात्मक कथा व कल्पना गाथांमध्यें घेतलेल्या नाहींत. मिथ्र इत्यादि बहुतेक सर्व पुराणदेवतांविषयीं गाथांमध्यें कांहींच उल्लेख आढळत नाहीं. परंतु त्या काळीं या सर्व देवतांची विस्मृति झाली होती असें मात्र म्हणतां येत नाहीं. इराणांमध्यें त्यांचे बरेच भक्त होते. या देवता इतक्या अनेक व मान्य होत्या कीं, पुढील धर्मप्रवर्तकांस त्यांची प्राचीन पूजार्ह विभूतींमध्यें गणना करावी लागली. मिथ्रला मझ्दच्या बाजूनें दुय्यम स्थान द्यावें लागलें. हिंदू लोकांमध्यांहि वरुणाची साहाय्यक अशी ही एक दुय्यम देवता होती. गाथांमध्यें वीरांचा मुळींच उल्लेख केलेला नाहीं, यांपैकीं कित्येकांनां झरथुष्ट्र संप्रदायांत यझत ( वैदिक यजत्र ) म्हणून स्थापन करावें लागलें. तथापि यिम हा या स्थानभ्रष्टतेच्या प्रकारांत अपवाद आहे. हा वेदांतील यम होय. परंतु गाथांमध्यें यास प्राचीन काळचा साधु म्हणून स्थान मिळतें, व अशा रीतीनें हा मझ्दपूजकांस पूजार्ह बनला आहे. स्वर्गांतील जुन्या रहिवाशांची जागा मझ्द अहुर व त्याचे सहा अहुर सोबती यांनीं आतां घेतली आहे. हेच अमेशस्पेन्त होत. आज्ञाधारकपणा व स्पष्टीकरण यांची देवता श्रौष हिची जोड यांच्या बरोबरच केली आहे.

आरमैति हीहि अपवाद आहे. परंतु हिला पूर्वेकडील आर्यन् लोकांच्या काळांत दोन प्रकारचें महत्त्व होतें, व एका लक्षणानें ही झरथुष्ट्री देवता झाली. वीरांची जागा स्वतः झरथुष्ट्र व त्याचे नातलग आणि स्नेही यांनीं घेतली. झरथुष्ट्रानें पूर्वीच्या लौकिक राष्ट्रीय धर्मातील दैवतपरंपरा जशीची तशीच मान्य केली असती तर प्राचीन धर्मातील वीर व देवता आपणांस थोड्याशा बदललेल्या व सुधारलेल्या स्वरूपांत झरथुष्ट्री संप्रदायांत दृष्टीस पडल्या असत्या.

झरथुष्ट्राच्या सुधारणाकार्याविषयीं इतकें जोरदार वर्णन आहे कीं, हओम विधीविषयीं गाथांमध्यें मुळींच उल्लेख नाहीं. हओमविधि जुन्या इराणी लोकांमध्यें सार्वत्रिक नव्हता असें गृहीत धरण्यास कारणें आहेत, व पूर्वेकडील देशांत मझ्द धर्माचा प्रसार झाल्यावर हओमविधीची झरथुष्ट्र मतांशीं सांगड घालण्यांत आली. आर्यन् लोकांप्रमाणें इराणी लोकांनां देखील एका अमर करणाऱ्या पेयाची माहिती होती व हें ते कित्येक धर्मविधींच्या प्रसंगीं पीत असत. सोमरस हें इराणी लोकांचें कदाचित् आवडतें पेय नसून केवळ प्राचीन परंपरागत जुन्या संप्रदायांतील म्हणून त्यांस तें घेणें प्राप्त झालें असावें.

गाथांच्या व त्यांमध्यें सांगितलेल्या धार्मिक मतांच्या अद्भुत स्वरूपावरून हीं मतें लौकिक धर्मांपासून उत्पन्न झालेलीं असावींत असें दिसत नाहीं, तर तीं एखाद्या विचक्षण बुद्धीच्या पुरुषानें प्रतिपादन केलीं असावींत असें वाटतें. हीं स्तोत्रें स्तुतिमय असून बहुतेक भविष्यासारखीं आहेत. उदाहरणार्थ, यस्न ३० म्हणतें:—" येथें जमलेल्या तुम्हां लोकांस मी आतां मझ्दाच्या म्हणी, अहुरांचीं स्तवनें, साधूंचीं स्तोत्रें, या पवित्र अग्नींतून निघणारें पवित्र सत्य सांगतों. हा साधु मूर्तिमंत अहुर मझ्द आहे, त्यानेंच ह्याला हें निवेदन केलें आहे, व त्याला हा नेहमीं प्रश्न विचारीत असतो. "

गाथा साक्ष देत असलेल्या सुधारणेचे हेतू दोन प्रकारचे आहेत.धर्माची शुद्धि व ईश्वराविषयींच्या अधिक प्रगत कल्पनांचें निवेदन, आणि परिभ्रमण वृत्ति टाकून देऊन शेतीचा स्थायिक धंदा करण्याची सामाजिक सुधारणा हे ते दोन हेतू होत. नांगर हातांत धरल्याशिवाय खऱ्या धर्माचें आचरण करण्याची इच्छा धरणें म्हणजे थोतांड होय. शेतकरी लोकच फक्त 'अश' व 'वोहुमनो', च्या अंतःकरणाचे आहेत.' यांच्या बरोबर जे राहतात परंतु काम मात्र करीत नाहींत ते लोक आएस्मा अथवा तिटकारा किंवा मत्सर उत्पन्न करतात. उद्योगी व उत्साही शेतकरी निःसीम झरथुष्ट्री समजला जात असे.

**झरथुष्ट्र व गाथांमधील त्याचे सांप्रदायिक लोक.**—अवेस्तामध्यें झरथुष्ट्र हा मोठा धर्मसुधारक गणला जातो. अहुर मझ्दनें यालाच ईश्वरप्रणीत धर्म सांगितला होता व यानें तो प्राणिमात्रांनां सांगितला.हा दरायसचा बाप-हिस्टापीझ याचा समकालीन होता असें कांहींचें मत आहे, तर इतरांच्या मतें ख्रि. पू. ६००च्या सुमारास हा होऊन गेला. कांहीं थोडेजण त्याला मीडियन, पर्शियन, अथवा मीडिओपर्शियन समजतात, तर दुसरे कांहीं तो बॅक्ट्रियन अथवा बाबिलोनियन होता असें म्हणतात. या विविध मतांत ऐतिहासिक सत्य कोणत्या बाजूस आहे हें ठरविणें फार कठिण आहे; व हिरोडोटसनें झरथुष्ट्राचा कांहींच उल्लेख केला नसल्यामुळें तर तें जवळ जवळ अशक्यच झालें आहे.

झरथुष्ट्र हें नाव निःसंदेह आर्यन् आहे. परंतु झरथुष्ट्र हा कदाचित् आपणांस परिचित असलेल्या इराणी भाषेच्या विकासाच्या अगोदरच्या काळातील असावा, व म्हणून त्या शब्दाच्या अर्थाबद्दल बराच संदिग्धपणा आहे. अर्थाच्या या अनिश्चिततेवरून झरथुष्ट्र हा कोणी ऐतिहासिक पुरुष नसून नवीन धर्म ज्या पंथांतून निघाला त्यांतील ती एक काल्पनिक व्यक्ति होती अथवा मिथ्र देवाचेंच तें एक सगुण रूप असेल अशी कल्पना निघणें साहजिक आहे. कांहीं विद्वान् लोक अवेस्ता व इतर इराणी धर्मग्रंथ यांमधील झरथुष्ट्रासंबंधींची हकीगत काल्पनिक अथवा रूपकात्मक समजतात; परंतु कांहीं झरथुष्ट्राला खरा ऐतिहासिक पुरुष समजून गाथांची रचना त्यानें किंवा त्याच्या शिष्यांनीं केली असें मानतात.

या वादग्रस्त प्रश्नांत फार खोल न शिरतां गाथासंप्रदायांतील कित्येक मंत्र झरथुष्ट्राचे आहेत असेंच आपण समजूं. एक स्तोत्र त्याला आपला कर्ता म्हणतें. गाथा उष्टवैति ( यस्न ४३ ) मध्यें वर्णन केलें आहे कीं, दैवता खुद्द वोहुमनो ( नियुक्ता ) सह येऊन तिनें झरथुष्ट्राला विचारलें;

"तूं कोण आहेस, तूं कोणाचा आहेस"? तेव्हां झरथुष्ट्रानें उत्तर दिलें कीं, "मी झरथुष्ट्र आहे व दुष्टांचा शासनकर्ता व साधूंचा मित्र होण्याची व ईश्वरभक्तांची प्रीति संपादन करण्याची माझी इच्छा आहे. या कामीं मला अहुर मझ्द मदत करील व आरमैति सल्ला देईल."

ध्रुपदासारखीं जीं गीतें आहेत त्यांत देखील बोलणारा व धर्मसंस्थापक हे एकच आहेत. तथापि यावरून तें कवनहि त्याचेंच आहे असें अनुमान निघत नाहीं.

दुसऱ्या एका कवितेंत कवीनें विष्टपाला आपला आश्रयदाता व फ्रशौष्ट्राला सासरा म्हटलें आहे, व हे दोघेहि अहुर मझ्दाबरोबर स्वर्गांत राहतात असें तो म्हणतो.

जिच्यावरून झरथुष्ट्राच्या काळची माहिती अनुमानानें काढतां येते अशी शेवटची गाथाच काय ती आहे. ही गाथा म्हणजे झरथुष्ट्राची सर्वांत वडील मुलगी पौरुचिस्त स्पितमी हिच्या लग्नाचें गाणें आहे. त्यांत झरथुष्ट्र, फ्रशावष्ट्र व पौरुचिस्त स्पितमी हे हयात असल्याचा उल्लेख आहे. परंतु बाकीचा बहुतेक भाग अस्पष्ट आहे.

एकंदरींत या ग्रंथांत ऐतिहासिक सत्य शोधण्यास उपयुक्त असे कांहींच आधार मिळत नाहींत. तथापि ते सर्वास निव्वळ रूपकात्मक समजण्यासहि कांहीं पुरावा नाहीं. यांत देवगंधर्वांच्या नांवांसारखीं नांवें आढळतात व झरथुष्ट्राच्या शिष्यांचीं नांवें रूपकात्मक दिसतात हें खरें. परंतु झरथुष्ट्राच्या संबंधांत पुढें प्रचारांत आलेल्या एकाहि रूपकात्मक गोष्टीचा मागमूस गाथांमध्यें आढळत नाहीं. गाथांमध्यें त्याचा अद्भुत जन्म, त्याचा मोह, त्याचें दुष्टांशीं भांडण, त्याला झालेला साक्षात्कार यांविषयीं कांहींच माहिती नाहीं. सारांश पुरातन काळचा झरथुष्ट्र हा अलीकडील झरथुष्ट्राहून अगदींच भिन्न दिसतो.

गाथांमधील त्याचे नातेवाईक व कट्टे शिष्य पूर्णपणें मानवी प्राणी आहेत. जरी विष्टप गाथा कवीचा राजा आहे तरी त्याचें राज्य जें मघव्य क्षेत्र तें काल्पनिक आहे. तो कव म्हणजे साधु आहे. फ्रशावष्ट्र व डे जमास्प या बंधुद्वयांपैकीं दुसरा कवि असावा. मैध्योमाओंघानें मझ्द धर्म जन्मभर पाळण्याचें ठरवून त्या धर्माचें शिक्षण घेतलें असें एका ठिकाणीं म्हटलें आहे. मैध्यो माओंघाखेरीज बाकीच्यांनां ऐतिहासिक पुरुष कां समजूं नये हें समजत नाहीं. उलटपक्षीं गाथांमध्यें धर्मोपदेशकांबद्दल झरथुष्ट्र शब्द इतका वारंवार वापरला आहे कीं, झरथुष्ट्र ही सामाजिक व धार्मिक सुधारणा घडवून आणणाऱ्या साधूंसाठीं वापरलेली पुरुषवाचक संज्ञा आहे असें वाटतें. परंतु हा तर्क सर्वस्वीं बरोबर असेलच असें म्हणतां येत नाहीं. अनेक दंतकथा उद्भूत झाल्यामुळें ज्याच्या चरित्रासंबंधीं संशोधन करणें कठिण झालें आहे असा झरथुष्ट्र हा कोणी मोठा सुधारक होऊन गेला असणेंहि संभवनीय आहे [ इंडियन अँटिक्वरी, पु. ३४ पृ. ११—१८ ].

**गाथाकार व त्यांच्या गाथा.**—जेव्हां गाथाकार कवी साओष्यंत संबंधीं वर्णन करतात, तेव्हां ते स्वतःविषयींच वर्णन करीत आहेत कीं काय अशी शंका येते, पण तसें निश्चयात्मक म्हणतां येत नाहीं. साओष्यन्त शब्दाचा मूळ अर्थ दुसऱ्याच्या उपयोगीं पडणारे लोक असा आहे, पण येथें त्याचा "मुक्ति देणारे साधू" हा अर्थ उत्तम लागू पडतो. नवीन अवेस्तामध्यें याचा अर्थ जगाच्या अंतीं येणारे व सर्व वस्तूंचें पुनरुज्जीवन करणारे ज्ञानी पुरुष असा केला आहे; परंतु जुन्या ग्रंथांत असा अर्थ आढळत नाहीं. गाथाकार कवी यांनां मानव जातीचे उद्धारक समजतात. याशिवाय यांनां दुसरींहि नांवें आहेत. एकजण आपणांस झओतर म्हणजे संस्कृत होतर म्हणवितो, दुसऱ्याला स्वतःस रतु म्हणणें आवडतें, आणि सामान्यतः ते स्वतःचा मथ्रन या नांवानें उल्लेख करतात. मथ्रन शब्दाचा अर्थ भविष्यवादी किंवा ज्ञानी पुरुष असा आहे.

अलीकडील काळांतील धर्मोपदेशकाची प्रचारांतील संज्ञा अथ्रव्हन ही गाथांमध्यें आढळत नाहीं. परंतु हा शब्द अग्निपूजक या अर्थाचा असून मागून झालेल्या अवेस्तामध्यें तो फार आढळतो. हल्लीं विशेष प्रचारांत नसलेला जो मगियन किंवा मगी शब्द त्याचीहि हीच स्थिति नसेलना ? कांहीं म्हणतात त्याप्रमाणें ज्युडीआवरील नेब्युकॅडनेझारच्या स्वारीबरोबर असलेला रब मग हा मगांचा मुख्य होता असें मानल्यास तो मीडियांतून बाबिलोनियांत आला असला पाहिजे.

गाथांत आढळणाऱ्या मग्वनचें मगियनशीं तादात्म्य सिद्ध झालें नाहीं, किंवा हा शब्द मगचा सजातीय आहे हें देखील ठरलें नाहीं. ज्या दोन उताऱ्यांत त्यांचा उल्लेख केला आहे, तेथें त्यांचा अर्थ प्रबल असा आहे. झरथुष्ट्राच्या मताचा कवि, लोकांनीं झरथुष्ट्राचा व त्याच्या शिष्यांचा उपदेश ऐकावा व मगाचीं अपवित्र कृत्यें सोडून द्यावींत असें सांगतो. परंतु उलटपक्षीं आपणांस "मोठा पुरवठा करणारा मग" व "वोहुमनोचा मग" असेंहि म्हटल्याचे उल्लेख आढळतात.

मग याचा अर्थ शक्ति—धर्मोपदेशकांची अद्भुत अथवा दैविक शक्ति व म्हणून जादू—असाहि करतां येईल. झरथुष्ट्राच्या अनुयायानें उपयोजिलेली शक्ति व 'दएवा'च्या 'पुरोहितानें उपयोजिलेली शक्ति यांत फरक एवढाच कीं, पहिला चांगल्या कामाकरितां व दुसरा दुष्ट कामाकरितां ' या शक्तीचा उपयोग करीत असे. सारांश अवेस्तामध्यें मगियन म्ह० मगी मुळींच आढळत नाहींत. हे गाथाकार कवी कोणीहि असोत, पण एवढें मात्र उघड दिसतें कीं, त्यांची, आपलें विशिष्ट कार्य, धंदा व आपल्या मतांचें गांभीर्य यांविषयीं फार उच्च कल्पना होती. जरी धर्माची संस्थापना करणाऱ्या पुरातन द्रष्ट्याविषयीं त्यांचा फार आदर दिसून येतो व या द्रष्ट्यांस ते झरथुष्ट्राहूनहि प्राचीन समज-

तात, तरी ते आपण प्राचीन द्रष्टयांच्या मतांचें विवरण कोठें करीत 'आहोंत व स्वःतची मतें कोठें प्रतिपादन करीत आहोंत हें स्पष्ट करीत नाहींत. वैदिक ऋषींप्रमाणें गाथाकारांहि आपणांस गाथांचे द्रष्टे समजतात. त्यांचीं मतें तींच मझ्दाचीं मतें असें दर्शविण्यांत आलें असून ते मझ्दास आपल्या मित्राप्रमाणें समजतात. उलटपक्षीं जे लोक या उपदेशाप्रमाणें चालणार नाहींत त्यांनां नरकवास प्राप्त होईल. मंथ्र म्हणणारांनां दुष्टांचें शासन करतां येतें. मंथ्र द्रुजांचा (दुष्टांचा) वध करतात. हे कुमार्गाचा उपदेश करणारे दुष्ट, लोकांपासून त्यांनां वोहुमनो ( नियुक्ता ) कडून प्राप्त होणारीं त्यांचीं इष्ट सुखें हिरावून घेतात, व हे सद्गुणी माणसांनां दुराचरणास प्रवृत्त करतात.

**पुरोहितांची हक्कासंबंधीं कल्पना.**—जे लोक आपल्या ईश्वरप्राप्त सामर्थ्यानें लोकांनां सुखें प्राप्त करून देतात व त्यांच्या मोठाल्या पीडा नाहींशा करतात त्यांची कामगिरी लोकांनीं ओळखून त्यांनां मदत करावी हें अर्थात् त्यांचें कर्म आहे. चांगलें राज्य करणाऱ्या राजाचें अथवा लोकांच्या उपजीविकेकरितां जमीन नांगरणाराचें कितीहि महत्त्व असलें तरी धर्मोपदेशकाचा धंदा सर्वांत उच्च प्रतीचा असून त्यांचा हक्क सर्वांहून जास्त आहे, जे हा हक्क नाकबूल करतात त्यांनां त्याचें फळ मिळाल्याशिवाय रहात नाहीं. एक गाथाकार कवि आपणांस आपल्या गुणांमुळें दहा सबर घोड्या व एक उंट मिळाला असल्याचें वर्णन करतो, पण हें सर्व मझ्दास अर्पण करण्याचा आपला निश्चय प्रकट करतो. वेदांतील ठिकठिकाणीं आढळणारा दानस्तुतीचा प्रकार गाथांत सांपडत नाहीं. आपण सद्धर्माचा मार्ग दाखवून लोकांनां सुख प्राप्त करून देत असल्यामुळें सुस्थितींत असणाऱ्या लोकांस जें कांहीं मिळतें त्याचा हिस्सा घेण्याचा आपणांस हक्कच आहे असें गाथाकार समजतात. परंतु असले स्वार्थपरिप्लुत विचार गाथांत फारच थोड्या ठिकाणीं आढळतात. गाथांत जिकडे तिकडे गाथाकारांचा धर्मप्रसारासंबंधीं उत्साह व्यक्त झालेला आहे. एका स्फूर्तिमय उताऱ्यांत कवि म्हणतोः—

"मी आतां भविष्य कथन करतों. सगळेजण लक्षपूर्वक ऐका! मी आतां सर्वज्ञाता मझ्द अहुर यानें मला जें सांगितलें तें सांगतों. जो हें माझें वचन पाळील त्याच्याकडे हौर्वतात, अमरेतात व खुद्द मझ्द अहुर येतील."

**झरथुष्ट्र धर्माची जन्मभूमि.**—झरथुष्ट्र धर्माची जन्मभूमि व अवेस्तांतील गाथा जेथें रचण्यांत येऊन कित्येक वर्षे पाठांतरानें एका पिढीपासून दुसऱ्या पिढीकडे चालत आल्या तो देश हे एकच असतील असें नाहीं. गाथा तयार झाल्यावर त्या लेखनिविष्ट करण्याची क्रिया पुढें निरनिराळ्या ठिकाणीं होऊं शकेल.

अत्यंत प्राचीन पाठ असलेल्या गाथा बहुधा जेथें गाथाकार कवींची भाषा प्रचारांत होती त्या देशांत रचल्या गेल्या असाव्यात. ही भाषा कोणत्या प्रांतांत प्रचलित होती हाच आपल्यापुढें प्रश्न आहे. गाथांचीं निरनिराळीं पुस्तकें सारखींच प्राचीन नाहींत व एक दुसरीहून पुरातन अशा दोन भाषांत लिहिलेलीं आहेत उत्तरकालीन गाथापुस्तकांचा बराचसा भाग भिन्न देशभाषा असलेल्या मुलखांत, धार्मिक ग्रंथांत जुनी पवित्र भाषाच वापरली पाहिजे अशा समजुतीच्या लोकांकडून रचला गेला असला पाहिजे. कांहीं गाथाग्रंथांत पर्शियन भाषेचा परिणाम झाला असल्याच्या खुणा दृष्टोत्पत्तीस आल्याहि आहेत. परंतु, हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, या निरनिराळ्या गाथाग्रंथांच्या भाषा कोणत्या प्रांतांतील आहेत हें ठरविलें तरी झरथुष्ट्र धर्माची जन्मभूमि निश्चित होऊं शकत नाहीं. अवश्यक पुराव्याची अत्यंत उणीव असल्यामुळें हा प्रश्न सोडविणें कठिण आहे. तथापि मझ्द धर्मांचें मूळ ठिकाण, ज्याला हल्लीं आपण पर्शिया किंवा मुख्य इराण म्हणतों तें नव्हे हें निश्चयात्मक सांगतां येतें.

या प्रश्नासंबंधीं निरनिराळ्या लेखकांनीं निरनिराळीं अनुमानें प्रकट केलीं आहेत. कांहींच्या मतें या धर्माची जन्मभूमि पूर्वइराण ही आहे. ते वेंदिदादच्या पहिल्या फर्गदाचा (खंडाचा) आधार देतात. या खंडांत आलेलीं स्थलादिकांचीं नांवें पूर्वइराणांतील आहेत असें जरी गृहीत धरलें तरी तेवढ्यावरून तो पूर्वइराणांत उत्पन्न झाला असेल असें अनुमान निघत नाहीं. कारण इराणी धर्माच्या जन्मभूमीसंबंधीं हकीकत देणें हा त्यांत कर्त्याचा उद्देश नसून त्याला केवळ इराणी धर्माच्या वर्चस्वाखालीं असलेल्या प्रदेशाविषयीं बोलावयाचें आहे असें दिसतें. अर्थात् इराणी धर्माचा जन्म दुसरीकडेच कोठें होऊन मागून तो पूर्व इराणांत प्रचारांत आला असेल.

मीडिया ही या धर्माची जन्मभूमि आहे. हें दुसरें अनुमान देखील वरच्याप्रमाणेंच निराधार दिसतें. ज्यांचा पुरातन व नवीन धर्मग्रंथांत एकदांहि उल्लेख नाहीं ते मगी लोक धर्मसंस्थापक कसे असूं शकतील? मीडिया जर या धर्माची जन्मभूमि म्हणावी तर मीडियाचा किंवा त्याच्या राजधानीचा गाथाग्रंथांत मुळींच उल्लेख सांपडत नाहीं हें कसें? तात्पर्य, हें अनुमान अगदींच असंभवनीय आहे, ही गोष्ट खुद्द अवेस्ता ग्रंथावरूनच सिद्ध होऊं शकते.

झरथुष्ट्राची धर्मसुधारणा उत्तर अथवा वायव्येकडील इराणांत झाली अशी तिसरी एक उपपत्ति आहे.

आर्यनेम वैजो ( आट्रोपाटकिन, अजर बैजान ) ही आर्य लोकांची मूल भूमि होती असें म्हणतां येईल. कारण हिचा वेंदिदादमध्यें मझ्दनें निर्माण केलेल्या देशांपैकी पहिला देश असा उल्लेख आला आहे.

आर्य लोकांची ही वास्तविक भूमि असतां तिची पुढें इतकी विस्मृति झाली कीं, तिची केवळ स्वर्गांत गणना होऊं लागली. एका दंतकथेप्रमाणें झरथुष्ट्र येथेंच जन्मला होता. आणि येथूनच पार्थियन राजांच्या अंमलांत मझ्दयस्न धर्माचें

पुनरुज्जीवन झालें. म्हणून येथें झरथुष्ट्राचा धर्म निर्माण झाला ही गोष्ट असंभवनीय नाहीं. सारांश झरथुष्ट्राचा धर्म या वायव्य किंवा उत्तर इराणांत जन्म पावून नंतर खालीं मीडियांत व अलीकडे पूर्व इराणांत प्रसार पावला असावा.

या भविष्यवाद्याची अथवा मझ्द उपासनेची जन्मभूमि मीडियाच्या ईशान्येंतील रघ हें ठिकाण होती, ही दंतकथा विशेषशी शक्य कोटींतील दिसत नाहीं. रघ हें धर्मोपदेशकांचें फार पुरातन शहर होतें. ससेनाइड काळांत येथें मुख्य मगी रहात असे; व यापूर्वी जेव्हां वेंदिदाद लिहिलें गेलें तेव्हां येथें झरथुष्ट्रोतेमो नांवाचा मुख्य धर्माधिकारी राज्य करीत होता. यावरून हें शहर झरथुष्ट्राची जन्मभूमि कशी मानली गेली याचा सहज उलगडा होतो. कोणत्याहि धर्माच्या धर्मोपदेशकाच्या संस्थेचें मुख्य ठिकाण त्या धर्माचें उदयस्थान असलेंच पाहिजे असें नाहीं. मझ्दनें निर्माण केलेल्या देशांत रघचा उल्लेख प्रथम आला नसून मध्येंच अथवा कोठें तरी आला असल्यामुळें यावरूनहि सदरहू तर्कास पुष्टि मिळूं शकत नाहीं ( इं. अँ. पु. ३४, पृ. ६०–६६ ).

**प्राचीन परमार्थसाधनांत सुधारणा.**—इराणच्या पलीकडे म्हणजे तुर्कस्थानांत धर्मविषयक क्रान्ति झाली नाहीं असें नाहीं. अरब, यहुदी आणि बाबिलोनी यांचा पैतृक धर्म एकच होता आणि विधिविषयक सादृश्येंहि अनेक असत. समाजांतील पुरोहित वर्ग दैनिक कृत्यें, आचार, प्रायश्चित्तें आणि शकुन सांगण्यांत म्हणजे सामान्य प्रतीच्या आथर्वण कर्मांत गढला असतांहि त्यांच्यामध्यें आरण्यक कालामध्येंच द्रष्टे आणि प्रवक्ते बाहेर पडण्यास सुरुवात झाली. देव अंगांत येतो आणि व्यक्ति जे आवेश करते ते ईश्वराचे वाचक होत अशा तऱ्हेची कल्पना पूर्व आशियांत बरीचशी प्रचलित होती. यहुद्यांमध्यें जे प्रवक्ते होऊन गेले त्यांचे अर्थात् विधीपेक्षां अन्तःकरण, विचार, राष्ट्रीय महत्त्वाकांक्षा इत्यादि गोष्टींकडे लक्ष असे. आणि आचारयुक्त धर्मावर विचार व आवेश यांचें कलम व्हावयास सुरुवात झाली. तथापि ही प्रवक्त्यांची परंपरा जुन्या वैधधर्माचें उच्चाटन करूं शकली नाहीं; तर वैध धर्म हा कायम राहिला आणि प्रवक्त्यांचीं वाक्यें हीं तात्पुरतीं करमणुकीचीं वाक्यें बनलीं एवढेंच.

ग्रीकांमध्यें तत्त्वज्ञानाचा काल बुद्धाशीं समकालिनच आहे. त्यांच्या तत्त्ववेत्त्यांच्या परंपरेचा प्रथम दीप पायथॅगोरस होय. याच्या मतांमुळें याचा भारतीयांशीं कसाबसा संबंध आला असावा असे विचार व्यक्त झाले आहेत.

झरथुष्ट्र संप्रदायाचा परिणाम यहुदी मंडळींवर काय झाला असावा याविषयीं एकदम निश्चयानें सांगतां येत नाहीं. ईश्वर आणि सैतान हें द्वैत मगांच्या संस्कृतींत उत्पन्न झालें किंवा पर्शुभारतीय काळीं उत्पन्न झालें, आणि तें हिंदुस्थानांत जरी आलें नाहीं तरी यहुद्यांत मात्र शिरलें; आणि असुरदेवता बाबिलोनियांत शिरली या गोष्टी सुप्रसिद्धच आहेत. परंतु हा झरथुष्ट्रपूर्व संबंधाचा परिणाम होय. झरथुष्ट्रोत्तर पारशी मतांचा आणि पर्शूंच्या जुडीयावरील विजयाचा तत्कालीन बौद्धिक देवधेवीवर काय परिणाम झाला हें सांगतां येण्याजोगें नाहीं. कां कीं, त्या कालांतील यहुद्यांचा इतिहास देखील इतका लुप्त आहे कीं, अनेक जातींचें आणि राष्ट्रांचें वर्णन करणाऱ्या हिरोडोटसनें यहुद्यांचा उल्लेख देखील केला नाहीं.

बुद्धोत्तर काळ आणि इराणी सत्तावर्धनाचा काळ यांतील एक महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे ख्रिस्ती संप्रदायाचा उदय झाला, त्यास बुद्धाचा संप्रदाय किती कारण झाला असावा याविषयीं बरीच चर्चा करण्यांत येते. त्या चर्चेचें फल विंटरनिट्झ येणेंप्रमाणें संक्षेपितो. विंटरनिट्झाचें मत आपल्याकडील कोणी लायख ग्रंथकारानें पद्धतशीर तपासलें नाहीं. आणि आपली बाजू चांगल्या तऱ्हेनें मांडण्याइतका परिश्रम कोणीच भारतीयानें केला नसल्यामुळें एका पाश्चात्य पण प्रामाणिक पंडिताचें मत केवळ मांडण्यापलीकडे आम्हांस कांहीं करतां येत नाहीं. विंटरनिट्झनें दिलेले आधार आम्ही तपासूनहि पाहिले नाहींत, आणि त्यामुळें ते येथें उद्धृतहि केले नाहींत.

**बौद्ध वाङ्मय व ख्रिस्ती संप्रदाय.**—जसा बौद्ध संप्रदाय हा जगांतील मोठ्या संप्रदायांपैकीं एक होऊन बसला आहे, तसाच बौद्ध वाङ्मयांपैकीं बराच भाग विश्व–वाङ्मयामध्यें मोडूं लागला आहे. बौद्ध धर्मांतील कल्पित कथा, आख्यायिका, अद्भुत कथा आणि दंतकथा बौद्धसंप्रदायाबरोबर पूर्व आशियामध्यें गेल्या इतकेंच नव्हे तर यूरोपीय वाङ्मयांमध्येंहि तत्समान कथा वारंवार आढळूं लागल्या. परंतु अशा उदाहरणांच्या बाबतींत बौद्धकथा यूरोपांत गेल्या" असेंच सरसहा खरें ठरेल असें नाहीं, तर त्याच्या उलटहि वस्तुस्थिति कधीं कधीं असूं शकेल. बुद्धकथा व ख्रिस्तकथा यांच्यामध्यें कांहीं बाबतींत साम्य आहे; आणि त्रिपिटकांतील व महायानसूत्रांतील सुत्तांमध्यें आलेल्या कांहीं भाषणांवरून व दृष्टान्तांवरून यूरोपीयांस ख्रिस्ती संप्रदायग्रंथांतील उपदेशांची कमीजास्त मानानें आठवण होते.

बौद्ध व ख्रिस्ती वाङ्मयांमध्यें अशीं साम्य–स्थलें किती प्रमाणांत आलीं आहेत व त्यांवरून काय अर्थबोध होतो हा प्रश्न अशा प्रकारचा आहे कीं, त्याच्या परस्परसंबंधांकडे आपणांस वळलेंच पाहिजे. आतां प्रश्न असा कीं, हीं समानस्थलें केवळ साहजिकरित्या आलीं, म्हणजे त्या त्या कथांत, त्यांतांत व भाषणांत समान परिस्थितींमुळें व समान धर्मभावनांमुळें तीं उत्पन्न झालीं, कीं हें सादृश्य एक वाङ्मय दुसऱ्यावर प्रत्यक्ष अवलंबून असल्यामुळें उत्पन्न झालें? ख्रिस्ती ग्रंथांवर तत्पूर्वकालापासून निर्माण होऊं लागलेल्या बौद्धग्रंथांचा परिणाम झाला आहे, किंवा उलट ललितविस्तर आणि सद्धर्मपुंडरीक या अलीकडच्या बौद्ध ग्रंथांवर ख्रिस्ती ग्रंथांचा परिणाम झाला आहे? हे प्रश्न पुनःपुन्हां उपस्थित होऊन संशोधन झालेलें

आहे. आणि त्यांची उत्तरें निरनिराळ्या लेखकांनीं फारच भिन्न भिन्न प्रकारचीं दिलीं आहेत.

**बौद्ध व ख्रिस्ती वाङ्मयांतील साम्य स्थलां संबंधीं सेडेलच्या मताचा विचार.**—बायबल ग्रंथांतील ख्रिस्तचरित्र व बुद्धकथा यांच्यामध्यें अनेक साम्यस्थलें असल्याचें सिद्ध करतां येईल, असें रुडॉल्फ सेडेल या लेखकास वाटत असल्यामुळें त्यानें असा सिद्धान्त काढला कीं, शुभवर्तमानलेखकांनीं सेंट. मॅथ्यू आणि सेंट मार्क यांच्या पुस्तकांचा उपयोग करून शिवाय ज्यावर बौद्ध संप्रदायाचा परिणाम झाला होता अशा एका ख्रिस्ती काव्यमय शुभवर्तमानाचाहि उपयोग केला होता; आणि बौद्धग्रंथांत ज्यांचीं सादृश्यें आढळतात अशा सर्व कथा, दृष्टान्त व उद्गार हीं यामधून घेतलीं होतीं. रुडॉल्फ म्हणतो कीं, " अशीं सादृश्यें एकएकटीं व स्वतंत्र नाहींत तर त्यांचा बराच मोठा समुच्चय असून त्याचे विभाग पडतात; इतकेंच नव्हे तर त्या सर्वांमध्यें एकसूत्रीपणाहि दिसतो; तेव्हां अर्थात् ज्याप्रमाणें एखादी काठी मोडून टाकतां येते परंतु काट्यांचें जुडगें मोडणें फार कठिण असतें व जुडग्यांचें जुडगें मोडणें तर त्याहूनहि कठिण असतें, त्याचप्रमाणें या एकंदर सदृश स्थलांची विल्हेवाट लावणेंहि कठिण असल्यामुळें मी म्हणतों त्याप्रमाणें सिद्धान्त काढणें केवळ अपरिहार्य आहे. " अगदीं बरोबर ! परंतु तो जिला काठी म्हणून म्हणतो ती काठी नसून केवळ काठीचा आभास असेल तर तसल्या काठ्यांचें जुडगें किंवा जुडग्यांचें जुडगें असलें तरी तें आपणांस कांहीं कामाचें नाहीं. आणि खरोखर सेडेलनें दाखविलेल्या ' सादृश्यांपैकीं बहुतेक सादृश्यें सूक्ष्म परीक्षणांत टिकणारीं नाहींत असें दाखविणें कठिण नाहीं.

**हिंदी गोष्टींचे ख्रिस्ती शुभवर्तमानावर झालेले परिणाम.**—या प्रश्नाचा सेडेलपेक्षां जी. ए. व्हान डेन बर्ग व्हान एसिंगनें अधिक काळजीपूर्वक अभ्यास केला आहे. हे ग्रंथ निर्माण झाले त्या परिस्थितींतील सारखेपणा, धार्मिक उन्नतींतील सारखेपणा आणि शेवटीं मानवी स्वभावांतील सामान्य सारखेपणा या कारणांनीं ज्यांचा सहज उलगडा होतो अशा गोष्टी सोडून देऊनच त्यानें प्रस्तुत विषयाचा विचार केलेला आहे. त्याचेंहि मत असेंच झालें आहे कीं, शुभवर्तमानांत वरच्या शिवाय दुसरींहि सादृश्य स्थलें असून तीं उसनीं घेतलेलीं आहेत असें मानलें तरच त्यांचा बरोबर उलगडा होतो. पण तीं कोणत्याहि लेखनिविष्ट ग्रंथांवर आधारलेलीं नसून रोमन साम्राज्याच्या काळीं ज्या हिंदी गोष्टी, विषय व कल्पना तोंडातोंडीं पाश्चात्त्य देशांत गेल्या त्यांतील कांहीं मुख्य लक्षणें आद्य ख्रिस्ती संप्रदायांतील कथा रचतांना घेण्यांत आलीं. सेडेलनें स्वमतानें काढलेल्या एकावन्न सादृश्यस्थलांपैकीं बर्ग व्हान एसिंगनें नऊच काय तीं वादविवादालायक ठरविलीं आहेत, आणि फक्त सहा कमजास्त प्रमाणानें परिणामकारक मानलीं आहेत.

**एतद्विषयक आलबर्ट जे. एडमंड्सचा अभ्यास.**—सेडेलनें अपुऱ्या साधनांनिशीं—कारण त्याच्या वेळीं बौद्ध वाङ्मयाची माहिती अगदींच अपुरी होती—जो प्रश्न हातीं घेतला होता, तो बौद्ध व ख्रिस्त संप्रदायग्रंथांतील सादृश्य विलोकनाचा प्रश्न पुढें पाली व संस्कृत ग्रंथांच्या बऱ्याच बिनचूक माहितीच्या आधारावर आलबर्ट जे. एडमंड्स या अमेरिकन गृहस्थानें पुन्हां हातीं घेतला. तो प्रथमच असें स्पष्ट सांगतो कीं, ख्रिस्ती पवित्र ग्रंथांनां बौद्ध ग्रंथ आधारभूत आहेत हें ठरविण्याच्या प्रश्नाशीं मला कांहीं कर्तव्य नसून ते दोन संप्रदाय परस्परांनां अधिक चांगले समजावे म्हणून मी त्यांची तुलना करणार आहें. अशा रीतीनें कोणत्याहि प्रकारचा पूर्वग्रह न ठेवतां विचार करणाऱ्या एडमंड्सचा देखील, ख्रिस्ती धर्म अधिक सारसंग्राहक असल्यानें त्यानें बौद्धधर्माची मदत घेतली होती, आणि सेंट ल्यूकला विशेषतः बुद्ध–महाकाव्याची माहिती होती, या मताकडे कल आहे. परंतु या दोन्ही वाङ्मयांतून अत्यल्प सादृश्य असलेल्या उताऱ्यांसुद्धां एकंदर सर्व सादृश्यांचा जो एडमंडसनें संग्रह केला आहे त्यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, या चार शुभवर्तमानांत कोठें कांहीं उसनें घेतलें आहे असें गृहीत धरण्यास चांगलें आधारभूत असें एकहि स्थल नाहीं. बहुतेक उताऱ्यांत फक्त कल्पनासादृश्यच काय तें आढळतें; पण तेवढ्यावरून या दोन वाङ्मयांचा परस्परसंबंध असल्याची कल्पना करणें योग्य नाहीं. अगदीं उत्तम उदाहरणांच्या बाबतींत मात्र परस्पर परिणामाची शक्यता कबूल करावी लागते; आणि त्यांपैकीं कांहीं थोड्या उदाहरणांत ही शक्यता विशेष संभवनीय दिसते. तथापि पुष्कळ वेळां खुद्द एडमंडसनें केलेल्या ग्रंथांच्या तुलनेवरूनच असें दिसतें कीं, सारखेपणापेक्षां त्यांत फरकच पुष्कळ आहे.

**बुद्ध व ख्रिस्त यांच्या जन्मासंबंधीं कथांचा विचार.**-ख्रिस्त आणि बुद्ध यांच्या चमत्कारयुक्त आधानकालाविषयीं व जन्मकालाविषयीं एडमंडसनें दिलेले तुलनात्मक मूल उतारे जर कोणी नुसते वाचले तरी त्यांतील फरक ताबडतोब स्पष्टपणें दिसूं लागतात. दोघांच्याहि बाबतींत त्या त्या वेळीं चमत्कार घडून आले हें खरें आहे. पण धर्म, पुराणें व प्रचलित दन्तकथा यांच्या इतिहासावरून आपणांस असा बोध होतो कीं, सर्व थोर माणसांच्या जन्मासंबंधानें अशा तऱ्हेचे चमत्कार सर्वत्रच आढळतात. कन्यकाजात ख्रिस्तकथेशीं बुद्धकथेपेक्षां अधिक निकट साम्य असलेल्या अशा गोष्टी ग्रीक पुराणांत आढळतात. उलट पक्षीं बुद्ध हा विवाहित राणीच्या पोटीं जन्मास आला होता, कुमारिकेच्या पोटीं नव्हता. तसेंच बुद्धाला मारनें व ख्रिस्ताला सेटननें पाडलेल्या मोहाबद्दलच्या उताऱ्यांतहि सारखेपणापेक्षां फरकच अधिक आहेत. झरथुष्ट्राला अहरिमननें पाडलेल्या मोहाच्या कथेवरूनहि हेंच सिद्ध होतें कीं, ग्रंथांतून आधार घेतल्याचा प्रकार यांत असणें शक्य नाहीं; फार तर हा धर्मविषयक इतिहासांतील प्राक्कालीन संबंधाचा

एक प्रकार आहे असें म्हणतां येईल. त्याचप्रमाणें, येशूच्या दिव्य स्वरूपप्राप्तीच्या कथेमध्यें आणि बुद्धाच्या देहदेदीप्यतेच्या महापरिनिब्बानसुत्तांतील वर्णनामध्यें तुलना करून पाहतां त्यांत फार आश्चर्यकारक सादृश्य दिसतें, व सांप्रदायिक इतिहासांत तें एक कौतुकस्थानच होय असें वाटतें. परंतु तेवढ्यावरून तद्विषयक कल्पना कोणी कोणापासून ग्रहण केल्या आहेत असें बिलकुल म्हणतां येत नाहीं.

**असित व सिमिऑन यांच्या कथा**—यापेक्षां असिताची कथा आणि सेंट ल्यूकमधील सिमिऑनची कथा यांमध्यें पुष्कळ अधिक साम्य आहे. या ठिकाणींहि कांहीं नाकबूल न करतां येण्यासारखे फरक आहेत. तरी त्यांवरून विंटरनिट्झचें. मत असें झालें आहे कीं, या ख्रिस्ती कथानकाच्या कर्त्याला बौद्ध कथेची माहिती असावी हें बरेंच संभवनीय दिसतें. तसेंच, 'बुद्ध लहान असतां तो एकदां आपल्या सोबत्यांनां सोडून बाजूला गेला, व नंतर कुटुंबांतील माणसें तो हरवला म्हणून त्याचा तपास करीत असतां त्यांनां तो 'ध्यानस्थ स्थितींत बसलेला सांपडला' या कथेमध्यें, आणि 'येशू बारा वर्षांचा असतां एकदां आईबापांबरोबर नॅझरेथला परत न येतां मागेंच यरुशलेममधील देवळांत राहिला, आणि तेथील गुरूंबरोबर त्यानें संभाषण केलें,' या कथेमध्यें सुद्धां परस्परसंबंध असणें शक्य आहे असें विंटरनिट्झ यास वाटतें. शिवाय एका स्त्रीकडून ख्रिस्तमातेला झालेल्या मोक्षप्राप्तीच्या कथेमध्यें आणि निदानकथेमध्येंहि कांहीं संबंध असण्याचा संभव आहे. साधूची देवदूतांनीं सेवा केली या गोष्टींत जरी कांहीं विशेष नाहीं, तरी देवदूतांनीं उपवासी येशूवर व उपवासीच बुद्धावर कृपा करावी हें साम्य मात्र लक्षांत घेण्यासारखें आहे; आणि म्हणूनच या बाबतींत या कथानकांचें अन्योन्य सापेक्षत्व असणेंहि शक्य आहे.

**बुद्ध व ख्रिस्त यांच्या चमत्कारांविषयीं कथा.**—ख्रिस्तानें केलेल्या चमत्कारांशीं साम्य असलेल्या अशा दोन गोष्टी जातकपुस्तकांत दिल्या आहेत. ज्याप्रमाणें येशूनें पांच पाव व दोन मासे एवढ्या सामुग्रीवर पांच हजार लोकांनां भोजन घातलें, त्याचप्रमाणें एका स्वयंवर्धन पावणाऱ्या चपातीनें बुद्धानें पांचशें भिक्षू जेऊं घातले, असें जातकांत वर्णन आहे. आणि जसें पीटर पाण्यावरून चालत जात असतां त्याची श्रद्धा डळमळूं लागतांच तो बुडूं लागला असें वर्णन आहे, तसेंच एक श्रद्धावान् पुरुष बुद्धाविषयीं चांगले विचार असेपर्यंत नदीवरून चालत जाऊं शकला पण जेव्हां लाटांच्या भीतीनें त्याची बुद्धाविषयींची आदरबुद्धि डळमळूं लागली तेव्हां तो बुडूं लागला, असें दुसऱ्या एका जातकांत सांगितलें आहे. हे दोन्ही चमत्कार जातकटीकेमधील आद्य-कथांमध्यें मात्र सांपडतात, आणि त्या मागाहूनच्या आहेत ही गोष्ट लक्षांत घेतां त्या मूळ ख्रिस्ती धर्मांतीलच असणें अशक्य नाहीं.

ख्रिस्तोत्तर कालांतील गोष्टींत एका गरीब मुलीची गोष्ट आहे. तिनें आपलें सर्वस्व जें स्वतःजवळ असलेली भींतींत सांपडलेली दोन पितळी नाणीं तीं भिक्षूंनां दिलीं; आणि त्याबद्दल तुझ्या देणगीचें महत्त्व श्रीमंतानें आपल्या सर्व मिळकतीच्या व संपत्तीच्या केलेल्या दानापेक्षां अधिक आहे अशी बुद्धानें तिची स्तुति केली. तिच्या सत्कृत्याबद्दल तिला बक्षिस मिळाल्यावांचून राहिलें नाहीं. त्यानंतर लवकरच ती त्या बाजूनें जात असलेल्या एका राजाच्या दृष्टीस पडून त्याचें प्रेम तिच्यावर जडलें व त्यानें तिला आपली राणी करून घरीं नेलें.

अश्वघोषाच्या सूत्रालंकाराच्या चिनी भाषांतरांत ज्या स्वरूपांत ही कथा आपणांस आढळते त्या स्वरूपांत ती शुभवर्तमानांतील विधवेच्या अल्पदानाविषयींच्या साध्या पण सुंदर कथेहून फारच कमी दर्जाची आहे. म्हणून ही कथाहि बौद्धांनां ख्रिस्ती धर्मप्रचारकांकडून माहीत झाली असणें अशक्य नाहीं. परंतु या बौद्धकथेचें मूळ जुनें अधिक चांगलें स्वरूप नष्ट झालें असणेंहि शक्य आहे. या कथेंतील नाण्यासंबंधींच्या अगदीं किरकोळ बाबींतहि असलेलें साम्य लक्षांत घेतां हेंच अत्यंत संभवनीय दिसतें कीं, अशा प्रकारच्या बौद्ध व ख्रिस्ती कथा परस्परसंबंध असल्यावांचून उत्पन्न झाल्या नसाव्यात.

सद्धर्मपुंडरीकामधील उधळ्या पुत्राच्या गोष्टीचा सेंट ल्यूकमधील गोष्टीशीं संबंध असणें कमी संभवनीय दिसतें. याबद्दल स्वतः सेडेलसुद्धां असें म्हणतो:—"कमलाच्या" उपमेचें ख्रिस्ती विचाराशीं खरोखर कसलेंहि साम्य नाहीं. नाहीं म्हणावयास भटकणारा पुत्र दरिद्री स्थितींत परत येतो एवढें मात्र दोहोंत साम्य आहे. तथापि त्या दोन गोष्टींमधील तुलनेचा प्रकार पूर्णपणें भिन्न आहे." सेंट जॉनच्या शुभवर्तमानांतील येशू आणि सामारिआची स्त्री यांच्या गोष्टींमध्यें आणि दिव्यावदानांतील आनंद व चांडालकन्या यांच्या गोष्टींमध्यें साम्य फारसें मोठें नाहीं. शिवाय दोन्ही उदाहरणांतील मूळ बौद्ध लेख ख्रिस्तोत्तरकालीन आहेत.

**मृत्यूसंबंधीं कथांमध्यें साम्य दाखविण्याचा प्रयत्न.**—ख्रिस्ताच्या मरणाची सुद्धां बुद्धाच्या निर्वाणप्रवेशाशीं तुलना केलेली आहे. सेडेलनें असें दाखविलें आहे कीं, दोन्ही गोष्टी घडल्या तेव्हां धरणीकंप झाला होता; आणि एडमंडसनें तर ख्रिस्त व बुद्ध दोघेहि उघड्या जागीं मरण पावले, या गोष्टीवर जोर दिला आहे. परंतु वस्तुतः दोन सांप्रदायिक कथांत इतका स्पष्ट फरक इतरत्र कोठेंहि आढळत नाहीं. महापरिनिब्बानसुत्त आणि सेंट मॅथ्यूचें २७ वें प्रकरण यांत केवढें अन्तर! इकडे हा धर्मवेडेपणाला बळी पडणाऱ्या आत्मयज्ञास तयार झालेल्या महात्म्यावरील हृदयद्रावक शोकप्रसंग आणि तिकडे तें महात्म्याचें शान्तपणें प्रयाण——उज्ज्वल व कष्टहीन मरण! सेंट मॅथ्यूच्या शुभवर्तमानांत धरणी दुभंग होते व कंप पावते आणि थडगीं उघडतात. पण तें घडत असलेल्या गुन्ह्याच्या

गंभीरतेमुळें. महापरिनिब्बानसुत्तामध्येंहि • धरणी कंप पावते, पण तें बुद्धदेवाला पूर्ण निर्वाणप्राप्ति झाल्याबद्दल वाटत असलेल्या आनंदामुळें !

**दृष्टान्त कथा.**—बुद्ध व ख्रिस्त यांच्या एकेरी वचनांसंबंधानें व दृष्टान्तकथासंबंधानें पाहतां, त्यांतील संभवनीय परस्परसंबंध दन्तकथांपेक्षांहि कमी प्रमाणांत आहे असें दाखवितां येतें. बहुतेक उदाहरणांत सामान्य सादृश्य असतें इतकेंच; किंवा अशा सामान्य कल्पना असतात कीं, तसल्या कल्पना सर्व संप्रदायांच्या पवित्र ग्रंथांत साहजिकच यावयाच्या व प्रत्यक्ष येतातहि. उदाहरणार्थ, सत्कृत्याचें बीजारोपण व फलप्राप्तीसंबंधींचा संवाद असलेलें मज्झिमनिकाय ११०, आणि पेरणी करणाऱ्याचा दृष्टान्त ( मॅथ्यू १३. १८ ) यांची तुलना करा. किंवा ' इह लोकीं तुम्ही स्वतःकरितां धनसंचय करीत बसूं नका, कारण त्याला कसर लागून व गंज चढून तो बिघडणारा आहे ' ही ' खरा संग्रह ' या संबंधाच्या सुत्तांतील कल्पनाच मॅथ्यू ६. १९ मध्यें आलेली आहे ती ताडून पहा.

येणें प्रमाणें चार शुभवर्तमानांची बौद्धग्रंथांशीं तुलना करतां ज्या गोष्टी निदर्शनास येतात त्यांचा सारांश असा दिसतो कीं, त्यांत ऐक्यभावापेक्षां फरकच पुष्कळ अधिक आहेत. अगोदर ज्या दन्तकथांची तुलना करतां येण्यासारखी आहे. त्यांचें स्वरूपच सर्वस्वीं भिन्न भिन्न प्रकारचें आहे. इकडे बौद्धधर्मांत सर्व चमत्कार कर्मवादानें म्हणजे पूर्वजन्मांतील कर्माचीं फलें म्हणून उलगडून सांगितले आहेत, तर तिकडे ख्रिस्ती चमत्कार, ईश्वरी दया व सामर्थ्य यांचे परिणाम होत असें म्हटलें आहे.

एडवर्ड लेहमन जें म्हणतो कीं, हिंदूलोकांच्या अभिरुचीला ख्रिस्ती कथांमधील गोष्टींनां दिलेलीं कारणें अगदीं अपुरीं आहेत असेंच नेहमीं वाटणार, आणि उलट आपणां ख्रिस्तानुयायांनां हिंदू कथांची प्रबल कारणेंहि—अगदीं शुद्ध साधुत्वाच्या दृष्टीनें पाहिलीं तरी बहुतेक निराधार अशीं वाटणार, तें अगदीं बरोबर आहे.

**बौद्ध वाङ्मयाचा ख्रिस्ती वाङ्मयावर अप्रत्यक्ष परिणाम.**—उपर्युक्त विवेचनावरून बौद्धवाङ्मयाचा शुभ वर्तमानावर प्रत्यक्ष परिणाम झाला नसला पाहिजे हें उघड सिद्ध होतें. तथापि हें निश्चित दिसतें कीं, अलेक्झांडर बादशहाच्या वेळेपासून, आणि विशेषतः रोमन साम्राज्याच्या काळीं हिंदुस्थान व प्राश्चात्य देश यांच्यामध्यें व्यापारी दळणवळण आणि बौद्धिक संबंध पुष्कळ असल्यामुळें बौद्ध सांप्रदायिक कल्पना व बौद्धकथा यांची उडत उडत माहिती शुभवर्तमानकथालेखकमंडळास असणें अगदीं संभवनीय आहे.

तथापि पाश्चात्य देशांत बौद्धधर्माविषयींची माहिती असल्याचा निश्चित पुरावा इ० स०च्या २ऱ्या व ३ऱ्या शतकापासून पुढील आपणांस उपलब्ध झाला असून बनावट प्रक्षिप्त शुभवर्तमानेंहि त्याच काळांत निर्माण झालेलीं आहेत; म्हणूनच त्यांत बौद्ध वाङ्मयांतून निस्संशय उसन्या घेतलेल्या अशा गोष्टींची मालिकाची मालिकाच दाखवितां येते.

त्याच प्रमाणें हीहि गोष्ट पूर्ण मान्य झाली आहे कीं, मध्ययुगांतील सर्व ख्रिस्ती समाजांत लोकप्रिय झालेलें पुस्तक म्हणजे बार्लाम व जोसाफेट यांची एक गोष्ट असून ती एका ख्रिस्तभक्तानें बुद्धकथेच्या आधारावर लिहिलेली होती, आणि त्याला त्या बुद्धकथेची माहिती ललितविस्तरांतून मिळाली असावी. ही सर्व गोष्ट जरी वस्तुतः पूर्णपणें ख्रिस्ती भावनांनीं भरलेली आहे, तरी तिची रचना अगदीं बौद्धपद्धतीवर केलेली आहे; बुद्धकथेंतील मुख्य प्रकार—तीन सहली त्यांमध्यें म्हातारपण व रोग आणि मृत्यु यांबद्दलचे बोधिसत्त्वाच्या मनावर झालेले परिणाम—हींत व्यक्त झाले आहेत; मधून मधून घातलेल्या दृष्टांतकथांपैकीं कांहीं कथा ( उ० ' कूपांतल्या माणसाची ' गोष्ट ) हिंदु वाङ्मयांत नेहमीं आढळणाऱ्या आहेत; आणि त्या खुद्द गोष्टींमध्येंहि हिंदुस्थानाबद्दल उल्लेख आहेत. स्टीन, ग्रुनवेडेल आणि व्हि. ली कॉक यांनां खोतान आणि टूर्फन येथें ज्या गोष्टी सांपडल्या त्यांवरून आपणांस अशी माहिती मिळते कीं, पूर्व इराणांत किंवा मध्य आशियांत झरथुष्ट्रसंप्रदायी लोक, बौद्ध लोक, ख्रिस्ती लोक आणि मणिसंप्रदायी लोक अगदीं शेजारीं शेजारीं रहात असल्यामुळें त्या वेळीं एखाद्या मठवाश्याला बुद्धकथेची सहजासहजीं माहिती होणें शक्य होतें, व म्हणून ख्रिस्ती धर्मतत्त्वें शिकविण्याकरितां तशीच एखादी गोष्ट लिहिण्याची स्फूर्ति होणेंहि साहजिक आहे.

ही गोष्ट बहुतकरून ६ व्या किंवा ७ व्या शतकांत प्रथम पह्लवी भाषेमध्यें व नंतर भाषांतर करून अरबी व सीरियन भाषांमध्यें लिहिली गेली असावी. जॉर्जियन व ग्रीक भाषान्तरें यांचा माग मागें सीरियनप्रतीपर्यंत लावतां येण्यासारखा आहे. ग्रीक प्रतीवरून नंतर अरबी, हिब्रू, इथिओपी, आर्मीनियन, रशियन आणि रोमानियनमध्यें तर्जुमे झाले. पुष्कळशा यूरोपीय भाषान्तरांचा व तर्जुम्यांचा—लोप डी व्हेगानें या विषयाचें नाट्य दृष्टीनें विवेचन केलें आहे—ग्रीकवरून झालेल्या लॅटिन भाषान्तरापर्यंत माग लावतां येतो. जर्मनभाषेंत १२२० पासून झालेले तर्जुमे आहेत. कित्येक शतकांच्या या कालामध्यें या गोष्टींतील व्यक्तींशीं ख्रिस्ती लोकांचा इतका परिचय झाला आहे कीं, श्रद्धाळू ख्रिस्ती लोकांनां, त्या व्यक्ती खरोखरच होऊन गेल्या व त्यांनीं लोकशिक्षणाचें काम केलें असें वाटतें. कॅथोलिक पंथामध्यें तर या गोष्टींतील दोघां नायकांनां बार्लाम आणि जोसाफेट यांनां शेवटीं साधू मानूं लागले. परंतु वस्तुतः जोसाफेट हा बोधिसत्त्वाशिवाय दुसरी तिसरी कोणी व्यक्ति नाहीं. ग्रीक जोसफ = अरबी जुडासफ = बुडासफ उर्फ बोधिसत्त्व. अरबी, सीरियन व पह्लवी लिपींत ब आणि य यांचा घोटाळा होतो. बार्लाम साधूला अरबीमध्यें

बालौहर नांव असून तें कदाचित् भगवानपासूनहि निघालें असेल. ही हिंदुस्थानांतील बुद्धकथा मध्ययुगांतल्याप्रमाणेंच आपल्या चालू कालांतहि अतिशय प्रचलित आहे; आणि तिची काव्यमय व नाट्यमय प्रतिकृति करण्याची तिनें कवींनां पुनः पुन्हां स्फूर्ति उत्पन्न केली आहे. उदाहरणार्थ, इंग्रज कवि एडविन आर्नोल्डच्या "आशियाचा प्रकाश" या महाकाव्यानें १९ व्या शतकामध्यें सुद्धां इतका प्रेमादर उत्पन्न केला होता कीं, इंग्लंडमध्यें त्या काव्याच्या साठावर आवृत्त्या निघाल्या, अमेरिकेमध्यें शंभराहून अधिक निघाल्या, इतकेंच नव्हे तर त्याचें जर्मनमध्येंहि भाषांतर झालें आहे. जर्मन कवि जोसेफ व्हिक्टर विडमननें तर आपल्या "बुद्धा" मध्यें प्राचीन हिंदी कथेंतील जवळ जवळ कांहींच भाग गाळला नाहीं म्हटलें तरी चालेल. बौद्ध धर्मांतील मूलभावना आणि बौद्धधर्माचें वळण यांचा बराचसा अंश त्याच कवीच्या "साधू व जनावरें" या छानदार काव्यामध्यें उतरला आहे. या बुद्धकथेला फर्डिनांड हॉर्नस्टेइननें जर्मनभाषेंत नाट्यस्वरूप दिलें. त्याच्या "बुद्ध" नाटकाचा प्रयोग इ. स. १९०० मध्यें म्यूनिकमधील हॉफथिएटर ( दरबार नाटकगृह )मध्यें करण्यांत आला.

ही बुद्धकथा रिचर्ड वॅग्नरच्या पुस्तकांतून अद्याप जिवंत आहे. आपल्या आयुष्याच्या शेवटच्या दिवसांत वॅग्नर हा स्वभावाबद्दलच्या प्रश्नांत गुंतला होता; आणि वॅग्नरच्या मृत्यूनंतर, तो कवि "बुद्ध" नांवाचें संगीत नाटक लिहिण्याच्या उद्योगांत होता अशी अफवाहि उठली होती. अशी अफवा उठणें साहजिक असलें तरी ती निराधार होती हें मात्र खरें आहे. स्वतः त्या कवीनें विंटरनिट्झ याला ता. २७ आगस्ट १९०५ रोजीं लिहिलेल्या एका पत्रावरून असें दिसतें कीं, बुद्ध काव्य म्हणजे आधुनिक स्वतंत्रविचारदर्शक मतांचें पौरस्त्य पोषाखांतील वेषांतर होय.

**विश्ववाङ्मयांत बौद्ध वाङ्मयांतील अंतर्भूत करण्यासारखा अवशिष्ट अंश.**—वाङ्मय व ग्रंथोत्पत्तीसंबंधानें पाहतां आपल्या चालू काळांतील आधुनिक बौद्धसांप्रदायिक चळवळ निष्फळ झाली असल्याचें दिसतें. भाषान्तर ग्रंथ वगळले तर निवडक वेंचे, प्रश्नोत्तरमाला व हलक्या दर्जाचे स्वमतप्रवर्तक लेख यांपलीकडे क्वचितच मजल गेली आहे. यूरोप आणि अमेरिका या खंडांमध्यें ज्याच्या प्रसाराचें काम चालू आहे, त्या अर्वाचीन बौद्धसंप्रदायाकडे पाहतां आपणांस असें दिसतें कीं, आयुष्यक्रमाला नवीन वळण लावण्याकरितां चालू असलेल्या धडपडींमुळें आपल्या हातून घडत असलेल्या अनेक चुकांपैकीं ही एक चूक आहे. हें जरी खरें आहे, तरी बौद्धसंप्रदाय व बौद्धवाङ्मयग्रंथ यांतील ज्या जीवनशक्तीच्या योगानें सर्व राष्ट्रांमधील कवींच्या व विचारवंतांच्या मनाला सदोदित पुनः पुन्हां स्फूर्ति मिळत आली व मिळत आहे त्या जीवनशक्तीचें, कौतुक करणें आपणांस प्राप्त आहे. विंटरनिट्झ याच्या मतें जो यूरोपखंडांतील विविध वाङ्मयांमध्यें घेतला जाऊन विश्ववाङ्मयांतील सार्वजनिक ज्ञानधनाच्या स्वरूपांत येण्यास लायक आहे असा बौद्धवाङ्मयांत अजूनहि पुष्कळ भाग शिल्लक आहे.

**बौद्धसंप्रदायाचा पश्चिमेकडील विचारांवर परिणाम.**—वर जी देवघेव वर्णन केली ती कांहीं अंशीं अज्ञातपणें झालेली असावी. परंतु जी जाणून बुजून झाली असण्याचा संभव आहे अशी देवघेव मणिसंप्रदायांत स्पष्ट झाली आहे. ज्योतिषाच्या देवघेवीसंबंधानें मतें पहिल्या विभागांत दिलीं आहेत; त्याप्रमाणेंच नाट्यकलेच्या व शिल्पकलेच्या देवघेवीसंबंधानेंहि मतें तेथें आलीं आहेत. महाभारताचा प्रसार पश्चिमआशियांत झाला असावा असा तुर्की भाषेंतील अज्ञातकालीन हिडिंबवधावरून संशय उत्पन्न होऊं लागला आहे. पायथॅगोरसचा बुद्धपूर्वकालीच पुनर्जन्मावर विश्वास दिसून येत होता. तसेंच भारतीय संगीत व पायथॅगोरियन संगीत यांमध्यें असलेलें साद्दश्य ( विज्ञानेतिहास पृ. १८९ पहा ) यांवरून बुद्धपूर्वकालीं देखील कांहींतरी बौद्धिक देवघेव असावी अशी कल्पना होते. लाउत्सेच्या ताओ विचारसंप्रदायावर जर बुद्धापूर्वीच भारतीय विचाराची छटा दिसत होती तर चीनशीं मध्यआशियामार्फत संबंध ठेवणाऱ्या पश्चिमेकडे भारतीय विचाराचा परिणाम झाला असणें अशक्य नाहीं. असो.

**हिरोडोटसचें हिंदुस्थानासंबंधीं ज्ञान.**—तथापि त्या काळचें परकीयांचें हिंदुस्थानासंबंधाचें ज्ञान बेताबाताचेंच होतें, हें हिरोडोटसच्या ग्रंथावरून दिसून येतें. हिरोडोटसनें हिंदूंसंबंधानें जी "माहिती" दिली आहे ती येथें उद्धृत करतों. हिंदूंबरोबर पक्थांचेंहि उल्लेख दिले आहेत.

"हिंदुस्थानची लोकसंख्या सर्व राष्ट्रांपेक्षां जास्त आहे. हिंदुस्थान हें जगांतील पूर्वेकडचें अगदीं शेवटचें मनुष्यवस्तीचें ठिकाण आहे. या देशांतले घोड्याखेरीज सर्व पशुपक्षी इतर देशांतल्यापेक्षां फारच मोठे असतात. खणून काढलेलें, नदींतून वाहून आलेलें व मुंग्यांच्या वारुळापासून मिळविलेलें असें बरेंच सोनें या देशांत सांपडतें. येथें कांहीं रानटी झाडांनीं फळांऐवजीं लोकर येते; ती मेंढ्यापासून काढलेल्या लोकरीपेक्षां जास्त चांगली व सफाईदार असते ( हिरोडोटस ३. १०६ ).

"हिंदूंचीं अनेक राष्ट्रें आहेत; त्यांची भाषा एक नाहीं. कांहीं लोक भटके आहेत, तर कांहीं नदीच्या दलदलींत राहून कच्चे मासे खातात. हे वेताच्या होड्यांत बसून मासे धरावयास जातात. वेताच्या एका पेराची एक होडी तयार होते. हे लोक लव्हाळ्यापासून तयार केलेले कपडे वापरतात ( ३. ९८ ).

"पॅडियन हिंदू भटके असून ते कच्चें मांस खातात. यांच्यांत अशी चाल आहे कीं, जर एखादा मनुष्य आजारी पडला तर त्याचे जवळचे संबंधी त्याचा जीव घेतात. याचें कारण असें दाखवितात कीं, रोगानें जर तो क्षीण झाला तर त्याचें मांस गोड लागणार नाहीं. आपण आजारी नाहीं असें

त्या मार्ग घातलेल्या माणसानें सांगितलें तरी त्याचें म्हणणें न ऐकतां त्याला मारून त्याच्या मांसावर ताव मारण्यांत येतो. कोणी म्हातारा झाला असला तर त्याला सुद्धां बळी देऊन त्याच्या मांसाची मेजवानी करितात; पण म्हातारपणापावेतों फारच थोडे लोक जगतात; कारण त्यापूर्वीच कांहींनांकांहीं आजार दाखवून त्यांचा मोक्ष करण्यांत येतो (३.९९).

"दुसऱ्या कांहीं हिंदूंत अशी चाल आहे कीं, ते कोणाहि जीवाची हत्या करीत नाहींत, किंवा जमिनींत कांहीं पेरून खात नाहींत, किंवा घरदार करूनहि रहात नाहींत. ते केवळ वनस्पतींवर आपली उपजीविका करतात. हे लोक जोंधळ्या-एवढा दाणा असलेल्या शेंगा गोळा करून त्या उकडून टरफला-सहित खातात. त्यांच्यापैकीं एखादा जर आजारी झाला तर तो अरण्यांत जाऊन पडतो. तेथें तो मेला कीं तसाच आजारी आहे याची कोणी कधीं चवकशीहि करीत नाहीं (३.१००).

"या सर्व हिंदूंची संभोगक्रिया गुरांप्रमाणें उघड्यावर होते; व सर्वांचे वर्ण इथिओपिअन्सप्रमाणेंच काळे असतात. त्यांचें रेतहि त्यांच्या कातडीप्रमाणेंच काळें असतें; इतर लोकांच्या प्रमाणें पांढरें नसतें (३.१०१).

"कॅसपॅटिरस शहर आणि पॅक्टिाशिया (पक्थ) देश यांच्या सरहद्दीवरचे हिंदू अगदीं उत्तरेकडे रहात असून, त्यांची रहाणी बॅक्ट्रियन लोकांप्रमाणें असते. सर्व हिंदूंत हे अतिशय लढवय्ये असतात. व म्हणूनच सोनें जमविण्याचें काम त्यांच्याकडे सोंपविण्यांत येतें. हिंदुस्थानचा पूर्वभाग वालुकामय आहे. या प्रदेशाजवळच वालुकारण्य असून त्यांत कुत्र्यापेक्षां लहान व कोल्ह्यापेक्षां मोठ्या आकाराच्या मुंग्या असतात. या जमिनींत राहतात, व त्यांच्या जागेवर वारुळें वाढलेलीं असतात. या मुंग्यांनीं जमीन पोंखरून बाहेर टाक-लेल्या वाळूंत सोनें मिसळलेलें असतें. म्हणून ही वाळू मिळ-विण्याकरितां हे हिंदू तेथें जातात. प्रत्येक माणूस बरोबर तीन उंट घेतो व कडक उन्हाच्या वेळीं या मुंग्या जेव्हां निवाऱ्या-करितां जमिनींत दडून बसतात, तेव्हां त्या ठिकाणची वाळू घाईघाईनें पोत्यांत भरून तातडीनें माघारा फिरतो. कारण मुंग्यांनां लवकरच यांचा वास लागून त्या या चोरांचा पाठलाग करतात व त्यांच्या तावडींत सांपडलेल्यास त्या जिवंत ठेवीत नाहींत. अशा रीतीनें हिंदू बरेंच सोनें मिळवितात;व थोडें फार खणूनहि काढतात (३. १०२-१०६).

"पॅक्टिए (पक्थ) लोक अंगांत बकऱ्याच्या कातड्याचे झगे घालतात; त्यांचें धनुष्य एका विशिष्ट तऱ्हेचें असतें. ते लहान तरवारी वापरतात (७. ६७)."

बौद्ध संप्रदायाची स्थापना होऊन त्याचा जगावर जो परि-णाम झाला तो भारतीयांचें अतिभारतीयत्व वर्णन करतांना पहिल्या विभागांत अंशतः दाखविलाच आहे. बुद्धाचें चरित्र आणि त्याच्या संप्रदायाची स्थापना, त्या वेळेची भारतीय स्थिति आणि बौद्ध वाङ्मय यांचा परामर्श याच भागांत पण पुढें सविस्तर येईल.

"येथें एवढेंच सांगितलें पाहिजे कीं, बुद्धाचें महत्व इतकें लवकर वाढलें कीं पारशी धर्मग्रंथांत देखील त्याचा उल्लेख झाला; आणि हिरोडोटसला देखील बुद्धाच्या परिणामाचा उल्लेख करावा लागला. पारशी ग्रंथांतील उल्लेख असा:

"त्याच्या तेजाच्या व प्रभावाच्या योगानें असा मनुष्य-जन्मास येतो कीं, त्यास सभांमध्यें व बैठकींमध्यें अग्रस्थान मिळतें. तो शास्त्राचें उत्तम अध्ययन करितो व ज्ञान संपादन करून पाखंडी गौतमापरोबर वादविवादांत जय मिळवितो:—(फर्वर्दिन यस्न १०.१६)

बुद्ध आणि झरथुष्ट्र या दोहोंच्याहि संप्रदायांचा परिणाम ज्यावर झाला, व ज्याचा प्रसार यूरोपांतहि झाला त्या वर उल्लेखिलेल्या मणिसंप्रदायाची माहिती येथें देणें अवश्य आहे.

ख्रिस्ती संप्रदायांत आणि बौद्धकथांत जें सादृश्य वर्णिलें तें बहुतेक अंशीं दोघांहि संस्थापकांच्या शिष्यमंडळाच्या कृतीचें वर्णन होय. त्यांत प्रत्यक्ष येशूचा बौद्ध संप्रदायाशीं संबंध दाखविला गेला नाहीं. परंतु मणिसंप्रदायाचें तसें नाहीं. तेथें प्रत्यक्ष कबूल केलेली सर्वसंग्राहकता आहे. तेव्हां आतां मणिसंप्रदायाकडे वळूं.

**मणिसंप्रदायाचा उदय.**—इसवी सनाच्या तिसऱ्या शतकाच्या अखेरीस पश्चिम यूरोप खंडांत दोन बलाढ्य उपासनासंप्रदायांचा एकमेकांशीं झगडा चालू होता. मिथ्रो-पासना ही पूर्णांशानें इराणी होती; व ख्रिस्ती संप्रदाय हा यहुदी संस्कृतींत जन्म पावून, कांहीं इराणी संस्कृतींतील अंश त्यामध्यें आला होता. मिथ्रोपासनेचा अंमल, बाल्कन द्विपकल्प, इटाली, ऱ्हाईन नदीच्या कांठचा प्रदेश,ब्रिटन, स्पेन इत्यादि मुलुखांवर चालत असे. मुख्यतः, रोमन पलटणींतले शिपाई जेथें जात तेथें ही उपासना आपल्याबरोबर नेत असत. शिपाई लोकांनां, ते रक्तपात करून पोट भरतात म्हणून ख्रिस्ती संस्कार वर्ज असत; व त्यामुळें त्यांच्याकडून मिथ्र संप्रदायाला अनायासेंच चांगली पुष्टि मिळत असे. आत्मनिग्रह, मनोधैर्य व निःस्पृहता हीं बिंबवून अंतःस्वास्थ्य देण्याच्या कामीं हे दोन्हीहि संप्रदाय सारखेच तयार असत. पुढें चवथ्या शतकांत, मिथ्रो-पासनेवरचा लोकांचा विश्वास तिच्यांतील कथापुराणें व जगदुत्पत्तिशास्त्र यांच्या भारुडामुळें उडाला; व ख्रिस्ती संप्र-दायाच्या प्रसाराबरोबर चवथ्या शतकांत तो अंतर्धान पावला. तथापि त्याची जागा ताबडतोब कथापुराणें व जगदुत्पत्तिशास्त्र यांच्या बाबतींत तितक्याच इराणी कल्पनांनीं भरलेल्या मणिसंप्रदायानें घेतली. मणिसंप्रदायाचा प्रसार इतका झपाट्यानें झाला कीं, त्याच्या स्वीकारासाठीं मिथ्रोपासनेनें लोकांची मनोभूमिका अगोदर तयार करून ठेविलेली होती असें मानल्याशिवाय या चमत्काराचा उलगडा होऊं शकत नाहीं.

हा नवीन संप्रदाय मणीनें काढला असून त्यांतील तत्त्वें खिस्तसंप्रदाय व जुना पार्शियन मगीसंप्रदाय यांशीं जुळतात. मणिसंप्रदायाचा इतिहासकार केस्लर ह्या संप्रदायाचा उगम सेमेटिक किंवा खाल्डियापासून झाला असावा असें दाखवितो, आणि असें सिद्ध करतो कीं, असुर कथापुराणांचा पर्शूच्या द्वारें मणीच्या मनावर बराच संस्कार झाला होता.

**मणीचें चरित्र.**—मणी हा उच्च कुलांत जन्मलेला एक-बटानाचा इराणी रहिवासी होता. केस्लरच्या मताप्रमाणें तो इ० स० २१५–२१६ त जन्मला. त्याच्या बापाचें नांव फटक असें असून त्यानें मणीला काळजीपूर्वक शिक्षण दिलें होतें. फटक हा दक्षिण बाबिलोनियांतील बॅप्टिस्ट लोकांच्या पंथांत असल्याकारणानें त्याच्या मुलासहि त्याच पंथाचें शिक्षण मिळालें. या बाबिलोनी पंथाचा एके साइट, हेमिरोबॅप्टिस्ट व मॅंडिअन या दुसऱ्या पंथांशीं उघड उघड संबंध असल्यामुळें व त्यांत खिस्ती संप्रदायांतीलहि अनेक गोष्टींचा अंतर्भाव झाला असल्यामुळें मणीला लहान वयांतच निरनिराळ्या पंथांच्या स्वरूपांची ओळख झाली. वयाच्या २५ व्या किंवा ३० व्या वर्षी त्यानें आपल्या नवीन संप्रदायाच्या उपदेशास सुरुवात केली. इराणचा राजा, पहिला शांपुर याच्या दरबारींच प्रथम ही सुरुवात झाली. आपल्या धर्मप्रसारार्थ त्यानें स्वतः दूर-दूरचे प्रवास केले व आपल्या शिष्यांसहि देशपर्यटनार्थ पाठविलें. अक्टा अर्चेलाइवरून त्याची चळवळ पश्चिमेकडे खिस्ती संप्रदायाच्या प्रदेशापर्यंत जाऊन पोहोंचलेली दिसते. पूर्वेकडील ग्रंथ वगैरेवरून जी माहिती मिळते तीवरून तो ट्रॅन्स ऑक्सेनिया, पश्चिम चीन या प्रदेशांत व दक्षिणेकडे हिंदुस्थानपर्यंत आला होता असें सिद्ध होतें. ही त्याची मोहीम यशस्वी झाली. त्याच्या मागून झालेल्या महंमद पैगंबराप्रमाणें तोहि मी शेवटचा व श्रेष्ठ पैगंबर आहें, मला ईश्वरानें सर्व श्रेष्ठ धर्मसंस्थापना करण्याकरितां धाडिलें आहे वगैरे सांगत फिरे. पहिल्या शापुरच्या कारकीर्दीच्या शेवटीं (इ० स० २७०) तो इराणच्या दरबारीं परत आला. तेथें त्याचे पुष्कळ भक्त होते, पण मगी पुरोहितवर्गाचें त्याच्याशीं वाकडेंच होतें. या पुरोहितांनीं राजाशीं संधान बांधून त्याला कैद केलें. तथापि तो कैदेंतून पळाला. पहिल्या बहिरामनें त्याला धर्मवेड्या मगी लोकांच्या स्वाधीन केलें. इ० स० २७६–७७ त त्याला सुळावर चढवून ठार मारण्यांत येऊन त्याच्या अनुयायांचा निष्ठुरपणानें छळ करण्यांत आला.

**मणीनें लिहिलेले ग्रंथ.**—मणीनें पुष्कळ ग्रंथ व निबंध लिहिले पण त्यांपैकीं आतां फारच थोडे उपलब्ध आहेत. फिहरिस्तवरून पाहतां, त्यानें, सहा सिरिअक व एक पर्शियन भाषेमध्यें, असे सात महत्त्वाचे ग्रंथ लिहिले. त्यांचीं नांवें:— १. रहस्यांसंबंधीं पुस्तक; त्यांत, पूर्वेकडील खिस्ती धर्मपंथांचें विवरण व टीका आहे. २. महापुरुषां (राक्षसां ?) संबंधीं पुस्तक. ३. श्रोत्यांकरितां आदेश असलेलें पुस्तक;-त्यांत थोडक्यांत श्रेष्ठांत श्रेष्ठ व प्रमाणभूत मानलेलीं तत्त्वें दिलीं आहेत. ४. शापुरकानाविषयीं पुस्तकः—केस्लरच्या मतें हें एक शापुरराजाला लिहिलेलें पत्र आहे. ५. उद्दीपनावर पुस्तक. ६. आचाराचें ? पुस्तक (विषयअज्ञात). ७. पर्शियन भाषेंत लिहिलेला एक ग्रंथ;-त्याचें नांव फिहरिस्तमध्यें दिलें नाहीं; परंतु हें मणिसंप्रदायाचें 'पवित्र शुभवर्तमान' असावें.

**मणिसंप्रदायाचीं तत्त्वें**:-सध्यां जगांतील प्रत्येक गोष्टींत दिसणारा विसंगतपणा व त्यांतील परस्परविरोध हीं पाहून मणीच्या विचारांची दिशा बदलली. ह्या विरोधाला कारण, जगांत दोन एकमेकांहून अगदीं भिन्न अशा वस्तू असल्या पाहिजेत असें त्याचें ठाम मत बनलें. त्या दोन वस्तू म्हणजे प्रकाश आणि तिमिर ह्या असून त्यांपैकीं प्रत्येकाचें स्वतंत्र राज्य आहे. ईश्वर हा प्रकाशांतील आदि तत्त्व आहे; शिवाय "प्रकाशनभोमंडळ" व "प्रकाश धरित्री" असे प्रकाशाच्या राज्याचे दोन भाग आहेत. तिमिर राज्यांत "ईश्वर" नाहीं; व त्यांत फक्त "तिमिर धरित्री" एवढी एकच फक्त आहे. सैतान व त्याचे गण ह्या राज्यांत उत्पन्न झाले. हीं परस्परविरुद्ध असून अनादिकालापासून त्यांच्यांत वैरभाव आहे तो कायमचाच. प्रकाशराज्यांतल्या प्रकाशधरित्रीमध्यें सैतानानें जेव्हां फारच धुमाकूळ मांडला तेव्हां ईश्वरानें आदिपुरुषास निर्माण करून त्याला सर्व तयारीसह सैतानावर लढण्यास पाठविलें; पण ह्या लढाईंत आदिपुरुषाचा पराभव झाला. मग ईश्वर स्वतःच आपल्या नवीन देवदूतांसह त्यावर चाल करून गेला व त्याचा मोड करून त्यानें आदिपुरुषास बंधमुक्त केलें. तथापि या झटापटींत प्रकाशाच्या कांहीं भागांच्या जागीं तिमिराचा प्रवेश होऊन प्रकाशसंततींत तिमिराचे घटक जाऊन बसले. तेव्हां आदिपुरुषाला तिमिरोत्पत्तीची आणखी वाढ होऊं नये म्हणून पाताळांत उतरून तिमिराचीं मुळेंच कापून काढण्याशिवाय दुसरा मार्ग राहिला नाहीं. सध्यांच्या दृश्य जगांत दिसणारीं हीं प्रकाशतिमिराचीं मिश्रतत्त्वें आहेत. प्रकाशतत्त्वांच्या बंधमुक्ततेला सुरुवात म्हणजेच जगाची रचना. जग हें अनेक स्वर्ग व अनेक धरित्री मिळून बनलेलें आहे. सूर्य व चंद्र यांत बंधमुक्त होत असलेला प्रकाश सांठवून ठेविलेला असतो. सूर्यमंडळाच्या बारा राशींचें एक मोठें चक्र, जगापासून मुक्त झालेला प्रकाश बादल्यांनीं सूर्यचंद्रांत भरीत असतें. येथें तो शुद्ध होऊन, ईश्वराशीं संलग्न होतो.

जगाची घटना हें चांगल्या देवदूतांनीं केलेलें काम आहे. पण मनुष्योत्पत्तीशीं मात्र तिमिराधिपतींचा संबंध येतो. हें ही संप्रदायाचें म्हणणें निराशावादीपणाचें द्योतक आहे. सैतानानें पाप, कामुकता, लोभ इत्यादि विकारांबरोबर पहिला मनुष्य आदम याची उत्पत्ति केली. तिमिर पिशाच्चानें या पहिल्या मनुष्यांत स्वतः चोरून घेतलेला प्रकाशाचा सर्व अंश, त्याला (प्रकाशाच्या अंशाला) चांगलें कह्यांत ठेवतां यावें म्हणून घातला. ह्या योगानें त्याच्यांत विसंगतपणा आला. ईव्हला या पहिल्या मनुष्याची सहचारिणी करण्यांत आलें.

ती कपटी व विषयलोलुप होती, तरी तिच्यांत थोडा प्रकाशस्फुलिंग होता. येशूसारखे चांगले देवदूत पहिल्यापासूनच मनुष्यांनां ह्या सैतानी राज्यांतून मुक्त होण्याचा उपदेश करीत. आदमला त्यांनीं विषयपराङ्मुख करण्याविषयीं खटपट केली पण तो अखेरीस विषयेच्छेला बळी पडला. केन व एबेल हे आदमचे पुत्र नसून ते ईव्हला सैतानापासून झालेले मुलगे आहेत. प्रकाशमय सेथ मात्र आदम व ईव्ह यांचा मुलगा आहे. ह्याप्रमाणें निरनिराळ्या व्यक्तींत प्रकाशाचें निरनिराळें प्रमाण असलेली मनुष्यजात अस्तित्वांत आली. परंतु आरंभापासून सरसकट पुरुषवर्गांत हें प्रमाण स्त्रीवर्गापेक्षां जास्त होतें. दानव मनुष्याला वाईट मार्गाकडे नेत तर देवदूत त्याला चांगला मार्ग दाखवीत व शुद्ध प्रकाश मिळवून देण्याची तजवीज करीत. ह्याच कारणाकरितां, पैगंबर व खऱ्या ज्ञानाचे उपदेशक आदम, नोहा, अब्राहाम वगैरेंचा अवतार होता. माझाहि अवतार त्याचकरितां आहे असें मणी म्हणत असे. जेव्हां प्रकाशाचीं तत्त्वें जगापासून पुरतीं मुक्त होतात तेव्हां सर्व वस्तूंचा विनाशकाळ प्राप्त होतो. देव, देवना, देवदूत हे सर्व एकत्र जमतात, जग वर उचलून धरणाऱ्या देवता भार खालीं ठेवतात व प्रत्येक गोष्टीचा अंतकाळ प्राप्त होतो. जग भयंकर आगीच्या डोंबांत जळून खाक होतें व पुन्हां पूर्वीप्रमाणें दोन राज्यें अगदीं निरनिराळीं होतात. वर अगदीं उंच पुन्हां पूर्णत्वास पोंचलेलें प्रकाशाचें राज्य व खालीं खोल निर्बल झालेलें तिमिराचें राज्य—गाढ अंधकार.

**मणिसांप्रदायी लोकांची आचारनीति, समाजघटना व उपासनापद्धति.**—मणिसंप्रदायी नीतिशास्त्र नुसतें निषेधात्मक स्वरूपाचें नाहीं. त्याचा उद्देश आत्मविनाश नसून आत्मसंरक्षण हा आहे. तथापि तें निवळ तपस्वीवृत्ति शिकविणारें आहेसें दिसतें. ह्या संप्रदायांतील लोकांनां विषयसुखापासून परावृत्त रहावें लागे. (१) कोणत्याहि तऱ्हेचें वाईट अन्न (याला वनस्पत्याहार अपवाद असे, कारण वनस्पतींच्या ठायीं जास्त प्रकाश असतो), मांस, दारू यांचें सेवन करावयाचें नाहीं; (२) तिमिरतत्त्वें ज्यांत आहेत अशा गोष्टींशीं संबंध ठेवावयाचा नाहीं; (३) व कोणत्याहि प्रकारें विषयेच्छातृप्ति करावयाची नाहीं (अर्थात् विवाहसंमत नसे); अशीं हीं तीन व्रतें पाळावीं लागत. कांहीं राशीनक्षत्रादिकांच्या योगांवर त्यांनां उपवास करावा लागे. त्यांनां दिवसांतून चार वेळां स्नान करून प्रार्थना करावयाची असे. प्रार्थनेच्या वेळीं प्रकाश जिकडे असेल तिकडे तोंड वळवून प्रकाशाधिपति ईश्वर, प्रकाशाचें संपूर्ण राज्य, तेजोमय देवता व मणी यांची त्यांनां आराधना करावी लागे. मणिसंप्रदायाची ही अशा प्रकारची कडक व तापदायक तपस्या फार थोडे लोक पाळतील व त्या संप्रदायाची वाढ होणार नाहीं म्हणून दोन पंथ काढण्यांत आले. एक तंतोतंत ह्या संप्रदायाप्रमाणें चालणाऱ्या लोकांचा व दुसरा प्रापंचिक लोकांचा. प्रापंचिकांकरितां धर्मशास्त्रांत बरीच सोडवणूक ठेवण्यांत आली. हे दोन पंथ करण्यांत ह्या संप्रदायाचें कॅथोलिक संप्रदायाशीं सादृश्य आहे. दुसऱ्या पंथांतील लोक पहिल्या पंथांतील लोकांनां गुरुस्थानीं मानून त्यांच्याकडून धर्मशिक्षण घेत असत. याच्या मोबदला ते त्यांनां भरपूर अन्नदान करीत असत. कारण ते लोक अन्न खाऊन वनस्पतींत असणाऱ्या प्रकाशास स्वातंत्र्य देतात अशी समजूत होती. हे सांप्रदायिक नियमानुसार चालणारे प्रापंचिक लोकांकरितां ईश्वरापाशीं प्रार्थना व रदबदली करीत असत; व यामुळें मरणानंतर त्यांच्यावर होणाऱ्या विशुद्धीकरणक्रियेंतील बराच भाग कमी होत असे.

या लोकांची उपासनापद्धति फार साधी असली पाहिजे असें दिसतें; गीत, प्रार्थना, स्तोत्रें व पूजापद्धति एवढेंच काय तें असावें. ह्या संप्रदायांतील निदान पश्चिमेकडच्या तरी लोकांनीं ख्रिस्ती देवालयांची सण पाळण्याची पद्धति स्वीकारली असावी. हे लोक कांहीं विशिष्ट सण साजरे करीत. मुख्यत्वेंकरून" मार्च महिन्यांत मणीच्या मृत्यूची तिथि पाळण्यांत येत असे तो बीमा नांवाचा अध्यापकपीठाचा सण सर्व जातींतील लोक साजरा करीत असत.

**अर्वाचीन संशोधन.**—एफ. क्युमॉंट ह्यानें मणीच्या मूलाधारभूत कथेंतील निदान एक तरी कथा अवेस्तावरून घेतली असली पाहिजे, असें दाखविलें आहे. मणिसंप्रदायी स्तोत्रें, प्रार्थना वगैरे कांहीं ग्रंथ पूर्व तुर्कस्थानांत तुर्फान येथें नुकतेच सांपडले आहेत; त्यांत आपला पंथ हा ख्रिस्ती व जुन्या मगी पंथांचें मिश्रण आहे असें मणीनें स्वतः कबूल केलेलें आढळतें. ज्याप्रमाणें हिब्रू धर्मग्रंथ हे ख्रिस्ती संप्रदायास मूलभूत झाले, त्याचप्रमाणें मणीच्या नवीन संप्रदायाचीहि अवेस्तावर उभारणी केली गेली. ह्या नवीन सांपडलेल्या कागदपत्रांत, एके ठिकाणीं मणीनें असें म्हटलें आहे कीं, आकाशांतलि बापाच्या ठिकाणीं भक्ति ठेवणारा ईश्वराचा मित्र जो येशू त्यानें मला धर्मप्रसारार्थ पाठविलें आहे.

**मणिसंप्रदाय आणि ख्रिस्तीसंप्रदाय.**—ख्रिस्ती संप्रदायाविषयीं मणीचें ज्ञान कितपत होतें, त्या संप्रदायाचा त्यानें कितपत उपयोग केला व कोणत्या मार्गांनीं त्याला तसें करतां आलें, हें ठरविणें फार कठिण आहे. एवढें मात्र सांगतां येईल कीं, कॅथोलिक पंथांतून त्यानें आपल्या संप्रदायाकरितां कांहींएक उचलिलें नाहीं. बॅसिलिडी, मार्शनाईटी यांसारख्या शाखांतून प्रतिपादिलीं जाणारीं तत्त्वें तोच खरा ख्रिस्ती संप्रदाय व इतर संप्रदायांशीं तुलना करतां हाच महत्त्वाचा व टिकाऊ संप्रदाय होय, असें त्याचें मत होतें. ह्या ख्रिस्ती संप्रदायापासून त्यानें 'पर्वतावरील व्याख्यानें' व इतर कांहीं गोष्टी घेतल्या आहेत. मार्शनाइटी संप्रदायाचाहि त्याच्या मतांवर कांहींसा पगडा बसला होता. गॉस्पेलमधील ऐतिहासिक मजकुराच्या कांहीं भागाचें त्यानें आपल्या मतांना साजसशा रीतीनें उद्घाटन केलें आहे.

**मणिसंप्रदाय व बौद्धसंप्रदाय.**—ज्या अर्थी मणीनें हिंदुस्थानापर्यंत लांबलांबचे प्रवास केले होते त्या अर्थी बौद्ध संप्रदायाचें ज्ञान त्यास असलें पाहिजे. केम्लरच्या म्हणण्या-प्रमाणें, मणीनें निदान नीतिशिक्षणाच्या कामीं तरी बुद्धाच्या उपदेशाचा उपयोग केला होता. मणीनें स्वतः लिहि-लेल्या ग्रंथांत बुद्धाचें नांव आढळतें, यावरून तो नवीन संप्रदाय स्थापन करण्यांत गुंतला होता तेव्हां त्याचें लक्ष्य बौद्धसंप्रदायाकडेहि गेलें असेल असें वाटतें. मणिसंप्रदाय हा उघडउघड सर्वसंग्राहक होता. मणीचा ख्रिस्तीसंप्रदायाशीं संबंध वर व्यक्त करण्यांत आलाच आहे. मणीनें झरथुष्ट्राला देव-दूतांत अंतर्भूत केलें आहे, तर बुद्धास ईश्वरी संदेशाचा निवेदक म्हटलें आहे. परंतु कांहीं बाबतींत त्याचें झरथुष्ट्र संप्रदायापेक्षां बुद्धसंप्रदायाशीं अधिक साम्य दिसतें. जगांतील वाईट गोष्टींचें निर्मूलन करणें हें झरथुष्ट्राचें ध्येय होतें, तर मणीचें ध्येय बुद्धाप्रमाणेंच जगांतील चांगल्या गोष्टींची जोपासना करणें हें होतें. बौद्ध संप्रदायाप्रमाणें मणिसंप्रदायां-तहि, हिंसा निषिद्ध मानली होती तरी दुसऱ्यांनें मारलेल्या पशूचें मांस खाण्यास हरकत नव्हती. या व इतर सादृश्यांवरून मणीचा व बुद्धाचा संप्रदाय यांत जें कोठें साम्य दिसतें तें चुकून आलेलें असेल व बौद्धसंप्रदायापासून मणीनें मुळींच कांहीं घेतलें नाहीं हें जें ब्रिटानिकाकाराचें विधान आहे त्यांत विशे-षसें तथ्य असेलसें दिसत नाहीं.

**मणिसंप्रदायाचें रहस्य.**—ह्या संप्रदायाचा जो इतक्या जलद प्रसार झाला व मुख्य मुख्य संप्रदायांमध्यें यानें स्थान पटकाविलें यांतील मर्म काय असा साहजिकच प्रश्न उद्भवतो. जुन्या कथापुराणांची सडेसोट जड द्वैतवादाशीं, जी यानें सांगड घालून दिली तिच्या योगानें या संप्रदायाला चांगला खंबीरपणा आला; शिवाय त्यांतील शिस्तवार नीतितत्त्वें व साधी मानस-पूजा हीं या जुन्या जगांत उद्भवलेली नूतन आकांक्षा तृप्त करण्यास कारणीभूत झालीं. ह्या संप्रदायास बळकटी येण्याचें दुसरें कारण, समाजाला सोइस्कर होईल अशी मणीनें आपल्या संस्थेंत केलेली सुव्यवस्था, हें होय. ज्ञानी व अज्ञानी, प्रापंचिक व पारमार्थिक वगैरे सर्व प्रकारच्या लोकांस यांत वाव असे व जरूरीपेक्षां कोणावरहि जास्त कांहीं लादलें जात नसे. अशा रीतीनें मुळापासून वैयक्तिक गरजा भागविण्याकडे लक्ष ठेविलें गेलें होतें व वेळोवेळीं बाह्य तत्त्वांचा अंगीकार करण्यासाठीं विश्वव्यापी संप्रदायाच्या ठिकाणीं लागणारा सुज्ञ-पणाहि याच्या घटनेंत होता. दुसऱ्या तिसऱ्या शतकांत मानवजातीला अतिशय डोईजड वाटणारा असा हा चांगल्या-वाइटासंबंधीं प्रश्न मणिसंप्रदायानें दिसण्यांत गहन पण सोप्या व सोइस्कर रीतीनें सोडवून दिला, इतकें सांगितलें असतां ह्या संप्रदायाची वाढ इतक्या झपाट्यानें कशी झाली याचें आश्चर्य वाटणार नाहीं.

**मणिसंप्रदायाचा थोडा इतिहास.**—हा संप्रदाय पहिल्यानें पूर्वेकडे इराण, मेसापोटेमिया व ट्रॅन्सआक्सियाना ह्या देशांतून चांगला रुजला गेला. मणिसंप्रदायाच्या मुख्य धर्मगुरूचें पीठ पहिल्यानें पुष्कळ शतकेंपर्यंत बाबिलोन येथें होतें, व नंतर तें समरकंद येथें गेलें. मुसुलमान लोकांच्या स्वाऱ्या होत असतांना व इस्लामी धर्माचा सर्वत्र विजय होत असतांना देखील या संप्रदायाचे अनुयायी वाढत होते. त्याचीं मतें व शिस्त यांत पूर्वेकडे फारसा बदल झाला नाहीं. दहाव्या शतकाच्या अखेरीस म्हणजे ज्या वेळीं फिहरिस्त हा ग्रंथ लिहिला गेला त्या वेळीं इराणांतील व मेसापोटेमियांतील शहरांतून पुष्कळसे मणिसंप्रदायी लोक हांकून लावले गेले होते. तथापि तुर्कस्थानांत व चीनच्या सरहद्दीपर्यंत बरीच मणिसंप्रदायी लोकांची वस्ती होती. बहुतकरून मांगोल जातीच्या टोळ्यांचीं जीं आगमनें झालीं, त्यांयोगानें मध्य-आशियांतील मणिसंप्रदाय पहिल्यानें बुडाला. तरी पण पंधराव्या शतकांत हिंदुस्थानांतील मलबार किनाऱ्यावर, थामस—ख्रिस्ती लोकांशेजारीं मणिसंप्रदायी लोक रहात अस-ल्याचा पुरावा सांपडतो. इ. स. २८० च्या सुमारास मणि-संप्रदाय पहिल्यानें ग्रीक–रोमनराज्यांत घुसला. चवथ्या शत-कांत रोमन राज्यांत ह्याचा फार झपाट्यानें प्रसार झाला. निदान पश्चिम देशांत तरी ह्यांतील वादविवादपद्धति व ह्यानें केलेलें कॅथोलिक धर्माचें गुणदोषविवेचन यामुळें त्याची बाजू बळकट राहिली. जुना करार हा बुद्धिमान् वाचकाला कुचकळयांत पाडून त्याच्या मार्गांत बरेच अडथळे आणतो, व आमचा हा संप्रदाय म्हणजे केवळ जुना करार वगळून राहि-लेला ख्रिस्ती संप्रदायच आहे असें ह्या संप्रदायातर्फे जाहीर करण्यांत आलें होतें. अशा रीतीनें, पश्चिमेकडे गेलेल्या मणि-संप्रदायी लोकांनीं आपल्या धर्मशिक्षणाला ख्रिस्ती मुलामा देऊन तें पाश्चात्त्य लोकांनां सुलभ व प्रिय वाटेल असें बनविलें. जसजसा हा संप्रदाय वाढत गेला तसतशीं यांत ख्रिस्ती संप्रदायाचीं तत्त्वें व उच्च तत्त्वज्ञान अधिकाधिक शिरलें. उत्तर आफ्रिकेंत तर ह्याचे फार अनुयायी होते; धर्मगुरूंचें सुद्धां चोरून मारून ह्यास पाठबळ होतें.

रोममध्यें जेव्हां ह्या संप्रदायाचें बंड फार माजलें तेव्हां तेथील बादशहांनीं ह्याविरुद्ध कडक कायदे केले. उत्तर-आफ्रिकेंतहि हा संप्रदाय पुढें हळू हळू नाहींसा होत गेला. सारांश, हा संप्रदाय–मूळचा इराणचा रहिवाशी मणी यानें स्थापलेला शुद्ध संप्रदाय नव्हे तर ख्रिस्ती संप्रदायाच्या वर्च-स्वानें फेरबदल झालेला मणिसंप्रदाय—कॅथोलिक पंथाबरो-बर तेराव्या शतकापर्यंत राहिला; व पुढें पार नाहींसा झाला.

**ससन घराण्याचा नाश होईपर्यंतच्या इतिहासाचें सामान्य पर्यालोचन.**—सध्यां आप-ल्याकडे इराण शब्द प्रचलित आहे तर यूरोपांत पर्शिया हा शब्द प्रचलित आहे. इराण शब्दाचा "आर्य" शब्दाशीं अन्वय लावण्यांत येतो आणि पर्शिया शब्दाचा पारशी शब्दाशीं अन्वय आहे. पारशी हा अर्वाचीन शब्द आपणांस परिचित आहेच, पण प्राचीनकाळींहि या लोकांचे वाचक संस्कृत

वाङ्मयांतील शब्द पारसीक व पर्शु हे होते. पर्शियाचा खरा अर्थ पर्शियन नामक लोकांच्या वस्तीचा प्रदेश. म्हणजे पूर्वी " पर्सिस " नांवानें व अर्वाचीन काळीं " फार्स " नांवानें परिचित असलेला जिल्हा असा आहे. तथापि रूढीमुळें इराणी डोंगरपठाराच्या सर्व प्रदेशाला या नांवानें संबोधण्यांत येतें. इराणचें साम्राज्य म्हणजे आजच्या इराणच्या मर्यादेंत रहाणारे लोक हें प्राचीन काळींच राष्ट्र असून, त्या राष्ट्राचें साम्राज्य असा अर्थ मुळींच करतां येणार नाहीं. ज्या काळाविषयीं आपण बोलत आहों त्या काळीं आजचें इराण हें राष्ट्र नव्हतें, तर त्या प्रदेशांत अनेक राष्ट्रजाती होत्या. त्यांपैकीं एखादी जात कधीं प्रबल होई आणि ती प्रथम इराणावर आणि नंतर इराणाबाहेरील राष्ट्रांवर स्वामित्व गाजवी. पुष्कळ यूरोपीयांची अशी समजूत आहे कीं, इराण हें राष्ट्र मोठें होतें व त्यानें ग्रीकांस चिरडण्याचा प्रयत्न केला तो अयशस्वी झाला. यावरून ते इराणचें भीरुत्व आणि यूरोपीयांचें शौर्य स्थापन करूं पहातात. इराणविषयक वस्तुस्थिति अशी दिसते कीं, प्राचीन काळीं सर्व जगांतील इराणी लोकांची संख्या कदाचित् ग्रीकांपेक्षांदेखील बरीच कमी असेल. एका लहानशा जातीनें केवळ सुसंघटित घटनेच्या जोरावर तत्कालीन जग पादाक्रांत केलें हें लोक विसरतात.

मॅराथॉन थर्मापिली वगैरे लढाया ज्या युद्धांत होऊन त्यांत इराणास माघार घ्यावी लागली त्या युद्धासंबंधाचे आधारग्रंथ ग्रीक असल्यामुळें त्यांत अतिशयोक्ति झाली असणें स्वाभाविक आहे. इराण हें राष्ट्र स्वभावतःच दुर्बल असतें तर ग्रीकांस पादाक्रांत करणाऱ्या रोमन साम्राज्याचें दोनशें वर्षें युद्ध करीत असताहि त्यापुढें कांहींच कसें चाललें नाहीं? रोमन पातशहा एकामागून एक ज्या इराणचे कैदी म्हणून पकडले गेले तें राष्ट्र दुर्बल किंवा भीरू लोकांचें असणें शक्य नाहीं. इराणी पातशाहीमुळें पूर्व आणि पश्चिम यांचा संबंध उत्पन्न झाला. पूर्व व पश्चिम यांमध्यें मोठया प्रमाणावर संबंध घडवून आणणारी शासनसंस्था या दृष्टीनें इराणला अग्रपूजेचा मान दिला पाहिजे.

**प्राचीन इराणच्या इतिहासाचीं साधनें:**—इराणी लोकांचा इतिहास आपणांस संपूर्ण द्यावयाचा म्हणजे पर्शुभारतीय कालापासून सुरुवात केली पाहिजे. पर्शुभारतीय कालापासून हिरोडोटसनें उल्लेखिलेल्या सायरस किंवा कुरुसपर्यंत इतिहास अज्ञात आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. फर्दुसीनें शहानाम्यांत दिलेल्या प्राचीन कथा व पारशांचे धर्मग्रंथ एवढेंच त्या कालाविषयीं साहित्य आहे. जर इराणामध्यें पुराणवस्तुसंशोधनपर सुसंघटित पहाणी झाली तर तेथें कदाचित् बरेंच भौतिक अवशेषरूपी साहित्य सांपडण्याचा संभव आहे. या पर्शुभारतीय कालापासून सायरसपर्यंत पसरणाऱ्या दीर्घ कालांतील इतिहास इतका तुटकलेला आहे कीं, त्यास जोडणारे धागेहि फारसे शिल्लक नाहींत. आज जो इतिहास म्हणून आपल्यापुढें मांडला जातो त्यांतील अत्यंत प्राचीन नांव अहिदहक हें होय. त्याचा अहिदास शब्दाशीं संबंध स्पष्ट आहे, आणि तो संबंध पर्शुभारतीय काल व सायरसच्या पूर्वीचा ऐतिहासिक कथाकाल यांतीलच केवळ नव्हे, तर आजच्या लोकवस्तीपैकीं एका जातीच्या नांवाशीं संबंध जोडणारा दुवा आहे. इराणाच्या इतिहासाच्या स्थूल मांडणीसाठीं इराणांतील वसाहतकालाच्या पूर्वीपासून सुरुवात केली पाहिजे.

**प्राचीन इराणी इतिहासाचे कालविभाग आणि त्यांचे अवशेष.**—प्राचीन इराणी इतिहासाचे स्थूलमानानें पुढें दिल्याप्रमाणें चार कालविभाग पाडतां येतील:—

(१) पहिला काल.—हा पर्शुभारतीय काल होय. या कालाची माहिती मागच्या विभागांत दिलीच आहे. हा काल म्हणजे प्राचीन इराणी लोकांचे आणि वेदभाषी लोकांचे पूर्वज जेव्हां एकत्र होते तो काल. या कालाचा अभ्यास करण्याचीं साधनेंहि मागें वर्णिलींच आहेत. (१) शब्दसादृश्यें व (२) सदृश कथा हीं तीं कारणें होत. या अभ्यासाचें फलहि मागें दिलेंच आहे.

(२) दुसरा काल.—हा वसाहतकाल होय. या कालाचा अभ्यास अजून शिस्तवार कोणीं केला नाहीं. निरनिराळ्या प्राचीन भाषांच्या स्थानांकडे लक्ष देऊन आणि प्राचीन भाषांतील शब्दांची आणि वाक्यरचनेची स्थिति तपासून निरनिराळ्या लोकांचे संयोग किंवा विसंयोग कसे झाले हें काढलें पाहिजे. हें काम अजून झालें नाहीं. आणि याचें कारण पार्थिआ वगैरे ठिकाणच्या भाषांचे अत्यंत जुने लेख सांपडले नाहींत. या तऱ्हेच्या अभ्यासास आज कितपत क्षेत्र आहे हें सांगतां येत नाहीं. निरनिराळ्या ठिकाणीं आजच्या काळांत ज्या राष्ट्रजाती दिसतात त्यांचें स्थान आणि त्यांच्या भाषा यांची कितपत संगति लावतां येईल हा अभ्यास करण्याजोगा आहे. पण तसा अभ्यास करण्यास आजच्या इराणाची विशेषेंकरून तेथील ग्राम्य भाषांची पहाणी करावी लागेल. स्थानिक ग्राम्य भाषांचा अभ्यास वाढला म्हणजे वसाहतकालावर विशेष प्रकाश पडेल.

(३) तिसरा काल.—हा पौराणिक काल होय. यांत सायरसच्या पूर्वीचे प्राचीन राजे अंतर्भूत होतात. या कालासंबंधाच्या आठवणी शहानाम्यांत पुष्कळ आहेत. दुसऱ्या व तिसऱ्या कालावर पुराणवस्तुसंशोधनार्थ शिस्तवार पहाणी अधिक प्रकाश पाडूं शकेल.

(४) चवथा काल.—म्हटला म्हणजे अकिमिनियन घराण्याचा काल होय. हाच इराणच्या सत्तावर्धनाचा खरा काल आहे. या कालाचे अवशेष आज इराणांत पुष्कळ शिल्लक आहेत. ते ग्रीक साहित्यास पुरवणीदाखल उपयोगी पडतात. या कालाचा विस्तार ख्रि. पू. ५५८ पासून ३३० पर्यंत आहे. हिंदुस्थानच्या ऐतिहासिक कालाशीं तुलना करावयाची झाल्यास याला बुद्धापासून मौर्योदयापर्यंतचा काल म्हणतां येईल. आज या कालाचीं मुख्य साधनें ग्रीक आहेत.

(५) पांचवा काल.—हा ग्रीक सत्तेचा काल होय. यावर ग्रीक साहित्य उपलब्ध आहेच. हा काल खि. पू. ३३० पासून खिस्तपूर्व २४८ पर्यंत आहे. हिंदुस्थानच्या इतिहासांत हा ऐन मौर्यकाल होय.

(६) सहावा काल.—हा पर्शूंचे बंधू जे पृथु त्यांच्या प्रामुख्याचा काल. या पार्थिअन राजांची कारकीर्द खि.पू. २४८ पासून खिस्तोत्तर २२९ पर्यंत होती. म्हणजे ज्या कालांत मगधप्रामुख्यास भारतांत उतरती कळा लागून पुढें आंध्रांचा उदय होऊन आंध्रांचाहि पाडाव झाला तो हा काल होय.

(७) सातवा काल.—हा काल म्हटला म्हणजे सस्सन राजांचा म्हणजे चवथ्याकालाप्रमाणेंच कट्टया इराणी राजांचा काल होय. याची कालमर्यादा. खिस्तोत्तर २२६पासून ६३० पर्यंत आहे.

हिंदुस्थानांत या कालांत प्रथम अराजक, मग लहान लहान संस्थानें आणि शेवटीं उत्तरेस हर्षवर्धनाचें आणि दक्षिणेंत सत्याश्रय पुलकेशीचें अशीं साम्राज्यें झालीं.

येणेंप्रमाणें प्राचीन इराणच्या इतिहासाचे सात काल पडतात. या कालानंतर तेथें मुसुलमानी सत्ता स्थापन झाली.

वरील सात कालांपैकीं पर्शुभारतीय कालावर पूर्वी सविस्तर माहिती दिलीच आहे. वसाहतकालाविषयीं माहिती देतां येत नाहीं. तिसरा काल जो पौराणिक तो सायरसच्या कारकीर्दीस प्रारंभ होतांच संपला असें म्हणण्यास हरकत नाहीं. सायरसच्या पूर्वीच्या उपर्युक्त अज्ञात कालाचा इतिहास जरी देतां येत नाहीं, तरी इराणच्या लोकसमुच्चयाचे घटक, त्यांचा इतिहासाशीं संबंध आणि वसाहतकालावर प्रकाश पाडील अशी थोडीशी माहिती येथें देतों.

**प्राचीन इराणी इतिहासाचीं साधनें.**—ग्रीक लोकांनीं इराणी राज्याचा इतिहास वारंवार लिहिला होता. आज उपलब्ध असलेला अतिशय पुरातन ग्रंथ हिरोडोटसचा आहे. या ग्रंथांत खि.पू.४७९ पर्यंतच्या काळाविषयीं विपुल व महत्त्वाची माहिती आहे. ही माहिती अंशतः ऐकीव दंतकथा व अंशतः प्रत्यक्ष ज्ञान या दोन साधनांपासून गोळा केली आहे.

हींत दंतकथा पुष्कळच आहेत, पण पुष्कळ माहिती प्रत्यक्षमूलक असल्यामुळें उपयोगी आहे. उदाहरणार्थ साम्राज्याचे प्रांत, त्यांची व्यवस्था, राजकीय रस्ते, क्सर्क्सीझच्या सैन्यांतील निरनिराळ्या राष्ट्रांचे लोक यांविषयीं माहिती खरी समजण्यांत येते. हिरोडोटसच्या ग्रंथांत ऐतिहासिक प्रसंग वर्णन करतांना देखील सायरस व क्रीसस यांच्या गोष्टी व बाबिलोन जिंकणें यांसारखे काल्पनिक भाग आहेतच. चाळीस वर्षांनंतर (खि.पू. ४९०) 'मोठ्या' राजाच्या नोकरींत सतरा वर्षें (खि. पू. ४१४–३९८) असलेला नायडसचा वैद्य टीसिअस यानें इराणी इतिहासावर मोठा ग्रंथ रचला. फोशिअसमधील उतारा व इतर असंख्य त्रोटक वर्णनें यांवरून या ग्रंथाची आपणांस माहिती मिळते. हिंदुस्थानावर हिंदुस्थानच्या इतिहासाच्या दृष्टीनें कुचकामाची पण हिंदुस्थानासंबंधानें ग्रीक कल्पनांची द्योतक माहिती देणारा ग्रंथकार हाच होय. हिरोडोटसपेक्षां टीसिअसला इराणी मतें व संस्था यांची जास्त स्पष्ट माहिती होती; व त्याला स्वतःला ठाऊक असलेल्या गोष्टींविषयीं लिहितांना तो फार उपयुक्त माहिती देतो. उलट पक्षीं पुरातन कालासंबंधींच्या त्याच्या लेखांत मात्र हिरोडोटसच्या काळापासून त्याच्या काळापर्यंत दंतकथा किती निकृष्टावस्थेस पोंचल्या हें चांगलें दिग्दर्शित होतें. या कालासंबंधांची त्याची माहिती कांहीं तुरळक गोष्टींतच तिचा सावधगिरीपूर्वक उपयोग केल्यास कामास पडूं शकते. कॉलोफॉनच्या डायनॉनचा मोठा ग्रंथ याहिपेक्षां जास्त महत्त्वाचा होता. सायमीचा हेराक्लायडीझ याच्या ग्रंथामधील कांहीं विधानें विशेषतः इराणी संस्थांविषयीं महत्त्वाची माहिती देतात. याशिवाय इतर ग्रीक इतिहासकारांचा (थ्युसिडिडीझ, एफोरस, थीओपॉम्पस वगैरे, व अलेक्झांडरसंबंधीं इतिहास ) व सर्वांत महत्त्वाचा म्हणजे 'ॲनॅबॅसिस हेलेनिकामधील' झेनोफनचा आधार आहे. सायरोपीडिआ ग्रंथ फारशी मदत करीत नाहीं. हा ग्रीक संस्थांसंबंधीं एक नीतिपर अद्भुतकथात्मक ग्रंथ असून इराणी राज्याविषयीं खरी हकीकत या ग्रंथांत क्वचितच सांपडूं शकेल यहुदी साधनांपैकीं, एझरा व नीहेमायस यांचे समकालीन ग्रंथ व बऱ्याच अलीकडील एसटरच्या अद्भुत कथांतील विधानें थोडीं विशेष महत्त्वाचीं आहेत. बिरोससच्या बाबिलोनच्या इतिहासांत बरीच महत्त्वाची व विश्वसनीय माहिती होती, परंतु यापैकीं जवळ जवळ कांहीं एक शिल्लक राहिलेलें नाहीं. अकिमिनियन कालच्या इतिहासाची स्वदेशीय दंतकथांस पूर्ण विस्मृति झाली असली पाहिजे असें दिसतें.

**इराणी वसाहतीचाकाळ.**—हा काळ अद्यापि निश्चयात्मक रीतीनें ठरवितां येत नाहीं. तथापि तो खिस्तपूर्व तीनचार हजार वर्षें धरला तरी वावगें होणार नाहीं. खिस्तपूर्व १५०० च्या अमर्ना लेखामध्यें अनेक आर्यन् नांवें दृष्टीस पडतात. अर्तमन्य, अर्शवीय, शुवर्दात, शिवाय 'वर्झन' हा अंत्य असलेलें एक नांव, दशरत्त हीं सर्व नांवें आर्यन् वंशाचें इजिप्तपर्यंत गमन दाखवितात. खिस्ती शकापूर्वी इराणी लोक या काळाच्या सुमारास पश्चिमेस बरेच लांब पसरलें असून त्यांचे व्यापारी नायक मेसापोटेमिया व सिरिया या देशांत जाऊन पोंचले होते; व त्यांनीं तेथें राज्यें स्थापलीं होतीं हें आज स्पष्ट आहे. तिसऱ्या विभागांत पर्शूंच्या संबंधानें प्राचीन माहिती आलीच आहे. त्यावरून सुदासच्या मदतीला वेदपूर्व कालींच ते आले होते असें दिसून येईल. इराणांत जाती अनेक असल्या तरी विशेष कर्तृत्वानें पुढें आलेल्या जाती म्हटल्या म्हणजे पृथु, पर्शु, मग व मांड (संस्कृत ग्रंथकारांनीं उल्लेखिलेल्या मेदांशीं यांचा संबंध असेल काय? ) या होत. इराणतर्फे प्रामुख्य घेऊन पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे संबंध उत्पन्न करणाऱ्या याच जाती होत.

मीड किंवा मिडी यांचा संबंध पश्चिमेकडे येतो. दुसरा शॅल्मानीझर या असुरी राजानें मीड लोकांशीं ख्रि. पू. ८३६ या वर्षी लढाई केली होती व त्यानंतर पुढें मीड लोकांचा उल्लेख असुरी इतिहासांत आढळतो. ख्रि. पू. ७१५ मध्यें सारगॉन यानें अनेक मीड संस्थानिकांपासून खंडणी वसूल केली होती. त्यानें दिलेल्या या संस्थानिकांच्या नांवांपैकीं जीं २३ आज उपलब्ध आहेत त्यांतील बहुतेक सर्व निःसंशय इराणीच दिसतात. अर्थात् मीड लोक हे इराणीच असले पाहिजेत हें उघड आहे. मीड लोकांसंबंधीच्या असुरी आधारांवरून इराणी लोक इराणच्या पश्चिमेस ख्रि. पू. ९०० च्या अगोदरच जाऊन पोहोंचले असावेत हें स्पष्ट दिसून येतें.

**इराणी लोकांच्या जाती**—इराणच्या आर्यन् भाषा बोलणाऱ्या लोकांच्या असंख्य जाती आहेत. दरायसच्या शिलालेखांच्या आधाराप्रमाणें मुख्य जाती पुढें दिल्याप्रमाणें आहेतः—

१. वायव्येकडील मीड नामक लोक. त्यांपैकीं कांहींचा उल्लेख अवेस्तांत आढळतो ( मओघि = मग ).
२. दक्षिणेंतील पर्शियन ( पर्श )लोक.
३. कास्पियन समुद्राच्या पूर्व कोपऱ्यांतील आस्त्राबाद जिल्ह्यांतील हिर्कानियन लोक.
४. खोरासनमधील पार्थियन लोक.
५. आरियस (हेरी-रुड) नदीजवळील आरियन ( आर्यन् ) लोक.
६. वायव्य अफगाणिस्थानांतील ड्रान्गियन लोक.
७. कंदाहार भोंवतालच्या हेलमंड नदीप्रदेशांतील आराकोशिअन लोक.
८. हिंदुकुश पर्वताच्या उत्तर बाजूचे बॅक्ट्रियन लोक. यांची राजधानी बॅक्ट्रा अर्वाचीन बल्ख होती.
९. ऑक्सस व झक्झार्टिस नद्यांमधील डोंगराळ प्रदेशांतील सोग्डियन लोक.
१०. खिव देशांतील खोरॅस्मियन लोक.
११. मार्गस (-मुर्घाब ) नदीवरील मार्गियन लोक.
१२. सागर्टियन लोक—इराणी भाषा बोलणाऱ्या फिरत्या घोडेस्वार लोकांची एक जात.
१३. तुर्कस्थानच्या पठारांवरील तुराण व तुराणी लोक.
१४. याशिवाय लुरी वगैरे हिंदुस्थानी लोकांशीं अधिक सदृश लोकांचाहि उल्लेख केला पाहिजे.

इराणी व हिंदू या लोकांमधील विभाजक रेषा हिंदूकुश व सुलेमान पर्वत हे होत. इराणी लोकांच्या शेजारीं शक नांवाच्या लढाऊ घोडे स्वार लोकांची पामीर डोंगरपठारांत रहाणारी जात होती. तिचा संबंध प्राचीन हिंदुस्थान व प्राचीन इराण यांच्या इतिहासाशीं बराच आलेला आहे.

**इराणी पारमार्थिक विचार व संस्कृति.**— इराणी व हिंदू या लोकांचे मूळ पूर्वज जे आर्यन् लोक त्यांच्या वेळीं या दोन्ही लोकांचा एक प्रकारचा ठराविक स्वभाव व लक्षणें होतीं. आतां देखील या दोन्ही प्रकारच्या लोकांचा धर्म, देवतांचीं नांवें, दंतकथा वगैरे बाबतींत विलक्षण साम्य दिसून येतें व तें मागें दुसऱ्या आणि तिसऱ्या विभागांत सविस्तर दिलेंच आहे.

**इराणी पौराणिक कथा.**— या दंतकथा इराणमध्यें त्यांच्या इतिहासाच्या प्रत्येक काळीं होत्या. झरथुष्ट्र व इस्लाम या धर्मांनीं देखील यांचें उच्चाटन केलें नाहीं. झरथुष्ट्री संप्रदायानें या दंतकथांतील जुन्या देवता व वीर पुरुष यांनां व्यवस्थित व निश्चित स्वरूप देऊन त्यांनां अहुर मझ्दचे धार्मिक मदतगार व सेवक बनविलें. यांत्र काळांत कथांची पुनरचना व विस्तार झाला.

**पारमार्थिक विचारांत इराणी व हिंदु भेद.**— जगाला अद्वैत समजणें ही दोन्ही विचारांत सामान्य कल्पना आहे. परंतु हिंदु विचारांत ईश्वर व मनुष्य यांमधील सर्व भेद नाहींसे करून एका विश्वात्म्याची कल्पना प्रस्थापित झाली आहे, तर इराणी विचारांत व्यावहारिक जीवित, जग व नैतिक आदेश यांचेंच महत्त्व मानलें आहे. इराणी पारमार्थिक विचारांतील प्राचीन देवता उत्तरकालीन नैतिक शक्ती झाल्या तर हिंदूंत त्या यज्ञाहे देवता झाल्या. हे फरक झरथुष्ट्री संप्रदाय व 'दरायसचें पापनिवेदन' यांमध्यें सांपडतात एवढेंच नव्हे तर इराणांतील सुफी पंथाच्या गूढ तत्त्वज्ञानांत देखील आढळतात.

झरथुष्ट्राचा काल व ठिकाण याची माहिती पारशी दंतकथांवरून मिळत नाहीं.

झरथुष्ट्राचीं मतें मीडियामध्यें ख्रिस्ती शकाच्या ७१४ वर्षे पूर्वी प्रचलित होतीं, आणि तो धर्मसंस्थापक म्हणून बराच आगोदर प्रसिद्ध झाला असावा. कांहीं तो त्याहिअगोदर झाला असावा अशी मांडणी करतात, तर कित्येक त्याला बुद्धपूर्व ठरविण्यास निश्चित आधार मागतात. त्याच्या काळाविषयीं निश्चयात्मक पुरावा उपलब्ध नाहीं.

झरथुष्ट्री पंथाचा प्रसार इराणांत कसा झाला याबद्दल माहिती मिळत नाहीं. पश्चिमेस मीड व पर्शु लोकांमधील प्रचलित धर्मांचे संरक्षक व प्रचारक यांच्या समूहास मगी म्हणत असत. हे लोक स्वप्नांचे अर्थ व भविष्यकथन करीत असत. धर्मविधी व मंत्र या लोकांमध्यें फार प्रचलित होते. पुढें मगी याचा मांत्रिक–धर्मोपदेशक असा अर्थ होऊं लागला. यांचा हिंदुस्थानांतहि प्रवेश झाला, आणि मग ब्राह्मण या नांवानें हे आज वावरतात. झरथुष्ट्र धर्म आणि पर्शूंचा प्राचीन धर्म यांत फरक पुष्कळ आहे. पारशांच्या धर्माचा संस्थापक झरथुष्ट्र मुळींच नव्हे. तो त्यांत फेरफार करणारा सुधारक असावा. मग धर्म हा श्रौतस्मार्त धर्मासमान धरला तर, झरथुष्ट्रधर्म हा उपनिषद् धर्माप्रमाणें आहे असें म्हणतां येईल.

**स्फुट इतिहासाचा आरंभ.**—शॉल्मानीझर राजाच्या वेळीं असुरी लोकांनीं ख्रिस्तपूर्व ८३६ च्या सुमारास इराणी-पासून भिन्न लोक व कांहीं मीड लोक यांनां जिंकलें. मीडियामध्यें असुरी सत्ता ख्रि. पू. ७१५ मध्यें शिखरास पोहोंचली; व ख्रि. पू. ६२६ पर्यंत तिनें टिकाव धरला. असुर–बनी–पाल याच्या अखेरीच्या वर्षांत स्वतंत्र मीड लोकांचें राज्य स्थापन झालें, आणि त्या कालापासून इराणच्या स्वतंत्र अस्तित्वास प्रारंभ झाला असें म्हणतां येईल.

**मीडियाचें साम्राज्य.**—या राज्याच्या इतिहासाविषयीं हिरोडोटसमध्यें कांहीं वर्णन आहे. हिरोडोटस म्हणतो कीं, मीड लोकांनीं असुरियाविरुद्ध सुमारें ख्रि. पू. ७१० या वर्षी बंड केलें; व डायोसीस यानें हें राज्य स्थापलें; याचा मुलगा फ्राओर्टीझ यानें देश जिंकण्याचें काम केलें; व त्याचा मुलगा सायाक्सारीझ यावर प्रथम सिथियन लोकांनीं हल्ला केला. पुढें त्यानें निनिव्हि काबीज करून मीडियाची सत्ता वाढविली. यानंतर बाबिलोनी राजा नाबोनिडस (ख्रि. पू. ५५५–५३९) याच्या शिलालेखांवरून थोडीशी माहिती मिळते, व नंतरची कांहीं माहिती जुन्या करारातून काढतां येते. खुद्द मीडियाच्या साम्राज्याचें एकहि स्मारक उपलब्ध नाहीं; यामुळें या साम्राज्याबद्दल जग अद्यापि अज्ञानांतच आहे.

ब्रिटानिका ११ वी आवृत्तीमध्यें मीडियाच्या राज्याला ख्रिस्ती शकाच्यापूर्वी ६४० या वर्षाहून अगोदर सुरुवात झाली नसावी अशी समजूत व्यक्त केली आहे. पण तीस समाधानकारक आधार दिला नाहीं. असुरी राज्य मोडून मीडिया, बाबिलोन, इजिप्त, सिलिशिया व लिडिया हीं राज्यें निर्माण झालीं. पैकीं मीडियाचें राज्य फार प्रबल होतें.

सायरसच्या पूर्वी म्हणजे अकिमिनियन या राजघराण्या-पूर्वी इराणचा इतिहास बराच मनोरंजक कथांनीं भरली आहे. त्यांतील सोराब व रुस्तुम यांची कथा त्यावरील झालेल्या आर्नोल्डच्या एका काव्यामुळें बरीच प्रसिद्ध आहे. त्या काळाचा इतिहास एस्. जी. डब्ल्यू. बेंजामिननें आपल्या ग्रंथांत थोडक्यांत येणेंप्रमाणें दिला आहे.

**इराणचे पौराणीक राजे.**—इराणच्या इतिहासांतील पौराणिक काळ फारच प्राचीन असून त्याबद्दल माहिती फार त्रोटक मिळते. शिवाय संशोधनाच्या अपुरेपणामुळें पौराणिक गोष्टी म्हणजे सर्व काल्पनिक कथा असा समज फार दिवस रूढ होता. तथापि प्राचीन हिंदुस्थान, असुरिया, बाबिलोनिया, ईजिप्त इत्यादि राष्ट्रांचा प्राचीनतर इतिहास उपलब्ध होत जाऊन एकमेकांच्या पौराणिक उर्फ काल्पनिक म्हणून गणल्या जाणाऱ्या गोष्टींनां प्रत्यंतर पुरावा मिळूं लागल्यामुळें त्यांनां ऐतिहासिक सत्याचें स्वरूप हळू हळू प्राप्त होऊं लागलें आहे.

इराणमधील पौराणिक कथा फार रम्य असून त्यांवरून सायरस व कसर्कसीझ यांचें इराणी राष्ट्र फार प्राचीन काळा-पासून सतत सारख्या जोमदार स्थितींत होतें असें दिसतें. म्हणून या पौराणिक राजांची यादी व तत्कालीन राजकीय घडामोडींची जंत्री येथें देतों.

**कैओमूर्स.**—हा इराणी राष्ट्राचा आद्य संस्थापक होय. याला गिलशहा उर्फ जगाचा राजा अशी पदवी होती. त्यानें आपली राजधानी बल्ख येथें स्थापली. त्यानें आसपासच्या रानटी जातींना सुधारण्याचा फार प्रयत्न केला. त्यांत दीवे नामक रानटी लोकांनीं त्याला विरोध केला व उभय पक्षांत झालेल्या लढाईंत कैओमूर्सचा मुलगा सायमेक मारला गेला; तथापि सायमेकचा मुलगा हौषेंग यानें अखेर दीवेंचा पराभव केला. नंतर लवकरच कैओमूर्स मरण पावून त्याचा नातू हौषेंग राजा झाला. याच्याच कारकीर्दींत इराणी लोकांनीं अग्निपूजा स्वीकारली. हौषेंगनंतर थमौरस राजा झाला, पण त्याबद्दल विशेष कथा नाहीं.

**शहा जमशीद.**—थमौरसनंतरचा हा इराणी राजा बराच प्रसिद्ध आहे. यानें पुष्कळ वर्षे राज्य करून लोकांची फार सुधारणा केली. त्यानें इराणी लोकांचे धर्मोपदेशक, योद्धे, व्यापारी व शेतकरी असे चार वर्ग करून त्यांचे धंदे पृथक् ठरविले. यांपैकीं शेवटचा शेतकरी वर्ग नेसौडी या नांवानें प्रसिद्ध होता. या राजानें लोखंड, धातूच्या वस्तू, लोंकर, रेशीम व कापसाचें विणकाम व वेलबुट्टीकाम, इमारती बांधण्याकडे विटांचा व संगमरवरी दगडांचा उपयोग, जहाजें बांधण्याची कला, वैद्यकीचें ज्ञान, सुगंधी पदार्थांचा धंदा, वगैरे अनेक गोष्टींना सुरुवात करून उत्तेजन दिलें; त्यानें नोरूझ म्हणजे नवें वर्ष म्हणून नवीन वर्षगणना पद्धति सुरू करून त्या वेळीं दहा दिवसांचा उत्सव करण्यास सुरुवात केली. अशा रीतीनें अनेक कृत्यें करून त्यानें बरीच कीर्ति मिळविली; पण याचा परिणाम असा झाला कीं, पुढें तो मोठा गर्विष्ठ व उद्दाम बनला, व लोकांवर जुलूम करूं लागला. यामुळें प्रजेमध्यें असंतोष माजून बंड झालें व शेजारच्या राष्ट्राचा झोहॉक नामक राजा होता त्यानें प्रजापक्षाला मदत करून जमशीदचा लढाईंत पराभव केला, व इराणचें राज्य घेतलें. तेव्हां जमशीद पळून जाऊन कांहीं वर्षे लपून राहिला आणि पुन्हां परत येऊन त्यानें राज्य घेण्याचा प्रयत्न केला. पण झोहॉकनें त्याला पकडून त्याची कत्तल केली व अशा रीतीनें जमशीदचा दुःखकारक शेवट झाला. तथापि पूर्वकारकीर्दींतील सत्कृत्यामुळें त्याला अद्याप लोक फार मान देतात.

**झोहॉक.**—या परकी राजानें इराणी प्रजेवर फार जुलूम केले. अखेर शहा जमशीद याचा नातू जो आबतिन त्याचा मुलगा फेरिदून यानें त्याचा पराभव करून त्याला एका दरीच्या तोंडाशीं खडकास घट्ट बांधून तेथें त्याला कायमच्या आरोळ्या मारीत ठेवलें. झोहॉक हा दुष्ट स्वभावाचा होता. याविषयीं त्याच्या पूर्व व उत्तर चरित्रातील अनेक दंतकथा आहेत. त्यानें भारतीय पुराणांतील कंसाप्रमाणें बापाला ठार मारून राज्य बळकावलें व पुढें

इराणचा राजा झाल्यावर आपला भावी शत्रु फेरिदून हा जन्मल्याचें कळल्यापासून त्याला ठार मारण्याचे अनेक प्रयत्न केले, वगैरे कथा आहेत. तसेंच कवेह नांवाच्या एका लोहाराचे १६ मुलगे मारले गेल्यामुळें फेरिदूनला झोहॉकविरुद्ध लढाईत लोकांची मदत मिळाल्याची कथा आहे. या कवेहनें आपल्या अंगावरचें कातड्याचें वस्त्रच बंडाचें निशाण म्हणून उभारलें होतें. पुढें या वस्त्रालाच सोनेरी नकशी व हिरेमाणकें लावून तें इराणचें राष्ट्रीय निशाण म्हणून मुसुलमानांच्या अंमलापर्यंत चालू होतें. परंतु यांपैकीं कित्येक कथा कल्पित असून त्या वेळीं इराणावर झालेल्या असुरी लोकांच्या स्वारीवर उभारलेलें तें एक रूपक आहे, असें अलीकडील ऐतिहासिक संशोधकांचें म्हणणें आहे.

**फेरिदून.**—यानें पुष्कळ वर्षें राज्य केलें, व त्या काळांत त्याची प्रजा फार सुखी होऊन भरभराटीस चढली. त्यानें आपल्या मुलांचीं लग्नें येमेनच्या ( अरबस्थानांतील भाग ) सेर्व्ह नांवाच्या राजाच्या मुलींशीं लावलीं. याबद्दलच्या मोठाल्या कथा आहेत. उत्तर व यात फेरिदूननें आपलें राज्य या मुलांत वांटून दिलें. सर्वांत धाकट्या आवडत्या इरेद्ज नांवाच्या मुलाला त्यानें खुद्द इराण देशाचा राजा केलें, व तूर नांवाच्या मुलाला चीनच्या बाजूकडील मुलूख दिला. हा देश तेव्हांपासून पुष्कळ शतकें तुराण देश या नांवानें प्रसिद्ध होता. परंतु ही वांटणी थोरल्या तूर व सेल्म या दोघांस पसंत न पडून त्यांनीं युक्तीनें धाकट्या भावाला आपल्या राज्यांत बोलावून तेथें त्याला मारलें. तेव्हां त्याबद्दल सूड उगविण्यासाठीं वृद्ध फेरिदूननें इरेदेजचा मुलगा मिनौश्चेहर याच्याबरोबर सैन्य पाठवून लढाई केली. तींत मिनौश्चेहरचा जय होऊन तूर व सेल्म मारले गेले.

**मिनौश्चेहर.**—वरील विजयानंतर लवकरच फेरिदून मरण पावला व त्याचा नातू मिनौश्चेहर गादीवर आला. यानें न्यायानें व दयाळूपणानें राज्य केलें. त्याचा इराणमधील सीस्तान नामक प्रांताचा नेरिमनचा पुत्र साहम नांवाचा अधिकारी फार विश्वासू व पराक्रमी होता. त्याच्या झाल नांवाच्या पुत्रासंबंधानें एक मोठी कथा आहे. या कथेपैकीं महत्त्वाचा राजकीय भाग एवढाच आहे कीं, झाल वयांत आल्यावर त्याचें काबूलचा राजा मिहरब याच्या रूदाबेह नावाच्या कन्येवर प्रेम बसून तिच्याशीं लग्न करण्याचें त्याच्या मनांत आलें. पण काबूलचा राजा हा इराणचा पूर्वीचा शत्रु झोहॉक याच्या वंशांतील असल्यामुळें झालच्या बापाला व खुद्द मिनौश्चेहरला हा शरीरसंबंध अनिष्ट वाटत होता. तथापि झालचें उत्कट प्रेम व अतुल पराक्रम याबद्दल मिनौश्चेहरनें स्वतःची खात्री करून घेऊन विवाहास आपली संमति दिली. पुढें या दंपत्यापासून इराणच्या पौराणिक कथांतील रुस्तुम हा सुप्रसिद्ध पुरुष जन्मास आला. हा रुस्तुम व त्याचा मुलगा सोराब यांच्या संबंधाच्या इराणी पौराणिक कथेच्या आधारें आर्नोल्ड नामक इंग्रज कवीनें आपलें ' सोराब व रुस्तुम ' हें सुप्रसिद्ध काव्य रचलें आहे.

**न्यूदेर, झेफ, गूरशाप व कैकोबाद.**—मिनौश्चेहर मरण पावल्यानंतर त्याचा मुलगा न्यूदेर राज्य करूं लागला. पण तो अन्यायी व जुलमी असल्यामुळें त्याच्या सरदारांनीं बंड केलें. या सुमारास तुराणवर तुरच्या वंशांतील आफ्रासिआब नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानें इराणबरोबर अनेक युद्धें केलीं. त्यांत सोहम, झाल व रुस्तुम यांनीं इराणतर्फे लढून मोठ्या पराक्रमानें राज्याचें संरक्षण केलें. पण न्यूदेरच्या कारकीर्दीतील बंडाची संधि साधून आफ्रासिआबनें पुन्हां इराणवर स्वारी केली व न्यूदेरचा लढाईत पराभव करून त्याला ठार मारलें. तथापि या वेळींहि झालनें फेरिदूनच्या कुळांतला एक दूरचा नातलग झेफ नांवाचा गादीवर बसवून आफ्रासिआबला हांकून लावलें. झेफ पांच वर्षें राज्य करून मरण पावला व गूरशाप नांवाचा राजा गादीवर आला. त्या वेळीं तुराणच्या तुर्क लोकांनीं पुन्हां इराणवर स्वारी केली, पण रुस्तुमनें मोठ्या शौर्यानें आफ्रासिआबला तोंड दिलें. याच धामधुमींत गूरशाप राजा निपुत्रिक मरण पावला. पुन्हां रुस्तुमनें जुन्या व पूज्य फेरिदूनच्या घराण्यांतला कैकोबाद नांवाचा पुरुष राज्यावर बसविला, व स्वतः अचाट पराक्रम गाजवून आफ्रासिआबचा पूर्ण मोड केला. या विजयानंतर कैकोबाद लवकरच मरण पावला.

**कैकऊस.**—कैकोबादनंतर कैकऊस राज्यावर आला. त्यानें पुष्कळ वर्षें राज्य केलें. तो दुर्बल व लहरी असल्यामुळें राज्याचें रक्षण करण्यास रुस्तुम व इतर प्रमुख सरदार नसते तर इराणच्या साम्राज्यावर कांहींतरी संकट खास ओढवलें असतें. कैकऊसनें आरंभींच माझानदरान उर्फ हर्केनिआ या डोंगरी भागांतील दीवे नामक लढवय्या लोकांशीं युद्ध सुरू केलें. या लोकांना जिंकण्याचा प्रयत्न शहा जमशीदपासून अनेक इराणी राजांनीं केला होता पण तो सफल झाला नव्हता. असा अनुभव असूनहि कैकऊसनें त्यांच्यावर स्वारी केली. या स्वारींत तो शत्रूकडून चोहोंबाजूंनीं वेढला गेला असतां झाल व रुस्तुम यांनीं आपल्या सैन्यानिशीं शत्रूशीं मोठी निकराची लढाई करून राजाला सोडविलें. या प्रसंगीं केलेल्या पराक्रमांविषयीं रुस्तुमचीं सात धाडशी कृत्यें म्हणून पौराणिक कथा आहे. उपर्युक्त दीवे नांवाच्या जातीसंबंधानें अनेक इराणी पौराणिक कथांत वर्णन आहे. हे लोक शुक्लभास्वर वर्णी, स्वभावानें क्रूर व मोठे पराक्रमी असल्याचें वर्णन आहे.

वरील विजयाबद्दल आनंदोत्सव चालू असतां कैकऊसच्या साम्राज्यांतील सिरिया या भूमध्यसमुद्रकांठच्या प्रांतांतील लोकांनीं बंड करून स्वातंत्र्य पुकारलें. कैकऊसनें लागलीच मोठ्या सैन्यानिशीं या लोकांवर स्वारी करून त्यांचें बंड

मोडलें, व सिरियाच्या राजाची मुलगी सौदाबेह हिच्याशीं तिच्या बापाच्या मर्जीविरुद्ध विवाह केला. त्याचा सूड म्हणून एका मेजवानीच्या प्रसंगीं सिरियाच्या राजानें कैकऊसला कैद करून एका मजबूत किल्ल्यांत अंधाऱ्या भुयारांत टाकलें व शिवाय इकडे सैन्यानिशीं इराणवर स्वारी केली. याच वेळीं दुसऱ्या बाजूनें इराणचा दुसरा शत्रु तुराणचा राजा आफ्रासिआब यानें इराणवर स्वारी केली व सिरियाच्या सैन्याचा पराभव करून इराण जिंकून घेतला.

अशा भयंकर संकटांतून राष्ट्राला व राजाला सोडविण्याची अत्यंत अवघड कामगिरी सीस्तानच्या शूर व थोर घराण्यांतील सुप्रसिद्ध पुरुष झाल व रुस्तुम यांनींच केली. प्रथम रुस्तुमनें मोठ्या सैन्यानिशीं सिरियावर चाल करून कैकऊसला सोडविलें व सिरियाच्या राजाच्या मदतीनें तुराणच्या आफ्रासिआब राजाचा पराभव करून व त्याच्या सैन्याची मोठी कत्तल करून त्यास इराणांतून हांकून लावलें. याप्रमाणें रुस्तुमनें राष्ट्राला आपत्तींतून सोडवून कैकऊसला पुन्हां राज्य मिळवून दिलें.

या सुप्रसिद्ध रुस्तुमचें लग्न इराणच्या साम्राज्यांतील सेमेंगान नामक प्रांताच्या मांडलिक राजाच्या तेहमिमेह नांवाच्या सुंदर कन्येशीं झालें होतें. त्यांना सोराब नांवाचा मुलगा झाला. तोहि बापाप्रमाणें मोठा पराक्रमी होता. या बापलेकांसंबंधानें उपर्युक्त ' सोराब व रुस्तुम ' नामक काव्यांत मोठी हृदयद्रावक गोष्ट दिली आहे.

कैकऊसला अनेक बायका होत्या, त्यांत फेरिदूनच्या वंशांतील एक स्त्री होती. तिला सिआवुश नांवाचा फार बुद्धिमान् व गुणवान् पुत्र होता सिरियाच्या राजघराण्यांतील कैकऊसची सौदाबेह नांवाची जी राणी होती तिनें पातिव्रत्यपराङ्मुख होऊन सिआवुशजवळ प्रेमयाचना सुरू केली; पण त्या शीलवान् पुत्रानें तिचा धिःकार केला. तेव्हां तिनें त्याच्यावरच उलट कुभांडखोरपणानें नीचपणाचा आरोप करून राजाला ती गोष्ट कळविली. राजानें ज्योतिष्यांच्या सल्ल्यावरून पुत्राला अग्निदिव्य करावयास लाविलें. परंतु परमेश्वरकृपेनें सिआवुश त्यांतून निर्दोष बाहेर पडला, व त्यानें आपल्या सापत्न मातेला क्षमा करण्याविषयीं बापास आग्रह केला. हें संकट टळलें नाहीं तोंच सौदाबेह राणीनें सावत्र पुत्रावर दुसरें संकट आणलें. याच सुमारास तुराणच्या आफ्रासिआबची देशावर पुन्हां स्वारी होऊन रुस्तुम व सिआवुश यांनीं त्याचा पराभव करून त्याशीं तह केला होता. पण त्या तहाच्या अटी राणीच्या चिथावणीवरून कैकऊसनें अमान्य करून आफ्रासिआबला न मारल्याबद्दल व तुराण देश न जिंकल्याबद्दल सिआवुशाला दोष दिला; व तहामुळें ओलीस आलेल्या इसमांस ठार मारण्याचें ठरविलें. पण सिआवुशला असा विश्वासघात करणें मान्य नसल्यामुळें त्यानें ओलीस इसम परत पाठवले; व स्वतः देशत्याग करून आफ्रासिआबच्याच आश्रयास जाऊन राहिला. आफ्रासिआबनें त्याचा उत्तम सन्मान करून त्यास आपली फेरेंगिस नांवाची मुलगी दिली व एका मोठ्या प्रांतावर अधिकारी नेमलें. पण आफ्रासिआबचा भाऊ ग्रेसिवेझ यानें सिआवुश तुराणवर इराणची स्वारी आणण्याच्या खटपटींत आहे असें आफ्रासिआबच्या मनांत भरविल्यामुळें आफ्रासिआबनें रागानें सिआवुशाला ठार मारलें व आपल्या गर्भवती मुलीसहि भुयारांत अटकेंत ठेविलें. अशा स्थितींत पिरनविसा नांवाच्या वृद्ध मंत्र्यानें आफ्रासिआबचें मन वळवून त्याच्या नातवाला वांचविलें. पुढें मुलाची ही हकीकत कळतांच कैकऊसनें रुस्तुमला आफ्रासिआबवर पाठविलें. त्यानें आफ्रासिआबचा पराभव करून व त्याला दूर चीनमध्यें हांकून देऊन सिआवुशच्या मुलाला, म्हणजे कैकऊसच्या नातवाला, परत आणलें. हाच इराणचा सुप्रसिद्ध कै खुशरू उर्फ सायरस राजा होय. व येथून इराणच्या ऐतिहासिक काळाला आरंभ होतो.

इराणसंबंधानें सायरसच्या पूर्वीच्या काळांतली वर दिलेली जी थोडी माहिती आपणांस निव्वळ ऐतिहासिक पुराव्यानें उपलब्ध होते त्या माहितीची आणि पौराणिक स्वरूपी इतिहासाची संगति लावली गेली नाहीं.

इराणच्या बऱ्याच भागांत इंडोयुरोपीय वंशांतील लोकांची वस्ती, आपणांस जेव्हांपासून इतिहासाचे धागे कांहींतरी लागतात तेव्हांपासून होती, असें आपणांस आढळून येतें. हे लोक आपणांस " आर्य " म्हणवीत असत अशी एरिआना वगैरे शब्दांवरून कल्पना करण्यांत आली आहे. यांची भाषा " आर्यन् " वर्गांतील असे. सर्व देशाला ॲरिअन (झेंद–ऐर्यन) म्हणजे आर्यांचा देश हें मध्यइराणी एरानवें व अर्वाचीन इराणचें मूलरूप असलेलें नांव होतें. आजच्या " अझर बैजन " या लोकसत्ताक संस्थाननामाचा संबंध आर्य शब्दाशींच आहे.

**इराणमधील इतर जाती.**—पूर्वी इराणी लोकांशिवाय परकी वंशांतील असंख्य जाती इराण देशांत वास्तव्य करून होत्या. बलुचिस्थानांतील ब्राहुइ लोकांचा हिंदुस्थानांतील द्राविडी भाषा बोलणाऱ्या लोकांशीं एकवंशसंबंध आहे. या जिल्ह्यांतील पर्शूंच्या अगोदरचे रहिवाशी व येथें पुरातन काळीं ज्यांनीं वसाहत केली ते लोक यांचा संबंध या द्राविड लोकांतच शोधून काढतां येईल अशी कित्येकांची कल्पना आहे. असुर देशांतील प्राचीन लोक सुमेरिअन हे द्राविड वंशांतील लोक, इराणांतील प्राचीन लोक हेहि द्राविड वंशांतले अशी परिस्थिति असल्यास द्राविडी वंशांचा वेदपूर्व प्राचीन काळीं मोठा प्रसार होता असें होईल. पॅरिकानी, जिड्रोसी व मिसि (यांना कधीं कधीं ' इथिओपिअन ' म्हणतात) हे लोक या प्राचीन जातींपैकींच आहेत. मीडियामध्यें अनारिआकी (म्हणजे अलीकडील "संशोधकांच्या" बेसावध मताप्रमाणें 'अनार्यन्') लोक रहात होते असें ग्रीक भूगोलकार म्हणतात. यांचपैकीं, टापुरी, आमार्डी, काश्पी व काडुसी लोक होत. झॅग्रोस पर्वतांत बाबिलोनी व असुरी सत्तेच्या काळांत इराणी लोकांचा अवशेष आढळत नाहीं, परंतु गुटीअन, लुलुबीअन

वगैरे सेमेटिक लोक व कोसीइ आणि एलीमीअन (एलमाइट?) लोक आढळतात.

**इराणी लोक व "आर्यन्" हिंदू लोक.**—इराणी लोक पूर्वेकडून आले असावेत हें त्यांच्या हिंदुस्थानांतील लोकांशीं असलेल्या निकट संबंधावरून ठरविण्याचें धाष्टर्य कांहीं लेखक करतात (ब्रिटानिका ११ वी आवृत्ति पर्शिया शब्द पहा). कोणाच्या मतें काळा व कास्पियन या समुद्रांच्या उत्तरेस दक्षिण रशियांतून तुराण (तुर्कस्थान) व ऑक्सस आणि जक्झार्टीस नद्यांपर्यंत पसरणाऱ्या मोठ्या डोंगरसपाटीवर, तर कोणाच्या मतें उत्तर ध्रुवकक्षेंत यांचें मूलस्थान असलें पाहिजे. कॉकेशसच्या आसपास यांचें मूलस्थान ठरविणारे असें कारण देतात कीं येथें इराणी जातीचे अवशेष वारंवार सांपडतात. हिरोडोटसच्या ग्रंथांत आढळून येणारीं दक्षिण रशियांतील सिथिअन (स्कोलोटी) लोकांचीं नांवें व शब्द अगदीं उघडपणें इराणी शब्दांपासून बनलेले आहेत हें क्षिअस व मुलेनहॉफनें दाखविलें आहे. तुराणच्या लुटारू जाती याच वंशांतील आहेत. यांनां तथील शेतकरी वर्ग 'दाह' असें म्हणतात; आणि त्या शब्दाचा अर्थ शत्रु किंवा चोर आहे असेंहि समजतात आमच्या मतें हें वैदिक "दास" शब्दाचें रूपांतर असावें. दास आणि दस्यु हे शब्द केवळ भारतीय नसून पर्शुभारतीय असावे. दास शब्दानें हिंदुस्थानांतील द्राविडी वंशाचा बोध होत नाहीं, असें तिसऱ्या विभागांत सांगितलेंच आहे. याच प्रदेशांतून आर्यन् लोक पूर्व इराणच्या सुपीक प्रदेशांत आले असावेत, व तेथून एक शाखा सिंधु व गंगा यांच्या प्रदेशांत पसरली असावी व दुसरी पश्चिमेस झॅग्रोस पर्वताच्या व सेमेटिक प्रदेशाच्या सरहद्दीकडे गेली असावी अशा आजच्या संशोधकांच्या कल्पना आहेत.

**अकिमेनिड घराण्याचा इतिहास.**—या घराण्याची राजावली येणेंप्रमाणें देतां येईल.

सायरस (५५८–५२८); ५५०मध्यें मीड लोकांना जिंकलें; ५३८ पासून बाबिलोनचा राजा.
कंबायसिस (५२८–५२१).
स्मेर्डिस (५२१).
पहिला दरायस. (५२१–४८५).
पहिला क्सर्क्सीझ. (४८५–४६५).
पहिला आर्टाक्सर्क्सीझ. (४६५–४२५).
दुसरा क्सर्क्सीझ, व सेसिडियानस अथवा सोग्डियानस, (४२५–४२४).
दुसरा दरायस. नोथस (४२४–४०४).
दुसरा आर्टाक्सर्क्सीझ (४०४–३५९).
तिसरा आर्टाक्सर्क्सीझ. ओकस (३५९–३३८).
आर्सेसीझ (३३८–३३६).
तिसरा दरायस (३३६–३३०).

वरील सनावळी बाबिलोनी व कांहीं मिसरी लेखांतील माहितीशीं तसेंच ग्रीक ग्रंथांतील पुराव्याशीं बरोबर मिळते.

**अकिमेनिड यांचें इराणी साम्राज्य, सायरस.**—ख्रि. पू. ५५३ मध्यें एलाममधील अन्शान (सुशिएना)चा इराणी सायरस(कुरुस) राजा यानें सायाक्सारीझचा मुलगा अस्तायाजीझ याचें वर्चस्व झुगारून दिलें. तीन वर्षांनीं सायरसनें अस्तायाजीझचा पासार्गाडी येथें पराभव केला; लवकरच त्याची राजधानी एक्बटाना सर केली व आस्तायाजीझला बंदिवान करून मिडियन राज्याच्या ठिकाणीं इराणी राज्याची स्थापना केली. सायरसनें इराणी लोकांच्या निरनिराळ्या जाती एकत्र करून त्यांचें जगांतील एक बलाढ्य राष्ट्र बनविलें. सायरसनें मीडियन राजांनीं केलेले तह मोडले त्यामुळें त्याच्या विरुद्ध बाबिलोनचा नाबोनिडस, इजिप्तचा अमासिस, लिडियाचा क्रीसस, व स्पार्टन यांची गट्टी होऊन, त्यांचें संयुक्त सैन्य सायरसवर चालून आलें. ख्रिस्ती शकापूर्वी ५४६ या वर्षी क्रीससनें हल्ला केला. सायरसनें टीरिआ येथें त्याचा पराभव केला, पॅक्टोलसच्या कांठीं सायरसला दुसरा जय मिळाला. लवकरच सार्डिस हस्तगत झालें व इराणी लोकांची सत्ता मध्यसमुद्रापर्यंत पसरली. थोडक्याच वर्षांत ग्रीक शहरें आणि कॅरियन व लिशियन लोक यांनां काबीज करण्यांत आलें. सिलिशियाचा राजा आपखुषीनें शरण आला. ५३९मध्यें सायरसनें नाबोनिडसचा पराभव करून बाबिलोन काबीज केलें. खाल्डियन राज्य, सिरिया व पॅलेस्टाइन हीं राज्यें इराणी राज्यांत सामील झालीं. नंतर पूर्व इराण पादाक्रांत करण्यांत आलें. सायरसविषयीं विशेष हकीगत देण्याचें हें स्थल नव्हे. (शरीर खंड सायरस पहा.)

**कंबायसिस व स्मेर्डिस.**—सायरसच्या मृत्यूनंतर (ख्रि. पू. ५२८) त्याचा मुलगा कंबायसिस यानें इजिप्त (ख्रि. पू. ५२५) जिंकलें. सायप्रस व आशिया मायनरच्या किनाऱ्यावरील बेटें शरण आलीं. सॅमॉस दरायसनें घेतलें. नपाता व मेरोइ या इथिओपिअन राज्यांवरील स्वारीचा मात्र न्यूबिआमध्यें मोड झाला. स्मेर्डिसला पदच्युत करून (ख्रि. पू. ५२२-५२१) मारल्यामुळें दरायसविरुद्ध बाबिलोन, सुशिआना, पर्सिस, मीडीया, आर्मिनिया व इतर पूर्वेकडील बऱ्याच प्रांतांत बंडें झालीं; परंतु त्यांचा दरायस व त्याचे सेनापती यांनीं (ख्रि. पू. ५२१-५१९) मोड केला.

**दरायसची राज्यव्यवस्था व पद्धति**—या राज्यव्यवस्थेचें बरेंचसें श्रेय सायरसला दिलें पाहिजे. दरायसनें फक्त त्याचें अनुकरण करून ही व्यवस्था पूर्णत्वास आणली. राज्याची घटना सर्वत्र उदार व स्वतंत्र धोरणावर रचलेली असून तीमध्यें क्षुद्रतेचें किंवा भीरुत्वाचें कोणतेंच लक्षण नव्हतें. सर्वशक्तिमान् ईश्वर अहुरमझ्द यानें आपणांस जगाचें राज्य दिलें असून आपणच जगाचे मालक आहों अशी लोकांची पूर्ण भावना होती. लोक व राजा हे दोघेहि

अहुरमझ्दाचेच उपासक होते. बहुतेक सर्व सुधारलेलीं राष्ट्रें दरायसच्या वर्चस्वाखालीं असून बाकीचे अज्ञानी देश त्याच्या दृष्टीनें विनमहत्वाचे होते. या राष्ट्रांनां अहुरमझ्दाच्या कृपेनें एकत्र करून त्यांच्यावर न्यायानें राज्य करणें हें आपलें कर्तव्य आहे असें दरायस समजत असे.

**अंकित राष्ट्रें.**—असुरी व रोमन लोकांच्या प्रमाणेंच पर्शियन लोकहि आपल्या लढायांत क्रूरपणा दाखवीत नसत. ते जिंकलेल्या लोकांचीं शहरें पाडून टाकित नसत. सायरसप्रमाणें त्याच्या मागून झालेले राजेहि जित लोकांनां कारभारी, सेनानायक अशा महत्वाच्या नोकऱ्यांवर नेमीत असत व त्यांनां जमिनींहि नेमणूक करून देत असत. केवळ मीड लोकांनांच नव्हे तर आर्मीनियन, लीडियन, यहुदी व ग्रीक या सर्व लोकांनां अशाच रीतीनें वागविण्यांत येत असे. जित व जेते या दोन्हि जातींच्या प्रजाजनांनां राजाची लष्करी नोकरी करावी लागत असे, व इराणी राजाच्या पदरीं इराणी लोकांप्रमाणेंच निरनिराळ्या जित लोकांचीहि पलटणें होतीं.

जित लोकांमध्यें मीड लोकांवर इराणी राजाची फार मर्जी असे. हे लोक इराणी लोकांपूर्वी राजसत्ताधीश असल्यामुळें जास्त सुधारलेले होते, व यांचे पोषाख व इतर चालीरीती पर्शियन लोकांनीं उचलल्या होत्या. येणेंप्रमाणें जातीजातींमधील भेदभाव नाहींसे करून सर्वांचें मिळून एकच इराणी राष्ट्र बनविण्यास सुरुवात झाली होती व हें काम सरसन लोकांच्या कारकीर्दींत पूर्णावस्थेंत आलें.

**पर्शियन लोक.**—जेते लोकांनां राज्यांत अर्थातच जास्त हक्क व सवलती मिळत असत. पर्सिसच्या ( कार्मेनियन व युटिअन इत्यादि लोक खेरीज करून ) रहिवाश्यांनां कोणताच कर द्यावा लागत नसे. त्यांची एक निराळीच क्षत्रपी म्हणजे प्रांत बनविला होता. हे लोक कराच्या ऐवजीं राजास आपल्या मालांपैकीं उत्तम उत्तम जिनसांचा नजराणा करीत असत. उदाहरणार्थ, राजा स्वारीवर वगैरे निघाला म्हणजे शेतकरी लोक त्याला भेटून उत्तम फळफळावळ नजराणा म्हणून देत असत. उलट पक्षीं राजा देखील त्यांनां लढाईंतील लूट व इतर मौल्यवान देणग्या वांटून देत असे. राज्यारोहणप्रसंगीं पासार्गाडी येथील रणदेवतेच्या देवळांत राजाला राज्याभिषेक होत असे तेव्हां तो साधें शेतकऱ्याचेंच जेवण जेवीत असे. या प्रसंगीं पर्शियन लोक त्याची इमानें इतबारें चाकरी करण्याची शपथ घेऊन त्याच्या आयुरारोग्याबद्दल अहुरमझ्द देवाची प्रार्थना करीत असत; व राजा त्यांचें परकीयांपासून रक्षण करण्याची व त्यांच्यावर न्यायानें राज्य करण्याची शपथ घेत असे. सारांश पर्शियन लोकांच्या बाबतींत राजा हा ' लोकांचा राजा ' म्हटला जात असे. न्यायनिवाडा करण्याकरितां राजाकडून तहहयात पर्शियन न्यायाधीश नेमले जात असत, व यांच्या जागा बहुधा त्यांच्या मुलांकडेच वंशपरंपरा चालत असत. लोकपक्षाच्या पुढारी लोकांचा सल्ला घेऊनच कोणत्याहि बाबतींत न्याय निवाडा करावयाचा तो राजा करीत असे. इतर अधिकारी व प्रांताधिकारी यांच्या सल्लामसलतीस देखील असेच निवडलेले बडे लोक असत.

शस्त्र हातीं धरण्यास समर्थ असलेल्या प्रत्येक पर्शियन इसमास राजाची लष्करी नोकरी करणें भाग होतें. मोठे जमीनदार घोड्यावर बसून तर साधारण लोक पायदळांत नोकरी करीत. ज्यांनां आपल्या जमिनीची मशागत स्वतः करावी लागत नसे अशा सरदार व सुखवस्तू लोकांनां शक्य तितक्या अधिक वेळां दरबारांत हजर रहावें लागत असे. त्यांच्या मुलांनां राजपुत्रांबरोबर दरबारांत घोड्यावर बसणें, शस्त्रास्त्रांचा उपयोग करणें, शिकार खेळणें कायदेकानू व राज्यकारभाराचीं कामें यांचा अभ्यास करणें इत्यादि शिक्षण मिळत असे. व जे लायक ठरत त्यांनां पुढें मोठमोठ्या हुद्याच्या जागांवर नेमून जमिनी देत असत.

मगिअनला मारण्याच्या वेळीं जे दरायसच्या मदतीस हजर होते, त्या सहा घराण्यांतील लोकांचा दर्जा अति उच्च होता. ग्रीक लोक राजा व हे सहा यांनां "सात पर्शियन" म्हणत असत. यांनां वर्दी दिल्याशिवाय राजाच्या समोर जाण्याचा अधिकार होता व यांनां देशांत राजाप्रमाणेंच जहागिरी वगैरे उत्पन्नें होतीं. याशिवाय इतर कित्येक पर्शियन लोकांनां दुसऱ्या प्रांतांत पाठवून तेथें त्यांनां जमिनी देऊन चिरस्थायी करण्यांत आलें होतें. ॲकिमेनिड काळांत ही वसाहत करण्याची चळवळ सर्व राज्यभर फार जोरानें प्रचलित होती. विशेषतः आर्मीनिया, कॅपाडोशिआ, लिशिआ, सिरिया व इजिप्त येथें वसाहती करण्यांत आल्या. या वसाहती म्हणजे प्रांतांतील लष्करी मदतीचीं केवळ केंद्रस्थानेंच होतीं; व त्यांच्या योगानें सबंध इराणी राज्याला आधारस्तंभाच्या प्रमाणें बळकटी आली होती. खुद्द पर्सिसमध्यें ज्याप्रमाणें राजाचें मंत्रिमंडळ या लोकांचेंच बनविलें जात असे, तसेंच प्रांतानिहाय देखील मंत्रिमंडळें व क्षत्रपांचे खासगी अधिकारी या वसाहतवाल्या लोकांतून निवडले जात असत.

ही राष्ट्रीयत्वाची खरी कल्पना जरी सबंध इराणी राज्यांत प्राधान्येंकरून दिसून येत होती, तरी जित लोकांसंबंधीं साधारण कर्तव्यें व त्यांचे हितसंबंध यांचा योग्य विचार केला जाईल अशी खबरदारी घेतली जात असे. राजाच्या तसेंच प्रांताधिकाऱ्यांच्या मंत्रिमंडळांत पर्शियन लोकांबरोबर जित लोकांचे देखील प्रतिनिधी असत. लष्करी नोकऱ्यांप्रमाणें क्षत्रपांच्या मंत्रिमंडळांतदेखील जित लोक भाग घेत असत; व पर्शियन लोकांप्रमाणें यांनांसुद्धां देणग्या व जमिनी मिळत असत. राज्यांतील सर्व जातींच्या प्रजाजनांवर सौम्य उपायांनीं राज्य करणें, गुणी लोकांचा उत्कर्ष करणें, व गुन्हेगारांचें शासन करणें हें राजाचें व अधिकाऱ्यांचें आद्य कर्तव्य असे.

**राजांची वसतिस्थानें.**—पासार्गोडी जिल्ह्यांत आपल्या मातृभूमीवर सायरसनें एक शहर बसवून तेथें एक राजवाडा व थडगें बांधलें. हें शहर हल्लीं जेथें मुर्गाबचे अवशेष सांपडतात तेथें होतें. परंतु पुढें दरायसनें याच्या ऐवजीं देशाच्या मध्यभागीं एक नवीन राजधानीचें शहर बसविलें. याचें नांव "पर्शियन" (पेर्सा) असें होतें व यालाच पुढें ग्रीक लोक पर्सेपोलिस असें म्हणूं लागले. परंतु पार्सिस जिल्हा साम्राज्याच्या मध्यापासून इतका दूर होता कीं, तें राज्यकारभार चालविण्याचें मध्यवर्ती ठिकाण होणें शक्य नव्हतें. खरें मध्यवर्ती ठिकाण तैग्रिस व युफ्रेटीझ नद्यांमधील सुपीक प्रदेशांत असल्यामुळें राज्याची खरी राजधानी सुसा हीच होती, व तेथें पहिला दरायस व दुसरा आर्टाक्सर्क्सीझ यांनीं भव्य राजवाडे बांधले होते. हिंवाळ्यांत हे राजे बाबिलोनमध्यें रहात व उन्हाळ्यांत ते एकबटानाच्या दक्षिणेस एलव्हेंड पर्वतावर बांधलेल्या वाड्यांत रहावयास जात. पर्सिस किंवा पर्सेपोलिस येथें हे राजे क्वचित् प्रसंगीं—मुख्यत्वें करून राज्याभिषेकाच्या वेळींच—येत असत.

**बाबिलोनिया व इजिप्त.**—राज्यांत सामील केलेलीं बाबिलोन व इजिप्त हीं सुधारलेलीं संस्थानें कोणत्याहि क्षत्रपीला जोडलेलीं नव्हतीं. नाबोनिडसचा पराभव केल्यानंतर सायरसनें आपणांस 'बाबेलचा राजा' म्हणवून घेतलें. त्याचप्रमाणें कंबायसिसनेंहि इजिप्तमध्यें फेरोच्या सर्व पदव्या धारण केल्या असल्याचें आढळून येतें. दरायसनें तर इजिप्तमध्यें तेथील पुरोहितांना त्यांच्या कार्यांत मदत केली, नवीन देवळें बांधलीं व नवीन कायदे जुन्या पद्धतीवरच केले. या राजांचा असें करण्यांत, जित राष्ट्रांतील लोकांनां आपलें जुनेंच राज्य अद्याप कायम आहे असें वाटावें हा हेतु होता हें उघड आहे. परंतु दरायसला त्याच्या आयुष्यांतच त्यांचें धोरण चुकलें असल्याचें प्रत्यक्ष अनुभवानें कळून आलें. खि. पू. ४८६ या वर्षीं इजिप्तनें बंड केलें व तें पुढें क्सर्क्सीझनें खि. पू. ४८४ मध्यें मोडलें. बहुधा यामुळेंच दरायसनें खि. पू. ४८४ मध्यें 'बाबेलचा राजा' ही पदवी टाकून दिली, व बेल-मार्डुकची सुवर्णमूर्ति तेथील देवळांतून काढून टाकली. या योगानें बाबिलोनमध्यें खि. पू. ४८४त व ४७९त अशीं दोन बंडें झालीं, पण त्यांचा ताबडतोब बंदोबस्त करण्यांत आला.

**वजीर वगैरे अधिकारी मंडळ व दरबारी भाषा.**—राजाच्या दहा हजार शरीरक्षकांचा नायक हाच दरबार व साम्राज्याची राज्यव्यवस्था यावर देखरेख ठेवीत असे. या सरदाराचें काम अर्वाचीन वजिरासारखें असे. याला ग्रीक लोक 'चिलिआर्क' असें म्हणत. याशिवाय सात मंत्री असत. 'राजनेत्र' नामक अधिकाऱ्याचा वारंवार उल्लेख येत असतो. याच्याकडे सर्व साम्राज्याचा ताबा व अधिकाऱ्यांवरील देखरेख हीं कामें सोंपविलेलीं होतीं. राजाचे सर्व हुकूम कीलाकृति लिपींत लिहिले जात. मूळ इराणी हुकुमाला सुसान व बाबिलोनी भाषांत केलेले तर्जुमे जोडीत असत. इजिप्तमध्यें याच्याच जोडीला चित्रलिपींतील व ग्रीक प्रांतांत ग्रीक लिपींतील आणखी एक तर्जुमा जोडण्यांत येत असे. ही लिपि दगड अथवा चिकणमाती यांवरच लिहिली जात असे. राजकीय पत्रव्यवहारांत दगडमातीच्या ऐवजीं चर्मपत्राचा उपयोग करीत असत. परंतु चर्मपत्रावर कीलाकृति लिपि लिहितां येत नसे म्हणून त्यावर पर्शियन भाषा अरमइक लिपींत लिहिण्यांत येऊं लागली. या लेखनसाहित्यामुळेंच पह्लवी लिपि विकास पावली.

इराणी साम्राज्याच्या पश्चिम भागांत सर्वत्र पर्शियन भाषेबरोबरच बरेच दिवसांपासून व्यापारी वर्गांत रूढ असलेली अरमइक भाषा ही दुय्यम प्रतीची भाषा म्हणून प्रचारांत होती. या भागांतील महत्वाच्या अशा सर्व सरकारी कागदपत्रांतील मजकुराचे सरकारी रीत्या अरमइक भाषेंत भाषांतर देण्यांत येत असे, व क्षत्रपांनीं पाडलेल्या नाण्यांवरहि अरमइक लिपीचा लेख देण्याची वहिवाट होती. इजिप्तमध्यें फक्त खासगी पत्रव्यवहार तेवढा डेमोटिक भाषेंत होत असे. फक्त हेलेनिक प्रांतांत मात्र अरमइकबद्दल ग्रीक भाषा वापरीत असत.

**प्रांत**—पहिल्या दरायसनें इराणी राज्याच्या पंचवीस क्षत्रपी म्हणजे मोठाले प्रांत करून प्रत्येक प्रांतावर एक एक 'देशपाल' (क्षत्रपावन) नेमिला. प्रत्येक क्षत्रपीचे कित्येक पोटविभाग केलेले असत. क्षत्रप हा आपल्या प्रांताच्या कारभाराचा मुख्य अधिकारी असे. तो कर बसवी, कायद्याचें नियमन करी, रस्ते व मालमत्ता यांच्या सुरक्षितपणाबद्दल जबाबदार असे, व आपल्या हाताखालच्या जिल्ह्यांवर देखरेख ठेवी. राज्यांतील मोठ्या लष्करी ठाण्याचे अधिकारी व राजकीय किल्ल्याचे अधिपती यांच्यावर क्षत्रपाचा अधिकार चालत नसे; तथापि क्षत्रपास स्वतःचें सैन्य ठेवण्याचा अधिकार होता. 'राजनेत्र,' प्रांतांतील पर्शियन लोकांचें मंत्रिमंडळ व सेना या सर्वांचा क्षत्रपावर अखत्यार चालत असे. राजाची सरकारी डाक एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं पाठविण्याकरितां जासुदांची व्यवस्था केलेली असून मोठमोठ्या रस्त्यावर डाकेचीं ठाणीं ठेवलीं होतीं.

**साम्राज्यांतील जित जातींची स्थिति.**—प्रांतांमध्यें जित जातींनां बरेंच स्वातंत्र्य होतें; उदाहरणार्थ, यहुदी लोक आपल्या धर्मोपदेशकांच्या व इतर वयस्कर लोकांच्या नेतृत्वाखालीं यरुशलेम येथें आपल्या जातीची सार्वजनिक परिषद भरवूं शकत असत. जी ती जात आपल्या जातींतील न्याय निवाडे आपण स्वतःच करीत असे; परंतु सामान्यतः जरी राजा किंवा त्याचे अधिकारी या जातींनीं दिलेल्या निकालांत ढवळाढवळ करीत नसत, तरी लहर येईल तेव्हां प्रजेचा हा हक्क गुंडाळून ठेवून एखाद्या व्यक्तीच्या बाबतींत ते आपली अरेरावी चालविण्यास मागें पुढें पहात नसत.

वालुकामय प्रदेशांत ( उ० अरबी व तुराणी भटक्या जातींत), जंगली एका बाजूस असलेल्या पर्वतांत (उ० ऐंग्रोस, मिस्त्रिआ, पिसिडिआ पॅफ्लागोनिआ, बिथिनिआ, व आशिया मायनर येथील प्रदेशांत) व इतर बऱ्याच इराणी जातींत त्या त्या जातींच्या मुख्यांच्या नियंत्रणाखालीं पूर्वापार चालत आलेली शासनव्यवस्था इराणी साम्राज्याखालीं पूर्ववतच चालू ठेवण्यांत आली होती. राज्यकारभाराच्या सोयीसाठीं सुधारलेल्या बहुतेक प्रांतांचे जिल्हे पाडून त्यांवर राजानें नेमलेले अधिकारी व क्षत्रप कारभार चालवीत असत या जिल्ह्यांना ग्रीक लोक राष्ट्रें या अर्थाचा शब्द योजीत. यांमध्येंच मोठाल्या शहरांच्या वसाहतींचा अंतर्भाव होत असे. त्यांचा कारभार तेथील वयोवृद्ध लोक अथवा समाजाचे मुख्य चालवीत असत. बाबिलोन, यरुशलेम हीं अशा प्रकारच्या शहरांचीं उदाहरणें आहेत. याचं नमुन्यावर देवळांच्या मोठाल्या जमीनजुमल्यांचीं व मालमत्तेची देखील संस्थानें होतीं. सिरियामधील बं।इस, कॅप्पाडोशिआमधील दोन कोमान हीं अशा संस्थानांचीं उदाहरणें म्हणून देतां येतील. याशिवाय कित्येक मोठाले जिल्हे बादशहाचा खासगी मुलूख म्हणून राखून ठेविलेले होते. राजाचीं उपवनें व शिकारीच्या जागा या प्रदेशांतच असत. या जिल्ह्यांवर बादशाही अधिकाऱ्यांची देखरेख असे, अथवा राजा ते इराणी इसमास अथवा जित जातींतील लायक लोकांना त्यांची खासगी मालमत्ता म्हणून देत असे. या जहागिरी निखालस खासगी असून त्या वंशपरंपरा चालत असत व पुढें हेलेनिस्टिक काळांत यांचीं स्वतंत्र राज्यें बनलीं.

**नगरसंस्थानें.**—नगरसंस्थानांची घटना वरच्या पेक्षां निराळीच होती. फिनीशियांतल्या संस्थानाप्रमाणें कांहीं राजसत्ताक होतीं व लिशिआंतल्याप्रमाणें कांहीं संस्थानांत उमरावांचें प्रभुत्व होतें, व ग्रीक शहरांप्रमाणें कांहीं संस्थानें प्रजासत्ताक असून त्यांत मंत्रिमंडळें व सार्वजनिक मंडळें असत. मुख्य मुद्दा हा होता कीं, या लोकांची स्वतंत्र स्वायत्त राज्यघटना होती. परंतु हा प्रकार फक्त पाश्चिमेकडील ग्रीक, फिनिशियन व लिशिअन प्रांतांतच दृष्टोत्पत्तीस येत होता. पूर्वेकडील शहरें पश्चिमेकडील शहरांहून भिन्न होतीं. ग्रीक लोकांच्या दृष्टीनें हीं शहरें म्हणजे केवळ मोठमोठीं खेडींच होतीं. एखादा आणीबाणीचा प्रसंग उद्भवला म्हणजे त्यांतील लोक आपल्या विश्वासांतील एखाद्या इसमाकडे राज्यकारभार सोंपवीत व तोच माणूस पुढें जुलमी बने. फक्त मार्डोनिअसनेंच आयोनियनांचें ( यवनांचें ) बंड मोडल्यावर लोकसत्तात्मक पद्धतीनें राज्य करण्याचा प्रयत्न केला होता( ख्रि. पू. ४९२ )

**व्यापार व जमाबंदी.**—राज्यव्यवस्थेच्या बाबतींत जसे इराणी राज्याचे प्रांत परस्पर भिन्न होते त्याचप्रमाणें विनिमयपद्धतीच्या दृष्टीनें देखील या प्रांतांत भिन्नपणा दिसून येतो. अगदीं पश्चिमेस लिडियन व ग्रीक लोकांत सरकारनें अथवा स्वायत्त समाजानें पाडलेलीं नाणीं वापरण्याची विकास पावलेली पद्धत ख्रि. पू. सातव्या शतकापासूनच प्रचारांत होती. इजिप्त, सिरिया, फिनीशिया, व बाबिलोनिया या देशांत प्रत्येक व्यवहाराच्या वेळीं सोन्यारुप्याच्या कांबी मोजण्याची जुनी व्यापारपद्धति प्रचलित होती. या देशांत नाणीं केवळ ख्रि. पू. ४ थ्या शतकापासूनच प्रचारांत आलीं. उलट पक्षीं पूर्वेकडील प्रदेशांत एक वस्तु देऊन तिच्या मोबदल्यांत दुसरी घेण्याची प्राथमिकावस्थेंतील अडाणी पद्धत चालू होती. तथापि सोनें सांपडणाऱ्या हिंदुस्थानच्या सरहद्दीच्या प्रांतांत ( पंजाबांत ) मात्र नाण्यांची पद्धत प्राचीन काळीच स्वीकारण्यांत आली असून तेथें इराणी व ॲटिक नाण्यांचा सार्वत्रिक प्रसार झाला होता. ख्रि. पू. पांचव्या व चौथ्या शतकांत या भागांत इराणी व ॲटिक नाण्यांप्रमाणें नाणीं पाडण्यांत आलीं होतीं. या निरनिराळ्या प्रकारच्या नाण्यांच्या पद्धतींशीं तोंड देऊन सरकारला त्यांचा शक्य तितका मेळ बसवावा लागे. दरबारांत "नैसर्गिक विनिमयपद्धती" चाच नेहमीं उपयोग करण्यांत येत असे. बडे अधिकारी व पौरस्त्य सैनिक यांना धान्यरूपानें वेतन मिळत असे. यांच्या जेवण्याखाण्याची सोय राजाच्या भोजनगृहांतच होत असे; व शिवाय त्यांना देणग्या व जमिनी बहाल करण्यात येत. ग्रीक शिपायांना मात्र नाण्यांच्या रूपानें वेतन द्यावें लागे, व शिवाय राजालाहि नाण्यांची गरज असे. म्हणून राजाचे कर अंशतः पैशाच्या रूपानें व अंशतः घोडे, गुरें, धान्य, कापड व इतर उद्योगधंद्यांची निपज यांच्या रूपानें घेतले जात असत. क्षत्रपसुद्धां पैशाच्या रूपानें कर घेऊन शिवाय आपल्या भोजनगृहाकरितां वर्गणी गोळा करीत असत. क्षत्रपांच्या या भोजनगृहांत त्यांच्या अधिकाऱ्यांच्या जेवण्याची व्यवस्था होत असे.

**नाणीं.**—खंडणीरूपानें आलेल्या मौल्यवान् धातू, सुसा, पर्सेपोलिस व इतर ठिकाणच्या, खजिन्यांत गोळा करून ठेवीत असत; व जेव्हां राजास नाण्यांची गरज पडे तेव्हां तो या धातूंचीं नाणीं पाडत असे. दरायसनें नाण्यांमध्यें सुधारणा केली. त्यानें दारिक नांवाचें ( पर्शियन झारिक= सोन्याचा तुकडा ) १३० ग्रेन वजनाचें व सुमारें २३ शिलिंग किंमतीचें सोन्याचें नाणें पाडिलें. एक दारिक बरोबर २० रुप्याचीं नाणीं ( मीडियन शेकेल ) होतीं व या रुप्याच्या नाण्यांचें वजन प्रत्येकीं ८६.५ ग्रेन व त्या वेळेच्या रुप्याच्या भावाप्रमाणें किंमत सुमारें १ शिलिंग २ पेन्स होती. सोन्याचें नाणें पाडण्याचा अधिकार फक्त राजालाच होता. परंतु रुप्याचीं नाणीं क्षत्रप, सेनानायक, स्वायत्त समाज व राज्यकर्ते राजे यांना पाडतां येत असत.

**साम्राज्याचें धोरण.**—इराणी साम्राज्याचा विस्तार मुख्यत्वेंकरून सायरस व कंबायसिस यांनीं. जिंकलेल्या प्रदेशांच्या फारसा पलीकडे मेळा नव्हता. दरायसनें

या राज्याचा व सरहद्दीवरील प्रदेशाचा बंदोबस्त करण्याचें काम केलें. आणि या उद्देशानें त्यानें आशियामायनरमधील डोंगरी जाती जिंकून साम्राज्याची सरहद्द कॉकेशसपर्यंत वाढविली; फक्त कॉलचिसचेंच राज्य बादशहाच्या मांडलिकत्वाखालीं स्वतंत्र राहिलें होतें. तसेंच त्यानें सिंधुनदाचें खोरें, काफरिस्तान व काश्मीरचा, हिरोडोटसचा कास्पिओइ किंवा कास्पिरोइ येथील, सोनें पैदा होणारा डोंगरी मुलूख व सिंधुनदावरील दर्दिस्थानांतील दरद हीं खालसा केलीं. येथूनच पामीरच्या डोंगरपठारावरील व उत्तरेकडच्या अर्मेजियन शकांवर त्यानें कित्येक स्वाऱ्या केल्या, व तुराणी मैदानांतील भटक्या मेंढपाळ लोकांना कैचींत पकडून पादाक्रांत करण्याकरितां त्यानें रशियन मैदानांतील सिथियन लोकांवरील अयशस्वी झालेली स्वारी हातीं घेतली ( खि० पू० ५१२ ). तथापि या स्वाऱ्यांबरोबरच राजाच्या शिरावर असलेलें राज्याची सुधारणा करण्याचें महत्त्वाचें कार्य तडीस नेण्याचाहि प्रयत्न केला जात होता हें आपणांस उपलब्ध असलेल्या अपुऱ्या दंतकथांवरून कळतें. हिरात जिल्ह्यांत दरायसनें मैदानाच्या प्रदेशांत लागवडीस उत्तेजन देण्याकरितां एक मोठें तळें बांधलें. आपल्या राज्याचा व्यापार वाढविण्याकरितां नौकानयनाच्या दृष्टीनें त्यानें सिंधुनदाच्या प्रवाहाचें संशोधन करविलें. इराणी किनाऱ्यावरील निआर्कसनें वर्णिलेलीं कित्येक बंदरें त्यानेंच स्थापिलीं. या त्याच्या खटपटींवरून पर्सिस व इतर जगांतील व्यापार यांमधील दळणवळणाचे मार्ग खुले करण्याची त्याची इच्छा दिसून येते. नीकोनें ज्याचें काम अगोदरच सुरू केलें होतें तो नाइल नदीपासून सुवेझपर्यंतचा कालवा दरायसनें पुरा केला. या कालव्यानें जहाजांना नाइल नदींतून सोबावरून इराणला सरळ जातां येत असे. क्सर्क्सीझच्या वेळीं आफ्रिकेच्या सभोंवतीं पर्यटन करण्याचा देखील प्रयत्न झाला होता.

**ग्रीसशीं लढाया.**— सायरस व कॅबायसिस यांच्याप्रमाणें दरायसनें जरी नवीन प्रांत काबीज करण्याकरितां स्वाऱ्या केल्या नाहींत, तरी ज्याच्या सरहद्दीवर त्याच्याच बरोबरीचीं दुसरीं साम्राज्यें असण्याऐवजीं लहान लहान राष्ट्रजाती व स्वायत्त समाज यांचा मुलूख असतो अशा साम्राज्यास आपला विस्तार करणें भागच पडतें. उत्तरेकडील भटक्या लुटारू लोकांचा बंदोबस्त करीत असतां दरायसला सिथियन लोकांवर स्वारी करावी लागली; व त्यामुळें थ्रेस व मॅसिडोनिया हे प्रदेश त्याला खालसा करावे लागले. येणेंप्रमाणें भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्याचा बराचसा भाग साम्राज्यांत सामील होतांच त्याबरोबर इतर अनेक लढे उद्भूत झाले. कार्थेजच्या लोकांनीं ग्रीसच्या उलट इराणचा पक्ष घेतला. दरायसनें कार्का या नांवाखालीं हें शहर व मॅक्सिअन्स हीं आपल्या राज्यांतील असल्याचा उल्लेख केलेला आहे. ग्रीसमधील शहरांचे आपसांत नेहमीं तंटेबखेडे चालत व मध्यस्ती करण्याकरितां ते दरायसला बोलावीत. परंतु दरायस कधीं यूरोपीय राजकारणांत फारसा पडला नाहीं. स्युतेशेवटीं अथेन्स व इरीट्रीआ या शहरांनीं अयोनियन व कॅरिअन बंडखोरांना मदत केल्यामुळें लढाई करणें अपरिहार्य झालें ( खि. पू. ४९० ). पण केवळ मार्डोनिअसची ( ४९२ ) व डेटसची ( ४९० ) स्वारीच नव्हे तर कार्थेजच्या मदतीनें क्सर्क्सीझनें जय्यत तयारी करून केलेल्या स्वाऱ्यादेखील सर्वस्वीं फसल्या ( खि. पू. ४८०–४७९ ). मॅराथॉन व प्लाटीआ येथील रणभूमीवर ग्रीक सैनिकांनीं इराणी तिरंदाजांना शरण यावयास लावलें, परंतु अथेनिअन थेमिस्टोक्लीझनें ग्रीक आरमाराचें इराणी–फिनीशियन आरमारावरील श्रेष्ठत्व सालामिस येथें सिद्ध करून त्यांची जमिनीवरील यशाची आशा नष्ट केली व अशा रीतीनें युद्धाचा खरा निकाल लावला. क्सर्क्सीझच्या स्वारीचा मोड झाल्यापासून इराणी राज्यास उतरती कळा लागली. ग्रीक लोकांचें श्रेष्ठत्व इतकें स्पष्ट दिसून आलें कीं, इराणी लोकांनीं पुन्हां स्वारी करण्याचें धाडस कधींहि केलें नाहीं. उलट पक्षीं खि. पू. ४६६ मध्यें इराणी सैन्य व आरमार यांचा सायमननें युरिमिडॉन येथें पुन्हां पराभव केला, व याचा परिणाम असा झाला कीं, आशियाच्या किनाऱ्यावरील ग्रीक प्रांत व सर्व थ्रेशियन मुलूख इराणी लोकांच्या हातचा गेला. इराणी राज्यासारख्या मोठ्या राज्याचें एवढासा प्रदेश गेल्यामुळें फारसें नुकसान झालें नाहीं; व सायप्रस घेण्याचे व बंडखोर इजिप्शियन लोकांच्या साहाय्यानें नाइल नदीचें खोरें जिंकण्याचे अथेन्सचे प्रयत्नहि यशस्वी झाले नाहींत. इराणी साम्राज्यावर स्वारी करण्याची अथवा मोठ्या प्रमाणावर नवीन मुलूख काबीज करण्याची ताकद अथेन्सच्या लोकांच्या अंगांत वस्तुतः नव्हती. हेलेनिक संस्थानांत चालू असणाऱ्या भांडणांमुळें अथेन्सला कॅलिअसचा तह ( खि. पू. ४४८ ) करून इराणशीं लढण्याचा नाद सोडावा लागला; सायप्रस व इजिप्त हीं इराणच्या बादशहाकडेच ठेवावीं लागलीं; व समुद्रकांठचीं शहरें परत न मिळतां अथेनियन लोकांवर पुन्हां स्वारी न करण्याचें इराणच्या बादशहानें वचन दिलें तेवढ्यावरच संतुष्ट रहावें लागलें. सालामिस व प्लाटीआ येथील पराजयांमुळें इराणी साम्राज्याच्या अंगीं इतर राष्ट्रांवर चढाई करून जाण्याची शक्ति राहिली नाहीं; व जगाच्या इतिहासांतील इराणी साम्राज्याचें महत्त्व थोडा वेळ कमी होऊन इजिअन समुद्राचें वाढूं लागलें; व ग्रीक लोक आयुधें व बुद्धि या बाबतींत आपणापेक्षां कमी नाहींत, त्यांचें केवळ शक्तीच्या जोरावर पारिपत्य करणें शक्य नाहीं व ते लोक आपल्याहि फौजेंत उपयोगी पडतील अशी इराणी लोकांना जाणीव झाली.

**साम्राज्याची अंतस्थ स्थिति व बंडें.**—येणेंप्रमाणें इराणी साम्राज्याची वाढ खुंटली. इराणांत शूर व उच्च दर्जाचे पुरुष निपजणें बंद झालें असें नाहीं, पण दिवसानुदिवस जनानखाना, खोजे लोक व अशाच प्रकारचे इतर

दरबारी लोक यांचें प्राबल्य वाढत चाललें होतें. देशाभिमान व राजभक्ति यापेक्षां सत्तेच्या मोहाचा पगडा कर्तबगार लोकांच्या मनावर अधिकाधिक बसत चालला होता. उदाहरणार्थ, राजाच्या जुलमामुळें नव्हे तर दुर्बल राजे गादीवर येऊं लागल्यामुळें प्रदीप्त झालेल्या महत्वाकांक्षेनें क्षत्रपांमध्यें स्वतंत्र होण्याची इच्छा उत्पन्न झाली. ख्रि. पू. ४६५ मध्यें पहिल्या क्सर्क्सीझचा त्याचा वजीर आर्टाबेनस यानें खून करून सर्व सत्ता आपणच बळकावण्याचा यत्न केला. पुढें ख्रि. पू. ३३८ मध्यें तिसऱ्या आर्टाक्सर्क्सीझचा खून करून बागोअसनें देखील असाच प्रयत्न केला: अशा परिस्थितींत पहिला क्सर्क्सीझ व दुसरा आर्टाक्सर्क्सीझ यांसारख्या सुस्वभावी परंतु दुर्बल, लहरी व परतंत्रानें चालणाऱ्या राजांची भर पडली. दुसरा दरायस व तिसरा आर्टाक्सर्क्सीझ हेच काय ते अमानुष जुलमी राजे होऊन गेले. तिसऱ्या आर्टाक्सर्क्सीझनें राजघराण्यांतील बहुतेक इसमांची कत्तल उडवून रक्ताचे पाट वाहविले व आपल्या पित्याच्या वेळीं विस्कळीत झालेल्या राज्याची घडी पुन्हां बसविली.

अशा स्थितीमुळें उत्पन्न झालेली बंडाळी व लढाया यांचा विचार करतांना एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, त्यांचा परिणाम राज्याच्या एकथ्या दुकथ्या प्रांतावरच झाला. यांचें स्वरूप दारुण होऊन त्यांच्यामुळें विस्तृत प्रदेशाला बाधा कैंचित् प्रसंगीच झाली असेल. ॲकिमेनिड कारकीर्दीच्या काळीं बहुतेक प्रांतांत दोन शतकें शांतता व सुव्यवस्था नांदत होती. जोरदार बादशाही सत्तेखालींच केवळ दाबांत राहूं शकणाऱ्या पर्वत व वालुकामय मैदानें यांमधील रानटी जाती, त्यांच्यावरील ताबा नाहींसा झाल्याबरोबर साहजिकपणेंच स्वतंत्र झाल्या. असले लोक म्हणजे झॅग्रोसमधील कार्ड्यूकिअन जात व इलामचा अंतर्भाग, उत्तर मीडिया, टॅारस व ओलिंपस या प्रांतांतील कित्येक निरनिराळ्या जाती या होत. या लोकांचें पारिपत्य करण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ झाले; व एकबटाना येथें जेव्हां राजधानी हालविण्यांत आली तेव्हां या डोंगरी लोकांनीं इराणी राजास सुरक्षितपणें जाऊं यावें म्हणून त्यांना पैसे द्यावे लागले! ख्रि.पू. ४०० मध्यें आर्मीनियाच्या उत्तरेस इराणी राजांची सत्ता नष्ट झाली होती व पॅांटिक पर्वतांतील लोक व समुद्रकिनाऱ्यावरील ग्रीक शहरें स्वतंत्र झालीं होतीं. पॅफ्लागोनिआमध्यें एतद्देशीय राजांनीं बलाढ्य परंतु अल्पकालीन राज्य स्थापिलें होतें, व बिथिनिअन लोकांचे नायक स्वतःच मालक बनले होते. हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील प्रांत इराणी साम्राज्यांतून फुटून निघाले व ख्रि. पू. ४८६–४८४ मध्यें एक व ४६०–४५४मध्यें दुसरें अशीं बंडें होऊन इजिप्त देश कायमचा स्वतंत्र झाला. यानंतर तिसऱ्या आर्टाक्सर्क्सीझनें देश्य राजघराण्यांचा मोड करून त्यांना फिरून एक वेळ शरण यावयास लावलें.

तथापि पहिल्या दरायसच्या कालानंतर ग्रीक, लिशिअन व फिनीशिअन शहरें खेरीज करून इतर सुधारलेल्यां देशांतील एकाहि प्रदेशानें इराणी सत्ता झुगारून देऊन स्वतंत्र होण्याचें मनांत आणलें नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. क्षत्रपांच्या बंडांमुळें राज्याचा दुबळेपणा आणखी स्पष्टपणें दृग्गोचर झाला होता. क्षत्रपांनां सैन्य ठेवण्याची परवानगी असल्यामुळें ते आपल्या नोकरींत पुष्कळ पगारी ग्रीक शिपाई ठेवूं लागले, व या सैनिकांच्या मदतीनें त्यांनां बंड करणें सुलभ झालें. पहिला आर्टाक्सर्क्सीझ व दुसरा दरायस यांच्या वेळीं अशीं बंडें क्वचितच होत असत. परंतु धाकट्या सायरसच्या बंडाच्या वेळीं (ख्रि. पू. ४०१) जेव्हां १२००० ग्रीक सैन्यावर सबंध इराणी सैन्यास हल्ला करण्याचें धाडस झालें नाहीं तेव्हां बादशाही सत्तेचें दौर्बल्य स्पष्टपणें व्यक्त झालें. यापुढें तर आशियामायनर व सिरिया या देशांत क्षत्रपांचीं बंडें प्रत्यहींच होऊं लागलीं. यांचा बंदोबस्त करतांना इराणी राजांनां ग्रीक व इजिप्त या देशांशीं लढाई करावी लागत असे.

**उत्तरकालीन ग्रीक युद्धें व ॲंटॅल्सिडसचा तह.**— तथापि याच काळांत राज्याचें परराष्ट्रीय धोरण बरेंच यशस्वी झालें ( ख्रि. श. ४१३ ). सिराक्यूस येथें अथेनियन सत्तेचा मोड झाल्यामुळें, ग्रीक शहरांपासून वसूल करावयाची खंडणी गोळा करण्याचा हुकूम दुसऱ्या दरायसनें आशियामायनरमधील क्षत्रपांनां केला. स्पार्टाबरोबर इराण अथेन्सविरुद्ध लढाईंत पडलें, व इराणी पैशाच्या जोरावरच लायसँडरला अथेन्सचा मोड करतां आला (ख्रि. पू. ४०४). पुढें लढाईमधील लुटीच्या वांटणीबद्दल स्पार्टा व इराण यांच्यामध्यें तंटा उद्भवून इराण स्पार्टाविरुद्ध ग्रीक संघांत सामील झालें. ख्रि. पू. ३९४ मध्यें नायडस येथें लॅसिडिमोनिअन आरमाराचा इराणी क्षत्रपांनीं निःपात केला व ख्रि. पू. ३८७ मध्यें ॲंटॅल्सिडसचा तह करून स्पार्टानें मोठ्या कष्टानें आशियांतील प्रदेशावरील आपला हक्क सोडून देऊन इराणी बादशहाचें ग्रीसवरील प्रभुत्व कबूल केलें. अतःपर इराणी बादशहाच्या इच्छेला ग्रीसमध्यें कायद्याप्रमाणें मान मिळूं लागला; व पुढें कांहीं कालपर्यंत कोणत्याहि हेलेनिक संस्थानानें इराणी साम्राज्याच्या शांततेचा भंग करण्याचें धाडस केलें नाहीं.

हा विजय इराणी लोकांनां ग्रीक लोकांमधील आपसांतील यादवीमुळें मिळाला. तथापि इराणी राजांनां इजिप्त पुन्हां जिंकतां आला नाहीं अगर सायप्रसमधील सालामिसच्या राजाचा पूर्ण बंदोबस्तहि करतां आला नाहीं. यावरून इराणी राजांचा कमजोरपणा व्यक्त होतो. दिवसानुदिवस क्षत्रपांचीं बंडें अधिकाधिक भयंकर स्वरूप धारण करूं लागलीं. दुसऱ्या आर्टाक्सर्क्सीझची कारकीर्द ख्रि. पू. ३५९ मध्यें संपली तेव्हां पश्चिमेकडील प्रदेशावरील बादशाही सत्तेचा समूळ लोप झाला होता. त्याच्या मागून तिसरा आर्टाक्सर्क्सीझ ओकस हा गादीवर बसला.

त्यानें मात्र साम्राज्याला पुन्हां पूर्वीचे चांगले दिवस आणून दिले. ख्रि.पू. ३५५मध्यें त्यानें अथेन्सच्या सत्तेचा तिसऱ्यांदा मोड केला, ३४३ मध्यें इजिप्त घेतलें व त्याच्या सेनानायकांनीं आशिआमायनरमधील सर्व बंडाळी मोडून टाकली. हा राजा ख्रि. पू. ३३८ मध्यें मेला तेव्हां निदान बाह्यतः तरी इराणी साम्राज्याची पूर्वीपेक्षां सर्वांत जास्त भक्कम पायावर स्थापना झालेली दिसत होती.

हे सर्व विजय ग्रीक सैन्य व सेनानायक यांच्या मदतीनेंच मिळालेले होते. उपर्युक्त क्रिया चालली असतांच पगारी सैनिक, व्यापारी, शिल्पकार, वारांगना, गुलाम या लोकांमार्फत ग्रीक सुधारणेचा इराणमध्यें जास्त जास्तच फैलाव होत होता. हेलेन श्रेष्ठ आहे यासंबंधीं उभयपक्षीं वाद नव्हता. ग्रीक लोकांनां राष्ट्रीय सैन्यांत नोकर ठेवून इराणी लोक संकटांपासून आपला बचाव करून घेत, व ग्रीक लोकांच्या व्यवहारनीतीचा फायदा घेऊन आपल्या राज्याचें हित साधीत असत. ग्रीक संस्थानांच्या परस्परांतील चुरशीमुळें होत असलेल्या भांडणांत जीं शहरें गुंतलेलीं नव्हतीं तेथील लोकांनां जगाचें राज्य करण्यास लायक असलेल्या अशा ग्रीक लोकांनीं आशियांतील दुर्बळ राजांचे हुकूम पाळावे ही गोष्ट फार टोंचत असे. आयसॉक्राटीझ, कॅलिस्थनीझ व इतर असंख्य लेखकांनीं ही राष्ट्रीय मनोभावना व्यक्त केली होती. स्वसंतोषानें अथवा सक्तीनें ग्रीक लोकांचें ऐक्य करून इराणविरुद्ध चढाई करावी असें हे लोक प्रतिपादीत असत.

**मॅसिडोनचा उत्कर्ष.**—या मताच्या फलप्राप्तीला फार कालावधि लागला नाहीं. मॅसिडोनच्या फिलिप राजानें स्थापिलेली नवीन सत्ता लवकरच पहिल्या प्रतीची झाली; परंतु या सत्तेचा इराणी राज्याविरुद्ध कटाक्ष नव्हता. थ्रेस, इलिरिया व बाल्कन द्वीपकल्प हे प्रदेश काबीज करून मॅसिडोनियाचा विस्तार करावा असा या सत्तेचा प्रत्यक्ष उद्देश होता. परंतु ग्रीक संस्थानांस आपल्या सत्तेखालीं आणण्याच्या उद्योगांत मॅसिडोनला इराणाविरुद्ध ग्रीक लोकांचें ऐक्य करणें भाग होतें. येणेंप्रमाणें, लढाया केवळ अपरिहार्यच झाल्या होत्या. ख्रि. पू. ३४० मध्यें तिसऱ्या आर्टाक्सर्क्सीझनें मॅसिडोनियाच्या चढाईपासून बचाव करण्याकरितां पिरिंथस व बिझॅन्शिअम या थ्रेसमधील शहरांनां मदत केली; ३३८ मध्यें त्यानें डिमॉस्थिनीझशीं तह केला. केरोनीआचा विजय मिळाल्यावर ३३७ मध्यें फिलिपनें कॉरिंथचा सर्व ग्रीक संस्थानांचा अंतर्भाव करणारा संघ स्थापन केला; व राष्ट्रीय कार्यक्रम मान्य करून त्यानें ३३६मध्यें आशियामायनरमध्यें आपलें सैन्य पाठविलें. सर्व इराणी साम्राज्य जिंकण्याचा त्याचा इरादा नव्हता. ग्रीक शहरें स्वतंत्र करून टॉरसपर्यंत आशियामायनर काबीज करावा ही फार तर जास्त फिलिपची महत्त्वाकांक्षा होती.

परंतु ३३६ मध्यें फिलिपचा वध झाल्यामुळें ही स्थिति अजीबात पालटून गेली. त्याच्या मागून त्याचा मुलगा अलेक्झांडर दि ग्रेट गादीवर बसला. हा लढवय्या व कुशाग्र बुद्धीचा राजकारणपटु पुरुष असल्यामुळें त्यानें मॅसिडोनियन लोकांच्या बळावर सर्व जग पादाक्रांत करण्याची अत्युच्च महत्त्वाकांक्षा धरली. जग जिंकण्याची कल्पना याच्या मनांत ॲकिमेनिड राजापेक्षांहि जास्त उत्कट असल्यामुळें त्यानें तें काम नेटानें हातीं घेतलें, व त्याचा अकालीं मृत्यु झाला नसता तर तो आपली महत्त्वाकांक्षा पूर्ण केल्याशिवाय खास राहिला नसता.

**मॅसिडोनियन साम्राज्य.**—अलेक्झांडरनें इराण कसें जिंकलें व आपली सत्ता जगभर कशी पसरविली हें येथें देण्यास अवकाश नाहीं. तथापि महत्त्वाची गोष्ट ही कीं, गॉगमलिच्या विजयानंतर (१, आक्टो. ३३१), व विशेषतः दरायसच्या खुनानंतर अलेक्झांडर हा स्वतःला इराणी साम्राज्याचा कायदेशीर अधिपति मानून इराणी राजांचा पोषाख वापरूं लागला व त्यांचे सर्व संस्कार पाळूं लागला.

इराणी साम्राज्यांतील मुख्य मुख्य शहरें काबीज होतांच इराणी युद्ध संपलें व अलेक्झांडरची जगावरील मोहीम सुरू झाली. जग जिंकण्याकरितां मॅसिडोनिया व ग्रीस यांमधील सैन्य अर्थातच अपुरें होतें. परंतु अलेक्झांडरनें मॅसिडोनियन, ग्रीक लोक आणि इराणी लोक यांमध्यें भेदभाव न मानतां या दोन्ही लोकांनां एकत्र करण्याचा यत्न केला. इराणी लोकांनां तो आपल्या जगड्व्याळ राज्याचा दुसरा आधारस्तंभच मानीत असे. त्यानें सुसा येथें (फेब्रु. ३२४) सर्व ग्रीक वरिष्ठ अधिकारी व इतर १०००० मॅसिडोनियन लोक यांचीं इराणी बायकांशीं लग्नें लावून या दोन जाती संलग्न केल्या; व तरुण इराणी शिपायांनां मॅसिडोनियन पद्धतीवर लष्करी शिक्षण देऊन त्यांची सैन्यांत भरती केली व मॅसिडोनियाच्या कसलेल्या शिपायांस स्वदेशीं परत जाण्यास परवानगी दिली. ३२४ मध्यें ऑलिम्पिआच्या उत्सवप्रसंगीं त्यानें, सर्व ग्रीक शहरांनीं आपणास ईश्वर मानून स्वदेशीं परत येणाऱ्या शिपायांनां पुन्हां समाजांत घ्यावें असा हुकूम सोडला. ख्रि. पू. ३२३मध्यें अरबस्थान जिंकण्याची पूर्ण तयारी झाली व तो जिंकल्यावर पश्चिमेकडील मोहीम, कार्थेज व इटालियन लोक यांवरील स्वारी या गोष्टी हातीं घ्यावयाचा अलेक्झांडरचा बेत होता. परंतु याच सुमारास ख्रि. पू. ३२३ मध्यें बाबिलोनमध्यें अलेक्झांडर मरण पावून त्याचे हे सर्व बेत जागच्या जागीं राहिले.

**सेनापतींचीं राज्यें.**—अलेक्झांडरला कोणी वारस नव्हता. यामुळें तो मेल्यानंतर जग जिंकण्याचें काम तहकूब राहून मॅसिडोनियाच्या पिच्छेहाटीस सुरुवात झाली. सैन्यांतील शिपाई हेच लोकांचे प्रतिनिधी मानले जात असल्यामुळें त्यांनीं आपल्या नायकांच्या नेतृत्वाखालीं राज्यकारभार हातीं घेतला. इराणी बायका आतां टाकून देण्यांत येऊन महत्त्वाच्या सर्व प्रांतांवरील इराणी क्षत्रप काढून टाकण्यांत आले. परंतु अलेक्झांडरनें पादाक्रांत केलेला सर्व मुलूख एका सत्तेखालीं ठेवणें आतां अशक्य वाटूं लागलें. अलेक्झांडरच्या

मागून त्याच्या गादीवर कोणीं बसावें याबद्दल बराच काळ-पर्यंत सेनापतींमध्यें झगडा चालू होता. अँटिगोनस अले-क्झांडरच्या गादीसाठीं आपल्या प्रतिस्पर्ध्यांशीं लढत असतां सिल्यूकसनें सिंधुनदापर्यंतचा इराणी साम्राज्याचा सर्व मुलूख आपल्या कबज्यांत घेऊन बाबिलोन ही आपली राजधानी केली. उत्तरमीडियामध्यें मात्र अलेक्झांडरनें नेमलेल्या इराणी ॲट्रोपाटीझ नांवाच्या क्षत्रपानें आपलें स्वातंत्र्य कायम राखलें होतें, व त्याच्या मागून त्याचे वारसच त्या प्रांताचा कारभार पाहूं लागले. तसेंच आर्मीनियामध्यें हैडार्नीझचें इराणी घराणें टिकाव धरून राहिलें होतें, व याचसारखीं आशियामायनरमधील पहिला मिथ्राडेटीझ व पहिला एरिआरेथीझ या इराण्यांनीं स्थापिलेलीं पाँटस व कॅप्पाडोशिआ हीं राज्यें होतीं.

**पहिला सिल्यूकस निकेटार व पहिला अँटायोकस.**—सिल्यूकसनें इराण ताब्यांत घेतल्यामुळें हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील प्रदेशासाठीं तो व चंद्रगुप्त मौर्य यांच्यामध्यें लढा उत्पन्न झाला. अखेरीस सिल्यूकसनें पांचशें हत्ती व इतर देणग्या घेऊन हे प्रांत व सिंधुनदाच्या पश्चिमेकडील सरहद्दीचे प्रांत चंद्रगुप्ताला दिले. यानंतर सिल्यूकसनें अँटिगोनसचें उच्चाटन करण्याच्या कामीं लायसिमाकस, टॉलेमी व कॅसँडर यांनां मदत करण्याकरितां पश्चिमेकडील प्रदेशांत स्वारी केली.

**इराणमधील ग्रीक शहरें.**—३०१मधील इप्ससच्या लढाईमुळें सिल्यूकसला सिरिया व आशियामायनरचा पूर्वभाग हे प्रदेश मिळाले व तेव्हांपासून त्यानें अँटिओकिआ हें सिरियांतील शहरच आपलें राहण्याचें ठिकाण केलें. यानंतर थोड्याच दिवसांनीं सिल्यूकसचा युफ्रेटीसच्या पूर्वेकडील सर्व प्रांत त्याचा मुलगा अँटायोकस याच्या हातीं आला. अलेक्झांडरनें आपल्या राज्याच्या रक्षणार्थ बॅक्ट्रिया, सॉग्डिएना व हिंदुस्थान या देशांत शहरें वसवून आपले निवडक लोक ठेविले होते. अलेक्झांडर मेल्यावर यांनीं बंड केलें व ते ग्रीसकडे परत जाण्याचा प्रयत्न करूं लागले. परंतु पायथॉननें त्यांच्यावर हल्ला करून त्यांनां कापून काढलें. याशिवाय अलेक्झांडरच्या मागून झालेल्या राजांनींहि आपल्या राज्याच्या संरक्षणार्थ कांहीं शहरें वसविलीं. हीं शहरें बहुतेक जुन्या वसाहतींच्या जागींच वसविलीं असून त्यांच्यासंबंधीं लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं या शहरांत ग्रीक व मॅसिडोनियन लोकांचीच वस्ती होती व ते साम्राज्यांत राहून स्वायत्त समाजाचे सर्व हक्क उपभोगीत होते. या शहरांनां त्यांच्या लगतचा कांहीं प्रदेश देखील जोडण्यांत आला होता व येणें प्रमाणें देशांतील बऱ्याच जिल्ह्यांचे अशा प्रकारचे स्थानिक स्वराज्य उपभोगणारे संघ बनले होते. तथापि, ज्या कांहीं शहरांनां पूर्ण स्वातंत्र्य देण्यांत आलें होतें तीं खेरीज करून बाकीच्या सर्वांवर राजाचा व त्याच्या अधिकाऱ्यांचा प्रत्यक्ष नसला तरी अप्रत्यक्ष अंमल चालत असे. प्रथमतः या शहरांतील एतद्देशीय रहिवाशांनां नागरिकत्वाचे वगैरे कांहींएक हक्क नसून त्यांवर सर्वस्वीं बाह्य वसाहतवाल्यांचाच अंमल होता. परंतु लवकरच हे दोन्ही लोक एकमेकांत मिसळून एक होऊं लागले. हा प्रकार सिल्यूकसच्या राज्यांत फार झपाट्यानें व पूर्णपणें घडून आला. अशा रीतीनें सिंधुनदापर्यंतच्या सर्व आशिया खंडांत ग्रीक भाषेचा व ग्रीक संस्कृतीचा फैलाव करण्यास तीं शहरें कारणीभूत झालीं. हीं शहरें व्यापाराचीं व उद्योगधंद्याचींहि केंद्रस्थानें होतीं व या शहरांनां दिलेले हक्क व त्यांवरील राजाची मर्जी यामुळें तेथें अनेक लोक ( विशेषतः यहुदी ) कायमची वस्ती करण्यास येऊन तीं लवकरच मोठीं भरभराटीचीं शहरें बनलीं. बाबिलोनिया जिंकल्यावर सिल्यूकसनें तैग्रिस नदीच्या कांठीं सिल्यूशिआ नांवाची नवीन राजधानी वसविली. यानंतर मेसापोटेमिया, बाबिलोनिया व सूशिएना या देशांमध्यें शहरें वसविलीं गेलीं व मीडियाच्या सभोंवारहि पुष्कळ शहरें बांधण्यांत आलीं.

**ग्रीक लोकांच्या कारकीर्दींतील इराणी धर्म.**—ग्रीक संस्कृतीचा येणेंप्रमाणें पूर्वेकडील प्रदेशांत फैलाव होत असतांना इराणी लोक परकी अंमल मुकाट्यानें सहन करीत होते, व वरच्या दर्जाचे इराणी लोक ग्रीक सुधारणेच्या बाह्यांगांचा अवलंब करीत होते. उत्तरकालीन पारशी दंतकथांत अलेक्झांडरनें झरथुष्ट्राचे धर्मग्रंथ जाळले असें म्हटलें आहे. परंतु या दंतकथांनां ऐतिहासिक दृष्ट्या कांहीं महत्त्व नाहीं. ग्रीक लोकांनीं इराणी लोकांच्या धर्मांत कधींच हात घातला नव्हता. उलट पक्षीं त्यांच्या अमदानींत या धर्माचा केवळ पश्चिमेंतच ( आर्मीनिया, उत्तर सिरिया, आशियामायनर ) नव्हे तर पूर्वेकडे देखील जोराचा प्रसार झाला. तथापि या धर्माचें राष्ट्रीय लक्षण व जुन्या इराणी साम्राज्याची स्मृति फक्त पार्सिसमध्येंच टिकून राहिली होती.

**बॅक्ट्रिया व पार्थियामधील स्वतंत्र राज्यें.**—ख्रि. पू. २८२ मध्यें लायसिमाकसवर स्वारी करून सिल्यूकसनें त्याचें आशियामायनर व थ्रेसमधील राज्य खालसा केलें. २८१ मध्यें सिल्यूकस मारला गेला व त्याचा मुलगा पहिला अँटायोकस हा या अवाढव्य राज्याचा मालक झाला. इजिअन समुद्रापासून सिंधु नदापर्यंत पसरलेल्या त्याच्या राज्यांत सर्वत्र शत्रूला हल्ला करतां येण्यासारखीं ठिकाणें होतीं. सिल्यूकसच्या मृत्यूनंतर या राज्यांत केव्हांच शांतता नव्हती. गॅलिशी लोक व ॲट्रोपाटीन, आर्मीनिया, कॅप्पाडोशिया, पाँटस, बिथिनिआ, गालेशन्स, पर्गामम, ऱ्होड्स व सरहद्दीवरील इतर लहान लहान ग्रीक संस्थानें या राज्याचें सामर्थ्य कमी करण्याचा हरएक प्रयत्न करीत असत. शिवाय ग्रीक सुधारणा वाढल्यामुळें असंख्य स्थानिक संस्थानें निर्माण झालीं होतीं, व हीं सर्व पूर्ण स्वातंत्र्य संपादन करण्याकरितां एकसारखीं धडपडत होतीं. यामुळें सिल्यूकिडी राजांनां आपलें अस्तित्व कायम राखण्याकरितां नेहमीं लढावें लागत

असे. दुसऱ्या अँटायोकसच्या वेळीं ( २६४-२४७ ) सिल्यूकिडी राज्यास दुसऱ्या टॉलेमीपासून त्रास झाला. बॅक्ट्रियामधील ग्रीक लोकांनीं डायोडोटस नांवाच्या आपल्या सुभेदाराच्या नेतृत्वाखालीं बंड करून हिंदुकुशपर्वताच्या उत्तरेस स्वतंत्र राज्य स्थापिलें. इतर प्रांतांत देखील बंडें झालीं व पार्नी अथवा अपार्नी नांवाच्या कास्पिअन समुद्राच्या पूर्वेकडील मैदानांत राहणाऱ्या इराणी भटक्या लोकांच्या आर्सेसीझ नांवाच्या नायकानें पार्थिया जिल्ह्यामध्यें स्वतंत्र राज्य स्थापिलें ( ख्रि. पू. २४८ ).

**तिसरा अँटायोकस**—या राजानें आपल्या कारकीर्दीच्या आरंभीं ( ख्रि. पू. २२० ) मीडियाच्या क्षत्रपाचें बंड मोडलें, नंतर अॅट्रोपाटीनच्या राजावर चढाई करून त्यास तह करावयास लावलें व आशिया मायनरमधील बंडाचें निर्मूलन करण्याकरितां पूर्वेकडील प्रदेशांत मोठी मोहीम केली. त्यानें आर्मीनियाच्या राजाला विश्वासघातानें पदच्युत करून तेथें दोन सुभेदार नेमिलें, मीडियाचा बंदोबस्त केला आणि पार्थियाचा आर्सेसीझ व बॅक्ट्रियाचा युथिडेमस यांच्यावर जय मिळवून त्यांच्याशीं तह केला. त्याचप्रमाणें त्यानें हिंदुस्थानच्या राजाशीं दोस्ती केली; कार्मोनिआ, पर्सिस व बाबिलोनिया या प्रदेशांत बादशाही अंमल पुन्हां प्रस्थापित केला; व २०५ मध्यें तैग्रिसच्या मुखापासून अरबी आखातांतून अरबस्थानांतील गेऱ्हा ( अर्वाचीन बारेन ) शहरापर्यंत जलपर्यटन केलें.

**सिल्यूकिडी अंमलाचा ऱ्हास**— तथापि यानंतर लवकरच या राजानें पांचव्या टॉलेमीवर स्वारी करून त्यावर जो विजय मिळविला त्यामुळें त्याचें रोमशीं युद्ध जुंपलें, व त्या युद्धांत सिल्यूकिडी राज्याचे तुकडे तुकडे झाले ( ख्रि० पू० १९० ) आणि आशिया मायनर प्रांत हातचा जाऊन अँटायोकसला बराच काळपर्यंत रोमला मोठी खंडणी भरावी लागली. हे पैसे मिळविण्याकरितां त्यानें ईलाम देशांतील बेलचें देऊळ लुटल्यामुळें तेथील रहिवाशांनीं त्याला ठार केलें. साम्राज्य दुर्बल झालेलें पहातांच आर्मीनियाच्या सुभेदारांनीं स्वातंत्र्य पुकारलें. इतर जिल्ह्यांतहि अशींच बंडें होऊन पूर्वेस युथिडेमस व त्याचे वारस यांनीं सिंधुनदाचा प्रदेश व इराणी सरहद्दीवरील मुलूख जिंकण्यास आरंभ केला.

आपलें वैभव कायम राखण्याकरितां सिल्यूकिडी राजे जिवावर उदार होऊन लढत होते. चौथ्या अँटायोकसनें (१७६-१६३) पूर्वेकडील प्रदेश व बाबिलोनियांतील शहरें एक वार परत मिळविलीं. पर्सिस व मीडिया हे देश अद्याप या राज्यांत होते, परंतु या राजाच्या मरणानंतर रोमन लोकांनीं सिल्यूकिडी राज्य नष्ट करण्याकरितां अंतस्थ तंट्यांचा फायदा घेतला. त्यांनीं या राज्याचें सैन्य व आरमार कमी करून प्रत्येक बंडाला प्रोत्साहन दिलें. अशा बिकट परिस्थितींतहि पहिल्या डिमीट्रिअसनें (१६१—१५० ) मीडिया बळकावून बसलेल्या बाबिलोनच्या सुभेदाराचें बंड मोडलें ( १५९ ).

**आर्सेसिडींचें पार्थियन साम्राज्यः पहिला मिथ्राडेटीझ व फ्राएटीझ.**—सिल्यूकिडी राजांच्या वैभवास उतरती कळा लागली असतांना पूर्वेकडील प्रदेशांत आर्सेसिडी राजांनीं आपल्या राज्याचा विस्तार करण्यास सुरुवात केली. पहिल्या फ्राएटीझनें ( १७५-१७० ) एलयुझ्नेमधील मीर्डिअन लोकांना जिंकलें. त्याचा भाऊ पहिला मिथ्राडेटीझ ( १७०-१३८ ) यानें बॅक्ट्रियाच्या राजाशीं निकराची लढाई करून तुराणी सरहद्दीवरील कांहीं जिल्हे जिंकले व सिंधुनदापलीकडे प्रवेश केला. पश्चिमेस त्यानें मीडिया जिंकून बाबिलोनिया घेतला व सेल्यूशिआ शहर काबीज केलें. १४० मध्यें सिल्यूकिडी राजा दुसरा डिमीट्रिअस यानें मिथ्राडेटीझशीं युद्ध केलें, परंतु त्यांत त्याचा पराभव होऊन तो कैद झाला. यानंतर मिथ्राडेटीझ मरण पावला. पुढें त्याचा मुलगा दुसरा फ्राएटीझ ( १३८-१२७ ) ह्याच्यावर १३० मध्यें डिमीट्रिअसचा भाऊ सातवा अँटायोकस यानें हल्ला करून डेमीट्रिअसची मुक्तता केली; परंतु पुढें १२९ मध्यें मीडियांत त्याचा पराभव झाला. यानंतर युफ्रेटीझ नदीच्या पूर्वेकडील प्रदेशांतील सिल्यूकिडींचें वर्चस्व कायमचें नष्ट झालें. सिल्यूशिआ वगैरे बाबिलोनियांतील शहरें फ्राएटीझनें आपल्या एका आवडत्या अधिकाऱ्याच्या स्वाधीन केलीं.

**दुसरा मिथ्राडेटीझ व त्याच्या मागून झालेले राजे.**—या लढाया चालू असतां इकडे पूर्व इराणांत मोठ्या घडामोडी झाल्या. चिनी लोक ज्यांनां युएची व ग्रीक लोक सिथियन म्हणत अशा मांगोल लोकांच्या १५९ जातींनीं सॉग्डिएनामध्यें प्रवेश करून १२९ मध्यें बॅक्ट्रिया देश काबीज केला. बॅक्ट्रियांतून त्यांनीं पुढें इराणांत व हिंदुस्थानांत शिरण्याचा यत्न केला. सातव्या अँटायोकसशीं दोस्ती करून त्यांनीं पार्थियन राज्यावर हल्ला केला. दुसरा फ्राएटीझ व त्याच्यामागून गादीवर बसलेला त्याचा चुलता पहिला आर्टाबेनस ( १२७-१२४ ) हे दोघेहि सिथियन लोकांशीं लढतांना पराभव पावून ठार झाले; परंतु त्याचा पुत्र दुसरा मिथ्राडेटीझ ( १२४-८८ ) यानें सिथियन लोकांचा पराभव करून कांहीं काळ आर्सेसिडींची सत्ता पुन्हां प्रस्थापित केली. त्यानें आर्मीनियाचा राजा आर्टाव्हेसडीझ याचाहि पराभव करून तो ७० खेरीं देईपर्यंत त्याच्या ओलीस ठेवलेल्या टायग्रेनीझ नामक पुत्राची मुक्तता केली नाहीं. टायग्रेनीझनें कॅपाडोशियावर स्वारी केली व रोमन अधिकारी कॉर्नेलिअस सल्ला हा त्यावर चालून आला तेव्हां मिथ्राडेटीझनें रोमशीं पहिला तह केला ( ख्रि. पू. ९२ ). यानंतर मिथ्राडेटीझ लवकरच मरण पावला व त्याच्या मृत्युमुळें आर्सेसिडी सत्ता पुन्हां दुसऱ्यानें नष्ट झाली. पश्चिमेकडील प्रांत व पश्चिम आशियांतील सत्ता आर्मीनियाच्या टायग्रेनीझच्या हातीं गेली.

याच वेळीं सिथियन लोकांबरोबरहि नवीन निकराचें युद्ध सुरू झालें. याच काळांतल्या पार्थियन राजांच्या नाण्यांवर जरी त्यांच्या कित्येक यशस्वी मोहिमांचा उल्लेख सांपडतो, तरी ख्रि. पू. ७६ मध्यें सिथियन लोकांनीं सॅनाट्रुसीझ नांवाच्या एका वयाचीं ऐशीं वर्षें उलटून गेलेल्या पार्थियन राजाला गादीवर बसविलें या गोष्टीवरून या काळांतील अंदाधुंदीची कल्पना होते. सॅनाट्रुसीझच्या पूर्वींच्या राजांचीं नांवें माहीत नाहींत. सॅनाट्रुसीझच्या मागून तिसरा फ्राएटीझ (७०–५७) गादीवर येईपर्यंत या राज्यांत शांतता प्रस्थापित झालेली दिसत नाहीं.

**रोमन लोकांशीं लढाया.**—रोमन लोक आतां टायग्रेनीझवर स्वाऱ्या करूं लागले, ही गोष्ट ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाची आहे. फ्राएटीझनें लुकुलस व पॉंपी यांशीं तह करून ६६ मध्यें रोमन लोकांस टायग्रेनीझवर स्वारी करण्याच्या कामीं मदत केली. रोमन लोकांनीं पार्थियन राजाला युफ्रेटीझ नदीपर्यंतचें त्याचें जुनें राज्य परत मिळवून देण्याचें आमिष दाखविलें होतें. परंतु रोमन सेनापतींनीं पुढें पार्थियन लोकांशीं केलेला तह पाळला नाहीं; व पार्थियनांत रोमन लोकांशीं लढण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें फ्राएटीझ स्वस्थ बसला.

आपल्या पूर्वजांचें वैभव फ्राएटीझला परत मिळवितां आलें नाहीं तरी तो आपणांस शहानशहा म्हणजे राजराजेश्वर म्हणवीत असे. फ्राएटीझचा ख्रि. पू. ५७ मध्यें त्याच्या मुलांकडून खून झाला.

**संघटना.**—बाह्यतः पार्थियन साम्राज्य हा ॲकिमेनिड साम्राज्याचाच उत्तरभाग असावा असें वाटतें, परंतु वस्तुतः हें साम्राज्य पूर्वींच्या साम्राज्याहून अंतस्थ व बाह्य स्थितींत अगदीं भिन्न होतें. हें राज्य जगभर पसरलेलें नव्हतें. युफ्रेटीझच्या पश्चिमेकडील देश या राज्याच्या सत्तेखालीं केव्हांच आले नव्हते व इराणांतीलहि अर्धा भागसुद्धां आर्सेसिडींच्या अंमलाखालीं नव्हता. आजूबाजूंस त्यांचे कित्येक सामंत राजे होते हें खरें, तथापि ज्यांचा कारभार स्वतः राजाच्या क्षत्रपांकडून चालविला जात होता असा फारच थोडा मुलूख होता. या प्रदेशाचा विस्तार केवळ युफ्रेटीझ व उत्तर बाबिलोनियापासून दक्षिण मीडिया व पार्थियामधून ॲराकोशिआ (वायव्य अफगाणिस्थान) पर्यंतच होता.

लहान संस्थानें राज्यांत सामील करून मोठें राज्य स्थापण्याचा प्रयत्न आर्सेसिडी राजांनीं केला नाहीं; यावरून त्यांचा दुबळेपणा व त्यांच्या शहानशहांची अल्प सत्ता या गोष्टी सिद्ध होतात. हें राज्य केवळ बाह्य व आकस्मिक परिस्थितीमुळें निर्माण झालें असून त्याचा पाया मजबूत नव्हता.

आपसांतील लढायांमध्यें पदच्युत झालेल्या राजांनां सिरियन लोक फिरून गादीवर बसवीत असत. पार्थियामध्यें हे लोक एतद्देशीय इराणी लोकांशीं संलग्न झाले होते व त्यांनीं त्यांचा पेहराव, धर्म व इतर चालीरीती अंगीकारिल्या होत्या.

आर्सेसिडी राजांचे औपचारिक विधी वगैरे सिल्यूकिडी राजांपासून घेतलेले होते. आणि यांचीं नाणीं व राज्यपद्धतीचा बराच भाग त्यांनीं ग्रीक लोकांपासून घेतला होता. जसजसा आर्सेसिडींच्या सत्तेचा फैलाव होऊं लागला तसतसे ते ग्रीक संस्कृतीचे भक्त बनले.

तथापि यांच्या कारकीर्दींत ग्रीक संस्कृतीविरुद्ध प्रतिक्रियाहि सुरू झाली होती. पार्थियन लोकांनां बलाढ्य राज्य स्थापतां आलें नाहीं. त्यांचे राजे हीं केवळ सैन्यांतील सरदारांच्या हातांतील बाहुलीं होतीं, व हे सरदार आर्सेसिडी घराण्याशीं राजनिष्ठ होते तरी व्यक्तिविषयक निष्ठा त्यांच्यामध्यें नसल्यामुळें वाटेल त्या राजाला गादीवरून काढून त्यांच्या मर्जीस येईल त्यास गादीवर बसवीत. या राजांनां राजघराण्यांतील प्रत्येक पुरुषापासून (विशेषतः स्वतःच्या मुलांपासून देखील) भीति असे.

**आर्सेसिडी राज्याचा उत्तरकालीन इतिहास.**—या परिस्थितीवरून असें दिसून येतें कीं, पार्थियन राज्याची स्थापना जरी इतरांपासून काबीज केलेल्या प्रदेशांवर झाली होती; तरी दुसऱ्या मिथ्राडेटीझच्या काळानंतर या राज्यानें जोरदार लढाईचें धोरण केव्हांहि अंगीकारिलें नाहीं. पश्चिमेस रोमन लोकांच्या व पूर्वेस सिथियन लोकांच्या स्वाऱ्यांपासून या राज्याला नेहमीं संरक्षण करावें लागत असे. मेसापोटेमिया व त्यांतील अंकित संस्थानें, तसेंच ॲट्रोपाटीन व आर्मिनिया यांवरील आपलें वर्चस्व राखणें अथवा पुन्हां मिळविणें हेंच या राज्याचें आद्य कर्तव्य होऊन बसलें होतें. आपले हक्क मिळविण्याचा प्रयत्न करतांना जबरदस्त शत्रूची गांठ पडल्यास आर्सेसिडी राजे माघार घेत असत. यावरून त्यांचें दौर्बल्य चांगलेंच दिसून येतें.

**क्रॅसस व ॲंटोनिअस यांशीं युद्धें.**—पार्थियन लोक व रोमन लोक यांच्यामध्यें ज्या लढाया झाल्या त्यांची सुरुवात प्रथम रोमन लोकांकडूनच झाली होती. नाइलाजानें रोमन लोकांनां अलेक्झांडरनें काबीज केलेले देश राज्यांत सामील करावे लागले. पॉंपीच्या काळापासून त्यांनीं युफ्रेटीझ नदीपर्यंतचा ग्रीक प्रदेश निश्चितपणें आपल्या राज्यास जोडला होता. व नंतर त्यांनां युफ्रेटीझ नदीपासून सिंधुनदापर्यंतचा सर्व पूर्वेचा देश आपल्या राज्यास जोडावा लागला. रोमन सत्ताधारी सरदारांचें मत या खालसा करण्याच्या पद्धतीविरुद्ध होतें; परंतु क्रॅससारख्या महत्त्वाकांक्षी वीरास पार्थियन राजांच्या यादवीचा फायदा घेऊन पार्थियन राज्यावर चढाई केल्यावांचून राहवेना (ख्रि. पू. ५४). क्रॅसस कॅरीच्या लढाईंत मारला गेला (ख्रि. पू. ५३). मेसापोटेमिया देश पार्थियन राजानें मिळविला; परंतु रोमन राज्यावर स्वारी या वेळीं अगर सीझर व पॉंपीमधील यादवीच्या वेळीं देखील करण्यांत

आली नाहीं. पार्थियन लोकांनीं ब्रूटर्स व कॅशिअस यांशीं तह केला. परंतु कांहीं फायदा झाला नाहीं. खि. पू. ४० मध्यें पार्थियन सैन्यानें सिरिया व आशिया मायनर या देशांवर हल्ला केला; परंतु मार्क ॲंटनीनें खि. पू. ३८ मध्यें गिंडारस येथें त्यांचा मोड केला; नंतर खि. पू. ३६ मध्यें पार्थियनांवर ॲंटनीनें हल्ला केला; परंतु चौथ्या फ्राएटीझ या पार्थियन राजानें त्याचा पराभव करून त्याला मागें हटाविलें. खि. पू. ३४ मध्यें आर्मीनियाच्या राजाला विश्वासघातानें मारून ॲंटनीनें आर्मीनिया देश घेतला.

**आगस्टसचें धोरण.**—बहुतेक रोमन लोकांनां वाटत होतें कीं, ऑगस्टस आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या कॉन्सलाप्रमाणें पार्थियन राज्याचा मोड करून पूर्वेकडील प्रदेश पादाक्रांत करील. परंतु ऑगस्टसचें धोरण रोमची सत्ता व हक्क यांचें शांततेनें रक्षण करावयाचें असें होतें; व हेंच धोरण त्या वेळच्या रोमन राज्यास अवश्य होतें. खि. पू. ३२ मध्यें दुसऱ्या टिरिडेटीझनें बंड करून चौथ्या फ्राएटीझला हांकून लावलें; पण सिथियन लोकांनीं फ्राएटीझला पुन्हां गादीवर बसविलें. ऑगस्टसनें टिरिडेटीझला मदत केली नाहीं. यामुळें फ्राएटीझ हा ओझ्रोने व आर्मीनिया या प्रदेशांवरील रोमन सत्ता कबूल करून (खि. पू. २०) रोमशीं सलोख्यानें राहूं लागला. याच्या मोबदला म्हणून रोमन लोकांनीं बाबिलोनिया व इतर मांडलिक संस्थानें यांवर पार्थियन राजांची सत्ता अव्याहत चालूं दिली.

चौथ्या फ्राएटीझनें खि. पू. ९ मध्यें ऑगस्टसकडे आपले चार मुलगे ओलीस पाठवून आपलें राज्य हें रोमच्या अंकित संस्थान बनविलें. खि. पू. ४ मध्यें फ्राएटीझचा, त्याची आवडती बायको व मुलगा पांचवा फ्राएटीझ यांनीं खून केला. यानंतर राज्यांत भांडणें लागलीं. एका पक्षानें रोम येथें ओलीस म्हणून असलेल्या राजपुत्रांपैकीं एकाला मुक्त करून (इ. स. ८) पहिला व्होनोनीझ म्हणून राजा केलें; परंतु हा फार वेळ गादीवर टिकला नाहीं. म्हणून उलट पक्षानें सिथियन भटक्या लोकांपैकीं दुसरा आर्टाबेनस नांवाच्या आर्सेसिडीला राजा केलें. हा फार क्रूर असल्यामुळें याला पुष्कळ वैरी झाले व पुन्हां देशांत अराजकता माजली.

**पहिला व्हिलोजिसीझ याची कारकीर्द.**—एक राजा काढून दुसरा बसविणें असले प्रकार पुढील काळांत वारंवार घडले. या काळांत आर्मीनियास आपल्या सत्तेखालीं आणण्याचा पार्थियनांनीं कित्येक वेळां यत्न केला; परंतु प्रत्येक वेळीं त्यांनां माघारच घ्यावी लागली. ॲट्रोपाटीन घराणें काढून त्या देशावर एका आर्सेसिडी राजाची स्थापना करण्यांत आली. रोमशीं प्रत्यक्ष युद्ध पहिल्या व्हिलोजिसीझच्या वेळीं (५१-७७) सुरू झालें. यानें आपला भाऊ टिरिडेटीझ यास आर्मीनियाच्या गादीवर बसविलें होतें. कांहीं काळपर्यंत युद्ध होऊन इ. स. ६३ मध्यें या दोन राष्ट्रांत तह झाला. या तहान्वयें आर्मीनियावर रोमची सत्ता प्रस्थापित झाली, तथापि टिरिडेटीझ यास आर्मीनियाचा राजा म्हणून मान्यता मिळाली. दाह व साकि(शक)लोकांच्या हल्ल्यामुळें व्हिलोजिसीझला रोमविरुद्ध केलेल्या लढाईंत फार अडथळा झाला. हिर्केनिआ देश स्वतंत्र झाला. यानंतर लवकरच दक्षिण रशियांतील ॲलन नांवाचे इराणी लोक—सध्यांच्या ओसेट लोकांचे पूर्वज—यांनीं कॉकेशस पर्वताच्या घाटांतून येऊन मीडिया व आर्मीनिया हे देश उध्वस्त केले व पुढील शतकांत यांनीं वारंवार स्वाऱ्या केल्या. येणेंप्रमाणें पूर्वेकडील प्रदेशांत व्हिलोजिसीझची बरीच नुकसानी झाली. याच राजाच्या कारकीर्दींत ग्रीक संस्कृतीविरुद्ध पौरस्त्य संस्कृतीच्या प्रतिक्रियेस जोर आला. दुसरा आर्टाबेनस (इ. स. १०) व त्याच्या मागून जे आर्सेसिडी राजे होऊन गेले त्यांची पूर्वींच्या राजांप्रमाणें ग्रीक संस्कृतीच्या निदान बाह्य स्वरूपाचा स्वीकार करण्याकडे तरी प्रवृत्ति नव्हती. त्यांचें आपल्या राज्याच्या पौरस्त्य रिवाजांकडेच जास्त लक्ष होतें. सिल्यूशिआ शहराच्या ग्रीक संस्कृतीस प्रतिस्पर्धी म्हणून टेसिफॉन, व्हिलोजीसॉसर्टा (वालाश्कर्ट) व्हिलोगिसिअस हीं शहरें वसविण्यांत आलीं.

**ट्राजन व मार्क ऑरीलिअस यांच्याशीं लढाया.**—पहिल्या व्हिलोजिसीझनंतर फार अंदाधुंदीचा काळ आला. या कालासंबंधीं वाङ्मयात्मक दंतकथा मुळींच उपलब्ध नाहींत; परंतु नाणीं व वाङ्मयांतील तुरळक उल्लेख यांवरून असें सिद्ध होतें कीं, इ. स. ७७—१४७ या काळांत एकाच वेळीं दोन किंवा तीन राजेहि राज्य करीत होते. अर्थात् या काळांत राज्यांत मुळींच शांतता नसली पाहिजे हें स्पष्ट आहे. या संधीचा फायदा घेऊन ट्राजननें पाश्चात्य संस्कृतीचा प्रसार करण्याकरितां हिंदुस्थानपर्यंत अलेक्झांडरचें राज्य जिंकण्याच्या इराद्यानें पार्थियन राज्यावर चढाई केली, व आर्मीनिया, मेसापोटेमिया व बाबिलोनिया हे प्रांत रोमन बादशाहाच्या अंमलाखालीं आणले. ट्राजन मेल्यावर हेड्रिअननें ऑगस्टसचें धोरण स्वीकारून जिंकलेले देश परत केले. याच वेळीं कुशनचें प्रबल इंडोसिथियन राज्य उदयास आलें व त्यामुळें पूर्व इराणांतील पार्थियन मुलूख बराच कमी झाला. तिसऱ्या व्हिलोजिसीझच्या (१४७—१९१) कारकीर्दींत शांतता फिरून नांदूं लागली. ११७ पासून रोमन राज्याशीं पूर्ण सलोखा होता, परंतु १६२ मध्यें आर्मीनिया व ओझ्रोने या प्रदेशांबद्दल ऑरीलिअस व व्हीरस यांनीं पार्थियन राज्यावर हल्ला केला. ॲव्हिडिअस कॅशिअसच्या हाताखालीं रोमन लोकांनीं सिल्यूशिआ या ग्रीक शहराचा नाश केला (१६४); व त्यामुळें ग्रीक संस्कृति नष्ट होऊन अरमइक नामक पौरस्त्य संस्कृतीचा फैलाव होऊं लागला. खिस्ती धर्मानें अरमइक वाङ्मय निर्माण करून या नवीन संस्कृतीच्या प्रसारास मदत केली. यानंतर ग्रीक संस्कृति व ग्रीक वाङ्मय यांचा परिचय अरमइक भाषेच्या द्वारें होत असे. तिसऱ्या व्हिलोजिसीझनें झरथुष्ट्राचे पवित्र लेख गोळा

करून सध्यांच्या अवेस्ता ग्रंथास आरंभ केला, या सर्व गोष्टींवरून पार्थियन राज्यांत इराणच्या राष्ट्रीयत्वास हळू हळू कसा जोम मिळत गेला हें स्पष्ट दिसतें.

१६५च्या तहानें वायव्य मेसापोटेमिया रोमला देण्यांत येऊन रोमन युद्ध संपलें. इ. स. १९५–२०२ व २१६–२१७ या दोन वेळीं पार्थियन राजे व रोमन बादशहा यांमध्यें अशाच झटापटी झाल्या; परंतु त्यामुळें दोन्ही राज्यांच्या स्थितींत विशेष फरक झाला नाहीं.

**पार्थियन राजांची यादी.**—( तोतया राजांचीं नांवें कंसांत दिलीं आहेत ):—

आर्सेसीझ पहिला व टिरिडेटीझ पहिला ... (सुमारें) ख्रि.पू.२४८–२११
आर्सेसीझ–दुसरा... ... " " २११–१९०
प्रियापॅटिअस... ... " " १९०–१७५
फ्राएटीझ–पहिला ... " " १७५–१७०
मिथ्राडेटीझ–पहिला ... " " १७०–१३८
फ्राएटीझ–दुसरा ... " " १३८–१२७
आर्टाबेनस–पहिला ... " " १२७–१२४
मिथ्राडेटीझ–दुसरा ... " " १२४—८८

× × × × × × ×

सेनाट्रुसीझ–पहिला ... ... ... " ७६–७०
फ्राएटीझ–तिसरा ... ... ... " ७०–५७
ओरोडीझ–पहिला ... ... ... " ५७–३७
[ मिथ्राडेटीझ–तिसरा ... ... ... " ५७–५४ ]
पाकोरस... ... ... ... " ५१–३८
फ्राएटीझ–चौथा... ... ... " ३७–४

× × × × × × × ×

[ टिरिडेटीझ–दुसरा ... ... ख्रि.पू.३२–३१व२६ ]
फ्राएटीझ–पांचवा ... ... ख्रि. पू.२–इ. स. ५
ओरोडीझ–दुसरा ... ... ... इ. स. ५–७
व्होनोनीझ–पहिला ... ... ... ८–११
आर्टाबेनस–दुसरा ... ... ...सुमारें १०–४०
[ टिरिडेटीझ–तिसरा ... ... ... ३६ ]
[ सिन्नॅमस ... ... ... ... ३८]
[ व्हार्डेनीझ–पहिला ... ... ... ४०–४५ ]
गोटार्झीस ... ... ... ४०–५१
व्होनोनीझ–दुसरा ... ... ... ५१
व्हिलोजिसीझ–पहिला ... ... ... ५१–७७
[ व्हर्डेनीझ–दुसरा ... ... ... ५५ ]
व्हिलोजिसीझ–दुसरा ... ७७–७९ व १११–१४७
पाकोरस ... ... ... ... ७८–सुमारें १०५
[ तिसरा आर्टाबेनस ... ... ८०–८१ ]
ओस्रोस ... ... ... ... १०६–१२९. ]
[ चौथा मिथ्राडेटीझ व त्याचा मुलगा दुसरा सॅनॅट्रुसीझ ११५; पार्थामॅस्पेटीझ, ११६–११७, व इतर तोतये ].
मिथ्राडेटीझ–पांचवा ... ... सुमारें १२९–१४७
व्हिलोजिसीझ–तिसरा ... ... ... १४७–१९१
व्हिलोजिसीझ–चौथा ... ... ... १९१–२०९
[ व्हिलोजिसीझ–पांचवा... ... २०९–सुमारें२२२ ]
आर्टाबेनस–चौथा ... ... २०९–२२९

**सस्सन साम्राज्य.**—आर्सेसिडी राजघराणें पहिल्या मिथ्राडेटीझकडून स्थापन झाल्यानंतर ३५० वर्षें टिकलें. हें घराणें इतकें वर्षें टिकण्याचें कारण त्यांतील पुरुष बलवान् होते असें नाहीं. या घराण्याच्या सत्तेचा बाह्य विस्तार केवळ यदृच्छेनेंच झाला होता व विशेष कांहीं आपत्ति ओढविली नसती तर ती आणखीहि कित्येक शतकें टिकून राहिली असती. परंतु चौथ्या आर्टाबेनसच्या वेळीं पर्सिसमध्यें पहिला अर्देशिर ( आर्टाक्सर्क्सीझ ) नांवाचा एक मोठा पुरुष निपजला. हा सस्सनचा वंशज पापाक ( बाबेक ) याचा मुलगा असून तो पर्सिसमधील एका लहानशा संस्थानचा राजा होता. त्याच्या बापानें जुन्या पर्सेपोलिसच्या जागेवर असलेला इस्ताखर जिल्हा आपल्या ताब्यांत घेतला होता. अर्देशिरच्या कारकीर्दीस इ. स. २१२ पासून आरंभ होतो. त्यानें शेजारचीं संस्थानें काबीज करून आपल्या संस्थानाची मर्यादा वाढविली, व त्यामुळें त्याला चौथ्या आर्टाबेनसशीं युद्ध करावें लागलें. हें युद्ध बराच काळ चालू होतें. त्यांत पार्थियन लोकांचा तीन वेळां मोड होऊन त्यांपैकीं शेवटच्या लढाईंत आर्टाबेनस मारला गेला. अर्देशिरनें आर्सेसिडी राजघराण्यांतील हातीं पडले तेवढे सर्व पुरुष ठार केले. कांहीं राजपुरुष आर्मीनियांत पळून गेले, व तेथें आर्सेसिडी घराणें (इ. स. ४२९) कायम होतें. राहिलेलीं कार्मोनिआ, सूशिएना, मेसीनि हीं सामंत संस्थानेंहि अर्देशिरनें आपल्या राज्यांत सामील करून घेतलीं व टेसिफॉनचा राजवाडा घेऊन त्यानें "इराणी लोकांचा शहानशहा" ही पदवी धारण केली.

**रोमशीं झालेलीं सस्सनांचीं युद्धें.**—पहिल्या अर्देशिरनें स्थापलेलें सस्सन अथवा नवीन इराणी साम्राज्य हें आर्सेसिडी साम्राज्याहून भिन्न होतें. हें साम्राज्य म्हणजे राष्ट्रीय इराणी राज्य होतें व पर्सिसच्या राजांप्रमाणें अर्देशिर हा कट्टा झरथुष्ट्राच्या पंथाचा असून अग्निपूजेच्या संप्रदायाचा त्यानें जोरानें सार्वत्रिक प्रसार केला. त्यानें पुन्हां जगभर इराणी साम्राज्य पसरविण्याचा निश्चय केला. व अकिमिनियन उर्फ आकिमेनिड राजांच्या पश्चिम आशियांतील राज्यावर हक्क दाखवून त्यानें आर्मीनियावर स्वारी केली. परंतु तींत त्याला कायमचें यश मिळालें नाहीं. रोमन मेसापोटेमियावर जें सैन्य पाठविण्यांत आलें, त्यानें सिरिया व कॅप्पाडोशियापर्यंत चाल केली; परंतु आर्मीनियाचा राजा व रोमन बादशहा यांच्या संयुक्त सैन्यानें इराणी लोकांची पिच्छेहाट केली.

**पहिला शापुर.**—अर्देशिर यानें आपल्या कारकीर्दीच्या शेवटीं या प्रदेशावर पुन्हां नव्यानें चाल केली, व

त्याचा मुलगा पहिला शापुर ( २४१—२७२ ) यानें निसिबिस व करी हे प्रदेश काबीज करून सिरियांत प्रवेश केला. परंतु तिसरा गॉर्डिअन या रोमन बादशहानें २४३ मध्यें त्याचा पराभव केला. तथापि पुढें लवकरच रोमन साम्राज्यास उतरती कळा लागली व या गोष्टीचा फायदा घेऊन शापुरनें आर्मीनिया घेतला, ॲंटिऑक शहर लुटलें व व्हालेरिअन रोमन बादशहाचा इडेसा येथें पराभव करून (२६०) त्याला कैद केलें. यानंतर इराणी सैन्यानें कॅप्पाडोशियावर चाल केली, परंतु येथून त्यांनां मागें हटावें लागलें. ही संधि साधून पॅल्मायराच्या राजानें बंड करून शापुरचा पराभव केला व दोन वेळ (२६३—२६५) टेसिफॉनवर चालून आला. या पराभवामुळें झालेलें नुकसान शापुरला शेवटपावेतों भरून काढतां आलें नाहीं व आर्मीनिया देशहि त्याला ताब्यांत ठेवतां येईना. सारांश सस्सन साम्राज्याचा विस्तार आर्सेसिडी साम्राज्याइतकाच होता. तरी देखील पहिल्या शापुरनें 'इराणी व इराणी नसलेल्या लोकांचा शहानशहा' अशी पदवी धारण करून आपला आसमुद्रक्षितीशत्वाचा हक्क प्रगट केला. त्याच्या वारसांनींहि ही पदवी पुढें धारण केली; परंतु मेसापोटेमियाच्या वाळवंटापर्यंतचा तैग्रिस व युफ्रेटीझ या नद्यांमधील प्रदेशच फक्त या साम्राज्याच्या अंमलाखालीं होता. पश्चिम व उत्तर मेसापोटेमिया रोमन लोकांच्या ताब्यांत होता.

**संघटना.**—अवेस्तामधील अहुरमझ्द नांवाच्या देवतेपासून प्राप्त झालेल्या "बादशाही वैभवा"चा सस्सन राजा हा प्रतिनिधि समजला जात असे. यामुळेंच सस्सन व ॲकिमेनिड राजे आपणांस ईश्वर म्हणवून घेत असत. राजाला व्यक्तिविषयक महत्त्व नव्हतें; एका राजाला काढून दुसरा राजा गादीवर बसविंतां येत असे. परंतु राजवंशांतील औरस संततीशिवाय कोणालाहि कायदेशीरपणें राज्यपद मिळविण्याची आशा नव्हती. म्हणूनच तद्देशीय दंतकथांमध्यें सस्सन राजांची उत्पत्ति ॲकिमेनिड वंशापासून व पौराणिक काळांतील राजांपासून झाली असल्याचें वर्णन आहे.

राजा हा सर्वसत्ताधीश मानला जातो व ईश्वरोपदिष्ट व कायद्यांत निविष्ट केलेली अशी राजाची इच्छा हीच 'कर्तुमकर्तुं' समजली जाते. राजे लोक टेसिफॉन येथील सिंहासनावर मोठ्या वैभवानें बसून राज्य करीत असत. राजाच्या नुसत्या मान डोलावण्यावर प्रत्येक मनुष्याचा जानमाल अवलंबून असे. राजा म्हणजे सर्व राज्यांत सर्वांत सुंदर, शस्त्रें वापरण्यांत अत्यंत तरबेज असा पुरुष मानला जात असे. इतकेंच नव्हे तर प्रत्येक धार्मिक चाल अथवा सद्गुण यांची उत्पत्ति राजापासूनच झाली पाहिजे. तथापि ॲकिमेनिड राजांप्रमाणें सस्सन राजे सर्वसत्ताधीश नव्हते. यांनां आपल्या राज्यांतील जमीनदार सरदारांचें वर्चस्व कमी करतां येत नसे. विशेष महत्त्वाची गोष्ट ही होती कीं, सस्सन राजांनां ॲकिमेनिड राजांप्रमाणें 'जगाच्या साम्राज्यावर आपला हक्क शाबीत करतां आला नाहीं. या राजांचें सैन्यबल केवळ त्यांच्या ताब्यांतील प्रांताच्या बचावापुरतेंच होतें. नवीन देश काबीज करण्यास लागणारें सैन्य पगार देऊन ठेवण्याची त्यांची ऐपत नव्हती. राज्यांतील जमीनदार सरदारांनीं पुरविलेल्या सैनिकांचें बनलेलें सैन्य या राजाजवळ असे. परंतु अशा प्रकारचें सैन्य बराच काळपर्यंत एकसारखें लढाईंत गुंतवून ठेवतां येणें शक्य नसल्यामुळें या राजांनां रणांगणावर मोठाले विजय तर मिळवितां येत नसतच, पण कधीं कधीं त्यांचा अगदीं पराजयहि होत असे.

**सरदार लोक.**—ॲकिमेनिड राज्याप्रमाणें सस्सन राज्यांतहि सहा सरदार घराणीं व सातवें राजघराणें अशीं सात घराणीं प्रमुख मानलीं जात असत. याच घराण्यांतील पुरुषांनां सेनापतीची, राजाधिकाऱ्याची किंवा सुभेदाराची जागा मिळत असे. यांपैकीं कांहीं घराण्यांची उत्पत्ति झरथुष्ट्राचा आश्रयदाता जो गुष्टस्प ( म्ह. विष्टप ) राजा त्याच्यापासून झाली होती असें दंतकथांत म्हटलें आहे, व हीं घराणीं आर्सेसिडी राजांच्या वेळीं होतीं. या सरदारांहून हलक्या दर्जाचे सरकार म्हणजे ज्यांनां दिखान ( खेड्यांतील सरदार ) व अस्वार अशीं नांवें होतीं ते होत. हे लोक जड चिलखतें घालून लढाईंत मदत करीत असत. राज्याचे लहान लहान असंख्य विभाग केलेले असून या प्रत्येक विभागावर एक मर्झवान ( सरहद्दीचा अधिपति ) असे. या लहान विभागांचे चार मोठाले जिल्हे केले होते. या स्थानिक अधिकाऱ्यांवर राजाची सत्ता चालत असे; परंतु या जागा याच घराण्यांतील लोकांनां द्यावयाच्या ही वहिवाट राजाला मोडतां येत नव्हती. सस्सन साम्राज्य बरेंच व्यवस्थित असून त्या राज्यांत राज्यकारभार उत्कृष्ट व कायदेशीर रीतीनें चालविण्यांत येत असे. सामान्य लोकांचें रक्षण करणें व कायदेशीरपणानें कर वसूल करणें यासाठीं राजे शक्य ती खटपट करीत.

**संप्रदायाचा विकास.**—प्रांतांच्या अधिकारी वर्गांतील सरदाराप्रमाणें सांप्रदायिक नायकांचेंहि वजन मोठें होतें. प्रत्येक मोठ्या जिल्ह्यावर एक वरिष्ठ मॅजिअन असे, व या सर्व मॅजिअनांचा मुख्य मोबेद असे, व तो रेंगी येथें रहात असे. राजा व प्रजा या दोहोंचा संप्रदाय झरथुष्ट्राचाच असल्यामुळें या लोकांच्या हातीं बरीच सत्ता होती. अकिमिनियन काळानंतर इराणी संप्रदायाचा जास्त जास्तच प्रसार झाला. इंडो-सिथियन राज्यांत इराणी देवतांची उपासना लोक मोठ्या भक्तीनें करीत असत; आर्मीनियांतील राष्ट्रीय धर्माचा बहुतेक ऱ्हास होऊन त्याच्या ऐवजीं इराणी संप्रदायच चालू झाला होता. कॅप्पाडोशियांत, उत्तर सिरियांत व आशियामायनरच्या पश्चिमेस इराणी देवतांची उपासना सर्वत्र प्रचलित होती. तिसऱ्या शतकांत लॅटिन भाषा बोलणाऱ्या सर्व रोमन प्रांतांत झरथुष्ट्र पंथाचा फार प्रसार झाला होता. या पारशी संप्रदायाचा कल नेहमीं निरनिराळे संप्रदाय एकत्र करण्याकडे होता. सांप्रदायिक कल्पनेच्या मानानें

अहुरमझ्द ही वरिष्ठ देवता होती, परंतु व्यवहारांत त्याच्या ऐवजीं अन्य देवतांची पूजा लोक करीत व शुद्धाचरणाचे नियम पाळणारास मोक्षप्राप्ति होते असा लोकांचा विश्वास असे.

परंतु पर्सिसमध्यें मात्र इराणी संप्रदायावर बाह्य जगांतील गोष्टींचा कांहींएक संस्कार झाला नव्हता. अहुरमझ्द व अहरिमन यांमधील अथवा सद्गुणी देवदूत व दुष्ट दैत्य यांमधील वैर हेंच संप्रदायाचें मुख्य तत्त्व पर्सिसमध्यें मानलें जात असे, व इतर देवदूत व देवता व्यवहारांत कितीहि उपयुक्त असल्या तरी ते अहुरमझ्दचे सेवक मानले जात असत. या देवतांचें उच्च मूर्त स्वरूप म्हणजे मिथ्र नांवाची सूर्यदेवता नसून धर्मोपदेशकांनीं रक्षण केलेला अग्नि हें होय. या देशांत शुद्धाचरणाचे सर्व नियम कडक रीतीनें पाळले जात असत; प्रेतांनां जमिनींत पुरीत नसून कुत्रीं व गिधाडें योजकडून खववीत असत. अहुरमझ्द ही राष्ट्रदेवता होती. ती घोड्यावर स्वार झालेली युद्धदेवता असून ती उपासकांनां विजय व जगाचें राज्य देते असा समज होता. झर्वन पंथाच्या अनुयायांनां नास्तिक समजत असत व खऱ्या धर्माच्या लोकांचें आद्य कर्तव्य या नास्तिकांचा नाश करणें हें होतें. अॅकिमेनिड काळांत सर्वधर्मसहिष्णुता होती; आर्सेसिडी काळांत इतर धर्मांकडे दुर्लक्ष केलें जात असे; परंतु सस्सन काळांत इराणी धर्माखेरीज इतर धर्मांचा छळ होऊं लागला. पहिला अर्देशिर हा असल्या प्रकारचीं मतें प्रचलित असतांना होऊन गेला. तिसऱ्या व्हिलोजिसीझनें सांप्रदायिक ग्रंथ गोळा करण्याचें काम सुरू केलें होतें तें अर्देशिरनें पुढें चालवून धर्माध्यक्ष टॅन्सरकडून सर्व पुराणधर्ममतें व लेख एकत्र करविले, व अन्यमतांच्या सर्व सांप्रदायिक पद्धती बेकायदेशीर ठरवून बंद करण्यांत आल्या. अशा रीतीनें पारशी लोकांचे अवेस्ता व वेंदिदाद हे धर्मग्रंथ अस्तित्वांत आले. देवतांच्या मूर्ती हें नास्तिकपणाचेंच लक्षण समजून सर्व देवळांतून काढून टाकण्यांत आल्या व त्यांच्या ऐवजीं स्थंडिलें बांधण्यांत आलीं. पहिल्या शापुरनें आपल्या सांप्रदायिक ग्रंथांत वैद्यक, ज्योतिष, गणित, तत्त्वविवेचन, प्राणिशास्त्र इत्यादि शास्त्रीय विषयांवरील ग्रंथांचा देखील समावेश केला.

**ख्रिस्ती व मणि संप्रदायाशीं संबंध.**—तैग्रिस व युफ्रेटीझ या नद्यांच्या प्रदेशांत अरमइक ख्रिस्ती संप्रदायाचा सर्वत्र जबर पगडा बसला होता. आपलाच काय तो खरा संप्रदाय असून इतर झूट आहेत व ते नाहींसे केले पाहिजेत हें तत्त्व ख्रिस्ती संप्रदायांत मुख्य होतें. या ख्रिस्ती संप्रदायाचे प्रचारक सर्व इराणभर पसरले होते. यामुळें ख्रिस्ती संप्रदाय व इराणी संप्रदाय हे परस्पर हाडवैरी बनले. प्रत्येक संप्रदायांत सत्यांश आहे व हा सत्यांश एका संप्रदायांतून घेऊन दुसऱ्यांत संलग्न करतां येतो ही जुनी कल्पना अद्याप प्रचलित होती, व याच तत्त्वाच्या आधारावर वर वर्णन केलेला मणि नामक पंथ अस्तित्वांत आला. या पंथाचा उपदेशक मणी नांवाचा इराणी मनुष्य होता. ख्रिस्ती संप्रदायाचा शुभवर्तमान ग्रंथ व झरथुष्ट्राचीं धर्मतत्त्वें एकत्र करून एक पंथ काढावा असा मणीचा प्रयत्न होता. मणी हा प्रथम पहिल्या शापुरच्या राज्यारोहणाच्या दिवशीं शिक्षक म्हणून बाबिलोनियांतून आला. दरबारांत व राज्यांतील इतर भागांत त्याचे बरेच लोक अनुयायी झाले. परंतु शापुरचा मुलगा पहिला बहराम ( २७३—२७६ ) यानें इराणी उपासकांच्या आग्रहानें मणीस देहांत शिक्षा दिली. सस्सन राज्यांत मणिपंथाचा छळ होऊं लागला, तरी सस्सन राज्याच्या हद्दीबाहेर बाबिलोन, रोमन राज्य, खोरासान, मध्य आशिया, वगैरे देशांत हा पंथ प्रचलित होता. समरकंद हें या पंथाचें मुख्य ठाणें होतें. मणी व त्याचे शिष्य यांनीं इराणी भाषेंत सिरियन लिपींत व सॉग्डिएना भाषेंत लिहिलेल्या संप्रदायग्रंथांचे अवशेष भाग आहेत. या ग्रंथांत विश्वाच्या पित्याचें झरथुष्ट्र पंथाच्या झर्व्हनशीं व भूताचें अहरिमनशीं तादात्म्य दाखविलें आहे.

सस्सन राजांची यादी.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अर्देशिर पहिला | ... | ... | इ.स. | २२६—२४१ |
| शापुर पहिला | ... | ... | ,, | २४१—२७२ |
| होर्मिझ्द पहिला | ... | ... | ,, | २७२—२७३ |
| बहराम पहिला | ... | ... | ,, | २७३—२७६ |
| बहराम दुसरा | ... | ... | ,, | २७६—२९३ |
| बहराम तिसरा | ... | ... | ,, | २९३ |
| नार्सेह | ... | ... | ,, | २९३—३०२ |
| होर्मिझ्द दुसरा | ... | ... | ,, | ३०२—३१० |
| शापुर दुसरा | ... | ... | ,, | ३१०—३७९ |
| अर्देशिर दुसरा | ... | ... | ,, | ३७९—३८३ |
| शापुर तिसरा | ... | ... | ,, | ३८३—३८८ |
| बहराम चौथा | ... | ... | ,, | ३८८—३९९ |
| येझ्देगर्द पहिला | ... | ... | ,, | ३९९—४२० |
| बहराम पांचवा-गोर | ... | ... | ,, | ४२०—४३८ |
| येझ्देगर्द दुसरा | ... | ... | ,, | ४३८—४५७ |
| होर्मिझ्द तिसरा | ... | ... | ,, | ४५७—४५९ |
| पेरोझ | ... | ... | ,, | ४५७—४८४ |
| बालाश | ... | ... | ,, | ४८४—४८८ |
| कवध पहिला | ... | ... | ,, | ४८८—५३१ |
| (जमास्प | ... | ... | ,, | ४९६—४९८) |
| खुशरू पहिला अनुशिर्षान | | ... | ,, | ५३१—५७९ |
| होर्मिझ्द चौथा | ... | ... | ,, | ५७९—५९० |
| खुशरू पर्वेझ दुसरा | ... | ... | ,, | ५९०—६२८ |
| बहराम सहावा कोबिन, बिस्तम | | ... | ,, | ५९०—५९६ |
| कवध दुसरा शेरो | ... | ... | ,, | ६२८. |
| अर्देशिर तिसरा | ... | ... | ,, | ६२८—६३० |
| [ शहारबराझ | ... | ... | ,, | ६३०. ] |

( बोरन व इतर, ६३०–६३२ ) येझ्देगर्द तिसरा ६३२–६५१.

**ससन साम्राज्याचा इतिहास.**—आपल्या राज्याचें रक्षण करणें व शक्य असेल तेव्हां पूर्वेस व पश्चिमेस विस्तार करणें हेंच या राजघराण्याचें परराष्ट्रीय धोरण होतें. पार्थियन साम्राज्याहून या साम्राज्याचा विस्तार जास्त नव्हता. अगदीं पूर्वेस सिंधुनदाच्या दोन्हीं किनाऱ्यांवर कुशनांचें राज्य पसरलेलें होतें. इ. स. ३२० नंतर कुशन राजांच्या ऐवजीं गुप्त राजे सत्ताधीश झाले. पश्चिमेस ओस्रोने, उत्तर मेसापोटेमिया, इडेसा, करी व निसिबिस या किल्ल्यांबद्दलचें भांडण रोमनलोकांशीं अद्याप धुमसतच होतें. आर्मीनियांत आर्सेसिडी घराणें अद्याप शिल्लक असून तें रोमन लोकांनां आपलें संरक्षण करण्यास बोलवीत होतें. म्हणून आर्मीनिया प्रदेश घेण्याच्या प्रयत्नांत रोमन लोकांशीं लढाया नेहमीं होत असत. दुसऱ्या बहरामच्या वेळीं (२७६—२९३) व्हालेरिअनबद्दल सूड उगविण्याच्या इरादानें केरस हा रोमन बादशहा मेसापोटेमियांत आला; व त्यानें कोचे व सिल्यूशिआजवळील टेसिफॉन हीं शहरें घेतलीं; परंतु २८३मध्यें तो मेल्यामुळें रोमन सैन्य परत गेलें. पुढें बहरामनें नजराणे देऊन डायोक्लीशिअनशीं तह केला. कांहीं वर्षांनंतर नार्सीझ नांवाच्या ससन राजानें आर्मीनिया घेऊन गालेरिअस बादशहाचा कॅलिनिकम येथें पराभव केला (२९६). परंतु २९७ मध्यें नार्सीझचा अगदीं मोड होऊन त्याचा खजिना व जनानखाना रोमन लोकांनीं घेतल्यामुळें त्याला रोमन लोकांशीं तह करणें भाग झालें. या तहान्वयें आर्मीनिया रोमन सत्तेखालीं राहिला; उत्तर मेसापोटेमियाचें मैदान, व गॉर्डियेनीपर्यंत तैग्रिस नदीच्या डाव्या तीरावरील प्रदेश रोमन लोकांनां देण्यांत आला; व नार्सीझचा जनानखाना नार्सीझला परत करण्यांत आला. हा तह २९७ मध्यें होऊन पुढें चाळीस वर्षें टिकला. पहिल्या शापुरनंतर झालेल्या सहा राजांचा इतिहास माहीत नाहीं. दुसरा होर्मिझ्द (३०२-३१०) मेल्यानंतर सरदारांनीं त्याच्या प्रौढ मुलांचा खून करून दुसरा शापुर नांवाच्या अल्पवयी मुलास गादीवर बसविलें. परंतु हा वयांत आल्यावर मोठा उत्साही राजा झाला.

**दुसरा शापुर व ख्रिस्ती लोकांचा छळ.**—रोमन राज्य ख्रिस्ती संप्रदायानुयायी झालें त्यामुळें मेसापोटेमिया व बाबिलोनिया या देशांतील सिरो—ख्रिस्ती लोक नास्तिक ससन लोकांची सत्ता झुगारून देण्याच्या कामीं रोमन लोकांच्या मदतीची अपेक्षा करूं लागले. आर्मीनियांतील राजाला २९४मध्यें ख्रिस्ती संप्रदायाची दीक्षा मिळाली. यामुळें ससन राजांनां झरथुष्ट्री पंथास जोरानें पाठिंबा द्यावा लागला. दुसऱ्या शापुरच्या वेळीं अवेस्ता ग्रंथ पुरा होऊन इतर सर्व संप्रदाय बेकायदेशीर ठरविण्यांत आले. झरथुष्ट्री पंथ सोडणारास देहांत शासन होत असे; व विशेषतः ख्रिस्ती संप्रदायानुयायांचा छळ होत असे. सारांश, रोमन व ससन राजांमधील युद्धाबरोबर ख्रिस्ती व झरथुष्ट्री या दोन संप्रदायांमध्येंहि युद्ध जुंपलें.

अशा स्थितींत लढाई टाळणें शक्य नव्हतें. इ. स. ३३७ मध्यें शापुरनें लढाई सुरू करून आमायडा (३५९), सिंगारा (३६०) वगैरे किल्ले घेतले. या युद्धास दर वर्षी पुन्हां पुन्हां तोंड लागत असे (३५३-३५८). ३६३ मध्यें, जूलिअन नांवाच्या रोमन बादशहानें इराणी राज्यावर स्वारी करून टेसिफॉनवर चाल केली, परंतु तो स्वतःच जखमी होऊन मरण पावला. त्याच्या मागून जोव्हिअनला इराणशीं तह करावा लागला (३६३). या तहानें रोमनें तैग्रिसचा प्रदेश, निसिबिसचा किल्ला व आर्मीनिया ससन राजास देऊन आपल्या आश्रयाखालच्या तिसऱ्या आर्सेसीझ नांवाच्या आर्सेसिडी राजास इराणी लोकांच्या स्वाधीन केलें.

शापुरनें आर्मीनिया पादाक्रांत करण्याचा व त्या देशांत झरथुष्ट्रपंथाचा प्रसार करण्याचा प्रयत्न केला. त्यानें तिसऱ्या आर्सेसीझला आत्महत्या करावयास लावलें. परंतु आर्मीनियन सरदारांनीं बंड करून आर्सेसीझचा मुलगा पॅप यास गादीवर बसविलें; व रोमन लोकांची गुप्तपणें मदत घेतली. यामुळें रोमशीं पुन्हां युद्ध उपस्थित झालें; परंतु ३७४ मध्यें व्हॅलेन्झ या रोमन बादशहानें पॅपचा टार्ससमध्यें खून करविला. ३७५मध्यें व्हॅलेन्झ हा ॲड्रिआनोपल येथें गॉथ लोकांशीं झालेल्या लढाईंत मारला गेला. यानंतर रोमन लोकांची ढवळाढवळ बंद झाली. चौथा बहिराम व थीओडोशिअस यांमध्यें ३९०मध्यें तह होऊन आर्मीनियाचा अगदीं पश्चिमेकडचा भाग रोमन लोकांनां व बाकीचा इराणी लोकांनां देण्यांत आला. ४०८मध्यें पहिल्या येझ्देगर्दनें दुसरा थीओडोशिअस या रोमन बादशहाशीं दोस्ती केली. यानंतर लागलीच इराणी लोकांनीं आर्सेसीझच्या घराण्यांतील शेवटचे राजे आर्मीनियांतून घालवून दिले (४३०), व या देशाचा एक इराणी प्रांत बनवून त्यावर एका मर्झबानची नेमणूक केली. तथापि येथें झरथुष्ट्री संप्रदायाचा प्रसार करण्याचा प्रयत्न करण्यांत आला नाहीं; कारण ख्रिस्ती संप्रदायाचीं पाळेंमुळें येथें फार खोल गेलीं होतीं. रोमन लोकांनीं पक्ष सोडल्यामुळें आर्मीनियांतील ख्रिस्ती लोकांनीं रोमचीं पुराण मतें सोडून नवीनच पंथ काढला.

**पहिला येझ्देगर्द.**—इ. स. ३७९त दुसरा शापुर मेल्यानंतर ससन साम्राज्यांत बंड होऊन सरदारांनीं त्याचा भाऊ दुसरा अर्देशिर याला गादीवर बसविलें, पण लवकरच ३८३मध्यें त्यास पदच्युत करण्यांत आलें. नंतर दुसऱ्या शापुरचा मुलगा तिसरा शापुर यास गादीवर बसविण्यांत आलें. परंतु ३८८मध्यें त्याचा व नंतर ३९९ मध्यें त्याचा भाऊ चौथा बहराम याचा खून झाला. या बहरामचा मुलगा पहिला येझ्देगर्द (३९९-४२०) हा मात्र मोठा उत्साही व हुषार राजा होऊन गेला. यानें सर्व सरदारांनां आपल्या

कयांत ठेवून त्यांच्या बंडखोरपणाबद्दल त्यांनां कडक शासन केलें. त्यानें मगी पंथापासून स्वतंत्र होण्याची देखील प्रयत्न केला. इराणी खिस्ती लोकांचा छळ करणें बंद करून त्यांनां व्यक्तिस्वातंत्र्य दिलें. परंतु हा मारला गेला. व लोक याच्याशीं इतके नाराज झाले होते कीं, त्याच्या मुलांपैकीं कोणासहि ते गादीवर बसविण्यास कबूल होईनात.

**पांचवा बहराम गोर.**—परंतु या मुलांपैकीं बहिराम पांचवा यानें मोंधिर नांवाच्या एका अरबी संस्थानिकाच्या मदतीनें गादी मिळविली, व आपल्या बापाचें संप्रदायविषयक धोरण सोडून देण्याचें इराणी लोकांनां वचन देऊन लोकप्रियता संपादन केली. आतां खिस्ती लोकांचा पुन्हां छळ होऊं लागून त्यामुळें रोमशीं युद्ध उपस्थित झालें. परंतु इराणी राजाचा पराभव होऊन ४२२ मध्यें तह झाला. या तहान्वयें इराणी राज्यांत खिस्ती लोकांनां व रोमन राज्यांत इराणी लोकांनां आपआपला धर्म पाळण्याची मुभा मिळाली. परंतु बहरामचा मुलगा दुसरा येझ्देगर्द (४३८–४५७) यानें खिस्ती लोकांचा छळ करणें पुन्हां सुरू करून रोमशीं तंटा उपस्थित केला. याशिवाय इराणला श्वेतहूण नांवाचे नवीनच शत्रू उत्पन्न झाले.

**एफथालाइट अथवा श्वेतहूण.**—इ. स. ४५० मध्यें या श्वेतहूण लोकांनीं बॅक्ट्रिया देश घेऊन कुशन राजसत्ता नष्ट केली. या लोकांनीं सस्सन राजांच्या सत्तेसहि उतरती कळा लावली. पेरोझ राजा (४५७–४८४) या लोकांशीं लढतां-लढतांच मरण पावला. त्याचा भाऊ बालाश (४८४–४८८) यास या लोकांनीं पदच्युत करून पेरोझचा मुलगा पहिला कवध (४८८—५३१) याला गादीवर बसविलें. परंतु देशांतील बंडाळीमुळें त्याला पदच्युत होऊन एफथालाइटच्या आश्रयास जावें लागलें. इ. स. ४९९ मध्यें मागील अनेक आर्सेसिडी राजांप्रमाणें हाहि दाह व शक लोकांच्या मदतीनें पुन्हां गादीवर आला. या अंतस्थ भानगडींमुळें रोमन लोकांविरुद्ध चाललेलें भांडण बंद पडून इराणी व खिस्ती संप्रदायांतील वैमनस्य मंदावत चाललें होतें. इराणी खिस्ती लोकांत आतां नेस्टोरिअन मताचें प्राबल्य झालें होतें. ४८३ मध्यें तर एका धर्मसभेनें सार्वजनिकरीत्या या नेस्टोरिअन पंथाचा स्वीकार केला व यानंतर हा पंथच इराणी साम्राज्यांतील खिस्ती संप्रदाय झाला. सिल्यूशिआ–टेसिफॉन येथील अधिकारी हा या पंथाचा मुख्य होता.

**मझ्दक पंथ व पहिला खुशरू.**—कवध जोरदार राजा होता. त्यानें देशास शांतता व सुव्यवस्था प्राप्त करून दिली. ५०२ मध्यें त्यानें रोमन लोकांवर स्वारी करून अमायडाचा नाश केला. परंतु इकडे हूण लोकांची स्वारी झाल्यामुळें त्याला रोमन लोकांशीं तह करावा लागला. ५२७ मध्यें त्यानें रोमन लोकांशीं फिरून युद्ध सुरू करून ५३१ मध्यें कॅलिनिकम येथें त्यांचा पराभव केला. ५३२ मध्यें त्याचा मुलगा पहिला खुशरू (५३१—५७९) यानें जस्टीनिअन या रोमन बादशहाशीं तह केला. पहिल्या येझ्देगर्दा प्रमाणेंच याचाहि जुन्या सांप्रदायिक मतांवर विश्वास नव्हता. मझ्दक नांवाच्या धर्मसंस्थापकावर त्याची मर्जी होती, व त्याच्या तत्त्वांप्रमाणें याचा सरदार लोकांची चैनबाजी कमी करण्याचा विचार होता. लोकांचेंहि या पंथाला पाठबळ होतें. परंतु मगांच्या चळवळीमुळें त्यास या पंथाचें निर्मूलन करावें लागलें. खुशरूच्या कारकीर्दीत सरकारीरीत्या अवेस्ताचा सटीक ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत आला; व झरथुष्ट्री संप्रदायाचा त्याग करणारास देहान्त शिक्षा होऊं लागली.

खुशरू हा एक मोठा राजा होऊन गेला. याच्या वेळेस करांची फेरतपासणी केली जाऊन न्याय्य रकम आकारण्यांत येऊं लागली. याच्या कारकीर्दींत रोमन लोकांशीं दोन युद्धें झालीं. त्यांपैकीं पहिल्यास ५४० त सुरुवात होऊन तें ५६२ च्या तहानें बंद झालें, व दुसरें ५७७ त झालें. यानें काळा समुद्र व कॉकेशसपर्वतापर्यंत आपलें साम्राज्य वाढविलें होतें. ५७० मध्यें त्यानें येमेनच्या अरब लोकांनां अबिसिनियन खिस्ती लोकांविरुद्ध मदत केली होती; व या वेळेपासून महंमदाचे अनुयायी घेईपर्यंत हा प्रांत इराणी साम्राज्यांतच मोडत होता.

**सस्सन लोकांनीं बॅक्ट्रिया जिंकला.**—इ. स. ५६० मध्यें तुर्क नांवाचें नवीन राष्ट्र निर्माण झालें. खुशरूनें एफथालाइट लोकांविरुद्ध तुर्कांशीं दोस्ती करून बॅक्ट्रिया प्रांत जिंकला. नंतर सस्सन लोकांचें तुर्कांशीं युद्ध सुरू झालें. पहिल्या खुशरूचा मुलगा चौथा होर्मिझ्द (५७९—५९०) याला शांतता राखतां येईना. शिवाय, खिस्ती संप्रदायाचा छळ न केल्यामुळें मगी धर्मोपदेशकहि राजाशीं नाराज झाले होते. त्याच्या विरुद्ध सरदारांचें बंड होऊन त्यांत त्याला बळी पडावें लागलें. यानंतर दुसरा खुशरू गादीवर बसला. परंतु नवीन बंडें होऊन त्याला रोमन लोकांकडे पळून जावें लागलें. रोमन बादशहा मॉरिसनें खुशरूला पुन्हां गादीवर बसवून इराणी लोकांनां निसिबिस किल्ला दिला. दुसरा खुशरू (५९०-६२८) यास पर्वेझ (जेता) असें म्हणत असत. यानें बऱ्याच उलाढाली पाहिल्या. ६०२ मध्यें मॉरिसचा खून होतांच त्यानें ती संधि साधून सूड उगविण्याच्या उद्देशानें रोमवर स्वारी केली. या युद्धामध्यें ६०८ त, ६१५ त व पुन्हां ६२६ त याचें सैन्य कॅल्सीडॉनपर्यंत घुसलें; त्यानें सिरिया उध्वस्त केला; ६११ त अँटिऑक, ६१३ त दमास्कस व ६१४ त यरुशलेम घेतलें, व खिस्त्यांचा पवित्र क्रॉस टेसिफॉनला नेला. ६१९ मध्यें इजिप्त देश पादाक्रांत करण्यांत आला. पुढें हेराक्लायस या रोमन बादशहानें ६२३ मध्यें इराणी साम्राज्यावर स्वारी करून सव्याज सूड उगविला. ६२४ मध्यें रोमन लोकांनीं ॲट्रोपाटीनमधील मोठें अग्निदेवालय पाडून टाकलें; ६२७ त ते तैग्रिस प्रांतांत शिरले, परंतु खुशरू त्यांनां तोंड न देतां टेसिफॉनला पळून आला. यामुळें राज्यक्रांति होऊन त्याचा मुलगा दुसरा कवध यानें

खुश्रूला पदच्युत करून त्याचा खून केला ( ६२८ ). परंतु हा राजा थोड्क्याच महिन्यांनीं मरण पावला. याच्या मागून बरेच राजे व तोतये एकामागून एक होऊन गेले. अखेरीस सर्व सरदारांनीं एकमतानें दुसऱ्या खुश्रूचा नातू तिसरा येझ्देगर्द याला ६३२ मध्यें गादीवर बसविलें. मध्यंतरीं रोमन बादशहाशीं तह होऊन जुनी सरहद्द कायम करण्यांत आली, व ख्रिस्ती लोकांचा क्रॉस त्यांचा त्यांनां परत देण्यांत आला.

येणेंप्रमाणें ५२७ मध्यें सुरू झालेल्या रोमन युद्धाचा शंभर वर्षांनंतर निकाल झाला. या युद्धापासून उभय पक्षांसहि कांहीं फायदा झाला नाहीं. उलट दोघांच्याहि शक्तीचा ऱ्हास होऊन त्यांच्या शत्रूला अनायासें संधि प्राप्त झाली. हा नवीन शत्रु म्हणजे अरब लोक व इस्लामी धर्म हा होय.

**अरब लोक इराण जिंकतात.**— तिसरा येझ्देगर्द ६३३ मध्यें गादीवर बसला व त्याच वर्षी अरबी सैन्यानें इराणांत प्रवेश केला. बऱ्याच झटापटी होऊन ६३७ त युफ्रेटीझच्या एका कालव्यावर झालेल्या कॅडिसिआच्या लढाईंत सस्सन घराण्याचा शेवट झाला. याच्या थोडें अगोदर ६३६ मध्यें यार्मुकच्या लढाईंत सिरिया देश काबीज करण्यांत आला होता; व पुढें ६३९ मध्यें अरब लोक इजिप्तमध्यें शिरले. कॅडिसिआच्या विजयानें टेसिफॉन शहर व तेथील खजिना अरबांच्या हातीं लागला होता. या विजयानंतर इराणी राजा मीडियांत पळून गेला. तेथें त्याच्या सेनापतींनीं पुन्हां सुसंघटित होण्याचा प्रयत्न केला, पण नाहावेंदच्या लढाईंत त्यांचा मोड झाला (६४१). तिसऱ्या येझ्देगर्द राजाचा एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांतांत पळत असतां अखेरीस मर्व्ह येथें ६५१ मध्यें खून झाला. अशा रीतीनें इराण देश अरबांच्या हातीं जाऊन तेथें त्यांची सत्ता प्रस्थापित झाली.

---

# प्रकरण ४ थें.

## ग्रीक संस्कृतीची व्यापकता.

पूर्व आणि पश्चिम यांचा संबंध जोडणारा महत्त्वाचा दुवा जें इराणी साम्राज्य त्याची सविस्तर हकीकत मागील प्रकरणांत दिलीच आहे. पूर्व आणि पश्चिम यांचा अत्यंत निकट संबंध अलेक्झांडरच्या दिग्विजयामुळें आला असल्यानें त्या दिग्विजयाचाच तेवढा वेगळा इतिहास थोडक्यांत पुढें दिला आहे. पूर्वेशीं संबंध जसा ग्रीसचा आला तसा पश्चिमेशीं व बऱ्याच अंशीं पूर्वेशीं संबंध रोमचा आला. परंतु रोमन लोकांस इराणनें पूर्वेकडे फिरकूं दिलें नाहीं हें मागें दाखविलें आहेच.

अलेक्झांडरनें जो दिग्विजय केला त्यांतील इराणी भाग आणि त्या दिग्विजयामुळें इराणवर झालेले परिणाम आतांच वर्णन केले आहेत. ते वगळून बाकीचा इतिहास पुढें दिला आहे. ग्रीसचा सबंध इतिहास येथें देण्याचें कारण नाहीं, पण ग्रीक लोकांचा कार्यव्याप अलेक्झांडरच्या पूर्वीपासून असल्यामुळें ग्रीकांच्या कार्याची थोडीशी माहिती देणें अवश्य आहे.

**ग्रीसचा इतिहास.**—मागें ग्रीसचा इराणच्या इतिहासाशीं संबंध दिलाच आहे. इराणी साम्राज्याला पूर्वपश्चिमसंयोगाचें श्रेय चार हजार वर्षें असेल, तर मध्येंच शें दीडशें वर्षें तें ग्रीकांसहि होतें. आणि व्यापक घडामोडीच्या इतिहासाच्या दृष्टीनें ग्रीक संस्कृति, तिशीं संबद्ध ग्रीसचा इतिहास, आणि त्या संस्कृतीचा जगभर व्याप हा स्पष्ट केला पाहिजे. ग्रीक संस्कृति ग्रीसमध्यें जन्मास आली नाहीं, पण तेथें ती सुदृढ आणि पसरण्यास योग्य अशी झाली. त्यामुळें ग्रीस देशांतील हालचाली, संस्था, वाङ्मय व शैली यांस इतिहासांत महत्त्व आहे.

प्रस्तुत प्रसंगीं प्राचीन ग्रीसच्या इतिहासांतील सर्व मुख्य गोष्टींची विस्तृत हकीकत देतां येत नाहीं. ग्रीसचा इतिहास म्हणजे एका राज्याचा किंवा एका देशाचा इतिहास नसून त्यांत आरिस्टॉटलला आपल्या 'ग्रीक संस्थानांतील राज्यपद्धति' या ग्रंथांत १५०हून अधिक संस्थानांचा समावेश करावा लागला. आणि ग्रीक लोकांची जात तर पिरिनीझपासून उत्तर कॉकेशसपर्यंत व दक्षिण रशियापासून आफ्रिकेपर्यंत सर्व प्रदेशांत पसरलेली होती. म्हणून सध्यां त्या इतिहासांतील गोष्टींचें कार्यकारणभावात्मक विवेचन करून ग्रीसमधील मुख्य मुख्य प्रश्न व त्यांवरील मतें द्यावयाचीं व एकंदर सांस्कृतिक वाढीमध्यें हेलेनिक भागाचें महत्त्व किती हें दाखविण्याचा विचार आहे.

**मिनोई व मायसीनी युगें.**—ग्रीसच्या इतिहासाला आरंभ केव्हांपासून होतो हा मोठा वादग्रस्त प्रश्न आहे. पहिल्या ऑलिंपिअड (ख्रि. पू. ७७६ ) पासून त्याला आरंभ होतो हें प्रसिद्ध इतिहासकार ग्रोट याचें म्हणणें बरेंच मान्य होऊं लागलें होतें तोंच पुराणवस्तुसंशोधनशास्त्राची विलक्षण वाढ होऊन त्यांतील पुराव्यांवरून असें ठरूं पहात आहे कीं, त्या इतिहासाचा आरंभ ख्रि. पू. ३ ऱ्या किंवा ४थ्या सहस्रकापासून धरला पाहिजे. या संशोधनाच्या कामांत एच. श्लीमन व ए. जे. इव्हॅन्स यांनीं फार परिश्रम केले आहेत. श्लीमननें ट्रॉय, मायसीनि, टिरिन्स इत्यादि ठिकाणीं जीं मोठालीं खोदकामें केलीं त्यांवरून मायसीनी युगाची माहिती उपलब्ध झाली असून त्यायोगें इतिहासास ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकाच्या मध्याइतकें मागें नेतां आलें; पुढें इव्हॅन्सनें इ. स. १९०० मध्यें क्रीट बेटांत जें खोदकाम हातीं घेतलें त्यायोगें मिनोई युगाची माहिती उपलब्ध होऊन आणखी हजारपंधराशें वर्षें अगोदरच्या संस्कृतीच्या इतिहासावर प्रकाश पडला. परंतु मिनोई व मायसीनी संस्कृतीशीं हेलेनिक लोकांचाच कार्यकारणरूप

## इराणी साम्राज्य.






पर्सेपोलिस येथील क्सर्क्सीझच्या पायऱ्यांवरील उठावदार खोदकाम.



पहिला शापुर
( एका इराणी पुतळ्यावरून )

६० व्या पृष्ठसमोर






भारतीय नाणीं:- १ अलेक्झांडर; २ अंगस्टस; ३ कुजुल कडफिसेस; ४,५ हुविष्क; ६ टायबेरिअस; ७ नहपान; ८ चष्टन; ९ रुद्रसिंह; १० कुमारगुप्त पहिला; ११ तोरमाण; १२ नेपाळचा अंशुवर्मा; १३ मिहिरकुल; १४ कनोजचा प्रतिहार राजा भोज.



शिकंदर बादशहाचा एक पुतळा.

संबंध आहे हें ठरण्यास त्या संस्कृतिकाळांतील लिपि व धर्म तदनंतरच्या ग्रीकांच्या लिपीशीं व धर्माशीं जुळावयास पाहिजे; पण तें अद्याप सिद्ध झालें नाहीं. कारण त्या लिपींतील लेख वाचून त्याचा अर्थ कोणास लावतां आलेला नाहीं. परंतु मायसीनी चित्रकला व ग्रीक चित्रकला या दोहोंतहि दिसून येणाऱ्या कल्पनास्वातंत्र्याच्या गुणावरून व त्या कलेच्या परिणत अवस्थेशीं प्राचीन ग्रीक कलेच्या निकट साम्यावरून त्यांचा परंपरागत संबंध चांगला सिद्ध होतो. तथापि एकंदरींत, ह्या प्रश्नाचें उत्तर अद्याप अनिश्चित, स्वरूपांतच आहे असें म्हटलें पाहिजे. तसेंच या संस्कृती स्वयंसिद्ध बनत गेल्या किंवा अनुकरणसिद्ध होत्या, अथवा या संस्कृतींचा मिसरी व पौरस्त्य संस्कृतींशीं, तसेंच मिनोई युगाचा पेरिक्लीन व पिसिस्ट्रेटस युगांशीं काय व कसा संबंध होता वगैरे गोष्टीहि नक्की ठरल्या नाहींत. नोसस येथील नहरांचें काम १८व्या शतकांतल्यापेक्षां चांगलें होतें; युद्धांत पायदळापेक्षां रथी योध्यांनां अधिक महत्त्व असे; सर्व शरीर आच्छादितील अशा मोठाल्या ढाली असत; ग्रीक इतिहासांतील नगरराज्यांपेक्षां त्या वेळच्या एकसत्ताक राजांचीं राज्यें विस्तृत होतीं वगैरे गोष्टी महत्त्वाच्या आहेत.

**होमरचें युग.**—क्रीटमध्यें ख्रि. पू. १२५०पासून नवपाषाणयुग ( निओलिथिक ) काळापर्यंत व पाषाणयुगापासून मिनोईयुगापर्यंत सारखी वाढ चालत राहून नंतर तेथें एकाएकीं खंड पडतो. आद्ययुगसंस्कृति व ऐतिहासिक काळांतील डोरिअन लोकांची संस्कृति यांचा संबंध जोडतां येत नाहीं. डोरिअन लोक आद्ययुगीन लोकांच्या मानानें फारच रानटी होते. पुराणवस्तुयुग व ऐतिहासिक युग यांमध्यें हें मोठें खिंडार आहे. आतां मायसीनी चित्रकला व ख्रि. पू. ९ व्या शतकांतील आद्य ग्रीक चित्रकला यांचा संबंध थोडासा जोडतां येतो. तसेंच मायसीनी युग व होमरयुग यांचाहि संबंध असल्याचें बहुतेकांस मान्य आहे. तथापि प्रो. रिजवेनें आपल्या 'ग्रीसचें आद्ययुग' या ग्रंथांत यांतील साम्य व विरोध उत्तम दाखविला आहे. उ० मायसीनि हेंच ॲगामेम्नॉनचें नगर होय; व होमरगृहें व मायसीनि येथील राजवाडे यांत साम्य आहे. उलट पक्षीं होमरमध्यें लोखंडाचा उल्लेख आहे, पण मायसीनी लोकांस तें माहीत नव्हतें. हेलेन हें नांव ग्रीक लोकांस पडलें असावें. ख्रि.पू. ८व्या ७ व्या शतकांविषयीं ऐतिहासिक माहिती फार अल्प आहे. त्याच काळांत राजसत्ताकपद्धति लयास जाऊन हक्कदार किंवा उच्च घराण्यांतील लोक यांच्या हातांत राज्यकारभार जाऊन अल्पसत्ताकपद्धति सुरू झाली.

**व्यापार.**—मिनोई व मायसीनी काळांत व्यापार चांगला चालत असून क्रीट व पेलोपॉनीसस येथील लोक इजिप्त व आशियामायनर येथें जात असत. पुढें हा व्यापार साफ बसला. नंतर पुन्हां ७व्या व ६व्या शतकांत त्याची जोरांत वाढ झाली. लिडिअन लोकांनीं नाण्यांची पद्धति शोधून काढिली तिचा ग्रीक लोकांनीं फार प्रसार केला. युबिआ, इजायना व कॉरिंथ ह्या व्यापाराच्या मुख्य पेठा होत्या. व्यापारी कारणांकरितां व्यापारीसंघ निर्माण होऊं लागले व तदनुरोधानें राजकीय मित्रसंघ बनूं लागले. फ्रिजियन डोंगराळ प्रदेशांतील लोंकरीची मायलीटस (मिलेटस) येथें वस्त्रें बनून एट्रुस्कन बाजारांत खपूं लागलीं. तथापि ग्रीकांचा व्यापार भूमध्यसमुद्रांतील बंदरांपुरताच चालू असे. उलट फिनीशियन व कार्थेजिअन लोकांनीं मात्र ब्रिटनपर्यंत व केपला वळसा घालून जाण्याचें धाडस वास्कोडिगामाच्या पूर्वींच दोन हजार वर्षें केलें होतें. तथापि भूगोलशास्त्रास जन्म देण्याचें श्रेय ग्रीक लोकांसच असून नकाशेहि प्रथम ( ६ व्या शतकांत ) त्यांनींच केलेले आहेत.

**वसाहती.**—व्यापाराबरोबरच वसाहतींसहि सुरुवात झाली. तथापि ग्रीक वसाहती म्हणजे केवळ व्यापारी ठाणीं नव्हतीं; किंवा लोकसंख्या फार झाल्यामुळेंहि त्या बनलेल्या नव्हत्या. यांपैकीं कित्येक वसाहती राजकीय असंतोषामुळें व कांहीं केवळ साहसप्रियतेमुळेंहि झालेल्या होत्या. शिवाय रोमन किंवा अलीकडील यूरोपीय वसाहतींप्रमाणें ग्रीक वसाहती राजकीय पारतंत्र्यांत नसून त्या पूर्ण स्वतंत्र किंवा स्वराज्ययुक्त होत्या. तसेंच जात, वर्ण व हवापाणी या बाबतींतहि ग्रीक वसाहतींनां अलीकडील वसाहतींप्रमाणें त्रास किंवा अडचणी सोसाव्या लागल्या नाहींत. कारण, ग्रीक वसाहतवाले व तद्देशीय लोक यांचा वर्ण, जात व संस्कृति हीं परस्परसदृश असून हवामानहि तेंच म्हणजे भूमध्य प्रदेशांतल्या सारखेंच होतें. यामुळें मूळचे व नवे लोक एकमेकांत लवकरच मिसळून जात.

**टायरंट उर्फ अन्यायी राजे.**—७ व्या शतकांत अनेक अन्यायी राजे उत्पन्न झाले व त्यांचा राजकारणावर व त्याचप्रमाणें सांपत्तिक, धार्मिक व वाङ्मयीन गोष्टींवरहि फार परिणाम झाला. अलीकडे 'टायरंट याचा अर्थ दुहेरी म्हणजे बेकायदेशीर ( बिगरहक्क ) राजा व अराजनिष्ठ ( जुलुमानें पीडिलेल्या ) लोकांचा राजा, असा आहे. परंतु ग्रीक इतिहासांत टायरंट म्हणजे केवळ राजा एवढाच अर्थ अभिप्रेत आहे. शिवाय सर्व ग्रीक संस्थानांतून असले राजे होऊन गेले हें म्हणणें खोटें असून 'टायरंटांचें युग' असेंहि कांहीं झालेलें नाहीं. फक्त पेलोपॉनीसस, सिसिली, अथेन्स, सिसिऑन, कॉरिंथ, सिराक्यूस वगैरे कांहीं ठिकाणीं व अगदीं निरनिराळ्या शतकांत(ख्रि.पू.७व्या ते४थ्या शतकांत) असले राजे होऊन गेले. तसेंच एकतंत्री राजसत्ता ही अल्पसत्ताकपद्धति व लोकशाही यांस जोडणारी संक्रमणावस्था होय, हा सामान्य सिद्धान्तहि खरा नाहीं. कारण अथेन्स, कॉरिंथ येथील इतिहास या प्रमेयाला धरून नाहीं. टायरंटांच्या उदयाचें कारण मात्र सर्वत्र सारखें दिसतें, व तें लोकांतील असंतोष हेंच होय. पण तोहि एकजात राजकीयच नसून सिसिऑनमध्यें जातिविषयक, अथेन्समध्यें सांपत्तिक,

व मायलीटसमध्यें औद्योगिक असंतोष हें कारण होतें. हा असंतोष दूर करून लोकांचें कल्याण करण्यांत पुढाकार घेत तेच पश्चिमेकडे म्हणजे युरोपांत टायरंट समजले जात. उलट पूर्वेकडे (आशियाखंडांत) पर्शियन बादशहानें जिंकलेल्या आशियामायनर प्रांतावरील टायरंट उर्फ बेजबाबदार राजे म्हणजे वस्तुतः त्यांचे अधिकारी असून ते राष्ट्रहितविघातक व प्रजापीडक असत. असा हा दोन खंडांतील टायरंटांमध्यें महत्त्वाचा फरक आहे. यूरोपमध्यें ग्रीसशिवाय रोमन इतिहासांतील सीझर व फ्रान्सवरील अलीकडील नेपोलिअन बादशहा हे याच प्रकारचे राजे होते. ग्रीकवाङ्मयांत प्लेटो, आरिस्टॉटल, किंवा हिरोडोटस व इतर इतिहासकार या सर्वांनीं या टायरंट राजांची एकजात निंदाच केलेली आहे. पण हीं पूर्वग्रहदूषित मतें होत.

**टायरंटांपासून फायदे.**—वास्तविक पाहतां या टायरंटांपासून अनेक दृष्टींनीं फायदेच झाले. पहिला फायदा म्हणजे या राजांनीं शिष्टसत्ताकपद्धति नाहींशी करून लोकशाहीचा मार्ग मोकळा करून दिला. दुसरें त्यांनीं राजकीय मित्रसंघ स्थापण्याचा उपक्रम केला; शिवाय व्यापार व वसाहती त्यांनींच वाढविल्या; विशिष्ट कुटुंबांकडे असलेली धार्मिक सत्ता काढून घेऊन सामान्य लोकांनीं मिळून धार्मिक उत्सव पार पाडावे अशी चाल त्यांनींच पाडली; विद्वानांनां आश्रय व कलाकौशल्याला उत्तेजन तेच देत असत; व त्यांच्या काळांत कित्येक संस्थानें अत्यंत सामर्थ्यवान् होऊन गेलीं. वरील सर्व गोष्टी पुढें याच पद्धतीनें वाढत गेल्या. बहुसंख्याकराज्यपद्धति किंवा लोकशाही प्रथम अथेन्समध्यें स्थापन होऊन नंतर सर्वत्र पसरली. पुष्कळ बाबतींत आयोनिया सर्वांच्या पुढें असे. गद्यग्रंथलेखनास सुरुवात होऊन थेलीझ, पायथॅगोरस, झिनॉफानीझ, हेराक्लायटस, पार्मेनिडीझ, ॲनॅक्सिमँडर, हेकाटीअस वगैरे गणित, ज्योतिष, भूगोल, तत्त्वज्ञान वगैरे विषयांतील विद्वान् ५ व्या शतकांत आयोनियामध्येंच होऊन गेले. तथापि राजकारणांत ग्रीक संस्थानांची व लष्करी सामर्थ्यांत स्पार्टन पायदळाची बरोबरी इतर कोणीहि करूं शकत नसे.

**पर्शियन युद्धें.**—लवकरच पुढें ग्रीसच्या परीक्षेची वेळ आली. त्या वेळेपर्यंत पर्शियन सैन्यांत ग्रीक लोकांचा भरणा असे; व पर्शियाबरोबर ग्रीक लोकांचा व्यापारहि मोठा चाले परंतु पर्शियांतील सायरसच्या कारकीर्दींत हा संबंध एकदम तुटला. त्या वेळीं पर्शिया व ग्रीस यांची स्थिति परस्पर अत्यंत विरुद्ध होती. पर्शियांत एकसत्ता, तर ग्रीसमध्यें लोकशाही होती. पहिल्या ठिकाणीं घोडदळाला तर दुसऱ्या ठिकाणीं पायदळाला महत्त्व होतें. इकडे पर्शियनांचा धर्म जगांतील श्रेष्ठ धर्मांत मोडणारा होता, तर ग्रीसमधील धर्म खुद्द ग्रीक लोकांनांच वेडगळ व तिरस्करणीय वाटे. पुढील काळांत ग्रीक पर्शियनांनां तुच्छ मानूं लागले व पर्शियन ग्रीकांनां भिऊं लागले; पण या

खि. पू. ६व्या शतकांत पर्शियनच ग्रीकांनां तुच्छ मानीत व ग्रीक त्यांनां भीत असत. प्रथम आयोनियन ग्रीकांचे व पर्शियनांचे जे सामने झडले, त्यांत म्हणजे ह्र्पेगसची स्वारी (खि. पू. ५४६—५४५) व आयोनिक बंड (खि.पू. ४९९—४९४) या दोन्हींहि वेळीं ग्रीकांनांच हार खावी लागली. कारण, व्यापारी दृष्टीनें बनलेल्या या ग्रीकांच्या संघांत एकराष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें बिलकुल जीव नव्हता. मायलीटससारख्या नगरांनीं पर्शियाशीं स्वार्थीपणानें स्वतंत्र तह करून दुसऱ्यांनां ऐन वेळीं तोंडघशीं पाडलें; आणि मत्सर व फितुरी या ग्रीकांच्या दुर्गुणांनीं पर्शियनांस जय मिळवून दिला. दरायस [खि. पू. ४९०] व क्सर्क्सीझ [खि. पू. ४८०—४७९] यांच्या स्वाऱ्यांच्या वेळीं मात्र ग्रीकांनां पूर्ण जय मिळाला. त्या वेळचें पुढाकार घेऊन मोठ्या युक्तीनें व देशभक्तीनें जय मिळविल्याबद्दलचें सर्व श्रेय स्पार्टाकडे आहे. शिवाय ग्रीसच्या डोंगराळ प्रदेशाची व खडकाळ किनाऱ्याची माहिती नसल्यामुळें, मूळ पर्शिया देशांतून फार लांबवर आल्यामुळें व खाण्यापिण्याचे हाल होऊं लागल्यामुळें पर्शियनांनां अपयश आलें.

**महायुग.**—(खि. पू. ४८०—३३८).—वर सांगितल्याप्रमाणें पर्शियनांचा मोड करून हांकून लाविल्यापासून जे अनेक इष्ट परिणाम झाले, त्या मानानें स्पेनच्या आरमाराच्या पराभवानें इंग्लंडवर झालेले परिणामहि कमी महत्त्वाचे आहेत. या जयानें राष्ट्रीय एकी व वर्चस्व या भावना ग्रीक लोकांत फार बळावल्या. या महायुगांत राजकारण, वाङ्मय व कला पूर्णावस्थेस पोहोंचल्या. सर्वत्र लोकशाही स्थापन झाली; व हळू हळू ग्रीक संस्थानांचा संयुक्तसंघ बनविला जाऊन अथेन्सच्या अध्यक्षत्वाखालीं डीलिअन संघ स्थापला गेला (खि. पू. ४७७). या डीलिअन संघाचेंच पुढें अथेनियन साम्राज्यांत रूपांतर झालें, व अथेन्सची जागा पुढें स्पार्टानें घेतली. यानंतर थीबीकडे व त्यापुढें मॅसिडोनकडे वर्चस्व गेलें.

**पेलोपॉनीशिअन युद्धें.**—याप्रमाणें सर्व ग्रीसदेशभर वर्चस्वाकरितां चुरस लागली असतां "पहिलें पेलोपॉनीशिअन युद्ध" अथेन्स विरुद्ध कॉरिंथ, इजायना व स्पार्टा यांच्यामध्यें झालें (खि. पू. ४६०—४५४). या युद्धांत ग्रीक साम्राज्यसत्ता आपल्या हातांत घ्यावी असा अथेन्सचा हेतु होता; तर हें साम्राज्याचें खूळ नाहींसें करावें असा स्पार्टाचा उद्देश होता. अथेन्साची समुद्रावरील सत्ता व स्पार्टाची जमिनीवरील सत्ता, अथेन्सच्या बाजूचीं अल्पसत्ताक संस्थानें व स्पार्टाच्या बाजूचीं लोकसत्ताक संस्थानें, अथेन्सकडील आयोनियन संस्थानें तर स्पार्टाकडील डोरिअन संस्थानें अशांमधला हा बडा सामना होता.

**अथेनिअन साम्राज्य.**—अथेनिअन साम्राज्यांत साम्राज्यशाही व लोकशाही या दोहोंतील तत्त्वांचा संकर करण्याचा प्रयत्न करण्यांत आला होता. अशा तऱ्हेचा जगाच्या इति-

ह्यासांत ह्या पहिलाच प्रयत्न असून तो फसला. इंग्रजापुरती लोकसमता व इंग्रजेतर लोकांवर इंग्रजांची सत्ता अशी जी प्रचलित ब्रिटिश साम्राज्यनीति आहे, त्याच प्रकारचा प्रयत्न लोकशाही व साम्राज्यभावना यांच्या एकीकरणामें व्हावयाचा; म्हणजे एक जात दुसऱ्या जातीच्या उरावर बसनावयाची. पेरिक्लीझनें ( ख्रि. पू. ४५१ ) कायदा करून मतदारीचा अधिकार अथेनिअन कुलोत्पन्न लोकांनांच दिला, त्यामुळें समाजांत हक्कदार व बिगरहक्क लोक असे दोन तट पडून राज्यसत्ता मूठभर हक्कदार लोकांच्या हातांत गेली. शिवाय समान धर्म, समान शिक्षण व समान नागरिकत्व हीं सर्व साम्राज्यभर सुरू केलीं गेलीं नाहींत. तथापि सर्वत्र तीच भाषा, तींच वजनेंमापें, तीच न्यायपद्धति व तीच राजकीय संस्था प्रचलित होती. अशा तऱ्हेचा ह्या अथेनिअन साम्राज्याचा विचित्र प्रयोग शेवटीं साफ फसला.

या महायुगाच्या अखेरीस स्पार्टा येथील राजसत्ताक पद्धतीसारखे कांहीं अपवाद खेरीज करून बहुतेक सर्वत्र लोकशाही सुरू होती; व तीस अनुसरून अनेक राजकारणी वक्ते प्रसिद्धीस आले. क्लीऑन, युक्राटीझ, लायसिक्लीझ, हायपर्बोलस, क्लीओफॉन वगैरे निरनिराळ्या धंद्यांतील लोक पुढें येऊन त्यांनीं राजकीय सत्ता हातीं घेतली. डिमॉस्थिनीझच्या वेळीं तर जन्मकुलाला राजकारणाच्या दृष्टीनें बिलकुल महत्त्व नसे. अशा लोकांनां प्रथम " डेमेगॉग्ज " व नंतर " ऑरेटर्स " असें म्हणत असत.

प्राचीन ग्रीक लोकशाही व अर्वाचीन लोकशाही यांच्यांत फार फरक आहे. पूर्वीचीं नगरराज्यें असत, तर हल्लीं राष्ट्रराज्यें आहेत. नगर राज्यांत फक्त दहा ते वीस हजार लोक असत. या सर्वांनां भाषणाचा व मताचा अधिकार सारखाच असे. त्यामुळें अलीकडील प्रातिनिधिक पद्धतीची जरूर नव्हती. तेथें कायदेकारी व कार्यकारी कौन्सिलें असा भेद नसे; कारण दोन्ही अधिकार त्या काळीं नागरिक सभेलाच असत. त्या वेळीं राजकीय पदाचा अभाव होता; व निवडणुकीची धामधूम, लांचलुचपत वगैरे कांहींहि गोष्टी नव्हत्या. ग्रीक लोकशाहींत नागरिकांनां अनेक विशेष हक्क असत व अथेनिअनेतरांनां नागरिकत्व फारच क्वचित् मिळे. खुद्द अथेनिअन स्त्रियांनांहि स्वातंत्र्य व हक्क बिलकुल नव्हते. गुलामगिरीची पद्धत सर्वत्र प्रचलित होती.

**स्पार्टन साम्राज्य.**—अथेनिअन साम्राज्य लहान होतें, पण स्पार्टन साम्राज्य सर्व ग्रीसभर पसरलेलें होतें. पुढें पुढें मत्सर वाढून कॉरिंथिअन युद्धांत ( ख्रि. पू. ३९४–३८७ ) लायसँडरच्या प्रयत्नानें स्पार्टाच्या विरुद्ध थीबि, अथेन्स, कॉरिंथ व आरगॉस हीं सर्व एकत्र झालीं. त्या युद्धांत स्पार्टाचाच जय झाला, पण स्पार्टाची समुद्रावरील सत्ता मात्र लयास गेली. कारण एक तर स्पार्टाचा दर्यावरील व्यापार फारसा नव्हताच; शिवाय स्पार्टाजवळ पैशाचा पुरवठा बेताचाच असल्यामुळें त्याच्या अंगीं मोठें आरमार बांधण्यास सामर्थ्य नव्हतें, व दर्यावर्दीपणांत कुशल अशीं माणसेंहि नव्हतीं. यामुळें एकाच पराजयानें ( नायडस येथें ख्रि. पू. ३९१ ) स्पार्टन आरमार नाहींसें होऊन स्पार्टन साम्राज्य मोडकळीस आलें.

**थीबीचें धुरीणत्व.**—ल्यूक्ट्राच्या लढाईनें पुढारीपणा स्पार्टाकडून निघून थीबीकडे गेला. परंतु थीबी लोकांजवळ अथेनिअनांप्रमाणें पैशाचें सामर्थ्य नव्हतें किंवा स्पार्टाप्रमाणें अद्वितीय लष्करी सामर्थ्यहि नव्हतें. आरमार तर त्यांच्याजवळ मुळींच नव्हतें; किंवा लोकशाहीसारख्या एखाद्या उच्च राजकीय तत्त्वाचा त्यांनां पाठिंबा नव्हता. यामुळें सर्व बाजूंनीं त्यांनां लवकरच अपयश येत गेलें.

**मॅसिडोनचा उदय.**—मॅसिडोनचा फिलिप किंवा अलेक्झांडर असल्या अनियंत्रित राजसत्ताधाऱ्यांचा जय व्हावा याचें कारण काय ? त्या वेळच्या नगरराज्यपद्धतीचा हा दोष, किंवा लोकशाहीचा ? याचीं राजकीय, आर्थिक व नैतिक अशीं निरनिराळीं कारणें आहेत. निरनिराळ्या संस्थानांत समतोलपणा राखण्याचें राजकारणांतील तत्त्व स्वीकारून अथेन्सनें कधीं थेलीझला तर कधीं स्पार्टाला मदत करून परस्परांतील शत्रुभाव वाढविला व सर्वांसच दुर्बलता आणली. नैतिकदृष्ट्या गर्भपात, शिशुत्याग वगैरे नीतिबाह्य रूढींमुळें लोकसंख्या कमी कमी होत चालली होती. आरिस्टॉटलसारख्या तत्त्ववेत्त्यानें शिशुत्यागावर टीका केली होती, तरी गर्भपातास त्याचीहि संमति होती. यामुळें अर्थोत्पत्तीहि मंदावली. उलट चैनबाजींत द्रव्यव्यय मात्र वाढत होता. सरकारी खजिन्यांत पैशाची टंचाई झाल्यामुळें युद्धखर्च चालविण्यास मारामार पडूं लागली. राजकारणांतील नीतिमत्ता कमी होत चालली, देशभक्ति मंदावली, लांचलुचपत वाढली, पुढाऱ्यांतील परस्परांवरील विश्वास उडत चालला, व पगारी लष्करभरती सुरू झाल्यामुळें सार्वजनिक कामें करण्याची हौस मावळत गेली. डिमॉस्थिनीझनें यावर पदोपदीं टीका केली आहे. परंतु या सर्वांपेक्षांहि महत्त्वाचें व्यंग म्हटलें म्हणजे संख्यागौणत्व हें होय. आरिस्टॉटली बुद्धीस हें संख्याल्पत्व मोठें गोजिरवाणें वाटे, आणि तें संभोगेच्छेचें नियमन न करतां रक्षिण्यासाठीं त्यानें मोठे घाणेरडे उपाय सुचविले आहेत.

**अलेक्झांडरपासून रोमन अंमलापर्यंत** ( ख्रि. पू. ३३६—१४६ ).—या काळांत मागील नगरराज्यपद्धति मागें पडून सांघिक राज्यपद्धति चालू झाली. या वेळीं इटोलिअन व आकिअन असे दोन प्रसिद्ध संघ होते; व आधुनिक काळांतील प्रातिनिधिक तत्त्व अंमलांत येऊन संघांतीलसंस्थानांतर्फेच्या प्रातिनिधींच्या हातांत खरी राज्यसत्ता होती.

**अलेक्झांडर**—तथापि या काळांतील अलेक्झांडरच्या कारकीर्दीनें इतिहासाला अगदीं निराळेंच वळण लावलें, व मानव जातीचा चरित्रक्रम बदलून टाकला. हेलेनी संस्कृति व उत्कृष्ट राजसत्ताकपद्धति या दोन गोष्टी अलेक्झांडरच्या कर्तृत्वामुळें पुढें आल्या. त्यांच्या पूर्वी डायोनिशिअस, पिसिस्ट्रेटस यांच्यासारखे हुषार व बुद्धिमान् राज्यकर्ते होऊन गेले

होते, पण ते कायदेशीर राजे नव्हते. त्यामुळें "राजा म्हणजे ईश्वरी अवतार" अशी कल्पना पाश्चात्त्य देशांत अलेक्झांडर-मुळेंच प्रथम उत्पन्न झाली. तसेंच त्यानें एकाच प्रकारची भाषा, वाङ्मय व कला सर्वत्र सुरू करून एका जातीची हेलेनिक संस्कृति सर्व जगभर पसरविण्याचा प्रयत्न केला. त्याप्रमाणेंच अलेक्झांडरनें अनेक देश जिंकून एक विश्वसाम्राज्य व विश्वसंस्कृति स्थापन केली. अलेक्झांडरच्या मृत्यूबरोबर त्याचें साम्राज्य लयास गेलें ही गोष्ट खरी; तथापि पौरस्त्य व पाश्चात्त्य या दोन्ही संस्कृतींवर ग्रीक संस्कृतीची छटा उगटली ती कायम राहिली, व त्यामुळेंच पुढें रोमन साम्राज्य व रोमन चर्च या दोन संस्था निरनिराळ्या झाल्या. असो.

अलेक्झांडरचा विजय सविस्तर वर्णन करण्याचें प्रयोजन नाहीं. ग्रीसमधील यादवीमध्यें अलेक्झांडरचा जय झाला. त्यानें कांहींस बरें वागविलें, कांहींस वाईट तऱ्हेनें वागविलें एवढेंच कायतें. अथेन्सला त्यानें म्युनिसिपालिटी चालविण्यापुरते हक्क जिवंत ठेवले. आशियांतील अलेक्झांडरचे पराक्रम इराणचें सत्तावर्धन विवेचितांना वर्णिलेच आहेत. ग्रीकांचा हिंदुस्थानाशीं काय संबंध आला हें मात्र येथें दिलें पाहिजे.

**अलेक्झांडरची हिंदुस्थानावर स्वारी.**—अलेक्झांडर यानें बॅक्ट्रियाचें राज्य पूर्णपणें हस्तगत करून, डायोनायसस, हेराक्लीझ आणि सिमिरामिस यांच्या हातून झालेल्या अद्भुत गोष्टींवर ताण करण्यासाठीं, हिंदुस्थानावर स्वारी करण्याचा निश्चय केला. ख्रि. पू. ३२७ या वर्षी वसंत ऋतूच्या शेवटीं त्यानें हिंदूकुश आणि खावक यांच्या घाटांतून ५०।६० हजार गोऱ्या सैन्यासह कूच केलें; व दहा दिवसांनंतर तो ज्याला आतां दाम म्हणतात त्या कोहि सुसंपन्न खोऱ्यापाशीं आला. येथें त्यानें दोन वर्षांपूर्वी आपल्या स्वारीच्या सुरक्षिततेसाठीं मोक्याची जागा पाहून अलेक्झांड्रिया नांवाचें एक शहर वसविलें होतें. येथील पूर्वीचा अधिकारी नालायक दिसल्यानें त्याच्या बदलीं आपल्या पार्मीनिऑन नामक मित्राच्या नायकेनॉर या नांवाच्या मुलाची त्या जागेवर नेमणूक केली. तसेंच वरील घांटामधील प्रदेशावर आणि काबूल नदीच्या कांठच्या प्रदेशावर टायरिआस्पस यास नेमून व कडेकोट बंदोबस्त करून तो काबूलपासून हिंदुस्थानास जावयाच्या मार्गातील जलालाबाद शहराच्या पश्चिमेस असलेल्या निकैया नामक शहराजवळ आपल्या सैन्यासह दाखल झाला. येथें त्यानें आपल्या सैन्याचे दोन भाग केले. एका भागावर हेफाइस्तिऑन आणि पेर्डिकस या दोन सेनापतींची नेमणूक करून त्यांनां तीन पायदळांच्या तुकड्या, अर्धे घोडदळ व सर्व भाडोत्री घोडेस्वार यांच्यासह तडक हिंदुस्थानाकडे कूच करण्यास सांगितलें; व सिंधुनदीच्या कांठीं जाऊन पेउकेलओटिस हें शहर काबीज करण्याचा हुकूम केला. मार्गातील निरनिराळ्या जातींच्या नायकांनीं त्यास अडथळा करण्यापेक्षां शरण जाण्यांतच आपलें हित आहे असें पाहिलें; तथापि हस्ति (अस्तेस) नांवाच्या एका नायकानें मात्र त्यास अडविण्याचा प्रयत्न केला. त्यानें आपला किल्ला तीस दिवस एकसारखा झुंजविला, पण शेवटीं तो काबीज करण्यांत येऊन त्याचा विध्वंस करण्यांत आला. या स्वारीमध्यें अलेक्झांडरच्या सेनापतींबरोबर तक्षशिलेचा राजा हजर होता व सिंधुनदीच्या पश्चिमतीरावरील दुसरे राजे देखील असेच त्यांनां मदत करण्यास आले होते. या हिंदू संस्थानिकांच्या मदतीनें अलेक्झांडरच्या सेनापतींनां सिंधु नदीवर पूल बांधण्याचें त्यांच्याकडे सोंपविलेलें काम पार पाडण्यास विशेषसा प्रयास पडला नाहीं.

**डोंगरांतील रानटी जातींचा बंदोबस्त.**—सैन्याच्या दुसऱ्या भागाचें आधिपत्य स्वतः अलेक्झांडर यानेंच पतकरलें होतें. यामध्यें ग्रेसचीं पायदळें, तिरंदाज, भालाईत वगैरे लढवय्यीं पलटणें होतीं. अशा सैन्यासह काबूल नदीच्या कांठच्या दुर्गम दऱ्याखोऱ्यांत रहाणाऱ्या निरनिराळ्या भयंकर जातींनां जिंकून आपली मागील बाजू सुरक्षित करण्याचा त्यानें प्रयत्न केला. या डोंगराळ प्रदेशांत लष्करी हालचाली करणें फार अवघड होतें. कडाक्याची थंडी, भाजून काढणारें ऊन व तेथील लोकांचें विलक्षण शौर्य यामुळें तर या मोहिमीचें काम अधिकच कठिण झालें होतें. तथापि अलेक्झांडर हा असामान्य पुरुष असल्या कारणानें असल्या अडचणींनां त्यानें दाद दिली नाहीं. त्यानें आपल्या हालचाली कशा रीतीनें केल्या, कोणकोणत्या जातींनां जिंकलें, कोणकोणते किल्ले काबीज केले याबद्दलची जरी नक्की माहिती देतां येत नाहीं, तरी चारपांच महिन्यांत कूनर किंवा चित्रळ नदीच्या खोऱ्यांत तो बराच वर गेला असला पाहिजे यांत शंका नाहीं. तेथील डोंगरांतील एका शहरीं त्याच्या खांद्यास एक बाण लागून तो जखमी झाला, व त्यामुळें त्याच्या शिपायांनीं चिडून जाऊन त्या ठिकाणीं कैद केलेल्या सर्व बंदिवान लोकांची सरसहा कत्तल करून तें शहर जमीनदोस्त केलें.

या अपघातानंतर लवकरच अलेक्झांडरनें आपल्या सैन्याच्या पुन्हां दोन तुकड्या केल्या. त्यांपैकीं एका तुकडीचें आधिपत्य आपला अतिशय विश्वासू सेनापति क्राटेरॉस यास देऊन त्याच्याकडे त्यानें कूनर नदीच्या खोऱ्यांमधील रानटी जातींचा पुरा बंदोबस्त करण्याचें काम सोंपविलें, व स्वतः अस्पासिअनांवर चाल करून जाऊन त्यांची भयंकर कत्तल करून त्यांचा पराभव केला. नंतर पर्वत ओलांडून तो ज्याला आतां बाजौर म्हणतात त्या खोऱ्यांत आला. तेथें त्याला अगीयॉन नांवाचें रहिवाशी जाळून सोडून गेलेलें निर्जन असें एक शहर आढळून आलें. येथेंच क्राटेरॉसहि आपली कामगिरी बजावून त्याला येऊन मिळाला; व त्यांनीं दोघांनीं मिळून पुढील हिंदुस्थानावर स्वारी करण्याचें काम सुकर व निर्धोक व्हावें याकरितां पूर्वेकडील जातींचें निर्दलन करण्यास सुरुवात केली. अस्पासिअन हे मोठें तुंबळ युद्ध होऊन दुसऱ्या खेपेस पुन्हां पराभूत झाले,

व त्यांचे ४०,००० लोक कैद होऊन २,३०,००० बैल लुटले गेले. यांपैकीं जे उत्तमोत्तम बैल व गाई होत्या त्यांनां, शेतकीकरितां मॅसिडोनियाकडे रवाना करण्यांत आले. यानंतर नायसा नांवाच्या शहरावर हल्ला करण्यांत आला. डायोनायसस आणि पौराणिक कथांतील पवित्र शिखर नायसा यांचा या नायसाशीं काल्पनिक संबंध जोडण्यांत आला होता. या शहराजवळची नदी अतिशय खोल असल्यामुळें अलेक्झांडरचा हल्ला फसला; म्हणून अलेक्झांडर त्यास वेढा घालून त्याचा सर्व बाजूंनीं कोंडमारा करण्याच्या विचारांत होता. परंतु, तेथील लोक आपण होऊनच त्यास शरण आले. असें ह्मणतात कीं, या लोकांनीं आपला डायोनायससशीं व ग्रीकांशीं संबंध लावून अलेक्झांडरपाशीं क्षमेची याचना केली. अलेक्झांडरला आपल्या परदेशांत राहून कंटाळलेल्या सैनिकांची "आपण आपल्या लोकांतच आहों असें भासवून समजूत करावयाची असल्यामुळें त्यानेंहि त्यांच्या विधानाच्या सत्यासत्यतेचा विचार न करतां त्यांच्यावर दया केली.

येथें सैनिकांनां थोडी विश्रांति मिळावी ह्मणून व आपल्या जिज्ञासातृप्तीसाठीं निवडक शिपायांनिशीं अलेक्झांडर ज्याला हल्लीं कोहिमोर म्हणतात त्या पर्वतांत हिंडावयास गेला. तेथील लोकांची गाणीं व नाच यांच्यामध्यें व हेलास येथील गाणीं व नाच यांमध्यें त्याला बरेंच साम्य आढळून आलें; त्याच्या शिपायांनांहि सजातीय लोक भेटल्यामुळें आनंदच झाला. या लोकांच्या सहवासांत अलेक्झांडरनें व त्याच्या सैनिकांनीं दहा दिवस मोठ्या चैनींत घालवून विश्रांति घेतली. नायसाच्या लोकांनीं अलेक्झांडरनें त्यांच्यावर दया केली ह्मणून तीनशें घोडेस्वारांचें एक पथक त्याच्या कुमकेस दिलें. हें पथक अलेक्झांडरपाशीं सर्व स्वारीभर होतें व शेवटीं खि. पू. आक्टोबर ३२६ मध्यें तें आपल्या गांवीं परत गेलें.

**असाकेनाईवर मोहीम.**—अलेक्झांडरनें यानंतर असाकेनाइ नांवाचें राष्ट्र काबीज करण्याचें काम हातीं घेतलें. तेथील लोकांजवळ २०,००० घोडेस्वार व ३०,००० हून अधिक पायदळ असून त्यांसह ते लढाईला सज्ज होऊन राहिले आहेत अशी बातमी त्याला लागली होती. अलेक्झांडरनें आपल्याबरोबर निवडक घोडेस्वारांचें पथक घेऊन गौरायास (हल्लींची पंजकोरा) नदी ओलांडली, व त्यांच्या प्रदेशांत शिरून त्या लोकांच्या मस्सग नांवाच्या एका मुख्य शहरावर हल्ला करण्याचा बेत केला. हें शहर ह्मणजे एक भरभक्कम किल्लाच होता. त्याच्या पूर्वेला एक डोंगरांतून वहात आलेली मोठी नदी असून तिच्यामुळें ती बाजू सुरक्षित झाली होती; व दक्षिणेला व पश्चिमेला मोठे पर्वत व टेकड्या असल्यानें त्या बाजूहि निर्धोक होत्या. मोकळ्या राहिलेल्या बाजूस शहराभोंवतीं चार मैलांची एक प्रचंड भिंत असून शिवाय तिच्याबाहेर एक खोल खंदकहि होता. अशा शहरावर कोठून कसा हल्ला करावा हें ठरविण्यासाठीं टेहळणी करीत असतांना अलेक्झांडरला एक बाण लागून तो जखमी झाला. परंतु जखम फारशी मोठी नसल्यामुळें त्यानें आपलें वेढ्याच्या देखरेखीचें काम दक्षतापूर्वक चालू ठेविलें. अशा प्रकारचा शूर सेनापति लाभला असतां साध्या शिपायाला देखील स्फुरण चढणें साहजिक आहे. त्याच्या सैनिकांनीं अतिशय उत्साहानें काम करून नऊ दिवसांच्या आंतच खंदकावरून पलीकडे जाण्यासाठीं धक्का तयार केला, व अशा रीतीनें भिंतीच्या जवळ जाऊन यंत्रांच्या साहाय्यानें मारा करण्यास सुरुवात केली. मुख्य नाईक आरंभीच जखमी होऊन मेल्यामुळें किल्ल्याच्या संरक्षणास असलेल्या शिपायांचा उत्साह नाहींसा होऊन ते अलेक्झांडरला शरण आले. त्या नायकाची बायको अलेक्झांडरच्या हातीं लागली व तिला त्याच्यापासून एक मुलगाहि झाला असें ह्मणतात. मस्सगच्या किल्ल्याच्या रक्षणाकरितां ७००० भाडोत्री शिपाई ठेवलेले होते. 'मला येऊन मिळाल्यास मी तुम्हांला जीवदान देतों' असें अलेक्झांडरनें त्यांनां सांगितलें, व तें त्यांनीं कबूल करतांच मॅसिडोनियनांच्या लष्करापासून नऊ मैल दूर असलेल्या एका टेकडीवर जाऊन राहण्यास त्यांनां परवानगी देण्यांत आली. परंतु स्वतःच्या लोकांनां जिंकण्यास मदत करणें हें बरोबर नाहीं असें त्यांनां वाटल्यावरून रात्रीच्या रात्रीं पळून जाण्याचा त्यांनीं बेत केला. अलेक्झांडरला ही वर्दी लागतांच त्यानें त्यांच्यावर एकदम छापा घातला. त्या लोकांनीं व त्यांच्या बायकांनीं मोठ्या धैर्यानें अलेक्झांडरच्या सैन्यास तोंड देऊन लढण्याची शिकस्त केली व कैद होऊन अपमानानें जिवंत रहाण्यापेक्षां लढतां लढतां प्राण सांडणें त्यांनीं पतकरलें. अलेक्झांडरच्या या कृत्याबद्दल पुष्कळांनीं त्यावर झणझणीत टीका केली आहे. त्यांच्या मतें अशी विश्वासघातानें कत्तल करणें अगदीं नीचपणाचें काम होय. परंतु एका दृष्टीनें अलेक्झांडरनें केलें तें बरोबरच केलें असें म्हटलें पाहिजे. कारण इतके शूर शिपाई विरुद्ध बाजूस मिळाले असते तर अलेक्झांडरला फार त्रास झाला असता.

अलेक्झांडरनें नंतर ओरा अथवा नोरा नांवाचें शहर काबीज केलें, व बझिरा नांवाचें एक महत्वाचें ठिकाण ताब्यांत घेतलें. या शहरांतील लोक इतर शहरांतील लोकांप्रमाणेंच सिंधु नदीच्या जवळील औरनोस नामक किल्ल्यांत आश्रयासाठीं गेले होते. लष्करी दृष्ट्या हें स्थळ महत्वाचें असल्यामुळें अलेक्झांडरनें तें काबीज करण्याचें ठरविलें. अलेक्झांडरच्या पूर्वी हेराक्लीझ याचे बेत या शहरानेंच ढासळून पाडले होते. या स्थळाच्या दक्षिण बाजूस सिंधु नदीचे खोल पात्र असून इतर बाजूंनां मोठे पर्वत, कडे वगैरे पसरले होते. अलेक्झांडरनें आपल्या नेहमीच्या पद्धतीस अनुसरून हा किल्ला काबीज करण्यास निघण्यापूर्वी आपली मागील बाजू ओरा, मस्सग, बझिरा वगैरे ठिकाणीं सैन्य ठेवून सुरक्षित केली. तसेंच, स्वतः स्वारी करून त्यानें पेउकेलेओटिस (चारसद्दा) आणि त्याच्या आसपास अस-

लेला, युसुफझाय नांवाचा मुलूख घेतला, व अशा रीतीनें या किल्ल्याला बाहेरची मदत मिळणें अशक्य करून सोडलें. नंतर त्यानें मोठ्या प्रयासानें औरनोसच्या पायथ्याखालीं असलेलें एंबोलिमा नांवाचें सिंधूवरील एक लहान शहर ताब्यांत घेऊन तेथें क्राटेरॉसच्या ताब्यांत युद्धसामुग्रीचें कोठार ठेवलें. उद्देश हा कीं, हल्ला अयशस्वी होऊन वेढा घालण्याची पाळी आली, तर तें दिरंगाईचें युद्ध चालवण्यास आसऱ्याची जागा असावी. नंतर अलेक्झांडरनें त्या किल्ल्याची दोन दिवस बारकाईनें टेहळणी केली. वाटाड्यांनां भरपूर बक्षीस देऊन त्यांच्या साहाय्यानें लेगसचा पुत्र टॉलेमी यानें पर्वताच्या पूर्वेकडील फांट्यावर एक माऱ्याचें ठिकाण शोधून तेथें त्यानें खंदक खणून आपले लोक बसविले. त्याच्या मदतीस जाण्याचा अलेक्झांडरचा प्रयत्न फसल्यानें टॉलेमीच्या सैन्यावर जोराचा हल्ला आला. तेथें दोन्ही सैन्यांत तुंबळ युद्ध होऊन टॉलेमीनें तो हल्ला कसाबसा परतविला. अलेक्झांडरचा दुसरा प्रयत्न मात्र खूप झटापटीनंतर यशस्वी झाला, व मॅसिडोनियनांच्या हातांत त्या किल्ल्यावर मारा करण्यास सोयीचें असें स्थान आलें. तरी पण अद्यापहि त्या किल्ल्यावर एकदम हल्ला करतां येणें अशक्य होतें. म्हणून प्रथम त्या जागीं विपुल असलेलीं लांकडें घेऊन अलेक्झांडरनें मधल्या दऱ्या भरून काढून चांगला रस्ता तयार केला. आतां मात्र हल्ल्याची सर्व पूर्व तयारी झाली. हल्ला यशस्वी होणार असें शत्रूला दिसतांच त्यानें समेटाचें बोलणें सुरू केलें. यांत त्यांचा एक उद्देश हा होता कीं, अलेक्झांडरला समेटाच्या बोलण्यांत गुंतवून रात्रीं बऱ्याच लोकांनीं मिळून निसटून जावें. परंतु अलेक्झांडर फार धूर्त असल्यानें त्यानें ७००० निवडक शिपायांसह किल्ला चढून जाऊन त्यांचा बेत बराचसा फसविला. अशा रीतीनें हेराक्लीझलाहि जो किल्ला घेतां आला नव्हता तो अलेक्झांडरनें काबीज केला. या जयोत्सवाप्रीत्यर्थ, अथीनि आणि नायकी या देवतांची पूजा करून त्यांनां बळी देण्यांत आले, व तेथें एक किल्ला बांधण्यांत येऊन त्या किल्ल्याचा बंदोबस्त सिसिकोटस ( शिशुगुप्त ) नांवाच्या एका विश्वासू हिंदु माणसाकडे सोंपविण्यांत आला.

**ओहिंदपाशीं आगमन.**—नंतर अलेक्झांडरनें असाकेनाईनां पूर्णपणें जिंकण्यासाठीं आसपासच्या टापूवर पुन्हां हल्ला करून डायर्टा नांवाचें शहर काबीज केलें. येथील लोक व आसपासच्या मुलुखांतील लोक हे हायडॅस्पीझ ( झेलम ) आणि अकेसिनीझ (चंद्रभागा चिनाब) या नद्यांमधील अभिसार देशांत आश्रयासाठीं गेले होते. यानंतर अलेक्झांडर आस्ते आस्ते दाट अरण्यांतून मार्ग काढीत ओहिंदच्या पुलाजवळ आला. अशा रीतीनें हेफाइस्तिऑनच्या लष्कराजवळ जाण्याला त्याला पंधरासोळा मुक्काम करावे लागले. येथें त्यानें आपल्या सैन्यास एक महिना विश्रांति देऊन मजेखातर मोठमोठे खेळ करविले. या ठिकाणींच अलेक्झांडरकडे तक्षशिलेचा नवीन गादीवर आलेला राजा आंभी याजकडून वकील आले व वडिलांप्रमाणेंच आपणहि मांडलिक व्हावयास तयार आहों असा त्याचा त्यांच्यातर्फे निरोप आला. त्यांनीं अलेक्झांडरला पुष्कळशी संपत्ति, ७०० घोडे, ३० हत्ती, ३००० लठ्ठ बैल व १०,०००हून अधिक शेळ्या नजर म्हणून दिल्या व अलेक्झांडरनेंहि त्यांचा साभार स्वीकार केला. तक्षशिलेच्या राजानें असें करण्याचें कारण आसपासच्या संस्थानांविरुद्ध आपणास मदत मिळावी अशी त्याची इच्छा होती असें पुष्कळांचें मत आहे. या वेळीं तक्षशिलेच्या राजाची अभिसार नामक पहाडी मुलुखाच्या राजाशीं व पोरस राजाशीं लढाई चालली होती.

या वेळीं वसंतकाळ होता,व ताजेतवानें झालेलें अलेक्झांडरचें सैन्य तक्षशिलेच्या राजाच्या साहाय्यानें पोरसकडे वळलें (ख्रि. पू. ३२६, फेब्रुवारी किंवा मार्च). तक्षशिला हें त्या वेळीं पूर्वेकडील एक मोठें विद्यापीठ होतें व त्या वेळेस निरनिराळ्या भागांतून मोठमोठे विद्वान् तेथें येत असत. येथें असतांना प्रथमतः ज्याचा पोरसला मिळून अलेक्झांडरवर चालून येण्याचा विचार होता त्या अभिसारच्या राजानें अलेक्झांडरपाशीं सख्याची याचना केली. पोरस देखील असाच आपल्याला येऊन मिळेल असें वाटून अलेक्झांडरनें त्याला खलिता पाठविला. परंतु, लढाईची तयारी करून मी आपणास भेटण्यास येत आहे असें त्यास पोरसकडून उलट उत्तर मिळालें.

**पोरसशीं लढाई.**—तक्षशिला येथें आपल्या सैन्याला बरीच विश्रान्ति देऊन तेथील राजाच्या साहाय्यानें हायडॅस्पीझ ( झेलम )वर युद्धाची तयारी करून वाट पहात असलेल्या पोरसला तोंड देण्यासाठीं अलेक्झांडर पूर्वेकडे निघाला. तक्षशिलेपासून हायडॅस्पीझवरील झेलम नामक शहर नैर्ऋत्येच्या बाजूस शंभर मैल दूर होतें. तेथपर्यंत येण्यास अलेक्झांडरला १५ दिवस लागले. उन्हाळा प्रखर होता तरी त्यास न जुमानतां कोठेंहि न थांबतां अलेक्झांडर आपल्या सैन्याला घेऊन तडक झेलम येथें आला ( मे. ख्रि. पू. ३२६ ). तेथें त्याला झेलम नदीला भयंकर पूर आला असल्याचें आढळून आलें. तेव्हां त्याला पुन्हां नावांचा उपयोग करावा लागला. त्याची सर्व जय्यत तयारी होती, तरी स्थानिक गोष्टींची माहिती असल्याशिवाय कांहींहि करणें फार धोक्याचें होतें. यास्तव अलेक्झांडर तेथील परिस्थितीचें फार बारकाईनें निरीक्षण करूं लागला. नदीच्या दुसऱ्या तीराला पोरसची सेना कडकोट बंदोबस्तानें उभी होती. तिच्यावर अगदीं समोरून हल्ला करतां येणें शक्यच नव्हतें. म्हणून अलेक्झांडरनें एक निराळीच युक्ति लढविली. नदीचें पाणी उतरेपर्यंत तेथेंच रहावयाचें असा त्यानें बहाणा केला व त्यामुळें पोरसचें सैन्य गाफिल राहिलें. अतिशय काळजीपूर्वक शोधाअंतीं त्याला असें कळून आलें कीं, त्याच्या छावणीपासून वर १६ मैलांच्या अंतरावर नदीला बांक असून त्या ठिकाणीं

शत्रूला कळूं न देतां आपल्याला नदी ओलांडतां येईल. तावडतोब त्यानें नदी ओलांडण्याचा निश्चय करून क्राटेरॉस-पाशीं ५००० सैन्य ठेवून त्याजकडे झेलमची छावणी संभाळण्याचें काम सोंपविलें, व आपण स्वतः अकरा बारा हजार निवडक सैन्य घेऊन तेथून कूच केलें. आपण कोठें जाणार हें शत्रूला कळूं नये म्हणून रात्रीच्या रात्रीं कूच करून तो ठरल्या जागीं आला, व तेथें नावांतून त्यानें सर्व सैन्य पहाटेच्या सुमारास निर्विघ्नपणें पैलतिरावर नेलें. परंतु येथें आणखी एक नदीचा खोल प्रवाह अद्याप आपणास ओलांडावयाचा आहे असें त्यास आढळून आलें. मोठ्या प्रयासानें त्यानें उताराची जागा शोधून काढली, व त्याचें सैन्य छातीइतक्या पाण्यांतून कसेंबसें अलीकडे आलें. येथून पोरसच्या छावणीकडे जाण्याचा मार्ग अडचणीचा होता, व शिवाय भिजून चिंब झालेल्या सैनिकांसहि कपडे वाळविल्याशिवाय पुढें जाणें शक्य नव्हतें. यामुळें अलेक्झांडरला आपला अचानक छापा घालण्याचा बेत रहित करावा लागला. इतकें होईतों पोरसला ही वर्दी लागून त्यानें आपल्या मुलास २००० घोडेस्वार व १२० रथ देऊन अलेक्झांडरवर पाठविलें. परंतु त्याचा पराभव होऊन त्यास आपले सर्व रथ गमावून परत फिरावें लागलें. हें पोरसला कळतांच तो आपलें सैन्य घेऊन अलेक्झांडरवर चाल करून आला. पोरसनें आपल्या सैन्यापुढें शंभर शंभर फुटांच्या अंतरावर आठ रांगांत २०० हत्ती उभे केले होते. त्याला असें वाटत होतें कीं, या हत्तींमुळें शत्रूचे घोडे बुजून वरील स्वारांस ते अनावर होतील. या हत्तींच्या मागें त्यांच्या दरम्यान ३०००० पायदळ शिस्तीनें उभें होतें. घोडेस्वार एकंदर ४००० असून ते सैन्याच्या दोन्ही बगलांचें संरक्षण करण्याकरितां दोन्ही बाजूंस रथांच्या मागें उभे केले होते. रथांची संख्या ३०० होती. प्रत्येक पाइकाजवळ रुंद व जड तलवारी, भाले व धनुष्यें हीं आयुधें होतीं. अशी जरी स्थिति होती तरी मॅसिडोनियाच्या चपळ सैन्यापुढें या लोकांचा टिकाव लागणें शक्य नव्हतें. पोरसजवळ जे कांहीं थोडे घोडेस्वार होते ते देखील ग्रीक घोडेस्वारांबरोबर टिकणारे नव्हते. अलेक्झांडरला पोरसच्या सैन्यावर समोरून हल्ला करणें आपणास जमणार नाहीं असें आढळून आल्याबरोबर त्यानें १००० तिरंदाज घोडेस्वारांस एकदम वळसा घालून शत्रूच्या डाव्या बगलेवर जोराचा हल्ला करण्यास पाठविलें, व शत्रूची धांदल होईतोंपर्यंत आपल्या ६००० पायदळास जागच्या जागीं स्वस्थ बसण्यास सांगितलें. अलेक्झांडरच्या तिरंदाज घोडेस्वारांनीं आपले बाण सोडण्यास सुरुवात केली. व थोड्या वेळानें अलेक्झांडरहि आपली फौज घेऊन त्यांस सामील झाला. तेव्हां पोरसच्या सैन्याच्या उजव्या बगलेकडील घोडेस्वार डाव्या बगलेकडील घोडेस्वारांस मदत करण्याकरितां सैन्याच्या पाठीस वळसा घालून यावयास निघाले. हें पाहतांच उजव्या बाजूनें कोइनॉसच्या आधिपत्याखालीं असलेली अलेक्झांडरच्या घोडदळाची एक तुकडी दौड करीत पोरसच्या स्थूल सैन्यासमोरून उजव्या बगलेकडे जाऊन, तिला वळसा घालून पिछाडीवर हल्ला करण्याकरितां मागें येऊं लागली. यांना तोंड देण्याकरितां पोरसचें सैन्य तोंड फिरवूं लागलें तेव्हां त्याची साहजिकच धांदल झाली. अशा रीतीनें पोरसच्या सैन्याच्या या धांदलीचा फायदा घेऊन अलेक्झांडरनें जोराचा हल्ला चढवला. तेव्हां पोरसचे दोन्ही बगलेकडील सैनिक आपली जागा सोडून आश्रयासाठीं म्हणून हत्तींमध्यें घुसले. अशा स्थितींत पोरसच्या महातांनीं ग्रीक घोडेस्वारांवर आपले हत्ती ढकलले. घोडेस्वारांनीं त्यांच्यावर बाण सोडण्यास सुरुवात केली, तेव्हां हत्ती चिडून शत्रूच्या सैन्यांत शिरले. ही संधि साधून पोरसच्या घोडेस्वारांनीहि ग्रीक सैन्यावर निकराचा हल्ला केला, पण तो निष्फळ झाल्यानें ते पुन्हां हत्तींच्या दरम्यान येऊन उभे राहिले.

पुढें ग्रीक घोडेस्वारांनीं जोराचा हल्ला चढवून पोरसच्या सैन्याची दाणादाण चालविली. पोरसचें सैन्य जिकडे तिकडे पळूं लागलें. पोरसचे हत्ती आतां जवळ जवळ आल्यानें त्यांनीं शत्रूच्या सैन्याइतकाच स्वतःच्याहि सैन्यांत हाहाःकार उडविला. पोरसचे ३००० लोक मारले गेले व ९००० बंदिवान झाले. पोरसनें स्वतः तर शौर्याची अगदीं कमाल केली. त्याला नऊ जखमा होऊन मूर्च्छित अवस्थेंत तो शत्रूच्या हातीं लागला. अलेक्झांडरनें त्याच्या विनंतीला मान देऊन, त्याचा राजाप्रमाणें सत्कार केला. त्यानें पोरसचें राज्य पोरसला परत देऊन आणखीहि कांहीं मुलूख त्याला दिला; व अशा रीतीनें त्यानें एका मोठ्या शत्रूस आपला कायमचा मित्र बनविलें.

या जयाचें स्मारक म्हणून निकैया आणि बूकेफल या नांवांची दोन शहरें वसविण्यांत आलीं. यांपैकीं निकैया हें लढाईच्या जागेवर व दुसरें बूकेफल हें ज्या ठिकाणाहून अलेक्झांडर हायडॅस्पीझ नदी ओलांडण्यास निघाला त्या ठिकाणीं वसविण्यांत आलें. या दुसऱ्या शहराला अलेक्झांडरचा प्रसिद्ध व त्यास अनेक संकटांतून निभावून नेणारा असा जो बूकेफालस नांवाचा विजयशाली घोडा त्याचेंच नांव देण्यांत आलें होतें. हें शहर पश्चिमेकडून हिंदुस्थानांत शिरण्याच्या राजमार्गावर वसलें असल्यामुळें, याची फार भरभराट झाली. प्लुटार्कच्या मतें, अलेक्झांडरनें वसविलेल्या सर्व शहरांमध्यें हें शहर मोठें व महत्वाचें आहे. हल्लींचें झेलम शहर हेंच पूर्वींचें बूकेफल होय, निकैया शहर मात्र फारसें प्रसिद्धीस आलें नाहीं. पण तें हल्लींच्या सुखचैनपुर या शहराच्या आसपास कोठें तरी वसलें असावें असा तर्क आहे.

पोरसच्या या लढाईचें नाणकविषयक स्मारक म्हणजे ब्रिटिश म्यूझिअममध्यें ठेवलेलें सुप्रसिद्ध दहा द्राम्सचें नाणें होय. या नाण्यावर एका बाजूस दोन महात वर असलेल्या हत्तीस

हांकून नेत असलेला एक मॅसिडोनियन घोडेस्वार असून दुसऱ्या बाजूला डोक्यास पर्शियन शिरस्त्राण घातलेला व हातांत वज्र ( भाला ) घेतलेला असा अलेक्झांडर उभा असलेला दाखविला आहे.

**ग्लैसाइ व दुसरा पोरस**—अलेक्झांडरनें आपल्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें लढाईंत मेलेल्यांचे अंत्यविधी केले व बळी वगैरे देऊन मोठमोठे खेळ करविले. यानंतर त्यानें आपला विश्वासू सरदार क्राटेरॉस याला कांहीं सैन्यानिशीं मागें ठेवून ठाणीं घालून मागील दळणवळण कायम राखण्याचा हुकूम केला, व स्वतः निवडक सैन्यानिशीं पोरसच्या राज्याला लागून असलेल्या ग्लैसाइ अथवा ग्लौकानिकॉइ नामक देशावर स्वारी केली. तेथील ३७ मोठीं महत्त्वाचीं गांवें व अनेक खेडीं कांहींहि अडथळा न करतां अलेक्झांडरला शरण आल्यामुळें तीं सर्व पोरसच्या मुलुखांत सामील करण्यांत आलीं, व त्यांचा कारभार पोरसकडे सोंपविण्यांत आला. शिवाय किंचित् सखल प्रदेशांतील ज्याला ग्रीकांनीं अबिसारेस म्हणून म्हटलें आहे तो राजाहि आपण होऊनच शरण आला, व गंडारिस प्रांतांत पोरसचा पुतण्या राज्य करीत होता त्यानेंहि ( याचेंहि नांव पोरसच होतें ) अलेक्झांडरजवळ वकिलामार्फत सख्याची याचना केली. हाच मार्ग पुढें दुसऱ्याहि कित्येक स्वतंत्र जातीच्या राजांनीं स्वीकारला.

यानंतर अलेक्झांडरनें चिनाब नदी ओलांडली. ती ओलांडण्यास त्याला फार प्रयास पडले याचें कारण त्या नदीचा प्रवाह जोरानें वहात असून त्यांत बरेचसे खडक होते, व त्यामुळें नाव सुरक्षितपणें पैलतीरास नेणें फार धोक्याचें काम होतें. चिनाब ओलांडल्यावर अलेक्झांडर युद्धसामुग्री गोळा करीत पूर्वेकडे आला, व त्यानें हिड्राओटीझ म्हणजे रावी नदी निर्विघ्नपणें ओलांडली. येथून त्यानें पोरसच्या पुतण्याचा बंदोबस्त करण्यासाठीं हेफाइस्तिऑन यास मागें पाठवलें. या पोरसच्या पुतण्यानें त्याच्या काकालाच अलेक्झांडरनें पुष्कळ प्रांत बक्षीस दिल्यामुळें चिडून जाऊन बंड उभारलें होतें.

**कांहीं स्वतंत्र जातींशीं सामना.**—हें बंड मोडण्याची तजवीज केल्यानंतर, कथायोइ नांवाच्या राजाच्या नेतृत्वाखालीं निरनिराळ्या जातींच्या नायकांचा संघ स्थापन झाला होता त्यावर अलेक्झांडरनें आपला मोर्चा फिरविला. हा कथायोइ राजा रावी नदीच्या पूर्वेस रहात असून त्या वेळच्या सर्व योद्ध्यांमध्यें तो अग्रणी मानला जात असे. त्याच्याच शेजारचे हिफासिस ( बिआस ) नदीजवळच्या मुलखांत राहणारे ऑक्सिड्राकाइ नांवाचे लोक व लाहोरच्या खालीं रावी नदीच्या तीरावर रहात असणारे मलोइ नांवाचे लोक यांनीं देखील त्या संघाला मिळण्याचा विचार चालविला होता. अलेक्झांडर रावी नदी ओलांडून गेल्यानंतर दुसऱ्या दिवशीं जिला ॲरिअननें अद्रैस्ताइ म्हटलें आहे त्या जातीकडे असलेलें पिंप्रम नांवाचें शहर हस्तगत झालें. नंतर एक दिवसाची विश्रांति घेऊन अलेक्झांडर कथायोइच्या संघानें मुख्य आश्रयस्थान केलेलें पाणिनीनें उल्लेखिलेलें जें संगल त्यावर हल्ला करण्यास निघाला. तेथें त्या लोकांनीं त्याशीं कसून लढाई चालवून त्याला आपल्या शौर्याची प्रचीति आणून दिली. इतक्यांत अलेक्झांडरच्या मदतीला पोरस ( धुडील ) पांच हजार सैन्य व वेढयाची सामुग्री घेऊन येऊन पोंचला. पण शहराच्या तटबंदीस भगदाड पाडलें जाण्यापूर्वीच मॅसिडोनियन लोकांनीं तटबंदीवरून चढून जाऊन ती जागा काबीज केली. या हल्ल्यांत अजमासें शंभर मॅसिडोनियन लोक ठार व १२०० जखमी झाले. या विरोधानें चिडून जाऊन अलेक्झांडरनें तें शहर जमीनदोस्त केलें.

आतां पुढें जाण्यास हिफासिस ( बिआस ) नदी ओलांडणें जरूर होतें. ही नदी ओलांडून पलीकडील राष्ट्रें काबीज करण्यास अलेक्झांडर फार उत्सुक झाला होता. हे लोक अतिशय शूर म्हणून नांवाजलेले असून यांचा धंदा शेतकीचा होता. या प्रांतामध्यें मोठे व फार उत्तम हत्ती होतात असा त्याचा लौकिक होता.

**सैनिकांतील निरुत्साह व स्वदेशाकडे गमन.**—परंतु अलेक्झांडरास या वेळीं, त्याच्या सैन्यामध्यें नेहमींचा उत्साह दिसून आला नाहीं. आपलें सैन्य पुढें जाण्यास नाखुष आहे असें त्याला आढळून आलें. त्यानें सर्व सैन्य एके ठिकाणीं गोळा करून त्याच्यापुढें एक वक्तृत्वपूर्ण आणि स्फूर्तिदायक असें भाषण करून लोकांचा उत्साह वाढवण्याचा प्रयत्न केला. त्यानें आतांपर्यंत आपण किती शौर्यानें लढलों व मोठमोठ्या बलाढ्य शत्रूंना कसें पादाक्रांत केलें याचें रसभरीत वर्णन केलें, व आतां जर आपण ही नदी ओलांडूं तर आपणांस आशियांतील अलोट संपत्ति मिळण्याचा संभव आहे असेंहि सांगून पाहिलें. परंतु या भाषणाचा त्या सैनिकांच्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं. सरतेशेवटीं कोइनॉस नांवाचा अलेक्झांडरचा घोडदळावरील विश्वासू सेनापति उठला व त्यानें अलेक्झांडरच्या सैन्याची स्थिति खराब कशी झाली होती, त्याचे अनेक लोक जखमी कसे झाले होते व घरीं जाण्यास बहुतेक लोक किती उत्सुक झाले होते वगैरे हकीकत वर्णन करून परत फिरण्याची अवश्यकता प्रतिपादन केली.

कोइनॉसचें भाषण सर्व सैनिकांनां अतिशय पसंत पडलें. यामुळें अलेक्झांडरला आपला पाणउतारा झालासें वाटून तो कांहीं न बोलतां निमूटपणें आपल्या तंबूमध्यें गेला तो तीन दिवस बाहेर पडला नाहीं. सरतेशेवटीं आतां पुढें जाणें अगदीं अशक्यच आहे असें आढळून आलें तेव्हां त्यानें परत फिरण्याचा हुकूम सोडला.

आपली स्वारी कोठपर्यंत आली होती याची खूण म्हणून अलेक्झांडरनें जेथून तो परत फिरला त्या ठिकाणीं दोन मोठ्या

वेदी बांधल्या व त्यांपुढें त्यानें बरेचसे बळी दिले. ह्या वेदी बांधण्यांतील उद्देश बराचसा सफळ झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण, मौर्य साम्राज्याचा संस्थापक चंद्रगुप्त व त्याच्या नंतरचे कित्येक राजे कांहीं शतकेंपर्यंत तेथें येऊन बळी देत असत असें म्हणतात.

यानंतर अलेक्झांडर दुसरें कांहीं साहस न करतां पुन्हां आपल्या सैन्यानिशीं चिनाब नदीच्या तीरीं परत आला. येथें हेफाइस्तिऑन यानें एक तटबंदीचें शहर बांधलें होतें. या ठिकाणीं आपलें निरुपयोगी सैन्य ठेवून अलेक्झांडर नद्यांतून जलमार्गानें समुद्रापर्यंत जावयाचें ठरवून त्या प्रवासाची तयारी करूं लागला. परत जातां जातां वाटेंत हल्लींच्या राजौरी व भिंभार या संस्थानांच्या व ब्रिटिश हद्दींतील हझारा जिल्ह्याच्या प्रदेशांतील राजांचे वकील खंडण्या घेऊन आले होते त्यांचा त्यानें स्वीकार केला; आणि अभिसार (भिंभार व राजौरी) देशच्या राजास आपला क्षत्रप नेमून ज्याला ॲरिअननें असेंकीझ म्हटलें आहे त्या उरसा (हझारा) च्या राजावर यास अधिकार दिला. याच वेळेस, थ्रेसहून ५००० घोडेस्वारांचें पथक व त्याच्या पुतण्याकडून म्हणजे बाबिलोनियाच्या क्षत्रपाकडून २५००० चिलखतें व ७००० पायदळ अशी कुमक येऊन पोहोंचली. हीं चिलखतें ताबडतोब सैन्यामध्यें वांटण्यांत आलीं. नंतर तो झेलम(बितस्ता)नदीकडे जावयास निघाला, व त्या नदीच्या तीरावर त्यानें येऊन तेथें आपला तळ दिला. नदींतून पुढें जाण्याची तयारी करण्यामध्यें त्याचे कित्येक आठवडे गेले. या जलप्रवासासाठीं त्यानें आसपासच्या नदींत चालणाऱ्या सर्व नावा गुंतवल्या होत्या. आणि कमी पडलेल्या नावा टेकडीच्या पायथ्याम असलेल्या अरण्यांतील लांकडाच्या नवीन तयार करण्यांत आल्या. ॲरिअनच्या मतें सर्व प्रकारच्या मिळून एकंदर २००० नावा अलेक्झांडरनें बरोबर घेतल्या होत्या. नावांवर चढण्यापूर्वी अलेक्झांडरनें आपल्या सरदारांची व हिंदू राजांच्या प्रतिनिधींची सभा भरविली, व त्यांच्या देखत बिआस व झेलम यांमधील सर्व प्रदेशावर पोरसला राजा नेमलें असल्याचें जाहीर केलें. याच वेळेस पोरस व त्याचा जुना शत्रु तक्षशिलेचा राजा यांच्यामध्यें सख्य घडवून आणून व त्या दोघांमध्यें शरीरसंबंध जुळवून तें चिरस्थायी करण्यांत आलें. तसेंच तक्षशिलेच्या राजाला झेलम व सिंधु यांमधील प्रदेश रीतसरपणें देऊन त्याला संतुष्टहि करण्यांत आलें.

अलेक्झांडरनें पुढें कूच करण्यापूर्वी हेफाइस्तिऑन आणि क्राटेरॉस यांनां पुढें जाऊन झेलमपासून सिंधूपर्यंत पसरलेल्या मिठाच्या डोंगराच्या प्रदेशाचा राजा सौभूति याला जिंकण्यास सांगितलें. परंतु तो राजा कांहींएक प्रतिकार न करतांच शरण आला.

**अलेक्झांडरचा जलप्रवास व मार्गांतील लोकांचा विरोध.**—अलेक्झांडरच्या आरमाराच्या संरक्षणार्थ दोन्ही तीरांवर मिळून वर सांगितलेल्या दोन सेनापतींच्या हाताखालीं १,२०,००० सैन्य चालावयाचें होतें, व सिंधूच्या पश्चिमेकडील मुलुखाचा क्षत्रप फिलिप्पॉस यास तीन दिवसांनंतर पिछाडीनें येण्यास सांगितलेलें होतें. अशा रीतीनें या आरमारानें आपला प्रवास सुरू केला. एके दिवशीं सकाळीं नदीच्या देवतांनां वगैरे बळी अर्पण करून अलेक्झांडरनें आपलें आरमार हांकारण्याचा हुकूम सोडला (अक्टोबर खि. पू. ३२६). तिसऱ्या दिवशीं हेफाइस्तिऑन व क्राटेरॉस यांनां जेथें तळ देण्यास सांगितलें होतें त्या ठिकाणीं, म्हणजे बहुधा भीरपाशीं हें आरमार येऊन पोहोंचलें. येथें मागून फिलिप्पॉसचें सैन्य येईतोंपर्यंत मुक्काम करण्यांत आला, व दोन दिवसांनीं तें सैन्य आल्यावर फिलिप्पॉस यास मागें चालण्याच्या ऐवजीं पुढें जाण्याची आज्ञा झाली. नंतर आरमार पुन्हां निघालें व पांचव्या दिवशीं जेथें झेलम नदी चिनाबला मिळते तेथें येऊन पोहोंचलें. येथें नदीचें पात्र लहान असून त्यांत भयंकर भोंवरे झालेले होते. त्यामुळें आरमाराला फार त्रास झाला. येथें पुष्कळशा खलाशांनिशीं दोन लढाऊ गलबतें बुडालीं व अलेक्झांडर ज्या जहाजांत बसला होता तें जहाज देखील अगदीं संकटांत सांपडलें होतें. शेवटीं अतिशय खटपटीनें बहुतेक आरमार तीरावर सुखरूपपणें येऊन लागलें. येथें अलेक्झांडर आपल्या सैन्यानिशीं उतरला, व ज्यांनां कर्शिअसनें सिबोइ व अगलसोइ म्हणून म्हटलें आहे त्या आसमंतांतील जातींनीं, नदीच्या खालच्या बाजूस असलेलें मलोइ (मालव) नामक बलाढ्य राष्ट्र अलेक्झांडरशीं लढण्याची तयारी करीत होतें त्यास जाऊन मिळूं नये यासाठीं त्यांनां जिंकून घेण्याचें त्यानें ठरविलें. सिबोइ लोक हे जंगलांतील पशूंचीं कातडीं पांघरणारे व गदेसारखीं हत्यारें वापरणारे रानटी लोक होते, व ते अलेक्झांडरला कांहीं विरोध न करतां आपण होऊनच शरण आले. परंतु अगलसोइ लोकांनीं मात्र ४०,००० पायदळ व ३,००० घोडेस्वार जमवून अलेक्झांडरला अडथळा केला; तथापि त्यांचा युद्धांत पराभव होऊन त्यांचे असंख्य लोक मारले गेले व कित्येकांनां गुलाम म्हणून धरून विकण्यांत आलें. अलेक्झांडरनें त्यांच्या देशांत ३० मैल शिरून त्यांचें मुख्य शहर काबीज केलें. त्यांच्या दुसऱ्या शहराकडून त्यास जोराचा विरोध होऊन पुष्कळ मॅसिडोनियन शिपाई मारले गेले. तेथील २०,००० रहिवाश्यांनां जय मिळण्याची निराशा वाटूं लागतांच त्यांनीं शहराला आग लावून तींत ते आपल्या बायकांमुलांसकट पडले. मुख्य किल्ला मात्र या आगींतून बचावला. त्याच्या संरक्षणार्थ ठेवलेल्या ३,००० शूर लोकांस अलेक्झांडरनें जीवदान दिलें.

इतक्यांत मलोइ, ऑक्सिड्राकाइ व इतर स्वतंत्र जातींनीं एकत्र होऊन आपल्याला तोंड देण्याची तयारी चालविली आहे असें अलेक्झांडरला कळलें. हे सर्व लोक एकत्र

होण्याच्या आंत त्यांपैकीं एकएकट्या जातीवरच हल्ला करून त्यांचा बेत फिसकटविण्याचा अलेक्झांडरनें निश्चय केला. त्यानें आरमारास व बरोबर न घ्यावयाच्या सैन्यास पुढील रावी व चिनाब यांच्या संगमावर जमण्याचा हुकूम केला; व तो स्वतः रावी नदीच्या दोन्ही तिरांवरील खोऱ्यांत रहाणाऱ्या मलोई लोकांनां प्रथम तोंड देण्याचा निश्चय करून निवडक सैन्यानिशीं कूच करून निघाला. या मालवांचे शेजारी जे ऑक्सिड्राकाइ (क्षुद्रक) यांचा जरी त्यांच्याशीं वैरभाव होता तरी या वेळेस ऑक्सिड्राकाइ लोकांनीं आपला वैरभाव बाजूस ठेवून त्यांनां मदत करण्याचा निश्चय केला. या दोन्हीहि जातींनीं मोठ्या प्रमाणावर परस्परांत शरीरसंबंध घडवून आणून आपली मैत्री पक्की करण्याचा प्रयत्न केला होता. परंतु वैयक्तिक द्वेषानें नेहमींप्रमाणेंच हा समेट यशस्वी होऊं दिला नाहीं. कोणत्या पक्षाच्या सेनापतीनें सैन्याचें आधिपत्य घ्यावें याबद्दल या जातींमध्यें एकत्र वाद चालला असतां अलेक्झांडरनें अतिशय कौशल्यानें त्या लोकांवर हल्ला चढवला, आणि ऑक्सिड्राकाइ लोक मदतीला येण्यापूर्वींच त्यांचा धुवा उडविला. या जातींनां जर योग्य रीतीनें तयारी करण्यास अवसर मिळाला असता, तर त्यांनीं अलेक्झांडरबरोबरचें लहानसें सैन्य सहज नामशेष करून टाकलें असतें. कारण त्यांच्या जवळ ८०।९० हजार चांगलें पायदळ १०,००० घोडदळ व ७००पासून ९०० पर्यंत रथ होते. मॅसिडोनियन सैन्य किती होतें हें जरी कोठें सांगितलेलें नाहीं तरी तें कांहीं थोडक्या हजारांहून अधिक नसलें पाहिजे असें म्हणतात. परंतु अलेक्झांडरनें एकदम अचानक या लोकांनां गांठल्यामुळें प्रतिकार करण्यास त्यांनां अवसरच मिळाला नाहीं. रावी व चिनाब यांच्या खोऱ्यांच्या दरम्यान असलेलें ज्याला हल्लीं बार म्हणतात तें निर्जल पठार अवघ्या दोन मजलांत ओलांडून त्यानें शेतांत निशःस्त्र काम करीत असलेल्या मलोइ लोकांवर अचानक छापा घातला. अशा स्थितींत त्यांची धांदल उडून त्यांचा मोड होणें साहजिक आहे. त्यांच्यापैकीं पुष्कळांनीं हातहि वर उचलला नसतां त्यांची निर्दयपणें कत्तल करण्यांत आली. मॅसिडोनियन लोकांच्या हातून जे सुटले ते आपल्या तटबंदीच्या शहरांचा आश्रय घेऊन, वेशी बंद करून आंत राहिले. अशा या शहरांपैकीं एक अलेक्झांडरनें आपल्या स्वतःच्या देखरेखीखालीं हल्ला करून घेतलें व तेथीलें २००० शिबंदीची कत्तल केली. अशाच दुसऱ्या एका शहरावर पेर्डिक्कस यास पाठविलें होतें; परंतु तो तेथें जाईतों तेथील रहिवाशी शहर सोडून पळून गेले होते. अलेक्झांडर तसाच रावी नदीपर्यंत चाल करून गेला, व पळून जाणाऱ्या मालव लोकांस उताराच्या तेथेंच गांठून त्यांच्यापैकीं कित्येकांची त्यानें कत्तल केली. या लोकांचा पाठलाग करीत तो रावीच्या पूर्वेकडे गेला व हल्लीं ज्याला मांटगोमेरी जिल्हा म्हणतात त्या भागांतील ब्राह्मणांनीं वसलेलें एक शहर सुरुंग लावून व तटावरून चढून जाऊन त्यानें काबीज केलें. तेथें सुमारें ५००० लोक होते त्या सर्वांची कत्तल करण्यांत आली.

अशा रीतीनें या (मालव) मलोई लोकांचा जिकडे तिकडे कोंडमारा झाल्यामुळें, त्यांनीं पुन्हां रावी ओलांडून ५०,००० सैन्यानिशीं तिच्या उताराचें रक्षण करण्याचा प्रयत्न केला. परंतु अलेक्झांडरच्या सैन्यापुढें त्यांचा टिकाव न लागल्यामुळें त्यांनां पळ काढावा लागला. येथून ते निघाले ते आसमंतांतील एका मजबूत तटबंदीच्या शहराचा आश्रय घेऊन राहिले. हें शहर मुलतानच्या ईशान्येस ८०।९० मैलांवर असावें. हें शहर हस्तगत करीत असतां एक अतिशय महत्वाची गोष्ट घडून आली. मॅसिडोनियन लोकांनीं शहर काबीज केलें होतें व किल्ला सर करण्याकरितां तटावर चढण्याचा त्यांचा प्रयत्न चालला होता. परंतु शिड्या आणणारे लोक रेंगाळत येत आहेत असें पाहून अलेक्झांडरनें एका माणसापासून शिडी हिसकावून घेतली, आणि तिच्या साहाय्यानें तो आणखी तीन इसमांसह किल्ल्याच्या तटावर चढून गेला. परंतु तो तटावर चढून उभा राहतांच आंतील शत्रूंनां त्याच्यावर नेम धरण्याची आयतीच संधि मिळाली. हें अलेक्झांडरच्या लक्षांत येतांच त्यानें आपल्या सोबत्यांसह एकदम त्या किल्ल्यांत उडी टाकली. त्याच्या सोबत्यांपैकीं एक जण तर लवकरच मरून पडला. अलेक्झांडर स्वतः किल्ल्याच्या जवळील एका झाडाच्या आश्रयानें उभा राहिला, व त्यानें त्या किल्ल्याच्या हिंदु किल्लेदारास ठार मारलें. अनेक लोकांविरुद्ध तो एकटा स्वतःचें रक्षण करीत असतां त्याला एक बाण लागून तो खालीं पडला. लागलेंच त्याच्या दुसऱ्या सोबत्यानें त्याच्यावर चिलखत घातलें व तो व तिसरा सोबती मिळून त्याचें रक्षण करूं लागले. शिड्या मोडल्यानें बाहेरील मॅसिडोनियन लोकांस आपल्या राजाला मदत करण्यासाठीं किल्ल्यांत प्रवेश करणें कांहीं वेळ अगदीं अशक्य झालें. परंतु सरतेशेवटीं कांहीं लोक कसेबसे भिंतीवरून चढून गेले, व कांहीं लोकांनीं किल्ल्याचे दरवाजे फोडून आंत प्रवेश केला व अलेक्झांडरचे प्राण वांचविले. अलेक्झांडरच्या छातींत बाण घुसला होता तो शस्त्रक्रिया करून मोठ्या कौशल्यानें बाहेर काढण्यांत आला. या प्रसंगीं बराच रक्तस्राव होऊन अलेक्झांडर जगेल अशी लोकांस आशा राहिली नाहीं. परंतु अलेक्झांडरची प्रकृति फार सुदृढ असल्यामुळें त्याची प्रकृति हळू हळू सुधारूं लागली, व कांहीं दिवसांनीं तो चांगला बरा झाला.

मालव लोक अशा रीतीनें पुरे चेचले गेल्यामुळें ते आतां अलेक्झांडरास शरण आले. ऑक्सिड्राकाइ लोक आपल्या दिरंगाईमुळें या संकटांतून वांचले तरी त्यांनींहि अलेक्झांडर यास बरीच खंडणी पाठवून आपण शरण येण्यास तयार आहों असा निरोप कळविला. अलेक्झांडरनें त्या खंडणीचा स्वीकार केला. त्या खंडणीमध्यें १०३० चार घोड्यांचे रथ, १००० ढाली, १०० चिलखतें, कापसाचा माल,

३०० घोडे आणि पुष्कळ प्रकारचे वाघ, सिंह आदिकरून प्राणी होते.

या सर्व जित प्रदेशावर फिलिप्पॉस यास अलेक्झांडरनें आपला क्षत्रप नेमलें. यानंतर त्याचें आरमार पुढें चाललें, व जेथें हिफासिस (बिआस) येऊन मिळते तो तिसरा संगम ओलांडून, झेलम, रावी व बिआस या सर्वांच्या प्रवाहांस घेतलेल्या चिनाब नदीचा जेथें प्राचीन लेखक जिला सिंधु म्हणतात त्या नदाशीं संगम होतो तेथें, म्हणजे चवथ्या संगमापाशीं, येऊन पोहोंचलें. येथें पुष्कळसें पायदळ ठेवून तें फिलिप्पॉसच्या ताब्यांत देण्यांत आलें. याच सुमारास अलेक्झांडरनें आपला सासरा ऑक्सायार्टीझ नांवाचा बॅक्ट्रियन सरदार होता त्याला टायरिआस्पसच्या बदलीं काबूल (परोपनिसदी) चा क्षत्रप नेमलें. वर सांगितलेल्या चार नद्यांच्या संगमाच्या ठिकाणीं अलेक्झांडरनें मोठें शहर वसविलें, व येथील कांहीं जातींचा पराभव करून त्यांनां आपल्या अंकित केलें. तसेंच क्राटेरॉस हा आतांपर्यंत नदीच्या पश्चिम बाजूनें चालत होता त्याला त्यानें आतां पूर्वेच्या बाजूनें चालण्याचा हुकूम केला. एवढें झाल्यावर अलेक्झांडर यानें अतिशय बलाढ्य अशा मौसिकनॉस या राजावर अचानक हल्ला करण्याचा निश्चय केला. या राजाची राजधानी बहुधा हल्लीं सक्कर जिल्ह्यांत असलेली सिंधची प्राचीन राजधानी अलोर किंवा अरोर असावी. येथील लोक अतिशय सशक्त असून १३० वर्षांचे होईतों जगत असें म्हणतात. त्यांच्या प्रदेशांत जरी सोन्यारुप्याच्या खाणी होत्या तरी त्या धातूंचा ते स्वतः कधीं उपयोग करीत नसत. इतर हिंदू लोकांप्रमाणें ते गुलाम बाळगीत नसत, व औषधिशास्त्राशिवाय दुसऱ्या कोणत्याहि शास्त्राचा अभ्यास करीत नसत. त्यांच्यामध्यें सार्वजनिक भोजनाची चाल होती. मलोईप्रमाणें अलेक्झांडर मौसिकनास यावरहि अचानक चालून आल्यामुळें त्यानें आपल्या सर्व वैभवानिशीं अलेक्झांडरास सामोरें येऊन त्याचें प्रभुत्व कबूल केलें. परंतु पुढें त्याचा त्याला पश्चात्ताप होऊन त्यानें बंड उभारलें. त्या बंडाचा मोड करण्यासाठीं अलेक्झांडरनें अगेनोरचा पुत्र पैथॉन यास पाठविलें व आपण स्वतः त्याच्या शहरांवर चाल करून जाऊन त्यांपैकीं कित्येक जमीनदोस्त केलीं. इकडे पैथॉननें मौसिकनॉसला कैद करून आणून त्यास त्याला बंडास प्रवृत्त करणाऱ्या ब्राह्मण मंत्र्यांसह ठार केलें.

मौसिकनॉसच्या वधानंतर सिंधु नदीच्या मुखांच्या दुबेळक्यांत पटल येथें राज्य करणारा संस्थानिकहि अलेक्झांडरच्या छावणींत येऊन आपण होऊनच त्याचा मांडलिक बनला. अलेक्झांडरनें नंतर ऑक्सिकनॉस नांवाच्या संस्थानिकावर चाल करून जाऊन त्यास कैद केलें. सिंदिमन या शहरीं राज्य करणारा संबॉस नामक दुसरा एक संस्थानिक तर आपण होऊनच त्यास शरण आला. अलेक्झांडरनें त्याला आपल्या आरमाराच्या स्वागताची तयारी करण्यास पुढें पाठवून दिलें. याच सुमारास त्यानें क्राटेरॉस यास बरेंचसें सैन्य बरोबर देऊन कंदाहार (ॲराकोशिआ) व सीस्तान या मार्गानें कार्मेनियांत जाण्याचा हुकूम केला. अलेक्झांडरनें स्वतः आपल्याकडे आरमाराचें आधिपत्य घेतलें, व हेफाइस्तिऑनला नदीच्या उजव्या तीरानें चालणाऱ्या बाकीच्यां सर्व सैन्याचें आधिपत्य दिलें. क्राटेरॉस पूर्वी नदीच्या डाव्या किनाऱ्यानें चालत होता त्याच्या जागीं पैथॉनची नेमणूक झाली, व त्याच्या हाताखालीं घोडेस्वार देऊन त्याला वाटेंतल्या सर्व बंडाळ्या मोडून अलेक्झांडरला पटल येथें येऊन मिळण्याचा हुकूम झाला. पटल येथें अलेक्झांडर आल्याबरोबर तेथील लोक भीतीनें पळून गेले; पण त्यांच्या जीवितास अपाय होणार नाहीं असें आश्वासन देऊन त्यांनां परत बोलावण्यांत आलें. या पटल नगराची नक्की माहिती लागत नाहीं, पण बहुतेक तें बहमनाबाद या शहराच्या आसपास कोठें तरी असावें असें तज्ज्ञांचें मत आहे. हें शहर लष्करी दृष्टया फार महत्त्वाचें आहे असें आढळून आल्यामुळें हेफाइस्तिऑन यास तेथें किल्ला बांधण्यास व आसपासच्या भागांत विहिरी खणण्यास अलेक्झांडरनें हुकूम केला. तसेंच ज्या ठिकाणीं नदीचे फांटे झाले होते. त्या ठिकाणीं एक मोठें बंदर बांधण्याचा त्यानें निश्चय केला, व त्या नदाच्या दोन्ही फांट्यांचें थेट समुद्रापर्यंत संशोधन करण्याचें ठरविलें. प्रथम तो पश्चिम दिशेच्या फांट्याचें संशोधन करण्यासाठीं निघाला, व ठठ (ठट्टा) नगरीपासून १५ मैलांवर असलेल्या दीबल बंदरापर्यंत येऊन पोहोंचला. त्याच्या खलाशांनां भूमध्यसमुद्राच्या संथ पाण्यांत नावा चालविण्याची संवय असल्यामुळें येथील भरतीओहोटीच्या भयंकर लाटांमुळें त्यांची फार फजिती होऊं लागली. तरी पण ते कसेबसे समुद्रापर्यंत येऊन पोहोंचले, व येथें थोडे मैल समुद्रांत जाऊन अलेक्झांडरनें तेथें देवतांनां बळी वगैरे दिले.

नंतर अलेक्झांडर पुन्हां पटल येथें परत आला. तेथें त्याला बंदर बांधण्याचें काम झपाट्यानें चाललेलें आढळून आलें. नंतर तो नदीच्या पूर्वेकडील फांट्याचें संशोधन करण्यास निघाला. मुखापाशीं त्याला एका मोठ्या सरोवरांतून जावें लागलें. हें सरोवर म्हणजे बहुधा उमरकोटाच्या पश्चिमेस असलेलें समारा सरोवरच असलें पाहिजे. तेथून नंतर त्याला समुद्र लागला. तेथें त्यानें तीन दिवस समुद्रकिनाऱ्याची पाहणी करण्यांत घालविले. नंतर पुन्हां पटल येथें तो परत आला. येथें आल्यावर त्यास बंदराचें काम बहुतेक पुरें झालेलें आढळून आलें. नंतर त्यानें भरपूर चार महिन्यांची सामुग्री बरोबर घेऊन दोन धाडशी कामगिऱ्या हातीं घेण्याचें ठरविलें. या कामगिऱ्या म्हणजे आरमाराचें पर्शियन आखातामधून पर्यटन व त्याला समांतर अशा दिशेनें जमिनीवरून जिड्रोसिआच्या प्रदेशामधून स्वतःचा प्रवास या होत. पहिल्या कामावर त्यानें निआर्केसची योजना केली. त्यानें त्याला पर्शियन आखातामधून युफ्रेटीझ नदीच्या मुखापर्यंत येण्यास सांगितलें, व वाटेंत जितकीं शहरें व जितके समुद्र लागतील

त्यांची काळजीपूर्वक माहिती मिळविण्याचा हुकूम केला. स्वतः त्यानें आतांपर्यंत कोणीहि न गेलेल्या अशा मकराणच्या मार्गानें जाण्याचा निश्चय केला. निआर्केसला नदीमध्येंच पुष्कळ दिवस रहावें लागलें व मोठ्या प्रयासानें तो समुद्रांत येऊन पोहोंचला. उलट दिशेनें वारा वाहूं लागल्यामुळें त्याला २४ दिवस एका बंदराचा आश्रय घ्यावा लागला. त्या बंदराला त्यानें आपला सेनापति अलेक्झांडर याचें नांव दिलें. नंतर १०० मैल प्रवास केल्यानंतर तो अरबिस [पुरालि] नदीच्या मुखाजवळ येऊन पोहोचला. नंतर पुन्हां ७०० मैल प्रवास केल्यानंतर तो कोकल नांवाच्या एका ठिकाणीं पोहोंचला. येथें त्यानें जरूर तेवढी विश्रान्ति घेतली. येथें एका किल्ल्यांत वस्ती करून रहात असतां अलेक्झांडरनें ओरैटाइ लोकांनां जिंकण्यास पाठविलेला लिओनाटस हा आपल्या नजीकच आहे असें त्याला कळलें. तसेंच त्याला अशीहि बातमी येऊन पोहोंचली कीं, तेथील लोकांचा लिओनाटसनें पराभव केला असून त्यांत त्यांची भयंकर प्राणहानि झाली होती. लिओनाटसच्या बाजूची प्राणहानि जरी थोडी होती तरी लिओनाटसचा गुरुबंधु आपोलोफानीझ, ज्याला अलेक्झांडरनें, त्या प्रांताचा क्षत्रप नेमलें होतें तो ठार झाला होता. आपण येथें आहों अशी बातमी त्यानें लिओनाटस यास कळवली, आणि जे कांहीं आपले खलाशी निरुपयोगी झाले होते त्यांनां त्यानें त्याच्या सैन्यांत पाठवून त्याच्या हाताखालील कांहीं नवे खलाशी आपल्याइकडे आणून घेतले. अशा रीतीनें ताजातवाना होऊन त्यानें आपलें पर्यटन पुन्हां सुरू केलें व तामीरस नदीच्या मुखापर्यंत येऊन पोहोंचला. तेथील रानटी लोकांचा पराभव करून व तेथें पांच दिवस राहून तो ओरैटाईच्या पश्चिम सरहद्दीवरील मलन (अर्वाचीन रासमाली) भुशिरापाशीं आला. मलन भुशिराच्या पुढें गेल्यावर किनाऱ्याच्या बाजूस ओरैटाईचा मुलूख संपून जिड्रोसीचा लागला.

याप्रमाणें बऱ्याच संकटांतून आपला मार्ग काढीत काढीत तो ऑर्मस (हार्मोसीआ)च्या सामुद्रधुनीच्या मुखाशीं असलेल्या जस्कच्या भुशिरानजीकच्या बादिस बंदरीं येऊन पोहोंचला. येथून पुढें तो ऑर्मस येथें आला. येथें विश्रांति घेत असतां त्याला एक ग्रीक बोलणारा गृहस्थ आढळून आला. त्याची विचारपूस करतां त्याला हा अलेक्झांडरच्या सैन्यांतील शिपाई आहे असें आढळून आलें, व त्याच्या सांगण्यावरून अलेक्झांडर हा तेथून पांच दिवसांच्या अंतरावर आहे असें समजलें. निआर्कस आणि आर्किआस हे लगेच आपल्या राजास भेटण्यास निघाले, व अतिशय हाल काढीत अलेक्झांडरपाशीं येऊन त्याला जहाजें सुरक्षित आहेत अशी त्यांनीं बातमी सांगितली. नंतर तो पुन्हां अनामिसच्या मुखाशीं परत आला व कांहीं दिवसांनंतर युफ्रेटीस नदीच्या मुखाशीं येऊन पोहोंचला. तेथें अलेक्झांडर हा सुसा येथें जात आहे असें कळल्यावरून तो परत फिरून तैग्रिसमध्यें शिरला व अशा रीतीनें अलेक्झांडरपाशीं येऊन त्यानें आपलें जलपर्यटन संपविलें.

परंतु निआर्कस यास जितके हाल सोसावे लागले त्यापेक्षां पुष्कळच अधिक हाल अलेक्झांडर यास सोसावे लागले. अलेक्झांडरास मार्गांत हाला नांवाची एक पर्वताची ओळ आहे हें माहीत नसल्यानें त्याच्या बेतांत बराच अडथळा आला. शिवाय हजारों सैनिक पाण्याच्या अभावीं मृत्युमुखीं पडले. व उन्हाच्या प्रखरतेमुळेंहि कित्येक ओझें वाहणारीं जनावरें व सैनिक प्राणास मुकले. सरतेशेवटीं ते एकदाचे पास्नी नांवाच्या बंदरापर्यंत येऊन पोहोचले. परंतु या प्रवासामध्यें बरोबर त्यांनीं जितकी कांहीं लूट आणली होती ती सर्व गमावल्यामुळें या स्वारीपासून विशेषसा फायदा कांहींच झाला नाहीं.

कार्मेनिआमध्यें सैन्य असतांनाच अलेक्झांडरला अशी बातमी लागली कीं, चिनाब व सिंधु यांच्या संगमाच्या उत्तरेकडील प्रांतावरचा क्षत्रप फिलिप्पॉस हा त्याच्या भाडोत्री लष्कराकडून मारला गेला. तथापि अलेक्झांडरला या वेळीं तक्षशिलेच्या राजास व यूडेमॉस यास त्या प्रांताची व्यवस्था पहाण्यास सांगण्याशिवाय दुसरें कांहींच करतां आलें नाहीं. पुढें स्वतः अलेक्झांडरहि दुसऱ्याच वर्षी बाबिलोनमध्यें वारल्यामुळें ग्रीकांनां या प्रांतावर चांगला ताबा बसवितां आला नाहीं.

ज्या वेळेस त्रिपारादैसॉस येथें ख्रि. पू. ३२१ सालीं साम्राज्याची पुन्हां विभागणी झाली, त्या वेळेस सर्व हिंदुस्थान व पंजाब यावरील अधिकार पॉरस व तक्षशिलेचा राजा अंभी यांजकडे देण्यांत आला व पैथॉन यास अॅराकोशिआचा क्षत्रप नेमण्यांत आलें. तात्पर्य, ग्रीकांचें सार्वभौमत्व यापुढें नांवाला जरी शिल्लक राहिलें होतें, तरी प्रत्यक्ष सत्ता ग्रीकांच्या हातीं न रहातां हिंदूंकडेच राहिली. अलेक्झांडरची ही स्वारी ख्रि. पू. ३२७ पासून ३२४ पर्यंत म्हणजे तीन वर्षें चालली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

कुशल सेनापतीच्या दृष्टीनें पाहतां इतक्या थोड्या अवधींत अलेक्झांडरनें जीं अनेक प्रचंड कृत्यें केलीं त्यांनां इतिहासांत दुसरी उपमाच नाहीं. त्याच्या लष्करी हालचाली, युद्धाच्या निरनिराळ्या युक्त्या वगैरेसंबंधीं ज्ञान पूर्णावस्थेप्रत पोहोंचलेलें दिसतें. तो अत्यंत शूर असल्यामुळें व कोणत्याहि संकटांत तो स्वतः सर्वांच्या अगोदर उडी टाकीत असल्यामुळें त्याच्या सैनिकांत तो उत्साह उत्पन्न करूं शकत होता. हिमालयापासून तों समुद्रापर्यंत त्यानें जे विजय मिळविले त्यांवरून यूरोपीय लोकांच्या शिस्तीपुढें अतिशय बलाढ्य असें हिंदु सैन्य देखील टिकाव धरीत नाहीं असें आढळून आलें. तसेच युद्धांतील हत्तींच्या उपयुक्ततेबद्दल हिंदूंची जुनी कल्पनाहि मॅसेडोनियन लोकांनीं फोल ठरविली. क्सेर्क्सीसच्या सिंधपासून ग्रीसपर्यंतच्या स्वारीमुळें यूरोपशीं

संबंध ठेवण्याचा एक सोपा मार्ग खुला झाला, व त्याचप्रमाणें निआर्कसच्या जलपर्यटनामुळें समुद्राच्या बाजूनें दुसरा एक मार्ग उपलब्ध झाला.

अलेक्झांडरनें स्वीकारलेल्या एकंदर धोरणावरून असें दृष्टीस पडतें कीं, त्याचा विचार हिंदुस्थान देश आपल्या साम्राज्यास जोडावा असा होता. परंतु त्याच्या अकालीं मरणामुळें तो हेतु सफल झाला नाहीं. त्याच्या मरणानंतर तीनच वर्षांच्या आंत त्याचे सेनापती, त्याचें लष्कर व त्याची सत्ता सर्व कांहीं लयाला गेलें व अशा रीतीनें त्याच्या स्वारीपासून मुळींच फायदा झाला नाहीं. हिंदुस्थान देश पूर्वी होता तसाच कायम राहिला व ग्रीकांच्या स्वारीचा येथें जवळ जवळ कांहींच मागमूस राहिला नाहीं असें म्हटलें तरी चालेल. कोणताहि हिंदु, बौद्ध किंवा जैन ग्रंथकार अलेक्झांडरच्या स्वारीचा उल्लेख देखील करतांना आढळत नाहीं, इतकी त्याची विस्मृति झाली.

हिंदुस्थानांतील ग्रंथकारांनां जरी अलेक्झांडरची पूर्ण विस्मृति पडली तरी ग्रीक संस्कृतीनें हिंदुस्थानांत किंवा आशियांत कार्य केलें नाहीं असें नाहीं. अलेक्झांडरच्या आगमनाची साक्ष जरी येथील ग्रंथकार देत नाहींत तरी ग्रीकांच्या पांडित्याबद्दल आदर दाखवून त्यांच्या प्राचीन अस्तित्वाची साक्ष गर्गासारखे ग्रंथकार देतात. असो. आतां आपण ग्रीक संस्कृतीच्या जगांतील एकंदर कार्याचा हिशेब घेऊं.

**ग्रीकसंस्कृतीचा इतिहास.**—ग्रीकसंस्कृति या शब्दामध्यें खुद्द ग्रीसमध्यें निरनिराळ्या स्वरूपांत असणारी व भासमान होणारी ग्रीक लोकांची विचारपरंपरा एवढाच अर्थ विवक्षित नसून हल्लींच्या सुधारणेमध्यें सुद्धां ग्रीक लोकांच्या आचारविचारपरंपरेची दिसून येणारी छटा हा विशिष्ट अर्थहि त्यांत समाविष्ट होतो. हा दुसरा अर्थ ग्रीकसंस्कृतीविषयीं बोलतांना अर्नोल्डनें प्रचारांत आणला. जर्मन इतिहासकार ड्रॉयसेन यानें अलेक्झांडरच्या विजयापासून पुढें जी ग्रीक आचारविचारपरंपरा ग्रीकेतर राष्ट्रांवर पसरली तिजबद्दल ग्रीकसंस्कृति म्हणजे "हेलेनिझम" हा शब्द उपयोगांत आणला. वस्तुतः या दोन्ही अर्थांतील तत्त्व एकच आहे. ज्याप्रमाणें एखाद्या वस्तूचा प्रकाश व त्या वस्तूच्या प्रतिबिंबांत दिसून येणारा प्रकाश हे भिन्न नसतात, तद्वतच ग्रीकसंस्कृतीविषयीं म्हणतां येतें. पण येथें मात्र ग्रीक संस्कृति या शब्दाचा दुसरा अर्थ घेऊन इतर राष्ट्रांमध्यें ग्रीक आचारविचारपरंपरा अलेक्झांडरच्या विजयानंतर कशी पसरली याचा विचार केला आहे. तथापि तसें करण्यापूर्वी ग्रीकसंस्कृतीमध्यें कोणकोणत्या गोष्टींचा अंतर्भाव होतो हें पहाणें जरूरीचें आहे.

एखाद्या राष्ट्राचा अगर युगाचा जीवितक्रम ठरीव शब्दांत सांगणें अशक्य असतें. पण जर आपण सर्व मानवजातीच्या इतिहासाचें निरीक्षण करून व त्यांत अंधश्रद्धा व खुळ्या समजुती यांमुळें शास्त्रीय विचारांच्या प्रसाराला कसे अडथळे आले, व शास्त्रीय विचारांनां हळू हळू विजय प्राप्त होऊन विचारशून्य समजुतींचा लोप होऊन शास्त्रीय शोधांची कशी प्रगती होत आली हें पाहिलें; आणि या सर्व गोष्टींचें सूक्ष्म पर्यालोचन करून मग अशा प्रकारच्या बुद्धिप्रामाण्यवादाचा जन्म प्राचीन ग्रीक लोकांत होऊन त्यांच्या मार्फत त्याचा यूरोपमध्यें प्रसार कसा झाला हें पाहिलें, तर जुन्या ग्रीक शहरांचें व त्यांच्या आयुष्यक्रमाच्या विकासाचें महत्त्व आपणांस सहज दिसून येईल. ज्या वेळीं ग्रीकसंस्कृति या शब्दानें कांहीं दृश्य स्वरूपाचा अगर गोष्टींचा बोध होऊं लागला त्या वेळेस त्याचें तात्त्विक स्वरूप जाऊन तिचें भाषेमध्यें, कलाकुसरीमध्यें व वाङ्मयामध्यें प्रतिबिम्ब पडूं लागलें. पुराणग्रीक लोकांच्या संस्कृतीचा जणूं काय आदर्शच असलेलें जें होमरचें काव्य त्यांत, जिच्यामुळें पुढें बौद्धिक व कलाविषयक क्षेत्रामध्यें ग्रीकांनीं नांवलौकिक मिळविला ती योग्य स्वरूप व प्रमाणशीरपणा अवगमिण्याची बुद्धि दृग्गोचर होऊं लागलेली आढळते. खिस्ती शकापूर्वी सातव्याआठव्या शतकांतील वसाहतीस्थापनेचा काळ येईपावेतों ग्रीक लोकांनां आपल्या राष्ट्रीयत्वाची जाणीव उत्पन्न झाली नव्हती. या वेळीं मात्र जेव्हां 'रानटी' विरुद्ध 'ग्रीक' असा शब्दप्रयोग होऊं लागला त्या वेळीं ही भावना उत्पन्न झाली; आणि तीन शतकांनंतर कला, वाङ्मय, राजनीति व विचार यांमध्यें ही भावना पूर्णपणें प्रतिबिम्बित झाली. या नवीन भावनेस आधारभूत संस्कृतीचा जगावर काय परिणाम झाला हें पहाणें जरूरीचें आहे. ग्रीकसंस्कृतिविकासाच्या इतिहासाचे शिकंदरपूर्व आणि शिकंदरोत्तर असे दोन भाग पडतील.

**अलेक्झांडरच्या पूर्वी ग्रीक संस्कृतीचा विस्तार.**—खिस्तपूर्व ५ व्या शतकांत ग्रीक शहरांनीं स्पेनपासून इजिप्त व कॉकेशस पर्वतापर्यंत भूमध्य व काळ्या समुद्राचा किनार व्यापून टाकला होता; आणि ग्रीक वाङ्मयाचा प्रसार ग्रीकेतर राष्ट्रांवरहि होऊं लागला होता. खिस्तपूर्व सातव्या शतकामध्येंच म्हणजे ज्या वेळीं ग्रीक संस्कृति बाल्यावस्थेंत होती त्या वेळींच ग्रीक लोक हे कणखर व शूर शिपाई आहेत अशी बाबिलोनिया व ईजिप्त या देशांची खात्री झाली होती; व इराणसारख्या साम्राज्यांत ग्रीक शिपायांची पगार देऊन सैन्यांत भरती करण्यांत येत असे. पुढें शिकंदरानें इराणच्या बादशहाचा पराभव केला तेव्हां देखील बादशहाचें ग्रीक सैन्य अखेरपर्यंत टिकून राहिलें. पण जसजशी ग्रीक संस्कृति विकसित होत चालली तसतसें इतर राष्ट्रांचें लक्ष तिच्याकडे अधिकाधिकच वेधूं लागलें. युफ्रेटीझ व नाइल या नद्यांच्या कांठच्या संस्कृतींनीं ग्रीक संस्कृतीची फारशी पर्वा केली नसेल. पण जेथें ग्रीक लोकांनीं आपल्या वसाहती केल्या होत्या त्या ठिकाणचे देश्य लोक ग्रीक संस्कृतीच्या वर्चस्वाखालीं आले. कांहीं कांहीं बाबतींत ग्रीक लोकांचा व रानटी लोकांचा निकट संबंध येत असे;

परस्परांच्या आचारांचेंहि मिश्रण होत असे. ॲनाकार्सैस व सायलॅस यांच्या कथांवरून काळ्या समुद्रावरील ग्रीक वसाहतींशेजारील जातींच्या ज्या प्रमुख लोकांचा ग्रीकांशीं संबंध आला, ते लोक ग्रीक संस्कृतीच्या अंतर्बाह्य तेजानें कसे दिपून गेले हें चांगलें दिसून येतें.

अलेक्झांडरच्या पूर्वीच्या दीड शतकांत जो ग्रीक संस्कृतीचा विकास झाला त्यामुळें ग्रीक लोक जगापुढें निराळ्या स्वरूपांत चमकले. त्यांचें लष्करी सामर्थ्य, क्सर्क्सीझचा पराजय व अथेन्सची अगर स्पार्टाची पूर्व भूमध्य समुद्रावरील सत्ता ह्यावरून अडाणी लोकांनां देखील सहज दिसण्यासारखें होतें. सायरसच्या स्वारीनें रानटी शिपायांपेक्षां ग्रीक शिपायांचें श्रेष्ठत्व कळून आल्यामुळें पूर्वेकडील राजे ग्रीक शिपायांवरच अवलंबून रहात असत. स्वतः ग्रीक लोकांमध्येंच जी अंतर्गत प्रगति झाली होती ती देखील महत्त्वाची होती. ग्रीक लोकांमध्यें राजकीय दुफळी माजली होती तरी कलाकौशल्यांत, वाङ्मयांत व तत्वज्ञानांत अथेन्सनें फारच प्रगति केल्यामुळें त्या दुफळीचे दुष्परिणाम लोकांनां दिसले नाहींत. ग्रीक सुधारणा व ग्रीकांची बुद्धिमत्ता अथेन्समध्यें केन्द्रीभूत झाली होती असें म्हटलें तरी चालेल. तितकीच महत्त्वाची दुसरी गोष्ट ही कीं, सर्व ग्रीक वाङ्मयांमध्यें ॲटिक ही एकच भाषा वापरलेली होती; कारण ग्रीकसंस्कृतीचा सर्व जगभर फैलाव व्हावयास त्याला एका ठराविक भाषेची जरूरी होती. वाङ्मय, कला, शौर्य इत्यादि गोष्टींमुळें ग्रीकांचा प्रसार सर्वत्र झाला. ग्रीक संस्कृतीचा प्रसार इतर राष्ट्रांत कसा काय झाला हें दाखविणाऱ्या टीपा दिल्या म्हणजे ग्रीकसंस्कृतीचें बल अधिक स्पष्ट होईल.

**इराणी लोक.**—पूर्वेकडील स्वामी जे इराणी लोक त्यांच्यावर या नवीन संस्कृतीचा परिणाम होण्यास फारच थोडा अवकाश सांपडला. तथापि ग्रीक लोकांच्या अंगचे लष्करी गुण व तसेंच त्यांचें उपयुक्त भौतिक शास्त्र यांची योग्यता इराणी लोकांनीं ओळखली होती. दरायसनें एका ग्रीक कप्तानाची सिंधूचें संशोधन करण्यासाठीं नेमणूक केली. एका ग्रीक शिल्पशास्त्रज्ञानें त्याला बास्पोरसवर पूल बांधून दिला. इराणी दरबारामध्यें ग्रीक वैद्यांच्या (उ. डेमोसीडीझ व टीसिअस) मोठमोठ्या पगारावर नेमणुका होऊं लागल्या. चवथ्या शतकामध्यें इराणी बादशहाचा व ग्रीक संस्थानांचा जो परस्परांशीं राजकीय बाबतींत संबंध घडून आला त्याचा परिणाम फक्त राजकीय बाबींपुरताच झाला नाहीं. पर्शियन सरदारांपैकीं जे सरदार आशियामायनरच्या बाजूला राहिले होते त्यांचा ग्रीक लोकांशीं निकट संबंध आल्यामुळें ग्रीक संस्कृतीच्या श्रेयात्मक बाजूकडेहि त्यांचें लक्ष वेधलेलें आढळून येतें. धाकट्या सायरससारख्या माणसाचा ग्रीक कप्तानांशीं मैत्री करण्यांत त्यांचा युद्धांत उपयोग करून घेण्यापेक्षां कांहीं अधिक हेतु होता; व त्यानें ग्रीक वारांना मिळविल्या त्याहि केवळ विषयवासना तृप्त करण्याकरितांच नव्हत्या. मिथ्राडेटीझ यानें, सिलेनिअननें केलेला प्लेटोचा पुतळा विद्यापीठाला नजर केला. पर्सेपोलिस अगर सुसा येथील राजवाड्यासारख्या पर्शियन कलाकौशल्याच्या कामामध्यें ग्रीक कलेची छटा कितपत उमटली होती हें सांगणें कठिण आहे; परंतु पर्शियन साम्राज्यांत ग्रीक लोकांकडून नक्षी केलेलीं अगर पैलू पाडलेलीं रत्नें जात होतीं हें निश्चित आहे. शापूर येथील विद्यापीठांत ग्रीक अध्यापक आणले होते व ग्रीक ग्रंथांचीं भाषांतरेंहि करण्याचा प्रयत्न चालू होता.

**फिनीशियन.**—चवथ्या शतकाच्या प्रथमार्धांतच फिनीशियन व्यापाऱ्यांनीं पैरिअसमध्यें आपलें ठाणें दिलें होतें. ग्रीक व सेमेटिक राष्ट्रांच्या सरहद्दीवर सायप्रसमध्यें या दोन लोकांची सत्तेसाठीं झटापट चालू होती. या बेटामध्यें सालामिसचा राजा इव्हॅगोरेस हा सत्तेच्या जोरावर ग्रीक संस्कृति लादीपर्यंत फिनीशियन संस्कृतीचेंच वर्चस्व होतें. आयसॉक्राटीझ यानें याबद्दल असे उद्गार काढले आहेत. "इव्हॅगोरेस आपली सत्ता स्थापीतोंपर्यंत हे (फिनीशियन) लोक ग्रीकांच्या इतके विरुद्ध होते कीं, जो राजा ग्रीकांचा कट्टा हाडवैरी असेल तो सगळ्यांत उत्तम गणला जात असे. पण इव्हॅगोरसनें आपली सत्ता स्थापन केल्यावर विलक्षण फरक घडून आला. प्रत्येक जण सर्व बाबतींत जास्त ग्रीक होण्याची स्पर्धा करूं लागला आहे; प्रत्येकाला भावी मुलें ग्रीकांसारखीं व्हावींत यासाठीं ग्रीक बायका करून घ्याव्या असें वाटत आहे; व ग्रीक चालीरीतींचें अनुकरण करण्यांतच त्यांनां धन्यता वाटत आहे." फिनीशियनांच्या मूळ ठिकाणींहि ग्रीक संस्कृति शिरकाव करूं लागली. एकदां तर इव्हॅगोरस (अजमासें ख्रि. पू. ३८६) यानें टायर देखील ताब्यांत घेतलें होतें. त्याचा नातू दुसरा इव्हॅगोरस हा पर्शियन राजाच्या तर्फे सायडॉनचा सुभेदार असल्याचें आढळून येतें (ख्रि. पू. ३४९-३४६).

सायडॉनचा राजा अब्दाश्टार्टे (ख्रि. पू. ३७४-३६२) यानें ग्रीक लोकांशीं निकट संबंध ठेवलेला होता, व त्यानें सायप्रसच्या ग्रीक राजांचें पूर्णपणें अनुकरण केलें होतें. सार्डिनिआंतील फिनीशिअन वसाहतवाले ग्रीक कलाकौशल्याच्या वस्तू विकत घेत असत, किंवा स्वतः तशा बनवीत असत.

**केरिअन आणि लिशिअन लोक.**—पूर्वेकडील ग्रीक लोकांचीं स्थळें त्यांच्याशीं कमीअधिक प्रमाणांत सदृश असलेल्या व प्राचीन ग्रीकांशीं संबद्ध असलेल्या केरिअन आणि लिशिअन लोकांच्या देशांशीं लागून होतीं. अलेक्झांडरपूर्वीच्या शतकांत मायलेसाच्या हेकाटोम्नसच्या वंशांतील राजांच्या आधिपत्याखालीं केरिआ हें राष्ट्र सुसंघटित झालें होतें. ख्रि. पू. चवथ्या शतकाच्या पहिल्या दशकांत हेकाटोम्नस हा केरिआचा राजा झाला; पण त्याचा पुत्र मॉसोलस याच्या कारकीर्दींत (राज्यारोहण, ख्रि. पू. ३७७-७६)

हें घराणें वैभवाच्या कळसाला जाऊन पोहोंचलें. हालिकार्नासस ही मॉसोलसच्या राज्याची राजधानी होती; व तेथील जें कलाकुसरीचें काम सध्यां उपलब्ध आहे तें ग्रीक धर्तीचें दिसून येतें. मॉसोलीअम म्हटलें गेलेलें जें त्याचें थडगें आहे, त्यावर ग्रीक कारागिरांनीं आपली सर्व निपुणता अहमहमिकेनें खर्च केलेली होती. या केरिआच्या राजांनीं आपली शासनपद्धति ग्रीक लोकांच्या शासनपद्धतीवर उभारलेली होती. मॉसोलिसच्या कारकीर्दीत एक ग्रीक तत्त्वज्ञ त्याच्या दरबारीं आला होता व त्याला तेथें आश्रयहि मिळाला होता. मायलेसा शहरांत सुद्धां ग्रीक संस्कृतीच्या खाणाखुणा दिसून येतात, व तेथील जाहीरनामे ग्रीक भाषेंत निघत असल्याचें आढळून येतें. लिशिआमध्यें मात्र ग्रीक संस्कृतीचा फारच थोडा परिणाम झालेला आढळून येतो. तेथें ग्रीक भाषेच्या ऐवजीं देशी भाषाच प्रचारांत होती. व्यक्तींचीं अगर गांवांचीं नांवें पार्शियन आहेत. ग्रीक भाषा तुरळक तुरळक दिसून येते. नाणीं ग्रीक पद्धतीचीं आहेत, पण सर्वांहून जास्त थडग्याच्या अगर स्मारकांच्या अवशेषांत ग्रीक संस्कृतीची निश्चित छाप दिसून येते.

**दक्षिण रशिया.**—काळ्या समुद्रावर असलेल्या ग्रीक वसाहतीमुळें कलाकुसरीच्या बाबतींत तरी सिथियन लोकांवर ग्रीक संस्कृतीची छाप पडलेली होती हें तेथील जमिनींत सांपडलेल्या वस्तूंवरून दिसून येतें.

**इजिप्त.**—सॅमेटिकसच्या कालापासूनच ( मृत्यु ख्रि. पू. ६१० ) फेरोच्या पदरीं ग्रीक शिपाई असत. तसेंच ग्रीक व्यापारीहि नाइल नदीपर्यंत आलेले होते. नाइल नदीच्या बॉलबिटायनिक मुखाजवळ नॉक्रॅटिस नांवाचें ग्रीक शहर वसलेलें होतें. परंतु ग्रीक लोकांचा स्पर्श झालेलें मांस देखील न खाण्याइतका जातिमत्सर इजिप्शियन लोकांत वसत असल्यामुळें ग्रीक संस्कृतीची त्या लोकांवर बसावी तितकी छाप बसली नाहीं. पण अलेक्झांडरच्या नंतर हें राष्ट्रच ग्रीकांचें अंकित झालें व पुढें रोमन राष्ट्रानें ग्रीकांचें उच्चाटन करून त्यावर आपलें स्वामित्व स्थापन केलें.

**मॅसिडोनिया.**—मॅसिडोनियामधील देश्य संस्थानिक ख्रि. पू. ५ व्या शतकापासूनच ग्रीक लोकांच्या ऐश्वर्याला मोहून गेलेले होते. पहिल्या अलेक्झांडरनें टेमेनिड घराणें हें अर्गाइव्ह वंशोत्पन्न आहे असें न्यायाधीशांनां अट्टाहासपूर्वक सांगितलें आहे; व जरी त्यांच्या शत्रूंनीं त्यांनां 'रानटी' (बार्बेरिअन) असें म्हटलें आहे, तरी मॅसिडोनियाचे राजे आपणांला ग्रीकवंशीय असें अभिमानानें म्हणवून घेत. आर्किलेअसनें ( ख्रि. पू. ४१३–३९९ ) राज्याची व्यवस्थित संघटना ज्या वेळीं केली तेव्हां ग्रीक संस्कृति मॅसिडोनियामध्यें हळू हळू शिरकावूं लागली; व थोडक्याच काळांत ती सर्वत्र पसरली. जें जें कांहीं ग्रीकांचें उत्तम असेल तें तें इलीच्या दरबारांत येऊं लागलें. झूक्सिसनें राजवाड्याचें बांधकाम करून तो शृंगारला. युरिपिडीझनें आपले वृद्धापकाळचे दिवस या दरबारीं घालविले. या वेळेपासून मॅसिडोनियाच्या सरदारांमध्यें देखील ग्रीक वाङ्मय पसरूं लागलें. त्यांचीं नांवें फिलिपच्या कारकीर्दींत ग्रीक तऱ्हेचींच दिसून येतात. फिलिपच्या ताब्यांत असलेल्या ग्रीक संस्थानांमधून पुष्कळसे ग्रीक लोक मॅसिडोनियाच्या लष्करांत आले होते. फिलिपनें आपल्या मुलाला शिकविण्यासाठीं आरिस्टॉटल नांवाच्या ग्रीक विद्वानाला नेमलें होतें; व वाङ्मयांत आणि दरबारांत सर्वत्र ग्रीक भाषाच मुख्य मानली जात असे.

**पश्चिमेकडेः सिसिलींतील मूळचे लोक.**—इटाली व गॉलच्या दक्षिणेकडील प्रांत यांच्या सन्निध ग्रीक वसाहती असल्याकारणानें त्यांच्यावरहि ग्रीक संस्कृतीची छाप बसली होती. चवथ्या शतकामध्यें छोटया व मोठ्या डायोनिशिअसच्या कारकीर्दींत सिसिल लोकांवर ग्रीक संस्कृतीची पूर्णपणें छाप पडली ( फ्रीमन–सिसिलीचा इतिहास २. ३८७ ).

ख्रि. पू. ५ व्या शतकापासून इटालियन लोकांमध्यें जीं अक्षरें प्रचलित होतीं तीं प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष रीतीनें ग्रीकांपासूनच घेतलेलीं होतीं. दक्षिण इटालीमधील लोकांमध्यें ग्रीकांचीच नामकरणपद्धति अस्तित्वांत होती. दक्षिण इटालीमध्यें प्रचलित असलेल्या पायथॅगोरियन तत्त्वज्ञानाचा तद्देशीय संस्थानिकांनीं अंगीकार केलेला होता. दक्षिणेकडील गॉलमधील ग्रीक लोकांमुळें केल्टिक जातींमध्यें ग्रीकसंस्कृति इतकी पसरली कीं, ग्रीक लोकांच्या नाण्यांप्रमाणें अतलांतिक महासागराच्या कांठींहि नाणीं पडूं लागलीं.

**अलेक्झांडर दि ग्रेटनंतर.**—ख्रि. पू. चवथ्या शतकाच्या मध्यकालापर्यंत साधारणतः ग्रीक संस्कृतीचा प्रसार किती झाला हें पाहूं लागल्यास आपणाला असें आढळून येईल कीं, ग्रीक वसाहतींनां लागून असलेल्या शहरांमध्येंच ग्रीक संस्कृति पसरली होती, व त्यांतहि मॅसिडोनियाच्या राज्याशिवाय इतरत्र ती नुसती दरबारांत व वरच्या वर्गामध्येंच पसरलेली होती. पण त्याबरोबर हेंहि ध्यानांत ठेवणें जरूर आहे कीं, ग्रीक संस्कृति अस्तित्वांत येऊन फारच थोडा काल लोटला होता. ग्रीक संस्कृतीचा तींतील आध्यात्मिक विचारांच्या योगानेंच केवळ किती प्रसार झाला असता हें ठरविणें फार कठिण आहे. जेव्हां अलेक्झांडरनें आपल्या विजयामुळें आपली सत्ता पूर्वेकडे हिंदुस्थानापर्यंत नेली व ज्या वेळीं ग्रीक शहरें निरनिराळ्या ठिकाणीं वसविलीं गेलीं, त्या वेळीं ग्रीकांचें ऐहिक व व्यावहारिक महत्त्व वाढलें; व त्यामुळें सर्वच गोष्टींत फरक पडून आला. जगज्जेत्या लोकांनीं ज्या गोष्टींस महत्त्व दिलें त्या गोष्टी सामान्य लोकहि महत्त्वाच्या मानूं लागले. ग्रीक संस्कृतीचे प्रसारक म्हणून घेण्यांत मॅसिडोनियन राजांनां अभिमान वाटूं लागला. अलेक्झांडरविषयीं

तर बोलावयासच नको. आशिया मायनर, सिरिया आणि ईजिप्त येथील अलेक्झांडरनंतर येणाऱ्या राजांच्या दरबारीं ग्रीक भाषाच चालत असे; व तेथील सर्व वातावरणच ग्रीक होतें. ग्रीक शहरांसाठीं व ग्रीक संस्थांसाठीं अनेक देणग्या देऊन ग्रीकांच्या तोंडून धन्यवाद मिळविण्यासाठीं सर्व राजे प्रयत्न करीत असत. ग्रीक वाङ्मयाला व कलेला पुष्कळ राजांनीं आश्रय दिला; व कित्येकांनीं स्वतःच ग्रंथ लिहिण्याचा प्रयत्न केला. ग्रीकेतर राजांच्या दरबारांनीं देखील ग्रीकांचें अनुकरण करण्यास सुरुवात केली होती. पण कांहीं झालें तरी ग्रीक संस्कृति ही नुसत्या दरबारप्रवेशानें पसरणें अशक्य होतें. ग्रीक संस्कृति ही ग्राम्य नसून नगरराज्याच्या विकसित संस्कृतीपासून ती निष्पन्न झाली होती; व ती नगरराज्याव्यतिरिक्त पसरणें शक्य नव्हतें. अलेक्झांडरनें सर्वत्र ग्रीक शहरें वसविलीं व या नगरराज्यपद्धतीवरच ग्रीक संस्कृतीचा प्रसार झाला. पुढें या नगरराज्यांतील राजांचीं घराणीं जरी नष्ट झालीं, तरी तेथें एकदां प्रस्थापित झालेल्या संस्कृतीला धक्का पोहोंचला नाहीं. रोमची सत्ता बलाढ्य झाली तेव्हां तिनें या संस्कृतीच्या रक्षणापलीकडे कांहीं केलें नाहीं. पूर्वेकडे रोमनें ग्रीक संस्कृतीचाच प्रसार केला. या दृष्टीनें पाहतां ग्रीक संस्कृति ही एका अखंड प्रवाहाप्रमाणें वहात चाललेली आढळून येईल. हा अखंड प्रवाह वहात असतां त्याला मॅसिडोनियन लोकांनीं वळण दिलें, व रोमच्या आश्रयाखालीं तो प्रवाह तसाच वहात चालला. तो कसा वहात चालला हें पहाणें जरूर आहे. पण तत्पूर्वी हीं 'नगरराज्यें' काय होतीं याचा थोडासा विचार करणें आवश्यक आहे.

**नवीन ग्रीक शहरांचें स्वरूप.**—या नवीन वसविलेल्या शहरांची नागरिक सभा आरंभीं केवळ ग्रीक अगर मॅसिडोनियन लोकांचीच असे. हे नागरिक म्हणजे बहुधा राजाच्या सैन्यांत काम केलेले शिपाई अगर व्यापाराच्या आशेनें जुन्या शहरांतून इकडे आलेले व्यापारी असत. या नवीन भूमीवर आपली लष्करी सत्ता कायम ठेवणें हें मॅसिडोनियन राजांना जरूर वाटत असे. कारण हीं नगरराज्यें ग्रीकेतर लोकांमध्यें वसलीं असल्याकारणानें त्यांवर केव्हां काय संकट येईल याचा नेम नव्हता. यासाठीं प्रत्येक राज्यांत चांगले कसलेले शिपाई ठेवलेले असत. या राज्यांत तद्देशीय रहिवाशी देखील पुष्कळ रहाण्यास येत. पूर्वेकडील प्रांतामध्यें जीं नवीं नगरराज्यें वसविलीं होतीं त्यांत अलेक्झांडरनें मुद्दाम तद्देशीय लोकांची बरीच वसाहत करविली होती. साधारणपणें अगदीं खालचा समाज तद्देशीय रहिवाशांचाच असे असें म्हटलें तरी चालेल. पण या खालच्या समाजाला नागरिक सभेंत भाग घेतां येत नसे; व बहुतेक यूरोपीयेतर लोकांना देखील तो क्वचितच घेतां येत असे असें दिसतें. यहुदी लोकांना नागरिक सभेमध्यें बसण्याचा हक्क असे, असें जें जोसेफसनें म्हटलें आहे तें खोटें आहे असें कित्येकांचें मत आहे. या नागरिक सभेचें कामकाज ग्रीक नगरांतील धर्तीवरच चालत असे. शहरांतील राजकीय व सामाजिक संस्था सर्व ग्रीक नगरांतल्याप्रमाणेंच होत्या. ग्रीक नगरांतल्याप्रमाणें येथेंहि आखाडे वगैरे असत, व तेथल्याप्रमाणेंच येथेंहि मोठमोठे महोत्सव व त्या महोत्सवांमध्यें खेळ, नाटकें इत्यादि होत असत. गाण्याबजावण्याप्रमाणें फिरत्या विद्वानांच्या प्रवचनांसहि श्रोतृसमुदायाची वाण पडत नसे. वरच्या समाजाची भाषा ग्रीक होती. इमारती, पोषाख, वगैरे सर्व ग्रीक पद्धतीचेच असत. या नव्या शहरांतील रस्ते तर जुन्या ग्रीक शहरांतील रस्त्यांपेक्षां देखील शोभिवंत व प्रमाणशीर आंखलेले असे असत.

कधीं कधीं जुनीं पूर्वेकडील शहरेंच चांगलीं सुधारून नवीं बनवलीं जात व त्यांनां ग्रीक नांव देण्यांत येत असे. उदाहरणार्थ, फ्रिजिआमधील सिलीनीला अॅपामिया, सिरियांतील हॅलेब (अलेप्पो)ला बिरीआ, मेसापोटेमियांतील निसिबिसला अँटिऑक व मीडियामधील रॅगी(रोइ)ला युरोपस अशीं नांवें देण्यांत आलीं होतीं. क्वचित् प्रसंगीं जुनें नांवहि कायम ठेवलेलें आढळतें. थायाटायरा, दमास्कस, सामेरिआ हीं अशा प्रकारचीं उदाहरणें आहेत. नवीं शहरें वसलीं नाहींत अशा फिनीशिया व सिरिया देशांत सुद्धां ग्रीक संस्कृतीची छाप बसल्याशिवाय राहिली नाहीं. टायर व सायडॉन येथें अलेक्झांड्रिआ व अँटिऑक येथल्याप्रमाणेंच ग्रीक-वाङ्मय व तत्त्वज्ञान यांचा अभ्यास होत असे. या ग्रीक संस्कृतीनें जुन्या शहरांवर देखील आपली छाप कशी बसवली हें यरुशलेमच्या उदाहरणावरून दिसून येईल. तेथील तरुण पिढी या ग्रीक संस्कृतीच्या तत्त्वांनीं मोहित होऊन तेथें आखाडे व नाटकगृहें उदयास येऊन ग्रीक शासनपद्धति प्रचारांत आली.

**अलेक्झांडरनंतरच्या ग्रीक संस्कृतीचें स्वरूप.**—अलेक्झांडरनें हिंदुस्थानपर्यंत देश जिंकून जीं नवीं नगरें वसविलीं त्यांनीं हेलासची मर्यादा हिंदुस्थानपर्यंत विस्तृत केली, व अशा रीतीनें ग्रीकांच्या ताब्यांतील प्रदेश विस्तीर्ण झाल्यामुळें जुन्या गुरुत्वमध्यांतहि साहजिकच पुष्कळ फरक झाला. या नवीन परिस्थितीमुळें ग्रीक संस्कृतीमध्यें कोणते फरक घडून आले तें पहाणें महत्त्वाचें आहे.

**शासनसंस्था.**—ग्रीक संस्कृतीचा उदय नगरराज्यांपासून झाला होता. केरोनीआच्या लढाईनंतर नगरराज्यांच्या ऐश्वर्याला उतरती कळा लागली. याचा अर्थ नगर राज्यांचें स्वातंत्र्य सर्वत्र नष्ट झालें असा नाहीं. खुद्द अलेक्झांडरच्या वेळीं सुद्धां ग्रीक संस्थानें गडबड करूं लागलीं होतीं, व इटोलिआचा बंदोबस्त तर अखेरपर्यंत झाला नाहीं. अलेक्झांडर मेला व राज्यामध्यें दुही माजली तेव्हां या नगरराज्यांनां पुन्हां संधि सांपडली. यानंतरच्या दोन तीन

शतकांत हीं नगरराज्यें स्वस्थ अशीं मुळींच बसून राहिलीं नाहींत. ऱ्होड्सनें कोणत्या तरी एखाद्या संस्थानाचा पक्ष स्वीकारून अधिक व्यापक राजकारणांत बराच भाग घेतला होता.खुद्द ग्रीसमध्यें सुद्धां अलेक्झांडरच्या महत्वाकांक्षेप्रमाणें साम्राज्य सत्ता प्रस्थापित झाली नव्हती. आगंतुक अडचणींनां तोंड देण्याकरितां सामुदायिक संघस्वरूपांत राहून सुद्धां स्वतंत्रपणें आपली राजकीय प्रगति करण्याची पात्रता ग्रीक संस्थानांनीं सिद्ध केली होती. आकिअन आणि इटोलिअन संघ हे आपआपल्या हद्दींत पूर्णपणें स्वतंत्र होते. स्पार्टानें मॅसिडोनियाशीं "दोन हात करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगली होती. ग्रीसच्या बाहेरील पण मॅसिडोनियन राज्याच्या सरहद्दीवर असलेले.सिल्यूकिड व टॉलेमाइक आणि ॲटालिड वगैरे प्रांत कमी अधिक प्रमाणांत स्वतंत्र होते. ख्रि. पू. दुसऱ्या शतकाच्या आरंभास एकीकडे लॅम्साकस (स्मर्ना) वगैरे जुन्या पुराण्या शहरांनीं आपलें स्वातंत्र्य राखण्याचा प्रयत्न चालविला होता; तर दुसरीकडे ॲलेक्झांड्रिया, ॲंटिऑक आणि पर्गामम यांसारखीं राजधानीचीं शहरें राजप्रतिनिधींच्या ताब्यांत नांदत होतीं. पण रोमनें हा ग्रीक संस्कृतीचा प्रदेश पादाक्रांत केल्याबरोबर ही स्थिति पालटली. मॅसिडोनियन लोकांच्या जयामुळें ग्रीक संस्कृतीचा, जिकडे तिकडे फैलाव झाला, तरी ग्रीसच्या स्वातंत्र्यास आळा बसला; व रोमनें आपल्या लगतच्या पौरस्त्य राष्ट्रांत ही ग्रीक संस्कृति पूर्णपणें रुजविली तरी ग्रीक स्वातंत्र्य मात्र नष्ट करून टाकलें. तथापि अथेन्स अगर ऱ्होड्स यांसारखीं संस्थानें मित्रराष्ट्रें म्हणून मानलीं गेलीं होतीं, व खंडणी देणारीं मांडलिक संस्थानें देखील अंतर्गत कारभारांत स्वतंत्रच होतीं; फक्त कांहीं महत्वाच्या बाबतींत मात्र रोमनें नेमलेल्या अधिकाऱ्यास ढवळाढवळ करतां येत होती. बौली आणि डेमॉस या सभा बरेच दिवस अस्तित्वांत होत्या व ग्रीक स्वयंसत्ताक पद्धतीचा ध्वनि अद्यापि ऐकूं येत होता. पण ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत हें अंतर्गत स्वातंत्र्य देखील नष्ट झालें; व डेमॉस सभा नामशेष झाली. दुसऱ्या शतकाच्या शेवटीं साम्राज्य सरकार अंतर्गत कारभारांत ढवळाढवळ करूं लागलें; व पैशासाठीं त्यांनीं ही अंतर्गत व्यवस्था आपल्याच हातांत घेण्यास सुरुवात केली. सारांश डायोक्लीशिअननंतर व पूर्वेकडील साम्राज्याखालीं ग्रीक प्रदेशाचा राज्यकारभार नोकरशाहीच्या तंत्रानें चालूं लागला.

**सामाजिक परिवर्तन.**—अलेक्झांडरपासून डायोक्लीशिअनपर्यंत राजकीय दृष्ट्या जो ग्रीक संस्कृतीचा ऱ्हास झाला त्याबरोबरच ग्रीक व ग्रीकसंस्कृतीच्या छत्राखालील लोकांच्या स्वभावांत देखील पुष्कळच फरक पडला. अर्थात् एका प्रदेशांत व दुसऱ्या प्रदेशांत बरेंचसें भिन्नत्व होतें. पण या सर्व साधारण असलेल्यां स्थितींत व पूर्वीच्या ग्रीक साम्राज्यामधील समाजाच्या स्थितींत कांहीं फरक आढळून येतात. पूर्वेकडील सर्व देश ग्रीक लोकांनां मोकळे झाल्यामुळें त्यांनीं अतोनात पैसा मिळविला. त्यांची राहणी थोडीशी उच्च व थाटाची बनली. ग्रीक, दरबारांतहि हा थाटमाट शिरला. डायोक्लिअस, हार्मिअस यांसारख्या मोठमोठ्या प्रधानांनीं अलोट संपत्ति मिळविली. मोत्यें, माणकें वगैरे रत्नें शोभेसाठीं वापरण्यांत येऊं लागलीं. अलेक्झांडरच्या पूर्वी ग्रीकांमध्यें जी एकराष्ट्रीयत्वाची भावना होती ती आतां दृढ होऊन एक सर्वसामान्य अशी ग्रीक संस्कृति जगभर पसरूं लागली. ग्रीकांमधील सामान्य भाषा जी 'कॉयनी' ती जुन्या पोटभाषांनां मागें टाकून सर्वत्र पसरली.

**कला व वाङ्मय.**—अशाच प्रकारचा फरक वाङ्मय, पारमार्थिक व्यवहार व कला या बाबतींतहि दिसूं लागला. पूर्वीचा तरतरीतपणा व कल्पकता हीं हळू हळू कमी होऊं लागलीं. कांहींतरी भावनोद्दीपक छटा किंवा अधिक हुबेहूबपणा उठविल्याशिवाय लोकांनां कलेंत आनंद वाटेनासा झाला. वाङ्मयामध्यें ऐतिहासिक वाङ्मय अगर कृत्रिम वाङ्मयच लोकांनां आवडूं लागलें. कारागीर आणि विद्वान् लोक दरबारी लोकांनां रुचतील अशींच कलाकौशल्याचीं कामें व वाङ्मय निर्माण करूं लागले. बौद्धिक क्षेत्रांत बरीच प्रगति होऊं लागली. भौतिक सुधारणा अधिकाधिक होऊं लागली व ती होण्याला आतां वाटेल तितकें क्षेत्र मिळालें. काव्याला उतरती कळा लागली. अलेक्झांड्रिया येथील वैद्यकपीठांनीं अनेक महत्त्वाचे व उपयुक्त शोध लावून मानवी ज्ञानांत भर घातली. वाङ्मयपीठांनीं व्याकरणशास्त्र उदयास आणलें, व ही वाङ्मयविषयक व कलाविषयक आवड उच्च दर्जास नेऊन पोहोंचविली. पूर्वयुग कल्पकतेचें व स्फूर्तीचें होतें, तर नवीन युग विद्वत्तेचें व चिकित्सेचें होतें. पूर्वीचे "प्रसिद्ध" ग्रंथ बारकाईनें अभ्यासले जाऊन त्यांची चिकित्सा होऊं लागली. लोकांनीं निरनिराळ्या देशांत राहून अध्ययन करण्यास सुरुवात केली. पुस्तकांची संख्या भराभर वाढूं लागली. ग्रंथालयें जिकडे तिकडे स्थापन झालीं. राजे लोकांनीं मोठमोठीं ग्रंथालयें स्थापलीं. ख्रि. पू. ४७च्या सुमारास अलेक्झांड्रियाचें ग्रंथालय जळालें तेव्हां तेथें ७,००,००० ग्रंथसमूह होता. फार तर काय, अगदीं लहान लहान शहरांत देखील ग्रंथालय अस्तित्वांत आलें होतें.

पण रोमन साम्राज्याखालीं ग्रीक संस्कृतीचा ऱ्हास होऊं लागतांच भौतिक सुधारणाहि होईनाशी झाली; व मध्यंतरीं जरी वाङ्मयाचें पुनरुज्जीवन झालें होतें तरी तें केवळ अनुकरणात्मक व कृत्रिम होतें.

**पारमार्थिक कल्पना व तत्त्वज्ञान.**—निरनिराळ्या ग्रीक जातींचें एकीकरण झाल्यामुळें, निरनिराळ्या देशांतील लोकांशीं ग्रीक लोकांचा संकर झाल्यामुळें व ग्रीकेतर सुधारलेल्या व रानटी जातींचा संपर्क घडल्यामुळें पूर्वीच्या पारमार्थिक समजुतींत साहजिकच फेरफार घडून आला, व नवीन प्रकारच्या आचारनियमांची जरूरी भासूं लागून स्टोइक

तत्त्वज्ञान अस्तित्वांत आलें. त्यांतील नीतीच्या कल्पना व तसेंच सामान्य ज्ञान व इतर तत्त्वज्ञानी यांनां सारखींच पसंत पडूं लागलीं; व समाजांतील चालीरीतींवर कोरडे ओढणारे स्टोइक किंवा सिनिक तत्त्वज्ञानी जिकडे तिकडे दृष्टीस पडूं लागले.

या नव्या शहरांमध्यें प्राचीन देवतांच्या यज्ञांत व महोत्सवांत भाग घेणारे जरी बरेच लोक होते, तरी इतर धर्मांतील देवतांकडे त्यांचें नाविन्यामुळें लक्ष वेधलें, व ते त्या देवतांचेहि महोत्सव करूं लागले. सिरेपिस व आयसिस, ओसायरिस व अनुबिस यांचीहि गणना ग्रीक देवतांत होऊं लागली. ख्रि. पू. दुसऱ्या शतकाच्या अखेरीस सिरेपिसचीं देवळें अथेन्स, ऱ्होड्स, डीलॉस इत्यादि ठिकाणीं बांधण्यांत आलीं. रोमन साम्राज्याच्या काळीं आयासिस देवतेला विशेष महत्त्व आलें. ख्रि. पू. तिसऱ्या शतकामध्यें अशोकानें अपले भिक्षु संप्रदायप्रसाराकरितां देशोदेशीं पाठवले होते. त्यांनां जरी येथें आपल्या कार्यांत विशेष यश आलें नाहीं, तरी पौरस्त्य संप्रदायांचा ग्रीक लोकांवर बराच परिणाम झाला यांत शंका नाहीं.

ख्रिस्ताच्या वेळीं यहुदी लोकांनीं आपला संप्रदाय निरनिराळ्या दिशेनें पसरविण्यास सुरुवात केली. पुष्कळ लोकांनीं त्यांचा संप्रदाय स्वीकारला व पुष्कळ लोक एकेश्वरवादी बनले. याशिवाय, अंटाईल शहराच्या देवळांनांहि पुष्कळसे भक्त मिळाले.

**ख्रिस्ती संप्रदाय.**—पूर्वेकडून ज्या पारमार्थिक विचारांनीं अगर पंथांनीं या ग्रीक जगावर आपला पगडा बसवला होता त्यांमध्यें सरतेशेवटीं एकाच पंथाचा विजय झाला. हा पंथ म्हणजे ख्रिस्ती पंथ होय. ग्रीक संस्कृतीचा व ख्रिस्ती पंथाचा संबंध जडल्यावर त्यांचे परस्परांचे परस्परांवर परिणाम घडून आले. प्रथमतः ख्रिस्ती पंथामध्यें ग्रीक संस्कृतीचा मागमूस देखील नव्हता. पण पुढें एकमेकांचा संबंध जडल्यावर ग्रीक संस्कृतीची छटा या पंथामध्यें दिसूं लागली. उदाहरणार्थ सेंट पॉलच्या लिहिण्यांत निसर्गाच्या शिकवणुकीबद्दल जें कांहीं आलें आहे, तें सर्व ग्रीक विचारजन्य आहे. हे ख्रिस्ती लोक ग्रीक भाषा बोलत असल्यानें व ग्रीक राहणींत वाढले असल्यानें त्यांच्या कल्पनांचा त्यांच्या पंथावर परिणाम होणें केवळ अपरिहार्य होतें. तथापि आरंभीं आरंभीं या नवीन पंथांत लोकमत पुष्कळसें ग्रीक संस्कृतीविरुद्धच होतें. अलेक्झांड्रियांतील ख्रिस्ती पंथानें ग्रीक ज्ञान व ख्रिस्ती पंथ यांचा टिकाऊ समेट घडवून आणला. जसजसा ख्रिस्ती पंथ परमेश्वराविषयीं अधिकाधिक खोल विचार करूं लागला तसतशी त्याला तत्त्वज्ञानांतील परिभाषेसाठीं ग्रीक तत्त्वज्ञानाची मदत घ्यावी लागली. तसेंच ख्रिस्ती नीतिशास्त्रामध्यें ग्रीकांच्या स्टोइक पंथाचाहि विचार होऊं लागला. या दृष्टीनें पाहतां आपणांस ख्रिस्तीसंप्रदाय हा एक प्रकारें ग्रीकसंस्कृतीचा प्रसारक झाला असें दिसून येईल.

**ग्रीकेतर लोकांवर ग्रीक संस्कृतीचा परिणाम.**—ग्रीक संस्कृतीनें अलेक्झांडरच्या विजयामुळें भूमध्यसमुद्रापासून हिंदुस्थानापर्यंतचा टापू आपल्या ताब्यांत आणला; व व्यापार व दळणवळणविषयक सर्व गोष्टी आपल्या हस्तगत करून घेतल्या. यामुळें ग्रीक संस्कृतीचा त्या देशावर व त्याचप्रमाणें रोमन अंमलाखालीं आलेल्या पश्चिमेंतील देशांवर काय परिणाम झाला हें आपण पाहूं.

**हिंदुस्थान.**—अलेक्झांडरनें हिंदुस्थानामध्यें अनेक शहरें वसविलीं. कॉकेशस पर्वतापाशीं अलेक्झांड्रिया नांवाचें शहर, काबूल खोऱ्यांत नायसीआ नांवाचें शहर, झेलम नदीच्या कांठीं दुसरें नायसीआ नांवाचें शहर त्याच्याच समोर बूकेफल शहर व चिनाबच्या कांठीं एक शहर वसविलें; आणि सिंधूपासून समुद्रापर्यंत पुष्कळ किल्ले बांधले. ख्रि. पू. ३२१ नंतर सिंधूपलीकडील सर्व मॅसिडोनियन सत्ता मौर्य राजांनीं नष्ट करून टाकली, व ख्रि. पू. ३०३ सालीं सिंधूच्या पश्चिमेकडील मोठमोठे जिल्हे देखील सिल्यूकसनें सोडून दिले. तथापि ग्रीक सत्ता अजीबात नष्ट झाली नाहीं. मौर्य घराण्याचा नाश १८० सालीं झाला, व याच वेळीं बॅक्ट्रियाच्या ग्रीक राजांनीं हिंदुकुश पर्वताच्या पलीकडे स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. ख्रि. पू. दुसऱ्या शतकांत मिनँडरनें हिंदुकुश पर्वतापासून गंगानदीपर्यंतचा सर्व टापू जिंकला. यानंतर मध्यआशियामधील शक आणि युएचि लोकांनीं बॅक्ट्रियाचें राज्य काबीज करून हिंदुस्थानांतील ग्रीक सत्तेचेंहि हळू हळू उच्चाटन केलें. ख्रि. पू. ३०या सालीं शेवटचा ग्रीक राजा हर्मीअस याचा पाडाव झाला. याच वेळीं पश्चिमेकडील यूरोपीय ग्रीक व रोमन प्रदेश हे रोमन साम्राज्यांत अंतर्धान पावले. ग्रीक सत्तेचें हिंदुस्थानांतून उच्चाटन झालें तरी हिंदुस्थानाशीं ग्रीक लोकांचा व्यापार बंद पडला नाहीं. अशा रीतीचे फेरफार घडून येत असतांना अलेक्झांडरनें वसविलेल्या शहरांतील ग्रीक लोकांनीं आपलें काय वैशिष्ट्य राखलें, ग्रीक संस्कृतीचा हिंदू लोकांवर काय परिणाम झाला, इत्यादि प्रश्न साहजिकच उद्भवतात व त्यांनां उत्तर देणें फार अवघड काम आहे. यावर स्पष्ट लिहिण्यास महत्त्वाचीं प्रमाणें अद्यापि उपलब्ध नाहींत. याकरितां काबूलच्या आसपास संशोधन जितकें होईल तितकें पाहिजे आहे.

**ग्रीक कला.**—कांहीं विद्वानांच्या मतें ग्रीक संस्कृतीचा हिंदुस्थानावर फार परिणाम झाला. पण फिलॉस्ट्राटसनें लिहिलेल्या ॲपॉलोनिअसच्या चरित्रामध्यें जें ब्राह्मणांचें वर्णन आलें आहे, त्यावरून ग्रीक संस्कृतीचा या ब्राह्मणांवर फारसा परिणाम झाल्याचें दिसून येत नाहीं. कांहीं लोक असें प्रतिपादन करतात कीं, ग्रीक अगर शक लोकांच्या नाण्यांच्या कल्पनेशिवाय हिंदुस्थानानें परकीयांच्या कोणत्याहि अंशाचा अंगीकार केला नाहीं. केवळ नाण्यांवरूनच ग्रीक भाषेचें त्या वेळेस किती महत्त्व होतें हें नक्की ठरविणें कठिण आहे; तथापि ग्रीक दरबाराबाहेर ग्रीक भाषा फारशी प्रचलित नव्हती तरी, ग्रीक सत्तेचा नायनाट झाल्यानंतर दोन शतकेंपर्यंत हिंदुस्थानांतील नाण्यांवर ग्रीक अक्षरें दृष्टीस पडतात. त्या अर्थी, त्या भाषेला महत्त्व आलें होतें यांत शंका नाहीं.

ग्रीक लोक त्या वेळीं हिंदुस्थानांत आपला दृढ पाया रोवण्याच्या खटपटींत गुंतले असल्यामुळें ग्रीक विचारांचा, वाङ्मयाचा व कलांचा प्रसार करण्यास त्यांनां अवसरच मिळाला नाहीं; व मिनँडरच्या वेळच्या एका हिंदू ग्रंथांत नंतर ग्रीक लोकांनां दुष्ट यवन म्हटलेलें आढळतें. अशा परप्रांतांत ग्रीक लोकांनां आपली छाप कशी बसवितां येणार, अगर आपलें वैशिष्ट्य कायम कसें राखतां येणार? क्सर्क्सीझनें वसविलेल्या ग्रीक ब्रँकिडी लोकांचें वंशज सहा पिढ्यांच्या आंत दोन भाषा बोलूं लागले, याच्या आधारावर टॉर्ननें मोठमोठीं अनुमानें काढलेलीं आहेत. पण अलेक्झांडरच्या पूर्वीच्या ग्रीक लोकांबद्दल अशी ख्याति नव्हती, म्हणून या अनुमानांवर थोडा फार जपूनच विश्वास ठेवावा लागतो. हिंदुस्थानांतील ग्रीक लोकांनीं जर खरोखर कांहीं तरी राजकीय चळवळ केली असती तर कलाकौशल्याच्या बाबतींत अगर शिलालेखांत त्याचा कांहीं तरी दाखला पहावयास मिळाला असता. कदाचित् हल्लींचे ग्रीक लोक जसे व्यापारामुळें निरनिराळ्या प्रदेशांत पांगले जाऊन त्या त्या देशाच्या परिस्थितीप्रमाणें फरक पावतात, तशीच जुन्या ग्रीक लोकांचीहि स्थिति असेल. हिंदुस्थानानें ग्रीक लोकांपासून काय घेतलें याविषयीं पुष्कळ मतभेद आहे. हिंदूंनीं ग्रीक नाटकांपासून आपली नाटकाची कल्पना घेतली असें पुष्कळ म्हणतात; पण तें नीट सिद्ध झालेलें नाहीं. ग्रीक लोकांपासून हिंदुस्थानानें ज्योतिःशास्त्र घेतलें हें त्यांनीं स्वीकारलेल्या ग्रीक नांवांवरून दिसून येतें. पण सर्वांत अधिक हिंदूंनीं ग्रीकांपासून कलाकौशल्य घेतलें. या दोहोंविषयीं आणि वाङ्मयविषयक चौर्याविषयीं भिन्न मतें पहिल्या विभागांत दिलीं आहेत. आशियांत पूर्वेकडे जी बुद्धकला गेली तिचा उगम वायव्य हिंदुस्थानांत झालेला होता. त्या ठिकाणीं संशोधनाअंतीं ज्या शिल्पकलेचे व कोरीव कामाचे अगर मंदिरांचे अवशेष सांपडले, त्यांवरून ही कला बौद्धांनीं मूळ ग्रीक लोकांपासून घेतली असें उघड दिसतें. पूर्वेकडे ही कला किती दूरवर गेली हें आथीनाच्या व इरॉसच्या मुद्रांसारख्या मुद्रा खोतानच्या गडप झालेल्या शहरांतून डॉ. स्टीननें उकरून काढल्या आहेत यावरून दिसून येईल. तसेंच जपानांतील अत्यंत जुन्या देवळांमध्यें जीं चित्रें आहेत त्यांत ग्रीक व बौद्ध तत्त्वांचें मिश्रण दिसून येतें असें जें हॅवेलनें प्रतिपादन केलें आहे त्यावरूनहि वरील म्हणण्याला बळकटी येते.

**इराण आणि बाबिलोनिया.**—अलेक्झांडरला व त्याच्या नंतरच्या राजांनां आपली नगरस्थापनेची कल्पना तडीस नेण्याला इराण हें चांगलेंच क्षेत्र मिळालें. त्यापूर्वी इराणामध्यें तटबंदीचीं शहरें क्वचितच होतीं. पण अलेक्झांडरनें व त्याच्या नंतरच्या राजांनीं व्यापाराच्या दृष्टीनें फायदेशीर व तटबंदीचीं अशीं पुष्कळ शहरें वसविलीं. पोलिबिअस म्हणतो कीं, मीडियाचा रानटी लोकांच्या स्वाऱ्यांपासून बचाव या ग्रीक शहरांमुळें झाला. हेराक्लिआ आणि युरोपस हीं शहरें तेहरानच्या जवळ होतीं. पूर्व इराणमध्यें हल्लीं जीं महत्त्वाचीं शहरें आहेत त्या सर्वांनां पूर्वी ग्रीक नांवें असून त्यांपैकीं प्रत्येकाचा मूळ वसविणारा अलेक्झांडर अगर कोणी ग्रीक राजा होता असें मानण्यांत येतें. खोजेंद, हिरात, व कंदाहार या सर्वांनां पूर्वी अलेक्झांड्रिया हेंच नांव होतें. मर्व्हला पूर्वी अलेक्झांड्रिया व नंतर ॲंटिऑक असें नांव होतें. सायरिंकासारख्या रानटी लोकांच्या शहरांत सुद्धां खि. पू. २०९ मध्यें पुष्कळ ग्रीक व्यापारी होते. ग्रीक ऐतिहासिक वाङ्मयाचा नाश झाल्यामुळें आणि इराणमध्यें सांपडलेला असा पुराणवस्तुसंशोधनविषयक पुरावाहि नसल्यामुळें या शहरांतील ग्रीक लोकांच्या आयुष्यक्रमाविषयीं केवळ अनुमान करीत बसण्याशिवाय गत्यंतर नाहीं. नुकताच सांपडलेला असा महत्त्वाचा पुरावा म्हणजे पर्सिसमधील ॲंटिऑकचा हुकूमनामा होय (खि. पू. २०६). त्यावरून बौली, एक्लेशिआ, प्रैटॅनीस वगैरे शासनसंस्था तेथें चांगल्या प्रचारांत होत्या, व अधिकाऱ्यांच्या वार्षिक निवडणुकी वगैरे सर्व प्रकार तेथें अस्तित्वांत होते असें आढळतें. पण ग्रीक संस्कृतीच्या विस्तारांत विस्ताराच्या क्षेत्रापेक्षां महत्त्वाची गोष्ट म्हणजे, ग्रीक संस्कृतीच्या लोकांचा एवढा मोठा विस्तार होता तरी त्यांच्या संस्कृतीमधील ऐक्यांत मुळींच फरक पडला नाहीं ही होय. पहिल्या ॲंटायोकसच्या बोलावण्यावरून मॅग्नीझिआ-ऑन-मिॲंडरहून जे वसाहतवाले आले होते ते एकग्रीकत्वाचे मोठे भोक्ते होते; आणि यामुळें निरनिराळ्या ग्रीक नगरांचें परस्परांशीं राजकीय बाबतींत व अन्य बाबतींतहि दळणवळण चालू होतें. विशेषतः स्थानिक धार्मिक महोत्सवांमुळें त्यांच्यामध्यें ऐक्य राहण्यास बरीच मदत झाली होती. पर्सिसमधलि ॲंटिऑकमधून ग्रीसमधलि मोठ्या शर्यतींनां खेळाडू पूर्वीपासूनच पाठविले जात असत. पण मॅग्नीझिआमध्यें आर्टेमिसप्रीत्यर्थ नवीन सुरू झालेल्या शर्यतींनांहि खेळाडू पाठविण्याचा ठराव या हुकूमनाम्याच्या द्वारें झाला आहे. यांत दाखविलेल्या सिल्यूकिडी राजांविषयींच्या स्वामिनिष्ठेवरून देखील ही एकग्रीकत्वाची कल्पना व्यक्त होते. अशाच प्रकारचे हुकूमनामे जेथें निघाले होते अशा बाबिलोनियामधील इतर ग्रीक शहरांची यादीहि यांत दिली आहे.

**ग्रीक राज्यें.**—खि. पू. तिसऱ्या शतकाच्या मध्यकाळांत सिल्यूकिडी साम्राज्यांतून बॅक्ट्रिया व सॉग्डिएना हीं राज्यें फुटलीं. पुढें एक शतकानंतर मध्यआशियामधलि शक व युएचि हे भटके लोक जिंकून घेईपर्यंत या प्रदेशांवर स्वतंत्र ग्रीक राजे राज्य करीत होते. अलेक्झांडरनें या प्रदेशामध्यें बऱ्याच ग्रीक लोकांची वसाहत करविली होती. त्यांनीं खि. पू. ३२५, आणि पुन्हां ३२३ सालीं स्वदेशीं जाण्याचा प्रयत्न केला, पण तो हाणून पाडण्यांत आला. यामुळें मॅसिडोनियन लोकांविषयीं त्यांच्यामध्यें जातिमत्सर उत्पन्न होऊन त्यांनीं खि. पू. २५० मध्यें मॅसिडोनियाविरुद्ध बंड केलें.

या ग्रीक राजघराण्यांचा इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं; आणि बॅक्ट्रियामध्यें मॅसिडोनियन व ग्रीक सत्तेच्या अमलासें १८० वर्षांच्या अवधींत ग्रीकसंस्कृति किती पसरली याचें अनुमान केवळ अपुऱ्या प्रमाणांवरूनच करावें लागतें. टार्ननें एतद्विषयक उपलब्ध असलेल्या सर्व साधनांचा विचार केला आहे,पण त्यासहि जोराची ग्रीक संस्कृति येथें प्रचलित होती असें दाखविणारा बळकट पुरावा मिळत नाहीं, अशा नास्तिपक्षी सिद्धान्ताशिवाय जास्त कांहीं सांगतां येत नाहीं. त्याच्या मतें ग्रीक राज्यें मुख्यतः स्थानिक इराणी पद्धतीवर चालत असावींत. पण उलट पक्षीं ग्रीक नाण्यांचा पुरावा पुढें मांडला जातो; व कलेच्या एका शाखेंतील उत्कर्षावरून दुसऱ्या शाखांचाहि उत्कर्ष आपणांस अनुमानतां येतो असें कांहींचें म्हणणें आहे. तथापि एकंदरींत या सरहद्दीवरील प्रांतांमध्यें इराणी वर्चस्वच प्रामुख्यानें दिसून येतें.

दुसऱ्या शतकांत पश्चिम इराण हें सिल्यूकिडी साम्राज्यांतून निघून पार्थियन राज्यामध्यें अंतर्भूत झालें; किंवा तद्देशीयांचीं लहान लहान संस्थानें बनलीं. ख्रि. पू. १३० सालीं पार्थियन लोकांनीं बाबिलोनिया व ख्रि.पू.८८सालीं मेसापोटेमिया जिंकला. पण यापुढें रोमन लोकांच्या आगमनामुळें पौरस्त्य राजांच्या या मुलूख पादाक्रांत करण्याच्या क्रियेस आळा बसला. ७व्या शतकांत मुसुलमान जिंकून घेईपर्यंत आशियामायनर व सिरिया हे रोमन साम्राज्याचे घटक म्हणून राहिले. पण यानंतर मुसुलमानी सत्तेनें या ग्रीक राज्यांनां नवें स्वरूप दिलें. पार्थियन राज्याच्या पूर्वी २०० वर्षें तरी सूशिएना, मेसापोटेमिया व बाबिलोनिया येथें नगरराज्यांच्या रूपांत ग्रीक संस्कृति प्रस्थापित झालेली होती. या सर्वांत मोठें असें सिल्यूशिआचें राज्य तैग्रिस नदीवर जवळ जवळ अर्वाचीन बगदादच्याच जागेवर होतें. बाबिलोनियांतील व्यापाराचें केंद्र या नात्यानें प्रत्यक्ष बाबिलोनला देखील या राज्यानें मागें टाकलें होतें. प्लिनीच्या मतें या राज्यांतील लोकवस्ती ६,००,००० होती. याशिवायहि अनेक ग्रीक शहरें वसलेलीं होतीं,पण त्यांची यादी येथें देणें अशक्य आहे. पूर्वीच्या खेडवळ रहाणींत या नव्या लोकांच्या वस्तीमुळें मेसापोटेमियांत केवढा फरक घडून आला याबद्दल प्लिनीनें फार महत्त्वाचें व मार्मिक विवेचन केलेलें आहे.

**ग्रीक—इराणी संस्कृति.**—आशियाच्या भूमीवर निर्माण झालेले जे पंडित ग्रीक वाङ्मयांत व तत्त्वज्ञानांत चमकून गेले त्यांचाहि उल्लेख येथें केला पाहिजे. प्रसिद्ध तत्त्वज्ञ डायोजिनीझ ( ख्रि. पू. १५६ त पीठाचा अध्यापक ) हा सिल्यूशिआचा रहिवाशी होता. सिल्यूकस हा प्रसिद्ध,गणिती व ज्योतिषी ( ख्रि. पू. २६१ पूर्वी ) बाबिलोनचा रहिवाशी होता. ग्रीक भाषेंत बाबिलोनियाचा इतिहास लिहिणारा बिरोसस हा ग्रीक बनलेला तद्देशीय रहिवाशी होता. पार्थियन इतिहासाच्या बाबतींत स्ट्रेबोनें प्रमाण मानलेला आपॉलोडोरस हा असुरियामधील आर्टिमायटा नांवाच्या ग्रीक गांवचा होता. पार्थियन लोकांनीं सिल्यूकिडी साम्राज्यापासून त्यांचे प्रांत हिसकावून घेतले तरी तदंतर्गत ग्रीक शहरांचें अस्तित्व नष्ट झालें नाहीं. ख्रि. पू. १४० व १३० मध्यें इराणांतील या ग्रीक वसाहती स्वारी करून येणाऱ्या एका सिल्यूकिडी राजाला मदत करावयास तयार झाल्या होत्या. त्याचप्रमाणें मेसापोटेमियामध्यें जीं ग्रीक शहरें होतीं त्यांनीं क्रॅसस याचें स्वागत केलें. इ. स. ३६ त सिल्यूशिआनें आपला संस्थापक जो सिल्यूकस त्याची स्मृति कायम ठेविली होती, व तें रानटी लोकांच्या वर्चस्वापासून अलिप्त राहण्यास समर्थ होतें असें टॅसिटसनें म्हटलें आहे. पार्थियन लोकांनां ग्रीक लोकांचें महत्त्व किती वाटत होतें हें पार्थियाचे राजे स्वतःला ग्रीक संस्कृतीचे अभिमानी म्हणवीत असत यावरून दिसून येईल. आर्टाबेनसच्या कारकीर्दीपासून (ख्रि. पू. १२७—१२३ ) नाण्यांवर 'ग्रीकसंस्कृतीचे अभिमानी' असा छाप पार्थियन राजे लावून घेऊं लागले. यानंतर ग्रीक शहराचें सगुण स्वरूप जी 'टायकीची आकृति' तिचा त्यांच्या नाण्यांवर छाप आला. ग्रीक व्यापारी या राज्यांत फार असल्या कारणानें त्यांच्यासाठीं म्हणून मुद्दाम हे पार्थियन राजे नाण्यांवर ही ग्रीक आकृति उपयोगांत आणीत असावेत हेंहि संभवतें. आज अफगाणिस्तानांत ज्याप्रमाणें व्यापारी वर्ग बहुतेक अफगाणेतर लोकांचा आहे,तद्वतच त्या वेळची स्थिति होती. ग्रीक नाटकवाले राजासमोर नाटक करीत असतां तेथें राजासमोर क्रॅससचें डोकें आणल्याची जी गोष्ट आहे तिजवरून पार्थियन राजे हे ग्रीक संस्कृतीचे केवढे भोक्ते होते हें दिसून येतें. एवढ्यावरूनच केवळ असें अनुमान काढणें थोडेसें धाडसाचें होईल हें. खरें, पण त्यांच्यावर ग्रीक संस्कृतीची छाप बसलेली होती ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाहीं. आर्मीनियाचा राजा आर्टाव्हॅसडीझ (ख्रि. पू.५४?–३४) यानें ग्रीक इतिहास व शोकपर्यवसायी नाटकें लिहिलीं. त्या वेळचे पुष्कळसे पार्थियन राजे ग्रीक राण्यांच्या पोटीं जन्मलेले होते. फ्राएटीझच्या ( ख्रि. पू.३-२–इ.स.४ ) नाण्यावर ज्या म्यूसा नामक राजमातेचा मुखवटा आहे ती इटालियन गुलामाची मुलगी होती. पुष्कळ पार्थियन राजे रोमन साम्राज्यांत ओलीस अगर आश्रयास म्हणून राहिले होते. तरी पण एकंदर जनसमाजाची वृत्ति या ग्रीक चालीरीतींच्या अंगीकारास फारशी अनुकूल नव्हती, हें मात्र कोणासहि सहज दिसून येतें.

पाश्चात्य वाङ्मयांतून जे त्रोटक उल्लेख सांपडतात, त्यांवरून ग्रीक संस्कृतीचा प्रसार इराणामध्यें किती झाला होता हें नीटसें कळत नाहीं.यासाठीं अवेस्ता व पह्लवी ग्रंथाकडे वळलें पाहिजे. येथेंहि दुर्दैवानें काल निश्चित करतां येत नसल्यानें फार अडचण भासते. आणि जरी काल निश्चित झाला तरी कल्पनासादृश्यावरूनच केवळ अनुमानें काढावीं लागतात. हल्लींच्या अवेस्ता ग्रंथावर ग्रीक तत्त्वज्ञानाचा पगडा

बसला आहे असें डार्मेस्टेटरनें आपलें मत दिलें आहे; पण डॉ. मिल्सनें ही गोष्ट नाकारली आहे. कलाविषयक अवशेषां-संबंधीं पाहतां येथेंहि उपलब्ध ऐतिहासिक साधनांचा पुरावा संशयग्रस्त आढळतो. रत्नासारख्या लहान वस्तूंच्या उत्पत्तीचें ठिकाण त्या जेथें सांपडल्या तेथून फार दूरवर देखील असूं शकतें. वास्तुकलाविषयक अवशेष हे जेथल्या तेथें सांपडतात; पण सुसामधील इमारतींबद्दलचा काळ ठरवितांना ड्यूलेफॉय व मॉर्गन या विद्वानांमध्यें ५ शतकांइतका मतभेद होतो. तथापि एवढें मात्र खरें कीं, इराण आणि बाबिलोनिया देशांत अलेक्झांडरच्या नंतरच्या काळांतील ग्रीक धर्तीवरचे असे पुष्कळ कलाकौशल्याचे पदार्थ सांपडतात, व अशा रीतीच्या जिनसांची आवश्यकता ज्या अर्थी भासली त्या अर्थी या ग्रीक संस्कृतीचा परिणाम निदान श्रीमंत व सुखवस्तु वर्गावर तरी खास झाला असला पाहिजे असें अनुमान काढणें गैर होणार नाहीं.

**सस्सन साम्राज्य.**—सस्सन राजांच्या अमदानींत ग्रीक संस्कृतीचा कांहीं अवशेष शिल्लक राहिला असला, तर उपलब्ध ऐतिहासिक साधनांवरून तरी तो दिसत नाहीं. सस्सन राजे आपल्या राष्ट्रसंस्कृतीच्या रक्षणार्थ फार झटत होते; व डॅर्मेस्टेटरनें म्हटल्याप्रमाणें झरथुष्ट्र पंथांत ग्रीक छटा दिसत असती तर सस्सन राज्यामध्यें ग्रीक संस्कृतीचा परिणाम दिसून आल्याशिवाय राहिला नसता. पण वस्तुस्थिति तशी दिसत नाहीं. दरबारामध्यें कदाचित् ग्रीक संस्कृतीच्या कांहीं अंगांचा मर्यादित प्रवेश झाला असेल. खुशरूला ग्रीक तत्त्वज्ञानाची आवड असून त्यानें ग्रीक अध्यापक आपल्या राज्यांत आणलेहि होते. तसेंच टेसिफॉन येथील आपला राजवाडा त्यानें ग्रीकांकडूनच बांधविला असें एक ग्रंथकार म्हणतो. पण खुशरूच्या एकंदर वागणुकीवरून इराणमधील ग्रीक संस्कृति ऱ्हास पावलेली होती, आणि जरूर लागल्यास ग्रीक विद्वानांनां व कारागिरांनां सरहद्दीपलीकडच्या प्रदेशांतून आणावें लागत होतें असें दिसतें.

**सेनापति—राजांचीं ग्रीक शहरेः आशिया मायनर.**—पण आशियामायनरचे जे भाग रोमन-साम्राज्याखालीं आलेले होते त्या ठिकाणची ग्रीक संस्कृतीची स्थिति अगदीं निराळी होती. आशियामायनरमध्यें ग्रीक संस्कृतीचा प्रसार तद्देशीय रहिवाश्यांत व रोमन सरदारांत अलेक्झांडरच्याहि पूर्वीपासून होऊं लागला होता. अलेक्झांडरच्या कारकीर्दींत या बाबतींत विशेष प्रगति दिसून येत नाहीं, व येथें त्यानें शहरेंहि वसविलेलीं आढळत नाहींत. अलेक्झांडरच्या नंतरच्या राजांनीं मात्र पुष्कळ शहरें बांधलीं व वसाहती वसविल्या. अँटिगोनसनें फ्रिजिआमधील सिलीनि ही आपली राजधानी केली. नायसीआ व अलेक्झांड्रिया-ट्रोॲस या शहरांचा प्रत्येकास अँटिगोनाया हें नांव देऊन त्यानेंच प्रथम पाया घातला; लायसिमाकसनें (ख्रि. पू. ३०१—२८१) मागाहून त्यांना दुसरीं नांवें दिलीं. सिल्यूकिडींनीं स्थापन केलेलीं अनेक शहरें आहेत. सिल्यूकिडी राजांची या प्रांताची राजधानी सार्डिस ही असून, ख्रि. पू. तिसऱ्या शतकाच्या अखेरीस सार्डिस हें पूर्णपणें ग्रीक शहर बनलें होतें. याशिवाय इजिअन किनारा व पूर्व यांमधील हमरस्त्यावर पुष्कळ नवीन शहरें वसविलीं गेलीं होतीं. 'सिलिशिअन गेट्स'च्या पश्चिमेला लेऑडिसीआ कॅटॉसिकॉमिनि, अॅपामीआ, फ्रिजिआची राजधानी, लायकसवरील लेऑडिसीआ, अँटिऑक-ऑन-मिॲंडर, अँटिऑक-नायसा, अँटिऑक-ट्रालीस हीं शहरें होतीं; या हमरस्त्याच्या दक्षिणेस पिसिडिआमधील अँटिऑक आणि केरिआमधील स्ट्रॅटोनायासिआ हीं शहरें होतीं. हमरस्त्याच्या उत्तरेकडील प्रदेशांतील सिल्यूकिडींची अतिशय प्रसिद्ध वसाहत म्हणजे थायाटायरा ही होती. दक्षिणेकडील समुद्रकिनाऱ्यावर बेरिनायसि, आर्सिनोइ व टॉलिमेइस हीं शहरें होतीं. पर्गामम येथील अॅटालिड घराण्याचा उदय झाल्यावर सिल्यूकिडी नगरांप्रमाणेंच अॅटालाया, फिलेटेरिआ, युमीनिआ व अॅपालोनिस हीं पर्गामिनींचीं शहरें अंतर्भागांत वसलीं गेलीं. तद्देशीय बिथिनिअन घराणें तिसऱ्या शतकामध्यें ग्रीक झालें, आणि नगरसंवर्धनाच्या कामीं प्रूशिअस (जुनें सायस), अॅपामीआ, कदाचित् प्रूसा व विशेषतः निकोमीडिआ यांनीं फारच मेहनत घेतली. अशा रीतीनें अंतर्भागांत नवीन ग्रीक शहरें उदयास येत होतीं तर पश्चिम किनाऱ्यावरील जुनी संस्कृति ग्रीक राजांच्या आश्रयाखालीं अधिकाधिक वृद्धिंगत पावत होती. लोकांची प्रवृत्ति या नवीन शहरांमध्यें जमाव करून रहाण्याकडे होऊं लागल्यामुळें लेबिडस, मायस किंवा कॉलोफॉन यांसारखीं लहान शहरें लवकरच नामशेष होत चाललीं. आणि एफिससचें वैभव व संपत्ति वाढत जाऊन स्मर्ना हें चार शतकांनंतर पुन्हां भरभराटीस आलें. ऱ्होड्स हें अलेक्झांडरनंतरच्या काळांत पूर्वेकडील व्यापारांत संपत्ति मिळवून वैभवास चढलें.

ख्रि. पू. २७८-२७७ सालीं केल्ट लोकांच्या स्वाऱ्यांस सुरुवात झाल्यामुळें अंतर्भागांत ग्रीक संस्कृतीचा प्रसार होण्याची क्रिया बंद पडली. गालेशन लोकांनीं पठाराच्या उत्तरेकडील बराचसा प्रदेश व्यापला; इतकेंच नव्हे, तर ते एका ठिकाणीं स्वस्थ बसणारे लोक नसल्यामुळें अस्वस्थता उत्पन्न होऊन ग्रीक संस्कृतीच्या राज्यांच्या प्रगतीस अडथळा आला. म्हणून तिसऱ्या शतकाच्या उत्तरार्धांत पर्गामिनी राजांनीं जीं युद्धें करून या लोकांच्या प्रगतीस आळा घातला त्यांनां संस्कृतियुद्धाचें महत्त्व आहे.

**देश्य राजघराणीं.**—रोमन लोकांनीं सिल्यूकिडी लोकांचें उच्चाटन करण्यापूर्वींच बिथिनिअन घराणें व पॉंटस आणि कॅप्पाडोशिआमधील पर्शियन घराणीं हीं ग्रीकेतर छोटीं घराणीं ग्रीक बनलीं होतीं. बिथिनिआंत वरच्या वर्गांतील लोकांचे रीतरिवाज दरबारांतल्याप्रमाणेंच होतेसें दिसतें. पॉंटसचें घराणें पूर्वीपासूनच ग्रीकाभिमानी होतें. कॅप्पाडोशिआ येथें,

खि. पू. दुसऱ्या शतकाच्या पूर्वार्धांत सिल्यूकिडी राजकन्या पांचव्या एरिआरेथीझची राणी होऊन आल्यानंतर ग्रीक-संस्कृतीचा पगडा बसूं लागला. परंतु कॅप्पाडोशिआमधील ग्रीक संस्कृति राजाच्या किल्ल्यांच्या व कांहीं थोडक्या शहरांच्या धूलीकडे गेली नव्हती.

**रोमन अंमलाखालील ग्रीक संस्कृति.**—आशियामायनरमध्यें रोम हांत घालूं लागल्यावर प्रथमतः त्यानें गॉलची सत्ता नष्ट केली (खि. पू. १८९). खि. पू. १३३ मध्यें ॲटालिड राज्य रोमच्या हातीं आलें; व ॲनॉटोलिअन द्वीपकल्पामध्यें जवळ जवळ बारा शतकें त्यानें सत्ता गाजविली. रोमन अंमलाखालीं ग्रीक संस्कृति बरीच फैलावली. पश्चिमेकडील व दक्षिणेकडील समुद्रकांठचा प्रदेश अगोदरच ग्रीक झालेला होता. स्ट्रेबोच्या वेळीं लिडियामध्यें जुन्या भाषेचा गंधहि नव्हता. मॅसिडोनियन सत्तेच्या आरंभींच लिशिआमधील देशी भाषा नष्ट झाली होती. पण फ्रिजिआमध्यें मात्र ग्रीक शहरांव्यतिरिक्त ग्रीक संस्कृति फारशी पसरली नव्हती.ॲटालिड राजे देखील येथें विशेष कांहीं करूं शकले नाहींत;आणि रोमन लोकांच्या सत्तेखालींहि ग्रीक संस्कृतीचा प्रसार हळू हळू झाला. हेड्रिअनच्या कारकीर्दींत मात्र फ्रिजिअन पठारांतील नगरांत देवळें, नाटकगृहें, स्नानगृहें वगैरे भौतिक सुधारणा शिरल्या. फ्रिजिआमधील उत्तरेकडील व पूर्वेकडील खेड्यांमध्यें तिसऱ्या शतकाच्या मध्यांत ग्रीक संस्कृतीचा नुकताच कोठें शिरकाव होऊं लागला होता. चवथ्या शतकापर्यंत उभारलेल्या थडग्यांवर भंजकास दिलेला शाप जुन्या फ्रिजिअन भाषेंतच लिहिलेला आढळतो. सेंट पॉलच्या वेळचे लिस्ट्रामधील खालच्या दर्जाचे लोक लिकेओनिअन भाषा बोलत असत. फ्रिजिआचा जो भाग स्वाऱ्या करणाऱ्या केल्ट लोकांच्या वसाहती होऊन गालेशिआ झाला, त्या भागांत खिस्ती शकाच्या सुरुवातीस मोठमोठ्या शहरांत ग्रीक संस्कृतीचा प्रसार झाला होता; परंतु त्यांतील खेड्यापाड्यांत चवथ्या शतकापर्यंत केल्टिक भाषाच उपयोगांत होती. खिस्ती शकाच्या सुरुवातीपर्यंत कॅप्पाडोशिआमध्यें शहरेंच नव्हतीं, व चवथ्या शतकांत देखील तेथें ग्रीक संस्कृतीचा पूर्णपणें प्रसार झाला नव्हता. पण खिस्ती संप्रदायानें जुन्या ग्रीक संस्कृतीचा इतका अंश ग्रहण केला होता कीं, मागसलेल्या प्रदेशांत ग्रीक संस्कृतीचा प्रसार त्याच्या द्वाराच होऊं लागला." आशियामायनरमध्यें देश्य भाषांच्या ऐवजीं ग्रीक भाषा प्रचारांत येऊं लागल्या. फ्रिजिअन मात्र कांहीं भागांत तुर्कांच्या स्वाऱ्यापर्यंत टिकाव धरून राहिली होती. मेस्रॉप आणि सहक पंथांनीं ग्रीक वाङ्मयाचें भाषांतर केल्यानंतर ५ व्या शतकामध्यें आर्मीनियांत ग्रीक संस्कृतीचा जोरानें प्रसार होऊं लागला.

**सिरियाः सिल्यूकिडी साम्राज्य.**—सिरियामध्यें विशेषतः ग्रीक लोकांच्या नवीन वसाहती पुष्कळ झाल्या होत्या. या कामाला सुरुवात अलेक्झांडरनेंच केली होती. त्यानें अलेक्झांड्रिया-बाय-इसस (आधुनिक अलेक्झांड्रेट्टा), सामेरिआ, पेल्ला, (उत्तरकालीन ॲपामीआ), करी इत्यादि शहरें वसविलीं होतीं. ॲंटिगोनसनें ॲंटिगोनीया वसविलें. हें पुढें थोडक्याच वर्षांनीं ॲंटिऑकमध्यें अंतर्भूत झालें; व त्याच्या नंतर (खि. पू. ३०१) सिरियामध्यें ग्रीक शहरें वसविण्याचें काम लेबानॉनच्या उत्तरेला सिल्यूकसच्या घराण्यानें व त्याच्या दक्षिणेला टॉलेमीच्या घराण्यानें केलें. सिरियाच्या उत्तरेला चार शहरें सर्वांत पुढें आलीं. (१) ओरॉंटीझवरील ॲंटिऑक, सिल्यूकिडी राजधानी; (२) ओरॉंटीझच्या मुखाजवळ सिल्यूशिआ-इन-पायिरा; (३) ॲपामीआ (अर्वाचीन फेमिआ),ओरॉंटीझच्या मध्यावर राज्याचें लष्करी ठिकाण; आणि (४) सिरियन दारूच्या निर्गतीसंबंधांत महत्व पावलेलें "समुद्रकांठचें" ठिकाण लॅओडिसीआ. सीलिसिरियांत टॉलेमींनीं वसविल्यापैकीं टॉलिमेइस हें एकच समुद्रकांठचें ठिकाण वरच्या इतक्या महत्वाचें होतें. जॉर्डनच्या पूर्वेकडील ग्रीक शहरें देखील खि. पू. तिसऱ्या शतकामध्यें टॉलेमीच्या राज्यांत आलीं. तिसऱ्या ॲंटायोकसनें (खि. पू. २२३–१८७) सिलिशिआसहित सर्व सिरिया सिल्यूकिडी साम्राज्याखालीं आणला. चवथ्या ॲंटायोकसच्या कारकीर्दींत (खि. पू. १७५–१६४) सिरियामध्यें ग्रीकसंस्कृतीला नवीन चालना मिळाली. आपल्या वाडवडिलांचे रीतरिवाज सोडून सर्वांनीं एक प्रकारचे ठरलेले रीतरिवाज स्वीकारावे अशी त्यानें आपल्या प्रजेला आज्ञा केली होती असें म्हणतात. पण हें जरी अगदीं बरोबर नसलें तरी त्याचें एकंदरीत धोरण काय होतें हें यावरून उघड दिसतें. इतर गोष्टींवरूनहि हेंच दिसून येतें. या शहरांनीं आपआपल्या नांवाचीं नाणीं काढलेलीं आढळून येतात. पुष्कळ शहरांनीं आपलीं नांवें बदलून ॲंटिऑक, सिल्यूशिआ अगर एपिफानीआ अशीं नांवें ठेवून घेतलीं. खुद्द ॲंटिऑकमध्यें कायदेमंडळाची इमारत, लष्करासाठीं जागा इत्यादि नवीन ठिकाणें बांधण्यांत आलीं. सिल्यूकिडी घराण्याचा जसजसा ऱ्हास होत चालला तसतशीं हीं शहरें अधिकाधिक स्वतंत्र होऊं लागलीं; पण त्याबरोबरच मध्यवर्ती सत्तेकडून संरक्षण केलें जाण्याची आशाहि त्यांना राहिली नाहीं. यामुळें या शहरांवर रानटी लोकांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या.

**रोमन काल.**—खि. पू. ६४ सालीं पॉंपीनें ज्या वेळीं रोमन साम्राज्याला सिरिया जोडला त्या वेळेस सिरियांतील शहरांमध्यें सर्वस्वीं अंदाधुंदी असलेली त्याला आढळून आली. नॅबाटीअन आणि यहुदी लोकांनीं ग्रीकसंस्कृतीखालच्या मुलुखांत प्रवेश केला होता, व दक्षिणेकडे या यहुदी लोकांच्या स्वाऱ्यांमुळें अनेक शहरें उध्वस्त झालीं होतीं. रोमन लोकांनीं हीं शहरें पुन्हां बांधलीं व ग्रीकसंस्कृतीचें रक्षण केलें. ग्रीकांचा नागर आयुष्यक्रम, त्यांच्या राजकीय

संस्था, त्यांचे महोत्सव, त्यांच्या करमणुकी वगैरे आतां पुन्हां मोठ्या प्रमाणांवर अस्तित्वांत आलें. सिरियामधील ग्रीकसंस्कृतीचे बहुतेक अवशेष रोमन काळांतील आहेत. जी कांहीं स्थानिक राजघराणीं रोमनांनीं राहूं दिलीं होतीं तीं सर्व थोडींबहुत ग्रीकसंस्कृतीखालीं आलेलीं अशींच होतीं. हेरडचें घराणें अशांपैकींच एक होतें. मोठा हेरड (ख्रि. पू. ३७-३४) यानें यरुशलेम येथें ग्रीक संस्कृतिदर्शक चिन्ह असें एक नाटकगृह बांधलें, व त्याच्या घराण्यानें एकंदरींत नगरसंस्थापनेच्या संबंधीं बरेंच कार्य केलें. मोठ्या हेरडनें सिबॅस्टि ( पुरातन सामेरिआ ), सेसारीआ, अँटिपाट्रिस हीं शहरें स्थापिलीं. हेरड अँटिपस ( ख्रि. पू. ४-इ. स. ३९) यानें टायबीरिअस शहर स्थापलें. हॉरनच्या जंगली मुलुखांत वसाहत करून तो ग्रीकसंस्कृतीखालीं आणण्याचा प्रयत्न प्रथम हेरड घराण्यानेंच केला. सिरियामध्यें सुद्धां रोमन छत्राखालीं ग्रीक संस्कृतीचा नवीन दिशेनें प्रसार झाला. रोमन काळापूर्वी ज्याचें नांवहि ऐकूं येत नव्हतें असें पॅल्मायरा शहर हें याचें उत्तम उदाहरण आहे.

**सिरियांतील ग्रीक संस्कृति.**—या ग्रीक नगरांच्या जाळ्यामुळें आशियामायनरमध्यें ज्याप्रमाणें देश्य भाषांचा नाश झाला, त्याप्रमाणें सिरियामध्यें झाला नाहीं; व मेसापोटेमियामध्यें तर ग्रीक नगरांचा देश्य भाषांवर परिणाम याहूनहि थोडा झाला. येथें जुन्या संस्कृतीचेंच वर्चस्व कायम होतें, व करी ( हरान ) येथें तर ख्रिस्तीसंप्रदायाच्या स्थापनेनंतरहि तें तसेंच टिकलें. अँटिऑक येथील व सामान्यतः सर्वच शहरांतील खालच्या वर्गांतील लोक अरमइक भाषा बोलत असत, व खेडेगांवांत तर हीच भाषा सर्वत्र प्रचारांत होती. उलट पक्षीं, शहरांतील सुशिक्षित लोकांत मिसळणाऱ्या किंवा सरकारी नोकरींत शिरलेल्या तद्देशीय श्रीमंत लोकांवर मात्र भाषेच्या व चालीरीतींच्या बाबतींत ग्रीक संस्कृतीचा बराच परिणाम झाला होता. या ग्रीक संस्कृतीचा तेथील समाजव्यवस्थेवर किती परिणाम झाला होता हें सिरियाच्या शासनग्रंथावरून कळून येतें. ग्रीक वाङ्मयामध्यें ज्या सिरियन लोकांनीं ख्याति मिळविली त्यांमध्यें सामोसाटाच्या ल्यूशिअनसारखे देश्य रक्ताचे कांहीं इसमहि होते. उत्तरकालीन ग्रीक तत्त्वज्ञानाच्या विकासामध्यें व ख्रि. पू. पहिल्या शतकांतील काव्य वाङ्मयांत फिनीशियन शहरांतील देश्य लोकांनीं बराच भाग घेतलेला आढळून येतो. वाङ्मयाची व. समाजांतील उच्च वर्गाची भाषा या दृष्टीनें ग्रीक भाषेला महत्त्व प्राप्त झालें होतें. इडेसासारख्या ठिकाणीं जेथें देश्य घराणीं राज्य करीत होतीं तेथें कदाचित् अरमइक भाषेचा वाङ्मयाच्या कामीं उपयोग होत असावा. दुसऱ्या शतकामध्येंच येथें आपणांस सिरिअक भाषेचा उपयोग करणारें एक ख्रिस्ती उपासनामंदिर आढळून येतें, व ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रसाराबरोबर ग्रीक भाषा मागें पडून सिरिअक भाषा पुढें आली. हल्लीं जें सिरिअक वाङ्मय उपलब्ध आहे तें सर्व ख्रिस्ती आहे.

पण ग्रीक भाषेच्या जागीं सिरिअक आली म्हणून तेथें ग्रीक संस्कृतीचें उन्मूलन झालें असें मात्र नाहीं. ख्रिस्ती संप्रदायांत ग्रीकसंस्कृतीचा बराचसा अंश होता. 'नशिबावर' म्हणून दुसऱ्या शतकाच्या शेवटीं लिहिलेला सिरिअक भाषेंतील जो प्राचीनतम ग्रंथ उपलब्ध आहे तो ग्रीक धर्तीवरच लिहिलेला आहे. पुढील शतकांत ग्रीक ग्रंथांची विशेषतः शास्त्रीय व तात्त्विक विषयांवरील पुस्तकांचीं सिरिअक भाषेंत बरींच भाषांतरें झालीं.

**यहुद्यांचा ग्रीकसंस्कृतीशीं संबंध.**—मॅसिडोनियन सत्तेच्या पहिल्या दीड शतकांतील या दोहोंमधील संबंध स्पष्ट कळत नाहीं. अलेक्झांडरनें यरुशलेमला भेट दिली किंवा नवीन मॅसिडोनियन राज्यांत यहुद्यांनां कांहीं हक्क दिले, असें जें जोसीफसनें म्हटलें आहे तें खोटें आहे असें म्हणतात. कांहींच्या मतें त्या वेळच्या जुन्या करारांतील 'म्हणींचें पुस्तक' यासारख्या भागांत ग्रीक संस्कृतीचा परिणाम दिसून येतो; पण याहि बाबतींत कांहीं थोड्या विचारसाम्यावरून जन्यजनकत्वाचा संबंध स्पष्ट सिद्ध होत नाहीं. ग्रीकवर्चस्वाला अनुकूल अशी एक गोष्ट म्हणजे ख्रि. पू. तिसऱ्या शतकामध्यें ग्रीक भाषेंत झालेलें यहुदी कायद्याचें भषांतर ही होय. यावरून त्या वेळीं अलेक्झांड्रिया येथील यहुदी डायास्पोरा हा पॅलेस्टाइनची भाषा विसरून जाण्याइतका ग्रीक झाला होता असें दिग्दर्शित होतें. ख्रि. पू. दुसऱ्या शतकाच्या आरंभास सिरियांतील सर्व ठिकाणच्या सधन लोकांप्रमाणें यरुशलेम येथील भिक्षुकशाहीवरहि ग्रीक विचारांचा पगडा बसलेला होता. ही गोष्ट तत्कालीन पुराणमताभिमानी पक्षाच्या विरोधाच्या तीव्रतेवरून चांगली व्यक्त होते. फारिसी ( जुन्या भिक्षुकी आचरणाचे लोक ) आणि साडुसी ( ग्रीक संस्कृतीचे अभिमानी ) असे यहुद्यांतले उद्धारक, सुधारक पक्ष प्रसिद्धच आहेत.

चवथा अँटायोकस एपिफानीझ ( ख्रि. पू. १७६-१६५ ) याच्या कारकीर्दींत ग्रीकाभिमानी पक्षानें यरुशलेम हें ग्रीक शहर करण्याचा प्रयत्न केला; जिकडे तिकडे आखाडे दिसूं लागले व ग्रीक पोशाखाचा तरुण पिढींत प्रसार होऊं लागला. पण पुढें जेव्हां राजकीय हेतूनें अँटायोकस यरुशलेमच्या कारभारांत ढवळाढवळ करूं लागला तेव्हां तेथील पुराणमताभिमानी पक्षानें जोराचा विरोध केला, व त्याला सर्व राष्ट्राचा पाठिंबाहि मिळाला. हॅसमोनीअन घराण्याच्या नेतृत्वाखालीं बंड होऊन ख्रि. पू. १४३—१४२ सालीं लोकांनीं हॅसमोनीअन राजाच्या आधिपत्याखालीं स्वतंत्र यहुदी राज्य स्थापन केलें. जुन्या ग्रीकाभिमानी पक्षाची सत्ता नष्ट झाली खरी, पण हॅसमोनीअन राजे हे उदारमतवादी होते. मोझेहच्या कायद्याला जरी त्यांच्या राज्यांत मान मिळत असे,

तरी ग्रीक संस्कृतीनेंहि तेथें निरनिराळ्या स्वरूपांत प्रवेश केला होता. पहिला अॅरिस्टोब्यूलस (ख्रि. पू. १०४—१०३) हा हॅसमोनीअन राजा ग्रीकांनां ग्रीकाभिमानी वाटत होता. त्यास आणि त्याच्या नंतरच्या इतर राजांस ग्रीक आणि हिब्रू अशीं दोन्ही नांवें होतीं, आणि जेनीअस अलेक्झांडर (ख्रि.पू.१०३-७६) नंतर नाण्यांवरहि हिब्रूबरोबर ग्रीक लेख दिलेले आढळतात. हॅसमोनीअन घराण्यास काढून त्याची गादी बळकावणाऱ्या हेरडनें (ख्रि. पू. ३७-३४) जुडीआच्या बाहेर नवीन ग्रीक शहरें व देवळें बांधून व जुन्यांनां आश्रय देऊन ग्रीक संस्कृतीचा प्रसार केला. इतकेंच नव्हे तर दमास्कसच्या निकोलेअससारख्या ग्रीक विद्वानांनां त्यानें आपल्या दरबारीं आश्रयहि दिला. यरुशलेमच्या आसमंतांत त्यानें नाटकगृह व सार्वजनिक दिवाणखाना बांधला. सिरियामध्यें ग्रीक संस्कृतीचा प्रसार करण्यासाठीं हेरडच्या घराण्यानें कसे प्रयत्न केले हें वर दिलेंच आहे. या वेळीं ग्रीक शहरांमध्यें जो यहुदी समाज पसरला होता त्याची तर ग्रीक ही मातृभाषाच झाली असून, पॅलेस्टाइनच्या यहुद्यांपेक्षां त्यांच्यावर ग्रीक आचारविचारांचा पुष्कळच अधिक परिणाम झाला होता. तरी पण त्यांनीं आपल्या मातृनगराशीं संबंध तोडला नव्हता, व यरुशलेम येथें त्यांच्या स्वतंत्र धर्मपरिषदा भरून त्यांत तेथें कांहीं कारणांनिमित्त आलेले हे ग्रीक यहुदी लोक भाग घेत असल्याचें आढळतें. तिसऱ्या शतकांत कायद्याचें भाषांतर झाल्यापासून यहुदी वाङ्मयाची ग्रीक भाषेंत बरीच वाढ झाली होती. यांत पुष्कळशीं हिब्रू धर्मग्रंथांचीं भाषांतरें होतीं. कित्येक हिब्रू वाङ्मयाचें अनुकरण करणारीं अशीं ग्रीक भाषेंत लिहिलेलींच स्वतंत्र पुस्तकें होतीं; कांहीं पुस्तकांत ग्रीक वाङ्मयाचें व ग्रीक विचारांचें अनुकरण केलेलें होतें; ग्रीक धर्तीवर कांहीं काव्येंहि निर्माण झालीं होतीं: व कांहीं तर एस्किलस अगर सॉफोक्लीझ यांच्या नांवांवर प्रसिद्ध केलेल्या कविता होत्या. साहेबांचें हिंदूंविषयीं चांगलें मत व्हावें म्हणून धडपडणाऱ्या हिंदू पुस्तकांप्रमाणें या सर्वांचा उद्देश मूर्तिपूजकांच्या मनांत इस्रायली धर्मकथांविषयीं आदर उत्पन्न करण्याचा होता.

या ग्रीक संस्कृतीखालीं आलेल्या यहुदी लोकांच्या द्वारें ग्रीक आचारविचार यरुशलेमपर्यंत जाऊन पोहोंचले. तथापि अरमइक भाषा बोलणाऱ्या रॅबिनिक शाखांवर याचा परिणाम विशेष झाला नाहीं. तरी मिशना आणि टॅलमड यांच्या भाषेंत बरेच ग्रीक शब्द आले आहेत ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. हेड्रिअनपर्यंत रॅबिनिक पंडित ग्रीक शिक्षणाच्या विरुद्ध नव्हते. पॅलेस्टाइनमधील यहुदी लोकांच्या कल्पनांत ग्रीक कल्पनांचें मिश्रण होत होतें हें एसीनीझ पंथावरून व्यक्त होतें. मॅकाबींचें बंड हें या दोन उद्धारकसुधारक पक्षांच्या लढ्याचाच भाग आहे.

**ईजिप्तः टॉलिमेइक राज्य.**—इतर मॅसिडोनियन घराण्यांप्रमाणें टॉलिमीच्या घराण्यांनां कांहीं विशिष्ट कारणांस्तव ग्रीक नगरांची स्थापना करतां आली नाहीं. नॉक्राटिस हें ग्रीक शहर ते येण्याच्या पूर्वींपासूनच अस्तित्वांत होतें. अलेक्झांडरनें अलेक्झांड्रिया शहर वसविलेलें होतें. पहिल्या टॉलेमीनें त्यांत 'वरच्या इजिप्त' साठीं ग्रीक संस्कृतीचें केंद्र म्हणून टॉलिमेइस ह्या शहराची भर घातली. याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि समाजांनां त्यांनीं ग्रीक शहराचें स्वातंत्र्य उपभोगूं दिलें नाहीं असें दिसतें. फायुममध्यें अगर इतर ठिकाणीं वसलेल्या ग्रीक आणि मॅसिडोनियन शिपाई लोकांच्या वसाहतींत स्वातंत्र्य असल्याचें दिसून येत नाहीं. खुद्द अलेक्झांड्रियामध्यें सुद्धां ग्रीक संस्कृतीच्या पूर्ण विकासास वाव दिला गेला नव्हता. टॉलिमेइसला शासनस्वातंत्र्याचे बहुतेक सर्व मामूल हक्क होते हें खरें. पण अलेक्झांड्रियांत अधिकाऱ्यांचा अरेरावी कारभारच चालत होता. अलेक्झांड्रियाची लोकवस्ती देखील अर्धवटच ग्रीक होती. कारण त्यांतील खालचा वर्ग इजिप्तमधील लोकांचा होता; तसेंच तें व्यापारी ठिकाण असल्याकारणानें त्यांत अनेक जातींच्या लोकांचा भरणा झाला होता. उदाहरणार्थ, शहराच्या पांच भागांपैकीं दोन भागांमध्यें यहुदी लोकांचीच अधिक वस्ती होती. परंतु यहुदी लोकांची मातृभाषा अरमइकच्या ऐवजीं ग्रीक झाली होती; व अलेक्झांड्रियाच्या उच्च समाजांतील लोक या टॉलेमींच्या कारकीर्दींत संस्कृतीनें ग्रीक होते एवढेंच नव्हे, तर वाङ्मयाच्या व कलाकौशल्याच्या बाबतींत त्यांनीं ग्रीक लोकांत ख्याति मिळविली होती; यावरून त्या वेळीं तेथील जनतेवर एकंदरींत ग्रीक संस्कृतीचाच पगडा होता हें व्यक्त होतें. तेथील सरकारी विद्यापीठ व अजबखाना यांमुळें, अथेन्सला ज्याप्रमाणें नैतिक शास्त्रांत त्याप्रमाणें अलेक्झांड्रियाला सृष्टिशास्त्रांत व वाङ्मयशास्त्रांत फार महत्त्व प्राप्त झालें होतें. अलेक्झांड्रियांत भाषाशास्त्रांचा, विशेषेंकरून ग्रीक व्याकरणाचा झालेला विकास ५ व्या विभागांत वर्णिलाच आहे (विज्ञानेतिहास, पृ. २१४ पहा).

इजिप्तमध्यें ज्याप्रमाणें ग्रीक संस्कृतीच्या प्रसाराला अडथळा आला त्याप्रमाणें जुडीआशिवाय दुसऱ्या कोठेंहि आला नाहीं. "यांच्या मनांत परधर्मीय जेत्यांविषयीं विलक्षण द्वेष असतो" असें जें पौरस्त्यांचें सर्वसाधारण वर्णन करण्यांत येतें त्याची थोडीफार सत्यता या ठिकाणीं दिसून येते. मेंफिस येथील सिरेपिसच्या देवळांत एका मॅसिडोनियन भक्तावर तो ग्रीक आहे एवढ्या सबबीवरच हल्ला करण्यांत आला होता हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. तरीपण कांहीं पापायरसावर लिहिलेल्या हस्तलिखितांवरून असें आढळून येतें कीं, ग्रीक लोकांमध्यें व तद्देशीय रहिवाश्यांमध्यें लग्नें होत असत व कांहीं तद्देशीय लोकांचीं नांवेंहि ग्रीक होतीं. इजिप्शियन धर्मांतील कांहीं अंगांची वाढ ग्रीक धर्माच्या वर्चस्वामुळें झाली असें कांहींचें मत आहे. ग्रीकसंस्कृति व देश्य संस्कृति यांचें मीलन व्हावें एतदर्थ सिरेपिसच्या पूजेला सरकारकडून उत्तेजन देण्यांत आलें. इजिप्तमध्यें ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार होऊं

लागला तेव्हां ख्रिस्ती वाङ्मय देश्य भाषांत वाढूं लागून त्यायोगें एका अर्थी ग्रीकसंस्कृतीवर देश्य संस्कृतीनें वर्चस्व मिळविलें असलें तरी सिरिअक वाङ्मयाप्रमाणें या कॉप्टिक ( इजिप्शिअन ) वाङ्मयांतहि ग्रीकसंस्कृतीचीं तत्त्वें ख्रिस्ती दैवतशास्त्रामधून आलेलीं होतीं हें विसरतां कामा नये.

**इथिओपिआ.**—ग्रीक संस्कृति ही आरंभकालींच टॉलेमींच्या राज्यांतून नाइल नदीच्या वरच्या बाजूस इथिओपिआमध्यें गेली. दुसऱ्या टॉलेमीच्या वेळच्या इथिओपियनांचा राजा एर्गामिनीझ यास ग्रीक शिक्षण मिळालें होतें, व त्यानें ग्रीक तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला होता. त्यानें स्वधर्मी भिक्षुकांचें वर्चस्व झुगारून दिलें व त्या वेळेपासून इथिओपिआंत ग्रीक संस्कृतीच्या प्रसारास सुरुवात झाली. पुढें चवथ्या शतकामध्यें इथिओपिआंत ख्रिस्ती धर्म शिरला तेव्हां तर इथिओपिआचा ग्रीक संस्कृतीच्या देशांशीं अधिकच निकटचा संबंध जडला.

**पश्चिमेकडील ग्रीक संस्कृति.**—पूर्वेकडे ग्रीकसंस्कृतीचा ग्रीक लोकांच्या राजकीय वर्चस्वामुळें प्रसार झाला, पण इटालीमध्यें तिला तो स्वतःच्या तेजामुळेंच केवळ करून घ्यावा लागला. तिसऱ्या शतकामध्यें कार्थेजमधील सुशिक्षित वर्गाचा ग्रीक संस्कृतीशीं परिचय झाला होता असें दिसतें. दुसऱ्या शतकांत अथेन्स येथील विद्यापीठाचा मुख्य क्लिटॉमाकस हा तत्त्वज्ञ कार्थेजियन होता. ग्रीक संस्कृतीचा प्रसार इटालींत अलेक्झांडरच्या पूर्वीच थोड्या फार प्रमाणांत झाला होता. पण दक्षिण इटाली आणि सिसिली येथील ग्रीक लोक जेव्हां ख्रि. पू. तिसऱ्या शतकामध्यें रोमन सत्तेखालीं आले, तेव्हांच ग्रीक संस्कृतीचा म्हणण्यासारखा अंश रोममध्यें शिरला. लिव्हिअस अँड्रोनायकस या दास्यत्वांतून मुक्त झालेल्या ग्रीक इसमानें ओडिसीचें भाषांतर करून नवीन धर्तीच्या लॅटिन वाङ्मयाचा पाया घातला. त्यानेंच ग्रीक नाटकांनांहि लॅटिन पेहेरावांत आणलें. आरंभींचे रोमन इतिहासकार ग्रीक भाषेंतच इतिहास लिहीत असत. तिसऱ्या शतकाच्या अखेरीस टायटस क्किंक्शिअस फ्लामिनिअसच्या नेतृत्वाखालीं रोममध्यें ग्रीकाभिमानी उमराववर्ग तयार झाला होता, व त्यानें १९६सालच्या इस्थमियन खेळांच्या वेळीं रोमच्या नांवानें ग्रीक स्वायत्ततेचा पुकारा केला. दुसऱ्या शतकाच्या मध्यांत रोममधील ग्रीक संस्कृति सिपिओ एमिलिएनसच्या मंडळांत केंद्रीभूत झालेली असून त्या मंडळामध्यें पोलिबिअससारखे विद्वान् आणि पॅनीशिअससारखे तत्त्वज्ञ होते. बाबिलोनियन डायोजिनीझ, क्रिटोलेअस आणि कार्निआडीझ हे तिघे तत्त्वज्ञ १५५ सालीं रोमला आले तो काळ रोममधील ग्रीक संस्कृतीच्या इतिहासांत नवयुगारंभकारी होता. ग्रीक संस्कृतीस स्थानिक विरोध होणें हें अर्थातच अपरिहार्य होतें; व सर्व ग्रीक तत्त्वज्ञांनां व विवादकांनां अधिकारी मंडळानें एकदां (१६१)शहर सोडण्याचा हुकूम सोडला. या हुकुमाचा परिणाम केवळ तात्पुरताच होता. इटालियन लोकांनीं ग्रीक मतांचा सरसहा अंगीकार केला नाहीं. निरनिराळ्या शाखामध्यें कमी अधिक प्रमाणांत त्यांनीं आपलें स्वातंत्र्य राखलेंच होतें. कला व वाङ्मय या बाबतींत सुद्धां इटालियन लोकांनीं थोडेंसें स्वातंत्र्य कायम ठेविलें होतें. रोममधील शासनपद्धति त्यांची स्वतःचीच होती. त्यांनीं लॅटिन भाषेंत वाङ्मय निर्माण केलें एवढ्यावरूनच त्यांची कल्पकता व ग्राहक बुद्धि दिसून येते. प्रतिभाशाली लॅटिन कवी हे केवळ अनुकरण करणारे नव्हते. उलट पक्षीं कायद्यासारख्या रोमन लोकांच्या स्वतंत्र बुद्धीनें विकास पावलेल्या विषयांत देखील थोडी तरी ग्रीक विचारांची छटा दिसून येते. रोमन कायदेशास्त्राच्या बाबतींत स्टोइक तत्त्वज्ञानानें बरीच मदत केली हें बहुश्रुतच आहे.

इटालीमधील वरच्या सुशिक्षित वर्गास शिक्षणामुळें ग्रीक संस्कार झाला, तर अगदीं खालचा वर्ग, रोममध्यें गुलाम म्हणून जे ग्रीक किंवा ग्रीकसंस्कृतियुक्त आशियामधील लोक आणले गेले, त्यांच्या संसर्गानें ग्रीक संस्कृतीखालीं आला. रोममध्यें यहुदी लोकांचे जे शिलालेख आहेत त्यांपैकीं दोन तृतीयांश ग्रीकमध्यें आहेत. रोममधील प्राचीन ख्रिस्ती प्रार्थनामंदिरांतहि ग्रीक भाषाच चालत असून तिसऱ्या शतकापर्यंत ती तशीच कायम राहिली.

**उत्तरकालीन इतिहास.**—पश्चिमेकडे व पूर्वेकडे ग्रीक संस्कृतीचें शेवटीं काय झालें एवढेंच आतां पहावयाचें उरलें. लॅटिन भाषा चालणाऱ्या पश्चिम भागांत ग्रीकभाषेचें ज्ञान व ग्रीक वाङ्मयाचें मूळावरून ज्ञान हें एकंदर संस्कृतीच्या अवनतीबरोबर दिवसानुदिवस दुर्मिळ होत चाललें, व शेवटीं ५ व्या शतकानंतर स्तिमित युगांत तर आयर्लंडशिवाय तें कोठेंच राहिलें नाहीं. लॅटिन वाङ्मयामध्यें ज्या ग्रीक दंतकथा आल्या होत्या त्या मात्र तशाच कायम राहिल्या; आणि, कांहीं थोड्या भिक्षूंच्या संघांनींहि, या कथा जिवंत ठेवण्याचें काम केलें. यानंतर ग्रीकसंस्कृतीच्या प्रवाहास पुन्हां सुरुवात झाली. प्रथम स्पेनमधील मूर लोकांनीं ग्रीक संस्कृतीचें पुनरुज्जीवन केलें; व नंतर चवदाव्या शतकामध्यें कान्स्टांटिनोपलहून पुन्हां ग्रीक विचारांचा नवा प्रवाह आला. एकंदर ज्ञानाच्या पुनरुज्जीवनाबरोबर ग्रीक संस्कृतीचा प्रवाह पुन्हां जोरानें वाहूं लागला, व वर्तमान जग ज्या प्रवाहाबरोबर भविष्य कालाकडे जात आहे, त्या प्रवाहांत हा प्रवाह येऊन मिळाला. पूर्वेकडे ग्रीक संस्कृति ही परकीय असल्याकारणानें तिचा नायनाट झाला असें पुष्कळ लोक समजतात. पण हा समज चुकीचा आहे. स्तिमित युगामध्यें बिझॅन्शिअमच्या पूर्वेकडील प्रदेशांत व पश्चिमेकडील भागांतहि ग्रीक संस्कृतीला पूर्णपणें ओहोटी लागलेली होती; व सरतेशेवटीं ग्रीक संस्कृतियुक्त पूर्वेकडील भाग इस्लामच्या ताब्यांत गेला हें खरें. पण एवढ्यामुळें ग्रीक संस्कृतीचें पूर्णपणें

उच्चाटन झालें असें जें कित्येक विद्वान् समजतात तें मात्र बरोबर नाहीं. ग्रीक संस्कृतीचा बराच भाग सिरियन ख्रिस्ती लोकांनीं आपल्या भाषेंत आणलेला मुसुलमानांनां आढळून आला, व त्यांनीं ग्रीक तात्विक व शास्त्रीय वाङ्मय सिरिअक-मधून अरबी भाषेंत आणण्यास सुरवात केली. अरबी पांडित्याची इमारत या पायावरच पुढें उभारली गेली. या दृष्टीनें पाहतां अरबी तत्वज्ञान, गणित, भूगोल, वैद्यक व भाषाशास्त्र हीं सर्व ग्रीक शास्त्रांवर रचलेलीं आढळून येतील. पाश्चात्य पंडितांच्या मतें, पूर्वेकडे काय अगर पश्चिमेकडे काय आरिस्टॉटल हाच ज्ञानाचा गुरु होता. कारण, हिपॉक्राटीझ व गेलेन यांचे धन्यवाद मुसुलमान वैद्य अद्यापि गातात. इस्लामी संस्कृतीमध्यें ग्रीक संस्कृतीचा लोप झालेला दिसतो हें खरें; पण याचें कारण ग्रीक संस्कृतीस मागें सारून इस्लामी संस्कृतीनें वरचष्मा मिळविला हें नसून, कांहींका कारणानें होईना, पुढील काळांत इस्लामी संस्कृतीसच एकंदरींत ओहोटी लागली हें होय.

---

## प्रकरण ९ वें.

### रोमन संस्कृति.

ग्रीकांच्या स्वतंत्र इतिहासास आळा घालणारी सत्ता रोमन लोकांची होय. यांच्या सत्तेंत ग्रीकसंस्कृति नष्ट न होतां कांहीं अंशीं रूपांतरित झाली आणि बळावली. यांची यूरोपला किंबहुना जगाला देणगी म्हटली म्हणजे कायदा होय. अधिक श्रेष्ठ प्रकारची शासनसत्ता रोमनें उत्पन्न केली, व शासनसत्तेचें एक अंग जो कायदा तो रोमनें शिस्तवार विकासविला. परंतु कला व शास्त्र या बाबतींत ग्रीसनें कार्य अधिक पुढें नेलें. रोमला सांस्कृतिक इतिहासांत महत्त्वाचें स्थान मिळण्यास कायद्याशिवाय दुसरें कारण नाहीं. राष्ट्रविकासाच्या इतिहासांत मात्र रोमला महत्त्वाचें स्थान आहे.

**रोमन व ग्रीक राष्ट्र.**—रोमच्या इतिहासाचा एक अत्यंत महत्त्वाचा विशेष असा आहे कीं, हा इतिहास देशाचा किंवा राष्ट्राचा नसून एका शहराचा आहे. इजिप्तमध्यें थीबि हें एके काळीं सत्ताधारी होतें व पुढें मेम्फिस हें झालें. मेसापोटेमियामध्यें बाबिलोन हें एकदां सत्तेचें केंद्रस्थान होतें व नंतर निनिव्हि हें बनलें. ग्रीसमध्यें अथेन्स व स्पार्टा यांच्यामध्यें वरिष्ठ सत्ता हातीं रहावी याकरितां बरींच वर्षें झगडा चालू होता. पण इजिप्त, मेसापोटेमिया किंवा ग्रीस हें एक एक देश मिळून राष्ट्र बनलेलें होतें. त्या देशांतील वर सांगितलेल्या शहरांनां त्या त्या संस्कृतीचें केंद्रस्थान इतक्या पुरतेंच महत्त्व होतें. पण रोमन राष्ट्राची स्थिति याहून अगदीं भिन्न आहे. रोमन संस्कृति म्हणजे मूळ रोम या एका शहरच्या लोकांची संस्कृति असा अर्थ आहे.

रोम हें शहर इटालीमध्यें आहे. परंतु रोमन व इटालियन या दोन शब्दांचा अर्थ समान नाहीं. इटालीमध्यें प्रथम जे लोक रहात होते ते रोमच्या सत्तेखालीं येण्यास बराच काळ लागला. त्यांनां अंकित बनविण्यास रोमन लोकांनां बऱ्याच लढाया कराव्या लागल्या. रोमन लोकांनीं इटाली देश जिंकला इतकेंच नव्हे तर यूरोप व आशियापैकीं भूमध्य समुद्राभोंवतीलचे अनेक देश जिंकून अखेर मोठें रोमन साम्राज्य बनविलें. तथापि या अवाढव्य राज्यावर सत्ता चालवणारे अधिकारी लोक टायबर नदीकांठच्या रोम या एका शहरांतलेच होते. फार तर काय, अवाढव्य रोमन साम्राज्यांत जेथें प्रजाजनांनां नागरिकत्वाचे हक्क देण्यांत येत असत तेथें त्यांनांहि रोमन नागरिक असेंच म्हणण्याचा पूर्वीपासून प्रघात असे.

मानववंशशास्त्राच्या दृष्टीनें पाहतां ग्रीक लोक आणि रोमन लोक यांच्यामध्यें कित्येक महत्त्वाचे फरक होते. ग्रीक लोक स्वभावानें इतर कोणत्याहि प्राचीन राष्ट्रांतील लोकांपेक्षां अधिक बुद्धिमान् व अधिक भावनाप्रधान होते. ग्रीक लोक तत्वज्ञान, व्याकरण, वास्तुकला, कोरीव काम वगैरे गोष्टींत इतके निष्णात होते कीं, त्यांच्यावर ताण दुसऱ्या कोणत्याहि लोकांनीं केलेली नाहीं. तथापि ग्रीकांची सर्वगामी बुद्धि आणि भावनाप्रधान स्वभाव यामुळें असा एक दोष उत्पन्न झाला कीं, ग्रीक लोक अत्यंत अस्थिर बुद्धीचे बनले, व त्यांच्यामध्यें राजकीय शिस्त आणि सत्ताधाऱ्यांसंबंधानें आज्ञाधारकपणा हे गुण नाहींसे होऊन लवकरच ग्रीकराष्ट्राचा अधःपात झाला. उलट पक्षीं रोमन लोकांमध्यें स्वतंत्र सांस्कृतिक प्रगति फारच थोडी झाली. रोमन लोकांचीं जीं चिरकालीन स्मारकें आहेत तीं करण्याची प्रेरणा त्यांनां ग्रीक लोकांशीं संबंध आल्यानंतर मिळालेली आहे. एका शहरांत राहणाऱ्या या रोमन लोकांनीं कायदे करण्याच्या कामांत आणि राज्यकारभार चालविण्याच्या कलेंत मात्र, ग्रीकांनीं ललितकलांत जितका उच्च दर्जा मिळविला तितकाच, उच्च दर्जा प्राप्त करून घेतला. ग्रीक लोकांनीं वैयक्तिक स्वातंत्र्याचें फाजील स्तोम माजवून बेशिस्त वागणूक सुरू केली आणि अखेर ग्रीक राष्ट्राचा नाश करून घेतला. उलट व्यक्तिस्वातंत्र्याचें महत्त्व राष्ट्राभिमानापेक्षां व राष्ट्रविषयक कर्तव्यापेक्षां कमी समजणाऱ्या रोमन लोकांनीं ग्रीससुद्धां सर्व सुधारलेल्या तत्कालीन पाश्चात्य जगावर आपला राजकीय अम्मल बसविला.

आधुनिक यूरोप ग्रीक आणि रोम या दोन् प्राचीन राष्ट्रांचा सारखाच ऋणी आहे. आधुनिक यूरोपनें रोमन लोकांपासून उत्तमोत्तम कायदे आणि राज्यकारभार करण्याच्या कलेचें ज्ञान मिळविलें; आणि ग्रीकांपासून अनेक शास्त्रें आणि कला यांचें ज्ञान मिळविलें.

भाषाविषयक पुराव्यावरून रोमन लोक आर्यन् वंशांतले होते हें मत अलीकडे प्राप्त झालें आहे. तथापि या भाषाविषयक पुराव्यावरूनच रोमन लोकांचा तत्कालीन इतर कोणत्याहि मानव जातीपेक्षां ग्रीक लोकांशीच फार निकट संबंध होता, असें स्पष्ट दिसतें. मूळ आर्यन् समाजापासून

विभक्त झाल्यापासून ग्रीक व रोमन लोकांच्या पूर्वजांचा बहुत काळ फार निकट संबंध होता. मूळ आर्यन् लोकांची कोणती शाखा कोणत्या काळीं ग्रीस व इटाली या देशांत येऊन राहिली, त्यांनां त्या त्या देशांत कोण देश्य लोक भेटले व त्यांचे पुढें मिश्र समाज कसे बनत गेले या प्रश्नासंबंधानें भरपूर ऐतिहासिक माहिती अद्याप उपलब्ध झालेली नाहीं.

**रोमच्या इतिहासांतील आद्य राजसत्ताककाळ**—( ख्रि. पू. ७५३–५१० ).–इटालीसंबंधाची प्राचीन माहिती फार अल्प व अस्पष्ट मिळते. ख्रि. पू. दुसऱ्या सहस्रकांत १५०० च्या पूर्वी तेथें आयबीरिअन व लिगूरिअन लोक रहात होते. पुढें आल्प्स पर्वताच्या बाजूनें एट्रस्कन लोक इटालींत येऊन राहूं लागले. नंतर आर्यन् वंशापैकीं सिक्युलाय नांवाची जात आणि त्यानंतर साबेलो अंब्रिअन नांवाची जात या देशांत येऊन राहिली. याशिवाय इटालीच्या किनाऱ्यावर अनेक ठिकाणीं ग्रीक लोक वसाहत करून राहूं लागले होते ते निराळेच. अशा प्रकारच्या परिस्थितींत मूळ रोम शहराची स्थापना झाली. टायबर नदीच्या कांठीं एका शेजारीं एक असलेल्या सात टेकड्यांवर वसलेला लोकसमाज मिळून रोम शहर बनलें. या लोकांनीं राजा व त्याच्या सल्ल्यासाठीं १०० लोकांचें एक मंत्रिमंडळ अशी शासनव्यवस्था ठरवून त्यांच्या हातीं राज्याचीं सूत्रें दिलीं. प्रथम या रोमच्या राज्यांत फक्त तीस गांवांचाच समावेश होत असे. रोमच्या या आद्य राजसत्ताक काळाचा इतिहास बहुतेक दंतकथात्मक आहे. रोमन लोकांचा प्राचीन इतिहास स्थूलतः येणेंप्रमाणें:—

**रॉम्युलस** (ख्रि. पू. ७५३–७१६).–पौराणिक काळापैकीं हा पहिला राजा होय. यानें सॅबिन लोकांबरोबर युद्ध केलें. पण सॅबिन लोकांचा राजा टायटस टेशिअस याला जय मिळाला तेव्हां रोमन आणि सॅबिन लोकांमध्यें तह होऊन रॉम्युलस आणि टेशिअस या दोघांची द्विराजक सत्ता सुरू झाली. पुढें रॉम्युलस हा एका वादळाच्या वेळीं नाहींसा झाला; व त्यालाच लोक पुढें क्विरायनस देवता मानून भजूं लागले.

**न्यूमा पाँपिलिअस** (ख्रि. पू. ७१५-६७३).–याला रोमन लोकांनीं एक वर्षानंतर राजा नेमिलें. त्यानें रोमन लोकांनां एक विशिष्ट प्रकारचा धर्म लावून दिला व जेनस देवतेचें देऊळ बांधिलें.

**टुलस हॉस्टिलिअस** ( ६७२–६४१ ).—यानें आल्बालाँगाबरोबर युद्ध केलें त्यांत रोमला जय मिळाला, व आल्बालाँगा मोडून तेथील सर्व लोक रोम येथें येऊन राहिले.

**अँकस मार्शिअस** (ख्रि.पू.६४१-६१६).—यानें लॅटिन प्रांतांतील चार शहरें जिंकून घेतलीं.

**टार्किनिअस प्रिस्कस** ( ख्रि. पू. ६१५—५७८ ) यानें कॅपिटोलाइन टेकडीवर ज्युपिटरचें देवालय बांधिलें, सैन्यामध्यें नवीन प्रकारची व्यवस्था सुरू केली आणि सेनेट नांवाच्या मंत्रिमंडळाच्या सभासदांची संख्या तीनशें केली. त्यानें सॅबिन, लॅटिन आणि एट्रस्कन या लोकांबरोबर लढाया करून जय मिळविले. या राजाचा त्याच्या मुलानें खून केला.

**सर्व्हिअस टुलिअस** ( ख्रि. पू. ५७८—५३४ ).—हा टार्किनिअसचा जांवई टार्किनिअसच्या मागून गादीवर आला. यानें रोमन प्रजेचे चार विभाग पाडले, रोम शहराभोंवतीं भिंती बांधिल्या व व्हीयाय लोकांबरोबर लढाया केल्या. याचा याच्या जांवयानें खून केला.

**टार्किनिअस सुपरबस** ( ख्रि.पू.५३४—५१० ).–यानें ज्युपिटरचें देवालय पुरें केलें, लॅटिन राजांनीं बनविलेला संघ पूर्णपणें आपल्या ताब्यांत आणिला व आपला मुलगा सेक्स्टस याच्या मदतीनें गेबिआय शहर काबीज केलें. याचा मुलगा सेक्स्टस यानें ल्युक्रीशिआ नांवाच्या स्त्रीवर बलात्कार केल्यामुळें रोमन लोकांनीं चिडून बंड केलें; आणि राजसत्ताक पद्धति नाहींशी करून प्रजासत्ताक शासनपद्धति सुरू केली.

**राजसत्ताक काळांतील लोकस्थिति**.—या आद्य काळांत रोमच्या नागरिकांचे तीन विभाग पाडलेले होते. त्यांनां ‘ ट्राइब ’ म्हणत. प्रत्येक ट्राइबचे दहा पोटवर्ग असत त्यांनां ‘ क्यूरी’ म्हणत. अनेक रोमन कुटुंबें मिळून एक क्यूरी होत असे. याप्रमाणें रोमन समाजाचा रोमन कुटुंब हा आद्यघटक असे. प्रत्येक कुटुंबांत पालक आणि पाल्य अशीं दोन दर्जांचीं माणसें असत. याशिवाय रोमन लोकांनीं आसपासचा प्रदेश जिंकल्यावर तेथील लोकांचा रोमन राष्ट्रांत समावेश होऊं लागला. तथापि त्यांनां रोमन लोकांचे नागरिकत्वाचे सर्व हक्क देण्यांत आलेले नव्हते. हे लोक प्लीबियन्स ( कॉमन्स ) या नांवानें रोमच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत. हे लोक निराळ्याच मानववंशांतील असून त्यांमध्यें मातृकन्यापरंपरा असे असें कित्येकांचें मत आहे.

**राज्यकारभार**.–या आद्य काळांत रोम येथें राजांचा अंमल होता. तथापि राजांच्या हातीं अनियंत्रित सत्ता नव्हती. प्रथमपासूनच रोम येथें सेनेट अस्तित्वांत येऊन तिच्या सल्ल्यानें राजाला आपला राज्यकारभार चालवावा लागत असे. शिवाय खुद्द रोमन नागरिकांची म्हणजे तीस क्यूरींची एक लोकसभा असे. पुढें प्लीबियन लोकांचा रोमच्या राज्यांत अंतर्भाव झाल्यावर या लोकांची स्वतंत्र लोकसभा स्थापन झाली. येणेंप्रमाणें इंग्लंडामधील पार्लमेंटांतील लार्डांची (बड्या लोकांची) सभा आणि कॉमन्स ( सामान्य ) लोकांची सभा यांच्याप्रमाणें प्राचीन रोमन राज्यांतहि दोन लोकसभा होत्या; आणि पॅट्रिशियन आणि प्लीबियन असे रोमन लोकांचे दोन वर्ग होते. नागरिकत्वाचे हक्क या दोन वर्गांनां कमजास्त प्रमाणांत होते. परंतु युद्धाच्या वेळीं मात्र सर्व रोमन लोक समानतेनें व एकजुटीनें रणांगणावर वागत असत.

पारमार्थिक संप्रदाय.–रोम शहर स्थापन झाल्यानंतर कांहीं वर्षें रोममध्यें सार्वजनिक देवळें व मूर्तिपूजा अस्तित्वांत नव्हती. पुढें एट्रुस्कन लोकांशीं संबंध आल्यावर ज्युपिटर, ज्यूनो, आणि मिनर्व्हा या तीन देवतांचीं देवळें ठिकठिकाणीं बांधण्यांत येऊं लागलीं. मूर्तिपूजेची कल्पना ही मूळ एट्रुस्कन लोकांची नसून ती त्यांनीं ग्रीक लोकांपासून घेतली असा कित्येकांचा समज आहे. पुढें मात्र रोमच्या राज्यांतील प्रत्येक शहरांत वर सांगितलेलीं तीन मुख्य देवालयें आणि तीन देवतांच्या नांवाचे तीन दरवाजे प्रत्येक शहराला बांधण्यात येऊं लागले. रोमन लोकांनीं आपले दुसरे अनेक धार्मिक विधीहि एट्रुस्कन लोकांपासूनच घेतले. इतकेंच नव्हे, तर हे धर्मविधी चांगले समजावे म्हणून एट्रुस्कन भाषा आणि त्यांचे धार्मिक विधी उच्च रोमन घराण्यांतील तरुणांनां शिकविण्यांत यावे असा सेनेटनें कायदा केला.

रोमन लोकांचें शिक्षण.—रोमन कुटुंबांतील माणसांनीं वैयक्तिक स्वातंत्र्य व स्वार्थ विसरून जाऊन सर्वस्वी रोमन राष्ट्राच्या हिताकरितां झटावें, सर्व रोमन प्रजाजनांनीं पराक्रमी योद्धे आणि कर्तव्यनिष्ठ नागरिक बनावें अशा तऱ्हेचें ध्येय पुढें ठेवून त्यांस शिक्षण देण्यांत येत असे. या विशिष्ट वळणाच्या शिक्षणाचा फायदा रोमन राष्ट्राला किती झाला हें पुढें सॅमनाइट युद्धामध्यें व त्या सुमाराच्या रोमच्या भरभराटीच्या स्थितींत दिसून आलें. त्या काळच्या रोमन नागरिकांमध्यें आज्ञाधारकपणा, सदाचरण, प्रामाणिकपणा आणि काटकसर हे गुण प्रामुख्यानें दिसून येत असत. आणि या सर्वांहून अत्यंत महत्त्वाचा गुण म्हटला म्हणजे राष्ट्राच्या हिताकरितां आपल्या सर्वस्वाची किंबहुना प्रत्यक्ष प्राणाची आहुति देण्याची त्यांची तयारी असे. हे राष्ट्रीय सद्गुण बाजूस ठेवून रोमन लोकांच्या खासगी वर्तनाकडे पाहिल्यास रोमन लोक मोठे कठोर व कडक स्वभावाचे दिसतात. दया व औदार्य हे गुण त्यांच्यामध्यें नव्हते असें म्हटलें तरी चालेल. श्रीमंत रोमन लोक ऋणकोला कर्जफेडीसाठीं गुलाम करून राबवीत असत, किंवा विकीत असत. कुटुंबांतील माणसांनां व प्रत्यक्ष मुलाबाळांनां गुलामांप्रमाणेंच कडक रीतीनें वागविण्यांत येत असे. रोमन लोक व्यापारधंद्यामध्यें मोठे धूर्त आणि आपमतलबी असत. इतर देश जिंकतांना सुद्धां त्यांची नजर द्रव्यावर असे. रोमन लोकांनीं आपलें साम्राज्य वाढविलें तें कीर्तीकरितां नव्हे किंवा जित लोकांचें कल्याण करण्याच्या बुद्धीनेंहि नव्हे, तर अनेक देश जिंकल्यानें आपल्याला मुबलक जमीन मिळून आपलें ऐश्वर्य वाढेल या बुद्धीनेंच होय. साम्राज्याचें वैभव प्राप्त होण्यापूर्वी रोमन लोकांची राहणी गरीबीची आणि कडक शिस्तीची असे; व त्यांची खासगी नीतिमत्ताहि चांगली होती.

नीतिमत्ता.—आद्य राजसत्ताक काळांत रोमन लोकांची वागणूक कशी असल याची माहिती मिळत नाहीं. प्रजासत्ताकपद्धति अस्तित्वांत आल्यानंतर आरंभाच्या काळांत रोमन लोकांचा जो स्वभाव व ज्या चालीरीती दिसतात, त्यांवरून राजसत्ताक काळांतील स्थितीची कल्पना करणें बिनचूक होणार नाहीं. तथापि खासगी कौटुंबिक व्यवस्थेंत कुटुंबांतील मुख्याचा बायकामुलांवर जो पूर्ण अधिकार चालत असे ती वहिवाट रोमन लोकांत अगदीं आरंभापासूनच होती असें वाटतें. रोमन लोकांमध्यें कॉन्युबियम नांवाचा विवाहविधि असे. त्या विधीप्रमाणें झालेला विवाहसंबंध फार पवित्र मानीत असत. त्यांच्यांत एकपत्नीत्वाची चाल असून घटस्फोटाची वहिवाट फारशी नव्हती. रोमन लोक उपस्त्रिया ठेवीत असत, परंतु हा प्रकार कायद्यानें हलक्या दर्जाचा ठरविलेला होता. रोमन लोकांतले अत्यंत महत्त्वाचे गुण म्हटले म्हणजे कायदा आणि शिस्त यांची आवड आणि राष्ट्राकरितां कोणताहि स्वार्थत्याग करण्याची तयारी हे होत.

कलाकौशल्य.—प्राचीन रोमन राजांच्या कारकीर्दींत ज्या मोठमोठ्या इमारती व मूर्ती किंवा पुतळे तयार झाले त्यांच्या कारागिरीचें ज्ञान रोमन लोकांनां एट्रुस्कन लोकांपासून मिळालें होतें. व या एट्रुस्कन लोकांनीं या कलेचें ज्ञान ग्रीक लोकांपासून मिळविलें असावें असें दिसतें. रोम येथील जुपिटरची न इतर देवांच्या मूर्ती, व देवळाच्या शिखरावरचा चार घोड्यांचा रथ हीं सर्व चिकणमातीचीं केलेलीं होतीं. ब्रॉंझ धातूचा उपयोग मूर्ति करण्याकडे बऱ्याच कालानंतर सुरू झाला. या राजसत्ताक काळांत रोम येथें रंगित चित्रें काढल्याचा पुरावा कोठें आढळत नाहीं. उपर्युक्त राजांच्या वेळचे लांकडाच्या किंवा धातूच्या पत्र्यावर लिहून ठेविलेले कांहीं कायदे आहेत, व हेंच आद्य काळांतील रोमन लोकांचें महत्त्वाचें स्मारक आहे. रोमन राजांच्या वेळीं कांहीं काव्यवाङ्मय व कांहीं पराक्रमवर्णनात्मक गद्य कथा प्रचलित असाव्या; परंतु हें लेखनिविष्ट केलेलें नव्हतें. तें सर्व वाङ्मय दंतकथेच्या रूपानें तोंडी प्रचलित राहिल्यामुळें त्यांत पिढ्यानुपिढ्या फरक होत गेला. तात्पर्य या आद्य-राजसत्ताक काळांतील लेखी पुरावा उपलब्ध नसल्यामुळें या काळांतील रोमन लोकांची बुद्धिमत्ता व आचारविचार याविषयीं गाढ अज्ञान आहे, व पुढेंहि तें तसेंच राहाणार असें वाटतें.

**रोमन लोकसत्ताकाचा काळ, पूर्वार्ध** (ख्रि. पू. ५१०—१३१)—रोम येथें राजसत्ताक शासनपद्धति नाहींशी होऊन लोकसत्ताक राज्य स्थापन झालें तें ख्रि. पू. ५१० पासून ख्रि. पू. २९ पर्यंत टिकलें. या मोठ्या काळाचे दोन विभाग पडतात. पहिला रोमन लोकांच्या एकीचा व जुटीचा आणि रोमन साम्राज्याच्या विस्ताराचा काळ होय; आणि दुसरा रोमन लोकशाहींतील पुढाऱ्यांच्या आपसांतील युद्धाचा काळ होय. यांपैकीं पहिल्या कालविभागांत–म्हणजे ख्रि. पू. ५१० पासून १३१ पर्यंतच्या काळांत–रोमन लोकांनीं सर्व इटाली देश जिंकून आपल्या अमलाखालीं आणिला; इतकेंच नव्हे तर भूमध्यसमुद्राच्या

पलीकडील आफ्रिकेच्या किनाऱ्यावरची कार्थेज येथील बलिष्ठ राजसत्ताहि त्यांनीं धुळीस मिळविली. लोकसत्ताकाच्या पूर्वार्धातील रोमच्या इतिहासाचें टांचण येणेंप्रमाणेः—

खि. पू. ५१०—४५१.—लोकसत्ताक स्थापन होऊन कॉन्सल म्हणून राज्यकारभार चालविणारे दोन मुख्य अधिकारी नेमण्यांत येऊं लागले. पहिल्या वर्षी जूनिअस ब्रूटस व मार्कस होरेशिअस या दोघांनां कॉन्सल नेमण्यांत आलें. रोम व कार्थेज यांच्यामध्यें व्यापारी तह झाला (५०९). एट्रुस्कन लोकांच्या राजानें रोमन लोकांचा पराभव केला. नंतर तीस लॅटिन शहरांचा संघ बनून त्यानें टार्किन घराण्याला पुन्हां रोमचें राज्य मिळवून देण्याचा कट केला, व रोमबरोबर युद्ध सुरू केलें. पण त्यांत लॅटिन लोकांचाच मोठा पराभव होऊन रोमन लोक विजयी झाले. तेव्हां लॅटिन संघानें रोमबरोबर मित्रत्वाचा तह केला (४९७). रोम येथें पॅट्रिशियन व प्लीबियन यांच्यामध्यें मोठा तंटा होऊन प्लीबियन लोक रोम शहर सोडून गेले. पण पॅट्रिशियन लोकांनीं त्यांनां राज्यकारभारांत कांहीं हक्क देऊन परत आणिलें (४९४). लवकरच रोमन लोकांची सर्व लॅटिन प्रदेशावर सत्ता प्रस्थापित झाली. ४९१ मध्यें रोमच्या राज्यांत मोठा दुष्काळ पडला असतां सरकारच्या खर्चानें गरीब प्लीबियन कुटुंबांनां धान्य वांटण्याचें मार्शिअस कोरिओलेनसनें ठरविलें; परंतु हें कृत्य लोकसभेला न आवडल्यामुळें तिनें कोरिओलेनसला हद्दपार केलें. तेव्हां त्यानें व्हॉल्शिअन्स नामक रोमच्या शत्रूंनां मिळून रोमवर स्वारी केली; पण अखेर स्वतःच्या आईच्या व बायकोच्या विनंतीवरून तो शत्रुपक्ष सोडून देऊन रोमला येऊन मिळाला. ४८६ मध्यें स्प्यूरिअस कॅशिअस व्हिसेलिनस हा कॉन्सल होता. त्यानें कांहीं सार्वजनिक जमिनी गरीब प्लीबियन व लॅटिन लोकांनां वांटून देण्याचें ठरविलें. त्याबद्दल पॅट्रिशियन लोकांनीं रागावून त्याला वर्षाच्या शेवटीं गुन्हेगार ठरवून फांशीं दिलें. ४६३ मध्यें रोममध्यें व सर्व इटाली देशांत भयंकर मोठा प्लेग झाला, व त्याच वर्षी व्हॉल्शिअन्स व ईक्विन्स लोकांनीं रोमवर स्वारी केली. या काळांत पॅट्रिशियन व प्लीबियन यांच्यामध्यें राजकीय हक्कांबद्दल तंटा चालू होता. ट्रिब्यून नांवाचे प्लीबियन लोकांतर्फे अधिकारी नेमण्यांत येऊं लागले. त्यांची संख्या प्रथम पांच होती ती नंतर दहा झाली. ४५४ मध्यें रोमनें तीन वकील ग्रीसमध्यें सोलॉनच्या कायद्याच्या लेखी प्रती करून आणण्याकरितां पाठविले. हे वकील ४५२ मध्यें परत आल्यावर नवीन् रोमन कायद्यांचें कोड तयार करण्यांत आलें.

खि. पू. ४५१–३९०.—नवे दहा कायदेपट तयार करून ते फोरममध्यें जाहीर ठिकाणीं ठेवण्यांत आले. ४५० मध्यें त्यांमध्यें आणखी दोन नव्या कायदेपटांची भर घालण्यांत आली. ४४५ मध्यें पॅट्रिशियन आणि प्लीबियन यांच्यामधील मिश्र विवाह कायदेशीर ठरविण्यांत आले. ४३१ मध्यें ईक्विन्स व व्हॉल्शिअन्स लोकांनीं रोमवर स्वारी केली, परंतु रोमन लोकांनीं त्यांचा पराभव केला. ४०५—३९६ पर्यंत रोमन लोकांनीं व्हीयाय लोकांशीं युद्ध करून अखेर जय मिळविला. ३९० मध्यें गॉल लोकांनीं रोमवर स्वारी करून ७ महिने रोमला वेढा दिला; व लोकांनां लुटून शहराची बरीच नासधूस केली. परंतु अखेर पांचशें शेर सोनें देऊन रोमन लोकांनीं गॉल लोकांनां परत लाविलें

खि. पू. ३७६–२६४.—रोमन कायद्यांमध्यें कांहीं महत्त्वाचे फेरफार होऊन ३६७ पासून कॉन्सलच्या जागेवर नेमलें जाण्याचा महत्त्वाचा हक्क प्लीबियन लोकांनां देण्यांत आला. या काळांत अनेक लढाया झाल्या. ३६७—३३९: उत्तर इटालींतील गॉल लोकांबरोबर युद्ध, ३६२—३५८: बंडखोर लॅटिन शहरांबरोबर युद्ध, ३५८—३५१: टार्किनि व इतर एट्रुस्कन शहरांबरोबर युद्ध, ३५०—३४५: व्हॉल्शिअन्स व ऑरन्साय लोकांबरोबर युद्ध, ३४३: पहिलें सॅमनाइट युद्ध, ३४०—३३८: पहिलें लॅटिन युद्ध, ३२६—३०४: दुसरें सॅमनाइट युद्ध, २९९—२९०: तिसरें सॅमनाइट युद्ध, २८५—२८२: लॅटिन संघाबरोबर युद्ध, २८०—२७५: पिर्‍हस बरोबर युद्ध अशीं अनेक युद्धें करून रोमन लोकांनीं सर्व इटाली देश आपल्या ताब्यांत आणिला.

खि. पू. २६४ ते १३३.—या काळांत रोमनें इटालीच्या बाहेर परदेशांबरोबर युद्धें केलीं. २६४—२४१: पहिलें प्यूनिक युद्ध, २१८—२०१: दुसरें प्यूनिक युद्ध व १४९ १४६: तिसरें प्यूनिक युद्ध हीं तीन कार्थेजियन लोकांबरोबर अत्यंत निकराचीं युद्धें करून अखेर रोमन लोकांनीं कार्थेज येथील सत्तेचा पूर्ण विध्वंस केला. याच कालविभागांत २१५—२०६: पहिलें मॅसिडोनियन युद्ध, २००–१९७: दुसरें मॅसिडोनियन युद्ध व १७१—१६८: तिसरें मॅसिडोनियन युद्ध अशीं तीन युद्धें अत्यंत बलिष्ठ अशा मॅसिडोनियन सत्तेशीं करून ती राजसत्ताहि अखेर रोमन लोकांनीं धुळीस मिळविली. शिवाय कॉरिंथ व सिसिली यांशीं युद्धें करून ते प्रदेश रोमन साम्राज्यास जोडण्यांत आले.

**लोकसत्ताक काळाच्या पूर्वार्धातील लोकस्थिति.**—येणेंप्रमाणें या विजयाच्या काळांत रोमनें सर्व इटाली देशावर आपलें स्वामित्व प्रस्थापित केलें इतकेंच नव्हे, तर कार्थेज व मॅसिडोनिया येथील आपले बलाढ्य प्रतिस्पर्धी पूर्णपणें नाहींसे केले. रोमन लोकांच्या राजकीय गुणांचा विकास झालेला अर्थात् याच काळांत दिसतो. प्यूनिक युद्धांच्या सुमारास रोमन राज्यकारभाराची घटना पूर्णत्वास येऊन पोहोंचली होती; प्लीबियन लोकांनां समान राजकीय हक्क मिळून आपसांतील तंटे नाहींसे झाले होते; इतकेंच नव्हे तर मिश्र विवाहास कायद्याची संमति मिळून पॅट्रिशियन व प्लीबियन या दोन वर्गांचें पथक् अस्तित्व

नाहींसें होत गेलें, व कोणत्याहि रोमन माणसाला कॉन्सलचा सर्वश्रेष्ठ दर्जा मिळविण्याची महत्वाकांक्षा धरण्याचा मार्ग मोकळा झाला.

सरकारी नोकरींतील अधिकाराच्या जागा.—तथापि कॉन्सलचा सर्वश्रेष्ठ अधिकार प्राप्त होण्यास रोमन नागरिकाला अनेक दर्जाच्या अधिकारावरून काम करीत व अनुभव घेत वर चढत जावें लागत असे. निरनिराळ्या अधिकारांच्या जागांची वयोमर्यादाहि ठरलेली असे. सरकारी नोकरींतील पहिली अधिकाराची जागा क्वेस्टरशिप (कॉन्सलचा खजिनदार) ही असून ती मिळण्याकरितां माणसाचें वय कमींत कमी २७ वर्षांचें असावें लागे. पुढील जागा एडाइलशिपची (सार्वजनिक इमारती, रस्ते, पोलीस, खेळ व सार्वजनिक उत्सव वगैरे गोष्टींवर देखरेख ठेवणारा अधिकारी) असून तिच्याकरितां वयोमर्यादा ३७ ठरविण्यांत आली होती. त्यानंतरच्या प्रीटॉरशिपच्या (कॉन्सलची बहुतेक कामें करणारे दुय्यम अधिकारी) जागेस वय कमींत कमी ४० असावें लागे, व अखेरच्या कॉन्सलशिपच्या अधिकाराकरितां ४३ ही वयोमर्यादा होती. अशीं बंधनें असल्यामुळें कॉन्सल होणारा इसम पुष्कळ अनुभवी व वयानें बराच प्रौढ असे. बहुतेक वरिष्ठ अधिकारांच्या जागांची मुदत एक वर्षाची असे व त्यांच्या कामाबद्दल पगार मिळत नसे. मात्र खर्चाकरितां भत्ता म्हणून कांहीं रक्कम देण्यांत येत असे.

सैन्य.—रोमन लोकसत्तेचें खडें सैन्य मुळींच नसे. १७-४५ वयाच्या आणि चार हजार तांब्याच्या नाण्यांइतक्या किंमतीची संपत्ति असलेल्या सर्व लोकांची लष्करी नोकरीकरितां यादी तयार करीत असत. या यादींतून प्रत्येक कॉन्सलची दोन लीजनें (यांत पायदळ व घोडदळ मिळून अजमासें चार हजारांपासून सहा हजारांपर्यंत शिपाई असत) याप्रमाणें दोन कॉन्सलांचें मिळून चार लीजन सैन्य सरकारजवळ तयार असे. प्रत्येक वर्षाच्या शेवटीं या चार लीजनमध्यें नव्या माणसांची भरती करीत असत. या चार लीजनशिवाय जरूरीप्रमाणें लीजनची संख्या वाढवीतहि असत. येणेंप्रमाणें सैन्यांत आणि वरिष्ठ सरकारी नोकरींत दरसाल नव्या नेमणुकी होत असल्यामुळें कोणाहि माणसाच्या हातांत एक वर्षाहून अधिक अधिकार रहात नसे.

सेनेट.—याप्रमाणें सैन्य आणि सरकारी नोकरी यांतील वरिष्ठ अधिकाराच्या जागांवरील माणसें बदलत असत तरी रोमन राज्यकारभाराचें धोरण संभाळणारी जी सेनेट सभा तिच्यांतील लोक कायमचे असत. जो इसम सेनेट सभेचा सभासद होई तो मरेपर्यंत त्या जागेवर कायम रहात असे. तथापि सेनेटचें सभासदत्व वंशपरंपरा मात्र चालत नसे. या सेनेटचे एकंदर तनिशें सभासद असत, आणि रोमन लोकसत्ताकाचा कारभार ही सेनेट व सर्व रोमन लोक यांच्या नांवानें चालत असे. सारांश सेनेट हीच सर्वसत्ताधारी सभा होती. व रोमच्या इतिहासांत या सभेचें अत्यंत महत्व आहे.

सेनेटचा सभासद होण्यास तीन गोष्टी लागत असत. पहिली गोष्ट, वरिष्ठ दर्जाची सरकारी नोकरी; म्हणजे विशिष्ट हुद्द्यावर नोकरी केलेल्या इसमांनांच सेनेटच्या निवडणुकींत उमेदवार होतां येत असे. दुसरी गोष्ट, उमेदवाराजवळ ठराविक किंमतीची जिंदगी असावी लागे. तिसरी गोष्ट, उमेदवाराचें वय तिसाच्यावर असावें लागे. कायदे करण्याचा अखेरचा अधिकार या सेनेटकडे असे. रोमन राज्याचें परराष्ट्रीय धोरणहि सेनेट सभाच ठरवीत असे. मात्र युद्ध करणें किंवा तह करणें या गोष्टी लोकांची मतें घेऊन ठरविण्यांत येत असत. कॉन्सल आपली कामें बरोबर करीत नसल्यास त्यांनां अधिकारावरून काढून डिक्टेटर म्ह. सर्वाधिकारी नेमण्याचा अधिकार सेनेटला असे. परराष्ट्रीय वकीलहि सेनेटच नेमीत असे. शिवाय विशेष महत्वाच्या आरोपांची चौकशी सेनेटचेच सभासद हायकोर्ट म्हणून करीत असत.

कुटुंबव्यवस्था.—रोमन रिपब्लिकच्या सॅमनाइट युद्धापर्यंतच्या काळास सुवर्णयुग असें मानण्यांत येतें. या काळांतले रोमन लोक साध्या रहाणीचे आणि प्रामाणिक होते यांत शंका नाहीं. तथापि ते ग्रीक लोकांइतके सुधारलेले व सुसंस्कृत नव्हते. शिवाय जसजसें रोमन साम्राज्य वाढत गेलें तसतशी, इतर प्रांतांतील मागसलेल्या लोकांचा साम्राज्यांत अंतर्भाव होऊन, एकंदर लोकसंख्या पुष्कळच वाढली; आणि गुलामपद्धतीचा एक अत्यंत अनिष्ट प्रकार रोमन समाजांत सुरू झाला. युद्धाच्या वेळीं लुटींत पकडलेले अनेक इसम पुढें जनावरांप्रमाणें विकण्यांत येत असत. यामुळें सर्व धनिक पॅट्रिशियन व प्लीबियन इसमांजवळ पुष्कळ गुलाम असत. एक एका लढाईनंतर वीसवीस तीसतीस हजार इसम गुलाम म्हणून विकण्यांत येत असत. अशा गुलामांनां नागरिकत्वाचे कोणतेहि हक्क नसत व त्यांनां कायदेशीर विवाहसंबंधहि करतां येत नसत. त्यांनां खासगी मालकीची जिंदगी मुळींच करतां येत नसे. गुलामावर मालकाचा पूर्ण ताबा असे, आणि गुलामाला कोणी इजा केल्यास अगर त्याचा खून केल्यास त्याची नुकसानभरपाई मालकाला मिळत असे. अशा अमानुष गुलामपद्धतीचे रोमन समाजावर अर्थात् फार अनिष्ट परिणाम झाले. तथापि चांगल्या वागणुकीबद्दल बक्षीस म्हणून गुलामांनां स्वतंत्र करण्याची पद्धति रोमन लोकांत हळू हळू बरीच रूढ झाली. गुलामगिरींतून स्वतंत्र झालेल्या लोकांनां अनेक प्रकारचे कलाकौशल्याचे धंदे करून श्रीमंतहि होतां येत असे.

रोमन कुटुंबांतील दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे बापाचा किंवा पालकाचा कुटुंबांतील इतर माणसांवर असलेला अनियंत्रित अधिकार ही होय. रोमन कुटुंबांतील मुख्याचा आपली बायको, मुलगे, मुली, सुना वगैरेंवर अगदीं गुलामावरच्याप्रमाणें हक्क असे. मुलगा वयांत आल्यावर तो स्वतंत्र होत असे, पण मुली व बायका यांच्यावरील अधिकार नेहमींच कायम असे. मनुस्मृतींतलें " न स्त्री स्वातंत्र्यमर्हति " हें सूत्र रोमन स्त्रियांनां पूर्णपणें लागू होतें.

प्रथमपासून रोमन लोकांत एकपत्नीपद्धति चालू होती. घटस्फोट कायद्यानें मान्य होता तरी नैतिक दृष्टया तो गर्हणीय समजला जात असे. असा घटस्फोट ५०० वर्षांतून एखादा ऐकूं येतो असें प्राचीन रोमन लेखकांनीं लिहून ठेविलें आहे. या उच्च प्रकारच्या धार्मिक व पवित्र विवाहसंबंधाशिवाय दुसरा एक हलक्या दर्जाचा विवाहसंबंध रोमन लोकांत रूढ झालेला होता.

पारमार्थिक संप्रदाय.—रोमन लोकांनीं आपले धार्मिक विधी मूळ एट्रुस्कन लोकांपासून घेतले होते हें मागें सांगितलेंच आहे. शिवाय रोमन साम्राज्यांत निरनिराळ्या देशांतील मानव जातींचा समावेश झाल्यावर रोमन लोकांच्या धार्मिक विधींत अनेक गोष्टींचा समावेश होत गेला. देवतांची संख्या तर पुढें इतकी वाढली कीं, "आमच्या देशांत माणसांपेक्षां देवांचीच संख्या अधिक आहे" असें एका रोमन इसमाचे उद्गार आहेत. तथापि देवतांच्या स्वरूपाविषयीं व गुणांविषयीं रोमन लोकांनीं ग्रीक लोकांइतकी चिकित्सा केलेली दिसत नाहीं. उलट रोमन लोक देवतांशीं फार भिऊन वागत असत असें दिसतें. देवतांविषयीं वाटणाऱ्या या धास्तीमुळें रोमन समाजांत माणसाच्या जन्मापासून मृत्यूपर्यंत देवतेची कृपा संपादण्याकरितां अनेक धार्मिक विधी रूढ झालेले होते. माणसें मेल्यावर देव होऊन आपल्या आप्तेष्टांचें संरक्षण करतात अशीहि रोमन लोकांची समजूत असे, व म्हणून ते मेलेल्या माणसांनां अगदीं घराजवळ पुरून ठेवीत असत. तथापि रोमन लोक प्रत्यक्ष देवतांपेक्षांहि रोमन राज्याच्या कायद्याला अधिक मानीत असत. यासंबंधाचें एक लक्षांत ठेवण्यासारखें उदाहरण म्हणजे मृत देह घराजवळ पुरून ठेवण्याची चाल आरोग्यदृष्टया अपायकारक आहे असें दिसून आल्यावर, कोणींहि गांवाच्या हद्दींत प्रेतें पुरूं नयेत असा रोमन सरकारनें कायदा केला आणि तो सर्व रोमन लोकांनीं बिनहरकत पाळला. या एकाच गोष्टीवरून सरकारी कायद्याबद्दल रोमन लोकांत किती आदर असे हें स्पष्ट दिसून येतें. तात्पर्य, वैयक्तिक स्वार्थ आणि वैयक्तिक स्वातंत्र्य यांच्यापेक्षां राष्ट्रहित आणि देशाभिमान यांची किंमत रोमन लोकांनां अधिक वाटत असे; त्याचप्रमाणें धार्मिक विधी व आचार यांपेक्षां सरकारी कायद्यांचें महत्त्व रोमन लोकांनां अधिक वाटत असे. या दोन गोष्टींतच रोमन लोकांच्या साम्राज्यवैभवाचें बीज आहे असें म्हणावें लागतें.

कलाकौशल्य.—हळू हळू ग्रीक वाङ्मयानें रोमन लोकांवर आपला पगडा बसविला, त्याप्रमाणें ग्रीक कलाकौशल्यानेंहि बसविला. युद्धांत मोठमोठे विजय मिळाल्यावर त्यांचें स्मारक म्हणून जीं देवालयें बांधण्यांत येत असत तीं रोमन सरकार एट्रुस्कन किंवा ग्रीक कारागिरांकडून बांधवीत असे. इटालीचा दक्षिणभाग जिंकल्यावर रोमन लोकांचा ग्रीक कलाकौशल्याच्या कामाशीं फार निकट संबंध येत गेला. ग्रीकांच्या राज्यांतील भाग्यांचे अनेक सुंदर नमुने रोमन लोकांनां मिळाले, व रोमन लोकांजवळ मौल्यवान धातूंचा संग्रह अधिकाधिक होत गेला. शिवाय जिंकलेल्या मुलुखांतून अनेक प्रकारचे पुतळे व मूर्ती रोमन लोकांनीं लुटून आणिल्या होत्या. व्होल्सिनी या एकाच शहरांतून रोमन लोकांनीं २००० पुतळे आणिले असें नमूद केलेलें आहे. याप्रमाणें ॲग्रिजेंटम, सिराक्यूस, कॉरिंथ वगैरे अनेक शहरांतून अनेक कलांचे अनेक उत्कृष्ट नमुने रोमन लोकांनीं आपल्या राजधानींत आणिले. तथापि ललित व उपयुक्त कलांचें प्रत्यक्ष ज्ञान मात्र रोमन लोकांनीं मिळवून त्यांत प्रगति केली नाहीं, हें रोमन लोकांच्या बुद्धिमत्तेंतलें मोठें वैगुण्य आहे. तथापि राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें साम्राज्यांतील शहरांची आरोग्यदृष्टया नीट मांडणी करणें, प्रत्येक शहराला पाण्याचा भरपूर पुरवठा करणें व शहरांतील घाण वाहून जाण्याकरितां गटारें, नहर, वगैरे नीट बांधणें या गोष्टी रोमन लोकांनीं उत्तम केल्या होत्या. शिवाय ज्वालामुखींतील तलावांत सांठलेला रस वाहून जाण्याकरितां रोमन लोकांनीं जे बोगदे तयार केले होते ते रोमन लोकांच्या वास्तुकलेंतील नैपुण्याची साक्ष देतात. तथापि ही बोगदे खोदण्याची कलाहि त्यांनीं एट्रुस्कन लोकांपासून घेतली होती असें दिसतें.

वाङ्मय.—रोमन इतिहासांतील या सुवर्णयुगांत रोमन वाङ्मयालाहि सुरुवात झालेली दिसते. परंतु प्रथमचे रोमन ग्रंथ म्हणजे ग्रीक ग्रंथांचीं केवळ भाषांतरें होतीं. पहिल्या प्यूनिक युद्धानंतर ( ख्रि० पू० २४० ) लिव्हिअस अँड्रोनायकस यानें लिहिलेलें पहिलेंच नाटक रोम येथें रंगभूमीवर आलें. त्यानें दुसरींहि अनेक नाटकें लिहिलीं, पण तीं ग्रीक वाङ्मयांतून घेतलेलीं होतीं. त्यानेंच ओडिसी या ग्रीक काव्याचें लॅटिनमध्यें भाषांतर केलें. दुसरा कवि नीव्हिअस यानें कांहीं नाटकें लिहिलीं व पहिल्या प्यूनिक युद्धावर एक स्वतंत्र काव्य केलें. क्यू. एनिअस याला रोमन काव्याचा आद्यजनक मानतात. त्यानें प्रथम लॅटिन भाषेमध्यें ग्रीक वृत्तांचा प्रचार पाडला. यानें अनेक आनंदपर्यवसायी व शोकपर्यवसायी नाटकें लिहिलीं. शिवाय रोमचा काव्यबद्ध इतिहासहि त्यानें लिहिला होता. मिक्किअस प्लॉटस आणि सिसिलिअस स्टेशिअस या दोघांनीं अनेक आनंदपर्यवसायी नाटकें लिहिलीं. पण यांनींहि ग्रीक नाट्यग्रंथांचा बराच आधार घेतला होता. यांशिवाय दुसरे कित्येक कवी होऊन गेले; तथापि त्यांपैकीं कोणीहि प्रत्यक्ष जातीनें रोमन नव्हता. प्रत्यक्ष रोम शहरानें असा एकहि कवि निर्माण केला नाहीं. रोमन लोकांत क्यू. फेबिअस पिक्टॉर, एल. सिन्सिअस, ॲलिमेंटस पॉस्टयूमिअस ॲल्बायनस, एम्. पोर्शिअस केटो वगैरे कित्येक इतिहासकार होऊन गेले. त्यांपैकीं पहिल्या तिघांनीं आपले ग्रंथ ग्रीक भाषेंत लिहिले. सर्व्हिअस यानें प्राचीन रोमन राज्यपद्धतीसंबंधानें ग्रंथ लिहिला, व बरेंच ऐतिहासिक संशोधन केलें. केटो यानें कृषिविषयक लिहिलेला ग्रंथ आज उपलब्ध आहे. त्यावरून प्राचीन इटालीबद्दल बरीच माहिती मिळते

**रोमन लोकसत्ताका या काळ-उत्तरार्ध**, ( खि. पू. १२७-३१ ):—खि पू. १३७ पर्यंतच्या काळांतील रोमन लोकांची साधी कृषिव्यवसायप्रधान रहाणी आणि शुद्ध नैतिक आचरण या गुणांच्या जोरावर रोमन लोकांनीं मोठें साम्राज्य संपादन केलें. या साम्राज्यविस्ताराचा रोमन राज्यकर्त्यांनीं असा एक फायदा करून घेतला कीं, गरीब रोमन लोकांनां या जिंकलेल्या देशांत वसाहती करण्याकरितां फुकट जमिनी दिल्या, व अशा रीतीनें रोमन समाजांतील गरीब वर्गाची स्थिति सुधारली. यामुळें खुद्द रोम राजधानींतले आणि या अनेक वसाहतींतले रोमन लोक बरेच श्रीमंत झाले. साम्राज्य बरेंच वाढल्यावर युद्धाचे प्रसंग कमी होऊन रोमन समाजाला शांततेचे दिवस लाभले. या शांततेच्या काळांत मोठमोठे धार्मिक उत्सव व समारंभ तसेच शारीरिक खेळांचे सामने, व नाटकें, तमाशे वगैरे करमणुकीचे प्रकार यांची आवड रोमन लोकांत वाढूं लागली; लॅटिन भाषेचें अध्ययन व त्या भाषेंत गद्यपद्यमय रचना यांच्याकडे रोमन लोकांचें लक्ष वेधलें; आणि ग्रीक भाषा व ग्रीक वाङ्मय, तसेंच ग्रीकांचें तत्त्वज्ञान व अलंकारशास्त्र या विषयांतहि रोमन लोकांनीं बरीच प्रगति केली.

या सुपरिणामाबरोबर ग्रीक लोकांतल्या कित्येक अनिष्ट गोष्टीहि रोमन् लोकांत सहजच शिरल्या. ग्रीक लोकांतले भविष्यकथन करणारे, तसेच नाकाडोळ्याचे वैदू, स्वयंपाकी, न्हावी, खुषमस्कऱ्ये, दरबारी वगैरे अनेक प्रकारच्या लोकांनीं रोमन समाजांत प्रवेश केला; व त्यामुळें रोमन समाजांत बऱ्याचशा अनिष्ट गोष्टी फैलावल्या. रोमन लोकांतले उच्च नैतिक सद्गुण, लष्करी बाणा, आणि शेतीची आवड वगैरे सर्व लोपत गेले. रोमन कायदा आणि रोमन राज्यव्यवस्था यांचा बाह्य देखावा कायम होता, तथापि धनिक रोमन लोक आणि बडे सरकारी अधिकारी यांच्यामध्यें हळू हळू स्वार्थबुद्धीनें आणि चैनबाजीनें प्रवेश केला. याचा मुख्य परिणाम असा झाला कीं, रोमन पुढारी लोकांत व्यक्तिद्वेष वाढून राज्यांतील अधिकाराच्या जागांकरितां पक्ष धरून आपसांत यादवी सुरू झाली. रोमन प्रजासत्ताकाच्या उत्तरार्धाचा हा काळ अशा प्रकारच्या युद्धांनीं भरलेला आहे. या काळांतील ऐतिहासिक गोष्टींचें टिपण येणेंप्रमाणें:—

खि पू. १३३-१११.—या सुमारास ट्रिब्यून नामक पॅट्रिशियन लोकांच्या जाचापासून स्वतःचें संरक्षण करण्याकरितां लोकांनीं निवडलेल्या अधिकाऱ्यांचें प्रस्थ रोमन राज्यांत फार माजलें. राज्यकारभारांत प्रत्यक्ष कॉन्सलपेक्षांहि वरिष्ठ अधिकार हे ट्रिब्यून गाजवूं लागले. खि. पू. १३३ सालीं टायबीरिअस संप्रोनिअस ग्रॅक्कस या नांवाचा इसम ट्रिब्यून निवडला गेला. त्यानें सार्वजनिक जमिनी गरीब लोकांनां वांटण्याचा व प्रत्येक माणसाकडे कांहीं मर्यादितच मालकीची जमीन असावी असा कायदा पुढें आणिला. या कायद्याला मोठ्या जमीनदार लोकांनीं विरोध केला. टायबीरिअस ग्रॅक्कस, त्याचा भाऊ केयस आणि सासरा ॲप्पिअस क्लॉडिअस या तिघांनीं संगनमत करून वरील कायदा व दुसऱ्या कित्येक सुधारणा अंमलांत आणण्याचा प्रयत्न चालविला; परंतु एक वर्षाच्या मुदतीनंतर आपण पुन्हां ट्रिब्यून निवडून यावें अशी कायद्याच्या विरुद्ध खटपट टायबीरिअस ग्रॅक्कसनें केली तेव्हां प्रतिपक्षानें दंगा केला, व त्यांत टायबीरिअस ग्रॅक्कस मारला गेला. त्याचा भाऊ केयस ग्रॅक्कस यानें नव्या सुधारणा करण्याचें धोरण तसेंच पुढें चालू ठेविलें. परंतु त्याला प्रतिपक्षी प्रबल भेटले; यामुळें सामान्य लोकांची सहानुभूति मिळविण्याकरितां गरीब लोकांनां सरकारी खर्चानें धान्य वांटावें असा ठराव त्यानें पुढें आणिला. जिंकलेल्या दूरदूरच्या प्रांतांत रोमन लोकांच्या वसाहती स्थापाव्या ही कल्पनाहि त्यानेंच प्रथम पुढें मांडिली. शिवाय रोमन सेनेटकडून चोख न्याय मिळत नाहीं म्हणून स्वतंत्र न्यायकोर्टें स्थापावें असाहि कायदा त्यानें पास करून घेतला. खि. पू. १२२ मध्यें त्यानें सर्व लॅटिन लोकांनां रोमन नागरिकत्वाचे हक्क द्यावे असा ठराव पुढें आणिला, पण तो सेनेटनें फेटाळून लाविला. याच्या पुढच्या वर्षी केयस ग्रॅक्कस हा एका दंग्याच्या वेळीं मारला गेला. पुढील दहापांच वर्षांत, ग्रॅक्कसबंधूंनीं ज्या कांहीं सुधारणा केल्या होत्या त्या त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं युक्तिप्रयुक्तीनें रद्द केल्या.

खि. पू. १११-१००.—या सुमारास न्युमिडिआ या राज्याचे दोन राजे ज्युगर्था व ॲधर्बल यांच्यामध्यें तंटा लागला. त्यांत ॲधर्बल मारला गेला. पण मरणापूर्वी त्यानें रोमन सेनेटचें मदत देण्याबद्दल मन वळविलें होतें त्यामुळें रोमनें ज्युगर्थाबरोबर युद्ध सुरू केलें; व त्यांत अखेर मेरिअस व सल्ला या दोन रोमन सेनापतींनीं ज्युगर्थाचा पराभव केला. खि. पू. १०४ मध्यें मेरिअस कॉन्सल निवडून आला. या सुमारास सिंब्रि, ट्यूटोनीझ ( ट्यूटोनाय ) आणि अँब्रोनीझ या जातींच्या रानटी लोकांनीं इटालीवर स्वारी केली. परंतु मेरिअसनें रोमन सैन्याची चांगली व्यवस्था करून या रानटी लोकांचा पराभव केला व बरेंच लोक कैद करून आणिले.

खि० पू० १००-८६ (मेरिअसची कारकीर्द).—मेरिअस हा वरील पराक्रमामुळें सहा वेळां कॉन्सल निवडून आला. नवीन जिंकून घेतलेल्या जमिनी स्वतःच्या शिपायांनां वांटून द्याव्या असा कायदा त्यानें सेनेटकडून पास करून घेतला. परंतु पुढें खि. पू. ९९ मध्यें सेनेटनें त्याच्या प्रतिस्पर्ध्याच्या मदतीनें त्यास विरोध केला. तेव्हां युद्ध उपस्थित झाल्याशिवाय आपल्या हातीं सत्ता राहण्याची आशा नाहीं असें वाटून तो आशियांत गेला, व तेथें त्यानें मिथ्राडेटीझशीं कुरापत काढून वैर संपादण्याचा प्रयत्न केला. नंतर तो स्वदेशीं परत आला व सामाजिक युद्धांत त्यानें दुय्यम सेनापतीच्या जागीं काम केलें ( ९० ). या धामधुमीच्या काळांत

सल्ला आणि ज्यूलिअस सीझर हे दोन पराक्रमी रोमन इसम पुढें आले. खि. पू. ८८ मध्यें मिथ्राडेटीझशीं युद्ध सुरू होऊन सेनेटनें सैन्याचें आधिपत्य सल्ला याजकडे दिलें; परंतु मेरिअसनें सल्पिशिअस या ट्रिब्यूनच्या मदतीनें तें सल्ला याजकडून काढून स्वतःकडे घेतलें. तेव्हां सल्ला रोमवर चालून आला व त्यानें सल्पिशिअस व मेरिअस यांचा पराभव केला. सल्ला व मेरिअस यांच्यामधील लढा म्हणजे वस्तुतः लोकपक्ष व सेनेट यांच्यामधीलच लढा होता. ट्रिब्यूनची वाढती सत्ता सेनेटला असह्य झाली होती. सल्ला यास विजय मिळतांच त्यानें मेरिअसला पकडून त्यास मॅजिस्ट्रेटकडून देहान्त शिक्षा ठोठावली. पण लोकांच्या सहानुभूतीमुळें मेरिअस बचावून आफ्रिकेंत पळून गेला. खि. पू. ८७ मध्यें, निवडणुकी आटपून सल्ला हा आशियांत निघून गेल्यावर कॉन्सल एल. कॉर्नीलिअस सिन्ना यानें, सल्पिशिअस याच्या ज्या लोकपक्षाचे हक्क विस्तृत करण्याच्या ठरावांवर रणें माजून सल्ला यानें तरवारीच्या जोरावर तात्पुरता विजय मिळविला होता तेच ठराव पुन्हां लोकसभेपुढें आणले. पण त्याचा साथीदार जो दुसरा कॉन्सल त्यानें सैन्यासह येऊन मत द्यावयास आलेल्या विरुद्ध पक्षाची कत्तल केली. ही संधि साधून मेरिअस यानें आफ्रिकेंतून सिन्नाच्या मदतीस येऊन रोमवर स्वारी केली व तें शहर हस्तगत करून तेथें पांच दिवस उमराव मंडळींची कत्तल व लुटालूट केली. शेवटीं ८६ मध्यें लोकसभांनीं मेरिअसला पुन्हां सातव्यानें कॉन्सल नेमिलें, पण तो लवकरच मरण पावला.

खि॰ पू॰ ८६–७८ (सल्लाची कारकीर्द).—तिकडे आशियांत सल्लानें मिथ्राडेटीझचा पराभव केल्यावर तो परत सैन्यानिशीं रोमवर चालून आला. त्याच्या पक्षास मोठा पाँपी हा पराक्रमी पुढारी मिळून त्यानें रोम येथील कॉन्सलचा पराभव केला. यानंतर मिथ्राडेटीझबरोबर पुन्हां युद्ध सुरू होऊन तें ८१ मध्यें संपलें. इकडे रोममध्येंहि मुख्य सत्ता हातीं घेण्याकरितां निरनिराळ्या पुढाऱ्यांच्या पक्षांत मारामाऱ्या सुरू होऊन त्यांत अखेर सल्ला विजयी होऊन त्यानें सर्व सत्ता हातीं घेतली, व प्रतिपक्षांतील अनेक पुढारी माणसांची कत्तल करून त्यांची मालमत्ता जप्त केली. नंतर त्यानें सेनेट सभा पुनर्घटित करून तिचे अधिकार वाढविले, व ट्रिब्यूनची सत्ता कमी केली. याप्रमाणें राज्यकारभाराची नीट व्यवस्था लावून दिल्यावर सल्लानें ७९ मध्यें स्वतः होऊन अधिकारन्यास केला, व लागलाच पुढच्या वर्षी तो मरण पावला.

खि॰ पू॰ ७८—६० (पाँपीची कारकीर्द).—पाँपीनें तिसऱ्या मिथ्राडेटीझबरोबर युद्धांत जय मिळविला व भूमध्यसमुद्रावर चांचेगिरी करणाऱ्या अनेक लोकांचा पराभव केला. शिवाय सिरिया, आशियामायनर या रोमन प्रांतांतील बंडाळी मोडिली. ६२ मध्यें तो रोमला परत आला तेव्हां त्यानें आपल्या शिपायांनां नव्या जमिनी मिळाव्या अशी मागणी केली. पण सेनेटनें ती नाकारिली.

खि॰ पू॰ ६०–४९ (पहिलें ट्रायमविरेट उर्फ त्रिकूटसत्ता).—या काळांत पाँपी, सीझर व क्रॅसस यांनीं आपलें त्रिकूट बनवून राजकीय सत्ता हातीं घेतली. ५९ मध्यें सीझर कॉन्सल झाला; आणि पाँपीच्या सैनिकांनां जमिनी देण्याच्या ठरावाला लोकसभेनें संमति दिली. सिसिरो व केटो हे वरील त्रिकूटाचे बलाढ्य प्रतिस्पर्धी होते. खि. पू. ५७ व ५१ यांच्या दरम्यान सीझरनें फ्रान्स, जर्मनी वगैरे यूरोपचा भाग जिंकून घेतला. या काळांत पाँपी हा कॉन्सल होता. पुढें सीझरचें आणि पाँपीचें पटेनासें झालें व सेनेटनें सीझरला परत बोलाविलें.

खि॰ पू॰ ४९–४४ (जूलियस सीझरचें वर्चस्व).—सीझर परत आल्यावर पाँपी ग्रीसमध्यें पळून गेला. ४८ मध्यें सीझर कॉन्सल नेमला गेला. त्याच सालीं त्यानें पाँपीचा पराभव केल्यामुळें पाँपी इजिप्तमध्यें पळून गेला व तेथें मारला गेला. यानंतर इजिप्तमध्यें राज्याबद्दल तंटे चालू होते तिकडे स्वारी करून सीझरनें इजिप्शियन सैन्याचा पराभव केला, आणि क्लीओपात्रा व तिचा भाऊ यांच्या हातीं राजसत्ता देऊन व त्यांनां रोमचे मांडलिक बनवून तो परत आला. सीझरला दहा वर्षांकरितां डिक्टेटर म्हणजे सर्वाधिकारी म्हणून नेमण्यांत आलें. तेव्हां त्यानें राज्यकारभारात अनेक सुधारणा केल्या. त्यानें मतदानाचा हक्क अधिक लोकांनां दिला, सेनेटच्या सभासदांची संख्या वाढविली, अधिक रोमन वसाहती करविल्या, सर्व रोमन साम्राज्याची पाहणी करण्याची व्यवस्था केली, आणि कायद्यांचें नवें कोड तयार करण्याची योजना केली. शिवाय त्यानें अनेक सार्वजनिक कामें करण्याचें ठरविलें. याप्रमाणें सीझर सर्वसत्ताधीश व लोकप्रिय झाला तेव्हां त्यालाच कायमचा राजा नेमून राजमुकुट अर्पण करण्याबद्दल सूचना पुढें आल्या. पण त्यानें राजपद स्वीकारण्याचें नाकारिलें. तथापि त्याच सालीं म्हणजे ४४ मध्यें ब्रूटस, कॅशिअस वगैरे त्याच्या प्रतिस्पर्ध्यांनीं गुप्त कट करून त्यास ठार मारिलें. पुढें सीझरच्या पक्षाचा मार्क अँटनी यानें या कटवाल्यांविरुद्ध लोकमत तयार केलें. तेव्हां कटवाले पळून गेले आणि मार्क अँटनी रोममध्यें सर्वसत्ताधीश बनला.

खि॰ पू॰ ४४–३० (दुसरें ट्रायमव्हिरेट).—४३ मध्यें सेनेटनें ऑक्टेव्हिएनस (ऑक्टेव्हिअन) याचा पक्ष घेऊन त्याला अँटनीविरुद्ध पाठविलें; तेव्हां अँटनीचा पराभव होऊन ऑक्टेव्हिअन कॉन्सल झाला. परंतु त्यानें अँटनी व लेपिडस यांशी सख्य करून पुन्हां एक त्रिकूट बनविलें. या त्रिकूटानें ब्रूटस, कॅशिअस वगैरे कटवाल्यांविरुद्ध सूड उगविला. ४० मध्यें या त्रिकूटानें रोमन साम्राज्य आपसांत वांटून घेतलें. पुढें अँटनी क्लीओपाट्राच्या जाळ्यांत सांपडून इजिप्तमध्यें जाऊन राहिला व ऑक्टेव्हिअनशीं त्याचें जमेनासें झालें. तेव्हां दोघांमध्यें लढाई होऊन अँटनीच्या

आरमाराचा पराभव झाला. खि. पू. ३० मध्यें अँटनी व क्लीओपाट्रा या दोघांनीं आत्महत्या केली. यानंतर इजिप्त देश रोमन साम्राज्यास जोडण्यांत येऊन आक्टेव्हिअन सर्व रोमन साम्राज्याचा सत्ताधीश बनला.

**लोकसत्ताकाच्या उत्तरार्धांतील लोकस्थिति.**—लोकसत्ताक स्थापन झाल्यावर प्रथम सर्व राजकीय सत्ता पॅट्रिशियन लोकांच्या म्हणजे उच्च रोमन कुळांतील लोकांच्या ताब्यांत होती. पुढें रोमन राज्याचा विस्तार वाढल्यावर प्लीबियन लोकांचा म्हणजे सामान्य लोकांचा मोठा वर्ग रोमन साम्राज्यांत तयार झाला, आणि या दोन वर्गांत स्पर्धा सुरू होऊन प्लीबियन लोकांनां हळू हळू बरेच हक्क मिळाले. प्लीबियन लोकांतर्फे ट्रिब्यून नांवाचे वरिष्ठ अधिकारी नेमण्यांत येऊन प्लीबियन लोकसभेच्या (कॉमीसिआ ट्रिब्यूटाच्या) मार्फत कायदे करण्याचा अधिकार हातीं आला. येणेंप्रमाणें सेनेटला प्रतिस्पर्धी अशी संस्था निर्माण होऊन कॉन्सल व ट्रिब्यून या वरिष्ठ अधिकाऱ्यांमध्यें झगडे होऊं लागले. लोकसत्ताकाच्या उत्तरार्धांत हा सामान्य लोकांचा पक्ष फार बळावला, व अखेर या दोन पक्षांच्या पुढाऱ्यांमध्यें सत्ता हातीं येण्याकरितां आपसांत युद्धें सुरू झालीं. अखेर पक्षाभिमानाचें पर्यवसान व्यक्तिविषयक स्वार्थामध्यें झालें. सेनेटसारख्या पुरातन संस्थेलाहि पुढारी जुमानीतनासे झाले. अशा रीतीनें रोमन राज्यघटनेंत प्रथम नियंत्रित राजसत्तेनंतर लोकसत्ता व नंतर अनियंत्रित पुढाऱ्यांचा जुलमी अंमल असे फेरफार होत गेले, व अखेर सर्व बेबंदशाही माजली. या अंदाधुंदीच्या काळांतून अखेर ऑक्टेव्हिअन हा मागील पुढाऱ्यांच्या अनुभवानें अत्यंत धूर्त बनलेला इसम पुढें आला आणि सर्व रोमन साम्राज्यावर बादशहा म्हणून राज्य करूं लागला.

**वाङ्मय.**—लोकसत्ताकाच्या उत्तरार्धांत रोम येथें राजकीय बखेडे माजल्यामुळें उच्च वाङ्मय निर्माण करण्याचा व्यवसाय शिथिल झाला, परंतु वक्तृत्वकलेला मात्र फार ऊत आला. या काळांतला वक्तृत्वशास्त्र व कला या दोहोंमध्यें सर्वश्रेष्ठ ठरलेला वक्ता सिसिरो हा होय. त्यानें तत्कालीन अनेक वक्त्यांची माहिती देणारा एक ग्रंथहि लिहिलेला आहे. या काळांतला दुसरा लेखनव्यवसाय म्हणजे इतिहासग्रंथ लिहिण्याचा. अनेक सुप्रसिद्ध सेनापतींनीं आपल्या मोहिमांचे वृत्तान्त लिहून ठेविले आहेत. त्यांत सीझरच्या कॉमेंटरीज फार प्रसिद्ध आहेत. व्याकरण आणि भाषाशास्त्र या विषयांतहि कांहीं थोडे लेखक झाले. त्यांत व्हॅरो हा प्रसिद्ध आहे. तो पॉपी, सीझर व पुढें ऑक्टेव्हिअन या तिघांच्या आश्रयास होता. त्यानें लॅटिन भाषेसंबंधानें २४ पुस्तकें लिहिलीं असून त्यांपैकीं सहा आज उपलब्ध आहेत. शिवाय त्यानें कृषि या विषयावर तीन पुस्तकें लिहिलीं होतीं. या काळांत नाट्यवाङ्मयहि फारसें जन्मास आलें नाहीं. नाटकाऐवजीं माइम (फार्स) नांवाचे लहान लहान नाट्यप्रबंध कांहीं काळ बरेच लोकप्रिय झाले होते. ही प्रबंधरचना रोमन लोकांनीं मूळ ग्रीकांपासूनच घेतली होती. पण ग्रीक नाट्यप्रबंध गंभीर व उच्च स्वरूपाचे असत, तर रोमन लोकांनीं लिहिलेले प्रबंध अश्लील व तमाशेवजा असत. या शेंदोनशें वर्षांच्या काळांत चांगले कवीहि कोणी निर्माण झाले नाहींत. फक्त ल्युक्रीशिअस व काटलस हीं दोनच नांवें उल्लेखिण्यासारखीं आहेत; ल्युक्रीशिअसचें मोठें काव्य 'दि नेचर ऑफ दि युनिव्हर्स' हें आहे. त्यांत ही सृष्टि निर्माण करणारा देव वगैरे कोणी नसून ती मूलभूत परमाणूंपासून निसर्गाच्या सामान्य नियमांअन्वयें बनत गेली असें प्रतिपादिलें आहे. हें सृष्ट्युत्पत्तीचें नास्तिकपंथी तत्त्व ग्रीक तत्त्ववेत्ता एपिक्यूरस याचें असून या एकंदर काव्यांत कवीचा ओढा आधिभौतिकपंथी ग्रीक तत्त्ववेत्त्यांकडे असलेला दिसून येतो. दुसरा कवि काटलस यानें उच्चनीच प्रकारच्या अनेक कविता केल्या. लोकसत्ताक काळच्या अखेरचे आणि बादशाही सत्तेच्या आरंभींचे दोन प्रख्यात कवी व्हर्जिल व होरेस हे होत. व्हर्जिलचें सर्वांत प्रसिद्ध काव्य इनीइड हें आहे. पण त्यांतील बहुतेक वर्णनें होमर व इतर ग्रीक कवींच्या काव्यांतून घेतलेलीं आहेत. होरेसच्या ओड्स फार प्रसिद्ध आहेत.

**कलाकौशल्य.**—या बाबतींत लोकसत्ताकाच्या पूर्वार्धापेक्षां उत्तरार्धांत फारसें अधिक कांहीं झालें नाहीं. ग्रीक कलांचेंच प्राबल्य रोममध्यें कायम होतें. कलाकौशल्याच्या जुन्या वस्तूंचा संग्रह मात्र रोममध्यें पुष्कळ अधिक वाढला. सीझरनें अनेक देश जिंकून त्यांत भर घातली होती. रोमचें वैभव व संपत्ति हीं जसजशीं वाढत चाललीं तसतशीं मोठमोठ्या इमारती, सडका, पूल, बोगदे, कालवे वगैरे बांधकामें करण्यांत आलीं, व रोममध्यें अनेक मोठाल्या भव्य सार्वजनिक इमारती बांधण्यांत आल्या.

**परमार्थसाधन व नीतिमत्ता.**—पूर्वीच्या धार्मिक विधींवरची लोकांची श्रद्धा उडत चालली, पण त्याबरोबर तत्त्वज्ञानाची प्रगति फारशी न झाल्यामुळें आणि उलट संपत्ति व ऐश्वर्य वाढत गेल्यामुळें रोमन लोकांमध्यें ऐषआराम व चैन फार वाढत जाऊन त्यांची नीतिमत्ता अत्यंत खालावली. विवाहबंधनांतील शिथिलता आणि स्त्रीवर्गाचें राजरोस अनैतिकाचरण या गोष्टी रोमन समाजाच्या अधःपाताची साक्ष देतात. सीझर व ऑक्टेव्हिअन यांनीं ही दुःस्थिति जाणून विवाहसंबंधाच्या बाबतींत कडक कायदे अंमलांत आणण्याचा प्रयत्न केला. भविष्यें जाणण्याची इच्छा रोमन समाजांत कायम होती, पण भविष्यकथनाचे पूर्वीचे मार्ग (ऑरेकल्स) मागें पडून ग्रहांच्या साह्यानें भविष्यें वर्तविण्याची पद्धति अमलांत येऊं लागली. अशा रीतीनें रोमन साम्राज्यांत सामाजिक स्थिति सर्वत्र विस्खलित व अवनत अशी झाली असल्यामुळें यानंतर लवकरच उदयास आलेल्या ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रसाराला रोमन साम्राज्यांत आयतीच चांगली भूमिका तयार झाली.

**रोमन बादशाही सत्तेचा काल** (खि. पू. ३०–इ. स. ४७६ ).—रोमन बादशाही सत्तेचा काळ म्हणजे रोमन राष्ट्राच्या अवनतीचा काळ असा सामान्य समज आहे, परंतु ही समजूत चुकीची आहे. कारण बादशाही-सत्तेच्या या काळांत, साम्राज्याची भरभराट, शत्रूवरील विजय आणि विस्तृत भूभागावर सत्तेचा प्रसार या दृष्टीनें पाहतां रोमन राष्ट्राचें वैभव शिखरास पोहोंचलेलें आढळतें. बादशाही सत्तेचा काळ म्हणजे अवनतीचा काळ हा समज रूढ होण्याचीं दोन कारणें आहेत. पहिलें कारण असें कीं, ऑगस्टसच्या वेळेपासून लोकसत्ताक पद्धति बदलून राजसत्ताक पद्धति म्हणजे एकतंत्री राज्यकारभार सुरू झाला; म्हणजे अर्थात् अवनति झाली असें पुष्कळांनां वाटतें. दुसरें कारण असें कीं, रोमन बादशाहीच्या उत्तरार्धांत राजसत्तेवर ख्रिस्ती संप्रदायसत्तेनें आपला पगडा बसविला . हें रोमन राष्ट्राच्या अवनतीचेंच चिन्ह होय, असें कित्येकांचें म्हणणें आहे.

वास्तविक पाहतां या दोन्हीहि कारणांत विशेष अर्थ नाहीं. कारण रोम येथें लोकसत्ता असतांनाहि आधुनिक अर्वाचीं खरी लोकशाही तेथें होती असें म्हणतां येणार नाहीं. कारण, रोमन साम्राज्यांत ज्यांनां नागरिकत्वाचे पूर्ण राजकीय हक्क नाहींत, अशा जित लोकांची आणि प्रत्यक्ष गुलामांची संख्याच पुष्कळ होती. रोमचा राज्यकारभार लोकसत्तेच्या वेळीं कांहीं अंशीं प्रातिनिधिक स्वरूपाचा होता; पण तितक्या अंशानें तो बादशाही सत्तेच्या वेळींहि होता. निदान ऑगस्टस व पहिले कित्येक बादशहा यांच्या वेळीं तरी राज्यकारभाराच्या घटनेंत फारसा फरक झालेला नव्हता. शिवाय बादशाही पदाला वंशपरंपरेचा हक्क केव्हांच लागू करण्यांत आलेला नव्हता. या एकाच गोष्टीवरून रोमन बादशाही आणि शुद्ध राजसत्ताक पद्धति यांतील फरक स्पष्ट दिसतो. अखेर अखेर बादशहांनीं अगदीं अनियंत्रित कारभार हातीं घेतला खरा, तथापि बराच काळ सेनेट सभा आणि लोकांनीं निवडलेले कॉन्सल हे बाह्यतः तरी राज्यकारभाराचे पुढारी म्हणून गणले जात असत.

ऑगस्टसच्या काळापासून रोमच्या इतिहासांत एका नव्या युगाचा आरंभ होतो हें मात्र खरें आहे. बादशहा म्हणजे एक कायमचा सर्वाधिकारी ( डिक्टेटर ) असून सेनेटपेक्षांहि अधिक सत्ता त्याच्या हातीं असे. राज्यपद्धतींतला हा फार मोठा फरक होय. परंतु या फरकाबरोबर रोमन राष्ट्राच्या अवनतीला सुरुवात झाली असें मात्र होत नाहीं. रोमन वाङ्मयांतलें सुवर्णयुग आणि रौप्ययुग म्हणजे बादशाही सत्तेची आमदानी उर्फ ऑगस्टस व त्याच्या नंतरचे कांहीं बादशाहा यांच्या कारकीर्दीचा काळच होय. तसेंच पांच चांगल्या बादशहांच्या म्हणजे नर्व्हा ते मार्कस ऑरीलिअस ( इ. स. ९६- १८० ) यांच्या वेळीं रोमन राष्ट्राला उत्तम सुखाचे दिवस लाभले. यावरून बादशाही अंमलाची निदान पहिलीं दोन शतकें तरी अवनतीचा काळ म्हणून मानतां येत नाहींत. मार्कस ऑरीलिअसच्या नंतर रोमन राष्ट्राच्या अवनतीला स्पष्टपणें सुरुवात झाली हें खरें आहे. व तिच्या कारणांचें बीज त्याच्या बराच काळ अगोदर पेरलें गेलें होतें हेंहि खरें आहे. फार तर काय सर्व रोमन इतिहास लक्षांत घेतां रोमन सत्तेच्या स्थापनेपासूनच तिच्या नाशाचीं बीजें पेरलीं गेलीं होतीं असें म्हणणें भाग पडतें. ख्रिस्ती संप्रदायाच्या वाढत्या सत्तेबरोबर रोमच्या सत्तेचा अधःपात सुरू झाला असें गिबन आदिकरून कित्येक इतिहासकारांचें म्हणणें आहे पण तें अतिशयोक्तीचें आहे. वास्तविक पाहतां, रोमन साम्राज्यांतील गुलामगिरीची पद्धति, अल्पसंख्याक धनिक वर्ग व बहुसंख्याक निर्धन बेकार वर्ग, वरिष्ठ वर्गांतील खालावत चाललेली लोकसंख्या व त्याबरोबरच ख्रिस्ती धर्मसत्तेचें वाढतें वर्चस्व, या अनेक कारणांमुळें रोमन साम्राज्यसत्ता लयास गेली असें म्हणावें लागतें.

या अंतस्थ कारणांबरोबर दुसरें महत्त्वाचें बाह्य कारण म्हणजे रोमन साम्राज्याच्या सरहद्दीवरील रानटी राष्ट्रांची वाढती सत्ता हें आहे. जगांतील इतिहासावरून पाहतां एका राष्ट्राचें स्थैर्य शेजारपाजारच्या अनेक राज्यांच्या परिस्थितीवर अवलंबून असतें. रोमनें प्रथम इटालींतील राज्यें व नंतर सिसिली, कार्थेज हीं राज्यें जिंकून घेतलीं, व त्या प्रदेशांत रोमन वसाहती, रोमन संस्कृति व रोमन नागरिकत्वाचे हक्क यांचा फैलाव करून रोमन साम्राज्य कांहीं अंशीं एकजीव केलें. परंतु यूरोपच्या उत्तरेकडील व पश्चिमेकडील रानटी लोक रोमन साम्राज्याच्या बाहेर राहिले त्यामुळें त्यांच्यावर रोमन संस्कृतीचा कांहीं एक परिणाम झाला नाहीं. तथापि, अनेक शतकांच्या सान्निध्यानंतर या रानटी लोकांनीं कांहीं बाबतींत आपली सुधारणा करूनं घेतली. रोमन लोक आणि उत्तरेकडील हे रानटी लोक मूळ एकाच वंशांतले असावे असें वाटतें, व त्यामुळें आपला समाज सुधारण्याची क्षमता त्यांच्या अंगीं वसत होती. या रानटी लोकांचा सीझरच्या स्वाऱ्यांपासून रोमच्या युद्धकलेशीं संबंध आल्यामुळें या बाबतींत त्यांनीं रोमन लोकांचें एकदम अनुकरण केलें, आणि नैसर्गिक जोम, क्रूरपणा आणि दृढनिश्चय या रानटी गुणांनां युद्धकलेची जोड मिळून हे शेजारी अखेर रोमला डोईजड झाले.

या रानटी लोकांच्या संकटांतून स्वतःला वांचविण्याचा एक मार्ग रोमला मोकळा होता. सीझरच्या वेळींच, त्यांचा रोमन साम्राज्यांत अंतर्भाव करून व त्यांच्यामध्यें रोमन संस्कृतीचा आणि रोमन नागरिकत्वाच्या हक्कांचा प्रसार करून त्यांनां रोमन राष्ट्राशीं एकजीव केलें असतें तर हें संकट टळलें असतें. परंतु हें धोरण रोमनें स्वीकारिलें नाहीं. जगाच्या इतिहासांत जागतिक सुधारणेचें आणि मानव जातीच्या प्रगतीचें पाऊल मिश्र मानववंश निर्माण झाल्यानेंच पुढें पडलेलें दिसून येतें. रोमन राष्ट्राच्या आद्य काळांत रोमन समाज अनेक बाह्य रक्तांच्या मिश्रणानें बनला होता. पण

पुढें २५–३० पिढ्या मात्र त्यांत नवीन मिश्रण झालें नाहीं, व त्यामुळें मूळचा रोमन समाज निःसत्व बनत चालला. रोमन लोकसत्ताकाच्या अखेरीचे आणि बादशाही सत्तेच्या आरंभीचे रोम येथील बरेचसे पुढारी व खुद्द बादशहा अस्सल रोमन जातीचे नव्हते. तात्पर्य, रोमन साम्राज्यांतील दूरदूरच्या प्रांतांतले लोक खुद्द रोम शहरांतल्या लोकांपेक्षां अधिक बुद्धिमान् व कर्तृत्ववान् निपजूं लागले, आणि या सर्वांहून रोमन साम्राज्याच्या सरहद्दीवरचे रानटी लोक रणांगणावर अधिक बलिष्ठ ठरून त्यांनीं रोमन सत्तेचा विध्वंस केला.

**ऑगस्टाइन काळ** (खि. पू. ३०–इ. स. १४).—रोमन बादशाही सत्तेच्या काळाचे तीन विभाग पडतात. पहिला विभाग ऑगस्टाइन काळ; दुसरा विभाग रोमन बादशाहीच्या भरभराटीचा काळ; व तिसरा तिच्या अवनतीचा काळ. यांपैकीं पहिल्या विभागांतील ऐतिहासिक महत्त्वाच्या गोष्टी येणें प्रमाणें:—

ऑगस्टसच्या कारकीर्दीत खि. पू. २९मध्यें रोम येथील आपसांतील युद्धें संपून शांततेच्या काळास सुरुवात झाली, व त्याचें निदर्शक म्हणून जेनस देवतेच्या देवालयाचे दरवाजे सेनेटच्या आज्ञेवरून बंद करण्यांत आले. ऑक्टेव्हिअन हा सैन्याचा मुख्य सेनापति नेमण्यांत येऊन युद्ध किंवा तह करण्याचा अधिकार त्याला देण्यांत आला. त्याचप्रमाणें त्याला ऑगस्टस ही पदवी अर्पण करण्यांत येऊन एकदम १० वर्षांसाठीं प्रो–कॉन्सल नेमण्यांत आलें. खि. पू २०मध्यें पार्थियाच्या राजाबरोबर व १२–९मध्यें जर्मनींत रोमनें कांहीं लढाया केल्या. खि. पू. ४ किंवा १मध्यें येशू ख्रिस्ताचा जन्म झाला.

**ऑगस्टाइन काळांतील लोकस्थिति.**—ऑगस्टस आणि तदुत्तर बादशहा यांनीं रोमन साम्राज्याला जी शांतता मिळवून दिली तिजबद्दल रोमन प्रजेला बरीच मोठी किंमत द्यावी लागली. ती किंमत म्हणजे बादशहांनीं हातीं घेतलेलें सर्वाधिकारित्व ही होय. बादशाही काळांत कांहीं युद्धें झालीं. परंतु तीं साम्राज्यवृद्धीकरितां नसून साम्राज्यांतील दूरदूरचे प्रांत संरक्षण करण्यापुरतीं होतीं. रोमन लोकसत्ताकाच्या काळांतील देश जिंकण्याकरितां केलेलीं अनेक युद्धें व पुढें झालेलीं रोमन पुढाऱ्यांतील आपसांतील युद्धें यांनीं रोमन लोक लढायांनां अगदीं कंटाळून गेले होते. त्यामुळें सुख आणि शांतता यांच्या लाभाकरितां रोमन बादशहाच्या हातीं अनियंत्रित सत्ता देण्यास ते सहजच तयार झाले. शांततेचें चिन्ह म्हणून या काळांतील ग्रीक व लॅटिन नाण्यांवर शांततेच्या देवतेची मूर्ति पहावयास मिळते.

**ऑगस्टस व फ्रान्सचा तिसरा नेपोलियन यांची तुलना.**—रोमचा बादशहा ऑगस्टस आणि फ्रान्सचा तिसरा नेपोलियन यांच्यामध्यें अनेक बाबतींत साम्य आहे. हे दोघेहि अधिकारारूढ झाले तेव्हां त्यांच्या प्रतिपक्षीयांनीं त्यांची अल्पवयी म्हणून थट्टा केली. सिसिरोनें ऑगस्टसला 'कार्कचा पोर' म्हटलें व व्हिक्टर ह्यूगोनें नेपोलियनला 'बटु' म्हटलें. दोघेहि आपसांतील युद्धांच्या व राज्यक्रांतीच्या धामधुमीनंतर अधिकारारूढ झाले होते. दोघांच्याहि वेळीं जमिनीच्या मालकी हक्कदारांमध्यें पुष्कळ फेरबदल झाले होते. त्यामुळें तत्कालीन जमीनदारांच्या हक्कसंरक्षणाची हमी देणाराचा पाठीराखेपणा करण्यास जमीनदारवर्ग तयार होता. या दोघांहि बादशहांनीं राज्यकारभाराचीं बहुतेक सूत्रें आपल्या हातीं घेतलीं; पण त्याचा उपयोग उदारपणानें शास्त्रें व कला यांनां उत्तेजन देण्याच्या आणि लोककल्याणाच्या कामीं केला. अलौकिक बुद्धिमत्ता दोघांमध्येंहि नव्हती, परंतु त्यांच्यांत व्यवहारचातुर्य व धूर्तपणा बऱ्याच प्रमाणांत होता. दोघेहि लोकमताचा कल पाहून आपलें धोरण ठरवीत असत. दोघांनींहि पुराणमताभिमानी पक्षाचा व जुन्या परंपरेच्या घराण्यांचा मान राखला. हें इतकें साम्य असलें तरी तें परिस्थितींतील समतेमुळें उत्पन्न झालेलें आहे; व्यक्तींच्या स्वभावांतील ऐक्यतेमुळें नाहीं. उदाहरणार्थ, नेपोलियन मोठालीं मनोराज्यें करणारा व गुप्त कारस्थानें लढवणारा होता तसा ऑगस्टस नव्हता. ऑगस्टसच्या हातीं सत्ता पूर्ववयांतच आल्यामुळें प्रत्यक्ष अनुभवानें तो फार शहाणा व मुत्सद्दी बनत गेला, व त्यानें ज्या बादशाही सत्तेचा पाया घातला ती पुढें चारपांचशें वर्षें टिकली. उलट पक्षीं नेपोलियनचें बरेंचसें वय अचाट धाडसी कारस्थानें रचण्यामध्यें जाऊन उतार वयांत राजसत्ता हातीं आल्यामुळें त्याच्या स्वभावांत पुढें सुधारणा झाली नाहीं; व त्यायोगें नेपोलियनच्या हयातींतच फ्रेंच बादशाही सत्ता डळमळूं लागली. ऑगस्टसला बादशहा झाल्यावर अनेक प्रकारच्या सुधारणा करण्यास वेळ भरपूर मिळाला, आणि त्यानें केलेल्या अनेकविध सुधारणांमुळें त्याची कारकीर्द रोमन इतिहासामध्यें सुवर्णयुग म्हणून दुमदुमत राहिली आहे.

**या काळांतील रोमन साम्राज्याचें ब्रिटिश साम्राज्याशीं साम्य.**—रोमन साम्राज्याची आधुनिक ब्रिटिश साम्राज्याशीं अनेक बाबतींत तुलना करतां येण्यासारखी आहे. उ० रोम येथें साम्राज्यसत्ता इंग्लंडमधील राजा आणि पार्लमेंट यांच्याप्रमाणें रोमन बादशहा आणि सेनेट यांच्या हातीं होती. तथापि इंग्लिश पार्लमेंटनें इंग्लंडच्या राजसत्तेला पूर्ण नियंत्रित बनवून राज्यकारभाराचा पाया अधिक मजबूत केला तसें सेनेटनें केलें नव्हतें. रोम येथें सेनेटची सत्ता दिवसानुदिवस कमी कमी होत जाऊन शेवटीं बादशहा पूर्णपणें अनियंत्रित सत्ताधारी बनले, व त्यामुळें अखेर रोमन बादशाही सत्ता डळमळीत होऊन लयास गेली.

सर्व राजकीय हक्क असलेले रोमन नागरिक आणि मुळींच राजकीय हक्क नसलेले गुलाम या रोमन राज्यांतल्या स्थितीप्रमाणेंच जवळ जवळ युनायटेड किंगडममध्यें शंभर वर्षांपूर्वी स्थिति होती. त्या वेळीं युनायटेड किंगडममध्यें प्रॉटेस्टंट लोकांनां सर्व राजकीय हक्क होते तर कॅथॉलिक

लोकांनां मुळींच राजकीय हक्क नव्हते. विशेषतः आयर्लंडमध्यें कॅथॉलिक लोकांच्या राजकीय हक्कांचें प्रकरण फारच विकोपास गेलें होतें. परंतु इंग्लंडनें शहाणपणानें स्कॉटिश व आयरिश लोकांनां अधिकाधिक राजकीय हक्क देऊन खुष केलें आहे, तर उलट पक्षीं रोमन साम्राज्यांत अशी मुत्सद्दीगिरी न लढवली गेल्यामुळें अंतःस्थ अस्वस्थता वाढत जाऊन ती रोमन साम्राज्याच्या लयास अंशतः कारणीभूत झाली.

इंग्लंडच्या साम्राज्यांतील हिंदुस्थान देशाप्रमाणें रोमन साम्राज्यांतहि भिन्न भिन्न जातींच्या व धर्मांच्या लोकांनीं भरलेले देश होते. अशा देशांत मांडलिक राज्यें व संस्थानें राहूं देऊन इंग्लंडप्रमाणें रोमनेंहि स्वतःवरील राज्यकारभाराचें ओझें कांहीं अंशीं हलकें केलें होतें. तथापि हिंदुस्थानांतील संस्थानांच्या राज्यकारभारावर 'ब्रिटिश रेसिडेंटांचें किंवा पोलिटिकल एजंटांचें पूर्ण लक्ष व बरेंच नियंत्रण असतें. शिवाय प्रांतांवरचे गव्हर्नर व हिंदुस्थानचा व्हाइसरॉय या अधिकाऱ्यांची मुदत मर्यादित व यांच्यावर पार्लमेंटचें नियंत्रण कडक असल्यामुळें हिंदुस्थानांतील अधिकारी बंडखोर बनण्याची बिलकुल शक्यता नाहीं. उलट पक्षीं हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयासारखे जे रोमन प्रो. कॉन्सल असत त्यांच्या हातीं बरीच अनियंत्रित सत्ता असे, आणि प्राचीन काळीं दूरदूरच्या प्रांतांतील अधिकाऱ्यांवर योग्य नियंत्रण ठेवण्याची साधनें उपलब्ध नसल्यानें रोमन साम्राज्यांत अस्वस्थता लवकर माजत असे. येणेंप्रमाणें रोमन व ब्रिटिश साम्राज्यांत अनेक बाबतींत साम्य पण परिस्थितीच्या बाबतींत कांहीं महत्त्वाचे फरक आहेत.

*या संक्रमणकालांतील शासनपद्धतीचें स्वरूप.*— ब्रिटिश साम्राज्य आणि रोमन साम्राज्य यांच्या राज्यकारभारांत एक अत्यंत महत्त्वाचा फरक असा आहे कीं, रोमच्या साम्राज्यांतील केंद्रवर्ती राजकीय सत्ता अधिकाधिक अनियंत्रित होत गेली. तथापि रिपब्लिक उर्फ लोकसत्ताक पद्धतीचे दिवस पाहिलेल्या रोमन पिढीच्या मनाला धक्का बसूं नये म्हणून ऑक्टेव्हिअननें लोकसत्ताक काळांतील राज्यकारभाराची पद्धति बाह्यतः कायम ठेवली होती. तो सेनेटकडून मुदती मुदतीचा अधिकार मिळवीत असे; व मुदतीच्या अखेर बिनबोभाट अधिकारन्यास करीत असे. यामुळें सेनेट सभा कुरकुर न करतां त्यालाच पुन्हां मुख्य अधिकारी नेमीत असे. या वेळीं सेनेटच्या सभासदांची संख्या ६०० ठरली होती. निरनिराळ्या अधिकाऱ्यांची निवड करण्याचें काम लोकसभा करीत असे, परंतु या अधिकाऱ्यांनां सर्व बादशहाचे हुकूम अमलांत आणावे लागत. ऑगस्टसनें पूर्वीचे धार्मिक सार्वजनिक उत्सव चालू ठेवून पूर्वपरंपरेच्या अभिमानी जुन्या रोमन घराण्यांनां संतुष्ट राखलें. सर्व सैन्याचा मुख्य सेनापति सेनेटनें ऑगस्टसलाच नेमलें होतें. प्लीबियन लोकांच्या तक्रारींची दाद लावण्याचें काम पूर्वी ट्रिब्यून नामक अधिकाऱ्याकडे होतें. पण या लोकांच्या सर्व तक्रारींची दाद ऑगस्टसनें स्वतःच घेण्याचें ठरविलें; आणि त्याच्या अंगच्या न्यायी व दयाळु स्वभावामुळें त्यानें बरीच लोकप्रीति मिळविली. अशा अनेक युक्त्यांनीं प्रत्यक्ष राज्यकारभाराची सत्ता आणि लोकांची प्रीति ऑगस्टसनें संपादन केली.

*लोकप्रीति संपादण्याच्या आणखी युक्त्या.*—प्लीबियन लोकांनां मत देण्याचा हक्क मिळाल्यापासून त्यांनां अनुकूल करून घेण्याकरितां प्रसंगानुसार गरीब लोकांनां धान्य वांटण्याचे ठराव पास करून घेण्याचा प्रघात लोकसत्ताकाच्या काळांतील पुढाऱ्यांनींच पाडला होता. ख्रि. पू. पहिल्या शतकांत तर असें धान्य वांटण्याचा सामान्य नियमच होऊन बसला होता. जूलिअस सीझरच्या वेळीं रोम येथें असें धान्य घेणारे भिक्षेकरी तीन लक्ष होते. या पद्धतींतील अनिष्टपणा ऑगस्टस जाणून होता. परंतु लोकप्रीति संपादण्याचें हें महत्त्वाचें साधन गमावण्यास तो तयार नव्हता. त्यानें दरमहा धान्य वांटण्याची पद्धत चालू ठेवली इतकेंच नव्हे, तर प्रसंगविशेषीं जादा धान्य व पैसेहि तो वांटीत असे. भिक्षेकऱ्यांची संख्या दोन तीन लाख असे असें त्यानें लिहून ठेविलेल्या माहितीवरूनच सिद्ध होतें.

रोमन जनतेला खुष ठेवण्याचा दुसरा मार्ग सार्वजनिक सामने व खेळ करविणें हा होता. असले खेळ लोकसत्ताकाच्या काळांतील पुढारीहि लोकांनां अनुकूल करण्याकरितां लहानमोठ्या प्रमाणावर करवीत असत. पण बादशाही काळांत, लोकांनीं राजकारणांत फारसें लक्ष घालूं नये म्हणून, असल्या खेळांमध्यें लोकांचें मन गुंतवण्याची युक्ति ऑगस्टस व त्याच्या नंतरचे बादशहा यांनीं मोठ्या प्रमाणांत अंमलांत आणली.

रोम येथें दर चार वर्षांनीं 'ॲक्टियन गेम्स' नांवाचे सामने होत असत. यांत प्रथम घोड्यावरच्या शर्यती, नंतर शारीरिक सामर्थ्याचे सामने आणि शेवटीं लढायांतील कैद्यांकडून करविलेलीं ग्लॅडिएटर्सचीं म्हणजे असिक्रीडकांचीं प्राणघातक द्वंद्वयुद्धें होत असत. या सर्व सामन्यांत असिक्रीडकांच्या खेळांनां फार महत्त्व असे, या द्वंद्वयुद्धांत सर्व पराजित सामनेवाल्यांनां तेथल्या तेथेंच ठार मारण्याची चाल होती.

ऑगस्टसनें ही चाल बंद केली. परंतु या सामन्यांत हत्यारांनीं एकमेकांनां जखमा होऊन प्राणहानीहि होत असल्यामुळें ते निर्दय व क्रूरपणाचे होते असेंच म्हणावें लागतें. रोममध्यें या असिक्रीडकांच्या युद्धांची लोकांनां फारच चटक लागली होती. असिक्रीडक म्हणून दहा दहा हजार लोक नेहमीं तयार ठेवलेले असत. याशिवाय बॉक्सिंगचे म्हणजे मुष्टियुद्धाचेहि सामने होत असत. मुष्टियुद्धाची कला ग्रीक लोकांत बरीच पूर्णत्वास पोहोंचली होती. हे मुष्टियुद्धाचे सामने निरनिराळ्या राष्ट्रांतील प्रसिद्ध मेळाव्यांमध्येंहि केले जात असत. याशिवाय फोरम-

मध्यें, ॲंफिथिएटरमध्यें किंवा रस्त्यांत तात्पुरतीं नाटकगृहें उभारून सर्कशीचे व नाटकांचे प्रयोग होत असत. या सर्व प्रकारच्या खेळांना व करमणुकींना स्वतः ऑगस्टस बादशहाकडून बरेंच उत्तेजन मिळत असे.

याप्रमाणें युद्धें बंद झाल्यामुळें लाभलेली शांतता, गरीबांना वांटलें जाणारें धान्य, पैशाची खैरात व करमणुकीकरितां हरएक प्रकारचे खेळ वगैरे साधनें या कारणांस्तव ऑगस्टस बादशहाची कारकीर्द म्हणजे नवीन सुखशांतीच्या युगाचा आरंभ असें सर्व लोकांस वाटूं लागलें.

ऑगस्टाइन उर्फ सुवर्णयुगांतील वाङ्मय.—या सुवर्णयुगाच्या काळांत गद्य, पद्य वाङ्मयाला बरेंच उत्तेजन मिळून त्यांत भर पडली. ग्रीक वाङ्मयांतील ग्रंथांचे आदर्श लॅटिन लेखकांपुढें होतेच. तथापि स्वतंत्र विचार, जोरदार लेखनशैली व विषय सुलभपणें प्रतिपादन करण्याची हातोटी हे ग्रीक ग्रंथकारांतले गुण लॅटिन ग्रंथकारांत दिसत नाहींत. ऑगस्टसच्या काळांत लोकप्रिय झालेलीं नाटकें आज उपलब्ध नाहींत. त्यामुळें त्यांच्या गुणदोषांचें विवेचन येथें करतां येत नाहीं. सेनिकाच्या नांवावर चालत असलेलीं कांहीं दुःखपर्यवसायी नाटकें उपलब्ध आहेत. या नाटकांत शब्दालंकारादि गुण आहेत; पण नियमबद्ध कथानकाची रचना व पात्रांचा स्वभावपरिपोष या गोष्टी मुळींच साधलेल्या नाहींत. उत्तान शृंगार, वीरादि रसांनीं युक्त असे प्रवेश व भाषणें मात्र पुष्कळ आहेत.

याच काळांत सुप्रसिद्ध व्हर्जिल (ख्रि. पू. ७०–इ. स. १९) कवीनें आपलें इनीइड हें राष्ट्रीय महाकाव्य रचिलें. व्हर्जिल हा अलेक्झांड्रियन पंडितांपाशीं अध्ययन करून उच्च प्रकारचा विद्वान् बनला होता. त्यामुळें त्याच्या काव्यांतील पद्यरचना उत्तम साधलेली असून पुढें अनेक शतकें ती आदर्शभूत होऊन राहिली होती. तथापि व्हर्जिलमध्यें उच्च प्रतीची काव्यप्रतिभा नसल्यामुळें आणि काव्याच्या विषयाची निवडहि चांगली झाली नसल्यामुळें इलिअड किंवा पॅरॅडाइज लॉस्ट यांच्या तोडीचें हें महाकाव्य झालेलें नाहीं. व्हर्जिलनें कित्येक उपदेशात्मक काव्येंहि लिहिलीं आहेत; पण या नमुन्याचीं काव्यें लिहिणारे कवी, पुढें कोणी झाले नाहींत. शोकगीतें मात्र अनेक कवींनीं बऱ्याच उच्च दर्जाचीं लिहिलेलीं आहेत. त्यांत टिबलसचीं शोकगीतें बरींच नांवाजण्यासारखीं आहेत.

याच काळांत ओव्हिड (ख्रि. पू. ४३–इ. स. १७) हा बराच बुद्धिमान् कवि होऊन गेला. त्याची कविता शृंगाररहास्यरसपरच विशेष आहे. होरेस (होरेशिअस ख्रि. पू. ६५–इ. स. ६) हा या काळांतला आणखी एक सुप्रसिद्ध कवि होय. त्यानें औपरोधिक व उपहासपर काव्यांत बरेंच नांव मिळविलें आहे.

रोमन लोकांत मोठाले इतिहासकार मुळींच कोणी झालेले नव्हते. या ऑगस्टाइन युगांतला लिव्हि (ख्रि. पू. ५९—इ. स. १७) हा प्रसिद्ध इतिहासकार होय. याचा रोमच्या राज्याचा संपूर्ण इतिहास लिहिण्याचा संकल्प होता. तथापि लिव्हि याला उत्तम इतिहासकार म्हणतां येत नाहीं. त्यानें वार्षिक अहवाल एकत्र करून व त्यांतील विशेष विसंगत दिसणाऱ्या गोष्टींना फांटा देऊन आपला इतिहास लिहिला; परंतु त्यांत त्यानें सत्यासत्याच्या निवडीबद्दल विशेष चिकित्साबुद्धि वापरली नाहीं; किंवा चांगल्या टीकाकाराचेंहि काम केलें नाहीं. त्याचा इतिहास बऱ्याच वक्तृत्वपूर्ण भाषेंत मात्र लिहिलेला आहे.

या काळांत झालेले शास्त्रीय ग्रंथ केवळ भाषांतरवजा आहेत. तत्त्वज्ञान, पदार्थविज्ञान, वैद्यक, कृषि, नीतिशास्त्र वगैरे शास्त्रांत रोमन लोकांनीं घातलेली भर फारच अल्प आहे. रोमन लोकांनीं परिणत केलेलें असें कायदेशास्त्र हेंच कायतें एक शास्त्र आहे.

**रोमन बादशाही अंमलाचीं पहिलीं दोन शतकें** (इ. स. १४–१८०).—ऑगस्टस बादशहानें रोमन राज्यकारभाराला जें बादशाही वळण लावून दिलें तदनुसार पुढील २०० वर्षे रोमन साम्राज्याला बरीच सुखशांतीचीं व बाह्यतः भरभराटीचीं गेलीं. परंतु त्यामुळें राज्यकारभाराचें लोकनियंत्रित स्वरूप मात्र हळू हळू नाहींसें होत जाऊन त्यांत अनेक अनिष्ट फेरफार होत गेले. ऑगस्टस आणि तदुत्तर बादशहा यांनीं अनेक बाबतींत फेरफार केले. सीझरच्या वेळेपासून खडया सैन्याची योजना अंमलांत आली होती; व या सैन्याच्या जोरावर पुढील बादशहांनीं राज्यकारभारपद्धतीला लष्करसत्ताक पद्धतीचें स्वरूप दिलें. या २०० वर्षांतील ऐतिहासिक महत्त्वाच्या गोष्टी येणेंप्रमाणें:—

टायबीरिअस ते नीरो (इ. स. १४–६८).—टायबीरिअसच्या कारकीर्दींत त्याचा पुतण्या जर्मानिकस यानें उत्तरेकडील जर्मन टोळ्यांचा दोन वेळां पराभव केला. पुढील बादशहा कालिग्युला इ. स. ३७ मध्यें गादीवर आला, पण त्याचा ४१ मध्यें खून झाला. नंतरचा बादशहा क्लॉडिअस यानें इ. स. ४३–४७ मध्यें ब्रिटनवर स्वारी करून तो देश जिंकून घेतला. ४३ मध्यें लिशिआ प्रांत व ४४ मध्यें जुडीआ प्रांत रोमन साम्राज्यास जोडण्यांत आला. ५४ मध्यें क्लॉडिअसची बायको ॲग्रिपायना हिनें नवऱ्याला विष घालून ठार मारिलें. त्यानंतर तिचा मुलगा नीरो (इ. स. ५४–६८) हा राज्यावर आला. त्यानें आपला सावत्रभाऊ ब्रिटॅनिकस व आई ॲग्रिपायना यांना ठार मारिलें. ६२ मध्यें त्यानें स्वतःची बायको ऑक्टेव्हिआ हिलाहि ठार केलें. या काळांत पार्थिया व आर्मीनिया या देशांशीं लढाया झाल्या, व अखेर त्यांनीं रोमचें सार्वभौमत्व कबूल केलें. ६४ सालीं रोम शहराचा बराचसा भाग आग लागून जळून गेला. नवीन उदयास आलेल्या ख्रिस्ती संप्रदायाच्या छळास सुरवात झाली. ६६ मध्यें यहुदी लोकांशीं युद्ध झालें. ६८ मध्यें गॉल व स्पेन येथें

बंड झाली व त्याच वर्षी नीरोनें आत्महत्या केली. नीरो हा सीझरच्या घराण्यांतला शेवटचा बादशहा होय.

फ्लेव्हिअन घराणें.—नीरोनंतर व फ्लेव्हिअन घराण्याला सुरवात होण्यापूर्वी इ. स. ६८–६९ या सालांत गाल्बा, ओथो व व्हिटेलिअस यांनीं एकामागून एक बादशाही सत्ता बळकावली होती; परंतु त्यांनां ती फार दिवस लाभली नाहीं. ६९ मध्यें व्हेस्पेशिअन हा फ्लेव्हिअन घराण्यांतला पहिला बादशहा सेनेटनें व सैन्यानें दोघांनींहि मान्य केला. यानें बरींच सार्वजनिक लोकोपयोगी कामें केलीं आणि सैन्यामध्यें, जमाखर्चामध्यें आणि राज्यकारभाराच्या इतर कित्येक अंगांत सुधारणा केल्या. याच्या कारकीर्दीत बाटेव्हिअन लोकांनीं बंड केलें. तें रोमन सेनापति सीरिएलिस यानें मोडलें. यालाच पुढें इ. स. ७१ मध्यें ब्रिटनचा गव्हर्नर नेमण्यांत आलें. ७८ मध्यें आग्रिकोला यानें ब्रिटनवर पुन्हां स्वाऱ्या केल्या. फ्लेव्हिअन घराण्यांतला दुसरा बादशहा टायटस हा ७९ मध्यें राज्यावर आला. त्याच वर्षी व्हेसुव्हिअस ज्वालामुखीचा स्फोट होऊन पाँपेयि व हर्क्युलेनिअम या शहरांचा नाश झाला. यानंतर लवकरच सदरहू घराण्यांतील तिसरा बादशहा डोमिशिअन (इ. स. ८१-९६) हा गादीवर आला. याच्या कारकीर्दीत ८३ मध्यें जर्मनींतील चॅटि लोकांबरोबर युद्ध झालें. ८४ मध्यें आग्रिकोला या रोमन सेनापतीनें कॅलिडोनिअन लोकांचा पराभव करून सर्व ब्रिटन देश जिंकून घेतला. ८६ मध्यें डेशिअन लोकांनीं मोशिआवर स्वारी केली; आणि रोमन सैन्याचा पराभव केला. ९० मध्यें डेशिअन लोकांबरोबर तह झाला. ९३ मध्यें उत्तर जर्मनीचा गव्हर्नर ॲटोनिअस साटर्निअस यानें बंड केलें, पण बादशहानें तें मोडलें. व या बंडांत सामील असलेल्या अनेकांनां क्रूरपणानें फांशीं दिलें. तसेंच या बादशहानें अनेक तत्त्ववेत्त्यांनां रोममधून हांकून लावलें, व यहुदी व ख्रिस्ती लोकांचा छळ केला. अशा अनेक कारणांनीं हा बादशहा अप्रिय झाल्यामुळें याचा खून झाला.

**बादशाही अमलाचें दुसरें शतक** (इ. स. ९६-१८०).—डोमिशिअननंतर झालेल्या ओळीनें पांचहि बादशहांनीं राज्यकारभार चांगल्या प्रकारें केला. म्हणून हें दुसरें शतक पांच चांगल्या बादशहांचें शतक या नांवानें प्रसिद्ध आहे. यांच्यापैकीं पहिला बादशहा नर्व्हा हा इ. स. ९६ मध्यें राज्यावर आला. त्यानें फार सौम्यपणाचें धोरण स्वीकारलें होतें. पण त्याची कारकीर्द दोनच वर्षांनीं संपून ट्राजनची कारकीर्द (इ. स. ९८-११७) सुरू झाली. त्याच्या कारकीर्दीत १०१-१०२ मध्यें डेशिअन लोकांनीं युद्ध सुरू केलें; परंतु अखेर ट्राजननें त्यांचा पराभव करून त्यांचा देश आपल्या साम्राज्यास जोडला. ११४ पासून ११६ पर्यंत ट्राजननें पार्थिअन लोकांबरोबर युद्ध करून जय मिळवलें. आणि आर्मीनिया, मेसापोटेमिया व असुरिया हे देश रोमन साम्राज्यांत सामील केले. या लढाईवरून परत आल्यावर हा बादशहा लवकरच मरण पावला. याच्या कारकीर्दीत लोकोपयोगी कामेंहि बरींच करण्यांत आलीं. यानंतर हेड्रिअन (इ. स. ११७-१३८) बादशहा झाला. यानें ट्राजननें नुकतेच जिंकलेले प्रांत सोडून दिले. याच्या कारकीर्दीत सार्मेशिअन लोकांबरोबर बरींच वर्षें युद्ध चालू होतें. १२०-१२७ या सालांत हेड्रिअननें साम्राज्याच्या सर्व प्रांतांनां भेट दिली. १२१ सालीं ब्रिटनमध्यें या राजाच्या नांवाची एक भिंत बांधण्यांत आली. १३२ सालीं प्रीटॉरनीं केलेले अनेक कायदे एकत्र संगृहीत करण्यांत आले. १३२–१३५ या सालीं यहुदी लोकांबरोबर दुसरें युद्ध झालें. या कारकीर्दीत कांहीं सार्वजनिक इमारतीहि बांधल्या गेल्या. पुढला, म्हणजे चौथा चांगला बादशहा (इ. स. १३८–१६१) ॲंटोनायनस पायस हा होय. याची सर्व कारकीर्द शांततेंत व भरभराटींत गेली. १३९ मध्यें ब्रिटनमध्यें एक बंड झालें तें लॉलिअस अर्बिकस यानें मोडलें. पांचव्या चांगल्या कारकीर्दीत (इ. स. १६१–१७८) मार्कस ऑरीलीअस व ल्यूशिअस व्हीरस या दोघांनीं जोडीनें राज्यकारभार केला. १६२–६५ मध्यें पार्थियन लोकांबरोबर युद्ध करून रोमन लोकांनीं आर्मीनियाचें राज्य कायदेशीर वारसास दिलें. १६३ मध्यें ख्रिस्ती लोकांचा छळ झाला. १६६ मध्यें मार्कोमॅनाय व इतर कांहीं रानटी टोळ्यांनीं एकत्र मिळून रोमन साम्राज्यावर स्वारी केली. तेव्हां दोघेहि बादशहा त्यांच्याबरोबर लढण्याकरितां गेले. १६९ मध्यें ल्यूशिअस व्हीरस बादशहा मरण पावला. १७४ मध्यें रोमन सैन्यानें क्वेडाय लोकांविरुद्ध जय मिळविला. याच लढाईत 'थंडरिंग लीजन' या नांवानें प्रसिद्ध असलेली अद्भुत चमत्कारिक गोष्ट घडली. १७५ मध्यें ॲव्हिडिअस कॅशिअस यानें आपण टॉरस पर्वताशेजारच्या सर्व प्रदेशाचे बादशहा असल्याचें जाहीर केलें, पण त्याच सालीं तो मारला गेला. १७८ मध्यें मार्कोमॅनाय लोकांबरोबर पुन्हां युद्ध सुरू झालें व तें पुढील कारकीर्दीत १८० मध्यें संपलें.

**बादशाही काळाच्या पहिल्या दोन शतकांतील देशस्थिति.**— या काळांत अमीर उमरावांचें वैभव व ऐषआराम, कांहीं विशिष्ट ठिकाणींच लोकसंख्येचें केंद्रीभवन, रोमन लोकांचा निष्ठुरपणा व निर्दयता अशा निरनिराळ्या कारणांमुळें देशांत दारिद्र्य वाढलें. कांहीं बादशहांनीं गरीबगुरिबांस धान्य वांटून जो दयाळूपणा दाखविला, त्यामुळें देशाचा फायदा होण्याच्या ऐवजीं लोकांत आळशीपणा मात्र वाढला. परंतु यूरोपच्या राजधानींत दिसून येणारी ही दुःस्थिति साम्राज्याच्या दूरदूरच्या भागांत क्वचितच दिसून येत होती. याचें कारण तेथील लोकांची रहाणी, रोमच्या लोकांप्रमाणें ऐषआरामाची बनली नव्हती हें होय. रोमनें तत्कालीन जगाचा नैतिक अधःपात केला असें जें म्हणतात तें सर्वस्वीं नसलें तरी बऱ्याच अंशीं खरें आहे. रोमपेक्षां रोमन साम्राज्यांतील प्रांतांची स्थिति पुष्कळ चांगली होती, याचें कारण सर्व ठिकाणचे दुर्गुणी व व्यसनी लोक रोममध्यें येऊन रहात

असल्यामुळें तेथें रोमन सद्गुणांचा परिपोष होण्यास अवकाशच राहिला नव्हता.

**आयुष्यक्रम व चालीरीती.**—रोम शहराच्या लोकसंख्येंत झपाट्यानें वाढ झाल्यामुळें अशा प्रकारच्या दाट वस्तीच्या शहरांतील सर्व दोष तेथेंहि दिसून येत होते. दुकानें थाटून बसण्याची पद्धति अद्याप प्रचारांत आली नसल्यामुळें बहुतेक व्यापार फेरीवाल्यांमार्फतच चालत होता. त्यांतच आश्रितांचा व नोकरचाकरांचा घोळका बरोबर घेतल्याशिवाय उंबरठ्याबाहेर पाऊलहि न टाकणाऱ्या अमीर-उमरावांच्या अनुयायांची भर पडत असे. व्यापाराकरितां व रोमचें वैभव पाहण्याच्या जिज्ञासेनें निरनिराळ्या देशचे लोक तेथें एकत्र जमत असल्यामुळें त्या शहरास मुंबईसारख्या बकाल वस्तीच्या शहराचें स्वरूप आलें होतें. सरकारी कामकाज व इतर उद्योगधंद्याचे व्यवसाय सकाळपासून दुपारपावेतों चालत असत. मध्यान्हीं सूर्य येतांच सर्व लोक आपलें कामकाज संपवून घरीं जाऊन कांहीं वेळ वामकुक्षी करीत. यानंतर पुढें अंधार पडेपावेतों लोकांचा सर्व वेळ विश्रांति घेण्यांत व करमणुकीच्या साधनांनीं स्वतःचें मनोरंजन करण्यांत जात असे. सुखवस्तू लोक हा वेळ पोहणें, पळणें, घोड्यावरून फेरफटका करणें, भाल्याची फेंक करणें यांसारख्या व्यवसायांत घालवीत. गरीब लोकांस असलेल्या श्रमाच्या करमणुकींच्या साधनांची अर्थातच आवश्यकता नसे; हे खेळ सामान्यतः टायबर नदीकांठच्या सार्वजनिक मैदानांत होत असत; व ते झाल्यानंतर मुद्दाम तयार केलेल्या स्नानगृहांत जाऊन उटणीं व सुवासिक तेलें अंगास लावून उष्णोदकस्नान किंवा बाष्पस्नान करण्याची वहिवाट होती. रोमन लोकांस स्नानाची फार आवड होती व गरीब लोक देखील सार्वजनिक स्नानगृहांत जाऊन थोडेसे पैसे देऊन हें सुख अनुभवीत असत. या सार्वजनिक स्नानगृहांचा स्त्रियादेखील उपयोग करीत असें दिसतें.

रोमन लोक जेव्हां नाटकांस किंवा सर्कशीस जात नसत तेव्हां ते घराबाहेर पडून रस्त्यांतील मौज पहात पहात चौकाकडे किंवा दुसऱ्या एखाद्या सार्वजनिक ठिकाणीं जात. तेथें एखादा खबरबातम्या जमविणारा कोणी तरी वक्ता उभा राहून तो शहरांतील बादशहासंबंधींच्या किंवा साम्राज्यांतल्या इतर भागांतील बातम्या जमलेल्या लोकांस सांगून त्यांचें मनोरंजन करीत असे. यानंतर साहजिकच त्या ठिकाणीं जमलेल्या लोकांत प्रचलित राजकारणविषयक गोष्टींचा खल होऊन जो तो तत्संबंधीं आपल्या मतांचा उच्चार करीत असे. त्या काळीं वर्तमानपत्रें नसल्यामुळें बातम्या काढणाऱ्या लोकांचा एक वर्गच अस्तित्वांत होता. तो बादशहाच्या व इतर मोठमोठ्या लोकांच्या हालचालींची खडानखडा माहिती ठेवीत असल्याचें दाखवीत असे. या लोकांच्या द्वारें शहरांत ज्या बाजारगप्पा उठत त्यांस आळा घालण्याकरितां बादशहा जितका अधिकाधिक प्रयत्न करी तितका त्यांनां जास्तच ऊत येत असे. लोक आपल्याविषयीं काय बोलतात हें जाणण्यासाठीं बादशहाचे हेर सर्वत्र पसरलेले असल्यामुळें सार्वजनिक ठिकाणीं बादशहाच्या कृत्यांवर टीका करण्यास सामान्यतः लोक कचरत असत. तथापि वेळप्रसंगीं समयोचित कोटि करून स्वतःचा प्राणहि धोक्यांत घालणारे लोक आढळून येत नव्हते असें नाहीं.

**लेखन व्यवसाय व ग्रंथालयें.**—होरेस म्हणतो कीं, या काळांत जवळ जवळ प्रत्येक इसमास आपल्या अंगीं लेखनकर्तृत्व आहे असें वाटत होतें. परंतु प्रत्येक इसमास आपले लेख प्रकाशित करण्याची ऐपत असणें शक्य नसल्यामुळें आपले लेख लोकांच्या नजरेस आणण्याच्या हेतूनें कित्येकजण, इतरांकडून टर उडविली जाण्याचीहि परवा न करतां आपले लेख सार्वजनिक ठिकाणीं किंवा इष्टमित्रांत वाचून दाखवित असत. सिनेकाचीं दुःखपर्यवसायी नाटकें उपलब्ध आहेत तीं अशा प्रकारें वाचून दाखविण्याकरितांच लिहिलेलीं असल्यामुळें त्यांची नाटकांचे नियम कडक रीतीनें लावून परीक्षा करणें युक्त होणार नाहीं.

रोम येथें ग्रंथप्रकाशनाचें काम त्या काळांत देखील जवळ जवळ हल्लींइतकेंच जोरांत चालू होतें. हर्क्युलेनिअम येथें जो खासगी ग्रंथसंग्रह सांपडला आहे, त्यावरून तत्कालीन पुस्तकांसंबंधीं बरीच कल्पना करतां येते. त्या वेळच्या खासगी ग्रंथालयांत देखील तीस तीस, बत्तीस बत्तीस हजार पुस्तकें असल्याचे उल्लेख सांपडतात. प्रत्येक पुस्तक पापायरसच्या किंवा चर्मपत्राच्या लांबलचक तुकड्याचें काडीभोंवतीं वळकटी केलेलें एक भेंडोळें असून तें झांकण असलेल्या नळकांड्यांत सुरक्षितपणें ठेविलेलें असे. खाजगी लोकांच्या ग्रंथालयांत जर इतकीं पुस्तकें आढळून येतात, तर सार्वजनिक ग्रंथालयांत यापेक्षां कितीतरी अधिक पुस्तकें असलीं पाहिजेत. सीझरचा मित्र आसिनिअस पॉलिओ (मृत्यु ख्रि. पू. ६) यानें पहिलें सार्वजनिक ग्रंथालय स्थापिलें असें म्हणतात. तथापि सार्वजनिक ग्रंथालयास खरें महत्त्व ऑगस्टसच्या वेळेपासूनच आलेलें दिसतें. पब्लिअस व्हिक्टरच्या लिहिण्यावरून रोममध्यें त्या काळीं कमींत कमी २९ तरी सार्वजनिक ग्रंथालयें होतीं असें कळतें. तत्कालीन लोकप्रिय ग्रंथकारांत ओव्हिड, प्रोपर्शिअस व मार्शिअल हे औपरोधिक लेखक; होमर, व्हर्जिल, होरेस हे कवी; व सिसिरो, लिव्हि व प्लिनि हे गद्य लेखक देतां येतील. पुस्तकांचा धंदा मुख्यत्वेंकरून रोममध्यें असलेल्या सुशिक्षित ग्रीक गुलामांनीच चालविलेला होता; व रोम शहरांत गुलामांचा भरणा बराच असल्यामुळें, त्या काळीं छापण्याची कला अस्तित्वांत नव्हती तरी पुस्तकें कमींत कमी पांच दिनारांइतक्या स्वल्प किमतींत विकतां येत असत.

**लग्नविधी.**—लग्नाच्या वेळचे धर्मसंस्कार कुमारिकांच्या लग्नांत जितके सविस्तर होत तितके ते विधवाविवाहाच्या वेळीं होत नव्हते. प्राचीन काळीं पुनर्विवाह क्वचितच होत

असत, व नंतरच्या काळांतहि ते फारसे लोकप्रिय नव्हते. फेब्रुवारीचा तिसरा आठवडा, मार्चचे पहिले दोन आठवडे व संबंध मे महिना, जूनचे पहिले पंधरा दिवस वगैरे कांहीं दिवस व महोत्सवाचे प्रसंग निरनिराळ्या कारणांसाठीं लग्नास वर्ज मानलेले होते. तथापि हा निषेध विधवांच्या विवाहास लागू नव्हता. त्याचप्रमाणें नवऱ्या मुलीच्या मंडनाचे नियम देखील सर्वस्वीं कुमारिकांकरितांच सांगितलेले आहेत. लग्नाच्या सुरुवातीस देवांची इच्छा जाणण्यासाठीं सूर्योदयापूर्वी शकुन पाहण्यांत येत असे. शकुन अनुकूल आढळून आल्यास एक पशुयज्ञ करून त्यांत शेळीचा बळी देण्यांत येई. यानंतर निमंत्रित पाहुण्यांसमक्ष वधूवरांनां लग्नास आपली सम्मति असल्याचें जाहीर करावें लागे. हा विधि झाल्यावर एका सुवासिनी स्त्रीकडून वधूचा हात वराच्या हातांत देण्याचा विधि होऊन त्यानंतर एक फलांचा यज्ञ होत असे. हा यज्ञ चालला असतांना वधू व वर हे दोघेहि बळी दिलेल्या शेळीचें कातडें घातलेल्या एका जोडखुर्चीवर बसलेले असत. संध्याकाळ झाल्यावर वर वाजत गाजत वधूस तिच्या सूत काढण्याच्या चरक्यासह आपल्या घरीं नेई. वधू घरीं आल्यावर गृहप्रवेशाचा विधि होऊन दुसऱ्या दिवशीं वधूकडून सर्व आप्तेष्टांस मेजवानी देण्यांत येत असे.

**स्त्रियांचा समाजांतील दर्जा.**—आरंभीं रोमन लोकांत विवाह ही एक मोठी पवित्र संस्था गणली जात होती. ते स्त्रियांनां पुरुषाची विषयवासना तृप्त करण्याचें साधन समजत नसून, विवाहाचा उद्देश राष्ट्र-देवतांची सेवा करण्यासाठीं, रोमन वंशाचा विस्तार करण्यासाठीं व जिंकलेल्या देशांत रोमन सैन्य ठेवण्यासाठीं प्रजोत्पादन करणें हा गणला जात असे. या कडक ध्येयामुळें रोमन लोकांस इतर जातींतील लोकांशीं अर्थातच विवाहसंबंध करतां येत नव्हता. परंतु रोमन लोकसत्ताकाच्या जेव्हां पूर्वेकडे मोहिमी होऊन रोमन सैनिकांचे अथेन्स, सेमॉस किंवा एफिसस येथें हिंवाळ्यांत तळ पडूं लागले, तेव्हां आल्बा येथील किंवा व्हॉल्शिअन टेकड्यांतील या अडाणी शेतकऱ्यांचा सुशिक्षित ग्रीक स्त्रियांशीं संबंध येऊन या स्त्रियांच्या अंगच्या गुणांनीं त्यांचे डोळे दिपून गेले. या स्त्रियांशीं कायदेशीर विवाह करणें त्यांस शक्य नव्हतें, व प्रचलित वेडगळ समजुतींमुळें आपल्या देशाच्या स्त्रियांस चांगल्या प्रकारचें शिक्षण देऊन त्यांचा दर्जा वाढविण्याचीहि कल्पना त्यांच्या डोक्यांत कधीं आली नाहीं. यामुळें पूर्वीच्या काळीं जेथें एखादा कठोर हृदयी सेनापति त्याचा सैनिक परस्त्रीच्या मोहांत गुंतलेला आढळून आल्यास त्याच्या जेवणाच्या जागीं त्या स्त्रीच्या देखत त्याचें डोकें उडविण्याची शिक्षा देत असे, तेथें आतां रोमन जिल्हाधिकारी उघडपणें स्वैरांत आपल्या अंगवस्त्रास घेऊन फिरूं लागले.

या गोष्टीचा रोमन लोकांच्या नीतिमत्तेवर फारच वाईट परिणाम झाला. ग्रीक स्त्रिया रोमन लोकांस आवडूं लागल्यामुळें ग्रीक वारयोषितांचा रोम शहरांत सुळसुळाट झाला; व विवाहसंस्थेबद्दल अनादर उत्पन्न होऊन वैवाहिक जबाबदारी टाळण्याकडे रोमन लोकांची प्रवृत्ति होऊं लागली. उलटपक्षीं स्त्रियांनाहि आपल्या गुलामगिरीच्या स्थितीचा वीट येऊन विवाह नकोसा झाला. कारण स्त्रिया म्हणजे पुरुषांच्या मालकीच्या जणूं काय निर्जीव वस्तूच आहेत अशी त्यांची रोमन समाजांत स्थिति झाली होती. लहानपणीं त्यांच्यावर बापाची मालकी असे, तर वयांत आल्यावर ती मालकी बापाकडून नवऱ्याकडे जात असे, एवढेंच काय तें. त्यांनीं लहानसा अपराध केला तरी त्यांची नवऱ्यापुढें किंवा चारचौघां इष्टमित्रांपुढें चौकशी केली जात असे. त्यांनां परपुरुषाशीं संबंध ठेवल्याच्या संशयावरून नवऱ्याच्या हातचा मार खावा लागे, व कधीं कधीं तर त्यांनां इतका बेदम मार बसे कीं त्यायोगें त्यांचा प्राणहि जाई.

रोमन प्रजासत्ताकाचें उत्तरार्ध कौटुंबिक भांडणांनीं भरलेलें आहे. ख्रि. पू. ३३० मध्यें अनेक पोक्त वयाच्या रोमन स्त्रियांनीं विषप्रयोग करून आपल्या नवऱ्यास ठार करण्याचा प्रयत्न केल्याचें आढळून येतें. अशा प्रकारच्या १७० स्त्रियांची त्यांच्या आप्तांच्या पंचायतीपुढें चौकशी होऊन त्यांनां देहान्त शिक्षा देण्यांत आली. पुढील शतकांत स्त्रियांनीं सव्वा तोळ्यापेक्षां अधिक सोनें जवळ बाळगूं नये, रंगारंगाचीं वस्त्रें परिधान करूं नयेत, किंवा गाडींत बसून जाऊं नये, अशा प्रकारचीं त्यांच्यावर बंधनें घालणारा ओप्पियन नांवाचा कायदा झाला. तेव्हां त्यांनीं पुन्हां एक नवीन कट केला असें म्हणतात. परंतु आतां त्यांनीं नवऱ्यांचे खून पाडण्याच्या भरीस न पडतां त्यांच्याशीं अबोला धरून प्रजोत्पादनाच्या बाबतींत त्यांची निराशा करण्याचें ठरविलें. यानंतर अर्ध शतकानें लेक्सओकोनिआ नांवाचा स्त्रियांचा वारसाचा हक्क काढून टाकणारा अत्यंत जुलमी कायदा करण्यांत आला. व्यवहारांत या कायद्याची कडक रीतीनें अंमलबजावणी होऊं शकली नाहीं. तरी स्त्रीपुरुषांचा एकमेकांविषयीं मत्सर इतका वाढला कीं, कॅटिलायंनिअन कटाच्या वेळीं नवऱ्यांचा नायनाट करून देशांत मोठी क्रांति घडवून आणण्याच्या उद्देशानें राजद्रोही लोकांस शेंकडों विवाहित स्त्रियांकडून पैसा पुरविला गेला होता अशी पुरुषांत अफवा पसरली होती.

प्राचीन काळीं रोमन लोकांत अविवाहित राहणें हा कायद्यानें गुन्हा ठरविण्यांत आला होता. ख्रि. पू. पांचव्या शतकाच्या अखेरच्या एका उल्लेखावरून निदान तोंपावेतों तरी असल्या गुन्ह्याबद्दल चौकशी होऊन अपराध्यास शिक्षा होत होती असें दिसतें. हा कायदा पुढें सौम्य करण्यांत येऊन बक्षिसें देऊन विवाहास उत्तेजन देण्यांत येऊं लागलें. अशा प्रकारच्या बक्षिसाचा उल्लेख ख्रि. पू. १९९ सालीं 'सेन्सॉर'च्या जागीं असलेल्या सिपिओच्या भाषणांत प्रथम आढळतो. तथापि या दोन्हीहि उपायांचा कांहीं परिणाम झाला नाहीं. ख्रि. पू. १३१ सालीं, 'सेन्सॉर' अस-

केल्या. मिटेलस मॅसिडोनिकस नांवाच्या पुरुषानें सेनेटमध्यें रोमन लोकांची संख्या दिवसानुदिवस झपाट्यानें कमी होत आहे अशी भीति व्यक्त केली होती. एवढा मोठा सीझर पण त्यालाहि रोमन लोकांच्या वैवाहिक जबाबदारी टाळण्याच्या वाढत्या प्रवृत्तीस आळा घालतां आला नाहीं. सरतेशेवटीं ऑगस्टसनें वयांत आलेल्या सर्व पुरुषांनीं लग्न केलेंच पाहिजे असा सेनेटकडून कायदा पास करून घेतला. योग्य वधू शोधून लग्न जुळविण्यासाठीं म्हणून त्यानें लोकांस तीन वर्षांची मुदत दिली. परंतु तीन वर्षें संपलीं तेव्हां ती मुदत आणखी दोन वर्षें वाढविणें जरूरीचें वाटलें, व त्यानंतरहि पुढें अनेक वेळां अशाच रीतीनें मुदती वाढविण्यांत आल्या. त्यानें रोमन लोकांची वैवाहिक नीतिमत्ता सुधारण्यासाठीं कोणाहि स्वतंत्र झालेल्या स्त्रीशीं केलेलें लग्न कायदेशीर ठरविलें, व जो कोणी अविवाहित राहील त्याचा वारसाचा हक्क काढून घेण्याचा कायदा केला. एवढेंच करून तो थांबला नाहीं, तर एखादा इसम विवाहित असूनहि निपुत्रिक असला तरी देखील त्याच्या वारशाच्या रकमेपैकीं अर्धी रकम सरकारांत दंडादाखल जमा केली जावी असा त्यानें दुसरा एक ठराव करून घेतला. उलट पक्षीं मुलेंबाळें असणाऱ्या इसमास सार्वजनिक ठिकाणीं मान मिळत असे. व सरकारी नोकरींतहि असा इसम निपुत्रिकांपेक्षां अधिक लायक समजला जात असे. परंतु ऑगस्टसनें विवाहासंबंधीं इतके कडक कायदे केले तरी त्यांचा फारसा उपयोग झाला नाहीं. कारण, धूर्त रोमन लोक कायद्याच्या कक्षेंत न येण्यासाठीं अनेक युक्त्या प्रयुक्त्यांचा उपयोग करूं लागले. सक्तीच्या विवाहाच्या कायद्यांतून सुटण्याकरितां रोमन लोक नांवाला लग्न करून नंतर काडीमोड करूं लागले. तेव्हां अशा लोकांसहि पुन्हां कायद्याच्या कक्षेंत आणण्याकरितां नवीन नियम करावे लागले. शिवाय लोकांनां लग्न करण्यास भाग पाडण्याकरितां स्त्रीपुरुषांच्या बेकायदेशीर संबंधास कडक शिक्षा ठरविण्यांत आल्या. इतकेंच नव्हे तर अशा प्रकारचे गुन्हे कमी करण्यासाठीं, असिकीडकांच्या सामन्यासारख्या प्रसंगीं जेव्हां स्त्रीपुरुषांनां एकत्र मिसळण्याची संधि मिळते तेव्हां स्त्रियांस पुरुषांच्या मागील रांगांत बसविण्याची व्यवस्था केली गेली, व कुस्त्यांच्या किंवा मुष्टियुद्धांच्या प्रसंगीं तर त्यांनां पहावयास येण्याचीच मनाई करण्यांत आली.

बापाचे अधिकार व मुलांचें दास्यत्व.—बायकासंबंधांत रोमन कायदा ग्रीक कायद्याइतकाच वाईट असला, तरी मुलांसंबंधांत मात्र तो ग्रीक कायद्याहूनहि अधिक वाईट होता. ग्रीक कायद्याप्रमाणें मुलगा ठराविक वयाचा झाल्यावर, लग्न झाल्यावर किंवा त्याला नागरिकत्वाचे हक्क मिळाल्यावर त्यावर बापाची सत्ता चालत नसे. मुलगा यांपैकीं कोणत्या तरी रीतीनें स्वतंत्र होण्यापूर्वीहि फार झालें तर बाप त्याला घराबाहेर काढूं शकत असे किंवा आपल्यामागें आपली मालमत्ता त्यास मिळूं नये अशी व्यवस्था करूं शकत असे. उलट पक्षीं रोमन समाजांत बाप हयात असेपर्यंत त्याची आपल्या मुलांमुलींवर अप्रतिबंध सत्ता चालत असे; व ती इतकी कीं, मूळ रोमन कायद्याप्रमाणें रोमन कुटुंबांतील कर्त्या पुरुषास आपल्या पाल्यास विकण्याचा किंवा योग्य वाटल्यास त्याचा जीवहि घेण्याचा हक्क होता. तथापि, रोमन इतिहासांत बापानें आपल्या मुलास निर्दयपणाच्या शिक्षा केल्याचीं जरी अनेक उदाहरणें आढळतात, तरी त्याला देहान्त शिक्षा केल्याचा कोठें उल्लेख आलेला नाहीं; व बादशाही काळांतल्या २०० व्या वर्षी तर बापाचा हा हक्कच मुळीं कायद्यानें काढून घेण्यांत आला. हीच स्थिति मुलांचा विक्रय करण्याच्या हक्कासंबंधींहि दिसते; व ज्या अर्थी बापानें मुलांचा विक्रय केल्याचें लेखनिविष्ट झालेलें एकहि उदाहरण आज उपलब्ध नाहीं त्या अर्थी तो हक्कहि प्राचीन काळींच काढून घेण्यांत आला असावा.

बापाच्या मृत्यूनंतर त्याच्या वयांत न आलेल्या मुलाचें, किंवा वयांत येऊनहि बुद्धिभ्रंशासारख्या कांहीं कारणांमुळें वडिलार्जित संपत्तीचा उपभोग घेण्यास असमर्थ असलेल्या मुलाचें पालकत्व त्याच्या दुसऱ्या एखाद्या नातेवाइकाकडे जात असे. कुटुंबांतील बायामंडळींपैकीं मयत इसमाची बायको व लग्न न झालेल्या पण वयांत आलेल्या मुली यांनां स्वतःची मालमत्ता उपभोगण्याचा हक्क असे; परंतु कायद्यासंबंधीं सर्व व्यवहार त्यांनां आपल्या पालकामार्फतच करावे लागत. वर दिलेल्या या मूळच्या नियमांत हळू हळू पुढें कायद्यानें सुधारणा घडवून आणण्यांत आली. पहिली सुधारणा म्हटली म्हणजे आपल्या मागून आपल्या कुटुंबांतील मंडळींचें पालकत्व कोणाकडे जावें हें प्रत्येकास मृत्युपत्र करून ठरवितां येऊं लागलें. ख्रि. पू. दुसऱ्या शतकांत मयतानें मृत्युपत्रांत तशी इच्छा दर्शविली तर त्याच्या विधवेसहि आपल्या इच्छेनुरूप आपला पालक निवडतां येऊं लागला. पुढें ऑगस्टसनें असा कायदा केला कीं, तीन मुलें असलेल्या रोमन विधवेस किंवा चार मुलें असलेल्या स्वतंत्र झालेल्या स्त्रीस यापुढें पालकाची कांहीं गरज नाहीं. यानंतर डायोक्लीशिअनच्या काळांत तर पतीच्या निधनानंतर स्त्रियांस आपल्या मुलाबाळांचेंहि पालकत्व स्वतःकडे ठेवण्याचा हक्क प्राप्त झाला. मुलांच्या पालकत्वासंबंधीं मात्र याच्या अगदीं उलट दिशेनें सुधारणा करण्यांत आली. मुलास स्वातंत्र्य देण्याच्या ऐवजीं कायद्यानें पाल्यासंबंधीं पालकांचीच जबाबदारी अधिक वाढविण्याचा प्रयत्न केला; आणि मुलाची वयांत येण्याची मर्यादा पूर्वी १४ होती तेथें आतां २५ करण्यांत आली. या बाबतींत कायद्यानें व्यक्तिस्वातंत्र्याइतकेंच कुटुंबाच्या एकंदर हिताहिताकडेहि लक्ष ठेविलेलें होतें. तथापि, व्यक्तिस्वातंत्र्याचे हे नियम समाजाच्या फारच लहान भागास लागू होते. रोमच्या लोकसंख्येंत गुलामांचाच भरणा मोठा असून, व्यक्तिस्वातं-

त्यांच्या बाबतींत घडून आलेल्या सुधारणेपासून त्यांना कांहींएक फायदा झाला नव्हता.

**गुलामगिरीची चाल.**—मोठ्या रोमन माणसाच्या घरांत जे गुलाम असत त्यांचे दोन प्रकार होते. एक विकत घेतलेला गुलाम व दुसरा गुलाम बाप व गुलाम आई यांच्यापासून झालेला गुलाम मुलगा. या दुसऱ्या प्रकारच्या गुलामांस व्हर्नी असें म्हणत व त्यांचा दर्जा विकत घेतलेल्या गुलामांपेक्षां अधिक समजला जात असे. मोठमोठ्या अमीरउमरावांजवळ हजारों गुलाम असत. त्यांच्यामधील जन्ममृत्यूची किंवा त्यांच्या विक्रीची मालकास रोजच्या रोज वर्दी देण्याकरितां देखील एका स्वतंत्र इसमाची गरज लागत असे. या गुलामांत निरनिराळ्या देशचे गुलाम असत व निरनिराळ्या देशच्या गुलामांची लायकी निरनिराळ्या कामांसाठीं प्रसिद्ध होती. ग्रीसमधून मुख्यत्वेंकरून व्याकरणकार व ग्रंथकार येत. आशियांतील लोक वाद्यें वाजविण्यांत किंवा स्वयंपाक करण्यांत कुशल असत. इजिप्तमधून येणारीं सुंदर मुलें आपल्या मधुर भाषणानें धन्याची करमणूक करण्याचें काम करीत. आफ्रिकन लोकांचा सामान्यतः धन्याच्या पालखीपुढें धांवून वाट मोकळी करण्यासाठीं उपयोग केला जात असे. जर्मन गुलाम हे खूप धिप्पाड व उंच असत व त्यांचा उपयोग सार्वजनिक सामन्यांतील द्वंद्वयुद्धांत स्वतःचा जीव गमावून रोमन लोकांची करमणूक करावी हाच काय तो समजला जात होता.

एवढ्या सर्व गुलामांचें पोट भरणें ही कांहीं सोपी गोष्ट नव्हती. या सर्वांना काम पुरविण्यासाठीं रोमन उमरावांना सर्व प्रकारचे कारखाने आपल्या घरींच ठेवावे लागत. हे लोक शेतांत काम करून आपल्या धन्याच्या अगडबंब कुटुंबास लागणारें सर्व धान्य पिकवीत व दररोज लागणाऱ्या बहुतेक सर्व वस्तू ते स्वतःच घरीं तयार करीत. रोमन लोकांत अफाट साम्राज्यावर राज्य करण्यास लायक असलेले अनेक लोक निर्माण झाले याचें कारण, प्रत्येक उमरावाचें घर हें एक लहानसें राज्यच असल्यामुळें त्यांच्यावर देखरेख ठेवण्यांत आपोआपच उपर्युक्त कामासाठीं लागणारे गुण अंगीं येत असत. मध्यम स्थितींतील लोकांजवळ देखील त्यांच्या ऐपतीच्या मानानें बरेच गुलाम असत. मार्कस स्कॉरस हा पुढें चांगला नांवारूपास आलेला पुरुष आरंभीं अगदीं गरीब होता. त्याच्या बापानें आपल्या मागें सारा ३००० रुपयांइतका ऐवज ठेवला होता. तथापि त्याला त्याच्या बापापासून मिळालेल्या गुलामांची संख्या मात्र त्या मानानें पुष्कळच अधिक म्हणजे दहा होती. आज तीन हजार रुपये बाळगून असलेल्या इसमाजवळ दहा चाकर असूं शकतील अशी आपणांस कल्पनाहि करतां येत नाहीं. दुसरें उदाहरण होरेस कवीचें आहे. हा कवि सर्वस्वीं दुसऱ्याच्या आश्रयावरच अवलंबून होता. त्याला खावयास जाडीभरडी भाकरीच मिळत असे; तरी जेवतांना त्याच्या तैनातीस तीन चाकर असत. याचें कारण मनुष्याची योग्यता त्या काळीं त्याच्या पदरीं असलेल्या गुलामांवरून ठरत असे. बड्या लोकांजवळ अनेक गुलाम असल्यामुळें त्यांच्या अवश्यवाची सर्व कामें या गुलामांनींच वांटून घेतल्यासारखें झालें होतें. पाहुण्यास दार उघडण्यास चाकर निराळा, त्याला आंत नेण्यास चाकर निराळा, त्याची वर्दी देण्यास चाकर निराळा, पडदा बाजूस सारण्यास चाकर निराळा, जेवणाचीं ताटें आणण्यास चाकर निराळा, मालकाअगोदर पदार्थांची चव पहाण्यास चाकर निराळा, व ते पाहुण्यांच्या हातांत देण्यास चाकर निराळा, अशी रोमन अमीरउमरावांच्या घरांत विचित्र स्थिति होती! यामुळें तो आळशी, निरुत्साही, भित्रा, बायकी व झोंपाळू बनला. घरांतील कोणत्या एखाद्या वस्तूचा तो जास्त उपयोग करीत असेल, तर तो कोचाचा होय. निजण्यास कोच, खाण्यास कोच, वाचण्यास कोच, व विचार करण्यासहि त्याला कोच लागत असे. रोमन लोकांच्या तैनातीस असलेल्या या गुलामांनींच त्यांना पुढें सीझरांचे गुलाम केले अशी जी म्हण आहे ती कांहीं खोटी नाहीं.

**गुलामांची वागवणूक.**—अँटोनायनसच्या काळापर्यंत गुलाम लोकांसंबंधीं रोमन लोकांत फार निर्दय कायदे होते. कायद्याप्रमाणें धनी आपल्या गुलामांचें वाटेल तें करूं शकत असे. त्याला आपल्या गुलामास मारण्याचा, विकण्याचा किंवा जीवहि घेण्याचा हक्क होता. परंतु व्यवहारांत गुलामांची स्थिति या कायद्यावरून आपणांस वाटते तेवढी वाईट नव्हती. शेतावर काम करणाऱ्या गुलामांस अगदीं गुराप्रमाणें वागविण्यांत येत असे हें खरें. त्यांना रात्रीच्या वेळीं गोठ्यासारख्या जागेंत कोंडून ठेवण्यांत येत असे; व त्यांनीं पळून जाऊं नये म्हणून दिवसां त्यांना पायांत बिड्या घालूनच काम करावें लागत असे. येथें त्यांना किती त्रास होत असेल याची कल्पना सणाच्या दिवशीं त्यांना सुट्टी मिळत असे तेव्हां ज्या प्रकारें ते आनंदानें ओरडण्याओरडण्यांत व नाचण्याबागडण्यांत काळ घालवीत त्यावरून चांगली करतां येते. तथापि शहरामध्यें गुलामास यापेक्षां पुष्कळ चांगल्या रीतीनें वागविण्यांत येत असे. गुलामांस शेतांत काम करण्यास पाठवीत तें सामान्यतः त्यावर मालकाची खपा मर्जी झाली म्हणजे शिक्षा म्हणूनच पाठवीत असत. मालकाजवळ असतांना गुलामास मालकाला लुटून पैसा जमविण्याची व मालकाची मर्जी संपादून वेळ प्रसंगीं स्वातंत्र्यहि मिळविण्याची बरीच संधि असे. कारण, घराची सर्व व्यवस्था गुलामांच्याच ताब्यांत असे. आपल्या घरांत काय आहे व काय नाहीं याचा पुष्कळदां मालकास पत्ताहि नसे. बादशहाजवळ जे गुलाम असत त्यांची स्थिति तर याहूनहि अधिक चांगली होती. हे अत्यंत गर्विष्ठ व उद्धट असून बादशहाइतकाच आपणांसहि मान दिला गेला पाहिजे अशी त्यांची अपेक्षा दिसत असे. बादशहाकडून एखादी गोष्ट करून घ्यावयाची

असली म्हणजे अमीरउमरावांनां प्रथम या गुलामांस बरोबर घेऊन यावा लागत असे. बादशहाच्या पदरचे कांहीं गुलाम तर सुभ्यांच्या जागांवरहि नेमले गेल्याचीं उदाहरणें आहेत. गरिबांच्या पदरीं असलेल्या गुलामांस मात्र आपल्या मालकाबरोबर त्याच्या सर्व हालअपेष्टा सोसाव्या लागत. परंतु गरिबांच्या कुटुंबांत गुलामास या हालअपेष्टांबद्दल प्रेमाचा भरपूर मोबदला मिळत असे. येथें त्याची वागणूक गुलामापेक्षां इष्टमित्रासारखीच अधिक असे.

**गुलामगिरीच्या चालीचा रोमन समाजावर परिणाम.**—रोमन समाजाचा अभ्यास करतांना प्रामुख्यानें दृष्टोत्पत्तीस येणारी गोष्ट म्हणजे, ज्या दुर्गुणांनीं अखेर रोमन साम्राज्याचा नाश झाला, त्यांच्या मुळाशीं सर्वस्वीं ही गुलामगिरीची चालच होती ही होय. या गुलामांमुळें वरिष्ठ लोकांत लांचलुचपतीचे प्रकार कसे अस्तित्वांत आले हें वर दाखविलेंच आहे. या गुलामांमुळें रोमन माणूस आळशी बनला. या गुलामांमुळें त्याच्या शक्तीचा ऱ्हास झाला. या गुलामांमुळें मानवी जीविताबद्दल त्याच्या मनांत तिरस्कार उत्पन्न झाला; व तो संवयीनें निष्ठुर बनत गेला. सीझरांच्या कारकीर्दींत अनेक चांगल्या चांगल्या लोकांचे झालेले शिरच्छेद लोकांनी शांतपणें तोंडांतून ब्रहि न काढतां पाहून घेतले याचें कारण असल्या प्रकारच्या हालअपेष्टा त्यांनां मुळींच नवीन नव्हत्या. रोममधील रोमन लोकांविषयीं तिरस्कार वाटत असलेल्या या गुलामांच्या मोठ्या संख्येमुळेंच रोमन लोकांवर सीझरांचा जुलूम शक्य झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. या गुलामगिरीच्या पद्धतीमुळें रोमन समाजावर जे अनिष्ट परिणाम होत होते ते त्या वेळीं कोणाच्या ध्यानांत आलेले दिसत नाहींत. गुलाम हा माणूसच आहे ही गोष्ट तत्ववेत्त्याप्रमाणें कांहीं रोमन लोकांसहि पटली होती. व ऑगस्टसच्या कारकीर्दींत गुलाम लोकांची स्थिति सुधारण्याकरितां कांहीं कायदेहि करण्यांत आले. परंतु या कायद्यांचा मूलतः जे दयाळु स्वभावाचे होते त्यांच्याशिवाय इतरांवर कांहींच परिणाम होऊं शकला नाहीं. सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हटली म्हणजे, एकहि जुन्या लेखकाच्या लेखांत गुलामगिरीची चाल कधीं काळीं नष्ट होऊं शकेल असा नुसता संभव दर्शविणारे देखील कोठें शब्द सांपडत नाहींत ही चाल त्यांच्या इतकी हाडीमांसीं खिळली होती कीं, मनुष्य तिला अनुकूल असो किंवा प्रतिकूल असो त्याला तिचा अभाव असलेल्या समाजाची नुसती कल्पना करणें देखील कठिण झालें होतें.

**खेळ व करमणुकीचे प्रकार.**—कोणत्याहि जनतेचा खरा स्वभाव तिच्या खेळांच्या स्वरूपावरूनच चांगला व्यक्त होतो. कारण खेळामध्यें मनुष्य व्यवसायाच्या वेळची कृत्रिम बंधनें बाजूस ठेवीत असल्यामुळें त्याच्या खऱ्या मनोविकारांस पूर्ण वाव मिळालेला असतो. प्राचीन रोमन लोकांच्या खेळांसंबंधीं फारच थोडी माहिती आज आपल्यापाशीं आहे. तथापि अशी एक दंतकथा उपलब्ध आहे कीं, रोमन लोकांनां नृत्याची व खेळांची बरीच गोडी होती. महोत्सवाच्या व स्मशानयात्रेच्या प्रसंगीं वाद्यें आवश्यक समजलीं जात असत; आणि जेवणाच्यां व दुसऱ्या कित्येक प्रसंगीं गाणीं म्हणण्याचा प्रघात होता. खेळांपैकीं चेंडू फेंकणें व झेलणें, त्याचे टप्पे पाडणें वगैरे चेंडूच्या खेळाचे कित्येक प्रकार त्यांच्यामध्यें प्रचलित होते. एका पक्षानें दुसऱ्या पक्षाकडे चेंडू फेंकावयाचा व दुसऱ्यानें तो आडवून आडवलेल्या जागीं उभें रहावयाचें; नंतर दुसऱ्या पक्षानें पुन्हां अडवलेल्या जागेपासून पहिल्या पक्षाकडे चेंडू फेंकावयाचा व पहिल्यानें तो आडवून आडविलेल्या जागीं उभें रहावयाचें; व अशा रीतीनें प्रत्येक पक्षानें आपल्या समोरच्या पक्षास मागें मागें रेटीत नेण्याचा प्रयत्न करावयाचा असाहि एक त्यांच्यामध्यें अनेक जणांनीं मिळून खेळण्याचा चेंडूचा खेळ होता. या चेंडूच्या खेळांत सबंध गांवचा गांव देखील एकदम भाग घेऊं शकत असे. हे खेळावयाचे चेंडू केसांचे किंवा पिसांचे बनविलेले असत. पाँपीच्या वेळीं हवा भरलेला मोठा चेंडूहि उपयोगांत असल्याचें आढळून येतें.

**रोमन नाटकगृहें व सर्कशी.**—हल्लींच्या नाटकगृहांत व रोमन नाटकगृहांत मुख्य महत्वाचा फरक म्हटला म्हणजे, हल्लींच्या नाटकगृहांत खासगी नाटक मंडळ्यांचे खेळ होतात व ते पाहण्यास ठराविक पैसे भरून तिकिटें घेणाऱ्या मंडळींसच फक्त जातां येतें, तर रोमन नाटकगृहें हीं सार्वजनिक करमणुकीकरितां म्हणून मुद्दाम बांधलेलीं असून त्यांत सरकारी अधिकाऱ्यांकडून फुकट खेळ करविले जात व ते खेळ पहाण्यास जाण्याचा आपणास हक्क आहे असें प्रत्येक नागरिक समजत असे. अर्थात् हीं नाटकगृहें तीस तीस हजार मंडळी मावतील एवढीं मोठीं केलेलीं असत. या ठिकाणीं होणाऱ्या नाटकांत नट पितळेच्या ओठाचे मुखवटे व उंच टांचांचे जोडे घालून रंगभूमीवर येत; व हीं हालतीं चालतीं बाहुलीं जुन्या दुःखपर्यवसायी नाटकांतील संभाषणें लोकांपुढें पाठ म्हणून दाखवीत. त्या वेळच्या सुप्रसिद्ध नटांत कांहीं रोमन नांवें आढळून येतात, तरी मुख्यत्वेंकरून त्यांत ग्रीक लोकांचाच भरणा जास्त होता. बाथिलस व पिलाडीझ हे दोन तत्कालीन लोकप्रिय नट होते. तथापि, या नाटकगृहांत जमणाऱ्या सामान्य जनतेची अभिरुचि असल्या केवळ नीरस संभाषणांनीं तृप्त होणें शक्य नव्हतें. यामुळें असल्या दोन खेळांच्या दरम्यानच्या अवकाशांत गारुडी, विदूषक, दोरीवरून चालणारे, मुष्टियुद्ध करणारे वगैरे लोकांच्या झुंडीच्या झुंडी रंगभूमीवर येऊन प्रेक्षकांचें मनोरंजन करीत असत. एवढेंच नव्हे, तर अत्यंत अश्लील प्रकारचे देखावे देखील लोकांच्या करमणुकीकरितां या रंगभूमीवरून दाखविले जात असत. लोकांच्या अनाचारी मनोवृत्तीस आळा घालण्याकरितां कायदेपंडितांनीं आपल्याकडून कायदे करून ठेविले होते; पण त्यांतहि पैशासाठीं लोकांसमोर नग्न

स्थितींत येणें हें हलकटपणाचें आहे, एवढाच काय तो असल्या प्रकारच्या खेळास आक्षेप घेण्यांत आला होता.

संपत्तीमुळें व वैभवामुळें दिवसानुदिवस रोमन लोकांस अधिकाधिक भपक्याची आवश्यकता वाटूं लागली. शूर व बुद्धिमान् ट्रिब्यून क्यूरिओ यानें कांहीं यांत्रिक रचना करून नाटकाचें काम झाल्यावर चाकांवर फिरणारीं अर्धवर्तुलाकार दोन लांकडी नाटकगृहें समोरासमोर आणून त्यांचा असिक्रीडकांच्या सामन्यासाठीं अँफिथिएटरप्रमाणें उपयोग करण्याची जी शक्कल काढली ती अर्वाचीन स्थापत्यशास्त्रज्ञांसहि तोंडांत बोट घालण्यास लावण्याइतकी अचाट आहे. जूलिअस सीझरच्या वेळचीं अँफिथिएटरहि लांकडीच होतीं, आणि तीं व त्याच्या पूर्वीचीं अँफिथिएटरें काम झाल्यावर मोडून टाकण्यांत येत असत असें दिसतें. ह्या नाटकगृहांवर व अँफिथिएटरांवर प्रेक्षकांचें उन्हापासून संरक्षण करण्याकरितां कापडाचें छत लावलेलें असे. नाटकगृहाची कायमच्या उपयोगाची दगडी इमारत प्रथम पॉपीनें बांधिली, व दगडी अँफिथिएटर बांधण्याचें श्रेय ऑगस्टसचा दुय्यम सेनापति स्टाटिलिअस टॉरस यास आहे.

अँफिथिएटरचा प्रकार जरी रोमन लोकांत नवीन होता तरी जिच्या पूरणार्थ तें अस्तित्वांत आलें, त्या सर्कशीची स्थिति तशी नव्हती. ती रोमन लोकांत प्राचीन काळापासून प्रचारांत असून तींत घोड्यांच्या व रथांच्या शर्यती, शिकार वगैरे प्रकार होत असत. या वार्षिक शर्यतींच्या खेळांसाठीं सभोंवतीं ठेंगणी भिंत घातलेलें एक क्रीडांगण बनविलेलें असे, व पसरलेल्या वाळूवरून त्यास ॲरेना हें नांव मिळालें होतें. या क्रीडांगणाच्या तीन बाजूंस आरंभीं आरंभीं मूळचाच एखादा उंचवटा खोदून प्रेक्षकांस बसण्याकरितां जागा बनविण्याची वहिवाट होती. या शर्यतींच्या खेळांची रोमन लोकांस पूर्वीपासून फार आवड होती. या ठिकाणीं निरनिराळे रानटी प्राणी मोकळे सोडून त्यांची पारधहि करण्यांत येत असे. हा प्रकार सहाव्या शतकांत विजयी रोमन सेनापती पूर्वेकडून आपल्या बरोबर सिंह, हत्ती, जिराफ वगैरे निरनिराळ्या प्रकारचे चित्रविचित्र प्राणी आणूं लागले तेव्हांपासून प्रचारांत आलेला दिसतो. सेनापतीची लोकप्रियता त्यानें लोकांस दाखविण्याकरितां आणलेल्या चित्रविचित्र पशूंच्या संख्येवरच अवलंबून असल्यामुळें अमीरउमरावांची आपसांत परदेशांतून कोण अधिक पशू आणतो अशी जणूं काय अहमहमिकाच लागलेली दिसत होती.

**असिक्रीडकांचे (ग्लॅडिएटर्सचे) घोरसामने.**—असिक्रीडकांच्या युद्धाची चाल कशी प्रचारांत आली हें जरी नक्की सांगतां येत नाहीं, तरी तिचा उपक्रम रोमन लोकांत प्रथम ख्रि. पू. २६४ मध्यें मार्कस व डेसिमस ब्रूटस यांनीं आपल्या पित्याच्या अंत्यविधीच्या वेळीं असिक्रीडकांचें द्वंद्वयुद्ध करविलें तेव्हांपासून झालेला दिसतो. रोमन लोकांनां हा प्रकार इतका आवडला कीं, रोमन अमीरउमरावांची सर्व संपत्ति व अक्कल आपल्या लोकांच्या करमणुकीसाठीं सर्कशींतील रानटी पशूंच्या व मानवी प्राण्यांच्या कत्तली घडवून आणण्याच्या कामीं खर्च होऊं लागली. पॉंपीनें एका दिवसांत क्रीडांगणांत सहाशें सिंह आणले. ऑगस्टसनें ४२० चित्त्यांचें लोकांपुढें प्रदर्शन करून त्यांची करमणूक केली. प्लिनी सांगतो कीं एकदां वीस हत्तींनां सहाशें कैद्यांबरोबर लढावयास लाविलें होतें. ट्राजननें करविलेले खेळ तीन महिन्यांहून अधिक दिवस चालले होते. वीस हजार असिक्रीडक लढण्यासाठीं क्रीडांगणांत उतरले व वीस हजारांहून अधिक पशू ठार करण्यांत आले. टायटस ह्या लोकप्रिय झालेल्या राजानें पांच हजारांहून अधिक पशूंची एका दिवसांत कत्तल करविली होती. लोकांच्या मनाची करमणूक करण्यासारखा एखादा विचित्र प्राणी मिळविण्यासाठीं जगाचा कोपरानकोपरा धुंडाळण्यांत येत असे. या प्राण्यांचा पुरवठा करण्याच्या कामीं जर कोणीं व्यत्यय आणला, तर रोमन लोकांचा त्याच्यावर भयंकर घुस्सा होई. पुढें थीओडोशिअसच्या वेळीं मात्र आत्मसंरक्षणार्थ देखील सिंहाचा वध करण्याची कायद्यानें मनाई करण्यांत आली.

रोमन लोकांची रक्ताची तहान केवळ रानटी पशूंच्या अंतकालच्या वेदना पाहून शमन होण्यासारखी नव्हती. अगोदर शिक्षण देऊन तयार केलेल्या असिक्रीडकाच दुसऱ्या एका असिक्रीडकाशीं जेव्हां त्यांच्या ह्या निर्घृण डोळ्यांसमोर युद्ध चालत असे तेव्हां त्यांनां आनंदाच्या उकळ्यावर उकळ्या फुटत. अशा प्रसंगींच्या अँफिथिएटरमधील देखाव्याचें वर्णन करणें केवळ अशक्य आहे. हीं युद्धें पहात असतां प्रेक्षकसमुदाय आनंदानें अगदीं वेडा होऊन जाई. भाल्याचा, तरवारीचा किंवा सुरीचा वार होऊन खेळाडूच्या अंगांतून रक्ताची चिळकांडी उडाली, कीं ते आपल्या जागेवर उठून उभे रहात, मोठमोठ्यानें ओरडत व टाळ्या पिटीत; वाहवा, काय सफाईचा वार! असे शब्द दहा हजार लोकांच्या तोंडून एकदम बाहेर पडून सर्व अँफिथिएटर दुमदुमून जाई; व अत्यंत शरमेची गोष्ट म्हटली म्हणजे या नीच कोटीच्या आनंदांत इतर बाजारबुणग्याबरोबर केवळ अमीर उमराव व बादशहाच नव्हेत तर कोमल मनोवृत्तीच्या म्हणून समजल्या जाणाऱ्या स्त्रिया देखील सारखाच भाग घेत असत. एखादा असिक्रीडक लढतां लढतां मेला, कीं त्याचें शरीर सभोंवतीं त्या कामासाठीं तयार असलेले नोकर सर्व प्रेक्षकांसमक्ष फरफटत फरफटत बेफिकीरपणें बाजूच्या गर्तेत नेऊन टाकीत, क्रीडांगणांतील वाळूवर जेथें त्याचें रक्त सांडलें असेल तेथें लांकडाचा भुसा पसरला जाई व तावडतोब त्याच्या जागीं दुसरा बळी आपल्या आहुतीनें प्रेक्षकजनांची करमणूक करण्यास पुढें येत असे. अशा रीतीनें हें किळसवाणें कसाबखान्याचें काम एकसारखें चालत असे. विशेष लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, या गोष्टी क्वचित् प्रसंगीं किंवा आकस्मिक कारणानें घडत होत्या अशांतला भाग मुळींच नाहीं. त्या मुद्दाम, पद्धतशीर-

पणें व शांत चित्तानें केल्या जात होत्या. त्या रोमन लोकांच्या रोमच्या व्यवहारांतल्याच गोष्टी होत्या. आरंभीं आरंभीं रानटी पशूंशीं लढण्यासाठीं शिक्षा झालेल्या गुन्हेगारांचीच योजना होत असे; परंतु पुढें पुढें या कामासाठीं पगारी स्वयंसेवक नेमण्याची गरज भासूं लागली. सामान्यतः जरी हे असिक्रीडक म्हणजे त्या कामासाठीं विकत घेतलेले असे गुलाम असत, तरी पुष्कळदां भरपूर पगार देऊन स्वतंत्र इसम देखील असिक्रीडकांच्या कामासाठीं तयार केलेले आढळून येतात. पुढें पुढें तर रोमन लोकांनां या गोष्टीची इतकी चटक लागली कीं, मोठमोठे अमीरउमराव देखील सभोंवताल्च्या हजारों प्रेक्षकजनांची वाहवा मिळविण्यासाठीं स्वतःचा जीव धोक्यांत घालून क्रीडांगणांत उतरूं लागले. या खेळांचा लोकांच्या अंगीं धैर्य उत्पन्न करण्याच्या कामीं उपयोग होतो असें त्यांचें समर्थन केलें जात असे. परंतु त्यांच्या योगें कांहीं शूर खेळाडू निपजत असले तरी, प्रेक्षकांवर तरी त्यांचा फारच वाईट परिणाम होत असे. या खेळांनीं प्रेक्षकांच्या अंगीं धैर्य तर आणलें नाहींच, पण दुसऱ्याच्या हालअपेष्टा पाहून त्याचा कळवळा येण्याची जी मनुष्यांत नैसर्गिक मनोवृत्ति असते ती मात्र साफ नाहींशी केली. त्या काळीं सुद्धां विचारी लोकांस असले खेळ आवडत नव्हते हें खरें. पण रिकामटेकड्या बाजारबुणग्यांचीं मनें गुंतवून राज्यांत शांतता ठेवण्यासाठीं याच काय पण दुसऱ्या कोणत्याहि नीच कोटींतील करमणुकीच्या साधनांस संमति देण्यास ते तयार झाले असते.

वर वर्णिलेल्या अत्यंत क्रूरपणाच्या गोष्टी एका उच्च दर्जाच्या प्राचीन संस्कृतीनें अलंकृत झालेल्या रोमन समाजामध्यें घडल्या असतील हें अलीकडील कोणाहि इसमाला शक्य सुद्धां वाटणार नाहीं. परंतु अनेक कवी, इतिहासकार व तत्त्ववेत्ते यांचे ग्रंथ, त्याचप्रमाणें शेंकडो अँफिथिएटरांचे प्रत्यक्ष पहावयास मिळणारे अवशेष वगैरेंच्या निःसंदिग्ध व भरपूर पुराव्यावरून या बाबतींत संशय घेण्यास तिळमात्र जागा रहात नाहीं. या सर्व तामसी राक्षसी मनोवृत्तींचा पुरावा देणाऱ्या गोष्टी वाचल्या म्हणजे रोमच्या सत्तेचा जो अखेर अधःपात झाला तो यथायोग्यच झाला असें म्हणावें लागतें. ज्या रानटी लोकांनां गुलाम करून त्यांच्याकडून रोमन सत्ताधीश असिक्रीडनाचे प्राणघातक खेळ करवीत असत. त्या रानटी जातींच्या वंशजांनीं रोमन लोकांनां त्यांच्याच खुद्द राजधानींत कंठस्नान घालून यथायोग्य सूड उगविला असें म्हणावें लागतें. स्वतंत्र रोमन नागरिक, रोमन सरदार, रोमन सेनेटर वगैरे सर्व दर्जांचे बादशाही वैभवानें मदांध झालेले रोमन पुरुष आणि रोमन स्त्रियांसुद्धां इतक्या नैतिक अधःपाताप्रत पोंचल्या होत्या कीं, अवाढव्य रोमन साम्राज्यावर सत्ता चालविण्यास सद्गुरहू रोमन समाज यत्किंचितहि पात्र नव्हता.

**रोमन बादशहांचें संप्रदायविषयक धोरण.**— सामान्य जनतेच्या पारमार्थिक समजुतींत क्रांति घडवून आणणें हें सरकारचें कर्तव्य नाहीं किंवा सरकारी शक्तीच्या आटोक्यांतलेंहि तें नाहीं. तथापि सीझर बादशहांनीं रोमन साम्राज्यांतील मुख्य संप्रदायाधिपति या नात्यानें एकराष्ट्रीय संप्रदाय चालू ठेवणें, व रोम येथें अनेक-दैवत-पूजनाला मोकळीक देणें या दोन परस्परविरोधी गोष्टी करण्याची आकांक्षा धरिली. धार्मिक सुधारणेसंबंधाची दुसरी कोणतीहि कल्पना त्यांच्या डोक्यांत नव्हती. बादशाही धोरणानुसार हळू हळू रोमनें जिंकलेल्या सर्व देशांतील देवतांचें भजनपूजन रोम शहरांतील कॅपिटॉलमध्यें होऊं लागलें. पौरस्त्य देशांतील पारमार्थिक संप्रदायांवर रोमन बादशहांचा विश्वास नव्हता तरी देखील अफाट रोमन साम्राज्यांतील प्रजाजनांच्या संतोषाकरितां रोम येथें रोमन व ग्रीक देवतांबरोबर इजिप्त व आशियामधील देवतांची स्थापना करण्यास परवानगी देणें त्यांनां भाग पडलें. साम्राज्यसंरक्षक अशा या एकीकरणाच्या प्रयत्नामुळें लोकांची ईश्वरश्रद्धा मात्र हळू हळू डळमळीत होत गेली. अनेक उपासनासंप्रदायांची एकत्र खिचडी झाल्यामुळें लोकांत सर्वच संप्रदायांविषयीं अश्रद्धा पसरूं लागली. या अश्रद्धेचा पगडा उच्च दर्जाच्या बुद्धिमान् लोकांवर व खुद्द रोमन बादशहांवर अधिक बसला. समाजामध्यें शांतता व स्वस्थता नांदण्याकरितां सामान्य जनतेमध्यें ईश्वरश्रद्धा जागृत असणें अवश्य आहे ही गोष्ट रोमन बादशहा जाणून होते. म्हणून प्रजाजनांच्या धर्मसमजुती न दुखावतील अशी व्यवस्था करण्याचें त्यांनीं धोरण स्वीकारिलें. धर्म म्हणजे सामान्य श्रद्धाळू जनतेला फसविण्याचें व ताब्यांत ठेवण्याचें एक साधन असें मानलें जांत असे. उच्च दर्जांचे बहुतेक तत्त्ववेत्ते नास्तिक मताचे असत किंवा कांहीं उच्च दर्जाच्या पंथाचे चहाते असत. भोळ्या धर्मसमजुती, ग्राम्य धार्मिक विधी किंवा देवादिकांचे अद्भुत चमत्कार यांचा ते उपहासच करीत असत.

**स्टोइसिझम नामक तत्त्वज्ञानपंथ.**—वर वर्णिलेल्या रोम येथील धार्मिक परिस्थितींतील क्रान्तीला स्टोइक पंथ अपकारक होण्याऐवजीं अधिक उपकारकच झाला. स्टोइक पंथानें माणसाच्या मनांत स्वाभिमान व स्वतंत्र विचार करण्याची प्रवृत्ति या दोन गुणांची वृद्धि केली. परंतु हेच दोन गुण रोमन बादशहांनीं चालविलेल्या जुलमी सत्तेला प्रतिकूल होते. त्यामुळें अर्थातच स्टोइक पंथ सीझर बादशहांनां आणि त्यांची खुशामत करून राहणाऱ्या भोंवतालच्या लोकांनां अप्रिय वाटत होता. उलट पक्षीं या पंथाचीं तत्त्वें उच्च दर्जाच्या बुद्धिमान् व विद्वान् लोकांनां पटून ते त्याचे अनुयायी बनत होते व त्या पंथाच्या तत्त्वांचा पुरस्कार करण्याकरितां वाटेल त्या हालअपेष्टा सोसण्यास तयार होते. अशी स्थिति केवळ रोम शहरांतच नव्हे तर रोमन साम्राज्यांतील दूर दूरच्या प्रांतांतहि थोड्याबहुत प्रमाणांत होती. सर्व

जित लोक, रोमन साम्राज्यांत राहिल्यानें होणारे शांतता आणि सुरक्षितता हे फायदे जाणून होते. तथापि पारतंत्र्य आणि रोमन बादशहांचें डोळे दिपविणारें वैभव पाहून विचारी लोकांच्या मनाचा कल स्टोइक पंथांतील स्वाभिमान आणि स्वतंत्रता या दोन गुणांकडे अधिक वळत चालला होता. ही अनुकूल परिस्थिति लक्षांत घेऊन स्टोइक पंथाच्या पुढाऱ्यांनीं आपलीं तत्त्वें समाजामध्यें रुजविण्याकरितां अधिक नेटाचे प्रयत्न सुरू केले. न्याय, विश्वबंधुता, समता, भूतदया, वगैरे तत्त्वांचा प्रसार त्यांनीं चालविला. सेनिका, एपिक्टीटस, मार्कस ऑरीलिअस, प्लुटार्क वगैरे या पंथाचे पुढारी होते. द्वेष, परनिंदा, क्रोध, शत्रुत्व, सूड, इत्यादि दुर्गुणांना माणसाच्या हृदयांत स्थान मिळूं नये असा त्यांचा उपदेश असे. तामसी मनोविकारांना बळी न पडतां मनुष्यानें सहिष्णुता, सहानुभूति, प्रेम इत्यादि सद्गुणांनीं प्रेरित होऊन एकमेकांशीं वागावें असें ते म्हणत असत.

या स्टोइक पंथाच्या तत्त्वांचा ज्या वेळीं बराच प्रसार झालेला होता अशा वेळीं रोमन साम्राज्यावर एका नव्या संप्रदायानें स्वारी केली.

**ख्रिस्ती संप्रदाय आणि रोमन साम्राज्य.**—ख्रिस्ती संप्रदायाची पवित्रता, त्यांतील नैतिक उपदेशाची थोर योग्यता आणि त्या संप्रदायाच्या प्रचारकांचा शुद्ध व कडकडीत जीवितक्रम या गुणांचा पगडा धर्मभ्रष्ट व अनीतिमान् बनलेल्या रोमन समाजावर सहज पडला असेल असें आपणांस वाटतें. शिवाय रोमन साम्राज्यांत अनेक उपासनासंप्रदाय गुण्यागोविंदानें एकत्र नांदावे अशी रोमन बादशहांची योजना असल्यामुळें धर्मसहिष्णुता हा गुण रोमन समाजाच्या अंगवळणीं पडला होता असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि नव्या ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रसारास रोमन समाजांत कसून विरोध करण्यांत आला असें इतिहासावरून दिसतें. ख्रिस्ताच्या मृत्यूनंतर केवळ ७० वर्षांनींच ख्रिस्ती संप्रदायाच्या निरपराधी प्रचारकांना एका सुस्वभावी रोमन प्रो.कॉन्सलनें मरणाची शिक्षा ठोठावली. ट्राजननंतरच्या अनेक रोमन बादशहांनीं अनेकदां फर्मानें काढून ख्रिस्ती लोकांना कायदेबहिष्कृत ठरविलेलें आढळून येतें. रोमन बादशहांनीं आणि गव्हर्नरांनीं यरुशलेम शहर आणि तेथील ख्रिस्ताचें पवित्र देवालय अनेकदां उध्वस्त केलें. उलट पक्षीं यहुदी लोकांनीं रोमन सार्वभौमत्वाचें जूं झुगारून देण्याकरितां अनेकदां बंडें केलीं, पण यहुद्यांविरुद्ध युद्धांत जय मिळविल्यावर रोमन बादशहांचा राग शांत होत असे आणि यहुदी लोकांना त्यांच्या धर्मसहिष्णुतेचा लाभ घडत असे. यहुदी लोक आणि ख्रिस्तपंथी लोक यांना वागविण्यांत रोमन बादशहा कोणत्या प्रकारचा पक्षपात कां करीत असत याचें कारण अगदीं उघड व स्पष्ट आहे. तें असें कीं, यहुदी लोक म्हणजे एक राष्ट्र मानलें जात असे, आणि त्या राष्ट्रानें रोमचें सार्वभौमत्व कबूल केलें कीं रोमन लोक संतुष्ट असत. उलट पक्षीं ख्रिस्ती लोक म्हणजे एक नवा पंथ होता; व तो पंथ रोमन साम्राज्यांतील इतर पंथांना नष्ट करून त्यांची जागा स्वतः पटकावण्याचा प्रयत्न करीत होता. त्यामुळें अर्थातच पूर्वपरंपरागत धर्मसमजुतींबद्दल अभिमानी असलेली रोमन जनता ख्रिस्ती संप्रदायप्रचारकांना शत्रुवत् लेखूं लागली, व त्यांचा नायनाट करण्याकरितां रोमन साम्राज्यांत जोराचा प्रयत्न करण्यांत आला.

**ख्रिस्ती लोकांचा छळ.**—ख्रिस्ती लोकांची सांप्रदायिक मंडळें व संघ असल्यामुळें त्यांचा नायनाट करण्याचें काम फार कठिण होतें. शिवाय रोमन लोक कायदेप्रिय असल्यामुळें ख्रिस्ती लोकांना कायद्याच्या कलमांत पकडून योग्य पुराव्यानिशीं आरोप शाबीत केल्याशिवाय शिक्षा करणें त्यांना लांछनास्पद वाटे. धर्मच्छळाच्या बाबतींत प्राचीन व अर्वाचीन बादशहांची तुलना करतां रोमन बादशहापेक्षां पांचवा चार्लस, किंवा चौदावा लुई हे अधिक क्रूर व अत्याचारी ठरतात. रोमन बादशहांनीं केलेल्या ख्रिस्ती लोकांच्या छळाचा एकंदर इतिहास पाहतां असें स्पष्ट दिसतें कीं, (१) प्रथम बरेच दिवस रोमन सरकारचें ख्रिस्ती पंथाकडे लक्षच गेलें नव्हतें; (२) पुढें धर्मच्छळ सुरू झाल्यावर ख्रिस्ती लोकांवर खटले फार सावधगिरीनें व नाखुषीनें करण्यांत येऊं लागले; (३) त्यांना दिलेल्या शिक्षा बऱ्याच सौम्य असत; आणि (४) ख्रिस्ती संप्रदायाला मधून मधून बरेच शांततेचे दिवस लाभले होते.

रोमन बादशहा नीरो याच्या कारकीर्दीत ख्रिस्ती लोकांचा प्रथम छळ झाला. याच्या कारकीर्दीत रोम शहराला आग लागली. तें आग लावण्याचें कृत्य ख्रिस्ती लोकांनीं केलें असा त्यांच्यावर आरोप ठेवून त्यांना अनेक प्रकारच्या क्रूर शिक्षा देण्यांत आल्या. "कांहींना खिळे मारून 'क्रूसला' टांगण्यांत आलें, कांहींच्या अंगाला ज्वालाग्राही पदार्थ फांसून अंधाऱ्या रात्रीं पलित्याप्रमाणें जाळून त्यांचा उजेडाकरितां उपयोग करण्यांत आला, व कांहींना रानांतील जनावरांच्या कातड्यांत गुंडाळून भयंकर शिकारी कुत्र्यांच्या तावडींत देण्यांत आलें," असें टॅसिटसनें लिहून ठेविलें आहे.

ख्रिस्त्यांच्या धर्मच्छळाला सुरुवात ट्राजन बादशहाच्या कारकीर्दीत झाली; व तो छळ हेड्रिअन, अँटोनायनस पायस व मार्कस ऑरीलिअस यांच्या कारकीर्दीत तसाच चालू होता.

**रोमन बादशाहीचीं अखेरचीं तीन शतकें (इ. स. १८०—४७६).**—या काळांत रोमन बादशाहीची अवनति अधिक अधिक स्पष्टपणें होत जाऊन अखेर तिचा ४७६ मध्यें अंत झाला. या काळांतील ऐतिहासिक गोष्टींचें टाचण येणेंप्रमाणें:—

**कॉमोडस ते दुसरा क्लॉडिअस.**—(इ. स. १८०—२७०).—कॉमोडसनें रानटी जातींबरोबर तह केला. पुढें त्याच्या विरुद्ध कट झाले म्हणून त्यानें अनेक कटवाल्यांना

क्रूरपणानें शिक्षा केल्या. तरीहि अखेर त्याचा खून झाला (इ. स. १९३). पुढील बादशहा पर्टिनॅक्स याच्या कारकीर्दीत अनेक ठिकाणीं बंडें व लढाया झाल्या. सिरिया, इलिरिकम व ब्रिटन येथील रोमन सैन्यानें आपआपला स्वतंत्र बादशहा असल्याचें जाहीर केलें. १९८ मध्यें पार्थियन लोकांबरोबर युद्ध झालें. २०८ मध्यें सिव्हीरसनें कॉलिडोनिआवर स्वारी केली. २१० मध्यें ब्रिटनमध्यें सिव्हीरसची भिंत बांधून पुरी करण्यांत आली. २११ मध्यें कॅराकॅल्ला हा बादशहा झाला. त्यानें २१२ मध्यें स्वतःचा भाऊ जीटा याचा खून केला. २१७ मध्यें माक्रायनस हा बादशहा झाला. २१८ मध्यें रोमन सैन्यानें एलिगॅबालसला बादशहा केलें; व त्यानें माक्रायनसचा पराभव करून त्याला ठार मारलें. २२२ मध्यें सिव्हीरस अलेक्झांडर हा बादशहा झाला. त्यानें २३१ मध्यें इराणबरोबर युद्ध केलें. २३५ मध्यें मॅक्सिमिएनस थ्रॅक्स बादशहा झाला. त्यानें २३६ मध्यें जर्मनीवर स्वारी केली. २३७ मध्यें गॉर्डिएनस पहिला व दुसरा हे बादशहा असल्याचें आफ्रिकेंत जाहीर करण्यांत आलें; परंतु त्या दोघांचाहि पराभव होऊन ते मारले गेले. २५० मध्यें ख्रिस्ती लोकांचा छळ झाला. २५१ मध्यें गॅलस व हॉस्टिलिएनस हे बादशहा झाले. २५२ मध्यें रोमन साम्राज्यांतील बहुतेक भागांत एक रोगाची सांथ उद्भवली; ती पुढें १५ वर्षें चालू राहिली. २५३ मध्यें एमिलिएनस हा बादशहा झाला. २५४ मध्यें व्हालीरिएनस हा बादशहा झाला. या कारकीर्दींत अनेक रानटी टोळ्यांनीं निरनिराळ्या रोमन प्रांतांवर स्वाऱ्या केल्या. २६० मध्यें गॅलिईनस हा बादशहा झाला. या कारकीर्दीत इराणी लोकांबरोबर युद्ध झालें; व गॉलमध्यें बंड झालें. २६८ मध्यें दुसरा क्लॉडिअस बादशहा झाला. त्यानें गॉथ लोकांचा पराभव करून त्यांची मोठी कत्तल केली.

**ऑरीलिअन तेथीओडोशिअस** (इ० स० २७०— ३९५).—२७० मध्यें ऑरीलिअन बादशहा झाला. त्यानें गॉथ लोकांचा पराभव करून त्यांच्याबरोबर तह केला. अॅलामेनाय यांनीं ऑस्ट्रिआवर स्वारी केली, परंतु त्यांचाहि ऑरीलिअननें तीन वेळां पराभव केला. २७३ मध्यें पॅल्मायरा आणि त्याची राणी झिनोबिआ हीं ऑरीलिअननें हस्तगत करून घेतलीं. या बादशहानें इजिप्तमध्यें झालेलें बंड मोडलें. २७४ मध्यें गॉल, ब्रिटन व स्पेन या देशांचा बादशहा म्हणून मिरविणारा टेट्रिकस याचा ऑरीलिअननें शालोन येथें पराभव केला.

२७५ मध्यें टॅसिटस बादशहा झाला. २७६ मध्यें प्रोबस व फ्लोरिअन हे बादशहा झाले. यांनीं गॉल देशामधून जर्मन लोकांनां ऱ्हाइन नदीपलीकडे हांकून लाविलें. २८२ मध्यें केरस हा बादशहा झाला. त्यानें सार्मेशिअन लोकांचा पराभव केला. २८४ मध्यें डायोक्लीशिअन हा बादशहा झाला. त्यानें बिथिनिआंतील निकोमिडीआ हें शहर आपली राजधानी केलें. २८५ मध्यें मॅक्सिमिअन हा जोड बादशहा म्हणून पश्चिमेकडील रोमन साम्राज्याचा कारभार पाहूं लागला. २९६ मध्यें कॉन्स्टॅन्शिअसनें स्वतंत्र होऊं पाहणारा ब्रिटन देश पुन्हां जिंकून घेतला. इजिप्तमध्यें झालेलें बंड डायोक्लीशिअन बादशहानें मोडिलें. २९७ मध्यें गालीरिअसनें इराणी लोकांचा पराभव करून मेसापोटेमिया प्रांत रोमन साम्राज्यास जोडला. ३०३ मध्यें ख्रिस्ती लोकांचा छळ झाला. ३०५ मध्यें डायोक्लीशिअन व मॅक्सिमिअन यांनीं बादशाही पदाचा त्याग केला आणि कॉन्स्टॅन्शिअस व गालीरिअस हे जोड बादशहा झाले. ३०६ मध्यें कॉन्स्टॅन्शिअस याचा मुलगा कॉन्स्टंटाइन दि ग्रेट हा स्पेन, गॉल व ब्रिटन या देशांवर राज्य करूं लागला. आणि मॅक्सेन्शिअस हा रोम येथें बादशहा झाला.

३१० मध्यें मॅक्सिमिअनला कॉन्स्टंटाइननें ठार मारलें. ३१२ मध्यें मॅक्सेन्शिअसचा पराभव झाला व तो मरण पावला. ३१३ मध्यें लिसिनिअस व कॉन्स्टंटाइन यांनीं एडिक्ट ऑफ मिलन नांवाचें फर्मान काढून धर्मसहिष्णुतेचा अंगीकार केला. ३१४ मध्यें लिसिनिअस आणि कॉन्स्टंटाइन यांच्यामध्यें युद्ध सुरू झालें. ३२३ मध्यें लिसिनिअसचा दोन लढायांत पराभव झाला व त्याला ३२४ मध्यें ठार मारून कॉन्स्टंटाइन हा एकटा राज्य करूं लागला. ३३० मध्यें त्यानें बिझॅन्शिअम उर्फ कॉन्स्टांटिनोपल हें साम्राज्याच्या राजधानीचें शहर केलें. ३३७ मध्यें दुसरा कॉन्स्टंटाइन, कॉन्स्टन्स व दुसरा कॉन्स्टॅन्शिअस या तिघांनीं सर्व साम्राज्य आपसांत वांटून घेतलें. ३४० मध्यें दुसरा कॉन्स्टंटाइन मरण पावला. ३५० मध्यें कॉन्स्टन्स मरण पावला. ३५३ मध्यें दुसरा कॉन्स्टॅन्शिअस हा एकटा राज्य करूं लागला. ३६१ मध्यें जूलिअन 'दी आपॉस्टेट' हा बादशहा झाला. यानें ३६२ मध्यें फर्मान काढून ख्रिस्ती लोकांनां धर्मस्वातंत्र्य देऊन त्यांचा छळ बंद केला. ३६३ मध्यें इराणबरोबर युद्ध सुरू झालें. प्रथम जूलिअनला अनेक लढायांत जय मिळाला, परंतु अखेर त्याला माघार घ्यावी लागली व तो मारला गेला. तेव्हां जोव्हिअन हा बादशहा झाला. त्यानें इराणबरोबर तह करून तैग्रिस नदीपलीकडले पांच जिल्हे इराणला परत दिले. या बादशहानें ख्रिस्ती संप्रदायाला इतर संप्रदायांच्या बरोबरीनें हक्क दिले. ३६४ मध्यें पहिला व्हॅलेंटिनिएनस आणि व्हेलेन्झ हे जोड बादशहा झाले. ३६७ मध्यें ग्रेशिएनस हा पश्चिम रोमन साम्राज्याचा बादशहा झाला. ३७४ मध्यें केडाय लोकांबरोबर युद्ध झालें. ३७५ मध्यें पहिला व्हॅलेंटिनिअन (निएनस) याच्या मरणानंतर दुसरा व्हॅलेंटिनिअन व ग्रेशिअन (एनस) हे दोघे मिळून राज्य करूं लागले. ३७६ मध्यें हूण व अॅलन्स लोकांनीं पूर्वेकडील गॉथ लोकांवर हल्ला केला, तेव्हां व्हेलेन्झनें गॉथ लोकांनां थ्रेसमध्यें राहण्यास परवानगी दिली. ३७८ मध्यें गॉथ लोक कॉन्स्टांटिनोपलवर हल्ला करण्याकरितां चालून आले. तेव्हां

हेड्रिआनोपोलिस येथें त्यांच्याशीं लढाई होऊन तींत गॉथ लोकांनीं रोमन सैन्याचा पराभव केला; व त्यांची मोठी कत्तल केली. ३७८ सालींच व्हेलेन्स मरण पावला. ३७९ मध्यें थीओडोशिअस दि ग्रेट हा पूर्व रोमन साम्राज्याचा बादशहा झाला. ३८० मध्यें त्यानें ख्रिस्ती संप्रदाय स्वीकारला. त्यानें गॉथ लोकांचा युद्धांत पराभव केला, आणि तह करून त्यांनां थ्रेस, फ्रिजिआ व लिबिआ या प्रांतांत राहण्यास परवानगी देऊन आपल्या सैन्यांत त्या लोकांची बरीच भरती केली. या कारकीर्दींत कित्येक बंडें झालीं. पण तीं सर्व मोडून अखेर ३९४ मध्यें थीओडोशिअस सर्व रोमन साम्राज्यावर राज्य करूं लागला. ३९५ मध्यें तो मरण पावला; आणि आर्केडिअस पूर्व रोमन साम्राज्याचा व होनोरिअस पश्चिम रोमन साम्राज्याचा बादशहा झाला.

अखेरीचें शतक (इ. स. ३९५—४७६).—थीओडोशिअसच्या मरणानंतर रोमन साम्राज्याचे कायमचे दोन विभाग झाले. पश्चिम रोमन साम्राज्याची राजधानी रोम येथें होनोरिअस गादीवर बसला. पण तो केवळ ११ वर्षांचा असल्यामुळें स्टिलिको हा राजप्रतिनिधि या नात्यानें कारभार पाहूं लागला. ३९५ मध्यें गॉथ लोकांचा सेनापति ॲलारिक यानें थ्रेस प्रांतावर स्वारी केली. तेव्हां त्याच्या विरुद्ध स्टिलिकोनें चाल करून जाऊन ३९६ मध्यें त्याला हांकून लाविलें. ३९७ मध्यें आफ्रिकेंत बंड झालें व त्यामुळें रोमला धान्याचा तुटवडा पडला. ४०३ मध्यें ॲलारिक यानें इटालीवर स्वारी केली. या वेळींहि स्टिलिकोनें गॉथ लोकांचा पराभव करून इटालीचें संरक्षण केलें. ४०५ मध्यें पुन्हां केल्ट, जर्मन, सार्मेशिअन व गॉल या रानटी लोकांच्या दोन लाख सैन्याची राडागैससच्या नेतृत्वाखालीं इटालीवर स्वारी झाली. पण याहि वेळीं स्टिलिकोनें शत्रूंचा पराभव करून त्यांच्या सेनापतीला कैद केलें व त्यांच्या सैन्याचा नाश केला. रानटी लोकांच्या या हल्ल्यांपासून इटालीचें संरक्षण करण्याकरितां गॉल व ब्रिटन या प्रांतांतील बहुतेक रोमन सैन्य परत बोलाविण्यांत आलें होतें. ही संधि साधून ४०६ मध्यें व्हँडल नांवाच्या रानटी लोकांनीं गॉलवर चाल केली. ४०७ मध्यें ब्रिटनमध्यें बंड झालें; व तेथें कॉन्स्टंटाइन नांवाच्या इसमास बादशहा म्हणून मान्य करण्यांत आलें. ४०८ मध्यें स्टिलिकोचा खून झाला. त्याच सालीं ॲलारिकनें रोम शहराला वेढा घातला आणि रोमन लोकांपासून बरेंच द्रव्य उकळलें. ४०९ मध्यें ॲलारिकनें रोमला पुन्हां वेढा दिला व ॲट्टालसला बादशहा म्हणून जाहीर केलें. याच सालीं जिरोन्शिअसनें स्पेनमध्यें बंड उभारिलें व मॅक्सिमसला बादशहा केलें. याच सालीं व्हँडल लोकांनीं स्पेनवर स्वारी केली. ४१० मध्यें ॲलारिकनें रोम शहर हस्तगत करून तेथें लुटालूट केली. नंतर त्याच सालीं ॲलारिक मरण पावला व आटाउल्फ हा गॉथ लोकांचा पुढारी झाला. ४११ मध्यें कॉन्स्टंटाइन व जिरोन्शिअस या राज्य बळकाऊं पाहणाऱ्या इसमांमध्यें युद्ध झालें, पण पुढें लवकरच ते दोघेहि मरण पावले. ४१२ मध्यें गॉलमध्यें जोव्हिनसला बादशहा करण्यांत आलें. होनोरिअस व आटाउल्फ यांच्यामध्यें तह होऊन ४१३ मध्यें आटाउल्फनें जोव्हिनसला ठार मारलें. ४१५ मध्यें आटाउल्फ स्पेनमध्यें मरण पावला व वालिआ हा गॉथ लोकांचा पुढारी बनला. ४१८ मध्यें गॉथ लोकांनीं सर्व स्पेन देश जिंकून घेतला. त्याच सालीं वालिआ मरण पावून पहिला थीओडोरिक हा गॉथ लोकांचा पुढारी बनला. ४२३ मध्यें होनोरिअस मरण पावला. ४२५ मध्यें त्याचा पुतण्या तिसरा व्हॅलेंटिनिअन हा बादशहा झाला. याच्या कारकीर्दींत गॉथ लोकांबरोबर युद्ध चालूच होतें. ४३१ मध्यें व्हँडल लोकांनीं आफ्रिकेंतील बराच प्रांत जिंकून घेतला. ४३४ मध्यें ॲटिला हा हूण लोकांचा राजा झाला. ४३९ मध्यें गॉथ लोकांबरोबर तह करण्यांत आला. ४५१ मध्यें ॲटिलानें गॉलवर स्वारी केली, पण त्याचा ईशिअस व थीओडोरिक यांनीं शालोन येथें पराभव केला. ४५२ मध्यें ॲटिलानें इटालीवर स्वारी केली, व ४५३ मध्यें तो मरण पावला. ४५५ मध्यें व्हॅलेंटिनिअन बादशहाचा खून करून मॅक्सिमस बादशहा झाला. गादीवर बसल्यावर त्यानें व्हॅलेंटिनिअनच्या विधवा राणीचा खून केला. पण त्याच सालीं त्याचा स्वतःचाहि खून झाला. ४५७ मध्यें माजोरिअन बादशहा झाला. त्यानें ४५८ मध्यें व्हँडल व गॉल लोकांवर स्वारी करून त्यांचा पराभव केला, व दुसऱ्या थीओडोरिकबरोबर तह केला. ४६१ मध्यें माजोरिअनला रिसिमरनें पदच्युत करून ठार मारिलें. नंतर सिव्हीरस बादशहा झाला. ४६२ मध्यें व्हँडल लोकांनीं इटालींत शिरून बरीच लुटालूट व जाळपोळ केली. ४६५ मध्यें सिव्हीरस मरण पावला, व रिसिमरनें सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली. ४६७ मध्यें ॲन्थिमिअसला बादशहा करण्यांत आलें. ४७२ मध्यें रिसिमरनें ॲन्थिमिअसला ठार मारिलें, पण तो स्वतःहि त्याच सालीं मरण पावला. ४७३ मध्यें ग्लिसरिअस बादशहा झाला. त्याच सालीं आस्ट्रोगॉथ लोकांनीं रोमन साम्राज्यावर स्वारी करण्याची तयारी चालविली. ४७४ मध्यें ग्लिसरिअस पदच्युत झाला, व पुढील वर्षी रॉम्युलस ऑगस्टयुलस बादशहा झाला. ४७६ मध्यें ओडोआसरनें इटालीवर स्वारी केली; व रॉम्युलस ऑगस्टयुलसला पदच्युत करून स्वतः इटालीचा राज्यकारभार हातीं घेतला.

**अखेरच्या तीन शतकांतील परिस्थिति.**—रोमन साम्राज्याच्या अखेरच्या अवनतीच्या काळांतील अत्यंत महत्त्वाची कारकीर्द म्हटली म्हणजे कॉन्स्टंटाइन दी ग्रेट या बादशहाची होय. हा प्रथम स्वतः सहकुटुंब ख्रिस्ती संप्रदायानुयायी बनला; आणि ख्रिस्ती लोकांचा छळ त्यानें बंद केला. साम्राज्याचा कारभार सुव्यवस्थित चालविण्याकरितां त्यानें अनेक

महत्वाचे कायदे केले. त्यांपैकीं दोन कायदे विशेष महत्वाचे आहेत. (१) गरीब, दरिद्री आईबाप लहान अर्भकांनां निर्वाहाच्या साधनांच्या अभावामुळें ठार मारीत असत. तो अनिष्ट प्रकार बंद पाडण्याकरितां कॉन्स्टंटाइननें दयाळूपणानें गरीब कुटुंबास सरकारी मदत देण्यासंबंधानें कायदा केला. (२) स्त्रियांवर होणाऱ्या बलात्काराच्या गुन्ह्याबद्दल त्यानें फार कडक म्हणजे मरणाची शिक्षा ठेविली. बलात्कार करणाऱ्या पुरुषास जिवंत जाळावें किंवा क्रूर श्वापदांच्या भक्ष्यस्थानीं द्यावें असा त्यानें कायदा केला. आईबापांच्या घरांतून तरुण मुलींनां पळवून नेणाऱ्या इसमांनांहि हीच कडक शिक्षा असे, व अशा कृत्याला त्या तरुणीची संमति असल्यास दोघांनांहि मरणाची शिक्षा मिळत असे.

कॉन्स्टंटाइनच्या कारकीर्दीतील आणखी एक महत्वाची गोष्ट म्हटली म्हणजे कॉन्स्टांटिनोपल या राजधानीच्या शहराची स्थापना ही होय. त्या शहराच्या सुधारणेकरितां त्यानें सुमारें पावणेचार कोट रुपये खर्च केले. या शहरांत त्यानें एक विद्यालय, दोन नाटकगृहें, आठ सार्वजनिक व १५३ खाजगी स्नानगृहें, पांच धान्याचीं कोठारें, आठ जलनिधी, सेनेट व न्यायकचेरी यांच्या उपयोगाकरितां चार मोठाले दिवाणखाने, १४ प्रार्थनामंदिरें, १४ राजवाडे व उच्च वर्गांतील रोमन लोकांनां राहण्याकरितां ४,३८८ सुंदर इमारती बांधविल्या. रोम शहरांतील सीझर बादशहांच्या वेळचा धान्य व पैसे वांटण्याची चाल आतां त्यानें या नव्या राजधानींत सुरू केली. अनेक धंद्यांतील कारागिरांनीं, व्यापाऱ्यांनीं व गाड्याघोड्यांच्या गर्दीनें ही नवी राजधानी गजबजून गेली व तिचें वैभव रोमच्या बरोबरीनें दिसूं लागलें. परंतु हा सर्व देखावा विझणाऱ्या दिव्याच्या शेवटीं मोठ्या होणाऱ्या ज्योतीप्रमाणें होता.

**रानटी टोळ्यांचा रोमन साम्राज्यावर हल्ला.**— इंडोजर्मानिक टोळ्यांनां यूरोपावर चालून येण्यास दोन मार्ग होते. एक काळ्या समुद्राच्या उत्तरेकडचा, व दुसरा त्या समुद्राच्या दक्षिणेकडचा. प्रथम हेलेनिक व इटालिक जातींच्या टोळ्या येऊन ग्रीस व इटाली देशांत वसाहत करून राहिल्या व तेथें एक हजार वर्षांच्या अवधींत या लोकांनीं एक उच्च दर्जाची विशिष्ट संस्कृति तयार केली. कलाकौशल्य व वाङ्मय, तसेंच राजकारणपटुत्व व लष्करी व्यवस्था या सर्व बाबतींत त्यांनीं इतकी प्रगति केली कीं, त्यांच्या प्राचीन सुधारणा आतांपर्यंत आधुनिक यूरोप खंडाला मार्गदर्शक होऊन राहिल्या आहेत. रोमन साम्राज्य वैभवाच्या शिखरास पोंहोंचलें होतें त्या सुमारास सुसंस्कृत बनलेल्या ग्रीस व इटाली देशांवर पुन्हां जर्मन रानटी टोळ्यांची नजर जाऊन त्यांनीं रोमन सरहद्दींत घुसण्यास सुरुवात केली. प्रथम रोमन लोकांनीं या रानटी जर्मन टोळ्यांनां जिंकून आपल्या सुधारणेखालीं घेतलें. परंतु पुढें दोन शतकें रोमन सरकारनें सरहद्दीवर चांगला लष्करी बंदोबस्त ठेवून या रानटी टोळ्यांनां आंत घुसूं द्यावयाचें नाहीं असें धोरण चालविलें. तथापि रोमन सैन्यांत पुढें पुढें या रानटी पण धिप्पाड व धाडशी लोकांचा समावेश मोठ्या प्रमाणांत होऊं लागला.

जर्मानिक वंशांतील हे रानटी लोक सुधारणेचें अनुकरण करण्याच्या गुणांत विशेष तरबेज होते. यांच्यापैकीं रोमन साम्राज्यांत राहिलेले कित्येक लोक रोमन शहरांत शिक्षण मिळवून व लष्करांत नोकरी करून मोठे कर्तबगार पुढारी बनले, व त्यांनीं आपल्या जातींतील बांधवांचें लक्ष व सहानुभूति साहजिकच आपणांकडे ओढून घेतली. अशा रीतीनें रोमनें आपणच आपल्या शत्रूस आपल्या घरांत जागा देऊन बलाढ्य प्रतिस्पर्धी निर्माण करून घेतला; व या शत्रूनेंच अखेर रोमन साम्राज्याचा घात केला. या रानटी टोळ्यांच्या निरनिराळ्या पुढाऱ्यांनीं ४ थ्या व ५ व्या शतकांत रोमन साम्राज्यांत अनेकदां घुसून रोमला त्रास दिला इतकेंच नव्हे तर खुद्द रोम शहर हस्तगत करून तेथें लुटालूट व जाळपोळ केली. इ. स. ४७६ च्या सुमारास यांचा ओडोआसर हा पुढारी रोम येथें बलिष्ठ बनला; व पूर्व रोमन साम्राज्याचा बादशहा झीनो यानें त्याला इटालीचा सत्ताधीश म्हणून मान्यहि केलें.

येणेंप्रमाणें सात शतकें पश्चिमेकडील अखिल ज्ञात जगावर सत्ता ज्या विख्यात रोम शहरानें गाजविली, त्याच रोम शहरांत परक्या रानटी जर्मानिक टोळ्यांचें राज्य सुरू झालें. ४७६मध्यें पश्चिम रोमन साम्राज्याचा अंत होऊन रोमन मुलुखावर रानटी जर्मन टोळ्यांची वसाहत कायम होण्याचा मार्ग मोकळा झाला.

परिस्थितींतील या घडामोडीनें तत्कालीन रोमन समाजाला विशेषसा धक्का बसला नाहीं. कारण ख्रिस्तीसंप्रदायाच्या प्रसारामुळें रोमन समाजाचें पूर्वींचें विशिष्टत्व फारसें उरलें नव्हतें. विस्कळित झालेल्या व नैतिक व शारीरिक दृष्ट्या अधःपतन पावलेल्या रोमन समाजाचें हें भवितव्य कित्येक दूरदर्शी राजकारणी पुरुषांनीं बरेंच अगोदर दिसूं लागलेलें होतें. फार काय, पण रॉम्युलसनें प्रथम रोम शहर वसविलें तेव्हांची बारा गिधाडांसंबंधाची जी दंतकथा प्रचलित होती तिच्यामुळें १२ शतकांनीं रोम शहराचें वैभव नष्ट होणार हें ब्रह्मलिखित जणूं काय स्वतः रोमन समाज देखील जाणूनच होता असें प्रतिपादण्यांत येतें! यामुळें तत्कालीन गद्यपद्यांत रोमन सत्तेच्या या अंताबद्दल सुखदुःखपर असें अवाक्षरहि काढलेलें आढळत नाहीं.

या एवढ्या बलाढ्य रोमन साम्राज्याचा अंत कशानें झाला, या प्रश्नाला आजकालच्या इतिहासकारांचें उत्तर असें आहेः " हा अंत विशिष्ट प्रकारच्या राज्यघटनेमुळें झाला नाहीं, किंवा विशिष्ट प्रकारच्या समाजरचनेमुळें झाला नाहीं, किंवा विशिष्ट प्रकारच्या स्त्रीपुरुषसंबंधामुळें झाला नाहीं, किंवा ख्रिस्ती संप्रदायप्रसारामुळें झाला नाहीं, किंवा

नव्या नव्या भौतिक शोधांच्या अभावामुळेंहि झाला नाहीं; तर रोमन राष्ट्रांतील एकंदर जोम कालमानाबरोबर कमी कमी होत गेल्यामुळें अखेर सदरहू प्रकारचा शेवट ओढवला. वरील गोष्टी ह्या अंतःस्थ सत्त्वाभावाची केवळ बाह्य चिन्हें होत. राष्ट्रांतील जोम हें भौगोलिक परिस्थितीचें फळ आहे. ग्रीस व इटाली या दोन्ही देशांचें हवापाणी बुद्धिमान् व जोमदार मनुष्यजात निर्माण करणारें आहे, पण हा जोम दीर्घकाळ टिकविण्याचें सामर्थ्य त्या हवेंत नाहीं. त्यामुळें दोन्हीं राष्ट्रें विशिष्ट कालावधीनंतर नष्ट झालीं. ग्रीसपेक्षां इटाली देशाचा विस्तार मोठा असल्यामुळें रोमन राष्ट्र कांहीं अधिक शतकें टिकलें इतकेंच कायतें." तथापि हें निदान इतिहासकारांचें आहे, शास्त्रज्ञांचें नाहीं. शास्त्रज्ञांच्या दृष्टीनें हें हवापाण्याचें निदान कसें फोल ठरतें तें पुढें विज्ञानेतिहास या पांचव्या विभागांत योग्य स्थळीं दाखविण्यांत येईलच.

**रोम व हिंदुस्थान.**—रोमन संस्कृतीच्या इतिहासाची पूर्तता हिंदुस्थान व रोमन साम्राज्य यांच्या परस्परसंबंधाविषयीं चार ओळी लिहिल्याशिवाय होणार नाहीं. युए-चि राजांच्या कारकीर्दीत रोमचा हिंदुस्थानाशीं बऱ्याच मोठ्या प्रमाणांत व्यापार चालू असल्याचा पुरावा सांपडतो. पहिला कडफिसेस आरंभीं फक्त ब्रॉंझचीं व तांब्याचींच नाणीं पाडीत असे. परंतु हिंदुस्थानांतून निर्गत झालेलें रेशमी कापड, मसाल्याच्या जिनसा, रत्नें, रंग इत्यादि वस्तूंच्या मोबदल्यांत रोमचें सोनें हिंदुस्थानांत येऊं लागलें तेव्हां दुसऱ्या कडफिसेसला सोन्याचें नाणें पाडण्याची उपयुक्तता दिसून येऊन रोमन नाण्याच्या धर्तीवर तेवढ्याच वजनाचें व तितकेंच सोनें असलेलें त्यानें आपलें नाणें पाडलें. या काळांत रोम व हिंदुस्थानचा पश्चिम किनारा यांच्या मध्येंहि फार मोठा दर्यावर्दी व्यापार चालत असे. प्लिनि नामक इतिहासकार रोमन स्त्रियांच्या चैनबाजीविरुद्ध तक्रार करतांना म्हणतो कीं, हिंदुस्थानांतून येणाऱ्या मालामुळें दरसाल साडेपांच कोटी सीस्टरसीझ ( म्ह० ४, ८६, ९७९ पौंड किंवा अवळ जवळ पाऊण कोट रुपये ) रोममधून हिंदुस्थानांत जातात व हिंदुस्थानांतील जिनसा तेथील किंमतीच्या शंभरपट किंमतीस रोममध्यें विकल्या जातात. परंतु दक्षिणेंतील राजांनीं आपलें स्वतःचें सोन्याचें नाणें न पाडतां, आज ज्याप्रमाणें जगाच्या बऱ्याचशा भागांत ब्रिटिश साव्हरिन चालतो त्याप्रमाणें रोममधून आलेलीं सोन्याचीं नाणींच आपल्या राज्यांत चालू केलीं होतीं. मदुरा येथील नदीच्या वाळवंटांत रुप्याच्या व सोन्याच्या नाण्यांप्रमाणें रोमन लोकांचीं तांब्याचीं नाणींहि बरींचशीं सांपडतात व त्यावरून त्या शहरीं रोमन लोकांची वस्तीहि असावी असें दिसतें.

वर दाखविल्याप्रमाणें हिंदुस्थान व रोम यांमध्यें व्यापारी दळणवळण तर होतेंच, परंतु त्याशिवाय दोन्ही देशांतील समकालीन बादशहांचाहि वकीलातीच्या रूपानें प्रत्यक्ष संबंध आला होता असें दिसतें. इ. स. ९९ मध्यें ट्राजन रोमला परत आल्यावर थोड्या दिवसांनीं त्याच्याकडे जी हिंदी वकीलात आली होती ती बहुधा कुशन राजा कनिष्क याजकडूनच रवाना झालेली असावी. इ. स. ११६ त ट्राजननें युफ्रेटीझ व तैग्रिस नद्यांमधील मेसापोटेमिया प्रांत काबीज केला तेव्हां रोमन साम्राज्याची पूर्व सरहद्द युए-चि साम्राज्याच्या पश्चिम सरहद्दीपासून अवघ्या ६०० मैलांवर येऊन भिडली होती; व पुढें जरी हेड्रिअननें युफ्रेटीझच्या पश्चिमेकडील मुलूख सोडून दिला असला, तरी रोमन साम्राज्याच्या वैभवाचा डंका उत्तर व पश्चिम हिंदुस्थानांतील राजांच्या कानीं आल्याशिवाय राहिला असेलसें संभवत नाहीं. दक्षिण हिंदुस्थानांतील राजांकडूनहि रोमच्या दरबारीं वकील पाठविण्यांत येत असत असें दिसतें. युसेबिअस याच्या 'जॉर्जिअस सिंकेलस याची शकावली' या ग्रंथांत ( इ. स. ८०० ) असें म्हटलें आहे कीं, हिंदूंचा राजा 'पांडियन' यानें ऑगस्टसकडे मैत्री व सख्य संपादन करण्याकरितां वकील पाठविले. या प्रसंगाचा येथें उल्लेख करणें म्हणजे हिंदुस्थानच्या मध्ययुगापर्यंत येणें होय. आतां हिंदुस्थानाकडे वळून या काळापर्यंत येऊन पोंचलें पाहिजे.

---

## प्रकरण ६ वें.

### भारती युद्धापासून बुद्धापर्यंतचा काळ-आरण्यकीय विचाराचा व नारायणीय धर्माचा विकास.

**या कालांतील सर्वसामान्य स्थिति.**—या दीर्घ कालांत अशी विशिष्ट गोष्ट सांपडत नाहीं कीं, जिच्या योगानें एका राष्ट्रापेक्षां दुसऱ्या राष्ट्राचा इतिहास अधिक महत्त्वाचा किंवा फारसा भिन्न होईल. अनेक राष्ट्रें व त्यांतील मारामाऱ्या या चालूच असाव्यात. कोणतीहि सार्वभौमत्वाची प्रामाणिकपणानें खटपट करावी. एकानें दुसऱ्याचा प्रदेश जिंकण्यांत पाप नाहीं अशा तऱ्हेची राजनीति भारतयुद्धकालीं संपली नाहीं. लोकांचा राजाचा धंदा कोण करतो या विषयींचा बेफिकीरपणा, संस्कृत भाषेची भ्रष्टता पण कोणत्याहि प्राकृत भाषेचा विकासाभाव, अशा प्रकारची सर्वसामान्य स्थिति या कालांत होती. म्हणजे हा संस्कृतिविकासाच्या दृष्टीनें फारसा महत्त्वाचा काल नव्हता. मात्र या कालांत संस्कृत पंडितांच्या आणि ब्राह्मणांच्या विचारांचा ओघ अप्रतिहत चालत असावा, आणि औपनिषद विचारांचा प्रसार चोहोंकडे झाला असावा. यामुळें या कालांतील बौद्धिक भारतीय इतिहासच कायतो उपलब्ध असून राजकीय इतिहास अज्ञात आहे. त्याच्या नंतरच्या काळाचा इतिहास मात्र बराच मनोरंजक आहे. कला, नवीन मतें, नवीन विचारसंप्रदाय यांनीं हा काल चित्रित आहे. तथापि हें शक्य आहे कीं, भागवत धर्माचीं मुळें बुद्धपूर्व असतील आणि कुरुयु-

होतर बुद्धपूर्व काळामध्यें नारायणीय धर्माच्या रूपांत भावी कालाचें प्रतिबिंब पडलें असेल.

इतिहासाचे बुद्धपूर्व आणि बुद्धोत्तरकाल असे दोन भाग केले आहेत, तरी येथें हें सांगून ठेविलें पाहिजे कीं, बुद्धोत्तर काल हा शब्द वापरण्यापेक्षां महावीरोत्तर काल हा शब्द वापरला असतां शब्दयोजना अधिक सार्थ होईल.महावीराच्या वार्धक्यकाळीं बुद्ध तरुण असावा असें दिसतें. श्रौत धर्माखेरीज इतर पारमार्थिक विचारांची उचल ज्या काळांत झाली तो काळ बुद्धापूर्वीचाच होता, आणि ज्या कर्त्या पुरुषांनीं ती घडवून आणली त्यांमध्यें सात्वतांतील कृष्ण आणि जैनांचा महावीर हे दोन प्रमुख पुरुष होऊन गेले होते. श्रौतधर्म भारतीयुद्धाच्या वेळेसच संकोच पावत होता. भारतीयुद्धानंतर शेंपन्नास वर्षांनीं झालेलें म्हणजे व्यासशिष्यांनीं घडविलेलें संहितीकरण कायम झालें याचा अर्थ श्रौतविकास पुढें फारसा झाला नाहीं हाच होय. सूत्रग्रंथांमध्यें जे थोडे बहुत फरक दिसतात त्यांत अथर्व्यांची विद्या त्रैविद्यांनीं आत्मसात् करून घेऊन अथर्व्यांचें अस्तित्व निष्प्रयोजन केलें ही क्रिया झालेली दिसते.

कर्मवादाचें महत्त्व कमी झालें व ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग यांमध्यें, आणि तशीच जैन व बौद्ध संप्रदायाचे चित्तशुद्धिमार्ग यांमध्यें स्पर्धा सुरू झाली. या स्पर्धेमुळें पुढें अनेक विचारसंप्रदाय उत्पन्न झाले. जैन व बौद्ध यांनीं आपले संप्रदाय परंपरेपासून अगदीं पृथक् करण्याची खटपट केली, तर भागवतांनीं आणि ज्ञानमार्गी वेदांत्यांनीं "स्वतः जगावें व दुसऱ्यास जगूं द्यावें" या तऱ्हेच्या नीतितत्त्वाचा अवलंब करून आपलें महत्त्व स्थापन केलें. वेदांत व भक्तिमार्ग यांच्या विचारांमध्यें देखील पुढें अन्योन्याश्रय उत्पन्न झाला. ज्ञान हें अंतिम साध्य झालें आणि ज्ञान उत्पन्न होण्यापूर्वी भक्तीची आवश्यकताहि मान्य झाली. वैदिक कर्ममार्ग सर्व जनसमाजास स्मार्त संस्कारांपुराच राहिला. ही चळवळ समजून घेण्यास पुढील विवेचन उपयोगीं पडेल. प्रथम आपण भागवत धर्माकडे वळूं.

**वेदकालीं शैवादि संप्रदायांचें अस्तित्व.**—वेदकालीन यज्ञसंस्था ज्या वेळेस नष्ट झाली नव्हती तर तिच्यांत शाखाभेद होतच होते अशा कालांत शैव, वैष्णव संप्रदायांचें अस्तित्व होतें हें दाखविण्यासाठीं भागवतधर्माच्या विवेचनाकडे वळण्यापूर्वी एक उतारा देतों. हा उतारा मैत्रायणीय संहितेंतील ( २. ९, १ ) आहे.

> तत्पुरुषाय विद्महे, महादेवाय धीमहि।
> तन्नो रुद्रःप्रचोदयात्॥
> तद्गांगौच्याय विद्महे, गिरिसुताय धीमहि।
> तन्नो गौरी प्रचोदयात्॥
> तत्कुमाराय विद्महे, कार्तिकेयाय धीमहि।
> तन्नः स्कन्दः प्रचोदयात्॥
> तत्कराटाय विद्महे, हस्तिमुखाय धीमहि।
> तन्नो दन्ती प्रचोदयात्॥
> तच्चतुर्मुखाय विद्महे पद्मासनाय धीमहि।
> तन्नो ब्रह्मा प्रचोदयात्॥
> तत्केशवाय विद्महे, नारायणाय धीमहि।
> तन्नो विष्णुः प्रचोदयात्॥ *
> तद्भास्कराय विद्महे, प्रभाकराय धीमहि।
> तन्नो भानुः प्रचोदयात्॥
> तत्सोमराजाय विद्महे, महाराजाय धीमहि।
> तन्नश्चंद्रः प्रचोदयात्॥
> तत्परमात्माय विद्महे, वैनतेयाय धीमहि।
> तनः सृष्टिः प्रचोदयात्॥

यासारखा उतारा काठक संहितेंतहि १७.११ येथें आढळतो. यावरून शैव, वैष्णव संप्रदायांच्या अधिष्ठानभूत देवता भौतिकस्वरूपांत असलेल्या संहिताकारांस सांपडल्या आणि त्यांस त्यांनीं आपल्या यज्ञसंस्थेंत स्थान दिलें हें उघड आहे. या देवतांचें अस्तित्व केवळ वेदोत्तर नसून वेदकालींच श्रौतेतर प्रचलित परमार्थसाधनांत होतें. म्हणजे यांचा मांत्रेतर संस्कृतींतून श्रौत संस्थांत समावेश झालेला दिसतो. *

या विषयावर डॉ. भांडारकरांनीं जें विवेचन केलें आहे तें बरेंचसें सविस्तर असल्यामुळें येथें त्याचा गोषवारा विचारभिन्नतेमुळें होणारे फेरफार करून देतों.

**उपनिषदांचें संहितीकरणात्मक स्वरूप.**—पुढील काळांतील पूजाविषयक व धर्मविषयक विचारांच्या वाढीस वळण लावण्याच्या कामीं उपनिषदांचें बरेंच प्रमुख अंग आहे.

ईश्वर, मनुष्य व जग यांचें स्वरूप काय व त्यांचा एकमेकांशीं संबंध काय याविषयींचीं निरनिराळ्या मतांचीं तत्त्वें उपनिषदांत सांठविलीं आहेत. एकमेकांशीं विसंगत असलेले असे जे अर्वाचीन काळांतील अनेक धर्मविषयक व तत्वज्ञानविषयक पंथ आहेत ते आपल्या विशिष्ट मतास आधारभूत असे उतारे उपनिषदांतूनच घेतात. बऱ्याच ठिकाणीं हे उतारे बरोबर घेतलेले आहेत; पण आपआपल्या मतांची तरफदारी करण्याकरितां आपल्या विशिष्ट तत्त्वांशीं जुळणारा अर्थ विरुद्ध बाजूच्या ग्रंथांतूनहि बळेंच काढण्याचा प्रयत्न झाला आहे तो मात्र उघड उघड चुकीचा आहे. ऋग्वेद संहिता ज्याप्रमाणें निरनिराळ्या व्यक्तींनीं रचिली त्याप्रमाणें उपनिषदेंहि निरनिराळ्या माणसांनीं रचिलीं आहेत; असें असल्यामुळें उपनिषदांत केवळ एका मताचेंच नव्हे तर अनेक मतांचें प्रतिपादन केलेलें आढळतें. प्राचीन ऋषींच्या विचारांनां शाब्दिक स्वरूप मिळून ते एका पिढीकडून दुसरीस तोंडीं पढविण्यांत आले, व त्यांचा एक मोठा संग्रह तयार झाला. हे सर्व विचार ( शाब्दिक स्वरूपांत आल्यावर ) संगृहीत करून ठेवण्याची जेव्हां कल्पना सुचली तेव्हां त्या सर्वांचा निरनिराळ्या वैदिक पंथांच्या उपयोगासाठीं वेगवेगळ्या पुस्तकांत समावेश केला गेला; व म्हणूनच एका

उपनिषदांत आढळणारे कांहीं श्लोक किंवा उतारे किंवा कधीं कधीं तर सबंध प्रकरणेंचीं प्रकरणें दुसऱ्या उपनिषदांत जशींचीं तशींच उतरलेलीं आढळून येतात.

**उपनिषदांतील सर्वेश्वरी वाद.**—जगांत सर्वत्र परमेश्वर भरला आहे ही कल्पना म्हणजे जें आहे तें देव आहे हें तत्व उपनिषदांत अतिशय प्रामुख्यानें आलें आहे यांत शंका नाहीं.

ईश्वर जगांत आहे ऐवढेंच नव्हे, तर जगाच्या बाहेरहि तो आहे असेंहि उपनिषदांत सांगितलें आहे. प्राणिमात्रांठायीं परमेश्वर अधिष्ठित झाला आहे या कल्पनेशीं तो सर्वांत श्रेष्ठ आहे या कल्पनेची सांगड घातली गेली आहे. या दोन तत्वांशिवाय, ईश्वर प्राणिमात्राचा पालनकर्ता आहे; तो सर्वांचा शास्ता असून सर्वांच्या अंतर्यामीं तो वास करतो; तो सर्वत्र आहे हें जाणणें व तो जसा आहे त्या स्वरूपांत त्याला ओळखणें म्हणजेच मोक्ष होय; ध्यान व आत्म्याची शुद्धि यांच्या योगानें मोक्ष मिळवितां येतो व मोक्षप्राप्ति झाली म्हणजे जीवात्मा परमात्म्याशीं पूर्ण साम्य पावतो ("परमं साम्यमुपैति"); वगैरे कल्पनाहि उपनिषदांत सांगितल्या आहेत. नदीचें पाणी ज्याप्रमाणें सागरांत मिसळून जातें त्याप्रमाणें जीवात्मा परमात्म्यांत विलीन होतो व फक्त स्वतःशिवाय इतर गोष्टींची जाणीव नाहींशी होऊन तो वेदनारहित होतो असें त्यांत सांगितलें आहे. या बाबतीपुरता उपनिषदांत सर्वेश्वरीवाद आहे. म्हणजे जें जें दिसतें तीं सर्व माया आहे असें तेथें प्रतिपादन केलें आहे, असें म्हणतां येईल. उपनिषत्कालीं विचारशक्तीस पूर्ण वाव होता; आत्म्यास पदार्थ या नात्यानें मुळींच अस्तित्व नाहीं इतकें मानण्यापर्यंत त्या काळीं निर्भीड विचाराची मजल गेली होती.

**अवताराच्या कल्पनेचा उगम.**—ईश्वर एकच आहे किंवा देव तेवढे येथून तेथून एकच या विचाराचा पगडाहि पुढील काळांतील लोकांच्यावर बसला होता. परमात्मा निरनिराळ्या स्वरूपांत व्यक्त होतो व सर्व देव—उदाहरणार्थ अग्नि, वरुण, मित्र इन्द्र, अर्यमन्—हे एकच आहेत;" या दोन कल्पनांची वाढ परस्परविरुद्ध दिशांनीं झाली. निरनिराळे सर्व देव जर एक आहेत तर एका देवास निरनिराळीं रूपें घेतां येणें शक्य आहे. या कल्पनेपासूनच पुढील काळांत प्रामुख्यानें दिसून येणाऱ्या अवताराच्या कल्पनेचा उगम आहे. उपनिषत्कालच्या मोठमोठ्या तत्वज्ञांचे विचार पुढील काळांतील सामान्य व्यवहारी माणसास आकलन करतां येण्याजोगे नसल्यामुळें व सामान्य जनसमूहास स्पष्ट आकृतीची विशेष आवश्यकता भासल्यामुळें मूर्तिपूजा प्रचारांत आली. येणेंप्रमाणें वैदिक काळचे प्राचीन देव व इतरहि नवीन देव यांची उपासना सुरू झाली.

**भागवत धर्माचा उदय.**—ही जी विचाराची लाट उठली तिचें पर्यवसान पूर्वेकडील भागांत बौद्ध व जैन या संप्रदायांत झालें. सृष्टीचा उत्पत्तिकर्ता या नात्यानें परमेश्वराचें अस्तित्व या दोन्ही पंथांस संमत नव्हतें; व मतप्रसाराकरितां वरील कल्पनेचें साहाय्य घेतलेलें दोहोंतहि आढळून येत नाहीं. बौद्ध पंथ तर आत्म्यास स्वतंत्र असें कांहीं अस्तित्व आहे असेंहि मानीत नसे. तथापि संप्रदायप्रसारास आवश्यक असे गुण या दोन्ही पंथांच्या संस्थापकांच्या ठायीं होते. उलटपक्षीं पश्चिमेकडे या काळांत एक नवीन पंथ उदयास आला. ईश्वर मानवांत येऊन राहतो ही कल्पना या पंथाच्या मुळाशीं होती. क्रि. पू. ४ थ्या शतकांत जे जे धर्म किंवा धर्मसमजुती प्रचारांत होत्या त्या सर्व "निद्देस" या पाली पुस्तकांत दिल्या आहेत. उदाहरणार्थ, "आजीवक लोकांची मुख्य देवता आजीवक; निगंठ लोकांची निगंठ; हत्ती, घोडा, गाय, कुत्रा, वासुदेव, बलदेव वगैरेंच्या उपासकांच्या मुख्य देवता अनुक्रमें हत्ती, घोडा, गाय, कुत्रा, वासुदेव वगैरे वगैरे."

सदर ग्रंथाच्या कर्त्यानें वासुदेव, बलदेव, अग्नि, चंद्र, सूर्य, ब्रह्मा, हत्ती, घोडा या सर्वांच्या उपासकांना एका माळेंतच गोंविलेलें आहे.

बौद्ध ग्रंथानें वासुदेवोपासना इतकी तुच्छ लेखली तरी सूर्य, चंद्र, ब्रह्मा, हत्ती, घोडा वगैरेंची उपासना करणारे जे पंथ होते त्या सर्वांना खालीं दडपून वासुदेवाची उपासना ज्यांत सांगितली आहे अशा पंथानें हिंदुस्थानच्या बऱ्याच मोठ्या प्रदेशांत प्रामुख्य मिळविलें. हा पंथ उदयास कसा आला व त्याचा प्रसार कसा झाला हें पाहूं.

**भागवत धर्माचे अष्टाध्यायींतील व शिलालेखांतील उल्लेख.**—पाणिनीच्या अष्टाध्यायींतलि ४. ३, ९८ व्या या सूत्रांत "वासुदेव" हें नांव आलें आहे; त्याचा पतंजलीच्या भाष्यांत "पूज्य" व्यक्तीचें नांव असा अर्थ दिला आहे.

"पूज्य" म्हणजे सर्वांत अतिशय पूज्य म्हणजे देव. तेव्हां वासुदेवाची उपासना किंवा भक्ति बौद्धांचा मुळींच उल्लेख न करणाऱ्या पाणिनीच्या काळाइतकी तरी जुनी आहे असें म्हटलें पाहिजे.

राजपुतान्यांत "घोसुंडि" येथें मोडक्या तोडक्या स्थितींत असलेला एक शिलालेख सांपडला आहे "संकर्षण" व "वासुदेव" यांच्या मंदिराभोंवतालच्या भिंतीचा उल्लेख त्यांत आला आहे. हा शिलालेख निदान क्रि. पू. २०० वर्षांचा असावा.

बेसनगर येथें एक शिलालेख सांपडला आहे. त्यांत देवाधिदेव जो वासुदेव त्याच्या सन्मानार्थ हेलिओडोरानें गरुडध्वज उभारला असें म्हटलें आहे [विविधज्ञानविस्तार वर्ष ४१, देवदत्त भांडारकर यांचे लेख पहा]. हेलिओडोर स्वतःस भागवत म्हणवून घेत असे. या शिलालेखांत "अंतलिकित" हें गांवाचें नांव आलें आहे. बॅक्ट्रो-ग्रीक नाण्यांवर ज्याचा उल्लेख आहे असें "अतिआल्किडस" व वरील नाव बहुधा

एकच असावें. हा शिलालेखहि खिस्तपूर्व दुसऱ्या शतकाच्या पूर्वार्धातील असावा. या काळीं वासुदेव हा देवाधिदेव समजला जात असे व त्याचे उपासक भागवत या नांवानें संबोधले जात.' या काळीं भागवत धर्म हिंदुस्थानच्या वायव्य भागांत' पसरलेला होता व ग्रीकांनींहि तो उचलला होता.

नानाघाट येथील शिलालेख नं. १ मध्यें संकर्षण व वासुदेव यांच्या नांवांचा द्वंद्व समास आढळतो. हा शिलालेख खि. पू. पहिल्या शतकांतील असावा.

**पूज्य देव, वासुदेव व वृष्णि कुलांतील वासुदेव एकच.**—पतंजलीच्या महाभाष्यांत वासुदेवाचा उल्लेख आल्याबद्दल वर सांगितलेंच आहे. त्यांत तो म्हणतो, वासुदेव हें क्षत्रियाचें नांव समजावयाचें नसून पूज्य देवाचें समजावयाचें. वृष्णि कुलांतील वासुदेवाचा व या वासुदेवाचा मुळींच संबंध नाहीं असा पतंजलीच्या म्हणण्याचा आशय आहे किंवा काय हें पाहिलें पाहिजे " निद्देस " या पाली पुस्तकांत वासुदेवाचा बलदेवाच्या बरोबरच उल्लेख केला आहे. त्यावरून व वरील तीन शिलालेखांपैकीं दोहोंमध्यें संकर्षण व वासुदेव यांचा बरोबरच निर्देश केला आहे त्यावरून " पूज्य देव " असें ज्यास पतंजलि म्हणतो तो वासुदेव वृष्णि कुलांतीलच असला पाहिजे. वासुदेव हा क्षत्रिय असून अवतारी पुरुष होता असा पतंजलीच्या म्हणण्याचा अर्थ घ्यावयास हरकत नाहीं. भागवत धर्माच्या सर्व वाङ्मयावरून अवतारी पुरुष व पूज्य देव' म्हणून समजला जाणारा वासुदेव वृष्णि कुलांतीलच असावा हेंच उघड होतें.

**महाभारतांतील नारायणीय आख्यान.**—वासुदेव ही मध्यवर्ती देवता कल्पून त्याची उपासना ज्यांत सांगितली आहे असा एक पंथ खि. पू. तिसऱ्या चवथ्या शतकापूर्वी अस्तित्वांत होता; व या पंथाच्या अनुयायांस " भागवत " म्हणत, असें पुराव्यानिशीं निर्विवाद सिद्ध झाल्यावर आतां या विषयाच्या वाङ्मयाचें, विशेषतः महाभारतांतील यासंबंधीं माहितीचें परीक्षण करूं. महाभारताचा किंवा त्याच्या कोणत्याहि भागाचा काळ निश्चितपणें ठरवितां येत नसल्यामुळें त्यांतील पुराव्यास अर्थात् प्राधान्य नाहीं. श्रीमच्छंकराचार्यांनीं शांतिपर्वांतील नारायणीय आख्यानांतून अवतरणादाखल श्लोक घेतले आहेत. त्यावरून सदर आख्यान श्री. शंकराचार्यांच्या आधींचें आहे हें खास. सदरहू नारायणीय आख्यान पुढें दिल्याप्रमाणें आहेः—

नर व नारायण यांचें दर्शन घेण्यास नारद बदरिकाश्रमीं गेले होते. तेथें नारायण उपासना करण्यांत गुंतलेले पाहून त्यांस नारदांनीं प्रश्न केला कीं, " हे नारायणा, आपण स्वतः देवाधिदेव आहांत; मग आपण कोणाची पूजा करतां ?" तेव्हां नारायणांनीं उत्तर केलें, " वर्तमान व भविष्य गोष्टींचें उगमस्थान अशी जी मोठी मूल प्रकृति तिचें मी पूजन करीत आहे. नर व नारायण, त्याचप्रमाणें कृष्ण व हरि हे जे धर्माचे पुत्र ते सर्व एकाच परमेश्वराचीं चार (निरनिराळीं) स्वरूपें होत."

तेव्हां त्या मूल प्रकृतीचें दर्शन घेण्याकरितां नारदांनीं आकाशांत उड्डाण केलें व मेरुपर्वताच्या एका शिखरावर ( गन्धमादनपर्वतावर ) ते उतरले; तेथें त्यांनीं निरिंद्रिय, निराहारी, शुद्ध, आतपत्राप्रमाणें मस्तकें असलेले, मेघांच्या सारखा स्वन ( आवाज ) असलेले व भगवानाची उपासना करणारे असे श्वेतवर्णी लोक पाहिले.

युधिष्ठिरानें भीष्मास हे लोक कोण व ते असे कशानें झाले असा प्रश्न केल्यावरून भीष्मांनीं उपरिचर वसु राजाची पुढील गोष्ट सांगितली.

**उपरिचर वसु राजाची गोष्ट.**—हा राजा सात्वत विधीप्रमाणें भगवन्ताची पूजा करीत असे. तो सत्यवचनी, पवित्राचरणी, कीर्तिवान् असून इन्द्रानेंहि त्याचा सन्मान केला होता; पांचरात्र धर्मातील अत्यंत विद्वान् माणसांस भोजनसमयीं वरचें पान देऊन तो त्यांचा सन्मान करीत असे. येथें कथेच्या अनुषंगानें या धर्माचे आद्य प्रचारक जे " चित्रशिखंडी " लोक त्यांचा उल्लेख आला आहे. या चित्रशिखंडी लोकांनीं प्रथमतः मेरु पर्वतावर आपला धर्म प्रगट केला. ते एकंदर सातजण होतेः मरीचि, अत्रि, आङ्गिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वसिष्ठ. यांशिवाय आठवा स्वायंभुव हा होता. या आठांपासून या उत्तम व श्रेष्ठ शास्त्राची उत्पत्ति आहे. श्रेष्ठ असा जो भगवान् त्याच्या समक्ष या शास्त्राचें(धर्माचें) प्रणयन त्यांनीं केलें. भगवान् ऋषींस म्हणाले:—"ऋक्, यजुः, साम, अथर्व या चारी वेदांना धरून, लोकांच्या सर्व व्यवहारांसंबंधीं नियम ज्यांत सांगितले आहेत असे एक लक्ष उत्तम श्लोक मीं रचिले असून आचार, विचार, विश्रांति यासंबंधाचे नियमहि त्यांत मीं ग्रथित केले आहेत. मीं आपल्या सौम्य प्रकृतीपासून ब्रह्मा व उग्र ( रौद्र ) प्रकृतीपासून रुद्र असे दोघेजण निर्माण केले. एकाकडून दुसऱ्यास याप्रमाणें वंशपरंपरा हें शास्त्र बृहस्पतीपर्यंत चालेल. बृहस्पतीपासून राजा वसूस तें प्राप्त होईल. हा राजा या शास्त्राप्रमाणें वागून माझा भक्त बनेल. त्याच्या निधनानंतर हें शास्त्र नाहींसें होईल." याप्रमाणें सांगून भगवान् अंतर्धान पावले. नंतर चित्रशिखंडींनीं या शास्त्राचा प्रसार केला. शेवटीं तें बृहस्पतीस प्राप्त झालें. पुढें पहिलें कल्प संपून नवीन कल्पास आरंभ झाला. अंगिरसाच्या मुलाचा ( देवगुरूचा ) जन्म झाल्यामुळें सर्व देवांस आनंद झाला. राजा उपरिचर वसु हा त्याचा पहिला शिष्य होय. बृहस्पतीजवळून तो हें शास्त्र प्रथम शिकला. एके काळीं त्यानें मोठा अश्वमेध यज्ञ केला; पण त्या समयीं कोणत्याहि प्राण्याचा त्यानें वध न करवितां आरण्यकांच्या नियमाप्रमाणें अहुती दिल्या. तेव्हां देवाधिदेवानें फक्त एकट्या वसूसच दर्शन देऊन हवनाचा स्वीकार केला. बृहस्पतीस दर्शन दिल्याखेरीज हरीनें हवनाचा स्वीकार केला त्यामुळें बृहस्पतीस राग आला, व त्यानें यज्ञाची दर्वी हवेंत वर फेंकली.

या यज्ञसमयीं प्रजापतीचे मुलगे एकत, द्वित, त्रित व मेधातिथि, तितिरि, ताण्ड्य वगैरे १६ ऋषी हजर होते. बृहस्पतीस राग आला त्या वेळीं, " श्रीहरि उगीच वाटेल त्याला दर्शन देणार नाहीं, ज्यावर त्याचा कृपाप्रसाद झाला असेल त्यालाच फक्त तो दर्शन देईल ". असें ते सर्वजण म्हणाले. एकत, द्वित, त्रित म्हणाले:—

" शाश्वत सुख किंवा मोक्ष साधण्यासाठीं उत्तरेकडे क्षीरसागरीं आम्ही गेलों व त्या ठिकाणीं चार हजार वर्षे तपश्चर्या केली. तेव्हां शेवटीं आकाशवाणी झाली: ' परमेश्वर तुम्हांस कसा दिसेल? क्षीरसागरीं श्वेतद्वीप आहे तेथें चन्द्राप्रमाणें कांति असलेले, निरिंद्रिय, निराहारी, असे माझे भक्त आहेत. ते एकान्ती असून सर्वदा सूर्याप्रमाणें तेजःपुंज अशा ईश्वराचें ध्यान करण्यांत मग्न झालेले आहेत. त्या द्वीपाप्रत तुम्ही जा, तेथें माझा आत्मा प्रकाशत आहे.'

" याप्रमाणें आकाशवाणी झाल्यावरून आम्हीं त्या श्वेतद्वीपास गेलों. पण त्या दिव्य तेजानें दिपून गेल्यामुळें आम्हांस भगवन्ताचें दर्शन झालें नाहीं. तेव्हां स्वतः तपश्चर्या केल्याशिवाय ईश्वराचें दर्शन होणार नाहीं असा आम्हांस अंतःप्रकाश झाला. आणखी शंभर वर्षे तपश्चर्या केल्यानंतर ईश्वराच्या ध्यानांत निमग्न झालेले असे चन्द्रकांती लोक आम्हांस दिसले. त्यांपैकीं प्रत्येकाचें प्रलयकालच्या सूर्याप्रमाणें तेज होतें. नंतर ' जितं ते पुंडरीकाक्ष ' इत्यादि शब्द आम्हांस ऐकूं आले; व नंतर थोड्या वेळानें आकाशवाणी झाली, ' जे त्याचे भक्त नाहींत त्यांस परमेश्वर दिसणार नाहीं. ' तेव्हां त्याचें दर्शन न होतांच आम्ही परतलों. तेव्हां तुम्हास ( बृहस्पतीस ) त्याचें दर्शन कसें होणार ? "

याप्रमाणें एकत, द्वित, त्रित यांचें म्हणणें बृहस्पतीनें ऐकल्यावर यज्ञ पुरा केला.

ऋषींच्या शापामुळें उपरिचर वसूला भुयारांत रहावें लागत असे. याचें कारण असें: एकदां ऋषींचें व देवांचें भांडण लागलें. यज्ञाच्या वेळीं पशुवध न करतां फक्त धान्य अर्पण करावें असें ऋषी म्हणाले; पण देव म्हणाले कीं, मेषवध केला पाहिजे. तेव्हां भांडण मिटविण्याकरितां दोघे उपरिचर वसूकडे गेले. त्यानें देवांतर्फे निकाल दिला. त्यामुळें त्यास ऋषींनीं शाप दिला. पण पुढें उपरिचर वसूच्या भक्तीनें संतुष्ट होऊन नारायणानें आपल्या गरुडाकडून त्यास भुयारांतून काढवून ब्रह्मलोकीं नेलें.

नारदमुनि श्वेतद्वीपास गेले, त्यांच्या सफरीची हकीकत यानंतर पुढें सांगितली आहे. नारदांनीं गौरवपर व शुद्ध सात्विक शब्दांनीं भगवन्ताची स्तुति केली. त्यामुळें संतुष्ट होऊन व नारद हे एकान्तिन् असल्यामुळें भगवन्तांनीं नारदांस दर्शन दिलें; व वासुदेव धर्म त्यांस थोडक्यांत समजावून सांगितला. तो येणें प्रमाणें:—

**वासुदेवधर्म.**—वासुदेव हा परमात्मा असून तो सर्वांच्या अंतर्यामीं वास करतो. तो मुख्य सृष्टिकर्ता आहे. यच्चयावत् प्राणिमात्र म्हणजेच संकर्षण असून संकर्षण हें वासुदेवाचेंच स्वरूप आहे. संकर्षणापासून प्रद्युम्न ( मन ) झाला व प्रद्युम्नापासून अनिरुद्ध ( आत्मज्ञान ) याचा संभव झाला. जे मला भजतात ते मत्स्वरूपांत विलीन होतात; व त्यांस मोक्ष मिळतो.

वर सांगितलेलीं चार रूपें ह्या परमेश्वराच्या मूर्ती होत. एका मूर्तीपासून दुसरी मूर्ति उत्पन्न होते असें सांगितलें आहे. तथापि हीं सर्व रूपें त्याच्याच मूर्ती होत असेंहि म्हटलें आहे. सर्व देव व सर्व वस्तू त्यानेंच उत्पन्न केल्या व त्या सर्व अंतीं त्याच्या ठायीं लय पावणार. नंतर त्याचे अवतार सांगितले आहेत. वराह, नरसिंह, वामन, परशुराम, राम, " कंसवधार्थ जो मथुरेस जन्मास येईल व दानवांचा निःपात करून शेवटीं द्वारकेस वास करील तो " म्हणजे कृष्ण, हे ते अवतार होत. येणेंप्रमाणें आपल्या चार मूर्तींकडून सर्वांचा निःपात करवून त्यानें सात्वतांसह द्वारका नगरी समुद्रांत बुडविली व ब्रह्मलोकीं प्रयाण केलें.

याप्रमाणें त्या परमश्रेष्ठ नारायणाकडून ही हकीकत ऐकल्यावर नारद बदरिकाश्रमीं परत आले.

पुढील चार अध्यायांत जें वर्णन आलेलें आहे त्याचा प्रस्तुत विषयाशीं मुळींच संबंध नाहीं; फक्त एके ठिकाणीं मात्र वासुदेवाचा खालीलप्रमाणें व्युत्पत्त्यर्थ दिला आहे. सर्व जगास व्यापणारा व सर्व भूतमात्रांचें आश्रयस्थान ( अधिवास ) असा जो, तो वासुदेव [ म. भा. अध्याय ३३९ व पुढील चार अध्याय पहा ].

३४४ व्या अध्यायांत निष्पापी लोकांचा मार्ग येणेंप्रमाणें सांगितला आहे:—सूर्य हें द्वार असून तें ओलांडून आंत प्रवेश करतांच सर्व अशुद्धता जळून खाक होते, व अणु बनून ते सूर्यांत राहतात. तेथून सुटका झाल्यावर ते अनिरुद्ध स्वरूपांत शिरतात; पुढें मनःस्वरूप होऊन ते प्रद्युम्न स्वरूपांत जातात; तें सोडून नंतर ते संकर्षण-स्वरूपांत म्हणजे जीवात्म्यांत प्रवेश करतात; आणि शेवटीं त्रिगुणरहित होऊन ते सर्वत्र वास करणारा वासुदेव जो, परमात्मा त्याच्या ठिकाणीं विलीन होतात.

याप्रमाणें परमेश्वर जो नारायण त्यानें हा धर्म नारदास सांगितला; व वैशम्पायनानें तो थोडक्यांत हरिगीतेच्या द्वारें जनमेजयास कथन केला. युद्धारंभीं अर्जुनास सांगितलेला धर्म व एकान्तिक धर्म एकच असें अध्याय ३४८ मध्यें सांगितलें आहे. प्रत्येक ब्रह्मयाच्या उत्पत्तीच्या वेळीं हा धर्म नारायण प्रथमतः प्रगट करतो व त्या ब्रह्मयाच्या लयकालीं हा धर्महि लय पावतो. सहाव्या ब्रह्मयाच्या हकीकतींत दोन ठिकाणीं या धर्मास ' सात्वत धर्म ' म्हटलें आहे. सातव्या ब्रह्मयाच्या वेळीं ह्या धर्माचा उपदेश प्रथम पितामहास केला गेला, व पितामहानंतर दक्ष, पितामहाचा नातू, आदित्य, विवस्वत् व मनु या क्रमानें तो शेवटीं इक्ष्वाकूपर्यंत चालत आला. पुढें असें म्हटलें आहे कीं, दुर्दैव

व कुक्कर असा हा सनातन व महान् आद्य धर्म फक्त सात्वतच पाळतात.

या धर्मांत अहिंसा तत्त्व सांगितलें आहे. तें योग्य रीतीनें पाळल्यास प्रभु हरि संतुष्ट होतो. कधीं कधीं ईश्वराचा एकच व्यूह (किंवा स्वरूप) समजावून सांगितला आहे; तर कधीं कधीं दोन, तीन, चारहि सांगितले आहेत. येणेंप्रमाणें एकान्तिकधर्म वैशम्पायनानें थोडक्यांत कथन केला आहे.

येथें रा. रा. भागवत यांच्या मताचा उल्लेख करणें अवश्य आहे. त्यांचें मत असें होतें कीं, गोप हे गाईचें पालन करणारे होत; व ब्राह्मण हे गोघातकी म्हणजे यज्ञसंस्थेचे अभिमानी होत. कृष्णाचें राजकीय आणि बौद्धिक महत्त्व स्थापन झाल्यामुळें अहिंसाधर्माचा व गोरक्षणाचा विजय झाला. आणि त्या परंपरेचा प्रचार करणें हा भागवत ग्रंथाचा हेतु होय (विविध ज्ञानविस्तार).

**उपरिचर वसूच्या गोष्टीवरून निष्कर्ष.**—याप्रमाणें आपणांपुढें या धर्माविषयीं दोन (दुसरींत पहिलीचीहि थोडीशी हकीकत आली आहे) हकीकती असून दुसरीची पहिलीशीं सांगड घातली आहे; पैकीं पहिली अधिक जुनी असावी. या संबंधांत खालील गोष्टी ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेतः– (१) उपरिचर वसूच्या यज्ञप्रसंगीं प्राणिहत्या करण्यांत आली नाहीं; (२) आरण्यकांतील (यांतच उपनिषदें येतात) नियमांप्रमाणें हवन करण्यांत आलें; (३) मुख्य देव देवाधिदेव हरि हा होता; (४) या देवाधिदेवाचें दर्शन याज्ञिकी उपासना करणारास होत नाहीं (उ० बृहस्पति); किंवा एकत, द्वित, त्रित यांच्याप्रमाणें हजारों वर्षे तपश्चर्या करूनहि होत नाहीं; तर उपरिचर वसु याच्या प्रमाणें जो त्यास भक्तीनें भजतो त्यासच होतें. म्हणजे या सर्वांवरून असें दिसतें कीं, ही जी धर्मांत सुधारणा झाली ती बौद्ध किंवा जैन पंथापेक्षां पूर्वपरंपरेस जास्त धरून आहे. प्राणिहत्येबद्दल निषेध आणि यज्ञयागादि कर्मे ज्यांत सांगितलीं आहेत अशी उपासना व तपाचरण या दोहोंची परमेश्वरसाधकाच्या बाबतींत निष्फलता, वगैरे गोष्टी या धर्मांत व बुद्ध संप्रदायांतहि आहेत. पण प्रभु हरीची भक्तीनें उपासना करणें, व आरण्यकांस प्रमाण मानणें या दोन गोष्टी हा या धर्माचा विशेष होय. उपरिचर वसूच्या गोष्टीवरून आपणांस एवढाच निष्कर्ष काढतां येतो.

नारदांनीं श्वेतद्वीपास केलेल्या सफरीच्या हकीकतींतहि परमात्म्याची जो भक्तीनें पूजा करील त्यासच फक्त तो दिसेल ही गोष्ट पुन्हां बजावून सांगितली आहे. अशा माणसालाच देवाधिदेव नारायण दर्शन देतो व वासुदेव व इतर तीन व्यूह यांचा धर्म समजावून सांगतो. वासुदेवाच्या नाना अवतारांचा उल्लेख या हकीकतींत आला आहे. यांपैकीं एक अवतार कंसवधार्थ मथुरा येथें व्हाव-याचा आहे असें सांगितलें आहे. परमश्रेष्ठ नारायण आणि वासुदेव व इतर चार व्यूह हे सर्व एकच असून सात्वत लोक हा धर्म पाळतात असें शेवटीं म्हटलें आहे.

**विचारविकासाच्या दोन पायऱ्या.**—सदरहू दोन हकीकती या विचारविकासाच्या बाबतींतील दोन पायऱ्या म्हणतां येतील. जींत वासुदेव व त्याचे इतर तीन व्यूह यांची पूजा सांगितली नाहीं, ती मूळ पायरी होय. परमश्रेष्ठ देवास हरि म्हणत व त्याच्या उपासनेंत यज्ञयागादि कर्मविषयक धर्माचा थोडाबहुत अवशेष कायम होता. ऐतिहासिक विभूतीशीं या मूळ सुधारणेचा कांहीं एक संबंध नव्हता. चित्रशिखंडी नांवानें संबोधल्या जाणाऱ्या ऋषींकडून या धर्माचा प्रसार केला गेला. दुसरी पायरी जीस म्हणतां येईल तीमध्यें वासुदेव, त्याचा भाऊ बलराम, मुलगा प्रद्युम्न व नातू अनिरुद्ध या सर्वांचा संबंध जोडला आहे; भगवद्गीतेंत सांगितलेला धर्म व हा धर्म एकच असें म्हटलें आहे; व या धर्माचा प्रसार स्वतः नारायणांनींच केला असें प्रतिपादिलें आहे.

यावरून असें दिसून येईल कीं, भक्तिप्रधान धर्माची कल्पना मुळारंभीं निघाली; व तीस, अर्जुनास वासुदेवानें गीता सांगितली तेव्हांपासून मूर्त व निश्चित स्वरूप प्राप्त झालें. पुढील काळांत वासुदेवाचा भाऊ बळराम, मुलगा प्रद्युम्न, नातू अनिरुद्ध हा मानसिक व्यापारांच्या अधिष्ठात्री देवता असून हीं सर्व वासुदेवानें निर्माण केलेलीं त्याचीं स्वतःचीच रूपें होत या कल्पनेची त्यांत भर पडून या सर्वांची एकत्र सांगड घातली गेली. या सर्व कल्पनांचा ज्यांत समावेश केला आहे, असा एक स्वतंत्र धर्मपंथ अस्तित्वांत आला. व सात्वत लोकांचा पंथ व हा पंथ हे दोन्ही एकच समजण्यांत येऊं लागले. तेव्हां आतां हे सात्वत कोण तें पाहूं.

**सात्वत लोक व त्यांचा धर्म.**—आदिपर्वांत वृष्णींनां उद्देशून वासुदेव म्हणतो कीं जे सात्वत आहेत ते लोभी आहेत असें पार्थ कधींहि समजत नाहीं. वासुदेव (महाभारत आदिपर्व २१८. १२), कृतवर्मा (आदि. २११. ३१), सात्यकि (द्रोण. ९७. ३६), जनार्दन (उद्योग. ७०. ७) या सर्वांस सात्वत म्हटलें आहे. भीष्मपर्वांतील ६६ व्या अध्यायाच्या शेवटीं शेवटीं भीष्म म्हणतातः—"अशा प्रकारचा 'सनातन, अज्ञेय,' दयाळु व कृपाळु असा जो देव त्यास वासुदेव म्हणतात. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे सर्व त्याची भक्तीनें उपासना करतात. द्वापारयुगाच्या शेवटीं व कलियुगाच्या आरंभीं संकर्षणानें सात्वत विधीप्रमाणें त्याची स्तुति केली." विष्णुपुराणाच्या तिसऱ्या खण्डाच्या १२ व्या अध्यायांत यादव व वृष्णि या कुळांची वंशावळ दिली आहे. तींत अंशाचा मुलगा सत्वत व त्याचे वंशज ते सात्वत असें सांगितलें आहे. परब्रह्मास भगवत् व वासुदेव म्हण-

णारे व त्याची विशिष्ट रीतीनें पूजा करणारे. ते सात्वत असें भागवतांत म्हटलें आहे. तेथें अंधक व वृष्णि या यादव कुलांबरोबरच सात्वत कुलाचा उल्लेख केला आहे, व वासुदेवास सात्वतर्षभ म्हटलें आहे (१. १४, २५; ३. १, २९; १०. ५८, ४२; व ११. २७, ५). पाणिनीच्या अष्टाध्यायींतील ४. १, ११४ यावरील पतञ्जलीच्या महाभाष्यांत वासुदेवाचे व बलदेवाचे पुत्र या अर्थी वृष्णि नांवावरून आलेले वासुदेव व बळदेव हे दोन शब्द दिले आहेत. यावरील काशिकाटीकेंतहि वासुदेव व आनिरुद्ध अशीं दोन उदाहरणें दिलीं आहेत. तेथें आनिरुद्ध म्हणजे अनिरुद्धाचा मुलगा असा अर्थ आहे. तेव्हां वासुदेव हा वसुदेवाचा मुलगा असा अर्थ न घेतां वासुदेवाचा मुलगा असाच अर्थ घेतला पाहिजे. त्याच टीकेंत दुसऱ्या एका ठिकाणीं "सिनि-वासुदेवाः" व "संकर्षणवासुदेवौ" अशीं दोन उदाहरणें दिलीं आहेत [अष्टाध्यायी ६.२, ३४ वरील काशिका टीका]. पहिल्यांत वासुदेव हा शब्द समुदायवाचक म्हणजे वासुदेवाचेच पुत्र या अर्थानें व दुसऱ्यांत वासुदेव कृष्ण या अर्थानें योजला आहे.

या सर्व विवेचनावरून असें दिसून येईल कीं, सात्वत हें वृष्णिकुलाचें दुसरें नांव असून वासुदेव, संकर्षण, अनिरुद्ध हे त्या कुलांतील पुरुष होत; व वासुदेवारूच परब्रह्म समजून त्याची उपासना ज्यांत सांगितली आहे, असा सात्वतांचा स्वतंत्र उपासनामार्ग होता. येणेंप्रमाणें वरील विवेचन नारायणीय आख्यानास पुष्टिदायकच आहे.

**उपनिषत्कालीन नवीन विचाराच्या लाटेंत वासुदेवसंप्रदायाचा उगम.**—सारांश, हा वासुदेवधर्म पाणिनीच्या काळापर्यंत जाऊन भिडतो. उपनिषत्काळीं क्षत्रियहि धार्मिक विषयावर विचार करीत, व कांहीं कांहीं बाबतींत प्रथमतः त्यांसच नवीन ज्ञान प्राप्त झालें होतें. अशी विचारांची खळबळ चालली असतांना, सिद्धार्थ व महावीर या दोघांनीं पूर्वेकडील प्रांतांत म्हणजे मगध देशांत नवीन संप्रदायांची स्थापना केली. ईश्वराचें अस्तित्व त्यांस संमत नव्हतें म्हणा किंवा या बाबतींत ते मुग्ध होते म्हणा, ईश्वर आहे असें त्यांनीं कधींहि म्हटलें नाहीं. मोक्षसाधनास इंद्रियनिग्रह व शुद्ध आचार आवश्यक आहे असें मात्र त्यांनीं प्रतिपादन केलें होतें. हे दोघे संप्रदायसंस्थापक क्षत्रिय वंशापैकीं शाक्य व ज्ञातृक वंशांतील होते; म्हणून बौद्ध व जैन पंथ हे त्या त्या वंशाचे धर्म असें म्हणतां येईल. पश्चिमेकडील प्रांतीं मात्र मूळावरच घाव न बसतां पूर्वपरंपरेस धरून असलेला असा एक धर्म सात्वत लोकांनीं स्थापला; परमश्रेष्ठ देवाचें अस्तित्व, व त्याची भक्ति केली तर मोक्ष मिळतो ही कल्पना, या दोन तत्त्वांचा त्यांनीं पुरस्कार केला. चंद्रगुप्ताच्या दरबारीं असलेला मॅसिडोनियाचा वकील मेगॅस्थिनीझ यानें या सात्वतांचा व वासुदेव-कृष्णाच्या उपासनेचा निर्देश केला आहे. ख्रि. पू. चवथ्या शतकाच्या शेवटच्या पादांत चंद्रगुप्त राज्य करीत होता. मिगॅस्थिनीझनें शूरसेन क्षत्रियकुळ, मथुरा, यमुना, वासुदेव-कृष्ण या सर्वांचा उल्लेख केला आहे. तेव्हां मौर्यांच्या वेळीं वासुदेव-कृष्णाची उपासना किंवा भक्ति जर पूर्ण भरांत होती तर तिचा उदय मौर्य वंशाच्या बराच आधीं झाला असला पाहिजे. यावरून उपनिषत्काळीं जी विचाराची लाट उसळली तिच्यांतच या भक्तिमार्गाचा उगम असला पाहिजे, व त्या लाटेचें पर्यवसान बौद्ध व जैन पंथांस अस्तित्वांत आणण्यांत होऊन त्या पंथांबरोबरच हा वासुदेवधर्महि उदयास आला असावा, या विधानांस बळकटी येते. या धर्मांतील मुख्य देवतेस प्रथम वासुदेव हें एकटेंच नांव होतें. "निद्देस" या पाली पुस्तकांत व वरील तीन शिलालेखांत हेंच नांव आढळतें.

**भक्तिधर्माच्या उपदेशकाचें नांव वासुदेव कीं कृष्ण.**—भगवद्गीतेंत "...ज्ञानवान् मां प्रपद्यते । वासुदेवः सर्वमिति...." असें म्हटलें आहे. "ॐ नमो भगवते वासुदेवाय" या द्वादशाक्षरी मंत्रांतहि वासुदेवाचाच निर्देश केला आहे. भीष्मपर्व अ. ६५ मध्यें ब्रह्मदेवानें पुरुष परमेश्वराची स्तुति करून यदुकुलाचा विस्तार करण्याविषयीं प्रार्थना केली आहे व नंतर म्हटलें आहेः—

> यत्तत् परमकं गुह्यं त्वत्प्रसादादिदं प्र (वि) भो ।
> वासुदेव तदेतत्ते मयोद्गीतं यथातथम् ॥ ६९ ॥
> दृ (सृ) ष्ट्वा संकर्षणं देवं स्वयमात्मानमात्मना ।
> कृष्ण त्वमात्मनः साक्षी (त्वमात्मनात्साक्षीः) प्रद्युम्नं . . त्वा (चा) त्मसम्भवम् ॥ ७० ॥
> प्रद्युम्नश्चानिरुद्धं (प्रद्युम्नादनिरुद्धं त्वं) यं विदुर्विष्णुमव्ययम् ।
> अनिरुद्धोऽसृजन् मां वै ब्रह्माणं लोकधारिणं ॥ ७१ ॥
> वासुदेवमयः सोऽहं त्वयैवास्मि विनिर्मितः ।
> विसृज्य (विभज्य) भागशोऽत्मानं व्रज मानुषतां विभो ॥७२॥

याच पर्वाच्या ६६ व्या अध्यायांतहि प्रजापति म्हणतोः—

> जगतोऽनुग्रहार्थाय याचितो मे जगत्पतिः ॥ ७ ॥
> मानुषं लोकमातिष्ठ वासुदेव इति श्रुतः ।

या अध्यायांत सनातन अशा पुरुष परमेश्वराला सर्वत्र वासुदेव असेंच संबोधिलें आहे. या दोन अध्यायांत, पूर्वीच्या काळीं पुरुष परमेश्वर जो वासुदेव त्यानें संकर्षणापासून ब्रह्मदेवापर्यंत व्यक्ती निर्माण केल्या होत्या त्याचप्रमाणें प्रस्तुत प्रसंगींहि यदुकुलाचा विस्तार करण्यासाठीं, वासुदेव म्हणून यदुकुलांत जन्म घेण्यासाठीं व वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें स्वतःचे चार अंश (विसृज्य भागशः आत्मानम्) निर्माण करण्यासाठीं ब्रह्मदेवानें (ईश्वराची) प्रार्थना केली आहे. यावरून हें स्पष्ट दिसतें कीं, भक्ति-धर्माचा मूळ उपदेशक वासुदेव हाच असून पूर्वीच्या युगांतील आपल्या इतर तीन मूर्तींसह तो अस्तित्वांत होता. वृष्णिकुळांत उत्पन्न झालेला या नात्यानें महाभाष्य व काशिका टीका या दोहोंमध्येंहि "वासुदेव" हेंच नांव त्यास दिलेलें आढळतें. भगवद्गीतेंतहि "वृष्णीनां वासुदेवोस्मि" असेंच म्हटलें आहे. "घटजातक" या बौद्ध ग्रंथांत उपसागर व देवगब्भा यांच्या

दोन ज्येष्ठ मुलांचीं नांवें " वासुदेव " व " बलदेव " अशीं आहेत. गद्यात्मक भागांत दुसरें कोणतेंहि नांव आढळत नाहीं; पण गद्यपद्यमिश्रित असा जो भाग आहे त्यांत " कण्ह " व " केशव " हीं नांवें आढळतात. " कण्हायन " गोत्रांतील म्हणून " कण्ह " हें नांव पडलें असा टीकाकारानें अर्थ दिला आहे-म्हणजे व्यक्तीचें नांव वासुदेवच होतें असा टीकाकाराचाहि समज आहे. कारण सदर टीकाकारानें दुसऱ्या एका ठिकाणीं म्हणजे " महौम्मग्ग-जातक " ग्रंथांतील एका श्लोकावरील आपल्या टीकेंत " जम्बावती " ही वासुदेव कण्हाची आवडती राणी होती असें म्हटलें आहे. मूळ श्लोकांत " वासुदेवस्स कण्हस्स " असें म्हटलें आहे. त्यावरून कण्ह हें गोत्राचें नांव व ' वासुदेव ' हें व्यक्तीचें नांव असावेंसें दिसतें.

याप्रमाणें " वासुदेव " हें व्यक्तीचें विशेषनाम होतें, व जेव्हां वासुदेव किंवा भागवत धर्म उदयास आला त्या वेळीं या धर्मांतील मुख्य देवास हें नांव मिळालें असें दिसतें. वसुदेव हा त्याचा पिता होय ही कल्पना नंतरची असावी. कारण वर दाखविलेंच आहे कीं, महाभाष्यांत " वासुदेवाः " याचा अर्थ " वसुदेवाचे " पुत्रपौत्रज असा घेतला नसून " वासुदेवाचे " पुत्रपौत्रज असा घेतला आहे ( ज्याप्रमाणें बालदेव हे बलदेवाचे पुत्रपौत्रज ). बलदेवाची सांगड वसुदेवाशीं घातलेली नसून, वासुदेवाशी घातलेली आहे. कृष्ण, जनार्दन, केशव हीं वृष्णिकुलोत्पन्न पुरुषांचीं नांवें नसून तीं मागाहून म्हणजे वासुदेवधर्म चोहोंकडे पसरल्यावर वासुदेवास मिळालेलीं असावींत. हीं तिन्ही नांवें पतञ्जलीच्या महाभाष्यांत आढळतात. तथापि शेवटचीं दोन फक्त एके ठिकाणींच आढळतात. या सर्वांत महत्त्वाचें असें नांव कृष्ण हें होय. वासुदेव या नांवाप्रमाणें हेंहि विशेष नामच आहे. पण वासुदेव हें नांव उच्चारतांच धर्मसंबंधी अर्थ किंवा कल्पना विशेषेंकरून डोळ्यापुढें उभी राहते. आतां असा प्रश्न उद्भवतो कीं, कृष्ण हें नांव कसें प्रचारांत आलें असावें ?

**कृष्ण हें नांव कसें पडलें.**--कृष्ण हें वैदिक काळच्या एका ऋषीचें ( ऋग्वेदाच्या आठव्या मण्डलांतील ७४ व्या सूक्ताच्या कर्त्याचें ) नांव होतें. या सूक्ताच्या ३ ऱ्या व ४ थ्या ऋचांत या ऋषीनें कृष्ण या नांवानें आपला उल्लेख केला आहे. " अनुक्रमणी " च्या कर्त्यानें त्यास आंगिरस म्हणजे अंगिरसाचा वंशज असें म्हटलें आहे. व ब्राह्मणाच्छंसीनें तृतीय सवनाच्या वेळीं म्हणावयाचा पर्यास कृष्णआंगिरसदृष्ट आहे असा कौ. ब्रा. ३०. ९ मध्यें उल्लेख केला आहे. पाणिनि अष्टाध्यायी ४. १, ९६ या सूत्रास जोडलेल्या एका गणांत " कृष्ण " हा शब्द आढळतो; व ४. १, ९९ या सूत्रास जोडलेल्या गणांत " कृष्ण " व " रण " यांवरून " कार्ष्णायन " व " राणायन " अशीं गोत्रांचीं नांवें पडलीं असें म्हटलें आहे. हीं ब्राह्मणें गोत्रें वासिष्ठ गोत्राच्या सदरांतच येतात. जातकावरील टीकाकारानें पहिल्या ( कार्ष्णायन ) गोत्राचा उल्लेख केला आहे हें वर सांगितलेंच आहे. ब्राह्मणगोत्र असा संकुचित अर्थ मात्र त्यानें घेतलेला दिसत नाहीं. छांदोग्योपनिषदांत कृष्णाचा उल्लेख देवकीचा पुत्र या नांवानें आला आहे ( ३. १७ ). कृष्ण हा घोर आंगिरसाचा शिष्य होता. कृष्ण हा जर आंगिरस असेल ( असें असणें असंभवनीय नाहीं ), तर कृष्ण हा एक ऋषि होता असा ऋग्वेदकालापासून छांदोग्योपनिषदाच्या काळापर्यंत समज चालत आला होता असें अनुमान काढावें लागतें. त्याचप्रमाणें मूळ प्रस्थापक ज्याचा कृष्ण आहे असें एक कार्ष्णायन गोत्र ( कुल ) होतें असें समजलें पाहिजे. यावरूनच वासुदेवास जेव्हां सर्व देवांत श्रेष्ठ पद दिलें गेलें, तेव्हां हा कृष्ण ऋषि व वासुदेव हे दोन्ही एकच अशी कल्पना निघाली असावी. ज्याप्रमाणें परीक्षिताचा मुलगा जनमेजय (ऐत. ब्राह्मणांत हें नांव आढळतें) याचें नांव महाभारत ज्या व्यक्तीस सांगितलें त्या व्यक्तीस दिलें गेलें व अर्जुनापासून त्याच्यापर्यंत वंशावळहि जोडण्यांत आली, त्याप्रमाणेंच याहि बाबतींत होणें शक्य आहे; म्हणजे वासुदेव व कृष्ण ऋषि हे दोन्ही एक करून वृष्णिकुलांत शूर व वसुदेव यांच्यापासून त्याच्यापर्यंत वंशावळ जोडली गेली. वासुदेवास कृष्ण नांव मिळण्याचें सर्वांत समाधानकारक उत्तर कदाचित् असें देतां येईल कीं, कृष्ण हें गोत्राचें नांव ( अगर आडनांव )असावें. जातकाच्या खुद्द कर्त्याचें व त्याच्या टीकाकाराचेंहि मत असेंच आहे; व वासिष्ठ गोत्राच्या सदरांत कार्ष्णायन ( म्हणजेच काण्हायन ) ब्राह्मण गोत्र येतें हें वर दाखविलेंच आहे. मत्स्यपुराण, अध्याय २०० मध्यें तर वरील सदराच्या पाराशर शाखेंत तें पडतें असें सांगितलें आहे. हें जरी पाराशरशाखेंतील ब्राह्मण गोत्र होतें, तरी तें यज्ञयागादि कर्में करण्याकरितां क्षत्रियांसहि धारण करतां येत होतें. कारण, क्षत्रियांच्या गोत्रास व पूर्वजांस जें आवाहन केलें आहे तें त्यांच्या ऋत्विजांच्या गोत्रांच्या व पूर्वजांच्या नांवानें केलें आहे असें आश्वलायनावरून दिसतें (श्रौ. सू. १२. १५ ). सर्व क्षत्रियांचे ऋषि-पूर्वज फक्त मानव, ऐल व पौरुरवस् हेच होत. यांच्या नांवांवरून कोणत्याहि दोन क्षत्रिय कुलांतील भेद पूर्णपणें व्यक्त होत नसल्यामुळें हा भेद नीट ध्यानांत यावा म्हणून क्षत्रियांनीं आपल्या ऋत्विजांचें गोत्र व पूर्वज घेतले असावेत. तेव्हां कार्ष्णायन हें ब्राह्मण व पाराशर शाखेंतील गोत्र असलें, तरी वासुदेव हा कार्ष्णायन गोत्राचा असावा व म्हणून त्यास कृष्ण म्हणावें या गोष्टी शक्य दिसतात. हें नांव एकदां पडल्यावर प्राचीन कृष्ण ऋषीची विद्वत्ता व अंतर्ज्ञान, व देवकीच्या मुलाचें नांव कृष्ण या दोहोंची सांगड घातली गेली. सभापर्वाच्या ३८ व्या अध्यायांत भीष्माचार्य म्हणतात कीं, कृष्णाला सर्वांत श्रेष्ठ मान देण्याचें कारण तो वेद व वेदांगें जाणतो, व शिवाय तो ऋत्विजहि आहे. कोणीतरी एक देव मुख्य कल्पून इतर देवं

त्याचीच रूपें किंवा अवतार होत अशी जी हिंदूंची कल्पना करण्याची चाल आहे, तीस धरूनच वासुदेव, इतर बाकीचे देव व गोकुळांतील कृष्ण हे सर्व एकच अशी कल्पना झाली असावी. याविषयीं आणखी विवेचन पुढें करण्यांत येईल.

भागवत किंवा पांचरात्र धर्माविषयीं बरीचशी माहिती नारायणीय आख्यानांत दिली आहे. हा धर्म ज्या काळीं भरभराटींत होता त्या काळाविषयींहि पुढचें विचार करूं. येथें प्रथम हरिगीतेंत सांगितलेला, वासुदेवानें स्थापलेला एकान्तिक धर्म व रणभूमीवर अर्जुनास बोधिला गेलेला धर्म (म्हणजेच भगवद्गीता) हे एकच आहेत या विधानाचा विचार करूं.

**वासुदेवानें स्थापलेला धर्म व गीतोपदिष्ट धर्म एकच काय.**—वरील विधान भक्तिसूत्र ८३ व त्यावरील टीका येथें केलें आहे. या ठिकाणीं एकान्तभाव म्हणजे केवळ भक्ति व एकान्तभाव व भगवद्गीतेचा मुख्य प्रतिपाद्य विषय हे दोन्ही एकसारखे आहेत असें म्हटलें आहे. परंतु परमात्म्याचे संकर्षण वगैरे चार व्यूह आहेत याबद्दल भगवद्गीतेंत कोठेंहि उल्लेख नाहीं. भागवत पंथाचें वरील चार व्यूह हें एक विशेष लक्षण समजलें जातें. भगवद्गीतेंत वासुदेवाच्या प्रकृती सांगितलेल्या आहेत त्या येणेंप्रमाणें:-

॥ भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ॥
॥ अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥
॥ जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥

भागवत धर्मांत जीव म्हणजे संकर्षण, अहंकार म्हणजे अनिरुद्ध आणि मन (बुद्धि) म्हणजे प्रद्युम्न असें सांगितलें आहे. यावरून असें दिसतें कीं, भागवत धर्मास व्यवस्थित शास्त्राचें स्वरूप येण्यापूर्वी भगवद्गीता रचिली गेली असावी, व नंतरच्या काळांत परमश्रेष्ठ वासुदेवाच्या तीन प्रकृतींसाठीं संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध हे त्याच्याच वंशांतील तीन पुरुष तीन देवता कल्पिल्या गेल्या. ''निद्देस'' पुस्तकावरून व शिलालेखावरून या धर्माच्या भरभराटीच्या काळांत वासुदेवाबरोबर फक्त संकर्षणाचाच उल्लेख केला जात होता असें दिसतें. 'धनपति, राम, केशव यांच्या देवळांत भक्तलोक जमून वाद्यें वाजवीत' असा एक श्लोक आहे असें पतञ्जलीनें अष्टाध्यायी २.२,३४ वरील आपल्या भाष्यांत म्हटलें आहे. या ठिकाणीं राम व केशव म्हणजे बलराम व वासुदेव–कृष्ण हेच होत. तेव्हां पतञ्जलीच्या काळांत वरील देवांच्या देवळांत उत्सव होत असत हें उघड आहे. पतंजलीनें अष्टाध्यायी ६.३,६ वरील भाष्यांत "व जनार्दन हा स्वतः चवथा" असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ तीन सोबती म्हणजे तीन व्यूह असा घेतला तर वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध हे चार व्यूह पतञ्जलीच्या काळींहि माहीत होते असें म्हणतां येईल. तरीपण ही बाब संशयित आहे; व आपणांस असें धरून चालतां येईल कीं, वरील तीन शिलालेखांपैकीं अगदीं अलीकडचा (म्ह. ख्रि.पू. पहिल्या शतकांतील) जो शिलालेख आहे त्याच्या काळापर्यंत वासुदेव व संकर्षण हे फक्त दोनच व्यूह माहीत असावेत. अर्थात् चार व्यूहांच्या कल्पनेचा त्या काळापर्यंत पूर्ण विकास झाला नसावा. ही विचारसरणी बरोबर असेल, तर भगवद्गीतेंत चार व्यूहांचा उल्लेख ज्या अर्थी मुळींच नाहीं त्या अर्थी ती ''निद्देस'' पुस्तक व वरील शिलालेख यांच्या बरीच आधीं म्हणजे किमान पक्ष ख्रि.पू. चौथ्या शतकाच्या बरीच आधीं रचिली गेली असली पाहिजे. गीता ज्या वेळीं रचली गेली, त्या वेळीं वासुदेव व नारायण एकच किंवा तो एक विष्णूचा अवतार आहे ही कल्पना रूढ नव्हती असें गीतेवरूनच स्पष्ट दिसतें. अकराव्या अध्यायांत, भगवंतांनीं अर्जुनास विराट् स्वरूप दाखविलें तेव्हां त्या स्वरूपाच्या अत्यंत देदीप्यमान् तेजानें अखिल विश्व व्यापलें जाऊन सर्व चराचर वस्तु तापल्या, त्यामुळें अर्जुनानें त्यास विष्णु ह्या नांवानें दोनदां संबोधिलें आहे. या ठिकाणीं परम श्रेष्ठ भगवान् ह्या अर्थी विष्णु ह्या शब्दाचा उल्लेख केला नसून आदित्यांतील मुख्य या नात्यानें केला आहे. एखाद्या समुदायांतील किंवा वर्गांतील श्रेष्ठ वस्तु ही वासुदेवाची विभूति असल्यामुळें त्यास या ठिकाणीं 'विष्णु' म्हटलें आहे.

एखादा धर्म प्रचारांत येतो तेव्हां त्या धर्माचा जो मूळ संस्थापक त्यानें तो धर्म स्थापला एवढें म्हणूनच त्या धर्माचे अनुयायी थांबत नाहींत, तर याच्याहि पुढें जाऊन आपल्या धर्माचा उगम किंवा आरंभ सदर अनुयायी मूळ संस्थापकाच्या मागच्या काळापर्यंत नेऊन भिडविण्याचा प्रयत्न करतात. यास अनुसरूनच सिद्धार्थाच्या आधीं बरेचसे बुद्ध व महावीराच्या आधीं बरेचसे तीर्थंकर निर्माण करण्यांत आले.

त्याचप्रमाणें भागवत धर्माच्या बाबतींतहि प्रत्येक ब्रह्मयाच्या आरंभीं प्रथमतः नारायण हा धर्म प्रगट करी व प्रस्तुतच्या ब्रह्मयाच्या काळांत तो पितामह किंवा प्रजापति, दक्ष, विवस्वत्, मनु व इक्ष्वाकु यास अनुक्रमें सांगितला गेला असें सांगितलें असल्याचें वर दाखविलेंच आहे. हाच अनुक्रम गीतेच्या चौथ्या अध्यायांतहि सांगितला आहे. यावरून नारायणानें सांगितलेला एकान्तिक धर्म व गीतेंतील धर्म एकच या नारायणीय आख्यानांतील विधानास बळकटी येते. याप्रमाणें मूळ आरंभ किंवा उगम मागें नेऊन भिडविण्याच्या बाबतींत भागवत धर्माचें बौद्ध व जैन खटपटींशीं साम्य आहे.

**भगवद्गीतेचें मूळ.**—कर्माच्या फलांकडे लक्ष न देतां म्हणजे निष्काम कर्म करीत राहणें हा भगवद्गीतेचा विशेष होय. तथापि ही कल्पना नवीन नाहीं. ईशोपनिषदांत दुसऱ्या श्लोकांत असें सांगितलें आहे:—

'कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतंसमाः ।
एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥

अर्थः—निश्चयानें कर्म करीत रहात १०० वर्षें जगण्याची इच्छा माणसानें धरावी. अशा कृत्यानेंच कर्माचा स्पर्श

लेप होणार नाहीं. मन उन्नत झाल्यावर कर्माचा लेप होत नाहीं.

अन्नाबद्दल छां० उ० ४. १४, ३ बृह० उ० ४. ४, २३, व मै० उ० ६. २० या ठिकाणींहि उल्लेख आले आहेत.

परमश्रेष्ठ ईश्वराचे गुण गीतेनें उपनिषदांतून घेतलेले आहेत. परमेश्वराच्या मूर्त स्वरूपाचें स्पष्ट वर्णन उपनिषदांत कांहीं ठिकाणीं आलें आहे. तथापि कांहीं ठिकाणीं निव्वळ ब्रह्माचेंहि (याचें स्वरूप तितकें व्यक्त नाहीं) वर्णन आलें आहे. भगवद्गीतेनें एतद्विषयक जे जे उतारे घेतले आहेत त्यांत अक्षरास किंवा ब्रह्मास मूर्त स्वरूप देण्याची पूर्ण खबरदारी घेतलेली आहे. आत्मसंयम किंवा इंद्रियनिग्रह करून परम शांतीप्रत किंवा निर्वाणास जाण्याचें गीतेंतील तत्त्वहि अगदीं आरंभींच्या उपनिषदापासून निरनिराळ्या ग्रंथांच्या स्थापनेच्या काळापर्यंत सामान्यपणें प्रचलित होतें. म्हणून ब्रह्म-निर्वाणाची कल्पना गीतेंत बुद्धपंथांतून घेतली आहे असें म्हणतां येत नाहीं. सर्व पंथांतील या कल्पनेचा उगम एकच आहे.

उपनिषदांशिवाय इतर प्राचीन स्थलांतून गीतेनें तत्त्वज्ञान घेतलें आहे. हीं स्थळें म्हणजे सांख्य व योग हीं दर्शनें होत. सांख्य दर्शनांत सांगितलेलीं २४ तत्त्वें, त्यानंतरच्या काळांतील पुरुष किंवा आत्मा यासंबंधचें २५वें तत्त्व, फक्त प्रकृति तेवढीच व्यापारवान् आहे—पुरुषाला व्यापार नाहीं ही कल्पना, या सर्वांचा गीतेंत उल्लेख केला आहे. तथापि उत्तम पुरुष किंवा परमात्मा या संबंधाच्या सांख्यांत न आढळणाऱ्या कल्पनेची गीतेनें नवीन भर टाकून एकपरी सदर दर्शनांस ईश्वराचें अस्तित्व मान्य करावयास लावलें आहे. सृष्टीच्या उत्पत्तिवर्णनाच्या बाबतींत पुराणें सदर तत्त्वज्ञानाचेंच अनुकरण करतात. उत्तरकालीन वैष्णव व शैव पंथांत हीच तत्त्वपरंपरा प्रसंगविशेषीं कमीजास्त फेरफार करून घेतली आहे. भगवद्गीतेंत सांख्य शब्द योजला आहे तो ईश्वराचें अस्तित्व ज्यांत मानलें नाहीं अशा उत्तरकालीन सांख्य-दर्शनाबद्दल योजलेला नाहीं. दुसऱ्या व पांचव्या अध्यायावरून असें दिसतें कीं, ज्ञानमूलक तत्त्वज्ञान तें सांख्य व कर्ममूलक तत्त्वज्ञान तो योग असा अर्थ अभिप्रेत असावा सांख्य दर्शनांत सांगितलेलीं म्हणून जीं शेवटच्या अध्यायांत पांच कारणें दिलीं आहेत, तीं पुढील काळांतील सांख्य-तत्त्वज्ञांस माहीत नसावींत असें दिसतें. तेव्हां श्वेताश्वतरोपनिषद् व भगवद्गीता यांच्या काळचें जें तत्त्वज्ञान तें सांख्य होय, व यांतूनच पुढील नास्तिकवादी सांख्य तत्त्वज्ञान निघालें असावें. योगदर्शनाचाहि या तत्त्वज्ञानावर बराच पगडा बसलेला होता; पण ब्रह्म, अक्षर किंवा परमात्मा यावर बाकीचे व्यापार बंद करून चित्ताची एकाग्रता करण्यापर्यंत त्याची मजल गेली होती, हा त्यांतील विशेष आहे.

**उपनिषदांत भक्तीच्या भावनेचें मूळ.**—यावरून, बौद्धसंप्रदाय उदयाला येण्यापूर्वी जी धार्मिक व तत्त्वज्ञानविषयक वाढ झाली तिचा निष्कर्ष भगवद्गीता ही होय असें दिसून येईल. परंतु भगवद्गीतेचें प्रमुख लक्षण किंवा वैशिष्टय जी भक्तीची किंवा ईश्वराबद्दलच्या प्रेमाची कल्पना, तिचा मूळ उगम कशांत आहे याविषयीं अर्वाचीन काळीं बरीच भवति न भवति चालू आहे. तेव्हां आतां त्या मुद्दयाकडे वळूं. मन, सूर्य, चन्द्र किंवा पुरुष, अन्न, प्राण या सर्वांस ब्रह्म कल्पून त्याची उपासना उपनिषदांत सांगितली आहे. याप्रमाणें एकाग्र चित्तानें एखाद्या वस्तूचें ध्यान केल्यास ती वस्तु मोठी व तेजस्वी दिसून तिजविषयीं आदर व भक्ति उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. बृहदारण्यकोपनिषदांत पुत्र, संपत्ति किंवा इतर कोणतीहि वस्तु या सर्वांहून आत्मा अधिक प्रिय आहे असें म्हटलें आहे. या ठिकाणीं 'आत्मन्' चा अर्थ कदाचित् स्वतःचा आत्मा असाहि घेतां येईल. सदर उपनिषदांत दुसऱ्या एका ठिकाणीं (४.४,२२), परब्रह्माचें ध्यान व सहवास यांच्यापुढें सर्व ऐहिक वस्तू ज्ञानी लोक तुच्छ मानतात अशा अर्थाचा श्लोक आहे. तेव्हां यावरून, वरील ठिकाणीं भक्ति हा शब्द आला नसला, तरी तत्कालीन लोकांस ईश्वराविषयीं प्रेम (भक्ति) वाटत होतें असें म्हणावयास हरकत नाहीं; व परमात्मा जगांत सर्वत्र व मनुष्याच्या अंतर्यामींहि वास करतो हें जाणल्यावर जी शांति प्राप्त होते तिच्याविषयीं जे परमानंदाचे उद्गार त्या ज्ञात्या लोकांनीं काढले आहेत त्यांच्या मुळाशीं भक्तीसारखीच एखादी वृत्ति असली पाहिजे. ऋग्वेदकाळच्या कवींच्या किंवा ऋषींच्या अंतःकरणांत देवांविषयीं प्रेमाची भावना निरंतर असे हें ऋग्वेद १. १६४, ३३; ८९, १० या ठिकाणच्या शब्दांवरून किंवा इतर प्रार्थनांवरून दिसून येतें. ऋग्वेदानंतरच्या यज्ञयागादि कर्मांच्या काळांत वरील प्रार्थनांतील खरा अर्थ नाहींसा होऊन त्यांस नुसत्या तोंडानें बडबडल्या जाणाऱ्या मंत्रांचें स्वरूप प्राप्त झालें, व त्यामुळें वरील प्रार्थना अगर सूक्तें रचणाऱ्यांच्या मनांत जी भावना होती तिला कांहीं काळपर्यंत वाव मिळाला नाहीं. पुढें उपनिषत्कालीं मात्र ती भावना कौतुक व आदर यांनीं युक्त होत्साती पुन्हां दृग्गोचर झाली असावी. निदान एवढें तरी खास म्हणतां येईल कीं, उपनिषत्कालीं ती भावना मुळींच नव्हती असें नाहीं. जीवात्मा व परमात्मा हे दोघे मित्र समजून त्यांवर केलेलें दोन पक्ष्यांचें रूपक (द्वा सुपर्णा सयुजा सखाया। १. १६४, २०) ऋक्संहितेंत आलें आहे, व त्याचीच मुंडकोपनिषदांत (७. १, १) पुनरुक्ति झाली आहे.

मुंडकोपनिषदांत (३. २, ३) व कठोपनिषदांत (२.२३) म्हटलें आहे.

> "नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन।
> यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम्॥"

कौषीतकिब्राह्मणोपनिषदांत ( ३.८ )

" एष प्राण एवं साधुकर्म कारयति तं यमन्वा-
न्नुनेषति । "

म्हणजे सर्व प्राणिमात्रांच्या अंतर्यामी ईश्वर वास करतो व सर्वांचें नियंत्रण करतो हें तत्त्व आलें आहे; व हीच गोष्ट विस्तारपूर्वक बृहदारण्यकोपनिषद् ३. ७ यांत अधिक स्पष्ट केली आहे. यावरून हें उघड दिसतें कीं, जीवात्मा परमात्म्यावर अवलंबून असून परमात्मा त्यास मुक्ति देतो हें तत्त्व उपनिषत्कालीं मान्य झालें होतें.

**भक्ति शब्दाचा उपनिषत्कालीन अर्थ.**—येणेंप्रमाणें भगवद्गीतेंतील एकान्तिक धर्माच्या सर्व बाबी प्राचीन तत्त्वज्ञानविषयक वाङ्मयांत आढळून येतात. प्रेम या अर्थी भक्ति हा शब्द श्वेताश्वतरोपनिषदाशिवाय दुसऱ्या ठिकाणीं कोठेंहि योजलेला दिसत नाहीं. पण नेहमीं प्रेम या अर्थी सदर शब्द रामानुजानें देखील वापरलेला नाहीं. रामानुजाच्या मतांत, भक्ति म्हणजे संतत ध्यान ( किंवा उपनिषत्कालीं ज्यास उपासना म्हणत ती ) असा अर्थ आहे. भक्ति या शब्दाचा व्युत्पत्तिशास्त्रदृष्ट्या मूळ अर्थ " चा अवलंब करणें, आश्रय करणें " असा असून नंतर " ज्या वस्तूचा अवलंब केला असेल तिजवर प्रेम करणें " असा आहे. याच अर्थी पाणिनीनें ( ४.३,९५ ) हा शब्द वापरला आहे. पण टीकाकारांनीं तो कर्मणि अर्थानें घेऊन आवडती किंवा प्रिय वस्तु असा त्याचा अर्थ दिला आहे. त्यांनीं कांहीं सामान्य व विशेष प्रत्यय सांगितले असून ते एखाद्या नामास लाविले म्हणजे त्या नामानें जी वस्तु दर्शविली जाते ती वस्तु ज्यास आवडते तो असा अर्थ होतो. या अर्थी भक्ति हा शब्द यास्कानें वापरला आहे. उ० अग्निभक्तीनि, इन्द्रभक्तीनि वगैरे. यावरून असें दिसून येईल कीं, प्रेमाची कल्पना सदर शब्दांत पूर्वीच्या काळींहि होती; फरक इतकाच कीं, त्याचा " प्रेम " असा भाववाचक अर्थ नसून "प्रेम केलेला" असा विशेषणात्मक अर्थ होता. खरें पाहिलें तर पाणिनीच्या नियमाप्रमाणें 'ति' हा भाववाचक प्रत्यय असल्यानें " प्रेम " असाच अर्थ व्हावयास पाहिजे. पुढील काळांत हा शब्द कशाहि अर्थानें प्रचारांत आलेला असो, त्यांत परमात्म्याविषयीं प्रेम ही जी कल्पना आहे ती उपनिषत्कालीं " प्रिय " किंवा " प्रेयः " या शब्दांनीं व्यक्त करीत.

**गीतेंतील विचारांचा विकास.**—गीतेंतील विचारांचा विकास खालीलप्रमाणें झाला असावा. आपणांस ज्या पंथांचा विचार करावयाचा आहे त्यांच्या उदयकालीं संसाराचा त्याग करून अरण्यांत जाऊन राहण्याकडे लोकांची प्रवृत्ति होती. खुद्द बौद्ध, जैन व त्यांसारखे इतर धर्म पंथ संन्यस्त वृत्तीचा अंगीकार करणें ही पारमार्थिक उन्नतीस अत्यंत आवश्यक गोष्ट आहे असें समजत. बौद्ध संप्रदायाचा उदय होण्यापूर्वींहि श्रमणांचें अस्तित्व होतें, असें मानण्यास जागा आहे. जे कांहीं पंथ निर्माण झाले त्यांतील बरेच ईश्वर न मानणारे होते. नैतिक उन्नति घडवून आणण्यांत किंवा नीतिविषयक गोष्टींचा खल करण्यांतच हे प्राचीन लोक गढून गेले होते. तेव्हां ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं विचाराचा अभाव होता, हें बौद्ध ग्रंथांतील व महाभारतांतील पुष्कळशा नीतिविषयक उताऱ्यांवरून दिसून येतें. या तऱ्हेच्या प्रवृत्तीस आळा घालण्यास भगवद्गीतेंत व्यक्त केलेल्या विचाराप्रमाणें एखाद्या जोरदार विचारसंप्रदायाची अत्यंत आवश्यकता होती. ईश्वराविषयींच्या कल्पना उपनिषदांत इतक्या रानोमाळ पसरल्या होत्या कीं, त्यांवरून सर्वांस सहज-सजेल असें एक मोक्षसाधनशास्त्र बनविणें अशक्य झालें होतें. अशा परिस्थितींत गीता अस्तित्वांत आली असावी. वासुदेवानें केलेला उपदेश म्हणजे भगवद्गीता ज्या काळीं रचली गेली, त्या काळीं वासुदेव जिवंत होता असें म्हणतां येणार नाहीं ती रचली जाण्यापूर्वीच वासुदेवास देवाचें स्वरूप मिळालें असावें. बुद्धानें केलेल्या उपदेशास जेव्हां पुस्तकाचें स्वरूप दिलें गेलें तेव्हां बुद्ध जिवंत होता असें ज्याप्रमाणें म्हणतां येणार नाहीं, त्याप्रमाणेंच हेंहि आहे. दोघांचाहि उल्लेख भगवान् असाच होतो.

जुन्या धर्माविषयीं भगवंताचें धोरण कसें होतें या प्रश्नास उत्तर द्यावयाचें असल्यास तें पूर्वपरंपरेस धरून होतें असेंच म्हणावें लागतें. धर्माची सांगता करण्यास भगवान् अवतरले, धर्मावर कुरघोडी करण्यास नव्हे. पूर्वींचा धर्म टाकण्याकरितां भगवान् अवतरले नसून तो आचरणांत आणण्याकरितांच ते अवतरले. भगवान् व उपनिषदें या दोघांची यज्ञयागादि कर्में ज्यांत सांगितलीं आहेत अशा श्रौत धर्माकडे पाहण्याची दृष्टि बहुतेक एकच आहे. यज्ञयागांत वासनांस उत्तेजन मिळतें तें अपायकारक होय, व वासनांपासून मिळणारें फलहि नाशवंतच होय. हा एकान्तिक धर्म पूर्वपरंपरेस इतका धरून होता म्हणूनच हिंदुसमाजांत त्याचा प्रसार झाला. तथापि सदर धर्मानें यज्ञयागादिकर्में ज्यांत सांगितलीं आहेत त्या धर्मास समूळ उपटून टाकलें नाहीं. स्त्रियांना व शूद्रांसहित इतर जातींनां पाळतां येण्यासारखें या धर्माचें स्वरूप होतें; व या धर्माच्या पुढील वाढीच्या काळांत त्या वेळीं जीं कांहीं वैदिक विधिविषयक कर्में अस्तित्वांत होतीं त्यांची व या धर्माची ब्राह्मणांनीं सांगड घातली. परंतु खालच्या जातींस अशी सांगड घालण्याची आवश्यकताच नव्हती व त्यामुळें त्यांच्यावर या धर्माचा बराच पगडा बसत चालला होता. इतर देवांस भजणाऱ्या लोकांकडे पाहण्याची भगवंताची दृष्टि अगदीं उदार स्वरूपाची होती. उपासना, मग ती कोणत्याहि देवाची असो शेवटीं भगवंतासच रुजू होते. परंतु इतर देवांस भजणाऱ्या लोकांस भगवंताचें वास्तविक स्वरूप कळत नसल्यामुळें त्यांची वाट चुकते असें म्हणावें लागतें. वासुदेव–कृष्णाच्या भक्तिपंथाचा खालच्या

जातींवर जो पगडा बसला होता त्याच्याशीं सदर दृष्टीचा थोडासा संबंध असावा.

**नारायण शब्दाची व्युत्पत्ति.**—नारायण हा शब्द नाडायन या शब्दाप्रमाणें आहे. पाणि. ४. १, ९९ ( नडादिभ्यः फक् ) या सूत्रास धरून नाडायन रूप झालें आहे; व त्याचा अर्थ नाडायन गोत्र असा आहे. यांतील प्रत्यय अन्वर्थक असून या ठिकाणीं त्याचा अर्थ नाड लोकांचें आश्रयस्थान किंवा ते ज्या ठिकाणाप्रत जातात तें ठिकाण असा आहे. याप्रमाणेंच नारायण म्हणजे नारांचें आश्रयस्थान होय. नारायणीय आख्यानांत ( महाभारत, पर्व १२, अध्याय ३४१ ) श्रीहरि अर्जुनास "अहमेव गतिस्तेषां ( नराणाम् )" असें म्हणतात. शूर पुरुष या नात्यानें देवांस नृ किंवा नर शब्द विशेषतः वेदांत लावलेला आहे. तेव्हां देवांचें आश्रयस्थान किंवा गति असाहि नारायण शब्दाचा अर्थ घेतां येईल.

**नारायणाविषयीं दंतकथेचा विकास.**—नारायण व उत्पत्तिकाळचें पाणी यांचा संबंध जोडणारी एक दंतकथा आहे. मनुस्मृति १. १० या ठिकाणीं व वरील नारायणीय आख्यानांत ' आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः ' असें म्हटलें आहे; व पहिल्या ठिकाणीं पाणी हें ब्रह्मदेवाचें, व दुसऱ्या ठिकाणीं श्रीहरीचें वसतिस्थान असल्यामुळें दोघांसहि नारायण म्हटलेलें आहे. वायुपुराण व विष्णुपुराण यांमध्येंहि असेंच सांगितलें आहे. नारायण किंवा विष्णु यांच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला असें महाभारतांत म्हटलें आहे ( ३. १२, ३४; १२. ३४९, १८ ). वायुपुराणांत, अव्यक्ताच्या पूर्वी नारायण होता, व अव्यक्तापासून ब्रह्माण्ड व ब्रह्माण्डापासून ब्रह्मदेव झाला अशी उत्पत्ति दिली आहे. या सर्व दंतकथा ऋ० १०. ८२, ५–६ वरून घेतल्या असाव्यात. या ऋचा पुढील प्रमाणें आहेतः

> परो दिवा पर एना पृथिव्या परो देवेभिरसुरैर्यदस्ति ।
> कं स्विद्गर्भं प्रथमं दध्र आपो यत्र देवाः समपश्यन्त विश्वे ॥५॥
> तमिद्गर्भं प्रथमं दध्र आपो
> यत्र देवाः समगच्छन्त विश्वे ।
> अजस्य नाभावध्येकमर्पितं
> यस्मिन्विश्वानि भुवनानि तस्थुः ॥ ६ ॥

येथें "आपः" म्हणजे पाणी प्रथम, आणि त्यावर गर्भ म्हणजे ब्रह्मा ( नंतरच्या काळांतील कल्पनेप्रमाणें ) व अज म्हणजे नारायण होय. या गर्भांत सर्व देव होते. सर्व नरांचें आश्रयस्थान नारायण होय या समजुतीशीं वरील गोष्ट जुळते. तात्पर्य, मनुस्मृति व पुराणें यांत ब्रह्मा व नारायण एकच असें म्हटलें आहे, त्यास या गोष्टीनें बळकटी येते. पण, ब्रह्मदेवाच्या आधीं नारायण होता असेंहि कित्येक ग्रंथांत म्हटलें आहे; तेव्हां यावरून असें दिसतें कीं, हा नारायण कोणी तरी दुसराच असावा व नारायण ही कोणी ऐतिहासिक किंवा पौराणिक एकच व्यक्ति नसून ती विश्वव्यापी असावी. ब्राह्मणें व आरण्यकें यांच्या काळांत नारायणाबद्दलच्या या कल्पनेची वाढ झाली. शतपथ ब्राह्मणांत ( १२ ३, ४ ) म्हटलें आहे कीं सकाळीं, मध्यान्हीं व संध्याकाळीं दिलेल्या आवापांच्या योगानें यज्ञस्थलापासून, पुरुष नारायणानें स्वतः जागीच राहून, वसु, रुद्र व आदित्य पुढें धाडले. या सर्व उताऱ्यांचा एकंदर निष्कर्ष असा कीं, सर्व लोक, देव, वेद व प्राण यांच्या ठिकाणीं नारायण असून नारायणाच्या ठायीं हे सर्व आहेत. नारायणास परमात्म्याचें पद प्राप्त होण्याच्या मुळाशीं ही कल्पनाच असावी. कारण परमात्माहि सर्वत्र भरला असून त्याच्या ठायीं सर्व आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं ( १३. ६, १ ) असें म्हटलें आहे कीं, आपण स्वतः सर्व चराचर वस्तुमय होऊन शिवाय सर्वांवर आपणांस प्रभुत्व मिळवितां यावें म्हणून पुरुष नारायणानें पंचरात्र यागाची कल्पना काढली; व तें यज्ञसत्र शेवटास नेऊन आपल्या कार्यांत त्यानें सिद्धि मिळविली. म्हणजे या ठिकाणींहि विश्वव्यापी होऊन नारायण सर्वांचा शास्ता झाला असें म्हटलें आहे. ऋ. १०. ९० या ठिकाणीं नारायण हा पुरुषसूक्ताचा कर्ता असें म्हटलें आहे. विश्वकर्मा वगैरेस सूक्तांचे कर्ते म्हणणें ही जशी एक कल्पना आहे त्याप्रमाणेंच नारायण हा पुरुषसूक्ताचा कर्ता हीहि केवळ कल्पनाच असावी; पुरुष किंवा नारायण या देवतेला उद्देशून हें सूक्त रचिलें असावें. वरील सूक्तांचा, सूक्त ज्या ज्या देवतेचें आहे त्या त्या देवतेशीं संबंध आहे. यावरून नारायण हें पुरुषाचेंच दुसरें नांव असावें, व या दोन नांवांचीच एके ठिकाणीं सांगड घातली गेली असावी असें दिसतें. उपनिषदांत परमात्म्याचे ( किंवा पुरुष परमेश्वराचे ) जे गुण सांगितले आहेत त्या सर्व गुणांनीं तैत्तिरीय आरण्यकांत नारायणाचें वर्णन केलें आहे. महाभारतांत व पुराणांत नारायण हा देवाधिदेव आहे असें म्हटलें आहे. क्षीरसागरांत शेषाच्या पाठीवर नारायण निजले आहेत असें पुराणांतरीं वर्णन आहे. म्हणजे ऋग्वेदांत सर्वांच्या आरंभीं पाणी व पाण्यावर नारायण, असें जें वर वर्णन आल्याचें सांगितलें आहे, तो संबंध पुराणांतहि कायम ठेवलेला दिसतो. याप्रमाणें नारायण पूजेचा किंवा उपासनेचा विषय होऊन बसला. घोसुंडि येथील शिलालेखांत एका " नारायण वाटिके" चा म्हणजे नारायणास अर्पण केलेल्या वाटिकेचा उल्लेख आला आहे.

**नारायणाचा स्वर्ग म्हणजेच श्वेतद्वीप.**—या नारायणाचा स्वर्ग म्हणजे श्वेतद्वीपच होय. कथासरित्सागरांत ( ५४. १९; २१; २३ ), नरवाहनदत्तास देवसिद्धीनें, श्वेतद्वीपास नारद तुंबर ज्याची स्तुति करीत आहेत अशा शेषशायी भगवान् श्रीहरीकडे नेलें असें म्हटलें आहे. त्याच ग्रंथांत दुसऱ्या एका ठिकाणीं ( ११५. १०१–३ ), कांहीं देव श्वेतद्वीपीं गेले व लक्ष्मी ज्याच्या चरणाजवळ बसली आहे अशा शेषशायी भगवान् श्रीहरीस रत्नखचित मंदिरांत

त्यांनीं पाहिलें असें वर्णन आहे. बलीनें केलेली स्तुति अगर प्रार्थना म्हणून मोक्षेच्छु योगी व कपिलसांख्य श्वेतद्वीपाप्रत जातात असें हरिवंशांत सांगितलें आहे ( १४. ३८४ ). यावरून श्वेतद्वीप हा स्वर्ग असून त्यांत नारायण,' ज्यास कांहीं ठिकाणीं हरि म्हटलें आहे. तो. वास करतो असें दिसतें.

विष्णूचें जसें वैकुंठ, शिवाचा जसा कैलास, गोपाल कृष्णाचा जसा गोलोक, त्याप्रमाणेंच नारायणाचें किंवा हरीचें श्वेतद्वीप; या ठिकाणींच नारद गेले व नारायणाचें दर्शन घेऊन त्यांजकडून एकान्तिक धर्म (वासुदेवधर्म) समजावून घेतला. श्वेतद्वीप म्हणजे श्वेतवर्णी लोक ज्यांत रहात आहेत असा ख्रिस्ती लोकांचा एक देश होता असें मानण्याची जरूर नाहीं असें यावरून दिसून येईल.

**नारायण व वासुदेव एकच.**—याप्रमाणें नंतरच्या ब्राह्मण-काळांत परब्रह्माच्या पदवीस चढलेला नारायण वासुदेवाच्या पूर्वीच अस्तित्वांत होता; पण पुढें महाभारताच्या काळीं जेव्हां वासुदेवभक्ति प्रचारांत आली तेव्हां नारायण व वासुदेव हे दोन एकच मानले गेले. वनपर्वांत (अ. १८८-८९) विश्वाच्या प्रलयकालच्या स्थितीचें वर्णन केलें आहे त्यांत असें म्हटलें आहे:

" सर्वत्र पाणीच पाणी होऊन गेलें व त्या पाण्याच्या पृष्ठभागावर न्यग्रोध वृक्षाच्या एका फांदीवर पर्यंकावर निजलेलें एक अर्भक होतें. या अर्भकानें आपलें तोंड उघडून मार्कण्डेयास आंत घेतलें. मार्कण्डेयानें आंत सर्वत्र संचार करून तेथें अखिल विश्व पाहिलें तेव्हां त्यास अत्यंत विस्मय वाटला. अर्भकानें मार्कण्डेयास तोंडाबाहेर काढतांच त्यास पुन्हां सर्वत्र पाणी दिसूं लागलें. तेव्हां मार्कण्डेयानें त्या अर्भकास तूं कोण असा प्रश्न केला. अर्भकानें उत्तर दिलें कीं पुरातन काळीं मी पाण्यास 'नाराः' हें नांव दिलें व तें माझें निवास स्थान म्हणजे 'अयन' असल्यामुळें मला नारायण हें नांव मिळालें."

येणेंप्रमाणें नारायणानें आपलें गुणमाहात्म्य वर्णन केलें तें येथें दिलें आहे. मार्कण्डेय युधिष्ठिरास ही गोष्ट सांगतांना शेवटीं म्हणतो कीं, हा जो जनार्दन तुझा नातेवाईक आहे तो व नारायण एकच. नारायणीय आख्यानाचें तर नारायण व वासुदेव हें एक पालुपदच दिसतें. या सृष्टिकर्त्या नारायणाशिवाय नरनारायण यांत ज्या नारायणाचा उल्लेख येतो त्या नारायणाविषयींहि एक गोष्ट आहे. "द्वासुपर्णासयुजा सखाया" या उपनिषद्वाक्यांतील कल्पनेवरून ही नरनारायणाच्या जोडीची कल्पना केली असावी. दोन पक्ष्यांपैकीं ज्यास स्वामी म्हटलें आहे व जो एका ठिकाणीं बसून सर्वत्र टेहळणी करतो तो सदर कथेंतील नारायण होय; आणि दुसरा जो फळें खाण्यांत गर्क झाला आहे तो नर होय. नारायणीय आख्यानाच्या पहिल्या अध्यायांत सनातन विश्वात्मा जो चार मूर्ती धारण करणारा तो धर्माचा पुत्र होय असें म्हटलें आहे. त्या चार मूर्ती म्हणजे नर, नारायण, हरि व कृष्ण या होत. यांपैकीं पहिल्या दोघांनीं आपणांस बदरिकाश्रमीं तपश्चर्या करण्यास वाहून घेतलें. वामनपुराणांतहि ( अ. ६ ) हीच कथा दिली आहे. या चार मूर्ती हीं धर्माचीं चार मुलें असून "अहिंसा" ही त्यांची माता होय असें तेथें म्हटलें आहे. या गोष्टींत कांहीं विशेष अर्थ भरलेला दिसतो. ही गोष्ट त्या काळच्या परिस्थितीची निदर्शक असावी. नवीन पंथ उदयास आले त्या काळीं यज्ञयागादि कर्में व प्राणिहत्या ज्यांत सांगितली आहे अशा धर्माविरुद्ध नीति व अहिंसा या दोन तत्त्वांसंबंधीं विचारांची खळबळ चालू होती. तेव्हां सद्धर्म किंवा धार्मिकपणा व अहिंसा हीं दोन तत्त्वें ज्यांत गोंविलीं गेलीं आहेत अशा पंथाशीं वरील चार मूर्तींचा किंवा नांवांचा संबंध जोडला जावा हें साहजिक आहे. धर्म हा पिता व अहिंसा ही माता असें जें म्हटलें आहे त्याचा हाच अर्थ अभिप्रेत असावा. नर व नारायण यांस कधीं कधीं ऋषी म्हणतात, त्याचा नारायण हा पुरुषसूक्ताचा ऋषि किंवा कर्ता अशी जी कल्पना आहे तिच्याशीं संबंध असावा. महाभारतकाळीं हे दोघेहि फार प्रसिद्ध असले पाहिजेत. कारण, प्रत्येक पर्वाच्या आरंभीं या दोघांस वंदन केलें आहे. वनपर्व अ. १२ श्लो. ४६-४७ या ठिकाणीं जनार्दन अर्जुनास म्हणतो:—

> नरस्त्वमसि दुर्धर्ष हरिर्नारायणो ह्यहम् ।
> काले लोकमिमं प्राप्तौ नरनारायणावृषी ॥
> अनन्यः पार्थ मत्तस्त्वं त्वत्तश्चाहं तथैवच ।
> नावयोरन्तरं शक्यं वेदितुं भरतर्षभ ॥

याच पर्वाच्या ३० व्या अध्यायांत महादेव अर्जुनास म्हणतो:—" तूं पूर्वी नरऋषि असून नारायण हा तुझा सहाध्यायी होता; व बदरिकाश्रमीं तुम्हीं दोघांनीं हजारों वर्षें तपश्चर्या केली." त्याचप्रमाणें

> वासुदेवार्जुनौ वीरौ समवेतौ महारथौ ।
> नरनारायणौ देवौ पूर्वदेवाविति श्रुतिः ॥

असें उद्योगपर्व अ. ४९ श्लो. १९ या ठिकाणीं म्हटलें आहे. अर्जुन व वासुदेव हे नरनारायण आहेत असा बद्दलचीं आणखी पुष्कळ स्थळें आहेत. सारांश भगवद्गीतारूपी संवाद ज्या दोघांत झाला ते दोघे अर्जुन व वासुदेव यांचा संबंध नरनारायण ऋषींच्या गोष्टीशीं जोडला गेला आहे.

**विष्णूच्या परमेश्वरपदप्राप्तीचा इतिहास.**—विष्णु ही वैदिक काळची देवता आहे. ऋग्वेदांत या देवतेस उद्देशून अशीं फारच थोडीं सूक्तें आहेत, एवढ्यावरून या देवतेचें महत्त्व कमी होतें असें म्हणता येत नाहीं ( वेदविद्या, पृष्ठ ३१३ पहा ). लांब लांब पावलें टाकून तीन पदांनीं तो सर्व विश्व आक्रमितो, अशा प्रकारचें त्याचें वर्णन अंतःकरणपूर्वक ( भावपूर्वक ) केलेलें आढळतें.

इदं इदस्य क्रमणे स्वर्दृशोऽभिख्याय मर्त्यो भुरण्यति ।
तृतीयमस्य नकिरा दधर्षति वयश्चन पतयन्तः पतत्रिणः ॥
( ऋ. १ १५५, ५ ).
तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यन्ति सूरयः दिवीव चक्षुराततं
( ऋ. १. २२, २० ).
विष्णोः परमे पदे मध्व उत्सः यत्र देवयवो मदन्ति
( ऋ. १. १५४,५ ).
इन्द्रस्य युज्यः सखा । ( ऋ. १. २२, १९ ).

वगैरे विष्णूचें वर्णन ऋग्वेदांत आलें आहे. ऋग्वेदकालीं जरी विष्णूस इतकें महत्त्व नव्हतें तरी ब्राह्मणकालापासून तें वाढूं लागलें, व महाभारतकालीं व पुराणकालीं तर त्यास परमेश्वरपदच प्राप्त झालें. विष्णूचा हा उत्तरोत्तर उत्कर्ष होत गेला त्याम कारण त्याचें जें सर्वांच्या दृष्टिपथाच्या बाहेर असणारें परमपद त्याविषयीं वाटणारी पूज्यबुद्धि होय. ब्राह्मणकालीं अग्नीस देवांत शेवटचें व विष्णूस सर्वांत वरचें स्थान दिलें जात असे ( ऐ. ब्रा १. १ ). वैभव, कीर्ति व अन्न यांची प्राप्ति होण्याकरितां देवांनीं यज्ञसत्र आरंभल्याबद्दल शतपथ ब्राह्मणांत व तैत्तिरीय आरण्यकांत एक गोष्ट आहे. जो आपल्या कर्तृत्वानें सर्वांत आधीं यज्ञ संपवील त्यास सर्वांत श्रेष्ठ पद यावयाचें असें त्यांनीं आपसांत ठरविलें होतें. विष्णूनें सर्वांच्या आधीं यज्ञ संपविल्यामुळें त्यास श्रेष्ठ पद मिळालें. अर्थात् ही गोष्ट लिहिली जाण्यापूर्वीच विष्णूस सदर पद प्राप्त झालें होतें, व याच्या समर्थनार्थ म्हणून मागाहून ही गोष्ट रचण्यांत आली. सदर ब्राह्मणांत( १. २, ५ ) वामनरूपी विष्णूचीहि गोष्ट आली आहे. यज्ञप्रसंगीं एकदां देव व दैत्य यांमध्यें जागेसंबंधानें भांडण लागलें तेव्हां वामनाच्या आकाराएवढी जागा देवांस देण्याचें दैत्यांनीं कबूल केलें. त्याप्रमाणें विष्णूस जमिनीवर निजविण्यांत आलें. हळू हळू त्याचा आकार इतका वाढला कीं, त्यानें सर्व पृथ्वी व्यापून टाकली. या ठिकाणीं विष्णूच्या अंगीं एक अद्भुत शक्ति ( मोठें होण्याची ) जोडली आहे. तरी त्यास परमेश्वराचें स्वरूप प्राप्त झालें होतें असें म्हणतां येत नाहीं. सर्व विश्वाचें पोषण करणारें अन्न हें भगवान् विष्णूचें स्वरूप आहे असें मैत्रायणीय उपनिषदांत म्हटलें आहे ( विश्वभृत् तनूर्भगवतो विष्णोर्यदिदमन्नम्–६. १३ ). कठोपनिषदांत जीवात्म्याच्या प्रगतीची प्रवासाशीं तुलना केली आहे; या प्रवासाचें शेवटचें ठिकाण विष्णूचें परम पद होय असें म्हटलें आहे ( सोऽध्वनः पारमाप्नोति तद्विष्णोः परमं पदम् ३. ९ ). या स्थानाप्रत जाणें म्हणजेच मोक्ष होय. येथें परमपद याचा मोक्षपद या अर्थीं उपयोग केला गेला असल्यामुळें या कालीं विष्णूस सर्वांत श्रेष्ठ पद मिळालें असावें. कांहीं काळानंतर गृह्यदेवतांतहि विष्णूस स्थान मिळालें. विवाहविधींतील सप्तपदींत वधू जेव्हां पाऊल पुढें टाकते, तेव्हां वर तिला म्हणतो कीं, विष्णु तुला मार्ग दाखवो किंवा तुजबरोबर असो ( विष्णुस्त्वामुन्नयतु ). आपस्तंब, हिरण्यकेशि, व पारस्कर गृह्यसूत्रांत सदर मंत्र आढळतो, पण आश्वलायन गृह्यसूत्रांत तो आढळत नाहीं.

**वासुदेव व विष्णु यांचें अभिन्नत्व.**—महाभारतकालीं विष्णूस पुरुषपरमेश्वराचें स्थान प्राप्त झालें होतें; आणि वासुदेव व विष्णु हे दोघे एकच मानले जात असत. भीष्मपर्वांत ६५–६६ अध्यायांत पुरुषपरमेश्वरास नारायण व विष्णु या दोन नांवांनीं संबोधिलें आहे आणि हे सर्व व वासुदेव एकच असें म्हटलें आहे.

अश्वमेधपर्वांतील अनुगीतेंत कृष्ण द्वारकेस परत येत असतांना त्यास भृगुवंशांतील उत्तंक नांवाचा ऋषि भेटतो, व त्या दोघांत थोडासा संवाद होऊन त्या ऋषीच्या विनंतीवरून कृष्ण त्यास आपलें विराट स्वरूप दाखवितो. या स्वरूपास वैष्णवरूप म्हटलें आहे. भगवद्गीतेंत अर्जुनासहि विराट स्वरूप दाखविलेलें आहे, पण त्या ठिकाणीं वैष्णवरूप हें नांव आढळत नाहीं. यावरून अनुगीता व भगवद्गीता यांच्यामधील काळांत वासुदेव–कृष्ण व विष्णु हे दोघे एकच ही गोष्ट ठरून गेलेली दिसते. शांतिपर्व अ. ४३ या ठिकाणीं युधिष्ठिरानें कृष्णाची स्तुति केली आहे तेथेंहि कृष्ण व विष्णु एक असेंच म्हटलें आहे. महाभारतकालीं विष्णूस पुरुषपरमेश्वर समजत, तथापि नारायण व वासुदेव–कृष्ण हीं नांवेंच फार करून आढळून येतात.

वासुदेव–कृष्णास देव समजत नव्हते अशाबद्दल पुराव्यादाखल महाभारतांत बरींच स्थळें दाखवितां येतील. अनुगीतेंतील वर उल्लेख केलेला उत्तंक ऋषि कृष्णास जणूं काय एक सन्मान्य व्यक्ति समजून शाप देण्यास उद्युक्त झाला होता; पण कृष्णानें आपलें विराट स्वरूप दाखविण्याचें कबूल केल्यावर त्यानें शाप दिला नाहीं. इतर बऱ्याच ठिकाणींहि कृष्णाचें देवपण नाकबूल केलेलें आहे. संजय व भीष्म हे मात्र सदोदित कृष्ण देव आहे ही गोष्ट मनावर ठसविण्याचा जेव्हां तेव्हां कसून प्रयत्न करीत. सारांश, या काळीं सात्वत लोक हे वासुदेवधर्म पाळीत असून त्याचा प्रसार हळू हळू देशांतील इतर लोकांत होत चालला होता असें महाभारतांतील सदर स्थळांवरून दिसून येतें. पौराणिक काळीं वासुदेव–धर्माचा प्रसार होण्याचें थांबलें; पण विष्णु ही वैदिक काळची देवता मध्यवर्ती कल्पून तिजपासून निघालेला, नारायण या विश्वव्यापी देवापासून निघालेला व वासुदेव या ऐतिहासिक व्यक्तीपासून निघालेला, अशा तीन उपासनासंप्रदायांचे प्रवाह जणूं काय एकांत एक मिसळून त्यांपासून पुढील काळांतील वैष्णवसंप्रदाय बनला. या उपासनासंप्रदायाचा एक चवथाहि प्रवाह आहे. अर्वाचीन काळीं वैष्णव पंथांतील कांहीं शाखांत त्यास अतिशय महत्त्व प्राप्त झालें आहे. तेव्हां आतां या चवथ्या मताकडे वळूं.

**गोपालकृष्णाचे उल्लेख व त्यांची वृष्णिकुलोत्पन्न वासुदेवाच्या हकीकतीशीं विसंगतता.**—आतांपर्यंत ज्या ज्या ग्रंथांचे आधार घेतले त्या ग्रंथांत गोपालकृष्णाचा

कोठेंहि उल्लेख केलेला आढळत नाहीं. मागें सांगितलेले शिलालेख, पतंजलीचें महाभाष्य किंवा नारायणीय आख्यान यांपैकीं कशावरूनहि गोपालकृष्ण असा एखादा देव असल्याचें दिसून येत नाहीं. नारायणीय आख्यानांत कंसवधार्थ वासुदेवानें अवतार घेतला असें सांगितलें आहे; पण गोकुळांत गोपालकृष्णानें जे दैत्य मारले त्यांच्या निःपाताकरितां अवतार घेतला असें कोठेंहि म्हटलेलें नाहीं. हरिवंश (५८७६–७८), वायुपुराण अ. ९८ (१००–१०२) व भागवतपुराण (२.७) या सर्वांमध्यें कंसाचा वध करण्याकरितां व गोकुळांतीलहि दैत्यांचा निःपात करण्याकरितां कृष्णावतार झाला असें म्हटलें आहे. दोन स्थळांमधील हा फरक ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. गोपालकृष्णाच्या कथा सर्वांच्या तोंडीं झाल्यावर, व वासुदेवकृष्ण व गोपालकृष्ण यांचें एकीकरण झाल्यावरच सदर ग्रंथ लिहिले गेलें असले पाहिजेत. वृष्णिकुलोत्पन्न राजपुत्र वासुदेव गोकुळांत लहानाचा मोठा झाला ही गोष्ट महाभारतांत त्याच्या पुढील आयुष्यक्रमाचें वर्णन आलें आहे त्याशीं विसंगत आहे. गोकुळांत ज्या तऱ्हेनें कृष्णाचें बाल्य गेलें, त्या तऱ्हेनेंच तें जावयास पाहिजे असें समजण्याची अवश्यकता महाभारताच्या कोणत्याहि भागावरून दिसून येत नाहीं.

सभापर्व अ. ४१ मध्यें शिशुपालानें कृष्णावर अपशब्दांचा भडिमार करीत असतांना त्याच्या पूतनावधादि गोकुळांतील कृत्यांचा उल्लेख केला आहे, व भीष्मानें अशा कृत्यांबद्दल त्याची वाखाणणीच केली आहे असें त्यानें म्हटलें आहे. पण अ. ३८ मध्यें भीष्मानें कृष्णाची स्तुति केली आहे त्यांत सदर कृत्यांबद्दल अवाक्षरहि नाहीं. तेव्हां वरील ठिकाणचा भाग प्रक्षिप्त असावा.

**गोविन्द हें नांव वासुदेवकृष्णास कसें मिळालें.**– भगवद्गीतेंत व महाभारतांत अन्यत्र गोविन्द हें नांव आढळतें. हें नांव बरेंच प्राचीन आहे. पाणिनि ३. १, १३८ या सूत्रावरील वार्तिकाप्रमाणें हें नांव बनलें आहे. गोकुळांत असतांना गाईंशीं संबंध असल्यामुळें कृष्णाला गोविन्द हें नांव मिळालें असें मानावें, तर असा संबंध दर्शविणारी या नांवाची व्युत्पत्ति महाभारतांत आढळावयास पाहिजे. पण आदिपर्वांत गोविन्द नांव पडण्याचें कारण असें दिलें आहेः–

> गां विन्दता भगवता गोविन्देनामितौजसा ।
> वराहरूपिणाचान्तर्विक्षोभितजलाविलम् ॥
> (१. २१, १२).

पुन्हां शांतिपर्वांतहि

> नष्टांच धरणीं पूर्वमविन्दं वै गुहागताम् ।
> गोविन्द इति तेनाहं देवैर्वाग्भिरभिष्टुतः ॥

असें म्हटलें आहे. याप्रमाणें गोविन्द नांवाचें मूळ या गोष्टीवरून शोधून काढतां येईल; पण बहुतकरून 'गोविद्' याचा हा नंतरच्या काळांत झालेला अपभ्रंश असावा.' 'गोविद्' हें नांव ऋग्वेदांत इन्द्रास 'गाईंस पाहून काढणारा' या अर्थी लाविलेलें आहे. वासुदेव–कृष्ण हा जेव्हां सर्वांत मुख्य देव मानला गेला तेव्हां त्यास इन्द्राचें सदर नांव व त्याचप्रमाणें दुसरें 'केशिनिषूदन' हेंहि नांव मिळालें असावें.

**गोपाल म्हणजे आभीर लोक.**—या सर्व विवेचनावरून असें दिसतें कीं, गोकुळांतील कृष्णाची बाल्यासंबंधींची हकीकत ख्रिस्ती शकाच्या आरंभापर्यंत कोणासहि माहीत नव्हती. सदर हकीकतीस मुख्य आधारभूत ग्रंथ म्हणजे हरिवंश होय. त्यांत 'दिनार' हा लॅटिन शब्द आढळतो. यावरून तो ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकांत रचला गेला असला पाहिजे; व त्याच्या पूर्वी कांहीं काळ कृष्णाच्या बाल्यांतील गोष्टी प्रचारात असाव्यात. कृष्ण ज्या गोपाल जातींत वाढला त्या जातीची स्थिति कृष्णाच्याच शब्दांवरून कळते. इन्द्राचा उत्सव न करतां त्याबद्दल गोवर्धन पर्वताची पूजा करण्याबद्दल नन्दाचें मन वळवितांना कृष्ण म्हणतो (हरिवंश ३८०८):—"गोधनावर उपजीविका करून रानावनांत भटकणारे आम्ही गोपाल आहोंत; गाई, पर्वत, वनें या सर्व आमच्या देवता होत." हे गोपाल घोषांत किंवा गौळीवाड्यांत रहात, व हे घोष त्यांनां चटकन एका स्थळाहून दुसऱ्या स्थळीं नेतां येत असत. घोष याचा अर्थ 'आभीरपल्ली (म्ह. गौळीवाडा) असा आहे. पण आभीर याचा मूळ अर्थ 'गोपाळ' असा नाहीं. गाईंची निगा राखण्याचा किंवा गाई पोळण्याचा ज्यांचा धंदा होता अशा लोकांचें हें नांव होतें; व नंतर त्याचा गोपाल असा अर्थ झाला.

यावरून गोपाल हे आभीर नांवाच्या एका भटकणाऱ्या जातीचे वंशज दिसतात. मथुरेजवळील मधुवन व द्वारकेजवळील अनूप, आनर्त या प्रदेशांच्या टापूंत सदर लोक रहात (हरिवंश ५१६१—६३). वृष्णिकुलांतील पुरुषवर्ग नष्ट झाल्यावर, त्या कुलांतील स्त्रियांस अर्जुन द्वारकेहून कुरुक्षेत्रीं नेत असतां त्यावर आभीर लोकांनीं हल्ला केला असें म. भा. मुसलपर्व अ. ७ या ठिकाणीं म्हटलें आहे. ते म्लेच्छ असून दरोडेखोर होते असें त्यांचें वर्णन आढळतें, व पंचनदाच्या (बहुतकरून हा पंजाब असावा) आसपास ते रहात असत. अपरान्त (कोंकण) व सौराष्ट्र यांच्या आसपास ते रहात असें विष्णुपुराणांत म्हटलें आहे; व वराहमिहिरानेंहि जवळ जवळ हेंच स्थान ठरविलें आहे. नैर्ऋत्यभागांत रहाणारे दक्षिणेकडील लोक असाहि त्यांच्यासंबंधीं उल्लेख आहे (बृहत्संहिता १४. १२, १८). तथापि आभीर लोक हे पुष्कळ मोठ्या प्रमाणांत देशांत शिरले असावेत. प्रथमतः ते निवळ भटकणारे होते; व नंतर पंजाबची पूर्व सरहद्द, मथुरा व दक्षिणेस सौराष्ट्र किंवा काठेवाड या प्रदेशांत—म्हणजे सबंध राजपुताना व त्याच्या ईशान्येस असणारा कांहीं प्रदेश एवढ्या भागांत—त्यांनीं वसति केली असावी. वास्तव्य करून राहिल्यानंतर त्यांनीं अनेक धंदे पतकरले. गुराख्याचा धंदा हा त्यांपैकींच एक होता.

**आभीरांचें आगमन व कृष्णासंबंधीं दंतकथा.**— आभीरांच्या वंशजांस सध्यां अहीर म्हणतात, व सध्यां ते

सोनार, सुतार, गुराखी, उपाध्याय वगैरे धंदेवाले बनले आहेत. महाराष्ट्राच्या उत्तर भागांत एके काळीं त्यांचें राज्य होतें. आभीर शिवदत्ताचा मुलगा ईश्वरसेन याच्या कारकीर्दीच्या ९ व्या वर्षाचा एक शिलालेख नाशिक येथें सांपडला आहे. हा शिलालेख इसवी सनाच्या तिसऱ्या शतकाच्या समाप्तीच्या काळांतील असावा असें दिसतें. आभीर नांवाचा एक राजवंश असून त्यांत दहा राजे होऊन गेले असा पुराणांत उल्लेख आहे (वायुपुराण, खण्ड २ रें अ. ३७). याच्या पूर्वीच्या काळचा एक शिलालेख काठेवाडांत गुंडा येथें सांपडला आहे त्यांत रुद्रभूति नांवाच्या एका आभीर सेनापतीच्या दानधर्माचा उल्लेख आहे. शके १०२ म्ह० इ. स. १८० च्यासुमारास रुद्रसिंह नांवाचा क्षत्रप राजा राज्य करीत होता त्याच्या वेळचा सदर शिलालेख आहे. दुसऱ्या शतकाच्या शेवटीं शेवटीं व तिसऱ्या शतकांत आभीर लोकांच्या हातांत बरीच राजकीय सत्ता होती, यावरून ते पहिल्या शतकांत या देशांत आले असावेत; व त्यांनीं बालदेव कृष्णाची पूजा आणि त्याच्या जन्माची कथा आपल्याबरोबर आणल्या असाव्यात. कृष्णाच्या जन्मकथेंत नन्द हा कृष्णाचा बाप नव्हता व कंसानें देवकीचीं मुलें मारलीं याबद्दलच्याच गोष्टी आहेत. गर्दभरूप धारण केलेल्या धेनुक दैत्याच्या वधाची गोष्ट व तिच्या सारख्याच कृष्णाच्या बाल्यांतील दुसऱ्या कांहीं गोष्टी आभीरांनीं आपल्याबरोबर आणल्या व कांहीं ते हिंदुस्थानांत आल्यावर नंतर रचल्या गेल्या. ख्रिस्त हें नांव कदाचित् या लोकांनींच आणलें असावें, व यावरूनच पुढें बालदेवाचें व वासुदेव-कृष्णाचें एकीकरण झालें असावें. गोवानीज व बंगाली लोक कृष्ण याचा जवळ जवळ कुस्टो किंवा किस्टो असा उच्चार करतात. तेव्हां आभीरांचा ख्रिस्त व संस्कृत कृष्ण हे दोघे एक मानले जाणें अगदीं संभवनीय दिसतें. कृष्णाची गोपींबरोबर क्रीडा हीं नंतरची कल्पना असावी. कारण वासुदेव धर्मांतील परिणतावस्थेंतल्या नीतिमत्तेशीं ती अगदींच विसंगत वाटते. सदर क्रीडेची कल्पना या भटकणाऱ्या रानटी आभीर टोळ्या व चांगले सुसंस्कृत आर्य लोक यांच्यांत अगदीं निर्बंध रीतीनें दळणवळण चालू असे त्यामुळें निघाली असावी. आभीरासारख्या त्या काळच्या जातींत कडक नीतिबंधनें असणें शक्य नाहीं. या बाबतींतील शिथिलत्वाचा आसपासच्या आर्य लोकांनीं फायदा घेतलेला दिसतो. आभीर स्त्रियाहि स्वरूपवान् व देखण्या असाव्यात हें सध्यांच्या अहीर गवळ्यांच्या बायका सौंदर्यवान् असतात यावरून स्पष्ट दिसतें.

**कृष्णासंबंधीं बौद्ध ग्रंथांतील उल्लेख.**—घटजातक या बौद्ध ग्रंथांत कंसाची बहीण देवगभ्भा व उपसागर यांचीं मुलें तीं वासुदेव व त्याचीं इतर भावंडें असें म्हटलें आहे. अंधकवेण्हु व त्याची बायको नन्दगोपा ( देवकीची दासी ) यांच्या ताब्यांत सदर मुलांस दिलें होतें. देवगभ्भा हा देवकीचाच अपभ्रंश असावा, व देवगभ्भेचीं मुलें जिनें वाढविलीं त्या दासीचें नांव नन्द व यशोदा किंवा गोपा या दोन नांवांचा समास करून बनविलें असावें. त्याचप्रमाणें अन्धकवेण्हु हें नांव अन्धक व वृष्णि या दोन यादव कुळांच्या नांवांचा समास करून बनविलेलें दिसतें. अंधक व वृष्णि हीं दोन निरनिराळ्या कुलांचीं निरनिराळीं नांवें असल्याबद्दल खात्रीलायक आधार सांपडतो. यावरून वरील गोष्ट मागाहून बनविलेली असून खऱ्या इतिहासाचा एक कांहींतरी चुकीचा अवशेष म्हणून राहिली असावी. सगळीं जातकें एकाच वेळीं लिहिलेलीं नाहींत; कांहीं ख्रिस्तीसनापूर्वीचीं तर कांहीं नंतरचीं असावींत. घटजातक हें दुसऱ्या वर्गांत येईल असें वाटतें. तेव्हां एकंदरींत नन्दगोपा या समासावरून, ख्रिस्ती सनापूर्वी नन्द व यशोदा या कृष्णाच्या पालनकर्त्या आईबापांचा त्यांत उल्लेख असला तरी वासुदेव कृष्ण व गोपालकृष्ण यांचें एकीकरण झालें होतें असें म्हणतां येत नाहीं.

**पांचरात्र किंवा भागवत धर्म.**—याप्रमाणें अर्वाचीन काळांतील वैष्णवपंथाच्या एका मुख्य अंगाचा आपण विचार केला. तथापि प्राचीन पांचरात्र धर्मांतील तत्त्वांच्या पायावर वैष्णव संप्रदायांतील ज्या कांहीं शाखा उभारल्या गेल्या आहेत त्यांत सदर अंग हा मोठासा महत्त्वाचा किंवा मुळींच महत्त्वाचा भाग नाहीं असें म्हटलें तरी चालेल. भगवद्गीतेंत सांगितलेला जो धर्म तो एकान्तिक धर्म हें मागें सांगितलेंच आहे. भक्तिमार्ग हा भगवद्गीता व पांचरात्र धर्म या दोहोंतहि सांगितला आहे; आणि पांचरात्र धर्मांत वासुदेव व त्याचे व्यूह यांची उपासनाहि सांगितलेली आहे. तथापि पांचरात्र व भगवद्गीतोपदिष्ट धर्म या दोहोंचा निकट व स्वाभाविक संबंध आहे असें दिसून येत नाहीं. सदर धर्म ख्रि. पू. तिसऱ्या शतकाच्या सुमारास रूढ होता हें शिलालेखांवरून व ग्रंथांवरून आपण ठरविलेंच आहे. या शिलालेखांत व ग्रंथांत गोपालकृष्णाविषयीं कांहीं उल्लेख नाहीं हें सयुक्तिकच आहे. अर्वाचीन वैष्णव संप्रदायाच्या रामानुज व माध्व यासारख्या कांहीं मतांत प्राचीन भागवत धर्मांतील तत्त्वांचा किंवा कल्पनांचा बराचसा आधार घेतला आहे व त्यांत गोपाल-कृष्ण किंवा त्याच्या कथा या वगळल्या आहेत. तथापि वैष्णव संप्रदायाच्या इतर शाखांत विशेषतः लोकांत पसरलेल्या वैष्णव संप्रदायांत त्या ( म्ह० गोपाल-कृष्ण व त्याच्या कथा ) अंगावर सामान्यपणें बराच भर दिलेला आढळून येतो.

**भागवत धर्माचे आधार.**—भागवतधर्माचा मुख्य आधारभूत पाया म्हणजे पंचरात्र संहिता हा होय. ब्रह्मसूत्रें २.२,३९-४२यांवरील आपल्या भाष्यांत रामानुजाचार्यांनीं यांपैकीं कांहीं संहितांतून आधार घेतले आहेत. त्या संहिता म्हणजे पौष्कर-संहिता, सात्वतसंहिता व परमसंहिता या होत. चतुर्विध आत्म्याची ब्राह्मण नेहमींच्या चार ( वासुदेव संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध ) नांवांनीं पूजा करतात

तेव्हां तें प्रमाणभूत मानलें जावें असें सांगण्यास पौष्कर संहितेंतून आधार घेतला आहे. सात्वतसंहिता सध्यां छापून तयार असून सर्वांस उपलब्ध आहे. या संहितेचा सारांश येणेंप्रमाणें आहे:—

**सात्वत संहितेचा सारांश.**—नारदमुनि मलय पर्वतावर परशुरामाचें दर्शन घ्यावयास गेले असतां परशुरामानें त्यांस श्रीहरीचें स्थान शोधून काढण्यांत निमग्न झालेल्या ऋषींस भेटून त्यांस सात्वत उपासनामार्गाचा उपदेश करावयास सांगितलें. नारदानें त्याप्रमाणें करून त्या ऋषींस आपला रहस्याम्नाय समजावून दिला. नारायण हा पुरुष, परमेश्वर किंवा परमात्मा होय असें या ठिकाणीं सांगितलें आहे. प्राचीन काळीं चक्रधारी वासुदेवानें संकर्षणानें विचारल्यावरून त्यास ही रहस्यविद्या समजावून सांगितली. त्रेतायुगाच्या आरंभीं विष्णूचा चेहरा लाल झालेला पाहून संकर्षणानें विष्णूस असें होण्याचें कारण विचारलें. तेव्हां, या युगांत लोक विषयी होतील म्हणून, असें विष्णूनें त्यास उत्तर दिलें. नंतर, त्यांची विषयांपासून सुटका कशी होईल, असा संकर्षणानें प्रश्न केल्यावरून त्यास उत्तर मिळालें कीं, सनातन व परमश्रेष्ठ अशा ब्रह्माची तीन प्रकारांनीं उपासना केल्यास त्यांची मुक्तता होईल. परमात्मा हा षड्गुणान्वित असून त्यास सर्वत्र हस्त, पाद, नेत्र वगैरे अवयव आहेत. तो सर्वांत पर म्हणजे श्रेष्ठ आहे. तो एकच असून सर्वांस आधारभूत आहे. याशिवाय त्याच्या आणखी तीन मूर्ती किंवा व्यूह आहेत, व त्यांपैकीं प्रत्येक व्यूह ज्ञान व इतर गुण या बाबतींत दुसऱ्याहून अगदीं भिन्न आहे. हे व्यूह ताबडतोब इष्टफलप्राप्ति करवून देतात.

उपासनेची पद्धत कशी असावी असें बलरामानें विचारल्यावरून भगवान् समजावून सांगतातः—

"सर्व विश्वाचें ध्येय जें शुद्ध ब्रह्म तें जेव्हां वासुदेवाची उपासना करणाऱ्या सदाचारसंपन्न ब्राह्मणांच्या हृदयांत वास करतें, तेव्हां त्यापासून ब्राह्मणांचें श्रेष्ठ उपनिषद् असें परमश्रेष्ठ शास्त्र जगदुद्धारार्थ निर्माण होऊन तें सर्वांस विवेक-शक्ति देतें. या शास्त्रांत बरेच ईश्वरी अगर दैवी मार्ग सांगितले असून ते अनुसरल्यास मोक्ष मिळतो. या शास्त्राचे अनेक प्रकार आहेत. अष्टांगी योगविद्या ज्यांनीं आचरिली आहे व ज्यांचें मन मानसयज्ञाच्या ठायीं रत झालें आहे, अशासच हें शास्त्र व रहस्यविद्या हीं फलदायी होतात. जे वेदांनां अनुसरून किंवा प्रमाण समजून चालतात, व अनेक देवतांची बाह्योपचारांनीं पूजा करण्याचें ज्यांनीं सोडून दिलें आहे, अशा ब्राह्मण योग्यांस अंतर्यामीं वास करणाऱ्या या एकमेवाद्वितीय ब्रह्माची मानसपूजा करण्याचा अधिकार आहे. क्षत्रिय, वैश्य व शूद्र या तीन वर्णांस व जे प्रपन्न म्हणजे गुरूला शरण गेलेले आहेत त्यांस चार व्यूहांची मंत्र म्हणून किंवा मंत्र न म्हणतां पूजा करण्याचा अधिकार आहे. हा त्यांचा अधिकार, चतुर्व्यूहांविषयीं जी विधिपरंपरा सांगितली आहे व विभव म्हणजे अवतार यांविषयीं जे मंत्र व विधी सांगितले आहेत तेवढ्यांपुरताच मर्यादित आहे. हे सर्व लोक सर्वसंगरहित, स्वकर्तव्यरत व कायावाङ्मनेंकरून परमेश्वराची भक्ति करणारे असे असावेत. याप्रमाणें चारी वर्ण लायक किंवा अधिकारी झाल्यावर त्यांस मंत्रोपदेश करण्यांत येतो. आतां एका व्यूहाच्या पूजेची पद्धत सांगतो ती ऐक."

यानंतर अक्षरांची गूढ मांडणी, मंत्र व मनन यांविषयीं वर्णन दिलें आहे. मंत्रांची निरनिराळ्या तऱ्हांनीं मांडणी करून पूजा करण्याचे गूढ मार्गच या ग्रंथांत सर्वत्र कथन केले आहेत. भीष्मपर्वांत ६६ व्या अध्यायाच्या शेवटीं संकर्षणानें वासुदेवाची सात्वत विधीप्रमाणें स्तुति केली, असा उल्लेख आहे. हे सात्वत विधी म्हणजे बहुतकरून सात्वत संहितेंत सांगितलेलेच विधी असावेत.

**शंकराचार्यकथित वासुदेवोपासनेचे पांच मार्ग.**—ब्रह्मसूत्र २.२,४२ या ठिकाणीं भागवत पंथाचा परामर्श घेतांना शंकराचार्यांनीं चतुर्विध व्यूहासहित भगवान् वासुदेवाची उपासना करण्याचे पांच मार्ग सांगितले आहेत. ते येणेंप्रमाणें:—(१) अभिगमन किंवा कायावाचामन हीं सर्व देवाच्या ठायीं एकवटून त्याच्या देवळांत जाणें; (२) उपादान किंवा पूजासाहित्य तयार करणें; (३) इज्या किंवा पूजा; (४) स्वाध्याय म्हणजे मंत्रपुरश्चरण किंवा जप; आणि (५) योग म्हणजे ध्यान. या पांच मार्गांनीं भगवंताची १०० वर्षें उपासना केल्यास, मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होऊन भगवंताप्रत जातो असें तेथें म्हटलें आहे.

**नारद पंचरात्रसंहितेंतील ज्ञानामृतसार.**—ही संहिता एशिआटिक सोसायटी ऑफ बंगालनें प्रसिद्ध केलेली असून बाल-देव कृष्णाच्या लीलांचें वर्णन सदर संहितेंत आहे. कृष्णाचा मोठेपणा व त्याच्या उपासनेचा मार्ग समजावून घेण्याची नारदांस इच्छा झाली असतां, 'शंकराकडे जा म्हणजे ते तुम्हास सांगतील' असें त्यांस सांगण्यांत आलें. त्यावरून नारदांनीं कैलास पर्वतावर शंकराच्या सप्तद्वारांनीं युक्त अशा राजवाड्यांत प्रवेश केला. या सात दारांशीं, गोपीवस्त्रहरण, कालियामर्दन, गोवर्धन पर्वतास तळहातावर उचलून धरणें, वगैरे कृष्णाच्या गोकुळांतील लीलांच्या तसबिरी व कोरून काढलेलीं चित्रें होतीं. जोधपुराजवळील मंदोड या गांवीं जमीन उकरतांना एक स्तंभ सांपडला आहे. त्यावर वरीलपैकीं कांहीं गोष्टींचीं खोदून काढलेलीं चित्रें आहेत [आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया, वार्षिक अहवाल १९०५-६, पृ. १३५]. सदर स्तंभ इसवी सनाच्या चौथ्या शतकाच्या आधींचा नसावा असें ठरविण्यांत आलें आहे. शंकराच्या राजवाड्याच्या दारावर अशीं चित्रें असावीत ही कल्पना दारावर किंवा खांबावर चित्रें काढण्याची चाल प्रचारांत आल्यावरच निघाली

असलें पाहिजे; व यावरून ज्ञानामृतसार ही संहिता चौथ्या शतकाच्या पूर्वीची तरी खास नसावी असें प्रतिपादण्यांत येतें. ती या काळाच्या बरीच नंतरची आहे हें खालील विवेचनावरून समजून येईल.

या संहितेप्रमाणें गोलोक हा कृष्ण ज्यांत वास करतो असा स्वर्ग असून कृष्णाचे भक्त या स्वर्गांप्रत जातात. या संहितेंत पुष्कळ मंत्र दिले असून ते म्हणणारास वरील गोलोकांत स्थान मिळतें. या ग्रंथाप्रमाणें पाहतां भक्तीच्या द्वारें हरीची सेवा करणें किंवा त्याचा दास होऊन राहणें हीच परम मुक्ति होय. श्रीहरीची उपासना करण्याचे सहा मार्ग यांत सांगितले आहेत. (१) स्मरण, (२) कीर्तन, (३) वन्दन, (४) पादसेवन, (५) भक्तियुक्त सतत पूजनअर्चन व (६) आत्मनिवेदन हे ते मार्ग होत. भागवत पुराणांत श्रवण, सेवा व सख्य या तिहींची आणखी भर घातली आहे. कृष्णाच्या आवडत्या स्त्रियांत राधा ही सर्वांत श्रेष्ठ होय, व परमात्म्यानें पुरुष व प्रकृति असें जें आपलें द्विधा स्वरूप केलें त्यापैकीं प्रकृति ही राधा होय, असें या संहितेंत म्हटलें आहे. स्त्रियांचा दर्जा वाढविणें हें या संहितेचें एक प्रधान अंग दिसतें. पांचरात्र धर्मांतील व्यूहांचा उल्लेख या संहितेंत नाहीं. वल्लभाचार्यांनीं ज्या मताचा प्रसार केला तें मत अगदीं या संहितेंतील मताप्रमाणेंच आहे. तेव्हां ही संहिता वल्लभाचार्यांच्या कांहीं काळ आधीं म्हणजे सोळाव्या शतकाच्या सुमारास लिहिली गेली असावी. रामानुजपंथी लोक ही संहिता मुळींच प्रमाण म्हणून समजत नाहींत.

**विष्णूचे किंवा नारायणाचे अवतार.**—दोन देवांचें एकीकरण व एखाद्या देवाचा अवतार या दोहोंत मुख्य फरक हा आहे कीं, अवतार घेणारा देव मानवाप्रमाणें किंवा पशूप्रमाणें आचरण करतो; पण त्याच्या अंगीं अद्भुत दैवी शक्ति असते. एकीकरणाच्या कल्पनेपासून अवताराची कल्पना हें अवस्थांतर होणें साहजिक आहे. अवताराच्या कल्पनेंत देह सामान्य जनासारखा व आंतील बुद्धि मात्र ईश्वरी हा अर्थ येतो.

विष्णूचे किंवा नारायणाचे अवतार निरनिराळ्या ग्रंथांतून निरनिराळे सांगितले आहेत. नारायणीय आख्यानांत एके ठिकाणीं फक्त सहाच अवतार सांगितले आहेत. ते येणेंप्रमाणें: वराह, नृसिंह, वामन, भार्गव राम, दाशरथि राम व कृष्ण (कंसवधार्थ धारण केलेला). यानंतर त्याच आख्यानांत दुसऱ्या एका ठिकाणीं दशावतार सांगितले आहेत. हंस, कूर्म व मत्स्य हे आरंभीं आणि कल्की हा शेवटीं असे चार, व प्रथम सांगितलेले सहा मध्यें, येणेंप्रमाणें हे दहा अवतार आहेत. कल्कीच्या आधींचा सात्वत म्हणजे वासुदेव-कृष्णाचा अवतार आहे. तेव्हां दुसऱ्या ठिकाणचा हा उतारा दशावतारांची कल्पना निघाल्यानंतर घुसडून दिलेला असावा. हरिवंशांत प्रथम सांगितलेले सहा अवतार आढळतात. वायुपुराणांत अवतारांबद्दल दोन ठिकाणीं उल्लेख आले आहेत. पहिल्या ठिकाणीं बारा अवतार सांगितले आहेत, पण यांपैकीं कांहीं शिवाचे व इन्द्राचे अवतार आहेत. दुसऱ्या ठिकाणीं दहा अवतार सांगितले आहेत. त्यांत वर सांगितलेले सहा आणि दत्तात्रेय, एक नांवरहित, वेदव्यास व कल्की हे चार येतात. वराहपुराणांत सर्वांच्या परिचयाचे असे दहा अवतार सांगितले आहेत; म्हणजे वर सांगितलेले सहा व मत्स्य, कूर्म, बुद्ध व कल्की हे चार मिळून दहा. अग्निपुराणांतहि हेच दहा सांगितले आहेत. भागवत पुराणांत तीन ठिकाणीं अवतारांची संख्या दिली आहे. पहिल्या ठिकाणीं २२ (प्रथम स्कंध, अ. ३), दुसऱ्या ठिकाणीं २३ (द्वितीय स्कंध, अ. ७) व तिसऱ्या ठिकाणीं १६ (एकादश स्कंध, अ. ४) अवतार सांगितले आहेत. या पुराणांत सांगितलेल्या अवतारांत सनत्कुमार, नारद, कपिल, दत्तात्रेय, ऋषभ व धन्वन्तरि हेहि दिले आहेत हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. या सर्व अवतारांपैकीं दत्तात्रेय व राम यांचीच उपासना समाजांत जास्त प्रमाणांत पसरली आहे. बाकीच्या अवतारांच्या उपासनेचा प्रसार बहुतेक कोठेंच झालेला दिसत नाहीं. कृष्णावतार या अवतारांत येत असला तरी तो अगदीं स्वतंत्र आहे. त्याची भक्ति किंवा उपासना सर्वत्र पसरली आहे याचें कारण तो अवतारी पुरुष समजला जातो हें नसून सात्वत लोकांत प्रथम उदय पावलेल्या अशा एका नवीन पंथाचे अनुयायी ज्यास अतिशय भक्तिभावानें भजतात असा एक तो विशिष्ट देव आहे हें होय.

---

## प्रकरण ७ वें.

### बुद्धजन्मकालीन वैचारिक चळवळ.

**ज्ञानकांड व कर्मकांड यांतील संबंध.**—मागच्या प्रकरणांत वासुदेवप्रणीत नारायणीय धर्माचा उद्गम दिला आहे. हा विचारसंप्रदाय उपनिषन्मूलक तथापि श्रौत धर्माशीं अविरुद्ध आहे, अशी भावना सर्वत्र असल्यामुळें तो बराच टिकला. परंतु तो टिकण्याचें कारण एवढेंच नाहीं. देशांतील राजघराण्यांचे इतिहास व सूतसंस्कृतीच्या कर्तृत्वाचें संहितीकरण श्रौत धर्मापासून वासुदेव धर्माकडे प्रयाण करणाऱ्या समुच्चयाकडून झालें ही गोष्ट या धर्माच्या लोकप्रियतेस तितकीच कारणीभूत झाली. त्या वेळेस दुसरे अनेक संप्रदाय प्रचलित होतेच. वेदकालीं ज्या देवता आपणांस दृष्टीस पडतात त्या सर्व एकदम मृत झाल्या नाहींत. सर्व देवतांपैकीं कांहीं देवतांस प्रामुख्य देऊन इतरांस बाजूस ठेवावयाचें ही क्रिया श्रौत धर्मांत झाली. ब्रह्माचें—म्हणजे विश्वव्यापी तत्त्वाचें—प्रामुख्य गाऊन सर्वच देवतांस तेजोहीन करावयाचें ही ज्ञानकांडाची पद्धत होय. परंतु निराकार निर्गुण ब्रह्माचें तत्त्व सर्व लोकांस पचण्यासारखें नव्हतें; त्यामुळें ज्ञानकांडांतील बहुतेक तत्त्व मान्य करून, परंतु सर्वव्यापी ईश्वरास भौतिक स्वरूप

देऊन, लोकांच्या मनांतील पारमार्थिक भावनेस उत्तेजन देणारें नारायणीय धर्माचें स्वरूप अस्तित्वांत आलें. तथापि अनेक दैवतांची पूजा चालूच होती, आणि दुसऱ्या प्रकारचे नीतिविषयक विचारहि चालू होते. त्या विचारांचें स्वरूप उपनिषदांत तसेंच महाभारतांत दिसून येत आहे. त्या विचारसंप्रदायांपैकीं ज्या संप्रदायांनीं शिष्य गोळा करणें; द्रव्य जमाविणें, आचार्यपद स्थापन करणें इत्यादि खटपटी केल्या आणि विद्वान् लोकांस वगळून सामान्यांस प्राकृत वाङ्मयानें आपल्याकडे ओढण्याची खटपट केली, त्यांचें स्वतंत्र वाङ्मयामुळें, आचार्यपरंपरांमुळें व अनुयायांच्या ब्राह्मणेतरत्वामुळें पृथक्त्व राहिलें. असे संप्रदाय जैन व बौद्ध हे होत.

**जग व ईश्वर यांच्या संबंधीं विचारांचा मोकळेपणा.**—बौद्धांनीं बुद्धाच्या संवादांत अनेक पाखंड मतांचा उल्लेख केला आहे. त्या पाखंडांपैकीं, बहुतेक पाखंडें त्या वेळेस प्रसिद्ध मतें म्हणून अस्तित्वांत असलीं पाहिजेत. त्यांचें अस्तित्व, त्या काळीं जग व ईश्वर यांच्या संबंधाच्या प्रश्नांवर किती मोकळेपणानें विचार होत असे हें दाखवितें. त्या पाखंडांचें स्वरूप लक्षांत येण्यासाठीं ब्रह्मजाल सुत्तांतील एक उतारा संक्षेपानें येथें देतों.

"बांधवहो, कित्येक यती व ब्राह्मण आपणांस अंतातिक म्हणवितात; आणि जगाच्या मर्यादित्वासंबंधानें किंवा अमर्यादित्वासंबंधानें चार विचार व्यक्त करतात............ ते म्हणतात जग मर्यादित आहे; इतकें कीं, त्याच्या भोंवतालचा मार्ग निश्चित करतां येईल, आणि तो कां, तर मी आपल्या अंतर्दृष्टीनें सांगूं शकतों म्हणून.........आणि दुसरे तसा मार्ग निश्चित करणें अशक्य आहे असें म्हणून पहिल्या मतास चूक म्हणतात......कित्येक असें म्हणतात कीं, जग ऊर्ध्व दिशेनें व अधो दिशेनें मर्यादित आहे. पण त्याच्या विस्तृततेला मर्यादा नाहीं. चौथ्या प्रकारचे ब्राह्मण किंवा यती तर्कटें रचणारे आहेत. ते म्हणतात कीं, जग हें समर्याद आहे तरी अमर्याद आहे, आणि आपआपल्या मतांचें तर्कटी समर्थन करतात. यांतलेच कित्येक म्हणतात कीं, तें समर्यादहि नाहीं आणि अमर्यादहि नाहीं.........

"अनेक यती व ब्राह्मण उलटपालट करणाऱ्या सापसुरळीप्रमाणें द्वयर्थी बोलण्याला संवकले आहेत. त्यांचें द्वयर्थी बोलणें चार प्रकारचें आहे. ते म्हणतात कीं, चांगलें अगर वाईट असें वस्तुतः कांहींच नाहीं. जेव्हां मी एखादें चांगलें किंवा वाईट म्हणतों तेव्हां मी आपली इच्छा अगर द्वेष व्यक्त करतों एवढेंच. त्यांना कोणत्याहि गोष्टीविषयीं प्रश्न विचारला म्हणजे ते म्हणूं लागतात कीं, मी तुम्हांस चूक म्हणत नाहीं किंवा बरोबरहि म्हणत नाहीं."

गौतमाच्या दृष्टीनें ठरलेल्या या योग्यायोग्य मूढांच्या पुढील पायऱ्या गौतम अशा वर्णन करतोः—"ते म्हणतात, मीं मत देण्यानें ( मताविषयीं अभिमान उद्भून ) विकारवश होईन आणि त्यामुळें मी दुःखाचें अगर खेदाचें स्थान होईन. पण तें मला नको, व म्हणून मी निर्णय देऊं इच्छित नाहीं.

"मूढांचा तिसरा प्रकार असाः कांहीं ब्राह्मण हुषार, बारीक सूक्ष्म भेद काढण्यांत पटाईत, वितंडवादांत कुशल आणि दुसऱ्याच्या विचारसरणीचे तुकडे पाडीत हिंडणारे आहेत. मीं कोणतेंहि विधान केलें तर ते त्याचीं कारणें मागतील आणि माझ्या चुका दाखवून देतील. मग मला त्यांचें उत्तर देतां येणार नाहीं. आणि त्यामुळें मला दुःख होईल. तें दुःख माझ्या प्रगतीस विघातक होईल, म्हणून या वादविवादास भिऊन मी योग्यायोग्य काय हें सांगत नाहीं.

"यतींचा आणि ब्राह्मणांचा आणखी एक ( चवथा ) मूढ वर्ग आहे. तो म्हणतो, तुम्ही मला जर विचाराल कीं परलोक आहे कीं काय, आणि तो आहे असें जर मला वाटत असेल, तर तो आहे म्हणून मी म्हणेन; पण मी तर तसें म्हणत नाहीं. माझें मत अमुक आहे किंवा तमुक आहे असें मी म्हणत नाहीं आणि तें निराळें आहे असेंहि म्हणत नाहीं. परलोक नाहीं असें म्हणत नाहीं आणि आहे म्हणणारांचा निषेधहि करीत नाहीं. असें म्हणून ते खालीलप्रमाणें प्रत्येक विधानाला द्विधा उत्तर देतातः—

अ ( १ ) परलोक आहे.
( २ ) परलोक नाहीं.
( ३ ) परलोक आहे आणि नाहीं दोन्हीहि.
( ४ ) परलोक नाहीं व नाहीं असेंहि नाहीं.

ब ( १ ) कांहीं आकस्मिक जीव आहेत ( कारण ते या लोकांत किंवा परलोकांत आईबापांशिवाय म्हणजे कारणांवाचून जन्मास येतात ).
( २ ) असे आकस्मिक जीव नाहींत.
( ३ ) असे जीव आहेत व नाहींतहि.
( ४ ) असे जीव नाहींत, व नाहींत असेंहि नाहीं.

क ( १ ) फल असतें व तें सत्कृत्य अगर दुष्कृत्य यांच्या परिणामामुळें उत्पन्न होतें.
( २ ) फल नसतें.
( ३ ) फल असतें व नसतेंहि.
( ४ ) फल नसतें व नसतें असेंहि नाहीं.

ड ( १ ) तथागत (जो मनुष्य सत्यापर्यंत पोहोंचतो तो ) मरणोत्तरहि अस्तित्वांत असतो.
( २ ) तो तसा नसतो.
( ३ ) तो असतो व नसतोहि.
( ४ ) तो नसतो, व नसतो असेंहि नाहीं."

**आजीविक नांवाचा भिक्षूंचा पंथ.**—त्या वेळेस जैन, बौद्ध आणि भागवत संप्रदायांशिवाय आणि श्रौत धर्माच्या अनुयायांशिवाय दुसरा एखादा संप्रदाय प्रचलित होता किंवा काय हा एक प्रश्न आहे. असें शक्य आहे कीं, कांहीं प्रचलित संप्रदायांचीं मुळें त्या काळांतलीं असतील. तंत्र ग्रंथांचें मूळहि वैदिक कालांत किंवा उपनिषत्कालांत सांपडेल. बौद्ध व इतर ग्रंथांत आजीविक म्हणून एक संप्रदाय दृष्टीस पडतो.

तो संप्रदाय नारायणीय होता कीं नव्हता याविषयीं मत-भेद आहे. या विषयांवरील भिन्न मतें येथें मांडलीं असतां काम भागण्यासारखें आहे.

याविषयीं प्रो. काशीनाथ बाळकृष्ण पाठक इंडियन अँटिक्वरि पु. ४१ मध्यें येणेंप्रमाणें लिहितातः—

आजीविक हा शब्द अजीव ह्यापासून झालेला आहे.आत्म्यास अस्तित्व नाहीं असें या पंथाचे अनुयायी मानतात. बौद्ध सम्राट् अशोक व त्याचा नातू दशरथ ह्यानें ह्या पंथाला कांहीं लेण्यां अर्पण केलीं होतीं. व्हिन्सेन्ट स्मिथ म्हणतो कीं ( अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया, पृ. १५६ ),ह्या पंथाचे लोक नग्न फिरत असत व त्यांचे पंथविषयक आचार फार कडक असत.स्मिथच्या मतें आजीविकांचा संबंध बौद्धांशीं नसून जैनांशीं होता.

प्रख्यात दिगंबर जैन ग्रंथकर्ता वीरनन्दि यानें शके १०७६त श्रीमुख संवत्सरीं "आचारसार" नांवाचा ग्रंथ रचला [ मूळ ग्रंथ पद्यांत असून त्याची कन्नड टीका गद्यांत आहे ]. ज्या काळीं दक्षिण हिंदुस्थानांत बौद्ध पंथ प्रचलित होता त्या काळीं वीरनन्दि होऊन गेला. आचारसारांत बौद्ध पंथाचा पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आलेला आहे (३.४६;५९). त्यावरून स्पष्ट दिसतें कीं, शके १०७६ त कानडी देशांत बुद्धाचे पुष्कळ अनुयायी होते. आचारसारांत एके ठिकाणीं आजीविकांचा उल्लेख केलेला आहे [ परिव्राड् ब्रह्मकल्पान्तं यात्युग्राचारवानपि आजीविकाःसहस्रार(?) कल्पान्तं दर्शनोज्झितः॥११.१२७] तेथील लिहिण्यावरून असें दिसतें कीं, त्याच्या काळीं आजीवक [ याचें शुद्ध रूप आजीविक असें आहे ] नांवाच्या बौद्ध भिक्षूंचा एक वजनदार पंथ होता; हे लोक कांजीवर रहात असत व आपल्या पंथाच्या कडक आचारांचें अनुसरण करून समकालीन जैनांनां आश्चर्य वाटावयाला लावीत.

आचारसाराच्या कागदावरील हस्तलिखित प्रती दोन आहेत. एक कोल्हापूर येथील लक्ष्मीसेन मठाची आहे. तिच्यावरील काल शके १६९२ हा आहे. दुसरी प्रत कोल्हापूर संस्थानांतील शिरोळ येथील जैन समाजाच्या ताब्यांत असून शके १६६६॰त अनन्तमति नांवाच्या प्रसिद्ध जोगिणीनें ती नक्कल केलेली आहे. दोन्हीं हस्तलिखित प्रती जुन्या कानडी लिपींत लिहिलेल्या असून त्यांत 'आजीवक' हें रूप आढळतें. कांजिकादि भोजनाला माधवचंद्राचा आधार आहे [ त्रिलोकसाराच्या ५४५ व्या गाथेवरील माधवचंद्राची टीका पहा].

'माघनन्दिश्रावकाचार' हा ग्रंथ १३ व्या शतकाच्या मध्यकालीं रचलेला आहे. त्यांत असें म्हटलें आहे कीं, बौद्ध मांसभक्षक आहेत व 'पात्रे पतितं पवित्रम्' या न्यायानें ते आपला आचार निर्दोष आहे असें ठरवितात (प्रकरण ६, शिरोळ हस्तलिखित, पृ. ७१४ ब ). त्याच ग्रंथांत आजीविकांविषयीं असें म्हटलें आहे कीं, अच्युतकल्प नामक स्वर्गांत कनिष्ठ प्रतीचे देव म्हणून त्यांचा जन्म होईल. पद्मप्रभाचेंहि मत असेंच आहे ( विंशति प्ररूपाणि शेवटचें प्रकरण पहा ). पद्मप्रभ त्रैविद्यानें माघनन्दि श्रावकाचारांतील उतारे वारंवार दिले असल्यामुळें तो १३ व्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला असावा.

सारांश,उत्तरकालीन चालुक्य व यादव यांच्या काळच्या जैन ग्रंथकारांनां आजीविक लोक हा मुख्यत्वेंकरून कांजीवर राहणारा बौद्ध भिक्षूंचा पंथ म्हणून माहीत होता.

यावर संपादक प्रो. देवदत्त भांडारकर लिहितातः—

"ह्या पंथावरील माझ्या एका लेखांत (जर्नल बाँबे एशियाटिक सोसायटी, पु. २१, पृ. ४०३ – ५ ) मी आजीविकांचे सर्व उल्लेख एकत्र केलेले आहेत. प्रो. पाठकांनीं दाखविल्याप्रमाणें जैनांनीं त्यांनां बौद्ध भिक्षूंचा पंथ म्हटलेलें आहे, परंतु बौद्धांनीं देखील त्यांनां 'निर्ग्रन्थ' म्हणून म्हटलें आहे असें दिसतें. कारण, 'दिव्यावदानांत' एकदां 'निर्ग्रन्थां'चा प्रत्यक्ष आजीवक असा उल्लेख केलेला आहे ( कॉवेल अँड नील, पृ. ४२७ ). वस्तुस्थिति अशी आहे कीं, बऱ्याच उत्तरकालीं देखील ते बौद्ध किंवा जैन यांपैकीं कोणांतच मोडत नसून त्यांचा एक वेगळाच पंथ होता. प्रो. हुल्टशनें 'दक्षिण हिंदुस्थानांतील अंकित लेखां' पैकीं कांहीं लेखांत उल्लेख केलेल्या आजीविकांनां जैन असें मानिलें आहे ( साउथ इंडियन इन्स्क्रिप्शन्स, पुस्तक १, पृ. ८८, ८९, ९२ व १०८) तें बरोबर नाहीं."

**आजीविक हे वैष्णव आहेत काय.**—अशोकाच्या स्तंभावरील सातव्या आदेशांत, जैनांच्या संप्रदायग्रंथांत व बौद्ध संप्रदायग्रंथांत आजीविकांचा उल्लेख आलेला आहे. ह्या तिन्ही ठिकाणचे आजीविक एकच आहेत असें बऱ्याच काळापासून संमत आहे. प्रो. कर्नच्या मतें आजीविक हा वैष्णवांचा एक पोटभेद असून ते नारायणाची पूजा करणाऱ्या प्राचीन तपस्व्यांच्या एका पंथाचे आहेत. प्रो. बुहलरनें ह्याच मताचा अनुवाद करून प्रो. कर्नच्या मताचें विवरण केलेलें आहे (बराबर व नागार्जुनाचा डोंगर येथील लेण्यांतल्या अशोक व दशरथ यांच्या शिलालेखांवर निबंध, जर्नल बाँबे एशियाटिक सोसायटी पु. २०,पृ. ३६२ ). आपल्या शिलालेखांतील आजीविक व अशोकाच्या सातव्या स्तंभादेशांतील आजीविक हे एकच आहेत असें प्रो. कर्न गृहीत धरतो, व 'ब्राह्मणी आजीविकांशीं धर्ममहामात्रांचा संबंध राहील ही स्तंभावरील आदेशांतून मिळालेली माहिती व आजीविकांविषयीं उत्पलानें केलेलीं विधानें (वराहमिहिर, बृहज्जातक १५. १ व त्यावरील उत्पलाची टीका पहा) एकत्र करतो. आजीविक हे नारायणाश्रित आहेत असें विधान करून त्याला कालकाचार्यांचा व कालकसंहितेंतलि वचनांचा आधार उत्पलानें दिलेला आहे. कालकाचार्य पांचव्या शतकांतला असल्यामुळें त्याचें प्रामाण्य महत्वाचें आहे. कालकाचार्यांनीं आजीविक ह्याचा अर्थ एकदंडी असा दिलेला आहे. कालकसंहितेंतला आधार उत्पलानें 'केशवमार्गदीक्षितः केशवभक्तो भागवत इत्यर्थः' असा दिला आहे.

म्हणून प्रो. कर्न व प्रो. बुह्लर त्यांच्या मतें आजीविक हे वैष्णव आहेत.

हें प्रो. कर्न साहेबांचें मत बरोबर नाहीं असें रा. दे. रा. भांडारकर खालीलप्रमाणें दाखवितातः—

उत्पलाच्या टीकेंतला उतारा पुढें दिल्याप्रमाणें आहेः—

"अत्र वृद्धश्रावकग्रहणं महेश्वराश्रितानां प्रव्रज्याना-,
मुपलक्षणम् । आजीविकग्रहणं'च' नारायणाश्रितानाम् ॥"

येथें 'च' कडे दुर्लक्ष्य केल्यामुळें प्रो. कर्नचा गैरसमज झालेला आहे. आजीविक शब्दाचा अर्थ नारायणाश्रित नव्हे, तर आजीविक हा शब्द नारायणाश्रितांचें उपलक्षण आहे. कोणत्या ज्योतिःशास्त्रविषयक परिस्थितींत मनुष्य संन्याशी बनतो व त्या विशिष्ट वेळीं त्याचें विशिष्ट पंथनाम काय असतें याविषयीं उल्लेख वराहमिहिरानें केला आहे. उत्पलानें असें दाखविलें आहे कीं, वराहमिहिराच्या विधानाला कालकाचार्यांचा आधार आहे, व म्हणून कालकाचार्यांनीं दिलेल्या संज्ञा वराहमिहिराच्या संज्ञांशीं जुळल्या पाहिजेत. ही पद्धति कितपत बरोबर आहे हें तज्ज्ञांनीं ठरवावें. म्हणून वृद्धश्रावक व आजीविक यांचा अर्थ कापालिक व एकदण्डी आहे असें उत्पल म्हणतो. कालकाचार्यांच्या दुसऱ्या एका पद्यांत त्या ज्योतिःशास्त्रविषयक परिस्थिती व संज्ञा दिलेल्या आहेत, त्यांत व मूळच्या कालकाचार्यांच्या पद्यांत दोन ठिकाणीं फरक आहे. त्या ठिकाणीं, वराहमिहिराची संज्ञा व कालकाचार्यांच्या दोन पद्यांतील दोन वेगळ्या संज्ञा येणेप्रमाणें:—

| उच्चस्थानीं असणारा ग्रह. | कालकाचार्यांच्या संज्ञा | | वराहमिहिराच्या संज्ञा |
|---|---|---|---|
| | १ | २ | |
| चंद्र | कापालिक | हरभक्त अथवा महेश्वराश्रित | वृद्ध श्रावक |
| बुध | एकदण्डी | केशवभक्त अथवा नारायणाश्रित | आजीविक |

यासाठीं उत्पल म्हणतो कीं, वृद्ध श्रावक व आजीविक हे शब्द महेश्वराश्रित व नारायणाश्रित दर्शविण्याकरितां फक्त उपलक्षण आहेत. म्हणून उत्पलाच्या मतें, आजीविक याचा नारायणाश्रित, केशवभक्त अथवा भागवत असा अर्थ नव्हे, तर तो शब्द फक्त हे शब्द सुचवितो. कालकाचार्यांचेंहि मत उत्पलाप्रमाणेंच आहे. अर्थात् प्रो. कर्न व प्रो. बुह्लर यांनीं दिलेली उपपत्ति साधार नाहीं.

**आजीविकांविषयीं कांहीं अधिक माहिती.**— या पंथाविषयीं कांहीं अधिक माहिती रा. दे. रा. भांडारकर यांनीं दिली आहे ती अशीः—

ह्या मठाश्रयी पंथाचे संस्थापक नंद-वच्छ, किससंकिच्छ व मखली गोशाल हे होते. मखली गोशाल हा बौद्ध संप्रदायग्रंथांत दिलेल्या सहा आचार्यांपैकीं एक होता. बुद्धघोष सांगतो कीं [रॉयल एशियाटिक सोसायटीचें १८९८सालचें नियतकालिक पृ. १९७], आजीविक हा 'नग्गपब्बजितो' आहे. आजीविकांचें 'अचेल' म्हणजे वस्त्ररहित असें वर्णन केलेलें आहे (जातक १. ३९०). विनयपिटकावरून असेंच दिसून येतें (एतद्विषयक एक गोष्ट महावग्ग ८. १५, २-६ मध्यें व दुसरी निसग्गिय ६. २ मध्यें आहे).

आजीविक आपलीं शरीरें धुळीनें माखीत व गोवराची विष्टा खात असत (जातक १. ३९०). त्यांचे धार्मिक आचार फार कष्टदायक व कडक असत (जातक १.४९३ व ऱ्हीस डेव्हिड्सचे बुद्धसंवाद, पु. १, पृ. २२७ व पुढील पानें आणि जातक ३. ५४२ पहा). न-अत्थि कम्मम्, न-अत्थि किरियम्, न अत्थि विरियन्-ति हें त्यांचें मत होतें (अंगुत्तर-निकाय, पु. १, पृ. २८६ व त्याचप्रमाणें ऱ्हीस डेव्हिड्सचे बुद्धसंवाद पु. १, पृ. ७१ व पुढील पानें पहा), व ते पूर्ण दैववादी होते.

बुद्धसंप्रदायाचा उदय होण्यापूर्वीं बराच काळ आजीविक अस्तित्वांत होते. बुद्धाच्या काळीं मक्खली गोशाल हा त्यांचा प्रसिद्ध मतवादी होता. पहिले दोन आचार्य नन्दवच्छ व किस-संकिच्छ हे होते, व मक्खली गोशाल हा तिसरा आचार्य होता. मौर्य कालांत त्यांना महत्त्व आलें असावें असें दिसतें. बराबर व नागार्जुनी लेण्यांतील शिलालेखांवरून असें दिसतें कीं, अशोक व त्याचा नातू दशरथ ह्यांनीं हीं लेणी कोरून ह्यांनां तीं अर्पण केलीं. धर्ममहामात्रांनां ज्यांच्याशीं संबंध ठेवण्याला त्यानें आज्ञा केली होती त्या पंथासंबंधांत आजीविकांचाहि उल्लेख केलेला आढळून येतो (एपिग्राफिआ इंडिका, पु. २, पृ. २७२). नंतर वराहमिहिराच्या कालापर्यंत (अजमासें इ. स. ५२५) आपणांला यांची कांहीं माहिती कळत नाहीं. वराहमिहिरानें त्यांचा बृहज्जातकांत उल्लेख केलेला आहे. कुमारदासाच्या (इ. स. ७२५) 'जानकीहरणां-तहि त्यांचा उल्लेख आढळून येतो. मद्रास इलाख्यांतील व १३ व्या शतकाच्या प्रथमार्धांतील कांहीं शिलालेखांत आजीविकांवर बसविलेल्या एका विशिष्ट कराचा उल्लेख आहे (साउथ इंडियन इन्स्क्रिप्शन्स, पु. १, पृ. ८८, ८९, ९२ व १०८). १३ व्या शतकापर्यंत त्यांच्या अस्तित्वाचा पुरावा सांपडत नाहीं या समजुतीनें कदाचित् प्रो. हुल्ट्श, त्यांनां जैन समजला असेल, परंतु हें मत निराधार आहे असें प्रो. पाठकांनीं दाखविलें आहे (इं. अँ. पु. ४१, पृ. ८९).

अमरकोशांत पांच प्रकारचे संन्याशी सांगितले आहेत. त्यांत 'मस्करिन्' यांचा उल्लेख केलेला आहे. पाणिनीच्या सूत्रांत (६. १, १५४) 'मस्करिन्' चा एक अर्थ परि-

प्राजक असो दिलेला आहे. ह्या सूत्रावरची पतञ्जलीची टीका, काशिका टीका व पतञ्जलीच्या महाभाष्यावरील कैयटाचा प्रदीप यांत 'मस्करिन्' असें कांहीं लोकांनां म्हणण्याचें कारण असें दिलें आहे कीं, ते लोक सर्व कर्मांच्या विरुद्ध होते. व शांति हेंच त्यांचें इष्ट ध्येय होतें. ह्या प्रकारचें मत धारण करणारा पंथ आजीविकांचाच होता ( दीघ निकायांतील सामञ्ञ फलसुत्त ). गोशाल याला बौद्ध ग्रंथांत मखली असें म्हटलें आहे. मखली (मक्खली) हें 'मस्करिन्' चें पाली रूप होय. शिवाय जानकी-हरणांत व भट्टिकाव्यांत (सर्ग ५, श्लोक ६१-६३ ) मस्करिन् शब्दाचा उपयोग आजीविक ह्या अर्थी प्रत्यक्ष केलेला आहे.

भट्टिकाव्यांत याच ठिकाणीं शेंडी अथवा जटा वाढविणें हेंहि आजीविकाचें एक चिन्ह दिलेलें आहे. म्हणून मल्लीनाथ त्यांनां त्रिदंडी म्हणतो. हें वर्णन जानकीहरणांतील 'उत्तुंगजटा' शीं जुळतें असल्यामुळें आजीविक हा त्रिदंडी असला पाहिजे,उत्पल म्हणतो तसा एकदंडी नसावा.

यासंबंधीं गोविंदाचार्यस्वामी यांनीं दोन मुद्दे पुढें आणले आहेत. ते येणें प्रमाणें ( इं. अँ. पु. २३, पृ. २४ ).

( १ ) वैखानसाच्या धर्मसूत्रावरून, प्रो. कर्ननें ( अथवा कालकाचार्य आणि उत्पल यांनीं ) आजीविक व भागवत हे एक आहेत असें जें म्हटलेलें आहे तें बरोबर आहे.

( २ ) भागवतांची उत्पत्ति फार प्राचीन काळीं झाली, ह्याविषयीं बौद्ध ग्रंथांत पुरावे आढळून येतात ( सद्धर्म पुंडरीक, एच. कर्नभाषांतरित पृ. ३९७ पहा ). ब्राह्मणांच्या ग्रंथांतील सूचक उल्लेखांवरूनहि या पुराव्यांनांच दुजोरा मिळतो. याप्रमाणें आजीविकांबद्दल निरनिराळीं मतें व्यक्त झालीं आहेत. असो.

**यज्ञसंस्थेविरुद्ध बंड करण्यांत प्रमुख स्थान कोणाला.**— उपनिषदांतील विचार ही विशिष्ट विचारपद्धति नसून निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या कवींनीं व्यक्त केलेले विचार आहेत हें मागें सांगितलेंच आहे. औपनिषद विचारांचा भर यज्ञसंस्थेच्या सामान्यतः विरुद्ध आहे. जैनमत आणि बौद्धमत यांत ब्राह्मणी विचारांस किंवा विचारपरंपरेस विरुद्ध असें कांहीं नाहीं. ज्या प्रकारचे विचार उपनिषदांनीं व्यक्त केले त्या प्रकारचेच जैनांनीं आणि गौतमानें व्यक्त केले आहेत. तथापि जैनमत आणि बौद्धमत यांस ब्राह्मणी यज्ञसंस्थेच्या विरुद्ध बंड करणाऱ्यांत प्रमुख्यानें स्थान देतां येणार नाहीं. यज्ञसंस्थेविरुद्ध बुद्धजन्मकाळीं बंड करण्यांत तात्पर्यच नव्हतें. कारण त्या काळीं आजच्या काळापेक्षां अधिक यज्ञ होत असावेत असें वाटत नाहीं. संहितीकरणाचा काळ तोच यज्ञसंस्थाविनाशाचा काळ होता. यज्ञसंस्थेपासून परावृत्त करून लोकांस ज्ञानमार्गानें नेण्याचें श्रेय आरण्यकीय ब्रह्मवेत्त्यांस दिलें पाहिजे. महावीर व बुद्ध यांस जर कांहीं श्रेय द्यावयाचेंच असेल, तर तें शत्रूचें डोकें अगोदरच कोणीं कापून नेल्यानंतर त्याचे हातपाय कापून काढणाऱ्या वीराचें श्रेय देतां येईल. जैन व बौद्ध संप्रदायांची किंमत त्यांच्या यज्ञविरोधित्वामुळें नव्हती. आरण्यकीय विचारानेंच यज्ञ अनवश्यक मानले गेले. यज्ञ खर्चाचे असल्यामुळें लोकांनां ते नकोसे झाले होते. यज्ञ करणाऱ्या ऋत्विग्वर्गांतच भांडणें होऊन व त्यामुळें विधींत बारीकसारीक फरक उत्पन्न करणारीं शाखांतरें उपस्थित होऊन, सामान्य जनांस जुगुप्सा उत्पन्न होण्याइतकी परिस्थिति त्यांनीं उत्पन्न केली होती; आणि यज्ञावर भिक्षुकी चालेना तेव्हां आपआपल्या शाखेला निराळें गृह्य उत्पन्न करून त्या शाखेंतील अन्य धंद्यांत पडलेल्या गृहस्थवर्गावर आपली भिक्षुकी ऋत्विग्वर्गाच्या वेदपठन करणाऱ्या वंशजांस चालवावी लागली होती. सारांश, यज्ञसंस्थेचा निःपात अगोदरच झाला होता.

उपनिषदांतलि कर्तव्यात्मक विचारांचें स्वरूप काय? मनुष्यानें ब्रह्मज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करावा या प्रकारचें ध्येय डोळ्यापुढें ठेवलें, तर त्यामुळें एक पंचाईत उपस्थित होते. प्रत्येकानें ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न जर करावयाचा, तर तेथें दैनिक नित्यकर्में मनुष्यानें कोणतीं करावयाचीं? शिवाय, जो ज्ञानाच्या मार्गेंच लागेल त्याचें पोट कसें चालावयाचें? ब्रह्मज्ञान जर अवश्य तर वेदज्ञानाची वाट काय? वेदज्ञान असलेल्यांनीं काय करावें? अशा प्रकारच्या परिस्थितींत लोकप्रवृत्ति अनेक तऱ्हेची उत्पन्न झाली. कांहीं लोक ज्ञानमार्ग खरा पण जुनें कर्म चालू ठेवावें असें म्हणणारे झाले;आणि कर्में हीं परमार्थकारण न राहतां लोकांच्या चातुर्वर्ण्यांतील सामाजिक स्थानांचीं निदर्शक होऊन त्यामुळें तीं समाजांतील कांहीं वर्गापुरतीं चालू राहिलीं. तथापि, ज्या लोकांनां कर्मेंच नाहींत त्या लोकांनां कांहींतरी कर्में लावून आणि प्रचलित मतांपैकीं एखाद्या विचारपरंपरेस तीं कर्में चिकटवून संप्रदायस्थापना करावी, या तऱ्हेची सवड या धंद्यांत चळवळ करणारांनां होती. बौद्ध आणि जैन या दोन संप्रदायांच्या अस्तित्वास पोषक अशी परिस्थिति येणेंप्रमाणें सांगतां येईल.

**जैनांचे तीर्थंकर.**—आतां बौद्ध व जैन यांतील अगोदरचा जो जैन संप्रदाय त्याकडे वळूं; जैनांचे प्राचीन ग्रंथ आज उपलब्ध नाहींत. त्यामुळें अधिक अर्वाचीन ग्रंथांवर भिस्त टाकणें प्राप्त होतें. जैनांनीं आपले धर्मप्रवर्तक चोवीस तीर्थंकर म्हणून मानले आहेत. त्या चोवीस तीर्थंकरांच्या अस्तित्वावर आज कोणी संशोधक विश्वास ठेवीत नाहीं. तथापि महावीराच्या अस्तित्वविषयीं प्रमाणें बरींच असल्यामुळें त्याच्याबद्दल कोणी शंका घेत नाहीं. ऋषभ हाहि ऐतिहासिक पुरुष असावा असा त्याजविषयीं भागवतांत म्हणजे जैनेतर ग्रंथांत उल्लेख असल्यामुळें कल्पना होते.

सद्धर्मालंकारावरून महावीर व त्यापूर्वीच्या सहा तीर्थंकरांची हकीकत येणेंप्रमाणें निघते ( इं. अँ. पु. ८ ):—

पू र्ण का श्य प बु द्ध.—हा एका सरदाराच्या घरीं परमुलुखांतून आलेल्या बाईच्या उदरीं जन्मला. तरी पण हा

आपणांस ब्राह्मण म्हणवीत असे. त्याच्या जन्मानें त्याच्या मालकाच्या घरांतील गुलामांची संख्या पूर्ण शंभर झाली, म्हणून त्याला 'पूर्ण' हें नांव मिळालें. मालकाचें घर सोडून तो चालला असतां चोरांनीं त्याला सर्वस्वीं नागविलें. तेव्हां नग्नावस्थेंतच तो शेजारच्या गांवीं जाऊन तेथील लोकांस त्यानें नाना तऱ्हेच्या युक्त्यांनीं फसविलें. आपलें नांव 'पूर्ण काश्यप बुद्ध' आहे असें त्यानें जाहीर केलें. त्याला कपडे देऊं केले असतां तो दिगंबरच राहिला. तो म्हणे कीं, ज्यानें पाप केलें असेल त्यास लाज उत्पन्न होते व लाज झांकण्याकरितां मग कपडे पाहिजेत; पण मला पापच नाहीं—मी निष्पाप (अर्हत) आहे. याच्या अनुयायांची संख्या लवकरच ८०,००० वर गेली. हा राजा अगर प्रजा, बाप अगर लेक इत्यादि धर्मबंधनें मानीत नसे. त्याच्या मतें शून्यता हीच या जगांतील मुख्य वस्तु आहे.

२ मखली गोशाल.—हा एका सरदाराच्या घरचा गुलाम होता. याच्या आईचें नांव मखली होतें, व हा गोशाळेंत जन्मला म्हणून याचें नांव मखली गोशाल असें झालें. एके दिवशीं हा तेलाचें भांडें घेऊन जात असतां त्याचा पाय घसरला व भांडें खालीं पडलें. तो मालकास भिऊन पळूं लागला असतां मालकानें त्याचीं वस्त्रें पकडलीं. तेव्हां तो वस्त्रें टाकून देऊन नग्न स्थितींतच पळत सुटला, व एका शहरांत शिरून दिगंबर जैन अथवा बुद्ध म्हणून प्रसिद्धीस आला. त्यानें काढलेल्या पंथास मखली गोशाल हें नांव प्राप्त झालें. मनुष्यास सुखदुःख पूर्वकर्मानुसार प्राप्त होत नसून तें यदृच्छेनें प्राप्त होतें असें हा म्हणत असे.

३ नीगंठ नातपुत्त.—हा नाथ (नात) नांवाच्या शेतकऱ्याचा पुत्र (पुत्त) होता व यानें गांठीं तोडल्या म्हणून याचें नांव नीगंठ (निर्ग्रंथ) नातपुत्त असें पडलें. थंड पाणी पिणें पाप आहे असें याचें मत होतें. पाण्याचे बारीक कण हे लहान आत्मे व मोठे कण हे मोठे आत्मे होत असें हा म्हणे. नशिबाप्रमाणें पापपुण्य किंवा सुखदुःख प्राप्त होतें व आपणांस तीं टाळतां येणार नाहींत असें याचें मत होतें.

४ अजितकेशकंबल.—हा एका सरदाराचा नोकर होता. पुष्कळ कर्ज झाल्यामुळें सावकारास चुकविण्याकरितां हा दुसऱ्या गांवीं पळून गेला. तेथें निर्वाहाचें दुसरें कांहीं साधन नसल्यामुळें यानें डोकें मुंडून व केशकंबल पांघरून तपाचरणास सुरुवात केली, म्हणून यास लोक अजित केशकंबल म्हणूं लागले. जलचर, भूचर व खेचर अशा सर्व प्राण्यांस व त्याचप्रमाणें वृक्षलतादिकांसहि जीव म्हणजे आत्मा आहे असें याचें मत आहे. या त्याच्या मतामुळें त्यास सहस्रावधि अनुयायी मिळाले. नशिबाचा म्हणजे पूर्वसंचिताचा नाश या जन्मांत नाना तऱ्हेच्या शरीरविटंबनेनें—उदाहरणार्थ, केशलुंचन, धूम्रपान, पंचाग्निसाधन इत्यादिकांनीं—होऊन पुढील जन्मांत निरवधि सुख प्राप्त होईल असें हा प्रतिपादन करी.

५ संजयबेलटे.—याचें डोकें चमत्कारिक असून यानें मुक्तता मिळवून निरनिराळ्या शास्त्रांचा अभ्यास केला व आपण बुद्ध आहों असा पुकारा केला. याचें मत असें होतें कीं, या जन्मांत प्राण्यास जी योनि प्राप्त झाली असेल तीच त्यास पुढील जन्मांत प्राप्त होईल. 'बोधि' शोधून काढण्याचें कांहीं कारण नाहीं, ऐशी हजार कल्पें संपतांच तें आपोआप प्राप्त होईल असें हा म्हणत असे.

६ ककुधकात्यायन.—याची उत्पत्ति जारकर्मापासून झाली. याची आई गरीब व हीन जातींतील असल्यामुळें तिला राहण्यास घर नव्हतें. व म्हणून याचा जन्म एका ककुध झाडाखालीं झाला. तेथून एका ब्राह्मणानें त्यास उचलून घेऊन त्याचें नांव कात्यायन असें ठेविलें. ककुध नांवाच्या झाडाखालीं हा सांपडला म्हणून ककुध कात्यायन असें याचें नांव पडलें. बाप मृत झाल्यावर याला फार वाईट स्थिति प्राप्त होऊन हा तपस्वी झाला, व एका मातीच्या उंचवट्यावर बसून यानें उपदेश करण्यास प्रारंभ केला. थंड पाण्यांत आत्मा असतो असें नीगंठ नातपुत्त याच्याप्रमाणें हाहि म्हणत असे. चिनी दंतकथांवरून असें समजतें कीं, धर्मशास्त्रापैकीं कांहीं नियम आपल्या बुद्धीस आकलन होत नाहींत व कांहीं होतात असें हा म्हणत असे.

**नीगंठ नातपुत्त व महावीर एकच.**—वरील सहा आचार्यांपैकीं 'नीगंठ नातपुत्त' हा व जैनपंथाचा मानलेला संस्थापक 'महावीर' या दोन्ही एकच व्यक्ति आहेत, असें म्हणतात.

जैन संप्रदायाचा एक विशेष हा आहे कीं, जैनसंप्रदायी लोकांची सजीव जगताची कल्पना फार विस्तृत व व्यापक असते. लता व वृक्ष सजीव आहेत इतकेंच नव्हे तर मृत्तिकाकण, जल, अग्नि व वायु हे देखील सजीव आहेत. हेंच मत नीगंठ नातपुत्ताचें होतें.

गौतमबुद्धाच्या अक्रियावादाच्या विरुद्ध असणारा जो क्रियावाद, त्याचा नीगंठ नातपुत्त यानें पुरस्कार केला होता (महावग्ग सुत्त ६. ३१, १). हा क्रियावाद म्हणजे आत्म्याच्या कार्यशक्तीवर असणारी श्रद्धा होय. हें जैनसंप्रदायाच्या आद्यतत्त्वांपैकीं एक तत्त्व आहे व आचारांगाच्या पहिल्या अध्यायांत तें तत्त्व सांगितलें आहे. नातपुत्त असेंहि प्रतिपादन करीत असे कीं, पाप करण्यासाठीं तीन दंड अथवा कर्तें आहेत. (१) कायेचीं कृत्यें, (२) वाचेचीं कृत्यें व (३) मनाचीं कृत्यें हीं पापाचीं तीन पृथक् कारणें होत; व तीं परस्परनिरपेक्षतया व्यापार करीत असतात (स्थानाङ्ग, तिसरें उद्देसक). अपराध व सद्वृत्त, सुख व दुःख हीं दैवनियंत्रित व केवळ दैवघटित आहेत व म्हणून पंथाच्या नियमांप्रमाणें वागून कांहीं फल नाहीं; कारण दैव टाळतां येत नाहीं. त्याचा विशेष या मुद्यांतच होता.

**नातपुत्त नवीन पंथाचा संस्थापक होता काय.**– नातपुत्ताची संप्रदायपद्धति कशी काय होती हें आतां आपण पाहूं (सामञ्ञफलसुत्त पहा). सामञ्ञफलसुत्त यांत चातुर्याम ह्या जैन संज्ञेचा उल्लेख केला आहे. ही संज्ञा महावीराचा पूर्वाधिकारी पार्श्व याच्या मताला लावीत असत. महावीरानें पूर्वीच्या मतांतच सुधारणा केली, व त्या सुधारलेल्या मताला पंचयाम मत ( भगवती–वेबर फ्रॅगमेंट डर भगवती पृ. १८५ व शीलांकाची आचारांगावरील टीका पहा ) असें नांव पडलें. हे पांच याम म्हणजे महाव्रतें १ अहिंसा, २ सूनृत, ३ अस्तेय, ४ ब्रह्मचर्य व ५ अपरिग्रह ( सर्व मायामय वस्तूंचा त्याग करणें ) हीं होतीं. पूर्वीच्या मतांत ब्रह्मचर्याचा अपरिग्रहांत अन्तर्भाव झाला होता.

त्यावरून दिसून येतें कीं, निर्ग्रंथ महावीराच्या पूर्वी अस्तित्वांत होते. नातपुत्तानें फक्त चातुर्याममतांत बदल केला. परंतु बौद्धांनीं असें मानिलें कीं, त्यानेंच हा पंथ स्थापन केला. सारांश महावीरानें पूर्वी प्रचलित असलेल्याच मतांत सुधारणा केली, नवीन मताची स्थापना केली नाहीं. या सिद्धान्तास प्रमाण म्हणून खालील कारणें दिलीं जातात:–

( १ ) बुद्ध व महावीर यांचे वर्तनक्रम फार भिन्न होते. बुद्धाला प्रचलित समज व विधी काढून टाकून नंतर श्रद्धा व आचार यांनां त्याच्या मताप्रमाणें योग्य वळण लावावयाचें होतें. त्याला आपला मार्ग कष्टानें काढावा लागला. महावीर हा एक संन्याशी होता. त्यानें वरील खटपट कधींच केली नाहीं. त्यानें फक्त आपलें ज्ञान पूर्ण ( केवल ) होईपर्यंत वाढविलें. त्याचीं सूत्रांतलीं मतें म्हणजे त्याचे शोध नाहींत, तर पूर्वीच प्रस्थापित झालेलीं सत्यें ( पन्नत ) आहेत.

( २) चतुर्दश पर्वांचा संग्रह देखील हीच गोष्ट सिद्ध करतो. हीं पुस्तकें तीर्थंकर ऋषभ अथवा आदिनाथ ह्याच्या वेळीं होतीं. म्हणून महावीराच्या सुधारणांपूर्वीचीं मूळ निर्ग्रंथांचीं पवित्र पुस्तकें हीं आहेत असें मानिलें पाहिजे. परंतु यावर एक मोठा आक्षेप असा निघतो कीं, हीं पुस्तकें जैन वाङ्मयांतून घेतलीं आहेत. जैन वाङ्मयाचें लेखन पांचव्या शतकांत झालें. जैनांनीं आपला पंथ सृष्टीच्या आरंभापासून अव्याहत चालू राहिला आहे ह्या कल्पनेवर त्यांच्या सर्व पवित्र पुस्तकांची जुळणी केली आहे. विरुद्ध मतास त्यांनीं त्यांत अगदीं थारा दिलेला नाहीं.

याला उत्तर असें देतां येईल कीं, जैन सूत्रांत कांहीं बदल झालेला नाहीं. त्याचप्रमाणें आचारांगाचाहि मूल ग्रंथ पूर्वीप्रमाणेंच आहे.

( ३ ) जर बौद्ध व जैन हे दोन्ही पंथ, त्यांच्या पंथांचे आद्य संस्थापक बुद्ध व महावीर हे समकालीन असल्यामुळें सारखेच प्राचीन आहेत, तर त्या पंथांचा निर्देश विरुद्धमतवाद्यांच्या ग्रंथांत केलेला आपणांला सांपडला पाहिजे. परंतु वस्तुस्थिति अशी नाहीं. निर्ग्रंथांचा उल्लेख बौद्धांच्या पिटकांच्या जुन्यांत जुन्या भागांत देखील आलेला आहे; परंतु जैन सूत्रांत बौद्धांचा उल्लेख नाहीं. यापुढें बौद्ध संप्रदायाला जास्त महत्त्व आलें. शिवाय, हे दोन्ही पंथ समकालीन आहेत असें याकोबी साहेबांनीं गृहीत धरलें आहे. ह्यावरून बुद्धाच्या वेळीं निर्ग्रंथांचा नवीन पंथ नव्हता असें अनुमान काढतात.

या सर्व गोष्टींवरून असें सिद्ध होतें कीं, जैन कल्पना व विधी हीं महावीराच्या काळीं प्रचलित होतीं, व तीं टिकून राहण्यासाठीं महावीराची जरूरहि नव्हती. त्याचप्रमाणें निर्ग्रन्थ लोकहि महावीरापूर्वी बराच काळ अस्तित्वांत होते. महाविरानें अगोदर अस्तित्वांत असलेल्या अशा एका पंथाची फक्त सुधारणा मात्र केली.

**बौद्ध व जैन संप्रदायांचापरस्पर संबंध.**— आतां बौद्ध संप्रदाय व जैन संप्रदाय यांचा परस्पर संबंध काय होता तें पाहूं.

बौद्ध संप्रदाय हा जैन संप्रदायापासून निघालेला नाहीं. कारण, निर्ग्रंथांचीं मुख्य तत्त्वें व विधी बुद्धानें नाकबूल केले आहेत. इतकेंच नव्हे, तर बौद्ध संप्रदाय हा जैन संप्रदायाच्या विरुद्ध टीका करणारा संप्रदाय आहे.

महावीराचा शिष्य गौतम इंद्रभूति व गौतम सांख्य मुनि हे एक नाहींत. त्याचप्रमाणें गौतम बुद्धाच्या पूर्वी २४ बुद्ध होऊन गेले ह्या गोष्टीलाहि कांहीं आधार नाहीं.

महावीर हा जैन संप्रदायाचा आद्य संस्थापक नव्हता. सर्व पंडितांच्या मतें पार्श्व हाच जैन संप्रदायाचा खरा संस्थापक आहे. त्याचे अनुयायी व त्याचीं मतें यांचा स्पष्ट उल्लेख जैन सूत्रांत केला आहे. चातुर्याम पंथाचें तेंच मत बौद्धांनींहि निर्देशिलें आहे, मात्र त्यांनीं तें नातपुत्ताचें आहे असें म्हटलें आहे. परंतु पार्श्व हाच जैन संप्रदायाचा संस्थापक होता असें म्हणण्यास कांहीं आधार नाहीं. जैन दंतकथेप्रमाणें ऋषभ हा पहिला तीर्थंकर होता. पुराणांतरीं ( विष्णुपुराण, स. २ अ. १ व भागवत पुराण पहा ) एक ऋषभ वर्णिला आहे. त्या वर्णनावरून हे दोन्ही ऋषभ एकच असावेत असें वाटतें ( विल्सन, विष्णुपुराण, पृ. १०४, टीप १ पहा ). परंतु ऐतिहासिक दृष्ट्या ह्याचें फारसें महत्त्व मानतां येत नाहीं.

जैन संप्रदायाच्या वाढीचा विचार करतां, मागें पार्श्वापर्यंत आपणांला कांहीं समाधानकारक माहिती मिळते. त्यापूर्वीची हकीकत दंतकथा व अद्भुत गोष्टी यांनीं भरलेली आहे.

**महावीराचा काल.**—उपर्युक्त तीर्थंकरांपैकीं महावीर ज्याचा संस्थापक समजला जातो त्या जैन संप्रदायाची हकीकत देण्यापूर्वी महावीराच्या कालासंबंधीं दोन शब्द लिहिणें

जरूर आहे. महावीराविषयीं आर्यविद्यासुधाकरांमधें असें वाक्य लिहिलेलें आढळतें:—

ततःकालेनात्र खंडे भारते विक्रमात्पुरा ॥
षण्णवत्यधिकपंचशत वर्षे वीराह्वयो नरः ॥
प्राचारयज्जैनधर्मं बौद्धधर्मसमप्रभम् ॥

त्याच्या निर्वाणाचा काल खिस्ती शकापूर्वी ५२७, हा येतो असें रा. का. बा. पाठक यांनीं 'श्रावकाचार' या ग्रंथांतील एका उताऱ्यावरून दाखवीत केलें आहे. नेमिचंद्र आपल्या 'त्रिलोकसार' या ग्रंथांतहि असेंच म्हणतो. पण त्याचा टीकाकार माधवचंद्र यानें चुकीची टीका केल्यामुळें सदर निर्वाणकालाबद्दल घोटाळा उत्पन्न झाला होता ( इं. अँ., पु. १२ पृ. २१ ).

**जैन संप्रदाय.**—या पंथाचा प्रवर्तक महावीर याचा जन्म उच्च कुलांत झाला होता. त्याच्या पित्यास राजा म्हटलें आहे; पण तो बहुधा कोणत्याहि देशाचा राजा नसून विदेह नगराच्या उपान्त भागांत असणाऱ्या एखाद्या प्रांताचा मुख्य असावा. तथापि विवाहसंबंधानें तो विदेहाच्या राजाचा आप्त असून मागध राजकुलाशींहि त्याचा संबंध जोडलेला होता. त्याचें कुलनाम ज्ञातृपुत्र ( अर्धमागधी—नातपुत्त ) असें होतें. पण त्याच्या सांप्रदायिकांनीं महावीर, जिन, वर्धमान इत्यादि उपपदें त्याच्या नांवास जोडलीं. त्याच्या संप्रदायाचें सर्वांत जुनें नांव निर्ग्रंथ ( नीगंठ ) असें होतें; नंतर या संप्रदायाचे निरनिराळ्या नांवांचे कमींत कमी सात पंथ आढळतात, व यांतच पुढें दिगंबर या पंथाची भर पडली. पहिले सात पंथ सर्व श्वेतांबर या सदराखालीं येतात. सध्यां श्वेतांबर व दिगंबर या दोन मुख्य सदरांत यांचे सर्व पोटभेद येतात. श्वेतांबरांची वस्ती उत्तर व पश्चिम हिंदुस्थानांत असून दिगंबरांची दक्षिण हिंदुस्थानांत आहे. दिगंबर पंथ हा श्वेतांबर पंथापासून फुटून निघण्याचें कारण, यतींनीं नग्न स्थितींत राहण्याचें व्रत पालन करण्याचें श्वेतांबरांनीं अग्राह्य ठरविलें हें होय. या पंथाच्या प्राचीन ग्रंथांवरून असें दिसतें कीं नग्न स्थितींत राहणें हें जरी चांगलें मानलेलें होतें तरी ती गोष्ट प्रत्येक यतीस आवश्यक अशी सांगितली नव्हती. जैनांच्या इतरहि पंथांचीं अनेक नांवें आढळतात. उदाहरणार्थ, केशलुंचनाच्या विधीपासून लुंचितकेश असें एका पंथास नांव पडलें. ग्रीक लोकांनीं 'जिम्नोसोफिस्ट' या नांवानें ज्यांचा उल्लेख केला आहे ते बहुधा दिगंबर जैन असावेत. पण या गोष्टीबद्दल तितकें निश्चित मत देतां येत नाहीं: कारण, नग्न स्थितींत राहणारे साधू हिंदूंमध्येंहि अद्यापि अनेक आढळतात.

जैन व बौद्ध मतांविषयीं येथें विवेचन करण्यांत फारसा मतलब नाहीं. बौद्ध व जैन वाङ्मयाच्या निरीक्षणाबरोबर त्यांच्या मतांचाहि विचार होईल. बौद्ध व जैन वाङ्मयासंबंधानें एक मात्र फरक लक्षांत घेतला पाहिजे. तो हा कीं, जितक्या प्राचीन काळचें बौद्ध वाङ्मय आपणांस उपलब्ध आहे तितकें प्राचीन जैन वाङ्मय उपलब्ध नाहीं.

बौद्ध आणि जैन संप्रदायासंबंधानें अशी एक शंका उत्पन्न होते कीं, दोघांचीहि बुद्धपूर्व आणि महावीरपूर्व परंपरा एकच असणें शक्य आहे. बुद्ध आपल्या पूर्वी अनेक बुद्ध होऊन गेले असें म्हणतो. जैनांचेहि महावीरापूर्वी अनेक तीर्थंकर होऊन गेले असें म्हणणें आहेच. कदाचित्, सूतसंस्कृतींतून उपनिषदांचा जन्म आहे तसाच बुद्ध आणि महावीर यांच्याहि वैचारिक पूर्वजांचा जन्म असावा, आणि मखली गोशालादि आजीविकांची ओढाताण त्यामुळेंच झाली असावी.

अर्हत वगैरे विशेषणें बुद्ध व महावीर या दोघांनाहि लावलीं गेलीं आहेत व तीं प्राचीन असावीत. ऋषि व आचार्य यांखेरीज पवित्र मानला जाणारा असा वर्ग समाजांत असावा आणि त्यापासून या दोन संप्रदायांचा उगम झाला असावा. विद्याधरांचें जैन ग्रंथांत व आपल्या पुराणांत असलेलें महत्त्व आणि वेदांत विद्याधरांचा अनुल्लेख यांवरूनहि सूतसंस्कृति आणि जैन संप्रदाय यांचा निकट संबंध दिसून येतो.

---

## प्रकरण ८ वें.

### बुद्धाचें चरित्र.

**बुद्धचरित्रावरील वाङ्मय.**—गौतम बुद्धाचें चरित्र चांगलें सूक्ष्मपणें अजून लिहिलें गेलें नाहीं. त्याच्या चरित्रावर अनेक भाषांतून ग्रंथ आहेत. तथापि सामान्यपणें असा प्रकार होतो कीं, बहुतेक चरित्रें अनुयायी व भक्त मंडळींनीं लिहिलेलीं आहेत. शिवाय बुद्धाची खरी ऐतिहासिक कल्पना करतांना जो दुसरा पक्ष ब्राह्मणांचा त्याविषयीं यूरोपीय लेखकांमध्यें फारसें प्रेम पाघळत होतें असें नाहीं. यूरोपीय संस्कृत पंडितांचा वर्ग बौद्ध वाङ्मयाशीं अथवा पाली भाषेशीं अपरिचित असे आणि पाली ग्रंथांचे अभ्यासक संस्कृत वाङ्मयाकडे दुर्लक्ष करीत. बुद्धाची कामगिरी पहावयाची म्हणजे ती तत्कालीन बौद्ध तसेच श्रौतधर्मी, उपनिषन्मार्गी व जैन यांचे ग्रंथ पाहून अजमाविली पाहिजे. महाराष्ट्रीयांपैकीं बौद्धवाङ्मयाशीं परिचित वर्ग फार थोडा आहे. त्यांतल्या त्यांत ब्राह्मणी भिक्षुकीच्या विरुद्ध असलेला वर्ग असें समजे कीं, पूर्वीच्या ब्राह्मणी लुच्चेगिरीवर गौतमानें प्रहार केले म्हणून गौतमाची तारीफ करणें योग्य आहे. जातिभेदाच्या विरुद्ध असलेला वर्ग असें समजे कीं, जातिभेद बुद्धानें बंद केला पण ब्राह्मणांचा पुन्हां वरचष्मा झाल्यामुळें तो प्रज्वलित झाला. अशा समजुती पसरल्यामुळें बुद्धसंबंधीं आणखी अनुकूल मत उत्पन्न झालें. आणि ब्राह्मणब्राह्मणेतर वादांत बुद्ध हा ब्राह्मणेतरांच्या हातांतील हुकुमाचा एक्का झाला. याशिवाय खिस्ती लोक आपल्या खिस्ताचें नांव पुढें करूं लागले, म्हणजे आपल्याकडील कोणाचें तरी नांव पुढें केलें पाहिजे आणि तें बरेच मोठें असलें पाहिजे अशी

त्यांनी लोकांत असल्यामुळें, बुद्ध हा सर्वांनाच वर्णनीय झाला आणि बुद्ध चरित्राचें सूक्ष्म निरीक्षण मात्र राहिलें.

**बुद्धजन्म.**–बुद्धाविषयीं ऐतिहासिक संशोधन मात्र फारसें झालेलें नाहीं. बुद्धाविषयीं निश्चित माहिती एवढीच देतां येईल कीं बुद्धाचा जन्म ख्रि. पू. ५६० या सालीं किंवा त्या सुमारास झाला. कपिलवस्तु नांवाच्या प्राचीन नगराजवळ लुंबिनी नांवाच्या राईंत बुद्ध जन्मास आला. कपिलवस्तु नगराचे अवशेष ब्रिटिश हद्दीपलीकडे दक्षिण नेपाळांत दाट तराईत आहेत. ही तराई संयुक्त प्रांतांतील बस्ती जिल्ह्याच्या उत्तरेस कांहीं मैलांवर आहे. बुद्धाचें जन्मस्थान १८९५ सालाच्या पूर्वी निश्चित झालेलें नव्हतें. या सालीं सदरील लुंबिनी राईंत बौद्ध राजा अशोक यानें उभा केलेला स्तंभ सांपडला, व त्यायोगें बुद्धाचें जन्मस्थान निश्चित झालें. हा स्तंभ त्या राजानें आपल्या यात्राप्रसंगीं उभा केला होता. अशोकानें आरंभिलेल्या यात्रेचा हेतु बुद्धानें आपल्या जिवंतपणीं आपल्या कृतींनीं अथवा केवळ वस्तीनें जीं स्थानें पावन केलीं होतीं त्यांतील मुख्य मुख्य स्थानें पहावीं आणि तेथें उपासना करावी हा होता. अशोकाच्या यात्रेचा मार्ग पाटलिपुत्र म्हणजे त्याचें राजधानीचें नगर, त्यानंतर लुंबिनीवन व कपिलवस्तु, बुद्धगया, सारनाथ, बनारसचा आसमंत भाग, श्रावस्ती, कुशनगर व इतर पवित्र स्थानें याप्रमाणें होता. या स्थानांपैकीं कांहींचीं ठिकाणें अद्यापि बरोबर निश्चित झालेलीं नाहींत. या प्रत्येक स्थानावर त्यानें स्तंभ बांधिले किंवा स्तूप बांधून काढले. या स्तंभांवर अथवा स्तूपांवर आपल्या आगमनाची तिथि आणि त्या त्या स्थानीं बुद्धाच्या जीवनाचा संबंध कोणता आला ती गोष्ट तो लिहवीत असे. लुंबिनी वनांतील स्तंभावर जें लिखाण आहे तें निर्व्यंग असून त्यांतील अक्षरें तीं कोरलीं गेलीं तेव्हांइतकींच आजहि स्वच्छ व सुवाच्य आहेत. एवढेंच कीं, कांहीं शब्दांचा अर्थ नीट लागत नाहीं. हा शिलालेख येणेंप्रमाणें:–

'राजा देवनांपिय–पियदस्सी यानें त्याच्या अभिषेकाच्या विसाव्या वर्षी हें स्थान आपल्या खुद्द स्वारीच्या आगमनानें पुनीत केलें. या ठिकाणीं शाक्य मुनि बुद्ध जन्मास आला म्हणून त्या राजानें या ठिकाणाभोंवतीं दगडी प्राकार उभा केला, व येथें एक दगडी स्तंभ उभारला. तो पुण्यश्लोक येथें जन्मला म्हणून राजानें लुंबिनी गांवाला साऱ्याची माफी दिली आणि धान्याच्या आठव्या (राज) भागाची मालकी त्याजकडे दिली.'

बुद्धाच्या चरित्राचें ऐतिहासिक निरीक्षण करण्यासाठीं आपण त्याच्या चरित्राचे भाग येणेंप्रमाणें पाडूं:—

(१) बुद्धाचें वैयक्तिक चरित्र,

(२) बुद्धाचें जातिभेदासंबंधाचें कार्य,

(३) बुद्धाचें विचार व शिस्त यांचा प्रवर्तक या नात्यानें कार्य.

या तीन गोष्टींपैकीं येथें प्रथम त्याच्या वैयक्तिक चरित्राकडे लक्ष देऊं.

**बुद्धाचें वैयक्तिक चरित्र.**—वैयक्तिक चरित्रासंबंधीं अज्ञानच असतें तर जी माहिती मिळाली ती दिली म्हणजे भागलें असतें. पण आजची गोष्ट तशी नाहीं. बुद्धास अवतार बनविणारें व अत्यंत लोकप्रिय झालेलें असें ललितविस्तर म्हणून जें काव्य प्रसिद्ध आहे, त्यानें काव्याचा नायक बुद्ध हा उत्तम तऱ्हेनें सजविला आहे. रामायण ज्याप्रमाणें रामाची कथा आहे तशीच सांगत असेल असा विश्वास नाहीं, त्याप्रमाणेंच ललितविस्तराचीहि गोष्ट होय. काव्याचा नायक सजविणें आणि लोकांत भक्ति वाढवावी म्हणून लिहिणें या दोन्ही हेतूंचा ललितविस्तरावर परिणाम झाला आहे. हे दोन्ही हेतू ऐतिहासिक सत्यास विरोधी आहेत. तथापि ललितविस्तराचें म्हणणें काय आहे हें दिल्याशिवाय पुढें जाणें योग्य नाहीं. ललितविस्तराचा गोषवारा येणेंप्रमाणें:—

**ललितविस्तर ग्रंथांतील बुद्धाची कथा.**—ललितविस्तर हा बुद्धचरित्रपर संस्कृत ग्रंथ हिंदुधर्मांतील पुराणांच्या पद्धतीवर लिहिलेला आहे. राम, कृष्ण यांच्याप्रमाणें बुद्ध हाहि एक परमेश्वराचा अवतार आहे अशा पद्धतीचें प्रतिपादन या ग्रंथांत असल्यामुळें हा अवतार घेण्याचें कारण व त्याची पूर्वतयारी यासंबंधाचें वर्णन या ग्रंथाच्या आरंभींच्या प्रकरणांत आहे. इतकेंच नव्हे, तर पुराणांतील, सूत शौनकाप्रत सांगतात या नमुन्यावरहुकूम ललितविस्तरांत भगवान् भिक्षूंच्या विनंतीवरून त्यांनां बुद्धचरित्राची कथा सांगतात, अशीच ग्रंथाची मांडणी केली आहे.

क था नि रू प णा चा प्र सं ग.—कोणे एके काळीं भगवान् श्रावस्ती (कोसल देशाची प्राचीन राजधानी उर्फ आधुनिक अयोध्या प्रांतांतील फैजाबाद शहर) नगरीच्या जेतवनानजीक अनाथपिंडद नांवाच्या उपवनांत फिरतां फिरतां येऊन पोहोंचले. त्यांच्याबरोबर बारा हजार भिक्षूंचा समुदाय होता, व शिवाय बत्तीस हजार बोधिसत्वहि होते. तेथें भगवान् समाधि लावून बसले असतां ईश्वर, महेश्वर, नंद, सुनंद, प्रशांत, महित, इत्यादि अनेक देवपुत्र प्राप्त झाले व त्यांनीं ललितविस्तर ग्रंथांतील कथा सांगण्याविषयीं भगवानास विनंति केली. बोधिसत्व व श्रावक यांनींहि तशीच विनंति केल्यावरून भगवान् ती कथा सांगते झाले.

अ व ता र प्र यो ज न.—एकदां देवांनीं तुषित येथें वास्तव्य करून असलेल्या बोधिसत्वाकडे जाऊन जंबुद्वीपांत अवतार घेण्याबद्दल विनंति केली. तेव्हां बारा वर्षांनीं बोधिसत्व मनुष्य अवतार घेईल अशी भविष्यवाणी झाली. नंतर अनेक देवपुत्रांनीं जंबुद्वीपांत (बौद्ध ग्रंथाप्रमाणें हिंदुस्थानांत) ब्राह्मणाचें रूप घेऊन ब्राह्मणांनां वेद शिकविला.

पुढें तिसऱ्या प्रकरणांत चक्रवर्ती राजांचीं लक्षणें सांगून त्याला चक्ररत्न, हस्तिरत्न, स्त्रीरत्न वगैरे सात रत्नें कशीं

प्राप्त होतात तें सांगितलें आहे. पुढें बोधिसत्वानें कोणत्या कुलांत जन्म घ्यावा याचा विचार करतांना वैदेह, कोशल, वंशराज, वैशाली, प्रद्योत, कंस, पांडु व सुमित्र या प्राचीन भारतीय कुलांचें गुणदोषविवेचन केलें आहे. नंतर बोधिसत्वानें ज्या कुलांत जन्म घ्यावयाचा त्या कुलाला अवश्य असलेले चौसष्ठ गुण, व ज्या स्त्रीच्या पोटीं जन्म घ्यावयाचा त्या स्त्रीच्या ठिकाणीं अवश्य असलेले बत्तीस गुण सांगितले आहेत. बोधिसत्व व देवपुत्र यांनीं वरील सर्व गोष्टी विचारांत घेऊन बोधिसत्वानें शाक्य देशांतील शाक्य कुलांतल्या शुद्धोदन राजाच्या मायादेवी नांवाच्या स्त्रीच्या पोटीं जन्म घ्यावा असें ठरविलें.

चवथ्या अध्यायांत, बोधिसत्वानें मनुष्यजन्म घ्यावयास जाण्यापूर्वी जमलेल्या देवपुत्रांनां निरनिराळे एकशें आठ विषय घेऊन धर्मनिरूपण केलें त्याबद्दलची माहिती दिली आहे.

बुद्धजन्मसूचक शुभ चिन्हें.—पांचव्या अध्यायांत भगवान् भिक्षूंनां सांगतातः—नंतर बोधिसत्वानें मैत्रेय बोधिसत्वाला तुषिताचा कारभार पाहण्यास नेमून देवपुत्रांचा निरोप घेतला व जंबुद्वीपांत जन्म घेण्याचा काल निश्चित केला. अवतारापूर्वी शुभ चिन्हें म्हणून शुद्धोदन राजाच्या राजवाड्यांतील घाण, डांस, चिलटें वगैरे सर्व नाहींशीं होऊन सर्वत्र स्वच्छता झाली; हिमालयपर्वताकडील अनेक जातींचे पक्षी राजवाड्याच्या निरनिराळ्या भागांवर येऊन बसले; आणि बागांतील सर्व झाडें फलपुष्पांनीं भरून गेलीं. मायादेवीनें देहशुद्धीकरितां व मनःशुद्धीकरितां उपवास करण्याचें राजाच्या परवानगीनें ठरवून तें व्रत केलें. अप्सरांनीं राजवाड्यांत प्रवेश करून मायादेवीचें दर्शन घेतलें व तिच्यावर पुष्पवृष्टि केली.

सहाव्या अध्यायांत असें सांगितलें आहे कीं, वसंत ऋतूंत वैशाख महिन्यांत पौर्णिमेच्या दिवशीं प्रशांत समयीं बोधिसत्वानें तुषित येथील निवासस्थान सोडून पीतशुभ्रवर्ण, सहा दांत इत्यादि गुणविशेषांनीं युक्त असलेल्या हत्तीच्या रूपानें मायादेवीच्या शरीरांत प्रवेश केला. त्या वेळीं यांच गोष्टीचें स्वप्न मायादेवीला पडलें. तें तिनें राजाला सांगितलें; तेव्हां राजानें विचारल्यावरून ब्राह्मणांनीं त्याचा अर्थ असा सांगितला कीं, मायादेवीच्या पोटीं एक पुत्र जन्मास येईल व तो चक्रवर्ती राजा होईल, पण पुढें गृहत्याग करून बुद्ध बनेल.

बुद्धाचा जन्म.—सातव्या अध्यायांत भगवान् सांगतातः भिक्षूहो, बोधिसत्व जन्माला येण्यापूर्वी बत्तीस शुभ शकुन झाले. फुलझाडांनां कळ्या आल्या पण फुलें उमललीं नाहींत, फळझाडांनां मोहोर आला पण त्यांनीं फळें धरलीं नाहींत, कपिलवस्तु नगरीकडे हिमालयांतले अनेक सिंह येऊन नगरीभोंवतीं हिंडूं लागले, पांचशें हत्तींनीं त्या नगरींत प्रवेश केला, आकाशांत सूर्यचंद्रतारकागणांचे रथ थांबून राहिले, जिकडेतिकडे सुगंध सुटले इत्यादि. हे शुभशकुन होते. पुढें पूर्ण दहा महिने भरल्यावर मायादेवी प्रसूत होऊन बोधिसत्व जन्मास आला. तेव्हां अनेक शुभ गोष्टी घडल्याः आजारी लोक रोगमुक्त झाले, क्षुधिततृषित लोकांची क्षुधातृष्णा शांत झाली, वेडे लोक पुन्हां सुबुद्ध झाले, दरिद्री श्रीमंत झाले व मायादेवीवर अप्सरांनीं पुष्पवृष्टि केली. शुद्धोदन राजानें पुत्रजन्मानिमित्त मोठा उत्सव करून मुलाचें नांव सर्वार्थसिद्ध असें ठेविलें. पुत्र जन्मल्यानंतर सातच दिवसांनीं मायादेवी मरण पावली. पूर्वी जन्म घेतलेल्या बोधिसत्वांच्या माताहि सर्व अशाच सात दिवसांनीं मरण पावल्या होत्या; कारण, बोधिसत्वाची गर्भाशयात पूर्ण वाढ झाल्यानें मातेचें हृदय दुभंगून जातें. मायादेवी वारल्यानंतर तिची बहीण वृद्ध गौतमी हिनें राजपुत्राला वाढविलें. हिमवत्पर्वतावर एक असित नांवाचा महर्षि रहात होता. त्यानें अन्तर्ज्ञानानें बोधिसत्व जन्मास आल्याचें जाणून, कपिलवस्तु नगरींत जाऊन शुद्धोदन राजाची भेट घेतली. राजानें त्याचा मोठा आदरसत्कार करून त्याला राजपुत्र आणून दाखविला. महर्षीनें त्या राजपुत्रास वंदन करून त्याला जवळ घेतलें; परंतु सर्व शरीरावयवांचें निरीक्षण केल्यावर त्यास वाईट वाटून त्यानें अश्रू गाळण्यास सुरुवात केली. शुद्धोदन राजानें अश्रू गाळण्याचें कारण विचारल्यावरून तो म्हणालाः " तुझा पुत्र उत्तम लक्षणांनीं संपन्न असून तो मोठा धर्मसंस्थापक होणार आहे. मला वाईट वाटण्याचें कारण एवढेंच कीं, हें बौद्ध रत्न पाहण्यास मी जिवंत राहणार नाहीं, व त्यामुळें मला त्याचा योग्य सत्कार करतां येणार नाहीं ! नंतर असित ऋषीनें राजपुत्राच्या शरीरावरचीं बत्तीस उत्तम लक्षणें व ऐंशीं उपलक्षणें राजास समजावून सांगितलीं, व शेवटीं राजाचा निरोप घेऊन तो महर्षि स्वस्थानीं परत गेला.

बुद्धाच्या ईश्वरी अंशाची साक्ष पटविणारे चमत्कार.—आठव्या अध्यायाचा सारांश येणेंप्रमाणें आहेः बोधिसत्व जन्माला आला त्या दिवशीं क्षत्रिय, ब्राह्मण व शाक्य वंशांतील अनेक कुटुंबांत मिळून वीस हजार मुली जन्मास आल्या होत्या. या सर्व पुढें त्यांनीं बोधिसत्वाबरोबर राहून त्याची सेवा करावी म्हणून त्यास अर्पण करण्यांत आल्या. एकदां राजपुत्राला देवालयांत दर्शनास नेण्यांत आलें तेव्हां असा चमत्कार झाला कीं, देवळांतील सर्व देवतांच्या मूर्ती आपलें स्थान सोडून स्वतःच राजपुत्रापुढें येऊन त्याला नमन करत्या झाल्या.

नवव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं, शाक्य वंशांतील पांचशें लोकांनीं चांगले चांगले दागिने करून आणून राजपुत्राच्या अंगावर घालण्याकरितां दिले. पण ते राजपुत्राच्या अंगावर घालण्यांत आले तेव्हां त्यांचें तेज किंवा चकाकी कांहींच पडेना; राजपुत्राच्या शरीरकांतीपुढें ते सर्व अगदीं फिके पडले.

दहाव्या अध्यायाचें तात्पर्य असें कीं, राजपुत्र जरा मोठा झाल्यावर त्याला शिक्षणाकरितां शाळेंत घालण्यांत आलें.

त्याच्याबरोबर दुसरीं दहा हजार मुलें होतीं. शाळेंत शिरतांच राजपुत्राचें तेजःपुंज शरीर पाहून तेथील शिक्षक विश्वामित्र यानें आपणच स्वतः त्याला साष्टांग नमस्कार घातला. नंतर बोधिसत्वानें विश्वामित्र गुरुजींनां विचारलें: "तुम्ही मला कोणती लिपि शिकविणार? ब्राह्मी, खरोष्ठी, पुष्करसारी, अंग, वंग, मागधी; कीं मांगल्य, मनुष्य, शकारी, ब्राह्मवली; द्रविड; कीं देवलिपि, नागलिपि, गंधर्वलिपि, यक्षलिपि, इत्यादि या चौसष्ट लिपींपैकीं मला तुम्ही कोणती शिकविणार?" हा अगाध ज्ञान दर्शविणारा प्रश्न ऐकून विश्वामित्र गुरुजी गलितगर्व होऊन व भांबावून जाऊन इतर मुलांनां शिकवूं लागले. बोधिसत्वानें आपल्या विद्यार्थी मित्रांनां तेथेंच पूर्णज्ञानाचा उपदेश केला.

अकराव्या अध्यायांत भगवान् म्हणतातः भिक्षूहो, राजपुत्र मोठा झाल्यावर एकदां आपल्या मित्रांसह एका खेड्यांत गेला असतां तेथें शेतकऱ्यांचीं शेतांतील कामें पाहून झाल्यावर तो शेजारीं एका बागेंत एकटाच जाऊन एका जंबुवृक्षाखालीं बसला व विचारांत मग्न झाला. फार वेळ राजपुत्र न दिसल्यामुळें शुद्धोदन राजानें त्याच्या शोधास अनेक लोक पाठविले, तेव्हां त्यांनां तो जंबुवृक्षाखालीं ध्यानस्थ बसलेला आढळून आला.

**बुद्धाचा विवाह.**—बाराव्या अध्यायांत पुढें अशी कथा आहे: राजपुत्र मोठा झाल्यावर शुद्धोदन राजानें त्याचा विवाह करण्याचें ठरविलें व त्या संबंधानें शाक्य कुलांतील पांचशें गृहस्थांबरोबर चर्चा केली. जो तो राजपुत्रासाठीं आपल्या मुलीची शिफारस करूं लागला. तेव्हां राजानें त्यांनां राजपुत्राकडे धाडलें व राजपुत्रानें आपणांस बायको कशी पाहिजे तें त्यांनां सांगितलें. अनेक शाक्यकन्या आणून राजपुत्राला दाखविण्यांत आल्या तेव्हां त्यांपैकीं दण्डपाणि नांवाच्या शाक्य इसमाची गोपा नांवाची कन्या राजपुत्रानें पसंत केली. राजानें त्या मुलीला मागणी घातली; पण दण्डपाणीनें उत्तर पाठविलें कीं, मुलगा कोणत्या शास्त्रकलांत प्रवीण आहे तें पाहिल्याशिवाय मुलगी देऊं नये असा आमचा कुलसंप्रदाय आहे. त्याप्रमाणें एके दिवशीं तरवार, धनुष्यबाण, कुस्ती व हत्ती चालविणें या विद्यांतील कौशल्याचे सामने करण्यांत आले असतां त्यांत बुद्धानें अनेक तरुणांवर विजय मिळविला; इतकेंच नव्हे तर त्यानें सर्वच तत्कालीन विद्यांमध्यें व कलांमध्यें आपलें नैपुण्य दाखविलें. या संबंधांत अशी एक कथा दिली आहे कीं, बुद्धाचा प्रतिस्पर्धी देवदत्त हा सामन्यासाठीं जात असतां समोरून बुद्धाचा हत्ती येत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्यास पाहून देवदत्तानें एका हातानें त्या हत्तीचा सुळा धरून दुसऱ्या हातानें त्याच्या श्रीमुखांत इतक्या जोरानें थप्पड मारली कीं, तो हत्ती तावडतोब गतप्राण होऊन खालीं पडला, मागून सुंदरानंद नांवाचा राजपुत्र आला. त्याला ही हकीकत समजली तेव्हां त्यानें देवदत्तानें हें चांगलें केलें नाहीं असें उद्गार काढून हत्तीची शेपूट धरून त्यास रस्त्याच्या बाजूस आणून टाकलें. सुंदरानंदाच्या मागून सिद्धार्थ रथांत बसून आला. त्याला हत्तीसंबंधीं सर्व हकीकत कळली. तेव्हां त्यांनें सुंदरानंदाची प्रशंसा केली; परंतु एवढा मोठा प्राणी रस्त्याच्या बाजूस सडत पडला तर लोकांस त्रास होईल असें म्हणून त्यानें रथाबाहेर एक पाय काढला व आंगठ्यानें त्या हत्तीचें शेपूट धरून त्यास इतक्या जोरानें भिरकाविलें कीं तो हत्ती सात तट व सात खंदक यांच्या पलीकडे दोन मैलांवर जाऊन पडला. बुद्धाच्या शौर्यानें दण्डपाणि संतुष्ट झाला व आपली कन्या गोपा, राजपुत्राला अर्पण करण्याचें ठरवून त्यांचा त्यानें मोठ्या थाटानें विवाह लावला. लग्न झाल्यावर गोषा वापरण्याबद्दल वडील स्त्रियांनीं गोपेला उपदेश केला, पण ती कधींहि गोषा घेत नसे. राजपुत्राला इतर चौऱ्यायशीं हजार कन्या अर्पण केल्या होत्या त्या सर्वांमध्यें गोपा ही राजपुत्राची मुख्य राणी होऊन राहिली.

**बुद्धाला वैराग्य प्राप्त होण्यास घडलेलीं कारणें**—या अनेक स्त्रियांसहवर्तमान राजपुत्रानें अत्यंत सुखानें कालक्रमणा कशी केली त्याचें वर्णन तेराव्या अध्यायांत आलें आहे. याप्रमाणें काल जातां जातां राजपुत्राची गृहत्याग करण्याची वेळ जवळ आली. एके दिवशीं पहाटेस देवपुत्र ह्रीदेव दुसऱ्या बत्तीस हजार देवपुत्रांसह राजपुत्राकडे येऊन स्वप्नामध्यें त्यास गृहत्याग करण्याविषयीं सूचना करता झाला.

चवदाव्या अध्यायांत म्हटलें आहे: नंतर लवकरच शुद्धोदन राजाला असें स्वप्न पडलें कीं, राजपुत्र अनेक देवांसह राजवाड्यांतून बाहेर पडून भगवीं वस्त्रें धारण करून संन्याशी बनला. तेव्हां राजा तावडतोब घाबरून उठला व त्यानें प्रथम राजपुत्र राजवाड्यांत असल्याची खात्री करून घेतली. नंतर राजपुत्रानें राजवाड्यांतून निघून बागेंत झाडाखालीं बसून विचार करूं नये म्हणून, राजानें तीन राजवाडे उत्तम तऱ्हेनें सजवून तेथील सुखांत आपल्या मुलाचें मन सतत रमविण्याचा प्रयत्न केला. तथापि एके दिवशीं रथांत बसून राजपुत्र बागेंत जाण्यास निघाला. वाटेंत त्याला एक जराग्रस्त इसम दिसला, आणि स्वतःस अशीच जरा प्राप्त होणार हा विचार मनांत येऊन तो फार कष्टी झाला. दुसऱ्या एका प्रसंगीं रथांतून जात असतांना राजपुत्रानें ज्वरादि रोगांनीं ग्रस्त असा इसम पाहिला, व स्वतःलाहि अशीच रोगग्रस्तता येणार हें जाणून तो दुःखी झाला. तिसऱ्या वेळीं एका मेलेल्या माणसाचें प्रेत जाळावयाकरितां नेत असलेलें त्यानें पाहिलें व स्वतःलाहि एके काळीं असाच मृत्यु येणार हें पाहून या दुःखांतून मुक्ति कशी मिळवावी याचा विचार तो करूं लागला. पुन्हां एके प्रसंगीं एक भिक्षु शांत व आनंदी वृत्तीचा, पूर्ण ब्रह्मचारी व हातांत भिक्षेचा लोटा घेतलेला असा त्यानें पाहिला, व भिक्षावृत्तीचा मार्ग अवलंबिणें हाच मार्ग विद्वज्जनांनां मान्य आहे असा राजपुत्रानें मनाशीं विचार केला.

ही सर्व हकीकत शुद्धोदन राजाला समजतांच त्यानें राजपुत्राच्या वाड्याभोंवतीं कडेकोट बंदोबस्त करून मोठा पहारा ठेवला.

राजपुत्राचा गृहत्याग.—पंधराव्या अध्यायांत राजपुत्राच्या गृहत्यागाची हकीकत आहे. वर सांगितल्याप्रमाणें जगांतील मानवी दुःखें पाहून राजपुत्राचें मन उद्विग्न झालें व त्यानें संसार सोडून भिक्षु होण्याचा निश्चय केला. व त्यानें पित्याकडे जाऊन त्याची या गोष्टीस परवानगी मिळविली. परंतु इतर शाक्य स्त्रीपुरुषांनीं राजपुत्र वाड्यांतून जाऊं नये म्हणून राजाच्या परवानगीनें आटोकाट बंदोबस्त व प्रयत्न केला. पण राजपुत्राच्या गृहत्यागाचा दिवस येतांच अनेक देव, देवपुत्र, नाग, यक्ष, वगैरेंनीं त्याच्या जाण्याची तयारी करून राजपुत्राला त्याच्या वाड्यांतील राजस्त्रियांच्या नाशवंत देहासंबंधाचा किळसवाणा व वैराग्यजनक देखावा दाखविला. तेव्हां राजपुत्र निश्चयपूर्वक गृहत्याग करून नगराबाहेर पडला. तो गेल्याचें समजतांच राजवाड्यांत व नगरांत सर्व माणसें अत्यंत दुःख करूं लागलीं.

वैशाली नगराप्रत गमन.—सोळाव्या अध्यायांत हकीकत दिली आहे ती अशीः याप्रमाणें बोधिसत्व निघून गेल्यामुळें राजा शुद्धोदन, शाक्य कन्या गोपा व सर्व अन्तःपुर शोकानें व्याप्त झालें. इकडे बोधिसत्व आपलीं वस्त्रें एका लुब्धकरूपी देवपुत्राला देऊन व त्याचीं आपण धारण करून पुढें चालूं लागला. प्रथम तो एका शाक्य ब्राह्मणीच्या आश्रमास गेला. तिनें अन्नवस्त्र देऊन त्याचा चांगला सत्कार केला. तेथून तो पद्मा नांवाच्या ब्राह्मणीच्या आश्रमीं गेला. तिनेंहि त्याचा अन्नवस्त्रानें सत्कार केला. नंतर तो रैवत महर्षीकडे गेला. तेथेंहि त्याचा वरीलप्रमाणेंच सत्कार झाला. पुढें त्रिमदंडिकपुत्र नांवाच्या राजानें केलेल्या सत्काराचा स्वीकार करून तो हळूहळू वैशाली नगरीकडे गेला. तेथें आराड कालाम नांवाचा एक साधु तीनशें शिष्यांसह रहात होता. त्याजवळ बोधिसत्व जाऊन म्हणाला कीं, मीं ब्रह्मचर्य आचरण करतों. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, तूं ब्रह्मचर्य आचरण कर व अशा धर्मानें वाग कीं, तुला थोड्याच तपानें धर्मज्ञान मिळेल. बोधिसत्वानें विचार केला कीं, आपणाला छंद, वीर्य, स्मृति समाधि, प्रज्ञा हीं सर्व आहेत. तेव्हां आपण धर्माच्या प्राप्तीकरितां व साक्षात्काराकरितां प्रयत्न करावा असा विचार करून त्याप्रमाणें त्यानें प्रयत्न केला; व नंतर आराड कालाम यास जाऊन विचारिलें कीं, तूं देखील याचप्रमाणें धर्मप्राप्ति करून घेतलीस काय? यावर त्या साधूनें होय असें उत्तर दिलें. तेव्हां बोधिसत्व त्यास म्हणाला कीं, मीहि धर्मप्राप्ति करून घेतली आहे. यावर तो साधु म्हणाला कीं, हे गौतम जो धर्म मला ठाऊक आहे तो तुलाहि ठाऊक आहे, व जो तुला ठाऊक आहे तो मलाहि ठाऊक आहे; तेव्हां आपण दोघेहि या शिष्यगणांस शिकवूं. याप्रमाणें आराड कालाम यानें गौतमाची पूजा करून गौतमाला आपल्या बरोबरीचें स्थान दिलें. नंतर गौतमाला असें वाटूं लागलें कीं, हा आराडाचा धर्म मोक्षदायक नाहीं, तेव्हां आपण दुःखनाशाकरितां कोणत्या धर्माचा शोध करावा? याप्रमाणें विचार करून गौतम वैशाली नगरीचा त्याग करून मगध देशाप्रत गेला, व तेथें राजगृह नगराजवळ जो पांडव नांवाचा पर्वत आहे त्याच्या बाजूस जाऊन राहिला.

राजगृहीं गमन व बिंबिसाराची गांठ.—नंतर गौतमानें भिक्षा मागण्याकरितां राजगृह नगरांत प्रवेश केला. गौतम हळू हळू राजवाड्याजवळ जाऊं लागला असतां, राजगृहांतील लोक त्याला पाहून हा कोण ब्रह्मा किंवा इंद्र किंवा वैश्रवण आला आहे असें म्हणून आश्चर्यचकित दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागले. राजगृहाचा राजा बिंबिसार यानें त्याला पाहिल्यावर तो सपरिवार त्याची भेट घेण्याकरितां पांडवशैलाजवळ गेला, व त्यानें त्यास राजगृहांत राहण्याचा आग्रह केला. त्याचें वर्णन असें आहेः—

> परम प्रमुदितोस्मि दर्शनात्ते
> अवचियु स मागधराज बोधिसत्वं ।
> भव हि मम सहायु सर्वराज्यै
> अह तव दास्ये प्रभूतं भुङ्क्ष्व कामान ॥
> माच पुनर्वने वसाहि शून्ये
> माभूयु तृणेषु वसाहि भूमिवासं ।
> परम सुकुमारु तुभ्य कायः
> इह मम राज्यि वसाहि भुंक्ष्व कामान ॥

परंतु बोधिसत्वानें

> न च अहं कामगुणेभिरर्थिकोस्मि ॥
> कामं विषसमा अनन्त दोषा
> नरके प्रपातन प्रेतमिर्यग्योनौ ।

इत्यादि शब्दांत राजाला उत्तर दिलें, व राजा आपल्या नगरांत परत गेला.

गयेस तपाचरण.—सतराव्या अध्यायाचा सारांश येणेंप्रमाणें आहेः राजगृह नगरांत रामपुत्र रुद्रक नांवाचा एक साधु सातशें शिष्यगणासह रहात होता. त्याला पाहून बोधिसत्वास असें वाटलें कीं, हा माझ्यापेक्षां अधिक ज्ञानवान् नाहीं त्या अर्थी आपण याचें शिष्यत्व पतकरून त्यास समाधीची असारता दाखवून द्यावी. याप्रमाणें विचार करून बोधिसत्व रुद्रकाजवळ जाऊन म्हणाला, 'तुला हा धर्म कोणीं शिकविला? त्यानें उत्तर केलें कीं, मीच तो शिकलों, मला तो कोणींहि शिकविला नाहीं.' यावर बोधिसत्वानें त्यास समाधीचा मार्ग शिकविण्याविषयीं विनंति केली, व तो साधूहि बरें असें म्हणाला. नंतर बोधिसत्व एकांतांत गेला असतां त्याच्या पुण्य, ज्ञान, पूर्व सुचरित वगैरेंच्या प्रभावामुळें त्यास सर्व समाधीचें ज्ञान झालें. तेव्हां तो रुद्रकाजवळ येऊन म्हणाला, 'संज्ञानासंज्ञानसमापत्तीचा आणखी एखादा मार्ग आहे कीं काय?' रुद्रक म्हणाला 'नाहीं.' हें ऐकून बोधिसत्व समजला कीं, या रुद्रकाजवळ

श्रद्धा, वीर्य, समाधि, प्रज्ञा इत्यादि कांहीं एक नसून आपल्याजवळ तें सर्व आहे. तुझा धर्म मला ज्ञात झाला आहे असें जेव्हां त्यानें रुद्रकास सांगितलें तेव्हां रुद्रक लागलीच म्हणाला, तर चला, मग आपण दोघेहि ह्या शिष्यगणास शिकवूं. यावर बोधिसत्त्व उत्तरला. 'पण या मार्गानें निर्वाणप्राप्ति होणार नाहीं; हा मार्ग निरुपयोगी आहे.' असें म्हणून बोधिसत्त्व तेथून निघून गेला. तेव्हां रुद्रकाच्या पांच भद्रवर्गीय शिष्यांनीं आपण येथें रात्रंदिवस प्रयत्न करून आपणांस जें प्राप्त होत नाहीं तें या श्रमणानें इतक्या लवकर प्राप्त करून घेतलें त्या अर्थी हा मोठा उपदेशक होईल असा विचार करून ते रुद्रकास सोडून बोधिसत्त्वाकडे गेले. पुढें बोधिसत्त्व राजगृह सोडून त्या पांच शिष्यांसह मगध देशांत प्रचार करण्याकरितां गेला, व फिरत फिरत गयेस येऊन पोहोंचला. तेथें अनेक श्रमण व ब्राह्मण निरनिराळ्या रीतींनीं तप करीत असलेले पाहून स्वतः बोधिसत्त्वानेंहि सहा वर्षें अतिशय घोर असें तपाचरण केलें. या तपानें त्याचें शरीर अतिशय कृश झालें. त्याच्या बरगड्या कर्कटकाप्रमाणें झाल्या, व त्याच्या पाठीचा कणा वेणीप्रमाणें दिसूं लागला. तो कांहीं दिवस एक तांदूळ खाऊन व नंतर कांहीं दिवस एकच तिळ खाऊन राहिला, आणि नंतर त्यानें कांहीं दिवस निराहार वृत्ति ठेविली यामुळें तो अतिशयच कृश झाला. तो इतका कीं, कानावाटे आंत गेलेलें तृणबीज नाकांतून बाहेर पडत असे व नाकावाटें गेलेलें कानांतून बाहेर पडत असे. याप्रमाणें त्यानें अत्यंत कडक तपाचरण केलें.

**माराचा मोह पाडण्याचा प्रयत्न व बोधिसत्त्वाचा प्रथम शरीरबल प्राप्त करण्याचा निश्चय.**—यानंतर अठरावा अध्याय सुरू होतो. त्यांत म्हटलें आहे कीं, याप्रमाणें बोधिसत्त्व सहा वर्षें दुष्कर तपश्चर्या करीत असतां पापी मार एकसारखा त्याच्या पाठीस लागला होता, व त्याच्या शरीरांत प्रवेश करण्याची संधि पहात होता परंतु त्याला अवसर न मिळाल्यामुळें तो बोधिसत्त्वास येऊन म्हणतोः 'हे शाक्यपुत्र तूं शरीरास कष्ट देऊन काय करतोस? तूं जर जिवंत राहिलास तर धर्माचरण करून तुला श्रेयप्राप्ति होईल, व दानादिकांमुळें तुला पुण्यप्राप्ति होईल' तेव्हां बोधिसत्त्वानें त्यास उत्तर केलेंः 'पुण्यप्राप्ति हेंच ज्यांचें ध्येय असेल त्यांस तूं या गोष्टी सांग. मी मरण्याला भीत नाहीं; कारण आयुष्याच्या अंतीं मरण हें आहेच. मी ब्रह्मचर्यामुळें या जगांत पुन्हां येणार नाहीं, व मी तुझ्या काम, रति, क्षुत्पिपासा इत्यादि सैनिकांवर जय मिळविणार आहे.' हें भाषण ऐकून मार अंतर्धान पावला. यानंतर बोधिसत्त्वाच्या मनांत असा विचार आलाः 'हा मार्ग बोधिप्राप्तीचा किंवा जातिजरामरण यांचा नाश करण्याचा नव्हे, तर आपण पित्याच्या उद्यानामध्यें जंबुवृक्षाखालीं ध्यानस्थ बसलों होतों तो मार्गच बोधिप्राप्ति व जातिजरामरणदुःख यांचा नाश करणारा आहे. तर आपण आतां त्याच मार्गाचें अवलंबन करावें. परंतु त्या मार्गाचा अवलंब करणें शरीराच्या दुर्बल स्थितींत शक्य नसल्यामुळें, प्रथम आहार मिळवून व शरीरबल स्थापन करून नंतर बोधिमंडाकडे जावें.' अशा रीतीनें, बोधिसत्त्वानें सहा वर्षें तपाचरण केल्यावर आसनावरून उठून आहार मिळविण्याकरितां गमन केलें. तेव्हां त्याबरोबर जे पांच शिष्य आले होते, ते बोधिसत्त्व तपाचरण सोडून आहार मिळविण्याकरितां गेलेला पाहून त्याला सोडून वाराणसीप्रत गेले. बोधिसत्त्व जात असतां दहा कुमारी त्याच्या दर्शनाकरितां व पूजेकरितां आल्या. त्यांची पूजा व सत्कार यांचा स्वीकार करून व गोचर ग्रामामध्यें भिक्षा मागून बोधिसत्त्व वर्ण, रूप व बल यांनीं युक्त असा झाला. तेव्हांपासून बोधिसत्त्वाला लोक सुंदर श्रमण असें म्हणूं लागले.

**बोधिसत्त्वाच्या निरिच्छतेचें उदाहरण.**—याच ग्रामीं सुजाता नांवाची ग्रामिकाची मुलगी बोधिसत्त्व तपाचरण करीत असतांना त्याच्या तपःसिध्द्यर्थ व शरीरस्वास्थ्याकरितां दररोज आठशें ब्राह्मणांनां भोजन घालीत असे. तिची अशी इच्छा होती कीं, बोधिसत्त्वानें आपलें भोजन ग्रहण करून नंतर आपणांस उपदेश करावा. इकडे बोधिसत्त्व सहा वर्षें तप करीत राहिल्यामुळें त्याचीं वस्त्रें जीर्ण झालीं होतीं. तीं चांगल्या वस्त्राच्या शोधांत असतां त्याच वेळीं सुजातेची एक दासी मरण पावून तिचें प्रेत वस्त्र गुंडाळून श्मशानांत ठेविलेलें होतें. बोधिसत्त्वानें या प्रेताचें वस्त्र डाव्या पायानें ओढून उजव्या हातानें घेतलें आणि पुष्करणीवर तें धुवून शिवून धारण केलें. नंतर त्याला अविमलप्रभ नांवाच्या देवपुत्रानें काषाय वस्त्रें दिलीं. तीं धारण करून बोधिसत्त्व गोचर ग्रामाकडे निघाला. तेथें सुजातेनें त्याला सुवर्णपात्रांत भोजन दिलें. पण बोधिसत्त्वानें अन्न ग्रहण करून सुवर्णपात्र निरंजना नदींत टाकून दिलें. हें पात्र पुरंदरानें पूजेकरितां नेलें. नंतर बोधिसत्त्व बोधिद्रुमाकडे चालता झाला.

**बोधिद्रुमाकडे प्रयाण.**—१९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं, याप्रमाणें बोधिसत्त्व निरंजना नदींत स्नान करून व शरीरबल संपादन करून बोधिद्रुमाकडे जात असतां त्याच्या मार्गावर रत्नखचित ध्वजपताकांनीं अलंकृत असे तालवृक्ष इत्यादि निर्माण झाले व अप्सरादिकांनीं त्याचा मार्ग सुगंधयुक्त जलानीं सिंचित केला. वाटेंत कालिक नागराजाची पट्टराणी वगैरेंकडून त्याचा सत्कार करण्यांत आला.

यापुढील २० व्या अध्यायाचें तात्पर्य येणें प्रमाणें आहेः—याप्रमाणें बोधिसत्त्व बोधिमंडाप्रत जाऊन तेथें आसनस्थ झाल्यावर त्यानें बोधिसत्त्व संचोदनी नांवाचे किरण आपल्या सव बाजूंनां टाकल्यामुळें सर्व दिशा प्रकाशित झाल्या. तेव्हां निरनिराळ्या दिशांचे बोधिसत्त्व तेथें येऊन त्यांनीं बोधिमंडाला बसलेल्या बोधिसत्त्वाची पूजा करून स्तुति केली; व नंतर ते आपआपल्या ठिकाणीं परत गेले.

**माराचा पराभव.**—पुढें २१ व्या अध्यायांत असें म्हटलें आहेः—नंतर बोधिसत्वानें आपल्या भ्रूविवरांतरापासून मार-मंडल-विध्वंस-कारी नांवाचें किरण टाकिले. त्यामुळें मारास धाक उत्पन्न होऊन त्याला निरनिराळ्या ३२ अशुभ देखाव्यांनीं युक्त असें एक स्वप्न पडलें. तेव्हां मार भयभीत होऊन त्यानें आपल्या सेनेला बोलावून आणिलें.' यानंतर त्याच्या सेनेचें कुतूहलोत्पादक वर्णन आहे. माराचे 'महस्र पुत्र होते, त्यांत सार्थवाह इत्यादि कांहीं बोधिसत्वास अनुकूल होते, व इतर मारपक्षाचे होते. त्यांच्यामध्यें बोधिसत्वाच्या बलाविषयीं अनुकूल प्रतिकूल संभाषण झालें. नंतर मार व बोधिसत्व यांत युद्ध व संभाषण होऊन माराचा पराभव झाला व मार अंतर्धान पावला. मग मारानें आपल्या मुलींनां बोलावून बोधिसत्वास जिंकण्यास पाठविलें. तेव्हां मारकन्यका व बोधिसत्व यांमध्यें पुढील तऱ्हेचें संभाषण झालें.

मारदुहिता म्हणतेः

प्रेक्ष हि तावच्चंद्रवदना वदनावलिनिभा
वाच मनोज्ञ श्लक्ष्ण दशना हिमरजतनिभाः।
ईदृश दुर्लभाः सुरपुरे कुत मनुजपुरे
ते त्वया लब्ध ये सुरवैरभिलषित सदा॥

बोधिसत्व उत्तर करितोः

पश्यामि कायममेध्य मशुचिं कृमिकुल भरितं
जर्जर मित्वनकच भिदुरमसुखपरिगतम्
यत्सचराचरस्य जगतः परमसुखकरं
तत्पदमच्युतं प्रतिलभे बुधजनमहितम्॥

इत्यादि.

याप्रमाणें मारदुहितांनीं अनेक प्रकारचें भाषण केलें; परंतु बोधिसत्व त्यांस वश झाला नाहीं. तेव्हां त्यांनीं त्याप्रमाणें जाऊन पित्यास सांगितलें. त्या वेळीं श्रीवृद्धि, तपा, श्रेयसी इत्यादि आठ बोधिवृक्षदेवता होत्या. त्यांनीं बोधिसत्वाची पूजा करून तूं लवकरच दशबल होशील असा त्यास आशीर्वाद दिला; व त्याची षोडशाकारानें श्री वाढविली. इकडे शुद्धावासकायिका नांवाच्या देवपुत्रांनीं षोडशाकारांनीं मारास दुर्बल केलें व त्यानें विच्छेदन केलें.

**बोधिप्राप्ति.**—२२ व्या अध्यायाचा सारांश असाः याप्रमाणें बोधिसत्व मारावर विजय मिळवून प्रथम पहिल्या व नंतर दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या याप्रमाणें ध्यानांत निमग्न झाला. अशा रीतीनें शुद्धचित्त झालेला बोधिसत्व विचार करूं लागला कीं, हीं जरामरणादि कशापासून उत्पन्न होतात? हीं जातीपासून उत्पन्न होतात. जाती कशापासून उत्पन्न होते? जाति भवापासून उत्पन्न होते. भव कशापासून उत्पन्न होतो? भव उपादानापासून होतो. उपादान तृष्णेपासून उत्पन्न होतें. याप्रमाणें अविद्येपासून हीं सर्व उत्पन्न होतात असा त्यानें विचार केला. याप्रमाणें एक आठवडाभर बोधिसत्व बोधिमंडाच्या ठिकाणीं बसून राहिला. तेव्हां त्याला बोधिप्राप्ति झाली व मीं जातिजरामरणदुःखाचा अंत केला असें तो म्हणाला.

२३ व्या अध्यायांत सांगितलें आहे, कीं, याप्रमाणें बोधिसत्व बोधिमंडाच्या ठिकाणीं बसला असतां अनेक देवपुत्र, देव, इंद्र, महाराज, भौम व अंतरिक्ष देव इत्यादिकांनीं त्याची स्तुति केली.

याप्रमाणें देवांकडून स्तविलेला बोधिसत्व आसनस्थ होऊन बोधिवृक्षाकडे पहात एक आठवडाभर राहिला. सात दिवसांनंतर कामावचर नांवाच्या देवपुत्रांनीं त्याला सुगंधयुक्त उदकानें स्नान घातलें. नंतर समंतकुसुम नांवाचा देवपुत्र येऊन त्यानें बुद्धास विचारिलें कीं, हे भगवन् ज्या समाधीच्या योगानें तूं सात दिवस एकाच आसनावर राहूं शकलास त्या समाधीचें नांव काय? बुद्धानें उत्तर केलें, हिला प्रीत्याहारव्यूह नामक समाधि म्हणतात. तेव्हां देवपुत्रानें त्याची स्तुति केली. दुसऱ्या आठवड्यांत बोधिसत्वानें दीर्घचंक्रांत भ्रमण केलें. तिसऱ्या आठवड्यांत तो बोधिवृक्षाकडे अनिमिष नेत्रांनीं पहात राहिला. चौथ्या आठवड्यांत त्यानें सूक्ष्म चक्रामध्यें पूर्वसमुद्रापासून पश्चिमसमुद्रापर्यंत भ्रमण केलें. नंतर पापी मार बुद्धाकडे येऊन म्हणाला कीं, हे भगवन् आतां तूं निर्वाणाप्रत जा. तुझी निर्वाणाची वेळ झाली आहे. तेव्हां बुद्धानें उत्तर दिलें, मी प्रथम स्थविर भिक्षु बहुश्रुत, विनीत, विशारद असे निर्माण करून त्यांच्याकडून धर्मप्रसार करीन व त्यानंतर निर्वाणास जाईन. तेव्हां मार दुःखित होऊन निघून गेला. तेव्हां त्याच्या रति, अरति व तृष्णा या तीन मुली बुद्धास मोह पाडण्याकरितां आल्या; परंतु बुद्धानें त्यांजकडे पाहिलें नाहीं. तेव्हां त्या तशाच जराजर्जर होईपर्यंत उभ्या राहिल्या. नंतर त्यांनीं बुद्धाची क्षमा मागितली. पांचव्या आठवड्यांत तथागत मुचिलिंद नागराजाच्या भवनांत राहिला. त्यानें पर्जन्य आला तेव्हां त्यावर फणांचें आच्छादन केलें. याप्रमाणें सर्व दिशांच्या नागांनीं त्यावर आपल्या फणांचें आच्छादन केलें. व पर्जन्य थांबल्यावर नमस्कार करून ते आपआपल्या घरीं गेले. सहाव्या आठवड्यांत तथागत मुचिलिंद नागराजाच्या घरून निघून न्यग्रोध वृक्षाखालीं येऊन बसला. तेव्हां निर्ग्रंथ, परिव्राजक, श्रावक वगैरेंनां ह्यानें पावसाचा आठवडा सुखानें घालविल्याबद्दल आश्चर्य वाटलें. सातव्या आठवड्यांत तथागत तारायण वृक्षाच्या मुळाशीं बसला. त्या वेळीं त्रपुष व भल्लिक या नांवाचे दोन वणिगबंधू माल घेऊन जात होते. त्यांच्या गाडीचीं चाकें जमीनींत आंसापर्यंत गेलीं. तेव्हां त्यांनीं बोधिसत्वाची स्तुति केली. व बोधिसत्वाला रत्नपात्रामध्यें भोजन दिलें. तेव्हां बोधिसत्वानें त्यांस स्वस्तिकारक आशीर्वाद दिला. त्याचें वर्णन सुमारें ५० पद्यांत केलें आहे.

**धर्मचक्रप्रवर्तन**—२५ व्या अध्यायांतील कथाः नंतर बोधिसत्वानें असें मनांत आणिलें कीं, मी धर्म जाणला. तर मी आतां धर्मचक्राचें प्रवर्तन करितों. असें म्हणून त्यानें ऊर्णाकोशापासून प्रभाविसर्जन केलें. त्या प्रभेमुळें सर्व वस्तू सुवर्णासारख्या दिसूं लागल्या. बोधिसत्वाच्या मनांतील धर्मप्रवर्तनाचा वृत्तांत

ग्रहपास करून त्यानें देवपुत्रांनां बोलावून आणून आपण तथागतास धर्मचक्रप्रवर्तन करण्याविषयीं विनंति करूं असें म्हटलें. व अनेक शतसहस्र ब्राह्मण घेऊन तो तथागताकडे आला, व त्यानें त्याची स्तुति केली. नंतर देवांचा इंद्र शक्र अनेक देवांसह येऊन बुद्धास धर्मचक्रप्रवर्तनाविषयीं विनंति करूं लागला. नंतर बुद्धानें धर्मचक्र प्रवर्तनाचा निश्चय केला. तेव्हां पृथ्वीवरील व आकाशांतील देवांनीं व ब्रह्मकायिक देवांनीं मोठा घोष केला.

उपदेश.–२६व्या अध्यायांतील कथासूत्र येणेंप्रमाणें आहे: नंतर बुद्धानें विचार केला कीं, आपण जो मनुष्य आपल्या धर्माची हेटाळणी करणार नाहीं त्यास प्रथम उपदेश करावा. म्हणून त्यानें रुद्रक रामपुत्र व अंडकालाम यांच्याबद्दल तपास केला. तेव्हां ते मृत झाले असें त्यास समजलें; व पांच भद्रवर्गीय शिष्य वाराणसीस आहेत असें कळलें. तेव्हां तो वाराणसीस जाण्यास निघाला. वाटेंत त्याचा व आजीवकाचा संवाद झाला. त्यांत त्यानें आजीवकास देवासुरगंधर्वांमध्यें माझ्याबरोबरीचा कोणी नाहीं मी जिनांच्या बरोबरीचा आहे असें सांगितलें. वाराणसीस गेल्यावर नावेकरितां देण्यास पैसा नसल्यामुळें तो आकाशांतून परतीरास गेला. ही गोष्ट राजा बिंबसार यास कळल्यावर त्यानें सर्व प्रव्रजितांस नावेचें भाडें माफ केलें. नंतर तथागत वाराणसीमध्यें भिक्षा मागण्याकरितां गेला असतां त्याला दुरून येत असतांना पांच भद्रवर्गीयांनीं पाहिला. तेव्हां त्यांनीं विचार केला कीं, यानें पूर्वीचें तपाचरण सोडून दिलें असावें असें दिसतें. त्या अर्थी आपण यास उत्थापन देऊं नये व त्याचा आदरसत्कारहि करूं नये. परंतु जसजसा बुद्ध जवळ येऊं लागला, तसतसें त्यांस आसनावर बसणें अशक्य होऊं लागून ते आपोआप उठून उभे राहून त्याचा सत्कार करूं लागले. नंतर बुद्धानें आसनावर बसून आपल्या शरीरापासून प्रभा विसर्जन केली. तीमुळें सर्वत्र प्रकाश पडला. नंतर त्यानें रात्रीच्या पहिल्या प्रहरांत शांत बसून दुसऱ्या प्रहरामध्यें कांहीं कथा सांगून तिसऱ्या प्रहरामध्यें भद्रवर्गीयांस उपदेश केला. नंतर मैत्रेय बोधिसत्त्व तेथें येऊन त्यानें बोधिसत्त्वास धर्मचक्र कसें प्रवर्तन केलें असें विचारिलें. तव्हां बोधिसत्वानें गंभीर, दुर्दमन, दुरनुबोध, दुर्विज्ञेय इत्यादि चक्रें व तथागत, सम्यग्संबुद्ध, स्वयंभू इत्यादि कोणास म्हणावें हें सांगितलें. शेवटीं २७व्या आध्यायांत ग्रंथश्रवणमाहात्म्य वर्णन केलें आहे.

**ललितविस्तराचें चांदोरकरांनीं केलेलें चिकित्सक परीक्षण.**—ललितविस्तरापासून निराळा पुरावा गोळा करून तो पुढें मांडण्याची खटपट धुळ्याच्या रा. चांदोरकरांनीं केली आहे ती येथें देतों.

गौतमाच्या चरित्रांत व त्याविषयींच्या समजुतींत इतकी कांहीं असंबद्धता भरली आहे कीं, गौतमबुद्ध नांवाची वस्तुतः कोणी व्यक्ति नसून तें चरित्र म्हणजे एक सूर्योत्प्रेक्षाच वर्णिलेली आहे असें सेनार्ट नांवाच्या एका ग्रंथकारानें आपलें मत दिलें आहे.

**गौतमाचें नांव.**—गौतमाच्या चरित्राचा विचार करूं लागलों म्हणजे प्रथम त्याच्या नांवाचाच प्रश्न पुढें उभा राहतो. गौतमाचें नांव कोणतें? अमरकोशांत 'गौतम' हें नांव आहे.

सर्वज्ञः सुगतो बुद्धो धर्मराजस्तथागतः।
समंतभद्रो भगवान् मारजिल्लोकजिज्जिनः॥ इत्यादि

यांत 'विशेषनाम' कोणतें? शाक्यमुनि, शाक्यसिंह, नागराज, भदन्त, हीं नांवें विशेषनामें नव्हत. सिद्धार्थ, विनायक, त्यांपैकींच. गौतम (विनयति शास्तीति विनायकः। गौतमो गौतमगोत्रावतारात॥ अमरकोश क्षीरस्वामीकृत टीकेसह १. १३–१५) या नांवाबद्दल स्पेन्स हार्डीनें स्पष्ट असें म्हटलें आहे कीं, हें पैतृक नांव आहे. गौतमाची एक सावत्र आई गौतमी असावी असें दिसतें, व तिनेंच गौतमाचें त्याच्या आईच्या निधनानंतर पालन केलें, म्हणून 'गौतम' हें नांव त्यास मिळालें असावें. 'भगवान्' हें नांव महायानी अश्वघोषानंतर 'सद्धर्मपुण्डरीकांत' आढळतें. याचें कारण उघड आहे कीं, त्यापूर्वी कित्येक वर्षें बौद्ध संप्रदायावर श्रीभगवद्गीतेचा बराचसा परिणाम झाला होता. अश्वघोषाच्या 'प्रबुद्धधर्मांत'हि भगवद्गीतेशीं सम असे कित्येक विचार आहेत. एवढेंच नाहीं तर समान वचनेंहि त्यांत आहेत! परंतु या ग्रंथांत 'भगवान्' हें नांव आढळत नाहीं. आपल्या पुराणांत जे उल्लेख आहेत त्यांवरूनहि या बुद्धाच्या नांवाचा निश्चय होत नाहीं.

ततः कलौ संप्रवृत्ते संमोहाय सुरद्विषाम्।
बुद्धो नाम्ना ऽञ्जनसुतः कीकटेषु भविष्यति॥ १. ३. २४

या श्रीमद्भागवतांतील श्लोकावरून 'बुद्ध' हेंच गौतमाचें नांव होतें असें दिसतें.

विष्णुपुराणांत तर त्याचें नांव नुसतें 'मायामोह' म्हणूनच दिलें आहे. गौतमाच्या आईचें नांव महामाया किंवा माया, असें होतें व तिच्या पोटीं मोहरूप पुत्र उत्पन्न झाला त्यास 'मायामोह' म्हणतात, असा या पुराणांतील श्लोकाचा भावार्थ आहे.

तपस्याभिरतान्सोथ मायामोहो महासुरान्।
मैत्रेय ददृशे गत्वा नर्मदातीर संश्रयान्॥

अग्निपुराणांत 'बुद्धावतार कथनम्' या १६ व्या अध्यायांत

रक्षरक्षेति शरणं वदन्तो जग्मुरीश्वरम्।
मायामोहस्वरूपोऽसौ शुद्धोदनसुतोऽभवत्॥

श्रीमद्भागवत, विष्णुपुराण व अग्निपुराण यांतील हे जे उतारे दिले आहेत त्यांवरून त्या वेळीं बुद्धाचें नांव गौतम होतें हें या श्लोककारांस माहीत नाहींसें दिसतें. पुराणांतील या श्लोकांचा काल निश्चयानें कनिष्काच्या वेळचा अथवा त्यानंतरचा असला पाहिजे. हा कालनिश्चय थोडक्यांत करूं.

अश्वघोषाच्या 'प्रबुद्धधर्मांत' सुखवति सूत्राचा उल्लेख केलेला आहे. सुखवतिसूत्रांत अनादि बुद्ध, त्याचे बोधिसत्त्व व त्याचे

मानवी अवतार यांची कल्पना आहे. म्हणजे त्या वेळीं 'बुद्धास' अवतारत्व प्राप्त झालेलें होतें; अश्वघोष हा वसुमित्र अथवा वसुबंधु याचा समकालीन होता. कनिष्कानें जालंधर येथें जी संगीति भरविली होती तिचा अध्यक्ष वसुमित्र हा होता. म्हणजे कनिष्काच्या वेळीं बुद्धाचें अनादित्व व सर्वज्ञत्व प्रस्थापित झालें होतें. कनिष्कानें आपल्या नाण्यावर बुद्धाची मूर्ति खोदविलेली आहे. यावरून असें सहजच अनुमान होतें कीं, बुद्ध हा परब्रह्म व गौतम हा त्या परब्रह्माचा मानवी अवतार अशी समजूत कनिष्काच्या वेळीं दृढ झालेली असावी. कनिष्काच्या नंतर वासुदेवाच्या वेळीं वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन झालें. त्याच्या वेळीं नारायण वासुदेवाचीं देवालयें बांधिलीं गेलीं. यावरून कदाचित् चातुर्वर्णीयांनीं बुद्धास अश्वघोषाचा बुद्ध – बिंबसाराचा अथवा प्रसेनजित् यांचा गौतम नव्हे–व्यक्ति म्हणून नव्हे, तर एक मूर्तरूप कल्पना म्हणून आपल्या अवतारांत त्याची गणना केली असावी असें वाटतें.

तेव्हां विशिष्ट व्यक्ति म्हणून नव्हे, तर केवळ एक कल्पना म्हणून जर आपल्या पुराणकारांनीं बुद्धास अवतार कल्पिलें असेल, तर त्याचें विशिष्ट नांव त्यांनीं दिलें नाहीं हेंहि योग्यच आहे. परंतु तसें नसल्यास त्यांपैकीं कोणींहि बुद्धाचें नांव न देणें हें आश्चर्य आहे. त्या वेळींहि गौतम बुद्धाच्या नांवाचा निश्चय नव्हता काय? स्पेन्स हार्डीनें तर 'सिद्धार्थ' हें बुद्धाचें पांचव्या दिवशीं पाळण्यांत ठेविलेलें नांव होतें, असें म्हटलें आहे.

**गौतमाचें कुल.**— गौतमाच्या नांवाचा असा अनिश्चय आहे. आतां त्याच्या कुलासंबंधीं विचार करूं.

सुत्तनिपाताच्या उरगवर्गांतील खड्गविषाणसूत्रांत आणि महावर्गांतील प्रव्रज्जसूत्रांत गौतम व बिंबसार यांचा जो संवाद आहे, त्यांत गौतम आपण आदिच्च कुटुंबांतील आहों असें म्हणतो. गौतम हा शाक्यांपैकीं होता, अशी प्रसिद्धि आहे. परंतु शाक्यांत लच्छवी ( लिच्छवी ), मल्ल, नाग, बलि व कोळी, यांचा समावेश होतो ( ५२१ कुस जातक, ४६५ भद्र जातक ३०१ चुल्लकलिंग ). गौतमाची रक्षा ज्या सात जणांनीं वाटून घेतली ते मगधांतील मागध, वैशालीचे लच्छवी, कपिलवस्तूचे शाक्य, अल्लकप्पचे बली, रामग्रामचे कोळी, पावाचे मल्ल व वेथदीपाचा ब्राह्मण, ज्यानें रक्षेचा विभाग केला तो, यांपैकीं पहिला व शेवटचा खेरीज करून इतर सर्व शाक्यवंशीय होते. कुस जातकांत गौतमाचा मूळ पुरुष ओक्काक हा मल्लांचा राजा होता असें म्हटलें आहे. गौतमानें आपल्या परिनिर्वाणाच्या वेळीं ( मरणसमयीं ) मल्लांस बोलाविण्यास आनंद यास आज्ञा केली होती. लिच्छवींचा नाश म्हणजे आप्तांचा नाश टाळण्याचा गौतमानें प्रयत्न केला. तेव्हां गौतम शाक्य खरा, परंतु वर दिल्यापैकीं कोणत्या कुळांतील? आदिच्च कुटुंब हें कोणतें? आदिच्च कां औदिच्य! असे अनेक प्रश्न आहेत. भागवतांत गौतम कोणत्या कुळांत जन्मला तें दिलें आहे व तें कुळ आज आपणांस ओळखतांहि येतें.

ततः कलौ संप्रवृत्ते संमोहाय सुरद्विषाम् ।
बुद्धो नाम्नाऽञ्जनसुत कीकटेषु भविष्यति ॥ १.३, २४

येथें 'कीकटेषु' हें बहुवचनी पद जनवाचक अथवा जनपदवाचक आहे, या संशयाची निवृत्ति यांच्या वरचा श्लोक वाचला म्हणजे होते.

एकोनविंशे विंशतितमे वृष्णिषु प्राप्य जन्मनि ।
रामकृष्णाविति भुवो भगवानहरद्भरम् ॥

येथें 'वृष्णिषु' हें पद 'कीकटेषु' पदाप्रमाणेंच सप्तमीचें बहुवचन आहे, आणि हीं दोन्ही पदें एका विशिष्ट अर्थानेंच उपयोजिलेलीं आहेत. रामकृष्ण हे 'वृष्णींत' जन्मले व बुद्ध हा 'कीकटांत' जन्मला. 'वृष्णी' हें कुल आहे, जनपद नाहीं. तेव्हां 'कीकट' हेंहि येथें कुलवाचक आहे. जनपदार्थी नाहीं.

हे पुरातन 'कीकट' आजचे कोण याचा निश्चय करण्यापूर्वी गौतमाचा वंश प्रथम देतों.

**गौतमाचा वंश.**—गौतम हा बापाच्या बाजूनें 'कीकट' होता व त्याचे मातुल 'कोळी' होते. 'कुनाल' जातकांत जी कथा दिली आहे तिच्या व इतर ग्रंथांत दिलेल्या हकीकतीच्या आधारें गौतम वंशाची हकीकत अशी आहे.

ओक्काक म्हणून एक राजा ( राजा हा शब्द सद्यःकालीन रूढार्थी नाहीं ) होता. त्यास चार मुलें व पांच मुली होत्या. संततीची अशी समृद्धि असूनहि त्यानें पुन्हां नूतन वधू केली. त्यामुळें पूर्वीची संतति सहजच देशोधडीस लागली. हीं भावंडें कपिलाश्रमाच्या शेजारच्या अरण्यांत गेलीं, व तेथें आपल्यांपैकीं वडील बहिणीस माता म्हणून ठरवून बाकीच्या चार बहिणींशीं चौघा भावांनीं लग्न केलें. कदाचित् हीं भावंडें सावत्र असावीं. माता म्हणून जी सर्वांत वडील बहीण होती तिला रक्तदोष होता, म्हणून तिला एका झाडाच्या ढोलींत ठेविली होती. तेथें कोळी वंशांतील—शाक्यच—राम नांवाचा कोणी आला. त्यासहि रक्तदोष होता. त्यानें या वडील बहिणीस पाहून तिला बाहेर आणली व तिच्याशीं विवाह केला. पुढें कीकटांनीं आपसांत व कोळी यांच्याशीं परस्परविवाह केले आहेत. दोन्ही कुलें रोहिणी नदीच्या दोन तीरांवर शेजारीं शेजारीं त्या नदीच्या पाण्यावर शेती पिकवून रहात असत.

एके समयीं अवर्षण पडलें असतां पाण्यावरून या दोन्ही कुलांत तंटा उपस्थित झाला; व दोघेहि हातघाईवर आले. कोळ्यांनीं कीकटांचा तुम्ही व्यभिचारी, जारकर्मी, आपल्या बहिणींशीं जार कर्म करणारे आहां, असा अधिक्षेप केला. कीकटांनीं तुम्ही कुष्ठी वन्यपशुप्रमाणें झाडाच्या ढोलींत राहणाऱ्यापासून झाला आहांत अशी कोळ्यांची निर्भर्त्सना केली. गौतमानें हा तंटा मिटविण्याचा प्रयत्न केला. परंतु तो फारसा यशस्वी झाला नाहीं.

"बुद्धघोषानें ज्या कथा वर्णन केल्या आहेत, त्यांतील २६ व्या अध्यायांत या दोन वंशांची जी हकीकत वर्णन केलेली आहे, ती वृक्षरूपानें खालीं देतों, म्हणजे या दोन कुटुंबांचा परस्पर संबंध कसा होता हें समजणें सुलभ होईल.

**गौतमवंश** ( कपिलवस्तु )




टीपः—श्रीमद्भागवतांत बुद्ध हा अञ्जनसुत म्हणून उल्लेख आहे.

गौतमाच्या वंशाची ही अशी हकीकत आहे. गौतम शाक्य खरा; परंतु तो मल्ल, लिच्छवी, नाग, बलि अथवा कोळी नव्हता. त्याचें कुल औदिच्य किंवा आदित्य म्हणजे कदाचित् 'कीकट' होतें. या 'कीकटांची'–ओक्काकाच्या वेळीं काय असेल तें असो, परंतु गौतमाच्या वेळीं जो व्यभिचार गणला आहे अशा संबंधापासून उत्पत्ति झालेली होती; कदाचित् हे चातुर्वर्ण्यबाह्य असल्यानें यांचे हे विवाह त्यांच्या धर्माच्या दृष्टीनें निंद्यहि नसावेत. गौतमानें तर अशा प्रकारें आपली उत्पत्ति झाली याबद्दल कस्सपसुत्तांत प्रौढी मारली आहे.

अशा चालीरीतीचे 'कीकट' हे आजचे 'कैकाडी' होत असें निर्णीत झालेलें आहे [असें रा. चांदोरकर समजतात. याला पुरावा खात्रीलायक नाहीं. रा. वि. का. राजवाडे यांनीं कीकट व कैकाडी हे एकच म्हणून म्हटलें आहे त्यावरून त्यांचें एकत्व सिद्ध झालें आहे अशी रा. चांदोरकर यांची भावना झाली असावी असें दिसतें]. गौतमाचीं पितृ व मातृकुलें कैकाडी व कोळी होतीं, असलें हें विधान ऐकून आज कोळी, कैकाडी यांची संस्कृति व त्यांचा समाजांतील दर्जा पाहिला म्हणजे कसेंसेंच वाटतें; परंतु इतिहासदृष्ट्या विचार केला तर तसें वाटण्याचें कांहीं कारण नाहीं."

**शाक्यांची नीतिमत्ता.**—शाक्यांत ( लिच्छवींस अनुलक्षून हें लिहिलेलें आहे ) स्त्रियांच्या नीतीसंबंधीं विशेषसा निग्रह नव्हता, असें कित्येक जातकांवरून व खुद्द गौतमचरित्रावरून दिसतें. कट्टहारी जातकांत महानाम शाक्याची कन्या वासभखत्तिया ही कोसलाधिपाजवळ होती. सिगाल जातकावरून एका शाक्य कन्येवर कोसलाधिपाच्या राजगृहींतील एक नापिक आसक्त झाला होता. स्वतः गौतमाचें मत स्त्रियांसंबंधीं अत्यंत नीच होतें–इतकें कीं, मिलिंदप्रश्नांत शेवटीं 'अमरा' नांवाच्या स्त्रीच्या नियमाबद्दलहि नागसेनास शंका प्रगट करावी लागली. याहूनहि त्या वेळच्या नीतीचें उठावदार चित्र स्पेन्स हार्डीनें दिलें आहे. वैसालीची (शाक्यांचें स्थान) अम्रपली नांवाची वेश्या अत्यंत सुंदर होती; व तिच्यामुळें वैसाली नगरीस अनेक फायदे होते. हें पाहून बिंबसारानेंहि राजगृहीं सर्व सुंदर स्त्रिया एकत्र करून त्यांतील अत्यंत सुंदर शालिवति नामक राजकन्या निवडून तिला वेश्यापण दिलें; व सर्व शहरानें कांहीं द्रव्य देऊन तिची योग्य प्रकारें स्थापना केली. हिच्याच पोटीं 'जीवक' नांवाचा प्रसिद्ध वैद्य जन्मला.

या प्रकारची त्या वेळीं शाक्यांची—म्हणजे गौतम ज्या कुलांतील त्यांची–नीति असल्यानें 'कोळी व कैकाडी' यांचीहि

नीति त्याच दर्जाची असल्यास त्यांत नवल नाहीं; व कर्मीपणाहि नाहीं. हे कीकट व कोळी आपला चरितार्थ रोहिणी नदीच्या पाण्यावर होणाऱ्या शेतीवर करीत असत; तसेंच भद्सा‌ल जातकावरून गौतमाच्या ह्यातींतच प्रसेनजित् याचा पुत्र जो विदूद्भ, त्यानें व ऐतिहासिक माहितीवरून अजातशत्रु यानें या सर्व शाक्यांचा जो निःपात केला, त्यावरून हे शाक्य आर्यावर्ताबाहेरून केवळ उदरभरणार्थच आले असावे असें दिसतें, मुलुखगिरीवर आलेले दिसत नाहींत. अशा कुळांत गौतमाचा जन्म झाला होता. यावरून 'दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम्।' ही कर्णोक्ति गौतमानेंहि उच्चारण्यासारखी होती असें चांदोरकर म्हणतात.

या कुलकथेवरून गौतमचरित्राचें रहस्य तर कळतेंच, परंतु त्याच्या धर्ममतावरहि उजेड पडतो; तसेंच त्याच्या चरित्रांत ज्या कित्येक गोष्टी दैवी चमत्कार किंवा परमेश्वरी स्फूर्ति म्हणून गायिल्या आहेत त्यांचा नेहमीं घडणाऱ्या गोष्टींप्रमाणें उलगडाहि लागतो.

**गौतमाची गृहस्थिति व शारीरस्थिति.**— गौतमाच्या अथवा त्याच्या बापाच्या ऐश्वर्याचें जें वर्णन केलेलें आढळतें त्यांत सत्यांश थोडा असून कविलाघवाचाच प्रकार फार अधिक आहे. गौतमाचा जन्म अरण्यांत एका झाडाखालीं झाला. फार दिवसांनीं आपन्नसत्वा झालेली माया ही जर राजपत्नी अथवा राजकन्या असती तर अगदीं शेजारीं असलेल्या माहेराला इतक्या उशिरां कां जाती? पण याहूनहि पुढील चमत्कार विशेषच आहे. मुलगा झाल्याबरोबर त्यास धुवावें लागतें तें मायेनें गौतमास एका ओहोळाच्या गार पाण्यानें धुतलें. यानंतर बाळबाळंतीण परत आपल्या घरीं गेलीं, माहेरीं गेलीं नाहींत. पुढें सातव्या दिवशीं गौतमाची आई परलोकवासी झाली.

गौतमाचा जन्म ज्या दिवशीं यशोधरा जन्मली त्याच दिवशीं झाला. म्हणजे गौतम व त्याची भावी पत्नी हीं एकाच वयाचीं होतीं; आणि यशोधरेचा बाप सुप्रबुद्ध हा नाखुष असतां तिचें व गौतमाचें शुद्धोदनाच्या आग्रहानें लग्न लागलें. याचा परिणाम पुढें चांगला झाला नाहीं.

नेपाळांतील संस्कृतांत असलेला बौद्ध ग्रंथांचा संग्रह जो राजेंद्रलाल मित्र यांस मिळाला, अथवा ज्याची सूचि त्यांनीं केली, त्यांत 'भद्रकल्पावदान' म्हणून एक ग्रंथ आहे. यांतील विषय म्हणजे जयश्री यानें जिनश्रीस ३४ कथा निवेदन केलेल्या आहेत. त्यांत गौतम व यशोधरा यांच्या विवाहासंबंधीं व त्यानंतरच्या आयुष्यासंबंधीं कांहीं माहिती आहे; त्यावरून असें दिसतें कीं यशोधरेचा पिता सुप्रबुद्ध, तिचा बन्धु देवदत्त व स्वतः यशोधरा हीं या विवाहाच्या विरुद्ध होतीं. थोडक्यांत लिहावयाचें म्हणजे यशोधरेला गौतम घरांतून निघून गेल्यानंतर ६ वर्षांनीं मागें 'राहुल' पुत्र झाला. अशी गौतमाची गृहस्थिति होती. त्याची स्वतःची स्थितीहि याच संग्रहांत 'बोधिसत्त्वावदानकल्पलता' या ग्रंथावरून जी दिसून येते ती अशी कीं, गौतमास पुढें जशीं दशबलें प्राप्त झालीं तशीं पूर्वी त्यास दशवैगुण्येंहि होतीं. हीं वैगुण्यें येणेंप्रमाणें:—

(१) त्याच्या उजव्या पायाच्या अंगठ्यावर व्रण होतें.
(२) त्याच्या पायास कांट्यानें कुरुप केलें होतें.
(३) त्याचें भिक्षापात्र नेहमीं रिकामें असे (तो खादाड होता हें चण्डानें त्यास अखेर जें भोजन दिलें त्या वेळीं स्पष्ट निदर्शनास आलें, व म्हणूनच मिलिंदप्रश्नांत याबद्दल सारवासारव करणारें विवेचन केलें आहे).
(४) सुंदरी नांवाच्या स्त्रीनें त्याच्यावर आरोप आणला होता.
(५) एका भिक्षुणीनें त्याच्यावर खोटा आळ आणला होता. येथें सुंदरीच्या बाबतींत 'खोटा' हा शब्द घातलेला नाहीं हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.
(६) त्यास कोद्रूवर रहावें लागे (यावरून त्याची पचनशक्ति फार क्षीण झाली होती. हेंच अखेरच्या मांसभोजनाचा जो परिणाम झाला व शेवटीं अतिसारानें त्याच्या प्राणावर बेतली त्यावरून सिद्ध होतें).
(७) या जन्मीं—गौतम म्हणून जन्मास आल्यावर—त्यानें ६ वर्षें अनीतींत घालविलीं (केशी गौतमीची व गौतमाची चांदण्या रात्रीं झालेली भेट जो कोणी वाचून मनन करील त्यास या वैगुण्याचें रहस्य कळेल).
(८) त्यास धातुक्षयाचा आजार होता.
(९) त्यास शीर्षवेदना नेहमीं होत होत्या.
(१०) त्यास संधिवाताचें दुखणें असे.

मिलिंदप्रश्नांत गौतमास चार प्रकारच्या शारीर व्यथा होत्या असें म्हटलें आहे. या व्यथा अशा:—

(१) त्याच्या एका पायांत पाषाणखण्ड घुसून त्याचें लासूर बनलें होतें.
(२) मृत्युसमयीं त्यास अतिसार झाला होता—म्हणजे तो मंदाग्नि होता.
(३) त्यास जीवकाकडून ढाळक घ्यावें लागलें—म्हणजे तो बद्धकोष्ठ होता.
(४) त्यास संधिवाताचें दुःख असे.

मिलिंदप्रश्नांतील व बोधिसत्वावदानकल्पलतेंतील गौतमाचीं शारीरिक दुःखें सारखींच होतीं असें म्हटलें तरी चालेल; आणि यावरून त्याच्या चरित्रकारांनीं त्याच्या अचाट शक्तीचें जें वर्णन मुद्दाम केलें आहे तें 'विरुद्धाचें समर्थन' या दृष्टीनें पाहिलें म्हणजे गौतम खरोखर अशक्त होता, निदान प्रथम प्रथम तरी तो तसा होता, असें म्हणणें लागतें.

८ **गौतमाचा गृहत्याग**.—अशा तऱ्हेची गृहस्थिति व शारीर स्थिति असल्यावर गौतमास या जगांत दुःख कां दिसूं नये? त्यास वैराग्य आलें असावें असें म्हणण्याऐवजीं त्यास गृह नकोसें झालें असावें हें म्हणणें अधिक सयुक्तिक आहे.

गौतम बाहेर पडल्यावर त्याची व बिम्बसाराची राजगृहीं भेट झाली; आणि नंतर तो ' आळारकालाम ' व ' उद्रक ' यांच्याकडे गेला. त्यांनीं गौतमास ध्यानयोग व समाधि यांचा उपदेश केला. रामपुत्र उद्रकासंबंधीं हुएनत्संग यानें असे उद्गार काढले आहेत कीं, हा गौतमास उपदेश देण्यास योग्य गुरु होता; कारण त्याचें मत कपिलाच्याहि पुढें गेलेलें होतें म्हणजे तो निरीश्वरवादी होता.

येथून गौतम पुढें अरण्यांत गेला. तेथें त्याच्या बरोबर आणखी पांच तपस्वी होते. या सहांनीं मिळून तप केलें. त्या वेळीं गौतमानें आपलें मन ताब्यांत यावें व वासनेचा क्षय व्हावा म्हणून अन्न सोडिलें. परंतु त्यामुळें त्यास इतकी अशक्तता आली कीं, एक वेळ तो निश्चेष्ट पडला. तेव्हां वासनेचा क्षय होण्याचा हा मार्ग नाहीं, असें जाणून त्यानें सुजाता नामक एका गौळ्याच्या मुलीच्या हातचा दूधभात घेतला. योग्यास दूधभाताचें अन्नच विहित धरलें आहे. हें अन्न ग्रहण केल्यावर तो एका अश्वत्थ वृक्षाखालीं जाऊन बसला; आणि तेथें त्यानें आसन घालून योगसाधन केलें असतां, आपणास निरामयता प्राप्त झाली असें त्यास वाटलें.

**गौतमाचा मनोनिग्रह**.—यापुढील गौतमाचा आयुष्यक्रम सर्व ग्रंथांतून जो दिलेला आहे त्यावरून त्यास आपल्या मनावर विजय मिळाला होता असें तर दिसत नाहींच; पण उलट ' कसाबसा राजदरबारांत आपल्या मताचा प्रवेश होऊन त्याचा महती वाढावी अशी लालसा त्यास असावी असें दिसतें. या विधानाच्या समर्थनार्थ कांहीं आख्यायिका देतों:—

अपकारकर्त्यावर उपकार करावा, चित्त अक्षोभ असावें, सर्वभूतीं दया, क्षमा व शांति असावी, हा जो गौतमाचा दुसऱ्यास उपदेश होता तसें त्याचें स्वतःचें वर्तन खास नव्हतें हें त्याचा व देवदत्ताचा जो संबंध ग्रंथांतरीं सर्वत्र वर्णिला आहे त्यावरून अगदीं स्पष्ट होतें. देवदत्ताचें व गौतमाचें इतकें वांकडें कां यावें याचें, तो यशोधरेचा भाऊ होता याच एका कारणावांचून दुसरें कोणतेंहि सयुक्तिक कारण दिसत नाहीं. देवदत्तच काय परंतु यशोधरेचा बाप जो सुप्रबुद्ध त्याच्याशींहि गौतमाचें अत्यंत वैर होतें; आणि यशोधरेचें पत्नी या नात्यानें गौतमाशीं जें वर्तन झालें तें वगळलें तर, हें अकारण वैर पाहून व या पितापुत्रांशीं गौतमानें व त्याच्या शिष्यांनीं जें वर्तन केलें तें वाचून, अशी दृढतर शंका येते कीं, या दोघांच्या परणाचें भविष्य म्हणून जें गौतमानें वर्तविलें तें भविष्य नसून त्यानेंच घडवून आणलेल्या त्या आपत्ती होत्या.

बौद्ध ग्रंथांत दिलेली हकीकत वाचली म्हणजे असें वाटतें कीं देवदत्तानें जो एक पंथ स्थापिला तो त्याच्या मरणापूर्वीच नाहींसा झाला होता. गौतमाचे शिष्य जे सारिपुत्र व मोग्गलान त्यांच्या खटपटीनें त्याचे सर्व शिष्य त्यास सोडून गेले होते. परंतु वस्तुतः तसें मुळींच नाहीं. शके ३२१ च्या सुमारास फाहिआन म्हणतो कीं, देवदत्ताचा शिष्यसंप्रदाय अद्यापहि आहे; व तो त्यास आणि त्याच्या पूर्वींच्या तीन बुद्धांस मानतो, गौतमास मानीत नाहीं. तसेंच ' कर्णसुवर्ण ' येथें तीन संघाराम होते. त्यांतील भिक्षु देवदत्ताच्या आज्ञेप्रमाणें लोण्याचा उपयोग करीत नसत असें हुएनत्संग म्हणतो.

तेव्हां गौतमाच्या चरित्रकारांनीं जें देवदत्ताविषयीं दर्शविलें आहे तें सत्य नव्हे. देवदत्ताचें आणि गौतमाचें यशोधरेच्या खासगी संबंधापासून उत्पन्न झालेलें वैषम्य जर एकीकडे ठेविलें तर, त्याचें परस्परवितुष्ट येण्यासारखें असें देवदत्तानें काय केलें होतें? गौतम म्हणतो देवदत्त माझा शिष्य होता; ही गोष्ट देवदत्त नाकबूल करतो. देवदत्तानें गौतमास, पूर्वींच्या बुद्धांच्या परंपरेस अनुसरून पांच गोष्टी करण्यास सांगितलें आणि तें गौतमानें नाकारिलें; तेव्हां देवदत्तानें स्वतंत्र मठस्थापना केली. यांत गौतमास वैषम्य वाटण्यासारखें कांहीं नव्हतें. परंतु देवदत्ताविषयीं गौतमाचा केवढा तीव्र द्वेष होता हें त्यासंबंधींच्या जातकांवरून दिसून येईल. एकंदर जातकें ५४७ आहेत. त्यांतील पुष्कळशीं म्हणजे जवळ जवळ दोन तृतीयांशाहून जास्त जातकें पतित झालेल्या भिक्षूंसंबंधीं आहेत. इतरांत देवदत्ताची जितकी निंदा करणें शक्य आहे तितकी केलेली आहे. बरें असा देवदत्ताचा अपराध तरी कोणता? कदाचित् कोणी असें म्हणतील कीं, हीं सर्व जातकें कांहीं गौतमाच्या तोंडचीं नव्हत, तेव्हां त्यांच्याबद्दल गौतमास दोष काय? त्याला उत्तर एवढेंच कीं, जें प्रमाण गौतमास तेंच देवदत्तास. दुसरें कित्येक असें म्हणतील कीं, देवदत्तानें गौतमास मारण्याचा तीनदां प्रयत्न केला होता; एकदां त्याच्या अंगावर त्यानें शिला ढकलली, एकदां चाळीस बाणकरी त्यानें गौतमास मारण्यास भाड्यानें लाविले, व एकदां नालगिरी नांवाचा हत्ती त्याच्या अंगावर त्यानें घातला. या गोष्टी खऱ्या असल्या तरी गौतमानें क्षमेचाच अंगीकार केला पाहिजे होता. परंतु या गोष्टींत अद्भुताची इतकी भेसळ आहे कीं त्या खऱ्या दिसत नाहींत. उलट गौतमचरित्रकारांनीं कितीहि मखलाशी केली, तरी गौतम व गौतमशिष्य यांचें जें वर्तन देवदत्ताशीं झालें त्यावरून गौतमानें देवदत्तास तो ह्यात होता तोंपर्यंत अत्यंत त्रास दिला व शेवटीं त्याचें मरणहि बनवून आणिलें हें दृग्गोचर होतें. त्याच्या मरणा-

नंतरहि त्याच्या संबंधीं बौद्धांनीं अत्यंत वाईट लिहून त्याचा सूड घेतला.

देवदत्ताबद्दलचीं जीं जातकें आहेत त्यांत, तो गौतमाचें अनुकरण करतो म्हणूनच त्याची बरीचशी निंदा केली आहे; जणूं काय शिष्यशाखा मिळविणें व प्रवचन करणें हा अधिकार फक्त एकट्या गौतमासच मिळाला होता.

गौतमानें देवदत्ताचा सूड कसा उगविला तें आतां दाखवितों:—

देवदत्ताचा कोकालिक म्हणून एक शिष्य होता. तो बरेच दिवस त्याच्याशीं शिष्याच्या नात्यानें वागला, पण पुढें त्याचें व गौतमशिष्य सारिपुत्र व मोग्गलान यांचें सख्य जमलें. तें कसें व कां तें गूढ आहे. एके प्रसंगीं देवदत्त हा आपल्या मठांत आपल्या ५०० शिष्यांस प्रवचन करीत बसला असतां सारिपुत्र व मोग्गलान हे तेथें आले तेव्हां कोकालिकानें देवदत्तास सांगितलें कीं त्यांस जवळ येऊं देऊं नका, दगा होईल. देवदत्तानें त्याच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष्य केलें. सारिपुत्र व मोग्गलान हे आंत येऊन ते देवदत्ताच्या दोन बाजूंस दोन उभे राहिले. पुढें वर्णन आहे तें असें:—' प्रवचन करीत असतां देवदत्तास निद्रा लागली. सारिपुत्रानें प्रवचन केलें व देवदत्ताचे सर्व शिष्य त्यास सोडून गेले तो उठून पाहतो तों सर्व शिष्य गेलेले; देवदत्त तेव्हांपासून नऊ महिने आजारी होता' येथें आजारी कशानें झाला तें दिलेलें नाहीं. विरोचन जातकांत कथा दिली आहे, ती अशी:—

' गयासीस येथें देवदत्त बुद्धाप्रमाणें वागत होता...एकदां देवदत्त निजला असतां कोकालिकानें त्याचे कपडे हिरावून घेऊन त्याच्या छातींत एक लाथ मारली. त्याबरोबर देवदत्त रक्त ओकला व त्या दिवसापासून त्यास छातीचें दुखणेंच लागलें. '

वरील दोन्ही हकीकतींवरून सारिपुत्र व मोग्गलान यांनीं देवदत्तास ज्या वेळीं भेट देऊन त्याचे ५०० शिष्य नेले तेव्हांच कोकालिकानेंहि आपल्या गुरूस गुरुदक्षिणा दिली, कीं हे दोन भिन्न प्रसंग होते हें कांहीं कळत नाहीं; तथापि या सर्व कृत्यांत गौतमाचा हात नव्हता अशी कल्पनाहि करवत नाहीं.

हरामखोरास जें प्रायश्चित्त मिळावयाचें तेंच कोकालिकासहि पुढें मिळालें. तित्तिर, सिंह कोलुक, सिंहचर्म्म, कच्छप व कोकालिक या जातकांवरून कोकालिक जें बोलूं नये तें बोलूं लागला म्हणून मरण पावला असें गौतमाचें म्हणणें होतें. तकारिय जातकांत तो कसा मेला याचें वर्णन दिलें आहे. सारिपुत्र व मोग्गलान यांनीं आपल्या देखत पातक केलें, असें कोकालिकानें म्हटल्यावर त्याच्या सर्व अंगांतून रक्त स्रवूं लागलें व तो जेतवनाच्या दाराशींच मेला.

खुद्द देवदत्ताचें मरण ' समुद्रवाणिज ' या जातकांत दिलें आहे. देवदत्त गौतमास भेटण्यास आला असतां व कदाचित् अपराधांची क्षमा मागण्याचीहि त्याची इच्छा असतां, गौतमानें त्याचा द्वेष सोडला नाहीं. असा दीर्घद्वेष संसारी मनुष्यहि करणार नाहीं. मग ज्यानें मनावर विजय मिळविला आहे, दयेचें व क्षमेचें या जगावर साम्राज्य पसरिलें आहे, अशा गौतमानें तो आपल्या जिवाशीं कसा धरला हें आश्चर्य आहे.

देवदत्तानें गौतमाच्या जिवाचा घात करण्याचा प्रयत्न केला होता म्हणून उल्लेख तरी आहे, व या दृष्टीनें गौतमाचा देवदत्ताविषयींचा द्वेष कांहींसा सकारण तरी ठरतो. परंतु त्याचा बाप जो सुप्रबुद्ध त्यानें गौतमाचें कांहीं वाईट केल्याचा अथवा चिंतिल्याचा कोठेंहि उल्लेख नाहीं. परंतु त्याचाहि आमरण गौतमानें द्वेषच केला.

एके वेळीं सुप्रबुद्ध रस्त्यानें चालला होता व मागून गौतम येत होता. गौतमाच्या शिष्यांनीं सुप्रबुद्धास सांगितलें कीं, मागून गौतम येत आहे त्यास वाट द्या. सुप्रबुद्ध अमलांत होता, तो ह्मणाला गौतम माझ्याहून लहान व त्यांत तो माझा जांवई आहे तेव्हां त्यानेंच मला वाट द्यावी. गौतम तें ऐकून व पाहून किंचित् हंसला (!) व ह्मणाला सात दिवसांत जिन्याखालीं पडून हा मरेल.

हें गौतमाचें भविष्य खरें होऊं नये ह्मणून सुप्रबुद्धानें आपली सर्व व्यवस्था घराच्या वरच्या मजल्यांतच करविली. परंतु सातव्या दिवशीं खालीं कांहीं गोंगाट झाला तो कशाचा ह्मणून तो जों पहावयास आला, तों त्याच्या रक्षकांनीं त्यास खालीं ढकललें आणि तो खालीं पडून मेला.

सासरा व मेहुणा—पितापुत्र—व गौतम यांचें या अशा तऱ्हेचें प्रेम होतें. गौतमाच्या चरित्रकारांनीं त्याच्या गृहसौख्याचें चित्र कसेंहि रेखाटलें तरी गौतमाचें मन या दोघांसंबंधीं द्वेषपूर्ण होतें ही गोष्ट त्यांस, केव्हांहि झांकतां येणें शक्य नव्हतें. या द्वेषाचें कारण उत्तरवयांत झालेलें नसून—कारण तसें घडून आलेलें कोठें वर्णिलें नाहीं—पूर्ववयांतच उत्पन्न झालेलें आहे. त्याचा स्पष्ट खुलासा बोधिसत्त्वावदानांत व भद्रकल्पावदानांतच फक्त दिलीं आहे—इतरत्र तो अंतरित असल्यानें दूरान्वयानें सुचविला आहे. परंतु सर्व ग्रंथांतून गौतमाचें वर्तन या दोघांशीं अत्यंत द्वेषमूलक होतें हें मात्र स्पष्ट आहे.

देवदत्ताशीं ज्याचा निकट संबंध आला अशा अजातशत्रु राजाचेंहि चित्र बौद्ध ग्रंथकारांनीं बरेंच उठावदार काढलें आहे.

अजातशत्रूनें आपल्या गौतमानुयायी बापास मारिल्याचा आरोप त्यावर आहे. परंतु गादीवर आल्यावर देवदत्ताचा तसा झालेला अंत पाहून तो जेव्हां ' जीवकाच्या ' सल्ल्यानें गौतमीस भेटण्यास आला तेव्हांचें जें चित्र चरित्रकारांनीं रेखाटलें आहे त्यावरून, गौतमाच्याच वर्तनाचें अत्यंत आश्चर्य वाटतें. भेटींत गौतमानें अजातशत्रूस त्याच्या पापाबद्दल कांहीं एक बोलूं नये व उपदेशहि करूं नये, उलट त्यास

आपल्या शिष्यांत लागलीच गणावें हें विलक्षण भासतें. तो मुलाखतीचा प्रसंग येथें वर्णिला पाहिजे.

**बुद्धअजातशत्रुसंवाद.**—" अशा प्रकारचें संभाषण झाल्यावर अजातशत्रु राजा भगवान् बुद्धास म्हणालाः ' अगदीं उत्तम, भगवन्, फार छान गोष्ट! ज्याप्रमाणें एखाद्या मनुष्यानें पडल्यास आधार देऊन उन्नत करावें, किंवा एखाद्यानें हरवलेली वस्तु परत आणून दाखवावी, किंवा आडमार्गानें जाणाऱ्यास योग्य मार्ग दाखवावा, किंवा अंधारांत चांचपडत असलेल्यास वस्तूंचीं स्वरूपें ज्ञात होण्याकरितां दिवा दाखवावा, त्याप्रमाणें भगवानांकडून मला सत्याचें स्वरूप ज्ञात झालें. म्हणून आतां मी बुद्ध, धर्म व संघ यांस शरण आलों आहे. शरीरांत प्राण आहे तोंपर्यंत मी बुद्धाचा शिष्य राहीन म्हणून आपणांस शरण आलों आहे, माझा स्वीकार व्हावा. प्रभो अत्यंत दुर्बल, मूर्ख असा जो मी त्या माझ्या हातून साम्राज्यतृष्णेमुळें पितृवधाचें अघोर पाप घडलें, मीं त्या परमपूज्य, सन्मार्गी राजाचा वध केला! भगवानांनीं माझ्या हातून घडलेल्या घोर अपराधाची चुकी पदरांत घ्यावी. त्या योगानें मृत्युकालपर्यंत माझ्या मनावर माझा ताबा राहील.'

' खरोखर, राजा, अशा तऱ्हेचें कृत्य तुझ्या हातून घडण्यांत मोठें पाप झालें आहे. परंतु ज्या अर्थी स्वमुखानें आपल्या हातून घडलेल्या पापाची तूं कबुली देत आहेस त्या अर्थी तुझा आम्ही स्वीकार करतों.

' कारण, राजा, सत्पुरुषांनीं घालून दिलेल्या आचारधर्मांत असें सांगितलें आहे कीं, जो कोणी आपला अपराध जाणतो व कबूल करतो तो भविष्यकाळीं मनःसंयम करूं शकेल.'

अशा रीतीनें संभाषण झाल्यावर, राजा अजातशत्रु बुद्धास म्हणाला,

' भगवन् आतां रजा घेतों. कारण आम्हांला बरीच कामें करावयाचीं आहेत.'

' राजन्, जा, व तुला योग्य दिसतील तींच कृत्यें करीत जा.'

बुद्धाच्या वरील शब्दांनीं राजा संतुष्ट व आनंदित होऊन आपल्या आसनावरून उठला व बुद्धास नमस्कार करून त्याच्या डाव्या बाजूनें निघून गेला.

राजा अजातशत्रु निघून गेल्यावर बुद्ध शिष्यास म्हणाला, ' बंधूंनों, ह्या राजाला अंतःकरणापासून वाईट वाटलें आहे. परंतु ह्यानें जर आपल्या पूज्य बापाचा—सदाचारी राजाचा—वध केला नसता तर येथें तो बसला असतांना त्याला सत्याविषयीं अत्यंत सूक्ष्म व निष्कलंक दृष्टि उत्पन्न झाली असती.'

अशा रीतीनें बुद्धाचें वचन ऐकून भोंवतालच्या शिष्यमंडळीस धन्य वाटलें व आनंद झाला."

बुद्धाचें हें अजातशत्रूशीं वर्णन केलेलें वर्तन वाचून आज पुष्कळांस आश्चर्य वाटेल. या बुद्धाच्या वर्तनावर व्हिन्सेंट स्मिथ येणेंप्रमाणें टीका करतोः—

" वरील कथेंतील शिष्यांच्या आनंदाबद्दल व संतोषाबद्दल सहानुभूति वाटणें कठिण आहे. पितृवधासारख्या अघोर व भयंकर साहसकर्माबद्दल बुद्धासारख्या महान् नीतितत्त्वांच्या उपदेशकानें निर्भीडपणें, कसल्याहि प्रकारची भीति न बाळगतां गंभीर शब्दांनीं राजाची निर्भर्त्सना केली असेल अशी वाचकाची अपेक्षा असते; परंतु वरील कथानकांत तसा कांहींच प्रकार दिसून न येतां त्याऐवजीं एखाद्या खुषमस्कऱ्याच्या तोंडीं शोभेल अशी दरबारी भाषा व वर्तन बुद्धाच्या ठिकाणीं आढळून येतें. वरील अपराधी राजाच्या पश्चात्तापाबद्दल व मनोधैर्याबद्दल आपलें मत कांहीं कां असेना, एवढी गोष्ट मात्र निश्चित आहे कीं, एकंदर बौद्ध कथांवरून वरील आख्यायिकांचें मूळ म्हणजे अजातशत्रूच्या हातून बापाचा वध ही गोष्ट मात्र सत्य असल्याबद्दल प्रतीत होतें."

गौतम, अजातशत्रु व त्याचा मामा कोसलाधिप प्रसेनजित् यांचा परस्परसंबंध जो जातकांवरून दिसतो तो सूक्ष्मतेनें विचार करण्यासारखा आहे. आपल्या मेव्हण्याचा—बिंबसाराचा—नाश केला म्हणून भाच्याविरुद्ध—अजातशत्रूविरुद्ध—कोसलाधिप रागावला, व त्यामुळें दोघांत युद्ध झालें. राजनीतींत खासगी प्रेमाच्या नात्यांस कोठें वाव असतो! पुढें या भांडणांत बौद्ध भिक्षू पडले व या बौद्ध भिक्षूंच्याच योगानें प्रसेनजित् यास विजय मिळाला, हें वड्ढकी सूकर व तच्छ सूकर जातक यांवरून स्पष्ट दिसतें. याचा सूड अजातशत्रूनें पुढें शाक्य लिच्छवी यांचा समूळ उच्छेद करून उगविला. अशा तऱ्हेनें हे भिक्षू राजकारणांत पडले होते. प्रसेनजित् यास ' मल्लिका ' नांवाची सुस्वरूप माळीण मिळवून देण्यांत गौतमानें साहाय्य केलें होतें, व त्यामुळेंच गौतमाचा राजवाड्यांत प्रवेश झाला.

**गौतमाच्या नीतिविषयक कल्पनेचें उदाहरण.**—परंतु याहूनिहि नमत्कार वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे ' मल्लिकेनें ' व्यभिचार केला त्या बाबतींत कोसलाधिपास गौतमानें जो उपदेश केला ती होय. पब्बतूपथ्यहूर, खष्टिवण्णन, कोसिय, सेय्य, एकराज, मणिकुण्डल, घट व मित्तामित्त या जातकांवरून असें दिसतें कीं, कोसलाधिप प्रसेनजित् हा आपल्या सीमेवर कांहीं बंड झालें होतें तें मोडण्याकरितां गेला असतां मागें त्याची स्त्री—गौतमानें त्यास मिळवून दिलेली मल्लिका—हिनें आपल्या एका प्रधानाबरोबर व्यभिचार केला. राजा परत आल्यानंतर त्यास तें वृत्त कळलें. वृद्धपणामुळें त्यास मल्लिका सोडवेना, परंतु प्रधानास मात्र त्यानें बंदींत टाकिलें. कदाचित् मल्लिकेनें त्यामुळें आकांत केला असावा. पुढें राजानें त्या प्रधानाचें काय करावें म्हणून गौतमास सल्ला विचारला असतां गौतमानें जो सल्ला दिला तो विचार करण्यासारखा आहे. त्यानें राजास असा प्रश्न केला कीं, या प्रधानाच्या बुद्धिमत्तेमुळें तुम्हास त्याची आवश्यकता आहे कीं नाहीं? राजानें या प्रश्नास ' होय ' म्हणून उत्तर

दिल्यावर गौतमानें त्यास सोडून देऊन पुन्हां पूर्ववत् त्याच्या अधिकारावर त्यास स्थापावा असें सांगितलें.

गौतमानें असा सल्ला दिलेला पाहून अतिशय आश्चर्य वाटतें. अनीति ही दण्ड्य केव्हां, तर ज्या वेळीं तिच्यापासून लाभ नाहीं तेव्हां; अथवा जेव्हां लाभालाभाचा प्रश्न उद्भवतो तेव्हां नीतिअनीतीचा प्रश्न बाजूस सारणें योग्य आहे, असेंच गौतमानें या वेळच्या आपल्या वर्तनानें दाखविलें. गौतमाच्या धर्मावर जो एक मोठा आक्षेप आहे कीं, त्यास सत्य हें सत्य म्हणून प्रिय नव्हतें तर त्यापासून स्वतःचे कल्याण होतें म्हणून प्रिय होतें, म्हणजे त्याचा धर्म अत्यंत स्वार्थी आहे, त्या आक्षेपाच्या यथार्थत्वाची जणूं काय सिद्धीच गौतमानें प्रसेनजितास या वेळीं केलेल्या उपदेशानें केली. तसेंच राजांच्या अंतर्गृहांत व राजकारणांत झालेला हा बौद्धांचा प्रवेश पाहूनहि या संप्रदायाबद्दल मन साशंक होतें.

गौतमाच्या चरित्रांतील यानंतरची गोष्ट म्हणजे त्याचें महापरिनिर्वाण. गौतम कुसिनार—कुशनगर—येथें जाण्यास निघाला असतां प्रथम तो 'पावा' येथें गेला. तेथील 'चण्ड' नांवाच्या घिसाड्यानें आपल्या घरीं बोलावून आणून त्यास मांसभोजन (डुकराच्या मांसाचें) दिलें. मिलिंदप्रश्नांतील उल्लेखावरून असें दिसतें कीं, गौतमानें तेथें प्रकृतीस न मानवेल इतकें भोजन केलें व त्यामुळें त्यास अजीर्ण होऊन अतिसार झाला. वाटेंत बरोबर आनंद होता. लागलेली तहान भागवीत ते कुकुत्थ नदीवर येऊन पोंहोंचले. तेथें गौतमानें स्नान केलें. परंतु त्यास अत्यंत थकवा येऊन श्रम उत्पन्न होऊं लागला; म्हणून शेजारच्या आंबराईंत जाऊन तो आपल्या कंथेवर निजला. तेथून हलके हलके ते कुसिनाराजवळील आम्रराजींत जाऊन पोंहोंचले. तेथून हिरण्यवती नदी ओलांडून उपवर्तन नामक शालवृक्षराजींत ते गेले, तेथें गौतमानें दोन शालवृक्षांत अंग टाकलें आणि निर्वाणास गेला. तो प्रसंग येणेंप्रमाणे वर्णिलेला आहे.

**गौतम बुद्धाचें देहावसान**—आनंदाबरोबर बुद्ध हा मल्लदेशांत कुशनगरामध्यें उपवर्तन नामक शालवृक्षांची राई होती तेथें आला. त्या ठिकाणीं त्यानें आज्ञा केल्यावरून दोन शालवृक्षांच्या मध्यभागीं एक आसन त्याचा शिरोभाग उत्तरेकडे करून आंथरण्यांत आलें. या आसनावर बुद्ध आपल्या उजव्या कुशीवर एखाद्या सिंहाप्रमाणें आडवा झाला आणि पायावर पाय ठेवून सावधानतेनें पडून राहिला. वृक्षांनां त्यांचा फुलांचा ऋतु नसतांहि फुलांचा बहर आला, व या वृक्षांनीं, बुद्ध वरीलप्रमाणें पडला असतां त्यावर फुलांचा वर्षाव केला. बुद्धाचे शेवटले क्षण आनंद आणि तेथें जमलेले दुसरे यतिजन यांस कार्यविषयक सूचना व उपदेश करण्यांत गेले. सुभद्र नांवाचा एक संन्याशी फिरत फिरत त्या ठिकाणीं प्राप्त झाला असतां बुद्धाला भेटण्याची संधि त्यास मिळाली. तेथें बुद्धाचा उपदेश ऐकून तो त्याचा अनुयायी झाला. हा पुण्यपावन बुद्धानें स्वतः केलेला शेवटचा चेला होय. यानंतर आपल्या चेल्यांना बुद्धानें बोलावून घेतलें, व आपली शिकवण म्हणजे धम्म आणि संघाचे नियम यासंबंधानें तुम्हांस कांहीं शंका असल्यास त्या सांगा म्हणजे मी त्या दूर करतों असें म्हटलें. मी गेल्यानंतर माझी शिकवण (धम्म) व माझी शिस्त (संघनियम) हेच तुमच्या गुरुस्थानीं तुम्हीं समजावें असेंहि त्यानें सांगितलें. खालील प्रश्न त्यानें तीन वेळां पुनः पुन्हां विचारलाः—

'बंधूंनों, तुम्हांपैकीं कोणाला बुद्ध धम्म, संघ, माग्ग, विनय यासंबंधानें कांहीं शंका असेल, कारण तशी ती असणें शक्य आहे, तर कोणताहि प्रश्न विचारा. पुढें तुम्हांला असा पश्चात्ताप करण्याची वेळ न यावी कीं, आमचा गुरु आमच्यांत असतां आम्हीं त्याला आमच्या सर्व शंका सांगितल्या नाहींत'

याप्रमाणें बुद्ध बोलला असतां सर्व बंधुगण मौन धरून राहिला. 'बंधूंनों गुरुविषयींचा आदरभाव तुम्हांला प्रश्न विचारूं देत नसेल कदाचित्. असें असेल तर आपापल्या मित्राजवळ प्रत्येकानें बोलावें.'

यानंतरहि बंधुगण मौनीच राहिला. तेव्हां मग पूज्यवर आनंद हा पुण्यपावन बुद्धास म्हणाला.

'पूज्यपाद ही केवढी आश्चर्याची व अलौकिक गोष्ट आहे. माझा असा विश्वास आहे कीं, या सर्व सभेंत एकाहि बांधवाला बुद्ध धम्म, संघ, माग्ग किंवा विनय यासंबंधानें शंका किंवा भ्रम राहिलेला नाहीं.'

'आनंद तूं हें म्हणत आहेस तें केवळ श्रद्धेनें म्हणत आहेस. परंतु तथागताची गोष्ट तशी नाहीं. या बांधवसभेंत एकाहि बांधवाला बुद्ध धम्म, संघ, माग्ग किंवा विनय यासंबंधानें एकहि शंका किंवा भ्रम राहिलेला नाहीं हें तथागताला विदित आहे. या पांचशें बंधूंपैकीं प्रत्येकजण, अगदीं मागसलेला इसम देखील, पूर्णपणें बुद्धानुयायी बनलेला आहे. यांपैकीं कोणालाहि दुःखाचा जन्म येणार नसून प्रत्येकाला निर्वाणप्राप्तीची खात्री आहे.'

यानंतर पुण्यपावन बुद्ध बंधुगणाला म्हणालाः 'बंधूनो! आतां मी तुमची रजा घेतों. अस्तित्वाचे सर्व घटक विनाशी आहेत. आपआपली मुक्ति प्रयत्न करून मिळवा.' हे तथागताचे शेवटचे शब्द होत.

यानंतर तो पुण्यपावन पहिल्या ध्यानांत प्रवेश करता झाला. पहिल्या ध्यानांतून उठून दुसऱ्या ध्यानांत, दुसऱ्यांतून तिसऱ्यांत, तिसऱ्यांतून चवथ्यांत व चवथ्यांतून अनंत आकाशांत तो प्रविष्ट झाला. तेथून अनंत चित्सृष्टींत, या चित्सृष्टींतून शून्यसृष्टींत, शून्यांतून भानाभानहीन सृष्टींत व तेथून भान व संवेदना यांच्या अभावाच्या स्थितीस तो प्राप्त झाला.

येथें गौतमाचें चरित्र संपलें. गौतम म्हणून ३५ व बुद्ध म्हणून ४५ अशी ८० वर्षांची ही कथा आहे; परंतु या कालांतील उपलब्ध अशा गोष्टी फारच थोड्या आहेत. वर दिल्या त्या, व शिवाय अनाथपिण्डदाचें जेतवन विहाराचें बांधणें, आनंदाच्या विनवणीवरून स्त्रियांचा भिक्षुणी म्हणून संघांत प्रवेश, गौतमाविरुद्ध कांहीं स्त्रियांच्या तक्रारी, आणि गौतमाचें सिलोनांत गमन त्या होत. या शेवटच्या आख्यायिकेबद्दल शंका असल्याकारणानें ती एकीकडे ठेविली तर विशेष महत्त्वाच्या अशा दोन गोष्टी राहतात. जेतवनीं विहार झाल्याकारणानें बौद्धसंघास एक प्रकारचें व्यवस्थित स्वरूप आलें. भिक्षूंपैकीं बरेच चातुर्वर्ण्यबाह्य असल्यानें ती एक प्रकारची शक्तीच गौतमाच्या हातांत आली. अजातशत्रु व प्रसेनजित् यांच्यासंबंधीं जें वर लिहिलें आहे त्यावरून त्या शक्तीचा उपयोग गौतमानें राजकारणांत करण्याचा प्रयत्नहि पण केला असें दिसतें.

**भिक्षुणीसंघ.**—स्त्रियांचा गौतमास अत्यंत तिरस्कार असे. त्यांस संधि मिळण्याचा अवकाश, कीं व्यभिचार करण्यास त्या लागलीच प्रवृत्त होतात अशी त्याची स्त्रियांविषयीं दृढ समजूत व्यक्त होते. गौतमास स्त्रियांचा असा तिरस्कार येण्यास स्वतःच्या अंतःपुरांतील त्याचा अनुभव कारण झाला असें एका ग्रंथकारानें म्हटलें आहे व हेंच वर दिलेल्या दोन ग्रंथांवरूनहि सिद्ध होतें.

आनंदाच्या आग्रहावरून जेव्हां कोसलाधिपाच्या स्त्रिया व गौतमाची सावत्र आई यांस 'भिक्षुणी' करून त्यांचा एक स्वतंत्र संघ निर्माण केला, तेव्हां गौतमानें असे उद्गार काढले कीं माझा धर्म जो कित्येक वर्षें टिकणार होता तो आतां ५०० वर्षें आधीं नामशेष होईल.

**बुद्धाचा काल.**—बुद्धाच्या जन्माचा काल क्रि. पू. ५६० धरतात. हा जन्मकाल तो ऐशीं वर्षें जगला आणि क्रि. पू. ४८० सालीं निर्वाणाप्रत गेला या दोन विधानांवरून ठरवितात. तथापि क्रि. पू. ४८० हें त्याच्या मृत्यूचें साल निश्चितपणें ठरलेलें नाहीं. परंतु एकंदरीत कांहीं वर्षांच्या फरकानें ५६०—४८० हाच त्याचा हयातकाल धरण्यास हरकत नाहीं असें अभ्यासकांचें मत आहे. मृत्युकाल निर्णयार्थ अनेक वादविवाद झाले आहेत त्यांपैकीं कांहींचा गोषवारा येथें देतों.

**मॅक्समुलरचें मत आणि महावंसोच्या व पेगूच्या लेखांवरून निर्वाणकालनिश्चय.**—प्रो. मॅक्समुलर यांनीं बुद्धाचा निर्वाणकाल क्रि. पू. ४७७ अथवा ४७८ असावा असें अनुमान काढलें आहे (संस्कृत वाङ्मयाचा इतिहास पृ. २६२-३००)

महावंसोंत म्हटलें आहे कीं, अशोकाच्या कारकीर्दीच्या १७ व्या वर्षी पाटलिपुत्र येथें बुद्धसभा भरली व तिच्या नंतर २ 'भिक्खु' 'सोवनभूमी'त पाठविण्यांत आले.

पेगूच्या इ. स. १४७६ च्या कल्याणी लेखांत वरील गोष्टीचा उल्लेख आहे, व असें म्हटलें आहे कीं, अशा रीतीनें बुद्धाच्या निर्वाणानंतर २३६ वर्षांनीं 'रामञ्ज' देशांत बुद्धसंप्रदाय सुरू झाली.

अशोकाचा राज्यारोहणकाल बहुमतानें क्रि. पू. २६० समजला जातो. यानंतर १८ वर्षांनीं म्हणजे क्रि. पू. २४२ सालीं पाटलिपुत्राची सभा झाली. याच्या पूर्वी २३६ वर्षें बुद्धाचा निर्वाणकाल आहे, तेव्हां क्रि. पू. ४७८ हा बुद्धाचा निर्वाणकाल या दोन लेखांवरून सिद्ध होतो [बर्जेस—इं. ॲं. पु. ३० पृ. ११७].

**दक्षिणेकडील व उत्तरेकडील बौध्द दंतकथा व कर्नचे विचार.**— दक्षिणेंतील बौद्धांनां संमत असलेला क्रि. पू. ५४३ हा बुद्धाचा काल बरोबर आहे असें मत जेव्हां टर्नर यानें दिलें तेव्हां तो काल बहुतेक सर्वमान्य झाला. तथापि हा काल मान्य असलेल्या लोकांनांहि, यांत ६० वर्षांची चूक आहे हें कबूल आहे. टर्नर साहेबांचें मत दक्षिणेकडील बौद्ध ग्रंथांच्या आधारावर रचलेलें आहे.

दक्षिणेकडील बौद्ध ग्रंथ उत्तरेकडील बौद्ध ग्रंथांपेक्षां जास्त विश्वसनीय आहेत हें जरी कबूल असलें, तरी दक्षिणेकडील ग्रंथांच्या आधारावर काढलेल्या बुद्धाच्या कालांत ६० वर्षांची चूक पडते, म्हणून त्यांच्यावर पूर्ण सत्यतेचा शिक्का मारतां येत नाहीं. सिंहली ग्रंथांत तीन बौद्ध सभांचा उल्लेख आहे. एक बुद्धाच्या निर्वाणानंतर लगेच झाली, दुसरी बरोबर १०० वर्षांनंतर काल अशोकाच्या कारकीर्दींत झाली व तिसरी दुसरीनंतर ११८ अथवा १३५ वर्षांनीं अशोकाच्या कारकीर्दींत झाली असें त्यांत म्हटलें आहे. परंतु हें असंबद्ध आहे. कारण अशोक नांवाचे दोन राजे झाले असा कोठेंच उल्लेख नसून ज्या ग्रंथांत ही माहिती आहे त्याच ग्रंथांत पुन्हां विरोधी उल्लेख आहेत. उत्तरेकडील बौद्धांनां अशोकापर्यंतच्या फक्त दोनच बौद्ध सभांची माहिती असून त्यांत दुसरी पहिलीनंतर ११० वर्षांनीं झाली असें त्यांचें मत आहे.

टर्नरचें असें म्हणणें आहे कीं, ज्या अर्थी क्रि. पू. ५४३ हा बुद्धाचा निर्वाणकाल नाहीं असें आपण सिद्ध करूं शकत नाहीं त्या अर्थी तोच बरोबर आहे हें मान्य करणें प्राप्त आहे. उलट पक्षीं, प्रो. कर्न याचें असें मत आहे कीं, क्रि. पू. ५४३ हा निर्वाणकाल आहे असें म्हणणाऱ्यांनीं बुद्धाचा निर्वाणकाल अशोकापूर्वी २१८, २६० अथवा त्याहून जास्त पूर्वी आहे हें सिद्ध केलें पाहिजे; कारण, नुसत्या दंतकथांवरून कोणत्याहि विधानाची सत्यता सिद्ध होत नसते.

चंद्रगुप्ताच्या कारकीर्दीस क्रि. पू. ३२२ मध्यें सुरुवात झाली असें प्रो. कर्न याचें मत असून तें इतर आधारांनीं त्यानें सिद्ध केलें आहे. चंद्रगुप्तानें २४ व त्याच्या मुलानें २८ वर्षें राज्य केलें, व त्यानंतर (म्ह० ५२ वर्षांनीं) अशोक गादीवर आला,

तेव्हां अर्थात् ख्रि. पू. २७० हा अशोकाचा राज्यारोहणकाल असला पाहिजे असें कर्न यास वाटतें. अशोकाच्या शिलालेखांत ज्या ग्रीक राजांचा उल्लेख आहे त्यांच्या कालावरून पाहतां हे लेख ख्रि. पू. २५८ त अथवा त्यानंतर लवकरच लिहिले असावे असें दिसतें व त्यावरूनहि ख्रि. पू. २७० हा अशोकाचा काल चूक ठरत नाहीं असें तो प्रतिपादितो. तेव्हां 'अशोक-अवदानाप्रमाणें बुद्धाचा मृत्यु अशोकापूर्वी १०० (११०) वर्षे झाला असें गृहीत धरलें तर ख्रि. पू. ३८०. हा बुद्धाचा निर्वाणकाल ठरतो [इं. अँ. पु. ३, पृ. ७७]. परंतु सिलोनी दंतकथांतच परस्परविरोध असल्यामुळें त्या आपणांस विश्वसनीय दिसत नाहींत.

**चिनी दंतकथेच्या आधारें बुद्धकालनिर्णय.**—मॅक्स मुल्लर साहेबांच्या मतें गौतमबुद्ध ख्रिस्ताच्या पूर्वी ४७७ सालीं मरण पावला. त्यांनीं आपल्या मतास आधार म्हणून मि. बनियु नँजिओच्या लेखाचें इत्थंभूत भाषांतर दिलें आहे. त्यांतील गोषवारा येणेंप्रमाणेः बुद्धाच्या मरणानंतर लवकरच. उपालीनें विनयपिटकाचा संग्रह केला, व ज्या वर्षी संग्रह केला त्याच वर्षाच्या ७ व्या महिन्याच्या १५ व्या दिवशीं पुष्पादिकांनीं त्याची पूजा करून त्याच्या प्रारंभीं एक टिंब दिलें. त्याचा प्रतिवर्षी हाच क्रम चालू असे. पुढें तो (उपाली) खिस्तापूर्वी ४४७ सालीं आपला शिष्य दाशक ह्याच्या स्वाधीन विनयपिटक करून आपण निर्वाणाप्रत गेला. दाशक ख्रिस्तापूर्वी ३९७ सालीं मरण पावला. त्याच्या नंतर विनयपिटक सोनकाच्या हातीं आलें. हा आपला शिष्य सिग्गव ह्याच्या ताब्यांत विनयपिटक देऊन ख्रिस्तापूर्वी ३५३ सालीं मरण पावला. सिग्गवानें ख्रिस्तापूर्व ३००½ सालीं विनय पिटक मौद्गल्यायनीपुत्र तिष्य ह्याच्या हवालीं केलें. तिष्यानें तें ख्रिस्तापूर्वी २३३ सालीं चंडवग्गी ह्याला दिलें. ह्याप्रमाणें शिष्यपरंपरा चालत जाऊन, विनय पिटक शेवटीं संगभद्रास प्राप्त झालें. संगभद्रानें आणखी एका चिनी उपाध्यायाच्या मदतीनें विनयपिटकाचें भाषांतर केलें; व त्याला वेणुवनविहार असें नांव दिलें. हें भाषांतर इ. स. ४९० या वर्षी झालें. त्या वेळीं मूळ विनयपिटकावर एका वर्षास एक टिंब ह्याप्रमाणें ९७५ वर्षे दर्शविणारीं ९७५ टिंबें होतीं.

आतां आपणांस बुद्धाचा मृत्युकाल पहावयाचा असल्यास ९७५ वर्षांतून इ. सनाचीं ४९० वर्षे वजा केलीं पाहिजेत. म्हणजे बाकी राहिलेलीं वर्षे बुद्धाचा ख्रिस्तपूर्व निर्वाणकाल दर्शवितील. ह्याप्रमाणें ख्रिस्तापूर्वी ४८५ या वर्षी बुद्धाच्या विनयपिटकाचा संग्रह झाला असावा, व त्याच्या सुमारें ८ वर्षे आगोदर बुद्ध मृत्यु पावला असावा. ह्यावरून ४७७ हें बुद्धाचें मृत्युवर्ष खरें धरण्यास हरकत नाहीं असें इं. अँ. पु. १३ (पृ.१४८–५१) मध्यें प्रतिपादिलेलें आहे.

**रा. गोपाल अय्यर यांचा एतद्विषयक लेख.**—गोपाल अय्यर यांनीं इं. अँ. पु. ३७, पृ. ३४१ वर या प्रश्नाचा जो ऊहापोह केला आहे, त्याचा सारांश येणें प्रमाणेः—उत्तरेकडील बौद्ध लोक ख्रि. पू. २४२२ पासून ५४६ पर्यंत निरनिराळ्या सालांत बुद्ध झाला असें सांगतात, आणि सिलोन, ब्रह्मदेश व सयाम येथील बौद्ध लोक बुद्धाचा निर्वाणकाल ख्रि. पू. ५४३ हा धरतात.

बुद्धविषयक दंतकथांवरून त्याचा निर्वाणकाल निश्चित करण्यास चंद्रगुप्ताचा व अशोकाचा राज्यारोहणकाल निश्चित करणें जरूर आहे. कारण सिलोनांतील ऐतिहासिक पुराव्यावरून असें दिसतें कीं, चंद्रगुप्ताचें राज्यारोहण निर्वाणानंतर १६२ वर्षांनीं व अशोकाचें २१८ वर्षांनीं झालें. हें विधान बरोबर आहे असें प्रो. मॅक्समुल्लर यांनीं कबूल केलें असून अशोकाच्या शिलालेखांनींहि त्याला पुष्टि येते.

पाश्चात्य अधिकारयुक्त ग्रीकमधील व इतर पुराव्यांवरून त्याचप्रमाणें अशोकासंबंधीच्या माहितीवरून चंद्रगुप्ताचें राज्यारोहण ख्रि. पू, ३२५ सालीं झालें असावें असें म्हणावें लागतें. त्याचप्रमाणें अशोकाचें राज्यारोहण ख्रि. पू. २६९ सालीं झालें असावें. म्ह जे यावरून असें दिसतें कीं, बुद्धाचें निर्वाण ख्रि. पू. ४८७ सालीं झालें असावें.

सदरहू पुराव्याशिवाय हिंदुस्थानांत सांपडणाऱ्या शिलालेखांवरूनहि बुद्धाचा निर्वाणकाल निश्चित करतां येतो. मध्यप्रांतांतील रूपनाथ येथील शिलालेखांतील आदेशांत असें लिहिलें आहे कीं, तो २५६ सालीं एका स्वर्गवासीयानें प्रसिद्ध केला. या लेखावरून असें अनुमान निघतें कीं, अशोक याच सालीं स्वर्गवासी झाला, व त्यांतलि २५६ साल म्हणजे बुद्धनिर्वाणानंतरचें २५६ वें साल होय. अशोकाचा मृत्युकाल ख्रि. पू. २३१ आहे, म्हणजे निर्वाण काल ख्रि. पू. ४८७ हा असावा. निर्वाणाच्या वेळीं बुद्ध ८० वर्षांचा होता असें दंतकथांवरून दिसत असल्यामुळें बुद्धाचा जन्म ख्रि. पू. ५६७ सालीं झाला असावा.

चीनमध्यें विनयपिटकाला जोडलेलें एक टिपक्याठिपक्यांचें पान आहे. पूर्वी प्रत्येक वर्षी 'वस्सोत्सवा' च्या वेळीं मुख्य उपाध्याय त्या टिपक्यांत एक ठिपका मिळवात असे, व ही पद्धत इ. स. ४८९ पर्यंत चालू होती. बुद्धनिर्वाणानंतर, दर वर्षास एक ठिपका याप्रमाणें त्यांत ९७५ ठिपके आहेत असें म्हणतात; यावरून निर्वाण काल ख्रि. पू ४८७ ठरतो.

सिलोनांतील बखरींत निर्वाणकाल ख्रि. पू. ५४३ दिला आहे. परंतु कालगणनेंत सिलोनच्या लोकांची चूक झाल्यामुळें हा ५६ वर्षांचा फरक पडला आहे. त्यांनीं मौर्यकाल अशोकापासून सुरू होतो असें गृहीत धरल्यामुळें चंद्रगुप्त व अशोक यांच्यांतील ५६ वर्षांच्या अंतराएवढी चूक बुद्धाचा निर्वाणकाल निश्चित करतांना पडली असावी.

**'अशोकाच्या राज्यारोहणकालावरून बुद्धाच्या निर्वाणाचें साल ठरविण्याचा प्रयत्न.**—अशोकाच्या १३ व्या शिलालेखावरून असें दिसून येतें कीं, त्याला राज्याभिषेक झाल्यानंतर १३ व्या वर्षी जेव्हां त्यानें कलिंगावर हा

लेख कोरविला तेव्हां अँटायोकस थिऑस व मगस हे ग्रीक राजे राज्य करीत होते. अँटायोकस ख्रि. पू. २६१ मध्यें गादीवर बसला; व मगस ख्रि. पू. २५८ व्या वर्षी मरण पावला असल्यामुळें, अशोकाच्या राज्याभिषेकानंतरचें १३ वें वर्ष ख्रि. पू. २६० व २५८ या दोन सालांच्या दरम्यान पडलें असावें. म्हणजे त्याला ख्रि. पू. २७२ व २७० यांच्या दरम्यान राज्याभिषेक झाला असावा हें उघड आहे. आतां वायुपुराणावरून असें समजतें कीं, बिंबिसाराच्या मृत्यूनंतर ३५३ वर्षांनीं (म्हणजे बुद्धनिर्वाणानंतर ३४५ वर्षांनीं—कारण अजातशत्रूनें बिंबिसाराचा वध करून राज्य बळकाविल्यावर ८ वर्षांनीं बुद्ध मेला असें बौद्ध ग्रंथांत म्हटलें आहे) अशोक मरण पावला. पण शिशुनाग घराण्यांतील नंदिवर्धन व महानंदी हे दोन राजे, नंदघराण्यांतील नंद व महापद्मनंद या दोन राजांचीच द्विरुक्ति होऊन लिहिले जाणें संभवनीय असल्यामुळें, नंद घराण्यांतील राजाबद्दल दिलेला १०० वर्षांचा संशयास्पद काळ या ३४५ वर्षांतून काढून टाकिला असतां, बुद्धानंतर २४५ वर्षांनीं अशोक मरण पावला असें म्हणणें प्राप्त होतें. आतां राज्याभिषेक झाल्यानंतर अशोकानें आणखी ३७ वर्षे राज्य केलें असें बौद्ध ग्रंथांत म्हटलें असल्या कारणानें, निर्वाणानंतर २०८ वर्षांनीं अशोकास राज्याभिषेक झाला असें, व तो ख्रि. पू. २७२-२७० च्या दरम्यान झाला हें आपणांस ठाऊक असल्यामुळें-बुद्धाचें निर्वाण ख्रि. पू. ४८० व ४७८ या दोन सालांच्या दरम्यान केव्हां तरी झालें असें सिद्ध होतें.

**वरील सालाची महावंशांतील उल्लेखाशीं संगति**—बुद्धाच्या. निर्वाणानंतर २१८ वर्षांनीं अशोकास राज्याभिषेक झाला असें महावंशांत सांगितलें आहे. अशोकाच्या राज्याभिषेकाचा काळ ख्रि. पू. २७२-२७० असा आपण शिलालेखाच्या विश्वसनीय पुराव्यावरून ठरविला असल्यामुळें त्यावरून हिशोब करून पाहतां बुद्धाचा निर्वाणकाल वाजवीपेक्षां ११-१२ वर्षे पुढें येतो. यावर उपसालाचे प्रो. शार्पेटियर यांचें असें म्हणणें आहे कीं,—"अशोकाच्या राज्याभिषेकापेक्षां त्यानें बौद्ध धर्माचा स्वीकार करणें हीच गोष्ट बौद्धांच्या दृष्टीनें महत्त्वाची असल्यामुळें जेव्हां राज्याभिषेकानंतर ११ वर्षांनीं अशोक बौद्ध संप्रदायाचा कट्टा अभिमानी झाला तेव्हाच त्याचा राज्याभिषेक झाला असें त्यांनीं मानलें असावें."

**देवानां पिय तिस्साच्या राज्याभिषेकदिनानिर्देशावरून वरील सालास पुष्टि.**—सिलोनच्या देवानां पिय तिस्सास बुद्धनिर्वाणानंतर २३६ वर्षांनीं मार्गशीर्षांत आदिचंद्रोदयदिन व पूर्वाषाढा नक्षत्र असतांना राज्याभिषेक झाला या माहितीवरून देवानां पिय तिस्स याला ख्रि. पू. २४२ किंवा २४७ या वर्षी राज्याभिषेक झाला असावा, व म्हणून बुद्धाच्या निर्वाणास ख्रि. पू. ४७८ किंवा ४८३ यांपैकीं एखादें वर्ष देतां येईल, असें डॉ. फ्लीट यांनीं गणित करून ठरविलें आहे. आतां यांपैकीं कोणतें वर्ष घेणें अधिक सयुक्तिक होईल तें आपण पाहूं. ख्रि. पू. २४२ सालच्या १४ नोव्हेंबर रोजीं ( लंकेंतील कालमानाप्रमाणें ) मध्यम सूर्योदयानंतर ५१॥ घटकांनीं द्वितीया संपली, म्हणजे तो 'आदिचंद्रोदय दिन' होता; आणि पूर्वाषाढानक्षत्र तर त्या दिवशीं दिवसभर होतें. परंतु ख्रि. पू. २४७ सालच्या ६ नोव्हेंबर रोजीं ९ घटकांनीं प्रतिपदा संपली, व ५०॥ घटकांनीं, म्हणजे मध्यरात्रीनंतर दोन घटकांनीं, पूर्वाषाढा नक्षत्र लागलें. यावरून असें दिसून येईल कीं, हा जरी आदिचंद्रोदय दिन होता तरी त्या दिवशीं पूर्वाषाढा नक्षत्र होतें, असें बहुधा कोणी म्हणणार नाहीं. म्हणून ख्रि. पू. २४२ हें देवानां पिय तिस्साचें राज्याभिषेकाचें वर्ष, व ख्रि. पू. ( २४२+२३६ ) ४७८ हें बुद्धाच्या निर्वाणाचें वर्ष असलें पाहिजे.

**बुद्ध निर्वाणाचा नक्की दिवस**—वरील विवेचनावरून आपणांस बुद्धाचा निर्वाणकाल स्थूलमानानें ख्रि. पू. ४८०-४७८ असा ठरवितां येतो असें दिसून येईल. बुद्धाच्या मृत्यूचें नक्की वर्ष, महिना व दिवस काढण्याकरितां बिशप बिगंडेटकृत गोदमचरित्रांतील पुढें दिलेल्या तिथी गोपाळ अय्यर यांस महत्वाच्या वाटतात.

१. फाल्गुनशुद्ध १ रोज शनिवारपासून कौद्द शक प्रचारांतून गेला ! ! !

२. चैत्रशुद्ध १ रोज रविवारपासून इंत्झन शक प्रचारांत आला.

३. वैशाख शुद्ध १५ ( इंत्झन ) शक ६८ रोजीं शुक्रवारीं विशाखा नक्षत्र असतांना बुद्ध जन्मास आला.

४. ९६ सालीं रविवार आषाढ शुद्ध १५ रोजीं उत्तराषाढा नक्षत्र असतांना बुद्ध कपिलवस्तु सोडून गेला.

५. १०३ सालीं वैशाख शुद्ध पौर्णिमेस बुधवारीं विशाखा नक्षत्र असतांना बुद्धास पूर्णज्ञान प्राप्त झालें.

६. १०७ सालीं श्रावणशुद्ध पौर्णिमेस शनिवारीं सूर्योदयीं शुद्धोदन मरण पावला.

७. १४८ सालीं वैशाख शुद्ध पौर्णिमेस, मंगळवारीं, विशाखा नक्षत्रावर सूर्योदयाच्या किंचित् अगोदर बुद्धाचें निधन झालें.

८. फाल्गुन शु. १ रोज सोमवार शके १४८ पासून बौद्ध पंथाचा शक सुरू झाला.

बुद्धाच्या निर्वाणाचीं जेवढीं म्हणून वर्षे सुचविण्यांत आलीं आहेत त्यांपैकीं फक्त ख्रि. पू. ४७८ हेंच वर्ष घेतलें असतां वरील तिथी त्या त्या ठिकाणीं दर्शविलेल्या वारीं पडतात, व जेथें नक्षत्रें दिलीं आहेत तेथें तींहि जुळतात. यावरून ख्रि. पू. ४७८ या वर्षांतील वैशाख शुद्ध पौर्णिमेस म्हणजे एप्रिल महिन्याच्या १ ल्या तारखेस बुद्ध मरण पावला असला पाहिजे हें निर्विवाद सिद्ध होतें.

**कार्तिक शुद्ध ८ हा बुद्धनिर्वाणदिन धरण्याची अनवश्यकता.**—डॉ. फ्लीट यांनीं देवानां पिय तिस्स-

याचे दोन्ही राज्याभिषेक ( खि. पू. २४७ तील मार्गशीर्ष शुद्ध १ व खि. पू. २४६ तील वैशाख शु. १५ ) आणि महेंद्राचें सिलोनमध्यें आगमन ( खि. पू. २४७ तील ज्येष्ठ शुद्ध १५ ), या तीनहि गोष्टी निर्वाणशक २३६ ( गत ) या वर्षींच पडाव्या म्हणून, कार्तिक शुद्ध ८ ही बुद्धाच्या निर्वाणाची तिथि घेतली आहे. परंतु तसें करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. कारण बिगंडेट्सच्या पुस्तकांत दिलेल्या तिथींवरून जुन्या पंचांगपद्धतीचा लक्षपूर्वक अभ्यास केला असतां असें दिसून येईल कीं, जरी शकारंभ निरनिराळ्या कालीं निरनिराळ्या दिवसांपासून केला होता तरी वर्षारंभ नेहमीं फाल्गुन शुद्ध प्रतिपदेसच होत असे. ही गोष्ट लक्षांत ठेविली, व खि. पू. २४२ हा 'देवानां पिय तिस्सा'चा राज्याभिषेककाल धरला म्हणजे बौद्ध ग्रंथांत दिलेली वैशाख शु. १५ ही निर्वाणतिथि धरूनहि दुसरी व तिसरी अशा दोन्हीहि गोष्टी निर्वाणशक २३६ गत ( म्हणजे २३७ वर्तमान ) या सालींच पडतील; व पहिली निर्वाण शक २३६ वर्तमानमध्यें येईल.

**निर्वाणवर्ष खि. पू. ४७७ कीं ४७८.**—इंडियन अँटिक्वरीच्या १९१४ सालांतील आगस्ट महिन्याच्या अंकांत महावीराचा निर्वाणकाल ठरवीत असतां, खि. पू. ४७७ हें बुद्धाच्या निर्वाणाचें साल असलें पाहिजे असें प्रो. शार्पेन्टिये यांनीं निर्णीत केलें आहे. हा निर्णय त्यांनीं ज्या पुराव्यांवरून केला त्यांतील महत्त्वाचे मुद्दे वर आलेच आहेत. खि. पू. ४७७ हा बुद्धाचा निर्वाणकाल धरला असतां मरणाच्या वेळीं त्याचें वय ८० वर्षांचें होतें ही गोष्ट जरी त्यांच्या निर्णयास अनुकूल पडते, तरी त्या सालच्या फाल्गुन शुद्ध प्रतिपदेस, म्हणजे निर्वाणशकाच्या आरंभदिवशीं, रविवार किंवा सोमवार येत नसल्यामुळें, तें साल धरणें बरोबर होणार नाहीं. खि. पू. ४७८ हें निर्वाणाचें वर्ष मानिलें असतां बुद्धाच्या वयास मरणाच्या वेळीं ७९ वर्षे झालीं होतीं असें म्हणणें प्राप्त होतें खरें. परंतु त्याचें निधन ईत्झन शक १४८ ( वर्तमान ) या वर्षी झालें असें मानलें असतां तिथि, वार, नक्षत्र व शक यांविषयीं सर्व अडचणी दूर होतात.

**बुद्धाच्या इतिहासांतील महत्त्वाच्या गोष्टींचा कालनिर्णय.**—तेव्हां आतां बिगंडेट्सच्या पुस्तकांतून घेतलेल्या तिथींना पुढें दिल्याप्रमाणें तारखा लावण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं:—

ईत्झन शक प्रचारांत आला:—रविवार ता. ५ मार्च ६२६ ( खि पू. )
बुद्धाचा जन्म:—शुक्रवार ता. ४ एप्रिल, ५५७ ( „ )
त्याचा गृहत्याग:—रविवार ता. २२ जून ५२९ ( „ )
ज्ञानप्राप्ति:—बुधवार ता. ८ एप्रिल ५२२ ( „ )
शुद्धोदनाचें निधन:—शनिवार ता. २० जुलै ५१८ ( खि. पू. )
बुद्धाचें निर्वाण:—मंगळवार, ता. १एप्रिल ४७८ (खि.पू.)
निर्वाणशकारंभ:—रविवार ता. १९ जानेवारी ४७८ ( खि. पू. )

**वारांचा उल्लेख व त्याचें ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्व.**—पांचव्या शतकापूर्वी, कोणत्याहि प्रसंगाचा काळ देतांना वार लिहिण्याची हिंदुस्थानांत रीति नसल्यामुळें, ५ व्या व ८ व्या शतकाच्या दरम्यान बहुधा कोणीतरी गणित करून या तिथींचे वार लिहिले असावे. परंतु एवढ्याच कारणावरून बिगंडेट्सनें आपल्या भाषांतरांत दिलेल्या तिथींचें ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्व बिलकुल कमी होत नाहीं. कारण बुद्धाच्या आयुष्यांतील प्रत्येक प्रसंगासंबंधीं तिथिवार-नक्षत्रादि सर्वच गोष्टी मागाहून गणित करून कोणीं लिहिल्या असणें असंभवनीय असल्यामुळें, तशी शंका देखील घेण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं [ इं. अॅ. पु. ४३ ].

**बौद्ध संप्रदायाची ऐतिहासिक किंमत.**—बौद्ध संप्रदायाचें कार्य मोठें आहे व त्यामुळें, बुद्धाचें ऐतिहासिक महत्त्व आणि त्याच्या चरित्राविषयीं त्याच्या प्राचीनतेच्या मानानें उपलब्ध माहिती या दृष्टींनीं या पुरुषासारखा दुसरा कोणीच झाला नाहीं. खिस्त व पैगंबर या दोन्ही व्यक्तींचें कार्यस्वरूप बुद्धाच्या कार्यस्वरूपाहून भिन्न आहे.

बौद्ध संप्रदायाचा प्रसार चांगल्या रीतीनें समजण्यासाठीं त्याचें वास्तविक स्वरूप कळणें अवश्य आहे. बुद्धानें आपलें मत केवळ मतस्वरूपी ठेविलें नाहीं, तर तें संप्रदाय स्थापन करून रक्षण्याचा आणि प्रसृत करण्याचा प्रयत्न केला. बुद्धाचा संप्रदाय आणि परंपरागत वैचारिक इतिहास यांचा परस्परसंबंध संप्रदायेतिहासाच्या दृष्टीनें अगोदर लक्षांत घेतला पाहिजे. याविषयीं थोडक्यांत असें सांगतां येईल कीं, त्यानें ईश्वरस्वरूप किंवा वैदिक वाङ्मय यांविषयीं फारसें विवेचन केलेलें नाहीं. बुद्धाच्या ईश्वरविषयक कल्पना निश्चयानें सांगणें कठिण आहे. कधीं कधीं तो पिशाचादिकांचें अस्तित्व मान्य करतांना आढळतो. इंद्रादि देवतांच्या अस्तित्वाविषयीं त्याची आस्तिक्यबुद्धि असावी असेंहि एखाद्या वेळेस वाटतें. स्वर्ग, पाताळ, नरक इत्यादि बाबतींत त्याचें मत फारसें भिन्न नव्हतें. पुनर्जन्माची कल्पना भिन्न स्वरूपांत त्यास मान्य होतीच. आयुष्य दुःखमय आहे, कर्म फार बलवान् आहे, या त्याच्या अधिष्ठात्री कल्पना होत्या.

बुद्धाचें अद्वितीयत्व जरी कोणासहि अमान्य करतां यावयाचें नाहीं तरी त्याच्या ज्ञानाच्या, स्वभावाच्या आणि वर्तनाच्या वर्णनांत श्रद्धावान् आणि चिकित्सक यांत तीव्र मतभेद झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

**बुद्धाची वेदांविषयीं वृत्ति.**—बुद्धाची वेदांविषयीं वृत्ति अनिश्चित होती. वेदांत काय असावें याची त्यास कल्पना होती असें म्हणण्यास पुरावा नाहीं. त्यास संस्कृत येत होतें कीं नव्हतें याविषयीं संशयच आहे. पांडित्याच्या अभावामुळें

वेदांस निश्चयानें विरोध करण्याचें साहस गौतमास करतां आलें नसावें.' कश्यपसुत्तांत त्यानें मंत्रद्रष्ट्या ऋषींस ब्रह्मज्ञान कोठें होतें असें म्हणून वेदांचा उपहास केला आहे. तर जातकांत प्रारंभींच आपला उपदेश वेदांचें सार होय म्हणून म्हटलें आहे.

**बुद्धाचें जातिभेदासंबंधाचें कार्य.**—गौतमास जातिभेदाचा द्वेष्टा व समानतेचा पुरस्कर्ता असें म्हणतां येत नाहीं. त्यानें आपल्या भिक्षूंच्या संघांत न्हाव्यास घेतलें किंवा चांडालास घेतलें अशा तऱ्हेचा पुरावा आणल्यानें त्याची जातिभेदविषयक वृत्ति स्पष्ट होत नाहीं. अविवाहित भिक्षूंच्या संघांत कोणीहि कां येईना, त्यानें समाजव्यवस्थेंत फरक पडत नाहीं तेव्हां आपण त्याची विवाहविषयक वृत्ति काय होती हें शोधलें पाहिजे. विवाह करणेंच चांगलें नाहीं आणि गृहस्थाचें मुख्य कर्तव्य भिक्षूस शिधा देणें हें होय अशी त्याची सामान्यतः विवाहविषयक वृत्ति होती. अंबट्ठसुत्तांत त्यानें आपल्याशीं वादविवाद करणाऱ्या ब्राह्मणांस तुम्हीं ब्राह्मण क्षत्रियवैश्यांच्या मुलींबरोबर लग्नें करतां म्हणून निर्भर्त्सना केली आहे; आणि आपल्या कुलाच्या शुद्धतेविषयीं सांगतांना, आमच्या पूर्वजांनीं जातीबाहेर लग्न करणें टाळण्यासाठीं भावाबहिणींचा संबंध केला असे उद्गार काढले आहेत. एवंच त्यास भावाबहिणींनीं लग्न करणें हें जातीबाहेर लग्न करण्यापेक्षां अधिक बरें वाटे. त्यानें जातिभेदाविरुद्ध चळवळ मुळींच केली नसून ब्राह्मणांविरुद्ध मात्र चळवळ केली. ब्राह्मणांच्या ज्ञानांत अर्थ नाहीं, ब्राह्मणांची जात क्षत्रियांच्या खालीं आहे, ब्राह्मण हीन कुलांतले आहेत, इत्यादि वाक्यें तो वारंवार बोले. म्हणजे त्याची जातिभेदाविरुद्ध ओरड नसून त्याच्यामध्यें ब्राह्मणमत्सर मूर्तिमंत वास करीत होता असें दिसतें.

**बुद्धाची ज्ञानविषयक वृत्ति.**—बुद्धास अज्ञानमूलक पूर्वग्रहांचा द्वेष्टा असेंहि म्हणतां येणार नाहीं. त्यास प्रत्ययावर रचलेलें ज्ञान नको होतें. ग्रहणें वर्तविणें, गणित करणें, औषधिज्ञान हीं फार हलकीं, यांत सर्व प्रकारचा विटाळ भरला आहे, असें त्याचें मत होतें. आणि असल्या गोष्टींपासून मी अलिप्त आहें याबद्दल तो गर्व बाळगीत होता. त्याची शास्त्रद्वेष्टी विचारपद्धति येणेंप्रमाणें होतीः ब्राह्मणांचीं शास्त्रें शिकाल तर तुम्ही अधोगतीस जाल; कां कीं, ब्राह्मणांचीं शास्त्रें अनुभवावर रचलीं आहेत. अनुभव म्हणजे काय, तर पदार्थ आणि इंद्रिय यांचा संनिकर्ष. पण पदार्थ आणि इंद्रिय यांचा संनिकर्ष झाल्यानें वासना उत्पन्न होते, आणि वासना म्हणजे सर्व अधोगतीचें कारण होय. म्हणून अनुभवमूलक शास्त्रें शिकाल तर तुम्हांस वासना उत्पन्न होऊन तुम्ही अधोगतीस जाल. गौतमास त्या वेळच्या अज्ञानाचा द्वेष्टा न म्हणतां, ज्ञानसंचयाचा द्वेष्टा व अडाणी लोकांच्या टोळींत बसून ज्ञानी वर्गाची चेष्टा करणारा म्हटलें पाहिजे. तो स्वतः गूढ "शास्त्रें" किंवा फलज्योतिष असल्या प्रकारच्या विद्यांचा व्यापार करण्याच्या पापापासून मुक्त नव्हता. जेव्हां त्यास भेटण्यास आलेल्या एका तरुणास शरीरलक्षणांवरून बुद्ध हा महापुरुष आहे असें वाटूं लागलें, आणि महापुरुषाचें आणखी एक लक्षण म्हणजे गुह्येंद्रियाचा विशिष्ट आकार हें मानलें जात असल्यामुळें, तें लक्षण गौतमास आहे किंवा नाहीं याविषयीं संदेह उत्पन्न झाला. तेव्हां आपल्या महत्त्वास साधक असें प्रमाण त्यास दाखविण्यासाठीं गौतमानें त्यास आपलें गुह्येंद्रिय उघडून दाखविलें! असो.

या तऱ्हेच्या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे बुद्धाचें स्वरूप चांगलें ध्यानांत येतें. बुद्ध विद्वान् नव्हता, मोठा सात्विक मनुष्य नव्हता, किंवा विशिष्ट नीतिमत्तेचा आग्रहीहि नव्हता. हे सर्व त्याचे गुण त्याच्या मतप्रसारास सहाय्यक झाले. तो विशिष्ट तत्त्वाचा आग्रही असता तर त्यास संप्रदायप्रसारांत यश आलें असतें कीं नाहीं याची शंकाच आहे. जेव्हां अनेक भिक्षू गोळा करावयाचे, त्यांच्या निर्वाहासाठीं मोठमोठ्या रकमा जमवावयाच्या आणि मालमत्ता मिळवावयाची तेव्हां त्या मनुष्यास तत्त्ववेत्तेपणापेक्षां मुत्सद्दीपणा पतकरावा लागतो; आणि ज्या गोष्टी त्यास अयोग्य वाटत असतील त्याहि कराव्या लागतात. गौतमाचें असेंच झालें असावेंसें दिसतें. ज्याप्रमाणें लूथरला धर्म सुधारावयाचा असतां राजाश्रय मिळविण्यासाठीं दोन बायका करण्यास अनुकूल असा एका राजाला शास्त्रार्थ काढून द्यावा लागला, त्याप्रमाणेंच अनेक गोष्टी गौतमास कराव्या लागल्या असतील. गौतम संघचालक आणि धर्मोपदेशक असल्यामुळें त्यास विचार आणि आचरण यांत येणारी असंगति पतकरावी लागली असें दिसतें. आमच्या मतें गौतमाची अपूर्वता ज्ञानमूलक किंवा आचरणमूलक नसून संघचालकत्वमूलक होती.

संघचालकत्वामुळें गौतमावर येणाऱ्या अपवादांचें निराकरण करतां येईल हें खरें, तरी तेवढ्यानें तो दोषापासून अजीबात सुटतो असें मात्र नाहीं. तथापि त्यामुळें तो फारसा मोठा दोषी ठरत नाहीं, एवढें मात्र कबूल केलें पाहिजे. त्याची जातिभेदविषयक वृत्ति जरी केवळ मत्सरप्रेरित असली, तरी तो त्यामुळें मोठ्या दोषाला पात्र होतो असें नाहीं. सामाजिक चळवळींत अंग ठेवणाऱ्या पुष्कळ लोकांची वृत्ति वरिष्ठ वर्गाविषयीं मत्सरयुक्त असते; आणि तो मत्सर त्यांस जातिभेदाविरुद्ध बोलावयास प्रेरणा करतो. अशी एकंदरींत स्थिति असतां त्याबद्दल एकट्या गौतमासच दोष कशाला? गौतम या बाबतींत वाईट दिसण्याचें कारण एवढेंच कीं, अलौकिक सद्गुण त्यावर लोकांनीं विनाकारण लादले. आणि अलौकिकत्वाच्या दृष्टीनें त्याचें परीक्षण करूं लागलें म्हणजे त्याचें वैगुण्य विशेष ठळकपणें दिसून येतें. आचरणानें केवळ सामान्य मनुष्य व धंद्यानें मुत्सद्दी या तऱ्हेचीच दृष्टि गौतमाच्या आयुष्याचें परीक्षण करतांना ठेवली, म्हणजे गौतम वाईट मनुष्य मूळींच दिसत नाहीं.

**बौद्ध संप्रदायाचा प्रसार.**—बौद्ध संप्रदायाचा उत्तर हिंदुस्थानांत प्रसार त्याच्या काळांतच झाला. ब्रह्मावर्ताच्या पश्चिमेकडे गौतमानें स्वतः चोहोंकडे संचार केला होता. तो संचारसंबंध द्यावयाचा म्हणजे त्याच्या अनेक सूत्रांचा परामर्श घ्यावा लागेल. हा पुढें बौद्धवाङ्मयाच्या विवेचनाच्या प्रसंगीं घेतला जाईल. सध्यां मतस्थैर्यार्थ झालेल्या धर्मसभा व निरनिराळ्या प्रदेशांत झालेला संप्रदायप्रसार इकडेच लक्ष देऊं.

**हिंदुस्थानांतील बौद्ध संप्रदाय.**—बौद्ध संप्रदायाचा उगम हिंदुस्थानांत झाल्यामुळें, त्या पंथाचीं आद्यतत्वें काय होतीं तें हिंदुस्थानच्या इतिहासावरून समजतें. बौद्धांचें सर्व संप्रदायग्रंथ याच देशांत तयार झाले असल्यानें येथील बौद्ध संप्रदायाचें स्वरूप समजून घेतल्याशिवाय इतर देशांतील बौद्ध संप्रदायांचें स्वरूप नीट लक्षांत येणार नाहीं. या दृष्टीनें येथील बौद्ध संप्रदायाचा अभ्यास फार महत्त्वाचा आहे. या पंथाचा हिंदुस्थानांत लोप होऊन जरी अनेक शतकें लोटलीं आहेत, तरी त्याचा हिंदुस्थानच्या संस्कृतीवर बराच परिणाम झालेला आहे. या देशांतील आध्यात्मिक जीवनावर बौद्ध प्रयत्नाचा परिणाम बराच झालेला असून वाङ्मयेतिहासामध्यें तर बौद्धपंथी वाङ्मयास महत्त्वाचें स्थान आहे.

कोसल ( हल्लींचा अयोध्या प्रांत ) व मगध ( बहार ) या देशांत बौद्ध संप्रदायाचा उगम झाला. ब्राह्मणसंस्कृतीच्या केंद्रस्थानापासून हे प्रदेश फार दूर असल्यामुळें येथें बौद्ध संप्रदायाच्या प्रसाराचें काम सुगम झालें.

**धर्मसभा**—बुद्धाच्या निर्वाणानंतर थोड्या दिवसांनीं महाकाश्यप नांवाच्या त्याच्या एका शिष्यानें राजगृह येथें भिक्षूंची एक सभा भरविली. बुद्धाच्या आज्ञा नीट समजावून देणें हा या सभेचा उद्देश होता. या पहिल्या धर्मसभेनें संघासंबंधाच्या कडक नियमांत व आचारांत कांहीं सुधारणा केल्या; परंतु धर्मशास्त्रांतल्या वचनांच्या स्पष्टीकरणासंबंधीं कित्येक प्रश्न उपस्थित झाल्यामुळें, पहिल्या सभेनंतर १०० वर्षांनीं वैशाली येथें दुसरी धर्मसंगीति भरविण्यांत आली. बौद्धांची तिसरी धर्मसभा प्रसिद्ध बौद्ध राजा अशोक याच्या कारकीर्दींत पाटलिपुत्र येथें भरली होती.

**अशोकाच्या उत्तेजनामुळें बौद्ध संप्रदायाचा प्रसार.**—हिंदुस्थानांतील बौद्ध संप्रदायाच्या इतिहासांत अशोकाच्या कारकीर्दीचा काल अत्यंत महत्त्वाचा आहे. या बलाढ्य राजाच्या पाठिंब्यामुळें हिंदुस्थानांत त्या विचारांचा प्रसार फार जारीनें सुरू झाला. अशोकानें स्वतः बौद्ध संप्रदायाचा स्वीकार केला इतकेंच नाहीं, तर त्यानें सिलोन, म्हैसूर, महाराष्ट्र, काश्मीर, वगैरे देशांत धर्मप्रचारक पाठविले, व अनेक मठ स्थापून भिक्षू व भिक्षुणी यांची राहण्याची सोय केली. अशा प्रकारें या संप्रदायास अमर्याद उत्तेजन मिळाल्यामुळें कित्येक हलक्या प्रतीचे लोक संघांत प्रविष्ट होऊन त्यांच्या स्वैर वर्तनानें बौद्ध संप्रदायाच्या तत्वांत घोटाळे माजले. अशोकानें हलकट लोकांना संघांतून घालवून देऊन कथावत्थु हा ग्रंथ रचिला; व ख्रि.पू. २५३ त पाटलीपुत्र येथें तिसरी धर्मसभा बोलाविली.

अशोकाला बौद्ध मतांची विशेष आस्था असल्यामुळें, त्यानें धर्मविषयक माहिती शिलास्तंभांवर लिहून ठेविली. या त्याच्या शिलालेखांवरून तत्कालीन बौद्ध संप्रदायाच्या इतिहासाची चांगली माहिती मिळते.

**मिलिंद व कनिष्क यांच्या काळांतील पक्षभेद.**—अशोकाच्या मृत्यूनंतरहि उत्तर हिंदुस्थानांत बौद्धमताचा बराच प्रसार झाला. ख्रि. पू. १०० च्या सुमारास मिलिंद (मिनँडर) राजानें बौद्धपंथाचा स्वीकार केला. याच सुमारास बॅक्ट्रिया व चीन या देशांतहि बौद्ध संस्कृतीचा प्रसार झाला. परंतु हिंदुस्थानांतील बौद्ध लोकांत या वेळीं फाटाफूट होऊन इतकी दुही माजली होती कीं, एका बौद्ध संप्रदायाचे अठरा निरनिराळे पंथ प्रचारांत आले असें म्हणतात. अशोकाप्रमाणेंच कनिष्क राजाचीहि कारकीर्द बौद्ध संस्कृतीच्या इतिहासांत महत्त्वाची आहे. हाहि राजा प्रथम बौद्धसंप्रदायी नव्हता; परंतु राज्यारूढ झाल्यावर तो या संप्रदायांत शिरला अशी दंतकथा आहे. इ.स. १०० च्या सुमारास कनिष्कानेंहि एक धर्मसभा भरविली होती. या सभेंत बौद्ध संप्रदायाच्या अठरा निरनिराळ्या पंथांचे लोक हजर होते. गौतमबुद्धाच्या वेळचा बौद्ध संप्रदाय व कनिष्काच्या वेळचा बौद्ध संप्रदाय यांत महदंतर होतें. बौद्ध संप्रदायाचें मूळचें शुद्ध स्वरूप या वेळीं राहिलें नव्हतें. कनिष्काच्या धर्मसभेंत हीनयान पंथाचे लोक बरेच हजर असून महायान पंथाचे लोक बहुतेक हजर नव्हतेच असें म्हटलें तरी चालेल. उत्तरेकडच्या बौद्ध संस्कृतीला महायान व दाक्षिणेकडील बौद्ध संस्कृतीला हीनयान अशीं नांवें होतीं. या दोन पंथांतील अंतर दिवसानुदिवस वाढत जाऊन कनिष्काच्या वेळीं ते पंथ अगदीं भिन्न झाले. कनिष्काच्या सभेच्या योगानें हीनयान पंथांत एकी झाली, परंतु या दोन पंथांचें एकमत झालें नाहीं. या धर्मसभेंत संप्रदायग्रंथांतहि सुधारणा झाली.

**ऱ्हास.**—इसवी सनाच्या आठव्या शतकापासून हिंदुस्थानांतील बौद्ध संप्रदायाच्या ऱ्हासास प्रारंभ झाला. व हळू हळू त्याचें विशिष्ट स्वरूप नष्ट होऊन तो प्रचलित विचारांत पूर्णपणें मिसळून गेला. बंगालांत व इतर अनेक ठिकाणीं उत्पन्नावर तगलेले मठ मुसुलमानांच्या विजयानंतर नष्ट झाले आणि सामान्य जनता ब्राह्मणाश्रयी बनली.

**पोषाख व आचारनियम.**— हिंदुस्थानांतील बौद्ध भिक्षूंचा पोषाख प्रथमतः पिंवळ्या रंगाचा असे; परंतु कालांतरानें ते तांबूस रंगाचीं वस्त्रें वापरूं लागले. आरंभीं बौद्ध भिक्षू अरण्यामध्यें किंवा गुहांमध्यें राहून मतप्रचाराच्या कामासाठीं बाहेर हिंडत असत. पावसाळ्यामध्यें मात्र ते

मतप्रचाराचें काम बंद ठेवून कोठें तरी एकत्र वास्तव्य करीत. पुढें पुढें धार्मिक बौद्ध गृहस्थ भिक्षूंसाठीं स्वखर्चानें वसतिगृहें बांधून देऊं लागले. अशा वसतिगृहांना विहार अशी संज्ञा होती. व कांहीं काळानें बौद्ध भिक्षू अरण्यांत रहाण्याचें सोडून देऊन या विहारांमध्येंच निरंतर राहूं लागले. अशा प्रकारें मठ बांधण्याची पद्धत प्रचारांत आली. बौद्ध भिक्षू आपला उदरनिर्वाह भिक्षा मागून करीत; परंतु भिक्षा मागते वेळीं कांहींएक बोलावयाचें नाहीं असा निर्बंध होता. ते दुपारीं फक्त एकदां भोजन करीत. तूप, लोणी, मध, साखर यांचा उपयोग फक्त आजारीपणांत करण्यांत येई.

**बौद्ध शिल्पकला व चित्रकला.**—बौद्ध संप्रदायाच्या आश्रयानें चित्रकलेस, मूर्तिशिल्पास व गृहशिल्पास विशिष्ट रूप आलें.त्यांच्या इतिहासास विचारेतिहासाप्रमाणेंच संप्रदायेतिहासांत स्थान दिलें पाहिजे. हिंदुस्थानांतील बौद्ध शिल्पकलेनें स्तूप, चैत्य व विहार अशीं तीन प्रकारचीं बांधकामें अस्तित्वांत आणलीं आहेत. स्तूप हे प्रथमतः बुद्धाचे अवशेष ज्या ठिकाणीं पुरून ठेविलेले होते त्या ठिकाणीं उभारण्यांत आले; परंतु पुढें बुद्धासंबंधीं ज्या ज्या ठिकाणीं महत्त्वाच्या गोष्टी घडल्या त्या त्या ठिकाणींहि त्या गोष्टींचीं स्मारकें म्हणून स्तूप उभारले जाऊं लागले. सांची येथील स्तूप प्रसिद्ध आहे. तो ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत बांधण्यांत आला असावा. चैत्य म्हणजे सभागृह हें ख्रिस्ती लोकांच्या उपासनामंदिरासारखें असतें. कालांतरानें या चैत्यांमध्यें मूर्ती वगैरे ठेवण्याचा प्रघात पडून त्यांनां हिंदू लोकांच्या देवळांचें स्वरूप प्राप्त झालें. विहार किंवा मठ हे बौद्ध भिक्षूंनां रहाण्यासाठीं बांधलेले असत. अजिंठा येथील विहार महत्त्वाचे आहेत. कारण त्यांवरून शुद्ध बौद्ध कला अवगत होते. ख्रि.पू. २०० पासून इ.स. ६०० पर्यंतच्या कालामध्यें ते बांधलेले असावेत. वेरूळ येथील विहारांवरून बौद्ध संप्रदाय, ब्राह्मण धर्म व जैन संप्रदाय यांचा परस्परसंबंध दिसून येतो. या ठिकाणीं बुद्धाच्या मूर्ती दृष्टीस पडतात. अगदीं प्राचीन काळीं बुद्ध किंवा बोधिसत्व यांच्या मूर्ती अस्तित्वांत नव्हत्या. त्या इसवी सनाच्या पहिल्या शतकांत दिसूं लागल्या. पुढें लवकरच चित्रकलेचाहि बौद्ध लोकांत प्रवेश झाला. धर्मपरायण बौद्धांच्या ज्ञानवृद्धीसाठीं, भिंतींवर व स्तंभांवर बुद्धाचीं चित्रें काढण्यांत येऊं लागलीं. जातककथांतील कित्येक प्रसंगांचीं चित्रें कांहीं ठिकाणीं काढलेलीं आढळतात. पुढें पुढें इतर लोकांप्रमाणेंच बौद्ध लोकहि मूर्तींचा उपयोग करूं लागले, व अखेरीस अमुक मूर्ति सामान्य हिंदूंची कीं बौद्धांची हें ओळखणेंहि दुरापास्त झालें. अशा रीतीनें बौद्ध संप्रदायाचें वैशिष्ट्य नष्ट होऊन तो संप्रदाय सामान्य हिंदुसंस्कृतींत समाविष्ट झाला.

**बौद्धसंप्रदाय व दक्षिण हिंदुस्थान.**—बुद्धाच्या संप्रदायाचा दक्षिण हिंदुस्थानांत प्रसार कसा झाला हें येथें थोडक्यांत सांगितलें पाहिजे. याविषयीं के. व्ही. सुब्रह्मण्य अय्यर यांनीं एका लेखांत (इं. अँ. पु. ४०) विवेचन केलें आहे तें योग्य ते फेरफार करून देतों.

**अशोकपूर्वकालीं पांड्यांचा बौद्ध पंथाशीं परिचय.**—महावंशांत अशी माहिती आहे कीं, विजय हा उत्तर हिंदुस्थानांत एक पराक्रमी राजा होऊन गेला. त्यानें सिंहलद्वीपावर स्वारी करून तें बेट आपल्या ताब्यांत घेतलें. नंतर त्यानें शेजारच्या पांड्य राजाशीं मैत्री करून तेथील राजकन्येशीं विवाह केला. विजय आणि गौतम हे दोघेहि शाक्य वंशांतले आहेत असें बौद्ध भिक्षूंनीं भासविल्यामुळें व तेथें ब्राह्मणांचा प्रवेशच न झाल्यामुळें सिंहली राजानें बौद्ध मताचा स्वाभाविकपणेंच स्वीकार केला असावा असें मानण्यास हरकत नाहीं; व पांड्य लोकांनीं जरी बौद्धमताचा स्वीकार केला नसला, तरी त्या मताविषयीं त्यांनां माहिती असली पाहिजे.

**तिस्साच्या मतप्रसारकांचें पांड्य देशांत आगमन.**—सिंहलद्वीपामध्यें मूतशिव याचा दुसरा मुलगा तिस्स यानें बौद्ध संप्रदाय आणला अशीहि माहिती महावंशांत आहे. या राजाच्या वेळीं तेथें अरिट्ठ आणि महिंद असे दोन प्रमुख मतप्रसारक होऊन गेले. त्यांची मतप्रसार करण्याच्या कामांत राजाला बरीच मदत झाली. हे दोघेहि सिंहलद्वीपामधून मतप्रसार करण्याकरितां बाहेर गेले. पहिल्यानें ते पांड्य देशांतच आले असावे. कारण पांड्य देश सिलोनच्या शेजारीं असून या दोन देशांमधील दळणवळणहि बरेंच वाढलेलें होतें. वरील विधान करण्यास आणखीहि कांहीं गुहांतील शिलालेखांचे आधार सांपडतात (असिस्टंट आर्किऑलॉजिकल सुपरिंटेंडेंट यांचे 'अर्लिएस्ट लिथिक मॉन्युमेंट्स ऑफ दि तामीळ कंट्री' या नांवाखालीं प्रसिद्ध झालेले १९०६–७, १९०७–८ व १९०८–९ सालांचे वार्षिक अहवाल पहा).

**अशोकाच्या प्रेषितांकडून झालेला मतप्रसार.**—पांड्य देशाशिवाय आणखीहि निरनिराळ्या जागीं बौद्ध संप्रदायाचा प्रसार झाला, व तो अशोक राजानें पाठविलेल्या मतप्रसारकांनीं केला. तीं ठिकाणें म्हटलीं म्हणजे कांची, महिषमंडल, वनवासी, अपरान्त आणि महारट्ट हीं होत. कांचीसंबंधानें ह्युएनत्संग असें म्हणतो कीं, हें शहर बुद्धाच्या कालाइतकें प्राचीन आहे (सेवेल, लिस्ट ऑफ अँटिक्विटीज, पु. १ पृ. १७६). तेथील लोकांनां बुद्धानें दीक्षा दिली; आणि कांचीच्या शेजारीं त्यानें स्तूप बांधलें असेंहि म्हटलेलें आहे. महिषमंडल हें हल्लींचें म्हैसूर होय. वनवासी ही कदंबांची राजधानी होती व ती पल्लवांच्या राज्याच्या सरहद्दीवर होती. महारट्टांत पुण्याच्या भोंवतालच्या प्रदेशाचा समावेश होत असावा. अपरान्तांत कोंकण येतें.

**शातवाहन व पल्लव राजांची पतद्विषयक कामगिरी.**—दक्षिण हिंदुस्थानांत निरनिराळ्या जागीं बौद्ध संप्र-

दायाचा प्रसार झाला होता हें ह्युएनत्संगानें भिरनिराळ्या ठिकाणीं पाहिलेल्या बौद्ध मठांचें जें वर्णन दिलें आहे त्यावरून लक्षांत येतें. ह्युएनत्संगाच्या पूर्वी तीन शतकें फा हिआन नांवाचा एक यात्रेकरू येथें आला होता. त्यानेंहि एका डोंगरांत कोरलेल्या मठाचें वर्णन दिलें आहे. शातवाहन घराण्यांतील राजे बौद्धांवरहि समदृष्टीनें कृपा करीत. त्यांच्या ताब्यांत दक्षिणेंतील बराच मुलूख असल्यामुळें इसवी सनाच्या पहिल्या शतकांत तेथेंहि बौद्धसंप्रदायाचा पुष्कळ प्रसार झाला. पल्लव आणि गुप्त हे उत्तरेकडून दक्षिणेकडे आले. पल्लवांचा अशोकवर्मा हा पूर्वज होता. म्हणून हे बौद्ध संप्रदायाचे असावे आणि त्यांनीं तो संप्रदाय आपल्याबरोबर दक्षिणेंत आणला असावा, अशीहि कल्पना फार थोड्या आधारावर मांडण्यांत आली आहे.

**जैन संप्रदायाचा दक्षिणेंतील समकालीन प्रसार.**—बौद्ध संप्रदायाचा दाक्षिण हिंदुस्थानांत प्रसार होत असतांना त्याच्या बरोबर जैन संप्रदायाचा देखील तेथें प्रसार होत असावा हें खालीं दिलेल्या गोष्टींवरून सिद्ध होतें:—

ह्युएनत्संग ह्यानें दिलेल्या माहितीवरून ( इं. गॅ, पु. २ पृ. १६ पहा ) असें वाटतें कीं, हे दोन्ही संप्रदाय जणूं काय एकाच पंथाच्या दोन शाखा आहेत. ह्या दोन्हींहि संप्रदायांप्रमाणें गौतमापूर्वी चोवीस बुद्ध होऊन गेले. म्हणून दोघांचाहि गौतम एकच असावा. ह्या दोन्ही संप्रदायांत भेद फार थोडा आहे. शिवाय, गौतम बुद्ध हा जैन महावीर ह्याचा शिष्य होता असें म्हटलेलें आहे. ह्यावरून असें दिसतें कीं ह्या दोन्ही संप्रदायांची कांहीं शतकेंपर्यंत बरीच दोस्ती असावी.

मौर्य घराण्यांतील चंद्रगुप्त राजा आपल्या आयुष्याच्या अखेरच्या दिवसांत जैन गुरु भद्रबाहु याच्यासह म्हैसूरमध्यें श्रवणबेळगोळ येथें येऊन राहिला होता. ह्या गोष्टीला सिद्धपूर येथील डोंगरांत कोरलेल्या अशोकाच्या आज्ञापत्राचाच आधार सांपडतो. इसवी सनाच्या दुसऱ्या शतकाच्या शेवटीं जैन उपाध्याय सिंहनन्दि हा म्हैसूरच्या दुसऱ्या एका भागांत जाऊन राहिला; व तेथें दडिग आणि माधव हे दोघेहि राजे त्याचे शिष्य झाले. दक्षिणेंतील कांहीं राजांनीं जैन पंथ स्वीकारला होता. कांची येथील कांहीं पल्लव आणि पांड्य राजे ह्या संप्रदायाचे कट्टे अनुयायी होते. पश्चिमेकडील चालुक्य राजे जैन संप्रदायालाच उत्तेजन देत होते. पल्लवांचा राजा महेंद्रवर्मा व राष्ट्रकूटांचे कांहीं राजे जैनपंथी होते. पहिला अमोघवर्ष हा स्वतः जैन मताचा असून त्यानें जैन लोकांकरितां आपल्या राजाकडून खाण्यापिण्याची सोय करून घेतल्याची नोंद आहे. समंतभद्र, अकलंक, विद्यानंद, माणिक्यनंद, प्रभाचंद्र, जिनसेन आणि गणभद्र ह्या सर्वांनीं जैन संप्रदायाचा प्रसार करण्यास चांगलाच हातभार लाविला. अज्जणन्दि नांवाच्या एका जैन आचार्याचा एक शिलालेख सांपडला असून त्यांत त्या वेळच्या निरनिराळ्या जैन शिक्षकांचीं नांवें दिलीं आहेत; आणि आणैमलै ( मदुरेपासून ६ मैल ) हा जैन वसाहतींपैकीं एक गांव होता असेंहि त्या शिलालेखांत म्हटलें आहे. पांड्य देशांत शिलालेख सांपडले आहेत ( मद्रास एपिग्राफिकल कलेक्शन फॉर १९१०, नं. ६१, ६२ व ६८ ) त्यांवरून असें दिसतें कीं, कुरंदी अष्टोपवासी हा एक प्रख्यात जैन उपाध्याय होऊन गेला व त्याचे कनकनंदि वगैरे बरेच शिष्य झाले. उत्तर आणि दक्षिण अर्काट, मदुरा, तिनवेल्ली आणि म्हैसूर येथें जैन तीर्थंकरांचीं मंदिरें व त्यांतील जैन भिक्षूंचीं नांवें आढळतात. पल्लवांचा राजा महेंद्रवर्मा ह्यानें कडलोर येथील जैन स्मारकें उध्वस्त केलीं असा पेरियपुराणम् या ग्रंथांत उल्लेख आहे.

**बौद्ध व जैन संप्रदायांच्या दक्षिणेंत झालेल्या ऱ्हासाचीं कारणें.**—बौद्ध व जैन संप्रदायांचा ऱ्हास होण्याला खालील गोष्टी कारणीभूत झाल्याः—( १ ) सातव्या, आठव्या आणि नवव्या शतकांत जैन आचार्यांची संख्या बरीच वाढली. उलट पक्षीं बौद्ध पंथाचे खरे पुढारी कोणी राहिले नव्हते; व राजांकडूनहि त्या संप्रदायाला मदत झाली नाहीं. (२) जैन व बौद्ध मतांच्या प्रसारकांस अनुयायांची संख्या वाढविण्याची हांव सुटून त्या त्या पंथांतील राजांच्या अधिकाऱ्यांनीं लोकांवर सक्ति करण्यास सुरुवात केली. तेव्हां लोकहि आपला पक्ष सांवरून धरण्याकरितां आणि अधिकाऱ्यांपासून आपली सुटका करून घेण्याकरितां दुसऱ्याच्या मदतीची अपेक्षा करूं लागले. ह्याच सुमारास शैव पंथाचे ज्ञानसंबंध, तिरुनावुक्करशु व सुंदर, वैष्णवपंथाचे नम्मालवार, मधुरकवि व तिरुमंगै आणि अद्वैतमताचे प्रख्यात शंकराचार्य आणि मणिक्कवाचगर हे पुढारी उदयास आले; व त्यांनीं दक्षिणेंत फिरून आपआपल्या पंथांचा प्रसार केला. ( ३ ) पल्लव आणि पांड्य राजांनां अनुक्रमें अप्पर आणि ज्ञानसंबंध यांनीं शैव पंथाची दीक्षा दिल्यामुळें जैन पंथाला तमीळ देशांतून पुरताच खो मिळाला. ( ४ ) वर दिलेल्या शैव, वैष्णव आणि अद्वैत मतांच्या पुढाऱ्यांनीं निरनिराळ्या जागीं मठस्थापना करून इ. स. च्या ९ व्या शतकानंतर थोडक्याच वर्षांत दोन्ही पंथांनां नामशेष करून टाकल्यासारखें केलें. ( ५ ) म्हैसूरमध्यें जैन पंथ आणखी तीन शतकांपर्यंत होता. परंतु इ. स. च्या १२ व्या शतकांत लिंगायत किंवा वीरशैव पंथ पुढें आला. या पंथांतील पुढाऱ्यांनीं व इ. स. च्या १२ व्या शतकांत झालेल्या वैष्णवांच्या रामानुज नांवाच्या आचार्यानें जैनपंथीची कानडी देशांतून कायमची हकालपट्टी केली. येथपर्यंत बौद्ध संप्रदायाची त्याच्या जन्मदेशांतील स्थिति कशी काय होती याचें विवेचन झालें. आतां सरहद्दीवरील व हिंदुस्थानाबाहेरील बौद्ध संप्रदायाच्या प्रसाराचा हिशेब घेऊं.

**भूतानमधील बौद्ध संप्रदाय.**—भूतानमध्यें प्रचलित असलेल्या संप्रदायास दक्पा बौद्ध पंथ असें म्हणतात. लामा

पंथाचाच हा एक जुना प्रकार आहे. या पंथांत पिशाचपूजेची चाल आहे.

दक्षिण तिबेटांतील एका लामानें (भिक्षूनें) सतराव्या शतकाच्या आरंभीं भूतानांत स्वारी केली, तेव्हांपासून भूतानांत बौद्धसंप्रदाय चालू आहे. येथील मुख्य लामास म्हणजे महोपाध्यायास धर्मराजा असें म्हणतात. त्याच्या हातीं ऐहिक व पारमार्थिक सर्व सत्ता असते. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा आत्मा एखाद्या लहान मुलाच्या देहांत प्रवेश करतो अशी तेथील लोकांची समजूत असून दैवी चिन्हांवरून व शुभ शकुनांवरून हें मूल शोधून काढण्यांत येतें, व तें मोठें झाल्यावर त्यास धर्मराजाची गादी मिळते. त्याच्या लहानपणीं सर्व सत्ता ज्या एका प्रतिनिधीच्या हातीं असते त्यास देवराजा असें म्हणतात. भूतानच्या मुख्य लामास म्हणजे धर्मराजास "लोकनायक, धर्मसंरक्षक, सरस्वतीतुल्य विद्वान्, धर्मशास्त्रज्ञ, ईश्वराचा अवतार" वगैरे पदव्या आहेत. कार्ग्यूप नांवाचे जे लोक अद्भुत सामर्थ्य मिळविण्यासाठीं गुहांमध्यें रहातात त्यांपैकींच दक्पा ही एक शाखा आहे. येथील भिक्षूंपैकीं अगदीं थोडे भिक्षू ब्रह्मचारी असतात. भूतानमधील बौद्ध लोक लांबट टोपी घालतात. त्यांच्या धर्मराजाच्या टोपीवर एक लंबरूप शूलचिन्ह असतें. या लोकांत श्मश्रू करण्याची चाल आहे.

ताशि–को ही या देशाची राजधानी असून, येथेंच धर्मराजा रहातो. त्याचा मठ इतर सर्व मठांपेक्षां मोठा आहे. ब्रिटिश भूतानांत, दार्जीलिंग जवळ, कलिंपाँग व पेडाँग येथें दक्पांचीं देवळें आहेत. एकंदर लोकवस्तीच्या सुमारें दशांशाइतकी भिक्षूंची संख्या आहे, परंतु त्यांपैकीं मठांत फक्त थोडेच लोक रहातात; बाकीचे भिक्षू सरकारी नोकर किंवा व्यापारी आहेत. येथें कित्येक संन्यासी व संन्यासिनीहि आहेत.

**ब्रह्मदेशांतील बौद्ध संप्रदाय.**—बुद्धघोष नांवाच्या सिंहलद्वीपांतील एका पंडितानें इ. स. ४५० च्या सुमारास ब्रह्मदेशांत बौद्ध संप्रदायाचा प्रसार केला अशी सामान्य समजूत आहे. प्रथमतः या ठिकाणीं सर्पपूजा प्रचलित होती. या पंथाच्या प्रचारकांनां अरि किंवा अरीय असें म्हणत. ते मठामध्यें रहात, परंतु त्यांचें वर्तन नीतिभ्रष्ट असे. तिबेटच्या लामांप्रमाणेंच हे लोकहि निळ्या रंगाचे झगे घालीत. इ. स. १०१० त ब्रह्मदेशच्या गादीवर बसलेल्या अनव्रहत नांवाच्या राजास एका प्रवासी भिक्षूनें बौद्ध पंथाची दीक्षा दिली. त्या राजानें थाटोनच्या मनुह राजापाशीं त्रिपिटकाची नक्कल मागितली; परंतु ती त्यानें देण्याचें नाकारल्यामुळें अनव्रहत राजानें मनुह राजावर स्वारी करून धर्माचीं सर्व पुस्तकें मिळविलीं. या वेळेपासून ब्रह्मदेशांत देवळें बांधण्यास सुरुवात होऊन बौद्ध संप्रदायाचा प्रसार झाला.

परंतु चिनी व थइ लोकांच्या इतिहासांवरून असें कळतें कीं, बुद्धघोषाच्या पूर्वीच बौद्ध संप्रदायाचा प्रसार ब्रह्मदेशांत झालेला होता. ख्रि. पू. २४१ त तिसरी मोठी धर्मसभा झाल्यानंतर अशोक राजानें ब्रह्मदेशांत दोन मतप्रचारक पाठवून तेथील लोकांस बौद्धसंप्रदायी बनविलें, अशी कित्येक लोकांची कल्पना आहे. ख्रिस्तपूर्व काळांतच तलैंग लोकांस दक्षिणेकडून तैलंगी लोकांमार्फत बौद्धागम मिळाला असावा.

अनव्रहताच्या वेळेपर्यंत ब्रह्मदेशांत महायानी पंथाचा बराच प्रसार झाला असावा. अशोकानें आपले मतप्रचारक उत्तर व दक्षिण ब्रह्मदेशांत पाठविले असतील. परंतु कनिष्कानें मतप्रसाराचें काम मोठ्या प्रमाणांत चालवून अधिक यश मिळविलें. ब्रह्मदेशांत बौद्ध संप्रदायाच्या महायानी पंथाचा प्रसार चौथ्या शतकांत चिनी लोकांनीं केला असें म्हणतात. धर्मसूत्राची पाली भाषाच ब्रह्मी लोकांनां संमत आहे. हीनयानी ग्रंथ पाली भाषेंत व महायानी ग्रंथ संस्कृत भाषेंत आहेत. हिंदुस्थानांत एकंदर ९५ लक्ष बौद्ध लोक आहेत. त्यांपैकीं फक्त ३ लक्षच ब्रह्मदेशेतर भागांत आहेत, असें खानेसुमारीवरून दिसून येतें. बौद्ध वाङ्मयाची येथें बरीच प्रगति झाल्यामुळें, ब्रह्मदेश हा अत्यंत पवित्र देश आहे असें बौद्ध लोक समजतात. अकराव्या शतकापासून ब्रह्मदेशांत अनेक महत्त्वाचे पाली ग्रंथ झालेले असून त्यांचा प्रसार सर्वत्र होत आहे. ब्रह्मी भिक्षूंची विद्वत्तेबद्दल बरीच ख्याति आहे. त्यांच्या धम्म संगणि नांवाच्या ग्रंथाचें ऱ्हीस डेव्हिड्सच्या पत्नीनें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. ब्रह्मदेशांतील एकंदर बौद्ध जनसमूह बराच शिकलेला आहे.

ब्रह्मी भिक्षू आपलें आयुष्य शिक्षणप्रसाराच्या कामीं खर्च करतात. जे भिक्षू मठांत राहून शास्त्राध्ययन करण्यांत अधिक काळ घालवितात, त्यांचा दर्जा उच्च गणला जातो. ब्रह्मी भिक्षूंचें वर्तन इतर भिक्षूंपेक्षां अधिक धार्मिकतेचें असतें. तथापि बुद्धानें घालून दिलेले नियम ते पूर्णपणें पाळीत नाहींत. हिंदू लोकांप्रमाणेंच येथील बौद्ध लोकांचाहि रक्षकदेवतांवर विश्वास आहे. रक्षकदेवता एकंदर बारा आहेत, अशी त्यांची कल्पना आहे. हिंदू लोकांमध्यें ज्याप्रमाणें ग्रामदेवता, कुलदेवता वगैरे असतात, त्याचप्रमाणें या ठिकाणीं नात–देवता आहेत. प्रत्येक घरामध्यें या देवतांच्या मूर्ती असतात. घरें बांधण्यापूर्वी, विवाह ठरविण्यापूर्वी किंवा प्रवासास निघण्यापूर्वी या देवतांनां हे लोक नवस वगैरे करतात. ब्रह्मी मठांचे व मंदिरांचे दोन भाग केलेले असतात. एका भागांत भिक्षू लोक अध्ययन, अध्यापन वगैरे करतात, व दुसऱ्या भागांत बुद्धाच्या मूर्ती, पूजासाहित्य, ग्रंथसंग्रह वगैरे गोष्टी ठेविलेल्या असतात. या देशांत दागबा नांवाच्या अनेक इमारती आहेत. दागबा म्हणजे समाधिमंदिरें. दागबा बांधणें हें पुण्यकृत्य आहे असें समजलें जातें. रंगून येथें श्वेडेगन नांवाचा दागबा फार सुंदर असून नामांकित आहे.

**आसामांतील बौद्ध संप्रदाय.**—आसाममांत बौद्ध संप्रदायाचा झपाट्यानें -र्‍हास होत चालला आहे. इ. स. १९११ मधील खानेसुमारींत फक्त ८,९११ बौद्ध लोकच त्या ठिकाणीं होते; परंतु एके काळीं त्यांनीं सर्व आसाम प्रांत व्यापून टाकिला होता. ते लोकांनीं तेराव्या शतकांत या देशावर स्वारी करून तेथें बौद्ध संप्रदायाचा प्रसार केला. ४०० वर्षेपर्यंत या ठिकाणीं बौद्ध संप्रदायाचें वास्तव्य होतें. परंतु इ. स. १६११ त चु-चेंग-पा नांवाच्या राजानें हिंदु धर्माचा स्वीकार केला, व मागून त्याच्या प्रजेनेंहि त्याचेंच अनुकरण केलें. येथील भिक्षूंस कलित असें म्हणतात.

**सिंहलद्वीपांतील बौद्ध संप्रदाय.**—सिंहलद्वीपांत बौद्ध संप्रदायाचा प्रसार अशोक राजानें केला अशी आख्यायिका आहे. हें मागें सांगितलेंच आहे. तिस्स हा सिंहलद्वीपचा पहिला बौद्धसंप्रदायी राजा असून ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास बौद्ध संप्रदाय हा सिंहलद्वीपांतील मुख्य संप्रदाय बनला.

सिंहलद्वीपांत हीनयान बौद्धपंथ प्रचलित आहे. येथील बौद्ध भिक्षूंची संख्या १८९१ च्या खानेसुमारीच्या वेळीं ९,५९८ होती, १९०१ मध्यें ती ७,३३१ झाली व १९११ मध्यें तर ती सात हजारांहूनहि कमी झाली. वाङ्मय जपून ठेवणें हें बौद्ध भिक्षूंचें एक मोठें काम होतें. इसवी सनाच्या आरंभापर्यंत सामान्यतः महत्वाचें वाङ्मय तोंडपाठ करून तें पुढें कायम टिकविण्यासाठीं हुषार शिष्यांनां तोंडीच शिकविण्याची वहिवाट होतीसें दिसतें. अध्ययन व अध्यापन हीं भिक्षूंचीं मुख्य कामें आहेत. भिक्षू लोक एके ठिकाणीं न राहतां अध्यापनासाठीं गांवोगांवीं हिंडत असतात. फक्त पावसाळ्यांत मात्र ते सर्व एके ठिकाणीं रहातात; व त्या वेळीं त्यांच्या धर्मसभा भरून त्यांत ते धर्मप्रवचनें करतात. या प्रवचनांसाठीं विहारांमध्यें मोटमोठे दिवाणखाने केलेले असतात.

सिंहलद्वीपांतील बौद्ध संप्रदायांत वैशिष्टय किंवा नाविन्य कांहींएक आढळत नाहीं. येथें सुशिक्षित लोकांनें लक्ष बौद्धसंप्रदायाकडे राहिल्यामुळें बरेच ग्रंथ तयार झाले आहेत. परंतु अनेक कर्तृत्ववान् लोकांनीं ब्रम्हचर्य पाळल्यामुळें येथील बौद्ध लोकांची संख्या मात्र बरीच कमी झाली आहे. तथापि जातिभेदाची कमी तीव्रता स्त्रियांनां अधिक असलेलें स्वातंत्र्य, भक्ष्याभक्ष्यविषयक मोकळीक व अधिक शिक्षण या बाबतींत हिंदुस्थानापेक्षां या देशाची लोकस्थिति अधिक समाधानकारक आहे.

**चीन देशांतील बौद्ध संप्रदाय.**—हान घराण्याचे राजे राज्य करीत असतां चीनमध्यें बौद्ध संप्रदायाचा प्रवेश झाला. बौद्ध संप्रदायाचा महायानी पंथ येथें फार प्राचीन काळापासून चालू आहे. देव, अर्हत व बोधिसत्व किंवा बुद्ध या निरनिराळ्या निर्वाणाच्या पायऱ्यांप्रत सर्व मानव जातीला नेणें हें चिनी बौद्ध संप्रदायाचें मुख्य ध्येय आहे. हीनयान पंथाचा स्वीकार केल्यानें मनुष्य अर्हत या पायरीपर्यंतच जाऊं शकतो, त्यापुढें त्याची प्रगति होऊं शकत नाहीं, असें मोक्ष मिळविण्याची खटपट करणाऱ्या मनुष्यास येथील भिक्षू लोक सांगतात. मठांत वास्तव्य करणें हें महायान पंथाचें मुख्य तत्त्व आहे; व या पंथाचा स्वीकार केल्यानें बोधिसत्व व बुद्ध या अर्हताच्या पुढच्या दोन पायऱ्या चढतां येतात, असें प्रतिपादण्यांत येतें. मठांमध्यें बोधिसत्वाच्या व बुद्धाच्या मूर्ती स्थापिलेल्या असून निर्वाणप्राप्तीसाठीं त्या मूर्तींची पूजा करण्यांत येते.

बौद्ध भिक्षूंचें अन्न सात्विक असतें. वनस्पत्याहाराशिवाय दुसरा आहार त्यांनां निषिद्ध आहे. त्यांचा पोषाख साधा असतो. प्रत्येक मठामध्यें अध्यापनाची व्यवस्था केलेली असते. धर्मप्रवचन हें अत्यंत पवित्र व पुण्यप्रद कार्य आहे अशी त्यांची समजूत आहे. एखादा मनुष्य मरण पावला असतां त्याच्या प्रेतापाशीं धर्मग्रंथ वाचण्याची चाल असून हें काम भिक्षूंनीं करावयाचें असतें. असें केल्यानें मृताचा आत्मा बोधिसत्वाप्रत जातो अशी त्यांची कल्पना आहे. या वेळीं वाचावयाच्या धर्मग्रंथांमध्यें अमिताभ-सूत्र हा ग्रंथ मुख्य असून बुद्धाच्या हजारों नांवांचाहि उच्चार करावयाचा असतो.

प्रथम बौद्ध भिक्षू होण्याला राजाची परवानगी लागत असे, आणि ती फारशी कोणाला मिळत नसे. यामुळें हिंदुस्थानांतून आणि मध्य आशियांतून गेलेले भिक्षूच फक्त मतप्रचाराचें काम करीत. परंतु पुढें राजाच्या परवानगीचा निर्बंध काढून टाकण्यांत आल्यावर चिनी बौद्ध भिक्षूंची संख्या वाढत गेली. कित्येक भिक्षू बौद्ध शास्त्राचें अध्ययन करण्यासाठीं हिंदुस्थानांत येत, व परत आपल्या देशांत गेल्यावर तेथें विहारांत राहून हिंदी ग्रंथांचीं चिनी भाषांतरें करीत. अशा प्रकारें चिनी बौद्ध ग्रंथांची संख्या बरीच वाढली. फा हिआन, ह्युएन् त्संग व इ त्सिंग हे चिनी प्रवासी अशा प्रकारेंच हिंदुस्थानांत येऊन गेले.

चीन देशांतील बौद्ध लोकांत ध्यानाचें माहात्म्य फार आहे. ध्यान व चिंतन करण्यासाठीं मठामध्यें निराळी जागा राखून ठेवलेली असते.

बौद्ध लोकांत भूतदयेला विशेष महत्त्व देण्यांत येत असल्यामुळें गुलामगिरीची चाल बौद्ध लोकांनीं मोडून टाकली. प्रत्यक्ष आईबापांच्या खुनाबद्दलहि सूड न घेतां क्षमाच करावी असें बौद्ध लोकांचें तत्त्व आहे.

बौद्ध लोकांच्या मठांमध्यें धर्म, बुद्ध व संघ या त्रिरत्नांच्या मूर्ती असल्यामुळें त्यांचा हवामानावर व पर्जन्यावर बराच परिणाम होतो अशी समजूत आहे.

सातव्या शतकापर्यंत बौद्ध संप्रदायाचा चीन देशांत उत्कर्ष झाला. परंतु पुढें आठव्या शतकापासून मात्र बौद्ध प्रचारकांचा तेथें छळ होऊं लागला. कन्फ्यूशिअनी पंथ हा तेथील राजधर्म असल्यामुळें त्याच्याशीं बौद्धसंप्रदायाला

झगडावें लागलें. इ. स. ८४५ त वु-त्संग नामक बादशहानें ४,६०० मठ व ४०,००० इतर धार्मिक इमारती उध्वस्त करून टाकल्या; व २,६०,००० भिक्षू व भिक्षुणी यांनां पुन्हां गृहस्थाश्रम घेण्यास लाविलें. दहाव्या शतकांत हजारों बौद्ध मंदिरांचा विध्वंस करण्यांत आला. राजाच्या हुकुमाशिवाय बौद्ध लोकांनीं मठ वगैरे बांधूं नयेत, कोणाहि बौद्ध भिक्षूनें एकापेक्षां अधिक शिष्य ठेवूं नये व ४० वर्षांचें वय होई-पर्यंत कोणीहि मतप्रचाराचें काम करूं नये असे कायदे चीन-मध्यें केलेले आहेत. यामुळें बौद्ध भिक्षू व भिक्षुणी यांची संख्या अलीकडे कमी झाली आहे; परंतु गृहस्थाश्रमी बौद्ध लोक बरेच आहेत. ते एकमेकांनां साहाय्य करतात. निर्वाण-प्राप्तीसाठीं मठांत जाऊन राहिलेंच पाहिजे असा निर्बंध नसल्या-मुळें, खून, चोरी, अनीतिकर्म, असत्य भाषण व मादक पदार्थांचें सेवन या पांच गोष्टींपासून अलिप्त राहणें एवढा धर्म सामान्य जनांस पुरेसा होतो. आठव्या नवव्या शतकापर्यंत बौद्ध संप्रदा-यास फक्त कन्फ्यूशिअनी पंथाशींच झगडावें लागलें; परंतु त्यानं-तर त्याला ब्रह्माचें सर्वव्यापित्व बोधणारा ताओ पंथ हा आणखी एक प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला. या ताओ पंथाचें बौद्ध संप्रदायाशीं कांहीं गोष्टींत साम्य आहे.एका चिनी बादशहानें हे दोन्ही संप्रदाय एक करून टाकण्याचा प्रयत्न केला, व त्या कामीं त्याला थोडें बहुत यशहि मिळालें.चीनमध्यें हिंदुस्थानां-तून जे अनेक श्रमण गेले, व ज्यांनीं चिनी भाषेंत अनेक ग्रंथ लिहिले अशांची यादी प्रस्तावनाखंडाच्या पहिल्या विभागांत चीनवरील प्रकरणांत दिली आहे.

**जपानमधील बौद्धसंप्रदाय.**—इ. स. ५३८ त बौद्ध संप्रदायाचा जपानांत प्रवेश झाला. चीनमधून कोरियांत व कोरियामधून जपानांत असा ह्या संप्रदायाचा प्रसार होत गेला. इ. स. ५९३ त शोटोक्यु नामक राजपुत्रानें बौद्ध संप्र-दायाचा स्वीकार करून बौद्ध देवळें, इमारती, दवाखाने वगैरे बांधले; व बौद्ध संप्रदायाचीं तत्त्वें शिकण्यासाठीं चीनमध्यें लोक पाठविले. तेव्हांपासून १८६८ पर्यंत या देशांत बौद्ध संप्रदायाचें पाऊल एकसारखें पुढें पुढेंच पडत गेलें. त्यास राजाश्रय मिळाला; व सर्वत्र शांतता नांदण्यास बुद्धाची कृपा अवश्य आहे अशी येथील लोकांची ठाम समजूत झाली. १८६८ मध्यें मात्र जपानांत राज्यक्रांति होऊन बौद्ध संप्रदायाला मिळत असलेला आश्रय बंद करण्यांत आला. परंतु ही चूक पुढें लोकांच्या लक्षांत येऊन ह्या संप्रदायाला पुन्हां उत्तेजन मिळूं लागलें. तथापि नुसत्या बौद्ध संप्रदायावर अवलंबून न राहतां, शिंतो, कन्फ्यूशिअस व बुद्ध या तिघांच्याहि पंथांतील चांगलीं चांगलीं तत्त्वें एकत्र करून तीं स्वीकारण्याचे जपानी लोकांनीं प्रयत्न चालविले आहेत.

जपानांतील बौद्ध संप्रदायाला ख्रिस्ती संप्रदायाशींहि झग-डावें लागलें. बौद्ध लोकांची ख्रिस्ती लोकांविरुद्ध चळवळ चालली असून, खुद्द बौद्ध संप्रदायाची सुधारणा करण्यासाठींहि सुशिक्षितांच्या नव्या संस्था स्थापन झाल्या आहेत.

जपानी भिक्षूंनां विवाह करण्याची मोकळीक आहे. जपानी बौद्ध संप्रदायांत अनेक पंथ आहेत. चिनी व जपानी भिक्षू यांमध्यें बरेंच साम्य आहे.

**यवद्वीप, बलि व सुमात्रा येथील बौद्ध संप्रदाय.**—सुमात्रांत व त्याच्या जवळच्या बेटांमध्यें बौद्ध संप्रदायाचा शिरकाव इ-त्सिंगच्या पूर्वींच झालेला असून तेथें त्याचा प्रसार हीनयान पंथाकडूनच झाला होता. तथापि मलयु देशांत महायानी पंथाचे लोक होते. आठव्या शतकांत यवद्वीपामध्यें महायानी पंथ चांगला प्रस्थापित झाला होता यांत संशय नाहीं. बोधिसत्व अवलोकितेश्वरची शक्ति, आर्या तारा देवी हिचा पुतळा, व महायानी भिक्षूंसाठीं बांध-लेलीं वसतिस्थानें यांचा उल्लेख कलसन व प्रंबनन येथें सांपड-लेल्या एका संस्कृत लेखांत आढळतो. हा लेख ७७८सालां-तील असून, हीं कामें शैलेंद्र घराण्यांतील एका राजाचीं आहेत. सदरहू लेख उत्तर हिंदुस्थानांतील लिपींत लिहिलेला आहे; पण यवद्वीपामधील इतर संस्कृत लेख यवद्वीपी लिपींत आहेत. यावरून राजाश्रयाखालीं असलेले महायानी बौद्ध बंगा-लच्या पश्चिमभागाकडून या टिकाणीं आले असावेत, असें अनुमान निघतें. आठव्या शतकानंतर यवद्वीपामध्यें झालेलीं सर्व स्मारकें महायानी पंथाच्या लोकांचीं आहेत. मध्ययुगा-पर्यंत यवद्वीपामध्यें शैव व महायान असे दोन निरनिराळे पंथ होते. या दोन पंथांमध्यें इतकें सख्य होतें कीं, पुढें त्या दोहोंचें मिश्रण होऊन एक नवीनच पंथ उत्पन्न झाला. उशना येथें एक देवालय आहे,त्याचा खालचा भाग शैवांचा व वरचा भाग बौद्धांचा आहे. खालच्या भागांत शिवाची व वरच्या भागांत ध्यानिबुद्ध अक्षोभ याची, अशा मूर्ती आहेत. ही इमारत कृतनगर राजानें बांधिलेली असून तो मोठा धर्मपरायण बौद्ध होता. [illegible]रणानंतर त्याला शिव—बुद्ध असें नांव मिळालें. एकंदरीत, यवद्वीपामधील महायानी लोक दुराग्रही नसून सर्व उपासनासंप्रदायांशीं सलोख्यानें वागत असत असें दिसतें. शिव आणि बुद्ध हे भिन्न नसून एकच आहेत असें सुतसोम नांवाच्या काव्यांत म्हटलें आहे. ब्राह्मणी धर्मांतील विषयांवर बौद्ध लोकांनीं काव्यें करून यवद्वीपाच्या वाङ्मयांत बरीच भर टाकलेली आहे. पांच ध्यानिबुद्धांची व त्यांच्या शक्तींची पूजा यवद्वीपामध्यें फार प्रचलित असावी; कारण देवालयांमध्यें त्यांच्याच मूर्ती आढळून येतात. बलि बेटांत १४ व्या शतकांत विनयानुयायी व वज्रधर असे दोन बौद्ध पंथ होते. यवद्वीपामध्येंहि या वज्रधर पंथाचे अनुयायी म्हणजे तन्त्री लोक होते. परंतु हल्लीं बलि बेटांत बौद्धसंप्रदायी लोक फारसे नाहींत असें म्हटलें तरी चालेल. या प्रदेशांतील भार-तीय संस्कृतिविषयक विवेचन पहिल्या विभागांत आलेंच आहे.

इ-त्सिंगच्या वेळेपासून १४ व्या शतकापर्यंत सुमात्रा बेटामध्यें बौद्ध संप्रदायाची काय स्थिति होती हें समजण्यास मार्ग नाहीं. तेथील राजा आदित्यवर्मा (१३४२—५६) हा महायानी पंथाचा कट्टा अभिमानी असून त्यानेंच

यवद्वीप येथील एका देवालयांत बोधिसत्त्व मंजुश्रीची मूर्ति स्थापन केली असें म्हणतात. कारण यवद्वीप येथील राणी त्याची नातलग होती.

आदित्यवर्माच्या वेळीं सुमात्राच्या उत्तर भागांत महंमदी पंथाचा प्रसार झालेला असून लवकरच मध्यसुमात्रांतहि तो पंथ प्रस्थापित झाला असावा. आदित्यवर्म्याचें लेख, अमोघपाशाचा पुतळा व बोधिसत्त्व लोकेश्वर याची मूर्ति यांशिवाय त्या ठिकाणीं बौद्ध संप्रदायाचें आतां कांहीं एक राहिलेलें नाहीं.

**कोरियामधील बौद्ध संप्रदाय.**—कोरियामध्यें बौद्ध संप्रदायाचा प्रवेश चीन देशांतून झाला. प्रथम चिनी राजानें संदो नांवाच्या चिनी मनुष्यास बुद्धाच्या मूर्ती व कांहीं ग्रंथ देऊन या देशांत पाठविलें; व पुढें कोरियाच्या राजानें चीनमधून आणखी मतप्रचारक आणवून या मतप्रचारकांकडून बौद्धसंप्रदायाचा सर्व कोरियांभर प्रसार केला. कोणत्याहि प्राण्याची हिंसा करावयाची नाहीं असा लवकरच येथें कायदा करण्यांत आला; व अनेक लोकांनीं भिक्षूची दीक्षा घेऊन आपली मालमत्ता मठांनां देऊन टाकिली. कांहीं कालानें एक बौद्ध भिक्षूच येथें राज्यपदारूढ झाल्यामुळें त्याच्याकडून बौद्ध संप्रदायाला अतिशय प्रोत्साहन मिळालें. बौद्ध संप्रदायानें कोरियांत उत्तम उत्तम सुधारणा घडवून आणल्या. परंतु चौदाव्या शतकाच्या अखेरीस मोठी राज्यक्रांति होऊन राजसत्ता मिंग घराण्याकडे गेली. या घराण्यांतील राजांनीं कन्फ्यूशिअसच्या पंथाला राजाश्रय दिल्यामुळें बौद्ध संप्रदायाला उतरती कळा लागली, व तो अगदीं निकृष्टावस्थेप्रत गेला. भिक्षूंनां राजधानींत येण्याची बंदी झाली, त्यांचे मठ उध्वस्त केले गेले व नवीन मठ बांधण्याची मनाई करण्यांत आली. अशा प्रकारें येथें भिक्षूंचा छळ सुरू झाला होता; परंतु कोरियांत जपानचें वर्चस्व झाल्यापासून भिक्षूंनां तापदायक असलेले कायदे रद्द करण्यांत येऊन बौद्ध संप्रदायाला थोडा बहुत पुन्हां राजाश्रय मिळूं लागला.

**सयाममधील बौद्धसंप्रदाय.**— इसवी सनाच्या सातव्या शतकानंतर ब्रह्मी लोकांनीं सयाममध्यें बौद्धसंप्रदायाचा प्रसार केला. सयाममध्यें या संप्रदायाचा प्रवेश हीनयान पंथामार्फत झाला व अद्यापीहि त्याच पंथाचें तेथें प्राबल्य आहे. येथील राजाची या संप्रदायावर कृपादृष्टि आहे. धर्माधिकाऱ्याची नेमणूक जरी राजाकडूनच होत असते, तरी राजा त्यास सन्मानपूर्वक वागवितो. प्रत्येक वर्षी तो भिक्षूंनां पोषाख वगैरे देणग्या देतो. येथील बौद्धसंप्रदायाचें स्वरूप शुद्ध नाहीं. इतर पंथांच्या चालीरीती या संप्रदायांत शिरलेल्या आहेत.

**तिबेटांतील बौद्धसंप्रदाय.**—इ. स. च्या सातव्या शतकांत तिबेटांत बौद्ध संप्रदायाचा प्रवेश झाला. कालांतरानें तेथील राजानें हिंदुस्थानांतून बौद्ध भिक्षू व त्यांचे ग्रंथ आपल्या देशांत आणविले. प्रथमतः तिबेटांत बोन नामक एक पंथ प्रचलित होता. तो पंथ व बौद्ध संप्रदाय यांचें मिश्रण होऊन लामा पंथ उत्पन्न झाला. लामा पंथांत राजापेक्षां धर्मगुरूला अधिक मान आहे. महायान पंथापासूनच या लामा पंथाची उत्पत्ति झालेली आहे. लामा पंथांत बुद्धाच्या मूर्तीशिवाय इतर अनेक मूर्ती पूजेसाठीं ठेविलेल्या असतात. हे लामा लोक इतर लोकांच्या घरींहि प्रार्थना करण्याकरितां जातात. ते भिक्षा मागत नाहींत; लोक त्यांनां त्यांच्या मठांतच शिजलेलें अन्न आणून देतात. लामापंथामध्यें पुन्हां अनेक पोटपंथ आहेत. तिबेटांत ३,००० पेक्षां अधिक मठ असून प्रत्येकांत सुमारें दहा हजारांपर्यंत भिक्षू राहतात. ल्हासा येथील दलाई लामाचा मठ फार महत्त्वाचा आहे. तिबेटांत पूर्वी रानटी लोकांची वस्ती होती. पण बौद्ध लोकांनीं त्यांनां सुशिक्षित केलें. लामा पंथांत कमळ ही अत्यंत पवित्र वस्तु मानण्यांत येते. तिबेटांतील मंदिरांत कित्येक प्राण्यांची चित्रें असतात, व ते सर्व पवित्र समजले जातात. हल्लींचे लामा, लोकांनां खऱ्या धर्माचा मार्ग न दाखवितां त्यांची राजरोसपणें फसवणूक करीत असतात. त्यांच्या अंगीं धनतृष्णा, आलस्य वगैरे अनेक दुर्गुण जडले आहेत.

एकोणिसाव्या व विसाव्या शतकांत बौद्ध ग्रंथांचा प्रचार यूरोपीय लोकांत झाला. आज सुशिक्षित यूरोपीयांत वीस हजारांवर बुद्धानुयायी आहेत असें म्हणतात.

---

## प्रकरण ९ वें.

## भारती युध्दांतापासून चंद्रगुप्तापर्यंत राजकीय इतिहास.

भारती युद्धान्तापासून कलियुग सुरू झालें असें धरतात. तर आपण त्या कालापासून आर्यविनाशापर्यंतच्या राजघराण्यांचें एक दीर्घ अवलोकन करूं. चंद्रगुप्ताच्या कालापूर्वीच्या निश्चित तारखा म्हणजे बुद्धाच्या आयुष्यविषयक होत. बुद्धाशीं समकालीन राजांची बौद्ध ग्रंथावरून अधिक माहिती मिळते. इतरांसंबंधीं याद्यांवरच भिस्त ठेवावी लागते. पुराणांतील याद्यांच्या जुळणीसंबंधानें अनेक विद्वानांनीं परिश्रम केले आहेत. त्यांच्या प्रयत्नाचें स्वतःच्या प्रयत्नाची भर घालून संयोजक फल पार्गिटर यानें कलियुगांतील राजघराण्यांवर एक पुस्तक लिहून दिलें आहे. पार्गिटरचें विवेचन थोडक्यांत येणें प्रमाणें:—

**पुराणांतरीं वर्णिलेलीं कलियुगांतील राजघराणीं.**—कलियुगांतील घराण्यांसंबंधीं हकीकत मत्स्य, वायु, ब्रह्माण्ड, विष्णु, भागवत, गरुड व भविष्य या पुराणांमध्यें सांपडते. यांपैकीं मत्स्य व भागवत यांखेरीज बाकी सर्व पुराणांमध्यें कौरवपांडवांमधील महायुद्धाच्या वेळेपर्यंत असलेल्या सर्व घराण्यांची हकीकत दिली आहे; व युद्धानंतर उत्तरहिंदुस्थानामध्यें जीं राजघराणीं झालीं तींहि दिलीं आहेत. मत्स्य पुराणामध्यें उत्तरकालीन पौरव घराणें पूर्वीच्या पौरव घराण्याला जोडून दाखविलें आहे, व कलियुगांतील इतर सर्व घराणीं निराळीं सांगितलीं

आहेत. भागवतामध्यें पूर्व व उत्तरकालीन ऐक्ष्वाकु एकत्र दाखविले असून उत्तरकालीन पौरव व बार्हद्रथ पूर्वींच्या पौरवांबरोबरच दाखविले आहेत; आणि पुढील सर्व घराणीं निराळीं दाखविलीं आहेत. पौरव, ऐक्ष्वाकु, बार्हद्रथ, प्रद्योत, शैशुनाग उर्फ नंद, मौर्य, शुंग, काण्व, आंध्र इत्यादि घराण्यांच्या याद्या दिल्या असून स्थानिक घराण्यांचे उल्लेख केले आहेत.

**पुराणांचें स्वरूप व भिन्न पाठ.**—मत्स्य, वायु व ब्रह्मांड यांच्या पाठांमध्यें विलक्षण सारखेपणा दिसून येतो; यावरून ते सर्व एकाच ग्रंथावरून घेतले असावेत असें दिसतें.

विष्णु आणि भागवत हींसुद्धां वरींचशीं सारखीं आहेत. त्या दोन्हींमध्यें मुख्य फरक एवढाच आहे कीं, भागवत हें कवितावद्ध आहे आणि विष्णु हें पुष्कळसें गद्यांत आहे. हीं दोन्ही पुराणें मत्स्य, वायु व ब्रह्मांड यांसारखीं विस्तृतशः लिहिलेलीं नाहींत. त्यामुळें फक्त नांवें व कधीं कधीं नातें दाखविणारे शब्द यांपलीकडे त्या दोन्हींमध्यें विशेष अशी हकीकत क्वचितच आढळते. परंतु, त्यांच्यामध्यें व वरील तीनहि पुराणांमध्यें सुद्धा बराचसा सारखेपणा दिसून येतो. त्यामुळें यांचा व त्यांचा मूळ आधार जवळ जवळ एकच होता असें म्हणण्यास हरकत नाहीं.

गरुडामध्यें फक्त पौरव, ऐक्ष्वाकु व बार्हद्रथ हीं घराणीं सांगितलीं आहेत, व त्यांमध्यें नांवापलीकडे कांहींच नाहीं.

भविष्यपुराणाची पूर्वींच्या घराण्यांसंबंधीं माहिती असलेली अशी फक्त वेंकटेश्वर प्रतच आहे. परंतु तिच्यांतील माहितीसुद्धां अशुद्ध व निरुपयोगी आहे. दुसऱ्या प्रतींमध्यें पूर्वींच्या बऱ्याच गोष्टी गाळल्या आहेत; व कांहीं अगदीं अलीकडच्या सांगितल्या गेल्या आहेत.

**मूळ आधारग्रंथ, भविष्यपुराण.**—भविष्यपुराण हाच आपला आधारग्रंथ आहे, असें मत्स्य व वायु या पुराणांमध्यें सांगितलें आहे (तान् सर्वान् कीर्तयिष्यामि भविष्ये कथितान् नृपान्). मत्स्य, वायु व ब्रह्मांड यांमध्यें 'भविष्य' हा शब्द ५३ दां आला आहे, व त्या शब्दाचा 'पुढील' किंवा 'पुढें होणारें' असा अर्थ न घेतां 'भविष्यपुराण' असाच अर्थ घ्यावा लागतो.

भविष्य हा इतर पुराणांचा मूळ आधारग्रंथ आहे, पण त्याच्या प्रती ज्या सध्यां मिळतात किंवा ऐकिवांत आहेत त्या अशुद्ध व निरुपयोगी आहेत.

**कथनाची तऱ्हा.**—या पुराणांत हीं जी घराण्यांची माहिती दिली आहे ती भविष्यकथनरूपानें सांगितलेली आहे. परंतु ही वंशावळीची हकीकत सुरवात करण्याची तऱ्हा, व वंशावळीचा आरंभपुरुष (म्हणजे कोणत्या राजापासून वंश सांगावयाचा हा प्रश्न) यासंबंधीं मात्र या पुराणांमध्यें बराच फरक दिसून येतो. उदाहरणार्थ, विष्णुपुराण पाराशर मैत्रेयाला सांगतो आहे व त्यांतील वंशावळ अभिमन्यूच्या मुलापासून सुरू केली आहे. बाकीचीं पुराणें नैमिषारण्यांत सूतानें ऋषींनां कथन केलीं आहेत असें म्हटलें आहे. मत्स्य व वायु हीं अधिसो[सी]मकृष्णापासून सुरुवात करतात, भागवतांत परीक्षितापासून सुरवात आहे व गरुडांत जनमेजयापासून आहे. त्यामुळें शब्दांचीं 'भविष्यरूपें' सर्व ठिकाणीं उपयोजिलेलीं नाहींत व 'अभवत्' 'स्मृत' असे शब्द कांहीं कांहीं ठिकाणीं आढळतात.

मुख्य महत्त्व मगधालाच दिलेलें दिसतें. कारण मगधाचें बार्हद्रथ घराणें बरेंच विस्तरशः म्हणजे राजे व त्यांच्या कारकीर्दीचीं वर्षें सांगून दिलें आहे.

डॉ. फ्लीटनें कृष्णाच्या मृत्युदिवसापासून कलियुग सुरू झालें असें दाखविलें आहे. परंतु वरील पुराणांत कलियुगांतील राजे म्हणजे महायुद्धानंतरच्या कालांतील राजे असा अर्थ धरला आहे, आणि असाच अर्थ घेणें सोइस्कर आहे.

**सूतवृत्तें प्राकृतांत असावींत.**—मत्स्य, वायु व ब्रह्माण्ड यांमधील संस्कृतमध्यें दिलेली हकीकत पूर्वीं प्राकृत श्लोकांमध्यें असली पाहिजे, याविषयीं पुष्कळ प्रमाणें आहेत. उदाहरणार्थ, संस्कृत पाठांमध्यें बऱ्याच ठिकाणीं वृत्तभंग झालेला आहे; कांहीं प्राकृत शब्द जसेचे तसेच ठेवून दिलेले आढळतात, व त्याचप्रमाणें अनियमित संधींचींहि उदाहरणें दृष्टोत्पत्तीस येतात. विष्णु व भागवत यांमध्यें सुद्धां जेथें जेथें पूर्वींचे श्लोक आहेत तेथें तेथें हाच प्रकार आढळतो.

जुने श्लोक व प्राकृत शब्दांचे नमुने यांवरून पाहतां असें दिसतें कीं, पूर्वींची प्राकृत संस्कृत भाषेपासून फारशी निराळी नव्हती. पार्गिटेर साहेबांच्या मतें हिंदुस्थानामध्यें लेखनकला अजमासें ख्रि. पू. ७०० च्या सुमारास अस्तित्वांत आली असावी, व त्याच वेळीं तिचा सरकारी कागदपत्रांत व तवारिखा लिहिण्याच्या कामींहि उपयोग होऊं लागला असावा. या सरकारी नोकरांनीं लिहून ठेवलेली मूळ हकीकत संस्कृतपेक्षां प्राकृतमध्येंच असणें अधिक संभवनीय दिसतें. या इतिहाससामुग्रींतूनच भाट, चारण, कवी वगैरे लोकांनीं आपलीं काव्यें केलीं असावींत. मगध देश हा त्या वेळीं मुख्य असल्यामुळें सर्व इतिहास पुष्कळसा मगधालाच अनुलक्षून आहे. यावरून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, पूर्वीचे श्लोक मागधीमध्येंच रचले गेले असावेत. किंवा ज्या अर्थीं तो इतिहास हिंदुस्थानामध्येंच लिहून प्रसिद्ध झाला होता, व ज्या अर्थीं भागवतांतील निदान एक तरी श्लोक आज पालींत उपलब्ध आहे, त्या अर्थीं हे श्लोक प्रथम किंवा नंतर तरी पालीमध्येंच लिहिले असावेत.

**पुराणांतील इतिहासरचना तिसऱ्या व चौथ्या शतकांतील असावी.**—असें मानण्याला दोन प्रकारचे पुरावे आहेत; (१) ग्रंथाचा विषय व (२) पाठांतील विशेष. वंशावळीचा इतिहास दोन ठिकाणीं संपलेला दिसतो. यांपैकीं पहिलें ठिकाण म्हणजे आंध्र व इतर स्थानिक राज्यें यांच्या पाडावानंतरचा काल होय. म्हणजे हा इतिहास ३ऱ्या शतकाच्या मध्यापर्यंत आलेला आहे. मत्स्यपुराणामध्यें इतकाच इतिहास आहे.

वायु, ब्रह्मांड, विष्णु आणि भागवत यांमध्यें गुप्तांच्या उदयकालापर्यंत इतिहास सांगितला आहे;व गुप्तांच्या अंमलाखालीं म्हणून जे देश सांगितले आहेत ते सर्व देश किंवा तो मुलूख पहिल्या चंद्रगुप्ताच्या मरणकालीं म्हणजे इ० स० ३३५ मध्यें त्यांच्या ताब्यांत होता. या इतिहासामध्यें समुद्रगुप्ताच्या स्वारीची किंवा त्यानंतरची कांहींच हकीकत नाहीं; समुद्रगुप्त हा चंद्रगुप्ताचा मुलगा व वारस होता,व त्यानें आपल्या मोहिमेला आरंभ राज्यारोहण झाल्याबरोबरच केला होता. जर हा इतिहास यानंतर लिहिलेला असता तर समुद्रगुप्ताच्या स्वाऱ्यांची हकीकत त्यांत आली असती. अर्थात् गुप्तराज्याचा आरंभ व समुद्रगुप्ताच्या स्वाऱ्या यांमधील कालापर्यंतचा—म्हणजे सरासरी इ० स० ३३५ पर्यंतचा—हा इतिहास असावा.

यावरून असें दिसतें कीं, हा कवितावद्ध इतिहास ( जो मत्स्य पुराणामध्यें सांपडतो तो ) ३ऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास एकत्रित केला गेला असावा, व नंतर ३३५ पूर्वी त्याला गुप्तराज्यापर्यंतची हकीकत जोडली गेली असावी. ही वाढविलेली हकीकतच वायु व ब्रह्माण्ड पुराणांत सविस्तर आणि विष्णु व भागवत पुराणांत सारांशरूपानें दिलेली आहे. आतां ज्या अर्थी मत्स्य, वायु व ब्रह्माण्ड या सर्व पुराणांनीं आपली माहिती भविष्यपुराणांतूनच घेतली होती त्या अर्थी भविष्यपुराणामधील आरंभींचा इतिहास खि०श०च्या३ऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास लिहिलेला असावा, व पुढील भविष्यात्मक इतिहास नंतर ३३५ पूर्वी घातला गेला असावा.

कुरुयुद्धांतानंतरच्या सूतवाङ्मयाच्या एकीकरणानंतर आणि आंध्रांच्या अंतानंतरच्या एकीकरणापूर्वी मगधराज सेनाजितच्या कारकीर्दीत आणखी एक एकत्रीकरण झालें असावें.

एका(e–वायु, जोन्स या) हस्तलिखितामध्यें सर्व इतिहास आहे. पण ती प्रत मत्स्याचा पाठ आणि वायूच्या इतर प्रतींतील पाठ यांच्यामधील आहे. याचें स्पष्टीकरण पुढीलप्रमाणें करतां येईल.मत्स्यानें भविष्यामध्यें तिसऱ्या शतकापर्यंत असलेला अपुरा इतिहास घेतला; व वायूनें गुप्तराज्याच्या हकीकतीपर्यंतचा इतिहास ताबडतोब घेतला. ई–वायु प्रतीचा हाच पाठ होय. यानंतर पुन्हां एकदां लगेच भविष्याची तपासणी होऊन सुधारणा झाली असावी. हा सुधारलेला इतिहास वायूनें जो घेतला तोच इतर वायु प्रतींचा पाठ असावा. भविष्यपुराण प्रथम तपासणीच्या वेळीं लिहिलेलें होतें, हें वायूच्या सर्व हस्तलिखितांमध्यें आलेल्या 'पठित' या शब्दावरून सिद्ध होतें.

हें जर स्पष्टीकरण बरोबर असेल तर मत्स्यपाठ हा वायु आणि ब्रह्माण्ड यांच्यापेक्षां जुना असला पाहिजे; आणि ई-वायु ही वायूची अगदीं प्रथम प्रत होय. या सर्व पाठांच्या भाषाशैलीवरूनहि हेंच सिद्ध होतें.

मत्स्य, वायु व ब्रह्माण्ड या सर्वांमध्यें 'कलियुगांतील दुःस्थिति', राजपरंपरा व ज्योतिष यांविषयीं गोष्टींचा इतिहास आहे. परंतु यासंबंधीं वायु व ब्रह्माण्ड यांच्या पाठांमध्यें मत्स्य पाठापेक्षां १२ ओळी जास्त आहेत, व ई-वायु या प्रतीमध्यें सुद्धां हा अधिक इतिहास आहे. अर्थात् तो प्रथम तपासणीच्या वेळेलाच जोडला गेला असला पाहिजे.

राजपरंपरा व ज्योतिष यांसंबंधीं मात्र बहुतेकांचा एक मेळ दिसतो (२७०० वर्षांचें सप्तर्षि चक्र तेव्हां ज्ञात होतेंसें दिसतें).

**पाठांची भिन्नता व अशुद्धता यांवरून लिपीवर प्रकाश.**—निरनिराळे पाठ व नांवांतील अशुद्धता यांवरूनहि बरीच माहिती मिळण्याजोगी आहे. हे जे निरनिराळे पाठ झाले आहेत, ते बहुतेक वाचण्याच्या व लिहिण्याच्या चुकांमुळेंच झाले असावेत. चुकांच्या सारखेपणावरून मूळ-ग्रंथ कोणत्या लिपींत लिहिलेला असावा हें काढतां येतें, व त्या लिपीच्या कालावरून त्या ग्रंथाचा काल कोणता असावा म्हणजे कोणता ग्रंथ जुना आहे व कोणता नंतरचा आहे याचा निर्णय करतां येतो.

असल्या चुका मत्स्य, वायु व विष्णु यांच्यामध्यें आढळतात. पार्गिटेर साहेबांच्या मतें या चुका खरोष्ठी लिपींतील अक्षरसादृश्यामुळें वाचनाच्या चुका होऊन उद्भवलेल्या आहेत; व त्यावरून त्यांनीं पुढें दिल्याप्रमाणें अनुमानें काढलीं आहेतः "हा इतिहास प्रथम खरोष्ठीमध्यें लिहिलेला असला पाहिजे, व खरोष्ठी ज्या अर्थी फक्त उत्तर हिंदुस्थानांतच प्रचलित होती, त्या अर्थी तो तेथेंच लिहिला गेला असला पाहिजे. सर्व पुराणांचा मूळ आधार भविष्यपुराण हा असल्यामुळें तेंच प्रथम खरोष्ठीमध्यें लिहिलें गेलें असावें; आणि ज्या अर्थी इ. स. ३३० च्यापुढें खरोष्ठी लिपि हिंदुस्थानांत प्रचलित राहिली नव्हती, त्या अर्थी तें पुराण त्याच्या पूर्वीच लिहिलेलें असलें पाहिजे."

पुराणें आरंभीं खरोष्ठी लिपींत लिहिलेलीं होतीं हें पार्गिटेर साहेबांचें अनुमान स्वीकारण्यास काय अडचणी आहेत तें पुढें विज्ञानेतिहासांत खरोष्ठी लिपीसंबंधीं माहिती देतांना दाखविलें आहे.

**प्राकृत इतिहासाचें संस्कृतमध्यें रूपांतर.**—राजघराण्यांचा इतिहास देणें हा पुराणांचा विषय असल्यामुळें भविष्यपुराणांत त्याचें नांव सार्थ करण्याकरितां त्याच्यामागून जीं घराणीं झालीं त्यांचा निर्देश करणें भाग होतें. यामुळें पूर्वी जो प्राकृतामध्यें लिहिलेला श्लोकबद्ध इतिहास होता त्याचें संस्कृतमध्यें रूपांतर करून तो त्यांत अंतर्भूत करण्यांत आला.

पूर्वीचे लेख प्राकृत श्लोकांमध्यें असल्यामुळें रूपांतर करतांना प्राकृत शब्दांच्या ऐवजीं संस्कृत शब्द टेवणें व भूतकाळाच्या जागीं भविष्यकाळ करणें एवढाच फरफार करण्याची अवश्यकता होती. या क्रियेंत हें रूपांतर अशुद्ध झालें व कोठें कोठें व्याकरणाचा दोष किंवा वृत्तभंगहि झाला. याच चुका पुढें मत्स्यादि ज्या पुराणांनीं भविष्यावरून मजकूर घेतला त्यांतहि शिरल्या.

**निरनिराळ्या पुराणांच्या माहितींतील भिन्नपणाचीं कारणें.**—मत्स्य, वायु व ब्रह्माण्ड यांचा मूळाधार

ग्रंथ जरी एकच होता, तरी हल्लींचीं हस्तलिखितें बरींच अशुद्धिपूर्ण आहेत. त्या अशुद्धी बहुतेक नकला करणारांच्या चुकीमुळें किंवा लिहिलेलीं पानें गहाळ झाल्यामुळें उद्भवल्या आहेत; व कांहीं नवीन गोष्टीहि ग्रंथसुधारणा करतांना घुसडल्या गेल्या आहेत. परंतु, जनमेजय व ब्राह्मण यांच्यामधील भांडणाच्या गोष्टीशिवाय पार्गिटेरच्या मतें धडधडीत खोटेपणा केलेला कोठेंहि दिसत नाहीं.

तेव्हां साधारणपणें पाहतां प्रस्तुत पाठांमध्यें व मूळ ग्रंथामध्यें विशेष फरक पडलेला नाहीं असें म्हणावयास हरकत नाहीं. परंतु कांहीं कांहीं भाग मात्र अजीबात नष्ट झालेले आहेत. एखाद्या पुराणामध्यें असा एखादा श्लोक आढळतो कीं, तो इतर कोणत्याहि पुराणामध्यें सांपडत नाहीं. उदा० शालिशूकासंबंधीं श्लोक फक्त ई-वायूमध्येंच आहे; किंवा भागवताच्या एकाच प्रतींत फक्त सुशर्म्यासंबंधीं श्लोक आढळतो. असे क्वचित् आढळणारे भाग सुद्धां वस्तुतः पूर्वपरंपरेचे अवशेषच आहेत.

**इतिहासदर्शक पाठ कसा काढला.**—मत्स्य, वायु व ब्रह्माण्ड हीं पुराणें एकाच भविष्यपुराणापासून घेतलीं असल्यामुळें त्यांच्या निरनिराळ्या पाठांमध्यें वस्तुतः फारशी तफावत नाहीं. पार्गिटर साहेबांनीं बरोबर म्हणून जो पाठ पुढें मांडला आहे, तो निरनिराळीं हस्तलिखितें व छापील प्रती यांवरून घेतलेला असून निरनिराळे पाठ होते तेथें त्यांपैकीं जास्त संभवनीय असेच पाठ स्वीकारिले आहेत. पाठशुद्धीसाठीं विष्णु, भागवत व गरुड वगैरे पुराणांचा शक्य तितका उपयोग करून घेतलेला आहे. लिहिण्यामध्यें झालेल्या किंवा संधि वगैरेमध्यें झालेल्या क्षुल्लक चुका एक शुद्ध तरी केल्या आहेत, किंवा त्या अजीबात गाळून तरी टाकिल्या आहेत. कारण, असल्या क्षुल्लक चुकांचा पुराणांत बराच सुकाळ आहे.

**पुराणांचा अर्थ कसा लावावयाचा.**—पुराणांतील या राजघराण्यांच्या इतिहासाचा अर्थ लावतांना हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, तो प्रथम प्राकृतमध्यें लिहिलेला होता. ही एक गोष्ट लक्षांत बाळगली म्हणजे बऱ्याचशा अडचणी दूर होतात. संख्यादर्शक शब्दांचा अर्थ करतांना ही गोष्ट विशेषें करून लक्षांत ठेविली पाहिजे. उदाहरणार्थ, लिहिणाराच्या निष्काळजीपणामुळें विंशाच्या जागीं त्रिंश किंवा अब्दाच्या जागीं अष्ट अशा चुका होऊन निरनिराळे पाठसमूह होण्याचा संभव असतो. पुष्कळदां नांवामध्यें फरक पडतो. अशा वेळीं अत्यंत विश्वसनीय अशा हस्तलिखितामध्यें जें नांव आढळतें तेंच घेतलें पाहिजे. आंकडे ओळखण्यामध्येंहि कित्येकदां बरीच अडचण पडते. उदाहरणार्थ १८ शक राजे 'शतानि त्रीण्यशीतिंच' वर्षें राज्य करतील असें म्हटलेलें आहे. ही रचना संस्कृत आहे असें मानलें असतां, शक राजे इ. स. ७८ पासून राज्य करूं लागले असल्यामुळें पुराणांतील हकीकत इ. स. (७८+३८० =) ४५८ पर्यंत आणली गेली आहे असें होतें. परंतु वस्तुस्थिति तशी असती तर त्यांत त्याच वेळीं राज्य करीत असलेल्या ब्राह्मण संस्कृतीच्या पुरस्कर्त्या गुप्त राजांचा उल्लेख आल्याशिवाय राहिला नसता. शिवाय पुराणांच्या काळासंबंधानें जें मागें विवेचन केलें आहे त्यावरूनहि इ. स. ३३० नंतरच्या काळाचा त्यांत उल्लेख येणें असंभवनीय दिसतें. अर्थात् उपर्युक्त लिखित उताऱ्याचा अर्थ संस्कृतप्रमाणें ३८० न करतां प्राकृतप्रमाणें १८३ असाच केला पाहिजे.

**पार्गिटेरच्या संशोधनाचा निष्कर्ष.**—या सर्वांचा सारांश असा.— कलियुगांतील राजघराण्यांचा इतिहास प्रथम भविष्यपुराणामध्यें ग्रथित झाला. मग मत्स्य, वायु व ब्रह्माण्ड यांनीं तो इतिहास त्या पुराणांतून घेतला. कौरवपांडवांमधील महायुद्धानंतर उत्तरहिंदुस्थानांत जीं घराणीं झालीं, त्यांचा इतिहास श्लोकबद्ध प्राकृतांत होता; व भाट, चारण इत्यादि लोक तो म्हणत असत. हिंदुस्थानामध्यें लेखनकला खि. पू. ७०० च्या सुमारास उदय पावली, व हा इतिहास नंतर लेखनिविष्ट केला गेला. हा इतिहास बहुतेक मगधामध्येंच लिहिला गेला. आणि ज्या प्राकृतमध्यें तो लिहिला गेला, तें प्राकृत बहुधा मागधी किंवा पाली असलीं पाहिजे. भविष्यामध्यें भविष्यत् गोष्टींचा इतिहास सांगावयाचा असल्यामुळें प्राकृतचें संस्कृतमध्यें भाषांतर करतांना भविष्यरूपच मुख्यत्वें वापरलें आहे.

प्रथम इतिहास लिहिला गेला तेव्हां कौरवपांडवांच्या महायुद्धानंतरच्या कालापासून आंध्रांच्या विनाशकाळापर्यंतचा इतिहास रचला गेला, व तोच भविष्यामध्यें तिसऱ्या शतकाच्या मध्याला घेतला गेला. ही गोष्ट इ. स. २६० च्या पूर्वींच झाली असली पाहिजे असें मानावयास चांगला आधार आहे. तो इतिहास मूळ खरोष्ठीमध्यें लिहिलेला होता, व तिसऱ्या शतकाच्या चरमपादांत मत्स्यानें तो भविष्यांतून घेतला. भविष्यपुराणांतील इतिहासाची तपासणी इ. स. ३१५ व ३२० या काळाच्या दरम्यान झाली व तोच भविष्याचा पाठ ई-वायुमध्य घेतला गेला. इ. स. ३२५ व ३३० याच्या दरम्यान भविष्याची पुन्हां तपासणी झाली, व ही सुधारलेली हकीकत वायु, ब्रह्माण्ड वगैरेंनीं घेतली. विष्णुपुराणानें तो इतिहास घेऊन त्याचें (शेवटचा भाग खेरीज करून) संस्कृत गद्यामध्यें थोडक्यांत रूपांतर केलें. भागवतानेंहि इतिहासाचा तसाच उपयोग करून नवीन संस्कृत श्लोकांमध्यें त्याचें संक्षिप्त रूपांतर केलें. गरुडामध्यें फक्त राजांची नांवनिशी दिली आहे. यानंतर या सर्व पुराणांमध्यें हळूहळू थोडीथोडी सुधारणा होत चालली; परंतु भविष्याच्या मूळ पाठामध्यें मात्र बरेच फेरफार घडून आलेले आहेत (उ० वेंकटेश्वर प्रत पहा). त्यांत १९ व्या शतकापर्यंतचें भविष्य अंतर्भूत केलें गेलें आहे!

**पुराणांत वर्णिलेलीं कलियुगांतील राजघराणीं.**—वरील विवेचनावरून जी एक गोष्ट स्पष्ट होते ती ही कीं, बौद्ध वाङ्मयांत आलेली बुद्धाच्या वेळची राजकीय माहिती सोडून

दिली तर पुराणांतरीं दिलेल्या निरनिराळ्या राजघराण्यांच्या वंशावळ्यांखेरीज चंद्रगुप्तापूर्वीचा हिंदुस्थानचा राजकीय इतिहास फारसा उपलब्ध नाहीं म्हटलें तरी चालेल. ज्या भविष्यपुराणापासून इतर पुराणांनीं आपल्या कलियुगांतील राजघराण्यांच्या वंशावळ्या उतरल्या, त्या भविष्यपुराणाची शुद्ध प्रत आज उपलब्ध नसल्यामुळें निरनिराळ्या पुराणांतील वंशावळ्यांचें चिकित्सक बुद्धीनें संशोधन करून त्यावरून भविष्यपुराणाच्या मूल प्रतीचा शुद्ध पाठ काढण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हें कार्य थोडेंबहुत पार्गिटेर साहेबांनीं केलें असल्यामुळें त्यांच्या मेहनतीचें फळ पुढें देत आहों.

### पौरव घराणें.

[ या व यापुढील वंशावळ्यांतील राजे अनुक्रमानें दिले असून जेथें पुढील राजा मागील राजाचा पुत्र म्हणून म्हटलें आहे, तेथें त्या दोहोंत उभी रेघ व जेथें त्या दोहोंचा संबंध दाखविणारें नातें दिलें नाहीं तेथें चरण रेघा घातल्या आहेत. नांवाच्या पुढें कंसांत दिलेले आंकडे कारकीर्दीचीं वर्षें दर्शवितात. ]

| | |
|---|---|
| अभिमन्यु = उत्तरा | [ नृचक्षु चालू ] |
| परीक्षित् | सुखीबल (नृचक्षूचा वारस) |
| जनमेजय | परिप्लव |
| शतानीक | सुनय |
| अश्वमेधदत्त | मेधावी (सुनयाचा वारस) |
| अधिसो[सी]म कृष्ण [ सध्यां (म्हणजे वंश सांगण्याच्या वेळीं) राज्य करीत असलेला]. | नृपंजय |
| निचक्षु [ याचे एकंदर आठ पुत्र, तेः—] | दुर्व |
| १ उष्ण (हा वडील मुलगा) | तीग्मात्मा |
| २ चित्ररथ | बृहद्रथ |
| ३ शुचिद्रथ | वसुदान |
| ४ वृष्णिमत् | शतानीक |
| ५ सुषेण | उदयन |
| ६ सुनीथ | वहीनर |
| ७ रुच | दण्डपाणि |
| ८ नृचक्षु | निरामित्र |
| | क्षेमक |

### ऐक्ष्वाकु घराणें.

| | |
|---|---|
| बृहद्बल | [ सुपर्ण चालू ] |
| बृहत्क्षय [बृहद्बलाचा वारस] | अमित्रजित् |
| उरुक्षय | बृहद्भ्राज |
| वत्सव्यूह | धर्मी |
| प्रतिव्योम | कृतंजय |
| दिवाकर [ मध्यदेशांत अयोध्येमध्यें राज्य करीत असलेला] | रणंजय |
| सहदेव | संजय |
| बृहदश्व [सहदेवाचा वारस] | शाक्य |
| भानुरथ | शुद्धोदन |
| प्रतीताश्व | सिद्धार्थ |
| सुप्रतीक | राहुल |
| मरुदेव | प्रसेनजित् |
| सुनक्षत्र | क्षुद्रक |
| किन्नराश्व | कुलक |
| अन्तरिक्ष | सुरथ |
| सुपर्ण | सुमित्र |

### मगध देशांतील बार्हद्रथ घराणें.

( जरासंधाच्या वंशांतील सहदेवापासून झालेले राजे )

भारतयुद्ध झालें व सहदेव मारला गेला. नंतर त्याचा वारस सोमाधि हा गिरिव्रजामध्यें राजा झाला व त्यानें ५८ वर्षें राज्य केलें.

सोमाधीनंतर गादीवर आलेले राजे पुढीलप्रमाणें दिले आहेत. यांपैकीं बृहत्कर्म्यापावेतोंच्या राजांच्या कारकीर्दीचीं वर्षें भूतकाळांत देऊन त्याच्यापुढील सेनाजित् हा सध्यां गादीवर आहे असें म्हणून त्याच्या कारकीर्दीचीं वर्षें दिलीं नाहींत. त्याच्या नंतरच्या राजांच्या कारकीर्दीचीं वर्षें मात्र हा अमुक वर्षें राज्य करील, हा तमुक वर्षें राज्य करील याप्रमाणें भविष्य काळांत सांगितलीं आहेत.

| | |
|---|---|
| श्रुतश्रवा (६४) | [ धर्मनेत्र चालू ] |
| अयुतायु (२६) | निर्वृति (५८) |
| निरमित्र (४०) | त्रिनेत्र (२८) किंवा सुश्रम (३८) |
| सुक्षत्र (५६) | दृढसेन (४८) |
| बृहत्कर्मा (२३) | महीनेत्र किंवा सुमति (३३) |
| सेनाजित् (२३?) सध्यां राज्यावर असलेला.) | सुचल (३२) |
| श्रुतंजय (४०) | सुनेत्र (४०) |
| विभु (२८) | सत्यजित् (८३) |
| शुचि (५८) | विश्वजित् (२५) |
| क्षेम (२८) | रिपुंजय (५०) |
| सुव्रत (६४) | |
| सुनेत्र (३५) किंवा धर्मनेत्र (५) | |

### प्रद्योत घराणें.

[ बृहद्रथ, वीतिहोत्र व अवंति हीं नाहींशीं झाल्यावर, पुलिक हा आपल्या धन्याला ठार करील व आपला मुलगा प्रद्योत याला राज्यावर बसवील. ]

| | |
|---|---|
| प्रद्योत [२३] | [ विशाखयूप चालू ] |
| पालक [२४] | अजक [२१] |
| विशाखयूप [५०] | नंदिवर्धन [२०] |

### शिशुनाग घराणें.

[ शिशुनाग हा पुत्राला काशीमध्यें ठेऊन स्वतः गिरिव्रज येथें राहील. ]

| | |
|---|---|
| शिशुनाग [४०] | [ दर्शक चालू ] |
| काकवर्ण [३६] | उदयी [३३ .–तो राज्याच्या चौथ्या वर्षी गंगेच्या दक्षिणतीरावरील कुसुमपुर ही आपली राजधानी करील.] |
| क्षेमधर्मा [२०] | नंदिवर्धन [४०] |
| क्षत्रौजस् [४०] | महानंदी [४३] |
| बिंबिसार [२८] | |
| अजातशत्रु [२५] | |
| दर्शक [२५] | |

### तत्कालीन असणारीं दुसरीं राजघराणीं.

[ वर सांगितलेल्या राजांना समकालीन असे दुसरे राजेहि होतील. पुढील राजांचा काल एकच होईल–म्हणजे ते सर्व एकाच वेळीं असतील:—२४ ऐक्ष्वाकु, २७ पंचाल, २४ काशीचे राजे, २८ हैहय, ३२ कलिंग, २५ अश्मक, ३६ कुरु २८ मैथिल, २३ शूरसेन व २० वीतिहोत्र ].

### नन्द घराणें.

[ एका शूद्रीपासून महानन्दीला महापद्म ( नन्द ) नांवाचा मुलगा होईल व तो सर्व क्षत्रियांचा नाश करील. तो ८८ वर्षे राज्य करील. त्याला आठ मुलगे होतील. त्यांपैकीं सुकल्प हा प्रथम होईल; आणि महापद्मानंतर १२ वर्षे ते सर्व राज्य करतील. कौटिल्य नांवाचा एक ब्राह्मण त्या सर्वांचा नाश करील; आणि शंभर वर्षेपर्यंत त्यानें राज्याचा उपभोग घेतल्यानंतर तें राज्य मौर्यांच्याकडे जाईल. ]

### मौर्य घराणें.

[ चंद्रगुप्ताला कौटिल्य राज्यावर बसवील. चंद्रगुप्त २४ वर्षे राज्य करील. बिंदुसार २५ वर्षे करील. अशोक ३६ वर्षे व त्याचा मुलगा कुनाल ८ वर्षे राज्य करील. ]

| मत्स्यपुराण व वायुपुराण ( जोन्स ) | [ बृहद्रथ चालू ] ( त्यानंतर शुंगांच्याकडे राज्य जाईल. ) |
|---|---|
| कुनालाचा पुत्र बंधुपालित [८] | वायुपुराण व ब्रह्मांडपुराण |
| दशोन त्याचा ( ? ) नातू [७] | कुनालाचा पुत्र बंधुपालित [८] |
| दशरथ [८] | इंद्रपालित [१०] |
| संप्रति [९] | देववर्मा [७] |
| शालिशूक [१३] | शतधनु [८] |
| देवधर्मा [७] | बृहद्रथ [७] ( यानंतर शुंगांच्याकडे राज्य जाईल ). |
| शतधन्वा [८] | |
| बृहद्रथ [७०] | |

### शुंग घराणें.

( पुष्यमित्र सेनापति हा बृहद्रथाचा नाश करील व ३६ वर्षे राज्य करील. )

| | |
|---|---|
| (पुष्यमित्र) | [ पुलिंदक चालू ] |
| अग्निमित्र [८] | घोष [३] |
| वसुज्येष्ठ [७] | वज्रमित्र [९] |
| वसुमित्र [१०] | भागवत [३२] |
| अंध्रक [२] | देवभूमि [१०] [यांच्यानंतर कण्वांच्याकडे राज्य जाईल]. |
| पुलिंदक [३] | |

### काण्वायन ( शुंगभृत्य ) घराणें.

[ देवभूमि वाईट व अल्पवयी असल्यामुळें त्याचा प्रधान वसुदेव हा त्याला पदच्युत करून स्वतः राजा होईल. ]

| राजा | वर्षें | |
|---|---|---|
| तो [ काण्वायन ] | [ ९ ] | यांच्या नंतर आंध्रांकडे राज्य जाईल. |
| भूमिमित्र | [ १४ ] | |
| नारायण | [ १२ ] | |
| सुशर्मा | [ १० ] | |

### आंध्र घराणें.

[शिशुक (सिंधुक) व त्याचे जातभाई हे सुशर्मा याचे नोकर असतील व ते काण्वायन व सुशर्मा यांच्यावर हल्ला करतील; आणि शुंगांच्या सत्तेचा नायनाट करून टाकतील. ]

| राजा | वर्षें |
|---|---|
| सिमुक | [२३] |
| ( सिमुकाचा धाकटा भाऊ ) कृष्ण | [१०] |
| श्री शातकर्णि [मल्लक] | [१०] |
| पूर्णोत्संग | [१८] |
| स्कंधस्तम्भि | [१८] |
| शातकर्णि | [५६] |
| लंबोदर | [१८] |
| आपीलक [ दिविलव ] | [१२] |
| मेघस्वाति | [१८] |
| स्वाति | [१८] |
| स्कंदस्वाति | [ ७ ] |
| मृगेंद्र स्वातिकर्ण | [ ३ ] |
| कुंतल स्वातिकर्ण | [ ८ ] |
| स्वातिवर्ण | [ १ ] |
| पुलोमावि [ पदुमान् ] | [३६] |
| आरिष्टकर्ण | [२५] |
| [ आरिष्टकर्ण चालू ] | |
| हाल | [ ५ ] |
| मंतलक [ पत्तलक ] | [ ५ ] |
| पुरिकषेण [पुरींद्रसेन] | [२१] |
| सुंदर शातकर्णि | [ १ ] |
| चकोर शातकर्णि | [६महिने] |
| शिवस्वाति | [२८] |
| राजा गौतमीपुत्र | [२१] |
| पुलोमा | [२८] |
| किंवा शातकर्णि | [२९] |
| शिवश्री पुलोमा | [ ७ ] |
| शिवस्कंध शातकर्णि | [ ३ ] |
| यज्ञश्री शातकर्णिक | [२९] |
| विजय | [ ६ ] |
| चंडश्री शातकर्णि | [१०] |
| पुलोमावि | [ ७ ] |

### निरनिराळीं स्थानिक घराणीं.

आंध्रांचें राज्य संपल्यानंतर त्यांच्या नोकरांचे वंशज राजे होतील. ७ आंध्र, १० आभीर, ७ गर्दभी [ भिन्न ] १८ शक, ८ यवन, १४ तुषार, १३ गुरुंड व ११ मौन इतके राजे होतील. यांपैकीं श्रीपर्वतीय आंध्र घराणें ५२ वर्षें टिकेल. १० आभीर राजे ६७ वर्षें राज्य करतील; ७ गर्दभी राजे ७२ वर्षें राज्योपभोग घेतील; १८ शक राजे १८३ वर्षें राज्यसुख अनुभवतील; ८ यवन राजे ८७ वर्षें राज्यकारभार करतील; १४ तुषार राजे १०५(१००७) वर्षें राज्य चालवितील; १३ गुरुंड राजे (म्लेंच्छ जातीच्या हीन लोकांसह) १०४३ वर्षें पृथ्वीचें राज्यशकट हांकतील व नंतर ११ मौनराजे १०३ वर्षें गादीवर राहतील. कालाच्या ओघानें ते नाहींसे झाल्यावर ' किलकिल ' राजे होतील. त्यांच्यामागून विंध्यशक्ति राज्य करील. किलकिल राजांनीं ९६ वर्षें राज्य केल्यानंतर पृथ्वी त्याच्या ताब्यांत जाईल.

### विदिशा वगैरे घराणीं.

नागराज शेष याचा पराक्रमी मुलगा भोगी हा नागवंशामध्यें प्रसिद्ध होईल. नंतर जणूं काय चंद्रांशच असा सदाचंद्र, दुसरा नखवंत, नंतर धनधर्मा आणि पुढें वंगर हा चौथा याप्रमाणें राजे होतील. नंतर भूतिनंद हा वैदिश राज्यामध्यें राज्य करील.

शुंगांचा वंश संपला म्हणजे शिशुनंदि राज्य करील. त्याचा धाकटा भाऊ नंदियश याच्या वंशांत तीन राजे होतील. त्याच्या मुलीचा मुलगा शिशुक हा पुरिकेमध्यें राजा होईल.

विंध्यशक्तीचा शूर मुलगा प्रवीर हा कांचनका नगरींत ६० वर्षें राज्य करील; आणि उत्तम दानादिकांनीं युक्त असे वाजपेय यज्ञ करील. त्याचे चार मुलगे राजे होतील.

### तिसऱ्या शतकांतील राजघराणीं.

विंध्यक घराणें नाहींसें झाल्यावर तीन बाल्हिक राजे होतील. सुप्रतीक आणि नभीर हे पृथ्वीचा उपभोग ३० वर्षें घेतील. शक्यमान् हा महिषीचा राजा होता. पुष्पमित्र (?) आणि १३ पटुमित्र होतील. मेकलेमध्यें ७ राजे ७० वर्षें राज्य करतील. कोसलामध्यें फार शक्तिमान् व शहाणे असे मेघ नांवाचे ९ राजे होतील. नलाच्या वंशांतील सर्व शूर असे नैषध राजे हे मनूचा शेवट होई तोंपर्यंत राहतील.

मगध देशाचा जो शूर असा विश्वस्फाणि राजा होईल, तो सर्व राजांना पदच्युत करून अन्यवर्णीयांना राज्यपदावर बसवील. त्या जाती म्हणजे कैवर्त, पंचक, पुलिंद व ब्राह्मण ह्या होत. त्या सर्वांना तो निरनिराळ्या देशांत राज्यावर बसवील. विश्वस्फाणि हा फार शक्तिमान् होईल. विश्वस्फाणि हा दिसण्यांत क्लीबासारखा आहे असें म्हणतात. तो क्षत्रिय वर्णाचा नाश करून दुसरी क्षत्रिय जात निर्माण करील. देव, पितर आणि ब्राह्मण यांना संतुष्ट करून तो गंगेच्या तीरीं जाईल, व आपलें शरीरोत्सर्जन करून इंद्रलोकाप्रत गमन करील.

चौथ्या शतकाच्या आरंभींचीं समकालीन घराणीं.

नऊ नाग राजे हे चंपावती शहराचा उपभोग घेतील व सात नाग राजे हे सुंदर मथुरा शहराचा उपभोग घेतील. गुप्त-वंशांत जन्मलेले राजे गंगा, प्रयाग, साकेत व मगध या प्रांतांचा उपभोग घेतील. मणिधान्यज राजे, नैषध, यदुक, शैशीत व कालतोयक या प्रांतांचा उपभोग घेतील. देवरक्षित हे कोशल, आंध्र, पौण्ड्र, ताम्रलिप्त, किनाऱ्यावरील सर्व लोक आणि सुंदर चंपाशहर यांच्यावर राज्य करतील. कलिंग, महिष हे देश व महेंद्र पर्वतावरील रहिवासी यांचें संरक्षण गुह हा करील. सौराष्ट्र व भोक्ष्यक यांचा कनक हा उपभोग घेईल. सौराष्ट्र, आवन्त्य, आभीर, शूद्र, अर्बुद व मालव येथील राजे बहुतेक बहिष्कृत केलेले द्विज, किंवा शूद्रच असे होतील. शूद्र, बहिष्कृत द्विज वगैरे, आणि वैदिक-पवित्रताहीन म्लेच्छ असे लोक सिंधु नदीचा तट, चंद्रभागा, कौंती व काश्मीरप्रांत यांचा उपभोग घेतील. हे सर्व राजे एकाच काळीं असतील. व ते अनुदार, असत्यप्रिय व दुर्वर्तनी असे होतील.

**पुराणेतर ऐतिहासिक साहित्य व तन्मूलक इतिहास.**—हा काय व किती जुन्या काळपर्यंत सांपडतो तें पाहूं. निरनिराळ्या घराण्यांचे कांहीं धागे जोडतां आले आहेत. ते जोडण्याचे जे दोन महत्त्वाचे प्रयत्न झाले आहेत ते त्यांच्या फलांसह देतों.

**शैशुनाग घराण्याच्या कारकीर्दीचा काल.**—बुद्ध-कालीन व त्याच्या निकटनंतरच्या काळांतील राज्यांचा एक-मेकांशीं कसा संबंध होता या संबंधानें ऱ्हीस डेव्हिड्स आपल्या बुद्धिस्ट इंडियांत पुराणेतर साहित्याच्या आधारें येणेंप्रमाणें लिहितो. हिंदुस्थानांत बुद्धाचा जन्म झाला त्या वेळीं येथें बलाढ्य असा एकहि राजा नव्हता. बौद्ध संप्रदायाचा उदय होण्याच्या अगोदर कित्येक शतकें गंगा नदीच्या खोऱ्यांत अनेक राजांनीं राज्य केलें होतें, व राजसत्तात्मक राज्यपद्धतीचें जाळें सर्व हिंदुस्थानभर पसरलें जाण्याचा काळ जवळ येत चालला होता. अगदीं आरंभीं या संप्रदायाचा पगडा हिंदुस्थानच्या ज्या भागांत बसला होता, तेथें बल व विस्तार या दोन्हीहि दृष्टींनीं बरीच मोठीं अशीं चार राज्यें होतीं. आज आपणांस उपलब्ध असणारा पुरावा निरनिराळ्या राज्यपद्धती, प्रचलित अस-लेल्या सर्व प्रदेशांतील लोकसंख्या, त्याच्या राज्यांचा विस्तार, वगैरेसंबंधानें निश्चयात्मक विधानें करतां येण्याइतका पुरेसा नाहीं. तेव्हां आजच्या स्थितींत तरी, उपलब्ध असलेल्या बौद्ध वाङ्मयावरून आपणांस एवढेंच म्हणतां येईल कीं, राज-सत्ताक राज्याबरोबरच कमी अधिक प्रमाणांत पंचायती-सारख्या लोकतंत्राचा अनुभव घेणारींहि कांहीं राज्यें त्या काळीं अस्तित्वांत होतीं.

**या काळांतील उत्तर हिंदुस्थानांतलीं चार मोठीं राज्यें.**—वर जीं चार राज्यें सांगितलीं, तीं राज्यें (१) मगध, (२) कोसल, (३) वत्स किंवा वंश आणि (४) अवंती हीं होत. मगध राज्याची राजधानी प्रथम राजगृह ही होती; व नंतर येथून ती पाटलिपुत्र येथें नेण्यांत आली. पाटलि नांवाची एक वेश्या होती तिच्या मुलाकडून या नगराची स्थापना झाली अशी कथा कथासरित्सागरानें दिली आहे. येथें या सुमारास शिशुनागाचा वंशज बिंबिसार नांवाचा राजा राज्य करीत होता, व त्याच्या मागून त्याचा पुत्र अजातशत्रु हा गादीवर आला. दुसरें कोसल राज्य; हें मगधाच्या वायव्य दिशेस असून, त्याची राजधानी सावत्थी म्हणजे श्रावस्ती ही होती. येथें पसेनदि उर्फ प्रसेनजित् नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या मागून त्याचा मुलगा विदूडभ हा गादीवर बसला. तिसरें वंशराज्य; तें कोसलाच्या दक्षिणेस होतें. येथील राजधानी कौशांबी ही असून ती यमुनेच्या तीरावर वसलेली होती. येथें परंतपाचा मुलगा उदेन उर्फ उदयन हा राज्य करीत असे. याच्याहि पलीकडे दक्षिणेच्या बाजूस अवंतीचें चौथें राज्य होतें. त्याची राजधानी उज्जयिनी असून तेथें पज्जोत म्हणजे प्रद्योत नांवाचा राजा राज्य करीत होता. अय्यर काशी हें आणखी एक निराळें राज्य धरतो.

**प्रसेनजित् व अजातशत्रु.**—हीं राजघराणीं सोय-रिकीच्या संबंधानें परस्परांशीं बद्ध झालेलीं होतीं. परंतु याच संबंधामुळें त्यांना भांडणाचे प्रसंग अनेक वेळां येत. प्रसेन-जित् म्हणून जो कोसलचा राजा वर सांगितला आहे त्याची बहीण कोसलदेवी बिंबिसाराला दिली होती. कोसलदेवीचा सावत्र मुलगा अजातशत्रु यानें आपल्या बापाला म्ह० बिंबिसाराला ठार मारिलें. [ शेवटीं शेवटीं व्ही. स्मिथला हीं पितृवधाची बौद्ध कथा बनावट असावी अशी शंका येऊं लागली होती ! ] तेव्हां प्रसेनजित् यानें काशी नगरी आपल्या ताब्यांत घेतली; कारण या नगरीचा सर्व वसूल कोसलदेवीच्या खासगी खर्चाकडे लावून दिलेला होता. यामुळें साहजिकच अजातशत्रु व प्रसेनजित् यांच्यामध्यें लढाई जुंपली. प्रथमतः अजातशत्रूला जय मिळेलसें वाटत होतें, परंतु शेवटीं तो कैद केला गेला. अजातशत्रूनें त्या नगरीवरील आपला हक्क सोडल्याकारणानें संतुष्ट होऊन प्रसेनजित् यानें आपली मुलगी त्यास दिली, इतकेंच नव्हे तर ज्या नगरी-बद्दल तो इतका भांडला तीच काशी नगरी त्याला आंदण म्हणून दिली. पुढें तीन वर्षांनीं प्रसेनजिताचा मुलगा विदूडभ यानें बापाविरुद्ध बंड केलें. प्रसेनजित् या वेळीं शाक्य देशामध्यें उलुंब या गांवीं होता. तेथून पळून जाऊन त्यानें अजातशत्रूची मदत घेण्याचा प्रयत्न केला. परंतु तेथपर्यंत पोंचण्याच्या आधींच तो आजारी पडून मृत्यु पावला.

**उदयन व प्रद्योत.**—कौशाम्बी व अवंती येथील राज-घराणीं अशाच सोयरिकीनें एकमेकांशीं निगडित झालीं होतीं. अवंतीची राजकन्या वासुलदत्ता ( वासवदत्ता ) व कौशांबीचा राजा उदयन यांची विवाहकथा धम्मपदाच्या २१—२३ या श्लोकांवरील टीकेंत मोठी मजेदार दिलेली आहे. ती हकीकत

अशी:प्रद्योतानें (अवंतीच्या राजानें) मजपेक्षां वैभवानें श्रेष्ठ कोण असा प्रश्न एकदां आपल्या दरबाऱ्यांस केला असतां, त्याला स्पष्ट सांगण्यांत आलें कीं, कौशाम्बी नगरीचा राजा उदयन हा तुजपेक्षां श्रेष्ठ आहे. तेव्हां प्रद्योतानें उदयनावर स्वारी करण्याचें ठरविलें. तें पाहून दरबारी लोकांनीं पुढें दिल्याप्रमाणें सल्ला दिली: 'उघडाउघडीं हल्ला करण्यांत अर्थ नाहीं; कारण उदयनाचें सामर्थ्य फार मोठें आहे. तेव्हां दगाफटका करून उदयनास कैद करावें हें चांगलें. उदयनाला सुंदर सुंदर हत्तींची शिकार करणें आवडतें, तेव्हां असा एखादा प्रसंग साधलेला बरा.' त्यावरून त्या राजानें एक लांकडाचा हत्ती तयार करवून त्याला उत्तम रंग वगैरे देऊन त्याच्या भोंवतीं साठ पाहरेकरी ठेविले; व जवळपास अशा तऱ्हेचा सुंदर हत्ती सांपडण्यासारखा आहे अशी बातमी उदयनाच्या कानावर जाण्याची तजवीज केली. उदयन ह्या आमिषानें फसला व प्रद्योताच्या लोकांनीं त्याला कैद केलें. परंतु उदयनाला गजवशीकरणाची विद्या माहीत असल्यामुळें प्रद्योतानें त्याला जीवदान व स्वातंत्र्य देऊं करून ती विद्या मला शिकव असें म्हटलें. उदयनानें उत्तर केलें कीं, तूं गुरु म्हणून मला नमस्कार करशील तर तुला ती विद्या शिकवितों. प्रद्योत म्हणाला: 'तुला, आणि नमस्कार! हें तर कालत्रयींहि होणार नाहीं.' हें ऐकून उदयनानें विद्या सांगण्याचें नाकबूल केलें. पहिल्यानें प्रद्योताचा विचार उदयनास ठार करावें असा होता; पण उपर्युक्त विद्या त्यास एकट्यासच माहीत असल्यानें त्यानें जरासें नमतें घेतलें. त्यानें उदयनास विचारिलें: 'माझ्याखेरीज दुसऱ्या कोणीं तुला नमस्कार केला तर त्याला तूं ही विद्या शिकविशील काय?' उदयनानें होय म्हणून उत्तर दिलें. तेव्हां राजकन्येला पडद्याआड बसवावें व पडद्याच्या बाहेरून उदयनानें ही विद्या तिला सांगावी असें ठरलें. तुला एका कुब्जेला विद्या शिकवावी लागेल असें उदयनाला सांगण्यांत आलें होतें, व तुला एक खुजा मनुष्य विद्या शिकवील असें राजकन्येला सांगण्यांत आलें होतें. परंतु एक दिवस खरा प्रकार उघडकीस आला; आणि उदयन आणि ती राजकन्या हे दोघे प्रद्योत शिकारीस गेला असतां हत्तीवर बसून पळून गेले. उदयन आपल्या राज्यांत गेल्यावर त्यानें वासुलदत्तेला राज्ञीपदावर बसविलें. अशी ही गोष्ट आहे. ही गोष्ट पुढें भास कवीच्या एका नाटकाचा विषय झाली आहे.

या गोष्टींत ऐतिहासिक सत्य किती आहे हें निश्चयानें जरी सांगतां न आलें, तरी प्रद्योत व उदयन हे समकालीन राजे होते व त्यांच्यांत सोयरीकहि झाली होती एवढें यावरून स्पष्ट होतें.

या उदयनाच्या संबंधानें आणखीहि बरीच माहिती मिळते. पिण्डोल नांवाच्या एका बौद्धपंथानुयायी माणसाशीं अनेक वेळां वादविवाद झाल्यामुळें मनावर परिणाम होऊन उदयनानें बौद्ध संप्रदायाचा अंगीकार केला. उदयनाच्या बापाचें नांव परंतप होतें. त्याला बोधि नांवाचा एक मुलगा होता. या बोधीचें नांव एका सुत्तंताला दिलें आहे.

**प्रसेनजितासंबंधीं आणखी माहिती.**—प्रसेनजित् हा फार निराळ्या प्रकारचा मनुष्य होता. संयुक्त निकायांपैकीं तिसरें संयुक्त सगळें याच्या संबंधाचें आहे. या संयुक्तांत २५ कथा असून, त्यांपैकीं प्रत्येकींत नीति शिकविलेली आहे. बौद्ध वाङ्मयाच्या इतर भागांतहि प्रसेनजितासंबंधाचे बरेच उल्लेख सांपडतात. याचें शिक्षण तक्षशिला येथील विद्यापीठांत झालें होतें. राजा ह्या नात्यानें त्यानें राज्यकारभारांत बरीच कळकळ दाखविली. भल्यांची संगति धरून राहणें त्याला आवडत असे. ह्याच त्याच्या आचारविचारांतील थोरपणा त्यानें पुढें बौद्ध संप्रदायाचा एका विशिष्ट अर्थानें अनुयायी बनून जास्त व्यक्त केला. या राजाचा आणि बुद्धाचा प्रत्यक्ष संवाद होण्याचा प्रसंग आला होता. प्रसेनजित् राजाची आत्या सुमना हीहि या संवादाच्या वेळीं हजर होती. तिनें बौद्ध संप्रदायाची दीक्षा घेण्याचें ठरविलें, परंतु एका वृद्ध नातेवाइकाची सेवाशुश्रूषा करण्याच्या कामामुळें तिचा निश्चय लांबणीवर पडला. थेरगाथा या ग्रंथामध्यें ज्या बौद्धसंप्रदायी स्त्रियांच्या कथा संकलित केलेल्या आहेत. त्यांपैकीं सुमना ही एक आहे.

**कोसलाधिपाचें शाक्यांशीं युद्ध.**—शाक्य कुळांपैकीं एका कुळाच्या अधिपतीच्या कन्येला प्रसेनजित् राजानें, बुद्धकुलाशीं सोयरीक करण्याच्या इच्छेनें मागणी घातली होती असें सांगतात. शाक्य लोकांनीं या सोयरिकीमुळें आपल्यास हलकेपणा येतो असें ठरविलें. परंतु पुढें त्यांनीं वासभखत्तिया नांवाची एका सरदाराच्या दासीची कन्या त्याला दिली. तिजपासून त्याला मागें सांगितलेला विदूदभ नांवाचा पुत्र झाला. या विदूदभानें पुढें राज्यावर बसल्यावर, आपल्या बापाशीं कपट केल्याबद्दल शाक्य लोकांचा सूड उगविला. या लढाईची सविस्तर हकीकत कोठेंहि उपलब्ध झालेली नाहीं; परंतु ही लढाई हा खराखुरा झालेला इतिहास आहे यांत शंका नाहीं, असें ऱ्हीस डेव्हिड्स समजतो. ही लढाई बुद्धाच्या मरणापूर्वी एक दोन वर्षेंच झाली होती असें म्हणतात.

या लढाईचें कारण म्हणून जें सांगण्यांत आलें आहे त्यासंबंधानें थोडासा संशय वाटतो. कारण ज्या तऱ्हेची सोयरीक व्हावयाचें ठरलें होतें, तशा सोयरिकी यापूर्वी झालेल्या होत्या. मगध देशच्या बिंबिसार राजाला अशाच एका कुळांतील मुलगी दिलेली होती.

**अजातशत्रु व प्रद्योत.**—अजातशत्रूनें आपल्या राजधानीवर-राजगृहावर-प्रद्योताचा हल्ला येईल या भीतीनें तिजभोंवती तट घातला होता असें सांगतात. हा हल्ला खरोखरच झाला कीं नाहीं, व झाला असल्यास त्यांत यश कितपत आलें हें समजल्यास बराच बोध होण्यासारखा आहे. पुढें ख्रि. पू. ४ थ्या शतकांत मगधाच्या ताब्यांत

उज्जयिनी गेली व अशोकास उज्जयिनीचा अधिकारी नेमण्यांत आलें. शूरसेनाचा राजा अवंतिपुत्त वगैरे अनेक राजांचे प्रसंगोपात्त केलेले उल्लेख बौद्ध वाङ्मयांत सांपडतात; परंतु ज्यासंबंधाची माहिती विशेष विस्तारपूर्वक दिलेली आढळते असे एवढेच चार राजवंश होत.

वर सांगितलेल्या प्रद्योत आणि अजातशत्रु या राजांचे उल्लेखच केवळ करून बौद्ध वाङ्मय मोकळें होतें; पण तें वाङ्मय त्या राजांचें ऐतिहासिक स्थान स्पष्ट करीत नाहीं. तें स्थान स्पष्ट करण्यासाठीं मागें दिलेल्या याद्यांची म्हणजे ज्या वाङ्मयास ऱ्हीस् डेव्हिड्स भितो त्या संस्कृत उर्फ ब्राह्मणी वाङ्मयाची मदत घेतली पाहिजे. तशी वेंकटेश्वर अय्यर (इं. ॲं. पु. ४४, ४५) यांनीं घेऊन खालीलप्रमाणें इतिहासाची मांडणी केली आहे.

**प्रागैतिहासिक मगध.**—(मगंद व मगध यांवरील वैदिक माहितीसाठीं विभाग ३ पहा.) अथर्व आणि यजुः या वेदांमध्यें मगध आणि तेथील लोकांविषयीं जो उल्लेख आला आहे त्यावरून असें दिसतें कीं, त्या वेळीं तेथें श्रौत संस्कृतीचा प्रसार झाला नव्हता. प्राचीन सूत्रांवरून येथें अयाजक ब्राह्मणांची वस्ती होती असें दिसतें. मगध देशाचें राज्य महाभारतांतील युद्धापूर्वीचें आहे अशी माहिती पुराणांत आहे. पुराणांत आणि हरिवंशांत बृहद्रथ हा मगध देशाच्या प्राचीनतम घराण्याचा संस्थापक होता असें दिलें आहे. तो उपरिचर वसु त्याचा पुत्र होता. आणि उपरिचर वसु हा चेदि येथील राजा होता असें हरिवंशांत म्हटलें आहे. बृहद्रथ त्याला वायुपुराणांत महारथ असें दुसरें नांव आहे.

"बृहद्रथापासून महाभारतीय युद्धापर्यंत तीन, आणि तेथून पुढें गौतमबुद्धापर्यंत तेवीस पिढ्या झाल्या. बृहद्रथाच्या घराण्यांत ३२ राजपुत्र झाले असें पुराणांत दिलें आहे. परंतु सहदेवानंतर वास्तविक तेवीसच राजांचीं नांवें वायुपुराणांत दिलेलीं आहेत [ब्रह्माण्डपुराणांत २२, भागवतांत २१, विष्णुपुराणांत २१ व मत्स्यांत २२ आहेत]. त्यांत आणखी बृहद्रथ वंशांतील नांवें घातल्यास म्हणजे सहदेवाशिवाय बृहद्रथाच्या दुसऱ्या पुत्राचे सात पुत्र मिळविल्यास ३० होतात. पुढें त्यांत जरासंध आणि सहदेव हीं दोन नांवें मिळविलीं म्हणजे एकंदर ३२ होतात. हे सर्व बृहद्रथाच्या वंशांतील होते असा पुराणांतलि आधार आहे. त्यांपैकीं २३ जणांनीं बृहद्रथानंतर मगध देशांत राज्य केलें.

शेवटल्या बृहद्रथा[बार्हद्रथा]नंतर अवंतीचा चंडप्रद्योत किंवा त्याचा बाप गादीवर आला अशी पौराणिक माहिती आहे. त्यावरून असें वाटतें कीं, बृहद्रथ घराणें गौतमबुद्धाच्या वेळेपर्यंत होतें. पण मध्यंतरीं शिशुनाग त्यानें मगध देशाची गादी बळकाविली. गिरिव्रज येथील राजांकडून बृहद्रथ घराण्याचा पूर्णपणें नाश होईपर्यंत त्या घराण्यांतील राजे मगध देशाचे मांडलिक होते असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**बुद्धकालीन राष्ट्रें.**—खि. पू. सातव्या शतकांत हिंदुस्थानांत निरनिराळीं प्रसिद्ध राज्यें होतीं. पुराणांत काशी, कोशल, कौशांबी, अवन्ती आणि मगध येथील घराण्यांचीं नांवें आढळतात. जातकांत आलेलीं काशीच्या राजांचीं बरींचशीं नांवें पुराणांत सांपडतात. हीं नांवें म्हटलीं म्हणजे ब्रह्मदत्त, विश्वक्सेन, उदक्सेन आणि बल्लत हीं होत. म्हणून काशी हें खि. पू. ७ व्या शतकांतील हिंदुस्थानच्या राज्यांपैकीं ब्रह्मदत्त आणि त्याचे वंशज त्यांच्या ताब्यांतील एक मोठें राज्य होतें असें वाटतें. तसेंच तक्षशिला येथें मोठें राज्य होतें. त्यानंतर मगध देशाचें नांव येतें. येथें त्या वेळीं बहुतकरून पौराणिक बृहद्रथ घराण्यांतील शेवटला राजा राज्य करीत होता. त्याशिवाय इतर राज्यांची देखील बौद्ध ग्रंथांतून अस्पष्ट माहिती दिली आहे. खि. पू. ७ व्या शतकाच्या शेवटीं हिंदुस्थानच्या पश्चिमेकडील राज्यांचें महत्त्व कमी होत जाऊन, पूर्वेकडील राज्यें उदयास येऊं लागलीं. काशीचें वर्णन पच्चुपन्नवत्थु जातकामध्यें एका जागीं दिलें आहे. कोशल देशाचें वर्णन पुष्कळ ठिकाणीं आढळतें. येथें महाकोशल नांवाचा एक नामांकित राजपुरुष होऊन गेला. काशीचा कांहीं भाग कोशल देश भरभराटींत असतांना त्याच्या ताब्यांत होता असें बौद्ध ग्रंथांवरून स्पष्ट दिसतें. गोपथ ब्राह्मणांत त्याला काशिकौशल असें म्हटलें आहे. काशीचा दुसरा भाग मगधघराण्याच्या शिशुनागानंतरच्या शेवटल्या राजांच्या ताब्यांत होता.

**गिरिव्रज येथील राजे.**—आपल्या मुलाला काशीच्या गादीवर ठेवून शिशुनाग हा गिरिव्रज येथें राहिला. शिशुनाग त्यानें प्रद्योतांचा नाश केला ही पुराणांतील माहिती चुकीची आहे. शिशुनाग हा गिरिव्रजचा राजा होण्यापूर्वी काशी येथें राज्य करीत असावा. पण त्याच्या पूर्वी काशीचा राजा कोण होता हें सांगणें कठिण आहे. बहुतकरून तो ब्रह्मदत्त त्याच्या वंशजांपैकीं एक असावा. त्यांतील शेवटला वंशज बल्लत हा होय. गौतम त्याच्या ब्रह्मी दंतकथेवरून असें वाटतें कीं, काशीचा पूर्वीचा राजा नागकुलांतील असावा. शिशुनागवंशांतील राजांना पुराणांत 'क्षत्रबंधवः' असें म्हटलें आहे. त्या शब्दाचा खरा अर्थ क्षत्रियाधम असा होतो.

येथील दुसरा राजा काकवर्ण हा होय. त्याच्याविषयीं बाणभट्ट असें म्हणतो कीं, एका दोषी ठरविलेल्या माणसानें त्याला पकडून एका अज्ञात जागीं विमानांत बसवून नेलें; आणि त्याच्या मानेंत खंजीर खुपसून त्याचा प्राण घेतला. त्याचें कारण असें असावें कीं, हा राजा नव्या मतांचा आणि नवे नवे शोध लावणारा असल्यामुळें त्याचा जुन्या मतांच्या लोकांनीं खून केला असावा. तिसरा राजा क्षेमधर्मा व चवथा क्षत्रजित् हे फार शूर असावे असें त्यांच्या नांवांवरून दिसतें त्यांनाच बौद्ध आणि जैन हे प्रसेनजित् आणि महापद्म असें म्हणत.

**साम्राज्याचा आरंभ—बिंबिसार.**—गिरिव्रज येथील राजांच्या कारकीर्दीत होणारी नव्या पंथाची आणि मगध येथील राज्याची वाढ बिंबिसार राजाच्या कारकीर्दीत पूर्णत्वास आली. जैन ग्रंथांत त्याला श्रेणिक आणि बौद्ध ग्रंथांत त्याला वैश्य असें म्हटलें आहे. त्यानें वैशाली येथील राजकन्येशीं लग्न केलें. जैन ग्रंथांत तिला चेल्लना हें नांव आहे. ती वैशाली येथील चेतक राजाची कन्या होती. बौद्ध ग्रंथांत तिला वासवी असें दुसरें नांव आहे. वैशाली हें व्यापाराचें मोठें केंद्र होतें; व त्यामुळें मगध देशाच्या व्यापाराचीहि साहजिकपणेंच वाढ झाली असावी.

वैशाली देशांतील राजकन्येशीं झालेला लग्नसंबंध राजकीय व व्यापारी दृष्ट्या फार महत्त्वाचा होता. वैशाली हें एका अति बलाढ्य लिच्छवी संघाचें ठाणें होतें. बिंबिसाराचा आपल्या सासऱ्याशीं व या संघाशीं स्नेहसंबंध असल्यामुळें त्याच्या ईशान्य सरहद्दीवर नेहमीं शांतता असे. बिंबिसार ह्यानें कोशलच्या राजकन्येशीं लग्न करून त्या देशाशीं मैत्री संपादन केली. ह्या लग्नामुळें त्याला बराच प्रांतहि आंदण मिळाला. ह्याप्रमाणें बिंबिसार ह्यानें पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील बंदोबस्त केल्यावर अनंग देशाकडे आपला मोर्चा फिरविला. ह्या मोहिमेंत पंचाल देशाच्या नागराजानें बिंबिसार ह्याला मदत केली. ह्या मोहिमेची सविस्तर हकीकत सांपडत नाहीं; पण एवढें सिद्ध होतें कीं, मगध देशाच्या राज्यांत अनंग देशहि येत होता. मगध देशाचा ह्याप्रमाणें विस्तार व महत्त्व वाढल्यावर बिंबिसार ह्यानें गिरव्रज येथील आपली राजधानी सोडून देऊन राजगृह ही मोठी राजधानी बांधली.

ह्या वेळच्या धार्मिक चळवळीहि बिंबिसार ह्याच्या कारकीर्दीत पूर्णत्वास आल्या. वासुदेवानें पश्चिमेकडील शूरसेनांमध्यें प्रचलित केलेल्या वासुदेवधर्माचाहि येथें प्रसार झाला. ह्याचप्रमाणें बौद्धपंथाचाहि येथें प्रसार झाला होता. बहुतेकांच्या जैन दंतकथेंत बिंबिसार हा जैनभक्त होता असें आहे. ह्याच वेळीं निरनिराळ्या इतर धर्मपंथांचीहि स्थापना झाली. त्यांपैकीं मुख्य म्हटला म्हणजे आजीविकांच गोशाल ह्यानें स्थापिलेला पंथ होय.

**शैशुनागांच्या इतिहासांतील वादग्रस्त भाग.**—हे अनेक आहेत. त्यांत (१) बिंबिसाराचा खून, (२) प्रद्योतांची शैशुनागांहून प्राचीनता, (३) शैशुनाग राजांची संख्या (४) व राजांचा अनुक्रम हे महत्त्वाचे होत. बिंबिसार ह्याच्या कारकीर्दीच्या शेवटल्या कालासंबंधानें भिन्न दंतकथा आढळतात. बौद्ध आणि ब्राह्मी दंतकथेंत त्याला त्याचा पुत्र अजातशत्रु ह्यानें मारलें असा उल्लेख आहे. परंतु मगध देशाच्या जैन दंतकथेंत तसें नसून उलट त्यानें आपलें राज्य अजातशत्रूच्या स्वाधीन केलें अशी हकीकत आहे. म्हणून बिंबिसार हा ८० वर्षें जिवंत होता आणि त्यानें आपल्या मरणापूर्वी कांहीं वर्षें आपलें राज्य अजातशत्रु ह्याच्या स्वाधीन केलें असें समजण्यास हरकत नाहीं.

**अजातशत्रु आणि साम्राज्याची स्थापना.**—अजातशत्रु हा ह्या घराण्यांतील एक प्रख्यात राजा झाला. काशी येथेंहि एक अजातशत्रु होऊन गेला. ह्या वेळीं काशी हें एक हिंदुस्थानांतील फार भरभराटींत असलेलें राज्य होतें. येथील त्या वेळचा अजातशत्रु आणि त्याच्या नंतर कित्येक पिढ्यांनीं झालेला मगध देशाचा अजातशत्रु हे अगदीं निरनिराळे होत. पण हे दोघेहि काशीचे राजे होते. ह्यावरून असें वाटतें कीं, शैशुनाग घराण्यांतील राजांनीं काशीच्या गादीवर असलेल्या आपल्या पूर्वजांचीं कांहीं नांवें ठेवलीं. अजातशत्रूच्या पुत्राला भद्रसेन अजातशत्रु असें नांव आहे; व त्यालाच वायुपुराणांत श्रेण्य भद्रसेन असें दुसरें नांव आहे.

अजातशत्रु हा पूर्वीच्या बुद्धांचा आणि जैन पंथाचा अनुयायी होता. त्याचप्रमाणें त्याची राणी मल्लिका ही देखील बुद्धपंथाची अनुयायी होती. त्यानें गयासिसा येथें देवदत्ताकरितां एक मोठा दिवाणखाना बांधिला.

बहुतेक त्याची पहिली लढाई त्याचा मामा कोशलचा पसेनदि ( प्रसेनजित् ) ह्याच्याशीं झाली. दुसरी लढाई वैशाली येथील राजाशीं झाली. नंतर त्यानें आपल्या आज्याचें राज्य घेण्याकरितां पाटलिग्राम येथें तटबंदी केली.

**साम्राज्याचा विस्तार.**—अजातशत्रूनंतरचा राजा उदय हा होय. त्यानें कुसुमपुर नांवाचें शहर बांधलें. त्याला अवंतीचा चंडप्रद्योत आणि यौगंधरायण ह्यांसारखे प्रबळ शत्रू असल्यामुळें राज्याचा फारसा विस्तार होणें कठिण होतें. ह्याच्या कारकीर्दींत लिच्छवींवरील स्वाऱ्या चालूच होत्या. तो पुढें ठार मारला गेला अशी दंतकथा आहे. ह्याच्या मरणानंतर पुन्हां राजदरबार राजगृह येथें गेला, आणि लिच्छवींवरील स्वाऱ्या त्या वेळेपुरत्या बंद झाल्या,

वैशाली हा देखील मगध साम्राज्याचाच भाग होता असें पारायणवग्ग यामध्यें दिलें आहे., कोशल देशाचा देखील महानंदी ह्याच्या वेळीं मगध राज्यांतच समावेश होत होता.

**प्रद्योतांची प्राचीनता?**—प्रद्योत घराण्यांतील राजे शैशुनाग घराण्यांतील राजांच्या पूर्वीचे आहेत ही पुराणांतील माहिती चुकीची आहे. कारण कीं, हिंदु बौद्ध आणि जैन ह्या सर्व दंतकथांवरून प्रद्योत हा बुद्धाचा आणि म्हणून बिंबिसार ह्याचा समकालीन होता असें एकच अनुमान निघतें. बिंबिसार आणि उदयन हे एकेच दिवशीं जन्मले अशी चिनी बौद्ध दंतकथेवरून माहिती सांपडते. म्हणून (चण्ड) प्रद्योत, उदयन आणि बिंबिसार हे बुद्धाचे समकालीन होते असें ठरविण्यास हरकत नाहीं.

**राजांची संख्या.**—आतां शैशुनाग घराण्यांत राजे किती झाले तें पाहूं. वेंकटेश्वर यांनीं निरनिराळ्या पुराणांतील जीं राजांचीं नांवें व त्यांच्या कारकीर्दीचीं वर्षें दिलीं आहेत तीं पार्गिटर साहेबांच्या पुराणांतील राजघराण्यांसंबंधाच्या माहितींत मागें आलीं असल्यानें तेवढीं वगळून फक्त जैन व बौद्ध ग्रंथांत आलेलीं शैशुनाग घराण्यांतील राजांचीं नांवें व त्यांच्या

कारकीर्दींची वर्षेंच पुढें दिलीं आहेत. नांवांपुढें दिलेले आंकडे त्या त्या राजांच्या कारकीर्दीची वर्षे दर्शवितात. प्रत्येक यादीच्या डोक्यावर तीस आधार असलेल्या ग्रंथाचें नांव दिलें आहे.

| कल्पद्रुमकालिका | महावंश | दिव्यावदान |
|---|---|---|
| श्रेणिक | बिम्बिसार | बिम्बिसार |
| कूणिक | अजातशत्रु ३२ | अजातशत्रु |
| उदय | उदयभद्रक १६ | उदयिभद्र |
| | अनिरुद्ध } १८ | मुण्ड |
| | मुंड } | काकवर्णी |
| | नागदशक २४ | सहली |
| | सुसनाग १८ | तुलकुचि अथवा |
| | | तुलेकुचि |
| | कालाशोक २८ | महामंडल |
| | १० पुत्र २२ | प्रसेनजित् |
| | ९ इतर २२ | नन्द |
| चंद्रगुप्त | चंद्रगुप्त | बिंदुसार |
| | | सुसिम |

शिशुनागानंतर बारा राजे झाले होते असें मत्स्यपुराणांत दिलें आहे, परंतु विष्णु आणि वायु पुराणांत फक्त दहा राजांचाच उल्लेख केला आहे. मत्स्य पुराणांत जास्त दिलेलीं दोन नांवें कण्वायन आणि भूमिमित्र हीं त्या पुराणांत आढळत नाहींत. ज्या अर्थी मत्स्य पुराणानें हीं जास्त दोन नांवें दिलेलीं आहेत, त्या अर्थी असें वाटतें कीं, दंतकथेचा त्या गोष्टीला बराच आधार असावा. सर्व पुराणांत असें सांपडतें कीं, राजांच्या दोन जास्त पिढ्या होत्या. त्याप्रमाणें पहिल्या शिशुनागापासून शेवटल्या नंदापर्यंत (१०+२) बारा पिढ्या झाल्या.

बिंबिसार त्याच्या नंतर सात पिढ्या झाल्या, असें दीपवंश आणि महावंश हे दोन्ही ग्रंथ सांगतात.

कल्पद्रुमकालिका या जैन ग्रंथांत–बिंबिसार हा पहिला राजा धरिला तरी–चंद्रगुप्तापूर्वी बारा राजे झाले असें सापडतें.

त्याप्रमाणें (१) चंद्रगुप्तापूर्वी राजांच्या बारा पिढ्या होत्या; (२) त्यांपैकीं सात बिंबिसारानंतर झाल्या; आणि (३) शेवटल्या सात राजांचा एक विशिष्ट वर्ग बनून त्याला पौराणिक आणि जैन दंतकथांत नंद असें म्हणूं लागले असें सिद्ध होतें.

**राजांचीं नांवें आणि अनुक्रम.**–निरनिराळ्या पुराणांत दिलेल्या बारा राजांचीं नांवें बहुतेक सारखींच आहेत. दीपवंशांत देखील बिंबिसार, अजातशत्रु, उदय आणि शिशुनाग हीं नांवें आहेत. त्यांतील नागदशक हें पुराणांतील दर्शक किंवा हर्षक या नांवाप्रमाणेंच आहे. महावंशामधील कालाशोक हें नांव काकवर्ण या अर्थाचेंच आहे. महावंशामध्यें नंदिवर्धन आणि महालिन (साहल्य अथवा सुमाल्य) अशीं आणखी दोन नांवें सांपडतात, परंतु त्यांनां दुसरीकडे कोठेंहि आधार सांपडत नाहीं. महापद्म आणि महामंडल अथवा उग्रसेन हीं नांवें समानार्थी आहेत. संदरहू ग्रंथांप्रमाणें पाहतां पौराणिक यादींत महानंदी आणि दिव्यावदान आणि महावंश यांमध्यें मुण्ड अशीं दोन विलक्षण नांवें सांपडतात.

दर्शक हा ऐतिहासिक पुरुष नव्हता असें महावंशांत दिलें आहे. पण त्याच्या अस्तित्वाबद्दल निरनिराळे आधार सांपडतात. भास कवीच्या स्वप्नवासवदत्ता नाटकांत त्याला मगधदेशाचा महाराजा म्हटलें आहे. हा उदयन वत्सराज त्याचा शालक होता. त्या माहितीस दिव्यावदान ग्रंथानें पुष्टि दिलेली आहे. शिवाय बाणाच्या हर्षचरित काव्यांत त्याला भासाप्रमाणेंच महासेन म्हटलें आहे. दर्शक हा अजातशत्रु, प्रद्योत आणि बुद्ध यांच्यानंतर दोन पिढ्यांनीं झाला, म्हणजे तो उदयानंतर जन्मला. बुद्धनिर्वाणानंतर दर्शक हा ४६ वर्षांनीं गादीवर आला असा देखील दीपवंशांत आधार सांपडतो.

**राजांचा अनुक्रम.**—शिशुनाग हा मगध घराण्याचा संस्थापक होता असें पुराणांत स्पष्ट रीतीनें सांगितलें आहे. परंतु बौद्ध आणि जैन ग्रंथांत शिशुनाग, काकवर्ण वगैरे त्या घराण्यांतील बिंबिसारानंतरचे राजे आहेत अशी माहिती सांपडते. आतांपर्यंत अवलोकन केलेल्या ग्रंथांशिवाय इतर बौद्ध व जैन ग्रंथांचें अवलोकन केल्यानें त्या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल लावतां येईल. हेमचंद्र यानें आधाराकरितां घेतलेल्या दंतकथेवरून असें लक्षांत येतें कीं, बिंबिसार हा प्रसेनाजिताच्या नंतर जन्मला. तिबेटी बखरींत बिंबिसार हा मगध देशाच्या महापद्म राजाचा मुलगा होता असें दिलें आहे. त्यावरून पौराणिक माहितीवर भरंवसा ठेवण्यास हरकत नाहीं असें दिसतें.

शिशुनाग हा यादींत पहिला येतो आणि त्याच्यानंतर काकवर्ण अथवा कालाशोक येतो असें महावंश व पुराणें या दोहोंतहि दिलेलें आहे. यानंतर दोन पिढ्या मागून बिंबिसार झाला. बौद्ध आणि जैन ग्रंथांप्रमाणें त्या पिढ्या महापद्म आणि प्रसेनजित् यांच्या होत. परंतु पुराणांप्रमाणें क्षेत्रवर्मा आणि क्षत्रजित् हे या जागीं येतात. पुराणांतील सर्व नांवें समानार्थीच आहेत. तेव्हां बौद्धांनीं व जैनांनीं दिलेलीं व पुराणांत दिलेलीं राजांचीं नांवें एकच आहेत असें समजण्यास हरकत नाहीं. त्या दंतकथांवरून महापद्म हा बिंबिसाराचा बाप आणि प्रसेनजित् त्याचा मुलगा होता असें समजतें.

बिम्बिसार आणि अजातशत्रु यांचा अनुक्रम सर्व ग्रंथांतून एकसारखा असल्यामुळें त्यांच्याविषयीं कांहींच प्रश्न उपस्थित होत नाहीं. वायु पुराणांतील कांहीं हस्तलेखांत अजातशत्रु हा बिंबिसार याचा आजा होता असें दाखविलें आहे. पण अजातशत्रु हा बिंबिसार याचा मुलगा आहे ही गोष्ट प्रसिद्ध असल्यामुळें, वरील हकीकत उघडपणें चुकीची दिसते. बौद्धांच्या लेखांप्रमाणें उदय हा अजातशत्रूच्या नंतर झाला. पुराणांमध्यें अजातशत्रु आणि उदय या दोहोंच्या मध्यें हर्षक अथवा दर्शक हा एक पुरुष जास्त दाखविला आहे. परंतु असें

असतें तर बौद्धांच्या लेखांत बिंबिसार, अजातशत्रु आणि उदय यांचें इतकें वर्णन दिलेलें असतां त्यांनीं दर्शक याचा उल्लेख देखील करूं नये असें झालें नसतें. दर्शक हा उदय याच्या मागाहून झाला असें ठरविल्यानें ही भानगड मिटते.

यानंतरचा पुराणांप्रमाणें क्रम नंदिवर्धन व त्यानंतर महानंदी असा आहे. आणि बौद्ध ग्रंथांप्रमाणें नंदिवर्धन, आणि महामुंड अथवा मुंड असा आहे.त्यानंतर महापद्म आणि सुमाल्य अथवा सहल्य हे येतात. यांचा विष्णु आणि भागवत या पुराणांनीं दुसऱ्याच एका घराण्यांत समावेश केलेला आहे.महावंशामध्यें कालाशोक, त्याचे दहा पुत्र आणि त्यांचे नऊ वंशज इतक्यांचीं नांवें दिलेलीं आहेत. परंतु सबळ पुरावा नसल्यामुळें हीं नांवें गाळण्यास हरकत नाहीं. यानंतर नंद येतात. सर्व दंतकथांप्रमाणें चंद्रगुप्त नंदांच्या नंतर लगेच गादिवर आला. म्हणून शेवटला नंद आणि चंद्रगुप्त यांच्यामध्यें चाणक्य याची शंभर वर्षांची कारकीर्द झाली ही पुराणांतील माहिती चुकीची आहे. या चुकीचें कारण पुराणांतील माहितीची तारिखवार नोंद नाहीं हेंच बहुतकरून होय.

**संनावळी.**—हें सर्व घराणें ३६० अथवा ३६२ वर्षें होतें असें पुराणांत दिलें आहे. नंतर महापद्म आणि त्याचे पुत्र यांच्या कारकीर्दीला शंभर वर्षें देऊन चाणक्याच्या कारकीर्दीला आणखी शंभर वर्षें दिलीं आहेत. जैनांनीं नंद घराण्याची कारकीर्द १५५ वर्षांची दिलेली आहे. परंतु ही कारकीर्द दोन पिढ्या होती असें पुराणें म्हणतात.

बुद्धाच्या निर्वाणासून तों चंद्रगुप्ताच्या राज्यारोहणापर्यंतच्या कालासंबंधांत महावंश, हेमचंद्र आणि पुराणें या तिन्हींमधील माहितीचा मेळ जमतो. पुराणांत नऊ नंदांच्या कारकीर्दीला १०० वर्षें लाविलेलीं असून कौटिल्यासहि तितकींच वर्षें दिलेलीं आहेत. म्हणजे पहिल्या नंदापासून तों पहिल्या मौर्यापर्यंत एकंदर २०० वर्षें धरलेलीं आहेत. वेंकटेश्वर अय्यर यांच्या मतें नंदांची कारकीर्द दोनशें वर्षें होती ही पौराणिक माहिती चुकीची नाहीं, पण ती दोन पिढ्या होती हें म्हणणें चुकीचें आहे. कारण महापद्म हा नंदवंशांतील पहिला पुरुष आहे, परंतु तो नंदिवर्मा याच्या नंतरचा नसून बिंबिसार याचा बाप होय. याप्रमाणें नऊ नंद हे शैशुनाग घराण्यांतील शेवटले नऊ राजपुरुष होत.

आतां शैशुनाग घराणें केव्हां गादीवर आलें हें ठरवूं. बुद्धनिर्वाणाचा काळ खि. पू. ४७७ आणि ४८७ यांच्या दरम्यान आहे हें बहुतेक ठरलेलेंच आहे. बौद्ध ग्रंथांप्रमाणें ही गोष्ट अजातशत्रूच्या कारकीर्दीच्या आठव्या वर्षी घडली. पुढें पुराणांप्रमाणें बिंबिसार याची २८ वर्षें कारकीर्द झाली. बिंबिसार याच्या पूर्वी चार पिढ्या झाल्या. त्यांतील प्रत्येक पिढी बावीस वर्षें होती असें समजूं. याप्रमाणें ४७७ पासून मागें मोजत गेलें असतां असें दिसून येईल कीं, खि. पू. ६०० मध्यें शैशुनाग घराण्याची स्थापना झाली असली पाहिजे. [व्ही. स्मिथच्या मतें ती ६४२ मध्यें झाली असावी.]

आतां या घराण्यांतील प्रत्येक राजानें किती वर्षें राज्य केलें हें ठरवावयाचें आहे. शिशुनाग पुराणांप्रमाणें ४० आणि महावंशाप्रमाणें १८ वर्षें गादीवर होता. मगध जिंकण्यापूर्वी तो काशीचा राजा होता; व म्हणून वेंकटेश्वर अय्यर यांच्या मतें त्याच्या कारकीर्दीस अठरा वर्षेंच रास्त दिसतात.

काकवर्ण हा ३६ वर्षें राज्य करीत होता; पण मत्स्यपुराणाच्या कांहीं प्रतींत २६ वर्षें दिलेलीं आहेत, आणि तीं बौद्धांनीं दिलेल्या माहितीशीं जुळतात म्हणून स्वीकार करण्यास हरकत नाहीं.

क्षेत्रवर्मा याची कारकीर्द पुराणांत ३६ वर्षें आहे. परंतु वायु आणि ब्रह्माण्ड पुराणांच्या हस्तलेखांत २० वर्षें दिलेलीं सांपडतात.

क्षत्रौजस् उर्फ महापद्म याच्या कारकीर्दीचीं मत्स्यपुराणांत २४ वर्षें दिलेलीं आहेत.

बिंबिसार उर्फ श्रेणिक याची सर्वानुमतें २८ वर्षांची कारकीर्द होती (फक्त महावंशांत मात्र ती ५२ वर्षांची दिली आहे).

अजातशत्रूकरितां वायु पुराणांत २५, मत्स्य पुराणांत २७, ब्रह्माण्ड पुराणांत ३५ आणि बौद्ध ग्रंथांत ३२ अशीं वर्षें दिलेलीं आहेत. बौद्धांना याची विशेष माहिती होती म्हणून त्यांनीं दिलेलीं वर्षें खरीं समजण्यास हरकत नाहीं.

उदय याची कारकीर्द बौद्ध ग्रंथांप्रमाणें १६ वर्षें होती व त्याला जैन दंतकथेचा आधार आहे.

दर्शक हा २४ वर्षें राज्य करीत होता, या गोष्टीला महावंशाचा आधार सांपडतो.

नंदिवर्धन याची कारकीर्द २२० वर्षें धरण्यास हरकत नाहीं.

महानंदी हा बौद्धांच्या कालाशोक राजाचा समकालीन असून त्यानें देखील त्याच्याप्रमाणें २८ वर्षें राज्य केलें.

महापद्म हा २८ वर्षें होता असें वायु पुराणांत दिलें आहे.

सहल्य याच्या कारकीर्दीचीं मत्स्यपुराणांत १२ वर्षें दिलेलीं असून त्याला महापद्म याचे आठ पुत्र जिंकण्यास आणखी १२ वर्षें लागलीं असेंहि दिलें आहे. त्याच्या कारकीर्दीस वायुपुराणांत १६ वर्षें आणि महावंशांत २२ वर्षें दिलेलीं आहेत.

**नंद.**—पुराणांपैकीं विष्णुपुराणांत महापद्म याला नंद हें नांव दिलें आहे; त्याचप्रमाणें भागवतांत महापद्म याचें नांव आलें आहे. पण मत्स्य, वायु आणि ब्रह्माण्ड पुराणांत नंदाचा नामनिर्देशहि केलेला नाहीं. बौद्ध लेखांतून नंद घराण्याची मुळींच माहिती दिलेली नाहीं, परंतु शेवटले नऊ राजे बिंबिसार ज्या घराण्यांतील होता त्या घराण्यांतलेच होते असें दिलेलें आहे. शिशुनाग याला दहा भाऊ होते आणि त्यांनीं त्याच्यानंतर राज्य केलें असें दीपवंशांत सांगितलें आहे. नंद आणि शैशुनाग हे

निरनिराळे नव्हते असें दिव्यावदानांत दिलें आहे. नंद हे उदय ह्याच्या नंतरचे नऊ राजपुरुष असून, त्यांच्या नऊ पिढया झाल्या असें जैन दंतकथेंत सांगितलें आहे. ह्या दंतकथेशीं पुराणांची देखील एकवाक्यता आहे. वरील गोष्टींवरून इतकें सिद्ध होतें कीं, नंद हे शैशुनाग घराण्यांतील शेवटले राजे होते. शकावलींतील माहितीवरून देखील हीच गोष्ट सिद्ध होते. जैनांनीं नंदांची कारकीर्द १५५ वर्षे दिलेली आहे. महावीर ह्याच्या निर्वाणानंतर १५५ वर्षांनीं चंद्रगुप्त हा गादीवर आला असें हेमचंद्र म्हणतो; आणि महावीर आणि बिंबिसार हे समकालीन होते, म्हणून बिंबिसारापासून पुढें झालेल्या राजांनां नंद घराण्यांतील राजे म्हणण्यास हरकत नाहीं. ह्याप्रमाणें शैशुनागांसंबंधीं आणि नंदांसंबंधीं उपलब्ध असलेल्या माहितींत थोडाबहुत घोटाळाच आहे. परंतु नऊ नंदांची कथा इतकी प्रसिद्ध आहे कीं, ती बहुतेक प्रत्येक दंतकथेंत आली आहे. म्हणून असें वाटतें कीं, नंद नांवाचे नऊ राजे खरोखरच झाले असावे, आणि म्हणूनच 'नवनंदाः' असें नांव पडलेलें आहे. हे कालाशोक अथवा काकवर्ण ह्याच्या नंतर झालेल्या राजाचे पुत्र होते असें महावंशांत सांगितलें आहे. म्हणजे बिंबिसार ह्याच्या बापापर्यंत माहिती मिळाली. त्यालाच बौद्ध लोक महापद्म असें म्हणत असत. त्याच्या मागून आठ राजे झाले. पुराणांप्रमाणें महापद्म हा नऊ नंदांपैकीं पहिला होय. आतां क्षेत्रवर्म्याचा मुलगा महापद्म त्याचे ते पुत्र होते असें म्हणण्याऐवजीं वंशज अथवा उत्तराधिकारी होते असें म्हटल्यानें बौद्ध आणि पौराणिक हकीकतींचा मेळ बसतो.

**नंद घराण्यांतील शेवटला पुरुष.**—ए. व्ही. स्मिथ ह्मणतो कीं, महापद्म हा महानंदी ह्याच्या राणीला न्हाव्यापासून झाला. परंतु बौद्ध आणि जैन ग्रंथांतून ह्या गोष्टीचा कोठेंहि उल्लेख नाहीं. मेरुतुंग ह्याचें तो न्हावीण गणिकेपासून झाला असें म्हणणें आहे. ग्रीक लेखकांनीं गंगारडींच्या राजांसंबंधीं जो इतिहास दिला आहे त्याचाच स्मिथ यानें आधार घेतला असावा असें दिसतें. राजाला शूद्र गणिकेपासून पुत्र झाला असा पुराणांत उल्लेख आहे. चम्पाची एक ब्राह्मण स्त्री एका मौर्य राजाकडे न्हाविणीचें काम करीत होती, आणि पुढें त्यानें तिच्याशीं लग्न लाविलें व तिच्यापासून त्याला अशोक हा मुलगा झाला असें दिव्यावदानांत दिलें आहे.

ह्याप्रमाणें नंदाचा किंवा जनपदकल्याणीचा कसा तरी हलकीं कामें करणाऱ्या लोकांशीं किंवा हलक्या कुळाशीं संबंध जोडलेला सांपडतो.

नंदांच्या नंतर चंद्रगुप्त गादीवर आला. मुद्राराक्षस नाटकांत चंद्रगुप्त मौर्य हा नंदांच्याच घराण्यांतला होता असें आहे. महावंशाप्रमाणें तो कापिलवस्तूच्या शाक्य वंशांतील होता. त्याचा बाप मयूरपुरचा अथवा दिल्लीचा शेवटला राजा होता असें अत्थकथांमध्यें दिलें आहे. जातिविकांतील माहिती अशी आहे कीं, तो न्हावी आणि शूद्र स्त्री किंवा न्हावी आणि दासी ह्यापासून झाला असावा. शब्दकल्पद्रुमांत तो उच्च कुलांतील नव्हता असें म्हटलें आहे. बौद्ध दंतकथेंत मौर्य हे पिप्पलवणचे (फाहिआन, २४) राजे होते असें आहे. जैनांच्या कल्पसूत्रांत त्यांचें काश्यप गोत्रांतील स्थविर मौर्यपुत्र असें वर्णन केलें आहे.

---

## प्रकरण १० वें.

## बुद्धापासून चंद्रगुप्तापर्यंतच्या काळची सामाजिक परिस्थिति.

एतद्विषयक माहिती ऱ्हीस डेव्हिड्सच्या बुद्धिस्ट इंडिया या पुस्तकाच्या आधारानें आमच्या दृष्टीनें अवश्य दिसणारे फेरबदल करून पुढें देत आहों.

**शाक्यांची लोकसंख्या.**—बुद्धकालीन राजकुलें व मोठीं घराणीं यांपैकीं शाक्यकुळासंबंधाची माहिती विशेष खुलासेवार उपलब्ध आहे. यांच्या प्रदेशाची जागा, तिची इतर प्रदेशांपासून जीं अंतरें दिलेलीं आहेत त्यांवरून निश्चित करितां येते. हा प्रदेश नेपाळ व ब्रिटिश मुलूख यांच्या सरहद्दीवर असावा. बुद्धाच्या रक्षेवर जी समाधि शाक्य लोकांनीं बांधिली तिजवरून, व बुद्ध ज्या लुंबिनी बागेंत जन्मला तेथें अशोक गेला होता असा शिलालेखांत पुरावा सांपडतो त्यावरून हें अनुमान काढिलेलें आहे. शाक्य कुळाच्या अंमलाखालील बऱ्याच गांवांचीं नांवें जुन्या ग्रंथांतून दिलेलीं आहेत. हीं गांवें म्हणजे चातुमा, सामगाम, खोमदुश्श, शिलावती, मेतलूप, उलुंप, सक्कर व देवदह हीं होत.

यांपैकीं शेवटचें गांव जें देवदह त्या ठिकाणीं बुद्धाच्या आईचा जन्म झाला. बुद्धाच्या आईच्या बापाचें नांव अंजनशाक्य असें स्पष्ट सांगितलेलें आहे. परंतु, बुद्धाची आई कोलियन कुळांतील होती, व देवदह (यांचेंच नांव त्याच्या नगरीस दिलेलें होतें) हाहि एक कोळी(कोलियन) सरदार होता असें सांगण्यांत येतें. याची संगति कोलियन ही शाक्य कुळाचीच एक पोटजात होती असें म्हणूनच लाविली पाहिजे. मातृवंशाच्या संबंधानें बुद्धाच्या आप्तवर्गांत मोडणारीं अशीं ८०,००० कुटुंबें होतीं व पितृवंशाकडूनहि आप्तवर्गांत मोडणारीं कुटुंबें तेवढींच होतीं असें बुद्धघोषापर्यंत चालत आलेल्या एका आख्यायिकेवरून दिसतें. तेव्हां, प्रत्येक कुटुंबांत लहानमोठीं ६७ माणसें धरलीं तरी शाक्य प्रदेशांत रहाणाऱ्या लोकांची संख्या दहा लक्षांपर्यंत जाते. ही संख्या जरी आख्यायिकारूपानें सांगितलेली आहे तरी वस्तुस्थिति फारशी भिन्न नसावी असें वाटतें.

**त्यांची शासनपद्धति.**— या कुलाचे राजकारणासंबंधाचे व न्यायप्रकरणाबद्दलचे सर्व व्यवहार संथागार नांवाच्या एका सभेमध्यें कपिलवस्तु गांवीं चालत असत, व अशा प्रसंगीं वृद्ध, तरुण सर्व लोक हजर असत.

शाक्य लोक आपला राजा निवडून नेमीत. ही निवडणूक कोणत्या पद्धतीनें होत असे, व निवडलेला अधिकारी आपल्या जागेवर किती दिवस असे हें समजण्यास मार्ग नाहीं. दरबार वगैरेच्या सभा भरत त्या वेळीं त्यांचें आधिपत्य हा स्वीकारीत असे; व ज्या वेळीं अशा सभा नसत त्या वेळीं हा कारभार चालवीत असे.

महावनांत न्यग्रोधारामामध्यें बुद्ध रहात असतांना कपिलवस्तु येथें एक नवीन सभागृह बांधण्यांत आलें. हा न्यग्रोधाराम कपिलवस्तूपासून फार दूर नव्हता. सर्व पंथांच्या भिक्षूंसाठीं येथें एक सार्वजनिक मठ होता. या नवीन सभागृहाचा प्रवेशसमारंभ गौतमाच्या हातून झाला. या समारंभाच्या वेळीं गौतमानें दिलेलीं वेदान्तपर व्याख्यानें आज उपलब्ध आहेत. त्यांमध्यें आनंद आणि मोग्गलान यांनीं दिलेलीं व्याख्यानेंहि आहेत.

अशींच आणखीहि कित्येक सभागृहें निरनिराळ्या गांवांत बांधण्यांत आलीं होतीं. या सभागृहांवर छायेसाठीं छपरें असत, परंतु यांच्या भोंवतालीं भिंती मात्र नव्हत्या. स्थानिक व्यवहाराबाबतच्या चर्चा लोकसभेपुढें एखाद्या वृक्षराजीमध्यें होत असत. पूर्वपश्चिम ५० मैल व हिमालयाच्या पायथ्यापासून दक्षिणेकडे ३० मैल एवढ्या प्रदेशांत शाक्य कुळांतले लोक रहात असत.

**त्यांची रहाणी.**—शाक्य कुलांतील लोकांची उपजीविका तांदुळावर व दूधदुभत्यावर होत असे. हे लोक ज्या खेड्यांतून रहात तीं खेडीं या तांदुळाच्या शेतांभोंवतीं पसरलेलीं असत, व यांचे गुरांचे कळप भोंवतालच्या रानांत चरत. ह्या भोंवतालच्या जंगलावर शाक्य लोकांपैकीं सर्वांची सारखीच मालकी असे. प्रत्येक गांवामध्यें लहान लहान कारागीर असत. हे बहुधा शाक्य नसावेतसें वाटतें. सुतार, लोहार, कुंभार, इत्यादिकांचीं निरनिराळीं गांवें होतीं. ब्राह्मणांचीं खेडीं निराळीं असत, व यांचा उपयोग प्रत्येक घरगुती बाबीमध्यें हरघडी होत असे. उदाहरणार्थ, खोमदुश्श हें एक ब्राह्मणांचें खेडें होतें. यावरून ब्राह्मण त्या वेळेस वर्गस्वरूप राहिले नसून जातिस्वरूप पावले होते हें उघड आहे. बाजारांत कांहीं कांहीं किरकोळ दुकानें वगैरे असत; परंतु शेजारच्या राज्यांतील मोठमोठ्या शहरांतल्याप्रमाणें येथें बडे व्यापारी किंवा पेढीवाले असल्याचें दिसत नाहीं. हीं खेडीं महावनांतील जंगलांत इतस्ततः पसरलेलीं होतीं. हें महावन पर्वताच्या पायथ्यापासून तों गंगातीरच्या प्रदेशापर्यंत पसरलेलें होतें. या सर्व कुळांचा शेजारच्या राजांनीं जेव्हां नाश केला, त्या वेळीं महावनांतील सर्व खेडीं लयास जाऊन तें पुन्हां एकच एक जंगल बनलें.

या जंगलांत चोर, दरोडेखोर, पळून आलेले गुलाम वगैरे लोक वेळोवेळीं येऊन रहात असत; परंतु खेड्यांपाड्यांतून दंगेधोपे झालेले मात्र कोठेंच ऐकूं येत नव्हते.

**त्यांची न्यायदानपद्धति.**—फौजदारी गुन्ह्यांबद्दल या लोकांत काय व्यवस्था होती याबद्दलची कल्पना एका परंपरेवरून करतां येते. वज्जि नांवाच्या कुलामध्यें एकापेक्षां एक असे वरचढ अधिकारी नेमिलेले असत. न्यायाधीश, कायदेपंडित, धर्मशास्त्रज्ञ, यांवर एक आठ कुलांच्या प्रतिनिधींचें मंडळ, त्यावर राज्याचा उपाध्यक्ष व अध्यक्ष अशी ही परंपरा होती. यांपैकीं प्रत्येक माणसाला गुन्हेगार इसम सोडून देण्याचा अधिकार होता; परंतु शिक्षा देण्याची पाळी आल्यास त्या माणसाचा कज्जा त्याला वरच्या अधिकाऱ्याकडे वर्ग करावा लागे, व शिक्षा देण्याचा अधिकार शेवटीं खुद्द अध्यक्षाच्या हातांत राही. या शिक्षा मागील दप्तराच्या दाखल्यांवरून सारासार विचारानें दिल्या जात. वज्जि कुलाखेरीज इतर कुलें अशा तऱ्हेचे न्यायदान करणारे अधिकारी ठरविण्याच्या खटाटोपांत पडलेलीं दिसत नाहींत; आणि खुद्द वज्जि कुळांत तरी या पद्धतीचा अवलंब कितपत केला जात असे याबद्दल शंका येते. परंतु, धर्मशास्त्रासंबंधाचे नियम व मागील माहितीचें दप्तर यांस अनुलक्षून केलेले उल्लेख दुसऱ्या ठिकाणीं सांपडतात, त्यांवरून या विषयासंबंधाच्या लेखी माहितीचा उपयोग केला जात असावा असें वाटतें.

**शाक्येतर कुलें.**—शाक्य कुलांखेरीज इतर कुलांचीं जीं नांवें सांपडतात तीं खालीं दिलीं आहेतः—

१ सुंसुमार पर्वतावरचे भग्ग.
२ अल्लकप येथील बली.
३ केसपुत्त येथील कालाम.
४ रामग्राम येथील कोलियन.
५ कुशिनार येथील मल्ल.
६ पावा येथील मल्ल.
७ पिप्पलीवन येथील मौर्य.
८ मिथिलेचे विदेह. } = वज्जि.
९ वैशाली येथील लिच्छवी. }

यांशिवायहि पुष्कळ जातींचीं नांवें सांपडतात; परंतु त्या एकत्र संघ करून रहात होत्या किंवा राजतंत्रानें चालत होत्या याबद्दल माहिती मिळत नाहीं. एकदां राजनियंत्रित पद्धतीखालीं असलेली जात मागून स्वतंत्र होऊं पहात असल्याचें एकच उदाहरण सांपडतें. ज्या ज्या ठिकाणीं राजसत्ता एकाच घराण्याकडे बराच काळ राहिली त्या त्या ठिकाणीं तिचें पर्यवसान अनियंत्रित एकमुखी राजसत्तेंत झालेलें आढळून येतें.

**हिंदुस्थानचे राजकीय विभाग.**—बुद्धाच्या धम्माच्या उदयाच्या वेळीं अगर त्याच्या कांहींसें अगोदर हिंदुस्थानचे राजकीय विभाग कोणते होते याची कल्पना तत्कालीन सोळा मोठ्या देशांची जी एक यादी प्रसिद्ध आहे तिजवरून येईल. या देशांचीं नांवें भूगोलविषयक परिस्थित्यनुरूप बसविलेलीं नसून त्या त्या ठिकाणच्या जातींच्या नांवांवर बसविलीं आहेत, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. यावरून ही याद ज्यांनीं तयार केली त्यांच्या काळांत जातींचें देशनामकारक महत्त्व अजीबात पुसून गेलें नव्हतें; इतकेंच नव्हे, तर देशाला नांव तो प्रदेश व्यापणाऱ्या मुख्य राष्ट्रजातीवरून पडणें ही क्रिया कार्य करीत होती. ही याद पुढें दिल्याप्रमाणें आहे.

( १ ) अंग, ( २ ) मगध, ( ३ ) कासी, ( ४ ) कोसल, ( ५ ) वज्जि, ( ६ ) मल्ल, ( ७ ) चेति, ( ८ ) वंश, ( ९ ) कुरु, ( १० ) पांचाल, ( ११ ) मत्स्य, ( १२ ) शूरसेन, ( १३ ) अस्सक, ( १४ ) अवंती, ( १५ ) गांधार व ( १६ ) कांबोज.

**अंग.**—अंग राजे मगधाच्या पूर्वेस रहात. यांची राजधानी चंपा ही असून ती अर्वाचीन भागलपूरच्या जवळ आहे. या देशाच्या चतुःसीमांविषयीं माहिती मिळत नाहीं. बुद्धाच्या वेळेस हें राज्य मगधाच्या मांडलिकत्वाखालीं होतें, व पुढें तें स्वतंत्र झाल्याचें कोठें आढळून येत नाहीं. तथापि पूर्वी एके काळीं हें स्वतंत्र होतें, व याच्या शेजारच्या राज्यांशीं लढायाहि होत असत अशाबद्दल आख्यायिका आहेत. बुद्धाच्या काळीं अंगराज हा केवळ एक श्रीमंत सरदार होता व एका ब्राह्मणाला त्यानें नेमणूक करून दिली होती, या पलीकडे त्याची कांहीं माहिती मिळत नाहीं.

**मगध.**—मगध राजे ज्या प्रदेशावर राज्य करीत होते तो प्रदेश म्हणजे सध्यांचा बहार प्रांत होय, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. याच्या चतुःसीमा बहुतकरून उत्तरेस गंगा नदी, पूर्वेस चंपा नदी, दक्षिणेस, विंध्य पर्वत व पश्चिमेस शोण नद या असाव्यात. बुद्धकालांत या मगध राज्यांत अंग राज्यांतल्या गांवांसटक ८०,००० गांवें होतीं, व याचा परीघ सुमारें २,३०० मैल होता.

**कासी.**—हे लोक म्हणजे अर्थातच काशी नगरीभोंवतालच्या प्रदेशांत वस्ती करून राहिलेले लोक होत. बुद्धकालीं हें राज्य राजकीय दृष्ट्या फारच खालावलेलें होतें; व त्याचा कोसलांच्या राज्यांत समावेश होत असे; हें राज्य या यादींत दिलें आहे ही गोष्ट ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाची आहे. कारण यावरून एका काळीं या राज्याला स्वतंत्र अस्तित्व होतें ही गोष्ट लोकांच्या मनांतून गेली नव्हती एवढें स्पष्ट दिसतें. पुढें जातककथांत याचा उल्लेख आहे, व तेथें याचा परीघ २,००० मैलांहून अधिक होता असें म्हटलें आहे. यावरूनहि हीच गोष्ट सिद्ध होते. परंतु या राज्याचें स्वातंत्र्य एकदां गेलें तें गेलेंच. याच्या चतुःसीमा माहीत नाहींत.

**कोसल.**—हे लोक ज्या प्रदेशांत राज्य करीत होते त्याची राजधानी श्रावस्ती ही होती. हाच प्रदेश अलीकडे नेपाळ या नांवानें प्रसिद्ध आहे. ही श्रावस्ती नगरी गोरखपूरच्या वायव्येस ७० मैलांवर होती. या राज्यामध्यें बनारस व साकेत यांचा समावेश होत असे. बहुधा गंगा नदी ही त्याची दक्षिण मर्यादा, गंडक ही पूर्व मर्यादा व हिमालय पर्वतांतील डोंगर ही उत्तर मर्यादा असावी. शाक्य लोकांनीं यांचें स्वातंत्र्य ख्रि. पू. ७ व्या शतकांतच कबूल केलें होतें.

कोसल राज्याची भरभराट व पुढें लगेच झालेलीं कोसल व मगध यांच्यामधील भांडणें, हा बुद्धकालीन राजकारणाचा एक प्रधान भाग होता. ह्या कंटक पहाडी लोकांनीं पर्वतांच्या रांगा व गंगा नदी यांच्या मधल्या प्रदेशांतले बहुतेक लोक आपल्या ताब्यांत आणिलेले होते. परंतु पूर्वेच्या बाजूस मात्र स्वतंत्र असे लोक रहात असल्यानें त्यांना तिकडे अनिरुद्ध संचार करतां आला नाहीं. हिंदुस्थानच्या सार्वभौम सत्तेबद्दल कोसल व मगध यांच्यामध्यें जी चुरस लागली होती, तिचा लिच्छवी हें बलाढ्य कुल मगधाच्या बाजूस मिळाल्यानें बहुतांशीं निकाल लागलाच होता. वंक, दब्भसेन, कंस वगैरे राजांच्या नेतृत्वाखालीं कोसलांनीं काशी लोकांवर केलेल्या स्वाऱ्या बुद्धकालापूर्वीच्या आहेत असा उल्लेख आहे.

**वज्जि.**—यांचा एक आठ कुलांचा संघ होता. या कुलांपैकीं लिच्छवी आणि विदेह हीं दोन कुलें मोठीं व महत्त्वाचीं होतीं. विदेह देशांत पुरातन काळीं राजसत्तात्मक शासनपद्धति प्रचलित होती असें जरी परंपरागत आख्यायिकांवरून दिसतें, तरी बुद्धकालांत हें राज्य प्रजासत्तात्मकच होतें. ह्या गोष्टीवरून बराच बोध होण्यासारखा आहे. स्वतंत्र राज्य या दृष्टीनें याचें क्षेत्रफळ वगैरे २३०० मैल असल्याचें लिहिलें आहे. याची राजधानी मिथिला ही लिच्छवींची राजधानी जी वैशाली तिजपासून वायव्येकडे सुमारें ३५ मैलांवर होती. याच ठिकाणीं, बुद्धधम्माचा उदय होण्याच्या पूर्वी प्रख्यात जनक राजा राज्य करीत होता. सध्यां जनकपूर म्हणून जें गांव आहे त्यास याच जनक राजावरून नांव मिळालें असावें असें दिसतें. हा राजा क्षत्रिय असून एक विद्वान् तत्त्ववेत्ता होता.

**मल्ल.**—कुशिनार व पावा येथील मल्ल हीं दोन्ही स्वतंत्र कुलें होतीं. वज्जि लोकांचा जो कुलसंघ होता, त्याच्या उत्तरेस व शाक्य लोकांच्या पूर्वेस पर्वताच्या पायथ्याशीं या लोकांचा प्रदेश होता अशी माहिती चिनी प्रवाशांच्या लेखांवरून मिळते. कांहीं लोक हा प्रदेश शाक्यांच्या दक्षिणेस व वज्जि लोकांच्या पूर्वेस होता असें मानितात.

**चेति.**—हे लोक बहुधा पूर्वी ज्यांना चेदि असें नांव आढळतें तेच असावेत. यांच्या दोन निरनिराळ्या वसाहती होत्या. एक सध्यां ज्याला आपण नेपाळ म्हणतों तेथेंच पहा-

डांत, व दुसरी कौशाम्बीजवळच पूर्वेच्या बाजूस. यांपैकीं पहिली पुरातन असावी.

**वच्छ.**—वंश हा वच्च लोकांचा देश होय. या देशांतील ठळक शहर म्हणजे कौशाम्बी हें होय. हें बहुधा येथील राजधानीचें नांव असावें. हा देश अवंती नगरीच्या उत्तरेलगतच्या प्रदेशांत यमुनेच्या कांठाकांठानें वसलेला होता.

**कुरु.**—कुरु देशाची राजधानी हल्लींच्या दिल्लीजवळ असलेलें इन्द्रप्रस्थ शहर हीं होय. याच्या पूर्वेस पांचाल लोकांची वस्ती होती, व दक्षिणेस मत्स्य लोकांची वस्ती होती. परंपरागत आख्यायिकांवरून याचा परीघ २००० मैल असावा असें दिसतें. बुद्धकालांत या लोकांनां राजकीय दृष्ट्या फारच थोडें महत्त्व असावेंसें दिसतें. कुरु देशांतील कम्मासधम्म या ठिकाणीं महत्त्वाचीं अशीं बरींच सुत्तें सांगितलीं गेलीं. त्यांपैकीं महासति पट्टान व महानिदान हीं प्रमुख होत. रट्ठपाल हाहि एक कौरव संस्थानिक होता.

**पांचाल.**—पांचालांच्या दोन जातींनीं कुरु देशाच्या पूर्वेस पर्वतराजि आणि यमुनानदी यांच्यामधला प्रदेश व्यापिलेला होता. कांपिल्ल आणि कनोज या त्यांच्या अनुक्रमें राजधान्या होत.

**मत्स्य.**—मत्स्य देश यमुना नदीच्या पश्चिमेस व कुरु देशाच्या दक्षिणेस वसलेला होता. यमुना नदी ही मत्स्य देश व दक्षिण पांचाल यांमधील मर्यादा होती.

**शूरसेन.**—या लोकांची राजधानी मधुरा(मथुरा?)हीं होती. हें राज्य मत्स्यांच्या नैर्ऋत्येस व यमुनेच्या पश्चिमेस होतें.

**अस्सक-[अश्मक ?].**—बौद्ध कालांत अस्सक ह्या लोकांची गोदावरीच्या कांठीं एक वसाहत होती. यांची राजधानी पोतन किंवा पोटली ही होय. मगध राज्याबरोबर जसा अंगांचा उल्लेख केला जातो तसाच अवंतीबरोबर ह्या अस्सक लोकांचा उल्लेख आढळतो. या यादीमध्यें ह्या देशाला शूरसेन व अवंती या देशांमध्यें जें स्थान दिलें आहे, त्यावरून ही यादी तयार केली गेली त्या वेळीं हा प्रांत अवंतीच्या वायव्येसच असावासें वाटतें. हें विधान ग्राह्य मानिलें तर गोदावरीकांटची वसाहत मागाहून झाली असली पाहिजे; आणि पोतन किंवा पोटली या गांवाचा उल्लेख तेथें नाहीं यावरून या म्हणण्यास बळकटी येते. या लोकांच्या नांवाबद्दलहि बराच संशय आहे. संस्कृत ग्रंथकार अश्मक व अश्वक या दोघांचाहि उल्लेख करतात. या दोन्ही शब्दांचें स्थानिक भाषेमध्यें आणि पाली भाषेमध्यें अस्सक असें रूपांतर होऊं शकतें. तेव्हां एक तर या लोकांच्या दोन जाती होत्या असें मानिलें पाहिजे. अगर या शब्दाला संस्कृत रूप देतांना चूक झाली असून अश्मक हें संस्कृत रूप बरोबर नाहीं असें म्हटलें पाहिजे.

**अवंती.**—अवंतीची राजधानी उज्जयिनी येथें चंडप्रद्योत नांवाचा राजा राज्य करीत होता. या देशाचा बराच भाग सुपीक आहे. सिंधु नदीच्या खोऱ्यांतून खालीं उतरलेल्या व कच्छच्या आखातापासून पूर्वेकडे वळलेल्या आर्य लोकांनीं येथें वस्ती केली होती. इसवी सनाच्या दुसऱ्या शतकापर्यंत तरी या प्रांताला अवंती म्हणत असत, व सातव्या किंवा आठव्या शतकापासून याला मालव म्हणूं लागले.

**गांधार.**—गांधार (म्हणजे आजचा कंदाहार) हा पूर्व अफगाणिस्थानचा एक भाग असून यांत बहुतकरून पंजाबच्या वायव्येकडील भागाचा समावेश होत होता. याची राजधानी तक्षशिला ही होय. बौद्ध कालांत गांधार देशाचा राजा पुक्कुसाति यानें मगध देशाचा राजा बिंबिसार याजकडे एक पत्र व वकील पाठविला होता.

**काम्बोज.**—हा देश वायव्येकडे अगदीं कडेला असून याची राजधानी द्वारका (?) ही होती.

राजकारणाच्या दृष्टीनें पाहूं गेल्यास ही याद जरा चमत्कारिक वाटते. शिबि, मद्र, सोवीर, उद्यान व विराट यांचीं नांवें यावयास पाहिजे होतीं तीं दिसत नाहींत. बौद्ध कालाच्या आरंभीं आरंभीं मल्ल व चेति यांनां जें कांहीं महत्त्व होतें त्याच्यापेक्षां या ठिकाणीं बरेंच वाढलेलें दिसतें. वैशाली हें मगधाच्या ताब्यांत जाण्याच्या रंगास आलेलें राज्य हींत स्वतंत्र म्हणून दिलें आहे. अंग व काशी या दोन राज्यांचा शेजारच्या राज्यांत समावेश झालेला असतांना, तीं दोन स्वतंत्र व एकाच दर्जाचीं राज्यें आहेत असें मानिलें आहे. तेव्हां या कालापूर्वीच्या स्थितीची निदर्शक अशी ही एक जुनी यादी असून ती बौद्ध परंपरेंत चालत आलेली असावी एवढें यावरून सिद्ध होतें. असें जरी असलें तरी या यादीचें महत्त्व कमी होत नसून उलट जास्तच वाढतें.

भूगोलाच्या दृष्टीनें सुद्धां या यादीचें महत्त्व बरेंच आहे. अवंतीच्या दक्षिणेस २३ अंशांपर्यंत एकाहि स्थलाचा उल्लेख हींत नाहीं; व दक्षिणेच्या बाजूस येथपर्यंत तरी या यादीनें एकदांच मजल नेलेली दिसते. दक्षिण हिंदुस्थान व सिलोन यांचा उल्लेख सुद्धां हींत नाहीं. इतकेंच नव्हे तर गंगा नदीच्या पूर्वेचा बंगालचा भाग व ओरिसा किंवा दक्षिण होहि भाग हींतून वगळले आहेत. उत्तरेकडे हिमालय व दक्षिणेकडे विंध्य, यांमधल्या प्रदेशांखेरीज दुसरीकडे ही यादी करणाऱ्याची नजर गेलेली दिसत नाहीं. याला वर सांगितलेला एकच कायतो अपवाद आहे. तसेंच पश्चिमेस सिंधु नदीच्या पलीकडील पर्वतांची रांग व पूर्वेस गंगा नदी जेथें दक्षिणेकडे वळते तो प्रदेश, यापलीकडेहि दुसऱ्या प्रांताकडे त्याची नजर गेलेली नाहीं.

**महाराष्ट्राचें बुद्धकालीं स्वरूप.**—दक्षिणापथ हें नांव अत्यंत प्राचीन बौद्ध ग्रंथांत (सुत्तनिपात ९७६) एकाच ठिकाणीं आढळतें व तेथें तरी तें सबंध दक्षिणप्रांताला लावलेलें असावें असें दिसत नाहीं. गोदावरीच्या तीरावर जी एक वसाहत वसलेली होती तिला अनुलक्षून या ठिकाणीं या पदाचा उपयोग केलेला आहे. चार निकायांपैकीं कोणत्याहि निकायांत याचा उल्लेख नाहीं.

पुढें विनयामध्यें याचा उल्लेख सांपडतो त्याहि ठिकाणीं वरील प्रांताला अनुलक्षून तो उल्लेख आहे; व तो अगदीं पुसट रीतीनें आहे.

दक्षिणापथ याचा अर्थ दक्षिणेकडील रस्ता असा असून हें नांव एका वसलेल्या प्रदेशास लावण्यांत यावें हें चमत्कारिक दिसतें. ऋग्वेदाच्या एका सूक्तांत एक हद्दपार झालेला मनुष्य दक्षिणेच्या मार्गानें जात आहे असें वर्णन आहे (१०. ६१, ८). दक्षिणेकडचें बौद्ध ग्रंथांत आढळणारें सर्वांत दूरचें गांव म्हणजे पतिथ्थान (प्रतिष्ठान, पैठण) हें होय. आणि दक्षिणेच्या बाजूस पण्णुख्या म्हणजे २० अंशांवर गोदावरीच्या कांठीं असलेल्या एका मठापर्यंत यांची मजल गेलेली होती.

दक्षिणेंत झालेल्या या प्रसाराखेरीज समुद्रप्रवासाचेंहि वर्णन निकायांमधून आढळतें. कलिंगारण्य आणि समुद्रकिनाऱ्यावरील वस्ती यांचाहि उल्लेख आहे. कलिंगांची राजधानी दन्तपूर होती असेंहि सांगितलें आहे. विनयामध्यें बहुतकरून भरुकच्छाला अनुलक्षून उल्लेख असावा असें वाटतें (३.३८). तसेंच उदानामध्यें सुपाकराचा (सोपाराचा) उल्लेख असावा असें वाटतें (उदान- १. १०). ह्या सर्व गोष्टी एकत्र केल्या तर तत्कालीन लोकांचें भूगोलविषयक ज्ञान बरेंच वाढलेलें होतें असें दिसून येतें. परंतु रामायणांत ज्याचा संबंध अतिशय आलेला आहे अशा दक्षिणेकडच्या भागाचा व सिलोनचा उल्लेखहि यांत नाहीं ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

ह्या भूगोलविषयक परिस्थितीच्या ज्ञानाचा उपयोग वैदिक वाङ्मयाचा शेवटचा भाग व संस्कृत वाङ्मयाचा आरंभींचा भाग यांच्या इतिहासाच्या दृष्टीनें बराच महत्त्वाचा आहे. 'गुप्त' कालामध्यें ब्राह्मण वाङ्मयाची सरसहा पुनर्रचना होत होती अशाबद्दल डॉ. भांडारकरांचीं जीं कांहीं मतें आहेत त्यांनां यामुळें बरीच बळकटी येते. आपस्तंब व हिरण्यकेशी यांचे ग्रंथ गोदावरीच्या खालीं दक्षिणेकडे लिहिले गेले हें बुहूलरचें म्हणणें खरें असेल तर, हे ग्रंथ प्रस्तुत ग्रंथांपेक्षा अर्वाचीन आहेत असें म्हटलें पाहिजे.

**संस्कृतीच्या व लोकांच्या प्रसाराचा मार्ग.**—याचा विचार करण्यापूर्वी एका समजुतीसंबंधानें विचार केला पाहिजे. कारण ही समजूत सर्वसाधारण असून वस्तुस्थितीशीं तिचा मेळ बसत नाहीं. लोकांच्या प्रसाराचा मार्ग यमुना व गंगा यांच्या खोऱ्यांमधून होता अशी साधारण समजूत आहे. पण वस्तुस्थिति तशी असावी असें दिसत नाहीं. यापलीकडे दोन शाखा— एक सिंधुनदाच्या खालून, कच्छच्या आखाताला वळसा घालून अवंतीपर्यंत पोंचलेली व दुसरी काश्मीरपासून पर्वतांच्या पायथ्यापायथ्यानें कोसलाच्या मार्गानें शाक्य देशापर्यंत व तेथून तिऱ्हूतमधून मगध व अंग येथपर्यंत गेलेली—अशा मानिल्या पाहिजेत. आजपर्यंत उपलब्ध असलेल्या पुराव्याहून बराचसा अधिक पुरावा, हिंदुस्थानांत निरनिराळ्या राष्ट्रजातींचें जें परिभ्रमण झालें त्याबाबतींत, उपलब्ध होण्यासारखा आहे. उदाहरणार्थ, ग्रियरसननें एक महत्त्वाची गोष्ट लोकांच्या नजरेस आणिली आहे. ती ही कीं, राजस्थानांत बोलल्या जाणाऱ्या ज्या भाषा आहेत त्या भाषा, व हिमालयाच्या बाजूनें नेपाळांतच नव्हे तर पश्चिमेच्या बाजूस चंबापर्यंत बोलल्या जाणाऱ्या ज्या भाषा यांत बरेंच साम्य आहे. यावरून असें म्हणतां येईल कीं, या दोन्ही लोकांचे पूर्वज एके काळीं एकत्र नांदत असून तेथून त्यांनीं अनुक्रमें पूर्वेस व दक्षिणेस परिभ्रमण करण्यास सुरुवात केली असावी. दोघेहि पंजाबच्या उत्तरभागांतून निघाले आणि त्यांपैकीं एकानेंहि गंगेच्या मार्गाचा अवलंब केला नाहीं.

**सिलोनमधील वसाहतीचा काळ.**—या भूगोलविषयक पुराव्यावरून जिच्यावर बराच प्रकाश पडतो अशी महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे सिलोन येथील वसाहतीचा काल ही होय. या वसाहती निकाय लिहिले गेले त्याच्या फार काळ पूर्वी वसविल्या गेल्या असाव्यात असें वाटत नाहीं. अशोकाच्या वेळेस या वसाहती बऱ्याच नांवारूपास आल्या होत्या. यावरून निकायकाल व अशोककाल यांच्यामध्यें केव्हां तरी या वसाहती वसल्या गेल्या असें दिसतें. हा काळ बहुधा निकायकालाच्या जवळचा असावा. सिलोनमधील पहिली वसाहत बुद्धाच्या मरणाच्या वर्षीच वसली गेली असें जें सिलोनच्या हकीकतींत दिलेलें आहे तें चुकीचें असलें पाहिजे. उत्तर हिंदुस्थानांत खिस्ती शकापूर्वी सातव्या शतकांत किती वस्ती होती याच्या माहितीवरून बऱ्याच गोष्टींचा उलगडा होण्यासारखा आहे.

**प्राचीन शहरें व त्यांचा स्थाननिश्चय.**—इसवी सनापूर्वी सातव्या शतकांत हिंदुस्थानांत मुख्य शहरें कोणतीं कोणतीं होतीं त्यांची यादी येणेंप्रमाणें: (१) अयोध्या, (२) वाराणसी, (३) चंपा, (४) कांपिल्ल, (५) कौशाम्बी, (६) मथुरा, (७) मिथिला, (८) राजगृह, (९) रोरुक, (१०) सागल, (११) साकेत, (१२) उज्जयिनी व (१३) वैशाली.

चंपा.—याची जागा भागलपूरच्या पूर्वेस २४ मैलांवर त्याच नांवाचीं खेडीं आज सांपडतात, तीच असावी असें कनिंगहॅम यानें दाखविलें आहे. कोचीनचीनमधल्या हिंदी वसाहतवाल्यांनीं आपल्या एका नगरास त्याचें नांव दिलें आहे.

कांपिल्ल.—या नगराची जागा अद्याप निश्चित झालेली नाहीं.

राजगृह.—हें अलीकडील राजगीर होय. गिरिव्रज व राजगीर येथील तटबंदी अद्यापि शाबूत असून त्यांचा परीघ अनुक्रमें ४॥ व ३ मैल आहे. गिरिव्रजाच्या दगडी भिंती हें हिंदुस्थानांतील सर्वांत जुनें दगडी काम होय.

रो रु क.–किंवा रोरुव. ही सोवीराची राजधानी होय. सॉलोमनचीं गलबतें ज्या बंदरास लागत असत असें हिब्रू लोकांच्या इतिहासावरून कळतें, तें बंदर हेंच असावें असें पुराव्यावरून दिसतें. कारण, पॅलेस्टाइनमध्यें येथून जो माल जात असे त्या जिनसांचीं म्हणजे हस्तिदंत वगैरेंचीं नांवें हिंदीच आहेत. त्याचा स्थलनिर्देश नक्की करतां येत नाहीं; परंतु आजच्या खारागोण्याच्या जवळपास कच्छच्या आखातावर वसलेलें हें शहर असावें असें बहुतेक वाटतें.

सा के त.—याचा स्थलनिश्चय झालेला आहे. सुजानकोट येथें जे पुराणवस्तूंचे अवशेष सांपडतात तेथें हें वसलेलें असावें. आधुनिक अयोध्या प्रांतांत उणाऊमध्यें साइ नदीच्या कांठीं हें सुजानकोट आहे. येथील अंजनवनांत बुद्धकालीन बरींच सुत्तें लिहिलीं गेलीं.

**ग्रामव्यवस्था.**—भूगोलविषयक परिस्थितीप्रमाणेंच आर्थिक परिस्थिति व समाजांतील संस्था यांच्या हिंदी लोकांच्या आयुष्याला वळण देण्याला कारण झाल्या. हिंदी समाजाची रचना ही ग्रामपंचायतीच्या पायावर केलेली होती. लोक एकटे लांबलांब निरनिराळीं घरें बांधून रहात असत असें दिसत नाहीं. प्रत्येक घरवाल्याचीं गुरें निरनिराळीं असत, परंतु त्यांनां चरण्यासाठीं प्रत्येकाचीं खासगी मालकीचीं अशीं निराळीं कुरणें नव्हतीं. पीक काढून घेतल्यावर गुरें सर्व शेतांतून हिंडत. जमिनींत पीक उभें असे त्या वेळीं, सर्व लोकांचीं गुरें एकत्र करून एका गुराख्याबरोबर चराईसाठीं राखलेल्या कुरणांत पाठविलीं जात. जातककथा १. १९४ यांत गुराख्याचें वर्णन आहे, त्यावरून याला त्या वेळीं बरेंच महत्त्व होतेसें दिसतें. सर्व शेतांची लागवड एकाच काळीं होत असे, व त्यांनां पाणी देण्याची व्यवस्था पाट काढून केलेली असे. प्रत्येक शेताला कुंपण घालण्याची त्या वेळीं जरूर नव्हती. सर्व शेतांभोंवतीं एकच कुंपण घातलेलें असे.

**भूमिनियमन.**—पीक निघण्याजोगी सर्व जागा एकत्र करून ती सर्व कुटुंबांत वांटीत. प्रत्येक कुटुंबानें आपल्या वांट्यांतील उत्पन्न घ्यावयाचें. परंतु या वांट्यावर त्याला खासगी रीतीनें मालकी हक्क मात्र नसे. या वांट्यांपैकीं कोणताहि वांटा एखाद्यानें त्रयस्थाला विकला अगर त्याजकडे गहाण टाकला असें घडून आल्याचीं उदाहरणें मुळींच नाहींत. किंबहुना, पंचायतीच्या सल्ल्याशिवाय त्याला असें करतां येत नसे. हे वांटे कोणाहि इसमास देणगी म्हणूनहि देऊन टाकतां येत नसत. इतकेंच नव्हे, तर मालकाला आपल्या जमिनीची स्वतःच्या कुटुंबांत देखील वांटणी करून देण्याचा अखत्यार नसे. न्याय्यान्याय्य गोष्टींचा निर्णय रूढीवर अगर पंचायतीच्या इच्छेवर असे. वडील मुलाचे विशेष हक्क त्या वेळींहि मानले जात नव्हते. कुटुंबांतला कर्ता पुरुष वारला म्हणजे त्याच्या सर्वांत वडील मुलानें पूर्ववत् कारभार चालवावा. जर वांटण्या करून देण्याचा प्रसंग आलाच तर सर्व मुलांनां सारखा हिस्सा मिळत असे. स्त्रियांचें खासगी मालकीचें धन म्हणजे जडजवाहीर व कापड हेंच मुख्यतः असे. त्यांनां जमिनीचा स्वतंत्र वांटा देण्याची जरूर नव्हती. गुरचराईसाठीं असलेल्या समायिक कुरणापैकीं कोणत्याहि भागाची खरेदी अगर विक्री एखाद्या व्यक्तीला करतां येत नसे; किंवा वारसा हक्काच्या योगानें त्याच्यावर अनियंत्रित स्वामित्वाचा हक्कहि कोणास मिळत नसे. या प्रांतांत, दुष्काळ वारंवार पडत, त्यानें या लोकांच्या एकंदर सुखमय स्थितीमध्यें थोडेंसें वैगुण्य आलें होतें. मिगॅस्थिनीझ यानें पाट, कालवे वगैरेंच्या योगानें या लोकांनां दुष्काळ मुळींच माहीत नव्हता असें म्हटलें आहे; परंतु येथें वारंवार दुष्काळ पडत याजबद्दल पुरावा सांपडतो. पाटणा म्हणजे ज्या ठिकाणीं मिगॅस्थिनीझ रहात असे त्या ठिकाणीं, व त्यांच्या भोंवतालच्या प्रदेशांत दुष्काळ पडल्याचीं उदाहरणें वारंवार सांपडतात. परंतु मिगॅस्थिनीझचा काळ व हा काळ यांच्यामध्यें जवळ जवळ दोन शतकांचें अंतर असल्यानें, मध्यंतरीं यांची स्थिति सुधारली असावी असें म्हणावयास जागा आहे.

अशा प्रकारच्या आर्थिक परिस्थितींत या लोकांपैकीं शेंकडा ७०-८० लोक रहात असत. हे लोक खेड्यांतून रहात खरे; परंतु आजच्या खेडेगांवांतील लोकांपेक्षां यांचा दर्जा बराच श्रेष्ठ ठरेल. मोल घेऊन टाकभाड्याचें काम करणें हीं त्यांनां मानहानि वाटत असे. स्वतःच्या जातीचा, कुलाचा व खेड्याचा त्यांनां अभिमान असे. आपआपल्या चालींप्रमाणें हे आपला राजा निवडून नेमीत असावेसें वाटतें.

**वर्णव्यवस्था.**—जगांत सर्वच राष्ट्रांतील अगदीं जुन्या लोकांमध्यें रोटीव्यवहार व बेटीव्यवहार यांसंबंधानें कांहीं निर्बंध असावे असें दिसतें. कोठें कोठें हे निर्बंध शिथिल असत, तरी पण प्रत्येक जातींत अशा तऱ्हेचे कांहींना कांहीं तरी निर्बंध होतेच. ख्रिस्ती शकापूर्वी ७ व्या शतकामध्यें हिंदुस्थानांतहि हे निर्बंध निरनिराळ्या जातींमध्यें निरनिराळ्या स्वरूपांत होते.

समाजांतले भेदाभेद बहुधा नात्यागोत्याच्या संबंधावरच अवलंबून असत, किंवा वर्गभेदावर अवलंबून असत. चार वर्गांची म्हणजे चातुर्वर्ण्याची कल्पना कशी तयार होत गेली याचा वेदकालीन इतिहास मागें दिलाच आहे. बुद्धाची चळवळ म्हणजे त्या संस्थेचा जरा अधिक पुढील काळांतील इतिहास होय.

बौद्ध ग्रंथांत नेहमीं अट्टहासपूर्वक असा सिद्धांत मांडला असतो कीं, सर्वांत उच्च दर्जाची जात म्हणजे क्षत्रिय. पितृवंशाकडून व मातृवंशाकडून सात सात पिढ्यांपर्यंत आपला वंश शुद्ध असला पाहिजे अशाविषयीं त्यांचा मोठा कटाक्ष असे. बौद्धांच्या दृष्टीनें यानंतरची जात म्हणजे ब्राह्मण. हे यज्ञकर्में करणाऱ्या ऋत्विजांचे वंशज होत. याखालची पायरी म्हणजे वैश्य लोक; व शेवटची पायरी, म्हणजे शूद्र. यांशिवाय हीनजातीय म्हणून कित्येक किरकोळ वर्गांचा

उल्लेख केला जातो त्या जाती निराळ्याच आहेत. हीन-जातीयांत गाड्या तयार करणारे, लव्हाळ्यांच्या वगैरे दोऱ्या करणारे, पक्षी मारणारे, असे पुष्कळ लोक असत. हीन सिप्पानि म्हणून ज्यांचा उल्लेख केला जातो, त्यांमध्यें चटया करणारे, न्हावी, कुंभार, कोष्टी, चांभार, वगैरे लोक असत. परंतु जन्मसिद्ध जातीवरून अमकाच धंदा अमुक माणसाचा असा निर्बंध असल्याचें दिसत नाहीं. यांपैकीं कोणताहि धंदा कोणीहि करीत. उदाहरणार्थ, जातककथा. ५. २९० यामध्यें एका प्रेमानें वेडावलेल्या क्षत्रियानें कुंभार, बुरूड, माळी व स्वैपाकी असे धंदे स्वीकारल्याचें सांगितलें आहे. तसेंच जातक कथा ६. ३७२ यांत शिंपी व कुंभार हे धंदे एका श्रेष्ठीनें केल्याचें सांगून, त्यामुळें त्याच्या सामाजिक दर्जांत कोणताहि फरक झाला नाहीं असें सांगितलें आहे. यांशिवाय, अत्यंत हीन मानलेले असे चांडाल व पुक्कुस नांवाचे लोक होते असा उल्लेख जैन व बौद्ध वाङ्मयांत सांपडतो. हे लोक स्वतंत्र नागरिक असून याखेरीज गुलाम लोकहि यांच्यांत होते. न्यायाधिशानें दिलेल्या शिक्षेमुळें कित्येक गुलाम बनत, तर कित्येक आपण होऊन गुलामगिरी पतकरीत. लढाईंत पकडून आणलेले कैदी लोक गुलामच समजले जात, व यांची संततीहि पण गुलामच गणली जात असे. गुलामांना धरगुती नोकरांप्रमाणें वागविलें जात असे व ते अल्पसंख्याक असावे असें वाटतें. चातुर्वर्ण्यविषयक सामाजिक स्थानांत गुलामगिरीमुळें फरक पडत होता असें दिसत नाहीं. गुलाम म्हणजे शूद्र असें नाहीं.

कोणत्याहि माणसाला आपला सामाजिक दर्जा बदलतां येत असे असा पुरावा आहे. याबद्दल जर्नल ऑफ दि रॉयल एशिआटिक सोसायटीच्या १९०९ च्या पुस्तकामध्यें ८६८ व्या पृष्ठावर खालील उल्लेख दिले आहेत:— (१) एका क्षत्रिय सरदारानें कांहीं प्रेमसंबंधामुळें कुंभार, बुरूड, माळी, स्वैपाकी, असे धंदे अनुक्रमें स्वीकारले होते. (२) दुसऱ्या एका राजपुत्रानें राज्यासंबंधाचा आपला सर्व हक्क बहिणीस दिला व तो व्यापारी बनला. (३) तिसरा एक क्षत्रिय राजपुत्र एका व्यापाऱ्याकडे राहून स्वतःच्या कष्टानें पोटाला मिळवीत होता. (४) चवथ्या एकानें तिरंदाजाची पगारी नोकरी पतकरिली. (५) एका ब्राह्मणानें दानधर्माकरितां पैसे मिळावे म्हणून व्यापार केला. (६) दुसरे दोन ब्राह्मण वरच्यासारखी सबबहि न सांगतां व्यापारावर उपजीविका करीत होते. (७) एका ब्राह्मणानें एका तिरंदाजाच्या हाताखालीं नोकरी पतकरली. हा तिरंदाजहि पूर्वी एक कोष्टी होता. (८–९) ब्राह्मण शिकारी व फांसेपारधी हे धंदे पतकरीत असत. (१०) एक ब्राह्मण चाकें तयार करण्याचा धंदा करी. ब्राह्मण लोक शेतकीसंबंधाचीं कामें करीत व गुराख्यांचें व धनगरांचेंहि काम पैशाकरितां पतकरीत अशाबद्दलचे दाखले सांपडतात

वरील प्रकारचीं उदाहरणें देऊन ऱ्हीस डेव्हिड्ससारखे संशोधक त्या काळांत जातिभेद कठोर झाला नव्हता असें सिद्ध करूं पाहतात. रमेशचंद्र दत्तांसारखे लेखक शिंगें मोडून वासरांत शिरणाऱ्या गाईप्रमाणें जातिभेद दृढ झाला नव्हता असले सिद्धांत काढतात. खरें पहातां असल्या तऱ्हेच्या उल्लेखांवरून जातिभेद पक्का झाला असून समाजव्यवस्था आजच्यासारखीच असावी असें सिद्ध होतें. जेव्हां व्यक्ति समुच्चयविशिष्ट धंदा सोडून समुच्चयाच्या स्वरूपाशीं विसंगत धंदा पतकरील व आपल्या समुच्चयांतील स्थान गमावणार नाहीं तेव्हां तो समुच्चय वर्ग राहिला नसून जातिस्वरूप झाला होता असें समजावें. संकरविवाहाच्या संततीचा दर्जाहि जातककथांत क्षत्रिय किंवा ब्राह्मण यांच्या बरोबरीचा होता असें दिसतें.

त्या लोकांत सहभोजनें होत असत किंवा नसत, याबद्दल ग्रंथांतरीं फारच थोडे दाखले सांपडतात. ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्यामध्यें अन्नव्यवहार झाल्याचीं उदाहरणें आहेत. चांडाळाचें अन्न भक्षण करून मागाहून पश्चात्ताप पावणाऱ्या ब्राह्मणांचीं उदाहरणेंहि आहेत. म्हणजे जातिभेद भोजनादि बाबतींत दृढ होत चालला होता असें दिसतें. पसेनदि राजाला दिलेल्या शाक्य कुळांतील कन्येच्या विवाहाचा प्रसंग क्षत्रिय-जातीचा मनुष्य दासीकन्येबरोबर—मग ती स्वतःच्या पोटची कन्या असली तरी—अन्नव्यवहार करीत नाहीं यावरच बसविलेला आहे. हे निर्बंध मोडल्याबद्दल शिक्षा झाल्याचींहि उदाहरणें आहेत. जातककथा ४.३८८ यांत ब्राह्मणांनीं एका ब्राह्मणाचें ब्राह्मणत्व चांडाळाच्या हातची पेज पडलेलें पाणी प्याल्यामुळें काढून घेतल्याचें सांगितलें आहे. तसेंच बुद्धसंवादांमध्यें, एका ब्राह्मणास कांहीं एका अपराधावरून क्षौर करावयास लावून अंगावर राख टाकून मारण्यांत आलें, व हद्दपार करण्यांत आलें असें सांगितलें आहे [ बुद्धाचे संवाद १. १२० ]. येथील या संवादाचा भाग पाहिला म्हणजे त्यांत बौद्धसांप्रदायिक कल्पना बऱ्याच असाव्या असें दिसतें. तरी पण हे संवाद लिहिले गेले त्या काळांत, असले आचारविचार व असला कुळाभिमान राष्ट्रांतील लोकांच्या मनोधर्माचें एक प्रधान अंग होता असें म्हणावयास हरकत नाहीं.

या लोकांत अनुलोमप्रतिलोम विवाह होत असत अशाबद्दल ग्रंथांतरीं दाखले सांपडतात. परंतु या पुराव्याच्या अभावीं देखील या बाबतींत काय प्रकार चालत असावा याचें वस्तुस्थितीवरून अनुमान करतां येण्यासारखें आहे. विवाहासंबंधाच्या तात्विक निर्बंधांस न जुमानतां इंग्लंडांत ज्याप्रमाणें इबेरिअन, केल्ट्स, आंग्ल, सॅक्सन, डेन्स, नॉर्मन वगैरे लोकांत संकर झाला, त्याचप्रमाणें उत्तर हिंदुस्थानांतील जातींचाहि बुद्धपंथाच्या उदयाच्या वेळीं संकर झाला असावा. वर्णांचें निरनिराळें अस्तित्व कोणी मानीत नसावे. वर्णांची कल्पना उदय पावण्याच्या अगोदरच जातींजातींतलें अंतर

नष्ट होऊन त्यांच्यांतील भेदाची कल्पनाहि नष्ट होण्याइतका संकर झाला होता, अशी कल्पना ऱ्हीस डेव्हिड्स यांनी व्यक्त केली आहे. तीविरुद्ध पुरावा त्यांनींच दिला आहे म्हणून ती येथें खोडीत बसण्याचें कारण नाहीं. संशोधकाची इच्छा व त्याचें ज्ञान यांत उत्पन्न झालेल्या द्वैताचें हें एक उदाहरण आहे म्हणून तिकडे दुर्लक्ष करावें.

वर्णभेद आणि जातिभेद हे दोन निरनिराळे आहेत. आजचा जातिभेद कसा उत्पन्न झाला हें समजण्यास, वर्ण-कल्पनेचा इतिहास व त्यांतील रोटीव्यवहार व बेटीव्यवहार यांच्याबद्दलचे नियम हें एक साधन असेल, व तें तसें आहेहि; परंतु वर्णभेद म्हणजे जातिभेद नव्हे. वर्ण या शब्दाचा जात या अर्थानें करण्यांत आलेला उपयोग चुकीचा आहे.

**बौद्धकालीन शहरें.**—बौद्धकालीन शहरांच्या बाह्य देखाव्याचें वर्णन केलेलें कोठेंहि सांपडूं नये, ही खेदाची गोष्ट होय. उंच उंच भिंती, मजबूत तट, पहारेवाल्यांचे बुरूज, मोठमोठ्या वेशी, व या सर्वांच्या भोंवतीं एक खंदक, कित्येक ठिकाणीं एक पाण्याचा व एक चिखलाचा असे दोन खंदक, असलीं वर्णनें सांपडतात. इसवी सनापूर्वीच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या शतकांतील सांची येथील स्तूपावरील एका भागांत अशा तऱ्हेच्या शहराच्या वेशींचीं चित्रें आहेत; व याच्या पूर्वीच्या काळांतहि तटबंदी वगैरे अशाच तऱ्हेची असावी. या तटांची लांबी, रुंदी किंवा घेर कोठेंहि सांगितलेला नाहीं. हीं शहरें म्हणजे लहान लहान दुर्गच होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण, येथील राजा किंवा अधिकारी दुपारच्या वेळेस आरामाकरितां शहराबाहेर जात असे असें म्हटलें आहे.

**घरें.**—तसेंच घरांच्या भोंवतीं मोकळी जागा बिलकुल नसे असें ' रस्त्यावरच्या गोष्टी घरांच्या खिडक्यांतून दिसत' असें म्हणतात त्यावरून दिसतें. घरांचीं वर्णनें देणारे लेख अनेक सांपडतात. त्यांवरून घरें बांधण्याच्या कामीं कोणत्या जिनसांचा उपयोग केला जात असे हें समजण्यास मार्ग आहे. शिवाय घरांच्या दर्शनी भागांची कल्पना आणून देणारीं चित्रेंहि आहेत. या बाबतींत महौषधानें आपल्या प्रसिद्ध बोगद्यांत बांधलेल्या जमिनीखालच्या राजवाड्याचें जें वर्णन आहे त्यावरून बरीच माहिती मिळण्यासारखी आहे [ जातककथा ६. ४३० ]. घरांचीं जीं चित्रें सांपडतात, त्यांवरून त्यांचे खांब लांकडी असावे किंवा दगड लांकडासारखे कांतून तयार केलेले असावे याबद्दल अनुमान काढण्यास जागा नाहीं. परंतु ते दगडी कांतकामाचे असावे असें वाटतें. एका डोंगरी किल्ल्याभोंवतीं दगडी भिंत असल्याबद्दल ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकांतील उल्लेख सांपडतो. परंतु या कालाच्या संबंधानें जीं पुस्तकें लिहिलीं आहेत, त्यांत खांब किंवा जिने यांखेरीज इतरत्र दगडाचा उपयोग केला असल्याबद्दल उल्लेख नाहीं. अगदीं आरंभीं तरी घरांच्या वरचें बांधकाम विटांचें किंवा लांकडाचें असलें पाहिजे. लांकडी किंवा विटांचें बांधकाम असलें तरी त्याला आंतूनबाहेरून चुन्याचा गिलावा करीत व त्यावर उत्तम रंगांत छापाचीं चित्रें काढीत. विनयामध्यें हा गिलावा कसा करावा वगैरेबद्दल विस्तृत सूचना केलेल्या आहेत [ विनय टेक्स्ट्स ३. १७०–७२ ].

सप्तभूमक पासाद म्हणून वर्णिलेल्या इमारतींबद्दल जागोजाग लिहिलेलें आढळतें. परंतु यांतली एकहि इमारत आजला हिंदुस्थानांत शिल्लक नाहीं. नाहीं म्हणावयास सिलोनमध्यें पुलस्तिपुरामध्यें एक अशा तऱ्हेची अर्वाचीन इमारत सांपडते. खाल्डिया देशाच्या इमारतींचा विशेष म्हणून प्रसिद्ध असलेल्या झिग्गरट नांवाच्या सात मजली इमारतींशीं हिचा संबंध असावा असें अनुमान यावरून ऱ्हीस डेव्हिड्स काढतात. गंगेच्या खोऱ्यांतील लोक व मेसापोटेमिया येथील लोक यांच्यामध्यें दळणवळण होतें ही गोष्ट दुसऱ्या मार्गानें सिद्ध झालेली आहे, तेव्हां हिंदी लोकांनीं या इमारतीची कल्पना दुसऱ्याची उचलली असावी असें दिसतें.

**जुगारवसरकार.**—राजवाड्यामध्यें एका मोठ्या दिवाणखान्यांत द्यूतकारांचा सार्वजनिक अड्डा असे हा अड्डा राजवाड्याच्या मोठ्या बसण्याउठण्याच्या दिवाणखान्याच्या एका भागांत असेल किंवा निराळा असेल. आपस्तम्बामध्यें [ २. २५ ] अशा तऱ्हेच्या जागेची सोय करणें हें राजाचें कर्तव्य होय असें म्हटलें असून पुढील एका ग्रंथांत या द्यूतकारांच्या मिळकतीपैकीं कांहीं भाग राजाच्या खजिन्यांत जाई असें लिहिलें आहे.

**तुर्की स्नानांचें प्राचीन भारतांत अस्तित्व.**—ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचा असा इमारतींचा दुसरा नमुना म्हणजे बाष्पस्नानाकरितां बांधलेल्या इतर इमारतींचा होय. यांचीं वर्णनें विनयांत सांपडतात (३. १०५–११० व २९७) या इमारती उंच जोत्यांवर बांधलेल्या असत. या जोत्यांचा दर्शनी भाग विटांचा व दगडांचा असे. या इमारतींत जाण्याकरितां दगडी जिने असत, व यांत एक लहानशी खोली व स्नानाकरितां एक हौद असे. उष्णवायुस्नानाच्या खोलीमध्यें मध्यभागीं एक आगटी पेटविलेली असून तिच्या सभोंवार बसण्याची व्यवस्था केलेली असे. घाम लवकर यावा म्हणून हें स्नान करतांना स्नान करणाऱ्या इसमाच्या अंगावर कढत पाणी ओतीत. त्याच्या तोंडाला एक प्रकारची सुवासिक चुन्याची फकी लावलेली असे. हें स्नान आटपल्यांनंतर संवाहनविधि व्हावयाचा व नंतर हौदांत स्नान करावयाचें अशी रीत असे. गंगा नदीच्या खोऱ्यांतून इतक्या पुरातन काळीं ' टर्किश बाथ्स'सारखीच हमामखान्यांची व्यवस्था आढळून येते हें बरेंच चमत्कारिक दिसतें. तुर्क लोकांनीं ही पद्धत हिंदूंच्यापासून तर उचलली नसेलना असाहि प्रश्न उपस्थित करण्यांत आला आहे. दीघनिकाय नांवाच्या ग्रंथांत अशाच उघड्यावर बांधलेल्या हौदांचें वर्णन आहे. याला आंत उतरण्यासाठीं पायऱ्या केलेल्या असत.

यांचा दर्शनी भाग दगडाचा असे, व यांजवर कांतकाम आणि नक्षी वगैरे कोरलेली असे. अशा या स्नानाच्या जागांपैकीं कित्येक अनुराधपूर येथें अद्यापहि शाबूत आहेत.

या प्राचीन शहरांतून मोठीं घरें अशीं फारशीं नव्हतीं. बहुतेक इमारती एक मजली व गवती छपराच्या असत.

न ग र र च ना.—हल्लीं जें कांहीं वाङ्मय उपलब्ध आहे त्यावरून पाहतां शहराच्या आरोग्याकडे विशेष लक्ष पुरविलेलें दिसत नाहीं. या बाबतींतल्या फारच थोड्या सोयी केलेल्या दिसतात. नहाणी घरें वगैरे ठिकाणच्या मोऱ्यांचे नळ व किल्ल्यांतील पावसाचें पाणी बाहेर लावून देण्याकरितां केलेलीं गटारें यापलीकडे असलेल्या गोष्टींचा उल्लेख सांपडत नाहीं. किल्ल्यांतील या वर सांगितलेल्या गटारांतून लांडगे व कोल्हे आंत किल्ल्यांत येत व दरवाजे बंद असतांना माणसेंहि यांचा उपयोग किल्ल्याच्या बाहेर जाण्याकरितां करीत. एवढीं हीं गटारें मोठीं होतीं.

मा र्ति का च्या भि न्न प द्ध ती.—मृतांची व्यवस्था लावण्याच्या बाबतींत सुद्धां कित्येक गोष्टी बऱ्याच चमत्कारिक असत. पैसेवाला म्हणून, सरकारी कामगार म्हणून, किंवा मोठ्या कुळांत जन्मलेला म्हणून असा जो जो कोणी मृत झालेला असेल, त्याचें प्रेत दहन करून टाकीत, व त्याच्या रक्षेवर एक स्तूप बांधीत. परंतु सामान्य लोकांचीं प्रेतें सीवथिका किंवा आमक सुसान नांवाच्या ठिकाणीं टाकून दिलीं जात. त्या ठिकाणीं पशुपक्षी तरी त्यांची वाट लावीत, अगर तीं कुजून जात.

कित्येक वेळां अशा तऱ्हेच्या स्मशानांत स्तूप उभारीत. तथापि, सामान्यतः हे स्तंभ खासगी जागेंत असत. मृत मनुष्य तशाच योग्यतेचा असला तर त्याच्या नांवाचा स्तंभ एखाद्या चौकांत असे. हे स्तंभ बौद्ध काळांतले होत असें आपण सामान्यतः समजतों, परंतु वस्तुतः ते बौद्ध काळाच्याहि पूर्वीचे आहेत. आर्य लोक हे स्तंभ बहुधा वाटेले बांधीत. आतांपर्यंत बांधलेले सर्व स्तूप—जे जे आजपर्यंत आढळून आले आहेत ते सर्व—तत्त्वज्ञान वगैरे बाबतींत ज्यांनीं विचारक्रांति घडवून आणिली अशाच लोकांच्या स्मरणार्थ बांधलेले आहेत, ही गोष्ट ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाची म्हणून लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

जेतवन दागब या स्तूपाचा काल ख्रिस्ती शकाचें तिसरें शतक हा होय. परंतु, येथें जें एक तळें आहे तें हिंदुस्थानांतलें सर्वांत जुनें असावें.' कारण, हें अशोकाच्याहि पूर्वी बांधलेलें आहे.

**श्रमविभाग.**—बौद्धकालीन आर्थिक परिस्थितीसंबंधाची माहिती मिळवून ती संगतवार एके ठिकाणीं करण्याचा प्रयत्न कोणीच केलेला दिसत नाहीं. प्रो. झिमर, डॉ. फिक व प्रो. हॉपकिन्स या लोकांनीं वेद, जातककथा, व महापुराणें, यांजवर लिहितांना यासंबंधानें मधून मधून उल्लेख केलेले आहेत. परंतु, सामान्यतः पाहिलें तर हिंदुस्थानासंबंधाचीं पुस्तकें धर्म, तत्त्वज्ञान, भाषा, वाङ्मय वगैरेसंबंधींच बहुतेक असल्यानें, येथील लोकांच्या आयुष्याचा व्यावहारिक भाग बहुतेक टीकाकार व शोधक विसरले असावेत असें दिसतें.

मगध देशाचा राजा अजातशत्रु यानें, बुद्धाच्या पंथांत शिरण्यानें काय फायदा होतो तो सांगा असा आपल्या गुरूस प्रश्न विचारला आहे. बुद्धाची त्यानें एकदांच भेट घेतली व याच वेळीं त्यानें त्यास खालील प्रश्न विचारले:—'तुमच्या पंथांत शिरण्यानें, किंवा तुमच्याप्रमाणें सर्वसंगपरित्याग करण्यानें फायदा काय? जगांत नाना तऱ्हेच्या धंद्यांचा अवलंब करणारे लोक आपली उपजीविका सुखानें करूं शकतात, तसा कांहीं प्रत्यक्ष 'फायदा तुम्हांस दाखवितां येईल काय?' येथें राजानें निरनिराळे धंदे करणाऱ्या लोकांची एक यादी दिलेली आहे ती बरीच सूचक असून तिजवरून, राजाच्या मतें ज्या धंद्यांपासून त्वरित फायदा होतो, असे धंदे म्हणजे खालीं दिलेले होत. (१) महार्त, (२) घोडेस्वार, (३) सारथी, (४) तिरंदाज, (५–१३) सैन्यापैकीं निरनिराळ्या जातींचे नऊ धंदे, (१४) गुलाम, (१५) स्वयंपाकी, (१६) न्हावी, (१७) स्नानगृहांतील सेवकजन, (१८) हलवाई, (१९) माळी, (२०) धोबी, (२१) कोष्टी, (२२) बुरूड, (२३) कुंभार, (२४) कारकून आणि (२५) फडणीस. या यादीकडे लक्ष दिलें तर यांपैकीं बहुतेक लोक राजवाड्यांत किंवा छावणींत वगैरे गुंतलेले असे आहेत. याला उत्तर देतांना शेतकरी व कर देणारे लोक यांचीहि राजाला बुद्धानें आठवण दिली आहे. या लोकांवर राजा व राजाचे आश्रित हे अवलंबून असतात. राजानें दिलेली ही यादी अपुरी आहे. दुसऱ्या ठिकाणीं असल्या धंदेवाल्यांचे संघ सांगितलेले आहेत त्यांची संख्या अठरा म्हणून सांगितली आहे. यापैकीं चारांचीं नांवें सांपडतात, परंतु सबंध अठरा संघांची याद कोठेंच सांपडत नाहीं. या संघांत खालील लोक असावेसें वाटतें.

(१) लांकूड काम करणारे.

(२) धातूंचें काम करणारे. हे लोक लोखंडाचीं सर्व हत्यारें तयार करीत. नांगराचे फाळ, कुऱ्हाडी, करवती, सुऱ्या वगैरे जिन्नस ते बनवीत. सुया वगैरे बारीक कलाकुसरीचीं कामेंहि ते करीत.

(३) दगडांचें काम करणारे. यांमध्यें इमारतीस लागणारें दगडकाम करणारे लोक तर होतेच, पण दगडाचे पेले, पेटारे वगैरे कौशल्याचीं कामेंहि हे लोक करीत. यांचे उत्कृष्ट नमुने शाक्यस्तूपांत सांपडले आहेत.

(४) कोष्टी. हे नुसतें साध्या कपड्यांनां लागणारें कापड विणीत असें नाहीं, तर बाहेरगांवीं पाठविण्यासाठीं उत्तम तऱ्हेची तलम मलमलहि बनवीत असत. शिवाय, उत्तम रेशमी कापड, लोंकरीचीं पांघरुणें वगैरे जिनसाहि येथें होत होत्या.

( ५ ) चांभार लोक. हे लोकांसाठीं पादत्राणें व वहाणा तयार करीत.

( ६ ) कुंभार. हे घरगुती कामांसाठीं लागणारीं भांडीं पेले वगैरे तयार करीत व आपला माल विकावयासाठीं घेऊन हिंडत.

( ७ ) हस्तिदंताचें काम करणारे. हे लोक हस्तिदंताचे घरगुती उपयोगास लागणारे जिन्नस तयार तर करीतच, पण शिवाय उत्तम तऱ्हेचें हस्तिदंताचें कातकाम व दागिने वगैरे तयार करीत. या गोष्टी हिंदुस्थानांत अजूनहि नामांकित तऱ्हेच्या होतात, व त्याबद्दल हिंदुस्थानची अजूनहि प्रसिद्धि आहे.

( ८ ) रंगारी.

( ९ ) सोनार व जवाहिरे. यांनीं केलेल्या कामांपैकीं कांहीं नमुने अद्याप आपल्या नजरेस पडतात, व त्यांवरून दागिन्यांच्या वगैरे आकारमानाची कल्पना चांगली येते.

( १० ) मासे धरणारे कोळी. हे लोक आपला धंदा नदींत चालवीत. समुद्रावर यांनीं मासे धरल्याचा उल्लेख प्रो. ऱ्हीस डेव्हिड्स यांस कोठेंच सांपडला नाहीं.

( ११ ) खाटीक. यांच्या दुकानांबद्दल व हिंसागृहाबद्दल पुष्कळ उल्लेख सांपडतात.

( १२ ) शिकारी व फांसेपारधी. हे लोक रानांत शिकारी वगैरे करून पशू, व तेथील रानांत उत्पन्न होणारे शाकपदार्थ गाड्यांवर घालून विकावयास आणीत. ह्या लोकांनीं संघ वगैरे केला होता कीं नाहीं याची माहिती मिळत नाहीं. परंतु यांचा धंदा महत्त्वाचा होता एवढें मात्र खास. लांबच लांब अरण्यें, हस्तिदंताची वाढती मागणी वगैरे गोष्टी शिकारीच्या धंद्याला अनुकूल होत्या. राजे लोक हा शिकारीचा पेशा केवळ शोकाखातर पतकरीत, त्यांत धंद्याचा भाग मुळींच नव्हता. पण मोटमोठ्या कुळांतले लोकसुद्धां धंदा म्हणून हा पेशा पतकरीत असत व फायद्याकरितां ब्राह्मण सुद्धां हा धंदा करीत.

( १३ ) आचारी व मिठाईवाले लोक. हे संघ करीत असें वाटतें. पण याबद्दल प्रत्यक्ष पुरावा कोठें नाहीं.

( १४ ) न्हावी लोक व संवाहक लोक. हे संघ करून असत. हे सुगंधी जिनसांचा व्यापार करीत, व पागोटीं बांधण्यांतहि निष्णात असत.

( १५ ) माळी व फुलें विकणारे.

( १६ ) नाखवे. हे मोठमोठ्या नद्यांतून मालाची नेआण करीत व क्वचित् समुद्रांतहि जात. पूर्वींच्या जुनाट लेखांतून समुद्रपर्यटनाचे उल्लेख थोडे, सांपडतात, परंतु जातककथांसारख्या पुढच्या वाङ्मयांत असले उल्लेख बरेच आहेत. जुन्या ग्रंथांत सहा सहा महिनेपर्यंत नावेंतून जलपर्यटनें केल्याचे उल्लेख आहेत. या नावा हिंवाळ्यांत किनाऱ्यावर ओढून ठेवीत. तिसऱ्या शतकांतील ( ख्रिस्तपूर्व ) कांहीं लेखांत, काशीहून गंगेच्या मुखापर्यंत गंगेंतून व तेथून हिंदीमहासागरांतून ब्रह्मदेशाच्या समोरच्या किनाऱ्यापर्यंत; व भडोच ( भरुकच्छ ) वरून कन्याकुमारीला वळसा घालून पुन्हां ब्रह्मदेशाच्या समोरच्या किनाऱ्यापर्यंत; अशीं जलपर्यटनें केल्याचीं उदाहरणें आहेत. या काळांत हे लोक नाविकाच्या धंद्याला अगदींच अनभ्यस्त नव्हते एवढें यावरून दिसतें.

( १७ ) लव्हाळ्याचीं दोरखंडें वळणारे व पाट्या तयार करणारे बुरूड.

( १८ ) चितारी. हे लोक बहुधा घरांवर चित्रें रंगवीत. घरांच्या लांकडी कामावर बहुधा चुन्याचा गिलावा केलेला असे, व त्यावर चित्रें काढलेलीं असत. तथापि, हे चितारी छापाचीं चित्रेंहि काढीत. मगध आणि कोसल येथील राजांच्या असल्या तऱ्हेचीं चित्रें काढलेल्या विश्रामशाला होत्या, असेंहि उल्लेख आहेत. या कालांतील हीं छापाचीं चित्रें इसवी सनाच्या सातव्या आणि आठव्या शतकांत अजिंठा येथील लेण्यांवर, व पांचव्या शतकांत सिलोन येथील सीगिरीवर, काढलेल्या अर्वाचीन चित्रांसारखीं आहेत यांत संशय नाहीं. आतां कालमानाप्रमाणें यांची तऱ्हा निराळी आहे इतकेंच.

**जातिसंस्था व राजदरबार.**—कांहीं महत्त्वाच्या कार्यासाठीं लोकांना आमंत्रण देणें झाल्यास राजा संघवार आमंत्रणें करी. या संघांचे मुख्य पुढारी पैसेवाले असून ते शिष्टांत मोडले जात व दरबारांत त्यांना मान असे असें वर्णन आहे. संघांतील लोकांत पतिपत्नींचीं भांडणें तोडण्याचा अधिकार संघांतल्या पंचांचा असे. संघासंघांत भांडणें उत्पन्न झालीं तर या संघांच्या प्रमुखांवर एक महाप्रमुख असे, त्यानें हीं भांडणें तोडावयाचीं असत. हा महाप्रमुख उत्तरकालीन नगरश्रेष्ठी होय.

**नेआण.**— शेतकरी व किरकोळ धंदे करणारे लोक मोठमोठ्या नद्यांतून किंवा किनाऱ्याकिनाऱ्यानें बोटींतून माल नेत व आणीत; किंवा खुष्कीच्या मार्गानें गाड्यांच्या तांड्यांतूनहि मालाची नेआण होत असे. हे तांडे म्हणजे दोनचाकी गाड्यांच्या रांगा असत. त्या काळच्या प्रवासक्रमाचा हा एक विशेष होता. त्या काळीं पक्क्या सडका किंवा पूल मुळींच नव्हते. गाड्या चकाऱ्याचकाऱ्यांतून, शेतकऱ्यांनीं मोकळ्या टेवलेल्या वाटांवरून, रानांतून वाट काढीत या खेड्यांतून त्या खेड्यास जात असत. या मालाच्या गाड्यांना प्रत्येक देशांत शिरतांना कर व जकात द्यावी लागे. गाड्यांच्या तांड्यांचें वाटेंत दरोडेखोरांपासून रक्षण करण्याकरितां दिलेल्या शिपायांचा खर्चही या करांपैकीं एक जबर बाब होती. ही बाब इतकी जबर होती कीं, ती फक्त उंची मालासच परवडत असे.

अन्नसामुग्री, सर्पण आणि उतारू लोक यांची नेआण आजच्या इतक्या मोठ्या प्रमाणांत त्या काळीं मुळींच नव्हती. रेशमी कापड, मलमल, तलम कपडे, चाकूकातरी वगैरे जिन्नस, चिलखतें, नकसकाम, पांघरुणें, सौगंधिक द्रव्यें व औषधें, हस्तिदंत व हस्तिदंती काम, जवाहीर व सोनें या

व्यापाराच्या मुख्य जिनसा होत्या. चांदीचा व्यापार क्वचितच होई.

**विनिमयपद्धति.**—जिनसांच्या अदलाबदलीनें व्यापार करण्याची पद्धत अजीबात नाहींशी झाली होती. तथापि राजमुद्रांकित नाणीं वापरण्याची पद्धतहि या वेळीं अंमलांत आली नव्हती. कहापन नांवाच्या एका तांब्याच्या नाण्यावर सर्व व्यवहार चालत असे. या नाण्याचें वजन अजमासें १४६ ग्रेन किंवा १॥ तोळे असे, व याच्या चोखपणाबद्दल व वजनाबद्दल खासगी व्यक्तींनीं शिक्के मारून हमी घेतलेली असे. हे शिक्के व्यापारी लोक मारीत, कीं संघांचे अधिकारी मारीत, कीं एखादा याच गोष्टीचा व्यापार करणारा इसम मारी हें निश्चित नाहीं.

चांदीच्या नाण्यांचा उपयोग कोठेंहि केला जात नसे. अर्धा व पाव कहापन अशीं आणखी दोन नाणीं होतीं. यांखेरीज दुसरीं नाणीं असल्याचें दिसत नाहीं. सोन्याच्या नाण्यांबद्दलचे उल्लेख उत्तरकालीन व संशयित आहेत; व असलीं जुनीं नाणीं कोठेंहि सांपडत नाहींत. हिंदुस्थानांत असतांना अलेक्झांडर यानें हिंदूसारखीं चौकोनी नाणीं पाडलीं होतीं, ग्रीक लोकांप्रमाणें वाटोळीं नाणीं पाडलीं नाहींत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

सरकारनें बाजारचे निरख ठरवून दिल्याचा उल्लेख अगदीं अलीकडचा आहे ( मनु. ८.४०१ ). राजवाड्यामध्यें खासगीकडे लागणाऱ्या जिनसांचे दरदाम ठरवून देण्याकरितां एक अधिकारी खिस्तपूर्व सहाव्या शतकांत असल्याचें लिहिलें आहे. परंतु सामान्य बाजाराचे दरदाम ठरविणें निराळें, व राजवाड्यांतील खासगी खर्चाच्या जिनसांचे निरख ठरविणें निराळें. सामान्यतः, कहापनाची किंमत आपल्या ६ आण्यां इतकी असे, व एवढ्या किंमतींतच आजच्या बारा आण्यांच्या किंमतीइतका माल मिळे.

**हुंड्यांचा व सावकारीचा व्यवहार.**—नाण्यांखेरीज हुंड्यांचाहि उपयोग बराच होई. कांहीं थोड्या मोठ्या शहरांतून व्यापारी परस्परांवर हुंड्या लिहीत. या हुंड्यांबद्दल अनेक उल्लेख सांपडतात. व्याजाचे दर काय असत याबद्दलची माहिती सांपडत नाहीं. परंतु, व्याजाच्या कल्पनेचा प्रादुर्भाव बऱ्याच जुनाट काळीं झाला असावा. कारण, व्याज ह्या शब्दाला अन्वर्थक असे शब्द बऱ्याच पुरातन काळीं वापरले गेले आहेत. तारणाशिवाय काढलेल्या कर्जावर दरसाल १८ टक्के व्याज घेत असा उल्लेख पुढच्या पुढच्या धर्मशास्त्राच्या ग्रंथांतून आढळतो.

पेढ्या वगैरे त्या काळीं मुळींच नव्हत्या. पैसे घरांत सांठवून ठेवीत; अगर डेऱ्यांत घालून जमिनींत पुरून ठेवीत असत; अगर एखाद्या मित्रापाशीं ठेवीत. अशा व्यवहाराबद्दल लेखी दाखला ठेवला जात असे.

**आर्थिक स्थिति.**—वरील सर्व माहितीवरून गरीब लोक, मध्यम स्थितींतील लोक व श्रीमंत लोक यांच्या ऐपतीबद्दल कांहीं अनुमानें काढतां येतात. या लोकांनां कोणत्या गोष्टीची ददात आहे असें कधीं झालें नाहीं; निदान अशाबद्दल पुरावा तरी सांपडत नाहीं. सामान्यतः स्वतंत्र माणसाला अन्नाकरितां टाकभाड्याचें काम करण्याचा प्रसंग येणें ही त्या काळांत सर्वांत मोठी आपत्ति समजली जात असे. वस्ती असलेल्या प्रदेशाशेजारीं फुकट जमीन मुबलक मिळत असल्यामुळें, फक्त तींतील जंगल काढून साफ करण्याचाच काय तो त्रास पडे.

परंतु त्या वेळच्या कालमानाप्रमाणें ज्यांनां श्रीमंत म्हणतां येईल, अशांची संख्या फारच थोडी होती. ज्यांची संपत्ति सामान्यतः कर व दुसऱ्या कांहीं वसुलाच्या बाबी हीच असे, असे राजे लोक विसाच्यावर नव्हते. श्रीमंत सरदार लोक बरेच होते. कांहीं परगण्यांतून उत्पन्न होणाऱ्या धर्मादायाच्या करांतून ज्यांनां नेमणुकी दिलेल्या असत, किंवा अशा तऱ्हेचे वंशपरंपरा हक्क ज्यांनां मिळालेले होते असे कांहीं थोडे भिक्षुकहि होतेसें दिसतें. तक्षशिला, श्रावस्ती, काशी, राजगृह, वैशाली, कौशांबी वगैरे शहरांतून व बंदरांतून लक्षाधीश व्यापारी दहाबाराच्यावर नव्हते. मध्यम स्थितींतले लोक व साधारण दर्जाचे व्यापारी बरेच असल्याचे उल्लेख आहेत; परंतु यांनां अपवाद म्हणावयास हरकत नाहीं. जमीनदार लोक मुळींच नव्हते. सामान्यतः त्या वेळच्या लोकांत सुखवस्त, शेतकरी व किरकोळ धंदे करून राहणारे लोक यांचा भरणा बराच होता. शेतकऱ्याची जमीन बहुतेक त्यांच्या मालकीची असे, व या लोकांचे अधिकारी त्यांचे त्यांनीं निवडलेले असत.

**दळणवळणाचे मार्ग.**—दळणवळणाच्या मार्गासंबंधीं खालीं दिल्याप्रमाणें माहिती उपलब्ध आहे.

( १ ) उत्तरेकडून नैर्ऋत्येकडे श्रावस्तीपासून प्रतिष्ठानपर्यंत. वाटेंत मार्गावर थांबण्याचे टप्पे ( दक्षिणेच्या बाजूनें आरंभ केल्यास ) माहिस्सती, उज्जयिनी, गोनद्ध, विदिशा कौशांबी व साकेत हे होते.

( २ ) उत्तरेकडून आग्नेयीकडे श्रावस्तीपासून राजगृहापर्यंत. या दोन शहरांमधला मार्ग पर्वताच्या पायथ्यापायथ्यानें वैशालीच्या उत्तरेकडच्या एका भागापर्यंत जातो, व त्यानंतर दक्षिणेकडे वळून गंगा नदीपर्यंत जातो. नद्यांचे उतार वगैरे साधण्यासाठीं हा रस्ता असा लांबलचक व वेडावांकडा केलेला असावा. तथापि याला कांहीं राजकीय कारणेंहि असावीं तसें वाटतें. उत्तरेच्या बाजूनें आरंभ केल्यास या मार्गांतील टप्पे सेतव्य, कपिलवस्तु, कुशिनार, पावा, हस्तिग्राम, भंडग्राम, वैशाली, पाटलिपुत्र व नालंद हे होत. हा रस्ता बहुधा गयेपर्यंत जाऊन तेथून बहुतेक ताम्रलिप्ती येथें, समुद्रकिनाऱ्याकडून येणाऱ्या व काशीकडे जाणाऱ्या रस्त्यास मिळत असावा.

( ३ ) पूर्वपश्चिम रस्ता. हा मुख्य रस्ता मोठमोठ्या नद्यांच्या तीरातीरानें होता. या नद्यांतून मोठ्याक-

रितां नावाहि चालत असत. नावांचा स्पष्ट उल्लेख केलेला सांपडतो. वर जातांना नावा पश्चिमेकडे सहजातीपर्यंत गंगा नदींतून जात, व कौशांबीपर्यंत यमुनेंतून जात. खालीं उतरतांना नावा थेट गंगा नदीच्या मुखापर्यंत जात व तेथून समुद्रकिनाऱ्यानें ब्रह्मदेशापर्यंत जात. बऱ्याच जुन्या काळच्या ग्रंथांत मगधापर्यंतच म्हणजे फार तर चंपानगरीपर्यंत व्यापार चालत असल्याचीं उदाहरणें आहेत.

यांशिवाय, विदेहापासून गांधाराकडे, मगधापासून सोवीराकडे, भरुकच्छापासून किनाऱ्याला वळसा घालून ब्रह्मदेशापर्यंत, वगैरे व्यापारी लोक जात असें ग्रंथांतून सांगितलेलें आहे. राजपुतान्याच्या पश्चिमेकडचें मैदान ओलांडून जातांना गाड्यांचे तांडे बहुधा रात्रींचेच प्रवास करीत, व ताऱ्यांच्या अनुरोधानें मार्गाची दिशा दाखविणारे वाटाडेहि त्या काळीं होते. व्यापारी लोक बाबिलोनपर्यंत प्रवासास गेल्याचें फक्त एकच उदाहरण आहे. हा प्रवास समुद्रांतून झाला होता; परंतु जेथून या प्रवासास सुरुवात झाली त्या बंदराचें नांव कोठेंच सांगितलेलें नाहीं. सिरेनची एक जगप्रसिद्ध गोष्ट आहे. सिरेन लोक हे ताम्रपर्णीद्वीपांत रहात होते. ताम्रपर्णी द्वीप हें बहुधा सिलोन असावें. लंकेचा उल्लेख कोठेंहि नाहीं. मिलिंदामध्यें चीन देशाशीं व्यापार केल्याचा उल्लेख प्रथमच सांपडतो; तथापि हा व्यापार यावरून वाटतो त्यापेक्षां बराच पुरातन असला पाहिजे असें चिनी वाङ्मयावरून दिसून येतें (विज्ञानेतिहास पृ. ४५३-४५५ पहा).

**साक्षरता.**—लेखनकलेला अनुलक्षून केलेला असा अत्यंत जुना उल्लेख म्हणजे शील नांवाच्या ग्रंथांत सांपडतो. सुत्तंताच्या म्हणजे संवादपद्धतीनें बुद्धानें दिलेल्या व्याख्यानाच्या पहिल्या वर्गाचा पहिला भाग म्हणून जे तेरा संवाद आहेत त्यांना ही संज्ञा समष्टिरूपानें दिलेली आहे. या शील ग्रंथांचा काळ ऱ्हीस डेव्हिड्सच्या मतें अजमासें खिस्तपूर्व ४५० हा असावा. या ग्रंथांत बौद्ध संप्रदायाच्या अनुयायांनीं काय काय गोष्टी करूं नयेत यांच्या याद्या सांपडतात. यांपैकीं एका यादींत पुष्कळ खेळ आहेत. अक्षरिका नांवाचा एक खेळ यांत आहे. हा खेळ म्हणजे हवेंत बोटांनीं दाखविलेलीं, किंवा एखाद्याच्या पाठीवर लिहिलेलीं अक्षरें ओळखणें हा होय. संदर्भावरून पाहतां, हे सर्व खेळ मुलांचे असावेत, व हाहि त्यांतलाच एक खेळ असावा.

लेखनकलेबद्दल विनय नांवाच्या ग्रंथांतहि बरेच सूचक उल्लेख सांपडतात. उदाहरणार्थ, विनय. ४. ७ यामध्यें लेखनकलेची एक उत्तम कला या नात्यानें स्तुति केल्याचें दिसून येतें. बौद्ध संप्रदायाच्या अनुयायी म्हणविणाऱ्या स्त्रियांनीं ज्या ज्या गोष्टी करूं नयेत म्हणून लिहिलें आहे त्यांनां लेखनकला हा एक अपवाद आहे. गुन्हेगार लोकांपैकीं ज्यांचीं ज्यांचीं नांवें राजाच्या देवडीवर नमूद करून ठेविलेलीं असत, त्यांनां संप्रदायांत घेतलें जात नसे. मुलानें पुढें कोणता धंदा करावा अशाबद्दल विचार करतांना त्याचे आईबाप म्हणतः "यानें लेखकाचा धंदा केल्यास हा सुखासमाधानानें आनंदांत दिवस काढील, परंतु याचीं बोटें मात्र दुखूं लागतील." संप्रदायापैकीं एखाद्या इसमानें दुसऱ्या एखाद्याला लिहितांना जर आत्महत्येपासून होणाऱ्या फायद्यांचें वर्णन केलें तर त्या लेखांतील प्रत्येक अक्षरागणिक त्यानें एक एक गुन्हा केला असें मानलें जात असे.

विनयांतील या सर्व उदाहरणांवरून एवढें स्पष्ट दिसतें कीं, विनय ग्रंथ रचला गेला त्या काळीं लेखनकला अस्तित्वांत होती; सरकारी जाहिराती, सूचना, वगैरेंच्या कामीं व खासगी पत्रव्यवहाराच्या बाबतींत लेखनकलेचा उपयोग होत होता; मानमरातबानें उपजीविका करण्याचें साधन म्हणून लेखनकलेचा उपयोग होण्याइतकी पात्रता तिला आली होती; आणि लेखनकला विशिष्ट वर्गांतले लोक शिकत इतकेंच नव्हे, तर सामान्य लोक किंवा स्त्रियासुद्धां या कालांत लिहिण्यास शिकत.

**वैचारिक चळवळ.**—पूर्वीच्या काळांत निरनिराळ्या पंथांच्या अनुयायांमध्यें निरनिराळ्या प्रकारच्या वाङ्मयपद्धती असल्या पाहिजेत. या प्राचीन संप्रदायांपैकीं कोणत्याहि संप्रदायानें दुसऱ्या संप्रदायाचें वाङ्मय जतन करून ठेविलें आहे असें दिसत नाहीं. तथापि प्रत्येक संप्रदायाला दुसऱ्या संप्रदायाची माहिती होती व दुसऱ्या संप्रदायांच्या मतांवर प्रत्येक संप्रदाय विचार करीत असे. याप्रमाणें साधारणतः या लोकांनां निदान दोन प्रकारच्या वाङ्मयांची माहिती असे.

वसाहतीच्या शेजारीं अरण्यें असत, त्यांमध्यें निरनिराळ्या संप्रदायांचे शिष्य रहात. यांची रहाणी एकंदरींत वैराग्यासारखी असे. आपल्या संप्रदायांतील ध्यान, यज्ञ, हठयोग यांसारख्या कांहीं तरी विशिष्ट गोष्टींनीं हे शिष्य आपआपल्या संप्रदायाची परंपरा चालवीत; व अध्ययन आणि अध्यापन यांच्या द्वारानें आपल्या संप्रदायाचीं तत्त्वें ते लोकांनां शिकवीत. स्वतःच्या निर्वाहाकरितां फलमूळें जमविण्यामध्यें किंवा शेजारच्या गांवीं भिक्षेसाठीं जाण्यामध्यें यांचा बराच काळ जात असे.

**परिव्राजक.**—या मठवासी वैराग्यांशिवाय परिव्राजक नांवाचे दुसऱ्या एका प्रकारचे लोक होते. हे लोक केवळ हिंदुस्थानांतच होते, व येथेंहि बौद्ध संप्रदायाच्या उदयापूर्वी ते फारसे असतील असें दिसत नाहीं. हे परिव्राजक लोक गांवोगांव हिंडून तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, वगैरेंसंबंधानें संभाषणें करीत; व हाच अशा तऱ्हेनें हिंडण्यांत त्यांचा मुख्य उद्देश होता. या कार्यांतच ते वर्षांतील आठ नऊ महिने घालवीत. हे लोक बुद्धिमत्तेंत, कळकळींत किंवा सत्याची चाड

ठेवण्याच्या बाबतींत विशेष श्रेष्ठ होते असें दिसत नाहीं. यांच्यापैकीं कांहीं लोक केवळ शाब्दिक वाद माजविणारे व उगीच नसतें तर्कावडंबर करणारे होते असें वर्णन आहे. त्यांच्या वादविवादांचे जे कांहीं अवशेष आज पहावयास मिळतात् त्यांवरून हें विधान अगदींच खोटें आहे असें म्हणतां येत नाहीं. परंतु यांच्यापैकीं कांहीं लोक बुद्धिमत्ता वगैरे बाबतींत बरेच श्रेष्ठ असले पाहिजेत; कारण, एरवीं त्यांची आजपर्यंत एवढी कीर्ति चालत आली नसती. त्यांच्या संभाषणाकरितां, म्ह० आपल्या तत्त्वांच्या प्रसारासाठीं हे जे वादविवाद करीत त्यांकरितां, मोठमोठे दिवाणखाने बांधले असल्याचें लिहिलेलें आहे. श्रावस्ती नगरींत मल्लिका राणीच्या बागेंत अशा तऱ्हेचें एक सभागृह होतें. तसेंच वैशाली राजधानीजवळच्या महारण्यांत लिच्छवी संघानें बांधलेला एक दिवाणखाना आहे. याचा उल्लेख पुस्तकांतून, इकडून तिकडे हिंडणाऱ्या जोगी लोकांचा मठ असा केलेला आहे. कधीं कधीं, या लोकांनां वस्तीच्या जवळच मोठमोठ्या राई तोडून दिलेल्या असत. चंपकारण्य व मोरनिवाप हीं याच तऱ्हेचीं स्थानें आहेत. चंपकारण्य हें चंपानगरीच्या जवळ व मोरनिवाप हें राजगृह येथें होतें.

हे संचार करीत इतस्ततः हिंडणारे लोक अशा ठिकाणीं एकमेकांच्या गांठी घेत. त्याच वेळीं ते आपल्या मुक्कामाच्या जागेच्या आसमंतांतील विद्वान् ब्राह्मण वगैरे लोकांच्याहि भेटी घेत. उदाहरणार्थ, 'दीघनखानें बुद्धाची गांठ घेतली, बुद्ध व सकुलदायी यांची भेट झाली, वैखानस बुद्धाकडे गेला, केनियानें बुद्धाची मुलाखत घेतली, पोटलीपुत्त समिद्धाकडे गेला,' अशा प्रकारचे उल्लेख ग्रंथांतून सांपडतात. हे मठवासी लोक एखाद्या खेड्याच्या शेजारीं येऊन राहिले म्हणजे गांवांतील लोकहि शिष्टाचाराप्रमाणें त्यांनां परत भेटी देत. यावरून या मठवासी लोकांमध्यें व गांवांतील लोकांमध्यें विचारविनिमय होत असला पाहिजे हें उघड आहे.

या श्रमण करणाऱ्या भिक्षूंपैकीं कांहीं स्त्रिया होत्या. हे लोक ब्रह्मचर्य पाळण्यापलीकडे कोणत्याहि यतिधर्माचा अवलंब करीत नसत. अरण्यांतील भिक्षू लोकांनीं देहदण्डन करून घेतल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. नीरंजनेच्या कांठीं अरण्यांत, बोधिवृक्षाखालीं बोधिप्राप्ति होण्यापूर्वी बुद्धानें अशा तऱ्हेचें तपाचरण केलें होतें. त्यानंतर तो संचारी भिक्षु बनला. तापसी व संचारी भिक्षू असे दोन निरनिराळे पंथ होते, व या पंथांतील लोकांचे नियमहि निरनिराळे होते. या दोन्ही पंथांतील बऱ्याच व्यक्तींचीं नांवें ग्रंथांतून आढळतात.

**इतर पंथ.**—बऱ्याचशा लोकांनीं एखाद्याचें शिष्यत्व पतकरिलें किंवा एकाच तऱ्हेच्या मतांचा अंगीकार केला म्हणजे त्या लोकांचा पंथ बनून त्यास कांहीं तरी नांव मिळत असे. उदाहरणार्थ, ज्याला आज आपण बौद्ध संघ म्हणतो त्यांतल्या लोकांनां 'शाक्यपुत्तिय सम्मण' असें म्हणत असत. जैनांच्या संघाला निगंठ म्हणत. आजीविक नांवाचा दुसरा एक संघ होता. बौद्ध संप्रदायाच्या उदयापूर्वीपासून तों आजतागायत शिस्तवार संघटना असलेला असा जैनांचाच कायतो संघ हिंदुस्थानच्या इतिहासांत टिकलेला सांपडतो. आजीविक संघ अशोकाचा नातू दशरथ याच्या काळापर्यंत होता. या दशरथानें लेण्यांमधून या लोकांनां राहण्याकरितां मठ दिले होते असें शिलालेखांवरून दिसून येतें. हा आजीविक संघ बऱ्याच दिवसांपूर्वीं नष्ट झाला व त्याच्याबरोबरच त्याच्या कल्पनांनीं व तत्त्वांनीं भरलेलीं त्याचीं सुत्तेंहि लयास गेलीं.

अंगुत्तरामध्यें या संघांच्या नांवांची माहिती आहे. या नांवांपलीकडे त्यांची आज फारशी माहिती नाहीं. इतस्ततः केलेल्या उल्लेखांवरून असे दोन तीन संघ तरी अस्तित्वांत असावे असें वाटतें. विखानसानें स्थापिलेल्या संप्रदायाचे नियम देणारें वैखानससुत्त नांवाचें एक सुत्त आहे, त्या सुत्ताचा काळ इसवी सनाचें ३ रें शतक हा बहुधा असावा. एक वैखानस बुद्धाला भेटला असें वर सांगितलें आहे. तो वैखानस या संघांतला असणें अगदींच अशक्य आहे असें नाहीं. पाणिनीच्या सूत्रांपैकीं एका सूत्रावरच्या वार्तिकांत कर्मंदिन आणि पाराशरि यांचा उल्लेख आहे (४.३,११०). मज्झिममध्यें (३.२९८) बुद्धानें एका पाराशरीय ब्राह्मणाच्या मतांची चर्चा केली आहे. या दोन शाखांपैकीं दुसऱ्या पाराशरी शाखेचा हा पाराशर संस्थापक असावा असें वाटतें. तें कसेंहि असलें तरी वरील वार्तिक लिहिलें गेलें त्या वेळीं हा संघ अस्तित्वांत होता.

भिक्षूंच्या दुसऱ्या कांहीं पंथांचीं फक्त नांवेंच तेवढीं माहीत आहेत. उ० मुंडश्रावक, जाटिलक, गोमंडिक, तेदण्डिक, अविरुद्धक, गोतमक, देवधम्मिक वगैरे. हीं नांवें विशिष्ट संघांनां लाविलीं जाण्याच्या अगोदर बराच काळ लोटला असला पाहिजे हें निर्विवाद आहे.

**भाषा आणि वाङ्मय.**—या सर्व गोष्टींवरून अनेक तऱ्हेचा बोध घेण्यासारखा आहे. भाषा आणि वाङ्मय यांच्या दृष्टीनें एक दोन मुद्दे जे महत्त्वाचे वाटतात, त्यांबद्दल येथें जरा जास्त विवेचन केल्यास तें अप्रासंगिक होणार नाहीं. परस्परांत दळणवळण होण्यास भाषावैचित्र्यामुळें कोणतीहि अडचण येत नव्हती. ही अडचण सामान्य व्यवहाराच्या बाबतींत नव्हती इतकेंच नव्हे, तर अत्यंत गहन अशा धार्मिक व तत्त्वज्ञानात्मक विवेचनांत सुद्धां ही भाषावैचित्र्याची अडचण भासली नाहीं. पश्चिमेस कुरुक्षेत्रापासून तों पूर्वेस मगधापर्यंत, उत्तरेच्या बाजूस श्रावस्ती व नेपाळच्या टेकड्यांतील कुशिनार गांवापर्यंत व दक्षिणेस उज्जयिनीपर्यंत एकच भाषा व ती संस्कृत असणें शक्य नाहीं. लौकिक संस्कृत तर अद्याप जन्मासहि आलें नव्हतें, व ब्राह्मणांत वापरली गेलेली भाषा सामान्य लोकांच्या आटोक्यांत येण्यासारखी नव्हती. तेव्हां सरकारी कामगार, व्यापारी, सरदार, वगैरे सुसंस्कृत वर्गांत प्रचलित असलेल्या भाषेंतच हे

संचारी भिक्षू बोलत असले पाहिजेत असें मानणें प्राप्त आहे. ही या सर्व लोकांत वापरली जाणारी सामान्य भाषा कोसल देशाची जी वाढ झाली तिनें आणखीच जोरावली. बौद्ध संप्रदायाच्या उदयापूर्वी कोसल देशांत आजच्या सर्व संयुक्त प्रांताचा समावेश होत असे. उपर्युक्त सर्वसामान्य भाषेमुळें या विस्तीर्ण प्रदेशाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत, सरकारी व व्यापारी सर्व तऱ्हेचें दळणवळण सुरळीतपणें होणें सुलभ झालें. या राजकीय परिस्थितीमुळेंच संचारी भिक्षूंच्या संस्थांची किंवा मतांची भरभराट होत गेली. सदरहू संचारी भिक्षूंचा कोसलें राज्याच्या स्थापनेपूर्वी कोठें मागमूसहि नव्हता. या भिक्षूंनीं बौद्धिक उत्क्रान्ति करून सदरहू भाषेला बरीच प्रौढ बनविली.

संस्कृत नाटकांच्या वाचनानें मनावर जो परिणाम होतो त्यामुळें ह्या भाषेचा प्रश्न अधिकच गुंतागुंतीचा झालेला आहे. संस्कृत नाटकांत कोणत्याहि दर्जाचीं माणसें असलीं तरी त्यांना संस्कृत भाषा समजते; व स्त्रियांना—विशेषतः उच्च दर्जाच्या स्त्रियांना—संस्कृत भाषा समजते इतकेंच नव्हे तर प्रसंगीं त्या संस्कृत बोलतातहि असें समजलें जातें.

संस्कृत नाटकें लिहिलीं गेलीं त्या काळांत कोणती भाषा प्रचलित होती याविषयीं नक्की विधान संस्कृत नाटकांवरून करतां येत नाहीं. शिष्ट लोकांची भाषा संस्कृत म्हणून ग्रंथकारांनीं कदाचित् नाटकांची भाषा प्रामुख्यानें संस्कृत केली असेल. तें कसेंहि असलें, व संस्कृत ही जरी त्या काळांत बोलण्याची भाषा होती असें मानिलें, तरी या गोष्टीला बाराशें वर्षांपूर्वीच्या स्थितीचा निदर्शक पुरावा म्हणून मानतां येणार नाहीं.

**ब्राह्मणांचें वर्चस्व.**—दुसरा मुद्दा असा कीं, तत्त्वज्ञानात्मक किंवा धार्मिक वादविवादांत ब्राह्मण पडत असत, त्यांत त्यांचा उल्लेख आदरभावानें केला जात असे व त्यांना समाजांत मान मिळत असे, तरी त्यांचें वर्चस्व सर्वांवर होतें असें म्हणतां येत नाहीं. भिक्षूंपैकीं बरेच लोक व त्यांच्यांतली बहुतेक शिष्ट व वजनदार मंडळी ब्राह्मण नव्हती. आणि ग्रंथांतरींचा पुरावा पाहिला, तर सामान्यतः या भिक्षूंना म्हणजे इतरेजनांच्या शिक्षकांना ब्राह्मणांइतकाच मोठा मान मिळत असे.

यावर असा एक आक्षेप येण्याचा संभव आहे कीं, वर उद्धृत केलेले ग्रंथ सर्व ब्राह्मणांच्या विरुद्ध जाणारे अतएव त्याज्य होत. धर्मशास्त्रग्रंथ व पुराणग्रंथ लोकांच्या सर्व गोष्टींसंबंधानें उल्लेख करतांना ब्राह्मणांचा प्रामुख्येंकरून निर्देश करतात; आणि ह्या निर्देश केवळ त्यांच्या जातिविशिष्ट पवित्रतेमुळेंच केला जात नसून त्यांच्या बुद्धिमत्तेच्या प्रखर तेजामुळें केला जात असे. त्याचप्रमाणें हिंदी वाङ्मयासंबंधानें किंवा धर्मासंबंधानें पाश्चात्य लोकांनीं लिहिलेलीं पुस्तकें घ्या. ते लोक तर धर्म व ब्राह्मणांचें प्राबल्य हे दोन्ही विषय एकच समजतात.

पण या दोन्ही गोष्टी स्वतंत्र पुरावा म्हणून मानतां येत नाहींत. पाश्चात्य लोकांनीं दुसऱ्या ग्रंथांचाहि विचार केला असता, परंतु ते त्यांना मिळालेच नाहींत. त्यांच्यापुढें जीं साधनें होतीं त्यांचा उपयोग मात्र त्यांनीं नीटपणें केला आहे. तरी सुद्धां ब्राह्मण लोकांच्या वर्चस्वाबद्दल पाश्चात्य लोकांत देखील एकमत नाहीं ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे.

डॉ. भांडारकर यांचें या बाबतींतलें मत विचार करण्यासारखें आहे. रॉयल एशिआटिक सोसायटीचें मुंबई शाखेचें नियतकालिक, १९०१ सालचा अंक यामध्यें शिलालेखांतील पुराव्याकडे डॉ. भांडारकर यांनीं लक्ष वेधिलें आहे. ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकांत ब्राह्मणांना दिलेलीं दानें नमूद करण्यास सुरुवात झाली. तिसऱ्या शतकांत यांचीं उदाहरणें थोडीं सांपडतात. चौथ्या शतकापासून पुढें ब्राह्मणांच्या वर्चस्वाची वाढ झपाट्यानें झालेली दिसते; व त्या काळच्या शिलालेखांत असल्या दानांचे उल्लेख पुष्कळच सांपडतात. यानंतर गुप्त वंशांतील राजांनीं अश्वमेधासारखे मोठ्या खर्चाचे व विधिनियमांच्या भानगडींनीं भरलेले असे यज्ञ तडीस नेले म्हणून सांगितलें आहे. या दोन शिलालेखांत यज्ञासाठीं उभारलेल्या स्तंभाचा उल्लेख आहे; व तिसऱ्या एकांत सूर्याच्या एका देवळामध्यें नंदादीपासाठीं देणगी दिल्याचा उल्लेख आहे. यज्ञासंबंधाचे विधी करण्याकरितां गांवांच्या नेमणुका करून दिलेल्या आहेत; ब्राह्मणांना अनेक तऱ्हेच्या देणग्या दिलेल्या आहेत; व त्यांच्या देवळांनाहि उत्पन्नें करून दिलेलीं आहेत. पण यांच्या पूर्वीच्या चार शतकांत (म्हणजे ख्रि. पू. ३०० ते इ. स. १०० पर्यंत) ब्राह्मण, ब्राह्मणांचीं देवळें, ब्राह्मणांचे देव, यज्ञ किंवा त्यांचा कसलाहि धर्मविधि यांचा उल्लेख एकदां सुद्धां केलेला दिसत नाहीं. राजे लोकांनीं, जहागीरदारांनीं किंवा व्यापारी, सोनार, कलाकुसरीचीं कामें करणारे कारागीर वगैरे लोकांनीं दिलेल्या देणग्यांचे उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतात; पण, यांपैकीं एकहि देणगी ब्राह्मणांनीं चालविलेल्या किंवा ब्राह्मणांचा संबंध असलेल्या देवळें वगैरे संस्थेला दिलेली नाहीं. इतकेंच नव्हे, तर ब्राह्मण व त्यांचे विशिष्ट प्रकारचे यज्ञ यांचा उल्लेख असणारे हे उत्तरकालीन शिलालेख संस्कृतांत आहेत, तर हे पूर्वीचे लेख पालींत किंवा तत्सदृश जी भाषा हे संचारी भिक्षू बुद्धसंप्रदायाच्या उदयाच्या वेळीं वापरीत असें वर सांगितलें तींत आहेत. ही भाषा हे शिलालेख जेथें सांपडले तेथें प्रचारांत असलेली भाषा होती असेंहि म्हणतां येत नाहीं.

या दोन प्रकारच्या शिलालेखांत दिसून येणाऱ्या भाषेसंबंधाच्या व देणग्यासंबंधाच्या तीव्र फरकावरून डॉ. भांडारकर यांनीं खालील सिद्धांत काढिला आहे.

" ख्रि. पू. दुसऱ्या शतकापासून ख्रिस्तोत्तर चार शतकांपर्यंतच्या काळांत ब्राह्मणधर्मासंबंधाच्या इमारती, खोदकामें वगैरे कोठेंच सांपडत नाहींत. याचा अर्थ ब्राह्मणधर्म

या वेळीं प्रचारांत नव्हता असा नव्हे; कदाचित्, पुढें पुढें ब्राह्मणधर्माला जें स्वरूप प्राप्त झालें त्याची ही प्रथमावस्था असूं शकेल. परंतु ब्राह्मणधर्माला महत्त्व असें या कालांत कधींच नव्हतें, व राजापासून रंकापर्यंत बऱ्याच लोकांनीं बौद्ध संप्रदायाचें अनुयायित्व पतकरिलें होतें. शिलालेखांच्या भाषेवरून ब्राह्मणविशेषेंपेक्षां ही भाषा वापरणारांचा मान अधिक राखला जात होता असें दिसतें. "

या काळाच्या (ख्रि. पू. २०० ते ख्रिस्तोत्तर ४००) संबंधांत हें मत खरें आहे असें घेऊन चाललें तर तत्पूर्वीच्या चार शतकांसंबंधानें हें जास्तच खरें असलें पाहिजे. प्रो. हॉपकिन्स म्हणतो:—" ब्राह्मणधर्म हा कांहीं अंशीं समुद्रांतल्या एका बेटासारखा आहे. ब्राह्मणधर्माच्या अत्यंत भरभराटीच्या काळांत सुद्धां हा धर्म कांहीं थोड्याच लोकांनीं अंगीकारलेला होता, असा पुरावा सांपडतो. " याचा अर्थ ब्राह्मणांचे आचारविचार व सामान्य जनांचे म्हणजे त्यांच्या मार्फत संस्कार करून घेणाऱ्यांचे आचारविचार यांत अंतर मोठें होतें असा असेल तर हॉपकिन्सचें म्हणणें आपणांस वावगें वाटत नाहीं.

**भाषा.**—राजसत्तेच्या केंद्राबरोबर भाषेच्या प्रभुत्वाचा केंद्रहि साहजिकच बदलत गेला. प्रथमतः हा केंद्र पंजाबांत होता. तेथून पुढें तो कोसलांत, व कोसलांतून मगधांत आला, आणि शेवटीं ज्या वेळीं संस्कृत ही सर्वसाधारण लेखनाची भाषा झाली, त्या वेळेस अत्यंत महत्त्वाची अशी देश्य भाषा पश्चिम हिंदुस्थानांत प्रचारांत होती.

वैदिक भाषेवर उच्चार व शब्दसमूह या बाबतींत द्रविड भाषांचा बराच परिणाम झाला होता. आर्यन् लोकांच्या प्रचारांतील पाली, प्राकृत किंवा संस्कृत या सर्व भाषांवर द्रविड भाषांचा थोडाबहुत परिणाम झालेला आहे. आणि हा परिणाम अनार्य लोक व आर्य लोक यांच्यांत जो वर्णसंकर झाला त्याच्या इतका तरी खास आहे. यावरून बऱ्याच गोष्टींचा बोध होईल.

गोदावरीच्या दक्षिणेस याच्या उलट प्रकार आढळतो; म्हणजे द्रविड भाषांवर आर्य भाषांचा परिणाम झालेला दिसतो. यावरून या भागांत आर्य लोकांची वस्ती उशिरां झाली व येथें आर्य फारसे आले नाहींत असें दिसतें. या भागांत ब्राह्मणांचें वर्चस्व प्रस्थापित होण्यास फार काळ लागला. मोठमोठे धनिक लोक, शेटसावकार व त्या काळचा सुशिक्षित समाज बुद्धानुयायी व जैनसंप्रदायी होता, व नंतर तो हिंदु बनला. कांची व तंजावर येथें पांचव्या किंवा सहाव्या शतकापर्यंतचीं पाली पुस्तकें सांपडतात; आणि बौद्ध संप्रदायाचा जसजसा ऱ्हास होत गेला तसतसें जैन संप्रदायानें आपलें डोकें वर काढलेलें आढळतें. उत्तर हिंदुस्थानांत ब्राह्मणधर्माचा उदय होऊन तेथें त्याचें वर्चस्व नीटपणें स्थापित झाल्यावर ब्राह्मणधर्माची दक्षिणेंत प्रस्थापना झाली. एकदां या स्थितीला येऊन पोंचल्यानंतर ब्राह्मणधर्माची विलक्षण भरभराट झाली व कुमारिलभट्टापासून तों शंकराचार्यापर्यंत (इ. स. ७००–८००) च्या काळांत तर त्या भरभराटीचा कळस झाला.

**ब्राह्मणांस वर्चस्व राखण्यासाठीं द्यावी लागलेली किंमत.**—ब्राह्मणधर्मानें हा विजय संपादन केला खरा, पण याला विजय कसा म्हणतां येईल? समाजसंस्था व धर्मशास्त्राच्या बाबी यांत ब्राह्मणांनीं सर्व मक्ता आपल्याकडे घेतला; जातिभेदाची पद्धति सर्व चालू होती तरी ब्राह्मण जातीचें वर्चस्व निमूटपणें मान्य झालें, व अध्यापनाचा अधिकार ब्राह्मणांनाच आहे त्याबद्दलहि वाद राहिला नाहीं. ब्राह्मणांच्या वर्चस्वाचा ज्यांनां हेवा वाटे व जे त्यांच्याशीं भांडत त्या रजपूतांतील बौद्ध व जैन लोकांची संख्या बरीच कमी होऊन हे पक्ष पडल्यासारखे झालें होते, व बाकीचे सर्व त्यांच्या आधीन झाले होते. सर्वांभूतीं परमेश्वराचें अस्तित्व पाहणाऱ्या पंथाखेरीज इतर पंथांचें तत्त्वज्ञान कुचकामाचें ठरलें गेलें. हें सर्व झालें खरें, पण याबरोबरच वैदिक देवता, वैदिक भाषा, वैदिक तत्त्वज्ञान हींहि यां झपाट्यांत चुरडलीं गेलीं. लोक आपआपल्या देवतांनां मान देऊं लागले. हिंसाप्रधान यज्ञ अद्यापहि क्वचित् होत असत, परंतु ते आतां नवीन देवतांनां उद्देशून होऊं लागले. याज्ञिक कर्मांत ब्राह्मणांचें वर्चस्व होतें तें कमी कमी होत चाललें. वैदिक देवतांनां न मानणाऱ्या व त्यांची पूजा न करणाऱ्या लोकांची मनधरणी करण्यासाठीं नवीन दैवतकल्पनांनां अनुसरून ब्राह्मणांनां आपलें वाङ्मय फिरवावें लागलें. जुन्या गोष्टींस नव्या कल्पनांनां पटेल असलें काव्यमय स्वरूप देण्याच्या भरांत ऐतिहासिक दृष्टि नष्ट झाली. ब्राह्मणांनीं यज्ञकर्माचें नेतृत्व टाकून देऊन लोकांच्या कल्पनांनां काव्यमय रूप देण्याचें पतकरलें. त्यांच्या देवांचे जेव्हां त्यांनीं पोवाडे गाण्यास सुरुवात केली, तेव्हांच त्यांनां आपलें वर्चस्व राखतां आलें. त्यांच्यापैकीं पुष्कळ लोकांची गरज भागली खरी, पण पुष्कळ लोक वैदिक देवतांनां मानीनातसे झाले. त्यांच्यामधील फारच थोड्या लोकांनीं वैदिक सरस्वतीचा ओघ थोडासा कायम ठेविला होता.

**ब्राह्मणी वाङ्मयावरून निघणाऱ्या इतिहासाचा एकांगीपणा.**—हिंदी भाषा व वाङ्मय यांच्या या अत्यंत त्रोटक सारांशावरूनहि असें दिसून येईल कीं, यूरोपांतल्याप्रमाणेंच येथेंहि आध्यात्मिक व आधिभौतिक सत्तांमधील लढा हाच या इतिहासाचा प्रमुख भाग होता. या लढ्याचें स्वरूप याज्ञिक कर्मकांडवाल्या भिक्षुकांनीं जसें आपणांस दाखविलें तसें आपणांपुढें आहे. या सर्व लढ्यांत त्यांचें वर्चस्व त्यांनीं दाखविलेलें आहे. परंतु या प्रश्नाच्या दुसऱ्या बाजूचाहि विचार केला पाहिजे. येणेंप्रमाणें ब्राह्मणांच्या महत्त्वाची कल्पना संकुचित करण्याचा प्रयत्न करून पुढें ऱ्हीस डेव्हिड्स म्हणतात.—

"येथें गैरसमज होऊं नये एवढ्याकरितां हें सांगणें जरूर आहे कीं, या ब्राह्मण लोकांमध्यें कांहीं धनाढ्य लोक होते, व विद्वान् लोकहि होते; हे लोक सत्ताधारी होते; यांनां समाजांत मान होता; व नीति व तत्त्वज्ञान यांच्या प्रसारार्थ यांनीं बरीच खटपट केली. परंतु या लोकांनीं स्वतःच्या बुद्धिमत्तेची, धनाढ्यत्वाची वगैरे एकांगी माहिती लोकांपुढें मांडिली आहे. ब्राह्मण विद्वान् नव्हते, धनाढ्य नव्हते असें म्हणण्याचा येथें हेतु नसून त्यांच्या म्हणण्याप्रमाणें विद्वत्तेचा वगैरे सर्व मक्ता त्यांनीं एकट्यांनींच घेतलेला नव्हता एवढेंच कायतें सांगावयाचें आहे." हें डेव्हिड्सचें म्हणणें विशेष अमान्य होईल असें नाहीं.

ब्राह्मणांनीं दिलेल्या या एकांगी इतिहासाचें सत्य स्वरूप लक्षांत आल्याखेरीज हिंदुस्थानचा सुसंगत इतिहास समजणें अशक्य होईल.

**वाङ्मय.**—ख्रि. पू. सहाव्या शतकांत हिंदुस्थानांत एका विशिष्ट प्रकारचेंच वाङ्मय होतें असें मागें दाखविलेंच आहे. ह्या वाङ्मयाचा विस्तार पाहिला म्हणजे, त्या काळांतील सामान्य लोक हीं भिक्षुकवर्गाच्या ताटाखालचीं मांजरें नव्हतीं तर इतर देशांतल्याप्रमाणेंच त्यांच्या मतांची वगैरे वाढ स्वतंत्रपणानें होत होती हें स्पष्ट होतें. ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे सामान्य लोकांनीं तत्त्वज्ञानाच्या बाबतींत एवढी मजल कशी मारली याचें आश्चर्य वाटणार नाहीं. सामान्य लोकांस पूर्वकल्पनापरंपरेचें ओझें नव्हतें त्यामुळें त्यांचे विचार स्वतंत्र होते. या वाङ्मयाचें पर्यालोचन केलें असतां त्या काळांतील हिंदुस्थानचा बराच इतिहास बनवितां येण्यासारखा असल्यामुळें त्यापैकीं महत्त्वाचें जें तिपिटक अथवा पालीधर्मशास्त्र त्याचा विस्तरतः परामर्श घेऊं.

## प्रकरण ११ वें.

## तिपिटक अथवा पाली धर्मशास्त्र.

या ग्रंथाचें सविस्तर विवेचन आपणांस चीन, जपान, सिलोन व ब्रह्मदेश यांतील वैचारिक परंपरा लक्षांत येण्यासाठीं अवश्य आहे. वेदविद्या आणि सूतवाङ्मय यांचें जें महत्त्व भारतीयांस आहे तितकेंच बौद्ध लोकांस तिपिटक नामक वाङ्मयाचें आहे. शिवाय वैदिक आणि सूतवाङ्मय यांचे संयुक्त परिणाम पहाण्यास जसें अर्वाचीन हिंदूंच्या आयुष्याकडे पाहिलें पाहिजे तसेंच त्या दोन्हीं वाङ्मयाचें परिणामस्थान म्हणून बौद्ध वाङ्मयाकडेहि अवलोकिलें पाहिजे. ज्या बौद्ध वाङ्मयाचा आपण मागें इतिहासार्थ उपयोग केला त्या वाङ्मयाचें स्थूल स्वरूप आपणांस ज्ञात झालें पाहिजे.

गौतम ख्रि. पू. ४८० च्या सुमारास निर्वाणाप्रत गेला व त्या वेळीं त्याचें वय ८० वर्षांचें होतें अशी विश्वसनीय सांप्रदायिक परंपरा आहे. तो २९ वर्षांचा असतांना "मोक्षाचा मार्ग शोधून काढण्याकरितां" यतिवेषानें भ्रमण करूं लागला असें दिसून येतें. बरेचसे मानसिक श्रम करून बुद्धीस प्रगल्भता आल्यावर तो आपण शोधून काढलेल्या तत्त्वांचें प्रतिपादन करूं लागला. बावरून तो आपल्या मताचा प्रचार अजमासें ख्रि.पू.५२५व ४८० यांच्या दरम्यान करीत असावा असें वाटतें.याच वेळीं त्यानें पुढें सर्व जगांत अत्यंत प्रमुख अशा पारमार्थिक संप्रदायांमध्यें महत्त्वाचें स्थान मिळविणाऱ्या एका भारतीय संप्रदायाचा पाया घालून त्याचा प्रसार केला. बुद्धाचें कार्यक्षेत्र भारतवर्षाच्या ईशान्य भागांतील गंगा नदीच्या कांठचा प्रदेश हें होतें. या प्रदेशांत म्हणजे त्या वेळच्या मगध ( बहार ) आणि कोसल ( अयोध्या ) या राज्यांत त्यानें ठिकठिकाणीं भ्रमण करून आपल्या तत्त्वांचा उपदेश केला, व त्याला अनेक अनुयायीहि मिळत गेले.

**प्रत्यक्ष बुद्धाचीं वचनें.**—या कालांत कांहीं बौद्ध वाङ्मय उत्पन्न झालें असेल काय? मुळीच नाहीं. यद्यपि बौद्धांचे पाली भाषेंतील सांप्रदायिक ग्रंथ जे तिपिटक अथवा त्रिपिटक त्यांमध्यें सर्व भाषणें व वचनें बुद्धांच्याच तोंडीं घातलीं आहेत; व तीं भाषणें त्यानें कोणकोणत्या प्रसंगीं केलीं हेंहि निश्चितपणें व सविस्तर दिलें आहे. तथापि खरोखर बुद्धाचीं वचनें यांपैकीं कोणतीं हें निवडून काढणें जवळ जवळ अशक्य आहे. कारण बुद्धाचे स्वनिर्मित ग्रंथ याज्ञवल्क्य, शांडिल्य अथवा शौनक यांच्या इतकेच असणें शक्य आहे. परंतु वर निर्दिष्ट केलेल्या ऋषींचीं ज्याप्रमाणें बरींचशीं भाषणें व वचनें उपनिषदांमधून परंपरेनें चालत आलीं आहेत, त्याप्रमाणेंच बुद्धाचीं बरींचशीं भाषणें व वचनें त्याच्या शिष्यांनीं आपल्या स्मरणांत फार काळजीपूर्वक ठेवून तीं परंपरेनें कायम राखलीं असावींत. 'सत्यचतुष्टय' म्ह० चार आर्य सत्यें यावरील बुद्धाचें काशी येथील प्रवचन; 'अष्टविध मार्ग' म्ह० आर्य अष्टांगिक मार्ग यावरील भाषण ( हें सांप्रदायिक पाली ग्रंथांमध्यें त्याचप्रमाणें बौद्ध-सांप्रदायिक संस्कृत ग्रंथांमध्यें त्याच शब्दांत अनेक वेळां आलेलें आहे); निर्वाणापूर्वी आपल्या शिष्यांस उद्देशून केलेलीं महापरिनिब्बान सुत्तांमधील त्याचीं अखेरचीं भाषणें; आणि धम्मपद, उदान, इतिवुत्तक व नेपाळांतील संस्कृत ग्रंथ व त्यांचीं तिबेटी आणि चिनी भाषांत असलेलीं भाषांतरें यांमध्यें जीं पद्यें व ज्या उक्ती 'बुद्धाचीं वचनें' म्हणून आढळतात तीं; हीं सर्व खास बुद्धाचींच असावींत असें म्हणण्यानें आपण अंधश्रद्धेच्या आरोपास पात्र होऊं असें वाटत नाहीं. शिवाय, गौतमानें केवळ हें जग दुःखमय आहे या तत्त्वाचा व त्या दुःखाचा परिहार कसा करावा याबद्दलचा उपदेश केला एवढेंच नव्हे, तर त्यानें एका नियमबद्ध संप्रदायाची स्थापना केली होती. त्यानें आपल्याभोंवतीं शिष्यमंडळ जमविलेलें होतें. हा शिष्यवर्ग त्यानें घालून दिलेल्या कडक नियमांचें पालन करून आपल्या गुरूच्या उपदेशाप्रमाणें

शुद्धाचरण ठेवून सर्व दुःखांचा अंत जें अत्युच्चनिर्वाण त्याची प्राप्ति करून घेण्याच्या मार्गास लागला होता. तेव्हां या भिक्षुसंघाचे कांहीं नियम व आचार स्वतः बुद्धानेंच घालून दिलेले असले पाहिजेत. विशेषतः 'दससीलम्' किंवा भिक्षुवर्गास केलेल्या दहा आज्ञा,व 'पातिमोक्ख' अथवा स्वपातकनिवेदन हीं या सदरांखालीं येतात.सारांश,कोणताहि बौद्ध वाङ्मयांतील ग्रंथ सर्वतः बुद्धकालीन म्हणतां येणार नाहीं; तरी त्यांतील कांहीं निवडक भाग बुद्धाचीं वचनें म्हणून मानल्यास तें चूक होणार नाहीं. एवढें मात्र खरें कीं, बुद्धाच्या पहिल्या शिष्यांपैकीं कांहीं विशेष बुद्धिमान् असून त्यांनीं या संग्रहांतील कांहीं भाषणें, श्लोक व वचनें स्वतःच रचून त्यांत सामील केलीं असण्याचा संभव आहे. पाली गाथांतील वचनें फार प्राचीन असावींत असें वृत्तांवरूनहि व्यक्त होतें. पाली गाथांतील वृत्तें रामायणांतील वृत्तांपेक्षां प्राचीन आहेत असें ओल्डेनबर्गचें मत आहे ( गुरुपूजाकौमुदी पृ. ९ व पुढील पानें ).

**बौद्ध धर्मशास्त्राच्या रचनेचा काळ.**—प्राचीन बौद्ध वाङ्मय म्हणजे बुद्धाचीं संभाषणें व वचनें, व गीतें, कथा व सांप्रदायिक नियम यांचा संग्रह हीं होत; व या संग्रहांचा मोठा समूह म्हणजेच त्रिपिटक होय. आतां हें उघड आहे कीं, या संग्रहांतील निरनिराळे भाग निरनिराळ्या काळीं रचले गेले असून हा संग्रह म्हणजे त्यांचें अखेरचें स्वरूप असावें;-व तो एका विशिष्ट काळांतील वाङ्मयविषयक चळवळीच्या अखेरीचा द्योतक होय.

बौद्ध परंपरेवरून पहिला असा एक संग्रह फार प्राचीन काळीं केला गेल्याचा दाखला मिळतो. कारण, बुद्ध निर्वाणाप्रत गेल्यावर कांहीं आठवड्यांनीं राजगृही-सध्यांच्या राजगिर गांवीं-त्याच्याजवळ असणाऱ्या शिष्यांनीं 'प्रथम बौद्ध संगीति' भरवून धर्म आणि विनय ( म्ह० बौद्ध धार्मिक आचार ) हीं निश्चित केल्याचा उल्लेख आहे.

आतां त्रिपिटकांमध्यें हे धर्म व विनय यांचे नियम सुत्तपिटक आणि विनयपिटक या दोन भागांत नमूद केले आहेत. प्रचलित पाली धर्मशास्त्रांत बुद्धनिर्वाणकालीन नियम अक्षरशः जसेचे तसेच चालत आलेले आहेत अशी समजूत आहे. परंतु ते इतक्या कालपर्यंत अविकृत स्थितींत राहणें सर्वथा अशक्य असल्यामुळें बुद्धकालीन नियम ते हेच या गोष्टीवर विश्वास ठेववत नाहीं. तथापि यावरून ही परंपरा अगदीं निराधार आहे असें समजण्याचें मात्र कारण नाहीं. कारण वरील गोष्टीपासून आपणांला एवढी गोष्ट कळते कीं, बुद्ध निर्वाणास गेल्यानंतर लवकरच त्या संप्रदायांतील शिष्टमंडळी आपली सांप्रदायिक मुख्य मुख्य तत्त्वें व संप्रदायाचे आचारनियम निश्चित करण्याकरितां एकत्र जमली असावी; व हीं गोष्ट संभवनीयहि दिसते. यद्यपि सध्यां प्रचलित असलेल्या तिपिटकाची रचना होण्याकरितां बुद्धनिर्वाणानंतरचा इतका अल्पकाल पुरेसा नाहीं.

वैशाली येथें बुद्धनिर्वाणानंतर शंभर वर्षांनीं द्वितीय संगीति भरल्याबद्दल जी परंपरा आहे ती जास्त विश्वसनीय दिसते. परंतु ही संगीति केवळ या संप्रदायांतील आचारांमध्यें जीं दहा पाखंडें उद्भवलीं होतीं तीं नाहींशीं करण्याकरितांच भरविली गेली होती अशी जुनी माहिती उपलब्ध आहे. अलीकडच्या माहितीवरून, एका सभेचें अधिवेशन आठ महिने चालून सांप्रदायिक वाङ्मयाचें परीक्षण करण्यांत आलें. जुन्या माहितीवर विश्वास ठेवला तर आपणांला एवढें एक ऐतिहासिक सत्य कळतें कीं, बुद्धनिर्वाणानंतर सुमारें एका शतकानें संप्रदायामध्यें मतभेद होऊन एवढा वादविवाद माजला कीं, सर्व भिक्षूंची एक मोठी सभा भरविणें भाग पडलें; व त्या सभेंत त्या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल करण्यांत आला. परंतु यावरून असें निश्चित दिसतें कीं, त्या वेळीं सध्यांच्या विनयपिटकाप्रमाणें भिक्षूंच्या आचारांबद्दलचे नियम आपणांला सध्यांच्या तिपिटकामध्यें आढळतात त्याप्रमाणें कांहीं तरी निश्चित असले पाहिजेत, आणि त्यावरूनच वरील वादग्रस्त प्रश्नांचा निकाल करण्यांत आला असला पाहिजे. सारांश, बुद्धनिर्वाणानंतर पहिल्या शतकामध्यें बौद्ध संप्रदायाचें पूर्ण धर्मशास्त्र नसलें तरी त्यास आधारभूत अशीं सूत्रें निश्चित झालेलीं होतीं.

**तृतीय संगीतींत बौद्ध धर्मशास्त्राची रचना.**—बौद्धसांप्रदायिक धर्मशास्त्र पूर्णतेनें तृतीय संगीतिमध्यें रचलें गेलें असावें. सिंहली बखरी महावंसो व दीपवंसो यावरून ही संगीति प्रसिद्ध अशोक राजाच्या कारकीर्दींत भरली होती. या बखरी जरी मधूनमधून दंतकथांनीं भरल्या आहेत, तरी त्या मुख्य गोष्टींत विश्वसनीय आहेत असें विंटरनिट्झ समजतो. या बखरींवरून असें दिसतें कीं, त्या वेळीं बौद्ध संप्रदायामध्यें बरेंच पंथ निघाले होते, व त्यामुळें ज्यांनां बुद्धानें घालून दिलेल्या मूळ संप्रदायाप्रमाणें चालावयाचें होतें त्यांच्याकरितां धर्मशास्त्राचे नियम निश्चित करणें अवश्य वाटूं लागलें असावें. राजा अशोक हा बौद्धांचा मोठा पुरस्कर्ता असल्यामुळें त्याच्याच कारकीर्दींत अशा प्रकारचें धर्मशास्त्र रचलें जाणें संभवनीय दिसतें. अशोकानेंहि आपल्या एका शासनामध्यें पाखंडवाद्यांचा प्रतिकार केलेला दिसतो. त्याला देखील बुद्धाचीं खरीं सांप्रदायिक मतें कोणतीं हें निश्चित करणें अशक्य वाटलें असावें. अशोकाच्या शिलालेखांत या संगीतीचा उल्लेख सांपडत नाहीं यावरून विंटरनिट्झ हा, अशोक हा इतका निःपक्षपाती होता कीं ही संगीति स्वतःच्या नांवानें न बोलावितां तें काम त्यानें भिक्षुवर्गावर सोंपविलें, असें अनुमान काढतो. हा त्याचा निःपक्षपातीपणा त्यानें आपल्या शासनांत इतर संप्रदायांस दिलेल्या मतस्वातंत्र्याचा विशेष उल्लेख केल्यावरून दिसून येतो असें तो म्हणतो. तथापि, आपल्या शासनामध्यें अशोकास या संगीतीचा उल्लेख करण्याचें कांहीं कारण नव्हतें असें फ्लीट यास वाटतें ( जर्नल रॉयल एशिआटिक सोसायटी,

१९०८, पृ. ४९३ पहा ). व स्वतः विंटरनिट्झहि खि. पू. २४२–२४१ या कालापर्यंत तिसरी संगीति झाली नव्हती हें व्ही. ए. स्मिथचें म्हणणें कदाचित् खरेंहि असूं शकेल आणि म्हणूनच त्याच्या शासनामध्यें या संगीतीचा उल्लेख आला नसेल हें कबूल करतो.

**तिस्स मोग्गलिपुत्त.**—तथापि ज्या सिंहली बखरींस व्ही. ए. स्मिथ उत्तरकालीन म्हणून कमी विश्वसनीय मानतो त्यांवर इतर कांहीं यूरोपीय पंडितांप्रमाणें विश्वसून विंटरनिट्झ पुढें म्हणतो कीं, परंपरेवरून पाहतांहि असेंच दिसतें कीं, ही संगीति अशोक राजानें स्वतः बोलाविलेली नसून ती विद्वान् आणि सर्वमान्य अशा तिस्स मोग्गलिपुत्त या भिक्षूनें बुद्धप्रणीत ( सत्संप्रदायाचें ) धर्मशास्त्र रचण्याकरितां बोलाविली होती. त्याच्या निमंत्रणावरून पाटलिपुत्र ( पाटणा ) येथें १००० भिक्षूंची संगीति भरली होती. त्याच्या मताप्रमाणें बुद्धांच्या प्रथम शिष्यांनीं पाळलेला व विभज्यवादी पंथाचा जो थेरवाद तोच बुद्धप्रणीत संप्रदाय होता. तिस्स हा स्वतः त्याच पंथाचा अनुयायी असून या संगीतीमध्यें त्यानेंच प्रमुख भाग घेतला होता. या संगीतीचें अधिवेशन पाटलिपुत्र येथें ९ महिने चालून त्यांत याच पंथाच्या धर्मशास्त्राची रचना करण्यांत आली. तिस्स यानेंच 'कथा वत्थु' हा भाग रचून तो धर्मशास्त्रामध्यें सामील केला अशी जी परंपरागत माहिती आहे तीहि विंटरनिट्झ यास विश्वसनीय वाटते. 'कथा वत्थु' या भागांत तत्कालीन सर्व पाखंडांचें खंडन केलेलें आहे. सिंहली बखरींवरून पाहतां याच तिस्सानें बौद्ध संप्रदायाचा प्रसार करण्याकरितां उत्तरेकडे व दक्षिणेकडे प्रथम प्रचारक धाडून बौद्ध संप्रदायाचा परदेशांत प्रसार करण्याचा उपक्रम केला. अशोकाचा धाकटा भाऊ ( कांहींच्या मतें अशोकाचा पुत्र ) महिंद हा या तिस्साचा शिष्य असून त्यानेंच बौद्ध संप्रदाय व बौ धर्मशास्त्र यांचा सिंहलद्वीपांत प्रवेश करविला असा समज आहे.

**तिपिटक तेंच तृतीय संगीतींत तयार झालेलें पाली धर्मशास्त्र काय?**—बखरकारानें महिंद व त्यासहवर्तमान असलेले भिक्षू हे आकाशमार्गानें उडत सिंहलद्वीपांत येऊन उतरले असें जें वर्णन केलें आहे त्यावर जरी आपणांस विश्वास ठेवतां येत नाहीं, तरी ही सिंहलप्रचारविषयक कथा आपणांस कुचकामाची समजतां येत नाहीं. अशा प्रकारच्या अनेक दंतकथांनां आधारभूत अथवा मूलभूत एक ऐतिहासिक सत्य असावें असें आपणांस धरून चालण्यास हरकत नाहीं. तें सत्य हें कीं, हा बौद्ध संप्रदाय व तद्विषयक धर्मशास्त्र यांनां सिंहलद्वीपांत प्रथम महिंद यानें नेलें. आरंभीं या धर्मशास्त्राचें संक्रमण एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे अध्ययनअध्यापनद्वारा तोंडी परंपरेनें होत असे, पण पुढें खिस्तपूर्व पहिल्या शतकामध्यें तें सिंहली राजा वट्टगामनि याच्या कारकीर्दींत लिहून काढण्यांत आलें, हा जो प्रचलित समज आहे तोहि बहुतांशीं खरा असावा. याप्रमाणें सिंहलद्वीपांतील बौद्धांच्या मतें, सध्यां प्रचलित असलेलें पाली भाषेंतील धर्मशास्त्र जें तिपिटक तेंच तृतीय संगीतीमध्यें रचलें गेलेलें, महिंदानें सिंहलद्वीपांत आणलेलें आणि वट्टगामनीच्या कारकीर्दींत लिहिलें गेलेलें बौद्ध धर्मशास्त्र होय.

या तिपिटकाचीं तीन पिटकें आहेत. पिटक याचा अर्थ पेटिका म्हणजे पेटी असा आहे. हीं तीन पिटकें येणेंप्रमाणें:—

१ विनय पिटक.—आचारसंग्रह. यामध्यें संघाचे नियम आहेत. त्यांत भिक्षू व भिक्षुणी यांच्या दिनक्रमाबद्दल व आचारांबद्दल नियम आहेत.

२ सुत्त पिटक.—पाली भाषेंतील सुत्त हा शब्द संस्कृत भाषेंतील सूत्र या शब्दासारखाच आहे. परंतु बौद्ध त्याचा उपयोग थोडक्यांत उपदेश अगर विधान या अर्थी न करतां उपदेशपर वाक्य अथवा प्रवचन या अर्थीं करतात. धम्म या विषयावरील लहान अथवा मोठें विवरणात्मक वाक्य अथवा संभाषण याला सुत्त हा शब्द लावतात. सुत्तपिटकामध्यें पांच निकाय म्हणजे सूत्रसंग्रह आहेत.

३ अभिधम्म पिटक.—यामध्यें विनय पिटकाप्रमाणेंच धम्मविषयक विवेचन आहे, परंतु तें वरीलप्रमाणें लहानलहान वाक्यांत अथवा संभाषणात नाहीं. हा भाग म्हणजे बौद्धसांप्रदायिक नीतितत्त्वांचा मानसशास्त्रदृष्ट्या पाया असून त्यामध्यें निरनिराळे विषय, विभाग व अनुक्रमणी देऊन त्यांवर पांडित्यपूर्ण लांबलचक रूक्ष विवेचन केलें आहे.

धर्मग्रंथांची पिटकवार तीन पेट्यांत विभागणी केली असून त्याशिवाय पाली धर्मसूत्रांत उल्लेखिल्याप्रमाणें धर्मग्रंथांची ९ अंगेंहि केलेली आहेत. हीं अंगें येणेंप्रमाणें.—(१) सुत्त (उपदेशपर व्याख्यानें); ( २ ) गेय्य ( गद्यपद्यमिश्रित व्याख्यानें); ( ३ ) वेय्याकरण ( अभिधम्माच्या धर्तीप्रमाणें केलेलें विवरण); ( ४ ) गाथा ( श्लोक ); ( ५ ) उदान ( स्फूर्तिदायक उक्ती); ( ६ ) इत्तिवुत्तक ( 'बुद्ध असें म्हणाला.' या शब्दांनीं सुरू होणारीं लहान लहान भाषणें ); ( ७ ) जातक ( बुद्धाच्या पूर्वजन्मींच्या गोष्टी); ( ८ ) अब्भुत धम्म ( चमत्कारांविषयीं विचार ); व ( ९ ) वेदल्ल ( प्रश्नोत्तररूपी उपदेश ). बौद्धांच्या संस्कृत वाङ्मयामध्येंहि अशाच प्रकारची विभागणी आहे. परंतु ही विभागणी सर्व सूत्रांत नाहीं, इतकेंच नाहीं तर कांहीं पुस्तकांतहि ती नाहीं. आकारावरून व मजकुरावरून कित्येक ग्रंथांचें फक्त वर्गीकरण या विभागणीपद्धतीनें केलेलें आहे.

वर उल्लेखिलेला तिस्स यानें रचलेला कथावत्थु हा भाग या पाली धर्मशास्त्रांत अभिधम्मपिटकामध्यें समाविष्ट केलेला आहे. परंतु हा तिपिटकांतील सर्वांत अखेरीस रचलेला भाग आहे हें सिद्ध करतां येईल. कारण त्यामध्यें सुत्तपिटकांतील बरींच वचनें अगोदरच ज्ञात आहेत असें गृहीत धरलें आहे. तसेंच प्राचीन ग्रंथामध्यें—उदाहरणार्थ

राजगृह येथील संगीतीच्या हकीकतीमध्यें-धम्म आणि विनय यांचाच वारंवार उल्लेख आढळतो; अभिधम्माचा कोठेंहि उल्लेख आढळत नाहीं. तेव्हां यावरून दुसऱ्या गोष्टी बाजूस ठेवल्या तरी असें म्हणतां येईल कीं, तृतीय संगीतीच्या सभासदांनीं सर्व सांप्रदायिक ग्रंथ एकत्र करते वेळीं अभिधम्म ग्रंथांस त्यांच्या उत्तरकालीनत्वामुळें शेवटची जागा दिली व शेवटीं तिस्स याचा स्वतःचा ग्रंथ जोडून दिला. तथापि सिंहली श्रद्धाळू बौद्ध लोकांप्रमाणें आपणांस तृतीय संगीतीच्या वेळीं रचलेलें बौद्ध धर्मशास्त्र हेंच सध्यां प्रचलित असलेलें पाली भाषेंतील तिपिटक होय हें मान्य करणें अशक्य आहे.

**पाली भाषा.**—प्रथमतः ख्रिस्तपूर्व तृतीय शतकामध्यें रचलें गेलेलें धर्मशास्त्र व सध्यांचें तिपिटक यांची भाषा एकच असणें अशक्य आहे. कारण तें त्या वेळची मगध (बहार) देशांतील जी मागधी भाषा तींतच रचलें गेलें असलें पाहिजे. गौतमबुद्धाची हीच जन्मभाषा असून तींतच तो उपदेश करीत असला पाहिजे. त्याचप्रमाणें मगध देशाची राजधानी जें पाटलिपुत्र शहर त्यामध्यें धर्मशास्त्रें रचणाऱ्या भिक्षूंनीं मागधीच भाषा वापरली असली पाहिजे. या मागधी धर्मग्रंथांचे अवशेष अद्यापीहि पाली भाषेंतील धर्मशास्त्रांत दाखवितां येतील. सिंहलद्वीप, ब्रह्मदेश व सयाम या देशांतील लोक तर त्यांच्या धर्मशास्त्राची जी पाली भाषा आहे तिला मागधी या नांवानेंच उल्लेखितात. तथापि ती भाषा आपणांला शिलालेख, व्याकरणें व इतर ग्रंथ यांमध्यें आढळून येणाऱ्या मागधी भाषेहून अगदीं निराळी दिसते. त्याचप्रमाणें ती दुसऱ्या कोणत्याहि भाषेशीं सदृश असेंहि दिसत नाहीं. पाली ही फक्त वाङ्मयविषयक भाषा म्हणजे केवळ प्रौढ वाङ्मयांत आढळणारी भाषा असून ती केवळ बौद्ध लोकच ग्रंथांतरीं उपयोगांत आणीत असत; आणि तिची वाढ इतर वाङ्मयीन भाषांप्रमाणें कमीजास्त प्रमाणान निरनिराळ्या देशभाषांचें मिश्रण होऊन झाली होती. अर्थात् अशी वाङ्मयविषयक भाषा जरी दोन निरनिराळ्या देशभाषांच्या मिश्रणांतील एक अवस्था दाखविते, तरी ती प्रथमतः त्यांपैकीं कोणत्या तरी एकाच देशभाषेपासून निश्चितपणें निघाली असली पाहिजे. अशा रीतीनें ही मूळ देशभाषा मागधी असणें शक्य आहे; व त्यामुळें पाली आणि मागधी या दोन्ही एकच भाषा आहेत अशी जी परंपरागत समजूत आहे, ती अक्षरशः खरी नसली तरी तिला थोडासा ऐतिहासिक पुराव्याचा पाठिंबा आहे.

बौद्ध संप्रदायाच्या बाल्यावस्थेंत धर्मशास्त्रग्रंथांच्या भाषेच्या स्वरूपाकडे विशेष लक्ष दिलें जात नसे. याविषयीं बुद्धाचें एक वचन असें सांगण्यांत येतें कीं, तो शब्दापेक्षां अर्थालाच जास्त महत्त्व देत असे. विनयपिटकामध्यें बुद्धाचें असें वचन दिलें आहेः "माझ्या वचनांचें संस्कृतासारख्या नियमबद्ध शास्त्रीय भाषेंत भाषांतर करतां कामा नये; त्या वचनांचा अर्थ प्रत्येकानें आपआपल्या भाषेमध्यें योग्य तो खुलासा करून समजून घ्यावा हेंच उत्तम."

तेव्हां, वाङ्मयविषयक जी पाली भाषा तिची वाढ हळू हळू झाली असून तिला निश्चित स्वरूप वट्टगामनीच्या कारकीर्दीत सिलोनमध्यें हें धर्मशास्त्र लिहिलें गेलें त्या वेळीं आलें असावें. यानंतर सिंहलद्वीपांतील भिक्षुवर्गानें धर्मशास्त्राची हीच भाषा कायम राखणें व त्याचा त्या भाषेंत प्रसार करणें या गोष्टींस महत्त्व दिलें असावें; कारण ही भाषा त्या वेळीं निश्चित झाली होती. तसेंच त्या वेळीं पाली भाषेमध्यें लिहिल्या गेलेल्या तिपिटकधर्मशास्त्राची निश्चित झालेली भाषा कायम राखण्याची खबरदारी ज्याप्रमाणें तेथील भिक्षुवर्ग गेल्या दोन हजार वर्षांत अत्यंत काळजीपूर्वक घेत आला, त्याचप्रमाणें त्यांत समाविष्ट केलेले विषयहि जसेचे तसे परंपरेनें कायम राखण्याची खबरदारी त्यानें घेतली असावी. तथापि पाली भाषेमध्यें जाऊन निश्चित होण्यापूर्वी व सिंहलद्वीपांत जाऊन पोंचण्यापूर्वी शास्त्रग्रंथांच्या स्वरूपांत पुष्कळ बदल झाला असणें संभवनीय आहे.

**तिपिटकाचें प्राचीन व अर्वाचीन स्वरूप.**—यावरून पालीभाषेंतील तिपिटक हें जरी अशोकाच्या वेळीं रचलेल्या धर्मशास्त्राशीं जवळ जवळ सदृश असलें, तरी त्याची भाषा व त्यांतील विषय हीं एकच असणें शक्य नाहीं. कारण ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकापासून पहिल्या शतकापर्यंत व हें धर्मशास्त्र लिहिलें जाऊन निश्चित होईपर्यंत—किंवा त्यानंतरहि—त्याच्या स्वरूपांत फरक होत गेले असले पाहिजेत. विशेषेंकरून त्यांत पुष्कळ भर पडली असली पाहिजे, व मूळ ग्रंथांवरील टीका त्या ग्रंथांतच सामील झाल्या असल्या पाहिजेत. या ग्रंथांच्या परंपरेची ऋग्वेदांतील सूक्तांच्या परंपरेशीं तुलना करणें बरोबर नाहीं. संस्कृतहून बऱ्याच भिन्न असलेल्या प्राचीन भाषेनें वैदिक सूक्तांचें रक्षण केलें आहे. वैदिक सूक्तांत प्रक्षिप्त भाग तेव्हांच ओळखतां आला असता. उलटपक्षीं पाली भाषा मठवासी भिक्षू वापरूं लागल्यामुळें, त्या भाषेंत निष्णात असलेल्या उत्तरकालीन इसमास पाली ग्रंथांत मागून प्रक्षिप्त भाग घुसडणें बरेंच सोपें होतें. हा जो मध्यंतरीं दोन हजार वर्षांचा काल गेला त्यानें आपला कांहीं तरी ठसा या ग्रंथांवर उमटविला असलाच पाहिजे. याखेरीज, या ग्रंथांमध्यें दिसून येणाऱ्या कित्येक परस्परविरुद्ध वचनांची, एकत्र ग्रथित केलेल्या जुन्या व नव्या परंपरांची व निरनिराळ्या संग्रहांत आढळून येणाऱ्या पुनरुक्तींची, संगति आपणांस लावतां येणार नाहीं.

तथापि अशा प्रकारच्या पुनरुक्तींवरून व विरोधांवरून एकंदर धर्मसूत्रें मूळचीं व खरीं नाहींत असें अनुमान करणें बरोबर होणार नाहीं. एखादी कविता बुद्धाची आहे असें एखाद्या ग्रंथांत सांगितलेलें असून ती सारि-

पुत्ताची आहे असें दुसऱ्या ग्रंथांत म्हटलें असेल, किंवा एखादें भाषण राजगृहामध्यें केलेलें होतें असा एका ग्रंथांत उल्लेख असून तें काशी येथें केलेलें होतें असा दुसऱ्या ग्रंथांत उल्लेख असेल, तर हीं दंतकथात्मक वचनें खरीं नाहींत एवढेंच यावरून सिद्ध होतें. परंतु या कवितांवरून व भाषणांवरून बुद्धाच्या प्राचीन तत्त्वांचा बोध होत नाहीं असें मात्र त्यावरून सिद्ध होत नाहीं. धर्मसूत्रांतील प्रत्येक शब्द खरा असून बुद्धाशीं त्याचा संबंध आहे या कर्मठ बौद्धांच्या समजुतीला विघातक असे फ्रँकी वगैरे टीकाकारांचे युक्तिवाद आहेत; परंतु धर्मसूत्रें कांहीं अंशीं खरीं व मूळचीं आहेत अशी जी यूरोपांतील पंडितांची कल्पना आहे, त्या कल्पनेविरुद्ध कोणताहि आधार नाहीं.

उपर्युक्त गोष्टी लक्षांत ठेवूनहि आपणांस असें म्हणतां येईल कीं,पाली तिपिटकाचा बहुतेक भाग साधारणतः ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत लिहिल्या गेलेल्या मागधी धर्मशास्त्राहून फारसा निराळा नाहीं. या गोष्टीची साक्ष अशोकाच्या शिलालेखांवरून विशेषेंकरून पटते. अशोकाच्या शासनांमध्यें पाली धर्मशास्त्रांतील जुन्या सूत्रांत असलेलेंच रहस्य दिसून येतें; एवढेंच नव्हे तर या दोहोंतील भाषाहि सारखीच असून अशोकाच्या शासनांत आढळून येणारीं अवतरणें या धर्मशास्त्रामध्यें थोड्या फार फरकानें जशींचीं तशींच आढळून येतात. बैरात येथील ख्रि. पू. २४९ मधील शासनामध्यें या राजानें मगध देशांतील भिक्षूंस उद्देशून, बुद्धाचीं सर्व वचनें चांगलींच आहेत असें म्हटलें आहे. परंतु त्यानें सातच ग्रंथांचीं नांवें दिलीं असून त्यांचा अवश्य अभ्यास करावा असें सांगितलें आहे. हे ग्रंथ सध्यांच्या सुत्तपिटकामध्यें कांहीं त्याच नांवांखालीं व कांहीं त्यांसारख्या नांवांखालीं आढळतात. शिवाय ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकांतील व त्यापूर्वींचे भरहुत, सांची वगैरे ठिकाणीं जे स्तूप आहेत त्यांवर कांहीं सूचक लेख व चित्रेंहि खोदलेलीं आहेत.

**सुत्तपिटकाचें अशोकाच्या कालीं अस्तित्व दाखविणारा पुरावा.**—या स्तूपांवर बौद्ध कथांतील प्रसंगांचीं चित्रें असून कांहीं चित्रांवर नांवें खोदलेलीं आहेत. त्यांवरून हीं चित्रें बुद्धाच्या जातककथांतील म्हणजे त्याच्या पूर्वजन्माच्या कथांतील प्रसंगांचीं आहेत याबद्दल संशय रहात नाहीं. या जातककथा हा एक तिपिटकाचाच भाग आहे. सांची येथील स्मारकांवर जे अपूर्ण लेख खोदलेले आहेत त्यांमध्यें भिक्षूंनां 'पचनेकायिक' म्हणजे पांच निकायांचें ज्ञान असणारा, 'पेतकि' म्हणजे पिटकांचें ज्ञान असणारा, 'धम्मकथिक' म्हणजे धर्माचें शिक्षण देणारा, अशा नांवांनीं संबोधिलें आहे; व भिक्षुणीस 'सुत्तातिकिनी' म्हणजे सूत्रें जाणणारी असें म्हटलें आहे. यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास बौद्ध संप्रदायाचा पिटक नांवाचा धर्मशास्त्रसंग्रह असून त्यामध्यें पांच निकाय होते; आणि धर्माचें विवरण करणारीं सुत्तें [सूत्रें] होतीं. या सुत्तांपैकीं कांहीं सुत्तें सध्यांच्या तिपिटकांतलि सुत्तांप्रमाणेंच होतीं. त्याप्रमाणेंच सध्यांच्या तिपिटकांतील जातकांतल्याप्रमाणेंच त्या वेळींहि जातककथा बौद्ध वाङ्मयांत प्रचलित होत्या. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अशोक राजाच्या वेळीं बौद्ध धर्मशास्त्रांतील सुत्तपिटक हा भाग तरी प्रचलित पाली ग्रंथांतील सुत्तपिटकाहून फारसा निराळ्या स्वरूपांत नव्हता.

तिपिटकाच्या व त्यांत असलेल्या निकायांच्या अस्तित्वाचा सर्वांत प्राचीन वाङ्मयांतील उल्लेख प्रथम मिलिंदपन्ह ( मिलिंदप्रश्न ) या ग्रंथांत आढळतो. हा ग्रंथ बहुधा ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकाच्या आरंभीं लिहिला गेला असावा. परंतु या पाली धर्मशास्त्राखेरीज जें इतर बौद्ध वाङ्मय आहे, त्यावरून या धर्मशास्त्रांतील बहुतेक भाग फार प्राचीन कालचा असून तो बुद्धकालाच्या फारसा अलीकडचा नसावा असें दिसतें; व त्यावरून बौद्ध संप्रदायाची बुद्धानंतरच्या दोन शतकांतील मतें काय होतीं तें खात्रीलायक कळतें. हीच गोष्ट धर्मशास्त्रेतर पाली वाङ्मयावरूनहि सिद्ध होते. या वाङ्मयामध्यें मिलिंदपन्हांतील संवाद, सिंहलद्वीपांतील दीपवंसो व महावंसो या बखरी व तिपिटकासंबंधीं अनेक भाष्यात्मक ग्रंथ येतात. हे सर्व ग्रंथ इसवी सनाच्या आरंभींच्या शतकांमध्यें तिपिटकाचें अस्तित्व गृहीत धरतात.

**बौद्धसांप्रदायिक संस्कृत वाङ्मय.**—बौद्धसांप्रदायिक संस्कृत वाङ्मयावरूनहि बौद्ध धर्मशास्त्राचें पुरातनत्व व त्याच्या पाली भाषेंत झालेल्या भाषांतराचें यथार्थत्व सिद्ध होतें. हें वाङ्मय कांहीं शुद्ध संस्कृत भाषेंत व कांहीं मिश्र संस्कृत भाषेंत असून त्यामध्यें नाना तऱ्हेचे व नाना पंथांचे ग्रंथ आढळतात. या पंथांपैकीं एका पंथाचें स्वतंत्र धर्मशास्त्र संस्कृत भाषेंत असून त्याचे कांहीं भाग अगदीं अलीकडे प्रसिद्धीस आले आहेत. हें धर्मशास्त्र स्वतः जरी पाली भाषेंतून घेतलेलें नसलें, तरी त्यावरून पाली भाषेंतल्या धर्मशास्त्राचें यथार्थत्व चांगलें सिद्ध होतें. कारण, जरी या संस्कृत आणि पाली धर्मशास्त्रीय ग्रंथांत शब्दरचनेमध्यें व विषयांच्या अनुक्रमामध्यें ठिकठिकाणीं फरक दिसून येतो, तरी त्यांमध्यें कांहीं भाग इतके शब्दशः सारखे आढळतात कीं ते मूळ एकाच परंपरेवरून निघाले असावेत असें गृहीत धरणें भाग पडतें. त्याप्रमाणेंच नेपाळामधील बौद्धांच्या संस्कृत धर्मग्रंथांमध्यें, व तिबेटी व चिनी भाषांतील भाषांतरावरून केवळ माहीत होणाऱ्या कांहीं बौद्ध संप्रदायाच्या धर्मग्रंथांमध्यें आपणांला कांहीं ठिकाणीं असें निश्चितपणें आढळून येतें कीं, त्यांतील मूल तत्त्वें एकच आहेत, एवढेंच नव्हे तर त्यांतील कांहीं ग्रंथहि मुख्य मुख्य गोष्टींत पूर्णतेनें या पाली धर्मशास्त्राशीं जुळतात. या बौद्ध संस्कृत वाङ्मयाशीं, आपला जसजसा अधिक परिचय होत जातो व त्याची पाली धर्मशास्त्राशीं आपण जों जों सूक्ष्मपणें तुलना करून पाहूं लागतों, तों

तों, पाली धर्मशास्त्र हें जरी सर्वस्वीं मुळास धरून नाहीं तरी तें मुळीचो उत्कृष्टतेनें कल्पना करून देतें असें जें ओल्डेनबर्गचें म्हणणें आहे तें आपणांस खरें वाटूं लागतें. ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकांत लिहिल्या गेलेल्या या पाली धर्मशास्त्राप्रमाणेंच, असा कोणताहि बौद्ध धर्मग्रंथ अथवा शास्त्र नाहीं कीं, ज्यामध्यें अशोकासारख्या प्रसिद्ध बौद्ध राजाचा एका शब्दानेंहि उल्लेख नाहीं. भाषा, रचना व विषय या सर्वांवरून हें पाली धर्मशास्त्र स्पष्टपणें उपनिषदां-सारखें दिसतें, तर उलट पक्षीं संस्कृत बौद्ध वाङ्मय हें पुराणांसारखें आढळतें.

**थेरवाद नांवाचें यथार्थत्व.**—या सिंहलद्वीपांत लिहिल्या गेलेल्या व परंपरेनें चालत आलेल्या धर्मशास्त्रामध्यें खुद्द सिंहलद्वीपाचा कोठेंहि उल्लेख नाहीं. यावरून हें सिंहली बौद्धांचें धर्मशास्त्र नसून भारतवर्षीय बौद्ध संप्रदायाचें धर्मशास्त्र आहे या गोष्टीस बळकटी येते. अर्थात् यामुळेंच सर्वांत प्राचीन बौद्ध संप्रदाय आज कायम राहिला असून, या धर्मशास्त्रास दिलेलें थेरवाद म्हणजे बुद्धाच्या पहिल्या शिष्यांचा संप्रदाय हें नांव यथार्थ आहे. हें पाली धर्मशास्त्र बौद्ध संप्रदायाचें यथार्थ ज्ञान देतें एवढेंच नव्हे, तर केवळ वाङ्मयाच्या दृष्टीनेंहि पाहिलें असतां हे ग्रंथ सर्व बौद्ध वाङ्मयामध्यें श्रेष्ठ आहेत.

**पाली धर्मशास्त्रांतील विनयपिटक.**—बौद्ध लोक विनयपिटकाला आपल्या धर्मग्रंथांमध्यें आद्यस्थान देतात. तेव्हां त्याचा आपण प्रथम विचार करूं. परंतु यावरून सुत्त पिटकापेक्षां हा ग्रंथ अगोदर रचला गेला आहे असें आपण मानतों, असें मात्र नाहीं. विनयपिटकामध्यें पुढील ग्रंथ येतात. १ सुत्त विभंग [ (अ) पाराजिक, (आ) पाचित्तिय ]; २ खंधक [ (अ) महावग्ग, आणि (आ) चुल्लवग्ग ]; ३ परिवार अथवा परिवार पाट.

**सुत्तविभंग.**—याचा अर्थ सुत्तांची फोड, म्हणजे विवरण असा असून सुत्त याचा अर्थ येथें पातिमोक्खांतील निरनिराळीं वाक्यें अथवा कलमें असा आहे. या ग्रंथांत पापांची यादी असून ती २२७ निरनिराळ्या कलमांत वर्णन केलेली आहे. सर्व भिक्षू व भिक्षुणी एकत्र जमले असतांना हा ग्रंथ त्यांपुढें पठन करीत असत; व प्रत्येक वचनानंतर त्या सभेचा अध्यक्ष हजर असलेल्या सर्वांस त्यांच्यामधील कोणीं वर्णन केलेलें पातक केलें आहे काय असें विचारी; व तसें असल्यास त्यास आपलें पाप कबूल करावें लागे. उपोसथ विधि हा प्रत्यक्ष बुद्धापासूनच प्रचारांत आला असावा; आणि पातिमोक्ख हा बौद्ध वाङ्मयाचा सर्वांत प्राचीन भाग असावा. या पातकांची यादी जरी हस्तलिखित ग्रंथांतून निराळा भाग म्हणून दाखविली जाते, आणि यामुळें जरी ती धर्मशास्त्रांत अंतर्भूत होत नाहीं, तरी सुत्त विभंगामध्येंच तिचा समावेश केलेला आहे. कारण यामध्यें पातिमोक्खावरील केवळ जुनी टीका असून तिलाच पुढें शास्त्रीय महत्त्व आलें आहे. तिजमध्यें प्रत्येक सुत्तांतील प्रत्येक शब्दाचा अर्थ स्पष्ट केला असून एक कथा सांगून तीमध्यें बुद्धानें स्वतः तो नियम कोणत्या वेळीं घालून दिला तें सांगितलें आहे.

**पाराजिक व पाचित्तिय.**—सुत्त विभंगाचे त्यांत वर्णन केलेल्या पातकांवरून दोन भाग करण्यांत आले आहेत. पहिल्या भागास पाराजिक असें म्हणतात, व त्यांत वर्णिलेल्या पातकांमुळें मनुष्य संप्रदायबहिष्कृत होत असे. दुसऱ्या भागास पाचित्तिय असें नांव असून त्यांत वर्णन केलेल्या पातकांस प्रायश्चित्तें सांगितलेलीं आहेत.

**खंधक[खंडक?].**—हा भाग सुत्तविभंगाच्या पुरवणीदाखल असून त्यामध्यें संघाच्या निरनिराळ्या व्यवस्थेबद्दल नियम आहेत. त्यांनां अनुसरून भिक्षू व भिक्षुणी यांची दिनचर्या आंखली जात असे.

खंधकांतील व सुत्तविभंगांतील कथानकांमध्यें लेखनपद्धतीसंबंधीं इतकें साम्य आहे कीं ओल्डेनबर्गच्या मतें ते दोन्ही ग्रंथ एकाच काळीं लिहिले गेले असावेत. सारख्या सारख्या विधींचें वर्णन करते वेळीं दोन्ही ग्रंथांत सारख्याच प्रास्ताविक गोष्टी दिल्या आहेत (ओल्डेन्बर्ग, विनयपिटक प्रस्तावना, पृ. २२ व पुढील पानें पहा ).

**महावग्ग व चुल्लवग्ग.**—खंधकाचे महावग्ग व चुल्लवग्ग असे दोन भाग आहेत. महावग्गाच्या दहा प्रकरणांमध्यें संघांत प्रवेश करण्याबद्दल, उपोसथ विधीबद्दल, वर्षाकालांतील दिनचर्येबद्दल, पवारणा म्हणजे वर्षाकालानंतर करावयाच्या विधीबद्दल, पादुका वापरण्याबद्दल, आसनें व वाहनें यांबद्दल, भिक्षूंचीं वस्त्रें व औषधी यांबद्दल, व विशेषत: संघाच्या नियमनासंबंधीं मतभेद उत्पन्न झाला असल्यास त्याची चौकशी कशी करावी याबद्दल नियम सांगितले आहेत. चुल्लवग्गामध्यें पहिल्या नऊ प्रकरणांत किरकोळ गोष्टींबद्दलचे शिस्तीदाखल नियम दिले आहेत. उदाहरणार्थ, प्रायश्चित घेण्याचे व व्रतबंधाचे निरनिराळे प्रकार, वादग्रस्त प्रश्नाचा निकाल, भिक्षूंची दिनचर्या, त्यांचे निवास व त्यांतील सामानसुमान, त्यांची परस्परांशीं वागणूक व पातिमोक्ख विधि केव्हां जरूर नाहीं याबद्दल नियम आहेत. चुल्लवग्गाच्या दहाव्या प्रकरणांत भिक्षुणीचा धर्म सांगितला आहे. सुत्तविभंग ज्याप्रमाणें पातिमोक्खाच्या पायावर रचलें गेलें आहे, त्याप्रमाणें खंधकामध्यें सांगितलेल्या क्रिया व विधी करण्यासाठीं आधारभूत असा "कम्मवाचा" म्हणजे क्रियाविषयक नियम किंवा शब्द हा भाग जोडलेला आहे. पातिमोक्खाप्रमाणेंच याचाहि अंतर्भाव तिपिटकामध्यें होत नाहीं. परंतु ज्याप्रमाणें वैदिक ब्राह्मणांमध्यें व सूत्रांमध्यें मंत्रांचा समावेश केला आहे, त्याप्रमाणेंच यांचा खंधकामध्यें समावेश केला आहे. अकरावें व बारावें प्रकरण हीं चुल्लवग्गाला परिशिष्टादाखल कांहीं

कालानंतर जोडलेली असून त्यांमध्यें राजगृह व वैशाली येथील पहिल्या व दुसऱ्या संगीतींची हकीकत दिली आहे. ज्या अर्थी परिशिष्टामध्येंहि संप्रदायाच्या इतिहासाबद्दलचीच माहिती दिली आहे त्या अर्थी आपणांस असें म्हणतां येईल कीं, विनयपिटकांतल्या ग्रंथांत बौद्ध भिक्षूंचा संघ हा एकच विषय आहे.

**खंधकांतील कथांमध्यें बुद्धाबद्दलच्या अतिप्राचीन दंतकथांचे अवशेष.**—सुत्तविभंगाप्रमाणें खंधकामध्येंहि प्रत्येक वचनास व नियमास आधार म्हणून कथा दिलेल्या आहेत; व त्या कथांमध्यें तें वचन अथवा तो नियम बुद्धानें केव्हा घातला हें सांगितलें आहे. या कथा अर्थातच कल्पित असून त्याना ऐतिहासिक महत्त्व मुळींच नाहीं; व त्या बहुतेक एकाच धर्तीच्या असल्यामुळें वाङ्मयाच्या दृष्टीनेंहि त्या निरुपयोगी आहेत. परंतु सुदैवानें ही गोष्ट सर्वच कथाना लागू नाहीं. महावग्गाच्या पहिल्या कांहीं प्रकरणांत बुद्धाबद्दलच्या ( बुद्धवंस ) दंतकथेचे अतिप्राचीन अवशेष आढळतात. त्यामध्यें उत्कृष्ट जुन्या भाषेंत गौतम बुद्धाला बोधीची प्राप्ति कशी झाली, त्यानें आपल्या मताचा प्रसार करण्याचा निश्चय कसा केला, व त्याला पहिले शिष्य कसे मिळाले ही हकीकत सांगितली आहे. उदाहरणार्थ, त्यामध्यें यस ( यश ) या आर्य तरुणाची गोष्ट सांगितली आहे. ही कथा अशीः यस हा ऐषआरामांत वाढला असून त्याच्या रात्रीच्या रात्री नृत्यगायनांत जात असत. एकदा तो मध्यरात्रीं जागा झाला असता सभोंवारच्या सुंदर स्त्रियांची ओंगळ स्थिति पाहून त्याला किळस आली. यामुळें त्याला ऐहिक सुखाबद्दल इतका तिटकारा आला कीं, चैनीचा मार्ग सोडून बुद्धाकडे येऊन तो भिक्षु होऊन राहिला. उत्तरकालीन बुद्धकथेमध्यें ही वरील गोष्ट सिद्धार्थाबद्दल—म्हणजे जो पुढें बुद्ध झाला त्याच्या स्वतःबद्दल—म्हणून सांगितली आहे.

**तत्कालीन संस्कृतीचें चित्र.**—या कथांत तत्कालीन संस्कृतीचें चित्र चांगलें दिसून येतें. कांहीं तरुण लोक आपआपल्या स्त्रियांसह मजा मारण्याकरितां जात असतां त्यांपैकीं एकानें स्वतःची स्त्री नसल्यामुळें आपल्याबरोबर एका कुमारीस घेतलें होतें. या कुमारीनें तरुणांच्या एकूण एक वस्तू घेऊन पळ काढला. हे तरुण तिच्या पाठीस लागले असतां वाटेंत त्यांची बुद्धाशीं गांठ पडली. तेव्हां त्यांनीं तुम्ही एक तरुण स्त्री पाहिली काय, असें बुद्धास विचारलें. बुद्धानें उत्तर केलें, तुम्ही एखाद्या स्त्रीचा शोध करण्यापेक्षां स्वतःचाच शोध करणें चांगलें नाहीं काय ? बुद्धानें या प्रसंगाचा उपयोग करून घेऊन त्या सर्वांस आपल्या मताचा उपदेश केला व ते सर्व भिक्षू झाले. नागराजांच्या व देवांच्या अद्भुत कथाहि या ग्रंथांत पुष्कळ आढळतात. परंतु या सर्व कथांमध्यें सारिपुत्त ( सारिपुत्र) आणि मोग्गलान ( मुद्गलायन ) यांनां बुद्धानें आपल्या संप्रदायांत घेतल्याबद्दलची हकीकत फार चमत्कारिक आहे. हे दोघहि पुढें बुद्धाचे प्रियशिष्य झाले. बुद्धाचीं पहिली प्रवचनें—म्हणजे त्यांमें काशी येथील प्रवचन व अग्निप्रवचन—हींहि याच जुन्या भागांत येतात.

यानंतरच्या महावग्गाच्या एका प्रकरणांत बुद्ध आपल्या जन्मभूमीच्या गांवीं जाऊन तेथें त्यानें आपला पुत्र राहुल यास आपल्या संप्रदायामध्यें घेतल्याबद्दलची हकीकत सांगितली आहे. चुल्लवग्गामध्यें अनाथपिंडक या धनाढ्य व्यापाऱ्याची एक गोष्ट आली असून त्यानें संघास एक उपवन अर्पण केल्याचें म्हटलें आहे. त्याप्रमाणेंच बुद्धाचा शत्रु व प्रतिपक्षी जो देवदत्त त्याचीहि कथा यांत आली आहे. यानेंच बौद्ध संप्रदायांत प्रथम मतभेद उत्पन्न केला. त्याचप्रमाणें, बुद्धाची दाई महाप्रजापती हिनें भिक्षुणींचा संघ स्थापन करण्याविषयीं बुद्धास केलेली विनवणी व तिची 'आनंदानें' केलेली तरफदारी याविषयींच्याहि कथा वर्णिलेल्या आहेत.

**वाङ्मयदृष्ट्या महत्त्वाचे भाग.**— या ग्रंथांतील बऱ्याचशा प्रास्ताविक गोष्टी जरी केवळ कल्पित असून ऐतिहासिक अथवा पौराणिक महत्त्वाच्या नसल्या, तरी त्यांमध्यें कांहीं भाग वाङ्मयदृष्ट्या फार सुंदर व महत्त्वाचे आहेत. अशा प्रकारची एक साधीच परंतु हृदयद्रावक गोष्ट आहे ती अशीः त्या कालीं एका भिक्षूला अतिसाराचा विकार होऊन तो आपल्या विष्ठेंत लोळत पडला होता. इतक्यांत बुद्ध आपला शिष्य आनंद यासह भिक्षूंच्या निवासावरून जात असतां वरील भिक्षु जेथें होता त्या खोलीजवळ आला, व तो भिक्षु आपल्या विष्ठेंत लोळत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. बुद्ध त्याच्या बिछान्याजवळ येऊन त्या भिक्षूस विचारूं लागला, 'तुला काय होत आहे ?' 'महाराज मला अतिसार झाला आहे,' असें त्यास उत्तर मिळालें. बुद्धानें विचारलें, 'तुझी शुश्रूषा कोणी भिक्षु करीत आहे काय?' भिक्षु उत्तरला, 'नाहीं महाराज.' यावर बुद्धानें पुन्हां प्रश्न केलाः 'हे भिक्षू लोक तुझ्याकडे कां बरें पहात नाहींत?' भिक्षू म्हणालाः 'महाराज, माझा त्यांनां उपयोग होत नाहीं म्हणून ते माझी काळजी घेत नाहींत.' तेव्हां बुद्ध आनंदाकडे वळून म्हणाला, 'आनंद', थोडें पाणी आण, आपण या भिक्षूस स्नान घालूं.' होय महाराज असें म्हणून आनंदानें पाणी आणलें, व बुद्धानें त्या भिक्षूवर पाणी ओतून आनंदानें त्याचें अंग धुतलें. नंतर बुद्धानें डोक्याकडून व आनंदानें पायांकडून याप्रमाणें दोघांनीं त्या भिक्षूस उचलून बिछान्यावर ठेविलें. ही गोष्ट घडल्यामुळें त्या प्रसंगीं बुद्धानें सर्व संघाची सभा भरवून तेथील भिक्षूंस पुढीलप्रमाणें प्रश्न विचारलेः—

'भिक्षूंनो ! या खोलींत एखादा भिक्षु आजारी आहे काय' 'होय, महाराज !' 'त्याला काय होत आहे ?' 'त्याला अतिसार झाला आहे महाराज.' 'त्याची कोणी शुश्रूषा करीत आहे काय?' 'नाहीं महाराज !' 'भिक्षू लोक त्याची कां बरें शुश्रूषा करीत नाहींत?' 'महाराज, या भिक्षूचा त्यांनां कांहीं उपयोग होत नाहीं म्हणून ते त्याची शुश्रूषा करीत

नाहींत.' 'हे भिक्षूंनो, तुमची शुश्रूषा करणारे आई अगर बाप येथें कोणीहि नाहींत; तेव्हां तुम्ही जर एकमेकांची काळजी घेतली नाहीं तर तुमच्याकडे कोण बरं पाहील? यासाठीं ज्यानें माझी काळजी घेतली असती त्यानेंच त्या भिक्षूचीहि काळजी घ्यावी.'

**तत्कालीन लोकांच्या आयुष्यक्रमाची माहिती देणाऱ्या कथा.**—दुसऱ्या कांहीं कथांवरून प्राक्कालीन भारतवर्षीय लोकांच्या आयुष्यक्रमाची आपणांस माहिती मिळते, म्हणून त्या आपणांस महत्त्वाच्या आहेत. उदाहरणार्थ, उपालीनें पुढें काय करावें याबद्दल त्याच्या मातापितरांमध्यें जो विचार चाललेला आहे, तो मोठा गमतीचा आहे. त्यानें कारकुनी केली असतां त्याचीं बोटें दुखतील, त्यानें गणित केलें तर त्याच्या छातींत दुखूं लागेल व तो चित्रकला शिकल्यास त्याचे डोळे बिघडतील. म्हणून त्याच्या आईबापांनीं त्याला भिक्षु होऊं देण्याचा निश्चय केला. कारण, पोटाला मिळविण्याचा हा सर्वांत सोपा मार्ग होता. त्याप्रमाणेंच जीवक या वैद्याच्या गोष्टी तत्कालीन संस्कृतीच्या इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत. एवढेंच नव्हे, तर त्यांमध्यें बराचसा गमतीचा विनोदहि आढळून येतो. त्यांतील एक लहानसा उतारा येथें देतों.

राजगृह हें वैशालीइतकेंच महत्त्वाचें व प्रसिद्ध शहर होतें. वैशाली येथील वेश्या अंबपाली हिनेंहि त्याच्या वैभवांत बरीच भर टाकली होती. ती एका रात्रीबद्दल ५० सुवर्णमुद्रा घेत असे.

राजगृहाचें वैभव वाढविण्याकरितां तेथील राजाच्या आज्ञेवरून सालवती या सुंदर व सुशिक्षित वेश्येची तेथें स्थापना करण्यांत आली. ती एका रात्रीबद्दल १०० सुवर्णमुद्रा घेत असे. पुढें ती गर्भवती झाली. परंतु धंद्याकरितां ही गोष्ट तिनें गुप्त ठेविली, व पुत्र झाल्यावर त्याला तिनें एका टोपलींत घालून नदींत सोडून दिलें. तें मूल राजा अभय यास सांपडलें, व त्यानें त्याचें जीवक असें नांव ठेवून त्याचें पालनपोषण केलें. जीवक मोठा झाल्यावर तो तक्षशिला येथें एका प्रसिद्ध वैद्याकडे शिष्य म्हणून राहिला. तेथें ७ वर्षें शिक्षण घेतल्यानंतर तो परीक्षेंत उत्तीर्ण झाला. ती परीक्षा अशी: त्याच्या गुरूनें त्याला एक खोरें देऊन तक्षशिलेच्या आसमंत भागांत फिरून ज्यांचा औषधीच्या कामीं उपयोग होणार नाहीं अशा सर्व वनस्पती शोधून आणण्यास पाठविलें. जीवकानें परत येऊन सांगितलें कीं, मी पुष्कळ हिंडलों परंतु अशा तऱ्हेची वनस्पति मला एकहि सांपडली नाहीं. या उत्तरानें त्याच्या गुरूचें समाधान होऊन त्यानें त्यास प्रवासाकरितां द्रव्य देऊन जावयास निरोप दिला.

जीवकाच्या जवळचें द्रव्य लवकरच संपल्यामुळें पोटाकरितां कांहीं मिळवावें म्हणून एका गांवीं त्यानें आपण वैद्य आहों असें प्रसिद्ध केलें. तेथील एका धनाढ्य व्यापाऱ्याची बायको आजारी आहे असें त्यास कळलें. तिला उपचार करतांना जीवकानें तिच्या नाकांत कांहीं तूप ओतलें. तें तिच्या तोंडांत गेलें, तेव्हां तिनें तें बाहेर थुंकून आपल्या मोलकरणीस तें भरून ठेवण्यास सांगितलें. हें पाहून बाई कंजूष आहे अशी जीवकाची समजूत होऊन त्यास पारितोषिकाबद्दल काळजी वाटूं लागली. तेव्हां त्या बाईनें आपण कंजूष नसून सुगृहिणी आहोंत अशी जीवकाची खात्री केली. कारण, तूप चाकरांनां कोठें चोळण्यास अगर दिव्यांत जाळण्यास उपयोगीं पडेल असें ती म्हणाली. पुढें ती बरी होऊन तिनें त्याला चार हजार सुवर्णमुद्रा दिल्या. त्याप्रमाणेंच, तिचा मुलगा, सून व नवरा यांपैकीं प्रत्येकानें त्याला चार चार हजार सुवर्णमुद्रा दिल्या. याखेरीज तिच्या नवऱ्यानें त्याला एक दास, एक दासी व एक रथ बक्षीस दिला. पुढें तो राजगृहास परत आला व आपलें पालनपोषण केल्याबद्दलचे उपकार स्मरून त्यानें स्वतःला मिळालेलें द्रव्य राजा अभय यास अर्पण केलें. परंतु राजानें तें त्याचें त्यासच देऊन त्याला राजगृह येथेंच कायमची वस्ती करून राहण्यास सांगितलें.

पुढें वृद्ध राजा बिंबिसार याची जीवकानें एका वाईट रोगापासून मुक्तता केल्यामुळें तो राजवैद्य झाला. त्यानें कित्येक असाध्य रोगी बरे केले होते. एकदां राजगृहांतील एक मोठा व्यापारी फार आजारी पडला. सर्व वैद्यांनीं त्याचा रोग असाध्य ठरविला. तेव्हां राजानें आपल्या वैद्यास त्याला उपचार करण्याची परवानगी दिली. जीवकानें प्रथम एक हजार सुवर्णमुद्रांचें परितोषिक मागितलें व तितकेंच राजाकरितांहि ठरविलें. नंतर त्यानें व्यापाऱ्यास विचारलें कीं, तुला प्रथम एका कुशीवर, नंतर दुसऱ्या कुशीवर आणि अखेरीस पाठीवर प्रत्येक वेळीं एकसारखें सात महिने त्याच स्थितींत निजून राहतां येईल काय ? त्या रोग्यानें ती गोष्ट कबूल केली. तेव्हां जीवकानें त्याला बिछान्याला बांधून टाकलें, व त्याच्या डोक्यावर शस्त्रक्रिया करून त्यांतून दोन किडे बाहेर काढून जखम शिवून टाकिली. याच किड्यांनीं त्याच्या जीवितावर गदा आणिली होती. परंतु त्या रोग्याला एकाच स्थितींत सात महिन्यांच्या ऐवजीं जेमतेम सातच दिवस पडून राहतां आलें. तथापि सात दिवसांच्या अखेरीस तो रोगी बरा झाला. तेव्हां जीवकानें सांगितलें कीं, मीं रोग्याकडून सात महिन्यांचा करार करून घेतला, म्हणून रोगी सात दिवस तरी एका स्थितींत राहूं शकला; नाहीं तर तो तितकेहि दिवस राहिला नसता.

याप्रमाणें जीवकाच्या चातुर्याच्या व कौशल्याच्या बऱ्याच गोष्टी आढळतात. जीवक हा बुद्धाला वैद्यकी उपचार करीत असे व संघालाहि त्याची बरीच मदत असे.

**दृष्टान्तादाखल सांगितलेल्या गोष्टींचें उदाहरण.**—याप्रमाणें विनयपिटक रचणाऱ्यांनीं केवळ आज्ञा व निषेध यांची यादी देण्याच्या रुक्ष कामास कंटाळून मधून

मधून मनोरंजक गोष्टी घातल्याचीं उदाहरणें ठिकाठिकाणीं आढळतात. उदाहरणार्थ, भिक्षूंमध्यें वयाच्या मानानें महत्त्व देण्यासंबंधानें बुद्धानें पुढील गोष्ट सांगून त्याप्रमाणें नियम घालून दिला आहे. एके काळीं हिमालयावर एक मोठें अंजिराचें झाड होतें. त्याच्या खालीं एक कवडा, एक माकड व एक हत्ती असे मैत्री करून रहात असत; परंतु ते एकमेकांनां मान देत नसत, एकमेकांची आज्ञा पाळीत नसत, किंवा त्यांच्या राहणींतहि कांहीं नियम नसे. एके दिवशीं त्यांच्या मनांत असा विचार आला कीं, आपणांपैकीं सर्वांत वयानें मोठा कोण हें ठरवावें व त्याप्रमाणें त्याला बाकीच्यांनीं मान द्यावा व त्याच्या आज्ञेप्रमाणें सर्वांनीं चालावें. तेव्हां कवडा व माकड यांनीं हत्तीस तुला किती जुनी गोष्ट आठवते म्हणून विचारलें. हत्तीनें उत्तर केलें: 'मित्रहो, मी जेव्हां लहान होतों तेव्हां या अंजिराच्या झाडाच्या दोन्ही बाजूंस पाय ठेवून मी चालत जात असे, व त्याची सर्वांत उंच असलेली फांदी माझ्या पोटाला लागत असे. येथपर्यंत मला आठवतें.' नंतर कवडा आणि हत्ती यांनीं माकडास विचारलें: 'मित्रा, तुला सर्वांत जुनी गोष्ट कोणती आठवते?' त्यानें उत्तर केलें: 'मित्रहो, लहान असतांना मी जमिनीवर बसून या झाडाच्या सर्वांत उंच फांदीचीं पानें खात असे. येथपर्यंत मला आठवतें.' नंतर माकड आणि हत्ती यांनीं मिळून कवड्यास प्रश्न केला कीं: 'मित्रा, तुला कोठपर्यंत आठवतें?' तेव्हां त्यानें उत्तर केलें: 'मित्रहो, त्या समोरच्या खोप्यांत एक मोठें अंजिराचें झाड होतें. त्याचें मीं एक फळ खाल्लें, व माझी विष्ठा याच जागेवर पडून तिजपासून हें अंजिराचें झाड उत्पन्न झालें. याप्रमाणें हे मित्रहो, मी सर्वांत वडील आहें.' तेव्हां माकड आणि हत्ती यांनीं त्या कवड्यास म्हटलें : 'होय मित्रा, तूं आपणां सर्वांत वयानें वडील आहेस. तेव्हां आम्ही तुला मान देऊं आणि तुझ्या आज्ञेप्रमाणें वागूं.'

**नीतिविषयक उदात्त कथा.**—याप्रमाणेंच कित्येक ठिकाणीं बौद्ध संप्रदायांतील कांहीं नीतिविषयक उदात्त कथाहि आहेत. उदाहरणार्थ, राजपुत्र दीर्घायु याची गोष्ट घ्या. त्यानें आपल्या मातापितरांच्या खुनाचा सूड घेण्याकरितां हरतऱ्हेचे प्रयत्न केले. परंतु खुनी इसम राजा ब्रह्मदत्त हा अगदीं त्याच्या हातांत सांपडला तेव्हां त्यानें आपली उपसलेली तरवार पुन्हां म्यानांत घालून सुडाची कल्पना टाकून दिली.

**उपमांचे प्रयोग**—विनयपिटकामध्यें भाषणांतून व वचनांतून उपमांची मुळींच उणीव नाहीं. उदाहरणार्थ, चुल्लवग्गामध्यें (९.१,३ इ.) महासागराच्या आठ गुणांची बौद्ध मताच्या व संघाच्या नियमांतील मुख्य आठ विशिष्ट गुणांनां उपमा देऊन तिचा फार काळजीपूर्वक परिपोष केलेला आहे. याच ठिकाणीं आपणांला एक वारंवार उद्धृत केलेलें वाक्य आढळतें. तें हें कीं, ज्याप्रमाणें सर्व महासागराच्या पाण्यामध्यें एकच रस (लवण) आहे, त्याचप्रमाणें धर्म आणि नियम यांमध्यें एकच रस मोक्ष हा आहे.

**विनयपिटकाचें ब्राह्मणांशीं साम्य.**—विनयपिटकांतील ग्रंथांचें वैदिक ब्राह्मणांशीं बरेंच साम्य आढळतें. ब्राह्मणाप्रमाणें यांतहि विधि (नियम) व अर्थवाद (नियमाचा अर्थ) हे एकापुढें एक दिलेले सांपडतात. अर्थवादांत स्पष्टीकरणार्थ कथा दिलेल्या असतात व त्या या विधिनिषेधांच्या रुक्ष प्रदेशांत शीतोदकाच्या झऱ्याप्रमाणें, सुखदायक वाटतात. विनयपिटकाचा शेवटचा भाग जो परिवार तो सर्वांत कमी महत्त्वाचा असून बराच उत्तरकालीनहि आहे. हा बहुतकरून एखाद्या सिंहली भिक्षूनें लिहून त्यांत सामील केला असावा. यामध्यें १९लहान लहान प्रकरणें असून संवाद, सूची, परिशिष्टें, अनुक्रमणी वगैरेहि आहेत. हा भाग वेद व वेदांगें यांनां जोडलेल्या अनुक्रमणीपरिशिष्टांप्रमाणेंच आहे. अभिधम्मपिटकाप्रमाणें हा भागहि प्रश्नोत्तररूपांत असून त्याचाच समकालीन असावा.

**पाली धर्मशास्त्रांतील सुत्तपिटक.**— ज्याप्रमाणें विनयपिटकावरून आपणांला संघाची म्हणजे प्राचीन बौद्ध संप्रदायांतील व्यवस्था व बौद्ध भिक्षूंची दिनचर्या यांबद्दल माहिती मिळते त्याप्रमाणें सुत्तपिटकावरून धम्माची म्हणजे बुद्ध व त्याचे प्रथम शिष्य यांच्या परमार्थसंप्रदायाची माहिती मिळते. सुत्तपिटकांतल्या गद्य कथांत व संवादांत आणि सुभाषितांत व गीतांत बौद्धांचें तत्कालीन वाङ्मय ग्रथित झालेलें आहे.

**निकाय.**— सुत्तपिटक या ग्रंथांत एकंदर पांच निकाय अथवा संग्रह आहेत. ते येणेंप्रमाणें: १ दीघ निकाय, २ मज्झिम निकाय, ३ संयुत्त निकाय, ४ अंगुत्तर निकाय व ५ खुद्दक निकाय. यांपैकीं खुद्दक निकायामध्यें पुढील ग्रंथ आहेत: १ खुद्दक पाठ, २ धम्मपद, ३ उदान, ४इतिवुत्तक, ५ सुत्तनिपात, ६ विमान वत्थु, ७ पेतवत्थु, ८ थेर गाथा ९ थेरी गाथा, १० जातक ११ निद्देस, १२ पटिसंभिदामग्ग, १३ अपदान, १४ बुद्धवंस व १५ चरियापिटक.

पहिल्या चार निकायांमध्यें सुत्तें म्ह० उपदेशपर भाषणें.(सुत्त या शब्दाबद्दल सुत्तन्त हा शब्द अनेकदां वापरलेला आहे) आहेत. हीं भाषणें कांहीं ठिकाणीं बुद्धानें व कांहीं ठिकाणीं त्याच्या एखाद्या शिष्यानें केलेलीं असून त्यांपूर्वीं तीं भाषणें कोणत्या प्रसंगीं व कशासाठीं केलेलीं होतीं याविषयीं थोडा प्रास्ताविक मजकूर असतो. कांहीं ठिकाणीं तीं उपनिषदें अथवा महाभारत यांतील इतिहाससंवादांप्रमाणें संभाषणरूपानें प्रास्ताविक कथेनंतर दिलीं आहेत. परंतु हीं सर्व सुत्तें गद्यामध्यें आहेत. फक्त क्वचित ठिकाणींच थोड्या सुत्तांत मधून मधून गाथा आलेल्या आहेत. ह्या गाथा बहुधा दुसऱ्या ग्रंथांतील अवतरणें अथवा मध्येंच घातलेलीं पद्यें आहेत. अशीं पद्यें गद्यामध्यें कांहीं ठिकाणीं त्या भागाचें महत्त्व दर्शविण्याकरितां व कांहीं ठिकाणी गद्याला प्रौढत्व आणण्याक-

रितां मधून मधून घालण्याची वहिवाट भारतीय वाङ्मयामध्यें पूर्वीपासून चालत आली असून ती लोकांनां फार प्रिय झाली होती.

**दीघ निकाय.**—हा उपदेशपर मोठमोठ्या भाषणांचा संग्रह असून यामध्यें ३४ बरींच मोठीं सुत्तें आहेत. प्रत्येक सुत्तामध्यें कांहीं तरी सांप्रदायिक मतानें सूक्ष्म रीतीनें विवरण केलें आहे. हा प्रत्येक भाग एक एक स्वतंत्र ग्रंथ मानतां येईल.

**ब्रह्मजाल सुत्त.**—दीघ निकायापैकीं पहिलें जें ब्रह्मजाल सुत्त ( ब्राह्मणी जाळ्यावरील भाषण ) तें बौद्ध संप्रदायांच्या इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. बुद्ध आपल्या शिष्यांस आचारविषयक व नीतिविषयक नियम घालून देत असतांना त्यानें ब्राह्मण व इतर यती यांचे जीवितक्रम, विचारपरंपरा, व्यवसाय, वादविवाद इ० गोष्टींच्या लांबलचक याद्या देऊन या सर्व गोष्टींपासून बौद्ध भिक्षूनें अलिप्त राहिलें पाहिजे असें सांगितलें आहे. आपलें श्रेष्ठत्व भासविण्यासाठीं गृहस्थाश्रमी ब्राह्मण आणि यती यांचा सामुच्चयानें उल्लेख करून एकाच कसोटीनें दोघांचें परीक्षण करण्याची क्लृप्ति त्याची मिशनरी हुषारी दाखविते. बुद्धानें असें म्हटलें आहे कीं आपणांला ब्राह्मण व यती यांचीं अशीं उदाहरणें सांपडतात कीं, ते संपत्ति जमवितात; त्यांनां नृत्य, गीत, नाटकें व इतर खेळ आवडतात ( येथें बुद्धानें त्या वेळच्या लोकांच्या करमणुकीच्या प्रकारांची एक लांबच लांब यादी दिली आहे ती सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीनें फार महत्त्वाची आहे ); कांहीं ऐषआरामांत दंग असतात; कांहीं आपली उपजीविका यज्ञ, भविष्यकथन व जादू वगैरे प्रकारांनीं करतात ( या ठिकाणीं यादी दिली आहे तीहि महत्त्वाची आहे);आणि कांहा अस्तिनास्तिवाद,जगाचे आद्यन्त व आत्मा यांचें स्वरूप व पूर्वपीठिका इत्यादि विषयांवर रणें माजवितात. या शेवटच्या ठिकाणीं बुद्धानें निरनिराळ्या ६२ विचारपरंपरांची-त्याच्या दृष्टीनें पाखंडांची-यादी दिली आहे व म्हटलें आहे कीं, या सर्व गोष्टींपासून बुद्धाच्या शिष्यांनीं दूर रहावें. विंटरनिट्झच्या मतें ज्याप्रमाणें एखादा कुशल कोळी आपलें, सूक्ष्म छिद्रांचें जाळें तळ्यांत टाकून त्यांतील लहान मोठे सर्व मासे पकडतो, त्याप्रमाणें बुद्धाला या आपल्या ब्रह्मजालामध्यें सर्व वितंडवादी व तत्त्ववेत्ते यांनां, त्यांचीं मतें व विचार हीं निरर्थक व मोक्षाच्या मार्गांत अडथळे आणणारीं आहेत हें दाखवून कसें पकडावें तें चांगलें ठाऊक होतें. या सुत्तामध्यें बुद्धानें कांहीं गणित वगैरे शास्त्रीय विषयांवरहि कोरडे ओढले आहेत. त्यामुळें त्याच्या सोवळेंपणापेक्षां त्याचें अज्ञानच दृष्टीस पडतें.

**सामञ्ञफल सुत्त.**—दुसऱ्या सामञ्ञफल सुत्तामध्यें वैराग्यफलावर विवेचन असून त्यावरूनहि बुद्धकालीन विचार व जीवितक्रम यांबद्दल बरीच महत्त्वाची माहिती मिळते. कारण यामध्यें आपणांला बौद्धेतर प्रमुख संप्रदायांच्या आचार्यांच्या व संस्थापकांच्या विचारपरंपरा दृष्टीस पडतात.

**अंबट्ठ सुत्त.**— भारतवर्षांतील जातिव्यवस्थेचा इतिहास व बौद्ध संप्रदायाची तद्विषयक वृत्ति हीं पहावयाचीं असल्यास अंबट्ठ सुत्त ( नं. ३ ) हें फार महत्त्वाचें आहे. या सुत्तामध्यें त्याचा ब्राह्मणांच्या श्रेष्ठत्वाविषयीं मत्सर दृग्गोचर होतो. हीन कुलामध्यें मुलगी देण्यापेक्षां तिच्या भावानेंच तिचें पाणिग्रहण करणें अधिक चांगलें व अशा संयोगापासून माझा जन्म झाला आहे अशी बढाई ज्यांत मारली आहे तें हेंच सुत्त होय. शाक्यवंश व श्रीकृष्ण [ कण्ह ] यांच्याबद्दल आलेल्या उल्लेखांमुळें या सुत्तास पौराणिक व कांहीं ऐतिहासिकहि महत्त्व आलें आहे.

**कूटदंत व तेविज्ज सुत्तें.**—कूटदंत सुत्त (नं. ५, तीक्ष्णदंत ब्राह्मण यावर व्याख्यान ) आणि तेविज्ज सुत्त ( नं. १३, वेदत्रयीवर व्याख्यान )या दोन सुत्तांमध्यें बौद्ध व ब्राह्मणी या नव्या व जुन्या संप्रदायांचा परस्परसंबंध चांगला दिसून येतो, व त्याबरोबरच बुद्धाचें वेदत्रयीबद्दल संपूर्ण अज्ञान दृष्टीस पडतें. या सुत्तामध्यें बुद्धानें बालिश व्याजोक्तींनें ब्राह्मणी संप्रदाय व त्यांतील क्रूर यज्ञ आणि वेदज्ञांची ब्रह्माशीं ऐक्य करण्याकरिता चाललेली खटपट यांची बौद्ध संप्रदायांतील त्याग (आत्मयज्ञ) व उच्चजीवितध्येय यांच्याबरोबर तुलना केली आहे.

**महानिदान व सिगालोवाद सुत्तें.**—बौद्ध विचारपरंपरेचें मुख्य तत्त्व जें कारणपरंपरा त्याचा ऊहापोह महानिदान सुत्त (नं. १५, कारणावरील प्रवचन) यांत केला आहे, व लौकिक दृष्टया बौद्ध नीतितत्त्वांचा विचार सिगालोवाद सुत्त ( नं. २९ ) या पाली धर्मशास्त्रांतील एका महत्त्वाच्या सुत्तांत केला आहे. यामध्यें बौद्ध गृहस्थाचा धम्म म्हणजे आचार विस्तृतपणें दिला आहे.

**महापरिनिब्बान सुत्त.**—परंतु दीघ निकायामधील सर्वांत सर्व बाबतींत महत्त्वाचें सुत्त म्हटलें म्हणजे महापरिनिब्बान सुत्त (नं. १६) हें होय. यामध्यें बुद्धाचें महानिर्वाणावरील व्याख्यान आहे. याचें स्वरूप व त्यांतील विषय हीं इतर सर्व सुत्तांहून अगदीं निराळीं आहेत. हें केवळ विशिष्ट धार्मिक विषयावर संवाद अथवा व्याख्यान अशा स्वरूपाचें नसून त्यामध्यें बुद्धाचे अखेरचे दिवस, त्याचीं शेवटचीं संभाषणें व वचनें आणि त्याचें निर्वाण याबद्दलची सविस्तर हकीकत आहे. यांतील सर्वांत जुना भाग हा तिपिटकाच्या सर्वांत जुन्या भागांबरोबरचा असून ज्या काळांत बुद्धचरित्रावर काव्यें रचलीं गेलीं त्या काळाच्या आरंभींचा असावा. पाली धर्मशास्त्रामध्यें बुद्धाचें चरित्र आढळत नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तथापि विनयपिटक व सुत्तपिटक यांतील कांहीं भागांतून त्याचा उपक्रम केलेला आढळतो.

**महापरिनिब्बानांतील बुद्धचरित्रविषयक गोष्टी.**—बुद्धाच्या आयुष्यांतील शेवटच्या भागांतील गोष्टी व त्याचीं भाषणें यांचा त्याच्या शिष्यांच्या मनावर विशेष परिणाम झाला असावा, व यामुळें त्या गोष्टी व तीं भाषणें जास्त काळजीपूर्वक व आदरपूर्वक स्मरणांत ठेविलीं जाऊन परंपरेनें चालत येणें हें साहजिकच दिसतें. त्यामुळेंच या सुत्ताच्या सर्वांत जुन्या असलेल्या भागांत बुद्धाच्या चरित्रविषयक गोष्टी आपणांस प्रथमतः आढळून येतात, असें विंटरनिट्झ याचें ठाम मत आहे. परंतु महापरिनिब्बान सुत्तामध्यें मूळचा व सर्वांत जुना असा भाग फारच थोडा आहे. कारण या सुत्ताचे निरनिराळे भाग निरनिराळ्या वेळीं रचले गेले असून त्यांमध्यें एकतानता दिसत नाहीं. फार प्राचीन काळीं—म्हणजे बुद्ध निवार्णानंतर लागलीच—बुद्धनिर्वाणाची साग्र हकीकत देणारें एखादें लहानसें सुत्त अस्तित्वांत आलें असलें पाहिजे, व त्यांतच पुढें आणखी भर पडून त्याचें हल्लींचें महापरिनिब्बानसुत्त हें मोठें सुत्त झालें असावें.'

**बुद्धाचा पहिल्या दुखण्यानंतरचा आनंदास उपदेश.**—या सुत्ताच्या दुसऱ्या प्रकरणामध्यें असलेला कांहीं भाग निश्चयपूर्वक मूळचा व प्राचीन म्हणतां येईल.दुसऱ्या प्रकरणामध्यें वेलुव येथें बुद्धाला आलेल्या पहिल्या दुखण्याची हकीकत सांगितली आहे. या दुखण्यांतून बुद्ध आपल्या आत्मिक सामर्थ्यानें बरा झाला व आनंदास येणेंप्रमाणें म्हणालाः "मी झांकली मूठ राखणारा गुरु नाहीं. मी स्वतःजवळ कांहींहि न ठेवतां सर्व जगाला सत्याचा उपदेश केला आहे. केवळ समाजाचा पुढारी म्हणून शेखी मिरविण्याची मीं कधींहि इच्छा केली नाहीं, व म्हणून हा संघ माझ्यावर केव्हांहि अवलंबून नव्हता. माझ्या मागें जर मीं उपदेशिलेल्या धर्माचें अवलंबन करून लोक राहतील तर त्यांनां नेत्याची उणीव भासणार नाहीं. तेव्हां, हे आनंदा, तुम्ही स्वतःचेच मार्गदर्शक (दीप) व्हा. तुम्हांला स्वतःचाच आश्रय असूं द्या. तुमचा धर्म तुम्हांला मार्गदर्शक आहे असें मानून त्याचा आश्रय करा.'

**महापरिनिब्बाणसुत्तांतील बुद्धाचें चित्र.**—तितकाच जुना व मूळचा भाग म्हटला म्हणजे, पांचव्या प्रकरणामध्यें बुद्धाच्या निर्वाणाचा समय जवळ आला तेव्हां आनंद यास तें दुःख असह्य होऊन तो बाहेर दरवाज्याजवळ उभा राहून रडूं लागला असतां, बुद्धानें त्याच्या प्रेमाची जाणीव दर्शवून त्याचें प्रेमळ शब्दांनीं शांतवन केलें या प्रसंगाचें जेथें वर्णन केलें आहे तो होय. या सुत्तामध्यें इतस्ततः आढळून येणाऱ्या गाथाहि बऱ्याच प्राचीन दिसतात. या गाथांमध्यें बुद्धाचीं व त्याच्या शिष्यांचीं कांहीं मार्मिक वचनें असून, कांहीं ठिकाणीं कथांमधील विशेष प्रसंग त्यामुळें मनावर जास्त ठसतात. या सर्व ठिकाणीं बुद्ध आपणाला साध्या माणसाप्रमाणेंच बोलतांना आढळतो. याच सुत्ताच्या इतर भागांत तो एखाद्या मांत्रिकाप्रमाणें किंवा यक्षाप्रमाणें चमत्कार करतांना आढळतो. उदाहरणार्थ, एके ठिकाणीं तो माझ्या इच्छेस येईल तर मला आपल्या मंत्रसामर्थ्यानें जगाच्या कल्पान्तापर्यंत आपलें आयुष्य वाढवितां येईल, अशी आपल्या सामर्थ्याची प्रौढी मारतो; दुसऱ्या एका ठिकाणीं बुद्धानें निर्वाणास जावयाचा निश्चय केल्यामुळें भूकंप झाला असें म्हटलें असून, या प्रसंगाचा फायदा घेऊन बुद्धानें भूकंपाचीं आठ कारणें सांगून त्यांची जगांतील आठ पदार्थांशीं जी तुलना केली ती दिली आहे (३.११—२३). या ठिकाणीं आपणांला नंतरच्या लेखकांनीं घुसडून दिलेला बराचसा मजकूर आढळतो. या मजकुरामध्यें प्राचीन गोष्टींतील मर्म अथवा प्राचीन लेखकांची स्फूर्ति, यांचा अल्पहि अंश सांपडत नाहीं. पुष्कळ ठिकाणीं हा प्रक्षिप्त भाग कोठून आला तें शोधून काढणें फारसें कठिण नाहीं. कारण या सुत्ताचे कांहीं भाग जसेचे तसेच तिपिटकाच्या इतर भागांत आढळत असल्यामुळें तेथूनच ते आले असावेत हें उघड होतें. परंतु या प्रक्षिप्त भागांनीं सुत्ताच्या मूळ स्वरूपांत विशेषसा फरक केला नाहीं. हें सुत्त वाचीत असतां ख्रिस्ती मनुष्यास त्याच्या शुभ वर्तमानाची आठवण झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

**या सुत्तांतील कांहीं भागांच्या उत्तरकालीनत्वाचा पुरावा.**—तथापि सध्यांच्या स्वरूपांत असलेलें महापरिनिब्बान सुत्त हें बऱ्याच अलीकडच्या काळचें असलें पाहिजे. कारण, एका ठिकाणीं विनयपिटकांतील सुत्तांचा व इतर कांहीं सुत्तांचा आधार घेतल्याबद्दल उल्लेख आहे, आणि या सुत्ताच्या अखेरच्या प्रकरणांत बुद्धाचे अवशेष व त्यावर बांधलेले स्तूप यांचाहि उल्लेख आढळतो. म्हणजे जो बुद्ध आनंदाशीं संभाषण करीत असतांना एखाद्या साध्या माणसाप्रमाणें व गुरूप्रमाणें बोलतांना आढळतो, तोच येथें बौद्ध संप्रदायाचें पूज्य दैवत झालेला दिसतो. परंतु बुद्धाची प्रतिमा अशोकाच्या काळीं प्रथम पूजेंत आली असें निश्चित ठरलें आहे.

**महापदान सुत्त.**—त्याप्रमाणेंच महापदान सुत्तांत (नं. १४) बुद्धानें केलेले चमत्कार वर्णिले असून तेंहि बरेंच अलीकडील असावें. यामध्यें गौतमबुद्धाच्या पूर्वी होऊन गेलेल्या सहा बुद्धांच्या अस्तित्वाबद्दलची कल्पना गृहीत धरलेली दिसते. त्याचप्रमाणें बुद्धाबद्दलची दंतकथा व त्यानें केलेले चमत्कार विशेषतः त्याची गर्भावस्था व जन्म या वेळचे चमत्कार—यांचें वर्णन त्यांत केलेलें आहे.

**पौराणिक सुत्तः सक्कपन्हसुत्त.**—कांहीं सुत्तें (१७—२१) पौराणिक आहेत. यांमध्यें देवलोकाचें वर्णन असून देवांच्या वैभवाचें कारण ते पूर्व जन्मीं बौद्ध संप्रदायाचे भाविक अनुयायी होते असें सांगितलें आहे. यांतील सर्वांत चमत्कारिक सुत्त म्हणजे सक्कपन्हसुत्त (शक्रप्रश्न-

सूत्र नं. २१ ) हें होय. यांत सक्काचे प्रश्न आहेत. सक्क म्हणजे देवांचा राजा वज्रायुध इंद्र होय. इंद्रास बुद्धाकडे येण्याचें धैर्य होईना; म्हणून त्यानें त्याला प्रसन्न करण्याकरितां प्रथम एका गंधर्वास पाठविलें. या गंधर्वानें एक गीत गाऊन ( हें प्रेमगीत होतें ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे ) बुद्धास प्रसन्न केलें. नंतर इंद्र आला तेव्हां बुद्धानें मोठ्या मेहेरबानीनें त्याचें स्वागत करून त्याला बौद्ध संप्रदायाप्रमाणें वागूनच कोणतेंहि उच्च ध्येय कसें संपादन करितां येतें हें समजावून सांगितलें. पुढें इंद्राच्या सर्व प्रश्नांस बुद्धानें उत्तरें दिल्यानंतर इंद्र हर्षभरित होऊन त्यानें बुद्धाच्या स्तुतिपर एक गीत म्हटलें. वरील गोष्ट आपणांला जरी विचित्र वाटत असली तरी जुन्या बौद्ध लोकांस ती भूषणीय वाटत असली पाहिजे.

**पायासि सुत्त.**—दीघ निकायांतील उत्कृष्ट संवादांपैकीं पायासि सुत्त ( नं. २३ ) हा संवाद आत्मा व परलोक यांचें अस्तित्व मान्य न करणारा राजा पायासि व कुमार कस्सप यांच्यामध्यें झालेला आहे. सुत्तपिटकांतील इतर संवादांमध्यें बुद्ध हा स्वतः बोलणारा असून दुसऱ्याचें काम केवळ होकार देण्याचेंच असे असें दिसतें. परंतु पायासि सुत्त हा एक वास्तविक सुरस असा संवाद असून त्यावरून प्लेटोच्या संवादाची आठवण होते.

तथापि हें सुत्तहि मूळचें नाहीं. हा एक केवळ इतिहाससंवाद असून त्यामध्यें भर घातल्यामुळें त्याचें मूळचें स्वरूप उलट बिघडलें आहे. बहुधा तो दुसऱ्या कोणत्या तरी संप्रदायांतून–विशेषतः जैन संप्रदायांतून–घेतलेला संवाद असावा असें विंटरनिट्झ म्हणतो.

**दीघ निकायाच्या रचनाकालावर प्रकाश पाडणारीं आणखी कांहीं सुत्तें.**—दीघ निकाय हा संग्रह अलीकडे पूर्ण झाला आहे, ही गोष्ट नं. ३२ या व इतर सुत्तांवरूनहि सिद्ध होते. यांमध्यें राक्षस व सर्प यांचें निवारण करण्याचे मंत्र दिलेले आहेत. त्याप्रमाणेंच नं. २६ या सुत्तामध्यें भविष्यत्कालीं होणारा बुद्ध मेत्तेय्य याचा उल्लेख आहे. थिऑसॉफिस्टांचा भावी महात्मा तो हाच होय. संगीति आणि दसुत्तर या दोन शेवटल्या सुत्तांमध्यें अभिधम्मपिटक याची रचना होण्यापूर्वी प्रचारांत नसलेलीं कांहीं वाक्यें आलीं असून त्यांची रचना अंगुत्तर निकायासारखी आहे. यावरूनहि वरील गोष्ट सिद्ध होते.

**मज्झिम निकाय.**— या शब्दांचा अर्थ मध्यम आकाराच्या उपदेशपर व्याख्यानांचा संग्रह असा आहे. यामध्यें १५२ भाषणें व संवाद आहेत. हे सामान्यतः दीघ निकायांतील भाषणें व संवाद यांहून लहान आहेत, एवढाच काय तो त्यांच्यांत फरक आहे. या संग्रहांतील सुत्तेंहि स्वतंत्र व पर्ण असन त्यांचें महत्व व प्रकार यांत फार भेद आहेत. या संग्रहांतील सत्तांची संख्या पुष्कळ असल्यामुळें दीघ निकायापेक्षां यांत विषयहि जास्त व विविध प्रकारचे आले आहेत. यामध्यें आपणांला बौद्ध संप्रदायाचीं निरनिराळीं तत्त्वें पुढें मांडणारे सत्यचतुष्टय, विषयांची व्यर्थता, आत्म्याच्या अस्तित्वाबद्दलच्या शंकांचें निरसन, निर्वाण, ध्यानाचे निरनिराळे प्रकार इत्यादि बहुतेक सर्व विषय आढळतात. कांहीं ठिकाणीं हे संवाद केवळ रूक्ष व्याख्यानाप्रमाणें वाटतात, परंतु कांहीं ठिकाणीं ते सामान्य लोकांनां आवडतील अशा मनोरंजक संभाषणाच्या स्वरूपांत असून आरंभीं मोठा व लहान उपोद्घात म्हणजे प्रास्ताविक गोष्ट आढळते. दृष्टान्त देऊन शिक्षण दिलें असतां तें लोकांस जास्त आवडतें—मग सर्व भाषणामध्यें एकाच दृष्टान्ताचा परिपोष केलेला असो अगर तेंच तत्त्व पुनः पुनः ठसविण्याकरितां एकामागून एक अनेक दृष्टान्त दिलेले असोत—हें तत्त्व जाणून या ग्रंथांत कांहीं कल्पित अथवा पौराणिक कथा सांगून त्यांचा संबंध एखाद्या तत्त्वाशीं जोडलेला आढळतो. उदाहरणार्थ, नं. ३७ या सुत्तामध्यें बुद्धाचा प्रसिद्ध शिष्य मोग्गलान यानें स्वर्गांत इंद्रास दिलेल्या भेटीचें वर्णन केलेलें आहे. त्या भेटीच्या वेळीं मोग्गलान या भिक्षूनें आपल्या पायाच्या आंगठ्यानें स्वर्गांतील सर्व मंदिरांस हालविलें ( ५० व्या सुत्तांत याच गोष्टीचा पुनः उल्लेख केला आहे ). या गोष्टीवरून महाभारत व इतर पुराणांतील ब्राह्मणी कथांची आठवण होते.

**घडलेल्या प्रसंगांचें वर्णन.**—कांहीं प्रास्ताविक गोष्टींमध्यें वास्तविक घडलेल्या कांहीं प्रसंगांचें वर्णन असावें असें वाटतें. याचें उदाहरण आपणांला पुक्कुसाति याच्या गोष्टींत दृष्टीस पडतें. तो दीक्षा घेण्याच्या उद्देशानें वस्त्र व भिक्षापात्रें आणण्याकरितां जात असतां त्याला एका गाईनें ठार मारलें ( नं. १४० ). तेव्हां बुद्धानें सांगितलें कीं, तो भिक्षु झाला नसतांहि निर्वाणाप्रत गेला. त्याप्रमाणेंच छन्न हा भिक्षु फार आजारी पडला असतां त्यानें आपलें शरीर तोडून आत्महत्या करून घेतली, व ही गोष्ट बुद्धास पसंत पडली ( नं. १४४ ). आत्महत्या ही केवळ दुसरा जन्म मिळविण्याकरितां केली असतां दोषार्ह आहे, परंतु जो निर्वाणाप्रत जातो त्याला आत्महत्येचा दोष लागत नाहीं.

**अस्सलायन सुत्त.**—सुत्त नं. ९३ हें प्रसिद्ध अस्सलायन सुत्त बुद्धकालीन समाजस्थितीवरून रचलेलें असावें असें दिसतें, व त्यामुळें तें आपणांला विशेष मनोरंजक वाटतें. गौतम बुद्ध हा चारहि वर्णांच्या शुद्धतेबद्दल उपदेश करीत होता हें त्या मानी ब्राह्मणास मोठें विचित्र वाटलें असलें पाहिजे. अस्सलायन आणि गौतम बुद्ध यांच्यामधील संभाषणांसारखे जातिभेदाच्या यथार्थत्वाबद्दल वाद अनेक प्रसंगीं झाले असले पाहिजेत. ब्राह्मणांच्या जातिभेदसमर्थनाविरुद्ध घेतलेले आक्षेप व त्याचें केलेलें खंडन फार मौजेचें आहे. अस्सलायन बुद्धास म्हणतोः 'हे बुद्धा ब्राह्मण म्हणतात कीं, ब्राह्मण हेच सर्वांत उच्च वर्णाचे आहेत; इतर वर्ण त्यांच्याहून कनिष्ठ आहेत ब्राह्मण हे श्वेतवर्णी असून इतर कृष्णवर्णी

आहेत. ब्राह्मण हे शुद्ध होतात तसे ब्राह्मणेतर होत नाहींत. ब्राह्मण हे ब्रह्मदेवाचे साक्षात् पुत्र आहेत. ते त्याच्या मुखापासून उत्पन्न झालेले आहेत. ते ब्रह्मबीजापासून उत्पन्न झालेले, ब्राह्मणांनीं वाढविलेले व त्यांचेच वंशज आहेत. यावर बुद्धाचें काय ह्मणणें आहे ?' नंतर बुद्धानें अस्सलायन यास एकामागून एक असे प्रश्न विचारले कीं, त्या सर्व प्रश्नांनां त्यास होकारार्थी उत्तर द्यावें लागून ब्राह्मणांचीं विधानें निराधार आहेत असें कबूल करावें लागलें. त्याचे प्रश्न अशा प्रकारचे होतेः—

"समजा, एका अभिषिक्त क्षत्रिय राजानें ब्राह्मणक्षत्रियादि सर्व दर्जांचे लोक मिळून १०० निरनिराळ्या जातींचीं माणसें एकत्र केलीं. नंतर प्रत्येकानें साल, चंदन अथवा पद्मक या झाडांच्या लांकडांची एक एक रवी घेऊन ती दुसऱ्या लांकडाच्या उखळांत फिरवून अग्नि उत्पन्न केला. येणेंप्रमाणें चांडाल, व्याध, बुरूड, रथकार, पुक्कस ( म्हणजे शूद्र ) इ. सर्व जातींच्या लोकांनीं अग्नि उत्पन्न केला, तर ब्राह्मणादिकांनीं चांगलीं लांकडें घेऊन तयार केलेला अग्नि जास्त तेजस्वी व प्रकाशमान असेल काय ? किंवा इतरांनीं तयार केलेला अग्नि अग्नीचीं सर्व कार्यें करणार नाहीं काय?" अर्थात् अस्सलायन याला दोन्ही अग्नींमध्यें कांहींहि फरक नाहीं असें उत्तर देणें भाग पडलें. तेव्हां गौतमानें त्याचप्रमाणें जातींमध्येंहि फरक नाहीं असें सांगितलें.

**गोष्टीरूप सुत्तें.**—परंतु कांहीं सुत्तें संवादरूपी अथवा प्रवचनरूपी नसून केवळ गोष्टीरूप आहेत. याप्रमाणें नं. ८६ हें एक जुन्या तऱ्हेचें आख्यान असून त्यामध्यें अंगुलिमाल या नांवाच्या एका भयंकर दरवडेखोराची हकीकत गद्यपद्यमिश्रित आहे. हा पुढें भिक्षु होऊन अर्हतपदापर्यंत पोहोंचला. हें सुत्त हा जुन्या बौद्ध काव्याचा एक चांगला नमुना असून यांतील कविता फार चांगली आहे. दुसऱ्या एका सुत्तांत (नं. ८३) मखदेव या राजाची कथा सांगितली आहे ( ही पुन्हां जातकांतहि आली आहे ). या राजानें पहिला शुभ्र केस दिसूं लागतांच राज्याचा त्याग करून भिक्षुवृत्ति स्वीकारिली. अशा सुत्तांमध्यें रट्ठपाल (राष्ट्रपाल) सुत्त (नं. ८२) हें विशेष प्रसिद्ध आहे. यामध्यें पोवाड्याच्या चालींत एक गोष्ट सांगितली आहे. तिचा सारांश असाः—

रट्ठपाल या तरुण राजपुत्रास भिक्षु होण्याची इच्छा झाली परंतु त्याचे आईबाप त्यास तसें करण्यास संमति देईनात तेव्हां अन्नत्याग करून त्यानें त्यांस संमति देण्यास भाग पाडलें. कांहीं वर्षांनीं तो भिक्षुवेषानें आपल्या गांवीं परत येऊन आपल्या पित्याच्या दारावर भिक्षा मागूं लागला. त्याच्या बापानें त्याला न ओळखल्यामुळें तो त्यास दुरुत्तरें बोलून घालवूं लागला. तो म्हणाला कीं, याच भिक्षूंनीं थापा मारून माझ्या मुलाला संसाराचा त्याग करावयास लावलें. इतक्यांत कांहीं खरकटें टाकावयास त्या भिक्षूची लहानपणची दाई बाहेर आली व तिच्या जवळ त्या भिक्षूनें तें खरकटें खाण्याकरितां मागितलें. तेव्हां तिनें त्या भिक्षूला ओळखून ती गोष्ट आपल्या धन्यास सांगितली. धन्यानें बाहेर येऊन त्या भिक्षूला घरांत बोलाविलें. पण त्या भिक्षूनें आज माझें जेवण झालें आहे असें म्हणून घरांत येण्याचें नाकारलें; व दुसऱ्या दिवशीं येण्याचें कबूल करून तो निघून गेला. दुसऱ्या दिवशीं बापानें त्याच्याकरितां चांगलें जेवण बनवून त्याला देण्याकरितां सोन्यादागिन्यांच्या राशी तयार करून ठेविल्या, व रट्ठपालाच्या पूर्वीच्या बायकोसहि उंची वस्त्रें परिधान करून हजर राहण्यास सांगितलें. दुसऱ्या दिवशीं मुलगा आला तेव्हां बापानें त्याचा आदरसत्कार करून त्यास तीं सर्व रत्नें व द्रव्य देऊं केलें. परंतु रट्ठपाल म्हणाला, 'बाबा, तुम्हांला जर माझें म्हणणें ऐकावयाचें असेल तर हे सर्व दागदागिने गाडींत घालून गंगानदीमध्यें खोल पाण्यांत नेऊन बुडवा. कां कीं, यांच्यापासून केवळ दुःख, क्लेश, दैन्य व त्रास मात्र उत्पन्न होतो.' त्याच्या बायकोनें त्याच्या पायां पडून त्याची पुष्कळ विनवणी केली; परंतु तिकडे बिलकुल लक्ष न देतां जेवण झाल्यावर तो निघून गेला. नंतर त्यास कुरुदेशाचा राजा भेटला. तो त्यास म्हणाला, 'जे गृहस्थ वृद्ध झाले आहेत, आजारी पडले आहेत, दरिद्री आहेत अगर ज्यांचे आप्त निधन पावले आहेत ते भिक्षू होतात; परंतु जो तरुण, सुखी व निरोगी आहे त्यानें या संसाराचा त्याग कां करावा हें समजत नाहीं.' तेव्हां रट्ठपालानें जीविताची अशाश्वतता व कामाची अतृप्तता यांबद्दल त्या राजाशीं संवाद करून बौद्ध तत्त्वांची सत्यता त्याला पटवून दिली. हा संवाद सॉक्रेटिसाच्या संवादाप्रमाणें वाटतो.

**रुक्ष प्रवचनें वगैरे.**—अशा प्रकारच्या सुंदर कथांशेजारींच रुक्ष प्रवचनें आढळतात. हीं प्रवचनें संवादरूपी असून त्यांमध्यें एखाद्या आद्यतत्त्वाचें प्रतिपादन केलेलें असतें; अथवा कांहीं तात्त्विक परिभाषेचा अर्थ समजावून दिलेला असतो. नं. ४३ व ४४ यांपैकीं कांहीं व नं. १२८, १३७, १४०, १४८ व १५१ हीं सुत्तें अंगुत्तर निकाय यांमधील याद्यांप्रमाणें व अभिधम्म पिटकांतील व्याख्यानांप्रमाणें किंवा वर्गीकरणाप्रमाणें आहेत.

वरील गद्यपद्यमिश्रित सुरस आख्यानांहून अगदीं निराळ्या तऱ्हेचें असें सुत्त नं. ११६ हें आहे. यामध्यें प्रथम गद्यामध्यें व लागलीच पुढें पद्यामध्यें ज्या भिक्षूंनां साक्षात्कार झाला असून त्यांनीं तो जगांत प्रसिद्ध केला नाहीं अशांच्या नांवांची यादी दिलेली आहे. हें गद्यपद्यमिश्रण बरेंच अलीकडचें असून तें आपणांस पुढें बौद्ध संस्कृत वाङ्मयामध्यें आढळून येणार आहे.

**ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचे भाग.**—परंतु मज्झिम निकाय यांतील सुत्तांवरून आपणांला प्राचीन बौद्ध संप्रदाय

व बुद्ध आणि त्याचा पहिला शिष्यवर्ग यांच्या उपदेशाची पद्धति कळते. एवढेंच नव्हे तर त्या प्राचीन कालांतील आयुष्यक्रमाबद्दलची कांहीं मजेदार माहितीहि मिळते. ही माहिती केवळ भिक्षूंच्या रहाणीबद्दलचु (नंबर ५, २१, २२ इत्यादि) मिळत नसून इतर लोकांबद्दलहि मिळते. उदाहरणार्थ, नं. ५१ वरून आपणांस ब्राह्मणांच्या यज्ञाबद्दल व त्या वेळचे यज्ञ, संस्कार व पुरोहितवर्ग यांच्यामधील परस्परसंबंधांबद्दल कित्येक उपयुक्त गोष्टी कळतात. भारतवर्षांत प्राचीन काळीं प्रचारांत असलेल्या निरनिराळ्या यतींच्या धर्मांचे उल्लेखहि कोठें कोठें आढळून येतात. नं १२ व १४ मध्यें आपणांस यतींच्या ओंगळ क्रियांचें उत्कृष्ट उदाहरण आढळतें. नं. ४०, ४५, ५१, आणि ६० यांवरून आपणांस निरनिराळ्या पंथांच्या चमत्कारिक साधूंची माहिती मिळते. त्या वेळीं 'श्वयति' व 'वृषभयति' अशा प्रकारचे साधू असून ते अगदीं हुबेहूब कुत्रे व बैल यांच्याप्रमाणें खात, पीत व रहात असत. अशा यतींचें पुढें काय होईल असा बुद्धाला प्रश्न विचारला असतां, फार झालें तर 'श्वयति' हा कुत्र्याच्या व 'वृषभयति' हा बैलाच्या जन्मास जाईल किंवा ते दोघेहि नरकांत जातील, असें बुद्धानें उत्तर. दिलें आहे. कांहीं सुत्तांवरून बौद्ध व जैन संप्रदायांच्या परस्परसंबंधाबद्दल ऐतिहासिक माहिती मिळते. ही माहिती विशेषतः उपालिसुत्तांत (नं ५६) व नं ५७, १०१ आणि १०४ ह्या सुत्तांत आली आहे. त्या वेळच्या खुळया समजुती, लोकभ्रम, सामाजिक गोष्टी व कायदेपद्धती यांचेहि उल्लेख मधून मधून आढळतात. उदाहरणार्थ, नं १३मध्यें त्या वेळच्या क्रूर शिक्षा दिल्या आहेत. सुत्त नं. ३८ मध्यें मुलांचा जन्म व त्यांचें शिक्षण याबद्दलच्या विचित्र कल्पना आढळतात. त्याप्रमाणेंच नं. ९८ आणि नं. ३७ यांमध्यें सून आणि सासरा यांचे परस्परसंबंध कसे असत हें दृष्टीस पडतें.

**सुत्तांच्या काळाच्या पौर्वापर्याचा विचार.**— कालाच्या दृष्टीनें हीं निरनिराळीं सुत्तें एकमेकांहून फार भिन्न आहेत. मज्झिम निकाय यांतील कांहीं सुत्तांमध्यें महापरिनिब्बान सुत्तांतील प्राचीन भागांतल्याप्रमाणें बुद्ध हा केवळ मनुष्य व उपदेशक असा दृष्टीस पडतो. तो स्वतःबद्दल एखाद्या मनुष्यकोटींतल्याच व्यक्तीप्रमाणें बोलतो. मात्र त्याला विशेष ज्ञान झाल्यामुळें पुढें पूर्ण निर्वाणाप्रत जाण्याच्या सुखाचा तो अनुभव घेत असतांना दृष्टीस पडतो. सुत्त नं. २६ व ३६ यांमध्यें तो साध्या भाषेंत आपल्या आत्मचरित्राचा कांहीं भाग कथन करतो. त्यामध्यें त्यानें एकहि चमत्कार केलेला आढळत नाहीं. परंतु इतर सुत्तांमध्यें (उदाहरणार्थ नं. १२) बुद्धाच्या ठायीं सर्व दैवी गुणांचें व चमत्कारांचें सामर्थ्य असल्याबद्दलचें वर्णन आढळतें. 'चमत्कार सुत्त' (नं. १२३) यामध्यें बुद्धाची गर्भावस्था व जन्म यांबद्दलच्या चमत्कारांचें वर्णन, पुष्कळ अलीकडील लौकिक वाङ्मयांमध्यें (उ. निदानकथा किंवा ललितविस्तर यांमध्यें) आढळून येणाऱ्या दंतकथांप्रमाणें व दीघ निकाय यांतील महापदानसुत्त यामध्यें आपणांस आढळून आल्याप्रमाणेंच दृष्टीस पडतें. या सुत्तामध्यें बुद्ध अथवा मोग्गलान यांचें अदृश्य होणें, व एखाद्या सशक्त मनुष्यानें आपला हात लांब किंवा आंखूड करावा त्याप्रमाणें एकदम देवलोकामध्यें अथवा ब्रह्मलोकामध्यें प्रगट होणें इत्यादि चमत्कार ठिकठिकाणीं वर्णन केलेले आढळतात. एका सुत्तामध्यें (नं. ४९) बुद्ध हा ब्रह्मदेवासुद्धां सर्व देवांपेक्षां श्रेष्ठ आहे असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. जरी बहुतेक भाषणें बुद्धाच्या तोंडीं घातलीं आहेत तरी कांहीं भाषणें बुद्धाच्या कांहीं शिष्यांच्या तोंडींहि घातलेलीं आढळतात. कांहीं ठिकाणीं विचारलेल्या प्रश्नास एखादा शिष्य उत्तर देतो, व तें बरोबर असल्याबद्दल बुद्धाची संमति घेतो (नं. १२६). तथापि, सर्व सुत्तें बुद्ध हयात असतांना रचलीं गेलीं ही कल्पनाहि सर्वत्र कायम राखलेली दिसत नाहीं. उदाहरणार्थ नं. ८४ व ९४ यांमध्यें एका शिष्यानें सध्यां बुद्ध कोठें आहे असा प्रश्न विचारिला असतां, तो पूर्णनिर्वाणाप्रत गेला आहे असें त्यास उत्तर मिळालेलें आढळतें. सूत्र नं. १०८ याचा बुद्धाच्या मरणाशीं निकट संबंध दिसतो. यामध्यें, बुद्धानें निर्वाणापूर्वी भिक्षुसंघावर एखाद्या मुख्याची नेमणूक केली नाहीं काय, असा आनंदास प्रश्न केलेला आढळतो. या प्रश्नास आनंदानें नकारार्थी उत्तर दिलें; पण केवळ तेवढ्याच गोष्टीवरून भिक्षुसंघास कोणाचाहि आश्रय नाहीं असें नाहीं, कारण धम्म हा त्यांचा आश्रय असून बुद्धानें घालून दिलेल्या पातिमोक्ख विधीमुळें त्यांच्यामध्यें सुव्यवस्था राहील असें सांगितलें. या सुत्ताचा धम्मापेक्षां विनयाशीं (भिक्षुवर्गाच्या आचारांशीं) जास्त संबंध दिसतो. अशीं दुसरींहि कांहीं सुत्तें आहेत (नं. १०३, १०४ व १४२).

निरनिराळ्या सुत्तांमध्यें ज्या निरनिराळ्या पद्धतींनीं बौद्धसांप्रदायिक तत्त्वांचें विवेचन केलें आहे, त्या पद्धतींवरून त्या सुत्तांच्या रचनेचा काल निश्चित करतां येईल किंवा नाहीं हा प्रश्नच आहे. सुत्त नं. १२९ F व १३५ F यांमध्यें कर्मवादाचें बीभत्स रीतीनें विवेचन केलें आहे व यमलोकांतील यातनांचें इतकें सूक्ष्म वर्णन केलें आहे कीं, तसेंच वर्णन आपणांला पुराणांमध्यें आढळतें. यावरून हीं सुत्तें बरींच अलीकडील असावींत असें वाटतें; परंतु प्राचीन काळींहि निव्वळ तात्त्विक कर्मवादाप्रमाणेंच परंतु त्यापेक्षां निराळी एखादी कर्मवादाची सुलभ कल्पना लोकांमध्यें रूढ असावी. मज्झिम निकाय रचला जाण्यापूर्वीचा बौद्ध संघाचा कांहीं तरी इतिहास असला पाहिजे ही गोष्ट नं. ६५ या सुत्तावरून व्यक्त होते. यामध्यें, पूर्वी शास्त्रवचनें थोडीं असून भिक्षूंची संख्या मोठी असे, परंतु सध्यां शास्त्रवचनांची संख्या मोठी असून भिक्षूंची संख्या थोडी आहे असें

म्हटलें आहे. अस्सलायन सुत्तामध्यें (नं. ९३) यवनांचा व कांबोजांचा उल्लेख आला आहे; त्यावरून त्या वेळीं ग्रीको-बॅक्ट्रियन साम्राज्य अस्तित्वांत असून तो काल अशोकाच्या थोडा पूर्वीचा असावा असें दिसतें.

नं. ४१ व ४२ या सुत्तांवरून या संग्रहाचा आरंभ कसा झाला हें ध्वनित होतें. नं. ४२ हें सुत्त थोड्या प्रास्ताविक भागांखेरीज शब्दशः नं. ४१ या सुत्ताप्रमाणेंच आहे. इतर ठिकाणींहि तींच प्रवचनें व तेच संवाद फक्त निरनिराळ्या परिस्थितींमध्यें पुन्हां आलेले आढळतात. उदाहरणार्थ, नं. १३२ ते १३४हीं सुत्तें एकाच प्रवचनाचीं दोन रूपें आहेत. हीं प्रवचनें बहुधा भिक्षूंनीं प्रत्यक्ष केलेलीं असावींत. जेव्हां एखाद्या भिक्षूस कांहीं नवीन आठवत नसेल तेव्हां तो एखादें जुनेंच प्रवचन कांहीं किरकोळ फेरफार करून सांगत असावा. पुढें संग्रहकारांनीं हीं सर्व प्रवचनें—मग तीं कोणत्याहि उपदेशकाच्या तोंडचीं असोत—जशीं उपलब्ध झालीं तशीं एकत्र केलीं असावींत.

**संयुत्तनिकाय.**—तिसरा मोठा संग्रह संयुत्तनिकाय हा होय. यामध्यें उपदेशपर प्रवचनांचा संग्रह असून त्यांचे निरनिराळे गुच्छ केलेले आहेत. या संग्रहांत सूत्रांचे ५६ गुच्छ (संयुक्त) असून प्रत्येकाचा संबंध निरनिराळ्या नांवांशीं अगर वस्तूंशीं आहे व त्यांमध्यें निरनिराळ्या सांप्रदायिक तत्त्वांचें विवेचन केलें आहे. हे निरनिराळे गुच्छ पाडतांना केलेली विषयविभागणी शास्त्रीय नसून केवळ प्रयत्नरूपी आहे. यामुळें देवतासंयुत्तामध्यें (नं. १) देवतांचीं वचनें आहेत; परंतु तीं अगदीं निरनिराळ्या विषयांबद्दल आहेत. मारसंयुत्तामध्यें (नं. ४) २५ सूत्रें असून त्यांमध्यें प्रत्येकांत माराबद्दलची एकएक दंतकथा सांगितली आहे. मार हा, बुद्ध स्वतः अगर त्याचा एखादा शिष्य मोक्षमार्गापासून च्युत व्हावा म्हणून प्रयत्न करतो. परंतु प्रत्येक वेळीं त्याला अपयश येतें. भिक्षुणीसंयुत्तामध्यें (नं. ५) भिक्षुणींबद्दलच्या १० दंतकथा असून त्यांमध्यें मार हा त्यांनां संप्रदायच्युत करण्याबद्दल व्यर्थ प्रयत्न करीत असलेला दिसतो. निदान संयुत्त (नं. १२) यामध्यें ९२ भाषणें व संवाद असून त्यांमध्यें पुनरुक्ति फार आढळते. यांचा विषय १२ निदानें म्हणजे कार्यकारणन्याय (पटिच्च समुप्पाद) हा आहे. अनमतग्गसंयुत्त (नं. १५) यामध्यें २० प्रवचनें असून तीं सर्व अनमतग्गो (हे भिक्षूंनो, आद्यंतरहित असा हा संसार आहे) या वाक्यापासून सुरू होतात. उलट कस्सप संयुत्तांतील (नं. १६) १३ सूत्रें केवळ तीं कश्यपाच्या तोंडीं घातलीं आहेत म्हणूनच एकत्र केलेलीं आढळतात. याप्रमाणें सारीपुत्त संयुत्तामध्यें (नं २८) सारीपुत्ताचीं १० प्रवचनें आहेत. नागसंयुत्ताच्या (नं. २९) ५० सूत्रांमध्यें नागांच्या निरनिराळ्या जातींचीं नांवें दिलीं असून कोणतें कृत्य केलें असतां विशिष्ट नागजातीमध्यें जन्म येतो तें सांगितलें आहे. ध्यान (झान) अथवा समाधिसंयुत्तांतील (नं. ३४) ५५ सूत्रांमध्यें ध्यानाचें अथवा समाधीचें विवेचन आहे. स्त्रियांची सबलता अथवा निर्बलता व त्यांचे सद्गुण अथवा दुर्गुण आणि त्यांनां पुढील जन्मीं प्राप्त होणारी स्थिति यांचें वर्णन मातुगामसंयुत्तांतील (नं. ३७) ३४ सूत्रांमध्यें केलें आहे. मोग्गलान याच्याबद्दल कथा व त्याचीं कांहीं प्रवचनें मोग्गलान संयुत्तांतील (नं. ४०) ११ सूत्रांमध्यें आहेत. सक्कसंयुत्त (नं. ११) यांतील नायक सक्क (शक्र) म्ह० इंद्र हा असून तो येथें धार्मिक बौद्धाप्रमाणें आढळतो. वेदांतल्या ऋचांतील वृत्रघ्न इंद्र याचें भयंकर वर्णन व सक्क संयुत्तांतील त्याची शांति व मी कधींहि रागावत नाहीं अशी त्यानें मारलेली प्रौढी हीं ध्यानांत घेतां वेद व तिपिटक यांच्या रचनेच्या कालामध्यें केवढें अंतर असलें पाहिजे ही गोष्ट लक्षांत येते. सच्चसंयुत्त (सत्यसंयुक्त नं. ५६) हें अखेरचें संयुत्त असून त्यामध्यें १३१ सूत्रांत सत्यचतुष्टयाचें, मानवी दुःखाचें व त्याच्या निरसनाचें विवेचन आहे. याच संयुत्तामध्यें (नं. ५६,११) प्रसिद्ध धम्मचक्कप्पवत्तनसुत्त—बनारस येथील प्रवचन—आढळतें. येथूनच बुद्धानें धर्मचक्राला गति दिली.

**रचना.**—हीं सूत्रें एकत्र करतांनां तीन गोष्टींकडे लक्ष दिलेलें आढळतें. (१) एकाच गुच्छांतील सूत्रांमध्यें बौद्धसंप्रदायाच्या कांहीं मुख्य तत्त्वांचें उद्घाटन केलेलें असतें अथवा (२) त्यांचा संबंध एखाद्या विशिष्ट वर्गांतील देव, दानव अगर मनुष्यें यांच्यांशीं असतो किंवा (३) त्यांमध्यें एखादी प्रसिद्ध व्यक्ति विवेचक अथवा नायक असते. या ५६ संयुत्तांचे ५ वर्ग (वग्ग) केलेले आहेत व एकंदर सूत्रसंख्या २८८९ आहे. हीं सर्व सूत्रें मध्यम अथवा दीघ निकायांतील सूत्रांपेक्षां बरींच लहान आहेत. सूत्रांची संख्या येवढी मोठी असण्याचें मुख्य कारण प्रत्येक विषयाच्या सर्व बाजूंचा एखाद्या ठराविक पद्धतीनें व कांहीं वाक्यांची अनेकवार पुनरुक्ति करून इतका उहापोह केला आहे कीं, वाचकांस कंटाळा येतो. उदाहरणार्थ, सळायतन संयुत्तामध्यें (नं. ३५) एकंदर २०७ सूत्रें असून त्यांत षडिंद्रियांवर संवाद व भाषणें आहेत. यांमध्यें पुनःपुनः हेंच सांगितलें आहे कीं, नेत्र, कर्ण इत्यादि पंचेंद्रियें व मन हीं नाशवंत असून दुःखमय आहेत, त्यांचा आत्म्याशीं कांहीं संबंध नाहीं व या षडिंद्रियांपासून झालेलें प्रत्यक्ष ज्ञान नाशवंत व दुःखमय असून त्याचाहि आत्म्याशीं कांहीं संबंध नाहीं. तसेंच या षडिंद्रियांचे जे विषय तेहि नाशवंत व दुःखमय असून त्यांचाहि आत्म्याशीं कांहीं संबंध नाहीं. ही गोष्ट प्रत्येक इंद्रियाबद्दल, तज्जन्य ज्ञानाबद्दल व त्याच्या विषयाबद्दल त्याच त्याच शब्दांत पुनःपुनः सांगितली आहे व प्रत्येक गोष्टीबद्दल निराळें सूत्र केलें आहे. अर्थात् याचें वाचन आपणांस त्रासदायक वाटतें. परंतु या संग्रहांतहि वाङ्मयाच्या दृष्टीनें महत्त्वाचा भाग पुष्कळ आढळतो.

**वाङ्मयीन महत्त्व.**—असा महत्त्वाचा भाग विशेषतः पहिल्या वर्गांत दृष्टीस पडतो. या वर्गामध्यें नं. १ ते ११ हीं

संयुत्तें असून त्यांस सागथवग्ग ( गाथायुक्त वर्ग ) असें नांव आहे. अशा गाथा मधून मधून इतर निकायांप्रमाणें सर्व वर्गांतून आढळतात. परंतु पहिल्या वर्गामध्यें त्यांची संख्या इतकी मोठी आहे कीं, कांहीं सूत्रें केवळ गाथामयच आहेत. इतर सूत्रें, विशेषतः मारसंयुत्त व भिक्षुणीसंयुत्त यांतील सूत्रें पूर्वी सांगितल्याप्रमाणें गद्यपद्यमिश्रित आख्यानरूपामध्यें आहेत. त्यांच्या स्वरूपावरून व त्यांतील प्राचीन भाषेवरून तीं, प्राचीन बौद्धकाव्यापैकीं आहेत हें उघड होतें. व्हीस डेव्हिड्स् यानेंहि निकायांतील बहुतेक गाथा प्राचीन असाव्यात असें म्हटलें आहे (दीघनिकाय ग्रं. २ पृ. ८ ).वरील दोन संयुत्तांतील कांहीं लहान लहान आख्यानें हीं प्राचीन भारतीय काव्यांचीं उत्कृष्ट उदाहरणें आहेत. नमुन्यादाखल किसा गौतमी ( कृश गौतमी ) हिचें सूत्र( ५, ३ ) हें आपण येथें देऊं:—

"मीं असें ऐकिलें आहे कीं,बुद्ध एकदां श्रावस्ती (सावत्थी) येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या बागेमध्यें रहात होता. किसा गौतमी ही भिक्षुणी प्रातःकाळीं वस्त्रें परिधान करून व आपलें भिक्षापात्र आपल्या वस्त्राखालीं घेऊन भिक्षा मागण्याकरितां श्रावस्ती नगरास गेली. श्रावस्ती नगरामधून भिक्षा मागून आणलेलें अन्न भक्षण केल्यावर ती राहिलेला दिवस घालविण्याकरितां एका दाट जंगलामध्यें गेली व बराच आंत प्रवेश केल्यावर ती एका झाडाखालीं बसली. तेथें दुष्टबुद्धि मार हा तिचें ध्यान मोडण्याकरितां तिला भीति दाखविण्यास आला व तिला एका श्लोकांत म्हणाला कीं, येथें तूं पुत्र हरवलेल्या आईप्रमाणें डोळयांत अश्रू आणून एकटीच कां बसली आहेस ? या दाट जंगलांत एकटीच बसून एखाद्या पुरुषाची मार्गप्रतीक्षा करीत आहेस काय ? हें ऐकून किसा गौतमी आपल्या मनाशीं विचार करूं लागली कीं, आतां ज्यानें श्लोक म्हटला तो कोण असावा; मानव असेल कीं मानवेतर असेल ? नंतर तिला असें वाटलें कीं, तो दुष्टबुद्धि मार असावा व त्यानें आपल्या ध्यानांत विघ्न आणण्याकरितां व आपणास भिवविण्याकरितां वरील श्लोक म्हटला असावा. नंतर किसा गौतमीला तो दुष्टबुद्धि मार आहे असें ज्या वेळीं कळून आलें तेव्हां तिनें त्याला पुढील अर्थाचें श्लोकांत उत्तर दिलें. "होय, मी खरीच एक पुत्र नष्ट झालेली आई आहे. परंतु मला जवळच असलेल्या या पुरुषाची मार्गप्रतीक्षा करण्याची जरूर नाहीं. मी अश्रू गाळीत नाहीं किंवा शोकहि करीत नाहीं व मित्रा, मला तुझी भीतीहि वाटत नाहीं. माझ्या कामाचा पूर्ण नाश झालेला आहे व अंधःकार दूर पळाला आहे. मी मृत्यूच्या सैन्यास जिंकलें आहे. सर्व दुःखापासून अलिप्त अशी मी रहात आहे." तेव्हां त्या दुष्टबुद्धि मारास किसा गौतमीनें आपणास ओळखिलें हें कळून येऊन तो मोठ्या दुःखानें तेथून अदृश्य झाला.

या काव्यांतून आपणास भारतीय महाकाव्याचें मूळ ज्यांत सांपडतें अशा आख्यानासारखींच सांप्रदायिक आख्यानें आढळतात.जे. शार्पेंटियेर हा या आख्यानांस लहान नाटकें असें नामाभिधान देतो. परंतु सर्व तिपिटकामध्यें अशा प्रकारचीं अध्यात्मिक विषयावर नाटकें त्या वेळीं होत असल्याबद्दल कोठेंहि मागमूस आढळत नाहीं. शिवाय इतकी सुसंस्कृतताहि त्या वेळच्या बौद्ध भिक्षूंमध्यें आढळून येत नाहीं. उलटपक्षीं वरील काव्यें बौद्ध भिक्षूंनींच रचलीं असलीं पाहिजेत व त्यांनां तर नाटकें व त्यांसारखे इतर प्रकार यांमध्यें भाग घेण्याबद्दल त्यांच्याच शास्त्रांत वारंवार निषेध केलेला आढळतो. तथापि आपणांला अशा प्रकारचीं कथागीतें ठिकठिकाणीं आढळतात व त्यांमध्यें वरीलप्रमाणेंच नाट्यकल्पनेचा बराच अंश आढळतो. अशा लौकिक व आध्यात्मिक कथागीतांपासूनच नाटकांचा उदय झाला असावा; परंतु महाकाव्यें यांपासून उत्पन्न झालीं तरी यांसच महाकाव्यें म्हणणें जसें सयुक्तिक होणार नाहीं, तसें या चुटक्यांसच नाटकें म्हणणेंहि सयुक्तिक होणार नाहीं. या आख्यानांतील गद्यभाग हा पद्याइतकाच जुना आहे कीं काय याबद्दल मात्र संशय आहे.

**अंगुत्तर निकाय.**—चौथा मोठा संग्रह अंगुत्तर निकाय हा होय. यामध्यें बोधपर वचनें असून तीं संख्येच्या चढत्या क्रमानें लावलेलीं आहेत. यांतील सूत्रें संख्येनें निदान २३०८ ( किंवा जास्तींत जास्त २३६३ ) असून तीं ११ प्रकरणांमध्यें ( निपातांमध्यें ) ग्रथित केलीं आहेत. तीं अशीं कीं, एकसंख्याक वस्तूंबद्दलचीं सूत्रें पहिल्या प्रकरणांत, दोन वस्तूंबद्दलचीं दुसऱ्या प्रकरणांत, तीन संख्याक वस्तूंबद्दलची तिसऱ्या प्रकरणांत. उदाहरणार्थ, दुसऱ्या प्रकरणामध्यें मनुष्यानें ज्या वस्तूंपासून दूर रहावें अशा दोन वस्तू, दोन काळ्या व दोन हलक्यावस्तू,अरण्यांत रहाण्याबद्दल दोन कारणें, बुद्धांच्या दोन जाती, इत्यादिकांविषयीं विवेचन आहे.तिसऱ्या प्रकरणामध्यें क्रिया, वाचा व विचार या त्रयीबद्दल, भिक्षूंच्या तीन वर्गांबद्दल, देवांच्या तीन दूतांबद्दल ( वार्धक्य, रोग व मृत्यु), मृत्यूचा जगावर तावा चालतो याच्या तीन कारणांबद्दल, मौनाच्या तीन प्रकारांबद्दल, ज्या तीन कारणांमुळें स्त्रिया नरकांत जातात त्यांच्याबद्दल, इत्यादि विवेचन आहे. आठव्या प्रकरणांत ज्या आठ गोष्टींनीं पतिपत्नी हे परस्परांस बद्ध करितात त्या गोष्टी, भिक्षेचे आठ प्रकार, पुढील जन्म देवगणाच्या कोटींत होण्यासाठीं स्त्रियांस अवश्यक असणारे आठ गुण, भूकंपाचीं आठ कारणें इत्यादि विषय येतात. दहाव्या प्रकरणामध्यें बुद्धाच्या दहा शक्ती, दहा आयतत्वें ( बौद्ध संप्रदायाचें थोडक्यांत स्वरूप ) पातिमोक्खांवधीबद्दल दहा कारणें व श्रीमंत लोकांचे १० वर्ग इत्यादि गोष्टी आहेत.

**पोटविभाग.**—या अकरा प्रकरणांचे पुन्हां कित्येक विभाग ( वग्ग ) केलेले आहेत. आणि यामध्यें बहुतकरून ( नेहमींच नव्हे )एकाच विषयाबद्दल असलेलीं सूत्रें एकत्र

केलीं आहेत. याप्रमाणें पहिल्या प्रकरणांतील (१ त्या निपातांतील) पहिल्या वग्गामधील १० सूत्रांमध्यें पतिपत्नी यांचा परस्परसंबंध वर्णन केला आहे. निपात १ वग्ग १४ यामध्यें ८० सूत्रें आहेत. त्यांमध्यें प्रमुख प्रमुख शिष्य व शिष्यिणी यांचीं नांवें दिलीं असून त्यांच्या गुणांचें वर्णन केलें आहे. निपात१वग्ग२० यांत निर्वाणप्राप्त्यर्थ करावयाच्या ध्यानाचे निरनिराळे प्रकार २६२ सूत्रांमध्यें सांगितले आहेत- निपात५वग्ग१८हा उपासकांबद्दल असून त्यांत१०सूत्रें आहेत. संयुत्तनिकायांतील सूत्रांप्रमाण या संग्रहांतील सूत्रेंहि लहान लहान भाषणांच्या व संवादांच्या रूपानें आहेत. परंतु कांहीं ठिकाणीं लांब लांब प्रवचनें असून इतर निकायांप्रमाणें यांतील प्रवचनांतहि मधून मधून पद्यें (गाथा) आढळतात. अंगुत्तर निकायांतील पुष्कळ सूत्रें व गाथा इतर ग्रंथांतील सूत्रें व गाथा यांच्या प्रमाणेंच आहेत; व कांहीं ठिकाणीं तर तीं अवतरणें म्हणून उद्धृत करून घेतलीं आहेत. अंगुत्तर निकायांतील कांहीं सूत्रांमध्यें लघुत्व हा मोठा विशेष गुण आहे. तिसऱ्या प्रकरणामध्यें (३, १२९) दिलेलें बुद्धाचें भाषण बौद्ध संप्रदाय हा गुप्तविद्याविशिष्ट आहे अशी ज्याची भ्रामक समजूत असेल त्यानें वाचण्यासारखें आहे. त्यांतील दोन गाथांचा आरंभ असा होतो.

" भिक्षूहो, तीन गोष्टी गुप्तपणें होत असतात, उघडपणें होत नाहींत. या तीन गोष्टी कोणत्या? भिक्षूहो, स्त्रिया नेहमीं गुप्तपणें गोष्टी करतात, उघडपणें करीत नाहींत. ब्राह्मणांचे मंत्र गुप्तपणें चालू असतात, उघडपणें नसतात. खोटा सिद्धांत गुप्तपणें पसरत असतो, उघडपणें पसरत नाहीं. भिक्षूहो, या तीन गोष्टी गुप्तपणें चालतात, उघडपणें चालत नाहींत.

"भिक्षूहो, तीन गोष्टींचा प्रकाश उघडपणें पसरत असतो, गुप्तपणा त्यांत नसतो. त्या तीन गोष्टी कोणत्या? चंद्राचें बिंब आपला प्रकाश उघडपणें पाडीत असतें, गुप्तपणें नाहीं. सूर्याचें बिंब आपला प्रकाश उघडपणें पाडीत असतें, गुप्तपणें नाहीं. बुद्धाचा धर्म आणि त्याचें शासन हीं उघडपणें आपला प्रकाश पाडीत असतात, गुप्तपणें नाहीं. भिक्षूहो, या तीन गोष्टी उघडपणें प्रकाश पाडीत असतात, गुप्तपणें नाहीं."

पुष्कळशा सूत्रांत स्त्रियांचें वर्णन असून त्यांत इतर संप्रदायांतील साधू व पुरोहित यांच्याप्रमाणेंच बौद्ध भिक्षूनींहि स्त्रियांस चांगलें म्हटलें नाहीं. फक्त बुद्धाचा प्रिय शिष्य आनंद यानेंच स्त्रियांची तरफदारी केलेली आढळते. त्याच्याच मध्यस्थीमुळें बुद्धानें पुष्कळ आढेवेढे घेऊन सरतेशेवटीं मोठ्या नाखुषीनें भिक्षुणींचा संघ स्थापन करण्याची परवानगी दिली या त्याच्या पक्षपाताबद्दल राजगृह येथील संगीतीमध्यें त्याला जाब द्यावा लागला अशी परंपरागत माहिती ( विनयपिटक चुल्लवग्ग ११, १, १०) आहे.

यां प्रकरणामध्यें असें सांगितलें आहे कीं, (४, ८०) एकदां अलीकडील 'स्त्रियांच्या कैवाऱ्यांप्रमाणें आनंदानें असा प्रश्न केला कीं, स्त्रियांनां सभेमध्यें जागा मिळत नाहीं अथवा त्यांनां स्वतंत्र धंदा करून पोट भरतां येत नाहीं याला काय कारण असावें? बुद्धानें उत्तर केलें स्त्रिया रागीट व मत्सरी असतात यामुळें त्यांनां सभेमध्यें स्थान नाहीं, अथवा त्यांनां स्वतंत्र धंदा करून पोट भरतां येत नाहीं. तिसऱ्या प्रकरणांतील सर्वांत उत्तम भाषण म्हणजे तीन देवदूतांचें होय. (३,३५). वार्धक्य, रोग व मृत्यु या तीन देवतांबद्दल घातक देशाचा राजा यम यानें दुष्कृत्यांचा जनक मार याजवळ चौकशी करून त्यास नरकाधिपतीकडे शिक्षेकरितां पाठवून दिलें. ही नरकाबद्दलची कल्पना बौद्धसंप्रदायापूर्वींहि असावी असें दिसतें.

वाङ्मयीन महत्त्व.—तथापि अंगुत्तरनिकायामध्यें वाङ्मयाच्या दृष्टीनें महत्त्वाचा असा फार थोडा भाग आहे. यांत कंटाळवाणीं, लांबलचक पुष्कळ प्रवचनें असून मधून मधून आढळणाऱ्या लांबलचक रुक्ष वादांनीं तीं अधिकच कंटाळवाणीं होतात. पहिल्या प्रकरणामध्यें सुरस अथवा सुंदर अशी एक गोष्ट आढळत नाहीं. यांत संपादकीय दडपशाहीचा एक असा चमत्कार आढळतो कीं, बौद्ध संप्रदायांतील नैतिक, मानसशास्त्रविषयक व आचारविषयक जीं अनेक सूत्रें आहेत त्यांबरोबरच कांहीं सूत्रें त्यांचा कोणत्याहि गोष्टींशीं संबंध नसतां केवळ त्यांतील संख्येवरूनच यांत घुसडून दिलेलीं दिसतात. परंतु अशा सूत्रांमध्यें एक प्रकारचा विनोद आढळतो व तो त्यांत एकामागून एक सांगितलेल्या वस्तूंच्या विविधतेवरून उत्पन्न होतो. उदाहरणार्थ, आठव्या प्रकरणामध्यें असें सांगितलें आहे (८,२७): भिक्षूहो, या जगांत आठ शक्ती आहेत. त्या कोणत्या म्हणाल तर, स्त्रियांची शक्ति कजागपणांत चोरांची शस्त्रांत मुलांची शक्ती रडण्यामध्यें राजाची सार्वभौम-सत्तेमध्यें, मूर्खांची गर्वामध्यें, शहाण्यांची नम्रतेमध्यें, विद्वानांची विचारामध्यें आणि ब्राह्मण व यति यांची लीनतेमध्यें असते."

भारतीय काव्यांतील सुभाषितांतून मधून मधून वरील प्रकार आढळतो. अशा तऱ्हेच्या सारख्या गोष्टी एकत्र देण्याची कल्पना बहुधा बरीच प्राचीन असून लोकांच्या आवडीची असावी व त्यामुळें प्रचलित रूढीवरून या संग्रहांतील सूत्रांची अशा तऱ्हेनें विभागणी करण्यांत आली असावी. अंगुत्तरनिकाय याची रचना झाली त्या वेळीं बुद्ध देवरूपाप्रत नव्हे, पण निदान सर्वज्ञ अशा देवयोनित्वाप्रत अगर देवगणत्वाप्रत पोहोंचला होता असें दिसतें. ही गोष्ट प्रवचनें करणाऱ्या बौद्ध भिक्षूंस या सर्व उत्तम गोष्टी तुम्हांस स्वयंस्फूर्तीनें प्राप्त झाल्या अथवा तुम्ही या बुद्धापासून शिकलां असा प्रश्न विचारल्याचा उल्लेख आलेला आहे त्यावरून दिसते. वरील इंद्राच्या प्रश्नास बौद्ध भिक्षूंनीं 'जीं सर्व उत्तम वचनें आहेत तीं सर्व बुद्धाचींच आहेत' असें उत्तर दिलें. हें अंधभक्तीचें उदा-

हरण पुढें दिलेल्या अशोकाच्या प्रौढींपेक्षांहि अधिक आहे. अशोक आपल्या भब्र येथील शासनामध्यें असें म्हणतो,"बुद्ध जें जें कांहीं बोलला तें सर्व उत्तम आहे." याप्रमाणेंच दिव्यावदान या एका उत्तरकालीन संस्कृत ग्रंथामध्यें असें म्हटलें आहे कीं, चंद्र व तारे यांसह आकाश खालीं येईल, पर्वत व वनें यांसह पृथ्वी रसातळास जाईल, सागर आटून जाईल परंतु बुद्ध कधींहि मिथ्या भाषण करणार नाहीं. या साहसी विधानावरून अंगुत्तर निकाय हें अभिधम्म पिटकाचें पूर्वगामी असून त्यानेंच त्यांतील सूत्रांचा पाया घातला असावा असें दिसतें. अंगुत्तरनिकायांतील सूत्रांची संख्या मोठी होण्याचें कारण संयुत्तनिकायांतील सूत्रांप्रमाणेंच आहे.

**निकायांतील परस्पर संबंध.**—या चार निकायांतील परस्पर संबंध पाहतां—क्षुद्रकनिकाय याचें स्वरूप अगदींच निराळें आहे—एवढी गोष्ट मात्र निश्चित दिसते कीं, कांहीं सूत्रांची मालिका या संग्रहांपैकीं एकांतच नव्हे तर निरनिराळ्या संग्रहांत आढळते व सूत्रांतून प्रतिपादन केलेल्या तत्त्वांमध्यें या चारहि संग्रहांत मुळींच फरक आढळत नाहीं. पुष्कळ ठिकाणीं तर एखादें सूत्र मूळ कोणत्या संग्रहांत असावें हें निश्चित करणें फार कठिण आहे. उदाहरणार्थ, ज्यामध्यें स्त्रिया नरकांत जाण्यास कारणीभुत होतात अशा तीन गुणांचें वर्णन केलें आहे. तें सूत्र, संयुत्त आणि अंगुत्तर या दोन्ही निकायांमध्यें आढळतें व तें पहिल्या संग्रहामध्यें स्त्रीविषयक सूत्रांमध्यें व दुसऱ्या संग्रहांमध्यें तीन संख्याविषयक सूत्रांमध्यें योग्यच दिसतें. उलटपक्षीं संयुत्तनिकायांतील कांहीं प्रकरणें अंगुत्तरनिकायांतील सूत्रांच्या पुरवणीदाखल अथवा उदाहरणादाखल असल्यासारखीं दिसतात. उ. ( सं. नि. ३७, १४—२४ व अंगु. नि. ५,२३० ) दीघनिकायांतील सूत्रें पुष्कळ ठिकाणीं प्रथम लहान असून नंतर वाढवल्यासारखीं दिसतात. उ० मज्झिम निकायांतील दहावें सूत्र ( सति पट्ठान सुत्त ) हें अक्षरशः दीघनिकायामध्यें ( नं. २२ महासति पट्ठान सुत्त ) आढळतें. मात्र या ठिकाणीं त्यांत कांहीं टीकात्मक मजकूर अधिक घातलेला आढळतो. त्याचप्रमाणें परिनिब्बानसुत्त हेंहि त्यांत पुष्कळ भर पडल्यामुळेंच एवढें मोठें झालें आहे. तसेंच दीघनिकायांतील कांहीं मजकूर अंगुत्तरनिकायामध्येंच जास्त योग्य दिसतो. शेवटच्या दोन निकायांमध्यें सूत्रांची संख्या बरीच वाढण्याचें कारण मुख्यतः एकाच विषयावर निरनिराळीं अनेक सूत्रें रचलीं गेलीं हें होय. असाच प्रकार मज्झिमनिकायामध्येंहि आढळतो. तसेंच मज्झिम व दीघनिकायांतील कांहीं प्रवचनें फार लांब असण्याचें कारण त्यांत वारंवार झालेली पुनरुक्ति हें होय. हे सर्व सूत्रसंग्रह आरंभीं त्यांची आवश्यकता असल्यामुळेंच रचले गेले ही गोष्ट लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं. हीं सूत्रें प्रथम भिक्षूंस आचार घालून देण्याकरितां, त्यांनां उपदेश करण्याकरितां, समाजामध्यें प्रवचन करण्याकरितां किंवा नित्यविधींचा काल व पूजापद्धति वगैरे निश्चित करण्याकरितां अस्तित्वांत आलीं असावींत. त्यांत वारंवार आढळून येणाऱ्या पुनरुक्तीचा आतां जरी आपणास कंटाळा येत असला तरी त्या पुनरुक्तीवरून हीं प्रथम वाचावयाकरितां केलेलीं नसून तोंडानें सांगण्याकरितां रचलीं होतीं ही गोष्ट सिद्ध होते.

**पुनरुक्ति.**—या सूत्रांमध्यें आढळून येणारे शब्द व वाक्यें यांच्या पुनरुक्तीमुळें हीं प्रवचनें वक्तृत्वाच्या दृष्टीनें जास्त परिणामकारक होत व तीं श्रोत्यांच्या मनावर चांगलीं ठसत असत. हीं प्रवचनें जर लिहून विद्यार्थ्यांस वाचावयासाठीं दिलीं असतीं तर तीं आतांइतकींच तेव्हांहि कंटाळवाणीं वाटलीं असतीं. त्यांतील सर्व पुनरुक्ति कायम ठेवून या सूत्रांचें भाषांतर करणें जवळ जवळ अशक्य आहे. के. ई. न्यूमन यानें जर्मन भाषेमध्यें लिहिलेल्या "गौतम बुद्धाचीं भाषणें" नांवाच्या ग्रंथामध्यें ठिकठिकाणीं ही पुनरुक्ति कायम ठेवण्याच्या कामीं फार चिकाटी दाखविली आहे. तरी तेथेंहि कांहीं ठिकाणीं ही पनरुक्ति गाळावी लागली आहे. कारण ओल्डेनबर्गच्या म्हणण्याप्रमाणें या बौद्ध भिक्षूंस "आणि" हा शब्द खरोखरच माहीत नसावा असें दिसतें. एवढेंच नव्हे तर त्यांस सर्वनामांचा उपयोगहि अज्ञात असावा. संयुत्तनिकायांतील खालीं दिलेलें भाषण (१५, ३) आंतील द्विरुक्ति गाळल्यास किती जोरदार व उदात्त दिसतें पहाः—

बुद्ध म्हणाला, "भिक्षूहो, हा संसार आद्यंतरहित आहे. अज्ञानानें आवृत व वासनेनें बद्ध असे हे जीव कधींपासून भ्रमण करूं लागले हें कळत नाहीं. कारण हे भिक्षूंनो, तुम्ही इतस्ततः भ्रमण करीत असतां तुमचा अनिष्टाशीं झालेला संयोग व इष्टापासून झालेला वियोग यापासून झालेल्या दुःखानें तुम्ही गाळलेले अश्रू व महासागरांतील उदक यांमध्यें जास्त कोणतें ?"

"महाराज," भिक्षू उत्तर करतात, "आपण उपदेशिलेल्या तत्त्वांप्रमाणें आम्हांला इतस्ततः या दीर्घ मार्गावर भ्रमण करीत असतां अनिष्टसंयोग व इष्टवियोग यांपासून झालेल्या दुःखामुळें गाळलेले अश्रू हे सागरांतील पाण्यापेक्षां अधिक वाटतात."

बुद्ध म्हणतो, "उत्तम, उत्तम, फार उत्तम. हे भिक्षूहो, मीं उपदेशिलेल्या तत्त्वांचा तुम्हांस बरोबर बोध झाला आहे. होय. या दीर्घ मार्गावर भ्रमण करीत असतां अनिष्टसंयोग व इष्टवियोग यामुळें तुम्ही गाळलेले अश्रू हे चतुःसागरांतील पाण्यापेक्षां अधिक आहेत. तुम्हांला मातृवियोगाचा अनुभव पुत्रवियोगाचा अनुभव, कन्यावियोगाचा अनुभव, वस्तुवियोगाचा अनुभव, आप्तवियोगाचा अनुभव व रोगामुळें झालेल्या नाशाचा अनुभव पुष्कळ दिवस आलेला आहे व हे वर सांगितलेले

( मातृवियोग इ. पुन्हां सर्व )*अनुभव घेत असतां व अनिष्टसंयोग व इष्टवियोग यांबद्दल शोक करीत असतां तुम्ही गाळलेलें अश्रुजल चतुःसागरांतील पाण्यापेक्षां जास्त आहे. यांचें कारण काय? हे भिक्षूहो, हा संसार आद्यंतरहित आहे. अज्ञानानें आवृत आणि वासनांनीं बद्ध असे हे प्राणी केव्हांपासून भ्रमण करूं लागले हें कळत नाहीं. आणि म्हणून या जगांतील वस्तूंबद्दल तिटकारा येण्यास पुरेसें कारण आहे; त्यांच्याबद्दल द्वेष वाटण्यास पुरेसें कारण आहे; व त्यांपासून सुटका करून घेण्यास पुरेसें कारण आहे."

तथापि, इतर सूत्रांप्रमाणें या सूत्रांतील पुनरुक्तिस्थलें इतकीं प्रमाणाबाहेर नाहींत; आणि यामुळेंच ज्या लहान व त्रोटक वचनांतून एकच विचार अगदीं स्पष्टपणें मांडलेला आहे, आणि ज्यांचें विवेचन एकहि अनवश्यक शब्द न घालतां केलें आहे तीं सूत्रें जास्त आवडतात. या चारहि निकायांमध्यें असे संवाद थोडेसे आढळतातच. यामुळें, कांहीं सयुक्तिक कारणांवरून आपणांला असें गृहीत धरतां आलें; कीं आटपसर व अशीं पुनरुक्तीनें दूषित न झालेलीं सूत्रें हीं या संग्रहांतील सर्वांत जुनीं सूत्रें आहेत, तर या चार संग्रहांतील अमुक एक संग्रह दुसऱ्या संग्रहापेक्षां आधीं रचला गेला असें म्हणण्यास जागा रहात नाहीं. तें कांहींहि असलें, तरी चारहि निकायांमध्यें कांहीं फार प्राचीन व कांहीं अलीकडील सूत्रें आहेत हें स्पष्ट आहे. चारहि संग्रहांमधील सूत्रांमध्यें ज्या कांहीं चांगल्या गोष्टी सामान्यतः आढळतात, त्यांवरून या सर्व सूत्रांचीं मूलतत्त्वें एकच आहेत ही गोष्ट दृष्टीस पडते. त्या सर्वांतहि मधूनमधून आपणांला कांहीं तुटक संवाद आढळतात. यांमध्यें बुद्धाचे प्रतिस्पर्ध्यांशीं झालेले वादविवाद दिलेले आहेत. हे वादविवाद सुसंस्कृत, सयुक्तिक, सभ्य व मनोहर अशा पद्धतीनें चाललेले आढळतात. त्याचे प्रतिपक्षी ब्राह्मण अथवा इतर सांप्रदायिक लोक असत. प्रथमतः तो आपल्या प्रतिपक्ष्याचें सर्व म्हणणें पुढें मांडीत असे. त्यानें दाखविलेले सर्व मुद्दे त्याच्याच भाषेंत व त्याच्याच दृष्टांतांसह घेऊन त्याची बाजू पुढें मांडून न कळत त्याला तो त्याच्या अगदीं उलट बाजूला नेत असे. हे संवाद रचणाऱ्यांनां प्रत्यक्ष बुद्धानें त्या वादविवादाच्या प्रसंगीं केलेल्या भाषणांची आठवण असावी असें ऱ्हिस डेव्हिड्सप्रमाणें विंटरनिट्झहि धरून चालतो व सॉक्रेटिस याच्या विवेचनपद्धतीची कल्पना ज्याप्रमाणें आपणांस प्लेटोच्या संवादांवरून येते, त्याप्रमाणेंच बुद्धाच्या विवरणपद्धतीची कांहींशी कल्पना आपणांस वरील संवादावरून करितां येईल, असें तो म्हणतो.

**गौतमाची विवेचनपद्धति.**— गौतमबुद्धाच्या विवेचन पद्धतीमध्यें दृष्टांत देऊन कोणतीहि गोष्ट श्रोत्यांच्या मनावर ठसवून द्यावयाची व अशा रीतीनें त्यांची खात्री करावयाची ही गोष्ट मुख्य असे. दृष्टांत म्हणजे कांहीं पुरावा नव्हे. परंतु दृष्टांताचा मनावर अधिक परिणाम होतो, व अनेक वेळां तो हजारों पुराव्यांपेक्षांहि श्रोत्याच्या बुद्धीलाहि पटतो ही गोष्ट बुद्धाला चांगली ठाऊक असल्यामुळें, तो आपल्या भाषणांतून वारंवार दृष्टांतांचा उपयोग करीत असे, व त्याच्या शिष्यांनींहि या गोष्टींत त्याचें अनुकरण केलेलें दिसतें. यामुळेंच आपणांला चारहि संग्रहांतून दृष्टांतांची रेलचेल आढळून येते, व त्यांमुळेंच या भाषणांमध्यें कौशल्य दृष्टीस पडून त्यांनां वाङ्मयविषयक महत्त्व आलें आहे.

दृष्टान्त.—अशा तऱ्हेच्या मनाची खात्री करून देणाऱ्या दृष्टांताचें उदाहरण आपणांला बुद्ध व मालुंक्या याचा पुत्र यांच्यामधील संवादामध्यें आढळतें. यामध्यें बुद्धाला एका जिज्ञासु शिष्यानें जन्म व मृत्यु इत्यादि आध्यात्मिक विषयांबद्दल प्रश्न केला असतां त्याला बुद्धानें असें उत्तर दिलें आहे कीं, अशा प्रश्नांस उत्तरें देत बसलें असतां मोक्षाचा उपाय शोधून काढण्यास व दुःखापासून मुक्त होण्यास वेळच रहाणार नाहीं. ही गोष्ट त्यानें पुढील दृष्टांतावरून सिद्ध केली आहे.

एका मनुष्यास एक विषारी बाण लागला, तेव्हां त्याच्या मित्रांनीं त्याला तत्काळ वैद्याकडे नेलें. वैद्य तो बाण उपटून काढूं लागला असतां, जर तो मनुष्य ओरडून म्हणाला कीं 'थांबा, प्रथम हा बाण कोणीं मारला तो क्षत्रिय, ब्राह्मण वैश्य किंवा शूद्र होता, तो कोणत्या कुलांतील होता, तो उंच होता कीं ठेंगणा होता, तो बाण कशा प्रकारचा आहे इत्यादि गोष्टी मला प्रथम समजल्याशिवाय मी हा बाण काढूं देणार नाहीं' तर पुढें काय होणार? या सर्व प्रश्नांचीं उत्तरें मिळण्यापूर्वीं तो मरूनहि जाईल. याचप्रमाणें ज्या शिष्याला परलोक इत्यादि विषयांबद्दल सर्व प्रश्नांचीं उत्तरें प्रथम मिळण्याची इच्छा असेल तो दुःख, दुःखाचा आरंभ व त्याचा शेवट व तें घालविण्याचा उपाय या गोष्टी कळण्यापूर्वीं मरूनहि जाईल. याप्रमाणेंच तेविज्जसुत्तांतील ( दीघ निकाय १३, १५ ) दृष्टांतहि असेच मुद्देसूद आहेत. यामध्यें बुद्धानें असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे कीं, ब्राह्मणांची ब्रह्ममध्यें एकरूप होऊन मोक्ष मिळविण्याची इच्छा मूर्खपणाची आहे. कारण त्यांनां असें कबूल करावें लागतें कीं, तें ब्रह्म त्यांनीं, त्यांच्या गुरूंनीं, परम गुरूंनीं अथवा प्राचीन कालांतील ऋषींनींहि प्रत्यक्ष पाहिलें नाहीं. बुद्ध म्हणतो कीं, ही गोष्ट अंधमालिकेप्रमाणें दिसते. त्या मालिकेंतील पहिल्याला, मधल्याला अथवा शेवटल्याला कोणालाहि दिसत नसतें. ही अज्ञात अशा ईश्वराच्या प्राप्तीबद्दलची इच्छा, ज्याप्रमाणें एखादा तरुण म्हणतो कीं, माझें प्रेम एका अतिशय सुंदर तरुणीवर बसलें आहे, पण त्याला ती तरुणी कोण आहे असा प्रश्न विचारला असतां ती कोणत्या जातीची आहे, कोणत्या वर्णाची आहे, तिचें नांव काय आहे, ती उंच आहे कीं ठेंगणी आहे, ती

काळी आहे कीं गोरी आहे, तिचें रहाण्याचें ठिकाण कोठें आहे, याबद्दल कांहींच सांगतां येत नाहीं; किंवा ज्याप्रमाणें एखादा मनुष्य एखाद्या चवाठ्यावरील प्रासादाच्या सज्जाला जिना बांधावयाची इच्छा करतो, परंतु हा सज्जा पूर्वेस आहे कीं दक्षिणेस आहे, पश्चिमेस आहे कीं उत्तरेस आहे, तो उंच आहे, ठेंगणा आहे, कीं मध्यम उंचीचा आहे, हें त्याला ठाऊक नसतें, त्याप्रमाणें आहे. 'त्यागफल' या सूत्रामध्यें ( दीघनिकाय २, ६९; ७८ ) संसारांतून मुक्त झालेल्या यतीच्या सुखाची कल्पना बुद्धानें अनेक सुंदर दृष्टांतांमध्यें दिली आहे. ज्याप्रमाणें एखादा ऋणको आपलें सर्व कर्ज फेडून व आपल्या कुटुंबाच्या पोषणाकरितां कांहीं संग्रह करून ठेवतो; एखादा रोगी पुष्कळ दिवस दुःख भोगून पुनः निरोगी बनतो; एखादा बंदिवासाचें दुःख भोगून नंतर मोकळा होतो; एखाद्या गुलामास त्याचा धनी स्वातंत्र्य देतो; एखादा पांथस्थ बिकट मार्गामध्यें वाट चुकून जंगलामध्यें भटकत फिरत असतां एखाद्या मनुष्यवस्ती असलेल्या खेड्यास पोहोंचतो; किंवा ज्याप्रमाणें एखाद्या तळ्यामध्यें फक्त एकाच थंड झऱ्याचें पाणी सांठतें–दुसऱ्या कोणत्याहि दिशेनें त्यांत पाणी येत नाहीं अगर त्यावर पाऊस पडत नाहीं–व अशा तऱ्हेनें तें तळें नेहमीं त्या एकाच झऱ्याच्या थंड पाण्यानें सदैव भरलेलें असतें; त्याप्रमाणें या यतीच्या ठिकाणीं नेहमीं सौख्यपूर्ण शांति भरपूर वास करीत असते. सुखाची नश्वरता ही पुष्कळ दृष्टांतांमध्यें दाखविली आहे. इंद्रियजन्य सुखें हीं किती दुःखमय व क्लेशमय आहेत हें दाखविण्याकरितां मज्झिम निकायांतील ५४ व्या सूत्रामध्यें सात ठळक दृष्टांत दिले आहेत. एका भुकेनें पीडित झालेल्या कुत्र्यापुढें एखाद्या खाटिकानें एक हाड टाकिलें असतां त्याची जशी क्षुधा शांत होत नाहीं, तशीं त्या मांसरहित हाडासारखीं हीं इंद्रियजन्य सुखें आहेत. हीं दुःखमय व क्लेशमय असून त्यांपासून परिणाम वाईटच व्हावयाचा. ज्याप्रमाणें एखादा पक्षी एखाद्या मांसखंडावर झडप घालतो व इतर पक्षी त्याच्यावर हल्ला करून त्याला टोंचतात, त्याप्रमाणें या विषयांपासून दुःखच उद्भवतें. साधू या विषयसुखांस निखाऱ्यानें भरलेल्या एखाद्या खांचेप्रमाणें मानून त्यांपासून दूर सरतात. ज्याप्रमाणें स्वप्नांतील सुंदर दृश्य जागें झाल्याबरोबर नाहींसें होतें, किंवा ज्याप्रमाणें उसन्या [illegible] 'नामुळें तें उसनें आहे हें न समजून एखाद्या मनुष्याचा हेवा करावा, त्याप्रमाणें हीं विषयसुखें आहेत. एखाद्या मनुष्यानें अरण्यामध्यें फळांनीं लादलेला एखादा वृक्ष पाहून तीं पोटभर खाण्याकरितां वर चढावें, पण इतक्यांत दुसऱ्या मनुष्यानें येऊन तें झाड पाहून त्यावरील फळें खाण्याकरितां तें मुळांसकट तोडून पाडण्यास आरंभ करावा व वरील मनुष्यास पीडा द्यावी, त्याप्रमाणें या विषयसुखांचा उपभोग घेतला असतां केवळ क्लेश, दुःख व सर्व प्रकारची पीडा उत्पन्न होते.

दृष्टान्त व प्रस्तुत परिस्थिति.—कांहीं ठिकाणीं या दृष्टांतांचा मेळ प्रस्तुत परिस्थितीशीं फार सुंदर व सहृदयतेनें बसविलेला आढळतो. उदाहरणार्थ, मज्झिमनिकायांतील ५८ व्या सूत्रामध्यें, नीगंठ नातपुत्त याच्या चिथावणीवरून राजा अभय हा बुद्धाला कांहीं तरी बिकट प्रश्न विचारून त्याला कुंठित करण्याच्या हेतूनें आला असतां, त्यानें बुद्धाला आपण कधीं कटु भाषण करीत नाहीं काय असा प्रश्न केला. बुद्धानें मला कांहीं प्रसंगीं कटु भाषण करावें लागतें असें कबूल केल्यावर यानें उलट असा प्रश्न केला कीं, तर मग आपणामध्यें व सामान्य जनांमध्यें—जर आपण कटु भाषण करतां तर—कांहीं फरक दिसत नाहीं. त्या वेळीं अभय राजाच्या मांडीवर त्याचें एक लहान अल्पवयी मुलगा बसला होता. बुद्धानें त्या राजाला असा प्रश्न केलाः 'हे राजा, या मुलानें तुझ्या अथवा दाईच्या निष्काळजीपणामुळें जर एखादा लांकडाचा तुकडा अगर दगड तोंडांत घातला, तर तूं काय करशील असें तुला वाटतें ?' राजानें उत्तर दिलें, 'महाराज, मी तो बाहेर काढीन; व मला जर तसें एकदम करतां आलें नाहीं, तर मी त्याचें डोकें डाव्या हातानें धरून उजव्या हाताचें बोट वांकडें करून बाहेर काढीन. तसें करतांना जरी रक्त निघालें तरी हरकत नाहीं. आणि असें कां म्हणाल तर याचें कारण एवढेंच कीं, या कृत्यानें मी त्या मुलावर दयाच केली असें होईल.' तेव्हां बुद्ध म्हणालाः 'त्याचप्रमाणें हे राजा, तथागत कोणताहि खोटा, चुकीचा अथवा अपायकारक म्हणून माहीत असलेला व दुसऱ्याला अप्रिय व दुःखकारक होईल असा शब्द केव्हांहि उच्चारीत नाहीं. त्याप्रमाणेंच खरा, बरोबर आणि अपायरहित म्हणून माहीत असलेला, परंतु दुसऱ्याला अप्रिय व दुःखकारक होईल असा शब्द तथागत उच्चारीत नाहीं. परंतु जर त्याला एखादा शब्द खरा, बरोबर व सुपरिणामी आहे असें माहीत असलें, तर जरी तो दुसऱ्याला अप्रिय व दुःखकारक होत असेल तरी तो उच्चारणें योग्य होय असें तथागत समजतो. आणि तसें कां तर, त्या जीवाबद्दल तथागताला दया येते म्हणून.'

दिव्याचा दृष्टांत हा फार आवडता असून तो वारंवार दिलेला आढळतो. हा दृष्टान्त येणें प्रमाणेंः

"हे भिक्षूंनो, ज्याप्रमाणें एखादा तेलाचा दिवा तेल आणि वात यांच्या साहाय्यानें जळत राहतो, आणि ज्याप्रमाणें त्यांत कोणी मधून मधून तेलवात घालीत राहिला तर तो दिवा अनंत कालपर्यंत तसाच जळत राहील, त्याचप्रमाणें, हे भिक्षूंनो, केवळ बंधनांप्रमाणें असलेल्या या जगांतील वस्तूंच्या ठायीं जो मनुष्य आसक्ति ठेवतो त्याचाहि हव्यास दिवसानुदिवस वाढतच जातो."

एका गांवांतील शिष्यांनीं बुद्धाला, आपणांस जर सर्व मनुष्यांबद्दल सारखीच कळकळ वाटते, व आपण जर सर्वांवर सारखेच उपकार करतां, तर आपण आपलीं तत्त्वें इतर लोकांसच जास्त पूर्णतेनें कां समजवून देत नाहीं, असा प्रश्न केला असतां त्यानें उत्तरादाखल पुढील दृष्टांत सांगितला. शेतकरी ज्याप्रमाणें प्रथम चांगल्या जमिनीवर, नंतर मध्यम जमिनीवर व शेवटीं वाईट जमिनीवर लागवड करतो, त्याचप्रमाणें बुद्ध आपलीं तत्त्वें प्रथम भिक्षूंस व भिक्षुणींस, नंतर इतर अनुयायांस, व शेवटीं संप्रदायास व आलेल्या इतर लोकांस समजावून देतो.

या दृष्टांतांतून विनोदहि मधून मधून आढळतो. उदाहरणार्थ, मज्झिम निकाय १२६ मध्यें म्हटलें आहे कीं, एखाद्यानें एका भांड्यांत वाळू व पाणी एका ठिकाणीं घेऊन कितीहि घुसळलें अथवा रगडलें, तरी त्यापासून तेल कधींहि निघणार नाहीं; किंवा एखाद्यानें गाईचें शिंग धरून कितीहि पिळलें, तरी त्यापासून दूध मिळणार नाहीं वगैरे; त्याप्रमाणेंच एखादा भिक्षु जर योग्य मार्गानें गेला नाहीं, तर तो ध्येयाप्रत कधींहि जाणार नाहीं.

कांहीं दृष्टांत थेट तत्कालीन--संप्रदायस्थापनेच्या कालांतील--बौद्धांच्या भाषेमध्येंच आढळतात. व ते प्रत्यक्ष बुद्धाच्या अगर त्याच्या निकट शिष्यांच्या तोंडचे दिसतात. जेव्हां ते सर्व दुःखांची उत्पत्ति वासनेपासून आहे असें म्हणतात तेव्हां ते तिला तन्हा ( तृष्णा ) असें नांव देतात; व हीच जन्मांतरास कारण आहे असें म्हणतात. त्यांच्या मतें हा जन्मजन्मांतराचा फेरा म्हणजे संसार हा एक सागर असून त्याच्या पैलतीरावर निर्वाण आहे. वासना, पातक व या जगांतील सर्व धडपड हा एक महापूर असून जो निर्वाणाप्रत पोंचेल तो या महापुरांतून पार पडेल. चांगल्या अथवा वाईट कृत्याच्या ( कर्माच्या ) परिणामास ते फल म्हणत. जेथें जेथें कर्माची कल्पना आली आहे, तेथें तेथें बीज आणि फल यांचा दृष्टांत डोळ्यापुढें असल्याप्रमाणें दिसतो. बुद्धाच्या उपदेशास सिंहगर्जनेची उपमा दिलेली आहे. अशा प्रकारच्या कल्पना ठिकठिकाणीं आलेल्या आहेत.

या निकायांखेरीज इतर ठिकाणींहि आढळून येणारा एक लोकांच्या आवडीचा रूढ दृष्टांत पुढें दिला आहेः "हे भिक्षूहो, समजा कीं, एखाद्या मनुष्यानें एकच भोंक असलेलें एक जोखड समुद्रामध्यें टाकून दिलें, आणि पूर्वेकडील वारा पश्चिमेकडे, पश्चिमेकडील पूर्वेकडे याप्रमाणें चारहि दिशांनीं वारा त्या जोखडास परस्परविरुद्ध दिशांस नेत असला, व तेथें एक एकाक्ष असा प्राणी शंभर वर्षांतून एक वेळ पृष्ठभागावर येत असेल, तर त्याचें डोकें त्या जोखडाच्या छिद्रामध्यें जाईल असें तुम्हांला वाटतें काय ? अशी गोष्ट फार मोठ्या कालावधींत क्वचित् एखाद्या प्रसंगीं घडेल. "परंतु त्या एकाक्ष प्राण्याचें डोकें त्या छिद्रामध्यें जाणें ही गोष्ट कदाचित् लवकर घडून येईल. पण जो मूर्ख मनुष्य एकदां नीच कोटीमध्यें जन्मास जाईल तो पुन्हां मनुष्यजन्मामध्यें येणार नाहीं. कारण, नीच कोटीमध्यें एकमेकांचा जीव घेण्यासाठीं धडपड चाललेली असून कोणतीहि चांगली गोष्ट तेथें घडत नाहीं."

दृ ष्टा न्तां व रू न सां स्कृ ति क इ ति हा स.--हे दृष्टांत संस्कृतीच्या इतिहासाच्या दृष्टीनें फार महत्वाचे आहेत. कारण, त्यांत आपणांला प्राचीन कालच्या भारतीय लोकांची, शिल्पकारांची, शेतकऱ्यांची व व्यापाऱ्यांची रहाणी पहावयास सांपडते. ब्राह्मणी वाङ्मय फक्त ब्राह्मण आणि क्षत्रिय या दोन वर्गांबद्दलच असल्यामुळें त्यामध्यें या लोकांची माहिती फार थोडी आढळते. परंतु यांत आपणांस गाडीवान, सारथी, द्यूतकार यांबद्दलचें किंवा तिळांचें तेल काढणाऱ्याच्या कृतीबद्दलचे दृष्टांत आढळतात. एका दृष्टांतामध्यें ( मज्झिम १४० ) सर्व सोनारकामाचें वर्णन आढळतें. दुसऱ्या एकांत ( मज्झिम १२५ ) हत्ती माणसाळवण्याची सर्व कृति दिलेली आहे. तिसऱ्या एकांत ( माज्झिम १०१ ) विषारी बाण लागला असतां त्यावर उपाय करण्याची रीति वर्णन केली आहे.

सरते शेवटीं या दृष्टांतांबद्दल एवढें म्हणतां येईल कीं, हे दृष्टांत म्हणजे जरी पुरावे म्हणून म्हटले जाणार नाहींत तरी या सूत्रांमध्यें उत्तम असा युक्तिवाद त्यांतच काय तो आढळतो. इतरत्र जेव्हां एखाद्या तत्त्वाचें विवेचन करावयाचें असतें तेव्हां आपणांला फक्त समानार्थक शब्द; ठरीव विषयविभाग व उदाहरणांची यादी दिलेली आढळते. ही गोष्ट अंगुत्तरनिकायामध्यें सर्वत्र आढळते.

आपला मुद्दा सिद्ध करण्याच्या या सूत्रांतील पद्धतीची तुलना प्लेटोच्या पद्धतीशीं कोणत्याहि बाबतींत करतां यावयाची नाहीं. आणि या सूत्रांमध्यें प्लेटोच्या संवादासारखे संवाद फारच थोडे आहेत, असें विंटरनिट्झनें आपलें मत दिलें आहे. कालफ्राइज यानें या भारतीय आणि ग्रीक संवादांमध्यें कांहीं ठिकाणीं असलेलें साम्य दाखविलें आहे ही गोष्ट खरी. परंतु या साम्यामध्यें कांहीं अवश्यक मुद्द्यांचाच अभाव दृष्टीस पडतो, आणि हें साम्य या दोहोंचा कांहीं परस्परसंबंध असेल असें वाटण्याइतकें स्पष्ट नाहीं. पुष्कळशीं सूत्रें वास्तविक संवादरूपी नसून त्यांमध्यें भाषण करणारी व्यक्ति एकच--पुष्कळदां स्वतः बुद्धच--असते, व दुसऱ्याचें काम फक्त होय किंवा नाहीं म्हणावयाचें अथवा आपली संमति दर्शविण्याचें असे. त्याप्रमाणेंच या निकायांतील जे उत्तम संवाद आहेत त्यांवरून आपणांला प्लेटोच्या संवादांची आठवण होण्यापेक्षां महाभारतामध्यें आढळणाऱ्या इतिहाससंवादांचीच वरिंवार आठवण होते.

**खुद्दक निकाय.**--खुद्दकनिकाय (क्षुद्रकनिकाय) याला नेहमीं सुत्तपिटकांतील पांचवा निकाय म्हणतात. परंतु केव्हां केव्हां याचा अभिधम्मपिटकामध्यें अंतर्भाव करतात. त्याला मिश्रसंग्रह हें नांव जास्त सयुक्तिक होईल.

कारण, या संग्रहामध्यें आपणांला कित्येक किरकोळ ग्रंथांबरोबरच पाली धर्मशास्त्रांतील कांहीं मोठमोठे ग्रंथहि आढळतात. परंतु या संग्रहामध्यें असलेल्या ग्रंथांचे विषय व स्वरूप हीं परस्परांपासून फारच भिन्न तऱ्हेचीं आहेत. एका विशेष मनांत भरणाऱ्या सूत्रांत बौद्ध संप्रदायावर पुढें येणाऱ्या संकटांबद्दलचें भविष्य वर्तविलेलें आढळतें, व हें सूत्र अनेक ठिकाणीं आढळतें. यांपैकीं एक संकट हें होतें कीं, पुढें भिक्षू लोकांनां बुद्धानें उपदेशिलेल्या उदात्त, गंभीर व या जगाच्या अंतापलीकडे टिकणाऱ्या शून्य वादावरील सूत्रांचें पठन करणें आवडेनासें होऊन त्यांनां पंडितांनीं व कवींनीं केलेल्या काव्यमय, सुंदर शब्द व सुंदर वाक्यें यांनीं अलंकृत अशा पाखंडी सूत्रांचें श्रवण करणें आवडूं लागेल. यावरून असें दिसतें कीं, प्रथमतः कविताबद्ध सूत्रांस मान्यता मिळाली नसून त्यांनां धर्मसूत्रांमध्यें जागा देण्याबद्दल वाद होता. व त्यानंतर बऱ्याच कालानें त्यांचा सूत्रांमध्यें अंतर्भाव होऊन खुद्दकनिकायामध्यें त्यांचा संग्रह करण्यांत आला. अशी कल्पना करण्याचें मुख्य कारण हेंच कीं, या संग्रहांतील मुख्य विषय काव्यमय म्हणजे सुभाषितसंग्रह, म्हणीं, गाणीं, पद्यें, काल्पनिक कथा व कल्पित गोष्टी हे आहेत. नंतर या संग्रहामध्यें कांहीं इतर, काव्यमय नाहींत अशा ग्रंथांचाहि अंतर्भाव करण्यांत आला असावा. यांच्याहि 'कर्त्याबद्दलची माहिती तितकीच अनिश्चित असावी; व त्यांचा अधिकारहि सर्वमान्य नसावा. हा संग्रह बराच उत्तरकालीं पुरा करण्यांत आला असावा. या संग्रहामध्यें आलेले निरनिराळे भाग अगदीं निरनिराळ्या कालीं रचले गेले आहेत, व प्रारंभीं ते एकाच संग्रहाचे भाग समजले जात नसावेत. आणि जरी हा संग्रह बराच नंतर करण्यांत आला तरी यांतील कांहीं भाग फार प्राचीन कालीं रचला गेला असावा असें दिसतें. बौद्ध वाङ्मयामध्यें, भारतीय काव्यामध्यें प्रसिद्ध व महत्त्वाचीं गणलेलीं अशीं जीं काव्यें आहेत तीं सर्व याच संग्रहांत आढळतात. तथापि आपण या खुद्दकनिकायांतील सूत्रांचा विचार त्यांच्या कालाच्या अगर महत्त्वाच्या अनुरोधानें न करतां तीं सिंहलद्वीपांतील हस्तलिखितामध्यें ज्या क्रमानें आढळतात त्या क्रमानेंच करूं.

**खुद्दक पाठ.**—या संग्रहाच्या आरंभीं खुद्दक पाठ हा भाग आहे. यामध्यें ९ लहान लहान सुत्तें असून त्यांचें ज्ञान नवीन बुद्धसंप्रदायांत प्रवेश करणारांनीं अवश्य संपादिलें पाहिजे. हीं सूक्तें मंत्रांप्रमाणें अथवा प्रार्थनेप्रमाणें म्हणावयाचीं असत. हीं नवशिक्षांकरितां प्रथमप्रवेश म्हणून किंवा नित्यप्रार्थना म्हणून रचलीं होतीं, हें सांगतां येत नाहीं. पहिलीं चार सुत्तें फारच लहान आहेत. पहिल्यामध्यें सांप्रदायिक प्रतिज्ञा आहे, दुसऱ्यामध्यें भिक्षूंनां केलेल्या दहा आज्ञा आहेत, तिसऱ्यामध्यें शरीराचा ओंगळपणा व त्याची नश्वरता या गोष्टींचें मनन करतां यावें म्हणून शरीराच्या ३२ भागांचीं नांवें दिलीं आहेत, आणि चवथ्यामध्यें नवशिक्यानें विचारलेले १० प्रश्न असून त्यांच्या उत्तरांमध्यें (अंगुत्तर निकायाप्रमाणें) महत्त्वाच्या सांप्रदायिक मर्यादांचें विवेचन केलें आहे. बाकीचीं पांच लहान लहान सुत्तें असून त्यांमध्यें पूजाविधीचे मंत्र असावेत असें त्यांतील विषय व त्यांचें मंत्रासारखें स्वरूप यांवरून अनुमान निघतें. फार प्राचीन काळापासून मंगलांनां (शुभदायक गोष्टींनां) भारतवर्षामध्यें फार महत्त्व दिलेलें आढळतें. शुभचिंतन, आशीर्वाद, ब्राह्मणसंतर्पण, पुष्पहार, वाद्य, गीत इ० गोष्टी मंगल असून यज्ञभोजनप्रसंगीं, विवाहप्रसंगीं व जननप्रसंगीं यांच्यावांचून चालत नसे. मंगल सुत्तांमध्यें बुद्धानें मंगल कशाला म्हणावें तें सांगितलें आहे. तो म्हणतोः 'मातपितरांस मान देणें, स्त्री व पुत्र यांचें प्रेमानें संगोपन करणें व शांततेनें एखादा धंदा करणें, हें उत्तम मंगल होय. औदार्य, सात्विक वृत्ति, आप्तांबद्दल प्रेम आणि निर्दोष आचरण हें उत्तम मंगल होय. वाइटाचा त्याग आणि त्यापासून दूर रहाणें, मादक पेयापासून, निवृत्ति आणि धर्माकडे लक्ष देणें हें उत्तम मंगल होय.'

बाकीच्या सुत्तांतहि अशींच नीतीचीं उच्चतत्त्वें भरलेलीं आहेत. उदाहरणार्थ, रतनसुत्त (नं. ६) यामध्यें असलेल्या मंत्रांनीं पृथ्वी, वायु इ० महाभूतांची व रत्नत्रयाची पूजा करण्याची चाल प्राचीन कालीं होती हें दिसतें. त्याप्रमाणें मृतासंबंधीं असलेल्या पांचव्या सुत्तांतील कांहीं मंत्र अद्यापीहि सिंहलद्वीप व सयाम या देशांत प्रेतसंस्काराच्या वेळीं म्हणण्यांत येतात. "गुप्तनिधि" नांवाचें आठवें सुत्त हें यापेक्षां वरच्या दर्जाचें आहे. यामध्यें बौद्धानें करावयाच्या संग्रहांमध्यें सत्कृत्यसंग्रह हा श्रेष्ठ होय असें सांगितलें आहे. सर्वांत श्रेष्ठ अशा मेत्त सुत्तामध्यें (नं. ९) सर्व जीवांवर उपकार करणें (मेत्त) हें बौद्ध संप्रदायाचें सर्वांत मुख्य तत्त्व म्हणून त्याची स्तुति केली आहे.

या नऊ सुत्तांतील सात सुत्तें अद्यापीहि परित्ताविधीमध्यें—ज्याला सिंहलद्वीपांतील बौद्ध 'पिरित' म्हणतात—उपयोगांत आणितात. परित्ता या शब्दाचा अर्थ "रक्षण" अथवा "निवारण [परित्राण]" असा असून तिपिटकामध्यें त्याचा 'पिरित' अथवा 'मंत्र' किंवा "आशीर्वाद" या अर्थी उपयोग केलेला आहे. सध्यां सिलोनमध्यें परित्ता (सिंहली–पिरित) या शब्दाचा अर्थ कोणतीहि पीडा निवारण करण्यासाठीं भिक्षूंनीं धर्मशास्त्रांतील विवक्षित सुमारें ३० मंत्र पठन करण्याची क्रिया असा होतो. हा परित्ताविधि सर्व प्रसंगीं करण्यांत येतो. (उदाहरणार्थ, नवीन घर बांधावयाचें झाल्यास, कोणी मरण पावल्यास अथवा कोणी आजारी पडल्यास वगैरे. के. सेडनस्टुकर याच्याप्रमाणें विंटरनिट्झचें मतहि असेंच आहे कीं, पांच ते नऊ हीं सूत्रें तांत्रिक मंत्रांसारखीं दिसतात, आणि पहिल्या चार सूत्रांचें रूप ठराविक सांच्याप्रमाणें दिसतें. यावरून खुद्दकपाठ याची रचना सध्यां सिंहलद्वीपांत प्रचारांत असलेल्या परित्ताविधी-

तील मंत्राप्रमाणेंच त्या काळीं विशिष्ट विधीकरितां झाली होती असें मानावयास हरकत नाहीं.

**धम्मपद.**—धम्मपद हा बौद्धसांप्रदायिक ग्रंथ फार प्राचीन कालापासून सर्वविश्रुत असा असून त्याचें यूरोपीय भाषांमध्यें अनेकदां भाषांतर झालें आहे. बौद्ध ग्रंथांमध्यें यांतील अवतरणें विशेष आलीं आहेत. आणि नीतिदृष्ट्या तो विशेष महत्त्वाचा असल्यामुळें त्याला फार मान्यता मिळाली आहे. या ग्रंथामध्यें बौद्धसांप्रदायिक नीतितत्त्वविषयक सुभाषितांचा संग्रह आहे. यामध्यें ४२३ श्लोक असून एकाच विषयाबद्दलचे अथवा दृष्टांताबद्दलचे (उदाहरणार्थ, वग्ग ४ पुप्फवग्ग), अथवा ज्यामध्यें एक विशिष्ट चरण आढळतो असे, दहा-वीस श्लोक एकत्र करून निरनिराळे वर्ग (वग्ग) पाडलेले आहेत. हे वर्ग पाडण्याचें काम संग्रहकारानें केलें असावें. परंतु कांहीं ठिकाणीं कित्येक श्लोक मिळूनच पूर्ण कविता होते. उदाहरणार्थ, श्लोक १९७ ते २०० पहा. त्यांचा अर्थ येणेंप्रमाणें:—

"अहाहा, सभोंवतालच्या द्वेषग्रस्त लोकांमध्यें स्वतः पूर्णपणें द्वेषवर्जित असलेले आम्ही किती तरी सुखानें काळ कंठीत आहोंत.

"या द्वेषग्रस्त लोकांमध्यें आम्हीच काय ते द्वेषवर्जित असे आहोंत.

"अहाहा, सभोंवतालच्या व्याधिग्रस्त अशा लोकांमध्यें व्याधिमुक्त असलेले आम्ही किती तरी सुखानें काळ कंठीत आहोंत.

"या व्याधिग्रस्त लोकांमध्यें आम्हीच काय ते व्याधिमुक्त असे आहोंत.

"अहाहा, सभोंवतालच्या लोभाविष्ट लोकांमध्यें लोभवर्जित असलेले आम्ही किती तरी सुखानें काळ कंठीत आहोंत.

"या लोभाविष्ट लोकांमध्यें आम्हीच काय ते लोभवर्जित असे आहोंत.

"अहाहा, आमच्याजवळ कांहीं धनदौलत किंवा मालमत्ता नसतांहि आम्ही किती तरी सुखानें काळ कंठीत आहोंत. तेजःपुंज देवतांप्रमाणें आम्ही आनंदपूर्वक सुखाचा अनुभव घेत आहोंत."

कांहीं श्लोकयुग्में विशेष लोकप्रिय झालीं आहेत. श्लोक ३३५–३६ हें अशा प्रकारच्या श्लोकयुग्माचें उदाहरण आहे. त्यांचा अर्थ पुढें दिल्याप्रमाणें आहे:—

"जो तृष्णेच्या व विषयवासनांच्या ताब्यांत गेला आहे त्याचीं दुःखें रानाप्रमाणें वाढतात.

"जो दुर्निवार अशा या तृष्णेस आपल्या ताब्यांत ठेवतो त्याचीं दुःखें कमलपत्रावर पडणाऱ्या जलबिंदूप्रमाणें नाहींशीं होतात."

बौद्ध संप्रदायांतील प्रसिद्ध सुभाषितें बहुतेक धम्मपदांतील आहेत. उदाहरणार्थ, बुद्धाला साक्षात्कार झाल्यानंतर बुद्धानें म्हटलेले श्लोक पहा (१५३ व पुढील). हे श्लोक असे: "या मंदिरांची रचना करणाऱ्याच्या शोधाकरितां मीं अनेक जन्म तळमळ केली. ही पुनर्जन्माची परंपरा फार दुःखमय आहे. हे मंदिरें बांधणाऱ्या, तूं आतां सांपडला आहेस, आतां तुला पुन्हां मंदिर बांधतां येणार नाहीं. त्याच्या तुळ्या मोडून गेल्या आहेत व त्याचें छप्पर नाहींसें झालें आहे. माझें हृदय मोकळें झालें आहे, त्यांतील तृष्णा नष्ट झाली आहे." यांतील चित्र फार साधें पण सुंदर आहे. वासना ही मंदिरें बांधणारी असून ती पुन्हां पुन्हां नवें मंदिर बांधते—म्हणजे पुन्हां जन्म घेऊन नवीन देह धारण करावयास लावते." या अशा तऱ्हेचे साधे परंतु मनावर ठसणारे देखावे व दृष्टांत आपणांला या सुभाषितांतून ठिकठिकाणीं आढळतात. साधूच्या शांतीची तुलना गंभीर अशा जलाशयाशीं, गुळगुळीत अशा आरशाशीं, व अचल शिलेशीं केली आहे (८१ व पुढील). एका ठिकाणीं म्हटलें आहे कीं, ज्याप्रमाणें कढीचा स्वाद आंतील पळीला मिळत नाहीं, त्याप्रमाणें साधूच्या सहवासापासून मूर्खाला कांहीं लाभ मिळत नाहीं; आणि कढीचा स्वाद ज्याप्रमाणें फक्त जिभेलाच कळतो त्याप्रमाणें साधूच्या सहवासापासून फक्त साधूलाच फायदा मिळतो (६५ व पु०). ज्याप्रमाणें गाडीला जोडलेल्या पशूच्या पावलामागोमाग चाक येतें, त्याप्रमाणें जो अशुद्ध मनानें कोणतीहि गोष्ट करतो अथवा बोलतो, त्याच्यामागें पीडा लागते. परंतु जो शुद्ध मनानें कोणतीहि गोष्ट करतो अथवा बोलतो, त्याला त्याच्या पाठीमागून येणाऱ्या सावलीप्रमाणें निरंतर सुख मिळतें (५० व पु०). जसें दुधाचें ताबडतोब दहीं होतें, तसें कांहीं एखाद्यानें केलेल्या दुष्कृत्याचें फळ तात्काल मिळत नाहीं; दुष्कृत्य राखेनें झांकलेल्या अग्नीप्रमाणें धुमसत राहून नंतर त्याचा परिणाम तें करणाऱ्या मूर्खावर होतो (७१). अशा प्रकारचे दृष्टांत आपणांला वरचेवर आढळतात; व पुष्कळ ठिकाणीं ते जोडीनें दिलेले असतात. कांहीं ठिकाणीं हीं सुभाषितें भारतीयांच्या विशेष आवडीच्या अशा शब्दावरील कोट्यांत व श्लेषादि शब्दालंकार यांमध्यें ग्रथित केलेलीं आढळतात (नं. ३४४).

धम्मपदांतील निम्म्यापेक्षां अधिक श्लोक पाली धर्मशास्त्रांतील इतर ग्रंथांत आढळतात. आणि सध्यां आपणांला ते ज्या ग्रंथांमध्यें दिसतात त्यांतूनच संग्रहकारानें ते घेतले असावेत याबद्दल संशय नाहीं. तथापि या संग्रहामध्यें असलेलीं कांहीं सुभाषितें मूळचीं बौद्ध नसून तीं तत्कालीन भारतवर्षामध्यें प्रचलित असलेल्या म्हणी व सुबोधवचनें यांवरून घेतलेलीं आहेत. हींच वचनें मनूच्या धर्मशास्त्रामध्यें, महाभारतामध्यें, जैनांच्या सांप्रदायिक ग्रंथांमध्यें, पंचतंत्रांतील कथांमध्यें वगैरे ठिकाणीं शिरलीं. अशा तऱ्हेचीं वचनें अथवा म्हणी हीं प्रथम कोणत्या ग्रंथांतून आलीं हें सांगणें अशक्य आहे.

उदान.—धम्मपद या ग्रंथामध्यें प्रथम श्लोकांचाच संग्रह असून त्यांना टीकारूपानें गद्यमय गोष्टींचा भाग मागून जोडण्यांत आला. या गोष्टींमध्यें विशिष्ट श्लोक कोणत्या विवक्षित प्रसंगीं म्हटला गेला तें सांगितलें आहे. परंतु उदान या भागामध्यें प्रथमपासूनच गद्य व पद्य भाग होते. या ग्रंथाचे आठ वर्ग असून प्रत्येक वर्गामध्यें दहा सूत्रें आहेत. या सूत्रांमध्यें बुद्धाच्या कालच्या लहान लहान गोष्टी असून, शेवटीं बुद्धानें त्या गोष्टींवरून स्फूर्ति होऊन म्हटलेलें वचन दिलेलें आहे. अशा स्फूर्तीनें उच्चारिलेल्या वचनाला उदान हें नांव आहे. हीं वचनें बहुधा पद्यमय असून त्रिष्टुभ् अथवा जगती छंदामध्यें आहेत. क्वचित् प्रसंगीं तीं गद्यमयहि आहेत. या उदानांमध्यें बौद्धांचें जीवितध्येय, बौद्ध भिक्षूंचा आयुष्यक्रम, त्यांच्या मनाला शांतीपासून होणारा आनंद, सर्व ऐहिक वस्तूंचा त्यांनीं केलेला त्याग, व निर्वाणापासून प्राप्त होणारें अनंत सुख यांची थोरवी वर्णन केली आहे.

परंतु या कथा ज्यांनीं श्लोक रचले त्यांनींच लिहिलेल्या असाव्या अशी मुळींच कल्पना होत नाहीं. या कथा बहुतेक पोरकट आहेत, व कांहीं ठिकाणीं तर यांतील कल्पनाहि मूर्खपणाच्या आहेत. यामुळें श्लोकांच्या स्वारस्याचा भंग होतो. उदाहरणार्थ, एका ठिकाणीं बुद्धानें सारिपुत्त यास दुसऱ्या एका भिक्षूस उपदेश करतांना पाहिलें व एवढ्याच गोष्टीवरून त्याला एक श्लोक म्हणण्याची स्फूर्ति झाली असें वर्णन आहे. तो श्लोक ( ७,५ ) असाः " ज्या अर्थी तो सर्व वासनांपासून मुक्त झाला आहे, प्रवाह आटून गेला आहे आणि यापुढें वाहणार नाहीं, त्या अर्थी ज्याप्रमाणें मोडलेलें चक्र पुढें फिरणार नाहीं त्याप्रमाणें दुःखाचा अंत झाला आहे." बुद्धाचे पट्टशिष्य सारिपुत्त व मोग्गलान यांच्याबद्दलची पुढील गोष्टहि अशाच प्रकारची आहे. श्रेष्ठ सारिपुत्त हा एकदां नुकतीच श्मश्रू करून चांदण्यामध्यें उघड्यावर ध्यान करण्यांत मग्न झाला होता. अशा वेळीं एका यक्षानें खोडसाळपणानें सहज त्याच्या डोक्यावर एक चापट मारली. या त्याच्या चापटीमुळें एखादा सात आठ हात उंच हत्ती सहज मरून पडला असता, अथवा एखाद्या गिरिशिखराचें पिष्ट झालें असतें; परंतु त्यानें चापटी मारली नाहीं तोंच तो जळालों जळालों म्हणून ओरडत खालीं नरकांत जाऊन पडला. हें सर्व वृत्त मोग्गलान यानें अंतर्दृष्टीनें पाहून तो धांवत सारिपुत्ताची चौकशी करण्याकरितां आला. आणि त्यानें विचारलें कीं, मित्रा, तूं ठीक आहेस ना ? तुला समाधान वाटतें कां? तुझें अंग कोठें दुखावलें आहे कां ? सारिपुत्तानें उत्तर दिलें, सर्व ठीक आहे, परंतु माझें डोकें थोडेंसें दुखत आहे. हें ऐकून त्याच्या मित्रानें मोठें आश्चर्य प्रदर्शित केलें. सारिपुत्तानेंहि आपणा स्वतःस एक धुळीचा कणहि दिसला नसतां मोग्गलान यानें आपल्या अंतर्ज्ञानानें ही गोष्ट पाहिली याबद्दल विस्मय दाखविला. बुद्धानें हें संभाषण अंतर्ज्ञानानें जाणून पुढील श्लोक म्हटला [ ४, ४ ]: " ज्याचें मन शिलेप्रमाणें दृढ असून त्यांत चलबिचल होत नाहीं, वासना उत्पन्न करणारे सर्व पदार्थ पुढें असतांहि ज्याच्या मनाला कशाचीहि इच्छा होत नाहीं, ज्याला कोणत्याहि गोष्टीपासून राग येत नाहीं [ असें ज्याचें मन आहे ], त्याला केव्हांहि दुःख होणार नाहीं. " या वरील गोष्टींत जर कांहीं विनोद असेल तर तो आपाततः आलेला आहे. दुसऱ्या एका गोष्टीमध्यें एक साधु हवेमध्यें उडत जाऊन तेथें इतका जळून गेला कीं त्याचा कोळसा अथवा काजळहि उरलें नाहीं. अशा रीतीनें तो पूर्ण निर्वाणाप्रत गेला असें वर्णन करून त्यावरून बुद्धानें पुढील श्लोक म्हटला आहे ( ८, १० ) : " जेव्हां एखाद्या मोठ्या घणाच्या आघातानें ठिणगी उडून विझून जाते तेव्हां तींतील अग्नि कोठें जातो हें कोणासहि कळत नाहीं. त्याप्रमाणेंच जो मनुष्य पूर्णपणें मोकळा झालेला आहे, जो इंद्रियांच्या बंधनांतून व वासनेच्या प्रवाहांतून सुटून गेला आहे, ज्याला निर्वाणाचा आनंद प्राप्त झाला आहे, तो कोठें जातो हें कोणासहि कळत नाहीं." विंटरनिट्झच्या मतें वर दिलेली पोरकट गोष्ट बुद्धाच्या वचनांतील गांभीर्याशीं विसंगत आहे. कांहीं ठिकाणीं तर श्लोक आणि गोष्टी यांमध्यें मुळींच एकवाक्यता आढळत नाहीं. उदाहरणार्थ ५,५ आणि ७,१० पहा. यावरून विंटरनिट्झच्या मतें उदान या ग्रंथांतील श्लोक हेच कायते मूळ प्राचीन बौद्ध वाङ्मयामध्यें असून त्यांत आढळणाऱ्या गद्य कथा मागून टीकाकारांनीं रचल्या असाव्यात, अथवा इतर ग्रंथांतून घेतल्या असाव्यात. यांतील कांहीं कथा बुद्धाच्या चरित्रांतील असून त्या विनयपिटकांतील महापरिनिब्बानसुत्ताच्या कांहीं भागांशीं (उदाहरणार्थ १, ४; २, १; ३, १; ७, ९; ८, ५ व ६ ) शब्दशः जुळतात. त्यांचा धर्मग्रंथांमध्यें संग्रह केला गेला याचें कारण धम्मपदावरील टीकेमध्यें सांगितलेल्या कथांपेक्षां त्या कदाचित् जुन्या असाव्यात, अथवा या सर्व वचनांनां प्रास्ताविक गोष्टी जोडून पूर्णता आणणें जरूर वाटलें असावें.

इतिवुत्तक.—उदानाप्रमाणेंच इतिवुत्तक ( बुद्ध असें म्हणाला ) यामध्येंहि गद्य आणि पद्य भाग आहेत, परंतु या दोन भागांतील संबंध अगदीं निराळा आहे. यांतील गद्यामध्यें कथा सांगितलेल्या नसून एकच कल्पना कांहीं गद्यामध्यें व कांहीं पद्यामध्यें सांगून एखाद्या तत्त्वाचें प्रतिपादन अगर उपदेश केलेला आहे. कांहीं ठिकाणीं एखादी कल्पना प्रथम गद्यामध्यें सांगून नंतर तीच पुन्हां फक्त वृत्ताला जुळण्यासारखे फेरफार करून पद्यामध्यें सांगितली आहे. असा प्रकार यांत असलेल्या ११२ सूत्रांपैकीं ५० सूत्रांमध्यें आढळतो. कांहीं ठिकाणीं गद्यामध्यें असलेला भाग प्रथम एकाच पद्यांत सांगून नंतर गद्यांत नसलेला मजकूरहि पुढील पद्यांत दिलेला आढळतो. कांहीं ठिकाणीं गद्य व पद्य भाग हे एकमेकांनां परिपोषक असून, प्रथम गद्यामध्यें पुढील पद्यांत येणाऱ्या

कल्पनेची प्रस्तावना केलेली असते; अथवा त्याच कल्पनेची एक बाजू गद्यांत दिलेली असून दुसरी बाजू पद्यांत दिलेली असते. या सर्व ठिकाणीं गद्य व पद्य भागांमध्यें एकच तत्त्व असून पद्यापेक्षां गद्यामध्येंच ती कल्पना जास्त स्पष्टपणें, मुद्देसूदपणानें व जास्त सुंदर रीतीनें मांडलेली आढळते. ठराविक वाक्यें, सांकेतिक शब्दसमुच्चय व पुनरुक्ति यांचा भरणा हा जो बौद्ध सूत्रांमध्यें असणारा विशेष प्रकार तो यामध्येंहि आढळतो. परंतु सामान्यतः या भागांत शब्दांचें भारूड जरा कमी आहे. यांतील सूत्रें बहुतेक लहान लहान आहेत. गद्य व पद्य या दोन्हींहि भागांतील भाषा नैसर्गिक व सरळ असून कल्पनांचें साम्राज्यहि कमीच आहे. यामध्यें मोठमोठे दृष्टांत आढळत नाहींत, परंतु कांहीं कल्पना फार सुंदर आहेत. उदाहरणार्थ, धर्मशील भिक्षूंना सढळ हातांनें दान करणाऱ्या उदार मनुष्याला पर्वत आणि दऱ्या यांवर वृष्टि करणाऱ्या मेघाची उपमा दिली आहे ( नं. ७५ ); दुष्टांच्या संगतीपासून साधू लोक दूर रहातात्–कारण, अतिशय शुद्ध अशा भात्यालाहि विषारी बाणामुळें दोष लागतो (नं. ७६ ); इंद्रियें हीं द्वारें असून त्यांचें रक्षण चांगल्या प्रकारें केलें पाहिजे ( नं. २८, २९ ); याहि कल्पना वरीलप्रमाणेंच सुंदर आहेत. एके ठिकाणीं बुद्धानें स्वतःला उत्तम वैद्य म्हटलें असून सर्व भिक्षूंना आपलीं मुलें व वारस म्हटलें आहे ( नं. १०० ). परंतु सर्व भूतांबद्दल दया दाखवावी म्हणून ज्या मेत्त सूत्रांमध्यें उपदेश केला आहे ( नं. ४० ), त्यांतील गद्य भागामधील कल्पना यांहीपेक्षां उच्च दर्जाच्या आहेत. " हे भिक्षूंनो, जीवितास आवश्यक व पुण्य प्राप्त करून देणारीं जीं कृत्यें आहेत तीं सर्व मिळून सर्व भूतदयेच्या ( मेत्ताच्या ) सोळाव्या अंशाइतक्याहि किंमतीची नाहींत. कारण, भूतदयेपासून आत्म्याला मुक्ति मिळते, व मुक्तिदायक म्हणूनच भूतदया ही वरील सर्व गोष्टींपेक्षां अधिक उज्ज्वल आणि प्रकाशदायक आहे. ज्याप्रमाणें सर्व ताऱ्यांचा प्रकाश एकत्र केला तरी तो चंद्राच्या सोळाव्या कलेपेक्षांहि अधिक होणार नाहीं—कारण, चंद्रकला ही त्यापेक्षां अधिक उज्ज्वल, प्रकाशमान व प्रकाशदायक आहे–त्याप्रमाणेंच जीवितास भूतदया ही प्रकाशदायक आहे. ज्याप्रमाणें वर्षाकालाच्या शेवटल्या महिन्यामध्यें आकाश स्वच्छ व निरभ्र असतें, आणि त्यामध्यें सूर्य वर येऊन अंतरिक्षांतील अंधकारीचा नाश करून आपले किरण पसरतो व आपल्या तेजानें स्वतः प्रकाशून दुसऱ्यास प्रकाशमान करतो, त्याप्रमाणेंच जीवितास भूतदया ही प्रकाशदायक आहे. ज्याप्रमाणें रात्र संपून पहाट होते त्या वेळीं सकाळचा तारा (शुक्र ) किरण टाकतो, प्रकाशतो व दुसऱ्यास प्रकाशित करतो त्याप्रमाणेंच जीवितास भूतदया ही प्रकाशदायक आहे."

तसेंच गद्यभागामध्यें कांहीं ठिकाणीं वक्त्याची भावना प्रतिबिंबित झालेली दिसते तशी ती पद्यामध्यें दिसत नाहीं. उदाहरणार्थ, नं. ३० इ० मध्यें बुद्ध म्हणतो कीं, मला दोन गोष्टींपासून दुःख होतें–जेव्हां एखाद्या मनुष्यानें कोणतेंहि सत्कृत्य केलें नसेल तेव्हां आणि जेव्हां एखाद्या मनुष्यानें एखादें दुष्कृत्य केलें असेल तेव्हां; तसाच मला दोन गोष्टींपासून आनंद होतो–जेव्हां एखाद्यानें कोणतेंहि दुष्कृत्य केलें नसेल तेव्हां, आणि एखाद्यानें सत्कृत्य केलें असेल तेव्हां. परंतु हीच कल्पना पद्यामध्यें अशी वर्णन केली आहे: 'जो मनुष्य क्रिया, वाचा अथवा मन यांच्या योगानें दुष्कृत्य करील तो मरणानंतर नरकास जाईल. आणि जो सद्गुणी मनुष्य क्रिया, वाचा अथवा मन यांच्या योगानें सत्कृत्य करील तो मरणानंतर स्वर्गास जाईल. ' नं. ९२ मध्यें गद्य भागामध्यें बुद्धाचें एक फार सुंदर वचन आहे. तो म्हणतो: 'एखादा भिक्षु माझा पदर धरून जरी पावलावर पाऊल ठेवून माझ्यामागें आला; परंतु लोभी, रागीट व मत्सरी वगैरे प्रकारचा असला तर त्याच्या व माझ्यामध्यें फार अंतर राहील. परंतु एखादा भिक्षु जरी शेंकडों मैल दूर रहात असेल; पण लोभी, रागीट अथवा मत्सरी नसेल तर आमच्यामध्यें फार थोडें अंतर राहील.' हीच गोष्ट पुढील पोंचट व सर्वसामान्य अशा पद्यांमध्यें सांगितली आहे ती अशी:—'लोभी, दुष्टबुद्धि व मत्सरी मनुष्य याच्यामध्यें, व शांति मिळालेल्या साधूमध्यें फार अंतर असतें. परंतु सदाचरणी, शांत व स्वार्थबुद्धीचा त्याग केलेल्या मनुष्यामध्यें व शांत अशा साधूमध्यें मुळींच अंतर नसतें.' हे वरील गद्य व पद्य भाग कोणीं तरी केवळ त्यांतील (दूर व जवळ ) अंतर हा शब्द पाहून एका ठिकाणीं आणले असावेत.

अशींहि कांहीं ठिकाणें आढळतात कीं, गद्य भाग हें एक स्वतंत्रच सूत्र असून त्यानंतर येणाऱ्या पद्यांशीं त्याचा बराच दूरचा–कित्येक वेळां केवळ शब्दसाम्याचाच–संबंध असतो. कांहीं ठिकाणीं तर गद्य व पद्य भागांचा कांहींच संबंध नसून, क्वचित् ठिकाणीं ते परस्परविरुद्धहि असतात. अशा ठिकाणीं त्यांपैकीं गद्य अगर पद्य कोणता तरी एक भाग मूळांत नसून बराच नंतर घातला असावा. प्रथम एखादी कल्पना गद्यामध्यें सांगून नंतर तीच पद्यामध्यें मांडावयाची, अथवा एखाद्या तत्त्वाचें प्रतिपादन प्रथम गद्यामध्यें आरंभून पुढें पद्यामध्यें चालवावयाचें, ही पद्धति जुन्या बौद्ध ग्रंथांमध्यें आढळून येते. अशा स्वरूपांत असलेलीं सूत्रें जेव्हां इतिवुत्तकामध्यें संगृहीत करण्यांत आलीं तेव्हां इतरत्र जो गद्य अथवा पद्य भाग आढळला तोहि त्याच नमुन्याप्रमाणें लावून संग्रहांत सामील करण्यांत आला. हें काम कदाचित् पहिल्याच संग्रहकारानें केलें असावें, किंवा बहुत करून बऱ्याच नंतरच्या काळीं झालें असावें. ह्युएनत्संग यानें केलेल्या इतिवुत्तकाच्या भाषांतरामध्यें या संग्रहांतील शेवटचीं बरींचशीं सूत्रें आढळत नाहींत ही गोष्ट खरी आहे. त्याप्रमाणेंच या शेवटच्या सूत्रांतील कांहीं अंगुत्तर निकाया-

मध्यें आढळतात,व हीं बहुत करून त्यांतूनच घेतलीं असावींत. तसेंच कांहीं श्लोक निरनिराळ्या गद्य भागाबरोबर दोन दोनदां आढळतात. या गोष्टीचा विचार केला असतां या लहानशा संग्रहामध्येंहि कांहीं जुना व कांहीं नंतरचा असे भाग एकत्र केले आहेत असें निःसंशय म्हणतां येतें. या मागून घातलेल्या भागांमध्यें कांहीं ठिकाणीं गद्य भाग हा पद्यावरील टीकेसारखाच दिसतो. जुन्या व मूळ सूत्रांमध्यें मात्र गद्य भाग काल अथवा सौंदर्य यांपैकीं कोणत्याच दृष्टीनें कमी प्रतीचा ठरत नाहीं. मागाहून घातलेल्या भागामध्येंहि कांहीं जुना गद्य भाग अलीकडील पद्याशीं जोडला गेला असण्याचा संभव आहे.

**सुत्तनिपात.**—आतांपर्यंत उल्लेख केलेल्या खुद्दकनिकायाच्या सर्व भागांमध्यें जरी आपणांला प्राचीन बौद्ध काव्यांपैकीं पुष्कळ भाग कायम राखलेला आढळून येतो, तरी हीच गोष्ट आपणांला सुत्तनिपाताबद्दल जास्त खात्रीपूर्वक म्हणतां येईल. कारण, हा सर्व संग्रह जरी अगदीं प्राचीन काळचा आहे असें सिद्ध करतां येणार नाहीं, तरी त्याच्या निरनिराळ्या भागांतील केन्द्र( सार )भूत असा कांहीं भाग सर्वांत प्राचीन बौद्ध काव्यांपैकींच आहे. सुत्तनिपात हा पद्यमय सूत्रांचा संग्रह आहे. त्यांत पांच प्रकरणें आहेत. त्यांतील पहिल्या चार प्रकरणांमध्यें ( उरगवग्ग, चुल्लवग्ग, महावग्ग व अट्ठकवग्ग ) ५४ लहान पद्यमय सूत्रें असून पांचव्या ( पारायण या ) भागामध्यें एक स्वतंत्र मोठें काव्य आहे. त्याचे १६ लहान लहान भाग आहेत. या पांच प्रकरणांपैकीं अट्ठकवग्ग आणि पारायण यांच्या नांवांचा उल्लेख व त्यांतील कांहीं अवतरणें इतर पाली व संस्कृत सांप्रदायिक ग्रंथांमध्यें आलीं आहेत. या दोन प्रकरणांनां एक प्राचीन टीका असून तिचा निद्देस या नांवानें पाली धर्मशास्त्रामध्यें समावेश करण्यांत आला आहे.

यां ती ल प्रा ची न सु त्तें.— यांतील पांचहि प्रकरणांतील स्फुट सूत्रें व पुष्कळ श्लोक इतर सांप्रदायिक ग्रंथांमध्य आढळतात. अशोक राजानें आपल्या भब्रू येथील शासनामध्यें ज्या सूत्रांचा मुद्दाम विशेष अभ्यास करावा म्हणून निर्देश केला आहे त्यांपैकीं तीन सूत्रें बहुत करून सुत्तनिपातांतील आहेत. या सूत्रांची भाषा व त्यांतील मूलभूत तत्त्वें यांवरून त्यांपैकीं कांहीं सूत्रें संप्रदायाच्या प्रारंभापासून अस्तित्वांत असून निदान तीं बुद्धनिर्वाणाच्या नंतर लवकरच त्याच्या आरंभींच्याच शिष्यवर्गापैकीं कोणीं तरी रचलीं असावीं असें दिसतें. यांच्या प्राचीनत्वाप्रमाणेंच बौद्ध संप्रदायाचीं मूलतत्त्वें काय होतीं हें समजून घेण्याच्या दृष्टीनेंहि यांचें महत्त्व सर्वमान्य आहे. सर्व बौद्धसांप्रदायिक ग्रंथांमध्यें धम्मपदाच्या खालोखाल सुत्तनिपातांतील आधार घेतलेले आढळतात. ह्या संग्रहांतील सूत्रांचें काव्यदृष्ट्याहि महत्त्व सर्वमान्य आहे.

ब्रा ह्म णां व र टी का.-यामध्यें आपणांला कांहीं लहान व कांहीं मोठे पद्यांचे गुच्छ,ज्यांमध्यें एकच कल्पना आहे अथवा ज्यांचें पालुपद एकच आहे असे एकत्र केलेले आढळतात. त्याप्रमाणेंच आपणांला प्राचीन ब्राह्मणी महाकाव्यामध्यें आढळणारे काव्याचे सर्वप्रकार—प्राचीन काळापासून लोकांच्या आवडीचे असलेले संवाद, मधूनमधून. संवाद व मधूनमधून कथानक असणारीं आख्यानें अथवा पोवाडे, आणि गद्यपद्यमिश्रित आख्यानें —आढळतात. कांहीं ठिकाणीं ब्राह्मणी कल्पनांशीं संबंध अथवा त्यांचा उल्लेख केलेला आढळतो. ब्राह्मणधम्मिक सुत्त ( नं.१९–धार्मिक ब्राह्मणाविषयीं सूत्र ) हें एखाद्या जुन्या पुराणांतहि तितकेंच शोभलें असतें. 'प्राचीन काळचे ऋषी हे खरे ब्राह्मण असून ते प्रत्येक बाबतींत संयमानें रहात असत; परंतु पुढें त्यांना राजांच्या संपत्तीचा व ऐषआरामाचा मोह सुटून तसें सुख भोगण्याची इच्छा होऊं लागली. त्यांनी इक्ष्वाकु राजानें द्रव्य व सुंदर स्त्रिया दान केल्या. नंतर पशुयज्ञ सुरू होऊन त्यामध्यें दीन गाईंचाहि वध होऊं लागला,व त्यामुळें भीतिभ्रष्टता व वर्णसंकर यांचा प्रसार झाला.' अशा प्रकारचें त्यामध्यें वर्णन आहे. यावरून बौद्ध संप्रदाय म्हणजे मूळच्या ऋषि–धर्माची पुनःस्थापना होय असें बौद्धांचें या ठिकाणीं म्हणणें असावेंसें दिसतें. याप्रमाणेंच सेल या ब्राह्मणाच्या धर्मप्रवेशाचा वृत्तांत असलेल्या सेल सुत्तामध्यें ( नं.३३ ) कांहीं भाग अगदीं भगवद्गीतेंतील व अनुगीतेंतील श्लोकांप्रमाणेंच आढळतात. तसेंच जो बौद्ध भिक्षु आपलें व्रत नियमानें पाळतो त्याला सन्मुनि म्हटलेलें आढळतें. खरें ब्राह्मण्य जन्मामध्यें नसून सदाचरणामध्यें आहे ही महाभारताच्या मूळ भागांत आढळणारी कल्पना वासेत्थ सुत्तामध्यें ( वसिष्ठसूत्र नं. ३५ ) "त्यालाच मी खरा ब्राह्मण समजतों" असें पालुपद असलेल्या ६३ श्लोकांमध्यें सुंदर रीतीनें विशद केलेली आढळते. ब्राह्मणी जीवितध्येयापेक्षां बौद्ध ध्येय उच्च प्रकारचें आहे असें कांहीं ठिकाणीं मोठ्या चातुर्यानें पूर्वपक्ष व उत्तरपक्ष करून सिद्ध केलें आहे. उदाहरणार्थ, आमगंध सुत्तामध्यें [ नं. १४ ] आहाराचे नियम पाळणें हा सर्वांत श्रेष्ठ धर्म असून निषिद्ध असें मांसाशन करणें हें सर्वांत मोठें पातक होय असें म्हणणाऱ्या ब्राह्मणाला बुद्धानें असें सांगितलें आहे कीं, जिवंत प्राण्याची हिंसा करणें, खून करणें, दुसऱ्याला दुःख देणें, चोरी करणें, खोटें बोलणें, कपट करणें, परस्त्रीगमन करणें या गोष्टींमध्यें पातक आहे; तसेंच क्रूरता किंवा कठोरपणा दाखविणें, निंदा करणें, विश्वासघात करणें, निर्दय, गर्विष्ठ आणि लोभी होणें, दान न करणें यामध्यें पातक आहे—मांसाशनामध्यें नाहीं ! !

बौ द्ध सं प्र दा या च्या आ रं भीं ची स्थि ति.—कासिभरद्वाजसुत्त ( नं. ४ ) यासारख्या काव्यामध्यें आपणांला बौद्ध संप्रदायाच्या आरंभींची स्थिति दिसते.

त्या वेळीं कामकरी लोक, शेतकरी लोके व धनगर यांनां भिक्षु हा एक आळशी मनुष्य वाटून त्याच्याकडे ते चमत्कारिक दृष्टीनें पहात असत. या सूत्रामध्यें असें वर्णन आहे कीं, भरद्वाज या ब्राह्मण कृषिकानें बुद्धाला तो भिक्षा मागावयास आला असतां, जो काम करीत नाहीं त्याला खावयाचा हक्क नाहीं असें सांगून तिरस्कारानें घालवून दिलें, तेव्हां बुद्धानें आपणहि काम करीत असून कोणतें क्षेत्र नांगरतों तें त्याला नीट समजावून दिलें. याप्रमाणेंच धनियसुत्त ( नं. २ ) या जुन्या कवितेमध्यें, आपल्या वैभवामध्यें व कौटुंबिक स्थितीच्या सुखामध्यें आनंद मानणाऱ्या एका श्रीमंत व अनेक कळपांचा धनी असलेल्या अशा गृहस्थाच्या सुखाची व निर्धन व निराश्रित परंतु सर्व ऐहिक बंधनांपासून मुक्त अशा बुद्धाच्या शांतीची तुलना केली आहे. तो श्रीमान् धनिय व बुद्ध यांच्या मधील संवाद फार सुंदर असून, प्रत्येक जण " हे देवा तुझ्या इच्छेला येईल तेव्हां वर्षाव कर " असें पालुपद असलेलें पद्य एकामागून एक म्हणतो. 'या जगापासून दूर असणारा, स्त्री अथवा अपत्य यांविषयीं कांहीं ज्ञान नसणारी व त्या ज्ञानाची इच्छाहि नसणारा असा भिक्षूच कायतो खरा सुखी असतो' हें जुनें गाणें या कवींनीं निरनिराळ्या प्रकारांनीं गायिलेलें आढळतें. जी गोष्ट धनियसुत्तामध्यें संवादरूपानें सांगितली आहे तीच पुन्हां आपणांला खग्गविसानसुत्त ( नं. ३, गेंड्यांचें काव्य ) यामध्यें " तो गेंड्याप्रमाणें एकटाच भ्रमण करीत राहील " असें पालुपद असणाऱ्या ४१ जोरदार पद्यांमध्यें आढळते. विंटरनिट्झच्या मतें यांत दिसून येणारी कळकळ व करुणरस यांचा भिक्षूंच्या जीवितक्रमाहून अगदीं भिन्न रहाणीच्या मनुष्याच्या मनावर देखील परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं.

आलवक सुत्त ( नं. १० ) आणि सूचिलोम सुत्त [ नं. १७ ] यांमध्यें या संवादांतून मधून मधून, वेद व महाकाव्यें यांतून आढळणाऱ्या कांहीं श्लोकांप्रमाणें कूट श्लोक दिलेले आढळतात. महाभारतांतील यक्षप्रश्नांप्रमाणें येथेंहि यक्ष व भिक्षु यांच्यांतील प्रश्नोत्तरांमध्यें कांहीं तत्त्वांचें प्रतिपादन केलेलें आढळतें.

सुत्तनिपातामध्यें बोधपर संवादांप्रमाणें कांहीं कथा व संवादहि आढळतात. यापैकीं नालक सुत्त ( नं.३७ ) पब्बज्जा सुत्त ( नं. २७ ) आणि पधान सुत्त ( नं.२८ ) हे तीन विशेष महत्त्वाचे आहेत. कारण, ते प्राचीन आध्यात्मिक पोवाड्यांपैकीं महत्त्वाचे अवशेष असून ज्याप्रमाणें लौकिक पोवाडे व आख्यानें यांपासूनच पुढें वीररसात्मक महाकाव्य तयार झालें त्याप्रमाणें यांच्या पासूनच पुढें बुद्धचरित्राचें महाकाव्य निर्माण झालें. यांचें संवादात्मक स्वरूप हेंच यांतील मुख्य वैशिष्ट्य आहे. श्रोत्यांच्या डोळ्यांपुढें कोणताहि प्रसंग मांडण्यास हें संवादात्मक स्वरूपच बहुधा पुरेसें होतें. तथापि जेथें हें पुरेसें वाटलें नाहीं त्या ठिकाणीं कांहीं ठराविक गद्य वाक्यें व थोडासा प्रास्ताविक भाग अथवा इतर थोडा गद्य मजकूर मधून मधून दिलेला आढळतो. संवादात्मक श्लोकांमध्यें मधून मधून कथानकात्मकें श्लोक घालणें ही त्यांत मागाहून केलेली सुधारणा असावी.

महाकाव्याच्या रचनेच्या अगदीं पूर्वीची व आख्यानांच्या रचनेला पूर्णत्वाप्रत नेणारी अशी शेवटची पायरी आपणांला या सुत्तनिपातांतील बुद्धाच्या तारुण्यांतील चरित्राचें वर्णन करणाऱ्या सूत्रांतील प्रसंगांमध्यें आढळते.

नालकसुत्त.–बुद्धचरित्रावर मागाहून रचलेल्या दंतकथेंतील मुख्य मुख्य भाग येथें आढळतात. नालक सुत्तामध्यें वर्णिलेला प्रसंग बुद्धाच्या जन्मानंतर लागलाच घडलेला आहे. स्वर्गामध्यें देवांनां आनंदातिशय झालेला आहे. त्यांच्या आनंदाचें ज्ञान असित या द्रष्ट्यास होऊन त्यानें विचारिलेल्या प्रश्नास असें उत्तर मिळालें कीं, जगाच्या मुक्ततेकरितां शाक्यांच्या देशामध्यें लुंबिनी वनांत बुद्धाचा जन्म झाला आहे. तेव्हां तो साधु स्वर्गांतून खालीं उतरून शुद्धोदनाच्या राजवाड्यामध्यें आला, आणि त्यानें त्या नुकत्याच जन्मलेल्या मुलास पहावयाची इच्छा दर्शविली. जेव्हां त्यानें त्या अग्नीप्रमाणें देदीप्यमान, सर्व ताऱ्यांपेक्षां प्रकाशमान आणि शरदृतूंतील निरभ्र आकाशांतील सूर्यासारख्या, ज्याला देवता थंड वारा घालीत आहेत अशा मुलास पाहिलें, तेव्हां त्यानें त्याला हातांत घेऊन म्हटलें कीं, हा मानवश्रेष्ठ आहे, हा अतुलनीय आहे. इतक्यांत त्याला स्वतःच्या नश्वरतेची आठवण होऊन तो अश्रुमोचन करूं लागला. तेव्हां त्या शाक्यांनां आश्चर्य वाटून त्यांनीं त्या मुलास कांहीं वाइटापासून भीति आहे काय असें विचारिलें. त्या साधूनें त्यांनां आश्वासून सांगितलें कीं, हा मुलगा पूर्ण ज्ञानाच्या शिखरास जाईल; परंतु त्याचा उपदेश मला ऐकावयास मिळणार नाहीं म्हणून मला दुःख होत आहे. परत जाण्यापूर्वी त्यानें आपला पुतण्या नालक यास बजावून सांगितलें कीं बुद्धाच्या आदेशाबरोबर तूं त्याचा अनुयायी हो.

पब्बज्जासुत्त.–यापैकीं दुसऱ्या पब्बज्जा सुत्तामध्यें तरुण बुद्धानें केलेला गृहत्याग व यतिवेषानें भ्रमण करीत असतां त्याची राजगृह येथें राजाशीं झालेली भेट यांचें वर्णन आहे.

पधानसुत्त.–पधान सुत्तामध्यें यापुढील एक प्रसंग वर्णिलेला आहे. यामध्यें दुष्टबुद्धि मार हा गौतमाच्या पाठोपाठ सात वर्षें फिरून त्याच्याशीं पुन्हां विरोध सुरू करतो, आणि त्याला ज्ञानाच्या मार्गापासून पुन्हां ऐहिक मार्गाकडे वळविण्याचा प्रयत्न करतो; परंतु त्याचा पराजयच होतो. जरी या पोवाड्यांतून दंतकथांचें व काल्पनिक कथांचें बरेंच प्राबल्य दिसून येतें, तरी नंतरच्या बुद्धाच्या चरित्रामध्यें आढळून येणाऱ्या अतिशयोक्तीशीं तुलना केली असतां हीं सूत्रें बरींच साधीं व सत्यास अनुसरून आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं.

पारायणवग्ग.—या कथा सुत्तनिपातांतील पोवाड्यांत ज्या स्वरूपांमध्यें आढळतात त्या स्वरूपांत त्या परंपरागत बौद्ध कथांचा जो जुन्यांत जुना भाग आहे त्यांत नसल्या पाहिजेत. कारण, त्यांमध्येंहि त्यांच्या पूर्वी बौद्धसांप्रदायिक इतिहासाची बरीच मोठी परंपरा अस्तित्वांत असावी ही गोष्ट गृहीत धरलेली दिसते. सुत्तनिपाताचें शेवटचें प्रकरण पारायणवग्ग हें निदान त्याच्या हल्लीं उपलब्ध असलेल्या स्वरूपामध्यें बरेंच अलीकडे रचलें गेलें असावें असें वाटतें. त्याच्या आरंभीं एक प्रास्ताविक गोष्ट आहे. बावरी नांवाच्या एका ब्राह्मणानें उदारपणानें आपलें सर्वस्व दान केल्यानंतर त्याच्याकडे एक ब्राह्मण येऊन पांचशें सुवर्ण मुद्रा मागूं लागला, आणि त्या मिळाल्या नाहींत तेव्हां तुझें शिर सात दिवसांनीं सप्तधा विदीर्ण होईल असा त्यानें बावरीला शाप दिला. तेव्हां बावरीला फार भीति वाटली, परंतु एका देवतेनें त्याला बुद्धास शरण जावयास सांगितलें. येथें एक बुद्धाचें स्तोत्र देऊन त्यामध्यें त्याच्या ३२ विशिष्ट शारीरिक लक्षणांचें वर्णन केलें आहे. या वर्णनांत त्याची लांब जीभ—जिच्यामुळें त्याला सर्व मुखाचें आच्छादन करतां येत असे—व वस्त्रांत आच्छादिलेला अवयव यांचेंहि वर्णन आहे. तेव्हां बावरीनें आपले विद्वान् व प्रसिद्ध असे १६ शिष्य बुद्धाकडे पाठविले. त्यांनीं त्याला १६ प्रश्न विचारिले, व बुद्धानें त्यांचीं उत्तरें दिलीं. हे सोळा प्रश्न व त्यांचीं उत्तरें हेंच वास्तविक या कवितेचें मूळ आहे. शेवटच्या प्रश्नानंतर कांहीं गद्य भाग असून त्यामध्यें या प्रश्नोत्तरांचें महत्त्व सांगितलें आहे, व हाच भाग कांहीं संस्कृत बौद्ध ग्रंथांप्रमाणें पुन्हां गाथांमध्यें दिला आहे. पुन्हां एक बुद्धाचें स्तोत्र देऊन कविता पूर्ण झाली आहे,व मूळ गोष्ट तशीच अर्धवट सुटलेली आहे.पूर्वी जुनीं म्हणून दाखविलेल्यांपैकीं(पृ.२१४पहा)पारायण सुत्त हें याच स्वरूपांत उपलब्ध असल्यामुळें, त्यांतील मूळ प्रास्ताविक गोष्ट मूळच्या स्वरूपांत चालत आली नसून तिच्या स्वरूपामध्यें कांहीं अधिक मजकूर आल्यामुळें फरक पडला असावा, असें गृहीत धरावयास हरकत दिसत नाहीं. हीच गोष्ट गद्यपद्यमिश्रित जे भाग आहेत त्यांतील गद्य भागासंबंधीं बहुतांशीं खरी दिसते. फॉसबॉल यानें सर्व गद्य भाग मागाहून घातलेला आहे असें जें विधान केलें आहे, तें बहुतांशीं खरें दिसत नाहीं; परंतु के. ई. न्यूमन यानें आपल्या भाषांतरामध्यें फक्त कांहीं गद्य भाग "भिक्षुकांची क्षुद्र टीका" अशी एका ठिकाणीं कडक टीका करून गाळून टाकला आहे,त्या ठिकाणीं तो बहुतांशीं बरोबर आहे असें विंटरनिट्झ यास वाटतें. उदाहरणार्थ, सेल सुत्तांतील गद्य भागामध्यें ज्या ठिकाणीं बुद्धाचा चक्रवर्ती म्हणून गौरव केला आहे, व त्याच्या विशिष्ट ३२ शारीरिक लक्षणांचें विस्तृत वर्णन केलें आहे, त्या ठिकाणीं त्या भागाचें अर्वाचीनत्व दाखविणारा ग्रंथांचा उल्लेख आलेला आहे. त्याप्रमाणेंच ज्या ठिकाणीं एखाद्या संवादाची प्रस्तावना करण्याकरितां एखादा यक्ष अथवा देवता यांचें नीरस व अनवश्यक वर्णन केलेलें आहे, त्या ठिकाणीं हा भाग टीकाकारानें घुसडून दिला आहे असें म्हणणें सयुक्तिक दिसतें.

**विमानवत्थु व पेतवत्थु.**— पाली धर्मशास्त्रामध्यें संगृहीत केलेल्या अगदीं अलीकडच्या वाङ्मयाचा भाग म्हटला म्हणजे 'विमानवत्थु–देवप्रासादांच्या कथा–व पेतवत्थु–भूतांच्या कथा–हे दोन ग्रंथ होत. हे अतिशय नीरस परंतु सुदैवानें लहान आहेत. कर्माचें जें गहन व परम महत्त्व–ज्याचें ब्राह्मणी व बौद्ध ग्रंथामध्यें अनेक सुंदर वचनांमध्यें प्रतिपादन केलेलें आढळतें, त्याचेंच या ग्रंथामध्यें उदाहरणें देऊन लहान लहान गोष्टींमध्यें परंतु अतिशय बोजड पद्धतीनें विवेचन केलेलें आहे.

या गोष्टीमध्यें त्या पद्यरूपांत आहेत. एवढाच कायतो काव्य या दृष्टीनें गुण आढळतो. या सर्व गोष्टी एकाच नमुन्याच्या आहेत. विमानवत्थु या ग्रंथामध्यें मोग्गलान यानें एखाद्या देवतेला, अमुक देवप्रासाद ( विमान ) तेथील ऐश्वर्यासह तिला कसा मिळाला असा प्रश्न केला असून, पूर्व जन्मीं तिनें केलेल्या सत्कृत्यांबद्दल हकीकत सांगून त्यांबद्दल तिला हें स्वर्गीय सुख मिळालें अशा तऱ्हेचें तिचें उत्तर दिलें आहे. पेतवत्थूमध्यें नारद हा एखाद्या प्रेतास (पिशाचास) कोणत्या कृत्यामुळें त्याला अशी दुःखदायक स्थिति प्राप्त झाली असा प्रश्न करतो, आणि तें थोडक्यांत आपली पूर्व जन्मींची कथा सांगतें. याचें एक उदाहरण पुरेसें होईल. पेतवत्थु १, २ येथें नारद एका पिशाचास प्रश्न करतोः "तुझें शरीर सोन्याचें असून त्याचा प्रकाश सर्व जगांत पडतो; परंतु तुझें तोंड डुकराचें आहे तर तूं कोणतें कृत्य केलें होतेंस?" पिशाच उत्तर करतें: "मी सर्व कृत्यें नियमानें करीत असे, परंतु माझ्या वाचेला नियम नसे. त्यामुळें मला अशी कुरूपता प्राप्त झाली आहे. म्हणून नारदा, मी तुला सांगतों कीं, ज्या अर्थी तूं हें पाहिलें आहेस त्या अर्थी वाचेनें कोणतेंहि दुष्कृत्य करूं नकोस. नाहींतर तुला असें डुकराचें तोंड प्राप्त होईल."

पेतवत्थूमध्यें ( ४, ३ ) ज्या अर्थी पिंगलक या राजाचा उल्लेख आला आहे, आणि धम्मपालाच्या टीकेवरून हा राजा बुद्धनिर्वाणानंतर दोनशें वर्षांनीं सुरत येथें राज्य करीत होता असें दिसतें, त्या अर्थी नंतरच्या काळचे टीकाकारहि हे ग्रंथ बुद्धनिर्वाणाच्या बऱ्याच अलीकडील काळचे आहेत असें समजत होते, ही गोष्ट सिद्ध होते. जरी अर्हत व निर्वाणपदप्राप्ति या प्राचीन बौद्धांच्या ध्येयाबरोबरच स्वर्ग व नरक यांविषयींच्या कल्पना प्रचलित होत्या असें मानिलें तरीहि हीं काव्यें फार प्राचीन आहेत असें म्हणतां येणार नाहीं.

**थेरगाथा व थेरीगाथा.**—खुद्दकनिकायांतील निरनिराळे ग्रंथ कसे अव्यवस्थित रीतीनें एकत्र केलें आहेत

हें या वरील दोन नीरस व रुक्ष काव्यांशेजारीं लागलीच थेरगाथा व थेरीगाथा हीं दोन सौंदर्य व जोरदारपणा या गुणांमुळें सरस असलेलीं अशीं काव्यें ग्रथित केलीं आहेत यावरून दिसतें. हीं दोन काव्यें ऋग्वेदांतील सूक्तांपासून तों कालिदास व अमरु यांच्या पद्यांपावेतों कोणत्याहि उत्कृष्ट काव्याच्या तोडीचीं आहेत. थेर आणि थेरी गाथा हे दोन काव्यांचे संग्रह आहेत. पहिल्यामध्यें १०७ काव्यें असून त्यांत १२७९ पद्यें (गाथा) आणि दुसऱ्यांत ७३ काव्यें असून ५२२ पद्यें आहेत. हीं कांहीं थेर व थेरी (वृद्ध भिक्षू व भिक्षुणी) यांनीं रचलीं असून रचणाऱ्यांचीं नांवें दिलेलीं आहेत. हीं नांवें आपणांला हस्तलिखितांतून व धम्मपाल याच्या टीकेंतहि आढळतात. ही टीका ख्रिस्ती शकाच्या ५ व्या शतकाच्या सुमारास रचली असून तिच्यामध्यें या थेर व थेरी यांच्या चरित्रविषयक गोष्टीही दिल्या आहेत. या गोष्टी कांहीं अंशीं पद्यांवरून जमविलेल्या आहेत, व कांहीं इतर कथाग्रंथांतून अथवा कल्पनेनें रचून घातल्या आहेत. त्या खरोखर घडलेल्या गोष्टी आहेत असें नाहीं. त्याप्रमाणेंच हीं सर्व काव्यें त्याच (नांवें दिलेल्या) थेर अथवा थेरी यांनीं रचल्याबद्दल जी परंपरा आहे तीहि खरी मानतां येत नाहीं. परंतु हीं सर्व काव्यें एकानेंच केलीं नसून अनेकांनीं केलीं आहेत; व त्यांपैकीं कांहीं थेरांनीं व थेरींनीं केलीं आहेत. येथपर्यंत ही परंपरा बरोबर आहे. निरनिराळ्या कर्त्यांच्या नांवावर असलेलीं कांहीं काव्यें एकानेंच केलीं असतील किंवा एकाच्याच नांवावर असलेलीं काव्यें अनेकांनीं केलीं असतील. त्याप्रमाणेंच भिक्षूंच्या काव्यांतील कांहीं काव्यें भिक्षुणींनीं केलीं असतील व भिक्षुणींच्या काव्यांतील कांहीं भिक्षूंनीं केलीं असतील. परंतु हीं सर्व एकाच्याच मेंदूंतून खास निघालीं नाहींत. कांहीं गोष्टींत विशिष्ट शब्दसमूह वारंवार आढळतो आणि त्यांतील रहस्यहि बहुतांशीं एकच आहे असें दिसतें. तरी यावरून केवळ त्यांवर बौद्ध कल्पनांचा ठसा उठला आहे एवढीच गोष्ट सिद्ध होते. के. ई. न्यूमन याच्या मताप्रमाणें या सर्व काव्यांवर एकाच व्यक्तीच्या कल्पनांचा ठसा आहे असें म्हणतां येत नाहीं.

भिक्षुणीगीतांतील बहुतेक गाणीं स्त्रियांनींच रचिलीं असावींत याबद्दल संशय नाहीं. स्त्रीहृदयांतून निघालेलीं हीं गाणीं पुरुषांनीं रचिलीं असतील असें न म्हणण्याइतकी बौद्ध भिक्षुवर्गास भिक्षुणींबद्दल कळकळ कधींच वाटत नसे. या गोष्टीच्या प्रत्ययाकरितां गौतमानें आपल्या दाईच्या भिक्षुणीसंघ स्थापन करण्याच्या मार्गांत किती अडचणी घातल्या याबद्दल जी परंपरागत माहिती आहे व स्त्रियांचा कैवार घेतल्याबद्दल आनंद यास सांप्रदायिक ग्रंथामध्यें ठिकठिकाणीं दूषणें दिलीं आहेत त्यांकडे पहावें. याच कारणामुळें वस्तुस्थिति जर इतकी विरुद्ध नसती तर या काव्यांचें कर्तृत्व भिक्षुणींकडे देण्यास त्यांचें मन केव्हांहि तयार झालें नसतें. या भिक्षू व भिक्षुणी यांच्या गीतांतील भाषा, भाव आणि त्यांचा खरा रोख यांमधील फरक मिसेस र्‍हीस डेव्हिड्स यांनीं चांगला दाखविला आहे. हे दोन्ही संग्रह जो एकामागून एक वाचील त्याला असें आढळून येईल कीं, भिक्षुगीतांमध्यें न आढळणारी वैयक्तिक आत्मविषयक छटा भिक्षुणीगीतांमध्यें वारंवार दिसून येते. भिक्षुगीतांमध्यें मनाचे निरनिराळे विकार अथवा अनुभव वर्णन केलेले असतात, तर भिक्षुणीगीतांमध्यें ठिकठिकाणीं त्यांनां बाहेरच्या जगाचे आलेले अनुभव दृष्टीस पडतात. भिक्षुगीतांत सृष्टिवर्णन अधिक आढळतें तर भिक्षुणीगीतांत आयुष्याचें चित्र दृष्टीस पडतें.



यांतील आध्यात्मिक व नैतिक तत्त्वें.—दोन्ही संग्रहांमध्यें आध्यात्मिक ध्येय व नैतिक तत्त्वें यांचें उद्घाटन केलें आहे. या सर्व भिक्षूंनां व भिक्षुणींनां मनाच्या अत्यंत शांतीपेक्षां कोणतीहि गोष्ट अधिक वाटत नाहीं. या शांतीमुळें साधूंचा देवांनां हेवा वाटतो. हिची प्राप्ति राग, द्वेष व भ्रम यांचा नाश केल्यानें आणि सर्व विषयवासनांचा त्याग केल्यानें होते; आणि हिच्यामुळें पुनर्जन्माच्या अभावाबद्दलची जाणीव झाल्यामुळें सर्व दुःखांचा शेवट होऊन अत्युच्च सुख जें निर्वाण त्याचा अनुभव मिळतो. ज्या भिक्षूला सुख व दुःख या दोहोंचीहि जाणीव होत नाहीं, व ज्याला भूक अथवा थंडी यांची बाधा होत नाहीं तो सुखी होय. ज्या भिक्षुणीला स्वतःबद्दल पुढें दिल्याप्रमाणें म्हणतां येईल ती सुखी होय (थेरीगाथा ७६): "ऐहिक अथवा पारलौकिक सुखाची इच्छा नष्ट झाली आहे; विषय आणि विभ्रम यांचा मीं त्याग केला आहे, मला शांति व सर्वश्रेष्ठ सुख जें निर्वाण त्याची प्राप्ति झाली आहे." [illegible] ध्येयें व मुख्य जीं चार नैतिक तत्त्वें—आर्यचतुर्विधिमार्ग, सर्वभूतदया (मेत्त), अहिंसा व आत्मनिग्रह, हीं धम्मपदांतील वचनें व सुत्तनिपातांतील पद्यें याप्रमाणेंच या काव्यांतहि एकत्र वर्णन केलीं आहेत. हीं भिक्षू व भिक्षुणी यांचीं गीतें, त्यांच्या स्वतःबद्दलचेच उद्गार व स्वतःचेच अनुभव असल्यामुळें वरील दोहोंपासून भिन्न आहेत. एका भिक्षूनें मोठ्या प्रौढीनें त्याची बायको व मुलगा त्याच्या शांतीचा भंग करीत असल्यामुळें त्यानें त्यांचें बंधन कसें तोडून टाकिलें हें सांगितलें आहे (थेरगाथा २९९ इ०). दुसऱ्यानें आपल्या बायकोपासून, देंठापासून ज्याप्रमाणें कळी वेगळी होते त्याप्रमाणें हळू हळू परंतु कायमची सुटका करून घेतल्यामुळें त्याला मिळालेल्या सुखाचें वर्णन केलें आहे (थेरगाथा ७२). तिसऱ्यानें एका वेश्येचे पाश आपण कसे तोडून टाकिले तें सांगितलें आहे (थेरगाथा ४५९ व पुढील). भिक्षुगीतांमध्यें ठिकठिकाणीं स्त्रियांची निंदा करून त्यांनां भुरळ पाडणाऱ्या, बंधनकारक व भिक्षूला त्याच्या पवित्र जीवितक्रमापासून भ्रष्ट करण्याचा सतत प्रयत्न करणाऱ्या असें म्हटलें आहे. एकजण म्हणतो, कितीहि बायका आल्या तरी त्या

मला मोहूं शकणार नाहींत ( थेरगाथा १२११ ). स्त्री हें सर्व दुःखाचें कारण आहे. जो तिच्यापासून निश्चयानें दूर रहातो तोच विजयी होतो ( थेरगाथा ७३८ व पु. ). एका भिक्षूनें एका स्त्रीच्या कुजत असलेल्या प्रेतास पाहिल्यामुळें आपणांला सन्मार्गाकडे जाण्याची प्रेरणा कशी झाली, याचें मोठें किळसवाणें वर्णन दिलें आहे ( थेरगाथा ३१५ व पु० आणि ३९३ व पु० ). या ओंगळ वर्णनाच्या उलट कांहीं सुंदर वर्णनेंहि आहेत. एका ठिकाणीं एका भिक्षूनें आपल्या आईनें आपणाला सत्याची ओळख कशी करून दिली तें सांगून तिचे सुंदर शब्दांनीं आभार मानिले आहेत. दुसऱ्या एका भिक्षूनें आपण भिक्षु झालों परंतु या जगास कायमचे सोडून गेलों नाहीं असें म्हणून आईचें सांत्वन केलें आहे (थेरगाथा ४४). एकानें आपण गळलेलीं फुलें वेंचून त्यांवर किती गरीबीनें निर्वाह करीत असूं व नंतर आपण बुद्धाकडे येऊन मुक्तीचा मार्ग कसा शोधून काढला हें सांगितलें आहे ( थेरगाथा ६२० व पु० ). दुसऱ्या एकानें आपण राजपुरोहिताचे पुत्र असून किती श्रीमंतींत रहात असूं, व पुढें बुद्धाचें दर्शन होऊन आपणाला दीक्षा कशी मिळाली याचें वर्णन केलें आहे (थेरगाथा ४२३ व पु० ). एका भिक्षु झालेल्या राजानें आपल्या पूर्वीच्या ऐश्वर्यसंपन्न दरबाराची व त्या वेळच्या भिक्षुवृत्तीची तुलना केली आहे ( थेरगाथा ८४२ व पु० ). पूर्वी दरोडेखोर असून नंतर भिक्षु झालेल्या लोकांनींहि आपल्या पूर्वचरित्राचें वर्णन केलें आहे. तथापि भिक्षुगीतांमध्यें अशा तऱ्हेच्या बाह्य परिस्थितीचें वर्णन कमीच आहे. बहुतकरून त्यांमध्यें भिक्षूंच्या अंतःस्थितीचें लहान लहान कवितांमध्यें वर्णन केलें आहे. तथापि थेर तलपुट याच्या गीतांमध्यें एक मोठें काव्य असून त्यामध्यें पवित्र ध्येय मिळविण्याचा प्रयत्न करणाऱ्या भिक्षूंचें आत्मगत भाषण दिलें आहे.

वर सांगितल्याप्रमाणें भिक्षुगीतांपेक्षां भिक्षुणीगीतांमध्यें आयुष्यांतील प्रसंगांचें वर्णन जास्त आढळतें. अपत्यवियोगाच्या दुःखानें वेडी झालेली एक बाई भटकत फिरत असतांना बुद्धानें तिचें समाधान करून तिला उपदेश केला व तिला संघांत घेतलें. अशा तऱ्हेची पुत्रवियोगामुळें संघांत प्रविष्ट झालेल्या स्त्रियांची उदाहरणें ठिकठिकाणीं बरींच आढळतात. एका गीतांत वर्णन आहे कीं, एका गरीब विधवेवर दारोदार भिक्षा मागावयाची पाळी आली असतां, ती सहज भिक्षुणींकडे आली, व त्यांनीं मोठ्या मायेनें तिचें स्वागत करून तिला उपदेश केला तेव्हां ती आपण होऊनच भिक्षुणी झाली व तिचा गुरु पटाचारा याच्या उपदेशानें तिला निर्वाणाचा मार्ग सांपडला. ठिकठिकाणीं आपणांला पूर्वी वेश्या असलेल्या भिक्षुणींचें वृत्त आढळतें; व त्या वेश्यावृत्तींतील आयुष्यक्रम व भिक्षुणीवृत्तींतील शांति व पावित्र्य यांमधील विरोध फारच गमतीचा दिसतो. एका ठिकाणीं, आनंदोत्सव व समारंभ चालले असतां त्यांतील थाटाचा पोषाख केलेली एक सुंदर तरुणी मेळ्यामध्यें येऊन बुद्धाचा उपदेश ऐकून भिक्षुणी झाल्याचें वर्णन आहे. येथेंहि त्या समारंभांतील आनंद व निर्वाणाची शांति यांमधील विरोध फार बहारीचा आहे. याप्रमाणेंच आपणांला उच्च कुलांतील तरुण मुली, वयातीत स्त्रिया, एक दहा मुलांची आई अशा स्त्रियांनीं बुद्धाचा अथवा त्याच्या एखाद्या भिक्षुणीचा उपदेश ऐकून निर्वाणाचा मार्ग शोधून तो प्राप्त करून घेतल्याचीं उदाहरणें आढळतात. भिक्षुणी होण्याच्या निश्चयापासून एखाद्या मुलीला परावृत्त करण्याचा व्यर्थ प्रयत्न तिचे आप्त करतांना दिसतात. एका श्रीमंत मनुष्याच्या सुंदर मुलीला धनवान् मनुष्यांचे मुलगे व राजपुत्र मागणी घालीत होते; व एकानें तर तिच्या वजनाच्या आठपट सोनें व शिवाय जवाहीर देतों म्हणून तिच्या बापाकडे निक्षेप पाठविला होता; परंतु तिनें बुद्धाचा उपदेश ऐकला असल्यामुळें भिक्षुणीचा मार्ग पतकरला. कांहीं कथानकें फार करुणरसपूर्ण आहेत. किसागोतमी रस्त्यामध्यें आजारी होऊन पडली असतां तिचा नवरा, पुत्र व कन्या, तशींच तिचीं मातापितरें व भाऊ मरून जातात; परंतु ती निराश होत नाहीं, व ज्ञानाची प्राप्ति करून घेऊन मुक्त होते. या करुणरसपूर्ण गोष्टीनंतर एक आनंदपर्यवसायी गोष्ट दिली आहे. हींत एका स्त्रीला दीक्षा मिळून ती तांदूळ सडण्यापासून व अप्रिय अशा नवऱ्यापासून मुक्त झाल्यामुळें तिला झालेला आनंद वर्णन केला आहे. ती म्हणते, माझी तीन वांकड्या गोष्टींपासून सुटका झाली आहे. उखळी, मुसळ आणि कुबडा नवरा.

या व रू न नि घ णा रें स मा ज चि त्र.—या आयुष्यांतील प्रसंगांच्या वर्णनांचें त्या वेळच्या समाजस्थितीचें व विशेषतः प्राचीन काळीं भरतखंडामध्यें स्त्रियांचा सामाजिक दर्जा काय होता याचें ज्ञान होण्याच्या कामीं किती महत्त्व आहे हें उघड आहे. त्याचप्रमाणें या प्रसंगांमुळें या सर्वत्र एकच कल्पना आढळून येणाऱ्या कवितांमध्यें किती स्वारस्य उत्पन्न होतें हें सांगावयास नको. भिक्षुगीतें त्यांत मधून मधून आढळणाऱ्या सृष्टिवर्णनामुळें कंटाळवाणीं होत नाहींत. रामायणामध्यें आढळून येणारी व भारतीय काव्यामध्यें प्रामुख्यानें वास करणारी ही निसर्गप्रीति, जिचें अद्यापहि आपण महाकाव्यामध्यें, लावण्यामध्यें अथवा प्रेमगीतांमध्यें व उपदेशपर चुटक्यांमध्यें कौतुक करतों, तिला सर्व जगाचा त्याग करणारे हे भिक्षूहि पारखे नव्हते. ज्यामध्यें एकाकी ऋषि ध्यानस्थ बसला आहे अशा एखाद्या अरण्याचें अथवा गिरिप्रदेशाचें वर्णन करीत असतां त्यांची लेखणी एखाद्या भिक्षूपेक्षां कवीप्रमाणें मोठ्या आनंदानें व मंद गतीनें चालते. मोठ्यानें मेघगर्जना होत आहे, व कृष्णमेघांतून जोरानें वृष्टि होत आहे अशा प्रसंगीं सर्वमुक्त असा भिक्षु आपल्या कपारीमध्यें बसला आहे असें वर्णन आढळतें. आणि ज्या साधूला सुख व दुःख हीं दोन्हीहि सारखींच आहेत, त्यालाहि वसंत ऋतूचें वर्णन केल्याशिवाय रहावत नाहीं. ही निसर्ग-

प्रीति अनेक सुंदर दृष्टांतांतहि दिसून येते. साधूंली अचल शिलेची अथवा हत्तीची उपमा दिलेली आढळते. ज्या भिक्षूला आपल्या छाटीबद्दल गर्व वाटतो त्याला सिंहाचें कातडें पांघरलेल्या माकडाची उपमा दिली आहे. आत्म-निग्रही भिक्षूला आपल्या गुहेंत बसलेल्या सिंहाची उपमा दिली आहे. एका भिक्षुणीगीतामध्यें मोठ्या कौशल्यानें उपमांचें ग्रथन केलेलें आढळतें ( थेरीगाथा ११२ व पु० ). ज्याप्रमाणें एखादा शेतकरी शेत नांगरतो, बी पेरतो आणि नंतर पिकाची कापणी करतो, त्याप्रमाणें भिक्षुणी निर्वाण प्राप्तीची इच्छा करते. एखाद्या शिलेवर पाय धुतले असतां पाणी खाली वाहून जातें ही गोष्ट पाहून ती विचार करूं लागते; व ज्याप्रमाणें एखादा उमदा घोडा वठणीस आणावा त्याप्रमाणें ती आपल्या मनाचा निग्रह करते. नंतर ती मठांत येऊन हातांत दिवा घेते आणि सुईनें त्याची वात आंत ओढते, आणि जसा त्या दिव्याचा प्रकाश नाहींसा होतो तशी तिला निर्वाणाची प्राप्ति होते. या चातुर्यानें एकत्र गुंफलेल्या उपमांकडे पाहून व विशेषतः मधून मधून आढळ-णाऱ्या श्लेष चमत्कारांकडे पाहून अलंकारिक काव्याची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. पूर्वायुष्यांत वेश्या असलेल्या अंबपालीनें केलेल्या एका गाण्याची रचना फारच चातुर्याची आहे ( थेरगाथा २५२ व पु० ). या गाण्यांत पद्याच्या पहिल्या दोन चरणांमध्यें ती आपल्या शरीराच्या सौंदर्याचें वर्णन करते व तिसऱ्या चरणामध्यें तारुण्यांत इतक्या सुंदर असलेल्या शरीराचें वृद्धावस्थेंत काय झालें आहे तें सांगते. या गाण्याच्या शेवटीं " सत्य वक्त्याचा शब्द खोटा होणार नाहीं " या अर्थाचें पालूपद असतें. हीं गाणीं संवादरूपांत फार आढळतात. उदाहर-णार्थ एका भिक्षुणीगीतामध्यें (थेरीगाथा २७१ व पु०) कन्या व पिता यांमधील संवाद दिला असून कन्येनें भिक्षु-वृत्तीपासून होणारें हित दाखवून देऊन पित्याला भिक्षु केलें आहे. दुसऱ्या एका गाण्यामध्यें (थेरीगाथा २९१ व पु०) एक मनुष्य प्रथम भिक्षु असून नंतर व्याध झाला आहे, व पुढें एक पुत्र झाल्यानंतर त्याला पुन्हां भिक्षु होण्याची इच्छा झाली आहे. त्याचा आणि त्याच्या स्त्रीचा संवाद दिला आहे. त्याची स्त्री त्याला त्याच्या निश्चयापासून परा-वृत्त करण्याचा प्रयत्न करते; व तो तिला सोडून गेला तर मुलास मारून टाकण्याचा धाक घालते. परंतु त्याचा निश्चय पक्का असून तो म्हणतो, जरी तूं या मुलाला कोल्ह्याकुत्र्यां-पुढें खाण्याकरितां टाकून दिलेस तरी, हे नीच स्त्रिये, त्या मुलाकरितांहि तूं मला मागें फिरवूं शकणार नाहींस. ही एक प्रकारची लावणीच आहे. या भिक्षुगीतांत व भिक्षुणीगीतांत —विशेषतः दुसऱ्यामध्यें—अशा तऱ्हेच्या लावण्या कथन-कात्मक पद्यांसहित अथवा तशाच पुष्कळ आढळतात. अशा तऱ्हेचा एक मोठा हुबेहूब वर्णन असणारा पोवाडा भिक्षुणी-गीतांमध्यें आढळतो ( थेरीगाथा ३१२ ते ३३७ ). एक ब्राह्मण आपल्या स्त्रियेस आश्चर्यचकित होऊन विचारतोः " आतां तुझीं सात मुलें मेलीं असतांहि तूं कशी रडतांना दिसत नाहींस? पूर्वी तर तूं रात्रंदिवस त्यांच्या-करितां रडत होतीस. " तिनें उत्तर दिलें: " मी जन्ममरणा-पासून कसें मुक्त व्हावें हें बुद्धापासून शिकलें आहे." हें ऐकून तो ब्राह्मण बुद्धाकडे जाऊन भिक्षु झाला. त्यानें आपल्या स्त्रीस आपल्या गाडीवानाबरोबर आपण भिक्षु झालों असा निरोप पाठविला. या आनंदाच्या बातमीबद्दल ती स्त्री त्या गाडीवानास घोडा, गाडी व एक हजार सुवर्णमुद्रा देऊं लागली, परंतु तो म्हणालाः " तो घोडा, गाडी व द्रव्य तसेंच राहूं दे, मी सुद्धां भिक्षु होण्याकरितां जात आहें." नंतर त्या स्त्रीच्या मनांत आलें कीं, हें सर्व घरदार व द्रव्य वगैरे आपल्या मुलीस देऊन टाकावें. परंतु तिनेंहि या सर्वांचा त्याग करून भिक्षुणी होण्याचा आपला निश्चय आहे असें सांगितलें. सुभा या भिक्षुणीचें गीत या सर्वांत उत्तम आहे. तिची प्रेमयाचना करीत एक शठ तिच्या पाठोपाठ अरण्यांत आला. त्यानें तिच्या सौंदर्याची वाखाणणी करून व अरण्यांतील भीतीचें वर्णन करून तिला विषयसुखाकडे वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु तिनें त्याचा धिक्कार करून म्हटलें : " तूं ज्या ठिकाणीं मार्ग अथवा पाऊलवाटहि नाहीं तेथें जाण्याची इच्छा करीत आहेस; तुला चंद्राचें खेळणें करावेंसें वाटतें; तुला हिमालयावरून उडी मारावीशी वाटते; तुला बुद्धाच्या मुलीच्या प्राप्तीची इच्छा आहे. मीं सर्व ऐहिक वासना निखाऱ्याप्रमाणें अथवा विषाप्रमाणें आपणापासून दूर केल्या आहेत." तिनें शरीराच्या नश्वर-तेचें, व डोळा केवळ मांसाचा गोळा आहे अशा प्रकारें शरीराच्या ओंगळपणाचें वर्णन केलें व आपला डोळा काढून त्याच्या हातांत दिला. तेव्हां त्याला पश्चात्ताप होऊन त्यानें तिची क्षमा मागितली. नंतर ती भिक्षुणी बुद्धाकडे गेली, व त्यानें तिच्याकडे पाहिल्याबरोबर तिचा डोळा पूर्ववत् झाला ( थेरीगाथा ३६६ ते ३९९).

यांपैकीं कांहीं गीतें मार व भिक्षुणी यांमधील संवादरूपी असून तीं संयुत्तनिकाय यांतील भिक्षुणीसंयुत्त यामध्यें आढ-ळणाऱ्या गाण्यांच्याच धर्तीचीं आहेत, व कांहीं ठिकाणीं तींच निराळ्या रूपांत असल्याप्रमाणें आढळून येतात. मज्झिम-निकाय या ग्रंथामध्यें असलेली अंगुलीमाल या दरोडे-खोराबद्दलची लावणी थेरगाथेमध्यें अक्षरशः पुन्हां आलेली आढळते (८६६ व पु०). याप्रमाणेंच या संग्रहांतील पुष्कळ पद्यें इतर चार संग्रह, धम्मपद व सुत्तनिपात यांमध्यें आढळून येतात. एका ठिकाणीं ( थेरगाथा ४४५ ) तर निकायामधील दृष्टांत माहीत असल्याचें दर्शविलें आहे एव-ढेंच नव्हे, तर ते प्रत्यक्ष उद्धृतहि केले आहेत. परंतु या सर्व ठिकाणीं जरी उद्धृत केलेलीं वाक्यें दुसऱ्यांतून घेतलेलीं आहेत हें खरें मानिलें, तरी त्यावरून हे दोन संग्रह मागा-

हून रचले गेले असें सिद्ध होत नाहीं; कारण हीं अवतरणें मागाहून घुसडून दिलीं गेलीं असण्याचा संभव आहे.

यांचा काल.—या दोन संग्रहांमध्यें उत्तरकालीं रचलेलीं बरींचशीं गाणीं आहेत ही गोष्ट निश्चित आहे. उदाहरणार्थ, एका भिक्षूनें एक फूल वाहिल्याबद्दल त्याला आठशें कोटी वर्षें स्वर्गवास घडून अखेरीस तो निर्वाणास गेला, असें सांगितलें आहे. अशा तऱ्हेच्या कल्पना बौद्ध संप्रदायामध्यें बऱ्याच अलीकडील महायान ग्रंथांच्या रचनेपर्यंत रूढ झाल्या नव्हत्या. त्याप्रमाणें एका सात वर्षांच्या भिक्षूनें दाखविलेले चमत्कार, एका भिक्षूनें निर्माण केलेल्या स्वतःच्याच १००० आकृती व त्यानें आकाशांत केलेलें उड्डाण, सारिपुत्ताचा स्वर्गामध्यें देवांनीं केलेला सन्मान, आणि असेच इतर चमत्कार ज्या भागांत वर्णन केले आहेत ते भाग बौद्ध काव्यांच्या व विचारांच्या प्राचीन स्वरूपांतील असावेत असें म्हणतां येणार नाहीं; आणि ज्या दोन गीतांमध्यें धर्माच्या नाशाचें वर्णन केलेलें आहे,तीं संप्रदायाच्या स्थापनेनंतर कांहीं शतकांनीं, बहुधा अशोकाच्या कालीं, रचलेलीं, असावींत असें विंटरनिट्झ याचें मत आहे. पहिल्या गीतामध्यें पूर्वींच्या भिक्षूंच्या साध्या व पवित्र राहणीची तुलना तत्कालीन भिक्षूंच्या राहणीशीं केली आहे. जे प्रथम संपत्ति, स्त्री व अपत्य यांचा त्याग करीत असत, तेच त्या वेळीं घासभर भातासाठीं पातक करावयास मागेंपुढें पहात नसत; जें आवडेल तें खात असत; बीभत्स भाषण करीत; आणि इतर लोकांपुढें दंभ माजवून, त्याबद्दल मोठें पारितोषिक मिळण्याची इच्छा करीत. ते वैद्याप्रमाणें वनस्पती गोळा करीत, वेश्येप्रमाणें नटत असत व ढोंगी, धूर्त व कावेबाज झाले होते. दुसऱ्या गीतामध्यें पुढचे भिक्षू कसे होतील असा प्रश्न विचारिला असतां फुस्स यानें जें त्यांचें चित्र रेखाटलें आहे, तें अलीकडील तिबेटी भिक्षूंना बरोबर लागू पडेल. त्यांत म्हटलें आहे कीं, भिक्षू राग, द्वेष, मत्सर आणि दुष्ट यांनीं पूर्ण असतील; त्यांनां सत्याबद्दल जिज्ञासा राहणार नाहीं; ते बुद्धाच्या वचनांचे विपरीत अर्थ करूं लागतील; सोनें व रुपें यांचा स्वीकार करूं लागतील, सद्गुणी व खऱ्या भिक्षूंचा तिरस्कार करतील; भिक्षू व भिक्षुणी शिस्तीनें राहणार नाहींत इ०. हें चित्र फार चमत्कारिक असून फार प्राचीन काळचें दिसत नाहीं. भिक्षुणीगीतांतील इतिदासी हिचें ~~म्हणें~~ (थेरीगाथा ४०० ते ४४७) या संप्रदायाच्या अवनतीच्या काळचें दिसतें. यामध्यें स्त्री ही तिजवर कांहीं तरी संकट ओढवल्यामुळेंच भिक्षुणी होते असें सरसकट मानिलेलें दिसतें. त्याप्रमाणेंच एखाद्या मनुष्यानें प्रथम भिक्षु व्हावें, पुन्हां भिक्षूची छाटी टाकून देऊन लग्न करावें व पुन्हां पंधरा दिवसांनीं भिक्षु व्हावें, याप्रमाणें गोष्ट घडली असावी.परंतु ती बौद्ध संप्रदायावर कांहीं संकटें येऊन गेल्यानंतर घडली असावी असें वाटतें. शेवटचें भिक्षुणीगीत (थेरीगाथा ४४८ ते ५२१) हेंहि मागाहून घातलेलें असावें, अथवा त्यामध्यें भर घातल्यामुळें व अवतरणांची गर्दी केल्यामुळें त्याचें मूळचें स्वरूप पालटून गेलें असावें असें दिसतें.

यामुळें के. ई. न्यूमन याचें जें म्हणणें आहे कीं हीं सर्व गीतें गौतम जिवंत असतांना संगृहीत करून काळजीनें रक्षण करून ठेवलीं होतीं व त्याच्या मरणानंतर त्यांचें बिनचूक रीतीनें वर्गीकरण करण्यांत आलें, तें सिद्ध करितां येणार नाहीं; एवढेंच नव्हे, तर कांहीं गीतांच्या बाबतींत तें सर्वथा अशक्य आहे व इतरांच्या बाबतींत असंभवनीय आहे. तथापि कांहीं गाणीं बुद्धाच्या प्रारंभींच्या शिष्यांनींच रचिलीं असावीं हें शक्य आहे. तसेंच भिक्षुगीतांमध्यें वारंवार आढळून येणारा चरण "मला मृत्यूपासून आनंद होत नाहीं. अथवा जीवितापासून आनंद होत नाहीं" हा बुद्धाच्या प्रथम शिष्यांपैकीं एखाद्यानें म्हटला असेल. महापजापती हिच्या नांवावर असलेलें बुद्धाच्या स्तुतिपर गीत तिनें प्रत्यक्ष म्हटलेलें असेल; आणि बौद्ध भिक्षूच्या जीविताचें ध्येय ज्यांमध्यें इतकें सूक्ष्म रीतीनें वर्णन केलें आहे तीं पद्यें (थेरगाथा ९८१ ते ९९४) सारिपुत्त यानेंच रचलेलीं असतील."पूर्णत्वाप्रत जाण्याची तुम्हांला सारखी तळमळ लागूं द्या हेंच माझें तुम्हांला सांगणें आहे. बरें आतां मी जातों, मी नाहींसा होतों. मी अगदीं स्वतंत्र झालों आहें,मी सर्वांपासून मुक्त झालों आहें." हे सुंदर शब्द खरोखर सारिपुत्तापासून त्याची शिष्यांस शेवटची आज्ञा म्हणून परंपरेनें चालत आले असतील. तसेंच पाली धर्मशास्त्रामध्यें अनेक ठिकाणीं आढळणारी व या संग्रहामध्यें याच्या नांवावर असलेलीं

"सर्व वस्तू क्षणभंगुर आहेत. त्या जशा उत्पन्न होतात तसाच त्यांचा नाश होतो. त्यांचा आरंभ होत नाहीं तोंच अंत होतो. त्यांपासून मुक्त होणें यांतच धन्यता आहे."

हीं पद्यें इतकीं जुनीं आहेत कीं, तीं मोग्गलान अथवा दुसऱ्या एखाद्या बुद्धाच्या आरंभींच्याच शिष्यानें रचलीं असणें शक्य आहे. तिपिटकाच्या इतर संग्रहांप्रमाणें यांतहि नवें आणि जुनें यांचें मिश्रण आहे, आणि शोधकाला प्रत्येक सूत्राचा काल पृथक्पणें निश्चित करावा लागतो.

**जातककथा.**—ही गोष्ट विशेषतः खुद्दकनिकायामध्यें समाविष्ट केलेल्या जातक अथवा बोधिसत्त(त्त्व)कथा (बुद्धाच्या पूर्वजन्मींच्या गोष्टी) यांमध्यें जास्त स्पष्टपणें दिसून येते. बौद्ध ग्रंथामध्यें बोधिसत्त हें नांव जो पुढें बुद्ध व्हावयाचा असतो त्याला दिलेलें आहे. गौतमबुद्धाला बोधिसत्त हें नांव शाक्य वंशांत येऊन बुद्धत्व प्राप्त होण्यापूर्वींच्या सर्व जन्मांमध्यें दिलेलें आढळतें. जातक कथांमध्यें बोधिसत्तानें आपल्या एखाद्या पूर्व जन्मामध्यें स्वतः केलेल्या, अथवा प्रेक्षक किंवा इतर कोणत्याहि प्रकारें त्याचा ज्यांत संबंध आलेला आहे, अशा गोष्टी दिलेल्या आहेत.यामुळें प्रत्येक जातकाचा आरंभ 'अमुक एका वेळीं (उदाहरणार्थ, ब्रह्मदत्त राजा राज्य करीत

असतां) बोधिसत्त्व अमक्याच्या पोटीं (उदाहरणार्थ, एखाद्या राणीच्या अथवा हत्तिणीच्या) जन्मास आला होता' अशा रीतीनें होऊन नंतर गोष्ट सुरू होते. यामुळें लोकांमध्यें प्रचारांत असलेल्या अथवा लौकिक वाङ्मयामध्यें आढळणाऱ्या कोणत्याहि गोष्टीला जातककथेचें रूप देणें शक्य होतें. त्या गोष्टीतील एखाद्या मनुष्याला, प्राण्याला अथवा देवतेला बोधिसत्त्व म्हटलें म्हणजे झालें. आणि याप्रमाणें कोणतीहि गोष्ट, मग ती लौकिक असो अथवा बौद्ध कल्पनांपासून कितीहि दूरची असो, तिला बौद्ध कथेचें रूप देतां येत असे. तथापि भारतीयांमध्यें कथा सांगण्याचा व ऐकण्याचा नाद जो इतका हाडींमासीं खिळला आहे, त्याचा उपयोग आपल्याला अनुयायी मिळविण्याकडे जर भिक्षूंनीं करून घेतला नसता तर त्यांनां भारतीय म्हणून म्हणतांच आलें नसतें. ही गोष्ट बौद्ध भिक्षूंनींच केवळ नव्हे तर, भरतखंडांतील सर्व संप्रदायांच्या उपदेशकांनीं केली आहे; आणि तीच गोष्ट कांहीं शतकांनंतर पाश्चात्य ख्रिस्ती भिक्षूंनींहि केली. या भिक्षूंनां पोप ग्रेगरी दि ग्रेट यानें 'दाखल्यासाठीं सांगितलेली गोष्ट पुराव्याप्रमाणें उपयोगीं पडते' असें सांगितलें होतें. भरतखंडांतील भिक्षूंनींहि याच तत्त्वाचा स्वीकार केला होता; आणि पुढें ख्रिस्ती उपदेशकांनीं जसें केलें त्याप्रमाणेंच बौद्ध भिक्षूंनींहि आपल्या कार्यासाठीं निरनिराळ्या तऱ्हेच्या काल्पनिक गोष्टी, अद्भुत कथा व आख्यानें इत्यादिकांचा उपयोग केला. यामुळें जातककथांची कल्पना ख्रिस्ती लोकांस जेस्टा रोमॅनोरम अथवा वेसेलस्किम मॉक्स्लेटैन यावरून करतां येईल. या पुस्तकांतील गोष्टी निरनिराळ्या शतकांतील धर्मोपदेशकांच्या प्रवचनांतून एकत्र केल्या असून त्यांचे विषय फार विविध आहेत व त्यांमध्यें कांहीं पारमार्थिक किंवा आध्यात्मिक तर कांहीं केवळ लौकिक अथवा ऐहिक विषयासंबंधाच्या गोष्टी आहेत. प्राचीन काळच्या बौद्ध थेरांनीं प्रथमतः भिक्षूंनां गोष्टी सांगण्याबद्दल कदाचित् निषेध केला असेल. धर्मशास्त्रामध्यें कित्येक ठिकाणीं भिक्षूंनां राजे, चोर, मंत्री, शस्त्रास्त्रें, युद्ध, स्त्रिया, देव, यक्ष, जलपर्यटन इ० विषयांवर गोष्टी सांगण्याचा स्पष्ट निषेध केलेला आढळतो. तथापि लवकरच या बाबतींत सवलत मिळूं लागली, आणि एका बौद्ध संस्कृत ग्रंथामध्यें आपणांला असें वर्णन आढळतें कीं, बुद्ध सूत्रें, गाथा, आख्यानें व जातकें यांच्या साहाय्यानें उपदेश करीत असे. आणि तो फार सुरस आणि उपदेशपर गोष्टी सांगत असे आणि त्यामुळें लोकांनां पारमार्थिक ज्ञानापासून या जन्मांत सुख मिळून मरणोत्तरहि सुख मिळत असे. प्रथमतः सर्व गोष्टींनां जातकाचें रूप देण्याची आवश्यकता वाटली' नसावी. कारण, आपणांला मधूनमधून कांहीं गोष्टी तशाच आढळतात; उदाहरणार्थ, विनय पिटकांतील दीघावु याच्या गोष्टीमध्यें नायकास बोधिसत्त्वाचें रूप दिलेलें आढळत नाहीं. या गोष्टीपासून बऱ्याच नंतर एक जातककथा निर्माण झाली. तथापि कांहीं वास्तविक जातककथा असून त्या सूत्रसंग्रहामध्यें आढळतात, आणि त्यांवरून बौद्ध भिक्षू मध्यकालीन ख्रिस्ती धर्मोपदेशकांप्रमाणें आपल्या प्रवचनांतून गोष्टींचा उपयोग करीत असत असें दिसतें. जातककथांचा जेव्हां एका ग्रंथामध्यें संग्रह करण्यास प्रारंभ झाला, तेव्हां सर्व जातककथांचा धर्मशास्त्रामध्यें समावेश झाला होता असें नाहीं. आणि या ग्रंथांपैकींहि कांहीं भागासच धर्मशास्त्राची मान्यता मिळाली. ज्या जातककथा पद्यांमध्यें (गाथा) असत, त्यांनां पूर्णपणें संग्रहामध्यें जागा मिळाली. प्राचीन कालीं भारतवर्षामध्यें गद्य व गद्यमिश्रित कथा सांगण्याचा प्रघात फार होता असें दिसून येतें. गोष्टी तरी विशेषतः याच गद्यपद्यमिश्रित पद्धतींत असत. गद्य कथेला कांहीं पद्यें जोडून रसभरीत करण्याची व पद्यांतील भाग गद्यामध्यें स्पष्ट करण्याची चाल फार सार्वत्रिक होती. यक्षयक्षिणींच्या काल्पित कथांमध्यें ग्रिम याच्या ग्रंथामध्यें आढळून येतात त्याप्रमाणें प्रचलित गोष्टी व पद्यें घातलेलीं आढळतात. कल्पित कथा रचणारा एक दोन पद्यांमध्यें तिचें तात्पर्य देत असे. लावण्या व गाणीं रचणारे यांचीं गीतें संवादात्मक पद्यांमध्यें असून ते प्रारंभीं कांहीं प्रास्ताविक गद्य भाग घालीत असत; व मधून मधून गद्यामध्यें कांहीं आवश्यक ठिकाणीं खुलासा देत असत. यामुळें ज्या गोष्टींनां जातकाचें रूप देण्यांत आलें त्या, सर्वच नसल्या तरी बहुतेक, गद्यपद्यमिश्रित असत. परंतु धर्मशास्त्रामध्यें फक्त पद्यांचा म्ह० गाथांचाच समावेश करण्यांत आला, व तेवढ्याच खुद्दकनिकायामध्यें समाविष्ट करण्यांत आल्या. यामुळें धर्मशास्त्रामध्यें जो जातक ग्रंथ आहे, तो फक्त पद्यमय असून त्यामध्यें कांहीं पद्यमय कथा आहेत. परंतु कांहींचा गद्य गोष्टींशिवाय अर्थ लागत नाहीं. अशा ठिकाणीं गद्य भाग घालण्याचें काम उपदेशकावर पडून ते आपल्या इच्छेप्रमाणें वेळेनुसार तो घालीत असत. अखेरीस कांहीं कालानें—धर्मशास्त्रांत अंतर्भूत होणारा भाग निश्चित झाल्यानंतर बऱ्याच कालानें—टीकारूपानें हा गद्य भाग जोडून निश्चित करण्याचें काम सुरू झालें असावें. अशा टीकात्मक ग्रंथामध्यें प्रत्येक जातककथेचे पुढील भाग येतात:—

१ प्रथम प्रास्ताविक गोष्ट असून तिला पच्चुप्पन्नवत्थु (प्रत्युत्पन्नवस्तु—कथाप्रसंग) असें नांव असून, तीमध्यें बुद्धानें ती गोष्ट भिक्षूंनां केव्हां सांगितली त्या प्रसंगाचें वर्णन असतें.

२ नंतर एक गद्य कथा अतीतवत्थु (अतीतवस्तु) असून तीमध्यें ती कथा सांगितलेली असते.

३ तिसऱ्या भागामध्यें गाथा (पद्यें) असून सामान्यतः त्या अतीतवत्थु किंवा क्वचित् पच्चुप्पन्नवत्थुमध्यें मांडतात.

४ चौथ्या भागांत (वेय्याकरण) गाथांनां व्याकरणदृष्ट्या शब्दार्थसूचक टीपा दिलेल्या असतात.

५ पांचव्या भागांत (समोधान) मागील कथेतील पुरुषांशी प्रस्तुत कथेतील व्यक्तींचें साम्य दाखविलेलें असतें.

**जातककथांची रचना व इतिहास.**—या जातक कथांवरील जैतकठ्ठ-कथा नांवाच्या टीकात्मक ग्रंथाचें सिंहली भाषेंत भाषांतर झालें होतें; परंतु तें केव्हां झालें हें निश्चित नाहीं, व मूळांतील गाथा (पद्यें) भाषांतरकर्त्यांनें पालींतच ठेविल्या होत्या. या सिंहली ग्रंथाचें बहुधा ख्रिस्ती शकाच्या पांचव्या शतकामध्यें जातकठ्ठवण्णन (जातकार्थवर्णन) या नांवानें पुनः पाली भाषेमध्यें भाषांतर झालें, आणि हेंच भाषांतर व्ही फॉसबोल या डेन विद्वानानें संपादन केल्यामुळें सर्वांनां माहीत होऊन भाषांतररूपानें त्याचा सर्वत्र प्रसार झालेला आहे.

या जातकठ्ठवण्णन ग्रंथाच्या इतिहासावरूनच असें म्हणतां येईल कीं, जातककथांतील गद्य भाग गाथांइतका जुना नाहीं हें सिद्ध होतें. धर्मशास्त्राच्या प्राचीनत्वाबद्दल जे मुद्दे पुढें आणितां येतात, ते येथें लागू पडत नाहींत. आणि गाथा कांहींहि फरक न होतां मूळापासून पालींतच राहिल्या आहेत, व गद्य भागाचें प्रथम पालींतून सिंहलींमध्यें व पुन्हां सिंहलींतून पालीमध्यें याप्रमाणें दोनदां भाषांतर झालें आहे. हें पहिलें व दुसरें भाषांतर होत असतांना मुळामध्यें पुष्कळ फरक झाले असतील व कांहीं भाग अधिकहि आला असेल; किंवा संग्रहकारानें अथवा या जातककथांच्या एखाद्या संपादकानें सुद्धां यांतील गद्यामध्यें फेरफार करणें अथवा भर घालणें शक्य आहे. पुष्कळ ठिकाणीं गद्यभाग अलीकडील आहे, हें अगदीं उघड दिसतें. त्यामध्यें सिंहलद्वीपाचा उल्लेख आढळतो. गाथा व गद्य यांमध्यें कांहीं ठिकाणीं विरोधहि दृष्टीस पडतो.

गाथांची भाषाहि गद्यापेक्षां वरीच जुनी आहे. याचें कारण गाथांचें भाषांतर व पुनर्भाषांतर झालें नाहीं हें एक होय. प्रत्युत्पन्नवस्तु आणि अतीतवस्तु यांमधील फरक फॉसबोल याच्या आवृत्तीवरून कळून येत नाहीं. ते दोन्हींहि भाग एकाच टीकाकारानें रचल्यासारखे दिसतात. तथापि, या टीकाकारानें जुन्या व चांगल्या सामुग्रीचा उपयोग केलेला असावा. कारण, लहान लहान कल्पित कथा व काल्पनिक अद्भुत गोष्टी यांमधील गद्य भाग उत्कृष्ट साधला आहे. परंतु इतर जातकांमधील —विशेषतः ज्यांमध्यें गद्य भागाची जरूर भासत नाहीं अशा गोष्टींतील—गद्य फारच कमी दर्जाचें, नीरस व कांहीं कांहीं ठिकाणीं गाथांशीं विसंगतहि दिसतें. एकाच टीकाकारानें कांहीं गोष्टी चातुर्यानें व विनोदयुक्त अशा लिहून कांहीं अगदीं नीरस व निर्जीव भाषेंत लिहिल्या आहेत, असें आपणांला म्हणतां येणार नाहीं. तेव्हां आपणांला असें गृहीत धरलें पाहिजे कीं, ज्या गोष्टी चांगल्या वठल्या आहेत तेथें त्याला मूळच्या चांगल्या गोष्टी व परंपरा उपलब्ध असाव्या. याप्रमाणें गद्यांतहि कांहीं जुना भाग राखला गेला असावा.

**ख्रि॰पू॰ तिसऱ्या शतकांत जातककथांचें अस्तित्व.**—आणि वास्तविक गोष्टहि अशीच आहे. कांहीं जातक कथा व त्यांतील गद्य भाग हीं बौद्ध परंपरेमध्यें ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत अस्तित्वांत होती, ही गोष्ट भरहुत आणि सांची येथील स्तूपांसभोंवतीं असलेल्या दगडी भिंतींवरील कोरीव चित्रांवरून सिद्ध होते. ही गोष्ट जातकांच्या इतिहासाच्या दृष्टीनें फार महत्त्वाची आहे. हीं बहुमोल बौद्ध स्मारकें अंकितलेखशास्त्रवेत्त्यांच्या मतें ख्रिस्तपूर्व तिसऱ्या किंवा दुसऱ्या शतकांतील असून, त्यांवर आपणांला जातककथांतील प्रसंग खोदलेले आढळतात. त्यांमध्यें कांहीं प्रसंग केवळ गद्य कथांमध्येंच वर्णन केलेले आहेत. भरहुत येथें तर त्या चित्रांवर जातकांचीं नांवेंहि खोदलेलीं आहेत. या चित्रांवरून एवढें सिद्ध होतें कीं, सध्यांच्या जातक ग्रंथांमध्यें आढळणाऱ्या कांहीं गोष्टी ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या अखेरीच्या कालींहि जातक या नांवानेंच संबोधिल्या जात असून, त्या बोधिसत्त्वाच्या गोष्टी म्हणूनच प्रसिद्ध असत. त्याप्रमाणेंच त्यांवरून असेंहि सिद्ध होतें कीं, त्या वेळीं प्रचलित असलेल्या पुष्कळ लौकिक गोष्टींनां बौद्ध भिक्षूंनीं सांप्रदायिक रूप दिलें होतें. यावरून त्या गोष्टी फार प्राचीन कालापासून प्रचलित असून बुद्धपूर्वकालीन असाव्यात.

**गद्य भागाचें उत्तरकालीनत्व.**—यामुळें कांहीं प्रसिद्ध संशोधकांनीं जातक कथांमध्यें आपणांला बुद्धकालीन अथवा त्याच्या पूर्वीच्याहि कालच्या गद्य वाङ्मयाचें व संस्कृतीचें चित्र दृष्टीस पडतें असें जें गृहीत धरलें आहे, तें कांहीं थोड्या बाबतींत खरें आहे. यांतील कांहीं पद्यें व कांहीं गद्य कथा मात्र इतक्या जुन्या असाव्यात. तथापि कांहीं म्हणी व परंपरागत कथा बुद्धपूर्वकालीन साधूंच्या काव्यांतील असल्या तरी, एकंदर गाथांचा भरणा ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाहून जुना आहे असें म्हणणेंच मुळीं वाजवी होणार नाहीं; मग सिद्ध करणें तर दूरच राहिलें. गद्य भाग बहुतेक ख्रिस्ती शकानंतरचाच आहे असें खात्रीनें म्हणतां येईल.

तथापि जातक ग्रंथांच्या स्वरूपामध्यें जे वेळोवेळीं फरक घडून आले, त्यांत गाथांनां हात लागला नाहीं असें म्हणतां यावयाचें नाहीं. कांहीं ठिकाणीं त्यांच्या क्रमामध्यें फरक झालेला आहे, व कांहीं ठिकाणीं मागाहून भरहि पडली आहे. जातकगाथांचा साकल्यानें विचार केला असतां, त्या सर्व एकट्यानें रचल्या असतील—म्हणजे त्यांचा संग्रह करूनच नव्हे, तर त्यांतील कांहीं स्वतः रचून, कांहींच्या स्वरूपांत बदल करून अथवा कांहींत भर घालून त्या सर्वांवर आपल्या बुद्धिमत्तेचा ठसा कोणीं एकट्यानें उठविला असेल—असें म्हणणें शक्य नाहीं. जातकांतील विषयांच्या विविधतेकडेच केवळ दृष्टि टाकली असतां आपणांला असें आढळून येईल कीं, इतकें विषयवैचित्र्य व इतके विविध महत्त्वाचे भाग एकट्याच्या कल्पनेंतून निघणें अशक्य आहे. या जातकगाथांचा संग्रहकार एक असूं शकेल, परंतु कर्ता

एक असणें शक्य नाहीं. तथापि या संग्रहकारानें, इतर भारतीय संग्रहकारांप्रमाणें मधून मधून नवीन भर घालण्यास अथवा कांहीं भागांची पुन्हां मांडणी करण्यास मागें पुढें पाहिलें नसेल.

यावरून या जातकांची महाभारताप्रमाणेंच अवस्था आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांतील प्रत्येक प्रकरण, प्रत्येक कथा, एवढेंच नव्हे तर कांहीं ठिकाणीं प्रत्येक पद्य घेऊन त्याच्या रचनेचा काल स्वतंत्रपणें निश्चित केला पाहिजे. परंतु जातकट्ठवण्णन या स्वरूपांत आढळून येणारा हा गोष्टींचा संग्रह भरतखंडांतील कल्पित कथा, अद्भुत गोष्टी व इतर परंपरागत कथा यांचा सर्वांत जुना संग्रह आहे, असें जें ठिकठिकाणीं म्हणण्यांत येतें तें खरें दिसत नाहीं.

तथापि,केवळ भारतीय वाङ्मयाच्या इतिहासाच्या दृष्टीनेंच नव्हे तर सर्व जगांतील वाङ्मयाच्या इतिहासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाच्या अशा बौद्ध कथांच्या संग्रहासंबंधानें जेव्हां आपण विचार करूं लागतों, तेव्हां आपणांस सध्यां उपलब्ध असलेल्या जातकट्ठवण्णन या एवढ्या एकाच ग्रंथापासून आरंभ करावा लागतो. यापैकीं प्रत्युत्पन्नवस्तु हा भाग बाजूलाच ठेवावा लागतो. यांतील कथाभाग अतीतवस्तु या भागाप्रमाणेंच असून त्यापैकीं कांहीं भाग केवळ मूर्खपणाचा, गचाळ व मागाहून घातलेला आहे. ज्या ज्या कांहीं यांत चांगल्या गोष्टी आहेत, त्या त्या विनयपिटक, सुत्तनिपात, अपदान इ० ग्रंथांतून व कांहीं इतर टीकाग्रंथांतून घेतल्या आहेत. यापेक्षां मुख्य जातककथा अथवा अतीतवस्तु हा भाग जास्त महत्त्वाचा दिसतो.

जा त क क थां चें स्व रू प.—या संग्रहांतील जातककथा संख्येनें पांचशेंहून अधिक असून त्यांमध्यें गोष्टींचे सर्व प्रकार व स्वरूपें आढळतात. स्वरूपाविषयीं पाहतां आपणांला पांच प्रकार आढळतातः–१ गद्य कथा व मधूनमधून पद्यमय कल्पित कथा, किंवा सुभाषित दिलेलें आढळतें. या कथानकांतील गद्य व पद्य यांचा संयोग फार सुंदर होऊन दोहोंमिळून कथानकास पूर्णता येते. अशा ठिकाणीं जातकट्ठवण्णनाच्या गद्य भागासहि पूर्वीच्या परंपरेचा आधार चांगला होता असें दिसतें. २ (अ) संवादरूपीं आख्यानें व (आ) पद्यरूपी संवाद व कथानक यांचें मिश्रण.: अशा कथानकांतील जातकट्ठवण्णनामध्यें आढळून येणारा गद्य भाग अनवश्यक, नीरस व टीकाकारानें घुसडून दिल्याप्रमाणें व कांहीं ठिकाणीं गाथांच्या अर्थाला विरोधात्मक असा दृष्टीस पडतो. ३ मोठमोठीं कथानकें. हीं प्रथम गद्यांत आरंभ होऊन पुढें पद्यमय वर्णन असलेलीं, अथवा मधून मधून गद्य कथानक असून कांहीं कथानकात्मक व कांहीं संवादरूपीं पद्यें असलेलीं अशीं आढळतात. या ठिकाणीं गद्य भाग अवश्यक असतो; परंतु जातकट्ठवण्णनांतील गद्य मूळच्या गद्याची वास्तविक नक्कल नसून टीकाकारांनीं त्यांत पुष्कळ भर घातली आहे, व त्याचें स्वरूपहि बदलून टाकलें आहे.

जातककथांतील विषय पुढें दिल्याप्रमाणें आहेतः—

(१) कल्पित कथा. या सर्वसामान्य भारतीय कल्पित कथांप्रमाणें नीतिविषयक आहेत. यांपैकीं कांहींचें धोरण वैराग्यपर आहे; आणि त्यांतील फारच थोड्या वास्तविक बौद्ध आहेत. (२) अद्भुत कथा. यांमध्यें कांहीं प्राण्यांच्याहि गोष्टी असून त्यांचें सामान्य स्वरूप यूरोपांत प्रचलित असलेल्या यक्षिणींच्या कथांप्रमाणें आहे, व त्यांत बौद्धसांप्रदायिक असें कांहीं नाहीं. त्यांपैकीं फारच थोड्यांस बौद्धसांप्रदायिक वळण दिलेलें दिसतें, व कांहीं बौद्धांनीं नवीन रचलेल्या दिसतात. (३) लहान लहान कथानकें, विनोदी कथा व प्रहसनें. यांवर बौद्ध संप्रदायाची मुळींच झांक पडलेली दिसत नाहीं. (४) कादंबऱ्या व अद्भुत कथा व कांहीं साहसकथा. यांमध्यें मधून मधून उपकथाहि आढळतात. या कथांतील नायक बोधिसत्त्व आहे. याखेरीज बौद्धसांप्रदायिक असें कांहीं एक त्यांत आढळत नाहीं. (५) नीतिकथा. (६) म्हणी व सुभाषितें. (७) आध्यात्मिक कथा. या सर्व कथांतील कांहीं अंशालाच बौद्धसांप्रदायिक म्हणतां येईल; बाकीचा बहुतेक भाग सर्वसामान्य भारतीय वैराग्यपर काव्यांतून घेतलेला आढळतो. टीका सोडून दिली तर जातककथांतील अर्ध्यापेक्षां अधिक भाग बौद्धांनीं न रचलेला आहे असें म्हटल्यास चूक होणार नाहीं. या गोष्टीचें कारण उघडच आहे.

बौद्ध भिक्षूंमध्यें सर्व वर्गांचे लोक येत असत. त्यामुळें त्यांच्यामध्यें निरनिराळ्या प्रकारचे लोक असून कांहींनां मजूर, कारागीर, वाणी, उदमी वगैरे प्रकारच्या लोकांत प्रचलित असलेल्या गोष्टी माहीत असत; कांहींनां वीर पुरुषांचे पोवाडे व लावण्या येत असत; व कांहींनीं आध्यात्मिक कथा व ब्राह्मण आणि ऋषी यांच्याबद्दलच्या अद्भुत कथा ऐकिलेल्या असत. जेव्हां ते भिक्षू होत असत, तेव्हां ते या गोष्टींचा आध्यात्मिक परंपरांशीं व भिक्षूंच्या कथांशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न करीत असत; आणि याच गोष्टीमुळें भारतीय वाङ्मयाच्या इतिहासामध्यें या जातककथांचें महत्त्व फार आहे. बौद्ध भिक्षूंनीं व उपदेशकांनीं त्यांनां स्व...ला त्यांच्या प्रोत्यांस जें जें आवडलें तें तें या जातकांमध्यें एखाद्या मोठ्या पोत्यांत पुष्कळ वस्तू भराव्या त्याप्रमाणें कोंबून ठेविलें आहे. याच कारणामुळें विषय व स्वरूप यांप्रमाणेंच जातकांचा विस्तारहि फार विचित्र आहे. यांमध्यें ज्यांचें छापलें अर्धेंहि पृष्ठ होणार नाहीं अशा लहान लहान गोष्टींशेजारींच लांब लांब स्वतंत्र ग्रंथ होतील एवढ्या मोठ्या कथा दिलेल्या आहेत.

क ल्पि त क था.— पहिल्या प्रकरणामध्यें लहान लहान जातकें असून त्यांत कल्पित कथा आहेत. त्यांमध्यें आपणांला, पवित्र तापसाचें ढोंग करून उंदीर खाणाऱ्या ढोंगी मांजराची गोष्ट आढळते. तशा तंत्राख्यायिक, पंचतंत्र व हितोपदेश या गोष्टींच्या पुस्तकांमध्यें आढळून येणाऱ्या पुष्कळ कल्पित कथा आढळतात. त्याप्रमाणेंच पौरस्त्य व पाश्चात्त्य

देशांमध्यें सारख्याच प्रचलित असल्यामुळें ज्यांचें मूलस्थान शोधून काढणें कठिण आहे अशाहि अनेक कल्पित कथा या ठिकाणीं आपणांला दिसून येतात. कोणी सिंह आणि बैल हे मित्र असून कोल्ह्यानें त्यांच्यामध्यें वैमनस्य आणिल्यानें त्यांनीं एकमेकांस ठार मारिलें, ही गोष्ट जातक नं ३४९ यांत सांगितली असून ती तंत्राख्यायिक या ग्रंथांतील पहिल्या भागांत सांगितलेल्या गोष्टीप्रमाणेंच आहे. तंत्राख्यायिकांतील चवथ्या भागांत सांगितलेली माकडानें सुसरीस फसविल्या-बद्दलची गोष्ट जातकांमध्यें अनेक ठिकाणीं निरनिराळ्या प्रकारांनीं सांगितली आहे. जातक नंबर १८९ या गोष्टींतील गाढवानें इसापनीतींतल्याप्रमाणें सिंहाचें कातडें पांघरलें होतें असें सांगितलें आहे. तंत्राख्यायिकांतील गोष्टींत त्याच ठिकाणीं चित्त्याचें कातडें, व पंचतंत्र आणि हितोपदेश यांमध्यें वाघाचें कातडें दिलें आहे. दुसऱ्या प्रसिद्ध कल्पित कथा म्हटल्या म्हणजे कोल्ह्यानें कोंवळ्याच्या आवाजाची स्तुति करून भक्ष्य मिळविल्याची गोष्ट; एका बैलाला डुकरास चांगलें अन्न खावयास मिळतें म्हणून प्रथम त्याचा हेवा वाटतो, परंतु त्या डुकराला केवळ कापण्याकरितां पोशीत आहेत हें त्याला मागाहून कळून येतें ही गोष्ट; एका बगळ्यानें एका सुंदर तलावांत घेऊन जातों म्हणून थाप मारून माशांस एकीकडे नेऊन खाऊन टाकिलें, परंतु शेवटीं खेकड्यानें त्याचा प्राण घेऊन त्याला प्रायश्चित दिलें ही गोष्ट; एका स्वेच्छाचारी स्त्रियेच्या वर्तणुकीवर नजर ठेवण्याकरितां ठेविलेला पक्षी आपल्या अविचारामुळें प्राणास मुकतो ही गोष्ट; त्याप्रमाणेंच एका नाचणाऱ्या मोरानें आपल्या उद्धट वर्तनामुळें आपली निश्चित वधू पक्षिराजाची कन्या गमावली, इत्यादि गोष्टी आढळतात. ही शेवटची गोष्ट ज्या अर्थी ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकामध्यें भरहुत येथील स्तूपावर खोदलेली आढळते, त्या अर्थी ती त्या वेळीं जातकांमध्यें असली पाहिजे. याच स्तूपावर जातक नं ३८३ यामध्यें असलेल्या गोष्टीचें चित्र खोदलें आहे. या गोष्टींत चार पद्यांमध्यें एका मांजरानें एका कोंबड्याला त्याची बायको होण्याचें मिष दाखवून त्याला आपल्या आटोक्यांत आणण्याचा प्रयत्न चालविला आहे, परंतु त्या कोंबड्यानें तिचें कपट ओळखून तिला हांकून दिलें आहे. यावरून तीन पद्यांमध्यें बौद्धांचें तत्त्व सांगितलें आहे. त्या मांजरी-प्रमाणेंच कपटी स्त्रिया पुरुषांनां नादीं लावण्याच्या वेळीं वर्तन करतात, परंतु जसें त्या कोंबड्यानें त्या मांजराचें कांहीं चालूं दिलें नाहीं, तसेंच साधू पुरुष त्यांनां फसत नाहींत. निव्वळ बौद्धांनीं रचलेल्या कल्पित कथांपैकीं नं. २७८ ही एक आहे. हींत बोधिसत्त्व रेड्याच्या जन्मास गेला असून त्या जन्मां-तहि त्यानें अतिशय शांति दाखविली आहे. एक चेष्टेखोर माकड त्याच्या पाठीवर बसून त्याच्या फार खोड्या करतें, त्याचीं शिंगें धरतें व नाना तऱ्हेच्या चेष्टा करतें. तेंच माकड नंतर दुसऱ्या रेड्याजवळ चेष्टा करूं लागलें असतां तो त्याचा प्राण घेतो. अशा रीतीनें—टीकेंतील गद्यांत म्हटल्याप्रमाणें-बोधिसत्त्वाची शांति कायम राहते, परंतु त्या माकडास शिक्षा मिळते.

प्राणिकथा.—या जातक ग्रंथामध्यें आढळणाऱ्या प्राणि-विषयक गोष्टीहि कल्पित कथांप्रमाणेंच असून त्यांमध्यें कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. सब्बदाठ (सर्वदंत) या कोल्ह्याच्या गोष्टीमध्यें थोडा सुरस विनोद आढळतो. त्याला सर्व चतु-ष्पाद जनावरांनां अंकित करण्याचा मंत्र चुकून ऐकावयास सांपडून तो त्याचा उपयोग करतो. तो गर्वानें बनारसच्या राजाशीं युद्ध करण्याचा निश्चय करतो. एका सिंहाला दोन हत्तींच्या पाठीवर उभें करून त्याच्या पाठीवर एका कोल्हीला राणी करून तिच्यासह आपण बसून मोठ्या दिमाखानें तो बनारसवर चाल करून जातो; आणि मोठ्या आढ्यतेनें त्या राजाला राज्य स्वाधीन करण्याबद्दल निरोप पाठवितो. सर्व लोक भयभीत होतात, परंतु राजाच्या उपाध्यायांच्या युक्ती-मुळें (हा उपाध्याय बोधिसत्त्वच असतो) त्या कोल्ह्याच्या सर्व पशुसैन्याचा नाश होतो. नंतर बोधिसत्त्व त्या लोकांनां वेशीच्या बाहेर त्या पशूंचें मांस घेऊन जाण्याकरितां बोला-वितो. (हें त्याचें बोलावणें बौद्धांच्या तत्त्वाच्या अगदीं विरुद्ध दिसतें.) तेव्हां लोकांच्या झुंडीच्या झुंडी बाहेर येऊन तें मांस घेऊन जातात; व जें त्यांनां खातां आलें नाहीं तें वाळवून ठेवितात. याप्रमाणें त्या जातक कथेमध्यें शेवटीं सांगितलें आहे कीं, मांस वाळविण्याची चाल या वेळेपासूनच पडली.

तथापि निव्वळ प्राण्यांच्या गोष्टींपेक्षां मनुष्यें व प्राणी यांच्या मिश्र गोष्टी जास्त आहेत, व त्यांमध्यें मनुष्यापेक्षां प्राण्यांचेच स्वभाव जास्त चांगले दाखविलेले आहेत. उदाहर-णार्थ, एका प्रसिद्ध विद्वानाकडून वेदांचें अध्ययन करविलेल्या शहाण्या तित्तिराची गोष्ट घ्या. त्याकडे पुष्कळ तरुण शिकण्या-करितां येतात. त्यांत वाघ, सिंह इत्यादि त्याचे मित्र असतात. त्यांनां राहण्यास सोन्याचा पिंजरा असून त्यावर एक सरडा राखण करतो. एके दिवशीं एक दुष्ट बैरागी, जो पूर्व आयुष्या-मध्यें द्वारपाल, फेरीवाला, गारुडी, पारधी, दांडपट्टेवाला, फांसेपारधी, व्यापारी, जुगारी व मांगाचा हस्तक अशा प्रका-रचे धंदे करणारा होता, तो त्या सरड्यास व तित्तिरास ठार मारतो; परंतु लागलीच वाघ त्याला मारून प्रायश्चित देतो. अशा तऱ्हेच्या काल्पनिक गोष्टी सर्व जगांतील वाङ्मयांमध्यें पसरल्या असून त्यांमध्यें मनुष्याची कृतघ्नता व इतर प्राण्यांची कृतज्ञता दृष्टीस पडते.

अशा तऱ्हेच्या गोष्टी या संग्रहांमध्यें फार आहेत. त्यांपैकीं नंबर ७३ ही फार सुंदर आहे. एकदां एका राजाला एक दुष्ट पुत्र होता. त्याचें नांव कितवराज असें होतें. तो विषारी सर्पाप्रमाणें होता. तो कोणाजवळहि चांगलें बोलत नसल्यामुळें तो सर्वांच्या मनांत सलत असे. एकदां वादळ सुटलें असतां त्याला पोहण्याची इच्छा झाली. तेव्हां लोकांनीं तो बुडून जावा म्हणून त्याला नदीवर आणिलें. परंतु तो एक सर्प, उंदीर व पोपट यांच्यासह त्या प्रवाहांतून

बचावून एका झाडाच्या खोडावर बसतो. त्या चौघांनांहि एक साधु बाहेर काढून आपल्या घरीं नेतो. त्यांपैकीं प्राणी अशक्त असल्यामुळें तो साधु प्रथम त्यांची शुश्रूषा करून नंतर राजपुत्राकडे वळतो; परंतु या गोष्टीचा राजपुत्राला फार राग येतो. ते तीनहि प्राणी त्या साधूचे उपकार फेडण्याचें वचन देतात. राजपुत्रहि तसेंच वचन देतो, परंतु मनांत मात्र त्या साधूचा सूड घेण्याचा विचार करतो. कांहीं दिवसांनीं त्या चौघांचीहि परीक्षा करावी असें त्या साधूच्या मनांत येतें. तेव्हां ते तीनहि प्राणी आपलें वचन पूर्ण करतात; परंतु राजपुत्र मध्यंतरीं राजा झाल्यामुळें तो त्या साधूला ओळखतांच त्याला चाबूक मारण्यास हुकूम करतो, व नंतर फांशीं देण्यास फर्मावतो. तो साधु चाबकाच्या प्रत्येक फटक्याबरोबर पुढील शब्द उच्चारतो: "पुष्कळ मनुष्यांपेक्षां पाण्यानें वाहून आलेला लाकडाचा ठोकळा अधिक चांगला असतो ही म्हण अगदीं बरोबर आहे." लोकांनीं त्याला तूं असें कां म्हणतोस म्हणून विचारल्यावरून तो सर्व हकीकत सांगतो. तेव्हां जमलेले सर्व लोक त्या दुष्ट राजाला पकडून ठार मारतात; व त्याच्या जागीं त्या साधूला राजा नेमतात.

पुढील कृतघ्न बायकोची गोष्टहि सर्वत्र प्रचारांत आढळते. एका मनुष्यानें स्वतःचें रक्त प्यावयास देऊन आपल्या बायकोचा जीव वांचविला होता. परंतु तिचें एका कुबड्यावर मन बसतें, व सर्वस्वीं त्याच्या स्वाधीन होण्याकरितां ती आपल्या नवऱ्यास कड्यावरून खालीं ढकलून देते. तथापि एक सरडा त्याचा जीव वांचवितो, व तो मनुष्य पुढें कांहीं चमत्कारामुळें राजा होतो. तेव्हां त्याची आणि त्याच्या कपटी स्त्रियेची व तिच्या कुबड्याची गांठ पडून तो त्यांनां शिक्षा करतो. हीच गोष्ट थोड्या फार फरकानें दशकुमारचरित्रांत 'किं क्रूरं स्त्रीहृदयं' या वचनाच्या स्पष्टीकरणार्थ आणली आहे.

एका मंत्रामुळें सर्व पशूंची भाषा अवगत झालेल्या राजाची गोष्टहि बरीच सार्वत्रिक झाली आहे. या राजाला तो मंत्र कोणालाहि सांगावयाचा नव्हता; कारण त्यामुळें त्याला मरण आलें असतें. एके दिवशीं त्याला मुंग्या आणि डांस यांच्यामधील गमतीच्या संवादामुळें हंसूं आलें. राणीनें त्याला हंसण्याचें कारण विचारलें, व तो मंत्र सांगण्याविषयीं विनवणी केली. त्या राजानें मंत्र सांगितला असतां आपणास मृत्यु येईल असें सांगितलें तरी तिचा हट्ट थांबेना. तेव्हां तो राजा तिच्या चोंकसपणास बळी पडणार, इतक्यांत देवांचा राजा शक्र हा बोकडाच्या रूपानें तेथें आला; आणि त्यानें त्या राजास आपल्या राणीस खूप चोपून काढण्यास सांगितलें. त्या राजानें त्याच्या सांगण्याप्रमाणें केलें, तेव्हां राणीनें आपला हट्ट सोडला.

पुढें दिलेल्या तीन भावांच्या गोष्टीवरून जर्मन वाचकांस जर्मन भाषेंतील "टेबला, तूं पूर्ण हो" या नांवाच्या व इतर कल्पित कथांची आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं, असें विंटरनिट्झनें म्हटलें आहे. या तीन भावांपैकीं पहिल्याजवळ एक कुऱ्हाड असून तिच्या स्पर्शाबरोबर सर्पण तयार होत असे; दुसऱ्याजवळ एक ढोलकें असून त्यामुळें तो सर्व शत्रूंनां जिंकीत असे; तिसऱ्याजवळ एक चरवी असून ती ओतल्याबरोबर दुधाचा प्रवाह निघत असे. अशा तऱ्हेचीच दुसरी एका तरुणाची गोष्ट आहे. त्यानें आपली सर्व दौलत उधळून टाकली होती. त्याच्या मृत पित्यास पुढील जन्मीं इंद्रपद मिळाल्यामुळें त्यानें त्यास एक भांडें दिलें. त्यांतून त्याला पाहिजे तें मिळत असे. परंतु तें देतांना त्यानें त्याला असें बजाविलें कीं, या भांड्याचें तूं चांगलें जतन कर; कारण जोंपर्यंत हें भांडें आहे तोंपर्यंतच तुला विपुल द्रव्य मिळेल. एके दिवशीं मद्याच्या धुंदीमध्यें तो मुलगा तें भांडें वर फेंकून झेलूं लागला. असें करतां करतां तें जमिनीवर पडून फुटून गेलें. तेव्हांपासून त्याच्या वैभवास उतरती कळा लागली; व पुढें त्याला इतकी गरिबी आली कीं, तो अखेरीस भिकाऱ्याप्रमाणें चिंध्या पांघरलेला असा एका भिंतीशीं टेंकून बसला असतां मरण पावला.

जरी पुष्कळ कल्पित कथा भरतखंडांतून पाश्चात्य देशांत गेल्या, तरी इतर देशांतूनहि कांहीं गोष्टी हिंदुस्थानामध्यें आल्या असल्या पाहिजेत असें विंटरनिट्झ म्हणतो. पुढें दिलेली गोष्ट, विशेषतः खलाशांच्या गोष्टीमध्यें जीं गलबतें फुटल्याचीं व इतर दर्यावरील साहसांचीं वर्णनें आहेत त्यांमध्यें आढळून येते. फुटलेल्या गलबतांतील खलाशांस यक्षिणी प्रथम फुसलावून नेऊन आरंभीं त्यांच्यावर प्रेम करतात, व अखेरीस त्यांनां मारून खातात. या गोष्टीवरून यूरोपीय वाचकांस सायरेन या जलदेवतांची व सर्से आणि कॅलिप्सो यांच्यासारख्या प्राण्यांची आठवण होते.

मित्तविंदक जातकामध्यें काल्पनिक कथा व नीतिकथा यांचें मिश्रण आढळतें. या गोष्टींत नायक दर्यावरील अनेक साहसांतून पार पडतो. तो महासागरांतील बेटामध्यें असणाऱ्या भव्य प्रासादांत यक्षिणींशीं विलास करतो; व शेवटीं, एका ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें त्याच्या अतिलोभामुळें, किंवा दुसऱ्या ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें आपल्या आईला त्रास दिल्यामुळें तो नरकांत जातो. तेथें तीक्ष्णधारी असलेलें एक चक्र त्याच्या डोक्यावर सतत भ्रमण करीत रहातें.

त्याप्रमाणेंच नरमांसभक्षक लोकांच्या काल्पनिक कथांमध्यें प्रचलित काल्पनिक कथांप्रमाणेंच नैतिक कथांचेंहि स्वरूप आढळतें. या नरमांसभक्षक लोकांच्या काल्पनिक कथांमध्यें शिवलीलामृतांत उल्लेखिलेल्या कल्माषपाद राजाचा संबंध येतो. ब्राह्मणी कथांमध्यें हा कल्माषपाद शापामुळें राक्षस झाला होता असें वर्णन

आढळतें. परंतु पुढें दिलेल्या प्रसंगामध्यें या बौद्ध कथेंतील रहस्याची परमावधि झालेली दिसते. तो प्रसंग असा: सुतसोम ह्या नांवाचा एक सात्विक राजा त्या राक्षसाच्या तडाख्यांत सांपडतो; परंतु एका ब्राह्मणास दिलेलें वचन पुरें करण्याकरितां तो राक्षस त्यास जाऊं देतो. तो राजा आपल्या वचनाप्रमाणें त्या राक्षसाकडे पुन्हां परत येतो. ही त्या राजाची सत्याबद्दलची प्रीति पाहून त्या राक्षसाच्या अंतःकरणास चटका बसतो व तो बौद्ध होतो.

या कल्पित कथांमध्यें नाग, गरुड, यक्ष, किन्नर वगैरे सर्व आढळतात. कांहीं जातकांतून बऱ्याच मोठाल्या कल्पित कथा आहेत. जातक नं. ५०४ यामध्यें एका किन्नर मिथुनानें त्यांचा एक रात्र वियोग झाल्यामुळें शोक केल्याचें वर्णन आहे. नं. ४८५ मध्यें अशी गोष्ट आहे कीं, एका किन्नर स्त्रीचा पति एका राजानें बाणानें मारिल्यामुळें तिनें इतका शोक केला कीं, तिला अमृताची प्राप्ति होऊन तिनें आपल्या पतीस उठविलें. या दोन गोष्टी भावपूर्ण व नाट्यमय अशा काल्पनिक कथा असून त्यांमध्यें भावाचा परिपोष चांगला झालेला दिसतो. या गद्य व गद्यमिश्रित पद्य काल्पनिक कथांमध्यें जातक नं. ४३२ ही बरीच मोठी गोष्ट आहे. या गोष्टींत बोधिसत्त्व एका अश्वमुखी नरभक्षक यक्षिणीच्या पोटीं जन्मास आल्याची कथा आहे. जातक नं. ५४३ याचीं आठ प्रकरणें असल्यामुळें त्याला एक स्वतंत्र ग्रंथच म्हणतां येईल. ही एक गद्यपद्यमिश्रित लांबलचक गोष्ट आहे. तीमध्यें नाग लोक व गरुड लोक यांचें वर्णन असून, त्यामध्यें प्रचलित काल्पनिक कथांतील अनेक प्रसंगांचें व बौद्धसांप्रदायिक तत्त्वांचें मिश्रण केलेलें आहे. विधुरपंडित जातक हें सहा खंडांचें एक महाकाव्यच आहे. त्यामध्यें कुरु राजाचा मंत्री विधुर याचें चरित्र आहे. या विधुराचा जातकामध्यें अनेक ठिकाणीं संबंध आलेला आहे. हा विधुर हा दुसरा कोणी नसून महाभारतामध्यें वर्णन केलेल्या धृतराष्ट्राचा सावत्र भाऊ व त्याला चांगली सल्ला देणारा विदुरच होय. त्याला अनेक कल्पित कथा, दृष्टांत व सुभाषितें माहीत होतीं असें म्हटलें आहे. या नांवाच्या उल्लेखावरून व या जातकामध्यें केलेल्या अक्षक्रीडेच्या हुबेहूब वर्णनावरून, या जातकाचा महाभारताशीं कांहीं तरी संबंध असावा असें वाटतें, व या दृष्टीनें हें जातक विशेष महत्त्वाचें आहे. त्याप्रमाणेंच काल्पनिक कथा व काव्य या दृष्टीनेंहि त्याचें अंगभूत महत्त्व कमी नाहीं.

विनोदपरकथा.—आतांपर्यंत वर्णन केलेल्या कल्पित कथा व अद्भुत कथा, व यांपेक्षांहि या जातक ग्रंथांत आढळणारीं अनेक लहान लहान व अनेक प्रसंगीं गमतीचीं अशीं कथानकें यांचा बौद्ध संप्रदायाशीं मूळचा कांहीं एक संबंध दिसत नाहीं. ज्याप्रमाणें सध्यां आपणांला मूर्खपणाच्या चेष्टांचें हंसूं येतें, त्याप्रमाणें पूर्वीच्या लोकांनाहि मूर्खपणाच्या गोष्टींचें हंसूं येत असे. हें पुढें दिलेल्या गोष्टींवरून दिसून येईल. एका मुलानें आपल्या निजलेल्या बापाच्या डोक्यावरील डांसास मारण्याकरितां इतक्या जोरानें प्रहार केला कीं, त्याच्या बापाचें डोकें फुटून गेलें. अशा प्रकारची एक माकडाची गोष्ट थोड्या फार फरकानें पंचतंत्रांतहि आली आहे. तसेंच कांहीं माकडांनां झाडांस पाणी घालावयास सांगितल्यावरून त्यांनीं प्रत्येक झाड उपटून, पाहून कोणत्या झाडास पाणी कमी लागतें व कोणत्यास जास्त लागतें तें ठरविलें. या गोष्टींतील मूर्खपणाचें काम पुरोहित व भिक्षू यांच्याकडेहि दिल्याचे प्रसंग थोडे नाहींत. उदाहरणार्थ पुढील गोष्ट पहा. दोन एडक्यांची टक्कर चालली आहे इतक्यांत एक ब्राह्मण भिक्षु भिक्षा मागण्याकरितां येतो. त्यांपैकीं एका एडक्यास मागें उडी मारतांना पाहून त्याची अशी कल्पना होते कीं, त्या एडक्याला कसें वागावें हें चांगलें समजतें; व तो आपणांला मान देण्याकरितांच मागें सरला. त्याला एका वाण्यानें सांगितलें कीं, तो फक्त पुन्हां टक्कर मारण्याकरितां मागें जात आहे. इतक्यांत तो एडका हि धांवत धांवत पुढें येतो, व त्या भिक्षूला धडक मारून खालीं पाडतो. तेव्हां तो मोठ्यानें धांवा धांवा, एक साधु मरत आहे असें ओरडतो. महापिंगल या दुष्ट राजाच्या गोष्टींतहि थोडासा शोकरसपूर्ण विनोद आहे (नं. २४०). हा राजा फार दुष्ट होता. तो जेव्हां मरण पावला तेव्हां सर्व बनारस शहराला आनंद झाला, परंतु एक द्वारपाल मात्र शोक करूं लागला. बोधिसत्त्वानें त्याला शोकाचें कारण विचारिलें असतां तो उत्तर करतो: 'मला महापिंगल मेला म्हणून दुःख होत नाहीं; कारण तो राजवाड्यांतून खालीं येतांना व वर जातांना प्रत्येक वेळीं मला घणाप्रमाणें डोक्यावर आठ तडाखे मारीत असे. पण मला अशी भीति वाटते कीं, तो यमलोकीं गेल्यावर तेथें यमालाहि असेंच करील, आणि त्याला यम पुन्हां पृथ्वीवर धाडील. मग मला पुन्हां पहिल्यासारखे तडाखे मिळूं लागतील, म्हणून मी रडत आहें.' बोधिसत्त्वानें त्याचें शांतवन करून म्हटलें कीं, मेलेला मनुष्य परत येणार नाहीं. त्याला पार जाळून टाकिलें आहे. त्याची चिता विझवून टाकिली आहे, व भोंवतालची जमीनहि साफ केली आहे.

पुढील गोष्टींत व्याजोक्तीचा चांगला मासला पहावयास सांपडतो. एक माकड कांहीं कालपर्यंत एका राजाजवळ असून पुढें तें त्यानें सोडून दिलें. तें आपल्या सोबत्यांत गेलें तेव्हां त्यांनीं त्याला विचारिलें: 'तूं मनुष्यें कशीं वागतात हें इतके दिवस पाहिलें असशील; तेव्हां त्याचें वर्णन करून आम्हांला सांग.' नंतर तें माकड पुढील अर्थाच्या दोन पद्यांमध्यें मनुष्याच्या चरित्राचें वर्णन करतें.

'मनुष्यें रात्रंदिवस सोनें माझें, जिंदगी माझी, असें ओरडत असतात. मनुष्यांनां त्यांच्या वेडामध्यें सत्य काय तें कळत नाहीं. प्रत्येक घरांत दोन धनी असतात. त्यांपैकीं एकाला दाढी नसते, परंतु लोंबणारे स्तन व लांब वेणी असून

कानांत मोठालीं सुंकलीं असतात. त्याला पुष्कळ द्रव्य देऊन विकत घेतात, तरी तो सर्वांना त्रास देतो.' '

हें ऐकून तीं सर्व माकडें पुढें कांहीं एक ऐकण्याची इच्छा न करतां कानांवर हात ठेवून पळून जातात ( जातक नं. २१९ ).

ग्री क वा ङ्म यां त आ ढ ळ णा री गो ष्ट.—पुढील गोष्ट, तिचा ग्रीक वाङ्मयाशीं संबंध असल्यामुळें महत्त्वाची आहे. एका स्त्रीचा नवरा, पुत्र व भाऊ अशा तिघांना फांशीं द्यावयाचें होतें. राजानें त्यांपैकीं एकाचा जीव तिला माफ केला. तेव्हां तिनें आपल्या भावाची निवड केली. याचें कारण तिनें असें दिलें कीं, तिला दुसरा नवरा सहज करतां येईल, किंवा त्याप्रमाणेंच तिला पुत्रहि होऊं शकेल; परंतु भाऊ कुव्हांहि मिळणार नाहीं. हीच गोष्ट हिरोडोटस यानें इंटाफरनीझ याच्या बायकोविषयीं सांगितली आहे; आणि तेथेंहि साफोक्लीझ या राजाला ॲंटिगोनी हिनें असेंच उत्तर दिलें आहे. हीच कल्पना रामायणामध्यें ' सख्या भावापेक्षां जगांतील दुसरी कोणतीहि वस्तु सहज मिळूं शकते' असें जें एक जुनें सुभाषित आलें आहे त्यामध्येंहि आढळून येते. यावरून ही गोष्ट हिंदुस्थान व ग्रीस या दोन्हीं देशांमध्यें फार प्राचीन कालापासून चालत आली असावी असें दिसतें. परंतु तिजमध्यें भारतीय अथवा ग्रीक असें विशेष कांहीं नसल्यामुळें ती मूळ कोठून निघाली हें निश्चित करणें कठिण आहे. तथापि ती दोन ठिकाणीं स्वतंत्र रीतीनें उत्पन्न झाली नसावी हें निश्चित आहे, असें बिचाऱ्या विंटरनिट्झला वाटतें !

चा तु र्या च्या गो ष्टी.—लोकांना मूर्खांच्या नकलांप्रमाणेंच आवडणाऱ्या व त्यांच्याप्रमाणें सर्व देशांच्या वाङ्मयांमध्यें आढळून येणाऱ्या ज्या चातुर्याच्या गोष्टी असतात, त्यांच्या वर्गांत या वरील गोष्टी मोडतात. या चातुर्यकथांध्यें अतिशय बुद्धिमत्ता व कौशल्य दर्शविणाऱ्या गोष्टी व प्रश्नोत्तरें—विशेषतः कोडीं व त्यांचीं उत्तरें—कांहीं कठिण कूटांचीं चातुर्यदर्शक उत्तरें, कांहीं शहाणपणाचे निवाडे, अथवा कांहीं आश्चर्यकारक कलाकौशल्याचीं कामें इ० प्रकार आढळतात. अशा प्रकारच्या अनेक गोष्टी जातक कथांमध्यें आढळून येतात, व त्यांपैकीं पुष्कळ सार्वदेशीय वाङ्मयामध्यें दिसतात. अशा तऱ्हेची सॉलोमनप्रमाणें शहाणपणाचे निवाडे देणाऱ्या एका न्यायाधीशाची गोष्ट आहे. ती अशी: एका मनुष्याकडून चुकून एका घोड्याचा पाय मोडला, व तसाच एका गरोदर स्त्रीचा गर्भपातहि झाला. अशाच आणखीहि कांहीं गोष्टी त्या मनुष्याच्या हातून त्याचा कोणत्याहि प्रकारें वाईट हेतु नसतां घडल्या होत्या. अशा स्थितींत त्या न्यायाधिशानें एकंदर वस्तुस्थिति लक्षांत घेऊन त्या इसमास निर्दोष ठरवून सोडून दिलें. त्याचप्रमाणें त्यानें त्याला अनेक प्राणी व मनुष्यें यांनीं विचारलेल्या कित्येक कोड्यांचीं समर्पक उत्तरेंहि दिलीं.

एका हरकामी कारागिराबद्दल कुसजातक ( नं० ५३१ ) यामध्यें एक गोष्ट सांगितली आहे. कुस हा ओक्काक राजाचा पुत्र असून अतिशय हुशार व शहाणा परंतु तितकाच कुरूप होता. त्याला लग्न करण्याची इच्छा झाली असतां त्यानें एक सोन्याची स्त्रीची प्रतिमा करून सांगितलें कीं, या सुवर्णप्रतिमेप्रमाणें जी सुंदर असेल तिच्यांशीं मी लग्न करीन. ती प्रतिमा गांवोगांव पाठविण्यांत आली, व अखेरीस मद्द देशाच्या राजाची कन्या प्रभावती ही त्या प्रतिमेप्रमाणें सुंदर असल्याचें आढळून येऊन तिचें कुस याजबरोबर लग्न लागलें. तो राजपुत्र कुरूप असल्यामुळें त्याच्या आईनें लग्नसमयीं अशी अट घातली कीं, प्रथम गर्भधारणेपर्यंत त्या जोडप्याची भेट फक्त रात्रींच व्हावी. परंतु त्यांना एकमेकांस पाहण्याची जिज्ञासा आवरून धरितां न आल्यामुळें त्यांनीं अनेक युक्त्या योजून सरते शेवटीं एकमेकांस अवलोकन केलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्या राजकन्येला असला कुरूप नवरा न आवडून ती आपल्या पित्याकडे रहावयास गेली. इकडे कुस याला आपल्या पत्नीचा ध्यास लागून त्यानें तिला कसेंहि करून परत आणण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें तो ती राजकन्या जेथें रहात होती त्या सागल गांवीं गेला, व तेथें त्यानें तेथील राजाची मर्जी संपादन करण्याचा प्रयत्न चालविला. प्रथम त्यानें एका सारंगीवर सुंदर पद्यें वाजविण्याचें काम केलें; नंतर कुंभार होऊन कांहीं अत्युत्तम चित्रें तयार केलीं; पुढें बुरूड होऊन कांहीं बहुमोल पंखे विणले; पुन्हां माळी होऊन एक सुंदर हार तयार केला; व शेवटीं आचारी होऊन त्यानें एक असा पदार्थ तयार केला कीं, त्याचा घमघमाट सर्व शहरांत पसरला. त्यानें प्रत्येक वेळीं राजकन्येची गांठ घेतली, परंतु तिनें त्याचा तिरस्कार करून प्रत्येक वेळीं त्याला धुडकावून लाविलें. नंतर सक्क ( इंद्र ) यानें सात राजांना प्रभावतीला मागणी घालण्याकरितां पाठविलें. तेव्हां राजाला काळजी पडली कीं, जर त्यानें त्यांपैकीं एकाला आपली मुलगी दिली, तर बाकीचे सर्व त्याच्या विरुद्ध उठतील. त्यानें आपल्या मुलीस सांगितलें कीं, मी आतां तुझे सात तुकडे करून एक एक त्या राजांस वांटून देतों. हें ऐकतांच राजकन्येची पांचावर धारण बसून ती राजवाड्यांत आचारी म्हणून राहिलेल्या कुस राजपुत्राकडे गेली, व तेथेंच त्या स्वयंपाक घरामध्यें तिनें त्याला साष्टांग नमस्कार घातला. कुस हा इतका वेळ जो कारागीर म्हणून होता, तो आतां एकदम योद्धा बनला, व त्यानें त्या सर्वांचा पराजय करून त्यांस कैद केलें. परंतु कुस हा जसा बुद्धिमान् होता, तसाच दयाळूहि होता. त्यानें त्या राजाच्या दुसऱ्या सात कुमारिका होत्या, त्यांबरोबर त्या सात राजांचीं लग्नें लावून दिलीं, आणि आपण स्वतः प्रभावतीस घेऊन परत आपल्या शहरीं गेला. प्रस्तुत कथेवरून व नलदमयंती आख्यानावरून स्पष्ट-

पतिकांचे पुनर्विवाह राजघराण्यांतहि होत असत अशी कल्पना होते.”

दुसऱ्या एका लहान गोष्टीमध्यें बोधिसत्व लोहाराच्या जन्मांत असल्याचें वर्णन आहे. तेथें असतांना त्यानें अतिशय कुशलतेनें सूक्ष्म डबांत गासलेल्या अशा कांहीं सुया तयार केल्या कीं, इतर लोहारांनां त्या डब्याच सुयांसारख्या वाटल्या. या आपल्या कौशल्यानें त्यानें एका लोहाराचा मुलगी आपणास बायको मिळविली.

म हा उ म्म ग जा त क.—महाउम्मगजातक (नं.५४६) यामध्यें तर अशा तऱ्हेच्या विलक्षण चातुर्याच्या व कोशल्याच्या गोष्टींचा संग्रहच आहे. हें एक मोठें अद्भुत कथानक असून त्यामध्यें अनेक लहान लहान गोष्टी, कूट प्रश्न व आख्यायिका यांचा भरणा आहे. अशा तऱ्हेच्या गोष्टींचे ग्रंथ आपणांला अद्यापहि हिंदुस्थानांत आढळतात; व त्यांचें अरबी भाषेतल्या गोष्टींतील अहिकार याच्या शहाणपणाच्या गोष्टींशी व ग्रन्युडस याच्या इसापचरित्राशीं साम्य असल्यामुळें हें जातक आपणांस विशेष महत्वाचें आहे. या जातकांतील नायक महोसध हा आहे. तो लहानपणींच आपल्या शहाणपणाचा व पुढें आपण फार हुशार न्यायाधीश होणार या गोष्टींचा प्रत्यय दाखवितो. सॉलोमन राजाप्रमाणें हाहि एका मुलाबद्दल भांडणाऱ्या दोन बायकांचा तंटा मातृप्रमाचो कसोटा लावून तोडतो. तो जमिनीवर एक रेघ ओढून तीवर त्या मुलास आडवें ठेवतो, व दोन्हीं स्त्रियांस एकीनें हात व एकीनें पाय याप्रमाणें धरून दोन्ही बाजूंस ओढावयास सांगतो. जी त्या मुलास आपणांकडे त्या रेघेच्या अलीकडे ओढून घेईल तिचें तें मूल होईल असें तो ठरवितो. त्यांनीं ओढूं लागतांच तें मूल रडूं लागतें, व त्याबरोबर त्याची खरी आई त्यास सोडून देते. अशा रीतीनें या तंट्याचा निकाल लागतो.

राजानें कोणताहि कोडें अथवा कूट प्रश्न घातला तरी महोसध याजवळ त्याचें उत्तर तयार असे. तो एक काठी पाण्यांत टाकून व तिची कोणती बाजू जड आहे तें पाहून, ज्या झाडापासून ती काठी केली होती त्याचा बुंधा कोणत्या बाजूस होता व शेंडा कोणत्या बाजूस होता हें ठरवितो. त्याप्रमाणेंच एखाद्या अलीकडील मानववंशशास्त्रवेत्याप्रमाणें दोन कवट्यांवरील रेषांचें निरीक्षण करून त्यांपैकीं पुरुषाची कोणती व स्त्रीची कोणती हें ठरवितो. त्याला सर्प कोणता व सर्पीण कोणती हें ओळखतां येत. एकदां राजानें पायांवर शिंगें असलेला, डोक्यावर वशिंड असलेला, व तीन वेळ आवाज करून नंतर ओरडणारा असा पांढरा बैल मागितला असतां, त्याला पांढरा कोंबडा पाहिजे आहे हें महोसध याखेरीज कोणालाहि ओळखतां येत नाहीं. एकदां राजानें अशा तऱ्हेचा भात शिजवून मागितला कीं, तो तांदूळ, पाणी, भांडें, विस्तव अगर सर्पण यांच्याखेरीज शिजवला गेला पाहिजे; व तो पुरुष अगर स्त्री यांच्याखेरीज कोणीं तरी आणून दिला पाहिजे. परंतु महोसध हेंहि करून दाखवितो. एकदां राजानें गोफणीकरितां वाळूची दोरी मागितली असतां महोसध तीहि आणून देण्याचें कबूल करतो, मात्र नमुन्याकरितां जुन्या गोफणीच्या वाळूच्या दोरीचा तुकडा मागतो. त्याला सरड्यासारख्या प्राण्यांचे विचारहि कळत असत. तो आपल्या शहाणपणामुळें राजाचा मंत्री होतो, व आपल्याकरितां स्वतःप्रमाणें सर्व कूट प्रश्नांचीं उत्तरें देणाऱ्या अतिशय चतुर पत्नीची निवड करतो. तिच्यामुळें इतर मंत्री महोसध याचा हेवा करतात. परंतु ती मोठ्या चातुर्यानें त्यांनीं आणिलेल्या संकटांतून पार पडून त्यांनां वाटेस लावते. महोसध हा बाहेरील शत्रूंशीं युद्ध करण्याच्या कामां सल्ला देण्यामध्येंहि अतिशय चातुर्य प्रगट करतो. त्याचप्रमाणें तो शिल्प कामांतहि फार कौशल्य दाखवितो. त्यानें बांधलेल्या विवराचें वर्णन वाचून आपणांला अजिंठा येथील लेण्यांची आठवण होते. हें अद्भुत कथानक म्हणजे एक स्वतंत्र ग्रंथच असून त्याच्या शेवटीं महोसध—हा अर्थात् बोधिसत्वच होता—याची स्तुति केली आहे. या सर्व गोष्टींमध्यें महोसध हा बोधिसत्व असल्यामुळेंच इतका हुषार व चतुर होता, या एका मुद्द्याखेरीज बौद्धसांप्रदायिक असें कांहीं एक आढळत नाहीं.

सं प्र दा या शीं सं बं ध न स ले ल्या गो ष्टी.—याप्रमाणेंच जातक ग्रंथामध्यें आढळणाऱ्या चोरांच्या वगैरे गोष्टींमध्यें बौद्धसांप्रदायिक असा भाग क्वचितच आढळतो. या गोष्टींत दरवडेखोर, उनाड लोक, जुगारी, वेश्या वगैरे मुख्य पात्रें असतात. या सर्व गोष्टी संस्कृतीच्या इतिहासाच्या दृष्टीनें फार महत्वाच्या आहेत. बोधिसत्व स्वतः दोनदां दरवडेखोराच्या रूपांत आढळतो. यांपैकीं एका गोष्टीचें तात्पर्य असें: एका ब्राह्मणानें मंत्राच्या योगानें रत्नांचा पाऊस पाडला, व तीं रत्नें गोळा करण्याकरितां चोरांच्या दोन टोळ्या आपसांत लढूं लागल्या; शेवटीं त्यांपैकीं दोघेजण शिल्लक राहिले, पण ते दोघेहि एकट्यालाच सर्व द्रव्य मिळावें या हेतूनें एकमेकांशीं लढून मरण पावले. ही गोष्ट चॉसर याच्या फेरीवाल्याच्या गोष्टींतील चोरांच्या गोष्टीप्रमाणेंच आहे.

स्त्रि यां च्या क प टी स्व भा वा वि ष यीं गो ष्टी.—स्त्रियांच्या कपटी स्वभावाविषयीं अनेक गोष्टी आहेत. हा विषय सर्व भरतखंडांतील गोष्टींनां जणूं काय पुरून उरलेलाच दिसतो. जातक नंबर ६१ ते ६६ यांमध्यें अशा तऱ्हेच्या गोष्टींचा एक मालिकाच दिली आहे. त्याप्रमाणेंच जातक नं० ५३६ मध्यें असल्या गोष्टींचा व त्यांच्याविषयीं वचनांचा एक मोठा संग्रह एकाच कथानकांत गुंतवून दिलेला आहे. थोड्याथोड्या फरकानें व नवीन नवीन खुबीदार गोष्टी रचून असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे कीं, स्त्रियांची नेहमीं व्यभिचाराकडे प्रवृत्ति असते, मात्र त्यांनां कोणी तरी मोह पाडणारा भेटला पाहिजे. अशा प्रकारची एका ब्राह्मणाची

फारच खुबीदार गोष्ट आहे. त्या ब्राह्मणानें आपल्या मनाची खात्री करण्याकरितां एका मुलीला जन्मापासून आपल्या घरीं वाढविलें, व पुढें ती मोठी झाल्यावर तिच्याशीं लग्न लाविलें. त्यानें तिला पांच तटांच्या आंत पहाऱ्यांत ठेविलें होतें तरी अखेरीस तिनें त्याला फसविलें. तथापि तिनें आपली गैरवर्तणूक कबूल केली नाहीं; इतकेंच नव्हे तर आपलें पातिव्रत्य सिद्ध करण्याकरितां दिव्य करतांना लबाडी करून आपलें म्हणणें खरेंहि करून दाखविलें. अशा तऱ्हेच्या गोष्टी भारतवर्षामध्यें सर्वकाल लोकांच्या अतिशय आवडीच्या असत; व त्यांना थोडेंसें बौद्धसांप्रदायिक वळण देऊन बौद्ध प्रवचनांमध्यें घालण्याचें काम फारसें कठिण नव्हतें. कारण, अशा गोष्टींपासून स्त्रियांसंबंधानें वारंवार तिरस्कार दाखविणाऱ्या बौद्धसांप्रदायिकांना प्रत्येक स्त्री ही पुरुषाला कशी जाळ्याप्रमाणें बंधनकारक व भयप्रद आहे, व तिच्या मोहापासून मनुष्यानें आपलें काळजीपूर्वक रक्षण कसें केलें पाहिजे हें चांगलें दाखवितां येत असे. अशा रीतीनें या गोष्टींमुळें भिक्षूंच्या जात्याला जणू काय अधिकच वैरणच मिळत असे.

नी ति प र क थां.— कांहीं ठिकाणीं असल्या अश्लील गोष्टीनंतर जातक ग्रंथांतील नीतिपर कथांस आरंभ होतो. जातक नं. ५२७ ही एक कथागीतासारखी बरीच नीतिपर कथा आहे. तींतील प्रसंग इतके नाट्यमय आहेत कीं, एखाद्याला तें लहानसें नाटकच वाटेल. एका राजाच्या दृष्टीस त्याचा सेनापति अहिपारक याची अतिशय लावण्यवती स्त्री पडली, व त्यामुळें त्याला तिच्याबद्दल अतिशय कामवासना उत्पन्न झाली. परंतु ती दुसऱ्याची स्त्री असल्यानें आपणाला दुष्प्राप्य आहे असें त्याला लवकरच कळून आलें; तेव्हां त्यानें आपली दुःखकहाणी मोठ्या शोकाकुल अंतःकरणानें अहिपारक यास सांगितली. अहिपारक यानें तें ऐकून व राजाच्या प्रकृतीची धास्ती वाटून, जरी तो आपल्या पत्नीवर अतिशय प्रेम करीत असे तरी, तिला तो राजाच्या स्वाधीन करण्यास तयार झाला. परंतु राजानें तें पातक करण्याचें साफ नाकारलें. अशा रीतीनें एका अतिशय उत्कृष्ट व नाट्यमय अशा संवादामध्यें तो राजा आणि सेनापति यांनीं औदार्यामध्यें एकमेकांहून थोरपणा दाखविल्याचें वर्णन आहे. सरते शेवटीं सद्गुणाचा जय होतो व राजा सर्वसंगपरित्याग करतो. राजास कामार्ततेनें, सेनापतीस स्वामिनिष्ठेनें आणि सेनापतीच्या पत्नीस अग्निप्रवेशानें मृत्यु आणून हीच कथा वेतालपंचविशींत पुनरुद्धृत केली आहे.

कांहीं नीतिपर कथा त्याप्रमाणेंच कांहीं कल्पित गोष्टी यांमध्यें शिक्षण देण्याचा हेतु स्पष्ट दिसत असून त्या लहान मुलांकरितांच रचलेल्या दिसतात. उदाहरणार्थ, नं. ४८४ मध्यें बोधिसत्व एका शहाण्या पोपटाच्या रूपामध्यें आढळतो. तो शेतामध्यें स्वतः तांदूळ खातो, व कांहीं चोंचींत धरून घरीं नेतो. असें करण्याचें कारण विचारिलें असतां तो उत्तर करतो कीं, मी ऋण फेडतो, कर्ज देतो व संचय करतो. त्याचा अर्थ असा कीं, तो घरीं आपल्या मातापितरांस अन्न नेत असे, पिलांस पोशीत असे व इतर अशक्त पक्ष्यांस खावयास देत असे.

'शांतवन कथा' ह्याहि एक प्रकारच्या नीतिपर कथाच आहेत. अशा प्रकारच्या थोड्या गोष्टी आपणाला महाभारतामध्यें आढळतात. यांपैकीं दोन गोष्टींतील विषय पुढें दिला आहे (नं. ३५२).

एका मनुष्याला पितृवियोगाचा शोक आवरेना. तेव्हां त्याचा मुलगा एका गाईपुढें उभा राहून तिला चारा व पाणी देतो, आणि तोंडानें म्हणतो कीं, या ठिकाणीं निदान डोकें, पाय, शेपटी वगैरे अवयव आहेत तेव्हां ही गाय पुन्हां उभी राहूं शकेल; परंतु माझ्या आजोबांचें डोकें, हात, पाय वगैरे कांहींच शिल्लक नसतां तुम्ही त्याच्या समाधीजवळ उभे राहून एकसारखे विलाप करीत आहांत, तेव्हां तुमची बुद्धि नष्ट झाली आहे असें दिसतें. तें ऐकून बापानें आपला शोक थांबविला.

नं. ४५५ मध्यें कृष्ण (कण्ह) हा आपल्या पुत्राच्या मरणाबद्दल अतिशय शोक करीत आहे असें दाखविलें आहे. त्या वेळीं त्याचा भाऊ घट हा वेड्याचें सोंग घेऊन रस्त्यांतून मला ससा पाहिजे म्हणून ओरडत सुटला. कृष्णानें त्याला काय पाहिजे म्हणून विचारिलें तेव्हां मला चंद्रांतील ससा पाहिजे असें घटानें उत्तर केलें. तूं मागितलेली वस्तु मिळणें अशक्य आहे असें कृष्णानें त्याला समजावून सांगितलें. तेव्हां घट म्हणला कीं, तर मग पुष्कळ दिवसांपूर्वी मृत झालेला पुत्र परत येणें अशक्य असून तूंहि त्याच्याबद्दल व्यर्थ शोक कां करीत आहेस? हे शब्द ऐकून कृष्णानें आपलें दुःख टाकून दिलें.

मृतांच्या वियोगापासून होणाऱ्या दुःखाचें शांतवन करणें हें जें वरील गोष्टींचें कार्य तेंच दसरथ जातक (४६१) यांतील रामाच्या श्लोकांनीं होतें. हें जातक प्राचीन कालीं प्रचलित असलेल्या एखाद्या रामाच्या पोवाड्यावरून घेतलें असावें.

सु भा षि तां चा सं ग्र ह.—उपर्युक्त जातकावरील गद्य टीका सोडून दिली, तर यांमध्यें कथानक मुळींच नसून कांहीं सुभाषितपर श्लोक मात्र राहतात. त्याप्रमाणेंच जातक नं. ५१२ हाहि एक सुभाषितांचा संग्रह आहे. जरी त्यामधील गद्यामध्यें मद्याच्या व्यसनाचा आरंभ कसा झाला याबद्दल गोष्ट दिली आहे, तरी ती एखाद्या अज्ञ टीकाकारानें पदरचीच घालून दिल्याप्रमाणें दिसते. यांपैकीं मादक पेय पिण्यापासून होणारे भयंकर परिणाम एका राजाच्या मनावर ठसविण्याकरितां त्यांचें ज्या सुभाषितांतून वर्णन केलेलं आहे, तीं मात्र फार जुनीं असावींत. या सुभाषितांपासून कोणत्याहि मद्यनिषेधवादास आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. परंतु या पद्यांच्या शेवटीं 'तेव्हां एक शिसा भरून ही दारू विकत

घेईन ' अशा अर्थाचें जें उपरोधिक पालुपद आहे, तें एखाद्या जुन्या दारूबाजाच्या लावणींतून घेतलें असावें.

या बोधपर काव्यामध्येंच कुरु देशचा राजा युधिठ्ठिल (युधिष्ठिर) आणि त्याचा सुज्ञ मंत्री विदुर यांमध्यें खरा ब्राह्मण कोण याबद्दल झालेला संवाद मोडतो. हा संवाद वस्तुतः सुत्तनिपातामध्यें शोभला असता. टीकाकारानें महामंगल जातक (नं० ४५३) याचा संबंध मंगलसुत्ताशीं जोडला आहे. परंतु वास्तविक पाहिलें असतां त्या संग्रहामधील सुभाषितांमध्यें कोणतें श्रेष्ठ मंगल आहे याचें उत्तर नसून, सुख कशांत आहे याचेंच उत्तर दिलेलें आहे. या सर्व सुभाषितांचें स्वरूपहि बौद्ध नसून त्यांत ब्राह्मणी जीवितध्येयाचेंच वर्णन आहे. त्याप्रमाणेंच नं० ४७३ या जातकामध्यें खरा मित्र कसा ओळखावा याबद्दल जीं सुभाषितें आहेत तींहि मूळचीं बौद्ध नसून उलट संस्कृत बोधपर लघु काव्यासारखीं आहेत.

इ ति हा स सं वा द.—जातक ग्रंथांतील व विशेषतः त्याच्या शेवटल्या पुस्तकांतील बराचसा भाग परंपरागत कथांनीं भरलेला आहे. यांपैकीं बहुतेक, कांहीं कांहीं उपनिषदांतल्याप्रमाणें–विशेषतः महाभारतांतील इतिहाससंवादाप्रमाणें—केवळ विशिष्ट वचनांनां अनुरूप असे कथाभाग बसवून तयार केलेला आहे. जातक नं० ५४४ मधील अतिशय मनोरंजक संवाद अशा प्रकारचाच असून त्यांतील कांहीं भागांचा उतारा पुढें दिला आहेः—

विदेह देशाचा राजा अंगति हा आपल्या तीन मंत्र्यांनां बोलावून त्यांचा सल्ला विचारतो. त्यांच्यापैकीं सेनापति अलात हा युद्ध करावें असें सांगतो; सुनाम हा सांगतो कीं, युद्ध करण्याची कांहीं जरूर नसून नृत्य गीतादि करून सुखांत असावें; आणि तिसरा विजय याचें म्हणणें असें कीं, एखाद्या सात्त्विक साधूचें अथवा ब्राह्मणाचें प्रवचन ऐकावें. अलात याच्या सांगण्यावरून राजा गुण नामक एका नग्न साधूस बोलावितो. हा साधु पुढें दिल्याप्रमाणें कांहीं जडवादांतील तत्त्वांचें प्रतिपादन करतो. ' कर्माचें अस्तित्व नाहीं. पूर्वज, मातापिता, गुरु वगैरे सर्व झूट आहे. सर्व प्राणी सारखे असून त्यांचें भवितव्य ठरलेलें आहे. दानधर्म करण्यापासून कांहीं फायदा नाहीं. इह लोकांतील कृत्यांबद्दल परलोकामध्यें चांगलें अगर वाईट फळ मिळतें या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ' अलात याचें मत या तत्त्वांप्रमाणेंच असून तो म्हणतोः ' मला माझ्या पूर्वजन्मांचें स्मरण आहे. मी खाटीक, शिकारी वगैरे अनेक जन्म घेतले असून सध्यां कुलीन घराण्यांत माझा जन्म होऊन मला सेनापतिपद मिळालें आहे. ' तेथें बीजक या नांवाचा एक दास होता तोहि वरील गोष्टीस आपली संमति देऊन म्हणतो कीं, ' मी पूर्वजन्मीं सज्जन व उदार असूनहि या जन्मीं वेश्येच्या पोटीं येऊन दास झालों आहे. या आयुष्यक्रमाच्या द्यूतामध्यें मी हार जात आहें; व अलात हा एखाद्या चांगल्या खेळाडूप्रमाणें जिंकतो आहे.'

या भाषणांवरून अंगति राजाची खात्री होऊन तो चैनीमध्यें आयुष्य घालवूं लागला, आणि सुखोपभोगाशिवाय कोणत्याहि गोष्टीचा विचार करीनासा झाला. त्यानें आपला सर्व राज्यकारभार दुसऱ्याच्या स्वाधीन केला. तेव्हां त्याची सद्गुणी व सात्त्विक मुलगी रुजा हिनें त्याला येणेंप्रमाणें खऱ्या तत्वाचा उपदेश केलाः ' जो वाईट मनुष्याची संगति धरतो तो स्वतः वाईट होतो. ज्याप्रमाणें फाजील जड माल भरल्यामुळें एखाद्या व्यापाऱ्याचें गलबत बुडून जातें, त्याप्रमाणें जो मनुष्य हळू हळू आपल्यावर पापाचें मोठें ओझें करून घेतो तो नरकांत बुडतो. ' नंतर ती आपल्या पूर्व जन्मांची हकीकत सांगते. एका जन्मांत ती एक तरुण मनुष्य असून तिनें पुष्कळ हलकट स्त्रियांस नादीं लाविलें होतें. नंतर तिला मनुष्यकोटींतील, प्राणिकोटींतील आणि नरकांतील अनेक जन्मांमध्यें भयंकर हाल सोसावे लागले. पुढें नारद स्वर्गांतून येऊन रुजा हिच्या प्रमाणेंच कर्म व परलोक यांच्या अस्तित्वाबद्दल राजाची खात्री करतो. परंतु राजा म्हणतोः 'जर परलोक असेल तर मला आज शंभर सुवर्णमुद्रा दे म्हणजे मी परलोकांत एक हजार देईन.' नारद उत्तर करतोः ' मी तुला खरोखर शंभर सुवर्णमुद्रा दिल्या असत्या; परंतु तूं नरकांत गेल्यानंतर मला त्या परत देशील याबद्दल जामीन कोण राहणार आहे? या जगांतहि मनुष्य फक्त खात्रीच्याच इसमास द्रव्य उसनें देतो.' यानंतर नारद नरक व तेथील हालअपेष्टा यांचें सविस्तर वर्णन करतो. आणि शेवटीं शरीराला रथाची उपमा देऊन आपल्या प्रवचनानें राजाची खात्री करून त्याला बौद्धसांप्रदायिक बनवितो.

जातक नं० ५३० हा एक यासारखाच इतिहाससंवाद आहे. परंतु तो एखाद्या जुन्या पुराणांतील उताऱ्याप्रमाणें दिसतो. यामध्यें राजा ब्रह्मदत्त याला त्याचा पूर्वीचा कुलोपाध्याय संकिच्च हा आल्याची वर्दी मिळते. तेव्हां तो त्याचा सत्कार करून त्याला पापी लोकांचें परलोकांत काय होतें असा प्रश्न विचारतो. तेव्हां संकिच्च हा एका प्रवचनामध्यें नरकाचें सविस्तर वर्णन करतो. या संवादांतील भाषणें मुख्यतः पुन्हां एका दोन मित्रांच्या गोष्टीमध्यें आलीं आहेत. हे दोन मित्र चांडाल, काळवीट, पाणगरुड इत्यादि अनेक जन्मांत जाऊन शेवटीं एकजण एका उपाध्यायाच्या पोटीं चित्त या नांवानें व दुसरा राजाच्या पोटीं संभूत या नांवानें जन्मला होता ( नं० ४९८ ). त्यांच्या संवादामध्यें चित्त हा आपल्या मरणाचें व पूर्वजन्माचें स्मरण करून यतिधर्माची स्तुति करतो; आणि आपला जुना मित्र जो राजा त्याला असें सांगतो कीं, तुला जर सर्वस्वाचा त्याग करतां येत नसेल, तर निदान न्यायानें राज्य करीत जा; आणि जो तूं आतां राजा आहेस तो एकदां दीन आणि दरिद्री होतास, हें सदैव ध्यानांत असूं दे.

या सर्व गोष्टी पूर्वी सांगितलेल्या आध्यात्मिक कथागीतांच्या स्वरूपांत आहेत. यांमधील अनेक गीतांत कांहीं राजांनी एखाद्या क्षुल्लक गोष्टीवरून कांहीं विचार मनांत आल्यामुळें राज्य सोडून सर्वस्वाचा त्याग करून हिमालयामध्यें जाऊन यतिवेषानें परमेश्वरचिंतनांत आयुष्य घालविल्याचा उदाहरणें आहेत. एका राजानें सर्व फळें गळून गेलेलें एक आंब्याचें झाड पाहिलें. त्यावरून त्याला सर्व ऐहिक वस्तूंच्या क्षणिकत्वाची आठवण झाली, व त्यानें सर्वस्वाचा त्याग केला. दुसऱ्या एकाला, एका मुलीच्या हातांतील बांगड्यांचा आवाज ऐकून मनुष्याला एकांतामध्येंच शांति मिळते ही गोष्ट ध्यानांत आली. तिसऱ्याला, एका मांसाच्या तुकड्याकरितां गिधाडें एकमेकांशीं भांडतांना व एकमेकांना फाडतांना पाहून लोभ हा किती तिरस्करणीय आहे ही गोष्ट पटली. चौथ्या एकानें एक मत्त बैल एका गाईपाठीमागें लागला असतां दुसऱ्या कामोत्सुक बैलानें भोसकून ठार मारिलेला पाहून विषयवासनेचा द्वेष करण्याचा धडा घेतला. या सर्व गोष्टींचा परिणाम एकच दाखविला आहे. मखदेव या राजाची गोष्टहि याच संग्रहांत आहे (नं. ९). या राजानें पहिला पिकलेला केस दिसतांच सर्वस्वाचा त्याग केला.

तथापि या सर्व गीतांमध्यें महाजनक जातक हें अतिशय सुंदर आहे (नं. ५३९). या काव्याचा नायक विदेह देशचा राजा जनक हा आहे. याचा उल्लेख उपनिषदें व महाभारत यांमध्यें आलेला आहे. या जातकामध्यें त्याचें प्रसिद्ध वचन दिलें आहे तें असें: 'जरी सर्व मिथिला दग्ध झाली तरी माझें कांहीं एक जळून जात नाहीं.' हें वाक्य त्यानें, राणीनें त्याला परत आणण्यासाठीं जेव्हां जळत असलेल्या मिथिला नगरीकडे बोट दाखविलें तेव्हां उच्चारिलेलें आहे. त्यानें जगाचा त्याग करण्याचा निश्चय कसा केला; तो प्रथम राजवाड्याच्या गच्चीवर ध्यानामध्यें कसा गढून जात असे; पुढें लवकरच राज्याभिषेकाचें सुवर्णपात्र टाकून देऊन मृत्पात्र घेऊन एकांतांतच गेलें पाहिजे अशी त्याची कशी खात्री झाली; त्याच्या स्त्रियांनीं त्याला परत आणण्याचा कसा प्रयत्न केला; परंतु त्याचा निश्चय उत्तरोत्तर कसा बळावत गेला; व सरते शेवटीं त्याच्यापुढें कोणाचेंहि चालेनासें होऊन तो एकांतांत कसा गेला; या सर्व गोष्टींचें इतक्या जोरदार भाषेंत वर्णन केलें आहे कीं, असें वर्णन त्या गोष्टींवर कर्त्याचा पूर्ण विश्वास असून त्याची कवित्वशक्तिहि दांडगी असल्याखेरीज होणें नाहीं.

**प्रचलित दंतकथांवरून घेतलेल्या गोष्टी.**—या सर्व गोष्टी प्राचीन काळीं भरतखंडामध्यें प्रचलित असलेल्या दंतकथांवरून घेतलेल्या आहेत. याच दंतकथांवरून महाभारतांत व इतर पुराणांमध्यें बऱ्याचशा गोष्टी घेतलेल्या आहेत. ऋष्यशृंगावरील कविता याच दंतकथांपैकीं असून ती जातकग्रंथामध्यें आढळते, आणि नलिनिका जातक (नं. ५२६) यामध्यें तिचें बरेंच प्राचीन स्वरूप दृष्टीस पडतें. तीच गोष्ट पुन्हां जातक नं. ५२३ मध्यें दिलेली आढळते. या गोष्टींत पूर्वी ज्याप्रमाणें ऋष्यशृंग याला शांतेनें मोह पाडला होता, त्याप्रमाणें अलंबुसा या अप्सरेनें इसिसिंग (हें ऋष्यशृंग याचें पाली रूप आहे) या तरुण साधूस मोह पाडल्याची कथा आहे. या जातकाच्या प्रास्ताविक गद्य भागामध्यें इसिसिंग याचा मृगापासून जन्म झाल्याबद्दलची हकीकत दिली आहे. हा प्रास्ताविक भागहि बराच जुना असला पाहिजे. कारण भरहुत येथें खोदलेल्या एका चित्रामध्यें एका मृगापासून जन्मलेल्या लहान अर्भकास एक साधु (इसिसिंग याचा पिता) उचलून घेत आहे, असें एक चित्र आहे.

परंतु याच गोष्टींमध्यें कांहीं अशा गोष्टी आहेत कीं, त्या बौद्धांनींच रचल्या असाव्यात हें नाकबूल करतां यावयाचें नाहीं असें विंटरनिट्झ याचें मत आहे. यांपैकीं सर्वांत सुंदर अशी गोष्ट म्हटली म्हणजे साम या सात्विक तरुणाबद्दलचें कथागीत (नं. ५४०) होय. त्याचा थोडक्यांत सारांश असा: साम हा एक सात्विक असा साधूचा मुलगा असून तो आपल्या अंध मातापितरांबरोबर अरण्यांत राहून त्यांची सेवा करीत असे. एकदां तो त्यांच्या करितां पाणी आणावयास गेला असतां शिकारीस आलेला बनारसचा राजा पिलियक्ख याचा एक विषारी बाण चुकून त्यास लागला. परंतु त्याच्या तोंडांतून शाप अथवा कोणतीहि अभद्र वाणी निघाली नाहीं. मात्र आपल्या बिचाऱ्या मातापितरांचा आधार तुटल्यामुळें त्यांचें कसें होईल याबद्दल शोकोद्गार निघाले. त्या राजाला पश्चात्ताप होऊन त्यानें त्याचें शांतवन केलें, आणि त्याच्या आईबापांची काळजी घेण्याचें कबूल केलें. सामानें त्याला आपल्या आईबापांची झोपडी कोठें होती तें दाखविलें आणि त्याचे आभार मानिले. नंतर तो बेशुद्ध झाला. राजाला अतिशय वाईट वाटून तो शोक करूं लागला. तेव्हां एका वनदेवतेनें त्याचें शांतवन केलें; आणि त्याला सांगितलें कीं, जर तूं सामाच्या मातापितरांची पुत्राप्रमाणें सेवा करशील तर या घोर पातकापासून तुझी सुटका होईल. नंतर तो राजा शोक करीत पाण्याचें भांडें घेऊन सामाच्या मातापितरांच्या झोपडीकडे गेला. त्या राजाची चाहूल ऐकून त्या वृद्ध पित्याला आपण मार्गप्रतीक्षा करीत असलेला आपला पुत्र हा नव्हे, असें कळून आलें. तथापि पिलियक्ख यानें आपण कोण आहों हें सांगितलें तेव्हां त्या वृद्ध अंध मनुष्यानें त्याचें स्वागत करून त्याला खावयास कांहीं फळें व प्यावयास पाणी दिलें. राजानें त्याला हीं फळें कोठून आणिलीं असें विचारिलें. कारण, त्याला स्वतःला तीं आणणें शक्य नव्हतें. तेव्हां त्या वृद्ध गृहस्थानें उत्तर दिलें कीं, आमचा एक तरुण व सुंदर मुलगा आहे तो आमच्या करितां फळें व पाणी आणतो. पुढें हा राजा त्यांना त्यांचा कर्तव्यनिष्ठ मुलगा आपल्या हातून मेला असल्याबद्दलची भयंकर बातमी सांगतो. ती ऐकून बाप शांत परंतु शोक-

पूर्ण उद्गारानें आपलें दुःख व्यक्त करतो; परंतु आई मोठ्यानें शोक करून आपला नवरा राजाचें कांहींच पारिपत्य करीत नाहीं याबद्दल आश्चर्य व्यक्त करते. राजा त्या दोघांचेंहि शांतवन करून मला तुम्ही आपल्या पुत्राच्या ठिकाणीं समजा, मी तुमची सामाच्या प्रमाणेंच काळजी घेईन असें सांगतो. परंतु ते दोघेहि त्याला आपल्या पुत्राच्या प्रेताकडे नेण्याची विनंति करतात, व राजा ती निरुपायानें मान्य करतो. त्या प्रेताजवळ जाऊन तीं मातापितरें हृदयद्रावक असा शोक करतात. परंतु त्याच त्यांच्या शोकोद्गाराचा मंत्राप्रमाणें परिणाम होतो. आई म्हणते, जर साम यानें नेहमीं सदाचरणामध्यें आयुष्य घालविलें ही गोष्ट खरी असेल, तर हें विष नाहींसें होऊन तो पुन्हां चांगल्या स्थितीमध्यें आमच्या पुढें उभा राहो. हीच गोष्ट बाप आपल्या संबंधानें व आपल्या स्त्रियेच्या संबंधानें उच्चारतो. वनदेवताहि अशाच प्रकारचे उद्गार काढते. तेव्हां साम पुन्हां जिवंत होऊन आपल्या मातापितरांसमोर पूर्ववत् उभा राहतो, आणि आश्चर्यचकित झालेल्या राजाचें स्वागत करतो. तो आपल्या मातापितरांस सांगतो कीं, मला फक्त मूर्च्छा आली होती; कारण जे आपल्या मातापित्यांस मान देतात, त्यांनां या जगामध्यें देवांचें साहाय्य मिळतें आणि मरणानंतर स्वर्ग मिळतो. नंतर राजा सामास शरण येतो, आणि साम त्याला राजानें कसें सदाचरणी असावें याबद्दल उपदेश करतो. रामायणांतील श्रावणापेक्षां आमचा बौद्ध साम किती चांगला हें दाखविण्याकरितां बौद्धांनीं ही कथा मुद्दाम फेरफार करून तयार केली नसेलना असा—विद्वान् ग्रंथकार विंटरनिट्झ जरी या गोष्टीचें जनकत्व सर्वस्वीं बौद्धांसच देतो तरी—आम्हांस संशय येतो.

केवळ बौद्ध लोकांनींच रचलेल्या ज्या गोष्टी आहेत त्यांमध्यें अतिशय नम्रता, दाक्षिण्य व आत्मत्याग हे गुण सामान्य जनांपेक्षां अधिक आढळतात, हा त्यांचा विशेष आहे.

जातक नंबर ४४० मध्यें कण्ह राजाची गोष्ट सांगितली आहे. त्यानें आपलें सर्वस्व देऊन टाकून यति होण्याकरितां हिमालयाची वाट धरली. शक्र हा त्याच्या सर्व कामना पूर्ण करण्यास तयार झाला; परंतु त्यानें कोणतीहि इच्छा न धरतां शांति, द्वेष, वासना व विषय यांपासून सुटका व सर्वांमध्यें अतिशय उत्तम असा पुढील वर मागितला: "हे जगदीश्वरा इंद्रा, जर तूं मला वर देणार असशील तर हा दे कीं, माझ्याकरितां कोणत्याहि प्राण्याला मानसिक अथवा शारीरिक पीडा होऊं नये. हीच माझी इच्छा आहे आणि माझ्याकरितां सर्वांत चांगली गोष्ट तूं हीच करावी."

आपल्या शत्रूवर प्रेम करावें हें तत्त्व नं. १५१ या गोष्टीमध्यें सांगितलेलें आहे. एका अरुंद खिंडीमध्यें दोन राजांची समोरासमोर गांठ पडली. ते दोघेहि सारखेच न्यायी, वृद्ध, विख्यात व सामर्थ्यवान् असल्यामुळें त्यांच्यापैकीं कोणी बाजूस होऊन दुसऱ्यास वाट द्यावी हा प्रश्न उत्पन्न होतो. त्यांपैकीं एक उपकाराची फेड उपकारानें करतो एवढेंच नव्हे, तर अपकाराबद्दलहि उपकारच करतो, असें दिसून आल्यामुळें त्याला पहिला मान देण्यांत आला.

**प्राण्यांचें कृतज्ञत्व व मनुष्याचें कृतघ्नत्व दर्शविणाऱ्या कथा.**—यांपैकीं अनेक गोष्टींमध्यें बोधिसत्त्व चांगल्या व उदार सत्त्वाच्या प्राण्यांच्या रूपांत आढळतो. यांनां आपण प्राण्यांच्या गोष्टी म्हणूं. अशा प्रकारच्या गोष्टींमध्यें एका मृगाच्या आत्मयज्ञाची गोष्ट दिलेली आहे. हा मृग एका गरोदर हरिणीसाठीं आपला जीव द्यावयास तयार झाला, आणि या गोष्टीमुळेंच राजाच्या अंतःकरणास चटका बसून पुढें त्या मृगाच्या विनंतीवरून राजानें तो कळप सोडून दिला; एवढेंच नव्हे तर त्यानें शिकार करणेंच अजीबात सोडून दिलें. ही कथा थोडक्या फरकानें शिवलीलामृतांत आणून तिचा उपयोग शिवोपासनेकडे केला आहे.

एका सशानें आपल्या पाहुण्यास मांस खाऊं घालण्याकरितां स्वतःसच भाजून घेतलें (नं. ३१६). एका वानरांच्या मुख्यानें आपला कळप वांचावा म्हणून स्वतःच्या शरीराचा गंगानदीवर पूल केला. एका वानरानें एका खोल विवरांत पडलेल्या मनुष्यास बाहेर काढलें; परंतु पुढें त्या मनुष्यास वानराचें मांस खाण्याकरितां त्याच वानरास मारण्याची इच्छा झाली आणि त्यामुळें त्याला कुष्ठ रोग उत्पन्न झाला (नं. ५१६). एका हत्तीनें एका जंगलामध्यें रस्ता चुकलेल्या मनुष्यास बाहेर येण्याचा मार्ग दाखविला व त्याला आपले दांत बक्षीस दिले. परंतु त्या लोभी मनुष्यानें हत्तीच्या दांतांचीं मुळेंहि कापून काढिलीं, त्यामुळें हत्तीला अतिशय वेदना झाल्या. तेव्हां त्या मनुष्याला जमिनीनें गिळून टाकलें व तेथून तो नरकांत गेला (नं. ७२).

वर दिलेल्या प्राण्यांच्या गोष्टींपैकीं शेवटल्या दोन गोष्टींवरून असें दिसतें कीं, कृतज्ञ प्राणी व कृतघ्न मनुष्यें यांविषयींच्या बहुतेक काल्पनिक कथा बौद्धांनींच रचल्या असणें संभवनीय आहे.

**वेस्संतर जातकाचें कथानक.**— या सर्व गोष्टींमध्यें विशेष प्रसिद्ध आणि बौद्ध लोकांस सर्वांत जास्त आवडणारी गोष्ट या जातकग्रंथांतील शेवटची वेस्संतर जातक (नं. ५४७) ही असावी. हें जातक म्हणजे वास्तविक एक महाकाव्यच आहे. कारण, त्यांतील गद्य हें फक्त टीकात्मक असून टीकाकारानें तीच कथा किती नीरस व बोजड रीतीनें दिली आहे हें स्पष्ट दिसतें. तथापि या काव्यामध्यें नायकाचें शौर्य अथवा विजय यांचें वर्णन केलें नसून त्याच्या औदार्याची स्तुति केली आहे. वेस्संतर या राजपुत्रानें कोणीं कोणतीहि गोष्ट मागितली तरी नाहीं म्हणावयाचें नाहीं अशी प्रतिज्ञा केली होती. तो म्हणतो, "माझें हृदय आणि नेत्र, माझें मांस आणि रक्त, किंवा माझें सर्व शरीर जरी कोणीं मजजवळ मागितलें तरी मी देऊन टाकीन." त्यानें आपल्या राज्याच्या कल्याणाचा कांहींहि विचार न

करतां एक अद्भुत हत्ती देऊन टाकल्यामुळें त्याला हद्दपार करण्यांत आलें. तेथें त्याजबरोबर त्याची मद्दी नामक स्त्री व त्याचीं दोन लहान मुलें गेलीं. त्यांच्या हवालीं एक चार घोडयांचा रथ करून त्यांनां बाहेर घालवून देण्यांत आलें. लवकरच त्यांनां एक भिक्षुक ब्राह्मण भेटतो व त्याला वेस्संतर रथ व घोडे देऊन टाकतो. नंतर वेस्संतर व त्याची स्त्री मुलांनां घेऊन पायीं चालत चालत रानामध्यें एका आश्रमापाशीं येतात व तेथें राहूं लागतात. येथें सक्क हा एका कुरूप व दुष्ट ब्राह्मणाच्या रूपानें येऊन तीं मुलें आपल्या सेवेकरितां मागून नेतो. सरते शेवटीं तो त्याची बायकोहि मागतो.परंतु वेस्संतर जेव्हां तिलाहि देण्यास तयार होतो तेव्हां सक्क आपलें रूप प्रगट करतो आणि नंतर सर्व सुखी होतात. ही गोष्ट ७८६ पद्यांमध्यें सांगितली असून महाकाव्याप्रमाणेंच ती विस्तृत आहे. वेस्संतर हा वनांत जावयास निघतो त्या प्रसंगाच्या वर्णनावरून रामायणांतील रामवनवासाची आठवण होते. त्याचप्रमाणें अरण्याचें, आश्रमाचें इ० जीं मोठमोठीं सृष्टिवर्णनें आहेत तींहि रामायणासारखींच आहेत. ब्राह्मणाला मुलें दिल्याचा प्रसंग, त्या दुष्ट ब्राह्मणानें त्यांनां निष्ठुरपणानें वागविल्याचा प्रसंग, त्या लहान मुलांच्या तक्रारी, त्यांच्या आईचें दुःख व त्यांचा तिनें केलेला व्यर्थ शोध इत्यादि प्रसंगांचें वर्णन कवीनें विस्तृत व बहारीचें केलेलें आहे. या प्रसंगांचें वर्णन वाचतांना अथवा तिबेट व ब्रह्मदेश यांमध्यें या कथाभागावर रचलेलीं नाटकें पाहतांना श्रोत्यांच्या डोळ्यांतून अश्रू येत असत त्यांत कांहीं नवल नाहीं. वरील गोष्टीपेक्षां हरिश्चंद्राची गोष्ट अर्थातच जास्त उठावदार दिसते, पण विंटरनिट्झच्या लक्षांत या दोन गोष्टींतील साम्य आलें नसावें असें वाटतें.

**जातकांची बौद्ध संप्रदायांतील सार्वत्रिक लोकप्रियता.**—वेस्संतर जातक या गोष्टींतील नायक पूर्वी सांगितलेल्या बौद्ध कथांतल्याप्रमाणें बोधिसत्त्व हाच असून त्याच्या ठिकाणीं अनेक पारमिता(पूर्ण गुण)वास करीत होते. त्याच्या ठायीं पूर्वजन्मस्मरण, अमानुष शारीरिक व मानसिक सामर्थ्य इत्यादि गुण होते असें वर्णन आहे. बोधिसत्त्वाचें हें अमानुषत्व हीनयान पंथांतील जिचें प्रस्तुत पाली तिपिटक हें धर्मशास्त्र आहे त्या थेरवाद शाखेच्या ग्रंथांमध्यें जातक ग्रंथांखेरीज इतरत्र प्रामुख्यानें पुढें आणिलेलें नाहीं; परंतु महायान पंथामध्यें मात्र याचा बराच देव्हारा माजविला आहे. अर्थात् जातकग्रंथांचा महायानामध्यें समावेश होतो यांत कांहीं विशेष नाहीं. यावरून हीं जातकें ज्या प्रदेशामध्यें हीनयान पंथ चालत असे त्या प्रदेशांत प्रथम रचलीं गेलीं नसून महायान पंथाच्याच प्रदेशांत रचलीं गेलीं कीं काय असा प्रश्न उद्भवतो. जातकें सर्व बौद्ध पंथांच्या धर्मग्रंथांमध्यें आढळतात, व प्रारंभींहि तीं अमुकच एका पंथाचीं म्हणून समजलीं जात नसावींत. बौद्ध संप्रदायाच्या निरनिराळ्या पंथांच्या लौकिक धर्मामध्यें विशेष मतभेद नसल्यामुळें व ह्या संप्रदायाचा प्रसार करतांना या जातकांचा विशेष उपयोग होत असल्यामुळें तीं बौद्ध संप्रदायाबरोबरच सर्व लोकांमध्यें प्रसार पावलीं. अद्यापहि बौद्ध लोकांमध्यें जातकाइतका आवडीचा ग्रंथ दुसरा नाहीं. आजकालसुद्धां सिंहली लोक जातककथा ऐकावयास मनापासून, आनंदानें व मुळींच कंटाळा न येतां रात्रीच्या रात्री बसतात. ब्रह्मदेशामध्यें अनेक शतकांपासून आतांपर्यंत जातककथा या विद्वान् व अविद्वान्, भिक्षू व श्रावक यांनां सारख्याच आनंददायक वाटत आल्या आहेत; आणि जेथें जेथें बौद्ध संप्रदायाचा प्रसार झाला त्या सर्व ठिकाणीं हीच स्थिति आहे. ए. शीफनेर याच्या ग्रंथावरून तिबेटी वाङ्मयामध्यें बौद्ध कथांचा केवढा संग्रह आहे याची आपणांला कल्पना होते. त्याचप्रमाणें एड० शाव्हन्स याच्या ग्रंथावरून चिनी बौद्ध वाङ्मयामध्यें गोष्टींचा कितो भरणा आहे तें आपल्या ध्यानांत येतें.

**संस्कृतिप्रसार व संस्कृतिविनिमय.**—या जातकांनीं सर्व वाङ्मयांमध्यें भर घातली आहे, आणि त्यामुळें सर्व जगाच्या वाङ्मयामध्यें त्यांनां बरेंच महत्त्व आलें आहे. तथापि भारतीय अभ्यासाचा प्रारंभींचा अभ्यासक बेनफी याच्या मताप्रमाणें जगांतील सर्व काल्पनिक कथांचा उगम बौद्ध कथांपासूनच झाला आहे असें आपणांला म्हणतां यावयाचें नाहीं. एवढें मात्र निर्विवाद आहे कीं, ब्राह्मण, जैन वगैरे पंथांनीं भारतीय कथांमध्यें कितीहि भर टाकली असली, तरी त्यांचा भरतखंडाच्या बाहेर प्रसार करून भारतीय संस्कृति व वाङ्मय यांचा पौरस्त्य व पाश्चात्य देशांमध्यें सर्वत्र प्रसार बौद्ध संप्रदायानेंच केला. बौद्ध संप्रदायानें भरतखंडांतील लोकांचा इतर लोकांशीं पूर्वीपेक्षां जास्त संबंध घडवून आणिला. अशा वेळीं बौद्धांनीं जसा आपल्या गोष्टींचा प्रसार त्यांच्यामध्यें केला तशा त्यांच्याहि गोष्टी त्यांनीं आपल्यामध्यें आणिल्या असल्याचा संभव आहे. ही गोष्ट विशेषतः ग्रीक, इराणी व सेमाइट या बुद्धिमान् लोकांच्या संबंधीं खरी दिसते. बहुतकरून अलेक्झांडरच्या स्वारीनंतर जे ग्रीक कारागीर भरतखंडांत आले आणि ज्यांनीं बौद्ध स्मारकांवर कलाकौशल्याचीं कामें केलीं, त्यांनीं आपणांबरोबर कांहीं तद्देशीय गोष्टी अथवा गोष्टींचीं कथानकें आणिलीं असलीं पाहिजेत. बौद्ध स्मारकांवर ज्या अर्थी कांहीं जातकांचीं चित्रें कोरलेलीं आहेत त्या अर्थी ही गोष्ट जास्त संभवनीय दिसते. कारण, या जातकांमुळें वाङ्मयाप्रमाणेंच भारतीय व इतर देशांतील कलांचीहि वाढ झाली आहे. त्या काळचीं चित्रें हीं भरतखंडांतील चित्रांमध्यें अतिशय प्राचीन असून अद्यापहि बौद्ध देशांमध्यें तीं शिल्पकामाचे व चित्रांचे नमुने म्हणून लोकांच्या फार आवडीचीं आहेत. आपणांला तीं ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकामध्यें भरहुत आणि सांची येथील दगडी भिंतींवर आढळतात. ख्रिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकामध्यें तीं अमरावती येथें आणि त्याच्या अलीकडील अजिंठा येथील लेण्यांत दृष्टीस पडतात. इ. स. ४१२ या वर्षी फाहि-

आन या नांवाचा चिनी बौद्ध प्रवासी सिंहलद्वीपांत आला होता. त्या वेळीं सिंहलद्वीपच्या राजानें एका उत्सवप्रसंगीं, मिरवणुकीच्या रस्त्याच्या दोन्ही बाजूंस पांच हजार जातककथांतील प्रसंग मनुष्यांच्या रंगीत आकृती करून दाखविले होते असें त्यानें वर्णन केलें आहे. जातककथांमध्यें वर्णिलेल्या बोधिसत्त्वानें केलेल्या चमत्कारांच्या स्मरणार्थ भरतखंडामध्यें ठिकाठिकाणीं उभारलेल्या स्तूपांचें वर्णन ह्युएन त्संग यानें केलें आहे. जावा बेटांत बोरोबुदोर येथील पर्वतप्राय देवालयावर जातक कथांतील शेंकडों प्रसंगांचीं चित्रें खोदलीं आहेत (९ वें शतक). त्याप्रमाणेंच ब्रह्मदेशांत पेगन येथें (१३ वें शतक) आणि सयाम देशांत सुखोदय येथें (१४ वें शतक) हि वरील प्रकारचींच चित्रें आढळतात. पाली जातकसंग्रहाचा जो अनुक्रम आहे तोच या चित्रांचा अनुक्रम आहे असें एल. फीरनेरोनें म्हटलें आहे (मुसी गिमे, १९०८).

**जातकांतर्गत संस्कृतीचा इतिहास.**— या जातकांचें वाङ्मय व कलाकौशल्य यांप्रमाणेंच संस्कृतीच्या इतिहासाच्या दृष्टीनेंहि अतिशय महत्त्व आहे. यांवरून जरी आपणांला बुद्धकालीन संस्कृतीची यथार्थ कल्पना यावयाची नाहीं, तरी ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या कालची कांहींशी व विशेषतः ख्रिस्ती शकानंतरची सांस्कृतिक स्थिति आपणांस या जातकांमध्यें–मुख्यत्वेंकरून त्यांतील गद्य भागांमध्यें–पहावयास मिळेल. मध्यंतरींच्या कालामध्यें भरतखंडांतील राहणीमध्यें इतका थोडा फरक झाला होता कीं, जातकांमध्यें वर्णन केलेलें आयुष्यक्रमाचें चित्र बरेंच प्राचीन कालचें मानावयास हरकत नाहीं. कसेंहि असलें तरी आपणांला या जातकग्रंथांतील कथांवरून भरतखंडांतील लोकस्थितीची कांहींशी कल्पना करतां येते, आणि ही माहिती भारतीय वाङ्मयांतील इतर ग्रंथांमध्यें फारच थोडी आढळते यांत शंका नाहीं.

जातकग्रंथाचें याप्रमाणें अनेक प्रकारचें महत्त्व असल्यामुळें त्याचें येथे विस्तृत विवेचन करणें अवश्यक होतें. आतां तिपिटकांतील ज्या इतर ग्रंथांचें आपणांला वर्णन द्यावयाचें आहे, तें थोडक्यांत देऊं.

**निद्देस.**—निद्देस अथवा महानिद्देस हें सुत्तनिपाताच्या दोन भागांवरील टीकेचें नांव आहे. या टीकेला पाली धर्मशास्त्रामध्यें स्थान मिळण्याचें कारण, बहुधा इतर पाली टीकांच्या मानानें ती बरीच जुनी आहे हें होय.

**पटिसंभिदामग्ग.**—हा अभिधम्म वाङ्मयापैकीं एक ग्रंथ आहे. या ग्रंथाला खुद्दकनिकाय यामध्यें स्थान मिळालें आहे यावरून खुद्दकनिकाय याचा कांहीं ठिकाणीं सुत्तपिटकाच्या ऐवजीं अभिधम्मपिटकामध्यें अंतर्भाव केलेला कां आढळतो या गोष्टीचा खुलासा होतो. परंतु प्रस्तुत ग्रंथाच्या स्वरूपावरून तो अभिधम्मपिटकांतीलच दिसत असतांहि, त्याचा त्यामध्यें अंतर्भाव कां केलेला नाहीं, तें निश्चितपणें सांगतां येत नाहीं.

**अपदान.**— जातकग्रंथ हा जरी बराच मोठा असून त्यामध्यें अनेक गोष्टी आल्या आहेत, तरी त्यामध्यें सर्वच कथा दिल्या आहेत असें नाहीं. जातकांमध्यें जशा बोधिसत्त्वाच्या व स्वतः बुद्धाच्या पूर्व जन्मांतील कथा सांगितल्या आहेत, तशाच खुद्दक निकायांतील अपदान (सं. अवदान) या भागामध्यें बुद्धाचे पुढें अर्हत झालेले शिष्य व शिष्यिणी यांच्या पद्यमय गोष्टींचा संग्रह आहे. या सर्व साधूंच्या गोष्टी आहेत. अपदान याचा अर्थ पराक्रमाचें कृत्य असा आहे. त्याप्रमाणेंच आत्मत्याग व भूतदया यांचीं उत्कृष्ट उदाहरणें असाहि त्याचा अर्थ आहे. या अपदानामध्यें बौद्ध संस्कृत वाङ्मयांतील अवदानाप्रमाणें पराक्रमकथा म्हणजे साधूंच्या तात्त्विक कृत्यांबद्दलच्या गोष्टी आहेत. कांहीं ठिकाणीं बुद्धाकरितां केलेल्या एखाद्या नीच कामाचीहि गणना वरील कृत्यांतच केलेली आढळते. आतापर्यंत थेरी अपदानापैकीं (भिक्षुणींच्या चाळीस गोष्टी) कांहीं उतारे व थेर अपदानासंबंधीं कांहीं लेख मात्र विशेष पुढें आलेले दिसतात. थेर अपदान यामध्यें ५५ प्रकरणें असून प्रत्येकांत १० अपदानें आहेत. याखेरीज थेरांच्या ५५० आणखी गोष्टी आहेत. या सर्व गोष्टी एकाच स्वरूपाच्या आहेत. प्रथम एखादा थेर अथवा थेरी आपण गौतमाच्या पूर्वी होऊन गेलेल्या एखाद्या बुद्धाची कशी भक्ति केली हें सांगून, त्या बुद्धानें पुढें गौतम बुद्ध येऊन तुला उपदेश करील असें भविष्य सांगितल्याचें सांगते; व शेवटीं तें भविष्य खरें होऊन आपणाला अर्हत् पद कसें मिळालें त्याचें वर्णन करते. हीं अपदानें बौद्ध धर्मशास्त्रांतील ग्रंथांपैकीं बरींच अलीकडील असावींत. एड. मूलर याच्या मताप्रमाणें कांहीं अपदानें बौद्ध संस्कृत वाङ्मयांतील अवदानापेक्षां अलीकडचीं आहेत. सिल्व्हेन लेव्ही म्हणतो कीं, थेरी गोतमी महापजापती हिचें अपदान अश्वघोषाच्या एका काव्यासारखें दिसतें. हा सर्व ग्रंथ अद्यापि प्रसिद्ध न झाल्यामुळें विंटरनिट्झ हा आपलें मत देण्याचें धाडस करीत नाहीं.

**बुद्धवंस.**—खुद्दक निकायांतील लहान ग्रंथांमध्यें बुद्धवंस हा एक आहे. यामध्यें गौतम बुद्धाच्या पूर्वी जगाच्या बारा कल्पांमध्यें होऊन गेलेल्या चोवीस बुद्धांच्या पद्यमय परंपरागत कथा दिल्या आहेत. पूर्वीच्या चोवीस बुद्धांपैकीं प्रत्येकाचें वर्णन एकएका प्रकरणांत केलें असल्याचें प्रास्ताविक प्रकरणांत सांगितलें आहे. प्रत्येक बुद्धानें धर्मचक्राला कशी गति दिली याचें शुष्क वर्णन असून गौतम बुद्धाच्या चरित्रांतील गोष्टी पूर्वीच्या प्रत्येक बुद्धाच्या चरित्रामध्यें कांहीं किरकोळ फरकानें कशा घडत गेल्या, तें दाखविलें आहे. या सर्व गोष्टी गौतम बुद्धानें स्वमुखानें सांगितल्या आहेत असें दाखविलें आहे, आणि त्यानें पूर्वीच्या प्रत्येक बुद्धाच्या वेळीं आपण कोण होतों, आपण त्याची कशी पूजा करीत होतों व त्यानें आपण पुढें बुद्ध होणार हें भविष्य कसें वर्तविलें होतें, याची हकीकत दिली आहे. या ग्रंथामध्यें पहिला

बुद्ध दीपंकर याची कथा असलेलें दुसरें प्रकरण यामध्येंच कायतों काव्य व प्रतिभा हीं दिसून येतात.

त्या वेळीं गौतम बुद्ध सुमेध या नांवाचा श्रीमान् ब्राह्मण होता. त्यानें एके दिवशीं जगाचा तिटकारा येऊन हें क्षुद्र शरीर एखाद्या घाणेरड्या वस्तूप्रमाणें तुच्छ लेखून हिमालयामध्यें जाऊन आश्रमवास पतकरला. या पद्यमय वर्णनावरून थेर गाथांचें स्मरण होतें. त्या वेळीं बुद्ध दीपंकर हा धर्माचा विजय करीत सर्व जगामध्यें फिरत होता, आणि सर्व मनुष्यें व देव त्याची पूजा करीत होते. साधु झालेला सुमेध ह्याहि येऊन मार्गांत एका चिखल असलेल्या जागीं आपल्या मोकळ्या केलेल्या जटा, तागाचें वस्त्र व चामड्याचें पांघरूण अंथरून आपण उपडा निजतो. मनांत इच्छा ही कीं, दीपंकर जेव्हां आपल्या शिष्यांसह त्या मार्गानें जाईल, तेव्हां त्याच्या पायाला चिखल लागूं नये याप्रमाणें तो जमिनीवर पडला असतां एके दिवशीं तो बुद्ध होऊन जगाचा उद्धार करण्याचा निश्चय करतो. दीपंकर येऊन सुमेध पुढें मोठा होईल असें भविष्य सांगतो. तेव्हां सर्व दहा सहस्र जगांतील लोक आनंदाची गर्जना करतात, आणि पुढें येणाऱ्या बुद्धाबद्दलचें भविष्य सांगण्याच्या वेळीं होणारीं नेहमींचीं शुभ चिन्हें व चमत्कार होतात. परंतु सुमेध हा बुद्धत्व प्राप्त होण्यापूर्वीची जी स्थिति—म्हणजे दहा पारमितांचें आपल्या अंगीं पूर्णत्व प्राप्त करून घेणें—ती साध्य करून घेण्याचा निश्चय करतो.

याप्रमाणें हा वरील भाग म्हणजे गौतमाच्या आत्मचरित्राचा प्रस्तावनाच असून तें आत्मचरित्र त्यानें सव्विसाव्या प्रकरणामध्यें पंचवीस पद्यांमध्यें आपल्या अखेरच्या जन्मांतील मुख्य मुख्य गोष्टींचें वर्णन करून सांगितलें आहे. या ग्रंथाच्या उपसंहारामध्यें पुढें येणाऱ्या मैत्रेय बुद्धापर्यंतच्या बुद्धांची यादी आणि बौद्ध स्मारकें कोणकोणत्या भागांत आहेत, हें दिलें आहे.

बुद्धवंस या ग्रंथावरील टीकेमध्यें हा ग्रंथ बुद्धानें स्वतः सांगितलेला असून थेरांच्या अव्याहत परंपरेनें तो तृतीय संगीतापर्यंत चालत आला होता आणि तसाच तो गुरुशिष्यांच्या अव्याहत परंपरेनें आजपर्यंत चालत आला आहे असें सांगितलें आहे. परंतु जुन्या धर्मग्रंथांमध्यें ज्या अर्थी गौतमपूर्वी सहा पुरुष होऊन गेल्याचा उल्लेख आहे, त्या अर्थी टीकाकाराच्या वरील म्हणण्यावर न विश्वसितां बुद्धवंस हा पाली धर्मशास्त्रांतील बराच अलीकडील ग्रंथ आहे, असेंच आपण मानलें पाहिजे. या ग्रंथकालीं बुद्ध देवत्वाप्रत जाऊन त्याची पूजापद्धति पूर्णपणें प्रचारांत आली होती. ही गोष्ट मूळ तिपिटकामध्यें मुळींच आढळत नाहीं. या पूजापद्धतीस बौद्ध संस्कृत वाङ्मयानें व विशेषतः महायान पंथानें पूर्णत्वाप्रत नेलें होतें.

**चरियापिटक.**—खुद्दकनिकायांतील शेवटचा ग्रंथ चरियापिटक हा होय. यामध्यें ३५ पद्यमय जातकांचा संग्रह असून त्यांमध्यें बोधिसत्त्वाच्या ठायीं त्याच्या निरनिराळ्या जन्मांमध्यें सर्व पारमिता कशा पूर्णपणें वसत होत्या हें सांगितलें आहे. औदार्य व सद्गुण या दोन पारमितांना प्रत्येकीं एक एक प्रकरण दिलें असून त्यामध्यें दहा दहा गोष्टी आहेत. तिसऱ्या प्रकरणामध्यें बाकीच्या पारमितांच्या उदाहरणादाखल पंधरा गोष्टी सांगितल्या आहेत. या सर्व गोष्टी बुद्धाच्या तोंडीं घातल्या आहेत. त्यानें या सर्व गोष्टी थोडक्या शब्दांत निरनिराळ्या प्रसंगांचें वर्णन करून व कांहीं ठिकाणीं निरनिराळ्या प्रसंगांचा केवळ उल्लेख करून सांगितल्या आहेत. यावरून ते प्रसंग वाचकांच्या माहितीचे असून त्यांचें केवळ स्मरण करून देणें हेंच कांहीं अशा या गोष्टींचें कार्य असावें असें वाटतें. यांपैकीं बऱ्याच गोष्टी जातक ग्रंथांमध्यें येऊन गेल्या आहेत, आणि या ठिकाणीं एखादा पारमिता पूर्णपणें मनावर ठसविण्याकरितां जरूर तेवढाच भाग सांगितला आहे. मूळ गोष्टींतील काव्यकल्पना व विनोद यांना मुद्दामच फांटा दिल्याप्रमाणें दिसतो. एखाद्या पारमितेबद्दल उदाहरण देतां यावें म्हणून कांहीं गोष्टींना तमच वळण दिलेलें आढळतें. उदाहरणार्थ, माकडानें फसविलेल्या मगराची गोष्ट पहावी. जातक नं० २०८ मध्यें पंचतंत्राप्रमाणें त्या मगरानें त्याच्या स्त्रीला वानराचें काळीज खावें अशी इच्छा झाल्यावरून वानराकरितां टपून बसून त्याला मारण्याकरितां फुसलावून आणलें, परंतु वानरानें आपलें काळीज नदीकांठच्या एका झाडावर टांगून ठेविलें आहे असें सांगून त्या मगराला चकविलें, ही गोष्ट फार विनोदी भाषेमध्यें सांगितली आहे. जातक नं० ५७ या गोष्टींतील विनोद थोडा कमी दर्जाचा आहे, परंतु चरियापिटक ( ३, ७ ) यामध्यें विनोदाला अजीबात फांटा दिलेला आहे. ही गोष्ट बुद्धानें अशी सांगितली आहे:—

"मी एकदां वानराच्या जन्मांत असून नदीतीरावरील एका गुहेत रहात असे. एकदां मला एका मगराच्या धास्तीमुळें बाहेर पडतां आलें नाहीं. ज्या ठिकाणावर उभा राहून मी पलीकडील तीरावर उडी मारून जात असें, त्याच ठिकाणीं तो माझा घातक शत्रु भयंकर मगर बसला होता. त्यानें मला हांक मारिली, इकडे ये; मी उत्तर दिलें, हा आलों, आणि त्याच्या डोक्यावर उभा राहून पलीकडील तीरावर गेलों. मी त्याच्याजवळ खोटें बोललों नाहीं, अगदीं आपल्या शब्दाप्रमाणें वागलों. सत्याच्या प्रीतीमध्यें माझी कोणीहि बरोबरी करूं शकणार नाहीं. याप्रमाणें माझी सत्यपारमिता होती.'

या ठिकाणीं मूळ गोष्टीचा अर्थविहीन असा केवळ सांगाडा आपल्या दृष्टीस पडतो. तींतील मुख्य भाग जें तात्पर्य तें जातक नं० ५७ याप्रमाणेंच असून मूळ गोष्टीला भिंतीवर कागद डकवावा त्याप्रमाणें चिकटविलेलें दिसतें. त्याप्रमाणेंच वेस्संतर जातक जें जातकग्रंथामध्यें ७८६ पद्यांचें महाकाव्य म्हणून आढळतें, तें चरियापिटक ( १, ९ ) यामध्यें ५८ भिकार पद्यांमध्यें आणिलें असून त्यामध्यें भूकंप इत्यादि

चमत्कारांवरच अधिक जोर दिलेला आढळतो. मूळ महाकाव्यांतील फक्त पांचच पद्यें येथें शब्दशः आलेलीं आढळतात.

चरियापिटक आणि जातकग्रंथ यांमधील संबंधाबद्दल आपणांला दोन कल्पना करतां येतील. प्रारंभीं जातकांचें मुख्य कार्य पारमितांचें विशदीकरण हें असावें. प्रथमतः तो ३४,३५ गोष्टींचा एक लहानसा संग्रह असून त्याचाच पुढें वाढत वाढत ५५० गोष्टींचा जातकग्रंथ झाला असावा, आणि त्याचा मूळ उद्देश बाजूला राहिला असावा. याच जातकग्रंथावरून पुढें चरियापिटक ग्रंथ तयार केला असावा. अथवा असेंहि शक्य आहे कीं, जातक ग्रंथामध्यें सध्यां आपणांला आढळणाऱ्या गोष्टी विशेष गंभीर वृत्तीच्या भिक्षूंना अगदींच लौकिक वाटल्यामुळें त्यांनीं जातकांना थोडेंसें तात्त्विक स्वरूप देण्याचा प्रयत्न केला असावा; व याकरितां त्यांनीं कांहीं जातकांची निवड करून त्यांची दहा पारमितांच्या अनुरोधानें रचना करून त्यांचें स्वरूप आपणांला पाहिजे तसें बदलून घेतलें असावें. विंटरनिट्झ यास दुसरी कल्पनाच जास्त शक्य दिसते, आणि त्याच्या मतें सध्यांच्या जातकसंग्रहावर चरियापिटकाची थोडी फार छाया पडलेली दिसते. या प्रारंभींच्या गोष्टींचा पारमितांशीं कांहींहि संबंध नसावा असें तो म्हणतो. याचें कारण तो असें देतो कीं, जातक कथांतील अनेक कथांनां केवळ वरवर सांप्रदायिक स्वरूप दिलें असून त्यांमध्यें या पारमितांचा उल्लेख कोठेंहि आढळत नाहीं. ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकामध्यें जेव्हां चरियापिटक धर्मशास्त्रामध्यें समाविष्ट करण्यांत आलें, त्या वेळच्याच स्वरूपामध्यें तें हल्लीं उपलब्ध आहे कीं काय हा दुसरा प्रश्न आहे. जातकग्रंथाचा प्रास्ताविक भाग जो निदानकथा त्यामध्यें एका चरियापिटकाचा गोषवारा दिला आहे, परंतु तें प्रस्तुत ग्रंथाहून अगदींच निराळें आहे. त्यामध्यें एकंदर ३४ गोष्टी असून त्यांपैकीं २१ प्रस्तुत चरियापिटकाशीं जुळतात. यावरून चरियापिटकाचे अनेक भिन्न पाठ होते असें दिसतें. परंतु या दोन पाठांचा व जातकमालेचा पारमितांच्या दृष्टीनें रचना करून तुलना केली असतां शार्पेंटिये यानें प्रयत्न केल्याप्रमाणें आपणांला मूळ चरियापिटकाची रचना करतां येईल असें विंटरनिट्झ यास वाटत नाहीं. शार्पेंटिये यानें असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे कीं, प्रस्तुत चरियापिटक हें अपूर्ण व अलीकडील असा बनावट ग्रंथ असून, तें कांहींसा मूळ ग्रंथाचा आधार घेऊन उपलब्ध जातकग्रंथाच्या नंतर-बहुधा धर्मग्रंथांचें पालीमध्यें भाषांतर झाल्यानंतर-ख्रिस्त शक ४३० या सुमारास रचलें गेलें असावें. परंतु प्रस्तुत जातकग्रंथ व चरियापिटक यांतील जातकांमध्यें आढळणारें अर्थसादृश्य व शब्दसादृश्य यांचा असाहि एक प्रकारें खुलासा करतां येईल कीं, जेव्हां धर्मशास्त्रीय ग्रंथ संगृहीत करून निश्चित करण्यांत आले, तेव्हां जे अनेक भिक्षू जमले होते, त्यांमध्यें कांहीं थोड्या स्वतंत्र विचारांचे जे भिक्षू होते त्यांनीं जातकट्ठवण्णनामध्यें आढळणाऱ्या गोष्टींचा संग्रह केला; आणि दुसरे जे जास्त कडक भिक्षू होते, त्यांनीं चरियापिटकांतील गोष्टींचा संग्रह केला. कसेंहि असलें तरी चरियापिटकाची रचना करणारा भिक्षु सरळ वृत्तीचा असून त्याच्या ठिकाणीं कवित्व शक्तीचा अभाव दिसतो. उलटपक्षीं जातकग्रंथांतील गोष्टींचा रचना करणाऱ्यांमध्यें कांहीं सात्त्विक भिक्षू व अडाणी कवी असून थोडेंसे अलौकिक कवींहि असावे.

याप्रमाणें आपणांला असें अनेक ठिकाणीं आढळून येतें कीं, खुद्दक निकायामध्यें निरनिराळ्या कालच्या व बहुधा निरनिराळ्या पंथांच्या सर्व तऱ्हेच्या ग्रंथांचा समावेश करण्यांत आला होता, आणि त्यांच्या धर्मशास्त्रांतील महत्त्वाबद्दलहि संशयच होता.

**अभिधम्मपिटक.**—पूर्वी अभिधम्म (श्रेष्ठ धर्म अथवा धर्माचीं श्रेष्ठ तत्त्वें) या शब्दाचे यूरोपस्थ पंडित मेटॅफिजिक्स (अध्यात्म) या शब्दानें भाषांतर करीत असत. परंतु अभिधम्म याचा अध्यात्मज्ञानाशीं अथवा तत्त्वज्ञानाशीं सुत्तपिटकांत सांगितलेल्या धम्मापेक्षां यत्किंचितहि कमी अगर जास्त संबंध नाहीं. मिसेस ऱ्हीस डेव्हिड्स ही बौद्ध तत्त्वज्ञानाची इतकी चिकित्सक व चहाती असूनहि तिनें असें म्हटलें आहे कीं, सर्व अभिधम्मपिटक जरी अस्तित्वांत नसतें तरी बौद्ध तत्त्वाविषयींच्या आपल्या ज्ञानामध्यें किंचितहि उणेपणा आला नसता. सुत्तपिटकांतील ग्रंथ आणि अभिधम्मपिटकांतील ग्रंथ यांमध्यें एवढाच फरक आहे कीं, दुसऱ्यामधील माहिती जास्त सविस्तर, रुक्ष, किंवा विद्वत्तादर्शक, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अधिक पांडित्यपूर्ण आहे. दोघांचाहि विषय एकच आहे. दोघांमध्येंहि कल्पकता व गांभीर्य यांचा अभाव दृष्टीस पडतो, व व्याख्या व वर्गीकरण यांची रेलचेल दिसते. या व्याख्यांचा कोशाच्या व बौद्धसांप्रदायिक परिभाषेचें यथार्थ ज्ञान मिळविण्याच्या कामीं उपयोग होईल म्हणावें तर त्यांमध्यें केवळ शब्दास समानार्थक प्रतिशब्द ठेवून दिलेले असल्यामुळें त्या बाबतींतहि निराशा होते. वर्गीकरणाचें नीतिशास्त्राची मानसशास्त्राच्या पायावर रचना करण्याचा प्रयत्न म्हणून कितीहि महत्त्व असलें, तरी त्यामध्यें सृष्टींतील व्यापारांविषयीं खोल दृष्टीनें व शोधक बुद्धीनें चिकित्सा केलेली क्वचितच आढळते. बहुतेक ठिकाणीं तर स्वतःच कल्पिलेल्या अथवा क्षुल्लक वर्गांमध्यें निरनिराळ्या वस्तूंच्या लांबलचक याद्या दिल्या आहेत, आणि त्यांमध्यें सर्वत्र कांहीं तरी सांप्रदायिक ठराविक तत्त्वेंच दृष्टीस पडतात-शोधक बुद्धीनें सशास्त्र पद्धतीनें केलेला एकहि शोध आढळत नाहीं. या ग्रंथाचें स्वरूप बहुतेक संवादात्मक आहे.

अभिधम्मांतील ग्रंथ सुत्तपिटकांतील ग्रंथांवरूनच रचलेले दिसतात. कांहीं सूत्रांची भाषापद्धति (मज्झिमनिकाय, १३७; व १४०) अभिधम्माप्रमाणेंच आहे, आणि अंगुत्तर-

निकाय हें तर अभिधम्मपिटकाचें पूर्वगामीच दिसतें. विनयपिटकामध्यें अभिधम्मासंबंधीं उल्लेख केलेल्या मातिका(मातृका-याद्या) यांमध्येंच अभिधम्मपिटकाचें मूळ आढळतें.

**पुग्गल पञ्ञत्ति.**—(व्यक्तिवर्णन) अभिधम्मपिटकांतील या पहिल्या ग्रंथाचें स्वरूप व आंतील विषय हीं अद्यापीहि पुष्कळ ठिकाणीं सुत्तपिटकांतील ग्रंथांप्रमाणेंच दिसतात. याचें स्वरूप दीघ निकायांतील संगीतिसुत्ताहून किंचित् निराळें असून यांतील ३ ते ५ हीं प्रकरणें बहुतेक अंगुत्तरनिकायामध्यें आलीं आहेत. यामधील कांहीं प्रकरणें इतर निकायांतील कांहीं सुत्तांप्रमाणेंच असून तीं इतरांपेक्षां अधिक चांगलीं दिसतात. मधून मधून कांहीं सुंदर दृष्टांत आढळतात. उदाहरणार्थ, निरनिराळ्या तऱ्हेनें स्त्रियांशीं संबंध असलेल्या पांच प्रकारच्या भिक्षूंना पांच योध्यांची उपमा दिलेली आहे (५, ३), आणि हाच दृष्टांत मज्झिम निकायामध्यें बारीक, सारीक गोष्टींतहि लावून दाखविलेला आहे. परंतु या ग्रंथामध्यें वाङ्मयाच्या दृष्टीनें ज्यांचें महत्त्व नाकबूल करतां येणार नाहीं, अशीं ठिकाणें थोडींच आढळतात. साधारणपणें ग्रंथाच्या इतर भागांप्रमाणें दृष्टांतहि बहुतेक नीरस आणि कंटाळवाणे आहेत. या ग्रंथाचा मुख्य विषय निरनिराळ्या व्यक्तींचें त्यांच्या नीतिमत्तेच्या दृष्टीनें वर्गीकरण करणें हा आहे. खालीं दिलेल्या उदाहरणावरून या ग्रंथाचें धोरण, आणि व्याख्या व वर्गीकरणें यांचें अभिधम्मांतील वास्तविक स्वरूप यांची कल्पना येईल.

प्र०—क्रोधयुक्त कोणास म्हणावें आणि क्रोध म्हणजे काय?

उ०—क्रोध म्हणजे संतापणें; संतापयुक्त व द्वेषयुक्त होणें; द्वेष करण्याची क्रिया; द्वेषयुक्त मनःस्थिति; रागीट असणें; देहभान विसरणें; रागावणें; खपा मर्जी; वैरीपणा; अत्याचार; जळफळाट; मनाची विकारवशता. ह्याला क्रोध म्हणतात; व जो मनुष्य ह्या क्रोधापासून मुक्त नसतो त्याला क्रोधयुक्त म्हणतात.

प्र०—लबाड कोणाला म्हणावें व लबाडी म्हणजे काय?

उ०—मनुष्य लबाड व कावेबाज असला; आणि त्यामध्यें लबाडी, लबाडीचा स्वभाव, लबाडपणाचे विचार, कावेबाजपणा, हेवा, मत्सर, विश्वासघातकीपणा हे दोष भरलेले असले तर त्यास लबाडी म्हणतात. आणि जो ह्या दोषांपासून मुक्त नसतो तो लबाड होय.

प्र०—नीच कोणाला म्हणावें?

उ०—अनीतिमान्, ज्याला वाईट संवयी आहेत व जो दुसऱ्या नीतिभ्रष्ट मनुष्याबरोबर स्नेह राखतो त्याला नीच म्हणावें.

प्र०—उदार कोणाला म्हणावें?

उ०—जो नीतिमान् असतो, ज्याला चांगल्या संवयी असतात व जो नीतिमान् व सुशील माणसाशीं संगत ठेवतो त्याला उदार म्हणावें.

**धातुकथा.**—धातुकथा (पदार्थनिर्देश) हा अभिधम्मपिटकांतील दुसरा ग्रंथ आहे. या लहानशा ग्रंथामध्यें चौदा प्रकरणें असून त्यांत प्रश्नोत्तररूपानें सृष्टींतील पदार्थांचे चमत्कार व त्यांचीं निरनिराळीं स्वरूपें यांचें वर्णन आहे.

**धम्मसंगणि.**—तिसरा ग्रंथ धम्मसंगणि (मनःस्थितींचे प्रकार) हा असून त्याला मिसेस ऱ्हीस डेव्हिड्स या भाषांतरकर्त्रीनें मानसिकनीतिशास्त्रसंग्रह असें नांव दिलें आहे. या ग्रंथांत धम्मांचे निरनिराळे प्रकार सांगितले आहेत. यामध्यें शारीरिक व मानसिक स्थिति, कल्पना व मनाचे चमत्कार हे विषय येतात. इंग्रजी भाषांतरकर्त्रीनें प्रास्ताविक आध्यात्मिक निबंधामध्यें या दुर्बोध प्रश्नोत्तरावरून व त्यांतील रुक्ष याद्यांवरून बौद्ध तत्वज्ञानपद्धतीचा उत्कृष्ट रीतीनें जुळवून मांडणी करण्याचा प्रयत्न केला आहे आणि या पद्धतीला तिनें तत्त्वज्ञान पद्धतीच्या इतिहासामध्यें बरेंच महत्त्वाचें स्थान दिलें आहे. सिंहलद्वीपामध्यें तरी निदान या ग्रंथाचा अधिकार बराच मोठा समजला जातो. या ग्रंथाच्या तिसऱ्या प्रकरणावर अत्थुद्धार या नांवाची सारिपुत्ताच्या नांवानें प्रचलित असलेली टीका परिशिष्टादाखल जोडलेली असून तिचा धर्मशास्त्रामध्यें समावेश करण्यांत आला होता.

**विभंग.**— विभंग हा वरील ग्रंथास पुरवणीदाखल रचलेला आहे. धम्मसंगणींतील सूत्रें व पदार्थांचे वर्ग यामध्यें गृहीत धरले असून कांहीं नवीनहि घातले आहेत. पहिल्या प्रकरणामध्यें बौद्धांच्या मूलभूत कल्पना व मूलभूत सत्यें यांचें विवेचन आहे; दुसऱ्या प्रकरणामध्यें इंद्रियजन्य ज्ञानापासून बुद्धाच्या सर्वश्रेष्ठ ज्ञानापर्यंत सर्व ज्ञानांबद्दल विवरण आहे; तिसऱ्या प्रकरणांत ज्ञानमार्गामध्यें येणारीं विघ्नें सांगितलीं आहेत; आणि शेवटच्या प्रकरणांत मनुष्य व इतर योनींतील निरनिराळ्या स्थितींचें काल्पनिक वर्णन आहे.

**पट्ठानपकरण व यमक.**—पट्ठानपकरण अथवा महापकरण, याचा दुकपट्ठान या नांवाचा एकच भाग अद्यापपर्यंत प्रसिद्ध झालेला आहे. त्याप्रमाणेंच यमक (दुहेरी प्रश्न—म्हणजे यांतील सर्व प्रश्न अस्तिवाचक व नास्तिवाचक अशा दोन्ही तऱ्हेनें विचारिलेले आहेत) या ग्रंथाचाहि फक्त पहिला भागच बाहेर पडला आहे.

**कथावत्थु.**— बौद्ध संप्रदायाच्या इतिहासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाचा ग्रंथ म्हटला म्हणजे तिस्स मोग्गलिपुत्त याच्या नांवावर असलेला या संग्रहांतील सातवा ग्रंथ कथावत्थु हा होय. या ग्रंथाचीं एकंदर २३ प्रकरणें असून प्रत्येक प्रकरणामध्यें आठ ते बारा उपप्रकरणांत निरनिराळीं पाखंड मतें देऊन त्यांचें खंडन केलें आहे. त्यामध्यें आपणांला पुढें दिलेल्या प्रकारचे प्रश्न आढळतात. आत्म्याचें अस्तित्व आहे काय? अर्हत पद प्राप्त झाल्यानंतर त्यापासून भ्रष्ट होणें शक्य आहे काय? निर्वाण दोन प्रकारचें आहेत काय? बुद्धाच्या दहा अमानुष शक्ती (दशबलें) त्याच्या श्रोत्यांनांहि प्राप्त होतात काय? कौटुंबिक मनुष्याला अर्हत

पद मिळतें काय ? ज्ञान हें विचारांत असून वेगळें असूं शकतें काय ? प्रत्येक कर्माला फल असतें काय ? वगैरे. या सर्व प्रश्नांना नकारार्थी उत्तर दिलें असून याच्या विरुद्ध असणारीं मतें पाखंडी म्हणून ठरविलीं आहेत. या पाखंडी मतांचें निरसन करण्याकरितां सुत्तपिटकांतील वचनांचे आधार दिले आहेत. हा ग्रंथ तृतीय संगीतीचा अध्यक्ष तिस्स मोग्गलिपुत्त यानें रचला असल्याबद्दल जी परंपरा आहे ती जर निश्चितपणें विश्वसनीय असेल तर या ग्रंथाचें महत्त्व विशेष मानिलें पाहिजे. कारण, या ग्रंथावरून आपणांला अशोककालीन सुत्तपिटकाची स्थिति, आणि तत्कालीन बौद्ध संप्रदायांतील अध्यात्मविषयक कल्पना यांच्याबद्दल विश्वसनीय पुरावा मिळेल सिंहली बखरी परंपरेनें चालत आल्या असून त्यांचें मूल स्वरूपच कायम राहिलें असावें असें ओल्डेनबर्गप्रमाणेंच विंटरनित्झ याचें मत आहे. आणि यामुळे कथावत्थु हा ग्रंथ ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांतील बौद्ध धर्माच्या स्वरूपाबद्दल पुरावा म्हणून मानण्यास हरकत नाहीं असें विंटरनित्झ म्हणतो. त्याच्या मतें कोणाला या परंपरेबद्दल संशय असला तरीहि प्रस्तुत ग्रंथाचें महत्त्व कमी होत नाहीं. मात्र तशा स्थितींत कथावत्थु या ग्रंथाचा काल अनिश्चित राहून निरनिराळ्या पंथभेदांचें ऐतिहासिक महत्त्व लक्षांत येण्याकरितां त्यांच्या संबंधीं नेपाळी, चिनी व तिबेटी ग्रंथांतून मिळणाऱ्या माहितीची तुलना केली पाहिजे.

परंतु आपण जर परंपरा खरी धरून चाललों, तर आपणांला असेंहि गृहीत धरावें लागेल कीं, कथावत्थु ग्रंथाप्रमाणेंच अभिधम्मपिटकांतील इतर सहा ग्रंथहि ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकामध्यें अस्तित्वांत असून थेरवाद पंथाच्या धर्मग्रंथांमध्यें समाविष्ट झाले होते. तथापि हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, बौद्ध संप्रदायांतील निरनिराळे पंथ अभिधम्माचें महत्त्व सारखेंच मानीत नाहींत. हीनयान पंथांतील सौत्रांतिक पंथामध्यें अभिधम्मपिटकांतील सातहि ग्रंथांना आधारभूत मानीत नाहींत. तसेंच सर्वास्तिवादीपंथामध्यें अभिधम्मपिटक संस्कृत भाषेत असून त्यांतहि सात ग्रंथ आहेत; परंतु ते पाली अभिधम्मपिटकापेक्षां निराळे आहेत. यावरून आणि विनयपिटकामध्यें संगीतीबद्दल दिलेल्या हकीकतींमध्यें अभिधम्माचा उल्लेख नाहीं, तसेंच इतर कांहीं ठिकाणीं फक्त सुत्त आणि विनय या दोहोंचाच आधारग्रंथ म्हणून उल्लेख असून अभिधम्माचा उल्लेख आढळत नाहीं यावरून, अभिधम्म ग्रंथ साधारणपणें सुत्तपिटक व विनयपिटक यांपेक्षां खात्रीनें अलीकडचे असले पाहिजेत असें दिसतें.

तथापि ज्या पंथांत अभिधम्मपिटक यास धर्मशास्त्रांत स्थान मिळालें आहे, त्यामध्यें त्याचें महत्त्व फार मानिलें आहे. मिलिंदपन्ह यामध्यें नागसेन याबद्दल असा चमत्कार सांगितला आहे कीं, तो इतका हुशार होता कीं, सुत्तांचें अध्ययन करण्यापूर्वीच त्याला अभिधम्माचे सात ग्रंथ शिकतां आले. ख्रिस्त शक २६२ या वर्षाच्या सुमारास खोदलेल्या सिंहलद्वीपांतील मिहिंतल येथील एका देवळाजवळच्या खडकावरील शिलालेखामध्यें तेथील मठांतील भिक्षूंकरितां नियम घालून दिले आहेत. त्यामध्यें असें म्हटलें आहे कीं, अभिधम्मपिटकाचा उपदेश करणाऱ्यांकरितां १२, सुत्तपिटकाचें विवेचन करणाऱ्यांकरितां ७ आणि विनयपिटकाचें पठन करण्याऱ्यांकरितां ५ याप्रमाणें खोल्या मुद्दाम राखून ठेविलेल्या आहेत.

अभिधम्म ग्रंथांचा अभ्यास विशेषतः ब्रह्मदेशामध्यें अद्यापपर्यंत चालू असून गेल्या शतकामध्यें या विषयावर अनेक ग्रंथ तयार झाले आहेत.

**सिंहावलोकन.**— बौद्धांच्या तिपिटक अथवा पाली धर्मशास्त्र या नांवानें प्रसिद्ध असलेल्या वाङ्मयांत किती ग्रंथ आहेत, त्यांचें अंतर्गत स्वरूप कसें आहे त्यांत 'नवा' भाग किती, जुना भाग किती, आंतील विचार कोणत्या प्रकारचे आहेत इत्यादि गोष्टींचें स्थूलपणानें वर्णन आतांपर्यंत केलें आहे. या प्रंथाच्या एकंदर विस्तारामुळें याचें स्वरूप आकलन होत नाहीं असें पुष्कळांस वाचतांना वाटेल. यासाठीं, झालेल्या वर्णनाचा पुनःसंक्षेप अवश्य आहे. तो करण्याकरितां पाली धर्मशास्त्र, त्याचे मुख्य विभाग आणि मुख्य विभागांचे पोटविभाग हें दाखविणार कोष्टक येथें देतों.

त्रिपिटक याचे १ विनयपिटक (आचारसंग्रह), २ सुत्तपिटक (विवरणात्मक) व ३ अभिधम्मपिटक असे तीन विभाग आहेत.

**१ विनयपिटक.**—विनयपिटकाचे पुन्हां तीन विभागः १ सुत्तविभंग [ पाराजिक व पाचित्तिय ], २ खंधक [ महावग्ग व चुल्लवग्ग ] आणि ३ परिवार अथवा परिवारपाठ.

(१) सु त्त वि भं ग.—याचा अर्थ सुत्तांची फोड. यांत पापांची यादी दिलेली आहे. पापांच्या प्रकारानुसार हीं पापें पाराजिक व पाचित्तिय या दोन भागांत विभागलीं आहेत.

पाराजिक.—यांतील पातकांनीं मनुष्य संप्रदायबहिष्कृत होत असे.

पाचित्तिय.—यांतील पातकांस प्रायश्चित्त आहे.

(२) खं ध क.—यांत संघाच्या व्यवस्थेबद्दल नियम दिले आहेत. याचे महावग्ग व चुल्लवग्ग असे दोन पोटविभाग आहेत.

महावग्ग.—याचीं दहा प्रकरणें असून त्यांत संप्रदायप्रवेश, उपोसथविधी वगैरेसंबंधीं नियम आहेत.

चुल्लवग्ग.—यांत १० प्रकरणें असून त्यांपैकीं ९ प्रकरणांत दिनचर्या वगैरे दिलें असून १० व्या प्रकरणांत भिक्षुणींबद्दल नियम दिले आहेत.

(३) प रि वा र.—कमी महत्वाचा भाग. यांत १९ प्रकरणें असून त्यांत सूची, परिशिष्टें वगैरे आहेत.

**२ सुत्तपिटक.**—यांत पुढें दिलेले पांच निकाय आहेतः १ दीघ निकाय ( दीर्घ सूत्रें ); २ मज्झिम निकाय ( मध्यम प्रकारचे संवाद ); ३ संयुत्त निकाय ( सूत्रांचे गुच्छ ); ४

अंगुत्तरनिकाय ( कांहीं लहान सूत्रें ); व ५ खुद्दकनिकाय ( क्षुद्र सूत्रें ).

(१) दी घ नि का य.—हा उपदेशपर मोठमोठ्या सूत्रांचा संग्रह आहे. यांत बरींच मोठीं सूत्रें आहेत. यांपैकीं कांहीं महत्त्वाचीं सूत्रें पुढें दिल्याप्रमाणें:—

नं १ ब्रह्मजालसुत्त, हें संप्रदायेतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे.

नं. २ सामञ्ञफलसुत्त, यांत वैराग्यफलावर विवेचन आहे.

नं ३ अंबट्ठसुत्त, यांत जातिव्यवस्थेचा इतिहास आहे.

नं. ५ कूटदंतसुत्त, हें तीक्ष्णदंत ब्राह्मण यावर व्याख्यान आहे.

नं. १३ तेविज्जसुत्त, हें वेदत्रयीवर व्याख्यान आहे. यांत व कूटदंत सुत्तांत बौद्ध व ब्राह्मण संप्रदायांचा संबंध दाखविला आहे.

नं. १४ महापदानसुत्त, यांत बुद्धाच्या चमत्कारांचें वर्णन आहे.

नं. १५ महानिदानसुत्त, यांत कारणपरंपरेचा ऊहापोह केला आहे.

नं. १६ महापरिनिब्बान सुत्त, हें बुद्धाचें महानिर्वाणावरील व्याख्यान आहे.

नं. १७–२१ हीं पौराणिक सुत्तें आहेत. यांपैकीं सर्वांत चमत्कारिक सक्कपन्हसुत्त ( शक्रप्रश्नसूत्र ) हें आहे.

नं. २३ पायासिसुत्त, हा एक प्लेटोच्या संवादासारखा इतिहाससंवाद आहे.

नं ३१ सिगालोवादसुत्त, यांत बौद्ध गृहस्थाचा आचार दिला आहे.

(२) म ज्झि म नि का य.— यांत १५२ भाषणें व संवाद आहेत. यांपैकीं अस्सलायनसुत्त यांत बुद्धकालीन समाजस्थिति चांगली दृष्टीस पडते.

(३) सं यु त्त नि का य.—या संग्रहांत सूत्रांचे ५६ गुच्छ आहेत. यांपैकीं नं. १ देवतासंयुत्त, नं. ४ मारसंयुत्त, नं. ५ भिक्षुणीसंयुत्त, नं. ११ सक्कसंयुत्त, नं. १२ निदानसंयुत्त, नं. १५ अनमतग्ग संयुत्त, नं. १६ कस्सपसंयुत्त, नं. २८ सारिपुत्तसंयुत्त, नं. २९ नागसंयुत्त, नं. ३४ समाधिसंयुत्त; नं. ३५ साळायतन संयुत्त नं. ३७ मातुगामसंयुत्त, नं. ४० मोग्गलानसंयुत्त, नं. ५६ सच्चसंयुत्त हे कांहीं महत्त्वाचे गुच्छ आहेत.

(४) अ गु त्त र नि का य.—यांतलि सूत्रें लघुत्व ह्या गुणानें युक्त आहेत.

(५) खु द्द क नि का य.—याचे पोट विभाग येणेंप्रमाणें: खुद्दकपाठ, २ धम्मपद, ३ उदान, ४ इतिवुत्तक, ५ सुत्तनिपात, ६ विमानवत्थु, ७ पेतवत्थु, ८ थेरगाथा, ९ थेरीगाथा, १० जातक, ११ निद्देस, १२ पटिसंभिदामग्ग, १३ अपदान, १४ बुद्धवंस व १५ चरियापिटक.

१ खुद्दकपाठ.—यांत ९ सूत्रें आहेत. पैकीं नं. ६ हें रतनसुत्त व नं. ९ मेत्तसुत्त आहे.

२ धम्मपद.—यांत ४२३ श्लोक आहेत.

३ उदान.—याचे १० वर्ग असून प्रत्येक वर्गांत ८ सूत्रें आहेत.

४ इतिवुत्तक.—यांत ११२ सूत्रें आहेत.

५ सुत्तनिपात.—यांत उरगवग्ग, चुल्लवग्ग, महावग्ग, अट्ठकवग्ग व पारायण अशीं ५ प्रकरणें आहेत.

६–७ विमानवत्थु व पेतवत्थु.—या देवांच्या व भूतांच्या गोष्टी आहेत.

८–९ थेरगाथा व थेरीगाथा.—हीं अनुक्रमें बौद्ध भिक्षु व भिक्षुणी यांनीं लिहिलेलीं दोन फार सुंदर काव्यें आहेत.

१० जातककथा.—या बुद्धाच्या पूर्वजन्मींच्या गोष्टी आहेत. प्रत्येक जातक कथेंत पच्चुपन्नवत्थु, अतीतवत्थु, गाथा, वेय्याकरण व समोधान असे ५ भाग असतात.

११ निद्देस.—हें सुत्तनिपाताच्या दोन भागांवरील टीकेचें नांव आहे.

१२ पटिसंभिदामग्ग.—हा अभिधम्म वाङ्मयापैकीं भाग आहे.

१३ अपदान.—हीं अर्हत झालेल्या शिष्यांचीं व शिष्यिणींचीं पद्यें आहेत.

१४ बुद्धवंस.—या २४ बुद्धांच्या परंपरागत कथा आहेत.

१५ चरियापिटक.—हा ३५ पद्यमय जातकांचा संग्रह आहे.

**३ अभिधम्मपिटक**—याचे १ पुग्गल पञ्ञत्ति ( म्ह० व्यक्ति वर्णन ); २ धातु कथा ( पदार्थ निर्देश–यांत १४ प्रकरणें आहेत ); ३ धम्मसंगणि (मनःस्थितीचे प्रकार); ४ विभंग ( वरील ग्रंथास पुरवणी दाखल ग्रंथ ); ५ पट्ठान प्रकरण अथवा महाप्रकरण ( पैकीं प्रसिद्ध भाग दुकपट्ठान ); ६ कथावत्थु ( यात २३ प्रकरणें असून त्यांत पाखंडांचें खंडन केलें आहे ); व ७ यमक ( याचा एकच भाग प्रसिद्ध झाला आहे ); असे सात भाग आहेत.

**तिपिटकेतर बौद्ध वाङ्मय.**—तिपिटकाशिवाय बौद्ध वाङ्मयात दुसरेहि अनेक ग्रंथ आहेत. यांपैकीं कांहीं पाली भाषेंत, कांहीं मिश्र संस्कृतांत व कांहीं शुद्ध संस्कृतांत लिहिलेले आहेत. तिपिटकेतर पाली वाङ्मयासंबंधानें लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं त्यामध्यें एक मिलिंदपन्ह हा अपवाद खेरीज करून दुसरा कोणताहि ग्रंथ खुद्द हिंदुस्थानांत लिहिलेला नाहीं. बौद्ध वाङ्मयांत आजपर्यंत झालेल्या या ग्रंथांची संख्या इतकी मोठी आहे कीं त्यांच्या स्वरूपाचा परिचय करून देण्याकरितां त्यांतील कांहीं मुख्य मुख्य ग्रंथांचा केवळ सूचिरूपानेंच येथें उल्लेख करतां येण्यासारखा आहे.

पाली ग्रंथ.

मि लिं द प न्ह.—मिनँडर व नागसेन नामक बौद्ध प्रचारक यांमधील संवाद. हा भरतखंडांत ख्रिस्ती शकाच्या आरंभीं रचला गेला असावा.

नि दा न क था.—म्ह० आरंभींच्या गोष्टी. बुद्धाचें संगतवार लिहिलेलें पहिलें चरित्र. हा सिंहलद्वीपांत रचला गेला.

गं ध वं स.—हा बहुधा १७ व्या शतकांत ब्रह्मदेशांत नंदपञ्ञ नामक ब्रह्मी इसमानें लिहिला असावा.

बु द्ध घो षा चे ग्रंथ.—जातकटीका; विसुद्धिमग्ग ( शुद्धतेचा मार्ग, सांप्रदायिक विधी व संस्कार यांची माहिती ); समंतपासादिका ( विनय पिटकावरील टीका ); समंगलविलासिनी (दीघनिकायावरील टीका); पपंचसूदनी (मज्झिम निकायावरील टीका ); सारत्थपकासिनी ( संयुत्त निकायावरील टीका ); मनोरथपूरणी (अंगुत्तर निकायावरील टीका); कंखावितरणी ( पातिमोक्खावरील टीका ); परमत्थकथा ( अभिधम्म पिटकांतील सात ग्रंथांवरील टीका ); खुद्दक पाठ, धम्मपद, सुत्तनिपात, जातक आणि अपदान यांवरील टीका.

प र म त्थ दी प नी.—पेतवत्थु,विमानवत्थु, थेरगाथा व थेरीगाथा या ग्रंथांवरील धम्मपालाची ख्रिस्ती शकाच्या ५ व्या किंवा ६ व्या शतकांत लिहिलेली टीका.

ने त्ति (संगतिसूत्र).—कच्चायनाच्या नांवावर असलेला पण मूळ ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत लिहिलेला ग्रंथ.

पे ट को प दे स.—पिटकाच्या अभ्यासकास उपदेश. कच्चायनाच्या नांवावरील दुसरा एक ग्रंथ.

दी प वं स.—ख्रिस्ती शकाच्या ४ थ्या ५ व्या शतकांत अट्ठकथांवरून महाकाव्य रचण्याचा सिंहलद्वीपांत केला गेलेला पहिला ओबडधोबड प्रयत्न.

म हा वं स.—सिंहलद्वीपांतील महानाम नामक कवीनें ५ व्या शतकाच्या चतुर्थ पादांत रचलेलें एक स्वतंत्र व पूर्ण महाकाव्य.

म हा बो धि वं स किं वा बो धि वं स.—बोधिवृक्षाची उपतिस्स नांवाच्या भिक्षूनें १० व्या शतकाच्या अखेरीस रचलेली गद्यात्मक गोष्ट.

दा ठा वं स.—धम्मकित्ति यानें १३ व्या शतकांत संस्कृतच्या धर्तीवर पालींत लिहिलेली बुद्धाच्या दांतांची गोष्ट.

थू प वं स.—पवित्र स्थानांची गोष्ट; काल-तेरावें शतक; भाषा-सिंहली व पाली; रचणार—वाचिस्सर.

च के स धा तु वं स.—हा ब्रह्मदेशांत रचला गेला.

शा स न वं स.—पञ्ञसामि भिक्षूनें १८६१ त ब्रह्मदेशामध्यें लिहिलेला पाली ग्रंथ.

खु द्द सि क्खा व मू ल सि क्खा.—हे अनुक्रमें महासामि व मूलसिरि यांनीं इ. स. ४४० त रचले असून त्यांत विनय पिटकांतील नियमांचा सारांश आहे.

ध म्म सं ग ह व सा र सं ग ह.—धम्मकित्तीचे बौद्ध मतावरील ग्रंथ.

द्वे मा ति का व कं खा वि त र णी.—ब्रह्मदेशांत सिक्खांप्रमाणेंच हेहि फार उपयुक्त समजले जातात.

अ भि ध म्म त्थ सं ग ह.—मानसशास्त्रावरील व नीतिशास्त्रावरील लहानसें बौद्ध पुस्तक.

पं च ग ति दी प न.—पातालादि लोकांचें वर्णन करणारें काव्य.

लो क दी प सा र.—१४ व्या शतकांतील मेधंकराचा वरच्याप्रमाणेंच एक ग्रंथ.

अ ना ग त वं स.—भविष्य कालाची गोष्ट.

पा र मी म हा श त क.—१४ व्या शतकांतील कोण्या एका धम्मकित्तीचें पाली काव्य.

स द्ध म्मो पा य न.—सद्धर्माचीं साधनें व मार्ग.

प ज्ज म धु.—बुद्धप्पिय याचें बुद्धस्तुतिपर ११०० च्या सुमाराचें पाली काव्य.

ते ल क टा ह गा था.—कल्याणीच्या तिस्स राजाची गोष्ट असलेलें १२ व्या शतकापूर्वीचें पाली काव्य.

जि ना लं का र.—बुद्धरक्खिताचें बुद्धाची गोष्ट वर्णन करणारें काव्य.

जि न च रि त.—वनरत मेधंकर याचें १३ व्या शतकांतील बुद्धचरित्रपर काव्य.

मा ला लं का र व त्थु.—ब्रह्मींत भाषांतर झालेलें एक बुद्धचरित्रपर पाली काव्य.

र स वा हि नी.—सिंहलींतून पालींत भाषांतरिलेला हिंदुस्थानविषयक व सिंहलद्वीपविषयक गोष्टींनीं भरलेला वृत्तान्तपर ग्रंथ.

बु द्धा लं का र.—आवामधील सीलवंस कवीनें पंधराव्या शतकांत रचलेला ग्रंथ.

वे स्सं त र जा त क.—पद्यात्मक तर्जुमा.

रा जा धि रा ज वि ला सि नी.—आठराव्या शतकांतील ब्रह्मदेशांत लिहिला गेलेला गद्य ग्रंथ.

शुद्ध व मिश्र संस्कृत भाषेंतील बौद्ध वाङ्मय.

ल लि त वि स्त र.—महायानी पंथाचा ग्रंथ. याचा सारांश मागें आठव्या प्रकरणांत दिलाच आहे.

म हा व स्तु.—बुद्धचरित्रपर ग्रंथ. हीनयानाच्या जुन्या संप्रदायाचें मिश्र संस्कृत भाषेंत ख्रि. पू. तिसऱ्या शतकांत लिहिलेलें गद्यपद्यात्मक पुस्तक.

अ श्व घो षा चे ग्रं थ.—बुद्धचरित ( बुद्ध चरित्रावर एक सुंदर काव्य, हा चिनी व तिबेटी भाषांत भाषांतरलेला आहे); सौन्दरानंद (बुद्धचरित्रपर दुसरें एक काव्य); सूत्रालंकार

(यांत हीनयानी धोरणाचीं अनेक कथानकें आहेत. हा इ. स. च्या दुसऱ्या शतकांत रचला गेला) वज्रसूचि (धर्मकीर्तीनें रचलेला ब्राह्मणांच्या जातिकल्पनेचें सूक्ष्मपणानें खंडन करणारा ग्रंथ); महायानश्रद्धोत्पाद (कर्ता निश्चित नाहीं); शतपंचाशतिकनामस्तोत्र (इत्सिंग हा हें स्तोत्र मात्रचेत-नामक कवीनें लिहिलेलें आहे असें म्हणतो. हें फार लोकप्रिय आहे); हे सर्व ग्रंथ इ. स. च्या दुसऱ्या शतकांत रचले गेले.

जा त क मा ला.—आर्यशूराचा चौथ्या शतकांतील ग्रंथ.

अवदान वाङ्मय.

अ व दा न श त क.—शंभर अवदानांचा संग्रह. हा हीनयान पंथाचा ग्रंथ दुसऱ्या शतकांत रचला गेला. अवदान म्हणजे धार्मिक अथवा नैतिक आचारकृत्यांचा इतिहास.

क र्म श त क.—अवदानशतकाशीं बरेंच साम्य असलेला ग्रंथ. याचें फक्त तिबेटी भाषांतर उपलब्ध आहे.

दि व्या व दा न.—आरंभीं महायानी पंथाचें स्तवन असलेला हीनयान पंथाचा तिसऱ्या शतकांत संगृहीत केलेला ग्रंथ. यापैकीं अशोकावदानचक्र इ. स. च्या तिसऱ्या शतकांत चिनी भाषेंत भाषांतरित केलें गेलें.

क ल्प द्रु मा व दा न मा ला.—
र त्ना व दा न मा ला.—
अ शो का व दा न मा ला.—
} महायान पंथाचे वीरकाव्यग्रंथ. यांतील गोष्टी अशोक व उपगुप्त यांमधील संभाषणरूपानें घातलेल्या आहेत.

द्वा विं श त्य व दा न.—यांत अवदानशतकांतील बऱ्याचशा गोष्टी घेतलेल्या आहेत.

भ द्र क ल्पा व दा न.—उपगुप्तानें अशोकाला सांगितलेला चौतीस गोष्टींचा पद्यात्मक संग्रह.

व्र ता व दा न.—यांत व्रतें व उत्सव यांच्या उपक्रमासाठीं शोधून काढलेल्या गोष्टी अशोक व उपगुप्त यांच्या संवादरूपानें दिल्या आहेत.

वि चि त्र क र्णि का व दा न.—यांत अवदानशतकांतून घेतलेल्या व व्रतावदानाच्या नमुन्याच्या गोष्टी आहेत.

सु मा ग धा व दा न.—चिनी व तिबेटी भाषांत उपलब्ध असलेली सुमागधा नांवाच्या मुलीची गोष्ट.

अ व दा न क ल्प ल ता.—काश्मिरी कवि क्षेमेंद्र याचा अकराव्या शतकांतील एक अवदानसमुच्चय.

महायान सूत्रें.

स द्ध र्म पुं ड री क.—महायान पंथाच्या विशिष्ट तत्त्वांची व गुणावगुणांची माहिती करून देणारा इ. स. २०० च्या सुमारास झालेला ग्रंथ. याचें चौथ्या शतकांत चिनी भाषेंत भाषांतर झालें.

अ व लो कि ते श्व र गु ण का रं ड व्यू ह.—सर्व प्राण्यांना जो अमर्याद तऱ्हेनें अवलोकन करतो त्या अद्भुत उद्धारक अवलोकितेश्वर या आदर्शभूत बोधिसत्त्वाची स्तुति असलेला ग्रंथ. याचें इ. स. २७० च्या सुमारास चिनी भाषेंत भाषांतर झालें.

सु खा व ती व्यू ह.—यांत बुद्धामिताभाची स्तुति आहे. याचें प्रथम दुसऱ्या शतकांत व नंतर बाराहूनहि अधिक वेळां चिनी भाषेंत भाषांतर झालें.

अ मि ता यु र्ध्या न सू त्र.—यांत अमितायूचें ध्यान करण्याची शिफारस आहे.

गं ड व्यू ह.—जपानी के-गोन पंथाचा मुख्य ग्रंथ. याचें चौथ्या शतकाच्या सुमारास बुद्धावतंसकसूत्र नांवाचें चिनी भाषेंत भाषांतर झालें.

क रु णा पुं ड री क.—म्ह० जाईचें कमल. या महायान सूत्राचें सहाव्या शतकांत चिनी भाषेंत भाषांतर झालें.

लं का व ता र उ० स द्ध र्म लं का व ता र सू त्र.—बुद्ध शाक्यमुनीनें लंकापति रावण यास दिलेल्या चमत्कारिक भेटीचें वर्णन. यांत तत्त्वज्ञानविषयक मतें आलीं आहेत. याचें इ. स. ४४३ त चिनी भाषेंत भाषांतर झालें.

द श भू मी श्व र.—एक महायानसूत्र. याचें ४०० च्या सुमारास चिनी भाषेंत भाषांतर झालें.

स मा धि रा ज.—यांत समाधीसंबंधाच्या दुराग्रहयुक्त गोष्टी आहेत.

सु व र्ण प्र भा स.—अंशतः तत्त्वज्ञानविषयक, अंशतः दंतकथात्मक व अंशतः तंत्रबौद्धधर्मप्रांतातला ग्रंथ. याचें ६ व्या शतकांत चिनींत भाषांतर झालेलें होतें.

रा ष्ट्र पा ल सू त्र.—याचें सहाव्या शतकाच्या अखेरच्या सुमारास चिनींत भाषांतर झालें. यांत बौद्ध संप्रदायाच्या ऱ्हासाबद्दलचें भविष्य दिलेलें आहे.

प्र ज्ञा पा र मि ता.—यांत बोधिसत्त्वाच्या बुद्धीच्या सर्वश्रेष्ठ परिपूर्णतेचें वर्णन आहे, यांत शब्दावडंबराचा कळस झाला आहे. हें सर्वांत धाकटें महायानसूत्र असून तें नागार्जुनानें केलेलें आहे असें हीनयान पंथाचे लोक म्हणतात. नागार्जुन २ ऱ्या शतकाच्या अखेरीस झाला असावा.

व ज्र च्छे दि का प्र ज्ञा पा र मि ता.—हा उपर्युक्त ग्रंथाचा थोड्या पानांत केलेला संक्षेप आहे.

अ कु तो भ या.—ही वरील ग्रंथावरील नागार्जुनाचीच टीका असून तिची तिबेटी भाषांतरावरून माहिती मिळते.

मा ध्य म क का रि का.—नागार्जुनाचा एक ग्रंथ.

ध र्म सं ग्र ह.—नागार्जुनाचा (?) ग्रंथ. यांत पारिभाषिक शब्दांची यादी आहे.

सु हृ ल्ले ख.—नागार्जुनानें एका राजास लिहिलेलें मित्राचें पत्र.

यो गा चा र भू मि शा स्त्र किं वा स प्त द श भू मि शा स्त्र.—चौथ्या शतकांत होऊन गेलेल्या पुरुषपुर येथील वसुबंधु असंगाच्या योगाचारपंथाचा तत्त्वज्ञानविषयक बिकट ग्रंथ.

म हा या न सू त्रा लं का र.—असंगाचा दुसरा एक ग्रंथ.

अ भि ध र्म को श.—वसुबंधू (असंगाच्या धाकट्या भावा)चा नीतिशास्त्र, मानसशास्त्र व अध्यात्मशास्त्र या विषयांची चर्चा करणारा सूत्रकारिकाबद्ध हीनयानपंथाचा ग्रंथ. याला महायानीयांनींहि प्रमाण मानिलें असून त्यावर पुष्कळ टीका झाल्या आहेत.

अ भि ध र्म को श व्या ख्या.—वरील ग्रंथावरील यशोधर्माची टीका. हिचें चिनी भाषेंतील प्राचीनतम भाषांतर ६ व्या शतकांतील आहे.

गा था सं ग्र ह.—वसुबंधूचा ग्रंथ. यांत हीनियान पंथांतील आधारवचनांचा संग्रह आहे.

प र मा र्थ स प्त ति.—परमार्थाविषयीं सत्तर श्लोक. सांख्य तत्वज्ञानावर टीकांचा भडिमार करणारा वसुबंधूचा ग्रंथ. यांशिवाय वसुबंधूनें सद्धर्मपुंडरीक, प्रज्ञापारमिता व इतर महायान सूत्रें वगैरे ग्रंथांवर भाष्यग्रंथ लिहिले आहेत.

शि ष्य लि ख ध र्म का व्य.—स्वतःच्या शिष्यास लिहिलेल्या पत्राच्या रूपांत असलेलें बौद्ध पंथाचीं तत्वें ग्रथित केलेलें अजमासें पांचव्या शतकांतील चंद्रगोमीचें काव्य.

शि क्षा स मु च्च य.—तत्वांचा समुच्चय. महायान पंथाचा सातव्या शतकांत होऊन गेलेला सौराष्ट्रांतील रहिवाशी शांतिदेव याचा ग्रंथ. यांत महायान पंथांतील मूलाधार नीतितत्वें दिलीं आहेत.

बो धि च र्या व ता र.—बोधिजीवितामध्यें प्रवेश, म्हणजे दिव्यदृष्टीप्रत नेणारा जीवितक्रम. शांतिदेवाचा दुसरा एक श्रेष्ठ प्रतीचा ग्रंथ.

सू त्र स मु च्च य.—शांतिदेवाचा आणखी एक ग्रंथ.

अ ष्ट सा ह स्रि का —
त था ग त गु ह्य क अ थ वा
त था ग त गु ण ज्ञा न.—

हे दोन व वर दिलेले सुवर्णप्रभास प्रज्ञापारमिता, सद्धर्मपुंडरीक, ललितविस्तर, दशभूमीश्वर, लंकावतार अथवा सद्धर्मलंकावतार, गंडव्यूह आणि समाधिराज हे सात अशा नऊ ग्रंथास वैपुल्यसूत्रें असें म्हणतात. हे कोणत्याहि एका विशिष्ट पंथाचे नाहींत.

स्तोत्रें, धारणी आणि तंत्रें.

क ल्या ण पं च विं श ति का.—पंचवीस आशीर्वचनें. अमृतानंदकवीचें काव्यपद्धतीवर लिहिलेलें पंचवीस कवितांचें सूत्र.

लो के श्व र श त क.—वज्रदत्त कवीचें जगताच्या ईश्वरावर सूक्त.

सु प्र भा त स्त व.—४९ सूक्तांचा एक संग्रह.

प र मा र्थ ना म सं गी ति.—हिंदुस्थानांत अगदीं प्राचीन काळापासून सतत चालू असलेलें देवतांचीं नांवें किंवा गौरवपूर्ण विशेषणें असलेलें सूक्त.

स्र ग्ध रा श त क स्तु ति.—
स प्त बु द्ध स्तो त्र.—
स मं त भ द्र प्र णि धा न.—
} दुसरीं कांहीं स्तोत्रें.

आ र्य ता रा स्र ग्ध रा स्तो त्र.—काश्मिरी कवी सर्वज्ञमित्र यानें अवलोकितेश्वराची अर्धांगी तारा इच्या स्तुतिपर लिहिलेलें गुणमय स्तोत्रकाव्य.

आ र्य ता रा ना मा ष्टो त्त र श त क स्तो त्र.—आर्यतारेच्या १०८ नांवांचें स्तोत्र.

ए क विं श ति स्तो त्र.—तारा देवतेच्या प्रार्थनापर पद्यांची विस्कळित माला.

मे घ सू त्र.—जादूच्या कामाकरितां केलेलें धारणीसूत्र. याचें इ. स. च्या चौथ्या पांचव्या शतकांत चिनी भाषेंत भाषांतर झालें.

पं च र क्षा.—पांच धारणींचा (धारणी=भूतें अथवा अद्भुतशक्ति यांना धरण्याचें साधन) संग्रह.

प्र ज्ञा पा र मि ता हृ द य सू त्र.—यांत सर्व दुःखहारक मंत्र असून त्यांचे मूळ संस्कृत ग्रंथ इ. स. च्या सातव्या शतकापासून जपानांतील एका मठांत जपून ठेविलेले आहेत.

उ ष्णी ष वि ज य धा र णी.—ही धारणी वरील मठांतच सुरक्षित असून तींत अर्थशून्य प्रार्थनांची मालिका आहे.

आ दि क र्म प्र दी प.—या क्रियातंत्रग्रंथांत ब्राह्मणांच्या विधिप्रयोगग्रंथांतल्याप्रमाणेंच धर्मकृत्य व विधी यांचें वर्णन आहे.

अ ष्ट मी व्र त वि धा न.—अष्टमीला करावयाच्या संस्काराबद्दल नियम. यांत गूढार्थक आकृती व हस्तविक्षेप उपयोगांत आणिले आहेत.

त था ग त गु ह्य क अ थ वा गु ह्य स मा ज.—हें योगतंत्र नेपाळी बौद्धांच्या नवधर्मांमध्यें मांडतें. यांत परमोच्च सिद्धीकरितां गज, अश्व व श्वान यांचें मांसभक्षण व तरुण चांडाल कन्येबरोबर नित्य मैथुन करण्याचा उपदेश केला आहे.

म हा का ल तं त्र.—याला बुद्धप्रणित म्हटलें असून गुप्तधन, इच्छित वधू इत्यादि गोष्टींच्या प्राप्तीविषयीं त्यांत माहिती दिली आहे.

सं व रो द य तं त्र.—हें बुद्ध आणि बोधिसत्व वज्रपाणि यांमधील संवादाच्या स्वरूपांत आहे तरी ते शैवपंथीच अधिक दिसतें. यांत मक्का व मुसुलमानी संप्रदाय यांविषयीं उल्लेख आहे.

मं जु श्री मू ल तं त्र.—हा ग्रंथ नागार्जुन व महायानसूत्रें यांनंतर बऱ्याच कालानें लिहिलेला असावा.

पं च क्र म.—या तंत्राचा पांच पैकीं भाग नागार्जुनानें लिहिला असें म्हणतात. यांत तांत्रिक संस्कारांपेक्षां योगाबद्दल जास्त माहिती आहे. हा नागार्जुन नवव्या शतकाच्या मध्यांतील—म्हणजे महायान पंथाच्या संस्थापकाहून भिन्न—दिसतो.

यांशिवाय मान्यतेच्या दृष्टीनें कमी महत्त्वाच्या अनेक ग्रंथांचाहि उल्लेख येथें करतां येईल, पण तसें करण्यास अवकाश नाहीं. जो संप्रदाय सुमारें पंचवीस शतकें जगांत आपलें अस्तित्व राखून आहे, आणि ज्या संप्रदायाचे अनुयायी जगांत सर्वांहून जास्त असण्याचा संभव आहे अशा संप्रदायाचें वाङ्मय जगड्व्याळच असणार. अनेक पोट संप्रदाय व त्यांचें वाङ्मय यांचा उल्लेख जरी करावयाचा झाला तरी वाङ्मयसूचिस्वरूपी अनेक ग्रंथ तयार करावे लागतील इतकें मोठें वाङ्मय या संप्रदायाचें आहे. तथापि सर्व राष्ट्रांवर परिणामकारी जें वाङ्मय झालें त्याची विस्तार-कल्पना वर दिलेल्या यादीवरून येईल.

---

## प्रकरण १२ वें.

### अशोक ते अराजक-शकयवनांचा धुमाकूळ.

**अशोकपूर्व— इतिहासाचें सिंहावलोकन.—** मागें ९ व्या प्रकरणांत बुद्धापासून चंद्रगुप्तापर्यंत राजकीय इतिहास दिला आहे. या कालांत कोणकोणते राजे झाले व त्यांचा कालानुक्रम काय होता हा प्रश्न बराच अवघड व वादग्रस्त असल्यामुळें, तत्संबंधीं झालेल्या प्रयत्नांचें स्वरूप ध्यानांत येण्याकरितां त्या प्रकरणांत तद्विषयय वेचक वाङ्मयाचा गोषवारा वाचकांपुढें टेवावा लागला. चंद्रगुप्तानंतरची हिंदुस्थानच्या इतिहासांतील सुप्रसिद्ध व्यक्ति म्हटली म्हणजे त्याचाच नातू अशोक ही होय. या दोघांच्या दरम्यान चंद्रगुप्ताचा पुत्र बिंदुसार याची कारकीर्द झाली, पण त्याच्या संबंधीं जवळजवळ कांहींच माहिती उपलब्ध नाहीं म्हटले तरी चालेल. अशोकासंबंधीं माहिती देण्यास सुरुवात करण्यापूर्वी मौर्य घराण्याच्या अगोदर होऊन गेलेल्या व ज्यांच्या कारकीर्दीतील एक दोन सन स्थूलमानानें ठरवितां येत असल्यामुळें ज्यांच्यापासून हिंदुस्थानच्या ऐतिहासिक कालास सुरुवात झाली असें मानतां येईल त्या शैशुनाग व नंद घराण्यांतील राजांची व्हिन्सेंट स्मिथ यानें आपल्या अखेरच्या ग्रंथांत ग्राह्य म्हणून दिलेली यादी सिंहावलोकनाच्या रूपानें येथें देतों. तथापि या यादींतील राजांचीं नांवें, त्यांचा अनुक्रम व त्यांच्या राज्यारोहणाचीं अजमासें दिलेलीं वर्षें या सर्वांत पुढें मागें नवीन पुरावा उपलब्ध झाल्यास सुधारणा करावी लागेल असें स्वतः व्हिन्सेंट स्मिथचेंच मत होतें हें येथें सांगून ठेविलें पाहिजे.

| अनुक्रमांक | राजांचीं नांवें (मत्स्य पुराणानुसार) | राज्यारोहणाचें अजमासें वर्ष ख्रि. पू. | विशेष माहिती. |
|---|---|---|---|
| | शैशुनाग | | |
| १ | शिशुनाग | ६४२ | प्रथम काशीचा राजा होता. |
| २ | काकवर्ण | | यांच्या कारकीर्दींतील कांहींच गोष्टी उल्लेखिलेल्या नाहींत. व्हिन्सेंट स्मिथ या चार कारकीर्दींस ६० वर्षें देतो. |
| ३ | क्षेमधर्मा | | |
| ४ | क्षेमजित् किंवा क्षत्रौजाः | | |
| ५ | बिंबिसार उर्फ श्रेणिक | ५८२ | नवीन राजगृह बांधलें; अंग देश जिंकला; महावीर व बुद्ध यांचा समकालीन होता. हा जैन होता असें म्हणतात. |
| ६ | अजातशत्रु उर्फ कूणिक | ५५४ | पाटलिपुत्र हें तटबंदीचें शहर बांधलें; वैशाली आणि कोसल येथील राजांचा पराभव केला; बुद्ध व महावीर मरण पावले. |
| ७ | दर्शक | ५२७ | भासाच्या स्वप्नवासवदत्तेंत उल्लेख आहे. |
| ८ | उदासी किंवा उदय | ५०३ | शोणवरील पाटलिपुत्राच्या शेजारीं गंगेवर कुसुमपुर नामक नगर वसविलें. |
| ९ | नंदिवर्धन | ४७० | यांच्या कारकीर्दींतील कांहींच गोष्टी ठाऊक नाहींत. नांवांवरून दिसतें त्याप्रमाणें हे नंदहि असूं शकतील. (खारवेलचा शिलालेख.) |
| १० | महानंदी | | |
| | नऊ नंद | | |
| ११ | महापद्म आणि | ४१३ (चंद्रगुप्तापूर्वी ९१ वर्षें) | हलक्या जातीचे ब्राह्मणक्षत्रियांविरुद्ध असलेले पाखंडी राजे; चंद्रगुप्त व कौटिल्य यांनी यांचा नायनाट केला. |
| १२ | त्याचे ८ पुत्र, २ पिढ्या | | |
| | मौर्य | | |
| १३ | चंद्रगुप्त | ३२२ (?३२५) | सन जवळ जवळ बरोबर. |
| १४ | बिंदुसार अमित्रघात | २९८ | |
| १५ | अशोक | २७३ | |

**सम्राट् अशोक मौर्य** ( ख्रि. पू. २७३-२३२ ).—बिम्बुसाराच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा अशोकवर्धन हा राज्यारूढ झाला. प्रथम हा कांहीं वर्षेपर्यंत उपराजा या नात्यानें तक्षशिला नगरींत राज्यकारभार पहात असे; व नंतर माळव्यामध्यें उज्जयिनी येथें राज्यकारभार पाहूं लागला. तो राज्यारूढ झाल्यानंतर चार वर्षांनीं त्याचा राज्याभिषेक झाला यावरून त्याला कांहीं प्रतिस्पर्धी होते असें अनुमान निघतें. त्याचा थोरला भाऊ सुसीम हा एक त्याचा प्रतिस्पर्धी होता असें निरनिराळ्या कथांवरून दिसतें. अशोकानें राज्यप्राप्तीस्तव ९८।९९ भाऊ मारले अशी सिलोनमधील भिक्षू जी आख्यायिका सांगतात ती अगदीं खोटी दिसते. उलट अशोकानें आपल्या भावांबहिणींची चांगली व्यवस्था ठेवली होती असें त्याच्या शिलालेखांवरून व्यक्त होतें. अशोकाबद्दलच्या त्याच्या मतस्वीकारापूर्वीच्या ज्या बौद्ध कथा प्रचलित आहेत, त्या अगदीं खोट्या असाव्यात असें संशोधक समजतात. अशोकाविषयींची विश्वसनीय माहिती त्याच्या शिलालेखांवरूनच कळूं शकते. हे शिलालेख फारच नमुनेदार आहेत.

अशोकाचें बहुतेक आयुष्य शांततेनेंच गेल्यामुळें त्याच्याजवळ लष्करी सैन्य किती होतें याचा अंदाज करतां येत नाहीं. त्याच्या आयुष्यांतील मुख्य चळवळ धार्मिक होती, व या धार्मिक चळवळीमुळें अशोकाच्या वृत्तींत किती फरक पडला हें त्याच्या शिलालेखांवरून दिसतें.

अशोकाचीं पहिलीं वर्षे कशीं गेलीं किंवा त्यानें राज्यारूढ झाल्यानंतर प्रथम कोणतीं कृत्यें केलीं याचा बोध होत नाहीं. आपल्या वाडवडिलांप्रमाणें त्यानेंहि आपल्या कारकीर्दीचा पूर्व भाग चैनींत व खाण्यापिण्यांत घालविला असावा असें दिसतें. पण यावरून त्याच्या हातून अनेक दुष्कृत्यें झालीं होतीं असा निष्कर्ष काढणें बरोबर होणार नाहीं.

**कलिंग देशावरील स्वारी व तिचे परिणाम.**—कलिंग देशाशीं झालेल्या युद्धानंतर (ख्रि. पू. २६१) मात्र अशोकाच्या स्वभावांत फार फरक घडून आला. युद्धामध्यें होणारी प्राणहानि, लोकांचे हाल, मृतांच्या आप्तेष्टांनां होणारें दुःख या सर्वांचा राजाच्या मनावर फार परिणाम झाला. याबद्दल अशोकानें स्वतःच शिलालेखांत असें म्हटलें आहे:

"प्रियदर्शी सम्राटानें राज्यारोहणानंतर आठ वर्षांनी कलिंग देश जिंकला; व त्या वेळीं त्यानें १,५०,००० लोक धरून नेले, १,००,००० लोक ठार झाले व पुष्कळसे बेपत्ता झाले. पण कलिंग देश राज्याला जोडल्यानंतर मात्र सम्राटानें धम्माचें पालन, त्यावर प्रेम व त्याचा प्रसार करण्यास सुरवात केली. कलिंगयुद्धाचा सम्राटाच्या मनावर परिणाम होऊन त्याला फार पश्चात्ताप झाला. यापुढें सदरहू युद्धांतील हालअपेष्टांच्या दशांश हालअपेष्टा जरी लोकांस झाल्या तरी सम्राटाच्या मनाला फार वाईट वाटेल. सम्राटाचा कोणीं अपराध केल्यास, सोसणें शक्य असल्यास सम्राट् तो सोसण्यास मागें पुढें पहाणार नाहीं. रानटी लोकांवर देखील सम्राटाची कृपा असून त्यांनीं सद्धर्मानें वागावें अशी सम्राटाची इच्छा आहे. सर्व मानव प्राण्यांच्या अंगीं संयमन, मनःशांति व समाधान असावें असें सम्राटास वाटतें."

या लेखांत अशोक म्हणतोः

'धर्मानें मानवांचीं अंतःकरणें आपल्याकडे आकर्षून घेणें हाच खरा विजय होय.' यापुढें, 'बौद्ध संप्रदायाचा प्रसार ६०० योजनें दूरवर झाला असून दक्षिणेस चोल, पांड्य, योन, कांबोज, भोज इत्यादि ठिकाणींहि या संप्रदायाचा प्रवेश झाला आहे' असें सांगितलेलें आहे; आणि 'जे कोणी हा धम्म ऐकतील त्यांनां तो पसंत पडेल व स्वीकारावासा वाटेल' असें म्हटलें आहे. तसेंच 'या धम्माच्या साहाय्यानें मिळविलेला विजय क्षणभंगुर नसून शाश्वत व पारमार्थिक दृष्ट्या फार उपयुक्त असल्यामुळें सर्वांनीं तो आचरावा' असा उपदेश केलेला आहे.

हाच उपदेश अशोकानें आणखी दोन शिलालेखांमध्यें पुढें चालविला आहे. त्यांपैकीं एक शिलालेख समापा नांवाच्या शहरांतील अधिकाऱ्यांनां व दुसरा तोसलीच्या अधिकाऱ्यांनां उद्देशून लिहिलेला आहे. उज्जयिनीच्या व तक्षशिलेच्या राजप्रतिनिधींनां देखील या तत्त्वांचा प्रसार करण्याविषयीं व तीं अंमलांत आणण्याचा प्रयत्न करण्याविषयीं त्यानें उपदेश केलेला आहे. 'सर्व प्रजा हीं माझीं लेंकरें आहेत' असें तो नेहमीं म्हणत असे. त्यानें रानटी मुलखांत रहाणाऱ्या लोकांचीं मनें वळविण्यासाठीं चांगले चांगले मतप्रसारक पाठविले. कांहीं अधिकारी अन्यायाचें वर्तन करतात हें पाहून त्याला फार खेद होत असे, व तो वारंवार त्यांनां व्यसनांपासून परावृत्त करण्याचा उपदेश करीत असे.

या शिलालेखांमध्यें केलेल्या उपदेशावरून अशोकाला खरोखर अंतःकरणापासून किती पश्चात्ताप झाला होता हें उत्तम प्रकारें निदर्शनास येतें यांत शंका नाहीं.

**अशोकसमकालीन राजे.**—पहिल्या शिलालेखामध्यें अशोकानें कांहीं राजांचा जो उल्लेख केला आहे त्यावरून हें उघड होतें कीं, अशोक हा अँटायोकस थीऑस, इजिप्तचा टॉलेमी फिलाडेल्फॉस, सीरीनचा राजा मगस, व एपायरसचा राजा अलेक्झांडर यांचा समकालीन होता. तसेंच अशोकाचें व ग्रीक राजांचें सख्यहि असावें असें दिसतें. कारण, या राजांनीं आपल्या राज्यांत बौद्ध संप्रदायाच्या प्रसाराला आडकाठी केली नाहीं; इतकेंच नव्हे तर अशोकानें तेथें त्या संप्रदायाचा बराच प्रसारहि केला होता. तसेंच या वेळीं चोल व पांड्य हीं तामीळ राज्यें अस्तित्वांत असून अशोकाचे दूत ताम्रपर्णी नदीपर्यंत उपदेश करीत आले होते. दुसऱ्या एका शिलालेखांत, केरळपुत्राचा व त्याचप्रमाणें इतर जातींच्या लोकांचाहि उल्लेख आढळून येतो.

## अशोकाच्या लेखाचे नमुने.



रुम्मिनदेयी स्तंभावरील अशोकाचा लेख.

[ लेखाचें देवनागरींत रूपांतर. ]

देवानपियेनपियदसिन लाजिनवीसतिवसाभिसितेन अतन आगाच महीयिते हिदबुधे जाते सक्यमुनीति सिलाविगडभीचाकालापित सिलाथभेच उसपापिते हिदभगवंजातेति लुमिनिगाम उबलिकेकटे अठभागियेच ( अर्थासाठीं पृ. १३६ पहा. )



अशोकाच्या तेराव्या शिलाशासनलेखाचा गिरनार येथें प्रो. ऱ्हीस डेव्हिड्स यांनां सांपडलेला एक भाग.

Manoranjan Press, Bombay.

**बौद्ध संप्रदायाचा प्रसार.**—अशोकाच्या चरित्राला मुख्य आधार म्हणजे त्याचे शिलालेखच होत असें वर सांगितलें आहेच. पण त्याशिवाय इतरहि आधार नाहींत असें नाहीं. अशा आधारांपैकीं एक आधार म्हणजे सिलोनमधील महावंश व दीपवंश हे ग्रंथ होत. दुसरा ग्रंथ ख्रिस्तोत्तर चवथ्या शतकांत झाला असला पाहिजे. बौद्ध संप्रदायाच्या प्रसारासंबंधींची जी हकीकत शिलालेखांत दिलेली आहे तिला या ग्रंथांतील गोष्टींवरून बळकटी येते. या दीपवंशांत अशोकानें ९ देशांमध्यें उपदेशकमंडळें पाठविल्याचा उल्लेख आहे. त्यांपैकीं सात हिमालय आणि पेशावरपासून महिषमंडलापर्यंतच्या सात देशांत व उरलेलीं दोन सुवर्णभूमि म्हणजे दक्षिणब्रह्मदेश व लंका या ठिकाणीं पाठविलीं, असें त्यांत म्हटलें आहे. तसेंच या दीपवंशांत उपदेशकांचीं नांवेंहि दिलीं आहेत व त्यांपैकीं कांहीं भेलसा येथील शिलालेखांत आढळतात. दक्षिण ब्रह्मदेशांत मात्र बौद्ध संप्रदायाचा फारसा प्रसार झालेला दिसत नाहीं. या देशांत प्रथमतः महायान पंथाचा प्रवेश झाला व हा पंथ अशोकाच्या पंथाहून निराळा होता (पृ. १५८ पहा).

सिलोनमध्यें मात्र या उपदेशकांनां चांगलेंच यश आलें. विशेषतः तेथील राजाकडून आश्रय मिळाल्यामुळें तर या पंथाचा प्रसार फार झपाट्यानें होत चालला. तिस्स राजाच्या इच्छेमुळेंच सिलोनमध्यें हें उपदेशकमंडळ आलें (ख्रि. पू. २५१ किंवा २५०). आपल्या कारकीर्दींत या उपदेशकमंडळानें बौद्ध संप्रदायाच्या प्रसारार्थ पुष्कळ श्रम केले व मोठमोठे विहार बांधले. येथील मुख्य धर्मोपदेशक अशोकाचा कनिष्ठ बंधु महेन्द्र हा होता. हा सिलोनमध्यें ख्रि. पू. २०४ सालीं मेला. या धर्मोपदेशाच्या कामांत महेन्द्राच्या बहिणीनें म्हणजे संघमित्रेनें फार मदत केली. मतप्रसाराच्या कामीं महेंद्रानें जितकें पुरुषांत तितकेंच संघमित्रेनें स्त्रियांत यश मिळविलें.

बौद्ध संप्रदायाच्या प्रसारास सिलोनमध्यें तिस्स राजाच्या कारकीर्दींत फार यश आलें, व याच संप्रदायाचा पगडा अद्यापिहि तेथें बसलेला आहे. याबद्दल सांडर्स यानें असें म्हटलें आहे:

'अशोकाचा संप्रदायप्रसार जगांतील सुधारणेच्या इतिहासांत एक महत्वाचा भाग होऊन बसलेला आहे. त्याचे उपदेशक रानटी व असंस्कृत प्रदेशांत गेले व तेथील लोकांनां हा संप्रदाय केवळ अमृततुल्य झाला. सिलोन, ब्रह्मदेश, सयाम, जपान व तिबेट यांच्या इतिहासास या संप्रदायस्वीकारापासूनच सुरुवात झाली असें म्हटलें असतां चालेल. या सर्व देशांमध्यें हा संप्रदाय लवकर प्रसृत झाला. सुधारलेल्या चीन देशांत मात्र याचा व्हावा तसा प्रसार झाला नाहीं.

'पण बौद्ध भिक्षूंनीं आपल्याबरोबर धर्माखेरीज इतर संस्कृतीहि नेली. महेन्द्रानें आपल्याबरोबर सिलोनमध्यें खोदकामाची व पाटबंधाऱ्याची कला आणली. या महेन्द्राच्या दीर्घ प्रयत्नानेंच बौद्ध संप्रदाय चिरस्थायी झाला असून अद्यापिहि सिलोनमध्यें प्रचंड दागबा व अनेक बुद्धभिक्षूंचे विहार आपल्याला आढळून येतात.'

अनुराधपूर नगर हें बौद्ध संप्रदायाचें 'रोमच' असून अशोकाच्या कारकीर्दीचा जगावर काय परिणाम झाला याचें तें निदर्शक होय. आज तेथील अनेक अवशेष पाहून त्या शहराच्या प्राचीन वैभवाची कोणासहि कल्पना येईल.

कांहीं यूरोपीय विद्वानांनीं या सिलोनी दंतकथेवरच केवळ विश्वास ठेवून सिलोनमध्यें संप्रदायप्रसार करण्याचें श्रेय अशोकाला नसून पाटलिपुत्र येथील धर्मसंगीति भरविणाऱ्या तिष्याला आहे असें प्रतिपादन केलें आहे. अशोकाच्या शिलालेखांत या संगीतीचा उल्लेख नाहीं. या गोष्टीचें स्पष्टीकरण अशोकानें ती आपल्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं भरविली असावी असें व्हिन्सेंट स्मिथ करतो.

उत्तर हिंदुस्थानांतील दंतकथेवरून उपगुप्त हा अशोकाचा गुरु होता असें दिसतें. याच्या नांवाचा विहार मथुरेमध्यें सातव्या शतकांत उपलब्ध होता. सिलोनी दंतकथेंत मोग्गलिपुत्र तिष्य याच्या संबंधानें उपगुप्तासंबंधीं प्रसिद्ध असलेल्या गोष्टीच सांगितल्या आहेत. उपगुप्त व मोग्गलिपुत्र तिष्य हे दोघे एकच असावेत हें आतां जवळ जवळ निश्चित झालेलें आहे.

या उपगुप्तानें अशोकास सांगून निरनिराळ्या देशांत संप्रदायप्रसारक उपदेशक पाठविले. ख्रि. पू. २४९ सालीं उपगुप्तानें अशोकाला तीर्थयात्रेला नेलें. प्रथमतः त्यानें अशोकाला लुंबिनीवनास नेलें. तेथें जो स्तम्भ आहे, त्यावरील लेखावरून अशोक तेथें आला होता असें दिसतें. अशोकानें या वेळीं मृगया वगैरे सर्व सोडून दिली असावी; तसेंच प्राण्यांची भक्षार्थ हिंसाहि त्यानें वर्ज केली असावी असें दिसतें. अशोकानें तात्पुरता कां होईना भिक्षुवेष पतकरला असावा. इत्सिंगानें भिक्षुवेषांतील अशोकाचा पुतळा पाहिल्याचें वर्णन केलें आहे.

अशोकानें आपल्या कारकीर्दींत संप्रदायप्रसारार्थ, धर्मोपदेशार्थ आणि प्रजाहितार्थ ज्या ज्या कांहीं गोष्टी केल्या होत्या त्या सर्व स्तंभांवर कोरून ठेवण्यास ख्रि.पू. २४२ सालीं सुरुवात केली. यांनां सात स्तम्भलेख अशी संज्ञा आहे. यांपैकीं पांचव्या स्तम्भलेखांत त्यानें आपले अहिंसेवरील विचार प्रकट केले आहेत. बैलांनां खच्ची करण्याचा प्रकार त्याला बिलकुल पसंत नव्हता; व त्यानें जीवांच्या रक्षणार्थ पुष्कळ नियम सांगितले आहेत. अशोकाच्या अवध्य पशूंच्या यादींत सशृंग जनावरांची गणना नाहीं; पण कौटिल्याच्या अर्थशास्त्रामध्यें गाई, बैल हीं देखील अवध्य मानलेलीं आहेत. तथापि एकंदरींत अर्थशास्त्रांतील हिंसेवरील नियम व अशोकाच्या पांचव्या स्तम्भलेखांतील आज्ञा या बहुतेकांशीं जुळतात.

हे सात स्तम्भलेख कोरविणें हीच जिचा आपणांस काळ ठरवितां येतो अशी अशोकाची शेवटची कामगिरी होय.

खि. पू. २४० च्या सुमारास पाटलिपुत्र येथें नास्तिक लोकांच्या मतखंडनार्थ जी धर्मसभा भरली होती तींत ठरलेले नियमच त्यानंतर कोरविल्या गेलेल्या दुय्यम स्तम्भलेखांत अंतर्भूत केले गेले असतील. वृद्धापकाळीं अशोक हा बौद्ध संप्रदायाचा फार अंधभक्त बनला होता. त्यानें भिक्षूंकरितां व विहारांच्या कार्यार्थ अगणित व थोडासा फाजील खर्च केला असें कांहींचें म्हणणें आहे. शिलालेखांवरून अशोक हा अखेरपर्यंत कडक शास्ता होता असें दिसतें. मरणापूर्वी त्यानें राज्यत्याग केला होता असेंहि म्हणतात; पण यासंबंधानें निश्चित मत कांहींच देतां येत नाहीं.

**अशोकाचें साम्राज्य.**—अशोकाचें साम्राज्य अफगाणिस्थान, बलुचिस्थान, मकराण, सिंध, कच्छ, सुवात, काश्मीर नेपाळ व बहुतेक सर्व हिंदुस्थान एवढ्यावर पसरलेलें होतें. अगदीं दक्षिणेकडचीं तामीळ संस्थानें स्वतंत्र होतीं. कदाचित् खोतानवर देखील याची सत्ता असावी. त्याच्या या साम्राज्यांत अनेक मांडलिक संस्थानेंहि होतीं; तसेंच अनेक रानटी जातीहि होत्या. तथापि खास राजप्रतिनिधींच्या अंमलाखालींहि बराच मुलूख होता. यांपैकीं एक तक्षशिला येथें, दुसरा तोसलीं येथें, तिसरा उज्जयिनी येथें व चवथा सुवर्णगिरि येथें रहात असे.

अशोकानें आपल्या पूर्वीच्या राजांप्रमाणेंच सर्व राज्यकारभार चालविला होता. वरिष्ठ अधिकाऱ्यांनां महामात्र अशी संज्ञा असे; व त्यांच्या हाताखालीं पुष्कळ अधिकारी असत. चौदा शिलालेख खोदविण्यांत आले त्या वेळीं अशोकानें धर्ममहामात्र नांवाचे नवीन अधिकारी नेमले. या धम्मांतील नीतितत्त्वें सर्वसामान्यच असल्या कारणानें तीं सर्व धर्मांतील लोकांनां संमत होण्यासारखींच होतीं. अहिंसेचा नियम कांहीं जातींनां थोडा जाचक झाला असावा; तरी पण हिंसा होऊं नये म्हणून महामात्र हे पूर्ण खबरदारी घेत असत.

**अशोकाच्या नीतिविषयक कल्पना.**—अशोकाच्या नीतिविषयक कल्पना काय होत्या, हें दुय्यम शिलाशासनलेखांतील दुसऱ्या लेखावरून आढळून येतें. यांत असें म्हटलें आहेः "मातापिता यांच्या आज्ञा पाळल्या पाहिजेत. जीवांबद्दल आदर असला पाहिजे. सत्य बोललें पाहिजे. धम्माच्या आज्ञानुसार प्रत्येकानें आपलें वर्तन ठेवलें पाहिजे. शिष्यानें गुरुशीं व आप्तांशीं नम्रतेचें वर्तन ठेवलें पाहिजे. यामुळें आयुष्याची व सुखाची वृद्धि होते."

अशाच प्रकारच्या आज्ञा त्यानें वारंवार दिलेल्या आहेत. याशिवाय भूतदया, नोकरांनां चांगलें वागविणें, दानधर्म व परधर्मसहिष्णुता इत्यादि इतर सद्गुणांचेंहि शिक्षण त्यानें दिलें. प्रवाशांच्या सोईसाठीं रस्त्यांवर विहिरी व धर्मशाळा बांधविणें व दोन्ही बाजूंनां झाडें लावणें इत्यादि परोपकाराचीं कृत्यें त्यानें केलीं. धर्मार्थ दवाखानेंहि त्यानें उघडले होते.

अशोकाच्या शासनलेखांतील आणखी कांहीं उतारेच दिले असतां त्याची व्यवहारनीति अधिक स्पष्ट होईल. तो म्हणतोः

'माझ्या राज्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं तसेंच प्रांतिक व तालुकानिहाय अधिकाऱ्यांनीं दर पांच वर्षांनीं कामाची तपासणी करण्याकरितां व धम्माचा प्रसार करण्याकरितां सर्व राज्यभर हिंडलें पाहिजे. हा धम्म म्हणजे पित्राज्ञापालन, दान, सदाचार, अहिंसा; भूतदया व मित आहार व विहार हा होय' (शिलाशासनलेख ३). 'धम्मदानासारखें दुसरें दान नाहीं' (शासनलेख ११). 'स्वधर्माविषयीं अभिमान व परधर्माविषयीं तिरस्कार असूं नये' (शासनलेख १).

अशा प्रकारच्या अशोकाच्या नीतिकल्पना त्याच्या शिलालेखांवरून व इतर आधारांवरून दिसून येतात. अशोक हा स्वतः इतर पंथांतील भिक्षूंनां दानें देत असे, तरी तो स्वतः बौद्ध पंथाचा कट्टा भक्त होता. बौद्ध पंथाविषयीं व त्याच्या प्रसाराविषयीं त्याचा अभिमान किती होता हें राजपुतान्यामधील भाब्रू येथील शिलालेखावरून कळून येतें. हा शिलालेख भिक्षूंनां उद्देशून लिहिलेला आहे. त्याचा मथितार्थ येणेंप्रमाणेंः—

'भिक्षूंनो, बुद्धाविषयीं व त्याच्या धम्माविषयीं मला किती आदर वाटतो हें तुम्हांला माहीत नाहीं असें नाहीं. बुद्धाच्या सर्व आज्ञा मला वंदनीय वाटतात.' यानंतर भिक्षुभिक्षुणींनां नेहमीं मनन करण्यासाठीं त्यानें बुद्धाचीं वचनें उद्धृत केलेलीं आहेत.

**अशोकाची राजनीति.**—कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत राजाचीं जीं कर्तव्यें सांगितलीं आहेत, त्यांप्रमाणें अशोकानें आपलें आचरण ठेवण्याचा प्रयत्न केला. हिंदु राजे प्रजेचीं गाऱ्हाणीं स्वतः ऐकून घेऊन त्यांचा निकाल लावून टाकीत असत. अगदीं हलक्यांतल्या हलक्या मनुष्याचीं देखील गाऱ्हाणीं ते स्वतः ऐकून घेण्याची खबरदारी घेत. पुढें अकबर, जहांगीर हे देखील त्याप्रमाणेंच वागत असत. अशोकानें एके ठिकाणीं स्वतःविषयीं पुढें दिल्याप्रमाणें म्हटलें आहे : 'गेलीं अनेक वर्षें सर्वकाळ प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकून घेणें व प्रजेच्या हितसंबंधांकडे लक्ष देणें या गोष्टी घडल्या नाहींत. पण मीं आतां तशी व्यवस्था केली आहे कीं, जेवतांना, अंतःपुरांत असतांना, खासगी कामांत असतांना अगर कोठेंहि असतांना अधिकाऱ्यांनीं आपआपल्या कामासाठीं माझ्याकडे यावें; मी प्रजेचीं कामें पाहण्याला सर्वकाळ सिद्ध आहें. प्रजेला नेहमीं सौख्य होत असावें यासाठीं मी माझ्या प्रयत्नांत मुळींच कसूर करणार नाहीं' (शिलाशासनलेख ६).

**अशोककालीन कलाकौशल्य.**— अशोकाच्या कारकीर्दींत वाङ्मय व कला यांचा अभ्युदय उत्तम रीतीनें झाला. निरनिराळ्या स्तूपांवरून व बऱ्याच मूर्तींवरून तत्कालीन कारागिरांचें कलानैपुण्य उत्तम तऱ्हेनें निदर्शनास येतें. सारनाथस्तम्भशिरावरील सिंहामध्यें दिसून येणारी कारागिरी इराणी अगर ग्रीक कारागिरांपेक्षां सरस आहे असें सहज दिसतें. मौर्य शिल्पज्ञ फार निष्णात होते याविषयीं

शकाच नाहीं. अशोकाच्या वेळीं बौद्ध भिक्षू हे शिक्षणाचें पवित्र काम करीत असत असें दिसतें. त्या वेळीं शिक्षणाचें प्रमाण समाधानकारक होतें. अशोकाच्या शिलालेखांतील भाषा जोरदार व उत्तम आहे. पुष्कळ ग्रंथहि याच्या कारकीर्दींत झाले असावेत; पण ते ग्रंथ सध्यां उपलब्ध नाहींत.

हिंदुस्थानच्या इतिहासांत अशोक व अकबर यांचीं चरित्रें अत्यंत प्रसिद्ध अशीं होऊन गेलीं याबद्दल वाद नाहीं. या दोघांच्या स्वभावाकडे पाहिल्यास आपल्याला त्यांतील फरक व सादृश्य सहज दिसून येईल. कलिंगविजयामुळें अशोकाच्या मनास जो पश्चात्ताप झाला त्याच्याकडे पाहून अकबराला हंसूं लोटलें असतें यांत शंका नाहीं. अकबराला इतक्या असंख्य लोकांच्या हानीकडे पाहून केव्हांहि वाईट वाटलें नसतें. अकबर हा फार महत्त्वाकांक्षी राजा होता. अशोकाला खरा विजय धम्माचा प्रसार करण्यांतच वाटत असे; तरी पण राजाचीं सर्व कर्तव्यें बजावण्यांत तो कधींहि कुचराई करीत नसे. अकबराप्रमाणें अशोकाला वाङ्मयाचा व कलाकुसरीचा नाद असे. अशोकाची राज्यव्यवस्थाहि फार उत्कृष्ट दर्जाची होती.

अशोकाच्या मृत्यूसंबंधाची माहिती उपलब्ध नाहीं. तिबेटी दंतकथेवरून असें दिसतें कीं तो तक्षशिलेला वारला. त्याच्या कित्येक मुलांचीं नांवें उपलब्ध आहेत. तीवर नांवाच्या एक मुलाचा एका शिलालेखांत उल्लेख आहे. तसेंच कुणाल व जलौक यांचींहि नांवें इतर ठिकाणीं आलीं आहेत.

**मौर्य घराण्याचे बाकीचे राजे** (ख्रि.पू.२३२-१८५).- अशोकानंतर त्याचा नातू दशरथ राज्यावर आला. पण याची कारकीर्द लवकरच संपली, व नंतर अशोकाचा दुसरा एक नातू संप्रति हा राज्यावर आला. याचा जैन वाङ्मयांत पुष्कळ उल्लेख आहे. कारण त्यानें जैन पंथास मोठा आश्रय देऊन आर्येतरांच्या देशांतहि जैन मठ स्थापले. तो जैन अशोक म्हणून लोकांत प्रसिद्ध आहे. तथापि बौद्ध व जैन ग्रंथांत याच्या संबंधानें परस्परविरुद्ध अशी माहिती सांपडते, व तींतून सत्य निवडून काढणें फार कठिण आहे. संप्रतीनंतर मौर्य घराण्याचे आणखी चार राजे झाले, परंतु ते केवळ नामधारी दुर्बल राजे होते. यांच्या वेळीं मौर्य घराण्याची सत्ता भराभर कमी होत गेली, व त्याला ब्राह्मणांकडून झालेला विरोध कारण झाला असें नव्हे. स्मिथ म्हणतो. कलिंगाचें राज्य मौर्य साम्राज्याचें जूं झुगारून देऊन स्वतंत्र बनलें आणि गोदावरी व कृष्णा यांच्यामधील प्रदेशांत आंध्रांचें राज्य बलिष्ठ बनलें. मौर्य घराण्याचा शेवटला राजा बृहद्रथ. याला त्याचा मुख्य सेनापति पुष्प-(ष्य)मित्र यानें विश्वासघातानें ठार मारलें.

यानंतरहि मौर्यांचें लहानसें राज्य मगधांत चालू होतें. ७ व्या शतकांत ह्युएन त्संग या चिनी प्रवाशाच्या वेळीं पूर्ण-वर्मा नांवाचा मौर्य राजा मगधांत होता. त्याशिवाय या मूळ मौर्य घराण्याचा वंशज, म्हणून सांगणारीं लहान लहान मौर्य घराणीं ६।७।८ व्या शतकांत पश्चिम हिंदुस्थानांतील कोंकण व इतर कांहीं भागांत राज्य करीत होतीं व त्यांचा अनेक शिलालेखांत उल्लेखहि आढळतो.

**मौर्य घराण्याच्या वेळची राज्यव्यवस्था.**— मागें दहाव्या प्रकरणांत बुद्धापासून चंद्रगुप्तापर्यंतच्या काळची सामाजिक परिस्थिति वर्णिलेली आहे त्यावरून तदुत्तर मौर्य घराण्याच्या वेळच्याहि समाजव्यवस्थेची थोडीबहुत कल्पना होऊं शकते. तेव्हां येथें आतां मौर्यकालीन शासनपद्धतीचेंच फक्त दिग्दर्शन करावयाचें बाकी राहिलें आहे. चंद्रगुप्तानें आपल्या अमदानींत जी राज्यव्यवस्था अंमलांत आणली तीच बहुतेकांशीं त्याच्या मुलाच्या व नातवाच्या कारकीर्दींत कायम राहिली. अशोकाच्या कारकीर्दींत कांहीं नवीन सुधारणा घडून आल्या, पण त्या फार थोड्या होत्या. मगध देशाची राज्यव्यवस्था अर्थशास्त्रांत सांगितलेल्या पद्धतीवर चाललेली होती; आणि चंद्रगुप्ताच्या कारकीर्दींत जरी राज्याचा विस्तार झाला तरी त्यामुळें तींत फारसा फरक पडला नाहीं. राज्यामध्यें निरनिराळीं खातीं असून त्या खात्यांची व्यवस्था निरनिराळ्या अधिकाऱ्यांकडून ठेविली जात असे. त्या राज्यव्यवस्थेसंबंधानें जी माहिती मिळते तिजवरून अकबराच्या वेळेपेक्षां या वेळची राज्यव्यवस्था चांगली होती असें दिसतें. अकबराच्या वेळीं न्यायखात्यांतील अधिकाऱ्यांखेरीज बाकीचे सर्व अधिकारी लष्करी पेशाचेच असत. अकबराच्या खासगींतील मंडळी सुद्धां शिपाईच समजण्यांत येत. कायम सैन्य फार थोडें होतें, व लढाईचा प्रसंग येई तेव्हां राजाच्या निरनिराळ्या सरदारांच्या हाताखालीं सैन्यें जमा होत. पण अशा प्रकारची पद्धत मौर्यकालीं नव्हती. मौर्यांच्या पदरीं सरकारी सैन्य असे व तें फार उपयोगीं पडत असे. एकंदर राज्यकारभार बिनलष्करी अधिकाऱ्यांच्या ताब्यांत असून तो उत्कृष्ट रीतीनें चालत असे. मध्यवर्ती सत्तेचा प्रांतिक अगर तालुक्यांतील अधिकाऱ्यांवर कडक दाब असे. चंद्रगुप्ताच्या पदरीं गुप्त हेरांचें खातें फार चांगल्या तऱ्हेचें असून त्या खात्याची व्यवस्था जर्मन पद्धतीची होती. सारांश मौर्यांची राज्यव्यवस्था म्हणजे उत्कृष्ट रीतीनें चाललेली एकतंत्री सत्ता होती.

**पा ट लि पु त्र रा ज धा नी.**— पाटलिपुत्र हें शोण नदीच्या उत्तर तीरावर ९ मैल पसरलेलें एक मोठें शहर होतें. आतां त्या जागेवर पाटणा, बांकीपुर इत्यादि शहरें झालीं आहेत. कुसुमपुर नांवाचें फार जुनें शहर पाटलिपुत्रांत अंतर्भूत झालें होतें व त्यामुळें पाटलिपुत्रालाच कुसुमपुर असेंहि म्हणत असत. शोण व गंगा यांच्या संगमामुळें जो जिव्हाकृति जमिनीचा तुकडा बनलेला आहे त्या ठिकाणीं हें पाटलिपुत्र नगर वसलेलें असून अशाच प्रकारची जागा शास्त्रकारांनीं राजधानीला सुरक्षित मानलेली आहे. शहराच्या रक्षणार्थ

सभोंवतीं भरीव लांकडी गजांची तटबंदी होती. तिला चौसष्ट दरवाजे व ५७० बुरूज होते. या गजांच्या तटबंदीचें रक्षण बाहेरून शोणनदीच्या पाण्यानें व भरलेल्या खंदकानें होत असे.

राजवाडा.—राजवाड्याचें सर्व काम लांकडी होतें. तेथील खांबांवर सोनेरी व रुपेरी चित्रें असत. राजवाड्याचें कलाकौशल्य पर्शियन राजवाड्याच्या धर्तीवरचें होतें. ग्रीक ग्रंथकारांच्या मतें सुसा व एकबटाना येथील राजवाड्यांपेक्षां चंद्रगुप्ताचा राजवाडा फार भव्य होता. दरबार तर फारच थाटाचा भरत असे. सहा सहा फूट रुंद तोंडाचीं सोन्याचीं भांडीं उपयोगांत आणलीं जात असत. सोन्यानें मढविलेल्या पालखींतून अगर अलंकारभूषित हत्तीवरून राजा सार्वजनिक ठिकाणीं येत असे. आशिया व चीन येथील ऐश्वर्याच्या सर्व वस्तू त्याला उपलब्ध होत्या. राजवाड्यामध्यें राजाच्या भोंवतीं सशस्त्र स्त्रियांचा पहारा असे. जनानखान्याची व्यवस्थाहि फार उत्कृष्ट होती.

राजेलोकांच्या करमणुकी.—त्या वेळेच्या शास्त्रकारांनीं जरी मृगया व द्यूत हीं सदोष मानलेलीं होतीं तरी पण तत्कालीन राजे लोक मृगया करीत असत. शिकारीसाठीं मोठमोठीं अरण्यें राखून ठेवलेलीं असत, व या अरण्यांत कोणी राजाच्या क्रीडेचा भंग केल्यास त्याला देहान्त शिक्षा मिळत असे. कुस्त्या, प्राण्यांच्या झुंजा वगैरे करमणुकीचे प्रकारहि प्रचलित होते. रथांच्या शर्यती लागत असत व त्यांच्यासाठीं फार स्पर्धा होत असे.

वेश्या.—नर्तिकांना त्या वेळीं फार मान असे. वेश्यांना, घरच्या दासी, माला करणाऱ्या दासी, किंवा पाय चेपणाऱ्या दासी म्हणून नेमीत असत. राजाचा पोषाख ठेवण्याचें आणि सुवासिक तेलें, अत्तरें ठेवण्याचें काम यांच्याचकडे असे. राजाच्या शिरावर छत्र धरण्याचें काम व पंख्यानें वारा घालण्याचें कामहि त्याच करीत असत. यांच्याकडे हेरांचेंहि काम असे.

इराणी वर्चस्व.—पंजाबच्या लगतच इराणी सत्तेखालील भाग असल्या कारणानें इराणी चालीरीतींचें वर्चस्व हिंदुस्थानावर पडलें असावें असें दिसतें. सरहद्दीलगतच्या प्रातांतून खरोष्ठी लिपीचाच उपयोग करण्यांत येत असे. क्षत्रप ही इराणी पदवी प्रचारांत होती. अशोकाच्या शिलालेखाची पद्धत व कलाकुसरीची पद्धत हीं सर्व इराणी तऱ्हेचींच होतीं. अग्निगृहामध्यें वैद्य व साधू यांचा सल्ला घ्यावा असा जो अर्थशास्त्रामध्यें नियम आहे तो, व तसाच राजाचे केस धुण्याचा उत्सव इत्यादि चाली इराणी लोकांपासून घेतलेल्या होत्या हें उघड दिसतें. हल्लींच्या शोधांवरून हिंदु धर्मावर व समाजसंस्थांवरहि इराणी वर्चस्व थोडें फार पडलें असावें, किंवा दोहोंसहि सामान्य अशा चाली मगांच्या परिणामाचे अवशेष असावेत असें वाटूं लागलें आहे.

एकतंत्री सत्ता.— हिंदुधर्मांत साधारणतः राजाचें अनियंत्रित वर्चस्व आढळून येतें. ब्राह्मणाला मान देण्याबद्दल किंवा त्याचा सल्ला घेण्याबद्दल कितीहि नियम असले तरी राजे लोक आपल्या मनास वाटेल त्याप्रमाणें करण्यास कचरत नसत. राजाचें प्रधानमंडळ जरूर तेवढ्याच लोकांचें असावें असा चाणक्यानें नियम घातला होता व त्याप्रमाणें चंद्रगुप्ताचें प्रधानमंडळ ठराविक लोकांचें नसे. शेवटचा निकाल राजाकडे असे. स्वतःविरुद्ध बंड अगर स्वतःचा खून एवढीच काय ती राजाला खरी भीति असे. राजानें जर रूढीविरुद्ध वर्तन केलें तर त्याला पदच्युत करण्याचे प्रयत्न होत असत. चंद्रगुप्त स्वतःच नंदाचा नाश करून राज्यारूढ झाला असल्यामुळें स्वतःवरहि तशी पाळी येईल अशा भीतीनें त्याचें मन व्यग्र असे. तो कधींहि एकाच दिवाणखान्यांत लागोपाठ दोन रात्री निजत नसे. नंदांच्या अनुयायांनीं त्याला मारण्यासाठीं अनेक प्रयत्न केले, पण याच्या सावधगिरीमुळें ते सर्व फसले.

सैन्य:—पूर्वापार रूढीप्रमाणें सैन्य चतुरंग असे. हत्ती, रथ, अश्व आणि पायदळ हीं तीं चार अंगें होत. हत्ती हा तट उध्वस्त करण्याच्या कामीं व शत्रूच्या सैन्याची दाणादाण करण्याच्या कामीं फार उपयुक्त असल्या कारणानें हत्तींच सैन्यांत फार महत्त्व असे. रथाची पद्धत ऋग्वेदाच्या काळापासून अस्तित्वांत होती; व ती नामशेष कधीं झाली हें निश्चित नाहीं. सातव्या शतकाच्या मध्यभागांत सैन्याचें सर्वसाधारण वर्णन करतांना ह्युएन त्संग यानें अधिकारी लोक रथाचा उपयोग करीत असत असें लिहिलें आहे. तथापि हर्षासंबंधीं ह्युएनत्संगनें, 'त्याच्या पदरीं प्रथम ५००० हत्ती, २०००० घोडदळ व ५०००० पायदळ होतें व पुढें ६०००० हत्ती व १००००० घोडदळ झालें असें ज्या ठिकाणीं म्हटलेलें आहे त्या ठिकाणीं त्यानें रथाचा उल्लेख केलेला नाहीं. यावरून हर्षाच्या वेळीं रथाची चाल नष्ट झाली असावी असें दिसतें. तथापि चंद्रगुप्ताच्या वेळीं चतुरंग सैन्य होतें. ग्रीक युद्धपद्धतीची छाप या चतुरंग सैन्यावर पडलेली दिसत नाहीं. नंदाच्या पदरीं ८०००० घोडदळ, २००००० पायदळ, ८००० रथ व ६००० हत्ती होते. चंद्रगुप्तानें त्यांत आणखी भरती करून ६००००० पायदळ व ९००० हत्ती अशी आपल्या सैन्याची जय्यत तयारी केल्यामुळें सिल्यूकसचा पराभव तो सहज करूं शकला. तथापि त्याचें घोडदळ मात्र सारें ३०००० च होतें. अर्थशास्त्रांतील नियमांप्रमाणें १०० लोकांची एक तुकडी व १००० चें एक पथक होत असे, व त्याच पद्धतीस अनुसरून चंद्रगुप्ताच्या काळची सैन्याची व्यवस्था सहा खात्यांमध्यें वांटलेली होती. या खात्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:—आरमार खातें, वाहतुक व मुदपाक खातें, पायदळ खातें, रिसाला, गजशाला व रथखातें. यांपैकीं प्रत्येक खात्याची व्यवस्था पंचायतीकडे असून प्रत्येक पंचायतींत पांच पांच इसम असत.

कडक शासनपद्धति.—चंद्रगुप्ताची शासनपद्धति फार परिणामकारक होती. त्या वेळीं दण्डनीति फार प्रचारांत होती व चंद्रगुप्तानेंहि याच पद्धतीचा अवलंब केला होता.

ग्रीक लोकांनीं त्या वेळची जी माहिती लिहून ठेवलेली आहे तिजवरून देखील हेंच अनुमान दृढ होतें. गुन्ह्याबद्दल कडक शिक्षा फर्मावण्यांत येत असे, व दंड ठोठावून खजिन्याची भरती करण्यांत येत असे. ४,००,००० लोकांच्या छावणीमध्यें दररोज १००।१२५ रुपयांपेक्षां जास्त चोरी होत नसे व तिजबद्दल देखील कडक शासन होत असे असें मिगॅस्थिनीझनें लिहिलें आहे.

शि क्षा.—एखाद्या मनुष्यावर चोरीचा आरोप आला असतां त्याचे हाल हाल करून त्याच्याकडून खरी हकीकत काढून घेण्यांत येत असे. खात्रीलायक पुराव्याशिवाय चोराला शिक्षा देण्यांत येऊं नये असें चाणक्यानें मत असलें तरी शिपायांकडून होणाऱ्या छलामुळें निरपराध्याला कबुली जबाब देणें भाग पडून शिक्षा भोगावी लागे. चाणक्यानें छलाचे १८ प्रकार वर्णन केले आहेत व ते दररोज निरनिराळ्या रीतीनें उपयोगांत आणावेत असें लिहिलें आहे. एखाद्या मनुष्यावर अपराध शाबीत झाला असतां दंड, अवयवच्छेदन अगर देहान्त शिक्षा या प्रकारच्या शिक्षा देण्यांत येत असत. या शिक्षा ठोठावतांना अपराध्याच्या जातीकडेहि लक्ष पुरवण्यांत येत असे. एखादा अपराधी ब्राह्मण असल्यास त्याचे हाल करण्यांत येत नसत, पण त्याला हद्दपारीची शिक्षा ठोठावण्यांत येत असे. तसेंच श्रीमंत, गरीब, कुलीन अगर हलका इकडेहि लक्ष पुरविण्यांत येत असे. चाळीस पन्नास पणांच्या सुद्धां चोरीबद्दल देहान्त शिक्षा ठोठावण्यांत येत असे. तसेंच घर फोडल्याबद्दल, मनुष्यवधाबद्दल, किंवा राजाच्या मालमत्तेचा नाश केल्याबद्दलहि देहान्त शिक्षा देण्यांत येत असे. कर न देण्याबद्दल सुद्धां जबर शिक्षा होत असत. अशोकाच्या कारकीर्दीतहि या शिक्षांमध्यें कांहीं बदल झाला नाहीं असें दिसतें.

एखाद्या निरपराधी मनुष्याच्या छलाबद्दल अधिकाऱ्याला ४८ पणांचा दंड करावा व एखाद्या निरपराध्याचा हाल हाल करून वध केल्याबद्दल १००० पणांचा दंड करावा असें अर्थशास्त्रांत लिहिलेलें आहे.

ना ग र क आ णि प्र जा ग ण न—लहानशा राज्याचे चार प्रांत करून प्रत्येक प्रान्तावर एक एक अधिकारी नेमावा असें अर्थशास्त्रांत लिहिलेलें आहे. हेंच तत्त्व राजधानीस व इतर मोठ्या शहरांनाहि लागू आहे. राजधानीचे चार भाग पाडून त्या प्रत्येक भागावर एक एका 'स्थानिका'ची नेमणूक होत असे. या स्थानिकांना मदतगार ह्मणून १० पासून ४० घरांवर देखरेख करणारे 'गोप' नेमले जात असत. सर्व शहराची व्यवस्था 'नागरका'कडे असे, शहर अधिकाऱ्यांच्यावर 'प्रस्थित' व 'आगत' अशा सर्व माणसांवर नजर ठेवण्याची जबाबदारी असे. प्रत्येक गोपाला त्याच्या ताब्यांतल्या घरांतील मंडळींच्या, कुळाची, गोत्राची, उत्पन्नाची व खर्चाची पूर्ण माहिती असली पाहिजे. यामुळें मध्यवर्ती सत्तेला एखादा कर वाढवण्यास अगर इतर रीतींनें पैसे काढण्यास सोपें जात असे. प्रजागणनाचें कामहि याच अधिकाऱ्याकडे असे. आग लावणाऱ्या मनुष्याला त्याच आगींत लोटून देण्याची शिक्षा होत असे. नगरारोग्याचें काम हेच अधिकारी पहात असत.



मौ र्यां च्या वे ळ चें न ग रा धि का री मं ड ळ.-चंद्रगुप्ताच्या साम्राज्यांतील नगराधिकारीमंडळाची व्यवस्था अधिक गुंतागुंतीची होती. हें अधिकारीमंडळ तीस लोकांचें असून त्याच्या सहा पोटकमिटया होत्या. त्यांचीं कामें येणेंप्रमाणें:- (१) उद्योगधंद्याच्या कला; (२) परकीयांची बरदास्त; (३) जननमरणाची नोंद; (४) फुटकळ विक्री, विनिमय, वजन व मापें यांवर देखरेख व विक्रीच्या मालावर देखरेख; (५) तयार झालेल्या व विकलेल्या मालावर देखरेख; व (६) विक्रीच्या मालावर एकदशमांश हिस्सा गोळा करणें.

वरील व्यवस्थेची रूपरेषा जरी पाहिली तरी मौर्यकालीन नगरव्यवस्था फारच उच्च दर्जाची होती असें दिसून येईल; व त्यांतील बारीकसारीक अंतर्व्यवस्थेचें बारकाईनें परीक्षण केल्यास अशी उत्कृष्ट व्यवस्था ख्रिस्ती शकाच्या आरंभाच्या ३०० वर्षें अगोदर अस्तित्वांत होती याबद्दल कौतुक वाटतें. कारण अकबराच्या वेळीं देखील अशी व्यवस्था नव्हती व ग्रीक नगरराज्यांत इतकी व्यवस्था असेल किंवा नाहीं याची शंकाच आहे.

क ला.—कलानिपुण कारागीर हे सरकारी नोकर ह्मणून समजले जात असत, व त्यांना जर कांहीं अपाय केला गेला तर अपाय करणाऱ्याला जबर शिक्षा देण्यांत येत असे. या खात्यावरील अधिकारी लोकांकडेच कारागिरांचा पगार व कामाच्या वेळा ठरविणें, सामानाचा पुरवठा इत्यादि कामें असत.

प र की य लो क.—परराष्ट्रमंत्र्यांच्या मंडळाकडे, परस्थ लोकांची राहण्याची व्यवस्था करणें, त्यांच्यावर नजर ठेवणें, त्यांची योग्य तऱ्हेनें पोंचवापोंचव करणें, व आजारी पडल्यास त्यांची काळजी करणें इत्यादि कामें असत. या खात्याच्या अस्तित्वावरून मौर्य राजांचें परराष्ट्रांशीं बरेंच दळणवळण असावें असें दिसतें.

ज न न म र ण.-जननमरणाच्या नोंदीचें खातें सरकारला कर बसविण्याचें काम सोपें व्हावें व तसेंच माहितीहि कळावी या हेतूनें अस्तित्वांत आलें होतें.

व्या पा र आ णि ज का त.—सर्व हिंदुस्थानांतील राजांची फार प्राचीन काळापासून या बाबतींत एकच पद्धत होती. खासगी मालावर पूर्ण नजर ठेवून त्यावर जकात बसविण्याची व अशा रीतीनें सरकारी मुद्रा मारण्याची चाल होती. ही मुद्रा हिंगुळाच्या रंगाची असे. चाणक्यानें याला अभिज्ञानमुद्रा असें म्हटलें आहे. माल तयार करणाऱ्यानें कर देण्याचें नाकारल्यास त्याला जबर शिक्षा होत असे.

रा ज प्र ति नि धी.—अर्थशास्त्राप्रमाणें लहानशा राज्याचे सुद्धां चार प्रांत पाडून प्रत्येक प्रांताला एकेक अधिकारी असावा असा नियम होता. यावरून चंद्रगुप्ताच्या अवाढव्य साम्राज्याची व्यवस्था पहाण्याला बरेच अधिकारी असावेत पण अशोकाच्या पदरीं एवढ्या साम्राज्याची व्यवस्था चार राजप्रतिनिधीच पहात असत.

खा ते वि भा ग णी.—राज्याचा कारभार सुरळीत चालण्यासाठीं अर्थशास्त्रांत अनेक खातीं पाडण्याविषयीं चाणक्यानें प्रतिपादिलें आहे. अर्थशास्त्रांत सुमारें तीस खातीं पाडलेलीं आहेत. पण्याधक्ष, कुप्याध्यक्ष, नावध्यक्ष तसेंच सूताध्यक्ष, शुल्काध्यक्ष, आकराध्यक्ष, इत्यादि निरनिराळ्या खात्यांचे अध्यक्ष नेमलेले आढळून येतात. विशेष माहिती अर्थशास्त्रावरून कळेल.

लां च लु च प तीं चे प्र का र.—वरीलप्रमाणें चोख व्यवस्था व उत्तम देखरेख असतांना सुद्धां लांचलुचपतीचे प्रकार राज्यांत चाललेले असावेत असें दिसतें. स्वतः चाणक्यानेंच असें म्हटलें आहे.

'यथा ह्यनास्वादयितुं न शक्यम् । जिव्हातलस्थं मधुवा विषंवा । अर्थस्तथाह्यर्थचरेण राज्ञः । स्वल्पोऽप्यनास्वादयितुं न शक्यः॥१॥ मत्स्या यथान्तः सलिले चरन्तो॥ ज्ञातुं न शक्याः सलिलं पिबंतः॥ युक्तास्तथा कार्यविधौनियुक्ताः ज्ञातुं न शक्या धनमाददाना ॥२॥ अपि शक्या गति र्ज्ञातुं पततां खे पतत्रिणाम्‌न तु प्रच्छन्नभावानां युक्तानां चरतां गतिः ॥३॥

( अर्थशास्त्र पान ७० )

यानंतर या लांचलुचपतीचे ४० प्रकार आहेत असें सांगितलेलें आहे. लांचलुचपती जो उघडकीला आणील त्यास मोठें बक्षिस ठेवलेलें असे.

हे रां चें खा तें.—सैन्याच्या खालोखाल हेरांच्या खात्यांचें महत्त्व असे. अनेक वेषांमध्यें हेर नेमलेले असत;व एकंदरीनें अलीकडील जर्मन हेरखात्याप्रमाणें हेरांची व्यवस्था असे. खबुतरांच्या कडूनहि काम चालविलें जात असे. अर्थशास्त्रामध्यें हेरखात्याचें महत्त्व वर्णन केलेलें आहे. ग्रीक प्रवाश्यांनीं देखील त्यावेळीं हेरांचें किती महत्त्व होतें हें सांगितलें आहे. प्रांतिक ठिकाणांहून मुख्य सरकारकडे सर्व बातमी पाठविली जात असे; व वेश्यांनांहि हें काम दिलें जात असे. राजानें या हेरांच्या साहाय्यानें आपल्या प्रजेवर नजर ठेवावी असें अर्थशास्त्रांत म्हटलेलें आहे.

ज मि नी व री ल स त्ता.—जमिनीवरील सत्ता प्राचीन हिंदुस्थानांत कोणाकडे असे याचा उलगडा होत नाहीं. डूबॉयेन असें लिहिलें आहे कीं, 'मलबारशिवाय इतर ठिकाणीं राजाची जमिनीवर सत्ता असते; ' व हेंच मत हल्लीं मान्य झालेलें आहे; पण अर्थशास्त्रामध्यें तर असें स्पष्टच म्हटलें आहे कीं, ' श्रुतिस्मृतिवेत्त्यांनीं असें सांगितलें आहे कीं राजा हा जलस्थलांचा स्वामी आहे. ' राजानें जमिनी, कर देणाऱ्या मनुष्याला त्याच्या हयातीपर्यंतच द्याव्या. 'करदेभ्यः कृतक्षेत्राणि ऐकपुरुषिकाणि प्रयच्छेत् । ' असेंहि त्यांत स्पष्ट म्हटलें आहे. व जमिनी न पेरणाऱ्यापासून त्या राजानें काढून घेऊन दुसऱ्याला द्याव्या ' अकृषतामाच्छिद्यान्येभ्यः प्रयच्छेत्-' असें वचन आहे.

ज मी न म ह सू ल.—जमीन महसूल म्हणजे जमिनीसाठीं राजाला द्यावा लागणारा कर होय. राजाला चौथा हिस्सा द्यावा लागत असे. मौर्यांच्या वेळीं धारेबंदीची पद्धत अस्तित्वांत होती किंवा नाहीं हें अजून निश्चित नाहीं.

पा ट बं धा ऱ्या चें खा तें.—हिंदुस्थानांत पिकाला पाण्याची फार जरुरी असल्याकारणानें त्याच्याकडे फार लक्ष पुरविलें जात असे. कालवे काढण्याची पद्धत अंमलांत होती व पाण्यावरील कर ठरलेला होता.

र स्ते.—मुख्य मुख्य रस्ते उत्तम रीतीनें बांधले जात असत आणि अंतर मोजण्याचे खांबाहि उभारलेले असत. अर्थशास्त्रामध्यें रस्ते बांधणें हें राजाचें कर्तव्य म्हणून म्हटलें आहे व त्याच्या लांबीरुंदीचेहि नियम दिलेले आहेत. मौर्यांच्या वेळीं तक्षशिला व पाटलीपुत्र यांमध्यें मोठा राजरस्ता होता.

म दि रा पा न.—मदिरापान व विक्री यांनां मुळींच प्रतिबंध नव्हता. यावर व्यवस्था ठेवण्यासाठीं एक सुराध्यक्ष नेमलेला असे; व तो मदिरापानासंबंधींचा व विक्रीचा परवाना देत असे; व सरकारी कर वसूल करीत असे. दारूचे गुत्ते जवळ जवळ नसत; व दुकानांची व्यवस्थाहि चांगल्या प्रकारची ठेवावी लागत असे. ' पानागाराणि अनेक कक्ष्याणि विभक्तशयनासनवन्ति, पानोद्देशानि गन्धमाल्योदकवन्त्यृतुसुखानिकारयेत् । ' चाणक्यानें दारूचे सहा प्रकार वर्णन केलेले आहेत. उत्सवाच्या वेळेला व यात्रेच्या दिवशीं विशेष प्रकारचे परवाने मिळत असत. ' उत्सवसमाजयात्रासुचतुरहस्सौरिको देयः । '

वर दिलेल्या एकंदर हकीकतीवरून मौर्यकालीन राज्यव्यवस्था कशा प्रकारची होती हें सहज दिसून येईल. अशा प्रकारची चोख व नमुनेदार व्यवस्था दोन अडीच हजार वर्षांपूर्वी होती हें वाचून सर्वांनां आश्चर्यच वाटेल. या सर्व माहितीचें प्रतिबिंब आपणांला अर्थशास्त्रांत पहावयास मिळतें. अर्थशास्त्र हें त्यावेळच्या राज्यव्यवस्थेचें प्रतिबिंब आहे यांत शंका नाहीं. थोडक्या अपराधाबद्दल जबर शिक्षा, व हेरखात्याचें महत्त्व यामध्यें दिसून येत असल्यामुळें स्मिथ साहेबानां फार राग आलासा दिसतो. पण प्रत्यक्ष ब्रिटिश राज्यांत देखील तोच प्रकार आढळून येतो. असो. अर्थशास्त्रावरून व इतर थोड्याशा प्रमाणांवरून मौर्यकालीन राज्यव्यवस्था फार उत्कृष्ट प्रकारची होती असें प्रत्येकाला वाटल्यावांचून रहाणार नाहीं.

**शुंग घराणें** (.ख्रि. पू. १८५-७३ ).— बृहद्रथ मौर्य राजाला मारून त्याचा सेनापति पुष्यमित्र यानें सिंहासन बळकावलें व आकुंचित झालेल्या मौर्यांच्या राज्यावर अंमल सुरू

केला. पुष्यमित्र हा शुंग घराण्याचा पहिला राजा होय. याची राजधानी पाटलीपुत्र येथेंच होती. याच्या कारकीर्दीत ख्रि.पू. १७५ च्या सुमारास युक्राटिडीझ या बॅक्ट्रियन राजाचा नातलग, आणि काबूल व पंजाब प्रांतांचा राजा मिनँडर यानें अलेक्झांडरप्रमाणेंच मोठ्या सैन्यानिशीं हिंदुस्थानावर स्वारी केली. त्यानें सिंध प्रांत, सुराष्ट्र (काठेवाड) व पश्चिम किनाऱ्यावरचे कांहीं भाग जिंकले, मथुरा शहर घेतलें, व खुद्द पाटलिपुत्र राजधानीवर चाल करण्याचा बेत केला. परंतु लवकरच त्याच्याशीं मोठा सामना होऊन या ग्रीक राजाला हिंदुस्थानांतून बाहेर हांकून लावण्यांत आलें. यूरोपीय सेनानायकानें जमिनीवरून स्वारी करून हिंदुस्थान जिंकून घेण्याचा केलेला हा दुसरा व शेवटचाच प्रयत्न होय. यानंतर इ.स.१५०२ मध्यें वास्को दि गामा जलमार्गानें हिंदुस्थानांतील कालिकत बंदरावर हल्ला करीपर्यंत मध्यंतरीं कोणीहि यूरोपीय सेनानीनें हिंदुस्थानावर स्वारी केली नाहीं.

पुष्यमित्राचा मुलगा अग्निमित्र, व नातू वसुमित्र हे दोघेहि चांगले पराक्रमी होते. अग्निमित्रानें विदर्भ (वऱ्हाड) देशच्या राजाचा पराभव केला. या एकंदर विजयांनंतर पुष्यमित्रानें सार्वभौमत्वाची खूण म्हणून प्राचीन परंपरेप्रमाणें अश्वमेध यज्ञ करण्याचें ठरवून एक अश्व वसुमित्राच्या संरक्षणाखालीं सोडला. सिंध प्रांतांत यवनांचा, व इतर कित्येक प्रांतांतील राजांचा पराभव करून व अजिंक्य ठरून वसुमित्र परत आल्यावर पुष्यमित्रानें अनेकांनां निमंत्रणानें बोलावून यज्ञसमारंभ सिद्धीस नेला. या यज्ञसमारंभाला प्रसिद्ध व्याकरणकार पतंजलि हजर होता असें त्याच्या ग्रंथांतील एतद्विषयक उल्लेखावरून वाटतें. अहिंसाप्रतिपादक बुद्धमताविरुद्ध सुरू झालेल्या ब्राह्मणधर्मपुनरुज्जीवनाच्या चळवळीचा सदरहू अश्वमेध यज्ञ हा चांगला निदर्शक आहे. शिवाय बौद्ध ग्रंथांवरून असें दिसतें कीं, पुष्यमित्रानें बौद्धपंथीयांचा क्रूरपणानें प्रत्यक्ष छळहि केला होता. त्यानें मगधापासून पंजाबांतील जालंधरपर्यंत बौद्ध मठ जाळले व बौद्ध भिक्षूंनां ठार मारलें. तेव्हां कित्येक भिक्षू परराज्यांत पळून गेले. बौद्ध ग्रंथांतील सदरहू वर्णन अतिशयोक्तीचें असेल, परंतु ही छळाची गोष्ट निखालस खोटी असेल असें म्हणतां येत नाहीं. जैन व बौद्ध सांप्रदायिकांचा छळ केल्याचीं दुसरींहि उदाहरणें आहेत. हिंदुधर्माभिमानी राजांनीं क्रोधानें असा छळ केला असल्यास त्यांत नवल नाहीं असेंहि स्मिथ म्हणतो; कारण जैन व बौद्ध मतांच्या अशोक वगैरे राजांनीं त्या पंथांतील तत्त्वें अमलांत आणण्याकरितां निर्दयपणानें लोकांवर सक्ती केली होती. तथापि पाश्चात्य ग्रंथकारांस आश्चर्य वाटतें तें याचें कीं, एका दृष्टीनें पाहतां भरतखंडांत उभयपक्षीं छळाचीं उदाहरणें फार क्वचित् असून निरनिराळ्या संप्रदायांचे लोक बहुतेक सर्वत्र गुण्यागोविंदानें एकत्र नांदत असत; व सरकारदरबारींहि सांप्रदायिक भेदभाव आड न येतां ते अनुग्रह पावत असत.

मिनँडर परत गेल्यावर पुष्यमित्र (ख्रि.पू. १८५-१४९) सुमारें पंचवीस वर्षांनीं मरण पावला, व युवराज अग्निमित्र राज्यावर बसला. परंतु ही कारकीर्द लवकरच आटोपून उपर्युक्त वसुमित्राचा भाऊ वसुज्येष्ठ हा राज्यावर आला. यापुढील चार कारकीर्दी फार अल्प कालांत म्हणजे अवघ्या सतरा वर्षांच्या अवधींत संपल्या. यावरून त्या काळांत बऱ्याच धामधुमी व राजवाड्यांत बऱ्याच क्रांतिकारक गोष्टी घडल्या असाव्या. याला पुरावा पुढील हकीकतींत मिळतो. एक गोष्ट अशी सांगतात कीं, अग्निमित्राचा एक मुलगा सुमित्र नाट्यप्रयोगाचा विशेष शोकी होता. तो एकदां आपल्या नटमित्रांमध्यें मिसळलेला असतांना मित्रदेव नांवाच्या इसमानें त्याला ठार मारलें. या शुंग घराण्याचा नववा राजा भागवत यानें बत्तीस वर्षें म्हणजे बराच दीर्घ काल राज्य केलें, तथापि त्याच्यासंबंधीं मुळींच माहिती उपलब्ध नाहीं. दहावा राजा देवभूमि हा दुर्व्यसनी होता. तो कांहीं निंद्य गोष्टींत पडला असतांना मारला गेला. याप्रमाणें हें शुंग घराणें एकशें बारा वर्षें राज्य करून लयास गेलें.

**काण्व अथवा काण्वायन घराणें.**—(ख्रि. पू. ७३-२८).-शुंग घराण्यांतला शेवटचा दुर्व्यसनी राजा देवभूमि (ति) याला ठार मारून त्याचें राज्य बळकावण्याकरितां त्याचाच ब्राह्मण प्रधान वसुदेव यानें कट केला होता. देवभूमि हा प्रथमपासूनच केवळ नामधारी राजा असून त्याच्या राज्याचीं सर्व सूत्रें त्याचा प्रधान वसुदेव याच्या हातीं होतीं. वसुदेव काण्व घराण्यांतला असून हें घराणें बराच काल चांगलें बलिष्ठ होतें. राजपुत्र सुमित्राला मारणारा मित्रदेव याच काण्व घराण्यांतला असावा असें वाटतें. मत्स्य व वायु हीं दोन पुराणें आणि बाणाचें हर्षचरित्र यांतील पुराव्यावरून शेवटचा शुंग राजा देवभूति याला मारून काण्व वसुदेव राजा झाला असें ठरतें. सबब शुंग व काण्व हीं घराणीं समकालीन होतीं हें डॉ. भांडारकरांचें मत (हिस्ट्री ऑफ डेक्कन व्हा. १ ला पान १६३) बरोबर नाहीं असें व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो.

वसुदेवानंतर काण्व घराण्यांतील आणखी तीन पुरुष राज्यावर आले व चौघांनीं मिळून [पृ. १६७ पहा] पंचेचाळीस वर्षें राज्य केलें. तथापि यांपैकीं कोणाहि राजाबद्दल माहिती उपलब्ध नाहीं. शेवटचा काण्व राजा ख्रि. पू. २८ किंवा २७ च्या सुमारास आंध्र किंवा शातवाहन घराण्यांतल्या राजानें ठार मारला.

काण्वानंतर आंध्र घराणें राज्य करूं लागलें असें पुराणांत सांगितलें आहे. पण आंध्र घराणें ख्रि. पू. २४० किंवा २३० पासूनच राज्य करीत होतें हें निर्विवाद आहे. सुशर्मा या शेवटच्या काण्व राजाला मारणारा आंध्र राजा आंध्र राजावलींतील ११, १२, किंवा १३ वा असावा.

**आंध्र अथवा अंध्र घराणें.**—काण्व घराणें राज्यभ्रष्ट झाल्यानंतरचा आंध्र घराण्याचा इतिहास देण्यापूर्वी या घरा-

ण्याचा पूर्वेतिहास दिला पाहिजे. चंद्रगुप्त मौर्य व मिगॅस्थिनीझ यांच्या वेळीं म्हणजे ख्रि.पू.३०० च्या सुमारासच द्रविड जातीचें व तेलुगु भाषा बोलणारें आंध्रांचें राष्ट्र हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्याकडे कृष्णा व गोदावरी या नद्यांमधील प्रदेशांत राज्य करीत होतें. लष्करी सामर्थ्याच्या बाबतींत चंद्रगुप्त याच्या खालोखाल त्यांचा नंबर होता. आंध्रांच्या राज्यांत तीस तटबंदी शहरें, अनेक गांवें, १,००,००० पायदळ, २००० घोडदळ व ९००० हत्ती होते. या राज्याची राजधानी कृष्णा नदीच्या कांठीं श्रीकाकुलम् येथें होती असा समज आहे. अशा प्रकारचें हें राष्ट्र प्रथम अर्थात् स्वतंत्र होतें, पण नंतर चंद्रगुप्त किंवा बिंदुसार यांपैकीं कोणाच्या कारकीर्दीत तें मगधाधिपति मौर्यांचें मांडलिक बनलें तें निश्चित माहीत नाहीं. अशोकाच्या शासनलेखांत (ख्रि. पू. २५६) हे आंध्र लोक त्याच्या साम्राज्यसत्तेखालीं असल्याबद्दलचा उल्लेख आहे. अशोकानंतर मौर्य साम्राज्यांतील कलिंगादि राज्यांप्रमाणें हें आंध्रांचें राज्यहि स्वतंत्र झालें. या नवीन स्वतंत्र बनलेल्या आंध्र राष्ट्राचा पहिला राजा सिमुक होता. त्या वेळीं आंध्रांची सत्ता इतक्या झपाट्यानें वाढली कीं, या नव्या घराण्यांतील दुसरा राजा कृष्ण (कन्ह) याच्या वेळीं गोदावरी नदीच्या उगमाजवळचें नाशिक शहर व तेथपर्यंतचा सर्व मुलूख आंध्रांच्या राज्यांत सामील करण्यांत आला होता. आंध्रांचा तिसरा राजा श्री शातकर्णि याची सत्ता कलिंगाचा राजा खारवेल यानें जुमानली नाहीं (ख्रि. पू. २१८). हें कलिंगाचें राज्यहि अशोकाच्या मृत्यूनंतर स्वतंत्र बनलें होतें. यानंतरच्या सुमारें दोनशें वर्षांतली आंध्र राजांबद्दलची कांहीं माहिती उपलब्ध नाहीं. पुराणांत दिलेलीं आंध्र राजांचीं नांवें व त्यांच्या कारकीर्दीचीं वर्षें मागें पृ. १६७ वर आलेलींच आहेत.

ख्रि. पू. २८ किंवा २७ च्या सुमारास, वर सांगितल्याप्रमाणें काण्वांपैकीं शेवटल्या राजाला मारून त्याचें उरलेंसुरलें राज्य आंध्रांनीं घेतलें. आंध्र राजे आपणांस शातवाहन कुलांतले म्हणवीत व त्यांच्यापैकीं पुष्कळांना शातकर्णि हें नांव होतें. या वंशांतील अनेक राजांचा उल्लेख एकाच नांवानें केला गेल्यामुळें फार घोटाळा होतो. काण्व राजा सुशर्मा याला मारणाऱ्या आंध्र राजाचें नांवहि नक्की माहीत नाहीं.

आंध्र घराण्याचा सतरावा राजा हाल याचें नांव वाङ्मयाशीं संबद्ध असल्यामुळें त्याला विशेष महत्त्व आहे. महाराष्ट्रांतील प्राचीन भाषेंत लिहिलेला 'सप्तशती' नामक ग्रंथ हालाचा म्हणून प्रसिद्ध आहे. तो खुद्द हालानें लिहिलेला असेल किंवा त्याला अर्पण केलेला असेल, असें डॉ. भांडारकरांचें मत आहे. प्राकृत भाषेंतील दुसरे कित्येक ग्रंथ आंध्र घराण्यांतील राजांच्या नांवांशीं संबद्ध आहेत. आंध्रांच्या वेळीं त्यांच्या मुलखांत संस्कृत भाषेंत शिष्ट वाङ्मय लिहीत नसत असें दिसतें.

काण्व घराण्यांतला २३ वा राजा गौतमीपुत्र श्री शातकर्णि आणि २४ वा राजा वासिष्ठीपुत्र श्री पुलुमायि यांच्या कारकीर्दीत आंध्रांची परकी लोकांशीं युद्धें झालीं. हे परकी लोक हिंदुस्थानच्या पश्चिमेकडील भागांत वसाहत करून व राज्यें स्थापून राहिलेले होते. ते प्रथम इंडोपार्थियन व नंतर कुशान राजांचे अंकित म्हणून राहिले होते. देश्य राजे व परकी सत्ताधारी यांच्यामध्यें सामने हिंदुस्थानांत या प्राचीन काळांत वारंवार होत असत.

हल्लींच्या मुंबई इलाख्यांतील कांहीं भागांत प्राचीन काळीं वसाहत करून राहिलेल्या परकी लोकांसंबंधानें माहिती फार त्रोटक मिळते; पण नाणीं व शिलालेख यांच्या आधारें कांहीं हकीकत देतां येण्यासारखी आहे. पश्चिम भागांतील अशा परकी सत्ताधाऱ्यांपैकीं माहिती उपलब्ध असलेला असा पहिला क्षत्रप भूमक क्षहरात हा होय. यानें पार्थियन नाण्यांसारखीं नाणीं पाडलेलीं असून तो इंडोपार्थियन राजांपैकीं गोंडोफेरस किंवा दुसऱ्या कोणा राजाचा अधिकारी असावा. हा बहुधा ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकाच्या मध्याच्या सुमाराचा असून त्याच्या जागेवर इतर अधिकारी होऊन गेले असावे. क्षहरातांचा शकांशीं संबंध होता व ते सिकस्तेन म्हणजे अर्वाचीन सीस्तान प्रांतांतून आलेले असावेत.

यानंतर नहपान या क्षहराताचा उल्लेख आढळतो. तो भूमकानंतर लगेच क्षत्रप बनला किंवा नंतर बनला हें नक्की समजत नाहीं. परंतु तो इ. स. ६० व ९० यांच्या दरम्यान अधिकारावर होता असें वाटतें. त्याच्या नांवावरून तो फारसी-पर्शियन कुळांतला असावा. प्रथम तो भूमकाप्रमाणें क्षत्रप होता व नंतर महाक्षत्रप व राजा या उच्च पदव्याहि त्याला मिळालेल्या होत्या. त्याच्या अंमलाखालीं दक्षिण राजपुतान्यापासून नाशिक व पुणें जिल्ह्यापर्यंतचा प्रदेश व काठेवाडहि होता. क्षत्रप व महाक्षत्रप या पदव्यांवरून हे उत्तरेकडील राजांचे अधिकारी असावेत हें उघड आहे; व हे उत्तरेकडील राजे म्हणजे कुशान असले पाहिजेत.

आंध्र घराण्यांतला २३ वा राजा गौतमीपुत्र श्रीशातकर्णि हा इ. स. १०९ च्या सुमारास राज्यावर आला असावा. त्यानें या क्षहरातांची सत्ता नष्ट करून त्यांचा मुलूख इ. स. १२४ च्या सुमारास आपल्या राज्यास जोडला. या विजयाचें चिन्ह म्हणून या नष्टसत्ताधाऱ्यांनीं पाडलेलीं अनेक वर्षांचीं नाणीं घेऊन त्यांवर या आंध्र राजानें आपला शिक्का पुन्हां मारला. 'शकपल्हवादि जातिविहीन परकी लोकांच्या हीन संस्कृतीपासून ब्राह्मणसंस्कृति आणि बौद्धसंप्रदाय यांचें संरक्षण करणारा व जातिसंस्था पुन्हां प्रस्थापित करणारा' अशी प्रौढी या आंध्र राजानें मारलेली आहे. यानें ब्राह्मण व बौद्ध या दोघांनाहि उदार देणग्या दिल्या. त्यांत विशेष आश्चर्याची गोष्ट ही आहे कीं, आंध्र राजे ब्राह्मण असून त्यांनीं बौद्धांच्या संस्थानांच बहुतेक देणग्या दिल्याचा उल्लेख आहे.

इ. स. १३५ च्या सुमारास राजा गौतमीपुत्र श्रीशातकर्णि याचा मुलगा राजा वासिष्ठीपुत्र श्रीपुलुमायि राज्यावर आला. त्यानें २८ वर्षे राज्य केलें. त्याचा विवाह उज्जयिनी येथील शककुळांतला महाक्षत्रप पहिला रुद्रदामा याच्या कन्येशीं झाला होता. तथापि या महाक्षत्रपानें आपल्या जावयाचा दोनदां पराभव करून आंध्रांनीं घेतलेल्या क्षहरातांच्या मुलुखापैकीं बराचसा जिंकून घेतला. पहिल्या रुद्रदाम्यानें आपलें मुलूख जिंकण्याचें काम इ. स. १५० च्या पूर्वी संपविलें होतें. पश्चिम हिंदुस्थानांतील आपल्या सत्तेखालील सर्व प्रांतांची नोंद त्यानें या सालानंतर लवकरच करून ठेवलेली आहे.

पहिला रुद्रदामा हा चांगला विद्वान् व कुशल होता. हा क्षत्रप चष्टन याचा नातू होता. याचीं रुप्याचीं व तांब्याचीं नाणीं ग्रीक, ब्राह्मी, व खरोष्ठी लिपींत मजकूर लिहिलेलीं गुजराथ प्रांतांत सांपडलीं आहेत. चष्टनबद्दल माहिती उपलब्ध नाहीं, परंतु त्याच्या नातवाच्या सनावरून पाहतां तो इ. स. ८० ते ११० च्या दरम्यान होऊन गेला असावा. यावरून चष्टन हा कुशान घराण्यांतील २ऱ्या कडफिसेसच्या वेळीं महाक्षत्रपाच्या हुद्द्यावर होता असें व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो. माळवा व सुराष्ट्र येथील शक क्षत्रप व क्षहरात नहपान हे सर्व स्वतःच्या कुशान राजांप्रमाणें शक सन वापरीत असत. शक सन असलेलीं नाणीं व शिलालेख पुष्कळ उपलब्ध असून त्यांवरून चष्टननें स्थापन केलेल्या घराण्याची शकावली नीटपणें ठरवितां येते.

पुलुमायि इ.स.१६३च्या सुमारास मरण पावला. त्यापुढील आंध्र घराण्यांतला विशेष महत्त्वाचा राजा गौतमीपुत्र यज्ञश्री हा होय. त्यानें सुमारें इ. स १७३ पासून २९ वर्षें राज्य केलें. याचीं रुप्याचीं नाणीं क्षत्रपांच्या नाण्यांच्या नमुन्यावर आहेत. यावरून याच्या वेळीं पुन्हां आंध्रांचा पश्चिमेकडील क्षत्रपांशीं संबंध आला होता असें ठरतें. यज्ञश्रीला सदरहू क्षत्रपांबरोबरच्या सामन्यांत यश आल्यानंतर जिंकलेल्या प्रांतांतील लोकांच्या उपयोगाकरितां हीं त्यानें रुप्याचीं नाणीं पाडलीं असावीत. यज्ञश्रीनें पाडलेलीं व पूर्वेकडील प्रांतांत चालू असलेलीं शिश्याचीं व ब्रॉंझचीं ओबडधोबड नाणीं पुष्कळ सांपडतात, व त्यांवरून यज्ञश्रीनें बरींच वर्षें राज्य केलें असें दिसतें. याच्या कांहीं नाण्यांवर जहाजाचेंहि चित्र आढळतें. त्यावरून यज्ञश्रीची सत्ता जमिनीपलीकडे समुद्रावरहि होती असें अनुमान निघतें.

यज्ञश्रीनंतर विजय, चंद्र(ड)श्री व चौथा पुलुमायि हे तीन राजे होऊन बराच काळ टिकलेलें हें आंध्र राजांचें घराणें इ. स. २२५ च्या सुमारास लयास गेलें. चंद्रश्रीच्या नांवाचीं कांहीं नाणीं सांपडलीं आहेत त्यांवरून त्याचें अस्तित्व सिद्ध होतें व दुसऱ्या दोघांचींहि नाणीं संशोधनांत सांपडतील असें वाटतें. पुराणांवरून पाहतां या घराण्यानें एकंदर ४५६ किंवा ४६० वर्षें म्हणजे ठोकळ मानानें साडेचार शतकें राज्य केलें असें दिसतें. आंध्र राजांची एकंदर संख्या तीस दिलेली आहे तीहि बरोबर वाटते. आंध्र घराणें कशामुळें नष्ट झालें याबद्दल कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. तथापि, उत्तर हिंदुस्थानांतील कुशान राजांपैकीं शेवटला वसुदेव ज्या वेळीं मरण पावला आणि पर्शियांतले सस्सन घराणें ज्या वेळीं उदयास आलें (इ.स.२२६) त्याच सुमारास हें आंध्र घराणें नष्ट झालें. यावरून या तीन गोष्टींचा परस्परसंबंध असावा असें अनुमान निघूं शकतें असें मागें सांगितलेंच आहे. ईसवी सनाचें तिसरें शतक हें हिंदुस्थानच्या इतिहासांत ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें पाहतां पूर्ण अज्ञात आहे. आंध्रांच्या नंतर शक, यवन व इतर कित्येक स्थानिक घराण्यांतील राजांच्या ज्या याद्या पुराणांमध्यें दिलेल्या आहेत त्यांची माहिती पूर्वी मांडलीच आहे. पण त्या याद्या इतक्या घोटाळ्याच्या आहेत कीं, त्यांतून ऐतिहासिक सत्य हुडकून काढणें अशक्य आहे. म्हणून कांहीं तरी तर्क लढवीत बसण्यापेक्षां हिंदुस्थानच्या इतिहासांतील इ.स. २२०–३२० हें शतक अज्ञातकाल म्हणून मानणें बरें.

अशोकाचा मृत्यु ही गोष्ट जगाच्या इतिहासांतील एक महत्त्वाची गोष्ट आहे. त्याच्या मृत्यूनंतर थोडक्याच कालानें मौर्य घराणें लयास गेलें. पुढें शुंग व काण्व घराणीं उदय पावलीं व मावळलीं, आणि उत्तर हिंदुस्थान हा एक अत्यंत दुर्बल प्रदेश होऊन बसला. अतःपर सतलजच्या पलीकडील हिंदुस्थानचा इतिहास हा पश्चिम आशियांतील घडामोडींचा उपांग झाला, व गंगेच्या कांठचा हिंदुस्थान दक्षिणेकडील आंध्रांच्या वाढत्या सत्तेचा उपांग झाला. दक्षिणेकडील आंध्रांची सत्ताहि कालेंकरून नष्ट झाली आणि त्यानंतर सर्व हिंदुस्थान तिसऱ्या शतकाच्या पूर्वार्धांतच अराजक स्थितीप्रत पोंचला. देशांत अराजक झालें याचा अर्थ देशभर कोणी राजे नव्हतेच असा नसून अनेक लहान लहान राज्यें पुन्हां देशभर स्थापन झालीं असा आहे.

**अशोकाच्या मृत्यूनंतर पश्चिम आशिया.**—अशोकाच्या कालांत पूर्वेकडे सिल्यूकिडी ग्रीक साम्राज्य भरभराटींत होतें तें पुढें दुर्बल झालें, आणि इकडे मौर्य साम्राज्यहि दुर्बल झालें. या दोन्ही साम्राज्यांच्या दुर्बलतेचे जे परिणाम झाले ते येणेंप्रमाणेः—

(१) ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या मध्यकालांत सिल्यूकिडी ग्रीक साम्राज्यांतून बॅक्ट्रिया व सॉग्डिएना हीं राज्यें फुटलीं व एक शतकानंतर तीं शक व युएचि यांनीं काबीज केलीं ( पृ. ७९–८० पहा ).

(२) ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकांत पश्चिम इराण सिल्यूकिडी साम्राज्यांतून निघून पार्थियन साम्राज्यांत अंतर्भूत झालें. या पार्थियन साम्राज्यानें पुढें बाबिलोनिया आणि मेसापोटेमिया हे प्रांत घेतले.

(३) आशियामायनर व सिरिया हे प्रदेश रोमन छत्राखालीं आले.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे रोमन साम्राज्य व पार्थिअन साम्राज्य यांत ग्रीक मुलूख वांटला गेला, आणि जो वांटला गेला नाहीं तो शक व युएचि यांच्या भक्ष्यस्थानीं पडला. हिंदुस्थानाला रोमन साम्राज्य किंवा पार्थियन साम्राज्य यांजकडून बाधा झाली नाहीं; तथापि बॅक्ट्रियन ग्रांक व शक यांच्याकडून मात्र त्यास त्रास झाल्याशिवाय राहिला नाहीं. सिल्यूकिडी साम्राज्य आणि ग्रीक प्रदेशावरील रोमन सत्ता यांचा इतिहास मागें दिलाच आहे. शक, युएचि व उपर्युक्त लहान ग्रीक राज्यें यांचा इतिहास मात्र द्यावयाचा राहिला आहे तिकडे आपण आतां वळूं.

**शकांचा जगास उपद्रव.**—हूण लोकांप्रमाणेंच शकांचाहि इतिहास आशिया व यूरोप या दोन्ही भूभागांस जाणवला आहे. तथापि त्यांचा इतिहास सुसंगतपणे आज लिहितां येत नाहीं. ते जरी पुष्कळदां मार देणारे होते तरी त्यांनीं आपला इतिहास लिहून ठेवलेला नाहीं. त्यांचे मार खाणाऱ्यांनीं जे कांहीं उल्लेख केले आहेत त्यांवरूनच यांच्या इतिहासाची कल्पना करावयाची असल्यामुळें केवळ माहितीचे तुकडे जोडण्यापलीकडे येथें अधिक कांहीं करतां येत नाहीं. शकांविषयीं माहिती आपणांस दोन बाजूंनीं मिळते. हिरोडोटस आदिकरून ग्रीक ग्रंथकारांनीं त्यांच्याविषयीं लिहून ठेवलेलें आहे, व शिवाय चिनी ग्रंथांतूनहि त्यांच्यासंबंधीं माहिती उपलब्ध आहे. यांपैकीं प्रथम आपण पहिल्या साधनापासून मिळणाऱ्या माहितीकडे वळूं.

**सिथियन लोक.**—सिथियन हें नांव बरेंच अस्पष्टार्थानें वापरण्यांत येतें. त्यामध्यें मध्य आशियांतील आणि उत्तर यूरोपांतील ज्या अनेक रानटी जातींनीं शेजारच्या सुधारलेल्या राष्ट्रांवर स्वाऱ्या करून त्यांनां अनेक वेळां त्रास दिला अशा अनेक जातींचा समावेश होतो. आशियाच्या इतिहासांत पहिल्या दरायसनें सिथिया देशावर जी सुप्रसिद्ध स्वारी केली तिची हकीकत हिरोडोटसनें दिली आहे. पुढें अलेक्झांडर दि ग्रेट यानें आशियाखंड जिंकण्याचा उपक्रम केला, तेव्हां त्याला पहिला अडथळा सिथियन लोकांनींच केला. प्राचीन ग्रीक सत्तेच्या वेळींहि सिथियन लोकांनीं खुद्द अथेन्स शहर एकदां काबीज केलें होतें. तात्पर्य प्राचीन पौरस्त्य देशांतील अनेक सुधारलेल्या राष्ट्रांनां वारंवार त्रास देणारे म्हणून सिथियन लोक इतिहासांत प्रसिद्ध आहेत.

त्यां चें प रि भ्र म ण.—सिथियन लोकांच्या टोळ्या आशियांत घुसल्या तेव्हां त्या वेळीं बलाढ्य असलेल्या असुर राष्ट्राच्या वाटेस न जातां त्यांच्यापैकीं कांहीं टोळ्या पूर्व बाजूला व कांहीं पश्चिम बाजूला गेल्या. होमरनें वर्णिलेला काल आणि इराणी साम्राज्याचा काल यांच्या दरम्यानच्या कालांतील आशियामायनरच्या परिस्थितीवर सिथियन लोकांचा बराच परिणाम झालेला आहे. होमरनंतरच्या काळांत ग्रीस देशावर डोरिअन लोकांच्या आगमनानें जो परिणाम झाला, त्याचें आशियामायनरवर झालेल्या सिथियन लोकांच्या परिणामाशीं साम्य आहे. होमरच्या काव्यांत सिथियन लोकांचा नामनिर्देश नाहीं, पण हेसिअडच्या काव्यांत तो आढळतो. सिथियन लोकांच्या चालीरीती वगैरे गोष्टींसंबंधानें विशेष महत्त्वाची माहिती हिरोडोटसच्या ग्रंथांत मिळते. हिरोडोटस व हिपॉक्राटीझ यांच्या ग्रंथांत सिथियन लोक पूर्ण रानटी होते असें वर्णन आढळतें, पण नंतरच्या इतिहासकारांनीं सिथियन हे बरेच सुधारलेले लोक होते असें म्हटलें आहे. या विरोधाचा खुलासा असा आहे कीं, सिथियन लोकांपैकीं कांहीं टोळ्या केवळ भटकेगिरी करणाऱ्या होत्या, तर उलट पक्षीं कांहीं स्थायिक राहून शेतकी व इतर अनेक उद्योगधंदे करणाऱ्या होत्या. अर्थातच या दोन प्रकारच्या सिथियन लोकांच्या चालीरीतीं आणि संस्कृति यांच्यामध्यें बरेंच अंतर होतें.

चा ली री ती.—सिथियन लोक उत्तर दान्यूब नदीपासून उत्तर टॅनास(डॉन)नदीपर्यंत पसरलेले होते असें जें हिरोडोटस म्हणतो तें बरोबर आहे. तसेंच हे लोक कृषिकर्म वगैरे कांहीं एक न करतां लुटालूट करीत हिंडणारे, केवळ जनावरांचें मांस खाऊन राहणारे व विशेषतः घोड्याचें दूध व दहीं खाणारे होते हेंहि हिरोडोटसचें वर्णन सिथियन लोकांच्या कांहीं टोळ्यांनां बरोबर लागू होतें. याप्रमाणें या भटक्या सिथियन लोकांच्या बऱ्याच चालीरीती हिरोडोटसनें दिल्या आहेत. हे लोक प्रत्यक्ष तलवारीलाच देवता मानून तिची उपासना करीत असत, व तिला मेंढ्या, घोडे आणि लढाईतले कैदी बळी म्हणून अर्पण करीत असत. ठार मारलेल्या शत्रूचीं कातडीं व डोक्याच्या कवट्या ते भूषणांप्रमाणें अंगावर वापरीत. लढाईत पकडलेल्या लोकांनां गुलाम करून ठेवतांना ते त्यांचे डोळे काढीत असत. सारांश या सिथियनांच्या अनेक चालीरीती घाणेरड्या व क्रूरपणाच्या असत. हे लोक दिसण्यांत भयंकर होते. त्यांच्या एकवटलेल्या सामर्थ्यापुढें कोणत्याहि तत्कालीन सुधारलेल्या राष्ट्राचा निभाव लागणें शक्य नव्हतें. युक्झाइनच्या आसपासच्या लोकांतील मूर्खपणाच्या मानानें सिथियन लोकांची बुद्धिमत्ता चांगली होती असें हिरोडोटस म्हणतो.

ध र्म वि धी—हे लोक जुपिटर, त्याची बायको टेलस, आपोलो, व्हीनस, हर्क्यूलिस आणि मार्स या सर्व देवतांची उपासना करीत असत. पण त्यांत मार्स हीं प्रमुख देवता होती. या देवतांनां ते जनावरांचा बळी देत असत, व बळी दिलेल्या जनावराचें कातडें बळी देणारा अंगावर वापरीत असे. ते अनेक जातींच्या जनावरांचा बळी देण्यासाठीं उपयोग करीत, पण त्यांतल्या त्यांत घोड्याला विशेष महत्त्व असे. शिवाय कैद केलेल्या लोकांपैकींहि शेंकडा एक लोकांनां ते बळी देत असत. माणसाचा बळी देतांना प्रथम त्याचा गळा कापीत आणि नंतर उजवा हात खांद्यापासून तोडून उंच हवेंत फेंकून देत. ते डुकराचा मात्र कधींच बळी देत

नसत; इतकेंच नव्हे तर ते या प्राण्याला आपल्या देशांतहि राहूं देत नसत.

युद्धविषयक रिवाज.—युद्धामध्यें प्रत्येक सिथियन सैनिक शत्रूकडील स्वतः मारलेल्या इसमांपैकीं पहिल्याचें रक्त पीत असे. लढाईंत मारलेल्या शत्रूकडील इसमांचीं मुंडकीं तोडून तीं आपल्या राजाला नजर करण्याची त्यांच्यामध्यें चाल होती. तसेंच ते लढाईंत सांपडलेल्या माणसांच्या अंगाची कातडी सोलून काढून ती चांगली गौरवर्ण असल्यास आपल्या घोड्यावर घालण्यास तिचा उपयोग करीत असत.

या लोकांच्या राज्यांत राजानें कोणास मरणाची शिक्षा दिल्यास त्या गुन्हेगाराबरोबर त्याची सर्व पुरुषसंततीहि मारून टाकण्याची चाल होती. असो.

सोक.—आतां चिनी ग्रंथांतील माहितीकडे वळूं. चिनी ग्रंथांत यांनां सोक हें नांव आहे. चिनी ग्रंथांतील माहिती एकत्र करून पाश्चात्त्य पंडितांनीं तयार केलेलें कथासूत्र इंडियन अँटिक्केरीच्या एका अंकांत आलें आहे. त्या कथासूत्राचा सारांश येणेंप्रमाणें:—

मूलस्थानापासून परिभ्रमण.—हे लोक पूर्वी आरल समुद्राजवळच्या, सिथियन, गेटीइ लोकांप्रमाणें आर्य लोकांच्या मूलस्थानापासून पूर्वेकडे व दक्षिणेकडे आले असावे. चिनी बखरीवरून असें दिसतें कीं, ख्रि. पू. १७४ सालीं हिंउ-ग्नु लोकांनीं युएचि लोकांचा देश काबीज केल्यामुळें युएचि लोकांनीं सइ लोकांचा देश घेऊन त्यांस तेथून हांकून दिलें. हिंउ-ग्नु लोकांनीं त-युएचि लोकांस जिंकलें तेव्हां त्यांनीं त-हिआ (बॅक्ट्रिया) देश सइ-वंग (सइ लोकांचे राजे) यांजपासून घेऊन त्यांस दक्षिणेकडे जावयास लाविलें. यांनीं दक्षिणेकडे जाऊन किपिन (काश्मीर प्रांत ?) घेतला (हान-बखरी): सोक, युएचि व हिंउ-ग्नु हे एकामागून एक त्याच प्रदेशांतून आल्यामुळें त्यांचें मिश्रण झालें असावें. पूर्वीच्या चिनी भाषेमध्यें शोध वगैरे करणाऱ्या सर्व ग्रंथकारांनीं या सोक लोकांस निरनिराळीं नांवें देऊन ते ग्रीक आणि रोमन लोकांनीं शकइ व सकइ या नांवांनीं वर्णन केलेले लोक व हिंदू बखरींमधील शक लोक हे एकच होते असें म्हटलें आहे. चिनी भाषानभिज्ञ डॉ. लॅसेन व सेन्ट मार्टिन यांनीं मात्र या नांवांतील फरकावरून हे लोक भिन्न असावेत असें म्हटलें आहे. या दोघांनींहि या सोक लोकांचें मूलस्थान होआंग-हो नदीजवळ असावें अशी कल्पना करून, त्यांचें येथपर्यंत येणें असंभवनीय ठरविलें व त्यांचा आर्य जातींच्या शक लोकांशीं कांहीं संबंध नाहीं असें उघडच म्हटलें.

पण हान लोकांच्या बखरींमध्यें असें स्पष्ट म्हटलें आहे कीं सोक लोक फार दूरवर पसरून त्यांनीं निरनिराळीं राज्यें स्थापन केलीं. शु-ले (काश्गार) पासून हिउ-सुन व कुं-तु यांच्या ताब्यांतील सर्व प्रदेश पूर्वीच्या सोक लोकांचे आहेत. पुढें हिउ-सुन लोकांचें वर्णन असून त्याच्या शेवटीं हे पूर्वीचे शक लोक होत असें म्हटलें आहे. नंतर कुं-तु लोकांचें वर्णन असून याच्याहि शेवटीं वरीलप्रमाणेंच हे पूर्वीचे शक लोक होत असें सांगितलें आहे.

या हिउ-सुन नांवाबद्दलहि लॅसेन व रिट्टन यांचा बराच गैरसमज झाला आहे. ते हें नांव व यूसुन हीं एकच असें समजतात. त्याप्रमाणेंच कुं-तु या नांवाचाहि घोटाळा झाला आहे. पिएन-यि-टिएन हा स्वरसादृश्यावरून हें नांव व शेन्-तु अथवा यिं-तु हें नांवाहि अभिन्न मानून त्यांच्या प्रमाणेंच याचा अर्थ हिंदू असा करतो. याप्रमाणेंच येन-शि-कु हा सुद्धां कुं-तु हा शब्द व शेन्-तु अथवा त्यॆंतु हें हिंदु या अर्थाचे शब्द एकच समजून यांचा हिंदु असाच अर्थ करतो.

यांचा धंदा व यांनीं व्यापलेल्या देशावरील यांची सत्ता.—पण हान बखरींमध्यें म्हटलें आहे कीं, हिउ-सुन व कुन्तु या दोन शक जाती असून ते आपले कळप काश्गारच्या वायव्येस व त्येन-शान पर्वताच्या नैर्ऋत्येकडील उतरणीवर व नरिन नदीच्या उपनद्यांवर चारीत असत. यांपैकीं हिउ-सुन हे फरघनच्या सरहद्दीजवळ असत व कुं-तु हे त्यांच्या पूर्व बाजूस असून इस्सि-कुलपर्यंत पसरलेल्या वु-सुन लोकांच्या प्रदेशास लागून उत्तरेकडे पसरलेले होते.

त-अंगशूमध्यें ६५८ या वर्षी चीनच्या बादशहानें कोसइ येथून हिउ-सुन येथें राजधानी नेण्याचा हुकूम दिल्याचा उल्लेख आहे. यावरून ७ व्या शतकांत हिउ-सुन घराणें फरघनच्या कांहीं भागावर तरी राज्य करीत असावें असें वाटतें.

परंतु वेइ घराण्याच्या इतिहासावरून असें दिसतें कीं, तिसऱ्या शतकांत कुं-तु व हिउ-सुन हीं घराणीं काश्गार प्रांतांत होतीं. त्याप्रमाणेंच तु-येनचा ज्ञानकोश झाला त्यावेळीं सो-के, कुं-तु व हिउ-सुन हे काश्गारच्या राज्याचे भाग होते असा त्यांत उल्लेख आहे.

यावरून शक लोक हे त्या वेळीं काश्गारच्या पूर्वेकडे किंवा दक्षिणेकडे फारसे पसरले नव्हते असें दिसतें.

पुन्हां परिभ्रमण.— नंग-क्येन याच्या चरित्रांत असें आढळतें कीं हिउं-ग्नु लोकांनीं युएचि लोकांस जिंकल्यावर त्यांनीं (युएचींनीं) पश्चिमेकडील शक लोकांवर स्वारी केली. तेव्हां शक लोकांनीं दक्षिणेकडे जाऊन नवी वसाहत केली. कुन्-मो यानें आपल्या बापाबद्दल सूड उगविण्याकरितां शान-यू याची परवानगी मागितली व युए-चि लोकांस जिंकून त्यांस पश्चिमेकडे पिटाळून दिलें. मोडुक राजा ख्रि. पू. १७४ या वर्षी मेला व यु-एचि लोक पश्चिमेकडे ख्रि. पू. १६० या वर्षी गेले त्या अर्थी शक लोक हे दक्षिणेकडे ख्रि. पू. १७४ पासून १६० या कालाच्या दरम्यान—म्हणजे इंडो-सिथियन लोक येण्याच्या पुष्कळच वर्षे अगोदर—आले.

तसेंच डॉ. लॅसेन यांच्या म्हणण्याप्रमाणें स्से (सोक) हे लोक सॉग्डिएनाकडे—हा देश पश्चिमेस आहे—गेल्याचा कोठेंच उल्लेख

नसून हे लोक दक्षिणेकडे किपिन प्रांतात गेले असें म्हटलेलें आहे.

हा किपिन देश त्या वेळीं अॅराकोशिआचा ईशान्य भाग नसून तो कपिल-कपिर-टॉलेमीचें कॅस्पेरिया व हल्लींचे काश्मीर असावें असें ब्रिटानिकाकार म्हणतात.

प रि भ्र म ण मा र्ग.—यांच्या मार्गाचें वर्णन हान बखरींमध्यें असें आहे: "ते दक्षिणेकडे जाऊन हिएन्तु (हीं जागा सिंधु नदीवर असावी) टाकून पुढें गेले. हें स्थळ काश्मीरच्या सरहद्दीवर असून तेथें एका कड्यावरून एक फूट रुंदीची पाऊल वाट जाते. येथें प्रवासी एकमेकांस धरून फार काळजीपूर्वक चालतात. तेथें एकमेकांस जोडलेले दोर्‍यांचे पूल असतात. व ते सुमारें ७ मैल लांब आहेत, नंतर हिएन्तु (लोंबती वाट) येते."

या हिएन्तु नामक ठिकाणाच बौद्ध भिक्षु फा-हिआन यानें उदयान येथें येण्यापूर्वी सिंधु नदी ओलांडली.

यावरून हिएन्तु काश्गारपासून नैर्ऋत्येच्याहि थोडेंसें दक्षिणदिशेच्या बाजूस असून हल्लींच्या दार्दिस्थानच्या सरहद्दीजवळ असलेल्या स्कार्डोच्या पश्चिमेस असावें असें दिसतें.

किपिन या प्रांताच्या नैर्ऋत्येस वु-इ-शान-ली अथवा अॅराकोशिआ हा प्रांत, आग्नेयीस त-युएचि यांचें राज्य बॅक्ट्रिया हा प्रांत, ईशान्येस नऊ दिवसांच्या वाटेवर नान्तौ व पूर्वेस ७५० मैलांवर वु-चा याप्रमाणें त्याच्या मर्यादा होत्या.

कुओ-यी कुंग म्हणतो कीं, हिएन्तु याच्या पूर्वेस वुचा आहे. यावरून हि-एन्तु हें सरहद्दीवर धरून याची राजधानी पेशावर जवळ असावी असें अनुमान निघतें.

याप्रमाणेंच शक लोकांनीं शकस्थान हल्लींचे सेजिस्थानयास आपलें नांव दिलें आहे.

शकांशीं सदृश किंवा संगत अशी एखादी राष्ट्रजाति असेल तर ती युएचि लोकांची होय. तिचा स्थूल इतिहास ग्रेणें-प्रमाणें देतां येईल.

**युएचि उर्फ कुशान.**—हें आशियांतील एका टोळीचें नांव आहे. या लोकांनीं बॅक्ट्रिया व हिंदुस्थान या देशांवर राज्य केलें. यांनां इंडो-सिथियन असेंहि म्हणतात व त्यांच्या एका पोटजातीवरून त्यांस कुशान हें नांवहि मिळालें आहे. हे चीन देशांतील कानशू प्रांतांत रहाणारे भटकणारे लोक असावेत, व त्यांच्याच वंशापैकीं हिउंग्नु नांवाच्या दुसर्‍या एका टोळीनें त्यांस तेथून हुसकून दिलें असावें. यांनीं इली नदीवर रहाणार्‍या वुसन नांवाच्या दुसर्‍या एका टोळीस जिंकून त्या प्रदेशांत कांहीं दिवस वसाहत केली असावी. हा काळ खि.पू. १७५ पासून १४० पर्यंतचा असावा. नंतर त्यांनीं शक नांवाच्या एका टोळीस जिंकून त्यांस इराण-हिंदुस्थानच्या दिशेला हुसकून लाविलें. हे युएचि लोक सुमारें वीस वर्षे चु आणि सरदारिया या दोन नद्यांमधील प्रदेशांत राहिले असावेत. येथेंहि पुन्हां त्यांचे जुने शत्रू जे हिउंग्नु लोक त्यांनीं त्यांचा पराभव केला. या वेळीं हिउंग्नु लोकांबरोबर वुसन लोकांचा पराभूत नाईक होता. नंतर युएचि लोक बॅक्ट्रिया प्रांतांत राहिले. यानंतर १०० वर्षें-पर्यंत त्यांच्याबद्दल फारच थोडी माहिती मिळते. या कालांत त्यांच्यांत जास्त ऐक्य उत्पन्न झालें. पूर्वी ते पांच निरनिराळ्या टोळ्या करून होते; परंतु आतां त्यांच्यांतील मुख्य जी कुशान (क्वेइशांग) तिचेंच नांव त्यांनीं धारण केलें. पूर्वीचें आपलें भटकणें सोडून देऊन त्यांनीं स्वतःची थोडीशी सुधारणा करून घेतली. त्या वेळीं बॅक्ट्रिया प्रांतांत एक हजार शहरें होतीं असें म्हणतात. ही जरी अतिशयोक्ति असली, तरी एवढें मात्र खरें कीं, या प्रांतापर्यंत इराणी व हेलेनी संस्कृती येऊन पोंचल्या होत्या. कारण, त्या देशाचे राजे युक्राटिडीझ व डिमिट्रिअस यांनीं हिंदुस्थानावर स्वार्‍या केल्या होत्या. तेव्हां युएचि लोकांस त्यांच्या संस्कृतीचा थोडासा आस्वाद मिळतांच, ते स्वतः शूर असल्यामुळें त्यांनींहि त्यांचाच कित्ता गिरविला असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं.

हिं दु स्था नां ती ल अं म ल.—या कुशान लोकांच्या स्वारीचा व त्यानंतरचा त्यांचा हिंदुस्थानांतील खात्रीलायक इतिहास सांपडत नाहीं. हिंदुस्थानांतील ग्रंथांतून या काळाबद्दल फारच थोडी माहिती मिळते, आणि जी कांहीं थोडीशी माहिती मिळते ती बहुतेक चिनी बखरींवरून, शिलालेखांवरून व विशेषतः नाण्यांवरून मिळते. यावरून त्यांच्या राजांचीं नांवें आपणांस कळतात. या पुराव्यांवरून असेंहि अनुमान काढण्यांत आलें आहे कीं, कोझुलो कडफिसेस, कुजुलकस किंवा किउत्सु किओ (इ. स. ४८-७८) या नांवाच्या एका राजानें त्या पांच टोळ्यांचें ऐक्य करून काबूल नदीकांठचा प्रदेश काबीज केला व तेथील ग्रीक सत्तेचा नायनाट केला. बहुतकरून यानंतर कांहीं काळानें ओइमो कडफिसेस, हिमकपिस किंवा येन-काओ-त्सिन-ताइ नांवाचा राजा येऊन त्यानें उत्तर हिंदुस्थान पादाक्रांत केलें. त्यानंतर कनिष्क आला (इ. स. १२०-१६२). हा बौद्ध लोकांचा आश्रयदाता म्हणून प्रसिद्ध आहे. यानें बौद्धांची तिसरी संगीति भरविली. त्यानें काश्गार, यार्कंद आणि खोतान हे देश जिंकले असें म्हणतात. त्याच्या मागून हुविष्क व वासुदेव हे गादीवर बसले. वासुदेव हा इ. स. २२० च्या सुमारास निवर्तला असावा. वासुदेवानंतर कुशान लोकांचें सामर्थ्य हळूहळू कमी होत जाऊन शेवटीं त्यांस सिंधु नदीच्या प्रदेशांत व ईशान्य अफगाणिस्थानाकडे जावें लागलें. चीनमधील माहितीप्रमाणें कुशान लोकांचें राज्य कि-तो-लो (किदार) नांवाच्या वंशानें घेतलें. हा कि-तो-लो वंशहि मूळ युएचि जातीचाच होता, पण जेव्हां कुशान लोक हिंदुस्थानांत आले तेव्हां हे कि-तो-लो लोक बॅक्ट्रियामध्येंच राहिले होते पुढें ज्या वेळीं ज्वेन लोक चीनच्या सरहद्दीपासून पश्चिमेकडे पुढें पुढें सरकूं लागले त्यावेळीं हे कि-तो-लो लोक हिंदूकुश पर्वताच्या दक्षिणेकडे आले. या वंशाचे राजे

गांधार ( पूर्व अफगाणिस्थानं ) देशांत लघु कुशान नांवाच्या लहानशा राज्यावर राज्य करीत होते. त्यांचें हें राज्य पुढें इ. स. ४३० च्या सुमारास हूण लोकांच्या स्वाऱ्यांमुळें बुडालें.

एके काळीं कांहीं पंडितांचें असेंहि मत होतें कीं कुशान राजांपैकीं कनिष्क हा ख्रि.पू. ५८ च्या सुमारास होऊन गेला असावा, आणि हुविष्काच्या पूर्वी किंवा नंतर दुसरा एक वसुष्क या नांवाचा राजा झाला असला पाहिजे. परंतु व्हिन्सेंट. स्मिथ म्हणतो कीं, आतां या कुशान राजांची संख्या व अनुक्रम आपणांस नक्की कळला असून त्यांच्या कालासंबंधानें संशोधकांस जो कांहीं प्रश्न सोडवावयाचा राहिला आहे तो एवढाच कीं, त्यांच्यापैकीं कनिष्क हा इ. स. ७८ मध्यें राज्यारूढ झाला किंवा त्यानंतर ४० वर्षांनीं, इ.स. १२० च्या सुमारास झाला. या कुशानांचा सविस्तर राजकीय इतिहास पुढें दिला जावयाचा असल्यामुळें येथें त्यांच्या संबंधीं अधिक कांहीं न लिहितां युएचींच्या संस्कृतीकडे वळूं.

**त्यांची संस्कृति.**— युएचि लोकांच्या स्वाऱ्या ख्रि. शकाच्या फारशा पूर्वी किंवा नंतर झाल्या नसाव्या. या स्वाऱ्यांचा हिंदु संस्कृतीवर कांहीं तरी परिणाम झाला असला पाहिजे. त्यांच्या नाण्यांत पुष्कळ राष्ट्रांच्या नाण्यांची छटा मोठ्या चमत्कारिक रीतीनें मिश्रित झालेली दिसते. त्या नाण्यांचा आकार व सर्वसाधारण घडण रोमन नाण्यांसारखी आहे. त्यांवरील लेख कांहीं ठिकाणीं ग्रीक भाषेंत व लिपींत आहेत, तर कांहीं ठिकाणीं ते पर्शियन भाषेंत असून ग्रीक किंवा खरोष्ठी लिपींत लिहिलेले आहेत. पाठीमागील बाजूस बहुतेक देवतेचें चित्र असतें, व तें बहुतेक ग्रीक (हेराक्लीझ, हीलिऑस, सिलीनि), अथवा झरथुष्ट्र (मिथ्र, वात किंवा वैरेथ्रझ, अथवा हिंदु ( बहुतकरून शिव किंवा योद्धा ) देवतेचें असतें. सरपो या नांवाची जी त्यांवर आकृति असते ती बहुतकरून इजिप्शियन सिरेपिस असावी, व दुसऱ्या कांहीं आकृती बाबिलोनी देवतांच्या असाव्यात. दर्शनी भागावर राजाचें चित्र असे. त्या चित्रांतील राजाचा पोशाख, निदान फार पूर्वकालच्या नाण्यांत तरी, एक लांब अंगरखा, गुडघ्यापर्यंत जोडे आणि एक उंच टोपी असा असे. हा पोशाख उत्तरेकडील भटकणारे लोक वापरीत असत. कनिष्काची राजधानी पुरुषपुर ( हल्लींचें पेशावर ) याच्या आसपास जे कांहीं शिलाकामाचे नमुने सांपडतात, त्यांवरून गांधार देशांतील शिल्पशास्त्र हें ग्रीक व रोमन पद्धतींवरूनच घेऊन त्यांत हिंदू देवतांस साजेल इतका फेरफार केला होता असें दिसतें. हिंदुस्थानांतील बौद्ध लोकांनीं व्यापलेल्या आशियाखंडांतलि भागांतल्या शिल्पशास्त्रावर गांधार देशांतील शिल्पशास्त्राचा व कलेचा जो परिणाम झाला आहे त्याचें महत्त्व आतां सर्वांस कळून चुकलें आहे.

कुशान राजांच्या मंदिरांमधून असलेल्या ग्रीक, पार्शियन व हिंदू देवतांच्या मिश्रणाचा परिणाम बौद्ध व हिंदू या दोहोंवरहि झाला असला पाहिजे. तसा तो पूर्वीच्या ब्राह्मण संस्कृतीवर झालेला नव्हता. कनिष्कादि राजे जरी बौद्धपंथानुयायी होते तरी ते धर्मवेडे नव्हते. कनिष्कानें काश्गार व खोतान हे प्रांत जिंकल्यामुळें चीनमध्यें बौद्ध संप्रदायाचा प्रवेश होणें सुलभ झालें असलें पाहिजे. ब्रिटानिकाकारांच्या मतें या युएचि लोकांनीं उत्तर हिंदुस्थानांतील लोकसंख्येंत चांगलीच भर टाकिली असली पाहिजे.

युएचि लोक हे तुर्क किंवा हूण लोकांप्रमाणें तुराणी राष्ट्रजातीपैकीं होते कीं काय हें नक्की सांगतां येत नाहीं. त्यांच्या मूळ भाषेबद्दल कांहींच माहिती मिळत नाहीं. त्यांच्या नाण्यावरचे जे लेख ग्रीक किंवा हिंदी भाषेंत लिहिलेले नसतात ते बहुतेक पर्शियन भाषेंत व ग्रीक लिपींत लिहिलेले असतात. तेव्हां त्यांच्या नाण्यांवरून त्यांच्या भाषेचा बोध होऊं शकत नाहीं.

या नाण्यांवर जें मनुष्याचें चित्र असतें त्याचें नाक मोठें व पुढें आलेलें, डोळे मोठे, साधारण बरीचशी दाढी, व थोडेसे जाड व पुढें आलेले ओठ असतात. यावरून युएचि हे मोंगल किंवा उग्रो-फिनिक असण्यापेक्षां तुर्क जातीचे असण्याचा संभव बराच दिसतो. पण या अनुमानांवर पुष्कळ वेळां भरंवसा ठेवतां येत नाहीं. त्यांचें शौर्य पाहिलें व त्यांनीं पर्शियन व हिंदु संस्कृति किती लवकर उचलली हें पाहिलें म्हणजे हे तुर्क असावे असेंच वाटतें; व त्यांना हिंदु ग्रंथकारांनीं दिलेल्या तुरुष्क अथवा तुरख या नांवावरून ते तुर्क असावे असें कांहींनीं अनुमान काढलेंहि आहे. परंतु तुर्कांचें राष्ट्र व नांव हीं मुळीं ख्रिस्ती शकाच्या ५ व्या शतकांतच जन्मास आलीं असल्यामुळें युएचि लोकांना तुर्क म्हणणें इतिहासाशीं विसंगत होईल. तथापि तुर्क व युएचि हे मूळ एकाच जातीचे असून त्यांची निरनिराळ्या दिशांनीं सुधारणा होत गेली असणें संभवनीय आहे. एक अलबेरुणी नांवाचा मुसुलमान ग्रंथकार म्हणतो कीं, पूर्वीचे हिंदू लोकांचे राजे तुर्कच असत, व यास तो कनिक ( कनिष्क ) याचें उदाहरण देतो. यावरून युएचि आणि तुर्क हे एकच असावेत अशी एखादी दंतकथा पूर्वी प्रचलित असण्याचा संभव दिसतो. कांहीं ग्रंथकारांचें म्हणणें आहे कीं, युएचि व जेति एकच असून, त्यांना पूर्वी जुत (युत) हा शब्द असे, व तोच शब्द पुढें जाट असा झाला [ ब्रिटानिका ].

बॅक्ट्रियामध्यें दोन ग्रीक राज्यें उरलीं होतीं व तीं पुढें शकांनीं बुडविलीं हें मागें सांगितलेंच आहे. आतां तेथें झालेल्या राज्यक्रांतींचें, आणि त्या राज्यक्रांतीस कारण झालेल्या शकांच्या चळवळीचे भारतवर्षावर परिणाम काय झाले आहेत तिकडे लक्ष देऊं.

**इंडो-ग्रीक व इंडो-पार्थियन घराणीं** ( ख्रि. पू. २५०-इ. स. ६० ).—हिंदुस्थानाच्या अन्तर्भागावर राज्य करणाऱ्या आंध्रानंतरच्या देश्य राजघराण्यांची इ. स. ३२० नंतरची हकीकत देण्यापूर्वी अशोकानंतरच्या कालांत पंजा-

बादि सरहद्दीवरील प्रांतांवर अंमल चालविणाऱ्या बाह्य राजघराण्यांसंबंधानें माहिती दिली पाहिजे. त्या वेळेस पंजाब भारतीय इतिहासाच्या कक्षेंतील भाग नसून मध्य आशियाच्या इतिहासाच्या कक्षेंतील भाग होता. ग्रीकांचा भरतखंडांत प्रवेश अलेक्झांडरच्या स्वारीनें केला, पण नंतर चंद्रगुप्तादि मौर्य राजांनीं अलेक्झांडरनें प्रस्थापित केलेला ग्रीक अंमल नष्ट करून अशोकाच्या कारकीर्दीअखेरपर्यंत हिंदुकुश पर्वतापर्यंत सर्व हिंदुस्थान हिंदी सत्तेखालीं ठेवला होता. इराण ग्रीकांकडून पादाक्रांत झालेला होता. तेव्हां जगाच्या स्वामित्वाबद्दल स्पर्धा व्हावयाचीच झाल्यास मगधसंमुख हिंदुस्थान व ग्रीस यांमध्येंच होईल अशी कदाचित् अशोककालीन जगाची समजूत झाली असावी. पण इराणी साम्राज्याच्या कक्षेंतून नवीन, जोमदार व साम्राज्यविस्तारक्षम राष्ट्रें ग्रीक संस्कृतीचा फायदा घेऊन डोकें वर काढूं लागलीं. इकडे अशोक मरण पावल्यानंतर त्याच्या साम्राज्यांतून अनेक प्रांत स्वतंत्र होऊन बाहेर पडले आणि वायव्य सरहद्दीवरील प्रांतांवर बॅक्ट्रिया व पार्थिया येथील हेलेनी उर्फ ग्रीक संस्कृतींतील राजांनीं व इतर रानटी जातींनीं हल्ले करण्यास सुरुवात केली.

अलेक्झांडरनंतर आशियांतील ज्या विस्तृत प्रदेशावर सिल्यूकस निकेटार राज्य करीत होता तें राज्य ख्रि. पू. २६२ किंवा २६१ च्या सुमारास त्याचा नातू अँटायोकस या मद्यपी व दुर्व्यसनी राजाच्या ताब्यांत गेलें. या नालायक राजानें पंधरावीस वर्षे राज्य केलें, पण अखेर अखेर डायोडोटसच्या नेतृत्वाखालीं बॅक्ट्रियन लोकांचें व आर्सेकीझ याच्या नेतृत्वाखालीं पार्थियन लोकांचें, अशीं दोन बंडें होऊन तीं राष्ट्रें स्वतंत्र झालीं.

यांपैकीं बॅक्ट्रिया हा देश ऑक्झस (अमूदर्या) नदीच्या कांठीं होता; तो फार सुपीक असून तेथें प्रागैतिहासिक काळापासून चांगले सुधारलेले लोक रहात होते. अकिमिनिअन राजांच्या वेळीं तो प्रमुख प्रांत गणला जात असे. अलेक्झांडरनें तो प्रांत जिंकल्यापासून तेथील लोकांनीं हेलेनी संस्कृति बऱ्याच अंशीं अंगीकारली होती. ख्रि. पू. ३२१ पासून तो सिल्यूकस निकेटार व त्याचे वंशज त्यांच्या ताब्यांत होता.

पार्थियन लोक हे अलीकडील तुर्की लोकांसारखे कणखर व राकट असून ते कास्पियन समुद्राच्या आग्नेयीकडील साधारणतः नापीक व वालुकामय इराणी प्रदेशांत रहात असत. त्यांचा व शेजारच्या ख्वोरास्मिअन, सोग्डिअन व अरिओइ या रानटी जातींचा प्रदेश दरायसच्या सोळाव्या प्रांतांत अंतर्भूत झालेला होता, व क्सर्क्सीझच्या सैन्यांत बाणभालेवाले शिपाई याच जातींपैकीं असत. या पार्थियन लोकांनीं ग्रीक संस्कृति स्वीकारली नव्हती, व बहुतेक मेंढपाळांचा धंदा करून रानटी स्थितींतच ते रहात असत. तथापि घोड्यावर बसण्यांत व धनुष्याचा उपयोग करण्यांत ते चांगले तरबेज होते.

बॅक्ट्रियन लोकांचीं एक हजार चांगलीं वसलेलीं शहरें होतीं, तर पार्थियन लोक लाखों ठिकाणीं लहान लहान टोळ्या करून राहिलेले होते. अशा या दोन परस्परांपासून अत्यंत भिन्न स्थितींत असलेल्या लोकांनीं ख्रि. पू. २५० च्या सुमाराला स्वतंत्र होऊन आपलीं राज्यें स्थापलीं. बॅक्ट्रियन लोक आपल्या प्रांताचा गव्हर्नर डायोडोटस याला राजा करून स्वतंत्र झाले. इकडे पार्थियन लोकहि राष्ट्रीय भावनेनें स्वतंत्र होऊन त्यांनीं आपला शूर पुढारी आर्सेकीझ (आर्सेसीझ) याला आपला राजा नेमिलें. याप्रमाणें इराणवर राज्य करणारें सुप्रसिद्ध आर्सेकिडी अथवा आर्सेसिडी घराणें स्थापन झालें, आणि तें सुमारें पांच शतकें (ख्रि. पू. २४८ ते इ. स. २२६) टिकलें. त्याचा सविस्तर इतिहास इराणच्या सत्तावर्धनाच्या प्रकरणांत (पृ. ५२–५४) वर्णन केलेलाच आहे.

इं डो–ग्री क रा जे —डायोडोटसनें स्थापलेलें बॅक्ट्रियन राजघराणें थोडाच काळ टिकलें. ख्रि. पू. २४५ मध्यें पहिला डायोडोटस वारला व त्याचा मुलगा दुसरा डायोडोटस यानें पंधरा वर्षे राज्य केलें. त्यानें पार्थियन राजाबरोबर मित्रत्वाचा तह केला. ख्रि. पू. २३० मध्यें, दुसरा डायोडोटस याच्या विरुद्ध बंड करून मॅग्नीशियाचा रहिवाशी युथिडेमस या निराळ्या घराण्यांतील इसमानें बॅक्ट्रियाचें राज्यपद मिळविलें. पुढें या नव्या राजानें सिरियाचा राजा अँटायोकस दि ग्रेट (ख्रि. पू. २२३–१८७) या राजाबरोबर अनेक वर्षे युद्ध करून अखेर जय मिळविला व ख्रि. पू. २०८ मध्यें तह होऊन अँटायोकसनें बॅक्ट्रियाचें स्वातंत्र्य कबूल केलें. ख्रि. पू. २०६ मध्यें अँटायोकसनें हिंदुकुश पर्वत ओलांडून काबूल खोऱ्यांत राज्य करणाऱ्या सुभागसेन नांवाच्या हिंदु राजाकडून बराच खजिना व कित्येक हत्ती जिंकून घेतले. बॅक्ट्रियाचें स्वातंत्र्य मान्य केल्यावर अँटायोकसनें युथिडेमसचा मुलगा डिमीट्रिअस याला आपली मुलगी दिली होती. अँटायोकसच्या ह्या जांवयानें सासऱ्याप्रमाणें ख्रि. पू. १९० मध्यें हिंदुस्थानावर स्वारी करून काबूल, पंजाब व सिंध हे प्रांत जिंकले. पण या दूरच्या स्वारींत डिमीट्रिअस गुंतला असतां तिकडे बॅक्ट्रियांत युक्राटिडीझ नांवाच्या इसमानें बंड करून मध्येंच बॅक्ट्रियाचें राज्य बळकावलें. तेव्हां डिमीट्रिअस हिंदुस्थानांतील प्रांतांवरच राज्य करीत राहिला. पण तिकडेहि युक्राटिडीझनें चाल केली व बऱ्याच दिवसांच्या युद्धानंतर डिमीट्रिअसचा पराभव केला. तथापि यानंतर युक्राटिडीझ बॅक्ट्रियाकडे परत जात असतां त्याच्या बहुधा अपोलोडोटस नांवाच्या मुलानें त्यास वाटेंत क्रूरपणानें ठार मारलें. त्यानें राक्षसीपणानें आपल्या बापाच्या प्रेतावरून आपला रथ नेला व प्रेताचा दफनविधीहि केला नाहीं!

युक्राटिडीझच्या दुसऱ्या एका हेलिओक्लीझ नांवाच्या मुलानें वरील खुनाबद्दल सूड घेतला असें वाटतें; व त्यानें बॅक्ट्रियावर थोडीं वर्षे राज्यहि केलें. पंजाबवर अपोलोडोटस-

नंतर युक्राटिडीझच्याच घराण्यांतील पहिला स्ट्रेबो यानें बरींच वर्षें अंमल केला. युक्राटिडीझच्या मृत्युपूर्वींचीं व नंतरचीं जीं सुमारें चाळीस नांवें असलेलीं नाणीं सांपडतात त्यांतील बहुतेक युथिडेमस, डिमीट्रिअस व युक्राटिडीझ यांच्या घराण्यांतील पुरुषांचींच आहेत. यावरून हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील प्रांत बॅक्ट्रिया येथील राजघराण्यांतील पुरुषांमध्यें विभागलेला होता असें दिसतें. यांपैकीं दोघांव्यतिरिक्त सर्वांची माहिती फक्त नाण्यांवरून मिळते. या अनेक अल्पज्ञात सत्ताधीशांपैकीं मिनँडर हा बराच प्रसिद्ध आहे. तो युक्राटिडीझच्या घराण्यांतील असावा. त्याची राजधानी काबूल येथें होती. त्यानें ख्रि. पू. १७५ च्या सुमारास हिंदुस्थानांत स्वारी केली तिचा उल्लेख मागें आलाच आहे यानें हिंदुस्थानांतील प्रांतांवर मोठ्या न्यायीपणानें राज्य केलें अशी प्रसिद्धि आहे. त्यानें बौद्ध संप्रदाय स्वीकारला होता असा समज आहे. बौद्ध वाङ्मयांत मिलिंदपन्ह म्हणून एक महत्त्वाचा ग्रंथ प्रसिद्ध असून त्यामुळें मिलिंदाचें उर्फ मिनँडरचें नांव अजरामर झालें आहे. 'हिंदूकुश पर्वताच्या उत्तरेकडील प्रदेशावर राज्य करणारा हेलिओक्लीझ हा शेवटचा ग्रीक राजा होय.

**शक लोकांच्या स्वाऱ्या.**—ग्रीक राजघराण्यांतील पुरुषांची आपसांत युद्धें चालू होतीं त्या वेळीं तिकडे मध्य आशियांतील वालुकामय प्रदेशांत निराळ्याच लोकांची उचल चालू होती. युएचि नांवाच्या भटक्या जातीच्या लोकांनां ख्रि. पू. १७० च्या सुमारास चीनच्या वायव्य प्रांतांतून हांकून देण्यांत आल्यामुळें ते लोक पश्चिमेकडे पुढें सरले. यानंतर कांहीं वर्षांनीं ख्रि. पू. १६० च्या अगोदर त्यांची जक्सार्टीझ उर्फ सिरदर्याच्या उत्तरेस रहात असलेल्या शक उर्फ से नांवाच्या लोकांशीं गांठ पडून त्यांनीं या शक लोकांनां दक्षिणेकडे हांकून लावलें. तेव्हां हे शक लोक उत्तरेकडून अनेक मार्गांनीं हिंदुस्थानांत शिरले. या रानटी लोकांची लाट पश्चिमेकडेहि पसरली व ख्रि. पू. १४० व १२० यांच्या दरम्यान ते बॅक्ट्रियाच्या व पार्थियाच्या राज्यांत शिरले. या लोकांबरोबर झालेल्या लढाईत पहिल्या मिथ्राडेटीझनंतरचा पार्थियाचा राजा दुसरा फ्राएटीझ हा ख्रि. पू. १२७ च्या सुमारास मारला गेला; व त्याच्या नंतर गादीवर आलेला पहिला आर्टाबेनस हा राजाहि या शकांशींच लढत असतां पुढें चार वर्षांनीं मरण पावला. बॅक्ट्रियाची ग्रीक राजसत्ता पार्थियाच्या व इराणच्या वाढत्या शक्तीमुळें अगोदरच दुर्बल झाली होती ती या रानटी जातींच्या हल्ल्यांमुळें कायमची नष्ट झाली. हेलिओक्लीझ हा शेवटचा ग्रीक बॅक्ट्रियन राजा होय. त्याच्या बरोबरच हिंदूकुशच्या उत्तरेकडील ग्रीक सत्ता कायमची नष्ट झाली.

हीलमंड (एरिमांड्रस) नदीची दरी म्हणजे अलीकडील सीस्तान किंवा शकस्तेने उर्फ शकस्थान म्हणून प्रसिद्ध असलेला प्रदेश शक लोकांनीं बऱ्याच पूर्वी व्यापला होता पण ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकांतील भटकणाऱ्या शक टोळ्यांपैकींहि कांहीं त्या प्रदेशांत शिरल्या असाव्या.

या रानटी जातीच्या कांहीं शाखा हिंदुस्थानांत शिरून पंजाबांतील तक्षशिला येथें व यमुनेच्या कांठावरील मथुरा येथें येऊन राहिल्या. येथें क्षत्रप ही पदवी धारण केलेल्या परकी राजांचा एक शतकाहूनहि अधिक काल अंमल होता, व ते पार्थियाच्या राजांच्या मांडलिकत्वाखालींच राज्यकारभार करीत होते असें दिसतें.

यानंतर रानटी लोकांची दुसरी एक टोळी बहुधा ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकाच्या मध्याच्या सुमारास आणखी दक्षिणेकडे घुसून सुराष्ट्र उर्फ काठेवाड व्यापून राहिली. हिनें तेथें जें शक राजघराणें स्थापिलें त्याचा अंमल इ. स. ३९० च्या सुमारास २ रा चंद्रगुप्त, विक्रमादित्य जिंकून घेईपर्यंत तसाच कायम राहिला.

काबूल व पंजाब येथील ग्रीक राजा पहिला स्ट्रेबो मोटर हा कांहींसा हेलिओक्लीझशीं समकालीन होता; त्याच्या मागून त्याचा नातू दुसरा स्ट्रेबो फिलोपेटर राजा झाला. त्याला पदच्युत करून तक्षशिला येथें दुसरे परकी क्षत्रप राज्य करूं लागले. हे नवे क्षत्रप शक होते किंवा दुसरे कोणी होते तें सांगतां येत नाहीं. मथुरा येथील क्षत्रप, नांवांवरून पाहतां इराणी असावेत असें वाटतें.

**इंडो पार्थियन राजे.**—या शकांच्या व इतर रानटी टोळ्यांच्या हालचालींचा आर्सेकिडी राजांच्या अमदानींतील वर्धिष्णु पार्थियन किंवा पर्शियन सत्तेशीं निकट संबंध आला होता. पहिला मिथ्राडेटीझ (ख्रि.पू.१७१ ते १३६) हा मोठा पराक्रमी राजा असून तो बॅक्ट्रियाचा राजा युक्राटिडीझ याशीं पुष्कळ वर्षें समकालीन होता. त्यानें आपली सत्ता सिंधु नदीपर्यंत व कदाचित् तिच्याहि पूर्वेस वाढविली होती. तक्षशिला व मथुरा येथील क्षत्रप पार्थियन म्ह० पर्शियन राजांचे अंकित असले पाहिजेत. कारण, तसे ते नसते तर त्यांनीं पर्शियन पदव्या आपल्या नांवांनां लावल्या नसत्या. यानंतरचे बरेचसे क्षत्रप पर्शियन राजकुळांतलेच होते व त्यावरून पार्थियन राजांचा अंमल हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील प्रांतांवर होता असें सिद्ध होतें.

अशा इंडो–पार्थियन राजांपैकीं अगदी आधींचा मोएझ किंवा मोआझ हा असावा. यानें ख्रि. पू. १२० च्या सुमारास पश्चिम पंजाब आपल्या सत्तेखालीं आणला. याच्या नाण्यांचा पहिल्या किंवा दुसऱ्या मिथ्राडेटीझच्या नाण्यांशीं निकट संबंध आहे. तक्षशिलेचा क्षत्रप ज्याचा नोकर होता तो मोग नांवाचा राजा व नाण्यांवर मोवो हें षष्ठ्यंत नांव असलेला राजा हे सामान्यतः एकच मानण्यांत येतात. या इंडो–पार्थियन राजांसंबंधानें माहिती फार त्रोटक व अपुरी आहे. तरी साधारणपणें असें दिसतें कीं, पार्थियन राजसत्तेखालचे जे अनेक क्षत्रप होते त्यांत दोन इंडो–पार्थियन राजघराणीं प्रमुख होतीं: एक ॲराकोशिआ व सीस्तान येथील, व दुसरें

पश्चिम पंजाबच्या म्हृ० तक्षशिलेच्या राज्यावरील. तक्षशिलेचें राज्य पहिल्या मिथ्राडेटीझनें ख्रि. पू. १३८ च्या सुमारास आपल्या राज्यास जोडलें, व ख्रि. पू. १२० च्या सुमारास त्यावर मौएझ हा राजा होता. या सुमारास पार्थियन राजांनां इराणांत रानटी लोकांशीं लढावें लागल्यामुळें हिंदुस्थानावरील त्यांचा अंमल शिथिल झाला व ती संधि साधून उपर्युक्त मौएझ हा पंजाबचा स्वतंत्र राजा बनला. मौएझ हा स्वतः कदाचित् शक जातीचाच असेल.

अॅराकोशिआ व सीस्तान येथील राज्यावर व्होनोनीझ हा पार्थियन राजा या सुमारास राज्य करीत होता. तो टेसिफॉन येथील महाराजाचा मांडलिक होता. सीस्तानच्या राज्यावर व्होनोनीझच्या घराण्यांतलि पुरुषांची सत्ता आणखी २५ वर्षे राहिली.

पार्थियन राजसत्ता रानटी टोळ्यांशीं झगडावें लागल्यामुळें कमकुवत बनली होती; ती पुन्हां दुसरा मिथ्राडेटीझ दि ग्रेट याच्या वेळीं बलिष्ठ बनली. त्यानें पंजाब व सीस्तान या प्रांतांचीं राज्यसूत्रें स्वतः हातीं घेतलीं असें दिसतें. अॅराकोशिआ या प्रांताचा राजप्रतिनिधि अॅझेस याला तक्षशिला प्रांतावर नेमण्यांत आलें. तो ख्रि. पू. ९० च्या सुमारास मौएझ याच्यानंतर अधिकारावर आला, व मिथ्राडेटीझचा मांडलिक म्हणून तक्षशिला प्रांतावर राज्य करूं लागला. पहिल्या अॅझेसनंतर पंजाबवर त्याचा मुलगा अॅझिलिसीझ यानें, व नंतर त्याचा नातू दुसरा अॅझेस यानें राज्य केलें. पहिला अॅझेस हा मोठा बलिष्ठ राजा होता व त्यानें पुष्कळ वर्षे बहुधा अर्धे शनक राज्य केलें. ख्रिस्ती शकाच्या आरंभाच्या सुमारास हिंदुस्थानच्या कोणताहि भाग पार्थियन साम्राज्यांत अंतर्भूत नव्हता, हें नक्की आहे. यावरून पहिला अॅझेस हा स्वतंत्र झाला असावा असें वाटतें. त्याच्या मुलानें व नातवानें पुष्कळ वर्षे राजसत्ता उपभोगिली. इ. स. २०च्या सुमारास दुसऱ्या अॅझेसनंतर गोंडोफेरस राज्यावर आला. त्यानें सिंध व अॅराकोशिआ हे प्रांत जिंकून घेतले, आणि पार्थियन अधिसत्ता न मानतां बऱ्याच विस्तृत मुलुखावर राज्य केलें. तो इ. स. ६० मध्यें मरण पावल्यावर त्याच्या राज्याचे विभाग होऊन पश्चिम पंजाबवर त्याच्या भावाचा मुलगा अब्दागसीझ राज्य करूं लागला आणि अॅराकोशिआ व सिंध या प्रांतांवर प्रथम ऑर्थाग्नीझ यानें, व नंतर पाकोरस यानें राज्य केलें. अब्दागसीझ याच्यानंतर पंजाबवर कोणीं राज्य केलें तें माहीत नाहीं. इसवीसनाच्या पहिल्या शतकाच्या मध्याच्या सुमारास कुशान राजा व्हिम अथवा विम (दुसरा कडफिसेस) यानें पंजाब प्रांत आपल्या राज्यास जोडला, व अॅराकोशिआ व सिंध यांचीहि तीच गत झाली असावी. तथापि सिंधु नदीच्या निरनिराळ्या फांट्यांमधील प्रदेशांत कांहीं लहान लहान पार्थियन राज्यें अस्तित्वांत राहिलीं असावीं. कारण, सिंधु नदीच्या मुखाकडील प्रदेशांत (ज्याला सिथिया हें नांव दिलेलें आहे) पार्थियन राजे राज्य करीत असून ते आपसांत भांडत होते असा उल्लेख ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकाच्या अखेरीस आपला ग्रंथ लिहिणाऱ्या 'पेरिप्लस ऑफ दि एरिथ्रिअन सी' या ग्रंथाच्या कर्त्यानें केला आहे. सिंधु नदीच्या प्रवाहांत गेल्या १८ शतकांत अतिशय फरक पडला असल्यामुळें त्या वेळचे व्यापारी बंदर बार्बारिकॉन (हें सिंधूच्या मुखांपैकीं मधल्या प्रवाहावर होतें) आणि राजधानी मीन नगर (ही आंतल्या बाजूस होती) या प्रसिद्ध शहरांच्या नक्की जागा कोणत्या आहेत हें निश्चित ठरवितां येत नाहीं.

**हिंदुस्थानांतील पहिला ख्रिस्तसंप्रदायप्रसारक.**—इंडो-पार्थियन राजा गोंडोफेरस याच्या नांवाशीं सेंट थॉमस ह्या ख्रिस्तसंप्रदायप्रसारकाच्या नांवाचा संबंध जोडलेला असल्यामुळें याच्या कारकीर्दीला विशेष महत्त्व आहे. या संप्रदायप्रसारकासंबंधाची हकीकत 'सेंट थॉमस याचीं कृत्यें' नांवाच्या मूळच्या सिरियन ग्रंथांत आढळते, तिचा थोडक्यांत सारांश येणप्रमाणेः—

"जेव्हां आद्यकालीन बारा संप्रदायप्रसारकांनीं ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रसाराच्या कार्याकरितां जगांतील सर्व देश आपआपसांत वांटून घेतले त्या वेळीं हिंदुस्थान हा जुडास थॉमस नांवाच्या संप्रदायप्रसारकाच्या वांटणीला आला.तो प्रथम हिंदुस्थानांत जाण्यास नाखुष होता; पण इतक्यांत हब्बान नांवाचा एक हिंदी व्यापारी तेथें आला.त्याला हिंदुस्थानांतील गुंडाफर राजानें राजवाडा बांधण्याकरितां एक चतुर कारागीर पाहून आणण्याकरितां सांगितलें होतें. थॉमसची नाखुषी लक्षांत घेऊन, ख्रिस्तदेवानें त्या व्यापाऱ्याला दृष्टान्त दिला, व २०रौप्य नाणीं घेऊन थॉमस यास त्या व्यापाऱ्याला विकलें. इकडे त्यानें सेंट थॉमस यासहि गुंडाफर राजाची नोकरी करून त्याचा राजवाडा बांधून देण्याची आज्ञा केली. ख्रिस्तदेवाच्या आज्ञेप्रमाणें दुसरे दिवशीं तो ख्रिस्तसंप्रदायप्रसारक हब्बान व्यापाऱ्याबरोबर जलमार्गानें प्रवासास निघाला, व अनुकूल वारा मिळून त्यांचें जहाज फार दिवस झाले नाहींत तोंच सँडरूक बंदरास येऊन लागलें. तेथील राजाच्या कन्येच्या विवाहानिमित्त झालेल्या भोजनसमारंभांत या दोघां प्रवाशांनीं भाग घेतला, आणि थॉमसनें नूतन वधूवरांनां ख्रिस्त पंथानुयायी बनविलें. याप्रमाणें प्रथमच यश संपादन करून सेंट थॉमस हा गुंडाफर राजाच्या दरबारीं गेला. त्यानें सहा महिन्यांत राजवाडा बांधवून देण्याचें कबूल केलें, पण राजवाडा बांधण्याकरितां मिळालेला सर्व पैसा त्यानें दानधर्मांतच खर्च करून टाकला. पुढें राजानें खर्च झालेल्या पैशाचा हिशोब मागितला असतां, राजाकरितां स्वर्गांत राजवाडा बांधण्याचें काम चालू आहे असें थॉमस यानें उत्तर केल; व त्या राजास त्यानें ख्रिस्ती संप्रदायाचा उपदेश इतक्या कळकळीनें व सुंदर रीतीनें केला कीं, खुद्द राजा, त्याचा भाऊ आणि इतर पुष्कळसे लोक

ख्रिस्ती बनले. ( त्या वेळीं यी आद्य संप्रदायप्रसारकानें कांहीं अद्भुत चमत्कारहि करून दाखविले असें म्हटलें आहे. )

" नंतर कांहीं दिवसांनीं मझदइ राजाचा सेनापति सिफूर थॉमसकडे येऊन त्यानें आपली बायको व मुलगी यांना बरें करण्याबद्दल विनंति केली. त्या विनंतीवरून सेंट थॉमस सिफूरबरोबर रथांत बसून मझदइ राजाच्या नगराला गेला. पाठीमागें गुंडाफर राजाच्या देशांतील ख्रिस्ती बनलेल्या लोकांची व्यवस्था पहाण्याकरितां त्यानें आपला हस्तक झँथिपॉस यास नेमिलें. तिकडे मझदइ राज्याच्या टर्टिआ राणीनें व मिग्डोनिआ नांवाच्या उच्च घराण्यांतील स्त्रीनें सेंट थॉमसच्या उपदेशावरून ख्रिस्ती पंथ स्वीकारिला. त्यामुळें मझदइ राजाला फार क्रोध येऊन त्यानें सेंट थॉमसला फांशीची शिक्षा सांगितली, व चार शिपायांनीं त्याला नगराबाहेर एका पर्वतावर नेऊन भाल्याच्या टोंकांनीं भोंसकून ठार मारिलें. सेंट थॉमसला प्राचीन राजांच्या श्मशानभूमींत पुरण्यांत आलें, परंतु त्याच्या शिष्यांनीं गुप्तपणानें त्याचीं हाडें तेथून काढून पाश्चात्य देशांत नेलीं."

सातव्या शतकानंतरच्या लेखकांनीं कलमिन, कलमिट, कलमेन, अथवा क्ररमेन अशीं अनेक नांवें जेथें हा आद्यसंप्रदायप्रसारक मारला गेला त्या शहराचीं म्हणून दिलीं आहेत. परंतु सदरहू शहर आज निश्चितपणें हुडकून काढण्याचे सर्व प्रयत्न निष्फल झाले आहेत. या गोष्टींसंबंधाच्या सातव्या शतकापूर्वींच्या ज्या निरनिराळ्या हकीकती सांगडतात त्यांत सेंट थॉमसच्या आत्मयज्ञाचें ठिकाण प्रत्यक्ष नांवानिशीं कोठेंच सांगितलेलें नाहीं. तेव्हां कलमिन हें शहर केवळ कल्पित असून त्याचें भौगोलिक अस्तित्व नकाशावर सिद्ध करणें शक्य नाहीं. सेंट थॉमस ज्या बंदरांत उतरला त्या बंदराचीं सँडरूक, अँड्रापोलिस वगैरे जीं नांवें देण्यांत आलीं आहेत तींहि कल्पित आहेत. सेंट थॉमसची ही सर्व गोष्टच कल्पित दिसते,व तींतील भौगोलिक नांवेंहि कल्पित आहेत. इतिहासकाराच्या दृष्टीनें या एकंदर हकीकतींत तथ्य इतकेंच आहे कीं, गोंडोफेरस राजाचें नांव इतकें प्रसिद्ध झालें आहे त्या अर्थीं कोणी तरी ख्रिस्तसंप्रदायप्रसारक या इंडो-पार्थियन राजाच्या कारकीर्दीत आले असावेत. गोंडोफेरस राजा व सेंट थॉमस हे समकालीन होते त्यामुळें उपर्युक्त संप्रदायप्रसारकांमध्यें सेंट थॉमस असणें असंभवनीय नाहीं. तथापि गोंडोफेरस राजा ज्या प्रांतावर राज्य करीत होता तेथें ख्रिस्ती समाजाचा त्यानंतर कांहींच मागमूस लागत नाहीं. शिवाय मद्रास जवळ सेंट थॉमस मौंट येथें सदरहू आद्य संप्रदायप्रसारक मारला गेला अशी जी आख्यायिका आहे ती सत्य असल्यास त्याला मझदईच्या राज्यांत शिक्षा झाली असणें शक्य नाहीं. या एकंदर हकीकतीचा विचार करून बिशप मेडिकॉट यानें आपलें असें मत दिलें आहे कीं, सेंट थॉमस प्रथम गोंडोफेरस राजाच्या दरबारीं जाऊन नंतर दक्षिण हिंदुस्थानांत गेला असावा.

मद्रासनजीक सॅन थॉम या नांवानें पोर्तुगीज लोकांना पूज्य असलेलें जे मैलापूर येथें ख्रिस्ती उपासनामंदिर आहे, आणि मलबार किनाऱ्यावर सेंट थॉमस मारला गेला व नंतर तेथील ख्रिस्त्यांचा छळ करून नायनाट करण्यांत आला यासंबंधानें ज्या हकीकती प्रसिद्ध आहेत, त्यांतहि कांहीं ऐतिहासिक सत्य दिसत नाहीं. फार तर काय, सेंट थॉमस हा खरोखर मारला गेला होता कीं नव्हता याचीच मुळीं शंका येते. कारण, हेराक्लिऑन दि ग्नॉस्टिक नांवाचा एक प्राचीन ग्रंथकार म्हणतो कीं सेंट थॉमस याचा शेवट शांततेनें झाला. तथापि दक्षिण हिंदुस्थानांत ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार फार पूर्वी म्हणजे तिसऱ्या शतकापासून झालेला आहे, हें मात्र खरें, असें व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो.

**अखेरचे इंडो-ग्रीक राजे.**—रानटी लोकांचे व पार्थियन लोकांचे हिंदुस्थानावर हल्ले होऊं लागल्यासून पुढें सुमारें दोन शतकें हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील पंजाब व त्याच्या शेजारचा प्रांत, काबूल नदीचें खोरें व सुवात खोरें या भागांवर लहान लहान ग्रीक राजांचा अंमल होता. ते पार्थियन सम्राटाचे मांडलिक असत किंवा स्वतंत्र असत. तथापि त्या सर्वांना रुप्याचीं व ब्रॉंझचीं नाणीं पाडण्याचा अधिकार असे. या इंडो-ग्रीक राजांपैकीं शेवटचा राजा हर्मैऑस याचा युएचि अथवा कुशान जातीच्या लोकांचा मुख्य पहिला कडफिसेस यानें इ. स. ४० च्या सुमारास पराभव करून काबूल प्रांत आपल्या युएचि साम्राज्यास जोडला. या युएचि मुख्यानें नाणीं पाडलीं त्यांवर प्रथम ग्रीक राजा हर्मैऑस याचा मुखवटा व नंतरच्या नाण्यांवर सुप्रसिद्ध रोमन बादशहा ऑगस्टस याचा मुखवटा काढलेला होता. पण अखेर त्यानें एका बाजूला हिंदी नंदीचें व दुसऱ्या बाजूला बॅक्ट्रियन उंटाचें चित्र असलेलीं नाणीं पाडलीं.

येणेंप्रमाणें नाणीं, पदकें इत्यादि पुराव्यांवरून त्या काळच्या इतिहासाची रूपरेषा बरीच स्पष्टपणें कळते, आणि प्रथम ग्रीक संस्कृतीच्या लोकांचा अंमल होता तो नष्ट करून मध्य आशियांतील रानटी जातीच्या लोकांनीं आपला अंमल तेथें बसविला ही गोष्ट सिद्ध होते.

**ग्रीक संस्कृतीचा हिंदुस्थानावर परिणाम.**—प्राचीन ग्रीक संस्कृतीचा आधुनिक पाश्चात्य संस्कृतीवर झालेला अपरिमित परिणाम मनःश्चक्षूपुढें स्पष्ट असलेल्या यूरोपीय इतिहासकारांनीं, हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील भागावर ग्रीकांचा अंमल होता त्या अर्थीं हिंदु संस्कृतीवर देखील ग्रीक संस्कृतीचा फार परिणाम झाला असला पाहिजे असें ठाम मत दिलेलें आहे. हरमायेसी यानें तर असें पराकोटीचें मत ठोकून दिलें आहे कीं, हिंदुस्थानांतील पुढील सर्व प्रगति अलेक्झांडरनें स्थापन केलेल्या संस्थांचें अप्रत्यक्ष फळ आहे; व चंद्रगुप्त मौर्य यानें सिल्यूकस निकेटार याचें सार्वभौमत्व कबूल केलें होतें. हें मत वास्तविक ऐतिहासिक माहितीशीं इतकें विसंगत आहे कीं, तें खोडण्याकरितां अधिक शब्द खर्ची

घालण्याची मुळींच जरूर नाहीं. तथापि हिंदुस्थानावर ग्रीक संस्कृतीचा कांहीं थोडासा परिणाम खास झालेला आहे असें मानणारे बरेच इंग्रज आहेत; म्हणून त्याचा येथें थोडक्यांत परामर्ष घेऊं.

व्हिन्सेंट स्मिथच्या मतें अलेक्झांडरच्या स्वारीचा हिंदुस्थानावर म्हणण्यासारखा कांहींच परिणाम झालेला नाहीं. अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर वीस वर्षांनीं सिल्यूकस निकेटार यानें सिंधु नदीच्या पूर्वेकडील अलेक्झांडरनें जिंकलेला प्रदेश परत मिळविण्याचा प्रयत्न केला, परंतु तो फुकट गेला. इतकेंच नव्हे तर चंद्रगुप्त मौर्य यानें सिंधु नदीच्या पश्चिमेकडील प्रदेशहि अलेक्झांडरनें नेमलेल्या अधिकाऱ्यापासून परत जिंकून घेतला. सिल्यूकसचा वकील मिगॅस्थिनीझ यानें हिंदु समाजाचें जें चित्र रेखाटलें आहे त्यावरून, हिंदु संस्कृतीवर इराणी संस्कृतीचा कांहीं परिणाम झाला होता पण ग्रीक संस्कृतीचा मुळींच झाला नव्हता, असें स्पष्ट दिसतें. अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर ऐशीं नव्वद वर्षे मौर्य सम्राटांच्या पराक्रमामुळें हिंदुस्थानांत कोणाहि परकीयांचा प्रवेश झाला नाहीं. अशोक सम्राटानें तर अँटायोकस व टॉलेमी यांनां बौद्ध संप्रदायाचा पुण्य उपदेश माहीत करून देण्याची फार उत्सुकता दाखविलेली दिसते; तथापि ग्रीक कल्पना ग्रहण करण्यासंबंधानें त्यानें तशी तयारी दाखविलेली आढळून येत नाहीं. मौर्यांच्या वेळीं हिंदी चित्रकला व सांचकाम यांवर हेलेनी अलेक्झांड्रियन नमुन्यांचा कांहीं परिणाम झालेला आहे; परंतु एकंदरींत ग्रीक संस्कृतीचा हिंदु संस्कृतीवर कांहीं थोडा वरवर परिणाम झालेला असला तरी हिंदु संस्कृतीच्या महत्त्वाच्या भागांवर कांहींच परिणाम झालेला नाहीं.

सिल्यूकस निकेटारनंतर बहुतेक शंभर वर्षे दुसरा कोणीहि ग्रीक राजा हिंदुस्थानावर हल्ला करण्यास धजला नाहीं. पुढें ख्रि. पू. २०६ च्या सुमारास अँटायोकस दि ग्रेट यानें अफगाणिस्थानवर चाल करून कंदाहार व सीस्तान येथील स्थानिक राजांपासून कांहीं करभार वसूल केला. पण या स्वारीचा हिंदुस्थानच्या संस्कृतीवर कांहीं परिणाम होणें शक्य नव्हतें. त्यानंतर ख्रि. पू १९०–१७४ च्या दरम्यान डिमेट्रिअस युक्राटिडीझ व मिनँडर यांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या. ते देशाच्या अंतर्भागांत बरेच शिरले होते, परंतु त्यांचेंहि हिंदुस्थानांत वास्तव्य अल्पकालच झाल्यामुळें खोल रुजलेल्या हिंदु संस्कृतीवर त्यांचा कांहीं महत्त्वाचा परिणाम झाला असेलसें शक्य दिसत नाहीं. एका हिंदु ज्योतिषशास्त्रज्ञानें आपल्या ग्रंथांत ग्रीकांनां 'दुष्ट पराक्रमी यवन' असें म्हटलें आहे. अलेक्झांडर व मिनँडर यांनां हिंदू लोक मोठे लढवय्ये पण रानटी राजे मानीत असत. त्यांच्यापासून कांहीं शिकण्यासारखें आहे असें त्यांनां मुळींच वाटत नव्हतें.

सामान्यतः पौरस्त्य लोक पाश्चात्यांपासून शिकण्याची तयारी क्वचितच दाखवितात. हिंदू लोकांनीं मूर्तिकला व नाट्यकला या बाबतींत यूरोपीयांपासून कांहीं कल्पना उचलल्या, परंतु त्या परकी म्हणून ओळखल्या न जाव्या याकरितां त्यांचें मूळ हिंदु कलेशीं इतकें बेमालूम मिश्रण करून दिलें आहे कीं, चांगल्या विद्वान् टीकाकारांनाहि त्यांतील परकीय अंश ओळखणें कठिण जातें. पंजाब व आसपासच्या प्रदेश यांवर ग्रीकांची सत्ता डिमेट्रिअस (ख्रि. पू. १९०) पासून हर्मेऑस कुशानांकडून प्रच्युत होईपर्यंत (अजमासें इ. स. ४०) सुमारें दोन शतकें होती. या काळांत मात्र या प्रांतावर ग्रीक संस्कृतीचा परिणाम झाल्याच्या खुणा सांपडाव्या असें वाटतें. परंतु संशोधनाअंतीं अशा खुणा फार अल्प व क्षुल्लक प्रकारच्या आढळतात. ग्रीक नमुन्याच्या नाण्यांशिवाय परकीय अमलाची कोणतीहि खूण येथें नाहीं असें म्हटलें तरी चालेल. ग्रीक भाषेतले शिलालेखहि अद्याप सांपडलेले नाहींत. ग्रीक शिल्पकला हिंदुस्थानांत शिरल्याचा मुळींच पुरावा अद्याप मिळालेला नाहीं. पहिल्या अॅझेसच्या वेळचें (ख्रि. पू. ८०) आयोनिक खांब असलेलें एक देवालय तक्षशिला येथें सांपडलें आहे. परंतु त्या इमारतीची बांधणी ग्रीक नमुन्यावर नाहीं. केवळ शोभेकरितां परकी नमुन्याचे खांब बसविलेले आहेत एवढेंच. इंडो–ग्रीक मूर्तिकलेचे नमुने अॅझेसच्या वेळचेच आहेत. त्याखेरीज डिमेट्रिअस, युक्राटिडीझ व मिनँडर यांच्या वेळचा एकहि नमुना नाहीं अलेक्झांडरच्या काळासंबंधानें तर बोलावयासच नको. पेशावरच्या आसपासच्या गंधार नामक प्रदेशांतले मूर्तिकलेचे नमुने अलीकडल्या ग्रीकोरोमन कलेचे आहेत. हिंदु वाङ्मयावर व शास्त्रावर या काळांत झालेला परिणाम क्वचितच आढळतो. ग्रीकोरोमन संस्कृतीचा हिंदु संस्कृतीवर झालेला महत्त्वाचा परिणाम पुढील काळांतला आहे. तात्पर्य या इंडो–ग्रीक काळांत ग्रीक संस्कृतीचा हिंदुस्थानावर फारसा परिणाम झाला नाहीं हें उघड आहे.

**कुशान अथवा इंडो–सीथियन घराणें** (इ. स. ४८–२२५).—वर उल्लेखिलेल्या रानटी जातींच्या स्वाऱ्यांचा हिंदुस्थानच्या राजकीय परिस्थितीवर बराच परिणाम झाला असल्यामुळें त्यांची जरा विस्तृत माहिती दिली पाहिजे. पूर्वी सांगितलें आहे कीं, ख्रि. पू. १७५ (स्मिथच्या मतें ख्रि. पू. १६५) च्या सुमारास चीनच्या वायव्य प्रदेशांतील युएचि नांवाच्या जातीला भटक्या तुर्कांच्या हिऊंग्नु नांवाच्या टोळीनें हांकून लावल्यामुळें युएचि लोकांचा पांच ते दहा लाखांचा जमाव पश्चिमेकडे चांगलीं तृणयुक्त कुरणें शोधीत निघाला. त्यांनां प्रथम वुसुन लोक भेटले, व त्यांचा त्यांनीं पराभव केला. नंतर या युएचींनीं शकांचा जक्झार्टीझ (सिर दर्या) नदीच्या उत्तरेकडील प्रदेशांत पराभव केला. तेव्हां पराभूत झालेले शक लोक उत्तरेकडील घांटांनीं हिंदुस्थानांत शिरले. तिकडे युएचि लोकांचा पूर्वीच्या पराभूत झालेल्या वुसुन जातीच्या लोकांनीं उलट पराभव करून

त्यांनां ऑक्सस नदीच्या प्रदेशांत हांकून दिलें. तेथें ऑक्सस नदीच्या दक्षिणेस बॅक्ट्रिया देशांत कायम वस्ती करून त्यांनीं आपलीं पांच राज्यें स्थापलीं. खि. पू. १० च्या सुमारास त्यांनां चांगलें व्यवस्थित स्वरूप आलें होतें.

पहिला कडफिसेस (४०–७८).—हीं पांच राज्यें स्थापन झाल्यावर सुमारें शंभर वर्षांनंतर युएचि जातींपैकीं कुशान नांवाच्या लोकांचा पहिला कडफिसेस हा इ. स. ४० च्या सुमारास राजा झाला. लोकसंख्या जास्त वाढल्यामुळें या कुशानांच्या राजानें हिंदूकुश पर्वत ओलांडून हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील किपिन ( ? काश्मीर ? काफिरिस्तान ? गंधार ) व काबूल प्रांत जिंकून घेतला, बॅक्ट्रियावर आपला नीट अंमल बसविला आणि पार्थियन लोकांवरहि हल्ला केला. अशा रीतीनें त्याचें साम्राज्य इराणपासून सिंधु किंवा तिच्या पलीकडे झेलम नदीपर्यंत पसरलें. अफगाणिस्थानांतील डोंगराळ मुलूख जिंकून घेण्यास त्याला बरींच वर्षें लागलीं असावीत. पण इ. स. ४८ च्या सुमारास काबूल प्रांत जिंकण्याचें त्याचें काम झालें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. याप्रमाणें युएचि जातीच्या लोकांनीं सिंधु नदीच्या पलीकडे पसरलेलीं इंडो–ग्रीक व इंडो–पार्थियन राज्यें जिंकून घेतलीं. पंजाबमध्यें उरलेली इंडो–पार्थियन राजांची सत्ता पुढें कनिष्कानें पूर्ण नष्ट करून टाकली.

दुसरा कडफिसेस ( ७८–११० ).—युएचि जातीचा राजा पहिला कडफिसेस हा ८० वर्षांचा होऊन मरण पावला व नंतर इ. स. ७८ मध्यें किंवा त्या सुमारास त्याचा मुलगा दुसरा कडफिसेस राज्यावर आला. तोहि मोठा पराक्रमी व धाडसी होता. त्यानें पंजाब प्रांत व काशीपर्यंत गंगानदीच्या कांठचा प्रदेश जिंकला असें मानण्यास आधार आहे. त्याचा बहुधा दक्षिणेस नर्मदा नदीपर्यंत अंमल बसला असावा, आणि माळव्यांतील व पश्चिम हिंदुस्थानांतील शक क्षत्रप त्याचें प्रभुत्व मान्य करीत असावे. सिंधकडील प्रांतांत पार्थियन राजांचा अंमल अद्याप चालू होता. युएचि राजानें जिंकलेल्या मुलुखावर लष्करी राजप्रतिनिधी अंमल चालवीत असत असें त्या वेळच्या सांपडलेल्या अनेक नाण्यांवरून दिसतें.

चीनशीं संबंध.—युएचि लोक ऑक्ससच्या उत्तरेस सॉग्डिएना येथें असतां त्यांच्या दरबारीं खि. पू. १२५ ते ११५ च्या दरम्यान चीनच्या राजानें वकील पाठविले होते, व पुढें एक शतक या दोघांमध्यें वकीलांमार्फत संबंध चालू होता. परंतु इ. स. २३च्या सुमारास पहिल्या हान घराण्याच्या अंतकाळीं चीनची पश्चिमेकडील देशांवरची सत्ता पूर्ण नष्ट झाली. तथापि पुढें आणखी ५० वर्षांनीं इ. स. ७३–१०२ च्या दरम्यान चिनी सेनापति पान-चौ यानें या पश्चिमेकडील देशांवर स्वारी करून सारखे जय मिळविले, व चिनी सत्ता रोमन साम्राज्याच्या हद्दीपर्यंत नेऊन भिडविली. खोतानचा राजा, काश्गारचा राजा वगैरे अनेकांनीं चीनचें सार्वभौमत्व कबूल केलें. या चिनी विजयांमुळें तत्कालीन कुशान राजा दुसरा कडफिसेस ( कनिष्काचा राज्यारोहण काल इ. स. १२० धरून ) याच्यावर एक मोठें संकटच आलें. पण तो चीनचें वर्चस्व कबूल करण्यास तयार नव्हता. आपला समान दर्जा प्रस्थापित करण्याकरितां त्यानें चिनी सेनापति पान–चौ याच्याजवळ चिनी राजकन्येबद्दल मागणी घातली ( इ. स. ९० ). पण चिनी सेनापतीनें त्या अपमानाबद्दल कडफिसेसच्या वकीलास कैदेंत टाकलें, तेव्हां कडफिसेस यानें आपला राजप्रतिनिधि सी याच्या हाताखालीं ७० हजार घोडदळ देऊन चिनी सैन्याबरोबर लढाई केली. या लढाईंत कडफिसेसच्या सैन्याचा पराभव झाल्यामुळें त्याला चीनच्या राजास खंडणी देणें भाग पडलें. असो.

दुसरा कडफिसेस यानें उत्तर हिंदुस्थानच्या बऱ्याच भागावर आपला अंमल बसविला होता. युएचि लोकांच्या सत्तेमुळें रोमन साम्राज्य व हिंदुस्थान यांच्यामध्यें खुशकीच्या मार्गानें मोठा व्यापार सुरू झाला. हिंदुस्थाननें पाठविलेलें रेशमी कापड, मसाल्याचे जिन्नस, मौल्यवान रत्नें आणि रंग तयार करावयाचे पदार्थ या जिनसांबद्दल रोमन साम्राज्यांतून हिंदुस्थानांत पुष्कळ सोनें येऊं लागलें. त्याचा फायदा घेऊन रोमन ऑरीसारखीं पण पौरस्त्य पद्धतीवर सोन्याचीं पुष्कळ नाणीं दुसऱ्या कडफिसेसनें पाडलीं. दक्षिण हिंदुस्थानचाहि रोमन साम्राज्याबरोबर जलमार्गानें बराच व्यापार चालू असे.

कनिष्काच्या कालासंबंधीं अनिश्चितता. दुसऱ्या कडफिसेसनें इ. स. ७८ ते ११० पर्यंत सुमारें ३३ वर्षें यशस्वी रीतीनें राज्य केल्यावर कनिष्क राज्यावर आला. कनिष्क हा दुसऱ्या कडफिसेसचा मुलगा नव्हता. त्याच्या बापाचें नांव वझेष्क असें असून कनिष्काचें राज्यारोहण व दुसऱ्या कडफिसेसचा मृत्यु यांच्या दरम्यान बराच काळ लोटलेला दिसतो. एकंदर कुशान राजांपैकीं कनिष्काचें नांव हिंदुस्थानाच्या बाहेरहि फार प्रसिद्ध आहे; तथापि त्याच्याबद्दल विश्वसनीय अशी ऐतिहासिक माहिती मात्र थोडी आहे. विश्वसनीय अशा चिनी इतिहासकारांच्या ग्रंथांतहि त्याच्याबद्दल उल्लेख आढळत नाहीं. कनिष्क व त्याच्या पाठोपाठचे कांहीं राजे यांच्या संबंधाचे उल्लेख असलेले कोरींव लेख पुष्कळ आहेत. त्यांपैकीं विसाहून अधिकांत कालदर्शक आंकडेहि दिले आहेत; परंतु ते घोटाळ्याचे असल्यामुळें त्यांची बरोबर संगति लागत नाहीं, व कांहीं विद्वान् संशोधक कनिष्काचें राज्यारोहण खि. पू. ५८ मध्यें झालें असें म्हणणारे आढळतात हें मागें सांगितलेंच आहे. नाण्यादि पुराव्यावरून स्वतः व्हिन्संट स्मिथचेंच एके काळीं कनिष्काच्या कारकीर्दीचा आरंभ इ. स. ७८ मध्येंच झाला असें नक्की मत होतें. परंतु १९२० मध्यें त्यानें हिंदुस्थानच्या इतिहासावर जें पुस्तक प्रसिद्ध केलें त्यांत त्याचा राज्यारोहणाचा काल कदाचित् सुमारें ४० वर्षें नंतरहि असूं शकेल अशी

जबर शंका प्रदर्शित केली आहे. तथापि कनिष्क हा युएचि राष्ट्रजातींतील कुशान नांवाच्या लोकांपैकीं असून तो दुसऱ्या कडफिसेस नंतर गादीवर आला हें आतां निःसंशय ठरलें आहे.

क नि ष्क (इ. स. १२०–१६२).—ह्युएनत्संगनें असें लिहून ठेविलें आहे कीं, 'जेव्हां कनिष्क गंधार येथें राज्य करीत होता तेव्हां त्याची अधिसत्ता आसपासच्या राज्यावर होती व दूरदूरच्या प्रदेशावरहि त्याचें वर्चस्व होतें.' त्याचीं नाणीं काबूलपासून गंगेच्या कांठच्या गाझीपूर पर्यंत दुसऱ्या कडफिसेस राजाच्या नाण्यांबरोबर सांपडतात. हीं नाणीं विपुल व अनेक प्रकारचीं सांपडत असल्यामुळें त्याची कारकीर्द बरीच मोठी होती असें दिसतें. सिंधपैकीं वरचा भाग त्याच्या अंमलाखालीं होता, आणि सिंधुनदीच्या मुखापर्यंतचीं उरलीं सुरलीं पार्थियन राज्येंहि त्यानें नाहींशीं करून टाकिलीं होतीं. कनिष्काच्या–किंवा या प्रकरणांत स्वीकारलेल्या व्हिन्सेंट स्मिथच्या सनावलीप्रमाणें दुसऱ्या कडफिसेसच्या–कारकीर्दींत हिंदुस्थानचा रोमशीं जो संबंध आला तो मागें पृ. १११मध्यें वर्णिलेलाच आहे. कनिष्कानें आपल्या कारकीर्दीच्या आरंभासच काश्मीर जिंकून तेथें अनेक स्मारकें उभारलीं, व आपल्या नांवाचें एक शहरहि वसविलें. हें शहर अद्याप लहान गांवाच्या स्वरूपांत अस्तित्वांत आहे. त्यानें हिंदुस्थानाच्या आणखी अन्तर्भागांत शिरून प्राचीन बादशहाची राजधानी जें पाटलिपुत्र तेथील राजावर हल्ला केला, व तेथला अश्वघोष नांवाचा एक बौद्ध साधु आपल्याबरोबर नेला. याबद्दलच्या ज्या अनेक कथा प्रचलित आहेत त्यांवरून निदान एवढें तरी निश्चित ठरतें कीं, कनिष्क आणि अश्वघोष हे समकालीन होते. इंडो–सिथियन अथवा कुशान घराण्याची सत्ता कनिष्काच्या कारकीर्दींत पश्चिम हिंदुस्थानावर आणि उज्जयिनी व महाराष्ट्र या भागांवरहि होती. कारण, महाराष्ट्राचा क्षत्रप क्षहरात नहपान आणि उज्जयिनीचा क्षत्रप चष्टन हे बहुधा शक असावे. हे कुशान राजांचे मांडलिक होते व ते कनिष्काचेहि असले पाहिजेत.

क नि ष्का चीं रा ज धा नी.—कनिष्काची राजधानी पुरुषपुर म्हणजे आधुनिक पेशावर ही होती. हें शहर अफगाणिस्थान व हिंदुस्थान यांनां जोडणाऱ्या हमरस्त्याचें संरक्षण करण्यास योग्य अशा ठिकाणीं वसलेलें होतें. या राजधानींत कनिष्कानें आपल्या उत्तर वयांत–तो बौद्ध संप्रदायाचा कट्टा पुरस्कर्ता बनल्यावर–बुद्धावशेषावर एक उंच इमारत उभारली. ही इमारत म्हणजे जगांतील अत्यंत आश्चर्यकारक गोष्टींपैकीं एक होती. ही इमारत कोरींव लांकडाची असून ती तेरा मजली व ४०० फूट उंचीची होती आणि तिच्यावर चांगला मजबूत लोखंडी कळस होता. सोंगयुन नांवाचा चिनी प्रवाशी ६ व्या शतकाच्या आरंभीं या शहरीं आला होता तोंपर्यंत ही इमारत आगीनें तीन वेळां जळून खाक झाली होती, पण श्रद्धाळू राजांनीं ती पुन्हां पुन्हां बांधून दुरुस्त केली होती. तिच्या शेजारीं एक बौद्ध मठ होता, तेथें ९ व्या शतकांतहि बौद्धविद्यादानाचें कार्य उत्तम प्रकारें चालू होतें. वीरदेव नांवाच्या बौद्ध पंडितानें त्या शतकांत या संस्थेला भेट दिली होती. हा पंडित मद्र देशच्या देवपाल राजाच्या कारकीर्दींत (इ. स. ८४४—९२) नालंद येथील मठाधिपति नेमला गेला होता. पुढें मुसुलमानांच्या स्वाऱ्यांच्या वेळीं गझनीच्या महंमुदानें व तदुत्तर सुलतानानें पुरुषपुर येथील उपर्युक्त विद्यापीठ नष्ट केलें असावें. बौद्धांच्या पवित्र स्थानांत असंख्य मूर्ती असल्यामुळें त्या स्थानांचा मूर्तिभंजक मुसुलमानांकडून नाश करण्यांत येत असे.

ची न शीं यु द्ध.—कनिष्कानें हिंदुस्थानाबाहेरील पार्थियन लोकांबरोबरहि युद्ध केलें. कारण त्या वेळच्या पार्थियन राजानें कनिष्काच्या राज्यावर हल्ला केला होता. कनिष्काचें अत्यंत महत्त्वाचें लष्करी पराक्रम म्हटले म्हणजे काश्गार, यार्केद आणि खोतान यांवरील विजय होत. हे प्रदेश चिनी सत्तेखालीं होते. हे जिंकण्याचा इ. स. ९० मध्यें दुसऱ्या कडफिसेसनें केलेला प्रयत्न फसला होता हें वर सांगितलेंच आहे. परंतु कुशानांची सत्ता अधिक बलिष्ठ बनल्यावर कनिष्कानें तें काम पुन्हां हातीं घेऊन तडीस नेलें; आणि चीनला खंडणी देण्याचें बंद करून चीनच्या साम्राज्यांतीलच एका मांडलिक राजापासून ओलीस इसम आणले. हे इसम काश्गारच्या आसमंतांतील प्रदेशांतल्या राजघराण्यांतले होते. यांनां कनिष्कानें त्यांच्या योग्यतेप्रमाणें उत्तम प्रकारें वागविलें. त्यांची निरनिराळ्या ऋतुमानाप्रमाणें निरनिराळ्या शहरीं बौद्ध मठांत राहण्याची सोय केली होती. हे ओलीस ठेवलेले इसम दिसण्यांत व पोषाखांत चिनी माणसांप्रमाणें होते असें सांगतात, व त्यांच्यापैकीं एकानें कपिश येथील मठाला मोठी देणगी दिल्यामुळें त्यांच्या चित्रांनीं बौद्ध भिक्षूंनीं कृतज्ञपणानें मठांतील भिंती सुशोभित केल्या होत्या. इ. स. ६३० च्या पावसाळ्यांत ह्युएनत्संग कपिश येथील मठांत राहिला होता त्या वेळीं मठवासी इसम पूर्वीच्या परोपकारी ओलीस इसमांचे धन्यवाद गातांना त्याला आढळले. ह्युएनत्संगच्या चरित्रकारानें उपर्युक्त ओलीस इसमांनीं दिलेल्या देणगीच्या द्रव्याबद्दल एक विलक्षण गोष्ट सांगितलेली आहे. हें द्रव्य कपिश येथील एका बुद्धालयांत वैश्रवणाच्या मूर्तीच्या पायाखालीं पुरलेलें होतें. तें एका पापी राजानें काढून घेण्याचा प्रयत्न केला तेव्हां तेथील देवतेनें क्रुद्ध झाल्याचें चिन्ह दाखविलें. पुढें देवालयाच्या दुरुस्तीकरितां तें द्रव्य काढण्याचा तेथील भिक्षूंनीं प्रयत्न केला, पण तेव्हांहि तेथील देवता क्रुद्ध झाली. त्यानंतर ह्युएनत्संग तेथें रहात असतां त्याला भिक्षूंनीं तें द्रव्य देवतेजवळून मिळवून देण्याची विनंति केली. तेव्हां या चिनी प्रवाशानें कांहीं धूप वगैरे जाळून द्रव्याची अफरातफर किंवा त्याचा गैरवाजवी खर्च होणार नाहीं असें देवतेला आश्वासन दिलें, व नंतर मजुरांकडून तेथील जमीन ७।८ फूट खोल खणविली. या प्रसंगीं

खोदणाऱ्या लोकांस देवतेकडून कांहीं एक त्रास न होतां त्यांनां तेथें सोन्यानें व मोत्यांनीं भरलेलें एक मोठें तांब्याचें भांडें सांपडलें. या पैशांतून देवालयाची दुरुस्ती करण्यांत आली. उरलेलें द्रव्य त्यानंतर बऱ्याच काळानें कमी पापभीरू लोकांनीं इतर कामीं खर्च करून टाकलें.

कनिष्काचा उपासनामार्ग.—कनिष्कानें बौद्ध संप्रदाय स्वीकारल्यासंबंधाच्या ज्या कांहीं कथा आहेत त्यांचें अशोकाच्या कथांशीं फार साम्य असल्यामुळें त्यांतील सत्यांश, हुडकून काढणें फार कठिण आहे. पूर्ववयांत युद्धादि निमित्तानें जीं रक्तपाताचीं क्रूर कृत्यें झालीं त्यांबद्दल विषाद वाटून या राजांनीं पुढें बौद्ध संप्रदाय स्वीकारला, असें दोघांविषयींहि समान वर्णन आहे. याबद्दल खात्रीलायक पुरावा नाण्यांवरून मिळतो. कनिष्काच्या कारकीर्दींतील आरंभींचीं नाणीं ग्रीक भाषा, लिपि व देवता यांहीं युक्त आहेत; नंतरच्या नाण्यांवर पर्शियन भाषेचे ग्रीक लिपींत लिहिलेले लेख आणि ग्रीक, इराणी व हिंदु देवतांचीं चित्रें आहेत; व अखेर अखेरचीं नाणीं बुद्ध शाक्य मुनीच्या मूर्तींनीं युक्त असून त्यांवरील लेख ग्रीक लिपींत आहेत. अशोकाच्या वेळीं बुद्धाची इतर देवतांप्रमाणें मूर्ति करण्याचा प्रघात पडला नव्हता; पण तो पुढें कनिष्काच्या वेळीं पडला. कनिष्काच्या काळांत बौद्ध संप्रदायाचा जो महायान म्हणून नवा पंथ निघाला तो हिंदु, झरथुष्ट्री ख्रिस्ती, नॉस्टिक व हेलेनिक अशा अनेक पंथांच्या मिश्रणानें बनलेला होता. अलेक्झांडरची स्वारी, मौर्यांचें साम्राज्य आणि रोमन साम्राज्य यांचा परस्परांवर परिणाम झाल्यावर बौद्ध संप्रदायाला हें नवें स्वरूप प्राप्त होणें अपरिहार्य होतें. या महायानपंथानें बुद्धाच्या देवतामूर्ती कनिष्काच्या साम्राज्यांत सर्वत्र स्थापन केल्या. कनिष्क बौद्धसंप्रदायी बनल्यावरहि ज्याप्रमाणें पुढें हर्षराजा शिव आणि बुद्ध या दोघांची भक्ति करीत असे त्याप्रमाणें तो जुन्या व नव्या अशा दोन्हीहि देवतांनां भजत असे. पेशावर व नजीकच्या प्रांतांत म्हणजे प्राचीन गांधार प्रांतांत ज्या सुप्रसिद्ध मूर्ती सांपडल्या आहेत त्यांवरून नवा महायान पंथ, त्यांतील पौराणिक कथा आणि देवता यांची चांगली कल्पना येते. ही गांधारदेशीय मूर्तिकला ग्रीको-रोमन कलेची शाखा आहे असें स्पष्ट दिसतें. ही गंधारी मूर्तिकला ख्रिस्तीशकाच्या २ऱ्या शतकांत अत्यंत उच्च दर्जास पोहोंचलेली होती असें अत्यंत अधिकारी टीकाकारांचें मत पडलें आहे.

धम्मसंगीति.—कनिष्काच्या कारकीर्दींतील आणखी महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे अशोकाच्या पद्धतीवर त्यानें भरविलेली धम्मसंगीति होय. हिचा उल्लेख सिलोनी लेखकांनीं केलेला नाहीं; पण तिबेटी, चिनी व मांगोली लेखकांनीं दिलेल्या उत्तर हिंदुस्थानांतील आख्यायिकेचा या संगीतीला आधार आहे. या संगीतीचा राजकारणाशीं कांहीं संबंध नव्हता. या मंडळासंबंधाची हकीकत अशी आहे कीं, कनिष्क एका भिक्षूच्या मदतीनें बौद्धसांप्रदायिक ग्रंथांचा अभ्यास करूं लागला तेव्हां त्यांतील निरनिराळीं परस्परविरोधी मतें पाहून त्याच्या मनांत गोंधळ झाला. तेव्हां आपला सल्लागार पूज्यपार्श्व याच्या संमतीनें कनिष्क राजानें बौद्धसांप्रदायिक ग्रंथ जाणणाऱ्या विद्वानांची सभा बोलावली. त्या सभेंतले सर्व पंडित हीनयान पंथांतील सर्वास्तिवादी मताचे अनुयायी होते. या मंडळाच्या सभा काश्मीरच्या राजधानीनजीक कुंडलवन नामक मठांत भरल्या. त्यांत वसुमित्र अध्यक्ष आणि पाटलिपुत्र येथून आणलेला सुप्रसिद्ध ग्रंथकर्ता अश्वघोष उपाध्यक्ष होता, व सभासद ५००शें होते. त्यांनीं अगदीं प्राचीन काळापासूनच्या सांप्रदायिक ग्रंथांचें नीट परीक्षण करून बौद्ध सांप्रदायिक तत्त्वांच्या तीन मुख्य विभागावर मोठाले टीकाग्रंथ तयार केले. त्यांपैकीं महाविभाषा नांवाचा बौद्ध तत्त्वज्ञानाचा ज्ञानकोशासारखा मोठा ग्रंथ अद्याप चीनमध्यें आहे. हे टीकाग्रंथ ताम्रपटावर लिहून एका स्तूपामध्यें ठेवून देण्यांत आले. ते श्रीनगरनजीकच एखाद्या ठिकाणीं अद्याप उपलब्ध होणें शक्य आहे. ही संगीति इ. स. १०० च्या सुमारास भरली होती असा सर्व साधारण समज आहे. परंतु कनिष्क इ. स. १२० मध्यें राज्यारूढ झाला ह्या व्हिन्सेंट स्मिथच्या मताशीं हा सन धडधडीत विसंगत दिसतो.

कनिष्काचा मृत्यु.—कनिष्क सुमारें ४३ वर्षें राज्य करून इ. स. १६२ च्या सुमारास मरण पावला. त्याच्या मृत्यूसंबधानें पुढील दंतकथा आहे. राजाचा माथर नांवाचा एक असामान्य बुद्धिमत्तेचा प्रधान होता. त्याच्या सांगण्यावरून राजानें अनेक पराक्रमी सेनापती व मोठें चतुरंग सैन्य यांसह दिग्विजयाचें काम सुरू केलें. तीन दिशांनां त्यांनां जय मिळाला, पण उत्तरेकडे दिग्विजय करण्याचें काम राहिलें. त्यांत मदत करण्याकरितां राजानें लोकांनां विनंति केली. तेव्हां लोकांनीं असा विचार केलाः 'आपला राजा फार लोभी व क्रूर असून, त्याच्या स्वाऱ्या व विजय यांमुळें सर्व नोकर अगदीं त्रासले आहेत तरी राजाला आणखी उत्तरेकडे दिग्विजय करण्याची इच्छा आहेच. आपल्या नातेवाइकांनां राजानें जिंकलेल्या दूरदूरच्या देशांत संरक्षणाकरितां रहावें लागतें आहे. या सर्व त्रासांतून मुक्त होण्याकरितां आपण सर्वांनीं मिळून राजालाच नाहींसा केला पाहिजे म्हणजे आप ल्याला सुख लाभेल.' असा विचार करून पुढें जेव्हां राजा आजारी पडला तेव्हां त्यांनीं कट करून त्याला एका दुलईखालीं झांकून टाकलें व एका माणसानें त्याच्यावर बसून त्याला गुदमरून टाकून त्याचा जीव घेतला.

हुविष्क.—(इ. स. १६२-१८२) कनिष्कानंतरच्या राजांविषयीं अगदीं थोडी माहिती मिळते. शिलालेखांवरून असें सिद्ध होतें कीं, २४ व २८या वर्षीं मथुरा येथें वासिष्क राज्य करीत होता; आणि हुविष्क ३३ व ६० या वर्षांच्या दरम्यान, व कनिष्क त्याच ठिकाणीं ४१ या वर्षीं राज्य करीत होता. या आंकड्यांचा मेळ घालण्याचा उत्तम मार्ग

म्हटला म्हणजे वासिष्क व हुविष्क हे कनिष्काचे मुलगे होते, व कनिष्क युद्धावर गेला असतां ते उत्तर हिंदुस्थानांत राजप्रतिनिधी म्हणून काम करीत असत असें मानलें पाहिजे. वासिष्काचीं नाणीं सांपडत नाहींत यावरून तो बापाच्या पूर्वी वारला असावा; आणि कनिष्कानंतर हुविष्क सम्राट् झाला असावा. हुविष्काचीं जीं पुष्कळ नाणीं सांपडतात तीं तो साम्राज्याधिपति झाल्यानंतरचीं असावींत. हुविष्काच्या साम्राज्यांत काबूल, काश्मीर व मथुरा यांचा अंतर्भाव होत असे. मथुरा येथील एका बौद्ध मठाला त्याचें नांव दिलेलें होतें. कनिष्काप्रमाणें यानेंहि बौद्धसंप्रदायी संस्थांनां मोठाल्या देणग्या दिल्या; आणि ग्रीक, हिंदी व इराणी या तीनहि संस्कृतींतील देवतांचा पुरस्कार केला. हुविष्काच्या नाण्यांवर हेराक्लीझ, सरापो, स्कन्द व त्याचा मुलगा विसाख, फेरो, अग्निदेवता व इतर अनेक देवता यांच्या मूर्ती आहेत; परंतु बुद्धाची मूर्ति नाहीं. यावरून असें दिसतें कीं, या जुन्या सिथियन राजांची बौद्ध संप्रदायावर फारशी श्रद्धा नव्हती. मात्र बौद्धसांप्रदायिक मठादि बडया संस्थांनां ते मोठाल्या देणग्या देत असत.

काश्मिरांत हुविष्कानें हुष्कपुर नांवाचें शहर वसविलें तें बारामूल घाटाच्या नजीक असून अनेक शतकें तें फार प्रसिद्ध होतें. इ. स. ६३१ मध्यें ह्युएनत्संग काश्मीरांत गेला तेव्हां हुष्कपुरमठांत त्याचा चांगला आदरसत्कार झाला. शिवाय त्या प्रवाशानें ५००० भिक्षू असलेले पुष्कळ मठ पाहिले. प्राचीन हुष्कपुराच्या ठिकाणीं आज उष्कूर नांवाचें लहानसें खेडें आढळतें, व त्याच्या नजीक एका प्राचीन स्तूपाचे अवशेषहि आहेत. हुविष्कानें बरींच वर्षें राज्य केलें. त्याचीं अनेक प्रकारचीं नाणीं सांपडलीं आहेत. त्यांपैकीं सोन्याचीं नाणीं उत्तम असून त्यांवर राजाचा मुखवटा आहे.

**१ ला वासुदेव (इ. स. १८२–२२०).**–हुविष्कानंतर १ला वासुदेव राज्यावर आला. हें राजाचें नांव पूर्णपणें हिंदु पद्धतीचें आहे, व त्यावरून या परकी राजांवर हिंदुस्थानांतील परिस्थितींचा किती लवकर परिणाम झाला हें स्पष्ट दिसतें. याच्या नाण्यांवरहि शिव देवतेची नंदीसह मूर्ति आहे. याचे पुष्कळसे शिलालेख मथुरा येथें सांपडतात. त्यांतील सनांवरून त्यानें किती वर्षें राज्य केलें तें कळतें. १ ल्या वासुदेवाच्या कारकीर्दीत कुशानांच्या सत्तेला उतरती कळा लागली आणि लवकरच त्या साम्राज्याचे विभाग पडले.

**इराणांतील सस्सन घराण्याचा हिंदुस्थानावर परिणाम.**—इ. स. २२६ मध्यें आर्सेकिडी घराणें नष्ट करून सस्सन घराणें इराणांत राज्य करूं लागलें. या नव्या घराण्यांतील २ रा बहराम यानें २७६–२९३ या काळाच्या दरम्यान सीस्तानवर स्वारी केली होती. परंतु या सस्सन घराण्यांतील राजानें तिसऱ्या शतकांत हिंदुस्थानावर स्वारी केल्याच्या मुळींच ऐतिहासिक पुरावा उपलब्ध नाहीं. एवढें मात्र खरें कीं, सस्सन घराण्याच्या उदयाच्या सुमारास (इ. स. २२६) हिंदुस्थानांतील आंध्र व कुशान हीं दोन सुप्रसिद्ध घराणीं नष्ट झालीं. त्यामुळें या तीन गोष्टींचा परस्परसंबंध असावा असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. हिंदुस्थानांतील बऱ्याचशा मुलुखावर राज्य करणारा १ ला वासुदेव हाच शेवटला कुशान राजा होय. त्याच्या नंतर उत्तर हिंदुस्थानांत अनेक लहान लहान स्वतंत्र राज्यें अस्तित्वांत आलीं असावीं, परंतु ३ ऱ्या शतकासंबंधानें हिंदुस्थानांत ऐतिहासिक पुरावा मुळींच उपलब्ध नाहीं. पुराणांत आंध्र गर्दभिल्ल, शक, यवन, बाल्हिक वगैरे अनेक घराण्यांचीं नांवें दिलीं आहेत तीं सर्व घराणीं समकालीन असावींत व त्यांपैकीं कोणत्याच घराण्यास साम्राज्याचा उपभोग घ्यावयास मिळाला नसावा.

**एकशतकभरचीं अराजकस्थिति (इ. स. २२०–३३०). रोमन साम्राज्याचा भारतीय सैन्याकडून पराजय.**—पंजाबमध्यें व काबूलवर कुशान राजांची सत्ता पुष्कळ काळ होती असें नाण्यांवरून दिसतें. काबूलवरची त्यांची सत्ता ५ व्या शतकांत हूण लोकांनीं नष्ट केली. चवथ्या शतकाच्या आरंभीं एका कनिष्क राजानें इराणांतील सस्सन राजा २ रा होर्मिझ्द याला आपली मुलगी दिली. इ. स. ३५९ मध्यें २ऱ्या शापुरनें आमायडाच्या वेढ्याच्या वेळीं हिंदुस्थानांतील हत्ती आणि कुशान सैन्य यांच्या मदतीनें रोमन सैन्यावर जय मिळविला. तिसऱ्या शतकांत पंजाबवर जे परकी राजे राज्य करीत होते त्यांपैकीं कुशान कोण होते व आशियांतील इतर जातीचे कोण होते हें सांगणें कठिण आहे. नाण्यांवरील राजांच्या नांवांत कनिष्क अथवा वसु (देव) हीं नांवें आढळतात. त्याच प्रमाणें भ, ग, वी अशीं चिनी पद्धतीचीं एकाक्षरी नांवेंहि आढळतात. हीं नांवें मध्य आशियांतील ज्या जातींनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या त्यांच्या मुख्यांचीं असावींत. एका नाण्यावर आरंभींच्या सस्सन राजांच्या नाण्यांवरच्या प्रमाणें अग्निस्थानाचें चित्र आहे. त्यावरून तिसऱ्या शतकांत पंजाबचा इराणशीं संबंध पूर्वीप्रमाणें चालू झाला असें दिसतें. त्यानंतरचींहि कुशानांचीं नाणीं सस्सन नाण्यांशीं संबद्ध आहेत. तथापि पंजाब व उत्तर हिंदुस्थान यांतील घराण्यांसंबंधाची ३ ऱ्या शतकांतील व ४ थ्या शतकाच्या आरंभींची निश्चित माहिती कांहींच मिळत नाहीं. प्राचीन साम्राज्याची राजधानी जें पाटलिपुत्र शहर त्याचें महत्त्व ५ व्या शतकांतहि कायम होतें. इ. स. ३२० मध्यें गुप्त शकाच्या संस्थापकानें एका लिच्छवी राजपुत्राच्या दोस्तीला दिलेलें महत्त्व लक्षांत घेता ३ ऱ्या शतकांत पाटलिपुत्र येथें वैशालीच्या लिच्छवींची सत्ता होती असें दिसतें. या लिच्छवींचा तिबेटी लोकांशीं निकट संबंध होता असें वाटतें. या काळांतल्या पश्चिम हिंदुस्थानांतील शक क्षत्रपांची वंशावळ मात्र बरोबर सांपडते. बाकी एकंदरीनें कुशान व आंध्र घराणीं नष्ट झाल्यावर (अजमासें इ. स. २२० किंवा २३० च्या) पुढें सुमारें एक शतकानें सम्राट्

गुप्तांचें घराणें उदयास येईपर्यंतचा हिंदुस्थानचा सर्व इतिहास अगदीं अज्ञात आहे.

---

## प्रकरण १३ वें.

### सेमेटिक संस्कृतीची जगद्व्यापकता.

**संस्कृतीच्या इतिहासांत सेमेटिक राष्ट्रांचें स्थान.**—ग्रीक रोमन, अगर भारतीय व इराणी या संस्कृतींच्या इतिहासाकडेच आतांपर्यंत विशेष लक्ष दिलें गेलें. संस्कृतीच्या इतिहासांत आर्यन् राष्ट्रांचें स्थान सर्वांत मोठें खरें, तथापि सेमेटिक राष्ट्रांचें स्थानहि फारच मोठें आहे. राष्ट्रीय संस्कृति राष्ट्रांत उत्पन्न झालेल्या राजकीय शक्तीच्या जोमानें जशी अतिराष्ट्रीय होते तशी ती अन्य कारणानेंहि होते ही गोष्ट लोकांत निघालेल्या एका संप्रदायानें लोकांच्या नजरेस आणली. राजकीय शक्ति आणि पारमार्थिक संप्रदाय हीं एकवटलीं असतां श्री, विजय आणि भूति यांचा फार जोमानें विकास होतो ही गोष्ट देखील सेमेटिक लोकांत निघालेल्या दुसऱ्या एका संप्रदायानें सिद्ध केली आहे. सेमेटिक संस्कृतीस जगांत महत्त्वाचें स्थान ख्रिस्त व पैगंबर यांनीं मिळवून दिलें. जगांतील इतिहासांत सेमेटिक संस्कृतीची उचल हा एक महत्त्वाचा भाग आहे, आणि सर्व जगाच्या नीतिकल्पनांवर या सेमेटिक उचलीचा परिणाम मोठा झाला आहे. ख्रिस्तीधर्म आणि महंमदीय धर्म म्हणून ज्या दैवतकल्पना आणि नीतिकल्पना लोकांत प्रसृत झाल्या त्याच्या मुळाशीं यहुदी लोकांचा एकसारखा वाढत चाललेला विचारविकास व भावनाविकास आहे.

**संस्कृतिविकासांत यहुदी लोकांची कामगिरी.**—तिसऱ्या विभागांत यहुदी राष्ट्राचा इतिहास सामान्यपणें दिलाच आहे. बुद्धोत्तर कालामध्यें यहुदी लोकांची जी कामगिरी झाली तींत त्यांची राष्ट्र या नात्यानें कामगिरी महत्त्वाची नाहीं. यहुद्यांच्या राष्ट्राचा नाश होऊन ते प्रथम खाल्डियन सारख्या प्राचीन साम्राज्याचे अंकित बनले, आणि नंतरहि त्यांनां आपलें राज्य पुन्हां स्थापण्यांत यश आलें नाहीं. राष्ट्रस्थापना करून उच्च प्रकारचा सांघिक आयुष्यक्रम तयार करण्यांत जरी त्यांस यश आलें नाहीं तरी सर्व जगभर वजनदार जात या दृष्टीनें त्यांचा प्रसार झाला; एवढेंच नव्हे तर त्यांच्या वाङ्मयाचें आणि संस्कृतीचें महत्त्व सर्व जगास मान्य होऊन त्यांचें वाङ्मय आणि त्यांच्या समाजसंस्था, यांचा सर्व जगभर संचार झाला. उच्च प्रकारचे विचार आणि श्रेष्ठ प्रकारचें आवेशयुक्त काव्य ज्यांत आहे असें त्यांचें वाङ्मय जातिविशिष्ट न राहतां जागतिक झालें; आणि त्यांच्या जातींत जो एक संप्रदाय उत्पन्न झाला त्याचा प्रसार सर्व जगभर होऊन बुद्धाच्या संप्रदायाच्या तोडीचें कार्य त्या संप्रदायानें केलें. बुद्धानंतर पांचशें वर्षांनीं हा संप्रदाय उत्पन्न झाला, आणि एक हजार वर्षांच्या आंत या संप्रदायानें यूरोपांतील सर्व देशांत देश्य संस्कृति बहुतेक पुसून टाकून यूरोपचें रूपांतर केलें. पुढें यूरोपच्या शासनसंस्थांतहि तो संप्रदाय महत्त्वाचा झाला. आज जगांतील लाखों लोकांस तोच संप्रदाय सत्कर्मास प्रेरित करीत आहे. या संप्रदायाचा इतिहास बुद्धोत्तर जगाच्या इतिहासाचा महत्त्वाचा भाग होय.

**ख्रिस्ती संप्रदाय.**—आतांपर्यंत जें जगाचें निरीक्षण झालें त्यांत ख्रिस्ती संप्रदायाविषयीं तुरळक उल्लेख आले आहेत. हे उल्लेख म्हटले म्हणजे यहुद्यांमध्यें 'मेसाया' (गांजलेल्यांचा रक्षणकर्ता) या राजकीय कल्पनेचें अस्तित्व, येशूचा मेसाया होण्याचा प्रयत्न व राजकीय दृष्ट्या त्याच्या कल्पनेंतील वैगुण्य यांविषयीं (पृ. २५) होत. तसेंच बौद्ध वाङ्मय आणि ख्रिस्ती सांप्रदायिक वाङ्मय यांतील साम्यस्थलांचें आणि दोन्ही संप्रदायांतील शक्य अन्योन्याश्रयाचें विवेचनहि मागें झालेंलेंच आहे (पृ. २९-३३). या संप्रदायाचा मणिसंप्रदायाशीं संबंध (पृ. ३६), इराणी साम्राज्यांत त्याचा प्रवेश व छळ (पृ. ५८) आणि रोमन साम्राज्यांतील त्याचें स्वागत (पृ. १०७) व हिंदुस्थानांत प्रसार (पृ. २६०-१) यांवरहि प्रसंगानुसार टीपा लिहिल्या आहेत. आतां या संप्रदायाकडे थोडें अधिक लक्ष देऊन यांशीं असलेला जगांतील इतर कार्यपरंपरांचा संबंध स्पष्ट केला पाहिजे; ख्रिस्ती संप्रदायाचा जगाशीं संबंध आला तो रोमन साम्राज्यामुळें आला; आणि तो देखील पश्चिमेकडील साम्राज्याच्या उत्तर काळांत आणि पूर्वेकडील साम्राज्याच्या प्रारंभापासून आला.

ख्रिस्ती संप्रदायाचा सविस्तर इतिहास द्यावयाचा म्हणजे तो अनेक अंगांनीं दिला पाहिजे. ख्रिस्ताचें चरित्र हा त्याचा अवश्य भाग आहेच, पण तेवढ्यानेंच काम भागत नाहीं. ख्रिस्ताच्या अनुयायांमध्यें कदाचित् राजकीय हेतूसाठीं आणि तदाश्रयानें नैतिक हेतूसाठीं संप्रदाय स्थापन झाला असावा असें दिसतें. तेव्हां तसें असल्यास त्याचें राजकीय स्वरूप जाऊन त्यास केवळ नैतिक आणि पारमार्थिक संप्रदाय म्हणून स्वरूप कसें प्राप्त झालें, त्यांत भिक्षुकी कशी शिरली, त्याचा कायद्यावर कसा परिणाम झाला; त्या संप्रदायाचें वाङ्मय काय, त्या संप्रदायांत मोठाले पुरुष व भगवद्भक्त कोण होऊन गेले, एवढेंच नव्हे तर या संप्रदायाचा तत्कालीन कलेवर काय परिणाम झाला अशा अनेक दृष्टींनीं विचार करून इतिहास मंडवितां येईल.

या अभ्यासाच्या शाखा एवढ्यानेंच सरल्या नाहींत. तर आज बायबल म्हणून जें वाङ्मय आहे त्याची जुळणी कशी झाली, तिचा इतिहास विस्मृत कसा झाला, तो इतिहास विस्मृत झाला असतां जेव्हां संशोधकांच्या प्रयत्नांनीं तो पुन्हां बाहेर पडूं लागला तेव्हां त्याचा परिणाम काय होऊं लागला, याची हकीकत जगाच्या विचारेतिहासांतील एक मोठें महत्त्वाचें पान आहे. हा संप्रदायेतिहास केवळ अंतर्गत

विकासाचा होय असें म्हटल्यास चालेल. पण जेव्हां या संप्रदायानें जगद्व्यापी धोरण ठेविलें तेव्हां इतर लोकांनां या संप्रदायांत आणण्याकरितां पारमार्थिक धंदेवाइकांनीं काय काय बरेवाईट उपाय योजले याचा वृत्तान्त इतिहासांत बरीच मनोरमता उत्पन्न करतो. प्रथम आपण संप्रदायसंस्थेचा इतिहास घेऊं. त्या इतिहासाचा राजकारणाशीं बराच संबंध असून राजकीय इतिहासाचें हें उत्तरांगच म्हटलें तरी चालेल.

**येशू ख्रिस्त आणि त्याचें यहुदी धार्मिक इतिहासांत स्थान.**—ख्रिस्ती संप्रदायाचें जागतिक इतिहासांत स्थान महत्त्वाचें आहे; आणि ज्या अर्थी येशू हा त्या संप्रदायाचा संस्थापक होता त्या अर्थी त्याचेंहि स्थान मोठें होतें असें म्हणतां येईल. तथापि येशू हा अलौकिक पुरुष होता अशी खात्री वाटत नाहीं. येशूचें यहूदी इतिहासांत कार्य फारसें महत्त्वाचें नव्हतेंच. अनेक उपदेशक आले व गेले त्यांपैकींच येशू हाहि एक होता. त्यांच्याकडून त्यास प्रवक्ता म्हणून मान्यता मिळून त्याच्या उपदेशाचा जुन्या करारांत समावेश होण्याइतकी योग्यता यहुद्यांच्या दृष्टीनें ख्रिस्ताची नव्हती. पॉलला येशूच्या उपदेशांत कांहीं तरी निराळें वाटलें म्हणून म्हणा, किंवा संप्रदायस्थापना करून आपलें महत्त्व वाढवावें अशी प्रेरणा होऊन संप्रदायस्थापनेला कोणी तरी स्पर्धाक्षेत्रांत नसलेला म्हणजे मृत गुरु पाहिजे या भावनेनें त्यानें येशूस शोधून काढलें म्हणून म्हणा, त्यानें स्वतः संप्रदायप्रवेश करून येशूस मोठें केलें.

**येशूची व्यक्तिविषयक माहिती.**—पॉलचें कार्य कितीहि मोठें असलें तरी ख्रिस्ती संप्रदायाचा उत्पादक नाझारेथचा येशू होय ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. या येशूविषयीं आपणास निश्चित माहिती फारच थोडी आहे. हा यहुदी होता असें गृहीत धरलें आहे, आणि तो यहुदी असावा असें आजपर्यंतच्या पुराव्यावरून वाटतें. तथापि हा जन्मतः यहुदी नसून आर्यन रक्ताचा असावा असें सिद्ध करण्याचे प्रयत्नहि दृष्टीस पडतात. येशूच्या भाविक भक्तांनीं त्याची पूर्वजपरंपरा यहुदी राजा दावीद याच्या घराण्याशीं नेऊन भिडविली आहे. ख्रिस्ती संप्रदायसंस्था त्याचा जन्म ईश्वरी अद्भुत करणीमुळें झाला असें शिकविते. येशू प्रसिद्धपणें उपदेश करूं लागण्यापूर्वीचा काळ आपला बाप योसेफ आणि आई मेरी-यांच्या बरोबर सुतारकाम करण्यांत घालवीत असावा असा समज आहे. येशूच्या बाल्यानंतर आपणांस योसेफचें नांव ऐकूं येत नाहीं. येशूच्या या कालांतील आयुष्यक्रमाविषयीं आपणांस निश्चित अशी माहिती कांहींच नाहीं. येशू तीस वर्षांचा झाल्यानंतर तो उपदेशक म्हणून पुढें आला, आणि थोड्याच कालानंतर त्याला त्याच्या देशबंधूंच्या फिर्यादीवरून रोमन अधिकाऱ्यांकडून क्रूसीं चढविण्यांत आलें. त्याच्या उपदेशाचा काल किती असावा याविषयीं निश्चितपणें कांहीं सांगतां येत नाहीं. हा उपदेशकाल १८ महिने असावा असा अजमास करण्यांत आला आहे, आणि जगद्व्यापक संप्रदायाच्या स्थापनेस आधारभूत झालेलें असें त्याचें कार्य केवळ या १८ महिन्यांतलेंच होय. येशूचें शिक्षण फारसें झालें नसावें; तथापि त्यास हिब्रूंच्या पवित्र ग्रंथांची साधारण बरी माहिती होती असें दिसतें. येशू हा उच्च वर्गांतील नव्हता किंवा हिब्रूंच्या पंडितवर्गांपैकींहि नव्हता. परंतु हा सामान्य वर्गांतील होता तरी इतरांपेक्षां त्यांत कांहींतरी निराळेपणा होता हें उघड आहे. हा निराळेपणा आनुवंशिक संस्कारानें किंवा शिक्षणाच्या उच्चतेमुळें आला नसून त्याच्या व्यक्तिविशिष्टत्वामुळें आला होता असें म्हणतां येईल.

येशूचें कार्य लक्षांत घ्यावयाचें म्हणजे त्याच्या पैतृक धर्माचें कार्य लक्षांत घेतलें पाहिजे. कारण यहुदी लोकांचें जें पूर्वसंचित येशूस लाभलें त्याच्या पायावरच येशूनें आपल्या कार्याची उभारणी केली होती. हें हिब्रूंचें पूर्वसंचित म्हणजे कांहीं परस्परांशीं सुसंगत अशा आचारविचारांची संस्था नव्हती. त्यांची धर्मसंस्था आणि धार्मिक वाङ्मय हीं बऱ्याच कालच्या आचारांचा आणि अनेक प्रवक्त्यांच्या विचारांचा संचय होऊन तयार झाली होती असें दिसतें. हें वाङ्मय म्हणजेच जुना करार होय. त्याचें स्वरूपवर्णन पुढें दिलें आहे. त्या वाङ्मयाकडे सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केलें असतां त्यांत भारतीय धर्मविकास व विचारविकास यांशी अनेक सादृश्यें दृष्टीस पडतात. ईश्वराविषयीं जंगली समजुतीपासून सुधारलेल्या लोकांस साजतील अशा समजुतीपर्यंत सर्व कल्पना जुना करार नांवाच्या संहितेंत आढळून येतील.

**यहुद्यांचा ख्रिस्तपूर्व धर्म.**—हिब्रू समाजाच्या प्राथमिक कालांतील लोकांचा धर्म इतर सेमेटिक जातींच्या धर्मापेक्षां भिन्न नव्हता. त्यांच्या वाङ्मयांतील कथा पारमार्थिक दृष्टीनें अत्यंत प्राथमिक स्वरूपाच्या होत्या. अनेक प्रकारचे विधिनिषेध मानवस्वरूपी देव, पूजनाचे प्राथमिक स्वरूपाचे अनेक प्रकार, जादूटोणा, भविष्यवाद, स्थानदेवता, कुलदेवता यांहीं तो मिश्र होता. यांतच हळू हळू प्रवक्त्यांच्या परिश्रमानें उच्च प्रकारच्या पारमार्थिक भावना व उच्च प्रकारच्या नीतिकल्पना यांची भर पडली. प्रवक्त्यांनीं शिकविलें, कीं, ईश्वरास अर्चनविधींची, यज्ञियपशूंची किंवा नैवेद्याची आवश्यकता नाहीं. ईश्वर काम्यवाणीनें किंवा स्तवनानें संतोष पावत नाहीं, तर तो आत्म्याच्या शुद्धीची व सत्याची अपेक्षा करतो. तो मनुष्यानें मनुष्याशीं वागतांना विनयपूर्वक, दयापूर्वक आणि धर्मपूर्वक वागणें इच्छितो. तो सर्वांकडून दया, क्षमा आणि सप्रेम स्वार्थत्याग हें अपेक्षितो. ईश्वर आपल्या लाडक्या इस्राएल लोकांनां ते त्याचे आवडते लोक आहेत व ते अब्राहामापासून जन्मले आहेत म्हणून, मुक्त करील असें मुळींच नाहीं. उलट, इस्राएल हे मनुष्यश्रेष्ठ असल्यामुळें त्यांनीं पापाचरण केल्यास ते अधिक कठोर शिक्षेस पात्र आहेत; कां कीं, ते आपल्या पापाचरणानें ईश्व-

रास अमान्य करतात. तथापि इस्राएल लोकांचा नाश होणार नाहीं, कारण त्यांच्यांत उच्चभावनाप्रेरित, ईश्वराची आज्ञा मानणारे व त्यावर प्रेम करणारे असे कांहीं लोक आहेत. प्रवक्त्यांनीं जें वाङ्मय तयार केलें त्याचा यहुदी राष्ट्रावर परिणाम झाला आणि राष्ट्रीय वाङ्मयाविषयीं आणि धर्माविषयीं त्यांच्या मनांत बळकट श्रद्धा उत्पन्न झाली. त्यांचा जरी पुढें स्वातंत्र्यनाश झाला, तरी त्यांचें एकत्व राष्ट्र-धर्मावरील श्रद्धेनें उत्पन्न झालेल्या एकीमुळें जें टिकलें तें आजपर्यंत कायम आहे; आणि ते सर्व जगभर पसरले तरी त्यांच्यामध्यें यहुदीपणाची भावना अद्याप आहे. यहुदी लोकांचें सर्वच वाङ्मय पारमार्थिक नव्हतें, त्यांत कांहीं ऐतिहासिक वाङ्मय आहे. व कांहीं ललितवाङ्मय या नांवास शोभेल असेंहि आहे. उदाहरणार्थ शलोमोनचें गीत उत्कृष्ट प्रकारचें शृंगारिक काव्य आहे. याशिवाय कांहीं प्रासंगिक प्रार्थना नीतिसूत्रें इत्यादि मनोरम भाग त्यांत आहेत. त्यांची पुढें दिलेल्या उताऱ्यांवरून कल्पना येईल.

**ऊर्जितकालाची आशा व मेसायाच्या कल्पनेचा उदय.**—यहुदी लोकांमध्यें आपल्या जातीच्या भवितव्याविषयीं जी आशायुक्त कल्पना होती ती पुढें अवतार कल्पनेंत परिणत झाली. अवतार उर्फ मेसाया जगांत येऊन त्यांचें पुन्हां राज्य स्थापन करील आणि दाविदाच्या वंशास राज्यारूढ करील अशी ही कल्पना होती. यशया, मीखा, यहेज्केल वगैरे प्रवक्त्यांनीं या कल्पनेचा पुरस्कार केला. इतर प्रवक्त्यांनीं जरी ही कल्पना पुढें मांडली नाहीं तरी भावी आशामय कालाची त्यांस जाणीव होतीच; आणि त्यांनीं तो काल परिश्रमानें, कष्ट सोसल्यानें आणि जे धर्माचरणयुक्त अवशेष हिब्रूंत राहिले आहेत, त्यांच्या विजयानें प्राप्त होईल, अशी आशा व्यक्त केली. धर्माचरणयुक्त वर्तनावर त्यांनीं जो जोर दिला त्याबरोबर त्यांची पारमार्थिक कल्पना जातिविशिष्टत्वाचे पाश तोडून टाकून सर्व लोकांनां सामान्य असा जो ईश्वर व त्यापर्यंत पोंचण्यास लागणारें सदाचरण यामध्यें स्थित झाली. त्यांच्या एकेश्वरवादामध्यें विश्वोत्पत्तिविषयक सिद्धान्त किंवा द्वैताद्वैतवाद वगैरे कांहीं नव्हतें. केवळ नैतिक आचरणाचा अंतिम परिणाम परमेश्वरसायुज्यता आहे एवढाच विचार त्यांनीं विकासविला. ईश्वरराज्याची कल्पना ही त्यांच्या पारमार्थिक भावनांचें प्रधान अंग होती. ईश्वर हा राजा आहे, तो स्वर्गांत आहे आणि तो सर्वांत वरिष्ठ आहे अशी त्यांची कल्पना मागाहून झाली. प्रथमतः त्यांची ईश्वरविषयक कल्पना ईश्वराचें बल नियमित आहे आणि हिब्रू जातीस जें यशापयश आलें तें जातीच्या देवाच्या बलाबलामुळें आलें अशी होती. पुढें त्यांची ईश्वरविषयक कल्पना व्यापक झाली तेव्हां ईश्वर हा केवळ हिब्रूंनां जय मिळवून देणारा नव्हे, तर तो सर्व जगाचा स्वामी व निर्माणकर्ता होय, त्याला सर्व लोकांनीं पुजिलें पाहिजे, व त्याची आज्ञा पाळली पाहिजे असें ईश्वरस्वरूप त्यांनीं जाणिलें.

हिब्रूंतील प्रवक्त्यांनीं जरी ईश्वरस्वरूप अधिक व्यापकपणें उपदेशिलें तरी त्यांच्या उपदेशांतील जातिविशिष्टता नष्ट झाली नव्हती. ईश्वर सर्वांचा स्वामी खरा; परंतु ईश्वरानें हिब्रू लोकांस कांहीं विशिष्ट कार्याकरितां निवडलें आहे आणि ते त्याच्या विशेष प्रेमाचा विषय आहेत अशी कल्पना त्यांनीं आपल्या लोकांत संचरविली. ही कल्पना त्यांनीं आपल्या जातीच्या उत्कर्षार्थ संचरविली असली पाहिजे हें उघड आहे. प्रवक्त्यांच्या उपदेशांत जातिविशिष्टता होतीच व त्यांचा वैध धर्म नष्ट झाला नसून कांहीं अंशीं उत्कर्ष पावला. जेव्हां पारतंत्र्यामुळें लोकांत देशाभिमान प्रज्वलित झाला तेव्हां देश्यसंस्कृतीविषयीं आदरहि वाढला. जित झालेल्या यहुदी लोकांचें एकत्व रक्षिण्यास परंपरागत विधींवर श्रद्धा अवश्य होऊन गेली, आणि यामुळें स्वाभाविकपणेंच भिक्षुकांचें महत्त्व वाढलें. जो या विधिधर्माशीं बेइमान होईल तो जातिबहिष्कृत होईल. मेसाया प्रकट होऊन यहुदी लोकांस मुक्त करणार आहे, तेव्हां सर्वांनीं धर्माचे विधिनियम पाळले पाहिजेत; जो पाळणार नाहीं तो मेसायाचें आगमन लांबणीवर टाकीत आहे अशा प्रकारची भावना यहुदी लोकांत अधिकाधिक बलवान होत गेली. असो.

**येशूचीं मतें.**—प्रवक्त्यांचा उपदेश व जुना वैध धर्म यांचा संबंध बऱ्याच अंशीं आपल्या कडील ज्ञानकांड व कर्मकांड यांतील संबंधासारखाच आहे. आरण्यकांत व उपनिषदांत ज्याप्रमाणें उच्च प्रकारचे विचार दृष्टीस पडतात. त्याप्रमाणें प्रवक्त्यांच्या वाङ्मयांत देखील ते दृष्टीस पडतात. ख्रिस्ती लोकांच्या दृष्टीनें जें कार्य प्रवक्त्यांनीं सुरू केलें तेंच येशूनें पुरें केलें. येशूला भुतें, परलोक, पवित्र ग्रंथ इत्यादि बाबतींत जुन्या कल्पना अमान्य होत्या असें म्हणवत नाहीं. त्याची ईश्वरविषयक कल्पना एखाद्या पंडितास साजेल अशी नसून ती साध्या मनुष्याची होती, व तींतच त्याचें बल होतें. ईश्वराचें सर्वव्यापित्व, नितान्त जगावरील पितृप्रेम, त्याची दया, त्याचें न्यायित्व इत्यादि गोष्टींवर त्याचा भर असे, आणि तो फार गहन व सूक्ष्म वादांत पडतच नसे. त्यानें जुन्या वैधधर्माविषयीं अनादर प्रकट केला नाहीं; तथापि त्याची बुद्धि भावनाप्रधान होती. आणि ती त्यानें जागोजाग व्यक्त केली आहे. येशूच्या उपदेशांत पश्चात्तापाचें महत्त्व मोठें आहे—विधिनियमांचें व ईश्वरविषयक सूक्ष्म विवेचनाचें महत्त्व कमी आहे. जे प्राचीन विधिनियम त्याच्या धार्मिक भावनेच्या विरुद्ध जात असत त्यांचा येशूनें निषेध केला आहे. त्याच्या उपदेशाचें रहस्य 'आत्मवत् सर्वभूतेषु' अशा प्रकारचें आहे. (मार्क १२. २९, ३१). ईश्वराविषयीं प्रेम असें असावें कीं, जेणेंकरून जीव व शिव यांचें ऐक्य होईल असें एके ठिकाणीं म्हटलेलें आहे.

येशूचा गुन्हेगार म्हणून झालेला वध व त्याचें पुनरुत्थान झालें म्हणून झालेली समजूत यांहींकरून त्याचे जे थोडे यहुदी अनुयायी होते त्यांच्यामध्यें एक तऱ्हेचा विश्वास

उत्पन्न झाला; आणि येशूचें जीवितकार्य आणि येशूचें चारित्र त्यांच्या प्रेमाचा आणि विचाराचा विषय झाला. इतके दिवस जो त्यांनां केवळ प्रवक्ता वाटत होता तो त्यांस आतां अवतार (मेसाया) वाटूं लागला. येशूचा शब्द मानावयाचा किंवा नाहीं हा विचार त्यांच्यापुढें नसून येशूला अवतार मानावयाचें किंवा नाहीं हा विचार त्यांच्यापुढें होता; ते येशूस ख्रिस्त म्हणजे अवतार समजूं लागले व आपणांस ख्रिस्ती म्हणवून घेऊं लागले. प्रथमतः येशूचे अनुयायी यहुदीच होते, परंतु पॉलनें ग्रीक देखील आपले अनुयायी बनविले. पॉलच्या पत्रांमध्यें येशूच्या ठायीं ईश्वरत्व स्थापिलें आहे. ईश्वर जगांत मुद्दाम आला—जगांत येऊन त्यानें मुद्दाम लघुत्व अंगीकारिलें-अशी कल्पना पॉल व जॉन यांनीं मांडली. पॉलच्या लेखांमध्यें मेसाया या शब्दाचा मूळ अर्थ नाहींसा होऊन मेसाया हा शब्द केवळ आडनांवासारखा झाला आणि येशू हा ईश्वराचा पुत्र झाला.

असें वारंवार म्हणण्यांत आलें आहे कीं, येशूच्या उपदेशांत नवीन असें कांहींच नव्हतें. येशूच्या उपदेशाशीं सदृश स्थलें आपण पाहूं गेलों तर जुन्या अनेक देशांच्या ग्रंथांतून तीं सांपडतील. तथापि त्या वेळच्या फॅरिसी लोकांनां येशूचा उपदेश नवीन व क्रांतिकारक वाटला यांत शंका नाहीं. ती क्रांतिकारकता उपदेशांत विशेषशी नव्हती. जेव्हां कोणतीहि पद्धति तयार होते तेव्हां ती अनेक कालच्या अनेक लोकांच्या परिश्रमामुळें व अनेक लोकांनीं आपल्या स्वार्थाकरितां केलेल्या अनेक गोष्टींच्या संचयानें तयार होते, व तींत साधेपणा रहात नाहीं. आजच्या ख्रिस्ती संप्रदायाच्या घटनेंत साधेपणा कोठें आहे? जे नियम प्रथम देतांना फार साधे वाटतात, त्यांचा जगांत प्रसार करूं लागलें, प्रसार करण्याकरितां एक वर्ग निर्माण केला, त्यांवर आलेले आघात खंडून काढण्यासाठीं वाङ्मय तयार झालें, शिवाय तत्त्वांचा प्रसार करणारे जे लोक असतील त्यांच्या योगक्षेमासाठीं अनेक खटपटी सुरू झाल्या, म्हणजे बरेंच अवडंबर वाढतें; तें देखील इतकें कीं, त्यांत मुख्य उपदेशाचा विस्मृतिहि होते. अशा प्रसंगीं मुख्य तत्त्वांची आठवण करून देणारा कोणी तरी भेटावा लागतो. तो तसा भेटला म्हणजे पूर्व संस्थांच्या अभिमान्यांस त्या मनुष्याचा उपदेश क्रांतिकारक वाटतो. यज्ञसंस्थेच्या अभिमान्यास औपनिषद विचारांचे प्रवर्तक क्रांतिकारक वाटले असावे, व कदाचित् हिब्रू लोकांसहि त्यांच्या प्रवक्त्यांचे उपदेश क्रांतिकारक वाटले असावे. येशूस जें महत्त्व प्राप्त झालें त्याची कारणपरंपरा अशी देतां येईल कीं, येशूस पॉलनें महत्त्व आणिलें, आणि पॉलच्या मनावर येशूचें महत्त्व अधिक ठसण्यास येशूचा दुःखकारक शेवट कारण झाला असावा. येशूचा असा दुःखकारक शेवट होण्याचें कारण कांहीं अंशीं येशूची निर्भयतेची वृत्ति असावी, व कांहीं अंशीं तो भिक्षुक वर्गांतील नसून सुताराचा मुलगा होता हें कारण असावें.

येशूविषयीं सविस्तर माहिती पुढें शरीरखंडांत येईलच. येथें त्याच्या संप्रदायाच्या इतिहासाची माहिती दिली पाहिजे. ती देण्यासाठीं अगोदर त्या संप्रदायास आधारभूत असलेल्या ''बायबल'' नांवानें प्रसिद्ध असलेल्या वाङ्मयाकडे वळूं.

**बायबल**—बायबल हा शब्द इंग्रजी भाषेंत एकवचनी असला तरी मूळ ग्रीक भाषेंत तो अनेकवचनी आहे, व त्याचा अर्थ 'ख्रिस्ती धर्मसत्तेसंबंधाचे पवित्र ग्रंथ' असा आहे. या मूळ अनेकवचनी शब्दयोजनेवरून बायबल हा एक ग्रंथ नसून तो निरनिराळ्या काळांत लिहिल्या गेलेल्या अनेक ग्रंथांचा समुदाय आहे असें स्पष्ट होतें. या ग्रंथाचे मुख्य दोन विभाग पडतात. एक जुना करार (ओल्ड टेस्टामेंट) व दुसरा नवा करार (न्यू टेस्टामेंट). या दोन्ही विभागांतील विषयवारी थोडक्यांत येथें देतों.

**जुना करार**---जुना करार हा "पवित्र शास्त्रा" चा पहिला विभाग असून त्यांत एकोणचाळीस पुस्तकें (बुक्स) आहेत. यां पैकीं कांहीं पुस्तकें फारच लहान म्हणजे एक, दोन, तीन किंवा चार इतक्याच प्रकरणांचीं आहेत; तर कांहीं पुस्तकांचीं चाळीस, पन्नास किंवा साठ पर्यंत प्रकरणें आहेत. एका स्तोत्रसंहिता (साम्स) नामक पुस्तकाचीं तर दीडशें प्रकरणें असून हा पहिला विभाग बारीक टाइपाच्या व मध्यम आकाराच्या सातमाडेसातशेंवर पानांचा आहे. या इतक्या पुस्तकांचें ग्रंथकर्तृत्व एका इसमाकडे असणें शक्य नाहीं. तीं निरनिराळ्या काळांत निरनिराळ्या व्यक्तींकडून लिहिलीं गेलीं आहेत. तथापि ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांतील एका ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, जुन्या कराराचीं पुस्तकें सर्व जळून गेलीं, तेव्हां एज्रानें पांच लेखकांनां सर्व मजकूर स्वतः तोंडानें सांगून चाळीस दिवसांत जुन्या कराराचीं २४ पुस्तकें (जुन्या यहुदी लोकांच्या गणनेप्रमाणें) आणि इतर ७० पुस्तकें मिळून ९४ पुस्तकें तयार केलीं. अर्थात् ही दंतकथा मुळींच विश्वसनीय नाहीं. तथापि एज्रानेंच जुन्या कराराचीं नष्ट झालेलीं पुस्तकें पुन्हां उपलब्ध करून दिलीं हें मत बरेंच प्रचलित आहे.

**रचना काल.**—यहुदी गणनेप्रमाणें जुन्या करारांतील पुस्तकांचे विषयानुरोधानें तीन वर्ग केलेले आहेत; ते येणें प्रमाणें:

१ धर्मशास्त्रविषयक (पांच पुस्तकें);

२ प्रवक्त्यांविषयीं (आठ पुस्तकें);

३ स्तोत्रें, नीतिसूत्रें, उपदेशक, गीतें, विलाप, इत्यादि (अकरा पुस्तकें).

हे तीन प्रकार मिळून जीं २४ पुस्तकें होतीं तींच पुढें वाढवून ३९ पुस्तकें करण्यांत आलीं.[१] हिब्रू बायबलचें ग्रीकमध्यें भाषांतर करण्यांत आलें तेव्हां या पुस्तकांचा अनुक्रमहि बदलण्यांत आला. जुन्या करारामधील पुस्तकांचे वर सांगितलेले तीन वर्ग ऐतिहासिक दृष्ट्याहि साधार आहेत. कारण, त्यांपैकीं धर्मशास्त्रविषयक पुस्तकें

प्रथम मान्य झालीं, नंतर प्रवक्तृविषयक पुस्तकें मान्य झालीं व शेवटीं स्तोत्रें, नीतिसूत्रें इत्यादि विषयांचीं पुस्तकें मान्य झालीं. अंतर्गत पुराव्यावरून धर्मशास्त्रविषयक पुस्तकें ख्रि. पू. ४४४ च्या सुमारास पूर्ण तयार होऊन मान्य झालीं असावींत, प्रवक्तृविषयक पुस्तकें ख्रि. पू. २५० च्या सुमारास पुरीं तयार झालीं असावींत आणि बाकीचीं (हेजिओग्राफा) ख्रि. पू. १५० व १०० यांच्या दरम्यान तयार झालीं असावींत, असें दिसतें.

कालनिर्णयानंतर लेखकनिर्णयासंबंधानें पाहतां, हीं सर्व पुस्तकें एका व्यक्तीनें तर अर्थात् लिहिलेलीं नाहींतच; पण त्यांपैकीं बहुतेक मोठालीं पुस्तकें व कित्येक लहान पुस्तकें सुद्धां प्रत्येकीं एकएका इसमानें लिहिलेलीं नसून अनेकांनीं निरनिराळ्या काळांत भर घालून एकएक पुस्तक पुरें केलें आहे असें स्पष्ट दिसतें.

इतर राष्ट्रांप्रमाणें हिब्रू राष्ट्रांतहि वाङ्मयाला मूळ आरंभ पद्यमय ग्रंथांपासून झाला असला पाहिजे. निर्गम (एक्झोडस १५) या पुस्तकांतील मोझेसच्या गीताचा मजकूर, न्यायाधीश (जजेस ५) या पुस्तकांतील डेबोराचें गीत, गणना (नंबर्स २१. २५-३०) या पुस्तकांतील इस्राएलाइटांचा विजय वर्णन करणारा युद्धविषयक पोवाडा, वगैरे भागांवरून इस्राएलाइट लोकांतील वीरांच्या पराक्रमांनीं व राष्ट्रीय गोष्टींनीं कवींनां काव्यें करण्यास कशी स्फूर्ति होत असे तें स्पष्ट दिसतें.

जुन्या करारामध्यें ऐतिहासिक गोष्टींविषयीं माहिती देणारीं जीं पुस्तकें आहेत त्यांचे दोन पोटवर्ग पडतातः पहिल्या पोटवर्गांत 'उत्पत्ती' पासून (जेनिसिस) 'राजे' (किंग्ज) पर्यंतच्या पुस्तकांचा समावेश होतो ('रुथ' हें पुस्तक वगळावयाचें, कारण ते तिसऱ्या हेजिओग्राफा या वर्गांतलि आहे). या पुस्तकांत सृष्टयुत्पत्तीपासून खाल्डी लोकांनीं ख्रि. पू. ५८६ मध्यें यरुशलेमचा नाश केला तेथपर्यंतची हकीकत आहे;

**मनुष्योत्पत्ति जलप्रलय व भाषावैचित्र्य-अब्राहामकाल.**—उत्पत्ति पुस्तकांतील पहिल्या बारा अध्यायांत अब्राहामच्या कालापर्यंतचा इतिहास दिला आहे तो येणेंप्रमाणें'उत्पत्ति' पुस्तकांत सहा दिवसांत ईश्वरानें सृष्टीची उत्पत्ति कशी केली या संबंधानें कथा आहे (अ. १); सातव्या दिवशीं ईश्वरानें विश्रांति घेतली (२. २); आदाम म्हणजे प्रथम पुरुषाची उत्पत्ति; त्यास बागेंतील एक खेरीज सर्व फळें खाण्यास अनुज्ञा (१७); प्रथम पुरुषाच्या बरगडींतून प्रथम स्त्रीची उत्पत्ति (२२); साप हाच सैतान व तो त्या निषिद्ध झाडाचें फळ स्त्रीपुरुषांकडून खाववितो; त्यामुळें त्यांस बरें वाईट कळूं लागलें. परमेश्वरानें या आज्ञाभंगाबद्दल आदाम, स्त्री व साप या सर्वांस शाप दिला (अ. ३). आदामच्या मुलांची हकीगत (अ. ४. ५). ईश्वराचे मुलगे आणि मानवांच्या मुली यांपासून प्राचीन मोठ्या लोकांची उत्पत्ति (अ. ६). मनुष्यांच्या दुष्टत्वामुळें त्यांस व इतर पशुपक्ष्यांस नाहींसे करण्याची ईश्वरास इच्छा होते. परंतु नोहावर मात्र परमेश्वर कृपादृष्टि करतो. जलप्रलय. नोहा परमेश्वरसूचनेनें मोठें तारूं करतो व आपले आप्त व प्रत्येक जातीच्या प्राण्याची नरमादी यांस तारवांत घेतो व वांचवितो (अ. ७-८). प्रजावृद्धीसाठीं ईश्वर नोहाच्या संततीस आज्ञापितो (अ. ९). नोहाचे पुत्र शेम, हाम व याफेथ यांचा वंशविस्तार (१०). माणसें आकाशापर्यंत जाईल असा मोठा व उंच बुरूज बांधण्याची तयारी करतात. तें ईश्वराला नापसंत होतें. म्हणून ईश्वर लोकांत अनेक भाषा उत्पन्न करून त्यांस पुढें काम चालू ठेवण्यास असमर्थ करतो (अ. ११). शेमच्या वंशांत अब्राम उत्पन्न होतो (११. २७). अब्राम ईश्वरप्रेरणेनें देशत्याग करतो आणि मिसरला पोंचतो, आपली बायको बहीण आहे असें सांगून राजास देतो व त्याबद्दल देणग्या मिळवितो. न कळत परस्त्रीगमनाबद्दल फारोस ईश्वर दपटशा देतो व फारो अब्रामास स्वदेशीं रवाना करतो (अ. १२) अब्रामास अब्राहाम हें नांव पुढें प्राप्त होतें.

दुसऱ्या पोटवर्गांत 'कालवृत्तांत' (क्रॉनिकल्स) पासून नेहम्यापर्यंतचीं पुस्तकें येतात व त्यांत आदामापासून नहेम्यानें यरुशलेमला ख्रि. पू. ४३२ मध्यें दुसरी भेट दिली तेथपर्यंतची माहिती आहे. या दोन्ही पोटवर्गांतील पुस्तकांत एक मोठें साम्य आहे तें हें कीं, त्यांपैकीं कोणतेंहि पुस्तक मूळ अथपासून इतिपर्यंत एकठ्यानें लिहिलेलें नाहीं, तर प्रत्येक पुस्तक अनेक जुने लेख एका इसमानें किंवा अनेक इसमांनीं अनेक निरनिराळ्या वेळीं एकत्र केल्यानें तयार झालेलें आहे. ही जुळणी अशी झाली आहे कीं, मधले सांधे स्पष्टपणें लक्षांत येतात एक एक पुस्तक निरनिराळ्या काळांतील लेखकांनीं आपआपल्या इच्छेप्रमाणें पूर्वकालीन लिखाणांपैकीं निरनिराळा मजकूर घालून व स्वतः कांहीं कांहीं मजकूर लिहून बनविलें आहे. त्यामुळें एकाच पुस्तकांत अनेक लेखनतऱ्हा आढळतात. पूर्वकालीन लिखाणांतून घेतलेले उतारे कांहीं ठिकाणीं लांबलचक व साग्र आहेत, तर कांहीं ठिकाणीं लहानलहान आहेत.

**पहिलीं सहा पुस्तकें.**— (उत्पत्ति-यहोशवा) इस्राएलाइट लोकांमध्यें स्वतःच्या राष्ट्राच्या उत्पत्तीबद्दल व आद्य इतिहासाबद्दल ज्या दंतकथा प्रचलित होत्या त्या ख्रि. पू. १० व्या किंवा ९ व्या शतकाच्या सुमारास ज्यूडा येथील एका प्रवक्त्यानें लिहून काढल्या. हा प्रवक्ता 'जे' या संक्षिप्त नांवानें संशोधकांत प्रसिद्ध आहे. या लेखकाची लेखनपद्धति फार ओजस्वी व धार्मिक भावनांनीं भरलेली आहे. या लेखकानें मूळ मनुष्यप्राणि मातीपासून देवानें कसा उत्पन्न केला, नंतर मनुष्यप्राण्यानें पहिलें पापाचरण कोणतें केलें व त्याचे काय परिणाम झाले, याची हकीकत दिली आहे (जेनिसिस २. ४-३. २४); पुढें आद्य मनुष्यजातीची कैसकशी सुधारणा होत गेली (जेनिसिस ४.), जलप्रलय कसा झाला (जेनिसिस

६-८), आणि निरनिराळ्या भाषा कशा झाला हें सांगून नंतर मोझेस, निगम (एक्झोडस), व निर्जन मुलखांतला प्रवास यांची हकीकत व कॅनान जिंकून घेतल्याची हकीकत दिली आहे.

'जे' या लेखकानंतर दुसऱ्या 'ई' या संक्षिप्त नांवानें ज्ञात असलेल्या लेखकानें उत्तरेकडील इस्राएल लोकांसंबंधाची आणखी कांहीं दंतकथात्मक माहिती लिहून काढली. या 'ई'नें लिहिलेला मजकूर जेनिसिस १५, २०. १-१७, २१. ८-३२, २२. १-१४, ४०-४२ व ४५; एक्झोडस १८, २०-२३ वगैरे पुस्तकांत पहावयास सांपडतो.

खि. पू. ७२२ मध्यें उत्तरेकडील राज्य नष्ट झाल्यानंतर लवकरच ज्यूडा येथील एका प्रवक्त्याच्या मनांत आपल्या लोकांविषयींचा सविस्तर इतिहास लिहिण्याची कल्पना उद्भवली. याकरितां त्यानें 'जे' व 'ई' या दोघांहि लेखकांच्या लेखांतील उतारे घेऊन एक सुसंगत इतिहास बनविला. हा संयुक्त इतिहासग्रंथ 'जे-ई' या नांवानें अभ्यासकांत प्रसिद्ध आहे. या लेखकाची भाषा पद्धतीहि चांगली जोरदार व धार्मिकभावनायुक्त अशी आहे. देव अंगांत संचरून बोलणाऱ्या प्रवक्त्याला साजेल असाच हा ग्रंथ आहे.

**अनुवाद (डयूटरॉनोमि).**—खि. पू. ७ व्या शतकांत मनासेह किंवा जोशाया या राजाच्या कारकीर्दीत 'जे-ई'नें लिहिलेली हकीकत 'अनुवाद' नामक भाग जोडून वाढविण्यांत आली. हे 'अनुवाद' म्हणजे मोझेसनें मरणापूर्वी मोआब येथें जमलेल्या लोकांस उद्देशून केलेलीं भाषणें होत. मोझेसनें अखेर निरोप म्हणून एक भाषण केल्याची दंतकथा होती, तिच्याच आधारावर मागाहून सदरहू 'अनुवाद' एका लेखकानें लिहून तयार केले. याह्वेह हा एकच देव इस्राएलाईट लोकांनां पूज्य असे व याच मताचा जोरानें पुरस्कार या अनुवादांत केलेला आहे. ईश्वरप्रीति हाच मानवी कर्तव्यांचा मुख्य झरा आहे, वगैरे अनेक सत्य सिद्धान्त या लेखकानें पुढें मांडले आहेत. धर्मशास्त्रविषयक नियम व त्यांनां आधारभूत असलेले नैतिक व धार्मिक हेतू यांचें विवेचन त्यानें केलें आहे. ईश्वराविषयीं प्रेम व पूज्य भाव असणें आणि आपल्या मानवबंधूंबद्दल सहानुभूति व कळकळ असणें हें ध्येय 'अनुवादांत' प्रतिपादिलें आहे.

'अनुवाद' या पुस्तकाचा जुन्या करारामधील पुढील पुस्तकांवर फार परिणाम झाला; कारण 'अनुवाद' या पुस्तकांत तत्कालीन धार्मिक ध्येय व्यवस्थित भाषेंत पुढें मांडण्यांत आलें.

पहिल्या सहा पुस्तकांत आतांपर्यंत सांगितलेल्या गोष्टींखेरीज आणखी एक विषय आहे. हा विषय म्हणजे लोकांनीं करावयाच्या धार्मिक विधींसंबंधाचा उर्फ भिक्षुकांच्या कार्यासंबंधाचा होय. खि. पू. ५८६ मध्यें 'देवालय' नष्ट झाल्यानंतर भिक्षुकांनीं यज्ञ, शुद्धिकर्म वगैरे अनेक धर्मविधी प्राचीन काळीं कसे करण्यांत येत असत तें लिहून काढलें. हें लिखाण 'पी' या संक्षिप्त नांवानें प्रसिद्ध आहे. यांत इस्राएल लोकांच्या देवालयांत पूर्वकालीं पूजा अर्चा व इतर धार्मिक विधी कसे होत असत त्यांचें वर्णन आहे. त्यांत वस्तुस्थितिदर्शक माहितीबरोबर भिक्षुकीदृष्टीला आवडणाऱ्या ध्येयात्मक गोष्टीहि आलेल्या आहेत. 'पी' च्या लेखनाचा नमुना जेनिसिस १. १—२. ४, १७; एक्झोडस ६. २—७. १३; लेव्हिटिकस (सर्व पुस्तक); नंबर्स १. १—१०. २८ इत्यादि ठिकाणीं पाहावयास सांपडतो.

'पी' लिखाण तयार झाल्यानंतर लवकरच म्हणजे बहुधा ५ व्या शतकांत पूर्वींचे सर्व भाग एकत्र करून हल्लींच्या स्वरूपांतलीं पहिलीं सहा पुस्तकें पूर्ण तयार झालीं.

**न्यायाधीश, शमुवेल व राजे.**—पहिल्या सहा पुस्तकांपेक्षां या पुस्तकांची रचना अधिक सोपी आहे. न्यायाधिशांसंबंधाचें पुस्तक जुन्या कथा घेऊन व त्यांनां प्रास्ताविक व उपसंहारात्मक मजकूर जोडून तयार केलेलें आहे. शमुवेल या पुस्तकांत शमुवेल, साउल आणि दावीद या तीन व्यक्तींसंबंधाची माहिती मुख्यतः आहे. 'राजे' या पुस्तकाची रचना 'न्यायाधीश' या पुस्तकाच्या रचनेसारखीच आहे. या दोन्ही पुस्तकांच्या लेखकावर 'अनुवाद' या पुस्तकाचा फार परिणाम झाला असल्याचें स्पष्ट दिसतें. यांतील बहुतेक भाग हद्दपारी (एक्झाइल) च्या पूर्वी लिहिलेला आहे.

**नंतरचे प्रवक्ते.**— प्रवक्त्यांचें लिखाण हा जुन्या कराराचा एक महत्त्वाचा भाग आहे. यांत यशाया, यिर्मया, यहेज्केल व दुय्यम दर्जाचे बारा प्रवक्ते यांचा समावेश होतो. आमोस व होशेय यांच्यापासून पुढें ज्यांच्या नांवांची मालिका आहे त्यांचीं पुस्तकें तीन शतकें पुरीं होईपर्यंत पूर्ण तयार झालीं नव्हतीं. प्रवक्त्यांच्या चळवळीला मुख्य कारण राष्ट्रीय इतिहासांतील आणीबाणीचे प्रसंगच होत. हे प्रवक्ते अंशतः नैतिक सुधारणावादी, अंशतः धार्मिक उपदेशक आणि अंशतः राजकीय सल्लागार असत. त्यांनीं एका भ्रष्ट लोकसमाजाला मानवीं कर्तव्यें, धार्मिक सत्य आणि राष्ट्रीय धोरण या संबंधाचीं ध्येयें शिकविलीं. पूर्वपरंपरागत सत्येंच त्यांनीं नवीन राष्ट्रीय परिस्थितीला लागू पडतील अशा स्वरूपांत लोकांपुढें मांडलीं. ईश्वराचें स्वरूप व त्याचे गुण; ईश्वराची मनुष्यासंबंधाची दयाळू दृष्टि; ईश्वर आणि मनुष्य यांचा परस्पर संबंध; धार्मिक सेवेचें खरें स्वरूप; ईश्वरी कृपा होण्याकरितां पश्चात्तापाची आवश्यकता; मनुष्याचीं निरनिराळ्या प्रकारचीं कर्तव्यें; दया, न्याय प्रामाणिकपणा आणि औदार्य या गुणानुसार करावें लागणारें वर्तन; गरीब दुबळ्यांच्या छळाबद्दल वाटणारा क्रोध; आणि भावी सत्ययुगांतील उच्च ध्येयें; इत्यादि गोष्टींचें विवेचन प्रवक्त्याबद्दलच्या लिखाणांत सांपडतें.

**यशाया**—यशाया या पुस्तकाचे दोन भाग स्पष्टपणें दिसतात. पहिला प्रकरणें १ते३९व दुसरा४०ते६६. प्रकरण ४०

ते ६६ हा भाग यशयाचा नाहीं. तो ५४०च्या सुमारास बाबिलोन सायरसनें जिंकून घेण्याच्या पूर्वी थोडा काळ एका प्रवक्त्यानें लिहिलेला आहे. तो लिहिण्याचा उद्देश इस्रालाइट लोकांनां हद्दपारीच्या स्थितींत उत्तेजन देणें व केनन पुन्हां हस्तगत होईल अशाबद्दल आश्वासन देणें हा होता. हें पुस्तक यहुदी लोक ५३७मध्यें हद्दपारींतून परत आल्यानंतर कांहीं काळानें लिहिलें गेलें असावें हें स्पष्ट दिसतें.

**यिर्मया**—यिर्मया हा प्रथम प्रवक्ता म्हणून जाहीररीत्या यशयाच्या तेराव्या वर्षी म्हणजे ख्रि० पू० ६२६मध्यें पुढें आला, आणि त्यानें आपलें शेवटलें भविष्यकथन ५८६मध्यें यरुशलेम् पडल्यानंतर लवकरच केलें. यिर्मया आपल्या देशबांधवांनीं काय पाप केलें होतें तें पूर्ण जाणून होता, आणि भविष्यकथन करण्यांत त्याचा मुख्य हेतु आपल्या देशबांधवांनां सुमार्गावर आणावें व त्यांच्यावर ओढवणारें अरिष्ट टाळावें हा होता. यिर्मया हा मोठा दयाळू आणि कोमल अंतःकरणाचा होता. या पुस्तकांतील बराचसा भाग चरित्रात्मक आहे. बाबिलोन पतन पावणार या संबंधाचें जें भविष्य आहे तें मात्र यिर्मयाचें नाहीं.

**यहेज्केल**—यहेज्केल हा ख्रि० पू० ५९७ मध्यें बाबिलोनियाला नेलेल्या कैद्यांपैकीं एक होता, व तो हद्दपार केलेल्या इतर पुष्कळ लोकांबरोबर टेल-एबिब नांवाच्या गांवीं राहिला होता. त्याचीं भविष्यकथनें ख्रि० पू०५९२-५७० यांच्या दरम्यान केलेलीं आहेत. या पुस्तकांतील पहिल्या२४ प्रकरणांचा विषय यरुशलेमचें निकटागामी पतन हा आहे. ही पतनाची गोष्ट ५८६ मध्यें घडली. हें पुस्तक अथपासून इतिपर्यंत एकाच माणसानें व तेंहि खुद्द यिर्मया या प्रवक्त्यानें लिहिलेलें आहे

**इतर बारा प्रवक्ते**.—हे बारा प्रवक्ते मिळून एकच पुस्तक यहुदी लोक मानीत असत. या बारा प्रवक्त्यांपैकीं पहिले दोन आमोस व होशेय यांनीं अनुक्रमें ख्रि. पू. ७६० व ७४० या सुमारास उत्तरेकडील राज्यांत भविष्यकथन केलें. त्या दोघांनांहि उत्तरेकडील इस्राएल लोकांचा असुर लोकांकडून व्हावयाचा भावी नाश स्पष्ट कळून चुकला होता. त्या दोघांनींहि आपल्या देशबांधवांनां चांगल्या मार्गाला लावण्याचा बराच प्रयत्न केला. या दुय्यम प्रवक्त्यांपैकीं इतरांचा काळ ( कांहींचा अजमासें काळ ) पुढीलप्रमाणें आहे: मीखा, अजमासें ख्रि. पू. ७२५-६८० ; सफन्या, अजमासें ६२५; नहूम ६०७ पूर्वी; हबक्कूक, ६०५-६००; ओबद्या, ५८६ मध्यें यरुशलेमचा खाल्डी लोकांनीं नाश केल्यानंतर; हग्गै, ५२०; जखर्‍या, १-८. ५२० व ५१८; मलाखी, अजमासें ४६०-४५०; योएल, ख्रि. पू. ५ व्या शतकांत; व योना ख्रि. पू. ४ थें शतक.

**स्तोत्रें**.—जुन्या कराराच्या या भागांत धर्मश्रद्धेच्या भावनांनीं थबथबलेले उद्गार बाहेर पडलेले आहेत. ईश्वरभक्तांनीं प्रेमभरित अन्तःकरणानें रचलेलीं हीं स्तोत्रें फारच सुंदर आहेत, व त्यांत निराशा व दुःख, पश्चात्ताप व विरक्ति, आशा व विश्वास, आनंद व कृतज्ञता, भक्ति व स्तुति, वगैरे अनेक भावना व्यक्त झालेल्या आहेत. हीं स्तोत्रें अर्थातच एका व्यक्तीची कृति नसून, अनेकांनीं भर घातल्यानें त्यांचा मोठा संग्रह जमला आहे. मासल्याकारतां कांहीं स्तोत्रें पुढें दिलीं आहेत.

**नीतिसूत्रें**.—हिब्रू लोकांच्या 'बोधपर वाङ्मय' म्हणून प्रसिद्ध असलेल्या तीन पुस्तकांपैकीं हें एक आहे; व बाकीचीं दोन ईयोब ( जॉब ) व उपदेशक हीं होत. या पुस्तकांत सर्वत्र मनुष्यस्वभावासंबंधाचें तत्त्वज्ञान व कोठें कोठें भौतिक सृष्टिविषयक तत्त्वज्ञान आहे. या पुस्तकांच्या लेखकांनीं मनुष्यस्वभाव बारकाईनें निरीक्षण करून नैतिक, बोधपर अशीं पुष्कळशीं सूत्रें सांगितलीं आहेत. त्यांचें स्वरूप पुढील उताऱ्यावरून अवगत होईल. तीं अर्थात् अनेकांनीं अनेक वेळीं भर घालून संगृहीत केलेलीं आहेत. हें नीतिसूत्रांचें पुस्तक ख्रि. पू.४थ्या शतकानंतर संपूर्ण स्वरूपांत तयार झालें.

**ईयोब**.—या पुस्तकांत मानवी जीविताच्या प्रश्नासंबंधाचा विचार केला आहे. आधुनिक भाषेंत बोलावयाचें म्हणजे धर्मविषयक तत्त्वज्ञानाचें हें पुस्तक आहे. ईयोब हा मोठा सच्छील मनुष्य होता; पण त्याच्यावर दुर्दैवानें अनेक घाले पडले. तेव्हां अर्थातच प्रश्न असा उद्भवला कीं, सदाचरणी मनुष्यावर दुःखें कां कोसळतात? चांगल्या मनुष्याला भोगावे लागणारे हे हाल ईश्वराच्या न्यायीपणाशीं विसंगत नाहींत काय? ईयोबच्या काळांत अशी उपपत्ति प्रचलित होती कीं, मनुष्याला जें दुःख भोगावें लागतें तें पापकर्माबद्दल शिक्षा म्हणून भोगावें लागतें. ही उपपत्ति खोडून काढण्याकरितां सदरहू पुस्तक लिहिलें आहे. ईयोबच्या मित्रांचें असें म्हणणें पडलें कीं, ईयोबच्या हातून कांहीं तरी मोठालीं पापकर्में घडलीं असलीं पाहिजेत. परंतु ईयोबनें स्वतः पूर्ण निष्पाप असल्याबद्दल प्रतिपादन केलें. अशा या मुद्दयावर हें सर्व पुस्तक रचलेलें आहे. ईयोबच्या या गोष्टीला प्राचीन दंतकथेचा आधार निःसंशय होता. हें पुस्तक हद्दपारीहून परत येण्यापूर्वी बहुधा तयार झालें नव्हतें.

हिब्रू बायबलांत या पुस्तकानंतर पुढें पांच लहान पुस्तकें आहेत. तीं गीतरत्न, रूथ, विलापपंचक, उपदेशक आणि एस्तेर हीं होत. यांपैकीं पहिलें शलोमोनाचें 'गीतांचें गीत' या पुस्तकांतील काव्य फारच उत्कृष्ट आहे. शुद्ध निर्व्याज मानवी प्रेमाची गोडी आणि सामर्थ्य यांची स्तुति त्यांत केली आहे. हें ख्रि. पू. ४ थ्या किंवा ३ ऱ्या शतकापूर्वी तयार झालें नसलें पाहिजे असें अलीकडील विद्वानांचें मत आहे. त्यांतील उतारे पुढें येतीलच. रूथ या सुंदर काव्यमय पुस्तकांत रूथ ही इस्राएल लोकांचा शत्रुदेश मोआब, येथील रहिवाशी असून तिनें इस्राएल धर्म कसा स्वीकारला आणि दावीद याची पूर्वज होण्यास ती योग्य कशी मानली गेली याबद्दलची हकीकत आहे. रूथ या पुस्तकाच्या काळा

बद्दलहि मतभेद आहे, पण तें ५ व्या शतकांतलें आहे असें अलीकडील विद्वानांचें मत ठरलें आहे. विलापपंचक हें पुस्तक यरुशलेम पडल्यानंतर तयार झालें असून त्यांत पांच शोकपर गीतें आहेत. यरुशलेम पतन पावल्यामुळें तेथील लोकांचे काय हाल झाले याचें वर्णन त्यांत आहे. हीं गीतें ख्रि. पू. ५८६ नंतर लवकरच तयार झालीं असलीं पाहिजेत. उपदेशक म्हणजे बोधपर वाङ्मयांतलें तिसरें पुस्तक; यांत अनेक नीतिपर वचनें आहेत. तीं कर्त्यावर आयुष्यांत दुःखकारक प्रसंग गुदरल्यामुळें मनाला स्फूर्ति होऊन त्यानें केलीं आहेत. सर्व मानवी प्रयत्नांचें फळ केवळ निराशा हें असतें, आणि समाजाकडून होणारें अन्याय्य वर्तन आणि चुका दुरुस्त करण्यास कोणीहि इसम व्यक्तिशः असमर्थ असतो, इत्यादि मतें त्यांत प्रतिपादिलेलीं आहेत. केवळ भाषेच्या दृष्टीनें पाहतां उपदेशक हें पुस्तक हिब्रू धर्मग्रंथांतल्या अगदीं अलीकडील पुस्तकांपैकीं असलें पाहिजे. हें बहुधा ग्रीक कालविभागांत ख्रि. पू. ३ ऱ्या शतकाच्या अखेरीच्या सुमारास लिहिलें गेलें असावें. एस्तेर ह्या पुस्तकांत यहुदी लोकांचा नाश करण्याचा हेमैननें जो बेत केला होता त्यांतून यहुदी लोकांनां त्या रूपसंपन्न यहुदिणीनें कसें वांचविलें याचें वर्णन आहे. हें पुस्तक ख्रि. पू. ४ थ्या शतकांतलें असावें.

**दानीएलचें पुस्तक.**—या पुस्तकाचा उद्देश पवित्र यहुदी लोकांनां, ख्रि. पू. १६८–१६५ मध्यें अँटायोकस इपिफानीझ याच्याकडून त्यांचा छळ चालू असतां त्याला धैर्यानें कसें तोंड द्यावें याबद्दल उपदेश करण्याचा आहे. १ ते ६ प्रकरणांत ख्रि. पू. ६०५ व ५३८ यांच्या दरम्यान बाबिलोनियाच्या दरबारीं दानीएलला जो अनुभव आला त्यासंबंधींचें वर्णन तत्कालीं प्रचलित असलेल्या दन्तकथेच्या आधारें केलें आहे. परमेश्वर आपल्या श्रद्धावान भक्तांनां संकटामध्यें ऐन वेळीं येऊन कशी मदत करतो तें सोदाहरण सांगण्याकरितां हें पुस्तक लिहिलेलें आहे. ७ ते १२ प्रकरणांत अलेक्झांडर दि ग्रेट पासून अँटायोकस इपिफानीझ याच्यापर्यंतच्या राजांची हकीकत दिली असून त्यांत विशेषतः अँटायोकसनें यहुदी लोकांना छळ कसा प्रकारें चालविला होता, याचें वर्णन आहे. हें पुस्तक दानीएलनें स्वतः लिहिलेलें नाहीं ही गोष्ट अंतर्गत पुराव्यावरून स्पष्ट दिसते. हें पुस्तक ख्रि. पू. १६८—१६५ च्या सुमारास झालें असावें.

**कालवृत्तान्त, एज्रा व नहेम्या.**-हीं पुस्तकें ही ऐतिहासिक पुस्तकांपैकीं दुसरी मालिका होय. एज्रा व नहेम्या यांत कालवृत्तांत या पुस्तकांतील हकीकतीच्या पुढील हकीकत दिलेली आहे. १ कालवृत्तांत १–९ यांत यहुदी जातींतील प्रसिद्ध घराण्यांतल्या पुरुषांची हकीकत दिलेली आहे. १ कालवृत्तांत १०–२ कालवृत्तान्त ३६ यामध्यें शमुवेल व राजे या पुस्तकांतीलचे उतारे दिलेले आहेत, व त्यांबरोबर लेखकानें स्वतःचा मजकूरहि घातला आहे. एज्रा व नहेम्या हीं पुस्तकें याच प्रकारानें तयार केलेलीं आहेत. ग्रंथकर्त्यानें स्वतः लिहिलेल्या मजकुरामुळें ग्रंथकर्त्याच्या काळांतील परिस्थितीची कल्पना नीट करतां येते. ग्रंथकर्त्याच्या लेखनाचा नमुना १ कालवृत्तान्त १२. १–२४, १६. ४–४२, २२. २–९; २ कालवृत्तान्त १३. ३–२२, १४. ६–१५. १५, १६. ७—१४ इत्यादि ठिकाणीं पहावयास सांपडतो. नहेम्याचें पुस्तक त्यांतील ऐतिहासिक उल्लेखांवरून ख्रि. पू. ३०० च्या सुमारास झालें असावें असें दिसतें.

आतां प्राचीन यहुदी लोकांच्या वाङ्मयांतील कांहीं उतारे देऊन त्या वाङ्मयाचें स्वरूप स्पष्ट करतों. यहुदी लोकांचें प्राचीन वाङ्मय राष्ट्रीय वाङ्मय या नांवास जगांतील दुसऱ्या कोणत्याहि प्राचीन वाङ्मयापेक्षां अधिक पात्र आहे. या जातीस दैवाच्या अनेक फेऱ्यांतून परिवर्तन करावें लागलें, आणि त्या परिवर्तनांतील अनेक प्रसंगांचें सूचक किंवा साक्षीदार म्हणून त्यांचें वाङ्मय शिल्लक आहे. त्यांची अशी समजूत होती कीं त्यांच्यावर जे बरे वाईट प्रसंग आले त्यांचें कारण त्यांचें चांगल्या वर्तणुकीस सोडून असलेलें वर्तन होय. त्यांचा आचार कसा असावा, तर मोश्याला परमेश्वरानें जसा सांगितला असेल तसा. परमेश्वरानें मोश्याला काय सांगितलें तें लेवीय म्हणून प्रसिद्ध असलेल्या प्रकरणांत घातलें आहे.

"परमेश्वरानें मोश्याला सांगितलें कीं, ज्या कशाला खोड आहे तें अर्पूं नका. कारण तें तुमच्यासाठीं मान्य होणार नाहीं. आणि कोणी नवस फेडण्यासाठीं किंवा खुशीनें दान करण्यासाठीं गुरांतला किंवा मेंढरांतला शांत्यर्पणाचा यज्ञपशु परमेश्वराला अर्पितो तर तो मान्य होण्यास निर्दोष असावा; त्याला कांहीं खोड नसावी." (२२. २० व पुढें). हा नियम भारतीय श्रौतविधींतील यज्ञिय पशूच्या वर्णनाची आठवण भारतीयांस करून देईल.

लेवीय प्रकरणांत इस्राएल लोकांनीं कोणते सण, उत्सव वगैरे पाळावेत, याविषयीं नियम दिले आहेत. त्यांतच पुढें कांहीं नैतिक नियम आहेत. त्या नियमांचा ख्रिस्ताच्या उपदेशाशीं विरोध दाखवून ख्रिस्ताचा उपदेश उच्च तऱ्हेचा अशी मांडणी आजचे ख्रिस्ती करतात. यासाठीं तो प्रसिद्ध उल्लेख अवतरणार्ह आहे.

"ज्याचा बाप मिसरी होता असा इस्राएली स्त्रीचा पुत्र इस्राएलाच्या संतानांमध्यें बाहेर गेला, आणि त्या इस्राएलीचा पुत्र व एक इस्राएली माणूस छावणींत भांडूं लागले. तेव्हां इस्राएली स्त्रीच्या पुत्रानें परमेश्वराच्या नामाची निंदा करून शिवी दिली, मग त्यांनीं त्याला मोश्याकडे आणिलें; त्याच्या आईचें नांव तर शलोमीथ, ती दानाच्या वंशांतला दिब्री याची कन्या होती. आणि परमेश्वराचा ठराव त्यांस कळावा म्हणून त्यांनीं त्याला बंदांत ठेविलें.

"मग परमेश्वरानें मोश्याला सांगितलें कीं, ज्यानें शिवी दिली त्याला छावणीच्या बाहेर नेऊन आ, आणि सर्व ऐक-

णाऱ्यांनीं आपले हात त्याच्या डोक्यावर ठेवावे, मग सर्व समुदायानें त्याला धोंडमार करावा. आणि इस्राएलाच्या संतानांस असें सांग कीं, जर कोणी माणूस आपल्या देवाला शिवी देईल तर त्यानें आपला पापाचा भार सोसावा. ह्मणजे जो परमेश्वराच्या नामाची निंदा करतो त्याला जिवें मारावें; सर्व समुदायानें त्याला धोंडमार करावा, जसा देशस्थ तसा विदेशी जो कोणी त्या नामाची निंदा करितो त्याला जिवें मारावें. आणि मनुष्य कोणत्याहि मनुष्याला जिवें मारील तर त्याला जिवें मारावेंच. आणि पशूला जो जिवें मारील त्यानें पशूबद्दल पशु देऊन फेड करावी. आणि कोणी आपल्या शेजाऱ्याला अपकार करील तर जसें त्यानें केलें तसें त्याला करावें. मोडण्याबद्दल मोडणें, डोळ्याबद्दल डोळा, दांताबद्दल दांत. कोणी माणसाला अपकार करील तसा त्याला करावा. आणि पशूला जो मारील त्यानें त्याची फेड करावी, आणि जो मनुष्याला मारील त्याला जिवें मारावेंच. तुम्हांस एक न्याय असावा. जसा देशस्थ तसा विदेशी असावा, कां कीं, मी परमेश्वर तुमचा देव आहें. मग मोशानें इस्राएलाच्या संतानांस सांगितलें, तेव्हां त्यांनीं शिवी देणाऱ्याला छावणीच्या बाहेर काढून धोंड्यांनीं त्याला मारिलें; मोशाला आज्ञा दिली त्याप्रमाणें इस्राएलाच्या संतानांनीं केलें." (लेवीय, अ. २४ १०–२३ ).

वरील उताऱ्यावरून यहुद्यांची आपल्या देवावरील श्रद्धा व्यक्त होते. त्या वेळेच्या यहुदी लोकांस एकेश्वरवादी असें म्हणतां येत नाहीं. कांकीं आपले देव व दुसऱ्याचे देव हा भाव त्यांच्यांत होता. आपला देव खरा, आपली उपासनापद्धति खरी अशी भावना त्यांच्यांत असून त्याविषयीं लोकांच्या मनांत श्रद्धा कायम असावी याबद्दल त्यांची खटपट असे.

सामान्य मनुष्य देवाच्या निवडणुकींच्या बाबतींत बराच निःपक्षपाती असतो. जो नवसाला पावेल तो देव खरा, आणि तोच पूज्य, अशी भावना सर्व ठिकाणीं दृष्टीस पडते. ग्रीक लोकांस आपले देव मान्य होते व अन्य स्थलांतील देवताहि मान्य होत्या. ग्रीक जेथें जात तेथें ते स्थानिक देवतेची पूजा करीत.

या प्रवृत्तीला ग्रीक अधिकाऱ्यांनीं उत्तेजनच दिलें. कांकीं या पद्धतीमुळें ग्रीक वसाहत करणारे व स्थानिक लोक यांचें एकीकरण झालें.

इस्राएल लोक स्वतःचे देव सोडून दुसऱ्या देवांची पूजा करतात याबद्दल त्यांचा निषेध जुन्या करारांत जागोजाग दृष्टीस पडतो. तसेंच ते अन्यजातिविवाहास देखील विरुद्ध होते.

इस्रायली स्त्रीचा पुत्र यहुदी लोकांच्या देवांची निंदा करतो ह्मणून त्यास धोंडमार करविला आहे. तसेंच यहुदी लोक इतर देशांतील स्त्रियांशीं विवाह करून अन्य देवतांच्या उपासनेस लागले ह्मणून त्यांची निंदा केली आहे.

अनुवाद हें पुस्तक लोकांवर परिणामकारी झालें म्हणून सांगितलेंच आहे. या पुस्तकांत नियोगाची ह्मणजे विधवेनें देवरापासून पुत्रोत्पत्ति करून घेण्याची चाल उपदेशिली आहे.

"भाऊ एकत्र राहतात, आणि त्यांतल्या एकाला पुत्र नसतां मरण आलें तर मेलेल्याची बायको बाहेरल्या परक्या पुरुषाची होऊं नये, तिच्या दिरानें तिजपाशीं जावें व तिला बायको करून तिजजवळ दिराचें कार्य करावें; आणि असें व्हावें कीं, तिला जो पहिला पुत्र होईल तो त्या मेलेल्या भावाच्या नांवानें असावा, असें त्याचें नांव इस्राएलांतून पुसलें न जावें. आणि तो पुरुष आपली भावजय करून घ्यायला न इच्छील तर त्याच्या भावजयीनें वेशींतल्या वडिलांकडे जाऊन म्हणावें, माझा दीर आपल्या भावाचें नांव इस्राएलांत उठवयास पाहतो, ह्मणजे तो मजशीं दिराचें कार्य करीत नाहीं. मग त्याच्या नगरच्या वडिलांनीं त्याला बोलावून सांगावें, आणि जर तो उभा राहून म्हणाला, मी इला करून घ्यावयास इच्छित नाहीं; तर त्याच्या भावजयीनें वडिलांच्या देखतां जाऊन त्याचा जोडा त्याच्या पायांतून काढून त्याच्या तोंडावर थुंकून उत्तर द्यावें जो मनुष्य आपल्या भावाचें घर बांधीत नाहीं त्याशीं याप्रमाणें करावें" ( अनुवाद, अ. २५ ).

अनुवादांतील विधिनिषेधविषयक आणखी एक उताऱ्याकडे लक्ष देऊं.

"परमेश्वराला ओंगळ, कारागिराच्या हातांचें काम अशी कोरींव किंवा ओतींव मूर्ति जो कोणी करून गुप्त ठिकाणीं ठेवतो त्याला शाप असो; आणि सर्व लोकांनीं उत्तर करून आमेन म्हणावें.

"जो आपल्या बापाला किंवा आईला हलकें मोजतो त्याला शाप असो; आणि सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

"जो आपल्या शेजाऱ्याची शिवेची खूण सारितो त्याला शाप असो; आणि सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

"जो आंधळ्याला वाटेंतून बहकवितो त्याला शाप असो; आणि सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

"प्रवासी, अनाथ व विधवा यांचा न्याय जो विपरीत करतो त्याला शाप असो; आणि सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

"जो आपल्या बापाच्या बायकोपाशीं निजतो त्याला शाप असो; कारण तो आपल्या बापाचा पदर काढतो; आणि सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

"जो कोणत्याहि पशूजवळ निजतो त्याला शाप असो; आणि सर्व लोकांनीं आमेन म्हणावें

"जो आपली बहीण, आपल्या बापाची कन्या किंवा आपल्या आईची कन्या इजपाशीं निजतो त्याला शाप असो; आणि सर्व लोकांनीं आमेन ह्मणावें.

"जो आपल्या सासूपाशीं निजतो त्याला शाप असो; आणि सर्व लोकांनीं आमेन ह्मणावें.

"जो आपल्या शेजाऱ्याला गुप्त मार देतो त्याला शाप असो; आणि सर्व लोकांनीं आमेन ह्मणावें.

"जो निर्दोष रक्ताच्या जणाला मारावयास लांच घेतो त्याला शाप असो; आणि सर्व लोकांनीं आमेन ह्मणावें." [ अनुवाद पृ. २७ ].

न्यायाधीश या पुस्तकांतील मागें उल्लेखिलेला अन्यदेवपूजननिषेधाचा उतारा येणें प्रमाणें:—

"११ इस्राएलाच्या वंशांनीं बाल देवाची सेवा करून परमेश्वराच्या दृष्टीनें वाईट केलें. १२ आणि त्यांनीं आपल्या पूर्वजांचा देव परमेश्वर, ज्यानें त्यांस मिसर देशांतून आणिलें, त्याला टाकून अन्य देव म्हणजे आपल्या चहूंकडल्या लोकांचे देव, यांच्यामागें लागून त्यांचें भजन करून परमेश्वराला चिडविलें. १३ असें त्यांनीं परमेश्वराला टाकून बाल व अष्टारोथ यांची सेवा केली. १४ मग परमेश्वरानें इस्राएलांवर रागें भरून त्यांस लुटणारांच्या हातीं दिलें, आणि त्यांनीं त्यांस लुटलें; आणि त्यानें त्यांस त्यांच्या चहूंकडल्या शत्रूंच्या हातीं विकत दिलें, आणि तेव्हांपासून त्यांच्यानें आपल्या शत्रूंच्या समोर उभें राहवलें नाहीं. १५जेथें जेथें ते जात तेथें परमेश्वराचा हात वाइटासाठीं त्यांवर असे, परमेश्वरानें त्यांस सांगितलें होतें आणि परमेश्वरानें त्यांशीं शपथ केली होती तसें; आणि त्यांस फार संकट होई. १६ तेव्हां परमेश्वर त्यांसाठीं न्यायाधीश उत्पन्न करी, आणि त्यांनीं त्यांस त्यांच्या लुटणाऱ्यांच्या हातांतून सोडविलें.१७तथापि त्यांनीं आपल्या न्यायाधिशांचेंहि ऐकलें नाहीं, तर अन्य देवांच्या मागें लागून व्यभिचार केला म्हणजे त्यांचें भजन केलें, त्यांचे पूर्वज परमेश्वराच्या आज्ञा ऐकून ज्या मार्गांत चालले होते त्यांतून ते लवकर वळले आणि त्यांनीं तसें केलें नाहीं. १८ आणि परमेश्वर त्यांसाठीं न्यायाधीश उत्पन्न करी तेव्हां परमेश्वर न्यायाधिशासंगतीं असे, आणि न्यायाधिशाच्या सर्व दिवसांत त्यांस त्यांच्या शत्रूंच्या हातांतून तारी, कां कीं, त्यांचे जाचणारे व गांजणारे यामुळें जी त्यांची कण्हणी त्यावरून परमेश्वराला दया येई. १९ आणि असें झालें कीं न्यायाधीश मेल्यावर ते फिरत, आणि आपल्या पूर्वजांपेक्षां दुष्ट होऊन दुसऱ्या देवांच्या मागें लागून त्यांची सेवा व त्यांचें भजन करीत, ते आपलीं कर्में आणि आपला हट्टाचा मार्ग सोडीनात. २० मग परमेश्वराचा क्रोध इस्राएलांवर तापला, आणि तो म्हणाला, या लोकांनीं माझा करार, जो म्यां यांच्या पूर्वजांशीं नेमून दिला त्याचें उल्लंघन केलें, आणि माझी आज्ञा मानली नाहीं, २१ म्यावरून मीहि जीं राष्ट्रें यहोशवानें मरतांना ठेवलीं त्यांतलें एक देखील त्यांच्या पुढून वतनांतून घालविणार नाहीं,-२२ यासाठीं कीं त्यांच्या योगें आपण इस्राएलाची परीक्षा घ्यावी कीं, जसे त्यांच्या पूर्वजांनीं परमेश्वराचे मार्ग पाळले तसे ते त्यांत चालून पाळतील किंवा नाहींत. २३ तर परमेश्वरानें त्या राष्ट्रांस असूं दिलें, त्यांस वतनांतून लवकर घालविलें नाहीं, आणि त्यांस यहोशवाच्या हातीं दिलें नव्हतें." (न्यायाधीश, अ.२)

"इस्राएलांत ज्यांनीं खनानांतल्या अवघ्या लढाया जाणल्या नव्हत्या, म्हणजे ज्यांनीं पूर्वीं त्या अगदीं जाणल्या नव्हत्या, २ त्या सर्वांस लढाई शिकवायाला इस्राएलाच्या संतानांतल्या पिढ्यांनीं समजावें यासाठीं त्यांची परीक्षा ज्यांकडून घ्यावी अशीं जीं राष्ट्रें परमेश्वरानें ठेवलीं तीं हीं; ३ पलिष्टयांचे पांच सुभेदार आणि जे खनानी व सीदोनी व हिव्वी बालहर्मोन डोंगरापासून हमाथाच्या वाटेपर्यंत लबानोन डोंगरावर राहतात ते सर्व. ४ ते यासाठीं होते कीं त्यांच्या योगें इस्राएलाची परीक्षा व्हावी, म्हणजे ज्या आज्ञा परमेश्वरानें मोशयाच्या योगें त्यांच्या पूर्वजांस दिल्या त्या ते ऐकतील किंवा नाहींत हें कळावें म्हणून. ५ तर खनानी, हित्ती व अमोरी व परिजी व हिव्वी व यबूसी यांमध्यें इस्राएलाचे वंश राहिले. ६ आणि त्यांनीं त्यांच्या कन्या आपणांस बायका करून घेतल्या आणि आपल्या कन्या त्यांच्या पुत्रांस दिल्या, आणि त्यांच्या देवांची सेवा केली. ७ असें इस्राएलाच्या वंशांनीं परमेश्वराच्या दृष्टीनें वाईट केलें; आपला देव परमेश्वर याला विसरून बाल व अशेरोथ यांची सेवा केली." ( न्यायाधीश अ० ३)

स्तोत्रसंहिता ह्मणून जें मोठें पुस्तक जुन्या करारांत आहे त्याचें सुंदर राष्ट्रीय वाङ्मय म्हणून महत्व मोठें आहे. त्यांतील अनेक स्तोत्रें प्रासंगिक असल्यामुळें अधिकच मनोरम वाटतात.

"राष्ट्रांनीं बंडाळी कां मांडली आहे ? लोक व्यर्थ योजना कां करतात ? २ परमेश्वराविरुद्ध व त्याच्या अभिषिक्ताविरुद्ध पृथ्वीवरील राजे उभे राहतात आणि अधिकारी एकत्र होऊन मसलत करतात—३ 'चला, आपण त्यांचीं बंधनें तोडूं, आपणांपासून त्यांच्या दोऱ्या टाकूं' ४ आकाशांत जो सिंहासनारूढ आहे तो हंसतो, प्रभु त्यांचा उपहास करितो. ५ पुढें तो क्रोधयुक्त होऊन त्यांशीं बोलेल, तो संतप्त होऊन त्यांस भयभीत करील. ६ (तो म्हणेल) 'तरी मीं आपल्या पवित्र सीयोन डोंगरावर आपला राजा अभिषेक करून नेमिला आहे.' ७ मी ठराव कळवितोः परमेश्वर मला म्हणाला, 'तूं माझा पुत्र आहेस, आज मीं तुला जन्म दिला आहे. ८ माझ्याजवळ माग म्हणजे मी राष्ट्रें तुझें वतन अशीं तुला देईन, पृथ्वीच्या सीमा तुझी मालमत्ता अशा करून देईन ९ लोहदंडानें तूं त्यांस फोडशील, कुंभाराच्या मडक्यासारखा त्यांचा चुराडा करशील. १० तर आतां राजांनो, शहाणे व्हा, पृथ्वीवरील न्यायाधिशांनो, बोध घ्या. ११ भय धरून परमेश्वराची सेवा करा. कंपित होऊन हर्ष करा.१२ तो रागावूं नये आणि तुम्ही मार्गांत नाश पावूं नये म्हणून पुत्राचें चुंबन घ्या; नाहींतर त्याचा क्रोध थोडक्यांत पेटेल. त्याचा आश्रय करणाऱ्याची केवढी धन्यता !" (स्तोत्रसंहिता अ० २)

[ गवयांच्या पुढाऱ्यासाठीं तंतुवाद्याच्या साथानें गावयाचें दावीदाचें स्तोत्र ]

"मी तुला हांक मारीन तेव्हां माझ्या न्याय करणाऱ्या देवा, माझें ऐक. ज्या तूं मला पेंचांतून मुक्त केलें, तो तूं मजवर कृपा कर व माझी प्रार्थना ऐक. २ अहो जनहो, माझें गौरव अपमान कोठवर असें राहील? तुम्हांला पोकळ गोष्टी आवडणार काय? तुम्ही लबाडीला अनुसरणार काय? [सेला] ३ परमेश्वरानें तर आपणासाठीं भक्तिमान निवडला आहे हें तुम्ही जाणा. मी परमेश्वराला हांक मारीन तेव्हां तो ऐकेल. ४ धाक धरा, पाप करूं नका. आपल्या अंथरुणावर आपणाशीं संभाषण करा, मौन धरा. [सेला] ५ नीतिरूप यज्ञ करा आणि परमेश्वरावर भरंवसा ठेवा. ६ आम्हांस चांगल्याचा अनुभव कोण घेऊं देईल असें म्हणणारे पुष्कळ आहेत, हे परमेश्वरा, तूं आपलें मुखतेज आम्हांवर पाड. ७ त्यांचें धान्य व द्राक्षारस विपुल झाली तेव्हांच्या त्यांच्या आनंदापेक्षां माझ्या मनांत तूं अधिक आनंद उत्पन्न केला आहे. ८ मी स्वस्थपणें अंग टाकून लागलाच गाढ झोंपीं जातो, कारण तूं मला अगदीं एकांतात निर्भय ठेवितोस." (स्तोत्रसंहिता अ० ४).

"बाबेलेच्या नद्यांजवळ आम्ही बसलों असतां, तेथें सियोनेची आठवण होऊन रडलों. २ तेथील वाळूंजावर आम्हीं आपल्या वीणा टांगून ठेविल्या; ३ कारण तेथें आमचा पाडाव करणाऱ्यांनीं आम्हांस गाणीं गाण्यास सांगितलीं होतीं, आम्हांस लुटणाऱ्यांनीं मौज करण्यास सांगितली होती. ते म्हणाले आम्हांसाठीं सीयोनेंतलें एक गाणें गा. ४ आम्हीं परक्या स्थळीं परमेश्वराचें गाणें कसें गावें? ५ हे येरुशलेमे जर मी तुला विसरलों तर माझा उजवा हात आपली क्रिया विसरो. ६ जर मीं तुझी आठवण ठेविली नाहीं, जर मीं यरुशलेमला माझ्या आनंदाच्या शिखरावर चढविलें नाहीं, तर माझी जीभ माझ्या टाळूला चिकटो. ७ तिचा पाया तळापर्यंत उघडा करा, उघडा करा, असें म्हणणाऱ्या अदोमी लोकांला उद्देशून हे परमेश्वरा, यरुशलेमच्या दिवसाची आठवण ठेव. ८ अगे ओसाड होणाऱ्ये बाबेलेच्या कन्ये, तं आम्हांशीं केलेल्या कृत्यांची जो फेड करील, त्याची केवढी धन्यता! ९ जो तुझीं बाळकें धरून खडकावर आपटून त्यांचा चुराडा करील, त्याची केवढी धन्यता!" (स्तोत्रसंहिता अ० १३७).

हिब्रूंच्या प्राचीन वाङ्मयामध्यें स्तोत्रसंहितेंत सुंदर भाग आहेत तरी नीतिसूत्रांचें अस्तित्व ही एक गोष्ट विशेष आहे.ती सूत्रें वाचतांना थोर चिनी तत्ववेत्त्यांची आठवण होते. मासल्याकरितां त्यांतील कांहीं उतारे येथें देतों.

"खोट्या तागडांचा परमेश्वराला वीट आहे, खरें वजन त्याला प्रिय आहे. २ गर्व आला कीं अप्रतिष्ठा आलीच, नम्रांच्या ठायीं ज्ञान असतें. ३ सरळांचा सात्विकपणा त्याला संभाळून नेतो, कपट्यांचा कुटिलपणा त्यांचा नाश करते. ४ क्रोधाच्या दिवशीं धन उपयोगीं पडत नाहीं, धार्मिकता मरणापासून सोडविते. ५ सात्विकांची धार्मिकता त्यांचा मार्ग नीट करते, दुर्जन आपल्या दुष्टतेनें पतन पावेल. ६ सरळांची धार्मिकता त्यांला सोडवील, कपटी आपल्या कामनेनें पाशांत सांपडतील. ७ दुर्जन मेला म्हणजे त्याची आशा नष्ट होते, वळकटांची अपेक्षा नाहींशी होते. ८ धार्मिक संकटांतून मुक्त होतो, आणि त्याच्या जागीं दुर्जन येतो. ९ अधार्मिक आपल्या तोंडानें आपल्या शेजाऱ्याचा नाश करतो, धार्मिक आपल्या ज्ञानानें मुक्त होतो. १० धार्मिकाचें कुशल असतें तेव्हां नगर उल्लासतें, दुर्जन नाश पावतात तेव्हां उत्साह होतो. ११ सरळांच्या आशीर्वादानें नगराची उन्नति होते, दुर्जनांच्या मुखानें त्याचा विध्वंस होतो. १२ जो आपल्या शेजाऱ्याला तुच्छ मानितो तो बुद्धिशून्य आहे, सुज्ञ मनुष्य तर उगाच राहतो. १३ चाता मारीत फिरणारा गुप्त गोष्टी उघड करतो, आत्म्यानें जो विश्वासू तो गोष्ट गुप्त ठेवितो, १४ शाहणा पुढारी नसल्यामुळें लोक पतन पावतात, सुमंत्री बहुत असले म्हणजे कल्याण होतें. १५ कोणी परक्याला जामीन झाला तर तो हानि पावेल, हातावर हात देणें ज्याला नावडतें आहे तो निर्भय राहतो. १६ कृपाळु स्त्री सन्मान संपादन करते, बलात्कारी धन संपादन करतात. १७ दयाळु मनुष्य आपल्या जिवाचें हित करतो, निर्दय तर आपल्या देहावर संकट आणितो. १८ दुर्जन जें कर्मफल मिळवितो तें असत्य असतें, जो नीति पेरितो त्याचें फळ सत्य असतें. १९ जो नीतीनें स्थिर त्याला जीवन प्राप्त होतें, जो दुष्कर्मामागें लागतो तो आपणावर मृत्यु आणतो. २० जे मनानें कुटिल त्यांचा परमेश्वराला वीट आहे, सात्विक मार्गाचे त्याचा आनंद आहेत. २१ दुर्जन शिक्षेवांचून असणार नाहीं याविषयीं मी हातावर हात देतों, धार्मिकांचा वंश तरेल. २२ डुकर आणि त्याच्या नाकांत सोन्याची नथ, सुंदर स्त्री आणि तिच्या अंगीं तारतम्यहीनता हीं एकच. २३ धार्मिकांची इच्छा शुभच असते, दुर्जनांची आशा आक्रोशाची असते. २४ पेरतो आणि द्रव्य वाढवितो असा एक आहे, आपणाला योग्य अशा उपभोगांतहि काटकसर करतो असा एक आहे, तरी परिणाम दरिद्रच. २५ उपकारी मनाचा पुष्ट होतो, जो पाजता त्याला पाजतात. २६ जो धान्य अडकवून ठेवितो त्याला शाप देतात, जो धान्य विकतो त्याच्या डोक्यावर आशीर्वादाचा हात पडतो. २७ जो हित पाहण्यास झटतो तो आवडत्या गोष्टींचा शोध करतो, जो अहित पाहतो त्याला तेंच प्राप्त होईल. २८ जो आपल्या धनावर भरंवसा ठेवितो तो पडेल, धार्मिक नव्या पालवीप्रमाणें प्रफुल्लित होईल. २९ जो घरच्यांस दुःख देतो त्याला वारा हेंच वतन मिळेल, मूर्ख शाहण्या मनाच्या मनुष्याचा चाकर होईल. ३० धार्मिकाचें फळ जीवनाचें झाड आहे, ज्ञानी आत्म्यांस वश करतो. ३१ पहा, धार्मिकाला पृथ्वीवर कर्मफल मिळत, तर दुर्जे-

नाला व पातक्याला विशेषकरून मिळेल." (नीतिसूत्रें अ.११)

"राजाचें मन पाटाच्या पाण्याप्रमाणें परमेश्वराच्या हातीं आहे, त्याला वाटेल तिकडे तो तें वळवितो. २ मनुष्याचे सर्व मार्ग त्याच्या दृष्टीनें नीट आहेत, अंतःकरण तोलून पाहणारा परमेश्वर आहे. ३ धर्मानें व न्यायानें वागणें, हें परमेश्वराला यज्ञापेक्षां मान्य आहे. ४ चढेल दृष्टि, व फुगीर अंतःकरण असा जो दुर्जनांच्या शेताचा उपज तो पाप आहे. ५ उद्योग्याचे विचार समृद्धि करणारे असतात, व जो कोणी उतावळी करतो तो दारिद्र्य कडे धांव घेतो. ६ लबाड जिभेनें मिळविलेलें धन उडून जाणारी वाफ आहे.ते मिळविणारे मृत्यूला आमंत्रण करतात. ७ दुर्जनांचा बलात्कार त्यांस उडवून टाकील, कारण त्यांनीं न्यायानें वागण्याचें नाकारलें आहे. ८अपराधग्रस्ताचा मार्ग फार कुटिल असतो, जो शुद्ध त्याचें वर्तन सरळ असतें. ९ भांडखोर बायकोबरोबर घरांत एकत्र राहण्यापेक्षां, धाब्याच्या एका कोपऱ्याला बसणें पुरवलें १० दुर्जनाचें मन वाईट इच्छितें, शेजाऱ्यावर तो कृपादृष्टि करीत नाहीं. ११ उपमर्द करणाऱ्यास शासन कर म्हणजे भोळा शाहणा होतो, सुज्ञांस शिक्षण दिलें म्हणजे तो ज्ञान पावतो. १२ न्यायी (परमेश्वर) दुर्जनाच्या घराकडे लक्ष देतो, तो दुर्जनाला विपत्तींत पाडतो. १३ गरिबाची आरोळी ऐकून जो कानांत बोटें घालितो, तोहि आरोळी करील पण कोणी ऐकणार नाहीं. १४ एकांतीं दिलेली देणगी राग शमविते, पदरांत झांकलेली लांच तीव्र कोप शमविते. १५ न्यायानें वागणें हा धार्मिकाचा आनंद आहे, अधर्म करणाऱ्यास हें नाश असें वाटतें. १६ ज्ञानपथापासून जो बहकतो, त्याला विश्रांति म्हटली तर मेलेल्यांच्या मंडळींत मिळेल." (नीतिसूत्रें अ. २१).

"हींहि शलोमोनाचीं नीतिसूत्रें आहेत, यहूदाचा राजा हिज्किया याच्या मनुष्यांनीं यांचा संग्रह केला. २ कोणतीहि गोष्ट गूढ ठेवणें यांत देवाचें गौरव आहे, एखाद्या गोष्टीचा शोध लावणें यांत राजांचें गौरव आहे. ३ उंचीमुळे आकाशाचा, खोलीमुळें पृथ्वीचा, व राजांच्या मनाचा थांग लागत नाहीं. ४ रुप्याचा गाळ काढून टाक, म्हणजे त्याचें सोनारासाठीं चांगलें पात्र निघतें. ५ राजासमोरून दुर्जनाला घालवून दे, म्हणजे त्याचें सिंहासन धर्मांत स्थापित होईल. ६ राजासमोर आपली प्रतिष्ठा मिरवूं नको, थोर लोकांच्या जागीं उभा राहूं नको. ७ कोणा सरदारास येतां पाहून त्या समोरून तुला खालच्या जागीं घालविणें, यापेक्षां वर येऊन बैस, असें तुला म्हणणें हें बरें. ८ फिर्यादीस जाण्याची उतावळी करूं नको, केलीस आणि तुझ्या शेजाऱ्यांनीं तुझी फजिती केली तर परिणामीं काय करावें असें तुला होईल. ९ तुझा व तुझ्या शेजाऱ्याचा वाद असला तर तो चालीव, पण इतरांच्या गुप्त गोष्टी बाहेर फोडूं नको. १० फोडल्या तर ऐकणारा तुझी निर्भर्त्सना करील, आणि हें दूषण तुला लागून राहील. ११ रुपेरी करंडींत सोनेरी फळें, तसें समयोचित भाषण आहे. १२ सोन्याचें कर्णभूषण आणि उत्कृष्ट सोन्याचा दागिना, तसा सुज्ञ उपदेश व लक्ष देणारा कान हे आहेत. १३ कापणीच्या समयीं जसें बर्फाचें पेय, तसा विश्वासू जासूद आपणास पाठविणाऱ्याला आहे, तो आपल्या धन्याचा जीव गार करतो. १४ मेघ व वारा असून वृष्टि नाहीं, या प्रमाणें कपटी देणग्यांची आख्यता मिरविणारा आहे. १५ धीर धरल्यानें न्यायाधीशाचें मन वळतें, नरम जीभ हाड फोडते. १६ तुला मध सांपडल्यास पोटापुरता खा जास्त खाल्लास तर तुला वांति होईल. १७ शेजाऱ्याच्या घरीं आपलें पाऊल कधींमधीं घाल, नाहीं तर त्याला कंटाळा येऊन तो तुझा द्वेष करील. १८ जो शेजाऱ्याविरुद्ध खोटी साक्ष देतो, तो घण, तलवार, व तीक्ष्ण बाण असा आहे. १९ संकटसमयीं विश्वासघातक्यावर भरंवसा ठेवणें, हें तुटलेल्या दांतानें खाणें, लचकलेल्या पायानें चालणें असें आहे. २० थंडीच्या दिवसांत अंगावरील पांघरूण काढणें, सज्जीखारावर शिरका घालणें आणि खिन्न हृदयापुढें गायन करणें हीं सारखीं आहेत. २१ तुझा शत्रु भुकेला असल्यास त्याला खायाला दे, तान्हेला असल्यास त्याला पाणी पिण्यास दे. २२ असें केल्यानें त्याच्या मस्तकावर निखाऱ्यांची रास घातल्यासारखें त्याला होईल आणि परमेश्वर तुला प्रतिफल देईल. २३ उत्तरेचा वारा पाऊस आणतो, त्याप्रमाणें चुगलखोर जीभ मुद्रा क्रोधिष्ट करते. २४ भांडखोर बायकोबरोबर घरांत एकत्र राहण्यापेक्षां धाब्याच्या एका कोपऱ्याला बसणें पुरवलें. २५ तान्हेल्या जीवाला गार पाणी, तसेंच दूर देशाहून आलेलें चांगलें वर्तमान आहे. २६ दुर्जनापुढें स्थानभ्रष्ट झालेला धार्मिक हा गढूळ केलेला झरा, बिघडलेलें जलकुंड यांप्रमाणें आहे. २७ मधाचें अतिसेवन करणें बरें नाहीं; कठिण गोष्टींचा शोध करण्यांत गौरव आहे. २८ ज्या मनुष्याचा आत्मा स्वाधीन नाहीं, तो गांवकुसूं नसलेल्या पडित गांवासारखा आहे." (नीतिसूत्रें अ० २५ वा).

"मस्सा लोकांचा राजा लमूएल याची त्याला आईनें शिकविलेलीं वचनें २ माझ्या मुला, मी काय सांगूं? माझ्या पोटच्या लेकरा मी काय मांगूं? माझ्या नवसाच्या लेकरा, मी काय सांगूं? ३ तूं आपलें वीर्य स्त्रियांस देऊं नको, राजांचा नाश करणाऱ्या अशांस आपल्या राजकारभारांत वश होऊं नको. ४ हे लमूएला, द्राक्षारस पिणें राजांस शोभत नाहीं, राजांस नाहीं शोभत. मद्य कोठें असें विचारणें सरदारांस शोभत नाहीं. ५ ते प्याले तर नियमशास्त्र विसरून पीडिलेल्यांचा न्याय विपरीत करतील. ६ मरणाच्या लागास आलेल्यांस मद्य दे. खिन्न मनाच्यांस द्राक्षारस दे. ७ त्यानें पिऊन आपलें दारिद्र्य विसरावें, त्याच्या हालाचें त्याला विस्मरण व्हावें. ८ मुक्यासाठीं, नष्टप्राय झालेल्यांस न्याय मिळण्यासाठीं, आपलें मुख उघड. ९ आपलें मुख उघड, धर्मानें न्याय कर, गरीब व गरजवंत यांस न्याय मिळूं दे. १० सद्गुणी स्त्री कोणाला प्राप्त होते? मोत्यांहून तिचें मोल

फार आहे. ११ तिच्या पतीचें मन तिजवर भरंवसा ठेवितें, त्याला संपत्तीचा तोटा पडत नाहीं, १२ ती आमरण त्याचें हित करिते, अहित करीत नाहीं. १३ ती लोंकर व ताग खटपटीनें मिळविते आणि आपल्या आनंदित हातांनीं काम करिते. १४ ती व्यापारी गलवतासारखी आहे, ती आपली अन्नसामुग्री दुरून आणिते. १५ रात्र सरली नाहीं तांच ती उठून कुटुंबाच्या अन्नसामग्रीची व्यवस्था करिते व आपल्या दासींस त्यांच्या अन्नाचा वांटा देते १६ शेताची चवकशी करून तें ती विकत घेते, ती आपल्या हातच्या कमाईनें द्राक्षमळा लाविते. १७ ती बलरूप पट्यानें आपली कंबर बांधते. ती आपले बाहु नेटानें कामास लाविते. १८ आपला उद्योग फायदेशीर आहे हें तिला कळतें; तिचा दीप रात्रीस मालवत नाहीं. १९ ती चाती आपल्या हातीं घेते, ती हातांनीं चरकी धरते. २० ती गरीबासाठीं मूठ उघडते, गरजवंतास हात देते. २१ आपल्या कुटुंबाविषयीं तिला बर्फाचें भय वाटत नाहीं, कारण तिचें सर्व कुटुंब किरमिजी बनात पावरलेलें असतें. २२ ती आपणासाठीं वेलबुटीदार पलंगपोस करिते, तिचें वस्त्र सूक्ष्म तागाचें व जांभळें आहे. २३ तिचा पति वेशींत देशाच्या वडील मंडळींत बसला असतां तेव्हांच लक्षांत येतो. २४ ती तागाचीं वस्त्रें करून तीं विकते, व्यापाऱ्यांस कमरबंध विकत देते. २५ बल व प्रताप हींच तिचीं वस्त्रें आहेत, ती पुढील काळाविषयीं निश्चित राहते. २६ तिच्या तोंडांतून सुज्ञतेचे बोल निघतात, तिच्या जिभेंत दयेचें शिक्षण असतें. २७ ती आपल्या कुटुंबाच्या आचारविचाराकडे लक्ष देते; ती आळसाचें अन्न खात नाहीं. २८ तिचीं लेंकरें उठून तिला धन्य ह्मणतात, तिचा नवराहि उठून तिची प्रशंसा करून ह्मणतो, २९ बहुत स्त्रियांनीं सद्गुण दाखविले आहेत, तूं तर त्या सर्वांत वरचढ आहेस, ३० सौंदर्य, कपट व सुरूपता व्यर्थ आहे, परमेश्वराचें सद्भय बाळगणाऱ्या स्त्रीची प्रशंसा होते. ३१ तिच्या हातचें श्रमफल तिला असो, तिचीं कृत्यें भर वेशींत तिची प्रशंसा करोत." ( नीतिसूत्रें अ. ३१ )

या यहुदी लोकांच्या वाङ्मयांत सुंदर स्थलें अनेक आहेत. त्यांपैकीं कांहींचे तरी येथें अवतरण केलें पाहिजे येथें थोडेसे उतारे घेतों त्यांवरून वाङ्मयाची आवेशयुक्तता व नीतीकल्पना याची कांहीं तरी माहिती होईल.

शलोमोनानें रचलेलें गीतरत्न.

"२तो मला मुखचुंबन देवो.तुझें प्रेम द्राक्षारसाहून मधुर आहे. ३ तुझ्या सुवासिक अत्तराचा घमघमाट सुटतो; तुझें नांव सिंचन केलेलें सुगंधी अत्तरच होय; म्हणूनच कुमारी तुजवर प्रेम करितात. ४ माझ्या चित्ताचें आकर्षण कर, म्हणजे आम्ही तुझ्यामागून धांवत येऊं: राजानें मला अंतःपुरीं आणिलें आहे. आम्ही तुझ्याठायीं आनंदोत्सव करूं; तुझें प्रेम द्राक्षारसाहून अधिक वर्णूं. त्या एकानष्ठपणें तुजवर प्रीति करीत आहेत.

"५ यरुशलेमनिवासी कन्यांनो, मी काळीसांवळी पण सुरूप आहें; केदराच्या डेऱ्यासारखी, शलोमोनाच्या पडद्यासारखी मी काळी आहें. ६ मी काळीसांवळी आहें हें मनांत आणूं नका, कारण मी उन्हानें होरपळलें आहें. माझे सहोदर बंधू मजवर संतप्त झाले; त्यांनीं मला द्राक्षमळ्याची राखण करावयास ठेविलें; पण माझ्या मळ्याची निगा मीं ठेविली नाहीं. ७ माझ्या प्राणसख्या, मला सांगः तूं आपला कळप कोठें चारितोस? दुपारीं त्याम कोठें बसवितोस? तुझ्या सोबत्यांच्या कळपांजवळ मीं कां भ्रमत रहावें?

"८ हे परमसुंदर स्त्रिये, तुला हें ठाऊक नसेल तर तूं त्या शेरडांमेंढरांच्या पावलांच्या मागोमाग जा; मेषपालांच्या मागोमाग जा; मेषपालांच्या राहुट्यांपाशीं आपलीं करडें चारीत रहा.

"९ माझ्या सखे, मी तुला फारोच्या रथाच्या अश्विनीसारिखी लेखितों. १० गोफांनीं तुझे गाल,व रत्नहारांनीं तुझा कंठ सुरेख दिसत आहे. ११ आम्ही तुजसाठीं चांदीच्या टिका लाविलेले सोन्याचे गोफ करूं." ( अध्याय १ ).

"३ वनवृक्षांमध्यें जसा सेवीवृक्ष तसा तरुणामध्यें माझा वल्लभ. त्याच्या छायेंत बसून मला आनंद झाला; त्याचें फळ मला स्वादिष्ट लागलें. ४ त्यानें मला आपल्या पानगृहांत आणिलें; त्यानें मजवर प्रेमध्वजा फडकाविली. ५ मनुकांची पोळी देऊन माझ्या जिवाला आराम करा; सफरचंद खाऊन मला हुशारी येऊं द्या. मी प्रेमज्वरानें पीडित झालें आहें. ६ त्याचा डावा हात माझ्या डोईखालीं आहे; त्याचा हात मला अलिंगांत आहे.

७ यरुशलेमच्या कन्यांनो, तुम्हांस वनांतील मृगींची, हरिणींची शपथ घालून सांगतें, माझ्या प्रेमानंदाला व्यत्यय विघ्न आणूं नका;तो हवा तितका वेळ राहूं द्या.किंवा"(अ.२).

"रात्रीं मी शय्येवर पडलें असतां माझ्या प्राणप्रियाच्या दर्शनाची उत्कंठा मला लागली; मीं त्याला चोहोंकडे पाहिलें; पण तो मला दिसला नाहीं. २ माझ्या मनांत आलें कीं, आतां उठून शहरभर फिरावें. माझ्या प्राणप्रियाचा शोध पेठांतून व गल्ल्यांतून करावा; मी त्याचा शोध केला पण तो मला आढळला नाहीं. ३ शहरांत गस्त घालणारे जागले मला भेटले; मी त्यांस विचारलें. माझा प्राणप्रिय तुम्हांस कोठें दिसला काय? ४ त्यांस सोडून मी अंमळ पुढें जातें तों माझा प्राणप्रिय मला भेटला. मीं त्याला धरून ठेविलें मीं त्याला माझ्या मातृगृहीं, माझ्या जननीच्या कोठडींत आणीपर्यंत सोडिलें नाहीं.

"५ यरुशलेमच्या कन्यांनो, तुम्हांस वनांतील मृगींची, हरिणींची शपथ घालून सांगतें कीं, माझ्या प्रेमानंदाला व्यत्यय आणूं नका, विघ्न आणूं नका, तो हवा तितका वेळ राहूं द्या.

६ गंधरस व ऊद, सौदागरांकडील एकंदर सुवासिक द्रव्यें यांच्या सुगंधानें युक्त असी धुराच्या स्तंभासारखें रानांतून हें येत आहे तें काय? ७ पाहा, तो शलोमोनाची

पालखी येत आहे; तिच्याबरोबर साठ वीरपुरुष चालत आहेत; ते इस्राएलांच्या वीरपुरुषांपैकीं आहेत. ८ ते सगळे खड्गधारी व युद्धकुशल आहेत; रात्रीच्या समयीं प्राप्त होणाऱ्या भयास्तव प्रत्येकाच्या कमरेस तलवार लटकलेली आहे. ९ शलोमोन राजानें आपणासाठीं लबानोनी लांकडाची एक पालखी करविली आहे. १० तिचे दांडे रुप्याचे आहेत, तिची पाठ सोन्याची आहे; तिची गादी जांभळ्या रंगाची आहे. तिचा अंतर्भाग यरुशलेमेच्या कन्यांच्या प्रेमानें विभूषित केला आहे. ११ सीयोननिवासी कन्यांनो, बाहेर या, शलोमोन राजास पहा. त्याच्या विवाहदिनीं, त्याच्या मनास उल्हास झाला त्या दिवशीं त्याच्या मातेनें त्यास घातलेल्या मुकुटानें मंडित झालेला असा हा पहा"(अ. ३).

"हे माझे भगिनी, माझे वधू, मी आपल्या बागेंत आलों आहें; मीं आपला गंधरस व सुगंधी द्रव्यें लुटिलीं आहेत. मीं आपलें मधूनें थबथबलेलें पोळें खाल्लें आहे. मीं दुग्ध व द्राक्षारस हीं सेविलीं आहेत, मित्रहो, खा, प्रियजनहो, प्या, मनमुराद प्या.

२ मी निद्रिस्थ आहे, तरी माझें मन जागृत आहे. ऐका! माझा वल्लभ दार ठोकीत आहे! त्याचा शब्द माझ्या कानीं पडत आहे. तो म्हणतोः "माझे भगिनी, माझे प्रिये, माझे कपोते, माझे विमले, मला दार उघड. माझें डोकें दंवानें थबथबलें आहे; माझीं झुलपें रात्रीच्या दहिंवरबिंदूंनीं भरून गेलीं आहेत. ३ मी पेहराव उतरला आहे, तो पुन्हां कसा लेऊं? मीं पाय धुतले आहेत ते पुन्हां कसे मळवूं? ४ माझ्या वल्लभानें झरोक्यांतून आपला हात आंत घातला, तेव्हां माझें हृदय त्याच्यासाठीं कळवळलें. ५ माझ्या वल्लभास दार उघडण्यासाठीं मी उठलें तेव्हां अर्गळीच्या मुठीवरील गंधरस माझ्या हातांस लागला, माझ्या बोटांवरून त्याचा द्रव थिबकला. ६ मीं माझ्या वल्लभासाठीं दार उघडिलें, आणि पाहतें तों तो निघून गेला होता. तो बोलत होता तेव्हां माझा जीव ठिकाणावर नव्हता; मीं त्याचा शोध केला पण तो सांपडला नाहीं, मीं त्याला हाका मारिल्या पण त्यानें ओ दिली नाहीं. ७ नगरांत फिरणारे जागले मला भेटले; त्यांनीं मला मार देऊन घायाळ केलें; तटाच्या रखवालदारांनीं माझा दुशालू हिसकावून घेतला. ८ यरुशलेमेच्या कन्यांनो, मी तुम्हांस शपथ घालून विनंति करतें कीं, माझा वल्लभ तुम्हांस आढळला तर त्याला सांगाः मला प्रेमज्वर लागला आहे.

"९ स्त्रियांतल्या परम सुंदरी, तुझ्या वल्लभांत इतरांहून अधिक तें काय आहे? तूं आम्हांस शपथ घालितेस ते तुझ्या वल्लभांत इतरांहून अधिक तें काय आहे?

१० माझा वल्लभ गोरापान व लालबुंद आहे; तो लाखांत मोहरा आहे. ११ त्याचें शिर बावनकशी सोन्यासारखें आहे. त्याचीं झुलपें कुरळ व डोमकावळ्यासारखीं काळीं कुळकुळीत आहेत. १२ त्याचे डोळे ओढ्यांच्या कांठांवरील होल्यांसारखे आहेत; ते दुधांत डुंबत असून नीट जडलेले आहेत. १३ त्याचे गाल सुगंधोत्पादक वनस्पतींचे ताटवे आहेत; त्याचे ओठ कमलाप्रमाणें असून त्यांतून गंधरस स्रवतो. १४ त्याचे हात पुष्परागानें खचलेल्या सुवर्णनालिकाच होत; त्याचें पोट नीलमणि जडलेल्या हस्तिदंतफलकासारखें आहे. १५ त्याचे पाय सुवर्णाच्या कोंदणांत बसविलेल्या संगमरवरी स्तंभांसारखे आहेत. त्याचा बांधा लबानोनासारखा आहे; तो गंधसरूसारखा उमदा आहे. १६ त्याची वाणी मधुर आहे; तो सर्वपरी मनोहर आहे. यरुशलेमेच्या कन्यांनो, असा माझा वल्लभ, माझा सखा आहे"! [गीतरत्न, अ. ५].

यहुद्यांच्या प्राचीन वाङ्मयाच्या स्वरूपावलोकनाची पूर्णता त्यांच्यावर परसत्तेचा प्रसंग आला असतां जीं विलापगीतें रचलीं गेलीं त्यांचा मासला दिल्याशिवाय होणार नाहीं म्हणून विलापपंचकांतील कांहीं भाग येथें देतों.

"हाय हाय, भरवस्तीची नगरी ती कशी एकाकी बसली आहे, राष्ट्रांमध्यें जी राणी, ती करभार देणारी कशी झाली आहे? ती रुदन करते, तिच्या गालांवर अश्रू वहात आहेत, तिच्या वल्लभांपैकीं तिचें सांत्वन करणारा कोणी नाहीं. तिच्या सर्व मित्रांनीं तिला दगा दिला आहे; ते तिचे शत्रू बनले आहेत. यहूदा जुलुमानें व भारी दास्यानें पाडावांत गेली आहे; ती राष्ट्रांमध्यें बसली आहे, तिला चैन नाहीं, तिचा पाठलाग करणारांनीं तिला संकटावस्थेंत गांठिलें. पर्वणीस जाणारे कोणी नाहींत म्हणून सियोनेचे मार्ग शोक करीत आहेत; तिच्या वेशी उजाड झाल्या आहेत; तिचे याजक उसासे टाकीत आहेत; तिच्या कुमारी खिन्न झाल्या आहेत व ती स्वतः कष्टी आहे. तिच्या शत्रूंस वर्चस्व मिळालें आहे, तिचा द्वेष करणारे चैनींत आहेत; कारण तिच्या बहुत अपराधांमुळें परमेश्वरानें तिला पीडा लावली आहे. वैऱ्यापुढें तिचीं लेंकरें पाडावांत गेलीं आहेत. सीयोनकन्येचें तेज सर्व गेलें आहे; तिचे सरदार चारा नसलेल्या हरणांसारखे झाले आहेत. ते पाठलाग करणारांपुढें निर्बल होऊन पळाले आहेत. यरुशलेम आपल्या क्लेशाच्या व भटकण्याच्या दिवसांत आपल्या प्राचीन काळापासून असलेल्या रम्य वस्तूंचें स्मरण करते. जुलूम करणाऱ्याच्या हातीं तिचे लोक लागले तेव्हां तिला कोणी साहाय्य नव्हता, हें तिच्या शत्रूंनीं पाहिलें, ती निर्व्यापार झाली म्हणून त्यांनीं तिची थट्टा मांडली. यरुशलेमनें अघोर पातक केलें आहे म्हणून ती किळसवाणी झाली आहे. जे तिचा आदर करीत ते तिला तुच्छ मानीत आहेत, कारण त्यांनीं तिची नग्नता पाहिली आहे. ती उसासे टाकते, ती पाठमोरी झाली आहे." (पहिलें विलापगीत १–८).

प्रवक्त्यांचें वाङ्मय आवेशपूर्ण असून प्राचीन यहुदी वाङ्मयांतील तो एक अत्यंत सुंदर भाग आहे. यांत इस्राएल लोकांस पापाचरण टाळण्यास उपदेश केला आहे, आणि खरा ईश्वर टाकून वाटेल त्या दैवताची पूजा करण्याबद्दल निषेध

केला आहे. मधून मधून लोकांस धाक घालण्यासाठीं त्यांच्यावर अशीं अरिष्टें येतील म्हणून भविष्यें केलीं आहेत. प्रवक्त्यांच्या वाङ्मयांतील एकदोन उतारे येथें देतों.

"पहा परमेश्वर पृथ्वी रिक्त करीत आहे. तिला ओसाड करीत आहे. तिला विरुद्ध करीत आहे, व तिच्या रहिवाशांची दाणादाण करीत आहे. तेव्हां जशी लोकांची तशी याजकाची, चाकराची तशी धन्याची, दासीची तशी धनणीची विकत घेणाराची तशी विकत देणाराची, सावकाराची, तशी कुळाची, धनकोची तशी रिणकोची स्थिति होईल. पृथ्वी अगदीं रिकामी होईल, तिची लुटालूट होईल; कारण परमेश्वर हें वचन बोलला आहे. पृथ्वी शोकाकुल व कृश झाली आहे; जग झुरून कृश झालें आहे पृथ्वीवरील प्रतिष्ठित जन जर्जर झाले आहेत. पृथ्वी आपल्या रहिवाशांकडून भ्रष्ट झाली आहे, कारण त्यांनीं नियमांचें उल्लंघन केलें आहे. विधींचे अतिक्रमण केलें आहे. व सनातन करार मोडला आहे. यास्तव पृथ्वी शापानें ग्रासली आहे, तिचे रहिवासी पापाचें फळ भोगीत आहेत; पृथ्वीचे रहिवासी जळून भस्म झाले आहेत, मानव थोडेच उरले आहेत. नवा द्राक्षारस शोकाकुल झाला आहे, द्राक्षी करपून गेली आहे हर्षितमनाचे उसासा टाकीत आहेत. डफांचा हर्षनाद बंद पडला आहे, उत्सव करणाऱ्यांचा कल्ला थांबला आहे, किनरीचा हर्षनाद बंद झाला आहे. ते गात गात द्राक्षारस पीत नाहींत, मद्यपींस मद्य कडू लागतें. व्यवस्थाभ्रष्ट नगर भंग पावलें आहे. प्रत्येक घर बंद पडलें आहे. कोणाचाहि आंत रिघाव होत नाहीं. बाहेर रस्त्यांत द्राक्षारसासाठीं ओरड चालली आहे, सर्व उत्सव मावळला आहे, पृथ्वीचा हर्ष लोपला आहे. नगरांत जी कांहीं उरली ती मोडतोड. वेशीचा चकनाचूर झाला आहे. जैत झाडें हालविल्यावर व द्राक्षांचा हंगाम आटोपल्यावर सर्वां वेंचतांनां जशी थोडींशीं फळें राहतात तसें पृथ्वीवरील राष्ट्रांचें होईल. ते उच्च स्वरानें गजर करितील, परमेशाच्या प्रभावास्तव समुद्रांतून गजर करतील. यास्तव उगवतेकडल्या लोकांनों, परमेश्वराचें गौरव करा; समुद्रतीरस्थहो, इस्राएलाचा देव परमेश्वर याच्या नांवाचें गौरव करा. (यशाया, अ. २४)

पुन्हां परमेश्वराचें वचन मला आलें कीं, मानवपुत्रा यरुशलेमेचीं अमंगळ कृत्यें तिच्या लक्षांत आणून दे. असें म्हण, प्रभू परमेश्वर यरुशलेमेस म्हणतो, तुझें मूळ व उत्पत्ति हीं कनान देशांतली आहेत. तुझा बाप अमोरी व तुझी आई हित्तीण होती. तुझ्या जन्माविषयीं म्हटलें तर तूं जन्मलीस तेव्हां तुझा नाळ कापला नाहीं, तुला पाण्यानें धुवून स्वच्छ केलें नाहीं तुझ्या अंगाला मीठ चोपडलें नाहीं. व तुला बाळंत्यांत गुंडाळिलें नाहीं. तुझी करुणा येऊन यांतलें कोणतेंहि करावें अशी तुजवर कोणाचीच दयादृष्टी झाली नाहीं. तर तूं जन्मलीस तेव्हां तुला अमंगळ समजून शेतांत टाकून दिलें होतें. मी तुजजवळ जातांना तुला आपल्या रक्तांत लोळतांना पाहिलें, तेव्हां मी तुला म्हणलों, तूं आपल्या रक्तांत लोळत आहेस तरी जग; असेंच मी तुला म्हणलों. शेतांतलें बीज वाढून सहस्रपट होतें, तशी मी तुझी वृद्धी केली. तूं वाढून उंच झालीस तुला ऊर फुटला, तुझे केंस वाढले, तरी तूं उघडीनागडी होतीस. मी तुजजवळून जातांना तुला पाहिलें तों ती वेळ तुझ्या प्रेमाविकासाची होती. तेव्हां मी तुजवर पार घालून तुझी नग्नता झांकली. प्रभु परमेश्वर म्हणतो, तेव्हां मी शपथ वाहून तुजशीं करार केला व तूं माझी झालीस. मीं तुला पाण्यानें न्हाणिलें, तुजवरचें रक्त धुवून काढिलें आणि तुला तेलानें माखलें तुला वेलबुट्टीचीं वस्त्रें लेवविलीं. उत्तम चामड्याचा जोडा तुझ्या पायीं चढविला. तुझ्या मस्तकाला उत्तम तागाचें वस्त्र गुंडाळिलें. तुला रेशमी ओढणी पांघराविली. मीं तुला दागिन्यांनीं सजविली, तुझ्या हातांत वांगड्या घातल्या, व गळ्यांत गळसरी घातली. तुझ्या नाकांत नथ घातली. कानांत बाळ्या घातल्या तुझ्या डोईला उत्तम शिरोभूषण घातलें. तूं सोन्यारुप्यानें नटली होतीस तुझा पेहराव, ताग, रेशीम, व जरतारी यांचा होता. तुला भोजनास सपीठ, मध व तेल हीं असत. तूं अतिसुंदर होतीस. तुझ्या सौंदर्यामुळें तुझी कीर्ति सर्व राष्ट्रांत गेली. कारण मी तुला दिलेल्या तेजानें तुझें सौंदर्य अप्रतिम झालें, असें प्रभू परमेश्वर म्हणतो.

तूं जर आपल्या सौंदर्यावर भरंवसा ठेवून आपल्या कीर्तीच्या जोरावर शिंदळकी केली. आल्यागेल्याशीं शिंदळकीचा सपाटा उडविलास. तुझें सौंदर्य त्यांस लुटावयास सांपडलें, तूं आपली वस्त्रें घेऊन रंगी बेरंगी उंचस्थानें आपणासाठीं सजविलीं आणि कधीं झाली नाहीं व कधीं पुन्हा व्हावयाची नाहीं अशी शिंदळकी त्यांवर केली. मीं तुला दिलेल्या सोन्यारुप्याचे शोभिवंत दागिने घेऊन तूं त्याच्या पुरुषमूर्ती केल्या व त्यांशीं शिंदळकी केली तूं आपली वेलबुट्टीचीं वस्त्रें घेऊन त्यास लेवविलीं मी दिलेल्या तेलाचा व धुपाचा त्यांस नैवेद्य दाखविला. मी तुला दिलेली भाकर, सपीठ, तेल व मध हीं जीं मी तुला चारीत असें, तीं तूं त्यापुढें सुगंधासाठीं अर्पिलीं हें खरोखर घडलें, असें प्रभू परमेश्वर म्हणतो. मजपासून तुला पुत्रकन्या झालीं, तीं तूं घेऊन त्यांस बळी म्हणून अर्पिलीं. ह्या तुझ्या शिंदळक्या तुला पुरेशा झाल्या नाहींत. म्हणून तूं माझे पुत्र वधिले, त्या मूर्तीला खाद्य होण्यासाठीं तूं त्यांस अग्नींत होमिलें काय ! हीं सर्व अमंगळ कृत्यें व शिंदळक्या करितांना तूं आपल्या लहानपणीं आपल्या रक्तांत लोळत होतीस याची तुला कधीं आठवण झाली नाहीं. तूं हीं इतकीं दुष्कर्में केल्यावर (प्रभु परमेश्वर म्हणतोः तुला धिःकार असो) असें झालें कीं, तूं आपणासाठीं कमानदार घर बांधिलें, रस्त्यारस्त्यांनीं तूं आपणासाठीं उंचस्थानें केलीं. तूं रस्त्यांच्या नाक्यावर आपलीं उंचस्थानें बांधिलीं, आपलें सौंदर्य भ्रष्ट केलें, सर्व आल्यागेल्यांना आपले पाय पसरून मनस्वी शिंदळकी केलीस. मोठ्या अंगाचे तुझे शेजारी

मिसरी यांशीं तूं शिंदळकी केलीस. तेव्हां मला चिडविण्यासाठीं तूं मनस्वी शिंदळकी केलीस. तेव्हां पाहा, मीं आपला हात तुजवर उगारून तुझें नित्याचें अन्न कमी केलें आणि तुझा द्वेष करणाऱ्या पालिष्टयाच्या कन्यांला तुझें शिंदळकीचें वर्तन लज्जास्पद वाटतें, त्याच्या स्वाधीन तुला केलें. तुझी तृप्ति म्हणून कधीं होत नाहीं, या करितां तूं अश्शूऱ्यांशींहि शिंदळकी केली. तरीहि तुझी तृप्ति होईना. प्रतिकनान असा जो खाल्द्यांचा देश तेथपर्यंत तूं मनस्वी शिंदळकी चालविली तरी त्यानेंहि तुझी तृप्ति होईना. प्रभू परमेश्वर म्हणतो, तूं स्वच्छंदी वेश्येच्या कृतीप्रमाणें हें सर्व केलें. तेव्हां तुझें मन किती दुर्बल आहे!

म्हणून अगे वेश्ये, परमेश्वराचें वचन ऐक. प्रभू परमेश्वर म्हणतो, तूं आपला पैका उधळला, आपल्या जारांशीं शिंदळकी करून आपली लाज दाखविली, तूं आपल्या मूर्तींशीं अमंगळ कृत्यें केलीं आणि आपल्या लेंकरांचें रक्त त्यांस अर्पिलें म्हणून, पहा, ज्यांस तूं खुश केलें, प्रेमपात्र व द्वेषपात्र असे जे तुझे सर्व जार, त्यांस मी चोहोंकडून तुजविरुद्ध जमा करीन, त्यांपुढें तुझी लाज उघडी करीन म्हणजे ते तुझी सारी लाज पाहतील. जारिणी व रक्तपाती स्त्रिया यांचा न्याय करावा तसा मी तुझा न्याय करीन, आणि क्रोधानें व ईर्षेनें मी रक्तपात करीन. मी तुला त्यांच्या हातीं देईन, म्हणजे ते तुझीं कमानदार घरें उध्वस्त करितील, तुझीं उंच स्थानें पाडून टाकितील; तुझीं वस्त्रें हिरावून घेतील व तझें उंची जवाहीर काढून घेऊन तुला नागवी उघडी करून सोडितील. ते तुजविरुद्ध मंडळी जमवून आणून तुला धोंडमार करितील व आपल्या तलवारींनीं तुझे तुकडे करतील ते तुझीं घरें अग्नीनें जाळतील आणि बहुत स्त्रियां देखत तुला शासन करितील याप्रकारें तुझी शिंदळकी बंद करीन, आणि यापुढें तूं कोणास वेतन देणार नाहींस. तेव्हां तुजवरचा माझा संताप मी शांत करीन. (यहज्केल पृ, ९६२ अ. १६)

### बायबल नवाकरार.

**बायबल नवाकरार.**— नवा करार हा ख्रिस्ती लोकांच्या पवित्र पुस्तकाचा संग्रह आहे. बायबलांतील हा भाग सर्वस्वीं एकट्या ख्रिस्ती लोकांचा आहे. उलट पक्षीं जुना करार हा भाग ख्रिस्ती व यहुदी या दोघांचा मिळून आहे.

या नव्या कराराची गुणदृष्ट्या आणि परिमाणदृष्ट्या दोन्ही प्रकारें वाढ होत गेली. गुणदृष्ट्या वाढ म्हणजे ह्या पुस्तकांना धार्मिक पवित्र ग्रंथ अशी योजना हळू हळू प्राप्त झाली, आणि परिमाणदृष्ट्या वाढ म्हणजे हीं पुस्तकें आकार वाढतां वाढतां प्रस्तुतच्या स्वरूपाप्रत हळू हळू पोहोंचलीं. हीं दोन्ही कार्यें कशीं झालीं याचा इतिहास आपणांस पाहिला पाहिजे. त्याकरितां या लेखांत पुढील चार मुद्द्यांचा विचार करूं. (अ) खास ख्रिस्ती वाङ्मयाची वाढ; (आ) अनेक पुस्तकें सुसंगतवार एकत्र करून त्यांचा एक ग्रंथ बनविण्याचें काम; (इ) या ग्रंथाला पवित्र ग्रंथाची योग्यता प्राप्त होण्याची कारणें; आणि (ई) या ग्रंथाला हळू हळू प्राप्त झालेलें सांप्रतचें विशिष्ट स्वरूप.

नवा करार हा ग्रंथ पूर्णपणें जुन्या कराराच्या नमुन्यावर तयार केला गेला आहे. नव्या कराराला जुन्या कराराचा पुरवणीभाग व तितकाच पवित्र ग्रंथ अशी योग्यता अखेर प्राप्त झाली. ही योग्यता प्राप्त होण्याचें काम बरेंच हळू हळू झालें, आणि अखेर जुना करार आणि नवा करार मिळून पवित्र बायबल ग्रंथ होय असें मत रूढ झालें. ही स्थिति कशी उत्पन्न झाली याचा इतिहास आपणांस बारकाईनें पाहिला पाहिजे.

**(अ) ख्रिस्ती वाङ्मयाची वाढ-पालचीं पत्रें.**— येशू आणि त्याचे शिष्य यांचें बायबल जुना करार हेंच होतें. दोघांचेंहि तेवढ्या ग्रंथानें समाधान असे. ख्रिस्तांच्या मरणानंतर दोन दशकें पुरीं होईपर्यंत ख्रिस्ती लोकांनीं स्वतःचे स्वतंत्र ग्रंथ लिहिण्यास आरंभ केला नव्हता. ख्रिस्ती लोकांच्या पहिल्या पिढीनें लेखनाचें कार्य मुळींच केलें नाहीं. त्यांनीं लेखनकार्य मुळींच न करण्याचें कारणहि सबळ आहे. या पहिल्या पिढीला ख्रिस्त स्वर्गांतून पृथ्वीवर पुन्हां जन्माला येणार आहे अशी रोज आशा वाटत होती. वस्तुस्थिति अशी कीं, ख्रिस्ती लोक मेसायाचा दुसरा अवतार होणार असें मानीत होते इतकेंच नव्हे तर हाच खरा अवतार होय असें त्यांना वाटत होतें. यहुदी लोकांची कल्पना अशी होती कीं, मेसाया म्हणजे अतिमानवकोटींतील व्यक्ति होय. त्याचें पहिलें मनुष्य स्वरूपांत झालेलें येणें मेसाया म्हणजे अवतारच नव्हे अशी त्यांची समजूत होती. त्यामुळें मेसायाचा सर्व शक्तिमान व कीर्तिमान स्वरूपांत खरा अवतार होण्यासंबंधाची वाट ख्रिस्ती लोकांची पहिली पिढी फार उत्सुकतेनें पहात होती; आणि हा अवतार लवकरच होणार असा त्यांना दृढ विश्वास वाटत होता. असल्या मनःस्थितीमुळें होऊन गेलेल्या ख्रिस्तासंबंधाची माहिती लेखनिविष्ट करून कायम ठेवावी असा हेतु त्यांच्या मनांत उद्भवला नाहीं. या कारणामुळें ख्रिस्ती लोकांचें आरंभींचे जे लेख आहेत ते नीट विचारपूर्वक लिहिलेले नाहींत. तत्कालीन व्यावहारिक आवश्यकता एवढ्याच साध्या कारणास्तव ख्रिस्ती लोकांच्या मूळ लेखनाला आरंभ झाला.

अशा रीतीनें, सेंटपॉलनें थेस्सालोनियन लोकांना लिहिलेलीं दोन पत्रें हे ख्रिस्ती लोकांचे अगदीं सर्वांत जुने लेख होत. या सुमारास सेंट पॉल हा आपल्या धर्मसंप्रदायप्रचाराच्या कामास नुकताच लागला होता. त्यानें कांहीं चर्चेस (ख्रिस्ती उपासना मंदिरें) स्थापिलीं होतीं आणि अधिक स्थापण्याच्या विचारांत तो होता. त्याचीं हीं अगदीं पहिलीं पत्रें नुकत्याच संप्रदायप्रवेश करून ख्रिस्ती बनलेल्या लोकांना उपदेश म्हणून लिहिलेलीं होतीं. या दोन पत्रांपूर्वी असल्याच तऱ्हेचीं दुसरीं कांहीं पत्रें त्यानें लिहिलीं असावीं असें वाटतें,

पण तीं पत्रें कोणीं रक्षण करून ठेविलीं नाहींत. वास्तविक आश्चर्य हें आहे कीं, सेंटपॉलचीं बऱ्याच आरंभापासूनचीं पत्रें रक्षण करून ठेविलीं आहेत. व त्यावरून ख्रिस्तानुयायी बनलेल्या लोकांवर त्याचें किती वजन होतें हें स्पष्ट दिसतें. पहिल्या दोन्ही पत्रांत सेंट पॉलनें थेस्सालोनींना लेकरांच्या वर सांगितल्याप्रमाणें उत्कंठित झालेल्या मनोवृत्ती शांत करण्याचा प्रयत्न केला आहे. या पत्रांचा लोकांच्या मनांवर जो मोठा परिणाम झाला त्यामुळें ख्रिस्ती लोक या पत्रांना ईश्वरी प्रेरणेनें लिहिलीं गेलेलीं पत्रें अतएव पवित्र लेख मानूं लागले. या पत्रांनां पवित्र मानण्याबद्दल कोणी तरी मोठ्या अधिकारी व्यक्तीनें हुकूम सोडला होता ही समजूत चुकीची आहे. वास्तविक पाहतां त्या पत्रांचा जो मोठा परिणाम झाला त्यामुळेंच लोकें त्यांनां पवित्र पत्रें मानूं लागले.

थेस्सालोनी लोकांनां लिहिलेल्या पत्रांनंतर थोड्याच काळांतील म्हणजे सुमारें वर्षादीडवर्षांतील्च कॉरिंथकर लोकांनां लिहिलेलीं दोन पत्रें आहेत. हीं पत्रें लिहिलीं त्या वेळींहि लोक बरेच अस्वस्थ मनःस्थितींत होते. ख्रिस्ताचा पुन्हां लवकरच नवा अवतार होणार आणि जगाची पूर्वीची सर्व स्थिति बदलून नव्या युगाला आरंभ होणार असें लोकांना वाटत होतें. हा समज इतका दृढ पसरला होता कीं, लोक चालू दिवसापुढील दुसऱ्या दिवसाचा विचारच करीत नसत. कायमच्या संस्था स्थापण्याचा प्रयत्न करणें तशा स्थितींत अगदीं निरुपयोगी होतें. कारण प्रत्येक मनुष्य चालू घटकेबद्दलच कायतो पहात असे. अशा स्थितींत सदरहू पत्रांत नूतन संप्रदायप्रवेश केलेल्या लोकांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें किंवा चर्चच्या व्यवस्थेंत प्रत्यक्ष दिसणारे कांहीं दोष नाहींसे करण्यासंबंधाची योजना असलेच विषय येणें संभवनीय होतें. अर्थात् या लेखांनां केवळ पत्राचें स्वरूप आहे; किंवा पुस्तकाचें निबंधाचें स्वरूप नाहीं. ख्रिस्तसंप्रदाय प्रचारक सेंटपॉल यांच्या या पत्रांत कांहीं कांहीं ठिकाणीं उच्च भावना व जोरदार भाषा दृष्टीस पडते. त्यानें तत्कालीन सामान्य प्रश्नहि उच्च धार्मिक तत्वाच्या अनुरोधानें सोडवण्याचा प्रयत्न केला आहे. कॉरिंथकर लोकांनां लिहिलेल्या पत्रांवरून सेंटपॉलचा स्वभाव अधिकच चांगल्या प्रकारें व्यक्त होतो. सेंटपॉल मोठा धोरणी, प्रेमळ व कोमल अंतःकरणाचा होता; व इतकें असूनहि तो मोठा मुत्सद्दी आणि अधिकार चालविण्यास समर्थ होता.

सेंटपॉलच्या पत्रांनां हळू हळू तात्विक विवेचनाचें स्वरूप प्राप्त झालें. कारण लोकांची अवतारविषयक उत्सुकता नाहींशी होऊन निराळेच वादाचे मुद्दे पुढें आले. प्रतिगामी धोरणाच्या यहुदी लोकांनीं सेंटपॉलनें स्थापन केलेल्या चर्चवर हल्ला सुरू केल्यामुळें गॅलेशियांत मोठा आणीबाणीचा प्रसंग उद्भवला. त्यामुळें सेंटपॉलनें आणखी एक पत्र लिहिलें. या पत्रांत सेंटपॉलला स्वतःबद्दल व नवीन स्थापन झालेल्या ख्रिस्ती संप्रदायांतील तत्त्वांबद्दल खुलासा करावा लागला. त्यामुळें या पत्राचा बराचसा भाग संप्रदायासंबंधीच्या मुख्य प्रश्नानेंच व्यापलेला आहे.

यानंतर दोन तीन वर्षांनीं ( इ. स. ५५–५६ च्या सुमारास) सेंटपॉलनें रोमला भेट देण्याचा विचार केला; पण सरळ रोमला न जातां त्यानें प्रथम यरुशलेमला जाण्याचें ठरविलें, तिकडे जाण्यांत स्वतःच्या जिवाला धोका आहे हें जागृत होता. अशा स्थितींत त्यानें ख्रिस्तीसंप्रदायाच्या विवादविपयीभूत झालेल्या अंगाचें समर्थन करणारा लेख लिहून तो रोमन लोकांकडे पाठविला.

यहुदी संस्कृति आणि ख्रिस्ती संप्रदाय त्यांच्यामध्यें चालू असलेल्या भांडणामुळें ख्रिस्तीसंप्रदायाच्या तत्वांनां निश्चित स्वरूप साहजिकच येत गेलें. याच भांडणामुळें भविष्यकालापेक्षां चालू काळाकडे आणि तत्संलग्न अशा भूतकाळाकडे लोकांचें लक्ष अधिक लागलें. सेंटपॉलसारख्या माणसाला संप्रदायविषयक सिद्धान्त बनविणें भाग पडलें तें याच परिस्थितीमुळें होय. निरनिराळे भाग एकत्र करून ख्रिस्ती संप्रदायाला सुव्यवस्थित स्वरूप देण्याचा प्रयत्न सुरू झाला. हे प्रयत्नाचें स्वरूप इफीसकरांस व कलस्सैकरांस या पत्रांत चांगलें व्यक्त झालें आहे.

हीं पत्रें तत्कालीन विचारांतील प्रगति पुढें मांडण्याकरितां व ख्रिस्ताच्या शेजारीं इतर देवता बसवून ख्रिस्ती आचार भ्रष्ट करण्याची जी प्रवृत्ति वाढत होती तिला आळा घालण्याकरितां लिहिलेलीं होतीं. तें कार्य साधण्यासाठीं, पॉल यानें ख्रिस्ताचें महत्त्व पुनः पुन्हां वर्णन केलें व यहुदी व यहुदी नसलेल्या लोकांचा चर्चमध्यें अंतर्भाव करून त्याचें स्वरूप व्यापक करण्याची आपली कल्पना एक पाऊल आणखी पुढें ढकलली. अशा रीतीनें या पत्रांमध्यें मुख्यत्वेंकरून गूढ विषयाचें प्रतिपादन केलें जाऊं लागल्यामुळें त्यांचें पत्राचें स्वरूप जाऊन त्यांनां ग्रंथाचें स्वरूप येऊं लागलें. इफिसकरांस ( इफीसनांनां ) पत्र हें अनेक चर्चांच्या समूहास उद्देशून लिहिलेलें एक हुकूमवजा पत्र असल्यामुळें त्यांत तर हें ग्रंथाचें स्वरूप अधिक स्पष्ट होतें. फिलेमोनाला पत्र शुद्ध पत्राच्या स्वरूपांत आहे. आणि फिलिप्पैकरांस पत्र हेंहि मुख्यत्वेंकरून तसेंच आहे. पास्टोरल्स या पत्रांत पालनें टिमोथि व टायटस या आपल्या हाताखालच्या लोकांस उपदेश केलेला आहे. टिमोथि व टायटस यांच्या स्वाधीन जेथें पॉल यास स्वतः जातां येत नव्हतें अशीं चर्चें केलेलीं होतीं.

हिब्रूंनां पत्र हा पॉलच्या धर्तीवर लिहिलेला पॉलच्या एका शिष्याचा–किंवा ज्यावर पॉलच्या मतांचा बराच परिणाम झाला होता अशा एखाद्या इसमाचा–ग्रंथ आहे. या लेखकावर अलेक्झांड्रियाच्या फायलो नामक यहुदी उपदेशकाच्याहि मताचा बराचसा परिणाम झालेला दिसतो. हें पत्र बहुधा रोममधील हिब्रू ख्रिस्त्यांस, किंवा पॅलेस्टाइन मधील एखाद्या चर्चला, किंवा ज्याचें केंद्र सेसारीआ

सारख्या ठिकाणीं आहे. अशा एखाद्या चर्चच्या समूहास लिहिलें असावें यरुशलेमच्या चर्चला उद्देशून लिहिलेलें असणें संभवनीय नाहीं.

पॉलच्या पत्रांचें वर जें वर्णन केलें आहे तें हीं सर्व तेराचीं तेरा पत्रें खरोखर पॉलचींच आहेत असें गृहीत धरून केलेलें आहे. तथापि येथें एवढें सांगून ठेविलें पाहिजे कीं, यांपैकीं थेस्सलनीकेकरांच्या, कलस्सैकरांच्या, फिलेमोनच्या, इफिसकरांच्या व पास्टोरल्सच्या अस्सलपणाबद्दल आधुनिक चिकित्सक पंडितांस बरीच शंका आहे.

**शुभवर्तमानें व प्रेषितांचीं कृत्यें.**-सदरहू पुस्तकांचा उद्भवहि पॉलच्या पत्रांप्रमाणेंच झाला. हीं पुस्तकें देखील लोकांनीं त्यांना पवित्र ग्रंथ म्हणून मान द्यावा या उद्देशानें लिहिलेलीं नव्हतीं. ख्रिस्त पुन्हां अवतार घेणार आहे या आशेमुळें हे ग्रंथहि बराच काळपर्यंत लिहून ठेवण्याची आवश्यकता भासली नाहीं. तेंहि, जसजशी जरूर भासूं लागली तसतसे त्यांचे, निरनिराळे भाग लिहिले जाऊन तयार झाले. तेव्हां त्यांच्यासंबधा ज्या गोष्टी आपणांस माहिती नाहींत. त्या अनुमानानें घालूनच सर्व कथासूत्र जुळविलें पाहिजे. या ग्रंथांच्या रचनेसंबंधीं पुढें दिलेली उपपत्ति कांहींशीं सयुक्तिक दिसते.

संप्रदायप्रसाराचें काम कांहीं काळ केल्यानंतरच, विशेषतः जेथें ख्रिस्ताची किंवा ख्रिस्ती ध्येयांची लोकांस कांहींएक माहिती नव्हती अशा पॅलेस्टाइनबाहेरील प्रदेशांतल्या अनुभवाअंतीं, या आद्य संप्रदायप्रसारकांस आपला उपदेश परिणामकारक व्हावा म्हणून कांहीं तरी आधारभूत ग्रंथाची आवश्यकता भासूं लागली असावी. पूर्वकालीन ख्रिस्ती उपदेशकांचें एक वैशिष्ट्य हें होतें कीं, ते एकाच ठिकाणीं फार दिवस कधींहि रहात नसत. ते एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं सारखे भटकत होते. एका ठिकाणीं एक उपदेशक येऊन गेल्यावर दुसरा उपदेशक येईपावेतों तेथील लोकांवर पहिल्या उपदेशकानें बिंबविलेला उपदेश कायम ठेवण्यास कांहींच साधन नव्हतें. ख्रिस्तसंप्रदायाचा उपदेश ग्रहण करण्यास सर्व लोकांची मनोभूमि सारखीच तयार झालेली नव्हती. शुभवर्तमानामध्यें ज्यांचें 'ईश्वराच्या राज्याची वाट पाहणारे' म्हणून वर्णन केलें आहे, ते चांगले धार्मिक व जुन्या कराराचा काळजीपूर्वक अभ्यास केलेले असे लोक होते. या लोकांच्या कानावर ख्रिस्ताचें नांव जाण्यापूर्वींच ते उपर्युक्त ईश्वरी राज्याच्या आगमनास लायक बनले होते. उलट पक्षीं यहुदी समाजाबाहेरील जे लोक ख्रिस्ती झाले होते, त्यांचें नीतिशास्त्रांतील व एकेश्वरीउपासना मार्गांतील अगदीं मूलभूत तत्त्वांसंबंधीं देखील गाढ अज्ञान होतें. अशा रीतीनें अगदीं अडाणी लोकांपासून तों चांगल्या सुसंस्कृत माणसापावेतों सर्व प्रकारच्या लोकांचा ख्रिस्ती संप्रदायांत भरणा होता. या सर्वांना उपयोगीं पडेल असें एखादें संप्रदाय टिकविणारें साधन शोधून काढणें आवश्यक झालें. आद्यकालीन ख्रिस्तसंप्रदायप्रसारक आपला संप्रदाय वाढविण्याकरितां संप्रदायाबाहेरील लोकांपुढें असा उपदेश करीत होते कीं, 'लवकरच जगामध्यें कोणीएक व्यक्ति निर्माण होऊन ती या पृथ्वीवर आधिदैविक राज्य स्थापन करणार आहे' व राज्यासाठीं प्रत्येकानें स्वतः लायक बनलें पाहिजे. अर्थात लोकानां स्वतःस लायक बनवून घेण्याच्या कामीं मदत करण्याचा उत्तम मार्ग म्हटला म्हणजे, ख्रिस्ताच्या मतें लोकांनीं जीं नीतितत्त्वें आचरणांत आणावयास पाहिजेत तीं जींत स्पष्टपणें सांगितलीं आहेत अशी ख्रिस्ताच्या शिकवणुकीची रूपरेखा लोकांपुढें ठेवणें हा होय. हीं नीतितत्त्वें लोकांच्या पुढें मांडण्याच्या प्रयत्नांनींच पहिल्या ख्रिस्ती शुभवर्तमानास जन्म दिला असावा. ब्रिटानिकाकारांच्या मतें हें पहिलें शुभवर्तमान म्हणजे 'क्यू' या संक्षिप्त नांवानें संबोधला जातो तो भाग होय. हा भाग म्हणजे जगांत कसें आचरण ठेवावें या विषयीं नियम घालून देणाऱ्या वचनांचा एक संग्रह आहे.

लोकांच्या मनांत ऐतिहासिक गोष्टींबद्दल जिज्ञासा उत्पन्न झाली ती यानंतर कांहीं कालानें जेव्हां मरणोत्तर स्थितीसंबंधीं त्यांची जिज्ञासा कांहीं अंशीं कमी झाली व त्यांची दृष्टि भविष्यकाळावरून निघून भूतकाळाकडे वळली तेव्हांच, झाली असावी. ख्रिस्ती लोकांमध्यें भूतकालीन गोष्टींबद्दलची ही इतिहासविषयक जिज्ञासा इ. स. ६०-७० या काळापर्यंत उत्पन्न झाली नव्हती असें मानावयास आधार आहे. या जिज्ञासेमुळेंच सध्यांचें सेंट मार्कचें शुभवर्तमान अस्तित्वांत आलें. हें शुभवर्तमान बहुधा इ.स. ६४-७० या काळाच्या दरम्यान रोम येथें रचलें गेलें असावें. हें हल्लींचें शुभवर्तमान मूळच्या दुसऱ्या एखाद्या शुभवर्तमानावरून तयार करण्यांत आलें असेल अशी शंका घेण्यास पुरेसा आधार नाहीं.

'क्यू' या नांवानें ओळखला जाणारा माथ्यू (मत्तय) व लूक या दोहोंच्या ग्रंथांत आढळून येणारा लोजिया नांवाचा भाग व मार्कचें शुभवर्तमान या दोन ग्रंथांवरच शुभवर्तमानाचें पुढील वाङ्मय आधारिलेलें आहे. हल्लींचा माथ्यूचा व लूकचा ग्रंथ हे उपर्युक्त दोन लिखाणांतील मजकूर भिन्न भिन्न रीतींनीं मांडून व त्यांत स्वतः संपादकांनीं मिळविलेल्या मजकुराची भर पडून तयार झाले आहेत. हिब्रूंचें शुभवर्तमान, पीटरचें शुभवर्तमान वगैरे ज्या कांहीं दुसऱ्या शुभवर्तमानांचे थोडथोडके भाग आज उपलब्ध आहेत, तीं देखील या दोन लिखाणांपासूनच तयार झालीं असणें संभवनीय आहे.

लूक यानें इतिहासकारास शोभेल असा जो आपल्या ग्रंथास उपोद्घात जोडला आहे त्यावरून शुभवर्तमान तयार करण्याचें काम प्रथम लूक यानेंच केलें असें दिसतें. हा ग्रंथ थिओफिलस (थियफिल) नामक इसमास उद्देशून लिहिलेला असून थिओफिलस हा ज्यास ख्रिस्ती संप्रदायाचीं मुख्य मुख्य तत्त्वें आगोदरच परिचित करून दिलेलीं होतीं असा कोणी तरी सरकारी कामगार असावा. या ग्रंथाची

मांडणी बहुतांशी लूक याच्याच डोक्यांतून निघालेली असून प्रेषितांचीं कृत्यें हा त्याचा दुसरा भाग आहे. प्रो. हार्नाक-सारखे विद्वान पंडित सुद्धां लूक हाच तिसरें, शुभवर्तमान व प्रेषितांचीं कृत्यें यांचा कर्ता आणि अंतिम संपादक आहे, या इंग्लंडमध्यें सर्वत्र प्रचलित असलेल्या मतांस येऊन मिळाला आहे.

हल्लींच्या शुभवर्तमानांमध्यें ज्या मूलभूत लिखाणांचा उपयोग करण्यांत आला होता त्यांच्या उत्पत्तिसंबंधानें व स्वरूपासंबंधानें वर दिलेला निष्कर्ष काढण्यास कारणें कारक झालीं आहेत तीं अशीः—

(१) या शुभवर्तमानांच्या ग्रंथांचें वाङ्मयीन पृथक्करण केलें असतां माथ्यू ( मत्तय ) व लूक या दोहोंतहि असणारे असे कित्येक भाग आढळतात. हे भाग एके काळीं स्वतंत्र लिखाणांच्या रूपानें अस्तित्वांत असले पाहिजेत. (२) या लिखाणांत मुख्यत्वेंकरून ख्रिस्ताचा स्वभाव, व त्यानें उपदेशिलेल्या धार्मिक व नैतिक कल्पना ज्यांत स्पष्टपणें व्यक्त झाल्या आहेत अशा त्याच्या वचनांचा संग्रह होता.(३) माथ्यू यानें लोजिया नामक हिब्रू ग्रंथ रचला असें मूळ इ. स. च्या पहिल्या शतकाच्या अखेरीस केलें गेलेलें स्पष्ट विधान आपणांसमोर आहे. लोजिया या शब्दाचा अर्थ 'ईश्वराच्या अधिकारयुक्त वचनांचा संग्रह' असा होऊं शकतो. (४) पूर्वकालीन ख्रिस्तसंप्रदायप्रसारकास मागें वर्णन केलेल्या परिस्थितींत उपदेश करावा लागत होता असें आपणांस डायडॅची नामक ग्रंथावरून कळतें; ज्याला "दोन मार्ग" असें नामाभिधान आहे तो या ग्रंथाचा पहिला भाग यहुद्यांपैकी जे लोक ख्रिस्तसंप्रदायांत नवीन प्रवेश करीत असत त्यांच्या हातीं आधारभूत धर्मग्रंथ म्हणून देण्यांत येत असे. ब्रिटानिकाकारांच्या उपपत्तीप्रमाणें लोजिया या ग्रंथाचा उपयोग उपर्युक्त "दोन मार्ग" या प्रकरणाप्रमाणेंच होत असावा. (५) या मतास पुष्टि देणारी गोष्ट म्हटली म्हणजे मूळ १२ प्रवक्त्यांच्या सान्निध्यांत नसलेले ख्रिस्ती लोक देखील त्यांनां ख्रिस्ताच्या आयुष्याची सविस्तर माहिती नसली तरी ख्रिस्ताच्या स्वभावांतील महत्वाच्या मुद्यांशीं व ख्रिस्ती ध्येयांशीं चांगले परिचित होते.

वरच्याप्रमाणेंच पहिलें शतक संपण्यापूर्वी केलेलें दुसरें एक विधान असें आहे कीं, मार्क यानें सेंटपीटर याच्या ( पेत्राच्या )'उपदेशावरून आपलें शुभवर्तमान रचलें. याचा अर्थ असा नाहीं कीं, मार्क यानें आपल्या ग्रंथांत स्वतःचे अनुभव किंवा अन्यसाधनापासून गोळा केलेली माहिती मुळींच अंतर्भूत केली नसेल. सेंट पीटरपासून मार्क यास फक्त कच्चा मालच मिळाला होता. तो तपासून त्याची पद्धतशीर मांडणी करण्याचें काम मार्क यानेंच केलें असून तें इतकें उत्तम साधलें आहे कीं, त्यास या कामीं दुसऱ्या एखाद्या चांगल्या माणसाची मदत झाली असावी अशी शंका येऊं लागते. इरीनीयस ( अजमासें इ. स. १८५ ) म्हणतो कीं, शुभवर्तमान हें पीटरच्या मरणापावेतों प्रसिद्ध झालें नव्हतें. यावरून तें इ. स. ६५-७० यांच्या दरम्यान रचलें गेलें असावें असें अनुमान निघतें.

लूक याचा ग्रंथ केव्हां संपूर्ण झाला ही गोष्ट या ग्रंथाचा कर्ता लूक किंवा दुसरा कोणी उत्तरकालीन शिष्य होता हें ठरविण्यावर अवलंबून आहे. त्याचप्रमाणें प्रेषितांचीं कृत्यें या ग्रंथाच्या कर्त्यांनें इ. स. ९३ किंवा ९४ मध्यें प्रसिद्ध झालेला जोसेफसचा अँटिक्विटीज नामक ग्रंथ पाहिला होता किंवा नव्हता या प्रश्नाच्या उत्तरावरहि लूकच्या ग्रंथाचा कालनिर्णय बराचसा अवलंबून आहे. माथ्यूचा ग्रंथ इ. स. ७०-१०० यांच्या दरम्यान केव्हां तरी तयार झालेला दिसतो.

**कॅथोलिक पत्रें.**—या पत्रांनां असें नांव पडण्याचें कारण तीं एखाद्या विशिष्ट चर्चला उद्देशून लिहिलेलीं नसून सामान्यतः सर्वच ख्रिस्ती लोकांस किंवा निदान बऱ्याचे मोठ्या प्रदेशांतील ख्रिस्ती लोकांस उद्देशून लिहिलेलीं आहेत. याला २ व ३ योहान हीं पत्रें अपवाद आहेत. पत्रांच्या एका विशिष्ट वर्गास हें नांव प्रथम ४ थ्या शतकाच्या आरंभीं युसीबिअसनें दिलेलें आढळतें. एक एकट्या पत्रास हें नांव ओरिजिनीझ यानें दिलें असून इ. स. च्या दुसऱ्या शतकाइतक्या प्राचीनकाळीं या नांवाचा अशा प्रकारें उपयोग केलेला पहावयास मिळतो. उत्तरकालीन लॅटिन भाषेंत कॅथोलिक याचा अर्थ जवळ जवळ कॅनॉनिकल या शब्दाप्रमाणेंच होऊं लागला.

पॉलच्या पत्रांनीं जें कार्य केलें तेंच कार्य उपर्युक्त वर्गांतील पत्रांनीं पुढें चालविलें. १ पीटर ( पेत्राचें पत्र ) हें ( पेत्राचें पहिलें ) पत्र जर अस्सल असेल तर तें पॉल याच्या आयुष्याच्या अखेरीच्या सुमारास लिहिलें गेलें असावें. हें पत्र आशियामायनरमधील ख्रिस्ती लोकांस त्यांचा छळ होऊं लागला असतां उपदेश करण्याकरितां व उत्तेजन देण्याकरितां लिहिलेलें होतें. जेम्स याचें [ याकोबाचें ] पत्र [ तें अस्सल असलें तर ] ख्रिस्ताच्या भावाच्या आयुष्याच्या अखेरी अखेरीस लिहिलेलें असावें. हें पत्र त्यावेळींच लिहिलेलें असलें तर तें पॉल याचे लेख प्रत्यक्ष पाहून त्यावर टीका ह्मणून लिहिलेलें नसून त्याच्या उपदेशाची जी कांहीं ऐकीव माहिती यरुशलेमला जाऊन पोहोंचत होती, तिच्यावर टीका करण्याकरितां लिहिलेलें होतें. अशा प्रकारचे वादविवाद नेहमीं वादांतील मंडळी एकमेकांचीं मतें बरोबर समजावून घेऊनच करतात असें नाहीं. जूडाचें [ यहूदाचें ] पत्र केव्हां व कोठें लिहिलें गेलें तें सांगतां येत नाहीं, व २ पीटर हें पत्र तर अस्सल आहे कीं नाहीं याचीच शंका येते. या पत्राच्या अस्सलपणाबद्दल लोकांस अगोदरपासूनच शंका होती असें दिसतें. त्यास कॅनॉनमध्यें स्थान मिळालें तें मोठ्या मुष्किलीनें मिळालें, व तेंहि त्याच्या अस्सलपणाबद्दल कांहीं खात्रीलायक पुरावा उपलब्ध होता म्हणून नसून

त्याचा कॅनॉनमध्यें अंतर्भाव केला जाण्यास चांगला कसून विरोध झाला नाहीं म्हणून होय.

१ पीटर व जेम्स या पत्रांसंबंधीं बोलतांना देखील ' तीं अस्सल असलीं तर ' अशीच प्रस्तावना केली पाहिजे. परंतु तसें करण्याचें कारण त्यां अस्सलपणाबद्दल पुरेसा पुरावा उपलब्ध नाहीं हें नसून, त्यांच्या अस्सलपणाबद्दल पुष्कळां-कडून शंका प्रदर्शित केली गेली आहे हें होय. १ पीटर हें पत्र प्राचीन काळापासूनच पीटरचें समजलें जात आहे. जेम्सच्या पत्राच्या अस्सलपणाबद्दल पुरावा १ पीटरच्या-इतका भरपूर नसला तरी तो प्राचीन काळच्या लेखांतून आढळून येतो. हीं दोन्हींहि पत्रें अस्सल असलीं तरी ज्यांचें स्पष्टीकरण करतां येत नाहीं अशा त्यांत कांहीं गोष्टी आहेत हें मात्र खोटें नाहीं. १ पीटर या पत्राचें पॉलच्या पत्राशीं इतकें सादृश्य आहे कीं, या पत्रांतला बराचसा भाग सिल्व्हे-नस याचा आहे असें प्रतिपादन करणारी उपपत्ति खरी असावी असें कधीं कधीं वाटूं लागतें. हें पत्र ज्यानें पॉलचीं एकदोन पत्रें वाचलीं होतीं अशा इसमानें लिहिलेलें असण्या-पेक्षां पॉलच्या सांनिध्यांत ज्यानें बरेच दिवस काढले आहेत अशा त्याच्या मित्रानें लिहिलेलें असणें अधिक संभव-नीय आहे.

**योहानचे लेख.**—योहानच्या नांवावर असलेलें शुभ-वर्तमान व पत्रें आणि आपोकालिप्स ( नव्या करारांतल्या शेवटच्या पुस्तकांत सांगितल्याप्रमाणें सेंट जॉन यांस झालेला साक्षात्कार ) या लेखांचा एक स्वतंत्रच वर्ग होत असल्यामुळें योहानचीं पत्रें कॅथोलिक पत्रांच्या सदरांत येत असतांहि त्यांच्यासंबंधीं विवेचन योहानचे लेख या सदराखालीं करणें सोईचें पडतें. या लेखासंबंधीं सर्व संमत मुद्दे म्हटले म्हणजे २ पीटर या पत्राखेरीज हे बहुधा नव्या करारांतील सर्वांत अलीकडचे लेख असावेत. हे सर्व लेख एका स्वतंत्र वर्गांतील दिसतात तरी ते लिहिण्यास कितीजणांचे हात लागले असतील हें नक्की सांगतां येत नाहीं. ते सर्व लेख पहिल्या शत-काच्या अखेरीस लिहिलेले आहेत. आपोकालिप्स हें रीनॅन व यर्नाक यांच्या मतें इ. स. ९३ च्या सुमारास तयार झालें होते, व बाकीचे लेख बहुतेक डोमिशिअन (इ. स. ८१–९६) याच्या कारकीर्दीत लिहिले गेले असावेत. कांहीं संशोध-कांच्या मतें या दुसऱ्या लेखांचा रचनाकाल सुमारें वीस वर्षें नंतर असावा. या लेखांचा इफिसच्या ( इफिसकर ) जॉन (योहान)शीं थोडया बहुत प्रमाणांत कांहीं तरी संबंध असावा. उलट पक्षीं ज्या मुद्यांसंबंधीं सर्वांत जास्त मतभेद आहे, ते मुद्दे पुढें दिल्याप्रमाणें आहेत. हा योहान कोण होता—ज्यास ' प्रियशिष्य ' म्हणतात तोच हा काय ? आद्यसंप्रदाय प्रसा-रक झेबेडीपुत्र तोच हाच कीं दुसरा कोणी ? शुभवर्तमानाचा व पत्रांचा लेखक तोच आपोकालिप्सचाहि काय ? इफि-सकर योहान व शुभवर्तमान यांच्यामधील नक्की संबंध काय ? तो शुभवर्तमानाचा खास कर्ता आहे किंवा केवळ त्याचीं वचनें त्यांत दिलेलीं आहेत ? ३ या शुभवर्त-मानाच्या लेखकाचा ऐतिहासिक दृष्टि ठेवण्याचा कितपत विचार होता, व तो कितपत साध्य झाला आहे ? हा शेवटचा प्रश्नच सर्वांत जास्त महत्त्वाचा आहे.

या गुंतागुंतीच्या प्रश्नाचा अखेर कांहींहि निकाल लागो, एवढें मात्र निःसंशय आहे कीं, चर्चच्या इतिहासांत व ख्रिस्ती दैवतशास्त्रांत चौथ्या शुभवर्तमानानें फार महत्त्वाचें कार्य केलें आहे. त्यानें आद्यसंप्रदायप्रसारकांच्या कालांत कार्य करीत असणाऱ्या सर्व शक्ती आपणामध्यें एकवटल्या; आणि उपोद्घा-ताच्या रूपानें ग्रीक तत्त्वज्ञानाशीं संबंध जोडून ख्रिस्ती संप्रदा-याच्या प्रमुख मतांना असें स्वरूप दिलें कीं, तो संप्रदाय यहुदी समाजाच्या बाहेरील लोकांनां पूर्वीपेक्षां अधिक प्रिय झाला आणि त्या शुभवर्तमानाला यूरोपीय जगाच्या विचारांत प्रमुखस्थान मिळालें. ख्रिस्ती संप्रदायाला व्यवस्थित स्वरूप देण्याचा पुढील काळांत प्रयत्न झाला त्यावर या शुभवर्तमानाइतका दुसऱ्या कोणत्याहि आद्यकालीन ख्रिस्तसांप्रदायिक लेखाचा परिणाम झालेला नाहीं.

**नव्या करारांत अंतर्भूत न झालेलें वाङ्मय.**—नव्या करारांतील लेख हे कांहीं ख्रिस्ती सांप्रदायिक वाङ्-मयांतील अखेरचेच लेख नाहींत. उलटपक्षीं त्यांच्याशीं कमी अधिक प्रमाणांत सादृश्य असलेले इतर बरेच लेख यानंतरच्या काळांत निर्माण झाले. पुष्कळ अंशीं नवीन कराराच्या धर्तीवर असलेले असे ॲपॉस्टॉलिक, वस्तुतः सब-ॲपॉस्टॉलिक म्हणजे आद्य ख्रिस्त संप्रदायप्रसारकांच्या नंतरच्या काळांतील धर्मगुरूंचे लेख. उदाहरणार्थ, रोमच्या क्लेमेंटचीं कॅरिंथक-रांस पत्रें, डायडॅची, बर्नाबस, इग्नेशिअसचीं पत्रें पॉलि-कार्प ( पत्रगुच्छां )मधील एकटें पत्र, हर्मसचा मेंढपाल व ज्यास क्लेमेंटचें दुसरें पत्र म्हणतात तें व्याख्यान. हे सर्व चर्चमधील पुढारी लोकांचे लेख असून त्यांनीं आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या आद्य ख्रिस्तसंप्रदायप्रसारकांचें कार्य पुढें चालू ठेवलें होतें. यांशिवाय हिब्रू, इजिप्शियन, पीटर, टॉमस वगैरेंचीं शुभवर्तमानें, नुकताच सांपडलेला लोजिया; निकोडेमसचें शुभवर्तमान; जेम्सचे प्रोटेव्हँजेलिअम; थॉमसचें शुभवर्तमान; पायलटचीं कृत्यें; पीटरचीं उपदेशपर व्याख्यानें; पीटरचें आपोकालिप्स इत्यादि ॲपॉक्रिफल ( अनिर्णीतकर्तृक ) शुभवर्तमानें व कृत्यें या सदरांत मोडणारे लेख आहेत. जसजसें दुसरें शतक लोटूं लागलें तसतसे आग्रिप्पा, कॅस्टर क्वाड्रेटस, ॲरिस्टिय-टीझ यांचे वादविवादात्मक व तत्त्वज्ञानात्मक लेख बाहेर पडूं लागले. २ऱ्या शतकाच्या मध्यांत जस्टिन मार्टिर सारखा प्रख्यात ग्रंथकार होऊन गेला. या जस्टिनबरोबर आद्य संप्र-दायप्रसारकांनंतरचा संधिप्रकाशाचा काळ समाप्त होऊन चर्च-च्या खऱ्याखुऱ्या इतिहासास सुरुवात होते.

**निवडानिवड व जुळवाजुळव.—(१) निवडा-निव.**—आद्य ख्रिस्तसंप्रदायप्रसारकांच्या काळांत ख्रिस्ती लोकांची अशी भावना होती कीं, आपण एका अतिमानवी चळवळीच्या प्रवाहांत पुढें चाललों आहोंत. या चळवळीस पेंटिकॉस्टच्या दिवशीं म्हणजे यहुदी लोक मिसर देशांतून निघाल्यानंतर सात आठवड्यांनीं सुरुवात होऊन पहिल्या शतकाच्या अखेर पावेतों ती जोरांत चालू होती; आणि जेव्हां ती कमी होऊं लागली तेव्हां देखील ती हळूहळूच कमी झाली. हा अवस्थांतराचा क्षण डायडॅचीमध्यें स्पष्टपणें दृग्गोचर होतो. तेथें पूर्वीच्या आद्य संप्रदायप्रसारकांची व प्रवक्त्यांची जागा हळू हळू बिशप, प्रेसबिटर, डीकन वगैरे चर्चचे कायम अधिकारी घेत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. ज्याला आपण हल्लीं नवा करार म्हणतों, तो टिकून राहण्याचें कारण, तें उपर्युक्त मोठ्या चळवळीच्या चांगल्या दिवसांतील वाङ्मय आहे अशी समजूत होती हें होय. या काळांत चर्चमध्यें "पवित्र आत्म्याचा" विशेषेंकरून जास्त संचार होता; आणि त्याच्या प्रेरणेनेंच नव्या करारांतील लेख लिहिले गेले अशी लोकांची प्रामाणिक समजूत होती. उदाहरणार्थ, आपण जो कांहीं उपदेश करतों तो ईश्वराच्या प्रेरणेनेंच करीत असतों व म्हणून आपले शब्द ते ईश्वराचेच शब्द आहेत असा सेंट पॉल याचा पूर्ण विश्वास होता. (१ थेस्सलोनीकेकरांस पत्र २. १३). पॉल प्रमाणेंच इतर उपदेशकांनांहि कमीजास्त प्रमाणांत तसें वाटत होतें. उपदेशकांच्या मनांतील ही जाणीव आपोकालिप्स मध्यें स्पष्टपणें व्यक्त झाली आहे.

या आद्यकालीन लोकांनां आपल्या कार्याच्या महत्त्वाची व त्यासाठीं लागणारे गुण आपल्या अंगीं असल्याबद्दलची जाणीव होती हें जरी खरें आहे, तरी या काळांतील आज उपलब्ध असलेले सर्व लेख (कदाचित् यास आपोकालिप्स अपवाद असेल, किंवा सात चर्चेनां लिहिलेल्या पत्रांवरून दिसतें त्याप्रमाणें आपोकालिप्ससुद्धां) प्रसंगानुसार आणि स्वाभावीक रीत्या निर्माण झाले होते यांत शंका नाहीं. आद्य संप्रदायप्रसारकांचा व प्रवक्त्यांचा आयुष्यक्रम व त्यांचीं कृत्यें हीं एकंदरींत इतर लोकांहून भिन्न नव्हतीं; केवळ संप्रदायप्रसाराच्या विशिष्ट कार्यापुरतेंच या लोकांनां आपण कोणी दैवी शक्ति अंगीं संचरलेले असे मोठे पुरुष आहोंत असें वाटत होतें. आपण ईश्वरी प्रेरणेनें केव्हां बोलत आहोंत व केव्हां नाहीं, हें स्वतः पॉलला देखील कळत होतें; आणि तें कांहीं अंशीं आपणांस त्याच्या पत्रांत देखील ओळखतां येतें. हाच नियम इतर लेखकांसहि लागू आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. तिसरें शुभवर्तमान व प्रेषितांचीं कृत्यें यांसारख्या ऐतिहासिक पुस्तकांत लेखक इतर सामान्य माणसाप्रमाणेंच इतिहास देतांना दृष्टीस पडतो; व आपण कांहीं अधिक करीत आहोंत असें तो दाखवीतहि नाहीं (१. १-४). इतिहासलेखनाच्या शास्त्रीय पद्धतीशीं हे लेखक अपरिचित असल्यामुळें त्यांच्या ग्रंथांत इतिहासाच्या दृष्टीनें चुका राहणें अपरिहार्य होतें. स्वतः लेखकहि आपण अगदीं बिनचूक माहिती देत आहोंत या भावनेनें लिहीत असलेले दिसत नाहींत. आतांपावेतों वर्णन केलेले पूर्वकालीन लेखक व तदुत्तरकालीन लेखक यांच्या लेखांतील मुख्य फरक म्हटला म्हणजे, या पहिल्या कालांतील लेखकांचा ज्या चर्चचे आपण अंगभूत आहोंत त्याची, एकंदर चळवळ ईश्वरीप्रेरणेनें चालली आहे असा विश्वास होता, तर तदुत्तरकालीन लेखकांचा तो तसा नव्हता.

तथापि पहिल्या कालांतील आधिदैविक प्रेरणा अमुक एका वेळीं नाहींशी झाली असें आपणांस नक्की सांगतां येत नाहीं. रोमचा क्लेमेंट (इ. स. ९७) आणि इग्नेशिअस [अजमासें इ. स. ११०] या दोघांचे लेख अवस्थांतराच्या कालांतील आहेत. उदाहरणार्थ, इग्नेशिअस हा आपला दर्जा आद्य संप्रदायप्रसारकाइतका श्रेष्ठ नाहीं असें स्पष्ट सांगतो; तथापि त्याला देखील कधीं कधीं आपण ईश्वरी प्रेरणेनें बोलत आहों असें वाटत होतें. क्लेमेंटनें सुद्धां याचप्रमाणें दोन ठिकाणीं जणूं काय याच्या मार्फत ईश्वरच बोलत आहे अशा रीतीनें लिहिलें आहे.

**(२) जुळवाजुळव.**—अशा रीतीनें उच्च दर्जाच्या व हलक्या दर्जाच्या लेखांत भेद करण्याच्या प्रवृत्तीबरोबरच उच्च दर्जाच्या लेखांच्या संहितीकरणाच्या कामास सुरवात झाली. या प्रवृत्तीचें सर्वांत जुनें उदाहरण पॉलच्या पत्रांसंबंधांत दिसून येतें. मार्शिअन (अजमासें इ. स. १४०) याच्याजवळ पॉलच्या १३ पत्रांपैकीं दहांची संहिता होती. तथापि हें संहितीकरणाचें काम मार्शिअन याच्या एक पिढी अगोदर पासूनच होऊं लागलें असावें. पॉलिकार्प (पत्रगुच्छ) मधील लहान पत्रांत पॉलच्या १३ पत्रांपैकीं ९ पत्रांचा उल्लेख सांपडतो. याच्या किंचित् काळ अगोदर लिहिणारा इग्नेशिअस हा सहांचा स्पष्ट उल्लेख करतो. या दोन पुरुषांनीं उल्लेखिलेल्या पत्रांवरून त्यांनीं सर्व तेराच्या तेरा पत्रांचा संग्रह पहावयास मिळत असावा असें अनुमान निघूं शकतें. पॉलिकार्पवरून मोठ्या लोकांचे लेख गोळा करण्याची लोकांना किती आवड होती हें स्पष्ट होतें.

पॉलच्या पत्रांचें संहितीकरण करण्यांत आलें होतें यावरून तीं पवित्र मानलीं जात होतीं असें मात्र अनुमान निघूं शकत नाहीं. त्यांच्याबद्दल लोकांच्या मनांत केवळ आदरयुक्त भावना होती एवढेंच कायतें.

इरिनिअसमधील एका प्रसिद्ध वचनावरून त्या वेळीं चर्चमध्यें सामान्यतः फक्त ४ शुभवर्तमानेंच ठेवलीं जात असत असें दिसतें. तथापि त्या काळीं सुद्धां चौथें शुभवर्तमान न मानणारा एक पक्ष होता, व मार्शिअन हा तर फक्त लूकचें शुभवर्तमानच प्रमाणभूत मानतो. परंतु इरिनीअसच्या लिहिण्याचा रोंख असा दिसतो कीं, [अजमासें

इ. स. १८५ ] रंगाच्या आठवर्णांतल्या काळापासून चाऱ्हींची चाऱ्ही शुभवर्तमानें आधारभूत मानली जात आली होती. इ. स. १७० च्या सुमारास टेशिअन यानें या चार शुभवर्तमानांचा उपयोग करून आपला ग्रंथ लिहिला. त्यानें या चारांशिवाय दुसऱ्या एखाद्या शुभवर्तमानाचा उपयोग केला असल्यास तो फारच थोडा असला पाहिजे. तेव्हां इरिनीअस व टेशिअन यांनीं उल्लेखिलेल्या चार शुभवर्तमानांचें श्रेष्ठत्व दुसऱ्या शतकाच्या मध्यांत प्रस्थापित झालें होतें असें सामान्यतः मानण्यास हरकत दिसत नाहीं. अर्थात् या चारांशिवाय दुसरें एखादें शुभवर्तमान मधून मधून कोणी प्रमाणभूत मानीत नसेल असें नाहीं. ही निवडानिवड करण्याची क्रिया यानंतरहि पुढें चालू राहून दुसऱ्या शतकाच्या अखेरीस ती संपूर्ण झाली असावी.

येणेंप्रमाणें चर्चेनें केलेली निवड अगदीं पूर्णपणें बरोबर असेलच असें म्हणतां येत नाहीं. अस्सल म्हणून निवडलेले कांहीं भाग तसे नसतील तर उलट पक्षीं टाकून दिलेल्या पैकीं कांहीं भाग अस्सलहि असूं शकतील. परंतु सामान्यतः आद्यकालीन चर्चेनें केलेली निवडच उत्तरकालांत कायम केली असें ह्मणावयास हरकत नाहीं.

आतां उतारे घेऊन नव्या कराराच्या स्वरूपाचें स्पष्टीकरण करूं. शुभवर्तमानें तयार कशीं झालीं याचा वृत्तांत मागें दिलाच आहे. येशूचीं चरित्रें त्याच्या वधानंतर जर दोन पिढ्यांनीं लिहिलीं गेलीं तर त्याचें विश्वसनीय चरित्र कमी स्पष्ट झालें आहे. शुभवर्तमानामध्यें येशूच्या ठायीं ईश्वर पुत्रत्व स्थापन झालें आणि अनेक चमत्कारांचें कर्तृत्व त्याच्या ठायीं आरोपिलें गेलें. ते चमत्कार आपण वगळून व आख्यायिकाहि वगळून येशूचे उपदेश काय होते त्याच्याकडे लक्ष देऊं. त्याच्या उपदेशांत प्राचीन प्रवक्त्यांपासून त्यांस निराळें पण आणणारें कांहीं तरी विशेष होतें असें दिसून येतें. त्याचें डोंगरावरील प्रवचन फार प्रख्यात आहे त्याचें प्रथम अवतरण करूं.

"तेव्हां लोकसमुदायास पाहून तो डोंगरावर गेला, व खालीं बसल्यावर त्याचे शिष्य त्याच्याजवळ आले. २ आणि तो तोंड उघडून त्यांस शिकवूं लागला कीं, ३ जे आत्म्यानें "दीन" ते धन्य, कारण स्वर्गाचें राज्य त्यांचें आहे. ४ "जे शोक करितात" ते धन्य, कारण "ते सांत्वन पावतील." ५ "जे सौम्य" ते धन्य, कारण "ते पृथ्वीचें वतन पावतील." ६ जे धार्मिकतेचे भुकेले व तान्हेले ते धन्य, कारण ते तृप्त होतील. ७ जे दयाळू ते धन्य, कारण त्यांवर दया होईल. ८ "जे अंतःकरणानें शुद्ध" ते धन्य, कारण ते देवाला पाहतील. ९ जे शांति करणारे ते धन्य, कारण त्यांस देवाचे पुत्र म्हणतील. १० धार्मिकतेकरितां ज्यांचा छळ झाला आहे ते धन्य, कारण स्वर्गाचें राज्य त्यांचें आहे. ११ जेव्हां माझ्यामुळें लोक तुमची निंदा व छळ करतील व तुम्हांविरुद्ध सर्व प्रकारचें वाईट लबाडीनें बोलतील तेव्हां तुम्ही धन्य. १२ आनंद व उल्हास करा, कारण स्वर्गांत तुमचें प्रतिफळ मोठें; कारण तुम्हांपूर्वी जे प्रवक्ते होऊन गेले त्यांचा त्यांनीं तसाच छळ केला.

१३ तुम्ही पृथ्वीचें मीठ आहां; जर मिठाचा मीठपणा गेला तर त्याला मीठपणा कशानें येईल? तें बाहेर टाकिलें जाऊन माणसांच्या पायांखालीं तुडविलें जावें याशिवाय कोणत्याहि उपयोगाचें नाहीं. १४ तुम्ही जगाचा प्रकाश आहां; डोंगरावर वसलेलें नगर लपत नाहीं; १५ दिवा लावून मापाखालीं ठेवीत नाहींत, दिवठणीवर ठेवितात, म्हणजे तो घरांतील सर्वांवर उजेड पाडितो; १६ त्याप्रमाणें तुमचा उजेड लोकांपुढें पडो, यासाठीं कीं, त्यांनीं तुमचीं चांगलीं कामें पाहावीं, आणि तुमच्या स्वर्गांतील बापाचें गौरव करावें.

१७ मी नियमशास्त्र व प्रवचनशास्त्र हीं रद्द करायास आलों असें समजूं नका; रद्द करायास नाहीं, तर पूर्ण करायास मी आलों आहें. १८ मी तुह्मांस खचीत सांगतों, कीं आकाश व पृथ्वी नाहींशीं होतपर्यंत सर्व गोष्टी पूर्ण झाल्यावांचून नियमशास्त्राची एक मात्रा किंवा एक बिंदु नाहींसा होणार नाहीं. १९ यास्तव जो कोणी या अगदीं लहान आज्ञांतील एक रद्द करील व तदनुसार लोकांस शिकवील त्याला स्वर्गाच्या राज्यांत अगदी लहान ह्मणतील, आणि जो कोणी त्या पाळील व शिकवील त्याला स्वर्गाच्या राज्यांत मोठा ह्मणतील. २० मी तुम्हांस सांगतों कीं, शास्त्री व परूशी यांच्यापेक्षां तुमची धार्मिकता अधिक असल्यावांचून स्वर्गाच्या राज्यांत तुमचा प्रवेश होणारच नाहीं.

२१ "मनुष्यहत्या करूं नको," आणि जो कोणी मनुष्यहत्या करील तो न्यायसभेच्या दंडास पात्र होईल असें प्राचीन लोकांस सांगितलें होतें, हें तुम्ही ऐकिलें आहे. २२ मी तर तुम्हांस सांगतों कीं, जो कोणी आपल्या भावावर रागें भरेल तो न्यायसभेच्या दंडास पात्र होईल; आणि जो कोणी आपल्या भावाला अरे वेडगळा, असें म्हणेल, तो वरिष्ठ सभेच्या दंडास पात्र होईल, आणि जो कोणी त्याला अरे मूर्खा, असें ह्मणेल तो अग्निनरकाच्या दंडास पात्र होईल. २३ यास्तव तूं आपलें दान अर्पिण्यास वेदीजवळ आणीत असतां, तूं आपल्या भावाचा अपराधी आहेस असें तेथें तुला स्मरण झालें, २४ तर तेथेंच वेदीपुढें आपलें दान तसेंच ठेव, आणि जा, प्रथम आपल्या भावाशीं समेट कर, आणि मग येऊन आपलें दान अर्पण कर. २५ तूं आपल्या वाद्याबरोबर वाटेंत आहेस तोंच लवकर त्याशीं समेट कर, नाहीं तर कदाचित् वादी तुला न्यायाधीशाच्या हातीं देईल, व न्यायाधीश तुला शिपायाच्या हातीं देईल, व तूं बंदीशाळेंत पडशील. २६ मी तुला खचीत सांगतों, तूं दमडीनदमडी फेडशील तोंपर्यंत तींतून सुटणारच नाहींस.

२७ "व्यभिचार करूं नको" ह्मणून सांगितलें होतें हें तुह्मीं ऐकिलें आहे. २८ मी तर तुम्हांस सांगतों कीं, जो कोणी स्त्रीकडे कामदृष्टीनें पाहतो त्यानें आपल्या अंतःकरणात

तिजशीं व्यभिचार केलाच आहे. २९ तुझा उजवा डोळा तुला अडखळवितो तर तो उपटून टाकून दे, कारण तुझें संपूर्ण शरीर नरकांत टाकलें जावें यापेक्षां तुझ्या एका अवयवाचा नाश व्हावा यांत तुझें बरें आहे. ३० आणि तुझा उजवा हात तुला अडखळवितो तर तो तोडून टाकून दे, कारण तुझें संपूर्ण शरीर नरकांत पडावें यापेक्षां तुझ्या एका अवयवाचा नाश व्हावा यांत तुझें बरें आहे. ३१ " कोणी आपली बायको टाकिली तर त्यानें तिला सूटपत्र द्यावें, " हेंहि सांगितलें होतें. ३२ मी तर तुह्मांस सांगतों कीं, जो कोणी आपली बायको व्यभिचाराच्या कारणावांचून टाकितो तो तिला व्यभिचारिणी करितो, आणि जो कोणी अशा टाकिलेलीशीं लग्न करितो तो व्यभिचार करितो.

३३ [illegible]टी शपथ वाहूं नको, " तर " आपल्या शपथा प्रभूपाशीं खऱ्या कर " ह्मणून प्राचीन लोकांस सांगितलें होतें, हेंहि तुम्हीं ऐकिलें आहे. ३४ मी तर तुम्हांस सांगतों कीं, शपथ ह्मणून वाहूंच नको; " स्वर्गाची " नको, कारण " तो देवाचें सिंहासन आहे "; ३५ " पृथ्वीचीहि " नको, कारण " ती त्याचें पादासन आहे "; यरुशलेमेचीहि नको, कारण " ती थोर राजाचें नगर " आहे. ३६ आणि आपल्या मस्तकाचीहि शपथ वाहूं नको, कारण तुझ्यानें एकहि केंस पांढरा किंवा काळा करवत नाहीं. ३७ तर तुमचें बोलणें होय होय, किंवा नाहीं नाहीं, एवढेंच असावें; याहून जें अधिक तें वाईटापासून आहे. ३८ "डोळ्याबद्दल डोळा" व " दांताबद्दल दांत " असें सांगितलें होतें, हें तुम्हीं ऐकिलें आहे. ३९ मी तर तुम्हांस सांगतों कीं, दुष्टाला अडवूं नका; तर जो कोणी तुझ्या उजव्या गालावर मारील त्याकडे दुसरा गाल कर; ४० जो तुजवर फिर्याद करून तुझी बंडी घेऊं पाहतो, त्याला तुझा अंगरखाहि घेऊं दे; ४१ आणि जो कोणी तुला वेठीस धरून एक कोस नेईल त्याबरोबर दोन कोस जा. ४२ जो तुजजवळ मागतो त्याला दे, आणि जो तुजपासून उसनें घेऊं इच्छितो त्याला पाठमोरा होऊं नको.

४३ " आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर ", व आपल्या वैऱ्याचा द्वेष कर असें सांगितलें होतें, हें तुम्ही ऐकिलें आहे. ४४ मी तर तुम्हांस सांगतों कीं, तुम्ही आपल्या वैऱ्यावर प्रीति करा आणि जे तुमचा छळ करितात त्यासाठीं प्रार्थना करा, ४५ म्हणजे तुम्ही आपल्या स्वर्गांतील बापाचे पुत्र व्हाल; कारण तो वाईटांवर व चांगल्यांवर आपला सूर्य उगवितो, आणि धार्मिकांवर व अधार्मिकांवरहि पाऊस पाडितो, ४६ जे तुम्हांवर प्रीति करितात त्यांवर तुम्ही प्रीति करितां तर तुम्हाला काय प्रतिफल? जकातदारहि तसेंच करितात कीं नाहीं? ४७ आणि तुम्ही आपल्या भाऊबंदास मात्र सलाम करितां तर तुम्ही त्यांत विशेष काय करितां विदेशीहि तसेंच करितात कीं नाहीं? ४८ यास्तव जसा तुमचा स्वर्गीय पिता पूर्ण आहे, तसे तुम्ही पूर्ण व्हा.

मनुष्यांनीं पाहावें या हेतूनें तुम्ही आपलें धर्माचरण त्यांच्या समोर न करण्याविषयीं जपा; केलें तर तुमच्या स्वर्गांतील बापापाशीं तुम्हांस प्रतिफल नाहीं.

२ यास्तव तूं धर्म करितोस तेव्हां ढोंगी जसे मनुष्यांनीं आपली कीर्ति वर्णावी म्हणून सभास्थानांत व रस्त्यांत आपणांपुढें करणा वाजवितात, तसें करूं नको, मी तुम्हांस खचीत सांगतों कीं, ते आपलें प्रतिफल भरून पावले आहेत. ३ तूं तर धर्म करितोस तेव्हां तुझा उजवा हात काय करितो हें तुझ्या डाव्या हाताला कळूं नये; ४ या साठीं कीं तुझें धर्म करणें गुप्तपणें व्हावें, म्हणजे तुझा गुप्तदर्शी पिता तुला फळ देईल.

५ आणि तुम्ही प्रार्थना करितां तेव्हां ढोंग्यासारिखे होऊं नका; कारण मनुष्यांनीं आपणांस पाहावें म्हणून सभास्थानांत व चवाठ्यांवर उभें राहून प्रार्थना करणें त्यांस आवडतें. मी तुम्हांस खचीत सांगतों कीं, ते आपलें प्रतिफल भरून पावले आहेत. ६ तूं तर प्रार्थना करितोस तेव्हां "आपल्या खोलींत जा, व दार लावून" आपल्या गुप्तवासी पित्याची "प्रार्थना कर" म्हणजे तुझा गुप्तदर्शी पिता तुला फल देईल. ७ तुम्हीं प्रार्थना करितां, तेव्हां विदेश्यांसारखी व्यर्थ बडबड करूं नका; आपल्या बहुभाषणामुळें आपलें मागणें मान्य होईल असें त्यांस वाटतें. ८ तुम्ही तर त्यांसारिखे होऊं नका, कारण तुम्हांस जें कांहीं अवश्य आहे तें तुम्हीं मागितल्यापूर्वी तुमचा बाप जाणतो. ९ यास्तव या प्रकारें प्रार्थना करा; "हे आमच्या स्वर्गांतील पित्या, तुझें नाम पवित्र मानिलें जावो. १० तुझें राज्य येवो. जसें स्वर्गांत तसें पृथ्वीवरहि तुझ्या इच्छेप्रमाणें होवो. ११ आमची प्रतिदिवसाची भाकर आज आम्हांस दे, १२ आणि जसें आम्हीं आपल्या ऋण्यांस ऋण सोडिलें आहे तशीं, तूं आमचीं ऋणें आम्हांस सोड. १३ आणि आम्हांस परिक्षेत आणूं नको; तर आम्हांस वाईटापासून सोडीव." १४ जर तुम्ही मनुष्यांच्या अपराधांची क्षमा करितां. तर तुमचा स्वर्गीय पिता तुमची क्षमा करील; १५ परंतु जर तुम्ही मनुष्यांच्या अपराधांची क्षमा करीत नाहीं, तर तुमचा पिता तुमच्या अपराधांची क्षमा करणार नाहीं.

१६ तुम्ही उपास करितां तेव्हां ढोंग्यासारिखे म्लानमुख होऊं नका, कारण आपणांस उपास आहे असें मनुष्यांस दिसावें, म्हणून ते आपलें तोंड विरूप करितात. मी तुम्हांस खचीत सांगतों कीं, ते आपलें प्रतिफल भरून पावले आहेत. १७ तूं तर उपास करितोस तेव्हां आपल्या डोक्याला तेल लाव, व आपलें तोंड धू; १८ यासाठीं कीं तूं उपास करितोस हें मनुष्यांस दिसावें म्हणून नव्हे, तर तुझा गुप्तवासी पिता याला दिसावें, म्हणजे तुझा गुप्तदर्शी पिता तुला फल देईल.

१९ पृथ्वीवर आपणांकरितां संपत्ति सांठवूं नका, तेथें कसर व जंग लाऊन नाश करितात, आणि चोर घर फोडून चोरी करितात; २० तर स्वर्गांत आपणांकरितां संपत्ति

सांठवा; तेथें कसर व जंग खाऊन नाश करीत नाहींत; व चोर घर फोडून चोरी करीत नाहींत; २१ कारण जेथें तुमची संपत्ति आहे तेथें तुमचें चित्तहि असणार. २२ डोळा शरीराचा दिवा आहे, यास्तव तुझा डोळा निर्दोष असला तर तुझें संपूर्ण शरीर प्रकाशमय होईल. २३ आणि तुझा डोळा सदोष असला तर तुझें संपूर्ण शरीर अंधकारमय होईल; यास्तव तुझ्यांतील प्रकाश अंधार असला, तर तो अंधार केवढा? २४ कोणाच्यानें दोन धन्यांची चाकरी करवत नाहीं, कारण तो एकाचा द्वेष करील व दुसऱ्यावर प्रीति करील; अथवा एकाशीं निष्ठेनें वागेल व दुसऱ्याला तुच्छ मानील. तुमच्यानें देवाची आणि धनाची सेवा करवत नाहीं. २५ यास्तव मी तुम्हांस सांगतों कीं, आपल्या जीवाविषयीं, म्हणजे आपण काय खावें व काय प्यावें; आणि आपल्या शरीराविषयीं, म्हणजे आपण काय पांघरावें अशी काळजी करूं नका. अन्नापेक्षां जीव व वस्त्रापेक्षां शरीर विशेष आहे कीं नाहीं? २६ आकाशांतील पांखरें पाहा, तीं पेरीत नाहींत, कापीत नाहींत, व कोठारांत सांठवीत नाहींत; तरी तुमचा स्वर्गीय पिता त्यांस खावयास देतो, तुम्हीं त्यांपेक्षां श्रेष्ठ आहां कीं नाहीं? २७ तुम्हांतील कोण काळजी करून आपलें आयुष्य हातभर वाढवायास समर्थ आहे? २८ आणि वस्त्राविषयीं कां काळजी करितां? रानांतील भूकमलें कशीं वाढतात हें लक्षांत आणा; तीं कष्ट करीत नाहींत व कांतीत नाहींत, २९ तरी मी तुम्हांस सांगतों कीं, शलमोन देखील आपल्या सर्व वैभवांत त्यांतल्या एकासारिखा सजला नव्हता. ३० जें रानांतलें गवत आज आहे व उद्यां भट्टींत पडतें. त्याला जर देव असा पोषाक घालतो, तर अहो अल्प विश्वासी, तो विशेषेंकरून तुम्हांस पोषाक घालणार नाहीं काय? ३१ यास्तव काय खावें, काय प्यावें, काय पांघरावें, असें म्हणत काळजी वाहूं नका, ३२ कारण हीं सर्व मिळवायास विदेशी लोक झटतात; या सर्वांची गरज तुम्हांस आहे, हें तुमच्या स्वर्गीय पित्यास ठाऊक आहे. ३३ तर तुम्ही प्रथम त्याचें राज्य व त्याची धार्मिकता मिळवायास झटा, म्हणजे यावर तींहि सर्व तुम्हास मिळतील. ३४ यास्तव उद्यांची काळजी करूं नका, कारण उद्यांची काळजी उद्यां करील; ज्या दिवसाचें दुःख त्या दिवसाला पुरे. (मत्तय, अ.५व६)

तुमचा न्याय करूं नये म्हणून तुम्हीं न्याय करूं नका; २ कारण ज्या प्रकारचा तुम्ही न्याय कराल त्या प्रकारचा तुमचा न्याय होईल, आणि ज्या मापानें तुम्ही माप घालितां त्याच मापानें तुमच्या पदरीं पडेल. ३ तूं आपल्या डोळ्यांतलें मुसळ ध्यानांत न आणितां आपल्या भावाच्या डोळ्यांतलें कुसळ कां पाहतोस? ४ अथवा तुझ्या डोळ्यांतलें कुसळ मला काढूं दे, असें तूं आपल्या भावाला कसें म्हणशील? पाहा, तुझ्या तर डोळ्यांत मुसळ आहे. ५ अरे ढोंग्या, तूं पहिल्यानें आपल्या डोळ्यांतलें मुसळ काढ, म्हणजे तुला आपल्या भावाच्या डोळ्यांतलें कुसळ काढावयास स्पष्ट दिसेल.

६ जें पवित्र तें कुत्र्यांस घालूं नका, आणि आपलीं मोत्यें डुकरांपुढें टाकूं नका; टाकाल तर तीं त्यांस पायाखालीं तुडवितील व उलटून तुम्हांस फाडितील.

७ मागा म्हणजे तुम्हांस दिलें जाईल, शोधा म्हणजे तुम्हांस सांपडेल, ठोका म्हणजे तुम्हांस उघडलें जाईल; ८ कारण जो कोणी मागतो, तो पावतो, व जो शोधितो त्याला सांपडतें, व जो ठोकितो त्यास उघडलें जाईल ९ आपल्या पुत्रानें भाकर मागितली तर त्याला धोंडा देईल, १० आणि मासा मागितला तर त्याला साप देईल, असा तुम्हांमध्यें कोण मनुष्य आहे? ११ यास्तव तुम्ही वाईट असतां आपल्या लेंकरांस चांगल्या देणग्या देण्याचें समजतां, तर तुमच्या स्वर्गांतील बापापाशीं जे मागतात त्यांस तो किती विशेषें करून चांगल्या देणग्या देईल? १२ याकरितां लोकांनीं असें तुम्हांशीं वर्तन करावें म्हणून तुमची इच्छा आहे तसेंच तुम्हीं त्यांशीं वर्तन करा, कारण नियमशास्त्र व प्रवचनशास्त्र हेंच आहे.

१३ अरुंद दरवाज्यानें आंत जा, कारण नाशाकडे जाण्याचा दरवाजा रुंद व मार्ग पसरट आहे, आणि त्यांतून आंत जाणारे बहुत आहेत, १४ कारण जीवनाकडे जाण्याचा दरवाजा अरुंद व मार्ग संकोचित आहे, आणि ज्यांस तो सांपडतो ते थोडके आहेत.

१५ खोट्या प्रवक्त्यांविषयीं जपा, ते मेंढराच्या वेषानें तुम्हांकडे येतात, तरी अंतरीं क्रूर लांडगे आहेत. १६ तुम्हीं त्यांच्या फळांवरून त्यांस ओळखाल. कांटेरी झाडांवरून द्राक्षें, किंवा रिंगणीच्या झाडांवरून अंजीर काढितात काय? १७ त्याप्रमाणें प्रत्येक चांगलें झाड चांगलें फळ देतें, आणि नासकें झाड वाईट फळ देतें. १८ चांगल्या झाडाला वाईट फळें येत नाहींत, आणि नासक्या झाडाला चांगलीं फळें येत नाहींत. १९ जें जें झाड चांगलें फळ देत नाहीं तें तें तोडून अग्नींत टाकिलें जातें. २० यास्तव तुम्हीं त्यांच्या फळांवरून त्यांस ओळखाल. २१ मला, हे प्रभु, हे प्रभु, असें म्हणणाऱ्या प्रत्येकाचा प्रवेश स्वर्गाच्या राज्यांत होईल असें नाहीं तर जो माझ्या स्वर्गांतील बापाच्या इच्छेप्रमाणें वर्ततो त्याचा होईल. २२ त्या दिवशीं मला बहुत म्हणतील, हे प्रभू, हे प्रभू, "आम्हीं तुझ्या नांवानें प्रवचन सांगितलें," व तुझ्या नांवानें भूतें घालविलीं, व तुझ्या नांवानें बहुत अद्भुत कृत्यें केलीं नाहींत काय? २३ तेव्हां मी त्यांस स्पष्ट सांगेन कीं, मला तुमची कधींच ओळख नव्हती. "अहो अधर्म करणाऱ्यांनो, मजपासून निघून जा." २४ यास्तव जो प्रत्येक माझीं हीं वचनें ऐकून त्यांप्रमाणें वर्ततो तो कोणी एका शहाण्या मनुष्यासारिखा ठरेल; त्यानें आपलें घर खडकावर बांधिलें; २५ मग पाऊस पडला, पूर आला, वाराहि सुटला, व त्या घरास लागला; तरी तें पडलें नाहीं, कारण

त्याचा पाया खडकावर घातला होता. २६ आणि जो प्रत्येक माझीं हीं वचनें ऐकून त्यांप्रमाणें वर्तत नाहीं तो कोणी एका मूर्ख मनुष्यासारिखा ठरेल, त्यानें आपलें घर वाळूवर बांधिलें २७ मग पाऊस पडला, पूर आला, वाराहि सुटला, व त्या घरास लागला; आणि तें पडलें, व तें पडणें भारी होतें." (मत्तय अध्याय ७).

येशूच्या उपदेशामुळें त्याच्या शिष्यांचें आचरण जुन्या आचारधर्माशीं सुटून निराळें होऊं लागलें तेव्हां जुन्या नियमशास्त्राचा संरक्षक येशू आपल्या शिष्यांच्या आचरणाचें समर्थन करिता झाला तद्विषयक उल्लेख येणें प्रमाणें:

"१४ त्या वेळेस योहानाचे शिष्य त्याकडे येऊन म्हणाले, आम्ही व परूशी पुष्कळ उपास करितों, तुझे शिष्य उपास करीत नाहींत, हें कां? १५ येशूनें त्यांस म्हटलें, वऱ्हाड्याच्या बरोबर वर आहे तोंपर्यंत त्यांच्यानें शोक करवेल काय? परंतु त्यांपासून वराला नेतील असा काळ येईल, तेव्हां ते उपास करतील. १६ कोऱ्या कापडाचें ठिगळ जुन्या वस्त्राला कोणी लावीत नाहीं, कारण थड करण्याकरितां जें कोरें लाविलें तें जुन्याला फाडून घेतें व भोंक अधिक मोठें होतें. १७ आणि नवा द्राक्षारस जुन्या बुधल्यांत कोणी घालीत नाहींत, घातला तर बुधले फुटून द्राक्षारस सांडतो, आणि बुधले नासतात; तर नवा द्राक्षारस नव्या बुधल्यांत घालितात व दोन्ही नीट राहतात. (मत्तय अ० ९).

येशू संप्रदायप्रवर्तक तयार करण्यासाठीं उपदेश कोणच्या प्रकारचा करी तो मत्तयाच्याच शुभवर्तमानांत दिला आहे. तो उपदेश येथें देतों.

"५ या बारा जणांस येशूनें अशी आज्ञा करून पाठविलें कीं, विदेश्यांकडे जाणाऱ्या वाटेंत जाऊं नका, व शोमरोनी यांच्या कोणत्याहि नगरांत प्रवेश करूं नका; ६ तर इस्राएलाच्या घरचीं जीं हरपलेलीं मेंढरें त्यांजकडे जा. ७ आणि जातांना असा उपदेश करा कीं, स्वर्गाचें राज्य जवळ आलें आहे. ८ रोग्यांस बरें करा, मेलेल्यांस उठवा, कुष्ठ्यांस शुद्ध करा, भूतें काढा, तुम्हांस फुकट मिळालें आहे. फुकट द्या. ९ सोनें किंवा रुपें किंवा तांबें आपल्या कंबरकशांत घेऊं नका; १० वाटेसाठीं झोळणा, दुसरा अंगरखा, वाहणा, किंवा काठी घेऊं नका, कारण कामकरी पोषणास योग्य आहे. ११ ज्या ज्या नगरांत किंवा गांवांत तुम्ही जाल, त्यांत कोण कोण योग्य आहे हें शोधून पाहा; आणि तुम्ही निघून जाईपर्यंत त्याच्या येथें राहा. १२ आणि घरांत जातांना तुला शांति असो असें म्हणा; १३ आणि तें घर योग्य असलें तर तुमची शांति त्याला प्राप्त होवो; तें योग्य नसलें तर तुमची शांति तुम्हांकडे परत येवो. १४ आणि जो कोणी तुमचा स्वीकार करणार नाहीं, व तुमचीं वचनें ऐकणार नाहीं, त्याच्या घरांतून किंवा नगरांतून निघतांना आपल्या पायांची धूळ झाडून टाका. १५ मी तुम्हांस खचित सांगतों कीं, न्यायाच्या दिवशीं त्या नगरापेक्षां सदोम व गमोरा यांच्या देशाला सोपें जाईल.

"१६ पहा, मी लांडग्यांमध्यें मेंढरासारखें तुम्हांस पाठवितों, यास्तव तुम्ही सापांसारिखे चतुर व खबुत्रांसारखे साळसूद व्हा. १७ मनुष्यांविषयीं जपा; कारण ते तुम्हांस न्यायसभांच्या स्वाधीन करतील, व आपल्या सभास्थानांत तुम्हांस फटके मारतील; १८ आणि देशाधिकारी व राजे यांस व विदेश्यांस साक्ष पटावी म्हणून तुम्हांस त्यांपुढें माझ्यामुळें नेतील. १९ आणि तुम्हांस स्वाधीन करतील तेव्हां कसें काय बोलावें याविषयीं काळजी करूं नका, कारण तुम्हीं काय बोलावें याची त्याच घटकेस तुम्हांस प्रेरणा होईल. २० कारण बोलणारे तुम्ही नाहीं, तर तुमच्या बापाचा आत्मा हाच तुम्हांमध्यें बोलणारा आहे. २१ भाऊ भावाला व बाप मुलाला जिवें मारण्यास धरून देईल, आणि 'मुलें आईबापावर उठून' त्यांस जिवें मारतील. २२ माझ्या नामामुळें सर्व लोक तुमचा द्वेष करितील; जो शेवटपर्यंत टिकेल तोच तरेल. २३ जेव्हां एका नगरांत तुमचा छळ करितील तेव्हां दुसऱ्यांत पळून जा, मी तुम्हांस खचित सांगतों, मनुष्याचा पुत्र येईपर्यंत इस्राएलाचीं नगरें तुम्हांस आटोपणार नाहींत.

"२४ गुरूपेक्षां शिष्य थोर नाहीं. २५ आणि धन्यापेक्षां दास थोर नाहीं. २५ शिष्य गुरूसारखा व दास धन्यासारिखा व्हावा, इतकें त्यांस पुरे, घरधन्यास बालजबूल म्हटलें तर घरच्या माणसांस किती विशेषेंकरून म्हणतील? २६ यास्तव त्यांस भिऊं नका, कारण उघड होणार नाहीं असें कांहीं झांकलेलें नाहीं; आणि कळणार नाहीं असें कांहीं गुप्त नाहीं. २७ जें मी तुम्हांशीं अंधारांत बोलतों तें उजेडांत सांगा, आणि तुमच्या कानांत सांगितलेलें जें तुम्हीं ऐकतां तें धाब्यांवरून गाजवा. २८ आणि जे शरीराला वधितात, पण आत्म्याला वधावयास समर्थ नाहींत त्यांस भिऊं नका, तर, आत्मा व शरीर या दोहोंचा नरकांत नाश करावयास जो समर्थ आहे त्याला भ्या. २९ दोन चिमण्या दमडीला विकतात कीं नाहींत? तथापि तुमच्या बापाच्या सत्तेशिवाय त्यांतून एकहि भूमीवर पडत नाहीं. ३० तुमच्या डोक्यावरले सर्व केंस देखील मोजलेले आहेत. ३१ यास्तव भिऊं नका; बहुत चिमण्यांहून तुमचें मोल अधिक आहे. ३२ जो कोणी मनुष्यांसमोर मला अंगीकारील त्याला मीहि आपल्या स्वर्गांतील बापासमोर अंगीकारीन. ३३ पण जो कोणी मनुष्यांसमोर मला नाकारील त्याला मीहि आपल्या स्वर्गांतल्या बापासमोर नाकारीन.

"३४ मी पृथ्वीवर शांतता चालवावयास आलों असें समजूं नका, मी शांतता चालवावयास नव्हे, तर तरवार चालवावयास आलों. ३५ कारण 'पुत्र व बाप, कन्या व आई, सून व सासू, यांत विरोध' पाडण्यास मी आलों. ३६ आणि 'मनुष्याच्या घरचेच लोक त्याचे वैरी होतील.'

३७ जो माझ्यापेक्षां बापावर किंवा आईवर अधिक प्रीति करितो तो मला योग्य नाहीं; आणि जो माझ्यापेक्षां पुत्रावर किंवा कन्येवर अधिक प्रीति करितो तो मला योग्य नाहीं. ३८ आणि जो आपला वधस्तंभ उचलून घेऊन माझ्या मागून येत नाहीं तो मला योग्य नाहीं. ३९ ज्यानें आपला जीव राखिला तो त्याला गमावील, आणि ज्यानें माझ्याकरितां आपला जीव गमाविला तो त्याला राखील.

४० जो तुम्हांस अंगीकारितो, तो मला अंगीकारितो, आणि जो मला अंगीकारितो, तो ज्यानें मला पाठविलें त्याला अंगीकारितो. ४१ प्रवक्त्याला प्रवक्ता म्हणून जो अंगीकारितो त्याला प्रवक्त्याचें प्रतिफल मिळेल; आणि धार्मिकाला धार्मिक म्हणून जो अंगीकार करितो त्याला धार्मिकाचें प्रतिफल मिळेल. ४२ आणि या लहानांतील एकाला शिष्य म्हणून जो कोणी गार पाण्याचा प्याला केवळ पाजितो तो आपल्या प्रतिफलाला मुकणारच नाहीं, असें मी तुम्हांस खचीत सांगतों" (मत्तय अ० १०).

जुन्या आचार धर्माशीं भावनाप्रधान व नीतिप्रधान धर्माचा उडालेला खटका मत्तयानें वर्णन केला आहे तो असा.

"तेव्हां यरुशलेमहून परूशी व शास्त्री येशूकडे येऊन म्हणाले,—२ तुझे शिष्य वडिलांचा संप्रदाय कां उलंघितात? कारण भोजनसमयीं ते हात धूत नाहींत. ३ त्यानें त्यांस उत्तर दिलें कीं तुम्हीहि आपल्या संप्रदायेंकरून देवाची आज्ञा कां उल्लंघितां? ४ कारण देवानें असें म्हटलें कीं, तूं 'आपल्या बापाचा व आईचा सन्मान कर;' आणि 'जो बापाची किंवा आईची निंदा करितो त्याला देहांत शिक्षा व्हावी.' ५ परंतु तुम्ही म्हणतां, 'जो कोणी बापाला अथवा आईला म्हणेल कीं, जें मीं दिल्यानें तुझें हित मजकडून झालें असतें तें अर्पण आहे'— ६ तो आपल्या बापाचा सन्मान करणारच नाहीं. या प्रकारें तुम्हीं आपल्या संप्रदायेंकरून देवाचें वचन रद्द केलें आहे. ७ अहो ढोंगी, तुम्हांविषयीं यशयानें प्रवचन ठीक सांगितलें कीं, ८ 'हे लोक ओंठांनीं माझा सन्मान करितात, परंतु त्यांचें अंतःकरण मजपासून दूर आहे. ९ ते मनुष्यांचे नियम, शास्त्र म्हणून शिकवून माझी व्यर्थ भक्ति करितात." १० तेव्हां त्यानें समुदायाला आपणाकडे बोलावून म्हटलें, ऐका व समजून घ्या; ११ जें तोंडांत जातें तें मनुष्याला विटाळीत नाहीं; तर जें तोंडांतून निघतें तें मनुष्याला विटाळवितें. १२ नंतर शिष्य येऊन त्याला म्हणाले, 'हें वचन ऐकून परूशी अडखळले हें तुला कळलें काय?' १३ त्यानें उत्तर दिलें कीं, जें जें रोप माझ्या स्वर्गीय पित्यानें लाविलें नाहीं तें उपटलें जाईल. १४ त्यांस असूं द्या; ते आंधळे वाटाडे आहेत.आणि आंधळा आंधळ्याला नेऊं लागला तर दोघेहि खांचेंत पडतील. १५ पेत्रानें त्याला उत्तर दिलें, हा दाखला आम्हांस फोडून सांग. १६ तो म्हणाला, अजूनहि तुम्ही सुद्धां अज्ञानी आहां काय? १७ जें कांहीं तोंडांत जातें तें पोटांत उतरतें, व बाहेर शौचकूपांत टाकलें जातें हें तुम्ही समजत नाहीं काय? १८ जें तोंडांतून निघतें तें अंतःकरणांतून येतें व मनुष्याला विटाळवितें, १९ कारण अंतःकरणांतून दुष्ट कल्पना, खून, व्यभिचार, जारकर्में, चोऱ्या, खोट्या साक्षी, शिव्यागाळी, हीं निघतात; मनुष्याला विटाळविणारीं तीं हींच आहेत, न धुतलेल्या हातांनीं जेवणें हें तर मनुष्याला विटाळवीत नाहीं." (मत्तय अ० १५)

आचरणानें अयोग्य पण उपदेश करण्यांत पटाईत अशा वर्गाशीं देखील येशूस अप्रिय व्हावें लागलें. त्यास उत्पन्नावर बसलेल्या लोकांचीं ढोंगें बाहेर काढावीं लागलीं; आणि प्रवक्त्यांचा लोकांनीं छळ केला त्याबद्दलहि येशूस बोलावें लागलें. त्या स्थितीचा निदर्शक उतारा मत्तयांत सांपडतो.

"तेव्हां येशू लोकसमुदायांस व आपल्या शिष्यांस म्हणाला, २ शास्त्री व परूशी हे मोशेच्या आसनावर बसले आहेत, ३ यास्तव ते जें कांहीं तुम्हांस सांगतील तें अवघें आचरा व पाळा, परंतु त्यांच्या करण्याप्रमाणें करूं नका, कारण ते सांगतात पण करीत नाहींत. ४ ते जड व वाहावयास कठिण अशीं ओझीं बांधून लोकांच्या खांद्यावर देतात, परंतु तीं सारण्यास ते स्वतः बोटहि लावावयाचे नाहींत. ५ आणि मनुष्यांनीं पाहावीं म्हणून ते आपलीं सर्व कामें करितात, आणि आपलीं मंत्रपत्रें रुंद करतात, व आपले गोंडे मोठे करतात, ६ जेवणावळींत श्रेष्ठ स्थानें व सभास्थानांत श्रेष्ठ आसनें, ७ व चवाठ्यावर नमस्कार घेणें व लोकांकडून गुरुजी असें म्हणवून घेणें हीं त्यांस आवडतात. ८ तुम्ही तर आपणांस गुरुजी असें म्हणवून घेऊं नका; कारण तुमचा गुरु एक आहे, व तुम्ही सर्व भाऊ आहां. ९ पृथ्वीवरील कोणाला बाप म्हणूं नका, कारण तुमचा बाप एक आहे, तो स्वर्गीय आहे. १० आणि आपणांस गुरु असें म्हणवून घेऊं नका, कारण तुमचा गुरु एक, तो ख्रिस्त आहे ११ जो तुम्हांमध्यें मोठा त्यानें तुमचा सेवक व्हावें. १२ जो कोणी आपणाला उंच करील तो नीच केला जाईल, आणि जो कोणी आपणाला नीच करील तो उच्च केला जाईल.

"१३ अहो शास्त्री व परूशी, अहो ढोंग्यांनो, तुम्हांस हाय हाय! कारण तुम्ही स्वर्गाचें राज्य लोकांनीं आंत जाऊं नये म्हणून बंद करितां, तुम्ही स्वतां आंत जात नाहीं व आंत जाणाऱ्यांसहि जाऊं देत नाहीं.

"१५ अहो शास्त्री व परूशी, अहो ढोंग्यानो, तुम्हांस हाय हाय! कारण तुम्ही एक शिष्य मिळवायासाठीं समुद्र व भूमि फिरतां, आणि तो मिळाला म्हणजे तुम्ही त्याला आपणांहून दुप्पट नरकाचा पुत्र करितां.

"१६ अहो आंधळ्या वाटाड्यांनो, तुम्हांस हाय हाय! कारण तुम्ही म्हणतां, कोणी देवळाची शपथ घेतली; तर त्यांत कांहीं नाहीं परंतु कोणी देवळाच्या सोन्याची शपथ घेतली तर तो ऋणी आहे. १७ अहो मूर्ख व आंधळ्यांनो, मोठें कोणतें, तें सोनें किंवा ज्याच्या योगानें तें सोनें पवित्र

झालें तें देऊळ! १८ तुम्ही म्हणतां, कोणी वेदीची शपथ घेतली तर त्यांत कांहीं नाहीं, परंतु तिजवरील अर्पणाची शपथ कोणी घेतली तर तो ऋणी आहे. १९ अहो अंधळ्यांनो, मोठें तें कोणतें, अर्पण किंवा अर्पण पवित्र करणारी वेदि? २० यास्तव जो कोणी वेदीची शपथ घेतो तो तिची व तिजवर जें कांहीं आहे त्याची शपथ घेतो. २१ आणि जो देवळाची शपथ घेतो तो त्याची व त्यांत राहणाऱ्याची शपथ घेतो; २२ आणि जो स्वर्गाची घेतो तो देवाच्या सिंहासनाची व त्यावर बसणाऱ्याची शपथ घेतो.

२३ अहो शास्त्री व परूशी, अहो ढोंग्यांनो, तुम्हांस हाय हाय! कारण पुदिना व शेपा व जिरें यांचा दशमांश तुम्ही देतां. आणि नियमशास्त्रांतील मुख्य गोष्टी, म्हणजे न्याय व दया व विश्वास ह्या तुम्हीं सोडल्या आहेत; ह्या करावयाच्या होत्या, तरी त्या सोडिल्या पाहिजेत असें नाहीं. २४ अहो अंधळया वाटाड्यांनो, तुम्ही मुरकूट गाळून काढितां व उंट गिळून टाकितां.

२५ अहो शास्त्री व परूशी, अहो ढोंग्यांनो, तुम्हांस हाय हाय! कारण ताटवाटी बाहेरून साफ करितां पण तीं आंतून जुलूम व असंयम यांनीं भरलीं आहेत. २६ अरे अंधळया परूशा, पहिल्यानें वाटी आंतून साफ कर, म्हणजे ती बाहेरूनहि साफ होईल.

२७ अहो शास्त्री व परूशी, अहो ढोंग्यांनो तुम्हांस हाय हाय! कारण तुम्हीं चुना लावलेल्या कबरांसारिखे आहां, त्या बाहेरून सुंदर दिसतात, परंतु आंतून मेलेल्यांच्या हाडांनीं व सर्व प्रकारच्या मळानें भरल्या आहेत. २८ तसेंच तुम्ही बाहेरून लोकांस धार्मिक दिसतां, परंतु आंतून ढोंगानें व अधर्मानें भरलेले आहां.

२९ अहो शास्त्री व परूशी, अहो ढोंग्यांनो, तुम्हांस हाय हाय! कारण तुम्ही प्रवक्त्यांच्या कबरा बांधितां व धार्मिकांचीं थडीं शृंगारितां; ३० आणि म्हणतां, आम्ही आपल्या वडिलांच्या दिवसांत असतों तर प्रवक्त्यांचा रक्तपात करण्यांत त्यांचे भागिदार झालों नसतों. ३१ यावरून तुम्ही प्रवक्त्यांचा घात करणाऱ्यांचे पुत्र आहां, अशी तुम्ही आपणांस साक्ष देतां. ३२ तर तुम्ही आपल्या वडिलांचें माप भरा. ३३ अहो सापांनो, सापांच्या पिलांनो, नरकदंड कसा चुकवाल? ३४ यास्तव, पहा, मी तुम्हांकडे प्रवक्ते व ज्ञानी व शास्त्री यांस पाठवितों; तुम्हीं त्यांतून कित्येकांस जिवें माराल वधस्तंभीं घाल; आणि कित्येकांस आपल्या सभास्थानांमध्यें फटके माराल व नगरोनगरीं त्यांचा पाठलाग कराल; ३५ यासाठीं कीं धार्मिक हाबेल याच्या रक्तापासून, ज्याला तुम्हीं वेदी व पवित्र स्थान यांच्यामध्यें जिवें मारिलें तो बरख्याचा पुत्र जखर्या याच्या रक्तापर्यंत जें सर्व धार्मिकांचें रक्त पृथ्वीवर पाडिलें तें तुम्हांवर यावें. ३६ मी तुम्हांस खचीत सांगतों, हें सर्व या पिढीवर येईल.

३७ यरूशलेमे, यरूशलेमे, प्रवक्त्यांचा घात करणाऱ्ये व तुजकडे पाठविलेल्यांस धोंडमार करणाऱ्ये! जशी कोंबडी आपलीं पिलें पंखाखालीं एकवटते त्याप्रकारें तुझीं लेंकरें एकवटायाची कितींदां माझी इच्छा होती, पण तुमची इच्छा नव्हती! ३८ पहा, 'तुमचें घर तुम्हांस ठेविलें आहे.' ३९ मी तुम्हांस सांगतों कीं आतांपासून 'प्रभूच्या नांवानें येणारा तो धन्यवादित' असें म्हणाल तोंपर्यंत मी तुमच्या दृष्टीस पडणारच नाहीं." (मत्तय अ० २३)

येशूच्या चरित्रांत ग्रीक तत्वज्ञान घुसडून त्याचा संप्रदाय यूरोपीयांस ग्राह्य करण्याचें श्रेय योहानाच्या शुभवर्तमानास देण्यांत आलें आहे योहानाच्या शुभवर्तमानाचें भिन्नस्वरूप त्याच्या ग्रंथारंभावरूनच व्यक्त होईल. तो म्हणतो.

"प्रारंभीं शब्द होता, आणि शब्द देवासहित होता, आणि शब्द देव होता. २ तोच प्रारंभीं देवासहित होता. ३ त्याच्या द्वारें सर्व झालें, आणि जें झालें, असें कांहींच त्यावांचून झालें नाहीं. ४ त्यांत जीवन होतें, व तें जीवन मनुष्यांचा प्रकाश होतें. आणि तो प्रकाश अंधारांत प्रकाशतो तरी अंधारानें त्याला ग्रहण केलें नाहीं. देवानें पाठविलेला एक मनुष्य प्रकट झाला; त्याचें नांव योहान. ७ तो साक्षीकरितां म्हणजे त्या प्रकाशाविषयीं साक्ष देण्याकरितां आला, यासाठीं कीं त्याच्याद्वारें सर्वांनीं विश्वास धरावा. ८ तो हा प्रकाश नव्हता, तर त्या प्रकाशाविषयीं साक्ष देण्याकरितां आलेला होता. ९ जगांत येणारा जो खरा प्रकाश प्रत्येक मनुष्याला प्रकाशित करितो तो होता. १० जगांत तो होता, व जग त्याच्याद्वारें झालें, तरी जगानें त्याला जाणिलें नाहीं. ११ तो आपल्या स्वकीयांपाशीं आला तरी त्याच्या स्वकीयांनीं त्याचा अंगीकार केला नाहीं. १२ जितक्यांनीं त्याचा अंगीकार केला तितक्यांस, म्हणजे त्याच्या नांवावर विश्वास ठेवणाऱ्यांस त्यानें देवाचीं लेंकरें होण्याचा अधिकार दिला. १३ त्यांचा जन्म रक्तापसून किंवा देहाच्या इच्छेपासून किंवा मनुष्याच्या इच्छेपासून नव्हे, तर देवापासून झाला. १४ शब्द देही झाला, आणि कृपा व सत्य यांनीं पूर्ण असून त्यानें आम्हांमध्यें वस्ती केली, आणि आम्हीं त्याचें गौरव पाहिलें, तें गौरव बापापासून आलेल्या एकुलत्याचें असें होतें. १५ त्याविषयीं योहान साक्ष देतो, आणि उच्च स्वरानें म्हणतो कीं, जो माझ्यामागून येतो तो माझ्या पुढें झाला आहे, कारण तो माझ्यापूर्वी होता. असा जो मीं सांगितला तो हाच आहे. १६ कारण त्याच्या पूर्णतेतून आम्हां सर्वांस मिळालें, होय, कृपेवर कृपा. १७ नियमशास्त्र मोशाच्या द्वारें दिलें होतें; कृपा व सत्य हीं येशू ख्रिस्ताच्या द्वारें आलीं. १८ देवाला कोणीं कधीं पाहिलें नाहीं; जो एकुलता पुत्र बापाच्या उराशीं असतो त्यानें तो प्रकट केला."(योहान अ.१)

येशूचें श्रेष्ठत्व आणि देवत्व येशूकडूनच योहानानें वदविलें आहे.

"१२ यास्तव येशूनें पुन्हां त्यांशीं बोलत असतां म्हटलें, मी जगाचा प्रकाश आहें, जो मला अनुसरतो तो अंधारांत चालणारच नाहीं, तर त्याजबळ जीवनाचा प्रकाश असेल. १३ यावरून परूशी त्याला म्हणाले, तूं आपणाविषयीं साक्ष देतोस; तुझी साक्ष खरी नाहीं. १४ यावरून येशूनें त्यांस उत्तर दिलें कीं, जरी मी आपणाविषयीं साक्ष देतों तरी माझी साक्ष खरी आहे; कारण मी कोठून आलों व कोठें जातों हें मला ठाऊक आहे; मी कोठून येतों व कोठें जातों हें तुम्हांस ठाऊक नाहीं. १५ तुम्हीं देहबुद्धीनें न्याय करतां मीं कोणाचा न्याय करीत नाहीं, १६ आणि जर मीं न्याय केला तर माझा न्याय खरा आहे, कारण मीं एकटाच नाहीं, तर मी व ज्यानें मला पाठविलें तो असे आहों. १७ तुमच्या नियमशास्त्रांत असें लिहिलें आहे कीं, दोन मनुष्यांची साक्ष खरी आहे. १८ मीं आपणाविषयीं साक्ष देणारा आहे, आणि ज्या बापानें मला पाठविलें तोहि मजविषयीं साक्ष देतो. १९ यावरून ते त्याला म्हणाले, तुझा बाप कोठें आहे ? येशूनें उत्तर दिलें कीं, तुम्ही मला व माझ्या बापालाहि जाणत नाहीं; जर तुम्हीं मला जाणिलें असतें तर माझ्या बापालाहि जाणिलें असतें. २० तो देवळांत शिकवीत असतां हीं वचनें भांडारांत बोलला; तरी कोणीं त्याला धरिलें नाहीं. कारण त्याचा समय तोंपर्यंत आला नव्हता.

२१ यास्तव त्यांस तो पुन्हां म्हणाला, मी निघून जातों, आणि तुम्ही माझा शोध कराल आणि आपल्या पापांत मराल; जेथें मी जातों तेथें तुमच्यानें येववत नाहीं. २२ यास्तव यहूदी म्हणाले, जेथें मी जातों तेथें तुमच्यानें येववत नाहीं, असें तो म्हणतो, यावरून तो आपणास जिवें मारून घेणार आहे कीं काय ? २३ त्यानें त्यांस म्हटलें, तुम्हीं खालचे आहां, मीं वरचा आहे, तुम्ही या जगाचे आहां, मीं या जगाचा नाहीं. २४ यास्तव मी तुम्हांस सांगितलें कीं, तुम्ही आपल्या पापांत मराल; कारण मीं तो आहें, असा जर तुम्ही विश्वास धरणार नाहीं तर तुम्हीं आपल्या पापांत मराल. २५ यास्तव त्यांनीं त्याला म्हटलें, तूं कोण आहेस ? येशूनें त्यांस म्हटलें जें पहिल्यापासून तुम्हांस सांगत आलों तेंच. २६ तुम्हांविषयीं मला बहुत बोलायाचें आहे व न्याय करायाचा आहे; ज्यानें मला पाठविलें तो खरा आहे आणि ज्या गोष्टी मी त्यापासून ऐकिल्या त्या मी जगास सांगतों. २७ तो आम्हांशीं बापाविषयीं बोलतो असें ते समजले नाहींत. २८ यास्तव येशूनें त्यांस म्हटलें, जेव्हां तुम्ही मनुष्याच्या पुत्राला उंच कराल तेव्हां तुम्हीं जाणाल कीं, मी तो आहें, आणि मीं आपल्याआपण कांहीं करीत नाहीं तर बापानें मला शिकविल्याप्रमाणें मी या गोष्टी बोलतों. २९ आणि ज्यानें मला पाठविलें तो माझ्याबरोबर आहे. त्यानें मला एकटें सोडिलें नाहीं; कारण जें त्याला आवडतें तें मीं सर्वदा करितों. ३० तो या गोष्टी बोलत असतां बहुत लोकांनीं त्यांवर विश्वास ठेविला.

३१ यास्तव ज्या यहुद्यांनीं त्याचा विश्वास धरिला त्यांस येशूनें म्हटलें, जर तुम्ही माझ्या वचनांत राहिला तर खरोखर माझे शिष्य आहां; ३२ आणि तुम्हीं सत्य जाणाल, व सत्य तुम्हांस स्वतंत्र करील. ३३ त्यांनीं त्याला उत्तर दिलें कीं, आम्ही अब्राहामाचा वंश आहों; व कधींहि कोणाच्या दास्यांत नव्हतों, तर तुम्हीं स्वतंत्र व्हाल असें तूं कसें म्हणतोस ? ३४ येशूनें त्यांस उत्तर दिलें कीं, मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों, जो कोणी पाप करितो तो पापाचा दास आहे. ३५ आणि दास घरांत सर्वकाळ राहत नाहीं, पुत्र सर्वकाळ राहतो. ३६ यास्तव जर पुत्र तुम्हांस स्वतंत्र करील तर तुम्हीं खरे स्वतंत्र व्हाल. ३७ तुम्हीं अब्राहामाचा वंश आहां हें मला ठाऊक आहे, तरी तुम्हांस माझ्या वचनाची गति होत नाहीं म्हणून तुम्हीं मला जिवें मारायास पाहतां. ३८ मीं बापाजवळ जें पाहिलें तें बोलतों, तसेंच तुम्ही आपल्या बापापासून जें ऐकिलें तें करितां. ३९ त्यांनीं त्याला उत्तर दिलें कीं, आमचा बाप अब्राहाम आहे. येशूनें त्यांस म्हटलें जर तुम्ही अब्राहामाचीं लेकरें असतां तर तुम्हीं अब्राहामाचीं कृत्यें केलीं असतीं. ४० परंतु आतां ज्यानें देवापासून ऐकलेलें सत्य तुम्हांस सांगितलें त्या मला मनुष्याला आतां जिवें मारायास पाहतां; अब्राहामानें असें केलें नाहीं.

४१ तुम्हीं आपल्या बापाचीं कृत्यें करितां. ते त्याला म्हणाले, आम्हीं व्यभिचारापासून जन्मलों नाहीं; आम्हांस एकच बाप. म्हणजे देव आहे. ४२ येशूनें त्यांस म्हटलें, जर देव तुमचा बाप असता तर तुम्ही मजवर प्रीति केली असती, कारण मीं देवापासून निघालों व आलों आहें; मीं आपल्या आपण आलों नाहीं, तर त्यानें मला पाठविलें. ४३ तुम्ही माझें बोलणें कां समजत नाहीं ? याचें कारण असें कीं, तुमच्यानें माझें वचन ऐकवत नाहीं. ४४ तुम्ही सैतान बापापासून झालां आहां आणि आपल्या बापाच्या वासनांप्रमाणें करायास इच्छितां. तो प्रारंभापासून मनुष्यघातक आहे आणि तो सत्यांत टिकला नाहीं, कारण त्यामध्यें सत्य नाहीं; तो खोटें बोलतो, तें आपल्यांतूनच बोलतो. कारण तो लबाड व लबाडाचा बाप आहे. ४५ मीं तर तुम्हांस सत्य सांगतों म्हणून तुम्ही माझा विश्वास धरीत नाहीं. ४६ तुम्हांतील कोण मजवर पाप लागू करील ? मीं सत्य सांगत असतां तुम्हीं माझा कां विश्वास धरीत नाहीं ? ४७ जो देवाकडला आहे तो देवाच्या गोष्टी ऐकतो, तुम्ही देवाकडले नाहीं याच कारणानें तुम्ही ऐकत नाहीं. ४५ यहूद्यांनीं त्याला उत्तर दिलें कीं, तूं शोमरोनी आहेस व तुला भूत लागलें आहे, हें आम्ही ठीक म्हणतों कीं नाहीं ? ४९ येशूनें उत्तर दिलें कीं मला भूत लागलें नाहीं तर मीं आपल्या बापाचा सन्मान करितों, आणि तुम्ही माझा अपमान करितां. ५० मी तर

आपलें गौरव पाहत नाहीं, तें पाहणारा व न्याय करणारा कोणी एक आहे. ५१ मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों, जर कोणी माझें वचन पाळील तर तो कधींहि मरण पावणारच नाहीं. ५२ यहूदी त्याला ह्मणाले. तुला भूत लागलें आहे हे आतां आम्हांस कळलें. अब्राहाम व प्रवक्तेहि मेले आणि तूं ह्मणतोस, जर कोणी माझें वचन पाळील तर त्याला कधींहि मरणाचा अनुभव होणारच नाहीं. ५३ जो आमचा बाप अब्राहाम मेला त्यापेक्षां तूं मोठा आहेस काय? प्रवक्तेहि मेले, तूं आपणाला कोण ह्मणवितोस? ५४ येशूनें उत्तर दिलें कीं, मीं स्वतः आपलें गौरव केलें तर तें कांहीं माझें गौरव नाहीं, माझें गौरव करणारा माझा बाप आहे, त्याला तो आमचा देव आहे असें तुम्हीं म्हणतां. ५५ तरी तुम्हीं त्याला जाणलें नाहीं; मी तर त्याला जाणतों; आणि मी त्याला जाणत नाहीं, असें जर ह्मणेन तर तुमच्या सारखा लबाड होईन; तर मीं त्याला जाणतों व त्याचें वचन पाळितों. ५६ तुमचा बाप अब्राहाम माझा दिवस पाहण्याच्या उत्कंटेनें उल्लासित झाला व पाहून हर्ष पावला. ५७ यावरून यहुदी त्याला म्हणाले, तुला अजून पन्नास वर्षे झालीं नाहींत आणि तूं अब्राहामाला पाहिलें काय? ५८ येशूनें त्यांस ह्मटलें, मीं तुम्हांस खचीत खचीत सांगतों, अब्राहाम् झाला त्यापूर्वी मीं आहे. ५९ यावरून त्यांनीं त्यावर फेंकण्याकरितां धोंडे उचलिले; परंतु येशु देवळांतून गुप्तपणें निघून गेला." ( योहान अ० ८ ).

प्रेपितांचीं कृत्यें म्हणून जो नव्या करारांत भाग आहे त्यांत येशूच्या अवतारपणाविषयीं त्याच्या निकट शिष्याच्या साक्षी व त्याच्या निकट शिष्यांचे उपदेश आहेत. जे येशूच्या विरुद्ध होते ते त्याचे पुढें निस्सीम शिष्य झाले. अशापैकीं जो पेत्र त्याची साक्ष आपण प्रथम अवलोकनार्थ घेऊं.

३४ तेव्हां पेत्रानें तोंड उघडून म्हटलें,

देव पक्षपाती नाहीं, हें मला पक्कें समजतें. ३५ तर सर्व राष्ट्रांपैकीं जो त्याला भितो व ज्याचीं कृत्यें धार्मिक आहेत तो त्याला मान्य आहे. ३६ येशू ख्रिस्त (तोच सर्वांचा प्रभु) याकडून देवानें शांतीचें सुवर्तमान गाजवितांना जें वचन इस्राएलाच्या संतानांस पाठविलें; ३७ तें कोणतें तर, योहानानें जो बाप्तिस्मा गाजविला त्यानंतर गालीलापासून प्रारंभ करून सर्व यहुदीयेमध्यें जी गोष्ट घडली ती तुम्ही जाणतां; ३८ नासोरी तो येशू; त्याला देवानें पवित्र आत्म्याचा व सामर्थ्याचा अभिषेक केला; तो सत्कर्म करीत, व सैतानाच्या सत्तेखालीं असलेल्या सर्वांस बरे करीत फिरत असे; कारण देव त्याच्याबरोबर होता. ३९ आणि त्यानें यहूद्यांच्या देशांत व यरुशलेमेंत जें कांहीं केलें त्या सर्वांचे साक्षी आम्ही आहों; त्यांनीं त्याला खांबावर टांगून मारिलें; ४० त्याला देवानें तिसऱ्या दिवशीं उठविलें, व तो प्रगट व्हावा असें केलें, ४१ तरी सर्व लोकांस नव्हे, पण जे साक्षी देवानें पूर्वी निवडलेल्या आम्हांस; त्या आम्हीं तो मेलेल्यांतून उठल्यानंतर त्याच्या बरोबर खाल्लें प्यालें. ४२ आणि त्यानें आम्हांस आज्ञा केली कीं, लोकांस उपदेश करा व साक्ष द्या कीं, देवानें नेमलेला जीवंतांचा व मेलेल्यांचा असा न्यायाधीश हाच आहे. ४३ त्याला सर्व भविष्यवादी साक्षी आहेत कीं, त्यावर विश्वास ठेवणाऱ्या प्रत्येकाला त्याच्या नांवानें पापांपासून मुक्ति मिळेल." (प्रेपित, अध्याय १०).

२, ३ अग्रिप्पा महाराज, जे आपण यहूद्यांच्या चाली, त्यांचे वादविवाद व धर्मविचार विशेष जाणतां आहां त्या आपणापुढें यहूदी ज्यांविषयीं मजवर दोषारोप ठेवितात त्या सर्वांविषयीं मला आज प्रत्युत्तर द्यावयाचें आहे, यावरून मी आपणाला भाग्यवान मानितों; यास्तव मी आपणास विनंति करितों कीं सहनतेनें माझें ऐका.

४ तरुणपणापासूनचें जें माझें वर्तन पहिल्यापासून माझ्या लोकांमध्यें यरुशलेमेस होतें तें सर्व यहूद्यांस माहीत आहे. ५ ते पहिल्यापासून मला ओळखतात म्हणून त्यांची इच्छा असली तर ते साक्ष देतील कीं, आमच्या धर्माच्या कडकडीत पंथाप्रमाणें मीं परूशी होतों. ६ आणि आतां देवानें आमच्या पूर्वजांस जें वचन दिलें, त्याच्या आशेविषयीं माझा न्याय होण्याकरितां मी उभा आहे. ७ तें वचन प्राप्त होण्याची आशा आमचे बारा वंश, रात्रंदिवस एकाग्रतेनें देवाची सेवा करीत राहून बाळगितात; त्याच आशेचा, हे राजा, मजवर यहूद्यांनीं आरोप ठेविला आहे. ८ जर देव मेलेल्यांस उठवितो, तर हें तुम्ही अविश्वसनीय कां ठरवितां ! ९ मलाहि वाटत असे कीं, नासोरी येशूच्या नांवाविरुद्ध पुष्कळ करावें. १० आणि तसें मीं यरुशलेमेंत केलेंहि; मुख्य याजकांपासून अधिकार मिळवून बहुत पवित्र लोकांस बंदिशाळांत कोंडून टाकिलें, आणि त्यांच्या घातास मीं संमति दिली. ११ आणि प्रत्येक सभास्थानांत त्यांस वारंवार शासन करून दुर्भाषण करण्यास लावण्याचा प्रयत्न करीत असें, आणि त्यांवर अतिशय पिसाळून बाहेरच्या नगरांपर्यंत देखील मी त्यांच्या पाठीस लागें. १२ आणि अशा क्रमांत असतां मुख्य याजकांचा अधिकार व परवानगी घेऊन दिमिश्काकडे चाललों होतों, १३ तेव्हां हे राजा, वाटेवर दोनप्रहरीं सूर्याच्या तेजापेक्षां तेजस्वी असा आकाशाचा प्रकाश माझ्या व मजबरोबर चालणाऱ्यांच्या सभोंवतीं चकाकतां मीं पाहिला. १४ तेव्हां आम्हीं सर्व भूमीवर पडलों, इतक्यांत इब्री भाषेंत मजशीं बोलतां मीं अशी वाणी ऐकिली कीं, शौला, शौला, माझा छळ कां करितोस? पराणीवर लाथ मारणें हें तुला कठीण. १५ मी ह्मटलें, हे प्रभू, तूं कोण आहेस? प्रभु म्हणाला, ज्या येशूचा तूं छळ करितोस तोच मी आहे. १६, १७ तर ऊठ, उभा राहा, ज्यांत तूं मला पाहिलें, व या लोकांपासून व विदेशी लोकांपासून तुझें रक्षण करितांना ज्यांत तुला दर्शन देईन त्या गोष्टींचा सेवक व साक्षी नेमावा या साठीं मी तुला दर्शन दिलें. १८ त्यांकडे मी तुला आतां पाठवितों, यासाठीं कीं त्यांनीं अंधारांतून उजेडाकडे

व सैतानाच्या अधिकारांतून देवाकडे फिरावें, म्हणून तूं त्यांचे डोळे उघडावे, आणि त्यांनीं मजवरल्या विश्वासानें पापांची क्षमा व पवित्र झालेल्यांमध्यें वतन पावावें. १९ म्हणून हे राजा अग्रिप्पा, मीं तो स्वर्गीय दृष्टांत अवमानिला नाहीं: २० तर पहिल्यानें दिमिश्कांत व यरुशलेमेंत व अवघ्या यहूदीय देशांत व विदेशी लोकांत उपदेश केला कीं, पश्चात्ताप करा, आणि पश्चात्तापास शोभतील अशीं कर्मे करून देवाकडे फिरा. २१ या कारणामुळें यहूदी मला देवळांत धरून वधायाला पाहात होते. २२ तथापि आजपर्यंत देवापासून साहाय्य पावून लहान मोठ्यांस साक्ष देत राहिलों आहे. आणि ज्या गोष्टी होणार आहेत म्हणून भविष्यवाद्यांनीं व मोशानें सांगितलें, त्यांखेरीज मीं दुसरें कांहीं सांगितलें नाहीं; २३ त्या अशा कीं ख्रिस्त दुःख सोसणारा असावा व मेलेल्यांतून उठणारांपैकीं पहिला असून त्यानें आमच्या लोकांस व विदेशी लोकांस उजेड दाखवावा. ( प्रेषित, अ० २६ ).

पाल हा ख्रिस्ती संप्रदायाचा द्वितीय संस्थापक होय अशी त्याची ख्रिस्ती जगांत आख्या आहे. त्याचीं पत्रें जोरदार व नीतिमत्तेच्या आवेशानें परिपूर्ण आहेत त्यांतील कांहीं उतारे दिल्याशिवाय ख्रिस्ती वाङ्मयाच्या वर्णनाची परिपूर्णता होणार नाहीं. ख्रिस्ताचाच उपदेश त्यानें निराळ्या शब्दांनीं मांडला पण त्यांत वैयक्तिक कांहींच आलें नाहीं असें नाहीं. ख्रिस्ती मंडळींत भांडणें बंद व्हावीं आणि सर्वांनीं सहकारितेनें कार्य करावें याबद्दल त्याचा प्रयत्न असे. त्यानें स्त्रियांनीं कसें वागावें यासंबधानें जे नियम केले त्यांस अर्वाचीनकाळीं स्त्रीवर्गाकडून आक्षेप घेण्यांत येत आहे. त्याचें स्त्रियांच्या समाजस्थानाविषयीं विवेचन येथें प्रथम अवतरितों.

"प्रत्येक पुरुषाचा मस्तक ख्रिस्त आहे, आणि स्त्रीचा मस्तक पुरुष आहे, आनि ख्रिस्ताचा मस्तक देव आहे असें तुम्ही जाणावें,"असें मी इच्छितों. जो पुरुष आपलें मस्तक आच्छादून प्रार्थना करितो तो आपल्या मस्तकाचा अपमान करितो. आणि जी स्त्री उघड्या मस्तकानें प्रार्थना करते किंवा प्रवचन करिते ती आपल्या मस्तकाचा अपमान करिते कारण ती मुंडलेल्या स्त्रीसारखीच होते. स्त्री जर आपलें मस्तक आच्छादित नाहीं तर तिने आपले केश कातरावे...पुरुष देवाची प्रतिमा व गौरव असल्यामुळें त्याला मस्तक आच्छादन करणें योग्य नाहीं. स्त्री तर पुरुषाचें गौरव आहे. कारण पुरुष स्त्रीपासून झाला नाहीं. तर स्त्री पुरुषापासून झाली. आणि पुरुष स्त्रीसाठीं उत्पन्न केला नाहीं तर स्त्री पुरुषासाठीं केली तरी प्रभूंत पुरुष स्त्रीपासून वेगळा नाहीं आणि स्त्री पुरुषापासून वेगळी नाहीं...स्त्रियांनीं मंडळ्यांत उगेंच रहावें कारण त्यांस बोलण्याची परवानगी नाहीं; नियमशास्त्रहि सांगतें त्याप्रमाणें त्यांनीं आधीन असावें. त्यांस कांहीं माहिती करून घेण्याची इच्छा असली तर त्यांनीं आपल्या नवऱ्यांस घरीं विचारावें. कारण स्त्रीनें मंडळींत बोलावें हें लाजेचें आहे." ( पालचें करिंथकरांस पत्र १ ).

पौलानें उर्फ पॉलनें ज्या अनेक गोष्टी केल्या त्यांतील एक महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे ख्रिस्ताचा उपदेश यहुदीमंडळीच्या बाहेर नेला आणि इतर राष्ट्रांच्या लोकांना या संप्रदायांत प्रवेश करून मुक्ति पावण्यास हरकत नाहीं असें शिकविलें. सुंता करणारे व सुंता न करणारे यांतील अंतर काढून टाकलें. तद्विषयक वाक्यें इफिसकरांच्या पत्रांत आहेत.

"यास्तव पूर्वींची आठवण करा कीं तुम्हीं जे देहानें विदेशी, जे सुंती म्हटलेल्यांकडून बेसुंती असे म्हटलेले, ते तुम्ही, त्यावेळेस ख्रिस्तविरहित इस्राएलांच्या राष्ट्राबाहेरचे, व प्रतिज्ञेच्या करारास परके, आशाहीन, व जगांत देवहीन असे होतां. परंतु जे तुम्ही दूर होतां ते तुम्ही आतां ख्रिस्त येशूंत ख्रिस्ताच्या रक्तानें जवळ झाला आहां. कारण आमचा समेट तो आहे. त्यानें दोघांस एक केलें, आणि मधली आडभिंत पाडली, त्यानें वैर, जें आज्ञाविधींचे नियमशास्त्र आपल्या देहानें नाहींसें केलें, यासाठीं कीं त्यानें समेट करून आपणांत दोघांचा एक नवा मनुष्य उत्पन्न करावा. आणि त्यानें वैर वधस्तंभावर जिवें मारून त्याच्या द्वारें देवाशीं एकशरीर अशा दोघांचा समेट करावा. आणि त्यानें येऊन जे तुम्ही दूर होतां त्या तुम्हांस, व जे जवळ होते, त्यांस शांतीची सुवार्ता सांगितली. कारण त्याच्या द्वारें एका आत्म्यांत आम्हां उभयतांचा पित्याजवळ प्रवेश होतो. तर आतांपासून तुम्ही परके व परदेशी नाहीं. तर पवित्रांचे एक राष्ट्र व देवाच्या घरचे आहां. प्रेषित व प्रवक्ते यांच्या पायावर तुम्हीं रचलेले आहां. व ख्रिस्त येशू हाच कोंपऱ्याचा मुख्य धोंडा आहे." ( २. ११-२० )

ख्रिस्तीसंप्रदायांत सुंता शिरली नाहीं. सुंता ही दैहिक क्रिया नसून पालनें आध्यात्मिक क्रिया केली. पाल म्हणतो "केवळ दैहिक सुंता झालेल्याविषयीं सावध असा जे आम्हीं देवाच्या आत्म्यानें सेवा करणारे व ख्रिस्त व येशूविषयीं आढयता बाळगणारे व देहावर भरंवसा न ठेवणारे ते आम्हीं सुंता झालेलेच आहों. ( फिलिप्पैकरांस पत्र ).

पालच्या विचारांत यहुदी प्रवक्त्यांची मान्यता पूर्णपणें असून अनेक पापांचा मूर्तिपूजेशीं संबंध आहे अशी भावना व्यक्त होते. या प्रकारच्या भावनेमुळेंच ख्रिस्ती व मुसलमान संप्रदाय लोकांस पीडादायक झाले

"१८ पण जीं मनुष्यें अनीतीनें सत्य दाबून ठेवितात त्यांचा अधर्म व अनीति यांवर देवाचा क्रोध स्वर्गांतून प्रकट होतो; १९ कारण देवाविषयींचें जें ज्ञान होत असतें तें त्यांच्या मनास व्यक्त आहे; कां तर देवानें तें त्यांस व्यक्त केलें आहे; २० कारण त्याचे अदृश्य गुण म्हणजे त्याचें सनातन सामर्थ्य व देवत्व हीं निर्मिलेल्या पदार्थांवरून ज्ञात होऊन सृष्टीच्या उत्पत्तिकालापासून स्पष्ट दिसत आहेत,

यासाठीं कीं, त्यांनीं निरुत्तर व्हावें; (२१) कारण देवाला जाणत असतां त्यांनीं त्याला देव म्हणून गौरविलें नाहीं, व त्याचे उपकार मानिले नाहींत; तर ते आपल्या पोकळ कल्पनांनीं शून्यवत् झाले, आणि त्यांचें मूढ मन अंधकारानें व्याप्त झालें. २२ आपण ज्ञानी आहों असें म्हणवीत असतां ते मूर्ख झाले, २३ आणि त्यांनीं अविनाशी देवाच्या गौरवाचा नाशवंत मनुष्य, पक्षी, चतुष्पाद व सरपटणारे जीव यांच्या आकाराच्या मूर्तींशीं मोबदला केला.

२४ यास्तव देवानें त्यांस त्यांच्या मनांच्या वासनांत अमंगळपणाच्या स्वाधीन केलें असें कीं त्यांच्यामध्यें त्यांच्या शरीरांचा अवमान झाला. २५ त्यांनीं तर देवाच्या सत्याचा असत्याशीं मोबदला केला आणि जो उत्पन्न कर्ता युगानुयुग धन्यवादित, आमेन! त्याला सोडून उत्पन्न केलेल्या पदार्थांची भक्ति केली.

२६ यामुळें देवानें त्यांस निंद्य मनोभावनांच्या स्वाधीन केलें; त्यांतल्या बायकांनीं स्वाभाविक व्यवहार सोडून विपरीत व्यवहार धरिला. २७ तसेंच पुरुषांनींहि स्त्रीशीं स्वाभाविक व्यवहार सोडून परस्परें कामसंतप्त होऊन पुरुषांनीं पुरुषांशीं अनुचित कर्म केलें, आणि त्यांच्या भ्रांतीचें योग्य प्रतिफल त्यांनीं आपल्या ठायीं भोगिलें. २८ आणि ज्याअर्थी देवाचें पूर्ण ज्ञान प्राप्त करून घेण्यास ते मान्य झाले नाहींत, त्याअर्थी देवानें त्यांस अनुचित कर्में करण्यास अवमान्य मनाच्या स्वाधीन केलें. २९ २९ ते सर्व अनीति, दुष्टपणा, लोभ वाईटपणा, यांनीं भरलेले असे होते; हेवा, हत्या, कलह, कपट, कुबुद्धि यांनीं पूर्ण असे होते. ३० ते चहाड, निंदक, देवद्वेषी, उद्धट, गर्विष्ठ, आत्मश्लाघी, कुकर्मकल्पक, मातापितरांचीं अवज्ञा करणारे, ३१ बुद्धिहीन, वचनभंग करणारे, ममताहीन, निर्दय असे होते. ३२ जे असें आचरण करितात ते मरणास योग्य आहेत, असा देवाचा नियम त्यांस ठाऊक असतांहि, ते स्वतः तींच कर्में करितात इतकेंच केवळ नव्हे, तर तसें आचरण करणाऱ्यांस त्यांची संमतिहि आहे." (रोमकरांस पत्र, अध्याय १).

"यास्तव हे मनुष्या, जो कोणी न्याय करणारा तो तूं निरुत्तर आहेस, कां तर ज्याविषयीं तूं दुसऱ्याचा न्याय करितोस त्याचविषयीं तूं आपणाला अन्यायी ठरवितोस, कारण न्याय करणारा तूं तींच कर्में आचरितोस. २ पण आम्हांस ठाऊक आहे कीं, जे अशीं कर्में आचरितात त्यांविरुद्ध देवाचा न्याय सत्यानुसार होतो. ३ तर हे मनुष्या, जो तूं तशीं कर्में आचरणाऱ्याचा न्याय करीत असून तींच स्वतः करितोस तो तूं देवाचा न्याय चुकविशील असें तुला वाटतें काय? ४ किंवा देवाची दया तुला पश्चात्ताप करावयास लावणारी आहे, हें न समजतां, त्याचें दयाळुत्व, क्षमा व सहनशीलता हीं विपुल असतां, त्यांस अवमानितोस काय? ५ आणि आपला हट्ट व पश्चात्तापहीन अंतःकरण यांस अनुसरून तूं जो क्रोधाचा व देवाचा यथार्थ न्याय प्रगट होण्याचा दिवस त्या दिवसाचा क्रोध आपणासाठीं सांठवून ठेवितोस; ३ "तो प्रत्येकाला त्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें फळ देईल," सत्कर्माविषयींच्या धीराप्रमाणें जे गौरव सन्मान व अविनाशिता यांसाठीं झटतात त्यांस तो सार्वकालिक जीवन देईल, ८ परंतु जे तट पाडणारे आहेत व सत्याला न मानितां अधर्माला मानितात त्यांवर ९ म्हणजे दुष्कर्म करणारा मनुष्य, प्रथम यहूदी, आणि मग हेल्लेणी अशा प्रत्येकाच्या जीवावर (क्रोध व कोप संकट व क्लेश हीं येतील). १० आणि प्रत्येक सत्कर्म करणारा, प्रथम यहूदी आणि मग हेल्लेणी यांस गौरव सन्मान व शांति हीं होतील, ११ कारण देवापाशीं पक्षपात नाहीं. १२ नियमशास्त्र ज्यांस नाहीं अशा जितक्यांनीं पाप केलें तितकेहि नियमशास्त्र नाहीं तरी नाश पावतील आणि नियमशास्त्र असतां जितक्यांनीं पाप केलें तितक्यांचा न्याय नियमशास्त्रानें ठरेल; १३ कां तर नियमशास्त्र श्रवण करणारे देवाच्या दृष्टीनें नीतिमान् आहेत असें नाहीं, तर नियमशास्त्राचरण करणारे नीतिमान् ठरतील; १४ ज्यांस नियमशास्त्र नाहीं असे विदेशी लोक जेव्हां स्वभावतः नियमशास्त्रांत आहे तें करितात तेव्हां त्यांस नियमशास्त्र नाहीं तरी ते स्वतः आपणांस नियमशास्त्रच आहेत;"—(रोमकरांस पत्र, अध्याय २).

"भावांनो, कोणी मनुष्य एखाद्या अपराधांत सांपडला, तरी जे तुम्ही आत्मिक आहां, ते तुम्ही अशाला सौम्यतेच्या आत्म्यानें स्थितीवर आणा; तूंहि परीक्षेंत पडूं नये याविषयीं आपणाला संभाळ. २ एकमेकांचीं ओझीं वाहा, म्हणजे तुम्ही ख्रिस्ताचा नियम पूर्ण कराल. ३ कारण आपण कोणी नसतां कोणी आहों असें जो कल्पितो तो आपणाला फसवितो. ४ तर प्रत्येकानें आपापल्या कामाची परीक्षा करावी म्हणजे त्याला दुसऱ्याला संबंधानें नव्हे, तर केवळ आपल्या संबंधानें आढ्यतेस जागा मिळेल. ५ कारण प्रत्येकानें आपापला भार वाहिला पाहिजे. ६ वचनाचें शिक्षण पावणारा व शिक्षण देणारा हे सर्व चांगल्या गोष्टींत एकमेकांचे भागीदार होवोत. ७ फसूं नका; उपहास देवाचा होत नाहीं; कारण मनुष्य जें कांहीं पेरितो त्याचेंच त्याला पीक मिळेल. ८ कारण जो आपल्या देहासाठीं पेरितो त्याला देहापासून नाशाचें पीक मिळेल; आणि जो आत्म्यासाठीं पेरितो त्याला आत्म्यापासून सार्वकालिक जीवनाचें पीक मिळेल. ९ तर आपण बरें करण्यास थकूं नये, कारण आपण न खचलों तर यथाकालीं आपणाला पीक मिळेल. १० तर मग आम्हांला प्रसंग आहे त्याचप्रमाणें आम्हीं सर्वांचें व विशेषेंकरून विश्वासबंधूंचें बरें करावें." (गलती यांस पत्र, अ० ६).

**प्रकटीकरण.**—प्रकटीकरण म्हणून एक मौजेचा लेख आहे. ज्याप्रमाणें आपल्याकडे कांहीं लोक पाहूं लागतात व त्यांस अनेक अपूर्व गोष्टी दिसतात. त्याप्रमाणें येशूनें ईश्वरपुत्रत्व आणि ग्रंथांचें ईश्वरप्रणितत्व योहानास दिसलें.

अनेक सुशिक्षित ख्रिस्तीदेखील प्रकटीकरणासारख्या लेखांस त्रिकालाबाधीत पण गूढ सत्यांचा अंश समजत. हें पाहून इतरांची बरीच करमणूक होतें. प्रकटीकरणांचें स्वरूप लक्षांत येण्यासाठीं कांहीं उतारे दिले आहेत.

"यानंतर मीं पाहिलें, तों पहा, स्वर्गांत उघडलेलें आहे. आणि जी पहिली वाणी ऐकिली ती मजशीं बोलणाऱ्या 'करण्याच्या' सारखी होती. ती म्हणाली इकडे 'वर ये,' म्हणजे जें यानंतर 'झालें पाहिजे' तें तुला दाखवीन. २ इतक्यांत मला आत्मावस्था प्राप्त झाली, तों पहा स्वर्गांत सिंहासन मांडलेलें आहे, आणि सिंहासनावर कोणी बसलेला आहे. ३ जो बसलेला तो दिसण्यांत यासफे व सार्दि या रत्नासारिखा आहे, आणि 'सिंहासनावरून' दिसण्यांत पाचेसारिखें 'वर्तुलाकार मेघधनुष्य आहे.' ४ आणि सिंहासनाभोंवतीं चोवीस सिंहासनें आहेत. आणि त्या सिंहासनांवर ते शुभ्रवस्त्रें ल्यालेले व डोक्यांवर सोन्याचे मुकुट घातलेले चोवीस वडील बसलेले आहेत असें दृष्टीस पडलें. ५ आणि सिंहासनाच्या आंतून 'विजा' व 'वाणी' व 'गर्जना निघत आहेत,' आणि सात अग्निरूप मशाली सिंहासनापुढें जळत आहेत, त्या देवांचे सात आत्मे आहेत. ६ आणि सिंहासनापुढें 'स्फटिकासारखा' जसा काय काचेचा समुद्र आहे, आणि सिंहासनाच्या मध्यभागीं सिंहासनाच्या चार बाजूंस पुढें व मागें 'डोळ्यांनीं भरलेले चार असे प्राणी' आहेत. ७ पहिला प्राणी 'सिंहा' सारखा व दुसरा गोऱ्ह्यासारखा आहे, व 'तिसऱ्याचें तोंड' मनुष्याच्यासारखें आहे व 'चौथा' प्राणी उडत्या 'गरुडा' सारिखा आहे. ८ त्या चारांहि प्राण्यांला 'प्रत्येकी सहा सहा पंख असून ते प्राणी सर्वांगीं-वरून' व पंखांखालींहि 'डोळ्यांनीं भरलेले'. आहेत. आणि 'पवित्र, पवित्र, पवित्र,' जो होता, आहे व येतो, 'प्रभु देव सर्वसत्ताधारी' हें म्हणतांना ते रात्रंदिवस थांबत नाहींत. ९ आणि 'सिंहासनावर बसलेला युगानुयुग जीवंत' याचें जेव्हां जेव्हां ते प्राणी गौरव व सन्मान व उपकारस्तुति करितात, १० तेव्हां तेव्हां ते चोवीस वडील सिंहासनावर बसलेला 'त्याच्या पायां पडतात,' आणि 'युगानुयुग जीवंत' याला नमस्कार घालतात आणि आपले मुकुट सिंहासनापुढें ठेवून म्हणतात,

११ हे आमच्या प्रभुदेवा, गौरव व सन्मान व सामर्थ्य तुझें आहे असें म्हणून घ्यावयास तूं योग्य आहेस. कारण, तूं सर्व उत्पन्न केलें आणि तुझ्या इच्छेनें तें झालें उत्पन्न झालें." ( प्रकटीकरण अ० ४ ).

"'सिंहासनावर बसलेला' याच्या उजव्या हातावर 'पाठपोट लिहिलेली' व सात शिक्के मारून बंद केलेली अशी 'पुस्तकांची गुंडाळी' मीं पाहिली, २ आणि 'पुस्तकाचे शिक्के फोडून तीं उघडायास कोण योग्य आहे असें मोठ्यानें ओरडणारा बलवान् दूत मीं पाहिला. ३ तेव्हां स्वर्गांत व पृथ्वीवर व पृथ्वीखालीं कोणी हें पुस्तक उघडायास किंवा त्यांत पाहायास समर्थ नव्हता. ४ हें पुस्तक उघडायास व त्यांत पाहावयास योग्य असा कोणी आढळला नाहीं म्हणून मीं रडलों. ५ तेव्हां वडिलांपैकीं एकजण मला म्हणाला रडूं नको, पाहा, 'यहूदी' वंशाचा 'सिंह' दाविदाचा 'अंकुर' यानें जय मिळविला, तो त्याचे सात शिक्के फोडून पुस्तक उघडण्यास योग्य आहे. ६ तेव्हां सिंहासन व चार प्राणी हीं आणि वडील ह्यांमध्यें 'वधिला होता' असा 'कोंकरा' उभा राहिलेला मीं पाहिला, 'त्याला सात शिंगें व सात डोळे होते,' ते 'सर्व पृथ्वीवर' पाठविलेले देवाचे सात आत्मे आहेत. ७ त्यानें जाऊन 'सिंहासनावर बसलेला याच्या उजव्या हातांतून पुस्तक घेतलें. ८ आणि त्यानें पुस्तक घेतलें तेव्हां चार प्राणी व चोवीस वडील कोंकऱ्याच्या पायां पडले, त्या सर्व वडिलांजवळ विणे व धुपानें भरलेलीं सोन्याची धुपाटणीं होतीं तीं पवित्रांच्या प्रार्थना आहेत. ९ ते 'नवें गीत गातात,' तें असें—

तूं पुस्तक घ्यायास व त्याचे शिक्के फोडायास योग्य आहेस कारण तूं वधिला होतास; आणि तूं आपल्या रक्तानें सर्व वंश व भाषा व लोक व राष्ट्रें यांतले आमच्या देवासाठीं विकत घेतले आहेत; १० आणि आमच्या देवासाठीं त्यांस राजे व याजक असे केले आहेत;

आणि ते पृथ्वीवर राज्य करीत आहेत. ११ तेव्हां मीं पाहिलें तों सिंहासन व प्राणी व वडील यांच्या भोंवतीं बहुत दूतांची वाणी ऐकूं आली; आणि त्यांची संख्या 'अयुतांचीं अयुतें व सहस्रांचीं सहस्रें होतीं.' १२ ते मोठ्यानें म्हणत होते-वधलेला कोंकरा सामर्थ्य, धन, ज्ञान, बल, सन्मान, गौरव व स्तुति हीं घेण्यास योग्य आहे. १३ आणि स्वर्गांत, व पृथ्वीवर व पृथ्वीच्या खालीं, व समुद्रावर जी प्रत्येक सृष्ट वस्तु आहे ती आणि त्यांतील सर्व यांस असें म्हणतांना ऐकिलें कीं, 'सिंहासनावर बसलेला' याला व कोंकऱ्याला स्तुति, सन्मान व गौरव व सत्ता हीं युगानुयुग असोत. १४ तेव्हां चार प्राणी म्हणाले, आमेन; आणि वडिलांनीं पाया पडून नमस्कार केला" ( प्रकटीकरण अ० ५ ).

"८ हें ऐकणारा व पाहणारा मी योहान आहें. जेव्हां मीं ऐकिलें व पाहिलें तेव्हां हें मला दाखविणाऱ्या दूताला नमस्कार घालण्यास त्याच्या पायांपुढें पडलों, ९ परंतु तो मला म्हणाला, असें करूं नको; मीं तुझा व तुझे भाऊ प्रवक्ते व या पुस्तकांतील वचनें पाळणारे यांचा सोबतीचा दास आहें; नमस्कार देवाला घाल.

१० पुन्हां तो मला म्हणाला, या 'पुस्तकांतील' प्रवचनें 'शिक्का मारून' बंद करूं नको, कारण वेळ जवळ आली आहे. ११ अधर्मी अधर्म करीत राहो, मलिन आपणाला मलिन करीत राहो, धार्मिक धर्म आचरीत राहो, व पवित्र आपणाला पवित्र करीत राहो. १२ पहा 'मी' लवकर 'येतों आणि प्रत्येकाला त्याच्या त्याच्या

कर्मोप्रमाणें देण्यास माझ्याजवळ वेतन ' आहे. १३ ' मी ' अल्फा व ओमेगा, ' पहिला व शेवटला, ' प्रारंभ व शेवट असा आहे. १४ जे आपलीं ' वस्त्रें धुतात ' ते धन्य, त्यांची ' जीवनाच्या झाडावर ' सत्ता होईल, आणि ते वेशींतून नगरींत आंत जातील. १५ कुत्रे, चेटकी, जारकर्मी, खून करणारे, मूर्तिपूजक हे व लबाडीषी आवड धरणारे, व लबाडी करणारे सर्व बाहेर राहतील"(प्रकटीकरण अ०२२).

" १८ या पुस्तकांतील ' प्रवचनें ' ऐकणाऱ्या प्रत्येकाला मीं खातरीनें सांगतों कीं, जो कोणी ' त्यांत भर घालील ' त्यावर ' ह्या पुस्तकांत लिहिलेल्या ' पीडा देव आणील. १९ आणि जो कोणी या प्रवचनाच्या पुस्तकांतील वचनांतून कांहीं ' काढील ' त्याचा या पुस्तकांत वर्णिलेल्या ' जीवनाच्या झाडांतून ' व पवित्र नगरींतून वांटा देव काढील " (प्रकटीकरण अ० २२).

**प्रकटीकरणांचा सेमेटिक जगावर परिणाम.**—हें प्रकटीकरण योहानास झालें अशी समजूत लोकांत प्रसृत करण्याचा प्रयत्न झाला त्यामुळें ईश्वर व्यक्तीच्या मार्फत ग्रंथ प्रकट करतो अशी कल्पना लोकांत पसरून महंमदास आपला सर्व उपदेश प्रकटी करणाच्या रूपानें मिळाला आहे अशी कल्पना प्रसृत करण्यास क्षेत्र मिळालें. ईश्वराचा पुत्र अशा तऱ्हेची कल्पना मांडण्यापेक्षां प्रकटीकरणाची कल्पना मांडावी हें महंमदास सोइस्कर वाटलें असावें.

**महंमदीय चळवळी, त्यांची जगद्व्यापकता व संकोच.**—इसवीसनाच्या सहाव्या शतकांत सेमेटिक महावंशांतील अरब लोकांमध्यें कांहीं विशिष्ट पारमार्थिक आणि सामाजिक भावना प्रदीप्त होऊन त्या भावनेनें जगांतील अनेक राष्ट्रांवर परिणाम घडविला, अनेक दुर्लक्ष करण्याजोगीं राष्ट्रें रणोत्सुक केलीं, जुन्या पुष्कळशा प्राचीन समजुतींचा उच्छेद करून त्यांबरोबर कांहीं अंशीं प्राचीन ज्ञानाचाहि उच्छेद केला आणि जगाच्या एका मोठ्या भागास कांहीं काल प्रगतीच्या रस्त्यावर आणलें तर कांहीं काल हटी अज्ञानानें कुंठितमार्ग केलें. ही महत्वाची शक्ति म्हटली म्हणजे इस्लाम ही होय. या चळवळीचा परिणाम यूरोपवर होऊन स्पेनला बऱ्याच काळपर्यंत इस्लामी सत्तेखालीं रहावें लागलें; व्हिएन्नापर्यंत यूरोपांतील मुलख मुसुलमानी सत्तेखालीं कांहीं काळपर्यंत आला; आणि अनेक शतकें जरी यूरोपनें ही सत्ता आपल्या किनाऱ्यावरून काढून टाकण्याचा प्रयत्न केला तरी यूरोपचा हा प्रयत्न अजून पूर्णपणें यशस्वी झाला नाहीं. आशियाखंडांत या शक्तीनें मोठीच क्रांति घडवून आणून भारतीय संस्कृतीचा विकास आणि तिचा जगद्व्यापी प्रयत्न बंद पडला, आणि चीनपासून फिलिपाइनपर्यंत या संप्रदायाचा विस्तार करविला. या संप्रदायाचा इतिहास म्हणजे त्या संप्रदायाच्या राजकीय शक्तीचा आणि भावनाशक्तीचा इतिहास होय. या संप्रदायाचे सर्व धागे लक्षांत येण्यासाठीं महंमदाचें चरित्र आणि खिलाफतीचा इतिहास हीं तर अवलोकिलीं पाहिजेतच, पण आधुनिक जगांतील या संप्रदायाच्या परिणामांचें विहंगमदृष्टीनें अवलोकन केलें पाहिजे. प्रथम इस्लामाचा संस्थापक जो हजरत महंमदपैगंबर त्याच्या चारित्र्यांकडे वळूं.

**महंमद पैगंबर.**—महंमदाच्या आयुष्याचे चार विभाग पडतात. (१) वयाचीं पहिलीं चाळीस वर्षे तो मक्का येथें जुना मूर्तिपूजकांचा धर्म आचरीत राहिला होता. वयाच्या पंचविसाव्या वर्षी त्यानें आपल्यापेक्षां वयानें बऱ्याच मोठ्या अशा एका स्त्रीबरोबर लग्न केलें. तिच्यापासून त्याला कांहीं पुत्र व चार कन्या झाल्या. यांपैकीं सर्वच पुत्र लहानपणीं वारले. चाळिसाव्या वर्षी त्याला प्रकटीकरण म्हणजे ईश्वरी साक्षात्कार होऊं लागला. त्याची प्रकटीकरणाची क्रिया सामान्यतः येणेंप्रमाणें होती. महंमद बेशुद्ध होई, व बेशुद्ध असतांना तो जीं वाक्यें वदे तीं वाक्यें अंतेवासी लिहून ठेवीत. हीं ईश्वरी वाक्यें समजलीं जात, अशा रीतीनें त्याच्या द्वारें परमेश्वर नवीन धर्म प्रकट करूं लागला, व त्यामुळें त्याला ज्ञानी, भविष्यवादी महात्मा म्हणून लोक मानूं लागले. (२) प्रथम तीन वर्षे त्यानें आपलें संप्रदायप्रसाराचें काम खाजगी रीतीनेंच चालविलें होतें. या काळांत त्याच्या कुटुंबांतील कांहीं नातेवाईक, कांहीं मित्र व मक्का शहरांतील हलक्या स्थितींतील लोक त्याचे अनुयायी बनले. (३) नंतर पुढें दहा वर्षे त्यानें मक्केंतच सार्वजनिक रीत्या संप्रदायप्रसाराचें काम केलें. या काळांत अबु तालीब नांवाच्या त्याच्या चुलत्यानें त्याची स्वतःची नव्या महंमदी संप्रदायावर श्रद्धा नसतांहि, महंमदाचें संरक्षण केलें. हा चुलता वारल्यावर कांहीं काळ ताइफनें त्याला आश्रय दिला; व नंतर मक्केमधीलच एका थोर रहिवाशानें त्याचा सांभाळ केला. परंतु मध्यंतरीं त्याच्या अनुयायांना मात्र मक्केंत फार छळ होऊं लागल्यामुळें ख्रिस्तसंप्रदायी हबसाण (आबीसीनिया) देशांत जाऊन राहावें लागलें. या त्याच्या आयुष्यांतील तिसऱ्या भागाच्या अखेरीला मदीना शहरांतील रहिवाशांमध्यें आपसांत दुही माजून लढाई चालू झाली होती, ती थांबवून तंटा मिटविण्याकरितां महंमदाला मध्यस्थ नेमण्यांत आलें. तदनुसार महंमदाला बोलावणें येऊन तें काम त्यानें पतकरलें. तथापि त्यानें धूर्तपणानें आपले कांहीं अनुयायी शरीरसंरक्षक म्हणून मदीनाला आधीं पाठविले; व नंतर स्वतः तो मक्केमधून मोठ्या प्रयासानें बाहेर पडला. (४) मदीना शहरांत गेल्यावर त्यानें आपले अनुयायी एकत्र करून एक सैन्य तयार केलें, शहरांतील बंडाळी मोडून टाकली व आसपासच्या अरब लोकांच्या टोळ्यांशीं स्नेह जोडून मक्केकडे जाणाऱ्या कारवान लोकांवर तो हल्ले करूं लागला. याप्रमाणें पूर्वीच्या नगरबंधूंबरोबरच त्याचें युद्ध सुरू होऊन त्यांचा त्यानें अनेक वेळीं पराभवहि केला; आणि शेवटीं मक्केंतून पळून गेल्यापासून आठव्या वर्षी तें शहर त्यानें हस्तगत केलें. पुढें आयुष्याच्या अखेरीपर्यंत त्यानें संप्रदायप्रसाराचें

काम सतत चालवून सर्व अरबस्थान देश मुसुलमानी करून टाकला; कांहीं थोडे अपवाद खेरीज करून सर्व यहुदी संस्कृतीचे लोक नाहींसे केले; ख्रिस्ती लोकांनां खंडणी देण्याच्या अटींवर राहूं दिलें; आणि मूर्तिपूजकांचा तर समूळ उच्छेद केला.

**महंमदाचे गुणदोष.**—मोठा धाडसी लढवय्या व राजकारणी पुरुष एवढ्याच दृष्टीनें महंमदाच्या चरित्राकडे पाहिल्यास त्याच्या तोडीचे पुरुष इतिहासांत अनेक सांपडतील. भोंवतालचे लोक जमा करून त्यांनां लष्करी शिक्षण देऊन त्या सैन्याच्या मदतीनें मोठाले विजय संपादन करण्याचें कर्तृत्व व शौर्य अंगीं असलेला कोणीहि मनुष्य अगदीं हीन स्थितींतून चढत जाऊन श्रेष्ठ व स्वतंत्र अधिकार गाजवूं लागण्याइतका मोठा होऊं शकतो. अब्बासिद, फातिमिद, बुवैहिद, सेलजुक व आटोमन ही घराणीं अशाच तऱ्हेनें उदयास आलेलीं आहेत. या सर्वांच्या शौर्याला संप्रदायप्रसाराच्या पवित्र उद्देशाची जोड मिळालेली होती. तथापि या सर्व मुसुलमानी संप्रदायप्रसारकांच्या कार्याला जें यश आलें तें त्या संप्रदायांतील तत्वांच्या श्रेष्ठपणामुळें आलेलें नसून त्याचें खरें श्रेय सदरहू पुरुषांच्या अंगच्या लष्करी गुणांकडेच आहे. असले गुण महंमदाच्या अंगीं तर विशेष प्रमाणांत होते. दुसऱ्यांच्या अंगांतील गुणांची परिक्षा त्याला फार उत्कृष्ट असे. त्यानें निवडून हाताखालीं घेतलेला एकहि मनुष्य पुढें नालायक किंवा बेइमान निघाला नाहीं. अरब लोकांच्या स्वभावांतील दोष व वर्मे त्याला पूर्ण अवगत होतीं आणि त्यांचा त्यानें स्वतःच्या कार्यांत अत्यंत उपयोग करून घेतला. इब्न इशाकनें महंमदाविषयींच्या सांगितलेल्या गोष्टींवरून महंमदाच्या मनांत नीत्यनीतिविचारांचा पूर्ण अभाव असल्याचें दिसतें; पण त्यांवरूनच त्याच्या अंगीं चिकाटी, धैर्य, धूर्तपणा, प्रसंगावधान व राजनिष्ठेच्या भावनेचा अभाव वगैरे त्याच्या कार्याला अत्यंत आवश्यक असे सर्व गुण होते असें ठरतें. महंमदाविषयीं दुसरी विलक्षण गोष्ट म्हणजे त्यानें आयुष्यांतील मुख्य कामगिरीला पन्नासाव्या वर्षी आरंभ केला. पण अशीं क्रॉमवेल सारख्यांचीं दुसरीं उदाहरणें आहेत. मुसुलमानी संप्रदायप्रसारांतील मुख्य मुद्दयाची गोष्ट म्हणजे ही कीं, महंमदानें जेव्हां तरवार उपसली तेव्हांच त्याच्या कार्याला खरें यश आलें त्याच्या आयुष्यांतील प्रसंगहि त्याच्या कार्याला हितकर असेच येत गेले. आतां 'समाजांतील एखाद्या विशिष्ट व्यक्तीलाच इतरांपेक्षां गुणांचा लाभ अधिक कां व्हावा व त्याच्या अंगांतील उपजत गुणांची वाढ उत्तम होत जाईल असेच प्रसंग त्याला कां प्राप्त व्हावे, हें इतिहासांत आढळणारें कोडें महंमदाच्या बाबतींतहि लागू असून तें अजून सुटलें नाहीं.

महंमदाला लिहितांवाचतां येत होतें कीं नाहीं, याबद्दल बराच वाद आहे. एकूंदर पुराव्यावरून त्याला दोन्ही गोष्टी येत होत्या, पण चांगल्या यत नव्हत्या असें दिसतें. त्याचा पोटाचा धंदा काय होता हेंहि नक्की माहीत नाहीं. कुराणांतील कांहीं उल्लेखांवरून तो व्यापारी असावा असा तर्क करतात. कुराणांतील स्थलविषयक वर्णनांवरून, त्यानें बराच प्रवास केलेला होता, हें मात्र नक्की ठरतें.

**मुसुलमानी संप्रदायाचा उदय व वाढ.**—नवीन संप्रदायसंस्थापकाचा अवतार होणार, असें मक्केतील कित्येकांनीं भविष्य केलें होतें असें सांगतात. त्यांत महंमदाच्या बायकोचाच एक नातेवाईक असून त्यानें बायबलच्या कांहीं भागांचें भाषांतर केलेलें होतें. अरबस्थानच्या दक्षिण व उत्तर भागांत ख्रिस्ती संप्रदाय पसरलेला होता,तेव्हां मध्य-अरबस्थानांत ख्रिस्ती प्रचारकांच्या उद्योगामुळें तेथील लोक ख्रिस्ती विचारांबद्दल जिज्ञासेनें चौकशींत असल्यास नवल नाहीं. प्रत्यक्ष कुराणावरून मात्र त्यांतील कोणताहि भाग दुसऱ्या ग्रंथांतून उतरून घेतलेला किंवा त्याच्या आधारें लिहिलेला असा दिसत नाहीं. बायबलांतील कांहीं गोष्टी कुराणांत सांपडतात, पण त्या ऐकींव माहितीवरून दिलेल्या दिसतात. कुराणांत आलेलीं विशेषनामें, व संप्रदायांतील पारिभाषिक शब्द, इथिओपिक, ग्रीक, सिरिअक, हिब्रू वगैरे अनेक भाषांतील शब्दावरून बनलेले आहेत.

महंमदाला प्रत्यक्ष साक्षात्कार होऊं लागण्यापूर्वी तो कांहीं काळ हिरा नामक पर्वतावर प्रपंच सोडून विरक्त स्थितींत जाऊन राहिला होता असें सांगतात. कुराणांत जे परमेश्वराचे संदेश म्हणून दिलेले आहेत ते महंमदाला प्रथम मिळाले तेव्हां तो अंगांत आलेल्या माणसाप्रमाणें बोलत असे. व यावेळीं तो स्वतःच्या भोंवतीं एक घोंगडी गुंडाळून घेऊन घामानें चिंब भिजून जात असे.त्याच्या तोंडांतून बाहेर पडणारा मजकूर कित्येक वेळां पद्यमय असे.परंतु या गद्यपद्यमय भाषेचा उत्तम अरबी गद्यपद्यात्मक भाषेशीं संबंध कसा जोडावयाचा, हें एक मोठें कोडें असून तें अद्याप सुटलेलें नाहीं. मक्केतील अरब लोक तर अशिक्षित व अडाणी असल्याचा कुराणांत उल्लेख आहे. शिवाय यहुदी ख्रिस्ती लोकांनां आपआपल्या धर्मानुसार आचरण करण्यास अडथळा करूं नये, अशी खुद्द महंमदानें इच्छा प्रदर्शित केलेली आहे; त्यावरून स्वतःच्या अज्ञानाची जाणीव व दुसऱ्यांच्या ज्ञानाबद्दल आदर या दोन्ही गोष्टी महंमदाच्या अंगीं होत्या, हें उघड आहे. तात्पर्य,महंमदाचे पूर्वकालीन अरब फारसे विद्वान् नव्हते त्यांची पद्यरचना फारशा चांगल्या वृत्तांत असणें शक्य नाहीं. अर्थात् कुराणाची म्हणजे महंमदाच्या धर्मोपदेशाची भाषा अशाच अर्धवट स्वरूपाची असल्यास त्यांत नवल नाहीं. शिवाय कुराणाला मूळ वृत्तपत्राचें स्वरूप असून नंतर त्याला ग्रंथाचें स्वरूप देण्यांत आलें, हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे.

देवाला कौल लावून भविष्यसूचक माहिती मिळविण्याची चाल महंमदापूर्वी अरबांत होतीच. महंमदासारखे भविष्यवादी दैवी शक्ति अंगांत संचरल्यावर जें बोलत त्यांत भावी संकटाच्या सूचनाहि लोकांनां दिलेल्या असत; कारण,

संकटानिवारणार्थ लोकांनां मदत करणें हें महंमद आपलें कर्तव्य समजे. स्प्रेंगर वगैरे कित्येकांनीं महंमदाला अपस्माराचे झटके येत असत असें म्हटलें आहे. परंतु महंमद हा शरीरानें चांगला बळकट होता, व त्याच्या उत्तर वयांत देखील तो बहुतेक लष्करी स्वाऱ्या व लढाया यांत गुंतलेला असे. त्याचा नवा मुसुलमानी पंथ संख्याबलानें एकसारखा वाढत होता, व त्या वाढत्या समाजाला धर्मोपदेश करणें, त्यांच्यासाठीं कायदे करणें, त्यांची अंमल बजावणी करणें व न्याय देणें वगैरे सर्व गोष्टी त्याला एकट्याला कराव्या लागत. इतका कामाचा बोजा असतांहि त्याची शरीरप्रकृति अखेरपर्यंत चांगली होती. तेव्हां त्याला वायूचे झटके वगैरे प्रकटीकरणानिमित्त येत असावेत, त्यांचा त्याच्या आरोग्याशीं कांहींएक संबंध नसावा असें मुसुलमान ग्रंथकार म्हणतात. महंमद पुढें जेव्हां मुसुलमानी राज्याचा मालक बनला, तेव्हां कुराण हें एक सरकारी बातमीपत्र होऊन बसलें, व त्यांत राज्यकारभाराच्या दृष्टीनें महत्त्वाची अशी सर्व हकीकत व हुकूम येऊं लागले. परमेश्वराच्या दूताच्या संदेशाबरहुकूम वागणें किती अगत्याचें आहे हेंहि त्यांत वरचेवर प्रतिपादन केलेलें असे.

**म हं म दा चा उ प दे श व आ च र ण यां तील वि सं ग त ता.**–महंमदाला एकेश्वर मताशिवाय कोणतेंहि एखादें विशिष्ट तत्त्व लोकांनां शिकवावयाचें होतें असें दिसत नाहीं. कारण तो आपल्या कोणत्याहि तत्त्वाचें, तसा राजकीय प्रसंग आल्यास, उल्लंघन करण्यास तयार असे. मुसुलमानी संप्रदायाची एकंदर परंपरा पाहिल्यास मुसुलमानी संप्रदायांतील तत्त्वें खुद्द महंमदापेक्षां त्याचे अनुयायीच अधिक एकनिष्ठेनें पाळीत आले आहेत, असें दिसून येतें. प्रथमारंभींच्या उपदेशांत महंमद (१) परलोक व पुनरुत्थान, (२) एकेश्वरत्व आणि (३) मूर्तिपूजेच्या तत्त्वांतला मूर्खपणा, या गोष्टींबद्दल मुख्यत्वेंकरून सांगत असे. मक्केंतील कृष्णपाषाणासंबंधींचे चुंबनादि प्रकार त्यानें शेवटीं धर्मसंमत ठरविले, यावरून मूर्तिपूजेविरुद्ध त्यानें उठविलेलें बंड निष्ठामूलक होतें असें मानणें पुष्कळांस कठिण होतें. पुनरुत्थानाच्या भविष्यत्कालीन अंत व त्या वेळीं होणारा सर्वांच्या पापपुण्याचा न्यायनिवाडा या गोष्टी अनुयायांच्या मनावर बिंबविण्याचा त्याचा उद्देश होता. परंतु पुढें संप्रदायप्रसाराच्या युद्धांत जेव्हां स्वतःच्या संप्रदायाचे लोक बळी पडूं लागले, तेव्हां त्यांचा तत्काल नंदनवनांत प्रवेश होतो व शत्रुपक्षी यांनां नरकवास घडतो असे महंमद प्रतिपादूं लागला. या दोन परस्परविरोधी गोष्टींचो मेळ घालणें कठिण आहे. ताबरी ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, एकेश्वरमतवादी महंमदानेंच एका अडचणीच्या प्रसंगीं मक्केंतील अनेक देवता आपल्या संप्रदायांत सामील करण्याबद्दल ईश्वरी संदेश झाल्याचें जाहीर केलें होतें. हा विशिष्ट भाग कोणी दुष्टानें मागाहून घुसडलेला असल्याचें ठरवून तो नंतर कुराणग्रंथांतून काढून टाकण्यांत आला हें खरें. तथापि या व कुराणांत वर्णिलेल्या आणखी कित्येक प्रकारांवरून वरील तिन्ही प्रमुख तत्त्वांचा व्यवहारांत कच्चेपणा दिसून येतो. परंतु यावरून महंमदाचा त्यानें स्वतः उपदेशिलेल्या तत्त्वांवर अविश्वास होता असें म्हणतां येत नाहीं. ही विसंगतता उत्पन्न होण्याचें कारण संस्थाचालकत्व आणि उपदेशकत्व हे दोन भिन्न धंदे एकट्या महंमदासच करावे लागत होते हें होय.

**महंमदाच्या धर्माज्ञा.**—दुसऱ्या कित्येक महत्त्वाच्या धर्माज्ञा–मक्केची यात्रा, महिनाभर उपवास व जकात नामक कर–महंमदानें मदीना येथें असतां केलेल्या आहेत. यांपैकीं पहिली आज्ञा मक्का व मदीना येथील लोकांचा सलोखा करण्याकरितां, दुसरी युद्धप्रसंगांत शिपायांनां उपासमारीचा त्रास वाटूं नये म्हणून व तिसरी गरिबांच्या मदतीकरितां द्रव्य निधि जमविण्याच्या उद्देशानें केलेली आहे. मद्यपानाचीहि त्यानें बंदी केलेला होती, व तिचा हेतूहि, लष्करी शिस्त चांगली पाळली जावी हाच दिसतो. शिवाय यावरून असेंहि ठरतें कीं, व्यावहारिक धर्माबद्दलच्या आज्ञा महंमदानें मदिनेस गेल्यानंतर तेथें प्रचलित असलेले यहुदी आचार पाहून केल्या आहेत.

परसंप्रदायांतील गोष्टी उसन्या घेतांना उसनेपणा उघडकीस न येऊं देण्याची तो खबरदारी घेत असे व त्यांत कित्येक महत्त्वाचे फरकहि करीत असे. आठवड्यांतील सुटीचा दिवस व खाद्यपेयांसंबंधाचे निर्बंध त्यानें थोड्या फार फरकानें यहुदी धर्मग्रंथांतून घेतलेले आहेत असें कित्येक म्हणतात. पण असेंहि शक्य आहे कीं तो अरब आणि यहुदी यांच्या सामान्य परंपरेचाच भाग असेल. ख्रिस्ती संप्रदायांतील तत्त्वें किंवा आचार यांतून त्यानें फारसें कांहींच घेतलेलें दिसत नाहीं. ख्रिस्ती लोकांशीं तो प्रथमपासून सलोख्यानेंच वागत होता, व अखेर प्रबल सत्ताधीश झाल्यावरहि केवळ खंडणी घेऊन त्यानें त्यांना निर्धास्तपणें स्वतंत्र राहूं दिलें होतें हें मात्र खरें आहे.

अरबस्तानांतील ख्रिस्ती नसलेल्या लोकांच्या जुन्या धर्माशीं तुलना करण्याकरितां जरूर तितकी माहिती उपलब्ध नाहीं. तेथील निरनिराळ्या अरब लोकांच्या टोळ्यांत निरनिराळीं दैवतें होतीं; तेव्हां सर्व अरबस्तानची राजकीय दृष्ट्या एकी करण्याकरितां सर्वांचा मिळून एक दैवतसंप्रदाय असण्याची आवश्यकता महंमदास वाटली असावी हें उघड आहे. मदीना येथें महंमदाला जे मोठमोठे अरब वीर येऊन मिळाले ते केवळ मुसुलमानी संप्रदायाकरितां नसून महंमदाच्या लष्करी व राजकारणी गुणांमुळेंच मिळाले असावेत. दुसरे कित्येक, महंमदाला ईश्वरी साक्षात्कार घडतात, येवढ्याच श्रद्धाबुद्धीनें मिळाले. महंमदाची राजकीय सत्ता जसजशी वाढत गेली तसतसें त्याच्या मूळ संप्रदायतत्त्वाचें महत्त्व कमी होऊन आसपासच्या पारमार्थिक संप्रदायांतील आचारांचा

महंमद आपल्या संप्रदायांत समावेश करून घेऊं लागला. त्याचा उद्देश अर्थात् शक्य तितकी दुही मोडून सर्व अरबांचें एक राष्ट्र बनवावें हा होता.

महंमदाच्या द्वारें होणाऱ्या प्रकटीकरणासंबंधाच्या खरेपणाविषयीं पुष्कळांनीं संशय घेतले आहेत. स्प्रेंगरचें अपस्माराच्या झटक्याविषयींचें मत वर दिलेलेंच आहे व त्यांतील अयथार्थताहि वर दाखविली आहे. दुसरें केटनचें मत असें आहे कीं महंमद प्रत्येक प्रकटीकरणांतील मजकुराची आगाऊ तयारी करून ठेवीत असे. पण ह्या मतांतहि तथ्य नाहीं; कारण महंमदानें हीं प्रकटीकरणें जपून ठेवण्याची काळजी घेतल्याचें मुळींच दिसत नाहीं. तीं त्याच्या अनुयायांनीं एकत्र करून जपून ठेवलीं आहेत. इतर अत्यंत बुद्धिमान व कर्तृत्वमान माणसांप्रमाणें महंमदालाहि, आपल्या हातून परमेश्वर सर्व गोष्टी करवीत आहे अशा प्रकारची श्रद्धा वाटत होती हें मात्र खरें.

**नैतिक सुधारणा.**—महंमदानें केलेली मोठी नैतिक सुधारणा म्हणजे लहान अर्भकें बळी देण्याची चाल त्यानें बंद केली ही होय. ही चाल अरबस्तानांत त्यापूर्वी होती, असें कुराणावरून स्पष्ट दिसतें. पण घेतलेली शपथ कांहीं प्रायश्चित्त घेऊन मोडण्यास हरकत नाहीं असेंहि त्यानें ठरविलें. नीतिनियमाविषयींचें तात्त्विक विवेचन कुराणांत कोठेंच केलेलें नाहीं; तथापि मनुष्यानें आचरणांत कोणत्याहि प्रकारचा अतिरेक होऊं देऊं नये हा उपदेश मात्र केलेला दिसतो. अनेक भार्या करण्याला तसेंच यथेच्छ वेश्यागमन करण्याला त्यानें परवानगी दिलेली आहे. इतकेंच नव्हे तर गुलाम करण्याची पद्धतीहि त्यानें मान्य केलेली आहे; खासगी मालमत्ता व द्रव्यसंचय करण्याच्या तो विरुद्ध नव्हता. सर्व गुणांत श्रेष्ठ मान धैर्यगुणाला तो देत असे. धाडसी शूरांना स्वर्ग मिळतो असें वारंवार सांगून तो अनुयायांना उत्तेजन देत असे. विरक्त संन्याशाचा आचारधर्म त्यानें कधींच उपदेशिला नाहीं; व तो त्याला मान्यहि नव्हता हें त्याच्या अखेरपर्यंतच्या आयुष्यक्रमावरून स्पष्ट दिसतें. खाजगी कौटुंबिक बंधनांपेक्षां एकंदर मुसुलमानी समाजाच्या हितार्थ बंधनें तो अधिक श्रेष्ठ मानीत असे, हें कुराणांतील अब्राहामच्या कथेच्या स्वरूपावरून स्पष्ट दिसतें. मुसुलमानी समाजांत आपसांत मारहाण, दंगेधोपे वगैरे कांहीं न होतां सर्वांनीं बंधुभावानें रहावें अशी त्याची फार इच्छा होती, पण ती सुफल झाली नाहीं. कारण त्याच्या मृत्यूनंतर लवकरच मुसलमानांमध्यें आपसांत युद्धें होऊन शेंकडों लोक बळी पडले हें इतिहासप्रसिद्धच आहे.

परधर्मसहिष्णुतेबद्दल विवेचन कुराणांत बऱ्याच वेळां आलेलें आहे. कालदृष्ट्या आरंभींच्या भागांत मुसुलमानांप्रमाणें यहुदी, सेबियन व ख्रिस्ती या लोकांनाहि मुसलमानांचा देव अल्ला व अंतिमन्यायदिन यावर विश्वास असल्यास सद्गति मिळते असें स्पष्ट सांगितलें आहे; पण उत्तरकालीन एका वचनांत वरील तिन्ही समाजांना सद्गति मिळण्याचा संभव कमी असल्याचें म्हटलें आहे. इतर कित्येक ठिकाणीं तर मुसुलमानांनीं परधर्मी समाजांशीं ते मुसुलमानी धर्म स्वीकारीपर्यंत किंवा खंडणी देण्याचें कबूल करीपर्यंत यत्किंचितहि दयामाया न ठेवतां लढत सुटावें अशी स्पष्ट आज्ञा केलेली आहे. परधर्मीयांशीं मैत्री करण्याची सक्त मनाई केलेली आहे. उलट तसा जिवावरचा प्रसंग आल्यास आपण मुसुलमानी संप्रदायांतील आहों हेंहि लपवून ठेवण्यास कुराणांत परवानगी दिलेली आहे. यावरूनहि कुराण ग्रंथ हा पवित्र धार्मिक हेतूपेक्षां राजकीय हेतूनीं प्रेरित होऊन लिहिलेला असावा असें म्हणावें लागतें. महंमदाचे अखेर अखेरचे उद्गार तर फारच असहिष्णुतापूर्ण आहेत. तथापि शेवटीं त्यानें परधर्मीयांपासून कर घेऊन त्यांना जिवंत राहूं देण्यास परवानगी दिली आहे.

तात्पर्य, धर्माज्ञा व सामाजिक व राजकीय कायदेकानू नवे व सर्वमान्य होण्यासारखे महंमदानें फारसे केले नाहींत; बहुतेक परंपरागत चालीरीतींवर व रूढींवरच त्यानें भागविलें आहे. म्हणून कायदेग्रंथ या नात्यानें कुराणाला फारशी किंमत नाहीं. त्यांत आलेल्या कायदेविषयक विवेचनांत अपूर्णता व परस्परविरोध व अव्यवस्था हे तिन्ही दोष भरलेले आहेत. वारसाहक्कासंबंधाचे नियम एकत्र व व्यवस्थित दिलेले आहेत हें खरें आहे; पण त्यांतहि पूर्वचिंतन व दूरदृष्टि फारशी दिसत नाहीं. साध्या चोरीच्या गुन्ह्याला हात तोडण्याची शिक्षा म्हणजे तर शुद्ध कठोरपणा दिसतो. असें सांगतात कीं, महंमद मृत्युशय्येवर पडला असतां त्यानें कायद्यांचा नवा ग्रंथ रचण्याची इच्छा दर्शविली होती. परंतु ज्यांना कुराण म्हणजे प्रत्यक्ष देववाक्य असें वाटतें अशा मुसुलमानांना, महंमदाची ती वातांतली बडबड होती, असें साहजिकच वाटतें. तथापि राज्याला अधिकारी कोण समजावा याचे नियम नीट घालून न दिल्यामुळें पुढें मुसुलमानी राज्यांत किती अनर्थ माजले याची साक्ष इतिहास देत आहेच. शिवाय प्रत्येक बाबतींत कुराण प्रमाण—त्याबाहेर नवे कायदेकानू करण्याचा कोणास कधींच अधिकार नाहीं—या समजुतीमुळें एकंदर मुसुलमानी समाज सुधारणेला सर्वस्वीं कसा पारखा होऊन बसला हेंहि सुप्रसिद्धच आहे.

**तत्त्वज्ञान.**—अतींद्रिय गोष्टींविषयीं तात्त्विक चर्चा करण्याची आवड महंमदाला होती, असें बहुधा दिसत नाहीं. पण संप्रदायस्थापक या नात्यानें त्याला कांहीं तत्त्वज्ञानात्मक गोष्टींचा विचार करणें भाग पडलें, व त्यामुळेंच ईश्वरविषयक कांहीं गोष्टींचें विवेचन कुराणांत आलेलें आहे; पण तें निश्चयात्मक स्वरूपाचें नाहीं. कुराणांतील अल्लाचें वर्णन महाबलाढ्य अशा एखाद्या अनियंत्रित सत्ताधीशाप्रमाणें आहे. त्याचा दरबार देवदूतांचा बनलेला असून त्यांपैकीं जिब्रिल हा महंमदाला देवाचे संदेश पोंचवीत असे. महंमदाला युद्धांत मदत करण्याला कित्येक देवदूतांना

घोडेस्वार करून पाठविले होते असेंहि वर्णन आहे. दुसरी आधिदैविक कोटी जिन्न किंवा सैतानांची. इब्लिस हा त्यांचा राजा. सैतान ईश्वराच्या परवानगीनेंच कांहीं काळ मनुष्याला कुमार्गाला लावीत असतो, व पृथ्वीवरील सर्व अनर्थांचें मूळ तोच होय. कुराणाला दैववाद एकंदरीनें मान्य असल्याचें दिसतें. त्यांत आत्म्याविषयींचा विचार फारसा केलेलाच नाहीं. सृष्टयुत्पत्तिविषयींचें वर्णन बायबलांतल्याप्रमाणेंच थोडीशी माहिती अधिक घालून दिलेलें आहे.

**महंमदाचें खाजगी वर्तन**:–इब्न इशाकनें लिहिलेल्या महंमदाच्या चरित्रावरून महंमदाचें आचरण अगदीं वाईट होतें असें दिसतें. स्वतःचा हेतु साधण्याकरितां तो वाटेल ती युक्ति योजण्यास कचरत नसे, आणि अनुयायांनांहि सदसद् विचार पूर्णपणें धाब्यावर बसविण्यास त्याची संमति असे. खून व कत्तली त्यानें बेफिकीरपणें वाटेल तशा घडवून आणलेल्या होत्या. मदीना येथील त्याचा जुलमी कारभार पाहिला म्हणजे तो निव्वळ दरोडेखोरांचा नायक होता असें दिसतें. कारण, वाटेल तशी लुटालुट करून जमविलेला पैसा आपल्या अनुयायांत वांटून यावयाचा एवढेंच कायतें अर्थशास्त्र त्याला माहीत होतें असें म्हणावे लागतें. इतकेंच नव्हे तर लुटींची वांटणी करण्यातहीं तो फार पक्षपात करतो, अशी अनुयायांची ओरड असे. तो स्वतः विषयोपभोग बेसुमार करीत असे व अनुयायानाहि तेंच करण्यास त्याची पूर्ण मुभा होती पुन्हां आपण जें जें करतो तें सर्व ईश्वराज्ञेनेंच करतों, असें म्हणण्यास तो नेहमी तयार असे. उलटपक्षीं कोणतेंहि तत्त्व राजकीय फायद्याकरितां पायाखाली तुडविण्यास त्यास केंव्हाहि हरकत वाटत नसे.

वरील वर्णन कोणा महंमदाच्या शत्रूनें केलेलें नसून प्रत्यक्ष त्याच्या अनुयायानें केलेलें आहे, आणि तें खोडून काढण्याचाही कोणी मुसुलमान लेखकानें प्रयत्न केलेला नाहीं उलट महंमदाच्या आयुष्यातील सर्व गोष्टी धर्मप्रमाण असें मानून त्या बरहुकुम हजारों लाखों मुसुलमान आज कित्येक शतकें वागत असल्यामुळें भयंकर अनर्थ होत आहेत. महंमदाच्या वर्तनाबद्दल तरफदारी किंवा समर्थन करणारे लेखक १८ व्या शतकापासून पुढें येऊं लागले असून त्यांत यूरोपियन विद्वान प्रमुख आहेत. गिबन, कार्लाईल व बास्वर्थ स्मिथ यांनीं महंमदाची फार स्तुति केलेली आहे. परंतु या लेखकांतला मुख्य दोष हा कीं त्यांनीं महंमदाचा सुप्रसिद्ध असा मदीना येथील वर्तनक्रम विचारांत न घेतां त्याच्या मक्का येथील अल्पज्ञात चरित्रक्रमावर मुख्य भिस्त ठेविली. शिवाय प्रत्यक्ष अरबी भाषेंतील चरित्रलेखन साहित्याशीं यांपैकीं कोणीहि परिचय करून घेतलेला नाहीं. अर्थात् त्यांच्या मतींस फारशी किंमत देतां येत नाहीं. अगदीं अलीकडे मुसुलमानी देशांत यूरोपियन संस्कृति बरीच ज्ञात झाल्यापासून या विषयावर लिहिण्याची जरूरी खुद्द मुसुलमानाना वाटूं लागली असून त्याप्रमाणें कांहीं लेखकांनीं प्रयत्न केलेला आहे. त्यांत सय्यद अमीर अली हा प्रमुख होय. त्यानें इब्न् इशाकचें चरित्र कित्येक ठिकाणीं विश्वासास अपात्र असल्याचें म्हटलें आहे; व तसें म्हणणें शक्य नसेल तेथें महंमदाच्या वर्तनाला विशिष्ट उच्च हेतु जोडून देण्याचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ, अनेक बायकांऐवजीं चारच बायका करण्याची मर्यादा महंमदानें घातली ती एकपत्नीव्रताकडे अरबांची हळूहळू प्रवृत्ति करावी म्हणून होय असें हा भाष्यकार म्हणतो, व स्वतः महंमद तर एकपत्नी व्रत पाळणाराच होता असें तो विधान करतो. या युक्तिवादानें कोणाचें समाधान होण्यासारखें नाहीं हें उघड: आहे. असें मार्गोलिथ म्हणतो.

कुराणाची ईश्वरदत्तता हें मत स्थापन करण्यासाठीं महंमदानें कुराणांतच प्रयत्न केला आहे व आक्षेपकांस इशारा दिला आहे महंमद म्हणतो:

"२३ आणि आम्हीं आपला सेवक ( मोहंमद ) यास जें (कुराण) प्रकट केलें आहे त्या संबंधानें जर तुम्ही संशयांत असाल, ( व समजत असाल कीं हें ईश्वरी पुस्तक नव्हे, पण मनुष्यानें रचिलेलें आहे ) आणि तुम्हीं ( आपल्या त्या दाव्यांत ) खरे असाल; तर त्या सारखाच एक अध्याय ( सूरा तुम्हींहि रचून ) आणा व परमेश्वराखेरीज तुम्ही आपले प्रत्यक्ष हिमाईतीहि बोलावून घ्या. २३. मग जर तुम्हीं ( एवढी गोष्टहि ) न करूं शकला व ( ती ) तुमच्यानें केंव्हांहि करवणारच नाहीं, तर ज्या नरकाग्नीचें इंधन मनुष्यें व दगड होतील, त्याचें भय बाळगा; तो नास्तिकांकरितां ( भडकवून ) तयार ठेवलेला आहे. २४ ( सूरतुल्–बक अध्याय २ रा. )"

चवथ्या अध्यायांत यहुदी लोकांप्रमाणें आदम व हव्वा यांपासून जगाची उत्पत्ति झाली अशी समजूत दाखविती. याच अध्यायांत स्त्रियांसंबंधी संप्रदायाची वृत्ति कशी असावी याविषयीं आज्ञा आहेत

"अहो लोकांनों! आपल्या पालनकर्त्यास भ्या, कीं ज्यानें तुम्हांस एका तनमना ( म्हणजे आदम ) पासून निर्माण केलें; आणि (तें अशा प्रकारें कीं प्रथमारंभीं) त्यापासून त्याची पत्नी ( हव्वा ) इला पैदा केलें व त्या उभयतां (पति पत्नी ) पासून पुष्कळ पुरुष व स्त्रिया ( जगांत ) फैलाविल्या. आणि ज्या परमेश्वराच्या नांवानें तुम्हीं एकमेकांकडून ( आपलीं कित्येक ) कामें काढून घेतां त्याच्या व गणगोत्रांच्या ( मर्यादां ) विषयीं जपून वागा; ( कारण ), परमेश्वराची तुम्हांवर ( नित्य ) नजर आहे. १. आणि अनाथ बालकांची मालमत्ता तुम्ही त्यांच्या हवालीं करा; आणि चांगल्या मालाच्या बद्दलीं रद्दी माल घेऊं नका, व त्यांचे माल आपल्या मालांत मिसळून गीळंकृत करूं नका. ( कारण हें (फारच) महा पातक होय. आणि जर तुह्मांस या गोष्टीची भीति असेल कीं तुह्मीं अनाथ बालिकियांच्या बाबतींत इन साफ कायम न ठेवूं शकाल, तर तुह्मांस भल्या वाटतील त्या

दोन दोन व तीन तीन व चार चार स्त्रियांशीं लग्न लावून घ्या. पण जर तुह्मांस या गोष्टीचें भय असेल कीं (अनेक बायकांमध्यें) (बरोबरीच्या नात्याचें वर्तन) न करूं शकाल, तर (अशा परिस्थितींत) एकच (बायको करणें) अगर जी (दासी) तुमच्या हस्तगत असेल (तिच्यावरच संतुष्ट राहणें.) तुमच्या हातून अन्याय न घडावा म्हणून ही (युक्ति बुद्धीस) विशेष अनुसरली होय. ३. आणि स्त्रियांस त्यांचीं स्त्रीधनें खुशीनें देऊन टाका. मग जर त्या तुम्हाला त्यांतून कांहीं आपल्या राजीखुशीनें सोडून देतील, तर तें तुम्ही रुचतें पचतें (समजून खुशाल) खा (प्या.).

"४ आणि मालमत्ता जिला परमेश्वरानें तुम्हांसाठीं (एका प्रकारचा) आधार बनविला आहे, ती कमअक्कल (अनाथ) बालकांच्या हवालीं करूं नका. पण त्यांतून त्यांच्या पोटापाण्यास द्या व त्यांचे कपडेलत्ते करा; आणि त्यांनां (जें) बोलणें (तें) नरमाईनें बोलून समजावा. ५. आणि अनाथ बालकांस (संसार) व्यवहारांत लावून ठेवा; येथपर्यंत कीं लग्ना (च्या वया) स पोहोंचतील. त्या वेळीं जर तुम्ही त्यांच्यांत कांहीं योग्यता पहाल, तर त्याचा माल त्यांच्या हवालीं करून टाका. आणि असें करूं नका कीं (उद्याला) ते मोठे होतील म्हणून उधळा उधळ करून व घाईघाईनें तो (त्यांचा माल) खाऊन (पिऊन) टाका. आणि जो (पालक) श्रीमंत असेल त्यानें (अनाथांचा माल आपल्यावर खर्च करण्याविषयीं) जपलें पाहिजे; आणि जो गरीब असेल त्यानें यथारीति (निर्वाहा पुरतें) खावें; (त्यास हरकत नाहीं). आणि जेव्हां तुम्ही त्यांचा माल त्यांच्या स्वाधीन करूं लागाल, तेव्हां (लोकांस) त्यां (नीं आपला माल घेतल्या) चे साक्षी करून ठेवा आणि (एरवीं) हिशेब घेण्यास तर परमेश्वर पुरा होय. ६. आईबाप व अगदीं जवळचे नातलग यांनीं जें कांहीं मागें सोडलें असेल त्यांत थोडा असो वा बहुत, पुरुषांचा हिस्सा होय; आणि (तसाच) आईबाप व अगदीं जवळचे नातलग यांनीं जें कांहीं मागें सोडलें असेल त्यांत स्त्रियांचाहि हिस्सा होय. (हा) हिस्सा (आम्हीं ठरविलेला (होय.) ७. आणि जेव्हां (हिस्याच्या) विभागणीच्या वेळीं (दूरचे) नातलग व अनाथ मुलें व गोरगरीब हीं येऊन हजर होतील, तेव्हां त्यांतून त्यांनांहि कांहीं देत जा; व (त्यांच्या मर्जीप्रमाणें त्यांनां देतां येण्यासारखें नसेल तर) त्यांनां नरमाईनें बोलून समजावून लावा. ८. आणि जे (हक्कदार वारस) होत त्यांनां भ्यालें पाहिजे कीं जर ते (खुद्द) आपल्या (मरणा) पश्चात् दुर्बल संतति सोडून जाते तर त्यांच्या [स्थिती] संबंधानें त्यांनां [कसला काय] घोर करावा लागता! म्हणून [गोरगरिबांवर सक्ती करण्यांत] त्यांनीं परमेश्वराचें भय बाळगावें व [त्यांच्याशीं] नीट भाषण करावें. ९. जे लोक अन्यायानें अनाथ बालकांची मालमत्ता खाऊन चटॅकरतात ते आपल्या पोटांत केवळ अंगारेच भरतात. आणि ते लवकरच [मेल्यावर] नरकाग्नींत पडतील. १० [मुसुलमानांनों!] तुमच्या संतती [च्या वांट्या] संबंधानें परमेश्वर तुम्हांस बजावून ठेवितो कीं मुलग्याला दोन मुलींच्या बरोबर हिस्सा [देत जा.] मग जर मुली [दोन वा] दोहोंहून जास्ती असतील, तर [मरणारा] जें मागें सोडील त्यांत त्यांचा [हिस्सा] दोन तृतीयांश होय. आणि जर ती एकटीच असेल, तर तिला निम्मेनिम. आणि मयताचे आईबापांस [म्हणजे] दोहोंतून प्रत्येकास, तो जें मागें सोडील त्यांतून, जर त्याला कांहीं संतान असेल तर एक षष्ठांश होय. पण जर त्याला संतान नसेल व त्याचे वारस [फक्त] आईबाप असतील, तर त्याच्या आईचा [हिस्सा] एक तृतीयांश; [बाकी बापाचा]. परंतु जर [आईबापां खेरीज] मयताचीं [एकापेक्षां अधिक बहीण] भावंडें असतील, तर आईचा [हिस्सा] एक षष्ठांश. [पण हे हिस्से] मयत इसम जो मृत्युलेख करील त्या [च्या बजावणी] नंतर व कर्जा [च्या फेडी] नंतर [दिले जावेत]. तुम्ही आपले बाप [-दादे म्हणजे मूळ] आणि आपले पुत्र [-पौत्रादि म्हणजे शाखा] यांस जाणूं शकत नाहीं कीं नफ्याच्या मानानें त्यांजपैकीं कोणते तुम्हांशीं विशेष जवळ होत? [तर तुम्ही आपलें मत चालवूं नका, व पक्कें समजा कीं ही] हिस्सेरसी परमेश्वराची ठरविलेली होय. परमेश्वर निःसंशय [सर्व कांहीं] जाणतो [व सर्व प्रयोजनांशीं] वाकब होय. ११ आणि जें कांहीं तुमच्या पत्न्या मागें सोडतील त्यांतून जर त्यांनां संतान नसेल तर, तुमचें अर्धें; आणि जर त्यांनां संतान असेल तर त्या जें कांहीं मागें सोडतील त्यांतून तुमचें एक चतुर्थांश; [पण तेंहि] त्या जो मृत्युलेख करतील त्या [च्या बजावणी] नंतर व कर्जा [च्या फेडी] नंतर आणि तुम्ही जें कांहीं मागें सोडाल त्यांतून, जर तुम्हांला कांहीं संतति नसेल तर, (विधवा) स्त्रियांस एक चतुर्थांश. आणि जर तुम्हांला संतति असेल तर तुम्ही जें कांहीं मागें सोडाल त्यांतून, (विधवा) स्त्रियांस एक अष्टमांश; (आणि तेंहि) तुम्ही जो मृत्युलेख कराल त्या (च्या बजावणी) नंतर व कर्जा (च्या फेडी) नंतर (दिलें जावें) आणि जर कोणा पुरुष वा स्त्रीचा (लांबचा) वारसा असेल व त्यांचा पिता व पुत्र (म्हणजे मूळ व शाखा) नसेल व (दुसऱ्या बापापासून) त्यांचा कोणी भाऊ वा बहीण असेल; तर त्या दोहोंपैकीं प्रत्येकास एक षष्ठांश. पण जर ते ह्याहून जास्त असतील तर एक तृतीयांशामध्यें ते (सर्व बरोबरीचे) पातीदार होत. (हे हिस्सेहि मयत इसमानें) केलेल्या मृत्युलेखा(च्या बजावणी) नंतर व कर्जा (च्या फेडी) नंतर,(मयताकडून) कोणालाहि अपाय न होईल अशा अटीनें [दिले जावेत]. [ही] परमेश्वराची ताकीद होय. आणि परमेश्वर [सर्व कांहीं] जाणतो [व लोकांची आज्ञाभंजक वृत्ति] सहन करतो. १२. ह्या, परमेश्वराच्या [बांधीव] मर्यादा होत. आणि जो परमेश्वर व त्याचा पैगंबर यांच्या हुकुमाप्रमाणें चालेल.[पर लोकीं] त्याला परमेश्वर अशा बागांत [नेऊन] दाखल

करील कीं ज्यांच्या खालून[ पाण्याचे ] पाट वहात असतील; [ व ते ] त्यांत सदासर्वदा राहतील. आणि हें मोठें सार्थक होय. १३. आणि जो कोणी, परमेश्वर व त्याचा पैगंबर यांच्या हुकुमांचा अनादर करील व परमेश्वराच्या[ बांधीव ] मर्यादांचें उल्लंघन करील, त्याला परमेश्वर नरकाग्नींत[ नेऊन] दाखल करील;[ व ] तो त्यांत निरंतर राहील; व त्याला फजितीची शिक्षा [ प्राप्त ] होईल.

१४ "आणि [ मुसुलमानांनों! ] तुमच्या स्त्रियांपैकीं ज्या स्त्रिया बदकर्म करतील, तर त्यांच्या [ बदफैली ] वर आपल्या ( लोकां ) तून चौघांची साक्ष घ्या. मग जर साक्षी ( त्यांच्या बदकर्मांची ) साक्ष देतील, तर ( शिक्षेपरी) त्या ( स्त्रियां ) स घरांत बंदिस्थ ठेवा; येथपर्यंत कीं मृत्यु त्यांचा अंत आणील अगर परमेश्वर त्यांच्यासाठीं (आणखी) कांहीं मार्ग काढील. १५ आणि तुम्हां ( लोकां ) पैकीं जे दोघे बदकर्म करतील त्यांनां मारहाण करा. मग जर ते उभयतां पश्चात्ताप पावतील व आपली स्थिति सुधारतील तर तुम्ही त्यांच्या ( आणखी जास्त ) वाटेस जाऊं नका. कारण, परमेश्वर मोठा पश्चात्ताप मान्यकर्ता व दयाळू होय. १६ परमेश्वर पश्चात्ताप तर मान्य करतोच; ( पण ) जे लोक अज्ञानामुळें एखादें दुष्कर्म करतील, मग लवकरच पश्चात्तापहि पावतील त्या लोकांचाच मात्र. तर परमेश्वरहि अशांचा पश्चात्ताप मान्य करून घेतो. आणि परमेश्वर ( सर्वांची स्थिति) जाणतो ( व सर्व- ) युक्तिसंपन्न होय. १७ आणि जे लोक ( आयुष्यभर ) वाईट कामें करीत राहतील, येथपर्यंत कीं त्यांच्यांतून जेव्हां एखाद्यास मृत्यु येऊन ठेपेल, तेव्हां तो म्हणूं लागेल कीं आतां मी अनुताप पावलों; अशा लोकांचा पश्चात्ताप ( मान्य ) नाहीं. आणि( तसाच )जे लोक नास्तिक असतांनाच मरण पावले त्यांचाहि (पश्चात्ताप मान्य) नाहीं. हेच.होत कीं ज्यांच्यासाठीं आम्हीं दुःखदायक शिक्षा तयार करून ठेविली आहे. १८ अहो मुसुलमानानों! तुम्हांला याची मुभा नाहीं कीं, स्त्रियांस ( मयताचा ) वारसा समजून बळेंच त्यांच्यावर कबजा मिळवावा. आणि जें कांहीं तुम्हीं त्यांनां ( नवऱ्याच्या वारश्यांतून ) दिलें असेल त्यांतून कांहीं हिरावून घेण्याच्या हेतूनें त्यांनां ( घरांत ) अडकवून ठेवूं नका; (कीं त्यांनां दुसऱ्या कोणाशीं लग्न करतां न यावें). परंतु त्या जर एखादें उघड बदकर्म करतील ( तर त्यांनां बंदिस्थ ठेवण्यास हरकत नाहीं ). आणि तुम्हीं पत्न्यांशीं जनशिरस्त्याप्रमाणें नांदणूक करा. मग जर ( कोणा कारणानें ) तुम्हीं त्यांनां नापसंत कराल तर नवल नव्हे कीं, तुम्हांस एक वस्तु नापसंत असेल व परमेश्वर त्यांत पुष्कळ हित ( व कल्याण ) देईल. १९ आणि जर तुमचा बेत एका पत्नीच्या जागीं दुसरी पत्नी बदलून करण्याचा असेल तरं त्यांतून ( पहिल्या ) एका पत्नीला तुम्हीं ढीगभर द्रव्य देऊन टाकलें असेल; तरीहि त्यांतुन कांहींच ( परत ) घेऊं नका. कां, ( तुमच्या सभ्यपणास ही गोष्ट शोभते कीं ) कोणा तऱ्हेचें कुभांड लावून व प्रत्यक्ष अनाठायीं गोष्ट करून ( आपण दिलेलें तिच्यापासून परत ) घ्यावें. २० आणि तुम्हीं ( दिलेलें परत ) कसें घ्याल ? व वास्तविक पाहतां, तुम्ही एकमेकांच्या समागमांत येऊन चुकलां आहां व त्या तुम्हांपाशीं ( लग्नाच्यावेळीं स्त्रीधन व पालनपोषण वगैरे संबंधींचें ) पक्कें वचन घेऊन चुकल्या आहेत. २१ आणि ज्या स्त्रियांशीं तुमच्या बापांनीं लग्न लाविलें असेल, तुम्ही त्यांच्याशीं लग्न लावूं नका. परंतु जें पूर्वी होऊन चुकलें ( तें होऊन चुकलें ) तथापि अर्थात् ही ( मोठ्या ) निर्लज्जपणाची व गहजबची गोष्ट होय ! आणि तो ( फारच ) वाईट प्रघात होता. २२ ( मुसुलमानांनों ! ) तुमच्या आई व तुमच्या मुली व तुमच्या बहिणी व तुमच्या चुलत्या मावश्या व भावाच्या मुली ( म्हणजे पुतण्या ) व बहिणीच्या मुली ( म्हणजे भाच्या ) व तुम्हांस ज्यांनीं दूध पाजिलें आहे त्या तुमच्या आया व तुमच्या दूधबहिणी आणि तुमच्या सास्वा ( ह्यां सर्व ) तुम्हांस निषिद्ध होत. आणि ज्या स्त्रियांशीं तुम्हीं समागम करून चुकलां आहां त्यांच्या पाळलेल्या कन्या कीं ज्या ( प्रायः ) तुमच्या ओट्यांत ( पालन ) होतात त्या ( तुम्हांस निषिद्ध होत. ) पण जर तुम्हीं त्या ( स्त्रियां ) शीं समागम केला नसेल, तर ( त्या पाळलेल्या मुलींशीं लग्न लावून घेतल्यास ) तुम्हांवर कांहीं पाप नाहीं. आणि तुमच्या ( खुद्द ) पोटच्या मुलांच्या पत्न्या ( म्हणजे तुमच्या सुना; ह्या तुम्हांस निषिद्ध होत ). आणि दोघां बहिणींशीं एकत्र लग्न करणें ( ही निषिद्ध होय. ) पण जें पूर्वी होऊन चुकलें [ तें होऊन चुकलें ]. निःसंशय परमेश्वर क्षमाकर्ता व दयाळू होय.

"२३आणि ज्या स्त्रिया (दुसऱ्यांच्या लग्न–)बंधनांत असतील त्याहि ( निषिद्ध होत ); पण ज्या, ( नास्तिकांचे लढाईंत बंदिवान होऊन ) तुमच्या हस्तगत झाल्या असतील त्या मात्र ( निषिद्ध नव्हत. ) ( ही ) परमेश्वराची लेखी आज्ञा होय ( व तिचें पाळणें ) तुम्हांस ( आवश्यक होय ). आणि ( ज्या स्त्रिया तुम्हांस निषिद्ध होत ) ह्या खेरीज ( इतर स्त्रियांची ) तुम्हांस मुभा आहे; या अटीवर कीं तुम्हीं कामतृप्तीसाठीं नव्हे तर ( लग्न ) बंधनांत आणण्याकरितीं, द्रव्याचे ( म्हणजे स्त्रीधनाचे ) देण्यानें (विवाह करूं) इच्छावें. मग ज्या स्त्रियांपासून तुम्हीं त्या ( स्त्रीधनाचे ) बदला सुखोपभोग घेतला असेल, त्यांच्याशीं जें स्त्रीधन ठरलें होतें तें त्यांच्या हवालीं करा. आणि ( स्त्रीधन ) ठरविल्यापश्चात् ( त्याच्या कमीजास्त करण्यास ) तुम्हीं आपसांत राजी होऊन जाल, तर त्यांत तुम्हांकडे कांहीं पाप नाहीं. परमेश्वर ( सर्वांच्या स्थितीशीं ) वाकब (व सर्व) युक्तिसंपन्न होय. २४ आणि तुम्हांपैकीं ज्याला स्वतंत्र मुसलमान स्त्रियांशीं विवाह करण्याचें सामर्थ्य नसेल तर ज्या दासी ( नास्तिकांचे लढाईत ) तुम्हा मुसलमानांचे हस्तगत होऊन जातील ( व ) त्या विश्वासूहि असतील, त्यांच्याशीं ( विवाह करा. ) आणि परमेश्वर तुमच्या विश्वासास खूप

जाणून आहे. ( मानवी उत्पत्तीच्या दृष्टीनें ) तुम्हीं एक मेकांचे सजातीय आहां;" तर त्या ( दास्यां ) च्या मालकांचे परवानगीनें तुम्ही त्यांच्याशीं ( बिनधडक ) विवाह करून घ्या; आणि शिष्टसंप्रदायाप्रमाणें त्यांचीं स्त्रीधनें त्यांच्या हवालीं करून टाका. ( पण ) शर्त अशी कीं त्या विवाहबंधनांत आणिल्या जाव्यात ( व ) त्या बाहेरख्याली व चोरी छपी यार राखणाऱ्या अशा नसाव्यात. मग जेव्हां त्या लग्नबंधनांत येतील तेव्हां, जर त्या निर्लज्जपणाचें एखादें काम करतील तर जी शिक्षा स्वतंत्र स्त्रियांची तिच्या निम्मी दासींची. ही ( दासीशीं विवाह करण्याची परवानगी ) तुम्हां पैकीं ज्याला पातका ( च्या घडण्या )चा अंदेशा असेल त्यालाच होय. आणि जर सहनशीलता राखाल तर तुमच्या ठायीं हें उत्तम होय. आणि परमेश्वर क्षमाकर्ता व दयाळू होय. २५ " ( सूरतु-न्निसा अ. ४ ).

कुराणांत स्त्रियांचें समाजांत स्थान दाखविणारे आणि स्त्रियांशीं वर्तन कसें असावें याविषयींचे सूचक, आणखी उतारे देतों.

"( मुसुलमानांनो ! ) उपासांच्या रात्रींत तुह्मांस आपल्या पत्न्यींपाशीं जाण्याची मुभा दिली आहे. त्या तुमचा पदर होत व तुह्मी त्यांचा पदर आहां. परमेश्वरानें पाहिलें कीं तुह्मी ( चोरून छपून त्यांच्यापाशीं गेल्यानें ) खुद्द आपलेंच ( धार्मिक ) नुकसान करीत होतां; ह्मणून त्यानें तुमचा पश्चात्ताप मान्य केला व तुमच्या अपराधाची क्षमा केली. तर आतां ( उपासांत रात्रीच्या समयीं ) तुह्मी त्यांच्याशीं अंगसंग करा ; आणि ( अंगसंगाचा परिणाम ) जी पुत्रप्राप्ति परमेश्वरानें तुह्मांसाठीं लिहून ठेविली आहे तिची आकांक्षा धरा; ( व निव्वळ कामतृप्तीच्या नादास लागूं नका ) आणि तुह्मी खा व प्या, येथपर्यंत कीं ( रात्रीच्या काळ्या धारेपासून प्रातःकाळची पांढरी धार तुह्मांस स्पष्ट दिसूं लागेल. नंतर रात्र ( पडे ) पर्यंत उपास पुरा करा; आणि ( होय, ) तुम्ही मशिदींत व्रतस्थ असाल, तर ( रात्रींहि ) त्यांच्याशीं अंगसंग करूं नका. ह्या परमेश्वराच्या ( ठराविक ) मर्यादा होत. तर तुम्ही त्यांच्याजवळहि फिरकूं नका. अशाच तऱ्हेनें परमेश्वर आपले नियम लोकांस स्पष्ट सांगतो; कीं, कदाचित् ते ( आज्ञाभंगास ) जपून वागतील. " [ अ. २. १८६ ]

" आणि ( मुसुलमानानों ! ) मूर्तिपूजक स्त्रिया विश्वास धरीपर्यंत त्यांच्याशीं तुम्ही लग्न करूं नका. आणि मूर्तिपूजक स्त्री, तुम्हांला कितीहि भली ( कां ) वाटेना, तिच्या परती मुसुलमान दासी बेहत्तर. आणि मूर्तिपूजक पुरुष विश्वास धरीपर्यंत तुम्ही त्यांचा विवाहसंबंध करूं नका. आणि मूर्तिपूजक तुम्हांला कसाहि भला ( कां ) लागेना त्याच्यापरता मुसुलमान दास बेहत्तर. हीं ( मूर्तिपूजक स्त्रीपुरुषें ) नरकाकडे पाचारण करतात; व परमेश्वर आपल्या आज्ञेनें स्वर्ग व तारणाकडे पाचारितो. आणि तो आपले नियम लोकांस स्पष्ट करून सांगतो कीं, ते कदाचित् हुशार राहतील. आणि ( हे पैगंबरा लोक ) तुला ऋतुस्रावाविषयीं विचारतात. तर ( तूं त्यांनां ) समजावून दे कीं तो मल होय; तर विटाळांत तुम्ही स्त्रियांपासून अलग रहा. आणि त्या चोख्या होईपर्यंत त्यांच्यापाशीं जाऊं नका. मग जेव्हां त्या नाहून धुवून घेतील तेव्हां जेथून परमेश्वरानें तुम्हांस सांगून दिलें आहे तेथून त्यांच्यापाशीं या. निःसंशय परमेश्वर पश्चात्ताप करणाऱ्यांस पसंत करतो व सफाई राखणाऱ्यासहि पसंत करतो. तुमच्या पत्न्या ( जणूं काय ) तुमचीं क्षेत्रें होत. तर तुम्ही आपल्या क्षेत्रांत जसें पाहिजे तसें या; आणि आपल्या पुढची ( परलोकींचीहि ) व्यवस्था ठेवा." [ अ. २. २२०—२२२ ]

" पुरुष हे स्त्रियांवर सत्ताधारक होत. ( त्यास ) कारण ( एक तर हें ) कीं ( मानवजातींत ) परमेश्वरानें कित्येकां ( पुरुषां ) नां कित्येकां ( स्त्रियां ) वर ( मानसिक व शारीरिक बलांत ) श्रेष्ठत्व दिलें आहे; आणि ( दुसरें कारण ) हें कीं पुरुषांनीं ( स्त्रियांसाठीं ) आपलें द्रव्य खर्चीं घातलें आहे. तर ज्या सदाचरणी ( स्त्रिया ) होत त्या, ( आपल्या भ्रतारांचा ) कह्या मानतात ( व ) परमेश्वरानें ( पतिकरवीं ) जसा सांभाळ ठेविला आहे तसाच त्या ( त्यांच्या ) पाठीमागें ( हरएक वस्तूचा ) सांभाळ ठेवितात. आणि तुम्हांस ज्या स्त्रियांचा शिरजोर होण्याचा अंदेशा असेल त्यांस (पहिल्यानें) समजावून सांगा, व ( मग ) त्यांचा शेजत्याग करा; आणि ( यावरहि त्या न समजल्या तर ) त्यांनां ( हलकासा ) चोप द्या. मग जर त्या तुमचा कह्या मानूं लागतील, तर तुम्हींहि त्यांच्यावर ( विनाकारण ठपका ठेवण्याचा ) मार्ग शोधीत फिरूं नये. परमेश्वर ( अति ) महिमाशाली व बडा होय. आणि जर तुम्हांस उभयतां ( पति-पत्नी ) त बिघाडाचा अंदेशा असेल, तर एक पंच त्या ( पती ) च्या कुटुंबांतून मुक्रर करा. व एक पंच त्या पत्नीच्या कुटुंबांतून जर पंचाचा ( मनापासूनचा ) इरादा ( पतिपत्नींत ) समेट ( करविण्याचा ) असेल तर परमेश्वर उभयतांत मिलाफ करून देईल " [ अ. ४. ३३-३४ ].

" आणि जे लोक आपल्या पत्न्यांवर व्यभिचाराचा दोष लावतील व आपणा स्वतःशिवाय त्यांचे कोणी साक्षी नसतील, तर असल्या ( वाद्यां ) पैकीं प्रत्येकाची शाबिती हीच होय कीं त्यानें चार वेळां परमेश्वराची शपथ घेऊन असें प्रतिपादन करावें कीं निःसंशय मी [ आपल्या दाव्यांत ] खरा आहे. आणि पांचव्यांदा असें [ म्हणावें ] कीं जर खोटें बोलत असेन, तर मजवर परमेश्वराचा धिक्कार असो. आणि [ पुरुषाच्या शपथेनंतर ] स्त्रीच्या ( शिरा ) वरून अशा प्रकारें शिक्षा टळूं शकते कीं तिनें चारदां शपथ वाहून प्रतिपादन करावें कीं हा [ गृहस्थ ] अगदींच लबाडांपैकीं आहे. आणि पांचव्यांदा असें म्हणावें कीं जर हा [ गृहस्थ आपल्या विधानांत ] खऱ्यांपैकीं असेल, तर मजवर परमेश्वराचा कोप [ कोसळो ]. [ अ. २४. ५-८ ]

" परमेश्वरानें कोणाहि माणसाच्या उरांत दोन अंतः-करणें ठेविली नाहींत. आणि त्यानें तर तुम्हां लोकांच्या बायका कीं ज्यांना तुम्ही मातेसमान गणून काडी मोडून देतां, त्यांनां तुमच्या माता बनविल्या नाहींत, व त्यानें तुमच्या दत्तक मुलांस तुमचे मुलगेहि बनविलेले नाहींत. हें तुमच्या तोंडांनीं तुमचे बोलणें आहे. दत्तकांस त्यांच्या ( खऱ्या ) बापाच्या नांवानें बोलावीत जा. हीच गोष्ट परमेश्वरासमीप विशेष न्याय्य होय. मग जर तुम्हांस त्यांचे बाप माहीत नसतील तर ते धर्मात तुमचे भाऊ व तुमचे मित्र होत." [ अ. ३३ ३–४ ]

" अहो पैगंबराच्या पत्न्यांनों ! तुम्ही कोणा ( सामान्य ) स्त्रियांसारख्या तर नाहींतच. ( मग ) जर तुम्ही परमेश्वराला भीत असाल तर ( कोणाशींहि ) बोलतांना कोमल स्वर काढीत जाऊं नका, ( कीं असें कराल ) तर ज्याच्या मनांत ( कोणत्याहि तऱ्हेचा ) रोग आहे तो ( तुमच्याशीं कोणत्या तऱ्हेची ) लालूच बाळगेल ( न कळे ); आणि ( बोलालहि तर ) वाजवी रीतीनें बोलणें बोला. आणि आपल्या घरांत जमून ( बसलेल्या ) राहा आणि पूर्वीच्या अज्ञानकालचे शृंगार दाखवीत फिरूं नका; आणि नमाज पढा व जकात द्या आणि परमेश्वर व त्याचा पैगंबर यांची आज्ञा पाळा." [ अ. ३३.३१–३२ ]

" आणि ( मुसुलमानांनों ! ) तुमच्या सोडचिठ्ठया दिलेल्या ) स्त्रियांतून ज्यांनां ( वयातीतपणामुळें ) विटाळाकडून निराशा होऊन राहिली आहे, ( व त्याविषयीं ) तुम्हांस संशय असेल तर त्यांची 'इद्दत' ( विटाळापासून नव्हे, दिनमानाप्रमाणें ) तीन महिने; आणि ( त्याचप्रमाणें ) ज्या स्त्रियांस विटाळ आलाच नाहीं ( त्यांची इद्दतहि तीन महिने ) आणि ( राहिल्या ) गर्भिणी स्त्रिया, तर त्यांची मुदत, त्यांच्या मूल प्रसवण्यापर्यंत होय." [ अ. ६५.३ ].

महंमदाला आपल्या अनुयायांच्या मध्यें एकनिष्ठ भक्ति उत्पन्न करावयाची होती या साठीं प्रयत्न कुराणांत जागोजाग दिसतो

" पैगंबर व त्याचे अनुयायी यांचा एकमेकांशीं संबंध काय होता याविषयीं कुराणवाक्य येणेंप्रमाणें: " पैगंबर मुसुलमानांवर खुद्द त्यांच्या जीवापेक्षांहि जास्त हक्क राखतो. व पैगंबराच्या पत्न्या त्यांच्या आई होत. आणि नातलग हे ईश्वरी पुस्तकानुरूप मुसुलमान व मुहाजिरीन यांच्या पेक्षांहि जास्त एकमेकांचे हक्कदार होत. " ( अ० ३३. ५ ). "

कुराणाच्या महत्त्वाविषयीं उल्लेखहि वारंवार येतात.

" ( ह्या ) सुव्यक्त व सुबोध पुस्तका ( कुराणा ) ची शपथ आहे कीं, आम्हीं एका शुभ रात्रीं हें ( प्रथमतः ) प्रकटलें. ( कारण ) आम्हांला ( लोकांनां आपल्या शिक्षेचें ) भय दाखवावयाचें होतें. ( जगाच्या ) साऱ्या व्यवस्था, ज्यांस युक्ति ( व प्रयोजन हीं ) आधारभूत होत त्या, त्याच रात्रीं निर्णय पावतात. " [ अ. ४४: १–३ ]

" आणि ( हे पैगंबरा ! ) जरी आम्हीं कागदावर ( आयतें लिहिलेलें ) पुस्तकहि तुला सादर करतों, व हे लोक त्याला आपल्या हातांनीं स्पर्शहि करून पाहते, तरीहि जे लोक नास्तिक होत ते हेंच म्हणाले असते कीं ही तर केवळ बोलून चालून जादूच होय. " [ अ. ६. ६ ]

यहुदी व ख्रिस्ती हे दोघेहि परमेश्वराचे मूर्तीपूजक नसलेले उपासक आहेत अशी महंमदाची भावना होती तथापि त्यांविषयीं त्याची वृत्ति कांहीं अंशीं त्यांच्या स्वतः विषयीच्या मताहून भिन्न होती हें पुढील वाक्यांवरून लक्षांत येईल.

" आणि यहुदी व ख्रिस्ती असें प्रतिपादन करितात कीं आम्ही परमेश्वराचीं लेंकरें व त्याचे आवडते आहोंत. ( हे पैगंबरा! तूं त्यांनां ) सांग ( कीं जर तुम्ही परमेश्वराचीं लेंकरें व आवडते आहां ) तर मग तो तुमच्या पापांबद्दल तुम्हांस ( वेळोवेळीं ) शिक्षाच कां देत असतो ! ( अतएव तुम्ही परमेश्वराचीं लेंकरें नव्हत व आवडतेहि नव्हत ) किंबहुना परमेश्वरानें जीं ( आणखी मनुष्यें ) निर्माण केलीं आहेत त्यांतलींच मनुष्यें तुम्हीहि आहां. परमेश्वर ज्याला इच्छील त्याला क्षमा करील व ज्याला इच्छील त्याला शिक्षा देईल. " [ अ. ५: १७ ]

बेनी इस्राएलांस उद्देशून वाक्यें कुराणांतील प्रत्येक भागांत दिसून येतात त्यावरून अरब लोकांत देखील यहुदी लोकांचे त्या वेळचें सामाजिक महत्त्व दिसून येतें.

यहुदी लोकांतील प्रवक्ते येशूख्रिस्त आणि महंमद या तिघांची कामगिरी कांहीं अंशीं सारख्या प्रकारची होती. व्यवहारोपयोगी नीतिशास्त्र आणि नीतिनियम यांच्याकडून प्रसृत झाले. आणि स्थानिक दैवतांची उपासना मूर्तिपूजा यांशीं या तिघांनीं विरोध केला. जुन्या करारांतील प्रवक्त्यांचीं नीतिप्रवर्तक व आवेशयुक्त भाषणें, तशींच येशूख्रिस्ताचीं सुंदर प्रवचनें, आणि येशूच्या शिष्यांचीं प्रवचनें व पत्रें हीं प्राचीन जगांतील सुंदर वाङ्मयांत मोडतील. त्या वाङ्मयासारखें वाङ्मय उपनिषदांतील महाभारतांतील व भगवद्गीतेंतील कांहीं भाग वगळला तर प्राचीन जगांत कोठें सांपडावयाचें नाहीं. निदान चिनी तत्त्ववेत्ते, उपनिषदांतील ब्रह्मवेत्ते, आणि वेदव्यास यांच्या वाक्यांशीं स्पर्धा करण्याजोगें वाङ्मय प्राचीन सेमेटिक लोकांत उत्पन्न झालें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. महमदानें केवळ संप्रदायच स्थापन केला असें नाहीं तर राज्य स्थापन केलें, आणि तरवारीच्या सत्तेस नीत्यात्मक उपदेशाचा जोर दिला. तेणेंकरून मोठ्या साम्राज्यांत एक उपासनासंप्रदाय व एक नीतिपद्धति यांचा प्रसार झाला. ख्रिस्ती संप्रदाय पुढें रोमन साम्राज्यांत वाढला आणि त्या साम्राज्याचा आधारस्तंभ झाला आणि त्यानें यूरोपच्या इतिहासावर हजार पुंधराशें वर्षें महत्त्वाचा परिणाम घडविला. सेमेटिक लोकांनीं लोकांस एकत्र जोडणाऱ्या उपासनापद्धति व धार्मिक विचार यांच्या एकीकर-

णानें साम्राज्य तयार करून किंवा साम्राज्यास नेट देऊन जगावर कार्य केलें आणि राज्यास कांहीं ध्येयें असावीं आणि त्या ध्येयार्थ राज्य आहे ही भावना जगांत प्रसृत केली, ही सेमेटिक लोकांची मोठी कामगिरी होय.

खलीफात आणि रोमन साम्राज्य यांची तुलना केली असतां दोघांत सादृश्यें अनेक आढळून येतील रोमन सम्राट आपणांस ( इंपेरेटॉर = एम्परर = आज्ञारक ) आज्ञापक ह्मणवीत त्याप्रमाणें, खलीफ हेहि आपणांस आज्ञापक ह्मणवीत. खलीफातीचा महंमदाच्या वंशाशीं जातीशीं किंवा अरबस्थानाशींहि संबंध राहिला नाहीं तरी केवळ अधिकारपरंपरेच्या सातत्यानें मुसुलमान जगाशीं संबंध राहिला त्याप्रमाणेंच रोमन पातशाहीचा रोमशीं, किंवा रोमन जातीशा संबंध न रहातां केवळ अधिकार सातत्यामुळेंच रोमन पादशाही अशी कल्पना चालू राहिली. रोमन पातशाहींमध्यें सर्व पाश्चात्य जग प्रथम रोमन नागरिकत्वाच्या विस्तारानें एकत्रित झालें आणि पुढें रोमन नागरिकत्व आणि ख्रिस्त्य यांचें एकत्व होऊन ख्रिस्तीसंप्रदायाच्या विस्तारानें साम्राज्यांतील विविध लोक एकत्रित झाले. तर जिंकलेल्या प्रदेशांतील लोक इस्लामाचा अंगीकार करून खलीफातीचें नागरिकत्व मिळवूं लागून सदृश व एका साम्राज्याचे अभिमानी बनले. पारमार्थिक विचारपद्धति आणि ऐहिक राजशक्ति यांचें एकत्व खलीफातींत जन्मतः होतें तर रोमन साम्राज्यांत तें मागाहून तयार करावें लागलें. रोमन पातशाहीनें ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार आपल्या साम्राज्याच्या बलवृद्धीसाठीं केला; तर खलीफातीनें इस्लामाचा विस्तार आपल्या साम्राज्यासाठीं केला. सहाव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंत दोन्हीं साम्राज्यें सदृश क्रिया करीत होतीं. आणि सोळाव्या आणि सतराव्या शतकांत जेव्हां राष्ट्रीय भावना जागृत होऊं लागली तेव्हां या दोन्ही साम्राज्यांविषयींच्या भावनांशीं राष्ट्रीयभावनेस यूरोपांत आणि एशियांत लढावें लागलें. संस्थांच्या संरक्षणासाठीं अभिमान लागतो तो घराण्याविषयीं उत्पन्न होवो. अगर साम्राज्याविषयीं उत्पन्न होवो अगर संप्रदायाविषयीं उत्पन्न होवो. रोमनसाम्राज्यानें संरक्षणार्थ ख्रिस्ती संप्रदायाचा अभिमान धरला आणि त्या संप्रदायाला आपला अभिमान धरावयास लावला ही गोष्ट उपासनासंप्रदाय व साम्राज्य यांचें एकत्व मूळपासून धारण करणाऱ्या इस्लामाचा रोमन साम्राज्यावर नैतिक विजय दाखविते. गोब्राह्मणप्रतिपालनाचें तत्व शिवाजी आणि गुरुगोविंदसिंग यांनीं अंगीकारलें आणि राष्ट्रीयतेचा विशिष्ट तत्वाशीं संबंध जोडला या क्रियेंत देखील इस्लामाचाच भारतीय संस्कृतीवर नैतिक विजय दृष्टीस पडतो. पारमार्थिक विचारांचा राजसत्तेवर इतका पगडा बसला कीं राष्ट्रीय भावना जरी जागृत झाली तरी प्रत्यक्ष संग्रामांत युद्धार्थ बद्धपरिकर होतानां कांहीं तरी तात्विक पारमार्थिक तत्त्व पुढें मांडावें लागलें. स्काटलंडांत मतशुद्धीचा पुरस्कार करावा लागला. इग्लंडला आपला मतभेद मांडावा लागला. जर्मनींतील अनेक संस्थानांत पारमार्थिक मतभेदाचा आश्रय करावा लागला. एवढेंच केवळ नव्हे तर पाश्चात्य रोमनसाम्राज्य आणि पौर्व रोमन साम्राज्य यांतील भेद जास्त पद्धतशीर करण्यासाठीं ख्रिस्ती संप्रदायास दोन पीठें तयार करावीं लागलीं. पौर्व यूरोप आणि पाश्चिम यूरोप यांतील आजचा आचारभेद हा पौर्व आणि पाश्चिम रोमन साम्राज्यांचा अवशेष आहे. पण तो दिसतांना ख्रिस्ती संप्रदायामुळें रक्षिला गेला आहे असें दिसतें. जगाच्या ऐतिहासिक वृत्ताच्या प्रवाहाकडे वळावयाचें म्हणजे रोमन साम्राज्याच्या उत्तरकालीन इतिहासाकडे वळून यूरोपच्या इतिहासाकडे वळावयाचें. आणि त्यांत उपासना संप्रदाय व साम्राज्य यांच्या मूलभूत द्वैतामुळें इतिहास स्वरूप कसें झालें हें वर्णन करावयाचें. इस्लामाला या द्वैताचा त्रास झाला नाहीं. तथापि संप्रदायप्रसार आणि साम्राज्यप्रसार या क्रिया कांहीं अंशीं एकत्र आणि कांहीं अंशीं पृथक्त्वानें चालू होत्या त्यांकडे वळावयाचें. खलीफात आणि रोमन साम्राज्य यांच्याकडे वळण्यापूर्वी जगांतील निरनिराळ्या भागांची एकमेकांशीं कशी ओळख झाली इकडे थोडेसें वळलें पाहिजे.

---

## प्रकरण १४ वें.

### राजकीय घडामोडी व भौगोलिक ज्ञानविकास.

**स्वाऱ्या व भौगोलिक शोध यांचा अन्योन्याश्रय.**— आतांपर्यंत झालेल्या विवेचनावरून, पश्चिमेच्या दिगंतापर्यंत रोमनसाम्राज्य वाढलें असून ग्रीक मध्यआशियांत व गंगातटाकापर्यंत येऊन पोंचले होते, आणि बुद्धसंप्रदायप्रविष्ट व मगधसंमुखभारतवर्षीयांनीं आपले हात पश्चिमेकडे ट्रान्सकॉकेशियापर्यंत तर पूर्वेकडे जपानपर्यंत पसरविले होते असें दिसून आलें आहे. म्हणजे, जगाचें ग्रेटब्रिटनपासून जपानपर्यंत बरेंच दळणवळण चालू असावें, व जगांतील राष्ट्रांनां एकमेकांस अत्यंत दूरचे नसले तरी आपल्या बरेच दूरचे प्रदेश माहीत असावेत. या जगद्विभागांच्या एकमेकांशीं व्यवहारास कारक झालेल्या भावना म्हणजे विजयोन्मुख समाजांची किंवा राष्ट्रांची महत्त्वाकांक्षा आणि संप्रदायप्रसारभावना या होत. भौगोलिक शोधांस महत्त्व आलें तें या दोन कारणांमुळेंच होय. अलेक्झांडर हा ज्याप्रमाणें जिंकण्यास उत्सुक होता त्याप्रमाणेंच जिंकण्याच्या प्रयत्नाचें अंग म्हणून भौगोलिक शोध करण्यासहि तत्पर होता. भौगोलिक शोध व जिंकण्याकरितां स्वाऱ्या यांचा अन्योन्याश्रय नेहेमीं दिसून येतो. रोमन कायद्यांत जो शास्त्रार्थ सांगितला आहे, तो शोध व सत्ता यांचें एकत्व प्रस्थापित करतो. एखाद्यानें जर नवीनच बेट शोधून काढलें तर तें त्याच्या मालकीचें होई. हा रोमन कायद्याचा नियम लोकांस शोध करण्यास

व आपली संपत्ति वाढविण्यास कारण झाला. या अन्योन्याश्रयामुळें राजकीय इतिहासाबरोबर शोधांचा म्हणजे भौगोलिक इतिहासहि या विभागांत देणें योग्य होईल.

भौगोलिक शोधांस कारण प्रदेशजिगीषा हें होय असें विधान अरब व यूरोपीय राष्ट्रें यांविषयीं बऱ्याच अंशीं करतां येईल. तथापि व्यापारविषयक बुद्धि नवीन शोधांस कारण झाली नव्हती, किंवा केवळ शास्त्रीय जिज्ञासा कार्य करीत नव्हती असें म्हणतां येणार नाहीं.

भौगोलिक शोधांचा इतिहास द्यावयाचा, म्हणजे प्रथमतः कोणीहि कांहींहि कारणामुळें भूभागाचें प्रामाणिक म्हणजे प्रत्यक्षावलोकनानें वर्णन करण्याचा जेथें कोठें प्रयत्न केला असेल तीं स्थळें आज उपलब्ध असलेल्या प्राचीन अवशेषांत हुडकावयाचीं. असलीं स्थळें आपल्या प्राचीन वाङ्मयांत नाहींतत्र असें म्हटलें तरी चालेल. तथापि प्राचीनकाळच्या दुसऱ्या कांहीं राष्ट्रांकडून भूगोलवर्णनाचा थोडाबहुत प्रयत्न केला गेला होता.

**भूगोलवर्णनाच्या कामीं भारतीयांचें शैथिल्य.**—भारतीयांच्या भूगोलवर्णनाच्या प्रयत्नांविषयीं थोडेंबहुत लिहिणें म्हणजे त्यांच्या केवळ कल्पनांचाच इतिहास देणें होय. कनिंगहॅमनें असें दाखविलें आहे कीं, प्राचीन भारतीयांनां देशाच्या सामान्य आकाराची कल्पना होती. तसेंच 'निरक्षदेशात् क्षितिषोडशांशे भवेदवंती गणितेन यस्मात्।' यासारखे उतारे विशिष्ट स्थानाचे अक्षांश मोजण्यापर्यंत ज्योतिषाचें अंग म्हणून भारतीयांचें भूगोलज्ञान वाढलें होतें असें दाखवितात. तथापि देशवर्णनें, दोन स्थलांमधील अंतरें, जगांतील निरनिराळे देश वगैरेसंबंधीं माहिती करून देणारें वाङ्मय भारतांतील लेखक वर्गानें फारसें निर्माण केलें नाहीं. निरनिराळ्या देशांचीं नांवें महाभारतांत येतात व रामायणांतहि आलेलीं आहेत; परंतु त्यांवरून तत्कालीन भूगोलाची स्थिति समजण्यास बरीच अडचण पडते; ती इतकी कीं, रामायणोक्त जनस्थान कोणतें—नाशिक कीं भद्राचलकडील प्रदेश—यासारख्या गोष्टीविषयीं देखील आज संशयच आहे. कांहीं देशांचा उल्लेख बृहत्संहितेनें केला आहे, पण त्यांतहि माहितीची निश्चितता विशेष नाहीं. प्राचीन भारताचा भूगोल जमविण्यास यवन लेखकांचे, व 'दिव्य साम्राज्यां' तील नागरिक प्रवाशांचे ग्रंथ पहावे लागतात. तथापि त्यांनीं लिहिलेले किंवा वर्णिलेले प्रदेश कोठें आहेत हें अजून पूर्णपणें निश्चित होत नाहीं. आपणांस येथें भूवर्णनशास्त्राची वाढ पहावयाची असल्यामुळें सामान्यतः असें म्हणतां येईल कीं, या विषयावर भारतीय प्रयत्न फारच थोडा झाला आहे, आणि म्हणून भूगोल ज्ञानाचा विकास द्यावयास भारतीय वाङ्मयाचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं. जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांकडून परस्परावगमन कसें झालें हें शोधण्यास ग्रीकांचे, अरबांचे, चिन्यांचे आणि यूरोपीयांचे परिश्रम आपणांस पाहिले पाहिजेत. नौकायनासारख्या गोष्टी भारतीयांस अपरिचित होत्या असें नाहीं, किंवा भारतीयांनीं मोठमोठ्या सफरी केल्या, क्षत्रियवर्गानें देशहि जिंकले, त्यांच्या वसाहतीबरोबर ब्राह्मणहि गेले व त्यांनीं आपलें धर्मशास्त्र, ज्योतिष यांच्या ज्ञानाचा फायदाहि घेतला, पण प्रवासवर्णनें लिहून ठेवण्याची मात्र कोणीं फारशी फिकीर केली नाहीं. असो.

भारतीयांच्या जगद्व्यापक प्रयत्नांत जरी भौगोलिक ज्ञान यांच्याकडून प्रत्यक्ष वृद्धिंगत झालें नाहीं, तरी त्यांच्या प्रदेशांत बाहेरचे लोक येत गेल्यामुळें या बाह्यांकडून भारतवर्णनाचें आणि भारतपरिकरवर्णनाचें कार्य झालें. उदाहरणार्थ जे अनेक चिनी प्रवासी आपल्या देशांत आले. त्यांचे ग्रंथ प्राचीन भूगोलज्ञानास अत्यंत महत्त्वाचे आहेत.

ज्यांनीं लिहून ठेविलेली भारतविषयक प्रवासाची माहिती थोडीबहुत आज उपलब्ध आहे अशा प्रवाशांमध्यें चिनी प्रवासी हे सर्वांत प्राचीन असल्यामुळें त्यांच्याविषयीं थोडी हकीगत येथें सांगितली पाहिजे.

**उत्तरेच्या मार्गानें हिंदुस्थानांत आलेले चिनी यात्रेकरू.**—चीन देशांत प्रसार पावलेल्या बौद्ध संप्रदायाच्या संस्थापकाचें जन्मस्थान हिंदुस्थानांत असल्यामुळें खिस्ती शकाच्या आरंभाच्या सुमारास व त्यानंतर अनेक चिनी प्रवासी यात्रेच्या उद्देशानें हिंदुस्थानांत येऊन गेले. त्यांपैकीं उत्तरेच्या मार्गानें हिंदुस्थानांत आलेल्या कांहीं प्रवाश्यांची माहिती इत्सिंग यानें दिलेल्या हकीगतीवरून इंडियन ॲंटिक्वेरीच्या दहाव्या पुस्तकांत दिली आहे; तिचा गोषवारा येणेंप्रमाणें:—

१इ सिंग.—ज्याच्या ग्रंथावरून प्रवाश्यांविषयीं माहिती मिळते तो इत्सिंग इ.स.६७१ च्या शेवटीं चीन सोडून निघाला. आणि कँटनहून जहाजानें जावा, मलाका वगैरे दक्षिणेकडील बेटांच्या आसपास दोन वर्षें राहून ६७३मध्यें ताम्रलिप्ती येथें आला. तेथें पांच महिने राहून नालन्द, बुद्धगया वगैरे क्षेत्रस्थानांकडे गेला. नंतर तो फोशीयला परत आला. तेथें आपल्या मित्रास त्यानें आपली सर्व हकीगत लिहून दिली. व ६९३ मध्यें चीन देशास परतला.

२ त उ हि—. हा लिहशिंग प्रांतांतील कायदेपंडित होता त्याचें संस्कृत नांव श्रीदेव होतें. तो उच्च कुळांतील होता. हिंदुस्थानांतील निरनिराळीं क्षेत्रें हिंडत तो महाबोधि येथें आला. तेथें बरींच वर्षें राहून नंतर तो नालंदला व तसाच पुढें कुशी (नगरा) ला गेला. अमरावताच्या मुंग राजानें त्याचा बराच सन्मान केला. नालंदास रहात असतांना त्यानें महायानाचा कसून अभ्यास केला. त्यानें चुपोपुन्ना (दहनक्षेत्र किंवा निर्वाणमंदिर) येथें विनय पिटकाचा आणि शब्दविद्येचा अभ्यास केला होता. तहशिओ (महाबोधि) देवळांमध्यें असतांना चिनी भाषेमध्यें त्यानें एक स्मृतिलेख कोरला. चिनी सूत्रें आणि शास्त्रें यांचे त्यानें नालंद येथें नवे जुने मिळून ४०० ग्रंथ ठेविले होते. इत्सिंगनें त्याचें

वसतिस्थानें पाहिलें, पण तो त्याला भेटला नाहीं. तो पन्नास वर्षांचा होऊन अमरावत देशांत वारला.

३ स्से.—षिन त्साइचाऊचा कायदेपंडित स्सेपिन हुआ-नचिन बरोबर उत्तर हिंदुस्थानांतून व पश्चिम हिंदुस्थानांतून प्रवास करून शेवटीं अमरकुव्याला आला. तेथें तो राजमंदि-रामध्यें राजाच्या अगदीं मर्जीतला होऊन राहिला. येथें त्याला त्याच्या गांवचाच ताउहि भेटला. सबंध उन्हाळाभर येथें राहिल्यावर तो आजारी पडून ३५ वर्षांच्या वयांत वारला.

४ आर्य वर्मा.—एक कोरियन आर्यवर्मा चंगान सोडून नालंद येथें ६३८ मध्यें आला. तेथें त्यानें बऱ्याच सूत्रांची नकल करून घेतली. तो विनय व अभिधर्म या दोनांहि पिटकांत चांगलाच प्रवीण होता. तो पूर्वेकडे कुक्कुट पाद पर्वतास जाऊन आला होता, आणि पश्चिमेकडील मकर-न्हदांतहि त्यानें स्नान केलें होतें. तो नालंद येथें ७० वर्षांचा होऊन वारला.

५ हुइ नि ए.—इ. स. ६३८ मध्यें एक कोरियन कायदे पंडित हुइनिए हा पश्चिमेकडील बोधि देवळांत येऊन राहिला होता. पुढें तो पवित्र वस्तूंचीं दर्शनें घेऊन नालं-दला गेला आणि तेथें धार्मिक ग्रंथांचा अभ्यास करीत राहिला. इत्सिंग हा कांहीं पुस्तकें चाळीत असतांना एक पुस्तक हुइनिएनें लिहिल्याबद्दल त्याला उल्लेख आढळला. तेथें चौकशी करतां तो ६० वर्षांचा होऊन त्याच वर्षीं वारल्याचें त्याला समजलें. त्यानें लिहिलेलीं संस्कृत पुस्तकें नालंदास जपून ठेविलीं होतीं.

६ यु आ न ता इ.–हाहि कोरियन कायदेपंडितच होता. याचें संस्कृत नांव सर्वज्ञानदेव होतें. यंगहिबाइ वर्षी म्हणजे इ. स. ६५० मध्यें तो तिबेटांतील रस्त्यानें नेपाळमधून हिंदुस्थानांत आला. तेथें त्यानें बोधिवृक्षाजवळच्या वस्तूंचें दर्शन घेतलें. नंतर तरखार देशास गेल्यावर त्याला ताउहि भेटला, आणि त्याबरोबर तो तहसिओ ( महाबोधि ) देवळास परत आला. पुढें त्यानें चीनदेशाकडे प्रयाण केलें व त्यानंतर त्याच्या संबंधांत पुन्हां कांहीं ऐकूं आलें नाहीं.

७ यु आ न हा उ.–हा कोरिअन कायदेपंडित युआन चिन बरोबर चेंगकान कालाच्या मध्यावर हिंदुस्थानांत आला आणि तहसिओ देवळास जाऊन तेथेंच तो वारला.

८ बो धि ध र्म.—हा तुरखार देशाचा असून अंगानें चांगला सशक्त होता. तो चिनास येऊन उपदेशक बनला. तो सांप्रदायिक भिक्षूप्रमाणें नऊहि प्रांतांतून भिक्षा मागत फिरला. नंतर पवित्र वस्तूंचें दर्शन घेण्यास तो हिंदु-स्थानांत आला. येथें त्याला नालंद येथें इत्सिंग भेटला. हा उत्तर हिंदुस्थानांत वयाच्या ५० व्या वर्षी वारला.

९ तौ लि ह.—पिंगचांगचा कायदेपंडित तौलिह हा वाळूचें मैदान व तासिह खडक या मार्गानें नेपाळास जाऊन तहसिओ देवळांस आला, आणि तेथें बरींच वर्षे राहिला. यानंतर तो नेपाळास पुन्हा परत गेला. ( इत्सिंग ही हकीकत लिहीत असतांना तो तेथेंच होता. )

१० तौ सिं ग.—हा पिंगचाऊचा एक कायदेपंडित होता. याचें संस्कृत नांव चंद्रदेव असें होतें. तो इ. स. ६४९ मध्यें म्हणजे चेंक्वान कालाच्या शेवटच्या वर्षी तुफान रस्त्यानें हिंदुस्थानांत आला, व बोधि देवळाजवळ येऊन यानें चैत्यांची पूजा केली. तो तरुण असल्यामुळें तो नालंदला गेला तेव्हां राजानें त्याचा बराच सन्मान केला. यानंतर १२ योजनें पूर्वेकडे गेल्यावर तो राजमंदिरास आला. तेथें फक्त हीन-यानाचाच अभ्यास होत असे. तेथें तो हीनयानाप्रमाणेंच तिपिटकाचाहि अभ्यास करीत बरींच वर्षे राहिला. पुढें नेपाळमधून चिनास परत जाऊन तेथें तो वारला.

११ शं ग ति ह.—पिंगचाऊचा शंगतिह हा एक मनन-शील उपदेशक होता. पश्चिम स्वर्गीय आनंदांचा अनुभव घेण्यास सांपडावा अशी त्याला उत्कट इच्छा होती. तेथें जन्म यावा म्हणून बुद्धाच्या नांवाचा जप करीत तो आपलें आयुष्य धार्मिक रीतीनें घालवूं लागला त्यानें संबंध प्रज्ञा-सूत्र म्हणजे १०,००० प्रकरणें लिहून काढावयाचा निश्चय केला होता. पवित्र वस्तूंचें दर्शन घेण्याच्या इच्छेनें व त्या स्वर्गांत जन्म व्हावा म्हणून जास्त पुण्याच्या संग्रहाकरितां तो नऊहि प्रांतांमधून लोकांना आपल्या संप्रदायाची दीक्षा देत आणि धर्म पुस्तकें लिहीत फिरला. नंतर किनाऱ्या-वर येऊन तो कलिंगास जाण्याकरितां जहाजांतून निघाला. तेथून पुढें जलमार्गानें मलाया देशास जाण्यास निघाला. या देशांतून तो पुन्हां हिंदुस्थानास जाण्याच्या इच्छेनें एका व्यापारी जहाजांत बसून येत असतां जहाज वादळांत सांप-डून तो बुडून मरण पावला. या प्रसंगाची अशी एक गोष्ट सांगतात कीं, खलाशी व व्यापारी जवळ एक नांव होती ती गांठण्यासाठीं धडपडूं लागले. जहाजाचा नाखवा हा भाविक बौद्ध असल्यामुळें तो ह्या उपदेशकास वांचविण्याकरितां त्याला मोठयानें हांका मारूं लागला. पण शंगतिह म्हणाला 'मी येणार नाहीं, बाकीच्या लोकांना वांचीव.' शंगतिह याचें बुद्धाच्या ठिकाणीं मन गुंतल्यामुळें, आयुष्याच्या राहिलेल्या थोड्या मुदतींतच आनंद मानून पश्चिमेकडे तोंड करून सुखानें 'अमित, अमित' असा पवित्र नामाचा उच्चार करीत जहाजाबरोबर त्यानें जलसमाधि घेतली. त्याचा एक अनुयायीहि अमित बुद्धाचें नांव उच्चारीत त्याच्या बरोबर मरण पावला.

१२ वों ग पो.—चीनच्या राजधानींत मतिसिंह म्हणून एक इसम होता त्याचें प्रचारांतील नांव वोंगपो होतें. हा स्सेपिनबरोबर मध्यप्रदेशास येऊन सिंगच्या देवळांत राहिला. संस्कृतमध्यें फारशी गति होईना म्हणून नेपाळास जात अस-तांना तो रस्त्यावरच वयाच्या सुमारें ४० व्या वर्षी वारला.

१३ यु आ ब लु इ.— हा कायदेपंडित असून एका सेनापतीचा मुलगा होता, असें ऐकिवांत आहे. तो उत्तर हिंदुस्थान सोडून काश्मीर येथें राहिला होता. राजाचे सर्व वृत्ती त्याच्या ताब्यांत होते. या देशाच्या राजास निरनिराळ्या मंदिरांत जाण्याचा फार नाद होता. मकरन्हद मंदिर व कुंगयंग मंदिर हीं यांपैकींच दोन मंदिरें आहेत. येथें ५०० अर्हतांनीं दान धर्म होत असे. मध्यन्तिकाचा शिष्य आनंद यानें राजास दीक्षा दिली ती याच ठिकाणीं. एकदां काश्मीरच्या राजानें १००० लोकांनां फांशीची शिक्षा फरमाविली असतांना यानें राजाला उपदेश करून सर्व लोक वांचविले. येथें कांहीं दिवस राहून तो दक्षिणेकडे बोधि देवळांत गेला. तेथें बोधिवृक्षाची पूजा करून मुचीन (मच्छलिंग) सरोवर पाहून गृध्रशिखरावर वगैरे गेला, आणि नंतर नेपाळास जाऊन तेथेंच वारला.

१४ चि त्त व र्मा.—हा आणखी उत्तरेकडून तुरखार देशास जाऊन नवविहारांत राहिला. या ठिकाणीं हीनयान पंथच उपदेशिला जात होता. येथें तो उपदेशक बनून चित्तवर्मा हें नांव धारण करिता झाला. उपदेश घेतल्यावर तीन पवित्र वस्तू खाण्याचें त्यानें नाकारिलें. त्यावर तेथील मठाधिकाऱ्यानें प्रश्न करतांच तो म्हणालाः ' बुद्धानें जरी पांची वस्तू खाण्याची परवानगी दिली असली तरी महायानाच्या सर्व पुस्तकांप्रमाणें त्या खाण्याची मनाई आहे; आणि माझीं बनलेली मतें सोडण्यास मी तयार नाहीं. ' त्या बरोबर मठाधिकारी म्हणाला; ' मुख्य तीन पवित्र ग्रंथांप्रमाणें मीं माझीं तत्वें ठरविलीं आहेत, व माझ्या मताविरुद्ध मी कोणाचें चालूं देणार नाहीं. जर तूं आपलाच हेका चालविणार असशील तर मी आज पासून तुझा गुरु नव्हेच. या थरास गोष्ट आल्यावर त्यास पडतें घेणें भाग पडलें. नंतर थोडेंसें संस्कृत शिकून उत्तरेच्या रस्त्यानें तो परत गेला. त्याची या पुढील कांहीं माहिती उपलब्ध नाहीं.

१५. ति बे ट च्या यु व रा जा चे धा त्री पु त्र.—नेपाळांत रहाणारे दुसरे दोघे तुफानच्या ( तिबेटच्या ) युवराजाच्या दाईचे मुलगे होते. या दोघांनींहि दीक्षा घेतली होती परंतु एक पुन्हां पूर्वाश्रमी गेला. ते स्वर्गीय राजांच्या देवळांत रहात होते. त्यांनां संस्कृत पुस्तकें चांगलीं समजत असत, आणि संस्कृत बोलतांहि चांगलें येत असे.

१६ लं ग.—हाहि एक कायदेपंडित होता, पण तो कोठून आला तें ठाऊक नाहीं. चेंगक्वान म्हणजे इ. स. ६२३–६५० या कालामध्यें तो उत्तरेकडील रस्त्यानें क्षेत्रांचें दर्शन घेण्याच्या हेतूनें उत्तरहिंदुस्थानास गेला. मध्य प्रदेशांत त्याला एक फाहवा ( पुंडरीकमल ) चें पुस्तक संस्कृतमध्यें लिहिलेलें मिळालें. नंतर तो गंधारास गेला व तेथेंच त्याचें देहावसान झालें.

१७ मिं ग यु ए न.—थिहचाऊचा हा कायदेपंडित होता. याचें संस्कृत नांव चिन्तादेव. कोचीन चीनच्या एका जहाजांत चढून तो कलिंग देशास आला. व तेथून सिंहलद्वीपास गेला. तेथील राजा एकदां पूजेंत गुंतला असतां यानें बुद्धाचा दांत उचलून तो आपल्या देशांत चोरून आणण्यासाठीं आपल्या हातांत लपवून ठेविला. परंतु तें उघडकीस येऊन त्याला हद्दपार करण्यांत आलें. पुढें तो दक्षिणहिंदुस्थानांत आला. तेथून तो महाबोधीकडे जात होता असें म्हणतात; परंतु रस्त्यांत तो एके ठिकाणीं थांबला असतां तेथें त्याच्या कोठ्याची पचनशक्ति बिघडून त्याचा अंत झाला. त्याचें त्यावेळींचें वय काय होतें तें ठाऊक नाहीं.

मिंग युएननें जो दांत चोरण्याचा प्रयत्न केला तो हि आतां फारच काळजीपूर्वक एका गोपुरांत पहाऱ्यांत ठेविलेला असतो. त्याच्या कुलुपावर पांच अंमलदारांची मोहर असते. तो जेव्हां बाहेर काढतात. तेव्हां वाद्यें वगैरे वाजवून चोहोंकडे बराच गोंगाट होतो, रोज फुलें, धूप वगैरेंनीं त्याची पूजा करतात. बाहेर काढल्यावर तो एका सुवर्णपुष्पावर ठेवतात व त्यामुळें त्याची प्रभा चोहोंकडे फांकते. हा स्मृतिशेष नाहींसा झाल्यास एक राक्षस येऊन सर्वांनां भक्षण करील असें म्हणतात. कोणी असेंहि ह्मणतात कीं, कांहीं दैविक चमत्कारानें तो चिनांत जाणार आहे.

१८ इ लीं ग.—इयेचाऊचा एक उपदेशक इलींग हा विनय पिटकामध्यें व योगतत्त्वामध्यें चांगला प्रवीण होता. चिंगन नांवाच्या आपल्याच प्रांतातील एका उपदेशकाबरोबर तो चंगनहून निघाला. त्याच्याबरोबर हुइआन नांवाचा एक प्रख्यात पुरुष होता. दक्षिण प्रान्तांतून प्रवास करीत ते निउलुइला आले. तेथून एका व्यापारी जहाजानें लंकियाला आल्यावर चिंगन मेला. इलींग हा आपल्या दुसऱ्या मित्राबरोबर सिंहलद्वीपास गेला, व तेथें दाताची पूजा वगैरे करून व बरेच ग्रंथ वगैरे घेऊन पश्चिम हिंदुस्थानांतून परत आला. इत्सिगनें आपली हकीकत लिहिण्याच्या वेळेस तो कोठें होता हें त्यास ठाऊक नव्हतें.

१९ हु इ ये न.—हिंगकंगचा एक शिष्य हुइयेन हा कायद्यांत निष्णात असून तो आपल्या गुरूबरोबर सिंगला ( सिंहल )स गेला असतां तेथेंच त्याचा अंत झाला.

२० सिं ग चि न.—हाहि एक कायदेपंडित होता. त्याचें संस्कृत नाव चरित्रवर्मा होतें. उत्तरेच्या रस्त्यानें तो पश्चिम देशांत येऊन सिंगच्या मंदिरांत राहिला. सिंगचिनचें देहावसान याच ठिकाणीं झालें. मरणसमयीं त्याचें वय ३५ वर्षांचें होतें.

२१ सं घ व र्मा.—हा समरकंदचा रहिवाशी असून तो वाळूचें मैदान ओलांडून चीन देशांत गेला व नंतर वकीलाबरोबर बोधिमंदिराहून वज्रासनाकडे आला. तेथें त्यानें सात दिवस व रात्रीं नंदादीप लावून ठेविले होते. त्यानें अशोकवृक्षाखालीं एक बुद्धाची व क्वान—त्से—त्साईची ( अवलोकितेश्वराची ) अशा दोन मूर्ती बोधीच्या सभामंडपांत कोरल्या. तेथून तो चिनांत परत

आला. त्यानंतर त्याला कवाइ चाउ ( कोचीन चीन ) येथें पाठविण्यांत आलें. तेथें दुष्काळ होता ह्मणून हा रोज गरीब लोकांत धान्य वगैरे वाटीत असे. तेथें पोरक्या पोराकडे पाहून हा द्रवून दुःखाश्रू गाळीत असे ह्मणून त्याचें नांव ' रोदनसील ' बोधिसत्व असें पडलें होतें. त्याचा तेथेंच कांहीं सांसर्गिक रोगानें वयाच्या साठाव्या वर्षी अंत झाला.

२२ व न यु न.—लोयांगचा वनयुन हा कायदेपंडित (धर्मतत्ववेत्ता) चीन देशाच्या दक्षिणभागांतून कोचीन चीनास येऊन जहाजानें कलिंग देशास जाऊन तेथेंच निर्वतला.

२३ व्हु इ लु न.—हा सिंको (कोरिया) चा मूळ रहाणारा असून कायदेपंडित होता. प्रज्ञावर्ग हें त्याचें हिंदुस्थानी नांव होतें. तो आपल्या संप्रदायाच्या क्षेत्रांस जाण्याच्या उद्देशानें जहाजांतून, फुहफीन येथें येऊन नंतर लोयांग या ठिकाणीं आला. तेथें बादशहानें त्याला पश्चिम प्रदेशांत जाऊन युआनचाऊच्या समागमीं असण्यास सांगितलें. तो जातां जातां सिंचे येथील मठांत [अमरावत-(अमराबाद ?)-देशांत] दहा वर्षें राहिला. नंतर तौहोलो लोकांनीं बांधलेल्या तौहोलोस्से मठांत राहिला. येथें खाण्यापिण्याच्या वगैरे उत्तम सोई होत्या. या ठिकाणीं व्हुइ लुन हा संस्कृत भाषेचा अभ्यास करीत होता. येथील मठाधीश फार विद्वान् म्हणून नांवाजलेला होता. या मठास तहसिओ ( =महाविद्या ) असें म्हणत. पश्चिमेला कपिशाचा दुसरा एक मठ होता. तोहि विद्वान् उपदेशकांविषयीं प्रख्यात होता. याला गुणचरित असें नांव होतें.

वरील तहसिओच्या ईशान्येस दुसरा एक चालुक्य नांवाचा मठ होता. तो दक्षिणेंतलि चालुक्य राजानें बांधला होता. पुढें इत्सिंगच्या वेळीं जिह्कवान ( सूर्यसेना ) राजानें त्याच्या पश्चिमेस एक नवा मठ बांधला. एकंदरींत हिंदुस्थान देशांत आणि त्याजवळच्या प्रांतांत उपदेशकांच्या सोईकरितां मठ बांधलेले असल्यामुळें प्रवाश्यास अडचण पडत नव्हती. परंतु चिनांत मात्र इत्सिंगच्या वेळीं तसे मठ नसल्यामुळें प्रवाश्यांस फार अडचण पडत असे. नालंद मठ याच्या पूर्वेस चाळीस टप्प्यांवर होता. गंगा नदीपार आल्यावर मृगशिखवन मठ लागत असे. त्यापासून जवळच चिनी मठ नांवाचा एक मठ होता. हा श्रीगुप्त महाराजानें चिनांतील उपदेशकांकरितां बांधला होता अशी इत्सिंगच्या वेळीं दंतकथा प्रचलित होती. याजवळील जमिनीहि चोवीस उपदेशकांचा धार्मिकपणा पाहून त्यांनां बहाल करण्यांत आल्या असून, त्या मृगवनाच्या तीन उपदेशकांकडे होत्या. ही गोष्ट इत्सिंगचा किउ-फा-को सांग-चुअन हा ग्रंथ होण्यापूर्वी ५०० वर्षांची आहे. इत्सिंगच्या वेळीं या जमीनी पूर्व हिंदुस्थानचा राजा देववर्मा याजकडे असून त्यानें प्रवाश्यांचा खर्च टाळण्याकरितां त्या शेतकऱ्यांस दऊन टाकल्या होत्या.

याशिवाय, वज्रासन महाबोधि नांवाचा सिलोनच्या राजानें बांधलेला आणखी एक मठ होता. याच्या ईशान्येस सात टप्प्यांवर श्री शक्रादित्यानें बांधलेला नालन्द मठ असून तो त्यानें राजभग या भिक्षूकरितां बांधला होता.

ना लं द दे ऊ ळ.—उपर्युक्त नालंद नामक सुप्रसिद्ध मठाचें वर्णन इत्सिंगनें आपल्या किउ-फा-को-सांग-चुअन नामक ग्रंथांत दिलें आहे तें येथें उद्धृत करतोः—"श्री शक्रादित्यानें बांधलेला नालंद मठ हा एका शहरासारखा चौकोनी आहे. त्याचे तीन तीन मजली असे चार दरवाजे आहेत. प्रत्येक मजल्याची उंची सुमारें १०फूट आहे. सर्व मठ कौलारू आहेत सभामंडपाच्या पश्चिमेच्या दरवाज्याबाहेर एक मोठा स्तूप आणि बरेच रत्नखचित चैत्य आहेत. मठावरील मुख्य अधिकारी म्हातारा आहे. दुय्यमास विहारस्वामी, विहारपाल किंवा कर्मदन म्हणतात. त्याला फार मान असतो. येथें एक पाण्यानें घड्याळ असतें. यावरून वेळ कशी समजते हें खिकवेइ चुअनमध्यें चांगलें सांगितलें आहे. रात्रीचा मध्य भाग झोंपेकरितां असतो; परंतु पहिल्या व शेवटल्या भागांत पूजापाठ वगैरे असतात. नागानन्दाच्या नांवावरून याला श्री नालन्द विहार असें म्हणतात. हें एक मोठें देऊळ आहे. याचा दरवाजा पश्चिमेकडे आहे. आंत सुमारें वीस पावलांवर एक मोठा १००फूट उंच स्तूप आहे. बुद्ध पावसाळ्याचे तीन महिने येथेंच रहात असे. त्याचें संस्कृत नांव मूलगन्ध कोठी असें आहे. नैर्ऋत्येला दहा फूट उंचीचा एक लहान चैत्य आहे. याच ठिकाणीं ब्राह्मणानें हातांत पक्षी घेऊन प्रश्न विचारले होते. सुलीफाउतो या चिनी शब्दसमुच्चयाचा अर्थ हाच आहे.

उत्तरेला ५० पावलें बालादित्यानें बांधलेला स्तूप आहे. तो वरील स्तूपापेक्षांहि मोठा आहे. त्यांत धर्मचक्र फिरवीत असलेली बुद्धाची मूर्ति आहे.

मूलगन्धाच्या पश्चिमेस बुद्धाचें दन्तधावनकाष्ठाचें झाड आहे. जवळच ज्यावरून बुद्ध चालला होता असा ओटा आहे. तो सुमारें २ हात रुंद, १४।१५ हात लांब आणि २ हात उंच आहे. बुद्धाचीं पावलें दाखविण्याकरितां त्यावर १४।१५ कमळें कोरलेलीं आहेत. तेथून राजगृह दक्षिणेस ३० ली आहे.

गृध्रशिखर व वेणूद्यान हीं दोन्ही शहरास लागून आहेत. महाबोधि तेथून सात योजनें आहे; वेशाली २५ योजनें उत्तरेस आहे; आणि ताम्रलिप्ती पूर्वेस ६०।७० योजनें आहे. पूर्व हिंदुस्थानांतून चीन येथें जाण्याकरितां येथेंच गलबतांत बसावयाचें असतें. निरनिराळ्या राजांनीं दिलेल्या जमिनींच्या उत्पन्नामधून या मठाचा खर्च चालतो.' येथें सुमारें ३५०० उपदेशक रहात आहेत.

२४ को रि या चे दो न उ प दे श क.—नंतर कोरियाचे दोन उपदेशक दक्षिण समुद्राकडे गेल्याचें इत्सिंग सांगतो. ते चंगनहून शिलीफोशाय येथें येऊन पुढें

पोल्युस्से देशास जाऊन वारले. पोल्युस्से ह्मणजे बहुतेक सुमात्राच असावें. यावरून फोशाय ( श्रीभोज ) हें त्याच्या पूर्वेस पडतें.

२५ हु इ निं ग.—हा 'विली'मधील यिङ्चाऊचा उपदेशक चिनाहून जहाजांतून दक्षिणेकडे ६६५ त येऊन. तीन वर्षे होलिंग ( कलिंग ) देशांत राहिला. हेंच नांव पेगूच्या किनाऱ्यावरील देशास तसेंच दक्षिण समुद्रांतील एका बेटासहि लावतात.

२६ वा न् कि.—कुन्लुन भाषेंत प्रवीण असून थोडें संस्कृतहि येत असलेल्या किआचाऊच्या वान्–कि यानें दक्षिण समुद्रांत १० वर्षे वास केला. नंतर तो शिलीफोशाय येथें राहिला. कुन्लुन ह्मणजे कन्डोर या बेटांतील शिद्दी लोकांनां चिनी लोक गुलामासारखे विकीत.

२७ मो च दे व.—कोचीन चीनमधील मोचदेव हा दक्षिण समुद्रांतून हिंदुस्थानांत येऊन जवळचे सर्व प्रदेश पाहून महाबोधि क्षेत्रीं आला, व तेथील पवित्र वस्तूंच्या दर्शनानें आनंदित होत्साता वयाच्या २५ व्या वर्षी निवर्तला.

२८ के इ – चुं ग.—कोचीनचा दुसरा उपदेशक केइचुंग दक्षिणेकडून सिलोनला गेला, व नंतर हुन्विउ नांवाच्या दुसऱ्या एका उपदेशकाबरोबर बोधिवृक्ष, राजगृह, वगैरे ठिकाणीं फिरून वेकू उद्यानांत येऊन तेथें आजारी पडून वारला. त्या वेळीं त्याचें वय ३० वर्षांचें होतें.

२९ त–अं ग—महायान शाखेंतील त–अंग किंवा दीप हा आपल्या आईबापांबरोबर लहानपणींच द्वारपतीस जाऊन नंतर तेथें भिक्षु बनला. पुढें चिनी वकिलाबरोबर राजधानीस जाऊन ह्युएनत्संग जेथें राहिला होता त्या त्सेयन मठांत येऊन राहिला. नंतर दक्षिणसमुद्राच्या मार्गानें सिलोनमधील बुद्धदन्ताची पूजा करून दक्षिण हिंदुस्थानांतून पूर्वेकडे जाऊन ताम्रलिप्तीस आला. नदीच्या मुखाजवळ तो मोठ्या मुष्किलीनें दरवडेखोरांच्या हातांतून कसाबसा जिवानिशीं सुटला. पुढें तो संस्कृतचा पूर्ण अभ्यास करून नालन्द,बुद्धगया, वैशाली, कुशी देश वगैरे ठिकाणीं फिरला, व शेवटीं कुशी नगराच्या पारिनिर्वाण देवळांत येऊन वारला.

३० दुसरे दोन बौद्ध भिक्षु चिनी वकिलाबरोबर दक्षिण समुद्रांत प्रवास करीत असतां जहाजावरच वारले. इत्सिंग ह्मणतो कीं त्यांचीं योगशास्त्र वगैरे पुस्तकें शिलीफोशायमध्यें आहेत.

३१ ता उ लि न.—किंगचाऊचा कियांगलिंग प्रांताचा भिक्षु ताउलिन ताम्रस्तंभाकडून लंकेला गेला, आणि कलिंगाच्या ( पेगूच्या ) किनाऱ्यानें नग्न लोकांच्या देशास आला. येथील राजानें त्याला फार चांगल्या रीतीनें वागविलें. तो तेथें बरींच वर्षे राहून ताम्रलिप्तीस गेला. व तेथें त्यानें तीन वर्षे संस्कृत शिकण्यांत घालविलीं. नंतर वज्रासनास जाऊन बोधिवृक्षाची पूजा करून नालंदास गेला. तेथें कोशाचा दोन वर्षे अभ्यास करून राजगृहाजवळील गृध्रशिखराकडून पश्चिम हिंदुस्थानांत आला. तेथें त्यानें तामिंगचाउ ग्रंथाचा अभ्यास केला. त्यांत एक लक्ष श्लोक होते असें ह्मणतात; परंतु त्याचा बराचसा भाग गहाळ झालेला होता. तरी बुद्धाच्या मरणानंतर आर्य नागार्जुनानें मूळ ग्रंथाचें महत्व कायम राखिलें. नंतर ताउलिन हा काश्मिराहून उद्यान देशास जाऊन कपिश येथें येऊन राहिला. त्या ठिकाणीं बुद्धाच्या शिराच्या कवटीची पूजा करून समुद्रातून केदाह—ला ( किएचा येथें ) आला. तेथें त्याला उत्तरेकडील तार्तर लोकांनीं त्याच्या मित्रांच्यासारखे कोणी त्यांनां भेटल्याचें सांगितल्यामुळें तो पुन्हा उत्तरहिंदुस्थानांत येऊन वयाच्या पन्नासाव्या वर्षी मरण पावला.

३२ त न क्कों ग.—दुसरा तनक्कोंग नांवाच्या देशांतील त्याच नांवाचा भिक्षु दक्षिणसमुद्राच्या मार्गानें आलिकीलो ( आराकान ) येथें आला त्याची आणि राजाची फार दोस्ती जमली. ह्मणून त्याला एक मठ बांधून देण्यांत आला, व कांहीं पुस्तकें व मूर्ती बहाल करण्यांत आल्या. हा भिक्षु शेवटीं येथेंच वारला असें म्हणतात.

३३ ह्वु इ भिं ग.—हा प्रवासी दक्षिणसमुद्राच्या मार्गानें हिंदुस्थानाकडे यावयास निघाला; परंतु प्रतिकूल वाऱ्यानें जहाज भडकल्यामुळें संगचाऊस (ताम्रस्तंभास) येऊन शांकिंग येथें थांबून त्याला चिनास परत यावें लागलें.

३४ ह्वु इ–ता.—कियांगनिंग प्रांतांतील कंगचाऊचा भिक्षु ह्वुइता हा मोठ्या कुळांतील होता. तो एका इराणी जहाजांतून दक्षिणसमुद्राकडे कोण्या तरी वकिलाबरोबर गेला असावा. नंतर तो फोशाय ( श्रीभोज ) येथें येऊन शब्दविद्येचा अभ्यास करीत सहा महिने राहिला. तेथील राजा फार चांगला होता. त्यानें पाठविलेल्या नजराण्याबरोबर ह्वुइता हा मोलयु ( मलाया ) देशास जाऊन तेथें दोन महिने राहिला. पुढें तो केदाला जाऊन राजाच्या जहाजांतून हिंवाळ्याच्या शेवटीं पूर्व हिंदुस्थानांत आला. दहा एक दिवसांनीं ते सर्व नग्न लोकांच्या देशांत आले. तेथें पूर्वें किनाऱ्यावर २१३ ली नारळ, सुपारी, खजुर वगैरेंचीं अरण्यें यांशिवाय कांहींहि नव्हतें. जहाज पाहिल्याबरोबर तेथील लोक आरडत ओरडत आपल्या लहान लहान सुमारें शंभर नावांमध्यें नारळ, केळीं, शेवाळी टोपल्या वगैरे भरून घेऊन जवळ आले. त्यांचा उद्देश बहुतेक हे जिन्नस देऊन जहाजांत कांहीं मजेदार वस्तु असल्यास त्या घ्याव्या असा होता. परंतु लोखंडाच्या तुकड्यांशिवाय त्यांनां फारसें कांहीं आवडलें नाहीं. दोन बोटें लांबीच्या लोखंडाच्या तुकड्यास ते ५।१० नारळ देत असत. येथील पुरुष नग्न होते, पण बायका मात्र पानांचा घागरा कमरेभोंवतीं गुंडाळीत होत्या. जहाजांतील लोक त्यांनां कपडे द्यावयास लागले तरी ते घेईनात. हा देश सेझेअमान प्रांताच्या दक्षिणेस आहे. येथें तांदूळ वगैरे धान्य फार कमी पिकत होतें. सर्व लोक नारळांवर व फळांमुळांवर निर्वाह करीत. तेथें लोखंड मुळींच मिळत नव्हतें आणि सोनें रुपेंहि क्वचितच सांपडत असे. यामुळें तेथें लोखंड

फारच किंमतीचें समजलें जात होतें. त्याला ते लुआ असें म्हणत. तेथील लोक अगदीं काळे नव्हते. ते उंचहि बेताचेच होते. त्यांचे बाण विषारी असत. त्यांतील एक बाण लागला तरी तो प्राण घेण्यास पुरा असे.

येथून पुढें वायव्येस पैधराएक दिवस प्रवास केल्यावर पूर्व हिंदुस्थानचा दक्षिणेकडील प्रांत ताम्रलिप्ती लागला. हें स्थान नालन्द किंवा बोधिवृक्ष येथून ६० टप्पे होतें. तेथें संस्कृत शिकत व शब्दशास्त्राचा अभ्यास करीत ते एक वर्ष राहिले. नंतर सुमारें शंभर व्यापारी मध्यप्रदेशाकडे जात होते त्यांच्या सोबतीनें ते निघाले, महाबोधिवृक्षापासून अजमासें दहा दिवसांच्या रस्त्यावर ते येऊन पोंचले. तेथें त्यांच्यांपैकीं एक भिक्षु एका खिंडींत रस्ता बुळबुळीत आणि वाईट असल्यामुळें मागें राहून चोराच्या हातीं सांपडला.. त्यांनीं त्याला नागवून अर्धमेला करून एका खड्ड्यांत टाकून दिलें. सूर्यास्ताच्या वेळेस आसपासच्या गांवकरी लोकांनीं त्याला खड्ड्यांतून बाहेर काढून कपडे वगैरे दिले. यानंतर व्हुइता हा उत्तरेस नालंदास जाऊन, आसपासच्या ठिकाणांचें दर्शन घेऊन पुन्हां ताम्रलिप्तीस येऊन केदाहला गेला; आणि सर्व पुस्तकें आणि भाषांतरें वगैरे मिळून जवळ जवळ पांच लक्ष श्लोक म्हणजे अजमासें एक हजार पुस्तकें लिहिलेलीं होतीं तीं घेऊन तो श्रीभोजास येऊन राहिला.

३५ शेनहंग.—सिन् चाऊचा भिक्षु शेनहंग हाहि श्रीभोजाला जाऊन तेथें मेला.

३६ लिग्वन.—नांवाचा भिक्षु अन्नमांतून हिंदुस्थानात आला आणि बोधिवृक्षाखालीं मैत्रेय बोधिसत्वाची एक हात उंचीची सुंदर मूर्ति त्यानें खोदिली.

३७ सेंगची.—लिग्वनाचा मित्र सेंगची हा भिक्षु दक्षिण समुद्राच्या मार्गानें हिंदुस्थानांत आला. तो समतटास आला तेव्हां तेथील राजा हर्षवर्धन हा तीनहि पवित्र वस्तूंची पूजा करून धार्मिक विधि करीत होता. त्यानें एक लक्षाच्या वर रत्नांच्या मूर्ती केल्या होत्या. एक लक्ष श्लोकांची प्रज्ञाहि त्यानें वाचली होती; आणि पूजेंत वगैरे तो फारच नियमित असे.

३८ चिसव्है.—या नांवाचा एक भिक्षु दक्षिणेकडे जाऊन कोचीन चीनच्या जवळ शंगकिंग येथें राहिला. नंतर तो दक्षिणेकडे श्रीभोजास गेला, आणि मग हिंदुस्थानास आला.

३९ वूहिंग.—वरील भिक्षूच्या बरोबरच हैतानहून निघालेला वूहिंग हा एक महिन्यानें श्रीभोजास आला. पुढें तो मलायाला गेला व नंतर १५ दिवसांनीं केदाहला गेला. तेथें त्यानें हिंवाळा संपेपर्यंत मुक्काम केला, व नंतर पश्चिमदिशेनें ३० दिवस प्रवास करून नागवनन (नागपट्टण ?) ला पोंचला. पुढें दोन दिवस प्रवास केल्यावर तो सिंहपुऱ्याला (सिंहद्वीपास) आला. तेथें त्यानें पवित्र दांताची पूजा केली, आणि मग एक महिना ईशान्येस प्रवास करून ओलिकिलो (आराकान) देशास आला. ही हिंदुस्थानची पूर्वमर्यादा समजली जात होती.

ओलिकिलो हा तेव्हां चंपा ( सयाम ) चा एक भाग होता. येथें एक वर्ष राहून तो आपला मित्र चिसव्है याच्या बरोबर नालन्दापासून सुमारें १०० टप्यांवर पूर्वेस गेला. यानंतर त्यानें मुंग देशांतील महाबोधि देवळाकडे प्रयाण केलें. मग नालंदाला येऊन योग, कोश वगैरेंचा अभ्यास करून विनय पिटकाच्या कांहीं प्रती मिळाल्या म्हणून खरदा ( किइ लोके ) मठाकडे गेला. याच्या पुढें दोन टप्यांवर त्याला एक साधुवृत्तीनें राहणारा शिल्पशास्त्रज्ञ भेटला. हा बोधिसत्व चमानें सांगितलेल्या मार्गानें पृथ्वीच्या गर्भांत जाण्याचा प्रयत्न करीत होता असें तो लिहितो. यानंतर वूहिंग हा लवकरच नालंदास जाऊन वारला.

४० काचिन.—हाहि दक्षिणेकडील मार्गानें शकिंग(सैगॉन) कुलांग, कलिंग, आणि केदाह वगैरे ठिकाणीं जाऊन मेला.

४१ ततूसिंग.—लइचाऊचा तत्सिंग (हुनानचा इत्सिंग?) हा ५८२ मध्यें दक्षिण समुद्रांत परत आला. आणि आपलीं पुस्तकें आणि मूर्ती चीनला पाठवून श्रीभोज येथें राहिला. तेथें तो किउलुन भाषेचा दुभाष्या म्हणून कांहीं दिवस होता. तो इ. स. ६९३ मध्यें चंगनला परत आला.

**इत्सिंगच्या ग्रंथांतील भूगोलज्ञान.**—इत्सिंगच्या दुसऱ्या नन् हे खि कइ निइफा चुएन ग्रंथांत पहिल्यांतील भूगोलाच्या कांहीं नांवासंबंधानें जास्त माहिती मिळते ती अशीः—नालन्दहून ५०० टप्पे म्हणजे ५०० योजनें पूर्वेस गेल्यावर सर्व देशास पूर्वदेश म्हणतात. याच्या टोंकास टयूफॉनच्या ( म्ह० तुफान उर्फ तिबेट याच्या, ) दक्षिणेस असलेल्या काळ्या पर्वतांच्या रांगा आहेत. दक्षिणेस समुद्राची मर्यादा आहे, आणि श्री क्षेत्र देश आहे. आग्नेयीस लंगकार आहे. पूर्वेला द्वारपति आहे. पूर्वेस अगदीं टोंकास लिनी [ चंपा ] देश आहे. येथील लोक फार धार्मिक असून तिन्ही पवित्र वस्तूंस (त्रिरत्नांस) फार मानतात.

दक्षिण समुद्रांतील देशांसंबंधानें इत्सिंग असें म्हणतोः—पश्चिमेकडून सुरवात केल्यास पहिल्यानें पोलुस्से [ सुमात्रा ] देश लागतो. नंतर मलय आहे. यालाच शिलीफोयो देश म्हणतात. पुढें महासिन देश [ सिंहपुरा ? ] त्यानंतर कलिंग देश, त्यानंतर तानतान देश, त्यानंतर पानपान देश, नंतर पोली, त्यानंतर किउलुन, त्यानंतर फोशा इपलो [ श्रीभोज व बली ? ] त्यानंतर अशेन आणि मोकि आमन व दुसरीं बेटें येणेंप्रमाणें देश लागतात.

इत्सिंग म्हणतो कीं, हे सगळे देश बुद्धाच्या संप्रदायनियमांस फार मान देतात. ते बहुतेक हीन यानाप्रमाणें चालतात; परंतु मलयामध्यें महायानाप्रमाणें चालणारेहि थोडे लोक आहेत. यांपैकीं कांहीं बेटांचा व्यास १०० ली, कांहींचा कांहीं शेंकडे ली आणि कांहींचा १०० योजनें आहे.

चंपा [कोचीनचीन] चें दक्षिण टोंक शकिंग [ सायगॉन ? ] हें आहे. या देशाचे लोक सम्मतिया [ ? ] आणि सर्वास्तिवादी शाखांचे आहेत. याच्या नैऋत्येस एक महिन्याच्या [ मार्गावर ] फुनान [ कांबोज ] आहे. येथील लोक प्रथम रानटी व नग्न रहाणारे होते. ते देवतांच्या साठीं बलिदान वगैरे करीत असत. पण पुढें ते बौद्ध झाले. परंतु एका दुष्ट राजानें तेथील भिक्षूंना हांकून दिलें असल्यामुळें आतां तेथें नास्तिकांशिवाय कोणीच नाहीं. हा जंबुद्वीपाचा अगदीं दक्षिणेकडील भाग होय.

ज्या दहा बेटांविषयीं इत्सिंग नेहमीं उल्लेख करतो तीं वर सांगितलेलींच बहुतेक असावींत. तो महाबोधी आणि लिनी ( कोचीन चीन ) यांमध्यें सुमारें वीस देश आहेत आणि दक्षिण समुद्रामध्यें सिलोनशिवाय दहा देश आहेत असें म्हणतो. पश्चिमेकडे महासागरापलीकडे पॉलिस्से [ इराण ] आणि तशि [ अरबस्थान ] हे देश असल्याचा त्यानें उल्लेख केला आहे. शिली फोशाय [ श्रीभोज ] याची जागा तिसऱ्या आणि चोविसाव्या पुस्तकांत ठरविलेली दिसते. इत्सिंग म्हणतो कीं त्या ठिकाणीं आठव्या महिन्यांत आणि वसंत ऋतूच्या मध्यावरहि सावली नसते. हे जर चिनी महिने असतील तर श्रीभोज विषुववृत्ताच्या जवळ जवळ सुमात्राच्या पूर्व किनाऱ्यावर बंकाच्या समोर येतें. पण चीनमधील महिने अनिश्चित असल्यामुळें श्रीभोज मलाया द्वीपकल्पांत किंवा जावामधील सुरबयाइतकें दक्षिणेस होतें असें ठरविण्यास कांहीं हरकत नाहीं.

एकंदरींत इत्सिंगच्या ग्रंथांमधील टीपांचा व उल्लेखांचा विचार करून आपल्याला तांग घराण्याच्या आरंभीच्या दिवसांत हिंदुस्थान आणि चीन यांमधील मार्ग—जावा, सुमात्रा, मलाक्काची सामुद्रधुनी, ब्रह्मदेश, आराकान आणि तेथून ताम्रलिप्ती असा होता. किंवा यापेक्षा जास्त धोक्याचा मार्ग म्हणजे केदाह पासून सिलोनचा. केडोर बेटें हें व्यापाराचें केंद्र होतें असें दिसतें, आणि येथील मूळ रहिवाश्यांचीच भाषा दक्षिण समुद्राकडे वापरली जात असे. निदान इत्सिंग तरी श्रीभोजास या भाषेचा दुभाषी असलेला आढळतो.

या यात्रेकरूंपैकीं प्रत्येकाच्या वर्णनावरून आपणांस एखाद-दुसरी गोष्ट तरी निश्चित करूं शकते. उदाहरणार्थ, सियुकीच्या हकीकतींत आपणांला सुमात्राच्या आग्नेयीस श्रीक्षेत्र नांवाचा देश, त्याच्या आग्नेयीस कामलांक व त्याच्या पूर्वेस द्वारपति असल्याचें दिलें आहे. कॅप्टन सेंट जॉननें या देशाची जागा म्हणजे ब्रह्मदेशांतील टंगू आणि सँडोवे उत्तर अक्षांश १८ कला२०, पूर्व रेखांश ९४ कला२० याच्या आसपास असावी असें ठरविलें आहे. ब्रह्मदेश व सयाम यांमधील हें द्वारच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्युएनत्संग म्हणतो कीं, लिनीच्या नैऋत्येस यवनांचा (किंवा येनमोनाचा) देश आहे. याबद्दल इत्सिंग कांहीं लिहीत नाहीं. पण कदाचित् तो कांबोज देश असावा.

आतां हिंदुस्थानच्या पश्चिमेकडच्या राष्ट्रांच्या भूगोलज्ञानविषयक प्रयत्नांकडे वळूं.

**भौगोलिक शोधांची वाढ.**—प्राचीन काळीं आगगाड्या, आगबोटी, वगैरे साधनांनीं सर्व जगाचें हल्लींप्रमाणें एकत्रीकरण झालें नसल्यामुळें, भौगोलिक शोधांचा इतिहास द्यावयाचा म्हणजे निरनिराळ्या संस्कृतींच्या केंद्रांकडून या बाबतींत झालेल्या प्रयत्नांचा वेगवेगळा विचार केला पाहिजे. यांपैकीं चिनी व यूरोपीय केंद्रांशिवाय इतर केंद्रांच्या प्रयत्नांची आपणांस आज कांहींच माहिती उपलब्ध नाहीं म्हटलें तरी चालेल. चिनी प्रवाश्यांनीं आपल्या प्रवासाचीं जीं वर्णनें लिहून ठेविलीं आहेत त्यांवरून मिळणारी कांहीं माहिती प्रथमारंभीं दिलीच आहे. तथापि भौगोलिक शोधांच्या वाढीचा अथपासून इतिपावेतों सुसंगतवार असा इतिहास भूमध्यसमुद्रगत यूरोपीय केंद्रासंबंधींच काय तो लिहितां येतो. या भूमध्यसमुद्रगत केंद्राच्या ज्ञानाची परंपरा प्राचीन मिसरी लोकांपासून सुरू होऊन फिनीशिया, ग्रीस व रोमन हीं तीन राष्ट्रें मिसरी लोक व आजचीं यूरोपिय राष्ट्रें यांनां जोडणाऱ्या सांखळींतील मधले मुख्य मुख्य दुवे आहेत.

**प्राचीन मिसरी लोकांचें भूगोलज्ञान.**—ख्रिस्तपूर्व चौदाव्या शतकाच्या पलीकडील काळांत, मिसर देशच्या शूर राजांनीं तरवारीच्या जोरावर आपला अंमल नाइल नदीच्या मुखाच्या आसमंतांतील त्रिकोणाकृति भूप्रदेशापासून दक्षिणेस तिच्या उगमापर्यंत व पूर्वेकडे असुरिया पर्यंत बसवीत नेला होता. इजिप्त मधील प्राचीन चित्रलिपींच्या शिलालेखांत व असुरियांतील कीलाकृति लिपीच्या शिलालेखांत सैन्यांच्या हालचाली, विजय इत्यादि गोष्टींसंबंधीं अनेक विश्वसनीय उल्लेख आले आहेत.

**फिनिशियनांचें भूगोलज्ञान.**—तथापि अज्ञातकालाचा ज्ञातकालाशीं संबंध जोडून देणारे आणि भौगोलिक शोधांच्या इतिहासांतील अतिप्राचीन कार्यकर्ते असे भूमध्यसमुद्राच्या कांठावरील लोक म्हणजे फिनीशियनच होत. हे प्राचीन व्यापाराचा आणि प्राचीन लिपिज्ञानाचा विस्तार करण्यांत भारतीयांच्या तोडीचे पण भूगोलज्ञानाच्या बाबतींत भारतीयांहून श्रेष्ठ होते. सायडॉनमधून व त्यानंतर त्याशीं स्पर्धणाऱ्या व त्याहूनहि अधिक प्रसिद्धीस आलेल्या टायर शहरामधून निघून फिनीशियांतील धाडशी व्यापाऱ्यांनीं भूमध्यसमुद्राचा सबंध किनारा शोधून काढला व त्यावर वसाहत केली. त्यानंतर त्यांनीं आपला मोर्चा त्या समुद्रापलीकडेहि फिरविला. तांबड्या समुद्रावरहि त्यांनीं व्यापार सुरू केला, आणि हिंदुस्थान देश व दक्षिणेकडील व पश्चिमेकडील बंदरें यांच्याशीं त्यांचें व्यापारी दळणवळण सुरू झालें. यामुळें साहजिकच शलोमोन बादशहानें आपल्या समुद्रावरील व्यापाराच्या कामीं टायरचीं व्यापारी गलबतें लावलीं.

फिनीशियन लोकांच्या भूगोलज्ञानविषयक प्रयत्नाच्या इतिहासांत कांहीं संशयस्थलें आहेतच. उदाहरणार्थ, बायबलमध्यें टार्शिश या नांवानें ज्ञात असलेलें पश्चिमेकडील व्यापारी केंद्र हें बहुधा स्पेनच्या दक्षिणेस केडिझच्या जागीं पूर्वी बसलेलें असावें, असें एक अनुमान आहे; पण कांहीं ग्रंथकारांना तें उत्तरआफ्रिकेंतील कार्थेज शहर असावें असें वाटतें. सोन्याची निर्गत करणाऱ्या दक्षिणेकडील ओफर बंदराच्या स्थलनिश्चयाविषयीं तर त्यापेक्षांहि जास्त मतभेद आढळून येतो. कांहीं संशोधक त्या बंदराची जागा अरबस्थानांत निश्चित करतात तर कांहीं आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील एक दोन स्थळें त्या जागेकरितां सुचवितात. एवढें मात्र निश्चित आहे कीं, आफ्रिकाखंडाचा शोध ज्या पर्यटनांत लागला तें पाहिलें समुद्रपर्यटन मग त्याचा ओफर बंदराच्या शोधाशीं संबंध असो अगर नसो–तांबड्या समुद्रांतून जहाजें हाकारणाऱ्या फिनीशियन लोकांनींच केलें होतें. खिस्तपूर्व पांचव्या शतकांतील प्रख्यात प्रवासी हिरोडोटस यानें असें म्हटलें आहे कीं, ख्रिस्तपूर्व ६०० च्या सुमारास होऊन गेलेल्या इजिप्त देशाच्या २६ व्या राजवंशांतील नीको नामक राजानें तांबड्या समुद्रावर एक जहाजांचा काफिला तयार केला, व तो फिनीशियन खलाशांच्या ताब्यांत देऊन त्यास दक्षिणेकडे जाऊन हर्क्युलीस याचा स्तंभ व भूमध्यसमुद्र या मार्गानें पुन्हां इजिप्त देशास परत येण्याची आज्ञा केली. ही दंतकथा जरी हिरोडोटससारख्या लेखकानें नमूद केलेली आहे तरी तिला शक्य कोटींतील म्हणून मानल्या जाणाऱ्या गोष्टीपेक्षां जास्त महत्त्व देतां येत नाहीं.

खि. पू. ८०१ च्या अगोदर स्थापन झालेल्या कार्थेजच्या सुप्रसिद्ध वसाहतीनेंहि आपल्या मातृदेशाच्या व्यापारी धाडसाची कीर्ति पुढें चालवून आफ्रिकेच्या व यूरोपच्या किनाऱ्यावरील प्रदेशाशीं जलमार्गानें व्यापार सुरू केला. विशिष्ट भौगोलिक हेतूनें केलेलें प्राचीन कालांतील सुप्रसि यटन म्हटलें म्हणजे कार्थेज येथील राजसभेच्या सांगण्यावरून हनो याच्या नेतृत्वाखालीं झालेलें होय. फ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर वसाहती कराव्या असा या पर्यटनाचा उद्देश होता. प्लिनीनें दिलेल्या माहितीवरून हें जलपर्यटन कार्थजच्या भरभराटीच्या काळांत म्हणजे खि. पू. ५७०–४८० च्या सुमारास झालें असावें असें दिसतें. त्या पर्यटनाचें क्षेत्र संशयित आहे, परंतु त्यांतील शेवटचें ठिकाण गिनीच्या आखाताच्या उत्तरेकडील पूर्वपश्चिम किनाऱ्यावर कोठें तरी असावें. त्याच प्रमाणें हनोशीं समकालीन असलेल्या हिमिल्को नामक पुरुषासहि कांहीं माणसें देऊन आयबीरिआच्या पश्चिम किनाऱ्यानें उत्तर दिशेस पर्यटन करण्याची आज्ञा झाली होती. त्या पर्यटनासंबंधाचे जे कांहीं संदिग्ध उल्लेख उमगले आहेत त्यांवरून त्यानें बिस्केच्या उपसागरांतून जाऊन इंग्लंडचा किनारा प्रत्यक्ष पाहिला असा असें दिसतें.

**ग्रीकांचें भूगोलज्ञान.**—हनो व हिमिल्को यांच्या मागून लवकरच आशियामायनरच्या किनाऱ्यावरील व इजीअन समुद्रांतल्या बेटांतील ग्रीक वसाहतवाल्यांची आरमारी शक्ति फिनीशियन सत्तेशीं जोरानें स्पर्धा करूं लागली; आणि या दृष्टीनें हर्क्युलीसच्या स्तंभापलीकडे केलेल्या पहिल्या ग्रीक जलपर्यटनाच्या उल्लेखास विशेष महत्त्व आहे. मॅसीलिआ (मर्सैल) च्या फोसीअन वसाहतींतील एका पिथिअस नांवाच्या खलाशानें तेथील महत्तम दिवस किती मोठा होतो तें पाहून त्या बंदराचे अक्षांश काढले पुढें खि. पू. ३३० च्या सुमारास ज्या वेळीं तो उत्तर दिशेकडे सोनें, कथील व अंबर वगैरे हीं कोठून येतात तें शोधण्यास निघाला, त्या वेळीं त्यानें आपल्या मुक्कामांचा स्थलनिश्चय वरील पद्धतीनेंच केला होता. पिथिअसनें स्वतः लिहिलेली हकीकत आज उपलब्ध नाहीं; परंतु त्यानें बिस्केच्या उपसागराच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें जाऊन व इंग्लिश खाडी ओलांडून ब्रिटनच्या किनाऱ्याचा अगदीं उत्तरेकडील बिंदु गांठला होता असें कळतें. याच्या पुढें थ्यूलि नामक देश असल्याचा तो उल्लेख करतो, व त्याचा महत्तम दिवसाचा अंदाज बरोबर असला तर हा प्रदेश शेटलंड किंवा कदाचित् आइस्लंड असावा. याच्या पलीकडे जहाजांतून जातां येण्यासारखा समुद्र असल्याचा जो त्यानें संदिग्ध उल्लेख केला आहे त्यावरून पिथिअस हाच उत्तरेकडील ध्रुवप्रदेशांतून प्रवास करून येणारा पहिला ग्रीक इसम असावा असें अनुमान निघतें. या किंवा यानंतरच्या दुसऱ्या पर्यटनांत पिथिअस हा बाल्टिक समुद्रांत प्रवेश करून भूमध्यसमुद्रांत परत आला. पिथिअस मागून या जलमार्गांनीं व्यापारी दळणवळण वाढल्याचें दिसत नाहीं, किंवा पिथिअसच्या पर्यटनाची हकीकत त्याच्या समकालीन लोकांनीं खरी मानल्याचेंहि आढळून येत नाहीं. परंतु आधुनिक इतिहास संशोधक पंडितांनीं पिथिअसच्या हकीकतीचा चिकित्सक बुद्धीनें अभ्यास करून ती आहे असा आपला निर्णय दिला असून पिथिअसच्या हकिगतीस बळकटी आणली आहे.

**अलेक्झांडरच्या मोहिमीनें भौगोलिक शोधांत घातलेली भर.**—ग्रीको-इराणी युद्धामुळें आशियामायनर देशांतील दूरदूरचे भाग ग्रीक भूगोलशास्त्रज्ञांना अलेक्झांडर च्याहि अगोदर बरेचसे ज्ञात झाले होते. परंतु खि.पू. ३२९–३२५मध्यें अलेक्झांडरच्या स्वाऱ्यांमुळें अलेक्झांडरनें जी आशियाखंडांत प्रचंड मोहीम केली तिच्यामुळें यूरोपीयांस आशियाखण्डाच्या अफाट प्रदेशासंबंधीं बरीच माहिती उपलब्ध झाली. अलेक्झांडरचें सैन्य कास्पिअन समुद्रापलीकडील अफाट भूप्रदेश ओलांडून, हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील डोंगराळ मार्गानें हिंदुस्थानांत प्रवेश करून सिंधु व गंगा या नद्यांमधील प्रदेशांत जाऊन तें परत आलें; व त्यामुळें हा काळ भौगोलिक शोधांच्या दृष्टीनें बराच महत्त्वाचा झाला.

येथून पुढें जग म्हणजे भूमध्यसमुद्रांच्या सभोंवतीं सर्व बाजूंस पसरलेला विस्तीर्ण प्रदेश होय असें लोक मानूं लागले व या त्यांच्या कल्पनेंत बरें च तथ्यहि होतें. अलेक्झांडरचा खुष्कीचा प्रवास सिंधु नदीच्या मुखापासून तैग्रिस नदी पर्यंत समुद्रांतून एक सं ोधनपूर्ण महत्त्वाचें जलपर्यटन होऊन संपला, व अशा ानें ग्रीक व भारतीय सं तींमध्यें परस्पर विनिमय होण्यास मार्ग मोकळा ला.

अलेक्झांडरबरोबरच्या ग्रीक लोकांनीं हिंदुस्थानांतील गांवें, शहरें व त्याचप्रमाणें तेथें उत्पन्न होणारीं धान्यें व देशाचें स्वरूप यांचें वर्णन केलें आहे. यूरोप व हिंदुस्थान यांच्य दरम्यान जलमार्गानें व्यापार सुरू करण्याचें अलेक्झांडरच्या फार मनांत होतें, व त्याच्या निआर्कस नामक सेनापतीनें लिहिलेल्या हकीकतींत त्या प्रसिद्ध जलपर्यटनाचा उल्लेख केले-लाहि आहे. अलेक्झांडरच्या नावांच्या काफिल्याचा वाटाड्या जो अॅनिक्रिटस त्यानें या जलपर्यटनाची सविस्तर हकीकत लिहून ठेविली होती पण ती आतां नष्ट झाली आहे. ख्रि. पू. ३२६ च्या ऑक्टोबर महिन्याच्या प्रारंभीं निआर्कसचें आरमार सिंधु-नदांतून बाहेर पडलें. त्यानें आपल्या आरमाराच्या प्रत्येक दिवशीच्या मुक्कामांच्या जागा सुव्यवस्थितपणें उल्लेखिलेल्या आहेत. नंतर तो इराणी आखातामध्यें शिरून सुसा येथें अलेक्झांडर यास येऊन मिळाला. त्या ठिकाणीं अरबस्तानाला वळसा घालण्याकरितां दुसरें एक आरमार तयार करण्याचा त्यास अलेक्झांडरचा हुकूम झाला. पण अलेक्झांडर पुढें लवकरच बाबिलोनियांत ख्रि. पू. ३२३ च्या सुमारास वारल्यामुळें या आरमाराचें पर्यटन तहकूब झालें. [पृ. ७१पहा]

अलेक्झांडरच्या सिल्यूकस, अंटायोकस व टॉलेमी मना-नायकांनीं स्थापन केलेल्या राजवंशाकडून व्यापारा ाडसास प्रोत्साहन मिळत गेलें व त्यायोगानें भौगोि ज्ञ सर्व बाजूंनीं विस्तारच झाला. सिल्यूकस निकेटार यानें ांका बॅक्ट्रियन साम्राज्याची स्थापना करून हिंदुस्थानशीं दळण वळण चालू ठेवलें. सिल्यूकसचा वकील मिगॅस्थिनीझ यानें पाटलिपुत्र म्हणजे हल्लींच्या पाटणा शहरापर्यंत प्रवास करून गंगानदीच्या सुप्रसिद्ध खोऱ्यासंबंधीं खरी माहिती पुरविली.

**टॉलेमी राजांची एतद्विषयक कामगिरी.**—इजिप्त मधील टॉलेमींनीं भौगोलिक ज्ञानाच्या मर्यादा विस्तृत करण्याबद्दल पुष्कळ खटपट केली. टॉलेमी युर्आजेटीझ (ख्रि. पू. २४७–२२२) यानें एराटॉस्थिनीझ या पुरुषास आश्रय देऊन भूगोलशास्त्राची अपूर्व कामगिरी बजावली. कारण पृथ्वीचें गोलत्व ज्ञात करून देण्यास ह्याचेच श्रम कारणीभूत झाले. दुसरा युर्आजेटीझ व त्याचा अनुगामी टॉलेमी लॅथिरस (ख्रि. पू. ११८–११५) ह्यांनीं अरबी समुद्राचें संशोधन करण्याकरितां एक आरमार 'युडॉक्सस' नामक पुरुषाच्या हाताखालीं दिलें. हीं दोन पर्यटनें यशस्वी रीतीनें पार पाडल्यावर युडॉक्सस यास आफ्रिकाखं ड दक्षिण दिशेस समुद्र वेष्टित असावें अशी जबर शंका आल्या वरून त्यानें इजिप्तच्या राजाची नोकरी सोडून आफ्रिकेच्या शोधाला पैसे पुरवील अशा तऱ्हेचा आश्रयदाता शोधण्याकरितां कॅडिझ वगैरे बंदराकडे मोर्चा फिरविला. स्ट्रेबोच्या उल्लेखावरून असें दिसतें कीं, वरील संशोधकानें आफ्रिकेच्या किनाऱ्याच्या बाजूनें दक्षिणदिशेकडे दोन पर्यटनें केली होतीं. इकडे टॉलेमी याचाहि आपल्या बेरिनायसि, मायॉस व हॉर्मस या तांबड्या समुद्रांतील बंदरांतून दर वर्षीं अरबस्तान, आफ्रिका आणि हिंदुस्थान येथील बंदरांकडे नवीन नवीन आरमारें पाठविण्याचा क्रम चालू होता.

**रोमन लोकांची कामगिरी.**—रोमन लोकांनीं प्राचीन ग्रीक लोकांप्रमाणें रोमन पर्यटनें व व्यापार यांनां प्रोत्साहन दिलें नाहीं, परंतु रोमच्या वाढत्या विलासलालसेमुळें ज्ञात जगांतल्या प्रत्येक प्रदेशांतील निरनिराळ्या वस्तूंची जरूर लागू लागल्या कारणानें जहाजें व कारवान यांच्या करवीं आपोआपच व्यापार पुष्कळ वाढला. तथापि रोमन लोकांनीं सर्व यूरोपखंडाचें आणि आशिया व आफ्रिका खण्डांतील बऱ्याच भागाचें जें संशोधन केलं त्याला कारण त्यांची जबर साम्राज्यतृष्णा व युद्धकलाकौशल्य हेंच होय. प्रत्येक मोहिमीबरोबर जिंकलेल्या नवीन नवीन देशांची पाहणीपुस्तकें व माहितीपुस्तकें तयार होऊं लागली, आणि जगाच्या निरनिराळ्या ज्ञात प्रदेशांतून रोमकडे येण्यास नवीन नवीन वाटा निघूं लागल्या. आपल्या ऐश्वर्याच्या भरांत रोमन लोकांनीं भूमध्यसमुद्राचा सबंध किनारा संशोधित केला व इटाली, ग्रीस, बाल्कन द्वीपकल्प, स्पेन, गॉल, पश्चिमजर्मनी आणि दक्षिणब्रिटन इत्यादि देशांचे किनारे पाहिले. आफ्रिकेंतील इजिप्त, कार्थेज, न्युमिडिआ व मॉरिटेनिआ इत्यादींचा रोमनसाम्राज्यांतच अंतर्भाव झालेला होता. आशियांतील आशियामायनर व सिरिया हे प्रांत रोमन साम्राज्यांतच अंतर्भूत होत असून रोमन लोकांनीं अरबस्थानावर स्वाऱ्या केल्या होत्या व पूर्वी अलेक्झांडरनें स्वाऱ्या केलेले इराण, बॅक्ट्रिया, सिथिया, हिंदुस्थान इत्यादि दूरदूरच्या देशांबरोबर त्यांचा बराच परिचय झाला होता. विशेषतः हिंदुस्थानशीं घडून आलेल्या दळणवळणामुळें भौगोलिक ज्ञानाचा बराच विस्तार झाला.

साम्राज्याच्या मर्यादा वाढविण्याकरितां नवीन प्रांतांत रोमन सैन्यांची पथकें पाठविण्यापूर्वी त्या प्रांताची माहिती मिळविण्याकरितां संशोधक लोकांच्या तुकड्या पाठविण्याची पद्धति प्रचलित होती. प्लिनी व सॅनिका ह्यांनीं असें म्हटलें आहे कीं, नीरो बादशहानें याच कामाकरितां (इ. स. ६० च्या सुमारास) नाइल नदीच्या उगमाकडे शंभर शंभराच्या दोन तुकड्या पाठविल्या होत्या, व हे लोक दक्षिणेस इतके दूर गेले होते कीं शेवटीं दलदलीचा प्रदेश लागून त्यांना नावांतून किंवा पायीं प्रवास करणें अशक्य झालें. ह्यावरून ते ०९ उत्तर अक्षांश

पावेतो जाऊन आले असावे असें दिसतें. ख्रि. पू. ७९ च्या थोडे दिवस अगोदर हिप्पालस यानें तांबड्या समुद्रांतून हिंदुस्थानास जमिनीपासून दूर असलेल्या समुद्रमार्गानें येण्याकरितां नियतकालिक वाऱ्याच्या दिशेंत जो नियमितपणें फेरबदल होतो त्याचा फायदा करून घेतला. हा समुद्रमार्ग जरी त्या पूर्वींच माहीत होता, तरी देखील प्लिनीच्यानंतर प्रसिद्ध झालेल्या पेरिप्लुस ऑफ् दि एरिथ्रिअन सी या ग्रंथाच्या कर्त्यानें अरबस्थानच्या द्वीपकल्पाच्या किनाऱ्या सभोंवतीं असलेली पूर्वींच्याच रस्त्यांची माहिती दिली आहे. तथापि सिव्हिरस व त्याच्या मागाहून झालेल्या राजांच्या अमदानींत रोमन लोकांचें हिंदुस्थानाशीं जास्तींत जास्त दळणवळण होतें. वपॉसेनिअस याच्या लेखावरून रोम व चीन या देशामध्येंहि यापूर्वीच प्रत्यक्ष दळणवळण सुरू झालें होतें असें दिसतें.

रोमन साम्राज्याचे तुकडे झाल्यानंतर कॉन्स्टांटिनोपल हेंच अनेक विद्या व अत्युच्च कलाकौशल्य यांचें निवासस्थान बनलें, व अलेक्झांड्रिया हें शहर पूर्वेकडील जिनसांच्या आयात व्यापाराचें ठिकाण राहिलें. ज्याच्या कारकीर्दीत पूर्वेकडील साम्राज्यास उतरतीकळा लागली त्या जस्टिनिअन बादशहानें ( इ. स. ४८३-५६५ ) चीन देशांत दोन नेस्टोरिअन धर्मोपदेशक पाठविले होते. व ते एका पोकळ वेतांत रेशमाच्या किड्यांचीं दोन अंडीं दडवून स्वदेशीं परत आले. अशा रीतीनें पेलोपानीसस आणि इतर ग्रीक बेटें यांत रेशमाचे कारखाने स्थापले गेले. याच बादशहाच्या कारकीर्दींत कॉस्मस इंडिकोप्लुस्टस या इजिप्तमधील व्यापाऱ्यानें बरीचशी जलपर्यटनें करून विलक्षण विश्वोत्पत्तिवर्णन व हिंदुस्थानची व्यवस्थित माहिती असलेला आपला भूपृष्ठविषयक माहितीचा ग्रंथ तयार केला.

**अरब लोकांचा हातभार.**—सातव्या शतकांत महंमदीयांनीं जे एकामागून एक प्रचंड विजय संपादन केले त्यांबरोबर अरब संस्कृतीची वाढ होऊन बगदाद व कार्डोव्हा हीं शहरें दळणवळणाचीं केंद्रें झालीं व त्या लोकांचें भूगोलाकडेहि लक्ष गेलें. प्राचीन ग्रीक भूगोलशास्त्रज्ञांच्या ग्रंथांचीं अरबी भाषेंत भाषांतरें झालीं आणि नवीन देश शोधण्याचे प्रयत्न पुनः अगदीं शास्त्रशुद्ध पायावर सुरू झाले. नवव्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत निरनिराळ्या बुद्धिमान अरब प्रवाश्यांनीं दूरदूरच्या देशांतल्या ज्या कांहीं गोष्टी त्यांनीं स्वतः पाहिल्या किंवा ऐकल्या होत्या त्या सर्व लिहून ठेवल्या. त्यापैकीं अतिप्राचीन अरबी प्रवासी सुलैमान नांवाचा एक व्यापारी असून नवव्या शतकाच्या मध्यांत त्यानें इराणी आखातांतून निघून हिंदुस्थान व चीन या देशांत सफरी केल्याबद्दल माहितीचे कागदपत्र उपलब्ध आहेत. अबू सैद यानेंहि हिंदुस्थानसंबंधीं माहिती लिहिली आहे. सुप्रसिद्ध मार्कोपोलोच्या जगद्विख्यात व नवयुगारंभक शोधापूर्वींचे अतिशय महत्त्वाचे असे लेख यांचेच आहेत. मसुदी नामक प्रसिद्ध प्रवाश्यानें स्वतःच्या अनुभविक माहितीवर स्पेन व चीन यांमधील सर्व देश, मैदानें, समुद्र, पर्वत वगैरेंचीं वर्णनें केलीं असून त्या वेळीं राज्य करीत असलेलीं राजघराणीं व लोक यांसंबंधीं आपल्या 'सोन्याचे प्रदेश' या ग्रंथांत माहिती दिली आहे. मसुदी हा इ. स. ९५६ मध्यें वारला. त्याच्या अवाढव्य निरीक्षणावरून त्याला 'पौरस्त्य प्लिनी' असें नांव देण्यांत येतें. इ. स. ९५० सालीं 'विविध देशांची माहिती' हें पुस्तक लिहिणारा प्रवासी 'इस्तखी, व इस्तखीच्या ग्रंथाच्या आधारें ९७६ सालीं 'अनेक मार्ग व राज्यें यांच्या माहितीचा ग्रंथ' हें पुस्तक लिहिणारा इब्न हौकल हे दोघे मसुदीशीं समकालीन होते. भूगोलशास्त्राबरील अरबी ग्रंथकारांपैकीं सुप्रसिद्ध इद्रिसी यानें १२ व्या शतकाच्या पूर्वार्धांत बरेंच देशाटन करून शेवटीं तो सिसिली देशांत कायमची वस्ती करून राहिला. त्यानें त्या ठिकाणीं तेथील नॉर्मन राजा दुसरा रॉजर याच्याकरितां एक रुप्याचें खगोल यंत्र तयार करून त्याच्या वर्णनपर एक ग्रंथ लिहिला. समकालीन प्रवाश्यांनीं मिळविलेली सर्व माहिती त्यानें या ग्रंथांत संगृहीत केली होती.

**नॉर्थमेन लोकांचें कार्य.**—डेन्मार्क व नॉर्वे येथील लोकांचीं चांचेगिरीचीं धाडसें सर्व यूरोपखंडाच्या किनाऱ्यावर मशहूर असून या लोकांनीं ग्रेटब्रिटन, आयर्लंड, फ्रान्स सिसिली इत्यादि देशांत कायमची वस्ती केली होती. या लोकांनीं मध्ययुगांतील ऐन तिमिर कालांत भौगोलिक शोधाचें कार्य पुढें चालू ठेविलें होतें. यांच्यापैकीं सर्वच लोक लुटारू व दरोडेखोर नसून कांहीं शांततेनें व्यापार करणारेहि होते. आल्फ्रेड दि ग्रेट हा इंग्लंडचा राजा आपल्या सॅक्सन प्रजेस पूर्वपरंपरागत विद्या शिकवूनच केवळ स्वस्थ बसला नाहीं तर त्यानें त्याबरोबरच स्वतः भाषांतरिलेल्या भूगोलविषयक ग्रंथांत त्या कालीं झालेल्या पर्यटनांची माहितीहि समाविष्ट केली. उदाहरणार्थ, उल्फस्टन नामक व्यापाऱ्यानें बाल्टिक समुद्रांत केलेलीं पर्यटनें जर्मनीच्या भौगोलिक माहितीसह त्यानें लेखनिविष्ट करून ठेविलीं. विशेषतः ज्याच्या उत्तरेकडील ध्रुवप्रदेशाच्या संशोधनाबद्दल आपणांस खात्रीलायक माहिती आहे व जो आपण नॉर्थकेपला वळसा घालून मध्यरात्रीच्या सूर्याचें दृश्य पाहिल्याचें सांगतो असा पहिला इसम, हेलगेलंडचा ओथरनामक नॉर्वेजिअन प्रवासी याच्या प्रवासाची माहितीहि त्यानें लिहून ठेविली होती. ९ व्या शतकाच्या मध्यांत झालेल्या या पर्यटनामधील मौज वाटण्यासारखा विशेष म्हटला म्हणजे त्यायोगें पहिल्या नॉर्वेजिअन ध्रुवप्रदेशसंशोधकाचा पहिल्या इंग्लिश प्रवाससंग्राहकाशीं संबंध आला हा होय. स्कँडिनेव्हियांतील व्यापारी हिंदुस्थानांतून इंग्लंड व आयर्लंड देशांत माल नेऊं लागले. आठव्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत हिंदुस्थानचा एक व्यापारी रस्ता नॉव्हगोरॉड वरून बाल्टिक समुद्रापर्यंत जात होता. स्वीडन देशांत व विशेषतः गॉटलंड

बेटांत आढळून येणाऱ्या अरबी नाण्यांवरून अरब व नॉर्वेमधील धाडसी लोकांचा परस्परांशीं किती निकट संबंध आला होता हें व्यक्त होतें. स्टॉकहोमच्या संग्रहांत असलेल्या नाण्यांपैकीं पांच षष्ठांश नाणीं इ. स. ९०० व १००० यांच्या दरम्यान खोरासाण व ट्रॅन्सऑक्सिआना येथें राज्य करणाऱ्या सामानी राजघराण्याच्या टांकसाळींत पाडलेलीं आहेत. गॉटलंड बेटांतील 'विस्बी' शहरास जें महत्त्व आलें त्याचें मूळ कारण हा पूर्वेकडील व्यापारच होय.

नवव्या शतकाच्या अखेरीस आइसलंडमध्यें नॉर्वेतील लोकांनीं वसाहत केली; आणि ९८५ च्या सुमारास धाडसी चांचा एरिक दि रेड यानें ग्रीनलंड देश शोधून काढून त्याच्या किनाऱ्यावर वस्ती करण्याकरितां आपल्या आइसलंडमधील कांहीं बंधूंचें मन वळविलें. त्याचा मुलगा लीफ एरिकसन व त्याचे इतर अनुयायी हे उत्तर अमेरिकेचा किनारा शोधण्यांत गुंतले होते. आइसलंड देश अगदीं एकीकडे नसता तर तेथील संशोधकांच्या उपर्युक्त चळवळीचा यूरोपवर फार महत्त्वाचा परिणाम घडून आला असता. परंतु वस्तुस्थिति तशी नसल्यामुळें त्यांचे शोध अज्ञात अवस्थेंतच बुजून गेले. १३ व्या शतकाच्या अखेरीस उत्तरेकडील समुद्रांत केलेल्या सफरींची अस्पष्ट माहिति देणारे निकोलो व अँटोनिओ झीनो या वेनिसच्या व्यापाऱ्याची गोष्ट आतां कोणी विश्वासार्ह मानण्यालायक समजत नाहीं.

**स्तिमित युगाच्या अखेरचा काळ.**— सरतेशेवटीं रोमन साम्राज्याच्या नाशानंतरचा यूरोपांतील अराजकतेचा काल एकदांचा संपला. 'क्रूसेड' युद्धांनीं पाश्चात्य राष्ट्रांच्या विचारशक्तीस योग्य वळण लावून दिलें. प्रवाश्यांच्या त्रोटक माहितीवरून ज्ञात झालेल्या प्रदेशांकडे लोकांचें लक्ष वेधलें जाऊन त्यांच्याबद्दल जास्त माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला जाऊं लागला. अज्ञात जगाची ओळख करून घेण्याच्या जिज्ञासेंत संप्रदायप्रसाराची हौस व द्रव्यार्जनाची इच्छा यांची भर पडून कित्येक लोकांनीं खुष्कीच्या मार्गानें पूर्वेकडील दूरदूरच्या प्रदेशांत प्रवास केले. यांपैकींच एक स्पेनमधील बेंजामिन आफ टयूडेला नामक गृहस्थ इ. स. ११६० मध्यें खुष्कीनें कॉन्स्टांटिनोपलला जाऊन तेथून हिंदुस्थानांत व पूर्वेकडील कांहीं बेटांत प्रवास करून इजिप्तच्या मार्गानें तेरा वर्षांनंतर पुन्हां यूरोपला परत आला.

**आशिया खंडांतील प्रवास.**— पोप इनोसंट यानें तार्तर देशांतील लोक व त्यांचा राजा यांनां आपल्या संप्रदायाचा उपदेश करण्याकरितां 'जोआनेस डी प्लॅनोकार्पिनि' नामक फ्रान्सिस्कन भिक्षूच्या नेतृत्वाखालीं एक संप्रदायप्रसारक मंडळ पाठविलें होतें. हा भिक्षु १२४६ च्या फेब्रुवारींत व्होल्गा नदीकाठीं बाटु मुक्कामीं पोहोंचला त्या ठिकाणीं कांहीं वेळ राहून तो मध्य आशियांत काराकोरम जवळ थोरल्या खानाची छावणी होती तेथें त्यास भेटण्यास गेला, व १२४७ च्या पावसाळ्यांत स्वदेशीं सुखरूप परत आला. त्यानंतर कांहीं वर्षांनीं रूब्रुकिस नामक गृहस्थास अशाच प्रकारें संप्रदायप्रचारक म्हणून पाठविण्यांत आलें. कास्पियन समुद्राची पूर्ण माहिती देणारा पहिला प्रवासी हाच होय. ह्याच सुमारास अर्मेनियाचा राजा हेटन यानें, १२५४ साली कार्पिनि व रूब्रुकिस हे ज्या मार्गानें गेले होते त्याच्या उत्तरेच्या बाजूस पुष्कळ दूर असलेल्या दुसऱ्या मार्गानें काराकोरमला सफर केली. त्या ठिकाणीं त्याचा बराच आदर होऊन तो समरकंद ताब्रीझच्या वाटेनें स्वदेशीं परत आला. हेटन राजाच्या कुतूहलोत्पादक प्रवासवर्णनाचें क्लॅप्रॉथ यानें भाषांतर केलें आहे.

अशा रीतीनें इटालींतील लोकसत्ताक राज्याचे व विशेषतः वेनिसच्या नगरराज्याचे रहिवाशी हिंदुस्थानांत व इतर पौरस्त्य देशांत तयार झालेला मौल्यवान माल पाश्चात्य जगांत खपवीत असतां, त्या व्यापारापासून होणाऱ्या फायद्याच्या इच्छेनें व त्याचप्रमाणें अज्ञात भूमि पाहण्याच्या जिज्ञासेनें पाश्चात्य देशांतील कांहीं व्यापाऱ्यांनीं या दूरदूरच्या देशांत जाण्यास उत्सुक व्हावें हें साहजिकच आहे. पूर्वेकडे व्यापार करणारे व तार्तरी देश स्वतः पाहून आलेले पोलो बंधु ह्यांपैकींच होत. त्यांच्या प्रवासाच्या कवनांनीं तरुण मार्कोपोलो याची कल्पनाशक्ति जागृत झाली, व आपला बाप व चुलता ह्यांसह तो १२६५ सालीं कुब्लाईखानाकडे जाण्यास निघाला. मार्कोपोलोनें १७ वर्षें खानाची नोकरी बजावली. ह्या अवधींत त्यानें स्वतःच्या निरिक्षणानें पुष्कळ माहिती गोळा करून स्वतः न पाहिलेल्या देशांची हकीकत दुसऱ्याकडून गोळा केली. अशा रीतीनें पौरस्त्य जगासंबंधीं माहितीचा अपूर्व सांठा करून घेऊन तो यूरोपखंडास परतला, आणि जिनोवाच्या लोकांनीं त्यास बंदिवान केलें असतां त्यानें बंदिवासांत आपल्या प्रवासाची माहिती लिहून काढली. हा मार्कोपोलोचा ग्रंथ मध्ययुगांतील भौगोलिक माहितीचा अमूल्य खजिना होय.

ख्रिस्तसंप्रदायप्रचारक लोकांनीं आपलें भौगोलिक संशोधन पुढें चालू ठेवलेंच होतें. हिंदुस्थानांत सफर करून आलेली जॉन आफ मॉंटे कार्व्हिनो, अँड्रयू ऑफ पेरुजिआ, जॉन मॅरिग्निऑली, व फ्रायर जॉर्डेनस इत्यादि मंडळी ह्यांपैकींच होती. यांशिवाय फ्रायर ओडोरिक यानेंहि हिंदुस्थानचा कांहीं भाग मलायाद्वीपसमूह, चीन, तिबेट इत्यादि प्रदेशांत १३१८ च्या सुमारास प्रवास केला होता.

**इब्न बतूता.**—यूरोपांतील अज्ञानमय स्तिमित युगांत अरबी संस्कृतीची भरभराट होत चालली असतां शेवटच्या अरब भूगोलशास्त्रज्ञाच्या हयातींतच यूरोपांत विद्याविषयक व कलाविषयक पुनरुज्जीवनास प्रारंभ झाला. इब्नबतूता हा तो शेवटचा भूगोलशास्त्रज्ञ होय. या सुप्रसिद्ध अरब प्रवाश्यानें प्रथम खुष्कीनें तांजीरपासून कैरोपर्यंत व पुढें

सिरिया देशांत प्रवास केला, आणि नंतर मक्केची व मदिनेची यात्रा केली.

ही यात्रा संपविल्यावर तो इराण देशांत भटकला, व त्यानंतर कांहीं वर्षें तो पुन्हां मक्केस जाऊन राहिला. तेथून परत येतांना त्यानें तांबड्या समुद्रांतून येमेनपर्यंत व नंतर पुढें त्या प्रदेशांतून एडनपर्यंत प्रवास केला. मग त्यानें आफ्रिकाखंडाच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें सफर केली. या सफरींत तो मोंबासा व किलोआ या बंदरांत उतरला होता. नंतर तो समुद्र ओलांडून ऑर्मझवरून इराणी आखातांतून गेला.

तो बारेनपासून निघून अरबस्थान ओलांडून जिद्दापर्यंत गेला, व तांबडा समुद्र व वाळवंट ओलांडून सायीनि येथें आला. त्यानें नाइल नदीच्या प्रवाहाप्रवाहानें कैरो शहरापर्यंत प्रवास केला. त्यानंतर पुन्हां तो सिरिया, व आशियामायनर या देशांत सफरी करून काळा समुद्र, अस्त्राखानपासून बुखारापर्यंत असलेलें वाळवंट आणि हिंदकुश पर्वत हीं ओलांडून हिंदुस्थानांत आला. त्यानें दिल्लीचा सुलतान महंमद तघलक याच्या पदरीं सुमारें आठ वर्षें नोकरी केली होती. येथें त्याची चीन देशास रवाना केलेल्या शिष्टमंडळांत नेमणूक होऊन तो हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यानें दक्षिणेस गेला व कालिकतवरून निघून मालदिव व सिलोन या मार्गानें मलायाद्वीपसमूहामधून चीनला जाऊन परत मलबारला आला. तेथून तो बगदाद, दमास्कस या शहरांवरून १३४९ च्या नोव्हेंबर महिन्यांत स्वदेशीं फेझ शहरीं पोहोंचला. नंतर स्पेनमध्यें जाऊन पुन्हां एकदां तो १३५२ सालीं मध्यआफ्रिकेंत जाण्यास निघाला व तिंबक्टू व नायगर हीं शहरें पाहून फेझ येथें १३५३ मध्यें परत आला. त्यानें स्वतः केलेलें प्रवासवर्णन सध्यां उपलब्ध आहे.

या नंतरचे भौगोलिक शोधाचे प्रयत्न स्पेन व पोर्तुगाल देशांतील लोकांनीं केले व त्यांचें अंतिम फल अमेरिकाखंड व हिंदुस्थान मार्ग सांपडणें हें होय.

प्राचीन काळापासून स्तिमित युगाच्या अखेरीपर्यंतच्या राजकीय घडामोडीस व संस्कृतिप्रसारास जे भौगोलिक शोध कारणीभूत झाले त्यांचा इतिहास वर दिल्याप्रमाणें आहे. आतां आपण १२ व्या प्रकरणांत कुशान घराण्याच्या अखेरीपर्यंत आणून सोडलेलें कथासूत्र पुन्हां हातीं घेऊं.

---

## प्रकरण १५ वें.

### अराजकापासून महंमदी स्वाऱ्यांपर्यंत हिंदुस्थान.

चवथ्या शतकापासून हिंदुस्थानच्या इतिहासाची माहिती मिळूं लागून इतिहासाचें कथासूत्र पुन्हां चालू करतां येतें. कुशान घराण्याच्या अंतापासून गुप्त घराण्याच्या उदयापर्यंत चें गत इतिहास लिहिण्यास माहिती न मिळण्याचें कारण हिंदुस्थानांत हा काळ फार धामधुमीचा होता हें होय. या काळाच्या अखेरीस बुद्धाच्या वेळीं प्रसिद्ध असलेल्या लिच्छवी जातीचें नांव पुन्हां प्रामुख्यानें पुढें येतें. कुशान राजे वायव्येकडे पेशावर येथें राज्य करीत असतां या लोकांनीं पूर्वेस पाटलिपुत्र हस्तगत करून आसमंतातील भागांत आपली सत्ता पसरविण्याचा उपक्रम केला होता. गुप्त घराण्याच्या उदयापूर्वी पूर्वेस लिच्छवी घराणें बरेंच प्रसिद्धीस आलें होतें, हें गुप्त घराण्याचा संस्थापक चंद्रगुप्त यानें जीं नाणीं पाडलीं होतीं त्यांत लिच्छवी लोकांच्या घराण्यांतील आपल्या बायकोस प्रमुख स्थान दिलें होतें यावरून दिसून येतें.

**गुप्त घराण्याचा संस्थापक चंद्रगुप्त ( इ. स. ३२०–३३० किंवा ३३५).**—पाटलिपुत्र येथील किंवा त्याच्या शेजारचा स्थानिक राजा चंद्रगुप्त याचा विवाह इ. स. ३०८ मध्यें किंवा त्या सुमारास लिच्छवी जातीच्या एका कुमारदेवी नांवाच्या राजकन्येशीं झाला. लिच्छवी जातीचे लोक प्राचीन काळच्या बौद्ध संप्रदायी ग्रंथांत विशेष वर्णिलेले आहेत. अजातशत्रूची कारकीर्द, आणि वर सांगितलेला कुमारदेवीचा विवाह या दोन गोष्टींच्या दरम्यानच्या सुमारें आठ शतकांच्या कालावधींतील या लिच्छवी जातीचा इतिहास बहुतेक नष्ट झालेला आहे. मनुस्मृतीनें लिच्छवींची गणना शूद्रांत केली आहे. त्यांनीं नेपाळांत एक राजघराणें स्थापलें होतें. उपर्युक्त विवाहानें या जातीचें नांव पुन्हां पुढें आलें. या विवाहाचें महत्त्व विशेष आहे, कारण या दांपत्यानें मौर्यांच्या तोडीच्या एका राजघराण्याचा पाया घातला. शिवाय कुमारदेवीबरोबरच्या विवाहानें चंद्रगुप्ताचें वर्चस्व मगध व त्या शेजारच्या देशांत थोडक्या वर्षांत स्थापन होण्यास फार मदत झाली. वैशालीचे लिच्छवी आणि पाटलिपुत्र येथील राजे यांची फार वर्षें स्पर्धा चालू होती, व पुष्यमित्रानंतरच्या अस्वस्थतेच्या काळांत या लिच्छवींनीं पाटलिपुत्र जिंकून घेतलें होतें असें दिसतें. या लिच्छवींबरोबरच्या शरीरसंबंधामुळें चंद्रगुप्ताला बाप व आजा यांच्या संस्थानिकाच्या दर्जापेक्षां बराच मोठा दर्जा प्राप्त झाला. तो आपल्या नाण्यांवर स्वतःच्या नांवाबरोबर आपल्या लिच्छवी राणीचेंहि नांव घालीत असे हें वर सांगितलेंच आहे. या पहिल्या चंद्रगुप्तानें गंगायमुनांच्या कांठचा प्रदेश जिंकून घेतला, व तिरहुत, दक्षिण बहार, अयोध्या व शेजारचे प्रांत एवढ्यावर राज्य केलें. यानें आपल्या घराण्याचा नवा शकहि सुरू केला. त्यानें मरणापूर्वी लिच्छवी राणीचा मुलगा समुद्रगुप्त याला युवराज्याभिषेकहि केला होता.

**समुद्रगुप्त इ. स. ३३०–३७५.**—यानें पुष्कळ वर्षें राज्य केलें. त्यांपैकीं बरींच वर्षें त्यानें साम्राज्य वाढविण्याकरितां युद्धें करण्यांत घालविलीं. त्यानें आपल्या विजयाचीं वर्णनें संस्कृत पंडितांकडून लिहवून तीं अशोकानें उभारलेल्या

जयस्तंभावर खोदून ठेविलीं. स्वतः समुद्रगुप्त हा चांगला विद्वान् असून त्याचप्रमाणें तो महत्त्वाकांक्षी, शूर व लढवय्याहि होता. बौद्ध साधू वसुबंधु याच्या जवळून बौद्ध संप्रदायाचीं तत्त्वेंहि त्यानें समजावून घेतलीं होतीं. पण एकीकडे बुद्धाच्या अहिंसातत्त्वाची तारीफ करीत असतांना त्याबरोबरच तो आपल्या समरांगणावरील विजयांची प्रौढीहि मिरवीत असे. समुद्रगुप्ताच्या पराक्रमांचें त्याच्या हरिसेन नांवाच्या राजकवीनें जें गद्यपद्यमय वर्णन करून ठेविलें होतें तें आज उपलब्ध असून त्यावरून तत्कालिन विश्वसनीय माहिती मिळते. हा ग्रंथ इ. स. ३६० च्या सुमारास लिहिलेला असावा. समुद्रगुप्तानें केलेल्या स्वाऱ्यांचें एकंदर वर्णन, दक्षिणेकडील अकरा राजांवर केलेल्या स्वाऱ्या, आर्यावर्तांतील म्हणजे गंगेच्या कांठच्या प्रदेशांतील नऊ राजांवर केलेल्या स्वाऱ्या, रानांत रहाणाऱ्या रानटी लोकांच्या मुलुखांवर केलेल्या स्वाऱ्या आणि सरहद्दीवरील राजांवर आणि लोकसत्ताक राज्यांवर केलेल्या स्वाऱ्या अशा चार विभागांत केलें आहे. या ग्रंथांत आलेल्या बहुतेक भौगोलिक स्थळांचा शोध हल्लीं लागतो. त्यावरून समुद्रगुप्त हा मोठा पराक्रमी व प्रख्यात राजा होता असें इतिहासकारांस आतां निश्चितपणें मानण्यास प्रत्यवाय उरला नाहीं. समुद्रगुप्ताची अनेकांगी विद्वत्ता आणि युद्धकौशल्य हीं दोन्हीं विचारांत घेतां त्याला हिंदुस्थानचा नेपोलियन असें म्हणतां येईल. त्यानें प्रथम उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक राज्यें जिंकून तीं आपल्या राज्यांत सामील केलीं होतीं. त्यांपैकीं हल्लींच्या शिंद्यांच्या मुलुखांत असलेलें पद्मावती नांवाचें प्रसिद्ध शहर ज्याची राजधानी होती त्या गणपति नांवाच्या राजाचा उल्लेख आलेला आहे. उत्तरेकडील राज्यें जिंकल्यावर दक्षिण हिंदुस्थानांतील महानदीच्या कांठच्या दक्षिण कोसलं राज्यावर त्यानें प्रथम हल्ला केला. तेथील राजा महेंद्र याला पदच्युत करून ओरिसांतील आणि मध्यप्रांतांतील राज्यें त्यानें जिंकलीं. नंतर अधिक दक्षिणेकडे चाल करून त्यानें कलिंगाची प्राचीन राजधानी पिष्टपुर ( गोदावरी जिल्ह्यांतील पिठापुरम् ) व जंगम मधील महेंद्रगिरि व कोत्तुर या किल्ल्यांचे अधिपती, कोलेरू ( कोलेर ) सरोवरानजीकच्या प्रदेशाचा राजा मंतराज, कृष्णा व गोदावरी यांच्या मधील वेंगी येथील ( बहुधा पल्लव ) राजा, कांची किंवा कांजीवरम् येथील राजा विष्णुगोप, व बहुधा नेलोर जिल्ह्यांत असलेले पालक्क शहर येथील राजा उग्रसेन यांचा पराभव केला. पुढें स्वदेशीं परत येतांना त्यानें देवराष्ट्र म्हणजे हल्लींचा महाराष्ट्र आणि एरंडपल्ल उर्फ खानदेश हे प्रांत जिंकून घेतले. या स्वारींत त्याचीं इ. स. ३५० च्या सुमाराचीं निदान दोन वर्षें खर्च झालीं असावीं. या दक्षिणेकडील स्वारींत त्यानें कोणतेंहि राज्य खालसा न करतां तेथील राजांस फक्त आपलें सार्वभौमत्व कबूल करावयास लाविलें. तथापि त्यानें आपल्या बरोबर सोनें व इतर बरीच लूट मात्र आणली होती. पूर्वेकडे समतट म्हणजे गंगा व ब्रह्मपुत्रा यांच्यामधील प्रदेश, कामरूप म्हणजे आसाम, आणि डवाक म्हणजे गंगेच्या उत्तरेकडील बोग्रा ( बग्रहा ), दिनाजपुर व राजशाही हे जिल्हे, हिमालयाच्या कांठचे नेपाळ आणि कर्तृपूरचें राज्य म्हणजे बहुधा कुमाऊन, अलमोरा, गढवाल, व कांग्रा हा मुलूख, इत्यादि राज्यें जिंकून घेतलीं. नंतर पश्चिमेकडील पंजाब, पूर्व राजपुताना व माळवा येथील लोकसत्ताक राज्यें, सतलजच्या कांठचें यौधेय जातीचें राज्य व भोपाळ कडील प्रदेशांतील राज्यें त्यानें जिंकलीं. याप्रमाणें चौथ्या शतकांत समुद्रगुप्ताच्या साम्राज्यसत्तेखालीं उत्तर हिंदुस्थानांतील सर्व मुलूख व दक्षिणेकडील बराचसा प्रदेश होता; आणि त्याच्या पलीकडे गंधार व काबूल येथील कुशान राजे, ऑक्सस नदीकांठच्या साम्राज्याचा सिथीयन बादशहा व त्याचप्रमाणें सिलोन व इतर दूरच्या बेटांतील राजे यांच्या दरबाराशीं त्याचें दळण वळण असे. उलटपक्षीं समुद्रगुप्ताच्या दरबारींहि परराज्यांतील वकील येत असत. त्यांपैकीं सिलोन येथून आलेल्या वकिलांची हकीकत विशेष प्रसिद्ध आहे. इ. स. ३६० च्या सुमारास सिलोन येथील बौद्ध राजा सिरिमेघवन्न (श्री मेघवर्ण) यानें दोन भिक्षू बोधगया येथें पाठविले होते. त्यांपैकीं एक राजाचा भाऊ होता असें सांगतात. या दोघांचा अबौद्ध हिंदूंनीं चांगलासा सत्कार केला नाहीं, व त्यामुळें त्यांना प्रवासांत बऱ्याच अडचणी सोसाव्या लागल्या. ही हकीकत मेघवर्ण राजाला कळल्यावर त्यानें समुद्रगुप्ताकडे मोठमोठे नजराणे देऊन वकील पाठविले, व गयेस एक मोठा मठ बांधण्याची परवानगी मागितली. समुद्रगुप्तानें ही परवानगी आनंदानें दिली व तदनुसार गया येथें बोधिवृक्षाजवळ ३०–४० फूट उंचीची तीन मजली इमारत बांधली गेली. ह्युएनत्संगानें सातव्या शतकांत जेव्हां या मठाला भेट दिली त्या वेळीं तेथें महायान पंथांतील स्थविर मताचे एकहजार भिक्षू होते.

याप्रमाणें चारीहि दिशांनीं दिग्विजय केल्यावर हिंदुस्थानांतील प्राचीन पद्धतीप्रमाणें समुद्रगुप्तानें अश्वमेध यज्ञ करून ब्राह्मणांनां मोठाल्या देणग्या दिल्या. त्या वेळीं अग्निकुंडापुढें यज्ञिय अश्व उभा आहे असें चित्र असलेलीं जीं सोन्याचीं पदकें त्यानें ब्राह्मणांनां दिलीं त्यांपैकीं थोडीशीं हल्लीं सांपडलीं आहेत. या अश्वमेधाचें दुसरें स्मारक उत्तरअयोध्या प्रांतांत सांपडलेल्या पाषाणावर कोरलेली अश्वाची मूर्ति हें होय. या स्मारकावर एक लेखहि खोदलेला असून तो हल्लीं लखनौ म्यूझिअममध्यें ठेविलेला आहे. उपर्युक्त राजकवीनें केलेलें समुद्रगुप्ताचें गुणवर्णन अतिशयोक्तीचें आहे. तथापि हा राजा संगीतनिपुण होता याबद्दल तरी निदान संशय नाहीं. कारण, या वर्णनास हातांत तंतुवाद्य घेऊन बसलेली राजाची मूर्ति असलेलीं जीं सोन्याचीं नाणीं सांपडतात त्यांनीं पुष्टि मिळते. संगीत कलेशीं संबद्ध असलेली

काव्यकलादि या अष्टपैलू राजाला अवगत होती. शिवाय त्याला मोठमोठे विद्वान् जमवून त्यांच्या सभेंत धर्मतत्वांवर वादविवाद करण्याची आवड असे. समुद्रगुप्त आणि त्याचा राजकवि यांची तुलना अकबर बादशहा आणि त्याचा चरित्रकार अबुल फजल यांच्याशीं करण्यास हरकत नाहीं. दुर्दैवानें त्याची नाण्यावरील मूर्ति स्पष्ट नसल्यामुळें त्याच्या स्वरूपाबद्दल नीटशी कल्पना करतां येत नाहीं. हा प्राचीन हिंदु सम्राट सुमारें पन्नास वर्षें मोठ्या भरभराटींत राज्य करून इ. स. ३७५ च्या सुमारास मरण पावला.

दुसरा चंद्रगुप्त इ. स. ३७५–४१३—याला बापाच्या हयातींतच युवराजपद मिळून प्रत्यक्ष राजकारभाराची जबाबदारी उचलावी लागली होती. त्यानें राज्यावर आल्यावर विक्रमादित्य ही पदवी धारण केली. त्याच्या राज्यारोहणाचें साल अद्याप निश्चित झालेलें नाहीं तथापि नाणीं आणि शिलालेख यांच्या सहाय्यानें इ. स. ३७५ हें सालच अखेर नक्की ठरेल अशी खात्री वाटते. चंद्रगुप्तविक्रमादित्यानें माळवा व गुजराथमधून चाल करून, बरीच शतकें परकी शक लोकांच्या ताब्यांत असलेलें सुराष्ट्र उर्फ काठेवाड जिंकून घेतलें. माळवा आणि सुराष्ट्र हे प्रांत चांगले सुपीक व सुसंपन्न होते; आणि पश्चिमकिनाऱ्यावरील बंदरें हातीं आल्यामुळें समुद्रावरून हिंदुस्थानचा इजिप्तच्या मार्गानें यूरोप बरोबर चालणारा व्यापार दुसऱ्या समुद्रगुप्ताच्या हातीं आला. अलेक्झांड्रियांतील व्यापाऱ्यांनीं आणलेल्या मालाबरोबर चंद्रगुप्ताच्या दरबारावर व प्रजाजनांवर यूरोपीय कल्पनांचा परिणाम होऊं लागला. अशारीतीनें वाङ्मय, कलाकौशल्य आणि शास्त्रें यांवर गुप्तराजांच्या कारकीर्दींत परकीय संस्कृतीचा जो परिणाम झाला त्याचें वर्णन पुढें येईल.

या काळांत पश्चिमेकडील दोन ठिकाणचे क्षत्रप विशेष बलाढ्य होते. त्यांपैकीं एक महाराष्ट्रांतील नाशिक ही राजधानी असलेले क्षहरात क्षत्रप असून यांनीं आपली सत्ता इसवी सनाच्या पहिल्या शतकांत स्थापन केली. परंतु ती इ.स. १२६ च्या सुमारास आंध्र राजा गौतमीपुत्र यानें नष्ट केली, व तो प्रदेश आंध्र राज्यास जोडला. दुसरी क्षत्रपी सत्ता माळव्यांतील उज्जनी येथें इसवी सनाच्या पहिल्या शतकाच्या अखेरीस शक चष्टनानें स्थापिली व चष्टनाचा नातु पहिला रुद्रदामा यानें इ. स. १२६ ते १५(?) यांच्या दरम्यान गौतमीपुत्राचा मुलगा दुसरा पुलुमायी याच्यापासून गौतमीपुत्रानें नाशिकच्या क्षहरातांपासून जिंकून घेतलेला बहुतेक सर्व प्रदेश जिंकून घेतला व इतर बाजूंनीहि आपल्या सत्ताक्षेत्राची व्याप्ति पुष्कळ वाढविली. याप्रमाणें पहिल्या रुद्रदामाची सत्ता सुराष्ट्र, माळवा, कच्छ, कोंकण, व इतर बऱ्याच जिल्ह्यांवर म्हणजे बहुतेक पश्चिम हिंदुस्थानवर स्थापन झाली. चष्टन व तदुत्तर राजे यांची राजधानी उज्जनी हें प्राचीन काळांतील एक मोठें प्रसिद्ध शहर होय. पश्चिम किनाऱ्यावरील बंदरें व अंतर्भागांतील प्रसिद्ध ठिकाणें यांच्या मधील व्यापारी संबंध जोडून देणारें उज्जनी हें मध्यवर्ती ठिकाण फार महत्वाचें होतें. त्याप्रमाणें प्राचीन संस्कृतविद्येचेंहि तें केंद्रस्थान होतें व हिंदुस्थानांतील मध्यवर्ति ठिकाण समजून तेथून यूरोपांतील सांप्रतच्या ग्रीनिच शहराप्रमाणें पूर्वपश्चिम रेखांश मोजण्यांत येत असत. उज्जयिनीचें विषुववृत्तापासून अंतर "निरक्षदेशात् क्षितिषोडशांशे भवदेवंती गणितेनयस्मात्" या श्लोकपादांत दिलेलें आहे. अशी सुप्रसिद्ध राजधानी असलेल्या राज्याचा या वेळीं रुद्रसिंह हा क्षत्रप होता. हें बलाढ्य व सुसंपन्न पण परकी अमलाखालील राज्य नष्ट करून तो मुलुख आपल्या राज्यास जोडण्याच्या हेतूनें दुसऱ्या चंद्रगुप्तानें त्याच्यावर स्वारी केली, रुद्रसिंहाला पदच्युत करून ठार मारलें, आणि तो मुलुख आपल्या साम्राज्यास जोडला. या परकी क्षत्रपाची अपकीर्ति करणारी अशी एक दंतकथा आहे कीं, 'हा शकांचा राजा दुसऱ्या एका माणसाच्या बायकोशीं प्रेमयाचना करीत असतां व चंद्रगुप्त आल्यामुळें भिऊन त्या स्त्रीच्या अंगावरील वस्त्राखालीं लपला असतां ओढून काढून चंद्रगुप्तानें त्याला ठार मारलें.' अर्थात् या दंतकथेंत ऐतिहासिक सत्य असेलसें दिसत नाहीं. सदरहू राजाचा अंत इ. स. ३८८ नंतर लवकरच झाला.

दुसऱ्या चंद्रगुप्तानें सुमारें चाळीस वर्षें राज्य केलें. गुप्तराजे पाटलिपुत्र ही राजधानी बाजूला असल्यामुळें प्राचीन अयोध्याशहरीं मधून मधून राहूं लागले व त्यामुळें पाटलिपुत्र नगरीचें महत्व कमी झालें आणि पांचव्या शतकांत या अयोध्या नगरीलाच अधिक महत्त्व होतें. शिवाय समुद्रगुप्तानें ज्यावर आपल्या कारकीर्दींतील हकीकत लिहून ठेविली तो अशोकाचा स्तंभ कौशांबी नगरी येथें होता असें मत आहे. या शहरींहि गुप्त राजे कधीं कधीं राहत असत व त्यामुळें त्या नगरीला तात्पुरतें राजधानीचें स्वरूप येत असें. चंद्रगुप्तविक्रमादित्यानंतरचे गुप्त राजे मात्र पाटलिपुत्र येथेंच कायम राहिल्यामुळें सहाव्या शतकांत हूणांच्या स्वारीपर्यंत पाटलिपुत्र हें शहर चांगलें भपकेदार व लोकांनीं गजबजलेलें होतें. इ. स. ६४० मध्यें चिनी प्रवाशी हुएनत्संग तेथें गेला तेव्हां या शहराचा बराचसा भाग नाश होऊन पडलेला त्यास दिसला व सुमारें १००० लोकवस्तीच्या, गंगेच्या कांठीं असलेल्या व तट असलेल्या लहान शहराखेरीज बाकी सर्व ओसाड प्रदेश पडला होता असें त्यानें लिहून ठेविलें आहे. पुढें हर्ष राजानें आपल्या कारकीर्दींत (६१२–४७) या प्राचीन राजधानीचें पुनरुज्जीवन न करतां गंगा व यमुना या नद्यांमध्यें वसलेल्या कनोज शहरीं आपली राजधानी स्थापिली. पुढें बंगाल व बहार प्रांतांतील पाल राजांपैकीं सर्वांत बलिष्ठ राजा धर्मपाल यानें पाटलिपुत्रनगर चांगलें बनवलें. कारण इ. स. ८११ च्या सुमारास तेथें तो दरबार भरवून राज्य कारभार पहात असे अशी निश्चित माहिती मिळते. तथापि नंतर लवकरच पुन्हां पाटलिपुत्र

नगर मागें पडून १५४१ पर्यंत त्याचें नांव इतिहासांत ऐकूं येत नाहीं. पुढें शेरशहानें युद्धविषयक हालचालींच्या सोयीच्या दृष्टीनें या शहराचें महत्त्व लक्षांत घेऊन तेथें एक किल्ला बांधिला व तेव्हांपासून हें नवें पाटणा शहर चांगलें भरभराटींत आहे. १९१२ पासून बहार ओरिसा प्रांताची राजधानी पाटणाशहर झालें आहे व पाटणाशेजारचें बंकीपूर हें ठिकाण खुद्द प्राचीन पाटलिपुत्र नगरीच्या एका भागावर वसलेलें आहे.

पहिला चिनी प्रवाशी फाहिआन.—याच चंद्रगुप्ताच्या कारकीर्दींत चीनमधील पहिला प्रवासी फा-हिआन हा हिंदुस्थानांत येऊन बौद्धग्रंथ, कथा, व चमत्कार यांचें ज्ञान मिळविण्याकरितां सहा वर्षें ( इ. स. ४०५-४११ ) राहिला होता. त्यानें आपल्या प्रवासवर्णनांत लिहून ठेविलेल्या वर्णनावरून हिंदुस्थानांतील तत्कालीन परिस्थितीची चांगली कल्पना येते. विक्रमादित्याच्या साम्राज्यांतील लोक शांततेंत, सुखांत व भरभराटींत होते असें त्यावरून स्पष्ट दिसतें. पाटलिपुत्र येथील अशोकाचा राजवाडा पाहून त्याच्या मनावर फार परिणाम झाला. तो मनुष्यकृति नसून बादशहाला वश असलेल्या पिशाच्चांनीं तो बांधला अशी समजूत होती. तेथेंच अशोकाचा म्हणून प्रसिद्ध असलेला एक स्तूप होता व त्याच्या शेजारीं दोन मोठाले मठ असून त्यांपैकीं एकांत महायानपंथाचे व दुसऱ्यांत हीनयानपंथाचे मिळून एकंदर सहासातशें चांगले विद्वान् भिक्षू होते. तेथें तीन वर्षें राहून फाहिआननें संस्कृत भाषेचा व अनेक बौद्धग्रंथांचा अभ्यास केला. मगधांतील शहरेंहि चांगलीं संपन्न होतीं. देणग्यांवर चाललेल्या संस्था पुष्कळ होत्या, प्रवाशांनां उतरण्याकरितां धर्मशाळा मोठाल्या रस्त्यावर जागजागीं होत्या, व राजधानीच्या शहरीं मोठा मोफत दवाखाना होता. त्यांत " सर्व गरीब व निराश्रित अशा लोकांस आजारीपणांत औषधपाणी देण्याची व शुश्रूषा करण्याची उत्तम सोय होती " असें फा—हिआन लिहितो. सिंधूनदीपासून यमुनेच्या कांठच्या मथुरानगरीपर्यंत जागजागीं अनेक मोठाल्या मठांत हजारो भिक्षू राहत असलेले त्याला आढळले व त्यावरून बौद्धधर्माची लोकप्रियता त्या प्रांतांत वाढत होती असें दिसतें. मथुरेच्या दक्षिणेकडील माळव्याचा प्रदेश हवापाण्याच्या, लोकस्थितीच्या व राजकारभाराच्या दृष्टीनें या चिनी प्रवाशाला फारच आवडला. चिनीदेशाच्या मानानें हिंदुस्थानांत प्रवाशास वाटेल तिकडे जाण्यायेण्यास फार मोकळीक असे, फौजदारी कायदा सौम्य होता, पुष्कळशा गुन्ह्यांना दंडाची शिक्षा असे, व फांशीची शिक्षा बहुतेक कधींच होत नसे, सरकारी अधिकाऱ्यांचे पगार ठरलेले असल्यामुळें त्यांचा रयतेवर जुलूम होत नसे, वगैरे अनेक गोष्टी पाहून फा हिआननें समाधान व्यक्त केलें आहे. तो म्हणतो, ' या सर्व देशांत कोणी कोणताहि हिंसा करीत नाहीं, दारू पीत नाहीं, कांदे किंवा लसूण खात नाहीं. कोणी कोंबड्याबदकें पाळीत नाहीं, गुरें विकीत नाहीं, बाजारांत खाटकांची दुकानें किंवा दारू गाळण्याच्या भट्या नाहींत." चलनामध्यें कवड्या होत्या, बौद्ध मठांना राजाकडून मोठाल्या देणग्या होत्या, व बौद्ध भिक्षूंना अन्न, वस्त्र वगैरे सर्व प्रकारची भिक्षा निःसंकोचपणानें मिळत असे.

या एकंदर वर्णनावरून चंद्रगुप्त विक्रमादित्याचा राज्यकारभार फार चांगला होता व लोक सुखी होते हें स्पष्ट दिसतें. सदरहू चिनी प्रवाशाला पाटलिपुत्र येथें तीन वर्षें व ताम्रलिप्ति ( तमलूक ) येथें दोन वर्षें संस्कृतचा अभ्यास निर्वेध करतां आला व वाटेनें प्रवासांतहि कोठें चोरादिकांचें संकट आलें नाहीं. उलटपक्षीं सातव्या शतकांतला चिनी प्रवाशी ह्युएनत्संग यानें प्रवासांत संकटें आल्याचें नमूद केलें आहे. यावरून प्राचीन पौरस्त्य पद्धतीची चंद्रगुप्ताची अमदानी शेवटची होय. सरकार प्रजेवर शक्य तितके कमी निर्बंध ठेवून लोकांना मोकळीक फार देत असे व त्यामुळें सरकार लोकप्रिय असे. बौद्ध, जैन वगैरे कोणाचाहि धर्मछळ होत नसे, असें बौद्ध संप्रदायभक्त फा—हिआन स्वतः म्हणतो. पण ब्राह्मणी गुप्त राजांच्या कारकीर्दींत बौद्ध धर्माला उतरती कळा लागून ब्राह्मणधर्माचें वर्चस्व पुन्हा प्रस्थापित होण्यास सुरुवात झाली होती, ही गोष्ट मात्र या चिनी प्रवाशाच्या लक्षांत आली नव्हती असें दिसतें. शिवाय गया शहर रिकामें निर्जन झालें होतें, तेथून सहा मैलावरचें बौद्ध—गया हें ठिकाण जंगलानें व्यापलें होतें, राप्ती नदीच्या कांठचें मोठें शहर श्रावस्ती, येथें फक्त दोनशें कुटुंबेंच उरलीं होतीं. आणि कपिलवस्तु व कुशिनगर हीं पवित्र स्थानें पूर्ण ओसाड पडलीं होतीं फक्त क्वचित् कोठें थोडे भिक्षू राहत असत. या स्थानांची अशी स्थिति होण्याचीं कारणें कळत नाहींत.

**कुमारगुप्त ( ४१३—४५५ ).**—विक्रमादित्यानंतर त्याचा मुलगा पहिला कुमारगुप्त इ. स. ४१३ मध्यें गादीवर आला. त्यानें चाळीसाहून अधिक वर्षें राज्य केलें पण त्याच्या कारकीर्दींतील गोष्टींची माहिती नाहीं. शिलालेख व नाणीं यावरून एवढें मात्र ठरतें कीं, यांच्या दीर्घ कारकीर्दींत साम्राज्याचा विस्तार मुळींच कमी झाला नव्हता. उलटपक्षीं ज्याअर्थी त्यानेंहि अश्वमेध यज्ञ केला त्याअर्थी त्यानें कांहीं नवीन दिग्विजय केला असावा. मात्र या कारकीर्दीच्या अखेरीस म्हणजे इ. स. ४५० च्या सुमारास परकी हूण लोकांनीं हिंदुस्थानावर स्वारी केल्यामुळें हें गुप्तसाम्राज्य लयास गेलें.

**गुप्त साम्राज्यकालीन परिस्थिति.**— ख्रिस्ती शकारंभाच्या पूर्वी दोन शतकें व नंतर दोन शतकें उत्तरहिंदुस्थान, काश्मीर, अफगाणिस्तान व सुवात इतक्या प्रदेशांत बौद्धधर्म बऱ्याच प्रमाणांत पसरलेला होता ही गोष्ट त्या काळांतील बुद्धाच्या अनेक स्मारकांवरून व शिला-

लेखावरून स्पष्ट दिसतें. बौद्धधर्माशीं विशेष सदृश असा जो जैनधर्म तो मात्र विशेष पसरलेला नव्हता. तथापि मथुरा वगैरे कांहीं विशिष्ट स्थळीं त्याचे अनुयायी पुष्कळ होते. या चार शतकांत बौद्धधर्माचा पगडा उत्तरहिंदुस्थानांत मोठा होता, तथापि जुना हिंदुधर्म व त्यांतील यज्ञयाग पूर्णपणें नष्ट झाले नव्हते. दुसरा कडफिसेस या परकी कुशान राजालाहि हिंदुधर्मानें वश करून घेऊन त्याला शिवाची भक्ति करण्यास लाविलें होतें. बौद्धधर्माच्या महायानपंथांत जातिसंस्थाविहीन अशा परकीयांच्या मनांमध्यें पूज्यभाव उत्पन्न होण्यासारख्या गोष्टी होत्या आणि कनिष्क व तदनंतरचा हुविष्क या परकी राजांनीं बौद्धांच्या मठादि संस्थांना सढळ हातानें देणग्या दिल्या होत्या. पण दुसरा कॅडफिसेस राजा पुन्हां हिंदुधर्माकडेच वळला; तसेंच सुराष्ट्र येथील शक क्षत्रपांनींहि हिंदुधर्म व ब्राह्मणांची संस्कृत विद्या यांनांच आश्रय दिला. शिवाय महायानपंथ व हिंदुधर्म यांच्यामध्यें कित्येकदेवतांच्या बाबतींत इतकें साम्य आहे कीं कोणत्या देवतेचा कोणत्या धर्मपंथांत अन्तर्भाव होतो हें ठरविणें चांगल्या तज्ज्ञांनाहि कठीण पडतें. याला कारणें काय झालीं हें अद्याप नक्की समजत नाहीं. परंतु येवढें खरें कीं, खिस्तोत्तर दुसऱ्या शतकांत ब्राह्मणीधर्म व संस्कृत भाषा यांनां पुन्हां चढती कळा लागली. तिसऱ्या शतकांत गुजराथ व सुराष्ट्र येथील परकी क्षत्रपांनींसुद्धां त्यांचा पुरस्कार केला आणि चवथ्या व पांचव्या शतकांत तर गुप्त सम्राटांनीं हिंदुधर्माचा अम्मल पूर्ववत् सर्वत्र बसविला. गुप्त राजे बौद्ध व जैन धर्मीयांनां पूर्ण सहिष्णुतेनें वागवीत असत, पण ते स्वतः पक्के हिंदु होते, संस्कृत भाषेचे व पंडितांचे आश्रयदाते होते व ब्राह्मणांच्या सल्ल्यानें चालणारे होते. बौद्धांचा यज्ञयागनिषेध खोटा ठरवून त्यांनीं अश्वमेधासारखे यज्ञ पुन्हां सुरू केले, तात्पर्य गुप्तांच्या कारकीर्दींत बौद्धधर्म मागें पडून ब्राह्मणी हिंदुधर्म पुन्हां चांगला बळावला.

गुप्तांच्या काळांत संस्कृत वाङ्मयांत चांगली भर पडली. चंद्रगुप्तविक्रमादित्यानें उज्जनी जिंकून घेतली होती उज्जनींतील विक्रमराजाच्या दरबारीं कालीदासादि नऊ विद्वद्रत्नें होतीं अशी आख्यायिका आहे. अर्थात् कालीदास हा श्रेष्ठ कवि खिस्तोत्तर पांचव्या शतकांतील होय. तसेंच मृच्छकटीक, मुद्राराक्षस, वायुपुराण, मनुस्मृति वगैरे ग्रंथहि याच गुप्तकाळांतील होत असें व्हिन्सेंट स्मिथचें मत आहे. गणित व ज्योतिष या शास्त्रांतील प्रसिद्ध ग्रंथकार आर्यभट्ट व वराहमिहिर हेहि याच काळांतले होत.

ललित वाङ्मय व शास्त्रीय वाङ्मय याप्रमाणें कलाकौशल्यहि चांगलें वाढलेलें या काळांत दृष्टीस पडतें. समुद्रगुप्त स्वतः संगीताचा ज्ञाता व चहाता होता. संगीताप्रमाणें शिल्पकला, चित्रकला, मूर्तिकला यांचीं अनेक उत्तम कामें या काळांत झालीं. परंतु पुढें मुसुलमानांच्या अनेक हल्ल्यांत तीं बहुतेक नष्ट होऊन गेलीं. तथापि अलीकडील संशोधनांत त्या काळांतले पुष्कळ अवशेष उपलब्ध होत आहेत. त्यांवरून गुप्त घराण्याचे वेळीं सर्वच प्रकारचे बौद्धिक हुशारीचे व्यवसाय फारच जोमांत होते असें नक्की ठरतें. हिंदुधर्माभिमानी, विद्वान् व रसिक अशा गुप्तराजांनीं दिलेला आश्रय हें या उत्कर्षाचें एक कारण आहे. तथापि इतिहासाचा असा अनुभव आहे कीं, परस्पर भिन्न अशा संस्कृतींचा संबंध व झगडा जेथें सुरू असतो तेथें बौद्धिक व कलाविषयक प्रगति झपाट्यानें होते, आणि गुप्तांच्या वेळची प्रगति याच कारणानें झाली. त्या वेळीं एकीकडे चीन देश व दुसरीकडे रोमन साम्राज्य यांच्याशीं हिंदुस्थानचा संबंध येऊन चिनी व ग्रीकोरोमन संस्कृतींचा परिणाम होऊं लागला. या स्पर्धेमुळें हिंदुसंस्कृतीचें पुनरुज्जीवन झालें व त्याबरोबर परकी संस्कृतींतील ज्ञानाची कांहीं भर हिंदुशास्त्रें व कला यांत पडली. (ज्ञानकोश पहिला विभाग पृष्ठ ३२५).

**पुढील गुप्त राजे व हूणांच्या स्वाऱ्या.**—इ.स. ४५५पर्यंत गुप्त साम्राज्याची अधिकाधिक भरभराट होत गेली, पण नंतर त्याला हूणांच्या स्वाऱ्यांमुळें उतरती कळा लागली. पहिला कुमारगुप्त याच्या कारकीर्दींतच ४५० मध्यें पुष्यमित्र नांवाच्या बलिष्ठ राजानें गुप्त सम्राटांच्या सैन्याचा पराभव केला. या धक्क्यामुळें डळमळूं लागलेलें गुप्त साम्राज्य पुढील सम्राट स्कंदगुप्त (इ.स.४५५–४८०) यानें ४५५ पूर्वींच पुष्यमित्र या शत्रूचा पराभव करून सावरून धरलें. परंतु तो राज्यावर आल्यानंतर लवकरच रानटी हूण लोकांनीं मध्य आशियांतून खालीं उतरून हिंदुस्थानावर स्वारी केली. तथापि या हूणांचाहि पराभव करून स्कंदगुप्तानें हिंदुस्थानचें संरक्षण केलें. हें युद्ध ४५८ पूर्वींच झालेलें असावें, कारण ४५८ मधील एका शिलालेखांत स्कंदगुप्ताच्या या विजयाचा उल्लेख आहे. पाटणा पासून ९० मैलांवर असलेल्या गोरखपुर जिल्ह्यांतील एका गांवीं असलेल्या एका स्तंभावरील लेखांत स्कंदगुप्ताचें साम्राज्य पूर्व व पश्चिम दोहोंकडील प्रांतांत पसरलें होतें असें लिहिलें आहे. तथापि पुढें इ.स. ४६५मध्यें हूणांची दुसरी टोळी हिंदुस्थानाकडे चालून आली व तिनें गंधार (वायव्य पंजाब) देश घेऊन कुशान राजाला पदच्युत केलें. नंतर इ.स.४७०चे सुमारास हूणांनीं हिंदुस्थानांत शिरून गुप्तांच्या साम्राज्यावर पुन्हां हल्ला केला. नव्या नव्या टोळ्यांची भरती होत जाऊन हूणांनीं वाढत्या सैन्यानिशीं अनेक हल्ले केल्यामुळें गुप्त सम्राटाचा पराभव झाला, व लढायांच्या खर्चामुळें पैशाची इतकी अडचण झाली कीं, स्कंदगुप्तानें हलक्या दर्जाचें नाणें पाडलें. पूर्वी प्रत्येक नाण्यांत शुद्ध सोन्याचें प्रमाण १०८ ग्रेन होतें तें ७३ ग्रेन पर्यंत उतरत गेलें.

स्कंदगुप्त ४८० मध्यें मरण पावला व साम्राज्यावरील संकटास तोंड देण्यास लायक असा पुत्र नसल्यामुळें स्कंदगुप्ताचा भाऊ पुरगुप्त यानें ४८० ते ४८५ पर्यंत राज्य केलें. त्यानें हलकीं नाणीं सुधारून पुन्हां पूर्ववत् केलीं. या वेळीं साम्राज्याचा विस्तार नष्ट होऊन मगध व शेजारच्या प्रांतांवरच कायतो गुप्तांचा अम्मल चालू राहिला. पुरगुप्तानंतर

त्याचा मुलगा नरसिंहगुप्त बालादित्य यानें इ.स. ४८५ ते ५३५ पर्यंत राज्य केलें. तो बौद्ध धर्माचा पक्षपाती होता याला पुरावा असा आहे कीं, मगध देशांतील नालंद येथे त्यानें ३०० फूट उंचीचें विटांचें बौद्धपंथी देवालय बांधिलें. त्याच्या कारकीर्दीतहि हूणांचे हल्ले झाले व त्यांना बालादित्यानें यशस्वी रीतीनें तोंड दिलें. बालादित्यानंतर त्याचा मुलगा दुसरा कुमारगुप्त राज्यावर आला. त्याच्या कारकीर्दीचा माहिती सांपडत नाहीं. गुप्तसम्राटांच्या घराण्यापैकीं हा शेवटचा होय. यानंतर गुप्तांचें एक दुय्यम दर्जाचें राजघराणें चालू होतें. त्यांत अकरा राजे झाले, ते फक्त मगधावर राज्य करणारे स्थानिक राजे होते. शिवाय मगधांतच त्या वेळीं नांवाला वर्मन् हा प्रत्यय असलेले मौखरी जातीचें राजघराणें राज्य करीत असे. या दोन घराण्यांत कधीं शत्रुत्व तर कधीं मित्रत्व असे. याप्रमाणें मगधाचें साम्राज्यवैभव नष्ट झालें तरी बौद्धपंथी विद्येचें केंद्रस्थान ह्या नात्यानें नालंदाचें व इतर कित्येक स्थानांचें महत्त्व कायम होतें. पुढें बाराव्या शतकांत येथील अनेक बौद्ध मठांचा व त्यांतील ग्रंथसंग्रहांचा मुसुलमानांनीं जाळून नाश केला. उत्तर कालीन गुप्त राजांच्या वेळीं मगधाचें बौद्धधर्मदृष्ट्या महत्त्व होतें याला पुरावा असा आहे कीं, इ.स.५३९मध्यें चीनांतील लिआंग घराण्याचा पहिला बादशाह व कट्टा बौद्धधर्माभिमानी वु-ति ऊर्फ सिआंयेन यानें हिंदुस्थानांतून महायान पंथाचे ग्रंथ व त्यांचें भाषांतर करण्यास विद्वान पंडित मिळवून आणण्याकरितां एक चिनी भिक्षुमंडळ मगधदेशीं पाठविलें होतें.त्याला मगधांतील तत्कालीन राजा, बहुधा पहिला जीवितगुप्त किंवा कुमारगुप्त, यानें चांगली मदत केली. परमार्थ नांवाचा विद्वान त्या मंडळाच्या मदतीला दिला व कित्येक वर्षे हिंदुस्थानांत राहिल्यानंतर बरेच हस्तलेख व उपर्युक्त विद्वान परमार्थ यास बरोबर घेऊन तें मंडळ चीनला परत गेलें. परमार्थ इ.स. ५४६ पासून ५६९ पर्यंत चीनमध्यें राहून त्या सालीं तेथेंच मरण पावला. याच चिनी बादशहाच्या कारकीर्दींत दक्षिणहिंदुस्थानांतील एका राजाचा मुलगा बोधिधर्म हा ५२० मध्यें चीनमध्यें जाऊन राहिला. त्यानें केलेले अद्भुत चमत्कार हा चिनी चित्रकारांचा आवडीचा विषय आहे.

उत्तर कालीन गुप्त राजांपैकीं अत्यंत प्रसिद्ध राजा आदित्यसेन हा होय. यानें सम्राट हर्ष इ. स. ६४७ त मरण पावल्यावर स्वतंत्र होऊन सार्वभौमत्वाचें लक्षण म्हणून अश्वमेध यज्ञहि केला. या घराण्यांतला शेवटचा ज्ञात राजा दुसरा जीवितगुप्त हा आठव्या शतकाच्या आरंभींच्या काळांत राज्यावर होता, आणि नंतर आठव्या शतकाच्या अखेरीस किंवा नवव्याच्या आरंभीं मगध देश बंगालच्या पाल राजांच्या अमलाखालीं गेला.

**सुराष्ट्रां [ काठेवाडां ] तील वलभी येथील राजघराणें.**—पांचव्या शतकाच्या अखेरीस मैत्रक नांवाच्या, बहुधा परकी असलेल्या जातीच्या, भट्टारक नांवाच्या पुढाऱ्यानें सुराष्ट्राच्या पूर्वभागांतील वलभी येथें राज्य स्थापलें. हें राजघराणें इ. स. ७७० पर्यंत टिकलें. नंतर अरबांच्या स्वाऱ्यामुळें तें नष्ट झालें असें वाटतें. प्रथम वलभीचे राजे स्वतंत्र नव्हतेसें दिसतें, कारण ते हूणांना खंडणी देत असत. पण हूणांची सत्ता नष्ट झाल्यावर स्वतंत्र होऊन पश्चिम हिंदुस्थानांत त्यांनीं मोठें बलिष्ठ राज्य बनविलें. सातव्या शतकांत ह्य-एन-त्संगानें या शहराला भेट दिली होती. याच सुमाराचा इत्सिंग हा चिनी प्रवाशी म्हणतो कीं, त्या वेळीं नालंद व वलभी दोनच ठिकाणें विद्येच्या बाबतींत चीनांतील मोठमोठ्या शहरांच्या बरोबरीचीं होतीं. ह्य-एन-त्संगानें याच अर्थाचा उल्लेख केला आहे. पुढें वलभीचें राज्य नष्ट झाल्यावर अनहिलवाडा व त्यानंतर पंधराव्या शतकापासून अहमदाबाद, हीं ठिकाणें महत्त्वास चढलीं.

**हूण राजे तोरमाण व मिहिरगुल.**—गुप्त सम्राट स्कंदगुप्त ( इ. स. ४५५-८० ) याच्या वेळेपासून हल्ले करून हळूहळू गुप्त साम्राज्य ज्या हूण लोकांनीं संपुष्टांत आणलें, ते रानटी लोक प्रथम मध्य आशियांतील मैदानांतून निघून इ. स. ३७५ च्या सुमारास पश्चिमेकडे आशियांतील ऑक्झस नदीकडील प्रदेशांत व यूरोपांतील व्होलगा व डॅन्यूब नदीकडील प्रदेशांत विभागून गेले. यूरोपांत गेलेल्या हूण लोकांचा एक पराक्रमी पुढारी ॲटिला यानें तिकडे मोठें साम्राज्य स्थापन केलें पण तो इ. स. ४५३ मध्यें मरण पावल्यावर १०।२० वर्षांत हें हूणांचें साम्राज्य लयास गेलें. आशियांत ऑक्झस नदीकडील प्रदेशांत हूणांचें साम्राज्य अधिक काळ टिकलें. या पांढऱ्या हूणांच्या टोळ्यांनीं काबूलांतील कुशान राज्यावर हल्ला केला व नंतर त्या टोळ्या हिंदुस्थानांत शिरल्या. त्यांनीं हिंदुस्थानावर इ. स. ४५५ मध्यें केलेला पहिला हल्ला स्कंदगुप्तानें परत फिरविला. पुढें १० वर्षांनीं गंधार (पेशावर) च्या राज्यावर हल्ला करून नंतर त्यांनीं हिंदुस्थानावर दुसरा हल्ला केला, व गुप्त साम्राज्य नष्ट केलें. या वेळचा हूणांचा पुढारी तोरमाण या नांवाचा होता. त्यानें इ. स. ५०० पूर्वी मध्यहिंदुस्थानांतील माळवा येथें राज्य स्थापिलें व हिंदू राजांच्या पद्धतीप्रमाणें "महाराजांचा राजा" अशी पदवी धारण केली. वलभीचा राजा व दुसरे कित्येक स्थानिक राजे याला खंडणी देत असले पाहिजेत असें दिसतें. हा हूण राजा तोरमाण इ. स. ५१० मध्यें मरण पावल्यावर त्याचा मुलगा मिहिरगुल राज्य करूं लागला. त्याची राजधानी पंजाबांत स्याकल(अर्वाचीन सिआलकोट) येथें होती. त्याकाळीं हूणांचें साम्राज्य हिंदुस्थानाबाहेर इराणपासून खोतानपर्यंत दूरवर पसरलेलें होतें. या हूण बादशहाच्या दरबारीं सोंगयुन नांवाचा चिनी प्रवासी-वकील इ. स. ५१९ मध्यें गेला होता. या हूणांच्या बादशहाला एकंदर ४० देशांचे राजे खंडणी देत असत. याच सुमारास कॉस्मस इंडिकोप्लुस्टस नांवाच्या भिक्षूनें हिंदुस्थानांतील गोल्लस नांवाच्या पांढऱ्या हूण राजाचें वर्णन

लिहून ठेवलें आहे. हा हूण राजा आपल्या सैन्यांतील दोन हजार लढाउ हत्ती व घोडेस्वारांचें मोठें सैन्य यांच्या बळावर जुलमानें खंडणी वसूल करीत असे असें तो लिहितो. हा हूण राजा मिहिरगुलच असला पाहिजे. यूरोपांत हूणांचा पुढारी ॲट्टिला याची क्रूरपणाबद्दल जशी प्रसिद्धि आहे तशीच हिंदुस्थानांत मिहिरगुल याची आहे. परंतु हिंदू ग्रंथकारांनीं या रानटी हूणांच्या क्रूर कृत्यांचीं वर्णनें दिलीं नाहींत. तथापि हूणांचा जुलुम इतका असह्य झाला कीं, हिंदुस्थानांतील अनेक देश्य राजांनीं मगधाचा राजा बालादित्य ( नरसिंहगुप्त ) आणि मध्यहिंदुस्थानचा राजा यशोधर्मन् यांच्या नेतृत्वाखालीं संघ बनवून हूणांशीं लढण्याची तयारी केली व इ. स. ५२८ मध्यें मिहिरगुलचा पूर्ण पराभव करून त्याला कैद केलें आणि हिंदुस्थान् देशाला परकीयांच्या जुलमांतून सोडविलें. मिहिरगुलाला मात्र ठार न मारतां बालादित्यानें मोठ्या थोर मनानें सोडून देऊन उत्तरेकडे त्याच्या देशास सन्मानानें परत पाठविलें. मध्यंतरी मिहिरगुलाचें साकलाचें राज्य त्याच्या धाकट्या भावानें बळकाविलें तें तो परत देईना म्हणून मिहिरगुल काश्मीरच्या राजाच्या आश्रयास गेला. तेथें काश्मीरच्या राजानें मिहिरगुलाला लहानशा मुलखाचा कारभार पाहण्यास सांगितलें. या संधीचा फायदा घेऊन मिहिरगुलानें आपल्या आश्रयदात्याच्याच विरुद्ध बंड केलें आणि त्याचें सिंहासन बळकाविलें. नंतर गंधारच्या राज्यावर हल्ला करून तेथील राजास विश्वासघातानें ठार मारिलें आणि राजघराणें व लोकसमाज यांची कत्तल केली. हा मिहिरगुल शिवाचा उपासक होता व त्यानें या विनाशक देवतेप्रमाणें क्रूरपणाचीं अनेक कृत्यें केलीं व विशेषतः शांतताप्रिय व अहिंसावादी बौद्ध लोकांचे मठ व स्तूप उध्वस्त केले व त्यांतील खजिना लुटून नेला. याप्रमाणें अनेक अनर्थ करून मिहिरगुल ५४० च्या सुमारास मरण पावला. मिहिरगुलाच्या मृत्यूनंतर ऑक्झस नदीकडील पांढऱ्या हूणांची सत्ता फार दिवस टिकली नाहीं. ६ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास तिकडे तुर्क लोक चालून गेले व त्यांनीं इराणच्या राजाबरोबर दोस्ती करून पांढऱ्या हूणांचा नाश केला. व पुढें तुर्क लोकांनीं हूणांचें सर्व साम्राज्य आपल्या ताब्यांत घेतलें.

यानंतर सुमारें पन्नास वर्षें म्हणजे इ. स. ५६५ ते ६०५ पर्यंतची हिंदुस्थानांतील परिस्थितीची माहिती उपलब्ध नाहीं. हूण शब्द संस्कृत वाङ्मयांत अनेकवार आला आहे.

शिलालेखांत हूण या नांवाबरोबर गुर्जर, (अर्वाचीन गुजर,) या नांवाचा कित्येकदां उल्लेख येतो. हे गुर्जर परकी असून हूण लोकांचे ते सजातीय असावे; तसेंच राजपुतान्यांतील परिहार नांवाचीं कित्येक क्षत्रिय म्हणून मानलीं जाणारीं घराणीं मूळ बाह्य असून हूणांचे वेळीं त्यांनीं राजपुतान्यांत लहान लहान राज्यें स्थापल्यानंतर हिंदुधर्मांत शिरून क्षत्रिय बनलीं असावीं, असें व्हिन्सेंट स्मिथचें मत आहे.

**पश्चिम माळवा उर्फ मोलापोचें राज्य.**—चिनी प्रवाशी ह्युएन-त्संग इ. स. ६४१ च्या सुमारास मोलापोच्या राज्यांत गेला होता. येथील राजाच्या सत्तेखालीं आनंदपुर सुराष्ट्र व कच्छ हीं तीन मांडलिक राज्यें होतीं. शिवाय मोलापो व सुराष्ट्र यांच्यामध्यें वलभीचें राज्य होतें. मोलापो येथें शीलादित्य नांवाचा हुषार व विद्वान राजा होता. तो ह्युएनत्संग येण्यापूर्वी साठ वर्षें होऊन गेला होता. तो बौद्धधर्मी होता व त्यानें आपल्या राजवाड्याजवळ बौद्ध देवालय बांधून त्यांत सात बुद्धांच्या मूर्ति ठेवल्या होत्या. दरसाल भिक्षूंना तो मोठमोठ्या देणग्या देत असे. ती चाल ह्युएनत्संगाच्या वेळेपर्यंत चालू होती. पुढें वलभी व मोलापो हीं दोन्हीं राज्यें हर्षानें जिंकून आपल्या साम्राज्यसत्तेखालीं आणलीं. मोलापो व उज्जनी एकच असा बील वगैरे कित्येक लेखकांचा समज आहे. पण वास्तविक मोलापो उर्फ पश्चिम माळवा व उज्जनी किंवा प्राचीन अवंती उर्फ पूर्व माळवा अशीं दोन निरनिराळीं राज्यें होतीं; व दोघांचा स्वतंत्रपणें उल्लेख ह्युएनत्संगनेंहि केला आहे.

**ठाणेश्वर येथील राजघराणें.**—सहाव्या शतकाच्या उत्तरार्धांतील हिंदुस्थानचा इतिहास अज्ञात आहे. सातव्या शतकापासून मात्र ही अडचण दूर होऊन आपला ज्ञातकाळांत पुन्हा प्रवेश होतो. नाणीं, शिलालेख इत्यादि साधनांखेरीज तत्कालीन ग्रंथहि आज उपलब्ध आहेत. त्यांत चिनी प्रवाशी ह्युएनत्संग यानें लिहून ठेवलेलें प्रवासवृत्त हा ग्रंथ बहुमोल आहे. यानें इ. स. ६३० ते ६४४ यांच्या दरम्यान हिंदुस्थानांतील बहुतेक भागांत फिरून प्रत्येक राज्य व प्रांत यांचें वर्णन लिहून ठेविलें आहे. शिवाय ह्युएनत्संगचा चरित्रकार ह्वुइली यानें बरीचशी अधिक माहिती दिली आहे. दुसरा महत्त्वाचा ग्रंथ म्हटला म्हणजे बाणाचें ' हर्षचरित्र ' हा संस्कृत ग्रंथ होय.

ठाणेश्वर येथें ६ व्या शतकाच्या उत्तरार्धांत प्रभाकरवर्धन नांवाचा राजा राज्य करीत होता. पण या ठाणेश्वर येथील राजासंबंधाची माहिती सातव्या शतकापासूनची मिळते. ठाणेश्वरच्या आसपासचा प्रदेश फार प्राचीनकाळापासून 'कुरुक्षेत्र' म्हणून प्रसिद्ध आहे. सातव्या शतकाच्या आरंभीं ठाणेश्वरचा प्रभाकरवर्धन हाच उत्तर हिंदुस्थानांतील राजमंडळांत प्रमुख होता. त्यानें यापूर्वीच हूण लोकांचा पराभव केला होता. हूणांशिवाय सिंधप्रांताचा तत्कालीन राजा व राजस्थानांतील गुर्जर या प्रमुख राज्याचा अधिपति यांचाहि प्रभाकरवर्धनानें पराभव केला असून सहाव्या शतकाच्या अखेरीस त्यानें माळवा व गुजराथ येथील राजांनांहि आपलें अंकित केलें होतें. पुढें इ. स. ६०५ मध्यें हूण लोकांनीं मागील पराभवाचा सूड उगविण्याकरितां ठाणेश्वरावर चाल केली. त्यांचा पराभव प्रभाकरवर्धनाचा ज्येष्ठ पुत्र राज्यवर्धन यानें केला. इतक्यांत

प्रभाकरवर्धन मृत्यु पावला व त्याचा ज्येष्ठ पुत्र राज्यवर्धन राज्यावर आला. परंतु त्यास पुरें एक वर्ष देखील राजकारभार करावयास मिळाला नसेल. प्रभाकरवर्धनाची मुलगी राज्यश्री कनोजच्या मौखरी घराण्यांतील ग्रहवर्मा यास दिली होती. या कनोजच्या राज्यावर माळव्याचा राजा देवगुप्त यानें स्वारी करून ग्रहवर्म्यास ठार मारलें व त्याची पत्नी राज्यश्री हिला बंदींत टाकलें आणि आपला मित्र बंगालचा राजा शशांकगुप्त याच्या मदतीनें ठाणेश्वरावर हल्ला करण्याचें ठरविलें. पण शशांकगुप्त त्यास येऊन मिळण्यापूर्वीच राज्यवर्धनानें देवगुप्ताच्या सैन्याचा पराभव करून त्यास ठार मारलें. इतक्यांत देवगुप्ताचा मित्र बंगालचा शशांकगुप्त येऊन पोहोंचला. व त्यानें राज्यवर्धनाजवळ तहाचें बोलणें सुरू करून एके दिवशीं भोजनाच्याप्रसंगीं त्याचा कपटानें वध करविला. इ. स. ६०६ मध्यें ही गोष्ट घडली. प्रभाकरवर्धनाच्या मृत्यूनंतर ठाणेश्वरचें राज्य त्याचा धाकटा भाऊ हर्ष याजकडे आलें.

**हर्षवर्धन ( इ. स. ६०६–६४७ ).**—राज्यवर्धन मारला गेला त्यावेळीं हर्षाचें वय अवघें सोळा वर्षांचें होतें. त्यानें प्रथम मालवाधिपाच्या अटकेंतून आपली सुटका करून घेऊन रानावनांत पळून गेलेल्या आपल्या बहिणीचा शोध लावला व तिला कनोजच्या गादीवर बसवून आपण राजपुत्र शिलादित्य हें नांव धारण करून तो कनोज येथून कनोजचा व ठाणेश्वराचा कारभार पाहूं लागला. या पुढील सहा वर्षांत हर्षानें पूर्वेस व पश्चिमेस स्वाऱ्या करून पंजाब खेरीज करून उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक राजांवर आपलें अधिराज्य स्थापित केलें. येणेंप्रमाणें आपला दिग्विजय संपविल्यावर इ.स.६१२या वर्षी त्यानें आपल्या राज्यारंभापासून सुरू होणारा आपल्या नांवाचा शक सुरू केला. यानंतरची हर्षाची ३५ वर्षांची कारकीर्द जवळ जवळ शांततेंतच गेली. इ. स.६२०त त्यानें दक्षिणेस आपलें साम्राज्य पसरविण्याच्या उद्देशानें नर्मदेच्या दाक्षिणेस राज्य करीत असलेल्या दुसऱ्या पुलिकेशीवर स्वारी केली पण तींत त्याला पराभव पावून परत यावें लागलें. ६४३च्या पूर्वी कांहीं वर्षें त्यानें वलभीवर स्वारी करून पश्चिमेकडील राजाकडून आपलें सार्वभौमत्व कबूल करून घेतलें व६४३त बंगालच्या उपसागरावरील गंजमच्या राज्यावर स्वारी करून विजय संपादन केला. हर्ष या शेवटच्या स्वारीनंतर चारच वर्षांनीं म्हणजे इ. स. ६४७ त मरण पावला.

**हर्षकालीन सामाजिक स्थिति.**—यासंबंधीं ह्युएनत्संग म्हणतोः—

" या देशांत आनुवंशिक अशा चार भिन्न जाती आहेत. या जातींत ब्राह्मण हे अति शुद्ध व सर्वांनां बहुमान्य असे आहेत. क्षत्रियांचा क्रम वरून दुसरा असून त्यांत राजे लोकांचा अंतर्भाव होतो. क्षत्रिय आणि ब्राह्मण यांचें वर्तन निष्कलंक आणि अगदीं साधें असून त्यांच्यांत डामडौल फारसा नसतो व त्यांची राहणी काटकसरीची असते. तिसरी जात वैश्यांची म्हणजे व्यापाऱ्यांची असून ते नानाविध वस्तूंचा देशींपरदेशीं व्यापार करून द्रव्यसंचय करतात. चवथी जात म्हणजे शूद्रांची अथवा शेतकऱ्यांची होय. धार्मिक विधींच्या शुद्धतेच्या मानानें या चार जाती मिसळून पुष्कळ दर्जाचे वर्ग झालेले आहेत. या लोकांत विवाह फक्त जातीजातींमध्येंच होतो. बापाकडून किंवा आईकडून कांहीं पिढ्यांपर्यंत सपिंडसंबंध असलेल्या स्त्रीपुरुषांचा विवाह होत नाहीं आणि स्त्रिया पुनर्विवाह कधींच करीत नाहींत " ( वाटर्सकृत ह्युएनत्संगाचे लेख पृ. १४१, १५७ व १६९ पहा ).

या काळांत भिन्न जातींत विवाह झाल्याचीं कित्येक उदाहरणें सांपडतात. उदाहरणार्थ, हर्ष हा वैश्यवर्णी असून त्याची मुलगी वलभीच्या क्षत्रियवर्णी ध्रुवभटास व बहीण मौखरीच्या क्षत्रियवर्णी ग्रहवर्म्यास दिलेली होती व विशेष हा कीं, हर्षाच्या कन्येच्या म्हणजे ध्रुवभटाच्या पुत्राला क्षत्रियांकडून कमी असें कोणीं मानिलेलें नाहीं. ब्राह्मणवर्ग हा अद्यापि एकच असून त्याचे हल्लींच्या सारखे गुर्जरब्राह्मण, महाराष्ट्रब्राह्मण वगैरे देशभेदानुसार पोटभेद झालेले नव्हते. तत्कालीन शिलालेखांत व ताम्रपटांत ब्राह्मणासंबंधानें लिहितांना गौड, द्रविड, असल्या विशेषणांचा उपयोग न करतां त्यांच्या गोत्राचा व शाखेचाच फक्त निर्देश केलेला असतो. आजच्या क्षत्रियांत आपली पूर्व पीठिका सूर्य, चंद्र व अग्नि यांच्यापर्यंत नेऊन भिडविण्याचा जसा प्रघात आहे तसा प्रकार हर्षकाळीं फारसा प्रचलित असलेला दिसत नाहीं. वलभी राजांच्या दानलेखांतहि सेनापतिघराणें म्हणजे ज्यांशीं हल्लींचें मुख्य सूर्यवंशी शिसोयांचें रजपूत घराणें आपला संबंध जोडतें तें सूर्यवंशी होतें असें सांगितलें नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांशिवाय ' आपआपल्या कामाप्रमाणें स्वतंत्र संघानें राहणारे वर्ग अनेक असून त्यांचें वर्णन करणें शक्य नाहीं ' असें ह्युएनत्संगानें म्हटलें आहे ( वाटर्सकृत ह्युएनत्संग पृ. २६८ ). आणखी एका मद्रासेकडील पंचमांसारख्या तत्कालीन वर्गाचा ह्यु–एन–त्संगानें उल्लेख केला आहे. तो म्हणतोः ' खाटीक, मासे धरणारे, डोंब, कत्तल करणारे, मांग इत्यादि लोकांच्या वसतिस्थानांवर कांहीं विशिष्ट निशाणी असे. त्यांनां सर्वत्र गांवाबाहेर रहावें लागे आणि गांवाच्या रस्त्यांतून समोरून जातांना आपल्या डावीकडून ते हळूच जपून जपून चालतात ( वाटर्सकृत ह्यु–एन–त्संग पु. १, पृ. १४७ ).

**समाज स्थिति.**—आपण पाहिलेल्या लोकांच्या वस्त्रप्रावरणाचें वर्णन ह्युएनत्संगानें असें केलें आहेः 'या लोकांचे आंतले व बाहेरचे असे कोणतेच कपडे शिवून तयार केलेले नसतात. त्याचा रंग स्वच्छ पांढरा असून छिटकांवाचा किंवा मिश्र रंग त्यांनां आवडत नाहीं. पुरुष मंडळी कंबरेभोंवतीं एक लांब वस्त्र गुंडाळतात आणि तसेंच दुसरें खाकांपर्यंत नेऊन उजवा खांदा उघडा ठेवतात. त्यांच्या स्त्रिया लांबच-

लांब झगेवजा वस्त्र नेसतात व तें दोन्ही खांद्यावरून जाऊन खालीं मोकळें सुटलेलें असतें. त्यांच्या डोक्याच्या वरच्या भागावरील "केसांची गांठ बांधलेली असते व बाकीचे तसेच मोकळे राहतात. पुरुष कांहीं आपल्या मिशा कातरतात व कांहीं त्यांच्या निरनिराळ्या तऱ्हा करतात. ते डोक्यावर फुलांच्या माळा गुंडाळून डोक्यावर हार घालतात" (वाटर्सकृत ह्युएनत्संग पृ. १५१). ह्युएनत्संगाच्या या पोषाखासंबंधीं वर्णनास हर्षचरितांत बाणभट्टानें हर्षाच्या पोशाखासंबंधीं जें वर्णन केलें आहे त्यानें पुष्टीच मिळते (ह. च. उच्छ्वास ७). राज्यश्रीच्या विवाहप्रसंगीं आणिलेल्या वस्त्रांचें बाणानें जें वर्णन केलें आहे (उच्छ्वास ४) त्यावरून हिंदुस्थानांत रेशीम, कापूस, लोंकर इत्यादिकांची अति तलम वस्त्रें बनत होतीं असें दिसतें. बिनकाठाचीं साधीं व शुभ्र वस्त्रें आतां प्रमाणें तेव्हांच्याहि स्त्रियांनां पसंत नसत; तशीं वस्त्रें केवळ विधवा मात्र वापरीत असें प्रभाकरवर्धन मृत्यु पावला असतां हर्षानें केलेल्या शोकाच्या वर्णनांत "परिधत्तां धवले वाससी वसुमती" असें जें म्हटलें आहे त्यावरून अनुमान होतें (उच्छ्वास ५).

तत्कालीन लोकांचीं वस्त्रें जरी वर सांगितल्याप्रमाणें साधीं होतीं तरी त्यांनां दागिन्यांची फार आवड असे. ह्युएनत्संग म्हणतो 'राजे व सरदार लोक डोक्यावर किरीट चढवीत असून बोटांत आंगठ्या, मनगटांत कडीं, आणि गळ्यांत रत्नांचे हार घालतात (पृ. ५१). या दागिन्यांशिवाय अंगद नांवाचीं बाहुभूपणें आणि कुंडलें व केयूर नांवाचीं कर्णभूषणें बाणानें सांगितलीं आहेत. ही पुरुषाच्या दागिन्यांची गोष्ट झाली. अर्थात् स्त्री–मग ती कितीहि गरीब असो–कांहींतरी दागिने अंगावर घातल्याशिवाय राहणारच नाहीं. पादत्राणासंबंधीं ह्युएनत्संग म्हणतो कीं बहुतेक लोक अनवाणीच चालत असतात. लष्करी अधिकारी दाढी वाढवीत आणि कल्लेहि राखीत असें हर्षचरितांत ठाणेश्वरच्या सेनापतींचें जें वर्णन केलें आहे त्यावरून दिसतें (उच्छ्वास ६).

बाणानें मयूरकवीच्या प्रौढ बहिणीशीं विवाह केला अशी जी कथा आहे तिजवरून व हर्षचरितांत बाणानें विवाहाच्या दिवशींच वधूचा गर्भाधान संस्कार झाल्याचें जें वर्णन केलें आहे त्यावरून त्या काळीं प्रौढविवाह रूढ होते असें व्यक्त होतें. एका ठिकाणीं बाणानें विधवा स्त्रीच्या वेणीचा उल्लेख केला आहे ("बध्नातु वैधव्य वेणीं परमनुष्यता—उच्छ्वास ५"). त्यावरून विधवांचें वपन जें आज दृष्टीस पडतें तें त्या काळीं नव्हतें असें रा. वैद्य आपल्या मध्ययुगीन भारतांत म्हणतात. परंतु ती चाल या काळीं मुळींच प्रचलित नव्हती असें म्हणतां येत नाहीं कारण राजस्त्रियांसंबंधीं या काळाच्या अगोदर होऊन गेलेल्या कालिदासाच्या रघुवंशात गतभर्तृका 'अनलकान्सपत्नपरिग्रहान्' असें वर्णन आलें आहे. सतीची चाल त्यावेळीं अस्तित्वांत होतीसें दिसतें. हर्षाच्या आईनें पति आसन्नमरण झाला असतांच निराशेनें अग्निप्रवेश केला. ग्रहवर्मा मालवराजाकडून मारला गेल्यावर राज्यश्री कनोजहून निसटली व पुढील दुर्दशा टाळण्यासाठीं अग्निप्रवेश करीत होती असें वर्णन आहे. स्वामीविषयींचें दुःख अनावर झाल्यामुळें केव्हां केव्हां पुरुष देखील अग्निप्रवेशाचा अवलंब करीत. प्रभाकरवर्धनाच्या मृत्युसमयीं त्याचा राजवैद्य रसायन, विश्वासू मंत्री आणि दुसरे कांहीं सेवक यांनीं अग्निप्रवेश केला.

धा र्मि क स्थि ति.—हर्षकालीं जैन संप्रदाय अद्याप महत्त्वास पोंचला नसून त्याचे अनुयायी पंजाब, बंगाल व दक्षिण यांतच कायते थोड्या ठिकाणीं दृष्टीस पडत होते. बौद्धांचें प्राबल्य विशेषतः अगदीं वायव्य सरहद्दीवरील कपिश (काफरिस्थान) देशांत होतें तर अगदीं ईशान्येकडील आसाम वगैरे भागांत बहुतेक हिंदूंचाच भरणा होता. इतर प्रांतांत हिंदुधर्म व बौद्धपंथ यांच्या अनुयायांची संख्या साधारणतः समसमानच होती. या वेळचे हिंदू काय किंवा बौद्ध काय हे दोघेहि सारखेच मूर्तिपूजक होते. शिव, विष्णु, सूर्य आणि बुद्ध यांचीं अनेक मंदिरें त्या त्या देवतांच्या भक्त राजांनीं, बड्या अधिकाऱ्यांनीं व श्रीमंत व्यापाऱ्यांनीं बांधलेलीं होतीं. मूलस्थानपूर येथें सूर्याचें प्रचंड मंदिर असून त्यांत सुवर्णाची मूर्ति व तीस रत्नजडित अलंकार असल्याचें ह्युएनत्संगनें म्हटलें आहे (वाटर्स पु. २, पृ. २५४). याच्याच जोडीचें दुसरें महत्त्वाचें मंदिर म्हणजे काशीचें शिवाचें देवालय होय. ह्युएनत्संग म्हणतो कीं, या देवालयांत दररोज १०,००० शिवभक्त दर्शनास येत असून देवाची ७० हात उंचीची भव्य व सुबक मूर्ति सजीव माणसासारखी वाटे! (वैद्य) शैव पंथांतील कित्येक शिवभक्तांच्या कल्पना अति विलक्षण होत्यासें दिसतें. शिवाचे गण म्हणून कोणी राक्षस व पिशाच्च असतात व त्यांना संतुष्ट करावयाचें तर मनुष्याचे बळी किंवा प्रेतमांसाच्या आहुती दिल्या पाहिजेत असें ते लोक मानीत. या लोकांनां पाशुपत असें नांव असून गळ्यांत ते नररुंडाच्या माळा घालीत असें ह्युएनत्संगानें त्यांचें वर्णन केलें आहे. असल्या विधींत पुरोहित म्हणून ज्यांचें नांव येतें ते द्रविड किंवा आंध्र असत (हर्षचरित उच्छ्वास पांच). शिवपूजेसारखीच जी दुसरी अघोरी पद्धतीची चंडिका पूजा तींतहि द्रविड व आंध्र हेच पुरोहित असत. यांच्या खालोखाल कुमार म्हणजे कार्तिक स्वामीचें महात्म्य दिसून येतें व क्वचित् कोठें गणपतीचेहि भक्त आढळतात.

गुप्तांच्या काळापासून हिंसाप्रधान यज्ञांचें पुनरुज्जीवन झालें होतें परंतु हर्षानें त्यास पुन्हा बंदी केली. प्राचीन वैदिक कर्ममार्गाचा अवशेष म्हणून त्याकाळीं बहुतेक ब्राह्मणांच्या घरांत अग्निहोत्र असे. त्याचप्रमाणें उत्तरवेदकालीन मार्गाचा भाग जो संन्यासाश्रम त्याचे देखील भक्त व अनुयायी हर्षकालीं पुष्कळ सांपडत. या संन्याशांपैकीं कित्येक खरोखर फार सत्शील व विद्वान असत पण त्यांच्यांत बहुतेक भरणा उदरंभरी अधार्मिक लोकांचाच असून ते लोक आपल्या

आश्रमाला तिरस्कारार्ह करून सोडलें होतें. या संन्याशांना हर्षचरित्रांत पाराशरी असें नांव असून बाणभट्ट म्हणतो कीं, या पाराशरींमध्यें अधार्मिक नाहीं असा माणूस विरळाच (उछ्वास ६). ह्युएनत्संग व बाणभट्ट या दोघांच्या साक्षीवरून हर्षाच्या काळीं सर्व हिंदुस्थानभर बौद्ध मठ पसरले असून त्यांत हजारो भिक्षू व भिक्षुणी यांना आश्रय मिळे. या काळीं तत्त्वज्ञान्यांत किती भिन्न वाद होते हें आठव्या उछ्वासांत हर्ष दिवाकरमित्र नांवाच्या भिक्षूच्या मठांत गेला असतां तेथें आपापले सिद्धांत स्थापन करण्यासाठीं जे जैन, संन्यासी, श्वेतांबर जैन, श्वेतवस्त्री भिक्षु, भागवत, ब्रह्मचारी, केशलुंचक, सांख्य, चार्वाक, वैशेषिक, वेदांती, नैय्यायिक, धातुवादी, धर्मशास्त्री, पौराणिक, सासतंतू (पूर्वमीमांसक यज्ञवादी ), शैव, वैय्याकरण, पांचरात्र( वैष्णव) इत्यादि लोक जमल्याचें सांगितलें आहे त्यावरून चांगलें ध्यानांत येतें. या यादींत जैन शब्द बौद्धवाचक असून ज्यांनां आपण जैन म्हणतों त्यांनां अर्हत् म्हटलेलें असतें. या लोकांमध्यें तात्त्विक विषयावर होणारे वादविवाद ऐकण्याची तत्कालीन राजांनां व लोकांनां मोठी आवड असे. हे निरनिराळे मतवादी आपआपसांत कितीहि निकरानें विवादले तरी त्यांतील लोकायतिक म्हणजे नास्तिकवादी चार्वाक सोडून इतर सर्व आत्म्याचें आस्तित्व व कर्मानुसार त्याचें अनेक योनींत भ्रमण मानणारे होते. त्यांच्या विषयीं ह्युएनत्संग म्हणतो कीं, हे लोक उतावळ्या व अनिश्चित स्वभावाचे असूनहि ते कोणाची वस्तु अन्यायानें घेत नाहींत व न्यायानें द्यावें लागावयाचें त्याहूनहि अधिक देतात. पापाचें प्रायश्चित्त अन्य जन्मीं भोगिलें पाहिजे अशी त्यांची खात्री असल्यामुळें ते पापाला भितात व या जन्मीं नीतीनें वागण्याचा प्रयत्न करितात( वाटर्स पु.१ पा. १७१ ).

कृष्णभक्तीनें हिंदुलोकांमध्यें गाई व बैल यांबद्दल पूज्यबुद्धि उत्पन्न झाल्यामुळें गोवध व त्याबरोबर दुसऱ्याहि मोठ्या प्राण्यांचा वध हे भरतखंडांतून अजीबात नाहींसे झाले होते. ह्युएनत्संग म्हणतो कीं, बैल, गाढव, हत्ती, घोडे, कुत्रे, डुकरें, कोल्हे, लांडगे, सिंह, वानर, व माकडें यांचें मांस लोकांस सर्वस्वी वर्ज आहे व जे कोणी या मांसाचें सेवन करितात ते अंत्यज वर्गांत जातात ( वाटर्स पु. १ पा. १७८ ). परंतु याखेरीज इतर कांहीं प्राण्यांचें मांस निषिद्ध नसून तत्कालीन क्षत्रिय, बहुधा ब्राह्मण सुद्धां बोकड व हरीण यांचें मांस खात असत. मासे तर सर्वांनांच चालत. शिवाय गुप्तांच्या साम्राज्यांत अश्वमेधाचें पुनरुज्जीवन झाल्यामुळें त्यांत बैल व घोडा यांचा वध होत असला पाहिजे. यज्ञार्थ हिंसा म्हणजे हिंसाच नव्हे असें हे यज्ञप्रवर्तक प्रतिपादन करीत असत.

**इ. स. ६४७ ते १२०० पर्यंतची राजकीय परिस्थितीः—** हूण लोकांच्या स्वाऱ्यांमुळें त्रस्त झालेल्या प्रजेस हर्षाच्या कारकीर्दींत फारच सुख व शांतता लाभली. इ. स



५२८मध्यें मिहिरगुलाचाच पराभव झाला तेव्हां पासून ११ व्या शतकाच्या आरंभीं गझनीच्या महमदाच्या स्वाऱ्यांस आरंभ होईपर्यंतचा सुमारें पांचशें वर्षांचा काळ परकीयांच्या स्वाऱ्यांपासून मुक्त होता. या काळांत राजकीय दृष्ट्या स्वतःची हवी तशी सुधारणा करून घेण्यास हिंदुस्थान देश स्वतंत्र होता. पण हर्षाच्या कारकीर्दींत किंवा पुढील काळांत शासनसंस्थांत कोणत्याहि प्रकारची विशेष सुधारणा हिंदुस्थानांत झाल्याचें दिसत नाहीं. हर्षानें अशोकाप्रमाणें बहुतेक हिंदुस्थानावर स्वतःची साम्राज्यसत्ता स्थापली. चंद्रगुप्त मौर्य, अशोक किंवा हर्ष यांच्या सारखा पराक्रमी सम्राट पुढील चार पांच शतकांत कोणी निपजला नाहीं.

हर्षानंतर कोणीहि पराक्रमी सम्राट हिंदुस्थानांत न झाल्यानें हिंदुस्थानभर सर्वत्र लहान लहान राज्यें उद्भवलीं. या कारणामुळें पुढील चारपांच शतकांच्या हिंदुस्थानच्या इतिहासांत एकसूत्रीपणा नसला तरी तेथें व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो त्याप्रमाणें केवळ या काळांत अराजकताच माजली असेल असें म्हणतां येत नाहीं. परस्परांशीं भांडणाऱ्या लहान लहान स्वतंत्र संस्थानांचें अस्तित्व अराजकतेचें द्योतक असतेंच असें नाहीं, हें प्राचीन ग्रीक नगरराज्यांच्या इतिहासावरून कोणाच्याहि ध्यानांत येईल.

**उत्तर हिंदुस्थानांतील प्रमुख राज्यें.—**हर्षानंतर सर्व हिंदुस्थानावर साम्राज्य करणारा कोणी निघाला नाहीं. तथापि प्रांतानिहाय अनेक लहान लहान राज्यें सुव्यवस्थित रीतीनें नांदत होतीं. त्यांपैकीं प्रथम उत्तर हिंदुस्थानांतील प्रमुख राज्यांची माहिती थोडक्यांत येथें देतों.

का श्मी र.—कल्हण पंडिताचा राजतरंगिणी ग्रंथ, ह्युएनत्संगाचे लेख वगैरे आधारांवरून काश्मीरचा इतिहास समजतो. काश्मिरावर अशोकाचें व नंतर कुशान घराण्यांतील कनिष्क व हुविष्क यांचें साम्राज्य होतें. पुढें इ. स. ६०२ मध्यें पूर्वीच्या गोनर्दीय वंशांतील बालादित्य नांवाचा निपुत्रिक राजा मरण पावला; तेव्हां त्याचा दुर्लभवर्धन नांवाचा अधिकारी व जामात राज्यावर आला. त्या राजवंशाला कर्कोटक वंश असें नांव आहे. या वंशांत एकंदर १७ राजे झाले व त्यांनीं इ. स. ६०२ पासून ८५६ पर्यंत काश्मिरांत राज्य केलें. यांतील प्रमुख राजांची सनावली येणें प्रमाणें.— १ दुर्लभवर्धन ( इ. स. ६०२–६३७ ), २ दुर्लभक उर्फ प्रतापादित्य ( ६३७–६८७ ), ३ चंद्रापीड ( ६८७–६९५ ), ४ तारापीड ( ६९५–६९९ ), ५ मुक्तापीड उर्फ ललितादित्य ( ६९९–७३५ ), ६ कुवलयापीड [ ७३६ ], ७ वज्रापीड [ ७३६–७४३ ], ८ संग्रामपीड (७४३–७५०), ९ जयापीड ( ७५०–७८२ ).

पहिला राजा दुर्लभवर्धन राज्य करीत असतां ह्युएनत्संग काश्मिरांत आला. त्या वेळीं बौद्धसंप्रदायाला उतरती कळा लागलेली त्याच्या दृष्टीस पडली. दुसरा राजा प्रतापादित्य याच्या न्यायप्रियतेच्या व प्रजाहिततत्परतेच्या पुष्कळ गोष्टी

कल्हणानें सांगितल्या आहेत. ललितादित्य हा या घराण्यांतील सर्वांत पराक्रमी राजा होय. त्याच्या दिग्विजयाचें वर्णन राजतरंगिणींत सविस्तर केलें आहे. त्यानें मोठमोठीं देवालयें व विहार बांधले. पैकीं मार्तंडाचें ( सूर्याचें ) मंदिर अद्याप प्रसिद्ध आहे.

जयापीड हा या घराण्यांतील आणखी एक प्रसिद्ध राजा होय. यानेंहि दिग्विजयास निघून कनोज, बंगाल वगैरे दोन चार प्रांतांतील राजांचा पराभव केला. विद्वानांचा आश्रयदाता म्हणून जयापीडाची प्रसिद्धि त्याचा आजा ललितादित्य याहूनहि अधिक आहे. जयापीडानंतर या घराण्यास उतरती कळा लागून शेवटचा राजा अनंगपीड याला इ. स. ८५५ मध्यें उत्पल घराण्यांतील अवन्तिवर्मा यानें पदच्युत करून स्वतः गादी बळकावली.

या पुढील काळांत काश्मिरांत उत्पल घराणें (८५५–९४०), ( २ ) वीरदेवाचा वंश ( ९४०–९४९ ), ( ३ ) दिविर वंश (९५०–१००३), ( ४ ), लोहर वंश ( १००३–११०१ ), ( ५ ) सातवाहन वगैरे घराणीं झालीं. पैकीं उत्पल घराण्यांतला पहिला राजा अवन्तिवर्मा हा विद्वानांचा आश्रयदाता होता. त्यानें आपल्या सुय्य नांवाच्या मंत्र्याच्या साहाय्यानें अनेक नद्यांनां बंधारे घालून ठिकठिकाणीं कालव्यांचीं कामें करून घेतलीं व हजारों एकर पडित जमीन लागवडीखालीं आणली. उत्पल घराण्यांतील पुढील राजे जुलुमी किंवा दुर्बल निघाले. पार्थ नांवाच्या राजाच्या कारकीर्दीत इ. स. ९१७–१८ सालीं काश्मिरांत इतका भयंकर दुष्काळ पडला कीं ' वितस्ता ( झेलम ) नदी प्रेतांनीं भरून गेली व जमीन हाडांनीं आच्छादून गेल्यामुळें सर्वत्र श्मशानभूमीसारखा देखावा दिसूं लागला ' असें एक ब्राह्मण बखरकार म्हणतो. पार्थ व त्याचा मुलगा उन्मत्तावंति यांनीं प्रजेचा भयंकर छळ केला.

यानंतर उत्पल घराणें नष्ट होऊन वीरदेवाचा वंश राज्य करूं लागला. त्यानंतरच्या दिविर घराण्याच्या वेळीं दिद्दा नांवाच्या राणीनें सुमारें पन्नास लोकांस फार त्रास दिला. या घराण्यांतील संग्रामदेवाच्या कारकीर्दींत गझनीच्या महमदानें काश्मिरावर स्वारी केली. तथापि तो देश पर्वतांच्या ओळींनीं संरक्षित असल्यामुळें काश्मिरचें स्वातंत्र्य कायम राहिलें.

त्यानंतरच्या लोहर घराण्यांपैकीं कलश व हर्ष हे राजे फार जुलमी झाले. कल्हणानें राजतरंगिणीमध्यें इ. स. ११४८ पर्यंतचा इतिहास दिला आहे. त्या नंतरच्या दोन शतकांत काश्मिरांत अंतस्थ कलहांनीं फाटाफूट झालेल्या स्थितींत एक लहानसें स्वतंत्र राज्य होतें. शेवटीं इ. स. १३३९.त काश्मिरच्या दक्षिणेकडून आलेल्या एका शहामीर नांवाच्या धाडशी मुसुलमानानें काश्मिरच्या शेवटच्या हिंदुराजाच्या कोटानामक राणीला पदच्युत करून, तेथें आपलें मुसुलमानी घराणें स्थापन केलें. मुसुलमानी संप्रदायानें क्रमाक्रमानें आपलें पाऊल तेथें रोवण्यास सुरुवात केली. तथापि ब्राह्मणांनीं, आपलें वर्चस्व धर्मत्याग न करतां कायम ठेविलें आणि विद्या व सरकारी महत्त्वाचीं कामें आपल्या हातून जाऊं दिलीं नाहींत.

काश्मीर देश पहिल्यापासून विद्येबद्दल प्रसिद्ध आहे. तेथील राजे पंडितांचे मोठे आश्रयदाते असत. काश्मिरी पंडितांची ख्याति सर्व हिंदुस्थानभर असे. त्यांच्या नांवांत एक विशेष आढळतो तो असा कीं, त्यांच्या शेवटीं ट किंवा ण हें अक्षर नेहमी येतें. उद्भट, मम्मट, लवट, कय्यट, तसेंच कल्हण, बिल्हण, सल्हण वगैरे नांवें प्रसिद्ध आहेत.

नेपाळ.—हा हिमालयाच्या पायथ्याचा देश बहुतेक डोंगरांनीं व दऱ्यांनीं आच्छादिलेला आहे. अद्यापहि तेथील सरकार यूरोपीय वगैरे सर्व परकीयांनां स्वराज्यांत फिरकूं देत नसल्यामुळें या देशाची फारशी माहिती उपलब्ध नाहीं. काश्मिरांतील वंशावळीप्रमाणें इ. स. १७६८ सालीं पृथिवीनारायणाच्या नेतृत्वाखालीं गुरखे लोक नेपाल जिंकीपर्यंतच्या राजांचा इतिहास बहुतेक दंतकथात्मक असून तो डॉ. राइटनें लिहिला आहे. अशोकाच्या व समुद्रगुप्ताच्या शिलालेखांवरून हा प्रांत त्या सम्राटांच्या राजकीय वर्चस्वाखालीं होता असें दिसतें.

नेपाळांतील मूळ रहिवाशी नेवार नांवाचे असून ते मोंगोलियन लोकांच्या वंशाचे आहेत. शिवाय भारतीय आर्य व मिश्रआर्य यांची वस्ती तेथें आहे. भारतीय आर्यांनीं ऐतिहासिक काळांत नेपाळांत प्रवेश केला. त्यांतील अगदीं अलीकडची स्वारी म्हणजे चितोडच्या शिसोद्यांचे वंशज म्हणविणाऱ्या गुरख्यांची होय. नेवारांपेक्षां गुरखे लोक अधिक गौरवर्ण असून त्यांच्यांत हिंदुधर्माचा कडक अभिमान आहे.

ह्युएनत्संगाच्या वेळीं तेथें लिच्छवी जातीचें घराणें राज्य करीत होतें. पुढें एक दोन शतकें नेपाळवर तिबेटचें अधिराज्य होतें. इ. स. ८७९ मध्यें नेपाळ स्वतंत्र झाला असें दिसतें. कारण त्या सालाच्या आक्टोबर महिन्यापासून नवीन नेपाळी शक सुरू झाला. इ. स. १७६८ मध्यें गुरखे लोकांनीं नेपाळ देश जिंकला. तेव्हांपासून गुरखा जातीचें घराणें नेपाळवर राज्य करीत आहे.

अशोकाच्या वेळीं बौद्धसंप्रदाय नेपाळांत शिरला. सातव्या शतकांत तेथें महायान पंथाचें प्राबल्य होतें. परंतु पुढें त्या संप्रदायास उतरती कळा लागून हल्लींच्या गुरखे राजांच्या अमलामध्यें बौद्ध लोक हिंदु बनत असल्यामुळें बौद्ध संप्रदाय लवकरच पूर्ण नष्ट होईल असें दिसतें.

नेपाळांतील व हिंदुस्थानांतील बौद्ध लोक हिंदूंनीं मोठाल्या लढाया, छळ व कत्तली करून नष्ट केले असें जें एक मत आहे तें निराधार असल्याबद्दल नेपाळचें उदाहरण उत्तम साक्ष पटवितें.

**कनोज.**—हर्षराजा इ. स. ६४७ मध्यें मरण पावला. त्यावेळीं त्याला कोणी वारस नव्हता. त्यामुळें जिकडे तिकडे अस्वस्थता माजून महत्वाकांक्षी लोकांनां चांगलें फावलें. येथें ७ व्या शतकाच्या अखेरीस मौखरी घराण्यापैकीं यशोवर्मा नांवाचा पुरुष राज्य करीत होता असें दिसतें. हा यशोवर्मा विद्वानांचा मोठा चहाता असून भवभूति, वाक्पतिराज इत्यादि सुप्रसिद्ध कवी त्याच्या पदरीं होते. गौडवाहो नामक काव्यांत यशोवर्म्याचेंच पराक्रमवर्णन आलेलें आहे. त्यानें हर्षाप्रमाणें दिग्विजयाचा उपक्रम केला, पण काश्मीरचा राजा ललितादित्य यानें त्याचा पराभव केला व त्याला मांडलिक बनविलें. यशोवर्म्याच्या कारकीर्दींतील महत्वाची गोष्ट म्हणजे वैदिकधर्माचें पुनरुज्जीवन व बौद्धसंप्रदायाचा ऱ्हास ही होय. यशोवर्म्यानंतर या घराण्यास उतरती कळा लागून तें इ. स. स. ८१६ मध्यें नागभट्ट नांवाच्या प्रतिहार राजानें लयास नेलें. प्रतिहार घराण्यांत नागभट्ट, रामभद्र व मिहिर यांच्यानंतर मिहिरभोज ( इ. स. ८४० –८९० ) हा मोठा पराक्रमी राजा झाला. त्यानें आग्रा, अयोध्या, ग्वालेर, रजपुताना, पंजाब, काठेवाड, वगैरे प्रांतांवर आपलें साम्राज्य स्थापलें. याच्यानंतर कनोजच्या राज्यास पुन्हां उतरती कळा लागली. या घराण्यांतले पुढील राजे येणेंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| १ महेंद्रपाल | ४ देवपाल ( ९४०–५५ ) |
| २ दुसरा भोज | ५ विजयपाल ( ९५५–९० ) |
| ३ महीपाल ( इ. स. ९१०–४० ) | ६ राज्यपाल |

राज्यपालाच्या वेळीं हिंदुस्थान व वर गझनीचा राजा सबक्तगीन व त्याचा मुलगा सुलतान महमूद यांनीं स्वाऱ्या केल्या. त्या वेळीं जयपालाच्या नेतृत्वाखालीं हिंदु राजांनीं या परकीयांच्या स्वारीस जो विरोध केला त्यांत कनोजचा राज्यपाल सामील होता. पुढें इ. स. १०१९ मध्यें सुलतान महमुदानें खुद्द कनोजवर स्वारी करून राज्यपालाचा पराभव केला. तथापि पुढेंहि बरींच वर्षे प्रतिहार घराणें टिकाव धरून होतें. १०९० मध्यें तें नष्ट होऊन कनोज येथें गहरवार नांवाचें किरकोळ घराणें राज्य करीत राहिलें. अखेर दिल्लीच्या महंमदघोरीनें कनोजचें राज्य खालसा केलें.

**माळवा**—इ. स. ८०० च्या सुमारास माळव्यांतील उज्जयिनी येथें परमार नांवाच्या घराण्याचे राजे राज्य करीत होते. या घराण्याचा संस्थापक उपेंद्र उर्फ कृष्णराज हा होय. या घराण्यांतला सातवा राजा मुंज हा मोठा विद्वान व वक्ता होता; इतकेंच नव्हे तर तो कवींचा आश्रयदाता असून शिवाय स्वतःहि कवि होता. मुंजाचा पुतण्या सुप्रसिद्ध भोजराजा हा इ.स. १०१८ मध्यें राज्यावर येऊन त्यानें चाळीस वर्षांवर राज्य केलें. तो फार विद्वान असून त्याप्रमाणेंच युद्धकलेंतहि निपुण होता, ज्योतिष, शिल्प, काव्य व इतर अनेक विषयावर त्यानें केलेले ग्रंथ आहेत असें मत प्रचलित आहे. एकंदरींनें समुद्रगुप्ताप्रमाणें भोजराजाची बुद्धिमत्ता असामान्य होती यांत संशय नाहीं. भोजराजानें स्थापन केलेलें एक संस्कृत महाविद्यालयहि प्रसिद्ध होतें. भोपाळनजीक विस्तिर्ण तलाव ( ज्याचें क्षेत्रफळ २५० चौरस मैल होतें, ) हें भोजराजाचें एक फार मोठें स्मारक होय. नंतर एका मुसुल्मान राजानें त्याचा बंधारा फोडून पाणी बाहेर काढून लावल्यामुळें हल्लीं त्या तलावाच्या जागीं उत्तम सुपीक जमीन झाली आहे. पुढें गुजराथ व चेदी येथील राजांनीं हल्ला केल्यामुळें या राज्याचें वैभव कमी झालें. तथापि १३ । १४ व्या शतकापर्यंत तेथें लहान लहान हिंदू घराण्यांनीं राज्य केलें. १४०१ मध्यें तेथें एक मुसुलमान घराणें राज्य करूं लागलें व अखेर १५६९ मध्यें अकबरानें माळवा प्रांत आपल्या साम्राज्यांत सामील केला.

**बहार व बंगाल.**—हर्षाची साम्राज्यसत्ता या प्रांतावर होती. त्याच्या मरणानंतर तेथील स्थानिक राज्यें स्वतंत्र होऊं लागलीं. रा. चिं. वि. वैद्य यांच्या मतें इ. स. ७८० च्या सुमारास बंगालवर गोपाल नांवाचा राजा राज्य करूं लागला. हाच बंगाल्यांतील सुप्रसिद्ध पाल घराण्याचा आदिपुरुष होय. गोपाल हा बौद्ध संप्रदायी होता. या घराण्यांतील राजांचीं नांवें व त्यांपैकीं कांहींचे अजमासें सन येणें प्रमाणें. १ गोपाल ( ७८०–८०० ), २ धर्मपाल [ ८००–८२५], ३ देवपाल ( ८२५–८५० ), ४ विग्रहपाल ( ८५०–७५ ), ५ नारायणपाल ( ८७५–९०० ), ६ राज्यपाल (९००–२५), ७ गोपाल २ रा ( ९२५–५० ), ८ विग्रहपाल ( ९५०–७५), ९ महीपाल १ ला ( ९७८–१०३० ), १० नयपाल, ११ विग्रहपाल, ३ रा, १२ महीपाल २ रा, १३ रामपाल, १४ गोविंदपाल इत्यादि.

१० व्या शतकाच्या उत्तरार्धांत कंभोज नांवाच्या डोंगरी लोकांनीं पाल घराण्याचा पराभव करून तेथें आपली सत्ता स्थापली. परंतु पहिला महीपाल यानें कंभोजांनां हांकून देऊन आपला अम्मल पूर्ववत् वसविला. अखेर मुसुलमानांनीं इ. स. ११९७ मध्यें पाल घराणें नष्ट करून बंगालप्रांत काबीज केला.

हिंदुस्थानच्या इतिहासांत पाल घराणें विशेष नांवाजण्यासारखें आहे. कारण आंध्र घराण्याखेरीज सतत चार साडेचार शतकें राज्य करणारें दुसरें घराणें आढळत नाहीं. प्रथम पाल घराण्याची सत्ता बहार वगैरे बऱ्याच भागावर होती. परंतु इ. स. १०८० मध्यें झालेल्या कैवर्तबंडाच्या सुमारास दक्षिणेकडील सामन्तदेव नांवाच्या पुढाऱ्यानें बंगालकडे स्वारी केली. व पुढें त्याचा नातु विजयसेन यानें १२ व्या शतकाच्या आरंभीं बंगालचा बराचसा भाग पाल राजांपासून जिंकून घेतला. हळू हळू हें सेन घराणें बरेंच प्रबळ बनलें. हे सेन राजे हिंदू ब्राह्मण असल्यामुळें ते बौद्धसंप्रदायी पाल राजांचा द्वेष करीत असत. या सेन घराण्यांत विजयसेन ( इ. स. १११९–५८ ), बल्लाळसेन (११५८–

११७० ) व लक्ष्मणसेन ( ११७०–१२०० ) हे राजे झाले. १२०० च्या सुमारास हीं दोन्हीं राज्यें मुसुलमानांनीं बुडविलीं. या मुसुलमानांच्या स्वारींत बंगाल्यांत मृतप्राय बनलेला बौद्ध संप्रदाय गतप्राण झाला. मुसुलमानांनीं बौद्ध भिक्षूंची इतकी सररहा कत्तल केली कीं, पुढें त्यांच्या मठांमध्यें सांपडलेल्या ग्रंथांचा अर्थ सांगण्यासहि कोणी उरला नाहीं. मुसुलमानांच्या तडाक्यांतून जे बौद्ध लोक निसटले ते तिबेट व नेपाळ देशांत पळून गेले.

सेन राजेहि स्वत: विद्वान् व संस्कृत पंडितांचे मोठे आश्रयदाते होते. गीतगोविंदाचा कर्ता जयदेव हा याच सुमारास होऊन गेला.

राजपुताना.—हर्षानंतरच्या काळांत राजपुतान्यांत अनेक रजपूत घराणीं उदयास आलीं. रजपूत लोक मोठे पराक्रमी, युद्धप्रिय व स्वसंस्कृतीचे अभिमानी असून मध्ययुगीन इतिहासांत त्यांचें फार महत्व आहे. कारण इंग्रजादि यूरोपीयांच्या सत्तेला मराठ्यांनीं ज्या प्रमाणें जबरदस्त अडथळा केला त्याचप्रमाणें परकी मुसुलमान सत्तेचा हिंदुस्थानांत प्रसार होण्यास रजपूतांनींच भयंकर विरोध केला. तथापि अशी ही पराक्रमी रजपूत लोकांची जात एकाएकी कोठून व कशी उद्भवली याबद्दल इतिहासकारांनां कोडें असून त्यांच्या मूळ उत्पत्तीबद्दल मतभेद आहेत. कर्नल टॉड, व्हिन्सेंटस्मिथ, वगैरे इतिहासकारांनीं रजपूत हे सिथियन, शक, हूण वगैरे परकी भारतबाह्य जातींचे वंशज आहेत असें मत दिलें आहे तर त्याच्या विरुद्ध रा. चिंतामणराव वैद्य यांनीं आपल्या 'मध्ययुगीन भारत' या ग्रंथांत रजपूत हे प्राचीन भारतीय क्षत्रियांचे वंशज आहेत असें प्रतिपादन केलें आहे.

असो. राजपुतान्यांत रजपुतांचीं अनेक संस्थानें व राजकुलें आहेत. मुसुलमानांच्या स्वाऱ्यांस तोंड देणाऱ्या या रजपूतांमध्यें मेवाडचें 'गुहिलोत राजघराणें हें सर्वांत प्रमुख असून रजपुतांचीं जीं ३६ कुळें इतिहासांत प्रसिद्ध आहेत तीं सर्व मेवाडच्या घराण्यास रामचंद्राचे वंशज या नात्यानें अग्रपूजेचा मान देतात. याशिवाय सांबरचे चाहमान, अनहिलवाड पाटणचे चावडा, धारचे परमार, वगैरे अनेक रजपूत घराणीं सुप्रसिद्ध आहेत.

यांशिवाय उत्तरहिंदुस्थानांत कामरूप उर्फ आसाममध्यें, सिंध प्रांतांत, काबूल प्रांत व प्राचीन गांधार देश म्हणजे पुरुषपुर उर्फ पेशावूर याच्या आसपासचा प्रदेश, वगैरे ठिकाणीं हिंदू राज्यें होतीं. पैकीं सिंध व काबुल या प्रांतांवर मुसुलमानी हल्ल्यांनां तोंड देण्याचें व आसाममधील राजांनां चिनी मोंगोलियन लोकांच्या स्वाऱ्यांनां तोंड देण्याचें काम करावें लागलें. आणि या कामांत सिंध व काबूलपेक्षां आसामाची कामगिरी फार प्रशंसनीय आहे. कारण आसामच्या हिंदू राजांनीं चिनी मोंगोलियनांनां व पुढें मुसुलमानांनांहि परतवून लावून १९ व्या शतकांत ब्रिटिश अम्मल बसेपर्यंत आपलें स्वातंत्र्य कायम राखलें.

**दक्षिण हिंदुस्थानांतील राज्यें.**—नर्मदा नदीच्या दक्षिणेकडील सर्व प्रदेशाला दक्षिण हिंदुस्थान म्हणतां येईल. परंतु दख्खन या शब्दानें तुंगभद्रानदीपर्यंतच्या प्रदेशाचाच बोध होतो व पलीकडील मद्रास इलाख्यांतला भाग स्वतंत्र गणला जातो. दख्खन म्हणजे वऱ्हाड, हैद्राबाद, महाराष्ट्र व म्हैसूर हा प्रदेश होय. हा डोंगरपठाराचा प्रदेश असून त्यांतून गोदावरी व कृष्णा या दोन मोठ्या नद्या वाहतात. या प्रदेशांत इ. स. २२५ च्या पूर्वी चार शतकें आंध्र घराणें राज्य करीत होतें. त्यानंतर इ. स. २२५ ते ५५० पर्यंतच्या कालासंबंधाची नीटशी माहिती उपलब्ध नाहीं. महाराष्ट्रांत राष्ट्रकूट नांवाचें घराणें मात्र—जें पुढें ८ व्या शतकांत विशेष प्रसिद्ध पावलें—बरींच शतकें राज्य करीत असावें असें दिसतें. सर भांडारकर यांनीं १८९६ मध्यें दख्खनचा प्राचीन इतिहास लिहिला. त्यानंतर आणखी उपलब्ध माहिती जमेस धरून दक्षिण हिंदुस्थानाच्या इतिहासावर कांहीं प्रकरणें व्हिंसेंटस्मिथनें आपल्या 'हिस्ट्री ऑफ एन्शन्ट इंडिया' या पुस्तकांत आणि रा. चिं. वि. वैद्य यांनीं 'मध्ययुगीनभारत' या पुस्तकांत लिहिलीं. तथापि दक्षिणहिंदुस्थानाचा प्राचीन इतिहास स्वतंत्र सविस्तर व सुसंगतवार अद्याप लिहिला जावयाचा आहे. तूर्त महाराष्ट्रांतील चालुक्य व राष्ट्रकूट आणि मद्रासकडील पांड्य, चेर उर्फ केरल, चोल व पल्लव या घराण्याची माहिती थोडक्यांत येथें देतों.

चालुक्य.—चालुक्य राजे स्वत:स रजपुतांचे वंशज म्हणवितात. चालुक्यांच्या शिलालेखांतर अयोध्येच्या राजवंशापासून चालुक्यांची उत्पत्ति झाली असल्याचें म्हटलें आहे. या राजघराण्याचा आद्यसंस्थापक पहिला पुलकेशी यानें इ. स. ५५० च्या सुमारास विजापूर जिल्ह्यांतील वातापि, अलीकडील बदामी, येथें राज्य स्थापून आसपासचा प्रदेश जिंकला; इतकेंच नव्हे तर, सम्राट् पदाची आकांक्षा धरून अश्वमेध यज्ञहि केला असें म्हणतात. पुलकेशीच्या कीर्तिवर्मा व मंगलीश या पुत्रांनीं आपलें राज्य पूर्वेकडे व पश्चिमेकडे आणखी वाढविलें. त्यानंतरचा राजा दुसरा पुलकेशी ( इ. स. ६०८–६४२ ) हा फार पराक्रमी होता. त्यानें चोल, पांड्य, केरल, पल्लव वगैरे आसपासच्या राज्यांवर, आणि गुजराथ, राजपुताना, माळवा वगैरे दूरदूरच्या प्रांतांवरहि स्वाऱ्या केल्या. इ. स. ६२० च्या सुमारास सम्राट् हर्षानें दक्षिणेंत केलेली स्वारीहि पुलकेशीनें परतविली. या पराक्रमी चालुक्य राजाची कीर्ति हिंदुस्थानाबाहेरहि पसरून इराणचा राजा दुसरा खुशरू व पुलकेशी यांनीं परस्परांच्या दरबारीं आपआपले वकील पाठविले. इराणी वकील चालुक्य राजाला आपले खलिते अर्पण करीत आहेत अशा प्रकारचा देखावा अजिंठा येथील लेणें नं. १ मध्यें आहे. इ. स. ६४१ मध्यें चिनी प्रवाशी ह्युएनत्संग पुलकेशी राजाच्या दरबारीं

गेला होता. त्या वेळीं पुलकेशीचा मुक्काम नाशिक नजीक होता. पुलकेशीच्या या उत्कर्षावर ६४२ मध्यें संकट आलें. कांचीचा पल्लव राजा नरसिंहवर्मा यानें पुलकेशीची राजधानी हस्तगत करून त्याला ठार मारलें.

नंतर तेरा वर्षांनीं पुलकेशीचा मुलगा पहिला विक्रमादित्य यानें ६५५ मध्यें आपलें शत्रूनें घेतलेलें राज्य परत मिळविलें. तथापि पुढें अनेक वर्षें चालुक्य व पल्लव राजांमध्यें झगडा चालू राहिला. त्यांत अखेर चालुक्य घराणें नामशेष होऊन त्या ठिकाणीं राष्ट्रकूट नांवाचें निराळें राजघराणें इ. स. ७५० च्या सुमारास उदयास आलें.

या राष्ट्रकूट घराण्याकडे दोन सव्वादोन शतकें राजसत्ता राहिल्यानंतर इ. स. ९७३ मध्यें चालुक्य घराण्यांतील तैल उर्फ दुसरा तैलप नांवाच्या एका वंशजानें राष्ट्रकूट घराण्याचा शेवटचा राजा दुसरा कर्क यास पदच्युत करून पुन्हां चालुक्यांची सत्ता स्थापिली या दुसऱ्या चालुक्य घराण्यानें आपलें वैभव बरेंच वाढविलें. या घराण्यांतील सहावा विक्रमादित्य ( १०७६–११२६ ) हा बिल्हणानें लिहिलेल्या ऐतिहासिक काव्याचा नायक आहे. या घराण्याची राजधानी निजामच्या राज्यांतील कल्याणी येथें होती. याज्ञवल्क्यस्मृती वरील सुप्रसिद्ध टीकाग्रंथ 'मिताक्षरा' याचा कर्ता विज्ञानेश्वर हा कल्याणीचाच रहिवाशी होय. या चालुक्यांच्या राज्यास विक्रमादित्यानंतर उतरती कळा लागून इ. स. ११९० मध्यें तें नष्टप्राय झालें. त्यानंतर चालुक्यांचें लहानसें राज्य अस्तित्वांत होतें.

रा ष्ट्र कू ट.—चालुक्यांनां पदच्युत करून राष्ट्रकूट घराण्यानें महाराष्ट्रांत आपली सत्ता स्थापिली. यांतील कांहीं महत्वाचे राजे येणेंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| १ दंतिदुर्ग ७५३ | ६ दुसरा कृष्ण ८७५ |
| २ कृष्ण ७७३ | ७ तिसरा [illegible] |
| ३ ध्रुव ७८३ | ८ दुसरा अमोघवर्ष |
| ४ गोविंद | ९ तिसरा कृष्ण९४०–९६१ |
| ५ अमोघवर्ष ८१५ | १० खोट्टिग ९७१ |
| | ११कोकल ९७२–९७४ |

मालखेडचें राष्ट्रकूट घराणें महाराष्ट्रांत फार प्रसिद्ध आहे. हे राष्ट्रकूट आपणांस चंद्रवंशी समजतात. अरबांनीं सिंध व कच्छ जिंकल्यावर त्यांनीं आपला मोर्चा महाराष्ट्राकडे वळविला परंतु राष्ट्रकूटांच्या पराक्रमापुढें त्यांनां माघार घ्यावी लागली, व त्यामुळें मुसुलमानी अंमलाचें महाराष्ट्रावरील संकट पांच शतकें पुढें ढकललें गेलें. शिवाय राष्ट्रकूटांनीं अलीकडील मराठ्यांप्रमाणें उत्तरेकडेहि स्वाऱ्या केल्या, व माळवाप्रांत जिंकून स्वराज्यास जोडला इतकेंच नव्हे तर भयाण व विस्तृत यमुनानदी ओलांडून कनोज उध्वस्त करून टाकलें. कलाकौशल्यांतहि राष्ट्रकूटांनीं आपलें चिरंतन स्मारक करून ठेविलें आहे. वेरूळ येथील मनास थक्क करून सोडणारें 'शिवलेणें' दंतिदुर्गाच्या पुढील कृष्ण नामक राजानें करविलें होतें. हें शिवाचें देवालय एक प्रचंड डोंगर खोदून तयार केलेलें आहे.

या द व.—देवगिरीचे यादव हे चालुक्यांच्या राज्यांतील सरदार होते. त्यांनीं देवगिरी ( दौलताबाद ) व नाशिक यांच्या दरम्यानच्या मुलुखावर राज्य स्थापलें. यादव घराण्यांतला सर्वांत बलिष्ठ राजा सिंघण ( इ. स. १२१० ) यानें गुजराथ व इतर देश जिंकून राष्ट्रकूट व चालुक्य राजांइतका आपल्या राज्याचा विस्तार वाढविला. परंतु यादवांचें राज्य फार काल टिकलें नाहीं. इ. स. १२९४ मध्यें दिल्लीच्या अल्लाउद्दिनानें देवगिरीच्या रामदेवाचा पराभव केला. व अखेर १३१८ मध्यें मुसुलमानांनीं तें राज्य नष्ट केलें.

**तामिळ देशांतील मध्ययुगीन राज्यें.**—दख्खन किंवा महाराष्ट्र यांची सरहद्द ज्या कृष्णा व तुंगभद्रा या नद्या, त्यांच्या दक्षिणेकडील प्रदेश पूर्वी तमिलकं किंवा तामिळ देश म्हणून प्रसिद्ध होता. ग्रीक भूगोलशास्त्रज्ञ टॉलेमी यानें या तमिलकम् देशाबद्दल माहिती दिली आहे. त्यावेळीं त्या देशांत तामीळ ही एकच भाषा प्रचलित होती. मध्यकालांत येथें पांड्य, चोल व चेर उर्फ केरळ हीं तीन प्रसिद्ध राज्यें होतीं. त्याशिवाय चौथ्या शतकापासून आठव्या शतकापर्यंत तेथें पल्लवांचेहि एक राज्य होतें.

पां ड्य.—पांड्यांचें राज्य मदूरा व तिनेवेल्ली हे जिल्हे आणि त्रिचनापल्ली व त्रावणकोर यांपैकीं कांहीं भाग इतक्या प्रदेशावर होतें. या पांड्यांची प्रथम लहानलहान पांच राज्यें होतीं. इसवीसनाच्या पहिल्या शतकांत मदुरा अथवा कूडल ही त्यांची राजधानी होती पण त्यापूर्वी कोरकै ही त्यांची राजधानी असावी. कात्यायन या ख्रि. पू. ४ थ्या शतकापूर्वीच्या संस्कृत व्याकरणकारानें पांड्यांचा उल्लेख केला आहे. प्राचीन पांड्य राज्यासंबंधानें एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे मदुरा येथें एक मोठें विद्यापीठ होतें ही होय.

इ. स ६४० मध्यें ह्युएनत्संग दक्षिण हिंदुस्थानांत गेला. त्यावेळीं तो पल्लव राजांची राजधानी कांची, येथें राहिला होता. तेथेंच त्यानें आपल्या बौद्ध मित्रांजवळून मिळालेली पांड्यांच्या राज्यासंबंधाची माहिती लिहून ठेविली. त्यावेळीं पांड्य राजा कांचीच्या पल्लव राजाचा मांडलिक असावा. एका शिलालेखांत ८ व्या शतकाच्या मध्यापासून १० व्या शतकाच्या आरंभापर्यंतच्या पांड्य राजांची यादी दिली आहे. १० व्या शतकापासून पांड्य राजे चोल राजाचे मांडलीक बनले.

पांड्य राजांची सिलोनच्या राजाबरोबर वरचेवर युद्धें होत असत. मलिक काफूर व इतर मुसुलमान पुढाऱ्यांनीं इ. स. १३१० त व नंतर या दक्षिणेकडील राज्यांवर हल्ले केले. परंतु हीं स्थानिक राज्यें त्यांनीं नष्ट केलीं नाहींत.

चे र उ र्फ के र ळ.—अशोकाच्या शासनपत्रांत या राज्याचा केरलपुत्र या नांवानें उल्लेख आढळतो. ख्रिस्ती शकाच्या आरंभीच्या शतकांत अरबस्थान व या राज्यांतील बंदरें यामध्यें मिरीं वगैरे जिनसांचा व्यापार चालत असे

असें ग्रीक व रोमन ग्रंथकाराचे उल्लेख आहेत. तथापि याखेरीज या केरळ राज्याबद्दलची प्राचीन माहिती उपलब्ध नाहीं. पुढें १० व्या शतकांत चेर व चोल या राज्यामध्यें आपसांत लढाया सुरू झाल्या. तेव्हांपासूनची त्रोटक माहिती चोल शिलालेखांवरून मिळते. केरळ प्रांत मुसुलमानी अंमलाखालीं फारसा नसल्यामुळें त्या प्रांतांतच फक्त प्राचीन भारतीय लोक, त्यांचा धर्म, कायदे, रूढी व चालीरीती शुद्धस्वरूपांत पहावयास मिळतात असें पी. सुंदरम् पिल्ले यांचे म्हणणें आहे.

चो ल.—चोल किंवा चोळ व पाण्डय यांचा उल्लेख पाणिनि करीत नाहीं व कात्यायन करतो. अशोकानें हीं राज्यें स्वतंत्र असल्याचें मान्य केलें आहे. जुन्या कवींनीं उल्लेखिलेला पहिला चोल राजा करिकाल हा असून त्यानें सिलोनवर स्वारी केली व तेथून कावेरी नदीला धरण बांधण्याकरितां हजारो मजूर धरून आणले अशी माहिती मिळते. हा खिस्तोत्तर पहिल्या किंवा दुसऱ्या शतकांतला राजा असावा. परंतु यानंतर लवकरच चेर राजे प्रबळ बनून चोळ राजे अनेक शतकें हतप्रभ होऊन पडले. इ. स. ६४० मध्यें पल्लव राज्याची राजधानी कांची येथें गेलेल्या ह्युएनत्संगानें चोळ राजासंबंधीं उल्लेख केला आहे. ८ व्या शतकांत महाराष्ट्रांतील चालुक्य व कांचीचे पल्लव यांच्यामध्यें मोठा सामना होऊन पल्लव राजे पराभूत झाले. या संधीचा फायदा घेऊन चोळ राजांनीं आपली सत्ता पुन्हा वाढविली. यानंतरच्या चोळ राजांबद्दलची माहिती शिलालेखांवरून बरीच मिळते. या राजांचीं नांवें येणेप्रमाणें:—

१ विजयालय, २ आदित्य ( ८८०–९०७ ), ३ परांतक पहिला ( ९०७–९४९ ), ४ राजादित्य, ५ राजराजदेव ( ९८५–१०१८ ), ६ राजेंद्र चोलदेव पहिला ( १०१८–१०३५ ), ७ राजाधिराज, ८ राजेंद्र परकेसरी वर्मा, ९ वीर राजेंद्र, १० अधिराजेंद्र. अधिराजेंद्राला औरस संतति नव्हती म्हणून राजेंद्र नांवाच्या त्याच्या नातलगाला त्याची गादी मिळाली. या राजेंद्राचा चालुक्य घराण्याशीं संबंध होता म्हणून पुढें चालुक्यचोल असें मिश्र घराणें बनलें. राजेंद्र हा पहिला कुलोत्तुंग चोल या नांवानें प्रसिद्ध आहे. हें चोल घराणें १३१० मध्यें मलिक काफूरनें नष्ट केलें. पुढें लवकरच विजयानगरचें हिंदुराज्य उदयास येऊन बहुतेक तामिळ देश त्या राज्यांत समाविष्ट झाला.

प ल्ल व.—पल्लव म्हणजे पुराणांत आलेले पल्हव किंवा पारसी ग्रंथांतील पल्हव असे बहुतेकांचे तर्क होते. परंतु या तर्काला ऐतिहासिक पुरावा नाहीं. व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो पल्लव हीं एक हिंदुस्थानांतील मूळच्या लोकांचींच जात असावी. चिं. वि. वैद्य म्हणतात, महाराष्ट्रांत वसाहत करणाऱ्या आर्यांपैकींच पल्लव हे होते. पल्लव लोक शेंकडों वर्षांपासून महाराष्ट्री प्राकृत बोलत आले असल्यामुळें कांचीस वसति केल्याबरहि त्यांनीं आपली मूळभाषा सोडून द्राविडीचा स्वीकार केला नाहीं. पल्लव याचें थोडें प्राकृत रूपांतर होऊन बनलेलें पालवे हें आडनांव मराठ्यांच्या आडनांवांपैकीं एक आहे. ह्युएनत्संगानेंहि कांचीचा राजा नरसिंहवर्मा यांस क्षत्रिय म्हटलें आहे.

उत्तर हिंदुस्थानांतील किंवा महाराष्ट्रांतील पल्लव आडनांवाचा वीरकूर्च म्हणून कोणी आर्य सरदार दक्षिणेंत आला व त्यानें इ० स० १७८ च्या सुमारास मर्दुमकी गाजवून तेथील नागवंशी राजकन्येशीं विवाह केला. वीरकूर्चाचा नातु कुमारविष्णु इ० स० २०० च्या सुमारास कांची ( कांजीवरम् ) शहर हस्तगत करून तेथें स्वतंत्र राजा बनला. हें राज्य पुढें इ० स० ३३८ त पाटलिपुत्राच्या समुद्रगुप्तानें जिंकलें त्यामुळें कांहीं काळपर्यंत पल्लवांनां नम्र व्हावें लागलें, पण पुन्हा इ० स० ५७५ च्या सुमारास सिंहविष्णु यानें डोकें वर काढून वैभव संपादिलें व त्याच्यापासून उत्तर पल्लवांची राजमालिका सुरू झाली. हे पल्लव राजे हिंदुधर्माभिमानी व शैवमतानुयायी होते. या उत्तरपल्लव राजांचीं नांवें येणें प्रमाणें:—

१ सिंहवर्मा ( मृत्यु स. ५८२ )
२ सिंहविष्णु ( मृत्यु स. ५९० )
३ महेंद्रवर्मा १ ला ( मृत्यु स. ६१८ )
४ नरसिंहवर्मा १ ला ( ६४६ )
५ महेंद्रवर्मा, २ रा ६६०
६ परमेश्वरवर्मा १ ला सन ६७४
७ नरसिंहवर्मा २ रा सन ७००
८ परमेश्वरवर्मा २ रा सन ७१५
९ दंतिपोतवर्मा स. ७४२

उत्तर पल्लवांतील पहिला मोठा राजा सिंहविष्णु होय. यानें पांड्य, चोल इत्यादि जवळच्या देशांखेरीज आणखी सिंव्हलद्वीपहि जिंकलें होतें. त्याचा पुत्र पहिला महेंद्रवर्मा याचा हर्षाचा प्रतिस्पर्धी जो द्वितीय पुलकेशी चालुक्य त्यानें युद्धांत पाडाव केला. ह्युएनत्संग कांचीस गेला तेव्हां तेथें महेंद्राचा पुत्र नरसिंहवर्मा राज्य करीत होता. तो जरी नांवानें पुलकेशीचा मांडलिक होता तरी पुढें इ. स. ६४२ त त्यांचें युद्ध होऊन त्यांत पुलकेशीचा त्यानें पराभव केला, व त्यांची राजधानी वातापी नगरी हस्तगत करून ती लुटून टाकली, पण या गोष्टीचा सूड पुलकेशीचा पुत्र पहिला विक्रमादित्य यानें घेतला. त्यानें कांचीवर स्वारी करून ती नगरी घेतली व चालुक्यांचा दरारा पुनः बसविला. याप्रमाणें सन ५५० पासून ७५० पर्यंत पल्लव व चालुक्य या दोन राजघराण्यांत पुष्कळ झगडे झाले. तथापि पल्लवांनीं आपलें राज्य कायम राखून बलाढ्यहि केलें. शेवटीं इ. स. ७४० मध्यें दुसरा विक्रमादित्य चालुक्य यानें पल्लवांचा मोठा पराभव केला, व तेव्हांपासून पल्लवांच्या राज्यास उतरती कळा लागून सन ९०० च्या सुमारास चोळांच्या आदित्य राजांनीं पल्लव कुलाचा उच्छेद केला. या वेळेपासून पल्लवांचें नांव इतिहासांत ऐकूं येईनासें झालें.

मराठ्यांप्रमाणें पल्लव हेहि मोठे शिवोपासक होते. त्यांनीं कांचीस मोठमोठीं शिवमंदिरें बांधलीं. शैवमताचें दक्षिणेंतील मुख्य पीठ कांची येथेंच असून तेथें अनेक शैव कवी व साधू होऊन गेले. याच कारणास्तव हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध सप्तपुरींत कांचीची गणना होऊं लागली असें वाटतें.

या तीनचार मुख्य राज्यांशिवाय सुमारें एकशेवीस लहान लहान पण बहुतांशीं स्वतंत्र अशीं राज्यें दक्षिणेंत होतीं. त्यांची आपापसांत नेहमींच युद्धें चालू असत, असें हल्लीं या प्रांतांत जीं अनेक तटबंदी असलेलीं पण सांप्रत ओस पडलेलीं गांवठणें आढळतात त्यांवरून दिसतें.

**दक्षिणेंतील धार्मिक परिस्थिति.**—दक्षिणेंतील मूळच्या लोकांत भुताखेतादि तामसी दैवतांची पूजा चालू असे. असल्या रानटी चालीरीतींवर हिंदु संस्कृतीचा व जैन आणि बौद्ध संप्रदायांचा परिणाम होऊन सुधारणा झाली. चंद्रगुप्त मौर्याच्या कारकीर्दींत ख्रि. पू. ३०९ च्या सुमारास बारा वर्षांचा मोठा दुष्काळ पडला होता त्या तडाक्यांत कित्येक जैन लोक दक्षिणेकडे गेले, व त्यांनीं बौद्ध प्रचारक दक्षिणेंत जाण्याच्या एक शतक पूर्वींच जैन संप्रदायाचा तिकडे प्रसार केला. हें जैन मत म्हैसूर व इतर प्रांतांत ख्रिस्तोत्तर ७ व्या शतकापर्यंत बरेंच पसरलेलें होतें. बौद्धसंप्रदायाचा दक्षिणेंत प्रसार अशोकाचा बंधु महेंद्र व अशोकानें पाठविलेले इतर प्रचारक यांनीं ख्रि.पू. तिसऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास केला. तथापि बौद्ध मताचें वर्चस्व दक्षिणेंत कधींहि नव्हतें. ख्रिस्तोत्तर ७ व्या शतकांत तर जैन व हिंदु धर्माच्या प्राबल्यामुळें बौद्धमत बहुतेक नष्टप्रायच झालें; व अखेर हिंदुधर्मांचा जैनमतावरहि विजय झाला. तेव्हांपासून इतर प्रांतांपेक्षां जातिभेदोपन्न आचारांची तीव्रता मद्रासकडे फार वाढली आहे.

**सामाजिक स्थिति व व्यापार.**—दक्षिणेंतील राज्यांत आपसांत लढाया नेहमीं चालू असत हें खरें आहे. तथापि त्यामुळें सर्वत्र अशांतता होती किंवा वाङ्मय, कलाकौशल्य व व्यापार यांची वाढ झाली नाहीं असें मात्र नाहीं. या संबंधानें मिगॅस्थिनीझ म्हणतोः 'समाजांतील मोठा वर्ग शेतकऱ्यांचा असून तो अत्यंत शांतताप्रिय आहे. त्या वर्गाला लष्करी नोकरीची माफी आहे, इतकेंच नव्हे तर त्याच्या शेतकीच्या धंद्याला लढाऊ वर्गाकडून बिलकूल उपद्रव होत नाहीं. एकीकडे लढाई चालू असली तरी दुसऱ्या बाजूला शेतकरी शेतकीचीं कामें बिनधोकपणें करीत असतात;'

या तामिळ देशांत मिरी, मोतीं व पाच हे दुसरीकडे न मिळणारे व्यापाराचे जिन्नस फार असत. मिऱ्यांनां यूरोपमधील बाजारांत फार किंमत येत असे. पाच या रत्नास रोमन व्यापारी भारी किंमती देऊन नेत असत, व मोतीं नेण्याकरितांहि दूरदूरचे व्यापारी दक्षिणेंत येत असत.

दक्षिणेकडील राजे स्वतः विद्वान् व विद्वानांचे मोठे आश्रय दाते होते यासंबंधीं उल्लेख वर जागोजागीं आलेच आहेत.

हर्षाचें साम्राज्य हेंच शेवटचें उत्तर हिंदुस्थानांतील हिंदूंचें साम्राज्य होय. अशोकानंतर उत्तर हिंदुस्थानांत सर्व हिंदुस्थानास एकत्र करणारी हिंदू शक्ति उत्पन्न झाली नाहीं. सर्वांत मोठा होऊन गेलेला राजाधिराज म्हणजे हर्षवर्धन त्याचें दक्षिणेंत सत्याश्रय पुलकेशीनें बिलकूल चालूं दिलें नाहीं. त्यावेळेस हर्ष व पुलकेशी हे दोन समान बलाचे सम्राट उत्तरेस व दक्षिणेस होते, आणि यानंतर हिंदू शक्तीनें हिंदुस्थान व दक्षिण यांचें तात्पुरतें ऐक्य करण्याचें श्रेय बाळाजी बाजीरावास मिळालें.

गुप्त साम्राज्य मोडल्यानंतर चोहोंकडे अनेक स्थानिक राज्यें उत्पन्न झालीं. साम्राज्य नष्ट झालें म्हणजे स्थानिक राज्यें बलवान व्हावयाचींच. या त्यांच्या काळांत देशी भाषांचा अधिक विकास झाला. गुप्तनाशापासून ही क्रिया मुसुलमानी स्वारीपर्यंत चालू होती. आणि तशीच क्रिया युरोपांतहि चालू होती. सातवें व आठवें शतक घेतलें तर असें म्हणतां येईल कीं, फ्रान्स पासून चीनपर्यंतच्या जगांत सुरळीत चाललेलें बलवान साम्राज्य म्हणजे खलीफात हेंच होतें. पश्चिम युरोपांत जो जोरदार होई त्यानें पूर्वेकडील बादशाचें नामधारी अंकितत्व मान्य करावें पण सत्ता आपणच चालवावी. नवव्या शतकाच्या आरंभीं पश्चिमेकडे नवीन साम्राज्य स्थापन झालें. पण त्यानें नामधारी परंपरा रोमची घेतली, नवव्या दहाव्या व अकराव्या या तीन शतकांत हिंदुस्थानांत आणि युरोपमध्यें स्थानिक राज्यांचा जोम, देशी भाषांचा विकास व भाषामूलक लोकसंघाच्या समाजाची जाणीव या क्रिया चालू होत्या.

---

## प्रकरण १६ वें.

## रोमन-ग्रीक साम्राज्याचा इतिहास व पश्चिमेकडील साम्राज्याची स्थापना.

अलेक्झांडर दि ग्रेटच्या मृत्यूनंतर ग्रीकांचीं जीं नवीन राज्यें झालीं त्यांचे उल्लेख मागें ग्रीक संस्कृतीची व्यापकता दाखवितांना आणि तिचा इजिप्त, इराण, हिंदुस्थान, तुर्कस्थान, इत्यादि भागांत प्रवेश वर्णन करतांना आलाच आहे, तसाच ग्रीकांच्या रोमन लोकांनीं केलेल्या सत्ताविध्वंसाचाहि उल्लेख केलाच आहे. परंतु त्यांत राजकीय घडामोडींचें कथासूत्र नीट येत नाहीं म्हणून तिकडे प्रथम वळलें पाहिजे. रोमन साम्राज्य वाढत चाललें असतां त्याचें ग्रीस हेंच मुख्य निवासस्थान झालें. तसेंच ख्रिस्ती संप्रदायाची यूरोपास ओळख झाली ती बहुतांशीं ग्रीस मार्फतच झाली आणि ख्रिस्ती संप्रदायाच्या शासनसंस्थेस जरी बळकटी ग्रीसच्या भूमीवर आली नाहीं तरी साध्या नैतिक उपदेशांत विचार-

मयता शिरून तो संप्रदाय विद्वानांसहि विचारार्ह झाला. हा इतिहास ग्रीसचा उत्तरकाळ वर्णन करतांनाच देणें प्राप्त होतें.

**रोमन प्रजासत्ताक अमदानींतील ग्रीस ( इ. स. पू. १४६-२७ ).**—ॲकियन संघाच्या ऱ्हासानंतर ग्रीसची पुनर्घटना करण्यासाठीं एक कमिशन रोमन सेनेटनें नेमिलें. प्रमुख प्रतिस्पर्धी केंद्र जें कॉरिंथ शहर याचा नायनाट करण्यांत आला. शहराशहरांमधील व्यापारी दळणवळण व लग्नव्यवहारहि बंद पाडण्यांत आले. राज्यकारभार प्रजासत्तावाद्यांच्या हातून काढून रोमन सरकारास अनुकूल अशा श्रीमंत वर्गाकडे सोंपविण्यांत आला. अथेन्स स्पार्टासारख्या कांहीं संस्थानांनां व शहरांनां मूळचे राजकीय हक्क देण्यांत आले. जमिनीवरची मालकी फारशी बदलली नाहीं. मॅसिडोनियाच्या सुभेदाराकडे ग्रीसवर देखरेख करण्याचें काम देण्यांत आलें होतें तरी इतर परतंत्र मुलुखापेक्षां एकंदरींत ग्रीसचा दर्जा बऱ्यापैकीं होता यांत शंका नाहीं.

ग्रीक लोकांस यापुढें विरोध करणें अशक्य होतें व हें त्यांनां लवकरच कळूनहि आलें. देशांत पुढें पुढें इतकी शांतता झाली होती कीं, रोमन लोकांनींच पूर्वीचे दडपशाहीचे कायदे रद्द करून टाकले. पण ही शांतता मिथ्राडेटीझशीं चाललेल्या युद्धामुळें आटोपली ( इ० स० पू. ८८–८४ ). या युद्धाचा शेवट ग्रीसला अपायकारक झाला. रोमन प्रजासत्ताक कारभाराच्या शेवटल्या दशकांत यूरोपियन ग्रीस तत्कालीन युद्धामुळें फारच थोडा स्पृष्ट झाला होता. इतर सर्व प्रांतांप्रमाणें रोमन अधिकाऱ्यांनीं त्याला बुडविलें नव्हतें. तथापि वेळोवेळीं अधिकाऱ्यांची ठेवावी लागणारी बडदास्त व रोमन व्यापाऱ्यांची नागवण यामुळें ग्रीस जास्त त्रस्त झालें होतें. इटली आणि लेव्हंट यांच्यामध्यें प्रत्यक्ष दळणवळणाचा मार्ग खुला झाल्यामुळेंहि ग्रीसच्या उत्कर्षास मोठा धक्का बसला. ग्रीसच्या समुद्रांत चांगलें बलिष्ठ आरमार नसल्यामुळें चांचे लोकांनीं मोठमोठ्या व्यापारी पेठा लुटल्या त्यामुळें त्याच्या पुष्कळ भागांतून लोकवस्ती कमी झाली.

सीझर आणि पॉंपी यांच्या भांडणांत ग्रीक लोकांनीं पॉंपीच्या उत्कृष्ट आरमाराला हातभार लाविला. सीझरचा जय झाल्यामुळें हा सबंध देश त्याच्या हातांत पडला. त्याची ग्रीक लोकांशीं वागणूक सौम्यपणाची होती. सीझरच्या मृत्युनंतर ब्रूटसचा पक्ष त्यांनीं उचलून धरला. पुढें ग्रीस ॲंटनीच्या ताब्यांत गेला ॲंटनीनें आपल्या लढायांचा खर्च भागविण्यासाठीं त्याच्यावर बरेचसें कर्जाचें ओझें लादलें, त्यामुळें देशांत दुष्काळ पडला.

**रोमन साम्राज्याखालीं [ इ. स. पू. २७–इ. स. ३२३ ].**—ऑगस्टस बादशहाच्या कारकीर्दींत थेसली प्रांत मॅसेडोनियाला जोडण्यांत आला व बाकीचा ग्रीस ॲकिया प्रांतांत सामील करून टाकिला व त्यावर एक प्रोकॉन्सल नेमिला. ॲथेन्स, स्पार्टा इत्यादि अनेक संस्थानांनां स्वतंत्र हक्क दिले. देशाचें हित पाहण्यासाठीं आरगॉस येथें एक प्रतिनिधिमंडळ भरत असे. पूर्वीचें डेल्फिक मंत्रीमंडळ पुन्हा अस्तित्वांत आणून उत्तर व मध्य ग्रीसचे प्रतिनिधि त्यांत घेण्यांत आले.

**साम्राज्याखालीं नैतिक व आर्थिक स्थिति.**—साम्राज्याच्या कारभाराच्या अमदानींत, ग्रीसची आर्थिक स्थिति फारशी सुधारली नाहीं. सामान्यतः देशाचा व्यापार खालावला व शेतकीच्या जमीनी कुरणें बनलीं. थेसली, फोसेस, एलिस, आरगॉस आणि लॅकोनिया या कांहीं जिल्ह्यांखेरीज सर्व प्रदेश ओसाड पडला. तथापि ग्रीक लोकांचें सामाजिक आयुष्य आकर्षक होऊन राहिलें. परतंत्र राष्ट्रांत राष्ट्रास स्वत्वाची जाणीव कमी करणारीं मतें, विश्वबंधुत्वात्मक किंवा खा, प्या, मजा करा, सांगणारे पुष्टिमार्ग, आणि जगन्मिथ्या सांगणारे वेदांत, एपिक्युरीयन किंवा स्टोईक इत्यादि विचारसंप्रदायाच्या रूपानें प्रसृत होत होतीं. मागील युद्धाचा व संकटाचा काळ जाऊन आतां यूरोपियन हेलेन लोकांनां शांततेचा व निष्कर्माचा काळ प्राप्त झाला. त्यांच्या पुढें भावी उत्कर्षाची आशा नसल्यानें गत वैभवाच्या विचारांत ते गढून गेले आणि राष्ट्रीय अभिमान त्यांच्यांत अमर्यादांत जागृत झाला. त्यामुळें समाजांत फारसे दुर्गुण शिरले नाहींत. आपल्या प्राचीन संस्कृतीचें सातत्य राखण्यासाठीं अभिजात शिक्षणाचा अथेन्स सारख्या शहरांतुन त्यांनीं सांठा करून ठेविला. हीच क्रिया त्यांच्या संस्कृतिविकासास कारण झाली असावी. व रोमवरहि ग्रीसचें वजन यामुळेंच पडलें. यूरोपियन ग्रीस आणि रोम यांच्यामधील नातें केवळ ज्ञानक्षेत्रापुरतेंच होतें. दुसऱ्या आणि तिसऱ्या शतकांत ग्रीसमधून बाहेर इटलींत प्रोफेसर व भाषाकोविद यांची संख्या जितकी जाई तेवढीच किंवा त्याहूनहि जास्त प्रवाशांची संख्या ग्रीस देशाचें सौंदर्य पाहण्यास आंत येत असे.

पहिल्या कांहीं सुभेदारांची कारकीर्द ग्रीकांना जड जाऊन त्यांनीं अशी मागणी केली कीं, तो देश सेनेटच्या सत्तेखालून निघून प्रत्यक्ष बादशाही सत्तेखालीं यावा. ही मागणी मान्य झाली पण फार थोडा वेळ (इ. स. ४४) टिकली. इ. स. ४४ मध्यें क्लॉडियसनें सिनेटच्या ताब्यांत तो प्रांत दिला. बादशहा नेरो स्वतः बराच काळ ग्रीसमध्यें हिंडला व त्यानें ग्रीसला स्वातंत्र्य देऊन खंडणींतून मुक्त केलें. या स्वराज्यामुळें अयोग्य महत्वाकांक्षा व पक्षभेद उत्पन्न झाल्यामुळें व्हेस्पॅशियननें ही देणगी परत घेऊन पुन्हा ॲकिया प्रांत बादशाही हुकूमती खालील प्रदेश बनविला. पुढें दुसऱ्या शतकांतले बादशहा ग्रीसचे पक्षपाती असल्यानें त्यांनीं त्याच्या उत्कर्षास बरीच मदत केली. हॅड्रियननें ग्रीसमध्यें बऱ्याच सुधारणा घडवून आणिल्या. तिसऱ्या शतकांत बऱ्याचशा ग्रीक लोकांना रोमन नागरिकत्वाचे हक्क मिळाले. ग्रीसवर पुन्हा परकीयांचे हल्ले सुरू झाले पण त्यांपासून फारसा अपाय घडला नाहीं.

**उत्तरकालीन रोमन साम्राज्यसत्तेखालीं.**— डायोक्लीशियननें साम्राज्याची पुर्नघटना केली तेव्हां अॅकियाला मॅसेडोनियामध्यें महत्त्वाचें स्थान मिळालें. पहिल्या कान्स्टंटाइनच्या कारकीर्दींत इलिरिकम भागांत त्याचा समावेश झाला. त्याचे जिल्हे पाडण्यांत आले व राज्यकारभार रोमन म्युनिसिपल धर्तीवर होऊं लागला. एकंदरींत चौथें शतक उत्कर्षाचें गेलें व ग्रीक राष्ट्राला एकराष्ट्रीयत्वाचें स्वरूप प्राप्त झालें. पण या काळांत ३७५ मध्यें झालेल्या भयंकर धरणीकंपामुळें व व्हिसिगॉथ लोकांच्या दरोड्यांमुळें राष्ट्राची थोडी पिछेहाट झाली.

चौथ्या शतकांतील बादशहांनीं शासनें काढून ग्रीसमधील जुना पाखंडी संप्रदाय नाहींसा करण्याचा प्रयत्न केला, पण अजमासें ६०० पर्यंत हा संप्रदाय त्या ठिकाणीं टिकून राहिला, पुढें ख्रिस्ती संप्रदायानें आपलें कायमचें ठाणें दिलें. साम्राज्याच्या पूर्व व पश्चिम प्रदेशांच्या विभक्ततेमुळें लेव्हंट मुलुखांत ग्रीसची भाषा व आचारधर्म पुन्हां प्रामुख्यानें प्रस्थापित झाले. पण पांचव्या व सहाव्या शतकांतील बादशहांना ग्रीक संस्कृतिबद्दल अगदीं आदर नसल्यानें त्यांनीं ग्रीसमध्यें रोमन कायदे पुन्हां सुरू करून ग्रीसचें स्वातंत्र्य हिरावून घेण्याचा प्रयत्न केला. पुढें पुढें तेथील लोक आपली जुनी संस्कृति इतकी विसरले कीं, त्यांनीं आपलें हेलेन हें नांव टाकून देऊन रोमन नांव धारण केलें. पुष्कळ काळपर्यंत ग्रीस सुस्थावस्थेंत राहिलें. पांचव्या शतकांत व्हांडॉल वाच्यांनीं व आस्ट्रॉगॉथनी ग्रीसवर स्वाऱ्या केल्या. जस्टिनियनच्या कारकीर्दींत ग्रीसमधील शहरांची व सरहद्दीवरील ठिकाणांची शत्रूपासून संरक्षण करण्याकरितां डागडुजी करण्यांत आली. त्यावेळीं स्थानिक सैनिकांच्या जागीं बादशाही सैन्य उभारण्याचें धोरण स्वीकारलें होतें पण सुदैवानें तें अमलांत न येतां ग्रीक लष्करच कायम ठेवण्यांत आलें.

ग्रीस हा देश साम्राज्यस्थान झाल्यामुळें आणि साम्राज्याचा रोमीपणा दिवसानुदिवस कमी होत गेल्यामुळें मूळचें रोमी साम्राज्य नंतर ग्रीक साम्राज्य बनलें आणि अथेन्स सारख्या जुन्या ग्रीक संस्कृतीच्या शहरांचें अर्वाचीन काळापर्यंत महत्त्व जरी कमी झालें तरी त्यामुळें ग्रीसचें महत्त्व कमी झालें असें नाहीं, तर जिंकणाऱ्या रोमी साम्राज्याचा सर्व प्रदेश, ग्रीस रोमला दत्तक जाऊन मिळाला असें म्हटलें पाहिजे. आणि ते सर्व फेरफार समजून घेण्यासाठीं पूर्वरोमन साम्राज्याचा इतिहास लक्षांत घेतला पाहिजे.

ग्रीस राष्ट्राचें स्वातंत्र्य रोमनें हिरावून घेतलें एवढेंच नाहीं तर इतर दुसरीं जीं ग्रीक साम्राज्यें रोमनें खालसा केलीं, तेथें देखील ग्रीसचें महत्त्व कायम राहिलें हें मागें वर्णिलेंच आहे. एशियामायनर, सीरीया व इजिप्त हे प्रदेश ग्रीकांपासून रोमन लोकांनीं घेतले आणि त्यामुळें रोमला इराणी सत्तेशीं वारंवार संग्राम करावा लागला.



**रोमनसत्ता व इजिप्त.**— प्राचीन इजिप्तचा ग्रीकांशीं कायमचा संबंध ख्रि. पू. ३२३ सालीं उत्पन्न झाला आणि तेथें टालेमी घराण्याची स्थापना झाली. ग्रीकांनीं कांहीं ग्रीक वसाहती तेथें सुरू करून ग्रीक व इजिप्शिअन लोकांस परस्परांशीं लग्नव्यवहार करण्यास संधि देऊन आपली सत्ता कायम करण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं दोघांस ग्राह्य होतील अशा देवतांचे उत्सवहि सुरू केले. ख्रिस्तपूर्व ३२३ पासून ख्रिस्तपूर्व ३० हा टालेमीच्या सत्तेचा काल होय. त्या कालापासून ६३९ पर्यंत म्हणजे महमदाच्या मरणानंतर थोडक्याच वर्षांनीं मुसुलमानांनीं इजिप्त घेतला त्या कालापर्यंत रोमन सत्ता चालू होती. ग्रीकांच्या कारकीर्दींत इजिप्तमधील लोकसंख्या ७० लाखांवर होती, यावरून त्या काळीं हा देश मोठ्या भरभराटीच्या स्थितींत असावा असें दिसतें. रोमन राज्यांत मात्र फारशी भरभराट असलेली दिसत नाहीं. रोमन राज्यामध्यें ज्या कांहीं गोष्टी स्मरणीय म्हणतां येतील त्यांत ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार ही एक गोष्ट होय. तेथें कॉप्टिक नांवाच्या निराळ्या ख्रिस्तीचर्चची स्थापना झाली. या चर्चनें आपल्या पुरोहितांवर विवाहनिषेध लादला नाहीं ही लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे. कॉप्टिक चर्चच्या मतांमध्यें प्राचीन मिसरी विचाराचा बराच अंश आला असेल. पण तो किती आला याचें संशोधन चांगलें झालें नाहीं. इजिप्त मधील लोकांचा रोमला मुख्य उपयोग हा होता कीं, रोमला लागणारें धान्य इजिप्त मधून येई. आणि त्यामुळें इजिप्त वरील अधिकार बादशहांनीं आपल्या ताब्यांत ठेवले होते आणि सेनेटला त्या अधिकारांत फारशी ढवळाढवळ करूं दिली नाहीं. रोमन पातशाही कालामध्यें व्यापारविषयक एक प्रयत्न झाला तो हा कीं, हिंदुस्थान आणि यूरोप यांमध्यें व्यापारी दळणवळण जें पूर्वी अरबस्थानामार्फत होतें तें इजिप्तमार्फत चालू केलें. रोमननागरिकत्वाचे हक्क इतर लोकांबरोबर इजिप्तला देखील काराकल्लाच्या कारकीर्दींत मिळाले. इजिप्तमध्यें ख्रिस्तीसंप्रदाय सुरू झाल्यानंतर ज्यूंना त्रास देण्यामध्यें इजिप्तहि इतर राष्ट्रांच्या मागें नव्हता. इजिप्तच्या रोमन सत्तेखालच्या इतिहासाविषयीं वरील गोष्टीपेक्षां सांगता येण्याजोगें विशेष नाहीं. रोमन साम्राज्याची इजिप्तवरील सत्ता पुढें महमदाच्या मृत्यूनंतर थोडक्याच दिवसांनीं मुसुलमानांनीं नष्ट केली आणि त्याच सुमारास एशियामायनर व सीरिया हे प्रांत हस्तगत केले. आणि रोमन साम्राज्याशीं संग्राम करण्याची संधि इराणपासून इस्लामानें इराणच काबीज करून स्वतःकडे घेतली.

पश्चिमएशिया व इजिप्त यांच्यासंबंधानें कथासूत्र थांबवून आपण आतां यूरोपकडे वळूं, आणि सिंहावलोकनार्थ, आणि ऐतिहासिक वृत्तांचा प्रमाणबद्धता लक्षांत येण्यासाठीं आजचा यूरोप आणि त्यांत ग्रीक व रोमन संस्कृतीचे अवशेष यांचा संबंध लक्षांत घेऊं.

**रोमनसाम्राज्याविषयीं स्थूल विचार.**—इ. स. ४७६ मध्यें पश्चिमेकडील रोमन साम्राज्य नष्ट झालें. तें साम्राज्य नष्ट करणाऱ्यांनीं आपला अधिकार स्वतःच्या नांवानें न पुकारतां शास्त्रार्थाकरतां कां होईना आपल्या अधिकारास पूर्वेकडील रोमन सम्राटाची संमति घेतली. ३३७ च्या सुमारास जुनें साम्राज्य नाहींसें होऊन त्याचे पूर्वसाम्राज्य आणि पश्चिमसाम्राज्य असे दोन तुकडे पडले. आणि त्यांच्या विभक्तस्थितीस इ. स. ३९५ मध्यें पूर्णता आली ही गोष्ट मागें (पृ. १०८-९ पहा) सांगितलीच आहे, आणि पूर्वभागाच्या इतिहासाचें कथासूत्र शकावलीच्या स्वरूपांत ४७६ पर्यंत दिलेंच आहे. होनोरिअसपासून रोम्यूलस आगस्टयुलसपर्यंत पश्चिमेकडील चक्रवर्ती राज्य करीत असतां त्यांचे प्रांत एकामागून एक कसे चालले, गॉल, ब्रिटन्, गॉथ्, आस्ट्रागाथ या लोकांनीं आणि उत्तर आफ्रिकेनें साम्राज्यापासून आपली विभक्तता कशी स्थापन केली हेंहि सांगितलेंच आहे. यांत पूर्वेकडील घडामोडींचें निवेदन शिल्लक राहिलें. रोमन साम्राज्याचा पुढील इतिहास द्यावयाचा म्हणजे कान्स्टंटाईनच्या कारकीर्दीपासून तुर्कांनीं कान्स्टन्टिनोपलचा पाडाव करीपर्यंतचा इतिहास सांगितला पाहिजे. पूर्वेकडील रोमन पातशाहीचे जेते जे तुर्क तेच खरोखर रोमन साम्राज्याची परंपरा आज चालवीत आहेत असें म्हटल्यास एका दृष्टीनें तें म्हणणें बरोबर होईल. तुर्कांनीं अशा तऱ्हेचा हक्क सांगितलाहि होता. तथापि तुर्कांनीं आपला परंपरेचा संबंध रोमन पातशाहाशीं न लावतां ते मुसुलमान असल्यामुळें त्यांनीं खलीफातीशीं लावला त्यामुळें तुर्की साम्राज्याला रोमन साम्राज्य म्हणतां येणार नाहीं. तुर्क ख्रिस्ती असते तर पूर्व रोमनसाम्राज्य अजूनपर्यंत चालू आहे असें म्हणतां आलें असतें. पाश्चिमेकडील रोमन साम्राज्य धुळीस मिळविणाऱ्या लोकांनीं आपली परंपरा रोमन साम्राज्याशीं भिडविण्याचा प्रयत्न केल्यामुळें आणि त्यांच्या महत्त्वाकांक्षी प्रयत्नांचें क्रीडास्थान रोम शहरच असल्यामुळें आणि रोमनसत्तेचें केंद्र जरी स्थानच्युत झालें तरी पोप व चर्चची शासनसंस्था यांचें केंद्र रोम राहिल्यामुळें रोमन 'पातशाही खरोखर मृत झाली असतां चालूच आहे अशी आभासात्मक कल्पना पाश्चात्य राजकारणाच्या भाषेंत आणि कार्यांत राहिली. रोमनसाम्राज्याचा पश्चिमेकडील इतिहास ४७६ नंतर द्यावयाचा म्हणजे निरनिराळ्या महत्त्वाकांक्षी संस्थानांचा, विशेषेंकरून ज्या संस्थानांनीं रोमन परंपरेवर आपला हक्क ठेवला त्या संस्थानांचा इतिहास द्यावयाचा. पूर्वेकडील गोष्ट मात्र निराळी आहे. कान्स्टंटाईननें कान्स्टंटिनोपलला गादी नेली तेव्हांपासून तुर्कांनीं या नगराचा पाडाव करीपर्यंत अकरा शतकांहून अधिक कालपर्यंतचा इतिहास सुसंगत देतां येतो. हें साम्राज्य ११ शतकें टिकलें म्हणजे एकच वंश अधिकारारूढ होता असें नव्हे. त्यांत रोमन रक्ताचा संबंध थोडकाच होता. कांहीं ग्रीक तर कांहीं एशियांतील रक्ताचे अशी तेथील राजावली होती. पण ही ख्रिस्ती होती किंवा निदान मुसुलमान तरी नव्हती. कित्येक राजांनीं ख्रिस्ती व मुसुलमान या दोघांविषयीं त्रयस्थवृत्ति ठेवण्यासाठीं यहुदीपंथ पत्करला होता.

पहिल्या ते शेवटल्या कॉन्स्टंटाइन पर्यंतचें ख्रिस्ती रोमन साम्राज्य ११३० वर्षें टिकलें आणि त्या लांबलचक काळांत आचारविचारविषयक आणि सत्ताविषयक अनेक घडामोडी त्यानें पाहिल्या. ५ व्या शतकांत टयूटॉन्स यांची वाढ होऊन पश्चिमेकडील प्रांत ताब्यांतून गेले. पण ६ व्या शतकांत त्या साम्राज्यानें आपली प्राचीन सत्ता पुन्हां कांहींशीं प्रस्थापित करून आपले गमावलेले प्रांत पुन्हां हस्तगत केले व रोमशीं संबंध जिवंत केला. ७ व्या शतकांत सारासेन आणि स्लाव्ह यांच्या राज्यविस्तारामुळें हीं साम्राज्यसत्ता अगदीं कमी झाली पण ८ व्या शतकांतील अंतर्गत सुधारणेमुळें व धोरणी राज्यकारभारामुळें ९ वें शतक संपण्यापूर्वीच साम्राज्यानें सत्ता आणि विजय यांच्या नवीन कारकीर्दीस सुरुवात केली. ११ व्या शतकाच्या मध्यापासून ऱ्हास सुरू झाला. पूर्व आणि उत्तर सरहद्दीपासून असलेल्या कायमच्या भीतीखेरीज नॉर्मन लोकांच्या राजकीय बाबतींतील चढाईची व व्हेनिसच्या व्यापारांतील चढाईची साम्राज्याला मोठी धास्ती होती. नंतर १२०४ मध्यें फ्रँक आणि व्हेनेशियन लोकांनीं साम्राज्याची राजधानीच बळकाविली आणि त्याचे मुलूख वियुक्त करून टाकिले. यापुढें २५० वर्षें पूर्वीच्या शरीराची केवळ छाया म्हणून तें अस्तित्वांत होतें.

पूर्वसाम्राज्याच्या दीर्घ आयुष्यांत त्याचें महत्त्वाचें राजकीय कार्य म्हणजे त्यानें पश्चिम आशियांतील बलाढ्य राष्ट्रांपासून यूरोपखंडाचें संरक्षण केलें हें होतें. यूरोपांत उत्तर सरहद्दीवर जर्मन, स्लॅव्होनिक, फिनिक आणि तार्तर या लोकांशीं एकसारखें तें झगडत होतें तरी आपला खरा सामना पूर्वेकडच्या बाजूला आहे ही गोष्ट त्याच्या मनांत सदैव वागत होती. अशा दृष्टीनें पाहतां आपल्यास साम्राज्याच्या बाह्य इतिहासाचे चार मोठे कालखंड करावे लागतील. प्रत्येक खंडांत निराळ्या आशियांतील राजसत्तेशीं त्याला झगडा करावा लागला आहे. (१) इराणशीं जें युद्ध चालू होतें त्यांत अनेक शतकें हें साम्राज्य पराभव पावलें त्या युद्धाचा अंत सुमारें ६३० मध्यें रोमी साम्राज्याचा जय होऊन झाला. (२) सारासेन लोकांशीं ११ व्या शतकांत युद्ध चालू होतें त्यांत सारासेन दुर्बल ठरले (३) सेल्जुक तुर्कांशीं ११ व्या आणि १२ व्या शतकांत युद्ध चालू होतें त्यानें साम्राज्य नष्ट झालें नाहीं पण (४) ओटोमन तुर्कांशीं, जें युद्ध झालें त्यांत मात्र रोमन सत्ता रसातळास गेली.

मध्ययुगावर लिहिणारे इतिहासकार पश्चिम यूरोपांत उदय पावणाऱ्या राष्ट्रांवरच कायती आपली दृष्टी ठेवून पूर्वे-

साम्राज्याचा यूरोपांतील दर्जा अजीबात विसरतात. ११ व्या शतकाच्या मध्यापर्यंत तें सामर्थ्यामध्यें सबंध यूरोपांत पहिल्या प्रतीचें राष्ट्र होतें. पण त्याच्या राजकीय बलावरच त्याचें ऐतिहासिक महत्त्व अवलंबून नाहीं. प्राचीनत्वाचे वारस म्हणून संस्कृतीच्या इतिहासांत व त्याचप्रमाणें व्यापारी इतिहासांतहि निःसंशयें त्याचा दर्जा श्रेष्ठ आहे. त्याच्या सबंध कारकीर्दीत कॉन्स्टंटिनोपल हें जगांतलि पहिलें शहर होऊन राहिलें होतें. आपल्या शेजाऱ्यावर विशेषतः स्लॅव्हॉनिक लोकांवर जो त्यानें पगडा बसविला ते त्याचें यूरोपमधील दुसरें कार्य म्हणतां येईल. या कार्यांचें महत्त्व लहान सहान नाहीं, रशीयासारख्या मोठ्या परंतु असंस्कृत प्रदेशांतील अनेक पौर्वात्यसंपन्न राष्ट्रांवर ख्रिस्तीसंप्रदायाची छाप पडण्यास हेंच साम्राज्य कारण झालें. नाहीं तर या साम्राज्यावर मुसुलमानी छाप पडून एशियाची सांस्कृतिक सरहद्द पोलंडला भिडली असती. असो.

**पूर्वसाम्राज्यांतील राजघराणीं.**—प्रथम ऐतिहासिक कथासूत्र लक्षांत येण्यासाठीं निरनिराळ्या राज्यकर्त्या घराण्यांची यादी देतों.,

१ कॉ न्स्टं टि नि य न घ रा णें.—इ. स.३२४-३६३. बादशहाः [घराण्याचा संस्थापक, कॉन्स्टंटिनस १ ला., ३०५-३०६]

कॉन्स्टंटाईन १ ला. [३०५-३०६,यापुढें संपूर्ण बादशहा], ३२४-३३७.

पश्चिमेस—कॉन्स्टंटाईन २ रा. ३३७-३४०; कॉन्स्टन्स ३३७-३५०.

पूर्वेस—कॉन्स्टंटिनस २ रा. ३३७–
संपूर्ण बादशहाः कॉन्स्टंटिनस २ रा. ३५०-३६१;
जुलियन, ३६१-३६३.

अंतर्घराणें.—जोव्हियन ३६३-३६४.

२. व्हॅ ले न्शि नि य नि य न घराणें.—इ. स. ३६४-३९२. बादशहाः

पश्चिमेस—व्हॅलेन्शिनियन १ ला., ३६४-३७५; ग्रेशियन, ३६७-३८३; व्हॅलेन्शियन २रा., ३७५-३९२

पूर्वेस—व्हॅलेन्स, ३६५-३७८ [थिओडोशियस १ ला ३७९-३९२.]

३. थि ओ डो शि य न घ रा णें.—इ. स. ३९२-४५७ बादशहाः थिओडोशियस १ ला. [ ३७९ ], ३९२-३९५.

पूर्वेस—अर्केडियस, ३९५-४०८; थिओडोशियस २ रा., ४०८-४५०; मार्सियन, ४५०-४५७.

पश्चिमेस—ऑनोरियस, ३९५-४२३; कॉन्स्टंटियस ३ रा., ४२२; व्हॅलेन्शिनियन ३रा.,४२५-४५५; (घराण्याबाहेरचे) मॅक्सिमस, ४५५; ॲव्हिटस ४५५-४५६.

४. लि ओ ना इ न घ रा णें.—इ. स. ४५७-५१८. बादशहाः

पूर्वेस—लिओ १ ला., ४५७-४७४; लिओ २ रा., ४७४; झेनो, ४७४-४९१; ॲनेस्टॅशियस १ ला., ४९१-५१८

पश्चिमेस—घराण्याबाहेरचे. मेजोरियन, ४५७-४६१; सेव्हेरस, ४६१-४६५; [लिकी १ ला, संपूर्ण बादशहा ४६५-४६७]; ॲंथेमियस ४६७-४७२; ऑलिब्रियस;, ४७२;, ग्लिसेरियस, ४७३-४७४; जुलियस नेपोस, ४७४-४८० [ अपहारी रोम्युलस ऑगस्टुलस, ४७५-४७६ ].

५. ज स्टि नि य नि य न घराणें.—इ. स. ५१८-६०२ बादशहाः जस्टिन १ ला , ५१८--५२७; जस्टिनियन १ ला., ५२७--५६५; जस्टिन २रा., ५६५--५७८, टायबेरियस २ रा ५७८--५८२ मॉरिस, ५८२--६०२.

अंतर्घराणें.--फोकास, ६०२--६१०.

६ हे र्‍या क्लि य न घ रा णें.—इ. स. ६१०--७११.

बादशहाः हेऱ्याक्लियस, ६१०--६४१; कॉन्स्टंटाईन ३ रा. ६४१; हेऱ्याक्लेओनस; ६४१--६४२; कॉन्स्टन्स २ रा, ६४२--६६८; कॉन्स्टंटाईन ४ था. ( पोगोनेटस ) ६६८--६८५; जस्टिनियन २ रा. ( ऱ्हिनॉट्मेटस ), ६८५--६९५; ( घराण्याबाहेरचे ) लिऑंटिस ६९५--६९८ आणि टायबेरियस ३ रा. (ॲप्शिमर) ६९८--७०५; जस्टिनियन २ रा. ( पुनस्थापित ) ७०५--७११.

अंतर्घराणें.--फिलिप बार्डानेस ७११--७१३; ॲनेस्टेसियस २ रा, ७१३--७१६. थिओडोशियस ३ रा, ७१६--७१७,

७ इ सौ रि य न ( सि रि य न ) घ रा णें.—इ. स. ७१७--८०२. बादशहाः लिओ ३ रा. ७१७--७४० ( ऊर्फ ४१ ); कॉन्स्टंटाईन ५ वा. ( कोप्रोनिमस ), ७४०--७७५; लिओ ४ था. ( खाझार ),७७५--७८०; कॉन्स्टंटाईन ६ वा. ७८०--७९७; इरेने ७९७--८०२.

अंतर्घराणें.—निसेफोरस १ ला ८०२--८११; (स्टौरॅशियस (निसेफोरसचा मुलगा ), ८११; मिचेल १ ला. (ऱ्हंगाबे,स्टौरॅशियसचा सासरा) ८११--८१३; लिओ ५ वा. ( अर्मेनियन ), ८१३--८२०.

८ फ्रि जि य न किं वा ॲ मो रि य न घ रा णें.-इ. स.८२०-८६७. बादशहाः मिचेल २ रा [ चोत्तरा ], ८२०-८२९. थिओफिलस, ८२९--८४२; मिचेल ३ रा. [ दारूडा ], ८४२-८६७.

९ मॅ से डो नि य न घ रा णें.--इ. स. ८६७--१०५७. बादशहाः बेसिल १ ला. [ मॅसिडोनियन ], ८६७-८८६; लिओ ६ वा [ तत्वज्ञानी ] आणि अलेक्झांडर, ८८६--९१२; कॉन्स्टंटाईन ७ वा. [ पॉर्फिरोजेनेटॉस ]; ९१२--९५९; रोमॅनस १ ला [ लेकॅमेनस ] ९२०-९४४; रोमॅनस २ रा. ९५९--९६३; बेसिल २ रा [ बल्गॅरोक्टोनस

आणि कॉन्स्टंटाइन ८ वा, ९६३—१०२५; [ घराण्याबाहेरचे ] निसेफोरस २ रा [ फोकास ], ९६३—९६९, आणि जॉन झिमिसेस, ९६९—९७६; कॉन्स्टंटाइन ८ वा, एकटा, १०२५–१०२८; रोमॅनस ३ रा. [ अर्गिरॉस ], १०२८—१०३४; मिचेल ४ था. [ पॅफ्लॅगोनियन ], १०३४—१०४१; मिचेल ५ वा [ कॅलॅफेट्स ], १०४१—१०४२; कॉन्स्टंटाइन ९ वा. [ मोनोमॅकस ], १०४२—१०५४; थिओडोरा, १०५४—१०५६; मिचेल, ६ वा, [ स्ट्रॅटिओटिकस ], १०५६—१०५७.

अंतर्घराणें.—आयझॅक १ ला. [ काम्नेनस ], १०५७—१०५९; कॉन्स्टंटाइन १० वा [ ड्युकस ] १०५९—१०६७; मिचेल ७ वा [ पॅरापिनॅसेस ], अॅन्ड्रोनिकस आणि कान्स्टंटाइन ११ वा, १०६७; रोमॅनस ४ था [ डायोजेनेस ], १०६७—१०७१; मिचेल ७ वा, एकटा, १०७१—१०७८. निसेफोरस ३ रा, ( बोटॅनेइ—अॅटेस ) १०७८—१०८१.

१० कॉम्नेनियन घराणें.—इ. स. १०८१–१२०४. बादशहाः अलेग्झियस १ ला. [ आयझॅक १ ला. याचा पुतण्या ], १०८१—१११८; जॉन २ रा, १११८—११४३; मॅनुएल १ ला, ११४३—११८०; अलेग्झियस २ रा, ११८०—११८३; अॅन्ड्रोनिकस १ ला ११८३—११८५; आयझॅक २ रा [ एंजेलस ], ११८५—११९५ अॅलेग्झियस ३ रा. [ एंजेलस ], ११९५—१२०३; आयझॅक २ रा आणि अलेग्झियस ४ था १२०३—१२०४.

अंतर्घराणें—अॅलेग्झियस ५ वा, ( मुर्तझुफ्लस ) १२०४. कॉन्स्टंटिनोपलचा पाडाव व साम्राज्याचें फ्रँक व व्हेनेशियन लोकांनीं केलेलें विच्छेदन, इ स. १२०४—१२०५.

११ लॅस्कॅरिड घराणें.—१२०६–१२५९. बादशहाः थिओडोर १ ला [ लॅस्कॅरिस ,] १२०६—१२२२; जॉन ३ रा. [ वटटझेस किंवा बटटसेस ] १२२२—१२५४; थिओडोर २ रा. [ लॅस्कॅरिस ], १२५४—१२५९.

१२. पॅलिओलॉजियन घराणें.—इ. स. १२५९–१४५३: बादशहाः मिचेल ८ वा. [ पॅलिओलोगस ], १२५९–१२८२, अॅन्ड्रोनिकस २ रा. [ थोरला ], १२८२—१३२८; अॅन्ड्रोनिकस ३ रा. [ धाकटा ]; १३२८—१३४१; जॉन ५ वा, १३४१—१३९१; [ घराण्याबाहेरचे ], जॉन [ कँटाकुझेनस ]; १३४७—१३५५; मॅनुएल २ रा, १३९१—१४२५; जॉन ६ वा, १४२५—१४४८; कॉन्स्टंटाइन ११ वा किंवा १२ वा. [ ड्रॅगॅसेस ] १४४८—१४५३.

**सिंहावलोकन**—कान्स्टंटाइनपासून ओडोॲकरच्या स्वारी पर्यंत ( ३२७—४७६ ) साम्राज्याचा इतिहास, मागें ( पृ. १०८–९ ) सांगितलाच आहे पण तो पुन्हां आठवणीसाठीं उद्धृत करतों.

कॉन्स्टंटाइन दी ग्रेट याला तीन पुत्र होते व त्याच्या मरणानंतर साम्राज्याची एक नवीन विभागणी होऊन भाऊबंदकीला सुरवात झाली व प्रथम कॉन्स्टन्सनें दुसऱ्या कॉन्स्टंटाइनचा सर्वा हिस्सा बळकाविला ( ३४० ), आणि सबंध पश्चिमेचा राजा होऊन राहिला. दुसऱ्या कॉन्स्टन्सियसनें त्याचा नाश करून ३५० मध्यें आपण साम्राज्याचा एकटा सत्ताधीश बनला. त्याला संतान नसल्यानें त्याचा चुलत भाऊ ज्युलियन दी अॅपोस्टेट त्याच्या मागून गादीवर आला. या काळीं जर्मन लोक आणि इराणी लोक यांच्याबरोबर युद्ध चाललें होतें. पूर्वेकडील लढाईंत ज्यूलियन मृत्यू पावला व तह होऊन पूर्वेकडील युद्ध थांबलें; पण जर्मनांची जास्त जास्त चढाई होत जाऊन शेवटीं अॅड्रियानोपलच्या लढाईनें रोमन आणि ट्यूटन यांच्यामधील लढ्याला नवीन स्वरूप प्राप्त झालें. थिओडोशियस दी ग्रेट यानें गॉथशीं सख्य करून कांहीं काळ टिकाव धरला. चौथ्या शतकांत विशेष कर्ते व मेहनती असे राज्यकर्ते एका मागून एक होऊन गेल्यानें साम्राज्याला धक्का लागला नाहीं पण त्यांच्या मागून येणाऱ्या दुर्बल राजांना संकटांनीं ग्रासलें. थिओडोसियसच्या मरणानंतर जर्मनांच्या उत्कर्षाची संधी प्राप्त होऊन त्यांनीं ती वाया दवडली नाहीं. त्या काळीं तीन लोक प्रामुख्यानें वावरत होते. त्यांत सरहद्दीपलीकडील ट्यूटॉनिक लोक; खेरीज साम्राज्यामध्यें वसाहत करून राहिलेले विसीगॉथ, व्हांडाल सारखे परतंत्र लोक होते. खेरीज साम्राज्यामध्यें नोकरीस असलेले व अर्धवट रोमन झालेले जर्मन लोकहि त्या ठिकाणीं होते. या जर्मनांपैकीं कांहीं वरिष्ठ अधिकारावर होते, तेव्हां साम्राज्याचें किंवा त्याच्या भागाचें कोणत्या तरी स्वरूपांत जर्मनीकरण होणें अपरिहार्य झालें. पण जर चौथ्या शतकांतील राज्यकर्त्यांच्या तोडीचेच पांचव्या शतकांतील राज्यकर्ते असते तर या क्रियेला नवीनच वळण लागलें असतें. थिओडोसियसचे मुलगे नालायक असून त्यांनीं ज्या राज्याची आपसांत वांटणी करून घेतली त्या साम्राज्याची भवितव्यता त्यांच्याच कारकीर्दींत निश्चित झाली. पूर्व आणि पश्चिम यांच्यामधील लढ्याला या भावांच्या अमदानींत यादवीचें स्वरूप प्राप्त झालें. जर्मनांचा पूर्वेकडून होणारा हल्ला परतविला पण थोड्याच वर्षांत बरेचसे पश्चिमेकडील प्रांत हातावेगळे झाले व ९० वर्षांच्या अखेरीस रोमन बादशहाची नजीकची सत्ता अॅड्रियाटिकच्या पश्चिमेस पोंचेनाशी झाली. ओनोरियसच्या कारकीर्दींत ब्रिटन सोडून द्यावें लागलें. अॅक्विटाइनमध्यें व्हिसीगॉथिक राज्य प्रस्थापित झालें व स्पेनचा बराचसा भाग व्हांडाल आणि सुयेव्हे लोकांनीं आक्रमिला. तिसऱ्या व्हॅलेनशिनियनच्या अमदानींत उत्तर अफ्रिकेमध्यें व्हांडालनीं राज्य स्थापिलें. स्पेन देश व्हिसिगॉथ आणि सुयेव्हे यांच्यामध्यें विभागला गेला; आग्नेय गॉलमध्यें बरगंडियन राज्याची स्थापना झाली. ४८६ मध्यें गॉलमधील रोमन लोकांची शेवटची मालकी फ्रँक लोकांकडे गेली. साम्राज्याचे तुकडे तुकडे करणारे त्याचे शत्रू जे जर्मन त्यांच्यापासून साम्राज्याचें मोठें रक्षण करणारे लोक जर्मन वंशाचेच होते हें लक्ष त ठेवण्याजोगें

आहे. ३९९–४०० मध्यें अर्केडियसच्या तक्ताला भीतिप्रद अशी सामर्थ्यवान् गॉथिक चळवळ एका जर्मनानेंच शमवून टाकिली. साम्राज्याविषयीं मनांत अतिशय आदर बाळगणाऱ्या जर्मनांनीं प्रथम रोमन भूमीवर बादशहाचे मांडलीक म्हणून आपलें राज्य स्थापिलें. आपण जेते म्हणून नव्हे तर प्रजा म्हणून त्यांनीं स्थानिक रोमनांचे मुलूख कबजांत घेतले.

मध्य यूरोपांत हूणांची सत्ता. एकदम वाढून त्यांचें तिसरें बलिष्ठ राष्ट्र बनलें. त्याचा विस्तार ऱ्हाईनपासून काकेशसपर्यंत आणि डॅन्युबपासून बाल्टिक पावेतों होता. सार्वभौमत्वांत रोम आणि इराण साम्राज्याशीं त्याची तुलना करतां येत होती. हूणांनीं जर्मनांची अभिवृद्धि व ते साम्राज्याचा कुंरीत असलेला नाश बंद केला. पण त्यांनां स्वतः साम्राज्यावर विजय मिळवितां आला नाहीं. ॲटिलाच्या मृत्यूनंतर (४५३) त्याचें राज्य ढासळलें व त्याच्या जर्मन नोकरांनीं त्या अवशेषावर मोठमोठालीं राज्यें निर्माण केलीं.

तिसरा व्हॅलेनसिनियन मरण पावल्यावर थिओडोशियन राज्य पश्चिमेस लयाला गेलें व त्याच्यामागून झालेल्या पाश्चात्य बादशहांची सत्ता इटलीपलीकडे फारच थोडी शिल्लक राहिली. या वीस वर्षांच्या अवधींत जर्मन कुळांतला सेनापति रिसिमर हा त्या द्वीपकल्पांत बव्हंशीं सत्ताधारी असून तो बादशहांनां गादीवर बसवीत व उतरवीतहि असे. त्याच्या मृत्यूनंतर पश्चिम साम्राज्याचें तक्त टिकाऊ राहिलें नाहीं. सेनापति ऑरेस्टेसनें आपला लहानगा पुत्र रोमुलस याला कायदेशीर वारस जो ऑगस्टस ज्यूलिअस नेपोस याच्या जागीं गादीवर बसविलें पण त्याला फार दिवस राज्य लाभलें नाहीं. ४७६ मध्यें ओड्रोॲकरच्या नेतृत्वाखालीं एक जर्मन सैन्याची बंडाळी होऊन तिनें राज्य उलथून पाडिलें. ओड्रोॲकरनें त्याचा कांहीं भाग जर्मन सैनिकांनां वाटून दिला व कॉन्स्टंटिनोपल येथील बादशहाच्या सार्वभौमत्वाखालीं एक इटालीअन राज्य स्थापिलें.

पश्चिमेकडील प्रांतांची जशी दशा झाली तशी पूर्वेकडील प्रांतांची झाली नाहीं. यावरून साम्राज्याचें बल पूर्वेकडे होतें हें उघड झालें. हे प्रांत जास्त लोकवस्तीचे असून त्यांवर स्वारी करणारांनां मोठमोठे अडथळे होत, पण आतांपर्यंत पूर्वेकडचा शत्रू बलिष्ठ असतांहि येथील साम्राज्यानें अखंड शांतता राखली हें फार महत्त्वाचें आहे. इराणशीं चालू असलेलें भांडणें ३६४ त जोव्हियनच्या तहानें मिटलें जाऊन पुन्हां ६ व्या शतकापर्यंत तें उद्भवलें नाहीं. राज्यकर्त्यांनीं जमावसुलीच्या कामांत आणि परराष्ट्रीय व्यवहारांत हुशारीचें व नरमपणाचें धोरण स्वीकारल्यामुळें शंभर वर्षांत खालावलेलें साम्राज्य पुन्हा सुव्यवस्थित व सामर्थ्यवान झालें. दुसरा थिओडोशियूस राजा दुर्बल होता तरी त्याचा राज्यकारभार अंथेमियस, त्याची बहिण पुल्चेरिहा आणि खोजा क्रिशाफियस यांनीं उत्तम रीतीनें चालविला होता. आर्मेनियन बाबतींत त्याची कारकीर्द महत्त्वाची होती. पहिल्या थिओडोशिअसनें या पाचरवजा संस्थानाची रोमन आणि इराणी लोक यांच्यामध्यें विभागणी करण्याला सम्मति देण्याची चूक करून ठेविली. सॅसॅनिड सत्तेनें ग्रीक भाषेच्या उपयोगाला त्या ठिकाणीं बंदी करण्याचा प्रयत्न केला, पण दुसऱ्या थिओडोशियसनें आर्मेनियन भाषेंत बायबलचें भाषांतर करण्याच्या प्रयत्नाला चांगली पुष्टी दिली व त्यामुळें ग्रीक भाषेंतून घेतलेलीं अनेक भाषांतरित पुस्तकें निर्माण झालीं व त्याचा परिणाम आर्मेनियन आणि यूरोपियन संस्कृतीचा कायमचा संबंध घडून येण्यांत झाला. याच कारकिर्दीत कॉन्स्टंटिनोपलच्या मोठाल्या भिंती बांधून झाल्या, त्या ठिकाणीं एक विद्यापीठ स्थापन झालें व कायद्यांचा "कोडे थिओडोशियानस" नांवाच्या ग्रंथांत संग्रह करण्यांत आला. या ग्रंथावरून साम्राज्यांतील तत्कालिन समाजस्थिति चांगली कळून येते.

झेनोच्या कारकिर्दींत बाल्कन द्वीपकल्पांत एक ऑस्ट्रोगॉथिक राज्य स्थापन होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं, पण हें संकट इटलींतच उत्पन्न झालें. त्या ठिकाणीं थिओडोरिकनें स्थापलेलें राज्य वास्तविक ओड्रोॲकरच्या अंमलाच्या परंपरेंतील होतें. ओड्रोॲकर आणि ॲलॅरिक प्रमाणें तो दोन अधिकार धारण करीत होता. एक जर्मन राजा म्हणून व दुसरा रोमन अधिकारी म्हणून. अनॅस्टॉशियस बादशहाबरोबर झालेल्या तहनाम्याप्रमाणें त्याचे अधिकार होते व त्यानें हा तहनामा राज्यनिष्ठपणें पाळला होता. कायदे करण्याचा हक्क बादशहाकडेच राखून ठेवण्यांत आला होता व थिओडोरिकनें तो कधींहि मागितला नाहीं, पण एकंदरींत तो स्वतंत्र असे.

**पूर्वसाम्राज्य-सहावें शतक: जस्टिनिअन.**—सहाव्या शतकांत बादशाहा जस्टिनियननें आपल्या हुशारीस व महत्त्वाकांक्षेस अनुसरून पूर्वजांनीं राखून ठेवलेल्या पैशाच्या बळावर पाश्चिमेकडील कांहीं प्रांत पुन्हां काबीज करण्याविषयीं कंबर बांधली. या वेळीं व्हांडालची सत्ता खालावली होती व ५६३ मध्यें बेलिसॅरियसनें एका मोहिमेंत आफ्रिका सर केली. इटली जिंकणें फार काठिण काम होतें. ५३५ मध्यें बेलिसॅरियसनें त्याला सुरवात केली पण ५५४ पर्यंत नारसेसला तें काम पुरें करतां आलें नाहीं. दक्षिण स्पेनैचा एक भाग विसिगॉथ पासून रोमनांनीं जिंकून घेतला तेव्हां पश्चिम सामुद्रधुनीवर पुन्हां रोमचा ताबा चालू झाला. जस्टिनियननें मोठा जेता, मोठा कायदे करणारा, मोठा धर्मगुरू, मोठा मुत्सद्दी मोठा बांधकाम करणारा होण्याची इच्छा बाळगली व वरील प्रत्येक बाबतींत सर्व साम्राज्याचा इतिहास पाहतां त्याची कारकीर्द मोठी ठळक म्हणतां येईल. नुसतें त्याचें कायदेकानूचें काम किंवा संतासोफियाची इमारत त्याची कीर्ति अजरामर करण्याला पुरेशी आहे. पण त्याच्या कारकीर्दीची उज्वलता कालीमायुक्त आहे असें म्हणणें भाग पडतें.

आफ्रिका पुन्हां जिंकून घेणें हें न्यायाचें व फायदेशीर होतें तरी इटलीला त्यामुळें फार खर्च सोसावा लागला. पहिली गोष्ट अशी कीं, या काळीं इराणचा सम्राट पहिला खुश्रु असून तो मुळींच शांततावादी नव्हता. जस्टिनिअन हा एकाच वेळीं एका मोठ्या इराणी युद्धांत व एका मोठ्या गॉथी युद्धांत गुंतला होता व त्याचें राज्य इतक्या ओढीला टिकण्यासारखें नव्हतें. दुसरी गोष्ट म्हणजे पश्चिमेकडील मुलूख जिंकण्याच्या कामांत इटालीयन सुभेदारांची व रोमन बिशपची सहानुभूति मिळविणें त्याला जरूर होतें. तेव्हां या कारणाकरितां त्यानें स्वतःला धार्मिक कामांत गुंतवून घेतलें व त्याचा परिणाम म्हणजे सिरियन आणि इजिप्शियन प्रांतांवरील सत्तानाश हा होय. याप्रमाणें पश्चिम जिंकण्याला पूर्वेचा संबंध तोडावा लागला. तिसरी गोष्ट म्हणजे इटालियन आणि इराणी युद्धांत व वास्तुशिल्पाच्या कामांत अतोनात पैसा खर्च होऊन लोकांकडून पुन्हां तो मिळविण्याकरितां त्याला दडपशाहीचें धोरण स्वीकारावें लागलें. व यामुळें त्याच्या कारकीर्दीच्या उज्वलतेला काळोखी लागली,व त्याच्या मरणानंतर राज्याला उतरती कळा आली. जस्टिनिअनला जर्मन, स्लाव्ह आणि बल्गेरियन यांच्या हल्ल्यांपासून डॅन्यूबचें रक्षण करण्याचें काम असे हें विसरून चालावयाचें नाहीं. किल्ले आणि तट बांधण्याच्या कामीं त्यानें पैशाकडे पाहिलें नाहीं. जस्टिनियनाच्या नांवाबरोबर त्याच्या थिओडोरा राणीचें नांव लोकांच्या तोंडीं राहिलें. पूर्ववयांत थिओडोरा एक साधारण नटी असून राज्ञीपद पावल्यावर तिच्या अंगचे गुण प्रगट झाले. तिचा कल तत्कालीन मोनोफिसाइट पाखंडाकडे असल्यानें त्या लोकांनां गुप्तपणें मदत होत असे.

**जस्टिनिअन नंतरची उतरती कळा.**—जस्टिनिअनानंतर अर्ध्या शतकांत साम्राज्याचें दौर्बल्य उघडकीस आलें. पश्चिमेकडून, उत्तरेकडून आणि पूर्वेकडून त्यावर हल्ले होऊं लागले व कोठेंहि शत्रूशीं बरोबरी त्याला करतां आली नाहीं. (१) इटलींत लॉंबर्ड लोकांनां बळी पडून थोड्याच वर्षांत अर्ध्याहून अधिक द्वीपकल्प त्यांच्या ताब्यांत गेलें. (२) ॲव्हर नांवाच्या हूण लोकांनीं कॅस्पियनकडून येऊन पॅनोनिया आणि डॅशिया प्रांत हस्तगत केले व स्लॅव्होनिक आणि बल्गेरियन प्रजा ज्यांत आहे असें एक साम्राज्य स्थापिलें, तें सुमारें ६० वर्षे टिकलें. यांचा मुख्य धंदा इलीरियन द्वीपकल्पावर स्वारी करून बादशहापासून खंडणी उपटण्याचा असे. केवळ ॲव्हर लोकांकडे पाहिल्यास त्यांच्या स्वाऱ्यांनां कायमचें असे महत्त्व नव्हतें; पण स्लाव्ह लोकांनीं प्रांत उध्वस्त करण्याखेरीज जास्त परिणाम करून ठेवला आहे. या काळांत स्लॅव्होनिक वसाहतीस सुरवात होऊन त्यांनीं या द्वीपकल्पाचें जातिविषयक स्वरूप पार बदलून टाकिलें, तेव्हांपासून एका नवयुगास आरंभ झाला. स्लाव्ह लोकांनीं मोसिया व मॅसेडोनियाचा बहुतेक भाग आक्रमिला. दक्षिणेकडे ग्रीसमध्यें जाऊन पिलोपॉनेसस येथें मोठमोठ्या वसाहती केल्या. क्रुएशिया व सर्व्हिया हे वायव्येकडील प्रांत त्यांनीं काबीज केले. द्वीपकल्पाच्या उत्तर भागांत स्लाव्ह लोकांचें वर्चस्व कायम राहिलें पण ग्रीसमध्यें ग्रीकांशीं ते एकरूप होऊन स्थलनामाखेरीज त्यांचा फारसा मागमूस राहिला नाहीं. (३, एकसमयावच्छेदेंकरून साम्राज्याचें इराणशीं कायमचें युद्ध सुरू झालें: मॉरिस बादशहानें दुसऱ्या खुस्रूला एका राज्यापहारी मनुष्याला पदच्युत करण्याच्या कामीं जेव्हां मदत केली तेव्हां कांहीं काळ शांततेचा गेला.

**सातवें शतक.**—मॉरिसच्या मृत्यूनंतर (६०२) निकराचें व शेवटचें युद्ध सुरू झालें.फोकासच्या नालायक अमदानींत पूर्वेकडील प्रांत इराण्यांनीं पादाक्रांत केले या दुष्ट राजाची अप्रिय कारकीर्द ६१०मध्यें अफ्रिकेच्या सुभेदाराच्या मध्यस्थीनें संपली. या सुभेदाराचा हिरॅक्लीस नांवाचा मुलगा कॉन्स्टंटिनोपल येथें जेव्हां उतरला तेव्हां लोकांत जास्त वजन असलेल्या पक्षानें त्याचा सत्कार केला. मॉरिसला मारणाऱ्या फोकासलाहि लोकांनीं ठार मारिलें, व विजयी वीराला बादशाहीचा अभिषेक केला पण या योगें तो मोठ्या आणीबाणीच्या प्रसंगांत सांपडला. अँटिऑक, दमास्कस व इतर मोठीं शहरें इराणी लोकांनीं जिंकून घेतलीं होतीं आणि ६१४ मध्यें यरुशलेमचा नाश करण्यांत येऊन होलीक्रॉस व पॅट्रिआर्क क्टेसिफोन येथें नेण्यांत आलें. ही गोष्ट सर्व ख्रिस्ती राष्ट्रांत बरीच मोठी खळबळ उडवून सोडणारी होती. ६१६ मध्यें इजिप्त काबीज करण्यांत आलें. फोकासच्या हाताखालीं सैन्याची अत्यंत दुरवस्था झाली होती व हिरॅक्लियस कॉन्टंटिनोपल वांचविण्याच्या कामीं इतका निराश बनला कीं, राजधानीचें शहर कार्थेजला हलविण्याचें त्यानें मनांत आणिलें. पण या अति आणीबाणीच्या प्रसंगामुळें प्रजेच्या नैतिक भावनेंत फरक पडला. लोकांत स्वदेशाभिमान जागृत करणारा पेट्रिआर्च सेर्गियस हाच असल्यानें त्यानें जेव्हां लोकांचीं मनें वळविलीं तेव्हां हिरॅक्लियसला चांगलें सैन्य तयार करण्याचें अवघड काम करतां आलें. ६२२ ते ६२८ पर्यंत झालेल्या मोहिमांत त्याच्या श्रमाचें चीज होऊन त्याला आपले प्रांत परत मिळवितां आले व इराणला आपल्या कबजांत ठेवतां आलें.

या चिरस्मरणीय युद्धांत इराणी लोकांनीं ॲव्हर व स्लाव्ह यांच्या मदतीनें कॉन्स्टंटिनोपल घेण्याचा प्रयत्न केला होता (६२६). नंतर लवकरच ॲव्हर लोकांची सत्ता खालावत गेली व स्लाव्ह आणि बल्गेरियन यांनीं त्यांचें जूं झुगारून दिलें. सबंध हातचा गेलेला इलीरियन मुलुख सुद्धां रोमन सरकार पुन्हां आपल्या ताब्यांत घेईल असें वाटूं लागलें. वायव्येकडे हिरॅक्लियसनें स्लाव्ह लोकांशीं तह केला असावा असें दिसतें. साम्राज्याचे मांडलिक अशा नात्यानें त्यांचें स्थान निश्चित बनलें [आणखी जास्त कांहीं कर-

ण्याला भवितव्यतेनें उसंत ठेविली नाहीं. अति घोर तिमिरानें व्याप्त असा क्षण जातो न जातो तोंच नवीन वादळी ढग अनपेक्षित दिशेनें येऊन त्यांनीं आकाश व्यापून टाकिलें.

या ठिकाणीं असें नमूद करणें अवश्य आहे कीं, सहाव्या शतकाच्या अंतापूर्वी राष्ट्रांत हेलेनिक तत्त्वाचें वर्चस्व इतकें झालें होतें कीं, यापुढें साम्राज्याला ग्रीक असें नांव द्यावें लागेल. जस्टिनिअनेची मातृभाषा लॅटिन होती व तो रोम येथील लॅटिन परंपरेचा मोठा भक्त होता पण त्याला सुद्धां आपले मागाहून केलेले कायदे ग्रीकमध्यें प्रसिद्ध करणें भाग पडलें. व त्याच्या अमदानीपासून ग्रीक ही सरकारी भाषा बनली.

**इस्लामाचा उदय, साम्राज्य व खलीफत यांचा संग्राम.**—इस्लामी धर्माच्या उदयानें दोन विश्वव्यापी संप्रदाय प्रथमच रुमीरासमोर आले. प्रत्येकाची इच्छा जगाला गवसणी घालण्याची होती. तेव्हां या वेळीं हें केवळ यूरोप आणि आशिया खंडांमधील भांडण नसून ज्याच्या मुळाशीं धार्मिक तत्त्वें आहेत असा एक महत्त्वाचा लढा होता यांत संशय नाहीं. अग्न्युपासना केवळ एक राष्ट्र–धर्म असून इस्लाम इतकी त्यापासून भीति नव्हती. मुसुलमानांची राजकीय सत्ता इतक्या तातडीनें निर्माण झाली कीं, सर्व जगाला तिनें स्तंभित केलें. रोमन अरबस्तानांतील बोस्ट्रा हा किल्ला ६३४ मध्यें त्यांच्या हातीं पडला आणि ६४१मध्यें हिरॅक्लिअसचा अंत होण्यापूर्वी सिरिया आणि अलेक्झँड्रिया खेरीज सर्व इजिप्त त्यांनीं जिंकून घेतलें. ६४३ मध्यें त्यांनीं अलेक्झँड्रियांत प्रवेश केला. सिरियन आणि इजिप्शियन लोकांचा कॉन्स्टांटिनोपलहून (ग्रीकांहून) भिन्न असलेला धर्म हा त्यांच्यावर मुसुलमानांनीं जो विजय मिळविला त्याचा एक महत्त्वाचा राजकीय गुणक म्हणतां येईल. याप्रमाणें मुसुलमानांनीं साम्राज्याचा पूर्वेकडील भाग, जर्मनांनीं ज्याप्रमाणें पश्चिमेकडील भाग घेतला त्याप्रमाणें तोडून घेतला. इजिप्त पुन्हां कांहीं परत घेतां आलें नाहीं, त्याचप्रमाणें सिरिया–आशियामायनरचें अखंडत्व पदोपदीं नाश पावण्याच्या धास्तींत होतें व सिलिशिया पिढ्यानपिढ्या दुसऱ्याच्या ताब्यांत रहात होता. इराण पादाक्रांत केल्यामुळें मुसुलमान ससनांच्या स्थानावर आरूढ झाले. आर्मेनिया साहजीकच त्यांच्या ताब्यांत गेला (६५४). इकडे पश्चिमेस ६४७ मध्यें त्यांनीं आफ्रिका व्यापून टाकिली. याप्रमाणें पहिल्या हल्ल्यापासून २० वर्षांच्या आंतच काकेशसपासून पश्चिम भूमध्यसमुद्रापर्यंत या नवीन चढाई करून जाणाऱ्या सत्तेनें साम्राज्याला रेटा दिला.

**साम्राज्याचें तात्पुरतें वर डोकें.**—सुदैवानें हिरॅक्लिअसचा नातू दुसरा कॉन्स्टंन्स मोठा खंबीर व लायक मनुष्य होता. त्यानेंच आशियामायनरचें रक्षण करून मुसुलमानांच्या आरमारी सत्तेविरुद्ध झगडण्याकरितां एक बलिष्ठ आरमार बांधिलें. त्यानें सैन्याची नवी व्यवस्था ठेवून तें पराक्रमी बनविलें. आयुष्याच्या शेवटल्या वर्षांत त्यानें आपली दृष्टि आफ्रिकेकडे वळविली. पुन्हां रोम हें साम्राज्याचें केंद्रस्थान करण्याची त्यानें इच्छा धरली. पण लॉंबर्ड लोकांपासून इटलीचा दक्षिणभाग त्याला परत घेतां आला नाहीं. रोम पाहून येऊन तो सिरॅक्यूज येथें राहिला त्या ठिकाणीं त्याचा खून झाला. आणखी पन्नास वर्षे ही ओढाताण कायम राहिली. कॉन्स्टंटिनोपलला दोनवेळां वेढा पडला व जर कां एखाद्या वेळ्यांत शत्रू विजयी झाला असता तर मात्र साम्राज्याची धडगत नव्हती.

हिरॅक्लियन घराणें बंडाळीच्या अमदानींत नाहींसें होऊन त्यानंतर तिसरा लिओ राज्यारूढ झाला. त्याच्या कारकीर्दीपासून एका नवीन युगास सुरवात झाली. राज्यांतील प्रत्येक क्षेत्रांत त्यानें सुधारणा केली पण आपल्या सुधारकी वागण्यानें आपल्या कार्याचें महत्व त्यानें लोकांच्या नजरेंतून उतरविलें. त्यानें केलेली प्रांतिक व्यवस्था क्रांतिकारक असून त्याची कायदेपद्धति रोमन परंपरेहून निराळी होती. त्याच्या आमदानीपासून ते दहाव्या शतकाच्या मध्यापर्यंत खलिफांशीं एकसारख्या जमीनीवरील लढाया चालल्या होत्या. प्रत्येक पक्ष दुसऱ्याच्या मुलखांत लुटालूट करणें, किल्ले जिंकणें, गनिमी काव्यानें लढणें इत्यादि गोष्टींचा अवलंब करीत असे. पण मोठासा विजय किंवा निर्णायक स्वरूपाची लढाई कधींच झाली नाहीं. सैन्याची कार्यक्षमता फार दक्षतेनें राखण्यांत आली होती पण आरमाराकडे झालेल्या दुर्लक्षतेमुळें क्रीट आणि सिसिली हातावेगळीं झालीं. पॅनोर्मस ८३२ त पडलें व सिराक्यूज ८७८ त काबीज करण्यांत आलें. आफ्रिकन लोकांनींहि दक्षिण इटलीमध्यें कांहीं काळ मुलुखगिरी आरंभिली होती. या काळांत रॅव्हेनावरील सत्ता लॉंबर्डेकडे गेली. इटलीमध्यें फ्रँक सत्ता वाढली व जुनें रोम साम्राज्याच्या ताब्यांतून गेलें.

**मॅसिडोनियन घराण्याखालीं साम्राज्यविस्तार.**—साम्राज्याच्या सुधारक बादशहांनीं मवाळ परराष्ट्रीय धोरण ठेवलें होतें पण मॅसिडोनियन घराण्याच्या अमदानींत साम्राज्याचा पुन्हां विस्तार होऊन तें यूरोपमधील बलिष्ठ राष्ट्र बनलें होतें. दोनशें वर्षेपर्यंत ज्यांना ग्रहण लागलें होतें ती संस्कृति व विद्वत्ता ९ व्या शतकांत पुनरुज्जीवित झाली. पहिल्या बॅसिलच्या कारकीर्दीत दक्षिण इटलीमध्यें मोठ्या उत्साहाची चढाई चालली असून पश्चिमेकडील बादशहा दुसरा लुई याच्या सैन्याचें त्यालीं सहाय्य होतें. सॅरसेन लोकांना त्यांच्या किल्ल्याबाहेर काढून लावण्यांत आलें. बारी परत घेतली, कॅलोब्रियाचा बचाव केला आणि लॉंगीबर्डीयाचा नवीन प्रांत स्थापन करण्यांत आला. यामुळें ॲड्रियाटिकमध्यें शिरण्यास मार्ग मिळाला व सिसिली गेल्यानें झालेलें नुकसान या बाजूस मुलूख वाढल्यानें भरून निघालें. सहाव्या लिओनें आरमाराची पुनर्घटना केली पण त्याची कारकीर्द दुर्दैवी ठरला. सॅरॅसेन यांच्यांनीं एजियन-

मध्यें लुटालूट. केली. थेसॅलोनिका हस्तगत केलें आणि असंख्य कैदी धरून नेले ( ९०४ ). पण ५० वर्षांनी पुढें विजयाची लाट आली. निसेफोरस फोकास यानें दुसरा रोमॅनस याचा सेनापति असतांना क्रीट परत घेतलें. व पुढें स्वतः बादशहा झाल्यावर सिलिसिया व उत्तर सिरिया परत मिळविले (९६८). सायप्रसहि परत जिंकून घेतलें. जॉन झिमिसेस आणि दुसरा बॅसिल यांच्या कारकीर्दीत साम्राज्यानें सॅरसेन लोकांवर मोठमोठे विजय मिळविले. दुसऱ्या बॅसिलच्या अर्मेनियांतील कर्तृत्ववान धोरणामुळें पूर्वेकडील सरहद्द बळकट करण्यांत आली व नवव्या कॉन्स्टंटाइनच्या अमदानींत अर्मेनिया साम्राज्याशीं चांगलें निगडीत करण्यांत आलें.

**बल्गेरियाची स्वतंत्र साम्राज्यविषयक स्पर्धा.**—दुसऱ्या बॅसिलच्या कारकीर्दीत पूर्वसाम्राज्यसत्तेचा कळस झाला. कारण त्याचवेळीं फार दिवस चाललेल्या दुसऱ्या एका भांडणाचा चांगला निकाल झाला होता. चौथ्या कॉन्स्टंटाइनच्या अमदानींत बल्गेरियन लोकांनीं लोअर मोसियामध्यें तेथील स्लाव्ह जातींचें उच्चाटण करून एक राज्य स्थापिलें. पण दोन शतकाच्या आंतच जित व जेते हे एकरूप झाले व बल्गेरियाला एखाद्या स्लॅव्हॉनिक संस्थानाचें स्वरूप प्राप्त झालें. पांचव्या कॉन्स्टंटाइनच्या वेळीं या शत्रूशीं एकसारखी लढाई चालली होती व पहिल्या निसेफोरसचा तर बल्गेरियन मोहिमेंत अंत झाला. यानंतर ८१५ मध्यें क्रुम राजानें कॉन्स्टंटिनोपलला वेढा दिला. पुढें तो मरण पावल्यावर शांततेचा काळ सुरू झाला. बोरिस राजानें ख्रिस्ती धर्मांत प्रवेश केला.बल्गेरियनांची निराळी धर्मगुरूची गादी स्थापण्यांत आली पण बल्गेरियनांची सुधारणा व त्यांच्या वाङ्मयाला सुरुवात या गोष्टी केवळ बिझांशिअमवर अवलंबून होत्या. सिरील आणि मेथॉडियस या दोन धर्मप्रचारकांच्या वेळीं वरील गोष्टी घडून आल्या. या दोन व्यक्तींनीं ग्लॅगोलिटिक वर्णमाला शोधून काढून व स्लॅव्होनिक भाषेंत धर्मग्रंथांचें कांहीं भाषांतर करून आग्नेयीकडील स्लाव्ह लोकांनां उपकृत करून ठेविलें. प्राचीन बल्गेरियन राज्याचा उज्वल काल म्हणजे सिमेऑनची कारकीर्द ( ८९३–९२७ ). या सिमेऑन राजानें आपलें राज्य पश्चिमेकडे ॲड्रियाटिक किनाऱ्यापर्यंत वाढविलें व बल्गेरीयाचा 'झार' व रोमन लोकांचा मुखत्यार अशी पदवी घेतली. साम्राज्यावर धाड घालण्याचें त्याच्या कारकीर्दीतील जें महत्वाचें धोरण तें त्याच्या मागून आलेल्या पिटरच्या अमदानींत अजीबात सुटलें. त्यानें पहिला रोमॅनस याच्या मुलीशीं लग्न केलें व सिमेऑननें स्थापिलेल्या बल्गेरियन पॅट्रिआर्चेटला बायझांशिअम येथें मान्यता मिळाली.पण हें बलिष्ठ स्लॅव्होनिक संस्थान खची करण्याला बयझंटाइनें राज्यकर्ते चांगली संधी पहात होते. शेवटीं झिमिसेसनें पूर्व बल्गेरिया पादाक्रांत करून डॅन्यूबची सरहद्द परत आपणाकडे घेतली. पण इकडे दुसरा बेसिल आपल्या शत्रूबरोबर लढण्यांत गुंतला असतां तिकडे शिष्मनिड घराण्यांतील झार शामियलनें बल्गेरियन सत्ता पुन्हां मिळवून सर्व्हियन लोकांना खालीं ओढलें.

**बल्गेरियावर साम्राज्याचा जय.**—चौदा वर्षांच्या मोठ्या घनघोर युद्धानंतर बेसिलनें सर्व पूर्व व पश्चिम बल्गेरिया जिंकला (१०१८). जित लोकांनां त्यानें चांगल्यारीतीनें वागविलें. त्यांच्या राजकीय संस्था, त्यांचीं देवस्थानें, त्यांच्या जहागिरी कायम ठेविल्या. कांहीं बल्गेरियन राजघराण्यांतील व खानदानीचे लोक ग्रीक सरदारांच्या जोडीस बसविण्यांत आले व त्यांच्यांत बेटीव्यवहाराहि होऊं लागले. १५० वर्षांवर यापुढें या द्वीपकल्पावर ग्रीकांचा ताबा राहिला. ९ व्या शतकाच्या मध्यकाळांत ग्रीसमधलि स्लाव्ह लोकांनां तेथील सरकारच्या अधिकारांत आणण्यांत आलें होतें.

**रशियाशीं संबंध.**—दुसऱ्या बेसिलच्या कारकीर्दीत व रशियन प्रश्नाचा निकाल लागला. ९ व्या शतकाच्या मध्यापूर्वी स्वीडनच्या नॉर्स लोकांनीं रशियन राष्ट्र स्थापिलें. मोसियाच्या स्लाव्हांसाठीं बल्गेरियनांनीं जें केलें तेंच यांनीं पूर्वेकडील स्लाव्हांचें केलें. नीसर आणि नीपर यांतून युक्झाइनला जाण्यास रस्ता असल्यानें त्यांच्या दर्यावरील स्वाऱ्यांची साम्राज्याला भीति होती. ९४५ मध्यें एक व्यापारी तह झाला आणि राजकन्या ओलगा हिची बिझांशिअमला भेट आणि हिचा ख्रिस्तीसंप्रदायस्वीकार ही या तहाची जामीनकी म्हणून त्यावेळीं वाटली. पण ओलगाच्या ख्रिस्त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. स्विॲटोस्लाव्ह यानें बल्गेरिया घेऊन साम्राज्यावर स्वारी करण्याचा घाट घातला पण त्याचा झिमिसेसनें पूर्ण पराभव केला ( ९७१ ). ९८८ मध्यें वाडिमिर राजानें चेर्सन काबीज केलें पण बेसिल बादशहाला तें परत देऊन टाकिलें. बादशानें त्याला आपली बहीण व ख्रिस्ती धर्म दिला. या फेरबदलानंतर बिझॅंशियमला कीव्हपासून फारच थोडी धास्ती होती. याचवेळीं रशियन लोकांनीं आपलें राष्ट्र तयार केलें. मग्यार लोक पश्चिमेकडे गेले व नीपर आणि डॅन्यूबमधील प्रदेश त्यांनीं आक्रमिला. त्यापलीकडे पेचिनेगलोक होते.बिझॅंशियमचा डाव बल्गेरियनांवर दाब म्हणून मग्यारांचा उपयोग करण्याचा होता व त्याप्रमाणें झार सिमिऑन विरुद्ध रोमन आणि मग्यार एक झाले होते.पण सिमिऑननें हाच डाव मोठ्या कुशलतेनें उलटून टाकिला.मग्यारा विरुद्ध पेचिनेग लोकांनां त्यानें उठविलें व त्याचा परिणाम असा झाला कीं, ९ वें शतक संपण्यापूर्वीच मग्यारांनां पश्चिमेकडे हल्लीं आहेत त्या प्रदेशांत पळ काढावा लागला व त्यांची जागा पेचिनेगनीं आक्रमिली. आपल्या नव्या जागेवरून मग्यार लोकांनां साम्राजावर स्वारी करतां येणें अगदीं शक्य होतें व त्याप्रमाणें त्यांनीं दालमाटिया किनाऱ्यावरील शहरें घेण्याचा प्रयत्न चालविला. बल्गेरिया घेतल्यामुळें पेचिनेग साम्राज्याचे अगदीं निकटचे शेजारी बनले. ११ व्या शतकांत या रानटी लोकांच्या हल्ल्यामुळें साम्राज्यसरकाराला

उसंत मिळेना. १०६४ मध्यें त्यांच्याच वंशांतील कुमार लोकांनीं मिसर प्रदेशांतून त्यांनां हाकून लाविलें. १०९१ मध्यें अलेक्झियस काम्नेनस यानें त्यांचा जंगी पराभव केला व ११२३ मध्यें जॉन कॉम्नेनसनें त्यांची पाळेमुळें खणून काढिलीं.

**साम्राज्याचें लष्करी धोरण व तुर्क**:—मॅसेडोनियन काळांत सरकारपुढें एक मोठा अंतर्गत व्यवस्थेचा प्रश्न येऊन उभा राहिला हा प्रश्न म्हणजे आशियामायनरमधील श्रीमंत सरदारांच्या मोठमोठ्या मालमत्तेची होत असलेली वाढ ही होय. ही वाढ होऊं देणें राजकीय व आर्थिक दृष्ट्या मोठें हानीकारक होतें. याचा बिमोड करण्यासंबंधीं प्रयत्न पहिल्या रोमॅनसपासून सुरू झाला त्याची कार्यदिशा श्रीमंतांपासून गरिबांचें रक्षण करणें व सैन्याची सुव्यवस्था राखणें ही होती. याचप्रमाणें मोठ्या श्रीमंत व सामर्थ्यवान घराण्यांच्या अतिशय मोठ्या असलेल्या वजनापासून सरकारला भीति होती. सैन्यांतील अधिकारी याच घराण्यांतले होते व त्यांचें आपआपसांत चांगलें नातें व स्नेह असे. स्क्लेरस आणि फोकास घराण्यांशीं वाकडें आलें तेव्हां दुसऱ्या बॅसिलला या संकटाची जाणीव झाली. पुढें अनेक प्रकारचे कायदे करून पाहिले. पहिल्या रोमॅनसच्या कारकीर्दींत मोठमोठ्या जमीनदारांनां जमीन विकणें बेकायदेशीर ठरविण्यांत आलें. निसेफोरस याचा ओढा अमीरउमरावांकडे असल्यानें आतांपर्यंत गरिब लोकांच्या संरक्षणाकरितां जे कायदे झाले तेवढे पुरे आहेत असें धरून या पुढें देवस्थानानें नवीन मिळकत करूं नये असें ठरवून लष्करी जमीनींच्या पुरवठ्याच्या कामांत जी अडचण होती ती नाहींशी करण्याचा प्रयत्न केला. दुसऱ्या बेसीलनें रोमॅनसचेंच धोरण स्वीकारलें; त्यानें फार कडक रीतीनें त्याचा अंमल चालविला. व आशियामायनर मधील उमरावांवर जबर कर बसवून त्यांचा नायनाट करण्याचा प्रयत्न चालविला. बाल्कन प्रांत पुन्हां मिळाल्या कारणानें यूरोपमध्यें आशियामायनरच्या तोडीचें राजकीय वजन त्याला प्राप्त झालें. आशियामायनरमध्यें लष्करी सत्ता जोरांत होती व या सत्तेविरुद्ध ११ व्या शतकांत विरोध उत्पन्न झाला पण त्यामुळेंच सेल्जुक तुर्कांनां फावलें. कॉन्स्टंटिनोपल लष्करी सत्तेच्या हातीं जातें कीं काय अशी भिति पडली होती. ९ व्या कॉन्स्टंटाइनची गादी जॉर्ज मॅनिॲसस नांवाच्या एका लष्करीवीरानें काबीज करण्याचा प्रयत्न केला पण तो फसला. व जेव्हां आशियामायनर मधील लष्करी उमरावांचा प्रतिनिधि ऐझॅक कॉम्नेनस गादीवर बसला तेव्हां मोठ्या विरोधामुळें त्याला गादी सोडावी लागली. १० व्या कॉन्स्टंटाइनच्या कारकीर्दींत हा विरोध कळसास पोंचला. सिनेटमध्यें खालच्या दर्जाचे लोक येऊन त्यांनीं लष्करी खर्चाची अतिशय छाटाछाट केली. या धोरणामुळें सैन्य कमी होऊन अधिकाऱ्यांचाहि तुटवडा पडूं लागला. मुत्सद्दीगिरीनें बाहेरच्या शत्रूंनां तोंड द्यावें असें बादशहाला वाटलें. शेवटीं सेल्जुक लोकांनां जसजसा जय मिळत गेला तसतसे सरकारचे डोळे उघडले. सेनापति रोमॅनस डायोजेनेसला बादशहा करण्यांत आलें; त्याला सैन्य ठेवून तयार करणें भाग होतें; त्यानेंहि मोठ्या परिश्रमानें हें काम हातीं घेतलें, पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. त्याचा पराभव होऊन तो पकडला गेला (१०७१). सुलतानानें त्याला बंधमुक्त करून त्याचा गौरव केला पण लोकांनीं त्याला पदच्युत केलें व तो शत्रूच्या हातीं सांपडून आंधळा झाला. अशा रीतीनें पूर्व आणि मध्य आशियामायनर हातावेगळें झालें; रूम येथें सेल्जुक राज्य स्थापिलें गेलें; १०८० मध्यें तुर्कांनीं निकाया काबीज केलें. जे प्रांत सेल्जुकांनीं व्यापिले नाहींत त्यांची दशा होऊन ते परकीय व स्थानिक धाडशी लोकांच्या भक्ष्यस्थानीं पडले.

**व्हेनिसची व लॅटिन राष्ट्रांची भयोत्पादक दोस्ती**.—याप्रमाणें अकराव्या शतकाच्या ७ व्या दशकांत साम्राज्याच्या हलकेपणामुळें व नालायकीमुळें तें लय पावत आहे असें दिसलें. ॲलेक्झिअस कॉम्नेनस हा असाधारण लायकीचा मुत्सद्दी जेव्हां आला (१०८१) तेव्हां ही अव्यवस्था मोडून मोठें बलिष्ट सरकार स्थापण्यांत आलें. त्याला सेल्जुक, पेचेनेग आणि पश्चिमेकडे नॉर्मन या तीन लोकांशीं झगडावयाचें होतें नॉर्मन लोकांनीं पूर्व रोमपासून त्याचे दक्षिण इटलींतील प्रांत हिसकावून घेतले होते. व सबंध कॉम्नेनियन अमदानींत ॲड्रिआटिक पलीकडील मुलुख जिंकण्याच्या त्यांच्या बेतामुळें साम्राज्य फार धास्तींत होतें. ॲलेक्झियसच्या कारकीर्दींतील दोन अति महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे शत्रूविरुद्ध मदत मिळविण्याकरितां त्यानें केलेल्या भरपाई होत. (१) नॉर्मन लोकांविरुद्ध व्हेनिसनें आरमारी मदत दिल्याबद्दल त्याला व्यापारी हक्क देणें भाग पडलें (१०८४). त्यामुळें व्यापारी दृष्ट्या साम्राज्य व्हेनिस प्रजासत्ताक राज्याच्या अंकित होऊन बसलें. (२) सेल्जुकशीं लढण्याकरितां पश्चिम यूरोपांत मदत सैन्य मिळविण्याची त्यानें खटपट केली. त्याच्या मागणीला पोपनें व लॅटिन ख्रिस्ती राष्ट्रानें दिलेलें उत्तर म्हणजे पहिली क्रूसेड मोहीम होय.

**क्रूसेडचे परिणाम**.—ही मदत ॲलेक्झियसला पाहिजे होती त्यापेक्षां अगदीं निराळ्या स्वरूपाची ठरली. आपल्या मुत्सद्दीगिरीनें व हुषारीनें त्यानें साम्राज्यावर आलेलें संकट दूर सारिलें. आशियामायनरचा मोठा भाग साम्राज्याला परत मिळून इकडे पूर्वेस तुर्क दुर्बल होत चालले असतां साम्राज्य बरेंच जोरावलें. ही मदत नसती तर बिझॅंशियमनें मॅनुएलच्या अमदानींत जें सामर्थ्य व ओज दाखविलें, तें त्याच्या आंगीं आलें नसतें. आशियामायनरमध्यें क्रूसेडरनीं पूर्वी साम्राज्याच्या ताब्यांत जें कांहीं होतें तें त्याला परत मिळवून देण्याच्या अटी पाळल्या. पण ॲंटिओक जिंकल्यानंतर (१०९८) त्यांनीं त्याप्रमाणें न वागतां नॉर्मन बोहेमॉंड यांनां तें आपल्यांकडे ठेवण्याची परवानगी दिली. ॲंटिओकवर

उघडपणें बादशहाचा हक्क होता, कारण थोड्याच वर्षांपूर्वी तें त्यांच्याकडे होतें. हें कारण बिझँशियम व यरुशलेम येथील लॅटिन सरकार ( स्थापना १०९९ ) यांमध्यें विद्वेष आणण्यास पुरेसें होतें. एरवी क्रूसेडनें उत्पन्न केलेली नवीन राजकीय परिस्थिति साम्राज्याला अखेर धोक्याची होती याविषयीं शंका नाहीं.' कारण त्याची जर्मन व समुद्र पश्चिम यूरोपपासून सीरियामधील लॅटिन वसाहतीकडे जाणारे हमरस्तेच बनले होते.तेव्हां बायझन्टाइन सरकारला पवित्र भूमीकडे जाणाऱ्या क्रूसेड मोहिमांपासून आपलें संरक्षण करण्याच्या योजना करणें भाग पडलें व या योजना पाश्चात्य राष्ट्रांना क्रूसेडच्या पवित्र हेतूमधील अडथळे वाटावे हें त्यांच्या दृष्टीनें योग्यच होतें. तेव्हां ग्रीक आणि लॅटिन ख्रिश्चन यांच्यामधील धार्मिक वैर वाढत जाऊन परस्परांविषयीं अविश्वास व संकट वाढूं लागलें.

**पूर्व आणि पश्चिम साम्राज्य व चर्च यांचा विरोध.**—पहिल्या क्रूसेडपासून पूर्व आणि पश्चिम यामधील नवीन संबंधाचा इतिहास, ग्रीक आणि लॅटिन यांचा १०५४ सालीं तुटलेला संयोग पुन्हा घडवून आणण्याविषयींच्या प्रयत्नाशीं अगदीं निगडित झाला आहे. हा प्रयत्न अयशस्वी झाला. यांच्यामधील भांडणें मिटून ग्रीक धर्मसंस्था रोमच्या अधिकाराखालीं आणणें हें सातव्या ग्रेगरीपासून पुढें झालेल्या पोपांचें मुख्य धोरण असे. हें घडून आणण्यासाठीं प्रसंग येईल त्याप्रमाणें पोप पुढील दोहोंपैकीं एक मार्ग एकापुढें एक स्वीकारीत. पहिला मार्ग म्हणजे शांततायुक्त समेट व दुसरा म्हणजे एखाद्या पश्चिम राष्ट्राकडून साम्राज्य व्यापून टाकणें. पूर्वेकडील बादशहा नेहमीं समेटाविषयींच्या कल्पना मनांत बाळगूनएकी करण्याविषयीं प्रयत्न करीत. यांत त्यांचें धोरण राजकीय फायदे मिळविण्याचें असे, व त्यांची प्रजा तर नेहमीं या एकीविरुद्ध असे. प्रथम प्रथम मॅन्यूएल कॉन्मेनस पश्चिम बादशहा तिसरा कॉनरॅड याचा 'जिवलग मित्र असे. पण कॉनरॅडच्या मृत्यूनंतर यूरोपमध्यें जस्टिनियन प्रमाणें आपलें साम्राज्य स्थापण्याची महत्वाकांक्षा त्यानें धरली व रोमला हातीं धरून आपला हेतु सफळ होईल असें त्याला वाटलें. त्याच्या धिटाईच्या धोरणांमुळें इटलीमध्यें युद्ध सुरू झालें. अंकोना त्याच्या हातांत पडलें पण त्याचें बल त्याच्या महत्वाकांक्षी योजनांना अनुरूप असें नव्हतें. लॅटिन राज्याविषयीं त्याची सहानुभूति, तसेंच त्याचा उधळेपणा यामुळें तो आपल्या लोकांच्या मनांतून अगदीं उतरला. त्याच्या पश्चिमेसंबंधीं धोरणाविषयीं सर्व राष्ट्रानें अप्रियता दर्शविली. दैवांत राज्यक्रांति होऊन त्याचा मुलगा अलेक्झियस याला पदच्युत करण्यांत आलें व पहिला अँड्रोनिकस गादीवर आला. अँड्रोनिकसच्या छोटया कारकीर्दींत सर्व बाजूंनीं आर्थिक व लौकिक प्रतिक्रिया झाली. त्याचें धोरण उमरावशाहीविरुद्ध असून त्यामुळेंच त्याचा नाश झाला. ऐझॅकएंजेलसनें त्याच्या प्रयत्नांनां हरताळ फांसला व राज्याचा पुरा नाश केला. यूरोपियन प्रांतांतून बल्गेरियन आणि कालाचियन लोकांनी जुलमी करांविरुद्ध चळवळ केली त्याचा परिणाम असा झाला कीं, झिमिसेस आणि बेसिल यांनीं केलेलें कार्य पार नष्ट होऊन गेलें व जॉन ॲसेननें नवीन बल्गेरियन राज्य स्थापिलें.

**साम्राज्याचे तुकडे.**—१२०४ या घातकी सालांत पूर्वेकडे पश्चिम ख्रिस्ती संप्रदायाचा क्रूसेड मोहिमा, व्यापारी वर्चस्व आणि व्हेनिसची महत्वाकांक्षा यायोगें होणारा प्रसार, हें जें संकट बरेच दिवस साम्राज्याला जाचत होतें त्याचा कळस होऊन साम्राज्य जित व वियुक्त झालें. याच वेळीं ही जी कुऱ्हाड पडली ती अनेक आगंतुक कारणांनीं पडली असली तरी अशा आपत्तींच्या कारणावस्था पुष्कळ दिवसांपासून हयात होत्या. ऐझॅकएंजेलसचा, त्याचा भाऊ तिसरा ॲलेक्झियस यानें पदच्युत केलें. त्याचा मुलगा पश्चिमेकडे पळाला ( १२०१ ); तेथें नवीन क्रूसेडची तयारी चालू होती. व्हेनिसनें ती ( मोहीम ) पवित्र भूमीला नेऊन सोडण्याचें काम आंगावर घेतलें होतें. या राजपुत्रानें स्वाबियाचा फिलिफ ( याला त्याची बहीण दिली होती ) आणि मॉंटफेरटचा बॉनिफेस यांनीं आपल्याला व आपल्या बापाला बिझँशियमची गादी परत मिळवून देण्याकरितां तिकडे मोहीम घेऊन जाण्यासाठीं विनविलें व क्रूसेडला मदत करण्याविषयीं आणि ग्रीक धर्मसंस्थेचा रोमशीं समेट करून देण्याविषयीं त्यांनां अभिवचन दिलें. व्हेनिसला हा बेत पसंत पडला. पण फिलिफचा शत्रू जो पोप तिसरा इनोसंट यानें त्याला हरकत घेतली. १२०३ मध्यें मोठ्या कष्टानें ऐझॅक आणि त्याचा मुलगा चौथा ॲलेक्झियस यांनां राज्य परत मिळालें. व ॲलेक्झियसनें आपलें वचन पाळलें असतें तर क्रूसेड सैन्य पॅलेस्टाइनला जाण्याला निघत होतें. लॅटिन मदतीमुळें ही झालेली राज्यपदप्राप्ति अतिशय लोकविरुद्ध ठरली व ॲलेक्झियसला इच्छा असूनहि आपलें वचन पुरें करतां येईना. पुढें थोड्याच महिन्यांनीं त्याला पदच्युत करण्यांत येऊन एक बाहेरचाच मनुष्य गादीवर स्थापण्यांत आला. पांचवा ॲलेक्झियस उपटसुंभ होता तरी मोठा स्वदेशभक्त होता. शहराबाहेर तळ देऊन बसलेल्या क्रूसेडर लोकांनीं, पूर्वीं नॉर्मनांनीं जो बेत घडून आणण्यासाठीं एकसारखा प्रयत्न केला होता, तो बेत पार पाडण्याचें ठरविलें व ग्रीक साम्राज्याचा शेवट केला. चौथ्या क्रूसेडमधील पुढाऱ्यांनीं निघण्यापूर्वीं हा बेत ठरवून ठेवला होता असें म्हणतां यावयाचें नाहीं. १२०४ पूर्वीं हा कोणाच्या मनांत सुद्धां आला नव्हता. साम्राज्य आपआपसांत कसें वाटून घ्यावयाचें हें प्रथम ठरवून नंतर त्यांनीं शहर घेतलें. साम्राज्याची वांटणी करतांना त्यांनां मार्गदर्शक अंधव्हेनेशियन पुढारी हेन्री डँडोलो हा होता. त्यानें अति अंकुचित वित्तवृत्तीनें फक्त व्हेनिसचेंच हित पाहिलें व ग्रीक साम्राज्याच्या

जागीं नवीन लॅटिन साम्राज्य स्थापतांना आपल्याला तें जाचक न होईल इतकें दुर्बल असावें असा त्याचा उद्देश होता. रोमॅनियाचें लॅटिन साम्राज्य यरुशलेमप्रमाणें सरंजामी पद्धतीचें संस्थान होतें. ग्रीक मुलखांत राज्य करणाऱ्या सर्व राजांचा तो बादशहा असे. त्याच्या प्रत्यक्ष अधिकारांत कॉन्स्टंटिनोपल, दक्षिण थ्रेस, बिथिनियन किनारा आणि एजियनमधील कांहीं द्वीपें इतका मुलख होता. पण व्हेनिसवर अवलंबून असल्यामुळें, पैशाच्या टंचाईमुळें व आरमार नसल्यामुळें त्याचा कोंडमारा झाला होता. त्याच्या हाताखालील सरंजामी सरदारांपासून त्यांच्या स्वार्थामुळें ग्रीक आणि बल्गेरियन यांच्या बरोबर भांडण्यांत त्याला फारच थोडी मदत मिळाली. दहा वर्षांनंतर हा क्षुद्र डोलारा ढासळूं लागला व पोपांच्या प्रयत्नांनींहि त्याचा नाश होण्याचें थांबलें नाहीं.

रोमन साम्राज्याच्या अवशेषांपासून तीन ग्रीक संस्थानें निर्माण झालीं. कॉम्नेनियन घराण्यांतील एकानें ट्रेबिझांड येथें एक स्वतंत्र राज्य स्थापिलें, तें १४३१ पर्यंत टिकलें. पुढें ऑटोमन लोकांनीं तें जिंकून घेतलें. एंजेलीच्या एका नातेवाइकानें यूरोपमध्यें एक स्वतंत्र ग्रीक राज्य स्थापिलें. त्याला एपायरसचें डेसपॉटेट असें नांव होतें. पण सम्राटवंशाचा खरा प्रतिनिधि थिओडोर लॅस्कॅरिस असून त्यानें निकाया येथें बिझँटाइन उमराव जमा केले व १२०६ मध्यें तो बादशहा म्हणून निवडला गेला.

**पुनः वर डोकें.**—थिओडोर लॅस्कॅरिस व त्याच्या मागून आलेले राजे यांनीं यूरोप आणि आशियामधील लॅटिन साम्राज्यावर जोराच्या मोहिमा केल्या. कॉन्स्टंटिनोपल शहर वालाचोबल्गेरियनांच्या हातांत पडतें कीं ग्रीकांच्या हातांत पडतें असा मोठा प्रश्न येऊन उभा राहिला. पण बादशहा मिचेल पॅलिओलोगस हा मोठा मुत्सद्दी व सेनापतीहि असून १२६१ मध्यें त्यानें तें काबीज केलें. त्याचा उद्देश लॅटिन लोकांपासून सर्व गेलेला मुलख परत मिळविण्याचा होता, पण अंजूचा चार्लस हें एक त्याच्या मार्गांत विघ्न उपस्थित झालें. चार्लसनें दोन्ही सिसिलींमधून होहेनस्टॉफेन यांचा अंमल झुगारून दिला व रोमॅनियाचें लॅटिन राज्य पुन्हां स्थापण्याचा निश्चय केला. हें संकट दूर सारण्याकरितां मिचेलनें पोप दहावा ग्रेगरी याच्याशीं संधान बांधिलें; तो प्रत्येक सवलत देण्यास तयार होता. १२७४ मध्यें लीऑन्सच्या बैठकींत या धर्मसंस्थांची एकी घडवून आणण्यांत आली. या धोरणाप्रमाणें चालण्याचें बादशहाला फार जड गेलें. त्याच्या प्रजेमध्यें त्याच्याविषयीं अविश्वास व अप्रीति उत्पन्न झाली. त्याच्या मागून येणाऱ्या बादशहांनीं हें धोरण सोडून दिलें. मध्यंतरी पोपनें कसा तरी अंजूच्या चार्लसला लगाम घातला पण चौथा मार्टीन हा आपल्यास जास्त उपयोगी पडेल असें त्याला आढळून आलें व १२८२ मध्यें ग्रीक साम्राज्यावर मोहीम करण्यासाठीं त्यानें जंगी तयारी केली. सिसिलीच्या व्हेस्पर लोकांनीं त्याचें संरक्षण केलें पण तें केवळ इतर सत्तांच्या भक्ष्यस्थानीं पडण्यासाठीं होय असें पुढें आढळून आलें.

**सर्व्हियाची उचल.**—तेराव्या शतकाच्या अखेरीस आशियामध्यें ऑटोमनची व यूरोपमध्यें सर्व्हियाची सत्ता प्रादुर्भूत झाली. आशियामायनरमध्यें ऑटोमन तुर्कांचा हल्ला परतविण्याच्या कामीं साम्राज्याला भाडोत्री स्पॅनिश फौजेनें मदत दिली. १३२६ मध्यें ब्रुसा ही ऑटोमन राजधानी बनली व इकडे बल्गेरियनांचा पराभव करून सर्व्हियन लोक बिझँशियम जवळ जवळ येत चालले. स्टीफन डयूसन (१३३१-१३५५) च्या कारकीर्दींत सर्व्हियाची सत्ता शिखरास पोहोंचली.

**सर्व्हिया आणि साम्राज्य यांचा नाश.**—इ. स. १३८९ मध्यें ऑटोमननीं सर्व्हियाची सत्ता चिरडून टाकिली. सुलतान पहिला बेझिद यानें साम्राज्याचा आशियाखंडांतील शेवटचा मुलूख जो फिलाडेल्फिया, तो जिंकून घेतला आणि १३९३ मध्यें बल्गेरियन राजधानी ट्रोव्हो काबीज केली. यावेळीं कॉन्स्टंटिनोपल वेढलें गेलें; क्षणैक ऑटोमन सत्तेला ग्रहण लागलें पण तैमूरच्या हल्ल्यानें ही विजयाची लाट थांबली. पहिल्या महंमदाला बादशहा मॅन्युएलशीं सख्य करणें भाग पडलें, पण ही ढिलाई थोड्याच वेळची होती. दुसऱ्या मुरादनें ॲड्रिआनोपल घेतलें व कॉन्स्टंटिनोपल घेण्याचा प्रयत्न केला (१४४२). यावेळीं ग्रीसमध्यें पॅलिओलॉजी लोकांना फ्रँकवर जय मिळत गेला ही गोष्ट फारशी जमेंत धरतां येत नाहीं. हा प्रसंग फार आणीबाणीचा होता. बाल्कनद्वीपकल्प तुर्कांच्या हातीं असून हंगेरीवर त्यांची दृष्टि होती. साम्राज्यास पश्चिम यूरोपांतूनच कायती मदत मिळण्या सारखी होती सहावा जॉन आणि मॅन्युएल या दोघांनीं पश्चिमेकडे जाऊन मदतीची खटपट केली. साम्राज्यावरील संकट म्हणजे रोमचा फायदा, असें असल्याकारणानें एकीचा प्रश्न पुन्हां जोरानें पुढें आला. पोप चौथा यूजेनियस यानें आस्थेनें हा प्रश्न हातीं घेतला. त्याचा परिणाम म्हणजे १४३९त फ्लॉरेन्स येथील बैठकींत ठरलेला 'ऐक्यशासन' (डिक्री ऑफ यूनिअन) होय. बादशहा व वरिष्ठ धर्माचार्य याला खरोखरीच अनुकूल होते पण लोकांना व भिक्षुकांना तें पटलें नाहीं. व त्यामुळें आचार्यभिक्षुकांत भांडणें सुरू झालीं. साम्राज्याला बचावण्याकरितां चौथ्या यूजेनियसनें संप्रदाययुद्ध (क्रूसेड) पुकारलें. व १३४३ मध्यें हंगेरियन आणि पोल लोकांनीं मुरादवर जय मिळविला. पण पुढील वर्षी व्हारनाच्या रणभूमीवर याचा भयंकर सूड उगवला गेला. पुढें ९ वर्षांनीं दुसऱ्या महंमदाच्या कारकीर्दींत शेवट होण्याची वेळ आली. १,५०,००० लोकांनीं समुद्राच्या व जमिनीच्या बाजूनें शहराला वेढा दिला. बादशहा ९ वा कॉन्स्टंटाइन याच्या जवळ सारे ८००० लोक होते. पश्चिमेकडून त्याला कांहीं मदत नव्हती, पण जॉन जस्टिनियनी

नांवाचा एक अनुभवशीर व धाडसी जिनोई शिपाई दोन जहाजें आणि ४०० उरस्त्राणधारी शिपाई ( क्युरॅसिअर ) घेऊन बादशहाच्या मदतीला आला. व्हेनेशियन आणि जिनोई या दोन्ही परकी लोकांनीं संरक्षणाच्या कामात फार तत्परता दाखविली. पण कांहींएक उपयोग झाला नाहीं. जस्टिनियनी, जखमी' होऊन पडला. तुर्क लोक निकट करून पुढें घुसले. कॉन्स्टंटाइन मोठ्या शौर्यानें लढतां लढतां मारला गेला. तेव्हां लवकरच मुसलमानांच्या मतें जी ख्रिस्ती संप्रदायाची राजधानी, तें कॉन्स्टंटिनोपल शहर त्यांच्या हातांत पडलें; व अशा रीतीनें पूर्व साम्राज्याचा कायमचा निकाल लागला.

कान्स्टंटिनोपलच्या पाडावाच्या प्रसंगीं ख्रिस्ती राष्ट्रें स्वस्थ बसलीं या गोष्टीचें ऐतिहासिक स्वरूप लक्षांत येण्यासाठीं पश्चिमयूरोपाची स्थिति अवगमिली पाहिजे. ती लक्षांत येण्यासाठीं पूर्वपश्चिम साम्राज्यांची एकमेकांशीं तुलना व एकमेकांशीं संबंध लक्षांत आणला पाहिजे.

रोमचें पश्चिम साम्राज्य आणि पूर्व साम्राज्य यांची तुलना स्थूलपणें अशी मांडतां येईल कीं, पूर्वेकडे साम्राज्याच्या सातत्यामुळें राष्ट्रीयत्वाचा विकास झाला नाहीं. पश्चिमेकडे साम्राज्याच्या कल्पनेचें अस्तित्व पण साम्राज्याच्या सत्तेचा अभाव या प्रकारची परिस्थिति असल्यामुळें लहान संस्थानें आणि राष्ट्रें हीं कायम राहिलीं एवढेंच नव्हे तर राष्ट्रस्वरूपांत विकास पावलीं आणि साम्राज्यकल्पना अनेक लहान संस्थानांच्या रक्षणापुरती राहून रोमनसाम्राज्याच्या ऐवजीं जर्मन साम्राज्य आणि आस्ट्रोहंगेरियन साम्राज्य हीं दोन साम्राज्यें उत्पन्न झालीं; आणि कालच्या महायुद्धाचा परिणाम म्हणून हीं साम्राज्यें अजीबात नष्ट होऊन जर्मनी हें लोकसत्ताक राष्ट्र आणि आस्ट्रियन साम्राज्याचे तुकडे पडून चेकोस्लोव्हाकिया वगैरे लहान राष्ट्रें तयार झालीं. पूर्वेकडील रोमन साम्राज्याचा बराचसा भाग तुर्कांनीं घेतला, तर पश्चिमेकडील रोमन साम्राज्याचा मुलूख, स्पेन वरील थोड्या काळापर्यंत सत्ता, व्हिएन्नाला वेढा या गोष्टी वगळतां तुर्कांच्या उपसर्गापासून बराच मुक्त राहिला. ख्रिस्ती संप्रदायाची सत्ता व स्वरूप दोन ठिकाणीं भिन्न आहे. ख्रिस्ती संप्रदायाचे अधिकारी पूर्वेकडे साम्राज्याच्या सातत्यामुळें लौकिक अधिकाराला नमून असत. पश्चिमेकडे सर्वलोकसंयोजक लौकिक सत्ता दुर्बल झाल्यामुळें, आणि प्रसंगीं सर्वक्षेत्रव्यापी वीरावर साम्राज्याभिषेक करण्याचाच अधिकार पोपांनीं घेतल्यामुळें रोमी ख्रिस्तीसांप्रदायिक सत्ता अधिकाधिक बलवान होत गेली. ग्रीक चर्च आणि साम्राज्य यांचा परिणाम रशियावर झाल्यामुळें रशियाला बराच काल पौरस्त्य वळण लागूं लागलें.

इतिहास सांगावयाचा ह्मणजे पश्चिमेकडील साम्राज्याचा पूर्वीपासून कथासूत्र सांगून सद्यःस्थिति स्पष्ट करावयाची. जगाच्या इतिहासाच्या प्राचीन कालाकडे अवलोकन केलें असतां यूरोप व आशिया यांच्या स्वरूपांत फारसा भेद दिसत नाहीं. साम्राज्याची अस्थिरता, साम्राज्यें व राज्यें यांच्या सरहद्दींत अदलाबदल इत्यादि गोष्टी आपणांस यूरोप व आशियांत सारख्याच परिचित आहेत. रोमन साम्राज्य, चंद्रगुप्ताचें साम्राज्य, इराणचें साम्राज्य यांत वस्तुतः फारसा फरक नाहीं. कांहीं अंशीं पूर्वीच्या राजापासून खंडणी घेऊन व्यवस्था त्यांच्या कडेसच ठेवणें, कांहीं अंशीं स्वतःच व्यवस्था पहाणें इत्यादि क्रिया दोहोंकडे दिसतात. हीं सादृश्यें जरी लक्षांत घेतलीं तरी यूरोपच्या इतिहासास कांहीं तरी वैशिष्ट्य आहे ही गोष्ट नाकबूल करतां यावयाची नाहीं. याकरितां सर्व यूरोपचा या कालचा इतिहास स्थूलरूपानें आपणास ज्ञात करून घेतला पाहिजे.

**यूरोपचें एकत्व.**--भूपृष्ठ स्वरूपाच्या दृष्टीनें यूरोप हें आशिया खंडापासून पृथक् मानतां येत नाहीं. यूरोपच्या इतिहासांत कोणत्या गोष्टींचें पर्यालोचन केलें पाहिजे हे सांगणें कठिण आहे. यूरोपियन संस्कृति तिच्या उदय प्रारंभापासून आतांपर्यंत यूरोपलाच चिकटून राहिली नाहीं; तरी यूरोपचा इतिहास म्हणजे यूरोपियन संस्कृतीचा व ज्या कारकांच्या योगानें तिला आजचें स्वरूप प्राप्त झालें आहे त्यांचा इतिहास होय. यूरोपियन संस्कृतीचा इतिहास यूरोपच्या इतिहासांतून वगळला तर सर्व यूरोपला स्वतंत्र इतिहास आहे किंवा नाहीं याविषयीं इतिहासशास्त्रपंडितास शंका उत्पन्न होईल. चिरकाल व अनेक व्यापारमय अशा ज्या संस्थांनीं यूरोपच्या बऱ्याचशा भागांत परस्पर सदृशता व तन्मूलक एकजनभाव उत्पन्न झाला त्या संस्था म्हटल्या म्हणजे रोमन साम्राज्य व रोमन कॅथॉलिक पंथ ह्या होत. सर्व साम्राज्य, राजधर्मशास्त्र अथवा राष्ट्रव्यवहारशास्त्रानें बद्ध असलेल्या राष्ट्रांचा संघ याअर्थी "यूरोप" शब्दाचा उपयोग १९ व्या शतकांतच होऊं लागला. मध्ययुगाच्या पूर्वी "यूरोप" शब्द उच्चारला असतां केवळ "पृथ्वीवरील एक भाग" एवढाच बोध होई. संस्कृतीनें, आचारानें, व इतिहासानें एकत्व पावलेल्या समाजाचा बोध होत नव्हता. ज्याप्रमाणें हल्लीं सदृश संस्कृतीच्या राष्ट्रसंघानें यूरोपला एकत्व आलें आहे त्याप्रमाणेंच मध्ययुगांत यूरोपचें ऐक्य साम्राज्यमूलक व ख्रिस्तीसंप्रदायमूलक होतें. रोमन साम्राज्य आणि ख्रिस्ती संप्रदाय या संस्था मुख्यतः यूरोपच्या जमिनीवर वाढल्या होत्या. ज्या लोकांस पृथक लोक अशी संज्ञा देतां येईल अशा लोकांचें पृथक व स्वतंत्र राज्य पाहिजे हें तत्त्व, व त्यावर बनलेली राज्यपद्धत हीं मूळची यूरोपीय आहेत असा यूरोपीयन ग्रंथकारांचा आग्रह आहे तथापि तो आग्रहच आहे. ह्यांत सत्य थोड्या अंशानें आहे. जरी यूरोपच्या बाहेरील घडामोडींचा यूरोपवर परिणाम झाला हें यूरोपियन ग्रंथकार कबूल करतात, तथापि राष्ट्रपद्धति मूळची आमचीच असें ते म्हणण्यास सोडीत नाहींत. यूरोपियन इतिहासकार म्हणतात तें खरें आहे कीं काय

याचें दिग्दर्शन करणें जरूर आहे. यूरोपियन इतिहासकार म्हणतात कीं हल्लीं यूरोपांत "राष्ट्रपद्धति" प्रचलित आहे. राष्ट्रपद्धति म्हणजे ज्यांस पृथक लोक अशी संज्ञा देतां येईल अशा लोकांचें पृथक राज्य पाहिजे ही पद्धत. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. यूरोपांत आज असें एकहि राष्ट्र नाहीं कीं ज्यांत एकाच महावंशाचे, संप्रदायाचे किंवा एकच भाषा बोलणारे लोक आहेत. प्रत्येक राष्ट्रांत एक वंश अगर संप्रदाय प्रमुख असून त्याच्या भोंवतीं लहान लहान राष्ट्रजाती जमलेल्या आहेत.उदाहरणार्थ इंग्लिशांचें राष्ट्र (नेशन) या नांवानें इंग्रज लोकांचें राष्ट्र असा बोध होतो.परतु वस्तुस्थिति तशी नसून इंग्लंडमध्यें निरनिराळ्या राष्ट्रजाती, भाषा, धर्म व पंथ हे प्रचलित असून पुष्कळ वेळां त्यांचे हितसंबंधहि भिन्न असतात. खरें पाहिलें असतां इंग्लंडांत इंग्लिश राष्ट्रजाति ही प्रबल असून तिला स्कॉटिश, वेल्स वगैरे राष्ट्रजाती चिकटल्या आहेत. "इंग्लिश नेशन" याचें इंग्लिश राष्ट्रजातीचें दुसऱ्या राष्ट्रजातीवरील राज्य असें लक्षण करितां येईल. संस्कृतीनें, आचारानें व इतिहासानें, एकत्व पावलेल्या यूरोपियन साम्राज्यानें व्यापलेला प्रदेश व यूरोप म्हणून समजला जाणारा पृथ्वीचा भाग हे केव्हांहि एक नव्हते. उदाहरणार्थ रशिया जरी यूरोपखंडांत मोडतो तरी पीटर धी ग्रेट पर्यंत त्याचा यूरोपच्या इतिहासाशीं कांहींएक संबंध नव्हता. पुन्हां तुर्की साम्राज्याचा जरी पहिल्यापासून यूरोपच्या इतिहासावर पुष्कळ परिणाम झाला आहे तरी तें मुख्यतः आशियाटिक राष्ट्र असून इ.स. १८५६ पर्यंत सामान्य धर्मशास्त्रानें बद्ध अशा राष्ट्रसंघांत त्याचा समावेश झाला नव्हता.

**यूरोपीय संस्कृतीचे घटक.**—यूरोपीय संस्कृतीच्या घटनेचा इतिहास द्यावयाचा म्हणजे खालील विषयांवर विवेचन केलें पाहिजे.

(१) एजियन व ग्रीक संस्कृति, (२) रोमन साम्राज्य(३), ख्रिस्ती संप्रदाय (४), ट्यूटन लोकांकडून झालेला रोमन साम्राज्याचा नाश व त्या नाशानंतर उत्पन्न झालेला राष्ट्रसमुच्चय. यूरोपची विचारपद्धति व तिचें वाङ्मय व कला यांतील वैशिष्ट्य यूरोपला एजियन संस्कृतीपासून मिळालें. एजिअन संस्कृति ग्रीक संस्कृति या नांवानें प्रगल्भ दशेस पावली. तिचें सविस्तर वर्णन मागें दिलेंच आहे. प्रजासत्ताक रोमपासून यूरोप, कायद्याची कल्पना व राजकारभाराची पद्धत शिकलें; शिवाय रोमनसाम्राज्य नष्ट झालें. तथापि रोमन साम्राज्यानें प्रचारांत आणिलेलें धर्मशास्त्र तसेंच राहिलें व त्या धर्मशास्त्राची मान्यता नवीन, उत्पन्न झालेल्या राजास, संस्थानिकांस, व सामान्य लोकांस स्वाभाविकपणेंच राहिली. या सर्वापेक्षां ख्रिस्ती संप्रदायानें यूरोपच्या इतिहासावर जास्त परिणाम केला आहे. ज्यावेळेस रोमनसाम्राज्य नष्ट झालें व सर्व ठिकाणीं अंदाधुंदी माजली त्या वेळेस यूरोपांतील निरनिराळ्या राष्ट्रजातींत आपण एक आहों ही भावना उत्पन्न करण्याचें काम ख्रिस्ती संप्रदायानें केलें. म्हणून यूरोपचा इतिहास लिहावयाचा म्हणजे प्रथम ग्रीक व रोम येथील पौर राज्यपद्धतीचा उद्भव, नंतर त्यांची साम्राज्य स्वरूपी वाढ व नंतर त्यांवर ग्रीक संस्कृति व ख्रिस्ती संप्रदाय यांचा परिणाम, यांचा इतिहास लिहिणें होय. ग्रीक संस्कृति व रोमन साम्राज्य यांचा इतिहास अन्यत्र दिलाच आहे. आतां रोमी सत्तेची उत्तरकालीन स्थिति, ट्यूटन लोकांनीं रोमन साम्राज्याचा नाश करून निरनिराळीं राज्यें कशीं स्थापन केलीं व त्यांचें पुढें काय झालें इत्यादि गोष्टी विवेचनीय आहेत.

रोमन साम्राज्याच्या पश्चिम भागाकडे आतां आपण वळूं. इ. स. ४७६ सालीं रोम शहर ओडोएकरच्या ताब्यांत आलें. तेव्हांपासून एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत पश्चिमेकडे रोमन साम्राज्याचें अस्तित्व एकसारखें चालूच होतें अशी यूरोपीयांची कल्पना होती. ओडोएकरच्या कालापासून इ० स० ८०० पर्यंतच्या दीर्घ कालामध्यें लहान लहान संस्थानें स्वतंत्रपणें कारभार चालवीत होतीं. पण साम्राज्यसत्ताधारी एम्परर हा मात्र पूर्वेकडील कान्स्टांटिनोपलचा सम्राट होता. इ. स. ८०० मध्यें मात्र साम्राज्य-सत्ताधारी पोपनें अभिषेक करून नवीन तयार केला. ज्यास हा अधिकार दिला तो मनुष्य म्हटला म्हणजे चार्लस धी ग्रेट ऊर्फ शार्लेमान होय. याच्या वेळेस रोमन साम्राज्यांत पुन्हां जें द्वैत स्थापन झालें तें पूर्व साम्राज्याच्या अंतापर्यंत होतें. पूर्व साम्राज्याचा जेव्हां अंत झाला तेव्हां परवाच्या महायुद्धाच्या अंतापर्यंत चालू असलेलें हाप्सबर्ग घराणें रोमन साम्राज्याधिकारावर स्थापन झालें होतें.

**रोमन सत्तेचा ऱ्हास.**—ट्यूटन वगैरे रानटी लोकांच्या स्वाऱ्या होण्यापूर्वींच रोमन साम्राज्य नामशेष झालें होतें. रोमन साम्राज्य म्हणजे रोमनलोकनियंत्रित, साम्राज्य अथवा ज्या राज्याकरितां रोमन लोक आपला देह रणांगणीं ठेवीत असत अगर ज्या साम्राज्यांत प्रजासत्ताक रोमनें घालून दिलेल्या धर्मशास्त्रांची वाढ झाली होती असें रोमचें राज्य असा अर्थ केल्यास रोमन साम्राज्य नाहींसें केव्हांच होऊन गेलें होतें. रोमन फौजेत, रोमन राज्यव्यवस्थेंत, रोमन शहरांत, परकी लोक दिसूं लागले होते आणि केवळ पूर्वीच्या इतिहासाशीं आणि अधिकाराशीं कोणी तरी कसा तरी संबंध उत्पन्न करून तो अधिकार आपल्या ताब्यांत घ्यावा आणि त्या सत्तेखालीं असलेल्या लोकांनां आपल्या हुकमतींत चालवावें अशी स्थिति झाली होती. लुटालूट करणारे बंडखोर आणि सत्ताधीश असलेले रोमन सम्राट यांतील फरक युद्धांतील यशाच्या पूर्णतेवर अवलंबून राहिला होता.

जरी ट्यूटन वगैरे रानटी लोकांच्या स्वाऱ्या इ. स. च्या १ल्या शतकापासून सुरू झाल्या तरी इ.स.च्या ४थ्या शतकापासून त्यांचा जोर विशेषच वाढला. याचा परिणाम असा झाला कीं, कॉन्स्टन्टाईन बादशहानें आपली राजधानी रोमहून कॉन्स्टंन्टिनोपल येथें नेली. तेव्हांपासून फोर्थनदी-

पासून टैग्रिसपर्यंत असलेल्या सर्व साम्राज्याचा कारभार कॉनस्टंटिनोपल येथेंच चालत असे. परंतु हें फार दिवस टिकणें शक्य नव्हतें; कारण दिवसेंदिवस स्वाऱ्यांची संख्या वाढत चालली. व साम्राज्याच्या प्रत्येक भागाची विशेष काळजी घेणें जरूर झालें आणि तें कॉन्स्टंटिनोपलसारख्या दूर असलेल्या राजधानीपासून करणें शक्य नव्हतें म्हणून १ ल्या 'थिओडोशियस' बादशहाच्या मरणानंतर साम्राज्याचे दोन विभाग झाले. येथूनच रोमनसाम्राज्याचा नाश होण्यास प्रारंभ झाला. याशिवाय यावेळेस पूर्व यूरोप व पश्चिम यूरोप यांचा आचार व मतें यांमध्यें अंतर पडण्यास प्रारंभ झाला.

**रोमवर स्वाऱ्या.**—रोमनसाम्राज्यावर स्वाऱ्या करणारे लोक एकाच प्रकारचे नव्हते. कित्येकांत राजसत्ता वाढली होती आणि कित्येकांत गोत्रश्रेष्ठ सत्तात्मक राज्यपद्धति प्रचलित होती. कित्येक केवळ लुटारीकरितां स्वाऱ्या करीत व कित्येक स्वाऱ्या कायमची वसती करण्याकरितां जमिनीच्या शोधार्थ भटकणाऱ्या लोकांनीं केलेल्या होत्या. सरदारांच्या किंवा संस्थानिकांच्या सैनापत्याखालीं केलेल्या स्वाऱ्या बहुधा प्रदेश काबीज करून वसती करण्यासाठीं केलेल्या असत. गोत्रश्रेष्ठसत्तात्मकांत गॉथ, व्हॅन्डॉल, बरगन्डियन व लॉंबर्ड यांचाच समावेश होतो व दुसऱ्यांत सॅक्सनीमधील फ्रँक व ब्रिटनवर हल्ला करणारे सॅक्सन लोक मोडतात. या दोन वर्गांत मोठा महत्त्वाचा फरक आहे. पहिल्या वर्गातील लोकांनीं आपलेपणा कायम टेविला नाहीं. त्यांच्यांतील सर्व संस्था कायमच्या लयास जाऊन ते रोमन साम्राज्यांत अंतर्धान पावले. दुसऱ्या वर्गातील लोक हे व्यक्तिशः स्वतंत्र होते. त्यांनीं आपलेपणा कायम ठेवून आपल्या राजांच्या बळावर रोमन साम्राज्याचा नाश करून एक नवीनच राज्यपद्धति निर्माण केली. साम्राज्याच्या एवजीं निरनिराळे प्रांत स्वतंत्र असावे हें या राज्यपद्धतीचें धोरण असून तिची पुढें वाढ सरंजामी राज्यपद्धतींत ( फ्यूडल सिस्टिम मध्यें ) झाली.

**टयूटन लोकांच्या स्वाऱ्या.**—हूण लोकांच्या स्वाऱ्यामुळें टयूटन लोकांना प्रथम रोमनसाम्राज्यांत आश्रय घेणें भाग पडलें. इ. स. ३७८ यावर्षी अॅड्रियानोपल जवळ झालेल्या लढाईत टयूटनापैकीं गॉथ लोकांनीं व्हालेन्स बादशहाचा पराभव करून त्यास ठार केलें. इ. स. ४१० मध्यें पश्चिमेकडील गॉथ लोकांचा राजा अलॅरिक यानें रोम शहर लुटलें. त्याच्या मरणानंतर गॉथ लोक स्पेन व गॉल या दोन प्रांतात शिरले. इ. स. ४२९ यावर्षी व्हॅन्डाल लोकांचा राजा गॅसेरिक यानें रोमन आफ्रिकेमध्यें जाऊन नवीन राज्य स्थापिलें. हें पुढें एक मोठें आरमारी व चांचेगिरी करणारें राष्ट्र म्हणून प्रसिद्धीला आलें. इकडे फ्रँक, बरगिन्डयन वगैरे लोक फ्रान्स व जर्मनीमध्यें प्रवेश करीत होते व ४४९ नंतर ज्यूट, आंग्ल, व साक्सन लोकांनीं ब्रिटन बळकावलें.

**हूण लोकांची भीति.**—यावेळेस हूण म्हणजे तुराणी लोक आर्यन लोकांचा पराभव करून यूरोपांत कायमची वसती करितात कीं काय अशी भिती पडली. परंतु इ. स. ४५१ यावर्षी शालों येथें रोमन, गॉथ, व फ्रँक वगैरे लोकांनीं एटियसच्या सैनापत्याखालीं हूणलोकांचा राजा अटिला याचा पूर्ण पराभव केला. या जयानें यूरोप, आशिया व आफ्रिका या खंडांपासून वेगळें झालें व तेथील संस्थांची वाढ अप्रतिहतपणें होत गेली. तेथें आतां ख्रिस्ती संप्रदाय हा कायम राहणार हें स्पष्ट झालें.

**साम्राज्याचें एकीकरण.**—इ. स. ४७६ यावर्षी ओडोसर यानें रोमशहर जिंकलें व तेव्हांपासून साम्राज्याच्या पश्चिम भागावर एक स्वतंत्र बादशहा नेमण्याची जी चाल १ ल्या थिओडोसिअस बादशहाच्या मरणानंतर सुरू झाली होती ती बंद पडली. सेनेटच्या अनुमतीनें साम्राज्याच्या पूर्वभागावरचा बादशहा झेनो हाच सर्व साम्राज्याचा कारभार पाहूं लागला. इकडे पूर्व गॉथचा राजा थिओडोरिक यानें इताली, गॉल व स्पेन जिंकून एक साम्राज्य स्थापिलें परंतु त्याच्या मरणानंतर तें साम्राज्य नष्ट होऊन त्यापासून नवीं लहान राज्यें निर्माण झालीं. पुढें जस्टिनियन बादशहाच्या कारकीर्दीत आफ्रिकेमधील व्हॅन्डाल साम्राज्य नष्ट झालें व स्वतंत्र झालेल्या लहान लहान राज्यांस जस्टिनिअन बादशहानें पुन्हां आपल्या ताब्यांत आणिलें. परंतु ही व्यवस्था फार दिवस टिकली नाहीं. जस्टिनिअनच्या मृत्यूनंतर साम्राज्यांत पुन्हां बंडाळी माजली. इ. स. ५६८ या वर्षी अलबोइनच्या सैनापत्याखालीं लॉंबर्ड लोकांनीं इतालीमध्यें शिरून चोहोंकडे नासधुस करून तेथें एक स्वतंत्र राज्य स्थापिलें. व जरी हेरॅक्लिअस बादशहानें आशियांत कशी बशी आपली सत्ता कायम ठेविली तरी पश्चिमेंत आतां खरें पहिलें असतां इताली साम्राज्यापासून विभक्त झाला.इताली साम्रज्यापसून विभक्त झाल्यानें पोपच्या राजकीय सत्तेस वाढण्यास वाव मिळाला. इ. स. ६ व्या शतकाच्या आरंभीं गॉथ लोकांचा राजा थिओडोरिक हा रोमवर राज्य करीत असतां रोम हें पादशाहीचें मुख्य ठिकाण असून त्याच्या प्राचीन आयुष्यक्रमाची परंपरा कायम होती. परंतु पोप ग्रेगरीच्या वेळेस रोम हें पोपांचें शहर बनलें व रोमन सम्राटांची पुष्कळ सत्ता पोपकडे गेली.

**महंमदी संप्रदायाचा उदय.**—याच वेळेस मुसुलमानी संप्रदाय उदयास आला व याचाहि यूरोपच्या इतिहासावर फार महत्त्वाचा परिणाम झाला. महंमदानें स्थापन केलेल्या या संप्रदायाचा परिणाम इ० स० ६३२ पर्यंत फारसा भासला नाहीं. परंतु पुढें मुसुलमान लोक प्रबल झाले. त्यांनीं हेरॅक्लिअस बादशास न जुमानतां इजिप्त व उत्तर आफ्रिका जिंकिली. पुढें त्यांनीं गॉथिक राज्य धुळीस

मिळविलें. नंतर स्पेन जिंकून ते पिरिनीजच्या पलीकडे नारबोन पर्यंत गेले. मुसुलमानी सत्ता वाढल्यामुळें ख्रिस्ती संस्कृति ही यूरोपच्या पलीकडे जाऊं शकली नाहीं. याशिवाय पूर्वेकडील व्यापाराचे मार्ग बंद झाले. नारबोनच्या पुढें मुसुलमान लोक जाऊं शकले नाहींत; कारण लवकरच टूर्सच्या लढाईत त्यांचा चार्लस मार्टेल यानें पराभव केला. पुढें मुसुलमान लोक गॉल सोडून निघून गेले. स्पेनमध्यें मात्र बराच काळ ते टिकाव धरून राहिले व तेथें त्यांनीं एक श्रेष्ठ संस्कृति निर्माण केली. या संस्कृतीचा परिणाम मध्ययुगांत यूरोपच्या बौद्धिक जीवनांवर फार होऊन तिनें त्या वेळच्या विचारास एक नवें वळण दिलें.

**कोरोलिंगियन घराणें:**—टूर्सच्या लढाईमुळें चार्लस मार्टेलची कीर्ति वाढली. वस्तुतः हाच आतां फ्रँक लोकांचा राजा होता. त्याच्या मरणानंतर मेरोव्हेक घराण्याचा शेवटला पुरुष पदच्युत झाला व त्याची गादी चार्लसच्या मुलाला मिळाली. त्यांच्या घराण्याला कोरोलिंगियन घराणें म्हणतात. हें घराणें पुढें फार प्रसिद्धीस आलें.

**पूर्वपश्चिमेची ताटातूट:**—इ. स. ७९७ या वर्षी यूरोपच्या इतिहासांत एक मोठी महत्त्वाची गोष्ट घडली. ती अशी कीं, कॉनस्टन्टाईन बादशहाची आई इरेन हिनें आपल्या मुलाला राज्यापासून दूर करून राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं, तेव्हां पश्चिमेकडील लोक ही स्त्री असून हिला रोमन साम्राज्यावर बसतां येत नाहीं असें म्हणून तिची सत्ता कबूल करीनात. त्यामुळें आतांपर्यंत पश्चिमेकडील राज्यें नांवाला तरी रोमची सार्वभौम सत्ता कबूल करीत, परंतु यापुढें तीं अगदींच स्वतंत्र होऊन त्यांचा रोमन साम्राज्याशीं कांहीं एक संबंध उरला नाहीं. इ. स. ८०० मध्यें पोप लिओनें फ्रँक लोकांचा राजा शार्लमान यास रोम येथें राज्याभिषेक करून नवीन साम्राज्याची स्थापना करविली. या साम्राज्यांत जर्मनी, हल्लींचा फ्रान्स इतलीचा बराचसा भाग व एब्रोपर्यंत स्पेन इतका प्रदेश मोडत असे. असो.

या साम्राज्याचा इतिहास देण्यापूर्वी मध्यंतरीं वर उल्लेखिलेल्या थोड्याच कालांत अनेक घडामोडी घडवून आणणाऱ्या महंमदी संप्रदायाकडे आपणांस लक्ष दिलें पाहिजे.

## प्रकरण १७ वें.

### खलीफत व इस्लामाचा प्रसार.

पूर्वी तेराव्या प्रकरणांत महंमदाचें पूर्व चरित्र थोडक्यांत देऊन त्याच्यावर संप्रदाय स्थापन करण्याच्या सुमारास कोणतीं संकटें आलीं व त्यांतून त्यानें वाट कशी काढली व आपले अनुयायी हळूहळू कसे जमविले, व ज्या मक्केंतून त्यास एका रात्रीं पळून जावें लागलें त्या मक्केवरच स्वारी करून त्यानें तें शहर कसें हस्तगत केलें ती हकीकत दिली आहे. व कुराणांतील निरनिराळे भाग कसकसे उत्पन्न झाले व निरनिराळ्या बाबतींत कुराणाचे नियम कसे आहेत हें सांगितलें. आतां या प्रकरणांत महंमदी संप्रदायाचा त्याच्या मरणानंतर निरनिराळ्या प्रांतांत कसकसा प्रसार झाला, निरनिराळ्या महंमदी खलीफांनीं कोठकोठें सत्ता गाजवली त्याची माहिती देऊन सध्यां महंमदी संप्रदायाचें अस्तित्व जगाच्या कोणकोणत्या भागांत आहे तें दाखविलें आहे.

**खलीफत.**—जगाच्या संस्कृतीला व इतिहासाला मुसुलमानांनीं जें वळण दिलें तें ध्यानांत आणणें अत्यवश्य आहे. इस्लामी धर्माचा पगडा सर्व जुन्या खंडांवर केव्हां ना केव्हांतरी पूर्णपणें बसलेला दिसून येतो. खलीफ (मागाहून येणारा प्रतिनिधि) हा या धर्मीयांचा धार्मिक व व्यावहारिक बाबतींतला सर्वश्रेष्ठ सत्ताधारी पुरुष असून, तो बहुधा महंमद पैगंबराच्या कुळांतला असे. खलीफ ही पदवी प्रथम अबूबकरपासून सुरू झाली. ती महंमदानंतरचे अबूबकर आदि चार आरब लोकसत्ताक राज्याचे अधिपती उमईदवंश, आब्बासीवंश, स्पेनचा उमईदवंश, फातिमाईदवंश, इजिप्तचा आब्बासीवंश, व इतर यांकडे चालत आलेली होती. इ. स. १५१७ मध्यें इजिप्तच्या आब्बासीवंशांतील शेवटच्या खलीफाकडून ही पदवी तुर्की राजघराण्यांत आली. ती अद्यापि चालत आहे. परंतु नुकत्याच झालेल्या महायुद्धानंतर यूरोपमध्यें ग्रीस व तुर्क यांमध्यें लढे चालले होते व मित्रसंघानें जे अधिकच बिकट केले त्यांत सत्ताधारी खलीफ मित्रसंघास अनुकूल दिसून आल्यामुळें तरुण तुर्क पक्षानें त्यास राजकीय सत्तेवरून पदच्युत करून सध्यां त्याकडे फक्त धार्मिक सत्ता ठेविली आहे, म्हणजे आज त्याची किंमत इकडील निर्बल मठाधिष्ठित शंकराचार्यांपेक्षां जास्त नाहीं. या खलिफांच्या राज्याचा म्हणजे खलीफतचा संकोचविकास, कसकसा होत गेला. हें पुढें थोडक्यांत दिलें आहे.

**पहिले चार खलीफ.**—अबूबकर (इ. स. ६३२—६३४), उमर (६३४–६४४), उस्मान (६४४–६५६) आणि अली (६५६–६६१) हे मदीना येथें लोकांनीं निवडलेले खलीफ होत. यांच्या कारकीर्दीला "आरबांचें लोकसत्ताक राज्य" म्हणतात. अबूबकरचा सरदार खालीद यानें बहुतेक अरबस्तान पादाक्रांत करून इ. स. ६३५ त दमास्कस शहर काबीज केलें. उमर खलीफानें सिरिया देश जिंकून, ज्याकरितां पुढें कित्येक शतकें ख्रिस्ती व मुसुलमान यांमध्यें मोठमोठीं युद्धें झालीं. तें यरुशलेम शहर हस्तगत केलें. इराकमध्यें इराणी लोकांशीं सामना करून त्यांना तेथून हुसकून लाविलें. ६४० मध्यें उमर नांवाच्या सरदारानें इजिप्तवर खलीफाचा अंमल बसविला, म्हणजे फार थोड्या अवधींत मुसुलमानांनीं आर्यन लोकांपासून बहुतेक सर्व मुख्य मुख्य जुने सेमिटिक प्रदेश जिंकून घेतले. ते प्रदेश म्हणजे यरुशलेम, सिरिया, मेसॉपोटेमिया. असुरिया, आणि बाबिलोनिया हे होत. या विजयमालिकेंत इजिप्तची भर

घालून ऑसीड, अरबस्तानच्या सरहद्दीवरील प्रदेशांचें एक पूर्ण वर्तुल आपल्या मालकीचें केलें. ६३५ मध्यें बसरा व कुफा हीं शहरें वसविलीं जाऊन नवीन साम्राज्याचीं तीं केंद्रस्थानें बनण्याइतकें महत्त्व त्यांनां प्राप्त झालें. हीच गोष्ट दमास्कसची. मदीना ही कांहीं दिवस पावेतों इस्लामची राजधानी होती खरी पण पुढें हेजाझ व बहुतेक सर्व मूळचें अरबस्तान खलीफत चळवळीच्या बाहेर पडल्यासारखें झालें. ६४३ च्या सुमारास सर्व इराण जिंकून उमरनें खलीफतच्या दिग्विजयावर कळस चढविला.

उस्मानच्या कारकीर्दीपासून अरबस्तानचा नाश करणाऱ्या अंतःकलहाला सुरुवात झाली असली तरी परदेशावरच्या मोहिमी बंद पडल्या नाहींत. उत्तरेकडे मुसुलमानांच्या तरवारी अर्मेनिया व आशियामायनरपर्यंत पोंचल्या होत्या; पश्चिमेकडे आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावरच्या कार्थेज शहराला जाऊन भिडल्या होत्या. या खलीफानें मुसुलमानांचें प्रचंड आरमार तयार केलें व आपल्या विजिगीषेला समुद्रमार्ग मोकळा केला. या आरमाराच्या साहाय्यानें माल्टा, ऱ्होडस, ग्रीस वगैरे देश मुसुलमानांनीं जिंकले. ६५२ त अलेक्झांड्राजवळ बायझँशियम आरमाराचा पराभव झाला. अशा रीतीनें सिंधु व ऑक्सस नद्यांपासून अटलांटिक महासागरापर्यंत मुसुलमानी सत्तेचा दरारा बसला होता. पण खुद्द मदीना येथें खलीफाचा खून झाला त्या वेळीं त्याच्या संरक्षणाला जवळपास कोठेंहि सैन्य नव्हतें. देशांत अशांतता पसरली होती. महंमदाचा जांवई (फतीमाबिबीचा नवरा) अली हा उस्मानानंतर खलीफ झाला. पण त्यालाहि अंतःकलह मिटवितां येईना व उस्मानाप्रमाणें तोहि या वैराला बळी पडला. या वेळीं खलीफतींत ताकद राहिली नाहीं. खलीफ कोणीं व्हावें याविषयीं एकसारखीं भांडणें चालू असत व त्यामुळें देशांत तट पडून परदेशांत तरवार गाजविण्याचें काम तहकूब राहिल्यासारखें झालें.

**उमईद घराणें** (इ. स. ६६१-७५०)—या घराण्यांत १४ खलीफ होऊन गेले. यांच्या अमदानींत इस्लामी सत्ता बरीच वृद्धिंगत झाली. आशियाखंडाच्या अगदीं पूर्वेस—चीनच्या सरहद्दीवर व यूरोपखंडाच्या अगदीं पश्चिमेस—स्पेन देशांत मुसुलमानी बावटा रोंवला गेला. या घराण्याच्या खलीफांची राजधानी दमास्कस येथें होती, त्यामुळें त्या शहराच्या सौंदर्यांत व महत्त्वांत बरीच भर पडली.

पहिला खलीफ मोआविया (६६१-६८०) हा मोठा शूर असून त्यानें मागील खलीफांच्या कारकीर्दींत सेनापतींचीं व सुभेदारांचीं कामें बऱ्याच वेळां केलीं असून, आपल्या अंगचीं मुत्सद्देगिरीहि अनेक प्रसंगीं दाखवून दिली होती. गादीवर आल्यानंतर ग्रीकांवर त्यानें आपलें शस्त्र उचललें. त्यानें कान्स्टंटिनोपल घेण्याचा दोनदां प्रयत्न केला व आफ्रिकेमध्यें सुद्धां मुसुलमानी सत्ता वाढविण्यासाठीं जोराची खटपट केली. ६७३ मध्यें ओबेदल्लानांवाच्या सरदारानें ऑक्ससनदी ओलांडून बुखारा घेतलें. उस्मान खलीफाचा मुलगा व खोरासानचा सुभेदार जो सय्यद हा समरकंदवर चालून गेला. दुसऱ्या सरदारांनीं काबूल, सिजिस्तान, मकान व कंदाहार हे प्रांत हस्तगत केले. मोआविया हा नमुनेदार अरब सय्यद (सभ्य गृहस्थ) होता. तो मोठा बुद्धिमान्, आत्मसंयमी, उदार व धार्मिक होता. त्याच्यामागून यजीद खलीफ झाला. यानेंच अलीचे मुलगे हसन आणि हुसेन यांची कत्तल केली असा जनापवाद आहे. त्यामुळें शियापंथी मुसलमान या कृत्याचा सूड उगविण्यास तयार झाले, त्याचा अवशेष अद्याप ताबुतांत दिसतो. यजीदनंतर दुसरा मोआविया व नंतर पहिला मरवान खलीफ झाला. यजीदचा मुलगा खालीद याचा हक्क बाजूला सारून मरवाननें आपला मुलगा अबदुल मलिक याला खलीफतचा वारस केलें. इ. स. ६८८ मध्यें धुलहिजा येथें जी यात्रा जमली त्या वेळीं खलीफतीवर हक्क सांगणारे चार पुरुष तेथें असून प्रत्येकाचा वेगवेगळा तळ पडला होता. या गोष्टीवरून एका खलीफाला आपल्या प्रतिस्पर्ध्यांशीं लढून प्रांत कसे आपल्या ताब्यांत घ्यावे लागत व इस्लामची मोठी शक्ति परप्रांत जिंकून खलीफत वाढविण्याऐवजीं पूर्वींच जिंकलेले प्रांत एका विशिष्ट व्यक्तीच्या किंवा पक्षाच्या ताब्यांत आणण्यांत कशी खर्च होत होती हें दिसून येईल.

अबदुल मलिकच्या कारकीर्दींत इस्लामचे पूर्वेकडील प्रांत जे आपआपसांतील युद्धांत हातावेगळे झाले होते ते पुन्हां मिळविण्याचा प्रयत्न सुरू झाला; तसेंच ग्रीकांविरुद्ध धर्मयुद्ध सुरू झालें. आफ्रिकेंत ट्युनिस प्रांत घेऊन केरो शहर वसविण्यांत आलें. ६९३ पर्यंत मुसुलमानांचीं निराळीं नाणीं नव्हतीं तर ते बायझँशियन व इराणी नाणीं वापरीत. अबदुल मलिकनें स्वतंत्र इस्लामी नाणीं पाडण्याची वहिवाट सुरू केली. आरबीभाषा ही सरकारदरबारची भाषा म्हणून मान्यता पावली. टपाल ने आण करण्याची व्यवस्था सुरू झाली. इ. स. ७०५ त हा खलीफ वारल्यानंतर त्याचा मुलगा वालीद गादीवर बसला. इस्लामच्या इतिहासांत हा काळ अत्यंत वैभवशाली म्हणतां येईल. आशियामायनर व अर्मेनिया या प्रांतांत खलीफाचा भाऊ मस्लामा व त्याचे सेनापती यांनीं ग्रीकांवर अनेक विजय मिळविले व बऱ्याच काळपर्यंत वेढा देऊन टायना शहर घेतलें व कॉन्स्टंटिनोपल घेण्याची मोठी तयारी केली. आफ्रिकेमध्यें मूसा नांवाच्या सुभेदारानें थोड्याच दिवसांत फेझ, टँजियर, आणि स्यूटा येथपर्यंत मुलखगिरी केली. त्याच्या एका सेनापतीनें सिसिलीवर हल्ला करून सिऱ्याक्यूज लुटलें. वालीद गादीवर आल्यानंतर पांच वर्षांनीं, स्पेनमध्यें तेथील राजा मरण पावतांच गादीच्या वारसासंबंधीं तंटा उपस्थित होऊन मृत राजाच्या मुलानें आरबांचें साहाय्य मागितलें, तेव्हां तारिक नांवाच्या सरदाराची तिकडे रवानगी करण्यांत आली. तो ज्या

ठिकाणीं स्पेनमध्यें उतरला त्या स्थळाला जेबोलतारिक ( "तारीकचा पर्वत" ) असें नांव पडून पुढें त्याचा जिब्राल्टर असा अपभ्रंश झाला. तारीकनें राजपुत्रांच्या शत्रूचा पराभव करून त्यांचा फार दूरवर पाटलाग केला व मूसालाहि आफ्रिकेंतून आपल्या मदतीस बोलाविलें. या अरब सरदारांनीं कॉर्डोव्हा, सेव्हिले, कार्मोना व मेरिडा हीं व इतर स्थळें घेऊन राजधानींत मोठ्या थाटानें प्रवेश केला. सर्व राजपुत्र लष्करी व राजकीय बाबतींत कुचकामाचे आहेत असें पाहून दमास्कसचा खलीफ हा सबंध द्वीपकल्पाचा अधिराज आहे असें मूसानें जाहीर केलें व मूळच्या वारसदारांनां कांहीं जहागिरी व मानमरातबी दिल्या. अशा रीतीनें पश्चिमयूरोप खंडांतील एक राष्ट्र खलिफाच्या ताब्यांत आलें.

इकडे पूर्वेकडे मुसुलमानांनीं सैन्यानें अतिशय आश्चर्य वाटण्याजोगे विजय मिळविले. कोतैबा सरदारानें थोडक्या अवधींत पैकेंड, बोखारा, समरकंद, ख्वारिझम ( खिवा ), फरघणा आणि शाश, इतकेंच नव्हे तर चीनच्या सरहद्दीवरील काशगरसुद्धां घेतलें. महंमद बीन कासीमनें मक्रानवर स्वारी करून देबोल ( देवल ) घेतलें सिंधु ओलांडली व हिंदुराजा दाहिर याचा पराभव केल्यानंतर सिंधमधून तो मुलतानवर चाल करून गेला व तें घेऊन मोठ्या प्रचंड लुटीसह परत आला.

वालीदनंतर सुलेमान खलीफ झाला. त्यानें कान्स्टंटिनोपलवरची वालीदनें हातीं घेतलेली मोठी मोहीम उत्साहानें पुढें चालविली पण त्याच्या कारकीर्दींत ती यशस्वी झाली नाहीं. सुलेमान नंतर दुसरा उमर, नंतर दुसरा यजीद, त्यामागून हशीम, हे खलीफ होऊन गेले. हशीम हा आपला बाप अबदुल मलिक याप्रमाणें आपलें सर्व बल देशांत शांतता व इस्लामसाम्राज्याची वाढ करण्याकडे खर्च करणारा होता. खलीफ दुसरा उमर याच्या अमदानींत इस्लामला जोडलेले हिंदुस्थानांतील जे अनेक प्रांत स्वतंत्र झाले त्याला कारण सर्व मुसुलमानांना समान हक्क देण्याचें वचन पुढील खलिफांच्या वेळीं पाळण्यांत आलें नाहीं हें होय. ग्रीकांशीं युद्ध चालू होतेंच व त्यांत मुसुलमानांची पिछेहाट होतच होती. पश्चिमेकडे मात्र पिरनीज पर्वत ओलांडून मुसुलमान फ्रान्समध्यें शिरले. तेथें त्यांनीं बोर्डो जिंकून लायरपर्यंतचा बहुतेक दक्षिण गॉल पादाक्रांत केला. पण इ. स. ७३२ मध्यें टूर्स येथें फ्रेंचांशीं गांठ पडून मोठी लढाई झाली; मुसुलमान आपल्या तळावरून मागें फिरले; त्यांचा शूर सेनापति अबदुल रहमान लढाईंत पडला. ही टूर्सची लढाई जगाच्या क्रांतिकारक लढायांपैकीं एक आहे. तीमुळें मुसुलमानांची पश्चिमेकडील प्रगति थांबून त्यांच्या ताब्यांतील ख्रिस्ती राष्ट्रें स्वतंत्र होऊं लागलीं. हशीमच्या कारकीर्दींतच मुस्लीम सत्तेला उतरती कळा लागून उमईद घराण्याचा लवकरच नाश होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. त्याच्या मागून आलेला दुसरा वालीद, तिसरा यजीद, इब्राहीम व दुसरा मरवान या चार खलिफांचा इतिहास म्हणजे उमईदांच्या ऱ्हासाचा इतिहास होय यांत शंका नाहीं.

**आब्बासी घराणें** [ इ. स. ७५०–१२५८ ].— या नवीन घराण्याच्या अमदानींत इस्लामी सत्ता कळसास पोंचली. पैगंबराचा एक आब्बास नांवाचा चुलता होता, त्याच्यावरून या घराण्यास हें नांव पडलें. मोआवियाचा वंश व अलीचा वंश यांत वांकडें असे. ते एकमेकांनां पाण्यांत पाहात, तेव्हां उमईद घराण्याच्या अमदानींत अलीवंश वर येण्याची खटपट करीत होता हें सांगावयास नकोच. शेवटीं ७५० त त्यानें खलीफत बळकाविली व त्याची गादी बगदादला नेली.

उमईद घराणें जाऊन हें जें नवीन घराणें आलें तें सुखानें कांहीं बंड किंवा रक्तपात न होतां आलेलें नाहीं बयानिया आणि हौरान, उत्तर सिरिया, मेसापोटेमिया आणि इराक, खोरासान या प्रांतांतील बंडाळी मोठे घातपात करून मोडावी लागली. अबुल आब्बास या नवीन खलीफानें जे प्रांत आपल्या अनुयायांनां वांटून दिले त्यांची यादी दिल्यास त्यावेळची खलीफत कोठवर पसरली होती हें दिसून येईलः— मेसापोटेमिया, अझरबैजान, अर्मेनिया; सिरिया; हेजाझ, येमेन आणि यमामा ( येममा ) कुफा; बेहेरिन आणि ओमानसह बसरा; अहवाझ, खोरासान आणि ट्रॅन्सऑक्सियाना; फार्स (इराण), इजिप्त, सिंध; या यादींतून आफ्रिका व स्पेन वगळला आहे याचें कारण आब्बासी घराण्याला त्यावरचा अधिकार प्राप्त झाला नाहीं हें होय. या सुमारास हे देश पूर्व खलीफतीच्या ताब्यांतून निसटले, आफ्रिका कांहीं काळपर्यंत पण स्पेन अजीबात कायमचा दुरावला. आफ्रिकेचा सुभेदार अबदुल रहमान यानें खलीफाविरुद्ध बंड पुकारलें पण पुढें त्याचा पराभव होऊन ७६१ पासून पुन्हां हा मुलूख पूर्व खलीफतीच्या कब्जांत आला. इ. स. ८०० पासून आफ्रिका केवळ नांवापुरतीच आब्बासी घराण्याकडे राहिली कारण हरुन अल रशीदच्या कारकीर्दींत इब्राहिम बिन अल-अघलब या आफ्रिकेच्या सुभेदारानें त्या ठिकाणीं एक स्वतंत्र घराणें स्थापिलें.

आफ्रिकेंत वरील बंड झाल्यावेळीं तिकडे स्पेनमध्यें पश्चिम उमईदांची निराळी खलीफत स्थापन झाली. खलीफ हिशमचा नातू अबदुल रहमान हा तेथील पहिला खलीफ निवडला गेला ( ७५५ ). या खलीफतीचें केंद्र कॉर्डोव्हा हें होतें.

आब्बासी घराण्याचा दुसरा खलीफ मनसूर यानें वरील नुकसानीची भरपाई करण्याकरितांच कीं काय, ७५७ त एक मोठें सैन्य उत्तर सरहद्दीवर बायझँशिअमच्या लोकांशीं टक्कर देऊन गेलेला मुलूख परत घेण्याकरितां पाठविलें. या मोहिमेंत मुसुलमानांनां फारसें यश आलें नाहीं. मनसूरनें आपलें राहाण्याचें ठिकाण कुफाच्या आसमंतांतून बगदादला नेलें. तेव्हांपासून बगदाद शहराची वाढ होऊन जगां-

तील अत्यंत प्रेक्षणीय स्थानांपैकीं तें एक होऊन राहिलें खलाफान तेथें आपला जंगी तटबंदी वाडा बांधिला व तो मोठ्या राजवैभवांत राहूं लागला. उमईद खलीफ अरब असल्यानें त्यांना मोठ्या वाड्यांची किंवा किल्ल्यांची जरूरी नसे. प्रत्येकजण खलीफ होण्यापूर्वी ज्या खेड्यांत राहात असे त्याच ठिकाणीं पुढेंहि वास्तव्य करी. पण अब्बासी खलीफ हे इराणी बीजाचे असल्यानें त्यांना मानमरातब आवडत असे. तेव्हां त्यांच्यावेळेपासून खलीफांचा वैय्यक्तिक दर्जा वाढला व त्यांचे प्रतिस्पर्धीहि पण त्यांच्याच बरोबरीचे त्यांच्या घराण्यांतील असत.

मनसूरनंतर महादी खलीफ झाला. त्याच्या अमदानींत बायझँटाइन लोकांविरुद्ध प्रतिवार्षिक स्वाऱ्या खळ न पडतां चालू होत्या. त्याचा मुलगा हारून ( भावी खलीफ हरून अल-रसीद ) यानें मोठें शौर्य गाजवून ग्रीक बादशहाला जेरीस आणिलें व तह करणें भाग पडलें; यायोगें हारूनचा जिकडे तिकडे बोलवाला झाला व महादी खलिफानेंहि आपला वडील मुलगा मूसा याच्या अगोदर हारून हा गादीवर बसावा असें निश्चित करून टाकिलें; पण मूसाला हें मान्य झालें नाहीं. महादीच्या मृत्यूनंतर तोच गादीवर बसला व हरूननेंहि त्याचा अधिकार कबूल केला. असो. महादीच्या कारकीर्दींत जिकडे तिकडे सुबत्ता होती; शेतकी व व्यापार यांची भरभराट झाली. इस्लामी सत्ता अगदीं पूर्वेकडेहि मानण्यांत येऊं लागली. चीनचा बादशहा, तिबेटचा राजा व बरेचसे हिंदुस्थानांतील राजे यांनीं खलीफाशीं तह करून सख्य राखिलें.

यानंतरच्या खलीफाचें हारून अल-रसीद हें नांव अरबी खलीफांत अत्यन्त मोठें व सर्वश्रुत आहे. पूर्वखंडांतच नव्हे तर पश्चिम खंडांतहि " अरेबियन नाईट्स " या चटकदार कादंबरीमुळें या खलीफाचें नांव फार लोकप्रिय झालेलें आहे. हारूननें सैन्याची व सरहद्दीवरील शहरांची नीट व्यवस्था ठेविली व आशियामायनरवर हल्ला चढविला. इ. स. ७९७मधील प्रत्येक स्वारी यशस्वी झाली. कान्स्टंटिनोपलच्या निसेफोरस बादशहाचा त्यानें अनेक वेळां पराभव केला, व ८०८ मध्यें त्याला आपल्या सर्व अटी कबूल करण्यास लाविल्या. हारून अल-रसीद व शार्लमेन यांच्यामध्यें दळण वळण सुरू असे. याच्याच कारकीर्दींत बगदाद येथें कागदाचे कारखाने प्रथम निघाले. हारुन ७८६ – ८०९ पर्यंत गादीवर होता. हा मुसुलमानांच्या अंमलांतील अत्यंत भरभराटीचा काळ होय.

हारून नंतर त्याचा मुलगा अमीन खलीफ झाला.तो ८१३ त मारला गेला तेव्हां त्याचा भाऊ मामून गादीवर आला. त्याच्या आश्रयाखालीं वाङ्मय, शास्त्र व कला यांचें तेज सर्व जगाला दिपवून टाकण्यासारखें वृद्धिंगत झालें.त्यानें बगदाद येथें एक शास्त्रगृह नांवाचें विद्यापीठ स्थापन केलें. गणित, ज्योतिष व वैद्यक आणि तत्त्वज्ञान या विषयांवर पुस्तकें तयार करविलीं; पृथ्वीच्या परिघाच्या एका अंशाची मोजणी करण्याकरितां दोन विद्वान् गणिती पाठविले. धार्मिक बाबींतहि तो लक्ष घालीत असे. तो आपल्या दरबारीं तरुण तुर्की सरदारांना ठेऊन घेत असे. त्याच्या मागून आलेल्या खलिफांनीं हा पाठ उचलिला व पुढें एक काल असा आला कीं त्यावेळीं दरबारांत तुर्कीच प्राबल्य माजलें.

इस्लामचे आनुवंशिक शत्रू जे बायझंटाइन यांना तो विसरला नाहीं, तर इ स. ८३०,८३१, व ८३२ या तीन वर्षी त्यानें आशियामायनरवर मोहिमा नेल्या व विजयहि मिळविले. मामूननंतर मोटासीम, नंतर वाथीक, नंतर मोटावाक्कील खलीफ झाले. मोटासीमचा काळ राज्यांतील बंडें मोडण्यांत गेला. वाथीक मामूनप्रमाणें विद्याभिलाषी होता. त्यानें लांच घेण्याबद्दल मोठमोठ्या सरदारांनाहि शिक्षा केल्या होत्या. मोटावाक्कीलच्या कारकीर्दींत ग्रीक इजिप्तवर चालून गेले व तेथें लुटालूट करून निघून गेले. नेहमींप्रमाणें मुसुलमान व ग्रीक यांच्या आशियामायनरच्या सरहद्दप्रांतांवर स्वाऱ्या चालू होत्याच.

**फातिमाइद्‌घराणें.**—यापुढें १२५८ पर्यंत २५ खलीफ होऊन गेले. पण त्यांच्या अमदानींत खलीफत वाढण्याऐवजीं ऱ्हास पावूं लागली; तिचे झपाट्यानें तुकडे पडूं लागले. गादीकरितां एकसारखीं भांडणें चालू राहिलीं. खलीफाची सत्ता ज्याच्या अंगांत जोर असेल तो धाब्यावर बसवूं लागला. बायझंटाइन लोकांशीं युद्ध चालू होतेंच. मोकटादीर खलीफाच्या कारकीर्दींत [ ९०८--९३२ ] फातिमाइद घराण्याची स्थापना झाली. त्याचें राज्य प्रथम माघ्रीबमध्यें व नंतर इजिप्तमध्यें अजमासें तीन शतकें टिकलें. या वेळीं खलीफत किती संपुष्टांत आली होती हें तिच्या ताब्यांतील प्रदेशांचा आढावा घेतल्यास कळून येईल.या काळचें साम्राज्य केवळ बगदाद प्रांतापुरतेंच होतें असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. कारण खोरासान व ट्रँन्सऑक्सियाना सामानिद लोकांच्या हातांत होतें. फार्स बुयिद लोकांकडे होतें; किर्मान आणि मेदिया स्वतंत्र राजांच्या ताब्यांत होतें; हामदानिद लोकांनीं मेसापोटेमिया व्यापला होता; साजिद लोकांनीं आर्मेनिया व अझरबैजन घेतला; इख्शीडाइट लोकांच्या ताब्यांत इजिप्त प्रांत होता; तसेंच फातिमाईद लोक आफ्रिकेचे व कार्मांथियन अरबस्थानाचे मालक होते. अशा रीतीनें खलीफतचे तुकडे तुकडे झाले; व खुद्द खलीफ निर्बल झाला; तो इतका कीं, मोरताकफी नांवाच्या खलीफानें एका अट्टल दरोडेखोरापासून दरमहा २५,००० दिनार घेऊन त्याला देशांत वाटेल तसा धुमाकूळ घालण्याचा परवाना दिला होता ( ९४५ ).

**मोंगल सत्ता.**—१२ व्या शतकांत जेंगीझखानाचा उदय होऊन त्यानें पूर्व तुर्की टोळ्यांच्या ( तार्तर किंवा मोंगल यांच्या ) मदतीनें चीनचा उत्तरेकडील मुलुख

काबीज केला व ट्रॅन्सऑक्सियानाच्या सरहद्दीपर्यंत आपली सत्ता वाढविली. तो ख्वारिझमच्या राजावर हल्ला करण्याकरितां पुढें चालून येत होता. १२२७ मध्यें जेंगीझखान मरला तरी मोंगलांचें पाऊल एक सारखें पुढें पडत होतें. १२५६ मध्यें जेंगीझखानाचा भाऊ हुलकू किंवा हूलगू हा ऑक्सस नदी ओलांडून इस्माईलींचे सर्व तटबंदांचे प्रदेश उध्वस्त करण्याच्या मार्गास लागला. नंतर तो बगदादकडे वळला. त्यावेळीं मोस्तासीम खलीफ गादीवर होता. त्यानें खानाशीं तहाचें बोलणें लाविलें पण व्यर्थ. तेव्हां मान व शौर्य अजीबात गुंडाळून तो हूलकूला शरण गेला. पण हुलकूनें त्याला त्याच्या इष्टमित्रांसह ठार मारिलें व बगदाद शहरांत लोकांची कत्तल करून अगणित संपत्ति लुटली. या प्रमाणें आब्बासी खलीफतीचा अंत झाला (१२५८).

**अखेर**:—अब्बासी वंशांतल्या एका पुरुषानें इजिप्तमध्यें पुन्हां खलफित स्थापण्याचा प्रयत्न केला. तो अल-हाकीम बी अमरइल्ला हें नांव धारण करून कैरो येथें खलीफ म्हणवून घेऊं लागला. त्याची मुलेंहि नांवाचे खलीफ बनून ईजिप्तमध्यें राहिली. तुर्की सुलतान पहिला सेलिम इजिप्त जिंकून ही पदवी आपणाकडे घेईपर्यंत ही नांवाची खलीफत तेथें टिकली (१२०५). पुढें ती तुर्कस्थानांत आली. तेव्हां पासून तुर्कस्तानचे सुलतान आपणाला खलीफ म्हणवून घेतात्.

गेल्या नोव्हेंबरांत अंगोराच्या नॅशनल ॲसेंब्लीनें सुलतान महंमद यास खलीफाच्या गादीवरून दूर करून त्याच्या जागीं अबदुल मजीद यास खलीफ निवडलें. या नवीन खलीफाच्या हातीं राजसत्ता न ठेवतां केवळ धार्मिक बाबींतच त्याचा अधिकार मानला आहे. हें नियंत्रण निःसंशय मुसुलमानांत मोठी खळबळ उडवून सोडण्यासारखें असूनहि केवळ तें केमालिस्टांनीं म्हणजे त्यांच्याच धर्मानुयायांनीं केलें म्हणून निमूटपणें सोसण्याखेरीज गत्यंतर मुसुलमानांनां राहिले नाहीं. हल्लीं खलीफाची स्थिति आपल्या इकडील शंकराचार्यांप्रमाणें झाली आहे असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं.

ईजिप्तमधील फातिमाईद खलीफत ९०९ पासून ११७१ पर्यंत टिकली. हिची राजधानी ट्यूनिस नजीक महादिया म्हणून शहर आहे तेथें होती. स्पेनमधील खलीफतीचा अंत इ०स०१०३३ मध्यें झाला. व तेथें पुन्हां ख्रिस्ती राज्य सुरू झालें.

आतां आपण निरनिराळ्या प्रदेशांत महंमदाचा संप्रदायाच प्रसार कसा झाला व तेथील स्थिति कशी आहे तें पाहूं.

**अरबस्तानः**—महंमदानें मक्का शहर पुन्हां काबीज करून घेतांच सर्व अरबस्तानांतून जुन्या मूर्तिपूजकांच्या संप्रदायांचा पूर्ण नायनाट करून टाकण्याचें ठरविलें आणि इतक्या अल्पावधींत त्यानें सर्व जुने उपासनासंप्रदाय नष्ट करून टाकले कीं, महंमदाची थोडक्या काळांतील ही अवाढव्य कामगिरी पाहून फार आश्चर्य वाटतें. अरबस्तानांतील कांहीं अद्याप असंशोधित असलेल्या प्रदेशांत जुने मूर्तिपूजक लोक आहेत असें कोणी ह्मणतात परंतु या विधानाच्या खरेपणाबद्दल खात्रीलायक पुरावा पुढें आलेला नाहीं; इतकेंच नव्हे तर महंमदाच्या पश्चात् जीं बंडें उद्भवलीं त्या सर्वांचा उद्देश जुना धर्म पुन्हां प्रस्थापित करण्याचा नसून केवळ मुसुलमान संप्रदायांतल्याच कित्येक कडक व जाचक गोष्टींतून सुटका करून घेण्याचा होता. एका टोळीनें बंड करून प्रार्थना करण्याच्या दररोजच्या वेळा कायद्या कमी करून घेतल्या. तात्पर्य जुने पारमार्थिक संप्रदाय लवकरच पूर्ण नष्ट होण्याच्या मार्गास लागले; इतकेंच नव्हे तर जुना धर्म पाळणारांनां व तसेंच ज्यू व ख्रिस्ती लोकांनांहि कायद्यानें शिक्षा ठेवण्यांत आली व त्यामुळें सर्व अरबस्तान अल्पावधींत मुसुलमान धर्मी बनला.

अरबस्तानाच्या खलीफांपैकीं तिसरा खलीफ मारला गेला, या गोष्टीनें महत्वाचे परिणाम घडून आले. पहिला परिणाम मुसुलमानी संप्रदायांत निरनिराळे पंथ उत्पन्न झाले हा होय आणि दुसरा मुसुलमानी सत्तेची राजधानी अरबस्तानाबाहेर नेण्यांत आली हा होय. तिसऱ्या खलीफाचा खून करणारे मारेकरी ईजिप्तमधील होते व नंतर खलीफाच्या गादीवर हक्क सांगणाऱ्या वारसांतील लढाया बसरा, कूफा व दमास्कस या शहरीं झाल्या. हींच तीन शहरें गादीकरतां भांडणाऱ्या पुरुषांच्या राजधान्या बनल्या व त्यामुळें मदिनी शहराचें महत्त्व गेलें तें कायमचेंच गेलें. अरबस्तान हा मुसुलमानी अंमलाखालील केवळ एक दुय्यम प्रांत बनला. त्यांत पुढें कित्येक संस्थानें पूर्ण स्वतंत्रहि झालीं पण तीं आकार व राजकीय महत्त्व या दोन्ही दृष्टींनीं लहानच होतीं. उलट अरबस्तानांत जन्मास आलेले अनेक थोर बुद्धिमान पुरुष बाहेर वरील राजधान्यांच्या शहरीं जाऊन तेथें उदयास आले आणि निव्वळ धर्मनिष्ठ असे मुसुलमान मात्र अरबस्तानांत येऊन राहूं लागले.

याप्रमाणें अरबस्तानचें राजकीय महत्त्व कमी झालें खरें तरी मुसुलमानी धर्मावर अरबस्तानचा कायमचा किंवा सतत परिणाम निरनिराळ्या मार्गांनीं होतच होता. उदाहरणार्थ, मुसुलमानी धर्माचें अत्यंत पवित्र स्थळ या नात्यानें मक्का शहराचें महत्त्व आजपर्यंत कायम आहे. इस्लामच्या पूर्वापार परंपरांची माहिती फक्त मक्केंतच मिळते. यामुळें मुसुलमानी निरनिराळ्या पंथांचे लोक येथेंच एकत्र जमतात; अद्यापहि या शहराचें महत्त्व पूर्ववत् कायम आहे. दुसरें शहर मदीना. याचें महंमदाच्या वेळीं असलेलें राजकीय महत्त्व जरी लवकरच नष्ट झालें तरी मुसुलमानी विद्येचें मुख्य पीठ ह्मणून त्याचा लौकिक पुष्कळ काळ कायम होता. महंमदाच्या पश्चात् त्याच्या विधवा स्त्रिया बरींच वर्षें तेथें हयात होत्या; त्यामुळें महंमदाच्या चरित्रासंबंधीं बऱ्याच आठवणी तेथें शिल्लक राहिल्या व मुसुलमानी कायद्याचें उगमस्थान मदीनाशहर होऊन बसलें व तेथें मोठमोठे कायदेपंडित उदयास आले. मलीक व शफी हे प्रसिद्ध कायदेपंडित येथी-

लच असून तीन प्रसिद्ध मुसुलमानी कायदेग्रंथ यांनीं केलेले आहेत व हेच अरबी कायदेग्रंथ बहुतेक मुसुलमानी देशांत आजहि प्रचलित आहेत. निरनिराळ्या मुसुलमानी धर्मपंथां-तील आपसांत झालेल्या लढाया मात्र सगळ्या अरबस्तानाबाहेर झालेल्या आहेत. आब्बासी घराण्याच्या कारकीर्दींत झुबे-रचा मुलगा अबदल्ला यानें उमइद सेनापतींच्या विरुद्ध लढून मक्का व मदीना हीं दोन्हीं पवित्र शहरें स्वतंत्रपणें आपल्या ताब्यांत घेण्याचा प्रयत्न केला पण तो फसला. त्यानंतरहि अरबस्तानांत कित्येक बंडें झालीं, पण त्यांचा उद्देश अरबस्तान स्वतंत्र करण्याचा होता; मुसुलमानी साम्रा-ज्याची गादी अरबस्तानांत आणण्याचा नव्हता.

अरबस्तानांत तीन प्रमुख राजकीय पंथ होते ते सुनी शिया व खारिजी. शिया पंथाची झैदी नांवाची शाखा दक्षिण अरबस्तानांत आहे. येथें महंमदी पंथस्थापनेनंतर अत्यंत महत्त्वाची धार्मिक चळवळ वहाबी नांवाची निघाली होती. येथील वाङ्मयाकडे पाहिल्यास तें अरबांनीं स्वतंत्र निर्माण केलेलें नसून इतर प्रसिद्ध ठिकाणच्या ग्रंथकारांपासून तें उसनें घेतलेलें दिसतें. येमेनच्या शाली बीन महदानें लिहिलेला देवशास्त्रपर ( अलइला अलशमिका ) ग्रंथहि मूळ अरबेतर जुन्या ग्रंथाच्या आधारेंच लिहिलेला आहे. अरब-स्तानांतले मुसुलमान बहुतेक फार भाविक असतात पण खेड्यांपेक्षां शहरांतले अधिक नियमितपणें धर्माचें आचरण करितात. यूरोपांत ज्यूंना लेखतात त्याप्रमाणें ख्रिस्त्यांनां हे हलके लेखतात इतकेंच नव्हे ख्रिस्ती संशोधकांनां जीव बचाव ण्याकरतां मुसुलमान होऊन राहावें लागतें. दक्षिण अरब-स्तानांतील एका वृत्तपत्राचा संपादक मूळचा ख्रिस्ती आहे.

**सिरीया.**–अरबस्तानांतील फाजिल वाढलेल्या लोकसंख्ये-ला सीरिया व पॅलेस्टाइन या प्रांतांत मुक्तद्वार सांपडलें. ७व्या शतकाच्या पूर्वार्धांत अरब लोकांनीं या प्रदेशावर स्वारी कर-ण्यास, व प्रदेश जिंकून घेण्यास तेथील लोक सेमेटिक वंशांतलेच असल्यामुळें फार सोपें गेलें. सीरियाच्या शेजारचीं घस्सान व हिरा हीं राज्यें रोमन साम्राज्य व इराणचें साम्राज्य यांच्या-मध्यें ' बफर स्टेट ' प्रमाणें होतीं, तेथील लोक शुद्ध अरबी रक्ताचे होते. त्यामुळें स्वारी करून येणारे अरब मुसुलमान त्यांनां बंधूप्रमाणेंच वाटले व रोमन साम्राज्याच्या जुंवाखालून सुटका झाल्याबद्दल आनंद वाटला. शिवाय इराण बरोबरच्या युद्धामुळें कांस्टंटिनोपल येथील खजिना रिता झाला होता, त्यामुळें हिरॅक्लिअसनें सरहद्दीवरच्या इतर जातींच्या लोकांना खंडणी देण्याचें बंद केल्यामुळें या जातींनाहि अर-बांनां मिळण्याची इच्छा झाली. या अनेक कारणांमुळें उमर खलीफाच्या फौजेनें स्वारी करतांच सर्व प्रदेश मुसुलमानांच्या ताब्यांत आला.

अरबांनीं खाल्डिया जिंकला तो केवळ अनावर द्रव्य-लोभामुळें, ईजिप्त जिंकला तो अरबस्तानला धान्य पुरवठा होणें जरूर म्हणून आणि सीरिया जिंकला तो त्या प्रांतांतील लोकांबद्दल वाटणाऱ्या बंधुभावामुळें. शिवाय याच प्रांतांत अनेक पवित्र स्थळें असल्यामुळें धार्मिक भावनाहि वरील स्वारीच्या मुळाशीं होती. अब्राहाम, सालो-मन व खुद्द येशू हे या पॅलेस्टाइन प्रांतांतच जन्मले व मेले. महंमद पैगंबरहि लहानपणीं सीरियांत आपल्या चुलत्या-बरोबर गेला होता यरुशलेमचें दर्शन घेण्याकरतां एकदां रात्रीं महंमद गेला होता व त्याच ठिकाणीं त्याला प्रत्यक्ष ईश्वरदर्शन घडलें असेंहि सांगतात. दमास्कसलाहि तो जाणार होता, पण नंदनवनांत माणसाला दोनदां प्रवेश घडत नसतो या समजुतीनें तो मागें फिरला. मदीना येथें यरुशलेमकडे तोंड फिरवून प्रथम दोन वर्षें मुसुलमान प्रार्थना करीत असत यावरूनहि यरुशलेमबद्दलची त्यांची पूज्यबुद्धि स्पष्ट दिसते. उपरिनिर्दिष्ट स्वारीच्या वेळीं ओमाननें सर्व पवित्र ठिकाणांचें दर्शन घेतलें. यरुशलेमपेक्षांहि हेब्रॉनचें धार्मिक दृष्ट्या महत्त्व मुसुलमानांनां अधिक वाटत असे कारण तेथें अब्राहाम, जेकब, एझॅक हे आपल्या बायकांसह राहिलेले होते व त्यांचीं थडगींहि तेथेंच आहेत. हेब्रॉन शहर १०९९ पासून ११८७ पर्यंत ख्रिस्ती धर्मयोध्यांच्या ( क्रुसेडर्स ) ताब्यांत राहून पुन्हां मुसुलमानांच्या ताब्यांत आलें. येथील देवालयांचीं अंतर्गृहें अत्यंत पवित्र मानून मुसुलमान आंत शिरत नाहींत; पण ख्रिस्ती लोक मात्र बेधडक आंत शिरून अब्राहामचें वगैरे प्रत्यक्ष दर्शन करून येतात; हें ऐकून मुसुलमानांनां साश्चर्य भय वाटतें.

उमईद खलीफांच्या कारकीर्दींत तर सीरिया ( ६६१–७५० ) सर्व अरब संस्थानांत श्रेष्ठ बनून दमास्कस शहर हिंदुस्थानपासून स्पेनपर्यंत अफाट पसरलेल्या मुसुलमानी साम्राज्याची राजधानी होतें. या ऐश्वर्या-बद्दल मत्सर वाटून मक्का येथें अरबांनीं दुसरा प्रति-स्पर्धि खलिफ गादीवर बसविला आणि लवकरच मुसुलमान मक्केच्या खलीफाला सार्वभौम मानूं लागले; तरीहि यरुशलेम, हेब्रॉन वगैरे पवित्र स्थळांमुळें सीरियाचें महत्त्व बरेंच कायम राहिलें. शिवाय उमईद अबद-अल-मलिकनें मक्केवर सैन्य धाडून तेथील खलीफाचा मोड केला व मुसुलमानी साम्रा-ज्यावर आपलें वर्चस्व पुन्हा प्रस्थापित केलें आणि यात्रेकरू-नाहि मक्केचें महत्त्व वाटूं नये म्हणून सालोमनच्या चर्चच्या जागींच मोटी मशीद बांधून त्यांत काबाची स्थापना केली.

तथापि उमईद खलीफांच्या मनांत मुसुलमानी धर्मा-बद्दल खरी निष्ठा नव्हती. हे खलीफ मूळ मक्का येथील पिढीजात श्रीमंत घराण्यांतील वंशज असून महंमदाचे ते कट्टे शत्रू होते. महंमदाच्या प्रबल सत्तेपुढें त्यांनां नमावें लागलें होतें इतकेंच. त्याच्या पश्चात् त्याच्या आवडत्या मदीना शहरावर हल्ला करून तें लुटून फस्त करण्यास त्यांस बिलकूल दिक्कत वाटली नाही; इतकेंच नव्हे तर खुद्द काबाचाहि त्यांनीं नाश केला आणि महंमद पैगंबराच्या कुटुं-बांतील माणसांचा बहुतेक उच्छेद केला. त्यांनां फक्त ऐहिक

सत्तेची व वैभवाची हांव होती व तें साधण्याकरितां साधन म्हणून त्यांनीं मुसुलमानी धर्माचा अंगीकार केला होता. सीरिया मधील लोक बहुतेक ख्रिस्ती होते.ते शिकलेले असत, त्यामुळें लढण्याखेरीज इतर सर्व राज्यकारभाराच्या कामांत खलीफानां त्यांची अरबांपेक्षांहि अधिक मदत होत असे. बहुतेक सर्व सरकारी खात्यांत कारकून ख्रिस्ती असत.ईजिप्त व इराणमध्येंहि अशी स्थिति होती. खलीफाच्या दरबारांत मोठे वजन असलेले असेंहि कित्येक ख्रिस्ती बडे गृहस्थ असत.दमास्कसचा जॉन व त्याचा बाप हे अरब राजाच्या पदरी वरिष्ठ दर्जाच्या हुद्यावर होते व उमईद खलीफाचा एक स्तुतिपाठकहि ख्रिस्ती कवीच होता; इतकेंच नव्हे तर कित्येक उदारधी खलीफांच्या समोर धार्मिक बाबतींत ख्रिस्ती व मुसुलमान वादविवाद करीत असत. या गोष्टींचा परिणाम असा झाला कीं, मुसुलमानांतील कट्टी धर्मनिष्ठा ढिली पडत चालली.उमईद खलीफांच्या वर्तनांतील प्रमादाचें पापमयत्व कमी भासावें म्हणूनच मुसुलमानी धर्म स्वीकारणारांचा कोणतेंहि पाप समूह घात करीत नाहींत; निदान प्रयलकालन्यायदिनापर्यंत तरी त्या पाप्याला कांहींच शिक्षा भोगावी लागत नाहीं; असें मुर्जैत प्रतिपादन करीत असत. निर्भेळ दैववादाला निदान इच्छास्वातंत्र्यवादाची तरी जोड मिळाली. याच मतस्वातंत्र्यांतून पुढें मुताझिलायटांची चळवळउत्पन्न झाली.ख्रिस्ती संप्रदायाचा मुसुलमानांवर लौकिक बाबतींतहि बराच परिणाम झाला. उमईद खलीफांपैकीं शेवटचा व सर्वांत उत्तम खलीफा हिशाम हा स्वतः मोठा प्रसिद्ध शेतकीतला माहीतगार होता. त्याच्या खालिद नांवाच्या सुभेदाराची आई ख्रिस्ती होती व तो मुसुलमानांपेक्षां ख्रिस्ती लोकांनांच आपल्या नोकरींत अधिक ठेवीत असे. कुराण हाच कांहीं सनातन धर्मग्रंथ नव्हे ही गोष्ट पुष्कळांनां हिशामच्या कारकीर्दींतच मान्य झाली आणि एकंदरीनें दमास्कसच्या या उमईद खलीफांची सुमारें एक शतकभरची कारकीर्दच एकंदर अरबांच्या इतिहासांत सर्वांत अधिक उज्ज्वल झाली. उमईद खलीफांचा पाडाव होतांच अरबांच्या हातांतील राज्यसत्ता गेली व सीरिया हा मुसुलमानी साम्राज्यांतला एक सामान्य प्रांत बनला. पुढें लवकरच तेथें मुसुलमान व ख्रिस्ती यांच्यामध्यें धर्म युद्धें माजलीं व तीं दोनतीन शतकें चाललीं. मध्यंतरीच्या कांहीं काळांत सीरिया ईजिप्तच्या ताब्यांत होता व अलीकडील चार शतकें तो तुर्कस्तानच्या सुलतानाचा एक प्रांत होऊन राहिला होता. महायुद्धानंतर कांहीं काळ तो फ्रेंचांच्या ताब्यांत होता.

**मेसापोटेमियाः**—सातव्या शतकांत इराणीलोकांनीं ईजिप्त व सीरिया जिंकून पूर्वरोमनसाम्राज्याची मर्यादा कांस्टंटिनोपलपर्यंत मागें हटविली होती. पण नंतर हिरॅक्लिअसनें मोठा पराक्रम करून इराणचें साम्राज्य धुळीस मिळविलें. या दोन साम्राज्यांच्या झुंजीमुळें अरबांनां आयतीच चांगलीच संधी मिळून त्यांनीं खाल्डिया—ज्यानें एक हजार वर्षें ग्रीक व रोमन सत्ताधीशांच्या भयंकर माऱ्यालाहि दाद न देतां टिकाव धरला होता तो—प्रांत पांच सहा वर्षांच्या अवधींत हस्तगत करून घेतला. कित्येक शतकें मोठें बलाढ्य असलेलें इराणचें साम्राज्य शेवटीं अगदीं अल्पावधींत विलयास गेलें. त्याचीं कारणें देशाची खालावलेली स्थिति, लोकांत वाढलेला नेभळटपणा, जमीनदारांचा जुलूम व राज्यांत माजलेली बेबंदशाही हीं होत. खाल्डियांतील लोक मूळ अरब जातीचे असल्यामुळें तो देश जिंकण्यास अरबांस सोपें गेलें. मेसापोटेमियांत तघलिब, आय्याद, निमार व केल्ब या जातींचे लोक असून ते ख्रिस्ती झालेले होते. पण या जाती मूळ अरब वंशांतल्या असल्यामुळें अरब मुसुलमानांनीं स्वारी करतांच हे लोक फारसा विरोध न करतां मुसुलमान होऊन अरबांनां मिळाले. सर्व मेसापोटेमिया लवकरच अल्पायासानें मुसुलमानी बनला, इतकेंच नव्हे तर तो तीन शतकें मुसुलमानी जगाचें धार्मिक व बौद्धिक बाबतींत केंद्र बनून राहिला होता. लवकरच दमास्कसच्या ऐवजीं बगदाद शहर मुसुलमानी साम्राज्याची राजधानी झालें. मेसापोटेमियाचे दोन प्रांत पडतात: दक्षिणेकडचा इराक व उत्तरेकडचा जझीरा. पैकीं धार्मिक चळवळीच्या इतिहासांत इराक प्रांतच फार गाजलेला आहे. धार्मिक बाबतींतील अनेक मतभेद व तंटेबखेडे या प्रांतांतच झालेले असून आजहि हा प्रांत अलीच्या शियापंथाचा अनुयायी आहे. पण खुद्द अली हा जिवंत होता त्या वेळीं त्याला विरोध करून ख्वारिज नामक स्वतंत्र पंथ येथें उपस्थित झाला होता. या पंथाचा ईश्वरैकसत्ताक पद्धतीच्या नांवाखालीं प्रचलित सामाजिक व राजकीय व्यवस्थेंत बखेडा माजवून सर्वत्र बेबंदशाही व विध्वंसन सुरू करण्याचा उद्देश होता, त्यामुळें खलीफांनां अनेक वर्षें त्रास सोसावा लागला. ९ व्या शतकाच्या पूर्वार्धांतल्या तीन अब्बासी खलिफांनीं तर मतस्वातंत्र्यवादी पंथाचा पक्ष स्वीकारून पुराणमताभिमानी पुरुषांचा फार छळहि केला. पुढें खलीफांनीं स्वसंरक्षणार्थ ठेवलेल्या तुर्की शिपायांनींच शिरजोर होऊन बगदादच्या खलीफाची सत्ता संपुष्टांत आणली व अखेर मोंगलांनीं स्वारी करून बगदादची सत्ता नष्ट करून टाकली.

इराक प्रांत धर्मद्रोह व राजद्रोह दोन्हीं बाबतींत अग्रणी असल्यामुळेंच उलटपक्षीं तेथें पुराणमताभिमानी पक्षाचा व राजकीय सत्तेचा जोर अधिक होता. कारण येथील बिलंदर लोकांवर राज्य करण्याकरितां खलीफांनां अट्टल, हुषार व कावेबाज अधिकारी नेमावे लागत. तसेंच येथील लोक मोठे स्वतंत्रपणें विचार करणारे असल्यामुळें मुसुलमानी संप्रदायाला पूर्ण विकसित स्वरूप येथेंच प्राप्त झालें. या प्रांतांवरील सुभेदारहि बहुतेक उत्तम उत्तम असत. हसन—अल बास्री हा कुराणावरचा प्रसिद्ध टीकाकार इराक प्रांतांत

जन्मला. धर्माच्या अनेक मतमतांतरांतून अखेर एक निश्चित धर्मपंथ चालू करणारा अबुल-हसन-अल-आशरी हा या प्रांतांतलाच होय, व त्याचाच पंथ अद्याप येथें चालू आहे.

इ. स. ६३८ मध्यें मेसापोटेमिया जिंकून घेतल्यावर येथें लवकरच अरबांनीं बसरा व कुफा हीं दोन लष्करी ठाणीं वसविलीं. पण त्यांचें लष्करी महत्त्व थोडक्याच दिवसांत नाहींसें होऊन तेथें दोन इस्लामी विद्यापीठें सुरू झालीं. त्यांची ऑक्सफोर्ड व केंब्रिज युनिव्हर्सिटीशीं तुलना करतां येण्यासारखी आहे. दोघांची एकमेकांशीं स्पर्धा व कुराणाच्या अर्थासंबंधानें विरोधी मतें असत. त्यांत बसरा हें विचार-स्वातंत्र्याचें पुरस्कर्ते असें. येथें परकी विचारांना व लोकांनां मुक्तद्वार असल्यामुळें हें शहर प्रगमनशील राहून व्यापारी दृष्टीनेंहि आज भरभराटींत आहे. उलट कुफा शहर पुराणप्रिय व दुराग्रही असल्यामुळें कायमचें नष्ट झालें. तिसरें प्रसिद्ध शहर हरन. याची प्रसिद्धी अशी आहे कीं, मूर्तिभंजक मुसुलमानी धर्म येथें चालू असतांहि जुन्या धर्मांतले मूर्तिपूजाविधी व उत्सव होत असत. ह्या शहरांत सोम (चंद्र) देवतेची उपासना चालत असे. मुसुलमान सुभेदार लांच घेऊन तिकडे दुर्लक्ष करीत. ८३० मध्यें मामून खलीफाला प्रथम ती गोष्ट कळली. तेव्हां त्यानें कुराणानें मान्य केलेला ख्रिस्ती, ज्यू वगैरे धर्म स्वीकारण्यास हुकूम सोडला व तो अमान्य केल्यास कत्तल करण्याची भीति घातली. तेव्हां हरण येथील रहिवाशांनीं आपण ख्रिस्ती असल्याचें जाहीर केलें. येथेंहि बरेच प्रसिद्ध लेखक होऊन गेले.

आब्बासी खलीफ इराणी जातीचे होते. ७६२ मध्यें बगदाद शहर वसविलें गेलें व लवकरच तेथें राजधानी गेली. येथील लोक सुनी पंथाचे होते. १०५५ पासून तेथें सेल्जुक खलीफांचा अम्मल होता. १२४२ मध्यें मोगलांनीं बगदादची सत्ता नष्ट केली. नंतर कांहीं वर्षें इराणच्या ताब्यांत राहून अखेर गेलीं चारशें वर्षें तो ओटोमन तुर्कांच्या ताब्यांत आहे. अली व त्याचा मुलगा हसन यांचें दफन येथें झालेलें असल्यामुळें इराणांतले शिया मुसुलमान या भूमीला मदीनापेक्षांहि अधिक पवित्र मानतात. त्यामुळें तेथें तुर्की व इराणी मुसुलमानांतला तंटा पूर्ववत् चालू आहे. या भांडणामुळें जगांतील अत्यंत सुपीक व श्रीमंत देश असूनहि हल्लीं येथें शेतकीकडे पूर्ण दुर्लक्ष्य झालेलें आहे. महायुद्धापासून येथें ब्रिटिश सरकारचा बराच हात शिरकला असल्यामुळें आतां सुधारणा होण्याची बरीच आशा आहे.

**तुर्कस्तान**:— तुर्कस्तानांतील परिस्थितीची माहिती देणारे आंकडे फारसे उपलब्ध नसतात व आजकाल ते मिळणें फारच दुरापास्त झालेलें आहे. तथापि इतकी गोष्ट नक्की आहे कीं, बाल्कन द्वीपकल्पांतील मुसुलमानांची संख्या फार झपाट्यानें कमी होत आहे व ख्रिस्ती राजांच्या अमलाखालीं मुसुलमानांची संख्या किती झपाट्यानें कमी होऊं शकते याची कल्पना एक थेसेलींमधील आंकडे पाहिल्यानें येण्यासारखी आहे. सन १८८१ सालीं तेथें ५०,००० मुसुलमान होते तर १९१० सालीं तेथें ३,००० मुसुलमान राहिले. थेसेलीमधील या उतरत्या प्रमाणावरच सायप्रस, क्रीट, बल्गेरिया व बोस्निया येथील मुसुलमानांची लोकसंख्या कमी होत आहे. एकंदर द्वीपकल्पांत तुर्कस्तानची हल्लीं प्रजा नसलेले लोक धरूनहि लोकसंख्या ३०,००,००० पर्यंत कायती आहे. ॲनाटोलियांत हल्लीं थोडी वाढली आहे व आशियामायनरमध्यें तुर्कांची संख्या सुमारें १,१०,००,००० आहे.

तुर्क लोकांनीं आपल्या संप्रदायाच्या धार्मिक भागांत फारशी भर घातली नाहीं. व्यावहारिक भागांत त्यांची कामगिरी मोठी आहे, पण त्याबद्दलचें संपूर्ण संशोधन अद्याप झालेलें नाहीं. गेल्या शतकांत यूरोपीय संस्कृतीचा परिणाम होऊन इस्लामी समाजांत जे फेरफार झालेले आहेत त्यांबद्दलचें विवेचन मात्र भरपूर झालेलें आहे. इस्लामी संप्रदायाला आधुनिक स्वरूप देण्याकरितां जे जे फेरबदल सुचविण्यांत आलेले आहेत ते सर्व अमलांत आलेले नाहींत. तथापि त्यांवरून मुसुलमानी समाजांत यासंबंधानें, कशा प्रकारचे प्रयत्न चालू आहेत याची चांगली कल्पना येते. हे करावयाचे फेरबदल परंपरागत मुसुलमानी आचारविचारांशीं सुसंगत दिसतील अशाच तऱ्हेचें त्यांनां स्वरूप देण्यांत येतें; पण वरील दिखाऊ आवरण दूर केल्यास त्यांचें वास्तविक स्वरूप लक्षांत येऊन तें जुन्या परंपरेशीं अगदीं विसंगत किंवा विरोधी आहे ही गोष्ट स्पष्ट होते. या ठिकाणीं शरीआ म्हणजे मुसुलमानी कायदा व तद्द्वारा मुसुलमानी संप्रदाय यांशीं उघड विरोधी अशा ज्या सुधारणा अलीकडे तुर्कस्तानांत करण्यांत आल्या आहेत त्यांचा काय तो विचार करूं. अशा प्रकारच्या सुधारणा करण्याकरितां अलीकडे बरेच कायदे व हुकूम करण्यांत आलेले आहेत; त्यांपैकीं सुलतानच्या फक्त दोन हुकुमांचा उल्लेख करतों. एक ५ नवंबर १८३९ रोजीं काढलेला गुल्हानाचा हत्त-इ-शरीफ नांवाचा हुकूम व दुसरा १८ फेब्रुवारी १८५६ चा हत्त-इ-हुमायून हा होय. हे दोन्हीहि अबद-अल-मजीद याच्या कारभाराच्या वेळचे आहेत. पहिल्या हुकमांत शरीआ म्हणजे मूळ मुसलमानी कायद्याशीं कोणत्याहि प्रकारें विरोध येणार नाहीं अशा तऱ्हेच्या सुधारणा सरकारला करावयाच्या आहेत असें सामान्यपणें मोघम जाहीर केलेलें असून दुसऱ्यांत कायद्यांत कोणत्या सुधारणा प्रत्यक्ष करण्यांत आलेल्या आहेत तें सांगितलें आहे. ख्रिस्ती लोकांनीं कायद्यान्वयें घ्यावयाची शपथ व लष्करांत करावयाची नोकरी यासंबंधाचे नियम, तसेंच इस्लाम धर्माचा त्याग करणारास असलेली

देहान्त शिक्षा बंद करणें व गुलामपद्धति नाहींशी करणें या सुधारणा करण्यांत आलेल्या आहेत.

वरील सुधारणा करण्याबद्दल मुसुलमान समाजाची मागणी नव्हती. उलट यूरोपीय राष्ट्रांच्या व विशेषतः ग्रेटब्रिटनच्या सांगण्यावरून व तुर्कस्तानांतील वरिष्ठ दर्जाच्या अधिकाऱ्यांची बरेच दिवसांच्या प्रयत्नानें समजूत घातल्यानंतर त्या अमलांत आणल्या आहेत ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. क्रिमियन युद्धामुळें यूरोपच्या पश्चिमेकडील राष्ट्रांनीं तुर्कस्तानचा बचाव करून तुर्कांनां जें ऋणबद्ध करून ठेवलें त्या उपकारांचा अल्पसा मोबदला म्हणून ख्रिस्ती लोकांनां अपमानास्पद असे कित्येक कायदे रद्द करण्याबद्दल मागणी करण्यांत आली. शिवाय या योगानें तुर्कस्तानांतील मुसुलमानेतर समाजांत राष्ट्रीय भावना जागृत करून रशियाच्या वाढत्या सत्तेस आळा घालावयाचा हाहि त्यांचा उद्देश होता. या सुधारणेच्या कार्यांत येणाऱ्या अडचणींची तुर्की सरकारला जाणीव नव्हती असें नाहीं आणि ती टाळण्याकरितां तुर्की सरकारनें मोठी धाडसाची युक्ति योजली. उपरिनिर्दिष्ट सुधारणा पुढीलप्रमाणें करण्यांत आल्या आहेतः—

( १ ) ख्रिस्ती लोकांस कोर्टांत येऊन शपथेवर साक्षीपुरावा देतां यावा म्हणून—अशी सवलत शरी-आनें दिलेली नाहीं—अगदीं नवीन प्रकारचीं कोर्टें स्थापन करण्यांत आलीं. शरीआप्रमाणें विवाह, विवाहद्रव्य ( स्त्रीधन ), घटस्फोट, वारसा वगैरे गोष्टींचे खटले तोडण्यासाठीं फक्त मुसुलमानांकरतां जीं कोर्टें होतीं, त्यांशिवाय यूरोपीय पद्धतीवर कांहीं नवीं कोर्टें स्थापण्यांत आलीं. त्या कोर्टांत मुसुलमानांविरुद्ध ख्रिस्ती लोकांनां लेखी साक्षीपुरावा दाखल करण्याची परवानगी मिळाली.

( २ ) मुसुलमानी संप्रदायाचा त्याग करणारास देहान्त शिक्षा बंद केली, ती पुढील हुकुमानेंः " माझ्या साम्राज्यांत सर्व धर्मांच्या व पंथांच्या लोकांनां आपआपले धार्मिक आचार पूर्ण स्वतंत्रपणें पाळण्यास मोकळीक आहे. म्हणून कोणालाहि स्वधर्माचरणांत विरोध किंवा उपद्रव केला जाणार नाहीं; तसेंच कोणावरहि धर्मांतर किंवा पंथांतर करण्याबद्दल सक्ती केली जाणार नाहीं."

( ३ ) झिझिया कराची बंदी व मुसुलमानेतर लोकांचा लष्करी नोकरींत प्रवेश होण्यासंबंधानें कायदे करण्यांत आले होते; पण त्यांची योग्य अंमलबजावणी झाली नव्हती. झिझिया कर तर बदल-इ-अस्कारी असें नांव मात्र बदलून चालूच ठेविला. १९०८ च्या राज्यक्रांतीपर्यंत मुसलमानेतरांनां लष्करांत प्रवेश नव्हताच. नंतर मात्र धर्मनिरपेक्षरीतीनें सर्वांनां लष्करी नोकरींत घेण्यांत येऊं लागले.

( ४ ) नवें पीनल कोड सुरु करण्यांत आलें तें शरी-आंतील फौजदारी स्वरूपाच्या कायद्यांशीं अगदीं विरुद्ध होतें. हें पीनल कोड १८५८ मध्यें सुरू केलें, तें स्वतंत्र न रचतां फ्रेंच पीनल कोड जसेंच्या तसेंच अमलांत आणलें. या कोडांतहि १९११ मध्यें आधुनिक स्वरूपाच्या सुधारणा करण्यांत आल्या. पण शरी-आंतील जुने कायदे रद्द न करितां दोन्ही कोडें चालू ठेवण्यांत आलीं व त्यांपैकीं कोणत्या तरी एका कायदेकोडानुसार गुन्ह्यांचा इनसाफ करण्यांत येत असतो. गुलामपद्धतीवरहि १८६८, १८७०, १८७१, १८७९ व १८८९ या सालीं हुकूम सोडून नियंत्रण घालण्यांत आलें. १८९० पासून आफ्रिकेंतील गुलामांचा व्यापार बंद करण्याकरितां ब्रुसेल्स येथें भरलेल्या सार्वराष्ट्रीय परिषदांमध्यें तुर्कस्तान भाग घेऊं लागला आहे.

वरील माहितीवरून आधुनिक स्वरूपाच्या सुधारणा तुर्कस्तानांत कशा प्रकारें होत चालल्या आहेत व त्या जुन्या शरीआंतील कायद्यांशीं कशा विरोधी आहेत हें दिसून येईल. असा प्रयत्न सतत चालू राहिल्यास तुर्कस्तानाला आधुनिक पाश्चात्य वळण लवकरच पूर्णपणें लागल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु या कामीं मुसुलमानांच्या धार्मिक समजुती किती आड येतील व त्यामुळें युद्धावरहि पाळी येईल किंवा नाहीं हें आज निश्चित सांगतां येत नाहीं. पारमार्थिक व देवज्ञानविषयक ग्रंथ आधुनिक चिकित्सक बुद्धीनें अद्याप मुसुलमानी संप्रदायांत लिहिले गेले नाहींत. तरुण तुर्कांनीं राज्यक्रान्ति घडवून आणल्यापासून तुर्की लोकांत उदारमतवाद शिरकाव करूं लागला आहे, हें "शिरात-इ-मुस्तकिम" या व १९१२ पासून त्याचेंच नांव बदलून चालविलेल्या "साबिल-अल-रशाद" या नियतकालिकांतील लेखांवरून स्पष्ट दिसतें.

तथापि तुर्कस्तानांतील बहुजनसमाज सुधारणांच्या अद्यापहि विरुद्धच आहे. या समाजाला ' उलेमा ' ही संज्ञा आहे. यांची एक स्वतंत्र संस्थाहि दुसरा सुलतान महमूद याच्या कारकीर्दीपासून स्थापन झालेली आहे. या संस्थेला खुद्द मुसुलमानांचा आश्रय असे. या संस्थेच्या मुख्याला शेख-अल-इस्लाम म्हणतात. हल्लीं त्याचे अधिकार व वजन बरेंच कमी झालें आहे. तथापि राजकारणांत या संस्थेकडे दुर्लक्ष करून चालण्यासारखें नाहीं.

**दरवेशी पंथः**—उलेमा पंथापेक्षांहि या दरवेशी पंथाचें वजन तुर्कीसमाजावर अधिक आहे. ओटोमन साम्राज्याच्या काळापासून यांनीं आशियामायनरमध्यें महत्त्वाच्या गोष्टी केलेल्या आहेत. जुन्या ख्रिस्ती लोकांनां हळूहळू मुसुलमान बनविण्याचें काम यांनींच केलें. यांपैकीं मौलवी पंथ सर्वांत प्रसिद्ध आहे व हा ' नाचऱ्या दरवेशांचा ' पंथ म्हणून लोकांच्या परिचयाचा आहे. दुसरा रुफाई पंथ ' गुरगुरणाऱ्या दरवेशांचा ' म्हणून प्रसिद्ध आहे. तिसरा बक्ताशी पंथ. याचा ' जॅनिझरी ' शीं संबंध असल्यामुळें एकेकाळीं त्याचें महत्त्व बरेंच होतें. या पंथाचीं मतें पाखंडी असल्यामुळें या पंथांतील लोकांना मुसुलमान मानितहि नाहींत. पण त्यांचा

आग्रह त्यांचा मुसुलमान मानावें असा आहे. याशिवाय दुसरेहि कित्येक किरकोळ पंथ आहेत.

तुर्की बहुजनसमाजांत भोळेपणा व अंधविश्वास पुष्कळ आहे. अशा धर्मभोळेपणाच्या समजुती तुर्की मुसुलमानांत कोणत्या आहेत याची संपूर्ण माहिती अद्याप कोणी मिळविलेली नाहीं. तथापि हा विषय मोठा गमतीचा व उपयुक्तहि होईल. शिवाय तुर्की लोकांत साधुसंतांचे उत्सव व ठिकठिकाणच्या यात्रेचीं पवित्र स्थळें यांचेंहि माहात्म्य फार आहे. यांत कित्येक जुन्या बायझँशियम शहरांतील साधुपुरुषांचाहि समावेश झालेला आहे. स्त्रीपुरुषांनीं वाचावयाजोगे धार्मिक ग्रंथ पुष्कळ आहेत. ते जुन्या ओस्मानली तुर्कांच्या काळचे असल्यामुळें त्यांतील कित्येक शब्द आजच्या वाचकांनां समजत नाहींत; तथापि लोकांची त्या ग्रंथांविषयींची भक्ति कायम आहे. यांपैकीं महंमदीय व अहंमदीय हे दोन ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. तुर्की वाङ्मयाचा इतिहास पाहूं इच्छिणारांनां हे ग्रंथ फार उपयुक्त आहेत; पण देवज्ञानविषयक माहिती त्यांत अगदीं अल्प असल्यामुळें सदरहू विवेचनांत त्यांचा अधिक परामर्ष घेण्याची जरूर नाहीं. इल्मा-इ-हाल नामक वाङ्मयविभागांत लहान लहान ग्रंथ असून त्यांत मुसुलमानांना धर्माची प्रमुख तत्त्वें प्रश्नोत्तरस्वरूपांत समजाऊन सांगितलीं आहेत.

**इराण**:—इराणांत इस्लामीधर्माचा प्रवेश बराच लवकर झाला. महंमद पैगंबर मरण पावल्यापासून एका वर्षाच्या आंत मुसुलमानी सैन्य व इराणी सरकार यांच्यामध्यें तैग्रिस ते ऑक्झस या नद्यांच्या दरम्यान रणसंग्राम सुरू झाले ते सतत ३० वर्षें चालू होते. शेवटचें झोरास्टर घराणें इ. स. ७५० मध्यें विलयास गेलें. इस्लामी धर्माचा प्रसार व झोरास्टर धर्माचा नायनाट हळूहळू होत होता. इस्लामी धर्माच्या बौद्धिक क्षेत्रांत इराणी विद्वानांनीं ग्रंथरचना करून उत्तम कामगिरी केली. अरब लोकांनीं इराण देश जिंकून घेतल्यानंतरहि इराणांतील मूर्तिपूजक लोकांत नेस्टोरियन (एक ख्रिस्ती पंथ) मिशनरी धर्मप्रसाराचें काम जोरांत करीत होते व त्यांनां यशहि चांगलें येत होतें. आणि इराणी लोकांनां इस्लामी संप्रदाय म्हणजे परकीयांचा मोठा हल्ला असल्यासारखें वाटत होतें.

अलीच्या पंथाला मात्र आरंभापासून इराणांत अनुयायी मिळत गेले; याचें कारण हुसेननें एका ससनियन राजकन्येशीं लग्न लावलें होतें. उमाईद खलीफांच्या वेळीं वारंवार बंडें होत होतीं व त्यांतील पुष्कळशीं खारिजी लोकांनीं केलेलीं असत. आब्बासींचा गुप्त कट मूळ इराणांत झाला. त्यांतला कटवाल्यांचा नायक अबू मुस्लीम हा इराणी जातीचाच होता; व त्यांतील झाब येथील निर्णायक लढाई इराणच्या भूमीवरच झाली. मुसुलमानांतील शिया पंथाचा प्रसार इराणांत करण्याचा निकराचा प्रयत्न इस्माइलियनांनीं केला. नंतर मूर्तिपूजक मोंगलांनीं हल्ला केला, त्यांत इराणी लोकांनां भयंकर हाल सोसावे लागले व त्यावेळीं इस्लामी धर्म अगदीं नष्ट होण्याचा प्रसंग आला होता. तैमूर हा सुन्नी मुसलमान होता, तरी त्यानें कोणावरहि दया केली नाहीं. त्यानें सर्वांची सरसकट कत्तल सुरू केली. इ. स. १५०० पासून पुढें सफवी राजांच्या कारकीर्दींत शिया पंथ हा राजधर्म म्हणून स्वीकारण्यांत आला व हल्लींहि इराणी सरकारनें तोच धर्म पत्करलेला आहे. या शियापंथांत प्रकटीकरणाचें कार्य महंमद पैगंबरबरोबर संपलें असें मानीत नाहींत; ते अलीला महंददाइतकाच पूज्य मानतात. प्रकटीकरणें व देवाचे प्रेषित पुन्हा पुन्हां होत असतात अशी यांची श्रद्धा आहे.

झोरास्ट्रियन धर्माचा कांहीं कांहीं परिणाम झालेला कुराणग्रंथांत दिसतो. इराणांत सुनी लोक १० लक्ष, शिया इराणी ५० लक्ष, तातरी २० लक्ष, अली इलाही ३ लक्ष व बहाई १ लक्ष आहेत, असा अंदाज आहे. कर्बला हें यात्रेचें प्रसिद्ध ठिकाण असून तेथें धार्मिक शिक्षण देण्यांत येतें. प्रत्येक शहरांत शिक्षणाचें कॉलेज आहे; पण मोठी विद्वत्ता व मान मिळविण्याकरितां कर्बला येथें शिक्षण घ्यावें लागतें. १० दिवस मोहरमचा उत्सव फार मोठ्या प्रमाणांत केला जातो. यांत दुःखप्रदर्शन म्हणून ऊर बडविणें व डोकी फोडणें असले क्लेशकारक प्रकार फार मोठ्या प्रमाणावर चालतात आणि सुशिक्षित वर्ग अल्प असल्यामुळें त्यांच्या हातून हे प्रकार बंद होऊं शकत नाहींत. मशीदीमध्यें धर्मोपदेश मुख्यतः चालू असतो व त्यांत इमामांच्या चरित्रांचें वर्णन विशेषें करून असतें. घदीर बैराम व कुर्बान बैराम यांची योग्यता सारखीच मानतात.

मुतशरी पंथांची संख्या पुष्कळ आहे. हे लोक जुन्या परंपरेच्या गोष्टींनां चिकटून राहणारे आहेत. याशिवाय शेखी, वहाबी व दुसरे कांहीं किरकोळ पंथ आहेत. शेखी लोक बुद्धिकौशल्यानें अनेक गूढ गोष्टींचा खरा अर्थ समजावून सांगणारे आहेत. वहाबी हे विरक्त फकिरी वृत्तीचे आहेत. अली इलाही व बहाई हे पंथ मर्यादित अर्थानेंच मुसुलमान आहेत. पहिल्या पंथांत अली खेरीज दुसरा कोणीच इमाम मानीत नाहींत, शरी—आ हा कायदे ग्रंथ मानीत नाहींत व रमदान म्हणजे प्रार्थना करण्याकडे लक्ष देत नाहींत. किरमानशहा हें या पंथाचें मुख्य ठिकाण आहे. कुर्द, तुर्क व इराणी जातीचे लोक या पंथांत आहेत व त्यांची संख्या खेडयांपाडयांत विशेष आहे. बहाई पंथ तर फारच प्रसिद्ध आहे. महम्मद पैगंबर व शरीआ यांच्या अधिकाराचा अतिक्रम ते करतात. या पंथाचे लोक शहरांत आहेत व सुशिक्षित वर्गांत आहेत म्हणून त्यांची संख्या अल्प असली तरी महत्त्व विशेष आहे. सुफी नांवाच्या पंथांत दरवेशी लोकांचा भरणा विशेष आहे. ते धर्माच्या तात्त्विक व बौद्धिक

अंगाचाच विशेष विचार करणारे भक्त आहेत. त्यांच्यांत कवीहि पुष्कळ होऊन गेलेले आहेत, त्यांपैकीं फार प्रसिद्ध जलाल अल-दिन, शम स-इ-ताब्रिझ, फरीद-अल-दिन, अत्तार व हाफिझ हे होत.

येथील धार्मिक संस्था पूर्ण लोकसत्ताक पद्धतीच्या असून उमेदवारांची लोकप्रियता पाहून त्यांची अधिकाराच्या जागेवर नेमणूक होते. हलक्या कुळांत जन्मलेल्यांनांहि धार्मिक अधिकाराच्या जागा मिळतात. सामान्य लोकांनां मशीदींतील शाळांत शिकण्याची सोय होते. मुसुलमानी देवळांतून अनीतीचे प्रकार पुष्कळ चालतात. मुल्ला लोकांची दुराचरणाबद्दल प्रसिद्धि आहे. शरी आ या कायदेग्रंथामुळें सुधारणेची गति खुंटलेली आहे. सुशिक्षित लोकांत धर्मबंधनें शिथिल होत आहेत. अगदीं अलीकडे बुद्धिप्रामाण्यवाद व (देवाच्या अस्तित्वाबद्दलच) संशयवाद उत्पन्न झाला असल्यामुळें इस्लामी धर्मांत फेरफार होणार असें दिसतें. ख्रिस्ती धर्म व पाश्चात्य संस्कृति यांचाहि परिणाम इराणवर झपाट्यानें होत आहे.

**मध्य आशिया.**—कॉन्स्टंटिनोपलपासून पूर्वेकडील मुसुलमानी देशांत धर्मवेडेपणा व अज्ञान उत्तरोत्तर अधिक प्रमाणांत असलेलें दृष्टीस पडतें व आशियाखंडांत जसजसें आंत खोल शिरावें तसतसा मुसुलमानेतरांबद्दल अधिकाधिक द्वेष व तिटकारा असलेला दृष्टीस पडतो. तुर्कस्तानांत ख्रिस्ती व मुसुलमान लोक अनेक शतकें एकमेकांसंन्निध राहात असल्यामुळें त्यांचे एकमेकांबद्दलचे दुराग्रह बरेच दूर झालेले असून सलोखा वाढलेला आहे. इराणांत आरंभापासून सुरू असलेलें शिया व सुनी या पंथांमधील शत्रुत्व व कलह अद्याप कायम आहेत. शिया पंथाच्या तेथील लोकांची धार्मिक वृत्ति व नीतिमत्ता अगदीं हलक्या दर्जाची आहे. तुर्कस्तानांत धार्मिक सत्ता बहुतेक सुलतानाच्या हातांत असते, तर इराणांत धर्माधिकाऱ्यांचा वर्ग अगदीं स्वतंत्र असून सर्वसत्ताधीश आहे. शहाच्या राजकीय सत्तेला ते जुमानीत नाहींत, इतकेंच नव्हे तर, त्याला प्रत्यक्ष विरोध पुष्कळ वेळां करतात. इराणांतील चालू घराण्याच्या शहांनीं गेलीं शंभर वर्षें या धर्माधिकाऱ्यांची सत्ता मर्यादित करण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. इस्फहान व कर्बला येथील इमाम जुम्मा हे शहाला बरोबरीनें लेखितात व प्रत्यक्ष शहाच्या हुकुमाला त्यांची सम्मति असल्याशिवाय कोणीहि कवडीची किंमत देत नाहीं.

मध्य आशियांत वरील दोन्ही देशांहून अगदीं भिन्न परिस्थिति दृष्टीस पडते. पूर्व तुर्कस्थानांतच फक्त शफी पंथाचे लोक आहेत. या देशांतील धार्मिक आचारविचार व चालीरीती फार निराळ्या आहेत. येथें धर्मवेडेपणाचा अतिरेक, धर्मविधींचा सुळसुळाट आणि सुधारणाविषयींचा भयंकर द्वेष दृष्टीस पडतो. अगदीं चालू काळांतील त्यांची राहणी, सामाजिक व्यवहार, व्यापार व सरकारासंबंधाची वृत्ति पूर्णपणें ८ व्या व ९ व्या शतकांतल्याप्रमाणें आहे; किंबहुना ८ व्या ९ व्या शतकांत सुद्धां कुराणाच्या आज्ञा इतक्या कडकडीत रीतीनें पाळल्या जात नसाव्या. दिवसाचा बहुतेक दोनतृतीयांश काळ तेथील लोक धर्माचरणांत घालवितात. प्रत्येक मुसुलमान सद्गृहस्थाच्या घरीं एका खोलींत धार्मिक शुद्धिकरणविधीकरतां स्वतंत्र खोल चौकोनी जागा केलेली असते, कुराण ठेवण्याकरितां ठरलेला कोनाडा असतो, तसेंच प्रार्थनेच्या वेळीं आंथरण्याची सतरंजी ठेवण्याची जागा नेमलेली असते. प्रत्येक माणसाचा पोषाख धर्माच्या नियमानुसार बरोबर असतो. आंतले व बाहेरचे कपडे कापण्यांत व बेतण्यांत रेसभरहि फेरफार चालत नाहीं. शुद्ध रेशमी कपडा वापरण्याची मनाई असल्यामुळें ते रेशमी कपड्यांत विणतांनां चार धागे तरी कापसाचे घालीत असतात. स्त्रियांनां कडक गोषांत ठेवतात व त्यांना निर्जीव वस्तूंप्रमाणें किंवा गुलामाप्रमाणें पुरुष वागवितात. तरुण वयांत आलेल्या मुलींकडे पुरुषांची कामांध दृष्टि जाऊं नये म्हणून त्या मुलींनां वृद्ध स्त्रियांप्रमाणें वांकून व काठीला टेकून चालावयाला लावतात. प्रत्येक स्त्रीला डोक्यावरून पायघोळ बुरखा घ्यावा लागतो. मद्यपानाची बंदीहि इतर सर्व मुसुलमानी देशांपेक्षां येथेंच अधिक कडक आहे. तात्पर्य येथील सुनी मुसुलमान सर्व जगावरील आपल्या इतर धर्मबंधूंपेक्षां फारच कडक आचरण करणारे आहेत. लोकांच्या धार्मिक आचरणावर सक्त नजर ठेवण्याकरितां एक स्वतंत्र अधिकारी असतो, त्याला राईस म्हणतात. तो बरोबर दोन शिपाई घेऊन बाजारांतून व सार्वजनिक जागांतून हिंडत असतो. प्रार्थनेला जाण्याची आरोळी ऐकतांच कोणी मशीदीकडे न गेलेला आढळला तर जवळच्या वाद्याच्या चावकानें फटके मारण्याचा त्याला अधिकार असतो; किंवा त्याला तुरुंगांतहि टाकतां येतें, तसेंच रस्त्यांत कोणालाहि हटकून कुराणाच्या मुख्य आज्ञा सांगण्याचा हुकूम राईसला करतां येतो; आणि ज्याला त्या आज्ञा तोंडानें पाठ म्हणतां येणार नाहींत त्याला वृद्धतरुण, स्त्रीपुरुष असा कोणताहि भेद न करतां शाळेंत शिकण्याकरितां परत पाठविण्याचाहि राईसला अधिकार असतो. याप्रमाणें दाढी पिकलेल्या म्हाताऱ्यांनांहि शाळेंत पाठविण्याचा अधिकार बजावतांना हा नोकर आढळतो. हे अधिकारी बायकांनांहि असभ्य पोषाख असल्यास रस्त्यांत हिंडूं देत नाहींत.

मध्य आशियांत निरनिराळ्या पंथांचें बरेंच महत्त्व आहे. दरवेशी पंथांतील लोक निरक्षर असतात, पण ते कुराणांतील वचनें व कवनें पाठ करून रस्तोरस्तीं म्हणत फिरतात. त्यांचा सोशिकपणा विलक्षण आहे. दोन दोन रात्रीं 'या हू, या हक' (तो परमेश्वर सत्यमूर्ति व धर्ममूर्ति आहे) असलें एकादें वचन मोठमोठ्यानें सारखे ओरडत असलेले आढळतात. तक्य किंवा खानका म्हणून अशा हिंडणाऱ्या लोकांनां उतरण्याकरतां बांधलेल्या इमारती असतात. तेथें रात्रीं गाणें व ओरडणें इतक्या मोठ्यानें व पुष्कळ वेळ चालतें कीं, त्या

दरवेशांच्या अंगांत आल्या सारखें त्यांचें अंग कापूं लागतें व तोंडांतून फेंस येऊं लागतो. त्यांच्याबरोबर तेथें जमलेले वृद्धतरुण स्त्रीपुरुषहि नाचूं ओरडूं लागतात, व बेसुमार गोंधळ माजवितात. असले प्रकार तुर्कस्तानांत कोठेंहि आढळत नाहींत. याप्रमाणें मध्यआशियांत सर्वच प्रकार पराकोटीला गेलेले आहेत.

अपराध्यांनां शिक्षाहि फार कडक करतात. मद्यपान करणाऱ्याला उंच शिखरावरून लोटून ठार केल्याचीं व जारकर्म करणाऱ्या स्त्रीला धोंडे मारून ठार मारल्याचीं उदाहरणें आहेत. महंमदाच्या आज्ञा आपण फार कडक रीतीनें पाळतों याबद्दल या लोकांनां अभिमान वाटतो. धर्मोपदेशक, धर्माध्यक्ष व साधुसंत फकीर यांनां येथें फार मान आहे. बहा अलदिन नक्षबंदी हा एक विद्वान, पवित्राचरणी साधु असून बुखारा येथें त्याचें थडगें आहे व तेथें यात्रा जमत असते. ख्वाजा काशानी, ख्वाजा अकसथ, ख्वाजा उबैद अल्ला अव्हार इत्यादि बरेच मोठे साधु होउन गेले आहेत. ख्वाजा अब्द अल्ला हातिफी हा प्रसिद्ध कवि होता; तो बाबरबरोबर हिंदुस्थानांतहि आला होता.

अशा प्रकारचे फिरते साधु मध्यआशियांतल्याप्रमाणें तुर्कस्तान, इराण वगैरे देशांत आढळत नाहींत. पण आधुनिक सुधारणेच्या दृष्टीनें मध्यआशिया अगदीं मागें म्हणजे ८ व्या ९ व्या शतकांतल्या सारखा अद्याप आहे. त्या मानानें तुर्कस्तान व इराणांतील लोक बरेच सुधारलेले आहेत व ते आपल्या मध्यआशियांतील फाजील धर्मनिष्ठ बंधूंनां हंसतात व नांवें ठेवितात. मध्यआशिया सुधारणेच्या कामीं अगदीं मागासलेला असल्याचें कारण असें कीं, सरहद्दीवर मोठालीं वाळूचीं मैदानें असल्यामुळें त्याचें पुढारलेल्या मुसुलमान देशांशीं दळणवळण नाहीं. मध्यआशियांतील स्थितीचा दुसरा वाईट परिणाम म्हणजे अफगाणिस्थान वगैरे हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील प्रांतांतल्या डोंगरी लोकांतहि तेंच धर्मवेडेपणाचें वारें शिरलेलें आहे; व त्यामुळें सरहद्दीवरील ब्रिटिश अधिकाऱ्यांनां पुष्कळ वेळां त्रास व अनर्थहि सोसावे लागतात.

**हिंदुस्थान.**—महंमद इब्न कासीम या अरब सेनापतीनें हिंदुस्थानावर इ. स. ७१२ मध्यें स्वारी केली व सिंध प्रांत जिंकून तेथें मुसुलमानी राज्य स्थापन केलें. तें पुढें मोंगल साम्राज्यांत सामील करण्यांत आलें. या स्वारीनंतर सुमारें तीनशें वर्षें सिंधप्रांताखेरीज इतर हिंदुस्थानाशीं मुसुलमानांचा संबंध नव्हता. पुढें १० व्या शतकाच्या अखेरीस सबक्तगीन व गिझनीचा महंमूद यांनीं पुन्हां हिंदुस्थानावर स्वाऱ्या सुरू केल्या. १०३० मध्यें महंमूद मेला तेव्हां फक्त लाहोर प्रांत मुसुलमानांस अधिक मिळालेला होता. नंतर आणखी एक दीड शतकानें महंमद घोरीनें दिल्लीपर्यंत मुलुख जिंकून घेऊन तेथें आपल्या मुसुलमान घराण्याचें राज्य सुरू केलें. अशा रीतीनें १२ व्या शतकाच्या उत्तरार्धांत मुसुलमानी सत्ता हिंदुस्थानांत कायमची प्रस्थापित होऊन १८५८ मध्यें मुसुलमानी साम्राज्य लयास गेलें. या राजसत्तेचा धर्मप्रसाराशीं निकट संबंध आहे. मुसुलमानी राजे आपल्या मुसुलमानेतर प्रजाजनांनां कसे वागवीत असत हा प्रश्न महत्त्वाचा आहे. मुसुलमानांची राजकीय सत्ता सुरू होण्यापूर्वीच्या स्वाऱ्यांत ज्या हिंदूंनीं त्यांनां प्रतिकार केला त्यांवर त्यांनीं पशुप्रमाणें जुलूम केला, व ब्राह्मणांचीं निर्दयपणानें वाटेल तशी कत्तल करून त्यांचीं पवित्र देवळें धुळीस मिळविलीं. परंतु हे रानटीपणाचे प्रकार पुढें बंद करून मुसुलमानी राजांनीं हिंदूंनां धार्मिक बाबतींत सवलती देण्यास सुरवात केली. सिंध प्रांतावर प्रथम स्वारी करणाऱ्या अरब मुसुलमानांनीं मात्र हिंदूंनां बिलकूल त्रास न देतां त्यांनां धार्मिक विधी व रीतिरिवाज पाळण्यास पूर्ण सवलत दिली होती; व पुढें उत्तर हिंदुस्थानांत व दक्षिणेंत राज्यें स्थापन करणाऱ्या मुसुलमानी राजांस आपल्या राज्यांत लष्कराची व्यवस्था व बंदोबस्त नीट ठेवण्याचेंच मुख्य काम असल्यामुळें धर्मप्रसाराचे कार्यांत लक्ष घालण्यास त्यांनां फारसा अवसर सांपडला नाहीं. मोंगल लोकांनीं राज्य पूर्णपणें प्रस्थापित केल्यावर सुद्धां त्यांचें धार्मिक धोरण प्रत्यक्ष धर्माच्या प्रसारापेक्षां घराण्याच्या व पैशाच्या स्थितीवर ठरत असे. याच्या उलट पुष्कळ राजांनीं आपल्या अमदानींत धर्मवेडानें परधर्मीय लोकांवर जुलूम करून त्यांचीं देवळें भ्रष्ट करून त्यांनां आपल्या धर्मांत ओढून घेतलें. अशा प्रकारच्या जुलमी कायद्यांबद्दल हिंदूलोक गुजराथमध्यें तिसऱ्या सुलतान महंमदाच्या विरुद्ध चेतले होते. देवळें फोडल्याबद्दल, काश्मीरमध्यें हिंदूंनीं सुलतान शिकंदर (१३९३–१४१७) यास बुतिसखन म्हणजे मूर्तिभंजक ही निंदाव्यंजक पदवी दिली होती. आणि बंगालमध्यें परधर्मीयांचा छळ केल्याबद्दल जलालउद्दिन महंमदशहा (१६१४–३१) यांची फार अपकीर्ति झाली होती. अवरंगजेबानें एक धर्म पसरविण्याच्या बाबतींत अनेक जुलमी कृत्यें केलीं व असें म्हणतात कीं त्यानें आपल्या साम्राज्यांत अनेक मूर्ति व देवळें फोडून अनेक हिंदूंना बाटविलें होतें. अगदीं अलीकडील उदाहरण म्हणजे टिपू सुलतानचें होय. त्यानें सर्व मागील राजांपेक्षां क्रूर व रानटी कृत्यें धर्मवेडाच्या भरांत केलीं. परंतु असले धर्मवेडे राजे सोडून दिले असतां एकंदर महंमदी धर्माच्या अनुयायांनीं हिंदू प्रजेला फार त्रास दिला नाहीं व कांहीं प्रसंगीं त्यांनीं हिंदूंशीं प्रेमळपणाचें व सख्याचें वर्तन केलें.

इस्लामी धर्माच्या इतिहासामध्यें एक महत्त्वाची बाब म्हटली म्हणजे ही कीं जीं मोंगल घराणीं हिंदुस्थानांत पसरलीं गेलीं व स्थापित झालीं तीं सर्व परकीय देशांतून स्वारी करण्याऱ्यांनीं स्थापलीं. त्यांनीं आपल्याबरोबर परदेशस्थ लष्कर आणलें व तसेंच त्यांच्या दरबारांमध्यें परस्थ विद्वान, साहसी शिपाई कवी वगैरे आले. अशा रीतीनें या

मुसलमानांच्या लोकसंख्येमध्यें अरब, पर्शिअन, अफगाण, तुर्क वगैरे लोकांची भर पडली, व त्यांनीं सामाजिक व राजकीय व धार्मिक कार्यांत बराच पुढाकार घेतला. तसेंच त्यांनीं दरबारांतून मोठमोठीं इनामें मिळविलीं व कांहीं वेळां धामधुमीच्या प्रसंगीं कांहीं प्रांत बळकावले. अशा रीतीनें 'बलाढ्य झाल्यामुळें अर्थातच ते या बाटलेल्या लोकांचा तिरस्कार करूं लागले. ज्या धर्मप्रसारकांनीं हें प्रसाराचें काम केलें व ज्या साधूंनां आज देखील मुसुलमानी राज्यांतून फार मान दिला जातो ते सर्व परकीय देशांतून आलेल्या लोकांचे वंशज होते. यांनीं स्थापन केलेल्या मशिदी ह्या अद्याप धर्माचें केंद्र म्हणून मानल्या जातात व दरवर्षी हजारों मुसुलमान येथें यात्रेसाठीं येतात. अशा प्रकारच्या मशीदी, अजमीर येथील मुइन अलदिन चिस्तीची, (१२३६), पाकपट्टन येथील फरीद अलदिन शकरगंजची (१२६९), दिल्ली येथील निजाम अलीदिन अवलियाची ( १३२५ ) आणि अहमदाबाद जवळील शहाअलमची ( १४७५ ) होय. या लोकांनीं आपलें किती वजन बसविलें याचें उदाहरण १३ व्या शतकांत युच येथें प्रस्थापित झालेल्या बुखारी सय्यद यांच्या कुलाचें देतां येईल. या परदेशीय लोकांच्या येण्याजाण्यानें एक महत्वाचा परिणाम घडून आला तो हा की हिंदुस्तानांतील मुसुलमानांचा तिकडील इस्लामी धर्माचे वादविवाद व त्यांतील मुख्यतत्वें यांच्याशीं कायमचा परिचय राहूं लागला व सुनी अगर शिया या दोन्ही पंथांनीं त्या तत्वांशीं जुळतें करून एकी उत्पन्न करण्याचा क्रम सुरु केला. या मुसलमानी संप्रदायाचें वाङ्मय हिंदुस्थानला परकीय अशा अरबी व फारसी भाषांतच आहे. या दोन भाषांच्या अभ्यासामुळें हिंदुस्थानांतील कांहीं लोकांनीं बाहेरील धार्मिक विचारांशीं परिचय कायम ठेवला आहे. पण त्यामुळें मुसलमानी धर्म हिंदुस्थानांत व्हावा तितका दृढमूल झाला नाहीं. कारण अशिक्षित देशी मुसुलमान व त्यांचे वंशज हे या मुसलमानी संस्कृतीच्या केंद्रापासून दूर असल्याकारणानें त्यांच्यामध्यें व हिंदूंमध्यें नांवापलीकडे फारसा भेद आढळून येत नाहीं. देशी मुसुलमान हिंदूंच्या देवांची व शीतला देवीची वगैरे पूजा करतांना आढळतो. तसेंच हिंदूंच्या होळीच्या सणांत व दसऱ्याच्या सणांत तो भाग घेतो. अशा प्रकारें हिंदूंच्या सणांत भाग घेण्याबद्दल, खऱ्या धार्मिक मुसुलमानांनीं तीव्र निषेध केलेला आहे. परंतु याविरुद्ध सक्रिय निषेध करण्यास सय्यद अहमद व हाजीशरियतअल्ला यांनीं १९ व्या शतकांत सुरवात केली व वहाबी नांवाची चळवळ सुरू करून त्यांनीं आपलीं तत्त्वें फैलावण्यास सुरवात केली. परंतु याच्या पेक्षांहि मौलवी करामत अली ( १८७४ ) या धर्मसुधारकाचा जोरदार लेखांनीं याविरुद्ध जोराचा हल्ला केला. अलीकडे शिक्षणाचा फैलाव चोहोंकडे झाल्यापासून व दळणवळणाचीं साधनें सुलभ झाल्यामुळें 'सर्व मुसुलमानांमध्यें एकी होण्याचे परिणामकारक प्रयत्न झाले आहेत व त्यांस थोडे बहुत यशहि आलें आहे पण अगदीं अशिक्षित अशा समाजामध्यें अजून धर्मतत्वांबद्दल अज्ञानच आहे.

जे हिंदू मुसुलमानधर्मीय झाले त्यांच्यावर अजून हिंदू संस्कृतीचा किती कायमचा परिणाम झालेला आहे हे त्यांनीं शारिआचा त्याग करून हिंदूंची विवाहपद्धति व वारसपद्धति स्वीकारली आहे त्यावरून दिसतें. इस्लाम हा कांहीं धर्मतत्वांचा समूह नसून तो एक शासनसंप्रदाय आहे हें प्रसिद्धच आहे. पण दक्षिण हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर वास करणारे मुसुलमानी धर्माचा स्वीकार केलेले मोपिला व तसेच मलकाना रजपूत व जाट हे मुसुलमानी कायद्यानुसार न वागतां आपल्या हिंदुपूर्वजांच्या कायद्याप्रमाणेंच आचरण करतात.

इस्लामांधर्माचा परिणाम हिंदुस्थानांत निवळ मुसुलमान लोकांवरच झाला असें नाहीं तर मुसलमानेतर जातीवरहि झाला. १५–१६ व्या शतकांतील व विशेषतः कबीर व नानक यांनीं केलेल्या धार्मिक चळवळीवर यांचा परिणाम झाला हें निःसंशय आहे. उत्तर हिंदुस्थानांतील खालच्या जाती मुसुलमान साधूंची पूजा करतात. यांपैकीं कांहीं साधू केवळ काल्पनिक असतात व कांहीं खरे असतात. तसेंच दरबारांतील मोठमोठ्या हिंदू सरदारांनीं जे कांहीं मुसलमानी रिवाज उचलले आहेत ते देखील याचेच निदर्शक आहेत.

इस्लाम धर्मामध्यें पडदा पद्धति सांगितली आहे व त्यामुळें स्त्रियांनां समाजांत वावरण्याची व नाच व इतर खेळ खेळण्याची देखील मनाई आहे. याच नीतिकल्पनामधून न्यायाधीश हा एकान्तांत राहणारा विरक्त मनुष्य असला पाहिजे, कारण तो समाजांत मिळून असला म्हणजे त्याला एक प्रकारची आसक्ति उत्पन्न होऊन तो पक्षपाती होण्याचा संभव असतो अशी कल्पना निघाली. तद्वतच अशीं कांहीं विद्वानांचीं उदाहरणें आहेत कीं ते आपल्या पुस्तकांमुळें पैसे मिळविल्याबद्दल रडले आहेत. ह्या नीतीच्या कल्पना कुराणाच्या आधारावरच रचिल्या आहेत. व वागणुकीबद्दलच्या म्हणी कवीपासून व शफी लेखकांपासून उदाहृत करण्याची वहिवाट आहे. अखलाक इ नाशिरी, अखलाक इ मुहानी सारखे नीतिशास्त्रावरील ग्रंथ हे विद्वान लोक वाचतात व अखलाक इ जहांगिरी सारखे ग्रंथ हिंदुस्थानांत निर्माण झाले आहेत तरी पण त्यांचा परिणाम फारसा झाला नाहीं, इतका कडक सोवळेपणा थोडा फार ढोंगीपणाच्या उत्पत्तीलाहि कारणीभूत होतो तरी पण हिंदुस्थानांतील मुसुलमान वर्गाची मनोवृत्ति पवित्र आचरणाकडे नाहीं असें म्हणतां येणार नाहीं.

महंमदी संप्रदायाच्या प्रसाराचा हिंदुस्थानावर झालेला राजकीय परिणाम व त्याचा इतिहास हे स्वतंत्र प्रकरणांत दिले आहेत.

**चीन—बाह्यप्रांत—तिबेट.**—मुसुलमानी जगाचा भाग या नात्यानें चीनचे दोन भाग पाडतां येतील

(१) खुद्द चीन (याचे अठरा प्रांत) व (२) बाह्य चीन (तुर्कस्तान, तिबेट व मंगोलिया) व या बाह्य प्रान्तांपैकीं तिबेट व मंगोलिया मधील मुसुलमानांची संख्या अतिशय अल्प असल्याकारणानें उपेक्षणीय आहे. एन डी ओलोनच्या मतें हे मुसुलमान फक्त तिबेट मधून हिंदुस्थानाला जाणाऱ्या खडकाळ मार्गामध्यें आहेत. उदाहरणार्थ टासिएन्लो जवळ रहाणाऱ्या १०० मुसुलमान घराण्यासाठीं एक मशीद आहे. वे हिंदुमुसलमानांच्यासाठीं ल्हासा येथें एक मशीद आहे. व बॅटंग येथें एक मशीद आहे. तिबेटचे लामा या इस्लाम धर्माला विरोध करीत नाहींत व याबद्दल एक कारण असें आहे कीं दोघांनांहि चीनचें वर्चस्व नको असल्यामुळें दोघांनांहि राजकीय दृष्ट्या एकमेकांचें सख्य पाहिजे आहे. तरी पण तिबेटमध्यें इस्लाम धर्म प्रसृत होईल असें दिसत नाहीं. आतांपर्यंतच्या मुसुलमान व तिबेटी यामधील व्यापारी दळणवळणामध्यें एकहि तिबेटी बाटला नाहीं. विशेषतः डेगुआन मधील सेगपॅटिंग येथील मुसुलमानांचा तिबेटी लोकांशी चहाचा फार व्यापार असतांना १९०५ च्या डोलोनच्या स्वारीमध्यें इस्लामी धर्माला एकच तिबेटी व तो सुद्धां मेव्हाकुटीनें मिळाला. उलटपक्षीं सेगपॅटिंगमध्यें पुष्कळ मुसलमानच ख्रिस्तानुयायी झालेले आढळून आले.

**तार्तरी**—तार्तरीमध्यें ज्या वेळेस सामानीयाचें बलाढ्य राज्य पूर्वेकडे विस्तार पावत होतें त्या वेळीं इस्लामचा प्रवेश झाला. अशी एक आख्यायिका आहे कीं पश्चिमेकडून आलेल्या अबू नस्रसामानी या नांवाच्या एका मुसुलमानानें सतकबोघ्रा या राजपुत्राला १२ व्या वर्षी इस्लामीधर्माची दीक्षा दिली. बोघ्रेड अथवा इलेकिड या नांवानें प्रसिद्ध असलेल्या बोघ्राच्या वंशजांनीं जवळ जवळ १०० वर्षे आपली सत्ता गाजवली व टॉपगॉशच्या कारकिर्दीत १०७० मध्यें यूसफखान हजीबनें इस्लामी रहस्यानें भरलेलें बोधपर काव्य संपविलें. पर्शिअन भाषा व पर्शिअन संस्कृति यांचा प्रसार झाल्यामुळें तार्तरीत इस्लामचा प्रसार झाला असल्याचा संभव आहे. पण या ठिकाणच्या राज्यकर्त्यांनीं जरी इस्लाम धर्म मस्करला तरी पण त्याच्या लगतच्या पूर्वेकडील तुर्की राज्यांत इस्लामी धर्माचा प्रवेश झाला नाहीं. शिवाय ज्या वेळीं कारा खिताईनें इलेकिडचें राज्य जिंकलें त्या वेळीं देखील त्यानें जित लोकांना धर्मस्वातंत्र्य दिल्याकारणानें इस्लामधर्माचा तेथें प्रसार झाला नाहीं. अशाच प्रकारची सवलत चेंगिझखान उर्फ गेंगिझखान यानें दिली. पण ज्या वेळेस चेंगिझखानाच्या साम्राज्याचे तुकडे झाले त्या वेळीं त्याच्या नातवाच्या ताब्यांत तार्तरी जाऊन त्याच्या वंशजांनीं इस्लाम धर्म स्वीकारला. तथापि पण पुष्कळ दिवसपर्यंत राजांची अगर प्रजेची श्रद्धा या धर्मावर बेताचीच होती. व यांच्यामध्यें लामांचा धर्मच प्रगृत होता. पुढें १७५७ सालीं तार्तरी हा चीन लोकांनीं जिंकून यांतलि झुंगेरिया व काश्गर हे प्रांत आपल्या राज्यास जोडून घेतले. त्या काळापासून तो प्रांत चिनी लोकांच्याच ताब्यांत आहे. फक्त कांहीं काळपर्यंत (१८६४–७७) अल्टीशहर व येटीशहर हीं संस्थानें रानटी पण अतिशय राजकारस्थानपटु अशा याकुब बेगच्या आधिपत्याखालीं स्वतंत्र झालीं व त्यांनीं खलीफाची सत्ता कबूल केली. या प्रांतांतील मुसुलमान हे सर्व तार्तर असून त्यांची लोकसंख्या कोटि दीडकोटि आहे.

**चीनः**—खुद्द चीनमध्यें मंगोलिअन कालापूर्वी इस्लामधर्म नव्हता. अशी दंतकथा आहे कीं, महंमदाचा मामा वाहब अबूकबशाहा हा ६२८–२९ सालीं कँटन येथें उतरला. त्यानें महंमदापासून चीनच्या बादशहाला मौल्यवान वस्तु नजर करण्यास आणल्या होत्या; तसेंच इस्लामधर्माचा स्वीकार करण्याबद्दल आज्ञापत्रहि आणलें होतें. नंतर तो सिआन् फु कडे गेला. दुसरी अशी एक दंतकथा आहे कीं, कँटनमध्यें ज्याचें थडगें अजून दृष्टीस पडतें अशा सादइब्नअबिवक्कास यानेंच प्रथमतः संदेश आणला. तसेंच ७५५ सालीं बंडखोरांच्या विरुद्ध बादशहाला मदत म्हणून खलीफा मनसूर यानें ४००० सैन्य पाठवून दिलें. बादशहानें त्यांस मुख्य मुख्य शहरांत रहाण्यास परवानगी दिली. त्या मुसुलमानांनीं चिनी स्त्रियांशी लग्नें लावलीं व ते चीनमधील मुख्य मुख्य मुसुलमानी जातींचे जनक झाले.

वरील दंतकथा अरब इतिहासकारांच्या ग्रंथांतून आढळून येत नाहींत. चीन व इस्लाम यांचा संबंध परिस्थितीच्या वैशिष्ट्यामुळेंच घडून आला. ६२० सालच्या सुमारास चीनमध्यें व आशियामध्यें नवीन सत्ता उत्पन्न होऊन एकमेक महत्त्वाकांक्षेनें प्रेरीत होऊन एकमेकांच्या प्रदेशांवर स्वारी करण्याच्या निमित्तानें येत असतां दोघांचा संबंध जडला. ज्याप्रमाणें ७२० मध्यें इस्लामानुयायांनीं ऑक्सच्या पूर्वेकडील प्रांत जिंकला त्याचप्रमाणें टाइसूंनें काश्गर जिंकून आपलें नांव गाजविलें. या दोघांमध्यें संबंध जडण्याचें मुख्य कारण म्हणजे व्यापार होय व हा व्यापार सुई घराण्यांतील राजांनीं आपल्या कारकिर्दीत फार वाढविला. दुसरें कारण म्हणजे ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं केलेलें काम होय; व या संबंधामध्यें अधिक शैथिल्य आणण्याचें कारण म्हणजे दोन्हीहि सत्तांचा अल्पसंतोषीपणा होय. मुसुलमान लोकांनीं कुतैबा इब्न मुस्लिम याच्या सेनाधिपत्याखालीं फरगाना प्रांत हस्तगत केला पण काश्गर घेण्याचा त्यांचा यत्न फसला. ताबरींत सांगितल्याप्रमाणें चीनच्या दरबाराकडे वकील पाठविल्याची कथा ऐतिहासिक असेल. उमईदे खलीफांच्या कारकीर्दीत चीनशीं अप्रत्यक्ष रीतीनें दळणवळण सुरू होतें. त्या वेळची जी एक गोष्ट सांगतात त्यांत नैझॅक व जबघू एका बाजूस व शत्रु आणि सेबेल दुसऱ्या बाजूस असा एक प्रवेश दाखविला आहे. हा जबघू हा पहिला चिनी तुर्क असून त्याला दमास्कसला पाठविण्यांत आलें होतें. एक गोष्ट मात्र खरी कीं चीनच्या राजकारस्थानामुळें चीनच्या तंत्राखालील

व इतर मुसुलमानी राज्यें चिडून जाऊन त्यांनीं चीनविरुद्ध सारखी चळवळ चालविली. परंतु जेव्हां अरबीसाम्राज्याला उतरती कळा लागून मुसुलमानांची सत्ताहि ढिली पडूं लागली व त्याबरोबरच तंग बादशहांच्या कारकीर्दीत चीनी साम्राज्यालाहि उतरती कळा लागली, त्यावेळेस किरकोळ राष्ट्रें शिरजोर होऊन त्यांनीं मुलुख बळकावण्यास सुरवात केली. यामुळें चीनमध्यें इस्लामधर्माचा प्रवेश होण्याचे मार्गात अडथळे येऊं लागले. चीनमध्यें बादशाही सत्ता डळमळीत झाल्याकारणानें चिनी लोकांनीं इतर धर्माचा आंत प्रवेशच होऊं दिला नाहीं. बुद्धधर्मानें अडथळ्याला न जुमानतां चीनमध्यें प्रवेश केला होता पण याला एक दोन कारणें होतीं; (१) बुद्धधर्म हा त्यांच्या प्रचलित तर्कविचारांशीं जुळता होता, (२) बुद्धधर्मानें चीनलोकांच्या राष्ट्रीय स्वभावांतील तत्वें आपल्यामध्यें घेऊन तेथील परिस्थितीशीं व भावनेशीं जुळतें करून घेतलें. परंतु इस्लामधर्माचा, आत्मा एकरूपता असल्याकारणानें व त्यांत अनेक भिन्न संप्रदाय निघूं शकत नसल्यामुळें व त्यांचा निषेधहि असल्यामुळें, आणि विशेषत: इस्लाम हा राजकीय धर्म असल्यानें, राजसत्तेच्या आश्रयाच्या अभावीं त्याचा प्रवेश प्रसार व चीनमध्यें होऊं शकला नाहीं. अशा प्रकारचा राजश्रय चेंगिझखानानें स्थापलेल्या मोंगल साम्राज्यावर राज्य करणाऱ्यांकडून प्रथमत: इस्लामधर्माला मिळाला पण चेंगिझखानाचा मुख्य उद्देश चीनपासून वेगळें होण्याचा असल्याकारणानें व असें केल्यावर आपल्याविरुद्ध चीननें प्रयत्न केला असतां तो सफळ होऊं नये म्हणून त्यानें या शौर्यात नांवाजलेल्या पश्चिमेकडील मुसुलमान जातीशीं सख्य केलें व अर्थातच त्याला तुर्कलोकांची संख्येनें, शौर्यानें, व शिस्तीच्या बाबतींत फार मदत झाली. पठाण लोकहि निवळ भाडोत्री असल्याकारणानें त्यांनींहि त्याला मदत केली. तरी पण सर्वात मोठी मदत चीनच्या व चीनीतुर्कस्तान, ट्रॅन्सऑक्सिआना व खुरासान यांमध्यें असलेल्या मुलखांतील लोकांपासून मिळाली. यामुळें, मुसुलमानी चीनच्या प्रदेशांत पर्शिअन भाषेला कां महत्व प्राप्त झालें याचा उलगडा होतो. चिनी मुसुलमानांच्या शब्दप्रयोगांत पर्शिअन भाषेचा भरणा जास्त असण्याचें मुख्य कारण म्हणजे या मोंगलराजांच्या सैन्यांत जवळच्या आशिया खंडांतील मुलखांतून निरनिराळ्या जातींतील लोकांचा भरणा झाला व या जातींतील लोकांनां पर्शिअन भाषेबद्दलचा फार आदर असे. शिवाय ज्यावेळेस कुबलाइखानानें चीनमध्यें आपली अंमल बसविला त्यावेळीं त्यानें आपल्या दरबारीं बरेच पर्शिअन सरदार ठेवले होते. व त्या सरदारांनीं पर्शिअन भाषेचा येथेंहि बराच फैलाव केला.

मोंगलराज्यकर्त्यांनीं आपल्याबरोबर मुसुलमान किती आणले याची कल्पना आपल्याला करतां येणार नाहीं. तरी पण हल्लीं प्रसिद्ध झालेल्या एका गोष्टीवरून आपल्याला कांहीं अनुमान काढतां येईल. १२३६ सालीं महंमदाचा वंशज म्हणवून घेणारा बुखारा येथील एक शूर तरूण सय्यद नांवाचा योद्धा चेंगिझखानाकडे आला. या तरुणाची तरतरीत बुद्धिमता पाहून चेंगिझखानानें त्याला आपला शरीरसंरक्षक नेमलें व हळू हळू त्याला खास महत्वाच्या कामगिऱ्या सांगण्यास सुरवात केली. कुबलाइखानानें त्याला युनान प्रांत जिंकण्यास पाठवलें व सहावर्षेंपर्यंत त्या प्रांताची व्यवस्था या सय्यदकडेच होती. या अधिकारावर असतांनाच तो वारला व थुन अॅनफु व सिअॅनफू येथें असलेली त्याची थडगीं फ्रेंच संशोधकांनां सांपडलेलीं आहेत. याची या प्रांतावर योजना झाल्याबर याच्या बरोबर पुष्कळच लोक आलेले होते. व तेव्हांपासून यूनान प्रांतात मुसलमानांचा प्रवेश झाला. चीनमधील मुसलमानांची लोकसंख्या किती आहे या प्रश्नाचा आपण थोडासा विचार करूं. चेंगिझखानाच्या अगदीं प्रथम स्वारीपासून तों मोंगलसत्तेला उतरती कळा लागेतों मुसुलमानांची चीनमध्यें असलेली लोकसंख्या १०,००,००० पलीकडे असूं शकणार नाहीं. हल्लींची चीनमधील मुसुलमानांची संख्या कमींत कमी ४०,००,००० भरते. ही संख्या आपोआपच हळूहळू वाढत गेली असें म्हणणें चुकीचें होईल. या वाढीचीं दोन तीन कारणें आपल्याला दाखवतां येतील. (१) वेळोवेळीं तुर्की राजकन्यांच्या झनान्याबरोबर ज्या मुसुलमानांच्या टोळ्या आल्या त्यांतील पुष्कळ लोक चीनच्या बादशहाच्या जनानखान्यांत नोकरीस राहिले. (२) चीनी मुलें मुसुलमानीधर्मांत दीक्षा देऊन ओढून घेतलीं गेलीं व अद्यापिहि घेतलीं जातात. (३) ज्या ज्या वेळीं प्लेग वगैरेमुळें चीनमधील अधिकाराच्या जागा रिकाम्या पडत असत त्यावेळेस मुसुलमान लोकांनां त्या देण्यांत येत असत. कारण त्यावेळची अशी समजूत होती कीं मुसुलमान लोक कोणत्याहि संकटाला न जुमानतां तोंड देत असत. चीनच्या लोकांनां व चीनच्या सरकारला मुसुलमानांबद्दल किती आदर व उच्च कल्पना होती व हल्लीं आहे हें हल्लीं शेतें नांगरण्याच्या बाबतींत त्यांची नेमणूक व योजना व्हावी असें सरकारनें ठरवलें आहे त्यावरून दिसतें. अशा प्रकारचीं वाढीला पोषक अशीं जरी दोन तीन कारणें होतीं तरी पण एक दोन प्रतिबंधक कारणेंहि आपल्याला दाखवितां येतील. पहिलें कारण म्हणजे मुसुलमानांच्या धार्मिक व राजकीय संघटनाशक्तीची चीनच्या लोकांनां फार भीति वाटत असे व तसेंच चीनमधील मुसुलमान लोक व त्याच धर्माचे इतर ठिकाणचे लोक यांमध्यें फार भांडणें होत असत.

चीनच्या मुसुलमान लोकांनां ज्या नांवांनीं संबोधण्यांत येतें त्यांबद्दल एक दोन शब्द सांगणें जरूर आहे. त्यांनां डंगन्स म्हणण्याचा प्रघात आहे. तुर्कलोक यांनां डंगन्लर असें म्हणतात. हे चीनचे मुसुलमान स्वत: आपल्याला हुयिहुयि अथवा हुयिहुटझु असें म्हणवून घेतात. पण चिनीलोक हें, नांव सर्वच मुसुलमानांनां वापरतात. ह्या

नांवाचा स्वतः तुर्कलोक निषेध करून आपल्यांस थोट असें म्हणवून घेतात.

चीनमधील निरनिराळ्या प्रान्तांविषयीं थोडक्यांत माहिती खालीलप्रमाणें आहे.—

(१) **कानसु.**—या प्रांतांत डाब्रींच्या मतें शेंकडा ८५.६ म्हणजे सुमारें ८३,५०,००० मुसुलमान आहेत. या प्रांताची राजधानी लानचौ आहे. येथील मुसुलमानांनीं १८६२-७४ आणि १८९५ सालच्या बंडांत भाग न घेतल्यामुळें त्यांचें कांहींहि नुकसान झालें नाहीं. त्यांच्यामध्यें शिक्षणाचें प्रमाण उच्च असून त्यांची संस्कृतिहि उच्च दर्जाची आहे. लानचौ हें व्यापारी शहर असल्याकारणानें येथें हिंदुस्थानांतून पार्शिआंतून व तुर्कस्तानमधून मुसुलमान व्यापारी येतात. धार्मिक चळवळींचीं केंद्रें या नात्यानें होचौ व किंकिणू हीं शहरें प्रसिद्ध आहेत. सिनिंफू हें ठिकाण तेथील संकीर्ण लोकसंख्येसाठीं महत्त्वाचें आहे. कानसूमध्यें मंगोलियन मुसुलमान आढळतात.

(२) **शेनसी.**—येथील मुसलमान वस्ती डाब्रीच्या मतें शेंकडा ७६.७ म्हणजे ६५,००,००० आहे. सि आन फू या राजधानीमध्यें ५०,००० मुसुलमान घराणीं असून या गावांत ७ मशीदी आहेत. गॅब्रील व मॉरीसच्या मतें आसपासच्या चारी हद्दी धरून एकंदर लोकसंख्या ४,००,००० आहे. त्यांत एकदशांश तार्तर लोक आहेत. दोनदशांश मुसुलमान आहेत व सातदशांश चिनी लोक आहेत.

(३) **शानसी.**—डाब्रींच्या मतें या प्रांतांतील लोकसंख्या ५०,००० आहे.

(४) **चिलि.**—फक्त पेकिंग येथील मुसुलमानांची लोकसंख्या अज्ञात असून ती १,००,००० आहे व ११ मशीदी आहेत.

(५) **शाँटुंग.**—येथील शहरांत मुसुलमान लोक पुष्कळ असून लिनशिंग चौ हें शहर महत्त्वाचें व्यापारी शहर असून तेथें एक विद्यालय आहे व त्यांत पेकिंगच्या मुलांनां शिकविलें जातें. या प्रांतांत ३२५ मशीदी आहेत.

(६) **झेचुआन.**—या प्रांतांत मुसुलमान लोकांची वसती ३,१०,००० असून जवळ जवळ चारशें मशीदी आहेत. येथें तुर्कस्तानांतून फार लोक येतात. या प्रांतांत सुंग पुनतिंग हें शहर असून तेथें ४,००० मुसुलमान व तीन मशीदी आहेत.

(७) **हो नान.**—या प्रांतांतील मुसुलमान लोकवस्ती २,००,००० आहे.

(८) **यु नान.**—डाब्रींच्या मतें येथील मुसुलमानांची संख्या साडेतीन ते चार लक्ष आहे.

(९) इतर प्रांतांमध्यें मुसुलमानांची संख्या पुष्कळ कमी प्रमाणांत आढळून येते. डाब्रानें आंकडे दिल्याप्रमाणें हुनानमध्यें ५०,०००, क्वांगसि ४,०००, क्यांगसु १,५०,०००, क्यांगतुंग २१,०००, फोटासि १५,०००, क्युइचौ ४०,०००, चे कियांग ३०,०००. वरील आंकडे अगदीं विश्वसनीय असे नाहींत.

**चिनी महमदीयांचें सामान्य वर्णन.**—जर चीनमधील मुसुलमान लोकांचा एकच संकीर्ण समाज कल्पिला तर त्यांचें ठोकळ वर्णन खालीं दिल्याप्रमाणें आहे.

(अ) वं श व भा षा.—निरनिराळ्या मुसुलमान जातींची उत्पत्ति कशी कां असेना त्यांनां सर्वांनां आज चिनी या नांवानेंच संबोधलें जातें. त्यांच्यामध्यें चिनी लोकांचे गुण किती उतरले आहेत हें नक्की ठरवितां येत नाहीं. ते सर्व लोक चिनी भाषाच वापरतात. त्यांच्या व चिनी लोकांच्या विचारांत देखील पुष्कळ साम्य आहे. तरी पण या दोहोंमध्यें फरकहि पुष्कळच आहे व त्यामुळें चीनमधील लोकसंख्येचे चीनी व मुसुलमान असे भाग पडूं शकतात. चीनमधील मुसुलमानांनां डंगन्स असें नांव आहे व हें नांव वर सांगितल्याप्रमाणें त्यांनां पसंत नसून ते आपल्याला हुयिहुयि असें म्हणवून घेतात; परंतु त्यांनां स्वतःला आपण चिनी म्हणवून घेणें मुळींच आवडत नाहीं. सारांश चिनी व मांचू या लोकांप्रमाणेंच ते आपली स्वतंत्र जात मानतात.

चीनमध्यें अशाच प्रकारची एक शक्ति आहे कीं, कोणत्याहि जातीचे लोक तेथें आले असतां त्यांचे जातिभेद अगदीं शिथिल होतात व एक प्रकारें चीनच्या रहिवाश्यांशीं त्यांचें मिश्रण होऊं लागतें. चीनमध्यें जातिभेद ढिले करण्याची एक विशेष शक्ति आहे. मांचू लोक आले व ते चीनच्या रहिवाश्यांप्रमाणें मिसळून गेले व अशाच प्रकारचा थोडा फार परिणाम या मुसुलमान लोकांवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. शिवाय चिनी लोकांमध्यें परक्या जातींत मुली देण्याला प्रतिबंध नसल्यामुळें त्यांच्या व मुसुलमानांच्या रक्ताचें मिश्रण होऊन त्यांच्यापासून पुष्कळ महत्त्वाचे परिणाम निष्पन्न झाले. तरी पण होतां होईल तों मुसुलमानांनीं आपलें स्वत्व कायम राखण्याचा बराच यशस्वी प्रयत्न केला व जरी एकमेकांमध्यें रक्तसंबंध झाले तरी पण त्यां दोघांमध्यें अनेक भेद आहेत. चिनी लोकांचा तर्कावर सारा भर तर मुसुलमान लोक परंपरागत चालीला फार मान देतात. चिनी साधारणतः सोशिक व शांत वृत्तीचा असतो, पण मुसुलमान मात्र त्याला दुखविलें असतां लगेच चिडतो. चिनी लोक तोंडावरून पहातां मलूल असे दिसतात तर मुसुलमान छाती वर काढून व मोठ्या ऐटींत चालतात. तसेंच अफूच्या व्यसनामुळें चिनी लोक फार अशक्त असतात पण मुसुलमान चांगले बळकट असतात. अशा रीतीनें आपल्याला या दोघांत स्पष्ट भेद दिसून येतो.

तेव्हां चीनमधील मुसुलमानांचा वंश कोणता? मुसुलमानांच्या अगदीं पहिल्या स्वाऱ्यांपासून विविध जातींचा हा चीन देश इतका अनेकवार बेचिराख झालेला आहे कीं, त्यामध्यें एकच जात प्रमुख आहे असें दाखवतांच येणें शक्य

नाहीं. याशिवाय दुसऱ्या धर्मांतील लोक व विशेषतः खरेदी केलेलीं मुलें मुसुलमान करण्याचें मुसलमानांचें धोरण आपण विसरतां कामा नये. डी ओलोन म्हणतो कीं, हीं विकलेलीं चिनी मुलें चिनी लोकांपेक्षां गुणधर्मांमध्यें भिन्न अशीं दिसतात. तसेंच चीनमध्यें इतक्या जाती मिसळून गेल्या आहेत कीं, एखादा मुसुलमानधर्मी नसला म्हणून तो शुद्ध चिनीच आहे असेंहि म्हणतां यावयाचें नाहीं.

सालर या नांवाची मुसुलमानांची एक विशिष्ट जात आहे. हे लोक होअँगहोच्या उजव्या तीरावर सुन हुआहिंग शहरामध्यें व आसपासच्या खेड्यांत आहेत. त्यांच्यामध्यें व चिनी मुसलमानांत मोठा फरक आहे. ते स्वभावतः उंच असून चिंचोळ्या व लांब नाकाचे असतात. त्यांचा चेहरा लांबट असून त्यांनां पुष्कळ दाढी असते; त्यांची कातडी काळी असते; चीनच्या तींड्यांत असलेल्या तुर्कस्तानांतील तुर्कांशीं त्यांचें बरेंच साम्य दिसतें. त्यांच्यांतील विशेष म्हणजे त्यांची अगदीं अशुद्ध भाषा होय. ते चिनी लोकांप्रमाणें पोषाख करतात. धर्मगुरूंनां ते अतिशय पूज्य मानतात. ते अतिशय मद्य पितात. त्यांच्यामधील पतित वर्गदेखील अरबी भाषेशीं परिचित असतो. पूजेच्या वेळीं ते धूप जाळीत नाहींत व त्यांनां मशीदींत बादशहाची तसबीर ठेवणें मुळींच खपत नाहीं.

**विवाह, कुटुंब व आप्तसंबंध.**—चीनमधील मुसुलमानांच्यामधील विवाहविधि शारिआच्या पद्धतिप्रमाणें केले जातात. ही पद्धति सर्व इस्लामधर्मीयांनां सारखीच लागू आहे. चीनमधील परिस्थितिमुळें या विधींमध्यें कांहीं फेरफार झाले किंवा नाहीं हें समजण्यास साधन नाहीं. आणि थोडी फार माहिती मिळविली तरी निरनिराळ्या भागांमध्यें निरनिराळी परिस्थिति असल्यानें तिचा फारसा उपयोग होणार नाहीं. तशीच स्त्रियांच्या बाबतींत निरनिराळ्या भागांत निरनिराळी स्थिति दृष्टीस पडते. डी ओलोनच्या मतें बुरख्याची पद्धत चीनमधील मुसुलमानी स्त्रियांमध्यें आढळून येत नाहीं. ग्रेनाडच्या मतें श्रीमंत व वरच्या दर्जाच्या स्त्रिया बुरखा घेतात. चूमध्यें मात्र डीओलोनला निराळीच पद्धत आढळून आली. तेथील स्त्रिया डोळ्यापासून खाली बुरखा वापरतात व घोड्यावर बसून रस्त्यांतून जातात. पण पाय बांधण्याची पद्धत चीनमधील मुसुलमानांमध्यें आहे. मुसलमानांनां परधर्मांतील स्त्रियांशीं लग्न लावण्याची मुभा आहे पण आपल्या धर्मांतील स्त्रियांनां परधर्मीयांनां देण्याची मनाई आहे. याला कांहीं कांहीं अपवाद आढळून येतात नाहीं असें नाहीं. उदाहरणार्थ तुर्क राजकन्येचा शिएनलंग बादशहाशीं विवाहसंबंध झाला. व्यभिचाराला जरी कडक शिक्षा नाहीं तरी पण तो निषिद्ध मानला जातो. एकंदरींत चिनी लोकांपेक्षां नैतिक दृष्ट्या चीनमधील मुसुलमान जास्त उच्च आहेत. कौटुंबिक पद्धतींतील दोन विशेष म्हणजे पितृपूजा व मातृपितृभक्ति हे होत. धर्मगुरूंच्या बाबतीशिवाय समाजांतील उच्चनीच भाव हा जन्मावरून ठरला जात नाहीं.

**उद्योगधंदे.**—चीनमधील मुसुलमानांचे मुख्य उद्योगधंदे (१) शेतकी, (२) व्यापार व (३) बाहुतुकीचा व्यापार हे होत. साधारणतः मुसुलमान लोक शेतकीचा धंदा करीत नाहींत पण या देशांतील लोक मात्र शेतकीच्या धंद्यांत प्रवीण आहेत. याचें एक कारण म्हणजे चिनी लोक स्वतः शेतकीचा धंदा करीत असल्यामुळें व कोणताहि परका मनुष्य आला असतां आपल्या संबयी त्याला जडविण्याची उपजत शक्ति त्यांच्यामध्यें असल्यामुळें त्यांच्या संसर्गानें मुसुलमानांनीं तोच धंदा करण्यास सुरवात केली. व्यापाराच्या बाबतींत चिनी लोक फार प्रवीण असले तरी मुसुलमानांनीं देखील या बाबतींत बरेंच प्रावीण्य संपादन केलें आहे व माल ने आण करण्याच्या त्यांच्या मोठमोठ्या कंपन्या आहेत. उदाहरणार्थ सर्व चीनमध्यें घोडे भाड्यानें देणारे व घोड्यांचा व्यापार करणारे लोक मुख्यतः मुसुलमानच आहेत; व पशुवध करणें इत्यादि धंदे हेच लोक करतात. तरी पण मुसुलमानांचा कल अधिकाराच्या जागा पटकावण्याकडेच अधिक आढळून येतो. मांगोलीयन काळानंतर आतांपर्यंत अनेक मुसुलमानांनीं लष्करामध्यें कामें केलेलीं आहेत व त्यांत त्यांनीं मानहि मिळविला आहे. याचीं ताजीं उदाहरणें म्हणजे सेनापति तंग फूसियंग व शेचौन येथील सैन्याचा सेनापति, महालुंगचा पुतण्या यूनानचा मानिकाई हे होत.

**संस्कृति व शिक्षण.**—चीनमधील मुसुलमान धर्माच्या बाबतींत नेमस्तवृत्तीचे होते. स्वतःच्या शरीराच्या व वित्ताच्या संरक्षणासाठीं ते राज्यकर्त्यांनां धर्माच्या बाबतींत हात घालण्यास थोडीफार मोकळीक देतात व मुसुलमानी अधिकारी चीनी राष्ट्रीय धार्मिक विधींत भाग घेतांना आढळून येतात. येथील मुसुलमान अधिकारी परकीय लोकांचा द्वेष करतात पण तो धर्मदृष्टीनें नसून परदेशीयांच्या चीनच्या अंतस्थ कारभारामध्यें लुडबूड करण्याच्या संवयीमुळें करतात. पुष्कळ बाबतींत अधिकाराची फाजील हाव असल्यानें सुद्धां ते परकीयांचा द्वेष करतात असें दिसून येतें. उदाहरणार्थ तुंगफूसिअंग यानें अधिकाराच्या जागेसाठीं स्वतः त्सो त्संगु तंग याचा हस्तक बनून महालुंग या 'नवीन तात्त्विक' पंथाच्या संस्थापकाचा शिरच्छेद करविला, व याबद्दल त्याला पुष्कळ संपत्ति व मुलूख मिळाला. यानेंच सिनिंगफू आणि होची मधील बंड मोडून पुष्कळ लूट मिळविली. त्याला सेनापति अशी पदवी मिळाली पण देशाचा तो राजाच होता असें म्हटलें तरी चालेल. १९०० मध्यें पेकिंग येथें बॉक्सर बंड उद्भवलें त्यावेळीं त्यानें परकीय लोकांच्या विरुद्ध अनन्वित कृत्यें केलीं. त्याला पुढें हद्दपारीची शिक्षा दिली असतां तो कानसु येथें एखाद्या सुलतानासारखा राहिला व तेथें त्यानें आपलें इतकें

प्रस्थ वाढविलें की, त्याच्या परवानगीशिवाय कोणतीहि गोष्ट होत नसे. १९०८साली फेब्रुवारींत तो मरण पावला व त्याला मोठ्या सन्मानानें पुरण्यांत आलें. असे कांहीं साहसी लोक सोडून दिले तर चिनी लोकांमध्यें व मुसुलमानांमध्यें बराच द्वेष आहे, व तो द्वेष एखाद्या वेळीं बंडाच्या रूपानें बाहेर पडतो. विशेषतः उत्तरेकडील प्रदेशांत हा द्वेष फार माजला आहे. तरी पण हा द्वेष केवळ धर्मसमजुतीमुळें नसून, सामाजिक, औद्योगिक राजकीय, वगैरे बाबतींतील अनेक मतभेदांमुळें माजलेला आहे.

येथील मशीदी साधारणतः भव्य मंदिरासारख्या भासतात. कांहीं ठिकाणीं इंडोॲरेबिक पद्धतीच्याहि मशीदी बांधलेल्या आहेत. प्रार्थनेच्या वेळीं धर्मगुरू पांढरी टोपी वापरतात पण बाकीचे लोक पगडीमध्यें बसविलेली टोपी वापरतात. या टोप्या इतर वेळीं वापरावयाच्या नसतात. या दोन आकाराच्या केलेल्या असतात. कांहीं वाटोळ्या, तर कांहीं चार पांच तुकडे शिवून केलेल्या असतात. दुसऱ्या आकाराच्या टोप्याच पुष्कळजण वापरतात. अशाच प्रकारच्या टोप्या रशियांतील मुसुलमान व चीनच्या ताब्यांत असलेल्या तुर्कस्थानांत वापरतात.

इस्लाम धर्माच्या बाबतींत इतरत्र घडून येणारे अत्याचार येथेंहि थोडे फार आढळून येतात. कानसु येथील बंडांत मारला गेलेला महालुंग हा एक नवीन पंथाचा होता. तेथें त्याचे पुष्कळच अनुयायी होते. त्याचे सर्व अनुयायी त्याला महंमदाचा अवतार असें मानतात. हें तत्त्व काय आहे हें गूढच आहे, कांहीं लोकांच्या मतें तें तत्त्व सुनी पंथालाच पोषक आहे. कांहींच्या मतें महालुंग हा एक तोतया होता. कानसुमधील सरदार लोक याच्या नादाला लागले नाहींत. नवीन पंथाचा प्रवर्तक या नात्यानें त्यानें आपल्या अनुयायांसाठीं कांहीं स्वतंत्र विधी सांगितले आहेत. उदाहरणार्थ प्रार्थना मनांत म्हणण्याची प्रचलित रीत टाकून देऊन त्यानें प्रार्थना मोठ्यानें म्हणण्याची आज्ञा केली व त्या वेळीं हात सरळ व उघडे ठेवावेत असें सांगितलें. याच्यापूर्वी सालार लोकांमधील धर्मसुधारक महमद अमीन यानें मोठ्यानें प्रार्थना करण्याची चाल सुरू केली होती; आणि त्या वेळीं यावर बरेच दंगे झाले होते. महालुंगनें मशीदींमध्यें प्रार्थना करण्यास मनाई केली नाहीं तरी पण त्यानें होतां होईतों घरीं प्रार्थना करण्यास सांगितलें. या लोकांत सामान्यतः तीन चार घरांना मिळून एक प्रार्थनेसाठीं निराळी जागा असते. सुंगपानतिंगमध्यें नवीन मताचे लोक जुन्याच मशीदींमध्यें जातात. पण शेंतूमध्यें मात्र जुन्या मशीदींत नवीन पंथाचे लोक अजीबाद प्रार्थना करीत नाहींत. या नवीन मताचे लोक यूरोपिअन लोकांशीं तेढीनें वागतात. महालुंगच्या मरणानंतर भांडणें सुरू झालीं. या महालुंगचा जावई मातासि व नातू मामीसी यांच्यामध्यें युद्ध झालें. मातासि हा १९१५ सालीं बासष्ट वर्षांचा असून त्याला पुष्कळ अनुयायी होते. तो चाको येथें रहात असून तें ठिकाण धर्माचें केंद्र झालें आहे. महालुंगच्या तत्त्वाचा प्रसार त्याच्या टलासान नांवाच्या भावानें केला. त्याचे यूनानमध्यें फार थोडे अनुयायी आहेत.

हुफेये व चैहरिन्ये या पंथाप्रमाणेंच कुबेरिन्ये व कटेरिन्ये हे दोन नवीन पंथ येथें आढळून येतात. या दोन नवीन पंथांचा अर्थ बरोबर समजत नाहीं. एका धर्मगुरूच्या मतें चारीहि पंथांचा संबंध पहिल्या चार खलीफांशीं जोडतां येतो. ते चार खलीफा अनुक्रमें अबूबकर, उस्मान, उमर, व अली हे होत. जे मृतांची पूजा करतात अशांना देखील चवथ्या पंथाचें नांव लावण्यांत येतें. चीनमध्यें इतर ठिकाणांप्रमाणेंच मुसुलमान लोक साधू लोकांच्या थडग्याला विशेष मान देतात. उदाहरणार्थ सुंगपानतिंगच्या उत्तरेला एक मैलाच्या आंतच मदीनाहून आलेल्या साधूचें थडगें आहे. या साधूनें प्रार्थनेच्या जोरावर या प्रांताचा एका संकटापासून बचाव केला. दुसरें एक थडगें तेथेंच मशीदींमध्यें दृष्टीस पडतें. परंतु या मृतांच्या पूजेवा पुराणमतवादी मुल्ला लोक निषेध करतात.

चीनमधील मुसुलमान लोकांपैकीं बहुतेकांना इस्लाम धर्मीयांचा महागुरु खलीफ असतो हें माहीतच नाहीं. पण मागील शतकाच्या उत्तरार्धांत इस्तंबूल मधून याबद्दल जे प्रयत्न करण्यांत आले त्याचा थोडा फार परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. याकुब बेगनें अबदल अझीझला खलिफ म्हणून मान्य केलें. त्याचप्रमाणें यूनानचा मुसुलमान राजा सुलेमान यानें खलीफाची मदत मागितली.

मुसुलमान लोक जात्या फार धार्मिक वृत्तीचे असल्याकारणानें प्राथमिक शिक्षणाचें ध्येय मुलांना धर्माचा ओनामा समजून देणें हें त्यांनीं आपल्या डोळ्यापुढें ठेवलें आहे व कुराणामधील उतारे व म्हणी यांचा अभ्यास या वयांत मुलांकडून करविला जातो. कुराणाचे उतारे काढलेलीं पुस्तकें अनेक आहेत. कला ही मुसुलमानांना फारशी अवगत नाहीं. फक्त नक्षीदार अरबी लेखनपद्धति मात्र या दृष्टीनें थोडी महत्त्वाची वाटते. मुसुलमान लोक अरबी भाषेमध्यें कोरीव मुद्रालेख लिहितात.

रा ज की य स्थिति.—खुद्द चीनमध्यें मुसुलमान लोकांना स्वतंत्र राजकीय अस्तित्व नाहीं पण तुर्कस्तानमध्यें त्यांनीं कांहीं वर्षेंपर्यंत याकुबबेगच्या हाताखालीं स्वतंत्र राज्य उपभोगिलें, कानसु व शेनसीमधील बंडाचा हेतु स्वातंत्र्य मिळविण्याचा होता. पण त्या चळवळींना यश आलें नाहीं. कायमची राजकीय सत्ता असण्याला मुख्य साधन म्हणजे राष्ट्रीयत्वाची भावना होय. पण येथील मुसुलमानांत ती भावना आढळत नाहीं त्यांमध्यें एक धर्माची भावना आहे पण धर्माच्या पायावर उभारलेलें राष्ट्र कायमचें टिकत नाहीं असें इतिहास शिकवतो. कांहीं लोकांकडून असा ध्वनि निघत आहे कीं चीनमधील मुसुलमानांनीं प्रयत्न करून सर्व चीन-

मुसुलमानी करून इस्लामी-चीन राज्य स्थापलें; व अशा प्रकारची महत्त्वाकांक्षाहि मुसुलमानांमध्यें दृष्टीस पडते व चीनच्या सरकाराविरुद्ध असंतोष पसरविण्यास हें एक चांगलें साधनहि होईल हें निःसंशय आहे. परंतु ही कल्पना धर्मप्रसाराच्या महत्त्वाकांक्षेप्रमाणेंच स्वतःचें राजकीय हित साधण्यासाठीं उपयोगांत आणली जात आहे. अशा प्रकारचे निष्फळ प्रयत्न १९०० सालीं सुलतान अब्द अल हमीद यानें केले व इतरहि अशाच प्रकारचे किरकोळ प्रयत्न करण्यांत आले पण ते सर्व निष्फळ झाले.

**इजिप्त.**—इ. स. ६४० मध्यें अरबांच्या ताब्यांत गेल्यापासून इजिप्तनें इस्लामी धर्माची लौकिक व पारमार्थिक दोन्हीं दृष्ट्या वाढ करण्यांत प्रमुख भाग उचललेला आहे. याचें एक कारण इजिप्तची नैसर्गिक सुसंपन्नता; दुसरें कारण, तेथील प्रसिद्ध अझर युनिव्हर्सिटी; व तिसरें, इजिप्तचा सीरियांतील पवित्र स्थळांवर असलेला ताबा. गेल्या शंभर वर्षांत तर इजिप्तनें मुसुलमानी संप्रदायाला यूरोपीय वळण देण्याचें काम इतर कोणत्याहि इस्लामी देशापेक्षां अधिक केलेलें आहे. इजिप्तचे लोक आजपर्यंत नेहमीं दुसऱ्या लोकांच्या सत्तेखालीं रहात आले आहेत.

सातव्या शतकाच्या आरंभीं इजिप्तवर इराणची सत्ता होती, व इराणी सत्ताधीशांचा कारभार फार सौम्य व सहिष्णु होता. म्हणून पुढें जेव्हां पूर्व-ख्रिस्तसाम्राज्याच्या हिराक्लिअस बादशहानें इजिप्त जिंकून घेतला, तेव्हां इजिप्शियन लोकांनां ही ख्रिस्ती सत्ता जुलमी वाटूं लागली.कारण हिराक्लिअसनें लवकरच ख्रिस्ती धर्म व जादा कर त्यांच्यावर लादण्याचा उपक्रम केला. त्यामुळें नाखूष झालेले इजिप्तमधील लोक अरब लोकांनां जिंकणें सुलभ गेलें, व थोडक्या सैन्याच्या मदतीनें चारदोन वर्षांत सर्व इजिप्त अरबांनीं हस्तगत केला. हें काम करणारा विजयी सेनापती उमर हाच इजिप्तचा पहिला सुभेदार झाला. त्यानें धार्मिक कारांचे बाबतींत इजिप्शियन लोकांनां बिलकूल त्रास दिला नाहीं, उलट कॉप्टिक लोकांना मोठाल्या नोकऱ्या दिल्या. त्यानें अलेक्झांड्रिया सोडून अलिकडच्या कैरो शहरानजिकच्या बाबिलोन शहरीं राजधानी आणली.

इराणी सत्तेप्रमाणें अरबांची सत्ताहि लवकरच नष्ट होईल या समजुतीनें इजिप्तमधील लोकांनीं मुसुलमानी धर्म लवकर स्वीकारला नाहीं; व ज्या कोणी स्वीकारला तो कर यावे लागूं नयेत म्हणून; कारण मुसुलमानांनां कर माफ असे. उलटपक्षीं अरब सत्ताधीशांहि कराचें उत्पन्न कमी होऊन सरकारी खजिन्याचें दिवाळें निघूं नये म्हणून धर्मांतराला फारसें उत्तेजन देत नसत. राज्यपद्धतिहि त्यांनी फारसा फेरबदल न करतां पूर्ववत चालू ठेविली. हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकारच्या धोरणाप्रमाणें इजिप्तमध्यें अरबांनीं वरिष्ठ अधिकाराच्या जागा मात्र आपल्या ताब्यांत ठेविल्या होत्या. हे अरब अधिकारी धर्माचे बाबतींत बिलकूल हात न घालतां फक्त शांतता राखणें, न्याय निवाडा करणें व कर वसूल करणें एवढींच कामें करीत असत. अरब मुसुलमानांनीं इजिप्तमध्यें इतकें सौजन्य दाखविलें कीं, या मूर्तिभंजकांनीं इजिप्तमधील जुनीं देवतांचीं चित्रें असलेलीं शिक्कामोर्तबेंहि आपल्या राज्यांत चालू ठेविलीं होतीं. जेत्यांवर अरबी भाषा न लादतां ग्रीक व कॉप्टिक भाषाच सरकारी कामकाजांत चालू ठेविली. अरबीलोकांच्या जुलमाच्या तक्रारी कानांवर येतात, पण तो थोडा फार जुलूम अरब अधिकाऱ्यांचा नसून आधल्यामधल्या इजिप्शियन नोकरांचा असे.

इजिप्तवर अरब सत्ता.—इजिप्तवर उमइद खलीफांची सत्ता सुमारें एक शतक (६५८-७५०) होती. अरबांनीं एकंदर दोन शतकें इजिप्तवर राज्य केलें. त्या काळांत इजिप्तला मोठ्या शांततेचा व भरभराटीचा लाभ झाला. खलीफांनीं पाठविलेले सुभेदार चांगले न्यायी व दक्ष असत. ख्रिस्ती लोकांचा त्यांनीं धर्मानिमित्त छळ कधींच केला नाहीं. इजिप्तमध्यें जमिनदारी पद्धति होती ती अरबांनीं बदलून जमिनी कसणाऱ्या कुळांनां मालकी देऊन टाकली व जमिनदारांनां सरकारचा कर वसुल करणारे अधिकारी म्हणून नेमलें.

तुर्की सत्ता.—अरबांनंतर तुर्कांचा अम्मल इजिप्तवर सुरू झाला. कायरोनजीक कटाई शहरीं त्यांची राजधानी होती. अरबांच्या वेळचें मोठमोठ्या इमारती वगैरे कोणतेंहि शिल्पकाम झालेलें नसल्यामुळें आरबांची आठवण म्हणून इजिप्तमध्यें कांहींच त्यांच्या मागें राहिली नव्हती. उलटपक्षीं तुर्कांचीं स्मारकें पुष्कळ राहिलेलीं आहेत. तुर्की जातीच्या घराण्याचा मूळ पुरुष इब्न टूलून याची मोठी सुंदर मशीद काबाच्या देवालयाच्या धर्तीवर ख्रिस्ती शिल्पकारांनीं बांधलेली आहे त्याशिवाय इतरहि बऱ्याच इमारती व सार्वजनिक उपयोगाचीं कामें आहेत. तुर्की अम्मल इ. स. ८६८-९६९ पर्यंत होता.

फातिमाइद खलीफ.—नंतर इ. स. ९६९ ते ११७१ पर्यंत फातिमाइद वंशाच्या खलीफांनीं राज्य केलें. त्यांच्या कारकीर्दींत इजिप्त वैभवाच्या शिखरास जाऊन पोहोंचला. त्यांची आल-काहिरा राजधानी होती; तेच अर्वाचीन कायरो शहर होय. फातिमाइद खलीफ मोठे सुधारणाप्रिय व विद्वान होते. त्यांनीं लवकरच आल्जेरियापासून सीरियापर्यंत सर्व आफ्रिका आपल्या सत्तेखालीं आणली. अरबस्थानांतील सर्व पवित्र स्थानें त्यांच्या ताब्यांत आलीं होतीं. वित्त व जीवित पूर्ण सुरक्षित असल्यामुळें लोकसंख्या झपाट्यानें वाढली, दळणवळण वाढलें, हिंदुस्थानाबरोबर व्यापार सुरू झाला. त्यामुळें आब्बासि खलीफांची राजधानी बगदाद या शहराला उतरती कळा लागून कायरो भरभराटीस चढलें. कायरोच्या फातिमाइद खलीफांत अझीझ हा सर्वांत श्रेष्ठ निघाला. या घराण्याचे इजिप्तवर व सर्व मुसुलमानां जगावर उपकार झालेले आहेत ते त्यांनीं स्थापलेल्या अझर कॉलेजमुळें. हें महाविद्यालय इ. स. ९७२ मध्यें स्थापन

झालें. त्याला जोडून गरीबांकरितां एक दवाखानाहि ठेवला होता. प्रथम तें शियापंथाचें होतें, नंतर सुनीपंथाच्या हातीं गेलें व त्याची मोठी भरभराट सुनी विद्वानांच्या हस्तेंच झाली. ११६९ मध्यें फातिमाइद वंश नष्ट झाल्यावर सर्व ईजिप्त सुनी बनलें. फातिमाइद घराण्याची आठवण देणाऱ्या पुष्कळ इमारती आहेत. अझरची मशीद, हकीमची मशीद व जुन्या शहराचे दरवाजे हे आजहि प्रवाश्यांनां दाखवितां येतात. पण मुख्य म्हणजे खुद्द कायरो शहर हेंच फातिमाइद खलीफांचें मोठें स्मारक आहे. सुनी पंथाखेरीज ईजिप्तमध्यें मलिक इब्न–अनासचा पंथ, शफी पंथ, अबुहनीफाचा हनाफी पंथ व हनबाली पंथ हे चार मुख्य आहेत. त्यांपैकीं शफी पंथ सर्वांत अधिक लोकप्रिय असून मतस्वातंत्र्याचा मोठा भोक्ता जो हनाफी पंथ तो सरकारच्या फार मर्जीतला आहे.

अय्युबिद व मामलुक.—११७१ ते १२५० पर्यंत अय्युबिद खलीफांनीं व १२५० ते १५१७ पर्यंत मामलुकांनीं इजिप्तवर राज्य केलें. या काळांत अझर युनिव्हर्सिटीची भरभराट अत्यंत झपाट्यानें झाली. ही युनिव्हर्सिटी म्हणजे ईजिप्तचें बुद्धिमापकयंत्रच होय. फर्डिनांड व इसाबेला यांनीं १४९८ मध्यें स्पेनमधून हाकून दिलेल्या मूर लोकांपासून किंवा १३ व्या शतकांत जेंगिझखानाच्या व १४ व्या शतकांतील तैमूरलंगाच्या स्वाऱ्यांपासूनहि इजिप्तला मुळींच धक्का पोहोंचला नाहीं. आणि कार्डोव्हा व बगदाद हीं मुसलमानी संस्कृतीचीं केंद्रें रसातळास जात असतां इकडे कायरो शहर इस्लामी विद्या व संस्कृति यांचें माहेरघर होऊन राहिलें होतें. मुसुलमानी जगांतील निरनिराळ्या देशांतून विद्यार्थी अझर विद्यापीठांत येत असत.व अधिक दूरदूरच्या विद्यार्थ्यांची सोय तेथें प्रथम करीत असत. येथील अध्यापकांपैकीं सर्वश्रेष्ठ असा इब्न–खाल्डून हा प्रसिद्ध इतिहासज्ञ व तत्त्ववेत्ता होता. हा मूळ ट्यूनिसचा रहिवासी असून कायरो येथें मलिकींच्या काझीच्या अधिकारावर नेमला होता. तेथेंच तो १६०६ त मरण पावला प्रो. फ्लिट यांनीं आपल्या इतिहासप्रसिद्ध तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत इब्न खाल्डून याचे उतारे देऊन तारीफ केली आहे. या अझर विद्यापीठाची कीर्ति यूरोपांतील विद्यांच्या पुनरुज्जीवनाच्या काळापर्यंत कायम होती. पुढें मात्र तें जुन्या, मागसलेल्या शिक्षणाचें स्थान होऊन बसलें. तेथें फक्त देवज्ञान, धर्मशास्त्र व व्याकरण या तीन विषयांचें जुन्या पद्धतीनें शिक्षण मिळूं लागलें गणित, सृष्टिविज्ञान, इतिहास, भूगोल वगैरे विषयांकडे पूर्ण दुर्लक्ष झालें. उलट यूरोपमध्यें शिक्षण व संशोधन दोन्ही बाबतींत ख्रिस्ती लोकांचें पाऊल झपाट्यानें पुढें पडूं लागलें.

संप्रदाय—ख्रिस्तीधर्मांतील मठांची स्थापना ईजिप्तमध्यें प्रथम झपाट्यानें झाली होती. पुढें मुसुलमानी धर्म स्वीकारल्यावरहि ही मठवासी वृत्ति इजिप्शियन लोकांमध्यें कायम होती. गूढार्थकविता लिहिणारे कवीहि पुष्कळ झाले. त्यांत इब्न—अल्–फरिद हा सर्व श्रेष्ठ होय. (११८१–१२३५) मुसुलमानी धर्म मूळ एकेश्वरवादी खरा, पण त्यांत पुढें मुसुलमान साधुसंत फार झाले व त्यांची पूजा अर्चा लोक करूं लागले. मुसुलमानी जगांत असल्या साधुसंतांचे मठ व धार्मिक पण गुप्त संस्था फार आहेत. अशा या पूज्य मानलेल्या फकीरांच्या मशीदीहि जागोजाग सर्व मुसलमानी देशांत पसरलेल्या आहेत. तेथें रोगमुक्ततेकरतां किंवा पुत्रप्राप्तीकरतां नवस, मंत्रतंत्र वगैरे गोष्टी चालू असअसतात व शिवाय अनीत्याचरण व गुन्हे करण्यासहि हीं ठिकाणें पुष्कळ अंशीं सोयीच्या जागा होतात.

पुन्हां तुर्की सत्ता.—इ. स. १५१७ पासून पुढें इजिप्तवर ओटोमन तुर्कांचें राज्य होतें. १७९८ मध्यें फ्रेंच लोकांनीं ईजिप्तवर स्वारी केली, तेव्हांपासून इजिप्तच्या इतिहासांत नवें युग सुरू झालें. खेदिवांनीं यूरोपीय वळण सर्व गोष्टींनां देण्याचा उपक्रम सुरू केला. महंमद अलीनें बरेच तरुण शिक्षणाकरतां पॅरिस येथें पाठविले, पण त्यांना यूरोपियांच्या सद्गुणांपेक्षां दुर्गुणच अधिक लागले. इस्मायलनें रेल्वे व तारायंत्रें सर्व देशभर सुरू केलीं. तैफिकच्या कारकीर्दींत गुलामपद्धति बरीच कमी झाली व अनेकपत्निपद्धतीहि नाहींशी होत चालली. त्याच वेळेपासून वृत्तपत्रांनांहि लेखनमुद्रणस्वातंत्र्य मिळालें, पण त्याचा आजपर्यंत दुरुपयोगच अधिक झालेला आहे. हल्लीं स्त्रियांकरतां स्त्रियांनीं चालविलेलीं अशीं तीनचार पत्रें आहेत. तेथें तीन प्रमुख राजकीय पक्ष आहेत. ते राष्ट्रीयपक्ष, कॉन्झर्वेटिव अथवा पुराणाभिमानीपक्ष व तिसरा प्रोग्रेसिव्ह अथवा प्रागतिकपक्ष. वृत्तपत्रें या निरनिराळ्या पक्षांनां वाहिलेलीं असतात. अझर युनिव्हर्सिटी १९०९ पर्यंत जुन्या पद्धतीचें १३व्या शतकांतलेंच शिक्षण देत होती. त्या सालीं विद्यार्थ्यांनीं संप करून शिक्षणक्रमांत कांहीं सुधारणा करून घेतल्या. त्यापूर्वींच खार्टूम येथें गॉर्डन कॉलेज व कायरो येथें एक आधुनिक शिक्षण देणारी युनिव्हर्सिटी स्थापन झालेली आहे.

कला.—एकंदरींत इजिप्तमधील मुसलमानी धर्म उच्च दर्जाचा होता व त्यानें ज्ञानप्रसारालाहि बरेंच उत्तेजन दिलें. पाषाण व धातूंच्या कलाकौशल्याच्या कामालाहि त्यानें बरेंच उत्तेजन दिलें. तेथील लोक प्लॅस्टरचीं जनावराचीं चित्रें करीत असत. मामलुकांच्या कारकीर्दींत बांधलेल्या मशीदी फार नमुनेदार आहेत. खेदिवांच्या कारकीर्दींतहि शिल्पकलांनां चांगलें उत्तेजन मिळालेलें आहे. अरबांनीं जुन्या इमारतींची व बांधकामाची मोडफोड केली नाहीं. मुसुलमानांनीं इराणमध्यें झोरास्ट्रिअन धर्माचा व स्पेनमध्यें प्रॉटेस्टंटपंथाचा उच्छेद केला, पण इजिप्तमधील कॉप्टिक पंथ अरबांनीं नाहींसा केला नाहीं. ब्रिटिशांनीं ईजिप्त व्यापण्याचा उपक्रम केला तेव्हां कॉप्ट लोक जुन्या मुसुलमान राजकर्त्यांनां मिळून राहिले, ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. येथील मुसुलमानांची नीतिमत्ता इतर देशांतील मुसलमानांपेक्षां वाईट नव्हती. अद्यापहि धूम्रपान, सार्वजनिक रस्त्यावरील

नाच तमाशे, गाणी व गोष्टी ऐकणें असले शोक त्या लोकांत फार आहेत.

**उत्तर आफ्रिका:—** इ. स. ६४१ मध्यें अमर-बिन अलास यानें आफ्रिकेवर स्वारी करून बार्का व ट्रिपोली पर्यंत चाल केली. दुसरी स्वारी ६४७ मध्यें अबद्दल्ला अबी सर यानें करून अकुबाच्या लढाईंत तेथील सत्ताधीश ख्रिस्तधर्मी ग्रेगरी याचा पराभव केला व त्याला ठार मारलें; आणि शेवटीं तो मोठी खंडणी घेऊन परत आला. पुढें ६६५ मध्यें पहिल्या उमईद खलीफानें मोठें सैन्य पाठवून बायझंटाइन बादशहाच्या फौजेचा मोड केला व तेथील मुसुलमानी अंमलाखालील प्रांतावर आपला सुभेदार नेमला. त्यानें बर्बर लोकांत मुसुलमानी धर्माचा झपाट्यानें प्रसार केला. पुढें आफ्रिकेंतल्या याच बर्बर लोकांनीं बंड करून पांच वर्षे स्वतंत्र राज्य केलें. पुढें कांहीं वर्षे अराजकता माजून राहिल्यावर ७०५ मध्यें पुन्हां अरबांनीं तो प्रांत जिंकून घेतला व तेथील ख्रिस्ती अम्मल नष्ट करून मुसुलमानी सत्ता कायम केली व बर्बर जातीचा एक सुभेदार नेमला. शुर्फा व इबादी या दोन्ही इस्लामी मतांचा येथें प्रसार झाला. ९व्या शतकांत बगदादच्या खलीफाचें मांडलीक म्हणून कैरवान येथें अघलबाइट नांवाचें घराणें राज्य करूं लागलें व पश्चिमकडे नव्या वसविलेल्या फेझ शहरांत इड्रिसिड घराणें उदयास आलें. याच ९व्या शतकांतील अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे अबू अबदल्ला या फातिमिद मिशनरीनें अघलबाइट घराण्याचा नाश करून कैरवान ऐवजीं महादिया ही नवी राजधानी स्थापून तेथें एक शफी घराणें सुरू केलें. पुढें याच महादियाच्या फातिमिदांनीं सर्व ईजिप्त जिंकून कायरो शहर आपली राजधानी केली. पुढें ११ व्या शतकांत आल्मोरविद घराणें, १२ व्यांत आल्मोहद घराणें व १६व्या शतकापासून १८३०पर्यंत शरीफ व तुर्क, उत्तर आफ्रिकेंत राज्य करीत होते. नंतर फ्रेंचांचा अम्मल सुरू होऊन हल्लीं फ्रेंच साम्राज्य बरेंच पसरलें आहे. येथील मुसुलमान मूळ बर्बर जातीचे आहेत. शिवाय अरबांहि वसाहती करून राहिले आहेत. येथील सुलतानांनीं नीग्रो लोकांना आपल्या सैन्यांत ठेविलें होते व एकदा त्यांची संख्या १,५०,००० पर्यंत होती.

**पं थ व सं प्र दा य.—** इ. स. ७५० मध्यें शाली बिन तरीफ यानें एक कुराण ग्रंथ तयार करून त्याचा प्रसार केला. त्यांत दिवस रात्र मिळून दहा वेळ निमाज पढावा, रमजान ऐवजीं रजब महिना उपवास करावा, अंडीं खाऊं नयेत वगैरे नियम सांगितले होते. हा ग्रंथ ११ व्या शतकांत लयास गेला. दुसऱ्या एका कुराणाचा कर्ता बर्बर जातीचा हामीम नांवाचा इ. स. ९२५ च्या सुमारास होऊन गेला. त्यानें आपल्या पंथांत दररोज दोनच वेळ प्रार्थनेचा नियम केला. शिवाय त्यानें गुरुवारचा सबंध उपवास व बुधवारचा दुपार पर्यंत उपवास करावा असें ठरवून रमजानच्या उपवासाचे दिवस कमी केले आणि यात्रा, शुद्धीकरण व प्रायश्चित्त हे विधी बंद केले; डुकरीणीचे मांस खाण्यास परवानगी दिली, कारण कुराणांत फक्त नर डुकराचें मांस निषिद्ध ठरविलेलें आहे. इ० स० ९२७ मध्यें या हामीमचा स्पेनमधील उमाद-अल-नाझिरनें पाठविलेल्या सैन्यानें पराभव केला व त्याचें शिर छाटून कार्डोव्हाला पाठवून दिलें.

इ. स. १२२८मध्यें घुमरह जातींमध्यें महंमद अबलि तबाजिन नांवाचा एक प्रवक्ता उदयास आला. त्यानें बरेच चमत्कार करून दाखविले व एक नवें कोडहि तयार केलें. परंतु अबद-अल-सलाम व मर्शाश नांवाच्या महात्मा फकीरानें त्याचा निषेध केला. तेव्हां बर्बर लोकांनीं त्याचें अनुयायित्व सोडून दिलें. त्याचा सूड म्हणून महंमदानें मशीशचा खून करविला. परंतु स्यूटा येथील शिबंदी सैन्यानें महंमदाचा थोड्याच अवधींत पराभव केला व नंतर एका बर्बरनें त्याला ठार मारिलें. बदरसच्या आसपास त्याचे अनुयायी अद्यापहि आढळतात. यांच्यांतलि पहिल्या प्रवक्त्यानें 'महादी' ही पदवी धारण केली; कारण पैगंबर हे नांव इतरांनीं धारण करणें मुसुलमानांना पसंत नसे. आफ्रिकतल्या फातिमिद व अल्मोहद घराण्यांतील मूळ पुरुषांनीं 'महादी' हीच पदवी स्वीकारली होती पण वास्तवीक हे सर्व तोतये होते. या प्रमुख-पंथांखेरीज आणखी कांहीं किरकोळ धर्मपंथहि होऊन गेले.

**का य दा व वा ङ्म य—** उत्तर आफ्रिकेंत अनेक घराणीं होऊन गेलीं; तरी कायद्याचे मलीकी कोड हेंच बहुधा सर्वत्र प्रचलित होतें. पुढें तुर्की अमलाच्या प्रांतांत वरील कोडाबरोबर अबु हनीफाचें कोडहि चालू करण्यांत आलें होतें. उत्तरआफ्रिकेंतील मोरोक्को पासून तिबक्तूपर्यंतच्या सर्व शहरांत धार्मिक शिक्षणाच्या बऱ्याच शाळा होत्या व त्यांतून शिकलेले बरेच विद्यार्थी पुढें मोठे विद्वान लेखक व शिक्षक बनले. येथील अहमद बाबा नांवाच्या एका पंडिताच्या खाजगी संग्रहाला सुमारे १६०० ग्रंथ होते. आणि या पेक्षांहि मोठाले पुस्तकसंग्रह इतर विद्वानांजवळ होते. इब्न अस्कर यानेंहि लिहिलेला दावत अल नशिर नांवाचा ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. त्यांत मोरोक्को येथे होऊन गेलेल्या बऱ्याच फकीरांचीं चरित्रें दिलीं आहेत. फेज येथें १३१६ मध्यें प्रसिद्ध झालेला साल्वत् अल् अनफास नांवाचा दुसरा ग्रंथ याच प्रकारचा आहे. तथापि ऐतिहासिक दृष्ट्या उपयुक्त अशी माहिती या ग्रंथांत फारशी नाहीं.

**वि धी, आ चा र व गै रे—** धार्मिक विधी व आचार अरबांपक्षां बर्बर लोकांच्या राहाणींत अधिक होते. १६ व्या शतकापासून बर्बर लोकांतील साधूलोकहि राजकारणांत पडूं लागले. त्यांनीं बंडांमध्येंहि पुष्कळ वेळां पुढारीपण घेतलें होतें. सामान्यतः या लोकांचा उद्देश आफ्रिकेंतून ख्रिस्ती लोकांना घालवून देण्याचा असे. तथापि ख्रिस्ती लोकांचीच मदत घेऊन ते कित्येकदां आपसांतहि लढाया करीत असत.

उत्तर अफ्रिकेंत कित्येक ठिकाणीं प्रसिद्ध साधुपुरुषांच्या मशिदी असून तेथें यात्रेकरू जात असतात इद्रिस इब्न मशीश यांच्या व इतर कित्येक मशीदी याप्रमाणे यात्रेचीं ठिकाणें प्रसिद्ध आहेत.

**मध्य आफ्रिकेंतील इस्लामधर्म.**—महंमदी धर्म हा मध्यआफ्रिकेमध्यें तीन मार्गांनीं आला. (१) नील व निला मिळणाऱ्या नद्या यांच्याजवळील मुलखांतून—म्हणजे इजिप्त-मधून, (२) घॅडॅमीसपासून तिंबक्तूला जाण्याच्या मार्गांतून म्हणजे त्रिपोलीमधून व (३) वारर्गोला जाणास लागणाऱ्या मार्गांतून म्हणजे अलजीरियामधून. बार्थ नांवाच्या प्रवाशानें निरनिराळ्या जातींमध्यें केव्हां व कसा या धर्माचा प्रवेश झाला याबद्दलची माहिती दिली आहे. ख्रिस्तीशकाच्या दहाव्या शतकाच्या अखेरीस इस्लामीधर्माचा सोंगामध्यें प्रवेश झाला. अकराव्या शतकाच्या अखेरीस कॅनेममध्यें प्रवेश झाला. सन १५०० च्या सुमारास बॅघिर्मीमध्यें त्याचा प्रवेश झाला व थोडक्याच काळानंतर कॅटसेनामध्यें झाला. १९ व्या शतकाच्या आरंभीं लॉगनमध्यें त्याचा प्रवेश झाला. सन १९०० मध्यें ब्रिटिश मध्यआफ्रिकेंतील मुसुलमान रहिवाश्यांची संख्या ५०,००० होती. कांहीं ठिकाणीं इस्लामी धर्माचा प्रवेश कांहीं प्रसिद्ध व्यक्तींकडून झालेला आढळतो. मध्यगीनीप्रोलंडमध्यें १५०० सालीं याचा प्रवेश महंमद अब्द अल करीम मॅघिली याच्या द्वारें झाला.

मध्यआफ्रिकेंतील मुसुलमानी धर्म मालिकाइट' पंथाचा आढळून येतो. त्या धर्माचें वाङ्मय जरी पुष्कळ आहे तरी मध्यां आपल्याला फार थोडी माहिती उपलब्ध आहे. 'रेव्हूद्दु मॉडे मुसुलमान' १२ भाग (१९१०) मध्यें इस्मेल हॅमेटनें महंमद अल मुखतारच्या किताब अल तारा इफ या ग्रंथाची त्रोटक माहिती दिली आहे. हा प्रसिद्ध गृहस्थ आपला ग्रंथ संपल्यावर वीस वर्षांनीं म्हणजे १८२६ सालीं वारला. या ग्रंथांत त्यानें आपल्या मातापितरांची समग्र हकीकत दिली आहे. 'रेव्हूद्दु मॉडे मुसुलमान' यांत हॅमेटनें महंमद अल म्यहाली (१७५२) याच्या बऱ्याच पुराण ग्रंथांतील उतारे दिले आहेत. व याच ग्रंथकारानें महंमद पैगंबराच्या स्तुतिपर केलेली कविता मॅसिग्नॉननें छापली आहे (१९०९). अशाच प्रकारच्या तत्कालीन कविता बार्थनें प्रसिद्ध केल्या आहेत. तसेंच मॅसिग्नॉननें मध्यआफ्रि-केंतील सरदार शेखूसीदिया याच्या ग्रंथसंग्रहाची यादी प्रसिद्ध केली. या यादींत तत्वज्ञानावरील, किमयाशास्त्रावरील व गायनशास्त्रावरील ग्रंथांची यादी नाहीं, असा संपादकांनीं शेरा मारला आहे. बाकीच्या सर्व पुस्तकांची यादी इतर इस्लाम धर्माच्या ग्रंथांच्या यादीप्रमाणें आहे. फक्त वरील शास्त्रावरील ग्रंथ कांहीं कारणामुळें या यादींतून गळलें असण्याचा संभव आहे.

येथपर्यंत जगांतील निरनिराळ्या भागांत महंमदी संप्रदायाची स्थिति कोणत्या प्रकारची आहे त्याचें वर्णन केलें. आतां ब्रिटिश साम्राज्यांत व जगाच्या इतर भागांत निरनिराळ्या ठिकाणीं मुसुलमानांची लोकसंख्या किती आहे तें पुढील कोष्टकांत दाखविलें आहे व मधून मधून कांहीं माहितीच्या टीपा दिल्या आहेत.

### जगांतील मुसुलमानी लोकवस्ती दाखविणारें कोष्टक.

#### ब्रिटिश साम्राज्यांतर्गत

| प्रदेशाचें नांव | मुसुलमानी लोकवस्ती | विशेष माहिती |
|---|---|---|
| एडन | ४६,००० बहुतेक मुसुलमान | तुर्क लोकांनीं एडन १५६८ मध्यें जिंकलें, तें १६३०पर्यंत त्यांच्या ताब्यांत राहिलें. |
| सोकोत्रा बेट | १२,००० | एकेकाळीं येथील लोक हिंदु होते, व नंतर ख्रिस्ती झाले नंतर १७व्या शतकापासून मुसुलमान झाले. |
| बेहरीन बेटें | वस्ती थोडी आहे. | येथील बहुसंख्याक लोक सुन्नीपंथाचे आहेत. हीं बेटें १७३५ मध्यें इराणचा शहा नादिर यानें जिंकलीं होतीं. |
| ब्रिटिश उत्तर बोर्निओ-ब्रुनी | ३०,००० | किनाऱ्यावरील बहुतेक वस्ती मुसुलमानांची आहे. (धर्माबद्दल माहिती नाहीं.) |
| सीलोन | ३,२०,००० | यांपैकीं२,७६,०००मूरलोक (मलायेतर) आहेत. येथील मुसुलमानांचे खाजगी व्यवहार-विषयक कायद्याचें पुस्तक स्वतंत्र आहे. |
| मालदीव बेटें | ७०,००० | येथील लोक चांगले सुधारलेले असून नौकानयनविद्येंत प्रवीण आहेत. |
| सैप्रस | ५६,००० | येथें आटोमन तुर्क लोक आहेत. १५७० मध्यें हें बेट तुर्कांनीं व्हेनेशियन लोकांपासून जिंकून घेतलें. १८७८ तें १९१४ पर्यंत तुर्कस्थानच्या सुलतानाबरोबर झालेल्या करारानें तेथें ब्रिटिश लोक व्यवस्था पहात होते, आणि महायुद्ध सुरू होतांच ब्रिटिशांनीं तें पूर्णपणें ब्रिटिश साम्राज्यास जोडलें. |

| प्रदेशाचें नांव | मुसुलमानी लोकवस्ती | विशेष माहिती |
| --- | --- | --- |
| हिंदुस्थानः— | ६,६,४७,२९९ | |
| अजमीर-मारवाड | ८१,०३५ | |
| अंदमान व निकोबार बेटें | ४,५८० | |
| आसाम | १८,८६,५२८ | |
| बलुचिस्थान | ३,७७,३५६ | |
| बंगाल | २,३९,८९,७१९ | |
| बिहार व ओरिसा | ३६,६६,८६१ | |
| मुंबई इलाखा | ४०,२४,४८५ | |
| ब्रह्मदेश | ४,२०,७७७ | |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ५,६४,९०९ | |
| कुर्ग | १३,१४३ | |
| मद्रास | २७,४०,४०८ | |
| वायव्य सरहद्दी वरील प्रांत | २०,३९,९९४ | |
| पंजाब | १,०९,५५,७२१ | |
| संयुक्त प्रांत | ६६,५८,३७३ | |
| संस्थानें व एजन्सी— | | |
| आसामांतील मणिपूर संस्थान | १४,५०४ | |
| बलुचिस्तानांतील संस्थानें | ४,०५,२९२ | |
| बडोदें संस्थान | १,६०,८८७ | |
| बंगालमधील संस्थानें | २,४७,५०९ | |
| बिहार व ओरिसामधील संस्थानें | १६,५७७ | |
| मुंबईइलाख्यांतील संस्थानें | ८,७७,४३१ | |
| सेंट्रल इंडिया एजन्सी | ५,११,२०० | |
| संयुक्त प्रांतांतील संस्थानें | २०,१२० | |
| हैद्राबाद संस्थान | १३,८०,९९० | |
| काश्मीर संस्थान | २३,९८,३२० | |
| मद्रास-इलाख्यांतील संस्थानें | ३,१४,४९८ | |
| म्हैसूर संस्थान | ३,१४,४९४ | |
| वा. स. प्रांतांतील एजन्सी व इतर मुलुखांतील टोळ्या | ९,६०५ | |
| पंजाब इलाख्यांतील संस्थानें | १३,१९,७०६ | |
| राजपुताना एजन्सी | ९,८५,८२५ | |
| सिकिम संस्थान | ४४ | |
| संयुक्त प्रांतांतील संस्थानें | २,४६,३५८ | |
| आशियाः— | | |
| बलुचिस्तान | ७,८२,००० | १७३९ मध्यें नादीरशहानें "बलुचिस्तान" हा निराळा देश बनविला. येथें सुनी पंथाचे लोक आहेत. १८७६ पर्यंत कलात येथील खान स्वतंत्रपणें राज्य करीत होते. नंतर हा देश ब्रिटिशांच्या ताब्यांत गेला. |
| लखदीव बेटें | १०,६०० | बहुतेक मुसुलमान आहेत. |
| स्ट्रेटस सेटमेंटस | | |
| संयुक्त मलाया संस्थानें. | ... | पेरक, सीलांगोर, नेग्री सेंबिलन व पहंग येथील राजे मुसुलमान आहेत. १८९६ मध्यें ते ब्रिटिश साम्राज्य सत्तेखालीं आलें. |

| प्रदेशाचें नांव | मुसुलमानी लोकवस्ती | विशेष माहिती |
| --- | --- | --- |
| मलाया संस्थानें (संयुक्त संस्थानांखेरीज). | | |
| जोहारे | १,०२,००० | इ. स. १२७६ मध्यें मलाका राजा महंमदशहा व सर्व लोक मुसुलमान बनले. व नंतर तो धर्म मनंग कबव व पश्चिम सुमात्रामध्यें पसरला. |
| केदाह | १,४५,००० | |
| पर्लिस | ३०,००० | |
| केलतन | २,६७,००० | |
| ट्रेंगनु | १,५४,००० | येथील बहुतेक लोक मुसुलमान आहेत. |
| ब्रुनेई | ... | |
| आफ्रिकाः- | ... | |
| ईस्ट आफ्रिका प्रोटे. | | किनाऱ्यालगत अरबांची वस्ती विशेष आहे. |
| कटॉरेट | ... | |
| युगांडा | ... | |
| झांझिबार | १,१३,००० | येथें मुसुलमान राजा आहे. १६ व्या शतकांत पूर्व किनाऱ्यावरील अरबांनीं मुक्सतच्या इमामांच्या मदतानें पोर्तुगीजांनां हाकून लावलें. १८३२मध्यें सय्यिद सय्यद यानें आपली राजधानी झांझिबार येथें नेली. बहुतेक वसती मुसुलमान शफी सुनी पथाची आहे. १६९८ मध्यें मोंबासा शहर इमामांनीं जिंकून घेतलें, नंतर १७८४ मध्यें सर्व बेट जिंकलें. |
| मॉरिशस | ३,८५,००० | मुसुलमानांचें संख्याधिक्य नाहीं. |
| न्यासालँड प्रोटेक्टरेट | ... | |
| सोमाली लँड | ३,००,००१ | यावर इजिप्तचा ताबा १८८४मध्यें बंद झाला. येथील लोक नांवाला मुसुलमान आहेत. परंतु ते वृक्षपूजा वगैरे करतात. |
| दक्षिण आफ्रिका. | | |
| बासुटो लँड, बेच्युलँड, र्‍होडेशिया, स्वाझिलँड | ... | |
| दक्षिण आफ्रिका | | |
| यूनियन | ४६,००० | |
| केप ऑफ गुडहोप प्रांत | २४,००० | |
| नाताळ प्रांत | ... | |
| ट्रान्सव्हाल प्रांत | फार थोडे | |
| ऑरेंज फ्री स्टेट | फार थोडे | |
| पश्चिम आफ्रिकाः-- | | |
| नायगेरिया | ... | उत्तरेकडील भागांत मुसुलमान लोक फुलनी व हौसा जातीच्या लोकांमध्यें पुष्कळ मिसळलेले आहेत. २४,००० हून अधिक मुसुलमानी शाळा असून त्यांत दोन लाखांवर विद्यार्थी शिकत आहेत. कॅनो हे मुसुलमान वस्तीचें महत्त्वाचें ठिकाण आहे. |
| गँबिया | कांहीं वस्ती | |
| गोल्ड कोस्ट | ... | |
| अशांटी | कांहीं वस्ती | |
| सीरिआ | ७५,००० | पांच मुसुलमानी शाळा आहेत. |
| लीऑन | | |
| इजिप्त | १,०३,६७,००० | १८११मध्यें इजिप्तचा गव्हर्नर महंमद अली हा स्वतः स्वतंत्र राजा बनला. १९१४मध्यें इजिप्त ब्रिटिश प्रोटेक्टरेट असल्याचें जाहीर झालें. |
| अँग्लो-इजिप्त-सुदान | ... | १८८२ पर्यंत इजिप्तचा अम्मल होता. त्या सालीं माहदीनें बंड केलें व देशांत जुलमी कारभार सुरू केला. १८९९ मध्यें माहदीनंतर राज्य करूं लागलेल्या खलीफाला ब्रिटिश सरकारनें पदच्युत केलें. ( ' नष्ट झालेली राज्यें ' ही यादी पहा. ). |

| प्रदेशाचें नांव | मुसुलमानी लोकवस्ती | विशेष माहिती |
|---|---|---|
| **अमेरिका:—** | | |
| कानडा | ... | |
| ब्रिटिश ग्वायना | ... | |
| त्रिनिदाद | ... | |
| **आस्ट्रेलिया व ओशियानिया:—** | | |
| न्यू साऊथ वेल्स | ... | |
| व्हिक्टोरिया क्वीन्स लँड | ... | |
| दक्षिण आस्ट्रेलिया | ४४० | |
| पश्चिम आस्ट्रेलिया टॅस्मानिया | १,५५० | |
| आस्ट्रेलियाचा उत्तरभाग | ... | कांहीं वस्ती मलाई लोकांची आहे (ते बहुध मुसु. असावे ) |
| ब्रिटिश न्यू ग्वायना | ... | |
| न्यू झीलंड | ... | |
| फिजी बेटें | ... | |
| पॅसिफिक बेटें | ... | |
| **ब्रिटिश साम्राज्याबाहेरील** | | |
| युनैटेड स्टेटस अमेरिका | अगदीं थोडी | |
| फिलिपाईन बेटें | कांहीं | येथील मूर लोकमुसुलमानधर्मी आहेत. |
| हावाई | ... | |
| पोर्टो रिको | ... | |
| सामोयन बेटें | ... | |
| अबीसिनिया (एंथिओपिया) | एकंदर लोकसंख्या तीस चाळीस लाख असून त्यांपैकीं बहुतेक ख्रिस्ती आहे. | येथील लोक मूळ सेमेटिक वंशाचे आहेत. डांकाली लोक म्हणजे पूर्वभागांत राहणारे मुसुलमान आहेत. ते अगदीं दुर्गम प्रदेशांत राहतात व त्यामुळें कांहींसे स्वातंत्र्यांत आहेत. वार्षिक खंडणी ते बादशहाला देतात. शिवाय या देशांत कांहीं अरब व कांहीं हिंदी लोक आहेत. |
| अफगाणिस्तान | बहुतेक मुसु० ६३,८०,००० | येथें राजसत्ताकपद्धति असून वंशपरंपरा हक्काचा मुसुलमान राजा आहे त्याला अमीर म्हणतात. १८ व्या शतकापूर्वीचा इतिहास फारसा उपलब्ध नाहीं. येथें बहुतेक इराणचा अम्मल होता. |
| आल्बेनिया | एकंदर वस्ती ८,००,००० असून त्यांपैकीं दोनतृतीयांश मुसुलमान आहेत. | येथील मुसुलमान बहुतेक बेक्ताशी पंथाचे आहेत. १८३१ मध्यें तुर्कांनीं यानिन प्रांत जिंकला व तेव्हांपासून तुर्कांचा अंमल चालू राहिला. मात्र मध्यंतरीं दोन वेळां स्वातंत्र्य प्रस्थापित केलें होतें. (१) १४४३-७७ जार्ज कास्ट्रियटच्या पुढारित्वाखालीं. (२) १८ व्या शतकांत टेपेडेलेनच्या अलीच्या नेतृत्वाखालीं. १८८० मध्ये आल्बेनियन लीग स्थापिली जाऊन तिनें स्वातंत्र्य स्थापण्याचा प्रयत्न केला पण निष्फळ झाला; व ती लीगहि लवकरच मोडली. १९१२ मध्यें आल्बेनियाचें स्वातंत्र्य जाहीर करण्यांत आलें. १९१४ मध्यें वीडच्या प्रिंस विल्यमनें राजमुकुट धारण केला. |
| आर्जेंटाइन | ... | |
| आस्ट्रिया | ... | |
| झेको-स्लोव्हाकिया | ... | |
| हंगेरी | ... | |
| बेल्जम | ... | |
| बेल्जियन कांगो | | येथें कांहीं अरबी संस्कृतीचे परिणाम दिसतात व |

| प्रदेशाचें नांव | मुसुलमानी लोकवस्ती | विशेष माहिती |
|---|---|---|
| | | त्यावरून कांहीं मुसुलमानांची वस्ती असावी असें वाटते. |
| भूतान | ... | |
| बोलिव्हियां | ... | |
| ब्राझिल | ... | |
| बल्गेरिया | ६,०२,००० | १८७८ मध्यें बर्लिनच्या तहानें हें स्वतंत्र राज्य करण्यांत आलें.तेथें राजा मुसुलमान आहे पण प्रधानमंडळ ख्रिस्ती आहे. उत्तर व पूर्व भागांतच विशेषतः मुसुलमानांची वस्ती आहे. |
| चिली | ... | |
| चीन | पन्नास ते शंभर लक्ष मुसुलमान (१९०९ मधील अंदाज). | मुसुलमान प्रत्येक प्रांतांत आहेत, पण विशेष वस्ती कानसु, हुसिन चिअंग, चिल्ही व युनान प्रांतांत आहे. |
| कोलंबिया | ... | |
| कोस्टा रिका | ... | |
| क्युबा | ... | |
| डेनमार्क | ... | |
| इक्वेडोर | ... | |
| फ्रान्स | ... | |
| आल्जेरिया (फ्रेंच) | ४४,११,००० | येथील बहुतेक देश्य वस्ती मुसुलमानधर्मी आहे. इ. स. ६७० पासून अरब लोक तेथें वसाहत करूं लागले व त्यांनीं तेथील लोकांना मुसुलमानधर्माची दीक्षा दिली ९३५ मध्यें अरबी राजा झीरी यानें हल्लींचें अल्जियर्स हें शहर वसविलें. १५१६ पासून तुर्कांचा अम्मल सुरू झाला. |
| मादागास्कर | कांहीं अरबांची किरकोळ वस्ती आहे. | |
| फ्रेंच सोमालीलँड | कांहीं हजार इतकी अरबांची वस्ती आहे | |

| प्रदेशाचें नांव | मुसुलमानी लोकवस्ती | विशेष माहिती |
|---|---|---|
| मॉरिटॅनिया (फ्रेंच) | २,५६,००० | मूर जातीचे मुसुलमान आहेत. |
| टयूनिस | अजमासें १९,५३,००० यापैकीं बरेचसे मुसुलमान आहेत. | इ. स. ६७५ मध्यें अरबांनीं खलीफ उस्मानच्या वेळीं हा जिंकला. १५७५ पासून तुर्कांचें राज्य सुरू झालें. १७०५ पासून हुसेन बेन अल्लीच्या वंशांतील राजे तुर्कस्तानच्या सुलतानाचे मांडलीक म्हणून राज्य करीत आहेत |
| फ्रेंच ग्वायना | ... | |
| मार्टिनिक | ... | |
| जर्मनी | ... | |
| टोगो | कांहीं मुसुलमान | |
| ग्रीस | ... | |
| ग्वाटिमाला | ... | |
| हायटी | ... | |
| हाँडुरस | ... | |
| इटाली | ... | |
| इटालियन सोमालीलँड | ... | अरबी भाषा बोलतात. इ. स. ६४४ मध्यें अरबांनीं देश जिंकून घेऊन मुसुलमानी धर्म सुरू केला. |
| ट्रिपोली व सीरेनेका | ... | |
| लायबेरिया | एकंदर लोकसंख्या अदमासें २० लाख | यापैकीं मंडिगो नामक जातीचे लोक मुसुलमान आहेत. |
| मेक्सिको | ... | |
| मॉंटेनेग्रो | ... | |
| मोरोक्को | ३,८८,००० | इ. स. ८०० मध्यें येथें अरबांचें राज्य सुरू झालें. हल्लींचा सुलतान हा महंमद पैगंबराचा चुलता अल्ली याच्या वंशातला ३६ वा पुरुष आहे. सुलतानाची सत्ता अनियंत्रित असून धार्मिक सत्ताहि त्याचेच हातीं आहे. |
| नेपाळ | ... | |
| नेदरलंड्स | ... | |

| प्रदेशाचें नांव | मुसुलमानी लोकवस्ती | विशेष माहिती |
|---|---|---|
| डच ईस्ट इंडीज (जावा बेटासुद्धां) | ४,६२,३०,००० | देश्य लोकांपैकीं बहुतेक मुसुलमान आहेत. महंमदाच्या मरणानंतर लवकरच अरब लोक जावा बेटांत जाऊन आले होते. परंतु १५ व्या शतकाच्या अखेरीस इस्लामी धर्म जावा बेटांत सुरू झाला. दोन राज्यें नष्ट झालीं, व त्या मधून बंटम व नंतर मातरं हीं स्थापन झालीं. |
| डच वेस्ट इंडीजः— सुरिनम (डच ग्वायना) | १२,००० | |
| नॉर्वे | ... | |
| ओमन | ५,००,००० | याची राजधानी मुक्सत शहर १५०८ पासून १७ व्या शतकाच्या मध्यापर्यंत पोर्तुगीज लोकांच्या ताब्यांत होतें. १८ व्या शतकांत अहमद बिन सय्यद यानें तें शहर घेतलें व १७४१ मध्यें तो तेथला इमाम म्हणून निवडला गेला. १९१३ पासून सुलतान व निवडलेला इमाम यांच्यामध्यें स्पर्धा चालू आहे. येथील मुसुलमान लोक कुराणाकडे लक्ष देत नाहींत. |
| पनामा | ... | |
| पॅराग्वे | ... | |
| इराण | ८५,००,००० शिया आणि ८,५०,००० सुनी. | ७ व्या शतकांत अरब लोकांनीं जुनें इराणी राजघराणें नष्ट केलें आणि इस्लामी धर्म प्रस्थापित केला. हल्लींचा शहा कर्जास घराण्यांतला ७ वा पुरुष आहे. हें घराणें १७९४ पासून राज्यावर आहे. |
| पेरु | ... | |
| पोर्तुगाल | ... | |
| मोझांबिक (पोर्तुगीज ईस्ट आफ्रिका) | ... | |
| रुमानिया | ४३,००० | |
| रशिया | १,३९,०७,००० | |
| बोखारा | १२,५०,००० सर्व मुसुलमान. | हें राज्य १५ व्या शतकांत तैमूरलंगनें गोल्डन होर्डचा पराभव केल्यावर उसबेगांनीं स्थापन केलें. हल्लींचें मुसुलमान घराणें १८ व्या शतकाअखेर पासून चालू आहे. १८७३ पासून यावर रशियाचें अधिराज्य चालू आहे. |
| खिवा | ६,४६,००० सर्व मुसुल. | तैमूरलंगाचें साम्राज्य नष्ट झाल्यावर हें राज्य स्थापन करण्यांत आलें. याचा १८ व्या शतकापासून रशियाशीं संबंध जडला. |
| फिनलंड | ... | |
| पोलंड | ... | |
| सर्व्हिया | ... | |
| सयाम | ... | |
| स्पेन | ... | |
| स्वीडन | ... | |
| स्वित्झर्लंड | ... | |
| तुर्कस्थान (मेसापोटेमियासुद्धां) | २,०९,७४००० बहुतेक मुसुलमान | इ.स.१२९९ मध्यें तुर्की साम्राज्य उस्माननें स्थापलें व हल्लींचा सुलतान हा त्या घराण्यांतला ३७ वा सुलतान आहे आणि कॉन्स्टंटिनोपल जिंकल्यापासूनचा ३० वा सुलतान आहे. |
| हेजाझ | ३,००,००० सर्व मुसु० | हल्लीं हें स्वतंत्र राज्य झालें आहे. |

**नष्ट झालेलीं मुसुलमानी राज्यें**

| प्रदेशाचें नांव | मुसुलमानी लोकवस्ती | विशेष माहिती |
|---|---|---|
| बोर्नु (हल्लीं सूदन मध्यें) | १८८३ मध्यें. अदमासें ५० लक्ष–सर्व मुसुलमान | मध्य सूदन मधील हा सर्वांत जुना व अत्यंत प्रसिद्ध मुसुलमान नीग्रोंचा प्रदेश आहे. येथील रहिवाशी बरोनों किंवा कनोरी |

| प्रदेशाचें नांव | मुसुलमानी लोकवस्ती | विशेष माहिती |
|---|---|---|
| | | जातींचे आहेत. . व्या शतकांत स्थापलेल्या व १५ व्या शतकांत मुसुलमानी बनलेल्या कनेमच्या राष्ट्राचा बोर्नु हा एक भाग होता. अली दुनामर्मी (१४७२-१५०५) यानें बोर्नूचें राज्य स्थापलें. |
| वर्गिमि ( हल्लीं सूदन मध्यें अन्तर्भूत ) | १५,००,००० | १७ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास अबदल्ला राजानें इस्लामी धर्म येथें आणला. त्या वेळीं हें स्वतंत्र राज्य विशेषतः महंमद-एल अमिन याच्या कारकीर्दींत चांगलें भरभराटींत होतें. तें १८७१ पर्यंत स्वतंत्र राज्य होतें. मात्र शेजारच्या वदईच्या राजाला खंडणी देत असे. |
| वदई (हल्लीं सूदन मध्यें अंतर्भूत) | ३० ते ६० लक्षांच्या दरम्यान लोकसंख्या असून बहुतेक मुसुलमान आहे. | येथील राजघराण्याचा मूळ संस्थापक साला यानें आपलें कुटुंब वोदा पर्वतांत नेलें. अबद-ल करिम यानें इस्लामी धर्म सुरू करण्याचा प्रयत्न केला; १६३५ मध्यें राज्य स्थापन केलें; वीस वर्षे राज्य केलें; फॉर व बोर्नु यांना खंडणी देत असे. |
| डारफार | ४० लक्ष लोक वस्ती, बहुतेक मुसुलमान | १८ व्या शतकाच्या मध्यापासून मुसुलमानी धर्म आहे. |

वर दिलेल्या कोष्टकावरून जगांत मुसुलमानी लोक वस्ती आज कोटकोठें पसरली आहे याची माहिती होईल. आज या सर्व निरनिराळ्या समूहांस एकत्र जोडणारी अशी शक्ति अस्तित्वांत नाहीं. खलीफतीमध्यें जोंपर्यंत राजकीय व धार्मिक या दोन्ही सत्तांचा अंतर्भाव होत होता; तोंपर्यंत खलीफाचें वजन तुर्कस्तानाबाहेरील मुसुलमानी प्रजेवर पडण्याचा संभव होता. पण खलीफाची राजकीय सत्ता काढून घेतल्यामुळें तुर्कसरकारास यापुढें इतर महंमदी राजांची सहानुभूति कितपत मिळेल याची शंका आहे व अलीकडील काळांत जी धार्मिक विचारांत क्रांति होत आहे तीमुळें केवळ संप्रदायाचें बंधन या समाजांस फार दूरच्या काळपर्यंत एकत्र बांधून ठेवील असें दिसत नाहीं. तेव्हां लवकरच निरनिराळीं महंमदी राष्ट्रें स्वतंत्रपणें आपआपल्या पुरेसा विचार पहावयास लागून मध्यवर्ति खलीफत संस्थेचें वजन हळू हळू नामशेष होण्याचा संभव आहे. असो. आतां या मध्यंतरांच्या अवधींत यूरोपमध्यें कोणकोणत्या घडामोडी झाल्या त्यांचें निरीक्षण करूं.

## प्रकरण १८ वें.

## यूरोप, शार्लमान राजाच्या मृत्यूपासून सोळाव्या शतकापर्यंत.

**पूर्व व पश्चिम ख्रिस्ती संप्रदाय.**—इ. स. ८१४ यावर्षी शार्लमान बादशहा मरण पावला. त्याच्या मरणानंतर त्याच्या एकसत्ताक राज्यास उतरती कळा लागून सरंजामी राज्यपद्धतीचा उदय होण्याचीं पूर्व चिन्हें दिसूं लागलीं. याच कालांत पूर्वरोमन साम्राज्यानें मुसुलमानांच्या वाढत्या सत्तेस आळा घालून यूरोप व ख्रिस्ती संप्रदाय यांचें मुसुलमानांपासून रक्षण केलें. परंतु या वेळेपासूनच पूर्वख्रिस्तीसंप्रदाय व पश्चिम ख्रिस्तीसंप्रदाय यांमध्यें विरोध उत्पन्न झाला.

**साम्राज्याची विभागणी.**—इ. स. ८४३ यावर्षी झालेल्या व्हरडूनच्या तहानें शार्लमानच्या साम्राज्याची विभागणी झाली. चार्लस् बोल्ड राजाला न्यूसट्रिया, अक्विटेन व पश्चिम बर्गंडी हे प्रांत मिळाले. लुई राजाला जर्मन बव्हेरिआ, स्वेबिया व सेक्सनी हे प्रांत मिळाले. याप्रमाणें शार्लमानचें साम्राज्य जाऊन आतां यूरोपांत स्वतंत्र लहान लहान राज्यें निर्माण झालीं. येथूनच आधुनिक यूरोपच्या इतिहासाला प्रारंभ होतो. हीं नवीं उदयास आलेलीं राज्यें बाहेरील लोकांच्या स्वाऱ्या व अंतःकलह यांपुढें फारसा टिकाव धरतील अशीं चिन्हें प्रारंभीं दिसत नव्हतीं कारण नॉर्स लोक त्यांनां फार त्रास देत होते. ते ( नार्स ) केवळ यूरोपच्या किनाऱ्यावरच चांचेपणा करीत रहात नसत, तर समुद्रापासून दूरच्या प्रदेशावरहि स्वाऱ्या करून नासधूस व लुटालूट करीत. इकडे साम्राज्यांत गादीकरितां तंटे सुरू होऊन अर्धवट स्वतंत्र अशा सत्ताधारी सरदारांचा वर्ग निर्माण झाला.

**सरंजामी राज्यपद्धतीचा उदय.**— राजसत्ता बलहीन झाल्यामुळें हे नवीन उत्पन्न झालेले सत्ताधारी सरदार तीस जुमानीनासे झाले. या सरदारांची सत्ता वंशपरंपरेनें चालत आलेली असे. याप्रमाणें यूरोपीय इतिहासाच्या मध्ययुगांतील सरदारांचा वर्ग राजसत्तेच्या मार्गांतील एक महत्वाचा अडथळा होऊन बसला. राजसत्तेशीं बरोबरीनें

झगडणाऱ्या व प्रसंगीं राजसत्तेला नाहींशी करून तिचें काम आपल्या हातांत घेणाऱ्या या संस्थेस फ्यूडल सिस्टिम म्हणत. आपणाला तीस सरंजामी पद्धति असें नांव देतां येईल. मराठे शाहींत या पद्धतीचा भाग होताच. या पद्धतीला त्या प्रसंगानें रा. रा. वासुदेव शास्त्री खरे यांनीं सरंजामी पद्धत असेंच म्हटलें आहे. या संस्थेनें यूरोपच्या संरक्षणाचें काम फार चांगल्या तऱ्हेनें केलें. इ.स.च्या १०व्या शतकाच्या प्रारंभींच यांनीं उत्तरेकडील रानटी लोकांनां हांकलून लावून फ्रान्स व जर्मनी यांच्या सरहद्दी सुरक्षित केल्या. नॉर्स वगैरे रानटी लोकांच्या स्वाऱ्यांचें भय नाहींसें करून त्यांस निरनिराळ्या राज्यांत प्रजाजन म्हणून स्थायिक केलें. इ.स.९११यावर्षी चार्लस धि सिंपल व रोलो यांच्यामध्यें सेंट-क्लेअर-सर-एपटे येथें झालेल्या तहानें नार्मन लोक नॉर्मंडींतील कायमचे रहिवासी झाले. पुन्हां इ.स.८७८ या वर्षी वेजमूर येथील तहानें आल्फ्रेड राजानें डेन्स लोकांनां आपल्या राज्यांत राहण्याची परवानगी दिली.

इ.स.११व्या शतकापर्यंत सरंजामी पद्धति ही संस्था यूरोपच्या पश्चिम भागांतच प्रचलित होती. तेथून ती नॉर्मन लोकांनीं इंग्लंड, इताली, व सिसली यांमध्यें नेली. सरंजामी पद्धतीनें राजाचे अधिकार सर्व नाहींसे होऊन राजसत्ता दुर्बल होऊन नामधारी बनते हें इंग्लंड, फ्रान्स, व जर्मनी येथील राजांच्या लक्षांत आलें व म्हणून या देशांचा पुढील तीन शतकांचा इतिहास म्हणजे, राजसत्ता व सरंजामी सरदारपद्धति यांमधील युद्धांनीं भरलेला आहे. प्रथम तीनांहि राज्यांत सरंजामी राज्यपद्धति प्रबल होती. इंग्लंडांत ही पद्धति प्रबल नसून तिनें राजसत्तेस कांहीं बाध आणिला नाहीं असें ऑलसन फिलीप सारख्या इतिहासकारांस म्हणण्याची फार हौस आहे; परंतु स्टीफनच्या वेळेचा अंतःकलह, सरदारांची सत्ता कमी करण्याकरितां पहिल्या हेन्रीनें केलेले प्रयत्न व जॉन राजाच्या वेळेस सरदारांची सत्ता किती प्रबळ होती या गोष्टी लक्षांत आणिल्या म्हणजे वरील इंग्लिश इतिहासकारांचें विधान किती फोल आहे हें दिसून येईल. फ्रान्स मध्यें इ.स.१२७७ या वर्षापर्यंत सरंजामी राज्यपद्धति प्रबल होती; परंतु पुढें नवव्या लुई राजाच्या कारकीर्दीपासून राजसत्ता हळूहळू सुदृढ होत चालली व तिची इ.स.च्या १७व्या शतकांत पूर्ण वाढ झाली.

**जर्मन राजसत्तेची स्थापना.**—जर्मन राजसत्तेची स्थिति याच्या अगदीं उलट होती. ज्याप्रमाणें सरंजामी राज्यपद्धतीचा नाश होऊन इंग्लंड व फ्रान्स या देशांत राजसत्ता प्रस्थापित झाली त्याप्रमाणें ती जर्मनींत झाली नाहीं यास पुढील कारणें देतां येतील. (१) रोमन साम्राज्याचा बादशहा जर्मनीचा राजा असे. (२) रोमन सम्राटाची सत्ता कांहीं निश्चित नव्हती. (३) एवढ्या मोठ्या साम्राज्याचा कारभार व्यवस्थित ठेवण्याकरितां त्यांनां सरदार लोकांनां पुष्कळ हक्क द्यावे लागले. आणखी (४) जर्मन राजा संस्थानिकांकडून निवडलेला असून त्यास पोपच्याहस्तें साम्राज्याभिषेक होत असे.

याप्रमाणें जर्मन राजाला पोप व साम्राज्य यांच्या भानगडींत पडावें लागल्यामुळें आपलें राज्यपद भक्कम पायावर उभें करण्यास फावलें नाहीं. असें होते तरी जर्मन राजसत्तेचा उदय फार झपाट्यानें झाला. इ. स. ९११ यावर्षी जर्मनीच्या प्रबळ सरदारांनीं कॉनराड फ्रँकोनियनला आपला राजा केलें. इ. स. ९१९ यावर्षी सॅक्सनी येथील हेन्री धी फाउलर यानें हंगेरियन, स्लाव्ह, व डेन लोकांचा पराभव करून जर्मन राज्य स्थापण्याचा प्रयत्न केला. त्याच्या पाठीमागून झालेल्या ओटो धि ग्रेट व त्याचा मुलगा दुसरा ओटो यांनीं तें काम पुढें चालविलें. दुसऱ्या हेन्रीनें (१००१-१९२५) जर्मन राज्याची स्थापना केली. यापुढें जर्मन राज्यसत्तेची वाढ झपाट्यानें होऊं लागली. जर्मन राजांनीं इतालीवर सत्ता मिळविण्याचा अट्टाहास केला नसता व ते पोप व साम्राज्य यांच्या भानगडींत पडले नसते तर जर्मन राजसत्तेला उतरती कळा कधींहि लागली नसती.

**फ्रान्सच्या राजसत्तेचा उदय**—फ्रान्सच्या राजसत्तेचा उदय जर्मनीप्रमाणें झपाट्यानें न होतां फारच मंदगतीनें झाला. इ. स. ९८७ यावर्षी केरोलिंगियन घराणें बुडालें व फ्रान्समधील सरदारांनीं—ह्यू कॅपटनला फ्रान्सचा राजा केलें. या वेळेपासून फ्रान्सच्या राजसत्तेचा उदय होण्यास प्रारंभ झाला.

**धर्मयुद्धें उर्फ खिस्ती संप्रदाय संरक्षणार्थ युद्धें.**—यावेळेस पूर्वरोमनसाम्राज्यावर सेलजुक, पर्शियन व नॉर्मन लोकांचे हल्ले सुरू होऊन त्यामुळें साम्राज्य नष्ट होतें कीं काय अशी भीति पडली. परंतु त्यावेळेच्या अलेक्झिअस कॉमनेनस नांवाच्या सम्राटानें त्यांचा पराभव करून हें संकट दूर केलें. धर्मयुद्धें म्हणजे संप्रदायसंरक्षणार्थ युद्धें या वेळेसच सुरू झालीं या युद्धामुळें पूर्वसाम्राज्य व पश्चिमसाम्राज्य यामधील बंद पडलेलें दळणवळण पुन्हां सुरू झालें. हीं युद्धें इ.स.च्या १३व्या शतकांत संपली. या मध्यंतरीच्या दोन शतकांत यूरोपच्या एकंदर आयुष्यक्रमांत पुष्कळ फेरफार झाला. (१) पोप व राजा यांची सत्ता वाढली. (२) पृथ्वीच्या पूर्वभागांतील प्रदेशाचें ज्ञान पश्चिमेकडील लोकांस जास्त जास्त होऊं लागलें, (३) व्यापाराची प्रगति झाली, (४) धंद्यांनां उत्तेजन मिळालें. (५) सरदारांचा वर्ग बलहीन व संख्येनेंहि कमी झाला (६) व शहरांत राहण्याची प्रवृत्ति वाढूं लागली. धर्मयुद्धांच्या बरोबरच यूरोपांत हिलब्रँड यानें संप्रदायसुधारणाविषयक चळवळ सुरू केली. या चळवळीचा यूरोपच्या बौद्धिक जीवनक्रमावर फार परिणाम झाला. हा हिलब्रँड सातवा ग्रेगरी या नांवानें पुढें पोपच्या गादीवर बसला (१०७३-८५) व त्यानें पोपची सत्ता फार वाढविली.

ही सत्ता वाढण्याचीं कारणें मुख्यतः वरील संप्रदायसुधारणेची चळवळ व धर्मयुद्धांमुळें जें पूर्व व पश्चिम यांमधील दळणवळण वाढलें त्यामुळें झालेली व्यापाराची भरभराट हीं होत.

इ. स. च्या १२ व्या शतकांत या पोपच्या सत्तेचा यूरोपच्या इतिहासावर बराच परिणाम झालेला दिसतो. सर्व यूरोपनें कबूल केलेली पोपची सत्ता, लोकांकडून मिळत असलेलें अमित धन, आंतरराष्ट्रीय व्यवहारांतील त्यांचा अनुभव व त्यांची विद्वत्ता व योग्यता यामुळें ते यूरोपचे धार्मिक व राजकीय गुरू बनले.

या धर्मयुद्धांचा दुसरा एक परिणाम असा झाला कीं, सरदार वर्ग दुर्बल व संख्येनेंहि कमी झाला. फ्रान्समध्यें याचा परिणाम असा झाला कीं, लहान लहान जमीनदार नष्ट होऊन मोठमोठे जहागीरदार निर्माण झाले व नंतर त्या सर्वांचा राजसत्तेंत लोप झाला. आपला प्रधान शुगर याच्या मदतीनें नवव्या लुईनें फ्रान्समध्यें अनियंत्रित राजसत्ता स्थापना केली. फ्रान्सप्रमाणें यूरोपांतील दुसऱ्याहि राज्यांना संप्रदायसंरक्षणयुद्धांपासून फायदा झाला. यूरोपांतून सरंजामी राज्यपद्धतीचा बहुतेक नाश होऊन राजसत्तेचा मार्ग निष्कंटक झाला. व्यापाराची भरभराट होऊन व्यापाऱ्यांचा एक नवा वर्ग बनला. शहरांत राहण्याची प्रवृत्ति वाढूं लागली. पूर्व व पश्चिम यांचा संबंध दृढतर होऊं लागला. याशिवाय सर्वांत मोठा परिणाम म्हणजे या युद्धांमुळें मुसुलमानांना सत्तेच्या वाढीस आळा बसला.

**पोपसत्ता व राजसत्ता यांमधील द्वंद्व.**—पोपची गादी व साम्राज्य यांमधील तंटा या धर्मयुद्धांशीं समकालीनच आहे. हें भांडण रोमन साम्राज्याचा रोमन बादशहा चवथा हेन्री याच्या कारकीर्दींत सुरू झालें. फ्रेडरिक बारबरोसा याच्या वेळेस ( ११५०–११९० ) तें भांडण कळसास पोंचलें. हें भांडण मुख्यतः इतालीच्या स्वामित्वाकरितां होतें व पोपची सत्ता प्रबल असल्यामुळें रोमन सम्राटाला इताली घेणें अशक्य झालें. दुसऱ्या फ्रेडरिकनें मोठ्या चिकाटीनें आपल्या पूर्वजानें सुरू केलेलें काम पुढें चालविलें परंतु त्याला या प्रयत्नांत यश आलें नाहीं. रोमन साम्राज्याचा पूर्ण पराभव होऊन पोपची सत्ता अजिंक्य झाली. रोमन साम्राज्यांतून इताली विभक्त होऊन पोप हा एक राजकीय सत्ताधारी बनला.

याप्रमाणें इ. स. च्या १३ व्या शतकाच्या अखेरीस यूरोपची स्थिति होती.

**राष्ट्रभावनेचा उदय.**—संप्रदाय संरक्षणार्थ चाललेलीं युद्धें बंद झालीं व साम्राज्य विस्कळित झालें. या सुमारास यूरोपीय इतिहासाच्या मध्ययुगाचा पूर्वार्ध संपला. पुढें १४ व १५ हीं शतकें मध्ययुगाच्या उत्तरार्धांत मोडतात. या कालांत यूरोप हा सामान्य धर्मानें बद्ध असा समाज आहे ही भावना नष्ट होत गेली होती. आजपर्यंत ज्यांनीं यूरोपला ऐक्य दिलें त्या पोपची गादी व साम्राज्यसत्ता या संस्था आतां प्रबल राहिल्या नव्हत्या. यूरोपचे आपण घटक आहोंत ही भावना जाऊन त्याच्या जागीं लोक आपापल्या प्रांतांचा विचार करूं लागले. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे लोकांत स्वराष्ट्रभावना व स्वतःचें वैशिष्ट्य या भावना जागृत होऊं लागल्या. याच वेळेस सांस्कृतिक पुनरुज्जीवनाची चळवळ सुरू झाली. एकंदरींत इ. स. च्या १४ व्या व १५ व्या शतकांत यूरोपांत जरी कोणताहि एक सामान्य धर्म प्रचलित नव्हता तरी भावी नव्या युगाचीं चिन्हें आतां चांगलीं दृग्गोचर होऊं लागलीं.

**राजवंशसत्तेची वाढ.**—कॉनराड ( दुसऱ्या फ्रेडरिकचा मुलगा १२२४—१२५३ )च्या मरणानंतर हॅप्सबर्ग घराण्यांतील रुडॉल्फ हा जर्मनीचा राजा झाला. त्याच्या कारकीर्दींत जर्मनींत चोहोंकडे अव्यवस्था माजली. या कालाला "ग्रेट इंटरेग्नम्" [महा–अराजक ]असें म्हणतात. साम्राज्याची विसकटलेली घडी पुन्हां बसविणें अशक्य होऊन स्वतंत्र राज्यें झपाट्यानें निर्माण होऊं लागलीं. रुडॉल्फनें परिस्थिति ओळखून आचरण केलें. त्यानें इतालीकरितां झगडणें सोडून देऊन स्वतःचें घराणें पुढें आणण्याचें धोरण सुरू केलें. हें धोरण त्याच्या वंशजांनीं फार चांगल्या तऱ्हेनें पुढें चालविलें. याच वेळेस नेपल्समध्यें आंजु व सिसलींत अरागॉन हीं घराणीं उदयास आलीं. रुडॉल्फनें ऑस्ट्रिया, स्टिरिआ, कारिन्थिआ, कारनिओला जिंकून व्हिएन्ना या शहरीं आपली राजधानी नेली. त्यानें स्थापिलेल्या या राज्याचें महत्त्व यूरोपच्या इतिहासांत फार मोठें आहे. जरी या ( हॅप्सबर्ग ) घराण्याचे पुरुष कित्येक वर्षे साम्राज्यपदावर आरूढ झाले नाहींत तरी त्यांनीं आपलें राज्य वाढविण्याची आलेली संधी कधींहि व्यर्थ दवडली नाहीं. इ. स. च्या १४ व्या शतकांत साम्राज्याचा ऱ्हास फार झपाट्यानें झाला. याच वेळेस स्वित्झर्लंड स्वतंत्र झाला. साम्राज्याची विसकटलेली घडी पुन्हां बसविण्याचा प्रयत्न लक्सेंबर्ग येथील चार्लसनें केला. त्यानें एक गोल्डन बुल नांवानें ओळखला जाणारा शासनलेख काढून साम्राज्याचे भाग ठरवून स्वतंत्र होऊं पाहणाऱ्या राजेलोकांस आपल्या सत्तेखालीं आणलें; परंतु त्याच्या अकालीं मृत्यूनें तें काम अर्धवट राहिलें. पुढें त्याच्या मुलाला तें काम झेंपलें नाहीं. याप्रमाणें पुन्हां साम्राज्याचा ऱ्हास होण्यास सुरवात झाली.

**पोपच्या सत्तेचा ऱ्हास.**—पंधराव्या शतकाच्या आरंभीं पोपच्या सत्तेस उतरती कळा लागली. अंतःकलह सुरू होऊन अव्हिग्नन येथें पोपची एक नवीन गादी स्थापन झाली. आतां लोकांत पोपविषयीं असलेली पूज्यता कमी झाली. राष्ट्रभावना व वैशिष्ट्याची कल्पना ही वाढत चालल्यामुळें राज्यविस्ताराकरितां लढाया सुरू होऊन लोकांचीं मनें ऐहिक बाबतीकडे जास्त लागलीं. याच वेळेस

वुइक्लिफ व हुस हे पुढें येऊन त्यांनीं पोपच्या धोरणांतील दोष दाखविले.

**हॅप्सबर्ग घराण्यांत साम्राज्यपद.**—इ. स. १४१९ या वर्षी सिजिसमंड हा बादशहा झाला. यानें कॉन्स्टन्स येथें एक मोठी सभा भरवून भांडणें मिटविण्याचा प्रयत्न केला. याशिवाय यानें बोहिमियन लोकांचें बंड मोडलें. सिजिसमंड हा इ. स. १४३७ या वर्षी मरण पावला. येथून साम्राज्याच्या इतिहासांत एक नवीनच युग सुरू झालें. आतां साम्राज्याचें पद हॅप्सबर्ग घराण्यांत गेलें. हॅप्सबर्ग घराण्यांतील पहिला राजा अलबर्ट यानें १४३८—४० पर्यंत राज्य केलें. दुसऱ्या फ्रेडरीकपासून ( १४४०—१४९३ ) साम्राज्याची गादी हॅप्सबर्ग घराण्यांत परंपरागत झाली.

**कॉन्स्टन्टिनोपलचा महंमदीयांकडून पाडाव.**—पुढें जॉन [ ६ वा ] या बादशहाच्या कारकीर्दीत कॉन्स्टंटिनोपल मुसलमानांच्या हातांत गेलें. या वेळेस पश्चिम यूरोप आपापसांतील भांडणांत गर्क होता. तेथील राजांनां स्वार्थापुढें दुसरें कोणतेंहि ध्येय राहिलें नव्हतें. म्हणून कॉन्स्टंटिनोपलच्या संरक्षणासाठीं यूरोपांतील राष्ट्रांनीं कांहींहि प्रयत्न केला नाहीं. आतां यूरोपच्या भूमीवर आशियामधील राष्ट्राची स्थापना झाली. या पौरस्त्य राष्ट्राच्या संस्कृतींत व यूरोपच्या संस्कृतींत जमीनअस्मानचें अंतर होतें. याशिवाय हें परकी राष्ट्र असल्यामुळें केवळ विस्तारानेंच याचा टिकाव लागणें शक्य होतें. यूरोपांतील सर्व राज्यें जर एक झालीं असतीं तर यूरोपांत या परकी सत्तेची वाढ होणेंच अशक्य होतें. परंतु निरनिराळ्या राजसत्तांच्या स्वार्थांधतेमुळें तसें होणें त्या वेळेस अशक्य होतें. बाल्कन द्वीपकल्पांतून तुर्की सत्तेला घालवून देण्यापेक्षां जर्मनीमध्यें आपली सत्ता प्रबल करणें हेंच त्यावेळच्या रोमन साम्राज्याच्या अधिपतीस जास्त महत्त्वाचें वाटलें. फ्रान्स देश नुकताच १०० वर्षांच्या युद्धांतून मोकळा झाला होता. व तेथील राजा लुइ [ ९ वा ] हा सरंजामी राज्यपद्धति नाहींशी करून एकसत्ताक राज्य स्थापण्याच्या कामास लागला होता. इतालींत इतकी अव्यवस्था माजली होती कीं, कोणत्याहि कामाकरितां एक होणें तिला अशक्य होतें. स्पेन मूर लोकांनां हांकलून देण्यांत गुंग झाला होता. बाल्कन द्वीपकल्पांतील राज्यांत अंतःकलह सुरू होते. या अशा परिस्थितींत तुर्की साम्राज्याला यूरोपच्या भूमीवर आपली सत्ता स्थापन करून जर्मनीच्या सरहद्दीपर्यंत येऊन भिडणें सोपें गेलें. याच वेळेस हॅप्सबर्ग घराण्याची सत्ता दृढ झाली. इ. स. १४७७ यावर्षी मॅक्सिमिलेनचें [ सम्राट पुत्र ] बर्गंडीची डचेस व चार्लस दि बोल्डच्या राज्याची वारसदारीण जी मेरी तिच्याशीं लग्न केलें. या लग्नानें मॅक्सिमिलनला फ्रान्समधील कॉन्टे व नेदरलंड हे प्रांत मिळाले. निरनिराळ्या राजघराण्यांतील मुलींशीं लग्नें करून हॅप्सबर्ग घराण्यानें आपली सत्ता वाढविली. ही ऑस्ट्रियाची राज्य वाढविण्याची पद्धत त्या वेळेस त्याला फार उपयोगी पडली. याच वेळेस इंग्लंड, फ्रान्स व स्पेन या देशांत सरंजामी राज्यपद्धतीचा नाश होऊन राजसत्ता कायम झाली.

**यूरोपीय मध्ययुगाची अखेर.**—यानंतर लवकरच हें मध्ययुग संपून अर्वाचीन युगाला उदय झाला. मुद्रण कलेचा शोध लागला, अमेरिका खंड ज्ञात झालें, हिंदुस्थानला जाणारा निराळा मार्ग सांपडला व विद्येच्या पुनरुज्जीवनाची चळवळ जोरानें सुरू झाली. ही चळवळ प्रथम इतालींत झाली. यामुळें ग्रीस व रोम यांच्या संस्कृतीची लोकांत अतिशय अभिरुचि उत्पन्न झाली. चित्रकला व मूर्ति खोदण्याची कला यांत फार प्रगति झाली. विद्येचा प्रसार फार जारीनें झाला, पुराणमतावर टीका करण्याकडे लोकांची प्रवृत्ति होऊं लागली, व पुढें होणाऱ्या धर्मक्रांतीकरितां लोकांचीं मनें तयार झालीं.

**नवयुगास आरंभ.**—वास्को डि गामानें हिंदुस्थानचा नवीन मार्ग शोधून काढला व कोलंबसानें अमेरिकेचा पत्ता लावला या दोहोंचे परिणाम जगावर अनेक तऱ्हेचे झाले. ते अजमावयाचे म्हणजे जुन्या व नवीन जगाच्या इतिहासाची संगति लावावयाची. पश्चिमेकडे यूरोपीयांनीं ज्या वसाहती केल्या त्यांचे यूरोपावर अनेक परिणाम झाले. धाडशी, द्रव्यलोभी, जगास त्रासलेले आणि आपल्या स्वातंत्र्यासाठीं स्वदेशत्याग करण्यास तयार अशा विविध प्रकृतींच्या लोकांनीं नवीन जगाची वसाहत केली आणि अमेरिका व हिंदुस्थानमार्ग या तऱ्हेच्या फलांमुळें भौगोलिक शोधांस महत्त्व प्राप्त होऊन नवीन नवीन प्रदेश शोधण्याची इच्छा राष्ट्रांमध्यें जागृत झाली आणि जगाचे सर्व भाग शोधण्याकडे बराच परिश्रम झाला. त्याचा इतिहास मागें दिलेल्या भौगोलिक शोधांच्या प्रकरणांत दिलाच आहे. त्या वेळेस भौतिक शक्तीचा उपयोग करण्याचें ज्ञान लोकांस प्राप्त झालें नव्हतें. आणि यामुळें उत्पादन व विनिमय हीं देखील लहान प्रमाणांत होतीं. त्या वेळच्या प्रगमनशील यूरोपचें समाजस्वरूप सध्याच्या हिंदुस्थानच्या मागसलेल्या भागापेक्षां फारसें भिन्न नसावें. त्यावेळेस कलाहि फारच कनिष्ठ स्थितींत असावी, आणि संसारमंडनशास्त्र देखील बरेंच कनिष्ठ प्रतीचें असावें. त्या वेळेस इंग्लंडमध्यें लोखंडाचे कारखाने किंवा कापसाच्या गिरण्या नव्हत्या व हिंदुस्थानांतील तलम माल नवीनच लोकांस ठाऊक होत होता. नाटकांमध्यें देखील इंग्लंडमध्यें आजच्यासारखीं सीनसीनरी नव्हती. आणि हार्मनीचा विकास करणारे संगीत शास्त्रज्ञ पुढें आले नव्हते. चहा, काफी, कोको यासारखीं पेयें नव्हतीं, तंबाखु नव्हती म्हणजे धूमपानहि नव्हतें. भुइमूग, रताळीं व बटाटे ठाऊक नव्हते. भोजन रुचिकर करण्यास लागणारे मसाले यूरोपीयांस ठाऊक नव्हते. नाटकांमध्यें बायकांचे काम पुरुषच करीत त्यामुळें देखण्या नटींचाहि समाजाला परिचय नव्हता. चित्रकला थोडीबहुत वाढली होती आणि

शेक्सपियर अजून झाला नव्हता व नाट्यलेखनहि होतांच होत होतें. दुसऱ्या रिचर्डच्या कारकीर्दीत ( १३९० ) इंग्लंडमध्यें चार्टर देऊन एक कंपनी स्थापन झाली होती. परंतु ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना १६०० साली झाली. म्हणजे कंपनीचें स्वरूप अजून यूरोपांत फारसें परिचित झालें नव्हतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. रिचर्डच्या काळापासून ईस्ट इंडिया कंपनीच्या काळ पर्यंत संयुक्त भांडवलावर व्यापार करणारे संघ असलेच तर ते याज्ञवल्क्यानें उल्लेखिलेल्या व नियम दिलेल्या संघांपेक्षां अधिक व्यवस्थित असतील असें वाटत नाहीं. संयुक्त भांडवलावर व्यापार करणें त्या वेळेस ज्या अर्थी फारसें परिचित नव्हतें त्या अर्थी उत्पादन आणि क्रयविक्रय हीं देखील कनिष्ठ स्थितींतच असलीं पाहिजेत. आणि राष्ट्रीय कर्जाचीहि कल्पना नसल्यामुळें संस्थानांची लोकोपयोगी शक्ति देखील अत्यंत नियमित होती.

मुद्रणकला यूरोपांतील लोकांस परिचित होती पण गद्याचा विकास चांगलासा झाला नव्हता. आणि वाङ्मयाचें स्वरूप १८०० च्या सुमारास जसें महाराष्ट्रांत होतें तशा तऱ्हेचें दिसतें. फरक एवढाच कीं ग्रीक संस्कृतींत उत्पन्न झालेल्या हिरोडोटस, थुसिडीडीझ, झेनोफोन यांसारख्या इतिहासलेखकांचा यूरोपीयांस परिचय होता. शास्त्रवृद्धि ही नुकतीच वर डोकें काढीत होती आणि पारमार्थिक वाङ्मय व तन्मूलक मनाचे पाश तोडून बाहेर पडली नव्हती. लढण्याची कला बरीच बाल्यावस्थेंत होती तरी तोफांचा उपयोग परिचित होता. आणि घोडेस्वारांचा उपयोग प्रथमतः शकांनीं व शकानंतर इतर लोकांनीं शिकून प्रसृत केला होता. विल्यम दि कांकररच्या वेळेस घोड्यांचा केवळ स्थानांतरास वाहनें म्हणून इंग्लंडमध्यें उपयोग होई व इंग्लिश लोक पाय उतार होऊन लढत असत. क्रेसीच्या लढाईमध्यें बंदुकीच्या दारूचा उपयोग करण्यांत आला व तो पुढें वाढला. स्पेनच्या दुसऱ्या फिलिपच्या कारकीर्दीपर्यंत जहाजें हीं देखील केवळ स्थानांतरास उपयोगी पडत, युद्धाचें उपकरण म्हणून जहाजांचा उपयोग झाला नाहीं. स्पॅनिश आरमाराचा जो इंग्रजांनीं पराभव केला त्यांतील बीज हेंच आहे कीं स्पॅनिश लोक मलवत हे स्थानांतराचें साधन समजत, तर इंग्लंडमधील लोक जहाज हें युद्धाचें साधन समजत व यामुळें दोन्ही आरमारांस भिन्न प्रकारचें शिक्षण होतें. नवीन जगाचा शोध लावल्यानंतर तेथें जीं माणसें गेलीं त्यांस राजसत्तेची परंपरा परिचित नसल्यामुळें त्यांनीं जेव्हां आपलें स्वातंत्र्य स्थापन केलें तेव्हां राजघराणें उत्पन्न न करितां वैराज्यात्मक शासनसत्ता निर्माण केली आणि त्यामुळें पुढें यूरोपामध्यें लोकराज्याची कल्पना विकसित करण्यास मदत केली. लोकराज्याचा काल म्हणजे शास्त्राधारानें नियम शोधून काढून लोकांवर नियम लादण्याचा काळ नाहींसा करून लोकांच्या संयुक्त मनानेंच शास्त्रें निर्माण करण्याचा काळ. याचे शासनशास्त्रावर व कायदेशास्त्रावर मोठाले परिणाम झाले आणि यामुळें 'रिफॉर्मेशन' नंतर पारमार्थिक मतांत फाटें फोडून जे नवीन संप्रदाय स्थापन झाले त्या संप्रदायांस जातिस्वरूप आलें नाहीं. आचारविषयक व विवाहविषयक कायदे लोकसत्ताक राज्यानें जर केले नसते तर शब्दप्रमाणावर भिस्त ठेवणाऱ्या परंतु मतांतर करूं पाहणाऱ्या शास्त्रीबावाकडून आचारविषयक व विवाहविषयक भिन्न कायदे लोकांवर लादले गेले असते.

भौगोलिक नवीन शोधांचा परिणाम भौतिकशास्त्रांच्या उपयोगाच्या शोधाइतका मोठा झाला आणि या दोहोंच्या मुळें पूर्वकालीन जगाहून अर्वाचीन जग भिन्न झालें आहे.

---

## प्रकरण १९ वें.

## यूरोपांतील लहान राष्ट्रांपासून मोठ्या राष्ट्रांचा व प्रांतिक भाषांचा विकास.

वरील प्रकरणांत सांगितलेल्या घडामोडी होत असतांच यूरोपमध्यें दुसरीहि एक महत्त्वाची क्रिया चाललेली होती. ती क्रिया म्हटली म्हणजे यूरोपखंडांत जे भिन्न भिन्न मानववंशोद्भव लोक समूह होते व भिन्न भिन्न भाषा बोलणारे संघ होते त्यांमध्यें व्यवस्थित समाजघटनेचा व राष्ट्रीय आकांक्षांचा विकास होत होता ही होय. आज आपणांस जीं मोठमोठीं बलिष्ठ राष्ट्रें यूरोपांत प्रामुख्यानें कार्य करतांना दिसतात व आज यूरोपमधील ज्या भाषांमध्यें प्रचंड ग्रंथसमूह दृष्टीस पडतात तीं राष्ट्रें व त्या भाषा यूरोपीय इतिहासाच्या मध्ययुगाच्या सुमारास अगदीं बाल्यावस्थेंत होत्या. तरी त्यांचा विकास कोण कोणत्या पायऱ्यांनीं कोणत्या कालीं होत गेला त्याचा इतिहास आपणांस समजावून घेतला पाहिजे म्हणून यूरोपीय इतिहासाचें कथासूत्र थोडावेळ बाजूस ठेऊन आपण या राष्ट्रांच्या व भाषांच्या विकासाकडे वळूं.

यूरोपच्या विकासाचा इतिहास समजून घ्यावयाचा म्हणजे आज दिसणारीं राष्ट्रें कशीं तयार झालीं आणि त्यांचा विकास कसकसा होत गेला हें समजून घ्यावयाचें. यूरोपमध्यें ख्रिस्ती शकाच्या प्रारंभाच्या सुमारास हजारों राष्ट्रस्वरूपी जाती असाव्यात कांहीं इतस्ततः संचार करणाऱ्या, कांहीं स्थानबद्ध व संस्कृतिविकासक्षम आणि कांहीं आपलें राज्य स्थापून आपल्या सत्तेचें जाळें पसरविण्यास उद्युक्त अशा दिसतात. या अनेक राष्ट्रांवर उर्फ राष्ट्रजातींवर रोमचें साम्राज्य पसरलें होतें आणि कांहीं त्याच्या बाहेर होत्या. रोमच्या साम्राज्यानें आणि रोमन ख्रिस्ती संप्रदायानें लॅटिन भाषेचा प्रसार चोहोंकडे केला. कालांतरानें रोमचें साम्राज्य म्हणजे केंद्रवर्ती शक्ति मोडकळीस आली तेव्हां स्थानिक सत्ता महत्त्व पावली. चोहोंकडचे लोक अधिकाधिक बलिष्ठ होत गेले. कांहीं ठिकाणीं लॅटिन भाषा पसरली होती परंतु

अनागरींच्या बोलीमध्यें अनेक स्थानिक फरक उत्पन्न होत गेले होते. या स्थानिक फरकांचीं कारणें दोन आहेत एक तर रोमचें साम्राज्य निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या ठिकाणीं पसरलें आणि ज्या निरनिराळ्या काळीं तें पसरलें त्या वेळेस लॅटिन भाषेचें निरनिराळें स्वरूप होतें, यामुळें निरनिराळ्या स्वरूपाच्या भाषा निरनिराळ्या ठिकाणीं स्थापन झाल्या. दुसरें फरकाचें कारण हें कीं प्रत्येक ठिकाणची भाषा तेथील देश्य जातींनीं घडविलेल्या संस्कारामुळें व नंतर होणाऱ्या दुसऱ्या भाषांच्या आघातामुळें निराळी झाली.

सध्यांच्या राष्ट्रघटनेचा इतिहास पाहिला असतां आपणांस त्यांत दोन निरनिराळ्या क्रिया आढळून येतात. एक क्रिया म्हटली म्हणजे विशिष्ट भाषेची विशिष्ट प्रदेशावर व्याप्ति व दुसरी क्रिया म्हटली म्हणजे विशिष्ट भाषेनें व्याप्त झालेल्या प्रदेशामध्यें ज्या शासनसंस्था निर्माण झाल्या असतील त्यांपैकीं एकीचा इतरांवर जय होऊन भाषाक्षेत्र आणि शासनसत्ता यांमध्यें स्थापन झालेलें जवळ जवळ ऐक्य. अर्थात राष्ट्रघटनेच्या इतिहासांत दोन मुद्द्यास महत्त्व येतें. (१) ज्यानें पुढें भाषाक्षेत्र सर्वभर व्यापलें अशा त्या भाषाक्षेत्रांतील विजयी संस्थानाचा भाषाक्षेत्र व्यापीपर्यंत झालेला इतिहास. हा राजकीय इतिहासाबरोबर दिलाच आहे. (२) पूर्वपरंपरागत भाषेपासून संबंध तुटून आजची अर्वाचीन भाषा आत्मवर्धनसंमुख झाली त्या क्रियेचा इतिहास.

यूरोपास जें तत्त्व लागू करावयाचें तेंच हिंदुस्थानाच्या इतिहासासहि अंशानें लागू करतां येईल. १० व्या शतकापर्यंत आजच्या देशी भाषांचें अस्तित्व यूरोपांतल्याप्रमाणें आपल्या कडेहि (तामिळ सोडून) दिसून येत नाहीं.

वरील विधानाची सत्यता प्रत्येक देशांतील लोक व तेथील भाषांचा इतिहास यांची संगति लावतांना स्पष्ट होते. यासाठीं यूरोपांतील प्रत्येक देशाची भाषाविषयक व लोकविषयक पहाणी करूं. भाषेचा विकास व विशेष प्रदेशाचा इतिहास यांचाहि प्रस्तुत प्रसंगी विचार होईल.

प्रत्येक देशांतील राष्ट्रीकरणाची क्रिया स्पष्ट करण्यासाठीं प्रत्येक देशांतील जनताघटकांचा व पूर्व कालीन भाषांची हिशोब घेतला पाहिजे.

इटली स्पेन पोर्तुगाल व फ्रान्स हीं सदृश भाषांची राष्ट्रें आहेत. त्याप्रमाणेंच जर्मन, स्वीड, नार्वेजिअन, डच व डेन हीं टयूटानिक वर्गांत मोडणाऱ्या सदृश भाषांची राष्ट्रें आहेत या दोहोंमधील दुवा इंग्लंड हा आहे. म्हणजे इंग्लंडची भाषा जरी मूळची टयूटानिक आहे तरी तीवर लॅटिन भाषेचा व फ्रेंच भाषेचा संस्कार बराच आहे.

साम्राज्यें जेथें स्थापन झालीं तेथें राष्ट्रीय संस्कृतिविकास बंद पडला आणि राष्ट्रीय भावना चांगली रुजली नाहीं,तथापि राष्ट्राचें पृथकत्व नष्ट झालें नाहीं तर जेव्हां जेव्हां साम्राज्य दुर्बल होऊं लागलें तेव्हां राष्ट्रीकरण जोरानें प्रदीप्त झालें. ही गोष्ट गेल्या महायुद्धांत आस्ट्रिया व रशिया या साम्राज्यांचे तुकडा झाल्यानंतर आपणांस आज डोळ्यांसमोर दिसत आहे. रोमन साम्राज्यामुळें रोमन प्रांत झाले त्यामुळें अनेक विस्कळित राष्ट्रें एका नांवानें बांधलीं गेलीं, आणि पुढें साम्राज्य दुर्बल झाल्यानंतर प्रांत राष्ट्रें होण्याच्या मार्गास लागले. हे विकासनियम पुढील प्रत्येक देशाच्या भाषा व लोक यांच्या इतिहासानें स्पष्ट होतील.

**इटालीमधील लोक व भाषा.**—सिराक्यूज येथील अंटायोकस नांवाच्या ग्रंथकाराच्या मतें इटाली हें नांव प्रथम, आज ज्या प्रदेशाला कालाब्रिया म्हणतात (ब्रुटियम द्वीपकल्पाचा दक्षिण भाग) त्या प्रदेशाला लावीत. नंतर इटालिया म्हणजे ओएनोट्रिया, इटालियन लोक म्हणजे ओएनोट्रियन लोक असा अर्थ असे. परंतु अंटायोकस व थुसिडिडीझ या इतिहासकारांच्या वेळींच इटालियामध्यें मेटापाँटमपर्यंतचा टारेंटाइन आखाताचा तटप्रदेश व लौस आणि पॉसिडोनिआ हीं आखातें अंतर्भूत झालीं म्हणजे पुढें लुकानिआ व ब्रुटिअम प्रांत या नांवाखालीं आलेल्या मुलखाला इटालिया हें नांव पडलें.

इटाली म्हणजे आल्प्स् पावेतोंचा उत्तर मुलुख घेऊन सर्व द्वीपकल्प याप्रमाणें इटालीची व्याप्ति घेतली म्हणजे या प्रदेशांत राहणाऱ्या लोकांचे दोन वर्ग पाडावे लागतात. इंडोयूरोपीय भाषा बोलणारे व तदितर. हे तदितर कोण होते हें आज निश्चित नाहीं. मात्र एट्रस्कन लोक या इतरांत होते याजबद्दल संदेह नाहीं.

एट्रस्कन लोकांची बोली व कुमी, निआपोलिस, टारेंटम या वसाहतींमधील ग्रीक बोल्या याखेरीज करून ख्रिस्तपूर्व ६०० ते २०० पावेतों इटालींत ज्या भाषा दक्षिणेकडून उत्तरेकडे जातां जातां आढळतात त्या येणेंप्रमाणें:—

१ सिसेल, २ साउथ ओस्कन व ओस्कन, ३ मेसापिअन, ४ नॉर्थ ओस्कन, ५ वोल्सिअन, ६ ईस्ट इटालिक किंवा साबेलिक, ७ लॅटिनिअन, ८ सॅबिन, ९ इगुव्हिन अ०अंब्रिअन, १० गॅलिक, ११ लिगुरिअन व १२ व्हेनेटिक.

या भाषांपैकीं बऱ्याच भाषांचें परस्पर नातें आहे. उदाहरणार्थ—वेनेटिक, ईस्ट इटालिक व मेसापिअन यांचा परस्पर संबंध आहे व या सर्व ॲड्रियाटिक भाषासंघांत येतात.

उपर्युक्त भाषा व लोक यांचा संबंध संशोधकांनीं सामान्यतः असा लाविला आहे:(१)लॅटिन ही भाषा,रोम व लाटियम येथील प्राचीन लॅबिअन लोकांची होती. हे लोक सर्व द्वीपकल्पभर एका काळीं पसरलेले असावेत. उत्तर इटालींत एट्रस्कन आणि गॅलिक स्वाऱ्या सुरू होण्यापूर्वी ज्या भाषा होत्या, त्यांजशीं लॅटिन हीं सदृश होती. (२) साबिन लोक हे उत्तरेकडील असून यांनीं दक्षिण इटलींत स्वाऱ्या करून मुलुख घेतला. यांची जी भाषा ती ओस्कन भाषा होय. (३) व्होल्सिअन व अंब्रियन या भाषा साबिन लोकांमध्येंच चालणाऱ्या भाषा होत्या.

इटाली हें नांव प्रथम द्वीपकल्पाच्या अगदीं दक्षिणेकडील भागाला लावीत. व पुढें तें लाटियम व कांपानिया यांनां लावलें गेलें. नांवाच्या या व यापेक्षां अधिक व्याप्तीची कहाणी विस्तारानें सांगणें अशक्य आहे. परंतु हें खरें कीं रोमन लोकांची सत्ता जसजशी विस्तृत होत गेली तसतशी त्या सत्तेखालीं आलेल्या मुलखाला एक नांव देण्याची जरूर अधिकाधिक भासूं लागली. लोकसत्तेच्या अखेरीपावेतों इटाली हें नांव सरकारी कागदोपत्रीं सिसल्पिन गॉल व ॲपिनाइनच्या उत्तरेकडील मुलुख खेरीज करून इतर भागाला ह्मणजे मध्य व दक्षिण भागाला लावण्यांत येत होतें. परंतु सामान्य लोकांच्या बोलण्यांत इटाली ह्मणजे आल्पसच्या पायथ्यापावेतोंचा मुलुख असाच अर्थ रूढ होता. सिसरो व सीझर यांच्या वेळीं हाच अर्थ रूढ असल्याचें कित्येक उताऱ्यांवरून दाखवितां येतें.

आगस्टस यानें इटालीचे जे राजकीय विभाग पाडले ते महत्त्वाचे आहेत. त्यानें इटालीचे ११ विभाग पाडले. कॉन्स्टंटाइनच्या वेळेपावेतों हेच विभाग मानीत. या विभागणींत पूर्वीच्या काळच्या मर्यादांनांच महत्त्व दिलेलें होतें. हे विभाग येणें प्रमाणें:—

१ लाटियम—व्होल्सी, हर्निसी, अरुन्सी यांचा मुलुख लाटियममध्यें येतो. कंपानिया व पिसेंटिनि यांतच येतात. म्हणजे टायबरच्या मुखापासून सिलावसच्या मुखापर्यंतचा जो मुलुख तो लाटियम.

२ अपुलिया व कालब्रिआ (ग्रीक लोक याला मेसापिआ अ० इआपिजिआ म्हणत), र्हिपिनी लोकांचा मुलुख (सम्नाइट लोकांपैकीं.)

३ लुकानिआ व ब्रुटिअम.

४ र्हिपिनीखेरीज बाकीचा सॅम्नाइट लोकांचा मुलुख साबिन व त्यांच्या नात्याचे फ्रेंटानी, मारुसिनी, मार्सी, पेलिग्नि, व्हेस्टिनी, इक्विकुली यांचा मुलुख.

५ पिसेनम

६ अंब्रिआ

७ एट्रुरिआ

८ गॅलिआ सिस्पादाना (सिसल्पाइन गॉलचा दक्षिण भाग).

९ लिगुरिआ.

१० व्हेनेशिआ, इस्ट्रिया, सेनोमानी.

११ गॅलिया ट्रान्सपादाना.

आगस्टसचे प्रांत आणि मागें दिलेल्या भाषा या दोहोंच्या नांवांच्या याद्या पाहिल्या म्हणजे कांहीं सामान्य नांवें आढळून येतात. उदाहरणार्थ वेनेशिया आणि वेनेटिक भाषा, ग्यालिआ आणि ग्यालिक भाषा, लाटिनिअन आणि लाटियम, लिगूरिआ व लिगूरिअन भाषा वगैरे. यावरून असें असें दिसतें कीं ज्यांचीं नांवें त्यांच्या प्रदेशाला व भाषेला मिळाली अशा लोकांनीं अगर जातींनीं विशिष्ट प्रदेश व्यापले होते.

विशिष्ट जातीनें जो देश व्यापला जाई त्या जातीचें नांव प्रदेशास चिकटे. अमेरिकेंत डाकोटा इलिनाय वगैरे नांवें विशिष्ट प्रदेशांस मिळालीं याचें कारण हेंच होय. हिंदुस्थानांत अंग, कलिंग, पौन्ड्र वगैरे नांवें विशिष्ट प्रदेशांस याच कारणानें मिळालीं. असल्या नांवांच्या पाठीमागें जातिविषयक इतिहास लपलेला आहे.

या निरनिराळ्या जाती अगर लहान राष्ट्रें यांच्या भाषा एकमेकांशीं सदृश होत्या त्यांस एट्रुस्कन भाषा तेवढी अपवाद होती. आणि त्यामुळें एका भाषेचा पगडा बसणें सोपें गेलें; व ती क्रिया झाल्यानंतर सर्वांस सारखेपणा आला. इटलीला रोमन प्रांत या नावानें जें एकत्व उत्पन्न झालें तें पुढें त्याच्या राष्ट्रीकरणास कारण झालें.

**स्पेनमधील लोक.**—आयबेरिया द्वीपकल्पांत अगदीं पूर्वकाळीं कोणते लोक राहत होते तें संशोधकांस अद्यापि नीट कळलेलें नाहीं. रोमन लोकांचा या द्वीपकल्पाशीं ख्रि. पू. ३ ऱ्या शतकांत संबंध आला. या लोकांनीं तेथें तीन जाती आढळल्याचें लिहून ठेवलें आहे. (१) आयबेरिअन लोक, पूर्व, उत्तर व दक्षिण भागांत (२) केल्ट लोक वायव्य भागांत (३) केल्टिबेरिअन लोक मध्य भागांत. रोमन लोकांच्या सत्तास्थापनेनंतर इटालियन लोक व रोमन साम्राज्य लयास गेल्यानंतर जर्मन सत्ताधीश झाले तेव्हां जर्मन लोक स्पेनमध्यें वस्तीला आले. वसाहतीला आलेल्यांची संख्या मात्र अजमासानेंहि सांगतां येणें शक्य नाहीं.

फीनिशिअन लोक व्यापारी या नात्यानें ख्रि. पू. ११ व्या शतकापासूनच स्पेनमध्यें येऊं लागले. कार्थेज हें जें आफ्रिकाखंडांतील मोठें फिनिशियन नगर त्याच्या भरभराटीच्या वेळीं फिनिशियन लोकांचा स्पेनमधील व्यापार भरभराटींत आला.

रोमन लोकांचा डोळा स्पेनमधील लोकांवर व खाणींवर होताच. कार्थेजचा पाडाव रोमनें केला. त्यांनीं स्पेन हळूहळू जिंकलें. रोमचें राज्य स्पेनवर कमी अधिक प्रमाणांत ख्रि. पू. २०० ते इ. स. ४०६ पावेतों होतें. रोमन संस्कृति बऱ्याच स्पॅनिश लोकांनीं हळूहळू पत्करली (ख्रि. ७०–७४). या काळांत म्हणजे सिसरो व सीझर यांच्या वेळीं स्पेनच्या दक्षिण भागानें तरी रोमन संस्कृति आपलीशी केली होती. त्यांची बोली, त्यांचें वाङ्मय, त्यांच्या देवता, बहुतांशी इटालियन झाल्या होत्या. रोमन राज्याच्या काळांत रोमन स्पॅनिश वाङ्मय पुष्कळ तयार झालें. पुष्कळ रोमन ग्रंथकार स्पॅनिअर्ड होते. उदाहरणार्थ सेनेका, लुकन वगैरे.

रोमन राज्याचा नाश व्हँडाल, सुएबी, अलन या रानटी जातींनीं केला. व्हिसिगॉथ लोक रोमन लोकांचे मित्र म्हणून आले (इ. स. ४१२). ५८६–६०१ या काळांत स्पेनच्या राज्यांत ख्रिस्ती धर्म हा राजधर्म म्हणून स्थापण्यांत आला.

मुसुलमानांनीं ७११ त स्पेनवर स्वारी करून तो देश जिंकला. या मुसुलमानांत अरब, सीरियन व बर्बर जाती होत्या. यांच्या अमदानींत पुष्कळ लोक नांवाचे मुसुलमान झाले. पुष्कळांनीं डोईपट्टी देऊन आपला पूर्वीचा धर्म राखला. सरासरीनें १२५० पावेतों मुसुलमानी सत्ता स्पेनमध्यें कमी अधिक प्रमाणांत होती. यानंतर फक्त ग्रेनाडांत मुसुलमान वस्ती राहिली.

ज्यू लोकांचीहि वस्ती स्पेनमध्यें पुष्कळ होती.

येणेंप्रमाणें आजच्या स्पॅनिश लोकांच्या रक्ताचा इतिहास सांगतां येईल. पोर्तुगीज जनतेचे घटकहि जवळजवळ या प्रमाणेंच आहेत.

**पोर्तुगीज लोक.**—पोर्तुगीज लोक हे पुष्कळ जातींचे घटक एकत्र होऊन बनलेले आहेत. आयबेरियन लोक हे पोर्तुगीजांचे अगदीं मूळचे पूर्वज होत. उत्तर पोर्तुगालमधील शेतकरी वर्ग व थोडा फार इतरत्रचाहि शेतकरी वर्ग स्वभावानें, शरीरबलानें, व भाषेनें गॅलिशियन व अस्तुरिअन स्पॅनिअर्ड लोकांशीं निकट बांधलेला आहे. उत्तरेकडील पोर्तुगीज लोक गॅलिशिअन व अस्तुरिअन हे स्पॅनिश वंशांतील शुद्ध कुळांचे प्रतिनिधिभूत लोक होत. कार्थेजिनिअन लोक वसाहतीला आले त्यांच्याशीं वरील लोकांचा विवाहसंबंध सर्वांत अगोदर होऊं लागला. कार्थेजिनिअन लोकांमागून ग्रीक लोक वस्तीला आले. यांची संख्या थोडी होती. यांजपासून मिळालेले असे कांहीं गुण पोर्तुगीज लोकांत आहेत अशी कांहीं लोकांची कल्पना आहे ती चुकीची वाटते. रोमन लोकांकडून पोर्तुगालला त्याची आजची भाषा व आजची संस्कृति प्रथमतः प्राप्त झाली. प्युनिक युद्धानंतर रोमच्या वरिष्ठ सत्तेला ६ शतकें पावेतों विशेष धक्का बसला नाहीं व त्याच्या संस्कृतीची छाप अव्याहत राहिली. तरी पण पोर्तुगीज लोकांच्या मूळ स्वभावांत अथवा शरीरघटनेंत या रोमन लोकांच्या नात्यानें विशेष फरक घडून आला असें म्हणवत नाहीं. या बाबतींत सएविक व व्हिसिगॉथिक सत्ताकाळांत म्हणण्यासारखे टिकाऊ परिणाम झाले. उत्तर भागांत हे परिणाम विशेष दिसतात. इ. स. ७११ नंतर अरब व बर्बर लोकांच्या म्हणजे मूर लोकांच्या वचस्वाचा काळ लागतो. टेगस नदीच्या दक्षिणेकडे मूर लोकांचें वर्चस्व सर्वांत अधिक होतें. अलेम्तेजो, अल्गार्व्हे या ठिकाणीं अरब व बर्बर नमुन्याचे लोक पुष्कळ सांपडतात. तसेंच इमारती कलाकुसरीचीं कामें व भाषा यांची तपासणी करतां अरब व बर्बर जातींचें कार्य या बाबतींत सर्वत्र दिसून येतें: मूर लोकांचा बौद्धिक विजय इतका पूर्ण व दूरगामी झाला कीं, मोझॅरॅबिक नांवाची एक स्वतंत्र जातच उत्पन्न झाली; व ती अशी होती कीं, तिचें रक्त पोर्तुगीज, तिचा उपासनामार्ग ख्रिस्ती, पण तिची भाषा व चालरीत अरबी. मुसुलमानांचा विशिष्टतासूचक सुंताविधि देखील पुष्कळ मोझॅरॅबिक लोकांनीं उचलला. मुसुलमानांच्या राज्यांत धर्मसहिष्णुता वसत असल्यानें पोर्तुगीज यहुदी लोकांना यूरोपांत इतरत्र कोठेंहि कोणाला मिळवितां आली नाहीं इतकी संपत्ति व संस्कृति मिळवितां आली. या मुसुलमानी काळांत तसेंच पहिला इम्यनुएल (१४९५-१५२१) यानें त्यांना जबरदस्तीनें धर्मांतर करावयास लावल्यानंतर यहुदी लोकांचीं ख्रिस्ती लोकांशीं लग्नें झालीं. याप्रमाणें यहुदी रक्त पोर्तुगीज रक्तांत मिश्रित झालें. १४५० सालानंतर आफ्रिकन गुलाम पोर्तुगालमध्यें आणूं लागले. या गुलामांची संख्या फार मोठी असे. यामुळें पोर्तुगालमध्यें त्यांच्या वस्तीनें आणखी एकं वंशाचें रक्त पसरलें. मध्य व दक्षिण पोर्तुगालमध्यें नीग्रो नमुन्याचे लोक पुष्कळ सांपडतात. यूरोपीय जातींना श्वेतेतर लोकांशीं मिसळून राहण्याचा प्रसंग वारंवार आलेला आहे. अशा प्रसंगीं सर्व यूरोपीय जातींत पोर्तुगीज लोकांनीं व त्यांच्या ब्रेझिलमध्यें गेलेल्या नातेवाइकांनीं सर्वांत अधिक यशस्वितेनें वेळ निभावलेली आहे. दोन्ही देशांत परस्पर विवाह सुरू करून ते निष्प्रतिबंध रीतीनें चालू ठेवण्याचा तोड पोर्तुगीज लोकांनीं स्वीकारली. या मिश्र विवाहांपासून झालेली प्रजा इतर अशा प्रकारच्या बहुतेक प्रजेहून शीलानें व बुद्धीनें श्रेष्ठ असते असा अनुभव आहे.

**स्पेनमधील भाषा.**—आयबेरिअन द्वीपकल्पांत अनेक भाषा चालतात. बास्क लोक वायव्येच्या भागांत आहेत त्यांची स्वतंत्र भाषा आहे. याखेरीज तीन रोमान्स भाषा या द्वीपकल्पांत चालतात.

रोमान्स भाषा.–(१) पोर्तुगीज गॅलाशिअन ही लिओंचा कांहीं भाग, पोर्तुगाल व गॅलिशिया येथें चालते. (२) कॅस्टिलिअन उत्तर, दक्षिण व मध्य प्रदेश येथें म्हणजे द्वीपकल्पाच्या एकंदर दोनतृतीयांश भागांत चालते (३) कॅटालन पूर्व व आग्नेय दिशेच्या बऱ्याच मोठ्या पट्टींत चालते.

इटालींतील रोमान्स भाषा परस्परांपासून जितक्या वेगळ्या आहेत त्यापेक्षां या तीन भाषा परस्परांपासून फारच अधिक प्रमाणांत भिन्न आहेत. त्यांचा एकत्र प्रचार असा कोणत्याहि प्रांतांत नाहीं. एका विभागांत एक तर दुसऱ्यांत दुसरी अशा रीतीनें यांचा प्रचार आहे. या भाषा म्हणजे नागर अथवा सामान्य (व्हलगर) लॅटिनचे प्रकार होत. सामान्य लॅटिनचेच प्रकार स्पेनमध्यें विशेष प्रचारांत आले व हे प्रकार वरील प्रमाणें झाले यांचें कारण स्पेनमधील राजकीय घडामोडी होत. ९व्या शतकापासून पुढें मुसुलमानांपासून स्पेन देश हळूहळू जिंकला गेला. पिरनीजमध्यें ख्रिस्ती लोक अरब लोकांच्या स्वाऱ्यांस भिऊन पळाले होते ते हळूहळू स्पेनच्या मध्यप्रदेशांत व दक्षिणप्रदेशांत परत आले व त्यांजबरोबर त्यांची लॅटिन भाषा आली.

कॅटालन—जेरोना, बार्सिलोना, तारागोना, व लेरिडा (जुनें नांव कॅटालोनिया.) कॅस्टेलान, दलाझाना, व्हॅलेन्शिया व आलिकांट (जुनें व्हॅलेन्शियाचें राज्य), बालिआरिक बेटें (भूमध्य समुद्र) याठिकाणीं कॅटालन भाषा चालते. दक्षिण

फ्रान्सच्या रोमान्स भाषेच्या पोटांत कॅटालन भाषा येते. ही स्पेनच्या रोमान्स भाषांपैकीं नव्हे. अरबांची सत्ता झाल्यावर जे हिस्पानी लोक लँग्वडॉकमध्यें गेले होते व ८९ व्या शतकांत परत येऊन आपल्या मूळच्या मुलखांत राहिले. त्यांनीं आपणांबरोबर आणलेली ती ही कॅटालन भाषा होय. पिरिनीज पलीकडील दोन फ्रेंच प्रांतांत ( रूसिलॉन व सर्डान्ये या प्रांतांत )हीच भाषा चालते. यावरून वरील अनुमान दृढ होतें. ९ते१२शतकांत कॅटॉलोनियांत ही भाषा पसरली. १२२९ त जेम एल कांक्विस्टा डार यानें ही भाषा मेजोर्का येथें आणली व याच राजाच्या द्वारां ती व्हॅलेन्शिआला गेली. मर्शियांत देखील सन१२६६सालीं कॅटालन लोकांनीं वस्ती केली परंतु कॅस्टिलियन लोकांच्याच सत्तेखालीं हा प्रांत वस्तुतः मोडत असल्यानें तेथें कॅस्टिलिअन भाषेनें इतर भाषा आत्मसात् करून आपलें वर्चस्व स्थापिलें. कॅटालन भाषेच्या मुलखाची दक्षिण सीमा सेगुरा नदी व पश्चिम सीमा स्पेनची सरहद्द आहे. ११३७ सालीं ॲरॅगॉन व बार्सिलोना यांचा ऐक्याचा तह झाला त्याअन्वयें ॲरॅगॉनच्या राज्यकारभारांत कॅटालन भाषा शिरली. ॲरॅगॉनची सत्ता सिसिली, नेपल्स, कॉर्सिका, सार्डिनिआ या ठिकाणीं स्थापन झाली तशी कॅटालन भाषाहि तेथें गेली परंतु राज्यकारभाराखेरीज व जेत्यांच्या व्यवहाराखेरीज इतरत्र तिचा प्रचार न झाल्यानें आतां ती सार्डिनियांतील आल्घेरोखेरीज कोणत्याहि ठिकाणीं अस्तित्वांत नाहीं.

**कास्टिलिअन.**—मध्य स्पेन सर्व आणि सोळाव्या शतकापासून स्पॅनिअर्ड लोकांनीं आशिया व अमेरिकाखंडांत वसाहती केलेला मुलुख यांजमध्यें ही भाषा चालते. स्पेनचें जें सामान्य लोकांचें अथवा अनागर लॅटिन त्याची एक शाखा कास्टिलिअन व दुसरी पोर्तुगीज—गॅलिशिअन हिस्पानिक रोमनमधून या दोन भाषा निघाल्या व तिसरी कॅटलान ही गॅलोरोमनमधून निघाली. इटालिअन जितकी लॅटिनच्या जवळ आहे तितकीच कास्टिलिअनहि कांहीं बाबतींत लॅटिनच्या जवळ आहे. इतर बाबतींत ती प्राव्हेन्शल भाषेइतकी दूर गेलेली आहे. हिच्या पोटभाषा अस्तुरिअन, नव्हारीज—ॲरागोनीज, अँडालुशिअन, लिओनीज या आहेत.

**पोर्तुगीज भाषा.**—स्पेनच्या लॅटिनची दुसरी शाखा म्हणजे पोर्तुगीज गॅलिशिअन. या शाखेमध्यें पोर्तुगाल व आफ्रिका, अमेरिका, आशिया येथील पोर्तुगीज वसाहती या ठिकाणीं बोलली जाणारी पोर्तुगीज भाषा व जुन्या गॅलिशियाच्या राज्याची (सध्यांचे पॅनेव्हेला, लाकोरूना, ओरेन्स व लुगो हे प्रांत ) व जुन्या लिऑं राज्याचा कांहीं भाग, (विएर्झो प्रदेश) या ठिकाणची भाषा या येतात. कॅस्टिलिअनप्रमाणें पोर्तुगीज ही वाङ्मयाची भाषा आहे. १२ व्या शतकांत पोर्तुगीज राष्ट्र निर्माण झालें तेव्हांपासून त्यांचें वाङ्मय या भाषेंत रचिलें जात आहे. गॅलिशिअन अथवा गलगो ही कॅटालनपेक्षांहि कमी महत्त्वाची आहे. गॅलिशिअन बोलणारे स्पॅनिअर्ड लोक १८,००,००० व कॅटालन बोलणारे ३५,००,००० आहेत. गॅलिशिअनच्या ऐवजीं कॅस्टिलिअन भाषेचा उपयोग ग्रंथरचनेच्या कामीं होऊं लागल्यानें गॅलिशिअन ही एक स्थानिक बोली होऊन बसली आहे. पोर्तुगीज ही लॅटिनपासून कॅस्टिलिअनपेक्षांहि दूर गेलेली आहे. तरी पण तिच्यांत लॅटिन शब्द पुष्कळच राखलेले आहेत, व तिचे क्रियापद—प्रयोगहि बहुतांशीं लॅटिनच ठेविले आहेत. ती बऱ्याच बाबतींत फ्रेंच भाषेसारखी आहे. तिच्यांतील लॅटिन शब्दांमुळें व प्रयोगांमुळें कॅस्टिलिअनपेक्षां पोर्तुगीज भाषा अधिक जुन्या स्वरूपाची वाटते.

**फ्रान्समधील लोक.**—गॉलचे अगदीं पहिले रहिवासी कोण हें नक्की समजण्यास मार्ग नाहीं. भाषाभिज्ञ, पुराणवस्तुशास्त्रज्ञ, मानववंशशास्त्रज्ञ या जुन्या रहिवाशांविषयीं माहिती काढण्याचा यत्न करीत आहेत. एवढें खरें कीं, या प्राचीन जातींना इतर जातींनीं जिंकलें असलें तरी त्यांचा कांहीं सर्वस्वी नायनाट झाला नाहीं. त्यांचें रक्त आजच्या फ्रेंच लोकांत आहे. या जातींचे अवशेष कृतिरूपानें डोंगरांतून खोदलेल्या लेण्यांत व तेथील चित्रांत, स्मशानांतून मिळणाऱ्या शस्त्रांत व भूषणांत वगैरे आजहि मिळतात. आयबेरिअन व लिगुरिअन हे लोक या वरील जातीनंतरचे. यांजबद्दलची माहिती मिळते. पिरीनीज पर्वताच्या दोन्ही बाजूंनां राहणारे बास्क लोक हे आयबेरिअन जातीचे होत. लिगुरिअन लोक हे उत्तर इटाली व फ्रान्सचा आग्नेय व मध्यप्रदेश यांत वस्ती केलेला इंडो यूरोपियांचा जो समूह त्याचे वंशज असावे. ख्रि. पू. ७ व्या शतकांत या लिगुरिअनांनीं मार्सेलस शहरीं फिनिशियन लोक आले त्यांस वस्तीस जागा दिली. या लिगुरिअन व आयबेरिअन पूर्व वस्तींवर पुढें गॉल अथवा केल्ट लोकांनीं विजय मिळवून आपली छाप बसविली. आणि यानंतर रोमन राज्य या ठिकाणीं झालें. ख्रि. पू. ६ व्या शतकांत केल्ट लोक डान्यूबपासून निघाले व त्यांनीं हळू हळू जिब्राल्टरपर्यंतचा मुलुख व्यापला पुढें एक दीड शतकानें उत्तरेकडून बेल्जीलोक व दक्षिणेकडून आयबेरिअन लोक यांच्या स्वाऱ्या होऊं लागून केल्ट राज्य हळू हळू अस्तंगत झालें व रोमन लोकांनां या ठिकाणीं सत्ता प्राप्त झाली.

'सीझरच्या 'कॉमेंटरीज' मध्यें गारोनच्या दक्षिणेस ॲक्विटानिअन लोक, गारोनपासून सीन व मार्नपर्यंत केल्ट लोक, व सीनपासून ऱ्हाइनपर्यंत बेल्जी लोक होते असें वर्णन आहे. या तीन जातींच्या नांवाखालीं येणाऱ्या अर्धगली जाती पुष्कळच होत्या.यांच्या भाषा व चालीरीती भिन्न होत्या. ( पृ. ११–१९ पहा )

रोमन राज्य असतां केव्हां किम्ब्रि व ट्यूटॉन तर केव्हां व्हेकाटिस वगैरे रानटी लोकांच्या स्वाऱ्या गॉलवर होत होत्या.

इ.स. च्या ५व्या शतकाच्या आरंभास रोमन साम्राज्यास उतरती कळा लागून त्या शतकाच्या अखेरीपावेतों तें लयास गेलें. या अवधींत फ्रान्समध्यें ज्या रानटी जाती वस्तीस आल्या त्या काळ्या समुद्राच्या आसमंतादागांतील व्हँडाल लोक व ॲलनी लोक,जर्मन लोक, व्हिसिगॉथ लोक, जर्मनींतील फ्रँक, ऱ्हाइनवरचे रिपुऍरियन, सेलियन ,वगैरे. रोमन साम्राज्याच्या लयानंतर शार्लमानच्या वेळेपर्यंत नव्या जातींशीं फ्रान्सचा संबंध आला नाहीं: शार्लमानच्या वेळीं ( ७६८–८१४ ) स्पेनमधील मुसुलमान, हंगेरीचे अव्हार, स्लाव्ह लोक, डेनलोक या सर्वांचा फ्रान्सशीं संबंध आला.व या सर्वांच्या मिश्रणानें हल्लींची फ्रान्सची लोकवस्ती बनलेली आहे.

**फ्रेंच भाषा.**—फ्रेंच हें रोमानिक पोटभाषांपैकीं एका भाषासमूहाचें नांव आहे.उत्तर गॉलचें फ्रेंच हें आधुनिक लॅटिन होय. फ्रेंच हें नांव संकुचित अर्थानें पॅरिसच्या भाषेला लावतात. जी आजकाल सुशिक्षित लोक बोलतात ती व फ्रान्सच्या वाङ्मयाची जी पॅरिस शहरांत प्रचारांत असणारी भाषा ती फ्रेंच भाषा. परंतु विस्तृत अर्थानें लोरेन धरून उत्तर फ्रान्स देश व बेल्जम आणि स्वित्झरलंड यांचे कांहीं भाग येथें बोलली जाणारी जी देश्यभाषा तिला फ्रेंच म्हणतात.

या भाषेच्या प्रदेशाच्या सीमा येणेंप्रमाणें—पश्चिमेस अटलांटिक महासागर व ब्रिटनी ( केल्टिक पोटभाषा ); उत्तर व वायव्य, इंग्लिश खाडी; ईशान्य व पूर्व बेल्जम, जर्मनी, स्वित्झर्लंड ( ट्यूटॉनिक पोटभाषा ); आग्नेय व दक्षिण ही सीमा स्पष्ट नाहीं. दक्षिणेकडील फ्रेंच पोटभाषा व स्वित्झरलंडच्या नैर्ऋत्य भागांतील,इटलीच्या वायव्य भागांतील, दक्षिणफ्रान्समधील उत्तर प्राव्हेन्शल पोटभाषा या दोन वर्गांच्या भाषांचे प्रदेश पूर्वी एकमेकांनां लागून होते. फ्रेंच भाषाप्रदेशाची सध्यांची आग्नेय दक्षिण सीमा म्हणजे कोठें फ्रेंच व प्राव्हेन्शल या दोहोंचे थोडथोडे अंश घेतलेल्या मध्यस्थ पोटभाषा, कोठें उत्तरचे व दक्षिणचे लोक अधिकाधिक वस्तीला राहिल्यानें बनलेल्या मिश्र पोटभाषा, तर कोठें मध्यस्थ पोटभाषा दाबून टाकून वावरणाऱ्या फ्रेंच व प्रॉव्हेन्शल पोटभाषा अशा प्रकारची आहे. ही सीमा म्हणजे पश्चिमेस जिरोंद नदीचें मुख तेथून बोर्डोवरून जवळ जवळ उत्तर दिशेकडे जाऊन अंगूलेमच्या किंचित् उत्तरेस पूर्वेकडे वळून स्वित्झरलंडमध्यें जिनीव्हाच्या उत्तर बाजूनें शिरते.

**फ्रेंच भाषेचा राजकीय इतिहास.**—रोमन लोकांच्या सत्ताविस्तारामुळें रोमची भाषा म्हणजे लॅटिन भाषा दक्षिण व पश्चिम यूरोपच्या अर्ध्याअधिक भागावर पसरली व तिनें देश्य भाषांचें स्थान हळू हळू काबीज केलें प्रथमतः सर्व साम्राज्यभर एकाच प्रकारची भाषा प्रचलित झाली. लॅटिनचे जे अनेक स्थानिक प्रकार होते ते रोम या राजधानीच्या शहरीं सुशिक्षितांकडून बोलल्या जाणाऱ्या भाषाप्रकाराच्या वर्चस्वामुळें पुष्कळसे कमी होऊन साम्राज्यांत पसरणारी भाषा जवळ जवळ एकरूप झाली होती. रोमन सैन्यविभाग जसे जागोजाग कायम वस्ती करून राहूं लागले, रोमन वसाहती जशा होऊं लागल्या, जेत्यांची भाषा देश्य लोक जसे वापरूं लागले, तसतशी ही जेत्यांची भाषा एक होती ती फुटून तिच्यांतून स्थानिक उपभाषा उत्पन्न होऊं लागल्या. या उपभाषा एकमेकींपासून वेगळ्या करून टाकणारे जे विशेष त्या त्या भाषांत आहेत त्यांचा उगम, विस्तृत प्रदेशांत एकाच जातीच्या लोकांकडून बोलल्या जाणाऱ्या भाषेंत स्थानपरत्वें जे रूपभेद, प्रयोगभेद वगैरे नेहमीं होत असतात ते केवळ प्रदेशविस्तारामुळेंच भिन्न ठिकाणीं भिन्न स्वरूपाचे होत असतात या वस्तुस्थितींत आहे. भिन्न जातींचे व राष्ट्रांचे लोक एकच लॅटिन भाषा आपापल्या ठिकाणीं आपापल्या वेड्यावाकड्या तऱ्हेनें बोलूं लागल्यामुळें एका लॅटिनमधून नाना प्रकारच्या उपभाषा निघाल्या अशी गोष्ट वरील उपभाषांसंबंधानें घडलेली नाहीं. ख्रि. पू. पहिल्या शतकाच्या मध्यापावेतों सीझरनें गॉल जिंकला नव्हता. तेव्हां तेथील लॅटिन रोमच्या लॅटिनपासून भिन्नता पावूं लागलें तें वरील मितीपावेतों लागलें नव्हतें खास. यानंतर भिन्नता बरोबर केव्हां उत्पन्न झाली हें सांगणें, सरकारी दफ्तरांत व ग्रंथलेखनांत अभिजात लॅटिन पुढें स्थानिक लोकभाषा भिन्न झाल्यानंतरहि वापरण्याचा प्रघात ठेवल्यानें दुष्कर झालें आहे. तरी पण मध्यइटालीच्या लॅटिनपासून गॉलचें लॅटिन ट्यूटन लोकांच्या सत्तास्थापनेपूर्वी भिन्न झालें होतें, म्हणजे इ. स. च्या ५ व्या शतकाच्या मध्याचे सुमारास भिन्न झालें होतें एवढें खात्रीनें सांगतां येतें. हे ट्यूटन जेते लोक आपल्या सत्तेखालीं आलेल्या सुसंस्कृत लोकांची भाषा हळू हळू वापरूं लागले. या जेत्यांच्या आगमनानें लॅटिन लोकभाषेंत शब्दांचा कमीअधिक भरणा झाला इतकेंच काय तें. इतर कोणताहि फरक या भाषेंत झाला नाहीं.

ही लोकभाषा कृत्रिम तऱ्हेनें संभाळलेली. जी ग्रंथभाषा तिजहून या ट्यूटन सत्तास्थापनेच्या वेळीं अगदीं वेगळी झालेली असून तिला भ्रष्टोच्चार लॅटिन असें म्हणण्याची सोय राहिली नव्हती. पुढें कित्येक शतकेंपावेतों जे लॅटिन दस्तऐवज सांपडतात त्यांत ग्रंथभाषेला लॅटिना व लोकभाषेला रोमॅना अशीं भिन्नत्वदर्शक नांवें आढळतात.

गॉलच्या देश्य केल्टिक भाषेला गॅलिका हें नांव असे. तें ९ व्या शतकाचे अखेरीस या केल्टिक भाषेची जिनें जागा घेतली त्या भाषेला लावलेलें सांपडतें. ब्रेटन प्रदेशांत गॅलेक म्हणजे फ्रेंच असा शब्द अद्यापिहि व्यवहारांत आहे.

गॉलमधील फ्रँक लोकांनीं आपली मूळ ट्यूटॉनिक भाषा टाकल्यानंतर तिचें फ्रान्सिस्का हें नांव त्यांनीं स्वीकारलेल्या रोमॅनिक भाषेला देण्यांत आलें व फ्रान्से हें जें आजचें फ्रेंच भाषेचें नांव तें वरील फ्रान्सिस्का या नांवाचाच अप

प्रदेश आहे. फ्रान्सिस्का हें नांव उत्तर गॉलच्या रोमॅनिक भाषेलाच लावीत. दक्षिण गॉलच्या भाषेला लावीत नसत. यावरून दक्षिणेंतील भाषा व उत्तरेंतील भाषा यांत फ्रान्सिस्का हें नांव उत्तर भाषेला लावण्याच्या काळीं स्पष्ट मतभेद उत्पन्न झाला होता असें दिसतें. फ्रेंच हा शब्द ट्यूटॉनिक आहे व रोमॅनिक भाषा आणि गॉलचे लोक यांना तो फार दिवसांपासून लावण्यांत आलेला आहे.

फ्रान्सच्या वायव्य किनाऱ्यावर स्कँडिनेव्हियन लोक दहाव्या शतकाच्या आरंभींच्या दिवसांत वस्तीस आले. त्यांची मूळ भाषा लवकरच नष्ट झाली. एवढेंच कीं त्यांच्या भाषेंतील कांहीं शब्द त्यांनीं स्वीकारलेल्या नव्या म्हणजे रोमॅनिक भाषेंत आले.

फ्रेंच भाषेच्या इतिहासांत यानंतरची महत्त्वाची गोष्ट म्हणजे पॅरिस शहराचें महत्त्व वाढल्यानें तेथील लोकभाषा ही फ्रान्समध्यें महत्त्वाची भाषा झाली. १५३९ सालीं फ्रान्सिस पहिला यानें पॅरिसच्या फ्रेंच भाषेंतच सर्व राज्याचे सरकारी कागदपत्र ठेवण्याबद्दलचा हुकुम सोडला. या सालापासून पॅरिसची फ्रेंच ही सर्व सरकारी भाषा झाली. पण अद्यापि या राज्यांतील जवळ जवळ निम्म्या लोकसंख्येला पॅरिसची भाषा अपरिचित आहे.

१०६६ सालीं वुइल्यमनें इंग्लंड जिंकल्यावर नार्मंडींतील भाषा इंग्लंडांत शिरल्या. या भाषा इंग्लंडांत एकमेकांत मिसळून गेल्या. नार्मंडीशीं इंग्लंडांतील नॉर्मन लोकांचें दळणवळण कायम राहिल्यानें यूरोपांत नॉर्मन भाषांत जे वेळोवेळीं फेरफार झाले तेहि इंग्लंडांत आले. जेते लोकांनीं इंग्लंडची भाषा शिकणें व इंग्लंडाच्या विद्वान् लोकांनीं जेत्यांची भाषा शिकणें या गोष्टींमुळें नॉर्मन भाषेंत इंग्रजीचा भाग बराच मिसळला गेला. इंग्लंडांतील नॉर्मन भाषा हळू हळू इंग्रजी भाषेंत विरून होत गेले तशी बदलूं लागली. नॉर्मंडी प्रांत १२०४ सालीं इंग्लंडच्या राजाच्या हातांतून निघाला तेव्हांपासून पुढें पॅरिसच्या फ्रेंचचें वजन इंग्लंडांत वाढलें. या निरनिराळ्या काळच्या व प्रकारच्या फ्रेंच भाषांच्या इंग्लंडांतील भेसळीला 'अँग्लोनॉर्मन' पोटभाषा असें नांव दिलें जातें. परंतु पोटभाषा या स्थितींत ही फार दिवस राहिली नाहीं. १३६२ त न्यायविषयक कामांत इंग्रजीचा प्रचार सुरू झाला. १३८५ मध्यें शाळांतहि इंग्रजी शिरलें. कोर्टाच्या निवाड्यांचे अहवाल मात्र १६०० पावेतों अँग्लोफ्रेंचमध्यें लिहिले जात होते. आज पार्लमेंटच्या कायद्यांना राजाची संमति दिली जाते तिची भाषा आजची ग्रांथिक फ्रेंच असते एवढेंच काय तें वरील फ्रेंचचें स्मारक आतां राहिलें आहे.

रोमॅनिक प्रांतभाषांत फ्रेंच ही प्रथम वेगळी म्हणून अस्तित्वांत आली. आणि ग्रंथांत वापरलेली रोमॅनिक पहिली पोटभाषा हीच होय.

**फ्रेंच भाषेच्या अंतर्गत विकासाचा इतिहास.**—हा इतिहास इंग्लंडमध्यें नार्मन लोकांनीं नेलेल्या भाषांचाच विशेषतः आहे. फ्रेंचमध्यें जो शब्दसंग्रह आहे त्यांतील मूळ भाग म्हणजे गॉलमध्यें प्रविष्ट झालेल्या लॅटिन शब्दांचा होय. हे लॅटिन शब्द बोलण्यांत असल्यानें स्वभावतः त्यांत कांहीं फेरफार होत गेले. हे फेरफार झालेले लॅटिन शब्द म्हणजेच फ्रेंच शब्द होत. यांत निरनिराळ्या काळीं साधित शब्दांची फार भर पडली. देश्यांच्या केल्टिक भाषेंतून कांहीं शब्द आले. पुष्कळसा भरणा गॉलच्या ट्यूटन जेत्यांच्या भाषेंतून आला. फ्रान्समध्यें स्कँडिनेव्हियनांची वसाहत झाली, त्या वसाहतीमुळें व उत्तर समुद्रावरील लोजर्मन लोकांशीं व्यापारी दळणवळण होतें त्यामुळेंहि कांहीं ट्यूटन शब्द आले. लोभाषा याप्रमाणें वाढ पावत असतां ग्रंथांत व सरकारी आणि धार्मिक कारभारांत लॅटिनचाच उपयोग करीत होते. त्याकारणानें या ग्रांथिक लॅटिनमधून लोकभाषेंत वेळोवेळीं बरेच अभियुक्त लॅटिन शब्द घेतले गेले. पुढें लोकभाषेचा ग्रंथांत उपयोग होऊं लागला. तेव्हां अभियुक्त लॅटिन शब्द तिच्यामध्यें मोठ्या प्रमाणांत शिरूं लागले. विद्येच्या पुनरुज्जीवनाच्या (रिनेसन्स) वेळेला हा लॅटिन शब्दांचा भरणा अतिशयच झाला. हा भरणा तदनंतर कमी झाला नाहीं तर हळू हळू वाढतच गेला आहे व त्यामुळें फ्रेंच भाषेची स्वतंत्र विकसनाची शक्ति कांहीं अंशीं मर्यादित झाली आहे. क्रूसेडर लोकांनीं पौरस्त्यांचे व इतर परकीयांचे कांहीं शब्द भाषेंत आणले. १६ व्या शतकांत युद्धें, राजघराण्यांतील विवाह व ग्रंथ यांच्या द्वारा पुष्कळसे इटालियन व स्पॅनिश शब्द आले. प्रॉव्हेन्शलमधून कित्येक शब्द आले असून पॅरिसच्या फ्रेंचमध्यें इतर पोटभाषांतूनहि बरेच शब्द घेतले गेले आहेत. जर्मन व इंग्रजी या भाषांतूनहि कांहीं शब्द आले आहेत.

**आंग्ल लोक.**—इंग्लंडांतील ठिकाणांच्या नांवांवरून ज्या तेथें रहात असलेल्या जातींची आठवण होईल त्यांचीं नांवें केल्टिक, रोमन, सॅक्सन, स्कँडिनेव्हियन, नॉर्मन हीं होत. स्मारकरूपी स्थलनामांचीं ओळीनें उदाहरणें ब्रूघॅम, वूसेस्टर, बॅम्बरो, व्हिटबि, बोल्यू अशीं देतां येतील. ब्रिटनमध्यें प्रथम कोणाची वस्ती होती याजबद्दल भूस्तरशास्त्रज्ञांचें एकमत्य नाहीं. बऱ्याच निरनिराळ्या जातींनीं ब्रिटनमध्यें स्वाऱ्या केल्या असाव्या. पूर्वीच्या स्वाऱ्यांबद्दल संदेह पुष्कळ आहे. अगदीं प्राचीन काळीं कृष्णवामनांची म्हणजे निग्रिटोंची वस्ती इंग्लंड, व स्काटलंड याचा पश्चिम भाग व आयर्लंडचा पूर्व भाग येथें होती असें अनेक संशोधक म्हणतात; पण ब्रॉन्झ युगांत गॉइडेल लोक व लोहयुगांत ब्रिथॉन व बेल्गाइ लोक येऊन त्यांनीं आपणांबरोबर केल्टिक संस्कृति व भाषा आणल्या, याबद्दल संदेह नाहीं. ब्रिटनमध्यें त्यांच्या पूर्वी रहात असलेल्या जातींचा या लोकांच्या येण्याच्या योगानें कितपत नायनाट झाला व हे लोक स्वतः कितपत केल्टिक रक्ताचे होते याजबद्दल वाद

आहे. पश्चिम यूरोपखंडाच्या केल्टिक बोलणाऱ्या लोकांची जात तीच यांची जात असावी. असें म्हणण्यास जागा आहे. जूलियस सीझर यांच्या वेळेपावेतों ब्रिटनचे लोक अगदीं उत्तरेकडील जाती वगळून भाषेनें व राहणीनें केल्ट झाले होते. ते ड्रुइड धर्मी होते. उत्तर गॉल रोमन लोकांनीं जिंकला त्या वेळेपासून (ख्रि. पू. ५७—५०) भूमध्यसमुद्र व ब्रिटन यांचा साक्षात् संबंध आला. क्लॉडिअसनें ब्रिटनचा मुलुख जिंकला [इ. स. ४३]

चवथ्या शतकांत सॅक्सन आयरिश (स्कॉटी) व पिक्ट यांच्या स्वाऱ्या ब्रिटनवर होऊं लागल्या.

पांचव्या शतकाच्या पहिल्या चरणांत ट्यूटॉनिक लोकांनीं गॉल जिंकला. तेव्हां रोमन व ब्रिटन यांचा संबंध तुटला. रोमानोब्रिटिशांना रोमहून कुमक येण्याचें बंद झालें. सॅक्सन लोकांना पिक्ट व स्कॉट लोकांशीं लढण्यासाठीं बोलाविण्यांत आलें. त्यांनीं कुमक केली व शेवटीं ते ठाणें देऊन बसले.

बीड या इतिहासकाराच्या मतें केंट व हँपशायर येथें जूट लोक एसेक्स, ससेक्स, वेसेक्स येथें सॅक्सन लोक व बाकीच्या ठिकाणीं अँगली लोक वस्ती करून राहिले.

सातव्या शतकाच्या मध्यापावेतों बाह्य लोक ब्रिटनच्या निरनिराळ्या भागांचें आक्रमण करीत होते. या जिंकलेल्या भागांत निरनिराळीं राज्यें व राजघराणीं स्थापन झालीं.

नवव्या शतकांत डेन लोकांच्या ब्रिटनवर स्वाऱ्या सुरू झाल्या.

या शतकाच्या अखेरीस डेन राजा गुथ्रम व आलफ्रेड यांजमध्यें तहनामा होऊन ईस्ट अँग्लियांत गुथ्रम स्वस्थतेनें राज्य करूं लागला.

दहाव्या शतकाच्या अखेरीला डेन स्वाऱ्या पुनः सुरू झाल्या. कॅन्यूट हा डेन राजा फार प्रसिद्ध होऊन गेला (१०१६—१०३५). २६ सप्टेंबर १०१६ रोजीं नॉर्मन लोक वुइल्यम दि कॉंकरर याच्या नेतृत्वाखालीं इंग्लंडच्या केनाऱ्यावर उतरले. वुइल्यमला नाताळाच्या दिवशीं राज्याभिषेक झाला व नॉर्मन लोकांचें लवकरच जिकडेतिकडे प्रस्थ माजलें. त्यांच्या वसाहती चोहोंकडे झाल्या. पुढें यांचें राज्य एकसारखें स्थिर व संवर्धित होत गेलें आणि त्या राज्याची स्थिरता स्थानिक भाषेच्या विकासास व राष्ट्रीकरणास उपयोगी पडली.

**इंग्लिश भाषा.**—इंग्लिश भाषा ब्रिटनची मूळ भाषा नव्हे. रोमन लोकांनीं ब्रिटन जिंकलें त्या वेळीं मूळचे लोक ज्या भाषा बोलत होते त्या सर्व इंडोयूरोपियन अथवा इंडोजर्मन भाषावंशांपैकीं केल्टिक कुलांतल्या होत्या. वेल्स, आयर्लंड स्कॉटिश हायलंड्स, आइल ऑफ मॅन, ब्रिटिनि या ठिकाणीं वरील जुन्या भाषा आधुनिक रूपांत अद्यापि कोठें कोठें चालू आहेत. ब्रिथॉनिक पोटभाषा वेल्श व कॉर्निश भाषाशीं संबद्ध असून ब्रिटनच्या अर्ध्याअधिक भागांत फोर्थ व क्लाइड-पावेतों याच पोटभाषा बोलत. त्यांच्या पलीकडे व आयर्लंड व मॅनबेटामध्यें गॉइडेलिक पोट भाषा बोलत. या दुसऱ्या भाषांचें आयरिश व स्कॉटिश गॅलिकशीं नातें आहे.

इ. स. ४३–४०९ या मुदतींत रोमन लोकांचा ब्रिटनवर ताबा होता या कारणानें लॅटिनचा ब्रिटनमध्यें प्रचार झाला. ब्रिटनचा भाषाविषयक इतिहास गॉल, स्पेन यांजसारखाच व्हावयाचा, पण ५ व्या व ६व्या शतकांत ट्यूटन लोकांनीं ब्रिटनवर स्वाऱ्या करून ताबा मिळविल्यानें निराळा प्रकार घडून आला. आंग्ल, सॅक्सन व त्यांचे स्नेही ट्यूटॉनिक कुळांतले होते. इंडोजर्मानिक (इंडोयूरोपियन) भाषावंशांतील ट्यूटॉनिक अथवा जर्मानिक कुळांपैकीं एक भाषा वरील लोक बोलत होते. हॉलंड, जर्मनी, डेन्मार्क, स्कँडिनेव्हियन द्विपकल्प आइसलंड व इंग्लंड आणि इंग्लंडच्या वसाहती या सर्व ठिकाणीं आज जी भाषा व जी लोकवस्ती आहे ती एकाच प्रकारची व जातीची आहे, म्हणजे या सर्व ठिकाणची भाषा ट्यूटन कुळापैकीं व लोकांची जात ट्यूटन आहे.

इंडोयूरोपियन भाषा बोलणारे लोक म्हणजे आर्यन लोक. यांचें मूलस्थान यूरोपांतच असावें असा एक पक्ष अलीकडे निघाला आहे. ट्यूटन लोक हे आर्यन लोकांपैकीं असून आंग्ल व सॅक्सन हे ट्यूटन अथवा जर्मानिक होते. ट्यूटन लोक कांहीं दिवस एकत्र राहून नंतर पांगले. त्यांच्या भाषेचे त्यांच्या पांगापांगीमुळें अनेक प्रकार झाले. या प्रकारांचे मोठे तीन वर्ग पडतात. हे वर्ग चवथ्या शतकांतच अस्तित्वांत आलेले दिसतात नॉर्थ जर्मानिक किंवा स्कँडिनेव्हियन, वेस्ट जर्मानिक अथवा लो आणि हाय जर्मन, व ईस्ट जर्मानिक हे ते तीन वर्ग होत.

ट्यूटॉनिक (जर्मानिक)

- नॉर्थ जर्मानिक अ० स्कँडिनेव्हिअन
- वेस्ट जर्मानिक
  - लो जर्मन
    - डच
    - फ्रिशिअन
    - ईस्ट-डश पोट भाषा
  - हाय जर्मन
    - ब्रिटनमध्यें आलेल्या आंग्ल सॅक्सन लोकांच्या भाषा
- ईस्ट जर्मानिक
  - गॉथिक अ. मोइसो—गॉथिक
    - मोएशियांतले लोक बोलत होते

ऐतिहासिक कालाच्या आरंभीं ऱ्हाइन नदी आणि वेसर नदीच्या मुखाकडच्या भागांत व मुखाच्या—आसपास तसेंच शेजारच्या बेटांत इंग्रजांचे पूर्वज जे आंग्ल व सॅक्सन लोक ते राहत असत. बीडनें केंट व आइल ऑफ वाइट येथें जूट (गीटा इटा) लोक वस्ती करून राहिले असें लिहिलें आहे. हे जूट लोक पूर्वी कोठें होते हे सांगतां येत नाहीं. जटलंडमध्यें ते होते हे म्हणणें साधार नाहीं. भाषेच्या दृष्टीनें पाहतां ते आंग्ल व ओल्ड सॅक्सन यांच्या मध्यें राहत असावे असें वाटतें.

ब्रिटनवर जे जर्मानिक लोक चढाई करून आले व ज्यांनीं ब्रिटन जिंकून तेथें राज्य स्थापलें. त्यांच्या भाषेचे अगदीं जुने नमुने घेतले तर त्यांत तीन स्पष्टपणें निराळे भाषावर्ग पडतात. ते येणें प्रमाणें:—

१ आंग्लिअन —नॉर्देंब्रिअन = उत्तरभाषा
—मर्शियन = मध्यांशभाषा

२ सॅक्सन (= वेस्ट सॅक्सन) } दक्षिण भाषा
३ कॅंटिश

बीडनें ज्या तीन जाती आंग्ल, सॅक्सन व गीट ब्रिटनमध्यें राहत होत्या म्हणून लिहिलें आहे त्या जातींच्या ह्या तीन भाषा असाव्या असें मानण्यास पुष्कळ जागा आहे. व या जाती या तीन वेगळ्या भाषा ब्रिटनमध्यें येण्यापूर्वीच बोलत असाव्या असेंहि दिसतें.

नॉर्देंब्रियाच्या एंगल अथवा आंग्ल लोकांमध्यें वाङ्मयाचा प्रथम उदय झाला व प्रथम आंग्ल किंवा इंग्लिस प्रांतभाषेंत देश्य ग्रंथरचना झाली या कारणानें लॅटिन वगैरे परकीय भाषांपासून वेगळ्या अशा ज्या देश्य भाषा त्या सर्वांनां 'इंग्लिस' भाषा असें सामान्य नांव पडलें. आंग्लनंतर वेस्ट सॅक्सन ही वाङ्मयरचनेची भाषा झाली व आंग्ल भाषा मागें पडली तरी वेस्ट सॅक्सनला 'इंग्लिस' असेंच नांव राहिलें. आज या जुन्या भाषेला ॲंग्लो—सॅक्सन म्हणतात. हें नांव १६ व्या १७ व्या शतकांतील भाषापंडितांनीं त्यांच्या वेळच्या इंग्रजीपासून आलफ्रेड व इल्फ्रिकच्या वेळचे इंग्रजी वेगळें आहे हें दर्शविण्याकरितां तें जुनें इंग्रजी ॲंग्लो सॅक्सन म्हणजे ॲंग्लोसॅक्सन लोकांचें व नवें इंग्रजी इंग्लिश असें नामकरण केलें. या पंडितांनां इंग्लिश व ॲंग्लोसॅक्सन या भाषा निराळ्या वाटत होत्या. या दोन भाषांत नातें आहे, जुनींतूनच नवी भाषा हळूहळू उदयास आली ही गोष्ट अलीकडील पंडितांनीं सिद्ध केली. जुनींतून नवी उदयास आली ती क्रमानें आली व या विकासक्रमाच्या पायऱ्या व त्याचे कालविभाग येणेंप्रमाणें.

| | |
|---|---|
| जुनें इंग्लिश अ० ॲंग्लोसॅक्सन | इ. स. ११०० पावेतों |
| सांक्रमणिक जुनें इंग्लिश (सेमिसॅक्सन) | ,, ११००–१२५० |
| आरंभींचें मध्यकाल इंग्लिश | ,, ११५०–१२५० |
| सामान्य ,, | ,, १२५०–१४०० |
| उत्तरकालीन सांक्रमणिक मध्यकाल इंग्लिश | ,, १४००–१४८५ |
| आरंभींचें आधुनिक अ० ट्यूडर इंग्लिश | ,, १४८५–१६११ |
| १७ वें शतक सांक्रमणिक आधुनिक ,, | ,, १६११–१६८८ |
| आधुनिक अथवा चालू इंग्लिश | ,, १६८९ नंतरचें |

**स्वीडनमधील लोक.**—स्वीडिश लोक हे स्कॅंडिनेव्हियन शाखेपैकीं आहेत. स्वीडनमध्यें लॅप व फिन लोकहि आहेत. पाषाण व कांस्य युगांत स्वीडनमध्यें जी वस्ती असल्याचें सिद्ध होत आहे ती, वस्ती आजच्या लोकांच्या सारखीच होती असें दिसतें. त्या जुन्या नमुन्याच्या जातीनंतर एखादी अगदीं नवी जात स्वीडनमध्यें आल्याचें दिसत नाहीं.

ऐतिहासिक उल्लेखांत स्वीडनसंबंधाचा पहिला उल्लेख टॅसिटसच्या जर्मानिया या ग्रंथांत सांपडतो. (हें पुस्तक इ. स. ९८–९९ या वर्षी प्रसिद्ध झालें.) स्कॅंडिनेव्हियन द्वीपकल्पांतील मुख्य लोक स्वीओनीज असा उल्लेख तेथें आहे. या लोकांपासूनच स्वीडन हें नांव तयार झालें. सिटोनीज नांवाची दुसरी एक जात तेथें असल्याचा उल्लेख टॅसिटसमध्यें आहे. या जातीवर एक स्त्री राज्य करीत होती असें वर्णन आहे. टॉलेमीनें गूटाइ अ० गोटार व इतर कांहीं नांवें स्वीडनमध्यें राहणाऱ्या जातींचीं म्हणून दिलीं आहेत. टॉलेमीनंतर ६ व्या शतकापावेतों स्वीडनसंबंधानें कांहींच माहिती उपलब्ध होत नाहीं. पुढें जोर्डेनीज हा गॉथिक इतिहासकार स्वीडनची बरीच माहिती देतो. स्वेअर, गोटार इत्यादि अनेक जातींचा तो उल्लेख करतो. या जातींवरून पडलेलीं नांवें अद्यापिहि निरनिराळ्या जिल्ह्यांनां आहेत. बिर्जि गौटी, फिन व्हिनोव्हीं, रेरेफेनी या जातींचा उल्लेख जोर्डेनीजमध्यें येतो. प्रोकोपिअस हा जोर्डेनीजचा समकालीन इतिहासकार स्क्रिथेफिनोई व गोटार (गूटाइ) या दोनच जातींचा उल्लेख करतो. याप्रमाणें स्वीडनमधील लोकांचे पूर्वज निरनिराळ्या जातींचे होते. ११ व्या शतकांत ख्रिस्ती पंथाचा स्वीडनमध्यें प्रसार झाला. या प्रदेशांत स्कॅंडिनेव्हिअन भाषा चालते.

**नॉर्वे मधील लोक.**— पुराणवस्तुशास्त्री व भूस्तरशास्त्रवेत्ते यांच्या संशोधनानें नॉर्वे मध्यें पूर्वी मासे व मृगया यांवर राहणारा लोकसमाज ख्रि. पू. ६०० वर्षांपासून होता असें सिद्ध झालें आहे. लॅप लोक या देशांत इ. स. ९००–१००० या कालांत आले. मूळ लोकवस्ती फिनीश जातीची होती. आज फिनलंडांत जे उग्रोफिन लोक आहेत त्यांचें व वरील फिनिश लोकांचें कांहीं फार दूरचें नातें असावें. ट्यूटॉनिक लोक नॉर्वेमध्यें केव्हां आले तें निश्चितपणें समजलेलें नाहीं. दक्षिण नॉर्वेमध्यें ट्यूटॉनिक लोक सुमारें ख्रि. पू. १७०० या काळीं गेले असावे असें पुराणवस्तुसंशोधनाच्या आधारावर अनुमान केलेलें आहे. तें कसेंहि असो. जुन्या लोकांची भाषा जाऊन ट्यूटॉनिक भाषा तिच्या जागीं आली हें मात्र निश्चित आहे. मूळचे लोक कांहीं गुलाम या नात्यानें ट्यूटॉनिक लोकांनीं आपल्यांत एकरूप करून घेतले व बाकीचे लोक त्यांनीं डोंगरांत व किनाऱ्यालगतच्या बेटांत पळवून लावले. माळजमिनीवर फिनलोक ऐतिहासिक काळापावेतों स्वातंत्र्य राखून होते असें दिसतें.

ट्यूटन लोक जे नॉर्वेंत आले ते कांहीं पश्चिमेकडील भागांतून जटलंडमधून व कांहीं पूर्वेकडील भागांतून म्हणजे

स्वीडनच्या पश्चिम किनाऱ्याच्या प्रदेशांतून आले. पश्चिमेकडून आलेले लोक अगुर, रांगालंड व होर्डालंड (आजचे क्रिस्तीयनसँड व सँड बर्गेन्हुस जिल्हे) येथवर पसरले व शेवटीं उत्तरेकडे सांडमूरपर्यंत पोहोंचले. पूर्वेकडील प्रवाह तीन भागांत विभागला जाऊन एकानें पश्चिम किनाऱ्यावरील प्रदेश, दुसऱ्यानें आजचे नॉडिलंड व हेडलंड हे प्रदेश व तिसऱ्यानें स्वीडनमधील जामालंड व हेल्सिंगलंड हे प्रदेश व्यापिले. व यांचेच वंशज आज त्या त्या भागांत वस्ती करून आहेत.

**स्कँडिनेव्हिअन भाषा.**—स्कँडिनेव्हियामध्यें जी टयूटॉनिक लोकवस्ती आहे ती व स्कँडिनेव्हियामधून गेलेल्या लोकांनीं वस्ती केलेला जो मुलुख आहे तेथील लोक ज्या जवळजवळ सारख्या व नात्याच्या असलेल्या भाषा बोलतात त्यांनां स्कँडिनेव्हिअन भाषा म्हणतात. या भाषांचा प्रदेश खालील प्रमाणें:—

स्वीडन (लॅपलंड व व्हेस्टरबॉटनचे अंतर्भाग खेरीज करून) या ठिकाणीं फिनिश व लॅपिश या भाषा चालतात; पश्चिम व दक्षिण फिनलंडच्या किनाऱ्यावरील कांहीं प्रदेश, लगतचीं कांहीं बेटें व आलंड; (एस्थोनिया येथें स्वीडिश बोलतात; डागो, नार्गो इत्यादि एस्थोनिअन बेटांतहि स्वीडिश बोलतात); नॉर्वे (फिन व लॅप लोकांनीं वसलेला भाग खेरीज करून); डेन्मार्क फेरोज, आइसलंड, ग्रीनलंड (येथें डॅनिश फार थोडे लोक बोलतात); श्लेस्विगचा उत्तर भाग; दक्षिण रशियामधील गामल्सव्हेन्स्कवी गांव (डॅगो येथील लोकांनीं हें वसविलें); रुनो हें लिव्होनियन बेट मिनेसोटा, इलिन्वा वगैरे उत्तर अमेरिकेंतील स्कँडिनेव्हिअन वसाहती.

निरनिराळ्या वेळीं स्कँडिनेव्हियन पोटभाषा खालील ठिकाणीं वापरण्यांत होत्या:—

| | | |
|---|---|---|
| नॉर्वेजिअन—आयर्लंडचे कांहीं भाग | | ८००–१०५० |
| | उत्तर स्कॉटलंड | |
| | आइल ऑफ मॅन | (८००–१४५० ) |
| | हेब्राइडीज | (८००–१४०० ) |
| | शेटलंड बेटें | (८००–१८०० ) |
| | ऑर्कनीज | (८००–१८०० ) |
| डॅनिश—श्लेस्विग सगळा, ईशान्य इंग्लंड | | |
| | (डेनलाख, | ८७५–११७५ ) |
| | नॉर्मंडी | (९००–११०० ) |
| स्वीडिश—रशिया | | (८६२–१३०० ) |
| आइसलँडिक—ग्रीनलंड | | (९८५–१४५० ) |

टयूटॉनिक लोक स्कँडिनेव्हियांत केव्हां वस्तीला आले हें नक्की समजण्यास मार्ग नाहीं. खिस्ती शकाच्या पूर्वीपासून हे लोक स्कँडिनेव्हिआंत आहेत याबद्दल वाद नाहीं. खि. पू. ५००० या सुमारास ते असावे असें मानण्यास जागा आहे. हें खरें असेल तर स्कँडिनेव्हियन भाषा ७१०० वर्षांच्या जुन्या ठरतात. खिस्ती शकाच्या आरंभापासून जुन्या स्कँडिनेव्हियन लोकांच्या भाषेची माहिती आपणांस मिळते. या शकाच्या आरंभाला सदरील भाषा डेन्मार्कमध्यें, स्वीडन आणि नॉर्वे या देशांच्या पुष्कळशा भागांत, आणि फिनलंड व एस्थोनिया येथें पसरली होती. या सर्व विस्तृत क्षेत्रांत जवळ जवळ एकच प्रकारची बोली बोलली जात होती. या एक भाषेंतून पुढें निरनिराळ्या स्कँडिनेव्हिअन पोटभाषा जन्मास आल्या. जुन्या स्कँडिनेव्हियन व इतर भाषा यांचें नातें येणें प्रमाणें:—




इ. स. ७००–१००० या काळांत मूळ स्कँडिनेव्हियन भाषा हळूहळू बदलून तिच्यांतून आइसलँडिक, नॉर्वेजिअन, स्वीडिश व डॅनिश या चार पोटभाषा निघाल्या. सुमारें १५३० पूर्वीचें जें या भाषांचें स्वरूप त्याला जुनें, व तदनंतरचें जें स्वरूप त्याला नवें असें नांव देऊन जुनी आइसलँडिक, नवी आइसलँडिक इ. असे भाषाभेद मानले आहेत.

**नेदर्लंडमधील लोक:**—नेदर्लंड्स म्हणजे हॉलंड व बेल्जम. जुलियस सीझरच्या स्वाऱ्या सुरू झाल्या—तेव्हां या स्वाऱ्यांमुळें रोमन लोकांना नेदर्लंडचा प्रथम परिचय झाला. या प्रदेशांत गॅलोकेल्टिक व जर्मानिक लोक राहत होते. सामान्यतः ऱ्हाईन नदी ही या दोन लोकांमधील सरहद्द होती. सरहद्दीजवळच्या मुलखांत मिश्र जातींचे लोक राहत होते. गॅलोकेल्टिक जातींना बेल्जी हें सामान्य नांव असे. यांपैकीं नव्र्हीं या जातीचे लोक खि. पू. ५७ सालीं सीझरची स्वारी इकडे झाली तेव्हां सर्वांत अधिक प्रबळ होते. म्यूस

नदीच्या उत्तरेला, विशेषतः वाल व ऱ्हाइन या नद्यांच्या मधील सखल क्षेत्रांत चट्टी.या सुविख्यात जर्मानिक जातीपैकीं बटावी ही जात राहत होती. यांच्या पलीकडे फ्रिशिअन ही जर्मन जात होती. आणखीहि जाती नेदर्लंडांत होत्या त्यांत कनिनफेटी, ऑसी,यूसिपेटीस,सिब्रि, व्यूरोनीज, मेनापि, मोरिनी, अडुआटयूकी या प्रमुख होत्या.(पृ.१८पहा)

जुलियस सीझरनें नव्हीं लोकांशीं व त्यांच्या मित्रजातींशीं निकरानें लढून बेल्जिक जातींवर रोमची सत्ता लादली. आगस्टसच्या कारकीर्दीत खि. पू. १५ या सालीं जिंकलेल्या मुलखाचा गॅलिया बेल्जिका नांवाचा प्रांत वनविला गेला. बटेवियन व फ्रिशियन हेहि पुढें जिंकले गेले (इ. म. १३ व इ. स. ४७). बटेविअन लोकांनीं इ. म. ६९-७० सालीं बंड केलें. पण तें मोडून बटेविअन लोक पुन्हां रोमचे स्नेही झाले.

फ्रँक लोक तिसऱ्या शतकाचे अखेरीस रोमन प्रांतांत स्वाऱ्या करून धुडगुस घालूं लागले त्या वेळीं जुन्या जातींचीं नांवें क्वचितच आढळतात. या जाती पुष्कळशा फ्रिशिअन या एका नांवाखालीं मिसळून एक झाल्या होत्या. रोमन प्रांतांत राहणारे लोक रोमनसंस्कृतीचे झाले होते. सॅलियन फ्रँक हे रोमचे नामधारी मांडलिक म्हणून बेल्जिया गॅलिकांत सत्ता चालवीत होते. वस्तुतः तेच खरे सत्ताधारी होते. इ. स. ४८१-५११ या मुदतींत सगळा दक्षिण व मध्य नेदर्लंड यांच्या ताब्यांत होता. फ्रिशियन लोक मात्र स्केल्डच्या मुखापासून एम्सच्या मुखापर्यंतच्या किनाऱ्यावर राहत असून स्वतंत्र होते. गेल्डर्लंड, ओव्हरीसेल व ड्रेन्ट या ठिकाणीं सॅक्सन लोक होते. सॅक्सन व फ्रिशियन यांची जूट असून ते दोघेहि फ्रँक लोकांचें शत्रुत्व करीत होते. फ्रँक राजा क्लोव्हिस (४८१-५११) हा व याचे लोक खिस्ती झाल्यानें गॅलोरोमन प्रजाजन व फ्रँक यांचा सलोखा लवकर झाला व त्यांच्यांतील जातिद्वेष मोडून दोघांची एक जात बनून गेली. पण हे फ्रँक लोक खिस्ती झाल्यानें पुराणधर्मी सॅक्सन व फ्रिशिअन यांचे त्यांजशीं असलेलें वैर अधिक तीव्र झालें. दक्षिण नेदर्लंडांत खिस्ती पंथाचा प्रसार लवकर झाला पण उत्तरेकडे त्याची गति फारच थोडी होती. फ्रिशिअन लोक पुष्कळ काळानंतर ख्रिस्त्यांच्या गोटांत आणतां आले (इ. स. ६५) यानंतरहि त्यांच्यांत वरेच जुन्या धर्माला चिकटून राहिले होते. ८ व्या शतकाच्या अखेरीला मात्र शार्लमान राजानें आपल्या सामर्थ्याच्या जोरावर फ्रिशियन व सॅक्सन यांस जिंकून खिस्ती करून टाकलें.

९ व्या व १० व्या शतकांत नॉर्थमेन लोकांच्या स्वाऱ्या नेदर्लंडावर झाल्या. ८३४ सालीं यूट्रेच व डॉरस्टेड हे भाग नॉर्थमेनच्या हातांत गेले व थोड्याच दिवसांत सर्व हॉलंड व फ्रीस्लंड येथें त्यांची सत्ता झाली. याप्रमाणें नॉर्थमेन यांची सत्ता कधीं येथें तर कधीं तेथें अशी १००।२०० वर्षे होती.

११ व्या शतकाच्या अखेरीला नेदर्लंडामध्यें सरंजामी संस्थानांची व्यवस्था दृढ होऊन बसली होती व सुधारणा हळूहळू विकास पावत होती. या सुमारास पीटर हर्मिट यानें क्रूसेड म्हणजे इस्लामविरुद्ध युद्ध करण्याचा उपदेश करून सर्व पश्चिम यूरोप चेतवून दिलें. या धर्मविषयक युद्धांत नेदर्लंडच्या राजांनीं व अमीर उमरावांनींच सर्वांत अगोदर व सर्वांत अधिक भाग घेतला. या युद्धांमुळें नेदर्लंडांत पूर्वेकडील जिनसा, कला व कल्पना आल्या आणि या युद्धानें जी तेथील व्यापाराला चलती मिळाली तिजमुळें नेदर्लंडांत शहरें उत्पन्न होऊन त्यांची खूप भरभराट झाली. बेल्जममध्यें फ्रेंच, जर्मन व फ्लेमिश भाषा चालतात. त्यांची माहिती अन्यत्र दिलीच आहे. हॉलंडमध्यें डच भाषा चालते. तिच्याबद्दल माहिती येथें देतों.

**डच भाषा.**-रोमन लोक आजच्या हालंडला आले त्यावेळीं ऱ्हाइनच्या दक्षिणेस जर्मनेतर जात बेल्जम जातीशीं जवळच्या नात्याची असून ऱ्हाइनच्या उत्तरेस उंच प्रदेशांतहि या जातीची वस्ती असावी. ते केल्टिक भाषा बोलत.

याच वेळीं गेल्डर्लंड, ओव्हरीसेल, युट्रेचचा कांहीं भाग, दक्षिण हॉलंड येथें लो फ्रँक भाषा प्रचारांत होती.

६ व्या शतकांत सॅक्सन लोक म्हणजे सध्याच्या उत्तर जर्मनींतील तेव्हांचे लोक यांनीं फ्रँक लोकांचा मुलुख घेतला. यामुळें फ्रँक लोक बेल्जन मुलखांत अधिकाधिक शिरूं लागले व त्यांनीं ऱ्हाइनच्या वाल नांवाच्या फाट्याचे दक्षिणेकडील मुलुख काबीज केला. यावेळीं तेथें फ्रँक भाषा आली व केल्टिक भाषा अजीबात नाहींशी झाली. बट व लिंबुर्ग या ठिकाणीं पूर्वी केल्टिक भाषा होती. तेथें आतां फ्रँक भाषा आहेत.

गेल्डर्लंडचा कांहीं भाग इसेलचा पूर्वभाग व ओव्हरीसेल येथें आणि ड्रेन्ट व ग्रॉनिंगनचा कांहीं भाग येथें जुनी फ्रँक भाषा जाऊन सॅक्सन भाषा आल्या. कोठें जुन्यानव्यांचें मिश्रण रूढ झालें.

उत्तर हॉलंड या ठिकाणीं किनाऱ्याच्या प्रदेशांत फ्रिशिअन लोक आहेत. हे चौथ्या शतकांत फ्लँडर्सपर्यंत पसरले होते या फ्रिशिअन भाषेचें मिश्रण पूर्वी फ्रिशिअन लोकांच्या सत्तेखालीं असलेल्या मुलखांत आढळतें. फ्रीस्लंडमध्यें शुद्ध फ्रिशिअन भाषा सांपडते.

फ्रीस्लंड येथें हॉलंडी भाषा तेराव्या शतकापासून फ्रिशिअन भाषेंत मिसळूं लागल्याचें दिसतें. हॉलंडी व फ्रिशिअन यांच्या मिश्रणाची भाषा शहरांत उदयास आली तिचें नांव स्टाडफ्रिश. खेड्यापाड्यांतून जुनी फ्रिशिअन आहे तिला बोएरेन फ्रिशिअन म्हणतात.

१७ व्या शतकाच्या आरंभापासून हॉलंडी भाषेचें वर्चस्व सर्व देशभर पसरूं लागलें. प्रचलित वाङ्मय भाषा व हॉलंडी

भाषा यांच्या मिश्रणानें एक स्वतंत्र लौकिक भाषा ( बोलण्याची भाषा ) उदयास आली. या मुखभाषेंत देशी भाषासंप्रदाय अंतर्भूत केले होते व वाङ्मयभाषेतील मोडणीहि तिच्यांत अंशतः घेतली होती. परंतु देशी भाषा व लेखभाषा यांजहून ती निराळी व स्वतंत्र झाली. डच ग्रंथभाषा देश्य डच बोलींहून व डच संवादभाषेहून अगदीं निराळी पडण्याचें कारण तिच्या उत्पत्तीच्या इतिहासांत आहे. तो इतिहास येणेंप्रमाणें:—

ड च ग्रं थ भा षे चा इ ति हा स.—डच बोलींत लिहिलेलें पहिलें कथानक 'सर्व्हेटिअस' हें होय या कथानकाचा कर्ता हेन्स्कि व्हान व्हेल्डेक.कथानकाची भाषा मिडल फ्रँकिशसारखी आहे. या वेळीं बेल्जमच्या पश्चिमभागीं व्यापार बहुत होता. त्यामुळें बौद्धिक हालचालहि पुष्कळ झाली व तेथें वेस्ट लोफ्रँकिश भाषेंत बरेंच लिखाण सांपडतें. या भाषेतील ग्रंथसमूहाला मिडलडच वाङ्मय म्हणतात. १२५४ त मिडलबर्गचा कायदा लिहिला गेला तो मध्य डच भाषेंतच आहे. प्रथम दक्षिणभागानें सर्व व्यवहारांत अग्रेसरत्व घेतलें होतें. पुढें उत्तरभाग अग्रेसर झाला व त्यांतील देश्य बोलीचा ग्रंथातून अंतर्भाव होऊं लागला. म्यूझ व ऱ्हाइन यांच्या उत्तरेकडे १३ व्या शतकापावेतों ग्रंथलेखन मुळींच नव्हतें म्हटलें तरी चालेल. चौदाव्या शतकांत दक्षिणेकडून पुरोहित वर्गानें व न्यायाधिकारी वर्गानें उत्तरेकडे ग्रंथभाषा आपल्याबरोबर नेली. ही भाषा अर्थातच तेथील देश्य बोलींहून बरीच निराळी होती. तेथील देश्य बोली फ्रिशिओ फ्रँकिश होती. दक्षिणेची ग्रंथभाषा थोडाफार उत्तरेकडील बोलीचा आपल्यांत समावेश करून घेऊन नेदर्लंडचा पश्चिमभाग व बेल्जम येथें हळू हळू पसरली. पूर्व नेदर्लंडची न्यायभाषा लो जर्मनींतील भाषेसारखी होती. ई नदीच्या तटांवरील प्रदेशांत ग्रंथभाषा व देशबोली यांजमध्यें अशीच मोठी तफावत आढळून येते. व्हॉंडेल या ग्रंथकाराच्या पहिल्या पहिल्या ग्रंथांत ब्रॅबंट येथील बोलीचें वर्चस्व दिसतें. १६२५ नंतर मात्र अॅम्स्टर्डाम बोलीचा त्याचे ग्रंथांत अंतर्भाव झालेला दिसतो. ग्रंथभाषा ही दक्षिणेकडून उत्तरेकडे गेली. अॅम्स्टर्डाम येथें तिच्यांत बदल बराच झाला व या फेरफारांसुद्धां ही भाषा १७ व्या शतकांत युट्रेचच्या तहानंतर इतर प्रांतांत पसरली. १६ व्या शतकापावेतों उत्तरेस ग्रॉनिंगन व फ्रीस्लंड येथें सरकारी कागदपत्र व कायदे फ्रिशन अथवा सॅक्सोफ्रिशन बोलींत लिहीत असत. हॉलंडचा संबंध अधिकाधिक येत गेला त्याप्रमाणें सरकारी भाषेंत हॉलंडी बोलीचा अंतर्भाव होत गेला. पूर्व प्रांतांत असेंच झालें. तरीपण १६२६ व १६३७ यांच्या दरम्यान बायबलचें अधिकृत भाषांतर 'स्टाटेनबिबेल' प्रसिद्ध होईपावेतों डच ग्रंथभाषा लोकांत फारशी प्रचार पावलेली नव्हती. या बायबलचा प्रचार वाढला तशी ग्रंथभाषा अधिकाधिक लोकप्रिय झाली व त्या योगें हॉलंडची भाषा धर्मवादाच्या द्वारा सर्व प्रांतांतून प्रचारांत आली. बायबलमधील पुष्कळशीं वाक्यें व शब्दसमूह देश्य बोलींत रूढ होऊन बसले.

हॉलंड स्वतंत्र राज्य होईपावेतों बव्हेरियाचे सरदार व बर्गंडीचे उमराव या प्रदेशांत आळीपाळीनें जागजागीं सत्ता गाजवीत होते व त्यांच्या सत्तेमुळें एकदां जर्मन तर एकदां फ्रेंच भाषेचा पगडा या प्रदेशांत बसत होता. १६ व्या व १७ व्या शतकांतहि हॉलंडांतील भाषांत फ्रेंच व जर्मन भाषांतूनहि बऱ्याच शब्दांची व भाषासंप्रदायांची भरती झाली. पौरस्त्य भाषांतूनहि डच भाषेंत व्यापारी व वसाहती संबंधामुळें पुष्कळ शब्द आले. तसेंच १६ व्या शतकांत विद्वज्जनांची भाषा लॅटिन हिच्यांतून व १७ व्या आणि १८ व्या शतकांत कविमंडळांच्या वजनामुळें फ्रेंच भाषेंतून डच भाषेंत पुष्कळच शब्द घेतले गेले. या परकी शब्दांच्या विरुद्ध १६ व्या शतकांत व १७ व्या शतकांतहि लोकांनीं बऱ्याच निकरानें मोहीम चालविली होती. परंतु या मोहिमेपेक्षां १८ व्या शतकांतील प्रमुख वाङ्मयमंडळांनीं जी मोहीम केली तिचा विशेष उपयोग झाला व शुद्ध डच भाषेंत आपले विचार मांडण्याकडे लोकांची बरीच प्रवृत्ति झाली. अर्थात् शुद्ध डच वापरावयाचें म्हणून गद्य व पद्य लेखनासंबंधांत पुष्कळसे नियम घातले गेले. या नियमांमुळें डच ग्रंथभाषा ताठर व घेलावयास अवघड होऊन बसली. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धापावेतों तिचा हा ताठरपणा गेला नाहीं. हॉलंड व बेल्जम यांचें ऐक्य घडून आल्यानंतर मात्र डच भाषेंत फ्रेंच शब्दांचें आधिक्य झालें. सभाजांतील वरच्या वर्गांच्या बोलण्यालिहिण्यांत तरी फ्रेंच शब्द अधिक येतात.

डच भाषा हॉलंड व बेल्जमपैकीं फ्लँडर्स, अँटवर्प, ब्रॅबंट, या ठिकाणीं आणि डच ईस्ट इंडिया व इंडिज या ठिकाणीं चालते. इंडियांत जवळ जवळ शुद्ध डच चालते परंतु वेस्ट इंडीजमध्यें तिच्यांत नीग्रो व इंग्रजी शब्द आणि प्रयोग शिरले आहेत. १७ व्या शतकांत हॉलंड व झीलंडमधील बरेच डच लोक जॉन. व्हान रिएबेक याच्या नेतृत्वाखालीं केप टौवन ( दक्षिण आफ्रिका ) येथें जाऊन राहिले. पुढें तेथें फ्रेंच, पोर्तुगीज, मलायी व इंग्रज लोकहि हळू हळू आले. याप्रमाणें केप कालनीमध्यें १८ व्या शतकाच्या पूर्वार्धांत साउथ आफ्रिकन डच नांवाची भाषा उत्पन्न झाली. या भाषेंत मूळ भाग डच भाषेचा असून इतरांचे शब्द व प्रयोगहि तींत मिसळले आहेत.

**डेन्मार्कमधील लोक.**—डेन्मार्कसंबंधीचें ज्ञान प्रथम प्लिनी याच्या ग्रंथांत मिळतें. स्कॅदिआइ या नांवाच्या तीन बेटांचा तो उल्लेख करतो. स्वीडनलाहि हेंच नांव लाविलेलें आढळतें. या बेटांतील लोकांविषयीं प्लिनी कांहीं लिहीत नाहीं. जूटिश द्वीपकल्पाविषयीं तो अधिक माहिती देतो. व याला सिंब्रिक केर्सोनीज असें म्हणतो. सॅक्सन, सिगूलोन, सबालिंगोइ, कोबंदोइ, शालोइ, फुंदुसी, शारूदे, कब्रोई हे लोक जूटिश द्वीपकल्पांत असल्याचें तो लिहितो. प्लिनी-

मध्यें आणखीहि याच प्रकारची कांहीं माहिती आहे. पाँपोनिअस मेला हा ग्रंथकार म्हणतोः सिनस कोडानस ( हें नांव प्लिनींत आहे. बाल्टिक समुद्राच्या नैर्ऋत्य भागाला हें नांव असावें ) येथें किम्ब्री आणि ट्यूटन लोक राहत होते.

गॉल व इटाली यांवर ख्रिस्तपूर्व २ऱ्या शतकाचे अखेरीस स्वारी करणारे हे चेकिंब्री व ट्यूटन लोक होत अशी रोमन लोकांची समजूत होती.

लांगोबर्डी यांनीं ६ व्या शतकांत एल्ब खोऱ्यांत राहणाऱ्या हेरुली लोकांचा पराजय केला व ते पुढें वार्नी आणि डेन यांच्या मुलखांतून थूलला म्हणजे स्वीडनला गेले असें प्राकोपिअस म्हणतो. हाच डेनचा प्रथम उल्लेख होय.

डॅनिश परंपरागत कथांप्रमाणें या काळीं डेन्मार्कचे राज्यांत विथेस्लाएथ ( झीलंड, मोएन, फाल्स्टर आणि लालंड ) व जटलंड आणि स्कानिआन हे प्रदेश होते.

६ व्या शतकाच्या मध्यापासून ८ शतकाच्या आरंभापावेतों डॅनिश इतिहासाची कांहींच माहिती उपलब्ध होत नाहीं. ८ व्या शतकाच्या आरंभाला ऑन्गेंडस नांवाचा डॅनिश राजा झाला.

८ वे शतकाचे अखेरीपासून यूरोपच्या इतिहासांत डॅनिश लोकांचें नांव पुनः पुन्हां आलेलें सांपडतें.

साधार असा डॅनिश इतिहास ९ व्या शतकाच्या आरंभापासून उपलब्ध होतो. 'व्हिकिंग पीरिअड' म्हणजे डेन लोकांच्या स्वाऱ्यांच्या काळ याला ७९३ पासून आरंभ होतो, व ९११ सालीं रोलो याची नॉर्मंडींत सत्ता स्थापन झाली तेव्हां तो संपतो.

याप्रमाणें डेन्मार्कच्या मूळच्या लोकांविषयीं माहिती आहे. आतां त्यांच्या भाषेकडे वळूं.

**डेन्मार्कची भाषा.**—डेन्मार्कची आजची भाषा जुन्या स्कँडिनेव्हिअन भाषेपासून निघाली आहे. स्वीडनची भाषा याच भाषेपासून निघाली आहे.

आइस्लंड येथें जुनी स्कँडिनेव्हिअन थोड्याफार फरकांनीं आजहि वापरली जाते. ११०० पावेतों ही सर्व स्कँडिनेव्हियाची ग्रंथभाषा होती. डॅनिश भाषा या जुन्या स्कँन्डिनेव्हिअनपासून दूर दूर जात चालली याचें कारण प्रथम लो जर्मन व नंतर हायजर्मन या भाषांचा तिजवर घडलेला परिणाम होय. १२व्या शतकांत हा फरक नजरेस येऊं लागला. डॅनिश भाषेच्या इतिहासांतील चार कालखंड पुढीलप्रमाणें पडतातः—११००ते१२५०आतप्राचीन डॅनिश.१२५०ते१४०० प्राचीन डॅनिश. १४०० ते १५३० जर्मन भाषेचा परिणाम फार झाला. १५३० ते १६८० भाषेचा विकास पूर्ण झाला व आजची भाषा तयार झाली.

अतिप्राचीन डॅनिश भाषा विभक्ति प्रकारांच्या बाबतींत जुन्या स्कँडिनेव्हिअन भाषेपासून निराळी झाली व प्राचीन डॅनिशमध्यें सामान्यलिंग आलें, अनियमित उपपद तयार झालें, क्रियापद चालविण्याचे सोपे प्रकार तयार झाले वगैरे.

याप्रमाणें आजच्या डॅनिश भाषेची वाढ होत आहे.

**जर्मन लोक.—रो म न सं स्था ली.**—ख्रि. पू. ५९ या वर्षी जूलियस सीझरला गॉलचा अधिकारी नेमलें तेव्हांपासून जर्मनीसंबंधाची प्रत्यक्ष माहिती आपणांस उपलब्ध होते. या काळापूर्वींहि दक्षिणेकडील संस्कृतीशीं जर्मनांचा संबंध येत होता असा पुरावा सांपडतो. रोमन लोकांस पहिले ट्यूटन लोक भेटले ते डेन्मार्कमधील किम्ब्री व ट्यूटनी हे होत. या लोकांनीं इलिरिया गॉल व इटली या मुलखांवर ख्रि. पू. २ ऱ्या शतकाच्या अखेरीस स्वारी केली. सीझर गॉलमध्यें आला त्या वेळेस आजच्या जर्मनीच्या पश्चिमभागांत गॉलिश जातींचा ताबा होता. गॉल व जर्मन यांच्यामध्यें ऱ्हाइन नदी हीच सरहद्द होती. ख्रि. पू. ७२ या वर्षी जर्मनांनीं आजचा आल्सेस प्रांत घेऊन तेथें वसाहत केली होती. सीझरच्या वेळेला गॉल लोकांवर जर्मन लोक सरहद्दीच्या सर्व बाजूंनीं स्वाऱ्या करून त्यांना जेरीस आणीत होते. सीझरला या जर्मनांवर अथवा त्यांनीं हांकलून लावलेल्या गॉल लोकांवर कित्येक वेळां चढाई करावी लागली.

ब्रुक्टेरी, चटी, चेरुस्की या जाती नीरो क्लॉडियसला ख्रि. पू. १२ च्या नंतर शरण आल्या.

टायबेरिअस यानें इ. स. ५ या वर्षी चौसी, लांगोवर्डी या जाती पादाक्रांत केल्या. आणि ऱ्हाइन व एल्ब यांच्यामधलि प्रदेशांत रोमन पलटणी संरक्षणार्थ ठेवल्या.

याच सुमाराला रोमन आरमार जटलंडपर्यंत गेलें व त्यानें त्या मुलखांतील किंब्री, चारुद व इतर जाती यांना नांवाला जिंकलें

आगस्टसच्या कारकीर्दींत जर्मनीमध्यें ज्या जाती राहत असल्याचें माहीत आहे त्या जाती येणेंप्रमाणें:—ऱ्हाइनच्या पश्चिमेला गॉलिश जाती होत्या. यांत महत्त्वाची जात म्हणजे ट्रेव्हेरी लोकांची. मोसेलच्या खोऱ्यांत ही जात राहत होती. आल्सेसच्या दक्षिणेस रौरासी ही जात, ट्रेव्हेरी जातीच्या दक्षिणेस मेडिओमॅट्रिसी व पश्चिमेस सेक्वानी हे होते. ट्रेव्हेरी आपणांस जर्मन म्हणवीत. नव्हीं व दुसऱ्या बेलजममधील जातीहि स्वतःस जर्मन म्हणवीत. जर्मनी हें नांव गॉलिश आहे, व तें प्रथम केल्टिक जाती ऱ्हाइनच्या पूर्वेस राहत त्यांना लावलें जात असून पुढें ट्यूटॉनिक जाती त्यांच्या जागीं आल्या तेव्हां त्यांना लावण्यांत आलें असें दिसतें.

ख्रि. पू. पहिल्या शतकांत केल्टिक लोकांना ट्यूटॉनिक लोकांनीं पश्चिमेकडे बरेंच लांबवर दडपीत नेलें होतें. सीझरच्या वेळीं ही क्रिया चालू होती. दक्षिणेकडेहि असाच प्रकार चालू होता. आगस्टसच्या वेळीं मार्कोमानी या ट्यूटॉनिक जातीनें बोहिमियांतून बोई लोकांना घालवून दिलें. आजच्या बेडन व वर्टम्बर्ग या ठिकाणांचा ताबा हेल्वेटी लोकांनीं याच वेळीं घेतला. व्होल्की टेक्टोसेजेस ही जात सीझरच्या वेळीं जर्मनींत राहत होती. फ्रान्सच्या दक्षिणे-

तील व्होल्की आरेकोमिसी आणि गॅलेटियांतील टेक्टोसेजेस या जाती वरील जातींच्या शाखा असाव्या. व्होल्की टेक्टोसेजेस हें नांव पूर्व टयूटॉनिक भाषांत केल्टिक आणि इटालियन जातींनां सर्वसामान्य म्हणून लावण्यांत येतें यावरून टयूटॉनिक जातींनां पहिली केल्टिक जात भेटली ती वरील जात असावी असा तर्क आहे. वेसरच्या खोऱ्यांत ही जात राहत असावी. पश्चिम जर्मनीचा ऱ्हाइनच्या पूर्वेकडील बराच भाग पूर्वी केल्टिक जातींनीं व्यापिलेला असावा. पूर्वभागीं कोटिर्न नांवाचे गॉलिश लोक होते असा उल्लेख असलेला आहे. हे ओडरच्या खोऱ्यांत वरच्या भागांत राहत होते. टासिटसनें ओसी नांवाची एक जात तेथेंच राहत होती असें म्हटलें आहे.

रो म न्स न्ते नं त र चे ज र्म न.—आतां खास जर्मन लोकांसंबंधानें लिहावयाचें. स्ट्रासबर्ग व मेझ यांच्या दरम्यानच्या ऱ्हाइनच्या खोऱ्यांत ट्रिबोक्सी, नेमेटीस, व्हांजिओनीस हे लोक राहत होते. थोड्या खालच्या प्रदेशांत वाइस बाडनजवळ मॉटिआसी आणि कोलोनजवळ यूबी लोक राहत होते. यांच्या खालीं सुगम्त्री ऱ्हाइनच्या मुखप्रदेशांत बटावी व इतर लोक होते. रोमन लोकांची सत्ता या सर्व लोकांवर होती. यांच्या पलीकडे लाहनच्या खोऱ्यांत टेंक्टरी, रुहरच्या खोऱ्यांत यूसीपिटीस, लिपी व एम्स खोऱ्यांत ब्रुक्टेरी व अंप्सीवेरी होते. हासच्या खोऱ्यांत चास्वारी, वेसरच्या खोऱ्यांत वरच्या भागीं चाहि होते. यांच्या वायव्येला मार्सी, वेसरच्या खोऱ्याच्या मध्यभागीं चेरुस्की व खालीं अंग्रिवारी होते. ऱ्हाइनच्या मुखाच्या उत्तरेकडे समुद्रकिनाऱ्याच्या प्रदेशांत कानिनाफॉटस, त्यांच्या पलीकडे फ्रिसी, पलीकडे चौसी याप्रमाणें वस्ती होती. आणखी जाती येणेंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| सुएविक, (यांत मार्कोमानी मुख्य) | एल्ब खोरें. |
| क्वादी | एल्बच्या उगमाजवळ. |
| हर्मुंदुरी | सात खोरें. |
| सेम्नोनीस | साल व एल्ब यांच्या संगमाखालीं. |
| लांगो बार्डी | सेम्नोनींच्या मुलुखाला लागून. |
| सॅक्सन | श्लेस्विग पश्चिम किनारा व शेजारचीं बेटें. |
| अँग्ली | श्लेस्विगचा पूर्व किनारा. |
| वारीनी अ० वार्नी | मेक्लेनबर्गचा किनारा. |
| रुगी | पोमेरानियाचा पूर्व भाग. |
| बर्गंडिओनी | ओडर खोरें, खालचा भाग. |
| लुगी ( हेच नंतरचे व्हँडल लोक यांपैकीं सिलिंगी लोक पुढें स्पेनमध्यें प्रसिद्ध झाले. ) | ,, वरचा भाग. |
| गॉथ | विस्तुला खोरें मध्यभाग. |
| गालिंदी ( प्रशिअन ) ईस्टी ( प्रशियन अ० इस्थोनिअन या टयूटॉनिक नव्हत्या ) | ,, खालचा भाग. |
| स्लॅव्हॉनिक ( वेनेटी ) | विस्तुलेच्या पूर्वेस. |

आगस्टसच्या वेळीं मार्कोमानी जर्मनांचा राजा मारोबोडुअस हा सर्वांत अधिक प्रबळ होता. याची सत्ता हर्मुंदुरी खेरीज करून सर्व सुएविक जातींवर होती. तशीच पूर्व जर्मनींतील लुगी व गॉथ धरून बहुतेक सर्व लोकांवर त्याची सत्ता होती. इ. स. १७ सालीं चेरुस्की लोकांचा मुख्य अर्मीनिअस याजशीं त्याचें युद्ध झालें व त्यांत त्याचा पराजय झाला. पुढें दोन वर्षांनीं तो पदच्युत झाला. पुढें हर्मुंदुरी, व त्यानंतर क्वादी लोकांमधील राजा प्रमुख झाला. इ. स. २८ या वर्षी फ्रिशन लोक रोमविरुद्ध उठले. इ. स. ४७ या सालीं ते पुनः शरण आले तरी क्लॉडिअसनें आपलें सैन्य लवकरच काढून घेतलें. पुढील पहिल्या शतकाच्या अखेरीपर्यंतच्या धामधुमींत सुएवी, चट्टी, हर्मुंदुरी, चेरुस्की चौसी, अम्पसीवारी अंग्रीवारी ब्रुक्टेरी व रोमन लोक यांचीं नांवें पुनः पुनः येतात. या शतकाच्या अखेरीस चौसी व चट्टी हे लोक सर्वांत अधिक प्रबळ झाल्याचें दिसतें.

शा लें मा न च्या का ला प र्यं त.—१६६–१८० या कालांत मार्कोमानिक युद्ध झालें. या युद्धांत सुएविक जाती व सर्माशिअन इयाझिग लोक रोमन लोकांशीं लढले.

तिसऱ्या शतकाच्या प्रारंभीं अलामानी जातींत अधिक चळवळ दिसते. याच वेळेला आग्नेय दिशेकडे गॉथ लोक गडबड करूं लागले व लवकरच रोमला त्यांनीं सळो कां पळो करून सोडलें. हेरुली जातीचे लोक २८९ चे सुमारास पश्चिमेकडील समुद्रावर आलेले दिसतात. सॅक्सन लोकांच्या दर्यावरील स्वाऱ्या याचे पूर्वी नुकत्याच सुरू झाल्या होत्या. २५० चे सुमाराला फ्रँक हें नांव प्रथम ऐकूं येतें. वायव्येकडील जर्मन जातींचें हें सामुच्चयिक नांव असावें.

चवथ्या शतकांत फ्रँक व अलामानी या जाती पश्चिम जर्मनींत सर्वांत प्रमुख दिसतात. या शतकाच्या मध्याचे सुमारास सॅक्सन लोकांनीं वायव्य जर्मनीचा बराच भाग जिंकून घेतला. तिसऱ्या शतकाच्या अखेरीस बर्गंडिअन लोक मेन नदीच्या खोऱ्यांत आले व त्यांनीं तेथें वस्ती केली. चवथ्या शतकाचे मध्याचे सुमारास गॉथ लोक पूर्व जर्मनींत सत्ताधारी झाले. यांचा राजा हर्मनारिक मेल्यानंतर गॉथ लोकांची सत्ता हूण लोकांकडे गेली. हे हूण लोक पूर्वेकडून आले. हे आले त्यामुळें पूर्व जर्मनींत फारच गोंधळ उडून लोक आपापली वस्ती सोडून गेले. कोणी कार्पाथिअन व रायसेन गॅबर्ज पर्वतांच्या दक्षिणेस राहावयास गेले. गॉथ जातीचे गेपिड लोक व रुगी लोक यांत होते.

पश्चिमेकडे अलामानी व बाइओराइ ( बव्हेरिअन लोक, हे मार्कोमानींचे वंशज ) या जातींनीं ५ व्या शतकाच्या प्रारंभीं नोरिकम व व्हिंडेलेशिआ या रोमन प्रांतांत प्रवेश केला ४०६ सालीं व्हँडाल लोक व सुएवि आणि टयूटने-

तर अलानी यांनीं ऱ्हाइन ओलांडून गॉलवर स्वारी केली. ४३५-४५, या सालांत बर्गंडियन लोकांचा आटिलानें निःपात केला. यांचे राहिलेले लोक नंतर गॉलमध्यें वस्ती करून राहिले. याच सुमारास फ्रँक लोक बेल्जममध्यें शिरून तेथें सत्ता धरून बसले. ४५३ मध्यें आटिला मेल्यानंतर हूण सत्ता खालावली.

६ व्या शतकांत प्रमुख जाती दिसतात त्या फ्रँक, फ्रिशन सॅक्सन, अलामानी, बव्हेरिअन, लांगोबर्डी, हेरुली, वार्नी. डेन लोकांचें नांव श्लेस्विग प्रांतांत याच काळीं प्रथम ऐकू येतें. ऑस्ट्रो गॉथ लोकाचा राजा थिओडोरिक यानें ६ व्या शतकाच्या आरंभीं व्हिसी गॉथ लोकांचे संरक्षणार्थ क्लोव्हिस-विरुद्ध थुरिंगी व्हेरुली व वार्नी यांजशीं कूट करण्याचा यत्न केला. परंतु हेरुली लोकांचा राजा लवकरच मारला गेला व त्यांची सत्ताहि त्याबरोबर लयास गेली. ५३१ त थुरिंगीचें राज्य फ्रँकिश राजानें धुळीस मिळविलें.

६ व्या व ७ व्या शतकांत सॅक्सन लोकांवर मधून मधून फ्रँक लोकांची सत्ता होती परंतु शार्लमेनच्या कारकीर्दीपर्यंत फ्रँक लोकांनीं त्या लोकांनां पूर्णपणें अंमलाखालीं आणलें नव्हतें. ६ व्या शतकाच्या मध्यानंतर लवकरच अव्हार लोकांनीं फ्रँक राज्यावर स्वारी केली. अव्हार लोकानंतर स्लाव्ह लोक आले व त्यांनीं एल्स्टर खोऱ्यांत वस्ती केली. ६ व्या शतकाच्या अखेरीपावेतों एल्बचें सर्व खोरें स्लॅव्हानिक झालें. एल्बच्या मुखाजवळचा प्रदेश मात्र सॅक्सन राहिला. सालच्या पूर्वेस सॉर्ब लोक, त्यांच्या पलीकडे डालेमिन्सीं आणि सिडस्लीं लोक होते. सॅक्सन लोकांच्या पूर्वेस एल्ब खोऱ्यांत पोलाव लोक आणि त्यांच्या पलीकडे हेवेली लोक होते मेक्लेनबर्गमध्यें वार्नाबी व पूर्व हॉल्स्टाइनमध्यें ऑबोट्रीटी व वाग्री लोक होते. वार्नाबीच्या पूर्वेस लिउटीसी हे ओडरपर्यंत वसले होते व त्या नदीच्या पलीकडे पोमेरानी होते. ओडरच्या दक्षिणेस मिलिसिएनी व लुसीसी होते. पोलोनी लोक विस्तुला खोऱ्यांत मध्यभागीं होते. खोऱ्याच्या खालच्या भागांत प्रुसी व लिथुआनी या प्रशिअन जाती होत्या.

या वेळेपासून आयडर जवळच्या डॅनिश हद्दीपर्यंत राहणाऱ्या उत्तरेकडील टयूटानिक लोकांनां सॅक्सन म्हणण्याचा प्रघात पडला. फ्रिशिअन लोकांनां जिंकण्याचें काम फ्रँक लोकांनीं ६८९ चे सुमारास सुरू केलें तें शार्लमानच्या कारकीर्दीपर्यंत पुरें झालें. ७७२-७७३ या सालीं सॅक्सन लोकांचा मोठा पराभव झाला व या शतकाच्या अखेरीपावेतों शार्लमानचें राज्य डेन लोकांच्या हद्दीला जाऊन भिडलें. या सुमाराला जर्मनीचा सर्व टयूटॉनिक भाग शार्लमानच्या पूर्णपणें अंमलाखालीं आला होता.

जर्मन लोक हेरिस्टलचा पिपिन याच्या कारकीर्दीत व त्याचा मुलगा व नातु यांच्या कारकीर्दीत ख्रिस्ती झाले. शार्लमानच्या सत्तेखालीं जर्मनी एकराष्ट्र होण्याच्या मार्गास लागला.

**जर्मन भाषा**—इंग्लीश व फ्रिशियन भाषांप्रमाणें जर्मन भाषाहि वेस्ट जर्मानिक भाषाकुलांतील आहे. याच कुलांतील लांगोबार्डिअन ही भाषा आहे. ही ९-१० व्या शतकांत लयास गेली. बर्गोंडिअन भाषा ईस्ट जर्मानिक कुलांतील आहे. हिचे अवशेष ५ व्या शतकापावेतों सांपडतात, पुढें सांपडत नाहींत. रोमान्स पोटभाषांनीं लांगोबर्डियन,कार्डियन या भाषा लयास नेल्या. पश्चिम फ्रँक भाषाहि याप्रमाणेंच नष्ट झाल्या. ८४२ सालीं फ्रँक लोक "स्टांसबर्ग शपथांसाठीं" रोमान्स भाषा वापरीत होते व 'लुई जर्मन,' हा राजा त्यांअशीं याच रोमान्स भाषेंत बोलत होता असा दाखला आहे. 'डॉएश स्प्राश' ही पश्चिम जर्मानिक जातींची भाषा, ज्या जाती प्रथम पासून आज पावेतों जर्मानिक बोली बोलत आल्या आहेत त्यांची भाषा. या जातींत मुख्य जाती येणें प्रमाणें: सॅक्सन, फ्रँक, चटी, (हेशिअन), थुरींगिअन, अलेमानिअन, बव्हेरिअन. लो कंट्रीजमध्यें बोलल्या जाणाऱ्या फ्लेमिश व डच भाषा या वरील सदरांत येतात परंतु या भाषांचा उत्तरकालीन विकास जर्मनवर अवलंबून झालेला नाहीं. म्हणून त्यांचा विचार येथें नको.

जर्मन भाषा बोलणारे ७१० लाख लोक आहेत. यूरोपीय भाषांमध्यें हिचा क्रम तिसरा लागतो. हिच्या प्रदेशाला पश्चिम व दक्षिण दिशेला रोमान्स भाषाप्रदेश (फ्रेंच इटालियन) व कांहीं अशीं स्लॅव्हॉनिक भाषाप्रदेश लागून आहे. पश्चिमेकडे व दक्षिणेकडे जर्मन भाषा पूर्वकाळापेक्षां हल्लीं कमी प्रचारांत आहे. तिची जागा थोडीफार रोमान्स भाषांनीं घेतली आहे. फ्रेंच फ्लँडर्स, अल्सेस व लोरेन या प्रांतांत वरील प्रमाणें स्थिति आहे. मॉंटे रोझा, दक्षिण टायरोल, स्टीरिया, कारिंथिया येथेंहि रोमान्स भाषांचें वर्चस्व आहे. पूर्वेकडे चार्लस दि ग्रेटच्या वेळेपासून आधुनिक काळापर्यंत जर्मन भाषा सारखी प्रसार पावली, अलीकडे मात्र बोहिमिया, मोरेव्हिया व लिव्होनिया येथें तिचा प्रचार कमी झाला आहे. चार्लसच्या वेळेला पूर्व मर्यादा लोअर एल्ब नदी साल नदी बोहीमियाचें जंगल व एन्सनदी याप्रमाणें होती. बोहीमियाकडे १२ व्या शतकांत, सायलेशियाकडे थोडी अगोदर व लिव्होनियाकडे १३ व्या शतकांत याप्रमाणें जर्मनचा प्रचार जर्मन वसाहतवाल्यांकडून झाला. प्राशियनांचा मुलूख याच सुमाराला टयूटॉनिक उमरावांनीं घेतला. व तेथें त्यांनीं वसाहत केली. उत्तरेकडे चार्लसच्या वेळेला आयडर ही जर्मन-भाषा-प्रदेशाची सीमा होती ती पुढें सरकून डॅनिश भाषा-प्रदेशांत जर्मनचें वर्चस्व सारखें वाढत आलें आहे.

८ व्या व ९ व्या शतकांत जर्मन अथवा डॉएश ही प्रथम ग्रंथभाषा म्हणून सांपडते. ही ग्रंथभाषा ओल्ड हाय जर्मन व ओल्ड लो जर्मन या स्वरूपांत सांपडते. या दोन

भाषांची जननी कोणती तरी पूर्व जर्मन भाषा असेल, परंतु तिचा थांग लागत नाहीं. जर्मन भाषेचा इतिहास विभागून त्याचे तीन काळ कल्पिले आहेत: (१) ओल्ड हाय जर्मन, ओल्ड लो जर्मन यांचा काळ; (२) मिडल हाय जर्मन, मिडल लो जर्मन; (३) मॉडर्न हाय जर्मन, मॉडर्न लो जर्मन. हाय व लो जर्मन हे जर्मन भाषेचे विभाग ज्या वर्णविषयक क्रियेमुळें पडले ती क्रिया ६ व्या शतकांत सुरू झाली. लो जर्मनचा प्रदेश म्हणजे उत्तर जर्मनी व हाय जर्मनचा प्रदेश दक्षिण जर्मनी. इ. स. ११०० पावेतों पहिला भाषाकाळ, इ. स. १५०० पावेतों दुसरा व तदनंतरचा तिसरा असें मानावयाचा सामान्य प्रघात आहे.

जर्मन भाषाप्रदेशांतील पोटभाषाः—

**जर्मन पोटभाषाः**




**हाय जर्मन पोटभाषाः**

(१) मिडल जर्मन भाषासमूह




(२) अपर जर्मन भाषासमूह




**रशियन लोक.**—स्लाव्ह लोकांचे पूर्वज हिरोडोटसनें उल्लेखिलेल्या सारमॅटिअन अथवा सौरोमॅटी वंशाचेच (मागील यादी पहा.) केवळ होते किंवा त्यांच्यांत सिथिअन रक्त होतें हें अद्यापि पुराणवस्तुशास्त्रज्ञांस निश्चितपणें माहीत झालेलें नाहीं. या दोहोंच्याहि कवटयांचे मंगोल वंशांतील कवट्यांशीं मुळींच साम्य नाहीं. येथील लोकांविषयीं सर्वांत प्राचीन माहिती ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकापासून मिळते. त्या वेळीं उत्तर व्हॉना नदीच्या प्रदेशांतून फिन लोक पश्चिमेकडे गेले. सारमॅटिअन लोकांस अओर्झी व सिरका लोकांनीं उपद्रव दिल्यामुळें त्यांस डॉन नदीचा प्रदेश सोडून रशियांतील पठारें पूर्वेच्या बाजूकडून ओलांडून पश्चिमेकडे यावें लागलें. अओर्झी व सिराक यांच्या मागोमाग हूण व उग्रगुरतुर्की अव्हार हे लोक होतेच.

ख्रिस्ती शकाच्या सातव्या शतकामध्यें दक्षिण रशियामध्यें खाझर लोकांचें साम्राज्य होतें. यांनीं हूण लोकांचे वंशज जे बल्गेरियन लोक त्यांस डॉन नदीवरून हांकून दिलें. त्यांच्या पैकीं एक शाखा व्होल्गा नदीवर जाऊन तेथें तिनें बल्गेरियन साम्राज्य स्थापन केलें. दुसरी शाखा डॅन्यूबकडे वळली. या लोकांच्या आगमनामुळें उत्तरेकडील फिन लोकांस आणखी पश्चिमेकडे जावें लागलें आणि तावास्ट आणि कारेलियन लोकांच्या मिश्रणानें बनलेली एक टोळी फिनलंडच्या आखाताच्या दक्षिणभागीं जाऊन राहिली.

आठव्या शतकाच्या आरंभीं किंवा त्यापूर्वीहि कांहीं वर्षें स्लाव्ह लोकांची एक टोळी पूर्वेकडून डॅन्यूब नदीच्या प्रदेशापासून निघून रशियाच्या नैर्ऋत्येकडील मैदानावर पसरली. याप्रमाणेंच दुसरी एक टोळी उत्तरेकडून एल्ब नदीच्या बाजूनें आली असावी. नवव्या शतकामध्यें स्लाव्ह लोकांनीं विस्तुला नदीच्या वरील भाग, रशियांतील सरोवरांच्या दक्षिणेकडील भाग आणि मध्यभागांतील मैदानाचा पश्चिम भाग व्यापला होता. त्यांच्या पश्चिमेकडे लिथुआनियन लोक होते. कांहीं फिनिश जातींचें आग्नेयीकडील प्रदेशांत तुर्की जातींशीं मिश्रण होत होतें. सध्यांचे बष्किर हे त्यांचेच वंशज होत. व्होल्गा आणि कामा नदीवर बल्गार लोकांची वस्ती होती. यांच्या पूर्वजांविषयीं विशेषशी माहिती मिळत नाहीं. पेचेनेग, पोलोव्हत्सी उझेस वगैरे तुर्की मंगोल जाती आग्नेयबाजूच्या प्रदेशांत होत्या व काळ्या समुद्राच्या किनाऱ्यावर खाझर लोकांचें साम्राज्य होतें. त्यांच्या अंमलाखालीं कांहीं स्लाव्ह व फिनिश जातीचे लोकहि होते. नवव्या शतकामध्येंच उग्रियन लोकांनीं उरल पर्वतावरील आपलें स्थान सोडून आग्नेय व दक्षिण रशिया ओलांडून डॅन्यूब नदीवर वसाहती केल्या.

जर सर्व स्लाव्ह लोकांचे पश्चिमस्लाव्ह (पोल, झेक व वेण्ड,) दक्षिणस्लाव्ह, (सर्व्हिन, बल्गेरियन, क्रोॲशियन वगैरे) आणि पूर्वस्लाव्ह (महारशियन, लघुरशियन व श्वेतरशियन) यांप्रमाणें विभाग पाडले तर लघुरशियन लोकांची तीसलक्ष लोकसंख्या सोडून बाकीचे सर्व पूर्वस्लाव्ह एका शेजारीं एक असे पश्चिम, मध्य व दक्षिण रशियामध्यें वस्ती करून आहेत. लघुरशियन हे पूर्वगॅलिशिया, पोलंड व कांहीं कार्पेथिअन पर्वताच्या दाक्षिणेकडील उतारावर राहिले आहेत.

रशियन लोकांमध्यें जरी फिनिश व तुर्को फिनिश रक्ताचें मिश्रण झालें आहे तरी त्यांच्या शारीरिक रचनेंत स्लाव्ह-विशिष्ट गुणांचें आधिक्य आहे. तसेंच जातिसंस्थेमुळें व

विवाहविषयक, विशेषतः स्त्रियांच्या बाबतींत, निर्बंधामुळें त्यांच्या जाती बऱ्याच शुद्ध राहिल्या आहेत. सध्यां रशियामध्यें आपणांस ज्या अनेक लहान लहान जाती दृष्टीस पडतात त्यांमध्यें आर्यन सेमेटिक कॉकेशन वगैरे महावंशांपासून निघालेले पोटवंश तसेच मांगोलियनवंशाचे चिनी जपानी वगैरे पोटवंश ऊरल-अल्ताइन वंशाचे पोटवंश हे प्रामुख्यानें दिसून येतात. जॉर्जिअन सरकॅशिअन हेहि अनुक्रमें १३ व १० लाखांवर आहेत. उरल आल्तांईक जातींत खिरगीज, बष्किर, तातार, फिन इस्थोनिअन व मोर्ड्व्हिनिअन हे प्रमुख दिसतात. यांचे प्रमाण पुढील कोष्टकावरून स्पष्ट होतील.

## रशियांतील जाती.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| आर्यन | स्लाव्ह | महारशियन | ५, ५६, ७३, ५०८ | श्वेतसमुद्रापासून प्स्कॉव सरोवरापर्यंत; ड्विना, डोनेट, सुरा, वेटलुगा व मेझेन नद्यांच्या प्रदेशांत; उरल पर्वतांत. भाषाः—व्हेलिकोरुस्किज पोटभाषा. |
| | | लघुरशियन | २, २३, ८०, ५५१ | दक्षिण व नैर्ऋत्य रशिया म्हणजे पोडोलिया, वोल्हिनिया, पोल्टाना आणि खिव प्रांत. भाषाः—मलोरुस्किज पोटभाषा. |
| | | श्वेतरशियन | ५८, ८५, ५४७ | मध्यभागच्या पटाराच्या पश्चिमेकडील उंचवट्याचा भाग. भाषाः वेलोरुस्किज पोटभाषा. |
| | | पोल | ७९, ३१, ३०७ | पोलंड. भाषाः–पोलिश पोटभाषा. |
| | | इतर स्लाव्ह | २, २४, ८५९ | |
| | लिथुआनियन | लेट | १४, ३५, ९३७ | विटेब्स्क, कूरलँड, लिव्होनिया प्रांत. भाषाः—स्लाव्ह पोटभाषा. |
| | | लिथुआनियन | १६, ५८, ५३२ | कोवनो, व्हिलना, सुवाल्की प्रांत. भाषाः—स्लाव्ह पोटभाषा. |
| | लॅटिन व ट्यूटॉनिक | जर्मन | १७, ९०, ४८९ | यूरोपीय रशिया, बाल्टन प्रदेश. सर्वत्र उच्च वर्ग व कारागीर. भाषाः जर्मन पोटभाषा. |
| | | ग्रीक | १, ८६, ९२५ | शहरांत तुटकपणें. भाषाः—ग्रीक पोटभाषा. |
| | | स्वीड | ३, ६३, ९३२ | भाषाः—स्विडिश पोटभाषा. |
| | | रुमानिअन | ११, ३४, १२४ | बेसआरेबिया, पोडोलिया, खेरसोन, एक्तेरिनोस्लाव प्रांत. भाषा.-रुमानिअन पोटभाषा. |
| | | इतर यूरोपीय | ३४, २७६ | |
| | इराणी | आर्मेनिअन | ११, ७३, ०९६ | दक्षिणरशियांतील शहरें. भाषाः—आर्मेनियन. |
| | | इराणी | ३८, ९२३ | |
| | | ताजिक | ३, ५०, ३९७ | |
| | | तालिशेन व टेट | १, ३०, ३४७ | |
| | | कुर्द | ९९, ८३६ | |
| | | ओस्सेटेस | १, ७१, ७१६ | |
| | ... ... | जिप्सी | २७, १२५ | |
| सेमेटिक | ... ... | यहुदी | ५०, ६३, १५६ | पोलंड. शहरें. |
| कॉकेशियन | जॉर्जिअन वंश | | १३, ५३, ४५५ | |
| | सरकॅशिअन वंश व इतर कॉकेशियन वंश | | १०, ९१, ७८२ | |
| कोर्याक, चुकची वगैरे | | | ३९, ३४९ | सैबेरिया. |
| चिनी जपानी कोरियन | | | ८६, ११३ | सैबेरिया. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| उरल अल्ताइन | फिन | इस्थोनिअन्स | १०, ०२, ७३८ | इस्थोनिया, लिव्होनिया. |
| | | फिन्स | २४, ९६, ०५८ | मध्यफिनलंड. |
| | | लॅप्स | ३, ११२ | उत्तर फिनलंड, कोला द्वीपकल्प. |
| | | मोर्डव्हिनिअन | १०, २३, ८४१ | काझन, कोस्ट्रोमा, व्याटका. |
| | | कारेलिअन | २, ०८, १०१ | पूर्वफ्रिमलंड, आर्चिंगल, नोव्हगोरॉड वगैरे. |
| | | चेरामिसेस | ३, ७५, ४३९ | काझन, कोस्ट्रोमा, व्याटका. |
| | | सिर्ग्रिएनिअन | १, ५३, ६१८ | व्होलोग्डा. |
| | | पेर्मिआक | १, ०३, ३३९ | पेर्म. |
| | | व्होतिआक | ४. २०, ९७० | पूर्व व्याटका. |
| | | इतर फिन• | ६७, ८४६ | |
| | | तवास्ट | | मध्य फिनलंड. |
| | | कावेन | | वायव्य फिनलंड. |
| | | इझांर्स | | नेव्हा नदी. |
| | | लिव्ह | | रिगाचें आखात. |
| | | व्होगुल | | उरल पर्वत. |
| | | ओस्तिआक | | तोबोल्स्क. |
| | | मग्यार | | उरलपर्वत. |
| | ... ... | सामोयिद | १५, ८६९ | आर्चेंगल, पश्चिम सायबेरिया. |
| | ... ... | तुंगुसेस | ७०, ०६४ | |
| | तुर्को तार्तार | तातार | ३७, ३७, ६२७ | |
| | | काझान | | व्होल्गा नदीवर, व्याझान; तंबोव्ह, समरा, सिंबस्कं, पेन्झा प्रांत. |
| | | आस्ट्राखानी | | व्होल्गाच्या मुखाजवळ. |
| | | क्रिमिअन | | तुर्कस्थानांत गेले ( १८५४-५६ क्रिमिअन युद्धांत). |
| | | बाष्किर | १४, ९८, ९८३ | दक्षिण उरल पर्वत, पेर्म, समरा प्रांत. |
| | | चुव्हाशेस | ८, ४३, ७५५ | व्होल्गा पूर्व किनारा, काझन, सिंबिर्स्क प्रांत. |
| | | मेश्चेर्याक | | ( मूळ फिनिश ) उफा, पेर्म प्रांत. |
| | | तेप्त्यार | | ( मूळ फिनिश ) समरा, व्याटका प्रांत |
| | | खिर्गिझ ( खिलजी ) | ४०, ८४, १३९ | ( मूळ आशियांतील ) इशिम आणि खिर्गिझ पठार. |
| | | तुर्क | २, ०८, ८२२ | |
| | | तुर्कोमन | २, ८१, ३५७ | |
| | | सार्ट | ९, ६८, ३५५ | |
| | | उझबेग | ७, २६, ५३४ | |
| | | याकुत | २, २७, ३८४ | |
| | | काराकल्पाक | १, ०४, २३४ | |
| | | इतर | ७, २४, ०३५ | |
| | मंगोल | कलमुक | १, ८५, २९४ | आस्ट्राखान. |
| | | बुरियात | २, ८८, ६६३ | |

**प्राचीन इतिहास.**—खिव येथील नेस्टर नांवाच्या एका भिक्षुबखरकारानें असें लिहून ठेविलें आहे कीं, ख्रिस्ती शतकाच्या नवव्या शतकांत लाडोगा सरोवर आणि नीपर नदीचा उत्तरभाग यांच्या दरम्यान वसती करून राहिलेले लोक रूसमधील कांहीं साहसी शिलेदारांस खंडणी देत असत. रूस हा प्रांत स्वीडनमध्यें होता असें म्हणतात. इ. स. ८५९ मध्यें त्यांनीं या रूसमधील लोकांस हांकून दिलें, परंतु ते निघून गेल्यावर जिकडे तिकडे बखेडे माजून अस्वस्थता उत्पन्न झाली. तेव्हां त्यांनीं रूस प्रांतांत कांहीं मंडळी पाठवून तेथील लोकांस पुन्हां राज्य करण्यास बोला-

वलें., रूस प्रांतांतून रूरिक, सिन्यूस आणि त्रुन्व्होर या नांवांचे तीन राजे आले. यांनीं ज्या घराण्याची स्थापना केली त्यांतील वंशज आजपर्यंत राज्य करीत होते.

हे रूसमधील लोक कोण होते याबद्दल आजपर्यंत बराच वादविवाद झाला आहे व या बाबतींत अजून एकमत झालेलें नाहीं. तथापि त्या वेळीं यूरोपच्या निरनिराळ्या भागांत आपल्या बाहुबलानें लुटालूट करीत फिरणाऱ्या ज्या नॉर्समेन अथवा नॉर्मन लोकांच्या टोळ्या असत त्यांपैकींच हे असावेत असें वाटतें. यांनीं निरनिराळ्या प्रदेशांत स्वाऱ्या केल्या व ठिकठिकाणीं आपल्या क्षत्रियवर्गाची स्थापना केली व पुढें स्थानिक लोकांत हे मिसळून गेले. रूरिक याची राजधानी नोव्हगोरोड हें शहर होतें व तें बाल्टिक समुद्राकडून काळ्या समुद्राकडे जाणाऱ्या हमरस्त्यावर होतें.

पोलंडमध्यें पुढें लिहिलेल्या जाती त्या त्या प्रदेशांत वसाहती करून आहेतः विएलकोपोलेनी–मध्य पोलंड प्रांतांत; मॅलोपोलेनी–वार्ता नदीवर; लेंक्झकेनी–नेर नदीच्या पाणथळ भागांत; कुर्पी–पोडलॅसी नदीच्या पाणथळ भागांत; कुजविआसी–सायलेशिया प्रांतांत; स्झलॅसी–सायलेशिया प्रांतांत; गोरेल–कार्पेथिअन पर्वतप्रदेशांत.

**या प्राचीन लोकांचा इतिहास.**—ऑस्ट्रियांतील साम्राज्याचें मूळ डॅन्यूब नदीच्या दक्षिण तीरावर एन्स नदीच्या पूर्वेकडील लहानशा प्रांतामध्यें आढळतें. याची स्थापना ख्रि. श. ८०० च्या सुमारास स्लाव्ह लोकांच्या स्वाऱ्यांपासून फ्रँकिश राज्याचें संरक्षण करण्याकरितां झाली. त्या वेळीं या राज्यांतील प्रदेशाची पूर्वपश्चिम लांबी अवघी ६० मैल होती. परंतु यामध्यें पूर्वेकडील बराच मोठा प्रदेश येतो असें समजून असल्यामुळें व जर्मनीच्या तो पूर्वेकडे असल्यामुळें त्यास ऑस्टेरिक म्हणजे पूर्वेकडील साम्राज्य असें नांव मिळालें. या नांवाचा उल्लेख प्रथमतः ख्रि. श. ९९६ मधील एका दस्तऐवजांत आढळतो. या राज्याची हळूहळू वाढ होऊन सध्यांचें ऑस्ट्रोहंगारीचें साम्राज्य तयार झालें. या साम्राज्यावर बबेनबर्ग आणि हॅप्सबर्ग हीं घराणीं आजपर्यंत एकापाठीमागून एक होऊन गेलीं.

या प्रदेशाच्या दक्षिण भागांत ख्रिस्तशकस्थापनेपूर्वी तैरिस्की या नांवाची एक केल्टिक जात रहात होती. यांनाच पुढें नोरिसि असें म्हणत. यांना रोमन लोकांनीं ख्रि. पू. १४ मध्यें जिंकलें होतें. यांच्या प्रदेशाचा पुढें पॅनोनिया आणि नॉरिकम या प्रांतांत समावेश झाला आणि रोमन सत्तेखालीं विंडोबाना (सध्यांचें व्हिएन्ना) या शहरास बरेंच महत्त्व आलें. डॅन्यूब नदीच्या उत्तरतीरावर मार्कोमानी व क्वादी जातीचे लोक राहत असत. त्यांचीं रोमन लोकांशीं वारंवार युद्धें होत. पुढें रोमन सत्तेच्या ऱ्हासकालीं हा प्रदेश हूण वगैरे उत्तरेकडील लोकांनीं व्यापला. ख्रिस्ती शक ५९० च्या सुमारास डॅन्यूब नदीच्या दोन्ही तीरांवर या प्रदेशांत स्लोव्हेन किंवा कोरुतेन नांवाच्या स्लाव्ह जातीच्या लोकांची वसती होती. हे त्या वेळीं सामो याच्या सत्तेखालीं असत व पुढें आवार लोकांच्या सत्तेखालीं गेले. ख्रि. श. ७९१ मध्यें शार्लमान राजानें यांच्यावर स्वारी केली व पुढें लवकरच सर्व आवार लोक फ्रँकिश साम्राज्यांत सामील झाले. ९व्या शतकामध्यें फ्रँकिश सत्ता नष्ट झाली आणि पुढें मोरेव्हिअन, मग्यार उर्फ हंगेरिअन इत्यादि लोकांनीं एकामागून एक येऊन त्या सत्तेचा मागमूस नाहींसा केला.

**हंगेरीमधील लोक.**–हंगेरी देशांत इ० स० १९०० सालीं पुढें दिलेल्या निरनिराळ्या जातींची वस्ती होती. हंगेरियन (मग्यार) ८५,८८,८३४; जर्मन (नेमेत) १९,८०,४२३; स्लोव्हाक (टोट) १९,९१,४०२; रुमानिअन (ओला) २७,८४,७२६; रुथेनिअन (रुथेन) ४,२३,१५९; क्रोएशिअन (होर्वत) १,८८,५५२; सार्व्हिअन (स्झर्ब) ४,३४,६४१; इतर ३,२९,८३७; मग्यार लोकांची वस्ती मध्यभागांतील मैदानांत डॅन्यूब व थेईस नद्यांच्या प्रदेशांत आहे. जर्मन लोक विशेषतः सखल (लोअर) प्रदेशांत व स्टिरिया प्रांतांत आढळतात. स्लाव्ह जातींपैकीं स्लोव्हाक लोक उत्तर हंगेरींतील डोंगराळ प्रदेशांत राहतात. रुथेनिअन लोक कार्पेथिअन पर्वताच्या उतरणीवर वस्ती करून आहेत. सार्व्हिअन लोक दक्षिण हंगेरींत दिसतात. क्रोएशिअन लोकांची संख्या विशेषतः क्रोआशिया स्लाव्होनिया प्रांतांत आढळते. स्लाव्ह लोकांपेक्षां रुमानिअन लोक संख्येनें बरेंच कमी असून ते आग्नेय दिशेकडील दहा परगण्यांत पसरले आहेत. यहुदी लोकांची वस्ती थोडी पण फार महत्त्वाची आहे. जिप्सींची संख्या १८९३ मध्यें २,७४,९४० होती पण त्यांपैकीं बरेच आपण मग्यार किंवा रुमानिअन आहोंत असें म्हणत व फक्त ८२,००० लोकांनीं आपली भाषा रोमी आहे असें सांगितलें.

**हंगेरींतील प्राचीन लोकांचा इतिहास.**—सध्यां ज्या प्रदेशास हंगेरी म्हणतात तो प्रदेश इ. स. ८९५ पर्यंत स्लाव्ह लोकांच्या ताब्यांत होता. त्या वर्षी मग्यार राज्याचा संस्थापक अर्पाद यानें त्यांच्यावर वेरेझ्का खिंडींतून आपल्या रानटी लोकांसह स्वारी करून दहा वर्षांच्या आंत मूळचें स्लाव्ह राज्य पूर्णपणें आपल्या कबज्यांत घेतलें. त्याप्रमाणेंच त्यानें दक्षिणेकडील प्रांतांतील बल्गेरियन, सर्ब, क्रोट, आवार वगैरे लोकांवर लवकरच आपली सत्ता स्थापित केली. ही अनार्य जात मध्येंच आल्यामुळें पूर्वेकडील व पश्चिमेकडील तसेंच दक्षिणेकडील व उत्तरेकडील स्लाव्ह लोकांमध्यें कायमचें अंतर पडलें. यामुळें स्लाव्ह लोकांच्या पश्चिमेकडील शाखेवर लवकरच ट्यूटॉनिक संस्कृतीचा पगडा बसला अर्पाद राजा इ. स. ९०७ मध्यें मरण पावला. याच्या नंतर गादीवर बसलेल्या दोन राजांच्या कारकिर्दींत मग्यार घोडेस्वार सर्व यूरोपभर इतस्ततः धिंगाणा घालीत होते. त्यांनीं थुरिंजिआ, स्वाबिया, बव्हे-

रिया वगैरे प्रांतांत शिरून जर्मन लोकांचा लेकफेल्ड येथें पराजय केला ( इ. स. ९०८-९१० ). पुढें इ. स. ९३३ मध्यें पराभूत जर्मन राजा पहिला हेनरी यानें सैन्य उभारून मग्यार लोकांचा गोथा आणि रीड येथें पूर्ण मोड केला. तेव्हां ते इतर प्रांतांकडे वळले. त्यांनीं ऱ्हाइन ओलांडून लोथरिंजिया प्रांत उध्वस्त केला. त्यांनीं पूर्वेकडील साम्राज्यावर चाल केली व कॉन्स्टंटिनोपलपासून खंडणी घेतली. ९४३ त त्यांनीं इटलींत प्रवेश केला व ९५५ त बर्गंडीवर स्वारी केली. अखेरीस ओटो (पहिला) यानें त्यांचा ऑग्सबर्ग जवळ पूर्ण पराजय करून त्यांची कत्तल केली ( ९५५ ). त्यांपैकीं फक्त सातजण वांचले पण तेहि बाटेंत गुलाम म्हणून विकले गेले. या वेळेपासून त्यांनीं मुलुखगिरी करण्याचें सोडून दिलें.

**बाल्कन द्वीपकल्पांतील लोक.**—या प्रदेशांत तुर्क लोक १४ व्या किंवा १५ व्या शतकांत आले. परंतु १९व्या शतकामध्यें तुर्की अंमलाखालून जो प्रदेश गेला त्या प्रदेशांतील मुसुलमानी लोकसंख्या हळू हळू कमी होत गेली व अद्यापिहि कमी होत आहे. सध्यां फक्त बल्गेरियामध्यें ईशान्य भागांत व ॲड्रिआनोपलपासून काळ्या समुद्रापर्यंतच्या प्रदेशांत यांची वस्ती आहे. एकंदर तुर्कांची संख्या १८,००,००० पेक्षां जास्त नाहीं. स्लाव्ह लोकांची संख्या एक कोटि आहे. यांत सर्बोक्रोट व बल्गर लोकांचाहि अन्तर्भाव होतो. सर्बोक्रोट लोक कार्पेथियन पर्वतामधून ७ व्या शतकांत आले. यांची संख्या ५६,००,००० आहे. बल्गर लोक हे स्लाव्ह आणि उग्रो फिनिश लोकांच्या मिश्रणानें उत्पन्न झालेले आहेत. त्यांची वस्ती मुख्यतः बल्गेरियामध्यें आहे. रूमन किंवा व्लाच जात ट्रान्सिल्व्हेनिया, दक्षिण हंगेरी, बेस अरेबिया वगैरे प्रांतांत आहे, पण त्यांची बाल्कन द्वीपकल्पांतील संख्या फार लहान आहे. यांची कांहीं वस्ती मासिडोनिया, अल्बेनिया, उत्तर ग्रीस व सर्व्हिया आणि बल्गेरियामध्यें थोडीशी आहे. आल्बेनियन हे प्राचीन इलिरियनलोकांचे वंशज आहेत ते मॉंटिनिग्रोच्या दक्षिण सरहद्दीपासून ग्रीसच्या उत्तर सरहद्दीपर्यंत पसरले आहेत. प्राचीन काळीं आशियामायनरमधून आलेले ग्रीक लोक या द्वीपकल्पांत फार प्राचीन काळापासून आहेत. ते ग्रीस व त्या सभोंवतालच्या प्रदेशांत वसती करून आहेत. आर्मेनियन, यहुदी व जिप्सी लोकांचीहि तुरळक वस्ती आहे.

**भाषा.**—तुर्की सत्तेखालीं असतांना ग्रीक व तुर्की या भाषांना महत्त्व होतें. परंतु इतर भाषाहि जीव धरून होत्या. हल्लीं निरनिराळे लोक आपआपल्या जातीची भाषा बोलतात. यामुळें तुर्की, ग्रीक, सर्व्हिअन, बल्गेरियन, अल्बेनियन इत्यादि भाषा त्या त्या लोकांत अस्तित्वांत आहेत.

**बाल्कन द्वीपकल्पांतील लोकांचा इतिहास.**—स्लाव्ह लोकांच्या टोळ्या या द्वीपकल्पांत ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकांत येण्यास सुरुवात झाली. व त्या यापुढें चार शतकेंपर्यंत एकामागून एक येतच होत्या. त्या वेळीं बायझंटाइन साम्राज्याचा या द्वीपकल्पावर अंमल होता. थ्रेस, इलिरिया वगैरे प्रांतांतले लोक लॅटिन भाषा बोलूं लागले होते. कांहीं थ्रेसमधील लोक डोंगरांत जाऊन राहिले होते. व त्यांचें बरेच दिवस पुढें इतिहासांत नांवच ऐकूं येत नव्हतें. यांचेच वंशज पुढें व्लाच या नांवानें प्रसिद्धीस आले. आल्बेनियामध्यें तेथील इलिरियन लोकांनीं कांहीं दिवस डोंगराळ मुलखाचा आश्रय करून आपुली भाषा व जात कायम राखली आणि पुढें या आगंतुकांस हांकून दिलें. ग्रीक लोक किनाऱ्यांचा व बेटांचा आश्रय करून राहिले. या प्रदेशांत अनेक ग्रामनामें स्लाव्ह भाषेंतील आढळून येतात. ६ व्या शतकांत स्लाव्ह लोकांनीं मोरिया प्रांतांत प्रवेश केला, व तेथें १५ व्या शतकापर्यंत एक स्लाव्ह भाषेचीच पोटभाषा प्रचारांत होती. ७ व्या शतकामध्यें सर्बोक्रोट लोकांनीं वायव्येकडील क्रोएशिया, सर्व्हिया, बोस्निया, हर्जेगोविना, मॉंटिनीग्रो व उत्तर आल्बेनिया या प्रांतांत प्रवेश केला. त्यांनीं मूळच्या इलीरियन लोकांस हांकून दिलें. अगर आपल्यांत मिसळून टाकलें. त्यांचे वंशज सध्यां मोरलॅक किंवा मव्रोव्लॅच नांवानें ओळखिले जातात. ७व्या शतकाच्या अखेरीस तुराणी वंशांतील बल्गर लोकांनीं डॅन्यूब नदी उतरून मोएशिया व थ्रेस प्रांतांतील स्लाव्ह लोकांवर आपला अंमल बसविला व पुढें त्यांस आपणांत मिसळून घेतलें. झार क्रुम ( ८०२—८१५ ) याच्या नेतृत्वाखालीं त्यांनीं ॲड्रियानोपल व मध्यमासिडोनियावर स्वारी केली, व सिमिअनच्या कारकीर्दींत (८९३—९२७) त्यांची सत्ता ॲड्रिआटिक समुद्रापासून काळ्या समुद्रापर्यंत पसरली होती. ९७१ मध्यें 'पहिलें बल्गेरियन साम्राज्य' जॉन झिमिसेस या बादशहानें नष्ट केलें; परंतु बल्गेरियनसत्ता पुनः ऑचरिडा येथील शिशमन घराण्यानें स्थापन केली. पुढें हें पश्चिम बल्गेरियन साम्राज्यहि लवकरच लयास गेलें.

व्लाच लोकांनीं प्रथम दहाव्या शतकामध्यें मासिडोनिया व पिंडस प्रांतांत आपली सत्ता स्थापन केली. या प्रदेशास त्या वेळीं ग्रेट वालाचिया म्हणत. सर्व्हिअन लोकहि स्टीफन नेमन्या ( ११६९—११९५ ) याच्या निशाणाखालीं एक होऊन आपली सत्ता स्थापन करण्याच्या उद्योगास लागले. दुसरें बल्गेरियन किंवा बल्गरो व्लाच साम्राज्य इव्हा व पीटर असेन नांवाच्या दोन भावांनीं ११८६ मध्यें त्र्नोव्हो नांवाच्या शहरीं स्थापन केलें. १३३० मध्यें सर्व्हिअन लोकांनीं बल्गेरियनांची सत्ता नष्ट करून आपली स्थापन केली. सर्व्हियन लोकांपासून अल्बेनियन लोकांनीं लवकरच सर्व सत्ता हिरावून घेतली. मध्यंतरीं बोस्नियन लोकांनीं त्व्रत्को ( १३५३—१३९१ ) नांवाच्या राजाच्या हाताखालीं आपली सत्ता थोडा वेळ स्थापन केली; परंतु निरनिराळ्या संस्थानांच्या आपसांतील वैमनस्यामुळें सर्व राज्यें तुर्की सत्तेस बळी पडलीं. तुर्कांनीं हळू हळू आपली सत्ता सर्व

द्वीपकल्पावर स्थापन केली व १४५३ मध्यें कान्स्टंटिनोपल घेऊन बायझंटाइन साम्राज्य नामशेष केलें. त्यांची सत्ता सुलेमान याच्या कारकीर्दीत् (१५२०—१५६६) कळसास पोंचली. पुढें १६८३ मध्यें त्यांच्या व्हिएन्ना येथील झालेल्या पराभवापासून तीस हळु हळू उतरती कळा लागली व अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत निरनिराळे स्वतंत्र पाशा उत्पन्न झाले.

**ग्रीसमधील लोक.**—ग्रीसमध्यें मुख्यत्वेंकरून तीन जातींची वस्ती आहे. त्या जाती ग्रीक, अल्बेनियन व व्लाच या होत. ग्रीक जात बऱ्याच जातींच्या मिश्रणानें बनलेली आहे. ही जात मूळ कोणत्या वंशापासून निघाली याबद्दल पंडितांमध्यें बराच वादविवाद झालेला आहे. तथापि हे लोक आपण प्राचीन होमरच्या युगांतील ग्रीक लोकांचे वंशज आहों असा अभिमान बाळगतात. परंतु फालमेरेयर नांवाच्या ग्रंथकारानें असें प्रतिपादन केलें आहे कीं, ८ व्या शतकांत जी स्लाव्ह लोकांची धाड या देशांत आली तिनें मूळच्या ग्रीक लोकांपैकीं जे थोडेफार त्या वेळीं शिलक राहिले होते त्यांस जवळ जवळ पूर्णपणें आत्मसात् केलें. म्हणजे सध्यांचे ग्रीक हे बायझंटाइन संस्कृतीचे स्लाव्ह लोक होत. या देशांतील पुष्कळ स्थळांस स्लाव्ह भाषेंतील नावें आहेत. व मोरियामध्यें १५ व्या शतकापर्यंत एक स्लाव्ह भाषेचीच पोटभाषा चालत होती या गोष्टीवरून वरील अनुमानास बळकटी येते. तथापि ग्रीक संस्कृतीचा परिणाम या देशात अबाधित राहिला असला पाहिजे व तसा तो दिसतो; या वरून तसा परिणाम घडवून आणण्यास त्याची संख्याहि बरीच असली पाहिजे. गॉथ लोकांनीं ख्रि. श. २६७ व ३९५ मध्यें ज्या स्वाऱ्या केल्या त्यांचा मानववंशशास्त्रदृष्ट्या फारसा परिणाम झालेला दिसत नाहीं. त्याप्रमाणें यूरोपीय मध्ययुगांत फ्रँक, व्हेनिशिअन, तुर्क इत्यादि लोकाच्या स्वाऱ्यांचेहि विशेषसे परिणाम दिसत नाहींत. यावरून ग्रीस मधील बायझंटाइन साम्राज्याच्या आरंभीच्या दिवसांत जी लोकवस्ती होती तिचेच वंशज मुख्यतः सध्यांचे ग्रीक असावेत असें कांहींचें म्हणणें आहे. परंतु ग्रीसमध्यें प्राचीनकालापासून असलेल्या निरनिराळ्या राष्ट्रांतील अन्तःकलहामुळें इराणी लोकांस शौर्यानें तोंड देणारे जुने ग्रीक लोक रोमन सत्तेच्या प्रारंभींच बहुतेक नष्टप्राय झालेले होते. स्पार्टन लोकांनीं प्लॅटिअन्सचा नाश केला, अथीनिअन लोकांनीं मेलिअन्स लोकांस पिलापोनिशन युद्धांत नामशेष केलें, त्या युद्धानंतर अथेन्समध्यें अनेमू लोकांस कायदेबाह्य करून ठार करण्यांत आलें, लोकपक्षानें कॉर्सिरिअन सत्ताधिकाऱ्यांस नाहींसें केलें, अलेक्झांडरनें थीबन लोकांची कत्तल केली, ममिअसनें कॉरिंथिअन लोकांस कंठस्नान घातलें याप्रमाणें ग्रीक शहरांतील प्रजेवर अनेक प्रसंग गुजरले. अर्थात् वेळोवेळीं गुलाम, शत्रुपक्षाचे लोक, त्यांचे वंशज वगैरेंची लोकसंख्येंत भर पडत गेली. गुलामांपैकीं बरेचसे लोक ग्रीकच असत. कारण एखादें शहर पडलें म्हणजे त्यांतील तरुणांची कत्तल केली जात असे व बायकापोरांस गुलाम म्हणून विकीत. प्राचीन कालीं खुद्द आटिका प्रांतांत एकंदर लोकसंख्येपैकीं चारपंचमांश लोक गुलाम होते व बाकीच्या लोकांपैकीं निम्मे परकीय लोक होते. रोमन सत्तेच्या कालांत तर गुलामांची संख्या अतोनात वाढली त्यामुळें शेतकरी वर्ग जवळ जवळ नाहींसा झाला, जे स्वतंत्र ग्रीक होते ते शहरांत राहूं लागले व सर्व शेती गुलामांकडून करून घेऊं लागले. प्लुटार्कनें लिहिलें आहे कीं, ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत ग्रीसमध्यें ३,००० सैनिक (होपलाइट) जमा करितां येईनात. प्राचीन ग्रीक वंशाचे नमुने आतां फक्त आर्केडिया, एजिअन बेटें व क्रीट बेटांत आढळतात.

आल्बेनियन लोकांची वस्ती मुख्यतः आटिका, मेगारिस, बिओशिया, लोक्रिस, यूबिया व अँड्रॉस या प्रांतांत व सालामीस, हैड्रा, स्पेत्सी, पोरोस व एजिनाचा कांहीं भाग इतक्यांत आढळते. हे आपणांस स्क्यीपेतर म्हणवितात व ग्रीक लोक त्यांस अर्बनिताइ असें म्हणतात. हे टॉस्क वंशाचे आहेत. हे या प्रातात १४ व्या शतकांत आले. यांच्या प्रसारास तुर्कांनीं प्रतिबंध केला. हे आपलीच भाषा बोलतात व त्यांच्या चालीरीतीहि भिन्न आहेत. यांनीं स्वातंत्र्याच्या युद्धांत फार महत्त्वाची कामगिरी बजावली.

व्लाच लोक आपणास अरोमनि (रोमन) म्हणवितात. यांची वस्ती पिंडस, थेसलीचा डोंगराळ प्रांत, ओथ्रिस, ओएटा, बिओशियाचे डोंगर, इटोलिया, अकरनेनिया वगैरे प्रातात आहे. हे पशुपालन व माल नेण्याआणण्याचा धंदा करितात. हे मूळचे या प्रातांतील लोक असून त्यांनीं रोमन सत्तेच्या कालात त्यांची संस्कृति स्वीकारली व पुढें रानटी लोकांच्या व स्लाव्ह लोकाच्या टोळ्या येऊं लागल्या तेव्हां ते डोंगरांत पळून गेले. याचे पूर्वी मोठा व लहान वालाचिया असे दोन प्रात होते. यांच्यापैकीं शहरात राहणाऱ्या लोकांनीं ग्रीक राहणी उचलली आहे व ते व्यापारांत तरबेज असतात. परंतु डोंगरांत राहणाऱ्या जाती अजून परिभ्रमणवृत्तीनें राहतात. व त्यांनीं आपली लॅटिन भाषा व आपल्या चालीरीती वगैरे कायम ठेवल्या आहेत.

**फिनो उग्रिअन.**—फिनोउग्रिअन हे यूरल अलटेक शाखेच्या भाषेचें अथवा भाषा बोलणाऱ्या वंशाचें नांव आहे. या नांवापैकीं पहिला भाग, त्याच्या शेजारच्या लोकांनीं, बालटिक समुद्राच्या पूर्व किनाऱ्यावर रहाणारे जे रहिवाशी त्यांना दिला आहे. कदाचित् टॅसीटस व टॉलेमी यांनीं वर्णन केलेले फेनिलोक व हे लोक एकच असावेत. कदाचित् झाडांत रहाणारे हे लोक असावेत यास्तव यांना फेन नांव पडलें असावें. फिन आणि फिनिश हा शब्द फिनलंडच्या रहिवाशांनाच लावतात असें नाहीं. तर रशियांत यांच्यासारख्याच ज्या जाती आहेत त्यांना लावतात. या दृष्टीनें पाहिलें असतां, एस्थोनियन, लॅप्स, चेरेमीस आणि मॉरड्वि-

नस व पर्मिअन जाती देखील फिन्सच आहेत. परंतु ओस्टियाक, वोगल, आणि मग्यार लोक उग्रिअन या शाखेच आहेत.

फिनो उग्रिअन हें नांव भाषेवरून पडलें असल्यामुळें विशिष्ट शरीररचना व विशिष्ट चालीरीतीचें दर्शक हें नांव नाहीं. तरीपण भाषेचा प्रश्न सोडून दिला तर हंगेरीयन लोकांशिवाय इतर फिनोउग्रिअन लोक एकवर्गी आहेत यांत शंका नाहीं. ते अगदीं रानटी अवस्थेंतले आहेत; त्यांनीं कोठें शौर्यहि दाखवलें नाहीं व त्यांनां राजकीयसंघटनेचीहि शक्ति नाहीं. जे यूरोपीअन लोकांच्या चालीरितीपासून अलिप्त आहेत, त्यांची रहाणी अगदीं साधी असून त्यांच्यामध्यें पितृसत्ताक राज्यपद्धति अस्तित्वांत आहे.

यांचें राहण्याचें मुख्य ठिकाण रशिया आहे. बाल्टिक पासून सायबेरियापर्यंतच्या जंगलांत व विशेषतः सरोवरें व नद्या यांच्या कांठीं ह्यांची वस्ती असते. त्यांच्या ठिकाणीं राजकीय सत्ता नसल्यानें त्यांनां फारसें महत्त्व नाहीं. पण रशियाच्या उत्तर, मध्य व पूर्व प्रांतांमध्यें यांची फार संख्या आहे. महारशियन व लघुरशियन यांच्यामध्यें जो फरक दृष्टीस पडतो तो फिनिशरक्ताच्या भेसळीचा परिणाम होय.

फिनोउग्रिक जाती शरीरानें फार बळकट, ठेंगू अगर मध्यम बांध्याच्या व चपट्या असतात. यांची कातडी, पांढरट, डोळे घारे व निळे, केंस थोडे, व दाढी फारच कमी असते. यांच्यामध्यें मानसिक अगर शारीरिक उत्साह यावा तितका दिसून येत नाहीं. ते, मंद, आळशी, संशयी, खुनशी, मलूल असे दिसतात. उलटपक्षीं ते, उद्योगी, शांत, विश्वासूक, प्रामाणिक व सत्कार करणारे असतात.

**जाती व राष्ट्रें.**—उग्रियम शाखेच्या ओस्टियाक, वोगल व हंगेरियन अशा तीन उपशाखा आहेत; व या तीनहि उपशाखांमध्यें कमी अधीक उच्च प्रकारची संस्कृति दिसून येते.

**ओस्टीयाक.**—हे लोक, प्राचीन रानटी व्याध व कोळी या जातीचे आहेत. हल्लींची यांची वस्ती ओबीच्या तीरावर व टोबोलस्क प्रांतांत आहेत. प्राचीनकाळीं, युरलपर्वताच्या यूरोपीय मुलखांतील पर्म प्रांतांत ते हळू हळू पसरले. येनिसी शाखेचे ओस्टीयाक लोक हे फिनोउग्रिअन शाखेच्या लोकांपेक्षां निराळे आहेत. हे ओस्टियाक लोक अद्याप मूर्तिपूजक असून ओबीनदीची ते पूजा करतात.

**वोगल.**—यूरलच्या दोन्ही बाजूला आढळून येणारी व पूर्वी वोलोग्डाच्या हद्दीपर्यंत पसरलेली, एक रानटी जात आहे. ओस्टीयाक व वोगल या लोकांच्या भाषा बहुतेक सारख्याच आहेत पण पश्चिम व पूर्व फिन्स लोकांच्या भाषेहून निराळ्या आहेत.

**मग्यार अथवा हंगेरियन.**—अशी एक दंतकथा आहे कीं निम्रॉडला ह्यूनियार आणि मग्यार नांवाचे दोन मुलगे होते. त्यांची लग्नें ॲलन्स नांवाच्या राजाच्या मुलींशीं झालीं व हे दोन जवळ जवळ सारख्या राष्ट्रांचे पूर्वज बनले. अर्थात बायबलांतील उत्पत्ति तत्त्वज्ञानापेक्षां जास्त महत्त्व असल्याची माहिती देतां येत नाहीं. हूण व मग्यार, ह्या टर्की व फिनोउग्रियन गुणधर्मांनीं युक्त अशा मिश्र जाती होत्या असेंहि म्हणण्यास जागा आहे. यांची भाषा फिनोउग्रिअन आहे परंतु हंगेरियन या शब्दाची पूर्व पीठिका पाहूं लागल्यास अनउगर ह्या शब्दावरून तुर्की संबंध आढळून येतो व मग्यार व हूण या लोकांच्या लष्करी वृत्तीकडे पाहिल्यास हा संशय दृढ होतो. चीनच्या सरहद्दीजवळच्या लोकांत हिउंगनु असा एक प्रयोग आढळतो पण हल्लीं आतां विद्वानांनीं असें ठरविलें आहे कीं, हल्लींच्या हंगेरियन लोकांच्या पूर्वजांच्या जाती, काकेशसच्या उत्तरेकडील टेरेक क्यूबन प्रदेशांत बनल्या असून तेथें उग्रिअन व तुर्की रक्ताचें मिश्रण बनून, उग्रिअन लोकांची भाषा व तुर्की आचारविचार या मिश्रणांत राहिले. शिवाय इराणी व काकेशसच्या जवळ असलेल्या अनेक जातींचा यांच्यावर परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. हूण व मग्यार हे पश्चिमेकडे हळू हळू सरकत चालले. पण हूण लोकांनीं ५ व्या शतकांत यूरोपवर स्वारी करून पुष्कळ देश जिंकला असून सुद्धां त्यांनीं कायमची वस्ती कोठेंहि केली नाहीं. पण मग्यार लोक मात्र डॉनच्या तीरापाशीं कित्येक शतकेंपर्यंत राहिले. अशी दंतकथा सांगतात कीं रानटी जातीच्या त्रासामुळें त्यांनां लेबेडिया प्रांत सोडावा लागला व सात ड्यूकांच्या नेतृत्वाखालीं ते पश्चिमेकडे सरकले. इ.स. ८८४-९५ या अवधींत त्यांनीं हंगेरी हा प्रांत जिंकला, व या जिंकलेल्या पहिल्या मुलखांचा राजा 'अर्पाद' या नांवानें संबोधला गेला. अकराव्या शतकांत मग्यार लोक ख्रिस्ती धर्माचे व रोमन चर्चचे अनुयायी झाले. त्यांनीं, आपली पूर्वीची शरीररचना जवळ जवळ लुप्त करून टाकली आहे. पण त्यांनीं आपली भाषा कायम ठेवली आहे; शिवाय त्यांच्यामध्यें, पूर्वीच्या ज्या घोड्यावर बसण्याचा शोक वगैरे संवई होत्या, त्या अद्याप दृष्टीस पडतात.

खालील प्रमाणें फिनीश लोकांच्या जाती आहेत.

**पर्मियन व सीर्येनियन.**—या लोकांची एकच जात मानतां येईल. या दोन्हीहि जाती आपल्यास 'कोमी' म्हणवून घेतात. व व्होटियाक लोकांच्या सारखीच भाषा बोलतात. ह्या जाती विशेषतः पर्म, व्होलोग्डा व आर्चेंजल या प्रांतांत आढळून येतात; परंतु उरल पर्वताच्या सायबेरियाकडील बाजूला ते विशेषसे आढळून येत नाहींत. सीर्येनियन लोकांची मुख्य वस्ती पेचोरा वरील इझ्मा या शहरांत आहे; व वरच्या कामा नदीच्या उजव्या तीरावरील रहिवाशांनां पर्मिअन हें नांव आहे. प्राचीन कालीं या दोन्हीहि जाती पश्चिमेकडे पुष्कळशा सरकल्या असें दिसतें. फिनीश लोकांच्या इतर जातीपेक्षां सीर्येनिअन लोक, बुद्धिमान् व उत्साही असून व्यापारासाठीं पुष्कळ ठिकाणीं प्रवास करतात. हे लोक बहुधा संकरवर्णाचे आहेत.

**व्होटियाक.**—व्हियाटकाच्या प्रांताच्या आग्नेय दिशेकडे मुख्यतः वस्ती करणाऱ्या सुमारें अडीच लक्ष लोकसंख्येचा व्होटियाक ही एक जात आहे. त्यांच्या भाषेकडे पाहिलें असतां तार्तर व च्यूव्हशस लोकांचे पुष्कळच शब्द यांनी उचललेले आहेत असें दिसतें. ते मानसिक अगर शारीरिक दृष्ट्या अशक्त असून त्यांचा स्वतःचा असा विशेष गुणधर्म दिसत नाहीं. ते स्वतः आपल्याला उदमुर्ट म्हणवून घेतात. सोळाव्या शतकाच्या सुमारास रशियाच्या हल्ल्यामुळें यांपैकीं कांहीं लोक युफाच्या राज्यांत आले आणि तो देश फार सुपीक असल्याकारणानें तेथें त्यांच्या शरीरांत चांगली सुधारणा झाली.

**चेरेमिशियन.**—हे स्वतःला मारी म्हणवून घेतात. हे काझानच्या शेजारीं व्होल्गाच्या तीरावर रहातात. व्होल्गाच्या दक्षिण तीरावर रहाणारे लोक फार सशक्त असतात. शहरांच्या नांवावरून पहातां मॉर्डव्हिन लोकांनीं उत्तरेकडे व पुन्हा रशियन लोकांनीं दक्षिणेकडे हांकल्यामुळें त्यांनीं हल्लींची जागा स्वीकारली आहे असें दिसतें. त्यांच्या भाषेत व शरीराच्या ठेवणींत थोडें वैषम्य दिसतें. त्यांच्या भाषेत व मॉर्डव्हिनिअन आणि पर्मिअन जातींच्या भाषेत साम्य आहे. ते सरळ व प्रामाणिक आहेत पण चलाख व बुद्धिमान नाहींत.

**मार्डव्हिनिअन.**—हे लोक मध्यव्होलगालगतच्या प्रांतांत विशेषतः निझनी, नोव्हगोरड, काझान, पेंझा, टांबोव्ह, सिंबर्स्क, युफा, आणि ओरेनबर्ग येथें पसरलेले आहेत. यांचे मुलूख तुटक पसरलेले असले तरी त्यांचा विस्तार फार मोठा आहे. पूर्वेकडील फिन्स लोकांत हेच प्रमुख आहेत व त्यांच्या एका दंतकथेंत त्यांची पूर्वी एक राजधानी असून त्यांचा राजा तार्तार लोकांशीं लढला असें लिहिलें आहे. सहाव्या शतकांत त्यांनां मॉर्डन असें संबोधण्यांत येत होतें. परंतु हल्लीं ते आपल्याला मोक्षा अथवा इर्झा म्हणवून घेतात. त्यांचा मुलुख खूप जंगलमय आहे. त्यांची भाषा कांहीं अंशीं चेरेमिसिअन लोकांच्या भाषेशीं तर कांहीं अंशीं फिनिश लोकांच्या भाषेशीं सादृश्य दाखवते. तरी पण तिचे स्वतःचें कांहीं विशेष गुण आहेतच.

**लॅप.**—हे नॉर्वे, स्वीडन, आणि फिनलंडमध्यें आढळून येतात. यूरोपमधील ते अत्यंत खुजे लोक आहेत. त्यांच्यातील पुष्कळ लोक रानटी असून रेनडिअर नांवाच्या हरणांचे कळप बाळगतात व डोंगरांत राहतात. परंतु कांहीं लोक व्याधाचा अथवा कोळ्याचा धंदा करतात. प्राचीन कालापासूनच हे लोक चेटूक करण्याबद्दल प्रसिद्ध आहेत.

**एस्थोनियन.**—हे लोक एस्थोनिया नांवाच्या रशियाच्या प्रांतांतील शेतकरी आहेत. "१८१७ पर्यंत ते गुलाम होते. पण त्यानंतर त्यांची गुलामगिरींतून सुटका झाली. फिन्स लोकांची हे शाखा आहेत. परकी लोकांना एस्ट या नांवानें ते माहीत आहेत. परंतु हें नांव वास्तविक पाहतां दुसऱ्या जातींचें आहे. ते स्वतःला मामेस (अनागर लोक) असें म्हणवून घेतात व आपल्या देशाला रवामा अथवा विरोमा असें म्हणतात त्यांच्या आसपास असणाऱ्या रशियन व जर्मन लोकांशा संबंध आल्यामुळें ते जास्त सुधारलेले आहेत.

**लिव्होनियनः**—पश्चिम लिव्होनिया आणि उत्तर कुर्लंडच्या प्राचीन फिनिश भाषा बोलणाऱ्या जातींचे हे लोक आहेत. मध्ययुगामध्यें ते शूर व मूर्तिपूजक लोक दिसतात व प्रथम पासूनच ते लेटोफिनिश या संकर जातीचे लोक असावेत असा तर्क आहे. हल्लींच्या काळीं लेट लोकांत ते फार मिळून गेले आहेत व त्यांची भाषा कुर्लंडच्या आसपास दृष्टीस पडते. त्या भाषेचें लिव्होनियन हें नांव असून तिचें एस्थोनियन भाषेशीं साम्य आहे.

**व्होट.**—हे दक्षिण चूड आणि वज्जलाइसेट या नांवानें हि प्रसिद्ध आहेत. सेंट पीटर्सबर्गच्या आसपासच्या इंग्रियाचे मुलुखांतील रहिवाशी असावेत; परंतु उत्तरेकडून कॅरेलियन व रशियन लोकांच्या झालेल्या हल्ल्यामुळें ते कमी झाले. ११ व्या शतकांत त्यांचा उल्लेख आढळतो व हल्लीं त्यांची वस्ती इंग्रियाच्या ईशान्येला आहे.

**व्हेप्सः**—यांनां उत्तरवासीय चूड असेंहि म्हणतात. यांचें व एस्थोनियन लोकांचें साम्य आहे. व्होट लोकांपेक्षां हे लोक संख्येनें जास्ती आहेत. ते तिखाव्हिनस्क प्रदेशांत व ओल्ड नोव्हगोरोड प्रांतांत आढळून येतात. ते प्राचीन काळीं व्होलोग्डा प्रांतांत पसरलेले दिसतात. भाषाशास्त्राच्या दृष्टीनें व्होट व व्हेप्स यांचें एस्थोनियनशीं फार साम्य आहे.

**फिनः**—हे लोक या सर्व शाखेमध्यें वरिष्ठ आहेत. ते हल्लीं फिनलंडच्या परगण्यांत व त्याच्या आसपासच्या ओलोनेटझ, व्हर, सेन्टपीटर्सबर्ग या प्रांतांत आढळून येतात. प्राचीन काळीं कैनुलायझेट नांवाची त्यांची उपशाखा स्वीडनमध्यें आढळून आली होती. व यामुळें स्वीस लोक यांनां व्हेन असें म्हणत व हल्लीं या लोकांचे मुख्यतः दोन वर्ग आहेत. फिनलंड परगण्याच्या दक्षिण व पश्चिम भागांत रहाणारे टाव्हास्टलॅंडर अगर हॅमेलायसेट व पूर्वेकडे व उत्तरेकडे आढळणारे कॅरेलियन अथवा कर्जालायसेट हे होत.

या परगण्यांतील दोन्ही प्रकारचे पण विशेषतः हॅमेलायसेट लोकांवर स्वीडिश लोकांच्या चालीरितींचा परिणाम फार झाला आहे. स्वीडिश रक्त यांच्यामध्यें मिसळलेलें आहे. भाषेत स्वीडिश शब्द फार आहेत. सार्वात्रिक ख्रिस्ती धर्म प्रमृत आहे. शहरांतील आणि वरच्या दर्जाचे लोक आचार विचारांत मुख्यतः स्वीडिश लोकांप्रमाणेंच आहेत. हल्लीं या सर्व लोकांनां रशियन आचार विचारांचा परिचय करून देण्याचा व त्या विचारांचे बनवण्याचा प्रयत्न चालला आहे. फिन लोकांचें तत्सदृश जातींशीं जरी गुणधर्मांच्या बाबतींत फार साम्य असलें तरी एकंदरींत ते फार बुद्धिमान व सुधारलेले लोक आहेत. त्यांच्यामधील काव्यांचा व गोष्टींचा संग्र

करण्यांत आला आहे. त्यांत १८३५ मध्यें रचलेलें लोकग्रा ट्य काव्य ' कालेवाला ' हें फार प्रसिद्ध आहे. राष्ट्रभाषांचा अभ्यास हेल्सिंगफोर्स येथें चालू झाला आहे. अनेक संस्था स्थापन झाल्या आहेत व अनेक शोध लावलेले आहेत. फिनिश लोकांनीं ही शास्त्रविषयक चळवळ मोठ्या नेटानें चालविली आहे तरी यांत देखील स्वीडिश वाङ्मयाचें वर्चस्व दिसून येतें. या मुख्य भाषेशिवाय त्यांची दुसरी महत्त्वाची भाषा म्हणजे सॅव्हॉलॅक्सची भाषा होय.

**कॅरेलियन:**—हे लोक जरी फिन लोकांपेक्षां निराळे आहेत तरी त्यांना फिनमध्यें गणण्यांत येतें. त्यांच्यावर स्वीडिश लोकांपेक्षां रशियन लोकांच्या आचारविचारांचा परिणाम फार झाला आहे. परंतु ते ज्या भागांत रहातात त्यांतील बराच भाग मागसलेला असल्यामुळें यूरोपियन सुधारणेचा त्यांना फारसा संसर्ग झाला नाहीं. हे फिन लोकांपेक्षां दांडगे, धाडसी, विनोदी पण किंचित हट्टी लोक आहेत. त्यांची एकंदर लोकसंख्या २,६०,००० असून त्यांपैकीं ६३,००० ओलोनेटझ व १,९५,००० व्हर आणि नोव्होगोराडमध्यें आहेत. ते रशियन चर्चचे अनुयायी आहेत. फिन हे प्रॉटेस्टंट आहेत. तसेंच कॅरेलियन लोक कॅलूगा, यरुस्लाव्हल, व्हॅलॅडिमिर, व्होलोग्डा आणि टांबोव्ह येथें असल्याचा पुरावा सांपडला आहे.

**सामोइड.**—या लोकांचा फिनोउग्रियन जातींत समावेश करून घ्यावा किंवा न घ्यावा याबद्दल वादविवाद चालू आहे. युरलच्या दोन्ही बाजूला असणाऱ्या व्हाईट आणि कारा समुद्राच्या हद्दीवर असणाऱ्या निर्वृक्ष जंगलांत हरणांच्या कळपांनिशीं फिरणारे हे रानटी लोक आहेत. संस्कृतींत व आचारांत त्यांचें व फिनो उग्रियन लोकांचें साम्य आहे; व यासाठीं त्यांचा यांतच समावेश केला आहे.

याशिवाय अनेक जातींचा यांत समावेश करण्यांत यावा असा वाद आहे पण त्यांपैकीं पुष्कळ जाती निर्मूळ झाल्या असल्यामुळें आणि कांहींनीं आपल्या भाषा बदलल्यामुळें थोडेंसें कठिण काम झालेलें आहे.

बल्गेरियावर स्वारी करण्यापूर्वी व्होल्गानदीवर वसती करणारे मूळचे बल्गेरियन लोक जवळ जवळ मग्यार लोकांप्रमाणेंच होते असें दिसतें. मध्ययुगामध्यें, दक्षिण रशियामध्यें व कास्पियन समुद्रावर रहाणारे ख्वाझार हे फिनो उग्रियन होते कीं तुर्क होते याबद्दलचा वाद चालला आहे. हीच स्थिति अव्हार व पेचेनेग लोकांसंबंधीहि आहे. लष्करी संघ जातीसंकर वगैरे मध्यएशियामध्यें वारंवार होत असल्यानें नेहमीं भाषेमध्यें बदल होतो व त्यामुळें भाषा निश्चित नसते.

हल्लींचे तार्तर भाषा बोलणारे बश्कीर, मेशेचेर, आणि टेप्टर हे मूळचे फिन लोक असावेत असा तर्क आहे. व तीच स्थिति चुव्हाशांच्या बाबतींत आहे. सायोट नांवाची अप्रसिद्ध जात देखील मूळची फिनो उग्रियन वर्गाची असावी.

चूड हें नांव वास्तविक व्हेप्सर, अगर व्होट लोकांना लावलें पाहिजे. आज हा शब्द सर्व फिनोउग्रियन जातीला लावण्यांत येतो. कांहीं रशियन प्राच्य संशोधक, या नांवाचा पर्मिअन शाखेला लावण्यांत उपयोग करतात.

याप्रमाणें सध्यांच्या यूरोपीय लोकसमाजाचे घटक आहेत. आतां आपण यूरोपीय इतिहासाचें कथासूत्र पुढें चालवूं.

---

# प्रकरण २० वें.

## राष्ट्रसंवर्धन राष्ट्रांतील चुरस व जगाची ओळख

इसवी सनाच्या सोळाव्या शतकांत यूरोपच्या इतिहासांत मुख्यतः संप्रदायसुधारणा व राष्ट्रपद्धतींची वाढ या दोन गोष्टी प्रामुख्यानें आपल्या नजरेसमोर येतात.

**ख्रिस्ती संप्रदाय सुधारणा.**—मागें सांगितलेंच आहे कीं ख्रिस्ती संप्रदायाच्या आचार्यपीठामध्यें म्हणजे पोपच्या कारभारांत अंतःकलह सुरू होऊन पोपची सत्ता पूर्वीसारखी राहिली नव्हती. एकंदर ख्रिस्ती संप्रदायसंस्थेंत अव्यवस्था माजल्यामुळें तिचा ऱ्हास फार झपाट्यानें होत होता. इकडे मुद्रण कलेचा शोध व मुद्रितग्रंथप्रसार व पुनरुज्जीवनाची चळवळ यामुळें लोकजागृति उर्फ बुद्धिभेद उत्पन्न झाला. पोपच्या व्यवस्थेंत अनाचार असून तिच्यांत सुधारणा करणें अवश्य आहे अशी त्यांची समजूत होऊं लागली. नंतर मार्टिन लूथर या नांवाचा एक उपदेशक पुढें आला. व ख्रिस्ती संप्रदायांतील दोष दाखवून सम्राट व पोप यांच्या विरोधाची पर्वा न करितां ख्रिस्ती संप्रदायाचा आद्य ग्रंथ जो बायबल त्याकडे वक्री अवलोकन करून त्यानें 'मूळ' मताचाच उपदेश करण्याचा प्रयत्न केला. त्यानें जो संप्रदाय स्थापन केला त्यांत पारमार्थिक मतांच्या बाबतींत पोपची सत्ता मानावयाची नाहीं, हें पहिलें मत आहे. त्याच्या पंथास प्रोटेस्टॅन्टिझम् हें नांव असून तदनुयायी लोकांस प्रोटेस्टन्ट असें म्हणतात. प्रोटेस्ट म्हणजे आक्षेप अथवा विरोध. प्रोटेस्टंट म्हणजे विरोध ( पोपच्या सत्तेस ) करणारा आणि प्रोटेस्टांटिझम म्हणजे विरोधवाद. पुढें पोपच्या विरुद्ध पुष्कळ पंथ निघाले व ते सर्वच पोपसत्तेला विरोधी असल्यामुळें प्रोटेस्टन्ट या नांवांत सर्वांचा समावेश होई. म्हणून त्याच्या मधील भेद दाखविण्यासाठीं कधीं कधीं लूथरी पंथास ल्यूथरंनिझम असें म्हणतात. सोळाव्या शतकाचा इतिहास म्हणजे प्रोटेस्टन्टिझम व रोमन कॅथॉलिसिझम ( लुथरचा व इतर पाखंड पंथ व पोपचा पंथ म्ह० मूल संप्रदाय ) यांतील भांडण हें होय. मागें सांगितलेंच आहे कीं या शतकांत दुसरी महत्त्वाची गोष्ट झाली म्हणजे राष्ट्रपद्धतींची वाढ ही होय. यूरोपांत बहुतेक सर्व ठिकाणीं राजघराणीं स्थापन झालीं. पुढें कांहीं राजे प्रबल झाले. व सहजच त्यांना राज्यविस्ताराची हांव उत्पन्न झाली. याचा परिणाम असा झाला कीं

सोळाव्या व सतराव्या शतकांत राज्य विस्ताराकरितां मोठमोठ्या लढाया झाल्या. याचवेळेस राजनीतिशास्त्रांत दिर्गनिराळ्या संस्थानांच्या अस्तित्वासाठीं व स्थैर्यासाठीं "स्थितिसाधकता" असावयास पाहिजे हे तत्त्व उद्भूत झालें या तत्त्वानें प्रबल राजांच्या वाढत्या सत्तेस पुष्कळदां आळा घालून (उ. फ्रान्सचा १४ लुई, स्पेनचा दुसरा फिलीफ यांच्या) १८ व्या शतकापर्यंत यूरोपांतील राजकीय व्यवस्थेत समतोलपणा राहिला.

संप्रदायक्रांति व प्रॉटेस्टंट पंथाचा विजय हीं आणि राष्ट्रपद्धति व तज्जन्य युद्धें हीं परस्परावलंबी आहेत. पहिला फ्रान्सिस व पांचवा चार्लस हे अनुक्रमें फ्रान्स व जर्मनी यांच्या गाद्यांवर आल्याबरोबर त्यांच्यामध्यें इ. स. १५२१ यावर्षी कलह सुरू होऊन तो इ. स. १७५६ या वर्षापर्यंत चालला. या कलहाच्या आरंभींच पॅव्हिआच्या लढाईत (इ.स. १५२८) फ्रॅन्सिसचा पराभव होऊन जर्मन सम्राट यशस्वी झाला. परंतु इतक्यांत तुर्क लोकांच्या स्वाऱ्या व जर्मनींतील संप्रदायक्रांति यांकडे लक्ष देणें चार्लसला जरूर झालें. पुढें तुर्क लोकांनां हांकलून लावण्यांत व प्रॉटेस्टन्ट पंथाचा मोड करण्यांत चार्लस गुंतला असतां पुन्हां फ्रान्सिसनें युद्ध सुरू केलें. म्हणून त्यास तीं कामें तशीच अर्धवट टाकून फ्रॅन्सिसकडे लक्ष द्यावें लागलें. इ. स. १५४४ यावर्षी क्रेपीच्या तहानें फ्रान्सिस व चार्लस यांमधील तंटा मिटून चार्लस मोकळा झाला. परंतु इतक्या वर्षांत प्रोटेस्टन्ट पंथाची वाढ इतक्या झपाट्यानें झाली कीं, यावेळेस त्याचा नाश करणें जवळ जवळ अशक्य झालें. शेवटीं इ.स.१५५५यावर्षी ऑग्सबर्ग येथें झालेल्या तहानें चार्लसला प्रोटेस्टन्ट पंथ मान्य करावा लागला. याप्रमाणें चार्लस व फ्रान्सिस यांच्या भांडणामुळें प्रॉटेस्टन्ट पंथाचा फायदा झाला. तसेंच संप्रदायक्रांति व तज्जन्य अशांतता यांकडे चार्लसला लक्ष द्यावें लागल्यामुळें त्याला फ्रान्सिसशीं झालेल्या भांडणांतहि यश आलें नाहीं. कारण इ. स. १५५३ यावर्षी मेट्झ टूल व व्हरडून हीं त्याच्या हातून गेलीं. शेवटीं इ. स. १५५६ यावर्षी साम्राज्याची राज्यव्यवस्था आपला भाऊ फरडिनान्ड याजकडे सोंपवून स्पेन व नेदरलंड हे प्रांत आपल्या मुलाच्या हातीं देऊन, चार्लसबादशहा स्पेनमध्यें विश्रांति घेत राहिला. फिलिपनें सेन्ट क्विन्टेन येथें १५५८ यावर्षी फ्रान्सिसचा पराभव करून त्यास तह करावयास भाग पाडलें. त्यानंतर फ्रान्सिस व हॅप्सबर्ग घराणें यांतील भांडण अजिबात बंद पडलें.

इतःपर फ्रान्स, स्पेन, जर्मनी व इंग्लंड येथील राजे आपापसांतील कलहापासून मुक्त झाल्यामुळें संप्रदायांतील मतक्रांति व अधिकारक्रांति यांकडे त्यांस लक्ष देण्यास फावलें. मागें सांगितलेंच आहे कीं आतां प्रॉटेस्टन्ट पंथाची वाढ फार झपाट्यानें होऊन इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी व डेन्मार्क या देशांत प्रोटेस्टन्ट पंथाभिमान्यांची संख्या वाढत चालली.

**रोमन कॅथोलिक पंथाचें पुनरुज्जीवन व प्रॉटेस्टंट पंथाची पिच्छेहाट.**—इसवी सनाच्या १६ व्या शतकाच्या मध्यापासून प्रॉटेस्टन्ट पंथाची पिछेहाट होण्यास प्रारंभ झाला. या काळाला सुधारणाविरोधी चळवळीचा काळ म्हणतात. ट्रेन्ट येथें भरलेली सभा, जेसूइट लोकांची संस्था, 'सांप्रदायिक न्यायसभा' या तीन संस्थांमुळें प्रोटेस्टन्ट पंथाची बरीच पिछेहाट झाली. ट्रेन्ट येथें भरलेल्या सभेंत रोमनकॅथोलिक पंथाचीं सांप्रदायिक मतें जमवून त्यांनां एक निश्चित स्वरूप दिलें गेलें. याशिवाय धर्माध्यक्ष व संस्कर्ते यांच्यांतील अनीति कमी करण्याकरितां पुष्कळ नियम तयार करण्यांत आले. यामुळें रोमनकॅथोलिक संप्रदायाविरुद्ध असलेली ओरड बरीच बंद झाली. जेसूइट लोकांची संस्था ही पोपच्या आधिपत्याखालीं काम करीत असे. प्रॉटेस्टन्ट पंथाचा नाश व कॅथोलिक पंथाचा प्रसार करणें हे या संस्थेचे मुख्य हेतु होते. जेसूइट लोक यूरोपमधील सर्व देशांत जाऊन तेथील लोकांनां फुकट शिक्षण, आजारीपणांत मदत वगैरे लोकोपयोगी कामें करीत. इ. स. च्या १६ व्या शतकांत युरोपांतील पुष्कळ देशांचें शिक्षण यांच्या हातांत असून त्यांच्या द्वारें ते आपल्या मतांचा प्रसार फार लवकर करूं शकले. सांप्रदायिक न्यायसभा (इनक्विझिशन) ही प्रॉटेस्टन्ट पंथाभिमान्यांची चवकशी करून त्यांनां शिक्षा देण्याकरितां स्थापन केलेली एक संस्था होती. या संस्थेनें हजारों प्रॉटेस्टन्ट लोकांनां शिक्षा देऊन फांसाला चढविलें. या वर सांगितलेल्या तीन गोष्टींनीं प्रॉटेस्टन्ट पंथाची पिछेहाट होऊन कॅथोलिक पंथ कायम राहिला. इतकेंच नव्हे तर यूरोपांतील प्रमुख देशांत कॅथोलिक पंथाचा फारच जारीनें प्रचार होऊन, प्रॉटेस्टंट पंथ अजिबात नाहींसा होतो कीं काय अशी भीति पडली. पांचवा पायस (पोप) व स्पेनचा राजा दुसरा फिलीफ यांनीं या चळवळींत फार पुढाकार घेतला व फिलिफनें प्रॉटेस्टन्ट राजांशीं युद्ध करून प्रॉटेस्टन्ट पंथ नाहींसा करण्याचा जणूं काय विडाच उचलला. त्यानें नेदरलंड इंग्लंड व फ्रान्स हे देश जिंकून तेथें कॅथोलिक पंथाची स्थापना करण्याचा निश्चय केला. प्रथम त्याला आपल्या प्रयत्नांत बरेंच यश आलें. परंतु पुढें प्रॉटेस्टन्ट पंथांतहि कांहीं पराक्रमी पुरुष निर्माण झाल्यामुळें फिलिफचे सर्व प्रयत्न निष्फल झाले. जरी तो नेदरलंडचा दक्षिणभाग घेऊं शकला तरी त्यास उत्तरेकडील भाग घेतां आला नाहीं. तेथील लोकांनीं ऑरेन्जच्या वुइल्यमच्या आधिपत्याखालीं फिलिफचा पराभव करून हॉलंडचें डच प्रजासत्ताकराज्य स्थापिलें. त्याचप्रमाणें फिलिफ राजास इंग्लंड व फ्रान्स हे देशहि जिंकतां आले नाहींत. इ. स. १५९८ यावर्षी व्हरव्हिन्स येथें झालेल्या तहानें फिलिफला इंग्लंड व फ्रान्स हे देश घेण्याचे आपले प्रयत्न पूर्णपणें फसले ही गोष्ट कबूल करावी लागली. ही वेळ सोळाव्या शतकाच्या अखेरीची होय. या वेळेस पश्चिम यूरोपांत हॉलं-

डचें प्रजासत्ताकराज्य, फ्रान्स व इंग्लंड हे देश स्वतंत्र व प्रॉटेस्टन्ट पंथाभिमानी होतें. फिलिफ राजाचे सर्व प्रयत्न निष्फळ झाले हें चांगल्या तऱ्हेनें सिद्ध झालें. कॅथोलिक पंथ जरी आतां विशेष प्रबळ राहिला नाहीं तरी त्याची शक्ति प्रॉटेस्टन्ट पंथांच्या बरोबरीची होती. सुधारणाविरोधी चळवळीनें हें आलेलें संकट नाहींसें होऊन प्रॉटेस्टन्ट पंथाच्या अस्तित्वाबद्दल आतां बिलकुल शंका राहिली नाहीं. परंतु इतकें झालें तरी या दोन पंथांतील वाद अझून मिटला नव्हता प्रॉटेस्टन्ट लोक कॅथोलिक लोकांस त्रास देत व कॅथोलिक प्रॉटेस्टन्ट लोकांवर जुलुम करीत व यांच्यामधील भांडण केव्हां कोणत्या थरास जाईल याचा नियम राहिला नव्हता.

**सतरावें शतक.**—यूरोपखंडामध्यें सतराव्या शतकांत पुढील गोष्टी प्रामुख्यानें घडून आल्या.

(१) प्रॉटेस्टन्ट व कॅथॉलिक पंथाभिमान्यांतील तीस वर्षे चाललेलें द्वंद्व.

(२) फ्रान्सची वाढती सत्ता.

(३) स्वीडनचे उदय व नाश.

(४) स्पेनचा ऱ्हास.

(५) इंग्लंडांतील राजसत्तेविरुद्ध तेथील प्रजेची सनदशीर चळवळ.

**कॅथोलिक विरुद्ध प्रॉटेस्टंट.**—आम्हीं मागें सांगितलेंच आहे कीं प्रॉटेस्टन्ट व कॅथोलिक पंथांतील भांडण केव्हां कोणत्या थरास जाईल याचा नियम राहिला नव्हता. पुढें होणाऱ्या महान युद्धाची सामुग्री यावेळेस तयार होती. फक्त ठिणगी पडण्याचाच अवकाश होता. या शतकाच्या आरंभीं अशा पुष्कळ गोष्टी घडल्या कीं त्यायोगें सामान्य मनुष्यासहि या दोन पंथांत मोठें द्वंद्व माजणार असें वाटूं लागलें होतें. बव्हेरियाचा संस्थानिक मॅक्सिमिलीयन हा कॅथोलिकपंथाभिमानी असून जर्मनीतून प्रोटेस्टन्ट पंथ अजिबात नाहींसा करण्याचें त्याच्या मनानें घेतलें. इ. स. १६०७ या वर्षी त्यानें डोनॅवर्थ नांवाचें एक प्रोटेस्टन्ट पंथाभिमानी शहर जिंकून घेतलें. इकडे प्रोटेस्टन्ट पंथाभिमानी राजेहि स्वस्थ बसले नव्हते इ.स.१६०८यावर्षी त्यांनीं कॅथोलिक पंथाच्या चळवळीस विरोध करण्याकरिता एक प्रॉटेस्टंट राजांचा संघ (प्रॉटेस्टंट यूनियन) स्थापन केला. हें पाहून लागलींच कॅथोलिक राजेलोकांनींहि आपल्या संघाची (कॅथोलिक लीग) स्थापना केली.

इ. स. १६१८ यावर्षी, फ्रेडरिक (पॅलाटिनेटचा संस्थानिक) नें बोहिमियाच्या राज्यपदाचा अंगीकार केला. फ्रेडरिक हा काल्व्हिनिस्ट पंथानुयायी असल्यामुळें बोहिमियाचें राज्य त्याच्याकडे जावें हे रोमन कॅथोलिक राजांस आवडलें नाहीं. हेंच पुढें तीस वर्षे चाललेल्या युद्धाचें तात्कालिक कारण होय. प्रथम प्रॉटेस्टन्ट पंथ हा प्रबल नसून तत्पंथानुयायी राजे लोकांत अंतःकलह सुरू होते. इकडे कॅथोलिक पंथांत स्पेनचा दुसरा फिलीफ, जर्मनीचा सम्राट फरडिनान्ड, बव्हेरियाचा राजा मॅक्सिमिलियन् आदिकरून मोठमोठे प्रबल राजे असून प्रॉटेस्टन्ट पंथ जर्मनींतून अजिबात नाहींसा करण्याचा त्यांनीं निश्चय केला होता. याशिवाय त्यांना वॅलेन्स्टीन सारखा उत्तम सेनापति मिळाल्यामुळें त्यांचें काम सुकर झालें. डेन्मार्क, स्वीडन व नॉर्वे हे प्रांत जिंकून देण्याचें त्यानें सम्राटाला अभिवचन दिलें होतें. व त्यास तें काम करणें कांहींच अशक्य नव्हतें. परंतु जर्मनीच्या कॅथॉलिक पंथानुयायी संस्थानिकांस त्याचा मत्सर वाटूं लागून ते त्यास मदत करीनातसे झाले. इतकेंच नव्हे तर ते त्याच्या मार्गांत हजारों अडचणी आणूं लागले. याशिवाय स्वीडनचा राजा गस्टावस ॲडोल्फस हा प्रॉटेस्टंट पंथाला येऊन मिळाला. हा मोठा सेनापति असून याच्या आगमनानें प्रॉटेस्टन्ट पंथ बराच प्रबल झाला. या वरील दोन कारणांमुळें कॅथॉलिक पंथानुयायी लोकांचे सर्व प्रयत्न निष्फळ झाले. ब्रेटनफील्ड व लुटझेन या ठिकाणीं कॅथोलिक राजांचा पराभव होऊन प्रॉटेस्टन्ट पंथावरील मोठेंच संकट टळलें.

गस्टावस अडोल्फसच्या मृत्यूनंतर तीस वर्षांच्या युद्धाचें धार्मिक स्वरूप जाऊन त्यास राजकीय स्वरूप प्राप्त झालें; कारण यापुढें फ्रान्स या युद्धांत सामील झाला व यापुढील तीस वर्षांचें युद्ध म्हणजे मुख्यतः फ्रान्स व हॅप्सबर्ग घराणें यांतील भांडण हेंच होय. वर सांगितलेंच आहे कीं फरडिनान्ड बादशहा व दुसरे कॅथॉलिक राजे यांचे सर्व जर्मनी कॅथॉलिक करून साम्राज्य सत्ता दृढ करण्याचे प्रयत्न निष्फल झाले. पुढें लवकरच वालेन्स्टीन सेनापतीचा खून झाल्यामुळें कॅथॉलिक लोकांची बाजू बरीच शक्तिहीन झाली. युद्धांत सामील होण्याला फ्रान्सला ही चांगली संधी मिळाली. येथून पुढें इ. स. १६४८ पर्यंत फ्रान्स हा स्पेन व ऑस्ट्रिया याच्याविरुद्ध लढत राहून शेवटीं त्यानें त्यांची सत्ता धुळीस मिळविली.

(१) ऑस्ट्रिया इतक्या वर्षांच्या युद्धामुळें आधींच थकला (२) स्पेनला उतरती कळा लागली, व (३) उत्तर जर्मनींतील कॅथॉलिक संस्थानिक हे प्रोटेस्टन्ट मतानुयायी फ्रान्स व स्वीडन यास मदत करण्यास तयार झाले. (४) व फ्रान्समधील अंतःकलह नाहींसे होऊन तो लढाईकडे पूर्ण लक्ष देऊं शकला—या चार कारणांमुळें तीस वर्षांच्या युद्धांत फ्रान्सला विजय मिळाला. शेवटीं इ. स. १६४८ या वर्षी वेस्टफालिया येथील तहानें हें युद्ध बंद झालें. येथून पुढें संप्रदायमूलक युद्धें बंद झालीं. त्याबरोबरच सर्व यूरोपांत आपली सत्ता प्रबल करण्याची हॅप्सबर्ग घराण्याची महत्त्वाकांक्षाहि नष्ट झाली. या तहानें जर्मनींतील संस्थानिक जवळ जवळ स्वतंत्रच झाले. विशिष्ट संस्थानांत विशिष्टच धर्मपंथ असावा हें ठरविण्याची सत्ता त्यांना मिळाली. यामुळें कॅथॉलिक, प्रॉटेस्टन्ट व काल्व्हिनिस्ट पंथाभिमानी लोक जर्मनींतील निरनिराळ्या संस्थानांत आनंदानें

राहूं लागले. लोकांत परमतसहिष्णुता वाढूं लागली. जर्मनीतील संस्थानिक स्वतंत्र झाल्यामुळें साम्राज्यसत्तेचा ऱ्हास होऊन ती नामधारी राहिली. साम्राज्यसत्ता पुढें मागें नष्ट होणार अशीं पूर्वचिन्हें दिसूं लागलीं. जवळ जवळ एक हजार वर्षें ज्या संस्थेनें जर्मनीला ऐक्य दिलें ती संस्था लवकरच नष्ट होणार हें स्पष्ट दिसूं लागलें व या तीस वर्षांच्या युद्धानंतर जर्मनीमध्यें व सामान्यतः यूरोपच्या इतिहासांत नव्या युगास आरंभ झाला. पुनरुज्जीवनाची चळवळ, संप्रदाय-सुधारणा व तज्जन्य चळवळी या आतां मागें पडून यूरोपच्या इतिहासाला नवीनच वळण लागण्यास प्रारंभ झाला.

**फ्रान्सच्या सत्तेची वाढ.**—फ्रान्समध्यें सरंजामी पद्धति नाहींशी होऊन राजसत्ता पूर्णपणें स्थापित झाली हें वर सांगितलेंच आहे. प्रथमतः तेथील राजास सरदार लोकांपासून त्रास झाला, परंतु चवथा हेन्री हा फ्रान्सच्या गादीवर आल्यापासून राजसत्ता दृढ होण्यास प्रारंभ झाला. आपला प्रधान सली याच्या मदतीनें त्यानें राज्यकारभारांत पुष्कळ सुधारणा केल्या. विशेषतः त्यानें व्यापाराला उत्तेजन दिलें. याशिवाय त्यानें जमाबंदी खात्यांत पुष्कळच व्यवस्थितपणा आणिला.

चवथ्या हेन्रीनें ह्युजेनॉट म्हणजे फ्रेंच प्रोटेस्टंट लोकांस पुष्कळ सवलती देऊन त्यांचा विरोध नाहींसा केला. त्यानें बंडखोर सरदारांस शिक्षा लावून व त्यांवर आपला वचक बसवून सरदारांचा वर्ग शक्तिहीन केला. याप्रमाणें राज्यांत सर्व ठिकाणीं व्यवस्था करून सर्व फ्रान्स त्यानें आपल्या सत्तेखालीं आणिलें. याबरोबरच त्यानें हॅप्सबर्ग घराण्याशीं युद्ध सुरू केलें. हेन्रीच्या मरणानंतर फ्रान्समध्यें पुन्हां अस्वस्थता माजली. सरदार लोक प्रबळ झाले. ह्युजेनॉट लोक आपल्या सवलतींचा दुरुपयोग करूं लागले. परंतु ही विसकटलेली घडी १३ व्या लुईच्या कारकीर्दीपासून पुन्हां बसावयास लागली. १३ व्या लुईचा प्रख्यात प्रधान रिशेलु यानें सरदारांनां बलहीन केलें. ह्युजेनॉट लोकांचे राजकीय हक्क काढून घेतले व राजसत्तेला विरोधी असणाऱ्या सर्व संस्था बंद करून फ्रान्समध्यें एकछत्री अंमल सुरू केला. फ्रान्समधील अंतःकलह बंद होऊन फ्रान्स आतां बराच प्रबल झाला. यामुळें त्यास तीस वर्षांच्या युद्धांत सामील होतां आलें. यावेळेस फ्रान्सला मोठमोठे सेनापती (कॉन्डे व टयूरेन) लाभल्यामुळें त्यास विजयश्रीनें माळ घातली. यूरोपांत फ्रान्स एक बलाढ्य राष्ट्र म्हणून त्याचा बोलबाला झाला. व मागील शतकांत बलिष्ठ असलेल्या हॅप्सबर्ग घराण्याचा ऱ्हास झपाट्यानें होऊं लागला. रिशेलूच्या मरणानंतर फ्रॉंडे चळवळीनें फ्रान्समध्यें पुन्हां अव्यवस्था माजून रिशेलूचें सर्व काम नष्ट होतें कीं काय अशी भीति पडली. परंतु १४ व्या लुईचा प्रधान माझरीन यानें फ्रॉंडे चळवळीचा मोड करून फ्रेंच राजसत्ता पुन्हां प्रस्थापित केली. यापुढें राजसत्तेला कधींहि विरोध झाला नाहीं. राजसत्तेला विरोध करणाऱ्या सर्व संस्था जवळ जवळ नष्ट होऊन राजसत्तेची इमारत भक्कम पायावर उभारली गेली. इ. स. १६६० यावर्षी १४ व्या लुईनें राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतली. यावेळेस यूरोपांतील सर्व देशांत राजसत्ता बलिष्ठ झाली होती. आतां यापुढें सतराव्या शतकांत राजसत्ता प्रबल करण्याकरितांच सर्वत्र प्रयत्न चालू होते.

१४ व्या लुईच्या कारकीर्दींत फ्रान्समध्यें तर ही राजसत्ता कळसास जाऊन पोहोंचली. या अशा प्रबल राजसत्तेच्या अमलाखालीं फ्रान्सची सर्व प्रकारें उन्नति होऊं लागली. वाङ्मय, कला, शुद्धशास्त्र तत्त्वज्ञान वगैरे विषयांत विद्वान लोक निर्माण होऊन फ्रान्स देश सुधारणेचें माहेरघर बनला. टयुरेन, लक्सेंबर्ग, व्हीलर या सेनापतींनीं फ्रान्सची कीर्ति सर्व यूरोपांत गाजवली; त्याचप्रमाणें पास्कल, रेसीन, करनेली, मॉलियर, फेनेलन्, सेन्टसायमन्, वगैरे विद्वानांनी तत्त्वज्ञान, नाट्यकला, वाङ्मय, इतिहास, वगैरे विषयांवर अधिकारयुक्त असे ग्रंथ निर्माण केले. फ्रान्समध्यें मोठमोठ्या इमारती बांधल्या जाऊन शिल्पशास्त्रांत फार सुधारणा झाली. फ्रान्स आतां सर्व यूरोपांत बलिष्ठ राष्ट्र म्हणून पुढें आलें. त्याचा हाडवैरी स्पेन व ऑस्ट्रिया यांच्या सत्तेस कधींच उतरती कळा लागून फ्रान्सला आतां कोणी प्रतिस्पर्धी उरला नव्हता. राष्ट्रव्यवहारांत व राजकारणांत पुढाकार घेण्यास फ्रान्सला ही चांगली संधी सांपडली.

तीस वर्षांच्या युद्धांत झालेली नासधूस भरून काढण्यांत जर्मनी गुंतला असून परराष्ट्रीय राजकारणांत लक्ष देण्यास त्यास शक्तिहि नव्हती व अवकाशहि नव्हता. ऑस्ट्रिया व पोलंड यांचें लक्ष तुर्क लोकांच्या स्वाऱ्यांकडे लागलें होतें व स्पेनच्या सत्तेला उतरती कळा लागली होती. इंग्लंडमध्यें दुसरा चार्लस व दुसरा जेम्स हे राजे लुईचे दोस्त असल्यामुळें त्यांनीं त्याच्या धोरणाला विरोध केला नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे यूरोपच्या सार्वराष्ट्रीय व्यवहारांत आपली सत्ता पूर्णपणें प्रस्थापित करावयास लुईला ही संधी चांगली सांपडली व तिचा त्यानें चांगला उपयोगहि करून घेतला. यापुढें लुईची महत्त्वाकांक्षा वाढत जाऊन सर्व यूरोप पादाक्रांत करण्याची हांव त्याच्या मनांत उत्पन्न झाली. इ. स. १६६७ यावर्षी त्यानें 'डेव्होल्युशन' युद्ध सुरू केलें. या युद्धांत त्यानें स्पॅनिश नेदरलंड मधील कांहीं किल्ले काबीज केले. पुन्हां इ. स. १६७२ पासून १६७८ पर्यंत त्याचें व डच लोकांचें युद्ध चाललें. पुढें इ.स. १६७३ पासून त्यानें ऑस्ट्रिया व स्पेनशींहि युद्ध पुकारलें. याच वेळेस तुर्क लोकांनीं पोलंडवर स्वारी केली; परंतु जॉन सोबेस्की यानें तुर्क लोकांचा पराभव केला. झुरवना येथें तुर्क लोक व जॉन सोबेस्की यांमध्यें तह होऊन पूर्व यूरोपवर आलेलें संकट कांहीं दिवस तरी टळलें. इकडे इ. स. १६७८ यावर्षी निज्मवेगेन येथें झालेल्या तहानें लुईला बराच फायदा झाला. इ. स. १६७८

पासून १७ व्या शतकाच्या शेवटपर्यंत तुर्क लोकांच्या स्वाऱ्या व चवदाव्या लुईची महत्त्वाकांक्षा याच दोन गोष्टी यूरोपच्या राजकारणांत प्रमुख होऊन बसल्या होत्या. सर्व पूर्वयूरोप मुसुलमानांच्या हाताखालीं जातो कीं काय अशी मोठी भीति पडली. परंतु सुदैवानें इ. स. १६८३ या वर्षी व्हिएन्नाच्या वेढ्यांत तुर्क लोकांचा पराभव होऊन तुर्क लोकांच्या स्वाऱ्यांस चांगलाच आळा बसला. या पुढें पूर्वयूरोपला तुर्कलोकांचें भय मुळींच राहिलें नाहीं. इकडे पश्चिम यूरोपांत लुईच्या महत्त्वाकांक्षेस इतक्या लवकर आळा बसला नाहीं. तिसरा वुइल्यम ज्यावेळेस इंग्लंडचा राजा झाला त्यावेळेपासून लुईच्या महत्त्वाकांक्षेस हळू हळू आळा बसूं लागला. तिसऱ्या वुइल्यमनें आपलें सर्व आयुष्य लुईच्या सत्तेशीं झगडण्यांत खर्च केलें. त्यानें वेळोवेळीं यूरोपांतील निरनिराळ्या राजांशीं तह करून लुईची महत्त्वाकांक्षा निष्फळ केली. इ. स. १६९७ यावर्षी रिसविक येथें झालेल्या तहानें लुईची सत्ता कांहीं अजिंक्य नाहीं हें स्पष्ट दिसून आलें.

**स्वीडनचा उदय व ऱ्हास.**—स्वीडन हें पूर्व यूरोपांतील राज्य असून तें सतराव्या शतकांत पुढें आलें. स्वीडनच्या उदयाचें मुख्य कारण म्हणजे स्वीडनला गस्टाव्हस घराणें राज्य करण्यास मिळालें हें होय. तीस वर्षांच्या युद्धांत स्वीडननें चांगलाच नांवलौकिक कमावला. या वेळेस स्वीडननें प्रोटेस्टंट पंथाचें रक्षण केलें. वेस्टफालियाच्या तहानें स्वीडनला बरेच फायदे झाले. स्वीडनचें राज्य वाढून तें यूरोपांत एक प्रमुख राष्ट्र होऊन बसलें. पुढें स्वीडनचा राजा १२ वा चार्लस यानें पोलंड व डेन्मार्क यांचा पराभव करून इ. स. १७०८ या वर्षी ऑलिव्हिया येथें झालेल्या तहानें पुष्कळ प्रदेश मिळविला. स्वीडन या वेळेस लहानसें राज्य राहिलें नसून त्याचा विस्तार फार मोठा झाला. तें आतां साम्राज्य झालें.

ज्याप्रमाणें हें फार लवकर उदयास आलें त्याप्रमाणेंच त्याचा ऱ्हासहि तसाच जलद झाला. त्याच्या ऱ्हासाचीं खालीलप्रमाणें कारणें देतां येतील.

(१) स्वीडन हें लहानसें राज्य असल्यामुळें येवढें प्रचंड काम हातीं घेण्यापुरेशी स्वीडनची लोकसंख्या व संपत्ति विपुल नव्हती.

(२) ख्रिश्चाना राणी फार उधळखोर निघाली.

(३) बाराव्या चार्लसच्या अंगीं उपजतांच सेनापतीचे गुण असल्यामुळें तो मोठमोठ्या लढाया मारूं शकत होता. युद्धाच्या योगानें आपण वाटेल तें करूं शकूं, अशी त्यास धमक असल्यामुळें त्यानें स्वीडनला जरूर नसतां युद्धपरंपरेंत ढकलिलें. चार्लस हा मुत्सद्दी नव्हता. त्यानें राजकारणांत फार मोठ्या चुका केल्या. आसपासच्या सर्व लहान राजांस आपलेसें करून घेण्याऐवजीं त्यानें सर्वांचें शत्रुत्व संपादिलें. यामुळें त्याच्या सबंध कारकीर्दीत स्वीडनला नेहमीं लढण्यास सज्ज रहावें लागलें, असें करणें मोठमोठ्या राष्ट्रांसहि फार दिवस शक्य नसतें. मग स्वीडनसारख्या चिमुकल्या राष्ट्राची गोष्ट विचारावयास नको. रशियाशीं झगडण्यांत स्वीडनचा पराभव होऊन एकदम स्वीडनची वाढलेली सत्ता नाहींशी झाली. तेव्हांपासून अजूनपर्यंत स्वीडन हें यूरोपांत एक लहानसें राष्ट्र असून राजकारणांत बरेंच मागें पडलें आहे.

**स्पेनचा ऱ्हास.**—१६ व्या शतकांत सांप्रदायिक युद्धांत स्पेननें सर्वांत प्रमुख भाग घेतला होता. त्या वेळेस निरनिराळ्या राजघराण्यांशीं विवाहसंबंध करून हॅप्सबर्ग घराण्यानें आपली सत्ता फार वाढविली होती. १६ व्या शतकांत सर्व यूरोपच्या स्वतंत्र संस्थानिकांस स्पेनच्या दुसऱ्या फिलीफचें मोठें भय वाटत होतें—दुसऱ्या फिलिफनें यूरोपांतील राजकीय समतोलपणाचा भंग केला होता. त्याच्या कारकीर्दीत स्पेन देश केवळ युद्धशास्त्रांतच प्रमुख नव्हता तर तो सर्व सुधारणांचें माहेरघर बनला होता; परंतु पुढें स्पेनच्या सत्तेस उतरती कळा लागली. त्याच्या ऱ्हासाचीं कांहीं प्रमुख कारणें खालीं दिलीं आहेत.

[ १ ] इ. स.च्या १६व्या शतकाच्या आरंभीं स्पेन हा मूर लोकांना हांकलून देण्यांत गुंतला होता व त्या कामीं स्पेनचें बरेंच नुकसान झालें. मूर लोक उद्यमशील नसून फक्त उत्तम व्यापारी होते. ते स्पेनमधून बाहेर गेल्यापासून स्पेनचा व्यापार जवळ जवळ बंदच पडला.

[ २ ] प्रथम अमेरिकेंतील वसाहतींपासून स्पेनला बरीच मदत होत असे. पुढें वसाहतींच्या अंतर्व्यवस्थेंत घोंटाळा माजून स्पेनला मदत मिळेनाशी झाली.

[ ३ ] इ. स.च्या सोळाव्या शतकांत स्पेननें एक मोठें साम्राज्य निर्माण करण्याचा अट्टाहास केला. त्या कामीं त्याची विपुल संपत्ति व मोठमोठे योद्धे कामीं आले. या प्रयत्नांत त्याला यश तर आलेंच नाहीं, परंतु त्या अट्टाहासांत तो इतका बलहीन झाला कीं, पुढें यूरोपच्या इतिहासांत स्पेनचें नांवहि ऐकूं येईनासें झालें.

[ ४ ] स्पेन हा प्रथमपासूनच कॅथोलिकपंथानुयायी होता. इ. स.च्या १६ व्या शतकाच्या आरंभीं झालेल्या संप्रदायसुधारणेला स्पेननें फार जोराचा विरोध केला. याचें एक कारण असें होतें कीं, ज्या बऱ्याचशा सुधारणा घडवून आणण्यासाठीं यूरोपांत इतर ठिकाणीं सांप्रदायिक अधिकारक्रांति झाली; त्यांपैकीं बऱ्याचशा सुधारणा स्पेनमध्यें अगोदरच झाल्या होत्या. त्यामुळें सांप्रदायिक अधिकारक्रांति स्पेनला करावी लागली नाहीं. तथापि त्या संप्रदायसुधारणेच्या चळवळीबरोबरच पश्चिम यूरोपांत झालेल्या बौद्धिक चळवळीला स्पेन पारखा झाला. त्या वेळेस स्पेनमध्यें सर्व ठिकाणीं अज्ञान माजलें असून ज्ञान फक्त काय तें पादी लोकांतच दिसून येई. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे स्पेन अजून अर्धवट मध्ययुगांतच होता.

हीं वरील कारणें व फ्रान्सचें वैर यामुळें स्पेनचा ऱ्हास झाला. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत स्पेनची स्थिति फार शोचनीय होऊन पुढें लवकरच स्पेनच्या खुद्द तक्ताकरितां यूरोपांतील राजांत लढाया लागल्या.

येथवर इ. स. १६९७ यावर्षी झालेल्या रिसविकच्या तहापर्यंत यूरोपच्या इतिहासाचें पर्यालोचन केलें आहे. यूरोपांत या वेळेस फ्रान्सची सत्ता जरी प्रबल होती तरी ती कांहीं अजिंक्य नाहीं हें आतां स्पष्ट दिसून आलें. स्पेन जो एकदां खालावला तो कायमचाच खालावला; स्वीडनलाहि उतरती कळा लागली. इंग्लंड नुकतेंच राजाच्या विरुद्ध झालेल्या सनदशीर चळवळीपासून मुक्त होत होतें. पुढें १८ व्या शतकांत ज्यांनीं यूरोपच्या राजकारणांत पुढाकार घेतला तीं रशिया व प्रशिया हीं राष्ट्रें नुकतींच कोठें उदयास येऊं लागलीं होतीं. अशा स्थितींत फ्रान्सला पुन्हां यूरोपांत धुडगूस घालण्यास चांगली संधी मिळाली. परंतु इतःपर इंग्लंडनें आपला एकलकोंडेपणा सोडून यूरोपच्या राजकारणांत प्रमुख भाग घेण्यास प्रारंभ केला. ऑरेन्ज घराण्याच्या तिसऱ्या वुइल्यमच्या धुरीणत्वाखालीं इंग्लंडनें फ्रान्सच्या महत्त्वाकांक्षेला विरोध करून यूरोपांतील राजकीय समतोलपणा कायम ठेविला. यावेळेस जर तिसरा वुइल्यम पुढें आला नसता तर सर्व पश्चिमयूरोप १४ व्या लुईच्या महत्त्वाकांक्षेला बळी पडला असता. स्पेनच्या गादीविषयीं झालेल्या युद्धांत वुइल्यमनें निरनिराळ्या राजांशीं दोस्ती करून फ्रान्सची सत्ता हाणून पाडली. इ. स. १७१३ यावर्षी यूट्रेचच्या तहानें हें युद्ध संपलें. यूट्रेचचा तह हा यूरोपच्या इतिहासांतील एक मोठी महत्त्वाची गोष्ट आहे. या तहानें इंग्लंडला जिब्राल्टर हें भूमध्यसमुद्राचें एक नाकें व मिनोरका हें बेट मिळून दक्षिण अमेरिकेंत व्यापाराचे हक्क मिळाले. तें आतां आरमारी राष्ट्र बनून समुद्रावर वर्चस्व स्थापण्याच्या कामाला लागलें. ऑस्ट्रियाला बेलजम व इताली हे प्रदेश मिळाले; फ्रान्स बराच दुर्बल झाला. यूट्रेचच्या तहानंतर ( इ. स. १७१३ ) अठराव्या शतकास आरंभ होतो. येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं कोणत्याहि देशाच्या इतिहासाची विभागणी शतकांप्रमाणें केली असतां सोईवार व्हावयाची नाहीं. तर ज्यावेळेस एक प्रकारच्या कल्पनांचा व संस्थांचा ऱ्हास होऊन नवीन कल्पना व संस्था दृग्गोचर होतात त्या वेळेस नव्या शतकाचा अथवा युगाचा आरंभ झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. या दृष्टीनें पाहिलें असतां इ. स. १७१३ हें १८ व्या शतकाचें पहिलें वर्ष होय. १८ व्या शतकांत यूरोपांतील राज्यें अतिशय स्वार्थी बनलीं, त्यांची नीतिमत्ता भ्रष्ट झाली. मोठमोठीं ध्येयें त्यांच्या दृष्टिपथांतून नाहींशीं झालीं. गस्टावस्, ॲडोलफस, जॉन सोबेस्की यांसारखे पुरुष १८ व्या शतकांत विरळाच दृष्टीस पडतात. त्याचप्रमाणें आतां ग्रेट रेबिलेशन सारख्या पारमार्थिक चळवळी बंद पडून विशिष्ट राष्ट्रस्वार्थ किंवा विशिष्ट वर्गाचा स्वार्थ साधण्याकरितां धडपड सुरू झाली. पूर्वी सांगितलेंच आहे कीं १७ व्या शतकांत यूरोपच्या राजकारणांत राजकीय समतोलपणा या तत्त्वाचा उद्भव होऊन त्याचें महत्त्व अठराव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत होतें. परंतु अठराव्या शतकांत या तत्त्वाचा विपर्यास केला गेला. १४ वा लुई व दुसरा फिलिफ यांनीं यूरोपच्या स्वतंत्रतेवर घाला घातला असतां ज्या तत्त्वाच्या बळावर यूरोपांतील राष्ट्रें एक होऊन त्यांनीं लुई व फिलिफ यांचा पराभव केला त्याच तत्त्वाच्या नावांखालीं आतां प्रबल राजे लहान लहान राष्ट्रांची स्वतंत्रता हिरावून त्यांच्या प्रदेशाची राजरोसपणें विभागणी करूं लागले व बळी तो कान पिळी हें तत्त्व आतां प्रबल झालें.

परंतु अठराव्या शतकांतील घडामोडींचा इतिहास देण्यापूर्वी १८ व्या शतकाच्या आरंभीं यूरोपांत जीं नवीनच राष्ट्रें उदयास आलीं त्या विषयीं थोडी माहिती देणें जरूर आहे; कारण त्यांनीं अठराव्या शतकांतील राजकारणांत बराच महत्त्वाचा भाग घेतला असल्यामुळें त्या शतकांतील इतिहास समजण्यास त्यांच्या माहितीचा उपयोग बराच होईल. हीं दोन राष्ट्रें म्हणजे रशिया व प्रशिया हीं होत त्यापैकीं रशियाकडे आपण प्रथम वळूं.

**रशियाचा अभ्युदय.**— जेथें आज आपण रशियाचें राज्य पाहात आहों तेथें १५ व्या शतकापूर्वी लहान लहान स्वतंत्र संस्थानें होतीं. तीं लहान संस्थानें नाहींशीं करून मस्कोव्हीचें राज्य स्थापण्याचें श्रेय इव्हान धी ग्रेट याकडे आहे. त्याचा मुलगा वेसील, व बेसीलचा मुलगा चवथा इव्हान व नातु इव्हान धी टेरिबल यानीं झारशाही स्वतंत्र करून तीचा सत्ता पुष्कळ वाढवली. रशियाचा खरा अभ्युदय पीटर धी ग्रेट याच्या कारकीर्दीपासून सुरू होतो. पीटरनें रशियाच्या अंतर्व्यवस्थेंत फेरफार करून परराष्ट्रीय धोरण बदललें. त्यानें रशियाच्या इतिहासाला एक निराळेंच वळण देऊन रशियाला सुधारलेल्या प्रमुख राष्ट्रांच्या पंक्तींत आणून बसविलें. पीटरनें मुख्यतः पुढें दिलेल्या सुधारणा केल्या.

[ १ ] रशिया एक मोठें आरमारी राष्ट्र व्हावें अशी पीटरची महत्त्वाकांक्षा होती. त्याप्रमाणें त्यानें एक मोठें आरमार बांधवून त्याच्या मदतीनें तुर्कांचा पराभव केला व त्यांच्यापासून अझोव्ह जिंकून घेतलें. यामुळें त्याची सत्ता श्वेतसमुद्रावर प्रस्थापित झाली. परंतु श्वेतसमुद्र हा लहान असल्यामुळें केवळ तेथें सत्ता प्रस्थापित करून पीटरला समाधान झालें नाहीं. त्याला बाल्टीक समुद्रावर वर्चस्व स्थापित करावयाचें होतें. परंतु बाल्टीक समुद्राच्या जवळील प्रदेश हा स्वीडनच्या ताब्यांत होता. तथापि लवकरच त्याचा मनोदय सिद्ध होण्याचीं चिन्हें दिसूं लागली. कारण पोलन्ड व स्वीडन यांमध्यें वैर उद्भवून स्वीडनच्या विरुद्ध पोलन्डचा राजा ऑगस्टस यानें पीटरची मदत

मागितली. त्याप्रमाणें स्वीडनबरोबर पोलंड व रशिया यांचें २० वर्षें युद्ध चालून शेवटीं स्वीडनचा पराभव झाला. या युद्धांत पीटरला इनग्रिया, कारेलिया, लिव्होनिया, एस्थोनिया, व फिनलंडचा कांहीं भाग इतके प्रदेश मिळाले. येणेंप्रमाणें त्याची सत्ता बाल्टिक समुद्राच्या किनाऱ्यावर प्रस्थापित होऊन त्यास आपलें आरमार वाढविण्याची इच्छा पूर्ण करून घेतां आली व आतां पूर्व यूरोपांत रशिया हें एक प्रमुख आरमारी राष्ट्र झालें. याशिवाय रशियाच्या राज्याचा विस्तारहि फार मोठा झाला.

( २ ) रशियाला सुधारलेल्या राष्ट्रांच्या पंक्तींत आणावयाचें हेंच एक ध्येय पीटरच्या मनांत नेहमीं वास्तव्य करीत होतें. त्यासाठीं रशियाला आरमारी राष्ट्र बनवून त्यानें रशियाचें राज्य वाढविलें. आतां त्यानें आपलें लक्ष रशियाच्या अंतर्व्यवस्थेकडे लाविलें.

पश्चिमयूरोपांत प्रवास करून तेथील संस्थांचा त्यानें चांगलाच अभ्यास केला होता. आपलें राष्ट्र पुढें यावयाचें असल्यास त्यानें सर्व बाबतींत पश्चिम यूरोपचें अनुकरण केलें पाहिजे असें त्याचें ठाम मत झालें होतें. आपल्या सर्व परंपरा सोडून त्यानें रशियाला यूरोपीय बनविण्याचा प्रयत्न केला. हा त्याचा प्रयत्न कितपत योग्य होता व त्यानें रशियाला खरोखर किती फायदा झाला हा प्रश्न वादग्रस्त असून इतिहासकारांचेंहि या विषयावर ठाम मत झालें नाहीं. पीटरच्या या प्रयत्नाला फार विरोध झाला. पीटरला सर्व लोकांच्या मनःप्रवृत्ती बदलणें शक्य नव्हतें. त्यानें ज्या कांहीं सुधारणा केल्या त्या फक्त औपचारिक होत्या. त्यानें जुन्या सरदारांचा वर्ग मोडून नव्या पद्धतीवर फौज उभारली. राज्यकारभाराच्या सर्व खात्यांत यूरोपियन तज्ज्ञांवर सुधारणा करून परराष्ट्रीय लोक मोठमोठ्या हुद्यावर नेमले. भोजन-पद्धति पोशाख वगैरे लहान महान बाबतींत सुद्धां पश्चिमांचेंच अनुकरण झालें पाहिजे या हेतूनें त्यानें नवे कायदे केले. थोडक्याच वर्षांत रशियाचें स्वरूप बदलून निदान रशिया दिसण्यांत तरी पाश्चिम राष्ट्र बनला. पीटरनें केलेल्या सुधारणांमुळें रशियावर बऱ्याच अंशीं यूरोपीय ठसा उमटला यांत शंका नाहीं. तरी एकदम कोणत्याहि राष्ट्राचें असें परिवर्तन होणें शक्य आहे कीं नाहीं, हा मोठा प्रश्न आहे. रशियांत अजून पुराणमताभिमानी पक्ष प्रबल होता. पीटरनें केलेल्या सुधारणा व त्यानें उचललेलें परराष्ट्रीय धोरण यांचा रशियावर कांहींहि परिणाम झाला असो, इतकें खरें कीं त्याचा परिणाम यूरोपच्या इतिहासावर फार झाला. आतां यापुढें रशियानें पश्चिम यूरोपच्या राजकारणांत वेळोवेळीं पुढाकार घेतला. पश्चिम यूरोपच्या राजकारणांत आतां रशियाला वगळून चालेनासें झालें.

**प्रशियाचा अभ्युदय.**—ज्या संस्थानानें विभागलेल्या जर्मन राष्ट्रांना एक करून होली रोमन साम्राज्याच्या जागेवर एक भलें मोठें साम्राज्य निर्माण केलें त्या प्रशिया संस्थानाच्या उदयाचा इतिहास मोठा मनोरंजक आहे.

प्रशिया संस्थानाच्या उदयाचा विचार करण्याबरोबर तीन गोष्टी डोळ्यासमोर येतात. ( १ ) प्रशियाची डची ( २ ) ब्रँडेनबर्ग संस्थान व (३) होहेनझोलर्न राजघराणें. प्रथम हें लक्षांत ठेविलें पाहिजे का, प्रशियाची डची हा त्यावेळेस जर्मन साम्राज्यांत मोडत नसे. ब्रँडनबर्गचें संस्थान हा जर्मन साम्राज्यांतला भाग असून हेंच संस्थान प्रशिया संस्थानाच्या शक्तीचें केंद्र होतें. त्याला पुढें प्रशियाची डची जोडिली जाऊन त्याचें परिवर्तन हल्लींच्या प्रशिया संस्थानांत झालें. होहेनझोलर्न घराणें ब्रॅन्डेनबर्गवर इ. स. १४११ पासून राज्य करावयास लागलें तेव्हांपासून ब्रॅन्डेनबर्गच्या संस्थानांत सुधारणा होण्यास सुरवात झाली.

होहेनझोलर्न घराण्यांतील राजे ज्यावेळेस ब्रॅन्डेनबर्गवर राज्य करूं लागले त्यावेळेस तें संस्थान फार लहानु होतें. राज्यांत अतिशय अस्वस्थता माजून राजसत्ता कोणीहि मानीना अशी स्थिति आली होती. याशिवाय साम्राज्य शक्तिहीन झाल्यामुळें त्याचा संस्थानिकावर दाब राहिला नव्हता. यामुळें शेजारचे संस्थानिक ब्रॅन्डेनबर्गच्या संस्थानांत लुटालूट करीत. ही अराजक स्थिति नष्ट करून ब्रॅन्डेनबर्गचें संस्थान स्वतंत्र व प्रबल करण्याचें काम आरंभींच्या राजे लोकांनी केलें. सतराव्या शतकाच्या आरंभीं आपणांस ब्रॅन्डेनबर्गचें संस्थान मोठें व साधारण शक्तिमान दिसतें. त्यास कांहीं प्रदेश विवाहसंबंधामुळेंहि प्राप्त झाले होते. त्यावरील पोपचें सांप्रदायिक वर्चस्व जाऊन तेथील संस्थानिक हाच सांप्रदायिक बाबतींत मुख्य झाला. प्रबल सरदारांचा वर्ग नष्ट होऊन राजसत्तेला विरोध करणाऱ्या सर्व संस्था अवनतीच्या मार्गास लागल्या होत्या. ग्रेट इलेक्टर गादीवर आला त्यावेळेस ब्रॅन्डेनबर्गची वर दिल्याप्रमाणें स्थिती होती. आतांपर्यंत ब्रॅन्डेनबर्गनें जर्मनाच्या किंवा यूरोपच्या राजकारणांत भाग घेतला नव्हता यापुढें तें यूरोपमध्यें एक बलिष्ट राष्ट्र म्हणून पुढें आलें. ग्रेट इलेक्टरनें पुढीलप्रमाणें सुधारणा केल्या.

(१) ग्रेटइलेक्टरनें सैन्य सुधारणेकडे फार लक्ष दिलें. उत्तम शिपाई व उत्तम अधिकारी नेमून लष्करी शिक्षणानें त्यानें आपलें सैन्य थोडक्याच दिवसांत यूरोपांतील कोणत्याहि राजाच्या सैन्याबरोबर टिकाव धरील असें केलें.

(२) या कामाकरितां त्याला द्रव्याची फार जरूर लागे म्हणून त्यानें जमाबंदी खात्यांत सुधारणा करून तेथील घोटाळा नाहींसा केला.

(३) ब्रॅन्डेनबर्ग संस्थान आतां विस्तारानें बरेंच वाढलें. संस्थानांतील निरनिराळ्या प्रदेशांत एकसूत्रीपणा नसून तें अठरा प्रांतांचें कडबोळें होतें. प्रत्येक प्रांताच्या निरनिराळ्या स्वतंत्र संस्था असून तेथील लोक त्या संस्था कायम टेवण्याकरितां फार प्रयत्न करीत. यामुळें एकछत्री राज्य होणें जवळ जवळ अशक्यच होतें. परंतु त्यावेळेस जर्मनांची

अशी स्थिति होती कीं, जिकडे तिकडे अरवस्थता माजून प्रबल राजे शक्तिहीन राजांना पदच्युत करून त्यांचें राज्य हिरावून घेत. या अशा परिस्थितींत प्रबल एकतंत्री राजसत्ता हा एकच रक्षणाचा उपाय होता. म्हणून ग्रेट इलेक्टरनें सर्व लोक-संस्थांचा नाश करून एकसत्तात्मक राजसत्ता स्थापन केली. याशिवाय त्यानें व्यापार व शिक्षण यांसहि उत्तेजन दिलें. उत्तम सेना, मुबलक पैसा, व प्रबल राजपुरुष या तीन साधनांनीं युक्त होत्सातें होलेनझोलन घराणें यूरोपच्या पटावर खेळावयास पुढें आलें. स्पेनच्या गादीविषयीं झालेल्या लढाईंत ब्रॅन्डेनबर्गच्या सैन्याची उपयुक्तता यूरोपांतील राजेलोकांनां कळून आली.

याप्रमाणें या कालापासून यूरोपच्या राजकारणांत रशिया व प्रशिया अशा दोन संस्थानांचा प्रवेश झाला. व येथून पुढें यूरोपांत महत्वाच्या घडामोडी घडून आल्या त्यांचा विचार पुढें एका स्वतंत्र प्रकरणांत केला आहे.

## प्रकरण २१ वें.

### मुसुलमानांची हिंदुस्थानावर सत्ता.

अलेक्झांडर दी ग्रेटच्या अधिकाऱ्यांनीं हिंदुस्थानच्या परिस्थितीचें जें वर्णन केलें आहे तेंच वर्णन पुढें दोन हजार वर्षांनंतरच्या हिंदुस्थानच्या परिस्थितीलाहि बरोबर लागू पडतें हें पाहून अर्वाचीन काळच्या परकी लेखकांनां मोठें आश्चर्य वाटतें. लोकांची नाजूक व सडपातळ शरीरयष्टि, त्यांचा काळासांवळा वर्ण, त्यांचे काळे केंस, त्यांचीं कापसाचीं वस्त्रें, त्यांचा शाकाहार, त्यांची लढाईकरितां हत्ती तयार करण्याची पद्धति, त्यांच्यांतील अनेक जातिभेद, त्यांच्यांतील जातीजातींतील मिश्र विवाहास बंदी, त्यांच्यांतील पुरोहितवर्गाचें ब्राह्मण हें नांव, त्यांच्यांतील विधवांनीं पतीच्या चितेवर स्वतःस जाळून घेण्याची पद्धति, वगैरे ॲरिअन यानें लिहून ठेवलेल्या प्राचीन हिंदू लोकांविषयींच्या सर्व गोष्टी अर्वाचीन काळांतील हिंदू लोकांनाहि अगदीं तंतोतंत लागू पडतात.

अलेक्झांडरच्या हिंदुस्थानांत पंजाबप्रांताच्या अलीकडे आंत फारसा शिरकाव झाला नाहीं. अलेक्झांडरच्या स्वारीनंतर बऱ्याच शतकांनीं मुसुलमानांच्या स्वाऱ्यांची लाट हिंदुस्थानावर आली. मुसुलमानांनीं इराण पादाक्रांत केल्यावर ते हिंदुस्थानाकडे वळले. या नव्या धर्माच्या लोकांच्या जोराच्या हल्ल्यांनां तोंड देण्यास शांत स्वभावी हिंदू लोक चांगले तयार नव्हते. तरीहि विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, कुराणी धर्माचे भक्त हिंदुस्थानांत जरी फार मोठ्या प्रमाणांत पसरले तरी जित हिंदू व जेते मुसुलमान यांचें संमिश्रण कधींहि झालें नाहीं—जुना हिंदू धर्म व नवा मुसुलमानी संप्रदाय यांचें संयोगीकरण होऊं शकलें नाहीं. मुसुलमानांनीं जे जे इतर देश जिंकले त्यांतील बहुतेक प्रत्येक इसम त्यांनीं आपल्या संप्रदायांत ओढून घेतला. पण उलटपक्षीं हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं त्यांचीं राज्यें होतीं व अनेक वर्षें राजसत्ता त्यांच्या हातीं होती तरी सर्व हिंदूलोकसंख्येच्या एक पंचमांशाहून अधिक मुसुलमानांची संख्या पूर्वी कधीं नव्हती व आतांहि नाहीं.

हिंदुस्थानांत बौद्ध संप्रदायाचा नायनाट होऊन पुन्हां हिंदुधर्माचा सर्वत्र पगडा बसत होता, त्याच काळांत अरबस्तानांत एक नवा संप्रदाय स्थापन होत होता. त्यानंतर लवकरच या नव्या संप्रदायाचे ताजेतवाने अनुयायी संप्रदायप्रसाराच्या नांवाखालीं हिंदुस्थानांत शिरून हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत, व अरबी समुद्रापासून बंगालच्या उपसागरापर्यंत धुडगूस घालूं लागले. या नव्या मुसुलमानी संप्रदायाचा संस्थापक महंमद पैगंबर हा इ. स. ६३२ मध्यें मदिना येथें मरण पावला, व त्यानंतर बत्तीस वर्षांनींच म्हणजे इ. स. ६६४ मध्यें मुसुलमानांची हिंदुस्थानावर पहिली स्वारी झाली. या स्वारींत पंजाबमध्यें कांहीं नासधूस व लुटालूट करून अरब मुसुलमान परत गेले. त्यानंतर इ. स. ७११त दमास्कसच्या खलीफाचा सेनापति महंमद कासीम यानें अरब सैन्यानिशीं हिंदुस्थानवर स्वारी करून सिंध प्रांत जिंकून घेतला. मुसुलमानांच्या भक्ष्यस्थानीं पडलेला हा पहिला प्रांत होय. याच वर्षी तिकडे स्पेनमध्यें गॉथ लोकांचा शेवटचा राजा रॉडरिक पराभव पावून तो सर्व देश सारासन लोकांनीं (तुर्की मुसुलमानांनीं) जिंकला. पण इकडे हिंदुस्थानांत रजपूत लोकांच्या शौर्यामुळें व ब्राह्मण जातीच्या धर्मनिष्ठेमुळें मुसुलमानांनां भयंकर अडथळा आला. तशा प्रकारचा अडथळा करणारे लोक पश्चिम यूरोपमधील देशांत नव्हते, यामुळें यूरोप पादाक्रांत करण्याचें काम मुसुलमानांनां बरेंच सोपें गेलें. उलट हिंदुस्थानांत इ. स. ७५० मध्यें हिंदूंनीं जुलमी मुसुलमानी सत्तेविरुद्ध बंड करून मुसुलमानांनां स्वदेशांतून पार हांकून लाविलें, व त्यानंतर अडीचशें वर्षें हिंदुस्थानाला मुसुलमानांपासून बिलकूल त्रास झाला नाहीं.

**हिंदुस्थानचें स्वातंत्र्यसंरक्षण.**—परकीयांच्या हल्ल्यांचा प्रतिकार हिंदू लोकांनीं अनेक वेळां केलेला आहे. अलेक्झांडर ऊर्फ शिकंदर बादशहाच्या वेळेपासून परकीयांचे हल्ले हिंदुस्थानावर होऊं लागले. त्यापूर्वीच्या हल्ल्यांची ऐतिहासिक माहिती नाहीं. खरें म्हटलें म्हणजे हिंदुस्थानास संपूर्ण स्वतंत्रता जर कधीं आली असेल, तर ती शिकंदर बादशहा येण्याच्या पूर्वी असेल. शिकंदराच्या वेळेपासून ग्रीक, सिथियन, शक, हूण व पुढें अरब, तुर्क, मोंगल आणि सरतेशेवटीं पाश्चात्य ख्रिस्ती इत्यादि अनेक परकीय लोकांचे हल्ले आज दोन अडीच हजार वर्षें हिंदुस्थानावर येत आहेत; आणि त्या सर्वांचा थोड्याबहुत अंशानें येथें रिघाव झाला आहे, तथापि त्यांचा प्रतिका

राष्ट्र वेळोवेळीं येथील लोकांकडून झालेला आहे, हें सहसा कोणाच्या लक्षांत येत नाहीं ' शिकंदर बादशहाच्या स्वारी-नंतर शहाबुद्दीन घोरीच्या स्वारीपर्यंत जीं पंधराशें वर्षें गेलीं, तेवढ्या काळांत ह्या देशावर परकीयांच्या स्वाऱ्या एकामागून एक येत होत्या; आणि तितक्यांस येथचे लोक मागें हटवून स्वतःची सत्ता स्थापन करीत होते. जगाच्या इतिहासांत इतके प्रचंड झगडे सांपडणें कठिण. शिकंदर बादशहाचें वास्तव्य येथें झालेंच नाहीं. त्याचे कांहीं लोक मागें राहिले, त्यांस चंद्रगुप्तानें घालवून दिलें. पुढें शंभर वर्षांनीं वायव्येकडील बॅक्ट्रिया या देशांतून ग्रीक लोकांनीं पुनः हिंदुस्थानावर स्वारी केली त्यावेळीं मगध देशाचा राजा पुष्यमित्र व त्याचे सेनापती ह्यांनीं इ. स. पू. १७५ च्या सुमारास त्या यवनांस बाहेर घालवून दिलें. यवना-नंतर शक आले. त्यांनीं तक्षशिला व मथुरा येथें सुमारें शंभर वर्षें राज्य केलें. त्यांचा पाडाव इ. स. पूर्वी ५७च्या सुमारास उज्जनीच्या विक्रमादित्यानें केला. नंतर पश्चिमे-कडून शकांची दुसरी एक टोळी आली. त्यांचा राजा नह-पान याचा गौतमीपुत्र पुलुमायि शातकर्णी यानें इ. स. १२६ त पराभव केला. त्यानंतर यूएची नांवाचे लोक हिंदुस्थानावर आले. त्यांचे राजे कनिष्क, हुविष्क व वासु-देव यांनीं शंभर वर्षेंपावेतों पंजाब व सभोंवारच्या प्रदेशा-वर राज्य केलें. त्यांचा पाडाव गुप्तवंशी प्रबल राजा समुद्र-गुप्त यानें चवथ्या शतकांत केला. पांचव्या शतकांत श्वेत हूण लोक हिंदुस्थानावर चालून आले. त्यांचा दुष्ट राजा मिहिरगुल यास सहाव्या शतकांत यशोधर्म राजानें जिंकलें. तरी सातव्या शतकांत पुनरपि हूण लोक हिंदुस्थानांत आले त्यांस कनोजच्या श्रीहर्षानें कायमचें हांकून लाविलें. त्या-नंतर सुमारें तिनशें वर्षेंपावेतो हिंदुस्थानावर परचक्र आलें नाहीं. पुढें सबक्तगीन व गझनीचा महमूद चालून आले. त्यांजपुढें हिंदु लोक हार पावले, तथापि त्यांनीं स्वराज्य घालविलें नाहीं. आणखी दोनशें वर्षें गेल्यावर महंमद घोरी हिंदुस्थानावर आला. त्याजला अडविणारा शेवटचा शूर वीर पृथ्वीराज होय. परंतु त्या सामन्यांत पृथ्वी-राजाचा पाडाव होऊन बाराव्या शतकाच्या आरंभीं हिंदु-स्थानावर परराज्य स्थापन झालें. सारांश, बाराव्या शत-काच्या अखेरीस पृथ्वीराजाचा पाडाव झाला. तोंपावेतों हिंदुस्थानांत आर्यांचें स्वतंत्र राज्य कायम होतें. तेराव्या शतकापासून मात्र हा देश परचक्राखालीं गेला. तें परचक्र मुसलमानांचें होय.

**मुसुलमानांतील मूळच्या जातींचें मानवशास्त्रीय स्वरूप.**—मुसलमानी संप्रदायांत श्रेष्ठ प्रतीच्या अरबी लोकांचा व तसेंच मध्य आशियांतील तुर्क, मोंगल, तातार वगैरे धनगरी पेशाच्या लोकांचा प्रवेश होत गेल्यामुळें मुसु-लमान लोकांत अनेक वंशांचें मिश्रण झालेलें आहे. व त्या वंशांचे स्वभावभेद पुढें त्यांच्या कर्तृत्वांत उतरलेले दिस-तात. तुर्क, मोंगल व तातार लोकांनीं मुसलमानी संप्रदाय स्वीकारून अनेक पराक्रम गाजविले; पण त्यांच्याकडून जगाच्या संस्कृतींत फारशी भर पडली नाहीं. याच तुर्क-मोंगलांचा हिंदुस्थानच्या इतिहासाशीं विशेष संबंध आहे. हे लोक मूळ मध्यआशियांत राहणारे. मध्यआशियाखंड म्हणजे सर्व बाजूंनीं प्रचंड पर्वतांनीं वर उचलून धरिल्यासारखा मेजाच्या आकृतीचा एक विस्तृत प्रदेश आहे. मानवी उत्प-त्तीचें मूळ ठिकाण येथेंच असावें असें कित्येक म्हणतात. पृथ्वीवरील आजपर्यंतच्या प्रचंड घडामोडी या प्रदेशांतील लोकांनीं केलेल्या आहेत. आर्य, सिथियन, हूण, यवन, शक, तुर्क, तातार वगैरे अनेक जातींचे लोक मूळ येथून बाहेर पसरले, आणि त्यांनीं दक्षिणेस व पश्चिमेस अनेक भराऱ्या मारल्या. पृथ्वीवरील मानव जातीचे जे तीन वंश समजतात त्यांपैकीं गौरवर्णी सेमाइट वंशांत बाबिलोनी, असुरी, अरेमियन व अरबी हे लोक मोडतात; आणि तुर्क, मोंगल, तातार वगैरे मध्यआशियांतील धनगरी पेशाचे लोक पीतवर्णी वंशांत मोडतात. तुर्क, तातार, मोंगल, मांचू या सर्वांस सिथियन अशीहि संज्ञा आहे. मध्यआशियाच्या पश्चिम भागीं बुखारा शहरचे आसपास जे रहात, ते तुर्क होत, उत्तरभागीं सैबीरियांत रहात ते तातार, आणि पूर्व भागीं रहात ते मोंगल होत. मोंगल व मांचू हे बहुतेक एकच. या सर्व लोकांची वहिवाट एक ठिकाणीं स्थायिक राहण्याची नव्हती. आपले गुरांचे कळप व तंबू बरोबर घेऊन ते मनास वाटेल तिकडे भटकत जात. त्यांपैकीं मोंगल हे विशेष शूर व धीट असत. मुसलमानी संप्रदाय स्वीकारण्यापूर्वी हे सर्व लोक बुद्धधर्मी असून तिबेटच्या लामाचे अनुयायी होते. इराणच्या प्राचीन राजांस या सर्व टोळधाडी नेहमीं जर्जर करीत असत. तुर्क व मोंगल हे तुराणी म्हणजे तुराणांत अथवा इराणच्या उत्तरेकडील व सैबीरियाच्या दक्षिणेकडील प्रदेशांत—ज्यास हल्लीं तुर्कस्तान म्हणतात—त्यांत राहणारे लोक होत. त्यांपैकीं मोंगलांचें मूळ ठिकाण मोंगोलिया. स्वभावानें व संस्कृतीनें मोंगल व तुर्क जवळजवळ सारखेच. दोघेहि मूळचे रानटी व धन-गरी पेशाचे. मोंगलांच्या शरीररचनेंत थोडें चिनी मिश्रण होतें; पण अलीकडच्या घडामोडींत मोंगलांचें मूळचें स्वरूप पार बदलून गेलें आहे. दोघांचा मूळचा स्वभाव क्रूर, विध्वं-सक, परहिताविषयीं निष्ठुर व मानवी संस्कृतीला विरोधी असा होता.

**मोंगल.**—मोंगल मूळ चिनी वळणाचे होते. म्हणजे त्यांचा रंग पिंगट, कपोलास्थी उंच, नाक पसरट, डोळे अरुंद व लांबोळे, तोंडें मोठीं होतीं. नंतर तुर्कांच्या सहवा-सानें त्यांच्यांत मिश्रण झालें आणि सरतेशेवटीं ते इराणी वळणावर गेले. त्यांच्या चेहऱ्यावर लाली येऊन तो सुंदर व फुगीर बनला. शेवटीं हिंदुस्थानांत शरीर लोहमय, चेहरे विस्तवासारखे, मान आंखूड, कातडी राठ, गाले सुर-

कुतलेले, नाकपुड्या केमाळ व रुंद, तोंड अजगरासारखें व अंगाला भयंकर दुर्गंध अशा तऱ्हेचें स्वरूप त्यांना प्राप्त झालें. सर्व तातार लोकांपैकीं मोंगलांस जास्त कुवत होती. विशाल फौजा तयार करून राज्यें पादाक्रांत करणें, तेथील लोकांची कत्तल करून त्यांचें सर्वस्वापहरण करणें व सर्व मुलख उध्वस्त करून टाकणें असा सामान्यतः त्यांचा क्रम असे. चेंगीझखान हा अशाच प्रकारचा एक तुफानी राक्षस होता. हिंदुस्थानांत आल्यावर इमारतींचें बांधकाम, रस्ते, कालवे वगैरे सार्वजनिक लोकहिताचीं कामें त्यांचे हातून झालीं, पण तीं तेथील संसर्गानें व परिस्थितीच्या प्रभावामुळें झालीं, स्वयंस्फूर्तीनें नव्हे. मोंगल मूळचे अज्ञानी पण स्वभावानें चौकस होते. ते उद्दाम व गर्विष्ठ असत. घरांतील सर्व व्यवस्था बायकांवर व बाहेरचीं सर्व हलकीं कामें नोकरांवर ते सोंपवीत. युद्ध व शिकार हीं दोन कामें मात्र स्वतः करीत. खाण्यापिण्याची चैन म्हणजे त्यांच्या सुखाचा कळस. ते नाना प्रकारचीं मद्यें प्राशन करीत. ते स्वभावाचे मोकळे, परंतु संशयी व रागीट आणि अंतःकरणाचे फार कठोर होते. त्यांच्या स्त्रिया व्यवस्थित व शुद्धाचरणी असत. त्यांच्यांत व्यभिचार हा अत्यंत निंद्य गुन्हा समजला जात असे. त्याला चेंगिझखानानें मरणाची शिक्षा ठरविली होती.

मोंगलांच्या जुन्या मूळ धर्माचें आर्यधर्माशीं साम्य होतें. पंचमहाभूतांस ते आपल्या अन्नाचा अवशेष अर्पण करीत. प्रत्येक घरांत मूर्ति असे, तिची ते मनोभावानें पूजा करीत. ब्राह्मणासारखे त्यांच्यांत पुरोहित होते; ते ज्योतिष पहात, शकुन सांगत व ग्रहणें वर्तवीत. हिंदु योग्याप्रमाणें त्यांच्यातहि अंगाला राख फांसलेले साधु असत, ते आपल्या तपाच्या व पवित्राचरणाच्या बळावर पुष्कळ चमत्कार करून दाखवीत. ते अनेक देवांची पूजा करीत. क्षात्रियांप्रमाणें त्यांस मांस आवडे. त्यांच्यांत पडदा नसे. सतीची चाल नव्हती. मेलेल्या भावाच्या बायकोशीं दुसरा भाऊ लग्न करी.

नंतर याच मोंगलांपैकीं कित्येक बुद्धधर्मी झाले. कित्येक ख्रिस्ती झाले व कित्येक मुसुलमान झाले. पण या धर्मांतरामुळें त्यांच्यांतील मूळची धर्मनिष्ठा ढासळत गेली. मुसुलमान झाल्यानंतरच्या त्यांच्या धर्मनिष्ठेत अरब मुसलमानांतील कडवेपणा नव्हता. धर्मसंबंधांत ते संशयी, ढिले व बेपर्वा असत. मुसुलमानी संप्रदायाचें वरील पातळ आवरण दूर केल्यास त्यांच्या अन्तर्यामीं आर्य, बौद्ध, ख्रिस्ती वगैरे धर्मांचें मिश्रण दिसून येतें. म्हणून कट्टे अरब मुसुलमान व सौम्य हिंदू यांच्या दरम्यानचा मोंगल हा एक निराळाच प्रकार आहे. हिंदुस्थानांतील मोंगल बादशहा धर्माच्या बाबतींत मुळींच आग्रही नव्हते. धर्मोपदेश करण्यास लागणारी जाज्वल्य धर्मश्रद्धा त्यांच्यांत नव्हती, सुधारणेचें आरोपण करण्यास त्यांच्याजवळ बीज नव्हतें. धर्मस्वीकार करण्याऐवजीं मोठी खंडणी दिली कीं ते जिंकलेल्या लोकांस सोडून देत. हा थोडासा त्यांच्या अत्यंत लोभी स्वभावाचाहि परिणाम होय.

**अरब.**—अरब लोक मूळ मानव जातीच्या गौरवर्णी उर्फ कॉकेशियन वंशातले होते. त्यांच्यांत अनेक जाती होत्या हे अरबस्तानच्या वालुकामय ओसाड प्रदेशांत धनगरी पेशानें रहात असत. यूरोपांत त्यांस सारासेन 'म्हणजे ओसाड प्रदेशांतील संतति' या नांवानें ओळखतात. हे लोक मूळ मूर्तिपूजक होते. नंतर ते ख्रिस्ती झाले व शेवटीं महंमद पैगंबराचे कट्टे अनुयायी बनले. धर्माच्या अस्सलपणासंबंधानें पाहिलें तर अरब सर्व मुसुलमानांत श्रेष्ठ होत. महंमदाच्या हाताखालीं अरब लोकांचा अडाणीपणा व आळस नाहींसा होऊन त्यांजमध्यें ऐक्य व उत्साह उत्पन्न झाला व अरबांचें एक राष्ट्र झालें. अरब मुसुलमान हिंदुस्थानांत फारसे आले नाहींत; पण अरबस्तानांतून चारीहि दिशांकडे मुसुलमानी संप्रदायाचा प्रसार करीत व देश जिंकीत ते गेले, व आपल्या पराक्रमांनीं जगाच्या इतिहासाचा ओघ त्यांनीं संपूर्णपणें बदलून टाकला. आशिया व आफ्रिका खंडांतील पुष्कळसे प्रदेश आणि स्पेन वगैरे दूरचे देशहि अरबांनीं जिंकले. तथापि त्यांच्या स्वभावांतील मूळचा आकुंचितपणा व नंतरचा जातिद्वेष व अन्तर्वैमनस्यें व मुसुलमानी कडवेपणा अखेरपर्यंत कायम होता व त्यामुळें पुढें त्यांची भरभराट एकदम खुंटली. तथापि जगाच्या संस्कृतींत अरबांनीं मोठीच भर घातली आहे. त्यांनीं आपल्या सत्तेच्या सुमारें आठशें वर्षांच्या काळांत ( ६३२–१४७९ ) प्राचीन काळाच्या प्राच्य सुधारणेंत जेवढें म्हणून चांगलें होतें तें सर्व ग्रहण करून, व त्यांत स्वतःची पुष्कळ भर घालून, त्यांनीं तो भाग ख्रिस्ती यूरोपास दिला. बगदादच्या आब्बासी खलीफांच्या कालांतील ज्याला मुसुलमानांचें 'सुवर्णयुग' म्हणतात त्या पहिल्या दीडशें वर्षांत त्यांच्यांत अनेक थोर व कर्ते पुरुष निपजले व त्यांनीं अनेक गहन विषयांत आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे. शास्त्र, तत्त्वज्ञान, वाङ्मय इत्यादि विषयांत अरब विद्वानांनीं खलीफांच्या पदरीं राहून अलौकिक कीर्ति मिळविली व मोठमोठे उद्योग केले. त्यांजपुढें तत्कालीन ख्रिस्ती राष्ट्रें अत्यंत हीनावस्थ व रानटी दिसतात. गिबन म्हणतो, 'मुसुलमानांच्या पहिल्या शंभर दोनशें वर्षांत ऐश्वर्यानें व सत्तेनें खलीफाची बरोबरी करणारे दुसरे राजे पृथ्वीवर नव्हते. या अरबी खलीफांनीं मशिदी, विद्यालयें, दवाखाने, धर्मशाळा रस्ते, पूल, कालवे इत्यादि लोकोपयोगी कामें केलीं व सर्व प्रकारच्या विद्याकलांस उत्तम आश्रय दिला. संस्कृत, खाल्डी, ग्रीक, वगैरे भाषांतून उत्तमोत्तम ग्रंथ मिळवून त्यांची अरबी भाषेंत भाषान्तरें करविलीं, गणित, भूगोल, खगोल, ज्योतिष, वैद्यक, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, इत्यादि विषयांतील त्या वेळच्या अरब विद्वानांचे उद्योग अद्यापपावेतों सर्वत्र मान्य होत आहेत. यूरोपच्या अर्वाचीन प्रगतीस याच अरब विद्वानांचे उद्योग बव्हंशीं

कारण झाले आहेत. अरबांनीं स्वतः निर्माण केलेला विषय ह्मणजे मुसुलमानी कायदा हा होय. यूरोपीय कायदेपंडित रोमन-कायद्याच्या खालोखाल अरबी कायद्यास मान देतात. वाङ्मयांतहि त्यांनीं फार चांगलें काम केलें. कादंबरीचें रचनाचातुर्य त्यांनीं इराणी लोकांपासून घेतलें. त्यांच्या 'अरेबियन नाइट्स' या पुस्तकानें एकंदर पृथ्वीवरील अमोल व अजरामर ग्रंथांत मोठीच भर घातली आहे.

हिंदुस्थानचे पुष्कळ लोक बगदाद येथें जाऊन राहात असत. चरक व सुश्रुत या दोन आर्यवैद्यक ग्रंथांचे तर्जुमे अरबी भाषेंत दोघा ब्राह्मणांनीं केलेले आहेत. आरबांनीं महत्प्रयास करून मिळविलेलें ज्ञानभांडार पुढें तुर्कांनीं धुळीस मिळविलें. तुर्कांनीं पुस्तक संग्रह जाळले, शास्त्रीय हत्यारें मोडून टाकलीं आणि विद्वानांचा शिरच्छेद केला, त्यामुळें अरब सुधारणा लयास गेली.

**हिंदुस्थानावर मुसुलमानांच्या पहिल्या स्वाऱ्या.**— प्राचीनकाळापासून हिंदुस्थानाशीं अरब लोकांचा व्यापार चालू होता. इ. स. ६३७ मध्यें खलीफ उमरच्या वेळेस अरबांची एक टोळी ठाणें येथें आली होती. पुढें इ. स. ६६४ त महल्लब नामक मुसुलमान सरदार कांहीं फौजेनिशीं मुलतान पावेतों येऊन परत गेला. आठव्या शतकाच्या आरंभीं वलीद खलीफ बगदाद येथें अरबी खिलाफतीवर असतां, सिंध प्रांतांतील कांहीं भागावर दाहिर नांवाचा रजपूत राजा राज्य करीत होता. बक्कर किल्ल्याजवळ आरोड म्हणून शहर होतें, तीं दाहिरची राजधानी. ह्या दाहिर-राजाशीं प्रथम मुसुलमानांचा तंटा लागला. सिंधप्रांतांत देवल नामक बंदरीं मुसुलमानांचे एक हजार लोक रजपुतांनीं पकडून ठेविले. मुसुलमानांनीं ते दाहिर राजापासून परत मागितले. परंतु देवलबंदर दाहिरच्या ताब्यांत नसल्यामुळें ती मागणी त्यास कबूल करतां येईना. त्याची ती सबब न ऐकतां त्याजवर खलीफ वलीदचा सरदार महंमद कासीम यानें फौजेसह स्वारी केली. त्या लढाईंत दाहिर समरांगणीं पडला व कासीमनें लोकांजवळून खंडणी वसूल केली. याबद्दल उल्लेख सतराव्या प्रकरणांत आलाच आहे.

दाहिर राजाच्या दोन मुली होत्या. त्यांस बंदिवान करून कासीमनें खलीफ वलीद यास नजर पाठविल्या. त्यांनीं कासीमचा सूड घेण्याची विलक्षण युक्ति केली. वडील मुलीवर खलीफाची मर्जी बसली. तेव्हां एके प्रसंगीं दीनवाणीनें ती मुलगी खलीफास म्हणाली, 'मजवर कासीमनें बलात्कार केला असल्यामुळें मी भ्रष्ट आहे.' कासीमचें हें दुष्कृत्य ऐकतांच खलीफास अत्यंत संताप येऊन त्यानें कासीमास ठार मारविलें. त्याचें प्रेत पाहून मुलीस फार आनंद झाला; व ती म्हणाली, 'माझ्या बापाचा घात करणाऱ्या दुष्टाचा चांगला सूड घ्यावा एवढ्याच साठीं मी हा आरोप त्याजवर आणला. मी भ्रष्ट नाहीं.' हें ऐकून व तिचें खोटें वर्तन पाहून खलीफानें तीसहि ठार मारलें. अशा रीतीनें कासीमचा सूड व पातिव्रत्यसंरक्षण अशा दोन्हि गोष्टी तिनें साधल्या. सिंधप्रांतावरची ही स्वारी सन ७११ चे सुमारास झाली. पण पुढें तीस वर्षांच्या आंत मुसुलमानांस रजपूतांनीं तेथून पार हांकून लावलें. नंतर दोनअडीचशें वर्षें मुसुलमानांचा उपद्रव हिंदुस्थानास झाला नाहीं.

**गिझनीचा महमूद.**—अकराव्या शतकाच्या आरंभीं मुसुलमानांनीं हिंदुस्थान जिंकण्यास गिझनीच्या महंमूदाच्या नेतृत्वाखालीं नेटानें आरंभ केला. महमूद हा तुर्की वंशांतला असून त्यानें गिझनी येथें स्वतंत्र राज्य स्थापलें होतें. या राज्यास कादिर या खलीफानें मान्यता दिली होती. रजपूत राजांनीं महंमूदास निकराचा विरोध केला. महमूदानें १००१ ते १०२६ च्या दरम्यान हिंदुस्थानावर एकंदर सतरा स्वाऱ्या केल्या. त्यानें दूर गुजराथेवर स्वारी करून सोमनाथाचें देवालय लुटलें. तथापि फक्त पंजाबप्रांत मुसुलमानांच्या ताब्यांत राहिला. पुढें महंमूदाच्या अनुगामी राजांनीं गंगायमुना नद्यांच्या कांठचा प्रदेश जिंकला तेव्हां तेथील रजपूत राजघराणीं राजपुतान्यांतील डोंगराळ मुलुखांत जाऊन राहिलीं. तीं पुढें मोगलांच्या वेळींहि पूर्णपणें जिंकली गेलीं नाहींत. अद्याप कित्येक घराणीं तेथें राज्य करीत आहेत.

महंमूदाच्या स्वाऱ्यांचे राजकीय व धार्मिक दोन्ही उद्देश होते. तो खलीफतीचा प्रतिनिधि ह्मणून संप्रदायप्रसार व अरबसंस्कृतिप्रसार करण्यास हिंदुस्थानावर स्वारी करून आला. शिवाय हिंदुस्थानांतील संपत्ति पाहून तर त्याचे डोळे दिपून गेले. त्यानें मथुरा नगरीच्या ऐश्वर्याचें पुढील प्रमाणें वर्णन केलें आहे, 'या आश्चर्यकारक शहरांत एक हजारावर इमारती आहेत व त्यांपैकीं बऱ्याचशा संगमरवरी दगडाच्या आहेत, त्यांची किंमत कित्येक लाख दिनार होईल. माझ्या शिपायांनीं मूर्तिपूजकांच्या देवळांत पांच सोन्याच्या मूर्ति सांपडल्या. त्या मूर्तींचे डोळे माणिकांचे होते त्यांची किंमत ५०,००० दिनार होती. याशिवाय रुप्याच्या मूर्ती तर शंभर सांपडल्या. ती एकेक मूर्ति एकेक उंटाच्या ओझ्याची होती.' याप्रमाणें महंमूदानें अनेक शहरांत मोठाली लूट मिळविली. बनारस शहरांत त्यानें एक हजार देवळांतल्या मूर्ती फोडल्या व एकंदर लूट चार हजार उंट भरून नेली असें म्हणतात.

**घोरी घराणें.**—महंमूदाच्या गझनवी घराण्यानें ९९६ते ११८६ पर्यंत गिझनी व लाहोर येथें राज्य केलें. हें घराणें घोरीच्या महंमूदानें बुडविलें. त्यानें हिंदुस्थान जिंकण्याकरितां एका अगदीं साध्या मार्गाचा अवलंब केला. नंतरच्या सर्व जेत्यांनीं व इंग्रजांनीं सुद्धां याच मार्गाचा उपयोग केला. तो मार्ग हा कीं, हिंदुस्थानांतील अनेक राजांचीं जीं भांडणें व युद्धें आपसांत होत त्यांमध्यें पडून त्यांच्या आपसांतील चुरसीनें त्यांना प्रथम हतबल करावयाचें व नंतर त्यांचीं राज्यें हस्तगत करावयाचीं. महंमूद घोरीनें दिल्ली व कनोज

येथील राजांच्या आपसांतील भांडणांत एका पक्षास प्रथम मदत करून नंतर त्यानें दोन्हीं राज्यें बळकावलीं, आणि नंतर बनारसपासून ग्वालेर व गुजराथपर्यंत मुलुख जिंकून आपलें साम्राज्य स्थापलें व दिल्ली येथें राजधानी ठेविली.

**गुलाम, खिलजी, तघलखघराणीं.**—महंमद घोरीनंतर कुतुबुद्दीन, नांवाच्या गुलाम सुभेदारानें दिल्लीचें राज्य बळकावलें. या गुलाम घराण्यानें इ. स. १२०६ ते १२९० पर्यंत राज्य केलें. त्यांनींच दिल्लीजवळ कुतुबमिनार नांवाचा लाल दगडांचा प्रचंड मनोरा बांधला. यानंतरच्या खिलजी घराण्यांत अलाउद्दीन हा फार प्रसिद्ध बादशहा झाला. याच्या कारकीर्दींत मुसुलमानांनीं दक्षिणेंत स्वाऱ्या करून साम्राज्य बरेंच वाढविलें. अलाउद्दीनालाहि इमारती बांधण्याचा मोठा नाद होता. या घराण्याच्या वेळीं साम्राज्याच्या सैन्यांत मोंगलांचा विशेष भरणा झाला व ही गोष्ट अफगाण राज्यकर्त्यांना घातक झाली. खिलजीनंतर तघलख घराण्यानें १३२०–१४१४ पर्यंत राज्य केलें. या घराण्यांतला महमद तघलख हा फार विलक्षण बादशहा झाला. त्याच्याबद्दल एल्फिन्स्टन म्हणतो, ‘ मनुष्य स्वभावास अतिशय भूषणभूत अगर दूषणभूत झालेल्या व्यक्तींत हा अग्रगण्य असून हा जितका गुणवान तितकाच क्रूर व जुलमी राजा होऊन गेला.’

**हिंदुस्थानावर स्वाऱ्या करणारे मोंगलः तैमूरलंग व बाबर.**—१३९८ मध्यें तैमूरलंगानें हिंदुस्थानावर स्वारी केली. त्यानें दिल्ली लुटली व मोठ्या वावटळीप्रमाणें हिंदुस्थानांत थोडावेळ धुमाकूळ घालून परत स्वदेशाची वाट धरली. या धामधुमीच्या काळांत दिल्लीच्या बादशहांचे प्रांतोप्रांतीचे सुभेदार स्वतंत्र राजे बनले. तैमूरलंग गेल्यावर दिल्ली येथें सय्यद घराण्यानें १४१४–१४५० पर्यंत व लोदी घराण्यानें १४५०–१५२६ पर्यंत राज्य केलें. लोदी घराण्याचा इब्राहिम राज्य करीत असतां लाहोरचा सुभेदार दौलतखान लोदी यानें काबुलचा मोंगल राजा बाबर याच्या मदतीनें दिल्लीवर चाल केली. त्यांत बाबरला जय मिळून त्यानेंच दिल्लीची गादी बळकावली. हा हिंदुस्थानांतला पहिला मोंगल बादशहा होय.

**मोंगल बादशहा बाबर व हुमायून.**—बाबरनें प्रथम विरुद्ध उठलेल्या लोकांच्या अत्यंत क्रूरपणानें कत्तली केल्या. त्यानें आपल्या ‘ आत्मवृत्तांत ’ सर्व हकीगत सविस्तर लिहून ठेविली आहे. तसेच त्यानें आपलीं मतें व भावना मनमोकळेपणानें लिहून ठेविल्या आहेत. शारीरिक व मानसिक दोन्ही प्रकारचे श्रम करण्याची त्याला आवड असे. राज्यकारभाराचें काम संभाळून शिवाय तो तलाव, विहिरी बांधणें व दूरदूर देशच्या फळझाडांची लागवड करणें वगैरे कामांत लक्ष घालीत असे. शिवाय फारसी भाषेंत कविता करण्याचा त्याला नाद असे. बाबरनंतर त्याचा मुलगा हुमायून राज्यावर आला. पण त्याला लवकरच शत्रू उत्पन्न झाले. प्रथम हुमायूननें आपला भाऊ कामरान याला इराण ते सिंधूनदीपर्यंतचा मुलूख देऊन त्याचा तंटा मिटविला. नंतर गुजराथवर स्वारी करून तेथील राजा बहादुरशाहा याचा त्यानें पराभव केला. इतक्यांत बंगाल्यांत शीरशहा नांवाच्या सुभेदारानें बंड केलें, तें मोडण्याकरितां तो तिकडे गेला. पण या सामन्यांत हुमायूनचाच पराभव झाल्यामुळें दिल्ली सोडून तो इराणांत पळून गेला, व इराणच्या बादशहाच्या आश्रयास राहिला. नंतर १५५५ मध्यें त्या बादशहाच्या सैन्याच्या मदतीनें त्यानें दिल्लीचें राज्य परत मिळविलें.

**शीरशहा व शूर घराणें.**—हुमायून पळून गेल्यानंतर शीरशहानें दिल्लीचें राज्य घेतलें, व आसपासचे प्रांत बंडें मोडून ताब्यांत आणले. शिवाय त्यानें राज्यकारभारांत हि चांगल्या सुधारणा केल्या. पुढें अकबरानें ज्या सुधारणा केल्या त्यांचा पाया घालण्याचें बरेंचसें काम शीरशहानें केलें. कीन म्हणतो, “ शीरशहानें जितकें शहाणपण दाखविलें तितकें कोणत्याहि सरकारनें, ब्रिटीश सरकारनें सुद्धां, दाखविलें नाहीं.” शीरशहा १५४५ मध्यें एका वेढ्याचे वेळीं मारला गेला. त्याचा मुलगा फार क्रूर निघाल्यामुळें लवकरच हुमायूनला परत येण्यास संधि मिळाली.

**अकबर बादशाह.**—( १५५६–१६०५ ) हुमायूनचा मुलगा अकबर चवदा वर्षांचें वय होण्यापूर्वींच राज्यावर आला. म्हणून प्रथम कांहीं वर्षें बहिरामखान या हुषार पण क्रूर इसमानें राज्यकारभार चालविला. त्यानें शूर घराण्यांतील शिकंदर व वजीर हिमु यांचें बंड मोडलें. चारपांच वर्षांनीं अकबर स्वतः राज्यकारभार पाहूं लागला. तरवार गाजविण्याचें सामर्थ्य असतांहि ज्यांनीं आपली सत्ता प्रजेचें धर्मस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य रक्षण करण्याकडे उपयोगांत आणली, असले राज्यकर्ते जगाच्या इतिहासांत फारच थोडे आढळतात. अशा अत्यंत थोर राज्यकर्त्यांत अकबराची गणना होते. “ इंग्लंडची तत्कालीन राणी एलिझाबेथ व स्पेनचा राजा फिलिप यांच्यांशीं तुलना करतां अकबराचा दर्जा त्यांच्यांहून उच्च लागतो, ” असें क्रूक म्हणतो. अकबराच्या कारकीर्दीचे तीन विभाग पडतातः त्यानें पहिलीं पंधरा वर्षें युद्धें करणें, शिकार वगैरे खेळ खेळणें व इमारती बांधणें यांत घालविलीं; १५७६ पासून पुढील वर्षें शिया पंथ, हिंदुधर्म ख्रिस्ती संप्रदाय वगैरे धर्मांचें ज्ञान मिळविण्यांत, व जमाबंदी वगैरे राज्यकारभाराच्या खात्यांत सुधारणा करण्यांत त्यानें खर्च केलीं; व नंतर तिसरा पंधरा वर्षांचा विभाग दुःखकारक परिस्थितींत काढला; कारण त्याच्या तोडीचा लायक वारस त्याला नव्हता, पूर्वींचे स्नेही एकेक त्याला सोडून गेले, व उतार वयामुळें शारीरिक व मानसिक शक्ति क्षीण होऊन राज्यकारभार त्याला उरकेनासा झाला. असो. अकबर राज्यकारभार पाहूं लागला तेव्हां तो अवघा अठरा वर्षांचा होता पण बुद्धि व शिक्षण यांच्यामुळें त्याची लायकी विशेष होती. त्याचा जन्म

हुमायून इराणांत पळून जात असतां वाटेंत झाला, व पूर्व वय एक प्रकारच्या बंदिवासांत गेलें. बापानें केलेल्या युद्धांत भाग घेतल्यामुळें अकबराचे धैर्यशौर्यादि गुण वृद्धिंगत झाले; व बहिरामखान अध्यक्षकारभार करीत असतां अकबराच्या अंगीं फार धूर्तपणा आला. शिवाय तो उदार व मनमोकळ्या स्वभावाचा होता. त्यानें सर्व हिंदुस्थान आपल्या राजछत्राखालीं आणण्याचा निश्चय तडीस नेला. त्यानें हिंदु-मुसुलमानांनां समानतेनें वागवून हिंदूंनां लायकी पाहून राज्यकारभारांत मोठमोठ्या हुद्द्याच्या जागा दिल्या. अकबरानें अन्तर्गत राज्यकारभारांत इतक्या चांगल्या सुधारणा केल्या व धार्मिक बाबतींत इतकें उदार धोरण स्वीकारलें कीं, उत्तमोत्तम राजांच्या यादींत त्याचें नांव पडतें. तो स्वतः कडवा मुसुलमान नसल्यामुळें इतर धर्मांच्या उपदेशकांचें म्हणणें ऐकून त्यांच्याशीं वादविवाद करीत असे. त्यामुळें अखेर त्यानें एक नवीनच धर्म काढला, व त्याला फैजी व अबुल फजल या दोन विद्वान् मुसुलमान बंधूंची मदत फार झाली. पण यामुळें तो कट्टया मुसुलमानी धर्माभिमान्यांनां अप्रिय झाला.

हिंदुधर्मीयांनां सहिष्णुतेनें वागवून त्यांच्या चालीरीतींत त्यानें सुधारणा केल्या. बालविवाहास बंदी, यज्ञयागादिकामध्यें होणाऱ्या पशुहत्येस मनाई, विधवाविवाहास परवानगी, व सती जाण्याच्या चालीस प्रतिबंध त्यानें केला. कारकीर्दीच्या सातव्या वर्षीच त्यानें झिझिया नामक हिंदूंवरील जुलमी कर बंद केला.

इतकी सुधारलेली भरभराटीची त्याची कारकीर्द झाली, तरी त्याच्या राज्यांत मधूनमधून बंडें होत असत. तीं मोडण्याचें व युद्धें करून नवे मुलुख जिंकण्याचें त्याचें काम अखेरपर्यंत चालू होतें.

**जहांगीर व शहाजहान.**— अकबर मरण पावतांच त्याच्या साम्राज्यांत बंडें, आपसांतील युद्धें, जनानखान्यांतील कृष्णकारस्थानें, स्त्रियांचा कारभार, वगैरे गोष्टी सुरू झाल्या; या सर्व गोष्टी अकबराचा मुलगा सेलीम उर्फ जहांगीर याच्या कारकीर्दींत चालू होत्या. त्याची राणी नूर जहान हिच्या हातांत राज्याचीं सूत्रें होतीं. जहांगिरनंतर त्याचा मुलगा शहाजहान बादशहा झाला. तो थाटमाट व भपका यांचा फार शोकी होता. त्याचें मयूरसिंहासन साठ लक्ष रुपये किंमतीचें होतें. त्याचा दिल्ली येथील राजवाडा व आग्रा येथें त्यानें आपल्या राणीच्या स्मरणार्थ बांधलेली ताजमहाल नामक इमारत यांची जगांतील आश्चर्यांत गणना होते. मोंगल साम्राज्याचा अखेर जो अंत झाला त्याला कारण या कारकीर्दीपासून हिंदू लोकांच्या छळास झालेला आरंभ हें होय. शहाजहानला कारकीर्दीच्या अखेरीस कौटुंबिक भांडणतंट्यामुळेंहि फार त्रास झाला. त्याच्या हयातींतच त्याच्या मुलांमध्यें राज्याकरितां भांडणें सुरू झालीं. सर्वांत थोरला दारा याला राज्य मिळूं नये अशी धाकट्या शुजा, औरंगजेब व मुराद या तिघांची इच्छा होती. या भांडणांत अखेर धूर्त व कपटी औरंगजेबाला राज्य मिळालें व शहाजहानला उरलेली हयात कैदेंत काढावी लागली.

**औरंगजेब.**—(१६५८—१७०७).—याच्या कारकीर्दींत मोंगल साम्राज्याची फार झपाट्यानें अवनति झाली. औरंगजेबाच्या अंगीं राज्यकारभार चालविण्यास योग्य असे बरेच गुण होते. त्यानें दक्षिणेंत स्वतंत्र बनलेल्या सुलतानांनां जिंकलें व दूरवर स्वतःचा अम्मल बसविला. परंतु याच्या कारकीर्दींत दोन नवीं हिंदु राष्ट्रें उदयास येत होतीं, एक मराठ्यांचें व दुसरें शीखांचें. शिवाय औरंगजेब मरण पावतांच दक्षिण हैद्राबादचा निझाम, अयोध्येचा नबाब, व बंगालचा सुभेदार हे स्वतंत्र राजे बनले. औरंगजेबानें मोंगल साम्राज्य वाढविलें पण त्याचा पाया भक्कम केला नाहीं. दक्षिणेंतील विजापूर व गोंवळकोंडा येथील स्वतंत्र मुसुलमानी राज्यें अनेक वर्षांच्या लढायानंतर औरंगजेबानें जिंकलीं आणि मुसुलमानांच्या या आपसांतील तंट्याचा फायदा मराठी राज्याचा संस्थापक शिवाजी यानें भरपूर घेतला.

दिल्ली येथील औरंगजेबाच्या दरबाराचें अनेक यूरोपीय प्रवाशांनीं वर्णन लिहून ठेविलें आहे. टॅव्हर्नियर म्हणतो: "ऐश्वर्याच्या बाबतींत या थोर मोंगलबादशहाची तुलना यूरोपांतील फ्रान्सच्या राजाशीं करतां येण्यासारखी आहे. १ नवंबर १६६५ रोजीं परत निघण्याकरितां मी बादशहाचा निरोप मागितला, तेव्हां त्यानें आपल्या जन्मदिनोत्सवाचा देखावा पाहण्याकरितां मी राहावें अशी इच्छा मला दर्शविली. या उत्सवप्रसंगीं राजाची तुला करून त्याचें वजन गेल्या वर्षापेक्षां अधिक भरल्यास मोठा सार्वजनिक आनंदोत्सव करण्यांत येतो. साम्राज्यांतील मोठमोठे अमीर उमराव, प्रांतोप्रांतीचे अधिकारी व दरबारचें स्त्रीपुरुष बादशहाला मौल्यवान रत्नें, सोनेंरुपें, मोठ्या किंमतीचे गालीचे, हत्ती, उंट, घोडे, वगैरे नानाप्रकारचे नजराणे देतात. या थोर मोंगल बादशहाची सात शोभिवंत सिंहासनें असून तीं सर्व हिरे, पाच, माणकें व मोतीं यांनीं मढवलेलीं आहेत. त्यांपैकीं मयूरसिंहासन सर्वोत्कृष्ट आहे. हत्तींनां बादशहापुढें गुडघे टेकून मुजरा करण्यास शिकविलेलें असतें. बादशहाच्या विशेष प्रीतीच्या हत्तीचा खर्च दरमहा पांचशें रुपये असतो व त्याला खावयास शर्करामिश्रित मांस व प्यावयास दारू देतात. बादशहाची स्वारी निघते तेव्हां अनेक उमराव किंवा सरदार घोड्यावर बसून त्याच्या मागून जातात व त्यांच्यापैकीं अगदीं हलक्या दर्जाचा उमरावहि दोन हजार घोडेस्वारांचा अधिकारी असतो.

शिवाजीच्या मरणानंतर मराठ्यांचें राज्य बुडविण्यास चांगली संधि मिळाल्यामुळें १६८२ मध्यें औरंगजेब स्वतः

सैन्यासह दक्षिणेंत आला. त्यानें मराठ्यांचा अनेक ठिकाणीं पराभव केला, आणि विजापूर व गोवळकोंडा हीं राज्यें बुडविलीं; व तो मरेपर्यंत मराठ्यांशीं झगडत राहिला.

औरंगजेबाचें मोठें साम्राज्य एकत्र राखण्यास त्याच्या सैन्याप्रमाणें त्या वेळच्या हमरस्त्यांचीं मोठी मदत झाली. लाहोरपासून आग्रा शहरापर्यंत एक मोठा रस्ता होता. शिवाय आग्र्यापासून सुरतेपर्यंत एक मोठा रस्ता व दुसरा बऱ्हाणपूरपर्यंत व तिसरा गोवळकोंड्यापर्यंत होता. या रस्त्यांवर झाडें लावलेलीं असून जागजागीं विहिरी व धर्मशाळा होत्या. राजधानीपासून दूरदूरच्या शहरीं टपाल नेण्याकरितां जासूद होते. व्यापारी मालाची नेआण बैलांवरून होत असे व ती पद्धति अद्यापहि पूर्ण नाहींशीं झाली नाहीं.

**मोंगल साम्राज्याचा ऱ्हास व नाश** (१७०७–१८५८).—औरंगजेबाच्या मरणानंतर मोंगल साम्राज्यास एकदम झपाट्यानें उतरती कळा लागली. औरंगजेबानंतर दहा मोंगल बादशहा झाले पण त्यांच्यापैकीं एकहि इतिहासांत विशेष प्रसिद्ध नाहीं. १७३९ मध्यें इराणच्या नादिरशहानें हिंदुस्थानवर स्वारी केली, व दिल्ली शहर लुटून नेलें. मोंगल घराण्यांतले वंशज १८५८ पर्यंत दिल्लीच्या तक्तावर होते, परंतु खरी सत्ता दरबारांतील लोकांच्या व मराठे सेनापतींच्या हातीं होती. औरंगजेबानंतर हिंदुस्थानांतील कोणाहि मुसुलमान राज्यकर्त्यानें सुलतान म्हणजे सम्राट ही पदवी धारण केली नाहीं. म्हैसूर येथील टिपू स्वतःस सुलतान म्हणवीत असे, पण खरी साम्राज्यसत्ता हातीं नसल्यामुळें तो त्याच्या वेडेपणाचा एक प्रकार समजला पाहिजे. औरंगजेबानंतर जी अंदाधुंदी व बंडाळी साम्राज्यांत माजली त्या वेळीं दोन मुसुलमान सरदार स्वतंत्र राजे झाले. एक दक्षिणेंत हैद्राबादेस निजामउल्मुल्क, हा सुनीपंथाचा होता. त्यानें १७२४ पासून स्वतंत्र राज्य स्थापलें. दुसरा सादत अल्ली खान, हा शिया पंथाचा होता. त्यानें अयोध्येस स्वतंत्र राज्य केलें. पश्चिम हिंदुस्थान व मध्य हिंदुस्थानांत मराठे प्रबळ होऊन राहिले. या तिघांपैकीं कोणीहि मोंगल बादशहास खंडणी देत नसे. बंगाल्यांत मुर्शिद कुलीखान व त्याचे वंशज यांनीं राज्य केलें, आणि हा श्रीमंत पण युद्धपराङ्मुख बंगाल प्रांत मात्र बादशाही खजिन्यांत खंडणीच्या रूपानें सतत पैसा ओतीत राहिला.

नादिरशहा निघून गेल्यानंतर मराठ्यांनीं दक्षिणेकडून व अफगाणांनीं पश्चिमेकडून दिल्लीवर चढाई केली. १७६१ मध्यें पानिपत येथें अहमदशहा दुराणीनें मराठ्यांच्या संयुक्त सैन्यावर जय मिळविला, पण दिल्ली येथें स्वतः राज्य करण्याची त्याची महत्वाकांक्षा नसल्यामुळें तो स्वदेशीं परत गेला, व दिल्लीचा बादशहा शहा अलम महादजी शिंद्याच्या हातांतील बाहुलें बनून दिल्लीच्या तक्तावर राहिला. त्यानंतरचा बादशहा दुसरा अकबर हा ब्रिटिशांच्या आश्रयानें तक्तनशीन झाला. अखेर मोंगल घराण्यांतला शेवटचा बादशहा बहादुर शहा याचें १८५७ च्या बंडांत अंग असल्यामुळें त्याला ब्रिटिश सरकारानें पदच्युत करून दिल्लीचें मोंगली राज्य १८५७ त खालसा केलें.

दिल्लीची मोंगल सत्ता दुबळ झाल्यानंतर उत्तरेकडे बंगाल व अयोध्या प्रांतांत व दक्षिणेंत निझामचें राज्य व म्हैसूरमध्यें हैदर व टिपू यांच्या सत्तेखालीं कांहीं काल मुसुलमानी अंमल चालू होता पण त्याचा सांस्कृतिक परिणाम म्हणण्यासारखा मुळींच झाला नाहीं.

**मुसुलमानी अंमलाखालील हिंदुस्थान.**—एखादें राजघराणें किंवा एखादी राज्यशासनपद्धति अस्तित्वांत आली असतां, तिच्या अस्तित्वास निसर्गनियमानुसारच कांहीं ठराविक मर्यादा असते, असें इतिहासांतील अनेक ठिकाणच्या दाखल्यांवरून दिसून येतें. उदाहरणार्थ, ख्रि. पू. ३० मध्यें ऑगस्टसनें रोमन साम्राज्यांत जी अनियंत्रित शासनपद्धति सुरू केली ती इ. स. १८० मध्यें एम्. ऑरेलियसच्या मृत्यूबरोबर लयास गेली. बगदाद येथें इ. स. ७५४ मध्यें स्थापन झालेली खलीफांची सत्ता ९६४ पर्यंत मोठ्या भरभराटींत होती, पण त्यानंतर लवकरच खलीफांचें साम्राज्यवैभव नष्ट झालें. त्याच सुमारास म्हणजे इ. स. ७५२ मध्यें पश्चिम यूरोपांत स्थापन झालेलें कॅरोलिंगियन साम्राज्यसत्ताधीश घराणें इ. स. ९५६ मध्यें ह्यू कॅपेटनें नष्ट केलें. इंग्लंडमध्यें वुल्यम दी कॉंकरर यानें स्थापन केलेलें राजघराणें तिसऱ्या हेनरीच्या निधनाबरोबर लयास गेलें, आणि पार्लमेंटची स्थापना होऊन लोकप्रतिनिधिनियंत्रित अशी राजसत्ताक पद्धति सुरू झाली. फ्रान्समधलें बोर्बोन राजघराणें चवथा हेनरी राज्यावर आला (१५८९) तेव्हांपासून सोळावा लुई मरेपर्यंत (१७९३) टिकलें. पुन्हां इंग्लंडमधील लोकनियंत्रित राजसत्ताकपद्धतीचा इतिहास पाहिला तरी असें दिसतें कीं, प्रथम पार्लमेंटमध्यें लार्ड लोकांचें वर्चस्व होतें तें १८३२ मध्यें नष्ट होऊन खरी सत्ता कॉमन्स लोकांच्या हातीं गेली आणि राजा तर लोकप्रतिनिधींच्या हातांतील केवळ बाहुलें बनून राहिला. अशा या अनेक उदाहरणांवरून असें अनुमान काढावेंसें वाटतें कीं, एकादें राजघराणें किंवा एकादी राज्यशासनपद्धति अस्तित्वांत आल्यावर तिचा जोम सरासरीनें सात पिढ्या टिकतो. शिवाय आकस्मिक युद्धादि कारणांमुळें ही अस्तित्वमर्यादा कमी होण्याचा संभव असतोच. वरील नियम हिंदुस्थानांतील मुसुलमानी (१००१–१३७८) व मोंगली (१५२६–१७४८) दोन्ही अम्मलांनां लागू पडतो.

**मुसुलमानी स्वाऱ्यांच्या वेळची लोकस्थिति.**—मुसुलमानांचा हिंदुस्थानांत प्रवेश झाला त्या सुमारास संस्कृति व ऐश्वर्य या दोन्ही दृष्टींनीं हिंदूंची स्थिति काय होती याची कल्पना १६ व्या प्रकरणावरून येईलच. ही स्थिति तुर्क, अफगाण वगैरे लोकांपेक्षां बऱ्या प्रकारची होती यांत शंका नाहीं. असें असतां मुसुलमानांस हिंदूंवर विशेषतः शूर

बाण्याच्या रजपूत लोकांवर जय कसा मिळाला असा प्रश्न उद्भवतो. हिंदुस्थानांत हर्षानंतर कोणी मोठा सम्राट झाला नाहीं, तर प्रांतोप्रांतीं लहान लहान स्वतंत्र राज्यें नांदूं लागलीं व आपसांत कलह व युद्धें करूं लागलीं, इत्यादि परिस्थितीचें वर्णन मागें आलें आहे ( पृष्ठ ३२९ पहा ). हिंदुस्थानांतील अनेक भागांत जीं रजपूत घराणीं राज्य करीत होतीं, त्यांचा बाणा शिपाईगिरीचा होता. सर्वच रजपुतांच्या अंगीं अप्रतिम शौर्यतेज वसत होतें. तत्कालीन पाश्चात्य सरदारांच्या ( नाईटस ) ठायीं ज्याप्रमाणें स्त्रीवर्गाविषयीं पूज्यबुद्धि व औदार्य वसत असे, त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील रजपुतांच्या अंगींहि ते गुण वसत होते. रजपूत राजांचा दिलदारपणा, धीरोदात्त स्वभाव व कदर यांची बरोबरी होणें नाहीं. अशा शूर बाण्याचे लोक मुसुलमानांच्या रस्त्यांत नाकें धरून बसले असतांहि मुसुलमानांचा प्रवेश हिंदुस्थानांत झाला, याला एक जबरदस्त कारण आपसांतील कलह. दुसरें कारण असें कीं, रजपुतांचा स्वभाव फार भोळा असे; कपटानें विश्वासघात करणें ते निंद्य समजत; जशास तसें वर्तन करून संकटनिवारण करण्यास जें एक प्रकारचें व्यवहारचातुर्य लागतें तें त्यांच्यांत नव्हतें. म्हणून त्यांच्यापेक्षां क्षुद्र लोकांचा कपटाच्या योगानें त्यांजवर पगडा सहज बसे.

मुसुलमानी स्वाऱ्यांच्या काळीं रजपुतांची कशी दुर्दशा झाली होती हें रासा ग्रंथांवरून चांगलें समजतें. विशेषतः चंदभाटाच्या रासा ग्रंथावरून असें दिसून येतें कीं, निरनिराळ्या राजघराण्यांतील परस्पर वैमनस्यें, पैशाच्या लोभानें मुसुलमान शत्रूंस बातमी पोंचविणाऱ्या राष्ट्रद्रोही लोकांचा सुळसुळाट, रजपूत फौजांची अव्यवस्थित रचना, शत्रूंकडील बातमी मिळविण्याविषयीं आमच्या वीर पुरुषांनीं केलेली हयगय, जातिभेदाच्या व्यवस्थेमुळें एकट्या क्षत्रियांवरच पडलेला युद्धाचा सर्व बोजा, आणि इतर वर्गांच्या ठिकाणीं असलेली स्वदेशसंरक्षणाविषयीं अनास्था, इत्यादि कारणांमुळें मुसुलमानांचा रिघाव हिंदुस्थानांत झाला.

**मुसुलमानी राज्यकारभाराचें स्वरूप.**—हिंदुस्थानांत मुसुलमान लोक शिरले, तेव्हांपासून लूट करण्याचा त्यांचा बराच रोख दिसतो. आरंभीं तर देवळें व शहरें लुटणें, मूर्ती फोडणें, घरें जाळणें व माणसांची कत्तल करणें हे प्रकार बरेच वारंवार होत असत. महंमूद गजनवी, महंमद घोरी, अलाउद्दिन खिलजी, तैमूरलंग, नादीरशहा, अहमदशहा अब्दाली, इत्यादि पुरुषांनीं व त्यांच्या अनेक सरदारांनीं व प्रांतोप्रांतींच्या अमलदारांनीं अनेक शहरें व देवालयें लुटलीं आहेत. या लुटींपैकीं बराचसा पैसा देशाबाहेर गेला.

इस्लामी धर्माचा प्रसार करणें हा मुसुलमान जेत्यांचा दुसरा प्रबल उद्देश होता. या बाबतींत आरंभींचे सुलतान हिंदूंना कसे वागवीत याबद्दल कोनच्या इतिहासांत पुढील वर्णन आहे. “ इस्लामी धर्मतत्व असें आहे कीं, लोकांनीं इस्लामी धर्म तरी स्वीकारावा किंवा तरवारीला बळी पडावें. पण भूतदयावादी एका इस्लामी पंथाचें मत असें होतें कीं, इस्लामी धर्म स्वीकारणें नसेल त्यांनीं झिझियानामक कर द्यावा. हा कर देण्याची सवलत देणें म्हणजे हिंदूंवर मोठे उपकार आहेत ही गोष्ट त्यांनीं ध्यानांत वागविली पाहिजे, व फार लीनतेनें वागलें पाहिजे. एखाद्या कर वसूल करणारा अधिकारी त्यांच्या तोंडावर थुंकला तरी सुद्धां त्यांनीं ती मेहेरनजर समजली पाहिजे त्यांनीं मुसुलमान अधिकाऱ्यांच्या आज्ञेंत राहून इस्लामी धर्माची कीर्ति वृद्धिंगत केली पाहिजे. कारण खुद्द कुराणांतच असें सांगितलें आहे कीं, ‘ त्यांनीं इस्लामी धर्म स्वीकारावा, नाहींतर मरण पत्करावें, नाहींतर गुलाम बनून राहावें’. ”

सदरहू प्रकारची धर्मक्रांति अल्पकाळांत घडवून आणण्याची मुसुलमान जेत्यांची उत्कट इच्छा होती. पण सामान्यतः ह्या मानव सृष्टींत कोणतीच क्रांति एकदम घडून येत नाहीं. विशेषतः हिंदुस्थानांत मोठी क्रांति म्हणून क्वचितच घडते असें म्हटलें तरी चालेल. शेंकडों वर्षें मुसुलमानांचे हल्ले या देशावर येत होते, तरी हिंदु लोकांच्या पूर्वजीवनक्रमांत फारसा फरक झाला नाहीं. हिंदु व मुसुलमान हीं दोन राष्ट्रें इतके दिवस एके ठिकाणीं राहून एकमेकांपासून इतकीं अलिप्त राहिल्याचें उत्कृष्ट उदाहरण भूतलावर हिंदुस्थानाशिवाय दुसरें नाहीं. इंग्लंडांत नॉर्मन व सॅक्सन लोकांचें संमिश्रण शंभर वर्षांच्या आंत झालें. असो. लष्करी जोरावर हिंदूंच्या भक्कम धर्माचा पाडाव करण्यास झटणें भ्रांतिमूलक होय, हें तत्त्व पांचशें वर्षांच्या अनुभवानें कां होईना पण अकबरासारख्या सुज्ञ राज्यकर्त्यास तेव्हांच कळून आलें. म्हणूनच वैरभाव सोडून गोडीगुलाबीचा सौम्य मार्ग त्यानें स्वीकारला, आणि हिंदूंशीं अनेक स्नेहसंबंध जोडले. अंततः ह्या युक्तीचाहि फारसा उपयोग झाला नाहीं हें इतिहासावरून स्पष्ट कळतें.

**मोंगल बादशहांचें कर्तृत्व.**—बाबरनें हिंदुस्थान जिंकल्यानंतर लवकरच सुधारलेली राज्यकारभारपद्धति सुरू झाली. परंतु ती सुरू करण्याचा पहिला मान खुद्द मोंगल बादशहास नसून शेरशहाला आहे. हुमायून बादशहाचें सिंहासन बळकावणाऱ्या या बंडखोर सरदारानें आपल्या अल्प कारकीर्दींत सुसंघटित व सुधारलेली कारभार पद्धति अमलांत आणण्याचा उपक्रम केला. नंतर त्याच्याच पायावर अकबर बादशहानें सुधारणांची मोठी भव्य इमारत उभारली या कामांत अकबराला अबुल फजलचें फार साहाय्य झालें अबुल फजलनें लिहिलेल्या ऐने अकबरी नामक ग्रंथांत अकबराच्या राज्यकारभाराची बादशहाच्या दिनचर्येसुद्धां सर्व हकीगत फार बारकाईनें दिली आहे. अकबर बादशहा अहोरात्रींत एकदांच जेवीत असे, मांसाशन कित्येक महिने बिलकुल करीत नसे. तो झोंपहि फार थोडी घेत असे. थोडीशी झोंप पूर्व रात्रीं व थोडीशी

पद्दाटेस घेऊन बाकी रात्रीचा वेळ तो वादविवादांत किंवा राज्यांचें काम पाहण्यांत घालवी. अकबर बादशाहानें चालू केलेली राज्यकारभारपद्धति आणि परधर्मीयाबरोबरचें सहिष्णुतेचें व समानतेचें धोरण हीं नवाजण्यासारखीं होतीं यांत शंका नाहीं.

त्याचा मुलगा जहांगीर याची कारकीर्द जुलुमी नव्हे पण निष्काळजीपणाची होती. राज्यकारभार कसा करावयाचा यासंबंधानें त्यानें आपले स्वतःचे विचार लिहून ठेविले आहेत, ते बऱ्या प्रकारचे आहेत. तथापि हे विचार प्रत्यक्ष अंमलांत आल्याचें दिसत नाहीं. उदाहरणार्थ, मालाच्या वाहतुकीवरील जकाती नसाव्या असा त्याचा हुकूमहि होता पण त्याची अम्मलबजावणी होत नव्हती. दुसरें उदाहरण मद्यपानाचें. मितपानाचा प्रसार प्रजाजनांत केल्याचें तो श्रेय घेतो, पण स्वतः अतिरिक्त मद्यपान करीत असे हें प्रसिद्ध आहे.

पुढील बादशहा शहाजहान याची कारकीर्द प्रजेला सुखावह गेली. हिंदु व यूरोपीय दोघांहि लेखकांनीं त्याची स्तुति केलेली आढळते.

अवरंगजेबाच्या कारकीर्दींत पूर्वी अकबरानें घालून दिलेली राज्यकारभाराची उच्च तत्वें झुगारून देण्यांत आलीं. एकीकडे साम्राज्याची मर्यादा वाढत होती, पण प्रजेमध्यें असंतोष पसरूं लागून मोंगल साम्राज्य विस्कळित होण्याची क्रिया झपाट्यानें सुरू झाली. अवरंगजेबानें जीं इतर मुसुलमानी राज्यें नष्ट केलीं त्यामुळें मराठी राज्यावरील दडपण कमी होऊन मराठे अधिकाधिक प्रबल होत गेले. अवरंगजेब मरण पावतांच प्रांतोप्रांतीचे मुसुलमान अधिकारी स्वतंत्र राजे बनले. सात पिढ्यांसंबंधाचा वर सांगितलेला नियम लागू झाला असें म्हणावें लागतें, कारण अवरंगजेबानंतर मोंगल राजघराण्यांतला जोम एकदम कमी झाल्याचें दिसून येतें.

**मोंगली राज्यकारभार-पद्धतीचा मूळ आधारः**— मोंगल बादशहांनीं तरी आपली पद्धति कशावरून ठरविली? अर्थात् त्यांनीं हिंदुस्थानाबाहेरील इराक येथील अब्बासी खलीफांच्या व ईजिप्तमधील फतिमिद खलीफांच्या पद्धतीवरून ती आयती उचललेली दिसते. म्हणून तिला थोडक्यांत पर्शु-अरबी पद्धति असें म्हणतां येईल. त्यांची राज्यकारभारांतील तत्वें, धार्मिक बाबतींतलें धोरण, करव्यवस्था, खातेविभागणी व सरकारी अधिकाऱ्यांचीं नांवें, हुद्दे सुद्धा सर्व हिंदुस्थानाबाहेरून आयतीं आणलेलीं होतीं अर्थात् हिंदुस्थानांत ती पद्धति सुरू करतांना तेथें पूर्वापार चालू असलेल्या प्राचीन हिंदु पद्धतीकडे सर्वस्वी दुर्लक्ष करणें शक्य नसल्यामुळें त्यांनां स्थानिक परिस्थितीला धरून थोडे फेरफार करावे लागलेच. उदाहरणार्थ आपल्या मुख्य इस्लामी तत्वांनां बाध येत नसेल अशा सर्व स्थानिक हिंदु चालीरीतींनां ते मान देत असत सामान्यतः प्राचीन हिंदु ग्रामव्यवस्था व खालच्या दर्जाचे नोकर, कामगार मोंगल बादशाहांनीं जुन्या हिंदुपद्धतींतीलच कायम ठेवले होते. मुख्य राजदरबार व वरिष्ठ अम्मलदार यांची रचना मात्र सर्वस्वी इराण व ईजिप्तमधील पद्धतीची होती. उदाहरणार्थ, ईजिप्तमधील अरबी राज्यपद्धतींत सुभेदार व खजिनदार हे दोन स्वतंत्र अधिकारी असत. सुभेदाराला अमीर म्हणत. व त्याच्या हातीं लष्कर व पोलीस हीं दोन खातीं असत खजीनदाराला अमील म्हणत व तो खजिन्यावर मुख्य असे. आणि सेनापतीपेक्षां खजिनदाराचाच पगडा राजावर अधिक असे. हिंदुस्थानांतहि मोंगलांचे प्रांतावर सुभेदार व दिवाण असे दोन अधिकारी असून ते एकमेकांचे प्रतिस्पर्धी असत.

**मोंगली कारभाराचें ध्येय**—मोंगली सत्ता लष्करी स्वरुपाची होती व त्यामुळे सर्व अधिकार एका अनियंत्रित व्यक्तीच्या हातांत एकत्र झालेला होता. या साम्राज्यांतील मुसुलमानी प्रजेला राजा हाच राजकीय व त्याचप्रमाणे धार्मिक बाबतींत सर्वसत्ताधीश असे, व त्यामुळें स्वधर्मबांधवांच्या सर्व प्रकारच्या समारंभांत तो भाग घेत असे, परंतु मुसुलमानेतरांच्या बाबतींत तो फारशी ढवळाढवळ करीत नसे. मुसुलमानेतर प्रजेचें संरक्षण पोलीस अधिकाऱ्यांकडून नीट करविणें व कर वसूल करणें हीं दोनच आपलीं कामें असें मोंगल राजे मानीत असत. प्रजेला शिक्षण देणें हें राजाचें कर्तव्य आहे असें त्या वेळीं मानीत नसत. खुद्द इंग्लंडमध्येंहि १८७० पर्यंत हें सरकारचें कर्तव्य आहे असें मानीत नव्हते. हिंदु व मुसुलमानी दोन्ही राज्यपद्धतींत शिक्षण हें धार्मिक चळवळीचें अंग आहे असें मानीत. राजा शिक्षणाप्रीत्यर्थ खर्च करी पण त्याला धार्मिक दानधर्माचें स्वरुप असे. तसेंच कला व वाङ्मय यांनां उत्तेजन देणें याचाहि राज्यकारभाराशीं संबंध नव्हता; ती केवळ राजाच्या खासगी मेहेरबानीची व वैयक्तिक मर्जीची गोष्ट होती. तात्पर्य पोलीसखातें व जमाबंदीखातें खेरीज करून बाकी सर्व बाबतींत मोंगल सरकार हिंदु समाजांतील एकंदर चळवळीपासून अलिप्त असे; व यावरून पहातां त्यावेळचें सरकारी धोरण अत्यंत आकुंचित स्वार्थपर व ऐहिक स्वरूपाचें होतें. मुसुलमानी संप्रदाय व संस्कृति जित हिंदूंमध्यें प्रसृत करण्याचें उच्च ध्येय मोंगल बादशाहांपुढें नव्हतें. प्राचीन रोमन किंवा आधुनिक ब्रिटिश राजनीतीचें ध्येय यापेक्षां अगदीं निराळें व फार व्यापक असल्याचें स्पष्ट दिसतें.

**मोंगलांच्या राज्यकारभारपद्धतीचें महत्त्व**—मोंगलांच्या राज्यकारभारपद्धतीची नीट माहिती करून घेणें आजहि आवश्यक आहे. त्याचीं कारणें अनेक आहेत. आज ज्याप्रमाणें ब्रिटिश राज्यपद्धति जशीच्या तशीच बडोदें, ग्वालेर, इंदोर, अलवार वगैरे संस्थानांत चालू करण्यांत आलेली आहे त्याचप्रमाणें मोंगली सत्तेच्या काळांत मोंगलांच्या सर्व मांडलीक राज्यांत, इतकेंच नव्हे तर पूर्णपणें

स्वतंत्र असलेल्या तत्कालीन हिंदू राज्यांतहि मोंगलांची राज्यकारभारपद्धति तिच्या सर्व अंगांसह व नांवकिताबासहित चालू करण्यांत आलेली होती.

शिवाजीसारख्या हिंदू पद्धतीच्या कट्टया अभिमानी राजानें सुद्धां आपल्या मराठी राज्यांत प्रथम तीच मोंगली पद्धति सुरू केली होती; आणि पुढें जरी आपल्या अष्ट प्रधानमंडळाला त्यानें विचारपूर्वक फारसी नांवें बदलून संस्कृत नांवें दिलीं, तरी पुष्कळ खात्यांत सरकारी कागदपत्रांत इस्लामी नांवेंच कायम होतीं. येणेंप्रमाणें एकेकाळीं ही मोंगली राज्यकारभारपद्धति सर्व हिंदुस्थानभर पसरलेली होती.

आजहि ब्रिटिश राज्यपद्धतीचें बारकाईनें निरीक्षण केल्यास तिची इमारत मोंगली पायावरच अद्यापहि उभारलेली आहे असें दिसून येईल. १८ व्या शतकामध्यें ईस्ट इंडिया कंपनींतील इंग्रज व्यापाऱ्यांनां व साध्या कारकुनांनां अत्यंत परकीय देशांत परकीय लोकांवर राज्य करण्याचा अनपेक्षित प्रसंग आला तेव्हां त्यांनींहि त्या वेळीं सर्वत्र प्रचलित असलेल्या मोंगली पद्धतीचाच जरूर त्या थोडक्या फेरफारानें अंगीकार केला. वारन हेस्टींग्जच्या वेळीं बंगाल व बहारमध्यें मोंगली राज्यपद्धतिच सुरू होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. पुढील गव्हर्नर जनरलांनीं पुष्कळ फेरबदल केले, तथापि मूळ मोंगली पाया कायमच आहे.

महंमदी अंमलामुळें एकंदर भरतखंडावर जे सांस्कृतिक परिणाम झाले त्यांचें विवेचन पहिल्या विभागांत केलेंच आहे.

---

## प्रकरण २२ वें.

### हिंदूंची उचल.

जैन व बौद्धांच्या धार्मिक आघातांमुळें भारतीय पारमार्थिक कल्पनांत फरक कसकसा होत गेला त्याचा शंकराचार्यांच्या काळापर्यंतचा इतिहास मागील अनेक प्रकरणांत त्रुटित स्वरूपांत आला आहे. शकहूणांच्या आघातामुळें हिंदुस्थानच्या इतिहासांत कोणकोणत्या राजकीय घडामोडी झाल्या त्याचा इतिहास बाराव्या व पंधराव्या—'अशोक ते अराजक' व 'अराजकापासून महंमदी स्वाऱ्यांपर्यंत हिंदुस्थान'—प्रकरणांत दिला आहे. या दोन्ही प्रकारच्या हल्ल्यांपासून बचावून नवव्या शतकांतला हिंदुस्थान हिंदुधर्मानुयायी व राजकीय दृष्ट्या पूर्ण स्वतंत्र झाला होता. पण नंतर लवकरच म्हणजे इ. स. १००१ पासून मुसुलमानांनीं राजकीय व धार्मिक हल्ले हिंदुस्थानावर चढविण्यास सुरवात केली. मुसुलमानांच्या इस्लामी धर्माच्या लाटेखालीं अरबस्तानापासून चीनापर्यंत बहुतेक पौरस्त्य देश सांपडले. इराणासारखा प्रौढप्रतापी प्राचीन देशहि हतबल होऊन तेथील अग्न्युपासक रहिवाश्यांनीं हिंदुस्थानचा आश्रय केला. मुसुलमानांनीं आपली राजकीय सत्ता तर पश्चिमेकडे स्पेन मोरोक्कोपासून पूर्वेस चीनपर्यंत बसविली. अशी ही जबरदस्त लाट हिंदुस्थानवरहि आली. इस्लामी धर्माच्या जबरदस्तांच्या सांनिध्यामुळें हिंदूंच्या पारधार्मिक विचारांत तसेंच राजकीय परिस्थितींत काय काय घडामोडी झाल्या त्यांचा विचार या प्रकरणांत करावयाचा आहे.

**मुसुलमानी आघात व हिंदूंची पूर्वप्रयाणें.—** मुसुलमानींनी स्वाऱ्यांचे जे परिणाम झाले, त्या परिणामांच्या निवेदनामध्यें एक गोष्ट लक्ष्यांतून सुटते, ती गोष्ट म्हटली म्हणजे हिंदूंची जसजशी वायव्येकडून पिछेहाट होत गेली तसतसा त्यांचा कांहीं अंशानें रहद्दीवर आणि कांहीं हिंदुस्थानाबाहेर प्रसार होत गेला. नेपाळशीं संबंध जरी लिच्छवींच्या पासून होता तरी तेथें ब्राह्मणानुयायी हिंदूंचें निश्चित राज्य स्थापन झालें नव्हतें. नेपाळ येथ हिंदु राज्य स्थापन झालें व तें आपला शह तिबेटवर देऊं लागलें; तो इतका कीं, तिबेटला रशिया गिळंकृत करील कीं नेपाळ गिळंकृत करील या प्रकारचा संशय वीस वर्षांपूर्वीपर्यंत होता असें कावागुचीच्या तिबेटांतील प्रवासाच्या ग्रंथावरून दिसतें. अजून देखील सरहद्दीवर बौद्ध संप्रदायाचा संकोच होऊन हिंदुत्ववर्धनाची क्रिया चालू आहेच. १४ व्या शतकापर्यंत हिंदूंचा प्रसार पूर्वेकडील द्वीपाकडे एकसारखा होत होता; आणि ज्या ठिकाणीं मुसुलमानी संप्रदाय अगोदर शिरला, अशा ठिकाणीं सुद्धां हिंदूंनीं पुढें राज्य स्थापन केलें, अशा प्रकारची परिस्थिति दिसून येत होती. चीनच्या दक्षिण भागावर देखील एक हिंदु राज्य स्थापन झालें होतें, अशा अर्थाचा एक लेख मॉडर्न रिव्ह्यूमध्यें कांहीं वर्षांपूर्वी येऊन गेला. तो लेख ज्या चिनी ग्रंथाच्या आधारें लिहिला आहे, त्या ग्रंथाच्या दिलेल्या उताऱ्यावरून तें राज्य खास हिंदूचें होतें हें अजून पटत नाहीं. पश्चिमेकडून आघात झाला असतां हिंदू पूर्वेकडे वळले ही क्रिया झाली असणें स्वाभाविक आहे. परंतु त्याची सविस्तर माहिती अजून मांडली गेली नाहीं. ज्ञानकोशाच्या पहिल्या भागांत ब्रह्मदेशापासून फिलिपाईन्सपर्यंत जो हिंदुत्वविकास दिला आहे, त्यांतील कांहीं विकास या मुसुलमानांच्या आघातांच्या काळीं झाला असावा अशी कल्पना होते.

**हिंदुसंस्कृतीची पांठेराखी राज्यें.—** मुसुलमानांसारख्या धर्मवेड्या लोकांनीं हिंदुस्थानांत स्थूलमानानें इ.स.१००० पासून १८०० पर्यंत निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या प्रमाणांत अंमल गाजविला, तरी त्यांना एकंदर लोकसंख्येच्या पंचमांशाहून फारसे अधिक लोक आपल्या संस्कृतींत आणतां आले नाहींत याचें हिंदू लोकांची पुराणप्रियता हें तर एक कारण आहेच, पण ऐतिहासिक दृष्ट्या त्याहूनहि महत्त्वाचें कारण म्हटलें म्हणजे हिंदुस्थानांत मुसुलमानांस संस्कृतिप्रसाराच्या कामीं अवलपासून अखेरपर्यंत विरोध होत राहिला हें होय. हे विरोधाचें कार्य नर्मदेच्या उत्तरेस

रजपुतांनीं व कांहीं अंशा शीखांनीं व दक्षिणेस प्रथम विजयानगरच्या राजांनीं व नंतर मराठ्यांनीं अव्याहतपणें व एकनिष्ठेनें चालू ठेविलें होतें. तेव्हां पश्चिमेकडून आलेल्या इस्लामी संस्कृतीच्या लाटेविरुद्ध हिंदूंनीं जी उचल केली तिचें खरें स्वरूप ध्यानांत येण्याकरितां आपणांस रजपूत, विजयानगरचे राजे, मराठे व शीख यांच्या इतिहासांचें पृथक्शः पर्यालोचन केलें पाहिजे.

### रजपुतांचा विरोध

इस्लामी विध्वंसक संस्कृतीस रजपुतांकडून जो विरोध झाला त्यांत अव्वलपासून अखेरपर्यंत मुख्यत्वेंकरून मेवाडच्या गेहलोट उर्फ घेलोट घराण्यानेंच प्रामुख्यानें पुढाकार घेतला होता. तेव्हां रजपुतांच्या विरोधाचा इतिहास देण्याकरितां मेवाडच्या घेलोट घराण्यांतील पुरुषांचे मुसुलमानांशीं केव्हां व कसकसे सामने झाले व त्यांचा परिणाम काय झाला हें सांगितलें असतां पुरें होईल. सिंध प्रांतांतील महंमद कासीमाची स्वारी घेलोट वंशांतील जो शूर पुरुष चितोड हस्तगत करून तेथील (घेलोट) घराण्याचा मूळ पुरुष बनला त्या बाप्पारावळाच्या कारकीर्दीतच झाली होती. इसवी सनाच्या बाराव्या शतकाच्या उत्तरार्धापासून बाप्पाच्या वंशजांचे इस्लामी संस्कृतीच्या अफगाणांशीं सामने सुरू झाले. मध्यंतरीं दहाव्या शतकाच्या अखेरीस रजपुतांचे सबक्तगीनाशीं व अकराव्या शतकाच्या आरंभास गझनीच्या महंमुदाशीं सामने झाले, पण त्यांत हिंदूंस यश प्राप्त झालें नाहीं. पुढें बाप्पाचा समरसिंह नामक एक शूर वंशज इ. स. ११५० त चितोडच्या गादीवर आला तोहि इ. स. ११९३ त स्थानेश्वरच्या घोर संग्रामांत महंमद घोरीविरुद्ध पृथ्वीराजास मदत करण्यास गेला तेव्हां धारातीर्थी पतन पावला. पण त्याच्या मृत्यूनंतर त्याची बायको करुणदेवी हिनें अंबरनजीक घोरीच्या एका सरदाराचा पराजय करून आपल्या राज्यास बळकटी आणली.समरपुत्र कर्ण याच्यानंतर समरसिंहाच्या भावाचा नातु रहूप यानेंहि मुसुलमानांचा पराजय करून शहाणपणानें राज्य केलें. पुढें लक्ष्मणसिंहाच्या कारकीर्दीत अलाउद्दिन खिलजी यानें१३०३ त चितोडवर स्वारी करून तें राज्य काबीज केलें. त्या प्रसंगीं राणा लक्ष्मणसिंह व त्याचे अकरा मुलगे लढून मेले. यानंतर ह्या घराण्यांत हमीर नांवाचा एक विलक्षण पराक्रमी पुरुष निपजला. त्यानें युक्तीनें चितोडचें राज्य परत घेतलें व अलाउद्दिनाच्या मुलाचा पराभव करून त्याच्या मुलास कैद करून आणलें. हमिरानें मेवाडचें राज्य ऊर्जित दशेस आणलें व सर्व रजपुतांची एकी करून मुसुलमानांचा मोड केला. हमिराच्या मागून तीन पिढ्यांनीं भीमसिंह नांवाचा पुरुष मेवाडच्या गादीवर आला. त्यानें आसपासच्या मुसुलमान राजांचा पाडाव करून माळव्याच्या सुलतानास युद्धांत पकडून आणलें. इ. स. १४७४ त भीमसिंहाचा पुत्र रायमल गादीवर बसला. तोहि चांगला पराक्रमी होता. त्यानें दिल्ली व माळवा येथील सुलतानांचा पराभव केला व त्याचा पुत्र पृथ्वीसिंह यानें गुजराथचा सुलतान मुजफरशहा यास कैद करून आणलें.

**मोंगलांशी सामने**.—रायमल्लाचा पुत्र संग्रामसिंह उर्फ संग याच्या कारकीर्दीत मेवाडच्या भाग्योदयाचा कळस झाला. त्यानें सर्व रजपुतांपासून करभार घेऊन व माळवा व दिल्ली येथील मुसुलमानी फौजांचा अठरा वेळां पराभव करून सार्वभौमाप्रमाणें अनेक वर्षे वैभव भोगिलें, परंतु शेवटीं फत्तेपूर शिक्रीच्या लढाईत त्याचा पराजय होऊन रजपुतांचें वर्चस्व मोंगलवंशीय बाबर राजाच्या ताब्यांत गेलें. तथापि संगराण्याच्या पश्चात् त्याचा तरुण पुत्र रत्नसिंह यानें मुसुलमानांचा निःपात करीपर्यंत विश्रांति घ्यावयाची नाहीं असा निश्चय केल्यामुळें बाबरास शिक्रीच्या जयाचा फायदा घेतां आला नाहीं.

रत्नसिंहाचा भाऊ विक्रमाजित याच्या कारकीर्दीत गुजराथच्या बहादुरशहानें पोर्तुगीज अधिकाऱ्यांकडून तयार करविलेलें आपलें कवायती सैन्य घेऊन चितोडवर स्वारी केली व सुरुंग लावून किल्ल्याचा तट तेव्हांच उडवून दिला. विक्रमाजिताच्या मदतीस कित्येक रजपूत राजे आले होते. त्यांचें कांहीं चालेना, तेव्हां त्यांनीं आपल्या स्त्रियांस दारूच्या भडक्यांत उडवून देऊन शस्त्रास्त्रांसहित शत्रूवर चाल केली, व धारातीर्थी आपले जीव बळी दिले (१५३६). तथापि बहादुरशहाच्या हातीं चितोड फार दिवस राहिलें नाहीं. बाबराप्रमाणेंच त्याचा पुत्र हुमायून याच्या मनांत चितोडच्या राण्यांविषयीं आदर वसत असल्यामुळें त्यानें बहादुरशहापासून चितोड घेऊन राण्याच्या वंशजाच्या स्वाधीन केलें. हुमायूनानंतर त्याचा पुत्र अकबर यानें रजपुतांस आपलें सार्वभौमत्व कबूल करावयास लाविलें व जयपूरचा राजा बहारमल्ल यानें तर त्याचा स्नेह संपादण्याकरितां त्यास आपली मुलगीहि दिली. इ.स. १५६७त अकबरानें चितोडवर स्वारी केली. या प्रसंगीं चितोडचा उदयसिंह हा मुसुलमानांशीं तोंड न देतां पळून गेला; पण इतर सरदार नेटानें लढले व अखेर जय प्राप्त होत नाहीं असें दिसलें तेव्हां जोहार करून त्यांनीं रणांगणीं जीव दिले. या उदयसिंहानें आपल्या अज्ञातवासांत रानामध्यें जें एक खेडें वसविलें, तेथेंच पुढें मेवाडची राजधानी होऊन तें उदेपूर या नांवानें प्रसिद्धीस आलें.

चितोड शत्रूच्या हातीं गेलें तरी उदयसिंहाचा पुत्र प्रतापसिंह (राज्यारोहण१५७२) यानें अनेक यातना सोसून रजपुतांचें धैर्य व उमेद खचूं दिली नाहीं. याचा बराच काळ अकबराशीं लढण्यांत खर्च झाला. संकटकाळीं प्रताप राण्याला पुष्कळ साहाय्यकर्ते मिळाले व त्यानें हळू हळू मुलूख कमावून राज्यांत स्वस्थता केली. त्यानें ज्या रजपूत राजांनीं मुसुलमानांस आपल्या मुली देऊन त्यांचा स्नेह संपादिला होता व ज्या रजपूत ठाकरांनीं मुसुलमानी धर्म स्वीकारिला होता त्यांचा निषेध करून त्यांच्याशीं निष्कलंक राहिलेल्या

## विजयानगरासभोंवतालचें सृष्टिसौंदर्य.



दगडांची नैसर्गिक झालेली कमान. विजयानगर



तुंगभद्रा नदींतील प्रचंड शिलाखंडें. हंपी



तुंगभद्रेचा रमणीय देखावा. हंपी.

## विजयानगराच्या आमदानींतील शिल्पकामाचे नमुने.



श्री विरूपाक्षाचें देवालय, हंपी.



कडलीस्पण गणपतीचें देऊळ, विजयानगर.



विजयविठ्ठल स्वामीच्या देवळांतील दगडी रथ, विजयानगर.

Manoranjan Press, Bombay.

रजपुतांनीं सोयरीक करूं नये असा ठराव केला. तथापि प्रतापसिंहास अखेरपर्यंत चितोड हस्तगत करतां आलें नाहीं. व त्यामुळें यापुढें उदेपूर हीच मेवाडची राजधानी झाली. प्रतापसिंहाचा पुत्र अमरसिंह यानें तर कित्येक वेळां मोंगलांच्या फौजेचा प्रत्यक्ष पराभव केला होता. पण तिच्याशीं झगडण्यांत आपला निभाव लागणार नाहीं असें पाहून अखेर तो जहांगिरास शरण गेला, व जहांगिरानेंहि इतके दिवस झालेली खराबी लक्षांत घेऊन अमरसिंहास सन्मानानें वागविलें.

जहांगिरच्या मुलांत तंटे लागले तेव्हां उदेपुरच्या राण्यानें शहाजहानास मदत करून त्यास आपल्या राजधानींत आश्रय दिला. त्या उपकाराबद्दल शहाजहानानें अधिकारारूढ झाल्यावर राण्यास फार सन्मानानें वागविलें. पुढें औरंगजेबानें रजपुतांबरोबर युद्ध सुरू केलें तेव्हां मेवाडचा राणा राजसिंह हा रजपुतांचा पुढारी बनला, व त्या हट्टी बादशहाचा या बाणेदार राजानें चांगलाच समाचार घेतला. त्यानें रूपनगरच्या ठाकुराची कन्या औरंगजेबाच्या तडाख्यांतून सोडवून तिला स्वतः वरिलें. औरंगजेबानें सर्व लष्करानिशीं मेवाडवर स्वारी केली तेव्हां तीन चार प्रचंड लढाया होऊन त्यांत औरंगजेबाचा पराजय झाला; आणि अत्यंत मानहानि व निरुपाय होऊन त्यास कसावसा तह करून राजपुतान्यांतून पाय काढावा लागला (इ.स. १६८१).

राजसिंहानंतर त्याच्या तोडीचा पुढारी रजपुतांस मिळाला नाहीं व इ.स.१७०७त औरंगजेब मरण पावल्यावर दिल्लीच्या तख्तावर बसलेले मोंगल बादशहाहि दुर्बलच निघाले.

### दक्षिणेंतील हिंदूंची उचल–

### १ विजयनगरचा इतिहास

**उत्तरेकडील व दक्षिणेकडील लढ्यांतील फरक.**–नर्मदेच्या उत्तरेस मुसुलमानांशीं टक्कर देण्याचें काम जसें रजपुतांनीं केलें, तसें दक्षिणेस तें प्रथम विजयानगरच्या राजांनीं केलें. उत्तरेकडील मुसुलमानांस अफगाणिस्तानांतून व मध्यआशियांतून इस्लामी पंथाच्या कडव्या लोकांचा अव्याहत पुरवठा होत गेल्यामुळें त्यांना त्या भागांत आपल्या संस्कृतीचा प्रसार करण्यांत बरेंच यश आलें. परंतु दक्षिणेंतील मुसुलमानांची स्थिति तशी नव्हती. दक्षिणेंत मुसुलमानी संस्कृतीचा प्रसार करण्याचें काम प्रथम ज्या बहामनी सुलतानांकडे आलें होतें ते किंवा त्या राज्याचीं शकलें होऊन निर्माण झालेले विजापुरादि मुसुलमानी राज्यांचे सुलतान हे सर्व दिल्लीच्या बादशहांशीं बंडखोर असल्यामुळें त्यांना उत्तरेकडून मदत मिळण्याची मुळींच अपेक्षा नव्हती. त्यांनीं जें संस्कृतिप्रसाराचें कार्य केलें तें बहुतेक हिंदूंमधील बाटविलेल्या लोकांच्या जोरावरच होय. परंतु हे बाटलेले मुसुलमान कांहीं अंशीं अस्सल मुसुलमानांपेक्षांहिहिंदू लोकांस जास्त जाचक झाले यांत संशय नाहीं. एकदां परधर्मांत गेल्यावर पूर्व धर्माचा पाडाव करण्यास लोकांस विशेष स्फुरण येत असतें. शिवाय या बाटलेल्या लोकांस हिंदूंची व्यंगें व राहणी ठाऊक असल्यामुळें त्या माहितीचा उपयोगहि त्यांनीं मुसुलमानांस करून दिला.

**विजयनगरच्या राज्याचा उदय.**—अलाउद्दीन खिलजीच्या कारकीर्दींत मुसुलमानांनीं दक्षिणेंत प्रथम स्वाऱ्या केल्या हें मागें सांगितलेंच आहे. इ. स. १३२३ त मुसुलमानांनीं वरंगळ घेतलें; व १३२७ त म्हैसूरची राजधानी द्वारसमुद्र लुटून फस्त केली. तेव्हां वरंगूळच्या राजाच्या पदरीं असलेल्या संगम नामक पुरुषाच्या हरिहर, बुक्क आदिकरून पांच पुत्रांनीं दक्षिणेंत एक मोठें हिंदु राज्य स्थापून मुसुलमानांस तोंड देण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें त्यांनीं इ. स. १३३६ त तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावर विजयनगर नांवाच्या एका मोठ्या तटबंदी शहराची स्थापना करून सुमारें पंधरा वर्षांच्या अवधींतच पूर्व किनाऱ्यापासून पश्चिम किनाऱ्यापावेतोंचा तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील बहुतेक मुलूख आपल्या अंमलाखालीं आणिला.

संगम घराणें.—उपर्युक्त संगमाच्या वंशजांनीं इ. स. १३३६ पासून १४५६ पर्यंत दक्षिणेंत राज्य केलें. या राजांचा बहुतेक काळ इ. स. १३४७ त तुंगभद्रेच्या उत्तरेस स्थापन झालेल्या बहामनी राज्याच्या सुलतानांशीं युद्धें करण्यांत खर्च झाला. यांपैकीं दुसऱ्या देवरायाच्या कारकीर्दींत (१४२४—१४४७) संगम घराणें वैभवाच्या शिखरास पोंचलें होतें. याच राजाच्या कारकीर्दीच्या आरंभीं निकोलो कॉंटि हा इटालियन प्रवासी व अखेरीस (इ. स. १४४३) अबदुर रज्जाक हा मुसुलमान प्रवासी विजयानगरच्या राज्यांत येऊन गेला. दुसऱ्या देवरायानंतरचे संगम घराण्यांतील सर्व राजे कमकुवत होते. या देवरायाचा पुत्र मल्लिकार्जुन याचा नरसिंह नामक कोणी एक कारभारी होता. तोच पुढें सत्ताधीश होऊन त्यानें १४५६ त संगमाच्या वंशजांस पदच्युत केलें. संगम घराण्याच्या संस्थापकबंधूंपैकीं बुक्क यानें इ. स. १३७४ च्या सुमारास चीनच्या मिंग घराण्यांतील तैत्सु बादशहाकडे आपले वकील रवाना केले होते.

सालुव घराणें.—हें घराणें फार दिवस गादीवर राहिलें नाहीं. तथापि या घराण्याचा संस्थापक नरसिंह सालुव हा मोठा शूर पुरुष होता. त्यानें दक्षिणेकडील तामिळ मुलखांत आपल्या राज्याचा विस्तार करून जिकडे तिकडे आपल्या नांवाचा दरारा बसविला. याच्या कारकीर्दींत बहामनी राज्याचीं शकलें होऊन इ. स. १४९० च्या सुमारास विजापुरचा सुलतान स्वतंत्र झाला व त्यानें पुढाकार घेऊन बहामनी राज्याचा विजयनगरशीं चाललेला झगडा पुढें चालू ठेविला. नरसिंहाच्या मागून त्याचा वडील मुलगा गादीवर बसला. पण लवकरच त्याचा खून होऊन त्याचा धाकटा भाऊ इरमदि नृसिंह उर्फ धर्मराय हा राजा झाला. याच्या कारकीर्दींत सर्व सत्ता त्याचा सेनापति नरस नायक याच्या

हातांत असून तोच पुढें १५०५ त आपल्या धन्याचा वध करून सिंहासनारूढ झाला असें दिसतें.

तुलुव घराणें.—नरस नायक हा तुलुव घराण्याचा संस्थापक होता. याचा पुत्र कृष्णदेवराय हा मोठा वैभवशाली व कीर्तिमान राजा होऊन गेला. यानें इ. स. १५०९ पासून १५२९ पर्यंत अवघीं वीस वर्षेच राज्य केलें. पण तेवढ्याअवधींत त्यानें विजापूरच्या इस्माईल आदील शहाचा पराभव करून त्याजपासून ज्याच्या करितां हिंदुमुसुलमानांत आजपर्यंत अनेक लढाया झाल्या होत्या तो रायपूरचा किल्ला घेतला, आदिल शहाची राजधानी विजापूरहि काबीज करून तेथें कांहीं दिवस आपला तळ दिला. हा जसा शूर तसा उदार मनाचाहि होता. पाएजसारख्या परद्वीपस्थ इसमानें देखील त्याच्या स्वभावाची अगदीं मन मोकळेपणानें स्तुति केलेली आढळते. त्याच्या दरबारचें वैभव पाहून यूरोपीय लोकांचे तर डोळेच दिपून जात. कृष्णदेवरायाच्या मागून त्याचा चुलत भाऊ अच्युतराय राज्यारूढ झाला. अच्युतराय हा दुर्बल व जुलुमी राजा निघाला. हा कृष्णदेवरायाच्या कारकीर्दींत जिंकून घेतलेले रायचूर व मुदगल हे दोन्हीं किल्ले गमावून बसला; व इब्राहिम आदिलशहानें विजयानगरवर स्वारी केली तेव्हां यानें त्यास जबर खंडणी देऊन वाटेस लावलें. अच्युतराय १५४२ त मरण पावला. व त्याच्या जागीं त्याचा पुतण्या सदाशिवराय १५४२ गादीवर बसला. याच्या कारकीर्दींत सर्व सत्ता त्याचा कारभारी रामराय सालुव याच्या हातीं होती. हा रामराय मोठा शूर पुरुष होता. कृष्णदेवरायाप्रमाणें यानेंहि मुसुलमानासंबंधांत चढाईचें धोरण स्वीकारून तुंगभद्रा ओलांडून पलीकडील मुसुलमानी राज्यांत स्वाऱ्या केल्या व तेथील सुलतानांस 'त्राहि भगवान्' म्हणण्याची पाळी आणली. इ. स. १५४३त रामरायानें अहमदनगर व गोवळकोंडे येथील राजांशीं सख्य करून विजापुरावर स्वारी केली व पुढें पंधरा वर्षांनीं विजापूरच्या राजांशीं सख्य करून अहमदनगरवर स्वारी केली. या दुसऱ्या स्वारींत हिंदूंनीं अहमदनगरचा मुलूख अतिशय निर्दयतेनें उध्वस्त केला व आपल्या मुसुलमान दोस्तांचाहि उघड उघड पाणउतारा केला. यामुळें मुसुलमान लोक चिडून गेले. विजापूर, अहमदनगर, गोवळकोंडें व बेदर येथील सुलतानांनीं आपसांतील भांडणें घटकाभर एकीकडे ठेविलीं, व एकजुटीनें विजयानगरवर स्वारी करून इ. स. १५६५ त तालिकोटच्या लढाईंत हिंदूंचा पूर्ण पराभव केला. लढाईंत विजय पावल्यावर मुसुलमानांनीं विजयानगर शहरांत शिरून इतकी कत्तल, लुटालूट व जाळपोळ केली कीं विजयानगरच्या राज्यास पुन्हां कधीं डोकें वर काढतां आलें नाहीं.

आरवीडु घराणें.—तालिकोटच्या लढाईनंतर रामरायाचा भाऊ तिरुमल हा सदाशिवराय या नामधारी राजास घेऊन पेनुगोंड्यास पळून गेला व इ. स. १५७० च्या सुमारास आपणच स्वतः राजा बनला. तिरुमल आरवीडु नामक विजयनगरच्या चौथ्या राजघराण्याचा मूळ पुरुष होता. त्याच्या वंशांत पहिला वेंकट हा कांहीं नांव घेण्यासारखा पुरुष झाला. त्यानें आपली राजधानी चंद्रगिरीस नेलेली दिसते. तो तेलुगू कवींचा व वैष्णव ग्रंथकारांचा आश्रयदाता म्हणून प्रसिद्ध आहे. त्याच्या मागून झालेले राजे केवळ स्थानिक संस्थानिक होते. त्यांपैकीं दुसरा रंग यानें इ. स. १६४५ त, सहा वर्षांपूर्वी आपल्या हाताखालील एका नायकानें इंग्रजांस दिलेली मद्रासच्या जागेची जहागीर कायम केली. दुसरा रंग हाच या घराण्यांतील शेवटचा स्वतंत्र राजा होय. तालिकोटच्या लढाईनंतर विजयानगरच्या साम्राज्याचे लहान लहान तुकडे होऊन त्यांवर पूर्वीचे विजयानगरच्या हाताखालील सरदार उर्फ नाईक स्वतंत्रपणें राज्य करूं लागले होते. पुढें विजापूरच्या व गोवळकोंड्याच्या राजांनीं दक्षिणेंत स्वाऱ्या करून बहुतेक दक्षिण काबीज केली, तेव्हां हे नाईक मुसुलमानांचे अंकित होऊन त्यांनां खंडणी देऊं लागले. शहाजीनें आपली तंजावरची जहागीर याच नायकांनां जिंकून मिळविली होती, व शिवाजीनें आपल्या राज्यारोहणानंतर दक्षिणदिग्विजय केला तेव्हां त्यालाहि याच नायकांशीं लढावें लागलें होतें.

विजयानगरच्या साम्राज्याची कामगिरी.—विजयानगर व मुसुलमानी राज्यें यांच्या झगड्यांत अनेक वेळां हिंदू लोकांस पराभूत व्हावें लागलें, हें जरी खरें आहे. तरी मुसुलमानांची लाट तुंगभद्रेपलीकडे थोपवून धरून विजयानगरच्या साम्राज्यानें हिंदु संस्कृतीच्या संरक्षणाची फार मोठी कामगिरी बजाविली आहे. विजयानगरचें राज्य उदयास आलें नसतें तर मुसुलमानांस तुंगभद्रेपलीकडे पसरण्यास फारसा काळ लागला नसता. विजयानगरच्या या कामगिरीची थोडीशी कल्पना येण्यास तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील मुसुलमानी लोकसंख्येची तिच्या उत्तरेकडील मुसुलमानी प्रदेशांतल्या लोकसंख्येशीं तुलना केली तरी पुरें होईल. ज्या ठिकाणीं पूर्वी विजयानगरचें साम्राज्य होतें. त्यापैकीं बराचसा भाग हल्लीं म्हैसूर संस्थानांत मोडतो. येथें एकंदर लोकसंख्येशीं मुसुलमानांचें प्रमाण अवघें शेंकडा पांचच आहे, तर उलटपक्षीं तुंगभद्रेच्या उत्तरेकडे असलेल्या मुंबई इलाख्यांत तें प्रमाण शेंकडा विसाहून कमी नाहीं. अठराव्या शतकांत म्हैसूर संस्थानाचा मुलूख हैदराच्या ताब्यांत गेला नसता तर त्या भागांत मुसलमानांचें प्रमाण शेंकडा एक तरी सांपडलें असतें कीं नाहीं याची वानवाच आहे. म्हैसूरच्या दक्षिणेस असलेल्या त्रावणकोर, कोचीन वगैरे इतर संस्थानांत किंवा ज्यांचा बराचसा भाग तुंगभद्रेच्या दक्षिणेस आहे त्या मद्रास इलाख्यांतहि मुसलमानांची स्थिति विशेष चांगली नाहीं. सबंध हिंदुस्थानांत मुसलमानांची लोकसंख्या एकंदर लोकसंख्येच्या पंचमांशाहून अधिक असतां या भागांत ती चौदांशाहूनहि कमीच भरेल.

### मराठ्यांचा इतिहास.

तुंगभद्रेच्या दक्षिणेस मुसुलमानी सत्तेस विरोध करण्याचें काम विजापूरच्या राजांनीं खालीं ठेविलें, तें त्यांच्या नंतर तुंगभद्रेच्या उत्तरेस मराठ्यांनीं आपल्या हातीं घेतलें. मराठ्यांच्या या सत्तावर्धनाचा इतिहास आपणांस अधिक महत्त्वाचा असल्यामुळें, तो येथें थोडा विस्तरशःच देत आहों.

मराठ्यांच्या राज्याच्या स्थापनेचा आणि त्यापुढील चळवळींचा साकल्यानें इतिहास द्यावयाचा झाल्यास एक प्रश्न उत्पन्न होतो. तो हा कीं, मराठे हें सामुच्चयिक नांव केव्हां उत्पन्न झालें. रामदेवराव जाधवाच्या कारकीर्दीत " मराठी" हें नांव भाषेस प्राप्त झालें होतें हें ज्ञानेश्वरींतील " माझा मराठाच बोल कौतुकें। परि तो संस्कृता पैं जिंके। ऐशीं अक्षरें रसिकें। मेळवीन॥ " या ओवीवरून स्पष्ट होईल. तथापि विशिष्ट लोकसमुच्चयास त्या वेळेस मराठा हें नांव उपलब्ध झालें होतें असें दिसत नाहीं. " मराठे " हें सामुच्चयिक नांव मुसुलमानांनीं त्यांस दिलें असावें, किंवा मुसुलमानी कारकीर्दीत प्राप्त झालें असावें.

मराठ्यांच्या इतिहासास सुरुवात त्यांच्याकडून राज्यस्थापना झाल्यानंतरच झाली असें म्हटलें पाहिजे. तथापि राज्यस्थापनेची क्रिया समजण्यासाठीं कांहीं पूर्वकालीन चळवळींचें ज्ञान अवश्य आहे.

**मुसुलमानांचा महाराष्ट्रांत प्रवेश.**—१४ व्या शतकाच्या पूर्वार्धांत उत्तरेकडील मुसुलमानांनीं दक्षिणेंत येऊन तेथें आपली सत्ता प्रस्थापित करीपर्यंत या भागांत हिंदु राजेच राज्य करीत होते. इ. स. १२९४ त अलाउद्दीन खिलजी यानें दक्षिणेंत प्रथम स्वारी केली परंतु देवगिरीचा यादव राजा रामदेव याजकडून वार्षिक खंडणी देण्याचें अभिवचन घेऊन तो पुन्हां लागलीच उत्तरेस परत गेला. पुढें अलाउद्दिनाच्या कारकीर्दीत देवगिरीच्या यादवांनीं दिल्लीच्या बादशहास खंडणी पाठविणें बंद केल्यामुळें मलीक काफुर याच्या आधिपत्याखालीं उत्तरेकडील मुसुलमानांनीं दक्षिणेंत एकंदर तीन स्वाऱ्या केल्या (१३०७–१२ ). यापैकीं शेवटच्या स्वारींत रामदेवाच्या मागून गादीवर बसलेला त्याचा पुत्र शंकर हा ठार होऊन त्याची राजधानी देवगड मुसुलमानांच्या ताब्यांत गेली. पुढें अलाउद्दिनाच्या मरणानंतर दिल्ली येथें जो गोंधळ माजला त्याचा फायदा घेऊन रामदेवाचा जांवई हरपाळ यानें स्वातंत्र्याचें निशाण उभारून कित्येक मुसुलमान सुभेदारांना हांकून लावलें. परंतु इ. स. १३१८ त दिल्लीचा बादशहा मुबारिक यानें दक्षिणेंत स्वारी करून हरपाळ यास कैद केलें व त्याचा मोठ्या क्रूरपणानें अंग सोलून वध केला.

**बहामनी राज्याची स्थापना.**— यानंतर ग्यासउद्दीन तघलकाच्या कारकीर्दीत त्याचा पुत्र जोना हा दक्षिणेंतील दंगा मोडण्यासाठीं सैन्य घेऊन इकडे आला होता. परंतु या स्वारींत त्याचा पराभव होऊन त्यास परत जावें लागलें. इ. स. १३२३ त जोना ऊर्फ उलुघखान पुनरपि दक्षिणेंत आला. या वेळेस त्यानें सर्व तैलंगण देश पादाक्रांत करून त्याची राजधानी वरंगूळ ही हस्तगत केली. तैलंगण देश मुसुलमानांच्या हातीं लागला तेव्हां तेथील बरेचसे प्रमुख रहिवाशी देशत्याग करून खालीं दक्षिणेंत गेले. (ग्रँट डफकृत मराठ्यांचा इतिहास, पु. १, पृ. ३६). तथापि अशीं कित्येक चांगलीं घराणीं होतीं कीं, तीं देशत्याग व स्वातंत्र्यनाश यांमध्यें स्वातंत्र्यनाश पतकरून आपल्या जन्मभूमीस चिकटून राहिलीं. इ. स. १३४४ त गुजराथेंतून पळून आलेल्या कांहीं अफगाण सरदारांनीं महंमद तघलकाविरुद्ध बंड केलें, तेव्हां त्या हिंदू सरदारांनीं त्यांना मनोभावें मदत केली. त्या बंडांतूनच पुढें १३४७ त बहामनी राज्य उदयास आलें. हें राज्य म्हणजे बोलून चालून दिल्लीच्या सुलतानाविरुद्ध एक उघड उघड बंडच असल्यामुळें त्याच्या संस्थापकास साहजिकच एतद्देशीय सरदारांचीं अंतःकरणें गोडीगुलाबीनेंच आकर्षून त्यांचा पाठिंबा मिळविणें अवश्य होतें. हाच क्रम त्याच्या वंशजांस व पंधराव्या शतकाच्या अखेरीस बहामनी राज्याचीं शकलें होऊन त्यांतून (१) विजापुरची आदिलशाही, (२) गोवळकोंड्याची कुतबशाही, (३) वऱ्हाडची इमादशाही, (४) अहमदनगरची निजामशाही व (५) बेदरची बरीदशाही हीं पांच लहान लहान राज्यें निर्माण झालीं तेव्हां तेथील सुलतानांसहि पुढें चालवावा लागला. उत्तर हिंदुस्थानांतील मुसुलमानांना हिंदुस्थानाबाहेर मुसुलमानी मुलखांतून कर्तृत्ववान् माणसांचा व लढाऊ शिपायांचा अव्याहत पुरवठा होत असल्यामुळें ते हिंदुस्थानांतील लोकांशीं फटकून राहूं शकत होते. परंतु दक्षिणेंतील मुसलमानांना तसें करतां येत नव्हतें. बहामनी राज्याचा संस्थापक झफिरखान उर्फ अलाउद्दीन हुसेन कांगो बहामनी यानें राज्यारूढ होतांच प्रथम वरंगूळच्या राजाचा स्नेह संपादन केला. त्यानें हिंदू सरदारांपैकीं कोणास वंशपरंपरा जमिनी किंवा दुसरे कांहीं हक्क देऊन संतुष्ट केलें, तर इतरांस त्यांचीं देशमुखीचीं किंवा देशपांडेपणाचीं जुनीं वतनें त्यांच्याकडेच ठेऊन आपल्या पक्षास वळवून घेतलें. पोळ, घाटगे वगैरे मराठे सरदारांस दोन तीनशें स्वारांच्या लहान लहान मनसबी आपल्या सैन्यांत देऊन त्यांच्या पथकांच्या खर्चासाठीं नवीन जहागिरी लावून देण्यासहि त्यानें मागें पुढें पाहिलें नाहीं.

**बहामनी राज्याचीं शकलें व हिंदूंचें वर्चस्व.**—बहामनी राज्यापासून पुढें जीं पांच मुसुलमानी राज्यें निर्माण झालीं त्यांत तर हिंदू सरदारांचें वर्चस्व पूर्वींहूनहि वाढत्या प्रमाणांत होतें. अहमदनगरच्या निजामशाही घराण्याचा संस्थापक मलीक अहंमद हा वस्तुतः एका ब्राह्मण कुळकर्ण्याचाच मुलगा असून लहानपणींच त्यास सुलतान अहमदशहा वली यानें बाटवून मुसुलमानी धर्माची दीक्षा

दिली होती. त्याचा पुत्र बुऱ्हाण निजामशहा यानें १५२९ च्या सुमारास आपल्या राज्यांतील पेशवाईची जागा एका ब्राह्मणाच्या हवालीं करून आपण होऊनच आपल्या राज्यांत हिंदूंचें वर्चस्व वाढवून घेतलें. १५५५ सालीं विजापूरचा इब्राहिम आदिलशहा तख्तनशीन झाला तेव्हां त्यानें देखील महाराष्ट्रांतील लोकांबद्दलच आपला पक्षपात व्यक्त केला. त्यानें फारशीमध्यें जमाखर्च ठेवण्याची जुनी वहिवाट बंद करून सर्व हिशेब मराठींत ठेवण्याचा शिरस्ता पाडला. कांहीं महत्त्वाचे कागदपत्र असत तेवढे मात्र दोन्ही भाषांतून लिहून ठेवण्याचा प्रघात असे. याच्या योगानें विजापुरच्या राज्यांत महाराष्ट्रीय ब्राह्मणांचें वर्चस्व साहजिकच पूर्वीपेक्षां अधिक झालें. इब्राहिम आदिलशहा एवढेंच करून थांबला नाहीं. त्यानें परकी शिपायांस व सरदारांसहि आपल्या नोकरींतून कमी करून त्यांच्या जागीं दक्षिणी लोकांची भरती केली [ ग्रँट डफ पु. १. पृ. ५९ ].

**बलाढ्य मराठे सरदारांचा उदय.**--सोळाव्या शतकाच्या अखेरीस आदिलशाही व निजामशाही राज्यांत लुकजी जाधव, वणोजी नाईक निंबाळकर, शहाजी भोसले यांच्यासारखे बलाढ्य सरदार निर्माण होण्यास तेथील मुसुलमानी बादशहांचें वर सांगितलेलें धोरणच बहुतांशीं कारण झालें होतें हें वरील विवेचनावरून स्पष्ट होईल. जाधवराव हे त्या काळीं केवढें मोठें बलाढ्य प्रस्थ समजलें जात होतें हें इ.स. १६२०त जाधवराव निजामशाही सोडून मोंगल पक्षास जाऊन मिळाला तेव्हां मोंगल बादशहानें त्याचा पराकाष्ठेचा गौरव करून शहाजाद्यासुद्धां सहसा मिळावयाची नाहीं अशी २४००० स्वारांची मनसब त्यास एकदम देऊन टाकली या एकाच उदाहरणावरून सहज ध्यानांत येईल. वणगोजी नाईक उर्फ जगपाल हा विजापूरच्या आदिलशाहींतील एक सरदार होता. तथापि तो चळवळ्या व धाडशी स्वभावाचा माणूस असल्यामुळें कोठेंहि लढाई निघाली कीं, तेथें तो हजर असावयाचाच. वणगोजीचा दक्षिणेंतील मुसुलमानी राजांस किती वचक होता हें 'राव वणंगपाळ बारा वजीरांचा काळ' ह्या एका जुन्या म्हणीवरून व्यक्त होतें. तिसरा जो शहाजी त्यास मलिकंबरानें निजामशहाकडून सरलष्करीचा अधिकार देवविला होता. सरलष्करचा हुद्दा हा जवळ जवळ सेनापतीइतकाच महत्त्वाचा आहे. याच शहाजीनें शहाजहान बादशहा तख्तनशीन झाल्यावर त्याच्या विरुद्ध बंड करणाऱ्या खानजहान लोदीस मदत करण्याचें धाडस केलें, व त्यानेंच पुढें सन १६३३ मध्यें निजामशाहीच्या तख्तावर एक बाहुलें बसवून त्याच्या नांवावर दिल्लीपतीच्या प्रचंड सेनेस तीन वर्षे सर्व महाराष्ट्रभर हुकवून तिकडे नाचविलें.

**स्वराज्यस्थापनेस परिस्थितीचें अनुकूलत्व.**—यावरून महाराष्ट्रांत ज्या वेळीं स्वराज्यसंस्थापक शिवाजी जन्मास आला त्या वेळीं तेथील परिस्थिति कशा प्रकारची होती याची अंशतः कल्पना करतां येईल. येथें कोणी अशी शंका घेईल कीं, दक्षिणेंतील मुसुलमानी राज्यामध्यें जर कर्तबगार हिंदु माणसास आपलें नशीब काढण्यास पूर्ण वाव होता, तर तत्कालीन हिंदु लोकांकडून स्वातंत्र्यप्राप्तीचा प्रयत्न कां करण्यांत यावा? वस्तुतः मुसुलमानी अमदानींतील चिमुकल्या किल्लेकऱ्यांपासून तों तहत लुकजी जाधव, मुरारपंत यांच्यासारख्या नांवलौकिकास चढलेल्या पुरुषांपर्यंत सर्व हिंदू सरदारांमध्यें मुसुलमानी सत्तेखालींच आपआपला व्यक्तिविषयक उत्कर्ष करून घेण्याची आकांक्षा दृग्गोचर होतें. देशमुख, देसाई वगैरे वतनदारहि आपआपल्या क्षेत्रामध्यें बहुतेकांशीं स्वतंत्रच असल्यामळें त्यांनां देखील मुसुलमानी सत्तेविरुद्ध एकत्र जमून कारस्थानें करण्याची अवश्यकता भासत नव्हती. बहामनी राज्याच्या स्थापनेपासून पुढें दोनशें वर्षेपर्यंत दक्षिणेंतील मुसुलमानांचा बहुतेक काळ विजयानगरच्या राजांशीं व त्यानंतर आपआपसांत व मोंगलांशीं लढण्यामध्येंच गेल्यामुळें ह्या वतनदारांच्या कारभारांत हात घालण्यास मुसुलमानी सरदारांनां म्हणण्यासारखी संधीच मिळाली नाहीं. त्यामुळें हे लोक स्वातंत्र्यास इतके लालचावलेले होते कीं पुढें शिवाजीनें स्वराज्यस्थापनेचें कार्य हातीं घेतलें तेव्हां त्यास त्या वतनदारांनां एकछत्री अंमलाखालीं आणण्यास जरा जडच गेलें.

याचा अर्थ असा नाहीं कीं, सदरहू पारतंत्र्याच्या काळांत महाराष्ट्रामध्यें सुराज्य होतें किंवा शांतता नांदत होती, व येथील लोकांस मुसुलमानी अंमलाविरुद्ध कोणत्याहि प्रकारची कुरकुर करण्यास जागा नव्हती. उलट पक्षीं अहमदनगरच्या विजापूरशीं, विजापूरच्या मोंगलांशीं आणि मलिकंबर व शहाजी यांच्या ह्या दोघांशींहि ज्या अनेक लढाया झाल्या त्यांमध्यें सर्व दक्षिण देश उध्वस्त झाला होता. उदाहरणार्थ, निजामशाहीच्या अखेरच्या वर्षांत विजापूर व मोंगल यांच्यामध्यें जें युद्ध झालें त्यांत मोंगलांचें सैन्य विजापुरास वेढा देण्यास आलें असतां महंमद आदिलशहानें आपल्या शत्रूस दाणावैरण मिळूं नये म्हणून राजधानीच्या सभोंवतालच्या २० मैलांच्या घेरांतील सर्व मुलूख उध्वस्त करून टाकला; व त्याबद्दल उसनें फेडण्याकरितां उलट मोंगलांनींहि विजापूरचा तितकाच मुलूख आणखी उध्वस्त केला. धान्य पेरणें म्हणजे शत्रूच्या फौजेस तें उध्वस्त करण्याकरितां आमंत्रण देणें व प्रसंगविशेषीं आपलेंहि मरण जवळ ओढून आणणेंच झालें होतें. हे लोक केवळ इतकेंच करून थांबत नसत. ज्या ज्या मुलुखांत यांची धाड येई, तेथील मुलांमुलींनां व तरुण बायकांनां ते आपल्या बरोबर धरून नेऊन बलात्कारानें त्यांनां बाटवून मुसुलमान करीत. दासबोधांतील वर्णनावरून असें दिसतें कीं हिंदूंच्या तरुण स्त्रिया धरून नेऊन त्यांचा मुसुलमानांशीं निका लावल्याचीं उदाहरणें त्या वेळीं वारंवार घडून येत होतीं.

**शिवाजीचा जन्म व त्याचा काल.**—अशा प्रकारच्या परिस्थितमध्यें शिवाजीसारखा एखादा अलौकिक

पुरुष जन्मास येऊन त्यानें मुसुलमानांच्या छळापासून आपल्या लोकांस सोडविण्याचा विडा उचलला तेव्हां त्याला महाराष्ट्रांतील त्रस्त झालेल्या लोकांनीं मनोभावानें साह्य केलें असल्यास त्यांत नवल नाहीं. शिवजन्माचा शक रायगड बखरींत १५४८ व इतर बखरींत १५४९ दिला असून ग्रँडडफच्या व किंकेड आणि पारसनीस यांच्या इतिहासांत ह्या दुसऱ्या बखरींच्याच आधारावर शिवाजीचा जन्म इ. स. १६२७ च्या एप्रिल महिन्यांत ( वैशाख शुद्ध २ स ) झाला असें म्हटलेलें आहे. परंतु हा काळ चुकला असून जेधे यांच्या शकावलींत म्हटल्याप्रमाणें शिवाजीचा जन्म शके १५५१ च्या फाल्गुन व॥ ३ ला म्हणजे इ. स. १६३० च्या फेब्रुवारी महिन्यांत १९व्या तारखेस शुक्रवारीं झाला होता असें आतां बहुतांशीं सिद्ध झाल्यासारखें झालें आहे. ह्याला पुरावा म्हणून रा. वासुदेव शास्त्री खरे यांनीं भारत इतिहाससंशोधक मंडळाच्या अष्टमसंमेलनांत वाचलेल्या आपल्या मालोजी व शहाजी नामक निबंधांत जो एक मुद्दा पुढें आणला तो असा: 'शिवाजीच्या प्रत्येक बखरींत, 'जाधवराव बरोबर मोंगल फौज घेऊन शहाजीचा पाठलाग करूं लागला तेव्हां शहाजीबरोबर जिजाऊ होती तिला शहाजीच्या स्वारीबरोबर धांवणें निभेना सबब शिवनेरीस जाऊन राहणें प्राप्त झालें व तेथेंच ती प्रसूत होऊन तिला शिवाजी हा पुत्र झाला' असा मजकूर लिहिलेला असतो. परंतु १६२७ त लढाई बालेघांटाकडे चालली होती पश्चिमघांटाकडे तिचा संबंध नव्हता. उलटपक्षीं इ. स. १६३० त लढाईची धुमश्चक्री सह्याद्रीच्या लगत्यास सुरू होती. इ. स. १६२७त मोंगलांनां शहाजीचा निकरानें पाठलाग करण्यास विशेष निमित्त नव्हतें, पण १६३० त लोदीच्या बंडाचा बीमोड करण्यासाठीं शहाजीचा झपाट्यानें पाठलाग करण्याचें काम मोंगल सरदारांस खुद्द बादशहाच्या हुकुमानेंच करावयाचें होतें. अर्थात् यावरून शिवजन्माचा शक जेधेशकावलींत दिल्याप्रमाणें १५५१ हाच असणें अधिक संभवनीय दिसतें. तंजावरच्या शिलालेखांतहि शिवजन्माचा काळ हाच दिलेला आहे. भारत इतिहाससंशोधक मंडळाच्या नवम संमेलनांत ह्या विषयावर जो एक स्वतंत्र निबंध वाचण्यांत आला त्यांतहि निबंधकारांनीं ( रा. चांदोरकर व दिवेकर ) तंजावर येथें सांपडलेल्या शिवभारत ग्रंथाचा आधार दिला आहे.

**स्वराज्यस्थापनेंतील शहाजीचें श्रेय.**— महाराष्ट्रास स्वातंत्र्य मिळवून देण्याचें श्रेय सर्वतोपरी ह्या समर्थ जन्मास आलेल्या वीर पुरुषासच सामान्यतः देण्यांत येतें. मुसुलमानी आमदानीनंतर महाराष्ट्रांत स्वराज्याच्या कल्पनेस मूर्त स्वरूप आणून देणारा हाच पहिला पुरुष असल्यामुळें एका अर्थी तें बरोबरहि आहे. शिवाजीसारखा महाराष्ट्रदीपक पुत्र लाभल्यामुळें त्याचा बाप शहाजी यांस निःसंशय धन्यताच वाटली असेल; तथापि आपल्या पुत्राच्या उज्वल तेजापुढें आपलें तेज फिकें पडून आपली वास्तविक योग्यता ध्यानांत येण्यास पुढील पिढ्यांनां फार प्रयास पडतील याची बिचाऱ्यास कल्पनाहि नसेल !

शिवाजीच्या चरित्रांतील विविध प्रसंग उद्भवण्यास वस्तुतः शहाजीचेंच चरित्र कसें कारणीभूत झालें याचें रा. वासुदेवशास्त्री खरे यांनीं आपल्या उपर्युक्त निबंधांत फार मार्मिक विवेचन केलें आहे. ते म्हणतातः—

"विजापुरकरांच्या चाकरींत शिरल्यानंतर ( इ. स. १६३७ )पहिल्या तीनचार वर्षांत शहाजीच्या मनोवृत्तींत जो क्षोभ उत्पन्न झाला, त्यांतच शिवाजीच्या राज्यस्थापनेचें बीज आहे. राज्यसंस्थापकाच्या पदवीस पोंचलेल्या शहाजीस हें परमुलुखांत सेवावृत्तीचें लाजिरवाणें जिणें पतकरणें कशामुळें प्राप्त झालें ! मोंगलांच्या नांवानें तो जळत होताच. पण विजापुरकरांनीं आयत्या वेळीं आपणास दगा देऊन स्वतःचा स्वार्थ साधून घेतला याबद्दल त्याचें मन फार दुखावलें होतें. 'महंमद आदिलशहानें विश्वासघात करून माझें राज्य बुडविलें आणि जहागीर दिल्याचा उपकार दाखवून मला हद्दपारीची शिक्षा भोगावयास लाविली. ज्यांच्या मांडीस मांडी लावून बसण्याची योग्यता आपण संपादन केली होती त्यांचीच आतां तावेदारी सोसावी, चाकरी करावी, मर्जी धरावी असे दिवस आपणास प्राप्त झाले ! आणि इतकें असून याबद्दल तोंडांतून अक्षरहि काढण्याची सोय नाहीं. हा गुपित मारा यावज्जीव सोसलाच पाहिजे,' असे विचार उद्भवून त्याच्या मनास फार खेद वाटे ! 'ज्यांनीं हें सर्व केलें त्या शत्रूंवर अगर हितशत्रूंवर सूड उगविण्याच्या संधी आतां माझ्या आयुष्यांतून निघून गेल्या. तर मग या अपमानाचें परिमार्जन आतां कुणी करावें ? हें उसनें कोणी फेडावें ?' असें जेव्हां जेव्हां त्याच्या मनांत येई, तेव्हां तेव्हां शिवाजीची आठ वर्षांची छोटी मूर्ति त्याच्या डोळ्यांसमोर उभी राही. करील तर हें सर्व माझा शिवबाच करील असें त्यास वारंवार वाटे. शहाजी हा महाप्रतापी महात्कारस्थानी पुरुष, हा राज्यक्रांति करणारा चळवळ्या-दक्षिणेंत राहू दिला तर आपलीं राज्यें नांदूं देणार नाहीं; असें मानून दिल्लीचा शहाजहान व विजापुरचा महंमद यांनीं शहाजीस कर्नाटकांत डांबून घातलें व पुनः त्यानें दक्षिणेंत येऊं नये असा बंदोबस्त केला."

"शिवाजीनें निराळें राहून स्वतंत्र राज्य करावें ही कल्पना शहाजीस सुचली खरी, पण ती अशा बिकट परिस्थितींत सांपडला होता कीं, ती अमलांत आणतांना फार सावधपणानें वागणें त्यास प्राप्त होतें. शिवाजीचा जन्म झाल्या दिवसापासून शहाजीचा सर्व काळ लढायांच्या धामधूमींत गेल्यामुळें मुलांचा सहवास त्याला फारच थोडा लाभला होता. मुलगा मोठा होऊं लागला, तसतशी त्याची चालचर्या पाहून आपला बेत पक्का करणें त्यास जरूर होतें. त्यासाठीं त्यानें इ.स. १६३८।३९ त व पुढें १६४१ त शिवाजीस आपणाकडे बोलावून जवळ ठेवून घेऊन परीक्षा

पाहिली. 'त्यांत शिवाजीचें उदयोन्मुख अपूर्व तेज त्याच्या चांगलेंच दृष्टोत्पत्तीस आलें. मग त्यानें आपल्या कारभारी मंडळींशीं खलबत करून पुढें योजलेला बेत पार पाडण्यासाठीं एव्हांपासून एकेक पाऊल धीरें धीरें कसें टाकावयाचें हा निश्चय ठरविला. नंतर जिजाऊ आपणांस आवडत नाहीं, शिवाजी आपल्या मर्जीबाहेर जाणार सबब जवळ ठेवण्याच्या सोयीचा नाहीं, असें खोटेंच निमित्त ठेऊन त्या दोघांसहि आपणापासून दूर पुण्यास ठेवण्याची मसलत योजिली.आणि शिवाजीस विश्वासू दिवाण दादोजी कोंडदेव याजबरोबर पुण्यास रहावयास पाठविलें आणि त्यांबरोबरच आपलें कारभारीमंडळहि कोणत्या ना कोणत्या तरी निमित्तानें तिकडेच रवाना केलें" [भारत इतिहाससंशोधक मंडळ त्रैमासिक अंक १ पृ. ३२. ].

स्वतंत्र राज्य स्थापन करण्याची कल्पना प्रथम शहाजीस सुचली होती व मराठी राज्य स्थापन करण्याचा डाव त्यानेंच पुढें शिवाजीकडून जुळवून आणला ही गोष्ट आतां सप्रमाण सिद्ध झाली आहे. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १५ पान ४७०,४७१; खंड २०, पान ३४९ व रामदास आणि रामदासी भाग ९ पान २२ यांत शिवाजीचा एक शिक्का आहे तो असाः—

प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ॥
शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भाति यशस्विनी ॥

ही मुद्रा शिवाजीच्या शके १५६१ आश्विन शुद्ध ८ च्या एका आज्ञापत्रावर सांपडते. या वेळीं शिवाजीचें वय अवघें १० वर्षांचें होतें. परंतु ह्या मुद्रेंतील मजकुराचा डौल तर असा दिसतो कीं, तिच्या मालकानें स्वतंत्र राज्य स्थापन करण्याचा जणूं निश्चयच केला होता. ही मुद्रा शिवाजीच्या इतक्या अल्प वयाच्या वेळची आहे कीं, तिजवरून स्वराज्यस्थापनेच्या योजनेचा उगम एकट्या शिवाजीपासून निघणें शक्य नाहीं हें उघड दिसतें. याच्या पुष्ट्यर्थ रा. वासुदेवशास्त्री यांनीं आपल्या मालोजी व शहाजी या निबंधांत व धुळ्याचे रा. भट यांनीं इतिहास व ऐतिहासिक मासिक पुस्तकाच्या २८ व्या अंकांत व रा. राजवाडे यांनीं राधामाधव विलास चंपू या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत जें विवेचन केलें आहे त्यावरून पुढील माहिती मिळते.

स्वराज्यस्थापनेच्या योजनेशीं शिवाजीमहाराजाखेरीज तत्कालीन ज्या अनेक व्यक्तींचा संबंध असावा अशी कल्पना होते, त्यांपैकीं शहाजी व दादोजी कोंडदेव ह्या दोन प्रमुख व्यक्ती होत असें म्हणावें लागतें. कारण रामदास आणि रामदासी मालेंतील १५ व्या भागांत विजापुरचा अली आदिलशहा यास शहाजीनें लिहिलेलें शके १५७८ (इ. स. १६५६) च्या सुमाराचें एक पत्र प्रसिद्ध झालें आहे. 'तें वाचलें असतां तें लिहिण्याच्या कित्येक वर्षें अगोदर शहाजीनें आदिलशाहीवर आलेलीं अनेक संकटें निवारण करून आणि अनेक प्रदेश जिंकून व ते विजापुरच्या राज्यांत सामील करून दरबारांत आपली विलक्षण छाप बसविली होती असें दिसून येतें. शहाजीसारख्या कर्तृत्ववान् विचारी पुरुषास तत्कालीन परिस्थितीच्या विचाराअंतीं स्वराज्यप्राप्तीचें काम सहज घडून आणण्यासारखें आहे असें वाटणें स्वाभाविक होतें. स्वतः विजापूरच्या बादशहाच्या दरबारांत राहून कमकुवत झालेल्या बादशाही सत्तेस संकटसमयीं मदत करून व तिजवर आपली छाप व दरारा ठेऊन विजापुरापासून बऱ्याच दूर असलेल्या स्वराज्यस्थापनेस योग्य अशा पुणें, सुपें, बारामती इत्यादि सह्याद्रीलगतच्या त्याच्या जहागिरींतील प्रदेशांत आपल्या कर्तृत्ववान् मुलाच्या हातून पोक्त व अनुभवी अशा दादोजी कोंडदेवासारख्या स्वामिनिष्ठ कारभाऱ्याच्या सल्ल्यानें स्वराज्यस्थापन करण्याचा बेत शहाजीनें ठरविला असला पाहिजे, असें अनुमान वरील अल्पशा पुराव्यावरून काढण्यास हरकत दिसत नाहीं (इतिहास आणि ऐतिहासिक अंक २८–३१ पृ. १३२).

इ. स. १६३८ च्या अखेरीस शिवाजी बेंगरुळाहून पुण्यास आला. येतांच त्यानें बारा मावळें काबीज केलीं असें सभासदाच्या बखरींत लिहिलें आहे; पण तेव्हां तर शिवाजी आठ वर्षांचा होता. आठ वर्षांच्या मुलानें हीं मावळें काबीज करावीं कशीं? अर्थात् त्याच्या नांवावर हणमंते वगैरे कारभाऱ्यांनीं ही मुलखगिरी केली हें स्पष्ट आहे. 'येतांच' ह्या बखरींतील पदावरून बेंगरुळास ठरलें होतें त्याप्रमाणें शिवाजीनें पुण्यास येतांच बारा मावळें काबीज केलीं असा ध्वनि निघतो. चिटणिशी बखरींत तर " शिवाजीमहाराज शके १५६२ यांत या (राज्यस्थापनेच्या) मसलतीचा आरंभ करते झाले " असें स्पष्टच म्हटलें आहे (भारत इतिहाससंशोधक मंडळ त्रैमासिक अंक १, पान ३४.).

शिवाजीच्या ज्या आज्ञापत्रावर वर उल्लेखलेली 'प्रतिपच्चंद्ररेखेव...... इत्यादि' मुद्रा आहे तो लेखांक शिवाजीच्या दहाव्या वर्षाच्या वेळचा आहे हें वर सांगितलेंच आहे. शहाजी व दादोजी कोंडदेव हींचीं मनें जर विजापुरच्या बादशहाविषयीं राजनिष्ठ असतीं तर दादोजी कोंडदेवासारख्या स्वामिनिष्ठ कारभाऱ्यास वरील मुद्रेंतील मजकूर संमत होऊन ती मुद्रा कागदोपत्रीं सुरू करण्याची परवानगी बालशिवाजीराजास त्यानें कधींच दिली नसती. अर्थात् शहाजी व दादोजी यांच्या सल्लामसलतीनेंच स्वराज्यस्थापनेची कल्पना निश्चितपणें अमलांत आणण्याचें ठरून वरील मुद्रा बालशिवाजीच्या आज्ञापत्रावर विराजमान होऊं लागली असली पाहिजे (इतिहास आणि ऐतिहासिक अंक २८–३१ पान १३३).

मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या पंधराव्या खंडांतील २६८ व्या लेखांकामुळें या अनुमानास चांगलीच बळकटी येते. शके १५६७ वैशाख शुद्ध प्रतिपदेचें (म्हणजे शिवाजीमहाराजांच्या १६ व्या वर्षाच्या वेळचें) लेखांक

२५८ हें पत्र आहे. हें पत्र दादाजी नरसू प्रभू यास शिवाजीमहाराजांनीं लिहिलेलें असून त्या पत्रांत स्वयंभू अशा रोहिडेश्वराच्या प्रसादानें आम्हांस यशप्राप्ति झाली असून तोच आमच्या हातून हिंदवी स्वराज्य स्थापन करून आमचे मनोरथ पूर्ण करणार आहे असें शिवाजी दादाजीस लिहीत आहे. पत्राच्या शेवटीं "राजश्री श्री दादापंताचे विद्यमानें बाबाचें व तुमचें व आमचें श्रीपाशीं इमान जालें तें कायम वज्रप्राय आहे. त्यांत अंतर आम्ही, आमचे वंशज लेकराचे लेकरीं वतन वगैरे चालविण्याविषयीं कमतर करणार नाहीं." असें शिवाजीमहाराज दादाजीस बजावून लिहीत आहेत. यावरून दादोजी कोंडदेव याच्या मार्फतीनें नरसो बाबाशीं व दादाजीशीं शिवाजीनें विजापूरच्या बादशहाच्या ताब्यांतील मुलुखासंबंधीं कारस्थान केलें होतें हें उघड होत आहे. सदरहू लेख उपलब्ध झाल्यानंतर दादोजी कोंडदेव याच्या सल्लामसलतीनें व मदतीनें शिवाजीमहाराजांच्या पूर्ववयांतील स्वराज्यस्थापनेसंबंधाच्या सर्व उलाढाली चालल्या होत्या याबद्दल शंका घेण्यास आतां बिलकुल जागा रहात नाहीं ( इतिहास आणि ऐतिहासिक, अंक २८—३१ पान १३३. ).

स्वराज्यस्थापनेची मसलत शहाजीस संमत असली पाहिजे या विधानास पुष्टि देणारी एक बाब सप्तप्रकरणात्मक चरित्राचें पान ९२ वर आढळून येते. या ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, ' आणि श्री जेजुरीचे देवास शहाजी महाराजांनीं नवस केला होता जे शिवाजी महाराज यांनीं हेतु धरला कीं, राज्य साध्य करून देवगोब्राह्मण यांची पीडा परिहार करून धर्मस्थापना करावी. तो सिद्धीस निर्विघ्न जावा म्हणजे लक्ष रुपयांचें सोनें घेऊन सोन्याच्या मूर्ती करून पाठवूं. त्याप्रमाणें तेथें कर्नाटकी कारागर याजपासून चांगल्या मूर्ती तयार करून पाठविल्या." आतां जो बाप आपल्या मुलानें सुरू केलेल्या स्वराज्यस्थापनेच्या मसलतींत यश यावें असा देवापाशीं नवस करतो तो बाप त्याच कार्यांत आपल्या मुलास सल्लामसलत अगर प्रत्यक्ष मदत देणार नाहीं हें संभवेल तरी कसें ? [ इतिहास आणि ऐतिहासिक, अंक. २८–३१, पान १३७ ].

शहाजीनें विजापूरच्या बादशहास आपल्या कामगिरीनीं उपकारबद्ध करून त्याच्या दरबारावर आपली छाप कशी बसविली होती याचा मागें उल्लेख आलाच आहे. अशा स्थितींत विजापूरचा सुलतान शिवाजीच्या बंडास मूळ कारण शहाजी आहे अशी पक्की खात्री करून घेतल्याशिवाय शहाजीसारख्या असामान्य महत्त्वाच्या माणसास केवळ संशयावरून ठार मारण्यास तयार होईल हें संभवत नाहीं. या अरिष्टांतून मुक्त होतांच पुन्हां असा पुंडावा करून माझ्या जिवावर संकट आणूं नकोस अशी शिवाजीस ताकीद देण्यापूर्वीं शहाजीनें कान्होजी नाईक जेधयापासून अशी आणभाक घेतली कीं "चिरंजीव राजश्री सिउबा खेडेबारीयांत व पुणां आहेत त्याजवळ तुम्ही जमावानसी राहावें. तुमची जबरदस्ती त्यां प्रांतें आहे. अवघे मावळचे देशमुख देखील त्यासी रुजू होऊन त्यांचे आज्ञेत वर्तेत येसा विचार करून जबरदस्तीनें राहावें येखादी मोगलाईकडील फौज व इदिलशाहीकडील फौज आली तरी आपण इमान राखावें. त्यांसी लढाई करावी येशी शफत इमानपुरस्कर बेलरोटीवर हात ठेऊन घेतली" (भा.इ स. मंडळ चतुर्थ संमेलनवृत्त पान १७९-८०). शिवाजी आपल्या मनोदयाप्रमाणें वागत आहे असें वाटत असल्याखेरीज शहाजीच्या हातून असें वर्तन कसें घडेल ? [ भा. इ. सं. मंडळ. त्रैमासिक अंक १, पान ३५ ].

जिजाऊ व शिवाजी यांजबरोबर शहाजीनें दादोजी कोंडदेवास जहागीर संभाळण्याकरितां पुण्यास पाठविलें हें योग्यच झालें पण शामराव निळकंठ पेशवे, बाळकृष्णपंत मुजुमदार, सोनोपंत डबीर व रघुनाथ बल्लाळ सबनीस हे शहाजीच्या अनेक संकटकाळीं उपयोगी पडलेले मुलकी व लष्करी कामांतले वाकबगार–शत्रूचे किल्ले व ठाणीं फितुरानें किंवा हल्ल्यानें घेण्यांत तरबेज असलेले असे मलिकंबराच्या वेळेपासूनचे शहाजीचे विश्वासू कारभारी–यांना पुण्यास राहून काय करावयाचें होतें ? हे कारभारी लोक पुण्यास नेहमीं राहण्याकरितां पाठविण्यांत राज्यस्थापनेखेरीज शहाजीचा दुसरा कांहींच हेतु दिसत नाहीं [ भा. इ. सं. मं. त्रैमासिक अंक १, पान ३३-३४ ].

इ. स. १६४० पासून जिजाऊ व शिवाजी यांवर शहाजीची इतराजी होऊन त्याचें तोंडसुद्धां पहावयाचें नाहीं असा त्यानें खरोखरच निश्चय केला होता असें जरी मानिलें, तरी त्या दोघांवर संभाजीची नाराजी होण्यास कांहींच कारण नव्हतें. संभाजीची व जिजाऊची विजापुरास शेवटची भेट झाल्यानंतर तो तेरा वर्षे जिवंत होता. या मुदतींत जिजाऊनें आपल्या थोरल्या मुलास भेटण्याकरितां एकदां देखील कर्नाटकाकडे जाऊं नये, अगर आईला भेटण्याकरितां संभाजीनें एकदांसुद्धां पुण्यास येऊं नये हें कसें घडलें ? पुण्याच्या मंडळींनीं कर्नाटकाकडे बघूं नये आणि कर्नाटकच्यांनीं पुण्यास आपलीं कोणी माणसें आहेत हें मुळीं अजीबात विसरून जावें हा सारा शहाजीनें कांहीं मतलबामुळें मुद्दाम घडवून आणलेला प्रकार दिसतो. शिवाजीकडून पुंडावा करावयाचा आणि आपण नामानिराळें रहावयाचें याखेरीज त्यांत दुसरा मतलब दिसत नाहीं [ भा. इ. सं. मंडळ त्रैमासिक अंक १, पान ३५ ].

वरील विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट होते कीं, शिवाजीनें आपल्या आयुष्यांत जें मराठी राज्य निर्माण केलें त्याचा पाया घालण्याच्या कामीं त्याला त्याच्या वडिलांकडून व वडिलांच्या पदरच्या विश्वासू नोकरचाकरांकडून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें बरीच मदत झाली होती. किंबहुना हा पाया घालण्याचें काम स्वतः शहाजीनेंच आपल्या मुलाकडून करविलें असें म्हटलें तरी तें गैरवाजवी होणार नाहीं. स्वतंत्र

राज्यस्थापनेचा प्रयोग प्रत्यक्ष शहाजीनेंच करून दाखविला होता. कदाचित् तो व्यक्तीपुरता अथवा आपल्या घराण्यापुरता असेल. राष्ट्राचा विस्तृत कल्पना शहाजीच्या मनांत नसावी. तथापि रियासतकार म्हणतात त्याप्रमाणें शिवाजीला जर आपण मराठशाहीचा संस्थापक म्हटलें तर शहाजीला मराठशाहीचा संकल्पक असें पद देण्यास हरकत नाहीं.

**महाराष्ट्रधर्माच्या ऊर्फ जयिष्णु हिंदुधर्माच्या कल्पनेचा उदय.**—शिवाजीला स्वराज्यस्थापनेच्या कामीं एकट्या शहाजीचीच मदत झाली असें नाहीं. तो ज्या वेळीं जन्मास आला त्या वेळची महाराष्ट्रांतील एकंदर परिस्थिति त्याच्या कार्यास आशाजनक अशाच होती. 'देव फोडणाऱ्या, विजापुर अहमदनगर, खानदेश, जुन्नर, कोंकण वगैरे प्रांतांवर अंमल करणाऱ्या, यवनांनीं मराठ्यांनां एका बाजूनें अगदीं सतावून सोडलें होतें व दुसऱ्या बाजूनें त्यांच्यांतील प्रमुख सरदारांनां व मुत्सद्द्यांनां मोठमोठया मानाच्या जागा दिल्या होत्या. यामुळें त्या वेळच्या मराठ्यांत यवनांविषयीं संताप व तो परिहार करण्याचें सामर्थ्य हीं एकाच वेळीं उत्पन्न झालीं. सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत महाराष्ट्रामध्यें महाराष्ट्रधर्माची एक नवीन कल्पना उद्भूत झालेली दिसते. त्या वेळीं होऊन गेलेल्या रामदासस्वामींच्या लेखांत ह्या कल्पनेचा विशेषेंकरून विकास झालेला पहावयास मिळतो. इतिहाससंशोधक रा. राजवाडे यांच्या मतें समर्थांच्या लेखांत ज्या महाराष्ट्रधर्माचा उल्लेख आला आहे त्याचीं मुख्य अंगें म्हटलीं म्हणजे (१) यवनांचा उच्छेद करणें, (२) धर्माची स्थापना करून गोब्राह्मणांचा प्रतिपाल करणें, (३) ही दुसरी गोष्ट साध्य करण्यासाठीं स्वराज्याची स्थापना करणें, आणि स्वराज्याची स्थापना करण्यासाठीं पुन्हां (४) मराठ्यांचें एकीकरण करणें व (५) त्यांचें धुरीधरण म्हणजे पुढारपण स्वीकारणें हीं होत. याप्रमाणें महाराष्ट्रेतर प्रांतांतील हिंदुधर्म + धर्मस्थापना + गोब्राह्मणप्रतिपाल + स्वराज्यस्थापना + एकीकरण + धुरीधरण मिळून महाराष्ट्रांतील हिंदुधर्म उर्फ महाराष्ट्रधर्म होतो अशी त्या काळीं समजूत होती, अशी राजवाडे यांची कल्पना आहे. महाराष्ट्रेतर प्रांतांतील हिंदुधर्मास सहिष्णु हिंदुधर्म व महाराष्ट्रांतील हिंदुधर्मास जयिष्णु हिंदुधर्म म्हटलें असतां हिंदुधर्म व महाराष्ट्रधर्म या दोहोंतील भेद उत्कटत्वें करून स्पष्ट होईल असें त्यांनां वाटतें. सारांश तत्कालीन महाराष्ट्रीय समाजाची स्थिति, शहाजीचें उत्तेजन व शिवाजीचें कर्तृत्व या तीन गोष्टींची परस्परांस जोड मिळून १७ व्या शतकांतील मराठयांचें राज्य उदयास आलें असें म्हटलें पाहिजे.

इ. स. १६४६ त शिवाजीनें तोरणा किल्ला घेऊन स्वराज्याचें तोरण बांधल्यापासून तों तहत सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर इ. स. १७९६त मराठे सरदारांत यादवी सुरू होईपर्यंत बरोबर १५० वर्षें उपरिनिर्दिष्ट कल्पनेच्या धोरणानें मराठे चालले होते." ही कल्पना ध्यानांत ठेवून मग शिवाजीच्या व त्याच्या अनुयायांच्या कृत्यांचा विचार करावा, म्हणजे त्या काळीं महाराष्ट्रांत व कर्नाटकांत जिकडे तिकडे मराठे निष्कारण धांवतांना परकीय इतिहासकारांनां जे दिसतात ते मनांत कांहीं हेतु धरून शिस्तवार मोहिमा करीत आहेत असें भासूं लागतील" असें राजवाडे म्हणतात.

**शहाजीच्या अडचणी व शिवाजी करवीं स्वराज्यस्थापना करण्याचा उपक्रम.**-इ. स. १६३८ हें साल मराठ्यांच्या राज्यस्थापनेच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखें आहे. "ह्या वर्षीं शहाजीनें शामराव नीलकंठ पेशवे, बाळकृष्णपंत मुजुमदार, सोनोपंत डबीर व रघुनाथ बल्लाळ कोरडे सबनीस ह्या आपल्या विश्वासू नोकरांस बरोबर देऊन शिवाजीस बेंगरुळाहून पुण्यास पाठविलें. असें दिसतें कीं आपण नामा निराळे राहून शिवाजीच्या नांवावर स्वतंत्र राज्य स्थापन करण्याच्या उद्देशानेंच शहाजीनें ही व्यवस्था केली होती. आपल्या आयुष्याच्या सुमारें चाळीस वर्षांच्या अवधींत मराठ्यांचें स्वतंत्र राष्ट्र निर्माण करण्याचें जें शिवाजीनें महत्कार्य केलें त्याचा आरंभ वस्तुतः शहाजीनें शिवाजीस आपल्यापासून वेगळें केलें त्या वर्षींच होतो असें म्हटलें पाहिजे. शहाजी हा स्वतः एक प्रख्यात राजकार्यधुरंधर पुरुष होता यांत संशय नाहीं; किंबहुना त्यानें कांहीं वर्षेंपर्यंत निजामशाहीच्या तख्तावर एक नामधारी बाहुलें बसवून आपल्या स्वतःच्या हिंमतीवर स्वतंत्रतेनें राज्यकारभारहि केला होता. तथापि किती केलें तरी तो मुसुलमानी राजांच्या नोकरींत वाढलेला माणूस होता. त्याला निजामशाही, आदिलशाही इत्यादि शाहींचा तिटकारा आला असेल, कदाचित् ह्या मुसुलमानी राजांचें जूं झुगारून देऊन स्वतंत्र राज्यस्थापना करावी असेहि विचार त्याच्या मनांत घोळत असतील; परंतु ज्या माणसाचें जवळ जवळ अर्धें अधिक आयुष्य मुसुलमानी राजांची नोकरी करण्यांत गेलें, त्याला स्वतःस स्वतंत्र म्हणवून स्वतःच्या नांवावर स्वतंत्र राज्य स्थापन करण्याचा धीर कसा होणार? तो स्वतः मोठा पराक्रमी पुरुष असेल, परंतु त्यानें जे पराक्रम केले, ते सर्व मुसुलमानी राजाच्या नांवावर केले होते. तो शहाजहान बादशहाशीं टक्कर देण्यासहि कचरला नाहीं, पण ती देतांना त्याला केवळ नामधारी कां होईना पण एका राजघराण्यांतील पुरुषास स्वतःच्या पाठीशीं घालावें लागलें. त्याच्या तरवारीस जो एवढा जोर आला होता, तो ह्या नामधारी बाहुल्यामुळेंच होय. आपल्या हातून हें बाहुलें गेलें कीं आपली तरवार लुली पडणार ही जाणीव त्यास सोडून गेली नव्हती. जे पराक्रम आपण शहाच्या नांवावर करीत आहोंत तेच स्वतःला स्वतंत्र म्हटल्यावर आपल्या हातून होतील किंवा नाहीं याची त्यास खात्री नव्हती. त्यानें मनांत आणलेंच असतें तर कदाचित् त्याला स्वतःलाहि मराठ्यांचें एक स्वतंत्र संस्थान निर्माण करतां आलें असतें. परंतु त्याच्यामध्यें सामर्थ्य असलें तरी आत्मविश्वास नव्हता. त्याची भीति

अगदींच निराधार होती असें नाहीं. त्यानें जर आदिलशाहीविरुद्ध बंड पुकारून स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला असता, तर त्यास आदिलशहा, कुतुबशहा व मोगल बादशहा या सर्वांकडूनच एकसमयावच्छेदेंकरून विरोध झाला असता; इतकेंच नव्हे तर ज्या देशमुखांना पुढें शिवाजीस गोडीगुलाबीनें आपल्या पक्षास वळवून घेतां आलें ते देखील शहाजीस विरोध करावयास चुकले नसते. उलट पक्षीं शिवाजीची स्थिति अगदीं निराळी होती. वडिलांचें धाडस व पराक्रम हे बालपणापासून त्याच्या समोर कित्याप्रमाणें होते. परंतु ज्या गुलामगिरीच्या वातावरणांत शहाजी अगदीं बालपणापासून वाढला होता त्या गुलामगिरीचा शिवाजीस अद्याप संपर्कहि झाला नव्हता. अशा स्थितींतच शहाजीनें त्यास आपल्यापासून दूर केल्यामुळें स्वतंत्र वातावरणांत त्याची मनोभूमि तयार होण्यास अवसर मिळाला; इतकेंच नव्हे तर ज्या गोष्टी शिवाजीस शहाजीपाशीं राहून करतां आल्या नसत्या त्या तो आपल्या वडिलावर टपका येऊं न देतां बराच काळपावेतों पुण्याच्या जहागिरींत करूं शकला. विजापुरकरांनीं शहाजीस कैद केलें तेव्हां मुलगा माझ्या आज्ञेंत नाहीं, तुम्ही वाटल्यास त्याजवर फौज पाठवून त्याचें पारिपत्य करा असें जें शहाजीनें आदिलशहास सांगितलें तें अगदीं अंतःकरणपूर्वक सांगितलें होतें असें जरी मानलें तरी शिवाजीवर एखादा कठिण प्रसंग ओढवला असता तर शहाजीनें आदिलशहापाशीं आपल्या मुलाबद्दल रदबदली करून त्याची सुटका केली नसती असें म्हणतां येत नाहीं. शिवाजी व त्याचे साथीदार विजापुरकरांच्या मुलखांत बेजबाबदारपणें धुमाकूळ घालीत असतांना त्यांच्या मनांतहि हा विचार येत असला पाहिजे.

**शिवाजीच्या चरित्राचें पर्यालोचन.**—मराठी राज्यस्थापनेच्या दृष्टीनें शिवाजीच्या चरित्राचें निरीक्षण करूं गेलें असतां त्याच्या आयुष्याचे स्थूल मानानें आठ आठ वर्षांचे पांच व दहा वर्षांचा एक असे सहा विभाग पाडतां येतात. यांपैकीं पहिला विभाग म्हणजे बाळपण. हा काळ इ. स. १६३० पासून १६३८ पावेतों येतो. त्यानंतरच्या आठ वर्षांत शिवाजीनें किंवा वस्तुस्थितीस धरून बोलावयाचें म्हणजे त्याच्या आईबापांच्या विश्वासू नोकरांनीं त्याच्या नांवावर शहाजीच्या जहागिरींतच एक चिमुकलें परंतु सर्वांशीं स्वतंत्र असें व्यवस्थित व नमुनेदार राज्य निर्माण केलें. ह्यापुढील शिवाजीचीं आठ वर्षे मुख्यतः किल्ले घेऊन व आसपासचा मुलूख कबजांत घेऊन ह्या राज्याचा बंदोबस्त करण्यांत गेलीं. यानंतर विजापुरकरांशीं युद्ध सुरू होऊन तेंहि पुढें जवळ जवळ आठ वर्षेच चाललें होतें. शहाजीच्या मध्यस्थीनें विजापुरकरांशीं समेट झाल्यानंतर, यापूर्वींच मोंगलांशीं सुरू झालेलें भांडण रंगांत आलें. हा औरंगजेब व शिवाजी यांचा सामना सुमारें १० वर्षेपर्यंत टिकला. या पुढील आठ वर्षांतील शिवाजीची कामगिरी म्हटली म्हणजे विजापुरकरांशीं तंटा व दक्षिणदिग्विजय होय. कोंकण प्रांत हाताखालीं घालीत असतां शिवाजीचा जंजिऱ्याच्या शिद्द्यांशीं संबंध आला. त्यापासून व इतर श्वेतवर्ण दर्यावर्दी लोकांपासून आपल्या मुलखाचा बंदोबस्त करण्याकरितां शिवाजीनें आपलें आरमार तयार केलें. तथापि अखेरपर्यंत शिद्द्याचा प्रश्न शिवाजीच्या हातून सुटला नाहीं तो नाहींच.

शिवाजीच्या आयुष्याचें साद्यंत पर्यालोचन करावयाचें म्हणजे उपरिनिर्दिष्ट सहा भागांत कोणकोणत्या गोष्टी साध्य झाल्या याचा पार्थक्यानें विचार करावयास हवा. यांपैकीं पहिल्या भागाचें पर्यवसान कोणत्या गोष्टींत झालें हें आपण वर पाहिलेंच आहे. तेव्हां बाकीच्या पांच भागांचा आढावा काढून शेवटीं ज्यामुळें शिवाजीचें आरमार निर्माण झालें त्या शिद्द्याच्या लढ्याचें सामान्य स्वरूप ध्यानांत आणलें म्हणजे मराठी राज्यस्थापना कसकशी व कोणकोणत्या प्रयत्नांनीं झाली याची नीट कल्पना होईल.

**वडिलांच्या जहागिरींत स्वतंत्र राज्याची स्थापना.**—(१६३८—१६४६). बेंगरूळहून पुण्यास येतांच शिवाजीनें बारा मावळें काबीज केलीं व 'मावळे देशमुख बांधून दस्त करून पुंड होते त्यांस मारलें' असें सभासद बखरींत म्हटलें आहे. पुण्याखालील बारा मावळांत उत्तरेस राजमाची व चाकणपासून दक्षिणेस रायरेश्वराचा डोंगर, अंबेड खिंड व खांबटकीचा घांट ह्या स्थानांपर्यंत चा मुलुख येतो. मावळांतील वजनदार देशमुखाचें साहाय्य शिवाजीनें आरंभींच मिळविलें. घांटावरील मावळाच्या बंदोबस्तांत शिवाजीस बाजी पासलकराचा व घांटाखालील कोंकणांतील डोंगरी प्रदेशाची व्यवस्था करण्यांत तानाजी मालुसऱ्याचा उपयोग झाला. मावळ प्रांत कबजांत आल्यावर तेथें शेतीची व वसुलाची व्यवस्था करण्यांत आली. या मुलुखांत शेंकडों वर्षे अंदाधुंदी माजून राहिली असल्यामुळें शिवाजीच्या राज्यस्थापनेच्या पहिल्या प्रयोगास विजापुरकरांकडून अडथळा झाला नाहीं. अशा रीतीनें इ. स. १६४६ पावेतों हल्लींच्या बहुतेक पुणें जिल्ह्यास वेष्टून शहाजीची जी जहागीर होती तेवढ्या भागांत एक व्यवस्थित व नमुनेदार—नांवानें परतंत्र पण वस्तुतः सर्वांशीं स्वतंत्र—असें राज्य निर्माण झालें.

पुण्याशेजारच्या प्रांतांत शिवाजी व त्याचे अनुयायी यांचा इतक्या थोड्या प्रयासांत अंमल बसला. यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. त्या भागांत नुकतीच जी राज्यक्रांति झाली होती तिचा हा सर्व परिणाम होय. "निजामशाही व आदिलशाही यांमध्यें नीरा नदीची सरहद्द होती. नीरेपासून चाकणपर्यंतचा मुलूख निजामशाहीपैकीं असून तेथें शहाजीचा अंमल होता व तो लोकप्रिय होता. अलीकडे झालेल्या वांटणींत हा मुलूख विजापुरकरांकडे गेला होता; तथापि त्यांचा तेथला बंदोबस्त ढिलाच होता. शहाजीचा अंमल उठून पांच चार वर्षे होतात न होतात तोंच तेथील

लोकांच्या कानांवर शिवाजीचे नांव वारंवार येऊं लागलें. तो काय करतो व करणार इकडे सर्वांची कौतुकपूर्ण दृष्टि वळली. या मुलाचें बरें व्हावें, त्याचा मनोदय सिद्धीस जावा, याला शक्य ती मदत करावी इकडे लोकांच्या मनाची प्रवृत्ति होऊं लागली. निरेच्या अलीकडचा मुलूख शिवाजीला सहजासहजीं मिळवितां आला याचें खरें कारण हेंच होय. सिंहगड, पुरंदर, तोरणा, लोहगड, राजमाची वगैरे मोठमोठे किल्ले या टापूंत आहेत; परंतु यांतील एकहि किल्ला घेण्यास शिवाजीला लढाई करावी लागली नाहीं. फारसा गाजावाजा न करतां किल्लेदाराकडे संधानें लावून तर कोठें लांच देऊन कोठें धाक दाखवून तर कोठें फितूर करून शिवाजीला हे किल्ले हाताखालीं घालतां आले. त्या किल्ल्यांवर शहाजीच्या नेमणुकीचे पूर्वींचे गडकरी लोक होते तेच विजापुरकरांनीं कायम केले होते. त्यांनीं शहाजीचे किल्ले वेळ आली तेव्हां शहाजीच्या मुलाला देऊन टाकले! कोंकणचा मुलूख निजामशाहीपैकीं होता तो सर करतांना शिवाजीला पुष्कळदां वडिलांची पुण्याई अशीच उपयोगी पडली. आबाजी सोनदेवानें कल्याणावर स्वारी केली, तो एक दोन महिन्यांत तो सुभा काबीज करून परत आला सुद्धां! सुभा म्हटला म्हणजे त्याची जागा बरीच बंदोबस्ताची व बळकट असते. त्या सुभ्यांत किल्ले आणि ठाणीं असतात. त्यांतून सरकारी मालमत्ता सांठविलेली असते आणि तिच्या रक्षणाकरितां कांहीं हजार दोन हजार तरी शिपाई ठेवलेले असतात. इतकें असून आबाजीनें कल्याणचा सुभा हां हां म्हणतां सर केला याचा अर्थ काय? अर्थ इतकाच कीं, किल्ल्यांतून व ठाण्यांतून लोक होते त्यांतले पुष्कळ शहाजीच्या नेमणुकीचे पूर्वींचेच होते" (भा. इ. सं. मं. वर्ष १, अंक १ पान ३६–३७).

**नूतन राज्याचा बंदोबस्त.**—(१६४६—१६५४) शिवाजीचा पहिला उद्योग केवळ जहागिरीपुरताच होता. परंतु आजूबाजूचा प्रदेशहि त्याच धर्तीचा असून शिवाजीला तो सर्व सलग्न करून किल्ले, फौजा व राज्यव्यवस्था यांनीं तो मजबूत करावयाचा होता. इ. स. १६४६ पासून पुढें जवळ जवळ आठ वर्षेंपर्यंत शिवाजीचे प्रयत्न ह्या दिशेनेंच चालले होते. इ.स. १६४६ त तोरण्याच्या किल्लेदाराशीं संधान बांधून त्यानें तो किल्ला आपल्या हस्तगत केला व त्याच सुमारास तोरण्याच्या आग्नेयीस तीन मैलांवर राजगड नांवाचा दुसरा एक किल्ला बांधला. ह्या दोन किल्ल्यांचा शिवाजीस बांदल नांवाच्या एका बंडखोर देशमुखास दस्त करण्याच्या कामीं फार उपयोग झाला. सुप्याचा अधिकार शिवाजीचा सावत्र मामा संभाजी मोहिते याजकडे होता. तो शिवाजीला साह्य करण्यास तयार नसल्यामुळें शिवाजीनें त्याला पकडून वडिलांकडे कर्नाटकांत रवाना केलें. चाकण येथें फिरंगोजी नरसाळा नांवाचा किल्लेदार होता त्यास वश करून तो किल्ला शिवाजीनें आपल्या स्वाधीन करून घेतला व नंतर पुढें पुरंदर व सिंहगड हे दोन किल्लेहि असेच युक्तिप्रयुक्तीनें आपल्या कबजांत घेतले.

हळू हळू शिवाजी अधिकाधिक हिंमतीचीं कृत्यें करूं लागला. एकदां त्यानें कोंकणांतून विजापुरास जात असलेला खजिना हस्तगत केला व कांगारी, तिकोना व लोहगड हे किल्ले काबीज करून उत्तरेकडील मावळ प्रांत आपल्या ताब्यांत आणला. ह्याच सुमारास कल्याण प्रांत व त्यांतील किल्लेहि काबीज करण्यांत आले. कोंकणामध्यें शिद्याच्या जुलुमामुळें त्याच्या अंमलास लोक इतके त्रासले होते कीं, त्याच्याच कांहीं सरदारांनीं शिवाजीस त्याच्या मुलखावर स्वारी करून येण्याची भर दिली. त्याप्रमाणें शिवाजीनें शिद्याच्या मुलखांत शिरून त्याचे तळें व घोसाळें हे दोन किल्ले काबीज केले. याच स्वारींत रायरीचा डोंगरहि शिवाजीच्या ताब्यांत येऊन त्या ठिकाणीं त्यानें लिंगाणा नांवाचा एक मजबूत किल्ला बांधला. हाच किल्ला पुढें रायगड नांवानें प्रसिद्धीस आला. एवढेंच करून शिवाजी स्वस्थ बसला नाहीं. शिद्याच्या अप्रियतेचा फायदा घेऊन त्यानें त्याच्या राजापुर बंदरावरहि स्वारी केली, व तें हस्तगत करून विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, रत्नागिरी, खारेपाटण वगैरे ठिकाणीं आपला अंमल बसविला. सारांश, इ.स. १६४६ पासून पुढें तीन चार वर्षांच्या अवधींत शिवाजीनें कल्याणपासून राजापुरापर्यंतचीं कोंकणपट्टींतील मुख्य मुख्य ठिकाणें, तसेंच तेवढ्या टापूंतील घांटमाथ्यावरील मोठमोठे किल्ले हस्तगत केले. नकाशावर वसईवरून इंदापूरपर्यंत एक रेघ काढून, इंदापुरावरून कोंकणांत राजापुरापर्यंत दुसरी रेघ काढली म्हणजे राजापुरापासून वसईपर्यंतचा किनारा ही पायाची रेषा धरून इंदापूरच्या शिरोबिंदूवर जो त्रिकोण होईल तेवढा टापू आतां स्थूल मानानें शिवाजीच्या कबजांत आला होता. (मराठी रियासत पृ. २०५.)

अर्थात् हा शिवाजीचा नवीन उपक्रम विजापुरच्या दरबारास रुचण्यासारखा नव्हता. शिवाजी जेव्हां किल्ले काबीज करून स्वतःच्या मुलखाचा बंदोबस्त करूं लागला तेव्हां त्याचा स्वतंत्र होण्याचा उद्देश स्पष्ट दिसून येऊन त्याला आंतून शहाजीची फूस असली पाहिजे, अशी विजापुरकरांस शंका येऊं लागली.

इ. स. १६४७–४८ च्या सुमारास त्यांनीं शहाजीस पकडून, मुलाचा बंदोबस्त कर नाहीं तर तुला भिंतींत चिणून मारूं अशी त्यास भीती घातली. शिवाजीस हें समजलें तेव्हां त्यानें शहाजहान बादशहाकडे वकील पाठवून त्याची नोकरी करण्यास आपण तयार आहों असें दाखविलें. शहाजहानास शहाजीची व ऐकीव माहितीवरून शिवाजीची योग्यता ठाऊक होती. हे अनकूल झाले असतां विजापुरचें राज्य जिंकण्यास विलंब लागणार नाहीं अशा समजुतीनें त्यानें शहाजीस सोडण्याविषयीं विजापुरच्या सुलतानास पत्र पाठविलें. बादशहाचा हुकूम आल्यावर शहाजीस अपाय करण्याची विजापुरकरांची छाती नसल्यामुळें १६४९ च्या अखेरीस

शहाजीची सक्त कैद कमी होऊन त्यास विजापुरांत नजरेखालीं रहाण्याची परवानगी मिळाली. याप्रमाणें शहाजीच्या जिवावर आलेलें संकट टळलें. तरी जोपर्यंत तो विजापुरांतच होता तोंपर्यंत शिवाजीस विजापुरकरांच्या वाटेस जातां येईना. यामुळे पुढील तीन वर्षे शिवाजीस आपल्या राज्याची अंतर्व्यवस्था करण्यांतच घालवावीं लागलीं असें दिसतें; व नंतरहि १६५५ च्या नोव्हेंबरांत मोरे-प्रकरण हातांत घेईपर्यंत शिवाजीनें कोठें स्वारी केल्याचें उपलब्ध नाहीं. दरम्यान इ. स. १६५२ त विजापुरकरांनीं मात्र शिवाजीस पकडण्याचा एकदां प्रयत्न करून पाहिला. परंतु शिवाजीनें त्यांजकडून आलेल्या बाजी-शामराज नांवाच्या सरदारावर हल्ला करून त्याचा मोड केल्यामुळें तो प्रयत्न फसला.

हा काळ पावेतों शिवाजीचे प्रयत्न आपल्या बापाच्या जहागिरींत स्वतंत्र राज्याची स्थापना करून तिचा बंदोबस्त करण्यांतच खर्च झाले होते. परंतु यापुढें त्यानें आसमंतांतील राज्यांशीं युद्ध करून आपल्या राज्याचा विस्तार करण्यास प्रारंभ केला. हें कार्य साधण्यासाठीं त्यास साहजिकच प्रथम ज्याच्या राज्यांत त्यानें स्वतंत्र राज्य स्थापण्यास सुरवात केली होती त्या विजापुरकरांशीं युद्ध करावें लागलें.

**विजापुरकरांशीं युद्धः**—( १६५५-१६६२ ):—इ. स. १६५२ त विजापुरकरांनीं शिवाजीवर पाठविलेल्या बाजी शामराजास जावळीच्या मोऱ्यांची आंतून मदत होती. शिवाय मावळांतील व कोंकणांतील जो प्रदेश शिवाजीनें आतांपर्यंत हस्तगत केला होता त्याच प्रदेशांत जावळीच्या मोऱ्यांचेंहि वतन असल्यामुळें ह्या मराठे सरदारास आपणाकडे अनुकूल करून घेतल्यानें शिवाजीस पुष्कळ फायदा होणार होता. परंतु सामोपचारानें तो विजापुरकरास सोडीना. तेव्हां शिवाजीनें त्याचा पाडाव करून जावळी आपल्या ताब्यांत घेतली. मोऱ्यांचाहि कांहीं अंशीं शिवाजी प्रमाणें स्वतंत्र होण्याचा प्रयत्न चालू असल्यानें विजापुरकरांनीं मोऱ्यास ह्या प्रसंगीं मदत केली नाहीं. शिवाय त्याच सुमारास औरंगजेबानेंहि विजापूर व गोवळकोंडे राज्यें घशाखालीं घालण्याची तयारी चालविली असल्यामुळें विजापुरकरांस मोऱ्याकडे लक्ष देता आलें नाहीं. औरंगजेबाचा उद्देश जाणून शिवाजीनें त्यास असें लिहिलें कीं आदिलशाहीचा कोंकणांतील भाग तुम्ही मला देत असाल तर आदिलशाहाशीं लढण्यांत मी तुम्हाला मदत करतों. ह्या पत्रास अनुकूल उत्तर न मिळाल्याकारणानें शिवाजीनें मोंगलांचीं जुन्नर व दुसरीं लहान मोठीं गांवें लुटलीं. ह्या कृत्यांमुळें औरंगजेबास शिवाजीचा फार राग आला, परंतु त्याच वेळीं त्यास शहाजहानाच्या आजारीपणामुळें उत्तरेस जाण्याची घाई झाल्यामुळें त्यानें शिवाजीस एक गोडीगुलाबीचें पत्र पाठवून हें भांडण विकोपास जाऊं दिलें नाहीं.

औरंगजेब उत्तरेस जातांच विजापुरकर पुन्हां शिवाजीच्या पारिपत्यास मोकळे झाले. इकडे शिवाजी केवळ जावळी घेऊनच स्वस्थ बसला नव्हता. त्यानें विजापुरकरांच्या वांई प्रांतांतहि आपला अंमल बसविण्याचे प्रयत्न चालविले होते. या वेळीं अफझलखान हा वांई प्रांताचा सुभेदार होता. तो विजापुरास गेला व शिवाजीस पकडून आणण्याची प्रतिज्ञा करून मोठ्या फौजेसह तीन वर्षांपूर्वी नवीन बांधलेल्या प्रतापगड, नांवाच्या पारघांटांतील एका किल्ल्यावर शिवाजी येऊन राहिला होता त्या रोखें निघाला. परंतु त्यास या कामगिरींत यश न येतां तो स्वतःच प्राणास मुकून त्याच्या फौजेची दाणादाण झाली. शिवाजीनें यानंतर पन्हाळा, पवनगड वसंतगड, रांगणा व खेळणा हे विजापुरकरांचे किल्ले एकामागून एक हस्तगत केले व खंडण्या वसूल करीत तो थेट विजापुरापर्यंत गेला. विजापुरकरांनां आतां शिवाजीचा बंदोबस्त केल्यावांचून गत्यंतरच उरलें नाहीं. त्यांनीं शिद्दी जोहार नामक सरदाराची शिवाजीवर योजना केली. परंतु तो शिवाजीस सामील असल्याची शंका आल्यावरून कांहीं दिवसांनीं स्वतः आदिलशहाच शिवाजीच्या पारिपत्यास आला. त्यानें पन्हाळा व पवनगड हे दोन किल्ले परत घेतले, परंतु इतक्यांत शिद्दी जोहारानें बंड केल्याचें समजल्यावरून त्याचा बंदोबस्त करण्याकरितां त्याला कर्नाटकांत जावें लागलें. विजापुरकरांच्या मदतीस मोहिमेंत वाडीकर सावंत, मुधोळचा बाजी घोरपडे व जंजिऱ्याचा शिद्दी हे तिघेहि शिवाजी विरुद्ध विजापुरकरांस सामील झाले होते. यांपैकीं घोरपड्यास तर शिवाजीनें यापूर्वीच देहांत प्रायश्चित दिलें होतें. बाकी दोघे जे राहिले ते आदिलशहा सर्व सैन्यासह कर्नाटकांत निघून गेल्यावर असहाय होऊन शिवाजीस शरण आले.

एकंदरींत विजापुरच्या युद्धांत शिवाजीनें आदिलशाहीवर आपला शह पूर्णपणें बसविला. जेव्हां आदिलशहानें पाहिलें कीं अफझलखान व शिद्दी जोहार यांच्यानें शिवाजीचें कांहीं न होतां उलट आपल्याच फौजेची खराबी होऊन सावंत, दळवी, घोरपडे वगैरे प्रमुख लोकहि शिवाजीच्या ताब्यांत गेले, तेव्हां त्यानें शहाजीस बोलावून आणून त्याच्या मार्फत शिवाजीशीं समेट केला. या तहान्वयें शिवाजीनें जिंकलेला सर्व मुलुख त्याजकडेसच राहिला व इतःपर त्यानें विजापुरच्या मुलुखास त्रास देऊं नये असें ठरलें. आतां शिवाजीच्या ताब्यांत कल्याणपासून गोव्यापर्यंत सर्व कोंकणपट्टी व भीमेपासून वारणेपर्यंतचा देश मिळून दक्षिणोत्तर १६० मैल लांबीचा व पूर्वपश्चिम शंभर मैल रुंदीचा प्रांत आला होता. पन्नास हजार पायदळ, सात हजार स्वार व शिवाय आरमार इतकी त्याची तयारी जमली. शहाजीच्या शिफारशीवरून त्यानें आतां रायगड येथील मजबूत किल्ल्यांत राजधानीसारखी सर्व सोय करून आपल्या सर्व मुख्य कचेऱ्या तेथेंच आणविल्या. वांई, कऱ्हाड, कोल्हापूर इत्यादि ठाणीं शिवाजीच्या हातीं आलीं. घोरपडे, दळवी,

घाटगे वगैरे सरदारांस त्याचा वचक बसला. प्रांताच्या बंदोबस्ताकरितां जागजागीं त्यानें नवीन किल्ले बांधले. शिद्द्यावर आपला तावा कायमचा बसविण्यासाठीं, त्यानें मोठें आरमार तयार केलें.लहान मोठीं (?) पांचशें जहाजें बांधून त्यांचें ठिकाण कुलावा हें केलें. तसेच सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग येथेंहि कांहीं जहाजें ठेवून दिलीं.

**औरंगजेबाशीं सामना** (१६६२–७२)—विजापुरकराशीं तह झाल्याबरोबर शिवाजीनें मोंगलांकडे आपला मोर्चा फिरविला. वस्तुतः शिवाजीनें मोंगलास सहा वर्षांपूर्वीच डंवचलें होतें. परंतु पुढें लवकरच औरंगजेब आपल्या बापाचें राज्य बळकाविण्यांत गर्क झाल्यामुळें इकडे शिवाजीचेंहि विजापुरकराशीं युद्ध सुरू झाल्यामुळें दोघांनांहि इतके दिवस दंड ठोकून आखाड्यांत उतरतां आलें नाहीं. शिवाजी विजापुरकरांचे युद्धांतून मोकळा होतांच त्यानें मोरोपंत पिंगळयाच्या हाताखालीं पायदळ व नेताजी पालकराच्या हाताखालीं घोडेस्वार अशी योजना करून त्यांनां मोंगलांच्या मुलुखांत पाठविलें. मोरोपंतानें जुन्नरच्या उत्तरेकडील सरहद्दीवरचे कित्येक किल्ले हस्तगत केले व नेताजी तर मोंगली मुलखांतून खंडणी वसूल करीत थेट औरंगाबादेपर्यंत चालून गेला. शिवाजीची ही धामधूम पाहून औरंगजेब फारच चिडला व त्यानें शिवाजीचा पाडाव करण्याविषयीं दक्षिणच्या सुभेदार शाएस्तेखान यास निकराचे हुकूम सोडिले. तेव्हां खानानें पुण्यास येऊन तेथें आपली छावणी दिली व चाकणच्या किल्ल्यास वेढा घालून तो सर केला. परंतु खान पुण्यास रहात असतां शिवाजीनें एके रात्रीं गुप्तपणें शहरांत शिरून खानाच्या वाड्यावर छापा घातल्यामुळें खानाला पुण्यांत राहाणें धोक्याचें वाटून त्यानें भीमेकांठीं पेडगांव येथें आपली छावणी नेली. ही बातमी औरंजेबास समजताच त्यानें शाएस्तेखानाची बदली करून त्याच्या जागीं जयसिंगाची नेमणूक केली. इकडे शिवाजीनें एके दिवशीं सुरतेवर अचानक हल्ला करून तेथून यथेच्छ लूट आणली. नेताजी पालकर मोंगलांच्या मुलुखास उपद्रव देत होताच. शिवाजीच्या अरमारानेंहि मक्केकडे जाणाऱ्या मोंगलाच्या गलबतांनां पकडून त्यांपासून खंडणी घेतली. शिवाजीचें मोंगलाशीं युद्ध जुंपलेलें पाहून शिद्दी व विजापुरकर हे दोघेंहि पूर्वीच जुने तह मोडून शिवाजीवर उठले. तेव्हां त्यांची खोड मोडण्याकरितां शिवाजी आपलें आरमार तयार करून बार्सिलोर शहरावर स्वारी करून गेला व तें शहर लुटून चहूंकडे फौजा पाठवून प्रांताच्या मोठमोठ्या शहरांतून त्यानें पैसे आणले.

**औरंगजेबाशीं तह.**—परंतु तेथून शिवाजी पुन्हां महाराष्ट्रांत येऊन पोंचण्यापूर्वीच त्याच्या पारिपत्यासाठीं औरंजेबानें पाठविलेला जयसिंग दक्षिणेंत येऊन पोंचला होता. जयसिंग हा मोठा धोरणी पुरुष असून तो चांगल्या तयारीनिशीं शिवाजीवर चालून आला होता. विजापूरकरांकडून शिवाजीस मदत मिळूं नये म्हणून त्यानें आदिलशाहीचा मुलूख व शिवाजीचा मुलूख यांच्या मध्यें आपलें ठाणें दिलें. व लोहगड, पुरंदर व राजगड या तीन किल्ल्यांच्या दरम्यानचा शिवाजीचा मुख्य मुख्य मुलूख असल्यामुळें तेवढ्यांतच युद्ध चालविलें. अशा स्थितींत मोंगलाशीं तोंड देणें शहाणपणाचें होणार नाहीं असें शिवाजीस वाटलें व त्यानें जयसिंगाची भेट घेऊन, त्याच्या मार्फत औरंगजेबाशीं तहाचें बोलणें लाविलें. शिवाजीला जिंकणें अशक्य आहे; आणखी दोन चार महिने तो कसेंहि भागवून घेईल पण पुढें पावसाळ्यांत तो मोंगलांस पुरे पुरे करून सोडील हें जयसिंग जाणून असल्यानें त्यानें औरंजेबास सल्ला देऊन पुढे दिलेल्या अटींवर शिवाजीशीं तह ठरविला. ह्या तहान्वयें शिवाजीनें २३ किल्ले व ४० लाखांचा मुलूख मोंगलास देऊन १२ किल्ले व ४ लाखांचा मुलुख आपल्याकडे ठेविला आणि संभाजीस फौजेसुद्धां जयसिंगाच्या हाताखालीं नौकरी करण्यास पाठविण्याचें व गरज पडल्यास स्वतःहि फौज घेऊन बादशहाच्या चाकरीस हजर राहण्याचें कबूल केलें. ह्या तहांत घाटमाथ्यावरील विजापूरच्या मुलुखांतून चौथाई व सरदेशमुखी हे हक्क स्वतःच्या खर्चानें वसूल करण्याची बादशहानें शिवाजीस मुभा दिली होती असें बखरींत म्हटलें आहे.

**अवरंगजेबाबरोबरच्या दोस्तीचा रंगपालट.**—जयसिंगाच्या मार्फत ठरलेल्या तहानुसार विजापुरकरावरील स्वारींत शिवाजीनें जयसिंगास चांगली मदत केली. अवरंगजेबानें खुष होऊन शिवाजीला दिल्लीस बोलाविलें. पण या भेटीचें पर्यवसान शिवाजीला कैदेंत टाकण्यांत झालें. ही शिवाजीची गैरहजेरी व संकट म्हणजे नूतन संस्थापित मराठी सत्तेवर मोठाच प्रसंग होय. तथापि अवरंगजेबासारख्या बलाढ्य व दक्ष मोंगल बादशहाच्या तावडींत सांपडूनहि शिवाजी लवकरच सुटून सुखरूप दक्षिणेंत परत आला. अफजुलखानाच्या भेटीप्रमाणेंच हा प्रसंगहि मोठा बिकट असून त्यांतून झालेल्या सुटकेचा विषय अद्भुतरम्य आहे. शिवाजीच्या गैरहजेरींत राज्यकारभाराचीं कामें सर्व अधिकाऱ्यांनीं मोठ्या दक्षतेनें केलीं. वरील प्रसंगानें राज्य चालविण्याचा मराठ्यांच्या अंगीं किती जोम आहे याची परीक्षा झाली; व शिवाजीला मोंगल दरबाराची प्रत्यक्ष माहिती मिळाली, असा या प्रसंगानें दुहेरी फायदा झाला.

या प्रसंगीं अवरंगजेबहि अत्यंत कावेबाजपणानें वागला. हातचें सावज सुटून गेल्यानें क्रोधवश होऊन लढाईचा प्रसंग न आणतां त्यानें पूर्वीचा पुरंदरचाच तह कायम करून शिवाजीच्या राज्यास मान्यता दिली. "त्यांत अवरंगजेबाचा हेतु कांहींहि असो, पण शिवाजीला या मान्यतेचा फार फायदा झाला. विजापूर, गोवळकोंडा, जंजिऱ्याचा शिद्दी वगैरे मुसुलमानी राजे व सर्व लोकसमुदाय शिवाजीला राजा म्हणून मान देऊं लागले. हा फायदा पूर्ण पदरांत पडण्याकरितां शिवाजीनें दोन तीन वर्षे अवरंग-

जेबाशीं सख्य राखिलें. नंतर १६७० मध्यें पुन्हां उत्तरेकडे वळून मोंगलांच्या मुलुखावर चढाई केली व मोंगल सैन्याशीं साल्हेर येथें सामना देऊन त्याचा पराभव केला.

**दक्षिणदिग्विजय** (१६७३–१६८०).–मोंगलांबरोबरचें युद्ध समाप्त झाल्यावर इ. स. १६७४ त शिवाजीनें स्वतःस राज्याभिषेक करवून आपल्या राज्यास लौकिक दृष्टया मान्यता मिळविली. शिवाजीचीं यापुढील दोन अडीच वर्षे राज्याच्या बंदोबस्तांत गेलीं. नंतर १६७६ च्या अखेरीस तो गोवळकोंड्याचा तोफखाना घेऊन कर्नाटकच्या मोहिमीवर निघाला. या मोहिमींत त्यानें जो मुलूख मिळविला त्यांतील कांहीं प्रत्यक्ष विजापुरच्या राज्यांतील होता व कांहीं शहाजीच्या जहागिरीपैकीं होता. शहाजीच्या मरणानंतर त्याच्या जहागिरीचा कारभार शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी हा पहात होता. शिवाजीच्या मनांत शहाजीची जहागीर व्यंकोजीकडून काढून घ्यावयाची नसल्यामुळें व्यंकोजी विजापूरचें अधिपत्य झुगारून देऊन आपली जहागीर मराठी साम्राज्यांत समाविष्ट करण्यास तयार होतांच त्यानें शहाजीची सर्व जहागीर व्यंकोजीकडेच पुन्हां देऊन शिवाय चालू मोहिमींत विजापुरापासून जिंकलेला मुलूखहि त्यानें व्यंकोजीच्या स्वाधीन केला. याचवेळीं शिवाजीनें विजापुरकरांस औरंगजेबाच्या सैन्याविरुद्ध मदत केल्यामुळें त्यांनीं कोपळ, बल्लारी व त्यापुढें दक्षिणेस जिंजी वगैरे जे प्रांत शिवाजीनें काबीज केले होते त्यांवरील व तंजावरच्या जहागिरीवरील आपला हक्क सोडला.

**शिद्द्यांशीं संबंध व आरमाराची वाढ**.—जंजीरा काबीज करून शिद्दयास तेथून हांकून लावावें अशी शिवाजीची फार इच्छा होती, परंतु अखेर पावेतों ती सफळ झाली नाहीं. शिवाजी व शिद्दी यांचे अनेक युद्धप्रसंग झाले व त्यांत कित्येक वेळां शिवाजीनें त्यास जेरीसहि आणलें होतें. तथापि त्याला मोंगलांचें साहाय्य असल्यामुळें त्याचा समूळ उच्छेद होऊं शकला नाहीं. शिद्दी आपल्या पराजयाचा वचपा काढण्याकरितां शिवाजीच्या राज्यांत स्वाऱ्या करून त्याच्या प्रजेची कत्तल करी व त्यांचीं बायकापोरें पकडून त्यांनां बाटवी किंवा गुलाम म्हणून विकी. यामुळें शिवाजीस शिद्दयावर दाब ठेवण्यासाठीं आपलें स्वतंत्र आरमार तयार करावें लागलें. हें आरमार वाढत वाढत इतकें वाढलें कीं, आरंभीं त्यामध्यें मोठीं लढाऊ जहाजें तीन होतीं तीं त्याच्या कारकीर्दीच्या अखेरीस साठांवर गेलीं. मोंगलांचा व विजापुरकरांचा बंदोबस्त करून या आरमाराच्या साहाय्यानें शिवाजी शिद्दयाचें निर्मूलन करणार तोंच इ. स. १६८० त तो एकाएकीं मरण पावला.

**मराठी सत्तेवरील संकट व त्याचें निवारण**.—(१६८०—१७०७) मुसुलमानी सत्तेनें व्यापलेल्या हिंदुस्थानापैकीं एका प्रांताला म्हणजे महाराष्ट्राला पारतंत्र्यांतून मुक्त करणारा शिवाजी १६८० मध्यें मरून मोंगली सत्तेचा व धर्माचा कट्टा अभिमानी अवरंगजेब पुढें आणखी सत्तावीस वर्षें जगला हा दैवविलास चिंतनीय आहे. अवरंगजेब अगोदर मरून शिवाजी आणखी वीस पंचवीस वर्षे जगता तर महाराष्ट्राप्रमाणें इतर प्रांतांनां मुसुलमानी अमलांतून मुक्त करण्याचें अल्पावधींत साधलें असतें असें मानण्यास पुष्कळ जागा आहे. असो; वस्तुस्थिति अशी झाली कीं, शिवाजी अवरंगजेबाच्या अगोदर वारला, इतकेंच नव्हे तर त्याच्या राज्याचा वारस संभाजी हा दुर्व्यसनी अतएव नालायक निघाला. त्याच्या नालायकीची जाणीव असल्यामुळें शिवाजीच्या अंतकाळच्या सुमारास संभाजीऐवजीं त्याचा भाऊ राजाराम याला राज्यावर बसविण्याचें कारस्थान सोयराबाईनें कांहीं मंत्रिमंडळींच्या साह्यानें केलें. पण तें फसून व संभाजी राजा होऊन राज्यकारभारांत अव्यवस्था माजली. या संधीचा फायदा घेण्याकरितां अवरंगजेब स्वतः मोठ्या फौजेनिशीं दक्षिणेंत चालून आला. त्या वेळीं पहिल्या सामन्यांत (इ.स.१६८३–१६८९). संभाजी अवरंगजेबाच्या कैदेंत पडून त्याचा वधहि झाल्यामुळें मोंगलांनां चांगलें यश मिळाल्यासारखें झालें. शिवाय १६८६ मध्यें विजापूरचें व १६८७ मध्यें गोंवळकोंडयाचें हीं दोन्ही मुसुलमानी राज्यें अवरंगजेबानें खालसा केलीं. अवरंगजेबाचा मराठ्यांबरोबर दुसरा सामना १६८९ ते १७०७ पर्यंत झाला. त्यांत आरंभीं संभाजीची बायको व मुलगा अवरंगजेबाच्या हातीं सांपडलीं व मराठी राजा राजाराम याला दूर पळून जाऊन जिंजीच्या किल्ल्यांत मुसुलमानांच्या वेढ्यांत अडकून पडावें लागलें. रायगड, पन्हाळा, विशाळगड, राजगड, तोरणा, सिंहगडा वगैरे किल्ले एकामागून एक मोंगलांनीं घेतले. अशा रीतीनें शत्रू मराठयांच्या घरांत शिरून तें काबीज करून बसला. मराठ्यांच्या हिंमतीची, शौर्याची, धाडसाची, हुषारीची, युद्धकौशल्याची, राज्यकारभारपटुत्वाची, धर्माभिमानाची, स्वातंत्र्यप्रीतीची, हरएक गुणाची परीक्षा होण्याची इतिहासांतली दुसरी वेळ क्वचित् आलेली आढळते. अशा वेळीं शिवाजीसारखा अद्वितीय नेता नसतांहि मराठी राज्याचा मालक राजाराम, त्याचे मंत्री रामचंद्रपंत व प्रल्हाद निराजी, आणि सरदार संताजी घोरपडे, धनाजी जाधव, परसोजी भोसले, हैबतराव निंबाळकर, शंकराजी नारायण (पंतसचीव), वगैरे स्वातंत्र्यवीरांनीं अद्भुतरम्य कामगिरी बजावली. त्यांनीं मोंगल शत्रूला ज्या युद्धनीतीच्या बळावर जेरीस आणून परत फिरविलें व देशाचें स्वातंत्र्य रक्षण केलें, ती गनिमी काव्याची सुप्रसिद्ध युद्धनीति होय. या युद्धनीतीनें मराठ्यांनीं मोंगलापासून आपला मुलुख हळुहळु परत जिंकून घेतला. कोणताच मराठी राज्याचा भाग पूर्णपणें कायमचा ताब्यांत येईना म्हणून अवरंगजेब निराश होऊन आपल्या सरदारांना दोष देत अहमदनगर येथें अखेर १७०७ मध्यें मरण पावला. पण त्यापूर्वीं १७०० मध्यें राजाराम मरण

पावून त्याची स्त्री ताराबाई हिनें आमला मुलगा शिवाजी यास राज्याभिषेक करविला. तथापि राज्याचा खरा वारस संभाजीचा मुलगा शाहू हा औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोगलांच्या कैदेंतून सुटून परत आला; व १७०८ मध्यें ताराबाई व शाहू या दोन पक्षांत युद्धप्रसंग होऊन त्यांत शाहू यशस्वी झाला व सातारच्या राज्यावर आला. आणि ताराबाईनें कोल्हापुरास आपलें स्वतंत्र राज्य स्थापलें.

**पेशव्यांचा उदय व राज्य पद्धतींतील फरक**—१७०८ पासून मराठी सत्तेचा उत्तरार्ध सुरू होतो. त्यांतील विशेष म्हणजे (१) मराठी राजे दुर्बल बनून पेशव्यांच्या हातांत खरी सत्ता जाणें, (२) मराठी राज्याची वाढ मराठी साम्राज्यांत होणें, व (३) त्याबरोबरच शिवाजीनें घालून दिलेली राज्यपद्धति बदलून तिच्यांत फेरफार करणें.

या उत्तरार्धाचें म्हणजे १७०८ पासून १८१८ पर्यंतच्या इतिहासाचे तीन भाग पडतातः (१) पेशव्यांचा उदय व साम्राज्याची स्थापना १७०८–१७६०, (२) पानिपतचा आघात व त्याचें निवारण १७६१ ते १७८५, व (३) मराठी सत्तेचा ऱ्हास व नाश १७८५ ते १८१८.

१७०८ मध्यें मराठी राजघराण्यांत दुफळी झाल्यामुळें मंत्रिमंडळांत व मराठे सरदारांतहि दुफळी झाली. स्वतः शाहूराजा मोगली दरबारांत वाढल्यामुळें दगदग सोसून राज्यकारभाराचें किंवा स्वाऱ्या लढायांचें काम जातिनिशी करण्याचें कर्तृत्व किंवा उमेद त्याच्या अंगीं नव्हती. अशा वेळीं लेखणीबहाद्दर व तरवारबहाद्दर असा सव्यसाची इसम शाहूला पाहिजे होता. बाळाजी विश्वनाथ हा सदरहू गुणांत लायक दिसतांच शाहूनें त्याच्याकडे महत्त्वाच्या कामगिऱ्या देतां देतां अखेर त्यानें त्याला आपला मुख्य प्रधान उर्फ पेशवा नेमिलें. बाळाजीनें प्रथम खटावकराचें व थोरातांचें बंड मोडलें व आंग्र्यास शाहूच्या पक्षास वळविलें. अशा रीतीनें मराठी राज्यांत शांतता व सुव्यवस्था स्थापन करून बाळाजीनें १७१५ पासून दिल्लीकडील कारस्थानांत लक्ष घातलें. औरंगजेबानंतर प्रांतोप्रांतीचे मुसुलमान सरदार बादशाही अंमल झुगारून देऊन स्वतंत्र होण्याची खटपट करूं लागले, व त्यामुळें दिल्लीस अनेक पक्ष उद्भवून बादशाही सत्ता दुर्बल बनली. दिल्लीचे बादशाहा व त्यांचे वजीर सय्यदबंधू यांच्या आपसांतील सामन्यांचा फायदा घेऊन बाळाजीनें शिवाजीचें राज्य व नवीन जिंकलेला खानदेश, गोंडवण, वऱ्हाड, हैदराबाद व कर्नाटक ह्या सर्व मुलुखाची सनद, मोगलांच्या दक्षिणेंतील मुलुखावर चौथाई व सरदेशमुखीचे हक्क मिळविले. हा तह मोठ्या कारस्थानीपणाचा आहे. एकीकडे बाळाजीनें बादशहास दहा लाख खंडणी कबूल करून मोगलांचें मांडलिकत्व पत्करलें, तर उलट चौथाई सरदेशमुखीचें उत्पन्न घेऊन त्याऐवजीं बादशाहाच्या मदतीकरितां पंधरा हजार फौज ठेवण्याचा करार केला. या दुसऱ्या कलमाचा परिणाम वेलस्लीच्या सबसिडियरी सिस्टिमसारखा झाला. बादशाहा मराठ्यांच्या कह्यांत आला, दिल्लीच्या कारभारांत मराठ्यांचा हात शिरकला, व बादशाहाचे शत्रू प्रांतोप्रांतीचे मुसुलमान सरदार यांचा पाडाव करण्याची कामगिरी मराठ्यांनां मिळाली, म्हणजे स्वराज्याबाहेर पडून इतर प्रांत जिंकून घेण्याची संधि आयती मिळाली. तात्पर्य, हा बाळाजीनें मोगल बादशहाबरोबर केलेला तह म्हणजे मराठ्यांनां मिळालेली साम्राज्याची सनदच होय.

हा क्षण मराठी सत्ताधाऱ्यांच्या मोठ्या परीक्षेचा होता. तरवारबहाद्दरांनां पराक्रम करून साम्राज्य कमावण्यास ही सोन्याची संधि मिळाली व तिचें चीज मराठे वीरांनीं करून १७२० ते १७६० या चाळीस वर्षांत दिल्लीअटकेपासून तंजावरापर्यंत मुलुख मराठी सत्तेखालीं आणला. पण त्याबरोबर लष्करी व मुलकी कारभाराची पूर्ण विभागणी करून स्वराज्य व साम्राज्याचा नवा जिंकलेला मुलुख यांत सुधारलेली शासनपद्धति सुरू करणें जरूर होतें. यूरोपांत याच सुमारास ब्रिटिश साम्राज्याची वाढ होत होती. इंग्लंडमध्यें प्रधानमंडळ सर्व सत्ताधारी राहून त्याच्या हुकुमाखालीं सेनापती दूरदूर देशीं पराक्रम करून मुलुख साम्राज्यास जोडीत होते, आणि जिंकलेल्या मुलुखाची व्यवस्था पाहणारे मंत्री व मुलकी अधिकारी निराळे व पगारी होते. वंशपरंपरा अधिकार कोणाकडेंहि चालत नव्हता. उलटपक्षीं मराठ्यांनीं जिंकलेल्या मुलुखांत सरंजामी पद्धति सुरू केली. शिवाजीची कामगारांस रोख तनखा देण्याची व अष्टप्रधानांत कामाची वाटणी स्पष्टपणें करण्याची व्यवस्था बंद होऊन जहागिऱ्या व पिढीजाद नोकऱ्यांची पद्धति सुरू झाली.

**बाजीराव व नानासाहेब पेशवे आणि साम्राज्याची वाढ**.—१७२० ते १७६० पर्यंतचा मराठी इतिहास म्हणजे साम्राज्यवाढीचा इतिहास होय. या कामास मराठ्यांनां दिल्लीकडे उत्तम वाव मिळाला. दिल्लीचे मोगल बादशहा सर्व दुर्बल निघाल्यामुळें वरील सनदेच्या आधारावर उत्तरेकडे मराठी साम्राज्य वाढविण्याचें काम दुसरा पेशवा बाजीराव यानें शिंदे, होळकर, गायकवाड, वगैरे सरदारांच्या मदतीनें केलें. शिवाजीच्या काळापासून युद्धव्यवसायांत कसलेल्या मराठा जातींतील अनेक सरदारांनीं हैद्राबादच्या निजामाचा, जंजिऱ्याच्या शिद्द्याचा, वसईकडील पोर्तुगीजांचा, माळवा व बुंदेलखंड यांतील मुसुलमान सरदारांचा, आणि तालभोपालच्या लढाईत दिल्लीच्या बादशाहाच्या खाशा फौजेचा पराभव केला. सारांश बाजीरावासंबंधानें बिनहरकत असें म्हणतां येतें कीं, "त्याला जय मिळाला नाहीं अशी कोणतीच लढाई तो खेळला नाहीं."

ही मराठ्यांच्या पराक्रमाची बाजू भूषणावह असली, तरी अंतर्गत राज्यव्यवस्थेंत मोठे दोष आढळतात. पहिलें व्यंग सातारकर व कोल्हापूरकर मराठा राजांच्या आपसांतील

तेव्यांचें; व दुसरें बंडखोर मराठे सरदारांचें. शिवाय मराठी सत्तेला अगदीं घराशेजारीं एक जबरदस्त परशत्रु उद्भवला होता. हैदराबादचा निजामउल्मुक हा मोठा पराक्रमी व कारस्थानी सरदार असल्यामुळें दिल्लीच्या दरबारांत त्याला चांगलें वजन होतें व दक्षिणेंत तर तो स्वतंत्र राजाप्रमाणें राहून मराठी राज्यांत सतत वीस वर्षे बखेडे माजवीत होता. या निजामानें कोल्हापूरकरांस आणि चंद्रसेनजाधव, रावरंभा निंबाळकर, त्रिंबकराव दाभाडे, पिलाजी गायकवाड वगैरे मराठे सरदारांस चिथावून व फितवून आणि स्वतः व त्यांच्या मार्फत अनेक लढाया करून मराठी राज्याचें बळ बरेंच खर्ची घातलें. या सर्व बंडखोरांस व निजामउल्मुकासारख्या स्वकर्तृत्वानें व दिल्लीच्या बादशाहाच्या मदतीनें बलाढ्य बनलेल्या निकटवर्ति शत्रूस जमीनदोस्त करून मध्यहिंदुस्थान, माळवा व बुंदेलखंड येथपर्यंत साम्राज्यविस्तार बाजीरावानें केला, ही गोष्ट त्याच्या युद्धकौशल्याची तसेंच कारस्थानपटुत्वाची उत्तम साक्ष पटविते.

याप्रमाणें कामगिरी बजावून बाजीराव १७४० मध्यें वारल्यावर त्याचा मुलगा नानासाहेब पेशवा झाला. स्वराज्य व वाढलेलें साम्राज्य यांचा कारभार नीट चालवून शिवाय साम्राज्य वाढविण्याची जबाबदारी नानासाहेबावर बाजीरावापेक्षां अधिक मोठी होती. पण ती पार पाडण्यास, बाजीराव बहुतेक एकाकी होता, त्याऐवजीं नानासाहेबास त्याच्या रघुनाथराव व सदाशिवराव या भावांचें साहाय्य होतें. नानासाहेबानें युद्धमंत्रि, परराष्ट्रमंत्रि, द्रव्यकोपमंत्रि, आणि रणांगणावर प्रत्यक्ष लढणारे सेनापती अशा निरनिराळ्या अधिकाऱ्यांत कामाची वाटणी केली, त्यामुळें साम्राज्यसंरक्षण व साम्राज्यविस्तार हीं दोन्हीं कामें त्याला व्यवस्थित चालवितां आलीं. शिवाय मागील कारकीर्दीतील कर्जाची फेड व वाढत्या खर्चाची तोंडमिळवणी करण्याचें अवघड काम त्याला करावें लागलें.

उत्तरेकडे शिंदे, होळकर व भोसले या मराठे सरदार घराण्यांची कायमची स्थापना झाल्यामुळें तिकडील मुलखाचा बंदोबस्त चांगला लागला होता. म्हणून नानासाहेबानें प्रथम कर्नाटक, तंजावर, त्रिचनापल्ली, अर्काट, वगैरे दक्षिणेकडील मुलख स्वसत्तेखालीं आणला, आणि रघूजी भोसल्याकडून बंगालवर पांच स्वाऱ्या करवून अलीवर्दीखानापासून बारा लक्ष रुपये व कांहीं प्रांत मिळविला.

**शाहूचा मृत्यु व पेशव्यांस वडीलकीच्या अधिकाराची प्राप्ति.**—सन १७४९ च्या दिसेंबर महिन्याच्या पंधराव्या तारखेस शाहू मृत्यू पावला. मरणापूर्वी तो बरेच महिने आजारी होता. त्या अवधींत आपल्या राज्याचें पुढें काय करावें या चिंतेंत तो निमग्न होता. तत्कालीन परिस्थिति व शाहूची गृहस्थिति पाहतां त्याला अशी चिंता वाटणें अगदीं साहजिक होतें. रामराजास आपल्या गादीवर स्थापण्याविषयीं त्यानें पूर्वींच निश्चय केला होता. आपण मेल्यानंतर आपल्या इच्छेप्रमाणें सर्व व्यवस्था पुढें सुरळीतपणें चालवील व राज्य संभाळील असा कोणी सरदार सर्व राज्याचा शास्ता व नेता म्हणून नेमिला पाहिजे, तसें न करावें तर राज्यांतील बलाढ्य सरदार रामराजास गुंडाळून ठेवून यादवी माजवितील व राज्याचा नाश करतील, हें त्यास स्पष्ट दिसत होतें. हा नेतृत्वाचा अधिकार कोणास द्यावा, या विवंचनेंत तो पडला होता. संभाजीमहाराज व फत्तेसिंग भोसले यांस हें काम झेंपण्यासारखें नव्हतें. दाभाडे, गायकवाड, नागपूरकर भोसले यांपैकीं कोणाच्या हवालीं हें काम करावें तर त्या तिघांस शाहूनें मरणापूर्वी वारंवार निकडीचीं पत्रें पाठविलीं असतांहि कोणी सातऱ्यास आले नाहींत. शेवटीं निरुपाय होऊन त्यानें नानासाहेब पेशव्याच्या हातीं राज्याचा मुख्य अधिकार सोंपविला. राज्याची नांवाची मालकी मात्र आपल्या वंशजांकडे, अखत्यारी आपआपल्या मुलखापुरती ज्या त्या सरदाराकडे, आणि सर्व राज्याची 'वडीलकी' मात्र पेशव्यांकडे, अशी ही महाराजांची योजना होती. पेशव्यांनीं सर्व राज्य संभाळावें, तें संभाळण्याच्या कामीं व वृद्धिंगत करण्याच्या कामीं योग्य दिसेल ती व्यवस्था करावी, व सर्व सरदारांस आपल्या कह्यांत वागवावें असें या वडीलकीच्या अधिकाराचें स्वरूप होतें.

**शाहूच्या आलस्यामुळें सरदारसंस्थानिकांचा उदय.**—अशा रीतीनें मराठी साम्राज्याचीं सूत्रें भोसल्यांच्या घराण्यांतून पेशव्यांच्या घराण्यांत जाऊन प्रधानाधिष्ठित संयुक्त-संस्थानिक-मंडळाचा उदय झाला. एका दृष्टीनें विचार केला तर जें राज्य शिवाजीनें मिळविलें तें शाहूनें गमावलें असाच निष्कर्ष निघतो ! कारण कीं हें संयुक्त-संस्थानिक-मंडळ शाहूनें मरणसमयीं निर्माण केलें: अथवा राज्याच्या स्थायिकपणासाठीं त्यास तें निर्माण करावें लागलें, आणि त्याचा मुख्य अधिकार पंतप्रधानाच्या हवालीं करावा लागला! हें सारें त्याच्या आलस्याचें व अनास्थेचें फल होतें! आपल्या पूर्वजांच्या पराक्रमांचा व त्यांनीं स्थापिलेल्या राज्याचा शाहूस पराकाष्ठेचा अभिमान होता, तें राज्य वृद्धिंगत करण्याविषयीं त्याचा उत्साह वर्णनीय होता तो उदार, शूर, धार्मिक व प्रजावत्सल होता याबद्दल वाद नाहीं. पण एवढे गुण अंगीं असले म्हणजे राजाच्या हातीं राज्य राहतें असें मुळींच नाहीं. राज्य हें करणाऱ्याचें आहे. भोगणाऱ्याचें नाहीं. स्वसुखाविषयीं निरपेक्ष होऊन राजानें प्रत्येक महत्त्वाच्या राजकार्यांत शरीर व मन शिणवावें तेव्हांच त्याचें प्रभुत्व कायम राहतें. पहिल्या तीन राजांप्रमाणें स्वारींत हजर राहून अंगमेहनत व दगदग सोसून सरदार व फौज कह्यांत ठेवणें हें त्याचें कर्तव्य होतें पण तें त्यास झेंपत नव्हतें व आवडतहि नव्हतें. राज्य वाढविण्याचा तर हव्यास मोठा, आणि दगदग तर करावयास नको, अशी त्याची स्थिति होती. त्यामुळें मोंग-

लांवर स्वाऱ्या करून त्यांचे मुलूख जिंकण्याचें काम त्यानें आपल्या सरदारांवर सोंपविलें !

गुजराथ, गोंडवण, नेमाड माळवा, बुंदेलखंड, कर्नाटक, इत्यादि प्रांत कुबीज करण्याविषयीं शाहूनें पेशवे, भोसले, दाभाडे यांस सनदा दिल्या तेव्हांच ते ते मुलूख त्या त्या सरदारांचे झाले. ज्यांची त्यांवर मालकी उत्पन्न झाली ती शाहूस काढून घेण्याचा मार्ग राहिला नाहीं. या सरदारांस सनदा मिळाल्याबरोबर त्यांनीं व त्यांच्या कामगारांनीं शेंकडों सावकार गोळा करून त्यांजकडून कोट्यवधि रुपये कर्ज मिळविलें व हजारों शिलेदारांस अनुकूल करून घेऊन लक्षावधि फौज गोळा केली. ती फौज घेऊन हे सरदार, सावकार व शिलेदार सर्व मिळून त्या त्या प्रांतांत जाऊन रात्रंदिवस मेहनत करून तेथच्या शत्रूंचा बीमोड करून ते ते प्रांत काबीज करिते झाले. त्यांनीं वर्षानुवर्षे झगडारगडा चालवून, हातचें पदरचें भरीस घालून व प्रसंगीं प्राणहि खर्च करून हे प्रांत मिळविले, ते जर छत्रपति मागूं लागले तर ते त्यांस कसे मिळावे! या सरदार वगैरे लोकांचें सर्व नुकसान भरून देऊन व सावकारांचीं कर्जें फेडून प्रांत आपल्या ताब्यांत घेण्याचा शाहूस मार्ग होता, पण त्याला अगणित संपत्ति पाहिजे ती त्याजवळ कोठें होती ? या करितां कोणीं सरदारानें एखादा प्रांत जिंकिला म्हणजे तोच त्याच्या फौजेच्या खर्चास सरंजाम म्हणून नेमून द्यावा, आणि हुजूर खर्चाकरितां कांहीं नियमित रकम त्याजपासून घेत जावी, असा शाहूनें प्रथमपासून प्रघात ठेविला होता. या योगानें सरदार लोकांस व कार्यकर्त्या पुरुषांस अधिक अधिक उत्तेजन येऊन ते राज्य वाढवीत सुटले. शाहू नुसता महाराष्ट्रवादी नसून आपल्या पूर्वजांप्रमाणेंच महत्तरराष्ट्रवादी होता; तो त्याचा हेतु वर सांगितल्याप्रमाणें उत्तम प्रकारें सिद्धीस गेला ! तो गादीवर बसला तेव्हां भीमा व कृष्णा या नद्यांमधील मुलुख देखील धडपणें त्याच्या ताब्यांत नव्हता, पण मरणसमयीं त्याच्या नांवाचा शिक्का काशीपासून रामेश्वरापर्यंत चालत होता! पण हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं, हें सारें राज्य सरदारांनीं मिळविलें असून तें त्यांच्या पूर्ण ताब्यांत होतें. सुघटित व अव्यवस्थित राजसत्तेंतला फरक किती आश्चर्यकारक आहे ! ईस्टइंडिया कंपनीचें राज्य व पेशव्यांचें वगैरे राज्य हीं एकाच नमुन्यावर बनलीं होतीं, पण इंग्रजांच्या राजानें कंपनीचें राज्य लेखणीच्या एका फटक्यासरशीं खालसा करून टाकिलें आणि मराठ्यांच्या राजास सरदारांच्या मुलुखापैकीं एखादा तालुकासुद्धां तक्रारीखेरीज मिळण्याची मारामार!

**शाहूच्या मृत्यूबरोबर एकतंत्रीपणाचा लोप.**— शाहूच्या ज्या सरदारांनीं एवढें अवाढव्य नवीन राज्य संपादिलें ते प्रतिनिधि, दाभाडे, गायकवाड, भोसले व पेशवे हे होत. या सर्वांत पेशव्यांचें प्राबल्य विशेष होतें. किंबहुना बाकीच्या सरदारांनीं जेवढें राज्य मिळविलें जवळ जवळ तितकें एकट्या पेशव्यांनीं मिळविलें होतें. आपल्या अभ्युदयाचा उगम शाहूच्या कृपेपासून आहे हें ओळखून हे सर्व सरदार शाहूशीं नम्रपणानें व आज्ञाधारकपणानें वागत. तें त्यांचें वर्तन सर्वथा औपचारिक होतें असें वाटत नाहीं. त्यांत भक्तीचा व कृतज्ञतेचा अंशहि अर्थात् असला पाहिजे. एवढ्यावरून राज्यांतले हे व दुसरे सरदार शाहूशीं तसे वागत होते तसे ते रामराजाशीं वागतील असा कांहीं नेम नव्हता ! स्वतः रामराजांत कांहीं राम नव्हता, त्या अर्थी नुसत्या पोकळ छत्रपतिपदास कोण जुमानणार ? शाहूचें तेज, दरारा, सारें त्याच्याबरोबर! त्याशीं इमानेंइतबारें वागण्याबद्दल सरदारांनीं घेतलेल्या आणाशपथा त्याच्या मागून गादीवर बसलेल्या रामराजाशीं पाळण्यास हे सरदार बांधले गेले नव्हते ! याचें कारण आपणा पौरस्त्य लोकांचे राजकीय कारभार संस्थाप्रधान नसून ते प्रायः व्यक्तिप्रधान असतात, असें खरेशास्त्री म्हणतात. शपथ घेणारा व घेवविणारा या दोहोंतून एक मेला कीं दुसरा वाटेल तें करण्यास मोकळा झाला ! शाहू मरण्याचा अवकाश कीं पेशव्यासुद्धां हे सारे सरदार रामराजा, सकवारबाई, ताराबाई, व संभाजी या चौघांपैकीं कोणाचे तरी नोकर आपणांस म्हणवून घेणार, आणि स्वच्छंदचारी राजे बनून एकमेकांच्या उरावर बसणार या गोष्टी अगदीं उघड उघड दिसत होत्या.

संभाजीच्या जागीं त्याच्या दत्तकवंशासहि लेखण्याचें पेशव्यानें कबूल केल्यामुळें स्वतः बाळाजी नोकराच्या नात्यानें बांधला गेला व करवीरकर संभाजी मात्र, बेजबाबदार धनीपणा प्राप्त झाल्यामुळें पाहिजे तें करण्यास मोकळा राहिला तो राहिलाच ! त्यानें किती फितूर व दंगे केले तरी पेशवे आपलें राज्य घेतील हें भय त्यास कधींच वाटलें नाहीं !

**पेशव्यांच्या अधिकाराचें स्वरूप.**— पेशवाईच्या अधिकारासारखा अधिकार दुनियेंत कधीं कोणीं चालविला नसेल! पेशवे दिल्लीच्या बादशहाचे सुभेदार, छत्रपतींचे प्रधान व आपल्या स्वतःच्या राज्यापुरते मालक होते. हे तीन विजातीय संबंध एके ठिकाणीं आल्यामुळें पेशव्यांचें राज्ययंत्र बरेंच बिकट व नाजूक झालें होतें! बादशहाच्या नोकरांशीं म्हणजे सुरत, जंजिरा, सावनूर, अर्काट वगैरे संस्थानांच्या नबाबांशीं दोस्त सरकार या नात्यानें त्यांस वागावें लागे. हे संस्थानिक चौथसरदेशमुखीच्या ऐवजीं फक्त खंडणी देण्यास पात्र होते. निजामाशीं पेशव्यांचा संबंध त्याहून अधिक निकट होता. कारण कीं, मोंगलाईच्या सहा सुभ्यांत टाणीं बसवून चौथसरदेशमुखी वसूल परभारें घेण्याचा प्रघात पेशव्यांनीं यापूर्वीं पुष्कळ दिवस पाडला होता. त्यामुळें मोंगलाईचें व पेशवाईचें नफानुकसान एकच असल्यामुळें द्वेषामर्षाचे प्रसंग वारंवार येत. हे सर्व परके संस्थानिक वगळले म्हणजे राज्यांत पेशवाईस स्वतःहूनहि वरिष्ठ अशीं दोन संस्थानें होतीं. त्यांपैकीं पहिलें सातारकर

छत्रपतींचें संस्थान पूर्णपणें त्यांच्या ताब्यांत होतें. पण दुसऱ्या म्हणजे करवीर संस्थानाचा प्रकार निराळा होता. तें संस्थान कोणासहि खंडणी देण्यास पात्र नसून हल्लीं स्वतः पुरतें स्वतंत्र व पृथक् झालें होतें. इतकें असून पुनः शिवशाहीमध्यें त्याचा अंतर्भाव होतच होता! त्या खालचा दर्जा नागपूरकर व अक्कलकोटकर भोसले, गायकवाड, प्रतिनिधि, सचिव, आंग्रे व वाडीकर सावंत इत्यादि संस्थानिकांचा असून ते पेशव्यांच्या बरोबरीचे होते. त्यांनीं जेथपर्यंत राज्यांत कांहीं फंदफितूर केला नाहीं तेथपर्यंत त्यांच्या संस्थानांत ढवळाढवळ करण्याचा पेशव्यांस अधिकार नव्हता. हे सर्व सालिना ठुजवी खंडणी देण्यास पात्र होते. यांपैकीं कांहींजणांस कधीं काळीं तर कांहींस दरवर्षी लष्करी चाकरी करावी लागे. आंग्रे, सचिव व सावंत यांस लष्करी चाकरीचें कलम लागू नव्हतें आस-पास कोठें काम पडलें तर तितक्यापुरती त्यांनीं जुजबी फौजेनिशीं मदत करावयाची असे. तसेंच पाटणकर, घोरपडे वगैरे हुजरातीचे मानकरी होते तेहि सर्व, मानानें पेशव्यांच्या बरोबरीचेच होते. त्यांनींहि जेथपर्यंत फंदफितूर केला नाहीं तेथपर्यंत त्यांच्या वाटेस जाण्याचा पेशव्यांस अधिकार नव्हता. या मानकऱ्यांत मातबर होते त्यांच्या सरंजामांत लहान मोठे तालुके होते. पण गरीब—पांच दहा स्वारांचे धनी—होते त्यांच्या सरंजामास एखादें खेडेंच लावून दिलेलें होतें! हे सर्व मानकरी फक्त लष्करी नोकरी करणारे होते. त्या खालचा दर्जा पेशव्यांनीं ज्यांच्या सरदाऱ्या उत्पन्न केल्या होत्या त्यांचा. ते शिंदे, होळकर, रास्ते, पटवर्धन, विंचूरकर वगैरे असंख्य होते. त्यांवर मात्र नारायणरावसाहेबांच्या खुनापर्यंत पेशव्यांची सत्ता अबाधित चालत होती. हे जे सर्व दर्जांचे लोक वर सांगितले आहेत, त्या सर्वांचा सांभाळ होऊन त्यांचें ऊर्जित व्हावें, त्यांचे परस्परांत कलह होऊन रयतेची पायमल्ली न व्हावी, व ती रयत निर्भय व संतुष्ट रहावी, म्हणून शाहूनें मराठी साम्राज्य ' शिवस्व ' म्हणून पेशव्यांच्या हवालीं केलें. अल्पवयी मुलावर संसाराचा व कुटुंबाचा भार सोपवून एखाद्या मनुष्यानें महायात्रेस जावें त्याप्रमाणें शाहूनें पेशव्यावर राज्य सोंपवून कैलासवास केला. ती जबाबदारी ओळखून पेशव्यांनीं हें ' शिवस्व ' यथाशक्ति संभाळिलें यांत संशय नाहीं. त्यांनीं कोणाच्याहि दौलतीचा अभिलाष केला नाहीं, अपराधावांचून कोणास शासन केलें नाहीं, सामर्थ्यानें उन्मत्त होऊन कोणास पायांखालीं तुडविलें नाहीं, रावापासून रंकापर्यंत सर्वांचे मानमरातब वै सरंजाम यथास्थित चालविले. हें त्यांस मोठें भूषणास्पद आहे. शाहूनें भोसले—गायकवाडांस अधिकार दिला असता तरी याहून अधिक त्यांच्या हातून खचित झालें नसतें! नाना फडनवीस हयात होते तोंपर्यंत पेशवाईचे हे सर्व कायदे निर्बाधपणें चालले.

**शाहूच्या व्यवस्थेंतील दोष:**—शाहूच्या स्वार्थत्यागानें मराठी राज्याचें आत्यंतिक कल्याण झालें असें मात्र मुळींच नाहीं. आजचें मरण उद्यांवर ढकललें गेलें इतकेंच काय तें झालें! असें होण्याचें कारण 'धड ना धनी ना नोकर' अशी पेशव्यांची स्थिति हेंच होय. शाहूच्या ज्या सनदेनें पेशव्यांस अधिकार मिळाला त्याच सनदेनें मराठी राज्यांत आपआपल्या क्षेत्रापुरते असंख्य पेशवे आपोआप निर्माण झाले! राज्यकारभाराचें सर्व चातुर्य काय तें 'जुनें मोडूं नये नवें करूं नये' या वाक्यद्वयांत समाविष्ट होऊन बसलें! महाराजांच्या वेळचे सरंजाम, तैनाता, अधिकार या सर्वांस मिरासदारीचा हक्क प्राप्त झाला! पेशव्यांस एखादा किल्ला पाहिजे असला तरी त्यास किल्लेदाराचा मिराशी हक्क आडवा येऊं लागला! कारण कीं, 'सरकारचें धान्य, खजिना व बंदिवान हे सर्व हवालीं करून घेऊन राखणें व परचक्र आलें तर त्याशीं लढाई करणें हें जेथपर्यंत आपण करीत आहों, जेथपर्यंत आपण राज्याशीं हरामखोरी केली नाहीं, तेथपर्यंत आपणास काढण्याचा पेशव्यांस अधिकार नाहीं,' हें किल्लेकऱ्यास माहीत होतें! एखाद्या शंभर स्वारांच्या पथक्यास तूं स्वारांचें पथक मोडून पायदळाचें पलटण तयार कर असें पेशव्यांनीं सांगितलें तर तो पथक्या म्हणणार कीं, महाराजांच्या वेळेस जसा सरंजाम होता तसा बाळगून मी चाकरी करीत आहे. त्यांत बाहेरची गोष्ट मला करावयास सांगण्याचा तुम्हास अधिकार नाहीं! यद्यपि एखादा पथक्या कबूल झाला, तरी त्याचे कारभारी, मुजुमदार, फडणीस व स्वारसुद्धा असली गोष्ट कबूल करावयाचे नव्हत! कारण तेहि सारे मिरासदारच! महादजी शिंद्यानें पलटणें तयार केलीं तीं दिल्लीच्या बादशहाच्या दौलतीतून! तें काम तो मराठी राज्याच्या उत्पन्नांतून करूं जाता तर मिरासदारांनीं उलट त्याचेंच उच्चाटन केलें असतें! या मिरासदारीमुळें सरदारांस भय नाहींसें झालें, कशीबशी चाकरी करून दिवस काढण्याची चाल पडली, आणि त्यामुळें राज्याची वाढ खुंटली. राज्यांतल्या फौजा गोळा करून पेशव्यानें परमुलुखीं स्वाऱ्या करून महाराष्ट्रांत दौलत आणावी, राज्य वाढवावें, व त्यांतलें तेज व उत्साह कायम राखावा, अशी शाहूची मनीषा होती. एक दोन पेशवे बरे निघाले तोंपर्यंत त्या मनीषेस साफल्य होत गेलें. परंतु पुढें तो प्रकार बंद पडतांच मराठी राज्य इंग्रजांच्या तडाख्यानें कपाळमोक्ष करून घेण्याची वाट पहात बसलें!!!

सातारच्या महाराजांस नामधारी बाहुलें करून पेशव्यांनीं राज्याधिकार भोगला असें म्हणण्याची प्रवृत्ति पडली आहे. परंतु तो केवळ त्यांचाच अपराध नसून त्या कालमहिम्याचा अपराध होता हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. त्या काळची स्थिति पाहतां हैद्राबाद, म्हैसूर, अर्काट, मुर्शिदाबाद, दिल्ली वगैरे ठिकाणीं तोच प्रकार चालू होता असें कोणासहि दिसून येईल. जुने वृक्ष मोडून पडल्यामुळें त्यांच्या बुंध्यां-

पासून नवें कोंब उत्पन्न होऊन जोरानें वर येण्याचा तो काळ होता. असो.

**मराठी सत्तेचा कळस** (१७४८-१७६०).—शाहूच्या मरणानंतर मराठी साम्राज्याचा सर्व हिंदुस्थानभर प्रसार करण्याचा कसून प्रयत्न करण्यांत आला. त्याकरितां सदाशिवराव भाऊ, रघुनाथराव, मल्हारराव होळकर, जयाप्पा व दत्ताजी शिंदे, गोपाळराव पटवर्धन वगैरे सरदार दरवर्षी चातुर्मास्यानंतर मुलुखगिरीसाठीं बाहेर पडत ते पर्जन्यकाळाच्या सुरवातीपर्यंत बहुधा पुन्हा स्वदेशीं परत येत नसत. या निरनिराळ्या मराठे सरदारांनीं मिळून कमींत कमी वेचाळीस तरी मोहिमा केल्या; त्यांपैकीं कांहीं गुजराथेंत, कांहीं कर्नाटकांत, कांहीं निजामावर, व बऱ्याचशा उत्तर हिंदुस्थानावर झाल्या. या सर्व मोहिमांच्या मुळाशीं सर्व हिंदुस्थान देश मराठ्यांच्या सत्तेखालीं आणून त्याचें एकीकरण करावयाचें, हा एकच उद्देश होता. या वेळीं दक्षिणेंत हैद्राबादचा निजाम व म्हैसूरचा हैदर या देश्य शत्रूंशिवाय फ्रेंच व इंग्रज हे परदेशी शत्रू हळू हळू वर डोकें काढूं लागले होते तथापि फ्रेंच व इंग्रज यांच्या कारस्थानांना १७५८ नंतर विशेष रंग चढूं लागला. तत्पूर्वी मराठ्यांनीं निजाम व हैदर यांचा बंदोबस्त बहुतेक दुय्यम प्रतीच्या सरदारांवर सोंपवून विशेष भर उत्तर हिंदुस्थानांतील मोहिमांवर दिला. त्या सर्वांची थोडक्यात फलश्रुति म्हणजे इ. स. १७६० पर्यंत लाहोर, मुलतान, ठठ्ठा, अंतर्वेद, रोहिलखंड, कटक, नागपूर, माळवा, गुजराथ, काठेवाड, खानदेश, औरंगाबाद, विजापूर, कोंकण, व किल्लेकोमलपर्यंत सर्व मुलुख मराठ्यांच्या साक्षात् अमलाखालीं आला. तात्पर्य १७६० सालीं मराठ्यांची सत्ता कळसास पोंहोंचली. यानंतर मराठी साम्राज्याची वाढ खुंटली, त्याच्या अनेक कारणांपैकीं प्रमुख कारण पानपतचा रणसंग्राम हें आहे.

**पानपतचें अरिष्ट**-मराठ्यांनीं १७४८ ते १७६० पर्यंत उत्तर हिंदुस्थानांत केलेल्या स्वाऱ्यांनां साम्राज्यप्रसार करणें हें एक स्वरूप असून शिवाय अफगाणांच्या स्वाऱ्यांनां बांध घालणें हें दुसरें स्वरूप होतें. मराठ्यांनीं आपल्या साम्राज्याची सीमा अटकेपर्यंत पोंहोंचवून दिल्लीच्या पातशाहाला आपल्या संरक्षणाखालीं घेतल्यामुळें हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीचें रक्षण करण्याचें काम त्यांच्यावर पडलें. या कामांत हिंदुस्थानांतील कायमच्या मुसुलमानांनीं मराठ्यांशीं एकनिष्ठपणें सहकार्य केलें असतें तर अबदालीसारख्या बाह्य शत्रूंस पायबंद घालण्याचें काम मराठ्यांनीं सहज केलें असतें. पण हिंदुस्थानांतील मुसुलमानांचा एकपक्षीं समानधर्मी अफगाणांकडे ओढा असल्यामुळें, व दुसऱ्या पक्षीं मराठ्यांच्या दराऱ्याची भीति असल्यामुळें 'त्यांचें दोन दगडावर हात ठेवल्याप्रमाणें वर्तन नेहमीं असे. यामुळें नादीरशहा, अहमदशहा वगैरे सुलतानांच्या स्वाऱ्यांचे आघात उत्तर हिंदुस्थानांतील मुसुलमानी राज्यांनां—दिल्लीच्या पातशाहीला—सोसावे लागले, व उलटपक्षीं पानिपतच्या संग्रामांत हिंदी मुसुलमानांनीं खुल्या दिलानें व एकजुटीनें मराठ्यांस मदत न केल्यामुळें त्यांतहि अबदालीलाच यश मिळालें.

अवरंगजेबानें दक्षिणेंत स्वारी केली, त्या वेळीं मराठ्यांपुढें स्वराज्यसंरक्षणाचा प्रश्न होता, तर अबदालीच्या १७४८ ते १७६१ पर्यंतच्या स्वाऱ्यांच्या वेळीं मराठ्यांनीं स्थापलेल्या हिंदुपदपातशाहीच्या संरक्षणाचा प्रश्न होता. हें व्यापक स्वरूप जाणूनच मराठ्यांच्या सर्व हालचाली चालू होत्या. प्रथम लहान प्रमाणांत सामने होऊन अखेर पानिपतावर उभय पक्ष आटोकाट तयारी करून सज्ज झाले. या पानिपताच्या मोहिमेचें सांगोपांग विवेचन करणारा ग्रंथ सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक राजवाडे यांच्या साधनांचा पहिला खंड आहे. त्यांत येऊन गेलेल्या मजकुराची सोप्या तऱ्हेनें मांडणी सरदेसाई यांनीं आपल्या मराठी रियासतीच्या भागांत केली आहे. सरदेसाई यांच्या पुस्तकावर परीक्षण म्हणून केसरी पत्रांतहि या प्रकरणाची छाननी केली आहे. सरदेसाई राजवाड्यांचें सर्व म्हणणें कबूल करतात. पण गोविंदपंत बुंदेले यांस ते राजवाडे देतात तितका दोष देत नाहींत. केसरीकार, राजवाडे व सरदेसाई यांच्यांतील वाद तोडण्यासाठीं निष्कर्ष काढतात तो येणेंप्रमाणें.—

१ भाऊसाहेबांनां या मोहिमेवर पाठविण्यांत पेशव्यांची चूक झाली असें म्हणतां येत नाहीं. २ या मोहिमेवर जातांना भाऊंनीं इब्राहिमखानास बरोबर घेतलें नसतें तर कुंजपुरा सर करीपर्यंत त्यांनां जें अभंग यश येत गेलें तितकेंहि यश त्यांस आलें नसतें. ३ इब्राहिमखानाची कवायती फौज बरोबर घेतांना गनिमी काव्यानें लढण्याचा प्रसंग आल्यास तोफखाना सोडून जाणार नाहीं असें त्यास वचन देणें व तें पाळणें अवश्य होतें; मात्र त्या वचनाची व्याप्ति व मर्यादा काय याची उभयतांसहि यथार्थ कल्पना नसल्यामुळें आयत्या वेळीं गोंधळ उडाला. ४ पानिपतच्या अपयशाचें सर्व खापर गोविंदपंत बुंदेल्यांवर फोडणें गैरवाजवी आहे. अंतर्वेदींतील कार्याचें महत्त्व जाणून एखादा अनुभवी सरदार गोविंदपंताच्या साहाय्याला पाठविण्यांत आला नाहीं ही भाऊसाहेबांनीं घोडचूक केली. ५ कुंजपुऱ्यावर चाल करून जातांना यमुनेला एक महिना पायउतार होत नाहीं अशी भाऊसाहेबांनीं जी माहिती मिळविली होती ती खोटी ठरली. पण त्याचा दोष भाऊसाहेबांस देतां येत नाहीं. मात्र पुढील सर्व अनर्थांचें बीज या आकस्मिक चुकींत सांठवलें आहे. ६ भाऊसाहेब पानिपतावर कोंडले गेल्यावर दक्षिणेंतून कुमक मागविण्यास त्यांनीं दिरंगाई केली, किंवा पेशव्यांनीं मदत पाठविण्यास विलंब लावला हें ठरविण्यास खात्रीलायक पुरावा नाहीं. यामुळें यांत भाऊसाहेब किंवा नानासाहेब या दोहोंतून कोण दोषी ठरतो तें सांगतां येत नाहीं. ७ अखेरच्या रणधुमाळीपर्यंत भाऊसाहेबांनीं आपल्या सैन्याची व्यवस्था परिस्थितीच्या मानानें, शक्य तितकी चांगली ठेवली होती; आणि

सैन्यांतले सगळे सरदारहि आपापलीं कामें बिनतक्रार करीत असत. ८ पानिपतास राहणें अशक्य झाल्यानें सगळ्या सैन्याचा गोल बांधून आत्मसंरक्षणार्थ जरूर तेवढें झुंज करीत करीत दिल्लीस निघून जाण्याखेरीज मराठ्यांस अन्य मार्ग राहिला नव्हता; व भाऊसाहेबांनींहि तीच योजना सर्वानुमतें ठरविली. ९ पीछेहाट करतांना तोफखान्याचा उपयोग कितपत करावयाचा; आणि तोफखाना, पायदळ व घोडदळ या तीनहि अंगांचा मेळ कसा राखावयाचा याची, गैर रावत्यामुळें आगाऊ नक्की शहानिशा करण्यांत आली नाहीं. त्यामुळें दुसरे दिवशीं घोटाळा उडून पानिपतचा महा अनर्थ गुजरला. १० पूर्वीचा बेत आयत्या वेळीं बदलला तरी विश्वासराव गतप्राण होईपर्यंत बहुतेक सर्व सरदार कुचराई न करतां शौर्यानें लढले. ११ विश्वासरावास गोळी लागण्याचे पूर्वीच मराठे थकून जाऊन त्यांचें पारडें मुसलमानांकडे झुकूं लागलें होतें. विश्वासरावास गोळी लागली नसती तरी मराठे जर युद्धांतून पाय काढून दिल्लीचा रस्ता लवकर न सुधारते तर त्यांचाच पराजय झाला असता. १२ सदाशिवराव एकाद्या शिलेदाराप्रमाणें ज्या वेळीं युद्धांत घुसले, त्या वेळीं सैन्याची स्थिति त्यांच्या आंवाक्याबाहेर गेली होती. भाऊसाहेब गर्दीत घुसल्यामुळें लढाई बिघडलेली नसून लढाई बिघडलेली पाहून निराशेनें ते गर्दीत घुसले.

**विस्कळित घडी सांवरण्याचा प्रयत्न.** (१७६१–१७७२).—पानिपतच्या पराभवानें मराठशाहीची घडी जी एकदां विस्कळीत झाली ती पुन्हां नीट कधीं बसली नाहीं. शाहूच्या मृत्यूनंतर मराठशाहीच्या शासनपद्धतींत जें एक विचित्र प्रकारचें स्थित्यंतर झालें, त्याला यशस्वी व चिरस्थायी स्वरूप देण्याकरितां पेशव्याच्या जागीं चांगल्या मुत्सद्दी व वजनदार माणसाची जरूर होती. हें कार्य साधण्यास लागणारे गुण नानासाहेब पेशव्यांत होते. परंतु तो मराठशाहींत एकसूत्रीपणा आणून देण्याची कांहीं खटपट करतो न करतो तोंच पानिपतच्या पराभवानें मराठशाहीस व खुद्द नानासाहेबांच्या मनासहि जबर धक्का बसला. नानासाहेब तर पानपतनंतर थोडक्याच महिन्यांनीं मरण पावला. परंतु मराठशाहीस थोरला माधवराव व नानाफडणवीस यांच्यासारखे कर्तृत्ववान्, पाठीराखे मिळाल्यामुळें तिचें मरण सुमारें अर्धशतक पुढें ढकललें गेलें. यांपैकीं थोरल्या माधवरावाच्या अंगीं शूरत्व व मुत्सद्दीपणा हे दोन्हीहि गुण योग्य प्रमाणांत वास करीत होते. मराठशाहीच्या शत्रूंनीं चहूं बाजूंनीं उचल खाल्ली होती व जानोजी भोसले, रघुनाथरावदादा यांच्यासारखी खुद्द मराठशाहींतलीच मंडळी शत्रूंशीं संगनमत करून मराठशाहीच्या मूळावर घाव घालीत होती, तरी त्या सर्वांचा बंदोबस्त करून मराठशाहीस पानिपतच्या पराभवापूर्वीचें वैभव प्राप्त करून देण्याच्या कामीं बरेंच यश मिळवितां आलें. तथापि काळाचा त्यावर अकस्मात घाला येऊन मराठशाहीच्या शासनपद्धतींस चिरस्थायित्व प्राप्त करून देण्याचें काम तसेंच अर्धवट राहिलें. माधवरावाच्या मृत्यूनंतर पेशव्यांच्या घराण्यांत कोणी कर्तृत्ववान् पुरुष निपजला नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्या घराण्यांतील पुरुषांतच अधिकारप्राप्तीकरितां इतकी चुरस लागली कीं, तीच शेवटीं विकोपास जाऊन तिनें मराठशाहीची पूर्णाहुति घेतली. नानाफडणविसाची कामगिरी ही कीं, ती अशा परिस्थितींतहि मराठशाहींतील मानानें केवळ आपल्याच नव्हे तर आपल्या धन्यांच्याहि बरोबरीच्या सरदारांवर वचक ठेवून त्यांच्या करवीं हैदर, निजाम व इंग्रज या तीनहि प्रबळ शत्रूंशीं टक्कर देववून मराठशाहीचें वैभव आणखी वीस पंचवीस वर्षें टिकवूं शकला. परंतु अंतःकलहानें मराठशाहीची इमारत इतकी पोखरली गेली होती कीं, ती नानाफडणविसासारख्या बिनलढवय्या व दुय्यम अधिकाराच्या जागेवर काम करणाऱ्या माणसाच्या हातून फार दिवस शाबूत राखली जाणें शक्य नव्हतें. थोरल्या माधवरावाच्या मृत्यूबरोबरच मराठशाहीचें वैभव पुन्हां प्राप्त होण्याची आशा नष्ट झाली, व त्यानंतर मराठशाही किंवा मराठ्यांचें साम्राज्य ही कल्पना केवळ तिच्या नांवातच अवशिष्ट राहिली. अर्थात् थोरल्या माधवरावाच्या मृत्यूनंतरचा पेशवाईचा इतिहास, मराठशाहीचा ऱ्हास व नाश याच सदराखालीं येतो.

मराठ्यांचा विस्कळित घडी सांवरण्याच्या प्रयत्नाचा इतिहास यावयाचा म्हणजे माधवरावानें उचल करून उठलेल्या निजामाचा, हैदराचा व उत्तरेंतील संस्थानिकांचा बंदोबस्त कसा केला हे सांगितले पाहिजे. हा इतिहास येणेंप्रमाणें:—

माधवरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं तेव्हां तो अल्पवयी असल्यामुळें त्याचा चुलता रघुनाथराव हा सर्व कारभार पाहूं लागला. पण लवकरच चुलत्यापुतण्यांचें जमेनासें होऊन रघुनाथरावानें निजामाच्या मदतीनें आपल्या पुतण्याचा पराभव करून सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली. तथापि माधवरावाचें तेज फार दिवस छपून राहिलें नाहीं. लवकरच ताराबाईच्या मृत्यूमुळें जानोजी भोसल्यास सातारच्या निर्माल्यवत् झालेल्या रामराजास बाजूस सारून मराठशाहीचीं सूत्रें आपल्या हातीं घेण्याची इच्छा झाली; व तो निजामाची मदत घेऊन रघुनाथरावावर चालून आला. तेव्हां निजाम व पेशवे यांच्यामध्यें १७६३ सालीं राक्षसभुवन येथें जी लढाई झाली, तींत मुख्यत्वें करून माधवरावाच्या कर्तबगारीनेंच निजामाचा पूर्णपणें मोड होऊन मराठ्यांस जय मिळाला. या लढाईंत माधवरावाच्या कर्तबगारीबद्दल निजामाची व रघुनाथरावाची खात्री होऊन त्यांच्याकडून माधवरावास त्याच्या हयातींत म्हणण्यासारखा त्रास झाला नाहीं. या प्रसंगीं भोसल्यानें आयत्या वेळीं पेशव्याच्या पक्षास मिळून त्यांच्याकडून जो मुलूख उकळला होता, त्यांपैकीं बराचसा

माधवरावानें १७६६ त व पुन्हां १७६९ त त्यावर स्वारी करून परत मिळविला.

मराठ्यांचा पानिपतच्या मोहिमेंत पराभव झाल्याचें ऐकून दक्षिणेंत हैदर नामक म्हैसूरच्या राज्यांतील एका बंडखोर सरदारानें, माधवराव अंतःकलहाचा व निजामाचा बंदोबस्त करण्यांत गुंतलों होता तोंपर्यंत तुंगभद्रेच्या पलीकडील मराठ्यांच्या स्वराज्यांतला शिराचा सुभा हस्तगत करून तुंगभद्रेच्या उत्तरेस कृष्णानदीपर्यंतचा मराठ्यांचा मुलुख काबीज केला होता. त्याचा बंदोबस्त करण्याकरितां माधवरावानें त्यावर १७६४पासून १७७२पर्यंत जातीनें मोहिमा केल्या व त्यांच्यापासून शिवाजीच्या मरणसमयीं शिवाजीच्या ताब्यांत जितका मुलूख होता त्यांपैकीं बेंगरूळ परगणाखेरीजकरून बाकीचा सर्व म्हणजे शिरें, होसकोटें, थोरलें बाळापूर व कोल्हापूर हे चार परगणे व स्वतः हैदरच्या मुलुखापैकीं मदगिरी व गुरमकोंडा हे भाग मिळविले व बरीचशी खंडणीहि वसूल केली.

पानिपतच्या लढाईनंतर उत्तरप्रांतीं रोहिले, पठाण, अयोध्येचा नबाब व इंग्रज या सर्वांनीं मराठ्यांचें वर्चस्व कमी करण्याचा व त्यांचा मुलुख बळकाविण्याचा उपक्रम आरंभिला होता; व माळव्याच्या उत्तर, वायव्य व पश्चिम सरहद्दीवर रजपूत संस्थानिक, जाट व बुंदेलखंडातील संस्थानिक यांनीं बंडाळी माजविली. या सर्वांचा बंदोबस्त करणें पेशव्यांस भाग होतें. यासाठीं उत्तरहिंदुस्थानांत पहिली मोहीम रघुनाथराव दादाच्या आधिपत्याखालीं इ. स१७६५स झाली. पण केवळ खेचींवाड व गोहद या दोन ठिकाणच्याच संस्थानिकांचें पारिपत्य करून व विठ्ठल शिवदेवास मागें ठेवून रघुनाथराव परत आला. म्हणून १७६९ त रामचंद्र गणेश कानडे यांच्या नेतृत्वाखालीं उत्तरहिंदुस्थानांत पुन्हां फौज रवाना करण्यांत आली. तिनें पुढील तीन वर्षांत उदेपूरकरांकडून २० लक्ष रुपये रोख खंडणी व ४० लक्षांकरितां राज्यांतील निरनिराळ्या प्रांतांवर तनखे करून घेतले; बुंदी व कोटा येथील संस्थानिकांपासून खंडण्या मिळविल्या; भरतपूरच्या जाटांचा पराभव करून ६५ लक्ष खंडणी आणि त्यानें बळकाविलेला आग्रा प्रांत व किल्ला परत घेतला; दोआबांतल्या अहमदखान बंगषास जेर करून त्यानें १७५१ त स्वतः दिलेल्या १६॥ परगण्यांपैकीं जेवढा मुलुख बळकाविला होता तेवढा त्यापासून सोडविला; गंगापार रोहिल्यांच्या मुलुखांत लुटालूट, कत्तल व जाळपोळ करून पानिपतचा पुरा सूड उगविला आणि शहाअलम बादशहास दिल्लीच्या तख्तावर बसवून पेशव्याचा भाऊ नारायणराव याकरितां मीरबक्षीगिरी हें पद मिळविलें.

**नारायणराव व सवाई माधवराव यांच्या कारकीर्दी.**—वर सांगितल्याप्रमाणें थोरल्या माधवरावानें पानिपत येथील पराभवामुळें मराठशाहीचें जें नुकसान झालें तें भरून काढण्याचे प्रयत्न चालविले असतां तो इ. स. १७७२ त क्षयरोग होऊन थेऊर येथें मरण पावला. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा भाऊ नारायणराव पेशवा झाला, पण फार दिवस झाले नाहींत तोंच तो आपल्या चुलत्याच्या कारस्थानास बळी पडला. त्याच्या वधानंतर नाना फडनवीस, सखाराम बापू वगैरे मंडळींनीं पेशवाईतील सर्व सरदारांच्या सल्ल्यानें थरवुडच्या राघोबादादास पेशवा न होऊं देतां नारायणरावाची स्त्री गंगाबाई गरोदर होती तिच्या नांवानेंच राज्यकारभार चालविण्याचा कट केला. तेव्हां राघोबादादानें इंग्रजांची मदत घेऊन अधिकारारूढ होण्याची खटपट चालविली. यामुळें इंग्रजास अंतःकलहानें व स्वार्थपरायणतेमुळें खिळखिळ्या झालेल्या मराठशाहीच्या राज्यकारभारांत हात घालण्यास आयतीच संधि मिळाली व त्यांनीं मराठ्यांशीं युद्ध सुरू केलें. मराठशाहींतील तुकोजी होळकर, महादजी शिंदे वगैरे जुन्या व प्रबळ सरदारांनीं आपआपल्या जहागिरींचा स्वतंत्रपणें विस्तार करून स्वतःचीं राज्यें स्थापण्याचा यापूर्वींच उपक्रम केला होता, तरी ते सर्व पेशव्यांच्या निर्मितीचे सरदार असल्याकारणानें त्यांच्या मनांतून पेशव्यांच्या गादीचा व त्याबरोबरच मराठशाहीचा अभिमान अद्याप नष्ट झाला नव्हता; व शिवाय प्रत्येकाचें वैयक्तिक हितहि पेशव्यांच्या नामधारी छत्राखालीं एकत्र होऊन इंग्रज आदिकरून शत्रूंशीं लढण्यांतच आहे हें न समजण्याइतके ते अदूरदर्शीहि नव्हते. यामुळें त्यांची आपसांत बरीच चुरस असतांहि ते इंग्रजांशीं सामान्यतः एकजुटीनेंच लढले व म्हणून इ. स. १७८२ त त्यांच्या मधील लांबलेलें युद्ध संपून इंग्रजाशीं सालबाई येथें तह झाला तो मराठ्यांस विशेषसा अहितकारक झाला नाहीं. या नंतर मराठ्यांनीं निजामाच्या मदतीनें १७८५ त टिपूवर पहिली मोहीम व नंतर १७९०–१७९२ मध्यें इंग्रज व निजाम यांच्या मदतीनें दुसरी मोहीम करून त्याचा पक्का बंदोबस्त केला, व अखेर १७९५ त खर्ड्याच्या लढाईंत निजामाचा पूर्णपणें पराभव करून त्याचीहि रग जिरविली.

**मराठी सत्तेचा ऱ्हास व नाश.**—खर्ड्याची लढाई ही जींत सर्व मराठे सरदार एकत्र झाले होते अशी शेवटचीच लढाई होय. तिच्यानंतर लवकरच ज्याचें नांव पुढें करून नाना फडनवीस पेशवाईतील सरदार कसे बसे एकत्र करूं शकत होता तो नारायणराव पेशव्याचा पुत्र सवाई माधवराव मरण पावला. महादजी शिंदे खर्ड्याच्या लढाईच्या अगोदर मृत्यु पावला होता व तुकोजी होळकरहि, खर्ड्याच्या लढाईनंतर दोनच वर्षांनीं म्हणजे इ. स. १७९७ त स्वर्गवासी झाला. विपत्तीच्या दिवसांत पेशवाईचे केवळ आधारस्तंभच असलेले हे दोन कर्ते पुरुष नाहींसे झाल्यामुळें नाना फडनविसासारख्या 'अर्ध्या शहाण्या' पुरुषास मराठशाहीच्या ढासळणाऱ्या इमारतीस टेकू देणें अशक्यप्राय झालें व जिकडे तिकडे बेबंदशाही माजून सुमारें पांच वर्षांच्या अवधींतच

इंग्रजांच्या हातीं मराठशाहीचीं सूत्रें देणाऱ्या वसईच्या तहावर बाजीराव पेशव्यानें सही केली.

या नंतर १८०२ ते १८१८ पर्यंतचा मराठ्यांचा इतिहास म्हणजे मरणोन्मुख माणसाच्या अन्तकालीन धडपडीसारखा आहे. वसईचा तह बेकायदेशीर ठरवून उत्तरेकडील मराठशाहीच्या अभिमानी सरदारांनीं इंग्रजांशीं शत्रुत्व चालू ठेविलें व त्यामुळें बाजीरावालाहि लाज वाटून त्यानें पुन्हां दक्षिणेंत इंग्रजांशीं सामना दिला. मण या धडपडींत एकसूत्रीपणा, परस्पर विश्वास व सहकार्य नसल्यामुळें इंग्रजांनीं मराठी साम्राज्याच्या प्रांताधिकाऱ्यांशीं पृथक् पृथक् सामने करून एकेक तुकडा घशांत टाकला. अशा सार्वत्रिक विनाशकालीं शिंदे, होळकर, गायकवाड, पटवर्धन, वगैरे कांहीं ब्राह्मण मराठे यांनीं अधिक बाणेदारपणानें व धूर्तपणानें वागून स्वतःच्या जहागिरी कायम राखल्यामुळें मराठेशाहीचें अल्पस्वल्प स्मारक आज पहावयास मिळतें.

**मराठी सत्तेच्या नाशाचीं कारणें**—या कारणांचा सविस्तर उहापोह रा. नरसिंह चिंतामण केळकर यांनीं आपल्या 'मराठे व इंग्रज' या पुस्तकांत केला आहे. इंग्रजांनां व्यापारास परवानगी देणें व प्रसंग विशेषीं इंग्रजांची मदत घेणें, हीं कारणें किंवा जातिभेदामुळें राज्यनाश झाला, हें कारण अग्राह्य ठरवून केळकर म्हणतात, "आमच्या मतें राज्य जाण्याचीं खरीं कारणें मुख्य अशीं दोनच आहेत. पहिलें, मराठ्यांमधील सवत्या सुभ्याची आवड आणि जुटीचा, शिस्तीचा व राष्ट्राभिमानाचा अभाव; आणि दुसरें, कवाइती लष्कर आणि सुधारलेली युद्धसामुग्री यांचा अभाव. कवाइती फौजा व सुधारलेला तोफखाना मराठ्यांजवळ व शीखांजवळ होता हें सिद्ध आहे. या बाबतींत हिंदी राजे फारसे मागासलेले राहात नसत. जपान व चीन लष्करी बाबतींत मागासलेले असूनहि स्वतंत्र राहूं शकले, तेव्हां हें स्वातंत्र्यनाशाचें प्रधान कारण होऊं शकत नाहीं. सरंजामी राज्यपद्धति व सवत्या सुभ्याची आवड या गोष्टींची पुनरावृत्ति जगाच्या इतिहासांत अनेक ठिकाणीं आढळते. साम्राज्यें वाढलीं म्हणजे दूरदूरचे प्रांत स्वतंत्र होण्याची धडपड करणारच. आजचें विसाव्या शतकांतलें ब्रिटिश साम्राज्य त्याच पेंचात सांपडलेलें आहे. तथापि साम्राज्याला लगाम घालणारी मध्यवर्ति सत्ता खंबीर असली म्हणजे सर्व सुरळीत चालतें. प्रांतिक स्वातंत्र्य व मध्यवर्ति सत्ता यांचा मेळ घालून सुसंघटितता राखणें ही जबाबदारी केंद्रवर्ति सत्तेवर असते. बाजीराव, नानासाहेब व नाना फडनवीस यांनीं हीं कामें बऱ्याच हुषारीनें केलीं. पानिपतावर (१७६१) व खर्ड्यांच्या रणमैदानावर (१७९५) दूरदूरच्या मराठी फौजा एकत्र जमू शकल्या; आणि दुसऱ्या बाजीरावाच्या वेळीं मात्र इंग्रजांबरोबर बाजीराव, होळकर व शिंदे पृथक् पृथक् लढले! याचा गुणदोष केंद्रवर्ति सत्तेकडे आहे. कित्येक वेळीं मराठे सरदारांनीं लष्करी मदत देण्यांत कुचराई किंवा कधीं कधीं तर प्रत्यक्ष फितुरी केली. पण असले कुचराईचे प्रसंग गेल्या महायुद्धांत ब्रिटिश प्रधानमंडळालाहि गोड बोलून व राजकीय हक्क देऊं करून निभावून घ्यावे लागले.

प्रत्यक्ष फितुरीला देहान्त प्रायश्चित्त शिवाजीनें अनेकदां दिलें. आजहि ब्रिटिश प्रधानमंडळ देतें. रघुनाथराव, दुसरा बाजीराव, किंवा रघूजी भोसले, अमात्यांची उपेक्षा केली गेली हा मराठा मध्यवर्ति सत्तेचा मोठा दोष होय. तात्पर्य, मराठेशाहींत शिवाजीनंतर मध्यवर्ति सत्ता असावी तितकी जोरदार नव्हती, हें राज्यनाशाचें प्रधान कारण आहे. राज्यशासनशास्त्रांत यूरोपमध्यें १७।१८।१९ व्या शतकांत फार प्रगति झाली. ब्रिटिश मुत्सद्दी साम्राज्य चालविण्याची अवघड प्रश्न मोठ्या चतुराईनें सोडवीत आहेत. हिंदुस्थानांत अशोक हर्षवर्धनासारखे कर्तृत्ववान् सम्राट अनेक झाले पण त्याबरोबर अराजकीहि अनेकदां माजली. कारण, शुक्रनीतीपासून रामचंद्रपंताच्या 'राजनीती' पर्यंत सर्व शासनशास्त्रविषयक ग्रंथांनीं कर्तृत्ववान् सम्राटाने राज्य कसें करावें हें उत्तम दिलें आहे, पण सम्राट दुर्बल निघाला तरी 'राज्यकारभार उत्तम रीतीनें कसा चालवावा हा अवघड प्रश्न कोठेंच सोडविला नाहीं. शिवाजीनें अष्टप्रधानमंडल, पगारी नोकर, वगैरे घालुन दिलेल्या पद्धतीऐवजीं जहागिरी, वतनें, व वंशपरंपरा अधिकार ही पेशवाईंतील पद्धति हें राज्यनाशाचें एक जबरदस्त कारण आहे. शाहूनें व पेशव्यांनीं सुरू केलेल्या सरंजामी पद्धतीचे दोष रा. वासुदेवशास्त्री खरे यांनीं दाखविले आहेत ते येणें प्रमाणें: "सरदारांचें लक्ष्य सरकारी कामावरचें उडून आपापल्या सरंजामाकडे वेधलें गेलें; सरंजामदार मगरूर होऊन भलत्याच उलट्या गोष्टी सांगूं लागले आणि स्वतंत्र होण्याची इच्छा करूं लागले; त्यामुळें राज्यांतलें ऐक्य नाहींसें होऊन राज्य बुडालें असें कांहीं लेखकांचें म्हणणें आहे, तें सर्वांशीं खरें नाहीं. तसेंच सरंजामी पद्धत सुरू केल्याचा दोष एकट्या शाहूवर अथवा पेशव्यांवरहि लादणें वाजवी नाहीं. मध्यवर्ति सत्ता खंबीर असली म्हणजे सरंजामी काय आणि इतलाखी काय, सर्वच नोकर नम्र व कर्तव्यतत्पर असतात. शिवाजीनें आपल्या सरदारांस सरंजाम दिले नसले तरी देशमुखीसारखीं वतनें दिलीं होतीं. आणि त्या वतनांबद्दल सरदारांस लष्करी चाकरी करावी लागे. हीं वतनें म्हणजे लष्करी सरंजामच नव्हेत काय? त्या वेळीं सर्व हिंदुस्थानांत कमीजास्त मानानें, हा सरंजाम देण्याची पद्धति प्रचलित होती. गुजराथ, माळवा, बुंदेलखंड यांतले संस्थानिक आपणास दिल्लीच्या बादशहाचे सरंजामदारच म्हणवीत होते. रोहिले पठाण व शीख यांचे सरदार सर्व सरंजामीच होते. मग शाहूनें अगर पेशव्यांनीं रोख पैका देण्याची सोय नसल्यामुळें आपल्या सरदारांनां सरंजाम तोडून दिले यांत काय बिघडलें!"

"सरंजामी पद्धत जारीनें अमलांत आल्यामुळें तिच्या योगानें परिणामीं राज्यास बळकटी यावी ती न येतां दुर्बळपणाच आला असें मीहि म्हणतों. पण माझ्या म्हणण्याचा अर्थ मात्र निराळा आहे. अजमासें १७२०।२५पासून १७६० पर्यंत मराठ्यांच्या परमुलखीं स्वाऱ्या होत होत्या. जो मुलुख ज्या सरदारानें काबीज करावा तोच मुलुख त्या सरदारास महाराजांनीं सरंजाम करून द्यावा. पुन्हां त्या सरदारानें आणखी मुलुख घेतला तर तोहि फौजेच्या खर्चाकरितां महाराजांनीं सरंजाम म्हणून नेमून द्यावा, असें होऊं लागलें; तेव्हां शूर व उत्साही सरदारांत महत्त्वाकांक्षा उत्पन्न होऊन परमुलखावर स्वाऱ्या कराव्या, लढाया माराव्या, लुटीवर पोट भरावें आणि प्रदेश काबीज करवेल तो महाराजांकडून सरंजाम म्हणून मिळवून आपली सरदारी कायम करावी, आपलें घराणें कीर्तिमंत व वैभवसंपन्न करावें असें ज्या त्या सरदाराच्या मनांत येऊं लागलें. नंतर हजारों स्वारांच्या झुंडी गोळा करून हे सरदार यंदा माळवा, पुढच्या वर्षी गुजराथ, त्याच्या पुढच्या वर्षी दुसराच एखादा प्रांत, याप्रमाणें निरनिराळ्या प्रांतांत मोहिमा करूं लागले शाहूमहाराजांनीं आपल्या हयातींत जें हें मोहिमांचें सत्र सुरू करविलें तेंच पुढें नानासाहेब पेशव्यांनीं चालू ठेविलें. त्यांचा परिणाम असा झाला कीं, दक्षिणेकडे म्हैसूर, अर्काट, त्रिचनापल्लीपर्यंत आणि उत्तरेस दिल्ली, पंजाब, आग्रा, अयोध्या, रोहिलखंडपर्यंत सर्व देशांतून मराठ्यांचा व्याप पसरला. पण मराठ्यांनीं जर हें एवढें राज्य १७२० पासून १७६० पर्यंत मिळविलें तर तें पुढच्या चाळीस वर्षांत घालवूनहि टाकिलें! ईस्ट इंडिया कंपनीनें इ.स. १६००पासून १८००पर्यंत २०० वर्षांत जेवढें राज्य मिळविलें तेवढें राज्य मराठ्यांनीं चाळीस वर्षांत कमावलें! मात्र मराठ्यांचें राज्य थोड्याच काळांत नष्ट झालें आणि कंपनीचें राज्य अद्यापि कायम असून उत्तरोत्तर त्याचा उत्कर्ष होत आहे. महापूर आला म्हणजे नदीचें पाणी आसपास पांचचार कोसपर्यंत पसरतें आणि मग ओसरतां ओसरतां अखेरीस उन्हाळ्यांत पात्रांत सुद्धां पाण्याचा बिंदु रहात नाहीं त्याप्रमाणें मराठी राज्याची स्थिति झाली!

"सरंजाम मिळविण्यासाठीं परमुलख जिंकून राज्य वाढविण्याची सरदारांनां हांव सुटली नसती, किंवा महाराज छत्रपतींनीं तसें न करण्याविषयीं त्यांस उत्तेजन देण्याऐवजीं 'आहे तेंच राज्य प्रथम चिरस्थायी करा, त्यांतली बंडें मोडा, शिस्त बसवा, कायदेकानू चालू करा, हाच मुलुख भरभराटीस येऊं द्या, मग दुसऱ्या प्रांताला हात घाला,' अशी सक्त ताकीद दिली असती, तर राज्य इतकें वाढलें असतें हें खरें; परंतु त्याला बळकटी आली असती यांत कांहीं संशय नाहीं. जिकडे सूर लागेल तिकडे मोहीम करून भालेराई गाजवण्याच्या फंदांत पडलेल्या मराठे सरदारांनां लाहोरावर स्वारी करण्यास फावलें, आणि बालेघाटाचा मुलुख—ज्याला साधुसंतांची जन्मभूमि व प्राचीन खरोखरीचें महाराष्ट्र म्हणतां येईल तो पैठण, औरंगाबाद, नांदेड जालना, बीड वगैरे मुलुख—ताब्यांत घेण्याची फुरसत मिळाली नाहीं! शांततेच्या काळांत मराठ्यांचें राज्य सर्वत्र होतें आणि अस्वस्थतेच्या काळांत कुठेंच नव्हतें अशी दशा होण्याचें कारण कोणताहि प्रांत मराठ्यांच्या ताब्यांत पूर्णपणें आला नव्हता हेंच होय."

लष्करी व मुलकी सत्ता पृथक न ठेवणें व मुलकी सत्तेच्या कह्यांत लष्करी सत्ता न ठेवणें, हें नाशाचें दुसरें बलवत्तर कारण आहे. इंग्लंडांत चार्लस राजाबरोबर व क्रामवेलबरोबर पार्लमेंट याच हक्काकरितां झगडलें. हिंदी शासनशास्त्रांतील मराठे किंवा क्षत्रिय आणि ब्राह्मण ही विभागणी या स्वरूपाची आहे. युद्धनिपुणांस रणांगणावर धाडणें व राज्यव्यवस्थानिपुणांस राजधानींत बसून अन्तर्गत व परराष्ट्रीय कारभार संभाळण्यास सांगणें अशी योजना पेशवाईत कांहीं कांहीं वेळां केलेली दिसते. परंतु बाळाजी विश्वनाथ व पहिला बाजीराव यांनीं एका हातांत लेखणी व एका हातांत तरवार असा आजन्म केलेला खटाटोप, शिपाई बाण्याच्या रघुनाथरावानें प्रधानपदाची धरलेली हाव, महादजी शिंद्यानें नानाच्या लेखणीवर ठेवलेला डोळा, उभयविधा नालायक असलेल्या दुसऱ्या बाजीरावाच्या हातीं लेखणी व तरवार दोन्हीं देण्याची मराठामंडळानें केलेली चूक, या राजशासनशास्त्राविरुद्ध केलेल्या अक्षम्य प्रमादांमुळें मराठेशाही बुडाली असेंहि एक मत आहे. हिंदु शासनशास्त्र प्रगतिप्रवर्तक कधींच बनलें नाहीं. १८ व्या शतकाच्या अखेरीस देखील फ्रान्स, इंग्लंडसारखीं यूरोपियन राष्ट्रें व महाराष्ट्र यांच्या शासनशास्त्रविषयक ज्ञानांत केवढें महदंतर होतें! इकडे नेपोलियन जगाचा भूगोल समोर पसरून मोहिमा कशा व कोठून न्यावयाच्या हा विचार करीत होता तर इकडे आमचे नानाफडणीस श्रीमंतांनां भारत भागवतांतील कोणते उतारे अध्ययनार्थ काढून द्यावेत हे ठरवीत बसले होते. तसेंच यूरोपियन राष्ट्रें जगाच्या प्रत्येक भागांत आपल्या वसाहती स्थापन करण्याच्या मार्गांत होतीं तर आपल्या इकडे मार्कंडेयादि पुराणांतील नवखंड पृथ्वीचीच कायती काल्पनिक माहिती खरी धरून चालत. हीच स्थिति युद्धसाधनांची. बंदुका व तोफा जुन्या पुराण्या अशा फिरंग्यांकडून खरेदी करून मग त्या लढाईंत चालवावयाच्या तेव्हां साहजिकच त्या कितपत कार्यक्षम असतील याचा अंदाज करावा. फिरंग्यांच्या युद्धकौशल्याची जागजागीं मराठ्यांनीं स्तुति केलेली आढळते, व पुष्कळ सरदारांनीं त्यांचीं पलटणें आपल्या दिमतीसहि ठेविलीं होतीं. सारांश, मराठ्यांनां, किंबहुना आशियाटिक राष्ट्रांनां युद्धशास्त्राची शिकवण नव्हती. तसेंच त्यांचें एकंदर ज्ञान पाश्चात्त्यांच्या ज्ञानापेक्षां कमती व कमी दर्जाचें होतें यांत संशय नाहीं. तात्पर्य "ज्ञानविषयक प्रगती-

शिवाय राजकीय स्वायत्तता टिकणें शक्य नाहीं" हा सिद्धांत. राष्ट्रानें ध्यानांत ठेवला म्हणजे 'मराठी सत्तेच्या नाशाचा उलगडा तेव्हांच होतो.

राष्ट्राभिमानाचा अभाव हें कारण केळकर यांनीं दाखविलें आहे. परंतु हा मुद्दा एकट्या मराठ्यांनांच लागू नसून शीख रजपूत, मराठे वगैरे सर्वप्रांतीय लोकांनां लागू असल्यामुळें त्याचा उहापोह प्रकरणाअखेर करूं.

**मराठी सत्तेविषयीं व्हिन्सेंट स्मिथचें मत**—मराठ्यांनीं व पेशव्यांनीं जें साम्राज्य कमाविलें व चालविलें त्यांतील त्यांच्या हेतूविषयीं व राज्यकारभारपद्धतीविषयीं अनेक परकी ग्रंथकारांनीं चुकीचीं मतें प्रदर्शित केलीं आहेत. तथापि खुद्द मुसुलमान तवारिखकारांच्या काळीं असणारे गैरसमज पुढें ग्रँडडफच्या काळींच नव्हे तर आज १९२० सालीं इतिहास लिहिणाऱ्या इंग्रज लेखकांनांहि दिसावे याचें सखेद आश्चर्य वाटतें; अशा मतांचा नमुना म्हणून पुढील उतारा वाचकांस सादर करतों.प्रसिद्ध इंग्रज इतिहासकार व्हिन्सेंट ए.स्मिथ हे आपल्या ऑक्सफोर्ड हिस्ट्री ऑफ इंडिया या पुस्तकांत लिहितात ! " शिवाजीचे अत्याचार व विश्वासघातकीपणाचे गुन्हे घडधडीत दिसत असतां त्याच्याबद्दल पुष्कळ हिंदूंनां जो इतका अभिमान वाटतो व व्यक्तहि केला जातो त्याचा खुलासा व थोडेंसें समर्थनहि सहज करतां येईल (पण) १८ व्या शतकाच्या अखेरीस व १९ व्या शतकाच्या सुरवातीस होऊन गेलेल्या बाजीराव आदिकरून मराठे सरदारांची सन्मान किंवा वाहवा करून घेण्याची मुळींच योग्यता नाहीं. अहल्याबाई नांवाच्या स्त्रीचा एकच अपवाद वगळला तर त्या सर्वांमध्यें एकहि म्हणण्यासारखा सद्गुण नव्हता; उलट दगेबाजपणा, दुष्टपणा, लुटारुपणा व दुसऱ्या आणखीं कित्येक दुर्गुणांची त्यांनां काळोखी लागली आहे. ज्या घाणेरड्या राज्यपद्धतीचा त्यांनीं अवलंब केला होता ती मनुष्य जातीच्या कोणत्याहि दिशेनें प्रगतीस अगर यत्किंचितहि कल्याणास अपात्र होती.

" मराठ्यांच्या राजकीय व्यवस्थेंत आढळून येणारा नीतीचा खून अगदीं स्पष्ट व निर्लज्जपणाचा होता.' त्यांच्या सैन्याची व राज्यव्यवस्थेची पद्धति साम्राज्यें उत्पन्न करण्यापेक्षां नष्ट करण्याकडेच जास्त जाईल ( अशी होती ). त्यांच्या सर्व राज्यघटनेच्या मुळाशीं असलेली लुटालुटीचे छापे व लुण्याची सवय तसेंच त्यांची भावना व वागण्याची तऱ्हा या गोष्टी इंग्रजी मनाचे नैसर्गिक शत्रूच होत. ज्यांच्या राज्यपद्धतीचे उद्देश व तत्त्वें परस्परविरुद्ध आहेत अशा राष्ट्रांत टिकाऊ सलोखा कधींच असणें शक्य नाहीं.

"एकंदरींत मराठे हे धंदेवाईक चोर असून त्यांच्या चळवळी त्यांच्या सालस शेजाऱ्यांनां असह्य होत असत. धामधुमीच्या काळांत पुढें घुसणाऱ्या सर्व दंगेखोरांशीं ते उघडपणें मिसळत व नंतर त्यांच्या वेलगामी राज्यास दाबून टाकणें हें त्यांचें पहिलें काम असे. असें असून देखील ते हिंदुस्थानांत एक सत्ताधारी राष्ट्र होऊन बसले होते.

'१८१८त मराठी राज्याचा पुरा नाश झाल्याबद्दल कोणाहि हिंदूच्या किंवा यूरोपीयाच्या अंतःकरणांत विषाद किंवा सहानुभूतीचा यत्किंचितहि विचार उद्भवण्याचें कारण नाहीं. ज्याला ऐतिहासिक वस्तुस्थितीचा थोडा तरी परिचय झालेला आहे, असा कोणीहि मनुष्य, मराठ्यांच्या दुष्टपणाबद्दल त्यांचा झालेला पुरा नाश व त्यांच्या जागीं व्यवस्थित ब्रिटिश राज्यव्यवस्थेचें आगमन हीं हिंदुस्थानच्या अलोट कल्याणासाठीं अवश्य होतीं याबद्दल संदेह बाळगणार नाहीं."

ज्या आर्वाचीन पाश्चात्य पंडितांनीं हिंदुस्थानच्या इतिहासाचें सूक्ष्म अवलोकन करून, त्यावर ग्रंथरचना केली अशा इतिहासकारांपैकीं व्हिन्सेंट स्मिथ हा एक असून, त्याचीं विधानें सर्वत्र प्रमाणभूत धरण्याचा परिपाठ आहे. तेव्हां त्याचें मराठ्यांसंबंधीं वरील धाडसाचें विधान वाचून व त्यामुळें आपल्या राष्ट्रसंस्थापकांबद्दल खोटा गैरसमज उत्पन्न होणार हें पाहून कोणा महाराष्ट्रीयाचें अंतःकरण तिळतिळ तुटणार नाहीं ? सध्यां तरी राजवाडे–खरे यांसारख्या निरपेक्ष स्वदेशाभिमान्यांच्या अविरत प्रयत्नामुळें मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं अज्ञानमूलक कुशंका काढण्याचें कारण उरलें नाहीं. पण जेव्हां मराठ्यांच्या वैभवाच्या आठवणीमुळें ब्रिटिश साम्राज्याच्या कार्यदक्षतेपणास किंवा अस्तित्वसच्चेनास धोका येईल काय अशी भीति त्यांच्या विरोध्यांनां भासूं लागते, तेव्हां तो विषय त्रयस्तपणें वादाचा राहिला नाहीं असें वाटावयास लागतें. तेव्हां स्मिथचें वरील विधान खोडून न काढलें तरी चालण्यासारखें आहे. पण या ठिकाणीं एक दोन आरोपांचा थोडासा उहापोह केलेला बरा.

मराठ्यांचें स्वतंत्र राज्य हें नांवाजलेल्या दरोडेखोरांचें राज्य असें जे स्मिथ म्हणतो त्याला कारण मराठे व इंग्रज यांचे हितसंबंध एक येत जाऊन बऱ्याच वेळां इंग्रजांनां मराठ्यांनीं मोठा विरोध केला आहे. १६६४ व १६७० या सालीं शिवाजीनें सुरत लुटली, तेव्हां आपल्या जवळची सर्व संपत्ति त्याच्या हवालीं करावी म्हणून त्यानें अनेक इंग्रजांची कत्तल केली असा शिवाजीवर आरोप ठेऊन स्मिथसारखा इंग्रज त्याला दरोडेखोरांचा नायक म्हणतो. उलट, क्यारे नावाचा फ्रेंच प्रवासी १६६८-१६७३ पावेतों हिंदुस्थानांत होता त्यानें शिवाजीची तुलना ज्यूलियस सीझर, व गस्टाव्हस अडॉल्फस यांच्याशीं करून " तो सर्वगुणसंपन्न योद्धा व चक्रवर्ती राजा होता" अशी प्रशंसा केली आहे. असे अनेक तत्कालीन पुरुषांचे शिवस्तुतीदाखल उतारे दाखविता येतील. ज्यांचा फायदा होतो ते गुण घेतात व तोटा होतो ते शिव्या देतात अशा गोष्टी थोर पुरुषांसंबंधांत आढळून येतात; त्यांपैकींच मराठे हे एक आहेत.

मराठे व इंग्रज यांचा उत्कर्ष बराच काळपर्यंत एकसमयावच्छेदेंकरून होत होता; इंग्रजांचा उत्कर्ष

हळू हळू पण शेवटपर्यंत, व मराठ्यांचा प्रथम प्रथम मोठ्या झपाट्यानें, व पुढें पिछेहाटीनें होत गेला. दोघांनांहि साम्राज्यतृष्णा होती, व त्यामुळें मत्सर उत्पन्न झाला. हिंदुस्थानांत साम्राज्यसत्ता स्थापण्याचा हक्क मोंगल, इंग्रज, मराठे वगैरे सर्वांसच आहे. मराठे हिंदु असल्यामुळें त्यांनां तर हिंदुपदपादशाही स्थापण्याचा सर्वांत जास्त हक्क आहे. तेव्हां ते आपल्या राज्यतृष्णेच्या मार्गांत येतात म्हणून वाईट हें म्हणणें कितपत न्याय्य होईल? शिवाय मराठे हे इंग्रजांचे हिंदुस्थानांतले सर्वांत बलिष्ठ प्रतिस्पर्धी. कडव्या शीखांशीं गांठ पडेपावेतों त्यांनां मराठ्याइतका लवकर न मोडणारा शत्रु मिळालाच नव्हता. शिखांशीं युद्ध जमलें त्यावेळीं इंग्रजांची सत्ता व बल फार वाढलें होतें, पण आरंभीं मराठ्यांशीं प्रसंग पडले त्यावेळीं इंग्रज फारसे सामर्थ्यवान् नसल्यामुळें दुबळ्या लोकांप्रमाणें ते मराठ्यांवर बोटें मोडीत राहिले यांत आश्चर्य तें काय? "आमचें बल वाढेपर्यंत मराठ्यांसारख्या शत्रूंशीं आमची टक्कर झाली नाहीं हें आमचें सुदैवच समजलें पाहिजे" असें सर आलफ्रेड लायलसारखा प्रख्यात आधुनिक इतिहासज्ञ कबूल करतो. तेव्हां केवळ मत्सर बुद्धीनें मराठ्यांची नालस्ती स्मिथसारखे प्रबुद्ध इतिहासकारहि करूं शकतात याचा हा मासला म्हणतां येईल!

दुसरी गोष्ट मराठ्यांच्या नीतिमत्तेविषयीं. मराठे राजकारणांत अनीतिपटु होते, चोराच्या शब्दाला जी किंमत ती त्यांच्या वचनाला होती, त्यांची राज्यघटना दरोडे, छापे, लुटालूट यांवर उभारली होती, व इंग्रज हे निसर्गतःच असत्य-अनीति, जुलूम याविरुद्ध असल्यानें त्यांनां उघडच मराठ्यांचा वीट आला असा अर्थाचा स्मिथ साहेबांची बतावणी कितपत सत्याला धरून आहे हें पाहण्याचा प्रयत्न म्हणजे तिला महत्त्व दिल्यासारखें होणार आहे. क्लाईव्हची उमीचंदाच्या बाबतींत खोटा दस्तऐवज करण्याची बुद्धी, वारन हेस्टिंगनें अयोध्येच्या नबाबाला रोहिल्यांची अमानुष कत्तल करण्याला दिलेली उघड उघड मदत, बेगमांपासून अमानुष छळ करून उकळलेलें द्रव्य तसेंच हिंदी संस्थानिकांवर इंग्रज अधिकाऱ्यांनीं अनेकदां केलेले जुलूम व परवां परवांचें क्राफर्ड प्रकरण या सारख्या गोष्टी जर न्याय्य व मुत्सद्दीगिरीच्या ठरतात तर मराठ्यांची मुत्सद्देगिरी कां म्हणूं नये? वारन हेस्टिंगजनंतर कोणाहि सिव्हिलियनाची पार्लमेंटांत अन्यायाबद्दल चवकशी झाली नाहीं याचा अर्थ त्यानंतर हिंदुस्थानांत मुळींच कोणीहि इंग्रजानें अन्याय केला नाहीं असा समजावयाचा कीं काय? याचें उत्तर वारन हेस्टिंगच्या पुढील काळांत इंग्रजांनां साम्राज्य वाढवितांना ज्या ज्या बऱ्या वाईट गोष्टी कराव्या लागतील त्यांकडे डोळेझांक करावयाची असें इंग्लंडांत ठरून गेल्यासारखें झालें होतें. म्हणजे, तें नैतिकदृष्ट्या बरोबर होतें असें मात्र नाहीं; तर ती "मुत्सद्देगिरी" होती. लार्ड वेलस्ली व डलहौसी यांनीं जें संस्थानें खालसा करण्याचें धोरण ठेविलें तें कितपत न्यायाला धरून होतें? मग त्यांचे गुण कां गावेत? त्यांनीं मराठ्यांप्रमाणें इंग्रजी साम्राज्य 'दरोडे घालून व लुटून वाढविलें असें कां म्हणूं नये? शिवाय पेशवाईच्या अखेरीस मराठ्यांत एकोपा नव्हता व इंग्रजांप्रमाणें मध्यवर्ती सत्ता राहिली नाहीं म्हणून जी अंदाधुंदी झाली व त्या काळीं ज्या वाईट प्रकारच्या गोष्टी घडल्या त्यांवरून सरसहा मराठे हे दरोडेखोर, दगलबाज राज्य करण्याला नालायक अतएव स्वातंत्र्याला व स्वराज्याला अपात्र असा एकदम शेरा मारणें स्मिथसारख्या विद्वान इतिहाससंशोधकाला तरी शोभत नाहीं. संशोधकाला एकांगीपणा व पूर्वग्रहदूषितता यांचा विटाळ असतां कामा नये. एखाद्याला अपयश आलें म्हणजे तो सर्वदोषसंपन्न असतो असें नाहीं. लायलनें तर पदोपदीं आपल्या इतिहासांत इंग्रजांचें सुदैव म्हणूनच त्यांनां हिंदुस्थानचें राज्य प्राप्त झालें असें जें म्हटलें तें खोटें नाहीं. तेव्हां साम्राज्यप्राप्तीच्या मदानें धुंद होऊन वाटेल तें बरळत सुटणें हें स्मिथसारख्या थोर पुरुषाला तरी भूषणावह नाहीं.

असो; पूर्वग्रहदूषित इतिहासकारांच्या मताचा मासला दिल्यानंतर स्वाभिमानाच्या दृष्टीनें मराठी सत्तेचें महत्त्व येथें थोडेंसें वर्णन करतों.

**मराठ्यांच्या सत्तेचें महत्त्व.**—मराठ्यांचा इतिहास हा विषय प्रत्येक महाराष्ट्रीयास स्वाभाविकपणें अत्यंत प्रिय आहे. त्या विषयाच्या अनेक अंगांचें ज्ञानकोशाच्या मुख्य भागांत विवेचन होईलच. तथापि जगाच्या एकंदर इतिहासक्रमांत व विशेषेंकरून भारताच्या इतिहासक्रमांत मराठ्यांच्या इतिहासाचें स्थान काय हा विषय प्रस्तावनाखंडांत विवेचनास योग्य आहे. शिवाजीनें राज्यस्थापना करून औरंगजेबासारख्या बलाढ्य बादशहाच्या अलमगिरीस वेसण घातली आणि पेशव्यांनीं त्याचें कार्य पुढें चालविलें आणि पुढें मराठी राज्य वाढत्या ब्रिटिश सत्तेमध्यें विलीन झालें. या सर्व खटाटोपीचा एकंदर सांस्कृतिक परिणाम काय झाला याचा विचार येथें करूं.

१ मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेच्या चळवळीचा भारताच्या इतिहासाच्या दृष्टीनें पहिला महत्त्वाचा परिणाम म्हटला म्हणजे मराठी भाषा बोलणाऱ्या समाजाचें एकीकरण होऊन त्यांत एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न झाली. राज्य करणाऱ्या परकी सरकारनें अर्ध्या महाराष्ट्रीय लोकांनां गुजराथी, कानडी व सिंधी भाषा बोलणाऱ्या लोकांत व अर्ध्या महाराष्ट्रीय लोकांस तामीळ व हिंदी भाषा बोलणाऱ्या लोकांत घालून त्यांची फाळणी केली आहे, तरी या भिन्न प्रांतांतील लोकांनीं आपलें स्वत्व व एकत्व अणुमात्रहि कमी होऊं दिलेलें नाहीं.

२ मराठ्यांच्या खटाटोपाचा आज उघड उघड दिसून येणारा परिणाम म्हटला म्हणजे होळकर, शिंदे व गायकवाड या बड्या बड्या मराठी संस्थानिकांचें व पवार, पटवर्धन आदिकरून कित्येक लहान लहान संस्थानिकांचें

अस्तित्व होय. आज राजपुतान्यांत व गुजराथेंत जीं कांहीं स्वतंत्र संस्थानें आहेत त्यांचें अस्तित्वहि त्यावेळीं मराठ्यांशीं शत्रुत्व असल्यामुळें इंग्रजांस त्यांनां आपल्या बाजूस अतिशय सवलतीच्या अटीवरहि करून घ्यावें लागलें या गोष्टीमुळेंच आहे. शिंदे, होळकर व गायकवाड हे संस्थानिक आज शें-दोनशें वर्षांपासून महाराष्ट्राबाहेर राज्य करीत असल्यामुळें महाराष्ट्रीय संस्कृतीचा आपआपल्या राज्यांत प्रसार करण्याचें काम ते सावकाश परंतु निश्चित करीत आले आहेत.

३ मराठ्यांच्या चळवळीचा आज दृष्टोत्पत्तीस येणारा तिसरा महत्त्वाचा परिणाम म्हटला म्हणजे त्यांनीं दक्षिणेंत महंमदी संस्कृतीच्या प्रसारास आळा घातला हा होय. पंजाब किंवा बंगाल यांसारख्या उत्तरेकडील प्रांतांत मुसुलमानांचें एकंदर लोकसंख्येशीं प्रमाण अर्ध्याहून अधिक पडत असतांना जेथें मराठ्यांनीं बराच काळ सत्ता चालविली त्या मुंबई इलाख्यांतील संस्थानांत तें शेकडा बाराहूनहि कमीच आहे.

४ मराठ्यांची सत्ता अस्तास जाऊन आज शंभराहून अधिक वर्षें झालीं असतांहि अद्याप पुणें हें सर्व महाराष्ट्राचें नाक समजलें जाण्याइतकी तेथें वैचारिक चळवळ आहे. याचें बीज मराठशाहीच्या वैभवकालांत हें शहर अर्धशतकाहून अधिक काल मराठी साम्राज्याची राजधानी होतें या गोष्टींतच आहे.

५ आपलें स्वातंत्र्य रक्षिण्याकरितां परशत्रूंशीं लढण्यांत मराठ्यांनीं अखेरपावेतों टिकाव धरल्यामुळें इंग्रजी अंमलाखालीं आल्यानंतरहि त्यांच्यामधील स्वातंत्र्यलालसा नष्ट होऊं शकली नाहीं. इ. स. १८८५ मध्यें राजकीय चळवळ करणाऱ्या राष्ट्रीय सभेची स्थापना झाली, तें महाराष्ट्रांत स्वातंत्र्यलालसा बीजरूपानें अस्तित्वांत राहिली होती त्याचेंच दृश्य फल होय. त्या वेळीं पुणें हेंच राजकीय चळवळीचें आगर असून राष्ट्रीय सभेच्या प्रथम अधिवेशनाकरितां तीच जागा अगोदर पसंत करण्यांत आली होती.

६ कर्नाटक, तंजावर, सागर, झांशी वगैरे हिंदुस्थानच्या महाराष्ट्रीयेतर कित्येक भागांत आज अनेक महाराष्ट्रीय लोक कायमची वसाहत करून राहिलेले दिसतात तोहि मराठ्यांच्या साम्राज्यविषयक चळवळीचाच एक परिणाम आहे. या वसाहतीमुळें आधुनिक महाराष्ट्रीयांनां परप्रांतीय राजकारण चालविणें विशेष सोयीचें जातें, आणि त्याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे हिंदुस्थानच्या आधुनिक राजकारणांत 'अखिल हिंद राष्ट्रीय पुढारी' ( ऑल इंडिया लीडर ) निर्माण करण्याचा आद्य मान महाराष्ट्रालाच आहे.

### शीखांची कामगिरी.

वायव्येकडून येणाऱ्या मुसुलमानांचा पहिला हल्ला पंजाब प्रांतावर पडला. परकी स्वाऱ्यांनां विरोध करण्याचें वास्तविक ठिकाण वायव्य सरहद्द हें होय. हें धोरण ब्रिटिश सरकारनें संभाळून सरहद्दीच्याहि दोन पावलें पुढें असलेल्या क्वेटा येथें आपलें लष्करी ठाणें ठेविलें आहे. गिजनीच्या महंमुदाला, या सरहद्दीवरच म्हणजे पेशावरनजीक जयपाळ व अनंगपाळ यांनीं विरोध केला. अशा प्रकारें पंजाब प्रांतावर विशेष जबाबदारी असल्यामुळें शिखांच्या कामगिरीचा 'हिंदूंची उचल' या प्रकरणांत परामर्ष घेणें जरूर आहे.

तथापि रजपूत राजे, विजयानगरचे राजे किंवा मराठे यांच्याहून जरा निराळ्या प्रकारचें स्वरूप शीखांच्या इतिहासास आहे. पहिल्या तिघांचा इतिहास केवळ राजकीय स्वरूपाचा आहे तर उलट पक्षीं शीखांचा पूर्व इतिहास तरी केवळ धार्मिक स्वरूपाचा आहे. शीख हें हिंदुजातिनाम नसून पृथक् अशा एका धार्मिक संप्रदायाचें नांव आहे. इंग्रज लेखकांनीं शिखांची प्राचीन बौद्धांशीं तुलना करून त्यांनां हिंदु धर्माची सुधारणा करणारे म्हटलें आहे. "बुद्धाप्रमाणें नानकानें धार्मिक व सामाजिक बंधनांखालीं वांकलेल्या हिंदु धर्माविरुद्ध बंड केलें. दोघांनीं भिक्षुकांच्या जुलमाला विरोध केला." तात्पर्य, शीख संप्रदाय हिंदु धर्माचाच शत्रु होय असें या लेखकांचें मत आहे. परंतु शीख समाजाचा पुढील इतिहास पाहतां त्यांनीं रजपूत राजांशीं किंवा मराठी सत्तेशीं झगडा केल्याचें दिसत नसून परकी मुसुलमानांची सत्ता व ब्रिटिश सत्ता यांच्यांशीं युद्धें केलीं हें स्पष्ट आहे. शिखांच्या इतिहासाचें सूक्ष्म अवलोकन केल्यास असें म्हणावें लागतें कीं, शीख पंथ मुसुलमानी धर्मप्रसार व मुसुलमानी सत्ता यांच्या जुलमापासून हिंदूंचा बचाव करण्याकरितांच प्रस्थापित झाला; परंतु, रजपुतांप्रमाणें किंवा मराठ्यांप्रमाणें मुसुलमानांविरुद्ध एकदम तरवार न उचलतां गुरु नानकानें एक निराळा संप्रदाय काढून इस्लामी धर्मप्रसाराला आळा घालण्याची निराळीच युक्ति काढली.

**शीख संप्रदायाचें स्वरूप.**—इस्लामी धर्माचा प्रवेश हिंदुस्थानांत झाल्यापासून त्यांतील धर्मतत्त्वांची हिंदुधर्मतत्त्वांशीं तुलना साहजिकच सुरू झाली आणि जातिभेद वगैरे समाजविघातक प्रचार मोडून हिंदुमुसुलमानांचें संमेलन करण्याचे प्रयत्न चालू होते. मुसुलमानांच्या प्रवेशामुळें मूलतःच तरवारीच्या जोरावर बंदी करतां न आल्यामुळें पंजाबांतील हिंदूंनां ही तडजोडीची व समेटाची बुद्धि सुचूं लागली असावी. याच बुद्धीनें गुरु नानकानें ( जन्म १४६९ ) आपल्या शीख पंथाची प्रस्थापना केली. शीख संप्रदायाचीं प्रमुख तत्त्वें अशा तडजोडीच्या स्वरूपाचीं आहेत. तीं तत्त्वें येणें प्रमाणें ( १ ) जगांत अल्ला किंवा राम, वगैरे विशिष्ट लोकसमुदायाचे पृथक् पृथक् देव नसून सर्व मानवजातीचा एकच देव आहे, ( २ ) देवाचे अवतार व भिन्नभिन्न मूर्ती या गोष्टी त्याज्य आहेत, सर्व माणसें एकाच ईश्वराचीं लेंकरें असल्यामुळें सर्वांचा दर्जा समान आहे. सबब कोणीहि जातिभेद

मानूं नये; इत्यादि. या सर्वांहूनहि विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे हिंदूंशीं किंवा मुसुलमानांशीं लष्करी सामना न करतां केवळ शांतताप्रधान मार्गानें स्वसंप्रदायाचा प्रसार करण्याचें व्रत आद्यगुरु नानक व तदनंतरचे पांच शीखगुरु त्यांनीं एकनिष्ठपणें पाळलें. मोंगल बादशाहा अकबर याची कारकीर्द या पंथाला विशेष "अनुकूल" गेली. सारांश कडव्या इस्लामी धर्माचा मूर्तिपूजक हिंदुधर्माबद्दलचा राग कमी करून इस्लामी धर्मप्रसाराला आळा घालणें हेंच शीखसंप्रदायसंस्थापकाचें उद्दिष्ट होतें असें म्हणावें लागतें.

तथापि या शांतताप्रधान संप्रदायास त्रास देण्यास मोंगल बादशाहांनींच सुरवात केली. अर्जुनमल्ल नांवाच्या शीख गुरुस १६०६ मध्यें मुसुलमानांनीं पकडून ठार मारलें. या कृत्यानें शीख लोक चवताळून गेले व शांततेचा बाणा सोडून देऊन ते लढाऊ बनले. औरंगजेबाच्या वेळीं नववा शीख गुरु तेघबाहाद्दर याचा वध ( सन १६७२ ) करून शिखांचा बहुतेक नायनाट करण्यांत आला. तथापि दहावा शीखगुरु हरगोविंद यानें लष्करी पद्धतीवर नवीन प्रजासत्ताकमंडळ स्थापन केलें. औरंगजेबाच्या मरणानंतरचे दिल्लीचे पातशहा दुर्बल निघाल्यामुळें शिखांनां आपली सत्ता वाढविण्यास काल अनुकूल मिळाला. गुरुगोविंद ( १६७५-१७०८ ) नंतरचे सर्व शीखगुरु धर्मोपदेशकापेक्षां सेनानायक म्हणून प्रसिद्ध आहेत.

पण या नव्या लष्करी स्वरूपामुळें शीख लोक १७०८ पासून १८०५ पर्यंत अधिकच कचाट्यांत सांपडले. एका अंगानें दिल्लीच्या पातशहांनां व दुसऱ्या अंगानें नादीरशहा अहमशहा यांनां तोंड देण्याचे प्रसंग त्यांच्यावर वारंवार आले. तथापि नादिरशहा व अहमदशहा हे दिल्लीची पातशाही खिळखिळी करून परत गेल्यानंतर मध्यंतरींच्या अंदाधुंदीच्या काळांत आपली सत्ता फैलावण्यास शिखांनां चांगली संधि मिळाली. अवरंगजेबाच्या कारकीर्दीत शिखांचा छळ झाला त्याचा सूड शीखांनीं बहादुरशहाच्या कारकीर्दीत बंदा नामक पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं मोंगलाच्या मुलुखांत चाल करून घेतला. उलट फर्रुखसेयर बादशहानें फौज पाठवून शिखांचा पराभव केला व बंदाला हाल हाल करून ठार मारिलें. पुढें अहमदशहा अबदाली मरण पावल्यानंतर पुन्हां शिखांनीं उचल केली व आपल्या लहान लहान टोळ्या बनवून लहान लहान राज्यें स्थापिलीं. त्यानंतर रणजितसिंग नामक पराक्रमी शीख राजानें ( १७९९--१८३९ ) लहान लहान राज्यें मोडून आपलें एक मोठें राज्य बनविलें. या वेळीं ब्रिटिश सत्ता हिंदुस्थानांत बरीच वाढली होती. पण रणजितसिंगानें ब्रिटिशांबरोबर अखेरपर्यंत दोस्ती ठेविली. त्या वेळीं शीखांचें ९०,००० कवायती सैन्य होतें. रणजितसिंग वारल्यानंतर शीख राज्यांत अव्यवस्था माजली आणि अखेर तीनचार निकराचीं युद्धें होऊन ब्रिटिशांनीं शिखांची सत्ता नष्ट करून पंजाब प्रांत जिंकून घेतला.

**स्वातंत्र्यसंरक्षणाच्या कामीं शिखांनीं लाविलेला हातभार.**—मुसुलमानी सत्तेला व धर्मप्रसाराला शिखांनीं केलेला विरोध महत्त्वाचा होता यांत शंका नाहीं. शिखांच्या पराक्रमाच्या गोष्टी वाचतांना रजपुतांच्या पराक्रमांची आठवण होते. मुसुलमानांच्या लाटेबरोबर रजपूत मागें हटून राजपुतान्यांत व अबूच्या पहाडांत शिरले. पण शीख आघाडीवर नेट धरून राहिले इतकेंच नव्हे तर दिल्लीवाले व अफगाण सत्ता यांच्यामध्ये पाचरीप्रमाणें सांपडले असतांहि त्यांनीं नामशेष होऊन न जातां अखेरपर्यंत आपलें हिंदराष्ट्रीयत्व कायम राखलें हें त्यांस अत्यंत भूषणावह आहे. पुढें वेळ आली तेव्हां ब्रिटिश सत्तेला विरोध करण्याचें कामींहि त्यांनीं पूर्ण राष्ट्रीय अभिमानानें केलें. व्यक्तिगत शौर्यपराक्रमादि गुणांत इंग्रज सैनिकांसच काय पण जगांतील कोणाहि सैनिकास शीख हार जाणार नाहीत अशी ख्याति त्यांनीं गेल्या महायुद्धांतहि कायम राखली आहे.

**शीख, रजपूत व मराठे यांच्या देशसंरक्षक प्रयत्नांची तुलना.**—हिंदुस्थानच्या बुद्धोत्तर इतिहासांत परकी स्वाऱ्यांशीं व परकी सत्तेशीं दीर्घकाल झगडण्याचे प्रसंग हिंदुस्थानावर तीन वेळां आले. पहिला प्रसंग शकहूणांबरोबरचा. हा झगडा दोन तीन शतकें चालवून हर्षवर्धनाच्या ( इ. स. ६०० चा सुमार ) हिंदुस्थानानें शकहूणांचें पूर्ण उच्चाटण केलें होतें. दुसरा प्रसंग त्यानंतर चार शतकांनीं मुसुलमानी सत्तेबरोबर झगडण्याचा आला. शकहूणांपेक्षां ही मुसुलमानी सत्ता अधिक दूरवर म्हणजे दक्षिणेंत कृष्णातुंगभद्रेपर्यंत पसरल्यामुळें अधिक बद्धमूल झाली. शिवाय शकहूणांनां धर्मप्रसाराचें वेड नव्हतें, इतकेंच नव्हे तर उलट तेच भारतीय संस्कृतीचे अनुयायी बनत असा इतिहास आहे. मुसुलमानांनीं धर्मसत्ता व राजकीय सत्ता या दोहोंचा विळखा हिंदुस्थानाभोंवतीं घातला. असल्या मगरमिठींतून सुटका करून घेण्यास अर्थातच अधिक प्रबल प्रयत्न व अधिक दीर्घ काळ लागला यांत आश्चर्य नाहीं.

मुसुलमानांनीं प्रथम ( इ. स. १००१-१००६ ) जयपाळ व अनंगपाळ यांचा पराभव करून पंजाब, नंतर ( इ. स. ११९३ ) पृथ्वीराज चव्हाण याचा पराभव करून दिल्ली, आग्रा वगैरे उत्तरहिंदुस्थान आणि पाल व सेन हीं घराणीं बुडवून बंगाल व बहार हे प्रांत जिंकले. अलाउद्दिन खिलजीच्या वेळीं ( १२८९-१३१६ ) मुसुलमानांनीं गुजराथेंतील वाघेला वंशांतल्या कर्णराजाचा, व महाराष्ट्रांतील देवगिरी येथील यादव वंशांतल्या रामदेव व शंकरदेव यांचा पराभव करून गुजराथ व महाराष्ट्र काबीज केला. नंतर अगदीं दक्षिण हिंदुस्थानांत स्वाऱ्या सुरू झाल्या. इ. स. १३०९ मध्यें मलीक काफूरनें तेलंगणांतील वरंगूळचें राज्य आणि इ. स. १३१० मध्यें म्हैसुरांतील होयसळ वल्लाळांची द्वारसमुद्र राजधानी बुडविली. सन १३५६ मध्यें वरंगूळचा कायमचा पाडाव झाला. येणें प्रमाणें

चवदाव्या शतकाच्या पहिल्या पंचविशींत सर्व हिंदुस्थान मुसुलमानमय झालें होतें. जिकडे तिकडे हिंदूंचा पाडाव झाला, पुरातन राज्यें लयास गेलीं व प्राणाहूनहि प्रिय जो हिंदुधर्म व भारतीय स्त्रियांची अब्रू ती बुडण्याचा समय प्राप्त झाला. गुजराथ व बंगाल तर कायमचेच मुसुलमानी सत्तेखालीं राहिले. अशा संकटसमयीं अघातास प्रत्याघात या न्यायानें हिंदूंनीं आपलें डोकें पुनरपि वर काढण्यास जी सुरुवात केली ती पुनरुद्धाराची लाट साहजिकच प्रथम अगदीं दक्षिणेंत उद्भवली. तुंगभद्रेच्या कांठीं विजयानगर येथें इ. स. १३३६ मध्यें माधवाचार्य ऊर्फ विद्यारण्य त्या विद्वान् मुत्सद्याच्या शिकवणीनें हरिहर व बुक्क यांनीं हिंदुराज्य स्थापलें. हेंच विजयानगरचें सुप्रसिद्ध हिंदु राज्य होय. दुसरा प्रयत्न शिखांचा गुरु नानक ( जन्म १४६९ ) याचा. तो राजकीय नसून धार्मिक स्वरूपाचा, सलोख्याचा व सामदामाचा होता. पुढें त्याचें रूपांतर लष्करी विरोधांत होऊन शिखांनीं पंजाबप्रांत मुसुलमानांच्या तडाख्यांतून थोड्या फार अंशानें सोडवून आपलें स्वतंत्र राज्य इ. स. १८४९ पर्यंत टिकविलें. तिसरा प्रयत्न रजपुतांचा. त्यांनीं प्रथम राजपुतान्यांत व अबूचे पहाडांत पिछेहाट करून व नंतर मोंगल बादशाहांशीं सोयरिकी करून आपला व आपल्या प्रांताचा बचाव कसाबसा केला. रजपुतांचीं लहान लहान राज्यें प्रथम मोंगलाचें व नंतर ब्रिटिशांचें मांडलिकत्व पत्करून अद्यापहि जिवंत आहेत. यानंतर शेवटचा व सर्वांत महत्त्वाचा प्रयत्न मराठ्यांचा होय. शिवाजीनें महाराष्ट्र मुसुलमानांच्या सत्तेखालून सोडवून स्वतंत्र मराठी राज्य स्थापलें व त्याचें पेशव्यांनीं मराठी साम्राज्य बनवून मुसुलमानांची हिंदुस्थानांतील सत्ता जवळ जवळ नामशेष केली. तात्पर्य, मुसुलमानी सत्ता नष्ट करण्याकरितां पंजाब, राजपुताना, महाराष्ट्र व दक्षिणहिंदुस्थान मिळून जे चार प्रयत्न झाले त्यांपैकीं महाराष्ट्रांतील मराठ्यांचा प्रयत्न फार मोठ्या प्रमाणावर म्हणजे सर्व हिंदुस्थानाला मुक्त करण्याकरितां झाला व तो बऱ्याच अंशानें यशस्वी झाला. हा मराठ्यांच्या इतिहासाचा अभिमानास्पद विशेष होय.

मराठ्यांच्या इतिहासाचा दुसरा अभिमानास्पद विशेष म्हणजे त्यांचा अधिक स्पृहणीय धर्माभिमान व परधर्म सहिष्णुता. पंजाबांतील हिंदूंनीं मुसुलमानांपासून स्वतःचा बचाव करण्याकरितां एक नवाच मिश्र धर्म स्थापण्याची युक्ति योजिली. पण त्यांच्या या प्रयत्नांत सनातन हिंदुधर्माचा त्याग हा गौणपणा येतो. शीखांचीं धर्मतत्त्वें अधिक उच्च म्हणून ती हिंदुधर्माची सुधारलेली आवृत्ति आहे असें त्याला स्वरूप दिलें तरी राष्ट्रीय दृष्ट्या शीखांच्या प्रयत्नाचें गौणत्व मान्य करावें लागतें. रजपुतांच्या प्रयत्नांतहि असाच धार्मिक दृष्ट्या गौणपणा आढळतो. त्यांनीं धर्मत्याग केला नाहीं तर धर्माचा खंबीर आधार जो स्त्रिया त्या मुसुलमान बादशहांनां दिल्या आणि 'स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः । संकरो नरकायैव' इत्यादि श्रीकृष्ण वचनाप्रमाणें आपल्या प्रयत्नाला गालबोट लावून घेतलें. या दोषास्पदतेची जाणीव खुद्द रजपुतांच्याहि मनाला खात होती. कारण उदेपूरचा राणा अमरसिंह यानें सर्व रजपुतांचें एकीकरण करण्याकरितां मुसुलमानांशीं ज्यांनीं सोयरिकी केल्या होत्या त्या रजपूत संस्थानिकांशीं संबंध ठेवावयाचा नाहीं हा आपल्या पूर्वजांचा नियम सैल केला तेव्हां सर्व रजपूत राजांत असा एक ठराव झाला होता, कीं मेवाडच्या घराण्यांतील कन्या ज्या राज्यांत दिली असेल त्यांत त्या कन्येचा मुलगा लहान किंवा मोठा कसाहि असला तरी तोच गादीचा वारस समजला जावा.' मराठ्यांनीं मात्र धर्माच्या बाबतींत विशेष स्पृहणीय धोरण स्वीकारलें. त्यांनीं शीखांप्रमाणें धर्म सोडला नाहीं, मुसुलमानांचा उलट सूड म्हणून मशिदी फोडल्या नाहींत, किंवा मुसुलमान मुल्लांच्या किंवा स्त्रीपुरुषांच्या क्रूरपणानें कत्तलीहि केल्या नाहींत. शीखांनां हा डाग लागला आहे ( सर. देसाईकृत मुसुलमानी रिसायत पान ८१८ ). अगदीं शिवाजीच्या वेळेपासून मुसुलमानांच्या मशिदी वगैरेंचीं वतनें बिनहरकत चालत होतीं. तसेंच रजपुतांप्रमाणें मुसुलमानांशीं सोयरिक करण्याचा कमकुवतपणाहि मराठ्यांनीं दाखविला नाहीं. तात्पर्य स्वधर्माभिमान व परधर्मसहिष्णुता या दोन्ही गुणांत मराठ्यांचें धोरण निष्कलंक व वाखाणण्यासारखें होतें यांत शंका नाहीं.

आतां देशाभिमानासंबंधानें विचार करूं. यासंबंधी इतिहाससंशोधक वासुदेवशास्त्री खरे म्हणतातः " मराठ्यांमधला प्रमुख दुर्गुण म्हटला तर देशाभिमानाचा बहुतांशीं अभाव हा होय. या सद्गुणाची पैदासच जर मुळीं हिंदुस्थानांत अत्यल्प होते तर महाराष्ट्राच्या वाटणीस त्यांतला कितीसा अंश येणार! कोणीहि परके लोक आम्हांवर स्वाऱ्या करोत आणि आमचीं राज्यें बळकावोत, आमच्या ग्रामसंस्था, धर्मसमजुती, रीतिरिवाज, वतनहक्क यांत राज्यकर्ते जोंपर्यंत हात घालीत नाहींत तेथपर्यंत ते लोक कोण आहेत, काय करतात याची आम्ही पंचाईत करीत नाहीं." रा. न. चिं. केळकर यांचें मत असेंच आहे तें वर दिलेंच आहे. राष्ट्राभिमान, देशाभिमान यांचें अस्तित्व किंवा अभाव केवळ परसत्ता पाहून किंवा मधून मधून होणाऱ्या फंदफितुऱ्या पाहून किंवा व्यक्तिविषयक स्वार्थपरायणतेचीं कांहीं ठळक उदाहरणें पाहून ठरावेणें युक्त नाहीं. बुद्धोत्तर हिंदुस्थानाच्या इतिहासांत अलेक्झांडरपासून ज्या अनेक परकी स्वाऱ्या झाल्या त्यांनां तोंड देण्याकरितां व बद्धमूल झालेलीं परकी राज्येंहि नष्ट करण्याकरितां कोणी कोणी कसे प्रयत्न केले त्यांचा उल्लेख या विभागांत जागोजाग आला आहे. हा सर्व इतिहास लक्षांत घेतां, परकी सत्तेखालीं भारतीय राजे, किंवा भारतीय जनता स्वस्थ मनानें सुखासमाधानांत नांदत होती असा आरोप करणें युक्त होणार नाहीं. हिंदुस्थानांत घुसणाऱ्या

किंवा घुसलेल्या परकीयांनां देशाबाहेर काढावें म्हणून अलेक्झांडरच्या ग्रीकांबरोबर पोरस व चंद्रगुप्त, बॅक्ट्रियाच्या ग्रीकांबरोबर पुष्यमित्र, शकांबरोबर विक्रमादित्य व पुलुमायी शातकर्णी, युएची लोकांबरोबर समुद्रगुप्त, श्वेतहूणांबरोबर यशोधर्मा व श्रीहर्ष, महंमद गजनवीबरोबर अनंगपाळ व जयपाळ, महंमदघोरीबरोबर पृथ्वीराज, अहमदशाहा अबदालीबरोबर सदाशिवराव, वगैरे अनेक वीर लढले, ते देशाभिमानाशिवाय केवळ स्वार्थाकरितांच लढले असा निष्कर्ष काढणें चुकीचें होईल. शेंकडों हिंदू राजे, हजारों सेनापती व लाखों सैनिक बुद्धोत्तर काळांत परकीयांबरोबर लढतांनां धारातीर्थी पतन पावले आहेत, त्या सर्वांवर स्वार्थपरायणतेचा शिक्का मारणें म्हणजे मनुष्यस्वभावाविषयीं अज्ञान व्यक्त करणें होय.

**हिंदूंच्या उचलींचें सांस्कृतिक स्वरूप.**—विजयानगरचे राजे, मराठे, व शीख या तीन कार्यकर्त्यांच्या मार्फत हिंदूंची उचल झाली. त्यांची कार्यें कशीं काय झालीं याची तुलना करतां आपणास कांहीं भेद आढळून येतील. विजयानगरच्या राज्याचे कोणतेहि व्यवहारलेख आपणांस उपलब्ध नाहींत आणि त्यामुळें राज्याचीं धोरणें काय होतीं याविषयीं त्या तऱ्हेचा पुरावा नाहीं. तर त्या वेळेस ज्या विद्यारण्य माधवांनीं विजयानगरच्या राज्याचें तंत्रीपण केलें त्यांच्या इतर कार्यांवरून आणि इमारती वगैरे अवशेषांवरूनच या संबंधाचा निकाल करावयाचा आहे. शीख लोकांच्या प्रयत्नांच्या इतिहासाचें शिखांमध्यें अजून संशोधन व त्यावरचें शीख लोकांकडून तत्त्वें, धोरणें वगैरेंचें विवेचन चांगलें समाधानकारक झालेलें नाहीं. मराठे आणि विजयानगरवाले व शीख यांतील मुख्य फरक कार्यक्षेत्राच्या व्यापकतेंत होय. विजयानगरनें गोदावरीच्या उत्तरेकडे लक्षच दिलें नाहीं, आणि शीखांस आपलें कार्य व्यापक करण्यास अवसर मिळाला नाहीं. कांहीं शीख संस्थानें बरेच दिवस मराठ्यांचीं मांडलिक होतीं, आणि शीखांचा सर्वांत कर्ता पुरुष जो रणजितसिंग याला देखील साम्राज्यविषयक भावना फारशी नसावी असें दिसतें. जेथें लाखों मराठ्यांच्या तरवारी इंग्रजांचें उन्मूलन करूं शकल्या नाहींत तेथें आपण काय करणार असे त्यानें उद्गार काढले आहेत. आणि इंग्रजांशीं स्नेह कायम ठेवून दुसऱ्या कमी बलवान देशी राज्यांस गट्ट करावें अशी त्याची कार्यपद्धति होती. शीख हे हिंदुस्थानच्या मालकीसाठीं आखाड्यांत मुळींच उतरले नव्हते. भारतीय साम्राज्यासाठीं प्रयत्न या दृष्टीनें मराठ्यांच्या जोडीचें हिंदूंकडून झालेलें कार्य पहावयाचें झाल्यास आपणांस हिंदुस्थानाच्या इतिहासांत दोनच प्रयत्न दिसून येतात. एक प्रयत्न मौर्यांचा आणि दुसरा आंध्रभृत्यांचा. मौर्यांचें राज्य संस्कृतीच्या इतिहासांत तर मोठेंच महत्त्वाचें आहे. मराठी राज्य जरी पुष्कळ अंशीं संस्कृतीनें विजयानगराहून देखील कमी दर्जाचें असलें तरी व्यापक कार्यक्रमाच्या बाबतींत अर्ध्या अधिक अंशानें महाराष्ट्रीय असलेलें आंध्रभृत्य आणि मौर्य यांखेरीज त्यांच्या तुलनेस कोणतेंहि राष्ट्र अगर राज्य बसवितां येत नाहीं.

विजयानगरचें कार्य व्यापकतेच्या दृष्टीनें जरी मराठ्यांच्या कार्यापुढें हीन दिसलें तरी दुसऱ्या दृष्टीनें विजयानगरचें कार्य मोठें महत्त्वाचें आहे. जो संस्कृत विद्येचा विकास विजयानगरच्या प्रारंभकालांत झाला तत्तुल्यविद्याविकास लहानशा क्षेत्रांत व नियमित काळांत हिंदुस्थानच्या इतिहासांत भारतीय युद्धानंतर पुन्हां कोठें झाला नाहीं. विजयानगरचें राज्य संस्कृतिविकासाच्या दृष्टीनें महत्त्वाचें होतें.

शीख लोकांचा प्रयत्न हिंदूंच्या स्वायत्तशासनविकासाच्या दृष्टीनें जसा महत्त्वाचा आहे त्याहूनहि नैतिक आणि पारमार्थिक दृष्टीनें महत्वाचा आहे. कर्मकांडाशीं कायमचा संबंध तोडून ज्ञान व भक्ति यांस प्राधान्य देण्याचा प्रयत्न जितक्या निकराचा रामानंदशिष्यपरंपरेच्या या शाखेनें केला तितका त्यांच्या महाराष्ट्रीय शिष्यशाखेनेंहि केला नाहीं. आर्यसमाज पंजाबांत स्थापन होण्यापूर्वी पंजाबमध्यें ज्या हिंदूंत कांहीं जीव दिसत होता ते हिंदु फक्त शीखच होत. धार्मिक चळवळीचा राज्यस्थापनेशीं संबंध महाराष्ट्रांत होता हें संत मंडळीच्या कट्या कैवाऱ्यांसहि सिद्ध करतां आलें नाहीं, पण पंजाबांत ती क्रिया घडून आली याविषयीं कोणी संशय घेत नाहीं.

मौर्यांचें साम्राज्य, आंध्रभृत्यांचें साम्राज्य आणि मराठी साम्राज्य यांची तुलना केली असतां असें दिसतें कीं, मौर्य साम्राज्यकालीं पाली वाङ्मयास जोर मिळाला आणि तो अशोकानें भरविलेल्या संगीतीमुळेंच मिळाला असावा. अनेक सुत्तें केवळ भिक्षूंच्या स्मरणांत होतीं तीं त्या काळींच प्रथमतः अक्षररूपानें अवतीर्ण झालीं असावींत. बौद्ध तिपिटकाच्या संहितीकरणाचें श्रेय मौर्यांस आहे. आंध्रभृत्यांचें संस्कृतिविषयक कार्य म्हटलें म्हणजे महाराष्ट्रीस महत्त्व उत्पन्न करणें हें होय. मराठीसाम्राज्यानें मराठीस जरी लौकिक महत्त्व उत्पन्न केलें तरी त्यांनां मराठीवाङ्मयास हिंदुस्थानांतील इतर भाषांतील वाङ्मयापेक्षां निराळेपणा फारसा उत्पन्न करतां आला नाहीं. कांहीं बखरी व पोवाडे निर्माण झाले, पण मराठी बखरींची योग्यता मुसलमानांच्या इतिहासग्रंथांपेक्षां बरीच कमी आहे हें केव्हांहि कबूल केलें पाहिजे. मराठ्यांची संस्कृति त्यांनीं खालीं पाडलेल्या मुसुलमानांपेक्षां कमी दर्जाची होती आणि त्यांचा सर्व काळ युद्धांत गेल्यामुळें त्यांनां संस्कृतिसंवर्धनास फारसा काळ देतां आला नाहीं.

महायुद्धग्रस्त यूरोप




महायुद्धपूर्व मर्यादा........ महायुद्धोत्तर मर्यादा– – – – – – अनिश्चित मर्यादा– – – – – –

( पृष्ठ ४९६ पहा. )

# प्रकरण २३ वें.

## जुन्या संस्कृती व त्यांचें यूरोपीभवन.

कोलंबस व वास्को डी गामा यांच्या भौगोलिक शोधांचा जगाच्या भवितव्यावर झालेला परिणाम म्हटला म्हणजे जगाचें यूरोपीभवन हा होय. हें यूरोपीभवन जगांत कमी अधिक प्रमाणानें चोहोंकडे झालें. रशीयासारख्या देशाचें स्वामित्व सैबिरियामध्यें पसरलें आणि पूर्वेकडील राष्ट्रांस आणि जातींस रशियनपणा बराचसा आला. जपाननें यूरोपीयांचीं शास्त्रें व अर्वाचीन व्यापाराच्या दळणवळणाच्या व उत्पादनाच्या पद्धती घेऊन आपल्या राष्ट्राचा अधिक विकास करून घेतला. चीननें यूरोपीय संस्कृति भीत भीत उचलली तरी कांहीं बाबतींत अर्वाचीनपणा अधिक दाखविला आहे. चीनवर परकीयांचे जे आघात झाले त्यापासून चीन बचावून त्यानें अधिक सुसंस्कृतता प्राप्त करून घेतली हें खासें. हिंदुस्थानावर यूरोपीय सत्ता स्थापन झाली आणि इतर एशिया यूरोपीयांच्या धाकांत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. एशियामध्यें यूरोपीयांनीं आपल्या वसाहती सैबिरिया खेरीज इतरत्र स्थापिल्या नाहींत. आफ्रिका, अमेरिका व ओशिआनिया येथें यूरोपीय रक्ताच्या लोकांच्या वसाहती स्थापन झाल्या आहेत आणि अमेरिकेंतील देश्य जनतेची प्राचीन संस्कृति पुसटून टाकली जाऊन त्यांच्यांत यूरोपीय संस्कृति स्थानापन्न होण्याचीं लक्षणें दिसत आहेत.

जगांत जें यूरोपाचें वर्चस्व झालें त्याचे प्रकार येणें प्रमाणें सांगतां येतील.

( १ ) कांहीं प्रदेश देश्य जनतेचा जवळ जवळ नायनाट होऊन यूरोपीय लोकांकडून वसविले गेले.

( २ ) कांहीं प्रदेशांत यूरोपीय जातीचे लोक मोठ्या संख्येनें वसती करते झाले आणि देश्य लोक जरी वसती करीत असले किंबहुना त्यांची वसती जरी मोठी असली तरी त्यांची संस्कृति वन्यच राहिली.

( ३ ) कांहीं प्रदेशांत यूरोपीय रक्ताच्या लोकांनीं जिंकून आपली संस्कृति तेथें प्रस्थापित केली आणि देश्यांस किंवा तेथील इतर लोकांस त्या संस्कृतीचे आश्रयी किंवा शूद्रवर्ग बनविलें.

(४) कांहीं प्रदेश यूरोपीयांनीं जिंकले पण देश्यांस आपल्या संस्कृतीचे अंशभाक् बनविलें नाहीं. तर त्यांना आपले उपासनी, संप्रदाय, भाषा वगैरे राखूं दिले पण त्यांचा विकास मात्र बंद पाडून त्यांचा राष्ट्रीय जीवितक्रम दुर्गतीस नेला.

( ५ ) ज्या कांहीं प्रदेशांचें विशिष्टत्व आणि स्वातंत्र्य राहिलें तेथें यूरोपीय शास्त्रीय ज्ञानाचा आणि रीतिरिवाजाचा प्रसार केला.

( ६ ) कांहीं प्रदेशांतील लोकांना यूरोपीय लोकांनीं जिंकलें पण त्यांच्याशीं लग्नव्यवहार करून त्यांस आत्मसात् केलें.

या नियमाखालीं सर्व जगाचा अर्वाचीन इतिहास आणतां येईल असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. यूरोपीय वर्चस्वाचा जपानवर, हिंदुस्थानवर, चीनवर, तुर्कस्तानावर, निग्रोंवर, मावरीलोकांवर व अमेरिकन इंडियन लोकांपैकीं पेरू व मेक्सिको येथील लोकांवर आणि संयुक्तसंस्थानांतील देश्यांवर परिणाम झाला, पण निरनिराळ्या प्रकारें झाला. तो कोठें व कसा काय हें पाहूं.

जे प्रदेश यूरोपीयांनीं वसविले आणि ज्यांतील देश्यांचा जवळ जवळ नायनाट केला अशांमध्यें आस्ट्रेलिया, न्यूझीलंड, टॅस्मेनिआ, संयुक्तसंस्थानें, कानडा वगैरे प्रदेश येतात. संयुक्तसंस्थानें आणि कानडा येथील लोकांचा नायनाट यूरोपीयांनीं केला किंवा नाहीं याविषयीं मतभेद आहे. कित्येक असें म्हणतात कीं संयुक्तसंस्थानांत जरी अनेक इंडियन लोकांचीं राष्ट्रें होतीं तरी त्यांची संख्या फारशी नसावी, कां कीं, ज्या लोकांची संस्कृति केवळ व्याधकर्मजीवि आहे व जींत कृषिकर्म फारसें वृद्धिंगत झालें नाहीं त्या संस्कृतींतील लोकांची संख्या फारशी नसते व कांहीं ग्रंथकार असेंहि म्हणण्यास धजतात कीं, ज्या काळीं यूरोपीयांनीं संयुक्तसंस्थानांत वसाहत केली त्या काळाच्या त्या जातींच्या लोकवस्तीपेक्षां आज त्या जातींची लोकवस्ती कमी नाहीं. यूरोपीयांच्या आगमनानंतर सामोआ, टाहिटी, वगैरे अनेक बेटांतील मूळ लोक नष्ट झाले, ते नवागतांनीं पशुप्रमाणें शिकार करून मारले असें नाहीं. ज्या जाती अत्यंत कनिष्ठ दर्जाच्या संस्कृतींच्या असतात त्यांचा गोऱ्या लोकांशीं प्रसंग आला म्हणजे त्या कनिष्ठ जातींचा संहार खालील कारणामुळें होतो. ( १ ) यूरोपीयन लोकांकडून त्या लोकांस संहारक शस्त्रास्त्रें मिळत आणि त्यामुळें त्या लोकांतील आपापसांतील लढाया अधिक संहारक होत, ( २ ) यूरोपीयन लोक किनाऱ्याजवळील जमीन घेत आणि त्यांस आंत किंवा दरीखोऱ्यांत घालवीत; त्या क्रियेंत त्यांचा संहार यूरोपियांकडून होई व त्यांचा यूरोपीयांकडून पराभव झाल्यामुळें दुसऱ्या आंतील लोकांशीं त्यांना लढावें लागे त्यामुळें आणखी संहार होई, ( ३ ) यूरोपीयांनीं देश्यांस कोपऱ्यांत घालविलें आणि त्यांची जमीन घेतली म्हणजे त्यांचें निर्वाहाचें साधन कमी होई आणि शिवाय त्यांच्यांत रोगराई वाढे व त्यामुळें त्यांची संख्या कमी होई, ( ४ ) यूरोपीयांकडून त्यांच्यामध्यें उपदंशप्रमेहादि नवीन रोगांचा प्रसार होई आणि त्या रोगापासून आपला बचाव करून घेण्यास त्यांस साधन नसे.

यूरोपीयांचें आगमन चोहोंकडे केवळ देश्यसंहारक झालें असें नाहीं. कांहीं ठिकाणीं देश्यांस नवीन धंदे व रोगांपासून नवीन संरक्षण यूरोपीयांच्या सत्तेपासून मिळालें. जेथें देश्यांची वस्ती मोठी होती पण ती विशेष कमी झाली नाहीं आणि यूरोपीयांची वस्ती मात्र बरीच झाली असा प्रदेश म्हटला म्हणजे आफ्रिका होय. सर्व आफ्रिका आज यूरोपी-

यांच्या ताब्यांत आली आहे आणि जीं देश्य संस्थानें तेथें आहेत तीं यूरोपीयांच्या संरक्षणाखालीं आहेत. जेथें देश्यांचा वर्ग बराच मोठा व यूरोपीयांचाहि वर्ग बराच मोठा अशी स्थिति असते, तेथें देश्यांस शूद्रत्व पत्करावें लागतें व हळू हळू त्यांच्या संस्कृतीचे आश्रयी व्हावें लागतें. अशा प्रसंगीं देश्यांची संख्या उलट यूरोपीयांनीं नवीन उत्पन्न केलेल्या उद्योगामुळें आणि शेतकीच्या उत्तेजनामुळें वाढते हिंदुस्थान व आफ्रिका यांची स्थिति कांहीं अंशीं एकच आहे.

जेथें देश्यांनीं आपलें स्वातंत्र्य कायम टेवलें आहे अशीं राष्ट्रें म्हटलीं म्हणजे इराण, तुर्कस्तान, चीन व जपान हीं होत. ज्या राष्ट्रांनीं यूरोपीय सुधारणा घेतली त्या राष्ट्रांनीं आपली उन्नति करून घेतली व त्यांनीं यूरोपीय सुधारणा ज्या मानानें घेतली त्या मानानें आपलें जगांत महत्त्व प्रस्थापित केलें.

जेथें देश्यांशीं लग्नव्यवहार करून त्यांस आपल्या समाजाशीं एकरूप करण्याचा प्रयत्न केला गेला असे प्रदेश म्हटले म्हणजे स्पानिश व पोर्तुगीज लोकांनीं व रशियन लोकांनीं व्यापलेले, होत. फ्रेंच, पोर्तुगीज व स्पानिश लोकांनां काळ्या लोकांशीं लग्नव्यवहार करण्यांत कमीपणा वाटत नसे. फ्रेंच कनेडियन लोकांत तेथील अमेरिकनइंडियन लोकांशीं लग्नव्यवहार बराच वाढला. स्पेन व पोर्तुगाल यांनीं रोमन कॅथोलिक संप्रदायाचा सत्तेखालीं आणलेल्या प्रदेशांत प्रसार केला आणि तेथील लोकांशीं लग्नव्यवहारहि केला. फिलिपाईन्समध्यें बहुतेक लोक ख्रिस्ती झाले आणि त्यांतील उच्च वर्गानें स्पानिश लोकांशीं लग्नें वगैरे केलीं. आज त्यांच्यांत संस्कृति व शिक्षण हिंदुस्थानाच्या पेक्षां किती तरी पटीनें अधिक आहे एवढेंच नव्हे तर त्यांच्यांत उच्च तऱ्हेचा आयुष्यक्रम संवर्धित झाला आहे. आणि आज फिलिपिनोंचा दर्जा जगाचे उपयुक्त नागरिक या दृष्टीनें हिंदुस्थानी लोकांच्यावर कोणीहि लावील.

एशियांतील राष्ट्रें, आफ्रिका व अमेरिका हीं सर्व यूरोपीय संस्कृतीनें, भिन्न प्रमाणानें व पद्धतीनीं संस्कारिलीं गेलीं. एशियांतील सैबेरियांतील लोकांखेरीज इतर राष्ट्रांचा हकीगत जगाच्या इतिहाससूत्राचें कथन करतांना देण्यांत आलीच आहे. आतां आफ्रिका, अमेरिका व हिंदी महासागरांतील द्वीपें व सैबेरिया येथील यूरोपीयस्पर्शापूर्वीची व त्यांच्या यूरोपीभवनाची हकीगत देण्याकडे लक्ष देऊं.

### आफ्रिका

**लोक.**—आफ्रिकेंतील मूळ रहिवाश्यांच्या जाती व पोटजाती, त्यांचें वसतिस्थान, त्यांचीं प्रयाणें व संस्कृति यांविषयीं विचार करतांनां मुख्य तीन गोष्टी लक्ष्यांत टेविल्या पाहिजेत. (१) या खंडांत मोठे पर्वत, नद्या वगैरे नैसर्गिक प्रतिबंधांच्या अभावामुळें निरनिराळ्या जातीपोटजातींत दळणवळणांस आडकाठी कोणतीहि नव्हती, त्यामुळें यांच्या संस्कृतींतहि विशेष भिन्नपणा उरला नाहीं. त्यामुळें निरनिराळ्या जातींतील फरक स्पष्टपणें नजरेस येण्यासारखे नाहींत. कित्येक वेळीं जेव्हां निरनिराळ्या जातींचे लोक एका ठिकाणीं येतात किंवा एका परिस्थितींत (उदाहरणार्थ एका राजसत्तेखालीं) असतात तेव्हां परस्परांच्या चालीरीतींच्या अनुकरणामुळें पुष्कळसे लोक संक्रमणावस्थेंत आढळतात, (२) पूर्वी रोमन लोकांच्या अमलाखालीं असलेला भाग सोडून आफ्रिकेंतील मूळ रहिवाश्यांचा इतिहास किंवा तो समजण्याचीं साधनें कांहीं समजणें शक्य नाहीं. तसेंच या लोकांची स्मरणशक्ति अगदीं कोती असते. यामुळें या लोकांचें प्राचीन वसतिस्थान, त्यांचे परिभ्रमणमार्ग, त्यांच्या संस्कृतीचा उगम यांविषयींची माहिती सर्व अनुमानात्मक आहे असें म्हटल्यास फारसें वावगें होणार नाहीं, (३) वरील गोष्टीविषयीं विद्वान लोकांनीं ज्या निरनिराळ्या उपपत्ती बसविल्या आहेत त्याहि पुरेशा साधनांच्या व पुराव्याच्या अभावीं पूर्णपणें विश्वसनीय नाहींत. येथील मूल रहिवाश्यांच्या पांच मुख्य जाती आहेत त्या अशा: बुशमन, नीग्रो, प्राच्य हेमाईट, लीबियन, व सेमाईट. यांच्यांत रक्ताची व चालीरीतींची भेसळ झाल्यानें किंवा होत असल्यानें संक्रमणावस्थेंत असलेल्या पुष्कळ उपजाती आहेत.

बुशमन.—या जातीचे लोक खुजट, पिंगट वर्णाचे असतात. या वर्णांत किंचित् पिवळसर रंगाची झांक असते. हे पारधी असल्यानें नेहमीं फिरते असतात. ऐतिहासिक कालापासून हे कालाहारी व साहारा वाळवंटाच्या दक्षिण व पूर्व सरहद्दीवर राहात असत. परंतु टँगानिका सरोवरापर्यंत यांच्या वसतीचे अवशेष आढळतात.

हाटेनटॉट.—या लोकांचें वर्गीकरण वरील सदरांत केल्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. पण यांचें कोणाशीं विशेष साम्य आहे याविषयीं बराच मतभेद आहे. हे गुरेंपाळणारे, किंचित पिंवळसर पिंगट वर्णाचे, मध्यम उंचीचे लोक आहेत. हे बुशमन नीग्रो व हेमाइट लोकांची भेसळ होऊन झाले असावे असें तज्ज्ञांचें मत आहे.

नीग्रो.—अबिसिनिया व तांबड्या समुद्राच्या कांठचा भाग सोडून साहाराच्या दक्षिण सरहद्दीपासून तों केपपर्यंत सर्व प्रदेश नीग्रो व त्यांच्याशीं लिबियन व सेमाइट लोकांचा भेसळ होऊन नवीन संक्रमणावस्थेंत असलेल्या लोकांनीं व्यापिला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

हेमाइट सेमाइट.—आफ्रिकेच्या ईशान्येस व अबिसिनीयांत हेमाइट व सेमाइट या दोन जाति मिसळून तयार झालेले लोक राहतात. अलजीरिया व मोरोक्कोंत लिबियन जातीचे लोक असतात. यांचा वर्ण गौर आहे. यांच्यावर अरबी चालीरीतींचा व धर्माचा संस्कार झालेला आहे. अबिसिनियाचा गाला म्हणून जो भाग आहे त्यांत व सोमाली मुलुखांत हेमाइट जात राहते.

नीग्रो व यांच्याशीं दुसऱ्या रक्ताची भेसळ होऊन तयार झालेल्या जाती यांचीच आफ्रिकेंत सर्वांत जास्त लोकसंख्या आहे. या लोकांचे त्यांच्या भाषेवरून दोन भाग केले आहेत. अस्सल नीग्रांत भाषेचा फारच घोंटाळा आहे. बंटु ही जी यांची पोटजात आहे तींतच काय ते सर्व लोक एक किंवा दोन ठरीव भाषा बोलतात.

याशिवाय अगदीं दाट अरण्यांत पारध करून उपजीविका करणाऱ्या फार खुज्या लोकांची एक निराळी जात आहे, त्यांची फारशी माहिती सध्यां उपलब्ध नाहीं.

**संस्कृति**—येथपर्यंत आफ्रिकेंतील मूळ रहिवाशी, त्यांचें अर्वाचीन वसतिस्थान व त्यांमध्यें मुख्य जातींच्या मिश्रणानें झालेल्या उपजाती, या सर्व गोष्टींचें वर्णन झालें. आतां त्यांच्या संस्कृतीचा विचार करावयाचा आहे. स्वाभाविक अथवा नैसर्गिक परिस्थितीचा व संस्कृतीचा अगदीं निकट संबंध असतो, म्हणून संस्कृतीविषयीं लिहितांना ज्या ठळक ठळक नैसर्गिक गोष्टींचा परिणाम या खंडांतील लोकांच्या संस्कृतीवर झाला त्याचें थोडें दिग्दर्शन केलें पाहिजे. या दृष्टीनें या खंडाचे मुख्य तीन भाग केले आहेत ते असे: (१) उत्तरेकडील माळरानाचा व वाळवंटाचा मोठा प्रदेश, (२) दक्षिणेंतील तशाच प्रकारचा लहानसा भाग, (३) तिसरा भाग कांगो नदीच्या पाणवठ्याचा व गिनीच्या आखाताजवळचा भाग मिळून झालेला आहे. यांत मोठ्या नद्या व दाट अरण्यें आहेत. वर सांगितलेल्या पहिल्या दोन प्रदेशांचा संबंध उभ्या उंचवट्याच्या पट्ट्यानें जोडिला आहे. हा उंचवट्याचा भाग सरोवरांच्या मालिकेच्या पूर्वेस आहे. अरण्यांतील अगदीं दाट प्रदेश सोडून, जेथें पाण्याचा पुरवठा चांगला असतो तेथें लोक शेतीचा धंदा करितात ही गोष्ट या मधल्या प्रदेशांत रहाणाऱ्या लोकांस चांगली लागू पडते. येथील दाट अरण्यांतील अतिशय खुजा लोकांशिवाय बाकी बहुतेक लोक शेतीवर आपली उपजीविका करितात. पूर्वेच्या पठारावर रहाणाऱ्या लोकांस शेती करतां येते. बंटू जात शेतीचा धंदा करिते. सपाट गवताळ माळरानांत म्हणजे पहिल्या व दुसऱ्या भागांत गुरेंढोरें व मेंढ्याबकरीं पाळून निर्वाह चालवितां येतो. या भागांतील बंटू लोकांस गुरें पाळण्याची फार आवड आहे. पण दक्षिण व मध्यआफ्रिकेंत निद्रारोगकारक माशा असल्यानें येथें गुरें पाळणें जवळ जवळ अशक्य झालें आहे. उत्तरेंत या माशा नसल्यानें गुराढोरांवर उपजीविका करणाऱ्या लोकांचा भरणा फार आहे. वाळवंटातल्या लोकांस नेहमीं फिरतें असावें लागतें. त्यांचीं नांवें तौरेग, तिब्बू, बेदुइन व बुशमन हीं होत.

राजकीय परिस्थिति व नैसर्गिक स्थिति ह्या एकमेकांवर अवलंबून असतात. फिरत्या लोकांत समाजाची अथवा लोकसंख्येची फारशी वाढ होणें शक्य नसतें. असल्या लोकांत पितृसत्तात्मक कुटुंब हें एक समाजाचें घटकावयव असतें. ज्या वेळीं शेतीस सुरुवात होते, त्याचवेळीं समाज अस्तित्वांत येतो व लहान लहान समाज, ग्राम संस्था व ग्रामणी अथवा ग्रामाधिपति हे अस्तित्वांत येत असतात. जेथें दळणवळणास नैसर्गिक आडकाठी किंवा अडचणी नसतात त्या मुलखांत मोठीं राज्यें अस्तित्वांत येतात. पण दळणवळणाच्या मार्गांत अडथळे नसल्यानें शत्रूंस स्वाऱ्या सहजगत्या करितां येतात, त्यांमुळें अशा राज्यांचा व तेथल्या संस्कृतीचा नाशहि लवकरच होतो. या सिद्धान्ताचें चांगलें उदाहरण म्हणजे पश्चिम सूदनचा इतिहास होय.

पूर्वेकडून आफ्रिकेंत येण्यास मार्गांत फारच थोडे अडथळे आहेत. त्या योगानें येथील मूळच्या संस्कृतीवर तिकडून आलेल्या लोकांच्या संस्कृतीची छाप पडली आहे. याकरितां आपणास जर आफ्रिकेंतील मूळच्या रहिवाश्यांची संस्कृति पहावयाची तर ज्या ठिकाणीं दुसऱ्या संस्कृतीचा प्रवेश होणें शक्य नाहीं, अशा ठिकाणच्या लोकांचा आपण विचार केला पाहिजे. कांगोच्या दाट जंगलांत गिनीच्या आखाताच्या परिकरांत असणाऱ्या लोकांच्या रहाणीकडे पाहिलें असतां आपणास नीग्रो संस्कृतीचें ज्ञान होईल. यांचा धंदा शेतीचा असतो. यांचें मुख्य खाण्याचे पदार्थ केळीं व गोराडू सारखीं कंदमुळें वगैरे आहेत. यांच्या घराचा आकार लांबट चौकोनी असतो व छपरास आढें असतें. हे लोक नरमांसभक्षक आहेत. यांचे कपडे झाडांच्या सालीचे केलेले असतात. यांचीं शस्त्रें म्हणजे धनुष्य—दोरी मात्र वेताची असते—व लाकडी ढाल हीं होत. आंगावर गोंदण्याचा या लोकांत प्रघात आहे. यांच्या पारमार्थिक विचारांकडे पाहिलें तर या लोकांत सृष्ट पदार्थांची पूजा करण्याची पद्धति अविकसित स्थितींत आढळते. येथील रहिवाशांत व आफ्रिकेच्या दक्षिण व पूर्व भागांत राहाणाऱ्या लोकांत थोडा फरक आहे. वर नमूद केलेल्या प्रदेशांत बंटु लोक राहतात. ते गुरेंढोरें पाळितात. त्यांचे खाण्याचे मुख्यपदार्थ दूध व मका हे होत. यांच्या झोपड्या वर्तुलाकार असून त्यावर लहानसा घुमट असतो. अथवा शंकूच्या आकारासारखें छप्पर असतें. ते मनुष्याशिवाय भाला व चांबड्याची ढाल यांचा उपयोग करितात. मृत पूर्वजांची पूजा करणें हा यांचा धर्म होय.

वरील अंतर पडण्याचें कारण असें आहे कीं, पहिली संस्कृति फार प्राचीन कालची आहे. दुसरी तिच्याहून थोडी अर्वाचीन आहे, व दुसऱ्या संस्कृतीच्या लोकांत समाजसंघटनेची बरीच वाढ झालेली दिसते. कारण मृतपूर्वजांची उपासना समाजसंघटना असल्यावांचून अस्तित्वांत येत नाहीं.

यांच्या उपजातींच्या राहणींत थोडा बहुत फरक असतो. पूर्वेकडील लोकांस तंतुवाद्य वाजवतां येतें व सुरा नेमका फेंकण्याची कला त्यांस अवगत असते. नाईल नदीच्या वरच्या भागांतील लोक लोखंडाचे अलंकार वापरतात.

सूदनमध्यें सेमाईट जात राहते. या भागांत अरब लोकांनीं आपली संस्कृति स्थापन केली. हे लोक मुसुलमानांप्रमाणें

सुंता करतात. यांचें विशिष्ट प्रकारचें शस्त्र म्हणजे तरवार होय. शिंगासारखा आफ्रिकेचा पूर्वभाग आहे तेथें हेमाइट व सेमाइट संस्कृतींची भेसळ झाली आहे.

दंतुवाद्य, शंकूसारख्या अथवा मधमाशाच्या पोळयाचा आकार असलेल्या झोंपडया, सुंता, तरवारीचा उपयोग हीं सर्व या लोकांत आढळतात.

**मुख्य जाती, त्यांची उत्पत्ति व प्रसार.**—आफ्रिकेंत बुशमन, नीग्रो, हेमाइट, सेमाइट व लिबियन अशा पांच मुख्य जाती आहेत हें वर सांगितलेंच आहे. शेवटच्या तीन जातींचा मूळ पुरुष एकच असावा असें मानववंशशास्त्रज्ञांचें मत आहे. बुशमन व नीग्रो हे दोन आफ्रिकेंतील अस्सल मूळचे रहिवाशी असावेत असें अनुमान तज्ज्ञ लोक काढितात.

बुशमन जातीच्या उत्पत्तीचा कांहींच पत्ता लागत नाहीं. हे लोक दक्षिण आफ्रिकेचे मूळचेच रहिवाशी असावेत. नीग्रोंचें मूलस्थान सरोवराच्या मालिकेच्या पूर्वेस असलेल्या उंचवटयाच्या प्रदेशांत असण्याचा बराच संभव आहे असें मानववंशशास्त्रज्ञ म्हणतात व तेथूनच हे लोक साहारा वाळवंटाच्या सरहद्दीवरून पश्चिमेकडे व पूर्वेचा उंच प्रदेश ओलांडून दक्षिणेकडे गेले असावेत.

तांबडा समुद्र व हिंदीमहासागर यांमध्यें असलेला जो शिंगासारखा भाग आहे तेथून हेमाइट लोकांचा प्रसार दुसरीकडे झाला असावा. बंटू ही नीग्रोंची पोटजात आहे व बंटू व बुशमन यांच्या मिश्रणानें हॉटेनटाट जात झाली आहे.

पूर्वेकडून पश्चिमेकडे व उत्तरेकडून दक्षिणेकडे जीं मुख्य जातींचीं प्रयाणें झालीं व त्या योगानें जें जातींचें संकरण झालें त्याचा बराच काल टिकणारा परिणाम सूदनसारख्या सपाट देशांत दिसून आला. तेथें मोठीं राज्यें उदयास आलीं. उदाहरणार्थ, घाना, मेले, सानघाई व बोर्नु हीं अनुक्रमें ७,११,१४व १६ व्या शतकाच्या सुमारास मोठ्या भरभराटीस आलीं.

त्याचप्रमाणें पूर्वेतून दक्षिणेंत जीं प्रयाणें झालीं, त्यामुळें जातीच्या संकरानें घोंटाळा माजला व अर्वाचीन ऱ्होडेशियांत निरनिराळ्या संस्कृती अस्तित्वांत आल्या त्यांचे अवशेष सध्यां तेथें दृष्टीस पडतात.

कांहीं झुलू लोकांनीं उत्तरेकडे व्हिक्टोरिया नायंझापर्यंत जोरानें चाल केली. तेथें त्यांचा व नीग्रो जातींचा संकर होऊन निरनिराळ्या नव्या जाती उत्पन्न झाल्या. प्राचीन "किटवारा" नांवाचें एक राज्य रेवेंझोरीच्या उंचवटयाच्या भागांत होतें तें मोडून त्यांचीं निरनिराळीं शकलें झालीं. हीं जीं लहान लहान राज्यें झालीं, त्यांतली सत्ता हेमाइट उमरावांचे हातीं होती. तसेंच झंग लोकांचें पूर्वी एक मोठें राज्य होते. त्याचें झांजीबार हें एक चिरस्मरणीय स्मारक सध्यां आहे. हे झंग लोक हेमाइट व नीग्रो लोकांच्या मिश्रणानें झाले असावेत असा मानववंशशास्त्रज्ञांचा समज आहे.

मादागास्कर ह्या बेटाचा आफ्रिका खंडांतच समावेश होतो. हें सध्यां फ्रेंचांच्या ताब्यांत आहे. ह्या बेटांतील लोकांच्या मुख्य तीन जाती आहेत. त्यांचीं नांवें (१) होव्हा, हे लोक उंचवटयाच्या प्रदेशांत राहतात. हे लोक मॅलेच्या द्वीपकल्पांतून अथवा त्याच्या लगतच्या बेटांतून आले असावेत. यांचा वर्ण पीत आहे. (२) साकालाव्हा हे नीग्रोवंशांतले आहेत. (३) मालागासे ही जात वर सांगितलेल्या दोन जातींच्या मिश्रणानें झाली आहे. व्होवा १९ व्या शतकांत ख्रिस्ती झाले. हे दर्यावर्दी आहेत व याच लोकांनीं नीग्रो लोकांस गुलाम म्हणून कामाकरितां येथें आफ्रिकेंतून आणिलें असावेत असा शास्त्रज्ञांचा तर्क आहे.

**आफ्रिकेचा यूरोपीयांस परिचय.**—आफ्रिका या नांवाच्या उत्पत्तीविषयीं बरींच अनुमानें विद्वानांनीं केलीं आहेत. कित्येकांच्या मतें हा शब्द सेमाइट लोकांच्या प्रचारांत होता व त्याचा अर्थ ते मातृभूमीपासून दूर असलेली वसाहत असा करीत असत. सर्वांत चांगलें अनुमान "चार्लस ईसाट" यानें केलें आहे. रोमन व कार्थेजचे लोक प्रमुख "बर्बर" अथवा न्युमिडियन जातीस "आफारिक" म्हणत असत व त्यांच्या देशास तेंच नांव देण्यांत आलें. त्याचाच म्हणजे आफारिक शब्दाचा अपभ्रंश आफ्रिका आहे. पूर्वी भूमध्यसमुद्राचे किनाऱ्यालगतच्या भागास आफ्रिका हें नांव देत असत. पुढें या सर्व खंडाला लोक आफ्रिका म्हणूं लागले.

इजिप्त देश जर या खंडांतून वगळला तर या खंडाचा इतिहास म्हणजे आशियांतील व यूरोपांतील येथें आलेल्या वसाहतवाल्यांचा इतिहास होईल. याला अपवाद म्हटला तर एक पूर्वेकडील अबिसिनीयाचें राज्य होय.

फिनिशियन लोकांनीं सुमारें ख्रि. पू. १००० चे सुमारास भूमध्यसमुद्रालगतच्या आफ्रिकेच्या इतर भागीं वसाहत करून ख्रि. पू. ८०० मध्यें कार्थेज हें मोठें प्रसिद्ध शहर वसविलें व त्यांनीं उत्तरेकडील वसाहत करण्याजोगता सर्व प्रदेश आपल्या ताब्यांत घेतला.

नंतर ग्रीक लोकांनीं वसाहत करण्यास आरंभ केला; व ख्रि. पू. ३३२ सालीं अलेक्झांड्रिया हें शहर वसविलें.

रोमन लोकांनीं ख्रि. पू. १४६ मध्यें कार्थेज शहराचा नाश केला व ग्रीक सत्ताहि नाहींशी करून आपली सत्ता इजिप्त देशांत व कार्थेज शहरीं कायम केली.

रोमन लोकांची आफ्रिका म्हणजे भूमध्यसमुद्राच्या कांठचा प्रदेश अशी समजूत होती. ख्रि. पू. १४६ या वर्षी सिपिओ आफ्रिकेनस यानें कार्थेज शहराचा पाडाव करून त्या शहराला रोमन साम्राज्यांत समावेश केला. याच्या शेजारी असलेले न्युमिडियन लोक रोमचे दोस्त होते. आगस्टस बादशहानें आफ्रिकेंतील रोमन वसाहतींचा कारभार

सीनेटच्या हवाली केले. डायोक्लेटीस बादशहानें कार्थेजच्या वसाहतीचा बराच भाग स्पेनच्या प्रांतास जोडला. अकराव्या शतकांत अरब लोकांचा उत्कर्ष झाला व या लोकांची लाट इजिप्त व आफ्रिकेचा किनाऱ्यालगतचा पूर्व भाग या प्रदेशांत पसरली व यांच्या संस्कृतीचा कायमचा ठसा उत्तरेकडील लोकांच्या संस्कृतीवर वठलेला आहे. अरब लोकांनीं उंटाच्या सहाय्यानें आफ्रिकेच्या अंतःप्रदेशांत प्रवेश करून सेनिगँबियांत व नायजर नदीच्या मध्यवर्ती प्रदेशांत आपली सत्ता स्थापिली.

तुर्कांनीं १४५३ सालीं कान्स्टांटिनोपल घेतलें, व इजिप्त अलजिरिया, ट्यूनिस व ट्रिपोली हे मुलुख आपल्या अमलाखालीं आणिले.

तुर्कांच्या सत्तेस लवकरच उतरती कळा लागून त्यांची पश्चिम यूरोपांतून उचलबांगडी झाली व वेनिस, पीसा व जीनोवा हीं शहरें व्यापारनिमित्तानें प्रसिद्धीस आलीं. त्यांचा व्यापार इजिप्त व उत्तर आफ्रिकेंतील इतर देशांशीं चालत असे.

पंधराव्या शतकांत पोर्तुगीज लोकांची धाडसीपणा व दर्यावर्दीपणाबद्दल यूरोपांत फार प्रसिद्धी होती. यांनीं केप ऑफ गुडहोपवरून हिंदुस्थानांत येण्याचा जलमार्ग शोधून काढिल्यापासून वेनिस वगैरे शहरांचें महत्त्व जवळ जवळ नाहींसें झालें. याच शतकांत पोर्तुगीज लोकांनीं गीनीकोस्ट व कांगो नदीचें मुख शोधून काढिलें व तेथें व्यापाराकरितां ठाणीं करण्यास सुरवात केली. पुढें पोर्तुगीज लोकांस तांबड्या समुद्राच्या कांठचीं मोठीं शहरें शोधाअंतीं सांपडलीं. तेव्हां तेथें म्हणजे अबिसिनियांत वसाहती करण्याचा अथवा साधल्यास राज्य स्थापण्याचा त्यांनीं प्रयत्न केला; पण त्यांत त्यांना यश न येऊन शेवटीं तेथून कायमचा पाय काढावा लागला.

कांहीं राजकीय घालमेली स्पेन देशांत झाल्यामुळें स्पेन व पोर्तुगालचीं राज्यें एका छत्राखालीं जाऊन पोर्तुगालची दर्यावर्दी सत्ता कमी झाली व हालंड, फ्रान्स व इंग्लंड या देशांच्या हातीं ती आली.

डच लोकांनीं केपकॉलनी येथें वसाहत केली व सेंट हेलेना हें बेट इंग्रजांनीं त्याच सुमारास घेतलें.

अठराव्या शतकांत यूरोपियन राष्ट्रांत, अमेरिकेंत व पौरस्त्य देशांत वर्चस्व मिळविण्याकरितां आपसांत चढाओढ सुरू झाल्यानें या खंडाकडे त्यांचें दुर्लक्ष्य झालें असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. पण याच सुमारास या खंडांतील लोकांस गुलाम करून विकण्याचा व्यापार अगदीं कळसास पोहोंचला.

पुन्हां आफ्रिकेंतील अज्ञात प्रदेश शोधण्यास आरंभ झाला व जेम्स ब्रूस व मंगोपार्क या दोन प्रवाशांनीं नाइल नदीचा व नायजर नदीचा प्रवाह कोठें कसा आहे याविषयीं निश्चितपणें माहिती मिळविली. इतक्यांत फ्रान्स देशांत राज्यक्रांति होऊन नेपोलियनशीं युद्ध करण्यांत सर्व राष्ट्रें गढून गेलीं. या युद्धांत इंग्रजांनीं केपकॉलनी डच लोकांपासून घेतली.

नेपोलियन बादशहाचा पराभव केल्यानंतर पुनः आफ्रिकेंतील अज्ञात भाग शोधण्यास सुरुवात झाली.

इंग्रज प्रवाशी १८२३ सालीं चाड सरोवराजवळ आले व १८३० च्या सुमारास त्यांनीं नायजर नदीचें मुख शोधून काढिलें व १८४१ सालीं तेथें एक व्यापारानिमित्त वसाहत केली. याच वेळीं फ्रेंचांनीं बर्बर लोकांच्या चांचेपणास आळा घालून अलजिरिया आपल्या ताब्यांत घेतला.

प्रसिद्ध प्रवासी लिव्हिंगस्टन यानें १८००' सालापासून मध्य आफ्रिकेंत प्रवास करण्यास आरंभ केला व त्यानें झांबिझी, न्यासा सरोवर व व्हिक्टोरिया फॉल्स नांवाचा धबधबा शोधून काढिला. त्यानें सरोवरांच्या मालिकेपैकीं बरींच सरोवरें शोधून प्रसिद्धीस आणलीं. लिव्हिंगस्टन १८७३ त मेल्यावर त्याचें काम स्टॅनलेसाहेबानें आपल्या हातीं घेतलें.

त्याचप्रमाणें सूदन व साहाराच्या भागांत रोल्फ्स व स्वाईनफर्ट, गस्टाव नाक्टिगल साहेबांनीं (१८६० ते ७५) अनेकदां प्रवास केला. याच सुमारास दक्षिण आफ्रिकेंत कार्ल माउच व सेलस या यूरोपियन लोकांनीं दक्षिणेंतील इतका वेळ टाऊक नसलेले भाग लोकांच्या नजरेस आणिले.

**आफ्रिकेची यूरोपियन राष्ट्रांत विभागणी.**—या विभागणीस १९ साव्या शतकाच्या अखेरीस सुरुवात झाली. कांगो व तिला मिळणाऱ्या दुसऱ्या नद्यांचा शोध करण्याचें काम शेवटास गेलें व यापुढें अज्ञात प्रदेश शोधण्याची यूरोपियन राष्ट्रांची जिज्ञासा पूर्ण होत आली आणि या खंडाकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलला. व्यापारनिमित्तानें अथवा आफ्रिकेंतल्या रानटी लोकांस सुसंस्कृत करण्याच्या मिषानें प्रत्येक पाश्चात्य राष्ट्रांनीं आफ्रिकेंत वसाहत करून साम्राज्यविस्तार करण्यास आरंभ केला. १८७५ च्या सुमारास इंग्लंड, फ्रान्स व पोर्तुगाल या तीन यूरोपियन राष्ट्रांचे हितसंबंध या खंडांत जडले होते. जर्मनीनें लवकरच अनुप्रवेश केला व त्याचें अनुकरण इतर राष्ट्रांनीं केलें.

त्यावेळची आफ्रिकेची राजकीय स्थिति लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. इजिप्त, इजिप्तमध्यें समावेश होत असलेला सूदनचा भाग, ट्युनिसीया व ट्रिपोली यांवर तुर्कस्तानच्या सुलतानाची सत्ता होती. मोरोक्को, अबिसिनिया व झांजीबार हीं स्वतंत्र राज्यें होतीं. यांशिवाय सहाराचा वालुकामय प्रदेश वगळला तर जवळ जवळ अर्धा आफ्रिकेचा प्रदेश निरनिराळ्या जातींनीं व्यापिला होता. त्यांपैकीं पश्चिमेस डाहोमे, अशांटी व व बेनिन हीं स्वतंत्र नीग्रो लोकांचीं संस्थानें होतीं. यांखेरीज मध्य सूदनमध्यें मुसुलमानांचें एक राज्य होतें व व्हिक्टोरिया नायंझा सरोवराचे वायव्येस युगांडा वगैरे बारीक–

सारीक स्वतंत्र संस्थानें नीग्रो लोकांचीं होतीं. इतर ठिकाणीं निरनिराळ्या जातींच्या टोळ्या होत्या. त्यांच्यांत अगदीं भिन्न राज्यपद्धती होत्या. आफ्रिकेच्या मूळ रहिवाशांच्या राज्यांत एकोपा कधींच नव्हता व त्यांच्यामध्यें राज्यविस्तार करण्याची किंवा तें प्रबळ करण्याची महत्त्वाकांक्षाहि नव्हती.

१८७० सालीं फ्रान्स व जर्मनी यांचें मोठें युद्ध होऊन जर्मनी पूर्णपणें यशस्वी झाला. या जयानें जर्मनीची इभ्रत यूरोपियन राष्ट्रांत वाढली व याच वेळेस बिस्मार्क हा जर्मनींत मुख्य मंत्री होता. त्याला जर्मनीचें वसाहतीचें साम्राज्य वाढविण्याची फार उत्कट इच्छा होती. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांनीं इतःपर परक्या राष्ट्रांचें उत्तर अथवा दक्षिण अमेरिकेंत बोट न शिरकूं देण्याचा आपला निश्चय जगजाहीर केला. यामुळें आफ्रिकेशिवाय मोकळा देश दुसरा कोणताहि राहिला नाहीं.

मोझांबिकपासून अँगोलापर्यंत एक पूर्वपश्चिम पट्टा दक्षिण आफ्रिकेंत आपल्या ताब्यांत घेण्याची मनीषा पोर्तुगालची होती. इंग्लंडची उडी तर फारच मोठी होती. इजिप्तपासून तों केपकॉलनीपर्यंत अविच्छिन्न प्रदेश आपल्या अमलाखालीं आणण्याकरितां इंग्लंडनें अटोकाट प्रयत्न केले. वसाहतीच्या साम्राज्याची कल्पना फार उशीरानें जर्मन लोकांच्या लक्षांत आली. तेव्हां शक्य त्या रीतीनें सांपडेल तेवढा मुलुख ताब्यांत घेण्याची हांव जर्मनीस सुटली. मादागास्कर बेटांत व पूर्व, पश्चिम व मध्य आफ्रिकेंत एक मोठें साम्राज्य स्थापन करण्याकरितां फ्रेंचांनीं जारीनें प्रयत्न सुरू केले. इतालीचें लक्ष सारखें ट्रिपोली व त्याच्या सभोंवतालचा मुलुख बळकावण्याकडे लागलें होतें.

व्यापार करण्याच्या व ख्रिस्तीसंप्रदायप्रसार करण्याच्या निमित्तानें व प्रदेश शोधण्याच्या मिषानें, पाश्चात्य राष्ट्रांनीं आपले लोक आफ्रिकेंत पाठविले. त्यांनीं आपलीं ठाणीं ते उतरलेच्या भागांत व तेथून दूरवरच्या मुलुखांत वसविलीं व तो प्रदेश आपल्या अंमलाखालीं आणिला. जेव्हां ही युक्ति लागू पडत नसे तेव्हां तेथील रानटी लोकांशीं तह करून मातीमोल किंमतीस मुलुख विकत घेत किंवा सक्ती करून विकत देण्यास भाग पाडीत. निरनिराळ्या राष्ट्रांत जेव्हां सरहद्दीबद्दल किंवा मुलुखाबद्दल भांडण लागे, तेव्हां जो भाग ज्याच्या पूर्ण ताब्यांत तेवढा त्या राष्ट्राचा समजला जात असे. या तत्त्वास इंग्रजींत "प्रिन्सिपल ऑफ इफेक्टिव्ह ऑक्युपेशन" असें नांव पडलें आहे. कित्येक प्रसंगीं आपसांत तडजोड होऊन एकमेकांत तह होऊन भांडण मिटत असे.

बेलजीयन लोकांनीं कांगोचा प्रदेश कसा घेतला व जर्मन लोकांनी पूर्व आफ्रिकेंत आपली वसाहत कशी केली या दोन गोष्टी फार मनोरंजक आहेत व त्यांवरून आफ्रिकेंतील मुलुख मिळण्यास कोणते प्रयत्न केले असतील याची कल्पना करतां येईल म्हणून त्या खालीं दिल्या आहेत.

बेलजमचा राजा लिओपोल्ड यानें स्टॅनले साहेबास बेलजीयन लोकांच्या पुढें गेलेल्या टोळीस मदत करण्याकरितां पाठविलें आहे असें जाहीर केलें. हा साहेब "कांगो मंडळाचा" प्रतिनिधी होता. याचा जाण्याचा खरा उद्देश, कांगोच्या प्रदेशांत ठाणीं वसवून तो आपल्या मंडळाच्या ताब्यांत घ्यावयाचा असा होता. या मंडळाचे सभासद निरनिराळ्या प्रांतांतील मोठे लोक होते. हळू हळू या सभेचे सभासद सर्व बेलजियन झाले व पुढें हा सर्व देश लिओपोल्ड बादशहानें आपल्या हयातींत आपल्या राज्यास जोडिला.

तसेंच पूर्व आफ्रिकेचा (सध्यां जर्मनीच्या ताब्यातून इंग्लंडला मिळालेला) प्रदेश दुसऱ्याच्या अमलांत जावयाचा आहे असें जर्मनीस आढळून येतांच तीन मोठ्या जर्मन पुरुषांनीं अगदीं हलक्या प्रतीच्या कारागिरांचीं सोंगें घेऊन झांजीबारच्या मुलुखांतून तेथें प्रवेश केला व आपल्या जवळचीं निशाणें दूरवर लावून जर्मन सत्ता स्थापन केल्याचें जाहीर केलें. त्यांनीं तेथील राजाशीं तह करून तो मुलुख जर्मनीच्या ताब्यांत गेल्याबद्दल कागदपत्र करून घेतले. पुढें कांहीं दिवस गेल्यानंतर जर्मन सरकारनेंहि अशाच आशयाचा जाहीरनामा प्रसिद्ध केला.

या खंडांतील मुलुखांच्या सरहद्दी ठरविण्याकरितां पाश्चात्य राष्ट्रांनीं जे आपआपसांत तह केले त्यांपैकीं खालील सहा मुख्य आहेत ते येणेंप्रमाणें.

(१) १८९० सालीं जुलै महिन्यांत ग्रेटब्रिटन व जर्मनी यांच्यामध्यें तह झाला. त्या तहान्वयें जर्मनी व ग्रेटब्रिटन या दोन राष्ट्रांचें सत्ताक्षेत्र अथवा कमाल मर्यादा (स्फिअर्स ऑफ इन्फ्ल्युअन्स) ठरल्या. जर्मनीनें झांजीबार हा एक ब्रिटिश साम्राज्याचा संरक्षित भाग असें कबूल केलें व त्या ऐवजीं इंग्लंडनें हेलीगोलंड हें बेट जर्मनीस दिलें.

(२) दुसरा अशाच प्रकारचा तह याच वर्षीं ब्रिटिश व फ्रेंच या दोन राष्ट्रांत झाला. या तहाच्या योगानें फ्रेंचांची मादागास्कर बेटावरील सार्वभौम सत्ता व सहारांतील प्रदेश हें सत्ताक्षेत्र ठरून या दोन राष्ट्रांचा तंटा मिटला.

(३) १८९१ मध्यें पोर्तुगाल व इंग्लंड यांनीं आपआपल्या कमाल मर्यादा अथवा सत्ताक्षेत्र पूर्वेकडील व पश्चिमेकडील निश्चितपणें ठरविलें.

(४) १८९४ त सूदनमधील एकमेकांचें सत्ताक्षेत्र फ्रेंच व इंग्लिश राष्ट्रांत निश्चित झालें.

(५) १८९१ त पूर्व आफ्रिकेंतील इतालियन व ब्रिटिश वसाहतींच्या मर्यादांचा कच्चा तक्ता तयार झाला.

(६) १८९८ सालीं "चाड" सरोवराच्या लगतच्या प्रदेशांत कोणाची सत्ता कोठपर्यंत आणावी हें कायमचें पक्कें झालें.

**पहाणी व मोजणी.**—यूरोपियन राष्ट्रांनीं आफ्रिकेंतील देश आपसांत वांटून घेतल्यावर प्रत्येक राष्ट्रानें आपल्या ताब्यांतील प्रदेशाची मोजणी केली. या मोजणीचें काम बरींच वर्षें चाललें होतें. डीअनव्हील या साहेबानें या खंडाचा नकाशा अज्ञात प्रदेशाची जागा रिकामी ठेवून तयार केला. या नकाशांतील कोरी जागा भरण्याचें काम कित्येक लोकांनीं हातीं घेतलें.

कांगो नदीच्या पाणवठ्याचा प्रदेश, त्या नदीला मिळणाऱ्या नद्या, त्यांचे उगम व तेथील अरण्यें यांची नक्की माहिती जर्मन व पोर्तुगीज प्रवाशांनीं अनेकदां प्रवास करून मिळविली. त्याच प्रमाणें पूर्व आफ्रिकेंतलें काम ब्रिटिश आफ्रिकन संशोधक मंडळाच्या वतीनें जोसेफ टॉमसन यानें आपल्या आंगावर घेतलें. या भागांत आस्ट्रियन प्रवाशी, काउंट टेलेकी व लुडविग व्हान होहनेल या दोन गृहस्थांनीं अबिसिनीयांत दूरवर जाऊन रुडोल्फ सरोवर शोधिलें. १८८३ सालीं जेम्स बंधूंनीं प्रवास करून लोकांच्या या भागाविषयींच्या ज्ञानांत भर टाकली. एडनच्या आखातापासून तों हिंदीमहासागराच्या किनाऱ्यापर्यंत पूर्व पश्चिम भाग डोनल्डसन स्मिथ या अमेरिकन पुरुषानें प्रथमच पादाक्रांत केला.

उत्तरेकडील प्रदेशाची माहिती फ्रेंच प्रवासी फोकोल्ड यानें वेशांतर करून काढली. व्हिक्टोरिया नायंझाचे वायव्येस स्टॅनले साहेबांनीं केलेला प्रवास फार प्रसिद्ध आहे. कर्नल मानटील हा फ्रेंच गृहस्थ साहाराचे वाळवंट चाड सरोवराचे दिशेनें ओलांडून ट्रिपोलिस येऊन पोहोंचला.

१८९१ सालीं डॉक्टर स्टुलमन हा एमिन पाशास बरोबर घेऊन नाईल नदीच्या पश्चिमेस असलेल्या सरोवराकडे गेला व तेथून पुढें ते दोघे आलबर्ट एडवर्ड सरोवराचे कांठीं उतरले. सरोवराच्या भागांत गेलेल्या प्रवाशांपैकीं डा. बौमन व कांउट गाटझेन यांनीं लावलेले शोध फार महत्त्वाचे आहेत. १८९९ सालीं मॅकाकिंडर हा केनया पर्वताच्या शिखरावर गेला. दक्षिणोत्तर दिशेनें एका टोंकापासून तों दुसऱ्या टोंकापर्यंत प्रथम प्रवास ग्रोगन साहेबानें केला.

निरनिराळ्या राष्ट्रांच्या ताब्यांत असलेल्या मुलुखांची सरहद्द ठरविण्याकरितां प्रत्येक राष्ट्राचे प्रतिनिधि घेऊन तयार केलेल्या मंडळानें मोजणीचें व मापनाचें काम फार चोख केलें.

पुराणवस्तुसंशोधनार्थ टामस शा व जेम्स ब्रूस यांनीं प्रवास करून बारबरीमधील अवशेष तपासून पाहिले. त्याच प्रमाणें 'दक्षिणआफ्रिकेंत ऱ्होडेशिआंत जुन्या काळच्या इमारती व त्यांचे अवशेष यांवर रॉनडाल माकीवर यानें पुष्कळ श्रम करून ते कोणत्या काळाचे असावेत यासंबंधींची निश्चित माहिती काढिली.

आफ्रिकेचा बरोबर नकाशा तयार करण्याकरतां रुवेनझोरी पर्वतावर त्याच्या सभोंतालच्या प्रदेशांत सर जानस्टन व अब्रुझीचा ड्यूक हे गृहस्थ बरीच मंडळी घेऊन गेले व त्यांनीं घेतलेलें काम चांगल्या तऱ्हेनें पार पाडिलें.

**व्यापार.**—आफ्रिकेंत वसाहती करून ती आपसांत वांटून घेण्याची जी घाई यूरोपियन राष्ट्रांनीं केली, तिचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे पाश्चात्य राष्ट्रांना व्यापारविस्ताराकरितां एक क्षेत्र पाहिजे होतें. पण कांहीं विशिष्ट कारणांमुळें व्यापार मात्र वाढूं शकला नाही. प्राचीन काळीं गुलामांचा मोठा व्यापार चालत होता व त्याबरोबर थोडें बहुत सोनें व हस्तीदंत हेहि व्यापाराचे जिन्नस होते. आशियांत व यूरोपांत ज्या मोठमोठ्या चळवळी झाल्या व ज्यांच्या योगानें मानवी इतिहासांत मोठी विचारक्रांति घडून आली त्यांचा स्पर्शहि येथील लोकांस झाला नाहीं. याचीं कारणें ४ आहेत: (१) दळणवळणाच्या साधनांचा अभाव, (२) किनाऱ्यालगतच्या प्रदेशाची रोगट हवा (३) येथल्या रहिवाशांमध्यें अर्थोत्पादन करण्याविषयींची उदासीनता, (४) गुलामांच्या व्यापारामुळें खऱ्या व्यापाराकडे झालेलें दुर्लक्ष. यांतील तिसरें कारण सोडून बाकीचीं सहजगत्या दूर करतां येण्यासारखीं आहेत. तिसरें मात्र येथील रहिवाश्यांच्या उत्कट इच्छेशिवाय नाहींसें होणें शक्य नाहीं.

गुलामांचा व्यापार अजिबात बंद करण्यासाठीं इंग्रज सरकारनें पुढाकार घेऊन ब्रूसेल्स शहरीं सर्व राष्ट्रांच्या प्रतिनिधींची सभा भरवून हा व्यापार बंद करण्याचा ठराव १८९० सालीं पसार झाला; व त्याची अंमलबजावणी हळू हळू होत जाऊन सरते शेवटीं हा घातुक व्यापार अगदीं बंद झाला.

या खंडांत व्यापारोपयोगी चार प्रकारचे निर्यात जिन्नस आहेत, (१) वनस्पतिजन्य, (२) प्राणिजन्य, (३) मनुष्यांच्या परिश्रमानें तयार झालेले पदार्थ, (४) खनिज.

पहिल्या सदरखालीं फार महत्त्वाचे पदार्थ येतात. (१) रबर—याची झाडें येथें फार आहेत व त्याची लागवड सुरू आहे, (२) तालवृक्षापासून काढलेलें तेल, (३) इमारतीचें लांकूड, (४) गोंद, कोलानट.

दुसऱ्या सदरांत (१) हस्तीदंत (कांगो) (२) मेण (३) कातडी (४) लोंकर, पक्ष्यांचीं पिसें हे जिन्नस येतात.

तिसऱ्या सदरांत नारळ त्याच्या झाडापासून तयार केलेले पदार्थ (झांजीबार), काफी, कापूस (इजिप्त), साखर (मारिशस), तंबाखू (अलजेरिया) हे पदार्थ येतात.

व चवथ्या सदरांत सोनें (दक्षिण आफ्रिका), हिरे (किंबरले द. आफ्रिका), दगडी कोळसा (द. आफ्रिका नाताळ), फास्फेटस (अलजिरिया) हे जिन्नस मोडतात.

कापड, कृत्रिम खाद्यपदार्थ व दुसरे ऐषआरामाचे पदार्थ हे जिन्नस बाहेरून येतात.

आफ्रिकेंत पूर्वी नद्यांचा उपयोग दळणवळणाचे कामीं होत नसे. कारण त्यांत धबधबे फार आहेत. सध्यां प्रयत्नानें त्यांचा व्यापारनिमित्त उपयोग होत आहे. पाकल

वाटेनें डोक्यावरून शेंकडो मैल सामानाची ने आण करीत असत. उंटांचे तांडे मालाची ने आण करण्याकरतां लावीत असत. पूर्वीच्या वाटा मोठमोठ्या शहरांवरून जात असतः पण विषुववृत्ताजवळच्या दाट अरण्यांतून मात्र एकहि वाट नव्हती. वालुकामय प्रदेशांतून प्रवासासाठीं उंटासारखें दुसरें कोणतेंही जनावर नाहीं. नाईल नदींतून माल खालांवर पूर्वी लहान लहान पडावांतून भरून जात येत असे.

युरोपियन राष्ट्रांच्या वसाहती झाल्यापासून तारायंत्रें, आगगाड्या व आगबोटी यांचा सुळसुळाट झाला आहे. या अर्वाचीन साधनांनीं आफ्रिकेंतील प्रवास बराच सुगम होत आहे. पण एकंदर खंडाच्या विस्ताराच्या मानानें पाहिलें असतां अजून कांहींच नाहीं असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. इजिप्त देशांत १८५५ पासून आगगाडी सुरू आहे.

अमेरिका.

**अमेरिकेंतील मूळ रहिवाशी**—कोलंबसानें अमेरिका शोधून काढिली खरी, पण त्यास आपण आशियाखंडाच्या दक्षिणेस आलो आहों, असें वाटून त्यानें त्या देशास व तेथील रहिवाशांस "इंडिया व इंडियन्स" अशीं नांवें दिलीं. पुढें जेव्हां या खंडास लोक अमेरिका या नांवानें ओळखूं लागले, तेव्हां येथील रहिवाशांस अमेरिकन इंडियन्स असें म्हणण्याचा प्रघात पडला.

हे लोक पूर्वेकडून आले व यांचा अगदीं प्राचीन काळीं नीग्रो किंवा कॉकेशियन वंशाच्या लोकांशी कोणत्याहि प्रकारचा संबंध नव्हता हें मानववंशशास्त्रज्ञांस कबूल आहे. या लोकांनीं कोठून व कसा अमेरिकेंत प्रवेश केला अथवा हे लोक एस्किमोचे वंशज आहेत कीं काय, किंवा पेनच्या मताप्रमाणें, जे वाचाहीन मानवसदृश प्राणी अमेरिकेंत अलास्काच्या मार्गानें उतरले ते यांचे पूर्वज आहेत, वगैरे प्रश्नांची शहानिशा होऊन कायमचा निकाल अजून लागला नाहीं. तरी पण या लोकांचा निराळाच एक वंश समजावा असें कांहींचें मत आहे.

हे मूळचे लोक सर्व उत्तर व दक्षिण अमेरिकेंत पसरले होते. अमेरिकेचा विस्तार मोठा व त्यांत सर्व प्रकारचें हवामान आढळतें तेथें डोंगराळ व सपाट प्रदेश आहेत. या सर्व स्वाभाविक स्थितीचा परिणाम या लोकांच्या बांध्यावर वर्णावर व शरीरप्रकृतीवर होऊन यांच्यांत कांहीं उंच तर कांहीं खुजे, कांहींचा वर्ण पिंगट तर कांहींचा काळा, कित्येकांचीं डोकीं वाटोळीं तर कित्येकांचीं लांबट वगैरे फरक यांच्यांत दिसूं लागले असावेत. तसेंच यांच्या जातींत आप आपसांत लग्नें झाल्यानें यांच्या शरीराच्या बांध्यावर व भाषेवरहि बराच परिणाम झाला असावा असें तज्ज्ञांचें मत आहे.

इंडियन लोक एकंदरींत उंच बांध्याचे आहेत. उंच जातींतल्या लोकांची सरासरी उंची ५ फूट ८ इंचावर असते. ही जात सपाट प्रदेशांत आढळते. खुजे लोक बहुतकरून पहाडी मुलुखांत राहतात.

इतर खंडांतील लोकांचें वर्गीकरण करतांना त्यांचा वर्ण, उंची व बांधा वगैरे गोष्टींचा फार उपयोग होतो. पण या लोकांचें वर्गीकरण करण्याच्या कामीं त्यांचा उपयोग न झाल्यानें त्यांच्या भाषेच्या विभागानुसार, त्यांच्या जाति व पोटजाति कल्पिल्या आहेत.

**अमेरिकन इंडियन लोकांच्या जाती.**—मानवेतिहासशास्त्रज्ञांनीं या लोकांची वसतिस्थानें लक्षांत घेऊन यांच्या जाती कल्पिल्या आहेत, त्यांपैकीं मुख्य जाती व त्यांचीं स्थानें येणेंप्रमाणें:—

(१) एस्किमो—आर्तिक किनाऱ्याच्या लगतच्या भागीं.

(२) तिने अथवा देने—कानडाच्या वायव्यप्रदेशांत.

(३) अलगोनक्विन-इरोका—कानडा व उत्तर अमेरिकेंतील पूर्वेकडील संस्थानांत.

(४) सीयो—पश्चिमेच्या सपाट प्रदेशांत.

(५) मस्कहोगी—मेक्सिकोच्या आखातालगतच्या संस्थानांत.

(६) ल्लिंकिट हैडा—उत्तर पॅसिफिक किनाऱ्यावर.

(७) सालिश चिनुक—फ्रेझर कोलंबिया किनारा.

(८) शोशोनी—कॅलिफोर्नियाच्या अंतर्भागांत

(९) प्युब्लो—नैर्ऋत्येकडील संयुक्त संस्थानांत व उत्तर मेक्सिको.

(१०) नव्हातला मय—दक्षिण मेक्सिको व मध्य अमेरिका.

(११) चिबचा केचुवा—दक्षिण अमेरिकेच्या डोंगरांच्या रांगेंत.

(१२) कॅरिब अरावाक—कॅरिबिअन समुद्राच्या लगतच्या प्रदेशांत.

(१३) टुपी ग्वारानी—अमेझॉनचा पाणवठ्याचा प्रदेश.

(१४) अरोकॅनिअन—पंपस गवताळ मुलखांत (दक्षिण अमेरिकेच्या).

(१५) पॅटॅगोनिअन—पॅटगोनिअन द्वीपकल्पांत.

(१६) फ्यूजिअन—मॅगेलनच्या सामुद्रधुनीजवळपासच्या भागीं.

स्वाभाविक परिस्थितीचा त्याचप्रमाणें उपयुक्त धातूंचें किंवा इतर वस्तूंचें सान्निध्य किंवा अभाव यांचाहि परिणाम राहणीवर बराच घडतो. जनावरें मालाची ने आण करण्याच्या कामीं व धातू आउतें व शस्त्रास्त्रें करण्याच्या कामी फार उपयुक्त असतात व यांच्या समृद्धीमुळें किंवा अभावामुळें या निरनिराळ्या लोकांच्या जीवनक्रमांत फार महत्त्वाचे फरक पडले आहेत.

**भाषा.**—इंडियन लोकांच्या भाषांच्या मुख्य २०० जाती आहेत. या दोनशें मुख्य जातींत सुमारें हजार पोट भाषांचा समावेश होतो. या बोलणारांची संख्या कमी जास्त असते. कांहींचा शब्दसंग्रह फार मोठा तर कांहींचा फार कमी आहे. या भाषांचें लेखन करण्यासाठीं ध्वनिलेखनशास्त्र-

ज्ञांस आपल्या लिपींत नवीन वर्णांची भर घालावी लागली. या भाषा चिकट्या भाषांच्या वर्गांत मोडतात. इतर भाषांप्रमाणें यांतहि वाक्य हा एक मुख्य घटक आहे. शब्द व शब्दसमुच्चय हीं वाक्याचीं मुख्य अंगें आहेत.

अमेरिकेंतील भाषांचा अभ्यास भाषाकोविदांनीं बऱ्याच पूर्णत्वास नेला आहे. म्हणून इंडियन लोकांत लेखनपद्धत कशी अस्तित्वांत आली असावी याविषयींची सुसंगत माहिती सध्यां शास्त्रज्ञांस देतां येते. अभिनय, उपास्यप्रतिमा, चित्रलिपी, चित्रा ऐवजी त्यांचा प्रमुख अवयव व कल्पनाचिन्हें ही ह्या विकासाचीं निरनिराळीं स्थित्यंतरें होत. वीर पुरुष आपण केलेल्या पराक्रमांची माहिती विस्तृतरीतीनें सांगतां यावी म्हणून ठळक ठळक प्रसंगांचीं चित्रें आपल्या वस्त्रांवर रंगवीत असत.

एस्किमो लोक आपल्या दंतकथांची सूचकें हस्तीदंतावर खोदून काढीत असत. त्लिंकिट जातीचे लोक असलीं सूचकें दैवकस्तंभांवर कोरून ठेवीत असत. मध्यअमेरिकेंतील कांहीं जातींनीं ह्या संक्षिप्त चित्रलिपीचा उपयोग याखेरीज दुसऱ्या कामीं केल्यामुळें त्यांची मजल शब्दाच्या घटकाबद्दल कांहीं विशिष्ट चिन्हें लिहिण्यापर्यंत येऊन पोहोंचली होती.

**शिल्पकला.**—इंडियन लोक आपल्या गरजा भागविण्याकरितां निरनिराळ्या वस्तू तयार करित असत व आहेत. या वस्तूंचे नमुने अमेरिकेंतील व यूरोपांतील पदार्थसंग्रहालयांत जुळवून व व्यवस्थित रीतीनें मांडून ठेविले आहेत. पुराणवस्तुसंशोधकांनीं इंडियन लोकांच्या शिल्पकलांचा विकास लक्षांत घेऊन फार प्राचीन कालापासून तो सद्यःकालापर्यंतच्या अवधीचे ६ भाग कल्पिले आहेत (१) कोलंबसाच्या पूर्वकालीन, (२) कोलंबसाच्या प्रथम कालचे अथवा १५व्या शतकांतले, (३) जगाशीं संबंध होण्याच्या पूर्वकालीन, (४) जगाशीं संघटनाच्या वेळचे, (५) संघटन झाल्यानंतरचे, (६) सद्यःकालीन.

पहिल्या भागांत अगदीं प्राचीन काळापासून तों कोलंबसानें अमेरिकेचा शोध लावीपर्यंतच्या काळाचा समावेश होतो. १५ व्या शतकांतल्या शिल्पकलांचे नमुने यूरोपांतील व अमेरिकेच्या पदार्थसंग्रहालयांत आढळतात. अमेरिकेचा शोध लागल्यापासून तों इंडियन लोकांशीं व्यापारविषयक संबंध येईपर्यंतच्या कालास इंग्रजींत पाश्चात्यसंसर्गपूर्वकालीन काल असें नांव दिलें आहे.

या पुढील कालांत इतर संस्कृतीचा परिणाम इंडियन लोकांच्या शिल्पावर झालेला दिसतो. यामुळें इंडियन लोकांनीं जे फेरफार केले त्यांचीं स्थित्यंतरें विचार करण्यासारखीं आहेत. सध्यां जे पदार्थ इंडियन लोक तयार करितात ते शेवटच्या भागांत मोडतात.

**यांत्रिक शिल्प.**—इंडियन लोकांनीं निरनिराळ्या प्रकारचीं हत्यारें केलीं होतीं. त्यांनां लोखंड काढतां येत नसल्यामुळें त्यांच्यांत त्या धातूचीं हत्यारें नव्हतीं. ते आपलीं हत्यारें बहुतकरून लांकूड, पाषाण व हाडें वगैरे पदार्थांचीं करीत असत. हे लोक हत्याराचा उपयोग तासण्याच्या, भोंक पाडण्याच्या, घट्ट भरण्याच्या, कुटण्याच्या व इतर असल्याच कामीं करीत असत. दगडाच्या चिपा व शार्क सारख्या प्राण्यांचे दांत यांचा त्यांनां फार उपयोग होत असे. त्यांनां मऊ दगडाच्या उपयुक्त वस्तू कापून तयार करतां येत होत्या. त्यांनां धातू गाळितां येत होत्या याविषयीं मात्र विश्वसनीय पुरावा नाहीं. सध्यांच्या इंजिनियर लोकांनां मोठमोठे दगड उचलण्याच्या व ते दूरवर नेण्याच्या ज्या युक्त्या माहीत आहेत त्या त्यांनां ठाऊक होत्या असें दिसत नाहीं. त्यांनीं ज्या मोठ्या इमारती बांधल्या आहेत त्यांचे मोठे दगड मजुरांच्या मदतीनें नेले असावेत. यासाठीं पुष्कळ माणसें कामाला लाविलीं असावींत. इतकीं माणसें एकत्र करून त्यांनां अन्नपाण्याचा पुरवठा करण्याकरितां राजकीय संस्था बऱ्याच व्यवस्थित व सुसंघटित स्थितींत आल्या असाव्यात.

कांहीं लोकांस छायायंत्राचा उपयोग माहीत होता. वेळ मोजण्याचीं साधनें सार्वत्रिक नव्हतीं. हे लोक सावलीवरून कालमानाचें मापन करीत असावेत. या लोकांत मापण्याचीं मापें किंवा तोलण्यासाठीं वजनें निश्चित नव्हतीं. या लोकांजवळ पैसा क्वचितच असे. देवघेवीच्या कामीं टिकाऊ वनस्पतींचा अथवा प्राणिजन्य पदार्थांचा उपयोग करीत असत.

**अन्न.**–इंडियन लोक बहुतेक मांसाहारी होते. ते लोक हवेंतील, पाण्यांतील व जमिनीवरील प्राण्यांची पारध करीत असत. नरमांसभक्षणाचा प्रघात सार्वत्रिक सुरू होता. पण हे निव्वळ मांसाहारी नसून भाजीपाला, फळें व कंद वगैरे वनस्पतिजन्य पदार्थांचा आपल्या आहारांत उपयोग करीत असत. कांहीं सुपीक भागांत हे लोक धान्य पिकवीत असत. शेतीच्या कामीं यांचें कांहीं कौशल्य दिसत नाहीं. शेतीचीं आउतें लाकडाचीं केलेलीं असत. एक जमीन फक्त तीन साल पेरीत असत. बीं टोंकदार काठ्यांनीं पेरीत असत. पॅसिफिक महासागराच्या बाजूच्या उतरणीच्या कांहीं कांहीं भागांत शेतीसाठीं कालव्याच्या पाण्याचा उपयोग करीत असत. एकंदरीत इंडियन लोकांची शेती अगदीं कनिष्ठ दर्जाची होती व त्यांचीं आउतें फार साधीं असून तीं लाकडाचीं केलेलीं असत.

**पोषाख.**—उत्तरेकडील कांहीं भाग सोडून पुरुषांत पायघोळ व बायकांत आंखूड आंगरखा घालण्याचा प्रघात होता. उष्ण प्रदेशांत वहाणा व उत्तरेच्या भागांत उंच बूट (लांब मोकासिन) पायांत घालीत असत. एस्किमो लोकांत मात्र विजार व झगा पुरुष व नायका वापरीत असत. दक्षिणेंत कातड्याचे सैल अंगरखे उपयोगांत आणीत असत. दक्षिणेच्या कांहीं प्रदेशांत शिरस्त्राण अगदीं वापरीत नसत. आंगावर गोंदण्याची चाल मात्र सार्वत्रिक सुरू होती. हाडें

शिंगा व दगड यांचीं भूषणें करीत असत. समारंभाच्या प्रसंगीं सोंगें घेण्याची वहिवाट होती.

**घरें व वस्ती.**—इंडियन लोक आपलीं घरें, ज्या प्रदेशांत जो पदार्थ घर बांधण्यास सोईस्कर होईल, त्याचीं बांधीत असत. एस्किमोंचीं घरें बर्फाचीं केलेलीं असत. तिने व सिओ लोकांच्या घरांचा आकार शंकूसारखा असून, तीं चामड्यांचीं अथवा झाडांच्या सालींचीं बनविलेलीं असत. लिंकिट लोकांचीं घरें लांकडाच्या फळ्यांचीं असत. प्यूब्लो लोकांच्या घरांतील खोल्या मधमाशांच्या पोवळ्यांतील घरासारख्या षट्कोनी असून त्यांवरील छप्पर गवताचें असे. अशीं पुष्कळ घरें मिळून एक खेडें होत असे. प्रत्येक खेड्यांत एक सार्वजनिक दिवाणखाना असे.

**पाषाण शिल्प.**—इंडियन लोक खाणींतून दगड टिकाव व पहारींनीं काढीत असत. मऊ दगड कठिण दगडाच्या हातोड्यांनीं फोडीत व ते हाडांच्या हत्यारांनीं साफ करीत असत. शंखजिऱ्यासारखे मऊ दगड कापून त्यांना पाहिजे त्या आकाराचे बनवीत. या लोकांस दगड कापण्याची व त्यांस भोंक पाडण्याची कला अवगत होती. पाषाणावर नक्षीकाम यांस करितां येत असे. छिनी, हातोडा व नक्षीकामाचीं हत्यारें धातूचीं केलेलीं नसत. तीं बहुतेक दगडाचीं तयार केलेलीं असत.

**धातुकाम.**—जरी या लोकांस संमिश्रक द्रव्यें मिसळून भट्टींतून शुद्ध स्थितींत धातु गाळून काढितां येत नसत, तरी पण सोनें, रुपें व तांबें वगैरे धातु बऱ्याच शुद्ध स्थितींत तयार करीत. या धातूंचे पत्रे, तारा, व कांबी यांस करतां येत होत्या.

**कुंभारकाम.**—कुंभाराचें चाक या लोकांनीं जरी प्रत्यक्ष शोधून काढिलें नव्हतें, तरी त्याजवळ जवळ ते आले होते. व त्या लोकांनीं निरनिराळ्या तऱ्हेचीं भांडीं केलीं आहेत. या कलेची या खंडांत सर्वत्र सारखी वाढ झाली नाहीं. संयुक्तसंस्थानाच्या नैर्ऋत्येकडील भागांतील मूळच्या रहिवाशांनीं या कलेंत चांगलेंच प्राविण्य संपादन केलें होतें. त्याप्रमाणेंच मेक्सिको, मध्यअमेरिका वगैरे भागांत उत्तम भांडीं सांपडतात. या विषयावर वाङ्मयहि बरेंच आहे.

**विणकाम.**—या लोकांस विणकाम करितां येत होतें. त्यासाठीं ते प्राणिजन्य व वनस्पतिजन्य तंतू वापरीत असत. पहिल्या प्रकारचे तंतू केस, पिसें, कातडीं, आंतडीं वगैरे पदार्थांपासून काढीत. लहान लवचीक फांद्या, साल, पानें, गवत व कापूस या सारख्या वस्तूंचा बराच उपयोग होत असे. यांपासून तयार केलेले पदार्थ निरनिराळ्या प्रकारचे असून त्यांचा उपयोग निरनिराळ्या कामीं होत असे. वल्कलें, ताटी, कुंपणें, कागद, टोपल्या तूणकामाचे पदार्थ, कापड, नक्षीकाम असलेले कपडे व फीत हीं बहुतेक प्रदेशांत बायका हातांनीं करीत असत. यासाठीं लागणारें यांत्रिक सामान व हत्यारें अगदीं साध्या तऱ्हेचीं असत. आंगावरील वस्त्रें, घरगुती सामान, हजारों लहानसान धंद्यासाठीं लागणारीं भांडीं, पूजेसाठीं व समारंभाकरितां उपयोगी पडणारीं उपकरणीं हीं सर्व विणून तयार करीत या वरून ह्या कलेंत या लोकांनीं बरेंच प्राविण्य संपादन केलें असावें असें दिसतें.

**प्राणिविद्या.**—इंडियन लोक मांसाहारी होते, त्याचा मागेंच उल्लेख केला आहे. हा आहार मिळविण्यासाठीं त्यांची समाजघटना कांहीं ठिकाणीं विशिष्ट प्रकारची आपोआप तयार झाली होती. त्यांस प्राण्यांच्या राहणीचें, वसतीचें व त्यांच्या जीवनक्रमाचें चांगलें ज्ञान होतें. त्यांस धरण्यासाठीं व कित्येक प्रसंगीं मारण्यासाठीं निरनिराळीं आयुधें व उपाय योजावे लागत असत. हीं आयुधें करण्यासाठीं व युक्त्या अमलांत आणण्यासाठीं त्यांत बरीच बुद्धि खर्चावी लागे. त्यामुळें त्यांची अवलोकनशक्ति, स्मरणशक्ति व बुद्धि हीं वरीच वाढलीं होतीं. त्यांचे ठिकाणीं साहस शौर्य व चिकाटी वगैरे गुण आले होते. स्वाभाविक सौंदर्य व सृष्टिचमत्कार यांची त्यांस चांगली माहिती होती. यांच्या समाजघटनेचा व प्राणिसृष्टीचा इतका निकट संबंध होता कीं, यांच्या जातिदैवकांस प्राण्यांचीं नावें दिलीं आहेत. ज्योतिष, संख्याशास्त्र, कार्यकारणाची मीमांसा, इतिहास, भाषा, व चित्र या सारख्या विषयांत यांचें पाऊल पुढें पडण्यास याच विद्येचा यांस उपयोग झाला असावा, असें तज्ज्ञांचें मत आहे. यांच्या देवतांची उत्पत्ति पशूंपासून होण्याचें हेंहि एक सबळ कारण आहे. दंतकथा, काहाण्या, मंत्रतंत्र, व धर्मभोळेपणा व यांचे निरनिराळे आचार या सर्वांवर या विद्येचा किंवा ज्ञानाचा ठसा उमटलेला दिसतो. हा त्यांच्या धर्माचा विचारात्मक किंवा विश्वासात्मक भाग असून दुसऱ्या भागांत आचाराचा समावेश होतो. या दोहोंमुळें त्यांच्यांत निरनिराळे पंथ व उपासना अस्तित्वांत आल्या. या विचारांचें प्रतिबिंब यांच्या उपासनेंत समाजघटना, धार्मिक नाटकें ( अभिनय ), व करमणुकींत पडलेलें आढळतें. यांच्या धर्माचें आकलन होण्यासाठीं खालीं सांगितलेले मुद्दे ध्यानांत ठेविले पाहिजेत. ( १ ) प्रत्येक सृष्टींतील वस्तूंत, चमत्कारांत एका जीवंत माणसाचे विचार, इच्छा, वगैरे गुणांनीं युक्त असलेली एक स्वतंत्र शक्ति किंवा व्यक्ति असते. ( २ ) या व्यक्तींत निरनिराळे आत्मे किंवा छाया असतात त्यामुळें तीस वाटेल त्या प्राण्याचें रूप धारण करितां येतें. ( ३ ) या अदृश्य सृष्टींत मानवसमाजसंस्थेसारखी घटना असते. तिचेंच अनुकरण आपण आपल्या मध्यें करतों. ( ४ ) सर्व उपासना अभिनयानें होत असे. कांहीं थोड्या पुढें आलेल्या किंवा उच्च संस्कृति असलेल्या जातींत बली देण्याचा प्रघात होता. धार्मिक आचारविचारांवर स्वाभाविक परिस्थितीचा परिणाम होत असे. तसेच जे लोक शेती करून राहात व जे फक्त पारध करून आपलें पोट भरीत, त्यांच्या धार्मिक

विचारांत बराच फरक होता. या विचारांचें प्रतिबिंब या लोकांच्या कलाकौशल्याच्या कामांत दिसतें.

**पुराणवस्तुसंशोधन.**—शास्त्रज्ञांनीं येथील पुराणवस्तूंचें संशोधन करून मुख्य दोन मुद्यांचा उहापोह केलेला दिसतो. (१) इंडियन लोकांनीं तयार केलेल्या वस्तूंचा विचार, (२) भूस्तर शास्त्रांत ठरविलेल्या युगांत मनुष्याच्या अस्तित्वाविषयीं विचार. १५व्या शतकांत या रहिवाशांविषयीं ज्या इतिहासकारांनीं माहिती दिली आहे, त्यांनीं इंडियन लोकांनीं केलेल्या वस्तूंचें वर्णन केलें आहे. त्यासारख्या वस्तू संशोधकांनीं उकरून काढिलेल्या जमिनीच्या थरांत आढळतात.

शास्त्रज्ञांनीं गुहा, उध्वस्त खेडीं, शिंपांचे ढीग, उकिरड्यावरील ढीग, कुंपणें, झोपड्यांच्या सीमा, मातीच्या भींती व राशी, दगडांच्या खाणी, बागांचे अवशेष, थडगीं व राहण्यासाठीं केलेल्या आश्रयांच्या जागा (गुहा, टेंकड्या सुळके,) वगैरे पदार्थांवरून माहिती मिळविली आहे. आर्टिक महासागराच्या भागांत प्राचीन खेड्यांचे अवशेष सांपडतात, त्यावरून असें दिसतें कीं, एस्किमो लोक एका काळीं अतलांतिक महासागराचे किनाऱ्यावर राहात होते. वर सांगितलेल्या पुराणवस्तू अमेरिकेच्या [ उत्तर व दक्षिण ] निरनिराळ्या भागांत आढळतात. एलडोरेडो, मेक्सिको, व पेरू या देशांत प्राचीन भव्य इमारतींचे अवशेष दृष्टीस पडतात. दुसऱ्या ठिकाणीं (उदा. पेरू व इक्वाडोर) घरांचे झोपड्यांचे व तटबंदींचे प्राचीन भाग नजरेस पडतात.

**नातेंगोतें.**—कांहीं अपवादादाखल उदाहरणें सोडून या लोकांत नात्याचे संबंध स्त्रियांमार्फत ओळखीत असत. हीं नातीं खरीं व कृत्रिम अशीं दोन प्रकारचीं असत. बायकांनां लढाईंतील कैदी दत्तक घेतां येत असे व त्या सर्वांनां मुलें समजण्याची चाल त्यांच्यांत होती. जेव्हां दोन जातींमध्यें जूट होत असे, तेव्हां त्या दोघांत वडील व लहान भाऊ (अथवा बाप व मुलगा) पणाचें कृत्रिम नातें लावीत. इंडियन लोकांच्या परस्परांच्या सहाय्यानें होणाऱ्या व्यवहारांत नात्याचें फार स्तोम माजलें होतें म्हणून ह्या सामाजिक संस्थेच्या छटा त्यांच्या कायद्यांत, कलांत व दुसऱ्या इतर कृतींत स्पष्टपणें दृष्टीस पडत असत.

**युद्धकला.**—इंडियन लोकांत युद्धकलेची फार वाढ झाली नव्हती, कारण (शास्त्रज्ञांच्या मतें) हे लोक शांतताप्रिय होते. परस्परांशीं दळणवळण ठेवणें, आदरातिथ्य करणें व मेजवान्या देणें हीं त्यांस फार आवडत असत. सैन्याची रचना समाजघटनेवर अवलंबून होती. सैन्य उभारतांना कांहीं नियमित लोक प्रत्येक टोळीकडून घेतले जात असावेत. सैन्याची संख्या, त्यांमधील जूट व तें सशस्त्र ठेवण्याचा काल हीं सर्व त्यांच्यांतील समाजसंस्थांच्या स्थितीवर अवलंबून होतीं. धनुष्य बाण, गोफण यांशिवाय हे लोक फेकण्याचीं, भोंसकण्याचीं वगैरे आयुधें वापरीत असत. बायकांनां पकडून त्यांनां टोळ्यांतील माणसांप्रमाणें वागवीत. यूरोपांत गुलाम याचा जो अर्थ रूढ आहे. त्या प्रकारचे गुलाम या लोकांत नव्हते.

**लौकिक अथवा बालसारस्वत.**—इंडियन लोकांनां आकाशांतील ज्योती व त्यांच्या स्थूलगती, हवामान, पाऊस, वारे, ऋतु, वगैरेंचें चांगलें ज्ञान होतें. तसेंच त्यांनां लागणारे पदार्थ (उदाहरणार्थ पाणी, माती, दगड, रंगाच्या व खाण्याच्या वनस्पती, विषारी वनस्पती, त्यांचे गुणधर्म; निरनिराळे उपयुक्त क्षार, वेगवेगळ्या प्रकारचीं झाडें, त्यांचे उपयोग इत्यादि.) कोठें चांगले सांपडतात हेंहि त्यांस ठाऊक असे. प्राणी, त्यांचा जीवनक्रम, त्यांचे खाण्याचे पदार्थ, त्यांचा उपयोग ह्यांची माहिती त्यांस होती. असल्या उपयुक्त ज्ञानांतून व त्यांच्यांत असलेल्या धार्मिक समजुतींमुळें (उदाहरणार्थ सृष्टींतील सर्व व्यापार विशिष्ट व्यक्तींच्या सामर्थ्यानें घडून येतात या श्रद्धेमुळें) या लोकांत एक अफाट बालसारस्वत निर्माण झालें आहे.

**परमार्थसाधन.**—या लोकांचा भुतेंखेतें, पिशाच, व छाया इत्यादि अदृश्य सृष्टीवर विश्वास होता. त्यांच्यामध्यें निरनिराळ्या जाती असून त्यांचा या जगाशीं निकट संबंध आहे, असें यांचें ठाम मत होतें. त्यांनां आपल्या इच्छेप्रमाणें कार्यें घडवून आणितां येतात, असें यांस वाटत होतें.

**प्रवासाचीं साधनें.**—एस्किमो लोक उत्तरेकडील हिममय प्रदेशांत रहात असत. त्यांनीं बर्फावरून प्रवास करण्याकरितां बिनचाकाच्या, कुत्र्यांनीं ओढण्याजोग्या हलक्या गाड्या केल्या होत्या. ह्या गाड्यांतून ते फार दूरवर प्रवास करीत असत व आहेत. पेरू देशांत ओझीं वाहण्याकरितां लामांचा उपयोग करीत. वरील लोकांशिवाय बाकी सर्व जातींचे इंडियन लोक पायीं प्रवास करीत व ओझीं पाठीवरून नेत. इंडियन लोकांनीं जलमार्गानें प्रवास करण्यासाठीं होड्या तयार केल्या होत्या. असल्या होड्या एस्किमो लोक वेहात आलेल्या लांकडांच्या ओंड्याच्या करीत. उत्तरेकडील प्रदेशांत या होड्या वर्च नांवाच्या झाडाच्या सालीच्या करीत, होड्या करण्याच्या कामीं इंडियन लोकांनीं बरीच कुशलता दाखविली होती. ही होडी एका माणसास सहज उचलतां येत असून, तिचे तुकडे करून दूरवर नेतां येत असे. ह्या होड्या वल्ह्यांनीं, काठ्यांनीं अथवा अवजारांनीं चालवीत असत. त्यांच्या सहाय्यानें इंडियन लोक हजारों मैल जलमार्गानें प्रवास करून जात.

**ललितकला.**—ललितकलांची वाढ होण्यासाठीं ज्या मुख्य साधनांची जरूरी असते तीं साधनें अमेरिकन लोकांस अनुकूल होतीं. तीं साधनें म्हटलीं म्हणजे, ज्याच्यावर काम करावयाचें त्या पदार्थांची विपुलता व स्फूर्तिजनक सृष्टिचमत्कार हीं होत. पण त्यांजवळ चांगल्या उपकरणांचा अभाव असल्यानें व त्यांच्या विलक्षण व चमत्कारिक धर्म-

समजुतीमुळेंच्या कलांची वाढ या समाजांत होऊं शकली नाहीं. त्या लोकांत कुशल कोष्टी, कुंभार, कारागीर, व चितारी होऊन गेले. निरनिराळ्या जातींनीं वेगवेगळ्या कलांत प्राविण्य संपादन केलें होतें. तिने लोक पिसांवर चांगलें नक्षीकाम करीत.

उत्तरेकडील पॅसिफिक महासागरालगतच्या प्रदेशांत राहाणाऱ्या जाती शिंग, स्लेट व सिडर लांकडांवर कातीव काम करण्यांत कुशल होत्या. कॅलीफोर्नियांतील लोकांना टोपल्या करितां येत असत. प्यूब्ला व पेरू देशांतील लोकांनीं कुंभारकाम करण्यांत अग्रस्थान मिळविलें होतें. अमेझान नदीच्या भागांत राहणाऱ्या लोकांस ठळक व उठून दिसणाऱ्या रंगांची फार आवड होती. मेक्सिको व मध्य अमेरिकेंतील लोक पाषाणशिल्प व वास्तुसौंदर्यशास्त्र या कलांत नांवाजलेले होते. मय लोकांच्या वास्तुकामावरून अमेरिकन लोकांनीं या कलांत किती पाऊल पुढें टाकीलें होतें याची कल्पना सहज करतां येईल. युक्समल व शिचेनिट्झ या गांवीं प्रेक्षणीय भव्य इमारती आहेत. वास्तुकामांत व पाषाण शिल्पांत नाजुकपणा मात्र आढळत नाहीं.

**समाजघटना**.—समाजाचा मूळ घटक गोत्र अथवा क्लॅन हें असें व बऱ्याच गोत्रांची मिळून एक जात होत असे. जातीचा पुढारी किंवा मुख्य निवडणूक करून नेमीत असत, अथवा तो मान वंशपरंपरा एकाच घराण्यांत असे. प्रत्येक गोत्राचें एक देवक असे व त्याचें नांव त्या गोत्रास ठेवीत असत.

येणेंप्रमाणें उत्तर अमेरिकेंतील इंडियन लोकांच्या संस्कृतीची माहिती मिळते. याखेरीज मेक्सिकोमध्यें एक प्राचीन संस्कृती बरीच प्रगल्भ दशेस पोंचली होती व पेरू देशांत इंका नांवाच्या राज्यकर्त्यांची व त्यांचे पूर्वी तेथें रहात असलेल्या लोकांची संस्कृतीहि बरीच विकास पावलेली असावी अशीं अनुमानें काढण्यास बरीच जागा आहे. तरी त्या दोन संस्कृतींविषयीं थोडीशी माहिती टीपारूपानें पुढें देत आहोंत.

**मयसंस्कृति**—हल्लींचें ग्वाटेमाला प्रजासत्ताक राज्य, होंडुरस प्रजासत्ताक राज्य आणि चिआपास व टाबास्को हीं मेक्सिकन संस्थानें, यांच्या नजीकचे प्रदेश आणि युकॅटन द्वीपकल्प एवढ्या मुलुखांत आतांप्रमाणें प्राचीन काळींहि अनेक निरनिराळ्या लोकांच्या टोळ्या रहात असत. यांच्या भाषा एकाच मयभाषावंशांतील असून, त्यांच्यांतील प्रमुख जे यूकॅटनमधील लोक, त्यांच्या नांवावरून या वंशाला "मय" असें नांव पडलें. मेक्सिको व मध्यअमेरिका यामधील प्रमुख संस्कृत-राष्ट्रांमध्यें या लोकांचें स्थान मेक्सिकन लोकांच्या खालोखाल लागेल यांत शंका नाहीं. पण दुर्दैवानें या लोकांचें संस्कृतिवैशिष्ट्य, यांचा इतिहास व त्यांच्या रोजच्या राहाणींतील गोष्टी यां संबंधीं मेक्सिकन लोकांपेक्षां फारच कमी माहिती उपलब्ध आहे. मध्य अमेरिकेंत जीं प्रमुख प्राचीन स्मारकें आहेत, तीं या वंशांतील लोकांनींच तयार केलेलीं आहेत. ते मोठे ज्योतिर्विद व गणिती असून त्यांनीं शुक्र व इतर ग्रह यांच्या परिभ्रमणाचा काल अजमावला होता व दशलक्षापेक्षां मोठ्या संख्या योजणें व लिहिणें त्यांना पूर्ण अवगत होतें. चित्रलिपीची त्यांची पद्धत मेक्सिकन लोकांपेक्षां जास्त चांगली सुधारलेली दिसते. माणसें व पशु यांच्या सजीव प्रतिमा पुनरुद्धृत करण्यांत त्यांचा हात धरणारा कोणी नव्हता. एकंदरींत त्यांची संस्कृति व उपासनासंप्रदाय मेक्सिकन लोकांबरहुकूम होता हें उघड आहे.

धार्मिक आचारांत मेक्सिकन लोकांसारखे ते रक्तपात करणारे नव्हते; कारण त्यांच्यांत नरमेध फारच अल्प प्रमाणांत असत व पुष्कळ वेळां तर मनुष्याऐवजीं कुत्रे मारून काम भागवीत. प्रार्थनाविधी, बलिदान, उपवास आणि देहदंड या बाबतींत ते मेक्सिकन लोकांसारखे वागत; कान व जीभ यांना भोंकें पाडून त्यांतून दोरा ओवीत. अग्निदेवतेला जिवंत प्राणी वळी देत व कोठें कोठें तर धगधगीत निखाऱ्यावरून उघड्या पायांनीं चालत जाण्याचा देहदंड ते भोगण्यास तयार होत.

वीस दिवसांचा एक महिना असे वर्षाचे अठरा महिने यांच्यांत असत. वर्षारंभीं धार्मिक संस्कारांकरितां लागणारी सर्व भांडीं व जिनसा नवीन तयार करून ते एकामागून एक संस्काराला आरंभ करीत. पर्जन्यदेवतांकरितां एक मोठा यज्ञ करण्यांत येई; त्या वेळीं जवळपास सांपडणारे सर्व प्राणी जमा करून आणीत व त्यांना मारून त्यांचीं हृदयें अग्नींत टाकीत. वाघ, सिंह, चित्ते यांसारखे न सांपडणारे भयंकर प्राणी, खरे न आणितां, त्यांच्या हृदयासारख्या राळेच्या आकृती तयार करून त्या अग्न्यर्पण करीत. दर महिन्याला कांहीं ना कांहीं सण असेच. मंथा व अरणीपासून अग्नि मंथन करून काढीत. हा विधि आपल्या इकडील अग्न्याधानाप्रमाणें असे. पशु मारणारा ऋत्विज यांच्यांत मोठा माणूस समजत नसत. उपाध्यायांना "अह्-किन्" दिवसांचे अधिपती, म्हणजे दिनमानावरून भाकितें करणारे म्हणत. तेच मय लोकांचे शिक्षक व पुढारी असत.

**इंकांच्या पूर्वीचे लोक**.—इंका लोकांचा उदय होण्यापूर्वीची संस्कृति आपणांस प्रथम पाहिली पाहिजे. कारण इंकांनीं कांहीं नांवें व त्याबरोबर धार्मिक कल्पना या अतिजुनाट लोकांपासून परंपरागत आलेल्या होत्या तशाच स्वीकारल्या टिटिकाका सरोवराच्या दक्षिण किनाऱ्याजवळ व समुद्रसपाटीपासून बारा हजारांपेक्षां जास्त फूट उंचीवर अतिशय संस्मरणीय स्वरूपाचे प्रचंड अवशेष आढळतात. हे अवशेष इतके विशाल आहेत कीं, त्यावरून तेथील आसमंतात एक मोठी लोकवस्ती असली पाहिजे असें दिसून येतें. तेथील दगड इतक्या मोठ्या आकाराचे आहेत व तेथून अगदीं जवळची म्हणतां येईल अशी खाण इतक्या दूर अंतरावर आहे कीं, त्या वेळच्या लोकांच्या जवळ अतिशय मोठें यांत्रिक

कौशल्य वास करीत असलें पाहिजे हें उघड दिसतें. तसेंच त्या दगडांचो घडण, त्यांवरील 'शिल्पकाम व त्यांच्या बांधेसूद व एकजातीच्या इमारती पाहून या लोकांचें कौशल्य व सौंदर्यकल्पना चांगली व्यक्त होते. त्या ठिकाणीं अनेक पुतळे आहेत. तसेंच, ३६ × ७ फूट एवढ्या आकाराचे सुद्धां अखंड पाषाणस्तंभ आहेत. हे लोक दक्षिणेकडून आले असावेत असें म्हणतात. हा प्रदेश पूर्वी हल्लींच्या इतका उंचावर नसावा. कारण १२,५०० फूट उंचीवर कांहीं एक धान्य पिकणार नाहीं व लोकवस्तीहि फारच थोडी असणार. पण त्या वेळची वस्तुस्थिति तशी नव्हती. टिआहूआनाकू ही प्रचंड इमारत बांधण्याला मोठी लोकवस्ती, यांत्रिक शाक्ति आणि खाद्यपेयादि अंगी सामुग्री आवश्यक होती हे निःसंशय आहे. प्राचीन स्पॅनिश ग्रंथकार एकमतानें असें प्रतिपादितात कीं टिआहूआनाकूचे हल्लींचे अवशेष इंकांच्या बऱ्याच मागील काळांत बांधलेले असले पाहिजेत.

**इंकांच्या पूर्वीचा धर्म**—या 'अखंड पाषाणस्तंभी' लोकांचा धर्म कशा प्रकारचा होता हें समजण्याला फक्त एक मार्ग आहे. तो, म्हणजे एका अखंड दगडाचा तयार केलेला सर्वश्रुत दरवाजा होय. या दरवाजावर मध्यभागीं एक प्रतिमा असून तिच्याभोंवतीं बरींच धार्मिक चिन्हें व आकृती आहेत. मध्यप्रतिमेच्या डोक्याभोंवतीं किरणें पसरलीं असून तिच्या प्रत्येक हातांत एक प्रकारचा टोकाला पक्ष्यांचीं चित्रें असलेला राजदंड आहे. तिच्या पोषाखावर इंकांच्या काळीं सूर्याच्या सुवर्ण प्रतिमेभोंवतीं जशीं महिन्यांचीं चिन्हें असत तशीं चिन्हें आहेत. ही वर वर्णिलेली मध्यप्रतिमा सर्व लोकाधिपतींकडून पूजिली जाणारी देवता असली पाहिजे. पण या अखंडपाषाणस्तंभी साम्राज्याचा नाश होऊन इंकांचें साम्राज्य उदयास येईपर्यंत बऱ्याच शतकांइतका काळ लोटला असला पाहिजे. जेव्हां या प्राचीन साम्राज्याचे तुकडे तुकडे झाले तेव्हां अँडियन प्रदेशांत अनेक टोळ्या येऊन राहिल्या व पूर्वीच्या जागीं अनेक पोटभाषा आल्या. स्पॅनियर्ड लोक येण्यापूर्वी सुमारें पांच शतकें इंकांनीं आपलें साम्राज्य स्थापण्याला सुरुवात केली. त्यांची भाषा त्या प्रदेशांत वरचढ होऊन राहिली.

**इंका लोकः**—प्राचीन अखंडपाषाणस्तंभी साम्राज्य जाऊन बराच काळ लोटला होता तरी त्याची स्मृति आजिबात नष्ट झाली नव्हती. त्या वेळच्या पौराणिक कथा इंकांत शिरल्या व त्यांपैकीं एक प्रमुख म्हणजे एका दगडी दरवाजावर कोरलेल्या विरकोच स्वरूपी परमेश्वरावताराची कथा होय. विरकोच या नांवाखेरीज कॉन, इला, टिक्सो, पचयचची, पचकमक इत्यादि परमेश्वराचीं गुणदर्शक नामें इंकांनीं पुरातन लोकांकडून घेतलेलीं दिसतात.

**विरकोच.**—सर्व वस्तूंचा आद्य स्रष्टा म्हणून इंका विरकोचाला पूजीत. पण त्यांनां त्याच्याविषयीं फारशी माहिती नसल्यानें ते त्याला एकसारखे आरडून ओरडून विचारीत असत कीं, तूं कोण आहेस, कोठें आहेस हें आम्हाला सांग. त्यांचीं जीं कांहीं स्तोत्रें उपलब्ध आहेत त्यांपैकीं एकाचा अनुवाद खालीलप्रमाणें करतां येईल.

"सर्व विश्वाधिपति विरकोचा! तूं सध्यां पुरुष आहेस कीं स्त्री आहेस? हे अग्नीशा, श्रेष्ठजनका? तूं कोठें आहेस हें कळण्याला कांहीं दृष्टांत होईल कां? तूं जवळ नाहीं। तर कोठें आहेस? वरती आहेस कीं खालती आहेस किंवा आपल्या राजसिंहासन दंडाच्या आसमंतांत आहेस? तूं वरती स्वर्गांत ऐस कीं खालीं समुद्रांत ऐस, कोठें कां असेनास, पण माझें ऐक."

**चालीरीती.**—इंका लोकांत मृताबरोबर जिवंतपणी लागणाऱ्या बहुतेक वस्तू पुरण्यांत येत असत. त्यांच्यांत पुरोहितांचा एक मोठा वर्ग असे. पेरणी, कापणी वगैरे वेळीं उत्सव पाळण्यांत येत. संवत्सर सौरमानाचें असून त्यांत १२ महिने व कांहीं अधिक दिवस असत. संपात व अयनबिंदु काढण्याकरितां कांहीं युक्त्या योजिलेल्या असत. पावसाळ्याला सुरुवात म्हणजे दुखण्याला सुरुवात असें समजून रोगराई घालविण्याकरितां कांहीं विधी करीत. अग्नीला हवि अर्पण करण्याचे बरेच संस्कार इंकांत असत. विजयोत्सव किंवा युद्धारंभ या प्रसंगीं मनुष्यबलीहि दिले जात. सर्व उपासनाविधी सूर्याच्या प्रार्थनेकरितां व शेतकीसंबंधीं असत.

**राज्यकारभार.**—प्रजेचे दहा वर्ग वयमान व शरीरसामर्थ्य यांच्या अनुरोधानें पाडलेले असत. चार प्रांतांवर चार सुभेदार असून, त्यांनीं देशांतील अंतःस्थितीचे आंकडेहि पुरवावयाचे असत. जमीन लोकांच्या मालकीची समजून त्यांतील उत्पन्न इंका [सरकार] हुआका [देवस्थान] व हुआच्चा (लोक) यांत विभागलें जाई. प्रत्येक धट्याकट्या मनुष्याचा म्हणजे "प्युरिक" चा पिकामध्यें भाग असे, पण तो पेरणीच्या वेळीं मात्र हजर पाहिजे. राज्यांत लोकसंख्या फार मोठी असून ती एकसारखी वाढत चालली होती.

**मेक्सिकोची प्राचीन संस्कृति.**—मेक्सिको हें नांव मेक्सिका अथवा अझटेका या नांवाच्या लोकांवरून पडलें आहे. सोळाव्या शतकांत स्पॅनिश लोकांनीं तेथें प्रवेश केला. त्यावेळीं त्यांनां तेथें एक सुधारलेलें राष्ट्र आढळलें. या राष्ट्राचें सैन्य, न्यायकोर्टें, तसेंच इतर राज्यकारभाराचीं खातीं आणि सुधारलेली शेतकी व अनेक प्रकारच्या शिल्पकला चांगल्या स्थितींत होत्या. स्पॅनिश लोकांनां विशेष आश्चर्याची गोष्ट आढळली ती अतिशय मोठाल्या दगडी इमारती ही होय. या इमारतींचें नक्षीकाम यूरोपांतील तत्कालीन शिल्पकारांनीं तोंडांत बोट घालावें असें होतें. त्यामुळें मेक्सिकोंतील प्राचीन राष्ट्राची माहिती मिळविण्याचा अनेक संशोधकांनीं प्रयत्न केला आहे. मेक्सिकोंतील मूळच्या अझटेक व इतर भाषांचा यूरोपांतील किंवा अमेरिकेच्या

इतर भागांतील भाषांशीं मुळीच संबंध नाहीं. यावरून मेक्सिकोंतले मूळचे लोक फार फार काळापूर्वी जेव्हां अमेरिका व आशिया हीं खंडें एकमेकांला जोडलेलीं होतीं तेव्हांपासूनच तेथें रहात असले पाहिजेत, असें अगदीं अलीकडील संशोधकांचें मत झालें आहे. तथापि मेक्सिकन लोकांची संस्कृति फार प्राचीन नसून ती अलीकडे आशियांतील व अमेरिकेंतील इतर राष्ट्रांबरोबरच्या परिचयामुळें तयार झाली असें दिसतें, उदाहरणार्थ राशींचीं नांवें, महिन्यांचीं नांवें व साठ वर्षांचें युग मोजण्याची पद्धति हीं मेक्सिकन लोकांनीं मोंगल, तिबेटी व चिनी लोकांतील उंदीर, बैल, वाघ, ससा, ड्रेगन ( कल्पित सपक्ष सर्प ), सर्प, घोडा, बोकड, माकड, कोंबडा, कुत्रा, डुक्कर या बारा प्राण्यांच्या नांवावरून घेतली आहे. हिंदु लोकांतील चार युगांची कल्पना मेक्सिकन लोकांत आढळते. तसेंच ब्राह्मण व बौद्ध धर्मांतील नऊ लोक व नरक या कल्पनाहि मेक्सिकन लोकांच्या धर्मकल्पनांत आहेत. मेक्सिकन राष्ट्राच्या इतिहासाची माहिती १२ व्या १३व्या शतकापासून मिळते. व त्या पूर्वीच्या कांहीं शतकांची त्रोटक दंतकथात्मक माहितीहि उपलब्ध आहे. सहाव्या शतकांत टोलटेक नांवाचे लोक मेक्सिकोंत येऊन राहिले. या लोकांच्या राजधानीचें शहर टोलन म्हणजेच हल्लींचें टुलन किंवा टुला हें शहर होय. या लोकांनींच मेक्सिकोंत मका व कापूस हे पदार्थ प्रथमतः आणिले. सोन्यारुप्याचें काम करण्यांत आणि इमारती बांधण्यांत हे लोक कुशल होते. या टोलटेक लोकांचें राष्ट्र ११ व्या शतकांत अवर्षण, दुष्काळ व रोगाच्या सांथी यामुळें नष्ट झालें. यानंतर मेक्सिकोंत अझटेक लोकांनीं वसाहत केली. या लोकांचा टेनोक या नांवाचा एक पुढारी होता. त्याच्या नांवावरून टेनोकटिटलन या नांवचें राजधानीचें शहर १३२५ मध्यें स्थापण्यांत आलें. या अझटेक लोकांच्या शेजारच्या आकोलहुवा व टेपानेक या लोकांबरोबर अनेक वर्षें लढाया होऊन अखेर तिघांची १४३० च्या सुमारास दोस्ती झाली व एक राष्ट्र बनलें. अझटेक राष्ट्रानें आपली संस्कृति बऱ्याच उच्च दर्जाप्रत नेली. तिचें थोडक्यांत स्वरूप येणेंप्रमाणें:—

रा ज्य का र भा र.—अझटेक राजांच्या हातांत अनियंत्रित सत्ता असे. राजा मृत झाल्यानंतर त्याच्या भावाला किंवा पुतण्याला, जो वयानें सर्वांत वडील असेल त्याला राज्यपद मिळत असे. या नियमाचें कारण राज्यकारभार पोक्त व अनुभवी माणसाच्या हातांत असावा हें दिसतें. या राजांचे राजवाडे भव्य व सुंदर असत. मेक्सिको येथील मुख्य राजवाड्यांत तीन चौक व शेंकडों खोल्या होत्या. राजवाड्याभोंवतीं विस्तृत बागा असून त्यांत अनेक जातींचीं फुलझाडें आणि पशु व पक्षी ठेवलेले होते. राजघराण्याशिवाय देशांत सरदार, शेतकरी, गुलाम हे तीन मुख्य वर्ग असत.

न्या य प द्ध ति.— वरिष्ठ न्यायकचेरी राजवाड्यांत असे आणि मुख्य मुख्य शहरीं न्यायाधीश नेमलेले असत. त्यांनीं दिलेले फौजदारी दाव्याचे निकाल फिरविण्याचा अधिकार खुद्द राजासहि नसे. कायदे व दाव्यांची हकीकत चित्रलिपींत लिहून ठेवलेली असे. फौजदारी कायद्यांतील शिक्षा फार कडक असत. किरकोळ चोरीला सुद्धां शिक्षा म्हणून चोराला चोरी केलेल्या इसमाचा गुलाम होऊन रहावें लागत असे. धान्याच्या पिकाचीं २० कणसें चोरणाराला मृत्यूची शिक्षा असे. बाजारांत चोरी करणाराला मार देऊन ठार करीत असत. तरुण मनुष्य दारू प्याल्यास त्याला काठ्यांनीं मारून ठार करीत.

यु द्ध.—अझटेक राष्ट्र मोठें युद्धप्रिय होतें. कसलेल्या लढवय्याला मोठा मान व मोठाल्या हुद्द्याच्या जागा मिळत. खुद्द राजपुरुषाला युद्धांत स्वतः कैदी पकडून आणल्याशिवाय राज्याभिषेक होत नसे. सरदारांच्या मुलांनां युद्धकलेचें शिक्षण नियमानें देण्यांत येत असे. वरच्या दर्जाचे सैनिक शिरस्त्राणें व चिलखतें वापरीत असत. त्यांचीं मुख्य हत्यारें धनुष्यबाण व भाले हीं होतीं. ते शत्रूवर चालून जाण्यापूर्वी त्याला मांडलिकत्व कबूल करण्याबद्दल वकिलामार्फत निरोप पाठवीत असत. तटबंदी किल्ले बांधण्याचीहि त्यांनां चांगली माहिती होती.

पा र मा र्थि क क ल्प ना.—अझटेक लोक युद्धदेवतेलाच सर्व देवांमध्यें श्रेष्ठ समजत असत. सूर्य व चंद्र या प्रमुख देवता होत्या. त्याशिवाय दुय्यम दर्जाच्या अनेक देवता होत्या. त्यांत दरबारी चैनबाज लोकांची निराळी देवता, मद्यपी लोकांची निराळी देवता, सुवर्णकारांची निराळी देवता वगैरे अनेकांच्या निरनिराळ्या देवता असत. येथील देवालयांचा नमुना प्राचीन बाबिलोनियाच्या देवालयांसारखा असून आकारानेंहि तीं तशींच असत. तीं पिरॅमिडच्या आकाराचीं चौकोनी किंवा लांबट पायावर बांधलेलीं असत. युद्धदेवतेच्या देवालयांत मनुष्यांचे बळी देत असत. अशा बळी दिलेल्या हजारों इसमांच्या शिरांचा ढीग देवालयाच्या शेजारींच पडलेला दिसत असे. मेक्सिकन लोकांमध्यें पुरोहित ऊर्फ देवाच्या सेवकांचा स्वतंत्र वर्ग असे. देवतेच्या धार्मिक विधींमध्यें प्रार्थना करणें, बळी देणें, मिरवणूक काढणें, नाचणें, उपास करणें वगैरे गोष्टी असत. मनुष्याच्या बळीशिवाय मका वगैरे पदार्थांचें बलिदान देत असत.

ले ख न प द्ध ति व शि क्ष ण.—येथें प्रथम चित्रलिपि प्रचारांत होती. या लिपीच्या साह्यानें मेक्सिकन पुरोहितवर्ग धार्मिक विधी, पौराणिक कथा, प्रसिद्ध ऐतिहासिक गोष्टी व दरसालचें पंचांग या गोष्टी लिहून ठेवीत असे. अशा लेखांचे कांहीं नमुने किंगज्बरो येथें पहावयास मिळतात.

मेक्सिकन लोकांचें शिक्षण—विशेषतः उच्च वर्गातील मुलांचें शिक्षण—धर्मोपदेशकांकडून होत असे. शिक्षणाकरितां बांधलेल्या मोठ्या इमारती देवळांनां जोडलेल्या असत व

तेथें मुलगे व मुली अगदीं लहान वयापासून शिक्षणाकरितां जमत असत. कांहीं वर्षे प्राथमिक शिक्षण झाल्यावर सैनिक होण्यास योग्य असलेल्या मुलांनां युद्धकलेचें शिक्षण देण्यांत येत असे. निरनिराळ्या उद्योगधंद्यांचें शिक्षण घेणाऱ्या मुलांनां त्यांचे वडील आपापल्या घरीं शिक्षण देत असत. सरदारांच्या मुलांनां इतिहास, ज्योतिष, कायदे व धर्मतत्त्वें यांचें शिक्षण मोठ्या परिश्रमपूर्वक देण्यांत येत असे.

शेंतकी व खाद्य पदार्थ.—येथील मुख्य धान्य मका हें असून त्याची पेरणी जमीन भाजून त्यांत करीत असत. मेक्सिकन लोकांनां शेताला पाणी देण्याकरितां कालवे बांधण्याचेंहि ज्ञान होतें. कोको आणि चाकोलेट हे पदार्थ यूरोपियन लोकांनां मेक्सिकन लोकांपासून माहीत झाले. टोमाटो व मिरची हे पदार्थहि मूळ मेक्सिकोमधून आले. मेक्सिकन लोक मातीचीं भांडीं घडविण्यांत मोठे कुशल असत. मेक्सिकन लोकांचीं वस्त्रें जुन्या काळांत कोरफड व ताडाच्या जातीच्या झाडांच्या धाग्यांचीं विणलेलीं असत. नंतर कापसाची लागवड मोठ्या प्रमाणांत होऊं लागली व कापसापासून रंगीत व तलम कापड करण्यांत हे लोक तरबेज बनले. सोनें, रुपें, तांबें, कथील वगैरेंचें धातुकामहि मेक्सिकन लोक चांगलें करीत असत. लोखंड ही धातु त्यांनां माहीत नव्हती.

या हकिकतीवरून मेक्सिकन लोक यूरोपियन लोकांचा सहवास लागण्यापूर्वी बरेच सुधारलेले होते हें स्पष्ट दिसतें.

**अमेरिकेशीं यूरोपीयांचा परिचय.**—फार प्राचीन काळापासून यूरोप खंडाच्या पश्चिमेस एक मोठा प्रदेश आहे असा लोकांचा समज होता. मध्ययुगांत तर या खंडाचा विस्तार, तेथील रहिवासी व त्यांची अफाट संपत्ति यांविषयीं दंतकथा यूरोपच्या वातावरणांत फार दाट पसरल्या होत्या. त्यांचा परिणाम कोलंबसाच्या मनावर झाला व त्यास हा देश शोधून काढण्याची उत्कंठा फार लागली. प्रवासाच्या सामुग्रीची जुळवाजुळव करतांना त्यास फार हालअपेष्टा भोगाव्या लागल्या. सरतेशेवटीं स्पेनचा राजा फर्डिनांड व राणी इसाबेला यांचीं मनें वळवून त्यांपासून त्यानें तीन जहाजें मिनतवारीनें मिळवलीं. ३ आगस्ट १४९२ इसवी रोजीं तो प्रवासास निघाला व त्याच वर्षाच्या आक्टोबरच्या १२ तारखेस बहामा बेटावर त्यानें पाय ठेवला. हा दिवस अमेरिकेचा शोध लागला म्हणून जगाच्या इतिहासांत चिरस्मरणीय झाला आहे.

अमेरिका या नांवाची उत्पत्ति अमेरिगो व्हेसप्युसी यापासून झाली आहे व १५०७ मध्यें वाल्डसीमुलर या गृहस्थानें जो नकाशा प्रसिद्ध केला त्यांत 'अर्जेनटाइनच्या मुलखास हें नांव दिलें होतें. जसजसे या खंडांतील अज्ञात प्रदेश उघडकीस येऊं लागले तसतसें तें नांव पसरत चाललें व शेवटीं या दोन्ही खंडांस एकाच नांवानें लोक ओळखूं लागले.

प्रथम कोलंबसास आपण अमेरिकेचा शोध लावला ही कल्पना देखील नव्हती. त्यास आशियाचे पूर्वेस आलों असें वाटून त्यानें आपण शोधून काढलेल्या प्रदेशास "इंडीज" हें नांव दिलें व तेंच नांव स्पेनच्या अमेरिकेतील वसाहतीस अनेक पिढ्या चालू होतें.

पोर्तुगीज लोकहि दर्यावर्दीपणाबद्दल व धाडसाविषयीं त्या वेळीं प्रसिद्ध होते. त्यांनींहि बऱ्याच नवीन नवीन देशांची ओळख पाश्चात्य लोकांस करून दिली.

स्पेन व पोर्तुगाल या दोन राष्ट्रांत नवीन हुडकून काढलेल्या प्रदेशावर कोणाचें स्वामित्व असावें याबद्दल तंटा उत्पन्न होऊन त्याचा निवाडा करण्याचें काम रोमच्या धर्मगुरूकडे सोंपविण्यांत आलें. त्याच्या अखेरनिकालान्वयें ग्रीनिचच्या पश्चिमेस ६० पश्चिम रेखांशाच्या पलीकडील मुलखावर स्पेनची सत्ता कायम राहिली. या निकालानंतर अमेरिका शोधण्याचें काम जारीनें सुरू झालें. कोलंबसानें स्वतः मध्य अमेरिकेच्या किनाऱ्यावरून एक दोन सफरी केल्या (१५०२—१५०४). १५०१ सालीं डेरियन नांवाची पहिली स्पेनची वसाहत हिस्पानिओलांत स्थापन झाली. १५११ त क्यूबा बेटांत वसाहत झाली. १५१२ च्या सुमारास फ्लॉरिडा व बहामा खाडीच्या किनाऱ्याचा पूर्णपणें शोध लागला. १५१३ त डेरिअनची संयोगीभूमि ओलांडून वास्को नुनेझ डी बाल्बोआ पासिफिक महासागरांत प्रविष्ट झाला. १५२० सालीं मॅगिलननें अमेरिकेच्या अगदीं दक्षिण टोंकास प्रथम वळसा घातला म्हणून त्या सामुद्रधुनीस मॅगिलनची सामुद्रधुनी हेंच नांव ठेविलें. त्या सामुद्रधुनीच्या शोधानंतर ५० पश्चिमरेखांशाच्या पलीकडील भूभागाच्या संशोधनाची इतिश्री झाली.

स्पॅनिश लोकांनीं प्रथम व्यापाराकरितां अमेरिकेंत वसाहती केल्या व त्यासाठीं अमेरिकेंत नसलेले प्राणी व वनस्पति युरोपांतून तेथें नेले. क्यूबा बेटांत ऊंसाची मोठी लागवड केली. पण अमेरिकेंत सोन्याच्या खाणींचा शोध लागला व जसजसें सोनें वगैरे धातू जास्त सांपडूं लागल्या तसतशी स्पॅनिश लोकांची सुवर्णतृष्णा अनावर झाली. खाणींत काम करण्याकरितां मजुरांचा तुटवडा भासूं लागला तेव्हां येथील मूळच्या रहिवाश्यांस जबरीनें गुलाम करण्यांत आलें. प्रथम वसाहती कायमच्या नसत. सोनें संपतांच त्या एका जागेहून दुसरीकडे हालवीत असत. मेक्सिको व पेरू हे देश सोडून जिकडे तिकडे रानटी लोकांच्या टोळ्या पसरल्या होत्या. असल्या टोळ्यांचा तर टिकाव स्पॅनिश लोकांपुढें मुळींच लागत नसे.

मेक्सिको व पेरु देशांत सुव्यवस्थित व सुसंपन्न राज्यें होतीं व तेथील लोकांतहि एका विशिष्ट संस्कृतीची प्रगति झाली होती. पण या लोकांस यूरोपीयांचें शस्त्रास्त्रांचें ज्ञान

नव्हतें म्हणून हीं दोन्ही राज्यें स्पॅनिश तृष्णेच्या बळी पडून त्यांचा नायनाट झाला. मेक्सिकोचें राज्य कोर्टिसनें तेथील दुफळ्यांचा फायदा घेऊन जिंकलें म्हणून, त्याची स्पेनच्या किंबहुना यूरोपच्या इतिहासांत निपुण राजकार्यधुरंधर पुरुषांत गणना केली आहे! पीझारोनें विश्वासघात करून थोड्या सैन्यानिशीं पेरू घेतला म्हणून जगांत त्याची कीर्ति अजरामर आहे!

स्पॅनिश लोकांनीं जें येवढें अफाट राज्य अमेरिकेंत निर्माण केलें त्याचा राज्यकारभार अगदीं निव्वळ वसाहतीच्या पद्धतीवर चालविला होता. या पद्धतीचें थोडक्यांत दिग्दर्शन करावयाचें म्हणजे ही पद्धत संपत्ति शोषण्याची होती असें म्हटलें तर अगदीं अन्वर्थक होईल. वसाहतींनीं सोन्यारुप्यासारख्या मौल्यवान धातू व कच्चा माल पुरवून त्या ऐवजीं स्पेन देशांत तयार झालेला माल विकत घ्यावा हें वसाहतीच्या राज्यकारभाराचें मुख्य धोरण ठरलें होतें. वसाहती म्हणजे स्पेनच्या राजाची अमेरिकेंतील खासगी मिळकत होती. व राज्यकारभाराकरितां "कौन्सिल ऑफ इंडिज" नांवाचें मंडळ स्थापन करण्यांत आलें होतें. अमेरिकेंतील वसाहतींचे चार भाग करून त्या प्रत्येकावर एक गव्हर्नर नेमीत असत. लहानसान भागाच्या मुख्य अधिकाऱ्यांस "कॅपटन जनरल" पदवी दिली होती. गव्हर्नरच्या हातीं सर्व प्रकारच्या अधिकाराचीं सूत्रें होतीं. त्याच्या सत्तेस फक्त न्यायकचेऱ्यासच थोडासा आळा घालतां येत असे. सर्व निकालांवर "कौन्सिल ऑफ इंडिजकडे" अपील होत असे. खाणीच्या उत्पन्नाचा पांचवा हिस्सा राजास द्यावा लागे. या कामाकरितां प्रत्येक धन्याच्या ताब्यांत पुरेसे गुलाम दिलेले असत. त्यांच्याकडून ते काम चोपून घेत असत. गुलामांकडून काम घेण्याची चट लागल्यावर तेथील मूळ रहिवाशी किती निकृष्टावस्थेस पोंचले असतील याची सहज कल्पना करतां येईल.

पोर्तुगीज लोकांनीं ब्राझिल (दक्षिण अमेरिका) देशांत वसाहत केली होती. त्यांनीं देखील स्पेनच्या वसहतीच्या पद्धतीचें अनुकरण केलें. १५३४ सालीं खासगी व्यापाराचें कायद्यानें नियमन करण्यांत आलें व १५४९ त या देशावर एक गव्हर्नर जनरल नेमला.

**फ्रेंच वसाहती.**—१४९४ सालीं रोमच्या पोप या धर्मगुरूनें स्पेन व पोर्तुगाल या दोन राष्ट्रांमधील तंट्याचा निकाल करून सर्व अमेरिका दोघांच्या स्वाधीन केली. त्या वेळीं त्या धर्मगुरूस अमेरिकेच्या विस्ताराविषयीं कांहींच कल्पना नव्हती. १६ व्या शतकांत यूरोपांत ज्या सामाजिक व धार्मिक चळवळी झाल्या व जी विचारक्रांति झाली त्यामुळें या निवाड्यास इतर राष्ट्रांनीं धाब्यावर बसविलें.

सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धांत फ्रान्स व स्पेन या दोन राष्ट्रांत वितुष्ट आल्यामुळें फ्रान्सचा राजा पहिला फ्रान्सिस यानें उत्तर अमेरिकेंत वसाहत करण्याचें मनांत योजिलें व १५२४ व १५४२ सालीं गिओवानी द वराझानो व कार्टिअर या दोन नाविकांनीं जे उत्तर अमेरिकेंतील प्रदेश शोधून काढले त्यांवर फ्रान्स देशाची मालकी आहे असें फ्रान्सिस बादशहानें जाहिर केलें. इतक्यांत या बादशहाच्या मृत्यूमुळें हें फ्रेंच वसाहतीचें काम इतकेंच राहिलें. याच सुमारास यूरोपांत धार्मिक तत्वांच्या मतभेदामुळें जीं रणें माजलीं होतीं, त्या योगानें फ्रेंच जनतेचें लक्ष इकडे फारसें गेलें नाहीं. १५९९ त हीं रणें बंद पडतांच फ्रेंचांचा बादशहा चवथा हेनरी यानें अमेरिकेंत वसाहत करण्यास आपल्या प्रजेस उत्तेजन दिलें, व आपला हक्क सध्यांच्या कानडाच्या मुलुखावर शाबित करण्याच्या तो तयारीस लागला. या प्रोत्साहनानें पुष्कळ फ्रेंच लोक कानडाच्या भागांत आले पण त्यांनीं तेथें शेती भाती केली नाहीं. त्यांनीं तेथील बायकांशीं लग्नें केलीं व तेथल्या रहिवाशांप्रमाणें शिकारी व जंगली बनले. यामुळें कायमचीं गांवें त्यांस बसवितां आलीं नाहींत व त्यांची लोकसंख्या इकडे तिकडे पांगलेली होती.

या वेळच्या फ्रेंच लोकांच्या डोक्यांत धर्मवेड फार भरलें असल्यामुळें त्यांनीं तेथील मूळच्या लोकांनां ख्रिस्ती करण्यासाठीं आटोकाट प्रयत्न केले. असें करण्यांत तेथील रानटी लोकांचा क्रूरपणा व जोम नाहिंसा करून त्यांनीं धर्मोपदेशकाच्या मुठींत राहावें, हा त्यांचा बाटविण्यांत मूळ उद्देश होता. १४ वा लुई हा एक प्रसिद्ध बादशहा फ्रान्स देशांत होऊन गेला. त्यानें १६६१ त कानडाच्या वसाहतीच्या बाबींत मन घातलें. व त्यानें फ्रान्स देशांतील पाखंडी लोकांस तेथें जाण्याचा मज्जाव केला. त्यामुळें ज्यांच्या अंगीं वसाहत करण्यास लागणारे गुण धाडस, पाणी व प्रसंगावधान होते अशा लोकांस तेथें थारा न मिळाल्यानें कानडांत फक्त एक लहानसा परावलंबी व अधिकाऱ्यांच्या मुठींत असलेला असा शेतकरी वर्ग फक्त राहिला. या वसाहतींत फ्रेंच अधिकाऱ्यांचें फार स्तोम माजलें होतें व त्याच कारणानें फ्रेंच लोकांस वसाहती राखण्यासाठीं अतोनात पैसा खर्च करावा लागला. वसाहतींची सुधारणा करण्यासाठीं जास्त जास्त मुलूख त्यांनीं आपल्या ताब्यांत घेण्यास सुरुवात केली. या धोरणाचा परिणाम असा झाला कीं, मुलूख मात्र अफाट, वस्ती थोडी व तुरळक, पण वसाहती राखण्यासाठीं मायदेशास खर्च अतोनात पडे.

**इंग्लिश वसाहती.**—अमेरिकेंत वसाहती स्थापन करण्याच्या बाबतींत इंग्रजांनीं फ्रेंचांचें अनुकरण केलें. राणी एलिझाबेथ इंग्लंडच्या तक्तावर असतांना इंग्लंड व स्पेन या दोन प्रमुख राष्ट्रांमध्यें वैमनस्याचें बीं रुजलें. त्याबरोबर स्पेनचा बादशहा पांचवा चार्लस यांशीं जो इंग्रजांनीं व्यापारविषयक तह केला, त्या अन्वयें आपणांस स्पेनच्या वसाहतींशीं व्यापार करण्याचा हक्क पूर्वीचे मिळाला आहे असें

इंग्रज लोक म्हणूं लागले. स्पॅनिश लोकांनीं अर्थातच हें नाकबूल केलें व रोमच्या धर्मगुरूनें आंखून दिलेल्या रेषेपलीकडील मुलुखांत यूरोपांत केलेल्या तहाचें अस्तित्व आपणांस मान्य नाहीं असें मत जाहीर केलें.

हा तंटा जरी चालू होता तरी इंग्रजांनीं १५७८ पर्यंत अमेरिकेंत वसाहत करण्याच्या प्रयत्नांस खराखुरा आरंभ केला नाहीं. याच वर्षी सर हंफ्रे गिलबर्ट नामक खलांशानें अमेरिकेंतील प्रदेशाचा शोध करून वसाहत करण्याचा परवाना बादशहाकडून मिळविला. याच कामांत त्याचा अंत झाल्यानें तें त्याच्या बंधूनें आपल्या हातीं घेतलें. या थोर पुरुषाचें नांव सर वॉल्टर रॅले होय. या गृहस्थानें व्हर्जिनिया नांवाची वसाहत स्थापन करण्यासाठीं एकसारखे पुष्कळ प्रयत्न केले पण यासहि यश आलें नाहीं. १६०७ सालीं व्हर्जिनियांत पहिली कायमची वसाहत स्थापन झाली. व्हर्जिनियाच्या प्रदेशाची मालकी त्या नांवाच्या कंपनीस मिळाली होती.

१६२० सालीं दुसऱ्या कायमच्या वसाहतीची स्थापना प्लिमथ येथें झाली. या वसाहतीचा पाया इंग्लंडांतील राजधर्माचीं मतें मान्य नसलेल्या लोकांनीं घातला. या दोन केंद्रस्थानापासून निरनिराळ्या १३ वसाहती उत्पन्न झाल्या. या वसाहतींस इंग्रजींत मळे (प्लँटेशन्स) असें म्हणत.

या तेरा वसाहतींपासून पुढें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें निर्माण झालीं. या वसाहतींचे उत्तरेकडील व दक्षिणेकडील वसाहती असे दोन विभाग करीत असत.

दक्षिणेकडील वसाहतवाल्यांचा कल विशेष कोणत्याहि धर्मपंथाकडे नव्हता. ते नीग्रो गुलामांच्या मजुरीनें शेती करीत. उत्तरेचे वसाहतवाले प्युरिटन पंथाचे होते व ते स्वतः शेती करीत असत. याशिवाय ते चांगले खलाशी व व्यापारी होते. उत्तरेकडील व दक्षिणेकडील वसाहतींच्या मधील प्रदेशांत विल्यम पेननें वसाहत केली होती. त्यांत क्वेकर पंथाचे लोक होते.

इंग्लिश वसाहतींचे हितसंबंध, रितीभाती, व धार्मिक पंथ जरी भिन्न होते तरी त्या स्वतःच्या राजकीय हक्कांचें संरक्षण करण्यासाठीं फार दक्ष असत. मायदेशांत छळ झाल्यामुळें पुष्कळ फ्रेंच, जर्मन वगैरे लोक स्वदेशत्याग करून इंग्लिश वसाहतींत येऊन राहिले होते. त्या लोकांनां इंग्रजांनीं आपल्यांत घेतलें. इंग्रज वसाहतींची भरभराट उत्तरोत्तर फार होत गेली. त्यांचा व्यापार, शेती, लोकसंख्या झपाट्यानें वाढत चालली. स्पॅनिश लोकांच्या हातीं इतके दिवस जो व्यापारसंबंधीं मक्ता होता तो त्यांनीं लवकरच हिरावून घेतला. त्यांनीं वेस्ट इंडिज बेटांवर स्वाऱ्या केल्या व "बुक्यानीर" म्हणून जे प्रसिद्ध लुटारू अमेरिकेंत होऊन गेले त्यांत इंग्लिश वसाहतवाल्यांचा बराचसा भरणा होता.

इंग्रज व फ्रेंच वसाहती, त्यांच्याशीं मायदेशाचें असलेलें राजकीय धोरण व त्यांच्या भरभराटीसाठीं झालेले प्रयत्न यांची तुलना केली असतां, ती बरीच बोधप्रद होण्यासारखी आहे. फ्रेंच वसाहतवाल्यांस सरकारी बंधनें फार. सरकारी हुकूम अगदीं झेलून धरणारे, त्यांच्या मुठींत असणारे अगदीं शेलके राजनिष्ठ अशा लोकांस, मात्र फ्रेंच अमेरिकेंत जाण्यास परवानगी होती. ज्यांच्या अंगीं स्वतःच्या पायावर उभें राहण्याची धमक होती, जे धाडस, प्रसंगावधान व कर्तृत्व या गुणांनीं प्रसिद्धीस आले होते, अशा लोकांवर धर्मसंबंधीं मतभिन्नत्वामुळें फ्रेंच सरकारचा रोष झाला होता म्हणून त्यांस अमेरिकेंत जाण्यास मज्जाव करण्यांत आला होता. सरकारी अधिकारी वर्गाच्या वर्चस्वामुळें लोक अगदीं पराधीन बनून गेले होते.

इंग्लिश वसाहतवाल्यांकडे पहावें तों कांहीं व्यापारविषयक बंधनें सोडून, त्यांनां पूर्ण स्वातंत्र्य मिळालें होतें. तेथें कोणासहि जाण्यास आडकाठी नव्हती. त्यांनां शेतीची चांगली माहिती असल्यानें त्यांची संपत्ति वाढत गेली. त्यांनीं आपण होऊन राज्यकारभाराकरितां मायदेशाबरहुकूम संस्था स्थापिल्या. या सर्व सोयींमुळें तेथें धाडसी, जोमदार, व कर्तृत्ववान् लोकांचा भरणा झाला होता. इंग्लंड देशास वसाहतींपासून फार फायदा होत असे. इंग्लिश वसाहतींचा व्यापार मुख्यत्वेंकरून इंग्लंड देशाशीं चालत असे. वसाहतवाले स्वदेशास धान्य व इतर कच्चा माल पुरवीत व यांत्रिक सहाय्यानें तयार झालेला माल यूरोपांतून अमेरिकेंत येत असे.

**फ्रेंच सत्तेचा ऱ्हास.**—फ्रेंचांनीं सध्याच्या कानडाच्या मुलुखांत वसाहत केली होती. पण ह्या अफाट प्रदेशांत त्यांचे लोक मात्र मूठभर होते. याखेरीज लुईझियानांत (संयुक्त संस्थानाचा मेक्सिकोच्या आखातालगतचा भाग) त्यांची कांहीं ठाणीं होतीं. मायदेशास या कांहीं वसाहतींच्या रक्षणासाठीं बराच खर्च करावा लागे. हा सर्व खर्च टाळून फायदा होण्यासाठीं, त्यांनीं जास्त जास्त मुलूख ताब्यांत घेण्यास सुरुवात केली. ही युक्ति फ्रेंच लोकांस फार पसंत पडून त्यांनीं ती अमलांत आणिली. कानडा व लुईझियाना या दोन वसाहती ओहीओ नदीवर ठाणीं बसवून जोडाव्या व इंग्लिश वसाहतवाल्यांस अलेघनीझ पर्वत व अतलांतिक महासागर यांमधील चिंचोळ्या पट्टींत कोंडावें असा फ्रेंचांनीं बेत केला, व पुढें लवकरच तदव्यास सुरुवात झाली. हें वितुष्ट बरीच वर्षे चाललें होतें. या बखेड्याचा निकाल थोरल्या पिटच्या कारकीर्दींत लागला. इंग्रजांची दर्यावरील सत्ता फार प्रबल होती. त्यामुळें त्यांनीं फ्रेंचांची कुमक सर्व बंद करून, फ्रेंचांची अमेरिकेंतील सर्व ठाणीं घेतलीं व फ्रेंचांशीं पुढें जो तह झाला त्यांत, कानडा, ओहीओ व मेस्सीसिपी या नद्या लगतच्या सर्व मुलुखावरील सर्व हक्क फ्रेंचांनीं सोडून दिले. ग्वायना व वेस्ट इंडिज-

मधील कांहीं बेटें हींच काय तीं फ्रेंचांच्या ताब्यांत अखेर उरलीं.

**संयुक्त संस्थानांचा उदय**.—फ्रेंच सत्तेच्या ऱ्हासामुळें पुढें अमेरिकेंत स्वतंत्र राष्ट्रांचा उदय होण्यास आरंभ झाला. इंग्लिश वसाहती व इंग्लंड यांमध्यें वितुष्ट पडलें व तें वाढत जाऊन त्याचें पर्यवसान अमेरिकेच्या स्वातंत्र्यप्राप्त्यर्थ युद्धांत होऊन अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचें एक तेजस्वी राष्ट्र अस्तित्वांत आलें.

**दक्षिण अमेरिकेंत स्वतंत्र राष्ट्रांचा उदय**.—यूरोपांत या वेळीं स्वतंत्रतेची लाट पसरली होती.व सर्व यूरोपभर अनियंत्रित बादशाही सत्तेला आळा घालून तिजवर लोकमताचा दाब घालण्याचे प्रयत्न जारीनें चालू होते. फ्रान्स देशांत राजदंडाचे केव्हांच तुकडे तुकडे झाले होते. अमेरिकेंतील इंग्लिश वसाहतवाल्यांनीं आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. या सर्व चळवळींचा परिणाम आपल्या वसाहतींवर काय होणार हें स्पॅनिश सरकारास अवगत होतें. स्पॅनिश लोक व दक्षिण अमेरिकेंतील मूळचे रहिवाशी क्रियोल यांच्या रक्ताची भेसळ होऊन नवीनच प्रजा अस्तित्वांत आली होती. यांपैकीं कांहीं तरुण स्पेन देशांत विद्याभ्यासासाठीं जात व त्यांबरोबर नवीन स्वातंत्र्याच्या कल्पनेचें वारें दक्षिण अमेरिकेच्या वसाहतींत खेळूं लागलें.

स्पॅनिश अधिकारी वर्गाची मिजास फार माजली होती.वसाहतींचा उपयोग दुभत्या गाईसारखा स्पॅनिश लोकांनीं इतकीं वर्षें केला होता कीं, त्यामुळें वसाहतवाल्यांत एक प्रकारची असंतुष्टता पसरली होती. वेळींच जर सढळ हातानें सवलती दिल्या असत्या तर दक्षिणअमेरिकेंतील वसाहती मायदेशास चिकटून राहत्या. स्पेन देश नेपोलियननें जरी जिंकला तरी वसाहतींनीं आपली राजनिष्ठा ढळूं दिली नाहीं. याचा मोबदला म्हणून त्या वसाहतींस कांहीं अधिकार न मिळतां स्पेनच्या कायदेमंडळानें कांहीं सवलती न देण्याचा आपला हट्ट तसाच चालविला. हें मंडळ स्पेनच्या व्यापाऱ्यांच्या मुठींत होतें म्हणून स्वार्थापलीकडे त्यास दुसरें कांहींच दिसलें नाहीं यांत नवल तें काय !

ही बातमी वसाहतींत पसरतांच इतकीं वर्षें धुमसत असलेला तीव्र असंतोष भडकला व वसाहतींनीं स्वातंत्र्याचें निशाण उभारलें व स्पेन देशाशीं असलेला संबंध कायमचा तोडून टाकला. स्पॅनिश लोकांनीं फ्रेंचांच्या मदतीनें पुन्हां आपल्या वसाहती जिंकण्याचे प्रयत्न सुरू केले. हें इंग्रजांस समजतांच स्पॅनिश सत्ता पुन्हां प्रस्थापित झाल्यास आपल्या व्यापारास अडथळा होईल अशी भिति वाटून त्यांनीं वसाहतींचें स्वातंत्र्य कबूल केलें.

**मनरोतत्त्व**.—१८२३ सालीं संयुक्त संस्थानांचा अध्यक्ष जो मनरो त्यानें इतःपर यूरोपियन राष्ट्रांस वसाहत करण्यास अमेरिकेंत जागा नाहीं व अमेरिकेचा यूरोपाशीं कांहीं एक संबंध नाहीं असें जाहीर केलें. वरील सिद्धांत मनरोच्या नांवानें प्रसिद्ध आहे व त्यास मनरो डॉक्ट्रीन असें म्हणतात.

कानडा व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील वसाहतवाल्यांस राज्यव्यवस्था व कारभार कसा चालवावा याचें बाळकडू लहानपणापासून मिळालें होतें. म्हणून त्यांनीं लोकसत्ताक राज्यपद्धतीच्या संस्था चांगल्या तऱ्हेनें चालवून त्या भरभराटीस आणिल्या व आपल्या देशाचें पाउल सुधारणेच्या दृष्टीनें पुढें टाकलें.

स्पॅनिश लोकांस अशा प्रकारचें शिक्षण न मिळाल्यानें त्यांच्या हातून लोकसत्ताक संस्थांचें चांगल्या प्रकारें संगोपन होत नाहीं, म्हणून त्यांची राज्यपद्धति सुरळीतपणानें चालत नाहीं.

मेक्सिकोंत तर नेहमीं बंडाळी चालू असते, त्यामुळें अमेरिकेंतील दक्षिण संस्थानांत शांतताभंग होण्याचा संभव असतो म्हणून तेथें पाळतीवर सैन्य ठेविलेलें असतें.

### आस्ट्रेलिया

**लोक**.—आस्ट्रेलियांतील देश्य लोकांचें मूळ शोधून काढणें हें मोठें बिकट कोडें आहे. या लोकांचा इतर प्रदेशांतील लोकांशीं असलेला मानवजातिविषयक संबंध शोधून काढण्याचें काम विशेष अवघड असण्याचें कारण असें कीं, त्यांच्या शरीराचें वळण आसपासच्या जातींच्या लोकांच्या शरीरवळणापेक्षां फारच निराळें आहे. हा शरीराच्या ठेवणीचा प्रश्न सोडून देऊन त्यांच्या सामाजिक चालीरीतींसंबंधानें पाहूं गेल्यास त्यावरूनहि त्यांचा पृथकपणा अधिकच प्रस्थापित होतो. त्यांचे शेजारी मलायी लोक, पाप्यूअन लोक व पॉलीनेशियन लोक शेती करणारे आहेत व घरें बांधून राहणारे आहेत, तर हे आस्ट्रेलियन लोक यांपैकीं कांहीं करीत नाहींत.मातीचीं भांडीं घडविणें ही कला मलायी व पाप्यूअन लोकांस अवगत आहे. धनुष्यबाण वापरण्याचें ज्ञान पाप्यूअन लोकांत आहे. चांगल्या मोठाल्या नावा तयार करण्याइतकें कौशल्य या तिन्ही जातींच्या लोकांत आहे पण यांपैकीं कोणतीच विद्या आस्ट्रेलियन लोकांत नाहीं. अर्थात् आस्ट्रेलियन लोक अत्यंत प्राथमिक अवस्थेंतील मानव जात असल्यामुळें त्यांचें मूळ शोधण्याकरितां फार दूरवर तपास करणें भाग पडतें.

शिवाय या लोकांचें आस्ट्रेलियांत प्रथम आगमन केव्हां झालें यासंबंधीं दंतकथा, आख्यायिका वगैरे कांहींच उपलब्ध नाहीं. यावरून हें आगमन फार फार प्राचीन असलें पाहिजे. मलायी, पाप्यूअन व पॉलीनेशियन या लोकांशीं यांचें शारीरिक साम्य मुळींच नाहीं. पण आस्ट्रेलियांतील अनेक देश्य जातींचें मात्र आपसांत इतकें निकट साम्य आहे कीं, त्या सर्व जाती एकाच मानववंशांतील आहेत असें मानणें भाग पडतें. पण या निरनिराळ्या जातींच्या भाषा मात्र भिन्नभिन्न आहेत. तथापि व्याकरणदृष्ट्या या अनेक भाषांतील बऱ्याच क्रियापदांचें मूळ धातू एकच

असल्यामुळें त्या सर्व भाषा मूळ एकाच मातृभाषेपासून झाल्या असाव्यात हें उघड आहे.' याच वस्तुस्थितीवरून आणखी एक अनुमान असें निघतें कीं, एका मूळ भाषेपासून या अनेक भिन्न भिन्न भाषा तयार झाल्या; त्या अर्थी या आस्ट्रेलियन जातीच्या लोकांच्या मूळ पूर्वजांची तेथें वसाहत झाल्यास फार दीर्घ काळ झाला असावा. पॉलिनेशियन लोकांहून आस्ट्रेलियन लोक मानववंशशास्त्रदृष्टया भिन्न आहेत या विधानाला भाषाविषयकहि पुरावा आहे: तो असा कीं, आस्ट्रेलियन भाषांत संख्यावाचक शब्द तीन चार आंकड्यांपर्यंतच आहेत तर पॉलिनेशियन भाषेंत हे शब्द हजार संख्येपर्यंतहि आहेत.

आस्ट्रेलियाच्या दक्षिणेकडील टॅस्मानिया बेटांतील लोकांच्या मूळ उगमाचा प्रश्न वरच्याहूनहि कठीण आहे. कारण टॅस्मानियन लोकांचें शारीरिक साम्य पाप्युअन लोकांशीं आहे. आस्ट्रेलियन लोकांशीं मुळींच नाहीं. पण टॅस्मानियन लोकांची कलाविषयक प्रगति मुळींच झालेली नव्हती. कारण त्यांनां नावाहि चांगल्याशा करतां येत नव्हत्या. आस्ट्रेलियांतील व टॅस्मानियांतील वनस्पती व प्राणी यांवरून पाहतां, पूर्वी एके काळीं आस्ट्रेलिया व टॅस्मानिया हीं दोन्हीं मिळून एकच खंड होतें असें ठरतें. तेव्हां हे पाप्यूअनांचे संबंधी टॅस्मानियन लोक आस्ट्रेलियांतून दक्षिणेकडे उतरत उतरत टॅस्मानियांत आले, कीं टॅस्मानियाचें स्वतंत्र बेट बनल्यानंतर समुद्रावरून तेथें आले ? आस्ट्रेलियांतून आले असें म्हणावें तर आस्ट्रेलियांत या जातीच्या लोकांचे अवशेष मुळींच सांपडत नाहींत. समुद्रावरून आले असें म्हणावें तर त्यांनां दर्यावर्दीपणाचें ज्ञान मुळींच नव्हतें.

आस्ट्रेलियन लोकांच्या संबंधानें मानववंशशास्त्रज्ञांनीं निरनिराळे सिद्धांत पुढें मांडले. कोणी त्यांनां भाषासाम्यावरून व आचारसाम्यावरून आफ्रिकेंतील नीग्रो लोकांचे संबंधी ठरविलें. परंतु हीं साम्यें भ्रांतिमूलक असल्याचें अलीकडे सिद्ध झालें आहे. ए. आर. वॅलेसनें असा सिद्धांत केला कीं, हे लोक काकेशियन वंशाचे आहेत; कारण त्यांचें जपानांतील आइनस लोकांशीं व कांबोडियांतील ख्मेर व चाम लोकांशीं साम्य आहे. हे काकेशियन वंशीय लोक दक्षिण अमेरिका, दक्षिण आफ्रिका व आस्ट्रेलिया मिळून पूर्वी जेव्हां एक खंड होतें तेव्हां या अँटार्टिक खंडांत रहात होते हा सिद्धांत ग्राह्यसा दिसतो. पण पाप्यूयनसदृश टॅस्मानियन लोक टॅस्मानियांत कसे आले हा प्रश्न वरील सिद्धांतास विघातक असल्यामुळें हा दुसरा सिद्धांतहि आतां अग्राह्य ठरला असून एक तिसराच सिद्धांत प्रस्थापित होऊं पहात आहे. तो सिद्धांत असा कीं, एका अज्ञात असलेल्या अशा प्राचीन काळीं, हिंदुस्थानच्या दक्षिणेंत रहाणारे द्रविडी लोक खालीं सरकत सरकत सिलोनमध्यें गेले व तेथून लहान लहान नावांच्या सहाय्यानें आस्ट्रेलियाच्या वायव्य भागांत उतरले. पाप्यूअन लोक अगोदरच तेथें होते. त्यांनां या द्रविडी लोकांनीं दक्षिणेकडे रेटलें, त्यामुळें ते अखेर टॅस्मानियांत जाऊन राहिले.

आस्ट्रेलियन लोक इंडो-आर्यन आहेत "या सिद्धांताला शारीरिक साम्याचा पुरावा आहे. डॉ. चार्लस-पिकेरिंग म्हणतो, "आस्ट्रेलियन लोक अत्यंत मागासलेले असले तरी त्यांचें शरीर बांधेसूद व अवयव रेखलेले असतात." हक्सले व सर डब्ल्यु. डब्ल्यु. हंटर यांनीं याच मतास पुष्टि दिली आहे. बिशप काल्डवेलनें असा पुरावा दिला आहे कीं, आस्ट्रेलियाच्या दक्षिण व पश्चिम भागांतील लोक "मी, तूं, तो, आम्ही, तम्ही, यांनां मद्रास किनाऱ्यावरील द्रविडी कोळ्यांचेच शब्द वापरतात." आणि शिवाय आस्ट्रेलियन लोकांचें द्रविडी लोकांशीं शारीरिक साम्य आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां द्रविडी लोकच फार फार प्राचीन काळीं आस्ट्रेलियांत गेले हा सिद्धांत खरा मानावा लागतो.

हे मूळचे आस्ट्रेलियन लोक फार मागासलेले राहिल्यामुळें त्यांचा इतिहास किंवा संस्कृति याबद्दल देण्यासारखी माहिती कांहींच नाहीं. यूरोपीय लोकांनीं आस्ट्रेलिया शोधून काढली तेव्हां तेथील लोक अगदीं प्राथमिक स्थितींत होते. शिकार केलेल्या जनावरांचें मांस व कंदमुळें आणि सर्प वगैरे प्राणी खाऊन ते रहात असत. जमीन नांगरून शेतकी करणें किंवा गुरें पाळणें या गोष्टीहि त्यांनां माहीत नव्हत्या. कायमची घरें बांधून राहणें त्यांनां माहीत नव्हतें. बहुतेक भागांतले स्त्रीपुरुष पूर्ण विवस्त्र स्थितींत हिंडत असत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सामाजिक, राजकीय व धार्मिक बाबतींत हे लोक मागासलेले असल्यामुळें त्यांची अधिक माहिती येथें देण्याची आवश्यकता नाहीं.

**आस्ट्रेलियाचें भौगोलिक संशोधन करणारे यूरोपीय प्रवासी.**—आस्ट्रेलियाचा प्रथम शोध कोणी लावला हे ठरविणें कठिण आहे. तेराव्या शतकांत चिनी लोकांनां या खंडाची माहिती होती असा पुरावा मिळतो. मलायी लोकांनांहि ही माहिती होती. १३ व्या शतकाच्या अखेरीस पूर्वेकडील देशांस भेट देणारा मार्कोपोलो यानें दक्षिणेकडे एक मोठें खंड आहे असा उल्लेख केलेला आहे. इंग्लंडच्या आठवा हेनरी या राजाला अर्पण केलेल्या एका नकाशांत हें दक्षिणेकडील मोठें खंड दाखवलें आहे. १५०३ मध्यें बिनॉट पॉलमियर सिऊर डी गॉनेव्हिल या फ्रेंच प्रवाशाचें जहाज वादळांत सांपडून एका मोठ्या बेटाच्या किनाऱ्याला लागलें होतें, पण हें बेट मादागास्कर असावें असें फ्लिंडर्स व इतर तज्ज्ञांचें मत आहे. १५३१ च्या सुमारास हें खंड शोधून काढल्याबद्दलच्या मानावर फ्रेंच व पोर्तुगीज या दोन राष्ट्रांतले लेखक आपापल्या तर्फे हक्क सांगत आहेत; परंतु खात्रीलायक पुरावा पुढें आलेला नाहीं. १७ व्या शतकाच्या आरंभीं स्पेनचा राजा तिसरा फिलिफ यानें हें दक्षिणेकडील खंड शोधून काढण्याकरितां डी टॉरेस

याच्या हुकमतीखालीं एक थोड्या जहाजांचा ताफा पाठविला. या जहाजांनीं १६०६ मध्यें न्यू हेब्रिडीज बेटांपैकीं एस्पिरिटो शँटो हें नांव हल्लीं असलेलें बेट शोधून काढिलें. परंतु पुढें जहाजावरील खलाशांनीं दुखण्याला वगैरे त्रासून बंड केल्यामुळें दी टॉरस संशोधनाचें काम सोडून फिलिपाइन बेटांत गेला. याच सुमारास अनेक डच प्रवाशांनीं या खंडाच्या शोधार्थ प्रयत्न केले. यांपैकीं पेलसर्ट यानें दिलेली आस्ट्रेलियाच्या पश्चिम किनाऱ्याची माहिती वाचनीय आहे. १७ व्या शतकाच्या आरंभींच्या या डच प्रवाशांनीं दिलेली पश्चिम किनाऱ्याची व त्यालगतच्या बेटांची माहिती विश्वसनीय असून त्यांनीं तिकडील भागांनां दिलेलीं नांवें अद्यापहि चालू आहेत. या खंडाच्या अंतर्भागाची माहिती डच प्रवाशांपैकीं पेलसर्ट ह्या एकट्यानेंच दिली असून कांगेरू या जनावराचाहि त्यानें उल्लेख केला आहे. १६४२ मध्यें डच ईस्ट इंडिज येथील गव्हर्नर व कौन्सील यांच्या मदतीनें अॅबेल जॅन्सझून टॅस्मन हा प्रवाशी बटेव्हिआ येथून आस्ट्रेलिया खंडाच्या शोधार्थ निघाला. त्यानें २४ नोव्हेंबर रोजीं जें बेट शोधून काढलें त्यालाच हल्लीं टॅस्मानिया हें नांव चालू आहे. परंतु टॅस्मनचे खलाशी तेथें उतरले नाहींत. त्यामुळें हें बेट डच लोकांच्या ताब्यांत राहिलें नाहीं. आस्ट्रेलिया खंडाला भेट देणारा पहिला इंग्लिश प्रवाशी वुइल्यम डँपियर हा होय. त्यानें प्रथम १६८८ मध्यें व नंतर १६९९ मध्यें या खंडाच्या संबंधाची बरीच माहिती मिळविली.

यानंतर बऱ्याच वर्षांनीं म्हणजे १७६९–७० या सालीं कॅप्टन जेम्स कुक यानें केलेली सफर विशेष महत्वाची आहे. १७६९ आक्टोबर ६ रोजीं कुक न्यूझीलंड बेटानजीक गेला व नंतर त्यानें आस्ट्रेलियाच्या पूर्व किनाऱ्यावर उतरण्याचा प्रयत्न केला. त्या वेळीं तेथें एक देश्य लोकांची टोळी विस्तवावर खाद्य पदार्थ शिजवीत होती. या देश्य लोकांनीं प्रथम कुकच्या जहाजाकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. परंतु कुकचे लोक किनाऱ्यावर उतरूं लागतांच दोघे देश्य इसम हातांत भाले घेऊन त्यांनां अडवण्याकरतां आले. तेव्हां कुकच्या लोकांनीं बंदुक झाडली तरी ते भिऊन पळाले नाहींत. हें त्यांचें धाडस आश्चर्य करण्यासारखें होतें; कारण कोलंबसाला अमेरिकेंत ह्याच्या उलट अनुभव आला होता. तेथील अमेरिकन इंडियन बंदुकींचा आवाज ऐकतांच अगदीं घाबरून गेले; व ते यूरोपीय लोकांनां देवाप्रमाणें मानूं लागले. असो. १७७२ मध्यें कुकनें याच खंडाकडे दुसरी सफर करून आणखी माहिती मिळविली. यानंतर १७८७ मध्यें ब्रिटिश लोकांनीं आस्ट्रेलियांत जाऊन पहिली वसाहत केली. पुढें १८१६ ते १८७५ याच्या दरम्यान अनेक प्रवाश्यांनीं आस्ट्रेलिया खंडाच्या अंतर्भागाचें संशोधन केलें. त्यांत ऑक्सले ( १८१६ ), मिचेल ( १८३३ ), एयर (१८४०), स्टुअर्ट ( १८६० ), गाईल्स ( १८७५ ) वगैरे संशोधक प्रमुख आहेत.

**आस्ट्रेलियांतील वसाहतींचा आरंभींचा इतिहास.**—आस्ट्रेलियांतील सहा संस्थानांपैकीं न्यू साऊथ वेल्स येथील वसाहत सर्वांत अगोदरची आहे. १७८८ मध्यें पोर्ट जॅक्सन हें ठिकाण इंग्लंडमधून पाठविलेल्या गुन्हेगारांकरितां नवीन वसविण्यांत आलें. येथें पुढें पन्नास वर्षें गुन्हेगार पाठविण्याचा क्रम चालू राहून १८३९ मध्यें काळ्या पाण्याची शिक्षाच इंग्रजी कायद्यांतून रद्द करण्यांत आली. १८२१ नंतर या गुन्हेगार वसाहतवाल्यांनीं आपल्या औद्योगिक प्रगतीला चांगला आरंभ केला. याच सुमारास टॅस्मानियांतहि गुन्हेगारांची वसाहत करण्यांत आली. लवकरच व्हिक्टोरिया हें नांव हल्लीं असलेला प्रांत व्यापण्यांत आला. १८२५ ते १८२९ यांच्या दरम्यान वेस्टर्न आस्ट्रेलिया हा प्रांत तयार झाला. हे इतर प्रांत वसाहत स्थापण्याच्या उद्देशानें स्थापन झालेल्या कंपन्यांनीं वसविले. न्यू साऊथ वेल्स हा प्रांत मात्र मूळ गुन्हेगारांनीं वसविला. पुढें १८६९ मध्यें गुन्हेगार पाठविण्याचा कायदा बंद झाल्यावर हे सर्व प्रांत सारख्या दर्जाचे बनले.

१७८८ मध्यें गुन्हेगारांची पहिली वसाहत झाली त्या वेळीं लष्करी अधिकाऱ्यांच्या हातांत सर्व अनियंत्रित सत्ता होती. या लष्करी गव्हर्नरांनीं तेथें रस्ते, पूल वगैरे बांधून व गुन्हेगार वसाहतवाल्यांस मेंढ्या पाळण्याचा धंदा करण्यास उत्तेजन देऊन या वसाहतीची बरीच सुधारणा केली. पुढें हा धंदा इतर प्रांतांतहि पसरला, व लोकरीचा व्यापार करण्याकरितां श्रीमंत लोक तिकडे जाऊन राहूं लागले.

१८४१ ते १८५१ याच्या दरम्यान बऱ्याच सोन्याच्या खाणी सांपडून या प्रांतांतील वस्ती झपाट्यानें वाढूं लागली. याप्रमाणें भरभराट होतांच १८६० मध्यें पांच संस्थानांनां जबाबदारीची राज्यपद्धति देण्यांत आली. त्यामुळें प्रत्येक प्रांतास आपापली अंतर्गत सुधारणा करण्यास पूर्ण मोकळीक मिळाली. असा आस्ट्रेलियांतील वसाहतींचा थोडक्यांत इतिहास आहे.

### सैबीरिया ( आशिया )

**सैबीरिया.**–यूरोपीयांच्या राजसत्तेखालीं व संस्कृतीखालीं पूर्णपणें सांपडलेला आशियाखंडाचा मोठा भाग म्हटला म्हणजे सैबीरिया हा प्रांत होय. हा प्रांत बळकाविण्याकरितां धडपड चीन, जपान व रशिया यांच्यामध्यें पूर्वी चालू होती व हल्लींहि चालू आहे.

**प्राचीन वसाहती.**—सैबीरियांतील सरोवरांच्या कांठीं प्राचीन नवपाषाण युगांतील अनेक अवशेष सांपडतात. त्यांवरून व इतर कांहीं पुराव्यांवरून येथें प्राचीन काळीं हल्लींपेक्षां फार दाट वस्ती असावी असें अनुमान निघतें. आशियांत पूर्वेकडून पश्चिमेकडे लोकांच्या मोठाल्या झुंडी पसरल्या त्या वेळीं कांहीं उत्तरेकडे वळून सैबीरियांत शिरल्या व मागून आलेल्या लाटेमुळें त्या अधिकाधिक उत्तरेकडे सरकल्या. राडलॉव्हचें म्हणणें असें आहे कीं, सैबीरियांतील अगदीं

आद्य रहिवाशी येनिसीयन लोक होते व त्यांची भाषा उरल आल्ताइक भाषेपेक्षां निराळी होती. त्यांचे थोडे अवशेष सयन पर्वतांत सांपडतात. येनिसीयनांनंतर उग्रोसामोयिडी लोक आले व ख्रि. पू. ३ र्‍या शतकांत हूण लोकांच्या मोठ्या लाटेमुळें ते आलताई व सयन पर्वत ओलांडून सैबिरियांत शिरले. दक्षिण सैबिरियांत सर्वत्र आढळून येणारे कांस्ययुगांतले अवशेष या उग्रो-सामोयिडी लोकांच्या वेळच्या वस्तूंचे असले पाहिजेत. त्यांनां लोखंड माहीत नव्हतें परंतु ब्रॉंझ अथवा कांसें, रुपें व सोनें या धातूंच्या कामांत ते निष्णात होते. त्यांचे ब्रॉंझचे दागिने व हत्यारें हीं बहुधा चांगलीं गुळगुळीत जिल्हई केलेलीं व मोठ्या कुशलतेनें बनविलेलीं दिसतात. पुष्कळ जमीन भिजेल इतके पाटबंधारे त्यांनीं बांधले होते. एकंदरीनें पाहतां हे लोक त्यांच्या मागून आलेल्या इतर लोकांपेक्षां पुष्कळ अधिक सुधारलेले होते. त्यानंतर आठ शतकांनीं चीनांतील तुर्की वंशांतल्या खगसी व यिगुर नांवाच्या लोकांनीं उग्रो-सामोयिडी लोकांनां जिंकलें. या नव्या जेत्यांचेहि अवशेष पुष्कळ सांपडतात. त्यांनां लोखंड धातूची माहिती होती व ब्रॉंझची माहिती त्यांनीं जित लोकांपासून मिळविली. या लोकांचें भांडी करण्यांतील कौशल्य कांस्ययुगांतल्या कामापेक्षां फार अधिक सुधारलेलें आहे. या खगसी लोकांचें तुर्की साम्राज्य १३ व्या शतकापर्यंत टिकलें असावें व नंतर चेंगिझखान याच्या नेतृत्वाखालीं मोंगल लोकांनीं तें जिंकून त्यांची संस्कृति नष्ट केली. त्या वेळचीं जीं थडगीं सापडलीं आहेत त्यांवरून हा काळ अवनतीचा गेला असें खास दिसतें.

**रशियनांचा प्रवेश.**—पुढें सोळाव्या शतकाच्या अखेरीस रशियन लोक सैबिरियांत आले तेव्हां त्यांनां तेथील अवनत स्थिति आढळली. पण त्यापूर्वी सोळाव्या शतकाच्या आरंभीं तुर्कस्तानांतून तातार लोक सैबिरियांत घुसून त्यांनीं उरल पर्वताच्या पूर्वेस वसलेल्या टोळ्यांचा पराभव केला; व तुर्कस्तानांतून शेतकरी, चांभार, व्यापारी, मुल्ला वगैरे लोक आणवून त्यांनीं लहान लहान राज्यें स्थापलीं. खान एडिगेर याच्या अमलाखालीं तीं सर्व संयुक्त बनलीं. रशियन लोक उरल पर्वतानजीक वसाहत करूं लागले तेव्हा त्यांचा तातार लोकांशीं खटका उडाला. पण त्यांत अखेर खान एडिगेरच्या वकीलांनीं मास्कोला जाऊन एक हजार रुबल वार्षिक खंडणी देण्याचें कबूल केलें. नोव्हगोरोरियन लोक ११ व्या शतकापासूनच सैबीरियांत घुसूं लागले होते. परंतु लोकसत्ताक राज्य मोडून ईशान्येकडील अमलाखालचा मुलुख ताब्यांतून गेला तेव्हां रशियन लोकांची उरलपर्वतापलीकडील प्रगति कांहीं काळ बंद झाली. पुढें स्टेनकारेझिन (१६६७-१६७१) या धाडसी वीराचा पराभव झाल्यावर मास्को येथील जुलुमी सत्तेखालीं मान वांकविण्यास तयार नसलेल्या पुष्कळ लोकांनीं पर्ममध्यें स्ट्रोगेनोव्हनें स्थापलेल्या वसाहतींत प्रयाण केलें. परंतु या आगंतुकांनां स्थान देण्याची स्ट्रोगेनोव्हची इच्छा नसल्यामुळें त्यानें त्यांनां उरल पर्वतापलीकडे सैबीरियांत जाण्यास सांगून धान्य व हत्यारांची मदतहि केली. तेव्हां १६३६ लोकांची टोळी येर्माकच्या नेतृत्वाखालीं १५८० मध्यें सैबीरियांत शिरली. त्यापैकीं ५०० लोकांनीं खान कुचुम याच्या इस्केर (तोबोलस्कनजीक) नांवाच्या निवासस्थानाला वेढा दिला. तेव्हां कुचुम पळून गेला व सैबीरिया येर्माकच्या हातीं पडला. तो मुलूख ४ थ्या इव्हॅनला देऊन त्याची मर्जी येर्माकनें पुन्हां संपादन केली. १५८४ मध्यें येर्माक इर्टीश नदींत बुडून मरण पावला व कोसॅक लोक सैबीरिया सोडून गेले. परंतु पुढें दरसाल धाडसी रशियन लोक या भागांत येऊं लागले व त्यांनां मास्को येथून मदत मिळत असे. दक्षिणेकडील लोकांशीं झगड्याचा प्रसंग न यावा म्हणून उत्तरेच्या बाजूनेंच पूर्वेकडे सरकत सरकत सुमारें ऐंशी वर्षांत या रशियन लोकांनीं अमूर नदी व पासिफिक महासागर गांठला. मध्यंतरीं मास्कोच्या सरकारनें या भागांत किल्ले बांधले व त्यांभोंवतीं शेतकरी लोकांच्या वसाहती करवून किल्ल्यांतील शिबंदीला धान्य मिळेल अशी व्यवस्था केली. इतक्या थोडक्या अवधींत सर्व सैबीरिया रशियनांच्या हातीं पडला याचें कारण त्यांनां तातार किंवा तुर्क यांपैकीं कोणीहि जोराचा अडथळा केला नाहीं. १६०७-१६१० मध्यें तुंगुस लोकांनीं स्वातंत्र्यरक्षणाकरितां रशियन लोकांशीं निकराचा सामना केला. पण १६२३ मध्यें त्यांचा रशियन लोकांनीं पूर्ण मोड केला. १६२८ मध्यें रशियन लोक लेना नदीपर्यंत पोहोंचले, व १६३७ मध्यें त्यांनीं याकुटस्कचा किल्ला बांधला. नंतर दोन वर्षांनीं ते ओखोटस्क समुद्रापर्यंत जाऊन पोहोंचले. बुरायत लोकांनीं रशियनांनां थोडा अडथळा केला, परंतु १६३१-१६४१ या काळांत कोसॅकांनीं त्यांच्या मुलुखांत कित्येक किल्ले बांधले. पुढें चिनी लोकांनीं विरोध केल्यामुळें मात्र कोसॅक लोकांनां ते किल्ले सोडून द्यावे लागले. १८५२ मध्यें एका रशियन लष्करी टोळीनें अमूर नदीच्या प्रदेशाचें संशोधन केलं; आणि १८५७ मध्यें रशियन कोसॅक व शेतकरी लोकांनीं हा प्रदेश वसाहत करून व्यापून टाकिला व या कृत्याला चीननें १८६० च्या तहानं संमति दिली.

सैबीरियाचें शास्त्रीय दृष्ट्या संशोधन १७३३ पासून सुरू झालें. या संशोधनात ग्मेलिन, मुल्लर, फिशर, गोर्गी वगैरे संशोधकांनीं भाग घेतला. पालास यानें कित्येक रशियन विद्यार्थ्यांच्या मदतीनें वनस्पति, प्राणी, व मानव रहिवाशी यांचें संपूर्ण संशोधन करण्यास सुरुवात केली व मॅक, ग्लेहन, रॅड, श्रेंक वगैरे संशोधकांनीं तें कार्य तडीस नेलें. याप्रमाणें सैबेरिया प्रांतांत यूरोपीयांचा प्रवेश झाला. सैबेरियाचा राजकीय इतिहास रशियाच्या इतिहासांत अंतर्भूत होतो.

## प्रकरण २४ वें.

### भारतीय तत्त्वज्ञान व धर्म यांचा विकास.

विज्ञानेतिहासांत हिंदुस्थानच्या वैदिक इतिहासाचा कांहीं भाग दिलाच आहे. त्यांत संगीत, छंद, भाषाशास्त्र त्याचप्रमाणें ज्योतिष, वैद्यक, रसायन यांचा विकास ह्याहि वर्णिलाच आहे. तत्त्वज्ञानापैकीं देखील पूर्वविधानाचा अर्थ लावणारें शास्त्र जें मीमांसा त्याचें स्वरूप वर्णिलें आहे. तथापि पारमार्थिक विचार आणि समाजनियमनात्मक धर्मशास्त्र यांचा विकास वर्णावयाचा राहिला. त्याचें अत्यंत त्रोटक वर्णन येथें करण्याचें योजिलें आहे. येथें अत्यंत त्रोटक वर्णन करण्याचें मुख्य कारण हेंच आहे कीं यांत आलेले ग्रंथकार सुशिक्षित वाचकास पूर्ण परिचित आहेत; आणि त्यांविषयीं सविस्तर माहिती शरीरखंडातच देणें योग्य होईल.

परमार्थसाधनविषयक भारतीयांचा प्रयत्न म्हणजे ब्राह्मणकालीन विकासविलेला श्रौतधर्म होय. हा श्रौतधर्म वेदविद्या या विभागात सविस्तर वर्णिला आहे. श्रौतधर्मसंकोचास कारण कोणत्या चळवळी झाल्या त्याचेंहि विवेचन वेदविद्या या विभागांत येऊन गेलेंच आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे असें सांगतां येईल कीं, यज्ञयागांच्या विकासकालीं वैयक्तिक कर्तव्य केवळ यज्ञ करणारा कोणी यजमान तयार झाला व त्यानें वर्गणी गोळा करण्यासाठीं सनीहार पाठविले तर त्यास द्रव्य द्यावयाचें आणि आपण यज्ञ तेवढा डोळ्यांनीं तमाशासारखा पहावयाचा, एवढेंच उरलें असल्यामुळें लोकांस कांहीं निराळा मार्ग हवा होता. त्यामुळें भक्तिमार्ग आणि ज्ञानमार्ग यांच्या विकासास क्षेत्र मिळालें. भक्तिमार्गास जें क्षेत्र मिळालें त्याचा परिणाम नारायणीय धर्म म्हणून मागें वर्णिलाच आहे. बुद्धजन्मकालीन वैचारिक चळवळीचा भाग म्हटला म्हणजे उपनिषदें, व तन्मूलक तत्त्वज्ञान होय. त्याच वेळेस आचरणास महत्त्व आलें असावें. कारण आचरणास महत्त्व सांगणाऱ्या बौद्धांनीं धम्म हा शब्द आपल्या आचरणप्रधान पद्धतीस लावला होता. धर्म हा शब्द श्रौतविधींपासून हिसकावून घेऊन पुढें धर्मशास्त्रकारांनीं चार वर्ण आणि चार आश्रम यांचा उपदेश करणाऱ्या पद्धतीस लावला. मीमांसाकारांनीं धर्म म्हणजे तीन अग्नींवरील क्रिया असें अट्टाहासानें सांगितलें असतांहि आणि यज्ञ अगर यज्ञांगभूत कर्म असाच धर्म याचा अर्थ वेदांत असतांहि स्मृतिकारांनीं धर्म म्हणून कांहीं निराळा आहे असें दाखविण्याचा प्रयत्न केला. तो प्रयत्न "श्रुतिस्तुवेदोविज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः" या मनुस्मृतिवाक्यांत स्पष्ट दिसत आहे. तसेंच कल्पसूत्राचे वर्ग करून त्यांत श्रौतास गृह्य आणि धर्म यांशीं समान महत्त्वाचें पद दिलें म्हणजे कल्पसूत्रांच्या वर्गीकरणांत श्रौतविद्या म्हणजे धर्म नव्हे या तत्त्वास मान्यता दिली. वेदविद्येस धर्मापासून पृथक्त्व हें धर्मशास्त्रकारांनीं बंड करण्याच्या उद्देशानें दिलें नसावें, तर भाग पडलें म्हणून दिलें असावें. अथर्व्यांची कांहीं विद्या त्रैविद्यांनीं श्रौतविद्येंत अंतर्भूत केली तर, कांहीं गृह्यसूत्रांत समाविष्ट केली आणि श्रौतगृह्य संस्थांस, धर्माची व्याख्या निराळी केली तरी त्या व्याख्येनुसार धर्माची पुष्टि दिली. जेव्हां बौद्ध व जैन धर्म म्हणजे कांहीं निराळीच चीज आहे व नारायणीय धर्मवाले धर्म याचाहि निराळाच अर्थ आहे असें सांगू लागले तेव्हां श्रौतविद्येशीं सहानुभूति बाळगणाऱ्या लोकांना "धर्म" शब्दाचा अर्थ अशा निराळ्या रीतीनें सांगावा लागला कीं, अप्रिय झालेल्या धर्माचें श्रौत विद्येशीं एकत्व स्थापन झालें नाहीं, तरी चार वर्ण आणि चार आश्रम यांची कर्तव्यकर्में सांगतांना श्रौतगृह्यसंस्थांचा स्वीकार ही गोष्ट वर्णाश्रमधर्मविवरणांत अंतर्भूत करून धर्मानें स्वरूप श्रौतापेक्षां व्यापक पण श्रौत न सोडणारें निदान वेदाभ्यासाचें महत्त्व ठेवणारें बनवावें लागलें. "धर्म" शब्द महत्त्व पावला होता तो बौद्धांनीं नैतिक आचरणास लावला तर जुन्या सहानुभूति बाळगणाऱ्यास विधिमिश्र आचरणास लावावा लागला. श्रौत कर्म आणि धर्म हे शब्द समानार्थक असून एकात्र व्यापकतेचे होत असा जैमिनीचा आग्रह होता. तो जर मान्य केला, तर असें होणार कीं, लग्न–मुंज इत्यादि संस्कार हा कांहीं धर्म नव्हे. हा सारा व्यवहार जेव्हां यज्ञविज्ञ करावयाचा असेल तेव्हां अगदीं वेदाक्षराप्रमाणें चालावें आणि त्यानें आपणांस बांधून घ्यावें. बाकी इतर गोष्टी म्हणजे व्यवहार, त्यांत आपण कांहीं केलें तरी तें धर्मबाह्य होत नाहीं असा सिद्धांत सहजपणें त्यांतून निघावयाचा. हें झालें म्हणजे वाटेल तें आचरण करून व्यक्तीस आपण पुन्हां धर्माचा अतिक्रम इतरांपेक्षां मुळींच करीत नाहीं असें सप्रमाण सिद्ध करून देतां येईल. याच्यासाठीं धर्म या शब्दाचा अर्थ जैमिनीपासून निराळा पण अधिक व्यापक करणें त्या वेळच्या कल्पसूत्रलेखकांस भाग पडलें.

**वेदोत्तर वाङ्मयाचा विकास**—वेद संपल्यानंतर सूत्र–काल येतो. त्या वेळेस सूत्र हा शब्द मोठ्या पांडित्याचा सूचक झाला असल्यामुळें तो बौद्धांनीं उचलला. वेदांगें व त्यांशीं संबद्ध सूत्रवाङ्मय यांचें स्वरूप मागें दुसऱ्या भागांत वर्णिलें आहे. वेदांगें जशीं वेदाभ्यासांतून निघालीं तशींच दर्शनेंहि वेदांपासून निघालीं. दर्शनांत मीमांसा त्रयीपासून निघाली तर इतर दर्शनें उपनिषदांपासून निघालीं. सांख्य, योग, पूर्वमीमांसा, उत्तरमीमांसा, न्याय आणि वैशेषिक हीं सहा दर्शनें उत्पन्न झालीं. यांपैकीं मीमांसाशास्त्र हें वस्तुतः भाषाशास्त्र आहे व त्याचें विवेचन इतर भाषाशास्त्रांबरोबर संपडेल.

हीं सहा दर्शनें ज्यांच्यापासून प्रवर्तलीं त्या ग्रंथकारांचीं नांवें येणेंप्रमाणें. (१) सांख्य—कपिल, (२) योग—पतंजलि, (३) पूर्वमीमांसा—जैमिनि, (४) उत्तरमीमांसा

—बादरायण–व्यास, (५) न्याय—गौतम, (६) वैशेषिक—कणाद.

या दर्शनांशिवाय चार्वाकाच्या नांवावर प्रसिद्ध असलेलें लोकायत–दर्शन म्हणून प्रसिद्ध आहे. त्या दर्शनावरील ग्रंथ उपलब्ध नाहीं. उत्तरमीमांसा नांवाचें जें दर्शन आहे तें वेदांताचा मूळ ग्रंथ समजतात. शंकराचार्यादि आचार्यांनीं यांवर भाष्यें केलीं आणि त्यांतून भिन्न मतें काढलीं.

वेदोत्तर कालानंतरचें एक महत्त्वाचें वाङ्मय म्हटलें म्हणजे महाभारत, रामायण व अठरा पुराणें होत. यांपैकीं महाभारतास राष्ट्रीय ग्रंथ या दृष्टीनें सर्वांत अधिक महत्त्व आहे. जगांत महाभारताएवढा प्राचीन प्रचंड ग्रंथ नाहींच. महाभारत, रामायण व पुराणें इत्यादि ग्रंथांत प्राचीन दृष्टीनें ज्यास इतिहास म्हणतां येईल असें वाङ्मय अंतर्भूत होतें. या ग्रंथांविषयीं येथें सविस्तर माहिती देणें शक्य नाहीं. ती योग्य प्रसंगीं शरीरखंडांत येईलच.

वाङ्मयाचें वर्गीकरण व नामकरण करतांना वेद, वेदांगें स्मृति, इतिहासपुराणें, सूत्रें, दर्शनें असें सांगून नामकरण करतां येतेंच. पण शिक्षणपद्धतीच्या दृष्टीनें दुसरींहि नामकरणें अस्तित्वांत आहेत. त्रयी, आन्वीक्षिकी, वार्ता व दंडनीति हे अभ्यासाचे विषय प्राचीन ग्रंथकार धरीत आले आहेत. त्रयी म्हणजे वेद, आन्वीक्षिकी म्हणजे वादविवादास उपयोगी पडणारीं न्यायादि शास्त्रें, दंडनीति म्हणजे अर्थशास्त्र ऊर्फ शासनशास्त्र होय. यावर शुक्रनीति व चाणक्य, कामंदक इत्यादिकांचे ग्रंथ आहेत. वार्ता या शास्त्राचें ज्ञान आज आपणास नाहीं. या शास्त्रावर ग्रंथ आहेत काय हे आपणास ठाऊक नाहीं.

प्राचीनांनीं व्यवहारोपयोगी ग्रंथ केलेच नाहींत असें नाहीं. साहित्यशास्त्रविषयक, नाट्य आणि संगीत शास्त्र यांविषयीं, गणिताविषयीं वगैरे ग्रंथ प्राचीनांनीं तयार केले. तसेंच आयुर्वेदविषयक वाङ्मयहि प्राचीनांनीं बरेंच तयार केलें. आज देखील प्राचीनांच्या आयुर्वेदविषयक ज्ञानाचा फायदा घेऊन धंदा करणारे लोक बरेच आहेत. शिल्पशास्त्र, मूर्तिशिल्प यांविषयीं ग्रंथ देखील दृष्टीस पडतात.

प्राचीनांनीं ज्या दोन ज्ञानांगांकडे अक्षम्य असें दुर्लक्ष केलें तीं दोन अंगें म्हटलीं म्हणजे इतिहास व भूगोलवर्णन हीं होत. या बाबतींत मुसुलमानांनीं हिंदूंवर कडी केली. मुसुलमान लोकांनीं ग्रीक लोकांपासून इतिहासलेखनविद्या घेतली. तथापि ग्रीक आणि हिंद यांचा संबंध आला असतां इतिहासलेखन आणि भूवर्णनलेखन ग्रीकांपासून हिंदूंनीं घेतलें नाहीं. यावरून प्राचीन हिंदूंच्या ग्राहकशक्तीस बराच कमीपणा येतो यांत शंका नाहीं.

व्याससूत्रें आणि भगवद्गीता हे ग्रंथ पुढील परमार्थविषयक तात्त्विक ग्रंथांस आधार झाले. अत्यंत भिन्न प्रकारचीं मतें या ग्रंथांवर टीका अगर भाष्य या स्वरूपानें निघालीं. त्यांत विष्णुस्वामी, रामानुज, मध्व, वल्लभ, महानुभावमत इत्यादिकांची गणना केली पाहिजे.

**दैवतें.**—वेदकालीन दैवतें उपनिषत्कालांतच मागें पडलीं. ऋग्मंत्रोत्पत्तीच्या वेळेस स्थानिक आर्येतरसंस्कृतीच्या लोकांत शिव, विष्णु हीं दैवतें असावींत. कारण एरवी शिव आणि विष्णु यांचें उच्चत्व दैवतांत कसें स्थापन झालें याच्या पायऱ्या सांपडल्या असत्या त्या तशा चांगल्या तऱ्हेनें सांपडत नाहींत. औपनिषद वाङ्मय हें सूतसंस्कृतीच्या लोकांचें वाङ्मय असावें व शिव, विष्णु हीं त्यांचींच दैवतें असावींत. शिव आणि विष्णु हे देव वैदिक लोकांसहि मान्य असल्यामुळें नवागतांचें स्थानिकांत समाविष्टीकरण सुलभ झालें. शिवाचें आजचें स्वरूप ज्या अर्थी ब्राह्मणकालीन यजुर्वेदाच्या संहितांमधूनहि आलेलें आहे त्या अर्थी तें फार जुनें असावें आणि ज्या पद्धतीनें शुनःशेपाच्या वरुणस्तुतीचा हरिश्चंद्रकथेशीं संबंध जोडण्यांत आला, व ज्या पद्धतीनें इतिहासपुराणांनां यज्ञप्रसंगीं शंसनाचा मान प्राप्त झाला त्या पद्धतीनेंच शिवाला वेदांत स्थान मिळालें असावें यांत शंका नाहीं. रामायण–महाभारतांत शिव, विष्णु हे निश्चिताधिकार सर्वेश्वरकल्प देव म्हणून सांपडतात.

ऋग्मंत्रकालीन लोकांनीं आपल्याबरोबर लहान यागांचा धर्म आणिला. तो हिंदुस्थानांत मध्य देशांत विकसित श्रौत धर्माचें स्वरूप पावला. तो तें स्वरूप पावतांनां देश्य धर्माचा म्हणजे शिवविष्णुपूजन, महापुरुषवर्णनपर सूत वाङ्मय, यक्षकिन्नरमय देवयोनी यांचा स्वीकार करावा लागला. आमची कल्पना अशी आहे कीं, सामान्य जनांचा धर्म वेदकालीं जसा होता तसाच तो आज आहे. फरक झाला तो केवळ वरच्या साक्षर वर्गाच्या प्रवृत्तींत झाला. ज्या वेळेस श्रौत धर्म मोठ्या विकसित स्वरूपांत होता त्या वेळेस सामान्य लोक आजच्या दैवतांसारखींच दैवतें पूजित असावेत आणि त्या दैवतांत शिवविष्णूंस महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें असावें. सुशिक्षित वर्ग यज्ञ सोडून हळू हळू आरण्यकीय विचारप्रवर्तनास लागला तोच वेदांगांच्या प्रवर्तनास लागला. भागवतांचा नारायणीय धर्म व पुढें विकसित झालेला आराध्यांचा शैव धर्म हे उच्च विचार आणि सामान्य जनांचे रिवाज व मतें यांत सांधा जोडण्याच्या खटपटीस लागले.

शंकराचार्य विशिष्ट दैवताच्या महत्त्वस्थापनेच्या भानगडींत पडले नाहींत. बसवाचे अनुयायी आपलें मत शांकरमतास सुटून नाहीं असें म्हणतात. रामानुज आणि पूर्णप्रज्ञ मध्व यांनीं विष्णुभक्तीस विशेष जोर दिला. त्यामुळें विशिष्टाद्वैत व शुद्धाद्वैत यांतील लढा शिवविष्णुप्रियतेवर येऊं पहातो.

**रामानंद व त्याचे शिष्य.**—धार्मिक अर्वाचीन काळ रामानंदापासून सुरू होतो. रामानंद हा प्रथम रामानुजाच्याच परंपरेंतला होता पण तो पुढें शांकरमतानुयायी झाला. याचें कार्य फार व्यापक होतें. त्याच्या कार्याची व्यापकता

त्यांच्या शिष्यांच्या कार्यावरून सहज लक्षांत येईल. त्याचे मोठे शिष्य म्हटले म्हणजे ज्ञानेश्वराचे वडील विठ्ठलचैतन्य, नानक, कबीर हे होत. यांचा बंगालच्या चैतन्य संप्रदायाशीं देखील संबंध असणें शक्य आहे. रामानंदाचें मुख्य कार्य म्हटलें म्हणजे वेदांततत्त्वें हीं केवळ संस्कृतपंडितांकरतां नसून प्राकृतांकरतां आहेत असें व्यवहारांत घडवून आणावयाचें. चोहोंकडे जी सामान्यांत एक नव्हेची धर्मश्रद्धा उत्पन्न झाली, संतमंडळें चोहोंकडे स्थापन झालीं, भक्तीस जोर मिळाला, त्या सर्व चळवळींचें आदिकर्तृत्व रामानंदाकडे येतें. रामानंदानंतर लोकांत निराळा संप्रदाय, निराळे आचार व विधी उत्पन्न न करतां कार्य करणारे अर्वाचीन काळापर्यंत कोणी मोठे कार्यकर्ते झाले नाहींत. बसवाचें कार्य मोठें होतें आणि बसवाचीं मतें सर्व हिंदुस्थानभर पसरलीं असतीं तर आज ज्या सुधारणांसाठीं तडफड चालली आहे ती सुधारणा घडवून आणण्याचें श्रेय बसवास मिळालें असतें. बसव, स्वामीनारायण, वल्लभाचार्य, महानुभाव यांच्या नंतर भारतीय पारमार्थिक भावनेला जागृत करण्याचें श्रेय राजा राममोहनराय व स्वामी दयानंद यांच्याकडे येतें. स्वामी दयानंदाच्या प्रयत्नानें पंजाबांतील मृत हिंदुत्वास सजीव केलें तर राममोहनरायांनीं धैर्यानें आणि व्यापकपणानें धार्मिक बाबतींत विचार करण्यास लोकांस शिकविलें.

राममोहनराय यांचें कार्य क्षेत्रानें अल्प आहे आणि आज दुर्बळ असलेला हिंदु समाज उदारमतवादानें अधिक दुर्बल होईल अशी लोकांस भीति वाटत असल्यामुळें आणि सुशिक्षित वर्गामध्यें पारमार्थिक बाबतींत संशयवाद असल्यामुळें एकीकडे परलोक आहे असें मानणाऱ्या आणि परलोकास जाण्याच्या पद्धतीमध्यें व्यापकपणा आणूं पहाणाऱ्या ब्रह्मसमाजास अनुयायी मिळविण्यांत फारसें यश मिळणार नाहीं तरी त्या समाजाच्या अस्तित्वाचा कांहीं तरी इष्ट परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. थिआसफी नांवाचा संप्रदाय सुरू झाला आहे. त्याचा बाणा जरी ईश्वरविषयक शोध करण्याचा असला तरी त्याबरोबर कांहीं हट्टवादी नवीन विचार लोकांवर लादले गेल्याशिवाय राहिले नाहींत.

---

## प्रकरण २५ वें.

### बुद्धोत्तर चीन व जपान.

बुद्धोत्तर जगाच्या इतिहासाचें कथन करीत असतां चीनच्या बाबतींत चौ घराण्यापासून आपण इतिहाससूत्र यूरोपीय स्पर्शापर्यंत ओढीत नेलें असतां फारसें वावगें होणार नाहीं. चीनच्या बाबतींत आपणांस एका मोठ्या साम्राज्याचा इतिहास दिला पाहिजे. त्या इतिहासाचें साहित्यहि विपुल आहे. या गोष्टी जरी खऱ्या आहेत तरी त्या साम्राज्याच्या इतिहासाचा अभ्यास आज अत्यंत प्राथमिक स्थितींत आहे असें म्हटलें तरी वावगें होणार नाहीं. बुद्धाच्या जन्मकालापूर्वी अनेक शतकें चौ घराणें राज्य करीत होतें; आणि त्या घराण्याचें राज्य शुंगाच्या कालापर्यंत टिकलें आणि त्यानंतर त्सिन घराण्याचें राज्य चालू झालें. पुढेंहि अनेक राजघराणीं झालीं.

चीनचा हिंदुस्थानाच्या इतिहासाशीं संबंध थोडा थोडका नाहीं. नेपाळ, सिकीम इत्यादि संस्थानांशीं चीनचे झगडे परवांपर्यंत चालू होते. ब्रह्मदेश हें जोंपर्यंत स्वतंत्र राष्ट्र होतें तोंपर्यंत चीनशीं त्याला झगडावें लागलेंच होतें. हा अर्वाचीन इतिहास होय. चीनचे उल्लेख प्राचीन संस्कृत ग्रंथांत थोडे बहुत येतात; पण ते उल्लेख राजकीय संबंधाचे फारसे द्योतक नाहींत. विजयानगरच्या राज्याची वकीलात चीनमध्यें गेल्याचा उल्लेख आहे एवढेंच. मुसुलमानी काळांत चेंगीजखान हा चीन, हिंदुस्थान व यूरोप यांचा सामान्य पीडक होता हा एक दुवा सांपडतो. महंमद तघलख यानें एक अपेशी फौज चीनकडे पाठविली होती असेंहि कळतें. पेशवाईचा चीनशीं संबंध होता किंवा नव्हता, असल्यास कितपत होता, हें स्पष्ट झालें नाहीं. चीनचा इतिहास देतांना एका साम्राज्याची घडामोड आणि त्याबरोबर भारतेतर हिंदुस्थानावर झालेले परिणाम द्यावे लागतील असें म्हणण्यास हरकत नाहीं. अरबी संस्कृति आणि भारतीय संस्कृति यांची स्पर्धा सुरू होण्यापूर्वी चिनी संस्कृति ही भारतीय संस्कृतीशीं स्पर्धा कशी करीत होती; आणि संस्कृतीचें सातत्य राखण्यांत ती भारतीयांपेक्षां अधिक यशस्वी कशी झाली हें पहिल्या विभागांत दिलेंच आहे.

चीनशीं भारतीयांचा संबंध बुद्धसंप्रदायमूलक, वैचारिक आणि वैज्ञानिक बाबतींत बराच आहे. आणि तत्संबद्ध प्रचारकांची नोंदहि पहिल्या विभागांत दिली आहे. चौ घराण्यापूर्वीचा इतिहास तिसऱ्या विभागांत दिला आहे. येथें (१) चौ घराण्यापासून १७९८ पर्यंत म्हणजे इंग्रजी वकीलात चीनमध्यें जाइपर्यंतचें कथासूत्र व (२) चीनचे ब्रह्मदेश, नेपाळ सिक्किमादि भारतीय संस्थानांशीं संबंध दिले आहेत.

**चौ घराणें (ख्रिस्तपूर्व ११२२-२५३).**—शांग अथवा इन घराण्यानंतर चीनवर चौ घराण्याचें राज्य सुरू झालें. या घराण्याचा पहिला बादशहा वू-वंग हा होता. चौ हा पश्चिमसरहद्दीवर एक जमीनदारीचा प्रदेश आहे. बादशहाचा भाऊ चौ-कुंग यानें साम्राज्याची सुसंघटना करण्याचे कामीं आणि राज्यकारभाराची नीट व्यवस्था लावण्याचे कामीं फार मदत केली. या बादशहानें आपले भाऊबंद व स्वपक्षीय प्रमुख यांनां मोठाल्या जमीनदाऱ्या बहाल केल्या. त्यांतूनच पुढें अनेक संस्थानें उदयास आलीं. या वेळीं चीनच्या साम्राज्याची घटना सांप्रतच्या जर्मन साम्राज्याच्या घटनेप्रमाणें बनली. म्हणजे अनेक चिनी स्वायत्त संस्थानांचा संघ बनवून त्या सर्वांच्यावर एक बादशहा नेमण्यांत आला.

धार्मिक बाबतींत चीनचा बादशहा हाच मुख्य पुरोहित मानला जात असे. राष्ट्रातर्फे होणारी परमेश्वराची प्रार्थना किंवा परमेश्वराला द्यावयाचें बलिदान बादशहाकडून करविण्यांत येत असे. वरिष्ठ सरकारी नोकरांबद्दल जमीनदारांबरोबर व मांडलीक राजांबरोबर बादशहाचे संबंध कशा प्रकारचे असावेत, परस्परांनीं एकमेकांचा मानमरातब कसा राखावा, पोशाख कसा करावा, भाषणें कोणतीं करावीं वगैरे सर्व बाबतींत नियम केलेले होते व त्यांप्रमाणें बादशहाला वागावें लागत असे. बादशहाच्या मर्जीवर किंवा लहरीवर कोणती गोष्ट न सोंपवतां प्रत्येक बाबतीचे नियम घालून दिल्यामुळें सर्व बादशाही कारभाराला कायम शिस्तीचें वळण लागलें. प्रत्येक नवा बादशहा पूर्वजांच्या पद्धतीप्रमाणें वागणें आपलें कर्तव्य आहे असें मानीत असे आणि सर्व चिनी प्रजा पूर्वपरंपरेनुसार वागणाऱ्या बादशहाशीं अत्यंत राजनिष्ठ रहात असे.

वू-वंग बादशहानें घालून दिलेली साम्राज्यकारभाराची शिस्त पुढें कायम टिकली नाहीं. कित्येक बादशहा दुर्बल निघाले तर दुसरे कित्येक फार कडक रीतीनें अंमलबजावणी करूं लागले. त्यामुळें बादशहा व त्यांचे मांडलीक यांच्यामध्यें असंतोष व बेबनाव उत्पन्न झाला. साम्राज्याचा विस्तार वाढल्यामुळें बादशाही सत्तेला सर्वांवर नीट नियंत्रण ठेवतां येईना. खुद्द बादशहाचा मुलूख देशाच्या मध्यभागीं असून त्याच्या भोंवताली चोहोबाजूंनीं मांडलीक राज्यें पसरलेलीं होतीं. त्यामुळें साम्राज्याचा विस्तार झाल्यास त्याचा फायदा सरहद्दीवरील मांडलीक राजांनां मिळून त्यांचा मुलूख व सामर्थ्य वाढत असे. उत्तर व पश्चिमेकडील तार्तार जातीच्या टोळ्या आणि दक्षिणेकडील रानटी टोळ्या यांनां जिंकल्यावर त्यांचा चिनी लोकांशीं व्यापारविषयक संबंध व पुढें प्रत्यक्ष शारीरिक संबंधहि होऊं लागला. त्यामुळें मूळची उच्च दर्जाची बुद्धिमान् चिनी जात रानटी लोकांच्या रक्तामुळें, मिश्र बनली. या मिश्र जातीमध्यें रानटी लोकांचा जोम व युद्धप्रियता अधिक दिसूं लागली. अशा कारणामुळें पुढें सरहद्दीवरील मांडलीक राज्यें मध्यवर्ति बादशाही सत्तेला डोईजड झालीं. चौ घराण्यांतील एकंदर ३५ बादशहांपैकीं कांहीं थोडेसे विशेष गुणसंपन्न होते. अशांपैकीं मू-वंग नांवाच्या दहाव्या शतकांतील बादशहानें आपल्या साम्राज्याच्या पश्चिम सरहद्दीपलीकडे दूरवर सैन्यासह चाल करून तिकडील हूण उर्फ हिउंग-नू या रानटी लोकांचा पराभव केला. सुवन-वंग याच्या कारकीर्दीत (ख्रि. पू. ८२७-८०२) हूण आणि तंगुतन या लोकांबरोबर युद्धें झालीं. या सुमाराचा यू-वंग हा दुर्व्यसनी राजा फार जुलमी होऊन गेला. त्याच्या दुष्कृत्यांचें वर्णन एका शाहीरानें आपल्या पद्यग्रंथांत करून ठेवलें आहे. या बादशहानें इतकीं दुष्कृत्यें केलीं कीं, खुद्द परमेश्वराचा कोप होऊन त्यामुळ कांहीं अशुभ गोष्टी घडल्या असें त्या शाहीरानें लिहून ठेवलें आहे. या अशुभ गोष्टींपैकीं सूर्यग्रहण ही एक होती. या ग्रहणाची चिनी मिति ख्रि. पू. ७७६ ऑगस्ट २९ तारखेशीं बरोबर जमते. यामुळें चीनच्या इतिहासांतील प्राचीन माहिती अधिक विश्वसनीय ठरते. चीनमध्यें प्राचीन इजिप्तप्रमाणें मनोरे किंवा देवालयांचे अवशेष उपलब्ध नाहींत. परंतु शांग व चौ घराण्याच्या वेळचीं ब्रांझ धातूचीं कांहीं भांडीं वर लेख कोरलेलीं उपलब्ध आहेत. त्यावरून या दोन्ही घराण्यांसंबंधाची कांहीं निश्चित माहिती मिळूं शकते. तथापि चिनी राष्ट्राच्या खऱ्या ऐतिहासिक काळास ख्रि. पू. ७७६ पासून आरंभ होतो असें म्हटलें पाहिजे.

ख्रि. पू. ७ व्या शतकांत चिनी बादशहांची सत्ता अगदीं कमकुवत होऊन चिनी संस्थानांपैकीं पांच संस्थानें विशेष प्रबल बनलीं. त्यीं म्हणजे सध्यांचें उत्तर शान-टुंग हें संस्थान कुअन-त्झी या तत्ववेत्त्या मुख्य प्रधानाच्या नेतृत्वाखालीं इतरांपेक्षां आर्थिक दृष्ट्या फार सामर्थ्यवान् बनलें. बाकीचीं चार लष्करी सामर्थ्यांत अधिक बलिष्ठ बनलीं. या प्रमुख संस्थानिकांमध्यें त्सिनचा संस्थानिक मु हा एक होता. हें संस्थान पश्चिम सरहद्दीवर असून त्यांतील चिनी लोकांचें शेजारच्या हूण लोकांशीं बरेंच मिश्रण झाल्यामुळें इतर चिनी लोक त्यांनां रानटी चिनी म्हणूं लागले. हे प्रमुख संस्थानिक बादशहास पूर्णपणें जुमानीनासे होऊन आपसांत श्रेष्ठत्वाकरितां लढाया करूं लागले. चीनच्या इतिहासांतील या काळाला "भांडणाऱ्या संस्थानिकांचा काळ" म्हणतात. या काळांत पराक्रमाचीं त्याप्रमाणेंच भ्याडपणाचीं तसेंच मुत्सद्देगिरीचीं आणि तत्ववेत्त्यांनां शोभणाऱ्या मनाच्या समतोलपणाचीं अनेक कृत्यें घडलीं. तीं अनेक गद्यपद्यमय सुंदर ग्रंथांत ग्रथित करून ठेवलेलीं आहेत. चौ घराण्याच्या वेळीं बादशाही सत्तेचा बराच उत्कर्ष झाला. त्याचप्रमाणें त्या काळांत वाङ्मयहि बऱ्याच उच्च दर्जाचें निर्माण झालेलें असून त्यावरून तत्कालीन लोकांचा जीवनक्रम आध्यात्मिक दृष्ट्या बराच उच्च दर्जाचा होता असें स्पष्ट दिसतें. तत्कालीन पुराणमताभिमानी बादशहा व इतर राजघराण्यांतील मंडळी यांचे नैतिक विचार कशा प्रकारचे होते हें कन्फ्यूशियस (ख्रि. पू. ५५१-४७९) या श्रेष्ठ पुरुषाच्या ग्रंथामध्यें पहावयास मिळतें. या चीनच्या महान् साधुपुरुषानें चिनी राष्ट्रांत अनेक शतकें प्रचलित असलेलीं नीतितत्त्वें आणि परंपरागत चालीरीती एकत्र नमूद करून ठेविल्या आहेत. कन्फ्यूशियसनें चीनमध्यें एक विशिष्ट पंथ प्रस्थापित केला. त्याचे अनेक अनुयायी बनले. पितृभक्ति हा चिनी इसमाचा श्रेष्ठ गुण मानला जात असे; व तदनुसार आईबापांची आज्ञा मानणें आणि बादशहाशीं राजनिष्ठ रहाणें हें प्रत्येकाचें पहिलें कर्तव्य असल्याचें कन्फ्यूशियसचा पंथ म्हणतो. या पंथाचा राजांनां असा उपदेश असे कीं, "याऊ शून वोयू यांच्या प्रमाणें व्हा म्हणजे तुमची वागणूक नेहमीं बरोबर राहील." या पंथांत पुढें मेनशिअस हा एक मोठा उप-

देशीक. झाला. कन्फ्यूशियस पंथाचीं तत्त्वें चौ घराण्याच्या वेळीं वरीच प्रचलित होतीं. पण पुढें एक प्रतिपक्षी पंथ उद्भवला. या पंथाचीं तत्त्वें लाऊत्से यानें घालून दिलीं. हीं तत्त्वें बादशहाशीं राजनिष्ठ न राहूं इच्छिणाऱ्या लोकांनीं मान्य होण्यासारखीं होतीं. याशिवाय लोकांना आत्मश्लाघा करण्यास प्रवृत्त करणारे यंगचू सारखे कित्येक उपदेशक निघाले. अशाल्या उपदेशामुळें चिनी समाजांत अनीति आणि बेबंदशाही माजूं लागली. अनेक संस्थानिक बादशहाशीं बेइमान होऊं लागले. त्यांत त्सिन्चा संस्थानिक प्रमुख होता. त्यानें अनेक संस्थानें प्रथम गिळंकृत करून चौ घराण्याचा शेवटचा दुर्बल बादशहा ननवंग याच्या बरोबर युद्ध सुरू केलें. व चौ बादशहाच्या मुलखापैकीं बराच भाग जिंकून घेतला. ख्रि. पू. २५६ मध्यें ननवंग मरण पावला. व पुढें दोन चार वर्षें बेबंदशाही चालून अखेर बादशाही सत्ता त्सिन् घराण्याकडे गेली.

**त्सिन घराणें**(ख्रि. पू. ८४९–२१०).–या घराण्यांतला पहिला बादशहा चौ–सिअंग, दुसरा हिआओ–वेन वंग आणि तिसरा च्वान–सिअंग वंग हे तिघे राज्यावर आल्यावर लवकर लवकर मरण पावले. या घराण्यांतला चौथा बादशहा शी व्हांगति ख्रि. पू. २४६ मध्यें राज्यावर आला. त्यावेळीं त्याचें वय १३ वर्षांचें होतें. पण पुढें लवकरच त्यानें सर्व राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं. पूर्वीची राजधानी बदलून ती हियेन यंग, अलीकडील सि–गन फू येथ नेली व तेथें मोठा राजवाडा बांधला. त्याची अत्यंत महत्त्वाची सुधारणा म्हणजे त्यानें पूर्वीची सरंजामी पद्धति बंद केली आणि संस्थानिकांचा कारभार नष्ट करून सर्व प्रांत आपल्या प्रत्यक्ष अमलाखालीं घेतले आणि त्यांवर स्वतःला जबाबदार असे अधिकारी नेमले. शिवाय त्यानें सर्व साम्राज्यांत सडका बांधल्या, कालवे खणले आणि अनेक सुंदर सार्वजनिक इमारती बांधल्या. याप्रमाणें साम्राज्याचा अंतःकारभार सुव्यवस्थित केल्यावर त्यानें सरहद्दीपलीकडल्या तातार नांवाच्या लोकांवर तीन लाख सैन्यानिशीं स्वारी केली. व त्यांची बहुतेक कत्तल करून बाकीच्यांनां मोंगोलियांत हांकून लावलें. तिकडून परत आल्यावर होनन येथें पूर्वीच्या सरंजामदारांनीं केलेलें बंड त्यानें मोडलें. नंतर त्यानें नान–शान पर्वताच्या दक्षिणेकडील लोकांवर स्वारी करून त्यांनां जिंकलें. या बादशहाचें एक मोठें स्मारक म्हणजे हूण लोकांपासून साम्राज्याचें संरक्षण करण्याकरितां उत्तर सरहद्दीवर समुद्रकिनाऱ्यापासून पश्चिमेकडील कोपऱ्यांतं कानसुह प्रांतापर्यंत बांधलेली प्रचंड भिंत होय. ही भिंत बांधण्यास ख्रि.पू.२१४सालीं त्यानें स्वतःच्या देखरेखीखालीं आरंभ केला. या बादशहानें राज्यकारभारांत ज्या आमूलाग्र सुधारणा केल्या त्या पुराणमताभिमानी विद्वानांनां पटल्या नाहींत. त्यांनां पूर्वकालीन सरंजामी कारभारपद्धतींतील व्यवस्थाच अधिक प्रिय होती. व हे लोक प्रजाजनांचीं मनें पूर्वपद्धतीकडे वळवूं लागले. अशा प्रकारची विरोधी चळवळ पूर्णपणें बंद पाडण्याकरितां सदरहू बादशहानें सर्व साम्राज्यांतले इतिहासविषयक ग्रंथ नष्ट करून टाकण्याचा हुकूम दिला, आणि ज्या विद्वानांनीं हा हुकूम मानला नाहीं त्यांनां देहांत शिक्षा दिली. या कृत्यामुळें हा बादशहा फारच अप्रिय बनला आणि ख्रि. पू. २१० मध्यें तो मरण पावतांच देशांत मोठें बंड झालें. त्याचा मुलगा एरह–शी हा दुर्व्यसनी व नालायक असल्यामुळें बंडखोरांनीं त्याला ठार मारलें. या बंडखोरांतच पुढें हान संस्थानचा लिउ पंग राजा आणि दुसरा एक संस्थानिक हिअंग यु या दोघांचे दोन प्रतिस्पर्धी पक्ष बनून त्यांचें आपसांत पांच वर्षें युद्ध चालू होतें. त्यांत अखेर लिउ पंग यानें हिअंग यूला ठार मारलें व तो ख्रि. पू. २०६ मध्यें बादशहा बनला.

**हान घराणें** (ख्रि. पू. २०६–).—ह्या नव्या घराण्याच्या बादशहानें काओ ति ही पदवी घेऊन होनान प्रांतांमधील लोयांग येथें आपली राजधानी नेली. व नंतर शेनसी प्रांतांतील चंग अन येथें नेली. त्यानें त्सिन घराण्यांतील शि–व्हांग–ति या बादशहाचे सर्व कायदे रद्द ठरवले. पण ग्रंथ नष्ट करण्याचा हुकूम मात्र कायम ठेवला. पण त्याच्या नंतरचा बादशहा व्हेति ( ख्रि. पू. १९४–१७९ ) यानें ग्रंथलेखनाला उत्तेजन दिलें. इतकेंच नव्हे तर पूर्वी नष्ट केलेले ग्रंथ पुन्हां तयार करण्याकरितां एक मंडळ नेमलें. या मंडळाचें काम बरेंच यशस्वी झालें. कारण पुष्कल लोकांनीं तो पूर्वीचा अनिष्ट हुकूम न जुमानतां ग्रंथ लपवून ठेवले होते ते मंडळाला मिळाले. शिवाय कित्येक विद्वानांनीं स्वतःच्या स्मरणशक्तीनें ग्रंथ पुन्हां लिहून दिले. या बादशहाच्या कारकीर्दींत साम्राज्यांत व सरहद्दीवरहि चांगली शांतता लोकांस लाभली. फक्त सरहद्दीवर हूण लोकांनीं स्वाऱ्या केल्या; पण त्यांत त्या रानटी लोकांचेच पराभव झाले. इकडे पराभव झाल्यावर या रानटी हूण लोकांनीं युएचींच्या राज्यावर हल्ला केला. व त्यांनां तुर्कस्थान व कास्पियन समुद्र यांच्यामधील प्रदेशांत हांकून लावलें. या हूण लोकांच्या त्रासामुळें चीनच्या बादशहानें युएचींच्या राज्याबरोबर मैत्रीचा तह करण्याचें ठरविलें, व त्याकरितां आपला सेनापती चंग-किएन याला वकील म्हणून पाठविलें. या वकीलाला हूण लोकांनीं दोनदां कैद केलें पण त्यांतून सुटून तो अखेर युएचींच्या म्हणजे इंडो सिथिअन लोकांच्या दरबारीं पोहोंचला, व तह करून परत आला. शिवाय चंगकीएन ह्या चिनी वकीलानें बॅक्ट्रिआ देश पाहून व हिंदुस्थानाबद्दलची माहिती घेऊन आपल्याबरोबर अनेक झाडांचे व जनावरांचे नमुने चीनमध्यें आणले. पुढें वू-ती ( ख्रि.पू.१४०–८६ ) याच्या कारकीर्दींत हूण लोकांचा पूर्ण मोड करण्यांत आला आणि पूर्व तुर्कस्थान चीनची वसाहत बनविण्यांत आला. तेव्हां या मार्गानें कारवान लोक दूरवर इराण व रोम येथें व्यापाराकरितां सुरक्षित जाऊं येऊं लागले. ह्या हान घराण्याच्या वेळीं पूर्वीची सरंजामी पद्धत मर्यादित स्वरूपांत

पुन्हां सुरू करण्यांत आली. राज्याची १०३ लहान लहान संस्थानें करून साम्राज्यांतील मुख्य तेरा प्रांतांवरील गव्हर्नरांच्या देखरेखीखालीं ताब्यांत देण्यांत आलीं.

ख्रिस्ती शकाला आरंभ होण्याचे सुमारास पिंग–ति या बाल बादशहाच्या विरुद्ध वांग मांग नांवाच्या इसमानें बंड केलें व इ. स. ९ मध्यें स्वतःला बादशहा म्हणून जाहीर केलें. यास कांहीं काळ लोकांचा पाठींबा मिळाला पण इ. स. २३ मध्यें हान घराण्यांतील लिउ सिउ नांवाच्या पुरुषानें त्याचा पराभव करून त्याला ठार मारलें.

**पूर्वेकडील हान घराणें (इ. स. २३).**—लिउ सिउनें क्कांग वु ति ही पदवी धारण करून इ. स. ५८–७६ पर्यंत राज्य केलें. त्यानें होनान प्रांतांत लो यांग येथें आपली राजधानी नेली. इ.स.६५मध्यें बौद्ध धर्म हिंदुस्थानांतून चीनमध्यें शिरला. याच सुमारास तुर्कस्थानांतील एका लहानशा शेनशेन संस्थानच्या राजाकडे पॅनचौ हा सुप्रसिद्ध चीनी वकील पाठविला. पुढें लवकरच शेनशेन, खोतान, कुचा व काशगर हीं संस्थानें चीनच्या राज्यास जोडण्यांत आलीं. हान हें चीनमध्यें पहिलें राष्ट्रीय व फार प्रसिद्ध घराणें होऊन गेलें. या घराण्यांतील बादशहाहून अधिक लोकप्रिय बादशहा कोणी झाले नाहींत. यांच्या कारकीर्दींत देशांत व्यापार वाढला, लोकांची बरीच सुधारणा झाली आणि विद्वानांनां पदव्या देण्याकरितां निरनिराळ्या परीक्षांची योजना करण्यांत आली. यांच्या कारकीर्दींत चीनमध्यें एकराष्ट्रीयत्वाची भावना इतकी दृढतर झाली कीं, पुढें आपसांत अनेक बंडाळ्या व परकीयांच्या अनेक स्वाऱ्या झाल्या तरी ती बिघडूं शकली नाहीं.

**वेई घराणें.**—ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या अखेरीस हान घराण्याला उतरती कळा लागली. इ. स. १७३ मध्यें एक भयंकर रोगाची साथ सुरू झाली ती ११ वर्षे चालू राहिली. या प्लेगच्या रोगावर चंगचिओ या धर्मोपदेशकानें एक जादूचा उपाय काढला. त्यामुळें एका महिन्यांत त्याला इतके अनुयायी मिळाले कीं, तो साम्राज्याचा उत्तरेकडील प्रांत बळकावून बसला. परंतु साम्राज्यपद मिळवूं इच्छिणाऱ्या त्सौ त्सौ नांवाच्या इसमानें त्याचा पराभव केला. व त्याचा मुलगा त्सौ पेइ यानें इ. स. २२० मध्यें स्वतःला बादशहा म्हणून जाहीर केलें व आपल्या घराण्याला वेई हें नांव दिलें. परंतु त्याला दुसरे दोघे प्रतिस्पर्धी उत्पन्न झाले. पहिला लिउ पेइ हा अलीकडला स्झे चुएन हा प्रांत बळकावून बसला आणि दुसरा प्रतिस्पर्धी सुन च्वान यानें दक्षिणेकडील प्रांत आपल्या ताब्यांत घेतला. याप्रमाणें या कालविभागांत चीनमध्यें तीन निरनिराळीं राज्यें सुरू झालीं.

**'तीन राज्यांचा' काळ.**— (इ. स. २२२–५९०) या तीन साडेतीन शतकांच्या काळांत चीनमध्यें सर्व अंदाधुंदी माजून राहिली होती. या तीन मुख्य राज्यांशिवाय पुढें दुसरीं कित्येक लाहान लहान राज्येंहि वर डोकें काढूं लागलीं.

**सुइ घराणें.**—इ. स. ५९० मध्यें वरील सर्व बंडाळी मोडून सुइ घराण्यांतील यंगकिएन यानें आपली सत्ता सर्वत्र स्थापित केली व स्वतःला बादशहा म्हणून जाहीर केलें. त्यानें सर्वत्र शांतता प्रस्थापित केल्यामुळें लोकांनीं आनंदानें त्याला आपला बादशहा मान्य केलें. त्यानें आपल्या १६ वर्षांच्या कारकीर्दींत सर्वत्र बरीच शांतता राखली व कायद्यांचें नवें सुधारलेलें कोड सुरू केलें. साम्राज्याच्या ग्रंथसंग्रहांतील ग्रंथांची संख्या ५००० वरून १०,००० पर्यंत नेली. त्यानें तातार लोकांचा पराभव केला व कोरीयन लोकांनांहि शासन लावलें. हा बादशहा इ. स. ६०४ मध्यें मरण पावल्यावर त्याचा दुसरा मुलगा यांगति यानें वडील भावाकडून आत्महत्या करवून राज्य बळकावलें. त्यानें तातार लोकांवर स्वारी केली व लुचू बेटें जिंकून साम्राज्यास जोडलीं. यानें ग्रंथांची संख्या ५४,००० पर्यंत वाढविली व पुष्कळच पैसा खर्च करून लोयांग येथें मोठा भव्य राजवाडा बांधला व कित्येक कालवे तयार केले. ह्या फाजील खर्चामुळें लोकांवर कराचें ओझें ज्यास्त बसून असंतोष पसरला व लौकरच बंड झालें. या बंडांत लिथुएन या सेनापतीनें पुढाकार घेतला व राजाला ठार मारून कायदेशीर वारस कुंगात यास गादीवर बसविलें. पण पुढल्या वर्षीच तो विषप्रयोगानें मारला गेला.

**तंग घराणें** (६१७–९०७ ).— कुंगति मारला गेल्यावर लियुएन हा कौत्सु या नांवानें बादशहा झाला. हा तंग घराण्याचा पहिला बादशहा होय. या सुमारास आशियांत तुर्कांची सत्ता शिखरास पोंहोंचली होती. कौत्सूनें पैसे देऊन तुर्कांचें सख्य संपादिलें होतें. पुढें लवकरच तुर्कांमध्यें दुही माजली. त्या संधीचा फायदा घेऊन या घराण्याचा दुसरा बादशहा ताइ त्सुंग (इ. स. ६२७–६५० ) यानें मध्य आशियामध्यें आपलें वर्चस्व पूर्वीप्रमाणें स्थापिलें. ६४० मध्यें हामि, तुर्फान व तुर्कांचा इतर मुलूख चीनच्या साम्राज्यांत सामील करण्यांत आला व मध्य आशियांत कुचा, खोतान खारस्तान व काश्गर असे चार प्रांत पाडून त्यावर लष्करी सुभेदार नेमण्यांत आले व चीन साम्राज्याची सरहद्द पूर्ण इराण व कास्पियन समुद्र येथपर्यंत वाढविण्यांत आली. या सुमारास चीनची इतकी प्रसिद्धी झाली कीं, नेपाळ, मगध, इराण व कान्स्टंटिनोपल येथून चीनच्या बादशहाच्या दरबारीं ६४३ मध्यें वकील आले. ताइत्सुंग याच्या कारकीर्दींत सर्व चीन देशांत राष्ट्रीय ऐक्य व शांतता नांदत होती. त्यामुळें शेतकी व व्यापार वाढून नवें वाङ्मयहि बरेंच निर्माण झालें. सदहू बादशहानें नेस्टोरियन पंथी लोकांनां उत्तेजन दिलें व महंमदाकडून आलेल्या वकिलांचा चांगला सत्कार केला. ६५० मध्यें कौत्सुंग हा बादशहा झाला. त्या वेळीं त्याची बायको वु हौ हिचें फार वजन वाढलें. आणि ६८३ मध्यें

संदेह, बादशहा मरण पावल्यावर हिनें कायदेशीर वारस बाजूला सारून स्वतः गादी बळकाविली. विधवा महाराणीनें स्वतः राज्यकारभार हातीं घेतल्याचें चीनच्या इतिहासांत हें पहिलेंच उदाहरण होय. तिनें राज्यकारभारहि सूज्ञपणानें चालविला. तिच्या सैन्यानें खितान लोकांचा व तिबेटी लोकांचा पराभव केला. ७०५ मध्यें ही महाराणी मरण पावल्यावर तिचा मुलगा चुंग त्सुंग गादीवर आला. परंतु त्याच्या बायकोनें अधिकारलालसेनें त्याला विष घालून ठार मारलें व जुइ त्सुंग या नांवाच्या मुलाला ७१० मध्यें गादीवर बसविलें. परंतु हा दुर्बल व व्यसनी निघाला. युएन त्सुंग हा ७१३ मध्यें बादशहा झाला. त्यानें राज्यकारभाराचे बाबतींत बऱ्याच सुधारणा केल्या आणि वाङ्मय व विद्या यांनां उत्तेजन दिलें. खोकंदच्या राजानें तिबेटी व अरब लोकांबरोबर लढण्याकरितां मदत मागितल्यावरून या बादशहानें आपलें सैन्य पाठविलें. परंतु त्यांत चिनी सेनापतीचा पूर्ण पराभव झाला. नंतर खितान लोकांनीं उत्तर चिनी प्रांतावर हल्ला केल्यामुळें चिनांत जरा बंडाळी माजली आणि तुर्की वंशांतील आनलु शान नांवाच्या सेनापतीनें बंडांत पुढाकार घेऊन चंग अनवर चाल केली, तेव्हां बादशहानें पळून जाऊन आपला मुलगा सुत्सुंग (७५६-७६२) याला राज्यावर बसविलें. यानें खोकंद व बुखारा या प्रांतांतील फौजेच्या मदतीनें व चार हजार अरब सैन्याच्या मदतीनें आन लु शान चा पराभव केला. या घराण्यांतील पुढील बादशहांच्या कारकीर्दींत तिबेटी लोकांनीं पश्चिम चिनी प्रांतावर सतत हल्ले चालू ठेविले होते. आणि तइ त्सुंग या बादशहानें (७६३-७८०) तुर्क लोकांजवळून त्यांच्या खानाला एक चिनी राजकन्या विवाहाची बायको म्हणून देऊन मदत मिळविली.

या घराण्याच्या वेळीं राजवाड्यांत खोजे लोकांचें बंड फार वाढलें व त्यांच्या गुप्त कटांनां या घराण्यांतले कित्येक बादशहा बळी पडले. तंग घराण्यानें एक शतक चांगल्या तऱ्हेनें राज्य केल्यावर त्या घराण्याला उतरती कळा लागली. आठव्या व नवव्या शतकांतील बहुतेक बादशहा दुर्बल असल्यामुळें सर्वत्र जुलूम व बंडाळी चालू होती. या कालांतील एक विशेष महत्त्वाची गोष्ट ही कीं, वु त्सुंग (८४१-८४७) या बादशहानें मठ व धार्मिक संस्था फार वाढल्यामुळें सर्व देवळें नष्ट केलीं व जोगी व जोगिणी यांचे मठ बंद केले व सर्व मठवासींनां आपल्या कुटुंबांत परत पाठविलें. परदेशांतून आलेल्या ख्रिस्ती, बौद्ध आणि मगी धर्मोपदेशकांनां स्वदेशीं परत पाठविलें आणि पुन्हां परत येण्यास मनाई केली. पुढें इ त्सुंग या बादशहाच्या कारकीर्दींत (८६०-८७४) बुद्ध धर्माचें चिनांत पुनरुज्जीवन झालें. या बादशहाला बुद्धाचें एक अस्थि सांपडलें. तो त्यानें मोठ्या समारंभानें आपल्या राजधानींत आणिला. यानंतर पुन्हां सर्व अव्यवस्था माजून ९०७-९६० यांचे दरम्यान लिअंग, तंग, त्सिन, हान व चौ या पांच घराण्यांनीं एकामागून एक पुन्हां बादशाही सत्ता बळकाविली. तथापि तंग घराण्यांतील बादशहा मर्यादित भागावर राज्य करीत होतेच.

**सुंग घराणें**– (९६०-१२७९) तंग घराण्यांतला शेवटला बादशहा कुंगति याला पदच्युत करून सेनापति चौ कांग यिन बादशहा झाला. चिनी साम्राज्यांतील बंडाळीच्या परिस्थितीला नवा पराक्रमी व बलाढ्य बादशहा अनुरूप होता. यानें खितान तातार लोकांचे हल्ले परत फिरविले व मांचूरिया आणि लाओ तुंग या सर्व प्रांतांवर आपली साम्राज्यसत्ता बसविली. हे सामने चालू असतांच ९७६ मध्यें हा बादशहा मरण पावून त्याचा मुलगा तइ सुंग (९७६-९९७) गादीवर आला. त्यानें खितान लोकांबरोबर युद्ध चालू ठेविलें. परंतु अखेर त्याला त्यांच्या बरोबर तह करावा लागला. यानंतरचा तिसरा बादशहा चेन तुंग (९९७-१०२२) यानें अधिक हल्ले होऊं नयेत म्हणून खंडणी देऊं केली. परंतु हा खंडणी नियमितपणें पोहोंचवीत नसे. त्यामुळें जेन त्सुंग (१०२३-१०६४) याचे कारकीर्दींत खितान लोकांनीं पुन्हा स्वारी करण्याची धमकी दिली. तें संकट टाळण्याकरितां दरसाल दोन लाख टील रुप्याची नाणीं इतकी खंडणी व बरेचसे रेशमी कपडे देण्याचें बादशहानें कबूल केलें. परंतु ही खंडणी नियमित पोहोंचली नाहीं. यामुळें हुवे त्सुंग या बादशहाच्या (११०१-११२६) कारकीर्दींत खितान लोकांनीं लाओ त्सुंग प्रांतावर हल्ला केला. तो परतविण्याकरीतां बादशहानें नूचि तातार लोकांची मदत मागितली, पण तातार लोकांनीं खितान लोकांनां हाकलून दिल्यावर तो प्रांत स्वतःच बळकाविला व पुढें कौत्सुंग या बादशहाच्या कारकीर्दींत (११२७-११६३) चि लि, शन सि शान सि व हो नान या चिनी प्रांतांवरहि हल्ला केला व बहुतेक उत्तर चीन ताब्यांत घेतला. यामुळें सुंग घराण्याची सत्ता दक्षिण चिनावरच कायती चालू राहिली. व उत्तरेकडे कांहीं भागावर किन ऊर्फ 'सुवर्ण' घराणें राज्य करूं लागलें. या किन घराण्यानें पेकिंग येथें आपली राजधानी ठेविली. सुंग घराण्यानें प्रथम नानकिंग व हंगचौ येथें राजधानी नेली. या दोन घराण्यांत पुढें बहुतेक सतत युद्ध चालू राहिलें.

**मोंगल लोकांची स्वारी १२ वें शतक.**— या सुमारास मोंगल लोकांची पूर्व आशियांत बरीच सत्ता वाढली व १२ व्या शतकाच्या आरंभीं जेंगिझखानाच्या सैन्यानें चीनच्या वायव्य सरहद्दीवर व हिआ संस्थानावर स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. हिआच्या संस्थानिकानें जेंगिझखानाला खंडणी देण्याचें कबूल केलें आणि मोंगल लोकांच्या राजाला एक राजकन्या बायको दिली. पुढें जेंगिझखानानें लाओ तुंग प्रांतावर स्वारी करून त्या प्रांताचें राजधानीचें शहर घेतलें १२१२ पासून जेंगीखानानें चीनवर स्वारी करण्यास सुरुवात केली व १२२७ पर्यंत चीनचा

बहुतेक प्रांत जिंकून घेतला. १२३० मध्ये जेंगिझखान मरण पावला. पुढें १२३२ मध्यें मोंगल लोकांनीं चिनांतील सुंग घराण्याशीं मैत्री करून किन घराण्याचा पाडाव केला व नंतर सुंग घराण्यावरच उलटून त्याचा प्रांत जिंकून घेतला. या १२३२--१२५९ च्या काळांत मोंगल लोकांचेहि दोन तीन बादशहा होऊन १२५९ मध्यें कुबलाईखान राज्यावर आला. कुबलाईखानानें बहुतेक चीन देशावर आपली सत्ता प्रस्थापित केली. तथापि सुंग घराण्याच्या पिंग ति नांवाच्या शेवटच्या बादशहानें प्रथम वीस वर्षे कुबलाईखानाशीं विरोध चालू ठेवला. पण अखेर जय मिळण्याची निराशा झाल्यामुळें समुद्रांत बुडून प्राण दिला. याप्रमाणें अंत झालेल्या सुंग घराण्यानें एकंदर ३२० वर्षे चीनवर राज्य केलें. हें घराणें चीनमधील प्रसिद्ध घराण्यांपैकीं एक आहे. कारण ह्यांच्या वेळीं कलाकौशल्य व वाङ्मय बरेंच वाढलें व पुष्कळ वरिष्ट दर्जाचे लेखक प्रसिद्धीं पावले.

**कुबलाईखान बादशहाचें युएन घराणें:**—(इ. स. १२८०—१३६८ ) १२८० पासून कुबलाईखानानें सर्व चीनवर आपली सत्ता सुरू केली व शित्सु ही पदवी घेऊन युएन घराणें प्रस्थापित केलें. त्यानें आपल्या राजधानीकरितां कानबालिग ( खानाचें शहर ) या नांवाचें नवीन शहर वसविलें. यावेळीं कुबलाईखानाची सत्ता हिंदुस्थान, अरबस्तान व आशियाचा कांहीं पश्चिम भाग याखेरीज बाकी नीपर नदीपर्यंतच्या सर्व देशांतील मोंगल राजे त्याचें सार्वभौमत्व कबूल करून त्याला निमूटपणें खंडणी देत असत. याच्याच कारकीर्दीत मार्कोपोलो यानें चीनला भेट दिली. कुबलाईखानानें सुज्ञपणानें राज्यकारभार केला, अनेक लोकोपयोगी सार्वजनिक कामें केलीं, वाङ्मयाला उत्तेजन दिलें व गरीब लोकांच्या आपत्ती दूर केल्या. तथापि तो परकी असल्यामुळें चिनी प्रजेचें त्याच्यावर प्रेम नव्हतें. कुबलाईखान १२९४ मध्यें मरण पावला व नंतर १३१२ पर्यंत दुसरे दोन चार बादशहा होऊन त्या सालीं जेनत्सुंग हा राज्य करूं लागला. त्यानें कान्फ्यूशियस या सुप्रसिद्ध चिनी पुरुषाबद्दल बहुमान दाखविला व मोंगल लोकांबरोबर चिनी लोकांनाहि मोठमोठ्या अधिकाराच्या जागांवर नेमिलें. यामुळें चिनी प्रजा संतुष्ट होऊन त्याची कारकीर्द शांततेंत व भरभराटींत गेली. तो १३२० मध्यें मरण पावल्यावर १३६८ पर्यंत कित्येक नालायक व व्यसनी मोंगल बादशहा झाले. शेवटीं चु युएन चंग याच्या नेतृत्वाखालीं चिनी लोकांनीं बंड केलें व या मोंगल घराण्याची सत्ता नष्ट केली.

**मिंग घराणें.**—चु युएन चंग हा एका चिनी मजुराचा मुलगा होता. त्यानें पुढारीपणा स्वीकारून जिकडेतिकडे सुव्यवस्थित राज्यकारभार करण्याचा प्रयत्न चालविल्यामुळें लोकांनीं फारसा विरोध केला नाहीं. १३५५ मध्यें त्यानें नानकिंग घेतलें व दुसरा बराच मुलुख त्याच्या सत्तेखालीं आला पण त्यानें राजा ही पदवी घेतली नाहीं. पुढें १३ वर्षांनीं म्हणजे १३६८ मध्यें उपर्युक्त मोंगल घराणें नष्ट होऊन सर्व चिनी साम्राज्य त्याच्या सत्तेखालीं आलें व त्यानें लोकाग्रहास्तव बादशहा ही पदवी स्वीकारली. पुढें तातारवर स्वारी करून तेथील मोंगलांची सत्ता नष्ट केली. नंतर लिओ तुंग हा प्रांत त्यानें मोंगलांपासून जिंकून घेतला व हुंग वु हें नवें नांव धारण करून आपलें मिंग ("तेजस्वी") हें नवें घराणें स्थापन केलें. १३९८ मध्यें हुंग वु मरण पावल्यावर त्याचा नातू किएन वेन हा बादशहा झाला. परंतु राजघराण्यांत आपसांत यादवी माजून युंग लो यानें १४०३ मध्यें किएन वेन याला हांकलून देऊन राज्यपद बळकाविलें. युंग लो नें कोचीन चीन व टाँगकिंग हे प्रांत जिंकून आपल्या राज्यास जोडिले. तो १४२५ मध्यें मरण पावल्यावर दोन वर्षे त्याचा मुलगा हुंग हि हा बादशहा होता व नंतर सुएन ते नांवाच्या इसमानें १४२६—१४३६ पर्यंत राज्य केलें. याच्या कारकीर्दींत कोचीन चीन बंड करून पुन्हां स्वतंत्र झाला. पुढचा बादशहा चेंग तुंग हा १४३६ मध्यें राज्यावर आल्यावर पुढें १४५० मध्यें तातार लोकांच्या पुढाऱ्यानें चीनवर स्वारी करून बादशहाला कैद करून नेलें. पण १४५७ मध्यें लाओ तुंग प्रांतांतील चिनी लोकांनीं तातार लोकांचा पूर्ण पराभव करून बादशहाला परत सोडवून आणिलें. या बादशहाच्या नंतर १४६५ ते १४८८ पर्यंत चेंग व्हा आणि १४८८ ते १५०६ पर्यंत हुंग चि या दोन बादशहाच्या कारकीर्दी शांततेत गेल्या.

यानंतरची चेंग ते या बादशहाची कारकीर्द (१५०६—१५२२) फार महत्त्वाची आहे कारण १५१७ मध्यें कँटन बंदरांत पोर्तुगीज लोक येऊन उतरले व तेव्हांपासून यूरोपियन लोकांशीं चीनचा संबंध सुरू झाला. शिवाय या कारकीर्दींत चीनमध्यें एक मोठें बंड झालें व त्याचा फायदा घेऊन तातार लोकांनीं चीनवर पुन्हां हल्ले केले आणि जपान देशच्या आरमारानेंहि चीनच्या कांहीं भागावर हल्ला केला. किआ त्सिंग ( १५२२–१५६७ ) याच्या कारकीर्दींत हे हल्ले चालू होते परंतु या बादशहाला त्यांचें निवारण करितां आलें नाहीं. नंतरचे बादशहा लुंग किंग ( १५६७–१५७३ ) व वान लि ( १५७३–१६२० ) या दोघांनीं तातार लोकांनीं कांहीं व्यापारी हक्क देऊन व कांहीं जमिनी देऊन सख्य राखिलें. १५९२ मध्यें जपानी लोकांनीं कोरियावर हल्ला केला. पण यावेळीं चिनी आरमारानें जपानी लोकांचा पूर्ण पराभव केला आणि जपाननें तह केला. तथापि १५९७ मध्यें जपानी लोकांनीं कोरियावर पुन्हा हल्ला केला आणि चिनी आरमाराचा पराभव केला. हा विजय मिळाला असूनहि जपानी लोक एकदम कोरिया सोडून गेले, त्यामुळें तो पुन्हा चीनच्या सत्तेखालीं आला. १६०१ मध्यें मत्तेओ रिसि हा ख्रिस्ती मिशनरी चीनच्या दरबारीं गेला व त्याची विद्वत्ता पाहून चिनी बादशहानें शास्त्रीय सल्लागार म्हणून त्याला आपल्या

दरबारीं ठेवून घेतलें. तो १६१० मध्यें मरेपर्यंत चीनच्या दरबारींच होता.

**मांचू लोकांची चीनवर स्वारी.**—या सुमारास मांचू तातार लोकांनां चिनी लोकांनीं तरचेवर बराच त्रास दिल्यामुळें त्यांनीं चीनवर १६१६ मध्यें स्वारी केली आणि चिनी सैन्याचा पराभव केला. यानंतर तीन वर्षांनीं लिओ तुंग हा प्रांतहि त्यांनीं जिंकून घेतला. या संकटामुळें हृदयाला धक्का बसून चिनी बादशहा १६२० मध्यें मरण पावला. मांचू लोकांचा राजा तिएन मिंग यानें चीनचें सार्वभौमत्व झुगारून देऊन आपलें राज्य स्वतंत्र केलें. १६२७ मध्यें मिंग घराण्याचा शेवटचा बादशहा त्सुंग चेंग राज्यावर आला. त्याच्या कारकीर्दींत इंग्रज व्यापारी प्रथम कँटन बंदरांत आले. या शेवटच्या चिनी बादशहाच्या कारकीर्दींत सर्वत्र बंडाळी माजली.बंड मोडण्याकरितां मांचू लोकांनां मदतीस बोलाविलें त्यांनीं पेकिंग शहर घेतलें. पण नंतर परत न जातां मांचू लोकांनीं आपला तिएनमिंग याचा नववा मुलगा गादीवर बसविला व त्याला शुनचि ही पदवी देऊन त्याच्या घराण्याला तात्सिंग हें नांव दिलें.या सुमारास नानकिंग येथेंहि बंडाळी माजली तेव्हां तातार सैन्यानें हल्ला करून तें शहर घेतलें. त्यावेळीं मिंग घराण्यांतल्या शेवटच्या बादशहानें पळून जाऊन यांगत्सि–किआंग या नदींत प्राण दिला. याप्रमाणें मिंग घराण्याचा शेवट झाला व परक्या मांचू लोकांची सत्ता चिनी साम्राज्यावर सुरू झाली. या मांचू लोकांनीं चीनचे एकंदर १८ प्रांत पाडिले. ही विभागणी अद्याप चालू आहे.

**तात्सिंग मांचू नांवाचें घराणें.**—मांचू घराण्याचे राज किन नांवाच्या चिनी घराण्याचे वंशज होते, असें अनेक पुराव्यावरून सिद्ध झालें आहे. मांचू घराण्याचा पहिला बादशहा शुनचि याच्या कारकीर्दींत माजी मिंग घराण्याच्या पक्षपाती लोकांनीं अनेक ठिकाणीं बंडें केलीं पण तीं मांचू तातार लोकांनीं सर्व मोडलीं. या पहिल्या बादशहानें शास्त्रीय ज्ञानास बरेंच उत्तेजन दिलें. याच्याच वेळीं १६५६ मध्यें रशियाचे वकील चीनच्या दरबारीं आले परंतु त्यांनीं बादशहापुढें 'कौ तौ' करण्याचें नाकारल्यामुळें बादशहाची भेट न होतां परत जावें लागलें. शुनचि १६६१ मध्यें मरण पावून त्याचा मुलगा कांगहि राज्यावर आला. याच्या कारकीर्दींत रशियाबरोबर तंटा सुरू झाला पण नेरचिन्स्कच्या तहानें १६८९ मध्यें तो मिटला. कांगहि बादशहानें जेसूट लोकांच्या मदतीनें वाङ्मय व शास्त्रें यांचा बराच अभ्यास केला. त्यानें चिनी भाषेचा एक कोशहि प्रसिद्ध करविला. याच्या कारकीर्दींत तिबेट प्रांत चिनी साम्राज्यास जोडण्यांत येऊन सैबीरियापासून कोचीन चीन पर्यंत व चिनी समुद्रापासून तुर्कस्तानापर्यंत चिनी साम्राज्याचा विस्तार वाढला. याच्याच कारकीर्दींत पेकिंग येथें मोटा धरणीकंप झाला व त्यांत एकंदर चार लक्ष लोक मरण पावले असें ह्मणतात.

१७३५ मध्यें गादीवर बसलेला किएनलुंग हा बादशहा फार महत्त्वाकांक्षी व युद्धप्रिय होता. यानें पूर्व तुर्कस्तान आपल्या साम्राज्यास जोडलें व ब्रह्मदेशावर दोनदां व कोचीन-चीनवर एकदा स्वारी केली पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. त्यानें प्रजेवरहि बराच जुलूम केला त्यामुळें चिनांत बंडें झालीं. १३ व्या शतकांत मोंगल लोक चिनांत शिरल्यापासून पश्चिम चिनांत मुसलमान लोकांची बरीच वसाहत झाली होती. त्या मुसलमानांनीं यावेळीं बंड केलें, परंतु चिनी बादशहाच्या फौजेनें तें मोडलें. किएनलुंग यानें गद्य-पद्य बरेंच लिहिलें, महत्त्वाचे ग्रंथ प्रसिद्ध केले व ग्रंथसंग्रह बराच जमविला. त्याच्या सेनापतींनीं ७०,००० सैन्यानिशीं नेपाळवर स्वारी केली तेव्हां नेपाळी लोकांनीं चीनचें वर्चस्व कबूल केलें. १७९५ मध्यें ६० वर्षें राज्य केल्यानंतर आपल्या पंधराव्या मुलाला गादीवर बसविलें व तो १७९८ मध्यें ८८ व्या वर्षी मरण पावला.

किएनलुंग बादशहाच्या कारकीर्दींत कँटन शहरीं यूरोपीय लोकांचा व्यापार बराच वाढला होता. या यूरोपीय लोकांत पोर्तुगीज, ब्रिटिश व डच व्यापारीच पुष्कळ होते. ब्रिटिश लोकांचा सर्व व्यापार ईस्ट इंडिया कंपनीच्या हातीं होता, व्यापाराचे मुख्य जिन्नस अफू, चहा व रेशीम हे होते. या व्यापारावर जकाती व इतर निर्बंध बरेच होते. त्याबद्दलचे अन्याय दूर करण्याकरितां ब्रिटिश सरकारनें पेकिंग येथें १७९३ मध्यें वकील पाठविले. तिसऱ्या जॉर्ज बादशहाच्या तर्फे गेलेला लॉर्ड मॅकार्टने याचा चिनी दरबारनें मोठा आदर-सत्कार केला परंतु व्यापाराचे बाबतींत मुळींच सवलती दिल्या नाहींत.

तथापि १९ व्या शतकांत अनेक यूरोपीय राष्ट्रें चीनमध्यें शिरलीं. प्रथम पोर्तुगीज आले, नंतर १८४१ मध्यें ब्रिटिश, १८९५ मध्यें जपान, १८९८ मध्यें रशिया व फ्रान्स यांचा शिरकाव चीनमध्यें झाला. हीं राष्ट्रें चीनमध्यें आल्यानें चीनमध्यें बरीच चळवळ उडाली व तिचें पर्यवसान १९०० मध्यें बॉक्सर बंडांत होऊन पेकिनमध्यें सात आठवडे अनर्थ उडाला व २०० ख्रिस्ती मिशनरी मारले गेले. मांचू घराणें देशावर सत्ता चालविण्यास अपात्र आढळून आल्यामुळें १९११ मध्यें चीनमध्यें राजक्रांति झाली व १९१२ मध्यें रिपब्लिक स्थापन झालें. रिपब्लिकचा राज्यकारभार दोन प्रतिनिधि मंडळें व त्यांनीं निवडलेला अध्यक्ष पाहतो. तथापि मध्यवर्ती सरकार कमकुवत असून प्रांतोप्रांतीचे गव्हर्नर बलिष्ट होऊन बसले आहेत. सांप्रत दक्षिणकडे एक व उत्तरेकडे एक अशीं दोन सरकारें स्वतःस सर्वसत्ताधीश समजून एकमेकांशीं भांडत आहेत.

बॉक्सर बंडांत पाश्चात्य राष्ट्रांचें जें नुकसान झालें त्याची भरपाई म्हणून फ्रान्स, अमेरिका, इंग्लंड, जपान, इटाली वगैरे अकरा राष्ट्रांनां मोठाल्या रकमा द्यावयाचें कबूल करणें चीनला भाग पडलें. या रकमा हप्त्याहिप्त्यानें १९४५ सालीं

फिटवयाच्या आहेत व त्याकरितां मीठ, व जकात ह्या उत्पन्नांच्या बाबी गहाण लावून दिल्या असल्यामुळें चीनच्या प्रत्यक्ष राज्यकारभारांत परराष्ट्रांचा हात शिरला आहे. या राष्ट्रांपैकीं सर्वांत अधिक सवलती जपाननें मिळविल्या असून चीनमध्यें मुबलक असलेल्या लोखंड व कोळसा यांच्या खाणींपैकीं बऱ्याचशा हल्लीं जपानच्या हुकमतीखालीं आहेत. तात्पर्य, सांप्रत चीनचें मध्यवर्ति सरकार अत्यंत दुबळ्या व परावलंबी स्थितींत आहे.

**ब्रह्मदेश व चीन.**— ब्रह्मदेशाशीं चीनचा संबंध अनेक शतकें आहे. ब्रह्मदेशाची पहिली राजधानी 'तागुंग' इरावतीच्या डाव्या बाजूस होती. खिस्ती शकापूर्वीच चिनी व तार्तार लोकांनीं त्याची धूळधाण केली व पुढें जुनें पगन निर्माण झालें.

पगनचा तिसरा राजा राज्य करीत असतां (म्हणजे इ.स. १६६–२४१) केव्हांतरी चिनी लोकांनीं इरावती सभोंवतालच्या मुलखावर पुन्हां स्वारी केली पण चिनी लोकांचा पराभव या वेळेस ब्रह्मी लोकांनीं केला.

अकराव्या शतकांत (१०१७–१०५९ मध्यें) चीन व ब्रह्मदेश यांमध्यें लढाया पुन्हां सुरू झाल्या. या युद्धाचा दांत चीनपासून मिळविण्यासाठीं केल्या असें ब्रह्मी बखर सांगते पण ती माहिती विश्वसनीय नसावी. चीनशी ब्रह्मदेशानें ज्या लढाया केल्या त्यांचें कारण चीननें मागितलेला करभार ब्रह्मदेशानें दिला नाहीं हें होय.

चीननें खंडणी मागण्यासाठीं पाठविलेल्या वकीलास ब्रह्मी राजांनीं ठार केलें म्हणून इ.स.१२८४मध्यें चिनी तार्तरींतून सैन्य पारिपत्यासाठीं आलें. त्यांनीं तारुप्यो पर्यंत प्रदेश यौगिकार्थी पादाक्रांत केला असें ब्रह्मी इतिहास कबूल करितो. तथापि सैन्यास वैरण न मिळाल्यामुळें परत गेलें असें लिहितो.

ब्रह्मदेश हा चीनचा मांडलिक होता असें चिनी मुत्सद्दी म्हणत तथापि त्यास प्रमाण नाहीं. चीन ब्रह्मदेशच्या राजाला आपला धाकटा बंधु असें म्हणत असे.

१४१२ सालीं ब्रह्मदेशांत ब्रह्मी लोकांनीं थीनी येथील त्साबवावर स्वारी केली असतां त्यास मदत करण्यासाठीं चीननें फौज पाठविली पण तिचा पराभव करून तिला परत पाठविलें.

१४४९सालीं पोंग जिंकण्याठीं चीननें खटपट केली पण त्यांत अपयश आलें.

१४७७ सालीं पेगूच्या साम्राज्याच्या फौजेनें आव्हांतून चाल करून चीनच्या सरहद्दीवर म्हणजे खांटी येथें विजयस्तंभ उभारला.

१५६२सालीं पेगू राज्यानें आव्हा व त्याचीं मांडलिक संस्थानें यांस जिंकलें.

१६०१ सालीं पेगू साम्राज्य मोडलें. आव्हा स्वतंत्र झालें, आणि भामोहि स्वतंत्र झालें. भामोवर आव्हाची फौज चाल करून गेली. भामोचा त्साबवा युनानच्या चिनी गव्हरनरच्या आश्रयास गेला. त्यास स्वाधीन करा नाहीं तर स्वारी करतो म्हणून आव्हाच्या राजानें निरोप पाठविला. त्यानें परत करण्याचें कबूल केलें तथापि त्साबवानें पळण्याची खटपट केली.

**चीनचा नेपाळशीं तिबेटमार्फत संबंध.**—प्रतापसिंहाचा अल्पवयी पुत्र बहादुरशहा हा गादीवर असतां त्याचा चुलता बहादुरशहा हा राज्यकारभार पहात असे. या काळांत गुरख्यांनीं आपली सत्ता आजूबाजूंच्या लहान सहान संस्थानांवर लादली व आपल्या राज्याचा विस्तार भूतानपासून सतलजपर्यंत व तिबेटपासून ब्रिटिश हद्दीपर्यंत वाढविला. १७९० मध्यें त्यांनीं तिबेटवर स्वारी केली. प्रथम त्यांस कांहीं विजय मिळाले पण या स्वारीमुळें त्यांनीं चीनचें शत्रुत्व संपादन केलें. तेव्हां १७९१ मध्यें चीनचें एक भलें मोठें सैन्य नेपाळवर स्वारी करून आलें व १७९२ मध्यें त्यानें नवकोटपर्यंत चाल करून येऊन नेपाळला तह करावयास भाग पाडलें. १७९१ मध्यें गुरख्यांनीं ब्रिटिशांशीं व्यापारी तह केला होता, व चिनी स्वारीचा प्रतिकार करण्यास त्यांनीं ब्रिटिशांची मदत मागितली पण ती येऊन पोंचण्यापूर्वीच तह होऊन गेला होता.

आज नेपाळ सरकारनें चीनच्या राजाचें स्वामित्व कबूल केलें आहे. पण दर पांच वर्षांनीं चीनच्या राजास कांहीं तरी मोठासा नजराणा द्यावा इतकेंच त्यांचें महत्व आहे.

नेपाळचा भारती राजकारणामुळें चीनशीं संबंध येतो; येवढेंच नव्हे तर परराष्ट्रीय राजकारणामुळेंहि येतो. सध्यां सोव्हिएट तत्वें मान्य करणारें रशियनसरकार बनलें असल्याकारणानें त्या सरकारच्या पूर्वीच्या धोरणांत फरक पडला असेलच. तथापि रशियाच्या विस्तारक धोरणामुळें त्याचा जो चीन व नेपाळ यांशीं तिबेटमार्फत संबंध आला तो कावागुची पुढीलप्रमाणें वर्णन करतो.

"रशियाचें वर्चस्व तिबेटावर वाढत आहे हें पाहून नेपाळास वैषम्य वाटत आहे. आणि नेपाळनें तिबेटास तुम्हीं रशियाबरोबर गुप्त तह केला आहे कीं काय असें विचारलें होतें. नेपाळनें युद्धांत तिबेटास जिंकलें तरी त्यास फारसा फायदा न होता इंग्रजांचा होईल हें नेपाळ जाणून आहे. तथापि नेपाळी सरकारचें आपल्या प्रजेचा शिरकाव तिबेटांत व्हावा याकडे लक्ष आहे. नेपाळनें आपल्या गुप्त धनाचा रशियाप्रमाणें तिबेटांत उपयोग केला तर नेपाळचा फार फायदा होईल. नेपाळ बौद्ध धर्माची जोपासना करतें यावद्दल तिबेटी लोकांत मान्यता आहे. तिचा उपयोग करून घेतल्यास नेपाळास बरेंच सुलभ जाईल. तथापि नेपाळपाशीं तरवारीचा जोर आहे तरी वकिलातीची हुषारी नेपाळपाशीं नाहीं."

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकांत नेपाळी शिपाई नेपाळी प्रजेच्या संरक्षणार्थ ल्हासा येथ ठेवण्यास सुरुवात झाली. याचें कारण असें झालें कीं, पालपो जातीचे नेपाळी बौद्ध व्यापारी ल्हासा येथें सुमारें तीनशें होते. या

व्यापाऱ्यांपैकीं एकाच्या दुकानांत एका ल्हासा येथील बाईनें पोंवळीं चोरलीं असा त्या व्यापाऱ्यास संशय आल्यामुळें तिचा झाडा घेण्याकरितां तिला त्यानें "घरांत बळजबरीनें ओढलें." तिला ज्या वेळेस परत जाऊं दिलें तेव्हां तिनें कल्ला केला आणि सेरा मठाच्या लढवय्या लामास सांगितलें. लढवय्ये भिक्षू चौकशी करून गेले आणि नंतर त्यांनीं सूड उगविण्यासाठीं पालपोवर एक हजार माणसांसह चाल केली. हा हजारोंचा जमाव येत आहे असें पाहून पालपो व्यापाऱ्यांनीं घर सोडून पलायन केलें. लढवय्ये भिक्षूंनीं येऊन घरें लुटलीं. त्यामुळें पालपो व्यापाऱ्यांचें सुमारें ३॥ लक्ष रुपयांचें नुकसान झालें. त्यानंतर या गोष्टीबद्दल नेपाळ दरबार व तिबेट दरबार यांमध्यें बोलणें सुरू झालें. तिबेटतर्फे वकील जांव बहादूर होते आणि तेव्हां तिबेटी दरबारनें नुकसानीची भरपाई केली आणि नेपाळी व्यापाऱ्यांच्या संरक्षणासाठीं २५ शिपाई ल्हासा येथें ठेवण्याचें ठरलें. ( कावागुची यांचीं तिबेटांतील ३ वर्षें. )

**चीन व सिकिम.**—सिकिमचे प्राचीन रहिवाशी रोंगपा अथवा लेपचा जातीचे होते. ही इंडो-चिनी जातीची पोट जात असावी; परंतु ते सिकिममध्यें केव्हां व कसे आले याबद्दल माहिती मिळत नाहीं. परंतु नेपाळचें राजघराणें तिबेटी असून ते लोक पूर्व चिनी तिबेटांतील ग्यालपो राजघराण्याशीं आपला संबंध जोडतात. त्यांचे पूर्वज अनेक पिढ्यांपूर्वी पश्चिमेकडे ल्हासा व शाक्य या बाजूनें अम्मोचु खोऱ्याकडे गेले. अखेरीस १६४१ मध्यें पेंचू नामिगे यानें राज्यस्थापना केली. १७७६ ते १७९२ पर्यंत सिकिम व नेपाळ यांमध्यें एकसारख्या लढाया चालू होत्या. अखेरीस १७९२ मध्यें चिनी सैन्यानें गुरख्यांस सिकिमच्या बाहेर घालवून दिलें. तथापि १८१६ मध्यें जनरल आक्तरलोनी यानें गुरख्यांचा पराभव करून सिकिमचा कांहीं भाग त्यांजपासून सोडवून सिकिमला परत देईपर्यंत तो गुरखेच बळकावून बसले होते. नंतर सिकिम व ब्रिटिश सरकार यांमध्यें कांहीं काळ वितुष्ट येऊन ब्रिटिशांनीं १८३९ मध्यें दार्जीलिंग व १८४९ मध्यें सर्व तराई प्रांत आपल्या ताब्यांत घेतला व १८६१ मध्यें एक मित्रत्वाचा तह करावयास सिकीमला भाग पाडलें. अखेरीस १८९० मध्यें चीनशीं तह होऊन चीननें सिकिमवरील ब्रिटिशांचें संरक्षण मान्य केलें. असो.

बुद्धोत्तर जगांत भारतीयांचा चीनशीं राजकीय संबंध फार थोडा आहे हें वरील विवेचनावरून समजून येईल. जो संबंध आला तो मुख्यतः बौद्धिक आणि सांस्कृतिक होता. हिंदुस्थानाकडून चीनकडे भारतीयांची संस्कृति नेणारे बौद्ध प्रवाशी पहिल्या विभागांत वाचकांस परिचित करून दिलेच आहेत. चिनी प्रवाशी हिंदुस्थानांत अनेक येऊन गेले. त्यांची माहिती भौगोलिक शोधाच्या प्रकरणांत दिलीच आहे. असो. आतां चीनचा शेजारी जो जपान देश त्याकडे वळूं.

**जपान.**—जपानचें इंग्लंड देशाशीं फार साम्य आहे. दोन्ही देश लहान व मुख्य खंडापासून पृथक् बेटें आहेत. दोन्ही देश साधारण समान अक्षांशावर असल्यामुळें हवापाण्याच्या बाबतींत बहुतेक सारख्या स्थितींत आहेत. प्राचीन इतिहासहि दोन्ही देशांचा जवळ जवळ सारखाच आहे. दोहोंपैकीं स्वतःची संस्कृति किंवा धर्म नाहीं. इंग्लंडमध्यें रोमन व फ्रेंच संस्कृति शिरली व यूरोपच्या दक्षिण टोंकाकडे स्थापन झालेला ख्रिस्ती धर्म ब्रिटन लोकांनीं स्वीकारला. अर्थात् इंग्लंडला ख्रिस्तपूर्वकाळचा असा इतिहास नाहीं. जपानमध्येंहि देश्य लोकांची सुधारणा चिनी संस्कृतीनें झाली व दक्षिणेकडे दूरवर असलेल्या हिंदुस्थान देशांत स्थापन झालेला बौद्ध धर्म व संस्कृति यांनीं जपानी राष्ट्र बनविलें. या दोन देशांत साम्य इतकेंच आहे. राजकीय इतिहासांत जपान देश इंग्लंडच्या मानानें १९व्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत फार मागसलेला राहिला होता. भौगोलिक शोधांत व शास्त्रीय संशोधनांत इंग्लंडनें १७ व्या शतकापासून पुढाकार घेऊन जागतिक साम्राज्यरूपी जें फल प्राप्त करून घेतलें त्या साम्राज्यकल्पनेचें स्वप्न जपानला अगदीं अलीकडे पडूं लागलें आहे. जपानच्या या मागसलेल्या स्थितीस जपानचा गैरमुत्सद्दीपणा जितका कारण झाला तितकाच चीन व सैबीरियासारख्या अजगर वृत्तीच्या देशांचा शेजार कारणी झाला यांत शंका नाहीं. तथापि अलीकडे पन्नास वर्षांत यूरोपीयांचें अनुकरण करून जपाननें आपली सर्वांगीण सुधारणा करून जगांतील प्रमुख राष्ट्रांत स्थान संपादिलें आहे. यामुळें जपानचा एकंदर इतिहास मोठा बोधप्रद बनला आहे. म्हणून जपानच्या इतिहासाची थोडक्यांत रूपरेषा येथें दिली आहे.

**प्रागैतिहासिक काल.**—जपानबद्दल अत्यंत प्राचीन माहिती कोजिकी ( प्राचीन गोष्टींचा लेखसंग्रह ) व निहोंगी ( जपानची बखर ) या दोन ग्रंथांवरून मिळते. हे ग्रंथ पुराणवजा असल्यामुळें त्यांतील माहिती काल्पनिक स्वरूपाची आहे. त्यांत विश्वोत्पत्तीपासून जपानची व तेथील पौराणिक राजांची माहिती आहे. जपानचा पहिला मानव राजा जिम्मू टेनो ख्रिस्तपूर्व ६६० मध्यें गादीवर आला असें म्हटलें आहे. जपानी साम्राज्याचा आरंभक हाच मानतात. तथापि ख्रिस्तोत्तर पांचव्या शतकापर्यंतची यांत दिलेली माहिती फारशी विश्वसनीय नाहीं. सबब ख्रिस्तपूर्व ६६० ते इ. स. ५०० पर्यंतच्या काळास जपानचा प्रागैतिहासिक काळ म्हटलें पाहिजे. या काळांत एकंदर २४ राजे झाले व त्यांतील बरेचसे शंभराहून अधिक वर्षें जगले असें वर्णन आहे. त्या वेळचीं कांहीं थडगीं उकरून काढलीं आहेत पण त्यांत खोदीव लेख मुळींच सांपडले नाहींत.

या काळांतील राजे अनेक स्त्रियांशीं लग्नें करीत असत. त्यामुळें त्यांनां संतति पुष्कळ असे. केइको नांवाच्या बाद-

शहाला (इ. स. ७१—१३०) ८० मुलें होतीं. अश्या राजपुत्रांनां योगक्षेम चालविण्याकरितां जहागिरी देण्याची वहिवाट पडली व त्यामुळें देशभर जहागिरदारांचा वर्ग निर्माण झाली या वर्गाचा जपानच्या भावी इतिहासावर फार परिणाम झाला.

इ. स. २०० च्या सुमारास जपानी सैन्यानें कोरियावर स्वारी केली व कोरियाच्या राजानें जपानचें मांडलिकत्व पत्करलें असा जपानी बखरींत उल्लेख आहे. चिनी इतिहासांतहि या प्राचीन जपानी लोकांचीं लांबलचक वर्णनें आहेत. या प्रागैतिहासिक काळांत तलाव व कालवे खणणें, बोटी बांधणें, रस्ते, पूल, खानेसुमारी, लेखनकला वगैरे अनेक बाबतींत जपानची प्रगति झाली होती.

**जपानचा ऐतिहासिक काळ.**—या काळाचे पुढील चार भाग पडतातः—

(१) आद्य ऐतिहासिक काळ (इ. स. ४००—६७२).
(२) फुजिवर लोकांचा काळ (इ. स. ६७३—११५५).
(३) सरंजामदारी सत्तेचा काळ (इ. स. ११५५—१५९८).
(४) टोकुगावा घराण्याचा काळ (इ. स. १५९८—१८६७).
(५) आधुनिक सुधारणांचा काळ (इ. स. १८६७ पासून पुढें).

आद्य ऐतिहासिक काळांतला रिचू हा पहिला बादशहा होय. या काळांत राजघराण्यांतील इतर पुरुषांनीं राज्य बळकाविण्याचे प्रयत्न केल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. या सुमारास समाजामध्यें धंदेवार वर्ग उर्फ जाती बनत चालल्या होत्या. चिनी व कोरियन विद्वानांनीं जपानांत जाऊन चिनी संस्कृतीचा प्रसार केला व कारागिरांनीं उद्योगधंदे सुधारले. तथापि या काळांतील सर्वांत महत्त्वाची गोष्ट जपानांत बौद्धधर्माचा प्रवेश ही होय. हें काम खुद्द कोरियाच्या राजानें केलें. प्रिन्स शोकोटु या विद्वान् तत्त्ववेत्त्यानें या कार्यास फार मदत केली. इ. स. ६२३ च्या खानेसुमारींत जपानांत ४६ बौद्धालयें, ८१६ भिक्षू व ५६९ जोगिणी असल्याचें आढळून आलें. यामुळें नवीन नीतिनियम व नवीन संस्कृति जपानांत शिरली.

याच्या पुढील काळास (इ. स. ६७३ ते ११५५) फुजिवर लोकांचा काल म्हणण्याचें कारण असें कीं, या काळांत प्रथम फुजिवर घराण्यांतल्या पुरुषांनीं आपल्या मुली बादशहांनां देऊन सर्व सत्ता आपल्या हातीं ठेविली. परंतु पुढें हें घराणें चैनबाज बनून दुसरीं तैरा व मिनमॉटो हीं दोन लष्करी पेशाचीं घराणीं पुढें आलीं व त्या दोघांमध्यें राज्याकरितां युद्ध होऊन त्यांत अखेर तैरा घराण्याचा पाडाव झाला.

इ. स. ११५५ ते १५९८ पर्यंतच्या काळांत जपानी राजांनां केवळ नामधारी बनवून एकामागून एक सरंजामी घराण्यांनीं पेशव्याप्रमाणें खरा राज्यकारभार आपल्या हातीं ठेविला. बौद्धधर्माचा प्रसार बराच वाढून कित्येक राजघराण्यांतले पुरुषहि भिक्षू बनले होते. असले भिक्षू राजकारणांत उलाढाली करीत असत. यामुळें जपानच्या राज्यकारभारांत बराच गोंधळ माजला होता. पण या उद्वेगजनक परिस्थितींतूनच जपानमध्यें तीन अत्यंत मोठे युद्धनायक व मुत्सद्दी उदयास आले. ते ओद नोबुनागा, हिदेयोशी व टोकुगावा इयेयसु हे होत. नोबुनागा हा लहानसा जमीनदार होता व हिदेयोशी हा गरीब शेतकऱ्याचा मुलगा असून तो नोबुनागाच्या पदरीं नोकरीस होता. तो मोठा तरवारबहाद्दर व कारस्थानकुशल निघाला. त्याच्या मदतीनें नोबुनागानें आपली सत्ता व सैन्य पुष्कळ वाढविलें. जपानी बादशहाच्या परवानगीनें त्यांनीं देशांतील बंडाळी मोडून शांतता प्रस्थापित केली. तेव्हां बादशहानें हिदेयोशीला प्रतिनिधि नेमिलें. त्यानें फार न्यायानें व दयाळूपणानें राज्यकारभार केला. कोरिया व चीनवर त्यानें स्वारीचा प्रयत्न केला. हिदेयोशी इ. स. १५९८ मध्यें मरण पावला. त्यानंतर टोकुगावा इयेयसू अधिकारारूढ झाला. याच्या वेळीं आपसांतील युद्धाचा वणवा पुन्हां पेटला आणि इ. स. १६०० मध्यें सेकिगहर येथें एक व १६१५ मध्यें ओसाका येथें एक अशा दोन लढाया होऊन त्यांत इयेयसूचा जय झाला. अशा रीतीनें बाराव्या शतकापासून १७ व्या शतकापर्यंत चाललेल्या अन्तर्युद्धाची परिसमाप्ति झाली. यापुढें जपानला पूर्ण शांतता लाभली व त्या काळांत टोकुगावा वंशांतल्या कारभारी पुरुषांनीं (शोगुनांनीं) पुष्कळ सुधारणा केल्या. 'इयेयसूची कैफियत' (स्टेटमेन्ट ऑफ इयेयसू) नांवाच्या ग्रंथांत या काळांतील जपानच्या परिस्थितीबद्दल सविस्तर माहिती मिळते. जपानांत सरंजामी पद्धति बरीच चालू असल्यामुळें जपानी समाजाचे तीन वर्ग पडले होते. (१) राजा व त्याचे दरबारी लोक, (२) लष्करी सरदार उर्फ सरंजामदार व (३) सामान्य लोक. यांपैकीं सरंजामदारांचा वर्ग बराच मोठा व बलिष्ठ होता. हे सरंजामदार व त्यांचे सैनिक हा जपानमधील लष्करी बाण्याचा वर्ग हिंदुस्थानांतील क्षत्रियांसारखा होता. टोकुगावाच्या शांततापूर्ण काळांत हा लढवय्या वर्ग अनवश्यक वाटूं लागला व तिसऱ्या वर्गांतले म्हणजे सामान्य लोकांतले शेतकरी, कारागीर व व्यापारी या वर्गाला महत्त्व चढलें.

**बाह्यांशीं संबंध.**—अगदीं प्राचीन काळापासून जपानचा चीन व कोरियाशीं संबंध होता. खिस्तोत्तर सोळाव्या शतकापर्यंत परकीयांनां सरकारी अधिकाऱ्यांस आपल्या सामानाची तपासणी करूं देणें, लढाऊ शस्त्रें खरेदी न करणें वगैरे अटींवर जपानांत सर्वत्र प्रवास करण्यास मोकळीक असे. जपानचा बहुतेक व्यापार चीनबरोबर असे. या पूर्वापार परिस्थितींत सोळाव्या शतकांत एकदम मोठा फरक झाला. इ. स. १५४२ पासून यूरोपीय लोकांशीं जपानचा संबंध सुरू झाला. प्रथम पोर्तुगीज लोक जपानांत शिरले.

त्यांनीं व्यापार व ख्रिस्तीधर्मप्रसार हीं दोन्ही कार्यें सुरू केलीं. १५५० ते १५८२ पर्यंतच्या बत्तीस वर्षांत १,५०,००० लोक ख्रिस्ती बनले व एवढें अवाढव्य कार्य अवघ्या सुमारें ७५ जेसुटांनीं केलें. हा परधर्मप्रसार बंद करण्याकरितां हिदेयोशीनें १५७८ मध्यें एकदम बंदीचा हुकूम काढून सर्व परकी धर्मोपदेशकांनां वीस दिवसांच्या आंत जपान देश सोडून जाण्यास फर्माविलें. पोर्तुगीज व्यापाऱ्यांनां मात्र मोकळीक ठेविली होती. नंतर व्यापारास अडथळा न यावा म्हणून धर्मोपदेशकांसंबंधाचा नियमहि ढिला करण्यांत आला. त्याबरोबर जेसुटांनीं पुन्हां झपाट्यानें धर्मप्रसाराचें कार्य चालविलें व १५९५ मध्यें बाटलेल्या जपान्यांची संख्या तीन लाखांवर गेली. त्यांत संस्थानिकांपैकीं सत्रा जण ख्रिस्ती झाले होते. याच सुमारास स्पॅनिश लोकहि जपानांत शिरून धर्मप्रसार करूं लागले. तेव्हां हिदेयोशीनें पूर्वीचा हुकूम कडक रीतीनें अमलांत आणून ख्रिस्ती मिशनऱ्यांस पूर्ण मज्जाव केला; इतकेंच नव्हे तर, पुढें इयेयसूनें सर्व परकीयांवर कडक बहिष्कार घालण्याचें धोरण १६३९ मध्यें अमलांत आणलें. हा निर्बंध दुहेरी होता. म्हणजे परकीयांनीं जपानांत येऊं नये या नियमाबरोबरच जपानी लोकांनीं कोणत्याहि परक्या देशांत जाऊं नये असा सक्त नियम करण्यांत आला.

या बहिष्कारापासून जपानचा तत्कालिक तोटा कांहीं झाला नाहीं. कारण यूरोपीयांची संस्कृति जपानी संस्कृतीपेक्षां उच्च दर्जाची नव्हती. यूरोपीयांजवळ त्या वेळीं दोनच गोष्टी अधिक होत्या. बंदुकी वगैरे अग्न्यस्त्रें व लष्करी तटबंदीचें शास्त्र. या दोन्ही गोष्टी जपानी लोकांनीं लवकरच ग्रहण केल्या. या बहिष्कारामुळें पुढें दोनअडीचशें वर्षें जपानला शांततेचा काळ लाभला खरा; पण तेवढ्यांत यूरोपीय राष्ट्रें शास्त्रीय संशोधनांत झपाट्यानें पुढें गेलीं. या शास्त्रीय शोधांची अंधुक कल्पना जपानी विद्यार्थ्यांनां देशिम येथील डच लोकांच्या फॅक्टरींतील गोष्टींवरून येऊं लागली. तथापि तेवढ्यानें जपानी सरकार बहिष्कार उठविण्यास तयार होणें शक्य नव्हतें.

**आधुनिक सुधारणांचा काळ.**—जपानचा हा एकांतवास १८५२ च्या सुमारास संपला. या सुमारास 'युनैटेड स्टेट्स' च्या सरकारनें कोमोडोर पेरी नांवाचा वकील व्यापारी तह करण्याकरितां जपानांत पाठविला व त्याच्याबरोबर आरमाराचा ताफा दिला. तीं आधुनिक लढाऊ जहाजें पाहिल्यावर त्यांचा प्रतिकार करणें लष्करी बाबतींत मागसलेल्या जपानला शक्य नव्हतें. त्यामुळें तह करून अमेरिकेला व्यापाराची मोकळीक देणें जपानला भाग पडलें. नंतर इंग्लिश, डच, फ्रेंच वगैरे राष्ट्रांनींहि सदरहू प्रकारचे तह करून व्यापार सुरू केला. बाह्यांबरोबरच्या संबंधांत ही क्रांति घडून येतांच जपानच्या अंतःस्थितीवर त्याचा महत्त्वाचा परिणाम झाला व १८६७ मध्यें जपानमध्यें दुसरी महत्त्वाची क्रांति घडून आली. ही क्रांति म्हणजे शोगुनांची उर्फ कारभाऱ्यांची सत्ता कमी करून बादशहाच्या हातीं संपूर्ण सत्ता देणें व त्याबरोबर देशांत कायदेमंडळ स्थापन करणें ही होय. याच वेळीं वंशपरंपरागत नोकऱ्यांची व सरंजामदाऱ्यांची पद्धति बंद करून विद्वत्ता व हुशारी पाहून अधिकारी नेमणें, आणि लोकप्रतिनिधींमार्फत व्यक्त होणाऱ्या लोकमतानुसार राज्यकारभार चालविणें इत्यादि राजकीय सुधारणा अमलांत आल्या. तेव्हांपासून जपाननें राजकीय, औद्योगिक, व्यापारी वगैरे बाबतींत यूरोपीयांचें अनुकरण करून अवघ्या चाळीस वर्षांत राष्ट्राची इतकी सुधारणा केली कीं, चीन व रशिया या अवाढव्य साम्राज्यांचाहि जपाननें रणांगणावर पराभव केला व त्यामुळें यूरोपीय राष्ट्रें जपानला बरोबरीच्या नात्यानें वागवूं लागलीं.

एवढी प्रगति एवढ्याशा अल्प काळांत जपाननें कशी घडवून आणली याबद्दल पुष्कळांनां आश्चर्य वाटतें. या कोड्याचें उत्तर असें आहे कीं, सुधारलेल्या जपानी सरकारनें पाश्चात्त्य सुधारणेचीं सर्व अंगें उपांगें सुरू करण्याचें काम एकदम हातीं घेतलें. नव्या सुधारणावादी पुढाऱ्यांपैकीं बहुतेक यूरोप, अमेरिका येथें राहून सर्व पाश्चात्त्य गोष्टींचें सूक्ष्म अवलोकन करून आलेले असल्यामुळें जपानांत सर्व बाबतींत त्यांनींच पुढाकार घेतला होता व राजकीय सत्ताहि त्यांचेंच हातीं होती. त्यांनीं रेल्वे बांधणें, तारायंत्रें सुरू करणें, समुद्रांत दीपगृहें बांधणें व आरमार तयार करणें या कामाकरितां तज्ज्ञ इंग्लिश लोक नेमले; कायदेग्रंथ करण्याकरितां व सैन्याला हालचाली, डावपेंच व रचना शिकविण्याकरितां फ्रेंच लोक नेमले; शिक्षण, पोस्टखातें, शेतकीसुधारणा व वसाहतींची स्थापना या गोष्टी अमेरिकन तज्ज्ञांवर सोंपविल्या; औषधिशास्त्र, व्यापारी कायदेबुकांची रचना, स्थानिक कारभार, संस्थांची मांडणी व लष्करी अधिकाऱ्यांचें शिक्षण या गोष्टी जर्मन तज्ज्ञांच्या हातीं दिल्या आणि खोदकाम व रंगकाम शिकविण्याच्या कामीं इटालियनांची नेमणूक केली. अशा रीतीनें विविध परदेशस्थ तज्ज्ञांच्या द्वारें एकदम सुरू केलेल्या अनेकविध सुधारणा जपानी लोकांच्या पचनीं पडणें मोठें कठिण आहे असें परकीयांस साहजिक वाटे. परंतु जपानी लोकांना त्यांचा कांहींच बाऊ वाटला नाहीं. आपला पुराणाभिमान कायम ठेवून त्यांनीं वरील बाह्य उपकरणांचा व सुखसोयींचा स्वीकार केला. अर्थात् यामुळें नव्या जपानी पिढीची राहणी द्विविध बनली. हे लोक दिवसां आफिसचे व कामाचे वेळीं पोषाख, शिस्त वगैरे सर्व बाबतींत पाश्चात्त्यांचे धर्तीवर वागत असत; आणि कामावरून सुटून मोकळे होतांच आपले जुने देशी कपडे चढवून पुरातन पद्धतीनें कालक्रमणा करीत. जपानी लोकांनीं रेल्वे, आगबोटी, तारायंत्रें, पोस्टआफिसें, प्यांका व सर्व प्रकारची यंत्रसामुग्री पाश्चात्त्यांपासून ग्रहण केली. पाश्चात्त्य भौतिक शास्त्रेंहि त्यांनीं आत्मसात् केलीं, पाश्चात्त्य तत्त्वज्ञान

बऱ्याच अंशीं मान्य केलें, 'यूरोपीय कायदेपद्धतीचें श्रेष्ठत्व कबूल करून त्या नमुन्यावर' आपले कायदेग्रंथ बनविले; आणि इतकें करूनहि आपलेपणा न गमावतां प्रत्येक बाबतींत आपलें जपानी वैशिष्ट्य त्यांनीं कायम राखलें. सर्व पाश्चात्य सुखसोयींचा उदारबुद्धीनें संग्रह करूनहि त्यांनीं आपल्या परंपरागत चालीरीतींनां व समजुतींनां फारसें दुखविलें नाहीं ही जपानी सुधारणाबाबांतील अत्यंत तारीफ करण्यासारखी गोष्ट आहे. दोन विजातीय संस्कृतींच्या संमिश्रणाचें हें अत्यंत अवघड काम करीत असतां त्यांचे हातून कित्येक वेळां वेडगळपणाच्या चुका झाल्या; पण त्या लवकरच दुरुस्त करून एकंदर सुधारणेच्या कामांत त्यांनीं चांगलें यश संपादन केलें आहे; व त्यामुळें पुढील सुधारणेच्या मार्गांतहि आपली राष्ट्रीय दृष्टि कायम ठेवून योग्य तितक्याच गोष्टीच ते स्वीकारतील व स्वसमाजाच्या पचनीं पाडतील, अशी खात्री वाटते.

---

## प्रकरण २६ वें.

### यूरोपीय इतिहास व जागतिक इतिहास.

१८ व्या व १९ व्या शतकांतलि यूरोपच्या इतिहासाचा अखिल जगाच्या इतिहासाशीं संबंध आहे. १८ व्या शतकांतील भौगोलिक शोधांनीं उपलब्ध झालेल्या भूभागांवर राजकीय सत्ता प्रस्थापित करण्याकरितां प्रथम स्पेन, पोर्तुगाल, हॉलंड, फ्रान्स व इंग्लंड हे देश पुढें आले. पण त्यांच्यापैकीं पहिले तीन मागें पडून अखेर लढा फ्रान्स व इंग्लंड या दोन देशांत उरला. हा लढा जवळजवळ पाऊण शतक म्हणजे १७४० ते १८१५ पर्यंत चालला. यूरोपांतील सप्तवार्षिक युद्ध ( १७५६—१७६३ ) हा या लढ्याचा पूर्वार्ध होय. आणि नेपोलियनबरोबरचीं युद्धें हा त्याचा उत्तरार्ध होय. ह्या दोहोंतहि इंग्लंड विजयी होऊन ब्रिटिश साम्राज्य सर्व जगभर पसरलें. सप्तवार्षिक युद्धानें इंग्लंडच्या अमेरिकेंतील व हिंदुस्थानांतील साम्राज्याचा पाया घातला. युनैटेड स्टेटसच्या स्वातंत्र्ययुद्धानें इंग्लंडच्या मुत्सद्दीगिरीला साम्राज्यसंरक्षक नीतीचा उत्तम धडा शिकविला आणि नेपोलियनबरोबरच्या युद्धांनीं ब्रिटिश आरमाराची समुद्रावर सत्ता प्रस्थापित केली. साम्राज्यसंपादक आरमार व साम्राज्यसंरक्षक मुत्सद्दीगिरी या दोहोंच्या बळावर इंग्लंडनें १९ व्या शतकांत कानडा, दक्षिण आफ्रिका, हिंदुस्थान व आस्ट्रेलिया आणि इजिप्त या दूरदूरच्या देशांवर साम्राज्य स्थापलें. अशा रीतीनें इंग्लंडनें राजकीय सत्ता जगभर प्रस्थापित केली.

यूरोपीय राष्ट्रांचा अखिल जगाशीं प्रत्यक्ष संबंध येण्याची दुसरी बाब म्हणजे यूरोपियांचा ख्रिस्तधर्मप्रसार व व्यापार. ख्रिस्तधर्मी लोक जगाच्या बहुतेक भागांत असून जगाच्या लोकसंख्येंत ख्रिस्त्यांची संख्या इतर कोणत्याहि धर्माच्या अनुयायांहून अधिक आहे. यूरोपीय व्यापाराची व्याप्ति तर शासनसत्ता व धर्मसत्ता याहूनहि अधिक आहे. फार काय पण यूरोपियांचा माल जेथें जात नाहीं असा जगाचा एकहि भूभाग नसेल.

शिवाय यूरोपियांचें हें आतिक्रमण केवळ एकपक्षीय आहे असें नाहीं. म्हणजे यूरोपीयेतर लोक यूरोपीयांशीं संबंध ठेवण्याच्या अगदीं विरुद्ध आहेत असें म्हणतां येत नाहीं. शासनशास्त्र, शास्त्रीय शोध व औद्योगिक प्रगति या तिन्ही बाबतींत यूरोपखंड फार पुढें गेलेलें असल्यामुळें इतर खंडांतील स्वतंत्र देशांनांहि यूरोपशीं आपण होऊन संबंध ठेवणें भाग पडतें. जपानचेंच उदाहरण घ्या, जपानदेश स्वतंत्र असूनहि स्वतःची सुधारणा करून घेण्याकरितां जपानला इंग्लिश, जर्मन, फ्रेंच, इटालियन, अमेरिकन, वगैरे तज्ज्ञ लोक स्वदेशांत बोलावून त्यांच्या मदतीनें आपली प्रगति करून घ्यावी लागली. दळणवळणाचीं आधुनिक साधनें म्हणजे रेल्वे, तारायंत्रें, आगबोटी, व विमानें यांनीं सर्व खंडांनां एकत्र जोडल्याप्रमाणें झालें आहे. ज्ञानविषयक क्षेत्रांत तरी सर्व जग म्हणजे एकच खंड किंवा देश अशी भावना उत्पन्न झाली असून प्रत्येक देशाच्या ज्ञानविषयक संपत्तींत इतर प्रत्येक देशाला अंशभागी होण्याचा मार्ग मोकळा झाला आहे.

अखिल जग म्हणजे एकच खंड असल्याचा प्रत्यय गेल्या महायुद्धानें प्रत्यक्ष आणून दिला. त्या युद्धाला पहिलें जागतिक युद्ध असें सार्थ म्हणतां येईल. त्या युद्धाचा वणवा सर्व खंडांत पसरला होता व त्याचे पश्चात्परिणाम सर्व जगाला भोंवले. सारांश प्रत्येक देशाला स्वतःच्या इतिहासाबरोबरच अखिल जगाचाहि इतिहास अभ्यासिल्यावांचून यापुढें गत्यंतर नाहीं. असो; आतां प्रस्तुत प्रकरणांत यूरोपनें आपला प्रसार सर्व जगभर कसा पसरविला तें पाहूं.

विसाव्या प्रकरणांत यूरोपच्या इतिहासाचें कथासूत्र यूट्रेचच्या तहापर्यंत आलें आहे. 'यूट्रेच'च्या तहांत जरी कांहीं व्यंगें असलीं तरी एकंदरींत सर्व बिल्हेवाट त्यामुळें उत्कृष्ट रीतीनें लागली. सन १७४० पर्यंत जरी लहान सहान लढाया होत होत्या तरी यूरोपमध्यें एकंदरींत शांतता नांदत होती. मुख्यत्वेंकरून अठराव्या शतकांत राजकीय बलाचा समतोलपणा नजरेस येत होता. सन १७१३ पासून १७४० पर्यंत बलिष्ठ राष्ट्रें आपापले संघ बनवून आपापलीं कार्यें घडवून आणीत होतीं. वसाहतींवर ग्रेटब्रिटनची सत्ता जास्त वाढूं देऊं नये म्हणून स्पेन व फ्रान्स यांचा सारखा प्रयत्न चालला होता आणि आस्ट्रियाचे सत्तेखालील इटालीमधलीं कांहीं ठाणीं आपल्याकडे असावीं म्हणून स्पेनची उत्कट इच्छा होती.

**जागतिक सत्तेकरितां इंग्लंड व फ्रान्सची चुरस.**—सन १७४० नंतर यूरोपमध्यें नव्या काळाला आरंभ झाला. जर्मनीवर वर्चस्व असावें म्हणून आस्ट्रिया व

प्रशिया यांमध्यें स्पर्धा चालली होती. हिंदुस्थान आपल्या ताब्यांत असावें म्हणून ग्रेटब्रिटन व फ्रान्स एकमेकांशीं लढत होते. तेव्हां यूरोपच्या इतिहासांत आस्ट्रियाच्या वारसाबद्दलचें युद्ध व त्याचीच पुरवणी म्हणून पुढें चाललेलें सप्तवार्षिक युद्ध यांचें फार महत्त्व आहे. १७४८ च्या एप्रिल महिन्यांत ग्रेट ब्रिटन, फ्रान्स आणि हॉलंड यांनीं शांततेचा तह केला व तोच पुढें आक्टोबर १८ तारखेला एलाशापेल येथील तह म्हणून प्रसिद्ध झाला. त्या तहाच्या योगानें फ्रान्स व ग्रेटब्रिटन यांनां युद्धांत गेलेला मुलूख परत मिळाला. परंतु इतर यूरोपीय राष्ट्रांचा कांहीं फायदा झाला नाहीं. सार्डीनियाला जरी मिलानच्या सभोंवतालचा मुलूख मिळाला तरी पायसेंझावरील हक्क सोडून देणें भाग पडलें. आस्ट्रियाला सायलेशिया प्रशियाला द्यावें लागलें आणि पार्मा व पायसेंझा डॉन फिलिपच्या स्वाधीन करावीं लागलीं. जिब्राल्टर मिळण्याची सर्व आशा स्पेनला सोडावी लागली. ग्रेटब्रिटनचा वरील तहामुळें बराच फायदा झाला. फक्त कानडा देशांत व हिंदुस्थानांत वर्चस्व प्रस्थापित करण्याच्या कामांत त्यांनां थोडा वेळ दम धरावा लागला. पण लवकरच कानडा व हिंदुस्थानांत ग्रेटब्रिटन पुढें सरकल्यामुळें अर्थात् फ्रान्सची पिछेहाट झाली. प्रशियाची शक्ति वाढून आस्ट्रियाशीं स्पर्धा करण्यास त्यास जोर आला. व सार्डीनियामध्यें पुढील इटालीच्या स्वातंत्र्याचें बीं रुजत पडलें.

या नंतरच्या सप्तवार्षिक युद्धाच्या (१७५६-१७६३) सुरुवातीस यूरोपांत एक मुत्सद्दीगिरींत जणूं काय क्रांतीच घडून आली. प्रशिया व ग्रेटब्रिटन यांमध्यें १७५६ मध्यें झालेल्या तहास प्रत्युत्तरादाखल फ्रान्स व आस्ट्रिया यांनीं व्हार्सेल्स येथें एक दोस्तीचा तह केला. हीं दोन राष्ट्रें आतांपर्यंत एकमेकांस पाण्यांत पहात असून त्यांच्यामध्यें झालेल्या या तहामुळें सर्व यूरोपास अचंबा वाटला. परंतु या तहाचा फारसा उपयोग झाला नाहीं. कारण रशियानें आस्ट्रियाच्या मदतीकरितां पाठविलेल्या सैन्याचा फ्रेडरिक दी ग्रेट यानें पार धुव्वा उडवून दिला व तो स्वतः अजिंक्य ठरला. याचीं कारणें अंशतः त्याची इंग्रजांशीं दोस्ती, फ्रेंच सेनापतींची नालायकी, व रशियांतील अंतस्थ भेद हीं होत. १० फेब्रुवारी सन १७६३ रोजीं पारिसचा व १५ फेब्रुवारी रोजीं ह्युबर्टस्बर्गचा तह झाला. यूरोपच्या इतिहासांत हे दोन तह महत्वाचे आहेत. कारण पारिसच्या तहामुळें ग्रेटब्रिटनचें साम्राज्य सर्व जगभर प्रस्थापित झालें व दुसऱ्या तहानें प्रशिया व आस्ट्रिया या राज्यांची योग्यता सारखी ठरली.

सप्तवार्षिक युद्धसमाप्तिकालापासून फ्रान्सच्या राज्यक्रांतीपर्यंतचा काळ संस्मरणीय गोष्टींनीं परिपूर्ण आहे. फ्रेडरिक दी ग्रेट, माराया थेरेसा हे तर असोत पण दुसरा जोसेफ, दुसरी क्याथेराइन, स्पेनचा तिसरा चार्लस, व टस्कनीचा लिओपोल्ड हे सर्व एकतंत्री पण लोकहितैषी राजे होते. टानुसी, टर्गो, स्क्विलासी, फ्लोरिडा ब्ल्यांका वगैरेसारखे मुत्सद्दी सुधारणाकांक्षी होते, तथापि या वेळीं राजनीतीचा दर्जा किती कमी झाला होता याचीं उदाहरणें सांपडतात. फ्रेडरिक दी ग्रेटनें सायलेशिया विनाकारण काबीज केला. नंतर १७७२ मध्यें पोलंडची राजनीतितत्त्वाला सोडून फाळणी झाली. तेव्हां या काळचे राजे प्रजेच्या कल्याणाची इच्छा कितीहि दाखवीत असले तरी, त्यांची समजूत सुधारणा व्हावयाच्या त्या राजेलोकांकडून झाल्या पाहिजेत, त्यांचा उगम प्रजेच्या मागणीपासून होतां कामा नये अशीच होती. या कालांत यूरोपांत घडलेल्या प्रमुख गोष्टी येणे प्रमाणें:

(१) पोलंडची फाळणी.
(२) बव्हेरियन सक्सेशन (राजवारसासंबंधीं) युद्ध.
(३) रशियाची प्रशिया व आस्ट्रिया यांच्याशीं दोस्ती.
(४) फ्रान्स व स्पेन यांचें, ग्रेटब्रिटन व अमेरिकन वसाहती यांमध्यें चाललेल्या युद्धांत पडणें.
(५) रशिया व ऑस्ट्रिया यांचा तुर्कस्थानावर हल्ला.
(६) राष्ट्रत्रिकूट अथवा त्रिराष्ट्रसंधि.

सप्तवार्षिक युद्ध संपतें न संपतें तोंच फ्रान्स आणि स्पेन यांनीं ग्रेटब्रिटनवर सूड उगविण्याचा विचार केला. फ्रान्सनें अमेरिकन वसाहतींनां मदत केली; स्पेननेंहि बव्हेरिया घेण्याची इच्छा धरली; रशिया हा यूरोपियन राष्ट्रांत वरचें स्थान पटकावण्याच्या तयारींत होता; इतक्यांत अमेरिकेशीं चाललेल्या युद्धांतून मुक्त होऊन इंग्लंडला या शत्रूंशीं सामना देण्यास अवसर मिळाला व पिटनें हॉलंड व प्रशिया यांच्याशीं दोस्तीचा तह केला (१७८८). हॉलंडमध्यें ढवळाढवळ करून वर्चस्व संपादण्याची फ्रान्सची इच्छा होती परंतु ती त्रिराष्ट्रसंधीमुळें समूळ फसली. डेन्मार्कनें स्वीडनवर मोर्चा फिरविला होता तोहि त्याजला परतवावा लागला. आणि दुसऱ्या जोसेफनंतर टस्कनीचा लिओपोल्ड बादशहा झाल्यावर नेदर्लंडमधली राज्यक्रांति संपली. शिवाय लिओपोल्डच्या मध्यस्थीनें प्रशियाचें आस्ट्रियाशीं असलेलें हाडवैर नाहींसें झालें आणि त्यांच्यामध्यें १७९० च्या जुलै महिन्यांत तह झाला. त्याचप्रमाणें यावर्षी ग्रेट ब्रिटन व स्पेन यांच्यामध्यें व १७९२ त रशियाचा तुर्कस्थानशीं तह होऊन यूरोपांतील भांडणें मिटल्यासारखीं दिसलीं. वास्तविक यूरोपमध्यें आतां शांतता असावयाची परंतु तसें न होतां उलट लढाया मात्र सुरू झाल्या व वाटर्लूचा संग्राम होईपर्यंत त्या थांबल्या नाहींत.

**फ्रान्समधील भयंकर राज्यक्रांति.**—इकडे सर्व यूरोपांत लढाया चालू असतां, व त्रिराष्ट्रसंधि करून यूरोपला शांतता देण्याचा विचार होत असतां, तिकडे फ्रान्समध्यें १७८९ सालीं भयंकर राज्यक्रांति घडून आली. अमेरिकन वसाहतींनां फ्रान्सनें मदत केल्यामुळें बादशाही खजिना रिकामा पडला. व सोळाव्या लुईला "स्टेट्सजनरल"

नांवाचें प्रातिनिधिक मंडळ 'बोलावणें भाग पडलें. त्याच-सालीं नेदर्लंडमध्यें दुसऱ्या जोसेफनें केलेल्या सुधारणांविरुद्ध चळवळ सुरू झाली व पोलंडमध्येंहि उमरावी सत्ता उलथून पाडण्यासंबंधीं अशीच खटपट चालली होती. प्रथमतः फ्रान्स-मधील राज्यक्रांति सौम्य स्वरूपाची होती. परंतु १७९१ मध्यें शासनमंडळ मोडल्यानंतर ही सौम्यता संपुष्टांत आली. या वेळीं जिरांडी पक्ष फार बलिष्ठ होता. त्यानें एक-दम राजसत्तेला शह देण्याचा धाक घातला. व यामुळें फ्रान्सला लढाईचा प्रसंग आला. लफायेत पक्ष राजाची सत्ता वाढविण्याकरितां लढाईंत अंग घेत होता. सन १७९२ त फ्रान्सनें आस्ट्रियाशीं युद्ध जाहीर केलें. फ्रेंच लोकांनां दोन लढायांत पूर्णपणें यश आल्यामुळें ऱ्हाइन नदीपर्यंत त्यांनीं मजल मारली. व बेलजम काबीज करून हॉलंडवर रोख धरला. हॉलंड ग्रेटब्रिटनच्या बाजूचें असल्यामुळें फ्रान्सचें ग्रेटब्रिटनशीं युद्ध सुरू झालें (१७९३). या युद्धांत स्पेन, सार्डीनिया आणि टस्कनी पडल्यामुळें एकट्या फ्रान्सला सर्व यूरोपशीं लढण्याचा प्रसंग आला. दोस्त राष्ट्रांत असावा तितका एकोपा नव्हता. उलट फ्रेंच लोकांचा देशाभिमान व दृढनिश्चय अवर्णनीय असल्यामुळें त्यांनीं दोस्तांची धूळधाण उडविली. सन १७९५ त दोस्त संघ मोडला व फक्त ग्रेट-ब्रिटन आस्ट्रिया व सार्डीनिया यांनीं फ्रान्सशीं युद्ध चालू ठेविलें. इटालीवर नेपोलियन बोनापार्टनें हल्ले करून पूर्णपणें यश संपादिलें. तेव्हां आस्ट्रियानें कँपो फॉरमिओ येथें व सार्डीनियानें चिरास्को येथें तह करून फ्रेंचांपासून आपली सुटका करून घेतली. फ्रान्सशीं सामना देण्याला फक्त ग्रेट-ब्रिटन मात्र उरलें. १७९९ त नेपोलियन इजिप्तमध्यें स्वारींत गुंतला आहे ही संधि साधून ग्रेटब्रिटन, रशिया व आस्ट्रिया यांनीं दुसऱ्यांदा एकजूट केली. जरी फ्रेंचांनां इटालींतून हाकून लावण्यांत आलें तरी रशियनांची स्वित्सर्लंडमध्यें व इंग्लिशांची हॉलंडमध्यें पिच्छेहाट होण्याची राहिली नाहीं. इजिप्तमधून नेपोलियन बोनापार्ट परत आल्यावर फ्रेंच कॉन्स-लेट स्थापण्यांत आलें व आस्ट्रियनांचा पाडाव झाल्यानंतर त्यांच्याशीं व इंग्रजांशीं तह करण्यांत आला (१८०३). येथपर्यंत फ्रान्सच्या राज्यक्रांतीपासून यूरोपचा फायदा झाला व १८ व्या शतकांतील राज्यकारभाराच्या जुन्या कल्पना मुळांतच हादरल्या असें म्हणतां येईल. कँपो फॉर-मिओ येथील तह झाल्यानंतर लवकरच जर्मनींत राज्य-क्रांति झाली व रोमन साम्राज्य आतां शेवटचें लयाला गेलें. अशा रीतीनें सर्व यूरोपभर मोठी क्रांति घडून आली; पण अद्याप मध्य यूरोपातील लोकांत एकराष्ट्रीयत्वाची भावना उद्भूत झाली नव्हती.

**नेपोलियनचें वावटळ.**—अमीनिराच्या तहाच्या पूर्वीच पिटनें प्रशिया व आस्ट्रिया यांच्यांत राष्ट्रीय भावना उत्पन्न करून नेपोलियनला अडथळा करण्याकरितां पुष्कळ चळवळ केली. परंतु त्याला त्याच्या हयातींत यश आलें नाहीं. उत्त-रोत्तर नेपोलियनचा विजय होत गेला व इंग्लंडलाहि तो शरण यावयाला लावील अशी स्थिति नेपोलियनला प्राप्त झाली. नेपोलियननें दूरवर विचार करून इंग्लंडवर उघडपणें स्वारी करणें सुकर नाहीं असें ठरविलें व इंग्रज मालावर यूरोपांत बहिष्कार घालण्याचा प्रथम बर्लिन डिक्रीअन्वयें हुकूम सोडला. टिलसीट येथील तह झाल्यानंतर बाल्टिक समुद्रावरचें आधिपत्य संपादन करण्याचा व स्पेन आणि पोर्तुगाल यांनां ताब्यांत ठेऊन भूमध्यसमुद्रावरचें वर्चस्व मिळविण्याचा नेपोलियनचा विचार होता. त्याचप्रमाणें पूर्वे-कडील खंड ग्रासून हिंदुस्थानांत वाढत चाललेली इंग्रज सत्ता समूळ नाहींशी करावयाची असा त्याचा बेत होता. इंग्रजांनां असें झाल्यास नाईल व ट्रॅफलगार या लढायींत मिळविलेल्या आरमारी विजयांचा कांहीं उपयोग न होऊन भूमध्यसमुद्रांत ब्रिटिश जहाजें फिरकणार नाहींत, हिंदुस्था-नांतील ग्रेट ब्रिटनचा मुलूख संपुष्टांत येईल व उपासमार होऊन त्याला शरण यावें लागेल असे नेपोलियन मनांत मांडे खात होता. यूरोपच्या सुदैवानें ही नेपोलियनची महत्त्वाकांक्षा सिद्धीस गेली नाहीं. त्याच्या वरील योजनेंत एका मागून एक सारखे अडथळे ग्रेट ब्रिटननें आणले. प्रथमतः १८०९ सालीं आस्ट्रियानें व नंतर १८१२ त रशियानें त्याचे बेत हाणून पाडिले. १८०७ सालीं कॅनिंगनें डॅनिश आरमार पकडून इंग्लंडला आणलें. हा नेपोलि-यनच्या महत्त्वाकांक्षी बेतांनां केलेला पहिला विरोध होय. १८०८ मध्यें बेलनच्या लढाईंत ३०,००० फ्रेंच सैन्य शरण आलें. स्पेन, आस्ट्रिया व जर्मनी या देशांतील लोकांत राष्ट्रीय भावना जागृत होत जाऊन बळावत चालली होती पण हें त्याच्या लक्षांत आलें नाहीं. १८१० सालीं नेपोलि-यननें आस्ट्रियाची मेरी लुई इजशीं लग्न लावलें व १८११ च्या मार्च २० ला त्याला एक मुलगा झाला. तेव्हां फ्रेंच साम्राज्य वंशपरंपरा आपल्या घराण्यांत रहावें असें त्याला वाटूं लागलें. या वेळीं नेपोलियनच्या राज्याचा विस्तार फार मोठा होता. शार्लमानचें राज्य देखील एवढें विस्तृत नव्हतें. पारिस येथें राजधानी असणारें नवें हार्लीं रोमन साम्राज्य स्थापण्याची कल्पना १८११ मध्यें मुळींच अशक्य कोटींतील ठरण्यासारखी नव्हती.

इटालींत व जर्मनींत नेपोलियननें फ्रेंच सत्ता प्रस्थापित केल्यामुळें राष्ट्रीय जागृति उत्पन्न झाली. प्रथम स्पेन देशांत तिचा प्रसार झाला. जर्मनींत तिचें अनुकरण होण्यास उशीर लागला नाहीं. स्पेनमधील विरोधक शक्तीला न जुमानतां व जर्मनींतील राष्ट्रीय चळवळीची प्रगति लक्षांत न घेतां रशि-यावर मोहीम करण्याचा जो त्यानें निश्चय केला ती त्याची अत्यंत मोठी चूक झाली. या स्वारींत त्याचें फार नुकसान न झालें. लागलीच रशिया, प्रशिया व आस्ट्रिया एक होऊन १८१३ मध्यें लिपझिग येथें नेपोलियनचा त्यांनीं पाडाव केला.

नेपोलियनचा पाडाव झाला तरी, राज्यक्रांतीच्या काळांत जुन्या राष्ट्रसंस्थांतून जे मोठे बदल करण्यांत आले होते ते पुन्हां पूर्वस्थितीला पोंचविण्याचें सामर्थ्य दोस्त राष्ट्रांमध्यें एकदम येणें शक्य नव्हतें. ज्यांच्या हातीं यूरोपचा घटना होती त्या चार महाराष्ट्रांचा उद्देश फ्रान्सला योग्य मर्यादेंत ठेवण्याचा व पुढील काळीं पुन्हां कोणतेंहि एकटेंच राष्ट्र राष्ट्रांतील शक्तींचा समतोलपणा बिघडवूं शकणार नाहीं अशी काळजी घ्यावयाची, हा होता. या उद्देशाचा पहिला भाग, फ्रान्सच्या जुन्या राजघराण्याकडे राजसत्ता सोंपवून पुन्हां राज्यक्रांति घडून येणार नाहीं अशी यूरोपला त्यानें हमी देऊन सिद्ध होण्यासारखा होता. व दुसरा भाग राजसभा भरवून यूरोपची पुनर्घटना करण्यानें तडीस जाणार होता. व्हिएन्ना येथें ही राजसभा १८१४-१५ मध्यें भरली. बहुतेक सर्व देशांचे प्रतिनिधी प्रथमच या ठिकाणीं एकत्र मिळाले असून, नवीन युगाचा तो आरंभ असें यथार्थ म्हणतां येईल. येथपर्यंत सर्व ठीक झालें. परंतु हीं नवीन तत्त्वें कृतींत उतरेनात. पुष्कळ दिवसांपासून लोकांच्या मनांत राजाच्या संबंधानें ज्या कल्पना रुजलेल्या होत्या त्या एकाएकीं नाहींशा होण्यासारख्या नव्हत्या. राजा प्रजेवर राज्य करण्याकरितां व प्रजेचे हक्क संरक्षण करण्याकरितां परमेश्वराकडून पाठविला गेला आहे ही लौकिक जुनी समजूत कायम राहून राष्ट्राधिपतींमध्यें प्रजेच्या इच्छांनां न जुमानतां व फ्रेंच राज्यक्रांति झालीच नाहीं असें समजून जगाची वांटणी करण्यांत आली.

जेंट्झच्या म्हणण्याप्रमाणें "ही लुटीची विभागणी" पुढील भांडणांनां साहजिकच कारणीभूत झाली. वार्सा येथील ग्रँड-डचीसंबंधानें ज्या वेळेस वाद उत्पन्न झाला त्या वेळेस राजे लोकांत तीव्र मतभेद उत्पन्न होऊन अखेर मजल लढाई-पर्यंत येऊन धडकली. आपलें वैयक्तिक हित यूरोपच्या हितापेक्षां गौण आहे याची या भांडत बसलेल्या राष्ट्रांनां जाणीव करून देण्यास नेपोलियनचें एल्बाहून पळून येणें अवश्यक होतें असें दिसलें. त्याच्या भीतीमुळें राष्ट्रें एक झालीं व व्हिएन्नाच्या तहाच्या अटी नक्की करण्याच्या मार्गास लागलीं. नेपोलियनला सत्ता अखेरची धुळीस मिळविणारी जी वाटर्लूची लढाई झाली तिच्या आधीं थोडेच दिवस व्हिएन्नाच्या करारनाम्यावर सह्या करण्यांत आल्या होत्या.

व्हिएन्नाच्या राजसभेनें यूरोपमध्यें जी अंतर्व्यवस्था केली ती सरासरी अर्धे शतक पर्यंत चालली होती. मुख्यतः मध्ययूरोपांतच नेपोलियननें उलथापालथ करून सोडली असल्यामुळें त्या ठिकाणीं व्हिएन्ना काँग्रेसला बरेच मोठे फरक करावे लागले. पवित्र (होली) रोमन साम्राज्य पुन्हां स्थापण्याचा मुळींच प्रयत्न करण्यांत आला नाहीं. पण जर्मनी स्वतंत्र संस्थानांचा संघ बनवून त्या वेळीं हयात असलेल्या पूर्वीच्या सर्व साम्राज्यघटकांनां वांटून देण्यांत आला.

यूरोपच्या उत्तरेस व पूर्वेस बरेच महत्त्वाचे फेरफार झाले. ग्रेट ब्रिटनचा मात्र इतरांच्या मानानें फार थोडा फायदा झाला. परंतु तो कमी महत्त्वाचा नव्हता. ग्रेट ब्रिटनला माल्टा बेट मिळाल्याकारणानें भूमध्य समुद्रावर आपली सत्ता बसवितां आली व पुढें पारिसच्या तहानें (१८१५ नोव्हेंबर ५) ती वाढली.

नेपोलियनाचें पुनरागमन झालें नसतें तर फ्रान्सला या तहांतून उजळ माथ्यानें व राज्यक्रांतीच्या युद्धांत मिळविलेल्या कांहीं मुलुखासह बाहेर पडतां आलें असतें. नेपोलियनाचा दुसऱ्यांदा पाडाव झाल्यानंतर फ्रान्सचे तुकडे तुकडे होण्याच्या बेतांत आले होते. पण १८ वा लुई जो आपल्या पूर्वजांकडून परंपरागत आलेल्या प्रदेशांचा राजा म्हणून कायम झाला त्याचें श्रेय रशियाचा पहिला अलेक्झांडर बादशहा व कॅसलरीग आणि वेलिंग्टन या इंग्लंडच्या मुत्सद्यांनां आहे. त्यांनां राष्ट्राराष्ट्रांत समतोलपणा राखावयाचा होता.

**काँग्रेस मार्फत शांतता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न.**—सरासरी २५ वर्षेंपर्यंत सारख्या लढाया चालू असल्यानें यूरोपला शांततेची अतिशय जरूरी होती. या वेळीं बहुतेक सर्व राष्ट्रें यूरोपांत शांतता कशी प्राप्त करून घेतां येईल या एकाच गोष्टीचा विचार करीत होतीं. शांततेचा विध्वंस एकटा फ्रान्स करतो असेंहि बहुमत झालें होतें. तेव्हां सर्वांनीं एक संघ निर्माण करून त्याचें नांव 'पवित्रसंघ' असें ठेविलें. तो तहाच्या स्वरूपाचा असून त्याजवर बादशाह पहिला अलेक्झांडर, बादशाहा फ्रान्सिस, प्रशियाचा राजा तिसरा फ्रेडरिक विलियम यांनीं सह्या केलेल्या होत्या (१८१५ सप्टेंबर २६). अशा तऱ्हेची मध्यवर्ती शासनसंस्था स्थापण्यांत स्वतंत्र संस्थानांचें स्वातंत्र्य जातें म्हणून ग्रेट ब्रिटनचें या संबंधानें फारसें अनुकूल मत नव्हतें. कॅसलरीगनें एला शापेलीच्या काँग्रेसमध्यें विरुद्ध बाजू घेतल्यानें "पवित्र संघाला" मूर्तस्वरूप प्राप्त झालें नाहीं.

सन १८१८ सालीं एलाशापेल येथें काँग्रेस भरली. या सभेस येण्यास फ्रान्सला परवानगी दिली. व्हिएन्नाच्या सभेंत जीं कामें करावयाचीं शिल्लक राहिलीं होतीं तीं दुसऱ्या वर्षीं फ्रांकफोर्ट येथें भरणाऱ्या मुत्सद्यांच्या परिषदेंत निकालास निघावीत असें ठरलें. हीं कामें जर्मनींतील संस्थानां-संबंधीं होतीं.

या अवधींत इकडे यूरोपियन संघांतील शक्तिसमता ढळूं लागली. अलेक्झांडर बादशहा चुळबुळ करूं लागला. त्यामुळें तो नेपोलियनपेक्षांहि जास्त जगत्शांतताभंजक ठरेल असें ग्रेटब्रिटन वगैरेंनां वाटूं लागलें. पण तो लवकरच देशांतील राज्यक्रांतिकारक चळवळीमुळें ताळ्यावर आला व ट्रोपौच्या काँग्रेसमध्यें त्यानें भाग घेतला. ट्रोपौची काँग्रेस १८२० मध्यें भरली होती. तींत रशिया, आस्ट्रिया व प्रशिया सामील होते. फ्रान्स व ग्रेट ब्रिटन आपल्या बाबतींत ट्रोपौच्या परिषदेचीं कलमें लागू करतां यावयाचीं

नाहींत म्हणून यावर सही करीनात. तेव्हांपासून दोस्त-संघांत फूट दिसूं लागली व ती पुढें वाढली व यूरोपचा राष्ट्रसंघ मोडला.

**राज्यक्रांतींची लाट.**— अशा रीतीनें यूरोपभर शांतता नांदावी म्हणून पुष्कळ प्रयत्न झाले, संघ स्थापन झाले, काँग्रेस सभा भरविल्या परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. राष्ट्रसंघानें आपली पराकाष्ठा केली पण व्यर्थ. यूरोपांत पुन्हां पूर्वीसारखी अंतर्राष्ट्रीय अराजकता शिरूं लागली. कॅनिंगला ही गोष्ट पसंत पडली. प्रत्येक राष्ट्र स्वतःकरितां आहे एक दुसऱ्याकरितां नाहीं. ईश्वर मात्र सर्वांकरितां आहे. राष्ट्राराष्ट्रांत उघडपणें चढाओढ असणें हा त्यांच्या उत्कर्षाला आवश्यक आहे असें त्याचें मत असे. अठरावें व एकोणविसावें शतक यांतील स्पर्धांमध्यें अति महत्त्वाचा फरक "राष्ट्र" या कल्पनेंत होता. कॅनिंग व व्हिएन्ना येथें जमलेले मुत्सद्दी यांनीं "राष्ट्र" याचा अर्थ "राज्य" असाच केलेला होता. राष्ट्राच्या मर्यादा तहांनीं निश्चित केल्या असतील त्या समजावयाच्या व त्या पाळणें प्रत्येकाचें कर्तव्य होऊन बसतें. पण १९व्या शतकांत या तहानें व्हिएन्ना येथील उभारलेली राजकीय इमारत मोडून पडली व पुढल्या पिढीपुढें न सुटलेले व कधीं न सुटणारे असे प्रश्न मांडून ठेविले. याच तत्वाला अनुसरून दक्षिण अमेरिकेंतली प्रजासत्ताक संस्थानांची स्वतंत्रता मान्य केली व ग्रीक बंडखोरांचे लढाऊ हक्क कबूल केले. मेटरनिक या तत्त्वाचा जबरदस्त पुरस्कर्ता होता. १८३० सालीं फ्रान्समध्यें जी राज्यक्रांति होऊन मध्यमवर्गीय शासनसंस्था स्थापन झाली त्याचें कारण राष्ट्रसंघानें यूरोपांत घडवून आणलेल्या शान्ततेमुळे देशांतील आर्थिक स्थिति सुधारून मध्यम वर्गाचे लोक वजनदार व महत्वाकांक्षी झाले. जर्मनी व इटली यांनीं राज्यक्रांतींत फ्रान्सचें अनुकरण करण्याचा यत्न केला. परंतु त्यांना यश आलें नाहीं. कारण त्यांची आर्थिक स्थिति फारशी सुधारली नव्हती. पण बेलजियम मात्र स्वतंत्र झाला (१८१५). ग्रेटब्रिटननें १८३२ सालीं 'रीफार्म बिल' पास केलें म्हणून त्यांत दंगाधोपा झाला नाहीं. १८३१–१८४१ पर्यंतच्या यूरोपांतल्या अंतर्राष्ट्रीय राज्यव्यवहारांत दोन गोष्टींमुळें मुख्यतः अनिष्ट फरक घडून येत होते. (१) फ्रान्स आणि ग्रेट ब्रिटन या पश्चिमेकडील राष्ट्रांचा रशिया, आस्ट्रिया व प्रशिया या पौर्व राष्ट्रांशीं विरोध; (२) इजिप्तचा बादशहा महंमदअल्ली यानें बंड केल्यामुळें पूर्वेकडील प्रश्नांत उडालेला गोंधळ.

**पूर्वयूरोपीय देशांचा प्रश्न.**—फ्रान्स व ग्रेट ब्रिटन एक पक्षाचे होते. तरी स्पेन प्रकरणांत या दोघांचीं फूट होण्याचा प्रसंग एकदां आलेला होता. परंतु सुदैवानें तो टळला. पुढें (१८३०) फ्रान्सनें अल्जीर्स जिंकून घेऊन आफ्रिकेंत फ्रेंच राज्याचा पाया घातला तरी ब्रिटनला त्याचें कांहीं वाटलें नाहीं. ही दोस्ती १८४० पर्यंत टिकली.

त्यावेळेस यूरोपच्या पूर्वेस असलेल्या देशांसंबंधानें पुष्कळ भानगडींचे प्रश्न उपस्थित झाले. सुलतानी राष्ट्रें व सनदशीर राष्ट्रें यांच्यामध्यें तात्त्विक मतभेद उत्पन्न होऊन फूट पडली, व १८३९–४१ मधील इजिप्तच्या महंमदअल्ली पाशाच्या बंडामुळें उत्पन्न झालेल्या पूर्वेकडील संकटमय परिस्थितींत त्या राष्ट्रांच्या धोरणांत जो फरक पडला तोहि यामुळेंच. ग्रीक बंडाच्या काळीं टर्कीवर रशियानें स्वारी करूं नये म्हणून आस्ट्रियानें प्रयत्न केला पण तो फसला. १८२८—१८२९ च्या रूसोतुर्की मोहिमांनंतर आड्रियानोपलचा तह झाला व तुर्कस्तानचा सुलतान झारचा पूर्णपणें मांडलिक झाला. परंतु १८३२ मध्यें जेव्हां सुलतान महंमदानें निकोलास बादशहाला इजिप्तच्या बंडखोरांपासून आपलें संरक्षण करावें म्हणून विनंति केली तेव्हां झारला काळ्या समुद्रावर पूर्ण ताबा मिळाला. तेव्हां यूरोपतर्फे ग्रेटब्रिटन व फ्रान्स या दोन देशांनीं या गोष्टीचा निषेध केला. आस्ट्रिया व प्रशिया आपल्या फायद्याकरितां गप्प बसले. १८३३ मध्यें, रशिया, आस्ट्रिया व प्रशिया या तिघांमध्यें तुर्क राष्ट्राच्या बचावार्थ तह झाला व एखाद्या मित्रराष्ट्राच्या विनंतीवरून या राष्ट्रसंघाखेरीज कोणालाहि त्याच्या अंतर्व्यवस्थेंत हात घालण्यास अधिकार नाहीं असें त्यांचें आपआपसांत ठरलें.

'पवित्र संघाची' ही पुनर्घटना संकुचित पायावर रचलेली होती. व तिचें चालकत्व बादशहा निकोलस याच्याकडे असल्याकारणानें तींत फेरफार करण्याचें सामर्थ्य कोणांतहि नव्हतें. हा वृहत्संग एकाएकी मोडला नाहीं. त्यानें केलेले तह अमलांतहि होतेच. परंतु १८३० मध्यें फ्रान्समध्यें राज्यक्रांति झाली तेव्हां त्यांत ब्रिटिशांच्या धोरणामुळें फूट पडूं लागली. ग्रेटब्रिटनचा मुख्य प्रधान त्यावेळेला पामर्स्टन होता. त्याला या अंतर्राष्ट्रीय व्यवस्थेची चीड असून तो उघडपणें तसें बोलून दाखवी. ज्या राष्ट्रावर जुलूम होत असेल त्याचा आपण पक्ष घेऊं असें तो म्हणत असे. उलट जर इंग्लंड आणि फ्रान्स उघड बंड पुकारून यूरोपचें स्थैर्य उलथून पाडतील तर आपल्याला दैवी सत्तेच संरक्षण करण्याचा हक्क असलाच पाहिजे असें झारने प्रशियाच्या राजाला लिहिलें. ही तत्वांतील मोठी फूट स्पेनच्या द्वीपकल्पांत झालेल्या गडबडीच्या वेळीं या राष्ट्रांनीं जी दिशा पत्करली तीवरून उघड दृष्टोत्पत्तीस आली. स्पेनचा राजा सातवा फर्डिनंड मरण पावला (१८३३ सप्टेंबर) व वारसासंबंधीं भांडणें सुरू झालीं व तीं मोडून शांतता प्रस्थापित करण्यासाठीं ग्रेटब्रिटन, स्पेन, पोर्तुगाल व फ्रान्स यांचा दोस्तसंघ स्थापन झाला (१८३४).

फ्रान्स व इंग्लंड यांची मैत्री फार दिवस टिकणारी नव्हती ही गोष्ट १८४० मध्यें फ्रान्सला वगळून ग्रेटब्रिटन, आस्ट्रिया, प्रशिया आणि रशिया यांच्यामध्यें झालेल्या एकीच्या तहावरून दिसून येते. पण पुन्हां १८४१ च्या

जुलै महिन्यांत स्ट्रेट्स कन्व्हेन्शनवर सर्वांच्या सह्या होऊन ही दुफळी थोडीफार बुजविण्यांत आली. या संघाच्या योगानें पुन्हां एकदां यूरोप एकमतानें वागूं लागल्यासारखें दिसूं लागलें.

पण जेव्हां १८४६ मध्यें क्रॅकोचें स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य क्रांतिकारक चळवळीचें केंद्र या सबबीवर रशियादि सुलतानी राष्ट्रांनीं मोडून टाकलें तेव्हां फ्रान्स व ग्रेटब्रिटन यांनींच याचा इनकार केला व ज्यांनीं नियम करावे त्यांनींच ते मोडावे अशांतला हा प्रकार होतो असें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आणिलें. १८४६ पर्यंत इंग्लंड व फ्रान्स यांच्यामध्यें स्नेहसंवर्धनार्थ फार प्रयत्न झाला. राजांनीं भेटी परतभेटी दिल्या. पण पुन्हां व्हावयाचें तेंच झालं. लुइ फिलिप बादशहा मोठा कारस्थानी असून स्पेनची गादी आपल्या वंशजाकडे रहावी याबद्दल त्याचा प्रयत्न चालू होता. ज्यांच्या आधारावर त्यांची सत्ता टिकून होती त्या आपल्या लोकांशीं सलोख्यानें न वागतां क्रांतिकारक पक्षाचा पाठिंबा मिळविण्याचा तो झटे. १८४७ मध्यें ग्रेटब्रिटनचें व आपल्या प्रजेचें न ऐकतां तो तीन सुलतानी शहांना मिळाला. व जेव्हां १८४८ मध्यें पारीस येथें क्रांति सुरू झाली तेव्हां कांहीं हातपाय न झाडतां मध्यमवर्गीय सत्ता लयास गेली.

१८४८ त आयर्लंडपासून डॅन्यूब नदीच्या किनाऱ्यापर्यंत एक मोठी राजकीय स्वरूपाची लाट उठली. यापूर्वी स्वित्सर्लंडांत उदारमतवाद्यांचा विजय, नेपल्स आणि पालेर्मोमध्यें विजयी राज्यक्रांत्या व पीडमाँटमध्यें नवीन शासनसंस्थेची घटना या गोष्टी घडून आल्या होत्या. सर्व देशांतून एकसमयावच्छेदेंकरून ज्या क्रांत्या या वेळीं घडून आल्या त्यांचीं कारणें निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं होतीं. फ्रान्समध्यें कामकरी वर्गाचा समाजसत्तावाद व मध्यम वर्गाचा विकासवाद यामध्यें झगडा होता व इंग्लंडमध्येंहि चार्टिस्ट लोकांची चळवळ कमीजास्तप्रमाणानें याच स्वरूपाची होती. उलट, जर्मनी, आस्ट्रियन साम्राज्य व इटली यांमध्यें सनदशीर व राष्ट्रीय विचारांचें प्राबल्य होतें. या धामधुमीतून पूर्वीची राज्यव्यवस्था हळू हळू डोकें बाहेर काढूं लागली न पुराणमताचा विजय दिसूं लागला.

या १८४८ च्या मोठ्या उठावणीनंतर तीन वर्षांच्या आंत सर्व ठिकाणीं क्रांतीचीं भुतें पार गाडलीं गेलीं असें दिसलें. व्हिएन्नाच्या तहानुसार यूरोपांतील राज्यपद्धति पुनस्थापित झाल्यासारखी वाटली. पण वास्तविक हें पुनःप्रस्थापन केवळ वरवर होतें. वरील क्रांतिकारक वावटळीनें उडविलेली धूळ खालीं बसते न बसते तोंच एक बोनापार्ट फ्रान्सच्या सिंहासनावर आरूढ झाला. सर्व यूरोपनें त्याच्या अधिकाराला मान्यता दिली. फ्रेंच लोकांनांहि तो प्रिय होता; कारण त्यानें फ्रान्सची समाजसत्तेच्या संकटापासून सुटका केली. १८३० मध्यें मध्यम वर्ग अधिकारारूढ झाल्यापासून समाजसत्तावाद वाढत चालला होता. १८४८ मध्यें त्यानें राज्यक्रांति करून देखील तो स्वाधिकार प्रस्थापित करूं शकला नाहीं. तिसरा नेपोलियन पहिल्या नेपोलियनप्रमाणेंच चढत चढत बादशहा झाला. त्याचे विचार त्याच्या पूर्वजासारखेच होते. तेव्हां तो लवकरच यूरोपांतील शांतता मोडणारा होईल असें सर्व राष्ट्रांस वाटलें. -हाईन, आल्प्स व पिरीनीज या फ्रान्सच्या "नैसर्गिक" मर्यादा व्हिएन्ना येथील तहामुळें संकुचित होत असल्यानें सहाजिकच फ्रान्स हा तह मानणार नाहीं असें दिसलें. राज्यक्रांतीच्या काळानंतर भौतिक सुधारणेचा काळ आला. यूरोपच्या पाठीवर आगगाड्यांचें जाळें पसरलें गेलें. १८५१ त लंडनमध्यें पहिलें विश्वप्रदर्शन भरलें. तेव्हां यापुढें अंतरराष्ट्रीय शांततेचा व सलोख्याचा काळ जाईल असें सर्वांनां वाटलें.

**क्रिमियन युद्ध.**—पण याच वेळेस 'पूर्वेस' क्रिमियन युद्ध सुरू झालें. याला मूळ कारण ग्रीक व लॅटिन मिशनमधील भांडण होय. पण रशिया व फ्रान्स हीं राष्ट्रें या भांडणांत पडलीं व त्याला युद्धाचें स्वरूप आलें. ग्रेटब्रिटन जें या युद्धांत पडलें तें तुर्की साम्राज्याचें स्वहितार्थ रक्षण करण्याकरितां म्हणून. कारण रशिया जर भूमध्यसमुद्रापर्यंत आला असता तर हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्याला धक्का पोंचला असता. पण क्रिमियाच्या युद्धानें त्याचा हेतु सफल झालेला दिसेना. कारण तुर्कस्थानची कुवत किती आहे हें पुढें दिसून आलेंच. पारीस येथें तह होऊन (१८५६) ही लढाई खलास झाली. या तहानें अंतरराष्ट्रीय कायद्याचें महत्त्व वाढविलें. तुर्कस्तान हें समान दर्जाचें राष्ट्र म्हणून गणण्यांत येऊं लागलें व काळ्या समुद्रांत व्यापार करण्याला सर्व राष्ट्रांनां मोकळीक मिळाली. ही पॅरिसची कॉंग्रेस मागल्या सर्व कॉंग्रेसपेक्षां जास्त यशस्वी झाली. बृहत्संघा (ग्रँड अलायन्स) पासून हेग परिषदेपर्यंतच्या विचारविकासाच्या मार्गांतील हा एक टप्पा म्हणतां येईल.

क्रिमियन युद्धापासून नेपोलियन बादशहाचा दर्जा वाढला. व पारिसलाहि मोठें महत्व प्राप्त झालें. १८५९ मध्यें फ्रान्स व इटली यांमध्यें सख्य घडून आलें व इटलीवरील आस्ट्रियाचा ताबा फ्रेंचांच्या मदतीनें झुगारून देण्यांत आला. फ्रान्सची "नैसर्गिक सरहद्द" परत मिळविण्याची नेपोलियनची महत्वाकांक्षा सफळ होण्याची ही वेळ होती. आल्प्सची सरहद्द परत घेतल्यावर -हाईनविषयीं प्रश्न राहिला. या वेळीं जर्मनींत फाटाफूट करून फ्रान्सला आपला कार्यभाग साधतां येण्यासारखा होता. १८६२ त प्रशियानें फ्रान्सशीं व्यापारी तह केला.

**बिस्मार्क व जर्मन साम्राज्य.**—पण १८६३ मध्यें पोलंडमध्यें बंडाळी होऊन फ्रान्सला आतांपर्यंत अनुकूल असा वहाणारा वारा प्रतिकूल वाहूं लागला. नेपोलियनला आपल्या प्रजेच्या आग्रहामुळें पोल लोकांचा पाठिराखा म्हणून पुढें यावें लागलें. यामुळें रशिया व ग्रेट ब्रिटन यांच्याशीं

त्याचें वांकडें आलें. प्रशियानें रशियाला पोल लोकांचा पाडाव करण्याला मदत दिल्यापासून त्याचें वजन वाढलें. या वेळीं बिस्मार्क हा प्रशियाचा धुरीण होता. यूरोपियन राष्ट्रसंघाला केव्हांच विचारीत नव्हतें. डेन्मार्कचा सातवा फ्रेडरिक वारल्यावर श्लेसविग–होलस्टीनसंबंधीं प्रश्नाला तोंड लागलें. जर्मनी व डेन्मार्क यांमध्यें एल्ब डचीसंबंधानें तंटा उपस्थित झाला. एका बाजूला जर्मनी व दुसऱ्या बाजूला सर्व यूरोप अशी स्थिति प्राप्त झाली. पण फ्रान्स व ग्रेटब्रिटन यासारख्या राष्ट्रांनीं सुद्धां पोलंड प्रकरणाच्या वेळेप्रमाणें शाब्दिक निषेधापलीकडे आस्ट्रिया–प्रशियाचें कांहीं एक केलें नाहीं. अशा रीतीनें प्रशियाचें बाल्टिक समुद्रांत वर्चस्व स्थापन झालें. या डेनो–जर्मन युद्धानंतर आस्ट्रो–प्रशियन युद्ध सुरू झालें (१८६६); व प्रेगच्या तहानें जर्मनीपासून आस्ट्रिया विभक्त होऊन प्रशियाच्या अधिपत्याखालीं उत्तरजर्मनसंघाची स्थापना झाली. इतकेंच नव्हे तर उत्तर समुद्रांत जर्मन सत्तेचा पाया दृढ होऊन भविष्यकाळीं इंग्लंडशीं होणाऱ्या स्पर्धेचें बीज पेरलें गेलें.

प्रशियाची मोठ्या झपाट्यानें होणारी वाढ पाहून नेपोलियनला भीति पडली. तेव्हां त्यानें फ्रान्सची ऱ्हाईनची सरहद्द मिळविण्याचा तडजोडीचा प्रयत्न करून पाहिला. पण तो सिद्धीस गेला नाहीं. त्याचे इतर सरहद्द वाढविण्यासंबंधीचे बेतहि असेच फसले. जर्मनीशीं लढाई करण्याविषयीं त्याच्या प्रजेचा त्याच्यामागें तगादा लागला; तेव्हा नाइलाजानें १९ जुलै १८७० या दिवशीं त्यानें जर्मनीबरोबर युद्ध पुकारलें. दक्षिण जर्मन संस्थानें व आस्ट्रिया यांकडून आपणाला मदत मिळेल ही नेपोलियनची आशा निष्फळ होऊन २ सप्टेंबरला त्याला प्रशियास शरण जावें लागलें. पुढें फ्रेंच साम्राज्य नष्ट होऊन एक तात्पुरतें प्रजासत्ताक राज्य फ्रान्समध्यें स्थापण्यांत आलें. अलसेस लोरेन प्रांत जर्मनीला देऊन तह करण्यांत आला (१८७१).

या वेळीं हें जें जर्मन साम्राज्य बळावलें तें पुढें परवांच्या महायुद्धापर्यंत तसेंच टिकलें, इतकेंच नव्हे तर सर्व यूरोपवर त्यानें वचक बसविला. यूरोपच्या प्रादेशिक व्यवस्थेंत मोठी उलथापालथ घडून आली. मुख्यतः १८६६ च्या युद्धानें आस्ट्रियन राजसत्तेची पुनर्घटना झाली; इटली संयुक्त होऊन स्वतंत्र राज्यपद पावला; व पोपांची ऐहिक सत्ता लयास गेली. फ्रान्सच्या पाडावामुळें झालेली दुसरी विशेष गोष्ट म्हणजे, १८५५ च्या पॅरिसच्या तहांत काळयासमुद्रासंबंधीं ज्या अटी रशियावर लादल्या गेल्या, त्या त्यानें आतां झुगारून देण्याचा बेत केला. या कामीं बिस्मार्कची त्याला फूस होती. ग्रेट ब्रिटननें अंतर्राष्ट्रीय विश्वासघाताच्या मुद्द्यावर याचा इनकार केला. पण बिस्मार्कनें १८७१ मध्यें लंडन येथें एक परिषद भरवून मोठ्या मुत्सद्देगिरीनें, यावर पांघरुण घातलें, असो.

जर्मनीला आपलें साम्राज्य चांगलें सुसंघटित होईपावेतों कोणा प्रतिस्पर्ध्याशीं टक्कर देण्याचें टाळणें भाग होतें. व या दिशेनें प्रयत्न म्हणून रशिया व आस्ट्रिया यांच्याशीं त्याचें होइतों तिनें सख्य राखण्याचा प्रयत्न केला. रशियापासून फारशी भीति नव्हती; कारण त्यानें बिस्मार्कला वेळोवेळीं त्याचे धाडसी बेत सफळ करण्यांत मदतच केली होती व बिस्मार्कहि हें जाणून रशियाशीं वागत असे. पण आस्ट्रिया मात्र फ्रान्सचा पाडाव होईपावेतों जर्मनीवर दांत ओठ खात होता. पण पुढें आपली एकाकी स्थिति लक्षांत घेऊन त्यानेंहि बिस्मार्कशीं स्नेह केला. १८७२ मध्यें रशिया व आस्ट्रिया यांचे बादशहा बर्लिनच्या विल्यम बादशहाला भेटण्यास आले व त्या ठिकाणीं बराच खल होऊन एकमेकांनीं एकमेकांना युद्धप्रसंगीं मदत देण्याचें ठरलें. अशा रीतीनें या तीन बलिष्ठ बादशहांची मैत्री नवजर्मनसाम्राज्याच्या प्रगतीला हितावह झाली.

हा या राष्ट्रांमध्यें झालेला सलोखा फार दिवस टिकणारा नव्हता. प्रत्येक जण आंतून स्वहितार्थ दुसऱ्याला लुबाडण्याची मसलत करीतच होता, पण वरून मात्र स्नेह दाखवीत होता. फ्रान्सच्या बाबतींत रशिया व जर्मनी यांचा मतभेद होता. जर्मनीच्या मनांत फ्रान्सला जास्त खची करावयाचा होता पण रशियाचें म्हणणें असें होतें कीं, जर्मन साम्राज्याला वेसण म्हणून फ्रान्स जोरकस राहिलेंच पाहिजे. तेव्हां रशियानें व ग्रेट ब्रिटननेंहि फ्रान्स करितां विल्यम बादशहाशीं रदबदली केली व त्यामुळें फ्रान्स बचावला व यूरोपची शांतता यावेळीं भंग पावली नाहीं. पण बिस्मार्कच्या मनांत रशियाविषयीं तेढ उत्पन्न होऊन तो रशियाला फ्रान्सच्या शत्रुत्वांत आपला मित्र म्हणून गणीना.

१८७५ च्या उन्हाळ्यांत हर्झेगोव्हिनामध्यें ख्रिस्ती स्लाव्ह लोकांनीं बंड केलें. त्याला मॉंटेनिग्रो आणि सर्व्हिया यांनीं पाठबळ दिलें व रशिया आणि आस्ट्रिया यांचीहि आंतून सर्व्हियामॉंटेनिग्रोला फूस होती. जेव्हां तुर्कसरकार व हे देश यांची लढाई जुंपली तेव्हां रशिया आणि आस्ट्रिया यांनीं १८७६ मध्यें आपआपसांत करार करून लढाईचा शेवट बरावाईट झाल्यास काय करावयाचें तें ठरविलें. पण जेव्हां आपल्या संरक्षणाखालीं असलेल्या राष्ट्रांचा पराभव होत आहे असें रशियानें पाहिलें तेव्हां तो त्यांच्या मदतीस धांवला. पण यामुळें लढाई थांबून तह झाला, व आस्ट्रो–रशियन करार रद्द ठरला. हा करार बाजूला सारण्याला दुसरेंहि एक मोठें कारण झालें.

१८७६ च्या जून महिन्यांत तुर्की लोकांनीं बलगेरियांतील बंडाळी, भयंकर कत्तल व जुलूम करून जेव्हां मोडली तेव्हां यूरोपांतील सर्व राष्ट्रांनीं तुर्कस्थानाला ताळ्यावर आणण्याचा व त्याच्या हस्तें देशांत सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न केला पण तो फसला. तेव्हां रशिया एकटा या कामास उद्युक्त झाला. त्यानें प्रथम जर्मनी व आस्ट्रिया यांचा पाठिंबा

फिलिस्तिन, मग आशियामायनर व यूरोपमधील तुर्की मुलखावर हल्ला करून तुर्कांनां तह करणें भाग पाडलें. या सॅन स्टेफॅनोच्या तहाचीं कलमें ऑस्ट्रियाला न आवडून त्यानें यूरोपियन कॉंग्रेस जो निकाल देईल तो आपण मान्य करूं असा हेका धरिला. ग्रेट ब्रिटननेंहि त्याचा अनुवाद केला. बिस्मार्क ऑस्ट्रियाची समजूत पाडण्याला तयार होईना.

तेव्हां या प्रसंगीं रशियाची स्थिति फार चमत्कारिक झाली. आस्ट्रिया व इंग्लंड एक झालें तर कॉन्स्टंटिनोपलमधील आपल्या सैन्याशीं दळणवळण ठेवतां येणार नाहीं, कारण जलमार्ग इंग्लंडनें व स्थलमार्ग आस्ट्रियानें आपल्या ताब्यांत ठेविला होता. अशा वेळीं त्यानें इंग्लंडशीं गुप्तपणें करार करून बर्लिनकॉंग्रेसची बैठक घडवून आणली. या बैठकींत सॅनस्टेफॅनो तहामध्यें थोडाफार फरक करण्यांत आला. रशिया व आस्ट्रिया, यांनां पाहिजे होते ते मुलुख मिळाले, सायप्रस ब्रिटिशांकडे आलें, पण रशियाला बिस्मार्कच्या तटस्थपणाचा बराच राग आला व त्यांच्यांतील, सख्याचा तह मोडून उलट एकमेकांविरुद्ध दुसऱ्या राष्ट्रांची मदत दोघेहि पाहूं लागले.

हा सख्यांत पडलेला बिघाड दोघांनांहि अनिष्ट असल्यानें १८८१ सालीं नवा रशियन बादशहा तिसरा अलेक्झांडर यानें जर्मनी व आस्ट्रिया या दोघांशींहि गोडीचें वर्तन ठेवून तीन वर्षांनीं पुढें होणाऱ्या "त्रिसम्राट संघाचा (थ्री एम्परर्स लीग)" पाया घातला.

**इटलीचें राजकारण.**—फ्रँको—जर्मन युद्धापासून व विशेषतः बर्लिनची कांग्रेस झाल्यापासून इटालियन सरकार आपल्या परराष्ट्रीय धोरणाच्या बाबतींत अस्वस्थ व अनिश्चित बनलें होतें. ऑस्ट्रियाच्या कक्षेंतून फ्रान्सनें त्याला सोडविलें खरें, पण तेव्हांपासून एकमेकांच्या मनांत एकमेकांविषयीं तेढ पडून राहिली. त्याला कारणेंहि पुष्कळ झालीं. म्हणून बाल्कन द्वीपकल्पाच्या बाबतींत मोठें यूरोपीय युद्ध होणार असें वाटलें तेव्हां इटली तटस्थ राहिला व आपणाकडे राष्ट्राराष्ट्रांतील न्याय निवडण्याचा अधिकार येईल अशी साहजीकच त्याला आशा वाटली. पण तसें कांहीं न होतां उलट बर्लिनच्या कॉंग्रेसमध्यें सर्व राष्ट्रांनां थोडाफार प्रसाद मिळाला तेव्हां इटली मात्र कोरडाच राहिला. आपलें अलिप्त राहण्याचें धोरण चुकीचें आहे असें तेव्हां त्याला कळून आलें व कोणाशीं तरी निकट स्नेह करावा अशी इच्छा त्याच्या मनांत उद्भवली. पण सख्य कोणाशीं करावें हा विचार त्याला पडला. आणखी एका गोष्टीनें या विचाराला जोराचें चालन दिलें ती गोष्ट म्हणजे फ्रान्सनें ट्यूनिस आपल्या संरक्षणाखालीं ओढलें ही होय. वास्तविक ट्यूनिसवर ऐतिहासिक हक्काच्या व राष्ट्रीय हिताच्या दृष्टीनें इटलीचा ताबा असावयास पाहिजे होता. तेव्हां फ्रान्सच्या या अपकृत्यानें इटलीला परक्या राष्ट्रांच्या सख्याची जरूरी भासली व त्यामुळें १८८२ च्या मे महिन्यांत त्यानें बर्लिन व व्हिएन्ना सरकारशीं सख्याचा तह केला.

**रशियन राजकारण.**—बिस्मार्कला फ्रँको-रशियन सख्याची भीति वाटत असल्या कारणानें त्यानें रशियाकडे पुन्हां मैत्रीचा तह करण्याविषयीं बोलणें लाविलें. रशियालाहि निहिलिस्ट चळवळयांची धास्ती वाटत होती. जेव्हां त्यानें या तहाला कबुली दिली तेव्हां १८८४ सालीं आस्ट्रिया, जर्मनी व रशिया या तीघां सम्राटामध्यें तह घडून आला. या तहामुळें आस्ट्रिया-जर्मनीच्या इटलीबरोबर झालेल्या तहाला बाध येणारा नव्हता. हे तह घडवून आणण्यांत बिस्मार्कचा हेतु फ्रान्सला अगदीं विभक्त ठेवावयाचा व रशियाला आस्ट्रोजर्मनांच्या दाव्याला बांधून टाकण्याचा होता. शिवाय बाल्कन द्वीपकल्पाच्या भांडणांत आस्ट्रिया व रशिया यांचा न्याय निवडण्याची संधि त्याला मिळणार होती. हें त्रिसम्राटसंघाचें नवें रूप फार दिवस टिकणारें नव्हतें. शांततेच्या काळांत फक्त त्याचा अम्मल चालण्यासारखा होता. जेव्हां बल्गेरियाचा राजा रशियाविरुद्ध चळफड करूं लागला व रशियाची ताबेदारी झुगारून देण्याचा प्रयत्न करूं लागला तेव्हां पुन्हां दुसरें बाल्कन युद्ध होतें कीं काय अशी भीति यूरोपभर पसरली व प्रसंगहि तसाच आला होता पण आस्ट्रियन सरकारच्या मध्यस्थीनें पुन्हां सर्वत्र समेट घडून आला. तथापि रशिया व बल्गेरिया यांच्यात वितुष्ट राहिलेंच.

बाल्कन द्वीपकल्पांत घडत असलेल्या या गोष्टींमुळें त्रिसम्राटसंघाला धक्का न बसणें अशक्य होतें. रशियाला जर्मनी आंतून आस्ट्रियाला आपल्याविरुद्ध फूस देतो असा बळकट संशय पूर्वीपासून होताच; तो पुढें दृढ झाला. रशियन व जर्मन वर्तमानपत्रांनीं तर उघड उघड याविषयीं खल चालविला. रशिया जर्मनीच्या मुत्सद्देगिरीच्या बंधनांतून सुटण्याची इच्छा करूं लागला. उलट बिस्मार्क हें बंधन जास्त घट्ट करूं पहात होता. पण १८९० सालीं त्रिसम्राटसंघाची मुदत जेव्हां संपली तेव्हां रशियानें पुन्हां अशा संघात हात गुंतवून घेण्याचें साफ नाकारलें.

फ्रान्स आणि रशिया यांच्यामध्यें एकमेकांला युद्धप्रसंगीं मदत करण्याचा कोठल्याहि प्रकारचा करारमदार नव्हता. तरी हीं दोन राष्ट्रें मोठ्या युद्धाचा प्रसंग उद्भवल्यास एका बाजूचीं होतील अशी सर्वांनां खात्री होती. प्रथम बिचकत बिचकत पण पुढें धीटाईनें एकमेक परस्परसंबंध आणूं लागले. रशिया परस्परसंरक्षणार्थ सख्याचा करार करून टाकण्याला नाखूष दिसला; कारण त्याला फ्रान्स सरकाराच्या टिकाऊपणाविषयीं शंका होती. शिवाय असा करार केल्यास लगेच फ्रान्स जर्मनीवर चालून जाईल असें त्याला वाटलें. पण पुढें असा करार झाला असावा असें दिसतें. तो गुप्तपणें झाला असल्यानें त्याविषयीं नक्की माहिती नाहीं. १८९५ मध्यें फ्रान्सच्या अध्यक्षानें प्रथम उघडपणें या फ्रँको-रशियन सख्याचा उल्लेख केला. या तहाच्या भागांत

रशियाचा वरचढपणा असल्यानें त्यानें फ्रान्सला फारसें उच्छृंखल होऊं दिलें नसावें.

**युरोपीय राष्ट्रें व जगाची विभागणी.**—या सलोख्याच्या परिणामासंबंधीं फ्रेंच लोकांनां जी मोठी आशा वाटत होती ती फलद्रूप झाली नाहीं. १९०४–५ च्या रुसो–जपान युद्धानें रशिया अति निर्बल झाला व त्याचें युरोपांतील श्रेष्ठ स्थान जर्मनीकडे गेलें. तेव्हां फ्रान्सला अशा दुबल मित्राचा काय कामाचा असें साहजिकच वाटून त्याच्या जागीं जर्मनी व इंग्लंड यांपैकीं कोणाला बसवावें हा विचार त्याला पडला. कोणाशींहि सख्याचा करार केला तरी नुकसानी सोसावी लागणारच. जर्मनीशीं सख्य केल्यास अलसेस व लोरेन हे आपले प्रांत परत मिळविण्याची आशा सोडावी लागणार व इकडे इंग्लंडकडे वळल्यास इजिप्तवरील त्याचें वर्चस्व कबूल करावें लागणार; तेव्हां या पेचांत सांपडून शेवटीं फ्रान्सनें इंग्लंडशीं १९०४ मध्यें एक सामान्य करार केला व त्याअन्वयें इजिप्तमध्यें त्याला मोकळीक दिली; उलट इंग्लंडनें फ्रान्सला मोरोक्कोंत स्वतंत्रता ठेविली.

अशा रीतीनें युरोपखंडांतील राष्ट्रांचे दोन वर्ग पडून, युरोपांत शांतता व सत्तासमता राहिली. याचा परिणाम असा झाला कीं, १९ व्या शतकाच्या अखेरपर्यंत वारंवार जीं कांहीं भांडणें वगैरे उपस्थित झालीं त्यांची मीमांसा नीट लागली. यांत जे कांहीं महत्त्वाचे प्रश्न अंतर्भूत झाले होते त्यांचा निर्देश सविस्तरपणें केलेला बरा.

**आर्मेनिया.**—१८७७—७८च्या रूसोतुर्की युद्धानें आर्मेनियाची बाजू प्रामुख्यानें पुढें मांडिली. सॅन स्टेफॅनो व बर्लिन येथें झालेल्या तहांतून तुर्कीसरकारनें आर्मेनियन लोक रहात असलेल्या प्रांतांची सुधारणा व त्यांचें सर्कासियन व कुर्द लोकांपासून संरक्षण करण्याबद्दल कबूली दिली होती, पण त्याप्रमाणें तुर्की सरकारची वागणूक मुळींच दिसेना. मुसुलमान व आर्मेनियन यांचें हाडवैर असल्यासारखें झालें. शिवाय आर्मेनियननांमध्यें जागृत होणारी राष्ट्रीयत्वाची भावना व त्यांचें संरक्षण करण्याची इतर युरोपीय राष्ट्रांनीं पत्करलेली जबाबदारी यामुळें तर सुलतानाला ते साम्राज्याचे शत्रू असे भासूं लागले. पुष्कळ वर्षेपर्यंत या गांजणुकीची उपेक्षा केल्यावर व आपल्या हितचिंतकांनां आपली पाठीराख करितां येत नाहीं असें पाहून आर्मेनियनांनीं बंड केलें. त्याचा परिणाम म्हणजे, १९७६ मध्यें बल्गेरियनांप्रमाणें यांचीहि कत्तल करण्यांत आली; पण बल्गेरियनांना मिळालें त्याप्रमाणें स्वातंत्र्य मात्र यांस मिळालें नाहीं. १८९५–९६ मध्यें ही जी आर्मेनियनांची कत्तल कॉन्स्टंटिनोपल व आशियामायनर मधील अनेक शहरें यांतून करण्यांत आली तिची वार्ता सर्वत्र पसरून सुलतानाला पुन्हां युद्धाचा धाक घालण्यांत आला. इंग्लंड व इटली यांनीं या कामीं पुढाकार घेतला. इतर राष्ट्रें मात्र कोरडी सहानुभूति व्यक्त करूं लागलीं. अशा स्थितींत सुलतानाला कांहींच अरब बसली नाहीं. कांहीं कागदी सुधारणा करून या युरोपीयन राष्ट्रांनां त्यानें गप्प बसविलें. आर्मेनियनांचा छळ कमी नव्हे तर अस्तच चालू राहिला. युरोपियन राष्ट्रांची मात्र एकजूट मात्र कायम राहिली व युद्धाचें अरिष्ट टळलें.

**क्रीट.**—पूर्वेकडची भानगड उपस्थित करण्याचा दुसरा प्रयत्न ग्रीकांनीं केला. १८९७मध्यें क्रीटबेट ग्रीसच्या राजाच्या अमलाखालीं आणण्याचा प्रयत्न झाला. तेव्हां इतर राष्ट्रांनीं त्याला हरकत घेतली व ग्रीकांनां आपलें सैन्य तेथून परत बोलावण्याविषयीं हुकूम केला पण ग्रीकांनीं तो मानला नाहीं. तेव्हां तुर्कस्तानानें आपल्या मुलुखांत ग्रीकांनीं प्रवेश केला म्हणून त्यांविरुद्ध लढाईचें शिंग फुंकलें व उभयतांमध्यें थोड्या चकमकीहि उडाल्या. हा रक्तपात टळावा म्हणून राष्ट्रसंघानें मोठी खटपट करून तह घडवून आणला. या प्रमाणें दुसऱ्यांदा या युरोपीयन राष्ट्रसंघानें शांतता राखण्यांत यश मिळविलें.

**आफ्रिका.**—जगाच्या निरनिराळ्या भागांत आपल्या वसाहती असाव्या अशी सर्व राष्ट्रांनां इच्छा असणारच व तीमुळें प्रतिस्पर्धा उत्पन्न होणारच. तेव्हां आफ्रिकेंत इंग्लंडचीं फ्रान्स व जर्मनी यांबरोबर वसाहतींसंबंधीं भांडणें झाल्यास नवल नाहीं. फक्त दक्षिण आफ्रिकेशिवाय इतर ठिकाणीं वसाहती स्थापण्याचा इंग्लंडचा मूळ उद्देश नव्हता; फक्त व्यापाराकरितां किनाऱ्यावरचीं कांहीं ठिकाणें त्याच्या ताब्यांत होतीं. पण फ्रान्स जेव्हां मुलुखगिरी करून व्यापार वाढवूं लागला तेव्हां मात्र इंग्लंडला पूर्वीचें धोरण बदलून फ्रान्सचें अनुकरण करावें लागलें. आफ्रिकेची वांटणी करण्यांत इंग्लंड फ्रान्सला अनेक सवलती ठेवी पण भूमध्यसमुद्राचीं दोन प्रवेशद्वारें मात्र आपल्या हातचीं जाऊं देण्याला तें तयार नसे. यामुळें इजिप्त व मोरोक्को यांसंबंधीं या दोन राष्ट्रांमध्यें कायम भांडणें चालू रहाण्याची धास्ती होती. १८८२ मध्यें इजिप्तांत उद्भवलेलें आरबी पाशाचें बंड मोडून टाकण्याच्या कामीं इंग्लंडनें फ्रान्सची जेव्हां मदत मागितली तेव्हां फ्रान्सनें ती दिली नाहीं. इजिप्त आपल्या ताब्यांत कायमचें असावें अशी इंग्लंडची इच्छा नव्हती पण फ्रान्सनें तें बळकावूं नये म्हणून इंग्लंडला तें आपल्या संरक्षणाखालीं ठेवणें भाग होतें व या कारणाकरितांच एकदां इंग्लंड व फ्रान्स यांच्या दरम्यान मोठें युद्ध होण्याचा प्रसंग आला होता.

**मोरोक्को.**—मोरोक्कोमध्यें फ्रान्स व इंग्लंड यांमधील चुरस कमी तीव्र होती पण वरच्या इतकीच त्रिकाटीची व त्रासदायक होती. तेथील सुलतानाच्या राज्याचा आपल्या उत्तर आफ्रिकेंतील फ्रेंच राज्यांत समावेश करण्याबद्दल फ्रान्सची धडपड चालू होती; उलट आपल्या व्यापारी चळवळीस धोका येऊं नये म्हणून फ्रान्सची सत्ता त्या प्रांतांत न बसावी अशी इंग्लंडची खटपट होती. अखेर १९०४ मध्यें इजिप्तप्रमाणें मोरोक्कोसंबंधानेंहि या दोन राष्ट्रांत तहनामा

होऊन फ्रान्सला शांततेच्या मार्गानें मोरोक्कोंत सत्ता वाढविण्याची इंग्लंडनें परवानगी दिली. त्यांत जिब्राल्टरच्या दक्षिण किनार्‍यावर मात्र फ्रान्सनें कोणतेंहि तटबंदीचें काम करूं नये अशी अट घातली. पुढें मोरोक्को प्रकरणांत फ्रान्सशीं जर्मनीनें विरोध सुरू केला, पण अखेर १९०९ सालीं त्या दोघांतहि तडजोड झाली. आफ्रिकेंतील मुलुखाच्या वांटणीसंबंधानें जर्मनीबरोबर इंग्लंडचाहि वाद कांहीं काळ चालून अखेर आपसांतील समजुतीनेंच प्रकरण मिटलें. १८९० मध्यें हेलिगोलंड बेट जर्मनीला देऊन पूर्व आफ्रिकेंत बर्‍याच सवलती इंग्लंडनें मिळविल्या होत्या. दक्षिण पासिफिक महासागरांतील लढयाचा निकाल १८८६ एप्रीलच्या अँग्लो-जर्मन करारानें लावून आस्ट्रेलिया खंडाच्या उत्तर व पूर्व बाजूकडील बेटांवरील सत्ताक्षेत्राबद्दलची वांटणी ठरविण्यांत आली; आणि १८९९ मधील करारानें जर्मनीनें सामोया घेऊन टाँगा आर्चिपेलागोमधील सर्व हक्क सोडून इंग्लंडला दिले.

आशिया.—आशियामध्येंहि मुलूख मिळवावा व आपआपल्या व्यापारधंद्यांकरतां नव्यानव्या बाजारपेठा काबीज कराव्या या अहमहमिकेनें यूरोपमधील राष्ट्रांत वरचेवर तंटे उपस्थित होत आले आहेत. इंग्लंड व रशिया यांच्यामध्यें मध्य आशियावरील सत्तेसंबंधीं वाद चालू आहेत पण उभयतांच्या सरहद्दींच्या मर्यादा बर्‍याच निश्चित होत गेल्या तसतसे वाद कमी होत आले आहेत. १८७२-७३ मधील मुख्य करार होऊन नंतर १८८७ मधील करार (प्रोटोकोल) व १८९० मधील पामीरच्या सरहद्दीविषयक करारामुळें रुसो-अफगाण सरहद्द पूर्वेस चीनच्या साम्राज्यापर्यंत जाऊन भिडली; व तेणेंकरून रशिया व ब्रिटन यांच्या आशियांतील सरहद्दी निश्चित झाल्या. आशियांतील दुसरें भांडण इंग्लंड व फ्रान्स् यांच्यामधलें. १८८५ मध्यें इरावती नदीच्या उगमाकडील प्रदेशांत फ्रेंचांनीं पाऊल रोंविलें; उलट इंग्लंडनें शान संस्थानें व थिबो राजाचा मुलूख मिळून पूर्वेकडे मेकांगपर्यंत मुलूख आपल्या साम्राज्यास जोडला. त्यावर फ्रान्सनें इंडो-चायनांतील आपली सरहद्द पश्चिमेकडे पुढें ढकलून सयामच्या राज्यावर १८९३ मध्यें हल्ला चढविला व त्यामुळें इंग्लंडशीं संबंध आला. त्या प्रकरणांचा निकाल उभयतांनीं १८९६ जानेवारीच्या करारानें लावला व मेनाम दरीमधील संस्थान स्वतंत्र ठेवून तेथपर्यंत आपल्या सरहद्दी ठरविल्या. पूर्व चीनमध्येंहि या यूरोपीय राष्ट्रांचा लढा चालू होऊन त्याला अधिक बिकट स्वरूप आलें. चीनबरोबर मोठमोठ्या मुदतीचे करार करून प्रथम जर्मनी; नंतर रशिया व इंग्लंड व शेवटीं फ्रान्सनें चीनच्या मुलुखावर आपआपली सत्ता बसविली. त्या योगानें चिनी सरकारांत व चिनी लोकांत बरीच खळबळ उत्पन्न होऊन अखेर बॉक्सर बंड उद्भवलें व त्यामुळें १९०० मध्यें पेकीनमधील परराज्यांच्या वकिलातीवरहि हल्ले झाले.

१८९९—१९०१ मध्यें दक्षिण आफ्रिकेमध्यें बोअर युद्ध सुरू होऊन यूरोपमधील राष्ट्रांतील संबंध बिघडण्यास आणखी एक कारण उपस्थित झालें. यूरोपमधील बहुतेक देशांत इंग्लंडबद्दल प्रतिकूल मत माजून त्या संधींत ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध भांडणारा राष्ट्रांचा एक संघहि बनेल असें चिन्ह दिसूं लागलें. परंतु ब्रिटिश सरकारच्या निश्चयी धोरणामुळें व वसाहतवाल्यांची साम्राज्यनिष्ठा अचल असल्यामुळें कोणतेंहि यूरोपीय राष्ट्र बोअर लोकांचा पक्ष घेण्यास धजावलें नाहीं, इतकेंच नव्हे तर बोअर लोकांच्या मुलुखांत स्वातंत्र्य पण अंदाधुंदी माजून राहिल्यानें कोणत्याहि यूरोपीय राष्ट्राचें त्यांत हित नाहीं असेंहि सर्वांस मान्य झालें.

**शांतता-परिषद.**—१८७०-७१ मधील युद्धानंतर यूरोपच्या इतिहासांत एक विशेष गोष्ट दिसून येते. ती म्हणजे मोठाल्या राष्ट्रांत चालू असलेली युद्धसामुग्रीची व शस्त्रास्त्रांची वाढ व करांचा वाढता बोजा. या गोष्टींचा रशियाचा तरुण बादशहा दुसरा निकोलस याच्या मनावर इतका परिणाम झाला कीं, ही अनर्थावह वाढ थांबविण्याकरितां राष्ट्रांनीं एकत्र जमून करारमदार करावे असें त्यानें सुचविलें. त्याप्रमाणें १८ मे १८९९ ते २९ जुलै पर्यंत हेग येथें बैठकीहि झाल्या पण उद्दिष्ट हेतु साधला नाहीं.

हेग येथें भरलेली ही पहिली परिषद व १९०७ मध्यें झालेली दुसरी परिषद यांनीं जगाला युद्धापासून होणारे अनर्थ टाळण्याची हमी दिली नाहीं तरी आंतरराष्ट्रीय भानगडींच्या प्रश्नांत शांततेच्या मार्गानें निकाल लावण्यास तयार असें लोकमत मात्र बरेंच उत्पन्न केलें. १९ व्या शतकाप्रमाणेंच २० व्या शतकांत यूरोपीय राष्ट्रांतील तुरस कायम असल्यामुळें त्यांच्यांत ऐक्यभाव नांदणें अशक्य होतें. १९०१ मध्यें हेग येथें स्थापन झालेल्या न्यायकोर्टानें व इंग्लंडचा राजा सातवा एडवर्ड या शांततावादी राजाच्या प्रयत्नांनीं यूरोपमधील राष्ट्रांतले बरेच प्रश्न आपसांतील तडजोडीनें मिटले हें खरें आहे तथापि कित्येक पिढीजाद वैरी असलेल्या राष्ट्राराष्ट्रांतील भानगडी 'बळी तो कान पिळी' या न्यायानें शस्त्रास्त्रांच्या जोरावरच अखेर मिटणार हें उघड दिसत होतें. क्रीट, आर्मेनिया व आफ्रिका येथील भांडणासंबंधाचा उल्लेख वर आलेलाच आहे. १९०५ आक्टोबरमध्यें स्वीडन व नार्वे यांचें भांडण शांततेनें मिटून नार्वेचें स्वतंत्र अस्तित्व मान्य करण्यांत आलें. ग्रेटब्रिटन, फ्रान्स, जर्मनी, डेन्मार्क, स्वीडन व हॉलंड यांच्यामध्यें उत्तरसमुद्रावरील हक्कासंबंधाचा प्रश्नहि शांततेनेंच मिटला. त्याचप्रमाणें फ्रान्स व स्पेन आणि स्पेन व ग्रेटब्रिटन यांमधील भूमध्यसमुद्रावरील हक्कासंबंधाच्या तडजोडी शांततेनें पार पडल्या. इराणावरील वर्चस्व व हिंदी साम्राज्याची उत्तरेकडील सरहद्द यांविषयीं रशिया व ग्रेटब्रिटन यांचे करार १९०७ मध्यें शांततेनेंच झाले व त्यामुळें रुसो-जपानी

युद्धानें कमी झालेलें रशियाचें वजन थोडेंफार वाढण्यास मदत झाली. १९०८ जूनमध्यें रेव्हल येथें रशियाच्या व इंग्लंडच्या बादशहांनीं मोठ्या सौजन्यानें एकमेकांच्या भेटी घेतल्या.

**यूरोपपूर्वस्थ देशांच्या प्रश्नाची पुन्हां उचल.**—वरील सर्व प्रश्नांपेक्षां मासिडोनियांतील अस्वस्थतेविषयींचा प्रश्न फार बिकट होता. येथें ग्रीक, बल्गेरियन व सर्व्हियन या तीन प्रमुख बाल्कन जातींमध्यें आपसांत मोठें वैर माजलें होतें. शिवाय तिकडील मुलुखासंबंधानें यूरोपांतील बड्या राष्ट्राराष्ट्रांची व मुसुलमानांची चुरस होतीच. १९०३ मध्यें रशिया व आस्ट्रिया यांच्यामध्यें कांहीं करारमदारहि झाले पण त्यांचा उपयोग झाला नाहीं. ग्रीक सैन्यानें व बल्गेरियन सैन्यानें खेड्यापाड्यांतील गरीब लोकांच्या कत्तली केल्या; त्यामुळें १९०८ मध्यें एकंदर प्रकरण हातघाईवर आलें. बड्या यूरोपीय राष्ट्रांनीं आटोमन अधिकाऱ्यांच्या सहाय्यानें मध्यें पडण्याचा प्रयत्न केला, परंतु तुर्की सरकारनें विरोध केला. मुसुलमानी सत्ता झुगारून देण्याच्या उद्देशानें चालू असलेल्या वरील ख्रिस्ती लोकांतील आपसांतील कत्तली स्वस्थपणें पहात बसणें सुलतानास पसंत पडलें याबद्दल त्याच्याकडे दोष नाहीं. स्वतःचे हक्क नाहींसे करण्यास सुलतानाची मदत मिळणें शक्य कसें होणार? मासिडोनियावर सुलताननेंच मुसुलमान गव्हर्नर नेमावा व जरूर तर त्याला काढून टाकण्याचा अधिकार यूरोपीय राष्ट्रास असावा ही इंग्लंडची सूचनाहि कोणास मान्य होईना.

अशा परिस्थितींत १९०८ आक्टोबर मध्यें अकस्मात तुर्कस्तानांत राज्यक्रांति होऊन सर्वच परिस्थिति पार बदलली. तरुण तुर्कांनीं मिळविलेला विजय व त्यांनीं सुरू केलेली राज्यपद्धति या गोष्टींनीं जगाला चकित करून सोडलें. पूर्वेकडील प्रश्न आतां सोयीनें सुटेल असा रंग दिसूं लागला. आक्टोबर ५ रोजीं फर्डिनांड राजानें आपण बल्गेरियाचा स्वतंत्र राजा झाल्याचें जाहीर केलें. नंतर दोन दिवसांनीं बोस्निया व हर्झेगोविना हे प्रांत आपल्या राज्यास जोडल्याचें फ्रॅन्सिस जोसेफ बादशहानें जाहीर केलें. ही गोष्ट आस्ट्रियाहंगेरीनें १८७१ मधील कराराच्या विरुद्ध केली. त्यामुळें इतर यूरोपीय राष्ट्रें तक्रार करूं लागलीं पण द्विराज साम्राज्याच्या बॅरन व्हान एहूँथल या जर्मन परराष्ट्रप्रधानानें मोठ्या हुषारीनें रशियाला व इतरांनां गप्प बसविलें. या वेळीं आस्ट्रियाहंगेरीला जर्मनीचें पूर्ण पाठबळ असल्यामुळें ग्रेटब्रिटन, फ्रान्स व रशिया दांत ओंठ खात युद्धाच्या तयारीस लागले असतांहि सर्व भानगड मोठ्या युक्तीनें मिटण्यांत येऊन तुर्कस्तानच्या सुलतानाला फक्त नुकसानभरपाई दिली गेली व बल्गेरियाचें स्वातंत्र्य कबूल करण्यांत आलें. याप्रमाणें तुर्कस्तानांतील यादवीचा फायदा जर्मनी व आस्ट्रिया यांनीं घेतला.

**इंग्लंड व जर्मनी.**—बल्गेरिया स्वतंत्र झाला एवढ्यानें यूरोपीय राष्ट्रांच्या सरहद्दी फारशा बदलल्या नाहींत. तथापि या एकंदर प्रकरणाचा राजकीय व अंतर्राष्ट्रीयदृष्ट्या फार महत्त्वाचा परिणाम झाला: आपसांतील करारमदारांनीं व अंतर्राष्ट्रीय कायद्याच्या मदतीनें यूरोपांत व सर्व जगावर शांतता नांदविण्याची आशा सुखस्वप्नाप्रमाणें केवळ निरर्थक भासूं लागली. "दैवो दुर्बलघातकः" किंवा "ज्याला शस्त्रबल अनुकूल त्याला दैव अनुकूल" या नेपोलियनच्या सुप्रसिद्ध उक्तीचा पगडा यूरोपीय राष्ट्रांवर बसूं लागला. ग्रेटब्रिटनमधील लोकांनीं तर ही गोष्ट फार लवकर ओळखिली. सर्व यूरोपला जो प्रश्न महत्त्वाचा तो जर्मनीनें आपल्या केवळ सैन्यबलाच्या धमकावणीनें स्वतःस फायदेशीर अशा रीतीनें सोडविला व त्यामुळें जर्मनीचा दर्जा व दरारा फार वाढला. ही गोष्ट दृष्टीस पडतांच इंग्लंडमध्यें लष्करी खर्च कमी करण्यासंबंधाची सर्व चळवळ एकदम बंद पडली; इतकेंच नव्हे तर आरमाराच्या वाढीस अनुकूलता मिळूं लागली. इतक्यांत १९०९ मध्यें जर्मनींत आरमाराची वाढ झपाट्यानें सुरू असल्याचें समजलें. तेव्हां तर समुद्रावरील ब्रिटनची सार्वभौम सत्ता अबाधित राखण्याकरितां हरएक उपाय करण्याचा इंग्लंडचा निश्चय झाला.

आरमार वाढविण्यांत जर्मनीचा मूळ उद्देश राजकारणांत इंग्लंडच्याहून अधिक वरचष्मा स्वतःचा असावा हा होता. बल्गेरियन प्रकरण जर्मनीनें केवळ बलाढ्य सैन्याच्या जोरावर रशिया, फ्रान्स वगैरे राष्ट्रांनां गप्प बसवून स्वतःला फायदेशीर अशा रीतीनें मिटविलें. तद्वतच आरमाराच्या जोरावर वेळप्रसंगीं इंग्लंडला नमतें घ्यावयास लावण्याचा जर्मनीचा डाव होता. इंग्लंडबरोबर युद्ध करावें व प्रत्यक्ष इंग्लंडवर स्वारी करावी असा जर्मनीचा आरमार वाढविण्यांत हेतु होता असा पुष्कळांचा समज आहे, पण तो चुकीचा आहे. सैन्य व आरमार दोन्ही बलिष्ठ असल्यानें प्रत्यक्ष युद्धावर पाळी न आणतां यूरोप व इतर खंडांतहि ईजिप्त, दक्षिण आफ्रिका, मेसापोटेमिया, इराण, हिंदुस्थान वगैरे भागांत इंग्लंडचें वर्चस्व व महत्त्व कमी करण्याकरितां घोटाळे उत्पन्न करतां यावे असें जर्मनीचें धोरण होतें. तुर्कस्तानच्या सुलतानाशीं मैत्री जोडण्यांत व झारबरोबर १९०५ मध्यें दोस्तीचा गुप्त तह करण्यांत जर्मन बादशहाचा हाच डाव होता. परंतु इंग्लंडनें फ्रान्सशीं व नंतर रशियाशीं मित्रत्वाचें नातें जोडून हा डाव हाणून पाडला. तथापि जर्मनीनें आपलें आरमार वाढविण्याचा क्रम चालूच ठेविला, व त्याबरोबरच इंग्लंडबरोबर आरमाराच्या वाढीला मर्यादा घालण्यासंबंधानें व युद्धांत परस्परांविरुद्ध भाग न घेण्यासंबंधानें सालोख्याचें बोलणें सुरू ठेविलें. इंग्लंडचे परराष्ट्रमंत्री सर एडवर्ड ग्रे यांनींहि खुल्या दिलानें व जाहीरपणें प्रत्येक प्रश्नाची वाटाघाट करण्याचें धोरण १९०९ पासून स्वीकारलें.

परंतु १९१४ मध्यें सुरू झालेल्या जागतिक युद्धाच्या सुमारास जर्मनीनें आपली ही वृत्ति बदलली. १९०९ ते १९१४ हीं वर्षे विशेष महत्त्वाचीं होत. इंग्लंड व जर्मनी यांच्या संलोख्यावर सर्व जगाची शांतता अवलंबून आहे हें स्पष्टपणें जाणून इंग्रज मुत्सद्दी या वेळीं वागत होते. जर्मनीच्या हालचालींवर इंग्लंडनें अत्यंत काळजीपूर्वक लक्ष ठेविलें होतें. आणि परदेशी राजकारणांत आपसांतील पक्षभेद आड येऊं न देतां इंग्रज मुत्सद्यांनीं एकविचारानें सर एडवर्ड ग्रे, मिस्टर आस्क्विथ व लॉर्ड हॉल्डेन या तीन शांत डोक्याच्या मुत्सद्यांच्या हातीं ग्रेट ब्रिटनचें परराष्ट्रीय धोरण ठेविलें. त्यामुळें १९१२ मधील बालकन युद्धाचा वणवा फारसा पसरला नाहीं. तथापि २८ जून १९१४ रोजीं आस्ट्रियन आर्च ड्यूक फर्डिनांड याचा आकस्मिक रीतीनें खून होऊन जागतिक युद्धास अखेर सुरवात झालीच. असो.

यूरोपच्या गेल्या दहा वर्षांतील इतिहास पुढें सविस्तर येणार असल्यानें या ठिकाणीं त्याचा संक्षेप केलेला बरा. फक्त प्रमुख उलाढालींचा नामनिर्देश करून यूरोपचा व तदनुषंगिक जगाचा हा आज तागाईत आढावा संपविण्यांत येईल.

१९१२ च्या फेब्रुवारी महिन्यांत चीनमधील सर्वांत प्राचीन असणारी राजसत्ता जाऊन तेथें प्रजासत्ताक राज्य स्थापन झालें; पण अद्यापपर्यंत तेथें बेबंदशाही चालू आहेच. १९१४ सालीं इजिप्त ब्रिटिशांनीं आपल्या संरक्षणाखालीं घेतलें. हें ब्रिटिशांचें कृत्य फ्रान्स, रशिया, बेलजम, सर्व्हिया, ग्रीस, पोर्तुगाल व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें यांना मान्य केलें. १९११ सालीं इटलीनें ट्रिपोली स्वाहा केला होता. १९१२ च्या सप्टेंबर महिन्यात तुर्कस्थान आणि बल्गेरिया, सर्व्हिया, ग्रीस व मॉंटिनिग्रो हीं बालकन यांच्यामध्यें युद्ध सुरू झालें. हें पहिलें बालकन युद्ध १९१३ च्या लंडनच्या तहानें बंद पडलें. या तहान्वयें तुर्कस्थाननें बाल्कन राष्ट्रांनां मिडिया व एनास यांनां जोडणाऱ्या रेषेच्या पश्चिमेकडील आपला मुलूख दिला. पण या मुलखाच्या वाटणींत बाल्कन राष्ट्रांमध्यें वितुष्ट येऊन लंडन तहानंतर एक महिन्यानें त्यांचें आपआपसांत युद्ध सुरू झालें (दुसरें बाल्कन युद्ध). पुढें बुखोरेस्टच्या तहानें तें मिटलें. १९१२ सालीं अल्बेनियाला स्वातंत्र्य मिळालें.

**जागतिक युद्ध व त्याचे परिणाम.**—१९१४ पासून १९१८ पर्यंत सर्वांचें महायुद्ध चाललें. रशिया, फ्रान्स, बेलजम, सर्व्हिया, मॉंटिनिग्रो, रुमानिया, अमेरिका व जपान एकीकडे; जर्मनी, आस्ट्रिया हंगेरी आणि तुर्कस्थान व बल्गेरिया दुसरीकडे अशी या युद्धांत वाटणी झाली होती. या महायुद्धाचा इतिहास येथें देण्याचें कारण नाहीं. १९१८ मध्यें जर्मन-आस्ट्रियन प्रजासत्ताक राज्य जाहीर झालें. त्याच्या आधल्या वर्षी रशियांत बोल्शेविकांचें राज्य स्थापन झालें. हल्लीं तुर्कस्तानहि सुलतानाच्या अधिकारांत नसून प्रातिनिधिक मंडळाच्या नियंत्रणाखालीं आहे.

येणेंप्रमाणें १९१० ते १९२० हीं दहा वर्षे युद्धाच्या मोठ्याच धामधुमींत गेलीं. १९१४ ते १९१८ चें महायुद्ध हें केवळ यूरोपीय युद्ध नसून जागतिक युद्ध होय. कारण अमेरिकेपासून जपानपर्यंतचीं अनेक स्वतंत्र राष्ट्रें व ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व भाग या युद्धांत पडले होते. अशा या जगद्व्यापी युद्धाचे परिणामहि जगद्व्यापी घडले आहेत. युद्धांत विशेष रीतीनें गुंतलेल्या फ्रान्स, इंग्लंड, जर्मनी, आस्ट्रिया वगैरे देशांत व्यापारी माल उत्पन्न होण्याचें प्रमाण कमी झाल्यामुळें जपान, अमेरिका वगैरे स्वतंत्र व पुढारलेल्या देशांनीं आपला व्यापार फार वाढविला. तथापि व्यापारी नेआण धोक्याची झाल्यामुळें देशोदेशीं जिनसांचे भाव फार वाढले. शिवाय महायुद्धांत मनुष्यहानि व द्रव्यहानि फार होऊन युद्धमान राष्ट्रांना कर्ज फार झालें. अशा अनेक आपत्ती उद्भवल्यामुळें गेल्या मयायुद्धासारखीं अरिष्टें कायमचीं बंद व्हावी म्हणून युनैटेड स्टेट्सचे प्रेसिडेंट विल्सन यांनीं राष्ट्रसंघाची कल्पना काढून अमलांत आणली. राष्ट्रसंघाची नियमावली व महत्त्व ज्ञानकोशाच्या पहिल्या विभागात दिलेंच आहे. प्रेसिडेंट विल्सनच्या स्वयंनिर्णयाच्या (सेल्फडिटर्मिनेशन) तत्त्वाचा अम्मल बऱ्याच प्रमाणांत होऊन पोलंड, जुगोस्लाव्हिया, झेकोस्लाव्हाकिआया, वगैरे स्वतंत्र राष्ट्रें निर्माण करण्यात आलीं असून त्यामुळें यूरोपीय देशांच्या सरहद्दी बऱ्याच बदलल्या आहेत. शिवाय जर्मन, रशियन व आस्ट्रियन या तीन जुन्या राजसंस्था मोडून, आस्ट्रिया व हंगेरी पृथक् देश बनून तेथें रिपब्लिक म्हणजे लोकसत्ताक राज्यपद्धति स्थापन झाली आहे. रशियात तर समाजसत्ताक पद्धति व स्वयंनिर्णय हीं दोन्ही तत्त्वें अमलांत येऊन बोलशेविझम म्हणून एक अभूतपूर्व शासनपद्धति अमलांत आली. जागतिक शांततापरिषद, मजूर परिषद, आरमारपरिषद, वगैरे परिषदा भरत असून जगात कायमची शांतता राखण्याच्या उपायांची भवति न भवति चालू आहे. ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत सर्व विभागांना साम्राज्यकारभारांत समान हक्क देणारी साम्राज्यपरिषद भरविण्याची पद्धति सुरू झाली आहे. राष्ट्रसंघ, ब्रिटिशसाम्राज्य परिषद, जागतिक मजूर परिषद वगैरे ठिकाणीं हिंदुस्थानला प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क मिळाला असून त्यामुळें हिंदुस्थानचा जगाच्या राजकारणात प्रवेश झाला आहे.

---

## प्रकरण २७ वें.

### मानवी आयुष्यक्रमाचा आणि स्वातंत्र्याचा विकास.

या गेल्या दोन हजार वर्षांतील सामाजिक आणि राजकीय इतिहासाचें अवलोकन केलें म्हणजे ज्या स्थूल गोष्टी आढळून येतात त्यांत समाज पूर्वीपेक्षां फार मोठे होत चालले आणि आतां सर्व जग म्हणजे सर्व देश हा अन्योन्याश्रयी

न्यायश्रयी व एकसंस्थाबद्ध समाज होऊं पहात आहे ही गोष्ट प्रथम लक्षांत येईल. समाज मोठा झाल्यानंतर त्यांत अंतर्गत फरक काय काय होतात आणि समाजविस्तार आणि सामाजिक दृढीकरण यांचें जगद्विकासांत स्थान काय आहे इत्यादि गोष्टींवर पहिल्या विभागांत चर्चा केली आहे (प्रकरण-१४). प्रस्तुत विभागांत ज्या मोठमोठ्या व्यापक घडामोडींच्या व चळवळींच्या योगानें आजची परिस्थिति उत्पन्न झाली त्या घडामोडींची रूपरेखा दिली आहे. राज्यें उत्पन्न होतात, नष्ट होतात, नवीन उत्पन्न होतात. हा केवळ मनुष्याचा एकांगी इतिहास आहे.

राज्यक्रांतीनें मनुष्याच्या आयुष्यक्रमांत किंवा सुखांत वृद्धि नेहमींच होते असें नाहीं. परंतु पूर्वीपेक्षां अधिक मोठीं राज्यें उत्पन्न झाल्यानें मनुष्याच्या आयुष्यक्रमावर इष्ट परिणाम होतो. मनुष्याच्या आयुष्यक्रमावर ज्या गोष्टी परिणाम करतात त्यांत राज्यमर्यादा, राज्यस्वातंत्र्य, पारमार्थिक संप्रदाय, राज्यस्वरूप, (लोकसत्तात्मक कीं राजसत्तात्मक) उत्पादन आणि दळणवळणविषयक नवीन फायदेशीर पद्धतींचा शोध आणि प्रचार, आरोग्यविषयक नवीन गोष्टींचा शोध, भौतिक गोष्टींचा उपयोग, भौगोलिक शोध या सर्व गोष्टी येतात. इतिहास म्हटला म्हणजे राजकीय घडामोडींवर भर देण्यात येतो. पण राजकीय घडामोडींशिवाय मनुष्यहितवृद्धीच्या दृष्टीनें दुसऱ्या अनेक गोष्टींचा इतिहास मनुष्याला समजला पाहिजे. त्यांतील अनेक गोष्टींचा इतिहास विज्ञानेतिहास नामक पांचव्या भागांत दिला आहे. परंतु अनेक शास्त्रीय शोधांनीं आयुष्यक्रमावर, विशेषतः मनुष्याच्या संपत्तीवर कसा परिणाम झाला हें त्यांत दिलें नाहीं.

**शास्त्रीय शोधाचा व व्यापारी दळणवळणाचा परिणाम.**—गेल्या शंभर वर्षांत शास्त्रीय शोधांचा परिणाम जगावर मोठा झाला आहे. उत्पादनाच्या आणि व्यापाराच्या पद्धती अगदीं पालटून गेल्या आहेत. संस्कृतीचा प्रसार त्यामुळें अधिक होत आहे आणि त्याचा संस्कृतिस्थानांवरहि परिणाम झाला आहे. पूर्वी संस्कृतीचें केंद्र म्हणजे राजधान्या असत. आतां तसें नाहीं. पूर्वी शहरें केवळ राजधानीमुळें प्रामुख्यास येत. आतां राजधानीपेक्षां नगरविकासाला पोषक अशीं कारणें म्हणजे व्यापार, माल तयार करण्यास व वाहून नेण्यास सोयी या गोष्टींचा अधिकाधिक परिणाम होऊं लागला आहे. जेथें मालाचें रूपांतर करावयास शक्ति स्वस्त मिळते, जेथें चोहोंकडचा माल आल्यामुळें कारखान्यास माल ताबडतोब मिळतो, तेथें उद्योगधंदा एकवटतो आणि मोठी लोकसंख्या पसरली जाते. न्यूयॉर्क शहर हें अमेरिकेंतील सर्वांत मोठें शहर आहे आणि जगांत लोकसंख्येनें दुसऱ्या प्रतीचें शहर आहे आणि संस्कृतिविषयक अनेक बाबतींत जगांतील पहिल्या प्रतीचें शहर आहे. पण हें शहर अमेरिकेची राजधानी नाहीं एवढेंच नव्हे पण न्यूयॉर्क संस्थानाची देखील राजधानी नाहीं. बफलो शहर हें केवळ नायगाराची वीज तेथें फार थोड्या पैशांत मिळते व त्यामुळें कारखाने काढण्यास मदत होते यामुळें वसलें आहे. खुद्द मुंबई शहराची गोष्ट घ्या. येथें हिंदुस्थान सरकारचें स्थान नाहींच पण मुंबई सरकारचें शासनयंत्र देखील अर्धेमुर्धेंच आहे. मुंबई शहराचें वैभव व्यापारावर आणि गिरण्यांवर अवलंबून आहे, जगांत दिवसानुदिवस या कारणांमुळेंच नगरवृद्धि विशेष होईल असें भाकीत करण्यास हरकत नाहीं.

मानवी आयुष्यक्रमाचा विकास पहावयाचा झाल्यास तो अनेक अंगांनीं पाहिला पाहिजे. येथें कोणत्याहि विकासाकडे पूर्ण लक्ष देणें शक्य नाहीं व अवश्यहि नाहीं. पुढील पंधरा भाग सविस्तर विवेचनासाठीं आहेतच. आयुष्यक्रमाच्या विकासाचीं अनेक अंगें व त्या अनेक अंगांचा अन्योन्याश्रय व त्यांचें अगदीं सामान्य स्वरूपवर्णन एवढेंच येथें पुरे.

**आयुष्यक्रमविकास आणि वैयक्तिक स्वातंत्र्यविकास.**—स्वातंत्र्यविकास द्यावयाचा म्हणजे अनेक बाजूंनीं तो दिला पाहिजे. मनुष्याला स्वेच्छेनें व कर्तृत्वानें आपलें समाजांतील स्थान ठरविण्याची संधि हवी, वाटेल त्या देशाचें नागरिकत्व घेण्याची मोकळीक हवी, लग्नव्यवहार वगैरे बाबतींत स्वातंत्र्य हवें. उलटपक्षीं आपला समाज सुस्थितींत रहावा म्हणून व्यक्तीस नियंत्रण करण्याचा अधिकारहि प्रत्येक समाजास हवा. स्वातंत्र्यविषयक कल्पना आज जेवढ्या वाढत चालल्या आहेत त्या शंभर वर्षांपूर्वीहि नव्हत्या. पारमार्थविषयक खासगी मतांकरितां ज्यांची रसायनशास्त्र किंवा लाटिन यांची प्रोफेसरी गेली अशी मंडळी अमेरिकेंत अजून जिवंत आहेत. मनुष्यानें आपण कोणत्या समाजाचें सदस्य व्हावें हें ठरविण्याचा त्याला हक्क आहे ही गोष्ट आज फारशी मान्य झालेली नाहीं. हिंदी लोकांस अनेक ठिकाणीं मज्जाव आहे. परसमाजप्रवेशास जशा अडचणी आहेत तशा स्वसमाजत्यागासहि आहेत. हिंदूचा मुसुलमान होणें किंवा मुसुलमानाचा ख्रिस्ती होणें ही गोष्ट माणसें गमावणाऱ्या लोकांस अत्यंत संतापदायक वाटते. इच्छिलेल्या समाजांत प्रवेशास मोकळीक किंवा तिचा अभाव ही गोष्ट वैचारिक बाबतींतील स्वातंत्र्याशीं निकट संबद्ध आहे.

**पारमार्थिक मतस्वातंत्र्य.**—या बाबतींत इतिहास लिहावयाचा झाल्यास तो मोठा मनोरंजक होईल. या बाबतींत इतिहासक्षेत्र मात्र ख्रिस्ती, मुसुलमान आणि बौद्ध जगापुरतेंच आहे. हिंदूंमध्यें पारमार्थिक बाबतींत स्वातंत्र्यास विरोधच नव्हता. त्यामुळें हिंदु समाजाच्या इतिहासांत या स्वातंत्र्याचा इतिहास महत्त्वाचा नाहीं. यूरोपच्या इतिहासांत हा इतिहास हें एक महत्त्वाचें पान

आहे. विचारस्वातंत्र्याच्या इतिहासावर पुढें योग्य स्थलीं लक्ष्य देऊं.

**स्वातंत्र्याचीं दुसरीं अंगें.**—विचारस्वातंत्र्य हें स्वातंत्र्याचें केवळ एक अंग होय. वैयक्तिक स्वातंत्र्यास जे अनेक शत्रु होऊन गेले त्यांत ज्यांच्या हातीं सत्ता असेल त्यांनीं वाटेल तर आपल्या तावडींतील लोकांस दाखवावीं आणि वाटेल तसें छळावें हा एक भाग होय. याशिवाय स्वातंत्र्याच्या दृष्टीनें दुसरी भयंकर उणीव म्हणजे गुलामगिरीची संस्था होय. जुलमी राज्यपद्धति जाऊन तिच्या ठायीं नियमांनीं व कायद्यानें बद्ध अशी शासनपद्धति क्रमानें उत्पन्न झाली ही स्वातंत्र्याच्या दृष्टीनें व सामाजिक जीवनाच्या दृष्टीनें महत्त्वाची गोष्ट झाली. तर या दोहोंचाहि इतिहास स्वातंत्र्याच्या इतिहासांत मोठा महत्त्वाचा आहे.

**जुलुमांच्या नाशानें निर्भयतेचा विकास.**—स्वतंत्र संस्था निर्भयवृत्तीच्या लोकांच्या हातूनच चालतात. लोकांचें मन निर्भय बनण्यास भोंवतालची स्थिति अशी पाहिजे की त्यांस निर्भयपणें पण प्रामाणिकपणें वागत असतां विनाकारण उपद्रव होऊं नये. ही निर्भयता न्यायपद्धतीचा व कायद्याचा विकास व शासन संस्थांचा खंबीरपणा यांवर अवलंबून असते. सोळाव्या शतकांत यूरोपांतील सरंजामी राज्यपद्धति बोहोंकडे नष्ट होऊन एकसत्ताक राज्यें झालीं. सरंजामीराज्यपद्धतिविनाश स्वातंत्र्यास संवर्धक झाला. ज्याच्या हातीं सर्व सत्ता असा मनुष्य जवळचाच न रहातां दूरचा झाला; यामुळें प्रत्येक व्यक्तीचें स्वातंत्र्य वाढलें. प्रोटेस्टंट धर्म जो स्थापन झाला त्याचा परिणामहि स्वातंत्र्यास पोषक असा झाला. मनुष्यास भेवडावण्यास राजा होताच पण आणखी पाद्रीहि भेवडावीत असे. कन्फेशनच्या युक्तीनें लोकांची गुह्यें काढून त्यांस कह्यांत ठेवण्याचा यत्न करणें हा प्रकार बऱ्याच देशांत बंद झाला. शिवाय उपजीविकेला साधन म्हणजे जोंपर्यंत केवळ जमीन असे तोंपर्यंत लोकांस जमीनदार किंवा सर्वांत बडा जमीनदार जो राजा त्याच्या धाकांत नेहमीं रहावें लागे. जशीं जशीं शहरें विकासूं लागलीं तशी तशी स्वतंत्र लोकांची संख्या वाढली. खेड्यांतील जमीनीस बांधून ठेवलेला "व्हिलेन" शहरांत पळून जाई आणि वाटेल तो धंदा करून पोट भरी. यामुळें तो अधिकाधिक निर्भय झाला. मनुष्याची स्वतंत्रता हिंदुस्थानांत ब्रिटिश हदींत वाढली, तशीच ती जेथें मोठमोठीं राज्यें असतील आणि स्थानिक सरदार दुर्बल झाला असेल तेथें वाढली. राजसत्तेनें सरंजामीपद्धतीचा नाश करून वैयक्तिक स्वातंत्र्य वाढविलें आणि लोकांस लोकशाही स्थापन करण्यास अवश्य असलेल्या मनोवृत्तीची जोपासना केली.

स्वातंत्र्यासाठीं ज्या लोकांनीं मोठी खिस्तवार चळवळ केली आणि देशाचा राज्यकारभार लोकांच्या प्रतिनिधींनीं करावा आणि कर बसवावयाचा असेल तर तो लोकांच्या प्रतिनिधींच्या मताशिवाय बसवूं नये इत्यादि गोष्टींबद्दल आग्रह धरून शासनसंस्था लोकायत्त केली अशा लोकांमध्यें इंग्रजांचें नांव प्रामुख्यानें येतें. त्याच स्वातंत्र्याच्या कल्पनांनीं जागृत झालेले लोक अमेरिकेंत होते. त्यांनीं जेव्हां पाहिलें कीं इंग्लंड वसाहतींवर हवेतसे वसाहतींच्या संमतीशिवाय कर लादतें आणि व्यापारविषयक नियम करतें तेव्हां त्यांनीं बंड करून अमेरिका, हें राष्ट्र स्वतंत्र केलें. या प्रसंगीं जी लढाई अमेरिकेनें केली तींत फ्रान्सनें अमेरिकेस मदत केली; आणि त्यामुळें फ्रेंच शिपाई जे अमेरिकेहून आले त्यांच्या मनांत लोकसत्तात्मक राज्याची गोडी उत्पन्न झाली आणि तें लष्कर फ्रान्सच्या राज्यक्रांतीच्या वेळेस लोकायत्त शासनसंस्था असाव्या या भावनेचें होतें. फ्रान्समध्यें राज्यक्रांति झाली तेव्हां तिची लाट चोहोंकडे पसरली. लोकसत्ता हा एक तऱ्हेचा धर्म झाला आणि त्याचा प्रसार फ्रान्स हें धर्मप्रसाराप्रमाणें करूं लागलें. पण त्या बाबतींत फ्रान्सला तत्काल यश थोडें मिळालें आणि उलट फ्रान्समध्यें नेपोलियनच्या कारकीर्दींत व नंतर राजसत्तेनें उचल खाल्ली. स्वित्झरलंडमध्यें लोकसत्ता त्या संस्थानाच्या जन्माबरोबरच स्थापन झाली होती.

इंग्लंडनें अमेरिका हातची गेली तरी वसाहतींची राज्यव्यवस्था सुधारण्याचा उपक्रम बरेच दिवस केला नव्हता. तथापि तो पुढें करण्यास सुरवात केली व अनेक वसाहतींस अंतस्थ कारभारांत स्वातंत्र्य दिलें आहे. वसाहतींना जरी इंग्लंडनें उदारतेनें वागविलें तरी जिंकलेल्या राष्ट्रांस उदारतेनें वागविण्यास इंग्लंड तयार नव्हतें. हिंदुस्थानची नागवण करावी व इंग्लंडची धन करावी अशीच राजनीति इंग्लंड आचरीत होतें. आयर्लंडचीहि स्थानिक स्वातंत्र्याची भूक इंग्लंडनें बरींच वर्षे शांत होऊं दिली नव्हती. आतां इंग्लंडची वृत्ति बदलली आहे असें समजतात. इंग्लंडची हिंदुस्थानाविषयीं वृत्ति कशी काय राहील हें हिंदुस्थानच्या लोकांच्या परिश्रमानेंच ठरणार आहे.

हिंदुस्थानांत ब्रिटिश साम्राज्यानें वैयक्तिक स्वातंत्र्याची जोपासना केली हें खास. कलेक्टरच्या हातीं सत्ता पुष्कळ असली तरी त्यास कायद्याविरुद्ध कांहीं करतां येणार नाहीं हें सुशिक्षित नागरिकास ठाऊक आहे. शिवाय आजचा कलेक्टर उद्यां जाणार अशी स्थिति असल्यामुळें त्यास फारसें भिण्याचें कारण नाहीं हेंहि लोकांस समजतें. कलेक्टरनें कांहीं जुलूम केला तर त्याविरुद्ध अपील करतां येतें ही गोष्टहि प्रत्येकास ठाऊक आहेच. न्यायपद्धति आपल्याकडे ब्रिटिश साम्राज्यांतील इतर कोणत्याहि भागापेक्षां कमी दर्जाची नाहीं, आणि ब्रिटिश न्यायपद्धतीवर लोकांचा विश्वासहि चांगला आहे. जेव्हां यूरोपियन गुन्हेगार असेल तेव्हां मात्र ब्रिटिश न्यायपद्धतींत इंग्रजास त्यांच्या जातीचीच ज्यूरी सदोष किंवा निर्दोष ठरविणारी असल्यामुळें अन्याय वारंवार होत असे. तो अन्याय काढून टाकण्यासाठीं एक

बराचसा सदोष कायदा नुकताच पास केला आहे. त्या कायद्याच्या योगानें पुढें कसे काय परिणाम होतील हें अजून दिसावयाचें आहे. इंग्रज व देशी लोक यांची समता हिंदुस्थानांत अजून पूर्णपणें स्थापित झाली नाहीं.

हिंदुस्थानांत आज स्वातंत्र्य अनेक बाबतींत पुष्कळ आहे. कांहीं काळपर्यंत मुद्रणसंस्थांस सरकारनें नियंत्रण केलें होतें. आणि याचें कारण अराजक किंवा इंग्रजजातिद्वेषपर चळवळींस आपल्याकडील मुद्रणसंस्था वापरल्या जातील अशी सरकारास भीति होती. या बाबतींत सरकारनें अजून पूर्णपणें मोकळीक दिली नाहीं. हिंदुस्थानांतील अनेक संस्थानांमध्यें ज्या गोष्टी होत असतील त्यांवर अत्यंत मोकळेपणानें टीका करण्याच्या प्रयत्नास नुकताच प्रतिबंध केला आहे. यामुळें सरकारनें देशी संस्थानास एक तऱ्हेचा दुर्वर्तनाचा बिल्ला दिला असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा कायदा कितपत वापरला जाईल याविषयीं शंका आहे आणि बऱ्याच तऱ्हेच्या टीकांस कायद्यानें मोकळीक ठेवली आहे त्यामुळें प्रत्यक्ष व्यवहारांत या कायद्याच्या योगानें टीका करणारास फारसें अडचणीचें नियंत्रण पडेल असें वाटत नाहीं. सध्यां मुद्रणसंस्था मोठ्या अडचणींत आहेत असें खात्रीपूर्वक म्हणवत नाहीं. राजकीय चळवळी करण्याच्या बाबतींत बऱ्याच प्रकारें खटपट करण्यास आज अडचण नाहीं. आणि लोकांची राजकीय चळवळींत पडण्याबद्दलची भीति आज बरीच कमी झाली आहे.

**लोकशाही.**—वैयक्तिक स्वातंत्र्य राजसत्ताक पद्धतींत देखील असू शकते; पण जेव्हां लोकसत्ता असेल तेव्हां स्वातंत्र्याचा आणखी विकास होतो; आणि समाजामध्यें एकमेकांस मदत करणें व अनेक लोकांनीं मिळून कार्य करणें इत्यादि गुणांची उपासना होते.

जगामध्यें लोकसत्तात्मक राज्याची कल्पना ग्रीसपासून आतांपर्यंत एकसारखी चालू आहे. फरक झाला तो हा गोष्टींत झाला कीं, प्राचीन काळीं मोठ्या क्षेत्रांत लोकराज्य शक्य नव्हतें. अनेक ठिकाणच्या लोकांनीं एकत्रित होऊन राज्य चालविणें ही गोष्ट ज्या कालांत दळणवळण कठिण त्या काळांत कठिण, किंबहुना अशक्य होती. मोठें राज्य व्हावयाचें म्हणजे राजसत्तेच्या साहाय्यानेंच व्हावयाचें. ग्रीसमधील लोकराज्यें म्हणजे शहरें व त्याच्या परिकरांतील भाग. राजसत्तेच्या मार्फत देशांत एकत्व झालें, निरनिराळ्या भागांतील लोकांची एकमेकांशीं ओळख झाली म्हणजे तेथील राजसत्ता जाऊन तेथें हळू हळू लोकसत्ता स्थापन होत जावयाची हा विकासक्रम आहे. ग्रीसच्या राष्ट्रांसारखींच लहान लहान राज्यें पुढें इटालींत व टयूटॉनिक भागांत उत्पन्न झालीं. प्रथम जरासें मोठें लोकसत्तात्मक राष्ट्र तयार झालें, तें स्वित्झरलंड होय. पण ज्या वेळेस तें राष्ट्र झालें त्या वेळेस त्याला राष्ट्र म्हणण्यापेक्षां अनेक राष्ट्रांचा तात्पुरता संघ असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या संघास पुढें चिरकालत्व येऊन पुढें त्याचें राष्ट्र बनलें. स्वित्झरलंडच्याप्रमाणेंच अमेरिकेची स्थिति होती. आज अमेरिका मोठी दिसते तेवढी त्या वेळेस नव्हती तर त्या वेळेस तेरा संस्थानें मात्र होतीं. प्रत्येक संस्थान मोठें होतें. मोठें संस्थान असून तें शासिलें जाई याचें कारण त्यांच्या पूर्वी राजसत्तेनें तें बांधले गेलें होतें आणि त्याची राज्यपद्धति त्या वेळेस तयार झाली तीच पुढील शासनविकासास प्रारंभ म्हणून उपयोगी पडली. अमेरिकेनंतर फ्रान्स लोकसत्तात्मक राष्ट्र झालें व त्याची पुढें अनेक स्थित्यंतरें होऊन पुन्हां तें लोकसत्तात्मक झालें. दक्षिण अमेरिकेंत, मेक्सिकोंत व मध्य अमेरिकेंतील बेटांत लोकसत्ता स्थित झाली. पण पुष्कळ ठिकाणीं नांवाला लोकांनीं "निवडलेला" अध्यक्ष असे. पुष्कळ प्रसंगीं अध्यक्ष आपली निवडणूक सशस्त्र सेनेच्या साहाय्यानें करून घेई.

इसवी सन १९०० सालापासूनच लोकसत्तेची वाढ पाहूं लागलों तर असें दिसून येईल कीं, या कालांत कांहीं साम्राज्यांचे अधिपती असलेल्या बादशहांचीं पदें नष्ट होत आहेत.

१९०० च्या सुमारास ज्या प्रसिद्ध बादशाही सत्ता होत्या त्यांत तीन सत्ता प्रमुख होत्या. त्या म्हटल्या म्हणजे रशिया, चीन व तुर्कांचा सुलतान या होत. या जवळ जवळ स्वरूपानें बादशाह्या परंतु वस्तुतः नोकरशाह्या होत्या. आज या तीनहि बादशाह्या नष्ट झाल्या आहेत. चीनचें साम्राज्य नष्ट होऊन तेथें लोकसत्ताक राज्य झालें आणि रोमानाफ घराणें व रशियन बादशाहीची गेल्या महायुद्धानें उत्पन्न झालेल्या परिस्थितिज्वालेंत आहुति पडली. आणि खिलाफतीमध्यें खलीफाचे धार्मिक अधिकार जिवंत ठेवले पण राजकीय अधिकार नष्ट केले. क्षेत्रफळाच्या दृष्टीनें पोर्तुगालचें साम्राज्यहि लहान नाहीं. आफ्रिकेचा बराचसा भाग, आशियाखंडांत कांहीं ठाणीं व खुद्द पोर्तुगाल हीं त्या साम्राज्यांत आहेत. त्या साम्राज्याच्या मध्यवर्ती संस्थानानें राजशासन टाकून देऊन लोकशासन पत्करिलें. त्यामुळें गोव्यांतील शासनपद्धतीवरहि परिणाम झाला. सर्वांत महत्त्व पावलेलें जुनें यूरोपीय बादशाही घराणें म्हटलें म्हणजे हाप्सबर्ग, तें नष्ट झालें. जर्मन कायसरचें पद नष्ट झालें एवढेंच नव्हे तर जर्मनींत जीं अनेक राजघराणीं होतीं तींहि नष्ट झालीं. आज जगभर लोकसत्ताच अधिकाधिक प्रबळ होत चालली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**जुन्या लोकशाहींत आणि अर्वाचीन लोकशाहींत फरक.**—लोकसत्ता अनेक गोष्टींत प्राचीन भारतांत होती यांत शंका नाहीं. पण ती देखील कांहीं ज्ञातिविशिष्ट असावी असें वाटतें. लिच्छवि हें लोकसत्तात्मक राष्ट्र होतें. पण त्या राष्ट्रांत जे इतर लोक असत त्यांस राज्यकारभारांत कितपत स्थान असे याविषयीं शंका आहे. राज्यकर्ती जात पुष्कळ गोष्टी बहुमतानें ठरवीत असेल पण तींत ब्राह्मण

किंवा अंत्यजवर्ग यांस दूरच ठेवीत असावी असें वाटतें. लोकसत्ता आणि समानता यांची जोडगोळी ही नवीनच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ग्रीसमधील लोकसत्ताक राज्यें पाहून समतेचें तत्त्व ही केवळ अर्वाचीन गोष्ट नाहीं असें कित्येकांस वाटेल. पण खरें पाहतां ही अर्वाचीनच गोष्ट आहे. ग्रीसमध्यें लोकसत्ताक राज्य होतें. पण तेथें जनतेपैकीं फारच थोडक्यांस नागरिकांचे हक्क होते. ग्रीक लोकांमध्यें जे हेलाट म्हणून होते त्यांस साधारण मनुष्याचेहि हक्क नव्हते, आणि गुलामगिरी ही स्वाभाविक संस्था आहे असें ग्रीसमधील सर्वांत प्रसिद्ध तत्त्ववेत्ता जो आरिस्टाटल त्यालाहि वाटत असे. जनतेपैकीं सर्व लोकांचा दर्जा एकच आहे अशी परिस्थिति उत्पन्न करण्याचें श्रेय कांहीं अंशीं ख्रिस्ती संप्रदायास दिलें पाहिजे. जो नागरिक नव्हे तो गांवढळ, तो पेगन, अशी लोकांची कल्पना होती ती कालांतरानें जो ख्रिस्ती नसेल तो पेगन अशी कल्पना झाली. मुसुलमानी जगांत मुसुलमान म्हणजे नागरिकाचे हक्क असलेला, क्षत्रियवर्गतुल्य वर्ग अशी कल्पना होती. सर्व जनता पुढें मुसुलमान झाल्यामुळें विशिष्ट अधिकारानें युक्त असा वर्ग मुसुलमान देशांतून नाहींसा झाला. याप्रमाणें ख्रिस्ती व मुसुलमान संप्रदाय हे समतास्थापक झाले. यूरोप जरी ख्रिस्ती झाला तरी त्यांच्यामध्यें जातिभेदसदृश संस्था होत्याच. रोमन राज्याच्या अंतिम काळांत इटालींत अशी आर्थिक परिस्थिति उत्पन्न झाली कीं, जीवनकलह फार कठिण होत गेला; आणि प्रत्येक व्यक्ति आपला धंदा हेंच आपलें पिढीजाद वतन होय असें समजूं लागली आणि धंद्यांत परक्याचा प्रवेश होऊं नये म्हणून नियम झाले होते. जो सुतार घराण्यांतील किंवा कोष्टी घराण्यांतील आईपासून जन्मला नसेल त्याला सुताराचें किंवा कोष्ट्याचें काम शिकवूं नये म्हणून त्या देशांतील श्रमजीवींच्या श्रेणींनीं नियम केले; आणि त्यामुळें एक तऱ्हेचा भारतसदृश जातिभेद तेथें सुरू झाला होता. त्याचें स्वरूपवर्णन प्रो. डिल यांनीं आपल्या ग्रंथांत मोठ्या मार्मिकतेनें केलें आहे.

**अर्वाचीन लोकशाहींत समता व स्वातंत्र्य या दृष्टींनीं उणीवी.**—अर्वाचीन लोकशाहींत समता अधिक आहे असें दाखविण्याचा प्रयत्न वर केला आहे. त्यावरून असें मात्र समजूं नये कीं, आजच्या लोकशाहींत लोकसत्ता खरोखर प्रस्थापित झाली आहे आणि लोकांत समता पूर्णपणें स्थापित झाली आहे. त्या दृष्टीनें अजून सुधारणा व्हावयास जागा पुष्कळ आहे. अमेरिकेंत नीग्रोंनां कान्स्टिटयूशन कायद्याप्रमाणें गोऱ्या लोकांशीं समतेनें हक्क आहे पण दक्षिणेंतील पुष्कळ संस्थानांनीं ज्यांच्या आज्याला मताचा हक्क होता अशा लोकांनाच तेवढा मतें देण्याचा हक्क ठेवण्याचा "कायदा" केला आहे. तो कायदा खरोखर बेकायदेशीर आहे पण त्याचा बेकायदेशीरपणा जेव्हां एखादी नीग्रो व्यक्ति संस्थानाविरुद्ध खटला अनेक वर्षे संयुक्त संस्थानांच्या अत्युच्च कोर्टांत लढेल तेव्हांच उघडणें सिद्ध होईल. नीग्रोंनां नागरिकत्वाचे हक्क मिळूं नयेत, नीग्रो मंडळी निवडून येऊं नयेत, अधिकारी बनूं नयेत, यांविषयीं बकासुरी खटपट सर्व गोरे लोक करीत आहेत आणि त्यांस हाणून पाडण्याची नीग्रोंकडून खटपट यशस्वी होत नाहीं. यामुळें कायद्याच्या तत्त्वानें समता आणि चालू कायद्यांत विषमता आणि व्यवहारांत अतिशूद्रत्व अशी तेथें समाजस्थिति आहे. अनेक राष्ट्रांत जे अल्पसंख्याक लोकसमाज आहेत त्यांवर बहुसंख्याकांकडून जुलूम किंवा उत्तेजनाचा अभाव तरी आहेच. उदाहरणार्थः—अमेरिकेंत रोमन क्याथोलिक किंवा ज्यू अध्यक्ष होणें शक्य नाहीं. रोमन क्याथोलिक जर महत्त्वाचें स्थान कोठें पावेल तर तो न्यूयॉर्क शहरामध्येंच. कां कीं, न्यूयॉर्क शहरांत आयरिश क्याथलिक लोकांची वस्ती पुष्कळ आहे आणि यामुळेंच न्यूयॉर्कचा मेअर पुष्कळदां क्याथोलिक असतो. सामाजिक वागणुकींत जातिभेद आडवा येतोच. यहुदी लोकांनां अनेक ठिकाणीं अमेरिकेंत थोडेबहुत बहिष्कृतांसारखें वागविलें जातें. थोडेसे फरक बाजूस ठेवले तर असें म्हणतां येईल कीं, अमेरिकेंतील गोऱ्या लोकांच्या बाबतींत समतेचें तत्त्व बहुतेक यशस्वी झालें आहे. चिनी व जपानी लोकांनां नीग्रोइतकें दूर ठेवीत नाहींत पण थोडेबहुत दूर ठेवतात. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे निरनिराळ्या जातींत समानबुद्धि ठेवून कार्यक्रम ठेवावा ही भावना अजून लोकशाहींमध्यें चांगल्या तऱ्हेनें जागृत झाली नाहीं. पण गेल्या पन्नास वर्षांत या बाबतींत प्रगति झाली नाहीं असें नाहीं.

**लोकसत्ताविकासाच्या इतिहासाचें आर्थिक अंग.**—लोकसत्ताविकास झाला तो केवळ कांहीं तत्त्ववेत्त्यांनीं लोकसत्तावाद उपदेशिला आणि त्यामुळें लोकसत्तात्मक राज्य उत्पन्न झालें अशांतली गोष्ट मुळींच नाहीं. लोकसत्तेचा विकास कांहीं निश्चित आर्थिक कारणांमुळेंच झाला. एवढेंच नव्हे तर पुष्कळ प्रसंगीं पार्लमेंट ही संस्था लोकांस नको होती. राजानें बोलावणें पाठविलें म्हणजे तें कर वाढविण्यासाठीं होय आणि लोकांच्याकडूनच कर वाढविण्याची खुबी राजा करीत आहे अशी लोकांची समजूत होती. राजा बोलावतो कशाला तर आणखी पैसे काढायला ! लोकांकडून पैशाची अधिकाधिक मदत होण्यास लोकांपुढें सर्व कारभार आला पाहिजे हें उघडच आहे. लोकांनीं केवळ लढून स्वतंत्रता वाढविली असें नाहीं. कारण तिसऱ्या विल्यमच्या नंतर लोक लढले नाहींत आणि त्या राजाच्या कारकीर्दींत पार्लमेंटची सत्ता आणि आजची सत्ता यांत फरक फार आहे. लोकसत्ताविकासाचें एक महत्त्वाचें कारण, शासनपद्धति अधिकाधिक व्यापक होत चालली आणि आजचें शासनयंत्र चालविणें पूर्वीपेक्षां अधिक कठिण झालें

हें होय. लोकांच्याकडून वारंवार कर वाढवून पैसे घ्यावे लागतात एवढेंच नव्हे तर कर्ज घ्यावें लागतें. कर्ज घेतेवेळेस सावकाराला साधारणपणें हिशोब द्यावा लागतो. अशा परिस्थितींत राज्य कसें काय चाललें आहे याचे अहवाल प्रसिद्ध करणें भाग पडतें. शिवाय केवळ राजसत्ता जेथें असते तेथें केवळ कार्याच्या व्यापामुळें नोकरशाही तरी उत्पन्न होते, किंवा राष्ट्रकारभारावर लोकांच्या प्रतिनिधींची देखरेख लागते. या प्रकारच्या परिस्थितीमुळें राजा व प्रजा यांतच लढा न राहतां नोकरशाही व लोकांचे पुढारी यांमध्यें अधिकारग्रहणास चुरस लागते आणि त्याचें पर्यवसान नोकरशाही लोकांच्या प्रतिनिधींस जबाबदार रहाण्यांत होतें.

**लोकप्रीतीशिवाय राज्य चालविण्याची अशक्यता.**—जर राज्य संपन्न असेल तर सरकारास प्रजेकडे वारंवार कर्जाकरितां वगैरे जावें लागणार. लोक नाखूष असले तर कर्ज मिळणार नाहीं एवढेंच नव्हे तर वसूलहि नीट होणार नाहीं. जबरदस्तीनें वसूल कधीं कधीं करतां येईल. निव्वळ सैन्य खूप ठेवून कांहीं काळ लोकांत अप्रीति असली तरी शासनसंस्था चालवितां येते. पण सैन्यास खूष ठेवण्यास त्यांनां वेळच्या वेळीं पगार द्यावा लागतो. व ज्यांचे लोक खूष नाहींत त्यांचे सैन्यहि खूष रहात नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**गुलामगिरीचा नाश.**—स्वातंत्र्याच्या व लोकसत्तेच्या इतिहासांत गुलामगिरीचा नाश ही गोष्ट आली पाहिजे. राजसत्ता, लोकसत्ता ह्या मोठमोठ्या गोष्टी आहेत. पण जगांतील लाखों व्यक्तींस आपलें म्हणून कांहीं नसावें, त्यांच्या प्रत्यक्ष शरीरावर दुसऱ्याची मालकी असावी या प्रकारच्या परिस्थितींतून जगाची सुटका नुकती अलीकडे झाली आहे. ही गोष्ट लोकसत्तेच्या इतिहासांत महत्त्वाची आहे. चीन, तुर्कस्तान यांसारख्या आशियाटिक राष्ट्रांत गुलामगिरी होतीच पण एकोणिसाव्या शतकाच्या अंत्यपादांत गुलामगिरी दक्षिण अमेरिकेंत पुष्कळ ठिकाणीं चालूच होती. सध्यां गुलामगिरीची संस्था राजरोसपणें कोठेंहि चालू नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. गुलामगिरी बंद करण्यांत इंग्लंडनें पुढाकार घेतला. अमेरिकेनें यादवी पत्करिली. मात्र जेव्हां अमेरिका गुलामगिरी बंद पाडण्यासाठीं दक्षिणेंतील संस्थानांशीं लढत होती तेव्हां मात्र इंग्लंडनें गुलामगिरी चालू ठेवणाऱ्या दक्षिणेस सहानुभूति दाखविली. सध्यां गुलामगिरी बंद पडण्याचें लोकांच्या नैतिक सुधारणेशिवाय एक निराळें कारण आहे. तें हें कीं, गुलाम हे महाग पडतात. स्पर्धेच्या तत्त्वाशीं सुसंगत अशा स्वतंत्र मनुष्याचें काम गुलामापेक्षां अधिक चांगलें होई व त्यास बारा महिने कामावर ठेवलें पाहिजे असें मुळींच नाहीं. अमेरिकेंत जेव्हां गुलामगिरी बंद झाली तेव्हां सर्वच गुलामांस आनंद झाला किंवा त्यांची ताबडतोब स्थिति चांगली झाली असें नाहीं. तर पुष्कळांस गुलामपणा सुटल्याबद्दल दुःख झालें. तेहि क्रमानेंच सुधारले. गुलामगिरी हिंदुस्थानांत कशी चालू होती आणि इंग्लंडचा राजाहि गुलामखरेदी कशी करीत असे हें पहिल्या विभागांत दिलें आहे. त्याबरोबर हेंहि सांगितलें पाहिजे कीं हिंदुस्थानांत गुलामगिरी होती पण फारशी नव्हती. गुलामगिरी पूर्वी जिंकलेल्या लोकांची जमीन घेतल्यानंतर त्या जमीनीची मशागत करण्यासाठीं प्राचीन जगांत अवतीर्ण झाली. अर्वाचीन काळांत जेथें जमीन मुबलक सांपडली तेथें दुसरीकडून गुलाम न्यावे लागले आणि गुलामगिरी बंद झाल्यानंतर तेथें मुदतबंद मजूरी सुरू झाली. मुदतबंद मजूरी व गुलामगिरी यांतील पडदा कांहीं ठिकाणीं अगदीं पातळ होतो हें पहिल्या भागांतील अर्वाचीन परदेशगमनाच्या प्रकरणावरून कळून येईल.

**अर्धवट गुलामगिरी.**—गुलामगिरी प्रत्येक देशांत निरनिराळ्या पद्धतीनें होतीच. अमेरिकेंतील गुलामगिरीमध्यें गुलामांतील कुटुंबपद्धति नष्ट झाली व गुलामांनां पशूंचें स्वरूप आलें. तशी गुलामगिरी जगांत दुसरीकडे कोठेंहि नसावी. ग्रीस रोममध्यें गुलामगिरी होती, यूरोपांत अगदीं अर्वाचीन काळापर्यंत सर्फ म्हणून गुलाम असत. ज्या वेळेस पोलंडचें स्वातंत्र्य नष्ट झालें त्या वेळेस सामाजिक परिस्थिति अशी होती कीं, तेथें लाख दोन लाख क्षत्रियवर्गतुल्य स्वार सरदार होते, व्यापार यहूद्यांच्या हातीं होता व बाकीचे सर्व लोक सर्फ होते. त्यामुळें पोलंडच्या संरक्षणाच्या कामाला त्यांतील फारच थोडा वर्ग उपयोगी पडला आणि त्याचें स्वातंत्र्य गेलें. इंग्लंडमध्यें तेराव्या-चौदाव्या शतकापर्यंत जमीन करणारे शेतकरी जमीनीलीं बांधले गेले असत. त्यांस जमीन सोडून जातां येत नसे. आणि जेव्हां जमीनदार जमीन विकी तेव्हां अर्थात् आंतील कामकरी वर्गासह विकी. इंग्लंडमधील मध्ययुगीन गुलामगिरी सुधारलेल्या स्वरूपांत आज मध्यप्रांत सरकारनें २००व्या शतकांत चालू ठेवली आहे. तेथें बरीच जमीन अशी आहे कीं, व्यक्तीस आपल्या मालकीची जमीन आपल्या मुलास ठेवतां येते पण विकतां येत नाहीं. ख्रिस्ती संप्रदाय प्रेमाचें तत्त्व ओठानें उच्चारीत असतां त्यानें गुलामगिरी मात्र नष्ट केली नाहीं. तर उलट जोंपर्यंत गुलामगिरी देशांत होती, तोंपर्यंत देवळें आपल्या मालकीचे स्त्री व पुरुष गुलाम करीत असत आणि कोणास गुलाम पुरुषाबरोबर अगर गुलाम स्त्रीबरोबर लग्न करावयाचें असेल तर लग्नानें दुसरा पक्ष देवळाचा गुलाम होई. येणेंप्रमाणें देवळें गुलामांची अवलाद वाढवीत. कुळाला लग्नाला पैसे देऊन जन्मभर कुळास कर्जांत ठेवून त्याजपासून जन्मभर नोकरी घ्यावयाची ही पद्धति आपण आपल्या समक्ष हिंदुस्थानांत मृत होत असलेली पहात आहोंत. गुलामगिरीच्या योगानें तीन वर्गांची अवनति होते. एक तर मनुष्यास पशूसारखें वागविल्यानें व संपूर्ण पार-

तेव्यानें त्यांचें मन नेहमीं दुःखांत असणें ही गुलामाची अवनति होय. पण गुलामगिरीचा परिणाम त्या देशांतील स्वतंत्र कामकरी वर्गावरहि अनिष्ट होतो. स्वतंत्र कामकरी वर्ग तेथें टिकत नाहीं; कां कीं काम करणें हीच गोष्ट हलकी होते. याशिवाय जेथें स्वतंत्र काम करणारा मनुष्य येणार नाहीं, तेथें कुसलाचा विकास व्हावयाचा नाहीं. म्हणजे तो प्रदेशहि सुसंपन्न होत नाहीं. अर्थात् तेथील सरकारहि दरिद्रीच रहावयाचें. गुलाम बाळगणाऱ्या वर्गावरहि कांहीं अनिष्ट नैतिक परिणाम होतात. अमेरिकेंत गुलाम बाळगणाऱ्या आणि गुलामांची पैदास करण्याच्या धंद्यांत असलेल्या गोऱ्या लोकांच्या मुलींची देखील त्या मालकिणी बनल्या म्हणजे स्वाभाविक भावना नष्ट होऊन निराळी दृष्टि बने. काळ्या मुलीपेक्षां गोऱ्या पुरुषापासून झालेल्या काळ्या बाईच्या मुलीला बाजारांत अधिक किंमत येई, आणि त्यामुळें कांहीं गोऱ्या पुरुषांना काळ्या बायकांशीं संगत होण्यासाठीं पैसे द्यावे लागत. अशा परिस्थितींत गुलाम पिकविण्याचा ज्यांचा पिढीजाद धंदा आहे अशा गोऱ्या स्त्रियांनां असें वाटे कीं, बाहेरचा मनुष्य लावून त्याला पैसे द्यावयाचे त्याच्या ऐवजीं आपल्या नवऱ्यानेंच काळ्या बायकांपासून प्रजोत्पत्ति केली तर वाईट नाहीं.

गुलामगिरी नष्ट झाली ती एकदम नष्ट झाली नाहीं. दक्षिण अमेरिकेंत गुलामगिरी उशीरां व हळु हळू नष्ट झाली. ही हळू हळू नष्ट झाल्यामुळें एक तऱ्हेनें आर्थिक व सामाजिक फायदाच झाला असें अनेक लोक म्हणतात.

गुलामगिरीचाहि एक फायदा झाला असें कित्येक इतिहासकार म्हणतात. ते म्हणतात कीं यूरोपांतील लोकांस सक्तीनें कामें करावीं लागलीं नसतीं तर त्यांनीं कामच केलें नसतें आणि आपल्या गरजा कमी करण्याचें तत्त्वज्ञान बोलावयास लागले असते. गुलामगिरीमुळें नीग्रोंसारखी जातें अनेकविध धंद्यांस तयार झाली. या जंगली लोकांत सुधारलेल्या समाजाचे सदस्यत्वास जी लायकी उत्पन्न झाली ती गुलामगिरीमुळेंच उत्पन्न झाली. अमेरिकन इंडियन गुलाम झाले नाहींत तर नष्ट झाले आणि आफ्रिकन पूर्वी गुलाम होते तर आज स्वतंत्रपणें पोट भरूं लागले व संख्येनें पुष्कळ वाढले.

भारतीय मुदतबंद मजुरीच्या पद्धतीचे दोष वारंवार दाखविण्यांत येतात व आम्हीहि मागें पहिल्या भागांत चांगले स्पष्टपणें दाखविले आहेत. आपले जे लोक इतरत्र गेले त्यांचे हालहि वर्णन करून त्यांच्या चळवळीचा इतिहास दिला आहे. मुदतबंद मजूर नेण्याची पद्धति आतां हिंदुस्थानसरकारनें रद्द केली आहे. कां कीं या पद्धतीचें पर्यवसान गुलामगिरींत झालें. पण ही गुलामगिरी असली तरी थोड्या काळाकरितां होती. हे मजूर तेथें गेल्यानंतर स्वतंत्रपणें धंदा करूं लागले व पुढें कांहीं संपन्नहि झाले. ही मुदतबंद मजूर नेण्याची पद्धति नसती तर भारतीयांकडून परदेशगमन व निराळे देश व्यापणें हें मुळींच झालें नसतें.

**लोकसत्ता आणि ग्रंथकार.**—वैयक्तिक सत्ता जाऊन लोकसत्ता स्थापन होण्याला जीं कारणें झालीं त्यांत लोकसत्तेचे प्रवर्तक ग्रंथकार यांचें कार्य विसरतां कामा नये. त्यामध्यें रूसो, लॉक, वगैरे अनेक महत्त्वाचे ग्रंथकार होऊन गेले. त्यांनीं लोकसत्तेच्या समर्थनार्थ निरनिराळीं ओद्यास्थितिविषयक मतें पसरविलीं. त्या ग्रंथकारांचा परामर्ष पुढें योग्य प्रसंगीं घेण्यांत येईल. हीं सर्व मतें सत्याच्या पायावर उभारलीं गेलीं होतीं असें नाहीं.

मनुष्याला आपल्या हक्काची जाणीव करून देणाऱ्या ज्या कांहीं गोष्टी झाल्या आणि त्यासाठीं जीं कांहीं तत्त्वज्ञानें पसरलीं त्यांत रूसोच्या "सामाजिक ठरावा" (सोशल कॉन्ट्रॅक्ट) चा उल्लेख केला पाहिजे. रूसोची सामाजिक ठरावाची कल्पना अशी होती कीं, आरंभीं माणसें स्वतंत्र होतीं, त्यांस शासनसंस्थांची गरज भासूं लागली तेव्हां त्यांनीं आपापसांत ठराव करून एक सत्ताधारी निवडला. तो चांगल्या वागणुकीच्या अटीवर निवडला. रूसोची येणेंप्रमाणें व्यक्त केलेली सामाजिक ठरावाची कल्पना जरी केवळ काल्पनिक आहे तरी तिचा परिणाम जनतेवर मोठा झाला. राजत्व हें ईश्वरनिर्मित नाहीं किंवा अमर्याद नाहीं तर आमच्या इच्छेवर आहे, आणि आम्ही ठरवूं त्या मर्यादेंत राजानें आपले अधिकार वापरले पाहिजेत अशी कल्पना झाली.

याशिवाय "स्वाभाविक हक्कां"चें एक तत्त्वज्ञान लोकांमध्यें कांहीं दिवस पसरलें होतें. मनुष्याला तो मनुष्य आहे म्हणूनच कांहीं हक्क आहेत असें "स्वाभाविक हक्कां"चे विचारप्रवर्तक लोकांस सांगत असत.

सध्यांच्या जगाच्या मनोवृत्तींत प्राचीन जगापेक्षां अधिक सुधारणा झाल्या असें म्हणतां येत नाहीं. आपल्या खेरीज इतरांनां नागरिकत्वाच्या हक्काच्या बाबतींत वगळावयाचें; दुसऱ्या राष्ट्रास जिंकलें तर गुलाम करावयाचें; गुलामगिरी गैरफायदेशीर झाली तर आपल्या ताब्यांतील लोकांची प्राप्ति नियमित करून फायद्याचा मोठा वांटा आपल्याकडेसच ओढावयाचा; जिंकलेल्या किंवा ताब्यांत सांपडलेल्या लोकांच्या पैशावर चैन करावयाची व जिंकलेल्यांच्या शिक्षणाकडे किंवा आरोग्याकडे दुर्लक्ष करावयाचें; त्यांनीं फार तडफड केली तर कांहीं तुकडे टाकावयाचे हा मनुष्य स्वभाव बदलला नाहीं. जो काय फरक झाला तो श्रीमंतांनीं आपला योगक्षेम चांगला चालण्यासाठीं इतरांस कसें वागवावें याविषयींच्या कल्पनेंत होत चालला. ताब्यांत सांपडलेल्या लोकांनीं नाडून आपली विशेष धन होत नाहीं तर काम करणारे व कामकरी, कर देणारे व कर घेणारे यांचा अन्योन्याश्रय असल्यामुळें कर देणारास किंवा काम करणारांस नाडणें फायदेशीर होत नाहीं हें वरच्या वर्गास समजूं लागलें. आणि खालचा नाडलेला आणि दुखावलेला वर्ग स्वहितसाधनक्षम

अधिकाधिक होऊं लागला. जगांतील प्रत्येक कार्य अन्योन्याश्रयी आहे. एक बाजू अडून बसली तर दुसऱ्या पक्षाचेंहि काम अडेल इत्यादि गोष्टी लोकांस समजूं लागल्या आहेत. यामुळें शासनसंस्था, मोठमोठे कारखानदार या सर्वांस सामान्य मनुष्याची किंमत अधिकाधिक वाटूं लागली आहे. सामान्य कामकरी अगर प्रजेंतील व्यक्ति यांचें वैयक्तिक महत्त्व नाहीं. तर सामुच्चयिक प्रयत्नानेंच परिणाम होतो ही गोष्ट देखील लोकांस अधिकाधिक समजूं लागली आहे.

**लोकशाही आणि शिक्षण व कला.**—लोकशाहीबरोबर कलेच्या विकास कितपत होतो हा मोठा प्रश्न आहे. कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं ज्या देशांत सरदार वर्ग व राजघराणें आहे अशा ठिकाणींच कलेस आश्रय मिळतो. या तऱ्हेचीं मतें व्यक्त करणारी मंडळी हें विसरतात कीं, ज्या देशामध्यें सर्वसामान्य जन कलेचे ग्राहक होतात, त्या देशामध्येंच कलेवर मनुष्य दोन पैसे मिळवील. आज जे छापखानदार चित्रें छापून विकतात किंवा जाहिरातीसाठीं चित्रें खरेदी करतात त्यांच्या सारखे चित्रकारांस उत्तेजक कोणीहि नाहींत. श्रीमंत वर्ग आपल्या घराण्यांतील व्यक्तींचीं चित्रें काढवून घेईल पण त्यासारख्या वर्गाकडून प्राप्ति थोडकीच व्हावयाची. सामान्य मनुष्य लोकशाहींत सुशिक्षित अधिक असतो एवढेंच नव्हे तर त्याच्या गरजा वाढलेल्या असतात. जेथें सामान्यवर्ग अधिक सुशिक्षित असतो त्या प्रकारच्या समाजापासून जी ग्रंथकार, चित्रकार यांस प्राप्ति असेल ती केवळ सरदार वर्गाकडून व्हावयाची नाहीं. युद्धापूर्वींच्या जर्मनींत सामान्य वर्गांत देखील वाङ्मय वगैरेचा विकास राजसत्तेचें महत्त्व लोकांत असतां झाला पण त्या विकासास कारण राजसत्तेपेक्षां सुशिक्षित राष्ट्रांच्या वाढत्या गरजा होत असें म्हटलें असतां अधिक बरोबर होईल. जर्मनींतील राजसत्ता केवळ सार्वजनिक पैशाचा अपहार करण्याकडेच प्रवृत्त झाली नसून लोकांची सर्व तऱ्हेनें प्रगति व्हावी याबद्दल प्रयत्न करणारी होती. म्हणजे लोककल्याणासाठीं आणि आपल्या राष्ट्रास इतरांपेक्षा बलाढ्य करण्यासाठीं खटपट ती राजसत्ता करीत होती. लोकशाहीमध्यें सामान्यतः सार्वजनिक गोष्टींत मन घालणारा वर्ग अधिक मोठा असावा लागतो आणि अनेक सार्वजनिक प्रश्नावर जनता अधिक सुशिक्षित करावी लागते. यामुळें सार्वजनिक व राष्ट्रीय हिताहिताचे प्रश्न यांवर अधिकाधिक वाङ्मय उत्पन्न होऊं लागतें. वर्तमानपत्रांचा धंदा व मुद्रकांचा धंदा हे धंदे कितीतरी अधिक भरभराटीस येतात. आपणांस नुकता जो निवडणुकीचा अनुभव आला त्यांत आपणांस असें दिसून आलें कीं, छपाई व पोस्टेज यां बाबतींतच लोकांनीं किती तरी खर्च केला. निवडणुकीच्या वेळेस उमेदवार प्रांतांच्या गरजांविषयीं आपलीं मतें वगैरे सांगतात आणि त्यामुळें जनता राज्यकारभाराविषयीं अधिक सुशिक्षित होते.

**लोकशाही व समाजसत्तावाद**—समाजसत्तावाद हा राजसत्तेच्या केवळ स्वार्थपरायणतेची भीति कमी झाल्यानंतरच उद्भवावयाचा. राज्यपद्धति जेव्हां लोकांच्या हितासाठीं चालली आहे असें लोकांस वाटत असेल तेव्हांच संस्थानाचें कार्यक्षेत्र व्यापक करण्याची बुद्धि लोकांस व्हावयाची. समाजसत्तावाद जेव्हां लोकांत पसरतो तेव्हां संस्थानाचा उपयोग आपल्या हितासाठीं करून घेण्यास लोक शिकलेले असावे लागतात. जेव्हां लोकराज्य उत्पन्न होतें तेव्हां समाजसत्तावादास कधीं कधीं अधिकाधिक जोर येतो. संस्थानाचें कार्यक्षेत्र अधिक व्यापक करून संस्थानास अधिकाधिक लोकोपयोगी करावें याबद्दल प्रयत्न चालतो.

**राज्यपद्धति व रीतीभातींचा व नीतीचा विकास.**—सामाजिक आयुष्यक्रमाचा रीतीभातींच्या विकासाशीं बराच संबंध आहे. लोकराज्यांत प्रत्येक मनुष्याचा मोठेपणा त्याच्या शेजाऱ्यांच्या चांगल्या मतावर अवलंबून असतो आणि त्यामुळें मोठ्या पदवीला चढलेला मनुष्य विनयादि गुणानें आणि भलेपणानें युक्त असतो. नोकरशाहींमध्यें मनुष्याचा मोठेपणा त्याविषयीं असलेल्या त्याच्या वरच्या लोकांच्या चांगल्या मतावर अवलंबून असतो. त्यामुळें अन्तेशीं उन्मत्तासारखें वागणारा आणि वरच्यांशीं तोंडपुजेपणा करणारा असा अधिकारी वर्ग निपजतो. अधिकारी वर्गाचें अनुकरण जनतेचा बराच भाग करीत असल्यामुळें सामान्यजनामध्यें आपण मोठे आहों असें समजलें जाण्यासाठीं इतरांशीं गुर्मीनें रहाणें वगैरे प्रकार सुरू होतात. लोकशाहीचा परिणाम मनुष्याच्या वागणुकीवर व नीतिमत्तेवर अधिक चांगला होतो यांत शंका नाहीं. पूर्वीं प्रत्येक राजघराण्याशीं संबंध असलेल्या लोकांची नीति खराब होत चालली असे. कारण अनेक सरदारांच्या बायका राजघराण्यांतील पुरुषांशीं गुप्त व्यवहार करीत आणि त्यावर त्यांच्या नवऱ्याची किंवा आप्ताची बढती किंवा संपन्नता अवलंबून असे. कित्येक सरदार तर आपली बायको राजाला किंवा प्रिन्स् ऑफ वेल्सला फार पसंत पडते म्हणून अभिमान बाळगीत. लोकशाहींत असे प्रकार फारसे ऐकूं येत नाहींत. पण लोकशाही म्हणजे निर्दोष आहे असेंहि नाहीं. सार्वजनिक कामांत पडणाऱ्या व्यक्तींचें नांव बद्दू कसें करावें याविषयीं प्रयत्न एकसारखा विरुद्ध पक्षाकडून होतो आणि त्यामुळें उखाळ्यापाखाळ्या काढणें, खोटे आरोप करणें किंवा विपर्यास करणें ही एक कला झाली आहे.

लोकशाही येथें स्थापन होण्याची खटपट चालली आहे. तिच्या योगानें राष्ट्राचा विकास होतो कीं राष्ट्र मवाळ व पाजी पुढारी मिळून पिच्छेहाटींच्या मार्गास लागतें हें भविष्य सांगण्यास आज कोण समर्थ आहे ?

—

## प्रकरण २८ वें.

### समाजनियमनात्मक विचार.

**समाजनियमनपद्धतीची अवश्यकता.**—जगांत असा कोणताहि भाग नाहीं कीं, ज्यांत समाजनियमनात्मक शास्त्राचा विकास झाला नाहीं. समाजनियमनात्मक जी व्यावहारिक शास्त्रें आहेत त्यांचीं अनेक ठिकाणीं व अनेक काळीं भिन्न भिन्न स्वरूपें दृष्टीस पडतात. समाजनियमनपद्धतीशिवाय कोणताहि समाज चालावयाचा नाहीं, त्यामुळें समाजशासनपद्धती प्रत्येक समाजामध्यें प्रचलित असतात. आज आपणांस असें दिसून येईल कीं, सर्व यूरोपभर व अमेरिकेंत रोमन कायदेपद्धतीच ज्यांचें मूळ सांगतां येईल अशा कायदेपद्धती प्रचलित आहेत. जगांत आजपर्यंत ज्या कायदेपद्धती प्रचलित आहेत त्यांत रोमन कायदेपद्धति ही सर्वांत अधिक प्रचलित आहे. त्या पद्धतीशीं स्पर्धा करणाऱ्या समाजनियमनपद्धती तीनच आहेत. त्या म्हटल्या म्हणजे ब्राह्मणी धर्मशास्त्र, मुसलमानी कायदेपद्धति आणि कांहीं अंशीं चिनी कायदेपद्धति या होत. जे लोक जगाच्या राजकीय स्पर्धेंत यशस्वी होतात त्यांचीच कायदेपद्धति चोहोंकडे प्रचलित होते. दुसऱ्यांची कायदेपद्धति जरी कांहीं महत्त्व पावली तरी ती यशस्वी राष्ट्रांनीं तिचा आदर केल्यासच पावते.

**प्राचीन कायदे पद्धती.**—जगांत आजपर्यंत मोठमोठीं साम्राज्यें अनेक होऊन गेलीं. इराणी साम्राज्य बरेंच मोठें होतें, पण त्याची कायदेपद्धति चिरकालीन झाली नाहीं याचें कारण त्या राष्ट्राचा किंवा साम्राज्याचा महंमदीय अरबांकडून पाडाव झाला हें होय. हिंदूंच्या कायदेपद्धतीचा जावा, सिलोन, ब्रह्मदेश, कांबोडिया ( कांबोज ) पर्यंत परिणाम झाला. सत्तावर्धनांत हिंदूंचें राष्ट्र जरी फारसें यशस्वी नसलें तरी संस्कृतिप्रसाराच्या कामीं आपल्या पूर्वजांचें एके काळीं महत्त्व कसें होतें हें मागें पाहिल्या विभागांत सविस्तर वर्णिलें आहे आणि प्रत्येक ठिकाणीं हिंदू कायद्याचा अंश तेथें कितपत जिवंत आहे हेंहि सांगितलें आहे. त्या विवेचनांत असें दिसेल कीं चीनमध्यें भारतीय धर्मशास्त्र किती गेलें आहे याची माहिती नाहीं पण पूर्वेकडील अनेक देशांत किती गेलें याची माहिती सविस्तर देतां येते.

गेल्या पंचवीसशें वर्षांचा समाजनियमनाचा स्थूल इतिहास येणेंप्रमाणें देतां येईल.

हमुरब्बीचा कायदेग्रंथ जरी आज आपणांस उपलब्ध आहे आणि जरी त्याच्या अवलोकनानें आपणांस असें दिसून येतें कीं निश्चित समाजनियम करण्यांत भारतीयांपेक्षां हमुरब्बीस श्रेष्ठत्व आहे तरी त्याची कायदेपद्धति फारशी टिकली नाहीं. पारशी साम्राज्याच्या वेळेस कायदेपद्धति कशी होती याची आपणांस फारशी माहिती नाहीं. त्या काळची कायदेपद्धति मुसुलमानी अमलानंतर अस्तंगत झाली. ग्रीकांची कायदेपद्धति जवळजवळ नष्ट झाली. रोमन लोकांच्या कायदेपद्धतीचें "जस जेन्शिअम" हें जेव्हां तयार होऊं लागलें तेव्हां कांहीं ग्रीकांच्या रीतीभाती कायदा म्हणून ग्रोमन साम्राज्यांत आल्या असाव्यात आणि त्यांचा कायदा म्हणून चोहोंकडे प्रसार झाला असावा. ब्रेहॉन म्हणून जे आयर्लंडमध्यें कायदेपंडित होते त्यांचा कायदा तर अस्तंगत झाला आहे. ख्रिस्ती संप्रदायाबरोबर जे विधिनिषेधात्मक नियम निर्माण झाले ते नियम यूरोपावर बरेच परिणामकारी होऊन कायद्यांत शिरले.

जेव्हां कांहीं नवीन सामाजिक स्थिति निर्माण होते तेव्हां त्याविषयीं कांहीं नियमहि तयार होऊं लागतात आणि जेव्हां कमी प्रगत समाज अधिक प्रगत समाजांच्या संबंधांत होऊं लागतात तेव्हां ते अधिक प्रगत समाजांची पूर्वानुभूत कायदेपद्धतीहि उचलूं लागतात असें आपणांस दिसून येईल. अमेरिकेंत मोठमोठे व्यापारी संघ आज उत्पन्न झाले आहेत; इतर देशांत तसेच संघ तयार होत आहेत. अशा प्रसंगीं अमेरिकेच्या संघविषयक कायद्याचें यूरोपियन जगाकडून अनुकरण होत आहे यांत कांहीं नवल नाहीं.

**कायदेपद्धतींतील अंतर्भूत गोष्टी.**—कायदेपद्धतीच्या इतिहासांत ज्या ज्या गोष्टींचें विवरण केलें जातें त्या गोष्टींचें स्वरूप येणेंप्रमाणें:—

( १ ) कायदा उत्पन्न कसा होतो ? या प्रश्नाचें उत्तर तो पूर्वी दिलेल्या निवाड्यांच्या संचयानें उत्पन्न होतो असें देण्यांत आलें आहे.

( २ ) कायदा लेखस्वरूपांत वाढत कसा जातो ? पुष्कळ प्रकारची परिस्थिति उत्पन्न झाली, म्हणजे त्या परिस्थितीविषयीं योग्यायोग्य विचार लोकांच्या मनांत येतात आणि त्यामुळें कांहीं चालीरूढी उत्पन्न होतात. न्यायाधीश त्या चालीप्रमाणें निकाल देऊं लागला म्हणजे तो ती चाल मान्य करतो. म्हणजे जी आज चाल अगर रूढी आहे ती उद्यां कायदा बनते.

( ३ ) कायदा दुसऱ्या कोणत्या कारणांनीं विकास पावतो ? कधीं कधीं कायदा अन्य जनतेंत उत्पन्न होतो आणि तो पुढें उचलला जातो.

( ४ ) एका परिस्थितींत उत्पन्न झालेला नियम अन्य परिस्थितींवर कसाबसा बादरायण संबंध लावून लागू करण्यांत येतो. या प्रकारच्या बादरायणसंबंधास इंग्रजींत "लीगल फिक्शन्स" म्हणतात.

( ५ ) कायदा पारमार्थिक विधींतून व कल्पनांतून कितपत उत्पन्न झाला हाहि एक कायदेशास्त्राच्या ऐतिहासिक अभ्यासकांचा विषय आहे. उदाहरणार्थ पिंड देण्याचा अधिकार कोणाला आहे याचा निर्णय करावयाचा आणि त्यावर इस्टेट कोणाला यावयाची हें ठरविण्याचा प्रकार हा

वैधसृष्टींतून व्यवहारसृष्टींत आलेल्या नियमांमध्यें घालतां येईल.

(६) दोन भिन्न कायदेपद्धतींचा एकमेकांशीं संपर्क झाला म्हणजे कायद्याची स्थिति कशी होते हाहि इतिहास-पंडितांच्या आवडीचा विषय आहे.

(७) कायदा हा केवळ राजसत्तामूलक आहे काय? या विषयीं चर्चाहि बरीचशीं कायद्याच्या वाङ्मयांत सांपडेल.

(८) समाजांची निरनिराळ्या काळची परिस्थिति, निरनिराळी कायदेपद्धति, व नीतिविचार कसे उत्पन्न करते, एके ठिकाणीं बहुपत्नीकत्व अमान्य कां व दुसऱ्या ठिकाणीं बहुपतिकत्व मान्य कां आहे याचें विवरण करणें यासारखे समाजशास्त्रीय विषय देखील कायद्याचा ऐतिहासिक दृष्टीनें विचार करण्यास घेतात.

(९) शासनसंस्थांचा आणि कायदेपद्धतींचा इतिहास यांचा निकट संबंध असल्यामुळें या दोहोंचा अभ्यास पुष्कळदां एकत्र करावा लागतो. राजानें निवाडे करणें हें केव्हां पासून सुरू झालें, वैरदेयाची वैदिक कल्पना काय आहे, तिचा प्रचार शिशुस्थितींत असलेल्या समाजांत कां व कितपत आहे याचाहि विचार वारंवार अवश्य होतो.

यूरोपचा कायदा हा हळू हळू जगांत चोहोंकडे प्रसृत होत चालला आहे. चिनी व जपानी राष्ट्रें देखील हा कायदा घेऊं लागलीं आहेत. जीं राष्ट्रें स्वतंत्र आहेत तींच इतःपर समाजनियमनशास्त्रांत भर टाकतील; अन्य राष्ट्रें टाकूं शकणार नाहींत.

---

## प्रकरण २९ वें.

### सिंहावलोकन.

मानव जातीची उत्पत्ति केव्हां व कशी झाली, आरंभ केव्हां व कसा झाला आणि तिचा अंत कशा प्रकारें होणार ह्या दोन्ही बाबींसंबंधींचा इतिहास अज्ञात आहे. भूशास्त्राच्या व प्राणिशास्त्राच्या मदतीनें मनुष्यजात पृथ्वीवर केव्हां निर्माण झाली, व तिची आरंभीची स्थिति कशी होती, यासंबंधानें माहिती मिळविण्याचा प्रयत्न अलीकडे चालू आहे. तथापि त्याला अद्यापि फारसें यश आलें नाहीं. मनुष्य जातीच्या भावी स्थितीबद्दल प्रस्तुत स्थितीवरून अनुमानें काढण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. तथापि एकंदरीनें भविष्यकाळहि अज्ञात राहणार म्हणून मानव जातीचा इतिहास आज लिहावयाचा म्हणजे तो प्रयत्न अर्धवटच होणार हें उघड आहे. तथापि प्रस्तुत काळीं मानव जातीच्या एकंदर प्रगतीचा आढावा घेणें बरेंच शक्य झालें आहे. कारण इजिप्त, भारतीय, इराणी, असुरियन, बाबिलोनियन, ग्रीक, रोमन, वगैरे प्राचीन काळांतील राष्ट्रांची ऐतिहासिक माहिती बरीच उपलब्ध झाली आहे. आणि पृथ्वीवरील एकंदर सर्व पृष्ठभागाचें संशोधन झालेलें असून त्याची निरनिराळ्या राष्ट्रांत मालकीच्या नात्यानें विभागणीहि झाली आहे.



**भौगोलिक परिस्थितीचा परिणाम.**—भौगोलिक स्थितीचा मानव प्रगतीवर फार परिणाम झालेला आहे. मनुष्य हा स्थलसंचारी प्राणी असल्यामुळें भूपृष्ठभागाचे जमीन आणि पाणी हे विभाग प्रामुख्यानें लक्षांत येतात. अमेरिका आणि ऑस्ट्रेलिया हीं दोन खंडें यूरोपियन लोकांनीं अगदीं अलीकडे १६ व्या शतकांत शोधून काढिलीं आहेत. तोंपर्यंत म्हणजे सोळाव्या शतकापर्यंत या दोन्ही खंडांत अगदीं रानटी लोकांच्या टोळ्यांची वस्ती होती. व त्यांनीं मानवप्रगतींत कांहींच भर घातली नाहीं हें उघड आहे. अर्थात सोळाव्या शतकापर्यंतचा मानवप्रगतीचा इतिहास म्हणजे आशिया, यूरोप आणि आफ्रिका या तीनच खंडांतील लोकांचा इतिहास होय. तथापि त्यांतहि दक्षिण आफ्रिका व उत्तर आशिया यांची माहितीहि प्राचीन इतिहासलेखकांनां नसल्यामुळें साधारणपणें स्पेन ते चीनपर्यंतचा पूर्वपश्चिम भूभाग यांतील प्राचीन मानवजातीचा काय तो इतिहास उपलब्ध आहे.

हा भूभाग द्वितीय हिमयुगानंतर बर्फ उत्तरेकडे जाऊन मनुष्यवस्तीस लायक बनला व तेव्हांपासून एकाच भौतिक स्थितींत अद्याप कायम आहे असें धरून चालण्यास हरकत नाहीं. यूरोपचा उत्तरभाग जसजसा हिमयुक्त होत गेला व साहाराचें रुक्ष वाळवंट बनत गेलें तसतसे गौरवर्णी लोक यूरोपांत वरवर जाऊं लागले आणि कृष्णवर्णी नीग्रो दक्षिणेकडे मध्य आफ्रिकेच्या जंगलांत शिरले. आणि या दोन भिन्नवर्गी लोकांच्या प्रगतींत जें जमीन अस्मानचें अंतर पडलें त्याचें कारण भौतिक परिस्थितींतील फरक हेंच आहे.

मानवजातीबद्दल दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे डोक्याच्या आकाराबद्दलची होय. हा शरीरभाग पिढ्यानपिढ्या जसाचा तसा कायम टिकतो. असा अनुभव आहे. आफ्रिकन व यूरोपीय लोकांचीं डोकीं लांबट असतात. आणि आशियाटिक लोकांचीं रुंदट असतात. पण पूर्वी एके काळीं रुंदट डोक्याचे आशियाटिक लोक मध्य यूरोपांत घुसले आणि त्यांच्या मिश्रणानें यूरोपांत रुंदट डोक्याचा 'आल्पाईन' मानववंश निर्माण झाला.

जीव जगण्याकरतां पाण्याची अत्यंत अवश्यकता असते आणि पृथ्वीवरील पाण्याचा पुरवठा पावसाच्या पाण्यावर अवलंबून आहे. भौतिक नियमानुसार समुद्रकांठच्या प्रदेशांत पाऊस फार पडतो व त्यामुळें अटलांटिक, हिंदी व पासिफिक महासागर यांच्या किनाऱ्यालगत जगाच्या एकंदर लोकसंख्येपैकीं तीन चतुर्थांश वस्ती आहे. यूरोपचा किनारा व हिंदुस्थान व चीन या देशांच्या किनाऱ्यावरच ही बहुतेक वस्ती होती. दक्षिण रशिया, हंगेरी व डान्यूब नदीच्या मुखाकडील प्रदेश खेरीज करतां बाकी सर्व यूरोप-

खंड अरण्यमय होतें. हंगेरीपासून उत्तर आशियामधून मांचुरियापर्यंत सर्व जंगलच पसरलेलें होतें.

भूमध्यसमुद्राच्या भोंवतालच्या प्रदेशांत, चीन व हिंदुस्थान ह्या देशांत उन्हाळा, पावसाळा वगैरे ऋतुविभागणी व्यवस्थित असल्यामुळें पावसाळ्यांत पिकें लावलीं म्हणजे तीं नीट तयार होण्यास व पुढील पिकाची तयारी करण्यास पुरेसा काळ मिळतो. यामुळें या एकंदर प्रदेशांतील लोक अगदीं प्राचीन काळापासून कृषिप्रधान असल्याचें दिसून येतें.

**प्रागैतिहासिक काळ.**—या काळांतील माणसांच्या इच्छा व आकांक्षा काय प्रकारच्या होत्या याची माहिती फार अल्प मिळते. त्यांनीं बोलण्याची भाषा बनविली होती हें बरेंच शक्य दिसतें. मात्र त्या भाषेंत चार दोनशेंहून अधिक शब्द खास नसावेत. पाषाणयुगांतील माणसांनां हाडांवरून कोरून प्राण्यांचीं व शिकारीचीं वगैरे चित्रें काढतां येत होतीं. व पाषाणांची घांसून व्यवस्थित आकाराचीं हत्यारें करतां येत होतीं. तसेंच ' स्टोनहेंज ' उभ्या केलेल्या दगडांचें वर्तुल या इंग्लंडमधील अवशेषांसारख्या कित्येक गोष्टींवरून त्या प्रागैतिहासिककालीन लोकांच्या कांहीं धार्मिक समजुती असाव्या असेंहि वाटतें.

**ऐतिहासिक काळ.**—ज्या काळासंबंधींची माहिती शिलालेख, ताम्रपट, नाणीं वगैरे कोणत्याहि प्रकारांनीं लेखनिविष्ट केलेली मिळते तेव्हांपासून ऐतिहासिक काल सुरू होतो. त्याच्या पूर्वीचा म्हणजे प्रथम व द्वितीय पाषाणयुगाचा काल अलीकडील ऐतिहासिक कालाच्या मानानें फारच मोठा आहे. जेव्हांपासून धातूंचा उपयोग व लेखनकलेची सुरवात होऊन ऐतिहासिक काळास आरंभ होतो त्या प्रकारची परिस्थिति प्रथम ज्या ठिकाणीं आशिया, यूरोप व आफ्रिका हीं तीन खंडें एकमेकांला जोडलेलीं आहेत त्या प्रदेशांत प्रथम उत्पन्न झाली असावी असें कांहीं पंडितांनीं अनुमान काढलें आहे. कृषिकर्म मूळ सुरू होण्यास भौगोलिक दृष्ट्या हाच प्रदेश फार अनुकूल आहे असें ते म्हणतात. ऐतिहासिक काळाला जेथून सुरुवात होते त्या काळीं आर्थिक व युद्धविषयक परिस्थित्यनुरूप मनुष्यसमाजाचे चार वर्ग होते. त्रिखंडांच्या संयोगभूमीवर हे चारी प्रकारचे लोक एकत्र आलेले आढळतात. हा मध्यवर्ती प्रदेश भूमध्य, काळा, कास्पियन, तांबडा, इराणी, या पांच समुद्रांनीं वेष्टिलेला आहे. या प्रदेशाला नाइल, तैग्रिस व युफ्रेटिस या नद्यांचें पाणी मिळतें, व या नद्यांनां पावसाचें व अबिसीनियांतील आणि आर्मीनियांतील पर्वतांवरील बर्फाचें पाणी मिळतें. तीन खंडांनां जोडणारे प्राचीन हमरस्ते याच प्रदेशांतून जातात. अशी अनेक प्रकारें अनुकूल परिस्थिति याच प्रदेशांत असल्यामुळें मानवजात रानटी स्थितींतून निघून सुधारणेस आरंभ प्रथम येथेंच झाला असला पाहिजे असें उपर्युक्त पंडितांचें मत आहे. कारण ते म्हणतात कीं या ठिकाणीं शेतकी करणारे, दर्यावर्दीपणा करणारे, घोडे पाळणारे व उंट पाळणारे असे चार प्रकारचे लोक एकत्र मिळाले होते. आद्य मानवोत्पत्ति व आद्यसंस्कृतिविकास यांची सविस्तर चर्चा ज्ञानकोश तिसरा विभाग यांत केली आहे.

मोझेसचा ग्रंथ व हिब्रू लोकांचे कायदेग्रंथ यावरून या आद्य ऐतिहासिक काळांतील परिस्थितीवर प्रकाश पडण्यास मदत होते. या ग्रंथांवरून असें दिसतें कीं या आद्य काळांत सुधारणेचीं दोन केंद्रस्थानें होतीं. एक ग्रीक बेटें व ग्रीक द्वीपकल्प व त्यांतलें विशेषतः क्रीटबेट, व दुसरें इजिप्त व मेसापोटेमिया. पैकीं क्रीटबेटामध्यें आरंभीं जें व्यावहारिक व ललितकलांचें ज्ञान होतें तोच पुढील ग्रीक लोकांच्या संस्कृतीचा मूळ पाया होय. इकडे इजिप्त व मेसापोटेमिया या देशांत प्रथम थीब्स व निनिव्हि आणि नंतर मेम्फिस व बाबिलोन हीं ठिकाणें प्रमुखत्व पावलीं असून तेथील शेतकीचे कालवे वगैरे गोष्टींवरून त्यांची आर्थिक उन्नति अधिक झालेली होती असें दिसतें; व तेथील समाज अर्थातच कायदेकानू व शांतता या बाबतींत अधिक पुढारलेला होता.

नाइल व युफ्रेटिस या नद्यांच्या कांठचे प्रदेश परस्परांस जोडणारा रस्ता अरबस्तानचा उत्तरभाग व सिरिया या देशांतून जात असे. या रस्त्याच्या आसपास वालुकामय प्रदेशांतील टाडमोर, दमास्कस वगैरे सुप्रसिद्ध ओलवणीचीं स्थळें आहेत. याच प्रदेशांतल्या डोंगराळ भागांत हिब्रू लोक आणि समुद्रकांठच्या शहरांत फिनिशियन राहात होते. पेलास्जियन लोकांचा व्यवहारसंबंध इजिप्शियन व फिनिशियन या दोन्ही राष्ट्रांबरोबर असे. त्यामुळें व्यापार व राजकारण या दोन्ही दृष्टींनीं सुधारलेले अनेक मानववंश या ठिकाणीं एकत्र दिसतात. त्या लोकांनींच निदान पश्चिमभागापुरत्या तरी येथें लेखनकला व सोनें, ब्रॉंझ, व लोखंड यांचें धातुकाम या कला प्रथम शोधून काढल्या असाव्यात. कारण हिंदुस्थानांत लेखनकलेचा उदय व विकास याच सुमारास किंबहुना याहूनहि पूर्वी झालेला दिसतो व लोखंडाचें धातुकामहि तेथें बऱ्याच प्राचीन काळापासून चालू असलेलें आढळतें. तत्वज्ञानाच्या प्रांतांत अरब व हिब्रू या सेमेटिक वंशाच्या लोकांनीं एकेश्वरी मताची आग्रहानें स्थापना केली. मिसरी व बाबिलोनी लोकांतील कलाकौशल्य व कायदेकानू घेऊन व त्याला एकेश्वरी उपासनेची जोड देऊन एका नव्या संस्कृतीचा लोकसमाज तयार करण्याचें महत्वाचें काम मोझेसनें ( ख्रि. पू. १५७१–१४५१ ) केलें असावें असें वाटतें.

**आर्यन् लोकांचे विजय.**—मोझेसनंतरचा महत्वाचा कालविभाग आर्यन् लोकांच्या विजयाचा होय. हे आर्यन् लोक मध्य आशियांतून मूळ बाहेर पडले. असा सिद्धांत पुढें आला होता. पण अलीकडील संशोधनामुळें, तो कांहींसा डळमळीत झालेला दिसतो. आर्यन्

लोक मुलूख जिंकीत निघाले,' पण त्यांचे निरनिराळे जमाव लहान लहान होते असें दिसतें. तथापि त्यांचा जोम अधिक असल्यामुळें त्यांनीं आपली राजकीय सत्ता प्रस्थापित केली. व पुष्कळ जित लोकांनां स्वतःची भाषा अंगीकारण्यास लाविलें. तथापि ज्याप्रमाणें गॉल व आयबेरियन लोकांमध्यें लॅटिन भाषेचें मूळ स्वरूप बदलून अनेक अपभ्रष्ट भाषा तयार झाल्या त्याचप्रमाणें आर्यन् लोकांच्या मूळ भाषेनें स्वरूप नष्ट होऊन जित लोकांनीं अनेक अपभ्रष्ट भाषा बनविल्या. तथापि आर्यन् लोकांनीं ज्यांनां जिंकलें त्या मूळच्या लोकांच्या रक्तांत व त्यांच्या मूळच्या कलाकौशल्यांत फारसा कांहीं फरक झाला नाहीं. ग्रीक व इराणी या लोकांच्या उदाहरणांवरून पाहतां हे जेते आर्यन् लोक त्या जितांच्या मानानें रानटीच होते, व त्यामुळें या जित लोकांची सुधारणाच आर्यन् लोकांनीं पत्करली. ग्रीसमध्यें पेलोस्जियन काळांतील सुधारलेली लोकस्थिति होमरच्या काव्यांतील काळापर्यंत चालून पुढें कांहीं काळ स्तिमित युग पसरलें व नंतर पुनरुज्जीवन होऊन अथेन्स शहर नव्या ग्रीक सुधारणेचें केंद्रस्थान बनलें. इकडे इराणी लोकांनीं मोठें साम्राज्य स्थापिलें पण त्यांची भाषा इराणाबाहेर कोठेंहि पसरली नाहीं.

**ग्रीकरोमन काळ.**—यूरोपखंडाला सुसंघटित स्वरूप या प्राचीन काळांतल्या दोन मोठ्या सामान्यानंतर आलें. त्यांपैकीं एक रोमन उर्फ आर्यसंस्कृति स्वीकारलेले इटालियन लोक आणि कार्थेजियन लोक यांच्यामध्यें जमिनीवर व समुद्रावर झालेला सामना होय व दुसरा ग्रीक व इराणी लोकांच्यामध्यें प्रथम यूरोपमध्यें मॅरेथान येथें व नंतर आशियांत अलेक्झांडरच्या वेळीं झालेला. ग्रीकांनीं मिळालेल्या विजयानें उत्साहित होऊन अथेन्स येथें तत्त्वज्ञानाची व अलेक्झांड्रिया येथें भौतिक शास्त्रीय संशोधनाची पुष्कळ वाढ केली. तिकडे रोमन लोकांनीं सशास्त्र कायदेपद्धतीची व सुराज्यव्यवस्थेची उत्तम वाढ केली. ग्रीकांनीं ग्रीक वाङ्मयाचा व ग्रीक संस्कृतीचा प्रसार केला व रोमन लोकांनीं लॅटिन भाषा व लॅटिन संस्कृतीचा प्रसार केला. उलट पक्षीं इराणी लोक व कार्थेजिनीयन लोक यांनीं तसलें कोणतेंच कार्य हातीं घेतल्याचें दिसत नाहीं.

पुढें ग्रीक राष्ट्र व रोमन राष्ट्र यांच्यामध्यें सामना सुरू होऊन त्यांत उभयतांनीं एकमेकांस अंशतः जिंकलें म्हणजे राजकीय दृष्ट्या रोमन राष्ट्रानें ग्रीक राष्ट्रास जिंकलें. तर उलट ग्रीकांचा विजय बौद्धिक होता. तत्त्वज्ञान, वाङ्मय व कला यांच्या क्षेत्रांतील तो होता. रोमन साम्राज्याच्या इतिहासांत आगस्टाईन युग प्रसिद्ध आहे. कायदेशीर तर रोमन राष्ट्रानें फार परिणत केलें, स्पेन व ब्रिटन येथील रानटी टोळ्यांनां त्यानें लॅटिन संस्कृति देऊन सुधारलें; पण ग्रीक संस्कृतीपुढें मात्र रोमन राष्ट्र पराभूत होऊन ग्रीक संस्कृतिमय बनलें. या संस्कृतिभवनास मासिडोनियाच्या अलेक्झांडरपासून सुरुवात झाली पण त्याचें कार्य अपुरें राहिलें. तथापि पूर्वेकडे बाल्कनप्रांतापासून तारसपर्वतापर्यंतचा मुलूख ग्रीक संस्कृतीनें संस्कृत झाला. यूफ्रेटीसनदीकडील प्रदेश,' व सीरिया आणि ईजिप्त हे देश ग्रीक संस्कृतीनें लवकरच व्यापले. आणि अखेर ग्रीक संस्कृतीनें रोमन राष्ट्रावर आपला पूर्ण पगडा बसविला. इकडे इराणवरील ग्रीकांची सत्ता लयास जाऊन तिच्या जागीं रोमन सत्ता सुरू झाली. याच सुमारास इराणच्या पूर्वेस हिंदुस्थान व चीन या दोन देशांत बौद्धधर्मानें मोठी क्रांति घडवून आणली. या बौद्ध संप्रदायद्वारा भारतवर्षांत शिरलेल्या आर्यन लोकांच्या शाखेनें विस्तीर्ण आशिया खंडाच्या अर्ध्याअधिक भागांत आपल्या संस्कृतीचा प्रसार केला. रानटी लोकांस उच्च संस्कृतीखालीं आणण्याचें जें कार्य पुढें ख्रिस्ती संप्रदायानें हातीं घेतलें तेंच कार्य त्या संप्रदायाच्या कित्येक शतकें अगोदर भारतीय संस्कृतीच्या या बौद्ध संप्रदायशाखेनें मोठ्या प्रमाणावर व यशस्वीपणें केलें होतें.

**ख्रिस्तीसंप्रदाय.**— ख्रिस्तीसंप्रदायाचा इतिहास अवगत करून घेण्यास रोमची त्रिभंगलेली स्थिति लक्षांत घेणें अत्यावश्य आहे. हिब्रू एकेश्वरीमत, कांहीं पंथांतून ग्रीक तत्त्वज्ञान व इजिप्तमधील मूर्तिपूजा यांयोगें बरेंच स्पष्ट झालेलें होतें. तेव्हां या जमीनींस ख्रिस्त्यमत—बीज पेरण्यांत आलें. भूमध्यसमुद्राभोंवतीं रोमनांनीं स्थपलेली शांतता मतप्रसाराला फार उपयोगी पडली. पण हें ख्रिस्तीसंप्रदायाचें बीज ज्या ज्या जमीनींत यावेळीं पडलें त्या जमिनी एकाच प्रकारच्या नव्हत्या. पश्चिम लॅटिन प्रदेशांत रोमन कायद्याच्या पाठिंब्यामुळें त्याचें झाड द्वयांग झालें. बिझांशिअमकडे पूर्वभागांत ग्रीक तत्त्वज्ञानाशीं त्याला झगडावें लागलें व अनेक पाखंडी पंथांनीं त्याचा कोंडमारा केला; सेमेटिक आणि इजिप्शियन पूर्वराष्ट्रांत महंमदाच्या एकेश्वरी संप्रदायानें त्याला पार धुडकावून लाविलें. यरूशलेमबाहेर पडलेल्या ख्रिस्तेतर ज्यूलोकांनीं मोठ्या आश्चर्यकारक प्रभावानें एक नवथाच पंथ निर्माण केला.

**अशियांतील लोकांचा यूरोपांत प्रवेश** — राजकारणांत रोमनसत्तेनें एक मोठी चूक केली; ती अशीकीं, पूर्व धोरणाला अनुसरून ऱ्हाईन व डॅन्यूब ही सरहद्द तिनें कायम केली. बाल्टिक आणि काळासमुद्र यांनां जोडणाऱ्या रेषेपर्यंत ती पुढें जाती तर जगाचा सर्वच इतिहास निराळा झाला असता. पण हंगेरीचीं गवताळ मैदानें तिनें आपल्या ताब्यांत घेतलीं नाहींत म्हणून जेव्हां अटिलाच्या नेतृत्वाखालीं आशियाच्या घोडस्वारांनीं पश्चिमेकडे डॅन्यूबपर्यंत मोहीम केली, तेव्हां त्यांनीं हंगेरी ज्याठिकाणीं ॲड्रियाटिकच्या माथ्याशीं येते त्या जागीं पूर्व आणि पश्चिम यांची ताडातोड केली. त्याचप्रमाणें त्यांनीं जर्मनांनां त्रास दिला तेव्हां सॅक्सन्स, फ्रँक्स, अलेमनी, आणि गॉथ असे जर्मनांचे संघ बनून, ते संघ लॅटिन पश्चिम प्रदेश व ब्रिटन या

ठिकाणीं गेले. व्हंडालांचा असाच एक संघ आफ्रिकेंत उतरला व त्यानें कार्थेज येथें वस्ती केली.

**रोमन साम्राज्याची घडामोड.**—याप्रमाणें पांचव्या व सातव्या शतकांच्या दरम्यान रोमचें साम्राज्य खाली नाऊन, रोमनांच्या आधीच्या तीन विभागांप्रमाणेंच नवीन तीन विभाग निर्माण झाले. पश्चिम लॅटिन प्रदेश टयूटनच्या योगें बळावला; इजिप्शियन आणि सेमेटिक पूर्वराष्ट्रांत मुसुलमानीधर्मानें वार्य घातलें. व या दोन टोकांच्या मध्यें पुष्कळ शतकें पर्यंत बाल्कन्स पासून टारस पर्यंतचें बिझान्शिअमचें पूर्व-रोमनसाम्राज्य पाचरी प्रमाणें राहिलें होतें. हें साम्राज्य भाषेनें ग्रीक, कायद्यानें रोमन, समाज व शासन या बाबतींत पौरस्त्य, आणि धर्मानें पाहतां ख्रिस्ती, असें होतें. यांत कांहीं काळपर्यंत कान्स्टंटिनोपल हें जगांतील मोठें शहर, व्यापार, विद्वत्ता आणि चैन यांचें केंद्रस्थान बनलें होतें.

**यूरोपांत मुसुलमानांची चढाई.**—तथापि, अगदीं पश्चिमेकडे मुसुलमानांनीं लॅटिन ख्रिस्ती प्रदेशावर हल्ला चढविला होता. जिब्राल्टरची सामुद्रधुनी ओलांडून एका पिढीइतक्या काळाच्या आंतच त्यांनीं संपूर्ण स्पेन व बहुतेक गॉलचा नैऋत्य भाग हस्तगत केला. शेवटीं टूर्सच्या लढाईनें त्यांची गति कुंठित करून, पिरीनीजच्या पार मागें त्यांनां हाकून लाविलें. हें मुसुलमानांशीं युद्ध त्याच्या परिणामांवरून पाहातां, ख्रिस्ती संप्रदायाच्या इतिहासातलें एक अतिशय आणीबाणीचें म्हणतां येईल. ज्यानें हें युद्ध जिंकलें तो फ्रँक मानववंश यानंतर सहाजीकच यूरोपखंडांत पुढें आला.

**फ्रँक लोकांचा उत्कर्ष**— लॅटिन रोमवर हल्ला करणाऱ्या टयूटॉन्समध्यें फ्रँक्स हे पहिल्या प्रतीचे म्हणतां येतील. इकडे गॉथ व व्हंडाल लोक कांहीं काळ पूर्वेकडे राहिले व तेथून पाखंडी ख्रिस्तीसंप्रदायाची दीक्षा घेऊन परत आले; तिकडे ब्रिटनमध्यें सॅक्सन्सनां परकीय धर्मप्रचारकांनीं ख्रिस्ती केलें; पण फ्रँकलोक लोक पुढें ऱ्हाइन नदी ओलांडतांना असद्धर्मी होते व पुढें त्यांनां त्यांच्या जित प्रजेकडून ख्रिस्ती दीक्षा मिळाली. आणखी, फ्रँक लोकांनीं इतर टयूटॉन प्रमाणें आपलें जर्मनमूळ सोडलें नाहीं व याचा फायदा असा झाला कीं लॅटिन प्रांतांतील टयूटॉनिक जोर कमी झाला तेव्हां ऱ्हाइनच्या पलीकडून यांनीं त्यांनां मदत पाठविली. तेव्हां फ्रँक हे लॅटिनाविषयीं कळकळ बाळगणारे व त्यांनां बल पुरविणारे होते यांत संशय नाहीं. या दोघांनां एकत्रित करून एक बलाढ्य राष्ट्र निर्माण करण्याला दोघांनांहि परकीय अशा लोकांच्या स्वारीची भीति मात्र हवी होती. त्याप्रमाणें अशी स्वारी दोन वेळां झाली; पहिली मॅरोव्हिंग घराण्याच्या अमदानींतली असून, त्यावेळीं हूणांचा चालॉन्स येथें पराभव करण्यांत आला व दुसरी कारोलिंगीयन कारकीर्दींतील असून, तेव्हां सॅरासेनांचा टूर्स येथें पराभव झाला. टूर्सच्या लढाईनंतर दोन पिढ्यांनीं, म्हणजे ज्यावेळीं फ्रँकनें इटलींतील पाखंडी लॉंबर्ड लोकांनां जिंकून व उत्तरजर्मनींतील सॅक्सनांनां ख्रिस्ती धर्मांत ओढून आपलें बल व धर्मश्रद्धा सिद्ध करून दिली, तेव्हां रोमचा सर्वांत वडील मुलगा म्हणून त्याला गणण्यांत आलें. इ.स.८००मध्यें पोपनें फ्रँक राजा जो चार्लस दि ग्रेट त्याला रोमन बादशाही तक्तावर अभिषेक केला.

**रोमन साम्राज्य व धर्मसंस्था.**—या संधिस जर बिझॅंशियम इस्लामांच्या हातीं पडलें असतें, तर मात्र डॅन्यूब व पिरीनीज प्रदेशांतील ख्रिस्ती व मुसुलमान यांच्या प्रत्यक्ष भांडणांपासून सर्व टयूटॉनिक व लॅटिन यूरोप मिळून एकच राष्ट्र तयार होणें शक्य होतें. पण चार्लस दि ग्रेट नंतर सहा शतकेंपर्यंत माळरान व ओसाडी या बाजूनें होणारे हल्ले कमी कमी होत गेले व रोमन साम्राज्याच्या पडद्यामागील उत्तर व पश्चिम यूरोप आशियांतून त्यांच्यावर होणाऱ्या हल्ल्यांच्या भीतीपासून निखालस मुक्त झालें. याचा परिणाम असा झाला कीं, एकीची वाढ खुंटत जाऊन पूर्वींचे भांडणतंटे सुरू झाले. पुढील धामधुमीच्या काळांत इस्लामाविरुद्ध झालेल्या क्रुसेड युद्धांतून सर्व ख्रिस्तीमतानुयायी एकत्रित करण्याचें ध्येय दिग्दर्शित केलें गेलें; तथापि रोमनसाम्राज्य व पोपराज्य यांच्यामधील भांडणांत लॅटिन आणि टयूटॉनिक हें मूलभूत द्वंद्व एकसारखें वावरत होतें. रोमनसाम्राज्य नांवालाच कायतें रोमन होतें, पण खरें पाहतां तें जर्मन होतें. पोप आणि साम्राज्य यांच्या भांडणांत, पोपचा जय झाला. एवंच, चार्लसच्या मृत्यूनंतरचीं तीन शतकें वांझ निघालीं नाहींत असें निःसंशय म्हणतां येईल. धर्मसंस्थेनें लॅटिन आणि टयूटॉनिक यूरोप एकाच धार्मिक रचनेंत गोंवून टाकिलें व तें किती सघन व सामर्थ्यवान केलें याची कल्पना त्यावेळच्या अनेक मोठ्या देवळांमठांच्या हल्लीं दिसून येणाऱ्या अवशेषांवरून होईल. उलट पक्षीं, साम्राज्यानें लष्करी सरकार स्थापण्याच्या आपल्या खटपटीनें यूरोपला क्षात्रधर्माची दीक्षा दिली; या गोष्टीचें स्मारक म्हणून आपणांस अनेक जुने पडके किल्ले दिसतात.

**व्हिकिंग किंवा नॉर्स लोक.**—ज्या ठिकाणीं ख्रिस्त्यांचा किंवा मुसुलमानांचा त्रास नाहीं, अशा फ्रँक आणि लॅटिन जगाच्या बाहेरील अगदीं उत्तरेकडच्या प्रदेशांत, चार्लस दि ग्रेटच्या कालाच्या थोडें आगेंमागें, जर्मन सदृश असणारी एक आर्यांची जात उदयास आली. आज स्कँडिनेव्हियन नॉर्स लोक किंवा व्हिकिंग फार थोडे दिसतात. इतर मानववंशांनां उत्तेजित करणें हें जणूं काय त्यांचें ब्रीद होतें. त्यांची हालचाल समुद्रावरची होती व माळरान किंवा ओसाड अरण्य यांपेक्षां महासागर विस्तीर्ण असल्यानें, अश्वंजन किंवा उष्ट्रजन यांच्यापेक्षां व्हिकिंग्सची सत्ता शेवटीं जास्त ठरली हें साहजिक होय. पश्चिमेकडे यूरोपीय द्वीपकल्पाच्या सर्व किनाऱ्यांनां त्यांनीं वेढून टाकिलें. पूर्वेकडे बाल्टिक ओलांडून रशियन स्लावांवर त्यांनीं अम्मल बसविला. ब्रिटन-

मध्यें आल्फ्रेड राजाच्या आधिपत्याखालीं अँगल आणि सॅक्सन लोकांनीं त्यांनां तोंड दिलें; पण इतर यूरोपखंडांत त्यांनां फारसा अडथळा न होऊन,त्यांनीं कारोलिंगियन राज्य विस्कळित केलें; व अशा रीतीनें नकळत धर्मसंस्थेला साम्राज्य बुडविण्याच्या कामीं त्यांनीं चांगली मदत दिली, असा एक प्रकार सीन नदीच्या कांठीं घडला. त्या ठिकाणीं नॉर्मन संस्थानाच्या धास्तीमुळें पारिस येथें एक रोमान्स राज्य उदयास आलें व त्यानें हळू हळू साम्राज्याचा अधिकार झुगारून दिला. नार्मन विल्यमनें इंग्लंड जिंकण्यांत व पुढील इंग्लंड आणि फ्रेंच यांच्या भांडणांत आपणाला अशी एक क्रिया दिसून येते कीं, जीमुळें फ्रँक व लॅटिन कुळांत अर्वाचीन बलिष्ठ राष्ट्रांचा जन्म झाला. कोकिळा ज्याप्रमाणें दुसऱ्याच्या घरट्यांत आपलीं अंडीं घालते त्याचप्रमाणें या व्हिकिंग कोकिळेनें फ्रँक व लॅटिन घरट्यांत हीं राष्ट्ररूपी अंडीं उबविलीं. घरटीं बांधणारें जें रोमन साम्राज्य व धर्मसंस्था यांच्यांत वितुष्ट आल्यामुळें हा प्रकार घडला; शिवाय बिझँशियमनें माळरान व ओसाड अरण्य यांत राहणाऱ्या व्हिकिंगपेक्षां जास्त प्रबल अशा परोपजीवी पक्ष्यांनीं अटकाव केला होता. या अवधींत नैर्ऋत्येस स्पेनमध्यें एक सामर्थ्यवान् व असहिष्णु राष्ट्र उदयास येत होतें.

अशा रीतीनें १३ व्या शतकाच्या अखेरीस ब्रिटन, फ्रान्स आणि स्पेन हीं आपापल्या राज्यांत बलिष्ठ होऊन राहिलीं होतीं. यावेळीं पोपराज्यानें जिकडे तिकडे साम्राज्याचा पाडाव करून टाकिला होता व याचा परिणाम म्हणजे, लॅटिन-ख्रिश्चन जगांत कांहीं आपल्या शक्तीचा पुरा अजमास न लागलेलीं राज्यें, व कांहीं आपल्या दुबलतेचा नीट थांग न लागलेलीं लहान सहान जर्मन व लॅटिन संस्थानें नांदू लागलीं होतीं. तुर्कांनीं बिझँशियमचा पाडाव करून कॉन्स्टँटिनोपल इस्लामला जोडण्यापूर्वींचीं दोन शतकें अशीं गेलीं कीं, त्या काळांत जुनें जग मृत्युपंथास लागलें होतें व नवीन जग उदयोन्मुख झालें होतें व या दोन्ही गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून घडत होत्या हें विशेष आहे. प्राचीन ग्रीसमधील नगर-राज्यांतून जसें घडून आलें त्याप्रमाणें पुढील काळांतील मध्ययुगांत जर्मनी आणि इटली या राष्ट्रांमध्यें राजकीय दुर्बलतेपासून अशा तऱ्हेचा एक नवा जोम उत्पन्न झाला कीं, त्यामुळें पुढील शतकें राजकीय घडामोडींच्यादृष्टीनें विशेष कार्यकारी व महत्त्वाचीं झालीं.एका बाजूला व्हेनिसियाटिक, स्वेबियन व उत्तर इटालियन शहरांनीं व्यापारविषयक कार्य सुव्यवस्थितपणें हातीं घेतलें व होकायंत्राचा उपयोग समुद्रावर दूरदूरच्या सफरी करण्याच्या कामीं करण्याची सुरुवात केली. दुसऱ्या बाजूला ख्रिस्ती संप्रदायाच्या आश्रयाखालीं लॅटिन भाषा बोलणाऱ्या अनेक युनिव्हर्सिट्या निघून त्यांनीं ज्ञानाच्या क्षेत्रांत स्वतंत्र संशोधनास चांगली चालना दिली.

**आधुनिक काळास आरंभ.**—१५ व्या शतकांत मध्ययुगीन परिस्थिति मागें पडून नव्या नव्या कल्पनांचा हळू हळू उदय होऊं लागल्यामुळें यूरोपीय समाजांत एक प्रकारची चलबिचल उडालेली होती. या सुमारास परस्परसंबद्ध अशा कित्येक फार महत्त्वाच्या गोष्टी घडल्या. १२ पासून ख्रिस्ती धर्मवीर (क्रूसेडर्स) व इस्लामी धर्मवीर यांच्यामध्यें अनेक निकराचे सामने होऊन अखेर १४५३ मध्यें कॉस्टॅंटिनोपल शहर मुसुलमानांच्या हातीं पडलें, आणि यूरोपमध्यें तुर्क लोक बळावत गेले. या गोष्टीचा प्रतिक्रियात्मक परिणाम असा झाला कीं, उत्तरेकडे व्हिएन्ना येथें हॅप्सबर्ग नांवाच्या जर्मनवंशी राजघराण्यानें आपली सत्ता अधिकाधिक सुसंघटित व दृढ केली. पोपच्या सत्तेला विरोध करणारें रोमन-जर्मन साम्राज्य १२५० मध्यें लयास गेलें. व त्याच्या पाठोपाठ व्हिएन्ना येथें हॅप्सबर्ग घराण्याचें साम्राज्य उदय पावून पोपसत्तेला व ख्रिस्ती समाजाला आधारभूत बनलें. कॉस्टॅंटिनोपल शहर तुर्कांच्या हातीं पडल्याचा दुसरा एक मोठा अनपेक्षित परिणाम झाला. तो असा कीं, छापण्याची कला सुधारून पूर्णत्वाप्रत पोहोंचली होती. अशा सुमारास कन्स्टँटिनोपल येथें संगृहीत होऊन राहिलेलें ग्रीक विद्वज्जनबळ व ग्रीक ग्रंथबळ तेथली धारा सुटल्यामुळें पश्चिमेच्या बाजूला उदयास येत असलेल्या युनिव्हर्सिट्यांच्या आश्रयास गेलें. अशा रीतीनें या सुमारास,ज्ञानविषयक स्वतंत्र संशोधनाच्या क्षेत्रांत आणि धर्मसत्तेच्या क्षेत्रांत नव्या जोमाची लाट उसळली.पहिल्या म्हणजे ज्ञानक्षेत्रीय लाटेमुळें विद्यापुनरुज्जीवन (रेनेसन्स) व ख्रिस्ती धर्मसुधारणा (रेफर्मेशन) हे दोन महत्त्वाचे परिणाम पुढें घडून आले. आणि धर्मसत्ताक्षेत्रीय लाटेमुळें कौंटर रेफर्मेशन व हॅप्सबर्ग-बोर्बोन घराण्यांची अनियंत्रित सत्ता हे परिणाम घडून आले.

आधुनिक काळांत जगाच्या इतिहासांत ज्या अत्यंत झपाट्यानें घडामोडी चालू आहेत त्यांच्या मार्गावरील १४९२ हें साल हें एक मोठें महत्त्वाचें ठिकाण आहे. या वर्षीं तीन महत्त्वाच्या गोष्टी झाल्या. पहिली गोष्ट ही कीं फ्रान्सनें इटालीवर स्वारी केली. या स्वारीमुळें मध्ययूरोपांतील राजकीय परिस्थितीला किती दुबळेपणा आलेला होता हें सिद्ध झालें व त्याबरोबरच यूरोपच्या पश्चिमेकडील नवीं राष्ट्रें कशीं बळावत चाललीं होतीं तें प्रत्ययास आलें. दुसरी महत्त्वाची गोष्ट ही कीं, स्पेननें ग्रानाडा घेतलें आणि त्या द्वीपकल्पांतील इस्लामची सत्ता नष्ट केली व त्याबरोबरच तेथून ज्यू लोकांनां हांकून लाविलें. तिसरी महत्त्वाची गोष्ट ही कीं, याच सालीं कोलंबसानें अमेरिकाखंड शोधून काढिलें. अमेरिकाखंडाचा शोध ही गोष्ट तत्कालीन अनेक चळवळींचें पर्यवसान होय. कान्स्टँटिनोपल येथून उपलब्ध झालेले अनेक ग्रीक ग्रंथ छापले जाऊन ते वाचनांत आल्यामुळें पृथ्वीवर अनेक दिशांनीं भौगोलिक संशोधन करण्याची कल्पना लोकांच्या डोक्यांत उद्भवली. मूरलोकांबरोबर सुरू झालेल्या झगड्यामुळें

पोर्तुगीज व स्पॅनिश लोकांना आटलांटिक महासागराचा दूरवरचा प्रदेश शोधून काढण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. इटालीमधील शहरांतील व्यापारविषयक कार्यांत जी जोराची चळवळ केली तिच्यामुळें दर्यावर्दीपणाचें कौशल्य लोकांच्या अंगीं वाढत गेलें. समुद्रावर दूरवर सफरी करण्याचा यूरोपांतील लोकांत जो नवा उत्साह दिसूं लागला त्याला नव्या उदयोन्मुख राष्ट्रांच्या परस्पर स्पर्धेमुळें अधिकाधिक उत्तेजन मिळालें. समुद्रावरील दूरदूरच्या सफरींच्या या कार्यक्रमांत प्रामुख्यानें पुढाकार घेणारा जो हेनरी दी नॅव्हीगेटर तो अंशतः इंग्रज वंशांतला व अंशतः पोर्तुगीज वंशांतला होता.

**फ्रान्सचें वर्चस्व.**—यानंतरच्या काळांत यूरोपखंडांत अनेक राष्ट्रांचा समुदाय आपापल्या ऐतिहासिक परंपरेनुसार स्वतःची प्रगति करून घेण्याचा प्रयत्न करीत असलेला दृष्टीस पडतो. तीस वर्षांच्या युद्धामध्यें जर्मनीचे दोन विभाग पडले. एक उत्तरेकडला प्रॉटेस्टंट पंथी पक्ष; याला स्कँडिनेव्हियाची मदत होती व दुसरा दक्षिणेकडील बादशाही पक्ष; हा तुर्कांबरोबर झालेल्या युद्धामुळें सांप्रदायिक दृष्टया व लष्करी दृष्टया बलिष्ठ बनला होता. फ्रान्स देशहि या सुमारास बलिष्ठ बनला होता; तो इतका कीं, त्यानें राजकीय सामर्थ्याच्या जोरावर नवा प्रॉटेस्टंट धर्मपंथ पूर्ण दडपून टाकून कॅथोलिक पंथाचा सुसंघटितरीत्या पुरस्कार केला. तथापि अशा स्थितींतहि रिशेल्यूच्या एकांतिक सांप्रदायिक धोरणाला पाठिंबा देऊन उत्तरेकडील जर्मन लोकांना हॅप्सबर्ग घराणें व दक्षिणेकडील कॅथॉलिक पंथ यांच्या विरुद्ध मदत करून आपला शेजारी जो जर्मनी देश त्याला राजकीय दृष्टया कमकुवत स्थितींत ठेवण्याचें कार्य फ्रान्सनें साधिलें. स्पेनमधील हॅप्सबर्ग राजघराण्यानें इंग्लंडवर आर्मेडा नांवाचें प्रचंड आरमार पाठविलें आणि नेदर्लंडमधील प्रॉटेस्टंट लोकांबरोबर सतत ८० वर्षें झगडा चालू ठेविला. या झगड्यांत अखेर स्पॅनिश हॅप्सबर्ग घराण्याला अपयश आलें. त्याचप्रमाणें आस्ट्रियन हॅप्सबर्ग घराण्याला उत्तर जर्मनीबरोबरच्या झगड्यांत हार खावी लागली. पुढें लवकरच फ्रान्सबरोबरच्या झगड्यांत स्पेनचें राष्ट्र कमकुवत बनलें. इंग्लंडमधील क्रॉमवेलनें डनकर्क येथें फ्रान्सचा पक्ष घेऊन कॅथॉलिकपक्षपाती स्पेनवर शेवटचा आघात केला आणि त्या योगानें कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट या दोन ख्रिस्त धर्मपंथांतील यादवी युद्धें कायमचीं बंद पाडिलीं. लवकरच पीरिनीजच्या तहानें स्पेन गतप्रभ ठरून फ्रान्स महत्पदाप्रत पोंहचल्याचें ठाम ठरलें.

**इंग्लंड-फ्रान्सचा १८ व्या शतकांतील झगडा.**—कॅथोलिकपंथी फ्रान्सनें हें जें राजकीय सत्तावर्चस्व संपादन केलें तें कॅथोलिकपंथी स्पेन व आस्ट्रिया यांच्या विरुद्ध प्रॉटेस्टंटपंथी उत्तर यूरोपला मदत करण्याचा डाव खेळून केलें. सदरहू कालावधींत म्हणजे १५ व्या शतकांतील शतवार्षिक युद्धानंतरच्या आणि १७ व्या शतकाच्या अखेरीच्या व्यापारविषयक युद्धें सुरू होण्यापूर्वींच्या काळांत फ्रान्सनें इंग्लंडबरोबर कोणतेंहि महत्त्वाचें युद्ध केलें नाहीं, या गोष्टीवरून फ्रान्सच्या मनांत कोणता डाव साधावयाचा होता ही गोष्ट अधिक स्पष्टपणें निदर्शनास येते. उपर्युक्त समिन्यांत पूर्ण विजयी झाल्यावर फ्रान्सनें आपला मोर्चा इंग्लंडकडे वळविला. १८ व्या शतकांतल्या फ्रान्सबरोबर झालेल्या अनेक युद्धांत इंग्लंडनें स्वतः प्रॉटेस्टंटपंथी असूनहि कॅथोलिकपंथी आस्ट्रियाचा पक्ष अनेकदां स्वीकारला ही गोष्ट यूरोपच्या इतिहासांतील त्या शतकांत पारमार्थिक हेतूपेक्षां राजकीय हेतू अधिक बलिष्ठपणें वावरत होते हें स्पष्ट दर्शविते. यासंबंधानें आणखी ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, स्पेनचें कर्तव्य यूरोपच्या संरक्षणाच्या दृष्टीनें संपलें होतें परंतु आस्ट्रियाचें संपलें नव्हतें. कारण मूर लोक हतवीर्य बनत चालले होते पण तुर्क लोक बलिष्ठ बनत होते; व या तुर्कांच्या वाढत्या सत्तेपासून यूरोपचें संरक्षण करण्याचें काम आस्ट्रियाच्या शिरावर पडलें होतें.

अशा परिस्थितींत फ्रान्सनें परस्पर विरोधी धोरण स्वीकारलें. इंग्लंडबरोबरच्या सामन्यामुळें फ्रान्सला सांप्रदायिक दृष्टया कॅथोलिक पंथाचाच पुरस्कार करणें प्राप्त होतें परंतु उलट पक्षीं आस्ट्रियाच्या हॅप्सबर्ग बादशहांच्या साम्राज्य सत्तेशीं झगडावयाचें असल्यामुळें कॅथॉलिकपंथी आस्ट्रियाशीं विरोध करून उत्तर जर्मनींतील प्रॉटेस्टंट सत्तेशीं राजकीय सख्य करण्याचें विसंगत धोरण फ्रान्सनें चालविलें. हॉलंड हें बोलून चालून लहान राष्ट्र होतें. या राष्ट्रानें स्वतःच्या स्वाभाविक परिस्थित्यनुरूप जगाला कांहीं कांहीं नव्या कल्पनांची जोड करून दिली. उदाहरणार्थ, लहान लहान लोकसत्ताक संस्थानांचा संघ बनवून त्याची राजकीय घटना त्यानें तयार केली. तसेंच जॉइंट—स्टॉक कंपन्या म्हणजे समाईक भांडवलाच्या कंपन्या बनवून मोठमोठे व्यापारधंदे कसे चालवावे याचें उदाहरण जगाला घालून दिलें. परंतु राजकीय वर्चस्वाकरितां यूरोपांतील प्रमुख राष्ट्रांत जीं युद्धें झालीं त्यांत या लहान राष्ट्राला मुळींच महत्त्वाचा भाग घेतां आला नाहीं. इंग्लंडनें यूरोपखंडांत जमिनीवर लष्करी सामर्थ्यानें विजय मिळविण्याचें धोरण सोडून देऊन दूरवर उत्तर अमेरिकेंत आणि हिंदुस्थानांत फ्रान्सला पराभूत करून समुद्रावर आपलें आरमारी वर्चस्व प्रस्थापित केलें. फ्रान्सला इंग्लंडबरोबर जमीन आणि समुद्र यावर जो दुहेरी सामना द्यावा लागला त्यामध्यें चौदाव्या लुईच्या नेतृत्वाखालीं फ्रान्सची सर्व सत्ता पारिस येथें केंद्रीभूत होऊन तें एक बलिष्ट सत्ताधारी एकतंत्री राज्य बनलें.

**आधुनिक रशियाची कामगिरी.**—या सुमारास यूरोपच्या पूर्व भागांत रशिया हें राष्ट्र उदयास आलें. हें राष्ट्र स्लाव्ह वंशी व आर्यन् भाषा बोलणारें असून, इंग्लंड व फ्रान्स या देशांना ज्या उत्तरेकडील लोकांनीं (नॉर्समेन) राष्ट्रस्वरूपाप्रत पोहोंचविलें त्यांच्याच वंशांतील लोकांनीं

रशियांत नवजीवन घातलें. परंतु हें रशियाचें राष्ट्र लॅटिन वंशी ख्रिस्ती समाजाशीं विरोध करावयास सिद्ध झालें. कारण त्याला ख्रिस्ती संप्रदायाची दीक्षा कान्स्टंटिनोपल येथून मिळाली होती. मध्य युगाच्या उत्तरार्धांत मोंगोलियांतील घोडेस्वारवृत्तीच्या लष्करी बाण्याच्या लोकांनीं स्वारी करून रशिया जिंकून घेतला त्यामुळें रशियाचा प्रगतीचा मार्ग कांहीं काळ बंद पडला. पण याच काळांत यूरोपच्या पश्चिमेकडील कांहीं देश सुसंघटित राष्ट्रस्वरूप पावून चांगलें बालिष्ठ बनलें. वरील स्वारीनंतर दोन शतकांनीं रशियानें मोंगोलियन लोकांची सत्ता झुगारून देऊन स्वतःस स्वतंत्र केलें. आणि तुर्कांनीं कान्स्टंटिनोपल घेतल्यामुळें निराधार बनलेल्या पूर्व यूरोपांतील ख्रिस्तसंप्रदायी समाजाचें पुढारीपण स्वतःकडे घेतलें. पीटर दी ग्रेटनें बहुतेक अंशीं आशियाखंडांत सुलतानशाही एकतंत्री सत्ता चालवून रशिया देशाची झटपट सुधारणा करून त्याला यूरोपांतील प्रमुख राष्ट्रांच्या पंक्तींत आणून बसविलें. अगदीं अलीकडे जपाननें जो मार्ग स्वीकारला त्याचें पीटर दी ग्रेटच्या अमलाखालचा रशिया हें तंतोतंत सर्वगामी उदाहरण होय. रशियाच्या या आकस्मिक स्थित्यंतरामुळें मध्ययूरोपची राजकीय परिस्थिति एकदम आमूलाग्र बदलली. आणि त्यामुळें १७व्या शतकाच्या अखेरीपासून १९व्या शतकाच्या आरंभापर्यंत यूरोपांत जीं अनेक मोठालीं युद्धें झालीं त्या वेळच्या यूरोपीय राष्ट्रांमधील परस्पर शत्रुमित्रत्वाच्या नात्यामध्यें रशियाचा हात वावरूं लागल्यापासून फार अस्थिरता चालू राहिली. इकडे पश्चिम यूरोपमध्यें आणि समुद्रावर इंग्लंड व फ्रान्स यांच्यामधील शत्रुत्व सारखें चालू होतें, तर तिकडे यूरोपखंडांतील इतर भागांत रशिया सारखी ढवळाढवळ करून अनेक देशांतील सुलतानांचे बेत व आडाखे फिसकटून टाकीत होता. याच काळांत प्रशियांतील एका मागून एक पुढें आलेल्या अनेक मोठ्या कर्तृत्ववान पुढारी इसमांनीं मध्यस्थाची भूमिका स्वीकारून मोठ्या धूर्तपणानें प्रॉटेस्टंटपंथी उत्तर जर्मनींत प्रशियाचें वर्चस्व प्रस्थापित केलें. सप्तवार्षिक युद्धामध्यें इंग्लंडनें ऑस्ट्रियाची दोस्ती सोडून देऊन प्रशियाच्या फ्रेडरिक दी ग्रेटचा पक्ष उचलला. पण पुढें इंग्लंडनें फ्रेडरिकची बाजू सोडून दिली, आणि त्याबद्दल सूड उगविण्याकरितां म्हणून २० वर्षांनंतर इंग्लंडबरोबर स्वातंत्र्याकरितां केलेल्या झगड्यांत युनायटेड स्टेट्सचें सहाय्य करण्यास फ्रेडरिकनें फ्रान्सला मोकळीक दिली.

**यूरोपांतील वैचारिक स्थित्यंतर.**—मध्ययुगांत यूरोपांतील अनेक शहरांत व युनिव्हर्सिट्यांत ज्ञानविषयक नव्या नव्या कल्पनांची जी लाट सुरू झाली होती व ज्या लाटेचें एक अंग म्हणून प्रॉटेस्टंट धर्मपंथांतील वैयक्तिक मतस्वातंत्र्याचें तत्व पुढें आलें होतें, त्या लाटेला पुढील शतकांत दुहेरी स्वरूप प्राप्त झालें. पहिलें स्वरूप, अनियंत्रित एकतंत्री राजसत्ता नष्ट करून लोकनियंत्रित राज्यव्यवस्था देशोदेशी स्थापन करण्याची चळवळ हें होय. आणि दुसरें स्वरूप, ख्रिस्ती सांप्रदायिक बायबली मतें अग्राह्य ठरवून शास्त्रीय नूतन संशोधनानें सिद्ध झालेलीं मतें प्रस्थापित करण्याची चळवळ हें होय. एकीकडे, राज्यकारभार पद्धतींतील घडामोडी संबंधानें पाहतां हॉलंड व स्वित्सर्लंड या देशांत संघिक राज्यकारभारपद्धतीच्या (फेडरल गव्हर्नमेंट) कल्पनेला मूर्तस्वरूप देण्यांत आलें. आणि इंग्लंडमध्यें लोकनियुक्त मंत्रिमंडळायत्त राज्यकारभारपद्धतीचा (कॅबिनेट गव्हर्नमेंट) पाया घातला गेला. दुसरीकडे कोपर्निकस, केपलर, बेकन, गॅलीलिओ व न्यूटन या शास्त्रज्ञांनीं शास्त्रीय संशोधनाचें काम, प्राचीन ग्रीक राष्ट्राचें रोमन लोकांनीं व सेरासन लोकांनीं निर्दालन केल्यामुळें ज्या ठिकाणीं खुंटून पडलें होतें तेथून पुढें चालू केलें. उत्तर जर्मनीनें या शास्त्रीय संशोधनाच्या व ख्रिस्तीधर्मसुधारणेच्या कार्यास थोडाफार हातभार लावला हें खरें असलें, तरी विशिष्ट भौगोलिक परिस्थितीच्या कचाट्यांत सांपडल्यामुळें जर्मनीनें लष्करी सामर्थ्य अधिकाधिक वाढवून लष्करी सोटेशाहीचा बाणा अधिकाधिक स्वीकारला. फ्रान्स लष्करी बाण्याचा व कॅथॉलिक पंथाचा होता तरीहि त्यानें ट्यूटानिक वंशी यूरोपिय समाज व लॅटिन वंशी यूरोपीय समाज यांच्यांमध्यें मध्यस्थाचें काम करण्याचें धोरण चालू ठेवलें. इंग्रज तत्ववेत्ता लॉक यानें राजकीय हक्कांच्या क्षेत्रांतील स्वातंत्र्य व समता या कल्पना तात्विक स्वरूप देऊन पुढें मांडिल्या त्या युनायटेड स्टेट्सनें इंग्लंडविरुद्ध स्वातंत्र्यप्राप्त्यर्थ उभारलेल्या बंडांत मान्य केल्या, इतकेंच नव्हे तर फ्रान्समध्येंहि राज्यक्रांतीच्या काळांत त्याच कल्पना लोकांनीं ध्येय म्हणून अंगीकारल्या.

**नेपोलियन.**—नेपोलियनच्या नेतृत्वाखालीं फ्रान्सनें आपला दुहेरी झगडा चालू ठेवला; समुद्रावर इंग्लंडबरोबर आणि जमीनीवर फ्रान्सच्या पूर्वेकडील राष्ट्रांबरोबर. नेपोलियनला फ्रान्सची सत्ता वाढविण्याची संधि आस्ट्रिया आणि प्रशिया यांच्यामधील अपरिहार्य राजकीय स्पर्धेमुळें मिळाली. त्यानें पृथकपणें आस्ट्रियाच्या सत्तेचा आस्टर्लीझच्या रणभूमीवर आणि प्रशियाच्या सत्तेचा जेनाच्या रणभूमीवर मोड केला. परंतु या दोन राष्ट्रांबरोबरच्या सामन्यांत नेपोलियनच्या विरुद्ध पक्षांत जेव्हां रशियाची भर पडली तेव्हां एकंदर सामना नेपोलियनला डोईजड होऊन त्यांत अखेर पूर्णपणें त्याच्या अंगावर बाजू आली.

**नेपोलियनोत्तरचीं पन्नास वर्षें.**—नेपोलियनबरोबरच्या युद्धाचा शेवट झाला त्या वेळीं दोन राष्ट्रें यूरोपांत सर्वांहून बलिष्ठ बनलेलीं होतीं. एक रशियाचें राष्ट्र व दुसरें ब्रिटनचें राष्ट्र. या युद्धानंतर तह ठरविण्याकरितां जी प्रथमच कॉंग्रेस भरली तिच्यांत नवे दोस्त-राष्ट्र-संघ स्पष्टपणें दिसूं लागले. फ्रान्स इंग्लंडच्या पक्षाला वळला, आणि आस्ट्रिया व प्रशिया रशियाच्या कक्षेखालीं शिरले. यानंतर अर्धें शतक

प्रशिया अगदीं असहाय स्थितींत पडून राहिला. कारण रशियानें आस्ट्रियाचा पूर्णपणें पाठीराखेपणा चालविला होता. पूर्व, मध्य आणि दक्षिण यूरोपच्या सर्व भागांत अनियंत्रित लष्करी सत्तेचें आणि धर्मसत्तेचें वर्चस्व चालू राहिलें. या अवधींत पश्चिम यूरोपांतील दोन वरिष्ठ राष्ट्रांमध्यें आणखी एका नव्या बलिष्ठ राष्ट्राची भर पडली. ज्याला ब्रिटन मातृस्थानीं होतें आणि ज्याला फ्रान्स स्वातंत्र्यदातृस्थानीं होतें असें नवें युनायटेड स्टेट्सचें राष्ट्र सामर्थ्यांप्रत व उत्कर्षांप्रत चढत होतें. दक्षिण अमेरिकेंतील देश स्पेन व पोर्तुगाल यांच्या साम्राज्यसत्तेविरुद्ध बंड करून स्वतंत्र होत होते; आणि कॅनिंग नांवाच्या इंग्रजानें शोधून काढलेलें ( मनरो डॉक्ट्रिन ) तटस्थ वृत्तीचें धोरण युनायटेड स्टेट्सनें अंगिकारलें होतें. फ्रान्स इंग्लंडबरोबर सख्य राखून भूमध्यसमुद्रापलीकडे आफ्रिकाखंडांतील प्रदेशांत आपली साम्राज्यसत्ता स्थापन करण्याच्या कार्यांत गुंतला होता.

**क्रिमियन युद्ध व फ्रँकोजर्मन युद्ध.**—तुर्कस्थानच्या दुबळेपणामुळें अखेर आस्ट्रिया आणि रशिया यांच्या मनांत एकमेकाला विरोधी अशा लोभमूलक भावना उत्पन्न झाल्या. त्यानंतर जें क्रिमियन युद्ध झालें, तें युद्धच हल्लींच्या जगाच्या राजकीय परिस्थितीची गुरुकिल्ली आहे. क्रिमियन युद्धाचा विशेष टिकाऊ असा कोणताच परिणाम झालेला नाहीं असें कांहीं जण म्हणतात पण तें मत चुकीचें आहे. या युद्धांत पश्चिम यूरोपांतील राष्ट्रें दोस्तसंघ बनून रशियाबरोबर लढत असतां आस्ट्रिया तटस्थ राहिला होता, इतकेंच नव्हे तर रशियावर बाजूनें हल्ला होण्याची भीतीहि त्यानें रशियाच्या मनांत उत्पन्न केली होती. या वर्तनाबद्दल आस्ट्रियाला रशियानें क्षमा केली नाहीं. लवकरच पुढें आस्ट्रियाचा फ्रान्सनें सॉल्फेरिनो येथें, आणि प्रशियानें सडावा येथें पराभव केला व त्यामुळें आस्ट्रियाची जी हीन दशा झाली ती रशिया स्वस्थ मौजेनें पहात राहिला. आस्ट्रियाच्या या पराभवामुळें उत्तरेकडे संयुक्त जर्मन राष्ट्र तयार झालें आणि दक्षिणेकडे इटालीचें संयुक्त राष्ट्र बनलें. सेडन येथें चार्लस दी ग्रेट याच्या साम्राज्याच्या फ्रेंच व जर्मन विभागांची पुन्हां एकदां अदलाबदल झाली. इ. स. १२५० पासून १८७० पर्यंत फ्रान्सनें जर्मनीला दुभंगलेला ठेवून सर्व यूरोपखंडावर आपलें वर्चस्व चालविलें होतें. १८७० पासून फ्रान्स कमजोर होऊन यूरोपखंडावर प्रॉटेस्टंट जर्मनीचें वर्चस्व स्थापन झालें. पण हें वर्चस्व मिळविण्याकरितां जर्मनीनें स्वातंत्र्याच्या कल्पना झुगारून देऊन लष्करी बाण्याचा स्वीकार केला. जर्मनीच्या या वृत्तीमुळें जगाच्या परिस्थितींत अस्थिरता चालू ठेवण्यास जर्मनी कारणीभूत झाला आहे.

जर्मनीची मूळ वृत्ति पाश्चात्य वळणाची असली तरी राजकारणामध्यें जर्मनीला पौरस्त्य देशांचें धोरण स्वीकारावें लागलें आहे.

**इंग्लंडांतील औद्योगिक क्रांति.**—जगाची आजची परिस्थिति हा पुष्कळ अंशीं जी औद्योगिक क्रांति इंग्लंडमध्यें १८ व्या शतकांत घडून आली तिचा परिणाम आहे. ही औद्योगिक क्रांति तत्पूर्वकालीन व्यापारविषयक परिस्थितीचा आणि नव्या शास्त्रीय संशोधनाचा परिणाम होय. शास्त्रीय संशोधन आणि वाढता व्यापार हे प्रॉटेस्टंट धर्मपंथाचा उदय आणि अमेरिका, आस्ट्रेलिया इत्यादि नव्या जगाचा शोध यांचे परिणाम आहेत. इंग्लंडमध्यें आल्फ्रेड राजानें डेन्स लोकांविरुद्ध केलेल्या झगड्यामुळें, नॉर्मन लोकांचा पुढारी वुइल्यम दी कॉंकरर यानें इंग्लंडदेश जिंकल्यामुळें आणि पुढें इंग्लंडनें फ्रान्सबरोबर केलेल्या शतवार्षिक युद्धामुळें राष्ट्रीयत्वाची भावना बलवत्तर वाढलेली असली तरी इंग्लंडदेश यूरोपखंडापासून अलग, जलवेष्टित असल्यामुळें इंग्लंड लष्करी बाण्यापासून विमुक्त स्थितींत आहे. तथापि यूरोपखंडामध्यें विचारांच्या व आचारांच्या ज्या मोठाल्या विस्तृत लाटा उसळत असत त्यांत इंग्लंड अंशभागी झाल्यावाचून रहात नसे. ही गोष्ट लक्षांत ठेविली म्हणजे असें दिसून येईल कीं यूरोपमध्यें युद्धांचा धुमधडाका चालून त्याची खराबी चालू असतां तिकडे इंग्लंड धर्माचे बाबतींत प्रॉटेस्टंटपंथी आणि राज्यकारभाराचे बाबतींत लोकनियुक्त बनला. तसेंच नव्या नव्या शास्त्रीय शोधांच्या आधारावर उद्योगधंद्यांच्या आणि व्यापाराच्या बाबतींत जो पुढारी बनला तो केवळ दैवयोग म्हणतां येणार नाहीं.

**नवे शास्त्रीय शोध.**—नव्या नव्या शास्त्रीय शोधांचा व्यावहारिक गोष्टींकडे उपयोग करण्याचें काम एक शतकभर झपाट्यानें चालू होतें. तथापि १८७० च्या फ्रँको जर्मन युद्धापर्यंत या एकंदर शास्त्रीय शोधांचा परिणाम अखिल जगांतील राजकीय परिस्थितींत मोठा महत्त्वाचा फरक उत्पन्न करण्याइतका झाला नव्हता. या शास्त्रीय शोधांमुळें हल्लीं असा परिणाम झाला आहे कीं, माणसांनां फार जलद दूरवर प्रवास करितां येतो; लहानमोठ्या वस्तू दूरवर जलद पाठवितां येतात; तसेंच हरएक कल्पनांचा दूरवर फैलावहि जलद करतां येतो. अर्थोत्पादक संस्थांची आणि राजकीय संस्थांची संघटना विशेष निराळ्या पद्धतीनें आणि बऱ्याच निर्दोषीपणानें करणें शक्य झालें आहे. या परिस्थितीमुळें राजनीतिशास्त्राच्या नव्या कल्पना पुढें येत असून त्यांची लॉकच्या आणि फ्रेंच राज्यक्रांतिकारकांच्या जुन्या व्यक्तिस्वातंत्र्यप्रधान कल्पनांशीं स्पर्धा चालू आहे. या नव्या कल्पना डार्विननें जगास परिचित करून दिलेल्या विकासवाद या शब्दानें दर्शविल्या जातात. राष्ट्रराष्ट्रांमध्यें चालू असलेला जीवनार्थ कलह सर्व जग व्यापून राहिला आहे. आणि तो उत्तरोत्तर अधिकाधिक तीव्र होत चालला आहे. त्यामुळें प्रत्येक राष्ट्रांत स्वतःच्या अंगीं सर्वांगीण कार्यक्षमता पाहिजे ही कल्पना अधिकाधिक जोरानें पुढें येत आहे. या कार्यक्षमतेच्या कल्पनेबरोबर कोणत्याना कोणत्या तरी स्वरूपांत

समाजसत्तावाद डोकें वर काढीत आहे. यामुळें सांप्रतच्या तीन बलाढ्य राष्ट्रांपुढें म्हणजे ब्रिटन, फ्रान्स आणि युनायटेड स्टेट्स यांच्यापुढें वैयक्तिक स्वातंत्र्याचा नाश होऊं न देतां कार्यक्षमता अशी कशी आणावी हा फार महत्वाचा प्रश्न आहे.

मागील इतिहासाचें सिंहावलोकन करून चालू असलेल्या विसाव्या शतकांत राजकीय क्षेत्रांत कोणत्या घडामोडी होतील यांचा साधारणपणें अंदाज सांगणें सोपें नाहीं, पण प्रवृत्ति सांगतां येईल.

**रशिया**—रशियानें आशियाकडील सैबेरियाचा पासिफिक महासागरापर्यंतचा प्रदेश नवीन वसाहतींनीं व रेल्वेच्या फांट्यांनीं व्यापून टाकला आहे. जपानबरोबर झालेल्या युद्धांत पराभव झाल्यामुळें रशियाला जबरदस्त धक्का बसला. त्या धक्क्यानें जागृत झालेल्या रशियांत प्रशियाप्रमाणें एकतंत्री पण महाकार्यक्षम राज्यपद्धति सुरू होणें किंवा फ्रान्सप्रमाणें पूर्णपणें लोकसत्ताक राज्यपद्धति सुरू होणें या दोहोंपैकीं कोणती तरी एक गोष्ट घडून येणार हें निश्चित होतें. त्याप्रमाणें झारची अनियंत्रित सत्ता कांहीं काळ चालली. गेल्या महायुद्धाच्या बिकट परिस्थितीमुळें त्रस्त झालेल्या जनतेनें क्रांति करून बोल्शेव्हिक सत्ता स्थापन केली व पुढें राजघराण्यांतील माणसांस ठार मारून राजसत्तेचा बीमोड केला.

बोल्शेविकांनीं प्रथम जुनी व्यवस्था मोडून टाकण्याच्या बऱ्याच अव्यवस्थित व अतिरेकाच्या गोष्टी केल्या व खासगी मालमत्ता नाहींशी करून परराष्ट्रीय कर्जेहि नाकबूल केलें. बोल्शेव्हिकांनीं स्त्रिया सार्वजनिक मालकीच्या केल्या अशीहि एक अफवा उठली होती. परंतु हळूहळू अतिरेकाच्या गोष्टी एक एक कमी होत गेल्या व त्यांची राज्यपद्धति जास्त सुसंघटित होऊं लागली. परकीय राष्ट्रांनींहि बोल्शेव्हिकांवर घातलेला बहिष्कार हळूहळू कमी केला व त्यांनीं बोल्शेव्हिकांविषयींची भीति कमी कमी होत गेली. इंग्लंड वगैरे राष्ट्रांनीं रशियाशीं व्यापारी तह केले व पुढें जिनोवा परिषदेंतहि रशियाला अंतर्भूत केलें.

रशियाची सध्यांची शासनघटना पहिल्या विभागांत दिलीच आहे. तीवरून असें दिसून येईल कीं कोणत्याहि लोकांच्या इच्छेविरुद्ध बोल्शेव्हिक सत्ता त्यांच्यावर लादली जात नाहीं. तर प्रत्येक प्रांताला अगर राष्ट्रकाला पूर्ण स्थानिक स्वायत्तता असून कांहीं विशिष्ट बाबतींतच त्यावर मध्यवर्ती सरकारची सत्ता चालते. यामुळें लष्करी सत्तेच्या जोरावर सत्ता वाढविणें हें रशियन सरकारचें ध्येयच नाहीं. रशियाला सैन्य अगर आरमार ठेवावयाचें ते स्वसंरक्षणापुरतेंच ठेवावयाचें त्यामुळें परराष्ट्राशीं वितुष्ट येण्याचें कारण नाहीं. कदाचित् सैबेरियाबद्दल चीन किंवा जपानकडून कुरापत निघून रशियाला युद्धांत पडण्याची पाळी येण्याचा संभव आहे. तसेंच रशियाचा व्यापारहि फारसा वाढलेला नाहीं; त्यामुळें त्या बाबतींतहि रशियाला लढाई करण्याचें वगैरे कारण नाहीं. रशियाशीं तंटा होण्याचें जर कांहीं कारण आज असेल तर बोल्शेव्हिक मतप्रसार एवढेंच संभवतें.

**फ्रान्स.**—फ्रान्सला उत्तरोत्तर ब्रिटन व अमेरिका यांना चिकटून रहाणें अवश्य आहे. गेल्या महायुद्धांत फ्रान्सचें जीवित ब्रिटन व अमेरिका यांच्या मदतीवरच अवलंबून होतें. तसेंच समुद्रापलीकडे दूर देशीं फ्रान्सचा जो साम्राज्यांतर्गत मुलूख आहे तो मुलूख म्हणजे बलिष्ठ आरमारी सामर्थ्य असलेल्या राष्ट्राच्या हातीं दिलेले एक प्रकारचे ओलीसच आहेत. अशा प्रकारें यूरोपांतील इतर कोणत्याहि राष्ट्रापेक्षां फ्रान्सचा हात प्रबल आरमारी सत्तावान् राष्ट्रांच्या जबड्यांत अधिक सांपडलेला आहे. आणि ही स्थिति जगाच्या फायद्याचीच आहे असें म्हणतां येईल. कारण त्याच्या योगानें जगांतील स्वतंत्र असलेल्या भागांत अँग्लो सॅक्सनी धोरणाचा जो पगडा बसला आहे त्याला आंत शिरून अंगलाग्यी होण्याकरितां जरूर असलेलें लॅटिन संस्कृतीचें धोरण चालू राहील अशी आशा आहे.

सध्यां यूरोपीय राजकारणांत फ्रान्सला जरी बरेंच महत्त्व प्राप्त झालें आहे व जर्मनी जरी महायुद्धाच्या भारामुळें चिरडून गेला आहे तरी जर्मनीचें सान्निध्य फ्रान्सला केव्हांहि विश्रांति घेऊं देणार नाहीं. फ्रान्सचें नांव जरी महायुद्धांतील विजयी राष्ट्रांच्या यादींत दिसलें तरी आर्थिक बाबतींत फ्रान्सची स्थिति बरीच खालावलेली आहे, व फ्रान्सचा मुलूखहि गेल्या महायुद्धांत बराच उध्वस्त झाला आहे, तेव्हां फ्रान्सला आर्थिक व लष्करी बाबतींत पूर्वस्थितीवर येण्यासच बरेच दिवस लागतील, व तोपर्यंत व त्यानंतरहि फ्रान्स बरींच वर्षे दोस्त राष्ट्रांस व विशेषतः इंग्लंड व अमेरिका यांस चिकटून राहील.

**ब्रिटन.**—ब्रिटनबद्दल बोलावयाचें म्हणजे असें म्हणतां येईल कीं, ब्रिटनचें राष्ट्र स्वतंत्रताप्रिय, स्वदेशाभिमानी आणि साम्राज्यवादी असल्यामुळें अखिल जगांतील राष्ट्रांच्या सामर्थ्यांत परस्पर समतोलपणा राखण्याच्या दृष्टीनें ब्रिटनला कांहीं एक विलक्षण प्रकारचें महत्व प्राप्त झालें आहे. ब्रिटिश साम्राज्याचा जो केंद्रभाग म्हणजे इंग्लंड देश तो जलवेष्टित अलग असल्यामुळें ब्रिटनचें राष्ट्र एका दृष्टीनें विशेष सामर्थ्यवान् आहे तर दुसऱ्या दृष्टीनें विशेष दुर्बल आहे. अलगपणामुळें ब्रिटन विशेष सामर्थ्यवान् बनलें आहे याचें कारण असें कीं, खास इतरांपासून अलग नसलेल्या यूरोपांतील इतर साम्राज्यवर्ती देशांना जी गोष्ट साधत नाहीं ती गोष्ट म्हणजे स्वतःची शेती व दुसऱ्यावर राज्य करणाऱ्या लोकांची विशिष्टगुणसंपन्न जात मिश्रण न होऊं देतां बऱ्याच अंशीं शुद्ध राखणें साधतां आलें आहे असें कित्येक लेखक म्हणतात. पण ते हें विसरतात कीं इंग्लंडच्या औद्योगिक उत्कर्षामुळें परक्या रक्ताचे लोक इंग्लंडांत येऊन त्यांचें रक्त तेथील लोकांत मिसळलें आहे. अलगपणामुळें ब्रिटनला एका अर्थी दुबळता आली आहे. कारण

वसाहती स्थापून साम्राज्य वाढविण्याकरितां ब्रिटनला दूरदेशीं आपले लोक पाठवावे लागतात आणि तेच वसाहतींतले लोक भौगोलिक दृष्ट्या दूरवर स्वतंत्र देशांत राहूं लागल्यामुळें त्यांच्यामध्यें स्थानिक देशाभिमान व स्थानिक गुणदोषवैचित्र्य उत्पन्न होऊनं ते मूळ ब्रिटनमधील लोकांनां परके मानूं लागतात. आणि असल्या वसाहतींखेरीज इतर पौरस्त्य देश जिंकून त्या जवेतोपरी परक्या लोकांवर राज्य करावयाचें म्हटलें म्हणजे तें काम अधिकच अवघड जातें. ब्रिटनला प्राचीन रोमन राष्ट्रानें सर्व पश्चिम यूरोप जिंकून तेथें लॅटिन संस्कृति प्रसृत करून सर्व दूरदूरचे प्रांत साम्राज्यांत एकजीव करण्याचें काम मोठ्या प्रमाणावर केलें तसें कांहीं करतां येईल अशी मुळींच आशा नाहीं. यामुळें आणि अमेरिकेनें स्वातंत्र्याकरितां केलेल्या प्रयत्नाविरुद्ध जें अपयश आलें त्या अपयशामुळेंच नवीन धडा शिकून ब्रिटन राजकारणांत एक राष्ट्रसंघरूपी साम्राज्याची नवीन कल्पना सिद्ध करून दाखविण्याच्या प्रयत्नास लागलें आहे. प्रथम हॉलंडनें आणि नंतर युनायटेड स्टेट्सनें अधिक मोठ्या प्रमाणावर घालून दिलेला धडा गिरवून स्थानिक स्वायत्तता असलेल्या अनेक राष्ट्रांचा एका साम्राज्यसत्तेखालीं संघ बनविणें या ध्येयाच्या मागें इंग्लंड लागलें आहे. भविष्यकाळीं हें ध्येय साध्य होणें ही गोष्ट अर्थातच सर्वस्वीं बलाढ्य आरमार जवळ बाळगून त्याच्या जोरावर दूरदूरच्या साम्राज्यांतर्गत भागांत दळणवळण कायम राखण्याच्या शक्यतेवर अवलंबून आहे. शिवाय साम्राज्यांतील इंग्रजी भाषा बोलणाऱ्या निरनिराळ्या लोकांमध्यें उच्च शिक्षणामुळें इतकें शहाणपण वसत असलें पाहिजे कीं, ते स्वतः बऱ्याच अंशीं स्वराज्याच्या हक्कांचा उपभोग घेत असले तरी त्या साम्राज्य सरकारला निरनिराळ्या अवयवांस चांगल्या तऱ्हेनें वागविणें शक्य व्हावें यासाठीं योग्य तऱ्हेची सहकारिता त्यांनीं दाखविली पाहिजे. "पैशाचा शक्य तितका कमी खर्च होऊन आणि स्वातंत्र्याचा शक्य तितका कमी अपहार होऊन जगांतील बऱ्याचशा भागांत शांतता राखणें या एकाच इच्छेनें प्रेरित होऊन त्यांनीं आपलें वर्तन ठेविलें पाहिजे.

त्याप्रमाणेंच वसाहतींनीं हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, पूर्ण स्वातंत्र्यापेक्षां साम्राज्यांतर्गत स्वायत्तता हीच गोष्ट त्यांस अधिक फायदेशीर आहे. कारण वसाहती साम्राज्याच्या घटक असल्यामुळें परकीय राष्ट्रांशीं जो व्यवहार करावयाचा तो साम्राज्याच्या मार्फत झाल्यामुळें परकी राष्ट्रांवर सर्व साम्राज्याचें वजन पडतें व त्यामुळें त्यांनीं स्वतंत्रपणें व्यवहार केला असतां त्यांस ज्या सवलती अगर फायदे मिळाले असते त्यापेक्षां अधिक फायदे मिळतात. तसेंच कोणत्याहि वसाहतीचें संरक्षण स्वतंत्रपणें करण्यापेक्षां सर्व वसाहतींस सर्व साम्राज्याच्या युद्धसामुग्रीचा उपयोग करतां येत असल्यामुळें हा युद्धसामुग्रीचा खर्च साम्राज्याच्या सर्व भागांवर वांटला जातो. अर्थात् ब्रिटनला यांतिला बराच मोठा भाग आपल्याकडे घ्यावा लागतो.

तसेंच साम्राज्याच्या निरनिराळ्या घटकांचे हितसंबंध एकत्र येत असल्यामुळें त्यांस व्यापारी बाबतींतहि एकमेकांस अनेक सवलती देतां येतात व या दृष्टीनें निरनिराळ्या पदार्थांच्या पैदासीमध्यें सहकार्य केल्यानें परस्परांचा फायदा होऊन सर्व घटकांस निरनिराळे जिन्नस अधिक चांगले व किफायतशीर मिळूं शकतात.

वरील दृष्टीनें हल्लीं ब्रिटनचा उपक्रमहि चालू आहे. वाशिंग्टन परिषदेमध्यें जरी आरमार व वैमानिक दळ कमी करावें अशा तऱ्हेचा ऊहापोह होऊन कांहीं नियम तयार झाले व कांहीं राष्ट्रांनीं ते मान्य करण्याचें ठरविलें, तरी साम्राज्यसंरक्षणाकरितां आरमाराची अतिशय आवश्यकता आहे ही गोष्ट लक्षांत बाळगून ब्रिटननें आरमारी खर्च निरनिराळ्या साम्राज्यघटकांत कसा वांटावयाचा यासंबंधीं योजना केली आहे. व पुढेमागें पूर्वेकडील समुद्रांत युद्ध करावें लागल्यास पश्चिमेकडून आरमार आणण्यांत खर्च व दिरंगाई होण्याचा संभव आहे हें जाणून पूर्वेकडे सिंगापूर येथें एक नवीन आरमारी ठाणें स्थापन करावयाचें ठरविलें आहे. व त्याला लागणारी जागाहि तेथील स्थानिक सरकारानें साम्राज्यसरकारास बहाल केली आहे.

पूर्वेकडे वैमानिक दळ ठेवण्याचेंहि घाटत आहे व वैमानिक ठाणेंहि पूर्वेकडील कोणत्यातरी देशांत लवकरच स्थापन होईल असा रंग दिसत आहे.

व्यापारी दृष्टीनेंहि 'इंपीरियल प्रेफरन्स' या तत्त्वाखालीं साम्राज्यघटकांस जकातीमध्यें विशेष सवलती द्यावयाचें घाटत आहे. या पद्धतीनें हिंदुस्थानचें कितपत हित होईल हा प्रश्नच आहे.

याप्रमाणें साम्राज्याचें संरक्षण व भरभराट करण्याची लष्करी व व्यापारी या दोन्हीहि बाजूंनीं तयारी करण्यांत ब्रिटन गुंतलें आहे.

जमिनीवरच्या लष्करासंबंधींहि सर्व साम्राज्याचें धोरण एकसूत्री करण्यांत येत आहे व परवां हिंदुस्थानांतील लष्कर कमी करण्यासंबंधींच्या प्रश्नास स्टेट सेक्रेटरी यांनीं दिलेल्या उत्तरांत हीच गोष्ट स्पष्टपणें निदर्शनास आली कीं, साम्राज्याच्या युद्धमंत्र्याच्या परवानगीशिवाय हिंदुस्थानांतला एकहि सैनिक कमी केला जात नाहीं.

सध्यां ब्रिटनशीं स्पर्धा करणारीं महत्त्वाचीं राष्ट्रें म्हणजे जपान व अमेरिका हीं होत. यूरोपमध्यें इंग्लंडच्या विरुद्ध जाईल असें आज एकहि राष्ट्र नाहीं. फ्रान्सनें कितीहि जोर दाखविला तरी इंग्लंडला नाखूष करून निकरावर गोष्ट आणण्याचें तो केव्हांहि टाळण्याचाच प्रयत्न करणार. सध्यांच्या जर्मनीपासून खंडणी वसूल करण्याच्या प्रश्नांतहि आॅपर्यंत ब्रिटन हें फ्रान्सनें रुहरमध्यें चालविलेल्या धामधुमीकडे कानाडोळा करीत होतें तोंपर्यंत फ्रान्सनें चढाईचें धोरण चालू ठेवलें

होतें. पण अलीकडे फ्रान्सचा स्वर बदलत चालला आहे. यूरोपमध्यें फ्रान्सशिवाय दुसरें कोणतेंहि एक अगर अनेक राष्ट्रांचा संघ, इंग्लंडशीं समोरासमोर उभें राहून दोन हात करील अशा स्थितींत नाहीं.

तुर्कांनीं स्मर्ना व सिरिया हीं जरी ग्रीस व फ्रान्सपासून परत घेतलीं तरी मेसापोटेमियाच्या वाटेस ते बिलकुल गेले नाहींत अगर लॉसेन परिषदेमध्यें त्यासंबंधीं त्यांनीं अवाक्षरहि काढलें नाहीं. ब्रिटनचें अमेरिकेशीं वितुष्ट येण्याचें कारण राज्यविस्तार किंवा वसाहती यांपैकीं असणें शक्य नाहीं. कारण अमेरिकेला स्वतःचा देशच पूर्णपणें वसविण्यास अजून बरींच वर्षें लागतील व वसाहती स्थापन करण्याचें अगर बाहेरील प्रदेश आपल्या सत्तेखालीं आणण्याचें धोरण अमेरिकेनें फिलिपाइन बेटांना स्वातंत्र्य दिलें त्याच वेळीं सोडून दिलें आहे. तेव्हां अमेरिका व इंग्लंड यांमध्यें जर पुढें मागें लढा उपस्थित व्हावयाचा असेल तर तो आर्थिक बाबतींत होईल. महायुद्धाचा फायदा घेऊन अमेरिकेनें आपला व्यापार सर्व जगभर फार मोठ्या प्रमाणांत वाढविला आहे व अमेरिकन भांडवलहि इतर देशांत गुंतून राहूं लागलें आहे. तेव्हां हा व्यापार सुरक्षित चालावा म्हणून अमेरिकेस आपलें नाविक दळ बरेंच वाढवावें लागेल. व्यापारी जहाजांची संख्याहि या व्यापाराकरितां वाढत राहील व त्याबरोबर आरमारहि सज्ज ठेवावें लागेल. याप्रमाणें वाशिंग्टन येथील ठरावाची शाई वाळली नाहीं तोंच हीं राष्ट्रें पुढील तयारीस लागतील व त्यांची आरमारी खर्चाचीं अंदाजपत्रकें पाहिलीं तर वरील गोष्टच स्पष्ट होईल.

इंग्लंडबरोबर स्पर्धा करणारें दुसरें राष्ट्र म्हणजे जपान होय. जपान व अमेरिका यांची स्थिति अगदीं निराळी आहे. जपान हें पूर्वेकडील इंग्लंडच होऊं पहात आहे व त्याला पूर्वेकडे दुसरा कोणी प्रतिस्पर्धीहि नाहीं. महायुद्धामुळें जपानचा व्यापार वाढला आहेच व त्याकरितां जपानला व्यापारी व लढाऊ जहाजांची संख्या वाढवावी लागणारच. पण त्याबरोबर जपानला आपल्या वसाहती वाढाव्या अशीहि इच्छा होऊं लागल्याचें दिसतें व पुढें मागें जपानची दृष्टि हिंदीमहासागरांतील बेटांकडे वळल्यास त्यांत विशेष आश्चर्य वाटण्यासारखें नाहीं. तेव्हां ब्रिटिश साम्राज्यांतील पूर्वेकडील ठाणीं विशेषतः ऑस्ट्रेलिया व त्यासभोंवतालचीं बेटें यांच्या रक्षणाची तजवीज ब्रिटिश साम्राज्यास जास्त काळजीपूर्वक करावी लागेल व तेथील वसाहतींसहि साम्राज्याशीं अधिक चिकटून राहणें फायदेशीर होईल. सिंगापूर येथील आरमारी ठाण्याच्या योजनेकडे आजच जपान साशंक दृष्टीनें पहात आहे.

**जर्मनी.**—जर्मनी आणि तुर्कस्थान यांची स्थिति विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. कारण त्यांच्या विशिष्ट भौगोलिक स्थितीमुळें त्यांनां एकमेकांशीं गट्टी राखणें भाग आहे. ऐतिहासिक घडामोडींच्या विशिष्ट ओघामुळें यूरोपच्या उत्तरेपासून आग्नेय कोपऱ्यापर्यंतच्या प्रदेशांत अनेक प्रकारच्या संस्कृतींचे लोक वसलेले आहेत. हॉलंड व उत्तर जर्मनींत प्रॉटेस्टंटपंथी लोक; आस्ट्रियांत कॅथॉलिकपंथी लोक, आस्ट्रियाच्या दक्षिणेकडील प्रदेशांत कट्टे पुराणमताभिमानी ख्रिस्तधर्मी स्लाव्ह लोक, आणि त्याच्याखालीं तुर्कस्थानांत मुसुलमानधर्मी लोक अशी ही मालिका लागली आहे. परंतु एका बाबतींत जर्मनी आणि तुर्कस्थान यांची स्थिति समान आहे. ती बाब ही कीं, हे दोन देश एका बाजूला रशियाची प्राधान्यतः जमिनीवरील लष्करी सत्ता आणि दुसऱ्या बाजूला ब्रिटन व फ्रान्स यांची समुद्रावरील सत्ता यांच्यामध्यें वसलेले आहेत. इंग्लंडनें इजिप्त व्यापल्यामुळें आणि फ्रान्सनें मोरोक्को व्यापल्यामुळें जर्मनी आणि तुर्कस्थान या देशांना विशिष्ट महत्त्व प्राप्त झालें आहे. एका बाजूला फ्रान्स आणि दुसऱ्या बाजूला रशिया अशा कचाट्यांत सांपडल्यामुळें जर्मनीला स्वतःचें स्वतंत्र अस्तित्व कायम राखण्याकरितां स्वतःचें लष्करी सामर्थ्य बलवान ठेवणें भाग आहे. तुर्कस्थानलाहि आशियामायनरमधील शेतकरी तुर्क लोकांचें बनलेलें सामर्थ्यवान सैन्य आणि त्याची जलद हालचाल करण्याकरितां लागणारे रेल्वेचे फांटे तयार असल्यामुळें तुर्कस्थानला आपल्या पूर्व सरहद्दीवरील आणि पश्चिम सरहद्दीवरील शेजारी राष्ट्रांनां एकमेकांशीं झुंजत ठेवण्याचें काम दीर्घकाल करीत राहाणें शक्य आहे. नवीन शोधून काढलेल्या अमेरिका, आस्ट्रेलिया, दक्षिण आफ्रिका वगैरे खंडांत नवीन नवीन वसाहती स्थापन करून साम्राज्य वाढविण्याचें जें कार्य कांहीं यूरोपियन राष्ट्रांनीं केलें त्या कार्यांत जर्मनी फार उशिरां पडला त्यामुळें त्याला वसाहतींचें साम्राज्य संपादितां आलें नाहीं. अशा स्थितींत जर्मन साम्राज्याला आपली सत्ता चालविण्याला दोन मार्ग होते. आपलें आरमार वाढवून ब्रिटन आणि युनायटेड स्टेट्स यांचेबरोबर मन्रो डॉक्ट्रिन संबंधानें सामना करणें हा एक मार्ग; किंवा आपलें जमिनीवरील सैन्य वाढवून आपल्या संपत्तीच्या जोरावर तुर्कस्थानच्या मार्फत आपलें वजन खर्च करून रशिया आणि पश्चिम यूरोपांतील राष्ट्रें यांच्या परस्पर सत्तेमध्यें समतोलपणा राखण्याचें काम करणें हा दुसरा मार्ग. हीं दोन्ही कामें न साधलीं तर यूरोपच्या मध्यभागीं असलेल्या आपल्या देशांत हॉलंड प्रमाणें खुल्या व्यापाराचें तत्त्व स्वीकारून स्वतःचे उद्योगधंदे अत्यंत मोठ्या प्रमाणांत वाढविणें हाहि एक मार्ग जर्मनापुढें होता.

त्याप्रमाणें जर्मनीनें आपले उद्योगधंदे व व्यापार सर्व जगावर अतिशय मोठ्या प्रमाणावर वाढविले, व आपल्या देशांत उद्योगाच्या आणि ज्ञानप्रसाराच्या अनेक शाखांत इतकी पद्धतशीर सुधारणा केली कीं जर्मनी हें सर्व जगास आदर्शभूत राष्ट्र बनलें. पण जर्मन राष्ट्रांत उत्पन्न झालेल्या साम्राज्यविषयींच्या राक्षसी महत्त्वा-

कांक्षेमुळें व त्यांच्या पाणबुड्यांच्या धुमाकुळामुळें महायुद्धाच्या वणव्यांत त्यास पडावें लागलें व त्यामुळें त्यानें जगांतील बहुतेक राष्ट्रांची सहानुभूति गमावली, व अखेरीस अमेरिकेलाहि आपली तटस्थ वृत्ति बाजूस ठेवून लढाईच्या आखाड्यांत उतरावें लागलें. त्यामुळें अखेरीस जर्मनीचा पराभव होऊन त्याची अत्यंत हलाखीची स्थिति झाली. तेथील प्रख्यात होहेनझोलर्न घराणें व त्याबरोबरच कैसरची साम्राज्यसत्ता सर्व लयास गेली; व क्षणभर जर्मनीहि खाकावर करून बोल्शेविक होतो काय अशी सर्व यूरोपास भीति वाटत होती. पण सध्यां तेथें एक लोकसत्ताक राज्य स्थापन झालें आहे पण फ्रान्सनें रूहरमध्यें लावलेल्या गळफांसामुळें त्याचेंहि आयुष्य किती काळ टिकेल याबद्दल संशय वाटूं लागला आहे. सध्यां जर्मन राष्ट्र आजचा दिवस जाऊन उद्याचा कसा निभेल या फिकिरींतच असल्यामुळें त्याच्या भवितव्यतेविषयीं कांहींच अनुमान काढतां येत नाहीं.

इंग्लंडनें जर्मनीवर लादलेल्या कर्जाच्या अटी थोड्या कमी करण्याविषयीं सहानुभूति दाखविली आहे.

**तुर्कस्तान व मुसुलमानी राष्ट्रें.**—यूरोपखंडामध्यें खलीफांनीं विजय मिळवून एका काळीं आपली सत्ता हंगेरी व स्पेनपर्यंत पसरली होती. परंतु पुढें मुसुलमानांचें सामर्थ्य कमी होत जाऊन त्यांस हळू हळू पाय मागें घ्यावा लागला. पुढें यूरोपांत जेव्हां राष्ट्रीय भावनांची व स्वातंत्र्याच्या लालसेची वाढ होत गेली त्या वेळीं तुर्कांच्या सत्तेखालचा एक एक प्रांत स्वतंत्र होऊं लागला. तुर्कांची यूरोपाबाहेर हकालपट्टी होण्याची वेळ क्रिमियन युद्धाच्या वेळीं आली होती. पण यूरोपियन राष्ट्रांतील परोत्कर्षासहिष्णुतेमुळें व इंग्लंडला रशिया प्रबळ झाल्यास आपल्या हिंदुस्थानांतील साम्राज्यास धक्का बसेल अशी भीति उत्पन्न झाल्यामुळें त्या वेळीं इंग्लंड व फ्रान्स हीं तुर्कांच्या बाजूनें रशियाच्या विरुद्ध लढलीं व तुर्कांचें यूरोपखंडांत अस्तित्व कायम राहिलें. त्यानंतर तशाच प्रकारचा दुसरा प्रसंग परवाच्या महायुद्धांत आला होता. पण या वेळीं तुर्कांनीं आपलें यूरोपांतील राज्य आपल्या चिकाटीनें व आपल्या तरवारीच्या जोरावरच कायम राखलें. तुर्की राष्ट्रानें पुराणपरंपरेची शृंखला तोडून टाकून खलीफाची राजकीय सत्ता काढून घेऊन ती लोकायत्त केली आहे; यूरोपांत होणाऱ्या शास्त्रीय प्रगतीचा पूर्ण उपयोग करून घेण्याचा उद्योग आरंभिला आहे व तरुण तुर्कांनीं नवीन तऱ्हेच्या संस्था व विचार यांचा अवलंब चालविला आहे. गेल्या महायुद्धानंतर ग्रीसशीं चाललेल्या दुरवणी-युद्धांत तुर्की तरवारीस यश मिळण्याचें मुख्य कारण तिला मिळालेलें नवीन पाणी होय हीं गोष्ट तज्ज्ञांच्या नजरेस आल्यावांचून राहिली नसेल. आतां नुकत्याच झालेल्या लोसेन येथील तहानें तुर्की प्रश्नांचा तात्पुरता तरी निकाल लागला आहे. आतां तुर्कांस आपलें अस्तित्व आपल्या लष्करी सामर्थ्यावर अवलंबून आहे ही गोष्ट स्पष्ट झाली आहे.

तेव्हां यापुढील तुर्कांचें काम म्हणजे प्रथम आपल्या प्रांतांत स्थिरस्थावर करून आपलें बल वाढवावयाचें हें होय. हें बल तुर्कांस स्वतःचें सामर्थ्य वाढवून व इतर मुसुलमान राष्ट्रांची सहानुभूति मिळवून वाढवितां येईल. अर्थात् तुर्क लोक इजिप्त, इराण, अफगाणिस्तान इत्यादि मुसुलमान राष्ट्रांस व हिंदुस्थानांतील मुसुलमानी जनतेसहि आपणांशीं संबद्ध करूं पाहतील; व त्यांच्या जयिष्णु पारमार्थिक संप्रदायाच्या बंधनानें बद्ध झालेलीं हीं राष्ट्रें व लोक पुढें मागें तुर्कांचें साहाय्य करण्यास उद्युक्त झाल्यास त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. मेसापोटेमियांतील शेख महादि व त्याचे दोन पुत्र इंग्रजसरकारनें हद्दपार केल्यामुळें इराणी लोक चिडून निषेध प्रदर्शित करतात व ब्रिटिश मालावर बहिष्कार घालतात यांतील मर्महि हेंच आहे. अफगाणिस्तान सरकारास स्वतंत्र सार्वभौम राजा म्हणून मान देऊन व त्यास लंडनमध्यें वकील ठेवण्याची परवानगी देऊन त्यांस गौरवून आपल्या पक्षास चिकटवून ठेवण्याचा ब्रिटिशांनीं कितीहि प्रयत्न केला तरी त्याच्यातील आजपर्यंत अनेक वेळां प्रचीतीस आलेलें धर्मवेड पुढें मागें त्यांस इतर महंमदी राष्ट्रांकडेच ओढ घ्यावयास लावील व पुढें जर इस्लामी विरुद्ध ख्रिस्ती किंवा बौद्ध संस्कृतीचा सामना व्हावयाची वेळ आली तर त्याचा परिणाम काय होईल याचें अनुमान आज करणें बरेंच धाडसाचें होईल.

उलट पक्षीं हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं मुसलमानांमध्यें द्वैत उत्पन्न झालें आहे आणि बराचसा महंमदी भाग परकी राज्यांखालीं असल्यामुळें चांगलें किंवा वाईट करण्यास असमर्थ आहे. हिजाजचा शरीफ स्वतंत्र राजा झाल्यामुळें मक्केवरील अधिकारामुळें सुलतानास जें प्रामुख्य होतें तेंहि आज गेलें आहे. मध्यआशियामध्यें व इराणच्या सरहद्दीवर अझरबैजनसारखीं राष्ट्रें रशियन लोकशाहीचा भाग झाल्यामुळें त्यांस या बाबतींत तटस्थ रहावें लागेल. चीन, हिंदुस्थान, मोरोक्को, त्रिपोली येथील मुसुलमान लढाईच्या वेळीं तुर्कांच्या उपयोगीं पडणें फारसें शक्य नाहीं. अफगाणिस्तानला स्वतंत्र राष्ट्राची पदवी जरी मिळाली असली तरी अफगणिस्तानची लोकसंख्या फारच थोडी आहे, आणि युद्धांत सर्व मुसुलमानी राष्ट्रें जरी पडलीं तरी युद्धांत सामान व सदर पुरवण्याइतकी ताकद या सर्व राष्ट्रांत राहील किंवा नाहीं याची शंका आहे.

**अमेरिका.**—साठ वर्षांपूर्वीच्या आपसांतील युद्धानंतर अमेरिका पुन्हां पूर्णपणें एकजीव होऊन आपल्या देशांतील अफाट व सुपीक जमीन शेतकरी वर्गानें व्यापून टाकण्याचें काम पुरें करीत आली आहे. अमेरिकेनें देशाच्या पूर्व टोकापासून पश्चिम टोकापर्यंत रेल्वेचे अनेक रस्ते बांधून सर्व खंड सुलभ रीतीनें ओलांडून

जाण्याचे इमारस्ते तयार केले आहेत. भौतिक सुधारणा आणि उद्योगधंद्यांची अतोनात वाढ करण्याचें तर अमेरिकेंत जणूं काय वेड लागून राहिलें आहे. अठराव्या शतकांत प्रचलित असलेल्या ज्या कल्पनांच्या आधारावर तिनें आपली स्वतंत्र स्वराज्याची इमारत उभारली होती तिचा पाया अलीकडे डळमळूं लागला असून नव्या साम्राज्यविषयक कल्पना ग्राह्य करणें अमेरिकेला भाग पडत चाललें आहे. पेकिनवरील स्वारी करून जाण्यांत अमेरिकेनें भाग घेतला. पासिफिक महासागरांतील कित्येक वसाहती जिंकून त्यांच्यावर साम्राज्य सत्ता तिनें चालू केली आहे. पनामाचा कालवा तयार केला आहे आणि दक्षिण अमेरिकेंत शांतता राखण्यासंबंधींची मन्रो डॉक्ट्रिनप्रमाणें पडणारी स्वतःवरची जबाबदारी हळू हळू ती मान्य करीत आहे. या सर्व कारणांकरितां अमेरिकेला स्वतःचें मोठें आरमार ठेवणेंहि भाग आहे. तथापि आज तरी अमेरिका साम्राज्य वाढविण्याकरितां प्रत्यक्षपणें कोणतीहि हालचाल करीत नाहीं. मात्र अमेरिकेमध्यें नवीन येणाऱ्या आगंतूंवर नवीन नवीन नियम लादले जात आहेत व अमेरिकन नागरिकत्वाचे हक्क देण्यासंबंधीं नियमांचा अर्थहि संकोचित करण्यांत येत आहे व हिंदुस्थानच्या रहिवाशांच्या बाबतींत या नियमांमुळें घोटाळा उत्पन्न झाला आहे. यूरोपांतील अनेक राष्ट्रांतील आगंतूंवर तितके कडक नियम आज नाहींत. पण पुढेंमागें या बाबतींत कदाचित् अमेरिकेस यापेक्षां कडक धोरण स्वीकारावें लागेल. चालू नियमांमुळें जपान किंवा चानशीं वितुष्ट येण्याचा संभव आहे.

फिलीपाइन्स बेटांना दिलेल्या स्वातंत्र्यावरून अमेरिका पासिफिक किंवा हिंदी महासागरांतील बेटांवर साम्राज्य वाढविण्याचा प्रयत्न करील असें दिसत नाहीं मात्र दक्षिण अमेरिकेंतील राजकारण आपल्याला अनुकूल अशा पद्धतीनें चालावें याबद्दल खटपट अमेरिकेला नेहमीं करावी लागेल.

तसेंच अमेरिकेचा व्यापार जो महायुद्धामुळें अतिशय वाढला आहे तो तसाच कायम ठेवणें अगर अधिक वाढविणें या गोष्टीकडे अमेरिकेचें लक्ष्य अधिक लागेल. तसेंच अमेरिकेमध्यें या महायुद्धकालीन व्यापारामुळें आलेला अलोट पैसा तेथील सावकारांस कदाचित् परकीय देशांत गुंतवावा लागेल व या परकीय देशांत गुंतलेल्या भांडवलाची सुरक्षितता व अमेरिकेला व्यापाराच्या बाबतींत सध्यां मिळत असलेल्या जकातीच्या वगैरे सवलती कायम ठेवणें अगर नवीन मिळविणें हें अमेरिकेच्या आरमारी सत्तेवर अवलंबून राहील व या बाबतींत कदाचित् पुढें मागें अमेरिकेचा इंग्लंड अथवा जपान या आरमारी व व्यापारी राष्ट्रांशीं तंटा होईल.

**मध्य व दक्षिण अमेरिकेंतील राष्ट्रें.**—यांच्याविषयीं सध्यां कांहीं विशेष लिहितां येत नाहीं. या राष्ट्रांपैकीं अनेकांस अमेरिकेच्या मन्रोमतामुळें उत्पन्न झालेलें संरक्षकत्व राग उत्पन्न करितें पण त्या रागाचा आज व्यावहारिक उपयोग कांहीं विशेष नाहीं. पश्चिम गोलार्धाचें एकीकडे संरक्षक बनावयाचें व प्रसंगीं आपणच वादी असतां आपणच न्याय ठरवावयाचा अशी अमेरिकेची वृत्ति नाहीं असें नाहीं. मध्यें एकदां मेक्सिकोशीं लढाई उत्पन्न होण्याचा संभव टाफ्टच्या कारकीर्दींत दिसून आला. त्या वेळेस अमेरिकन सरकारची वृत्ति कलुषित झाली होती पण ती वेळेवर सुधारली. दक्षिण अमेरिकेंतील राष्ट्रांचा व्यापार एकमेकांशीं व उत्तर अमेरिकेशीं वाढण्यासाठीं संयुक्त प्रयत्न करण्यास सुरवात झाली आहे आणि त्यांचा "ब्यूरो ऑफ अमेरिकन रिपब्लिक्स" हा स्थापन झाला आहे. आणि त्यामुळेंच जरी सर्व राष्ट्रांत सलोखा स्थापन होईल असें नाहीं तथापि संघीकृत होऊन एका ध्येयाचा परिपोष करणें सुरू झालें आहे यांत शंका नाहीं. हा ब्यूरो स्थापन करण्याच्या कामांत अँण्ड्रू कार्नेगी यानें मोठी वर्गणी दिली होती, व कांहीं अंशीं कार्नेगी हा या संस्थेचा उत्पादक होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. दक्षिण अमेरिका यूरोपावर परिणाम करीत नाहीं असें नाहीं. पोर्तुगाल देशामध्यें जें लोकराज्य स्थापन झालें त्याची पूर्व तयारी ब्रेझिलमध्यें झाली. आणि अमेरिकेनें दक्षिण अमेरिकेचें संरक्षकत्व घेण्यापूर्वी तिच्या तावडीसाठीं यूरोपांत लढाया झाल्या. व्हेनेझुएला प्रकरणामुळें अमेरिका व इंग्लंड यांची हातघाई होणार होती पण तो प्रसंग टळला. आतां डच, फ्रेंच व इंग्रज यांच्या स्वामित्वाखालील ताब्यामुळें यूरोप पुन्हां लढाईंत गुंतेल असें वाटत नाहीं.

लाटिन अमेरिका हा प्रदेश यूरोपांतून वसाहती करूं येणाऱ्या लोकांची अपेक्षा करितो. त्याला गौरेतर वर्णाची चाड नसल्यामुळें तो मंगोलियन रक्ताच्या लोकांसहि आश्रय देतो. त्यामुळें गौरेतर वर्णाची चीड असणाऱ्या अमेरिकेची व त्याची दृष्टि भिन्न आहे हें उघड आहे. पण त्याचा परिणाम काय होईल हें सांगतां येत नाहीं. अमेरिकेच्या मन्रो मताला नवीन नवीन फांटे फुटूं लागले आहेत. त्याचा सर्वांत विचित्र फांटा म्हणजे मेक्सिकोमध्यें जपानी लोकांनीं येऊन वसाहत करणें व जमिनी पैदा करणें या गोष्टींस प्रतिबंध करण्यासाठीं युनायटेड स्टेट्सनें केलेला विरोध होय. हें मन्रो मत जर फार व्यापक होऊं लागलें तर त्याच्या योगानें युनायटेड स्टेट्सची पश्चिमगोलार्धसंरक्षकता दक्षिणेकडील राष्ट्रांस बरीच जाचूं लागेल आणि त्यामुळें त्यांमध्यें खटका उडण्याचा संभव आहे.

**जपान.**—जपानला आपलीं बंदरें व्यापाराकरितां खुलीं करणें पाश्चात्य देशांनीं भाग पाडल्यामुळें जपाननें पाश्चात्य देशांवर प्राधान्यांचाच युद्धकला व हत्यारें वापरण्यास शिकून एकप्रकारचा सूड उगविला. जपानमध्यें सामुराई म्हणून प्रसिद्ध असलेल्या लढाऊ क्षात्रियवर्गानें अखिलजपानी समाजांत मिसळून जाऊन सर्व लोकांत क्षात्रवृत्ति पसरविली. सर्व देशभर उत्कट देशाभिमानाचें वारें संचरलें त्यामुळें जपाननें अनेक अंगांनीं आपली कार्यक्षमता वाढविली; व चीन-

बरोबरच्या युद्धांत पोर्ट आर्थर बंदरासंबंधानें जपानला जी अडचण भासली ती दूर करण्याकरितां रशियासारख्या अवाढव्य व पाश्चात्य संस्कृतींतल्या देशांशींहि युद्ध करून त्यांत विजय संपादन केला. जपानच्या या अभ्युदयामुळें पाश्चात्य जगांत ख्रिस्ती खेरीज इतर लोकांच्या नैतिक कल्पना वावरूं लागल्या असल्यामुळें ख्रिस्ती समाजामध्यें काय फेरबदल होतात तें पहाण्यासारखें आहे.

जपाननें जरी रशियासारख्या यूरोपीय राष्ट्रावर विजय मिळविला तरी जपानचें सामर्थ्य त्यामुळें आज कोणत्याहि यूरोपीय सत्तेच्या तोडीचें आहे असें खात्रीनें सांगतां 'येण्यासारखें नाहीं.'

तसेंच जपाननें रशियाशीं जो अतिशय सवलतीचा तह केला त्याचें कारण जपानचा उदारपणा नसून इतर यूरोपीय राष्ट्रांस आपणाबद्दल हेवा वाटूं नये अगर द्वेष उत्पन्न होऊं नये हें असावें असें मानणेंच जास्त सयुक्तिक होईल. कारण रशिया हें यूरोपांत मागसलेलें राष्ट्र म्हणूनच गणण्यांत येतें. तेव्हां जपानची शक्ति अद्यापि यूरोपांतील पहिल्या वर्गांतील राष्ट्राशीं अजमावली जावयाची आहे. गेल्या महायुद्धांत जपान जरी इंग्लंडशीं असलेल्या दोस्तीखातर महायुद्धांत पडलें तरी जवळचेंच किआचौ बंदर घेण्याखेरीज त्यानें कोणतीच कामगिरी केली नाहीं. अगर आपलें लष्करी किंवा आरमारी बल खर्चूं केलें नाहीं. महायुद्धामुळें जपानला आर्थिक फायदा मात्र अतिशय झाला. पूर्वेकडील विशेषतः हिंदुस्थानांतील बहुतेक व्यापार जपानच्या ताब्यांत गेला.

तथापि जपाननें यूरोपीयांचें अनुकरण करून आपलें शास्त्रीय ज्ञान व लष्करी सामर्थ्य बरेंच वाढविलें आहे यांत मात्र संशय नाहीं. तसेंच यूरोपीयांचें अनुकरण करतांना जपानला सर्व यूरोपीय राष्ट्रें सारखींच असल्यामुळें त्यानें ज्या ज्या बाबतींत जीं राष्ट्रें उत्तम असतील त्या त्या बाबतींत त्या राष्ट्रांचें अनुकरण करून यूरोपीय संस्कृतींतील शक्य तितक्या उत्तम गोष्टी आपल्या देशांत आणिलेल्या आहेत.

इंग्लंडशीं पूर्वी झालेल्या दोस्तीच्या तहाची मुदत संपल्यानंतर तो तह पुढें चालू ठेवण्याची उत्सुकता जपाननेंच दाखविली नाहीं.

जपान देश लहान असल्यामुळें त्याला आपल्या वाढत्या लोकसंख्येस व भरभराटीस वाव मिळण्याकरितां आपल्या साम्राज्याचा विस्तार करण्याची जरूरी वाटूं लागेलच व ही "भौगोलिक परिस्थिति" पुढें मागें जपानला दुसऱ्या एखाद्या राष्ट्राशीं झगडावयास लावील. चीन हल्लीं हळू हळू जागा होऊं लागला आहे. तेव्हां जपानला यापुढें चीनमध्यें फारसे हातपाय पसरतां येणार नाहींत. अर्थात् जपानची दृष्टि जवळच्याच पासिफिक महासागरांतील व हिंदी महासागरांतील बेटांकडे प्रथम वळेल व त्यामुळें फ्रान्स अगर ब्रिटन यांपैकीं एखाद्या राष्ट्राशीं पुढें मागें खटका उडेल. त्यांतल्या त्यांत ब्रिटिश साम्राज्याच्या अवाढव्य प्रसारामुळें व त्यांतील वसाहतींच्या स्वतंत्र होण्याच्या प्रवृत्तीमुळें ब्रिटनशींच विरोध येणें अधिक संभवनीय दिसतें. तथापि जपान हा प्रसंग शक्य तितका दूर लोटण्याचा प्रयत्न करील.

त्याप्रमाणेंच व्यापारी बाबतींत जपानचा पुढें मागें अमेरिका किंवा ब्रिटन या राष्ट्रांशीं खटका उडण्याचा संभव आहे. सध्यां हीं दोन्ही राष्ट्रें आपल्या व्यापाराचें संरक्षण करण्याच्या खटपटीस जोरानें लागलीं आहेत.

**चीन.**—याप्रमाणें जगांतील प्रमुख राष्ट्रांच्या प्रवृत्तीचा अंदाज करतां येतो. परंतु चाळीस कोट लोकवस्ती असलेल्या अवाढव्य चीनच्या राष्ट्राची पुढें स्थिति काय होणार हें कोडें मात्र मुळींच उलगडतां येत नाहीं. या अजगर राष्ट्रांची कुंभकर्णी झोंप जरी सध्यां मोडलेली दिसते तरी अजून तें डोळे चोळून फारसें हालचाल करूं लागलें नाहीं. तेव्हां या राष्ट्राच्या भवितव्यतेबद्दलहि मत देणें आज अकालींच होईल.

तथापि आतां तेथें पूर्वीची राज्यपद्धति बदलून लोकशाही स्थापना झाली आहे, अनेक चिनी विद्यार्थी परदेशांत जाऊन शास्त्रें कला वगैरेंचा अभ्यास करून येऊन आपल्या देशाची सुधारणा करण्याची खटपट करीत आहेत. त्यांच्या देशांत विद्वत्तेला पूर्वीपासूनच फार मान देण्याची वहिवाट आहे. ज्ञानकोश, गॅझेटिअर यांसारखे ग्रंथ चीनमध्यें फार पूर्वीपासून तयार करण्याची पद्धति आहे. तेथील राज्यकारभारांत पदवीधरांचाच फक्त प्रवेश होत असे. तेथें पूर्वीच्या परंपरेंत सुधारणा करण्याची खटपट जोरानें चालू आहे व पुराणमताचा लोप होत आहे. यामुळें पाश्चात्य विद्येचा प्रसारहि चीनमध्यें सौकर्यानें होईल. याप्रमाणें हें अवाढव्य राष्ट्र जर नवविचारांनीं प्रेरित होऊन जागृत होईल तर त्यामध्यें फार मोठ्या महत्त्वाकांक्षेचा उदय होऊन आपल्या असंख्य लोकसंख्येनें सर्व जग व्यापून जागतिक साम्राज्य स्थापण्याच्याहि गोष्टी कदाचित चिनी लोक बोलूं लागतील. पण या सर्व गोष्टी भवितव्यतेच्या उदरांत लपून बसलेल्या आहेत. त्यांविषयीं आज निश्चित तर्क कांहीं करतां येत नाहीं. पण या पीत बागुलबोवाचें भय कांहीं यूरोपीय ग्रंथकारांस आज अर्धशतक वाटत आहे.

**हिंदुस्थान.**—हिंदुस्थानचें धोरण कोणत्या तऱ्हेचें आहे असा प्रश्न विचारला असतां उत्तर देण्याची पंचाईत पडते. हिंदुस्थानसरकारचें धोरण काय आहे आणि त्याची भावी जागतिक चळवळींत वृत्ति कशी राहील हें सांगतां येणें आज अशक्य आहे. देशी संस्थानांसंबंधाचें ब्रिटिश हिंदुस्थानाचें धोरण जागतिक चळवळीचा भाग होत नाहीं.

देशी संस्थानांस हिंदुस्थान सरकार स्वप्रजापालनस्वातंत्र्यापलीकडे किती स्वातंत्र्य देईल याविषयीं शंका आहे. देशी संस्थानें राष्ट्रसंघाचे कायदेशीर सभासद होतील किंवा नाहीं

हाहि प्रश्न आहे. हिंदुस्थानचें सरकारचें धोरण ठरविणाऱ्या दोन शक्ती आहेत. एक तर साम्राज्य सरकार आणि दुसरी म्हटली म्हणजे भारतीय जनता. देशाच्या. आसपासच्या राष्ट्रांशीं तहनामे वगैरे करण्याचा हिंदुस्थान सरकारचा हक्क दिवसानुदिवस मर्यादित होत आहे. अफगाणिस्तान आपली वकीलात नव्या तहानंतर इंग्लंडमध्यें ठेऊं लागलें आहे. हिंदुस्थान सरकारचा हात हिंदुस्थानाबाहेर कमी गुंतावा या तऱ्हेचा प्रयत्न चालला आहे. मुंबई सरकारच्या ताब्यांतील एडन सुद्धां काढून तें वसाहतींच्या मंत्र्याच्या ताब्यांत देण्याची खटपट चालू आहे. म्हणजे अनेक एशियाटिक राष्ट्रांशी व्यवहार करण्यास येथें व्हाईसरायला जे अधिकार होते ते आतां नष्ट झाले आहेत. त्यामुळें शेजाऱ्याशीं वागणुकीचें धोरण ठरविणें देखील साम्राज्य सरकारच्या हातीं गेलें आहे. साम्राज्यसरकारच्या धोरणावर हिंदुस्थानी जनतेच्या मताचा परिणाम होत नाहीं असें नाहीं. हिंदुस्थान सरकार साम्राज्य सरकारावर हिंदुस्थानांतील देशी लोकमताचें वजन पाडूं लागल्यास आणि इंग्लंडच्या नीतीचें संयामक झाल्यास इंग्लंडांतील प्रधानमंडळ रागावतें व स्टेट सेक्रेटरीस जागा सोडावयास लावतें हें मांटेग्यूच्या सक्तीच्या राजीनाम्याकडे लक्ष दिल्यास दिसून आलें तरी हिंदुस्थानचें लोकमत हिंदुस्थानच्याच काय पण साम्राज्य सरकारच्या धोरणास देखील थोडेंबहुत नियामक होते ही गोष्ट ताज्या (१९२३ जुलै) लासेन कान्फरन्समध्यें झालेल्या तुर्की तहाच्या फेरफारांवरून स्पष्ट होत आहे.

हिंदुस्थानसरकाराच्या धोरणावर भारतीय लोकमताचा परिणाम झाल्यास सार्वराष्ट्रीय व्यवहारांत काय परिणाम होईल हें सांगतां येत नाहीं. देशाच्या व्यवहारांत मात्र थोडाबहुत निश्चित स्वरूपाचा परिणाम होईल.

हिंदुस्थानाला विसाव्या शतकांत राष्ट्रीय दृष्ट्या करावयाची कामगिरी लक्षांत येण्याकरितां मागील पांच हजार वर्षांचा भारतीय इतिहास पाहिला पाहिजे. या इतिहासाचें सिंहावलोकन करतां पुढील कामगिरी मुख्य तीन प्रकारची ठरते; (१) समाजिक, (२) राजकीय व (३) औद्योगिक. आजचा हिंदुधर्म व हिंदुसमाज हा आर्य, द्रविड, व मंगोलियन या तीन मानववंशांच्या चालीरीतींचें व रक्ताचें मिश्रण होऊन बनला आहे. द्रविड व मंगोलियन लोक कांहीं बाबतींत तरी हीन संस्कृतीचे असल्यामुळें उच्च आर्यसंस्कृतींत पूर्णपणें मिसळून गेले. हें कार्य शकहूणांच्या आगमनानंतर पूर्ण होऊन आजचा हिंदुसमाज इ.सच्या ७।८ व्या शतकांत तयार झाला. त्यानंतर आलेले पारशी, मुसुलमान व यूरोपीय लोक हिंदुसमाजांत अन्तर्भूत झाले नाहींत, कारण या लोकांना स्वतःचा विशिष्ट धर्मग्रंथ व धर्मसंस्थापक यांनीं पुरस्कृत केलेला असा धर्म व संस्कृति हीं आहेत, इतकेंच नव्हे तर पारशी समाजाखेरीज दुसरे म्हणजे मुसुलमानी व ख्रिस्ती समाज यांना स्वधर्मप्रसार व स्वसमाजवृद्धि करण्याचा हव्यास आहे. या त्यांच्या हव्यासामुळें हिंदुस्थानांतील एकतीस कोटी लोकसंख्येपैकीं ६।७ कोटी मुसुलमान असून त्यांपैकीं बरेचसे मूळचे हिंदू असून धर्मांतर केल्यानें मुसुलमान झाले आहेत. तसेंच हिंदुस्थानांत सुमारे अडतीस लक्ष ख्रिस्ती असून त्यांपैकीं सुमारें दोन लक्ष यूरोपीय ख्रिस्ती वगळल्यास बाकीचे सर्व मूळचे हिंदुच आहेत. स्वतःची मूळ हिंदु संस्कृति उच्च दर्जाची असतांहि या बाटलेल्यांनीं ख्रिस्ती किंवा इस्लामी धर्म स्वीकारला तो अर्थात् बहुतांशीं सक्तीमुळें किंवा सक्तीच्या खुषीमुळें स्वीकारला असें इतिहास सांगतो. करितां अनिच्छेनें ख्रिस्ती किंवा मुसुलमान झालेल्या पण मूळ हिंदू असलेल्या सर्वांस आपल्या समाजास चिकटून राहण्यास मदत करावयाची हें महत्त्वाचें कार्य या शतकांत करावयाचें आहे. नुकत्याच चालू झालेल्या शुद्धीकरणाच्या चळवळीनें या कार्यास तोंड लागलें हें शुभचिन्ह आहे.

हिंदुस्थानला जगामध्यें आपल्या धर्मशास्त्रास आणि संस्कारांस अधिकाधिक मान्यता मिळविण्याचा प्रयत्न करावा लागेल. हिंदू पद्धतीचें लग्न वसाहतींत कायदेशीर होत नाहीं, आणि ख्रिस्ती लग्न मात्र कायदेशीर होतें अशा स्थितींत हिंदूस आपल्या कायद्याची इतर ठिकाणीं मान्यता रहावी म्हणूनहि प्रयत्न करावा लागेल.

पण हिंदुस्थानांतल्या या शुद्धीकरणाच्या कार्यापेक्षांहि अधिक महत्त्वाचें व अधिक बिकट कार्य म्हटलें म्हणजे हिंदुस्थानाबाहेर इतर देशांत पसरलेल्या हिंदूंचें हिंदुत्वरक्षण आणि धर्मांतर केलेल्यांचें शुद्धीकरण. ज्या ठिकाणीं पूर्वी हिंदूंनीं जाऊन वसाहती केल्या असे देश अनेक आहेत. त्यांपैकीं सुमात्रा. जावा मसाल्याच्या वगैरे बेटांत सध्यां हिंदु तोंडी लावावयास सुद्धां उरला नाहीं ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. तथापि सिलोन (१०,५८,४५०), ब्रह्मदेश (४,९३,६९९), बलुचिस्तान (४१,२३२), दक्षिण आफ्रिका (१,१५,७०१), मॉरिशस, फिजी, केनया, युनायटेड स्टेट्स, वगैरे अनेक देशांत हिंदुधर्मी लोक असून त्यांचें हिंदुत्व रक्षिण्याचें काम, आणि मूळ हिंदु असूनहि नंतर बाटून ख्रिस्ती किंवा मुसुलमान बनलेल्यांत भारतीय संस्कृतीचा अभिमान जिवंत राखण्याची जबाबदारी हिंदुस्थानांतील हिंदुसमाजावर आहे. ती पार पाडणें हें विसाव्या शतकांतील हिंदुस्थानचें धार्मिक कर्तव्य होय. हिंदुस्थानेतर अनेक देशांत हिंदी समाजाची आज स्थिति काय आहे त्याची सविस्तर माहिती व चर्चा ज्ञानकोशाच्या पहिल्या विभागांत केली आहे.

रा ज की य.—वर सांगितल्याप्रमाणें हिंदुस्थानांतील व हिंदुस्थानेतर देशांतील मिळून अखिल हिंदुसमाजाचें दृढीकरण करण्याकरितां शुद्धीकरण व उच्च हिंदुसंस्कृति उर्फ ब्राह्मणसंस्कृति प्रसृत केली पाहिजे. पण त्याबरोबरच राजकीय स्वायत्तता हिंदुस्थानानें मिळविली पाहिजे. या राज-

कीय स्वायत्ततेची पहिली पायरी म्हणजे हिंदुस्थानाला ब्रिटिश साम्राज्यांतील पूर्ण स्वायत्त वसाहतींचा दर्जा, व इतर देशांत हिंदी लोकांनां यूरोपीयांबरोबरीनें सर्व प्रकारचे हक्क मिळणें हीं होय. अशा रीतीनें अखिल हिंदुस्थानचें मिळून हिंदराष्ट्र आणि भारतस्थ व बहिर्गत हिंदी लोकांचें मिळून हिंदसाम्राज्य या भावना उत्कटतेनें जागृत झाल्या पाहिजेत. पण राजकीय प्रगति येवढ्यानें संपत नाहीं.

संस्कृतिदृष्ट्या हिंदुसाम्राज्याला ख्रिस्ती व मुसुलमानी राष्ट्रांपेक्षां बौद्धधर्मी असलेलीं चीन व जपान हीं राष्ट्रें नजीकचीं आहेत. अर्थात् हिंदुस्थानानें परराष्ट्रीय संबंध जोडण्याचा अधिकारहि ब्रिटिश सरकारपासून मिळवून ब्रिटिश साम्राज्याशीं असलेल्या दोस्तीच्या नात्याप्रमाणें चिनी व जपानी राष्ट्रांशीं दोस्तीचे संबंध जोडले पाहिजेत. विसाव्या शतकांत सांप्रतचे राष्ट्राराष्ट्रांमधील प्रादेशिक स्वरूपाचे झगडे स्वयंनिर्णयाच्या तत्वानुसार बंद पडून किंवा निदान बरेच कमी होऊन राष्ट्रीय भावनेपेक्षांहि व्यापक अशा सांस्कृतिक भावनेच्या स्वरूपानुसार पुढील झगडे होतील असे वाटते. अखिल ख्रिस्ती राष्ट्रें, अखिल इस्लामी राष्ट्रें, व अखिल भारतोद्भवधर्मी (हिंदु व बौद्ध) राष्ट्रें अशा प्रकारें जागतिक राजकारण विभागलें जाणें बरेच संभवनीय आहे. म्हणजे भारतीय संस्कृतीनें स्पष्ट असलेले पूर्व आशियांतील हिंदुस्थान, सिलोन, ब्रह्मदेश, सयाम, तिबेट, चीन, जपान वगैरे देश आणि दक्षिणेकडील द्वीपें म्हणजे सुमात्रा, जावा, बोर्निओ, फिलीपाईन्स वगैरे अनेक बेटें या सर्वांचा मिळून पौरस्त्य संघ बनवावा लागेल. या संघांत पुढाकार जपान राष्ट्र लहान असल्यामुळें व चीन मंदगति असल्यामुळे हिंदुस्थानाकडेच येण्याचा अधिक संभव आहे व पौरस्त्य संस्कृतीचें उगमस्थान मूळ हिंदुस्थानच असल्यामुळें 'वडीलकी'-चा मान हिंदुस्थानला योग्यच आहे. पण 'आधी पात्रता मग मान्यता' या न्यायानें हिंदुस्थाननें आपला राजकीय दर्जा पाहिल्या प्रतीचा वाढविल्याशिवाय हें पुढारीपण मिळणें शक्य नाहीं. त्याकरितां राजकीय स्वायत्ततेचा प्रश्न प्रथम सोडविला पाहिजे.

या विसाव्या शतकांत राजकीय स्वायत्ततेचा मूळ आधार ज्ञानविषयक स्वायत्तता हा आहे. हें शतक केवळ शारीरिक बलाचें नसून ज्ञानबलाचें आहे हें गेल्या महायुद्धानें सर्वांच्या प्रत्ययास आणून दिलें आहे. आपल्यामध्यें उच्च योग्यतेचीं माणसें तयार झालीं पाहिजेत. हिंदुस्थानांतील इंग्रजांचा राज्यकारभार कलेक्टरपासून गव्हर्नर, व्हाइसराय, स्टेटसेक्रेटरी, मुख्य प्रधान, इत्यादिकांपर्यंत कशा प्रकारच्या विद्वान् कर्तृत्ववान व कारस्थानी पुरुषांच्या हातून चालला आहे याचा अनुभवहि प्रत्यहीं येत आहे.

युनिव्हर्सिट्या व संशोधनसंस्था यांच्याकडून स्वतंत्र संशोधनाचे निबंध किंवा पुस्तकें लिहून ज्ञानमूलक सन्मानदर्शक पदव्या मिळविलेले बरेच इंग्रज सिव्हिलियन लोक असतात. दुसऱ्या पक्षीं हे लोक कलेक्टर, कमिशनर, एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर, वगैरे जागांवर कामें करून राज्यकारभारकुशल बनतात. तेव्हां अशा तऱ्हेचें विद्वत्त्व अंगीं असलेल्या हिंदी माणसांचा वर्ग हिंदुस्थानांत भरपूर तयार असणें या गोष्टीवर हिंदुस्थानची राजकीय स्वायत्तता अवलंबून आहे; ही एक बाजू झाली तर दुसऱ्या बाजूला सामान्य जनसमाज शेकडा ६०।७० तरी साक्षर बनून मतदारीचा हक्क योग्य तऱ्हेनें बजावतां यावा म्हणून प्रचलित राजकीय प्रश्नांची चर्चा करण्यास समर्थ बनेल इतका सार्वत्रिक सक्तीच्या शिक्षणाचा प्रसार शक्य तितक्या लवकर देशभर झाला पाहिजे. अशी दोन्ही प्रकारें लायकी वाढविणें या शतकांतलें प्रस्तुत कर्तव्य आहे.

औद्योगिक.—राजकीय सत्तेखालोखाल व्यापारी सत्तेचें महत्त्व आहे. जर चीनसारखा स्वतंत्र देश यूरोपीयांच्या व्यापाराखालीं वांकला आहे; तर मग पारतंत्र्यांत चाचपडणाऱ्या हिंदुस्थानची व्यापाराच्या बाबतींत सध्यां काय स्थिति असेल त्याची कल्पना सहज होईल.

हिंदुस्थानांत जरी अनेक जातींचा कच्चा माल विपुल असला तरी शास्त्रीय ज्ञानाच्या अभावीं व यांत्रिक शिक्षणाच्या अभावीं आपल्या देशांतील कच्चा माल आपणास परक्या देशांत पाठवून तेथून पक्का माल आणावा लागतो. यामुळे या मालावर दुप्पट वाहतुक बसते व ही वाहतुकहि आपलें व्यापारी नाविक दळ नसल्यामुळें दुसऱ्याच राष्ट्रास मिळते. इंग्लंडसारख्या यांत्रिक साधनांनीं पक्का माल तयार करणाऱ्या देशास सर्वस्वी फायदेशीर पण हिंदुस्थानसारख्या अप्रगत राष्ट्रास संशयास्पद असे खुल्या व्यापाराचें तत्त्व हिंदुस्थानास लावण्यांत आल्यामुळें हिंदुस्थानांत नवीन कारखाने काढण्यांत नुकसान सोसावें लागतें. त्यामुळे नवीन धंद्यांस उत्तेजन मिळत नाहीं व नवीन कारखाने निघत नाहींत. त्याप्रमाणेच देशांतल्या देशातहि वाहतुकीस सवलती जशा निर्गत व्यापारास मिळतात तशा अंतर्गत व्यापारास मिळत नाहींत व सरकारहि अंतर्गत जकाती बसवतें त्यामुळें देशांत तयार झालेला मालहि परप्रांतांत बाहेरून येणाऱ्या मालापेक्षां महाग पडतो. सरकार येथील उद्योगधंद्यास देखरेख, भांडवल अगर व्याजाची हमी या द्वारें मदत करीत नाहीं. यामुळे हिंदुस्थानचा व्यापार आर्थिक स्वातंत्र्याशिवाय वाढणें शक्य नाहीं. याशिवाय हल्लीं नवीनच डोकावूं पहाणारें "इंपीरियल प्रेफरन्स" चें तत्व हिंदुस्थानाला जाचक झाल्याशिवाय राहणार नाहीं.

शिवाय हल्लींचा व्यापार व उद्योगधंदे पद्धतशीर ज्ञान न मिळालेल्या परंतु पिढीजाद व्यापारी जातींच्या हातीं आहेत. त्यांनां जगांत होणाऱ्या मोठमोठ्या आर्थिक उलाढालींचें मुळींच ज्ञान नसतें त्यामुळें त्यांनां केवळ परकी बाजारभावावर अवलंबून रहावें लागतें. जगाच्या बाजारांत आपलें वजन पाडण्याची धमक आज त्यांच्या अंगांत असणें

अशक्य आहे. व्यापारी वर्ग सुशिक्षित होऊन नवीन कल्पना ग्रहण करण्यास व नवीन धंद्यांत भांडवल गुंतविण्यास तयार होण्यास अजून बराच कालावधि लागेल.

तसेंच हल्लीं परकी भांडवल हिंदुस्थानांत जास्त मोठ्या प्रमाणांत येऊं लागलें आहे व त्याचशा जमीनीहि परदेशांत स्थापन झालेल्या व्यापारी मंडळींच्या तंत्र्यांत जाती आहेत. पण यानें अकल्याण नाहीं. उलट परकीय भांडवल आपणांस आणखी ओढतां कसें येईल याचा विचार केला पाहिजे. मात्र परका वर्ग देशांत सांपत्तिक दृष्ट्या मोठा झाला म्हणजे देशांतील लोकांस हलक्या जातीचें स्वरूप येईल काय हाहि विचार आपणांस पाहिजे.

याकरितां सुशिक्षित वर्गानें व्यापारांत पडून जुन्या भांडवलवाल्यां व व्यापारी वर्गास नवीन कल्पनांचा परिचय करून दिला पाहिजे. व आपली पत परदेशांत वाढविली पाहिजे. परकीय तज्ज्ञ पगारी नोकर म्हणून आणून आपल्या उद्योगधंद्यांची सुधारणा केली पाहिजे. आपला पैसा सरकारी किंवा परकी ब्यांकांस वापरण्यास न देतां देशी ब्यांकांत एकत्र करून मोठमोठ्या योजना तयार करून पार पाडल्या पाहिजेत. व्यापारी नाविक दळ तयार केलें पाहिजे. देशोदेशी व्यापारी एजंट नेमून तेथील बाजारांची माहिति मिळविली पाहिजे व एकीकडे आर्थिक स्वातंत्र्य मिळविण्यास जोराची चळवळ चालू ठेवली पाहिजे.

**विसाव्या शतकांतील प्रवृत्ती**—चालू विसावें शतक म्हणजे आरमारी सत्तेचा व वैमानिक विकासाचा काळ आहे असें म्हणावें लागतें. या काळांतील मुख्य घडामोडी ब्रिटनचें आरमार व अमेरिकेचें आरमार यांच्या परस्पर संबंधावर अवलंबून आहेत. या दोन बलिष्ठ आरमारी राष्ट्रांमध्यें जर मित्रभाव आणि एकी राहिली तर जगांत स्वातंत्र्याचें पाऊल पुढें पुढें पडत राहील. पण जर या दोन राष्ट्रांत दुही माजली तर पूर्व यूरोपांतील आणि आशियांतील राष्ट्रें लष्करी सामर्थ्याच्या जोरावर आगगाड्यांनीं सैन्याच्या हालचाली सुलभ केल्यामुळें सुधारणेच्या उच्च शिखरावर चढलेल्या राष्ट्रांना डोईजड होतील आणि जगाच्या सुधारणेच्या मार्गांत इतका भयंकर खो आणतील कीं, भविष्यकाळीं जगाची स्थिति काय होईल त्याचा आज कांहींच अंदाज करतां येत नाहीं असें भय यूरोपीयांच्या लेखांत मधून मधून व्यक्त होतें. तथापि अशा तऱ्हेनें एखादा रानटी जातकिडून आजचीं संस्कृत राष्ट्रें पादाक्रांत केलीं जातील असें भविष्य करण्यास आज जागा दिसत नाहीं. पुष्कळ ग्रंथकारांस पश्चिम यूरोपांतील राष्ट्रें तेवढीच सुसंस्कृत वाटतात व तीं राष्ट्रें पूर्व यूरोपांतील किंवा एशियांतील राष्ट्रांकडून पादाक्रांत केलीं जातील अशी त्यांस भीति वाटते. त्यांच्या मतानें मुसुलमानी राष्ट्रें व चीन हीं राष्ट्रें सुशिक्षित दिसत नाहींत व त्यांपासून त्यांस भीति वाटत आहे असें दिसतें. परवां ग्रीस व तुर्क यांमध्यें झालेल्या लढाईंत तुर्कांनीं जय मिळविला आहे आणि इराण व अफगाणिस्तान हीं राष्ट्रें अलीकडे हातपाय हलवूं लागलीं आहेत. त्यांनीं जर तुर्कांशीं एकमत करून त्यांचें अनुकरण केलें तर वरील भीति साधार होण्याचा संभव आहे. शिवाय चीनसंबंधीं लिहितांना पिवळ्या बागुलबोवाची भीति श्वेतवर्णीयांस वाटूं लागली आहे असें आम्हीं पूर्वी म्हटलेंच आहे व भविष्यकाळीं ती भीति खरी ठरण्याचा संभव जरी नाहीं तरी एशियामध्यें यूरोपीयांस दादागिरी करतां येणार नाहीं. हिंदुस्थानहि आतां आपल्या हक्कांबद्दल जागृत होऊं लागला आहे व इंग्लंडलाहि आतां हिंदुस्थान कायमचा हातचा गमवावयाचा नसेल —तर त्यास अधिक राजकीय हक्क देणें व लष्करी व आरमारी बलानें स्वसंरक्षणक्षम बनविणें भाग आहे. इंग्लंडचें वाढतें साम्राज्य, त्याचा वाढता व्यापार, त्याचें वाढतें सामर्थ्य व वैभव याबद्दल अमेरिका व जपान यांस मत्सर वाटण्याचा संभव आहे व जशी अमेरिका अमेरिकनांकरितां तशी पूर्व पूर्वेकडील लोकांकरितां हें तत्त्व पुढेंमागें पुढें येण्याचा संभव आहे. आफ्रिकेंतहि स्वयंनिर्णयाच्या बाबतींत पण सध्यां यूरोपीयांच्या फायद्याकरितां हें तत्त्व पुढें करण्यांत येत आहे.

तसेंच आज जर्मनी जरी पूर्णपणें चिरडल्यासारखा दिसत आहे तरी या मानहानीचें शल्य जर्मनीच्या अंतःकरणांत खूप खोल जाऊन बसेल व या अडचणींतून कोणत्याहि मार्गानें एकदां जर्मनीची सुटका झाल्यावर तो या अपमानाचा सूड येन केन प्रकारेण घेण्याच्या तयारीस लागेल व आज जर सर्व विजयी दोस्त राष्ट्रें पूर्णपणें हतबल झालेलीं नसतीं व युद्धास कंटाळलीं नसतीं तर या लुटीच्या वांटणीच्या वेळींहि दोस्त राष्ट्रांत चकमकी उडाल्याशिवाय राहिल्या नसत्या. पण यापुढें जर्मनी आपल्या शत्रूंस प्रत्यक्ष अगर गुप्तपणें त्रास देण्याची संधि केव्हांहि फुकट जाऊं देणार नाहीं व हा धुमसत राहिलेला द्वेषाग्नि जगाची निराळी न्याय्य घटना न झाल्यास पुढेंमागें अभूतपूर्व अशा जागतिक युद्धाच्या रूपानें पेट घेतल्याशिवाय राहणार नाहीं. त्यावेळीं राष्ट्रसंघ आपल्या शांतिमंत्रानें ही आग थांबविण्यास असमर्थ ठरेल व पुन्हां यूरोप खंड व सर्व जग युद्धाच्या वणव्यांत सांपडेल. मात्र त्या वेळीं परस्परविरुद्ध पक्षांत कोणतीं राष्ट्रें पडतील हें आज सांगतां येत नाहीं. तथापि आजपर्यंतच्या अनुभवावरून ब्रिटन आपल्या मुत्सद्देगिरीनें यशस्वी पारड्यांतच पडेल असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

———

## प्रकरण ३० वें.

### जगद्विकासाची कारकें.

जगद्विकासाचे अनेक नियम आतांपर्यंत दिलेल्या विवेचनांत दिसून येतील, त्यांमध्यें फक्त दोनतीन बाबतींत विकास दाखविता आला. मनुष्यांची प्रयाणें व त्यामुळें जगांतील सर्व प्रदेशावर यूरोपीय राष्ट्रांच्या लोकांचें वर्चस्व कसें होत गेलें हें दाखविलें आहे, आणि राष्ट्रविकासाचे नियम दिले आहेत.

**विकासांगे व प्राधान्य.**—जगांत विकास आपणांस अनेक बाबतींत दिसून येतो आणि राजकीय क्रियांचा उलगडा करतांना किंवा निरनिराळ्या क्रियांचा विकास दाखवितांना देखील इतिहास स्पष्ट करतां येतो. उत्पादन, वाहन व विक्रय यांच्या मोठमोठ्या संस्था भौतिक शक्तींच्या उपयोगानें कशा होत गेल्या, त्यामुळें अप्रगत देशांतील कच्च्या मालाचें महत्त्व कसें वाढलें, आणि आपल्या मालाचा दुसऱ्या देशांत प्रसार करण्यासाठीं काय राजकारण करावें लागलें हें जगाचा आर्थिक दृष्टीनें इतिहास देतांनाहि देतां येईल, त्याप्रमाणेंच त्याचा संबंध विज्ञानेतिहासाशीं दाखवून राजकीय घडामोडी विज्ञानेतिहासाचें एक अंग म्हणून दाखवितां येईल. कोणत्या गोष्टींना अधिक महत्त्व द्यावें याविषयीं निरनिराळी अभिरुचि दृष्टीस पडते. आणि पुष्कळ ग्रंथकार आपला इतिहासविषय तें मुख्य कारण आणि इतर तीं आनुषंगिक कारणें किंवा निमित्त कारणें असें दाखविण्याच्या प्रयत्नांत पडलेले दृष्टीस पडतात.

**वृत्तकथन प्रधान कीं नियमाविष्करण प्रधान.**—इतिहासांत जगद्विकासविषयक नियमांनां किती प्राधान्य द्यावें याविषयींहि भिन्नवृत्ती दृष्टीस पडतात.

'इतिहास म्हणजे उदाहरणांनीं तत्त्वज्ञान शिकविणारा ग्रंथ' अशी व्याख्या इतिहासाच्या शास्त्रीय अभ्यासाचे आग्रही करतात. या लहानशा व्याख्येंत इतिहासाचें मुख्य महत्त्व व विचारी माणसांनां इतिहासाचा होणारा खरा उपयोग हीं दोन्हीं चांगलीं दिग्दर्शित होतात हें खरें आहे; तथापि इतिहास व तत्त्वज्ञान यांच्यामधील परस्पर संबंध पूर्णपणें बरोबर या व्याख्येवरून व्यक्त होत नाहीं. उपर्युक्त व्याख्येवरून असा ग्रह होतो कीं, इतिहास म्हणजे वास्तविक तत्त्वज्ञानाचाच ग्रंथ असून केवळ तत्त्वें नीट समजण्यापुरता ऐतिहासिक गोष्टींचा उपयोग त्या ग्रंथांत करावयाचा असतो. वास्तविक इतिहास याचा तसा अर्थ नाहीं. त्यांत आगाऊच कोणतींहि तत्त्वें ठाम ठरलेलीं नसतात; तर प्रथम गतकालीन घडामोडींचा संग्रह करावयाचा व त्यांवरून विशिष्ट तत्त्वांची ग्राह्याग्राह्यता ठरवावयाची. तात्पर्य, इतिहासकारानें प्रथम गतगोष्टी सविस्तर वर्णन केल्यानंतर इतिहासविषयक तत्त्ववेत्त्यानें ऐतिहासिक गोष्टींसंबंधानें तात्त्विक विवेचन मुत्सद्दी लोक व सर्व साधारण नागरिकांचे पुढारा यांच्या उपयोगाकरितां करावयाचें असतें.

तथापि इतिहास या विषयाच्या क्षेत्रांतहि व्यापक आणि तात्त्विक विचार लागू करतां येतील असा एक भाग आहे. इतिहासाचा मानवजातीच्या कृत्यांशीं सर्वस्वीं संबंध असल्यामुळें तत्त्वज्ञानविषयक संशोधन करण्यास इतिहासाइतकें विस्तृत क्षेत्र दुसऱ्या कोणत्याहि शास्त्रामध्यें सांपडणें शक्य नाहीं. गणितशास्त्रांत सत्य केवळ मुख्यतः वादानें ठरवावयाचें असतें, ज्योतिषशास्त्रांत अवलोकनानें, आणि रसायनशास्त्रांत प्रयोगानें ठरवावयाचें असतें. पण इतिहास व तत्संबद्ध शास्त्रें, यांपैकीं कोणत्याहि मार्गांनीं निश्चित निर्णय देतां येईल अशीं नाहींत. कायदेशास्त्र, नीतिशास्त्र, अर्थशास्त्र हीं सर्व अनिश्चितस्वरूप शास्त्रें आहेत; कारण त्यांत आपण ज्या गृहीतगोष्टींवरून अनुमानें काढतों त्या गोष्टी म्हणजे मानवसमाजाची परिस्थिति नेहमीं बदलणारी असते, त्यामुळें त्रिकालाबाधित अशीं तत्त्वें किंवा नियम ठरविणें कठिण असतें. इतिहाससंबद्ध अशा प्रत्येक शास्त्रांत कांहीं मूलभूत व्यापक तत्त्वें असतात, पण तीं लागू करून काढावयाच्या अनुमानांत परिस्थितिभिन्नत्वामुळें पुष्कळच फेरफार होत असतो.

प्रत्येक काळांतील निघणारीं अनुमानें बदलणारीं असलीं तरी इतिहासविषयक तात्त्विक चर्चा करणारे ग्रंथ निर्माण होत राहणारच, कारण मानवी मनाला तात्त्विक चर्चा करून परस्परांशीं असंबद्ध अशा दिसणाऱ्या गोष्टींत कांहीं विशिष्ट प्रकारची कार्यकारणविषयक सूत्रबद्धता आहे असें दाखविल्यावांचून चैन पडत नाहीं. शास्त्रीय शोधांची बरीच वाढ होऊन अनेक शास्त्रांत उत्क्रांतितत्त्व उर्फ विकासवाद लागू करण्यांत आल्यापासून ऐतिहासिक घडामोडींनाहि हें उत्क्रांतितत्त्व लागू करून दाखविण्याकरितां इतिहासविषयक तात्त्विक विवेचन करणारे ग्रंथ अगदीं अलीकडे होऊं लागले आहेत. उत्क्रांतितत्त्वासारखें एखादें सर्वव्यापी तत्त्व इतिहासाला लागू करतां येतें असें म्हणणारे जे विद्वान् आहेत, त्यांच्या मतें ऐतिहासिक गोष्टींनां धार्मिक, नैतिक व राजनैतिक क्रियाविकासास कारक एवढ्याच दृष्टीनें महत्त्व असतें. असे ग्रंथकार जगाच्या एकंदर इतिहासाचें अवलोकन करून त्यावरून व्यापक अनुमानें काढण्यामध्यें मुख्य लक्ष घालतात. असलें कार्य करण्यास प्राचीन ग्रीक विद्वान् लायक होते, पण त्यांनां निरनिराळ्या प्राचीन देशांच्या इतिहासाची माहिती नव्हती. त्यांच्यापैकीं फक्त आरिस्टॉटलनें अनेक सुधारलेल्या समाजांचे कायदे व राज्यकारभार घटना यांची माहिती मिळविली व राजनीतिशास्त्रावर ग्रंथ लिहिला. त्यानंतर सेंट आगस्टाईननें ख्रिस्तीधर्माला सरकार दरबारांत प्रवेश मिळविण्याकरितां आपला ग्रंथ लिहिला. आधुनिक काळांत असल्या प्रकारचा ग्रंथ लिहिणारा पहिला लेखक बॉसेट हा होय. त्यानंतर विचो यानें ती परंपरा चालू ठेवली. अलीकडे तर डार्विनचें उत्क्रांतितत्त्व ऐतिहासिक घडामोडींनां लागू करणारे लेखक बरेच निघत आहेत.

उत्क्रांतितत्व ऊर्फ विकासवाद हातांशीं धरून जगांत चाललेल्या प्रत्येक दुष्ट गोष्टीचें समर्थन करणारे मुत्सद्दी व ग्रंथकारहि आपणांस दृष्टीस पडतात. गोऱ्यांनीं जग व्यापावें, दुर्बल लोकांस आपले नोकर किंवा आपणासाठीं राबणारे करावे हेंच जगाचें भवितव्य होय आणि असें होऊं न देणे म्हणजे केवळ विकासवादाच्या कायद्याशीं भांडणें आहे असें सांगणारे अरण्यपंडित देखील आढळतात.

**व्यक्तिपरिस्थितिप्राधान्यवाद:—** जगद्विकासाच्या स्पष्टीकरणार्थ आर्थिक किंवा राजकीय विषयास प्राधान्य द्यावें यांविषयीं जसे वाद आहेत तसेच ते व्यक्तीस अगर परिस्थितीस प्राधान्य द्यावें या विषयींहि आहेत.

ऐतिहासिक गोष्टींचें शास्त्रशुद्ध संशोधन करून त्यांनां विकासवाद लागू करण्याचे प्रयत्न होऊं लागल्यापासून गत कालांतील व्यक्तिविषयक गोष्टींनां कमी महत्त्व देण्याची, व कायदे, अर्थशास्त्रविषयक गोष्टी, मतें, वाङ्मय, कला, इत्यादि ज्या गोष्टींवरून लोकांची सामाजिक व आध्यात्मिक स्थिति नीट कळते त्या गोष्टींनां विशेष महत्त्व देण्याची पद्धति सुरू झाली आहे. उदाहरणार्थ, सीझर किंवा कॉन्स्टंटाइन या व्यक्तींच्या पराक्रमांचें रसभरित वर्णन करीत न बसतां त्यांनीं केलेलीं कृत्यें काय कारणांमुळें घडलीं याची चिकित्सा मागील अनेक पिढ्यांची परिस्थिति लक्षांत घेऊन करणें हें नवीन पद्धतीचे इतिहासकार आपलें कर्तव्य समजतात. अशा प्रकारच्या ग्रंथांनां ऐतिहासिक तत्वज्ञानाचे (हिस्टॉरिकल फिलॉसफी) ग्रंथ असें म्हणतां येईल. अशा ग्रंथांत व्यक्तींनां महत्त्व कमी देऊन व्यक्ती व त्यांच्या हातून होणारीं कृत्यें कांहीं ठराविक व दुर्लंघ्य नियमानुसार घडत आहेत असें प्रतिपादन केलेलें असतें. तथापि मुद्रणकलेचा प्रसार होण्यापूर्वीच्या काळांतील ऐतिहासिक माहिती अपुरी मिळते आणि जों जों प्राचीन काळाकडे जावें तों तों ही माहिती फारच अपूर्ण असल्यामुळें त्या त्या काळांतील ऐतिहासिक गोष्टींसंबंधाची कार्यकारणमीमांसा सदोष असणार हें उघड आहे.

निरनिराळ्या काळांतील मोठमोठ्या कार्यकर्त्या व्यक्तीहि केवळ देशकालपरिस्थितीच्या हातांतील बाहुलीं असतात हें जितकें खरें आहे, तितकेंच हेंहि खरें आहे कीं मोठमोठ्या क्रान्त्या आपोआप घडून येत नसतात तर त्या घडवून आणण्यास मोठमोठ्या व्यक्ती लागत असतात. म्हणून कोणत्याहि समाजांत किंवा संस्थेंत मोठी क्रांति होणें जरूर आहे अशी स्थिति आली म्हणजे त्या वेळीं कोणी तरी मोठी व्यक्ति जन्मास येणार हें खचीत समजावें. परंतु या नैसर्गिक नियमाचा कित्येक शास्त्रकदृष्टि इतिहासकार विपरीत अर्थ करतात व मोठ्या व्यक्तींची किंमत मुळींच मानीत नाहींत, तर उलट असें प्रतिपादन करतात कीं, त्या त्या परिस्थितींत नेपोलियन किंवा शिवाजी नसता तरी त्यांचीं कार्यें दुसऱ्या कोणत्या तरी व्यक्तींनीं पार पाडलींच असतीं. अशा तऱ्हेचा दैववाद किंवा शास्त्रीय वाद ऐतिहासिक पुराव्याच्या कसोटीला टिकत नाहीं. उदाहरणार्थ यूरोपांतील सोळाव्या शतकांतली ख्रिस्तीधर्मसुधारणा उर्फ रेफर्मेशन ही गोष्ट घ्या. ही सुधारणा होणें तत्कालीन परिस्थित्यनुरूप अपरिहार्य होतें हें कबूल आहे; परंतु मार्टिन लुथर किंवा केल्व्हिन या पुरुषांच्या ऐवजीं दुसऱ्या कोणी व्यक्ती असत्या तर या सुधारणेचें कार्य निराळ्या स्वरूपांत झालें असतें हेंहि कबूल केलें पाहिजे.

**जगद्विकास व दिवसानुदिवस अवनति!—** ऐतिहासिक तत्वज्ञानांचा आणखी महत्वाचा सिद्धांत अलीकडे हा निघाला आहे कीं उत्क्रांतिनियमानुसार जीवजातींच्या उन्नतीप्रमाणें अखिल मानव समाजाचीहि उत्तरोत्तर उन्नति होत जात आहे; आणि ज्याला 'सत्ययुग' किंवा 'सुवर्णयुग' म्हणतात तें पूर्वी होऊन गेलें नसून पुढें यावयाचें आहे. म्हणजे जगाची एकंदर स्थिति उत्तरोत्तर सुधारत चालली आहे, निराशावादी म्हणतात त्याप्रमाणें अवनत होत चाललेली नाहीं. जगाचा आजपर्यंतचा एकंदर इतिहास उपर्युक्त सिद्धांत मनावर स्पष्टपणें बिंबवितो.

प्रत्येक राष्ट्रांत गेला तो दिवस बरा, दिवसानुदिवस काळ कठिण होत चालला आहे, अशा तऱ्हेची समजूत दृष्टीस पडते. इतिहासकार वस्तुस्थिति अगदीं उलट आहे असें सांगत आहेत. आपल्याकडील सत्ययुगकलियुगांची कल्पना घ्या. आपल्या देशांतील मोठमोठे कार्यकर्ते पाहिले तर ते कलियुगांतलेच. उपनिषदांतील ब्रह्मवादी, निरनिराळे सूत्रकार, दर्शनकार व शंकराचार्यादि आचार्य हे सर्व कलियुगांतीलच आहेत. अशोकासारखे चक्रवर्ती कलियुगांतलेच. प्रत्यक्ष रामायण व महाभारत यांसारख्या ग्रंथांचे अनेक कर्ते व संपादक हेहि कलियुगांतलेच. वेदांच्या संहितीकरणाच्या कार्यांत मदत करणारे वैशंपायनासारखे लोक देखील कलियुगांतलेच. बुद्धासारखा जगद्व्यापी कार्याचा संस्थापकहि कलियुगांतलाच. असें असतां आपण कलियुगास काल्पनिक सत्ययुगापेक्षां वाईट कसें म्हणावें? आज जी संपत्ति जगांत आहे तिची प्राचीन जगास कल्पनाहि होणें अशक्य आहे. हिंदुस्थानासारख्या परतंत्र राष्ट्रास दिवसानुदिवस आपली प्रगतीच होत चालली आहे या तऱ्हेची कल्पना पचनीं पडणें कठिण जाईल पण विचार करतां आपली उन्नति अनेक अंगांनीं होत आहे असें दृष्टीस पडेल. पूर्वीपेक्षां आज प्रत्येक मनुष्याची राहाणी अधिक चांगल्या तऱ्हेची होऊं लागली आहे. आपल्या लोकांत जागतिक विचारविषयक ज्ञान मुळींच नव्हतें. आज आपणास बंगालावंगच्या दृष्टीनें तरी इतर लोक आपल्या दृष्टीनें विचार करूं लागले आहेत. व्यक्तीस आज हिंदुस्थानांत जितक्या निर्भयतेनें वावरतां येतें तितकें पूर्वी वावरतां येत नव्हतें. लोकसत्तेची आकांक्षा आज भारतीयांत इतकी बद्धमूल झाली आहे कीं, ती आपलें कार्य अधिकाधिक केल्याशिवाय राहणार नाहीं. आणि भावी हिंदुस्थान कालच्या हिंदुस्थानापेक्षां अधिक सुखमय होईल यांत शंका नाहीं.

# परिशिष्ट.

## जगांतील धर्म व संप्रदाय.

| धर्म | प्रदेश | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | यूरोप | आशिया | आफ्रिका | उ. अमे. | द. अमे. | ओशिया. | एकूण |
| **ख्रिस्ती** | | | | | | | |
| रोमन कॅथोलिक | १८३७६० | ५५०० | २५०० | ३६७०० | ३६२०० | ८२०० | २७२८६० |
| कनिष्ठ कॅथोलिक | ९८००० | १७२०० | ३८०० | १००० | | | १२०००० |
| प्रॉटेस्टंट चर्च | ९३००० | ६००० | २७५० | ६५००० | ४०० | ४५०० | १७१६५० |
| एकूण ख्रिस्ती | ३७४७६० | २८७०० | ९०५० | १०२७०० | ३६६०० | १२७०० | ५६४५१० |
| **ख्रिस्तेतर** | | | | | | | |
| ज्यू | ९२५० | ५०० | ४०० | २००० | ३० | २५ | १२२०५ |
| मुसुलमान | ३८०० | १४२००० | ५१००० | १५ | १० | २५००० | २२१८२५ |
| बौद्ध | | १३८००० | ११ | | | २० | १३८०३१ |
| हिंदू | | २१०००० | ३०० | १०० | ११० | ३० | २१०५४० |
| कन्फ्युशियानिस्ट व ताओ | | ३००००० | ३० | १०० | | ७०० | ३००८३० |
| शिंतो | | २५००० | | | | | २५००० |
| वन्य | | ४२००० | ९८००० | २० | १२५० | १७००० | १५८२७० |
| वर्गीकरण न केलेले | १००० | ६००० | १३० | ८०० | | १५० | १५२८० |
| एकूण ख्रिस्तेतर | १४०५० | ८६३५०० | १४९८७१ | १०२३५ | १४०० | ४२९२५ | १०८१९८१ |
| **एकूण** | ३८८८१० | ८९२२०० | १५८९२१ | ११२९३५ | ३८००० | ५५६२५ | १६४६४९१ |

### मानवजाती

मानव जातींची विभागणी वंशावरून किंवा थोड्या अशास्त्रीय पद्धतीनें वर्णावरून करतां येते. त्यांत प्रमुख वर्ण पिवळा आहे. पुढील कोष्टकांतील वंशांचे वर्ण अनुक्रमें येणें प्रमाणें आहेतः—

(१) पीतवर्णी, (२) श्वेतवर्णी, (३) कृष्णवर्णी, (४) पिंगटवर्णी व (५) ताम्रवर्णी

| वंश | प्रदेश | संख्या |
|---|---|---|
| मंगोलियन अथवा तुरेनियन | आशिया | ६५५ ००० |
| काकेशियन, इंडो जर्मानिक अथवा आर्यन | यूरोप, इराण, हिंदुस्थान | ६४५ ००० |
| नीग्रो अथवा बंटू | आफ्रिका | १९० ००० |
| सेमेटिक अथवा हॅमेटिक | उत्तर आफ्रिका व अरबस्तान | ८१ ००० |
| मॅले आणि पॉलिनेशियन | आस्ट्रेलिया व पॉलिनेशिया | ५२ ००० |
| रेड इंडियन | अमेरिका | २३ ००० |

### क्षेत्रफळ व लोकसंख्या

जगाच्या पृष्ठभागाचें क्षेत्रफळ १९,६५,५०,००० चौरस मैल इतकें ठरविण्यांत आलें असून त्यांपैकीं ५,५५,००,००० चौरस मैल जमीन व १४,१०,५०,००० चौरस मैल पाणी आहे. विषुववृत्तावरील पृथ्वीचा व्यास ७,९२६॥ इंग्रजी मैल असून ध्रुवाजवळ ७,९०० मैल आहे.

| खंड | क्षेत्रफळ चौ. मैल | लोकसंख्या |
|---|---|---|
| यूरोप | ३ ७५० | ४०० ००० |
| आशिया | १७ ००० | ९१० ००० |
| आफ्रिका | ११ ५०० | १८० ००० |
| उत्तर अमेरिका | ८ ००० | १२० ००० |
| दक्षिण अमेरिका | ६ ८०० | ३८ ००० |
| ओशियानिया | ३ ४५० | [illegible] |
| ध्रुवप्रदेश | ५ ००० | ... ... ... |
| एकूण | ५५ ५०० | १ ६४६ ००० |

टीप.— आंकडे हजारांचे आहेत